# जन्म हा अखेरचा

'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथावरील आशीर्वचने


श्रीकाशीविश्वाराध्यज्ञानसिंहासनाधीश्वर

काव्य-सर्वदर्शनतीर्थ, वेदान्ताचार्य, विद्यावारिधि, विद्यावाचस्पति

**श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी**

जंगमवाडी मठ, श्रीक्षेत्र काशी

अनुवाद / संपादन

**डॉ. शेषनारायण देवाप्पा पसारकर**

एम्. ए. पीएच. डी.



**श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन**

जंगमवाडी मठ, वाराणसी

सहावीआवृत्ती इ. स. २०२३

■ जन्म हा अखेरचा
श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी
Janma ha Akhercha (marathi)
By Shri Kashi Jagadguru Dr. Chandrashekhar Shivacharya Mahaswamiji

■ प्रकाशक
श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन
जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तर प्रदेश) २२१ ००१
प्रथमावृत्ती : २५ डिसेंबर २०००, द्वितीयावृत्ती : २१ जुलै २००१, तृतीयावृत्ती : १४ नोव्हेंबर २००३, चौथी आवृत्ती : सप्टेबर २००८, पाचवी आवृत्ती: १९ ऑगष्ट २०१३
श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अमृत महोत्सवानिमित्त
सहावी आवृत्ती : महाशिवरात्री २०२३ (प्रती ३०००)





■ अक्षरजुळणी:
उषा शेषनारायण पसारकर
केतकी फोटो टाईप सेटर्स, 'उषास्वप्न' १२६ ब, मार्कंडेय नगर, सोलापूर
भ्रमणध्वनी : ९३५९२४१६२८

■ मुद्रण :
बाबुराव धों. कोरे
शिवानंद प्रिंटर्स, 'शिवसदन' परांजपे पार्क, माधवनगर रोड, सांगली
भ्रमणध्वनी : ९८९००३१८६७, ९५४५१७७७५५

■ ग्रंथासाठी संपर्क
श्रीधर श्रीराम पैलवान. १७०४, सोमवार पेठ, भवानी गल्ली, तासगाव जि. सांगली
भ्रमणध्वनी : ९५२७८०६७५०, ९३७२१४८०९६
एस. के. हिरमेठ, शाहीर वस्ती, भवानीपेठ सोलापूर, दूरभाष : (०२१७) २७२७२२१,
भ्रमणध्वनी : ९९६०२२२१५१,९४२१०३३७०६

■ मूल्य : रु.५००.००

## प. पू. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांचे

# शुभाशीर्वचन

नांदेड येथे महाराष्ट्र वीरशैव सभेचे दुसरे अधिवेशन २५ डिसेंबर २००० रोजी पार पडले त्यावेळी 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे श्रीजगद्गुरू पंचाचार्यांच्या अमृतहस्ते मोठ्या थाटात प्रकाशन झाले. प्रकाशनापूर्वी ग्रंथाची मिरवणूक काढण्यात आली.

'जन्म हा अखेरचा' हा एक श्रेष्ठ दार्शनिक ग्रंथ आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथावर विविध ठिकाणी केलेल्या आशीर्वचनांचा हा संग्रह आहे. सोलापूरचे डॉ. शे. दे. पसारकर यांनी या आशीर्वचनाचे संकलन, अनुवाद आणि संपादन केले आहे. १९८९ मध्ये काशीपीठाचे आधिपत्य आम्ही स्वीकारले. नंतर सोलापूर, नागपूर, बार्शी, वाराणसी अशा विविध क्षेत्री श्रावणमास आणि नवरात्र यानिमित्ताने अनुष्ठाने झाली. त्यावेळी जी आशीर्वचने आम्ही केली, तीच 'जन्म हा अखेरचा'या नावाने संग्रहित झालेली आहेत. ध्वनिफितींवरून संकलन आणि अनुवाद डॉ. पसारकर यांनी अतिशय उत्तम रीतीने केला आहे. या ग्रंथातील आशय आमचा असला तरी ललित आणि सुबोध अशी मराठी भाषा पसारकरांची आहे.

डॉ. पसारकर हे वयाने लहान असले तरी त्यांच्या संशोधन-लेखनामुळे ते मराठी साहित्यातील एक श्रेष्ठ लेखक ठरले आहेत. लहानपणापासून आईवडिलांच्या संस्कारामुळे त्यांच्या मनात संतसाहित्याविषयी प्रेम निर्माण झाले आहे. त्यांनी नागपूर विद्यापीठातून स्नातक पदवी व पुणे विद्यापीठातून स्नातकोत्तर पदवी संपादन केली असून संतशिरोमणी मन्मथस्वामीच्या 'परमरहस्य' ग्रंथावर 'मन्मथशिवलिंग यांच्या परमरहस्य या ग्रंथाचा सर्वांगीण चिकित्सक अभ्यास' हा प्रबंध लिहून शिवाजी विद्यापीठाची पीएच्.डी. पदवी मिळविली आहे. आपली नित्याची कामे सांभाळून त्यांनी हे अनुवादकार्य व संपादनकार्य पार पाडले आहे.

डॉ. पसारकर यांच्या पत्नी सौ. उषा पसारकर या विज्ञान पदवीधर असून त्या




पसारकरांच्या लेखनकार्यात बहुमोल मदत करत. 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे आधी १२ भाग प्रकाशित झाले आहेत. त्या भागांचे लेखन करताना लेखनिक म्हणून त्यांनी उत्तम रीतीने जबाबदारी पार पाडली आहे. याशिवाय त्यातील काही भागांची संगणकीय अक्षरजुळणीदेखील त्यांनी केली आहे. आता या सर्व भागांचे एकत्रिकरण करताना सर्व अक्षरजुळणीचे काम त्यांनी पार पाडले आहे. पसारकरांच्या कु. केतकी आणि कु. अबोली या दोन कन्या आईवडिलांच्या कार्यात सर्वतोपरी मदत करतात. या चौघांना पाहिल्यावर ज्ञान, श्रद्धा, भक्ती आणि मुक्ती यांचा समन्वय झालेला आहे, असे आम्हाला वाटत आले आहे. या शुभप्रसंगी पसारकर कुटुंबियांना आम्ही मनःपूर्वक शुभाशीर्वाद देत आहोत.

'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे १२ भाग यापूर्वी प्रकाशित झाले आहेत. त्यांच्या प्रकाशनासाठी अनेक भक्तांनी आर्थिक सेवा केली आहे. त्यांची नावे आणि परिचय त्या त्या भागात देण्यात आला आहे. हे १२ भाग एकत्रित प्रकाशित करण्यासाठी काशीपीठाचे परमभक्त असलेले अमेरिकेतील एक कम्प्यूटर इंजिनियर यांनी गुप्तदान म्हणून दोन लक्ष रुपयांची देणगी उदारपणाने दिली आहे. त्यांना आणि त्यांच्या परिवाराला आयुरारोग्य, ऐश्वर्य, भक्ती आणि मुक्ती प्राप्त होवो हा शुभाशीर्वाद.

'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाच्या अनुवाद-संपादनासाठी डॉ. शे. दे. पसारकर यांनी १० वर्षे तपस्या केली आहे. त्यांची तपस्या पाहून आम्हाला अत्यंत समाधान झाले म्हणून आम्ही दि. २१ फेब्रुवारी २००९ या दिवशी, श्रीक्षेत्र काशी येथे महाशिवरात्रीच्या पर्वकाळी डॉ. शे. दे. पसारकर यांना 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य विश्वभारती' पुरस्कार देऊन काशीपीठातर्फे त्यांचा गौरव केला. प्रतिवर्षी एका नामवंत साहित्यिकला हा पुरस्कार दिला जातो. २५,००० रुपये रोख, प्रशस्तिपत्र शाल व श्रीफल असे या पुरस्काराचे स्वरूप आहे. या आधी काशीचे पं. देवस्वरूप मिश्र, पं. व्रजवल्लभ द्विवेदी, बंगळूर विश्वविद्यालयाचे डॉ. एम्. शिवकुमार स्वामी आणि गुलबर्ग्याचे ज्येष्ठ वीरशैव साहित्यिक डॉ. चंद्रशेखर कपाळे यांना हा पुरस्कार मिळालेला आहे. आता सन्मान डॉ. पसारकरांना लाभला असून पुरस्कारप्राप्त




विद्वानांत त्यांचे वय सर्वात कमी आहे. डॉ. पसारकरांकडून उत्तरोत्तर अशीच उत्तम साहित्यसेवा घडावी असा शुभाशीर्वाद आम्ही देत आहोत.

या ग्रंथाच्या मुद्रणासाठी अनेकांनी परिश्रम घेतले आहेत. सांगलीच्या शिव ऑफसेट प्रिंटिंग प्रेसचे संचालक श्री. बाबूराव कोरे आणि त्यांच्या सर्व कर्मचाऱ्यांनी कमीत कमी वेळात या ग्रंथाचे मुद्रणकार्य पार पाडले आहे. त्या सर्वांना मंगलाशीवाद. या ग्रंथाचे संपादक, मुद्रक, अर्थसाहाय्य करणारे दाते, वाचक सद्भक्त, श्री. ओमप्रकाश कोयटे, श्री. सुनील रुकारी आणि सर्व कार्यकर्ते यांना शुभाशीर्वाद,

२५ डिसेंबर २००० या दिवशी, नांदेड येथे भरलेल्या महाराष्ट्र वीरशैव सभेच्या द्वितीय अधिवेशनात 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे प्रकाशन झाले. २००० प्रतींची आवृत्ती केवळ सहा महिन्यातच संपली, म्हणून दूसरी आवृत्ती काढली. आता या ग्रंथाची तिसरी आवृत्ती प्रकाशित होत आहे. यावरून या ग्रंथाची लोकप्रियता लक्षात येते.

ज्येष्ठ पत्रकार व महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध प्रवचनकार श्री. विवेक घळसासी यांनी तिसऱ्या आवृत्तीला सुरेख प्रस्तावना लिहून दिली आहे. श्री. घळसासी हे संतवाङ्मयाचे रसज्ञ भाष्यकार आहेत. त्यांच्या वाणीत एक विशेष गोडवा आहे. ते संतवाङ्मयाचे अभ्यासक आहेत आणि उपासकही आहेत. 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाबद्दल त्यांनी अनेकवार आमच्याजवळ प्रशंसा केली. त्यांची मधुर भाषणे आम्हीही ऐकली आहेत. म्हणूनच त्यांना या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्यास सांगितले. श्री. घळसासी आणि त्यांच्या परिवाराला दीर्घ आयुरारोग्य लाभो आणि त्यांची वाणी संतसाहित्यात नित्य रमो, हा शुभाशीर्वाद.

ज्यांचे ज्यांचे या सत्कार्याला हातभार लागले त्या सर्वांना शुभाशीर्वाद.

इत्याशिषः

# 'जन्म हा अखेरचा' जन्मकथा

परमपूज्य श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी हे काशीच्या जंगमवाडी मठातील ज्ञानसिंहानावर आरूढ झाले, त्यानंतर १९९० मध्ये त्यांचे पहिले श्रावणमासानुष्ठान सोलापूरच्या सिद्धेश्वर मंदिरात आयोजित करण्यात आले. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथावर कन्नडमधून त्यांची महिनाभर मंत्रमुग्ध करणारी रसाळ आशीर्वचने झाली. आशीर्वचनांचा विषय वीरशैव तत्त्वज्ञान हा असल्यामुळे सोलापूरच्या 'दै. संचार'साठी वृत्तलेखनाचे काम संचारचे संपादक रंगाअण्णा वैद्य यांनी माझ्यावर सोपवले. माझ्या कुवतीप्रमाणे मी ते पार पाडले. 'संचार' मधील वृत्तलेखनाचा एवढा परिणाम झाला की अप्पासाहेब काडादी यांनी आणि अनेकांनी त्याचे पुस्तक करावे असा आग्रह धरला.

प.पू. श्रीकाशीजगद्गुरूंचे दुसरे श्रावणमासानुष्ठान १९९१ मध्ये नागपूर येथे आयोजित करण्यात आले. त्यावेळी नागपूरचे रामभाऊ रामापुरे यांनी अनुष्ठानकाळात एक पुस्तक प्रकाशित करण्याचा आग्रह धरला. एप्रिल-मे १९९१ या काळात प. पू. श्रीकाशीमहास्वामीजींसोबत मी अलाहाबाद येथील जंगमवाडी मठात 'आवरण-विज्ञान' या पुस्तकाचे लेखन करीत होतो. त्यावेळी रामापुरे तेथे आले होते. आमचे लेखनकार्य पाहून 'हेच पुस्तक नागपूरला प्रकाशित करा' अशी प्रार्थना त्यांनी काशीजगद्गुरूंना केली. परंतु ते लेखन कच्चे होते, त्यावर अधिक संस्कार करायचे होते. म्हणून 'दै. संचार' मधील वृत्तलेखनाच्या आधारे एक पुस्तक सिद्ध करावे असे आम्ही ठरवले. त्याप्रमाणे जुलै १९९१ मध्ये सोलापूरला श्री. गणेश शेट्टी यांच्या निवासस्थानी संचार मधील वृत्तलेखनाची कात्रणे समोर ठेवून प. पू. श्रीकाशी जगद्गुरूंशी चर्चा करीत जन्म हा अखेरचा या पुस्तकाच्या पहिल्या भागाची संहिता मी लिहून काढली. चार-पाच दिवस सारे काही विसरून आम्ही दिवसरात्र लेखनाचे काम करीत होतो. ते दिवस मंतरलेले होते. ज्येष्ठ वीरशैव साहित्याभ्यासक डॉ. चंद्रशेखर कपाळे यांनी संहिता वाचून मनपूर्वक दाद दिली. त्यातील शीर्षकांनाही जणू काव्याचा स्पर्श झाला होता सद्बुद्धीची ज्योत, माणसातला पशू, गुरुकृपेची ओल, उपासनेची वाट, स्नानांत स्नान भस्मस्नान, मुखी शिवनाम घ्यावे, जपयश सर्व यज्ञांत, वंद्य पाऊल गुरूचे, शिव भावाचा भुकेला, ज्ञानयुगाकडे अशा शीर्षकांची तारीफ अनेकांनी केली.

पुस्तकातील एका प्रवचनाचे 'अखेरचा जन्म' हे शीर्षक बदलून ते 'जन्म हा अखेरचा' करावे, असे डॉ. कपाळे यांनी सुचवले. ते प. पू. श्रीमहास्वामीजींना एवढे आवडले की हेच नाव पुस्तकाला देण्याचा निर्णय त्यांनी घेतला. 'एकेन जन्मना मुक्तिः वीराणां तु महेश्वरि।' षट्स्थलाची साधना करणारा वीरशैव साधक एकाच जन्मात मुक्ती मिळवतो- असे शिवागमांत वीरशैवांविषयी विधान केलेले आहे. एकाच जन्मात मुक्ती मिळणार असल्यामुळे वीरशैवांचा विद्यमान जन्म अखेरचा असतो, म्हणून षट्स्थलप्रतिपादक अशा या ग्रंथाला 'जन्म हा अखेरचा' हे नाव अन्वर्थक ठरते.

पहिल्या भागाच्या मुद्रणासाठी नागपूरचे सांभाप्पा सागोळे यांनी अर्थसाहाय्य दिले आणि मधुकर आष्टीकर यांच्या हस्ते २५ ऑगस्ट १९९१ रोजी नागपूरच्या वीरशैव समाजभवनात पुस्तकाचे प्रकाशन झाले. त्या पुस्तकामुळे मधुकर आष्टीकर एवढे प्रभावित झाले होते की, त्यांनी नंतर साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष झाल्यावर, मुंबईहून डॉ. निर्मलकुमार फडकुले यांच्याकडून मला निरोप पाठवता आणि पुस्तकाचे पुढील भाग मागवून घेतले.

यापूर्वी 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथमालेचे एकूण १२ भाग प्रकाशित झाले आहेत. त्यांच्या प्रकाशनासाठी अनेक भक्तांनी अर्थसाहाय्य केले आहे. कै. सांभाप्पा सागोळे, नागपूर (भाग १); श्री. गंगाधर व सौ. नलिनी चिरमे, पुणे (भाग २); श्री. अनंत सीताराम सांगळे, मुंबई (भाग ४); श्री. धर्मराज काडादी, सोलापूर (भाग ५); श्री. महादेवराव गोपीनाथ हिंगमिरे, तासगाव (भाग ६ व भाग ११); कै. नंदकुमार शेटे, दिघंची (भाग ७); श्री. अण्णासाहेब विश्वनाथ महाजन, श्री. नारायण बाबुराव शाळगावकर, श्री. रामचंद्र कृष्णा शेटे, तासगाव (भाग ८); कै. शिवलिंगप्पा पाटील, सोलापूर (भाग ९); श्री. बाबू वीरभद्रप्पा कन्नूरे, श्री. सदानंद गुरुपाद बुटाले, श्री. गंगाधर ज्ञानोबा बुकरे, सांगली (भाग १०); श्री. मनोज व सौ. मधुमती खेराडकर, तासगाव (कै. विरूपाक्ष विश्वनाथ ऊर्फ अप्पासाहेब खेराडकर यांच्या स्मरणार्थ, भाग १२) अशा सद्भक्तांनी ग्रंथमुद्रणासाठी सेवा समर्पित केली आहे. त्या सर्वांविषयी मी कृतज्ञता व्यक्त करतो. 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे १२ भाग सिद्ध करताना लेखनिक म्हणून श्री. ब्रिजकुमार मोहनसिंह परिहार, कु. संगीता गुरुलिंग कन्नूरकर, सौ. उषा शेषनारायण पसारकर, अभिजीत अशोक पसारकर, कु. केतकी शेषनारायण पसारकर व कु. अबोली शेषनारायण पसारकर यांनी सेवा केली आहे. मुद्रणासाठी सर्वश्री. बाबूराव मैंदर्गीकर, सिद्धय्या हिरेमठ यांची मदत झाली आहे. या सर्वांविषयीचा कृतज्ञताभाव माझ्या मनात जागा आहे.

या ग्रंथाचे एकत्रिकरण करताना अनेकांचे सहकार्य लाभले. जिच्या मदतीशिवाय हे काम पूर्ण झाले नसते ती माझी पत्नी सौ. उषा पसारकर हिने दिवसरात्र संगणकासमोर बसून अक्षरजुळणीचे काम केले. त्यामुळेच हे काम पूर्णत्वाला जाऊ शकले. अक्षरजुळणीचे काही काम कु. निशा मिरजगावकर, कु. केतकी पसारकर व कु. अबोली प्रसारकर यांनी केले. लेखनाचे थोडे काम श्री. गुरुबसप्पा लवंगे गुरुजी यांनी केले. एवढ्या मोठ्या ग्रंथाचे मुद्रणकार्य सांगलीचे श्री. बाबूराव कोरे, त्यांचे बंधू श्री. प्रकाश व अशोक कोरे आणि त्यांचे सहकारी यांनी अल्पावधीत पार पाडले. या सर्वांविषयी कृतज्ञता.

दहा वर्षे 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथलेखनाचे काम आम्ही केले. गतजन्मातल्या पुण्याईनेच ही सेवेची संधी आम्हाला लाभली अशी आम्हा कुटुंबियांची श्रद्धा आहे. अन्यथा हे अनुवादकार्य अन्य कोणीही पार पाडू शकले असते. विदर्भ सोडून माझे सोलापूरला येणे- इथल्या मातीत महत्प्रयासाने रुजणे- वाढणे- प. पू. श्रीकाशीजगद्‌गुरूंशी संबंध येऊन त्यांच्या विश्वासाला पात्र ठरणे- त्यांनी संपूर्ण ग्रंथमालेचे अनुवादकार्य माझ्यावर सोपवणे, या साऱ्या घटनांत एक नियतिक्रम असावा,

# 'जन्म हा अखेरचा' जन्मकथा

परमपूज्य श्रीकाशीजगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी हे काशीच्या जंगमवाडी मठातील ज्ञानसिंहानावर आरूढ झाले, त्यानंतर १९९० मध्ये त्यांचे पहिले श्रावणमासानुष्ठान सोलापूरच्या सिद्धेश्वर मंदिरात आयोजित करण्यात आले. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथावर कन्नडमधून त्यांची महिनाभर मंत्रमुग्ध करणारी रसाळ आशीर्वचने झाली. आशीर्वचनांचा विषय वीरशैव तत्त्वज्ञान हा असल्यामुळे सोलापूरच्या 'दै. संचार'साठी वृत्तलेखनाचे काम संचारचे संपादक रंगाअण्णा वैद्य यांनी माझ्यावर सोपवले. माझ्या कुवतीप्रमाणे मी ते पार पाडले. 'संचार' मधील वृत्तलेखनाचा एवढा परिणाम झाला की अप्पासाहेब काडादी यांनी आणि अनेकांनी त्याचे पुस्तक करावे असा आग्रह धरला.

प.पू. श्रीकाशीजगद्‌गुरूंचे दुसरे श्रावणमासानुष्ठान १९९१ मध्ये नागपूर येथे आयोजित करण्यात आले. त्यावेळी नागपूरचे रामभाऊ रामापुरे यांनी अनुष्ठानकाळात एक पुस्तक प्रकाशित करण्याचा आग्रह धरला. एप्रिल-मे १९९१ या काळात प. पू. श्रीकाशीमहास्वामीजींसोबत मी अलाहाबाद येथील जंगमवाडी मठात 'आवरण-विज्ञान' या पुस्तकाचे लेखन करीत होतो. त्यावेळी रामापुरे तेथे आले होते. आमचे लेखनकार्य पाहून 'हेच पुस्तक नागपूरला प्रकाशित करा' अशी प्रार्थना त्यांनी काशीजगद्‌गुरूंना केली. परंतु ते लेखन कच्चे होते, त्यावर अधिक संस्कार करायचे होते. म्हणून 'दै. संचार' मधील वृत्तलेखनाच्या आधारे एक पुस्तक सिद्ध करावे असे आम्ही ठरवले. त्याप्रमाणे जुलै १९९१ मध्ये सोलापूरला श्री. गणेश शेट्टी यांच्या निवासस्थानी संचार मधील वृत्तलेखनाची कात्रणे समोर ठेवून प. पू. श्रीकाशी जगद्‌गुरूंशी चर्चा करीत जन्म हा अखेरचा या पुस्तकाच्या पहिल्या भागाची संहिता मी लिहून काढली. चार-पाच दिवस सारे काही विसरून आम्ही दिवसरात्र लेखनाचे काम करीत होतो. ते दिवस मंतरलेले होते. ज्येष्ठ वीरशैव साहित्याभ्यासक डॉ. चंद्रशेखर कपाळे यांनी संहिता वाचून मनपूर्वक दाद दिली. त्यातील शीर्षकांनाही जणू काव्याचा स्पर्श झाला होता सद्बुद्धीची ज्योत, माणसातला पशू, गुरुकृपेची ओल, उपासनेची वाट, स्नानांत स्नान भस्मस्नान, मुखी शिवनाम घ्यावे, जपयश सर्व यज्ञांत, वंद्य पाऊल गुरूचे, शिव भावाचा भुकेला, ज्ञानयुगाकडे अशा शीर्षकांची तारीफ अनेकांनी केली.

पुस्तकातील एका प्रवचनाचे 'अखेरचा जन्म' हे शीर्षक बदलून ते 'जन्म हा अखेरचा' करावे, असे डॉ. कपाळे यांनी सुचवले. ते प. पू. श्रीमहास्वामीजींना एवढे आवडले की हेच नाव पुस्तकाला देण्याचा निर्णय त्यांनी घेतला. 'एकेन जन्मना मुक्तिः वीराणां तु महेश्वरि।' षट्स्थलाची साधना करणारा वीरशैव साधक एकाच जन्मात मुक्ती मिळवतो- असे शिवागमांत वीरशैवांविषयी विधान केलेले आहे. एकाच जन्मात मुक्ती मिळणार असल्यामुळे वीरशैवांचा विद्यमान जन्म अखेरचा असतो, म्हणून षट्स्थलप्रतिपादक अशा या ग्रंथाला 'जन्म हा अखेरचा' हे नाव अन्वर्थक ठरते.

पहिल्या भागाच्या मुद्रणासाठी नागपूरचे सांभाप्पा सागोळे यांनी अर्थसाहाय्य दिले आणि मधुकर आष्टीकर यांच्या हस्ते २५ ऑगस्ट १९९१ रोजी नागपूरच्या वीरशैव समाजभवनात पुस्तकाचे प्रकाशन झाले. त्या पुस्तकामुळे मधुकर आष्टीकर एवढे प्रभावित झाले होते की, त्यांनी नंतर साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष झाल्यावर, मुंबईहून डॉ. निर्मलकुमार फडकुले यांच्याकडून मला निरोप पाठवता आणि पुस्तकाचे पुढील भाग मागवून घेतले.

यापूर्वी 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथमालेचे एकूण १२ भाग प्रकाशित झाले आहेत. त्यांच्या प्रकाशनासाठी अनेक भक्तांनी अर्थसाहाय्य केले आहे. कै. सांभाप्पा सागोळे, नागपूर (भाग १); श्री. गंगाधर व सौ. नलिनी चिरमे, पुणे (भाग २); श्री. अनंत सीताराम सांगळे, मुंबई (भाग ४); श्री. धर्मराज काडादी, सोलापूर (भाग ५); श्री. महादेवराव गोपीनाथ हिंगमिरे, तासगाव (भाग ६ व भाग ११); कै. नंदकुमार शेटे, दिघंची (भाग ७); श्री. अण्णासाहेब विश्वनाथ महाजन, श्री. नारायण बाबुराव शाळगावकर, श्री. रामचंद्र कृष्णा शेटे, तासगाव (भाग ८); कै. शिवलिंगप्पा पाटील, सोलापूर (भाग ९); श्री. बाबू वीरभद्रप्पा कन्नूरे, श्री. सदानंद गुरुपाद बुटाले, श्री. गंगाधर ज्ञानोबा बुकरे, सांगली (भाग १०); श्री. मनोज व सौ. मधुमती खेराडकर, तासगाव (कै. विरूपाक्ष विश्वनाथ ऊर्फ अप्पासाहेब खेराडकर यांच्या स्मरणार्थ, भाग १२) अशा सद्भक्तांनी ग्रंथमुद्रणासाठी सेवा समर्पित केली आहे. त्या सर्वांविषयी मी कृतज्ञता व्यक्त करतो. 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे १२ भाग सिद्ध करताना लेखनिक म्हणून श्री. ब्रिजकुमार मोहनसिंह परिहार, कु. संगीता गुरुलिंग कन्नूरकर, सौ. उषा शेषनारायण पसारकर, अभिजीत अशोक पसारकर, कु. केतकी शेषनारायण पसारकर व कु. अबोली शेषनारायण पसारकर यांनी सेवा केली आहे. मुद्रणासाठी सर्वश्री. बाबूराव मैंदर्गीकर, सिद्धय्या हिरेमठ यांची मदत झाली आहे. या सर्वांविषयीचा कृतज्ञताभाव माझ्या मनात जागा आहे.

या ग्रंथाचे एकत्रिकरण करताना अनेकांचे सहकार्य लाभले. जिच्या मदतीशिवाय हे काम पूर्ण झाले नसते ती माझी पत्नी सौ. उषा पसारकर हिने दिवसरात्र संगणकासमोर बसून अक्षरजुळणीचे काम केले. त्यामुळेच हे काम पूर्णत्वाला जाऊ शकले. अक्षरजुळणीचे काही काम कु. निशा मिरजगावकर, कु. केतकी पसारकर व कु. अबोली प्रसारकर यांनी केले. लेखनाचे थोडे काम श्री. गुरुबसप्पा लवंगे गुरुजी यांनी केले. एवढ्या मोठ्या ग्रंथाचे मुद्रणकार्य सांगलीचे श्री. बाबूराव कोरे, त्यांचे बंधू श्री. प्रकाश व अशोक कोरे आणि त्यांचे सहकारी यांनी अल्पावधीत पार पाडले. या सर्वांविषयी कृतज्ञता.

दहा वर्षे 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथलेखनाचे काम आम्ही केले. गतजन्मातल्या पुण्याईनेच ही सेवेची संधी आम्हाला लाभली अशी आम्हा कुटुंबियांची श्रद्धा आहे. अन्यथा हे अनुवादकार्य अन्य कोणीही पार पाडू शकले असते. विदर्भ सोडून माझे सोलापूरला येणे- इथल्या मातीत महत्प्रयासाने रुजणे- वाढणे- प. पू. श्रीकाशीजगद्गुरूंशी संबंध येऊन त्यांच्या विश्वासाला पात्र ठरणे- त्यांनी संपूर्ण ग्रंथमालेचे अनुवादकार्य माझ्यावर सोपवणे, या साऱ्या घटनांत एक नियतिक्रम असावा,

असे मला वाटते. हे आम्ही आमचे परमभाग्य समजतो.

हो आशीर्वचने लिहिताना प. पू. श्रीकाशीमहास्वामीजींच्या दर्शनशास्त्राच्या प्रगाढ़ व्यासंगाचा, सामान्य माणसांचे जीवनव्यवहार अचूक टिपणाऱ्या त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा, त्याच्या सुसंस्कृत, नर्मविनोदबुद्धीचा आणि क्लिष्ट प्रमेयांचे सुबोधपणे प्रतिपादन करणाऱ्या त्यांच्या निवेदनशैलीचा प्रत्यय येतो. एवढ्या सुबोध रीतीने वीरशैवसिद्धान्त मराठीत आजपर्यंत प्रकट झाला नाही. प. पू. श्रीमहास्वामीजींच्या विचारात एक व्यापकपण आहे. विज्ञानाची आणि व्यवहाराची त्यांनी तत्त्वज्ञानाशी सांगड घातली आहे. अत्यंत चपखल असे दृष्टान्त योजून त्यांनी अवघड वाटणारे तत्त्वज्ञान अतिशय सोपे करून सांगितले आहे. त्यामुळे ही तात्विक चर्चा राहात नाही तर आबालवृद्धांना सन्मार्ग दाखवणारा एक आचरणकोश बनून जातो.

आमच्या भाग्याने हे अनुवादकार्य पार पाडले आहे. वाचकांनी अत्यंत उत्स्फूर्तपणे या लेखनाचे स्वागत केले आहे. ज्यांची ज्यांची या कार्याला मदत झाली त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार.

२५ डिसेंबर २००० या दिवशी, नांदेड येथे भरलेल्या महाराष्ट्र वीरशैव सभेच्या द्वितीय अधिवेशनात 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे प्रकाशन झाले. केवळ सहा महिन्यांत २००० प्रताची पहिली आवृत्ती हातोहात संपली. त्यामुळे जुलै २००१ मध्ये पुणे येथे द्वितीयावृत्ती प्रकाशित करण्यात आली. आज हा तृतीयावृत्तीचा योग आला आहे. आहे. अध्यात्मप्रेमी व जिज्ञासू वाचकांच्या या उत्स्फूर्त प्रतिसादाबद्दल त्यांना मनःपूर्वक धन्यवाद.

महाराष्ट्रातील सुपरिचित वक्ते व संतसाहित्याचे अभ्यासक श्री. विवेक घळसासी यांनी तृतीयावृत्तीला प्रस्तावना लिहिली आहे. 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथमालेचे काही सुटे भाग श्री घळसासी यांच्या हाती पडले तेव्हा त्यांनी अत्यंत आत्मीयतेने सोलापूरच्या दै. तरुणभारत' मध्ये ग्रंथमालेचे वैशिष्ट्य सांगणारा लेख लिहिला, 'विभूतिवैभव' या काशीपीठाच्या त्रैमासिकाच्या प्रथमांकाचे प्रकाशन श्री. घळसासी यांच्या हस्तेच झाले. काशीपीठाशी त्यांचा असा अनुबंध जुळलेला आहे. श्रीकाशीमहास्वामीजीविषयी त्यांच्या मनात परमादर आहे. म्हणूनच त्यांना विनंती केल्यावर त्यांनी अल्प काळात या ग्रंथाला प्रस्तावना लिहून दिली. मी त्यांचा शतशः ऋणी आहे.

या ग्रंथाची प्रथमावृत्ती पाहिल्यावर ज्येष्ठ वीरशैव साहित्याभ्यासक डॉ. चंद्रशेखर कपाळे यांनी अतीव आनंद प्रकट केला होता. प्रथमावृत्तीच्या प्रकाशनसमयी ते नांदेडला उपस्थितही होते. त्यानंतर प्रकाशित झालेली द्वितीयावृत्ती व आज प्रकाशित होत असलेली ही तृतीयावृत्ती पाहायला ते आपल्यात नाहीत याचे मला अत्यंत दुःख आहे. त्यांचे स्मरण वीरशैव साहित्याभ्यासकांच्या मनात सदैव राहील.

१ नोव्हेंबर २००३ — शे. दे. पसारकर

'उषास्वप्न'
१२६ ब, मार्कंडेय नगर, सोलापूर ४१३००३

।। श्री जगद्गुरु पंचाचार्या: प्रसीदन्तु।।



श्री काशीपीठाचे आद्य जगद्गुरु विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यापर्यंत चालत आलेल्या गुरु परंपरेचे स्मरण करुन

**लिंगैक्य श्री १००८ जगद्गुरु विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी**

यांच्या पावनपुण्यस्मृतीस समर्पण...

# ग्रंथदानी!



श्री. शिरीष रामचंद्र रामापुरे, नागपूर
सौ. मंगला शिरीष रामापुरे



श्री. आप्पासाहेब सदाशिव महाजन, [illegible] ([illegible]गली)
सौ. राजमती आप्पासाहेब [illegible]



''दानचिंतामणी'' श्री. सुभाष सिद्राम म्हमाने, पंढरपूर
विस्वस्थ श्री जगद्गुरु विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान
जंगमवाडी मठ, वाराणसी



श्री. रविंद्र गंगाधर बुकटे, सांगली
सौ. रेवती रविंद्र बुकटे



श्री. विश्वनाथप्पा त्र्यंबकप्पा स्वामी सावळे, लातूर
सौ. शांतादेवी विश्वनाथप्पा स्वामी सावळे

## जगदुद्धारक आशीर्वचने 'जन्म हा अखेरचा'

सभोवारचे वातावरण पर खचून जावे असे नसले तरी उत्साहाने मन उमलून यावे असेही नाही. भौतिक प्रगती, संपर्काची गतिमानता भोगाच्या-उपभोगाच्या साधनांना आलेली भरती यांमध्ये मानवी कल्याणाचा विचार संपून गेला की काय, असा प्रश्न पडला आहे. जाणकार समाजशास्त्रज्ञ, विचारी राजकारणी, क्रियाशिल शिक्षणतज्ज्ञ, जागरूक पालक अशा सर्वांनाच हा प्रश्न पडला आहे. जगभर अस्वस्थता निर्माण झाली आहे. वाढता हिंसाचार, बेलगाम भ्रष्टाचार, बेफाम स्वैराचार आणि सार्वत्रिक दंभाचार हे चार दुराचार जगाला चारही दिशांनी ग्रासून टाकू लागले आहेत. मानवजातीच्या भवितव्याविषयीच साशंकता निर्माण झाली आहे.

जीवनहेतूचा गंभीरपणे विचार न करण्यातूनच हे सारे प्रश्न निर्माण झाले आहेत. 'मला हा जन्म का मिळाला?' हा प्रश्न कोणी विचारात घ्यावयास तयार नाही. त्यामुळे खाणे, पिणे, मौज करणे यासाठीच आपले जीवन असल्याचा भ्रम सर्वांना झाला आहे. मी इथे जन्माला येण्यापूर्वी जीवन होते का? असेल तर त्यात मी कोण आणि कोठे होतो? मरणानंतर काय असणार आहे? तेव्हा मी कसा असेन? या प्रश्नांच्या उत्तरातच, जन्मपूर्व अन् मृत्योत्तर यांमधील वर्तमान जीवनाचे म्हणजेच आपल्या सध्याच्या जन्मातील ध्येयाचे रहस्य दडले आहे.

हे रहस्य जाणून घेण्याचा अनेक सत्पुरुषांनी प्रयत्न केला. हे रहस्य जाणून घेऊन त्यांनी स्वतःच्या जगण्याचे सोने केले. भोगाच्या दलदलीत हे जगणे पडू न देता, योगाच्या गगनावेरी ते नेले. याच ऋषींनी, द्रष्ट्यांनी, साधूंनी, संन्याशांनी आणि सत्पुरुषांनी त्यांना झालेले ज्ञान विश्वाच्या कल्याणासाठी मांडले. ते मांडताना संप्रदाय-परंपराविशेष परिभाषेचा, इष्टदेवतांचा उल्लेख त्यांनी केला खरा, पण तरीही आपल्या मांडणीच्या हेतू व परिणामात त्यांनी संकुचितपणा येऊ दिला नाही. 'जन्म हा अखेरचा' या आशीर्वचनांच्या ग्रंथात असाच भाव आहे. हा जन्म अखेरचा असावा असा प्रयत्न प्रत्येक स्त्री-पुरुषाने केला पाहिजे. त्यासाठी साधक झाले पाहिजे. एकेक पाऊल पुढे पडले पाहिजे. त्या प्रत्येक पावलाने साधकाचा विकास साधला पाहिजे. तो तसा साधावयाचा तर त्या प्रत्येक पावलावरचा आचरण-धर्म समजला पाहिजे 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथात हेच सारे रहस्य उलगडून दाखविले आहे.

### जगदुद्धारक आशीर्वचने

विद्यावाचस्पती श्री १००८ काशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथावर विविध ठिकाणी केलेल्या आशीर्वचनांचा-प्रवचनांचा संग्रह असलेला ग्रंथ म्हणजे 'जन्म हा अखेरचा'. ही आशीर्वचने वर्तमान सर्व समस्यांची उत्तरे समर्थपणे देऊ शकतात. म्हणूनच ही जगदुद्धारक आशीर्वचने आहेत असे मला वाटते. वर्तमानाचे समुचित भान ठेवत महास्वामीजींनी एका सनातन सिद्धान्तावर भाष्य केले आहे.

जगद्गुरू रेणुकाचार्य आणि अगस्त्य मुनी यांच्यामधील संवादातून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ तयार झाला. रेणुकाचार्य हे शिवगणांतील प्रमुख रेणुकगण होते. शिवआज्ञेने ते मनुष्यलोकी

अवतीर्ण झाले. मलयगिरीवरील अगस्त्य आणि त्यांची पत्नी लोपामुद्रा यांच्या आश्रमात रेणुकाचार्य गेले. तेथे वेदान्ताइतकेच प्रमाण असणारे शैवतंत्र जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्त्य ऋषींना सांगितले. हेच षट्स्थलदर्शन!

जीव शिवापर्यंत विकसित करीत नेण्याची सहा स्थले आहेत. या षट्स्थलांचे दर्शन म्हणजे विकासाचाच विचार आहे. प्रथम भक्त होता आले पाहिजे. म्हणून भक्तस्थल पहिले नंतर माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण ही चार स्थले अन् शेवटी ऐक्यस्थल! माणसाचा जन्म जीवास प्राप्त होतो तो चौऱ्यांशी लक्ष योनी फिरून झाल्यावर! याच जन्मात साधना-उपासना-व्रत-तप आचरून शिवैक्यानुभूती घेऊन जन्म-मरणाच्या चक्रातून सुटका करून घेता येते. हे ऐक्यस्थल प्राप्त करून घेण्याची संधी फक्त मनुष्यजन्मातच लाभते. म्हणून मनुष्यजन्म मोलाचा, दुर्लभ मानला आहे. या योनीत स्वतःचे कल्याण करून घेतले पाहिजे. तरच हा जन्म अखेरचा ठरेल. शिवाशी ऐक्य साधणे हे मनुष्यजन्माचे ध्येय गाठण्यासाठी ही षट्स्थल-यात्रा आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथाचे असे माहात्म्य आहे. अठ्ठावीस शैवागमांचे सार या ग्रंथात आहे. श्रीज्ञानेश्वरांनी भगवद्गीतेच्या शेवटच्या श्लोकात साऱ्या महाभारताचे सार आहे असे म्हटले. त्याच चालीवर मी म्हणेन-

**'अष्टविंशत शैवागमांचा आवाका। आणूनि ग्रंथा एका।**
**श्रीशिवाचार्ये सर्व लोका। दिधला हाती।।'**

जगद्गुरू रेणुकाचार्य व अगस्त्य ऋषींच्या संवादरूपातील तत्त्वे श्रीशिवयोगी शिवाचार्यांनी एकत्र करून जगावर मोठेच उपकार केले आणि त्यावर भाष्य करून दिलेल्या आशीर्वचनाद्वारे वर्तमानात असे उपकार साऱ्या जगावर डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांनी केले आहेत.

**सहज-सुलभ मांडणी**

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचे बोलणे सहज-सोपे असते. अवघड सिद्धान्त सरळपणाने श्रोत्यांना समजेल असेच महास्वामीजी बोलतात. पांडित्याच्या प्रदर्शनापेक्षा श्रोत्यांच्या काळजावर संस्कार करणे मोलाचे वाटत असल्याशिवाय 'मितुले मवाळ-साच' बोलणे होतच नाही. महास्वामीजींचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. स्पष्टीकरणासाठी ते मार्मिक आणि चपखल अशा गोष्टी पेरतात. खऱ्या लोकशिक्षकाचेच हे लक्षण आहे. 'मानुषीं योनिमासाद्य महादुःखविवर्धिनीम्।' हे मनुष्य-योनीचे रेणुकाने केलेले वर्णन यथार्थच आहे. मानवजन्म म्हणजे 'कार्पण्यप्रसवस्थल' आहे. अशा जीवांचा उद्धार सहानुभूती, प्रेम, दया याच मार्गाने होतो. महास्वामीजींच्या बोलण्यात हे सारे असते.

'जन्म हा अखेरचा' या महाग्रंथाची तिसरी आवृत्ती प्रसिद्ध होते आहे. यामागे महास्वामीजींच्या प्रतिपादनातील सुंदर सुगमता आणि वागण्यातील कृपामयता हेच कारण आहे. साधकांना हा ग्रंथ आवडला याचा आनंद कोणासही वाटेल. मलाही तसाच तो वाटतो आहे. साधक शैवमतावलंबी असो की नसो, त्याला हा ग्रंथ आवडतो हे मी पाहिले आहे. कारण यात प्रतिपादन केलेली तत्त्वे जीवोद्धारक आहे. सर्वांनाच ती उपयुक्त आहेत.

जीवाची मोठी गंमत असते. 'पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यं नेच्छन्ति मानवाः।' याचे कारण मन,

बुद्धी, चित्त, अहंकार अन् शरीर, वाणी, वर्तन शुद्ध नाही. ते शुद्ध करीत एकेक स्थल पार करण्याचे ज्ञान आणि कौशल्य या ग्रंथातून मिळते. जीवा-शिवाचे ऐक्य करण्याची ही शेवटची योनी आणि संधी जीवास मिळाली आहे. तेव्हा 'आयुषः क्षण एकोऽपि न लभ्यः स्वर्णकोटिभिः।' हे ओळखून प्रत्येक क्षण शिवमय करण्याची प्रेरणा हा ग्रंथ देतो. प्रेरणाच देतो असे नव्हे तर हाताला धरून चालवितोही. 'तपः कर्म जपो ध्यानं ज्ञानं चेत्यनुपूर्वकम्।।' हे शिवपंचयज्ञ साधकाकडून हा ग्रंथ करवून घेतो. जगाला ग्रासणाऱ्या वर्तमानातील सर्व समस्यांचा निचरा करण्याचा यापेक्षा वेगळा, सोपा आणि शाश्वत मार्ग कोणता आहे? भारतभूमीतून उदयास आलेले वेद-आगम-निगम हे विश्वाच्या कल्याणाचा मार्ग प्रशस्त करणारे आहेत. कारण त्रिगुणांवेगळ्या, शुद्ध-चिद्घन-आनंद स्वरूपाच्या श्वास-निःश्वास, वाणी-वचनातून ते प्रकट झाले आहेत. वर्तमानात महास्वामीजींनी त्याच वाणीचा पुनःसाक्षात्कार घडविला आहे.

**सुख स्वार्थ नव्हे, शरणता!**

वर्तमानातील सारी शास्त्रे इंद्रियसुखे व स्वार्थाशीच माणसास जोडतात. त्यामुळे माणसाची वाटचाल पशुत्वाच्या दिशेने सुरू झाली आहे. माणसाला मनुष्यत्वच सांभाळता आले नाही तर तो शिवत्व कसे मिळवणार? भक्त होणे हे मनुष्यत्वाचे लक्षण आहे. भक्त होताच स्वार्थ आणि सुखलोलुपता गळून जाते व शरणता उरते! पण ती आपाततः येत नाही.

'शमो दमो विवेकश्च वैराग्यं पूर्णभावना।
क्षान्तिः कारुण्यसम्पत्तिः श्रद्धा सत्यसमुद्भवा।।'

या दहा गुणांनी आपल्याला परिपूर्ण होता आले पाहिजे. पूर्णता असेल तरच शरणता शक्य आहे. वर्तमान अपूर्ण आहे. आधाशी आहे. म्हणून आतंकित आहे. हा ग्रंथ सद्गुण-पथ दाखवून पूर्णता अन् सुशांती देणारा आहे. म्हणूनच साधकांना तो आवडतो, भावतो. श्रद्धेचा वाटतो. ग्रंथाचा विषय गुरुपरंपरेने आला आहे. गुरुमुखातून आला आहे. म्हणून 'जन्म हा अखेरचा' हा ग्रंथ गरुपदास प्राप्त झाला आहे. गुरू जे करतात तेच कार्य, म्हणजे 'दीयते परमं ज्ञानं क्षीयते पाशबंधनम्।' हा ग्रंथ करीत आहे.

दुराचाराने ग्रासलेल्या वर्तमान-जगताचे प्रश्न कोण सोडवेल? भारतीय सनातन दर्शनच सोडवेल! दुराचाराला पंचाचाराचे उत्तर चोख नाही का? शिवभक्ताचे हे सहजलक्षण आहे. 'सदाचारप्रियः शम्भुः सदाचारेण पूज्यते।' या ग्रंथाचे शिकवण-सार हेच आहे. अशी शिकवण महास्वामीजींच्या मुखातून प्रकट झाली. ग्रंथरूपात आपणा सर्वांच्या हाती आली हे आपले भाग्यच! 'त्रैलोक्ये दीपको धर्मः।' हेच चरण, हा ग्रंथ पाहून 'त्रैलोक्ये दीपको ग्रंथः।' असे म्हणावे वाटते. हा ग्रंथदीप जनसामान्यांच्या हाती देऊन जन्मजन्मांतरीची भूक शांत करणारा प्रसादच दिला आहे. मुखाने भक्षण करण्याचा एक प्रसाद असतो पण त्याने तात्पुरती भूक भागेल. ज्ञानरूपी प्रसादाने कायमची तृप्तता येईल. जन्माचे समाधान लाभेल. अशा तृप्त, समाधानी समाजातच शरणभाव निर्माण होईल. वर्तमानात तो नसल्यानेच अनंत समस्यांनी आपले जगणे ग्रासून गेले आहे.

**हा सूर्य, हा जयद्रथ!**

'जन्म हा अखेरचा' या ग्रंथाचे केवळ भावनेपोटी मी गुणगान करतो असे समजण्याचे कारण नाही. आपण या ग्रंथाची प्रचिती घेऊ शकतो, अगदी 'हा सूर्य हा जयद्रथ' इतक्या रोकड्या रूपात घेऊ शकतो. घरोघर थैमान घालत असलेल्या स्वैराचाराचेच उदाहरण घ्या ना! कशामुळे हे स्वैर वागणे आहे? वस्तूच्या अथवा सुखाच्या आसक्तीनेच ना? तर मग आसक्ती कशामुळे आहे? अज्ञानामुळे! हा ग्रंथ सांगतो- 'ज्ञानचंद्रोदये जाते ध्वस्तमोहतमोभराः।' ज्ञानचंद्राच्या उदयाने मोहरूपी अंधार नाहीसा होतो.

असे ज्ञान गुरू देतात. ज्ञान झाले तो ज्ञानी! गुरू तर प्रत्यक्ष परतत्त्वच म्हणजे ज्ञानच असतात. 'ज्ञानेनाचार्ययुक्तेन प्रसीदति महेश्वरः।' आज याच प्रसादाची, कृपेची गरज जगाला सर्वात जास्त आहे. वेदानुकूल जीवनधारणाच अशा कृपेची प्राप्ती करून देऊ शकते. हा ग्रंथ वाचून हीच श्रद्धा वाढते. हा विश्वास वाढतो.

भावजागृतीचा अभाव ही विश्वाची खरी समस्या आहे. सगळे जगणे कोरडे, शुष्क कशाने झाले तर 'अ-भावा'ने! ज्या मनोवृत्तीत केवळ परमात्माच भरलेला आहे, तिला भाव म्हणावे असे महास्वामीजी म्हणतात. ज्याची वृत्ती परमात्ममय झाली त्याच्या हातून कोणताही दुराचार घडणे शक्यच नाही. असा भाव जागृत करण्यासाठी प्रथम घरांची मंदिरे झाली पाहिजेत. देहाची मंदिरे झाली पाहिजेत. आई-बाप धर्मशील झाली की पुढची पिढी धर्मशील होईल आणि धैर्यशीलही होईल. 'जन्म हा अखेरचा' या ग्रंथामुळे अशी जाणीव निर्माण झाल्याशिवाय राहात नाही. घरोघरी वीरशैव होतील तर धरेचा स्वर्ग होण्यास वेळ लागणार नाही. वीरशैव होण्याचा अर्थ तरी काय आहे?

> **'वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका।**
> **तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः॥'**

'वी' म्हणजे अशी विद्या की जी शिव आणि जीव यांच्या ऐक्याचा बोध करून देते. या विद्येत 'र' म्हणजे रमणारे ते वीरशैव! या न्यायाने घराघरांतून ऐक्यस्थलाला प्राप्त झालेले जीव असतील तर कोणते दुःख धरेवर राहील? अशा अपूर्व ग्रंथावर श्री १००८ श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी आशीर्वचने देऊन खरोखरच मानवजातीवर खूप उपकार केले आहेत. यातून अंशतः जरी उतराई होता आले तर आपण धन्य होऊ. या ग्रंथानुसार आचरण करूनच आपण उतराई होऊ शकतो.

**सुंदर ऋणानुबंध**

श्रीकाशीमहास्वामीजींचे प्रथम दर्शन मी १९९२ साली घेतले. सोलापूर येथे शिवानुभव मंगल कार्यालयात 'विभूतिवैभव' या नियतकालिकाचे प्रकाशन माझ्या हस्ते झाले, महास्वामीजी तेथे उपस्थित होते. डॉ. शे. दे. पसारकर यांच्यामुळे हा योग जुळून आला. त्याच कार्यक्रमापासून महास्वामीजींशी माझे नाते जुळून आले. त्यांच्या प्रतिपादनातील समन्वयाची दृष्टी, मांडणीतील

वर्तमानाचे भान आणि तपःपूत जीवन यांमुळे मी भारावून गेलो. आजवर त्यांची कृपा मी अखंड अनुभवतो आहे.

महास्वामीजींची प्रवचने माझ्यासारख्या अनेक मराठी वाचकांपर्यंत पोहचविण्याचे श्रेय जाते डॉ. शे. दे. पसारकर यांना! त्यांनी महास्वामीजीच्या आशीर्वचनांची टिपणे काढून, उत्तम संकलन करून भाषांतर केले. म्हणून मराठी भाषक त्यांचेही ऋणी आहेत. 'या ग्रंथातील आशय आमचा असला तरी ललित आणि सुबोध अशी मराठी भाषा पसारकरांची आहे' असे पू. श्रीकाशीजगद्गुरूंनी स्वतःच म्हटले आहे. डॉ. पसारकरांचे महद्भाग्यच!

महास्वामीजींचा डॉ. पसारकर आणि कुटुंबियांवर वरदहस्त आहे. गुरू अन् शिष्य एवढाच ऋणानुबंधाचा परीघ नाही. संतसाहित्य, तत्त्वज्ञान, दर्शनशास्त्र अशा वाङ्मयीन संबंधाने हे परीघ विस्तारले आहे, सुंदर झाले आहे.

भाषांतर ही केवळ तांत्रिक क्रिया नाही. मूळ समजले, रुजले तरच भाषांतर उत्तम वठते. डॉ. पसारकरांनी ही किमया करून दाखविली आहे. आशीर्वचने मुळात मराठीच असली पाहिजेत, असे वाटण्याइतके भाषांतर सरस झाले आहे. डॉ. पसारकरांनी मराठीचे ऋण फेडले खरे पण मराठी वाचकांना ऋणाईत करून ठेवले आहे. या ऋणाचा मराठी वाचकांना अभिमानच आहे.

सरतेशेवटी जन्माने वीरशैव असण्याचे भाग्य लाभलेल्यांसाठी दोन शब्द लिहिले पाहिजेत. या ग्रंथाचे नित्य वाचन करण्याचा संकल्प वीरशैवांनी केला पाहिजे. व्यापार, उद्योग, शेती, नोकरीपेशा यांमुळे वीरशैव सक्षम आहेत. ते ग्रंथ विकत घेतील याची खात्री आहे. पण त्यांनी तो नित्य वाचनात ठेवला पाहिजे. महास्वामीजींना सादर वंदन. डॉ. शे. दे. पसारकर यांना सानंद धन्यवाद!

१५, वामननगर,
जुळे सोलापूर-४१३००४

विवेक कृ. घळसासी
पत्रकार/व्याख्याता

# अनुक्रम

**भाग ५ : अंग-षट्स्थलांतर्गत शरणस्थल**



**भाग ६ : अंग-षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थल**



**भाग ७ : लिंग-षट्स्थलांतर्गत भक्तस्थल**



**भाग ८ :लिंग-षट्स्थलांतर्गत माहेश्वरस्थल**

# पूर्वपीठिका

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम् ।
विश्ववंद्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगद्गुरुम् ।।

श्रीकाशी ज्ञानसिंहासनाचे आद्यजगद्गुरू श्रीविश्वाराध्यांपासून श्रीविश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे तिला अनंत प्रणिपात समर्पित करून या पवित्र ज्ञानसत्रात उपस्थित असलेल्या जिज्ञासू सद्भक्तांनो,

भारतीय दर्शनाशास्त्रांत एक दर्शनशास्त्र वीरशैवांचे देखील आहे. त्याला आधार शिवागम होत. शिवाच्या नि:श्वासापासून उत्पन्न झाले ते 'निगम' आणि त्याच्या वाणीतून प्रकट झाले ते 'आगम' होत. संपूर्ण तत्त्वांचा उपदेश करणारे शास्त्र म्हणजे आगम. आगमांना 'तंत्र'ही म्हणतात. ज्याच्या अध्ययनामुळे सर्व प्रकारचे ज्ञान प्राप्त होते त्याला 'तंत्र' असे नाव आहे. शैवागमांची संख्या अठ्ठावीस असून त्यांची नावे अशी आहेत:-

१. कामिक, २. योगज, ३. चिन्त्य, ४. कारण, ५. अजित, ६. दीप्त, ७. सूक्ष्म, ८. सहस्र, ९. अंशुमान, १०. सुप्रभेद, ११. विजय, १२. नि:श्वास, १३, स्वायंभुव, १४. अनल, १५. वीर, १६. रौरव, १७. मकुट, १८. विमल, १९. चंद्रज्ञान, २०. बिम्ब, २१. प्रोद्गीत, २२. ललित, २३. सिद्ध, २४. संतान, २५. शर्वोक्त, २६. पारमेश्वर, २७. किरण २८. वातुल.

यांपैकी पहिले दहा आगम शिवाकडून आणि त्यानंतरचे अठरा आगम रुद्राकडून उपदेशिलेले आहेत. आगमांचा काळ वेदांइतकाच प्राचीन मानला जातो. आगमांत क्रियापाद, चर्यापाद, योगपाद आणि ज्ञानपाद असे चार विभाग असतात. त्यांपैकी ज्ञानपादात तत्त्वज्ञान सांगितलेले असते. वीरशैव तत्त्वज्ञानाचे आधारग्रंथ शिवागमच होत. अठ्ठावीस शिवागमांतून विखुरलेली वीरशैव सिद्धान्ताची तत्त्वे 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथात श्रीशिवयोगी शिवाचार्यांनी एकत्रित केली आहेत. म्हणून हा ग्रंथ वीरशैवांचा धर्मग्रंथ म्हणून मान्यता पावला आहे. अठ्ठावीस शैवागमांचे सार या ग्रंथात एकवटलेले आहे. जगद्गुरू रेणुकाचार्य आणि अगस्त्य मुनी यांचा संवाद या ग्रंथात असल्यामुळे याला 'श्रीरेणुकगीता' असेही म्हटले जाते. वीरशैवांचा षट्स्थल सिद्धान्त या ग्रंथात १०१ स्थलांतून विवरिला आहे.

या ग्रंथाचे कर्ते श्रीशिवयोगी शिवाचार्य होत. शिवयोगी शिवाचार्य (पहिले)- मुद्ददेव शिवाचार्य- सिद्धनाथ शिवाचार्य- शिवयोगी शिवाचार्य (ग्रंथकर्ते), अशी वंशपरंपरा याच ग्रंथात (परिच्छेद १, श्लोक १३-२०) दिलेली आढळते. ही वंशपरंपरा क्रमशः गुरुपरंपरादेखील असली पाहिजे. तपस्वी, विद्वान, आचारसंपन्न, श्रेष्ठ कुलोत्पन्न असे शिवयोगी शिवाचार्य आपल्या ज्ञानाने आणि कर्तृत्वाने वंदनीय ठरले. त्यांनी वेद, शैवागम, शैवपुराणे आदी ग्रंथांचा चिकित्सक अभ्यास केला होता. त्यांतील वीरशैवसिद्धान्ताची सूत्रे एकत्रित करून त्यांच्या आधाराने 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ सिद्ध केला. वेदमार्गाला विरोध न करता वीरशैवसिद्धान्ताचे आणि आचारधर्माचे संपूर्ण व निर्दोष दर्शन त्यांनी या ग्रंथात घडविले आहे.

या ग्रंथात एकूण २१ परिच्छेद असून श्लोकसंख्या १४०२ आहे. पहिल्या चार आणि शेवटच्या २१ व्या परिच्छेदात चरित्रविषयक वर्णन आलेले असून पाच ते वीस परिच्छेदांपर्यंत १०१ अवांतरस्थलांतून वीरशैवांच्या

षट्स्थल सिद्धान्ताचे विस्तृत विवेचन आले आहे. जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्त्य मुनींना हा सिद्धान्त उपदेशिला, अशी ग्रंथकर्त्याची धारणा आहे. या ग्रंथात पहिल्या चार परिच्छेदांत ग्रंथाची पूर्वपीठिका व्यक्त झाली आहे. तिचाच आपण आता विचार करणार आहोत. प्रारंभी शिवस्तुती आणि शक्तिस्तुती केलेली आहे.

## पहिला परिच्छेद

**त्रैलोक्यसम्पदालेख्यसमुल्लेखनभित्तये ।**
**सच्चिदानन्दरूपाय शिवाय ब्रह्मणे नमः ।।१।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, प्रथम परिच्छेद)

स्वर्ग, मृत्यू आणि पाताळ हे तीन लोक म्हणजे त्रैलोक्य होय. या त्रैलोक्याचे आणि त्याच्या वैभवाचे म्हणजेच सर्व चराचर सृष्टीचे चित्र काढायचे झाल्यास त्यासाठी केवढा मोठा पट लागेल! या विश्वापेक्षा मोठे एकच तत्त्व होय. ते म्हणजे शिव. म्हणून या श्लोकात त्रैलोक्यवैभवाचे विशाल चित्र काढण्यासाठी आधारभूत असलेली भिंत म्हणजे शिव होय, असे म्हटले आहे. अशा शिवाला नमस्कार केला आहे.

**ब्रह्मेति व्यपदेशस्य विषयं यं प्रचक्षते ।**
**वेदान्तिनो जगन्मूलं तं नमामि परं शिवम् ।।२।।**

पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश ही पंचमहाभूते होत. पंचमहाभूतांपेक्षा व्यापक असणाऱ्या परमात्म्याला वेदान्ती 'ब्रह्म' असे म्हणतात. ब्रह्म म्हणजे सर्वात मोठे, सर्वव्यापक असे तत्त्व. अशा जगाच्या मूलकारणाला, परशिवाला माझा नमस्कार असो.

**यस्योर्मिबुद्बुदाभासः षट्त्रिंशत्तत्त्वसंचयः ।**
**निर्मलं शिवनामानं तं वन्दे चिन्महोदधिम् ।।३।।**

या ठिकाणी परशिवब्रह्म आणि जगत् यांच्यातील संबंध स्पष्ट करून परशिवाला नमस्कार केला आहे. महासागरावर जशा लाटा आणि बुडबुडे असतात त्याप्रमाणे परशिवब्रह्म हा महासागर असून विश्वातील ३६ तत्त्वे म्हणजे त्यावरील लाटा आणि बुडबुडे आहेत, अशी भूमिका येथे घेतलेली आहे. ३६ तत्त्वांचा समूह पुढीलप्रमाणे:-

| | | |
|---|---|---|
| पाच शुद्ध तत्त्वे | : | १. शिव, २. शक्ती, ३. सदाशिव, ४. ईश्वर, ५. शुद्ध विद्या. |
| सात शुद्धाशुद्ध तत्त्वे | : | ६. माया, ७. कला, ८. विद्या, ९. राग, १०. काल, ११. नियती, १२. पुरुष. |
| चोवीस अशुद्ध तत्त्वे | : | १३. प्रकृती, १४. महत्, १५. अहंकार, १६. मन, १७. श्रोत्र, १८. त्वक्, १९. चक्षु, २०. जिव्हा, २१. घ्राण, २२. वाक्, २३. पाणि, २४. पाद, २५. पायू, २६. उपस्थ, २७. शब्द, २८. स्पर्श, २९. रूप, ३०. रस, ३१. गंध, ३२. आकाश, ३३. वायू, ३४. अग्नी, ३५. जल, ३६. पृथ्वी. |

**यद्भासा भासते विश्वं यत्सुखेनानुमोदते ।**
**नमस्तस्मै गुणातीतविभवाय परात्मने ।।४।।**

परशिव हा असा प्रकाश आहे की ज्याच्या प्रकाशाने हे सर्व जग उजळून जाते. परशिव हा असा आनंद आहे की ज्याच्या आनंदाने सर्व जग सुखी आणि आनंदी होते. सत्त्व, रज, तम या त्रिगुणांच्या पलीकडे असलेल्या वैभवसंपन्न अशा परशिवाला माझा नमस्कार असो.

**सदाशिवमुखाशेषतत्त्वोन्मेषविधायिने ।**
**निष्कलंकस्वभावाय नमः शान्ताय शंभवे ।।५।।**

परशिव हा शक्तियुक्त आहे, म्हणजेच तो शक्तिविशिष्ट आहे. शिवापासून शक्ती आणि शक्तीपासून शिव विलग करता येत नाही. विमर्शशक्तीने परशिव हा सदाशिवतत्त्वापासून ते पृथ्वितत्त्वापर्यंत सर्व तत्त्वांचा विकास करतो. अशा निर्मल आणि शांतस्वरूप शंभूला माझा नमस्कार असो.

**स्वेच्छाविग्रहयुक्ताय स्वेच्छावर्तनवर्तिने ।**
**स्वेच्छाकृतत्रिलोकाय नमः सांबाय शंभवे ।।६।।**

परशिवाला कोणताही आकार नाही, तो निराकार आहे. त्याला कोणताही अवयव नाही, तो निरवयव आहे. असे असले तरी आपल्या भक्तांवर अनुग्रह करण्यासाठी तो स्वेच्छेने दिव्य देह धारण करतो, आपल्या इच्छाशक्तीने त्रैलोक्याची निर्मिती करतो. अशा अंबेसह असणाऱ्या शिवाला नमस्कार असो.

**यत्र विश्राम्यतीशत्वं स्वाभाविकमनुत्तमम् ।**
**नमस्तस्मै महेशाय महादेवाय शूलिने ।।७।।**

परशिव हा स्वभावतः सर्व विश्वाचा स्वामी आहे. त्याच्या ठिकाणी सहजपणे सर्वश्रेष्ठ स्वामित्व वास करते, विराम पावते, अशा त्रिशूलधारी महादेवाला नमस्कार असो.

**यामाहुः सर्वलोकानां प्रकृतिं शास्त्रपारगाः ।**
**तां धर्मचारिणीं शंभोः प्रणमामि परां शिवाम् ।।८।।**

परशिवाच्या ठिकाणी अविनाभावसंबंधाने शक्ती वास करते. त्या शक्तीची स्तुती या ठिकाणी केली आहे. शास्त्रपारंगत विद्वान जिला सर्व जगताचे मूलकारण मानतात, जी शिवाची सहधर्मचारिणी आहे, अशा परशिवेला (पार्वतीला) मी नमस्कार करतो.

**यया महेश्वरः शंभुर्नामरूपादिसंयुतः ।**
**तस्यै मायास्वरूपायै नमः परमशक्तये ।।९।।**

परशिव हा सर्वश्रेष्ठ आहे. त्याला नामरूप नाही. परंतु शक्तीच्या योगाने त्याला नामरूप प्राप्त झाले आहे. अनामाला नाम आणि अरूपाला रूप देणाऱ्या अशा मायारूप परमशक्तीला माझा नमस्कार असो.

**शिवाद्यादिसमुत्पन्नशान्त्यतीतपरोत्तराम् ।**
**मातरं तां समस्तानां वन्दे शिवकरीं शिवाम् ।।१०।।**

परशिवापासून सर्वप्रथम प्रकट झाली ती शांत्यतीतोत्तर कला. या कलेपेक्षा शक्ती श्रेष्ठ आहे. निवृत्ती, प्रतिष्ठा, विद्या, शांती, शांत्यतीत, शांत्यतीतोत्तरा अशा सहा कलांना जन्म देणारी, कल्याणकारक आणि सर्वमंगल अशी जी शक्ती तिला माझा नमस्कार असो.

**इच्छाज्ञानादिरूपेण या शंभोर्विश्वभाविनी ।**
**वन्दे तां परमानंदप्रबोधलहरीं शिवाम् ।।११।।**

शक्ती इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती अशी त्रिविध रूपांत प्रकट होऊन सर्व विश्वाला प्रकाशित करते. परमानंदज्ञानाचा प्रवाह असलेल्या त्या शक्तीला मी नमस्कार करतो.

**अमृतार्थं प्रपन्नानां या सुविद्याप्रदायिनी।**
**अहर्निशमहं वन्दे तामीशानमनोरमाम्।।१२।।**

प्रत्येक जीवात्म्याला अमरत्वाचा ध्यास असतो. त्यांना अमृतत्व हवे असते. यासाठी जे भक्त शरण येतात त्यांना शक्ती उत्तम ज्ञान प्रदान करते. शिवाचे मन रमविणाऱ्या त्या शक्तीला मी अहर्निश वंदन करतो.

**कश्चिदाचारसिद्धानामग्रणीः शिवयोगिनाम्।**
**शिवयोगीति विख्यातः शिवज्ञानमहोदधिः।।१३।।**

या श्लोकापासून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे रचनाकार शिवयोगी शिवाचार्य यांच्या कुलपरंपरेचे आणि गुरुपरंपरेचे वर्णन सुरू होते. ग्रंथकार शिवयोगी शिवाचार्य यांच्या वंशात पूर्वी सदाचारसंपन्न, शिवज्ञानाचा महासागर असे 'शिवयोगी' नावाचे प्रसिद्ध योगिपुरुष होऊन गेले.

**शिवभक्तिसुधासिंधुजृम्भणामलचन्द्रिका।**
**भारती यस्य विदधे प्रायः कुवलयोत्सवम्।।१४।।**

मूळपुरुष शिवयोगी यांची वाणी श्रवण केल्यावर भक्तांच्या मनात, पूर्णचंद्राच्या दर्शनाने सागराला भरती यावी तशी, भक्ती उचंबळून येत असे आणि सर्वांची मने चंद्रप्रकाशात उमलणाऱ्या कुमुदिनीप्रमाणे प्रफुल्लित होत असत.

**तस्य वंशे समुत्पन्नो मुक्तामणिरिवामलः ।**
**मुद्ददेवाभिधाचार्यो मूर्धन्यः शिवयोगिनाम् ।।१५।।**

त्या शिवयोग्याच्या वंशात निर्मल मोत्यासारखा, शिवयोग्यांत श्रेष्ठ अशा 'मुद्ददेव' नामक आचार्यांनी जन्म घेतला.

**मुद्दानात् सर्वजन्तूनां प्रणतानां प्रबोधतः ।**
**मुद्ददेवेति विख्याता समाख्या यस्य विश्रुता ।।१६।।**

मुद्ददेव म्हणजे संतोष देणारा, जे प्राणी त्यांना शरण जात अशांना मुद्ददेव ज्ञानोपदेश करून संतुष्ट करीत असत. म्हणून त्यांचे 'मुद्ददेव' हे नाव अन्वर्थक होते.

**तस्यासीन्नन्दनः शांतः सिद्धनाथाभिधः शुचिः ।**
**शिवसिद्धान्तनिर्णेता शिवाचार्यः शिवात्मकः ।।१७।।**

या मुद्ददेवाला 'सिद्धनाथ' नामक पुत्र होता. ते अत्यंत शांत, पवित्र, शिवस्वरूप, शिवसिद्धान्ताचा निर्णय करणारे एक महान आचार्य होते.

**वीरशैवशिखारत्नं विशिष्टाचारसम्पदम् ।**
**शिवज्ञानमहासिन्धुं यं प्रशंसन्ति देशिकाः ।।१८।।**

सिद्धनाथ हे वीरशैवांचे मुकुटमणी आहेत, ते सदाचारसंपन्न आहेत, शिवज्ञानाचा महासागर आहेत; अशी

त्यांची प्रशंसा त्यावेळी केली जात असे.

**यस्याचार्यकुलाज्जाता सतामाचारमातृका ।**

**शिवभक्तिः स्थिरा यस्मिन् जज्ञे विगतविप्लवा ।।१९।।**

सिद्धनाथाचा ज्या कुलात जन्म झाला होत ते कुल अत्यंत आदर्श होते. सज्जनांनी आचरण करावे अशा आचारांचा उगम त्या कुळात झालेला होता. अशा आचारसंपन्न कुळात सिद्धनाथांचा जन्म झाल्यामुळे त्यांच्या अंगी निर्दोष अशी शिवभक्ती दृढ झाली होती.

**तस्य वीरशिवाचार्यशिखारत्नस्य नन्दनः ।**

**अभवच्छिवयोगीति सिन्धोरिव सुधाकरः ।।२०।।**

वीरशैवशिवाचार्यांचे मुकुटमणी अशा सिद्धनाथ शिवाचार्यांना 'शिवयोगी' नावाचा पुत्र झाला. सागरापासून जन्मलेला चंद्र ज्याप्रमाणे आपल्या जन्मदात्या सागराला आनंदित करतो त्याप्रमाणे शिवयोगी आपल्या पित्याला- सिद्धनाथाला आनंददायक ठरले.

**चिदानन्दपराकाशशिवानुभवयोगतः ।**

**शिवयोगीति नामोक्तिर्यस्य याथार्थ्ययोगिनी ।।२१।।**

शिवयोगी शिवाचार्याला सत्-चित्-आनंदस्वरूप, आकाशाप्रमाणे सर्वव्यापक अशा परशिवाचा साक्षात्कार झाला असल्यामुळे त्यांचे 'शिवयोगी' हे नाव यथार्थ होते.

**शिवागमपरिज्ञानपरिपाकसुगन्धिना ।**

**यदीयकीर्तिपुष्पेण वासितं हरितां मुखम् ।।२२।।**

त्यांना शिवागमांचे परिपूर्ण ज्ञान असल्यामुळे त्यांच्या कीर्तिरूपी फुलांचा सुगंध दाही दिशांत दरवळत होता. शिवयोगी हे शिवागमांचे संपूर्ण ज्ञाते आहेत, अशी त्यांची कीर्ती सर्वत्र पसरली होती.

**येन रक्षावती जाता शिवभक्तिः सनातनी ।**

**बुद्धादिप्रतिसिद्धान्तमहाध्वान्तांशुमालिना ।।२३।।**

सूर्य ज्याप्रमाणे अंध:काराचा नाश करतो त्याप्रमाणे शिवयोगी शिवाचार्यांनी बौद्धादी नास्तिक मतांचे खंडन करून सनातन अशा शिवसिद्धान्ताचे रक्षण केले.

**स महावीरशैवानां धर्ममार्गप्रवर्तकः ।**

**शिवतत्त्वपरिज्ञानचन्द्रिकावृतचन्द्रमाः ।।२४।।**

चंद्र चांदण्यामुळे शोभायमान दिसतो. त्याप्रमाणे शिवतत्त्वज्ञानाच्या चांदण्याने शोभणारे शिवयोगी शिवाचार्य श्रेष्ठ अशा वीरशैवांनाही धर्ममार्गाचे मार्गदर्शन करीत असत.

**आलोक्य शैवतन्त्राणि कामिकाद्यानि सादरम् ।**

**वातुलान्तानि शैवानि पुराणान्यखिलानि तु ।।**

**वेदमार्गाविरोधेन विशिष्टाचारसिद्धये ।**

**असन्मार्गनिरासाय प्रमोदाय विवेकिनाम् ।।**

**सर्वस्वं वीरशैवानां सकलार्थप्रकाशनम् ।**

अस्पृष्टमखिलैर्दोषैरादृतं शुद्धमानसैः ॥
तेष्वागमेषु सर्वेषु पुराणेष्वखिलेषु च ।
पुरा देवेन कथितं देव्यै तन्नन्दनाय च ॥
तत्सम्प्रदायसिद्धेन रेणुकेन महात्मना ।
गणेश्वरेण कथितमगस्त्याय पुनः क्षितौ ॥२५-२९॥

शिवयोगी शिवाचार्यांनी कामिकागमापासून वातुलागमापर्यंत अठ्ठावीस शैवागमांचे आणि सर्व शैवपुराणांचे साक्षेपाने अध्ययन केले. वेदमार्गाला विरोध न करता, शिवाचार सिद्ध करण्यासाठी, कुमार्गाचे निराकरण करण्यासाठी आणि विवेकी लोकांना संतुष्ट करण्यासाठी वीरशैवांचे सर्वस्व असलेला, सर्व अर्थ स्पष्ट करणारा, निर्दोष असा, निर्मलमनस्क सज्जनांना आदरणीय असलेला असा शिवाद्वैत सिद्धान्त विवरून सांगितला. हा शिवाद्वैत सिद्धान्त सर्व आगमांत आणि शैवपुराणांमध्ये सांगितलेला असून तो पूर्वी शिवाने पार्वतीला आणि षडाननाला सांगितला होता. शिवसंप्रदायात प्रसिद्ध असलेले महिमाशाली, शिवगणांचे अधिपती अशा महात्मा रेणुकाचार्यांनी हाच सिद्धान्त पुन्हा पृथ्वीवर अगस्त्य ऋषींना सांगितला.

वीरशैवमहातन्त्रमेकोत्तरशतस्थलम् ।
अनुग्रहाय लोकानामभ्यधात् सुधियांवरः ॥
सर्वेषां शैवतन्त्राणामुत्तरत्वान्निरुत्तरम् ।
नाम्ना प्रतीयते लोके यत्सिद्धान्तशिखामणिः ॥३०-३१॥

पिंडस्थलापासून ज्ञानशून्यस्थलापर्यंत अशा एकूण एकशे एक स्थलांत विखुरलेले हे वीरशैव महातंत्र आहे. हे पूर्वी रेणुकाचार्यांनी अगस्त्य मुनींना सांगितले होते. तेच वीरशैवांवर अनुग्रह करण्यासाठी पंडिताग्रणी अशा शिवयोगी शिवाचार्यांनी या ग्रंथात पुन्हा प्रकट केले आहे. शैवतंत्राच्या म्हणजेच शैवागमांच्या उत्तर भागात वीरशैवांचा शिवाद्वैत सिद्धान्त सांगितलेला आहे. तो श्रेष्ठतम आणि सर्वांच्या शिरोभागी असल्यामुळे त्याचे 'सिद्धान्तशिखामणी' असे नाव प्रसिद्ध आहे. म्हणून या सिद्धान्ताचे प्रतिपादन करणाऱ्या या ग्रंथाचेही नाव 'श्रीसिद्धान्तशिखामणी' असेच आहे.

अनुगतसकलार्थे शैवतन्त्रैः समस्तैः।
प्रकटितशिवबोधाद्वैतभावप्रसादे ।
विदधतु मतिमस्मिन् वीरशैवा विशिष्टाः।
पशुपतिमतसारे पण्डितश्लाघनीये ॥३२॥

या श्लोकात ग्रंथकाराने या ग्रंथाचे वीरशैवांनी विशेष अध्ययन करावे असा आग्रह व्यक्त केला आहे. सर्व वीरशैव तंत्राचे रहस्य व्यक्त करणारा, सर्व अर्थ प्रकट करणारा, प्रासादिक, पंडितांनी प्रशंसिलेला, पाशुपतमताचे सार असलेला असा हा 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ असून याच्याकडे वीरशैवांनी विशेष लक्ष देऊन याचे अध्ययन करावे.

## दुसरा परिच्छेद

**सच्चिदानन्दरूपाय सदसद्व्यक्तिहेतवे ।**

**नमः शिवाय साम्बाय सगणाय स्वयम्भुवे ।।१।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, द्वितीय परिच्छेद)

दुसऱ्या परिच्छेदात शिवपरब्रह्माचे निरूपण, शक्तिस्तुती, सृष्टिप्रकारकथन आदी विषय आलेले आहेत. या पहिल्या श्लोकात ग्रंथकाराने शिवाला वंदन केले आहे. सत्–असतूरूपी प्रपंचाच्या निर्मितीला कारण असणाऱ्या प्रमथगण आणि पार्वती यांच्यासमवेत राहणाऱ्या सच्चिदानंदरूपी शिवाला माझा नमस्कार असो.

**सदाशिवमुखाशेषतत्त्वमौक्तिकशुक्तिकाम्।**

**वन्दे माहेश्वरीं शक्तिं महामायादिरूपिणीम्।।२।।**

सदाशिवतत्त्वापासून भूमितत्त्वापर्यंत असणारी चौतीस तत्त्वे जणू मोती आहेत. हे मोती ज्यामध्ये निर्माण झाले अशी शिंपली म्हणजे परशिवाची शक्ती शुद्धविद्या, महामाय, प्रकृती या नावांनी ओळखली जाते. शिवाशी अभिन्न असलेल्या या शक्तीला माझा नमस्कार असो.

**अस्ति सच्चित्सुखाकारमलक्षणपदास्पदम्।**

**निर्विकल्पं निराकारं निरस्ताशेषविप्लवम्।।३।।**

सत्–चित्–आनंदस्वरूप असे परशिवब्रह्म विश्वनिर्मितीच्या आधी लक्षणरहित, भेदरहित, आकाररहित आणि सर्व उपाधींपासून मुक्त होते.

**परिच्छेदकथाशून्यं प्रपंचातीतवैभवम्।**

**प्रत्यक्षादिप्रमाणानामगोचरपदे स्थितम्।।४।।**

परिच्छेद म्हणजे विभाग, देश, वस्तू, काल हे परिच्छेद होत. जगातील प्रत्येक वस्तू वा व्यक्ती या परिच्छेदांनी बाधित असते. परंतु परशिवब्रह्म परिच्छेदरहित असते. ते प्राकृतिक प्रपंचाच्या पलीकडले आणि प्रत्यक्ष, अनुमान इत्यादी सर्व प्रमाणांना अगोचर असते.

**स्वप्रकाशं विराजन्तमनामयमनौपमम्।**

**सर्वज्ञं सर्वगं शान्तं सर्वशक्ति निरंकुशम्।।५।।**

ते शिवपरब्रह्म स्वयंप्रकाशित असून जन्ममरणादी दोषांपासून मुक्त असते. ते उपमा देण्याच्या पलीकडले असते. ते सर्वज्ञ असून सर्वांच्या हदयात वास करते. रागद्वेषापासून मुक्त, शांत, सर्वसामर्थ्यवान आणि गतिशील असून त्यांच्यावर कोणाचाही अधिकार नसतो.

**शिवरुद्रमहादेवभवादिपदसंज्ञितम्।**

**अद्वितीयमनिर्देश्यं परं ब्रह्म सनातनम्।।६।।**

त्याला शिव, रुद्र, महादेव, भव आदी नावे आहेत. ते अद्वितीय आहे. म्हणजे त्याच्यासारखे दुसरे तत्त्व अस्तित्वात नाही. ते अमुक तऱ्हेचे आहे असे सांगता येत नाही. ते नित्य असून परब्रह्मरूप आहे.

तत्र लीनमभूत् पूर्वं चेतनाचेतनं जगत्।
स्वात्मलीनं जगत्कार्यं स्वप्रकाश्यं तदद्भुतम्।।
शिवाभिधं परं ब्रह्म जगन्निर्मातुमिच्छया।
स्वरूपमादधे किंचित् सुखस्फूर्तिविजृम्भितम्।।७-८।।

त्या शिवपरब्रह्मात चराचर विश्व निर्मितीपूर्वी लीन झालेले होते. त्यामुळे सर्व आंतर आणि बाह्य इंद्रियांना ते अगोचर होते. अर्थात् इंद्रियांच्या अनुभवाला ते येत नव्हते. स्वत:त विलीन झालेल्या जगताला परब्रह्म आपल्या तेजाने प्रकाशित करते, असे ते (परब्रह्म) अद्भुत आहे. या शिवपरब्रह्माने जगनिर्मितीच्या इच्छेमुळे किंचित स्फूर्तिमय व उल्हसित रूप धारण केले.

निरस्तदोषसम्बन्धं निरुपाधिकमव्ययम्।
दिव्यमप्राकृतं नित्यं नीलकण्ठं त्रिलोचनम्।।
चन्द्रार्धशेखरं शुद्धं शुद्धस्फटिकसन्निभम्।
शुद्धमुक्ताफलाभासमुपास्यं गुणमूर्तिभिः।।९-१०।।

त्या शिवपरब्रह्माचे स्वरूप कसे आहे हे या ठिकाणी सांगितले आहे. जन्ममरणादी सर्व दोषांपासून मुक्त, उपाधिरहित, नाशरहित, त्रिकालअबाधित, दिव्य, त्रिगुणात्मक प्रकृतीचा संबंध नसलेले आणि नित्य असे त्याचे स्वरूप आहे. त्यालाच नीलकंठ आणि त्रिलोचन असे म्हणतात. त्याच्या मस्तकावर अर्धचंद्र असून ते शुद्ध आहे. स्फटिकासारखे निर्मल आहे, मोत्यासारखे तेजस्वी आहे. अशा रूपाची ब्रह्मादी देव उपासना करतात.

विशुद्धज्ञानकरणं विषयं सर्वयोगिनाम्।
कोटिसूर्यप्रतीकाशं चन्द्रकोटिसमप्रभम्।।
अप्राकृतगुणाधारमनन्तमहिमास्पदम्।
तदीया परमा शक्तिः सच्चिदानन्दलक्षणा।।
समस्तलोकनिर्माणसमवायस्वरूपिणी।
तदिच्छियाऽभवत्साक्षात्तत्स्वरूपानुसारिणी।।११-१३।।

ते शिवस्वरूप निर्मलाज्ञानाचे कारण असून सर्व योग्यांच्या ज्ञानाचा विषय झालेले आहे. ते कोटिसूर्यासारखे तेजस्वी असून कोटिचंद्रासारखे कांतिमान आहे. सर्वज्ञत्व इत्यादी अप्राकृतिक गुणांचा आश्रय असलेल्या, अनंत महिम्यांचा आधार असलेल्या अशा परशिवाला स्वत:त विलीन असलेल्या सृष्टीची निर्मिती करण्याची इच्छा झाली. परशिवाची जी विमर्शशक्ती आहे ती सच्चिदानंस्वरूपिणी आहे. ही विमर्शशक्तीच विश्वनिर्मितीचे उपादान कारण असून तीच विश्वस्वरूप होते.

मोराच्या अंड्यात ज्याप्रमाणे त्या पक्ष्याचे सर्व अवयव दडलेले असतात त्याप्रमाणे विमर्शशक्तीमध्येच सर्व जग लपलेले असते. एकाच बीजातून झाड, त्याची पाने-फुले-फळे वेगवेगळ्या रूपात निर्माण होतात त्याप्रमाणे विमर्शशक्तीमधूनच हे भिन्न दिसणारे जग निर्माण होते. परंतु मुळात ते शक्तिस्वरूप असते. कासव आपले हातपाय पसरतो आणि आवरून आत घेतो, त्याप्रमाणे शक्तीचा विस्तार होतो तेव्हा जग निर्माण होते आणि जेव्हा तिचा संकोच होतो तेव्हा विश्व तिच्यात विलीन होते.

स शंभुर्भगवान् देवः सर्वज्ञः सर्वशक्तिमान्।
जगत्सिसृक्षुः प्रथमं ब्रह्माणं सर्वदेहिनाम्।।
कर्तारं सर्वलोकानां विदधे विश्वनायकः।
तस्मै प्रथमपुत्राय शंकरः शक्तिमान विभुः।
सर्वज्ञः सकला विद्याः सानुग्रहमुपादिशत्।
प्राप्तविद्यो महादेवाद् ब्रह्मा विश्वनियामकात्।।
समस्तलोकान्निर्मातुं समुद्यमपरोऽभवत्।
कृतोद्योगोऽपि निर्माणे जगतां शंकराज्ञया।।१४-१७।।

संपत्ती, ज्ञान, यश, शोभा, वैराग्य आणि धर्म अशा सहा ऐश्वर्यांनी संपन्न असलेल्या, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान आणि विश्वनायक अशा शिवाने चौदा भुवनांची आणि प्राण्यांची निर्मिती करण्यासाठी समर्थ अशा ब्रह्मदेवाला प्रथम निर्माण केले. सर्वज्ञ शिवाने आपल्या प्रथम पुत्राला म्हणजे ब्रह्मदेवाला अनुग्रहपूर्वक सर्व विद्यांचा उपदेश केला. महादेवाकडून प्राप्त झालल्या विद्यांच्या आधारे आणि त्याच्या आज्ञेने ब्रह्मदेवाने जगनिर्मितीचा उद्योग सुरू केला.

अज्ञातोपायसम्पत्तेरभवन्माययावृतः।
विधातुमखिलान् लोकानुपायं प्राप्तुमिच्छया।।
पुनस्तं प्रार्थयामास देवदेवं त्रियम्बकम्।
नमस्ते देवदेवेश नमस्ते करुणाकर।।
अस्मदादिजगत्सर्वनिर्माणनविधिक्षम।
उपायं वद मे शम्भो जगत्सृष्टौ जगत्पते।।१८-२०।।

शिवाज्ञेने ब्रह्मदेव ब्रह्मांडाचे निर्माण करण्यास उद्युक्त झाला तरी तो मायेने आवृत झाल्यामुळे त्याला सृष्टिनिर्मितीचा उपाय सुचेना. जगनिर्मितीची युक्ती प्राप्त करून घेण्याच्या इच्छेने ब्रह्मदेवाने देवाधिदेव शंकराची पुनः प्रार्थना केली. हे देवाधिदेवा, तुला नमस्कार असो. माझ्यासह त्रैलोक्याची उत्पत्ती करण्यास फक्त तूच समर्थ आहेस. जगाच्या निर्मितीचा उपाय मला सांग.

सर्वज्ञः सर्वशक्तिस्त्वं सर्वकर्ता सनातनः।
इति संप्रार्थितः शम्भुर्ब्रह्मणा विश्वनायकः।।
उपायमवदत् तस्मै लोकसृष्टिप्रवर्तनम्।
उपायमीश्वरेणोक्तं लब्ध्वाऽपि चतुराननः।।
न समर्थोऽभवत् कर्तुं नानारूपमिदं जगत्।
पुनस्तं प्रार्थयामास ब्रह्मा विह्वलमानसः।।
देवदेव महादेव जगत्प्रथमकारण।
नमस्ते सच्चिदान्द स्वेच्छाविग्रहराजित।।

भव शर्व महेशान सर्वकारणकारण।
भवदुक्तो ह्युपायो मे न किंचिज्ज्ञायतेऽधुना।।
सृष्टिं विधेहि भगवन् प्रथमं परमेश्वर।
ज्ञातोपायस्ततः कुर्यां जगत्सृष्टिमुमापते।।२१-२६।।

शंकरा, तू सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वकर्ता आणि शाश्वत असा आहेस, म्हणून मला जगनिर्मितीचा उपाय सांग. अशा प्रकारे ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यावर शिवाने जगनिर्मितीचा उपाय त्याला सांगितला. त्यावेळी या बहुरूपी जगाचे निर्माण करण्यास ब्रह्मदेव समर्थ झाला नाही. म्हणून त्याने पुन्हा व्याकुळ अंतःकरणाने शंकराची प्रार्थना केली. हे देवाधिदेवा, महादेवा, जगाच्या आदिकारणा, सच्चिदानंदरूपा, स्वेच्छेने देह धारण करणाऱ्या महेश्वरा, सर्व कारणाचे कारण असणाऱ्या तुला नमस्कार असो. तू सांगितलेला उपाय मला थोडादेखील समजलेला नाही. हे उमापती भगवंता, परमेश्वरा, प्रथम तू सृष्टीची निर्मिती कर. नंतर तो उपाय समजल्यावर मी जगाची निर्मिती करीन.

इत्येवं प्रार्थितः शम्भुर्ब्रह्मणा विश्वयोनिना।
ससर्जात्मप्रख्यान् सर्वगान् सर्वशक्तिकान्।।
प्रबोधपरमानन्दपरिवाहितमानसान्।
प्रमथान् विश्वनिर्माणप्रलयापादनक्षमान्।।२७-२८।।

अशा प्रकारे ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यावर भगवान शिवाने आपल्यासारखेच प्रसिद्ध, सर्वगामी, सर्वशक्तींनी युक्त, ज्ञानी आणि विश्वसृजन व विश्वसंहार करण्यास समर्थ असलेले वीर, नंदी, भृंगी, वृषभ, स्कंद, रेणुक, दारुक असे असंख्य शिवगण निर्माण केले.

तेषु प्रमथवर्गेषु सृष्टेषु परमात्मना।
रेणुको दारुकश्चेति द्वावभूतां शिवप्रियौ।।
सर्वविद्याविशेषज्ञौ सर्वकार्यविचक्षणौ।
मायामलविनिर्मुक्तौ महिमातिशयोज्वलौ।।
आत्मानन्दपरिस्फूर्तिरसास्वादनलम्पटौ।
शिवतत्त्वपरिज्ञानतिरस्कृतभवामयौ।।
नानापथमहाशैवतन्त्रनिर्वाहतत्परौ।
वेदान्तसारसर्वस्वविवेचनविचक्षणौ।।२९-३२।।

शिवाने निर्मिलेल्या अनेक प्रमथगणांपैकी रेणुक आणि दारुक हे दोघे शिवाला अत्यंत प्रिय होते. हे दोघे सर्व विद्यांत प्रवीण आणि सर्व कार्यात चतुर होते. आणव, मायिक व कार्मिक या त्रिमलांपासून ते मुक्त होते. अत्यंत प्रभावी आणि तेजःपुंज होते. ते आत्मानंदात तल्लीन असून शिवतत्त्वाच्या ज्ञानामुळे संसाररूपी रोगापासून दूर होते. शिवाद्वैतसिद्धान्ताची प्रतिष्ठापना करण्यात तत्पर आणि उपनिषदांचे सारसर्वस्व उलगडून दाखवण्यात निपुण होते.

नित्यसिद्धौ निरातंकौ निरंकुशपराक्रमौ।

तादृशौ तौ महाभागौ संवीक्ष्य परमेश्वरः।।
समर्थौ सर्वकार्येषु विश्वासपरमाश्रितौ।
अन्तःपुरद्वारपालौ निर्ममे नियतौ विभुः।।३३-३४।।

नित्यसिद्ध, निर्भय आणि पराक्रमी अशा त्या दोघा महाभागांना पाहून शंकराने समर्थ आणि विश्वसनीय अशा त्या दोघांना आपल्या अंतःपुराचे द्वारपाल केले.

गणेश्वरौ रेणुकदारुकावुभौ
विश्वासभूतौ नवचन्द्रमौलेः।
अन्तःपुरद्वारगतौ सदा तौ
वितेनतुर्विश्वपतेस्तुसेवाम्।।३५।।

बालचंद्राला मस्तकी धारण करणाऱ्या शंकराचे रेणुक आणि दारुक हे दोघे गण अत्यंत विश्वासातील होते. अंतःपुराच्या दारावर पहारा करून ते शंकराची सेवा करीत होते.

## तिसरा परिच्छेद

तिसऱ्या परिच्छेदात रेणुकाचार्याचे लोकावतरण, श्रीशंकर-भवानी वर्णन, शिव-रेणुकसंवाद इत्यादी विषय आले आहेत. प्रारंभी कैलासपर्वताचे वर्णन ग्रंथकार करीत आहेत.

कदाचिदथ कैलासे कलधौतशिलामये।
गन्धर्ववामनयनाक्रीडामौक्तिकदर्पणे।।
मन्दारबकुलाशोकमाकन्दप्रायभूरुहे।
मल्लीमरन्दनिष्यन्दपानपीनमधुव्रते।।
कुंकुमस्तबकामोदकूलंकषहरिन्मुखे।
कलकण्ठकुलालापकन्दलद्रागबन्धुरे।।१-३।।
(श्रीसिद्धान्तशिखामणि, तृतीय परिच्छेद)

एकदा चांदीच्या शिलांनी युक्त असा कैलास पर्वत गंधर्वस्त्रियांच्या क्रीडेसाठी केलेल्या मोत्यांचा आरसा असावा असा दिसत होत. मंदार, बकुल, आंबा अशा अनेक वृक्षांनी सघन असलेला, बटमोगरा आदी फुलझाडांच्या फुलांतील मकरंद पिऊन पुष्ट झालेल्या भ्रमरांनी भरलेला होता. लाल रंगाच्या सुवासिक फुलांमुळे कैलासपर्वताचा आसमंत सुगंधित झाला होता. वृक्षांवर अनेक कोकीळ मधुर गायन करीत होते, त्यांचा स्वर सर्वत्र भरून राहिला होता.

किन्नरीगीतमाधुर्यपरिवाहितगह्वरे।
सानन्दवरयोगीन्द्रवृन्दालंकृतकन्दरे।।
हेमारविन्दकलिकासुगन्धिरसमानसे।
शातकुम्भमयस्तम्भशतोत्तुंगविराजिते।।

माणिक्यदीपकलिकामरीचिद्योतितान्तरे।
द्वारतोरणसंरूढशंखपद्मनिधिद्वये।।
मुक्तातारकितोदारवितानाम्बरमण्डिते।
स्पर्शलक्षितवैडूर्यमयभित्तिपरम्परे।।
संचरत्प्रमथश्रेणीपदवाचालनूपुरे।
प्रवालवलभीशृंगशृंगारमणिमंटपे।।४-८।।

कैलासपर्वतावर किन्नरस्त्रिया मधुर गायन करीत होत्या. त्यांच्या मंजूळ शब्दांनी दऱ्या दुमदुमत होत्या. काही गुहात सानंदगणेश्वर इत्यादी शिवयोगी ध्यान लावून बसले होते. त्यामुळे कैलासपर्वत जणू अलंकृत झाला होता. सुवर्णाच्या कमलकलिकांच्या सुगंधित रसाने मानससरोवर भरलेले होते. तेथील शतावधी उंच शिखरे सोन्याच्या स्तंभांसारखी शोभत होती. माणकाच्या रत्नदीपांच्या प्रकाशात कैलासाचे अंत:पुर उजळले होते. महाद्वाराच्या तोरणस्तंभावर शंख आणि पद्म आरूढ झाले होते. मंडपाचा अंतर्भाग विशाल वस्त्राने सजवलेला होता. त्यावर नक्षत्रांप्रमाणे मोती जडवलेले होते. त्याच्या भिंती वैडूर्य रत्नांनी भरलेल्या होत्या. उतरत्या छताची शिखरे पोवळ्यांनी सजवलेली होती. पायातील नूपुरांचा ध्वनी करीत प्रमथगण रत्नमंटपात संचार करीत होते.

वन्दारुदेवमुकुटमन्दाररसवासितम्।
रत्नसिंहासनं दिव्यमध्यस्तं परमेश्वरम्।।
तमास्थानगतं देवं सर्वलोकमहेश्वरम्।
त्र्यन्तकमलारण्यविहारकलहंसकम्।।
उदारगुणमोंकारशुक्तिकापुटमौक्तिकम्।
सर्वमंगलसौभाग्यसमुदायनिकेतनम्।।
संसारविषमूर्च्छालुजीवसंजीवनौषधम।
नित्यप्रकाशनैर्मल्यकैवल्यसुरपादपम्।।९-१२।।

भगवान शिवाला तेहतीस कोटी देव वंदन करीत होते. त्यांच्या मुकुटांतील मंदारपुष्पांच्या सुगंधाने सुगंधित झालेल्या नवरत्नखचित सिंहासनावर परमेश्वर विराजमान झाले होते. उपनिषदरूपी कमलवनात विहार करण्याऱ्या राजहंसाप्रमाणे देवांच्या दरबारात महेश्वर शोभत होते. सर्व प्रकारचे मंगल आणि सौभाग्याचे निवासस्थान असलेला, औदार्यगुणाने युक्त असा परमेश्वर ॐकारूपी शिंपल्यातील जणू मोतीच होता. तो परमेश्वर कसा होता? तर संसारविषाने ग्लानी आलेल्या जीवांना संजीवन देणाऱ्या औषधासारखा, स्वयंप्रकाशित, निर्मल आणि शरण आलेल्या भक्तांना मोक्ष देणाऱ्या कल्पवृक्षासारखा होता.

अनन्तपरमानन्दमकरन्दमधुव्रतम्।
आत्मशक्तिलतापुष्यत्त्रिलोकीपुष्पकोरकम्।।
ब्रह्माण्डकुण्डिकाषण्डपिण्डीकरणपण्डितम्।
समस्तदेवताचक्रचक्रवर्तिपदे स्थितम्।।
चन्द्रबिम्बायुतच्छायादायादद्युतिविग्रहम्।
माणिक्यमुकुटज्योतिर्मंजरीपिंजराम्बरम्।।

चूडालं सोमकलया सुकुमारबिसाभया।
कल्याणपुष्पकलिकाकर्णपूरमनोहरम्।।
मुक्तावलयसम्बद्धमुण्डमालाविराजितम्।
पर्याप्तचन्द्रसौन्दर्यपरिपन्थिमुखश्रियम्।।
प्रातःसंफुल्लकमलपरियायत्रिलोचनम्।।
मन्दस्मितमितालापमधुराधरपल्लवम्।।१३-१८।।

मकरंदाच्या आस्वादात जसा भ्रमर तल्लीन होतो तसा परमेश्वर आत्मानंदात तल्लीन झाला होता. आपल्या शक्तिरूपी वेलीवर पोसलेल्या सृष्टिरूपी फुलाच्या कळीसारखा शोभत होता. अनंत ब्रह्मांडे म्हणजे जणू पात्र (भांडी) होत. या पात्रांच्या समूहाला एकत्रित करण्यात कुशल असा परमेश्वर सर्व देवतांच्या समुदायात चक्रवर्ती सम्राटासारखा दिसत होता. दहा सहस्र चंद्रबिंबांच्या कांतीसारखी त्याची देहकांती होती. वंदन करणाऱ्या देवतांच्या मुकुटांवर जडवलेल्या रत्नप्रभेने त्याचे वस्त्र पिंगट दिसत होते. कोमल कमलतंतूसारखी चंद्रकला त्याने मस्तकावर धारण केली होती आणि कल्याणपुष्पाची कळी कर्णालंकारासारखी धारण केल्यामुळे तो मनोहर दिसत होता. मोत्यांच्या माळेत गुंफलेली मुंडमाला त्याने गळ्यात घातली होती. त्याची मुखकांती पूर्णचंद्राला देखील लाजवत होती. प्रातःसमयी उमललेल्या कमलांप्रमाणे त्याचे तीन नेत्र प्रफुल्लित दिसत होते आणि मंदस्मित व मितभाषणामुळे त्याच्या ओठांच्या पाकळ्या मनोहर दिसत होत्या.

गण्डमण्डलपर्यन्तक्रीडन्मकरकुण्डलम्।
कालिम्ना कालकूटस्य कण्ठनाले कलंकितम्।।
मणिकंकणकेयूरमरीचिकरपल्लवैः।
चतुर्भिः संविराजन्तं बाहुमन्दारशाखिभिः।।
गौरीपयोधराश्लेषकृतार्थभुजमध्यमम्।
सुवर्णब्रह्मसूत्रांकं सूक्ष्मकौशेयवाससम्।।
नाभिस्थानावलम्बिन्या नवमौक्तिकमालया।
गंगयेव कृताश्लेषं मौलिभागावतीर्णया।।
पदेन मणिमंजीरप्रभापल्लवितश्रिया।
चन्द्रवत्स्फाटिकं पीठं समावृत्य स्थितं पुरः।।१९-२३।।

शंकराच्या कानांतील मकरकुंडले गालापर्यंत रुळत होती. हलाहल विष प्यायल्यामुळे त्याचा गळा निळसर दिसत होता. नवी पालवी फुटलेल्या कल्पवृक्षाच्या शाखांसारखे त्याचे चार हात रत्नकंकण आणि बाजुबंदांतील रत्नप्रभेमुळे शोभत होते. पार्वतीच्या स्तनालिंगनाने शंकराच्या वक्षस्थलाचे जणू सार्थक झाले होते. त्याच्या गळ्यात सोन्याचे यज्ञोपवीत होते आणि त्याने तलम रेशमी वस्त्र नेसले होते. नाभीपर्यंत रुळणारी तेजस्वी मोत्यांची माळ त्याने धारण केली होती, त्यामुळे जटेतल्या गंगेने जणू त्याला आलिंगन दिले असे भासत होते. चंद्रकांत मण्यापासून निर्मिलेल्या चौरंगावर रत्ननूपुरांच्या तेजामुळे शोभिवंत झालेला एक पाय पुढे ठेवून व दुसरा दुमडून शंकर ताठ बसले होते.

वामपार्श्वनिवासिन्या मंगलप्रियवेषया।
समस्तलोकनिर्माणसमवायस्वरूपया।।
इच्छाज्ञानक्रियारूपबहुशक्तिविलासया।
विद्यातत्त्वप्रकाशिन्या विनाभावविहीनया।।
संसारविषकान्तारदाहदावाग्निलेखया।
धम्मिल्लमल्लिकामोदझंकुर्वद्‌भृंगमालया।।
सम्पूर्णचन्द्रसौभाग्यसंवादिमुखपद्मया।
नासामौक्तिकलावण्यनाशीरस्मितशोभया।।
मणिताटंकरंगान्तर्वलितापांगलीलया।
नेत्रद्वितयसौन्दर्यनिन्दितेन्दीवरत्विषा।।
कुसुमायुधकोदण्डकुटिलभ्रूविलासया।
बन्धूककुसुमच्छायाबन्धुभूताऽधरश्रिया।।
कण्ठनालजितानंगकम्बुबिब्बोकसम्पदा।
बाहुद्वितयसौभाग्यवंचितोत्पलमालया।।२४-३०।।

जगनिर्मितीचे उपादानकारण असलेली पार्वती परमेश्वराच्या डावीकडे बसलेली होती. मंगलकारक आणि प्रिय अशी तिची वेषभूषा होती. इच्छा, ज्ञान आणि क्रिया अशा शक्तींनी युक्त अशी पार्वती आत्मविद्यातत्त्वाला प्रकाशित करीत अविनाभावसंबंधाने शोभत होती. संसाररूपी विषवनाचा दावाग्नीप्रमाणे दाह करणाऱ्या पार्वतीच्या केशकलापात खोवलेल्या मल्लिकापुष्पाच्या सुवासाने भ्रमर मंडलाकार गुंजारव करीत होते. तिचे मुखकमल पूर्णचंद्रासारखे कांतिमान होते. तेजस्वी मोत्यांची नथ धारण केल्यामुळे तिचे मंद हास्य अधिकच शोभायमान झाले होते. तिने कानांत नीलरत्नांची कर्णभूषणे धारण केली होती. त्यांची नीलप्रभा तिच्या नेत्रांवर पडल्यामुळे त्यांना नीलकमलांचे सौंदर्य प्राप्त झाले होते. कामदेवाच्या धनुष्यासारख्या तिच्या वक्र भुवया शोभत होत्या आणि तिचे दोन्ही ओठ जास्वंदीच्या फुलासारखे लालचुटुक दिसत होते. पार्वतीचा गळा आकृतीने आणि ध्वनिमाधुर्याने मदनाच्या विजयशंखाला जिंकणारा आणि तिचे दोन्ही हात नीलकमलाच्या माळेला लाजविणारे होते.

स्थिरयौवनलावण्यशृंगारितशरीरया।
अत्यन्तकठिनोत्तुंगपीवरस्तनभारया।।
मृणालवल्लरीतन्तुबन्धुभूतावलग्नया।
शृंगारतटिनीतुंगपुलिनश्रोणिभारया।।
कुसुम्भकुसुमच्छायाकोमलाम्बरशोभया।
शृंगारोद्यानसंरम्भरम्भास्तम्भोरुकाण्डया।।
चूतप्रवालसुषुमासुकुमारपदाब्जया।।
स्थिरमंगलशृंगारभूषणालंकृतांगया।।

हारनूपुरकेयूरचमत्कृतशरीरया।
चक्षुरानन्दलतया सौभाग्यकुलविद्यया।।३१-३५।।

पार्वतीचे शरीर चिरयौवनाच्या लावण्याने आणि उन्नत व पुष्ट स्तनभाराने शोभत होते. तिची कंबर कमलवेलीच्या देठासारखी नाजूक होती. तिचे नितंब जणू शृंगाररूपी नदीतील वाळूच्या उंचवट्याप्रमाणे शोभत होते. कुसुंबी रंगाचे कोमल वस्त्र तिने परिधान केले होते. शृंगारवनातील केळीच्या स्तंभासारख्या तिच्या मांड्या होत्या. तिची पावले आंब्याच्या कोवळ्या पानांसारखी तांबूस आणि कोमल होती आणि नित्य मंगलकारक अशा अलंकारांनी तिचे शरीर अलंकृत होते. गळ्यात मोतीमाळ, पायात पैंजण, दंडांत बाजुबंद असे अलंकार तिने धारण केल्यामुळे ती विलक्षण सुंदर दिसत होती. डोळ्यांना आनंद देणारी अशी तिची देहलता होती. सर्व सौभाग्यांची आणि विद्यांची ती कुलस्वामिनी होती.

उमया सममासीनं लोकजालकुटुम्बया।
अपूर्वरूपमभजन् परिवाराः समन्ततः।।
पुण्डरीकाकृति स्वच्छं पूर्णचन्द्रसहोदरम्।
दधौ तस्य महालक्ष्मीः सितमातपवारणम्।।
तन्त्रीझंकारशालिन्या संगीतामृतविद्यया।
उपतस्थे महादेवमुपान्ते च सरस्वती।।
झणत्कंकणजातेन हस्तेनोपनिषद्वधूः।
ओंकारतालवृन्तेन वीजयामास शंकरम्।।
चलच्चामरिकाहस्ता झंकुर्वन्मणिकंकणाः।
आसेवन्त तमीशानमभितो दिव्यकन्यकाः।।
चामराणां विलोलानां मध्ये तन्मुखमण्डलम्।
रराज राजहंसानां भ्रमतामिव पंकजम्।।३६-४१।।

सर्व लोक जिचे कुटूंब आहे अशा उमेसह आसनस्थ झालेल्या सौंदर्यस्वरूप परमेश्वराची सर्व देवपरिवार सेवा करीत होता. महालक्ष्मीने श्वेतकमलासारखे निर्मल आणि पूर्णचंद्रासारखे शुभ्र छत्र परमेश्वराच्या डोक्यावर धरले होते. उमामहेश्वरांच्या समोर सरस्वती नवरत्नांच्या कंकणांनी युक्त अशा हाताने वीणेच्या तारा छेडून संगीताच्या अमृतविद्येने सेवा करीत होती. उपनिषदरूपी स्त्रिया हातांतील कंकणांचा किणकिण ध्वनी करीत ॐकाररूपी पंख्याने शंकराला वारा घालत होत्या. कंकणांचा रुणझुण आवाज करीत देवकन्या शंकरपार्वतीवर चवऱ्या ढाळत होत्या. चवऱ्यांच्या मध्ये दिसणारे शंकराचे मुख सरोवरातील राजहंसांच्या भ्रमणामुळे मधूनच दिसणाऱ्या कमलाप्रमाणे दिसत होते.

मन्त्रेण तमसेवन्त वेदाः सांगविभूतयः।
भक्त्या चूडामणिं कान्तं वहन्त इव मौलिभिः।।
तदीयायुधधारिण्यस्तत्समानविभूषणाः।
अंगभूताः स्त्रियः काश्चिदासेवन्त तमीश्वरम्।।

आम्नाधिकारिण: केचिदनन्तप्रमुखा अपि।

अष्टौ विद्येश्वरा देवमभजन्त समन्ततः।।४२-४४।।

शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष या सहा अंगांनी युक्त असे वेद परमात्म्याला आपल्या मस्तकावर शिरोरत्नाप्रमाणे धारण करून त्याची भक्तिपूर्वक स्तुती करीत होते. वेदांप्रमाणेच सर्व आयुधे, त्यांच्यासारखीच आभूषणे धारण करणाऱ्या वेदांगरूपी स्त्रिया परमेश्वराची सेवा करीत होत्या. शंकराचे अधिकारप्राप्त अनंत, सूक्ष्म, शिवोत्तम, एकनेत्र, एकरुद्र, त्रिमूर्ती, श्रीकंठ आणि शिखंडी असे आठ विद्येश्वर त्याच्या भोवती उभे राहून त्याची सेवा करीत होते.

ततो नन्दी महाकालश्चण्डो भृंगी रिटिस्ततः।

घण्टाकर्णः पुष्पदन्तः कपाली वीरभद्रकः।।

एवमाद्या महाभागा महाबलपराक्रमाः।

निरंकुशमहासत्त्वा भेजिरे तं महेश्वरम्।।

अणिमादिकमैश्वर्यं येषां सिद्धेरपोहनम्।

ब्रह्मादयः सुरा येषामाज्ञालंघनभीरवः।।

मोक्षलक्ष्मीपरिष्वंगमुदिता येऽन्तरात्मना।

येषामीषत्करं विश्वसर्गसंहारकल्पनम्।।

ज्ञानशक्तिः परा येषां सर्ववस्तुप्रकाशिनी।

आनन्दकणिका येषां हरिब्रह्मादिसम्पदः।।

आकांक्षन्ते पदं येषां योगिनो योगतत्पराः।

कांक्षणीयफलो येषां संकल्पः कल्पपादपः।।

कर्मकालादिकार्पण्यचिन्ता येषां न विद्यते।

येषां विक्रमसन्नाहा मृत्योरपि च मृत्यवः।।

ते सारूप्यपदं प्राप्ताः प्रमथा भेजिरे शिवम्।।

ब्रह्मोपेन्द्रमहेन्द्राद्या विश्वतन्त्राधिकारिणम्।।

आयुधालंकृतप्रान्ताः परितस्तं सिषेविरे।

आदित्या वसवो रुद्रा यक्षगन्धर्वकिन्नराः।।

दानवा राक्षसा दैत्याः सिद्धा विद्याधरोरगाः।

अभजन्त महादेवमपरिच्छिन्नसैनिकाः।।४५-५४।।

तसेच नंदी, महाकाल, चंड, भृंगी, रिटी, घंटाकर्ण, पुष्पदंत, कपाली, वीरभद्र आदी प्रमुख महाभाग, पराक्रमी असे प्रमथगण शंकराची सेवा करीत होते. अणिमादी आठ सिद्धी त्या प्रमथांच्या सिद्धीपुढे तुच्छ होत्या आणि ब्रह्मादी देवदेखील त्यांच्या आज्ञेचे उल्लंघन करण्यास भीत होते. त्या प्रमथांना मोक्षरूपी लक्ष्मीने आलिंगन दिल्यामुळे ते अंतरात अत्यंत संतुष्ट होते. विश्वनिर्मिती आणि विश्वसंहार ही कार्ये त्यांना सहजसाध्य होती. सर्व वस्तूंना प्रकाशित करणारी ज्ञानशक्ती त्यांना लाभली होती. ज्ञानशक्तीपुढे विष्णू ब्रह्मादिकांची संपत्तीही त्यांना एका आनंदकणासारखी लहान भासत होती. आपल्याला प्रमथांची योग्यता लाभावी अशी इच्छा योगसाधनेत

निमग्न असलले शिवयोगी करीत असतात. त्या प्रमथांचे संकल्प म्हणजे सर्व सिद्धी देणारे कल्पवृक्षच होत. ज्यांना कर्म-काल यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या कृपणतेची चिंता नव्हती आणि ज्यांच्या पराक्रमामुळे मृत्यूला देखील आपल्या मृत्यूची भीती वाटावी असे परमेश्वराशी एकरूप झालेले प्रमथगण शिवाची सेवा करीत होते. ब्रह्मा, विष्णू, इंद्र इत्यादी तेहतीस कोटी देव शस्त्रांनी अलंकृत होऊन विश्वाचा सूत्रधार असलेल्या शंकराभोवती उभे राहून त्याची सेवा करीत होते. बारा सूर्य, आठ वसू, अकरा रुद्र, कुबेरादी यक्ष, गंधर्व, किंन्नर, राक्षस, दानव, दैत्य, सिद्ध, विद्याधर, नाग हे सर्व आपल्या संपूर्ण सेनेसह महादेवाला भजत होते.

**वसिष्ठो वामदेवश्च पुलस्त्यागस्त्यशौनकाः।**
**दधीचिर्गौतमश्चैव सानन्दशुकनारदाः।।**
**उपमन्युभृगुव्यासपाराशरमरीचयः।**
**इत्याद्या मुनयः सर्वे नीलकण्ठं सिषेविरे।।**
**पार्श्वस्थपरिवाराणां विमलांगेषु बिम्बितः।**
**सर्वान्तर्गतमात्मानं स रेजे दर्शयन्निव।।५५-५७।।**

वसिष्ठ, वामदेव, पुलस्त्य, अगस्त्य, शौनक, दधीची, गौतम, सानंद, शुक, नारद, उपमन्यू, भृगू, व्यास, पराशर, मरीचि इत्यादी महर्षी नीलकंठ अशा परमेश्वराची सेवा करीत होते. भोवताली उभ्या असलेल्या परिवाराच्या निर्मल शरीरांत शंकराची प्रतिबिंबे उमटलेली होती. म्हणून तो जणू आपण सर्वांच्या अंतर्यामी राहतो असे दाखवीत होता.

**क्षणं स शम्भुर्देवानां कार्यभागं निरूपयन्।**
**क्षणं गन्धर्वराजानां गानविद्यां विभावयन्।।**
**ब्रह्मविष्ण्वादिभिर्देवैः क्षणमालापमाचरन्।**
**क्षणं देवमृगाक्षीणां लालयन्नृत्यविभ्रमम्।।**
**व्यासादीनां क्षणं कुर्वन् वेदोच्चारेषु गौरवम्।**
**विदधानः क्षणं देव्या मुखे बिम्बाधरे दृशः।।**
**हास्यनृत्यं क्षणं पश्यन् भृंगिणा परिकल्पितम्।**
**नन्दिना वेत्रहस्तेन सर्वतंत्राधिकारिणा।।**
**अमुंचता सदा पार्श्वमात्माभिप्रायवेदिना।**
**चोदितान् वासयन् कांश्चिद्विसृजन भ्रूविलासतः।।५८-६२।।**

एखादे वेळी शंकर सर्व देवांना कामे सांगत होते तर कधी गंधर्वांच्या सुस्वरगायनाचा आस्वाद घेत होते. कधी ब्रह्मदेव, विष्णू आदी देवांबरोबर सुखसंवाद करीत तर कधी देवांगनांचे नृत्य पाहात. व्यासादिकांच्या उत्तम वेदोच्चारांचा गौरव करीत तर कधी देव पार्वतीच्या बिंबफलासारखे ओठ असलेल्या मुखावर नजर ठेवत. कधी भृंगीच्या हास्यनृत्याकडे बघत तर कधी सर्व तंत्रांचा प्रमुख असलेल्या हातात दंड धारण केलेल्या आणि सर्वदा जवळ असलेल्या नंदीकडून काही जणांना जवळ बोलावत. काही जणांना केवळ नेत्रसंकेत करून दूर पाठवत.

**सम्भावयंस्तथा चान्यानन्यानपि नियामयन्।**
**समस्तभुवनाधीशमौलिलालितशासनः।।**

अकुण्ठशक्तिरव्याजलावण्यललिताकृतिः।
स्थिरयौवनसौरभ्यशृंगारितकलेवरः।।
आत्मशक्त्यमृतास्वादरसोल्लासितमानसः।
स्वाभाविकमहैश्वर्यविश्रामपरमावधिः।
निष्कलंकमहासत्त्वनिर्मितानेकविग्रहः।
अखण्डारातिदोर्दण्डकण्डूखण्डनपण्डितः।।
चिन्तामणिः प्रपन्नानां श्रीकण्ठः परमेश्वरः।
सभान्तरगतं तन्त्रं रेणुकं गणनायकम्।।६३–६७।।

काही लोकांना आपल्या प्रिय भाषणाने संतुष्ट करीत तर काही लोकांना शिक्षा करीत. त्रैलोक्याधिपती शंकराची आज्ञा सर्व भुवनांचे अधिपती शिरसावंद्य मानून पालन करीत होते. निरंकुश शासन आणि अप्रतिहत शक्ती असलेल्या, सुंदर अशा शंकराचे शरीर चिरतारुण्याने अलंकृत होते. आत्मशक्तिरूप अमृतरसाच्या स्वादामुळे त्याचे मन सदैव आनंदित होते. स्वाभाविक अशा महाऐश्वर्याचे तो विश्रामस्थान होता. कलंकरहित महाशक्तीने निर्माण केलेल्या अनेक शरीरांचा धारक होता. असंख्य दुर्जनांच्या बाहुबलाची रग जिरवण्यास समर्थ होता. शरण आलेल्या भक्तांचे दुःख दूर करणारा जणू चिंतामणीच होता. त्या शिवसभेत सर्व शिवगणांत प्रमुख असलेला रेणुकगण बसलेला होता.

प्रसादं सुलभं दातुं ताम्बूलं स तमाह्वयत्।
शम्भोराह्वानसन्तोषसंभ्रमेणैव दारुकम्।।
उल्लंघ्य पार्श्वमगमल्लोकनाथस्य रेणुकः।
तमालोक्य विभुस्तत्र समुल्लंघितदारुकम्।।
माहात्म्यं निजभक्तानां द्योतयन्निदमब्रवीत्।
रे रे रेणुक दुर्बुद्धे कथमेष त्वयाऽधुना।।
उल्लंघितः सभामध्ये मम भक्तो हि दारुकः।
लंघनं मम भक्तानां परमानर्थकारणम्।।
आयुः श्रियं कुलं कीर्तिं निहन्ति हि शरीरिणाम्।
मम भक्तमवज्ञाय मार्कण्डेयं पुरा यमः।।६८–७२।।

रेणुकगणाला तांबूलप्रसाद देण्यासाठी शंकराने जवळ बोलावले. त्या आनंदाच्या भरात मार्गात बसलेल्या दारुकगणाला ओलांडून रेणुक शंकराजवळ गेला. आपल्या भक्ताचा मोठेपणा दाखवणारे शंकर रेणुकाचे वागणे पाहून त्याला म्हणाले, 'हे उतावीळ रेणुका, माझ्या परमभक्त अशा दारुकाला ओलांडून तू का आलास? माझ्या भक्ताचा कोणी असा अपमान केला तर त्याच्या आयुष्याचा, संपत्तीचा, कुलाचा आणि कीर्तीचा नाश होतो. मार्कंडेय या माझ्या भक्ताचा यमाने एकदा अवमान केला होता–'

मत्पादताडनादासीत् स्मरणीयकलेवरः।
भृगोश्च शंकुकर्णस्य मम भक्तिमतोस्तयोः।।

कृत्वानिष्टमभूद् विष्णुर्विकेशो दशयोनिभाक्।
मद्भक्तेन दधीचेन कृत्वा युद्धं जनार्दनः।।
भग्नचक्रायुधः पूर्वं पराभवमुपागमत्।
कृताश्वमेधो दक्षोऽपि मद्भक्तांश्च गणेश्वरान्।।
अवमत्य सभामध्ये मेषवक्त्रोऽभवत् पुरा।
श्वेतस्य मम भक्तस्य दुरतिक्रमतेजसः।।
औदासीन्येन कालोऽपि मया दग्धः पुराऽभवत्।
एवमन्येऽपि बहवो मद्भक्तानामतिक्रमात्।।
परिभूता हताश्चासन् भक्ता मे दुरतिक्रमाः।।
अविचारेण मद्भक्तो लंघितो दारुकस्त्वया।।
एष त्वं रेणुकानेन जन्मवान् भव भूतले।
इत्युक्तः परमेशेन भक्तमाहात्म्य शंसिना।।७३-७९।।

त्यावेळी मी त्याला लाथ मारल्याने यम नामशेष झाला होता. माझे परमभक्त भृगू आणि शंकुकर्ण यांना विष्णूने पूर्वी छळले होते, तेव्हा त्याचे केस नाहीसे होऊन त्याला दहा वेळा निरनिराळ्या योनीत जन्म घ्यावा लागला. दधीची या माझ्या भक्ताबरोबर विष्णूने युद्ध केल्यामुळे त्याचे चक्र मोडून त्याचा पराभव झाला. दक्षाने अश्वमेध यज्ञ करताना माझ्या भक्तांचा आणि गणांचा अपमान केला होता, त्यावेळी वीरभद्राने दक्षाचे मुंडके छाटून त्याला एडक्याचे शिर लावले होते. श्वेतनामक माझ्या पराक्रमी भक्ताकडे यमाने दुर्लक्ष केले, त्यावेळी मी यमाला जाळून टाकले होते. अशाच प्रकारे ज्यांनी ज्यांनी माझ्या भक्तांना ओलांडून त्यांचा अपमान केला होता, त्यांपैकी काही लोक पराभूत झाले आणि काही मारले गेले. म्हणून भक्तांचा कोणी अपमान करू नये. रेणुका, माझ्या भक्ताला अविचाराने ओलांडून जाण्याचा तू अपराध केला आहेस. म्हणून तू भूतलावर जन्म घेतला पाहिजेस. अशा प्रकारे परमेश्वराने भक्तांचे माहात्म्य सांगितले

प्रार्थयामास देवेशं प्रणिपत्य स रेणुकः।
मानुषीं योनिमासाद्य महादुःखविवर्धिनीम्।।
जात्यायुर्भोगवैषम्यहेतुकर्मोपपादिनीम्।
समस्तदेवकैंकर्यकार्पण्यप्रसवस्थलीम्।।
महातापत्रयोपेतां वर्णाश्रमनियन्त्रिताम्।
विहाय त्वत्पदाम्भोजसेवां किं वा वसाम्यहम्।।
यथा मे मानुषो भावो न भवेत् क्षितिमण्डले।
तथा प्रसादं देवेश विदेहि करुणानिधे।।८०-८३।।

त्यावेळी रेणुकाने परमेश्वराला प्रणाम करून त्यांची प्रार्थना केली. तो म्हणाला, मनुष्ययोनीत खूप दुःखे भोगावी लागतात. जात, आयुष्य, उपभोग यांच्यात विषमता उत्पन्न करणारी अनेक कर्मे तेथे घडतात. मनुष्ययोनीत अनेक देवांची सेवा करावी लागते. ती योनी म्हणजे दैन्याची जन्मभूमी होय. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक दुःखे तेथे भोगावी लागतात. वर्ण आणि आश्रम यांच्या नियंत्रणात राहावे लागते.

हे देवा, तुमच्या चरणकमलांची सेवा सोडून अशा मनुष्ययोनीत मी कसा राहू? म्हणून हे करुणासागरा, भूलोकी मला जन्म घ्यावा लागणार नाही, अशी कृपा करा.

इति संप्रार्थितो देवो रेणुकेन महेश्वरः।
मा भैषीर्मम भक्तानां कुतो भीतिरिहेष्यति।।
श्रीशैलस्योत्तरे भागे त्रिलिंगविषये शुभे।
कोल्लिपाक्यभिधानोऽस्ति कोऽपि ग्रामो महत्तरः।।
सोमेश्वराभिधानस्य तत्र वासवतो मम।
अस्पृशन् मानुषं भावं लिंगात् प्रादुर्भविष्यसि।।
मदीयलिंसम्भूतं मद्भक्तपरिपालकम्।
विस्मिता मानुषाः सर्वे त्वां भजन्तु मदाज्ञया।।
मदद्वैतपरं शास्त्रं वेदवेदान्तसम्मतम्।
स्थापयिष्यसि भूलोके सर्वेषां हितकारकम्।।
मम प्रतापमतुलं मद्भक्तानां विशेषतः।
प्रकाशय महीभागे वेदमार्गानुसारतः।।८४-८९।।

रेणुकाने अशी प्रार्थना केल्यावर महादेव म्हणाले, हे रेणुका, तू भ्यायचे कारण नाही. माझ्या भक्तांना या जगात भीती कशी असेल? श्रीशैल पर्वताच्या उत्तरदिशेला तेलंगदेशात कोल्लिपाकी नावाचे एक मोठे गाव आहे. त्या क्षेत्रात मी सोमेस्वरलिंगरूपाने वास करतो. त्या लिंगापासून तू दिव्य जन्म घेशील. सोमेश्वरलिंगातून अवतरलेल्या भक्तपालक अशा तुला पाहून सर्व लोक आश्चर्यचकित होतील आणि तुझी सेवा करतील. जगातील सर्व लोकांचे कल्याण करण्यासाठी वेदोपनिषदांना संमत असणारा वीरशैवसिद्धान्त तू स्थापन करशील. माझा आणि माझ्या भक्तांचा प्रताप अतुलनीय आहे. तो वेदमार्गाला अनुसरून भूलोकात तू प्रकाशित कर.

इत्युकत्वा परमेश्वरः स भगवान् भद्रासनादुत्थितो।
ब्रह्मोपेन्द्रमुखान् विसृज्य विबुधान् भ्रूसंज्ञया केवलम्।
पार्वत्या सहितो गणैरभिमतैः प्राप स्वमन्तःपुरं
क्षोणीभागमवातरत् पशुपतेराज्ञावशाद् रेणुकः।।९०।।

इतके बोलून शंकर आपल्या सिंहासनावरून उठले. ब्रह्मादी देवांना नेत्रसंकेत करून त्यांनी जाण्यास सांगितले आणि आपल्या गणांसह आणि पार्वतीसह ते अंतःपुरात निघून गेले. शंकराज्ञेप्रमाणे रेणुकगणाने कोल्लनुपाक गावातील सोमेश्वरलिंगापासून अवतार धारण केला.

## चौथा परिच्छेद

यापुढील चौथ्या परिच्छेदात रेणुकाचे अवतारधारण, अगस्त्य आश्रमाचे वर्णन, अगस्त्य-रेणुक संवाद इत्यादी विषय आले आहेत.

अथ त्रिलिंगविषये कोल्लिपाक्याभिधे पुरे।
सोमेश्वरमहालिंगात् प्रादुरासीत् स रेणुकः।।

प्रादुर्भूतं तमालोक्य शिवलिंगात् त्रिलिंगजाः।
विस्मिताः प्राणिनः सर्वे बभूवुरतितेजसम्।।
भस्मोद्धूलितसर्वांगं साररुद्राक्षभूषणम्।
जटामुकुटसंयुक्तं त्रिपुंड्रांकितमस्तकम्।।
कटीतटीपटीभूतकन्थापटलबन्धुरम्।
दधानं योगदण्डं च भस्माधारं कमण्डलुम्।।१-४।।
(श्रीसिद्धान्तशिखामणी, चतुर्थ परिच्छेद)

शिवाज्ञेने रेणुक गणेश्वर तेलंग देशातील कोल्लिपाक नगरातील सोमेश्वरलिंगातून अवतीर्ण झाले. ते अत्यंत तेजस्वी होते. त्यांना पाहून सर्व लोक आश्चर्यचकित झाले. त्यांचे सर्वांग भस्मविलेपित होते. त्यांच्या शरीरावर रुद्राक्षाची आभूषणे होती. डोक्यावर जटा होत्या आणि कपाळावर सुरेख त्रिपुंड्र होते. त्यांच्या कमरेला वस्त्राप्रमाणे कंथा बांधलेली होती. हातात योगदंड आणि कमंडलू होता.

शिवाद्वैतपरिज्ञानपरमानन्दमोदितम्।
निर्धूतसर्वसंसारवासनादोषपंजरम्।।
शिवागमसुधासिन्धुसमुन्मेषसुधाकरम्।
चित्तारविन्दसंगूढशिवपादाम्बुजद्वयम्।।
यमादियोगतन्त्रज्ञं स्वतन्त्रं सर्वकर्मसु।
समस्तसिद्धसन्तानसमुदायशिखामणिम्।।
वीरसिद्धान्तनिर्वाहकृतपट्टनिबन्धनम्।
आलोकमात्रनिर्भिन्नसमस्तप्राणिपातकम्।।
तपमृच्छन् जनाः सर्वे नमन्तः को भवानिति।
इति पृष्टो महायोगी जनैर्विस्मितमानसैः।।
प्रत्युवाच शिवाद्वैतमहानन्दपरायणः।
पिनाकिनः पार्श्ववर्ती रेणुकाख्यगणेश्वरः।।५-१०।।

शिवाद्वैतज्ञानाच्या परमानंदाने ते आनंदित झाले होते. संसारवासनांच्या पिंजऱ्यापासून ते मुक्त होते. शिवागमरूपी अमृतसमुद्राला भरती आणणारे ते जणू चंद्रच होते. त्यांनी आपल्या चित्तात शिवाचे पदकमळ धारण केले होते. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी अशा अष्टांग योगात ते प्रवीण होते. सर्व सिद्धकुलात ते श्रेष्ठ होते. वीरशैवसिद्धान्ताच्या प्रतिष्ठापनेसाठी ते कटिबद्ध होते. केवळ दृष्टिक्षेपाने प्राणिमात्रांची पापे ते नष्ट करीत होते. अशा रेणुकाला पाहून तेलंगदेशातील लोक आश्चर्यचकित झाले. लोकांनी त्यांना साष्टांग नमस्कार करून 'आपण कोण आहात' असा प्रश्न केला. शिवाद्वैतानंदात निमग्न असलेल्या रेणुकांनी त्या लोकांना असे उत्तर दिले.

केनचित्कारणेनाहं शिवलिंगादिहाभवम्।
नाम्ना रेणुकसिद्धोऽहं सिद्धसन्ताननायकः।।

स्वच्छन्दचारी लोकेऽस्मिन् शिवसिद्धान्तपालकः।
खण्डयन् जैनचार्वाकबौद्धादीनां दुरागमान्।।
इत्युक्त्वा पश्यतां तेषां विषयस्थिरचक्षुषाम्।
उत्थाय व्योममार्गेण मलयाद्रिमुपागमत्।।११-१३।।

हे लोकहो, काही विशिष्ट कार्यासाठी मी लिंगापासून प्रकट झालो. सर्व सिद्धसमूहात मी रेणुक नावाचा एक श्रेष्ठ सिद्ध आहे. मी स्वच्छंद, शिवसिद्धान्ताचा संरक्षक असून चार्वाक, जैन, बौद्ध आदी नास्तिक आगमांचे खंडन करणार आहे. एवढे बोलून ते एकाएकी उठून आकाशमार्गाने मलयपर्वताकडे निघून गेले.

नवचन्दनकान्तारकन्दलन्मन्दमारुतम्।
अभंगुरभुजंगस्त्रीसंगीतरससंकुलम्।।
करिपोतकराकृष्टस्फुरदेलातिवासितम्।
वराहदंष्ट्रिकाध्वस्तमुस्तासुरभिकन्दरम्।।
पटीरदलपर्यंकप्रसुप्तव्याधदम्पतिम्।
माधवीमल्लिकाजातीमंजरीरेणुरंजितम्।।
तत्र कुत्रचिदाभोगसर्वर्तुकुसुमद्रुमे।
अपश्यदाश्रमं दिव्यमगस्त्यस्य महामुनेः।।
मन्दारचन्दनप्रायैर्मण्डितं तरुमण्डलैः।
शाखाशिखरसंलीनतारकागणकोरकैः।।
मुनिकन्याकरानीतकलशाम्बुविवर्धितैः।
आलवालजलास्वादमोदमानमृगीगणैः।।१४-१९।।

नव्या चंदनाच्या सुगंधित वायूने मलय पर्वत दरवळून गेला होता. नागस्त्रियांच्या मंजूळ गानरसाने तो व्याप्त होता. हत्तीच्या पिल्लांनी आपल्या सोंडींनी वेलदोड्यांच्या वेली उपटून टाकल्या होत्या. त्याचा सुवास सर्वत्र भरून राहिला होता. रानडुकरांनी सुळ्यांनी उकरलेल्या वाळ्याचा घमघमाट पर्वतावरील गुहांमध्ये भरून गेला होता. मलयपर्वतावरील व्याधदंपती चंदनपानांच्या शय्येवर निद्रिस्त होते. माधवी, मोगरा, जाई यांच्या फुलांनी, मंजिऱ्यांनी आणि परागांनी सर्व परिसर रंगलेला होता. सर्व ऋतूंत बहरणाऱ्या पुष्पवृक्षांनी भरलेल्या मलयपर्वतावरील अगस्त्य ऋषींचा दिव्य आश्रम रेणुक गणेश्वराने पाहिला. आश्रमातील पारिजात-चंदन आदी वृक्ष अतिशय उंच होते. इतके की आकाशातील नक्षत्रे त्यांच्या शेंड्यावरील पांढऱ्या कळ्यांप्रमाणे भासत होती. ऋषिकन्या आश्रमातील झाडांना कलशांनी पाणी घालत होत्या. झाडाच्या आळ्यातील पाणी पिऊन हरिणींचा समूह तृप्त होत होता.

हेमारविन्दनिष्यन्दमकरन्दसुगन्धिभिः।
मरालालापवाचालुवीचिमालामनोहरैः।।
इन्दीवरवरज्योतिरन्धीकृतहरिन्मुखैः।
लोपामुद्रापदन्यासचरितार्थतटांकितैः।।

हारनीहारकर्पूरहरहासामलोदकैः।
नित्यनैमित्तिकस्नाननियमार्थैस्तपस्विनाम्।।
प्रकृष्टमणिसोपानैः परिवीतं सरोवरैः।
विमुक्तसत्त्ववैरस्यं ब्रह्मलोकमिवापरम्।।२०-२३।।

पर्वतावरील सरोवरांचे पाणी सुवर्णकमलांतून पाझरणाऱ्या मकरंदाने सुवासिक झाले होते. राजहंसांच्या मधुर ध्वनीने आणि पाण्यावरील तरंगांनी तो परिसर मनोहर दिसत होता. नीलकमलांच्या निळ्या प्रभेने दाही दिशा अंधारल्या होत्या. अगस्त्य ऋषींची पत्नी लोपामुद्रेच्या चरणचिन्हांनी सरोवरांचे काठ कृतार्थ झाले होते. मोत्यांचा हार, हिम, कापूर आणि शिवाच्या मंदस्मिताप्रमाणे सरोवराचे पाणी निर्मल आणि शुभ्र दिसत होते. त्या पाण्यात तपस्वी लोक नित्य स्नान करीत असत. रत्नांच्या पायऱ्यांनी युक्त अशा सरोवरांनी अगस्त्य ऋषीचा आश्रम वेढलेला होता. आश्रमातील प्राण्यांमध्ये वैरभाव नसल्यामुळे तो परिसर ब्रह्मलोकासारखा भासत होता.

हूयमानाज्यसन्तानधूमगन्धिमहास्थलम्।
शुकसंसत्समारब्धश्रुतिशास्त्रोपबृंहणम्।।
तस्य मध्ये समासीनं मूले चन्दनभूरुहः।
सुकुमारदलच्छायादूरितादित्यतेजसः।।
तडित्पिंगजटाभारैस्त्रिपुण्ड्रांकितमस्तकैः।
भस्मोद्धूलितसर्वांगैः स्फुरद्रुद्राक्षभूषणैः।।
नववल्कलवासोभिर्नानानियमधारिभिः
परिवीतं मुनिगणैः प्रमथैरिव शंकरम्।।
समुज्वलजटाजालैस्तपःपादपपल्लवैः।
स्फुरत्सौदामिनीकल्पैर्ज्वालाजालैरिवानलम्।।
विशुद्धभस्मकृतया त्रिपुण्ड्रांकितरेखया।
त्रिस्त्रोतसेव सम्बद्धशिलाभागं हिमाचलम्।।
भस्मालंकृतसर्वांगं शशांकमिव भूगतम्।
वसानं वल्कलं नव्य बालातपसमप्रभम्।।२४-३०।।

होमहवनात जळणाऱ्या तुपाचा वास येणारा धूर सर्वत्र भरला होता. तेथील पोपट वेदशास्त्रांची चर्चा करीत होते. आश्रमातील चंदनवृक्षाखाली अगस्त्य ऋषी बसले होते. वृक्षाच्या कोवळ्या आणि दाट पानांच्या छायेमुळे त्यांना ऊन लागत नव्हते. विजेसारखे तेजस्वी, पिंगट जटा असलेले, कपाळावर भस्माचे त्रिपुंड्र धारण केलेले, गळ्यात रुद्राक्षमाळा घातलेले, नूतन वल्कले परिधान केलेले, नाना नियमांचे पालन करणारे असे मोठमोठे ऋषी अगस्त्य ऋषींना वेढून बसले होते. त्यामुळे अगस्त्य ऋषी प्रमथगमांनी वेढलेल्या शंकरासारखे दिसत होते. तपश्चर्यारूपी वृक्षाची तांबूस पालवी त्यांनी धारण केली होती. त्यांच्या जटा विजेसारख्या लखलखीत होत्या. ते उफाळणाऱ्या अग्नीप्रमाणे भासत होते. कपाळावर शुद्ध भस्माचे त्रिपुंड्र धारण केल्यामुळे गंगेच्या तीन धारा कोसळणाऱ्या हिमालय पर्वतासारखे दिसत होते. कोवळ्या उन्हासारखे नवे वल्कल नेसलेल्या अगस्त्य ऋषींचे सर्वांग भस्मविलेपित असल्यामुळे त्यांच्या रूपाने भूलोकावर जणू चंद्र अवतरला होता.

वडवाग्निशिखाजालसमालीढमिवार्णवम्।
सर्वासामपि विद्यानां समुदायनिकेतनम्।।
न्यक्कृतप्राकृताहन्तं निरूढशिवभावनम्।
तृणीकृतजगज्जालं सिद्धीनामुदयस्थलम्।।
मोहान्धकारतपनं मूलबोधमहीरुहम्।
ददर्श स महोयागी मुनिं कलशसम्भवम्।।
तमागतं महासिद्धं समीक्ष्य कलशोद्भवः।
गणेन्द्रं रेणुकाभिख्यं विवेद ज्ञानचक्षुषा।।
तस्यानुभावं विज्ञाय सहसैव समुत्थितः।।
लोपामुद्राकरानीतैरुदकैरतिपावनैः।।
पादौ प्रक्षालयामास स तस्य शिवयोगिनः।।
सम्पुज्य तं यथाशास्त्रं तन्नियोगपुरस्मरम्।।
मुनिर्विनयसम्पन्नो निषसादासनान्तरे।
समासीनं मुनिवरं सर्वतेजस्विनां विभुम्।।
उवाच शान्तया वाचा रेवणः सिद्धशेखरः।
निर्विघ्नं वर्तसे किं नु नित्या ते नियमक्रिया।।३१-३८।।

सर्व विद्यांचे निधान असलेले अगस्त्य ऋषी वडवाग्नीच्या ज्वालांनी व्यापलेल्या समुद्रासारखे दिसत होते. ते अष्टसिद्धींचे उगमस्थान होते. त्यांच्या ठिकाणी अहंकार उरलेला नव्हता. ते संसाराला कस्पटासमान लेखत होते आणि त्यांच्या ठिकाणी शिवाविषयी दृढ निष्ठा होती. मोहरूपी अंधाराला सूर्यासारखे असणाऱ्या आणि मूळज्ञानाचे कल्पवृक्ष अशा अगस्त्य ऋषींना महायोगी रेणुकाचार्यांनी पाहिले. आपल्या आश्रमात आलेले महासिद्ध म्हणजे रेणुकाचार्य गणेश्वर आहेत हे अगस्त्य मुनींनी ज्ञानचक्षूंनी ओळखले. रेणुकाचार्यांना पाहताच ते आदराने उभे राहिले . त्यांना नमस्कार करून आसनावर बसवले आणि लोपामुद्रेने आणलेल्या पवित्र जलाने त्यांचे पादप्रक्षालन केले. त्यांची शास्त्रयुक्त पूजा केली आणि त्यांची आज्ञा घेऊन अत्यंत विनयाने अगस्त्य ऋषी दुसऱ्या आसनावर बसले. रेणुकाचार्य म्हणाले, हे अगस्त्य महर्षी, तू कुशल आहेस ना? तुझी नित्य नियमक्रिया व्यवस्थित पार पडते ना?

अथ वाऽगस्त्य तेजस्विन् कुतः स्युस्तेऽन्तरायकाः।
विन्ध्यो निरुद्धो भवता विश्वोल्लंघनविभ्रमः।।
नहुषो रोषलेशात् ते सद्यः सर्पत्वमागतः।
आचान्ते भवता पूर्वं पंकशेषाः पयोधयः।।
जीर्णस्ते जाठरे वह्नौ दृप्तो वातापिदानवः।
एवंविधानां चित्राणां सर्वलोकातिशायिनाम्।।
कृत्यानां तु भवान् कर्ता कस्तेऽगस्त्य समप्रभः।
शिवाद्वैतपरानन्दप्रकाशनपरायणम्।।

भवन्तमेकं शंसन्ति प्रकृत्या संगवर्जितम्।
पुरा हैमवतीसूनुरवदत् ते षडाननः।।३९-४३।।

हे अगस्त्या, तुझ्यावर विघ्ने कशी येतील बरे? मेरूपर्वतापेक्षाही उंच होऊ पाहणाऱ्या विंध्यपर्वताला तू अडवलेस, तुझ्या वाटेला गेलेला नहुष राजा तुझ्या अल्पशा रागाने लगेच सर्प झाला. एका आचमनातच सप्तसमुद्रांचे तू प्राशन केलेस. तुझ्या पोटात शिरलेला वातापी राक्षस जठराग्नीत भस्म होऊन गेला. अशी लोकविलक्षण, चमत्कारिक लीला करणारा तुझ्यासारखा दुसरा कोणी या जगात नाही. शिवाद्वैतज्ञान प्रकाशित करण्यात तत्पर आणि स्वभावतः सर्वसंगपरित्यागी असा एकमेव तूच आहेस, अशी तुझी प्रशंसा सर्व लोक करतात. हे अगस्त्या, पार्वतीचा पुत्र कार्तिकाने तुला एक शास्त्र उपदेशिले होते.

शिवधर्मोत्तरं नाम शास्त्रमीश्वरभाषितम्।
भक्तिः शैवी महाघोरसंसारभयहारिणी।।
त्वया राजन्वती लोके जाताऽगस्त्य महामुने।
इति तस्य वचः श्रुत्वा सिद्धस्य मुनिपुंगवः।।
गम्भीरगुणया वाचा बभाषे भक्तिपूर्वकम्।
अहमेव मुनीन्द्राणां लालनीयोऽस्मि सर्वदा।।४४-४६।।

शिवाने सांगितलेले शिवधर्मोत्तर नावाचे शास्त्र त्याने तुला उपदेशिले होते. महाघोर अशा संसाराचे भय दूर करणारी शिवशक्ती तुझ्यामुळेच या जगात प्रसिद्धीला आली. अशा प्रकारचे रेणुकसिद्धांचे बोलणे ऐकून ऋषिश्रेष्ठ अगस्त्य भक्तियुक्त गंभीर वाणीने त्यांना म्हणाले, हे आचार्यवरा, आज माझ्या सौभाग्यामुळे मीच एकटा सर्व ऋषींमध्ये धन्य झालो आहे.

भवदागमसम्पत्तिर्मां विना कस्य संभवेत्?।
स्थिरमद्य शिवज्ञानं स्थिरा मे तापसक्रिया।।
भवद्दर्शनपुण्येन स्थिरा मे मुनिराजता।
संसारसर्पदष्टानां मूर्च्छितानां शरीरिणाम्।।
कटाक्षस्तव कल्याणं समुज्जीवनभेषजम्।
समस्तलोकसंदाहतापत्रयमहानलः।।
त्वत्पदाम्बुकणास्वादादुपशाम्यति देहिनाम्।
रेणुकं त्वां विजानामि गणनाथं शिवप्रियम्।।
अवतीर्णमिमां भूमिं मदनुग्रहकांक्षया।
भवादृशानां सिद्धानां प्रबोधध्वस्तजन्मनाम्।।
प्रवृत्तिरीदृशी लोके परानुग्रहकारिणी।
त्वन्मुखाच्छ्रोतुमिच्छामि सिद्धान्तं श्रुतिसंमतम्।।४७-५२।।

आपले आगमंन हीच मोठी संपत्ती आहे. ती माझ्याशिवाय कोणाला बरे प्राप्त होईल? माझे शिवज्ञान आणि माझी तपस्या आज स्थिर झाली. आपल्या दर्शानाने माझे मुनिश्रेष्ठत्व स्थिर झाले. आपला कृपाकटाक्ष म्हणजे

संसाररूपी सर्पाच्या दंशाने मूर्च्छित झालेल्या जीवांना औषधच होय. आपल्या पादोदकाचा एक थेंब प्राशन केला तर संसाराच्या तापत्रयरूपी महाअग्नीचा दाह शांत होतो. आपण शिवप्रिय असे गणनाथ रेणुकाचार्य आहात आणि माझ्यावर अनुग्रह करण्यासाठी आपण पृथ्वीवर अवतरला आहात, याची मला जाणीव आहे. जन्ममरण चुकलेले आणि सर्व सिद्धींची प्राप्ती झालेले आपल्यासारखे योगीश्वर लोकांवर अनुग्रह करण्यासाठीच पृथ्वीवर संचार करतात. श्रुतिसंमत असा सिद्धान्त मी आपल्या मुखातून ऐकू इच्छितो.

**सर्वज्ञ वद मे साक्षाच्छैवं सर्वार्थसाधकम्।**
**सद्यः सिद्धिकरं पुंसां सर्वयोगीन्द्रसेवितम्।।**
**दुराचारैरनाघ्रातं स्वीकृतं वेदवेदिभिः।**
**शिवात्मैक्यमहाबोधसम्प्रदायप्रवर्तकम्।।**
**उक्त्वा भवान् सकललोकमहोपकारं**
**सिद्धान्तसंग्रहमनादृतबाह्यतन्त्रम्।**
**सद्यः कृतार्थयितुमर्हति दिव्ययोगिन्**
**नानागमश्रवणवर्तितसंशयं माम्।।५३-५५।।**

हे सर्वज्ञा, सर्व पुरुषार्थ साधणारा, तत्काल सिद्धी देणारा, सर्व योगीश्रेष्ठांना मनापासून आवडणारा, दुराचारी नास्तिक मतांच्या लोकांचा ज्याला स्पर्श झाला नाही आणि ज्याचा वैदिकांनी स्वीकार केला आहे अशा शिवजीवैक्य सांगणाऱ्या वीरशैवसिद्धान्ताचा आपण मला उपदेश करावा. अनेक आगमांचे अध्ययन करून माझ्या मनात अनेक शंका उत्पन्न आहेत. म्हणून वेदसंगत, नास्तिक मतांचे खंडन करणारा, कल्याणकारक अशा शिवसिद्धान्तशास्त्राचा उपदेश करून मला कृतार्थ करावे. अगस्त्य ऋषींनी रेणुकाचार्यांची अशी प्रार्थना केली.

## पाचवा परिच्छेद

पाचव्या परिच्छेदात रेणुकाचार्य अगस्त्य ऋषींना तत्त्वोपदेश करतात. त्या परिच्छेदातील पंचविसाव्या श्लोकापासून सिद्धान्तशिखामणीच्या मुख्य विषयाला म्हणजे षट्स्थलाला प्रारंभ होतो.

**अथागस्त्यवचः श्रुत्वा रेणुको गणनायकः।**
**ध्यात्वा क्षणं महादेवं साम्बमाह समाहितः।।**
**अगस्त मुनिशार्दूल समस्तागमपारग।**
**शिवज्ञानकरं वक्ष्ये सिद्धान्तं शृणु सादरम्।।१-२।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, पंचम परिच्छेद)

शक्तीसहित शिवाचे ध्यान करून, स्थिरचित्त होऊन श्री रेणुकाचार्यांनी अगस्त्यांच्या प्रश्नाला उत्तर दिले. ते म्हणाले, सर्व निगमागमांत पारंगत असलेल्या मुनिश्रेष्ठ अगस्त्या, शिवज्ञान प्रकाशित करणारे असे सिद्धान्तशास्त्र मी तुला सांगणार आहे. ते तू आदराने ऐक.

अगस्त्य खलु सिद्धान्ता विख्याता रुचिभेदतः।
भिन्नाचारसमायुक्ता भिन्नार्थप्रतिपादकाः।।
सांख्यं योगः पांचरात्रं वेदाः पाशुपतं तथा।
एतानि मानभुतानि नोपहन्यानि युक्तिभिः।।
वेदः प्रधानं सर्वेषां सांख्यादीनां महामुने।
वेदानुसरणादेषां प्रामाण्यमिति निश्चितम्।।
पांचरात्रस्य सांख्यस्य योगस्य च तथा मुने।
वेदैकदेशवर्तित्वं शैवं वेदमयं मतम्।।
वेदैकदेशवर्तिभ्यः सांख्यादिभ्यो महामुने।
सर्ववेदानुसारित्वाच्छैवतन्त्रं विशिष्यते।।
शैवतन्त्रमिति प्रोक्तं सिद्धान्ताख्यं शिवोदितम्।
सर्ववेदार्थरूपत्वात् प्रामाण्यं वेदवत् सदा।।३-८।।

हे अगस्त्या, अनेक ऋषींनी रुचिभेदानुसार सांगितलेले, भिन्न भिन्न अर्थ प्रतिपादन करणारे आणि भिन्न आचारांनी युक्त अनेक सिद्धान्त प्रसिद्ध आहेत. सांख्यशास्त्र, योगशास्त्र, पांचरात्र, पाशुपतशास्त्र आणि पूर्वमीमांसाशास्त्र हे सर्व वेदांनी प्रमाणित केलेले असल्यामुळे त्याचे युक्तिवादाने खंडन केले जाऊ नये. सांख्यादी सहाही शास्त्रांना वेद आधारभूत आहेत. वेद हे मुख्य प्रमाण आणि शास्त्रे ही उपप्रमाण होत. पांचरात्र, सांख्य, योग ही शास्त्रे वेदांच्या एखाद्याच भागाला मानतात. पण शैवसिद्धान्त मात्र संपूर्ण वेदाला मानणारे मत आहे. त्यामुळे वेदाला अंशतः मानणाऱ्या शास्त्रांपेक्षा सर्व वेदांना अनुसरणारा शैवसिद्धान्त हा सर्व शास्त्रांमध्ये अग्रगण्य मानला जातो. हे शास्त्र शिवाने उपदेशिलेले असून ते शैवतंत्र, सिद्धान्त या नावाने ओळखले जाते. हे शास्त्र सर्व वेदांचा अर्थ प्रतिपादन करते, म्हणून ते वेदांइतकेच प्रमाणभूत आहे.

आगमा बहुधा प्रोक्ताः शिवेन परमात्मना।
शैवं पाशुपतं सोमं लाकुलं चेति भेदतः।।
तेषु शैवं चतुर्भेदं तन्त्रं सर्वविनिश्चितम्।
वामं च दक्षिणं चैव मिश्रं सिद्धान्तसंज्ञकम्।।
शक्तिप्रधानं वामाख्यं दक्षिणं भैरवात्मकम्।
सप्तमातृपरं मिश्रं सिद्धान्तं वेदसंमतम्।।
वेदधर्माभियायित्वात् सिद्धान्ताख्यः शिवागमः।
वेदबाह्यविरोधित्वाद् वेदसंमत उच्यते।।
वेदसिद्धान्तयोरैक्यमेकार्थप्रतिपादनात्।
प्रामाण्यं सदृशं ज्ञेयं पण्डितैरेतयोः सदा।।९-१३।।

सर्वज्ञ परशिवाने सांगितलेल्या अनेक आगमांचे शैव, पाशुपत, सोम आणि लाकुल असे चार भेद आहेत. शैवागमांचे वाम, दक्षिण, मिश्र आणि सिद्धान्त असे चार भेद मानले जातात. वाम शैवतंत्र शक्तीची उपासना करते, दक्षिण शैवतंत्र भैरवाची, मिश्र शैवतंत्र सप्तमातृकांची आणि सिद्धान्त शैवतंत्र शिवाची उपासना करते.

सिद्धान्त शैवतंत्र हे वेदानुसारी असून अन्य तीन तंत्रे वेदानुसारी नाहीत. सिद्धान्तशास्त्र वेदोक्त धर्माचे प्रतिपादक असून वेदविरोधी सिद्धान्तांना विरोध करते. म्हणून हे शास्त्र वेदसंमत आहे. वेद आणि सिद्धान्त या शास्त्रांत एकाच विषयाचे प्रतिपादन असल्यामुळे त्यांच्यात एकत्व आहे. म्हणून विद्वान वेदांइतकेच सिद्धान्त-आगमांना प्रमाण मानतात.

सिद्धान्ताख्ये महातन्त्रे कामिकाद्ये शिवोदिते।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम्।।
विद्यायां शिवरूपायां विशेषाद् रमणं यतः।
तस्मादेते महाभागा वीरशैवा इति स्मृताः।।
वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका।
तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः।।
विद्यायां रमते यस्मान्मायां हेयां श्ववद् रहेत्।
अनेनैव निरुक्तेन वीरमाहेश्वरः स्मृतः।।
वेदान्तजन्यं यज्ज्ञानं विद्येति परिकीर्त्यते।
विद्यायां रमते तस्यां वीर इत्यभिधीयते।।१४-१८।।

शिवाने उपदेशिलेल्या कामिकागमापासून ते वातुलागमापर्यंत अशा अठ्ठावीस शिवगमांना 'सिद्धान्त' नामक महातंत्र असे नाव आहे. या महातंत्राच्या उत्तरभागात श्रेष्ठ अशा वीरशैवमताचे प्रतिपादन केलेले आहे. शिवस्वरूपी विद्येत जे विशेषत्वाने रमतात, रस घेतात अशा महाभागांना 'वीरशैव' असे म्हणतात. शिव आणि जीव यांच्या ऐक्याचा बोध करून देणारी विद्या असा 'वी' या शब्दाचा अर्थ असून 'र' याचा अर्थ रमणारे असा आहे. या विद्येत जे रममाण होतात ते वीरशैव होत. शिवजीवैक्यबोधक विद्येत जे रममाण होतात आणि संसाररूपी मायेला श्वानासारखे तुच्छ समजतात, तिचा त्याग करतात त्यांना 'वीरमाहेश्वर' असे संबोधिले जाते. विद्या म्हणजे उपनिषदांच्या अध्ययनामुळे प्राप्त होणारे शिव-जीवाच्या ऐक्याचे ज्ञान. या विद्येत जे रमतात ते 'वीर' होत.

शैवैर्माहेश्वरैश्चैव कार्यमन्तर्बहिःक्रमात्।
शिवो महेश्वरश्चेति नात्यन्तमिह भिद्यते।।
यथा तथा न भिद्यन्ते शैवा माहेश्वरा अपि।
शिवाश्रितेषु ते शैवा ज्ञानयज्ञरता नराः।।
माहेश्वराः समाख्याताः कर्मयज्ञरता भुवि।
तस्मादभ्यन्तरे कुर्युः शैवा माहेश्वरा बहिः।।
वीरशैवास्तु षड्भेदाः स्थलधर्मविभेदतः।
भक्तादिव्यवहारेण प्रोच्यन्ते शास्त्रपारगैः।।
शास्त्रं तु वीरशैवानां षड्विधं स्थलभेदतः।
धर्मभेदसमायोगाद अधिकारिविभेदतः।।१९-२३।।

वीरशैव आणि वीरमाहेश्वर या दोघांच्या क्रियेत थोडा भेद आहे. वीरशैव आंतरक्रियेवर भर देतात तर वीरमाहेश्वर बाह्यक्रियेवर भर देतात. परंतु त्यांचे लिंगार्चन एकच असते. उपासकांची नावे भिन्न असली तरी त्यांच्या उपासनेचे लक्ष्य एकच आहे. शिव आणि महेश्वर यांच्यात जसा भेद नाही तसा वीरशैव आणि वीरमाहेश्वर यांच्यात भेद नाही. वीरशैव हे ज्ञानयज्ञ करणारे तर वीरमाहेश्वर हे कर्मयज्ञ करणारे आहेत. म्हणून वीरशैवांनी अंतरंगात आणि वीरमाहेश्वरांनी बहिःरंगात पूजा करावी, असे सांगितले आहे. स्थल, आचरण आणि लिंगार्चन यांच्या अनुरोधाने वीरशैवांचे सहा भेद होतात. वीरशैवशास्त्र अन्य शास्त्रांपेक्षा वैशिष्ट्यपूर्ण आहे. धर्माचरण, अधिकार इत्यादी भेदांमुळे वीरशैव मतात प्रमुख सहा स्थले मानली जातात. त्यांना षट्स्थल म्हणतात.

**आदौ भक्तस्थलं प्रोक्तं ततो माहेश्वरस्थलम्।**
**प्रसादिस्थलमन्यत्तु प्राणलिंगिस्थलं ततः।।**
**शरणस्थलमाख्यातं षष्ठमैक्यस्थलं मतम्।**
**भक्तस्थलं प्रवक्ष्यामि प्रथमं कलशोद्भव।।२४-२५।।**

ही षट्स्थले पुढीलप्रमाणे आहेत. पहिले स्थल म्हणजे भक्तस्थल, दुसरे माहेश्वरस्थल, तिसरे प्रसादिस्थल, चौथे प्राणलिंगीस्थल, पाचवे शरणस्थल आणि सहावे ऐक्यस्थल. या सहा स्थलांपैकी मी तुला भक्तस्थलाची उपस्थले यांच्याविषयी उपदेश करणार आहे, असे जगद्गुरू रेणुकाचार्य अगस्त्य महर्षींना म्हणाले.

या ठिकाणी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाची पूर्वपीठिका पूर्ण झाली आहे. यापुढे प्रत्यक्ष विषयाला, षट्स्थलांच्या विवेचनाला आरंभ होणार आहे. त्याविषयी पुढील भागात विचार करणार आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।



# भाग १ : अंगषट्स्थलांतर्गत भक्तस्थल

आशीर्वचन पहिले

## पिंडस्थल– १

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।
विश्ववंद्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगदगुरुम।।

**श्री**काशीज्ञानसिंहासनाचे आद्यजगद्गुरू विश्वाराध्यांपासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत चालत आलेल्या गुरुपरंपरेला अनंत प्रणिपात समर्पित करून आजच्या धर्मसभेत उपस्थित असलेले समस्त शिवाचार्य, अनुष्ठान समितीचे सर्व पदाधिकारी आणि जिज्ञासू सद्भक्तांनो,

सोलापूरच्या या पवित्र भूमीत, श्रीसिद्धरामेश्वरांच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या या सिद्धेश्वर मंदिरात काशीमहास्वामीजीचे पहिले श्रावणमास तपोनुष्ठान आजपासून सुरू झाले आहे. सायंकाळी शिवयोगी शिवाचार्यरचित 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या वीरशैवांच्या धर्मग्रंथावरील आशीर्वचनालाही आता आरंभ होत आहे. जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्त्यमुनींना निमित्त करून, सर्व मानवांच्या कल्याणासाठी जो उपदेश केला आहे तोच 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा धर्मग्रंथ होय. हा ग्रंथ म्हणजे एक उत्तम रत्नच होय. वेदागमांत जो वीरशैवसिद्धान्त प्रतिपादन केलेला आहे त्याचे सार या ग्रंथात प्रकट झाले आहे.

वेद आणि आगम हे भारतीयांचे प्राचीन साहित्य आहे. परशिवाच्या उच्छ्वासातून वेद निर्माण झाले आणि शिवाच्या ईशान या पाचव्या मुखातून अठ्ठावीस शैवागम निर्माण झाले. वेदकालापासून वीरशैवसिद्धान्त प्रचलित आहे. जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्त्य महर्षींना या सिद्धान्ताचा उपदेश केला. तोच उपदेश साररूपाने शिवयोगी शिवाचार्यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथात संग्रहित केला आहे. वीरशैवांच्या षट्स्थल सिद्धान्ताचे, त्यातील एकशे एक उपस्थलांचे तपशिलवार वर्णन या ग्रंथात केलेले आहे. भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य या षट्स्थलातील पहिले स्थल आहे भक्तस्थल. अगस्त्य ऋषींनी 'षटस्थलाचा उपदेश करा' अशी प्रार्थना केल्यावर जगद्गुरू रेणुकाचार्यांनी त्यांना भक्तस्थलाची उपस्थले सांगितली.

तदवान्तरभेदांश्च समाहितमनाः शृणु।
शैवी भक्तिः समुत्पन्ना यस्यासौ भक्त उच्यते।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.२६)

हे अगस्त्या, भक्तस्थलातील पिंडस्थल व त्याची उपस्थले मी तुला स्पष्ट करून सांगणार आहे, ती लक्षपूर्वक ऐक. ज्याच्या मनात शिवाविषयी उत्कट भक्ती उत्पन्न झालेली आहे, त्याला शिवभक्त म्हणतात. भक्ताने आचरावेत अशा धर्माचरणाचे प्रतिपादन केलेले स्थल म्हणजे भक्तस्थल होय.

तस्यानुष्ठेयधर्माणामुक्तिर्भक्तस्थलं मतम्।
अवान्तरस्थलान्यत्र प्राहुः पंचदशोत्तमाः।।

पिण्डता पिण्डविज्ञानं संसारगुणहेयता।
दीक्षा लिंगधृतिश्चैव विभूतेरपि धारणम्।।
रुद्राक्षधारणं पश्चात् पंचाक्षरजपस्तथा।
भक्तमार्गक्रिया चैव गुरोर्लिंगस्य चार्चनम्।
जंगमस्य तथा ह्येषां प्रसादस्वीकृतिस्तथा।
अत्र दानत्रयं प्रोक्तं सोपाधिनिरुपाधिकम्।।
सहजं चेति निर्दिष्टं समस्तागमपारगैः।
एतानि शिवभक्तस्य कर्तव्यानि प्रयत्नतः।। ५.२७-३१।।

आचार्यांनी भक्तस्थलाचे पंधरा पोटभेद सांगितले आहेत, ते असेः-

१. पिंडस्थल, २. पिंडज्ञानस्थल, ३. संसारहेयस्थल, ४.गुरुकारुण्यस्थल, ५. लिंगधारणस्थल, ६. विभूतिधारणस्थल, ७. रुद्राक्षधारणस्थल, ८. पंचाक्षरजपस्थल, ९. भक्तमार्गक्रियास्थल, १०. उभयस्थल, ११. त्रिविधसंपत्तिस्थल, १२. चतुर्विधसारायस्थल, १३. सोपाधिदानस्थल, १४. निरुपाधिदानस्थल, १५. सहजदानस्थल.

सर्व आगमांत पारंगत असलेल्या विद्वानांनी सांगितल्याप्रमाणे या पंधरा उपस्थलांत वर्णिल्याप्रमाणे शिवभक्तांनी आचरण केले पाहिजे, असे ज. रेणुकाचार्य सांगतात.

भक्त कोणाला म्हणावे? तर 'शैवी भक्तिः समुत्पन्ना यस्यासौ भक्त उच्यते।' (श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.२६) ज्याचे नितांत प्रेम शिवावर असते तो भक्त होय. प्रत्येक मनुष्याच्या मनात प्रेम असतेच. परंतु त्याच्या प्रेमाचा सर्व रोख सांसारिक वस्तूंकडे आणि व्यक्तींकडे असतो, ईश्वराकडे नसतो. म्हणून त्याला सांसारिक म्हटले जाते आणि जन्ममृत्यूच्या फेऱ्यात तो सदैव भ्रमत असतो. आपण जर संसारावरील प्रेम ईश्वराकडे वळवू शकलो तर आपण भक्त या संज्ञेला पात्र होऊ. उत्तम भक्त होण्यासाठी मनुष्याच्या अंगी पंधरा सद्गुण असावे लागतात. हे पंधरा सद्गुणच पंधरा उपस्थलांच्या रूपाने भक्तस्थलात सांगितले आहेत. पंधरा उपस्थलांत जे पहिले स्थल आहे, त्याचे नाव आहे पिंडस्थल. भक्त होण्याची ही पहिली पायरी, पहिली योग्यता. लहान मुलाला शाळेत दाखल करून घेताना त्याची जन्मतारीख, त्याचे वय तपासले जाते आणि मग त्याला प्रवेश देण्यात येतो. त्याप्रमाणे भक्तस्थलात प्रवेश करण्यासाठी अंतःकरणशुद्धी ही पहिली योग्यता होय. याविषयी सांगताना जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणतातः-

बहुजन्मकृतैः पुण्यैः प्रक्षीणे पापपंजरे।
शुद्धान्तःकरणो देही पिण्डशब्देन गीयते।। ५.३१।।

या श्लोकातील प्रत्येक शब्द अर्थपूर्ण आहे. बहुजन्म म्हणजे किती जन्म? सामान्य मनुष्याला आपण किती जन्म घेतले याची जाणीव नसते. खरेतर तो असंख्य जन्मांतून फिरत आलेला असतो. मनुष्यजन्म ही जन्मांतरातली शेवटची योनी आहे. मनुष्यजन्म घेण्यासाठी जीवाला चौऱ्यांशी लक्ष योनींतून भ्रमण करावे लागते, असे शास्त्रकार म्हणतात. अक्कमहादेवीने आपल्या एका वचनात असे म्हटले आहे की, एक नव्हे, दोन नव्हे तर चौऱ्यांशी लक्ष योनींमधून फिरत फिरत मी मनुष्यजन्मात आले आहे.

उद्‌भिज, स्वेदज, अंडज आणि जरायुज असे जन्माचे प्रकार शास्त्रकार मानतात. भूमी भेदून वर उगवणारी वनस्पतिसृष्टी म्हणे उद्‌भिज होय. घामातून उत्पन्न होणारे जीवजंतू म्हणजे स्वेदज होत. अंडज म्हणजे अंड्यातून उत्पन्न होणारे सर्पादी जीवजंतू आणि पक्षी. मातेच्या गर्भातून जरेसहित जन्म घेणारे पशु-मनुष्यादी प्राणी हे जरायुज होत. अशी जीवसृष्टी विविध प्रकारची आहे. या सर्व जन्मांतून भ्रमण करीत जीव मनुष्यजन्मात आलेला असतो. भलेही त्याचे त्याला स्मरण नसेल. पूर्वजन्मातले शरीर त्याने सोडलेले असते. परंतु संस्कार मात्र सोबत आणलेले असतात.

मनुष्याच्या ठिकाणी प्रत्येक प्राण्याची, जीवाची लक्षणे आढळतात. मनुष्य मांजराचा आवाज काढू शकतो, परंतु मांजर मात्र मनुष्याचा आवाज काढू शकत नाही. प्राणी आपला विशिष्ट आहारच भक्षण करतात. मनुष्य मात्र सर्व प्रकारचे आहार भक्षण करू शकतो, म्हणून तो सर्वाहारी आहे. शाकाहारी प्राणी मांस खात नाहीत. आणि मांसाहारी प्राणी कधीही शाकाहारी होत नाहीत. मनुष्य मात्र दोन्ही प्रकारचे आहार भक्षण करू शकतो. त्याच्या समोर तुम्ही काहीही ठेवा, तो सोडणारच नाही. मनुष्य नेमका कोणता आहार भक्षण करतो, हा संशोधनाचा विषय आहे.

याचा अर्थ एवढाच की, जीवात्मा सर्व शाकाहारी शरीरांत आणि सर्व मांसाहारी शरीरांत राहून आता मनुष्यजन्मात आला आहे. त्याने ती शरीरे सोडली, परंतु संस्कार मात्र सोबत आहेत. सगळ्या जीवजंतूंना, चौऱ्यांशी लक्ष योनींना एकत्र पाहायचे असले तर एक मनुष्य पाहिला की पुरे! सर्व जन्मांत मनुष्यजन्म हा श्रेष्ठ आणि अंतिम जन्म मानला जातो. मनुष्यजन्म म्हणजे मुक्तीचे महाद्वार होय. म्हणून ज. रेणुकाचार्य म्हणतात, अनेक जन्म पार करून तू शेवटी या मनुष्यजन्मात आला आहेस, तेव्हा निषिद्ध कर्मे न करता केवळ विहित कर्मे कर. जी कर्मे करा असे शास्त्र सांगते ते विहित कर्म होय आणि जे कर्म करू नका असे शास्त्र सांगते ते निषिद्ध कर्म होय. विहित कर्मामुळे पुण्यसंचय होतो तर निषिद्ध कर्मामुळे मनुष्य पापाचा धनी होतो. तुम्हाला पुण्य हवे की पाप? सर्वजण म्हणतात की महाराज, आम्हाला पुण्य करायचे आहे, त्यासाठीच आम्ही लिंगपूजा करतो, प्रवचन ऐकायला येतो, पुण्य हवे असे म्हणणारे खूप आहेत, परंतु पुण्यकर्म करणारे मात्र कोणी नाही.

**पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यं नेच्छन्ति मानवाः।**
**पापस्य फलं नेच्छन्ति पापं कुर्वन्ति यत्नतः।।**

काही माणसे 'सुख हवे सुख हवे' असा घोष करतात, परंतु सुख देणारे धर्माचरण मात्र अजिबात करत नाहीत. पुण्यकर्म न करता त्यांना सुख हवे असते. ते कसे मिळणार? काही लोक आम्हाला दुःख नको असा घोष करतात, परंतु दुःखाचे कारण असे पापकर्म मात्र बिनधास्त करीत असतात. मग दुःख कसे नाहीसे होईल?

अंतःकरणशुद्धीसाठी निषिद्ध कर्माचा त्याग केला पाहिजे आणि विहित कर्माचे निष्ठापूर्वक आचरण केले पाहिजे. पुण्य आणि पाप ह्या काही दिसणाऱ्या गोष्टी नाहीत. परंतु मनुष्य सुख भोगतो की दुःख भोगतो यावरून त्याने पुण्य केले आहे की पाप केले आहे याचे अनुमान करता येते. पुण्य-पापाची व्याख्या व्यासांनी केली आहे.

**परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम्।**

दुसऱ्यांना निरपेक्षपणे मदत करणे ह्याला पुण्य म्हणतात आणि दुसऱ्याला दुःख देणे याला पाप म्हणतात. किती सोपी व्याख्या केली आहे व्यासांनी! पुण्य मिळवायचे असेल तर काय करावे आणि पाप नको असेल तर काय

टाळावे, हे अतिशय सोप्या शब्दांत त्यांनी स्पष्ट केले आहे. आपल्याकडून लोकांना मदत होत असेल तर समजावे की पुण्यकर्म घडत आहे. आपल्यामुळे इतरांना वेदना होत असतील तर समजावे की पापकर्मे घडत आहे.

अनेक जन्मांत पुण्यकर्मे करून करून जीवात्म्याचे अंत:करण शुद्ध होते. त्याचे मनोमळ नाहीसे होतात. अशा शुद्ध अंत:करण असलेल्या जीवाला इथे 'पिंड' असे म्हटले आहे. अंत:करण प्रत्येकालाच असते. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांना 'अंत:करण' असे म्हणतात. अंत:करण प्रत्येकाला असले तरी काहीचे अंत:करण शुद्ध असते तर काहींचे अशुद्ध असते. अशुद्धाला शुद्ध करणे आपल्या हाती आहे. जेव्हा आपण सकाळी घराबाहेर पडतो तेव्हा अंगावरचे कपडे स्वच्छ असतात. रात्री आपण जेव्हा परत येतो तेव्हा अंगावरच कपडे मळलेले असतात. आपल्याला त्याचे काही वाटत नाही. कारण घरी कोण आपले कपडे पाहतो? ते कोणाला दिसतात? असे आपल्याला वाटते. बाहेर जाताना मात्र कपडे स्वच्छ असले पाहिजेत. कारण बाहेर लोक पाहतात. याप्रमाणेच लोकांना दिसणारे आपले शरीर आपण स्वच्छ ठेवतो, परंतु जे लोकांना दिसत नाही त्या मनाची मात्र अजिबात स्वच्छता करत नाही.

माणसाचे मन मळत मळत इतके मळले आहे की त्या मनापासून चांगला संकल्पदेखील उत्पन्न होत नाही. संकल्प–विकल्प हा मनाचा धर्म आहे. कोणाचे वाईट व्हावे असा विचार (म्हणजे संकल्प) जर आपल्या मनात निर्माण होत असेल तर समजावे की आपले मन मलिन झाले आहे. सामान्यत: इतरांचा उत्कर्ष माणसाला पाहवत नाही. परंतु ही भावना तो समोरच्याला दिसू देत नाही. अशुद्ध संकल्पनामुळे मनुष्य दुसऱ्याचे नुकसान तर करतोच परंतु आपलेही नुकसान करून घेतो, म्हणून आपल्या मनात सदैव शुद्ध संकल्प, शुभ संकल्प असला पाहिजे. त्यामुळे आपणही आनंदित होतो आणि इतरांनाही आनंदित करतो. परंतु सामान्य माणसाला याची जाणीव नसते. दुसऱ्यांच्या कुटाळक्या करण्यात, त्यांचे वाईट चिंतन करण्यात त्याला स्वारस्य वाटते. असा मलिन मनाचा मनुष्य भक्त कसा होऊ शकेल?

मन शुद्ध हवे तशी बुद्धीही असली पाहिजे. बुद्धी ही निर्णयशक्ती आहे. मनाचा कोणताही संकल्प पक्का होण्यासाठी बुद्धीचा निर्णय लागतो. जर एखाद्याच्या मनात चोरी करण्याचा संकल्प उत्पन्न झाला तर मन बुद्धीला विचारते की ते कर्म करू की नको? बुद्धी शुद्ध असेल तर ती मनाला त्या संकल्पपासून परावृत्त करते. सर्वच चोर आहेत, म्हणून चोरी करायला हरकत नाही असा निर्णय जर बुद्धीने दिला तर ती शुद्ध नाही असे समजावे.

अंत:करणात चित्त हे चिंतन करणारे तत्त्वदेखील आहे. चिंतनशक्ती प्रत्येकाजवळ असते. तुम्ही कुठेही, कधीही गप्प बसू शकत नाही. वरवर पाहताना गप्प बसलेले दिसाल, परंतु तुमच्या मनात नाना प्रकारचे विचारमंथन चाललेले असते. घरात काय चालले असेल? दुकानात काय घडत असेल? तुम्ही जी वस्तू सोडून दूर जाल ती वस्तू तुमचा असा पाठलाग करीत असते. ज्या दिवशी उपवास असतो त्या दिवशी रोजच्या पेक्षा जास्त जेवणाची आठवण येत असते. 'आज माझा उपवास आहे' असे सारखे लोकांना सांगणे म्हणजे एक प्रकारे जेवणाची आठवण करणेच होय. फराळाच्या निमित्ताने रोजच्या जेवणापेक्षाही माणसे जास्त खातात. म्हणजे जी वस्तू तुम्ही सोडता तिचेच चिंतन तुमचे चित्त करीत असते. चित्त जर शुद्ध असेल तरच ते ईश्वराचे चिंतन करू शकेल. चित्त शुद्ध नसेल तर ते संसाराचे, वाईट गोष्टींचेच चिंतन करील. आपले चित्त शुद्ध आहे की नाही हे तपासून पाहता येते. जर तुमच्या चित्तात ईश्वराचे चिंतन होत असेल, शास्त्रविचाराचे चिंतन होत असेल, इथून घरी गेल्यावरही महास्वामीजींच्या प्रवचनाचे चिंतन होत असेल तर समजा की तुमचे चित्त शुद्ध आहे.

अंत:करणाचा एक भाग अहंकार आहे. अहंकार म्हणजे अभिमान, मीपणा. 'मी हे केले, मी ते केले' असे मनुष्य सांगत फिरतो, तोच अहंकार होय. अहंकारदेखील शुद्ध आणि अशुद्ध असा दोन प्रकारचा असतो. 'मी देह आहे, अमुक व्यक्ती आहे' अशा भावनेने तुमचे वर्तन होत असेल तर तो अशुद्ध अहंकार होय. परंतु गुरुपदेशानंतर 'मी शिव आहे, मी आत्मा आहे' अशा भावनेने तुमचे वर्तन होत असेल तर तो शुद्ध अहंकार होय. अहंकाराचा आश्रय अशुद्ध असेल तर तो अशुद्ध होतो. त्याचा आश्रय शुद्ध असेल तर तो शुद्ध होतो. प्रपंचाविषयी, शरीराविषयी अभिमान असेल तर तो अशुद्ध, अपवित्र अहंकार आहे. शिवाविषयी, परमार्थाविषयी अभिमान असेल तर तो शुद्ध, पवित्र अहंकार आहे. म्हणून ज. रेणुकाचार्य सांगतात:-

**बहुजन्मकृतैः पुण्यैः प्रक्षीणे पापपंजरे।**
**शुद्धान्तःकरणो देही पिण्डशब्देन गीयते।।**

अशा रीतीने प्रत्येक जन्मात शास्त्रविहित कर्म केल्यामुळे ज्याचे मन शुद्ध झाले आहे, ज्याचे चित्त शुद्ध झाले आहे, ज्याची बुद्धी आणि अंहकार शुद्ध झाला आहे अशा जीवात्म्याला 'पिंड' असे नाव आहे. देवाकडे जायचे असेल तर शुद्धतेची नितांत आवश्यकता आहे. लिंगपूजा करताना शुचिर्भूत होऊन, सोवळे नेसून तुम्ही पुजा करता. त्यावेळी तुमचे बहिरंग शुद्ध असते, त्याप्रमाणेच तुमचे अंतरंगही शुद्ध असले पाहिजे. अंग मळले तर तुम्ही साबण लावून ते स्वच्छ करता, पण मन मळले तर ते स्वच्छ करायला कोणते साबण वापरता? टी.व्ही. वर साबणाच्या अनेक जाहिराती तुम्ही पाहता. ते सर्व साबण शरीर स्वच्छ करणारे आहेत. मन स्वच्छ करणारा साबण मात्र जाहिरातीत दाखवला जात नाही. मन स्वच्छ करणारा साबण इथे आहे. या सत्संगात! जो मनुष्य रोज सत्संग करतो, सद्ग्रंथाचे अध्ययन करतो, संत-सज्जनांच्या संगतीत राहतो त्याचे अंत:करण निश्चित शुद्ध होते. सत्संग करून, सत्कर्मे करून ज्याचे अंत:करण परिशुद्ध झालेले असते. ज्याचे सर्व पाप जळून गेलेले असते असा जीवात्माच पिंड आहे. भक्तस्थलाची ही पहिली पायरी आहे. पहिली पायरी चढल्यावरच दुसऱ्या पायरीवर पाय ठेवता येतो. भक्त होण्यासाठी ही पहिली अट आहे. गळ्यात इष्टलिंग धारण करणे, त्याची मन:पूर्वक पूजा करणे, गुरुमंत्राचा जप करणे अशा शारीरिक, मानसिक आणि वाचिक क्रियेने अंत:करण शुद्ध होते. मग तो साधा मनुष्य राहत नाही तर 'पिंडस्थली' होतो. भक्तमार्गावरच्या पहिल्या पायरीवर त्याने पाऊल ठेवलेले असते.

असे हे षट्स्थलातील एकशे एक स्थलांमधील पहिले स्थल होय. प्रयत्न केला तर कोणताही मनुष्य या स्थलात प्रवेश करू शकतो. या स्थलाची अधिक चर्चा आपण उद्याच्या आशीर्वचनात करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
१६ जुलै १९९०

## पिंडस्थल- २

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालपासून आपण भक्तस्थलातील पहिल्या उपस्थलाची-पिंडस्थलाची चर्चा करीत आहोत. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार या चारही अंत:करण वृत्ती जेव्हा शुद्ध होतात तेव्हा त्या जीवाला 'पिंड' असे म्हणतात, हे आपण काल पाहिले. परमेश्वराने प्रत्येकाला तीन करणे (साधने) दिली आहेत, शरीर, वाणी आणि अंत:करण ही तीन करणे होत. या तिन्ही करणांकडून शुद्ध व्यवहार घडायला हवा. जर आपल्या शरीराकडून सत्कर्म घडले नाही तर दुर्लभ असा मनुष्यजन्म पुन्हा आपल्याला मिळणार नाही. मानवजन्म मिळाल्यानंतर प्रत्येकाने किमान माणसासारखे तरी वागले पाहिजे. दिसायाला सगळे माणसासारखे दिसतात, परंतु सगळीच माणसे असतात असे नव्हे. बहुतेक सगळे मानवदेहधारी पशूच असतात. 'मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति' असे एका सुभाषितकाराने म्हटले आहे. मनुष्याच्या आचार-विचारावरून तो मनुष्य आहे की पशू, याचा निर्णय करता येतो. एखादा नारळ दुकानातून खरेदी करताना आपण ते दहावेळा वाजवून, हलवून घेतो. त्यात पाणी आहे की नाही, खोबरे आहे की नाही हे तपासून घेतो. मडके खरेदी करताना तेही वाजवून खात्री करून घेतो. त्याप्रमाणे आपला अनुग्रह करण्याआधी ईश्वरदेखील आपल्याला तपासून घेत असतो. हा खरेच मनुष्य आहे की पशू? याचे अंत:करण शुद्ध आहे की अशुद्ध? ईश्वरी अनुग्रह हवा असेल तर शरीर, वाणी आणि अंत:करण हे तिन्ही शुद्ध असावे लागतात.

शरीरशुद्धी कशी करावी हे तुम्हाला चांगले माहीत आहे. वाणी शुद्ध करण्यासाठी ईश्वराचा नामजप करावा लागतो. ईश्वर अमृतरूप आहे. त्याला जन्म-मरण नाही. अशा ईश्वराचे नाव सतत घेतल्यामुळे आपली वाणी पवित्र आणि अमृतमय होते. जी वाणी देवाचे नाव कधीही घेत नाही ती वाणी प्रभावशून्य असते. देवाचे नाव घेण्यासाठी काही पैसाअडका लागत नाही. तुमची नित्याची कामे करता करता तुम्ही सहज देवाचे नाव घेऊ शकता. एका आसनावर बसून तुम्ही नामजप, मंत्रजप करू शकाल तर फारच चांगले. परंतु तुमच्याकडे तेवढा वेळ नसतो. संसारासाठी भरपूर वेळ असतो, परमार्थासाठी मुळीच नसतो.

दीक्षा घेणारा भक्त गुरूला विचारतो की 'महाराज, तुम्ही मंत्र देणार तो किती वेळा जपावा लागेल?' मंत्रजप हा दीक्षा घेणाऱ्यांच्या पुढील फार मोठा प्रश्न असतो. जर गुरूने सांगितले की 'दहा हजार जप कारावा लागेल' तर तो शिष्य म्हणतो, 'यावर्षी नको, पुढच्या वर्षी बघू.' जप किती करावा? शास्त्र सांगते की जेवढे श्वास तुम्ही, घेता आणि सोडता तेव्ढा जप रोज केला पाहिजे. आपण रोज किती श्वास घेतो हे तुम्हाला माहीत आहे? नाही, मिळतील तेवढे श्वास घ्यायचे अन् सोडायचे एवढेच तुम्हाला माहीत असणार. झोपेत देखील तुमचा श्वासोच्छ्वास सुरू असतो. श्वास सरला की आपण संपलो! मग आपल्याला कोणी घरात ठेवून घेत नाही. स्मशानात नेऊन आपली विल्हेवाट लावतात. प्राण हा मुख्य आहे. श्वास चालू आहे तोवर आपला प्राण असतो.

एका राजाची आणि त्याच्या हत्तीची ही कथा आहे. तो हत्ती राजाला अत्यंत प्रिय होता. त्याच्यावर बसून राजाची स्वारी निघाली. एका गावात हत्ती आजारी पडला, तेव्हा राजाला चिंता वाटली. हत्तीला परत नेणे शक्य नव्हते, म्हणून सर्व गावकऱ्यांना बोलावून राजाने सांगितले,

''हा माझा अत्यंत प्रिय हत्ती आहे. तुम्ही सर्वांनी आळीपाळीने याच्यावर नजर ठेवा. याला वेळच्या वेळी चारापाणी द्या आणि मला रोज ज्याची पाळी असेल त्याने राजधानीत येऊन या हत्तीची वार्ता कळवली पाहिजे. हत्ती मेला अशी बातमी जो आणेल त्याचा मी शिरच्छेद करीन.''

राजा निघून गेला आणि गावकरी चिंतेत पडले. प्रत्येक कुटुंबाने एकेक दिवस हत्तीची निगा राखावी असे ठरले. त्याप्रमाणे रोज एक कुटुंब हत्तीची देखभाल करून संध्याकाळी राजधानीत जाऊन हत्तीच्या प्रकृतीची बातमी सांगत असे. बरेच दिवस हा प्रकार चालू होता. एके दिवशी हत्ती मेला. त्या दिवशी ज्या कुटुंबाची पाळी होती ते कुटुंब घाबरले, रडत बसले. सगळे गावकरी गोळा झाले. चिंतेत पडले. आता राजाला हत्तीच्या मृत्यूची बातमी कोणी कळवायची? कारण जो ही वार्ता सांगेल त्याचा शिरच्छेद होणार हे नक्की. त्या कुटुंबाची वाताहत होणार म्हणून सर्व गावकरी रडत बसले.

त्या वाटेने एक संत चालले होते. त्यांनी हा हलकल्लोळ पाहिला. सर्व गाव रडत आहे हे पाहून त्यांना आश्चर्य वाटले. कारण एखाद्या घरात जर मृत्यू झाला तर त्या कुटुंबातली माणसेच फक्त रडतात, बाकीची माणसे कोण कसे रडते हे पाहण्यासाठी आलेली असतात. पण इथे प्रकार वेगळा होता. म्हणून संताने या प्रकाराविषयी विचारले, तेव्हा राजा–हत्ती–त्याचा मृत्यू–त्याची बातमी–शिरच्छेद ही सर्व कथा संताला समजली. त्याने सर्वांना धीर दिला आणि म्हणाला,

''घाबरू नका, रडू नका. मी सांगतो राजाला ही बातमी कशी सांगायची ते. हत्ती मेला हे त्याला सांगायचे नाही. त्याला सांगायचे की हत्ती चांगला आहे. पण तो श्वास घेत नाही, सोंड हलवत नाही, काही खात नाही, काही पीत नाही. बस्स, एवढेच राजाला सांगा. तो तुम्हाला फासावर लटकवणार नाही.''

त्याप्रमाणे ज्याची पाळी होती तो कुटुंबप्रमुख राजधानीत राजाकडे गेला. राजाने विचारले, ''काय, हत्ती चांगला आहे ना?''

''होय महाराज, पण.....''

''महाराज, हत्ती चांगला आहे. पण तो श्वास घेत नाही, काही खात नाही, हालचाल करत नाही.''

''म्हणजे तो मेला की काय?'' राजाने विचारले

''ते माहीत नाही. तो श्वास घेत नाही एवढे खरे.''

राजाने काय ओळखायचे ते ओळखले. पण कुटुंबप्रमुखाच्या चातूर्यावर तो खूष झाला. त्याने त्याचा शिरच्छेद केला नाही. अशा प्रकारे राजक्रोधापासून ते कुटूंब बचावले.

या कथेचे तात्पर्य एवढेच की जोपर्यंत श्वास चालू असतो तोपर्यंत मनुष्य जिवंत असतो. एकदा त्याचा श्वास थांबला की त्याचे जीवनही थांबते. तुम्ही श्वास घेता म्हणजेच हवा आणि तिच्यातला प्राणवायू शोषून घेता. हवा कोणाची आहे? ती कोणी निर्माण केली आहे? तुम्ही तर नक्कीच नाही. ती परमेश्वराची आहे आणि त्यानेच निर्माण केली आहे. तुम्ही फार तर हीटर, कूलर लावून ती गरम किंवा थंड करू शकता. पंखा लावून आपल्याभोवती फिरवू शकता. एका श्वासाची किंमत किती आहे?

**आयुषः क्षण एकोऽपि न लभ्यः स्वर्णकोटिभिः।**
**स एव व्यर्थतां नेताः कालोहानिस्ततोधिकः।।**

देवाने आपल्याला शंभर वर्षाचे आयुष्य दिले आहे. या आयुष्यातला एक क्षण एवढा मोलाचा आहे की कोटी सुवर्णाशी देखील त्याची तुलना होणार नाही. आयुष्यातला गेलेला क्षण कोट्यवधी सुवर्णमुद्रा दिल्या तरी परत मिळत नाही. आयुष्य संपल्यावर एखादा अधिक क्षण हवा असेल तर तो देखील काय वाटेल ते दिले तरी मिळत नाही. एवढे मूल्यवान आयुष्य परमेश्वराने आपल्याला दिले ते त्याचे नामस्मरण करण्यासाठी परंतु आपल्या मूल्यवान आयुष्यातला थोडासा वेळदेखील आपण परमेश्वराला देऊ इच्छित नाही. '१००८ जप करायचा? हे कसे शक्य आहे? महाराज, आम्हाला इतका वेळ नाही हो. पाच वेळा, अकरा वेळा म्हणाल तर शक्य आहे' आम्ही म्हणतो की तुम्हाला एवढा जप करणे शक्य नाही तर दिवासातून तुम्ही श्वास कमी घ्या. बघा जमते का? श्वासांची संख्या थोडी तरी कमी करा.

प्रत्येक मनुष्य दिवस-रात्रीतून २१,६०० वेळा श्वासोच्छ्वास करतो. श्वासाला एक याप्रमाणे २१,६०० वेळा जप केला पाहिजे. श्वास हवा आहे, पण जप नको आहे. ईश्वाराने निर्मिलेली सृष्टी, हवा-पाणी हे सारे हवे आहे, पण ईश्वर नको आहे. मनुष्याचा सर्व व्यवहार हा असाच आहे. आईवडिलांच्या संपत्तीत सर्व मुले वाटा मागतात, तो दिला नाही तर कोर्टात जातात. स्वतःच्या स्वार्थासाठी कोर्टात जातात, परंतु म्हाताऱ्या आईबापाच्या पालनपोषणासाठी कोणी मुलगा कोर्टात गेला आहे का? आईबापाचे पालन करणारी मुले फारच कमी दिसतात. त्यातही म्हातारपणी आई आणि बापाची फारकत केली जाते. एका मुलाकडे आई तर दुसऱ्या मुलाकडे बाप. आईबाप दोनचार मुलामुलींचे पालपोषण करतात, त्यांना वाढवतात, शिक्षण देतात, मार्गाला लावतात: परंतु ते सर्वजण मिळून आई आणि बाप या दोघांचे पालनपोषण करू शकत नाहीत. ही केवढी दुर्दैवाची गोष्ट आहे!

आईवडिलांची संपत्ती हवी, परंतु आईवडील मात्र नकोत. अशीच आपल्या सर्वांची अवस्था असते. देवाने निर्मिलेली प्रत्येक वस्तू आपल्याला हवी असते, परंतु देव आणि त्याचे नाव मात्र नको असते. अंतःकरण शुद्ध नसल्याचे हे लक्षण आहे. म्हणून ज. रेणुकाचार्य म्हणतात की शरीर, वाणी आणि अंतःकरण यांची शुद्धी केली पाहिजे. शरीरशुद्धीसाठी त्यावर इष्टलिंग धारण केले पाहिजे. इष्टलिंगाला 'पवित्र' असे नाव आहे. ते धारण केले म्हणजे शरीर पवित्र होते. दुधात पाणी मिसळले तर पाणी दुग्धरूप होते. त्या पाण्यालाही दुधाचा भाव मिळतो. त्याप्रमाणे इष्टलिंगाच्या संगतीने शरीर पवित्र होते. गुरू जेव्हा मंत्रपूर्वक दीक्षा देतात तेव्हा मांसपिंड असलेल्या आपल्या शरीराचे मंत्रपिंडात रूपांतर होते. लिंगदीक्षेमुळे आणि लिंगपूजेमुळे शरीर शुद्ध होते. तसेच मंत्रजपामुळे, परमेश्वराचा नामस्मरणामुळे वाणी शुद्ध होते.

२१,६०० वेळा जप करणे अवघड आहे असे तुम्हाला वाटते. परंतु प्रयत्न केला तर ते काही कठीण नाही. उठताना, बसताना, काम करताना तुम्ही सहजपणे नामस्मरण करू शकता. तुमचे कामही होत राहील आणि नामस्मरणही चालू राहील. त्याच्यासाठी वेगळा वेळ देण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे तुमची वाणी शुद्ध होईल. वेदपठण केल्याने वाणी शुद्ध होते, असे शास्त्र सांगते. परंतु प्रचंड असे वेदवाङ्मय कोण वाचू शकणार? ते शक्य नाही, परंतु वेदपठणाचे पुण्य तर हवे होते. श्रीरुद्राचे पठण केले तर वेदपठणाचे पुण्य लाभते. तेही शक्य नसेल तर श्रीरुद्रातला आठवा अनुवाक वाचल्याने ते पुण्य लाभते. ज्याला तेही शक्य नाही त्याने आठव्या अनुवाकातील पंचाक्षरी मंत्र पठण केला तर त्यामुळेही वेदपठणाचे पुण्य लाभते. 'नमः शिवाय' हा पंचाक्षरी मंत्र जपणेही ज्याला अशक्य असेल त्याने त्या मंत्रातील 'शिव' या नामाचा जप केला तर त्याला वेदपठणाचे पुण्य लाभते. शास्त्राने आपल्यासाठी एवढी सवलत दिली आहे. शिवदास महाराजांनी म्हटले आहे:-

**शिवपाठ करा शिवपाठ करा।**
**चौऱ्यांशीचा फेरा चुके येणे।।**

वेद वाचू नका, रुद्र म्हणू नका, पंचाक्षरी जपू नका; पण निदान 'शिव शिव' तरी म्हणा. पण तेवढे म्हणण्यासाठीही आपल्याजवळ वेळ नाही. काही पक्षी सहजपणे 'शिव शिव' म्हणतात. तुमच्या घरात येणारी चिमणी 'चिव चिव' म्हणते. एखाद्या बोबड्या मुलाने 'शिव शिव' म्हणावे तशी. तुम्ही मात्र सकाळी उठल्याउठल्या 'चहा चहा' म्हणता. 'शिव' म्हणणारी चिमणी आणि 'चहा' म्हणणारे तुम्ही यात श्रेष्ठ कोणाला मानावे? उठल्याबरोबर काय म्हणावे हे देखील माणसाला कळत नाही आणि आपण सर्व प्राण्यांत श्रेष्ठ आहोत अशी शेखी मात्र तो मिरवतो.

इष्टलिंग धारण केल्याने शरीर शुद्ध होते, नामजप केल्याने वाणी शुद्ध होते आणि ईश्वरचिंतन केल्याने अंत:करण शुद्ध होते. संसारचिंतनामुळे अपवित्र झालेले मन ईश्वरचिंतनामुळे पवित्र होते. शिवध्यान हे आपल्या जीवनातील अत्यंत श्रेष्ठ कार्य आहे. एका सुभाषितकाराने कोणत्या वेळी काय करावे, सर्वप्रथम काय करावे हे एका सुभाषितात सांगितले आहे. तो म्हणतो:-

**शतं विहाय भोक्तव्यं।**

पहिल्यांदा तो सांगतो की शंभर कामे सोडून जेवण करा. किती आनंद वाटला तुम्हाला! आंघोळ नाही, पूजा नाही, ध्यान नाही, काही नाही. फार छान आहे महाराज, आम्ही उद्यापासून तसेच करू. काम करताना, उद्योगधंदा करताना मनुष्य जेवणाकडे दुर्लक्ष करतो. काहीबाही खाऊन वेळ भागवतो. उद्योगात चार पैसे अधिक मिळणार असतात हे खरे, परंतु वेळेवर जेवण नीट न केल्याने प्रकृतीसाठी आठ आणे खर्च करावे लागतात. शरीराला वेळेवर अन्नपाणी देणे महत्त्वाचे आह, म्हणून सुभाषितकार म्हणतो, 'शतं विहाय भोक्तव्यम्' हातातली शंभर कामे टाकून पहिल्यांदा भोजन करा.

**सहस्रं त्यक्त्वा स्नानमाचरेत्।**

हजार कामे सोडून स्नान केले पाहिजे. आता सांगा, जेवण मुख्य आहे की स्नान? शंभर कामे सोडून जेवण करा असे सांगणारा सुभाषितकार पुढे सांगतो की हजार कामे सोडून स्नान करा. म्हणजेच जेवणापेक्षा स्नानाला अधिक महत्त्व आहे. पुढे तो म्हणतो:-

**लक्षं विहाय दातव्यं।**

एक लाख कामे सोडून प्रथम दान करा. जर कोणी चांगल्या कार्यासाठी देणगी मागण्यासाठी आला तर त्याला म्हणू नका की माझी आंघोळ व्हायची आहे, नंतर ये. स्नान करू नका, दान मात्र आधी करा. जेवण सोडून, स्नान सोडून, लाख कामे बाजूला सारून प्रथम सत्पात्राला दान केले पाहिजे आणि शेवटी तो सर्वात महत्त्वाचे सांगतो:-

**कोटिं त्यक्त्वा शिवं स्मरेत्।**

कोट्यवधी कामे बाजूला सारून शिवाचे स्मरण करा. तुम्ही आंघोळ करा न करा, शिवध्यानासाठी त्याची गरज नाही. ध्यान करावेसे वाटले की तत्काल ध्यानाला बसले पाहिजे. तुम्हाला झोपावेसे वाटते, ध्यान करावेसे कसे वाटेल? ध्यान हे मानसिक स्वास्थ्याचे साधनच होय. तुम्ही रोज तास-अर्धा तास जर ध्यान केले तर तुम्हाला

बी.पी. होणार नाही. तुम्हाला ध्यान करायला वेळ नाही म्हणून तुम्ही एक गोळी घेता. अनावश्यक चिंतनामुळे बी.पी. वाढते. डॉक्टर तुम्हाला काय म्हणतात, हेच की 'आता तुमचे बी.पी. वाढलेले आहे. जास्त चिंता करू नका.' 'संसाराची चिंता करू नका' असे डॉक्टर सांगतात. 'देवाचे चिंतन करू नका' असे सांगत नाहीत. 'देवपूजा करू नका, देवाचे ध्यान करू नका, त्यामुळे तुमचे बी.पी. वाढेल' असे कोण्या डॉक्टराने कधी सांगितले आहे काय? याउलट 'योगासने करा. प्राणायाम करा, ध्यान करा' असाच सल्ला अलीकडे डॉक्टर देऊ लागले आहे.

योगसाधना हा साधुसंन्याशांचा प्रांत आहे, आपला नव्हे असे सामान्य माणसाला वाटत असते. देव मिळो न मिळो, मुक्ती मिळो न मिळो, परंतु शरीरस्वास्थ्यासाठी योगाची आवश्यकता आहे. दिवसभरच्या व्यवहारात अनेक अनुकूल-प्रतिकूल घटना घडत असतात. त्यामुळे मनुष्य चिंताग्रस्त होतो. चिंता सोडून जेव्हा तो चिंतन करू लागतो तेव्हा त्याचे मनस्वास्थ्य ठीक होते. थंड पाणी चुलीवर ठेवून तापवले तर ते हळूहळू गरम होते. इतके की आपण त्यात बोटही बुडवू शकत नाही. ते पाणी तसेच ठेवून चूल विझवली तर कालांतराने हळूहळू ते पाणी पुन्हा थंड होते. म्हणजे पूर्वपदावर येते. पाणी स्वभावतः थंड असते, परंतु अग्नीच्या संपर्काने ते गरम होते. अग्नीचा संपर्क तुटला की पुन्हा थंड होते. त्यापमाणेच चिंतेच्या संपर्काने मनुष्याच्या देहाचे संतुलन बिघडते आणि त्याच्या देहात अनेक रोग उत्पन्न होतात. ध्यानधारणेमुळे चिंतेचा संपर्क तुटतो आणि मनुष्यदेह पूर्वस्थितीवर येतो. यासाठीच डॉक्टर योगासने, प्राणायाम, ध्यान करा असे सांगत असतात. म्हणून सुभाषितकार म्हणतो की कोट्यवधी कामे बाजूला ठेवा आणि प्रथम ध्यान करा.

अशी रीतीने लिंगधारण, लिंगपूजा करून आपले शरीर शुद्ध करून घ्यावे. शिवनामस्मरण करून वाणी शुद्ध करून घ्यावी आणि निरंतर शिवध्यान करून अंत:करण शुद्ध करून घेतले पाहिजे. अशी आपली त्रिकरणे जो शुद्ध करून घेतो त्यालाच 'पिंड' असे म्हणतात. धर्म कोणताही असो, जात कोणतीही असो. प्रत्येक व्यक्तीने अशी शुद्धी करून घेतली पाहिजे. त्यानंतरच पुढची साधना तो करू शकतो.

**शिवशक्तिसमुत्पन्ने प्रपंचेऽस्मिन् विशिष्यते।**
**पुण्याधिकः क्षीणपापः शुद्धात्मा पिण्डनामकः।।५.३३।।**

शिव आणि शक्ती यांच्यापासून उत्पन्न झालेल्या या सृष्टीत जो जो जन्माला येत तो आपल्या पुण्याच्या बळावर पापाचा क्षय करून शुद्धात्मा होतो तेव्हा त्याला 'पिंड' असे नाव प्राप्त होते. हा पिंडस्थली इतर सामान्य लोकांपेक्षा विलक्षण असतो. श्रेष्ठ असतो. त्याच्या आचारात, विचारात अत्यंत शुद्धता असते.

हा प्रपंच शिव-शक्तीपासून उत्पन्न झालेला आहे. ही सृष्टी म्हणजे शिव-शक्तीचा विलास होय. इथल्या प्रत्येक व्यक्तीत, वस्तूत शिव आहे आणि शक्तीही आहे. शिवशक्तिविलासात्मक अशा या प्रपंचात शुद्ध अंत:करणाचा जीवात्मा सामान्यांपेक्षा आपले वेगळे व्यक्तित्व घडवतो, जपतो. त्यालाच 'पिंड' असे म्हटले जाते. याविषयी आणखी अधिक चर्चा उद्या आशीर्वचनात करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
१७ जुलै १९९०

# पिंडस्थल– ३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथात सर्व सिद्धान्तांचा समन्वय साधलेला आहे, म्हणून सर्व दार्शनिक ग्रंथांत याचे वेगळेपण जाणवते. अगस्त्य ऋषींना उपदेश करण्याच्या निमित्ताने ज. रेणुकाचार्यांनी सर्व मानवजातीला उपकृत केले आहे. या ग्रंथातील एकशे एक स्थलांपैकी पहिल्या पिंडस्थलाचा विचार आपण गेल्या दोन दिवसांपासून करीत आहोत.

पिंडस्थलात ईश्वराचे स्वरूप आणि जीवाचे स्वरूप यांचा विचार केला गेला आहे. वीरशैवसिद्धान्ताप्रमाणे जीव हा शिवाचा अंश आहे. जीव हा ईश्वरचा अंश असल्यामुळे जीवाचा विचार करण्याआधी शिवाचा विचार करावा लागेल. त्याचे स्वरूप नीट समजून घ्यावे लागेल. ज. रेणुकाचार्य शिवाचे स्वरूप स्पष्ट करतात:–

**एक एव शिवः साक्षाच्चिदानन्दमयो विभुः।**
**निर्विकल्पो निराकारो निर्गुणो निष्प्रपंचकः।**
**अनाद्यविद्यासम्बन्धात् तदंशो जीवनामकः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.३४)

शिव किती आहेत? देव किती आहेत, असा प्रश्न तुम्हाला विचारला तर तुम्हाला तुमच्या देव्हाऱ्यातील देव मोजावे लागतील. कारण तुम्ही भरपूर देव जमा केलेले असतात. देव एकच आहे असे तुम्ही म्हणू शकणार नाही. गावात अनेक देवळे असतात. नागपंचमीसाठी एक देऊळ, शिवरात्रीसाठी दुसरे देऊळ, नवरात्रीसाठी तिसरे देऊळ, एकादशीसाठी चौथे देऊळ... अशी कितीतरी. हिंदू संस्कृतीत तेहतीस कोटी देवता मानल्या जातात. ही शिरगणती जुनी आहे. माणसांची संख्या वाढत जाते तशी आता देवांचीही संख्या वाढली असणार. जगात जेवढी माणसे आहेत तेवढेच देवही असतील. प्रत्येकाचा देव वेगळा. आमचा देव तुम्हाला पटणार नाही, तुमचा देव आम्हाला पटणार नाही. सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीने देव असंख्य असतील, परंतु तत्त्वज्ञान मात्र देव एकच आहे असे सांगते,

**एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति।**

ईश्वर एकच आहे. त्याची आराधना करणारे भक्त मात्र असंख्य आहेत. प्रत्येकाने त्याला वेगळे नाव आणि वेगळे रूप दिले आहे. एकाच परमात्मतत्त्वाला भक्तांनी वेगवेगळ्या रूपांत पाहिले आहे, वेगवेगळ्या नामांनी बाहिले आहे. म्हणून ज. रेणुकाचार्य म्हणतात, 'एक एव.' परमात्मा एकच आहे. स्वगत, सजातीय, विजातीय अशा सर्व भेदांपलीकडे परमात्मा आहे.

स्वगत, सजातीय, विजातीय असे भेदाचे तीन प्रकार आहेत. आपले शरीर एक असले तरी त्याचे अवयव भिन्न असतात. हात वेगळे, पाय वेगळे इत्यादी. उजवा हात हा उजवा हातच असतो, तो कधी डावा हात होत नाही. एकाच वस्तूमधील अशा भेदाला 'स्वगत–भेद' असे म्हणतात. दुसरा भेद आहे सजातीय–भेद. प्रत्येक व्यक्तीमध्ये एक जाती, जात असते. 'नित्यत्वे सति अनेकसमवेतत्वं जातिः' नित्य असणारे, एक असणारे आणि

अनेकांमध्ये राहणारे जे तत्त्व ते जाती होय.

मनुष्यत्व ही सर्व माणसांमधली एक जाती आहे. पशुत्व ही सर्व पशूंमधील एक जाती आहे. गाय, बैल, सिंह या सर्वांमध्ये पशुत्व समान असले तरी बैल हा बैल असतो आणि सिंह हा सिंह असतो. यालाच 'सजातीय-भेद' असे म्हणतात. सर्व माणसांत मनुष्यत्व असले तरी प्रत्येक मनुष्य इतरांपासून वेगळा असतो. एक जाती असून त्यात जो अशा प्रकारचा भेद केला जातो तोच सजातीय-भेद होय. पशू हा मनुष्य नव्हे आणि मनुष्य हा पशू नव्हे, हा 'विजातीय-भेद' सर्वांनाच समजण्यासारखा आहे.

हे तिन्ही भेद ईश्वराजवळ नसतात. ईश्वराला अवयव नसल्यामुळे आणि तो निर्गुण निराकार असल्यामुळे त्याला स्वगत-भेद नाही. आकाशाकडे पाहा. आकाश म्हणजे प्रचंड विश्वपोकळी. त्याला अवयव नाही, डोके नाही, पाय नाही. त्याला कुठला आकार नाही. घरात ते घरासारखे दिसते, घटात ते घटासारखे भासते. आकाश ईश्वरापासून निर्माण झाले. म्हणजेच ईश्वर हा आकाशाचा पिता होय. आकाशाकडे पाहून त्याच्या पित्याच्या स्वरूपाची कल्पना करता येते. अवयव नसल्यामुळे जसा आकाशाला स्वगत-भेद नाही तसाच परमेश्वरालाही स्वगत-भेद नाही. ईश्वरासारखा दुसरा ईश्वर नसल्यामुळे त्याला सजातीय-भेद नाही. ईश्वरापेक्षा वेगळे असे दुसरे तत्त्व नसल्यामुळे त्याला विजातीय-भेद देखील नाही. स्वगत-सजातीय-विजातीय भेदरहित असा परमात्मा एकच आहे असा अर्थ 'एक एव' या दोन शब्दांत ध्वनित झाला आहे.

ईश्वर एक आहे, पण तो दिसत नाही. देव असून तो का बरे दिसत नाही? कबीरांनी म्हटले आहे की चार हजार ग्रंथ वाचा, परंतु फक्त चार गोष्टी लक्षात ठेवा.

तुम्ही कितीही वाचन करा, तुम्हाला त्याचा विसरच पडेल. अगदी बालपणी तुम्हाला काहीदेखील येत नव्हेत. एक अक्षर लिहिता येत नव्हते. हीच अवस्था तुमच्या नशिबी म्हातारपणी येणार आहे. तुम्ही सारे काही विसरून जाल. हे जाणून कबीर म्हणतात: चार हजार ग्रंथ वाचा, पण चार गोष्टी लक्षात ठेवा. या चार गोष्टींतही दोन लक्षात ठेवा आणि दोन विसरा, असे ते सांगतात. उपकार विसरा. तुम्ही केलेले दानधर्म विसरा. विसरले नाही तर प्रतिफलाची अपेक्षा आपण करू लागतो. लग्नात तुम्ही आहेर करता तो कसा करता? ज्याला आहेर करायचा आहे त्याने यापूर्वी आपल्याला किती आहेर केला याचा हिशेब करून तेवढाच आहेर तुम्ही करता. त्याने जेवढे दिले तेवढी परतफेड करून, भरपेट जेवण करून तुम्ही परत येता. ज्या गोष्टी विसरा असे संत सांगतात त्या गोष्टी तुम्ही विसरत तर नाहीच, उलट विसरून जातील म्हणून कागदावर लिहून काढता.

दुसरी कोणती गोष्ट विसरायची? तर दुसऱ्याने केलेला अपकार, अपमान विसरायचा. ही गोष्ट जर तुम्ही विसरला नाही तर त्याचा सूड कसा घ्यायचा याचाच तुम्ही सतत विचार कराल. आपण केलेला उपकार आणि दुसऱ्यांनी केलेला अपकार या दोन गोष्टी जर आपण विसरलो नाही तर आपले मन अशांत होते. म्हणून त्या विसरल्या पाहिजेत.

यापुढे दोन लक्षात ठेवण्याच्या गोष्टी कबीरांनी सांगितल्या आहेत. त्यांपैकी पहिली म्हणजे मृत्यू. मृत्यूचा विसर कधी पडू नये. एक ना एक दिवस आपण त्याच्या तावडीत सापडणार आहोत. आपल्या डोक्यावर मृत्यू दबा धरून बसलेला आहे ही जाणीव ठेवून आपण वागले पाहिजे. तुम्ही तर हे लक्षातच ठेवत नाही. मरणाची आठवणदेखील तुम्ही काढत नाही. लक्षात ठेवावी अशी चौथी गोष्ट म्हणजे ईश्वर, ईश्वराला कधी विसरू नये.

देव आहे असे आपण मानतो, परंतु तो आपल्याला दिसत नाही. देव दिसत नाही याचे एकच कारण आहे की तो मायाशक्तिविशिष्ट आहे. देव आणि आपण यांच्यामध्ये माया उभी असते. दिसणारा हा सर्व प्रपंच हीच देवाची माया आहे. आपण मायेच्याच इतके प्रेमात पडलो आहोत की तिच्या मागे उभा असलेला देव आपल्याला दिसत नाही. सर्व जीवांना आपल्या अधीन ठेवणारी माया त्यांना देवापर्यंत पोहचू देत नाही. मायेला ओलांडून जाणे अतिशय अवघड आहे. एखादाच धैर्यशील जीव तिला ओलांडून जातो आणि त्याला ईश्वराचा साक्षात्कार होतो. सामान्य जीव मायापाशातच गुरफटून राहतात. देवदर्शनाला जाणारी माणसे सरळ देवापर्यंत पोहचत नाहीत. देवळात जाऊन देवासमोर शांत बसण्यापेक्षा देवळाबाहेरच्या बाजारातच त्यांचा अधिक वेळ जातो. असा मायेचा प्रभाव आहे.

मायेच्या प्रभावाबद्दल एक कथा सांगितली जाते. एका राजाने आपल्या राज्यात दवंडी पिटवली की उद्या सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत राजा आपल्या बागेत बसणार आहे. या काळात प्रजेतील कोणत्याही मनुष्याने जर राजापर्यंत पोहचून त्याला स्पर्श केला तर राजा त्याला आपले राज्यपद देईल.

झाले, सर्व प्रजेत आनंदाची लहर पसरली. प्रत्येक जण राजा होण्याची स्वप्ने पाहू लागला. राजाला स्पर्श केला की बस्स, आपण झालोच राजे! प्रत्येकाला ही गोष्ट अत्यंत सोपी वाटत होती. त्या रात्री कोणी झोपलेच नाही. न जाणो आपल्या आधीच कोणी राजाला स्पर्श केला तर? आपल्या हातून संधी निघून जाईल. सगळी प्रजा रात्रभर जागी होती. उजाडते कधी याचीच सारे वाट पाहात होते.

दुसरा दिवस उगवला. राजबागेबाहेर लोकांच्या रांगा लागल्या. प्रचंड गर्दी उसळली. सूर्योदय होताच त्या विशाल बागेचं फाटक उघडले आणि लोकांचे लोंढे आत शिरले. आत पाहतात तो सर्व प्रकारची दुकाने लावलेली होती. खाद्यपेयांची दुकाने, कापडांची दुकाने, खेळण्यांची दुकाने, दागिन्यांची दुकाने... असा सर्वत्र मायाबाजार भरलेला होता. सकाळची वेळ होती. लोकांना वाटले आधी थोडा नाश्ता करावा, हाताशी पूर्ण दिवस आहे, राजाला काय केव्हाही स्पर्श करता येईल. सगळे हॉटेलात शिरले, नाश्त्यावर आडवा हात मारला. काउंटरवर बिल विचारले तर दुकानचालक म्हणाला, आज सर्व फुकट, पैसे द्यायचे नाहीत. मग काय, फुकटच म्हटल्यावर लोकांनी पुन्हा नाश्ता केला.

सर्व पुढे निघाले तेव्हा कळले की, आज या बाजारात सर्व काही फुकट मिळणार आहे. मग मात्र सर्वांना राजाचा विसर पडला. फुकट म्हटल्यावर कोण सोडतो? सगळी प्रजा बाजारातच गुंतली. फुकट वस्तू घ्यायच्या, घरी नेऊन ठेवायच्या, पुन्हा धावत यायचे, पुन्हा जमेल ते घ्यायचे अन् घराकडे धावत सुटायचे... दिवसभर हाच प्रकार चालू होता. शेवटी सूर्यास्त झाला. राजापर्यंत एकही मनुष्य आला नाही. सूर्यास्तानंतर बाजार बंद झाला, लोक घरोघरी निघून गेले.

राजाला फार राग आला. एकही मनुष्य आपल्याकडे आला नाही म्हणजे काय? आपल्या राजपदापेक्षाही लोकांना बाजारातल्या वस्तू अधिक मौल्यवान वाटल्या, याचे त्याला वैषम्य वाटले. त्याने प्रधानाला बोलावून सांगितले, ''ज्या लोकांनी बाजारातून फुकट वस्तू नेल्या त्यांच्याकडून उद्या सर्व वस्तू परत घ्या. त्यांच्या घरात असेल नसेल ते सर्व जप्त करा आणि त्यांच्या पाठीवर कोरडे ओढा.''

दुसऱ्या दिवशी राजाज्ञेप्रमाणे प्रधानाने वर्तन केले. तेव्हा लोकांना अतिशय वाईट वाटले. अरेरे! आपण काल राजाला स्पर्श केला असता तर सहज राजपद मिळाले असते. ते सोडून क्षुद्र वस्तूंच्या मागे आपण लागलो आणि

आज ही अशी दशा झाली!

तुम्हाला ही एक काल्पनिक कथा वाटेल, परंतु विचार केला तर असे दिसेल की प्रत्येक मनुष्याची अवस्था अशीच आहे. कोणाला खरोखर देव हवा आहे? कोणालाच नको आहे. सगळे आपल्या सुखोपभोगात मग्न झाले आहेत. देवाची कोणालाच आठवण नाही. तुमच्या अशा वागण्याबद्दल देव तुम्हाला शिक्षा नक्कीच करणार. तुम्ही जेवढी संपत्ती मिळवली असेल ती सारी इथेच ठेवायला लावून फक्त तुम्हाला घेऊन जाणार. तुमच्या मृत्यूनंतर तुमच्या अंगावरचे अलंकार तसेच ठेवले जाणार नाहीत. रुद्रभूमीत गेल्यावर काढून घेतील. त्यावेळी कान फाटला की नाक फाटले याचा कोणी विचारदेखील करणार नाही. अशी सगळ्यांचीच अवस्था होणार आहे.

हा प्रपंच असाच मायाबाजार आहे. या प्रपंचापलीकडे असलेल्या ईश्वरापर्यंत कोणी पोहचत नाही. सगळे अलीकडेच मायेच्या बाजारात गूंतून पडतात आणि जन्ममरणाच्या चक्रात भरडत राहतात.

**पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम्।**

या संसारचक्रात प्रत्येकाला पुन्हा पुन्हा जन्म घ्यावा लागतो, पुन्हा पुन्हा मरावे लागते. म्हणून मृत्यूची आठवण प्रत्येकाने सदैव ठेवली पाहिजे. त्याबरोबरच ईश्वराचे स्वरूप कसे आहे आणि त्याचे खरे वास्तव्य कोठे आहे हेदेखील समजून घेतले पाहिजे. यासाठीच ज. रेणुकाचार्य सांगतात, 'एक एव शिवः साक्षात् चिदानंदमयो विभुः।'

परमात्मा कसा आहे? तर सत्-चित्-आनंदरूप आहे. तो सद्रूप आहे म्हणजे केवळ तोच अस्तित्वात आहे. त्याच्याशिवाय अन्य काही अस्तित्वात नाही. तो चिद्रूप आहे म्हणजे प्रकाशरूप आहे. त्याला प्रकाशित करण्यासाठी अन्य प्रकाशाची गरज नाही. तो आनंदरूप आहे म्हणजेच त्याला इतरांकडून आनंद घेण्याची गरज नाही. तो सर्वव्यापक आहे. देव इथे आहे आणि तिथे नाही, असे म्हणता येत नाही. तो अणुरेणूंत सर्वत्र व्याप्त आहे. आकाश जसे सर्वत्र आहे तसाच देवदेखील सर्वत्र आहे. फक्त त्याला पाहण्याची दृष्टी आपल्याजवळ नाही इतकेच. गुरुकृपेने ज्ञानदृष्टी लाभली तर आपल्याला सगळीकडे देव दिसू लागतो.

देव निर्विकल्प आहे. विकल्प ही मनाची एक वृत्ती आहे. समोर नसलेल्या वस्तूबद्दल विचार करणे म्हणजे विकल्प. 'वस्तुशून्य विकल्पः।' हे विकल्पवृत्तीचे लक्षण आहे. बसल्या ठिकाणी मनोरथांचे इमले उभे करणे हा विकल्पच होय. मुलगा झालाच नाही, परंतु मुलाला डॉक्टर करायचे की वकील? या मुद्यावर नवरा-बायकोने भांडत बसणे; हे विकल्पवृत्तीचेच उदाहरण आहे. ईश्वराच्या ठिकाणी विकल्प नाही. तो निर्गुण आहे म्हणजे सत्त्व, रज, तम या तीन गुणांच्या पलीकडला आहे. प्रपंच हा त्रिगुणात्मक आहे, परंतु ईश्वर मात्र त्रिगुणातीत आहे. त्याला कोणताही आकार नाही. तो निष्प्रपंच आहे. हा सर्व प्रपंच त्याच्यापासून निर्माण झाला, याचे पालन तोच करतो आणि याचा संहारही तोच करतो. परंतु तो या प्रपंचापलीकडचा आहे. तुम्ही मात्र 'आम्ही प्रापंचिक आहोत... आमच्या मागे प्रपंच लागलेला आहे... आमचा प्रपंच आहे'... असे म्हणत असता. हा प्रपंच तुमचा नसून तो तुम्ही आपला मानता.

पाऊस सुरू असताना एक मनुष्य डोक्यावर छत्री धरून चालला होता. पुढे गेल्यावर एक मनुष्य भिजत चाललेला त्याने पाहिला. छत्रीमालकाने त्या माणसाला आपल्या छत्रीत घेतले. छत्रीला दांडा दोघांनी धरला आणि ते पुढे निघाले. पुढे गेल्यावर त्यांना तिसरा मनुष्य दिसला. तो पावसात अर्धाअधिक भिजला होता. छत्रीमालक दयाळू होता. त्याने तिसऱ्या मनुष्यालाही आपल्या छत्रीत घेतले. तिघांनी छत्रीचा दांडा धरला होता. पुढे चौरस्ता लागला आणि तिघांच्याही वाटा भिन्न झाल्या. छत्रीमालकाला सरळ जायचे होते, दुसऱ्या मनुष्याला

डावीकडे जायचे होते तर तिसऱ्या मनुष्याला उजव्या दिशेने जायचे होते. छत्रीमालक सरळ जाऊ पाहत होता तर दुसरे दोघे त्याची छत्री डावीकडे-उजवीकडे ओढू लागले. शेवटी त्या दोघांत प्रचंड भांडण लागले. एक म्हणत होता डावीकडे जायचे तर दुसरा म्हणत होता उजवीकडे जायचे. छत्रीमालक बिचारा गप्प होता. छत्री त्याची होती, पण तिच्यासाठी भलतेच भांडत होते. शेवटी मालक छत्री सोडून पावसात भिजत आपल्या रस्त्याने निघून गेला. बाकीच्या दोघांनी छत्री मोडून तोडून तिच्या चिंध्या केल्या आणि तेही पावसात भिजत आपापल्या रस्त्यांनी निघून गेले!

त्याप्रमाणे प्रपंच ईश्वराचा आहे, आपण सगळे तो आपलाच आहे असे म्हणत धरून बसलो आहोत. 'हे माझे, ते माझे' असे म्हणत आहोत. प्रपंच सोडायलाच तयार नाही. ईश्वराने प्रपंच निर्माण केला, पण तो निष्प्रपंच आहे. तुम्ही मात्र काही केलेले नाही तरी 'हे माझे, ते माझे' असे म्हणत भांडत बसला आहात. हे पाहून ईश्वरदेखील हसत असेल. तुम्ही प्रापंचिक आहात, म्हणून दुःखी आहात. ईश्वर प्रपंचरहित आहे, म्हणून तो शांत आहे. निर्गुण, निराकार, निष्प्रपंचक अशा परमात्म्याचाच प्रत्येक जीवात्मा अंश आहे, असे ज. रेणुकाचार्य प्रतिपादन करतात. या विषयाचा आणखी ऊहापोह उद्या आशीर्वचनात करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
१८ जुलै १९९०

---

आशीर्वचन चौथे

## पिंडस्थल– ४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

पिंडस्थलात जीव, जगत् आणि ईश्वर या तिन्हींचे स्वरूप ज. रेणुकाचार्य स्पष्ट करणार आहेत. काल ईश्वराच्या निर्गुण, निराकार आणि निष्प्रपंचक अशा स्वरूपासंबंधी आपण ऐकले आहे.

**एक एव शिवः साक्षाच्चिदानन्दमयो विभुः।**
**निर्विकल्पो निराकारो निर्गुणो निष्प्रपंचकः।**
**अनाद्यविद्यासम्बन्धात् तदंशो जीवनामकः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.३४)

या श्लोकात परमात्मस्वरूपाचे विस्तृत वर्णन केले आहे. परमात्मा एक असून त्याची नावे अनेक आहेत. तो विश्वाचा स्रष्टा असला तरी प्रपंचरहित आहे. निर्गुण-निराकार आहे. अविद्येच्या संबंधाने याच परमात्म्यापासून जीवात्म्याचा जन्म होतो. जीव दुसरा-तिसरा कोणी नसून शिवाचाच एक अंश आहे. अग्नीपासून ठिणग्या उत्पन्न होतात. ठिणगी हा अग्नीचा अंश असते. त्याप्रमाणे जीव हा शिवाचा अंश असतो. शिव सर्वज्ञ आहे तर जीव अल्पज्ञ आहे. शिव सर्वकर्ता आहे तर जीव अल्पकर्ता आहे. शिव व्यापक आहे तर जीव मर्यादित आहे. अंश

आणि अंशी यांच्यामध्ये असा संबंध असतो.

जोपर्यंत जीव आपल्या मूळ रूपापर्यंत म्हणजेच शिवरूपापर्यंत पोहोचत नाही तोपर्यंत त्याला शांती लाभत नाही. तुम्ही समाधानी आहात काय? असा प्रश्न कोणालाही विचारला तर तो असेच उत्तर देईल की 'नाही हो, कुठले समाधान आणि कुठली शांती? ती कुठे मिळते ते जरा सांगता का?' आपल्याला शांती लाभत नाही याचे हेच कारण आहे की आपण आपली मूळ जागा सोडून दुसऱ्या जागेवर बसलो आहोत. आपले मूळस्वरूप विसरून स्वत:ला दुसरेच कोणी समजत आहोत.

मनुष्य जेव्हा भाड्याच्या घरात राहत असतो तेव्हा तो समाधानी नसतो. त्याला वाटते की आपले स्वत:चे घर बांधून त्यात राहायला गेलो तर आपण समाधानी होऊ. भाड्याच्या हवेलीपेक्षा स्वत:ची झोपडी मनुष्याला प्रिय वाटते. हक्काच्या घरी मनुष्य राहायला जातो, त्यानंतर कालांतराने इथेही आपण समाधीनी झालो नाही हे त्याला उमजते. आधी दुर्मिळ असलेली वस्तू प्राप्त झाली, तिचा उपभोग घेतला की मग तिच्यातली गंमत निघून जाते, कालांतराने ती आनंद देईनाशी होते. या प्रपंचातली कोणतीही वस्तू आपल्याला मिळाली तरी ती आपल्याला खरे, शाश्वत सुख देऊ शकत नाही. सामान्य मनुष्याला हे उगमत नाही. आनंदरूप असलेले आत्मरूप जोपर्यंत जीवाला प्राप्त होत नाही, तो आत्मरूप होत नाही तोपर्यंत त्याला खरे समाधान मिळत नाही.

पावसाचे पाणी जमिनीवर पडले तर लगेच उताराकडे वाहू लागते. आधी ओढ्यात, नंतर नदीत आणि त्यानंतर समुद्रात जाते. हे निसर्गचक्र तुम्ही प्रत्येक वर्षी पाहता. परंतु आकाशातून पडलेल्या पाण्याला समुद्राची ओढ का असते, याचा विचार तुम्ही कधी केला आहे काय? समुद्राच्या पाण्याची वाफ होऊन आकाशातले ढग बनतात, तेच पृथ्वीवर पाणी होऊन बरसतात. म्हणजे पाण्याचे मूलस्थान, मूलरूप समुद्र हे आहे. आपल्या मूलरूपापर्यंत पोहोचण्याची ओढ स्वभावत: पाण्याला असते. जमिनीवर ते सतत वाहत असते, परंतु समुद्रात पोहोचल्यावर मात्र त्याचे वाहणे थांबते आणि त्याचे नाम-रूपही बदलते. या ओढ्यातले पाणी, त्या नदीतले पाणी अशी नावे घेऊन वाहणारे पाणी समुद्रात शिरल्यावर केवळ समुद्ररूप होऊन राहते. त्याचे आधीचे वेगळेपण तेथे शिल्लक राहत नाही. ओढ्यातून वाहताना, नदीतून वाहताना पाणी कधीच समाधानी नसते. ते सारखे वाहत असते. समुद्रात एकरूप झाल्यावर मात्र त्याचे वाहणे थांबून ते स्थिर होते.

जीवात्म्याची अवस्था अशीच आहे. शिवस्वरूपापासून वेगळा झाल्यामुळे तो सदैव अस्वस्थ असतो. प्रपंचातील वस्तूंत समाधान शोधत राहतो. परंतु पाण्यातून वेगळ्या झालेल्या मासोळीसारखी आपली तडफड नेमकी कशासाठी आहे हे मात्र त्याला कळत नाही. तो आपल्या मूळरूपापासून म्हणजेच शिवस्वरूपापासून जेव्हा वेगळा झाला तेव्हाच तो आपले समाधान हरवून बसलेला असतो. यात्रेच्या निमित्ताने तुम्ही घर सोडून जेव्हा दूर जाता तेव्हा काही काळानंतर घराच्या ओढीने अस्वस्थ होता. तुमच्या गावापेक्षा एखादे शहर मोठे असेल, समृद्ध असेल, तुमच्या घरापेक्षा तेथले घर प्रशस्त आणि देखणे असेल तरी तेथे तुमचे मन रमत नाही. ते सारखे घराकडे ओढ घेऊ लागते. आपली आई आणि आपली जन्मभूमी यांची ओढ प्रत्येक माणसात स्वभावत:च असते. 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसि' असे एका सुभाषितकाराने म्हटलेलेच आहे. यात्रा मध्येच सोडून गावी जावे की काय असेही तुम्हाला वाटते. आणि खरोखरच गावी पोहोचल्यावर, घरात शिरल्यावर तुम्हाला समाधान मिळते.

आपल्या लौकिक यात्रेसारखीच जीवात्म्याचीही यात्रा चालू आहे. तोही आपले मूळ घर सोडून असंख्य जन्मांतून प्रवास करत भटकत आहे. अनेक युगे आली अन् गेली, त्याची यात्रा संपलेली नाही. आपली लौकिक

यात्रा सरळ रेषेत असते. दक्षिणेकडून तुम्ही उत्तरेकडे जाता आणि उत्तरेकडून पुन्हा दक्षिणेत परत येता. परंतु जीवात्म्याची यात्रा अशी सरळ नसते, ती चक्राकार असते. चक्रकार यात्रा कधीच संपत नसते. कारण तिला कुठलेच टोक नसते, शेवटचा बिंदू नसतो. म्हणून युगे उलटली तरी जीवात्माचा प्रवास सुरूच आहे. परमात्मा हे त्याचे मूलस्थान जेव्हा त्याला सापडेल तेव्हाच त्याचा प्रवास थांबेल. त्याला खरे समाधान लाभेल. प्रत्येकाचे मूलस्थान परमात्मा हेच होय. त्याच्यापर्यंत आपल्याला जायचे आहे. तो आहे तरी कोठी? कोठे जाऊन त्याला भेटले पाहिजे? तो मंदिरात आहे की मशिदीत? की चर्चमध्ये? खरेच कोठे जाऊन त्याला भेटायचे?

**नाहं वसामि कैलासे न मेरौ न च मंदरैः।**
**मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि पार्वति।।**

एकदा पार्वतीने शिवाला विचारले, देवा, तुमचा नित्य निवास कोठे असतो? कैलासात, मेरूपर्वतावर की मंदिरात? तुमचा नक्की पत्ता मला सांगा. त्यावेळी शिवाने सांगितले, पार्वती, माझे नित्य वास्तव्य कैलासात नसते, मेरूपर्वतावर नसते की मंदराचलावरही नसते. जे भक्त माझे भजन करीत असतात त्यांच्या हृदयांत अष्टौप्रहर माझा निवास असतो. भक्ताचे हृदय हेच माझे मंदिर होय.

**देवतिर्यङ्मनुष्यादिजातिभेदे व्यवस्थितः।**
**मायी महेश्वरस्तेषां प्रेरको हृदि संस्थितः।।**
**चन्द्रकान्ते यथा तोयं सूर्यकान्ते यथाऽनलः।**
**बीजे यथांकुरः सिद्धस्तथात्मनि शिवः स्थितः।।३५–३६।।**

शिव भक्तांच्या हृदयांत नित्य निवास करतो हे खरे असले तरी प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयात तो कसा राहतो हे इथे स्पष्ट केले आहे. देव, मनुष्य, पशू इत्यादी चौऱ्यांशी लक्ष योनींतील सर्व रूपांत तो विद्यमान असतो आणि त्यांना आपल्या संस्काराप्रमाणे वागण्यास प्रेरक ठरतो. चंद्रकांत आणि सूर्यकांत हे दोन विलक्षण मणी असतात. चंद्रकांत मण्यावर चंद्रप्रकाश पडला तर तो मणी पाझरतो. अर्थात् चंद्रकांत मण्यात जसे निश्चित पाणी असते त्याप्रमाणे प्रत्येकाच्या हृदयात शिवाचे वास्तव्य असते. चंद्रकांत मण्यात पाणी असते तसा सूर्यकांत मण्यात अग्नी असतो. सूर्यकांतावर सूर्यप्रकाश पडला तर त्या मण्याखाली जी वस्तू असते ती जळून जाते. सूर्यकांत मणी आज आपल्याला पाहायला मिळत नाही. परंतु एखादे जाड काचेचे भिंग तुम्ही सूर्यप्रकाशात धरले तर त्याच्याखाली असणारा कागद किंवा कापूस जळून जातो, याचा अनुभव तुम्ही घेऊ शकता. सूर्याच्या उन्हाने काही जळत नाही, परंतु त्याचे ऊन जर भिंगातून गेले तर खालची वस्तू पेटते. सूर्याची आग भिंगातून प्रकट होते तशीच सूर्यकांत मण्यातून प्रकट होते. म्हणजेच सूर्यकांत मण्यात अग्नी विद्यमान असतो. त्याप्रमाणे प्रत्येक जीवाच्या हृदयात शिव अवस्थित असतो. वनस्पतीच्या बीजात जसा अंकुर असतोच असतो, त्याप्रमाणे प्रत्येकाच्या हृदयात शिवाचे वास्तव्य असते. 'यत्र जीवः तत्र शिवः।' जेथे जीवात्मा असतो तेथेच परमात्माही असतो. परमात्मा आणि जीवात्मा यांच्यात दोन ध्रुवांइतके अंतर असते, असे नव्हे. मुंडकोपनिषदात म्हटले आहे:-

**द्वा सुपर्णा सयुजा सखया समानं वृक्षं परिषस्वजाते।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्ति अनश्नन् अन्यो अभिचाकशीति।।**

या ठिकाणी एक सुरेख रूपक केलेले आहे. एका वृक्षावर दोन पक्षी बसलेले आहेत. त्यांपैकी एक झाडाचे

पक्व फळ खात आहे तर दुसरा शांत बसून त्याला प्रकाशित करीत आहे. यातील पहिला पक्षी म्हणजे जीवात्मा आणि दुसरा पक्षी म्हणजे परमात्मा होय. आपल्या शरीररूपी वृक्षावर देखील जीव आणि शिव हे दोन पक्षी बसलेले आहेत. अर्थात प्रत्येकाच्या शरीरात जीव आणि शिव आहेत. जीव आपल्या कर्मफलांचा भोग घेत असतो आणि शिव त्याकडे तटस्थतेने पाहत असतो. जीवाने जी सुखदुःखादी कर्मे केलेली असतात ती भोगण्यासाठी त्याला शरीर मिळालेले असते. शरीरामुळे जीवाला सुख मिळते तसेच दुःखदेखील मिळते. जीवात्म्याला एखादे सुख अथवा दुःख भोगायचे असेल तर त्यासाठी शरीर धारण करावेच लागते. त्याशिवाय भोग संभवत नाही. एखादा अतृप्त आत्मा भोगासाठीच भूत होऊन एखाद्या मनुष्याच्या शरीरात संचार करीत असतो. कारण उपभोगासाठी शरीरासारखे साधन लागते. शरीराशिवाय सुखदुःख भोगता येत नाही, म्हणून शरीराला 'भोगायतन' असे नाव आहे. शरीरात राहून कर्मफळे भोगणाऱ्या जीवात्म्याकडे परमात्मा अलिप्तपणे पाहत असतो. तो काही सुखदुःख भोगत नसतो कारण ते भोगण्यासाठी देहाभिमान आवश्यक असतो. अभिमान नसेल तर सुखदुःखाची बाधा होत नाही.

एक कंजूष व्यापाऱ्याची ही कथा आहे. तो एवढा कंजूष होता की दुकानावर काम करणाऱ्या नोकरालाही पगार देण्याची त्याची इच्छा नव्हती. यासाठी त्याने एक युक्ती शोधली होती. नोकरी देण्यापूर्वी तो नोकराला सांगत असे, "हे बघ, एक महिनाभर मी तुझे काम पाहीन. ते पसंत पडले तरच तुला पगार मिळेल."

अडलेल्या माणसाला होकार देण्याशिवाय गत्यंतर नसे. व्यापारी नोकराचे नाव, त्याच्या आईवडिलांची नावे आणि त्याची जात विचारून घेई. नोकर कामावर आला की दोनचार दिवस व्यापारी गप्प बसे. चांगला वागत असे. पण त्यानंतर मात्र तो काही ना काही निमित्त काढून नोकराला शिव्या देई. त्याच्या आईचे नाव घेऊन, बापाचे नाव घेऊन, जातीचे नाव घेऊन, शिव्या ऐकून नोकराला राग येई, परंतु पोटापाण्याचा प्रश्न आहे म्हणून तो गप्प बसे. उगवणाऱ्या प्रत्येक दिवशी व्यापाऱ्याच्या शिव्यांची संख्या वाढत जाऊन त्या अधिक घाणेरड्या होत असत. शेवटी नोकरीही नको आणि तुझ्या शिव्याही नकोत, असे म्हणण्याची पाळी नोकरावर येई. पंधरा दिवसांतच तो नोकरी सोडून जात असे. महिना भरल्याशिवाय आणि काम पसंत पडल्याशिवाय पगार देण्याचा प्रश्नच नव्हता. म्हणजे पंधरा दिवस व्यापारी त्या नोकराकडून फुकट काम करून घेत असे. आणि तो गेल्यावर पुन्हा दुसऱ्या नोकराला कामाला लावत असे. त्याच्याही बाबतीत हाच प्रकार. पंधरा दिवसांत दुसरा नोकरही नोकरी सोडून जात असे.

एका हुशार नोकराने मालकाच्या ह्या सवयीचा अभ्यास केला आणि त्याला धडा शिकवण्याचे ठरवले. तो नोकरीसाठी व्यापाऱ्याकडे गेला, त्याच्या सर्व अटी मान्य केल्या, आईवडिलांची नावे आणि जात त्याला सांगितली. व्यापाऱ्याने नेहमीचा यशस्वी प्रयोग त्याच्यावर करायला सुरुवात केली. त्याच्या आईबापांची नावे घेऊन खच्चून शिव्या द्यायला प्रारंभ केला, त्याच्या जातीच्या उद्धार केला. गंमत अशी की व्यापाऱ्याने शिव्या द्यायला सुरुवात केली की नोकर गालातल्या गालात हसत असे. त्याला शिव्या ऐकून राग वगैरे काही येत नसे. पंधरा दिवस उलटून गेले तरी हा नोकर जायला तयारच नाही. व्यापाऱ्याने शिव्यांची मात्रा आणि घनता वाढवली, तरी हा नुसता हसत बसे. शेवटी महिना उलटला. कराराप्रमाणे नोकराला पगार द्यायची वेळ आली. आतापर्यंत अनेक नोकरांना पगार न देता व्यापाऱ्याने पळवून लावले होते. परंतु ह्या नोकराच्या बाबतीत वेगळेच काहीतरी घडले. शेवटी व्यापाऱ्याने नोकराला विचारले,

''बाबा रे मी महिनाभर तुला एवढ्या शिव्या दिल्या तरी तुला थोडादेखील राग आला नाही. हे कसे काय?''

''मालक'' नोकर हसून म्हणाला, ''तुम्ही एवढ्या शिव्या दिल्या तरी मला अजिबात राग आला नाही. कारण मी माझ्या आईवडिलांची खरी नावे आणि खरी जात तुम्हाला सांगितलीच नाही. ती सर्व खोटी सांगितली. म्हणून तुम्ही ती नावे घेऊन जेव्हा जेव्हा शिव्या देत होता तेव्हा तेव्हा मला हसू येत असे.''

हे ऐकून व्यापाऱ्याने कपाळावर हात मारून घेतला.

आईवडील आणि जात यांच्याविषयी आपल्या मनात अभिमान असतो. म्हणून त्यांचा उल्लेख कोणी अनादराने केला तर आपल्याला दुःख होते आणि रागही येतो. जीवाला शरीराविषयी अभिमान असतो. म्हणून शरीराला सुख झाले की जीवाला आनंद होतो आणि शरीराला दुःख झाले तर जीवही दुःखी होतो. शरीरात जीव आणि शिव दोघेही राहतात. परंतु जीव अभिमानी आहे तर शिव निरभिमानी आहे. जीव सुखदुःखादी फळे भोगत असतो तर शिव तेथे साक्षीरूपाने उपस्थित असतो. एवढ्या जवळ असलेल्या शिवाला जीव ओळखत नाही हे एक आश्चर्यच आहे.

हृदयस्थ शिवाला मनुष्य विसरतो आणि दूरवर जाऊन त्याचे दर्शन घेण्याचा अट्टहास करतो. त्यावेळीही त्याच्या हृदयातील देव त्याला सोबत करीत असतो. देव नेमका कोठे आहे हे त्याला अज्ञानामुळे समजत नाही. कस्तुरीमृगाच्या नाभीत कस्तुरी असते, परंतु तो कस्तुरीच्या सुगंधाने वेडा होऊन तिचा शोध बाहेर सर्वत्र घेत धावत असतो. अशीच अवस्था हृदयस्थ शिवाला विसरून त्याचा बाहेर शोध घेणाऱ्या मनुष्याची असते. शिव दूर नाही हे समजावून सांगण्यासाठी ज. रेणुकाचार्यांनी सांगितले आहे की जसा प्रत्येक बीजात अंकुर विद्यमान असतो तसे सर्वांच्या हृदयांत शिवाचे वास्तव्य असते.

तुम्ही म्हणाल, आमच्या हृदयात जर परमेश्वर राहत असेल तर तो आम्हाला उपदेश का करीत नाही? आमच्याकडून वाईट आचरण घडले तर आम्हाला सावध का करीत नाही? तर असे नसून देव तुम्हाला क्षणीक्षणी उपदेश करीत असतो, परंतु तुम्ही त्याकडे दुर्लक्ष करीत असता. तम्ही खरेदी करता एखाद्या दुकानावर जाता. पाच रुपयांची वस्तू खरेदी केल्यावर दुकानदाराच्या हाती दहा रुपयांची नोट ठेवता. कामाच्या गडबडीत दुकानदाराने जर पाच रुपये परत करण्याऐवजी पंधरा रुपये तम्हाला परत केले तर त्यावेळी तुमच्या हृदयातून परमेश्वराची वाणी तुम्हाला उपदेश करीत असते की त्याने चुकून दहा रुपये अधिक दिले, ते परत कर. परंतु तुम्ही त्याकडे दुर्इक्ष करता. कारण आत एक लोभी जीव बसलेला असतो. तो तुम्हाला सांगतो की अनायासे काही परिश्रम न करता लक्ष्मी आपल्या हाती आली आहे. ती परत करणे म्हणजे आपला करंटेपणा ठरेल. चल निमूटपणे घरी. देव सांगतो. परत कर. जीव सांगतो, परत करू नकोस. अशा वेळी तुम्ही काय कराल? शिवाचे ऐकाल की जीवाचे? जो माणूस शिवाचे ऐकतो तो पैसे तात्काळ परत करतो. जो जीवाचे ऐकतो तो पैसे घेऊन घरी जातो. शिवाच्या वाणीची तुम्ही उपेक्षा केली तरी अशा प्रसंगी तो पुनःपुन्हा तुम्हाला सावध करीत असतोच. परंतु त्याच्याकडे दुर्लक्ष करण्याची एकदा सवय जडली तर तुम्ही नेहमी दुर्लक्षच करीत राहणार.

गुन्हा करणाऱ्या, वाईट कामे करणाऱ्या प्रत्येक मनुष्याला आपण गुन्हा करीत आहोत, वाईट काम करीत आहोत हे माहीत असते. परंतु हृदयातील आवाजाकडे, अंतर्वाणीकडे दुर्लक्ष करून तो पुनःपुन्हा वाईट काम करीत राहतो. म्हणून प्रत्येक मनुष्याने अंतर्वाणीकडे लक्ष दिले पाहिजे. जो अंतर्वाणीकडे लक्ष देत नाही अशा मनुष्यासमोर लाऊडस्पीकर लावून कितीही उपदेश केला तरी त्याचा काहीही उपयोग होणार नाही. प्रत्येकाच्या

हृदयातला शिव क्षणोक्षणी उपदेश करीत असतो. मानवाचे हृदय हेच ईश्वराचे मंदिर होय. म. बसवेश्वरांनी आपल्या एका वचनात म्हटले आहे. माझा देह हेच एक मंदिर आहे. माझे पाय हेच मंदिराचे खांब, माझे शरीर हेच मंदिर आणि माझे मस्तक हेच सुवर्णकळस होय.

वीरशैवसिद्धान्तानुसार मनुष्याचा देह हे मंदिर आहे. तुमच्या हृदयावर इष्टलिंग कशासाठी दिले आहे? देवळात जाऊन तुम्ही देवदर्शन घेऊ शकत नाही काय? शिव तुमच्या हृदयात राहतो. परंतु तुम्हाला त्याचे ज्ञान नसते. ते ज्ञान व्हावे यासाठीच तुमच्या हृदयावर इष्टलिंग बांधले आहे. लिंगधारणेमुळे तुमचे शरीर एक मंदिरच झालेले असते. तुम्ही कुठेही गेलात तरी देव तुमच्या बरोबर असतो. देवाबरोबर राहणे, देवाबरोबर जेवण करणे, देवाबरोबर सर्व कर्मे करणे हे भाग्य केवळ तुम्हालाच प्राप्त झाले आहे. हृदयावरील इष्टलिंग सोडून तुम्ही कोणत्याही मंदिरात गेलात तरी तुमच्यावर देव कृपा करणार नाही.

हृदयस्थ शिवाची वाणी ऐकण्यासाठी अंतर्मुख व्हावे लागते. बाहेरचा देव पाहणे फार सोपे आहे. येथून तुम्ही काशीला पटकन जाऊ शकता. परंतु अंतरंगातील देव पाहण्यासाठी तासभर ध्यान करा असे तुम्हाला सांगितले तर तुम्ही ते करू शकणार नाही. तुम्हाला ते अवघड वाटेल. तात्पर्य असे की प्रत्येकाच्या हृदयात शिवाचे वास्तव्य असते. शिव एकच आहे. मग तो जगात अनेक रूपांनी कसा दिसतो, हे स्पष्ट करण्यासाठी ज. रेणुकाचार्य सांगतात:-

**आत्मत्वमीश्वरत्वं च ब्रह्मण्येकत्र कल्पितम्।**
**बिम्बत्वं प्रतिबिम्बत्वं यथा पूषणि कल्पितम्।।**
**गुणत्रयविभेदेन परतत्त्वे चिदात्मनि।**
**भोक्तृत्वं चैव भोज्यत्वं प्रेरकत्वं च कल्पितम्।।**
**गुणत्रयात्मिका शक्तिर्ब्रह्मनिष्ठा सनातनी।**
**तद्वैषम्यात् समुत्पन्ना तस्मिन् वस्तुत्रयाभिधा।।३७-३९।।**

एक असलेल्या परशिवब्रह्मापासून तीन वस्तू निर्माण झाल्या. जीव, जगत् आणि जीवावर अनुग्रह करणारा ईश्वर. परशिवाजवळ जी शक्ती आहे तिच्यामुळे हे घडले. परशिवात अविनाभावसंबंधाने शक्ती वास करते. शिव आणि शक्ती एकरूपच आहेत. चंद्र आणि चांदणे, फूल आणि गंध जसे एकरूप असतात तसे शिव-शक्ती एकरूप असतात. तत्त्व एकच असून ते शिव-शक्तिरूप आहे. शक्तीमुळेच शिवतत्त्व जीव, जगत् आणि ईश्वर असे त्रिविध झाले आहे. यापुढील विचार उद्याच्या आशीर्वचनात करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
१९ जुलै १९९०



## पिंडस्थल– ५

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल शिव आणि शक्ती यांच्या तादात्म्यसंबंधाबद्दल आपण विचार केला आहे. या शक्तीचे स्वरूप कसे आहे. हे ज. रेणुकाचार्य सांगतात:–

गुणत्रयात्मिका शक्तिर्ब्रह्मनिष्ठा सनातनी।
तद्वैषम्यात् समुत्पन्ना तस्मिन् वस्तुत्रयाभिधा।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.३९)

शिवासोबत तादात्म्य होऊन राहणारी जी शक्ती आहे तिच्या ठिकाणी सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण आहेत. हे तीनही गुण प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी असतात. एखाद्या मनुष्यात सत्त्वगुण अधिक असतो, रज आणि तम् कमी प्रमाणात असतात. एखाद्याच्या ठिकाणी रजोगुणाचे प्राबल्य असते, अन्य दोन गुण कमी प्रमाणात असतात तर एखाद्या मनुष्यात तमोगुण अधिक असून सत्त्व व रजोगुणाचे प्रमाण कमी असते. प्रत्येकाच्या ठिकाणी हे तिन्ही गुण विषम प्रमाणात असतात, सम प्रमाणात नसतात. गुणाधिक्यामुळे प्रत्येकाची प्रवृत्ती भिन्न होते. मनुष्य सात्त्विक आहे, राजस आहे की तामस आहे हे त्याच्या आचरणावरून आणि स्वभावारून समजते. 'सत्त्वात् संजायते ज्ञानम्।' सात्त्विक मनुष्य ज्ञानप्राप्तीसाठी सत्संग करतो, संतांच्या सहवासात राहतो, सद्ग्रंथांचे अध्ययन करतो. तो सदाचरणी असतो. राजस मनुष्याला सत्संग, प्रवचन वगैरे काही आवडत नाही. त्याला वाटते की हा सारा वेडेपणा आहे, प्रवचन ऐकल्याने काय घरची कामे होतात? सांसारिक व्यवहारात त्याला अधिक रुची असते. काही लोकांना संसारात रुची नसते आणि परमार्थातही नसते. ते झोपेतून उठले की कोणासोबत तरी भांडत बसतात आणि भांडण संपले की झोपतात. 'निद्रया कलहेन वा।' काहीही न करणारा आळशी मनुष्य म्हणजे तामस होय. अशा प्रकारे माणसाचा व्यवहार आणि स्वभाव पाहून तो सात्त्विक, राजस, तामस यांपैकी कोण आहे हे ओळखता येते. तमोगुणी मनुष्य अत्यंत आळशी असतो. त्याला 'कुठेतरी जा' असे सांगितले तर 'हो हो' म्हणत तो एक तास घालवतो. आळशी मनुष्याला धड संसार करता येत नाही आणि परमार्थ तर नाहीच नाही. एका सुभाषितकाराने म्हटले आहे:–

अलसस्य कुतो विद्या अविद्यस्य कुतो धनम्।
अधनस्य कुतो मित्रं अमित्रस्य कुतः सुखम्।।

आळशी माणसाला विद्या कशी प्राप्त होणार? आळशी मुलगा तुम्ही पाहा. तो शाळेतच जाणार नाही, गेला तर लक्ष देऊन ऐकणार नाही, ऐकले तरी अभ्यास करणार नाही. मग तो पास कसा होणार? ज्याच्याजवळ विद्या नाही तो द्रव्यार्जन करू शकत नाही. ज्याच्याकडे द्रव्य नसते त्याला मित्र मिळत नाही आणि कोणीही मित्र नसल्यामुळे त्याला सुख देखील मिळत नाही.

तात्पर्य हे की, आळसामुळे केवळ दुःखप्राप्ती होते, सुख मिळत नाही. म्हणून माणसाने उद्योगी असले पाहिजे. उद्योगामुळेच कार्यसिद्धी होते, केवळ मनोरथामुळे नव्हे. सिंह वनाचा राजा असला तरी त्याच्या तोंडात आयती

शिकार पडत नसते. नुसते तोंड उघडून तो एका जागी बसला तर त्याच्यावर उपासमारीची पाळी येईल. याचा अर्थ एवढाच की आळशी मनुष्याला धड संसारही करता येत नाही आणि धड परमार्थही करता येत नाही.

तमोगुणी मनुष्य बर्फाच्या खड्यासारखा असतो. बर्फाचा खडा तुम्ही ठेवाल त्याच ठिकाणी स्थिर राहतो, स्वतःहून हालचाल करीत नाही. रजोगुणी मनुष्य पाण्यासारखा अधोमुख असतो. पाणी नेहमी उताराकडे वाहत असते, त्याप्रमाणे रजोगुणी मनुष्याची प्रवृत्ती संसाराकडेच असते. तो उदात्त विचार, पारमार्थिक विचार करू शकत नाही. पाणी तापवले तर त्याची वाफ होते आणि ती ऊर्ध्वगामी असते. सात्त्विक मनुष्य वाफेसारखा असतो. तो नेहमी उदात्त, पारमार्थिक विचार करणारा असतो. बर्फ, पाणी आणि वाफ ही एकाच पदार्थाची तीन रूपे आहेत. तामस मनुष्य बर्फासारखा, राजस मनुष्य पाण्यासारखा तर सात्त्विक मनुष्य वाफेसारखा असतो. बर्फाला उष्णता दिली की त्याचे पाणी होते. पाणी तापवले की त्याची वाफ होते. याप्रमाणेच संस्कारमुळेच तामस मनुष्य राजस होऊ शकतो आणि राजस मनुष्य सात्त्विक होऊ शकतो. अशा प्रकारे प्रकृतीमधील तीन गुण प्रत्येक व्यक्तीमध्ये आढळतात.

**किंचित्सत्त्वरजोरूपं भोक्तृसंज्ञकमुच्यते।।**
**अत्यन्ततामसोपाधिर्भोज्यमित्यभिधीयते।**
**परतत्त्वमयोपाधिर्ब्रह्मचैतन्यमीश्वरः।।**
**भोक्ता भोज्यं प्रेरयिता वस्तुत्रयमिदं स्मृतम्।**
**अखण्डे ब्रह्मचैतन्ये कल्पितं गुणभेदतः।।४०-४१।।**

शिवाच्या शक्तीमधील तीन गुणांमुळे ईश्वर, जीव आणि जगत् अशी तीन तत्त्वे उत्पन्न झाली. शुद्ध सत्त्वामुळे ईश्वरतत्त्व, मलिन सत्त्वगुणामुळे जीवतत्त्व आणि तमोगुणामुळे जगत्तत्त्व. यालाच ज. रेणुकाचार्यांनी प्रेरयिता, भोक्ता आणि भोज्य अशी नावे दिली आहेत. ईश्वर हा प्रेरयिता आहे, जीव हा भोक्ता आहे आणि जगत् हे भोज्य आहे. परमेश्वराने जीवाच्या उपभोगासाठी सृष्टी निर्माण केली. आपल्या प्रारब्धकर्मानुसार जन्म घेतलेल्या प्रत्येक जीवाला सुख आणि दुःख देण्यासाठी ही सृष्टी उत्पन्न झाली आहे. प्रेरयिता, भोक्ता आणि भोज्य ही तीन तत्त्वे वेगवेगळी भासत असली तरी ते मूलतः एकच तत्त्व आहे. एक शिवतत्त्वच या त्रिविध रूपांत प्रकट झाले आहे.

**अत्र प्रेरयिता शम्भुः शुद्धोपाधिर्महेश्वरः।**
**संमिश्रोपाधयः सर्वे भोक्तारः पशवः स्मृताः।।४२।।**

ईश्वर सर्व प्राणिमात्रांना प्रेरणा देणारा आहे. त्याच्या प्रेरणाशक्तीमुळेच जगाचे सर्व व्यवहार चालतात. त्याच्या प्रेरणेशिवाय गवताचे पातेदेखील हलू शकत नाही. काही लोकांच्या मनांत शंका उपस्थित होईल की जर सर्व कर्मांचा प्रेरक ईश्वर असेल तर जे लोक दुष्कर्म करतात त्या दुष्कर्मांचाही प्रेरक ईश्वरच आहे काय? दुष्कर्मे करणारे लोक म्हणतील की ईश्वर आम्हाला जशी प्रेरणा देतो तशी आम्ही कर्मे करतो.

हा विषय नीट समजून घेतला पाहिजे. शेतकरी शेतात अनेक प्रकारची बियाणे पेरतो. पाऊस पडल्यावर ती बीजे आपापल्या स्वभावधर्मानुसार अंकुरित होतात, जमिनीतून वर उगवतात. त्यांना फळे आल्यावर तुम्ही पाहता की लिंबू आंबट असते, मिरची तिखट असते, आंबा गोड असतो. जमीन, पाणी, हवा सर्वांसाठी समान असते, त्यांच्यामुळेच सर्व झाडे फोफावतात, फळतात. तरीही प्रत्येक झाडाचे गुणधर्म वेगळे असतात. त्याच्या फळाची रुची वेगळी असते. जसे बीज असेल तसे फळ असते. त्याप्रमाणे प्रत्येक जीवात्मा जी बरी-वाईट कर्मे करतो

तसा त्याचा स्वभावधर्म बनतो. वाईट कर्म करणाऱ्या जीवात्म्याची प्रवृत्ती दुष्कर्म करण्याकडे असते. आणि चांगले कर्मे करणाऱ्या जीवात्माची प्रवृत्ती सत्कर्म करण्याकडे असते. जीवात्म्याची कर्मबीजे उगवण्याला ईश्वर कारणीभूत ठरतो. जमीन, पाणी, हवा बीजांना अंकुरित करण्यास साहाय्यभूत ठरतात, परंतु बीजांची गुणधर्मे ते ठरवत नाहीत; त्याप्रमाणे ईश्वर सर्व कर्मांचा प्रेरक असला तरी जीवात्मा आपल्या प्रवत्तीनुसार सत्कर्मे किंवा दुष्कर्मे करतो. पंखा, ट्युबलाईट ह्यांना एकच विद्युतशक्ती प्रेरक असते, परंतु पंखा फिरतो आणि ट्युबलाईट प्रकाशमान होते. याउलट, पंखा प्रकाशित होतो आणि ट्युबलाईट फिरते, असे घडत नाही. त्यांची प्रेरणाशक्ती एकच असली तरी ते आपापल्या स्वभावधर्मांनुसार वर्तन करतात. त्याप्रमाणे ईश्वर मनुष्यांच्या कर्मंबीजांना प्रेरक ठरतो आणि जीवात्मा आपल्या प्रवृत्तीनुसार वागतो. एखादा मनुष्य चोरी करतो तर एखादा मनुष्य ध्यान करतो. म्हणून ज. रेणुकाचार्य सांगतात, 'अत्र प्रेरयिता शंभुः।'

ईश्वर एक आहे, परंतु त्याचे अंश असलेले जीवात्मे असंख्य आहेत, सृष्टी अनादी आहे, जीव अनादी आहेत आणि त्यांची कर्मेदेखील अनादी आहेत. आपापल्या कर्मानुसार जीवात्मे वेगवेगळे देह धारण करतात. कधी पशू, कधी पक्षी तर कधी मनुष्य. असे चौऱ्यांशी लक्ष योनींमधून ते भ्रमण करतात.

एखाद्या जीवात्म्याला विशिष्ट योनी अथवा विशिष्ट देह का मिळतो? असा प्रश्न कोणाला पडेल. याचे उत्तर असे देता येईल. तुम्ही कापडाच्या दुकानात जाता. तेथे अनेक किंमती, स्वस्त आणि विविध मापांची वस्त्रे असतात. त्यांपैकी तुम्ही कोणता पोषाख खरेदी करता? तुमच्या खिशाला परवडणारा आणि तुमच्या मापाचाच पोषाख तुम्ही विकत घेता. तुमच्या अंगाला न येणारा आणि तुम्हाला न परवडणारा पोषाख तुम्ही विकत घेत नाही. त्याप्रमाणे चौऱ्यांशी लक्ष प्रकारचे पोषाख परमेश्वराने तयार केले आहेत. गीतेत शरीराला वस्त्र असेच संबोधिले आहे: 'वासांसि जीर्णांनि यथा विहाय।' जीवात्म्याच्या कर्मानुसार त्याच्या मापाचे शरीर त्याला मिळते. तो कधी जीवजंतू होईल, कधी पशू होईल तर कधी पक्षी होईल. त्याचे कर्म हेच त्याचे पैसे असतात, त्याचे माप असते. त्या पैशात आणि मापात बसणारा देह, योनी त्याला निमूटपणे स्वीकारावी लागते.

**चक्रनेमिक्रमेणैव भ्रमन्ति हि शरीरिणः।**
**जात्यायुर्भोगवैषम्यकारणं कर्म केवलम्।।४९।।**

चक्रगतीप्रमाणे जीवात्म्याची शरीरे बदलत राहतात. त्याची जात, त्याचे आयुष्य, त्याचे सुखदुःखभोग याला त्याचे कर्मच कारणीभूत असते. कोणाची जात वेगळी, कोणाचे आयुष्य कमीअधिक, कोणाचे रंगरूप वेगळे. मला दरिद्री का केलेस, मला असा चेहरा का दिलास असे म्हणून देवाला शिव्या देण्यात काही अर्थ नाही. तुम्हाला जे काही मिळाले ते तुमच्या कर्माप्रमाणे मिळालेले आहे. संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण असे कर्माचे तीन प्रकार आहेत. अनेक जन्मांतील साठलेले कर्म म्हणजे संचितकर्म होय. या जन्मात सुखदुःखभोगांना कारणीभूत झालेले कर्म म्हणजे प्रारब्धकर्म होय आणि प्रारब्धकर्म भोगता भोगता पुढील जन्माला कारणीभूत ठरणारे जे नवे कर्म घडते ते क्रियमाणकर्म होय. आपण जी सुखदुःखे भोगतो ती आपल्या प्रारब्धकर्माची फळे होत. प्रारब्धकर्म आपण टाळू शकत नाही. संचितकर्म ज्ञानाने नष्ट करता येते. क्रियमाणकर्म टाळता येते. परंतु ज्ञानी असो वा अज्ञानी, प्रारब्धकर्म सर्वांनाच भोगावे लागते. प्रारब्धकर्म म्हणजे लटालरेषा. जिंवत असताना माणूस प्रारब्धाप्रमाणे सुखदुःखे भोगतोच, परंतु मेल्यानंतरही त्याच्या शरीराचे, अस्थींचे काय व्हावे हे देखील प्रारंब्धकर्मानुसारच ठरते.

एक दैवज्ञ ज्योतिषी फिरत फिरत समुद्रकाठी गेला. तेथे त्याला एक मानवी कवटी सापडली. या अशी निर्जन ठिकाणी शरीराचा कोणताही अवयव नसलेली फक्त कवटी पाहून त्याला आश्चर्य वाटले. तो दैवज्ञ असल्यामुळे त्याला ललाटलेख वाचता येत होता. त्याने उत्सुकतेने कवटीच्या ललाटावरील मजकूर वाचला. त्यात लिहिले होते:-

**जन्मप्रभृति दारिद्र्यं अटनं पृथिवीतले।**
**समुद्रतीरे मरणं किंचिदग्रे भविष्यति।।**

...जन्मापासून हा दरिद्री असेल, त्यामुळे पोट भरण्यासाठी हा पृथ्वीवर सर्वत्र फिरत राहील. समुद्राच्या तीरावर याचा मृत्यू होईल आणि त्यानंतरही किंचित काहीतरी घडेल....

असा मजकूर वाचून ज्योतिषी आश्चर्यचकित झाला. हा दरिद्री होता, आयुष्यभर वणवण भटकला आणि शेवटी समुद्राच्या काठावर मरण पावला; हे सर्व ठीक. परंतु 'किंचिदग्रे भविष्यति' म्हणजे काय? याच्यापुढेही याचे, याच्या कवटीचे काहीतरी घडणार आहे काय? असा प्रश्न ज्योतिषाला पडला. काय होते ते बघूया असे म्हणून त्याने तो कवटी आपल्या झोळीत घातली आणि गावात परतला.

एका जिवलग मित्राकडे त्याने ती कवटी दिली आणि कोणालाही नकळू देता सांभाळून ठेवण्यास सांगितले. त्या गृहस्थाने आपल्या तिजोरीत कवटी ठेवली. कोणालाही कळता कामा नये असे ज्योतिषाने सांगितल्यामुळे तिजोरीची किल्ली त्याने आपल्या करदोड्याला बांधली. एरव्ही तिजोरीची किल्ली घरातच खुंटीवर ठेवलेली असे. परंतु तेव्हापासून तो ती आपल्या कमरेला बांधू लागला. त्यामुळे त्याच्या बायकोला संशय आला. हा आपल्यापासून काहीतरी लपवतोय. तिने एकदोनदा त्याला किल्ली मागितली, परंतु त्याने नकार दिला. त्यामुळे तिचा संशय दृढ झाला.

एके दिवशी तिजोरीत काय आहे हे पाहण्यासाठी तिने तिजोरी फोडली. आत मानवी कवटी पाहून ती आश्चर्यचकित झाली. तिला वाटले, आपल्या नवऱ्याचे डोके नक्की फिरले आहे. ही कवटी कोणाची असावी, नवऱ्याने आपल्यापासून लपवून ती तिजोरीत सुरक्षित का ठेवली असावी, ह्या प्रश्नांनी तिला भंडावून सोडले. शेजारी राहणाऱ्या आजीबाईला याविषयी विचारावे असे तिला वाटले. ती कवटी घेऊन आजीबाईकडे गेली. आजीबाई भांडण लावण्यात वस्ताद होती आणि ही सहजच तिच्या तावडीत सापडली. कवटीचे बारकाईने निरीक्षण करून आजीबाई म्हणाली, ''बाई ग, ही कवटी बहुतेक तिचीच दिसते!''

''कोणाची हो आजीबाई?'' बाईने विचारले.

''अग, तिची... तुझ्या सवतीची! तुला माहीत नाही, तुझे लग्न होण्याच्या आधी तुझ्या नवऱ्याचे एक लग्न झाले होते. त्याची पहिली बायको मेली. तिचीच ही कवटी आहे. ती मेली तरी तिच्यावरचे प्रेम अजून कायम आहे. म्हणून तर तिची कवटी तुझ्या नवऱ्याने तिजोरीत ठेवली होती.''

झाले, मग त्या बाईचा पारा चांगलाच चढला. ती कवटी घेऊन घरी आली आणि उखळात घालून मुसळाने इतकी ठेचली की तिचा पार भुगा होऊन गेला. मेलेली सवत हाती लागणे शक्य नव्हते, म्हणून सगळा राग तिच्या कवटीवर काढला. कवटीचा भुगा एका फडक्यात बांधून तिने कोपऱ्यात फेकून दिला. आणि अंथरुणावर पडून मुसमुसत राहिली.

संध्याकाळी नवरा घरी आला तेव्हा त्याला जाणवले की घरातील वातावरण तंग आहे. एरव्ही संध्याकाळी

हसतमुखाने समोर येणारी, चहा करून देणारी पत्नी आज रुसून रडत बसलेली त्याला दिसली. त्याने जवळ जाऊन तिला विचारले, ''काय झाले? का रडतेस?''

''जा, तिलाच विचारा. मला विचारू नका. काय करायचे, काय बोलायचे ते तिच्या बरोबर करा.'' ती फणकाऱ्याने म्हणाली.

''तिच्या बरोबर म्हणजे कोणाबरोबर?'' त्याने आश्चर्याने विचारले.

''जा, बघा त्या कोपऱ्यात. तिथे फडक्यात तिची भुकटी भरून ठेवली आहे.'' ती म्हणाली.

त्याने पाहिले तर वस्त्रात कवटीचा भुगा दिसला. मग त्याने तिची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. माझे आधी लग्न झाले नव्हते, माझी दुसरी कोणी बायको नव्हती, असे परोपरीने सांगितले. परंतु काही उपयोग झाला नाही.

एक आठवडा उलटून गेला, त्या कवटीचे काय झाले हे पाहण्यासाठी ज्योतिषी आपल्या मित्राकडे आला. तेव्हा त्याने झालेला सर्व प्रकार ज्योतिषाला सांगितला आणि कवटीचा भुगा असलेली पुरचुंडी त्याच्या हाती सोपवली. तेव्हा ज्योतिषाला कळला 'किंचिदग्रे भविष्यति' या ललाटलेखाचा अर्थ. हिच्या हातून या कवटीचा असा भुगा व्हायचा होता तर!

मनुष्य जिवंतपणी भोग भोगतोच, परंतु मरणोत्तरही त्याच्या देहाला असे काही भोगावे लागते. प्रारब्धकर्म हे भोगूनच संपवावे लागते. 'ना भुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटि शतैरपि।' कोटी कल्प जातील, परंतु कर्म भोगल्याशिवाय ते क्षीण होत नाही, ते संपत नाही. जगात जी विषमता दिसते त्याला ईश्वर कारणीभूत नाही. जीवात्म्यांनीच आपापल्या कर्मांनी ती निर्माण केली आहे. म्हणून सर्व जीवात्मे हे भोक्ते आहेत. ते आपल्या कर्मांची फळे भोगतात.

प्रारब्धकर्मांची फळे भोगणाऱ्या जीवात्म्यांनाच येथे 'पशू' म्हटले आहे. पशू म्हणजे ज्याला पाशांनी बांधले आहे असा. आणव, मायीय आणि कार्मिक अशा तीन पाशांनी जीवात्मा बांधलेला असतो. प्रेरयिता शिव सर्वज्ञ असतो तर भोक्ता जीव अल्पज्ञ असतो. ज्याला आपण जड सृष्टी म्हणतो त्या जडात देखील अत्यंत गूढरूपाने चैतन्य वसत असते. शिवाच्या शक्तीचे शुद्ध उपाधी (माया) आणि अशुद्ध उपाधी (माया) असे दोन भेद आहेत. त्यांपैकी शुद्ध उपाधी शिवाच्या आश्रयाने राहते. ती आपल्या आश्रयाला म्हणजे शिवाला मोहित करीत नाही. अशुद्ध उपाधी जीवाच्या आश्रयाने राहते आणि जीवाला मोहात पाडते.

आपल्या कर्मांमुळेच जीवात्मा निरनिराळ्या योनींमधून भ्रमण करीत असतो. सुखदुःखे भोगत असतो. एखादा जीवात्मा अनेक जन्मांत सत्कर्मे करीत असतो. त्याचे सत्कर्म परिपक्व झाले की त्याच्या वासनांचा क्षय होऊन त्याचे अंतःकरण परिशुद्ध होते आणि त्याच्यावर शिवाची कृपा होते. असा अंतःकरणाचा जीव म्हणजेच 'पिंड' होय.

> शिवप्रसादाज्जीवोऽयं जायते शुद्धमानसः।
> शुद्धान्तःकरणे जीवे शुद्धकर्मविपाकतः।।
> जायते शिवकारुण्यात् प्रस्फुटा भक्तिरैश्वरी।
> जन्तुरन्त्यशरीरोऽसौ पिण्डशब्दाभिधेयकः।।५४-५५।।

शिवाच्या अनुग्रहाने त्याच्या शुद्ध अंतःकरणात शिवभक्ती उत्पन्न होते. मग तो मोक्षमार्गाचा अधिकारी होतो.

ज्याच्या मनात शिवभक्ती प्रकट होते अशा जीवाचा जन्म हा अखेरचा असतो. या जन्मात त्याला मुक्ती प्राप्त होते आणि जन्म–मरणाच्या चक्रातून त्याची कायमची सुटका होते. ज्याचे अंत:करण शुद्ध असते आणि ज्याच्या मनात शिवभक्ती उत्पन्न होते अशा मनुष्याला या ठिकाणी 'पिंड' असे म्हटले आहे. हे पिंडस्थल एकशे एक स्थलांतील पहिले स्थल असून आपणदेखील ते प्राप्त करून घेऊ शकतो. या ठिकाणी पिंडस्थलाचे विवेचन पूर्ण झाले आहे. यापुढील पिंडज्ञानस्थलाचा विचार आपण उद्यापासून करू एवढे बोलून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

अशा प्रकारे प्रेरयिता, भोक्ता आणि भोज्य अशा त्रिविध तत्त्वाचे वर्णन या पिंडस्थलात केलेले आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
२० जुलै १९९०

---

आशीर्वचन सहावे

## पिंडज्ञानस्थल– १

जिज्ञासू सद्भक्तांनो,

गेले पाच दिवस आपण भक्तस्थलातील पहिल्या पिंडस्थलाविषयी विचार केला आहे. अनेक जन्मांत वेदविहित कर्मे केल्याने ज्याचे अंत:करण परिशुद्ध होते आणि ज्याच्या हृदयात शिवभक्तीचा उदय होतो अशा जीवात्म्याला 'श्रीसिद्धान्तशिखमणी'त 'पिंड' असे म्हटले आहे. जो साधक पिंडस्थली होतो त्याचा जन्म अंतिम असतो, अखेरचा असतो. म्हणजे या जन्मात त्याला मुक्ती मिळते आणि त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. पिंडस्थलानंतरचे दुसरे स्थल आहे पिंडज्ञानस्थल. या स्थलाविषयी ज. रेणुकाचार्य सांगतात:–

**शरीरात्मविवेकेन पिण्डज्ञानी स कथ्यते।**
**शरीरमेव चार्वाकैरात्मेति परिकीर्त्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.५५)

शरीर आणि आत्मा यो दोन वस्तूंचे ज्याला यथार्थ ज्ञान होते त्याला 'पिंडज्ञानी' म्हणतात. सामान्य माणसाला शरीर आणि आत्मा ही दोन वेगळी तत्त्वे आहेत, हे माहीत नसते. शरीरापासून आत्मा वेगळा आहे याचे त्यांना ज्ञान नसते. जन्मापासून मृत्यूपर्यंत मनुष्य शरीरालाच कवटाळून बसलेला असतो. शरीर म्हणजेच आपण, असे तो समजत असतो. जो शरीर हेच सर्वस्व मानतो त्याला अटळपणे दु:ख भोगावे लागते. कारण शरीर हे सर्व दु:खाचे मूळ आहे. अनेक जन्मांत दु:ख भोगून आर्त झालेला जीवात्मा केवळ आत्मज्ञानामुळेच दु:खापासून मुक्त होऊ शकतो, अन्य कशामुळेही नाही. म्हणून प्रत्येक मनुष्याला शरीर आणि आत्मा यांचे यथार्थ ज्ञान प्राप्त करावे लागते. पिंडज्ञानस्थलात ज. रेणुकाचार्यांनी हे ज्ञान प्रकट केले आहे.

आत्म्याबद्दल विचार करताना तत्त्वज्ञांनी कशाकशाला आत्मा मानले याचा विचार करावा लागतो. भारतामध्ये

अनेक दर्शने निर्माण झाली. त्यामधले पहिले दर्शन आहे चार्वाकदर्शन. चार्वाक म्हणजे 'चारुः वाक्'. चारू म्हणजे गोड आणि वाक् म्हणजे बोलणे. ज्याचे बोलणे अर्थात् ज्याचा विचार अत्यंत गोड आहे तो चार्वाक होय. चार्वाकदर्शन चार्वाकाचा विचार सर्वसामान्य माणसांना अत्यंत प्रिय असा आहे. फार सोपा आहे हा विचार चार्वाक सांगतो:-

यावज्जीवेत् सुखं जीवेद् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्।
भस्मीभूतस्य देहस्य नुरागमनं कुतः।।

फार सुरेख आहे हा उपदेश! चार्वाक सांगतो की जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत भरपूर सुख भोगा, सुख भोगण्यासाठी पैसा लागतो. तो नसेल तर माणसाने काय करावे? चार्वाक सांगतो, त्यासाठी तुम्ही कर्ज काढा आणि मनसोक्त तूप प्या, मौज करा. ऋण काढून सण साजरा करा. कर्ज काढायचे, मौज करायची, उद्योगधंदा काही करायचा नाही तर मग कर्ज कसे फेडायचे? चार्वाक म्हणतो, कर्ज फेडण्याची गरजच काय आहे? जो कर्ज देतो तोदेखील एक ना एक दिवस मरणारच आहे. जो कर्ज घेतो तोदेखील त्याच वाटेने जाणार आहे. एकदा देहाची राख झाली की पुन्हा कुणी जन्माला येत नसतो. मग कशाला कर्ज फेडायची काळजी करायची?

हे ऐकून तुम्हाला किती बरे वाटले, हे तुमच्या चेहऱ्यांवरून आम्हाला दिसत आहे. हा विचार ऐकून तुम्हाला एवढा आनंद झाला तर तसे वागल्यावर किती आनंद होईल! चार्वाकाच्या मते आत्मा कोणी वेगळा नसून शरीर हाच आत्मा होय. प्रत्यक्ष प्रमाण हेच खरे आहे. जे दिसते तेच खरे मानले पाहिजे. जे दिसत नाही ते सर्व खोटे होय. शरीरापेक्षा वेगळा असा आत्मा अस्तित्त्वात नाही. असे हे चार्वाकदर्शन आहे.

शरीर म्हणजेच आत्मा असे म्हणणाऱ्या चार्वाकाला जर तुम्ही विचारले की जिवंत शरीर आणि मृत शरीर यांच्यात फरक का दिसतो? जिवंत शरीर खाते, पिते, बोलते, हालचाल करते. मृत शरीर निश्चेष्ट पडलेले असते. त्याला स्वत:हून काहीही हालचाल करता येत नाही. चार माणसे त्याला उचलून घेऊन जातात, हे कसे? याला चार्वाकाचे उत्तर आहे. त्याचे म्हणणे असे की पृथ्वी, आप, तेज, वायू या चार महाभूतांचा संयोग शरीरात झालेला असतो. चार तत्त्वे एकत्र आल्यामुळे शरीरात चैतन्य निर्माण झालेले दिसते. पान, चुना आणि काथ हे एकत्र करून जर चघळले तर आपले तोंड लाल होते. म्हणजे तीन वस्तूंच्या एकत्रिकरणामुळे लाल रंग उत्पन्न होतो. त्या तीन वस्तूंपैकी एकही वस्तू लाल रंगाची नसते. त्याप्रमाणे चेतन नसलेल्या चार महाभूतांच्या संयोगामुळे शरीरात चेतना येते. परंतु चेतना म्हणजे आत्मा नव्हे. शरीरात चेतना आल्यावर ते हालचाल करते. म्हणून आपण त्याला जिवंत मानतो. जेव्हा चार महाभूतांत विघटन होते, त्यांच्यातील संयोग नष्ट होतो तेव्हा चेतना संपल्यामुळे ते शरीर मृत होते. तेव्हा आपण त्याला मेला असे म्हणतो. शरीर मृत होते याचा अर्थ, त्याच्यात संयुक्त झालेली महाभूते वियुक्त होतात, एवढाच आहे. शरीरातून आत्मा निघून गेला असे मानणे योग्य नाही, असे चार्वाक म्हणतो.

चार्वाकाचा एक युक्तिवाद असा आहे. तो म्हणतो, तुम्ही सर्व संस्कार शरीरावर करता, आत्म्यावर करीत नाही. म्हणून शरीर हाच आत्मा आहे असे मानले पाहिजे. मुलाच्या जन्मापासून ते त्याच्या मृत्यूपर्यंत वैदिक शास्त्राप्रमाणे सोळा संस्कार केले जातात. गर्भाधान संस्कारापासून ते अंत्य संस्कारापर्यंत. हे सर्व संस्कार केले जातात. गर्भादान संस्कारापासून ते अंत्य संस्कारापर्यंत. हे सर्व संस्कार शरीराशी संबंधित आहेत. आपण लिंगधारण करतो ते शरीरावर. आपण मुलाचे नाव ठेवतो म्हणजे त्याच्या शरीराला एक नाव देत असतो. अंत्य संस्कारदेखील शरीरावरच केला जातो. म्हणून शरीर हाच आत्मा होय असा चार्वाकाचा दावा आहे.

काही तत्त्वज्ञांच्या मते इंद्रियांचा संघात म्हणजे शरीर असून इंद्रिये हाच आत्मा होय. काही लोक ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये अशा दहा इंद्रियांना आत्मा मानतात तर काही जण फक्त ज्ञानेंद्रियांनाच आत्मा मानतात. शरीरात प्राण नसेल तर इंद्रिये काही करू शकत नाहीत. म्हणून काही तत्त्वज्ञ प्राणाला आत्मा मानतात. प्राणामुळे सर्व इंद्रियांचे व्यवहार होतात हे खरे असले तरी प्राण हा जड आहे, त्याच्या ठिकाणी ज्ञान नाही. त्यामुळे प्राणाला आत्मा मानण्यात काही अर्थ नाही. काही जण मनाला तर काही जण बुद्धीला आत्मा मानतात. मन आणि बुद्धी सूक्ष्म असली तरी ते दोन्ही पदार्थ जडच आहेत. शरीर, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी या सर्वांना प्रकाशित करणारे आत्मतत्त्व वेगळेच आहे, असे काही तत्त्वज्ञांच्या लक्षात आले.

आत्मा सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप आहे. आत्म्याच्या अस्तित्त्वामुळे शरीरादी असत्, अचित् आणि दुःखरूप असलेले जड पदार्थदेखील आपल्याला सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप भासतात. म्हणून ज. रेणुकाचार्य शरीर, इंद्रिये आणि बुद्धी यांच्यापासून आत्मा वेगळा आहे हे सांगतातः–

**नेन्द्रियाणां न देहस्य न बुद्धेरात्मता भवेत्।**
**अहंप्रत्ययवेद्यत्वादनुभूतस्मृतेरपि।।५७।।**

न शरीर आत्मा आहे, न इंद्रिय आत्मा आहे, न बुद्धी आत्मा आहे. ज्या ठिकाणी मीपणाचा, अहंपणाचा प्रत्यय आहे तोच आत्मा होय. 'मी' असा बोध ज्या ठिकाणी आहे तो आत्मा आहे. ज्याला आपण 'माझे' म्हणतो ते सारे अनात्म आहे. तुम्ही शरीराला 'मी' म्हणता की 'शरीर माझे आहे' असे म्हणता? माझे हात, माझे डोळे, माझे मन, माझी बुद्धी, माझे शरीर... अशीच तुमची भाषा असते. ज्याला तुम्ही 'माझे' म्हणता ते तुमच्यापासून वेगळे आहे आणि ज्याला तुम्ही 'मी' म्हणता ते तुमचे खरे स्वरूप आहे.

**शरीरेन्द्रियबुद्धिभ्यो व्यतिरिक्तः सनातनः।**
**आत्मस्थितिविवेकी यः पिण्डज्ञानी स कथ्यते।।५८।।**

शरीर, इंद्रिये आणि बुद्धी यांच्यापेक्षा वेगळा, मीपणाचा बोध असलेला आत्मा हा सनातन आहे. अशा आत्मस्थितीचा विवेक जो करतो त्यालाच पिंडज्ञानी म्हणतात. चार्वाक सांगतो ते काही खरे नाही. खा-प्या, मौज करा, त्यासाठी कर्ज काढा हे चार्वाकाचे सांगणे तुम्ही ऐकले तर तुमचे काहीही हित होणार नाही. ऋण काढणे, कर्ज काढणे ही काही सामान्य गोष्ट नाही. काढलेले कर्ज कधी ना कधी, या जन्मात नाही तर पुढल्या जन्मात फेडावेच लागते.

एक चोर मध्यरात्री एका शेतकऱ्याचा घरात शिरला. शेतकरी सधन होता. चोराने दागदागिने, रोकड जमा केली, एका गाठोड्यात बांधली आणि लपतछपत घराबाहेर पडला. बाहेर गोठा होता. अंधारात त्याचा पाय एका म्हशीवर पडला आणि एकीकडे गाठोडे, दुसरीकडे तो असा खाली पडला. ती म्हैस घाबरली आणि तिच्या तोंडातून विलक्षण शब्द बाहेर पडले. ती म्हणाली, "तेवढ्याला एवढं तर एवढ्याला केवढं?"

म्हैस बोलली हे पाहून चोर घाबरला, आश्चर्यचकित झाला. त्याने म्हशीला विचारले, "तू काय बोललीस त्याचा अर्थ मला कळला नाही. जरा समजावून सांग."

म्हैस म्हणाली, "बाबा रे मीदेखील तुझ्यासारखीच गेल्या जन्मात चोर होते. मी एका घरात चोरी केली. तो घरमालक काही श्रीमंत नव्हता.. त्याच्या घरात मला फक्त ताक सापडले आणि मी ते पोटभर प्याले. तेवढ्या

ताकाच्या चोरीसाठी, त्याची परतफेड करण्यासाठी या जन्मात मी त्याच्या गोठ्यात म्हैस होऊन दूध देत बसले आहे. ताकाची परतफेड जर एवढी आहे तर तू जे गाठोडे घेऊन चाललास त्याची परतफेड केवढी असेल असा प्रश्न माझ्या मनात आला. म्हणून 'तेवढ्याला एवढं तर एवढ्याला केवढं' असे शब्द माझ्या तोंडातून बाहेर पडले.''

म्हशीचा उपदेश ऐकून चोर शहाणा झाला आणि गाठोडे तेथेच सोडून निघून गेला.

चार्वाकाचे सांगणे ऐकून उद्यापासून तुम्ही तसे वागू नका. घेतलेल्या कर्जाची परतफेड करावी लागते हे लक्षात ठेवा. घेतलेले कर्ज बुडवल्यावर तेवढ्यापुरते बरे वाटेल, परंतु ते पुढे सव्याज फेडावे लागेल हे लक्षात घेतले पाहिजे. म्हणून शरीर आत्मा नसून शरीराच्या आत वसणारे चैतन्य हाच आत्मा होय असे जो जाणतो तोच पिंडज्ञानी आहे, असे ज. रेणुकाचार्य सांगतात. या स्थलाचा अधिक विचार आपण उद्या करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
२१ जुलै १९९०

---

आशीर्वचन सातवे

## पिंडज्ञानस्थल– २

जिज्ञासू सद्भक्तांनो,

ज. रेणुकाचार्यांनी पिंडज्ञानी पुरुषाचे जे लक्षण सांगितले ते आपण काल ऐकले आहे. शरीर आणि आत्मा यांचे यथार्थ ज्ञान ज्याला असते अशा पुरुषाला पिंडज्ञानी म्हणतात. जगात सांसारिक माणसे असंख्य आहेत, परंतु पिंडज्ञानी मनुष्य मात्र अभावानेच आढळतो. आपल्या अंतर्यामी असलेला आत्मा प्राप्त करून घेणारा, म्हणजेच आत्मज्ञान मिळवणारा धीर पुरुष एखादाच असतो, असे उपनिषदात म्हटले आहे. बहिरंगात सर्व माणसे रंगतात, अंतरंगात रंगणारा एखादाच असतो. तुम्ही सिनेमाला गेलात तर एकटक तीन तासापर्यंत पडद्याकडे पाहत असता. पुढे काय घडते, पुढे काय घडते, अशी उत्सुकता मनात वागवत. काय घडणार आहे तिथे? तुमच्या घरात जे रोज घडते तेच सिनेमाच्या पडद्यावर घडत असते. तुमच्या जीवनाचाच तो एक आरसा असतो. त्यात नवीन काय असणार? तुमच्या रोजच्या जीवनात घडणारे जे छोटे प्रसंग असतात तेच सिनेमात मोठे करून प्रभावीपणे दाखवलेले असतात. आपण तेच ते पाहत असतो. जोपर्यंत डोळे संपूर्णपणे मिटत नाहीत म्हणजेच जोपर्यंत माणूस शिवैक्य होत नाही तोपर्यत तो सतत बाहेर पाहत असतो. आपल्या अंतरंगात कधीच डोकावून पाहत नाही. आपली सर्व इंद्रिये बहिर्मुख आहेत. बाह्यरूप आपण पाहू शकतो, बाहेरचा स्पर्श आपण अनुभवू शकतो, बाहेरचा रस आपण चाखू शकतो, बाहेरचा शब्द आपण ऐकू शकतो आणि बाहेरचा गंध आपण हुंगू शकतो, परंतु अशब्द, अस्पर्श, अव्यय अशा परमात्म्याला मात्र आपण अनुभवू शकत नाही. कारण तो आपल्या अंतर्यामी राहतो, बाहेर राहत नाही.

विषय समोर असून जर इंद्रिये त्यांच्याकडे धावत नसतील तर अशा पुरुषाला धीर पुरुष म्हणावे लागेल. आत्मज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी इंद्रियांना अंतर्मुख करावे लागते. आत्मज्ञान हे अतिशय दुर्लभ आहे. 'आत्मलाभात् परं लाभो न विद्यते' असे शास्त्रात म्हटले आहे. मनुष्यजीवनात आत्मलाभाएवढा श्रेष्ठ लाभ अन्य कोणताच नाही. आत्मलाभ फक्त मनुष्यजन्मातच होतो. मनुष्यजन्मात येऊन जर आत्मज्ञान मिळवले नाही तर ती जीवनातली फार मोठी हानी होय. सामान्य मनुष्य अधिक पैसा मिळाला तर लाभ झाला असे म्हणतो. कमी पैसा मिळाला तर हानी झाली असे म्हणतो. तुम्ही व्यापारी लोक दिवाळीच्या दिवशी लक्ष्मीपूजन करता खतावणीवर मध्यभागी स्वस्तिक काढून एकीकडे 'शुभ' तर दुसरीकडे 'लाभ' असे लिहिता. आधी शुभ, नंतर लाभ. हे फक्त तुमच्या लिहिण्यापुरतेच आहे. तुमच्या व्यवहारात पहिले माप घालताना प्रथम 'लाभ' म्हणता, 'शुभ' म्हणत नाही. खरे तर आधी 'शुभ' म्हटले पाहिजे, परंतु तुम्ही आधी 'लाभ' म्हणता आणि मग तुमच्या मनात लोभ निर्माण होतो. कितीही मोजत बसलात तरी तमचा लोभ तृप्त होत नाही. एखाद्या माणसासमोर एकेक रुपयांच्या एक कोटी नोटांचा ढीग घालून त्याला त्या मोजायला सांगितले तर सर्व काही विसरून तो त्या मोजत बसेल. तहान विसरेल, भूक विसरेल, नोटा मात्र मोजत बसेल. त्यात त्याला कंटाळा वाटणार नाही. परंतु त्याला जर एक लक्ष नामजप करायला सांगितला तर तो मात्र त्याला झेपणार नाही. जप करता करता हातातली माळ कधी गळून पडली हे देखील त्याला कळणार नाही. त्याला त्यावेळी प्रचंड झोप येईल.

यावरून तुमचा लोभ कोणावर आहे हे लक्षात येते. तुमचा लोभ देवावर नाही तर त्याच्या संपत्तीवर आहे. संपत्तींचा कितीही लोभ धरला आणि ती कितीही मिळवली तरी हे जग सोडताना तिला येथेच सोडून जावे लागणार आहे. एक पैदेखील तुम्ही सोबत नेऊ शकणार नाही. म्हणून कबीर म्हणतात.

**मुठ्ठी बांध के आया था। हाथ पसार के जायेका।।**

मूल जन्माला येते तेव्हा त्याच्या मुठी बांधलेल्या असतात. त्या कितीही सोडल्या तरी पुन्हा पुन्हा वळतात. जन्माला येताना ते मूल पूर्वजन्मातले संचित जणू हातात घेऊन आलेले असते. मेलेलल्या मनुष्याचे हात मोकळे असतात. त्याच्या हाताच्या मुठी बांधून पाहा. बांधल्या जाणारच नाहीत. येताना मनुष्य मुठी बांधून येतो तर जाताना हात मोकळे ठेवून जातो. मग जीवनात असा लाभ करून घ्यावा की तो सोबत नेता आला पाहिजे. सांसारिक लाभ कितीही झाले तरी तुमचे मन तृप्त होणार नाही.

एक व्यापारी व्यापार करण्यासाठी मुंबईला गेला आणि एक वर्षात पाच लाख रुपयांचा फायदा मिळवून घरी आला. तो बायकोला म्हणाला, "मी व्यापार करून आलो हे खरे, परंतु माझे पाच लाख रुपयांचे नुकसान झाले आहे."

असे म्हणून तो कामानिमित्त घराबाहेर पडला. त्याच्यासोबत मुंबईला गेलेला त्याचा मित्र घरी येऊन त्याच्या बायकोला म्हणाला, "वहिनी, तुमच्या नवऱ्याने वर्षभरात पाच लाख रुपयांची कमाई केली. त्याचा फार मोठा फायदा झाला."

बायकोला आश्चर्य वाटले. नवरा म्हणतो– नुकसान झाले आणि त्याचा मित्र सांगतो– फायदा झाला नेमके काय झाले? नवरा घरी आल्यावर तिने नवऱ्याला विचारले, "तुमचे मित्र मघाशी घरी येऊन गेले. त्यांनी सांगितले की तुम्हाला पाच लाख रुपयांचा फायदा झाला. तुम्ही तर म्हणालात की पाच लाख रुपयांचे नुकसान झाले. तुमचे खरे की मित्राचे?"

व्यापारी म्हणाला, "माझेच खरे आहे. व्यापारासाठी मुंबईला जाताना दहा लाख रुपयांचा फायदा होईल असा माझा

अंदाज होता. परंतु मला फक्त पाच लाख रुपये मिळाले. म्हणजे पाच लाखांचे माझे नुकसान झाले की नाही?

बायकोला होकार देण्याशिवाय गत्यंतरच नव्हेत. फायद्याला नुकसान म्हणण्याची. लाभाला हानी म्हणण्याची प्रवृत्ती कशी असते, ते यावरून लक्षात येते. लोभी माणसाला कितीही पैसा मिळाला तरी त्याचे समाधान होणे शक्य नाही. काही काळ समाधान झाले असे वाटते, परंतु त्यामुळे अंतिम समाधान मिळत नाही. शाश्वत समाधान तेव्हाच मिळते जेव्हा आत्मलाभ होतो. म्हणून पिंडज्ञानस्थलात ज. रेणुकाचार्यांनी आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे.''

आत्म्याचे स्वरूप शास्त्रात स्पष्ट केले आहे. आत्मा चिद्रूप आहे, सद्रूप आहे, आनंदरूप आहे. लोकांना या शब्दांचे अर्थच कळत नाहीत. सत् म्हणजे काय, चित् म्हणजे काय? सत् म्हणजे तिन्ही कालांमध्ये अस्तित्त्वात असणारा. चित् म्हणजे जो स्वयंप्रकाशित आहे तो. आत्मा आनंदरूप आहे. प्रत्येक मनुष्याला अमरत्वाची ओढ असते. मरण यावे असे कोणालाच वाटत नाही. मरणारा मनुष्यदेखील 'डॉक्टरला बोलवा आणि मला वाचवा' असेच म्हणतो. शरीर आहे म्हणून आपण जिवंत आहोत असे सर्वसामान्य माणसाला वाटत असते. परंतु आत्मा शरीराशिवाय देखील राहू शकतो. त्याचे अस्तित्त्व सदैव असते. म्हणून तो सत् आहे. आत्मा प्रकाशरूप आहे. स्वप्नात तुम्ही दृश्य पाहता तेथे कोणाचा प्रकाश असतो बरे? तेथे सूर्य नसतो, चंद्र नसतो, दिवा नसतो. मग कोठला प्रकाश असतो? तर तेथे आत्मप्रकाश असतो. आत्मप्रकाशामुळे तुम्ही स्वप्न पाहू शकता. गाढ झोपेत सर्वांना अतिशय आनंद मिळतो. हा आनंद कोठून येतो? काही खाल्यामुळे की काही प्याल्यामुळे? असे काही नसते. तेथे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पंचविषयदेखील नसतात. तरीही आनंद मिळतो तो आनंद आत्म्यापासून मिळतो. म्हणून आत्मा आनंदरूप आहे म्हणून आत्मा आनंदरूप आहे. अशा आत्म्याला जाणून घेणे हेच पिंडज्ञानस्थल होय.

> **नश्वराणि शरीराणि नानारूपाणि कर्मणा।**
> **आश्रितो नित्य एवासाविति जन्तोर्विवेकिता।।**
> **शरीरात् पृथगात्मानमात्मभ्य: पृथगीश्वरम्।**
> **प्रेरकं यो विजानाति पिण्डज्ञानीति कथ्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.५९-६०)

या दोन श्लोकांत ज. रेणुकाचार्यांनी शरीराचे क्षणभंगुरत्व आणि आत्म्याचे अमरत्व फार सुरेख रीतीने पटवून दिले आहे. शरीर हे नष्ट होणारे आहे, ते क्षणभंगुर आहे. कमलदलावरचा दवबिंदू जेवढा अस्थिर असतो तेवढेच शरीर अस्थिर असते. आता दिसते, नंतर नसते. शरीरे अनेक असतात. उद्भिज, स्वेदज, अंडज आणि जरायुज असे चौऱ्यांशी लक्ष योनींचे चार प्रकार शास्त्रकारांनी मानलेले आहेत. प्रत्येक प्रकारात एकवीस लक्ष विविध प्रकारचे जीव असतात. ईश्वरनिर्मित सृष्टी वैचित्र्यपूर्ण आणि वैविध्यपूर्ण आहे. तिचे रूप न्याहाळणे हे मनोरंजक आणि आनंददायक आहे. माणसाने आपल्या बुद्धिसामर्थ्याने मोठमोठे कारखाने उभे केले. त्या कारखान्यातील प्रॉडक्शन पाहिले तर काय आढळते? प्रत्येक वस्तू ही सारखी असते. परंतु परमेश्वराने जी सृष्टी निर्माण केली तिच्यात एवढे वैविध्य आहे की एकासारखे दुसरे कोणी नाही. एकाच आईच्या उदरातून जन्मलेली मुले रंगरूपांनी आणि स्वभावांनी वेगवेगळी असतात. एकाच्या हातावर ज्या रेषा असतात तशा रेषा दुसऱ्या कोणत्याच मनुष्याच्या हातावर नसतात. ही गोष्ट केवढी विलक्षण आहे! एखाद्याची हुबेहूब सही दुसरा करू शकतो, म्हणून

सहीपेक्षाही अंगठ्याची निशाणी महत्त्वाची मानली जाते. कारण प्रत्येकाच्या अंगठ्यावरच्या रेषा वेगवेगळ्या असतात. मुंग्यांच्या रांगेमधल्या मुंग्या आपल्याला सारख्याच वाटतात. परंतु प्रत्येक मुंगी दुसरीपेक्षा वेगळी आणि स्वयंभू असते. अशी वैविध्यपूर्ण आणि वैशिष्ट्यपूर्ण सृष्टी ईश्वराने निर्मिलेली आहे.

माणसांच्या रंगरूपांत, स्वभावांत, वर्तनात एवढा फरक का आढळतो? याचे काय कारण असावे बरे? जीवात्म्यांची कर्मेच या भिन्नत्वाला कारणीभूत आहेत. जीवात्मा जेव्हा नश्वर शरीर धारण करतो तेव्हा त्याच्या मनात शरीराभिमान, इंद्रियाभिमान, जात्यभिमान इत्यादी अनेक प्रकारचे अभिमान उत्पन्न होतात. त्यावेळी तो आपल्या आत्मरूपाला विसरून जातो. शरीर म्हणजेच मी आहे असे मानू लागतो. शरीर आणि जीवात्मा हे भिन्न आहेत याची जाणीव मनुष्य जिवंत असताना होत नाही. मृत्यूनंतर मात्र याच्या शरीरातील जीव निघून गेला हे जाणवते. माणूस मेला तर तुम्ही त्याचा उल्लेख 'तो गेला' अशा शब्दात करता. मेला म्हणजे शरीर सोडून गेला हेच तुम्ही सांगत असता.

जोपर्यंत शरीरात जीवात्मा आहे तोपर्यंत शरीर ताठ असते, जीव निघून गेला की शरीर लुळेपांगळे होते. तुम्ही त्याला भिंतीशी नीट बसवू शकत नाही. मग खुंट्या मारून, मानेला दोऱ्या बांधून तुम्ही त्याला भिंतीशी बसवण्याचा किंवा कैलासरथावर बसवण्याचा प्रयत्न करता. पोत्यात जोपर्यंत ज्वारी भरलेली असते तोपर्यंत पोते तुम्ही ठेवलेल्या अवस्थेत भिंतीला लागून नीट उभे असते. पोत्याला छिद्र पाडून ज्वारी बाहेर काढून बघा. मग पाहा पोत्याची कशी अवस्था होते ती. ज्वारी न भरलेले पोते तुम्ही भिंतीला लावून ठेवू शकत नाही. जीव निघून गेलेल्या शरीराची अशीच अवस्था असते. ही अवस्था पाहिल्यावर तुमच्या लक्षात येते की शरीरापेक्षा जीवात्मा वेगळा होता, तो निघून गेल्यामुळे शरीराची अशी विकल आणि दयनीय अवस्था झाली आहे. म्हणून पिंडज्ञानीस्थलातील साधक शरीर आणि आत्मा यांच्यातील वेगळेपण समजून घेतो. ईश्वराने शाश्वत आणि अशाश्वत अशा दोन वस्तूंना एकत्र गुंफून ठेवले आहे. देह अशाश्वत तर आत्मा शाश्वत. देह असत् तर आत्मा सत्. एखादा लबाड व्यापारी तांदळात तांदळासारखे दिसणारे पांढरे खडे घालून ग्राहकांना फसवतो. ते तांदूळ घरी आणल्यावर तुम्ही तसेच शिजवून खाता काय? नाही. तुम्ही ते निवडता, त्यातले खडे बाजूला करता आणि नंतर शुद्ध तांदूळ शिजवून खाता. तांदूळ न निवडता शिजवून खाल्ले तर काय होईल? तुमचे बत्तीस दात जागेवर राहणार नाहीत. म्हणजे व्यवहारात नको असलेले बाजूला काढणे आणि हवे असलेले स्वीकारणे हे काम तुम्ही चोख करता. परमार्थव्यवहारदेखील असाच आहे.

ईश्वरानेदेखील शरीर आणि आत्मा यांना एकत्र मिसळून ठेवले आहे. तुमच्या बुद्धीची परीक्षा घेण्यासाठी. सुवर्णपात्रात त्याने सत्य झाकून ठेवले आहे. परंतु मनुष्य सुवर्णपात्र पाहून मोहात पडतो, त्याच्या आत ठेवलेल्या सत्यापर्यंत पोहचत नाही. शरीराच्या सौंदर्यानेच लोभावून जातो. त्याच्या अंतर्यामी वसणारे आत्मसौंदर्य न्याहाळत नाही. शरीराची निगा राखण्यात तो सारे आयुष्य खर्ची घालतो. एका हिंदी कवीने म्हटले आहे:-

**ब्राह्मण कुल में जन्म लिया किया धोबी का काम मैने।**
**बना चमार तभी पहचाना छुपा हुवा मुझको मैं।।**

ब्रह्मज्ञान संपादन करण्याची योग्यता ज्याच्याजवळ असते तो ब्राह्मण होय. केवळ मनुष्यजन्मातच ब्रह्मज्ञान प्राप्त करता येते. म्हणून मनुष्यजन्म हाच ब्राह्मणजन्म आहे असे कवीला सुचित करायचे आहे. तो म्हणतोः मी ब्राह्मणकुळात जन्म घेतला खरा, परंतु काम मात्र धोब्याचे केले. धोबी काय करतो? गावातून मळलेले कपडे गोळा करतो. नदीवर नेऊन धुतो, वाळवतो, परत ज्याचे त्याला नेऊन देतो. जन्मभर तो हेच करीत असतो.

दुसऱ्याचे कपडे स्वच्छ करणे हेच त्याचे काम असते. कवी म्हणतो: मी धोब्याचेच काम केले आहे. केवळ शरीर स्वच्छ करण्यात सारे आयुष्य घालवले. केवळ स्वत:चे शरीरच नव्हे तर मुलामुलींची, नातवांची शरीरेही स्वच्छ केली. एवढे करून देखील शरीरातील आत्मतत्त्व ओळखता आले नाही.

आत्मज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी म्हातारे व्हावे लागते असा काही लोकांचा समज असतो. आत्मज्ञान मिळवण्याचे आमचे वय झाले आहे काय, असा प्रश्न ते विचारतात. लहान मुले जर प्रवचनाला आली तर त्यांना हे लोक म्हणतात, 'अरे, हे वय काय प्रवचन ऐकण्याचे आहे?' मग कधी ऐकायचे प्रवचन? म्हातारा झाल्यावर? ज्यावेळी काही ऐकू येत नाही त्यावेळी ऐकले पाहिजे काय? त्यावेळी ऐकून न ऐकल्यासारखेच होईल.

कवी म्हणतो की ज्यावेळी चांभार झालो त्यावेली माझ्यातला खरा मी मला सापडला. चांभार काय करतो? मेलेल्या जनावराची कातडी सोलतो. आतले सर्व अवयव वेगळे करतो. त्यावेळी त्याला बोध होतो की या शरीरात आता जीव नाही. तो निघून गेला आहे. हा देह कितीही सोलला तरी यात जीव सापडणे शक्य नाही. जीव हा देहापेक्षा वेगळाच असतो. विवेकबुद्धीने जर हा विचार आपण आपल्या शरीराबाबत केला तर आपल्या खऱ्या रूपाचा म्हणजे आत्मरूपाचा बोध होऊ शकतो. नाशिवंत शरीरात अविनाशी आत्म्याला ईश्वराने ठेवले आहे. एका वचनकाराने म्हटले आहे: मी लोणी भांड्यात घालून तापवले तर भांडे वितळून गेले आणि लोणी तसेच राहिले. सामान्यत: आपण पाहतो की लोणी तापवले तर ते वितळते आणि त्याचे तूप होते, भांडे वितळत नसते. परंतु वचनकार म्हणतो की भांडे वितळले, लोणी तसेच राहिले. याचा वाच्यार्थ असा की आत्मा हा लोण्यासारखा आहे आणि शरीर हे भांड्यासारखे आहे. शरीररूपी भांड्यात आत्मारूपी लोणी ईश्वराने ठेवले आहे. आधिभौतिक, आध्यात्मिक, आधिदैविक असे तीन प्रकारचे अग्नी शरीरूप भांड्याला जाळत असतात. त्यामुळे शरीर जळून जाते, नष्ट होते; परंतु त्याच्या आतील आत्मा मात्र आहे तसाच राहतो. आत्मा शस्त्राने छेदला जात नाही, अग्नीने जाळला जात नाही आणि त्याला वायूदेखील शोषू शकत नाही. सामान्य माणसे शरीराचा नाश झाला की रडत बसतात. आत्मा अविनाशी आहे हे त्यांना कधीच उमगत नाही. ज्यांना आत्मज्ञान नसते ते जन्मभर दु:ख भोगत राहतात. जे आत्मज्ञानी असतात ते सदैव सुखी असतात.

शरीरापासून आत्मा वेगळा आहे आणि आत्म्याहून ईश्वर वेगळा असून तो आत्म्यांना प्रेरक आहे असे जाणणारा मनुष्यच पिंडज्ञानी होय, असे ज. रेणुकाचार्य सांगतात. म्हणून प्रत्येकाने पिंडज्ञान प्राप्त करून घेण्याची आवश्यकता आहे.

उपनिषदात नचिकेताची कथा आलेली आहे. त्याच्या पित्याने, वाजश्रवा ऋषीने एकदा ब्राह्मणांना शंभर गाई दान दिल्या. कारण त्याला पुण्य हवे होते. त्या गाई कशा होत्या? अशक्त, रोगट, दूध न देणाऱ्या. दान देताना तुम्हीही असेच दान देता. देवपूजेसाठी स्वस्त, किडलेल्या सुपाऱ्या आणता. खाण्यासाठी मात्र चांगल्या आणता. मंदिरात जाऊन नारळ फोडला आणि तो कुजका निघाला तर देवाला पावला म्हणून टाकून देता. नारळ जर चांगला निघाला तर त्याची दोन्ही शकले पुजाऱ्याशी भांडून घरी आणता. त्याला म्हणता, आम्हाला खोबऱ्याची चटणी करायची आहे. प्रसादापेक्षा चटणी महत्त्वाची. याप्रमाणेच अशक्त, रोगट गाई वाजश्रवा ऋषीने दान केल्या.

नचिकेताला हे पटले नाही. त्याने त्याविषयी पित्याला विचारले. असे करणे बरोबर नाही, हे सांगितले. परंतु पिता आपल्या मतावर ठाम होता. शेवटी नचिकेताने पित्याला विचारले, "माझेही दान करून टाका. कुणाला करणार?"

पिता रागाने म्हणाला, "मी तुला यमाला देऊन टाकले आहे."

मुलावर तुम्ही रागावला तर तुम्ही चिडून म्हणता. जा मर. असाच नचिकेतावर पिता रागावला होता. पण

नचिकेताने तें खरे मानले आणि तो स्वतःच यमाच्या दारात जाऊन उभा राहिला. यम त्यावेळी घरी नव्हता, तो भूलोकात कोणाचे तरी प्राण हरण करण्याकरिता गेलेला होता. तीन दिवसपर्यंत यमाची वाट पाहात नचिकेता त्याच्या दारात उभा होता. यम परतला. नचिकेताची निष्ठा पाहून प्रसन्न झाला यमाने नचिकेताला सांगितले की मी प्रसन्न झालो आहे. तू मला तीन वर माग.

नचिकेताने पहिला वर मागितला, ''माझा पिता भूलोकात एक यज्ञ करीत आहे. त्यानिमित्त त्याने शंभर गायी दान केल्या आहेत. परंतु त्या अशक्त आणि रोगट आहेत. या दानामुळे माझ्या पित्याला कोणतेही पाप न लागता त्याला यज्ञाचे फळ मिळावे.''

''तथास्तु. दुसरा वर माग.'' यम म्हणाला. नचिकेताने दुसरा वर मागितला, ''यमलोकातून मी भूलोकात गेल्यावर माझ्या पित्याने माझा स्वीकार करावा.''

''तथास्तु. तिसरा वर माग''

''यमदेवा, आत्मा म्हणजे काय ते मला सांगा. मला आत्मज्ञानाचा उपदेश करा.'' नचिकेताने तिसरा वर मागितला.

यमाला आश्चर्य वाटले. तो म्हणाला, ''बाळ तू अजून लहान आहेस. तुला कशाला हवे आहे आत्मज्ञान? तुला शंभर वर्षाचे निरामय आयुष्य देईन, तुला हवी तेवढी संपत्ती देईन, तुला हवे तेवढे पुत्र होतील असा आशीर्वाद देईन. हे सारे घे, पण आत्मज्ञानाचा नाद सोडून दे.''

पण नचिकेताने आपला हट्ट सोडला नाही. तो म्हणाला, ''तू मला शंभर वर्षांचे आयुष्य दिले तरी ते संपल्यावर तू पाश घेऊन माझ्याकडे येणारच आहेस. म्हणजे केव्हा ना केव्हातरी मला मृत्यू येणारच आहे. त्यामुळे तू दिलेले आयुष्य मला नको आहे. माणसाला संपत्ती कितीही मिळाली तरी तिच्यामुळे अंतिम सुख मिळू शकत नाही. त्यामुळे संपत्ती घेऊन मी काय करू? मला अमरत्व प्रदान करणारे आत्मज्ञानच हवे आहे. ते मला दे.''

शेवटी यमाने नचिकेताला आत्मज्ञानाचा उपदेश केला.

आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी शरीराचा मोह सोडावा लागतो आणि अंतर्मुख व्हावे लागते. ईश्वराने मनुष्याला जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती अशा तीन अवस्था दिल्या आहेत. जागृतास्थेत आपण जग पाहतो तेव्हा ईश्वराच्या सद्रूपाचा म्हणजेच त्याच्या अस्तित्वाचा आपल्याला प्रत्यय येतो. स्वप्नावस्थेत त्याच्या चिद्रूपाचा म्हणजे त्याच्या प्रकाशरूपाचा आणि सुषुप्ति-अवस्थेत ईश्वराच्या आनंदरूपाचा अनुभव आपल्याला येतो. आत्मा हा सर्वांना आधारभूत आहे.

आम्ही ज्या आसनावर बसलो आहोत त्याला आधार खालचा चबुतरा आहे. चबुतऱ्याला आधार जमीन आहे. तसा सर्व विश्वाला आधार परमेश्वर आहे. परमेश्वर म्हणजेच आत्मा. आत्म्यात जीवभाव आला तर त्यालाच जीवात्मा म्हणतात. परंतु शुद्धात्मा म्हणजेच परमात्मा, परमेश्वर होय. आत्मा अस्तित्त्वात नसेल तर मग काहीच अस्तित्त्वात नसणार आहे. त्याच्या अस्तित्त्वाची प्रमाणे आपल्याला क्षणोक्षणी जाणवतात. अशा आत्म्याचे ज्ञान पिंडज्ञानी मनुष्याला होते. हे ज्ञान तुम्हा सर्वांना होवो असा आशीर्वाद देऊन आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

२२ जुलै १९९०

## संसारहेयस्थल– १

जिज्ञासू सद्भक्तांनो,

याआधी आपण भक्तस्थलातील पिंडस्थल आणि पिंडज्ञानस्थल या उपस्थलांची चर्चा केली आहे. आज 'संसारहेयस्थल' या तिसऱ्या उपस्थलाविषयी आपण विचार करणार आहोत. 'संसार' म्हणजे काय आणि 'हेय' म्हणजे काय, हे नीट समजून घेतले पाहिजे. हेय म्हणजे जे सोडून देण्याच्या योग्यतेचे आहे ते. याविरुद्ध उपादेय म्हणजे जे ग्रहण करण्याच्या योग्यतेचे आहे ते.

> निरस्तहृत्कलंकस्य नित्यानित्यविवेकिनः।
> संसारहेयताबुद्धिर्जायते वासनाबलात्।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.६१)

संसाराविषयी हेयबुद्धी कोणाच्या मनात निर्माण होते? ज्याच्या हृदयातील दोष पूर्णतः नष्ट झालेले असतात, ज्याचे हृदय अत्यंत परिशुद्ध असते अशा जीवात्म्याच्या मनात. त्याचे हृदय केवळ निष्कलंक असून चालत नाही, त्याबरोबरच त्याच्या ठिकाणी विवेकही असला पाहिजे. विवेक दोन प्रकारचा असतो. नित्यानित्यविवेक आणि अनात्मानात्मविवेक. या प्रपंचात नित्य वस्तू कोणत्या आहेत आणि अनित्य वस्तू कोणत्या आहेत हे समजून घेतले पाहिजे. त्याबरोबरच आत्मपदार्थ कोणता आहे आणि अनात्मपदार्थ कोणता आहे याचाही विचार केला पाहिजे. आपल्या डोळ्यांना ज्या ज्या वस्तू दिसतात त्या परिवर्तनशील असतात. जे परिवर्तनशील असते ते अनित्य असते. ते चिरंजीव होऊ शकत नाही. कोणत्याही कालात, कोणत्याही कारणाने ज्यात किंचितही परिवर्तन होत नाही तिला 'नित्य वस्तू' म्हणतात. आपल्याला दिसणारी सृष्टी परविर्तनशील असल्यामुळे ती अनित्य आहे आणि आपल्या डोळ्यांना न दिसणारा परमेश्वर मात्र नित्य आहे.

दृश्य प्रपंचाला अदृश्य परमात्मा आधारभूत आहे. तुम्ही तुमच्या बागेत किंवा शेतात एखादे झाड लावता. ते वाढले की त्याच्या छायेत विश्रांती घेता, त्याच्या फुलाफळांचा आस्वाद घेता. जे झाड तुम्हाला दिसते, तुमच्यावर सावली धरते ते कशाच्या आधारावर उभे असते? तर तुम्हाला न दिसणाऱ्या मुळाच्या आधारावर. त्याप्रमाणेच दिसणारा प्रपंच, न दिसणाऱ्या परमात्म्याच्या आधारावर उभा आहे. झाडाचे संवर्धन करायचे असेल तर त्याच्या मुळाला पाणी घालावे लागते. मुळाला पाणी न घालता जर खोडावर, फांद्यावर आणि पानांवर पाणी शिंपडले तर झाड वाढेल काय? अर्थातच वाढणार नाही. कारण मूळच झाडाचा आधार आहे. तसा परमात्मा प्रपंचाला आधारभूत आहे. विवेकी मनुष्य हे सर्व जाणतो. प्रपंच हा अनित्य आहे आणि परमात्मा हा नित्य आहे. याची त्याला जाणीव असते. शरीरादी जड पदार्थ अनात्म असून सर्वांतर्यामी असणारे चैतन्य हा आत्मा आहे हे तो जाणतो. असा नित्यानित्यवस्तुविवेक आणि आत्मानात्मविवेक ज्याच्या ठिकाणी असतो, ज्याचे अंतःकरण अत्यंत परिशुद्ध असते अशा मनुष्याच्या मनात संसाराबद्दल हेयबुद्धी उत्पन्न होते.

हेयबुद्धी म्हणजेच प्रपंचविषयक वैराग्यभावना होय. परमात्मतत्त्व जाणण्यासाठी जर एखादा मनुष्य गुरूकडे

गेला तर गुरू त्याची परीक्षा घेतात. त्याचे अंत:करण शुद्ध आहे की नाही, त्याच्या ठिकाणी विवेक उत्पन्न झाला की नाही, त्याच्या मनात संसाराविषयी विरक्ती बाणली की नाही आणि मोक्षप्राप्तीची उत्कट इच्छा त्याच्याकडे आहे की नाही; या चार बाबींची परीक्षा गुरू घेतात आणि जर तो परीक्षेत उतरला तर त्याला उपदेश करतात. विवेक, वैराग्य, शमदमादी षट्संपत्ती आणि मुमुक्षुत्व असे साधनचतुष्टय वेदान्तशास्त्रात सांगितले आहे. साधन नसेल तर साध्य प्राप्त होणार नाही. तुम्ही आगगाडीत बसता म्हणून सोलापूरला पोहोचू शकता. म्हणजे आगगाडी हे तुमचे साधन झाले. जर तुमच्याकडे आगगाडी नसेल बस किंवा कोणते वाहन नसेल, तुमच्या पायात चालण्याचे बळ नसेल आणि तुम्हाला आधार देऊन, पाठीवर उचलून नेणारा कुणी नसेल अशा असहाय्य अवस्थेत तुम्हाला कुठेही पोहोचता येणार नाही. जिथे आहात तिथेच राहावे लागेल. म्हणून साधनाशिवाय साध्य प्राप्त होत नाही. काही गोष्टी साध्य करण्यासाठी साधनाची आवश्यकता असते. एका सुभाषितकाराने कशासाठी कोण अधिकारी आहे हे सांगितले आहे:-

**ज्योतिष्टोमे स्वर्गकामो विवाहे पुत्रकामवान्।**
**वाणिज्ये लोभवान् मोक्षे मुमुक्षुरधिकारवान्।।**

ज्याला स्वर्गप्राप्तीची इच्छा असेल त्याने ज्योतिष्टोमी याग केला पाहिजे, असे मीमांसाशास्त्र सांगते. हा यज्ञ केल्याशिवाय स्वर्गप्राप्ती संभवत नाही. ज्याला पुत्र व्हावा असे वाटत असेल त्याने लग्न केले पाहिजे. लग्नाशिवाय अपत्यप्राप्ती शक्य नाही.

एका संताकडे अनेक लोक काही ना काही इच्छेने जात असत. एका तरुणाला त्याबद्दल कुतहूल वाटले, त्याने एकाला विचारले, ''तुम्ही त्या संताकडे कशासाठी गेला होता?''

''संततीसाठी'', त्याने उत्तर दिले.

''मग झाली तुम्हाला संतती?''

''होय, झाली. गुरुमहाराजांच्या आशीर्वादाने.''

त्या तरुणाला वाटले की आपल्यालाही संतती झाली पाहिजे. तो संताकडे गेला. म्हणाला, ''महाराज, मला अपत्यप्राप्तीची इच्छा आहे. आपण आशीर्वाद द्यावा.''

संताकडे अशी माणसे नेहमीच येत असत. त्यावेळी तो एखादे श्रीफळ देऊन त्यांची बोळवण करीत असे. तरुणालाही त्याने असेच श्रीफळ देऊन एक व्रत करायला सांगितले. तरुणाने निष्ठेने व्रत केले. बरचे महिने आणि वर्ष उलटले. तरुण संताकडे गेला आणि म्हणाला,

''महाराज, इतके दिवस मी निष्ठापूर्वक व्रत केले. पण अजूनही मला संतती झाली नाही. तुम्ही ज्यांना ज्यांना प्रसाद दिला त्या सर्वांना संतती झाली. मग मला का बरे होत नाही?''

संताने विचारले, ''तुमचे लग्न होऊन किती दिवस झाले?''

तरुण उतरला, ''महाराज, माझे अजून लग्नच झाले नाही.''

संताने कपाळावर हात मारून घेतला.

लग्न न करताच संतती हवी असे कोणी म्हटले तर कशी होणार? म्हणून 'विवाहे पुत्रकामवान्'. पुत्रकामना

असेल तर विवाह केला पाहिजे. विवाहित स्त्री-पुरुषच संततीचे अधिकारी होत. त्याप्रमाणेच ज्याच्या मनात धनप्राप्तीची इच्छा असेल तोच व्यापार करू शकतो. इतरांनी त्या वाटेला जाऊ नये.

मुमुक्षू म्हणजे मोक्षप्राप्तीची उत्कट इच्छा असलेला मनुष्य. तोच मोक्षाचा अधिकारी होय. जिवंत राहायला श्वासाची जेवढी गरज असते तेवढीच गरज मुमुक्षू मनुष्याला मोक्षाची असते. मोक्ष हा त्याचा श्वास असतो, ध्यास तर असतोच असतो. म्हणून मुमुक्षू मनुष्यच मोक्षाचा खरा अधिकारी असतो. मोक्ष हवा असेल तर मुमुक्षुत्व अंगी बाणले पाहिजे.

मुक्ती कोणाला नको असते? प्रत्येकालाच ती हवी असते. उद्या जर आम्ही म्हटले की कोणाकोणाला मुक्ती हवी आहे, त्यांची यादी करा. तर दीक्षा घेण्याऐवजी सर्वजण त्या यादीतच आपले नाव घालतील. दीक्षा घ्या, भस्म लावा, लिंगपूजा करा... ह्या भानगडी हव्यातच कशाला? डायरेक्ट मुक्ती मिळणार असेल तर किती छान होईल! प्रत्येकालाच मुक्ती हवी असते. पण त्यांच्या इच्छेत उत्कटता नसते. जाता जाता सहज मिळाली मुक्ती तर बरेच, नाहीतर पुढल्या जन्मी बघू, अशीच सर्वसामान्यांची भूमिका असत. म्हणूनच ज. रेणुकाचार्यांनी गुरुकृपेसाठी तीन सद्गुण हवेत असे म्हटले आहे. अंतःकरणाची शुद्धता, नित्यानित्य व आत्मानात्मविवेक आणि संसारविषयक हेयबुद्धी. हेयबुद्धी म्हणजेच वैराग्य. संसारहेयबुद्धी म्हणजे काय हे समजून घेण्यासाठी संसार म्हणजे काय हे आधी समजून घेतले पाहिजे. संसार सोडला पाहिजे, कारण तो हेय आहे. असे सर्वजण सांगत असतात. पण संसार म्हणजे नेमके काय? काही जण पति-पत्नी आणि मुलेबाळे यांना संसार समजतात, तर काही जण उद्योगधंदा, जमीनजुमला यांना संसार समजतात. परंतु हा काही संसार या शब्दाचा खरा अर्थ नव्हे. तो यापेक्षा वेगळाच आहे.

एका मनुष्याने गुरूकडे जाऊन दीक्षा घेतली. तो रोज जमेल तेवढ्या वेळा गुरूचे दर्श घेत असे. आपण गुरूच्या गावी गेलो किंवा गुरू आपल्या गावी आले तर त्यांचे दर्शन आपण दिवसातून दोन-तीन वेळा तरी घेतले पाहिजे. असे शास्त्र सांगते. त्याप्रमाणे तो शिष्य गुरुदर्शन अनेकवार घेत असे. दिवस उलटत गेले आणि त्याच्या गुरुदर्शनात खंड पडत गेला. दिवसातून तीन वेळा दर्शनासाठी येणारा शिष्य हळूहळू दोन वेळा आणि नंतर मोठ्या कष्टाने एक वेळाच येऊ लागला. गुरूने त्याला विचारले,

"बाबा रे, मी पाहतो आहे की गेल्या काही दिवसांपासून तू दर्शनासाठी क्वचितच येतोस. तुझी प्रकृती वगैरे बरी नाही का?"

"नाही महाराज, तसे काही नाही. माझे आता लग्न झाले आहे. संसार गळ्यात पडला आहे. म्हणून तुमच्या दर्शनासाठी आता वेळ मिळत नाही." शिष्य उत्तरला. त्याने आपल्या बायकोलाच संसार समजले होते. काही दिवसांनी मुले-बाळे झाल्यावर तो त्यांना संसार समजू लागला. मनुष्य जे निमित्त सांगतो, त्याला संसार समजले जाते. पत्नी, मुले, दुकान, मकान, पैसा अशा अनेक गोष्टींना माणसे संसार म्हणत असतात, पण वस्तुतः हे सारे म्हणजे संसार नव्हे. मग संसार म्हणजे आहे तरी काय?

जी वस्तू आपली नाही ती आपल्या मालकीची समजणे ही भावना म्हणजे संसार होय. मनुष्याच्या ठिकाणी अहंकार असतो तसेच ममत्वदेखील असते. असा मनुष्य सांसारिक मनुष्य होय. घरदार आणि अन्य पदार्थ हे दुःख

देणारे नाहीत. घरावर, व्यक्तीवर आणि पदार्थावर तुम्ही 'हे माझे आहे' अशी भावना ठेवता म्हणून तुम्ही दुःखी होत असता. घर, व्यक्ती किंवा पदार्थ हे काही तुम्हाला दुःख देत नसतात. एखादा मनुष्य आपले घर दुसऱ्याला विकून त्याचे पैसे मिळवतो. मग त्याची त्या घरावरची मालकी जशी संपुष्टात येते तसेच त्याचे ममत्वही संपून जाते. त्यानंतर जर त्या घराला आग लागली तरी त्याला दुःख होत नाही, कारण ते घर आता त्याचे नसते. विकण्याआधी जर ते घर जळाले असते तर त्याने मोठ्याने भोकाड पसरले असते, छाती बडवून आकांत केला असता. घर तर तेच आहे, मग त्याच्या वागण्यात असा बदल का बरे व्हावा? कारण विकण्याआधी 'हे घर माझे आहे' अशी त्याची भावना होती आणि विकल्यानंतर 'हे घर माझे नाही' अशी त्याची भावना झाली. म्हणजे ज्या वस्तूवर आपले ममत्व नसते ती वस्तू नष्ट झाली तरी आपल्याला चालते. त्याचे आपल्याला दुःख होत नाही. परंतु याउलट ज्या वस्तूवर आपले ममत्व असते त्या वस्तूला इजा पोहोचली तरी आपल्या मनाला वेदना होतात. याचा अर्थ तुमच्या मनातील ममत्व तुम्हाला दुःख देत असते, संसारातील वस्तू नव्हे. निजगुण शिवयोगींनी म्हटले आहे: 'ममकारदिंदे मिक्किनबंदमुटे।' ममत्व हे सांसारिक बंधन आहे, 'ममेति बध्यते जंजुः न ममेति विमुच्यते।' मोक्ष आणि बंधन यामधला फरक येथे सुरेख रीतीने स्पष्ट केला आहे. 'हे माझे आहे, हे माझे आहे' असे म्हणणारा जीव बंधनात पडतो तर 'हे माझे नाही, ईश्वराचे आहे' असे म्हणणारा जीव मुक्त होतो.

तुम्ही प्रवचन ऐकण्यासाठी घराला कुलूप लावून इथे येता, तेव्हा एक किल्ली सोबत आणता. कुलुप बंद करण्यासाठी जी किल्ली तुम्ही वापरता त्याच किल्लीने तुम्ही कुलूपही उघडता. म्हमजे एकाच किल्लीने दोन क्रिया घडतात. कुलूप बंद करणे आणि कुलूप उघडणे. फक्त किल्ली फिरवण्याची दिशा वेगळी असते. किल्ली डावीकडे फिरवली की कुलूप बंद होते आणि ती उजवीकडे फिरवली की कुलूप उघडते. त्याप्रमाणे मनुष्याचे मन ही एक प्रकारची किल्लीच आहे. मनामुळेच जीवात्मा संसारबंधनात पडतो आणि मनामुळेच तो त्यामधून मुक्त होतो. तुमच्या मनात ममत्व असेल तर समजा की तुमचे कुलूप बंद आहे, तुम्ही बंधनात आहात. ममत्व मनातून नाहीसे झाले की समजा तुम्ही मुक्त झालात. प्रवचन संपल्यावर तुम्ही धावत पळत कुठे जाता? तुमच्याच घरी जाता की दुसऱ्याच्या घरी जाता? चला, आज या घरात जाऊ, उद्या त्या घरात जाऊ असे काही करता का? तुमचे घर झोपडी असेल तर तेच तुम्हाला प्रिय असते, त्यातच तुम्हाला आनंद वाटत असतो. म्हणजे तुम्ही जेथून येथे येता तेथेच पुन्हा परत जाता. घर ही जड वस्तू असली तरी त्याच्यावरील ममत्वामुळे ते एक बंधन झालेले असते. जणू घरातून तुम्ही निघता तेव्हा घराने तुमच्या पायाला बांधलेली अदृश्य दोरी हळूहळू ढिली होत जाते आणि तुम्ही येथे प्रवचनासाठी पोहोचता. प्रवचन संपले की तीच अदृश्य दोरी तुम्हाला हळूहळू तुमच्या घराकडे खेचून नेते. लहान मुले पतंग खेळतात तेव्हा पतंगाची दोरी त्यांच्या हातात असते. दोरी सैल सोडली की पतंग आकाशात उंच उंच जातो. मुले खेळाला कंटाळली किंवा पतंग पडतो आहे असे त्यांना वाटले की ती दोरी खेचतात. पतंग त्यांच्या हाती येतो.

पतंगाची दोरी जशी मुलाच्या हाती असते तशी तुमची दोरी घराच्या हाती असते. घराने ओढले की तुम्ही सरळ घराकडे जाता. घराला संस्कृतमध्ये गृह असे म्हणतात. 'गृह्णातीति गृहः।' जे ग्रहण करते, ओढून घेते ते गृह होय. यात्रेला गेलेला यात्रेकरूदेखील घराची चिंता वाहत असतो. एस्.टी.डी. करून कोण आले, कोण

गेले अशी विचारणा करीत असतो. ज्या वस्तूंना आणि व्यक्तींना आपण आपले मानतो त्या वस्तू-वक्तींनी आपल्या हातापायला जणू एकेक दोरी बांधून ठेवलेली असते. दिसत मुळीच नाहीत, पण प्रत्येक मनुष्याच्या गळ्याला अशा हजारो अदृश्य दोऱ्या बांधलेल्या असतात. जेवढ्या वस्तूंचा संग्रह तुम्ही केलेला असतो त्या सगळ्यांनी तुमच्या गळ्यात पाश अडकवलेले असतात. म्हणून वस्तुविषयक ममत्व हेच बंधन आहे आणि निर्ममत्व हीच मुक्ती आहे.

संसार हेय आहे म्हणजे संसार त्याज्य आहे असे जेव्हा ज. रेणुकाचार्य सांगतात तेव्हा घरदार सोडून अरण्यात जाऊन बसा असा त्याचा अर्थ होत नाही. तुम्ही घर सोडू नका, उद्योगधंदा सोडू नका. फक्त 'हे सर्व माझे नसून परमेश्वराचे आहे' अशी दृढ भावना बाळगा. एवढे केले तर मुक्तीची वाट तुमच्यासाठी खुली होईल. संसार सोडा असे म्हटले तरी खरोखरच तुम्ही संसार सोडू शकता काय? हा विश्वसंसार तुमचा आहे काय? हा सोडताना तुम्ही इथले काय घेऊन जाणार? एक कवडीदेखील घेऊन जाता येणार नाही. कारण हे विश्व, हा प्रपंच ईश्वराचा आहे, ईश्वरनिर्मित आहे. तो तुमचा नाही.

**ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच्य जगत्यां जगत्।**
**तेन त्यक्तेन भुंजीथा: मागृध: कस्यस्विद्धनम्।।**

हा सर्व प्रपंच ईश्वराचा आहे की जीवात्म्याचा? तो जीवात्म्याचा नसून ईश्वराचा आहे आणि ईश्वराने तो जीवात्म्याच्या उपभोगासाठी निर्माण केला आहे. दुसऱ्याने एखादी वस्तू जर आपल्याला वापरायला दिली तर ती काय आपल्या मालकीची होते? एखादी स्त्री मैत्रिणीला नवी साडी वापरायला देत. दोन दिवस वापरून तिने ती परत केली पाहिजे, तसे घडले नाही तर? कोण आपली वस्तू दुसऱ्याला वापरायला देईल? तशी ईश्वराने पंचमहाभूतात्मक सृष्टी, उत्पन्न करून ती जीवात्म्याला उपभोगासाठी दिली आहे. परंतु जीवात्मा मात्र सर्व सृष्टी आपल्या मालकीची समजतो. एखादा भाडकेरी हे माझेच घर आहे म्हणून घरमालकाला कोर्टात खेचतो तसाच हा प्रकार आहे. मालक बिचारा काय करणार? सर्व प्रपंच ईश्वराच्या मालकीचा आहे, जीवात्मे तेथील भाडेकरू आहेत. आपले हे शरीरदेखील एक भाड्याचे घरच आहे. केव्हा ना केव्हातरी ते तुम्हाला सोडावेच लागणार आहे. तुम्ही आपणहून सोडले नाही तरी तुम्हाला बाहेर काढले जातेच. म्हणून आधीपासूनच आपण हे माझे नाही असे जाणून सावध असले पाहिजे. आपण जग आणि शरीर आपले समजलो तरी काही ना काही लीला करून ईश्वर आपल्याला पश्चात्ताप करायला भाग पाडतो. दुःखाची चपराक बसली की मनुष्य शहाणा होतो. त्यावेळी त्याला देवाची आठवण येते.

म्हणून ममत्व म्हणजेच संसार आहे. घर म्हणजे संसार नव्हे, तर घरावरील ममत्व म्हणजे संसार, तुम्ही कुठेही असलात तरी प्रपंच ईश्वराचा आहे ही भावना ठेवली तर तो दुःखदायक ठरणार नाही. संसारहेयस्थलामध्ये जगद्गुरू रेणुकाचार्यांनी संसार म्हणजेच ममत्व असून त्याचा त्याग करा असे प्रतिपादन केले आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
२३ जुलै १९९०

## संसारहेयस्थल- २

जिज्ञासू सद्भक्तांनो,

अनेक जन्मांत पुण्यकर्मे केल्यामुळे एखाद्या जीवात्म्याचे अंत:करण परिशुद्ध होऊन त्याच्याठायी विवेक उत्पन्न होतो. अशा विवेकसंपन्न पुरुषाच्या मनात संसाराबद्दल हेयबुद्धी निर्माण होते. संसार या शब्दाचा अर्थ काय, याचा थोडा विचार काल आपण केला आहे. सामान्य मनुष्य घरदार, मुलेबाळे, शेतीवाडी इत्यादी वस्तूंना संसार मानतो. ईश्वराने जी सृष्टी निर्माण केली आहे त्या सृष्टीतल्या काही वस्तूंचा संग्रह जीवात्मा करतो. त्या वस्तूंवर आपल्या ममत्वाचा शिक्का मारतो. या ममत्वालाच संसार असे म्हणतात. 'संसरति इति संसार:।' जो पुढे पुढेच जातो, कधी हाती लागत नाही, त्याला 'संसार' असे नाव आहे. लहानपणी आपला असा समज असतो की डोक्यावर दिसणारे निळे आकाश एखाद्या सर्कशीच्या तंबूसारखे आहे. आपण धावत धावत जर क्षितिजापर्यंत गेलो तर आपण त्याला हाती पकडू शकू. निळे आकाश क्षितिजावर टेकलेले दिसते. तेथपर्यंत जर धावत गेलो तर क्षितिज पुन्हा दूर गेलेले असते, ते कधीही हाती लागत नाही.

संसाराची आणि सांसारिक वस्तूंची अवस्था अशीच आहे. जीवात्मा सुखाच्या मागे सतत धावत असतो. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पाच विषयांत सुखाचा शोध घेत असतो. युगे उलटून गेली, परंतु त्याला कोठे सुख सापडले नाही. एका कवीने म्हटले आहे:-

तारीख तुम्हे बतलायेगी दुनिया मे सुख का नाम नही।
जिस दिल मे हौस का शिक्का है उस दिल को आराम नही।।

जीवात्मा संसारात सुख शोधण्याचा आटोकाट प्रयत्न करतो. त्यासाठी आयुष्यभर वणवण करतो. आज सुख मिळाले नाही तर उद्या मिळेल. या वर्षी नाही मिळाले तर पुढल्या वर्षी मिळेल. परंतु त्याला ते कधीही मिळत नाही म्हणून कवी म्हणतो, 'तारीखच तुम्हाला सांगेल की संसारात सुख नाही.' तारीख म्हणजे दिवस. आपल्या आयुष्याची एक शेवटची तारीख असते-- लास्ट डेट! आयुष्यात दोनच तारखा महत्त्वाच्या असतात. एक बर्थ-डेट आणि दुसरी लास्ट-डेट. कवी म्हणतो की शेवटची तारीख म्हणजे तुमचे जीवन ज्या दिवशी संपुष्टात येईल त्या दिवशी तुम्हाला कळेल की उभे आयुष्य आपण गमावले तरी सुख सापडले नाही. अंतिम क्षणी तो पश्चात्ताप करतो. एकाची अशी अवस्था पाहून देखील दुसरा शहाणा होत नाही. संसारात आणि सांसारिक वस्तूंत कोणालाही सुख गवसलेले नाही. सुख बाहेर शोधून ते सापडणार नाहीच. कारण ते बाहेर नाही, तर आत आहे. त्याच्या शोधाची दिशाच चुकलेली आहे.

एक म्हातारी आपल्या घरात वाकळ शिवत बसली होती. आपल्या नातलगांना अशा वाकळी शिवून ती भेट देत असे. दुकानात खरेदी केलेल्या ब्लँकेटपेक्षा वाकळीत मायेची ऊब अधिक असते. म्हणून ती सर्वांना वाकळ शिवून 'ही घे बघ, नवी वाकळ' असे म्हणत त्यांना वाकळ देई. वाकळ असते जुन्या कपड्यांचीच, पण ती शिवली की तिला 'नवी वाकळ' म्हणतात. म्हातारी वाकळ शिवत बसली होती. संध्याकाळची वेळ होती. घरात अंधार दाटू लागला होता. दोरा ओवताना तिच्या हातातून सुई खाली पडली. दृष्टी अधू असल्यामुळे तिला सुई सापडेना.

रस्त्यावरून एक शहाणा चालला होता. त्याने सहज वळून पाहिले तर दारातून म्हातारी जमिनीवर काहीतरी शोधत असलेली त्याला दिसली. त्याने उत्सुकतेने विचारले, ''आजी, काय शोधत आहेस तू?''

''अरे बाबा, शिवताना सुई खाली पडली ती शोधत आहे.'' म्हातारी उतरली.

''आजीबाई, मग अंधारात सुई कशी दिसेल? उजेडात पाहा.'' असे सांगून तो निघून गेला. म्हातारी होती जरा शहाणीच. ती घरातून बाहेर आली आणि रत्यावर मर्क्युरी लाईटच्या प्रकाशात सुई शोधू लागली. सुई पडली घरात अन् शोधू लागली रस्त्यावर! जाणाऱ्या-येणाऱ्यांनी म्हातारीची कृती पाहिली. त्यांना वाटले, हिची काहीतरी मूल्यवान वस्तू हरवली आहे, आपण हिला मदत केली पाहिजे. त्यांनीही शोधायला सुरुवात केली. एकाला पाहून दुसरा, दुसऱ्याला पाहून तिसरा, तिसऱ्याला पाहून चौथा. असे हळूहळू लोक जमा होत गेले. सगळे रस्त्यावर शोधाशोध करू लागले. नेमके काय शोधायचे हे कोणालाच माहीत नव्हते. प्रचंड गर्दी जमली, वाहतूक ठप्प झाली.

त्या मार्गाने एक संत चालले होते. त्यांनी गर्दी पाहिली. त्यामधल्या एकाला विचारले, ''तू काय शोधत आहेस? तुझे काही हरवले का?''

''नाही, माझे काही हरवले नाही. पण या रस्त्याने जाताना माझ्या आधी जाणारा मनुष्य काहीतरी शोधत होता म्हणून मीही शोधत बसलो.'' त्याने उत्तर दिले. मग त्याच्या पुढच्या मनुष्याला संताने हाच प्रश्न विचारला. त्याने वरीलप्रमाणेच उत्तर दिले. असे प्रत्येकाला विचारत विचारत शेवटी संत म्हातारीपर्यंत पोहोचले. त्यांनी म्हातारीला विचारले, ''बाई, तुझे काही हरवले आहे का?''

''होय महाराज, माझी सुई हरवली आहे. ती मी शोधत आहे.''

''कुठे हरवली?'' संताने विचारले.

''घरात.'' तिने उत्तर दिले.

''मग रस्त्यावर कशाला शोधत आहेस? सुई हरवली घरात अन् शोधत आहेस रस्त्यावर?''

''महाराज,'' म्हातारी म्हणाली, ''मी घरातच शोधत होते. पण एका शहाण्याने मला उजेडात शोधायला सांगितले. म्हणून मी रस्त्यावरच्या प्रकाशात सुई शोधत आहे.''

संत म्हणाले, ''त्याने बरोबरच सांगितले. प्रकाशातच शोध घेतला पाहिजे. परंतु वस्तू जिथे हरवली तिथे प्रकाश आणून शोधले पाहिजे.''

आपली गत त्या म्हातारीसारखीच आहे. वस्तू जिथे आहे तिथेच तिचा शोध घेतला पाहिजे. दुसरीकडे ती शोधत बसलो तर युगे निघून जातील. पण वस्तू सापडणार नाही. संसारात सुखाचा कितीही शोध घ्या, ते सापडणार नाही. कारण ते तेथे नाहीच, ते आहे आपल्या अंतरंगात. ते आहे आपल्या आत्म्याच्या ठिकाणी. आपल्या अंतरंगात सुख असताना आपण ते बाहेर का बरे हुडकतो? ते असेच, एकाला बघून दुसरा, दुसऱ्याला बघून तिसरा याप्रकारे. हा सर्व वेडेपणा चाललेला आहे. संसारात सुख हुडकले तर निराशेशिवाय पदरात काय पडणार?

संसार हा असा आहे. त्याच्यात सुख शोधण्याचा कितीही प्रयत्न करा, त्याला पकडण्याचा कितीही प्रयत्न करा, तो पुढेपुढेच सरकत जाईल. तुमच्या हाती लागणार नाही. संसार हा असा जीवात्माला आपल्या मागे धावायला भाग पाडतो. म्हणून कवी म्हणतो, 'जिस दिल मे हौस का शिक्का है उस दिल को आराम नही।'

ज्याच्या मनात हौस, आशा असते त्याला कधीही समाधान लाभत नाही. 'नैराश्यं परमं सुखम्।' आशारहित मनुष्यच सुखी होऊ शकतो. म्हणून ज. रेणुकाचार्य सांगतातः-

**ऐहिके क्षणिके सौख्ये पुत्रदारादिसंभवे।**
**क्षयित्वादियुते स्वर्गे कस्य वांच्छा विवेकिनः।।५.६२।।**

संसारात जर अजिबातच सुख नसेल तर जीवात्मा संसाराच्या मागे का लागलेला असतो? त्याचा पाठलाग का करीत असतो? ज. रेणुकाचार्य सांगतात की, संसारात सुखच नाही असे नाही. पण त्यात जे सुख आहे ते क्षणिक असते. सुखाचे दोन प्रकार आहेत. इहलोकातील सुख आणि परलोकातील सुख. इहलोकात सुख भोगून जीवात्मा जेव्हा शरीर सोडतो तेव्हा परलोकात सुख भोगण्याची इच्छा त्याच्या मनात असते. त्याच्या पुण्यकर्मामुळे त्याला परलोकातही सुखप्राप्ती होते. इहलोकातील असो वा परलोकातील असो, हे सुख शाश्वत नाही. एका क्षणापेक्षा अधिक सुख देणारा कोणताही विषय या संसारात नाही. एखादा गुलाबजामून तुम्ही जिभेवर ठेवता त्यावेळी जिभेवर असेपर्यंतच तुम्हाला माधुर्याचा अनुभव येतो. जिभेवर ठेवण्यापूर्वी आणि पोटात गेल्यानंतर त्याचे माधुर्य तुम्हाला जाणवत नाही. एक तासभर तुम्ही तो जिभेवर ठेवत नसता, ठेवू शकतही नाही. म्हणून क्षणापुरतेच सुख तो तुम्हाला देत असतो, त्यापेक्षा अधिक देऊ शकत नाही. आकंठ भोजन झाल्यावर एक गुलाबजामून तुम्हाला खायला सांगितले तर तो दुःखदायक ठरतो. म्हणजे जो पदार्थ आधी सुखदायक असतो तोच नंतर दुःखदायक ठरतो.

एखादा प्रिय असलेला पाहुणा घरी येणार असेल तर मनुष्याला खूप उत्सुकता लागून राहते. पाहुण्याच्या स्वागतासाठी तो स्टेशनवर ज़ातो. गाडी लेट असेल तर आपल्या मनाशी चरफडतो. स्टेशनवर पाहुणा उतरला की त्याला आनंदाने मिठी मारतो. घरी आणून आगतस्वागत करतो. आंघोळीसाठी नवे साबण, गरम पाणी, जेवणात गोडगोड पदार्थ... सारे काही यथास्थित करतो. परंतु हे किती दिवस चालते? दोन दिवस, तीन दिवस. पाहुण्याचा मुक्काम लांबत चालला की त्याचे आदरातिथ्य करणारा यजमान आणि यजमानीण अस्वस्थ होऊ लागतात. हा कधी जाणार? याला घरदाराची आठवण आहे की नाही? मग हळूच त्याला विचारले जाते-- 'आपण कधी जाणार? तिकीट काढून देऊ का? रिझर्वेशन करून देऊ का?' म्हणजेच पाहुण्याबद्दल यजमानाच्या मनात पहिल्या दिवशी जी प्रेमभावना असते ती नंतर राहत नाही. हे सर्व व्यवहार क्षणिक असतात. माणसे एकमेकावर प्रेम करतात, परंतु ते परिपूर्ण असू शकत नाही. म्हणून बृहदारण्यक उपनिषदात याज्ञवल्क्य महर्षी मैत्रेयीला सांगतातः-

**न वारे पत्युकामाय पति प्रियो भवति। आत्मनस्तु कामाय पति प्रियो भवति।।**
**न वारे जायायै कामाय जाया प्रिया भवति। आत्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति।।**
**न वारे पुत्रस्य कामाय पुत्र प्रियो भवति। आत्मनस्तु कामाय पुत्र प्रियो भवति।।**

पती पत्नीवर आणि पत्नी पतीवर प्रेम करताना दिसतात. पिता-पुत्र यांच्यामध्येही प्रेमसंबंध असतात. परंतु कुणीही कोणावर प्रेम करीत नसतो. प्रत्येक जण स्वतःवरच प्रेम करीत असतो. आपल्यासाठी दुसऱ्यावर प्रेम करीत असतो. त्याच्यासाठी त्याच्यावर प्रेम करीत नाही. संसारातील प्रेमात काही ना काही स्वार्थ दडलेला आपल्याला आढळतो. दुसरे काही नाही तरी समोरच्या व्यक्तीकडून निदान प्रेमाची तरी अपेक्षा असतेच. संसारात निरपेक्ष प्रेम संभवत नाही. म्हणून पत्नी, पुत्र, मित्र यांच्याकडून मिळणारे सुख क्षणिक असते, असे ज. रेणुकाचार्य म्हणतात.

विद्याभ्यास, प्रजोत्पादन, समाजसेवा आणि परमार्थसाधना या चारही गोष्टी एकाच आयुष्यात साध्य व्हाव्यात यासाठी भारतीय जीवनपद्धतीत ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास असे चार आश्रम सांगितले आहेत. शंभर वर्षाच्या आयुष्यात पहिली पंचवीस वर्षे विद्याभ्यास करावा, त्यानंतर पुढील पंचवीस वर्षे गृहस्थ होऊन संसार करावा, त्यानंतरची पंचवीस वर्षे वानप्रस्थ होऊन समाजसेवा करावी आणि शेवटची पंचवीस वर्षे संन्यास घेऊन परमार्थात व्यतीत करावी; अशी एक रेखीव जीवनपद्धती आपल्या पूर्वसूरींनी आखून दिली आहे. ब्रह्मचर्याश्रमात विद्यार्जन केले पाहिजे. विद्या ही अशी गोष्ट आहे की जी कितीही वाटली, तिचे कितीही दान केले तरी ती संपत नाही. संपत्ती उधळली तर ती संपून जाते, परंतु हजारो लोकांना विद्यादान केले तरी आपल्या जवळची विद्या संपत नाही. तुम्ही संपत्तीत, जमिनीत, घरात वाटा मागू शकता. परंतु विद्येमध्ये वाटा मागता येत नसतो. व्यवहारात तुम्ही पाहता की घरदाराची कशी वाटणी केली जाते. त्याविषयी एक मनोरंजक कथा सांगतात.

दोन भाऊ होते. त्यांच्यात वाटणी झाली. घराचे दोन भाग झाले, शेताचे दोन भाग झाले. घरातली भांडीकुंडी, चीजवस्तू सारे काही दोन भागांत वाटले गेले. राहता राहिली एक म्हैस. तिची वाटणी कशी करायची, असा प्रश्न पडला. दोघा भावांत एक भाऊ भोळा होता तर दुसरा चतुर होता. भाऊ पंचायतीकडे गेला आणि त्याने पंचांना सांगितले, ''माझा भाऊ भोळा आहे. तेव्हा तुम्ही एक काम करा. म्हशीचे दोन भाग करा. तिची लांबी मोजून मध्यभागापासून तोंडाकडे एक भाग आणि मध्यभागापासून शेपटीपर्यंत दुसरा भाग. पहिला भाग माझ्या भावाला द्या आणि दुसरा भाग मला द्या. पहिल्या भागाची सर्व काळजी त्याने घ्यावी आणि दुसऱ्या भागाची सर्व काळजी मी घेईन.''

बघा, किती हुशार होता तो भाऊ! म्हशीला चारापाणी भोळ्या भावाने घालायचे आणि म्हशीचे दूध वगैरे याने फस्त करायचे! जगात असे हुशार लोक बरेच असतात. पंचांनी त्याने सांगितल्याप्रमाणे म्हशीची लांबी मोजून तिचे दोन भाग केले. पहिला भाग भोळ्या भावाला तर दुसरा भाग हुशार भावाला वाटून दिला. बिचारा भोळा भाऊ म्हशीची पूर्ण काळजी घ्यायचा. तिला चारा खाऊ घालणे, पाणी पाजणे हे सारे करायचा. दुसरा भाऊ तिचे दूध आणि शेण यांचा वापर करायचा. भोळ्याने खाऊ घालायचे, शहाण्याने दूध प्यायचे. असे बराच काळ चालले. भोळ्याची बायको हुशार होती. ती नवऱ्याला म्हणाली, ''आपण चारा घालायचा आणि त्यांनी दूध प्यायचे हे काही बरोबर नाही. मला हे पटत नाही.''

''पण आपण काय करू शकतो? पंचांनीच अशी वाटणी करून दिली आहे.'' तो म्हणाला.

''मी सांगते तशी युक्ती करा म्हणजे हा प्रश्न मिटेल.'' बायको म्हणाली. तिने त्याच्या कानात एक युक्ती सांगितली. दुसऱ्या दिवशी हुशार भावाची बायको दूध काढायला बसली. त्यावेळी भोळ्या भावाने एक लहानशी काडी म्हशीच्या नाकात घातली आणि तो हळूहळू फिरवत बसला. म्हैस अस्वस्थ होऊन हालचाल करू लागली. तेव्हा भावजय म्हणाली, ''भावजी, असे काय करता? मी दूध काढते आहे ते दिसत नाही का?''

तो म्हणाला, ''वहिनी, हा भाग माझ्या मालकीचा आहे. मी काहीही करीन. तू तुझे काम कर, मी माझे काम करतो.''

शेवटी म्हैस उधळली. तिच्या लाथेने सर्व दूध सांडले. रोज हा प्रकार घडू लागला. शहाण्या भावाला काही बोलता येईना. म्हशीचा पुढचा भाग भोळ्या भावाच्या मालकीचा होता. नियमाप्रमाणे तो त्या भागात काहीही करू शकत होता. 'तोंड दाबून बुक्क्यांचा मार' अशी शहाण्या भावाची अवस्था झाली. शेवटी त्याने भोळ्या

भावाला बोलावून त्याच्याशी समझोता केला. दोघांनी मिळून म्हशीचे चारापाणी करायचे आणि दूध निम्मे निम्मे वाटून घ्यायचे असे ठरले.

भावाभावांच्या वाटणीची अशी ही गंमतीची कथा आहे. तुम्ही प्रत्येक वस्तूत वाटा मागू शकता, परंतु विद्येत वाटा नाही मागता येत. तुमचा एखादा भाऊ जर शिकला, एम्.ए., पीएच्.डी. झाला तर त्याच्या त्या कमाईत तुम्ही वाटा मागता काय? त्याची डिग्री अर्धी फाडून घेता काय? तुम्ही फार तर त्याच्याकडून त्याची विद्या शिकून घेऊ शकता. त्याने ती शिकवली तरी ती कमी होत नाही.

म्हणून ब्रह्मचर्याश्रमात विद्या मिळवली पाहिजे. विद्या ही अशी संपत्ती आहे की जी कोणताही चोर चोरू शकत नाही, राजा जप्त करू शकत नाही. या संपत्तीवर इन्कमटॅक्स खात्याची धाड पडत नाही. विद्येमुळे मनुष्य निर्भय होतो. म्हणून विद्याधन हे सर्व धनांत श्रेष्ठ धन होय. ब्रह्मचर्याश्रमात तुम्ही जी कमाई करता तिच्यावरच तुमच्या आयुष्याची पुढची पंचाहत्तर वर्षे अवलंबून असतात. म्हणून विद्याध्ययनाला प्राधान्य दिले पाहिजे. 'विद्याध्ययनं तपः।' असे म्हटले जाते. विद्याध्ययन ही एक तपश्चर्या आहे. विद्यार्थ्याने व्यसनापासून मुक्त असले पाहिजे. नसता त्याचे जीवन अंधकारमय होईल. ज्या देशाची युवापिढी व्यसनाधीन असते त्या देशाचे भवितव्य अंधारात बुडालेले असते. बुद्धी ही बलिष्ठ आणि निरामय असली पाहिजे. ती तशी नसेल तर 'बुद्धिनाशात् विनश्यति।' अशी अवस्था होते. मस्तकाला उत्तमांग असे म्हटले जाते. तेच सर्व शरीरावर अधिकार गाजवते. व्यसनाचा परिणाम बुद्धीवर होतो. व्यसनाधीन मनुष्य स्वतःचे रक्षण करू शकत नाही, मग इतरांचे कसे करू शकेल?

आहार शुद्ध असेल तर बुद्धी शुद्ध होते. 'आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः।'आहाराचा आपल्या शरीस्वास्थ्यावर जसा परिणाम होतो तसाच आपल्या मनावर आणि बुद्धीवरही होतो. आहार शुद्ध असेल तर शरीरातील रक्त, मांस, मज्जा, शुक्र इत्यादी सप्तधातू शुद्ध होतात. म्हणून वीरशैवसिद्धान्तात, स्वयंपाक झाला की लगेच खायला बसू नये, असे सांगितले आहे. स्वयंपाक झाल्यावर त्याची पूजा करावी, देवाला नैवेद्य दाखवावा आणि ते अन्न प्रसाद म्हणून सेवन करावे, असे हा सिद्धान्त सांगतो. इष्टलिंगाला नैवेद्य दाखविल्याशिवाय पदार्थ खाण्यास येथे मनाई आहे. म्हणून ब्रह्मचर्यावस्थेत आहार शुद्ध असला पाहिजे, म्हणजेच अपेयपान आणि अभक्ष्यभक्षण यांच्यापासून विद्यार्थ्याने दूर राहिले पाहिजे. ब्रह्मचर्यावस्थेत एकाग्र मनाने केवळ विद्यार्जनच केले पाहिजे. आपल्या देशात बालवयातील मुले शाळेत न जाता पोटापाण्यासाठी कामे करतात, हे चुकीचे आहे. असे घडू नये. विद्या संपादन करण्याचा त्यांचा हक्कच त्यामुळे नाकारला जातो. या वयात जी विद्या मिळते तिच्यावरच पुढील जीवन अवलंबून असते. ब्रह्मचर्याश्रम हा असा आश्रम आहे की जो कोणालाही टाळता येत नाही. पुढील आश्रम टाळणे शक्य आहे. ब्रह्मचारी मनुष्य गृहस्थाश्रम आणि वानप्रस्थाश्रम टाळून संन्यास घेऊ शकतो. परंतु कोणत्याही मनुष्याला ब्रह्मचर्याश्रम टाळता येत नाही, एवढा हा आश्रम महत्त्वाचा आहे. यापुढील आश्रम आहे गृहस्थाश्रम. त्याविषयी आपण उद्या विचार करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

२४ जुलै १९९०

## संसारहेयस्थल– ३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

संसारात जन्म घेतल्यावर जीवात्म्याला सुखाची गरज भासते. सुखोपभोगाची अभिलाषा त्याच्या मनात उत्पन्न होते. कसेही असो, कुठूनही मिळो पण मला सुख मिळाले पाहिजे असा प्रत्येकाचा आग्रह असतो. सांसारिक सुखासाठी दुसऱ्या व्यक्तीची अथवा पदार्थाची आवश्यकता असते. आत्मसुख यापेक्षा वेगळे आहे. एखादा मनुष्य अंतर्मुख होऊन अंतरंगात एकटेपणाने आत्मसुख भोगू शकतो. तेथे दुसऱ्या व्यक्तीची गरज नसते. परंतु संसारसुख मात्र दुसऱ्या व्यक्तीवर अवलंबून असते. संसारसुख आत्मसुखासारखे सरळ मिळत नाही. सुख आणि सुखभोक्ता यांच्यामध्ये एक व्यक्ती अथवा वस्तू असावी लागते, तेव्हाच ते मिळते. संसारसुख कसे मिळते आणि कोणाकडून मिळते, याची तुम्हाला कल्पना आहे. पतीला पत्नीकडून, पत्नीला पतीकडून, मातापित्याला मुलाबाळांकडून, मुलाबाळांना मातापित्याकडून जे सुख मिळते त्याला संसारसुख म्हणतात. हे सुख किती काळ मिळते? तर केवळ एका क्षणापुरते. संसारात शाश्वत सुख मिळत नाही. खरे तर सुख मनुष्याच्या अंतर्यामीच असते, परंतु तो सुखासाठी दुसऱ्यासमोर भिकाऱ्यासारखा हात पसरतो. पहिला दुसऱ्यासमोर हात पसरतो तर दुसरा पहिल्यासमोर हात पसरतो. दोघेही परस्परांकडे भिकाऱ्यासारखी सुखाची याचना करताना दिसतात. त्यांना मिळणारे सुख क्षणिकच असते. शब्दस्पर्शादी विषयांपासून मनुष्याला सुख थोडे मिळते, परंतु दुःख मात्र भरपूर मिळते. विषय रमणीय दिसतात, परंतु दुःखदायक ठरतात.

आत्मसुख आणि संसारसुख यांच्यातील फरक शास्त्रकारांनी ऊसाचा दृष्टान्त देऊन स्पष्ट केला आहे. तुम्ही ऊस कधी खाल्ला आहे काय? खाल्ला असणार. ऊस खाण्याच्या दोन पद्धती आहेत. पहिली पद्धत म्हणजे शेंड्याकडून बुडापर्यंत ऊस खाणे. दुसरी पद्धत म्हणजे बुडाकडून शेंड्यापर्यंत ऊस खाणे. शेंड्याकडे गोडी कमी असते आणि बुडाकडे गोडी जास्त असते. शेंड्याकडून बुडाकडे खात असताना हळूहळू गोडी वाढत जाते, शेवटी परमावधीला पोहोचते. बुडाकडून जर ऊस खायला सुरुवात केली तर सुरुवातीला त्याचा रस अत्यंत गोड लागतो, परंतु हळूहळू त्याची गोडी कमी होत जाऊन तो फिका होतो. ऊस खाण्याचा पहिला प्रकार म्हणजे आत्मसुख आणि दुसरा प्रकार म्हणजे संसारसुख. आत्मसुखाची गोडी प्रारंभी कमी असते, नंतर ती गहिरी होत जाते. संसारसुखात प्रारंभी गोडी अधिक असते, परंतु नंतर ते सुख फिके होत जाते. काही माणसे संसाराला इतकी कंटाळतात की घरदार, मुलेबाळे यांना सोडून जातात. नको हा संसार, असे त्यांना वाटते.

अध्यात्मात सुरुवातीला गोडी वाटत नाही. प्रवचनात झोप येते. पूजा म्हणजे ओझे वाटते. जप करणे कंटाळवाणे वाटते. ध्यान तर आवडतच नाही. कशाला आपण इथे आलो, असे वाटते. परंतु हळूहळू त्यात तुम्ही रमत गेलात तर त्याची रंगत अधिक वाढत जाते. मग अध्यात्म सोडवत नाही. शेंड्याकडून बुडापर्यंत ऊस खात जाण्याचाच हा प्रकार. संसार शेवटी सोडावासा वाटतो. अध्यात्म शेवटी आपला श्वास होऊन राहते. संसारसुख असे क्षणिक असते. संसारात जे सुख आपल्याला दिसते ते आपल्या आत्म्यातील सुखाचाच अंश असतो. संसारसुख भोगण्यासाठी ब्रह्मचर्याश्रमातून गृहस्थाश्रमात प्रवेश करावा लागतो. 'गृहे तिष्ठतीति गृहस्थः।' जो घरात राहतो आणि घराविषयी विचार करतो तो गृहस्थ होय. वंशसातत्य राखण्यासाठी, प्रजोत्पादनासाठी गृहस्थाश्रमाची

निर्मिती झाली आहे.

विवाह जुळवताना वधू-वरांचे छत्तीस गुण जुळले पाहिजेत. जन्मकुंडली पाहून गुणांची पारख करता येते. मुलगी बघताना तिचे गुण बघितले पाहिजेत. तिचे आईवडील किती धन देतात त्याकडे पाहू नये. गुण-धर्म सोडून जर धन-धर्म पाहिला तर वैवाहिक जीवनात अनर्थ होण्याचीच शक्यता जास्त आहे. हुंड्यासाठी कितीतरी स्त्रियांचे बळी जातात. तुमच्या सुनेचा तुम्ही बळी घेतला तर तुमच्या मुलीचा तिकडे बळी जातो, हे लक्षात घेतले पाहिजे. आपल्या समाजात स्त्रियांची अवहेलना आणि मानखंडना खूप झाली आहे. 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता।' असे स्त्रीविषयी गौरवोद्‌गार पूर्वसूरींनी काढले आहेत. ज्या घरात नारीची पूजा केली जाते त्या घरात देवतांचा निवास असतो. ज्या घरात स्त्रियांना यातना होतात, स्त्रिया सदैव रडत असतात त्या घरात देव नव्हे तर राक्षस राहतात, असे समजावे.

म्हणून लग्न जुळवताना धन नव्हे तर गुणाला प्राधान्य दिले पाहिजे. त्याशिवाय घरात सुखसमाधान नांदणार नाही. आपल्या मुलाच्या शिक्षणासाठी दहा लाख रुपये तुम्ही खर्च केले असतील, म्हणून सुनेकडून ते वसूल करावेत, हा कुठला न्याय आहे? हा कुठला धर्म आहे? तुम्ही सुनेचा छळ केला तर तिकडे तिचे आईवडील आणि कुटुंब दुःखात बुडून जाते. म्हणजे तुम्ही एका व्यक्तीचा छळ करीत नाही तर एका कुटुंबाचा छळ करीत असता. स्त्री हे परमेश्वराचे मातृरूप आहे. तिच्यावरच सर्व कुटुंब अवलंबून असते. म्हणून घरात स्त्रीचा गौरव झाला पाहिजे. स्त्रीचा छळ स्त्रीच करते ही दुर्दैवाची गोष्ट आहे. सासू-सुनेचे नाते मांजर-उंदरासारखे आहे. सुनेला पाहिले की सासू मांजरीसारखी फिसफिस करते, तिला खाऊ की गिळू अशा नजरेने पाहते. सासूच दोषी असते असे नव्हे तर सूनही आपल्या अंगातले 'गुण' दाखवत असते.

लग्न होऊन जेव्हा सून घरात येते तेव्हा घरात सासूबाई असतातच. अलीकडे लग्न जुळवताना सासू नाही असे पाहूनच मुलींना देतात. सासू-सासरे मेले असतील तर त्या घरात आपली मुलगी सुखात राहील असे आईवडिलांना वाटते. सासू-सुनेचे भांडण कसे सुरू होते हे आमच्यापेक्षा तुम्हालाच जास्त माहीत आहे. तरीही गंमत म्हणून आम्ही तुम्हाला सांगतो. सासू सुनेला चहा करायला सांगते. सून छानपैकी दोन कप चहा करते. एक कप सासूसाठी, एक कप स्वतःसाठी. स्वतःच्या कपात साय थोडी घालते. झाले, भांडणाला कारण मिळते. सासू विचार करते की ही नवी नवरी, पहिल्याच दिवशी स्वतःच्या कपात साय घालते. पहिल्या दिवशी साय खायला सुरुवात तर पुढे ही अख्खे घर गिळणार की काय? यामुळे जर सासू सुनेला बोलली तर सुनेला वाटते की एवढीशी साय खाल्ली म्हणजे फार मोठा अपराध केला की काय? आईची माया सायीसारखी असते असे म्हणतात. म्हणजे साय हे मायेचे प्रतीक आहे. परंतु येथे मात्र सायीमुळे माया नव्हे, तर कलह निर्माण होतो. खरे तर सुनेने सासूच्या कपात साय घातली पाहिजे. तिला हे शिक्षण तिच्या घरातून, आईकडून मिळायला हवे होते. समजा, सुनेचे चुकले तर सासूने विचार केला पाहिजे. एवढी साय खाणे म्हणजे काही मोठा गुन्हा नव्हे. हिने साय खाल्ली तर पुढे हिच्या पोटी जन्माला येणारा आपला नातूच धष्टपुष्ट होईल. अशा विचार सासूने केला तर कलह होण्याची शक्यता नाही. सुनेने सासूला आईसारखे मानले आणि सासूने सुनेला मुलीसारखे मानले तर असंख्य कुटुंबे समाधानी होतील.

संसारात सुख फार कष्टाने मिळते. तेही क्षणिकच असते. 'सुख पाहता जवापाडे। दुःख पर्वताएवढे।।' असे एका संताने म्हटले आहे. जवाच्या दाण्याएवढे संसारात अल्प सुख आहे आणि दुःख मात्र पर्वतासारखे प्रचंड आहे.

'संसारसागरं दुःख तस्मात् जाग्रत जाग्रत।' संसारसागर दुःखमय आहे. येथील दुःख एकटा मनुष्य सहन करू शकत नाही. म्हणून त्याला आपले दुःख दुसऱ्याला सांगून हलके करून घ्यावे लागते आणि दुसऱ्याचे दुःख ऐकून घ्यावे लागते. असे सुख-दुःख वाटून घेण्यासाठी गृहस्थाश्रमाची निर्मिती झाली आहे. शास्त्रात सांगितले आहे- 'एकाकी नैव रमेत्।' म्हणून शिवदेखील एकटा नसतो, त्याच्या सोबत शक्ती असते. शिव-शक्तीचा विलास म्हणजे हे विश्व होय.

सानंदं सदनं सुताश्च सुधीयः कांता न दुर्भाषिणी।
सन्मित्रं सुधनं स्वयोषितिरतिश्चाज्ञा परासेवकाः।
आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिनं मिष्टान्नपानं गृहे
साधोःसंगमुपासते हि सततं धन्यो गृहस्थाश्रमः।।

गृहस्थाश्रम हा एक श्रेष्ठ आश्रम आहे, असे आपल्या आचार्यांनी सांगितले आहे. गृहस्थाश्रम धन्य कधी होतो? घरात येताक्षणीच मनुष्याचे मन प्रसन्न झाले पाहिजे. घराचे अंगण स्वच्छ, रांगोळी घातलेले असावे. घरही आतून स्वच्छ आणि नीटनेटके असावे. घरातली संतती बुद्धिमान असावी. घराची मालकीण गोड बोलणारी असावी. ती कर्कशा असू नये. मित्र हे सन्मित्र असावेत. आपली कमाई स्वकष्टार्जित आणि उत्तम मार्गाने मिळवलेली असावी. गृहस्थाची आवड आपल्या पत्नीमध्येच असावी आणि पत्नीची पतीमध्ये असावी. तुम्ही वटसावित्रीची पूजा करता तेव्हा काय मागता? 'हाच पती सात जन्म मिळो' हेच मागता ना?

आपल्या देशातील एक साधू परदेशात गेले होते. ते सहज एका स्मशानात गेले. तेव्हा तेथे एक स्त्री एका थडग्याजवळ बसलेली त्यांना दिसली. ती पंख्याने थडग्याला हवा घालत होती. थडग्याला गिलावा केलेला होता. तो ओला होता. साधूला आश्चर्य वाटले. त्याला वाटले ही स्त्री पतिव्रता असावी. आपल्या हातून नवऱ्याची जिवंतपणी सेवा घडली नाही म्हणून ही पतीच्या थडग्याला वारा घालत असावी. त्याने सहज त्या बाईला विचारले, ''बाई, तुम्ही थडग्याला वारा का घालत आहात?''

बाई म्हणाली, ''हा गिलावा वाळल्याशिवाय मला दुसरे लग्न करता येत नाही. गिलावा वाळावा यासाठी मी वारा घालते आहे.''

अशी पाश्चात्त्य संस्कृती आहे. आपल्याकडे मात्र स्त्रिया नवऱ्याला सात जन्मापर्यंत बांधून ठेवतात. पत्नीने सात जन्मापर्यंत 'बुक' करून ठेवावे असेच पतीचे वर्तन असले पाहिजे. घरातले सेवक आज्ञाधारक असावेत. घरात संतसज्जनांचा आदरसत्कार व्हावा. असे जेव्हा घडते तेव्हा तो गृहस्थाश्रम धन्य होतो. याच्या विरुद्ध जो गृहस्थाश्रम असतो त्याला धन्य म्हणता येत नाही. ज्या घरात सुखसमाधान नांदते, बुद्धिमान पुत्र असतात, सुभाषिणी पत्नी असते, आज्ञाधारक सेवक असतात, साधुसंतांचा सत्कार होतो त्या घराला धन्य म्हटले पाहिजे. आपले घर असे व्हावे अशी इच्छा तुम्हा सर्वांच्या मनात उत्पन्न झाली पाहिजे. गृहस्थाश्रमाविषयी अधिक चर्चा आपण उद्या करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
२५ जुलै १९९०

## संसारहेयस्थल- ४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

संसारातील सुख क्षणिक आहे, असे शास्त्रकार सांगतात. घरदार, पत्नी, मुले यांच्याकडून सुख मिळते असे आपल्याला वाटते. परंतु हा एक भ्रम आहे. आत्म्यातील सुख आपण भोगू शकत नाही. मग निदान सांसारिक सुख तरी भोगू असे मनुष्याला वाटते. सांसारिक मनुष्याला जर तुम्ही विचारले: तुला तरी मुक्ती हवी आहे का? तर तो म्हणतो: कसली मुक्ती आणि काय? आमच्यासारख्यांना कोठे मुक्ती मिळणार आहे? संसारात आम्हाला जे सुख मिळते तेच आम्हाला पुरेसे आहे.

मुक्ती म्हणजे एकटेपणा. सर्वांना सोडून एकटेपण कोण भोगत बसेल? म्हणून प्रत्येक मनुष्य संसारसुखातच गुरफटलेला असतो. माणसे संसार सोडायला तयार नसतात.

एकदा भगवान विष्णू वैकुंठात एकटेच निवांत बसले होते. तिथे नारदमुनी आले. विष्णूला एकटे पाहून ते म्हणाले, ''भगवान्, तुम्ही एकटेच बसलात. तुम्हाला कुणी भक्त वगैरे नाही का? मी पृथ्वीवरून पाच-पन्नास भक्तांना घेऊन येतो.''

विष्णू हसले. म्हणाले, ''नारदा, तू प्रयत्न कर, पण एकही भक्त वैकुंठात यायला तयार होणार नाही. जा आणि घेऊन ये भक्तांना.''

नारद विमानात बसून पृथ्वीवर आले. जिथे सत्संग चालू होता, तिथे बाहेर थांबले. आत भक्त महाराजांचे प्रवचन ऐकत होते. आरती, प्रसाद संपल्यावर बाहेर निघालेल्या भक्तांला नारदांनी विचारले, ''भक्तराज, मी वैकुंठाहून आलो आहे. भगवंतांनी तुम्हाला आणण्यासाठी विमान पाठवले आहे. चला विमानात बसा. विमानाला तिकीट नाही. फ्री ऑफ चार्ज.''

''मी घरी सांगून येतो.'' असे म्हणून तो भक्त निघून गेला. एक एक करून असे सगळेच भक्त सटकले. शेवटी एक जखख म्हातारा उरला. नारदाला वाटले, तरुण आणि प्रौढ लोक वैकुंठात काही येणार नाहीत. पण हा म्हातारा मात्र मरणाला टेकला आहे. हा नक्कीच वैकुंठात येईल. असे वाटून त्यांनी म्हाताऱ्याला विनंती केली. तेव्हा म्हातारा लुटूलुटू मान हलवत म्हणाला.

''येईल रे बाबा. आता काय माझं वय झालंच आहे. पण आज नाही येणार. एक वर्षाने येईन.''

नारदाला वाटते, चला एक वर्षाने का होईना, पण एकतरी भक्त वैकुंठात यायला तयार आहे. एक वर्षानंतर नारद म्हाताऱ्याकडे गेले. तेव्हा म्हातारा म्हणाला, ''मी तुला वर्षाने येईन असे म्हटले होते. वर्षापूर्वीच माझ्या मुलाचे लग्न झाले आहे. पण अजून त्याला मूलबाळ झाले नाही. नातवाचे तोंड पाहिल्याशिवाय मी येणार नाही. तू पुढच्या वर्षी ये, मग मी तुझ्यासोबत येईन.''

नारदाने ते मान्य केले आणि एक वर्षाने ते पुन्हा म्हाताऱ्याकडे गेले. त्यावेळी म्हातारा मेला होता. नारदाला वाटले, म्हातारा मेला तरी त्याचे घरावर; मुलावर आत्यंतिक ममत्व होते. तेव्हा त्याने जरी पुनर्जन्म घेतलेला असला तरी तो इथेच जवळपास कुठे तरी असणार. नारदाने अंतर्दृष्टीने पाहिले तेव्हा त्यांना दिसले की घरात एक कुत्री नुकतीच व्याली आहे आणि तिचे पिलू म्हणून म्हताऱ्याने जन्म घेतला आहे. त्या पिलापाशी जाऊन नारद

म्हणाले, ''मी तुम्हाला ओळखले आहे. नवा जन्म कुत्र्याचा मिळाला. कुत्र्याला वैकुंठात न्यायची परवानगी नाही. तरीदेखील मी तुम्हाला शब्द दिला होता. म्हणून विमानातून न्यायला तयार आहे, तुम्ही येणार का?''

''सध्या मला वेळ नाही'', ते पिलू म्हणाले, ''माझ्या मुलाने खूप संपत्ती मिळवली आहे. तिचे रक्षण करणे भाग आहे. दुसरी कुत्री प्रामाणिकपणे काम करणार नाहीत. म्हणून मलाच या घराची आणि संपत्तीची रखवाली करावी लागणार आहे. तू नंतर ये. मग मी तुझ्याबरोबर येईन.''

नारद हात हलवत परत गेले. काही वर्षांनंतर ते पुन्हा त्या घरी आले. तेव्हा तो कुत्रा मेला होता. नारदांनी त्याचा शोध घेतला. इथेच कुठे तरी दुसऱ्या रूपात म्हतारा नक्कीच सापडेल. नारदांनी शोध घेतला तेव्हा त्यांना तो म्हातारा बेडूक होऊन न्हाणीच्या मोरीबाहेर बसलेला आढळला. नारदांनी त्याला ओळखले आणि त्याच्याजवळ जाऊन ते म्हणाले, ''म्हातारबुवा, तुमची ही काय दशा झाली आहे! तुम्ही आधी चांगले मनुष्य होता, नंतर कुत्र्याच्या जन्माला गेलात आणि आता चक्क न्हाणीच्या मोरीत बेडकाचा जन्म घेऊन बसलात. आता तरी घराचा मोह सोडा. तुम्ही घरात गेलात तर कुणी तुम्हाला ओळखणार नाही. बाहेर फेकून देतील. आता तरी चला माझ्याबरोबर वैकुंठात. तुम्हाला इथे काय सुख आहे?''

बेडूक म्हणाला, ''इथे मी फार आनंदात आहे. माझी मुले, नातू न्हाणीघरात आंघोळ करतात. त्यांच्या अंगावरील पाणी माझ्या अंगावरून जाते तेव्हा जे सुख वाटते ते सांगता येत नाही. गंगास्नानदेखील या स्नानापुढे तुच्छ आहे.''

नारद हसून म्हणाले. ''बाबा, आता या क्षुद्र सुखाचा मोह सोडून द्या आणि चला माझ्याबरोबर.''

तेव्हा तो बेडूक चिडून म्हणाला. ''ए बाबा, तुला माझ्याशिवाय जगात कुणी सापडले नाही का? मी मनुष्य होतो तेव्हा माझ्यामागे लागलास, कुत्रा झालो तरी माझा पिच्छा सोडला नाहीस आणि आता बेडूक झालो तरीही मला सुखाने बसू देत नाहीस. काय आहे रे तुझ्या वैकुंठात? जा पळ इथून.''

नारद बिचारे तोंड लहान करून हात हलवत वैकुंठात परत गेले.

''ये नारदा, ये'' विष्णू म्हणाले, ''आणलेस का भक्ताला?''

''नाही भगवन्'', नारद म्हणाले, ''वैकुंठात येण्याची सर्वांची इच्छा असली तरी येण्याची तयारी मात्र नाही. मी हरलो.''

सांसारिक संबंध असे चिवट असतात. त्यांच्यापासून मनुष्य सुटका करून घेऊ इच्छित नाही. संसारात दुःखच दुःख भरलेले आहे. एक सुभाषितकार म्हणतो:-

**जन्मदुःखं जरादुःखं जायादुःखं पुनःपुनः।**
**संसारसागरं दुःखं तस्माद् जाग्रत जाग्रत।।**

संसारात कोणताच पदार्थ सुख देणारा नाही. सर्वत्र आहे ते दुःखच. तेच सुखाचा पोषाख घालून आपल्यासमोर येते. जन्म असो, वार्धक्य असो की पत्नी असो, हे सारेच दुःखदायक असते. त्यातही जो मनुष्य धर्माचरण करतो त्याला थोडेबहुत सुख मिळते. परंतु धर्माचरण करणारे कमी असल्यामुळे त्यांना गृहस्थाश्रमात सुख लाभत नाही. वीरशैव धर्मात पंचाचार्यांचे प्रतीक असलेल्या पंचकलशांच्या साक्षीने विवाह होतो. त्यावेळी विवाहित दंपतीला प्रतिज्ञा करावी लागते- 'धर्मे च अर्थे च कामे च नातिचरितव्यम्।' दोघेही प्रतिज्ञा करतात की, धर्म, अर्थ आणि काम या तीन पुरुषार्थांचे संपादन मी तुला सोडून करणार नाही. प्रतिज्ञा दिली जाते खरी, परंतु ती कोणी ऐकत

नाही. तिथे गांभीर्य कोणाला कळत नाही. कधी जेवण करू, कधी घरी जाऊ अशी सर्वांची घाई चाललेली असते. माईकमधून पुरोहित प्रतिज्ञा देतो, उच्चारतो. वधु-वरांनी ती म्हटली की नाही याकडे त्याचे लक्ष नसते. तासाभरात सर्व लग्नविधी आटपायचा म्हणजे असेच घडणार. म्हणून पूर्वी लग्नसमारंभ तीन तीन दिवस चालत असे. सर्व विधी यथास्थित केले जात.

गृहस्थाश्रमी व्यक्तींनी कोणताही विधी एकट्याने करू नये असा धर्मशास्त्राचा दंडक आहे. म्हणून पूजा करताना, धर्मविधी करताना दांपत्याला बसवले जाते. एकट्या पुरुषाला अथवा स्त्रीला बसवले जात नाही. पती-पत्नी दोघांनीही यात्रेला गेले पाहिजे. एकट्याने जाता कामा नये. वीरशैव धर्मानुसार तर आपल्या गुरूंनाही यात्रेला घेऊन गेले पाहिजे. तीर्थस्थान करताना गुरूचे पाय डोक्यावर घेऊन त्यावर पाणी घालून स्नान केले पाहिजे. परंतु बऱ्याच वेळा पतीला सवड नसते म्हणून एकटी पत्नीच यात्रेला जाते. कधी पत्नीला घरी ठेवून एकटा पतीच यात्रा करतो.

आम्ही काशीला असताना काही भाविक महाराष्ट्रामधून तीर्थयात्रेसाठी आले. त्यांच्यासोबत आम्ही गंगेवर गेलो. सगळेजण जोडीजोडीने बसले. एक बाई एकटीच बसलेली दिसली. तिने आपल्या डोक्यावर धोतर घेतले होते. आम्ही जवळ गेल्यावर ती म्हणाली, ''महाराज, माझ्या डोक्यावर पाय ठेवा.''

आम्ही तिला विचारले, ''हे डोक्यावर काय घेतले आहेस? कोणाचे धोतर आहे हे?''

''माझ्या पतीचे आहे. ते यात्रेला येऊ शकले नाहीत, म्हणून मी त्यांचे धोतर सोबत आणले आहे.'' तिने उत्तर दिले.

पती सोबत आला नाही म्हणून त्याचे धोतर तिने प्रतीकरूपाने सोबत आणले होते. ते डोक्यावर घेऊन आपण जोडीने स्नान करीत आहोत अशी तिची भावना होती. याचा अर्थ एवढाच की गृहस्थाश्रमात कोणतेही कार्य जोडीने करायचे असते. सीतात्यागानंतर जेव्हा रामाला यज्ञ करावा लागला तेव्हा त्याने सीतेची सुवर्णप्रतिमा डावीकडे ठेवून ते कार्य पूर्ण केले होते. गृहस्थाला पत्नीशिवाय धर्मकार्य करता येत नाही. परंतु जेव्हा शक्य नसते तेव्हा पती पत्नीची अनुमती घेऊन आणि पत्नी पतीची अनुमती घेऊन एकटी यात्रेला जाऊ शकते. पण सोबत दुसऱ्याची एखादी वस्तू आणली पाहिजे. यासाठीच त्या बाईने नवऱ्याचे धोतर सोबत आणले होते. बाई नवऱ्याचे धोतर घेऊन जाते तर नवऱ्याने तिचे काय घेऊन जाव? पंचाईतच आहे. पतीने पत्नीची साडी वगैरे न्यायची नसते तर एक सुपारी घेऊन जायची असते. धर्म, अर्थ आणि काम हे तिन्ही प्राप्त करताना पत्नी सोबत असली पाहिजे. म्हणून विवाहप्रसंगी दोघेही प्रतिज्ञा करतात. 'धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि।' दोघांनी याचे निष्ठेने पालन केले तर गृहस्थाश्रमात त्यांना बरेच सुख मिळते. जे याचे पालन करीत नाहीत ते नावाला गृहस्थाश्रमी असतात, प्रत्यक्षात संन्याशासारखे वागतात.

विषयभोग कितीही घेतला तरी माणसाचे समाधान होत नाही. ययातीने आपल्या पुत्राकडून त्याचे आयुष्य मागून घेतले आणि एक हजार वर्षेपर्यंत विषयभोग भोगले. तरी त्याचे समाधान झाले नाही. शेवटी त्याने एक श्लोक लिहून ठेवला:-

> न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति।
> हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते।।

उपभोग गेऊन वासना कधी शांत होणार नाही. अग्नी विझवण्यासाठी जर त्यात तूप टाकले तर अग्नी विझत

नाहीच, उलट अधिक भडकतो. त्याप्रमाणे उपभोग घेऊन काम कधी शांत होत नाही.

ययातीला हजार वर्षे आयुष्य मिळाले होते. तुम्हाला किती जन्म मिळाले याची कल्पना आहे काय? आपण किती वेळा जन्म घेतला, किती वेळा संसार केला, किती वेळा शरीर सोडले याचे ज्ञान जीवात्म्याला नसते. निजगुण शिवयोगी म्हणतात की पृथ्वीचा चुरा केल्यावर तिचे जेवढे कण होतील त्यापेक्षाही अधिक जन्म एका जीवात्म्याने घेतलेले असतात. चौऱ्यांशी लक्ष योनींमध्ये आपण असंख्य जन्म घेतलेले आहेत: परंतु आपल्याला वाटते की हा आपला पहिलाच जन्म आहे. एवढे जन्म घेऊन देखील जीवात्म्याचे समाधान झालेले नाही. भोगाने तृप्ती मिळत नाही म्हणून योगाभ्यास करावा लागतो.

मनोवृत्तींचा निग्रह करणे हाच योग होय. मन एखाद्या भुतासारखे असते. कितीही मिळाले तरीही ते तृप्त होत नाही. पोट भरले तर मनुष्य एक जादा लाडू पोटात घालू शकत नाही. पोट भरलेले असते, पण मन भरलेले नसते म्हणून तो इकडे तिकडे पाहून लाडू खिशात घालतो. कितीही खाल्ले, कितीही पाहिले तरी मनुष्याचे समाधान होत नाही. सांसारिक विषयात गुंतून पडल्यामुळे जीवात्म्याला मुक्ती हवी असे वाटत नाही. जोपर्यंत जीवात्म्याचा मनात विरक्ती उत्पन्न होत नाही तोपर्यंत त्याच्यावर गुरुकृपा होत नाही. त्याच्या मनात विरक्ती उत्पन्न व्हावी यासाठीच ज. रेणुकाचार्य संसारहेयस्थलाचा उपदेश करीत आहेत, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
२६ जुलै १९९०

---

## आशीर्वचन बारावे

# संसारहेयस्थल– ५

जिज्ञासू सद्भक्तांनो,

संसारहेयस्थलात संसाराचे स्वरूप समजावून देऊन तो कसा हेय आहे, हे ज. रेणुकाचार्य प्रतिपादन करीत आहेत. संसार हा केवळ भूलोकापुरता मर्यादित नाही तर समस्त लोकलोकांतरात तो व्यापलेला आहे. इहलोकातील सुखप्राप्तीसाठी प्रयत्नशील असणारा जीव हाच केवळ संसारी आहे असे नव्हे तर पारलौकिक सुखप्राप्तीसाठी जो प्रयत्न करतो त्याला देखील संसारीच म्हणावे लागते. परलोकात सुख मिळावे म्हणून काही जीवात्मे इहलोकात पुण्यकर्मे करतात. त्यामुळे त्यांना स्वर्गप्राप्ती होते. आपली पुण्यकर्मे घेऊन ते स्वर्गात जातात. ते कोठपर्यंत स्वर्गात राहतात? तर त्यांच्या पुण्यकर्मांचे फळ संपेपर्यंत. एखादा मनुष्य ऐष करण्यासाठी भरपूर पैसे घेऊन एखाद्या निसर्गरम्य ठिकाणी जातो. महागड्या हॉटेलात उतरतो. खातो, पितो, मौज करतो. हे सारे कुठपर्यंत चालते? त्याचा खिसा गरम आहे तोपर्यंत. पैसे संपत आले की तिकिटापुरते पैसे बाजूला काढून तो निमूटपणे घरी येतो. स्वर्गस्थ जीवांची अवस्था अशीच असते. ते स्वर्गात पुण्यकर्मांची फळे भोगतात, पुण्य संपले की पुन्हा इहलोकात जन्म घेतात. स्वर्ग ही भोगभूमी आहे आणि इहलोक ही कर्मभूमी आहे. इथे पुण्य मिळवता येते तसेच पापही मिळवता येते. म्हणून ज. रेणुकाचार्य सांगतात:-

**ऐहिके क्षणिके सौख्ये पुत्रदारादिसंभवे।**
**क्षयित्वादियुते स्वर्गे कस्य वांछा विवेकिनः।।**
(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.६२)

स्वर्गाच्या ठिकाणी क्षयदोष आणि पतनदोष असे दोन दोष आहेत. स्वर्गात जसजसे भोग भोगले जाता, तसतसा पुण्याचा क्षय होतो. सुख भोगल्याने पुण्य सरत जाते तर दुःख भोगल्याने पाप सरत जाते. पुण्य संपले की जीवात्म्याचे स्वर्गातून पतन होते. तो कितीही वेळा स्वर्गात गेला तरी पुण्य संपल्यावर त्याला पुन्हा इहलोकात यावेच लागते. पैसे संपल्यावर माणसाला हॉटेल सोडावे लागते त्याप्रमाणे. म्हणून आचार्य सांगतात की, इहलोकातील सुख असो वा पारलौकिक सुख असो, ते क्षणिकच असते. क्षणिक सुखासाठी आपले संबंध जीवन पणाला लावणे हे मनुष्याचे कर्तव्य नव्हे. इहलोकाला 'मृत्युलोक' असे नाव आहे. जो जीव मृत्युलोकात जन्म घेतो तो आपल्या शरीरात अनंतकाळ राहू शकत नाही. आयुष्य सरले की त्याला शरीर सोडावे लागते.

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।**
**जन्तुर्मरणजन्मभ्यां परिभ्रमति चक्रवत्।।५.६३।।**

जन्म आणि मृत्यू हे द्वंद्व आहे. ते एकमेकांच्या सोबतच असणार. एकाला सोडून दुसरे राहूच शकत नाही. भूक आणि तहान हे जसे एकमेकांसोबत असतात तसेच जन्म-मृत्यू सोबत असतात. सुख-दुःख हेदेखील द्वंद्व आहे. मी पूर्णसुखी आहे असे जगातला कोणताही मनुष्य म्हणू शकत नाही. समर्थ रामदासांनी आपल्या मनाला विचारले आहेः-

**जगी सर्व सुखी असा कोण आहे।**
**विचारे मना तूचि शोधूनि पाहे।।**

सर्वसुखी असा प्राणी शोधून देखील सापडणार नाही. सुखाच्या मागे दुःख आणि दुःखाच्या मागे सुख असे चक्र निरंतर फिरत असते. एक टाळून दुसरे स्वीकारता येत नाही, एक स्वीकारून दुसरे टाळता येत नाही.

**सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्यानंतरं सुखम्।**
**न नित्यं लभते दुःखं न नित्यं लभते सुखम्।।**

सुभाषितकार सांगतो की, जेव्हा तुम्ही संसारात येता तेव्हा सुखापाठोपाठ दुःख आणि दुःखापाठोपाठ सुख तुमचा पाठलाग करीत असते. तुम्ही कायमचे सुखी नसता आणि कायमचे दुःखीही नसता. केवळ सुख मिळाले तर त्या सुखात काही गोडी वाटणार नाही. दुःखानंतर जेव्हा सुख वाट्याला येते तेव्हा त्या सुखाची लज्जत औरच असते.

भूक-तहान, सुख-दुःख हे जसे द्वंद्व आहे, तसेच जन्म-मृत्यू हेदेखील द्वंद्व आहे. ज्याचा जन्म होतो त्याचा मृत्यू अटळ असतो. जन्माला आलेला कोणताही जीव आजपर्यंत अमर झालेला नाही. म्हणून ज. रेणुकाचार्य सांगतात, 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्य च।' जो जन्म घेतो त्याला मृत्यू अवश्य येतो आणि जो मरतो त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागतो. पूर्वजन्म, पुनर्जन्म हा जन्मविचार भारतीय दर्शनशास्त्रांनी मान्य केला आहे. वीरशैवांच्या आगमशास्त्रात एक महत्त्वाचे विधान आहेः-

**एकेन जन्मना मुक्तिः वीराणां तु महेश्वरि।**

शिव पार्वतीला सांगतात की, वीरशैवांना जन्म आहे, परंतु मरण नाही. तुम्ही म्हणाल, 'महाराज, असे कसे सांगता? आमचे आजोबा, आमची आजी यांपैकी कोणीही जिवंत नाही. ते फोटोमध्ये जाऊन बसले आहेत. त्यांचा वीरशैवधर्मात जन्म झाला तरी ते मरणच पावले आहेत ना? हे कसे काय? आगमात म्हटले आहे की, वीरशैवांना एकाच जन्मात मुक्ती मिळते. त्यांना मरण नाही आणि ज. रेणुकाचार्य तर सांगतात की जो जन्माला आला त्याला अवश्य मृत्यू येतो. मग ही दोन विधाने परस्परविरोधी नाहीत काय?'

तुम्हाला पडलेला प्रश्न अगदी योग्य आहे. ज. रेणुकाचार्यं सामान्य जीवाबद्दल विधान करीत आहेत. जन्मणाऱ्या प्रत्येकाला मृत्यू येतो, हे खरेच आहे. परंतु ज्याचे अंतःकरण शुद्ध होते असा पिंडस्थलातील साधक पुढे पिंडज्ञानी होतो, त्याला संसार 'हेय' (त्याज्य) वाटू लागतो, मग त्याच्यावर गुरुकृपा होते, पुढे तो षट्स्थलातील एकेक पायरी चढत जातो आणि शेवटी शरणस्थलात जाऊन लिंगात ऐक्य होतो. म्हणजेच मुक्त होतो. जो मुक्त होतो त्याला कसे बरे मरण येईल? तुमच्या घरातील एखादा मनुष्य कालवश झाला तर 'तो मेला' असे तुम्ही म्हणता काय? तुम्ही असे म्हणत नाही. 'शिवैक्य झाला... लिंगैक्य झाला' असे तुम्ही म्हणता. जो लिंगदीक्षा घेतो, गुरूपदेशाप्रमाणे शिवयोगसाधना करतो त्याला पुनर्जन्म मिळत नाही. जो दीक्षा घेत नाही. दीक्षा घेतली तर आचरण करीत नाही त्याला मात्र पुन्हा पुन्हा जन्म घ्यावा लागतो. म्हणून 'वीरशैव' या शब्दाची व्याख्या करताना ज. रेणुकाचार्य महास्वामीजींनी सांगितले आहेः-

**वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका।**
**तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः।।५.१६।।**

तुम्हाला कोणी विचारतात- ''तुम्ही कोण आहात?'' तेव्हा तुम्ही उत्तर देता- ''मी वाणी आहे, मी पंचम आहे, मी तेली आहे'' इत्यादी. उद्योगाप्रमाणे तुम्हाला पडलेली ही आडनावे आहेत. ती काही तुमची जात किंवा धर्म नाही. तुमचा धर्म आहे वीरशैव! मग वीरशैव कोणाला म्हणावे? शैव म्हणजे शिवावर नितांत निष्ठा ठेवणारा, शिवाची उत्कट भक्ती करणारा. शैव अनेक आहेत, शैवपंथही अनेक आहेत. पण तुम्ही 'वीर'शैव आहात. 'वी' म्हणजे विद्या. कोणती विद्या? तर शिव आणि जीव यांच्यातील ऐक्य प्रतिपादन करणारी विद्या. जीव हा मुळात शिवच आहे, शिवाचा अंश आहे. तो शिवस्वरूप होऊ शकतो. पण केव्हा? तर षट्स्थलसाधना केल्यानंतर. अशा शिवजीवैक्य प्रतिपादन करणाऱ्या विद्येत 'र' म्हणजे रममाण होतो तो 'वीरशैव' होय. तुम्ही गुरूकडून उपदेश घेऊन या विद्येत जर रममाण झालात तर तुम्हाला मृत्यू कसा येईल? या विद्येने तुम्हाला मुक्ती मिळेल, पुनर्जन्म मिळणार नाही. महर्षी व्यासांनी वीरशैव या शब्दाची स्कंदपुराणात एक व्याख्या केली आहे. ते सांगतातः-

**यो हस्तपीठे निजमिष्टलिंगं विन्यस्य तल्लीनमनः प्रचारः।**
**बाह्यक्रियासंकुलनिःस्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैवः।।**

जो मनुष्य आपल्या डाव्या तळहातावर इष्टलिंग ठेवून त्याची पूजा करतो, त्याच्या चिंतनात तल्लीन होतो तो वीरशैव होय, असे महर्षी व्यास सांगतात. जो विरोधरहित आहे तो वीरशैव होय, अशीही एक व्याख्या वीरशैव शब्दाची केली जाते. लिंगपूजा करणारा, देहावर नित्य इष्टलिंग धारण करणारा, शिवजीवैक्य विद्येत रममाण होणारा जो वीरशैव आहे त्याने जगाबरोबर कसे वर्तन करावे हेदेखील आपल्या आचार्यांनी सांगितले आहे. अन्य धर्मीयांसोबत बोलताना 'आमचा धर्मच श्रेष्ठ आहे, आमचे आराध्य श्रेष्ठ आहे' असा अहंभाव व्यक्त

केला तर समोरचा मनुष्य तुमच्याशी भांडण करेल. म्हणून त्याच्याशी विरोध करू नये, असे आचार्य सांगतात. स्वधर्माचे पालन करताना सौहार्दभावनेचे आणि सहिष्णुतेचे विस्मरण होऊ नये. विरोधरहित भावनेने जेव्हा तुमचे वर्तन होते तेव्हा तुम्ही खरे वीरशैव असता. तुम्ही लिंगपूजा करीत असाल, धर्माचे पालन करीत असाल, परंतु जर एखाद्या व्यक्तीविषयी तुमच्या मनात वैरभाव असेल तर तुम्हाला मुक्ती मिळणार नाही. सर्व ब्रह्मांड हे लिंगरूप आहे अशी भावना ज्या वीरशैवाच्या मनात दृढ असते त्याच्या दृष्टीत एखादा मनुष्य वैरी कसा ठरू शकेल?

'वीरशैव' शब्दाचा अर्थ नीट ध्यानात घेऊन जर तुम्ही निष्ठापूर्वक धर्माचरण करीत असाल तर ह्या एकाच जन्मात तुम्हाला मुक्ती प्राप्त होईल. तुमचे असे आचरण नसेल तर जन्ममृत्यूपासून तुमची सुटका होणार नाही.

जन्म आणि मृत्यू या शब्दांचे अर्थही नीट समजून घेतले पाहिजेत. जीवात्मा शरीरात प्रवेश करतो त्याला जन्म असे म्हणतात, तर जीवात्मा शरीराचा त्याग करतो त्याला मृत्यू असे म्हणतात. आईच्या गर्भात पाचव्या महिन्यापासून गर्भाची हालचाल सुरू होते. तेव्हा मग सगळे सोपस्कार सुरू होतात. चोरचोळी, डोहाळजेवण असे काही काही. घरोघरी तुम्हाला स्वामीसारखे जेवायला बोलावतात. ते तुमच्यासाठी नव्हे तर तुमच्या गर्भात जो बाळजीव असतो त्याचे स्वागत करण्यासाठी. पाचव्या महिन्यात जीवात्मा गर्भात प्रवेश करतो असे शास्त्रात सांगितले आहे. जीवात्म्याचा प्रवेश ज्याला तुम्ही टाळू म्हणता त्या ठिकाणाहून होतो. तान्ह्या बाळाच्या टाळूवर जर तुम्ही बोट ठेवून पाहिले तर तिथे हृदयासारखी धडधड तुमच्या बोटाला जाणवेल. इथूनच जीवात्म्याने शरीरात प्रवेश केलेला असतो. त्यानंतर त्या रंध्रावर, जीवात्म्याने बाहेर जाऊ नये म्हणून, एक पातळ आवरण निर्माण होते. मुलाच्या जन्मानंतर तुम्ही त्याची टाळू तेलाने भरता ती तिथले आवरण घट्ट व्हावे यासाठी. आईच्या गर्भातून मूल बाहेर आल्यावर आपण त्याचा जन्म झाला असे म्हणतो. वस्तुत: ज्या क्षणी जीवात्म्याने शरीरात प्रवेश केलेला असतो तोच खरा जन्म असतो. शरीराबाहेर जाण्यासाठी जीवात्म्याला नऊ द्वारे असतात. दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, एक तोंड, एक गुदद्वार आणि एक मूत्रद्वार- अशी नवद्वारे असून मस्तकावरील ब्रह्मरंध्र हे दहावे द्वार होय. नऊ द्वारांपैकी कोणत्याही एका द्वारातून जीवात्मा बाहेर जातो. योगीपुरुषांचा प्राण मात्र ब्रह्मरंध्रातून बहिर्गमन करतो. तात्पर्य हे की जीवात्म्याचा शरीरात प्रवेश होणे म्हणजे जन्म आणि जीवात्म्याने शरीर सोडणे म्हणजे मृत्यू होय. ज्याचा जन्म होतो त्याचा मृत्यू अटळ आहे. परंतु ज्याला मुक्ती मिळते त्याला पुढे जन्मही नाही आणि मरणही नाही. जन्म-मृत्यू हे शरीराचे धर्म आहेत, त्याचा स्व-भाव आहे. ज्या महापुरुषांनी आपल्या तपोबलाने लोकांना जीवदान दिले त्या महापुरुषांना देखील स्वत:चे मरण टाळता आले नाही. एका कन्नड संताने म्हटले आहे की, 'मी वाघाचा पाठलाग केला तरी त्याने मला खाल्ले नाही, असे जर एखाद्या हरिणाने म्हटले तर ते आश्चर्य होय. नरभक्षक राक्षसीच्या घरात मी रात्रभर राहिलो आणि सकाळी जिवंत घरी परत आलो, असे जर एखाद्या मनुष्याने म्हटले तर तेही आश्चर्यच होय. त्याप्रमाणे मृत्युलोकात जन्म घेऊन मी मरणारच नाही असे जर कोणी म्हणत असेल तर त्यासारखे दुसरे नवल नाही.'

मृत्यू कधी येईल आणि कोणत्या रूपात येईल हे सांगता येत नाही. मृत्यूची वेळ माहीत नसते म्हणून तर आपण सुखाने जगू शकतो. जर एखाद्या मनुष्याला तू सात दिवसांत नक्की मरशील असे सांगितले तर तो कसा सुखाने राहील? म्हणून म. बसवेश्वर म्हणतात:-

**शूलव नेरिद कळ्ळनु हालुतुप्पवनुंडु मेलेसुकालबदुकुवनु.**

-ज्याला सुळावर चढवले जाणार आहे अशा माणसासमोर तुम्ही दूध, तूप, पक्वान्ने ठेवली तर तो खाऊ शकेल काय? मृत्यू समोर उभा असताना कोणाचे लक्ष पक्वान्नाकडे राहील? म्हणून मृत्यूची आठवण ठेवून आपण कर्म केले पाहिजे. धर्मकार्य, सत्संग म्हातारपणीच करावा असे नाही. तुम्हाला म्हातारपणी मृत्यू येईल, असे कोणी लिहून दिले आहे काय? तो केव्हाही तुमचे दार ठोठावील.

मृत्यू कधी येईल हे सांगता येत नसले तरी तो जवळ आल्याची चिन्हे तुमच्या शरीरावर दिसू लागतात. डोळे अधू होतात, इंद्रिये थकू लागतात, केस रूपेरी होऊ लागतात, त्वचेवर सुरकुत्या पडू लागतात. तुम्ही ही चिन्हे झाकण्याचा कितीही प्रयत्न केला तरी वार्धक्याला तुम्ही थोपवू शकत नाही. मरण हा शरीराचा स्वभाव आहे, म्हणून ते कोणाला टाळता येत नाही. कबीर म्हणतात:-

**पानीबीच बतासा हो। छन में गली जान।।**

बत्तासा पाण्यात टाकला तर क्षणात तो विरघळून जातो. त्याप्रमाणे देह कधी गळून जाईल हे सांगता येत नाही. मृत्यू हा शरीराचा स्वभाव असल्यामुळे त्यात परिवर्तन होत नाही. स्वभाव कसा बदलत नाही याविषयीची एक मजेशीर कथा आहे.

एकदा एक ऋषी सायंकालीन अर्घ्य देत होते. त्यांच्या ओंजळीत अचानक एक उंदराचे पिलू पडले. ऋषींनी आश्चर्याने वर पाहिले. आकाशातून एक घार जात होती. तिच्या तोंडातूनच ते पिलू आपल्या हातात पडले हे ऋषींनी जाणले. या पिलाचे प्राण वाचवावे म्हणून ते आपल्या हातात पडले आहे असे ऋषीला वाटले. त्यांनी त्या पिलाचे संगोपन केले. नंतर आपल्या तपोबलाने उंदरीला मानवी देह प्रदान केला. ती आता ऋषींची कन्या म्हणून वावरू लागली. कन्येला तारुण्यावस्था प्राप्त झाली. ऋषीला वाटले, आता हिचे लग्न करावे. म्हणून त्यांनी तिला बोलावून विचारले, ''बाळे, तुझा विवाह करण्याचा माझा निश्चय झाला आहे. तुला कसा वर हवा आहे ते मला सांग.''

कन्या लाजून म्हणाली, ''बाबा, मला अत्यंत तेजस्वी असा वर हवा आहे.''

अत्यंत तेजस्वी कोण आहे? तर सूर्य. ऋषींनी सूर्याला आवाहन केले, तेव्हा सूर्यदेव त्यांच्या आश्रमात प्रकट झाले. सर्वत्र प्रकाश पसरला खरा, परंतु वातावरण तप्त झाले. ऋषीने मुलीला सूर्य दाखवला. तेव्हा ती म्हणाली, ''बाबा, हा तेजस्वी आहे, परंतु अतिशय तापदायक आहे. हा वर मला पसंत नाही. तापदायक नसलेला परंतु याच्यापेक्षा शक्तिमान असलेला वर मला हवा.''

ऋषीने सूर्यालाच विचारले, ''तुझ्यापेक्षा अधिक शक्तिमान कोण आहे?''

''माझ्यापेक्षा अधिक बलवान मेघ आहे, कारण तो मलाही झाकून टाकतो.'' सूर्य म्हणाला.

मग ऋषीने मेघाला आवाहन केले. एक काळाकभिन्न मेघ आश्रमात आला. त्याच्या अंगात ओलसरपणा होता. ऋषीने आपल्या कन्येला हा वर दाखवल्यावर ती म्हणाली, ''बाबा, हा फारच काळाकुट्ट आहे. याच्या अंगातून सारखे पाणी झरत आहे. हा वर मला पसंत नाही. ज्याचे अंग कोरडे आहे आणि जो याच्यापेक्षाही शक्तिमान आहे असा वर मला पाहिजे.''

ऋषीने मेघालाच विचारले, ''तुझ्यापेक्षा अधिक बलवान कोण आहे?''

''माझ्यापेक्षा अधिक बलवान वायू आहे. कारण तो मला आपल्या सामर्थ्याने दूर सारतो, पळवून लावतो.''

मग ऋषीने वायूला आवाहन केले. वायू आश्रमात आला. ऋषीने कन्येला तो दाखवला. ती म्हणाली,

''बाबा, हा तर इतका सूक्ष्म आहे की मला दिसत देखील नाही. याच्याशी मी कसे लग्न करू? मला हा पसंत नाही. असा सूक्ष्म नव्हे तर स्थूल पती मला हवा.''

ऋषीने वायूला विचारले, ''तुझ्यापेक्षा सामर्थ्यवान आणि स्थूल असा कोण आहे?''

वायू म्हणाला, ''माझ्यापेक्षा सामर्थ्यवान पर्वत आहे. कारण तो मला अडवतो, माझे वाहणे थांबवतो.''

ऋषीने आपल्या कन्येला पर्वत दाखवला. पर्वत दुरून छान दिसत होता. परंतु जवळ गेल्यावर त्याचे ओबडधोबडपण पाहून कन्या नाराज झाली. ती म्हणाली, ''इतका अवाढव्य आणि ओबडधोबड पती मला नको आहे. याच्यापेक्षा लहान आणि सामर्थ्यवान पती मला हवा आहे.''

ऋषीने पर्वताला विचारले, ''तुझ्यापेक्षा सामर्थ्यवान आणि लहान कोण आहे?''

''उंदीर! कारण माझ्या देहाला तोच पोखरू शकतो.'' पर्वताने उत्तर दिले.

मग ऋषीने कन्येला उंदीर दाखवला, तेव्हा ती छानपैकी लाजून म्हणाली, ''बाबा, मला हा वर एकदम पसंत आहे. मी याच्याशीच लग्न करणार.''

ऋषी चमकले. त्यांना वाटले ही मुळात उंदरी, हिला आपण मानवी स्त्री बनवले. परंतु हिचा मूळ स्वभाव काही गेला नाही. शेवटी हिला उंदीरच पसंत पडला. मग त्यांनी तिला पुन्हा उंदरीचे रूप देऊन तिचे उंदराशी लग्न लावून दिले.

'स्वभावो दुरतिक्रमः।' स्वभाव काही केल्या बदलता येत नाही, हेच खरे. त्याप्रमाणे जन्म आणि मृत्यू हा शरीराचा स्वभाव आहे. तो काही केले तरी बदलणार नाही. शरीराला अमरत्व देणे शक्य नाही. म्हणून शरीराचे क्षणभंगुरत्व जाणून शाश्वत असे आत्मसुख मिळवण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

२७ जुलै १९९०

---

आशीर्वचन तेरावे

## संसारहेयस्थल– ६

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जीवात्म्याच्या ठिकाणी अहंकार असतो आणि ममत्वही असते. अहंकार म्हणजे मीपणा. आपल्या घराचे दार रात्री ठोठावल्यावर आतून कोणीतरी विचारले, 'कोण आहे?' तेव्हा आपण उत्तर देतो, 'मी आहे' हेच आपले मीपण, अहंकार. आपला अहंकार जणू आत्म्याला लपेटून बसलेला असतो. तो आतून बाहेर येतो. माणूस ज्याला 'माझे' म्हणतो ते ममत्व होय. आपल्या मालकीच्या आपल्या आवडीच्या ज्या वस्तू आणि व्यक्ती असतात ते आपले ममत्व असते. आपली प्रिय व्यक्ती जर परदेशात असेल तर आपले ममत्व तेथपर्यंत पसरलेले असते. जोपर्यंत मीपण असते तोपर्यंत ममत्व असते. मीपण नसेल तर ममत्वाला काय अर्थ आहे?

पावसाळ्याचे दिवस होते. नदीला पूर आला. नदीचे पाणी शेतात शिरले. एक कोल्हा आपला जीव वाचवण्यासाठी धडपडू लागला. शेतात गवताची गंजी होती. कोल्हा गंजीवर जाऊन बसला. त्याला वाटले,

आता आपला जीव नक्की वाचणार. परंतु नदीचे पाणी हळूहळू वाढत गेले. प्रवाहाच्या वेगाने गवताची गंजी पाण्यात वाहू लागली. तिच्यासोबत तिच्यावर बसलेला कोल्हादेखील वाहत निघाला आता आपण वाचणार नाही असे त्याला वाटले. म्हणून तो मोठमोठ्याने ओरडू लागला, ''प्रलय होणार आहे. प्रलय होणार आहे.''

तो सारखा ओरडत होता. नदीकाठावरील शेतकऱ्यांनी त्याचे ओरडणे ऐकले. त्यांना कुतूहल वाटले. खरेच कधी प्रलय होणार? कोल्हा तर पाण्याहून वाहत चालला होता. तो जर पाण्यात बुडून मेला तर प्रलयाचे भाकीतही त्याच्यासोबत बुडून जाणार होते. म्हणून काही धाडशी शेतकऱ्यांनी कंबरा कसल्या. पाण्यात उड्या ठोकल्या आणि कोल्ह्याला सुखरूप पाण्याबाहेर काढले. त्यांनी कोल्ह्याला विचारले, ''सांग, प्रलय कधी होणार आहे?''

कोल्हा म्हणाला, ''आता नाही होणार.''

शेतकऱ्याने विचारले, ''असे कसे? तू तर मघाशी ओरडत होतास प्रलय होणार म्हणून.''

कोल्हा म्हणाला, ''त्यावेळी मी बुडून मरणार होतो. म्हणून माझ्यापुरता प्रलयच होणार होता. परंतु आता मी सुखरूप बाहेर निघालो आहे. आता प्रलय होणार नाही.''

जोपर्यंत 'मी' आहे तोपर्यंत जग आहे, ममत्व आहे. एकदा 'मी' संपल्यावर मग कसले आले जग आणि ममत्व? अवघे जग आणि त्यावरील ममत्व येथेच ठेवून जीवात्मा एकटा निघून जातो. प्रपंचावरील जीवाचा जो अभिमान आहे त्याला संसार म्हणतात. संसारातून मुक्ती मिळण्यासाठी संसारविषयक वैराग्य अंगी बाणले पाहिजे. सामान्य जीव असो की अवतारी पुरुष असो, ज्याने या संसारात जन्म घेतला त्याला कधी ना कधी तरी देहत्याग करावाच लागतो. म्हणून ज. रेणुकाचार्य पुढे सांगतातः-

> मत्स्यकूर्मवराहाद्यैर्नृसिंहमनुजादिभिः।
> जातेन निधनं प्राप्तं विष्णुनापि महात्मना।।
>
> (श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.६४)

सामान्य माणसाची गोष्ट सोडून द्या, परंतु ज्यांच्या ठिकाणी अवतार घेण्याचे सामर्थ्य आहे अशा भगवान विष्णूला देखील अवतार धारण करून त्या त्या अवतारात देहत्याग करावा लागला. जेव्हा जेव्हा धर्माला ग्लानी आली, अधर्म फोफावला तेव्हा तेव्हा भगवान विष्णूने मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौद्ध आणि कल्की असे दहा अवतार घेतले. ह्या सर्व अवतारांत त्याला मृत्यूला सामोरे जावे लागले.

विष्णूला दशावतार का घ्यावे लागले याविषयी एक पौराणिक कथा सांगितली जाते. देव आणि असुर यांच्यात युद्ध सुरू होते. भगवान विष्णूशी लढताना असुर पराभूत झाले आमि पळत सुटले. विष्णू त्यांचा पाठलाग करू लागले. जीव वाचवण्यासाठी असुरांनी भृगू ऋषींच्या आश्रमात आसरा घेतला. भृगू ऋषी आश्रमात नव्हते, तरी त्यांच्या पत्नीने शरण आलेल्यांना अभय दिले आणि त्यांना आश्रमात ठेवून घेतले.

असुरांचा पाठलाग करीत विष्णू भृगू ऋषींच्या आश्रमाच्या दारापर्यंत आले. तेव्हा भृगुपत्नीने त्यांना दारात अडवले. विष्णूंनी तिची परोपरीने समजूत काढली, परंतु शरण आलेल्या असुरांना तुमच्या स्वाधीन करणार नाही असे तिने निक्षून सांगितले. शेवटी विष्णूला तिचा वध करावा लागला. नंतर त्यांनी आश्रमात लपलेल्या असुरांचा वध केला.

भृगू आश्रमात आल्यावर त्यांना सर्व प्रकार समजला. ते अत्यंत संतप्त झाले. त्यांनी विष्णूला शाप दिला.

"माझ्या निरपराध पत्नीचा वध करून मला पत्नीवियोगाचे दुःख दिले. म्हणून तू मृत्यूलोकात एक कोटी जन्म घेऊन त्या जन्मांत पत्नीवियोगाचे दुःख भोगशील."

भृगू ऋषींची शापवाणी ऐकून विष्णू घाबरले. भृगू शिवभक्त होते. तेव्हा शिवाला प्रसन्न करू भृगू ऋषींकडून उःशाप मिळवावा या उद्देशाने विष्णूने कांचीक्षेत्रात तपश्चर्या केली. भगवान शिव प्रसन्न झाल्यावर विष्णूंनी भृगूच्या शापातून मला मुक्त करा अशी प्रार्थना केली. शिव म्हणाले, "माझे भक्त माझ्यापेक्षा सामर्थ्यसाली आहेत. त्यांचे शब्द मी बदलू शकणार नाही परंतु तुझ्यासाठी मी भृगूची प्रार्थना करीन."

त्याप्रमाणे भगवान शंकरांनी भृगू ऋषींना विनंती केली, "विष्णू सर्व जगाचा रक्षक आहे. तेव्हा त्याला एवढा मोठा शाप देणे बरे नव्हे. म्हणून विष्णूने एक कोटी जन्म नव्हे तर फक्त दहा जन्म भूलोकावर घ्यावेत आणि त्यांपैकी फक्त एका जन्मात त्याला पत्नीवियोग घडावा असा उःपाश द्यावा."

शंकरांची विनंती भृगूने मान्य केली आणि त्याप्रमाणे त्यांनी विष्णूला उःशाप दिला. विष्णूला दशावतार का घ्यावे लागले या संबंधीची ही पुराणकथा आहे. त्याला फक्त रामावतरातच पत्नीवियोग भोगावा लागला, हे तुम्हाला माहीत आहे. या सर्व अवतारांत विष्णूला जे देह धारण करावे लागले त्या देहांना अटळपणे मरण पत्कारावे लागले. म्हणून मृत्यू कोणालाही टाळता येत नाही.

जीवन म्हणजे तरी काय आहे? जीवन म्हणजे पुनरावृत्ती. तेच तेच ते पुन्हा पुन्हा करीत राहणे म्हणजे जीवन. प्रत्येक जन्मात आपण तेच ते करीत असतो. जन्माला येणे, वाढणे, शिक्षण घेणे, लग्न करणे, मुलामुलींना जन्म देणे, त्यांची लग्ने करणे, म्हातारपणी नातवांना सांभाळणे आणि शेवटी मरून जाणे. मागच्या जन्मांची आपल्याला आठवण नसते म्हणून प्रत्येक जन्म नवा वाटतो इतकेच. बाकी जीवन म्हणजे पुनरावृत्तीशिवाय दुसरे काही नाही. पुन्हा पुन्हा संसार करणे हे धाडस फारसे उपयोगाचे नाही. धाडस असावे, पण ते परमार्थव्यवहार करण्यात. संसाराची पुनरावृत्ती केली तर अनेक प्रकारची दुःखे भोगावी लागणार यात संशय नाही. शब्दांच्या पुनरावृत्तीने कसे नुकसान होते याविषयी एक कथा आहे.

एका गावात एक पाटील होता. गावचा राजाच तो. पण कानाने थोडा बहिरा होता. एकदा सांगितल्यावर त्याला काही कळत नसे. एकच गोष्ट पुन्हा पुन्हा सांगितल्यावर त्याच्या ध्यानात येत असे. त्याच्या बहिरेपणाला लोक हसत, नावे ठेवत. आपला बहिरेपणा लपवण्यासाठी आणि लोकांवर राग काढण्यासाठी त्याने एके दिवशी फर्मान काढले, "उद्यापासून गावातील सर्वांनी कोणतेही वाक्य नऊ वेळा उच्चारले पाहिजे. जर कोणी नऊपेक्षा कमी अथवा नऊपेक्षा जास्त वेळा उच्चारले तर त्याला फटके मारण्यात येतील."

झाले, दुसऱ्या दिवसापासून पाटलाच्या हुकुमाची अंमलबजावणी सुरू झाली. गावातली सर्व माणसे प्रत्येक शब्द आणि वाक्य नऊ वेळा उच्चारू लागली. एखाद्याला बोलावताना दुसरा 'ये रे, ये रे, ये रे', अशी नऊ वेळा हाक मारत असे. त्याला उत्तर देणारा, 'काय रे, काय रे, काय रे?', असे नऊ वेळा विचारत असे. कामापेक्षा लोकांचा बोलण्यातच अधिक वेळ जाऊ लागला.

एके दिवशी पाटलाच्या शेतातल्या गवताच्या गंजीला आग लागली. शेतावरचा गडी धावत धावत घरी आला पाटील घरात नव्हता. पाटलीणबाई घरी होत्या. गडी धापा टकत हाक मारू लागला, "बाईसाहेब, बाईसाहेब, बाईसाहेब.." असे नऊ वेळा.

"काय रे, काय रे, काय रे?...." पाटलिणीने नऊ वेळा विचारले.

''शेतात, शेतात, शेतात...'' तो म्हणाला.

''काय, काय, काय...?''

''गवताच्या, गवताच्या, गवताच्या...'' तो सांगू लागला. ''गंजीला, गंजीला, गंजीला...''

गवताच्या गंजीला आग लागली हे सांगण्यात इतका वेळ गेला की तोपर्यंत सर्व गंजी जळून खाक झाल्या. पाटलाच्या अजब फर्मानामुळे त्याला नुकसान सोसावे लागले. शब्दांची पुनरुक्ती करण्यामुळे हे सगळे घडले. दुसऱ्या दिवशी पाटलाने आपले फर्मान रद्द करून लोकांना नेहमीसारखे बोलायला परवानगी दिली.

संसाराची पुनरावृत्ती अशीच अनर्थकारक आहे. परंतु परमार्थाची पुनरावृत्ती मात्र जीवनाचा उद्धार करणारी आहे. जो कधीही सरत नाही, संपत नाही त्याला संसार म्हणतात. तुम्ही धान्य जात्यावर दळत बसलात तर तुमचे दळणे कधीतरी संपते. परंतु जर एखाद्या बाईने पीठ दळायला घेतले तर? जात्यात पीठ घातले तर खाली पीठच पडणार. ते पुन्हा जात्यात घातले तर? तिचे दळण कधी संपणारच नाही. अशी संसाराची स्थिती आहे. तुम्ही थांबायलाच तयार नसता. जर कोणाशी तुमचे भांडण होऊन कोर्टकचेरी चालू असेल तर तुम्ही आपल्या मुलाला सांगता की काय वाट्टेल ते होवो याला सोडायचे नाही, कार्टाची पायरी चढतच जायची. तुम्ही आपल्या भांडणाचा वारसा मुलाला देऊन जाता. अशाने तुमचा संसार कसा संपेल? तुम्ही एखादे दुकान नव्याने सुरू करता तेव्हा 'दुकानाचा प्रारंभ अमुक दिवशी होणार आहे. या दिवशी तीर्थप्रसादास यावे', अशी निमंत्रणपत्रिका छापता. 'दुकान अमुक दिवशी सुरू होणार आणि अमुक दिवशी ते कायमचे बंद करण्यात येईल', अशी पत्रिका तुम्ही छापत नाही. म्हणजे एकदा दुकान उघडले तर ते पिढ्यानुपिढ्या चालत राहावे, ते कधीही बंद होऊ नये, अशी तुमची इच्छा असते. आणि सत्संग? तो सुरू करायचा आणि लगेच बंद करायचा. अशाने तुमचा संसार कधी संपणारच नाही. तो कितीही केला, कितीही जन्म केला तरी सरणार नाही. संसाराचा केव्हातरी कंटाळा आला पाहिजे.

घरात बसून, दुकानावर बसून तुम्हाला कंटाळा आला तर तो घालवण्यासाठी तुम्ही येथे प्रवचनात येऊन बसता. इथे थोडे फ्रेश होऊन पुन्हा नव्या संसाराला लागता. इथे प्रवचन ऐकून तुमचे काम संपत नाही. तुम्ही स्वतः ग्रंथाचे अध्ययन केले पाहिजे. महास्वामीजी महिनाभर 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर आशीर्वचन करून जातील. पुन्हा ते तुमच्या वाट्याला कधी येतील हे सांगता येत नाही. म्हणून 'सिद्धान्तशिखामणी'चा अभ्यास थोडा थोडा का होईना, तुम्ही रोज केला पाहिजे. तुमची प्रवृत्ती आध्यात्मिक असली पाहिजे. अध्यात्म हा जीवनाचा मूलाधार असला पाहिजे. त्यानंतर मग तुम्ही कोणीही व्हा, चालेल. व्यापारी व्हा, शिक्षक व्हा, सैनिक व्हा. अध्यात्माचा प्रारंभ बालपणी व्हायला पाहिजे. आपण म्हतारपणी अध्यात्माकडे वळतो. जे आधी करायचे ते नंतर करतो आणि जे नंतर करायचे ते आधी करतो.

एका गरीब घराण्यातील मुलाने मोठ्या कष्टाने आपले शिक्षण पूर्ण केले. तो एम्.कॉम. झाला. नोकरीसाठी अनेक ठिकाणी अर्ज केला. मुंबईच्या एका कंपनीकडून त्याला मुलाखतीचे पत्र आले. मुंबईला जाण्याइतका पैसा नव्हता. त्याच्या आईने उधारउसनवार करून पैसे जमा केले. त्याच्या हाती ठेवले. सोबत भरपूर शिदोरी बांधून दिली आणि रात्रीच्या आगगाडीत बसून दुसऱ्या दिवशी सकाळी तो मुंबईला पोहोचला.

मुलाखत सायंकाळी चार वाजता होती. एवढा वेळ कोठे काढायचा, असा त्याला प्रश्न पडला. मग एका सिनेमा–थिएटरात तो जाऊन बसला. सकाळी नऊ ते बारा या काळात. त्याला सिनेमा फारच आवडला. पुन्हा

एकदा तोच सिनेमा पाहावेसे त्याला वाटले. त्याने बारा ते तीन या दुसऱ्या खेळाचे तिकीट काढले. पुन्हा सिनेमा पाहत बसला तीन वाजता सिनेमा संपला. थिएटरबाहेर येऊन मुलाखतीच्या ठिकाणी जाईपर्यंत साडेपाच वाजले. मुलाखती संपून गेल्या होत्या, उमेदवारांची निवडदेखील झाली होती. याने जाऊन मुलाखतीचे पत्र दाखवले. तेथील कारकून त्याला म्हणाला, ''या पत्रावर मुलाखतीची वेळ किती लिहिली आहे?''

''चार'' त्याने उत्तर दिले.

''आता साडेपाच वाजले आहेत. मुलाखती संपून उमेदवारांची निवडदेखील झाली आहे. तुम्ही परत जा.'' शेवटी त्याला निराश होऊन परत यावे लागले. त्या मुलाचे काय चुकले? त्याने जे आधी करायला हवे होते ते केले नाही. हीच त्याची मोठी चूक. या चुकीमुळे त्याच्यावर आयुष्यभर पश्चाताप करायची वेळ आली.

परमेश्वराने तुम्हाला या जगात अशीच मुलाखत देण्यासाठी पाठवले आहे. गुरुमहाराजांकडून दीक्षा घ्या, लिंगधारण करा, गुरुमंत्राचा जप करा, महास्वामीजींचे आशीर्वचन ऐका. पण तुम्ही आधी हे करत नाही. पाहू नंतरच्या अनुष्ठानाच्या वेळी, असे म्हणता. तुम्हाला संसारात अधिक स्वारस्य वाटते. अध्यात्मात मुळीच वाटत नाही. आधी आत्मज्ञान प्राप्त करा. मग वाटेल तेवढा संसार करा. तुम्हाला संसाराची बाधा होणार नाही. आत्मज्ञानी संसारात राहून संसारापासून अलिप्त राहू शकतो. मग त्याला जन्म-मृत्यूची बाधा होता नाही. परंतु जो आत्मज्ञानापासून वंचित राहतो, सामान्य संसार करतो त्याची मात्र जन्म-मृत्यूच्या चक्रातून सुटका होत नाही. जन्म-मृत्यू हा देहाचा सहजधर्म आहे. म्हणून सामान्य मनुष्य असो की अवतारी पुरुष असो, त्याला मरण येतेच, असे ज. रेणुकाचार्य या संसारहेयस्थलात सांगतात. यापुढील विषयाचा आपण उद्या विचार करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

२८ जुलै १९९०

---

आशीर्वचन चौदावे

## संसारहेयस्थल- ७

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जीवात्मा कर्माधीन आहे. तो जशी कर्मे करतो तशी त्याला फळे भोगावी लागतात. त्याचे कर्म त्याला फरफटत नेते. एखाद्या पशूच्या गळ्यात दोर बांधून त्याला न्यावे त्याप्रमाणे. भारतीय दर्शनशास्त्रांत कर्मसिद्धान्त सांगितलेला आहे. तोच बीजरूपाने ज. रेणुकाचार्यांनी पुढील श्लोकात स्पष्ट केला आहे:-

भूत्वा कर्मवशाज्जन्तुर्ब्राह्मणादिषु जातिषु।
तापत्रयमहावह्निसन्तापाद् दह्यते भृशम्।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी,५.६५)

जीवात्मा कर्माधीन आहे. तो आपल्या कर्माप्रमाणे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र इत्यादी कोणत्या तरी जातीमध्ये जन्म घेत असतो आणि तापत्रयाच्या अग्नीमध्ये सतत जळत असतो. मनुष्याला सुख मिळाले तर तो 'हे माझ्या

कष्टाचे फळ आहे' असे अभिमानाने सांगतो. त्याला दुःख मिळाले तर मात्र देवाकडे बोट दाखवून मोकळा होतो. 'देवाने मलाच एकट्याला एवढे दुःख दिले आहे' अशी तक्रार करतो. देव तुम्हाला दुःख देतो आणि सुख मात्र तुम्ही स्वतःच्या कर्तृत्वाने मिळवता? चांगला सोयीस्कर युक्तिवाद आहे हा. ईश्वर आपल्याला दुःख देतो असे म्हणणे म्हणजे ईश्वरावर आरोप करण्यासारखे आहे. आपले सुख-दुःख हे केवळ आपल्या कर्माचेच फळ असते. शरीर सोडून जाताना जीवात्मा सोबत काहीही नेत नाही असे आपण म्हणत असतो. पण हे म्हणणे बरोबर नाही. तो सोबत धर्म तरी घेऊन जातो किंवा अधर्म तरी घेऊन जातो. बाकी त्याच्या सोबत काहीही येत नाही. त्याने मिळवलेली संपत्ती घरातच राहते. त्याचे पशुधन गोठ्यात राहते. त्याचे नातलग, सगेसोयरे त्याला पोहोचवायला स्मशानापर्यंत येतात, त्यापुढे सोबत करीत नाहीत. त्याची पत्नी मोठमोठ्याने आकांत करून 'मलाही घेऊन जा' असे दुःखातिरेकाने फक्त म्हणत असते; तीही त्याला शेवटपर्यंत सोबत करीत नाही. एवढेच नव्हे तर त्याचा देहदेखील येथेच ठेवून त्याला जावे लागते. त्याला सोबत करते ते त्याने केलेले पुण्यकर्म आणि पापकर्म. जाताना तो हेच घेऊन जातो आणि येताना हेच घेऊन येतो. जीवात्मा असा कर्माच्या अधीन आहे.

कर्म म्हणजे नेमके काय? हे समजून घेतले पाहिजे. महर्षी पतंजलींनी 'योगसूत्रा'त 'क्लेशमूलः कर्माशयः दृष्टादृष्टजन्मवेदनीयः।' असे कर्माचे स्वरूप सांगितले आहे. कर्म हे क्लेशाचे मूळ आहे. या जन्मातील काही कर्मांची फळे याच जन्मात जीवात्म्याला भोगावी लागतात. त्या कर्मांना 'दृष्टजन्मवेदनीय' कर्म असे नाव आहे. ज्या कर्माचे फळ पुढील जन्मात भोगावे लागते ते 'अदृष्टजन्मवेदनीय' कर्म होय. उत्कृष्ट पुण्यकर्म किंवा घोर पापकर्म हे तीन वर्षांत, तीन महिन्यांत, तीन पक्षांत, तीन आठवड्यांत किंवा तीन दिवसांत भोगावे लागते, असे शास्त्रात म्हटले आहे. कर्माची तीव्रता जेवढी असेल तेवढे त्याचे फळ लवकर भोगावे लागते.

विहित कर्म आणि निषिद्ध कर्म असे कर्माचे दोन प्रकार आहेत. जे कर्म करा असे शास्त्र सांगते ते विहित कर्म होय. जे कर्म करू नका असे शास्त्र सांगते ते निषिद्ध कर्म होय. सामान्यतः माणसाची प्रवृत्ती निषिद्ध कर्माकडे असते.

एक मुलगा गुरुमहाराजांकडे येऊन म्हणाला, "महाराज, माझी इच्छा नाही, परंतु सगळे जण मला 'लिंगदीक्षा घे' असा आग्रह करीत आहेत. मला जास्त जप करणे शक्य होणार नाही. मी रोज फक्त अकरा वेळा जप करीन. त्यामुळे मला सिद्धी मात्र पूर्ण मिळाली पाहिजे."

महाराज हसले. म्हणाले, "ठीक आहे, तू दीक्षा तरी घे."

त्या मुलाने गुरुमहाराजांकडून दीक्षा घेतली. महाराजांनी त्याला मंत्र दिला. 'रोज अकरा वेळ जप कर' असे सांगितले. आणखी म्हणाले, "जप करताना एक गोष्ट ध्यानात ठेव. त्यावेळी माकडाचा विचार मनात आणू नकोस, नाहीतर तुला सिद्धी मिळणार नाही."

मुलगा लिंगपूजा करून जपाला बसला. महाराजांनी सांगितले होते की जप करताना माकडाचा विचार करू नकोस. त्याने जपमाळ हातात घेतली की त्याच्या डोळ्यासमोर सारखे माकडच उभे राहू लागले. जप होईचना. त्याने माकडाचा विचार डोक्यातून काढून टाकण्याचा खूप प्रयत्न केला. पण काही जमले नाही. दिवसभर प्रयत्न करून तो थकला. शेवटी गुरुमहाराजांकडे गेला. म्हणाला, "काय महाराज! तुम्ही माझ्याबरोबर माकडाला कशाला पाठवले? माकडाचे स्मरण करायचे नव्हते तर ते करू नकोस असे तुम्ही मला सांगितले कशाला? तुम्ही सांगायचे काही कारणच नव्हते. आता आयुष्यभर माझ्या डोक्यातून माकड जाते की नाही कुणास ठाऊक?"

जे कर्म करू नकोस असे सांगितले तेच कर्म मनुष्य आधी करतो. म्हणजे निषिद्ध कर्माकडे मनुष्याची प्रवृत्ती

अधिक असते. हिंसा करू नये असे वेदांत म्हटले आहे. परंतु मनुष्य अधिकाधिक हिंसक होत चालला आहे. हरिणाची, वाघाची तो कातड्यासाठी शिकार करतो, तर हत्तीची त्याच्या दातासाठी शिकार करतो. हे प्राणी अरण्यात राहतात, माणसाच्या वाटेत आडवे येत नाहीत. हरीण तर गरीब प्राणी आहे. पण माणूस त्याची शिकार करतो. जीवाची हत्या केल्यावर ज्याला आनंद मिळतो त्याला माणूस म्हणावे की राक्षस? लोभामुळे मनुष्य हिंसा करतो तशीच क्रोधामुळेही त्याच्या हातून हिंसा घडते. यज्ञ करून स्वर्गात जाण्याच्या इच्छेने माणसांनी अगणित प्राण्यांची हिंसा केली आहे. ज्या पशूंना यज्ञात बळी दिले जाते ते पशूदेखील स्वर्गात जातात, असे पशुहत्येचे समर्थन याज्ञिक करीत असतात. अशा याज्ञिकांना म. बसवेश्वरांनी एक प्रश्न विचारला आहे. ते म्हणतात- जर यज्ञात बळी दिलेले पशू स्वर्गात जात असतील तर तुमच्या घरातल्या वृद्ध मातापित्यांना यज्ञात बळी देऊन त्यांना स्वर्गात का पाठवत नाही?

अशा प्रकारे लोभामुळे, क्रोधामुळे आणि धर्मविषयक अज्ञानामुळे हिंसा घडते. स्वतः हिंसा करणे, दुसऱ्याकडून हिंसा करविणे आणि हिंसेला कारणीभूत ठरणे असे हिंसेचे आणखी तीन प्रकार आहेत. म्हणून स्वतः पापकर्म करू नये, दुसऱ्याकडून पापकर्म करवून घेऊ नये आणि पापकर्माला अनुमोदन देऊ नये. 'अहिंसा परमो धर्मः।' हे सदैव ध्यानात ठेवले पाहिजे. शारीरिक, वाचिक, मानसिक अशी तीन प्रकारची हिंसा असते. एखाद्याच्या शरीराला इजा करणे ही शारीरिक हिंसा होय. अपशब्द बोलून, शिव्या देऊन एखाद्याची अवहेलना करणे ही वाचिक हिंसा होय. शब्द हे शस्त्र असते, ते जपून वापरले पाहिजे. शब्दामुळेच मित्रा-मित्रांत, भावा-भावांत, पति-पत्नीत वितुष्ट निर्माण होते. अशा वेळी 'कडवे बोल न बोल रे भाई' असा त्यांना उपदेश केला पाहिजे. देवाने आपल्याला मृदू जीभ दिली आहे. म्हणून आपले शब्द जिभेसारखे मृदू असावेत. मनुष्य वाणीचा खूपच दुरुपयोग करतो. जेव्हा आपण एखाद्याला मारू शकत नाही, अपशब्द बोलून त्याचा अपमान करू शकत नाही त्यावेळी त्या माणसाचे आपल्या मनात वाईट चिंतन करतो. त्याचा सत्यानाश व्हावा अशी इच्छा धरतो. हीच मानसिक हिंसा होय. अशा प्रकारे हिंसेचे ऐंशी भेद योगशास्त्रात सांगितले आहेत. ज्या कर्मांचा वेदशास्त्रांनी निषेध केला आहे ती निषिद्ध कर्मे होत.

विहित कर्मांचे अनेक प्रकार आहेत. नित्यकर्म, नैमित्तिक कर्म, काम्य कर्म, प्रायश्चित्त कर्म इत्यादी. आयुष्यभर जे कर्म निष्ठेने करावे लागते त्याला नित्यकर्म म्हणतात. इष्टलिंगपूजन हे वीरशैवांचे नित्यकर्म होय. गुरू तुमच्या हातावर इष्टलिंग देतात, ते सदोदित शरीरावर धारण करावे असा आदेश देतात. इष्टलिंगपूजन हे नित्यकर्म आहे. ते रोज केले पाहिजे. संतशिरोमणी मन्मथस्वामींनी दिवसातून सहा वेळा लिंगपूजा करावी असे म्हटले आहे. ज्यांना हे शक्य नाही त्यांना सवलत देऊन तीन वेळा करावी असे सांगितले आहे. ज्यांना तेही शक्य नाही त्यांनी एक वेळा तरी इष्टलिंगपूजा केली पाहिजे. काही लोक असे विचारतात की 'महाराज, एक वेळा म्हणजे रोज एक वेळा करायची की काय? रोज एक वेळा करायची की आठवड्यातून एक वेळा करायची?' काही जण दर सोमवारी लिंगपूजा करतात. सोमवार ते सोमवार. काही लोक फक्त श्रावणातच लिंगपूजा करतात. काही बहाद्दर तर वर्षातून एकदाच, फक्त महाशिवरात्रीला लिंगपूजा करतात. वर्षभर लिंग कुठेतरी पडलेले असते. ते हुडकून महाशिवरात्रीला हमखास पूजा करतात.

पण असे करू नये. लिंगपूजा हे व्रत आहे. तुमच्यासाठी रोजच शिवरात्र आहे असे समजा. एकदा गळ्यात लिंग घातले तर ते कधी काढू नये. रोज लिंगपूजा केलीच पाहिजे, कारण ते तुमचे नित्यकर्म होय.

कर्माचे जसे भेद आहेत तसेच तापाचेही तीन भेद आहेत. आध्यात्मिक ताप, आधिभौतिक ताप आणि

आधिदैविक ताप. या तापांना दुःख असेही म्हटले जाते. शरीर आणि मन यांना जे दुःख होते ते आध्यात्मिक दुःख होय. शरीराला होणारे दुःख हे बाह्य आध्यात्मिक दुःख होय, तर मनाला होणारे दुःख हे आंतर आध्यात्मिक दुःख होय.

आध्यात्मिकं द्विधा प्रोक्तं बाह्याभ्यन्तरभेदतः।
वातपित्तादिजं दुःखं बाह्यमाध्यात्मिकं मतम्।।५.६८।।

वात, पित्त, कफ यांच्यापासून होणारे दुःख बाह्य आध्यात्मिक दुःख आहे. मनुष्याचे शरीर हे एक रोगालय आहे. देवालयात जसा देवाचा नित्य निवास असतो त्याप्रमाणे या रोगालयात रोगांचे नित्य वास्तव्य असते. मला एकही रोग नाही असे म्हणणारा मनुष्य तुम्हाला सापडणार नाही. प्राचीन काळचे वैद्य नाडीपरीक्षा करून रोगनिदान करीत असत. आज वैद्यकीय क्षेत्रात स्पेशालिस्ट निर्माण झाले आहेत. प्रत्येक अवयवाचा आणि रोगाचा वेगळा डॉक्टर असतो. कान–नाक–घसातज्ज्ञ डॉक्टर वेगळा, नेत्रशल्यविशारद वेगळा, हृदयरोगतज्ज्ञ वेगळा तर अस्थिरोगतज्ज्ञ, चर्मरोगतज्ज्ञ डॉक्टर वेगळे. प्रत्येक मानवी अवयवाचा स्वतंत्र डॉक्टर आहे. दोन्ही डोळे तपासणारा डॉक्टर सध्या तरी एकच आहे. कालांतराने उजव्या डोळ्याचा डॉक्टर वेगळा आणि डाव्या डोळ्याचा डॉक्टर वेगळा, असे होण्याची शक्यता आहे. शरीर हे रोगालय आहे. यात अनेक रोग असे आहेत की ज्यांचा डॉक्टरला पत्ता लागत नाही. सर्व प्रकारच्या तपासण्या करून देखील तुमचा आजार सापडत नाही. डॉक्टर म्हणतात, तुम्हाला काहीच झाले नाही. तुम्हाला मात्र आराम वाटत नाही. पोलिसापेक्षा जसे चोर हुशार असतात तसे डॉक्टरांपेक्षा रोग अधिक हुशार झाले आहेत.

वात, पित्त आणि कफ यांना आयुर्वेदात त्रिदोष म्हणतात. यांच्यामुळेच शरीरात आजार उत्पन्न होतात. रोग जर धातुजन्य असतील तर ते औषधाने बरे होतात. परंतु औषध घेऊन देखील जेव्हा रोग बरा होत नाही तेव्हा समजावे की हा रोग धातुजन्य नसून कर्मजन्य आहे. अशा रोगनिवृत्तीसाठी जप–तप–ध्यान असे उत्कृष्ट कर्मच करावे लागते.

ईश्वराने प्रपंचात सुख कमी आणि दुःख अधिक भरून ठेवले आहे. त्याने असे का बरे केले असावे? प्रपंचात केवळ सुखच सुख असते तर जीवात्म्याने ईश्वराचे स्मरण कधीच केले नसते. सुखाच्या काळात मनुष्य ईश्वराला विसरतो आणि दुःखाच्या काळात त्याची आठवण करतो. यासाठीच महाभारतात कुंतीने श्रीकृष्णाकडे 'मला सुख नको, केवळ दुःखच दे' असे मागणे मागितले होते. रस्त्याने जाणाऱ्या एखाद्या माणसाला जर रत्न फेकून मारले तर तो रत्न मिळाल्याच्या आनंदात ते कोणी मारले याचा विचार न करता आपल्या मार्गाने निघून जाईल. परंतु जर त्याला एखादा दगड फेकून मारला तर तो ज्याने मारला त्याचा शोध घेईल. सुख–दुःखाची कहाणी अशीच आहे. ईश्वराने दुःख दिले तरच आपली नजर त्याच्याकडे वळते, सुख दिले तर वळत नाही. जीवात्म्याला आपल्याकडे आकृष्ट करण्यासाठी ईश्वराने प्रपंचात अधिक दुःख भरून ठेवले आहे. आपल्या देशात जे संतमहात्मे होऊन गेले त्यांनी ईश्वराजवळ कधीच सुख मागितले नाही. मागितले असेल तर ते दुःख!

कर्नाटकात अक्कमहादेवी ही शिवशरणी होऊन गेली. तिचे राजा कौशिकाशी लग्न झाले होते. परंतु संसारात तिला स्वारस्य वाटत नव्हते. विवाहानंतर तिने आपल्या पतीला सांगितले, ''माझे एक व्रत चालू आहे. ते संपेपर्यंत माझ्या अंगाला तुम्ही स्पर्श करायचा नाही.''

राजाने विचारले, ''तुझे व्रत किती दिवसांचे आहे?''

''चाळीस दिवसांचे.'' तिने उत्तर दिले.

राजा म्हणाला, ''ठीक आहे. चाळीस दिवस मी वाट पाहतो.''

शिवपूजेत, शिवध्यानात अक्कमहादेवी मग्न होती. एकेक दिवस सरत गेला. एकोणचाळिसावा दिवस उजाडला. आता काय, एकच दिवस बाकी आहे, हिला स्पर्श केला तरी चालू शकते असे वाटून राजाने तिचा हात धरला. तिला तेवढे निमित्त पुरे होते. ती म्हणाली, ''तुम्ही माझ्या व्रताचा भंग केला. आता मी तुमच्यासोबत राहणार नाही.''

सर्व सुखे हात जोडून उभी होती, राजाचे सर्व ऐश्वर्य दिमतीला हजर होते, परंतु त्यांपैकी कुठलाही मोह अक्कमहादेवीला पडला नाही. ती राजवैभव सोडून बाहेर पडली. तिला पुढे खूप कष्ट सहन करावे लागले. परंतु तिने देवाजवळ सुख मागितले नाही, तर दुःखच मागितले. कारण दुःखात परमेश्वराची आठवण होते, सुखात ती होत नाही. म्हणून दुःखाला घाबरण्याचे कारण नाही. उलट दुःख हे देवाचे वरदान आहे असे समजले पाहिजे. दुःखामुळे तुम्ही देवाच्या अधिक जवळ जाता.

आम्ही एका शहरात एका घरी पादपूजेसाठी गेलो होतो. ते घर सधन होते. ऐश्वर्य ओसंडत होते. आम्ही कुटुंबप्रमुखाला विचारले, ''तुमचा बंगला फार छान आहे. पण येथे देवघर कोठे आहे?''

ते म्हणाले, ''महाराज, आमच्या घरात देवघरच नाही. कारण आम्ही पूजाच करत नाही.''

आम्हाला आश्चर्य वाटले. आम्ही विचारले, ''तुम्ही देवापासून एवढे विरक्त का झालात?''

त्यांनी चांगले उत्तर दिले. ते म्हणाले, ''देवाने आम्हाला काय कमी केले आहे म्हणून आम्ही देवाचे स्मरण करायचे? ऐश्वर्य, अधिकार सारे काही आमच्याकडे आहे. म्हणून आम्ही देवाला त्रास देत नाही. त्याच्यावर पाणी घालायचे, त्याला भस्म लावायचे, म्हणजे देवाला त्रास देणेच आहे. आम्ही ते करीत नाही.''

देवाला काहीतरी मागायचे म्हणून पूजा केली पाहिजे असे नव्हे. देवाने एवढे सारे दिले त्याविषयी कृतज्ञता म्हणून तरी त्याचे स्मरण केले पाहिजे. देवाने एवढा मूल्यवान देह आपल्याला दिला आहे याची आठवण ठेवायला हवी. पूर्वी देहाचे मूल्य कळत नव्हते. अलीकडे ते चांगले कळू लागले आहे. बहिरेपण आल्यावर जेव्हा कानावर यंत्र बसते तेव्हा देवाने दिलेल्या कानांची किंमत कळते. दात असेपर्यंत त्यांची किंमत कळत नाही. सर्व दात पडल्यावर कवळी बसवताना दातांचे मूल्य समजते. अरे, दातांची एवढी किंमत आहे? देवाने तर फुकटच दिले होते. कितीही चांगली कवळी बसवली तरी ती मूळच्या दातांसारखी उत्तम नसते. खाताना ती पुढे-मागे हलणारच. किडनीसारखा एखादा अवयव निकामी झाला तर लक्षावधी रुपये देऊन तो विकत घ्यावा लागतो. जुन्या काळी घरातल्या दागदागिन्यांची चोरी होत असे, आता मानवी अवयवांची चोरी चालू आहे. यावरून शरीराची किंमत तुम्हाला कळली पाहिजे. मग ज्या देवाने एवढे मूल्यवान शरीर तुम्हाला दिले त्या देवाबद्दल तुम्ही कृतज्ञ राहायला नको?

म्हणून देवाने दुःख दिले तरी ते त्याचे वरदान मानले पाहिजे. अशा प्रकारे वात-पित्त-कफापासून शरीराला जे दुःख होते त्याला बाह्य आध्यात्मिक दुःख म्हणतात, असे ज. रेणुकाचार्य सांगतात. यापुढील विषय उद्याच्या आशीर्वचनात विचारार्थ घेऊ, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

२९ जुलै १९९०

## संसारहेयस्थल- ८

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथाला शिवयोगी शिवाचार्यांनी 'श्रीगोप्यचिंतामणी' असे विशेषण दिले आहे. चिंतामणी हे असे रत्न आहे की जे मनुष्याच्या चिंता दूर करते. या ग्रंथाचे पठण-पारायण केल्यावर आपल्याही सांसारिक चिंता दूर होतात. म्हणून या ग्रंथाचा नित्याभ्यास केला पाहिजे. कालच्या आशीर्वचनात आपण बाह्य आध्यात्मिक ताप म्हणजे काय, याविषयी चर्चा केली. वात-पित्त-कफ या त्रिदोषांमुळे शरीराला जे दुःख होते त्याला बाह्य आध्यात्मिक दुःख असे नाव आहे. तीनशे पासष्ट आजार आपल्या शरीरात उपस्थित असतात. एखाद्याने 'मला कोणताही आजार नाही, मी पूर्ण निरोगी आहे' असे कितीही सांगितले तरी त्याला क्षुधा आणि तृषा हे दोन आजार असतातच. शंकराचार्यांनी म्हटले आहे की, क्षुधा आणि तृषा हे आजार असून भिक्षान्नरूपी औषधीमुळे ते बरे होतात.

तुम्ही म्हणाल, 'महाराज, आम्ही कशाला भिक्षा मागू? आम्ही तर अनेकांना भिक्षा घालत असतो.' परंतु लक्षात ठेवा, ज्याला तुम्ही सर्व देवांचा देव मानता अशा भगवान शंकराने देखील हाती कपाल घेऊन माता अन्नपूर्णेजवळ भिक्षा मागितली आहे. मग भिक्षा मागण्यात तुम्हाला का लाज वाटावी? भिक्षा मागायला तुम्ही कोणाच्या दारी जाऊ नका. तुमच्या घरीच पाटावर बसून तुमच्या धर्मपत्नीजवळ 'भिक्षां देहि' असे म्हणून भिक्षा मागा. भिक्षा म्हणून जे वाढले जाते त्या अन्नाला दोष द्यायचा नसतो. झोळीत किंवा ताटात जे पडेल ते अन्न 'परब्रह्म' म्हणून स्वीकारावे लागते. नाहीतर ताटात पडलेल्या अन्नाला तुम्ही नाव ठेवत असता- यात मीठच कमी आहे... तिखटच जास्त आहे... तुला स्वयंपाकच करता येत नाही... तुझ्या आईबापाने तुला काही शिकवलेच नाही... माहेरी निघून जा, इत्यादी. म्हणून एकदा अन्न शिजवल्यानंतर 'अन्नपूर्णे सदा पूर्णे शंकरः प्राणवल्लभे' असे म्हणावे लागते. मग त्या अन्नाला दोष देता येत नाही. एखाद्या भिक्षुकाला तुम्ही भिक्षा वाढल्यानंतर तो भिक्षेला नाव ठेवतो काय? ठेवत नाही. झोळीत जे पडेल ते प्रसाद म्हणून सेवन करतो. गृहस्थाश्रमात सहनशीलतेची आवश्यकता असते. म्हणून शंकराचार्य म्हणतात- तुम्हीसुद्धा भिक्षा मागा.

मनुष्याचे शरीर हे रोगालय आहे. त्याच्यामागे अनेक व्याधी लागलेल्या आहेत. या स्थूल शरीराच्या आत आणखी एक शरीर आहे-सूक्ष्म शरीर. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच प्राण, मन आणि बुद्धी अशा सतरा तत्त्वांचे हे सूक्ष्म शरीर आहे. या सतरा तत्त्वांमध्ये सुख-दुःख भोगणारे तत्त्व मन हे आहे. तुम्ही म्हणत असता, 'माझ्या मनाला फार दुःख झाले... त्याचे बोलणे माझ्या मनाला फार लागले... माझ्या मनाला फार आनंद झाला' इत्यादी. दुसऱ्याच्या बोलण्यामुळे मनाला दुःख होते. परंतु मनातील विकारांमुळे मनाला जे दुःख होते त्याला 'आंतर आध्यात्मिक दुःख' असे नाव आहे. ज. रेणुकाचार्य सांगतातः-

**रागद्वेषादिसम्पन्नमान्तरं परिकीर्त्यते।**
**आधिभौतिकमेतद्धि दुःखं राजादिभूतजम्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.६९)

मनात राग (प्रेम), द्वेष, अभिनिवेश असे अनेक विकार दडलेले असतात. राग आणि द्वेष यांच्यामुळे मनाला

सुख-दुःख भोगावे लागते. राग म्हणजे प्रेम, प्रीती, आसक्ती. रागामुळेच जीवात्म्याला संसारात पुन्हा पुन्हा जन्म घ्यावा लागतो. मराठीत 'राग' या शब्दाचा अर्थ क्रोध असा होतो. संस्कृतमध्ये 'राग' म्हणजे अनुराग, प्रेम. राग-द्वेष याचा अर्थ क्रोध आणि द्वेष असा नसून प्रेम आणि द्वेष असा आहे. 'सुखानुशयी रागः' अशी रागाची व्याख्या योगसूत्रात केली आहे. एखादे सुख भोगल्यानंतर त्याचा संस्कार उमटतो आणि ते सुख पुन्हा भोगावेसे वाटते. हा संस्कार म्हणजेच राग होय.

रंजनात्मक चित्तवृत्तिविशेषः रागः।

मिष्टान्न खाताना मनुष्याला फार आनंद होतो. ते दुसऱ्याच्या घरचे असेल तर अधिकच आनंद होतो. दुसऱ्याच्या घरचे अन्न पुन्हा मिळेल न मिळेल अशा भावनेने पोटाचा विचार न करता माणूस यथेच्छ खातो. जो पदार्थ त्याला अतिशय आवडतो तोच पदार्थ त्याच्या मृत्यूचे कारण ठरतो. एका सुभाषितकाराने भ्रमराचा दृष्टान्त देऊन हे सत्य पटवून दिले आहे. कोरडे लाकूड आरपार कोरण्याची शक्ती भ्रमराजवळ असते. तो मकरंद चाखण्यासाठी कमळात जाऊन बसतो. सूर्यास्त झाल्यावर कमळाची दले मिटतात. तो आतच राहतो. लाकूड भेदण्याची शक्ती असली तरी कमळाच्या बाहेर येत नाही. कारण त्याचे कमळावर प्रेम असते. तो विचार करतो की उद्या सूर्योदय होईल, कमलदले उघडतील आणि आपण मुक्त होऊ. परंतु असे घडत नाही. सरोवरात क्रीडेसाठी हत्ती येतात आणि ते कमळे उखडून फेकतात. उखडून फेकलेले कमळ सूर्योदय झाला तरी विकसित होत नाही आणि भ्रमर मिटलेल्या कमळात तडफडून मरतो. भ्रमराच्या मृत्यूचे कारण कोणते? तर त्याला कमळाविषयी वाटणारी आसक्ती, अनुराग हे. त्याप्रमाणे एखाद्या सांसारिक वस्तूविषयी वा व्यक्तींविषयी जर जीवात्म्याच्या मनात अत्यधिक राग (प्रेम) असेल तर ती वस्तू किंवा व्यक्ती त्याच्या मृत्यूचे कारण ठरू शकते.

संसारात असणे वाईट नाही, पण संसार आत (म्हणजे मनात) ठेवणे वाईट आहे. नावेला जर छिद्र असेल तर नावेत पाणी शिरून बुडण्याचा धोका नक्की असतो. ज्या नावेत पाणी शिरत नाही ती नाव प्रवाशांना पैलतीरावर सुखरूप पोहोचवते. तुमचे मन म्हणजे एक नाव आहे, नौका आहे. मनरूपी नौकेला राग आणि द्वेष ही दोन छिद्रे आहेत. या छिद्रांतूनच बाहेरचा संसार तुमच्या मनात शिरतो. राग-द्वेषामुळेच बाहेरच्या व्यक्ती आणि वस्तू तुमच्या मनात ठाण मांडून बसतात. तुम्ही कोणाची आठवण करीत असता? देवाची? देवाची तर तुम्हाला आठवण येतच नाही. 'देवाची आठवण करा' म्हटले तरी तुम्ही करणार नाही. देवाची आठवण करायला बसल्यावर देखील तुम्ही दुसऱ्या कोणाची तरी आठवण करीत असता. ज्या व्यक्तीवर आणि ज्या वस्तूवर तुमचे खूप प्रेम आहे त्या व्यक्तीची आणि वस्तूची तुम्ही नेहमी आठवण करीत असता. त्याचप्रमाणे ज्या व्यक्तीचा तुम्ही द्वेष करता त्या व्यक्तीचीही आठवण तुम्ही करीत असता. ज्या व्यक्तीबद्दल प्रेम नाही आणि द्वेषही नाही त्या व्यक्तीची तुम्हाला आठवण येत नाही. प्रपंचाबद्दल तुमच्या मनात 'राग' (प्रेम) असेल तर प्रपंच तुमच्या मनात शिरतो आणि त्याच्याबद्दल 'द्वेष' असेल तरीदेखील तो तुमच्या मनात शिरतो. म्हणून प्रपंचाबद्दल मनात राग-द्वेष असू नये.

राग-द्वेष सोडणे मनुष्याला शक्य होत नाही. मग त्याने काय करावे? त्याने राग-द्वेषाची दिशा बदलावी. देवावर अनुराग करावा आणि द्वेष करायचा झाला तर तो देवाचाच करावा. कारण त्यामुळे तुम्हाला मुक्ती मिळेल. 'अनुरागभक्ती' आणि 'वैरभक्ती' असे भक्तीचे दोन प्रकार आहेत. देवाचा अनुराग करा किंवा द्वेष करा, दोन्हीमुळे तुम्हाला मुक्तीच मिळते. तुलसीदासांनी 'रामचरितमानसा'त याविषयी एक कथा सांगितली आहे.

राम-रावणयुद्धात ज्यांचा अपराध नव्हता असे अनेक वानर आणि राक्षस मारले गेले. त्यांचे रावणाशी किंवा रामाशी वैर नव्हते. म्हणून रामाला वाटले की या निरपराध वानरांना आणि राक्षसांना जिवंत करावे. रामाने देवेंद्राची प्रार्थना केली. तेव्हा देवेंद्र त्याच्यासमोर प्रकट झाला. त्याने विचारले, ''आपण माझी आठवण कशासाठी केली?''

राम म्हणाले, ''माझे रावणाशी आणि रावणाचे माझ्याशी वैर होते. परंतु आम्हा दोघांशी ज्यांचे वैर नव्हते असे अनेक वानर आणि राक्षस या युद्धात मारले गेले. त्यांचा काही अपराध नव्हता. म्हणून तू स्वर्गातून अमृत आणून मृत वानरसेनेवर आणि राक्षससेनेवर त्याचे सिंचन कर, म्हणजे ते जिवंत होतील.''

रामाची आज्ञा प्रमाण मानून इंद्राने स्वर्गातून अमृत आणले आणि मृत वानरांवर आणि राक्षसांवर शिंपडले. आश्चर्य असे की फक्त वानरसैन्यच जिवंत झाले, राक्षससैन्य जिवंत झाले नाही. तुलसीदास म्हणतात:-

**सुधा बरषि कपि भालु जिआए। हरषि उठे सब प्रभु पहिं आए।।**
**सुधाबृष्टि भै दुहु दल ऊपर। जिए भालु कपि नहिं रजनीचर।।**

रामाने विचारले, ''देवेंद्रा, तू पक्षपात केलास काय? फक्त वानर जिवंत झाले आणि राक्षस झाले नाहीत, असे का?''

तेव्हा इंद्राने उत्तर दिले, ''प्रभू रामचंद्रा, मी पक्षपात केलेला नाही. परंतु हे जे घडले त्याला एक कारण आहे.''

''कोणते कारण?'' रामाने विचारले.

''तुमचे आणि रावणाचे युद्ध चालू असताना वानरसैन्य रावणाकडे पाहत होते तर राक्षससैन्य तुमच्याकडे पाहत होते. सतत तुमच्याकडे पाहिल्यामुळे राक्षसांची मने रामाकार झाली आणि तुमच्याकडे पाहत देह सोडल्यामुळे त्यांना मुक्ती मिळाली. वानरांनी रावणाकडे पाहत देह सोडला. म्हणून त्यांना मुक्ती मिळाली नाही. राक्षसांना मुक्ती मिळाल्यामुळे अमृत शिंपडून देखील ते जिवंत झाले नाहीत. वानर मात्र जिवंत झाले. हे या घटनेचे रहस्य आहे.''

राक्षसांना रामविषयी प्रेम नव्हते तर द्वेष होता. परंतु त्यांचा द्वेषदेखील मुक्तीचे कारण ठरला. म्हणून राग-द्वेष करायचा झाला तर तो ईश्वराचा करावा, संसाराचा करू नये. काम, संकल्प, अभिलाषा अशी रागाची विविध रूपे आहेत. राग-द्वेष या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. ज्या व्यक्तीविषयी आधी अनुराग असतो त्याच व्यक्तीविषयी पुढे द्वेष उत्पन्न होऊ शकतो. अनुरागच द्वेषात रूपांतरित होतो. एकमेकांवर प्रेम करणारी माणसे पुढे एकमेकांचे तोंडदेखील पाहत नाहीत. खरे तर आपण आपल्यावरच खरे प्रेम करीत असतो, इतरावर नव्हे. माणूस आपल्या शरीराला खूप जपतो. त्याला इजा होऊ नये, ते सुरक्षित राहावे, याची काळजी घेतो. शरीरापेक्षाही तो आपल्या प्राणावर अधिक प्रेम करतो. काही कारणाने हात-पाय कापावा लागला तरी त्याला ते चालते. कारण आपला प्राण सुरक्षित राहावा असे त्याला वाटते. काही माणसे आपल्या प्राणावर देखील उदार होतात. कोणी बलिदान करतात तर कोणी आत्महत्या करतात. त्यावेळी जाणवते की त्यांच्या प्राणपेक्षाही त्याच्या पलीकडे असलेल्या आत्म्यावर त्यांचे अधिक प्रेम आहे. आत्म्यावरील प्रेमामुळेच मनुष्य दुसऱ्यावर प्रेम करीत असतो. 'रागा'तूनच पुढे 'द्वेष' उत्पन्न होतो. म्हणून ज. रेणुकाचार्य म्हणतात, 'रागद्वैषादिसंपन्नं आंतरं परिकीर्त्यते।'

रागामुळे आणि द्वेषामुळे जे दुःख होते त्याला आंतर आध्यात्मिक दुःख म्हणतात. काम, क्रोध, मोह, लोभ, मद, मत्सर हे मनाचे सहा विकार आहेत. जेव्हा अक्कमहादेवी घर सोडून निघाली तेव्हा तिच्या मार्गात हे सहा

विकार अडथळे आणत होते. परंतु त्यांना बाजूला सारून ती पुढे निघून गेली. त्यावेळी या घटनेचे आपल्या वचनात तिने सुरेख वर्णन करून ठेवले आहे. ती म्हणते, 'हे कामा, माझी वाट अडवू नकोस, बाजूला सरक. हे क्रोधा, माझ्या मार्गात आडवा येऊ नकोस, बाजूला हो. हे लोभा, तूही माझ्या वाटेत येऊ नको. हे मोहा, तू बाजूला हो. हे मदा, तूही मध्ये येऊ नकोस. हे मत्सरा, माझी वाट अडवू नकोस. तुमच्यासाठी मी अनेक जन्म घालवले आहेत. आता हा जन्म तुमच्यासाठी नाही, तर मल्लिकार्जुनासाठी आहे.'

असे म्हणून तिने सर्व विकारांना बाजूला सारले आणि मल्लिकार्जुनाशी एकरूप होऊन ती मुक्त झाली. तुम्ही या विकारांना दूर ढकलत नाही, उलट जवळ बोलावता. जो विकारांना जवळ करतो त्याला मुक्ती कशी मिळेल? काम, क्रोध आणि लोभ ही तीन नरकाची द्वारे आहेत, असे गीतेत म्हटले आहे. सांसारिक मनुष्याच्या मनात हे तीन विकार नसावेतच, असे म्हणता येत नाही. परंतु त्याचे प्रमाण अधिक होता कामा नये. अती काम, अती क्रोध आणि अती लोभ जीवात्म्याला नरकाकडे घेऊन जातो. हिवाळ्यात जेव्हा थंडी पडते तेव्हा उबेसाठी तुम्ही शेकोटी पेटवता. ऊब यावी म्हणून तुम्ही ज्वालेकडे हात नेता, परत मागे घेता. जेवढी गरज आहे तेवढीच ऊब तुम्ही घेता. ज्वालेमध्ये हात कायमचा ठेवत नाही. त्याप्रमाणे संसारात काम, क्रोध, लोभ या विकारांचा आवश्यक तेवढाच उपयोग करून घ्यावा. संसारात राहून देखील न राहण्याचा सराव केला तर त्याला जीवन जगण्याची कला साध्य होते. मग 'रागी' असून तो 'विरागी' होऊ शकतो, 'द्वेषी' असून तो 'अद्वेषी' होऊ शकतो, 'लोभी' असून तो 'निर्लोभी' होऊ शकतो.

एका गावात एक अत्यंत लोभी मनुष्य होता. तो श्रीमंत होता. गावात प्लेगची साथ आली. लोक म्हणाले,''तुम्ही श्रीमंत आहात, तेव्हा डॉक्टरला घेऊन या आणि प्लेगचा बंदोबस्त करा.''

तो म्हणाला, ''मला काही झाले नाही. गावातले लोक मरताहेत. त्यांच्यासाठी मी कशाला पैसा खर्च करू?''

त्याने काहीही केले नाही. गावातला प्लेग त्याच्या गल्लीमध्ये शिरला. त्याच्या घरात शिरला. गल्लीतली माणसे मेली. त्याच्या घरातली माणसे मरू लागली. परंतु त्याच्या कनवटीचा पैसा काही सुटला नाही. अखेर घरातली सगळी माणसे मेली. त्याला स्वतःला प्लेग झाला. तरी औषधोपचारासाठी त्याने पैसे खर्च केले नाहीत. शेवटी मरायला टेकला. त्याला वाटले, आपण मरताना सर्व संपत्ती घेऊन जावी. घरातला सर्व पैसाअडका, सोनेनाणे त्याने कमरेला बांधले. त्याच्या ओझ्याने त्याला नीट उभे राहता येईना, चालता येईना. मोठ्या कष्टाने तसाच चालत तो गावाबाहेर आला. गावाबाहेर नदी होती. नदीवर दोन नावाडी होते. त्यांच्यापैकी एकाला त्याने विचारले, ''मला नदीच्या मध्यावर जायचे आहे. किती पैसे घेशील?''

तो म्हणाला, ''पैलतीरावर जाण्यासाठी मी एक रुपया घेतो. तुम्हाला नदीच्या मध्यापर्यंत जायचे आहे तर मी आठ आणे घेईन.''

त्याला ते भाडे अधिक वाटले. त्याने दुसऱ्या नावाड्याला विचारले, तेव्हा तो म्हणाला, ''मी चार आणे घेईन.''

त्याच्या नावेत श्रीमंत मनुष्य बसला. नाव नदीच्या मध्यावर आली. श्रीमंत नावाड्याला म्हणाला, ''मला एक वचन देशील?''

''देईन की.'' तो म्हणाला.

''तू जर चार आणे माफ केले तर मी सुखाने मरेन.''

जवळ लक्षावधी रुपये असताना चार आणे देण्याची त्याची तयारी नव्हती. असा लोभ जर जीवात्म्याजवळ असला तर त्याला पुढचा जन्म सापाचा घ्यावा लागणार. संपत्तीवर तो सर्प होऊन बसणार हे नक्की.

मानसिक विकारांमुळे होणाऱ्या दुःखाला आंतर आध्यात्मिक दुःख असे नाव आहे. शरीरस्वास्थ जेवढे महत्त्वाचे तेवढेच मानसिक स्वास्थही महत्त्वाचे आहे. म्हणून ज. रेणुकाचार्य येथे शारीरिक आणि मानसिक स्वास्थ सांभाळण्याचा उपदेश करीत आहेत, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

३० जुलै १९९०

---

## आशीर्वचन सोळावे

## संसारहेयस्थल– ९

जिज्ञासू सद्भक्तांनो,

संसारात दुःखच दुःख भरलेले आहे. दुःख किती आहे हे सांगताना वचनकार म्हणतात, आपण दुःख अंथरतो आणि दुःखच पांघरतो. सांख्यशास्त्रकारांनी सर्व दुःखांची विभागणी आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा तीन प्रकारांत केली आहे. वात-पित्त-कफ यांच्यामुळे होणारे शारीरिक दुःख हे बाह्य आध्यात्मिक दुःख असते, तर राग-द्वेषादी विकारांमुळे होणारे मानसिक दुःख हे आंतर आध्यात्मिक दुःख असते, हे आपण काल पाहिले. आज आधिभौतिक आणि आधिदैविक या दोन दुःखांचा विचार करायचा आहे. राजा आणि प्राणी यांच्याकडून जे दुःख होते त्याला 'आधिभौतिक दुःख' असे म्हणतात. राजा म्हणजे शासक किंवा अधिकारी यांच्याकडून मनुष्याला त्रास होतो. साप आणि विंचू यांच्या दंशानेही दुःख होते, त्या दुःखाला 'आधिभौतिक' असे नाव आहे. ग्रहांमुळे आणि यक्ष-पिशाच्च यांच्यामुळे जे दुःख होते ते 'आधिदैविक दुःख' होय. भूकंप, अनावृष्टी, अतिवृष्टी यांपासून होणारे दुःख हे आधिदैविक दुःखच आहे.

**आधिदैविकमाख्यातं ग्रहयक्षादिसंभवम्।**
**दुःखैरेतैरुपेतस्य कर्मबद्धस्य देहिनः।**
**स्वर्गे वा यदि वा भूमौ सुखलेशो न विद्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ५.७०)

आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक यांच्यापैकी कोणते ना कोणते दुःख माणसाला निश्चित असते. संसारात सुख भोगण्याची कितीही इच्छा असली तरी संसार दुःखमय असल्याने तेथे सुख कसे मिळेल? सुख मिळाले तरी ते क्षणिकच असते. 'सुख पाहता जवापाडे, दुःख पर्वताएवढे' अशी या संसाराची अवस्था आहे. जीवात्मा कर्मबंधनात अडकलेला आहे. तुम्ही घरात दुःख आहे म्हणून तुम्ही बाहेरगावी गेलात तर काय फरक पडतो? तुमचे कर्म तर तुमच्यासोबतच असते. ते घरी ठेवून जाता येत नाही. मुलेबाळे, घर, पत्नी, दुकान हे सर्व तुम्ही सोडून जाऊ शकता. परंतु तुमचे कर्म सावलीसारखे तुमच्याबरोबर असते. ते कसे सोडाल? कर्माने बांधलेला

आणि दुःखाने वेढलेला जीवात्मा कुठेही गेला तरी त्याला कर्म सोडत नाही आणि दुःखही सोडत नाही. तो मृत्युलोकात असो वा स्वर्गात, दुःख त्याची पाठ सोडत नाही. तुम्ही म्हणाल, 'स्वर्गात कसे असेल दुःख? तिथे तर सुखच सुख आहे.' स्वर्गात सुख आहे हे खरे आहे, परंतु स्वर्गात गेलेला जीवात्मा एकेक दिवस उलटत जाईल तसा, आता हे सुख संपणार म्हणून दुःखी होतो. तुरुंगात गेलेल्या माणसाची शिक्षा जशी संपत जाते तसतसा तो आनंदी होतो आणि सुख भोगणाऱ्या माणसाचे सुखाचे दिवस जसजसे संपत जातात तसतसा तो दुःखी होतो. स्वर्गात सुख भोगणाऱ्या जीवात्म्याची अशीच अवस्था असते. म्हणून शास्त्रकार सांगतात की, संसार दुःखमय आहे. संसार सोडून पळून गेलो तरी दुःखापासून मुक्ती मिळणार नाही. वाघाच्या भीतीने वारुळात जाऊन जर कोणी लपला तर काय उपयोग? तिथे त्याचे प्राण घेणारा भुजंग बसलेलाच असतो. मोहनिद्रेतून जागृत झाल्याशिवाय संसारदुःखापासून मुक्ती मिळणार नाही.

महाभारतात यक्षाने युधिष्ठिराला एक प्रश्न विचारला आहे. यक्ष विचारतो, 'का वार्ता: ?' –या प्रपंचाची वार्ता कोणती? बातमी काय?...

युधिष्ठिराने उत्तर दिले, 'भूतानि काल: पचतीति वार्ता: ?' –काळ सर्व भूतांना शिजवत आहे. मोहाच्या कढईत सर्व प्राणिमात्रांना घालून शिजवतो आहे, सर्वांना मारीत आहे, हीच प्रपंचाची वार्ता आहे...

जो मोहपाशात गुरफटलेला असतो तो काळाच्या हाती सापडतो. म्हणून मोहनिद्रेतून जागे झाले पाहिजे. मन्मथस्वामींनी तुम्हाला सांगितले आहे–

**निजू नका जागा जागा । आपुल्या स्वधर्माचे वागा ।।**

उपनिषदात देखील म्हटले आहे, 'उत्तिष्ठित जाग्रत प्राप्य वरान्निबोधत् ।' —उठा, जागे व्हा आणि आपल्याला कोणते वर मिळाले आहेत हे समजून घ्या... तुम्ही रोज सकाळी उठता ते झोपेतून. मोहनिद्रेतून उठत नाही. मोहनिद्रेतून जागे झाल्यावरच दुःख तुमची पाठ सोडील.

एका व्यापाऱ्याला काही कामानिमित्त परगावी जायचे होते. म्हणून त्याने आपल्या बायकोला सांगितले की पहाटे चार वाजता मला उठव. सूर्य उगवल्यावर उठणारा तो सूर्यवंशी माणूस होता, म्हणून पहाटे उठण्याची त्याला काळजी पडली होती. तो रात्री झोपी गेला. त्याची बायको जागत बसली. व्यापाऱ्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात काही चोरांबरोबर तो बँकेवर दरोडा घालायला गेला. दरोड्याचा प्रयत्न फसला आणि ते सगळेजण पोलिसांच्या हाती सापडले. त्यांना बेड्या घालून तुरुंगात नेण्यात आले. तुरुंगाच्या दारात पाऊल ठेवणार... तेवढ्यात पत्नीने त्याला झोपेतून उठवले. तो घाबरून उठला आणि 'कुठे आहेत पोलीस?' असा बायकोला विचारू लागला. ती म्हणाली, ''इथे कसले पोलीस? हे आपले घर आहे, आणि तुम्हाला मी आत्ताच झोपेतून उठवले.''

हळूहळू तो पूर्ण भानावर आला, जागा झाला. बँक, दरोडा, पोलीस, तुरुंग– हे सर्व स्वप्न होते, हे त्याच्या लक्षात आले. स्वप्न पाहताना ते सर्व सत्य होते असेच त्याला वाटले. जागा झाल्यावर ते सत्य नसून स्वप्न होते हे ध्यानात आले. आपणही असेच स्वप्नात आहोत. मोहनिद्रेत आहोत. जोपर्यंत तुम्ही मोहनिद्रेत असता तोपर्यंत, तुम्ही स्वर्गात जाता– नरकात जाता– संसार करता– सुख-दुःख भोगता– जन्माला येता– मरता...! जोवर मोहनिद्रा आहे तोवर हे सारे चालत राहणार. तिच्यातून जागृत झाल्यावर मात्र हे सारे संपेल. ही जागृत अवस्था म्हणजे 'वर-जागृतावस्था' होय. ही अवस्था म्हणजे जागे असलेल्याला जागे करणे. संसारदुःखापासून मुक्ती मिळवायची असेल तर संसार सोडून पळून जायचे नाही तर मोहनिद्रेतून असे जागे झाले पाहिजे.

तटित्सु वीचिमालासु प्रदीपस्य प्रभासु च ।
सम्पत्सु कर्ममूलासु कस्य वा स्थिरतामतिः ।।५.७१।।

जन्मापासून मृत्यूपर्यंत जीवात्मा अनेक प्रकारची दुःखे भोगतो. जन्म हेच एक दुःख आहे. जन्म झाल्याबरोबर मूल रडू लागते. पूर्वजन्मात त्याने रडतच देहत्याग केला होता, म्हणून या जन्मात तो रडत येतो. जीवनाचा अंतिम क्षण जसा असतो, तसाच नव्या जीवनाचा पहिला क्षण असतो. हसत हसत मृत्यूला कोण कवटाळतो? सामान्य मनुष्य नक्कीच नव्हे. संतमहात्मे मात्र मृत्यूला 'महानवमी' मानतात. तो आनंदाचा क्षण समजतात. सामान्य माणसाला मृत्यू म्हणजे 'होळीपौर्णिमा' वाटते. मृत्यू पाहून तो शंखध्वनी करतो. रडत रडत मरतो, म्हणून रडतच जन्माला येतो. कबीरांनी म्हटले आहे—

जब तुम आये जगत में जग हँसे तुम रोय।
ऐसी करनी कर चलो तुम हँसे जग रोय।।

तुम्ही जगात आला, तेव्हा तुम्ही रडत होता आणि जग हसत होते. म्हणून या जीवनात अशी कर्तबगारी दाखवा की जाताना तुम्ही हसत जावे आणि जगाने रडावे...! जाताना हसत जायचे असेल तर या जीवनात काहीतरी मिळवले पाहिजे. जी संपत्ती इथेच सोडून जायची असते ती मिळवण्यात आम्ही आयुष्य खर्च करतो, परंतु जो धर्म सोबत येणार असतो त्याचा संग्रह मात्र करीत नाही. जो धर्मसंग्रह करतो तो जाताना रडत नाही. कारण धर्माच्या बळावर आपण निश्चित सुखी होणार याची त्याला खात्री असते. म्हणून अखखे आयुष्य संसारासाठी खर्च करू नये. थोडा वेळ सत्संगासाठी, धर्मासाठी दिला पाहिजे. या पुण्याईने तुम्ही आनंदाने मृत्यू पत्करू शकाल. ज्याने कधीही सत्संग केलेला नसतो, संतसहवास अनुभवलेला नसतो, सद्ग्रंथाचे पान उघडून पाहिलेले नसते असा मनुष्य जाताना रडतच जाणार. माणसाचे भौतिक संपत्तीकडे अधिक लक्ष असते, आध्यात्मिक संपत्तीकडे तो दुर्लक्ष करतो. भौतिक संपत्तीचा अस्थिरपणा जगद्गुरू रेणुकाचार्य येथे स्पष्ट करीत आहेत.

मनुष्य संपत्तीविषयी खूप अभिमान वाहत असतो. माझ्याजवळ एवढी संपत्ती आहे, तिच्या बळावर मी सर्व सुखे भोगू शकतो. परंतु हा विचार अयोग्य आहे असे ज्ञानी लोक सांगतात.

अर्थानां अर्जने दुःखं अर्जितानां च रक्षणे ।
आये दुःखं व्यये दुःखं धिगर्थाः कष्टसंश्रयाः ।।

संपत्ती मिळवताना खूप कष्ट करावे लागतात. तिचे रक्षण करतानाही कष्ट करावे लागतात. चोरापासून, इन्कमटॅक्सपासून माणूस संपत्ती लपवत असतो. सत्संगासाठी कोणी देणगी मागायला आला तर त्याच्यापासूनही लपवतो. संपत्ती खर्च झाली तरीही मनुष्य दुःखी होतो. संपत्ती कोठेही स्थिर नसते. आकाशातली वीज एकाएकी चमकून लुप्त होते, समुद्रावरील लाटा सारख्या येतात आणि जातात, दिव्याची ज्योत सतत हलत असते; त्याप्रमाणे मनुष्याने मिळवलेली संपत्ती अस्थिर असते, चंचल असते. या घरातून त्या घरात, या हातातून त्या हातात, अशी ती सारखी फिरत असते. लक्ष्मीचे चित्र तुम्ही पाहिले असेल. ती बसलेली नसते तर उभी असते. तीही पाण्यात. पाणी जसे वाहते तशी लक्ष्मी वाहात असते. तुम्ही तिला तिजोरीत बंद करून ठेवा, गाडग्यात घालून पुरून ठेवा किंवा पाकिटात बंदिस्त करा, ती बाहेर येणारच. तिथे कायमची कधीच राहणार नाही. आजचा लक्षाधीश उद्या भिक्षाधीश होऊ शकतो. म्हणून संपत्तीविषयी माणसाने अभिमान बाळगू नये आणि केवळ ती मिळवण्यात सारे आयुष्य खर्च करू नये. भौतिक संपत्तीपेक्षा आध्यात्मिक संपत्तीकडे अधिक लक्ष दिले पाहिजे.

नित्यानंदचिदाकारमात्मतत्त्वं विहाय कः।
विवेकी रमते देहे नश्वरे दुःखभाजने ।।
विवेकी शुद्धहृदयो निश्चितात्मसुखोदयः।
दुःखहेतौ शरीरेऽस्मिन् कलत्रे च सुतेषु च ।।५.७३-७४।।

संपत्ती जशी अस्थिर असते तसेच शरीदेखील नश्वर असते. अस्थी, मांस, चर्म, मल, मूत्र अशा पदार्थांचे कोठार म्हणजे शरीर होय. शरीराला 'मलकोश' असे नाव आहे. शरीरामुळे जीवात्म्याला खूप दुःख भोगावे लागते. सामान्य जीवाला शरीराविषयी प्रेम वाटत असले तरी ज्ञानी पुरुषांना त्याच्याविषयी आसक्ती असत नाही. आत्मानंदात निमग्न असलेला माणूस शरीराविषयीचा अभिमान वाहत नसतो आणि शरीराविषयीची आसक्ती त्याच्या ठिकाणी नसते. विवेकी मनुष्याचे हृदय अत्यंत शुद्ध असते. त्याच्या हृदयात आत्मानंद प्रकटल्यामुळे दुःखाचे मूळ असलेल्या शरीराविषयी तो उदासीन असतो. शरीरामुळे पत्नी, मुलेबाळे इत्यादी नात्याची माणसे भोवती गोळा झालेली असतात. ज्याला आपल्या शरीराविषयी आसक्ती वाटत नसते त्याला बाकीच्या नात्यागोत्याबद्दल कशी आसक्ती वाटेल? अर्थातच वाटणार नाही.

सुहृत्सु बंधुवर्गेषु धनेषु कुलपद्धतौ।
अनित्यबुद्ध्या सर्वत्र वैराग्यं परमश्नुते ।।
विवेकिनो विरक्तस्य विषयेष्वात्मरागिणः।
संसारदुःखविच्छेदहेतौ बुद्धिः प्रवर्तते ।।५.७५-७६।।

मित्र, नातलग, संपत्ती, रीतिरिवाज यांच्याविषयी सामान्य माणसाला प्रेम वाटत असते. परंतु त्यांच्यामुळे जीवात्म्याला दुःख भोगावे लागते. संसारहेयस्थलातील साधक या सर्वांविषयी उदासीन असतो. त्याच्या मनात वैराग्यभाव बाणलेला असतो. त्याला आत्मसुखाची गोडी लागलेली असते. संसारदुःखाचा नाश व्हावा अशी ओढ त्याला लागलेली असते. शेवटी संसारहेयस्थलाचा समारोप करतात—

नित्यानित्यविवेकिनः सुकृतिनः शुद्धाशयस्यात्मनो
ब्रह्मोपेन्द्रमहेन्द्रमुख्यविभवेष्वस्थायितां पश्यतः।
नित्यानंदपदे निराकृतजगत्संसारदुःखोदये
सांबे चंद्रशिरोमणौसमुदयेद् भक्तिर्भवध्वंसिनी ।।५.७७।।

या स्थलातील साधक नित्य वस्तू कोणती, अनित्य वस्तू कोणती, सार काय, असार काय, यांचा विचार करतो. त्याच्या हातून नेहमी सत्कर्मेच घडतात. त्याचे मन लहान मुलासारखे निष्पाप असते. देवतांचे ऐश्वर्यदेखील क्षणभंगुर असल्यामुळे त्याला तुच्छ वाटते. त्याच्या मनात संसाराविषयी हेयबुद्धी, उदासीनता उत्पन्न होते. मग त्याला आनंदमय, संसारदुःखांचा नाश करणाऱ्या, मस्तकावर चंद्र धारण केलेल्या शंकराविषयी प्रेम उत्पन्न होते, आणि तो या स्थलातून पुढील स्थलात प्रवेश करतो.

या ठिकाणी भक्तस्थलातील 'संसारहेयस्थल' या उपस्थलाचे विवेचन पूर्ण झाले आहे. यापुढील स्थलाचा विचार उद्यापासून करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

३१ जुलै १९९०

# गुरुकारुण्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालपर्यंत आपण संसारहेयस्थलाची चर्चा केली. आज 'गुरुकारुण्यस्थल' या भक्तस्थलातील उपस्थलाचा विचार करायचा आहे. गुरुकृपा प्राप्त करण्यासाठी साधकाच्या अंगी कोणती योग्यता असली पाहिजे, याविषयी ज. रेणुकाचार्य सांगतात:-

**ततो विवेकसंपन्नो विरागी शुद्धमानस:।**
**जिज्ञासु: सर्वसंसारदोषध्वंसकरं शिवम्॥**
**उपैति लोकविख्यातं लोभमोहविवर्जितम्।**
**आत्मतत्त्वविचारज्ञं विमुक्तविषयभ्रमम्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ६.१-२)

गुरूजवळ जाण्यासाठी आपल्या अंगी काही योग्यता असली पाहिजे. योग्यतेविना कोणतेही कार्य सिद्ध होत नाही. बाजारात गेल्यावर आपल्या खिशात पैसे असले तरच आपण वस्तू खरेदी करू शकतो. खिशात पैसे नसताना बाजारात जाऊन काय करणार? फक्त हिंडून यावे लागेल, पदरात काही पडणार नाही. त्याप्रमाणे गुरुकृपा संपादन करायची असेल तर मनुष्याच्या ठिकाणी विशिष्ट योग्यता असावी लागते. वरील श्लोकांत याच योग्यतेचे विवेचन केले आहे. विवेकसंपन्नता, वैराग्य, शुद्ध अंत:करण आणि जिज्ञासा हे चार गुण साधकाच्या अंगी असावे लागतात. नित्यानित्यविवेक, आत्मानात्मविवेक ही पहिली योग्यता होय. नित्य वस्तू कोणती, अनित्य वस्तू कोणती, आत्म पदार्थ कोणता आणि अनात्म पदार्थ कोणता, याचे ज्ञान साधकाला असले पाहिजे. संसाराविषयी वैराग्य उत्पन्न होणे ही दुसरी योग्यता होय. मालिन्य नष्ट झालेले शुद्ध अंत:करण ही तिसरी योग्यता होय. शुद्ध अंत:करणातच आत्म्याचे प्रतिबिंब पडू शकते. जिज्ञासा म्हणजे ज्ञानप्राप्तीची उत्कट इच्छा. ज्याच्या ठिकाणी जिज्ञासा असते तोच सद्गुरूजवळ जात असतो. ज्याला काही श्रवण करायचे नसते, काही विचारायचे नसते, तो फक्त मंदिरात जाऊन देवदर्शन घेऊन येतो. कारण तेथे देव आपल्याशी बोलत नसतो आणि आपण देवाशी बोलत नसतो. आपल्या मनातील शंका दूर करून घेण्यासाठी गुरूजवळ जाण्याशिवाय गत्यंतर नसते. उपनिषदात म्हटले आहे, 'स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणि: श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्।'

संसार आणि आत्मा यांचे यथार्थ ज्ञान करून घ्यायचे असेल तर गुरूला शरण गेले पाहिजे. पण कोणत्या गुरूला? तर जो श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ आहे, अशा श्रीगुरूला. शिष्य होण्यासाठी जशी योग्यता लागते तशीच गुरुत्वासाठी देखील योग्यता असते. गुरू कसा असावा, हे येथे सांगितले आहे. तो आपल्या ज्ञानामुळे, तपस्येमुळे, त्यागामुळे जगात प्रसिद्ध असावा. लोभ-मोह हे मनोविकार त्याच्याठायी नसावेत. हे विकार जर असतील तर तो आध्यात्मिक विचार करू शकणार नाही. तो आत्मतत्त्व जाणणारा असावा. जर गुरूलाच आत्मतत्त्वाचे ज्ञान नसेल, तर तो शिष्याला काय सांगणार? अंग म्हणजे काय, लिंग म्हणजे काय, अंग आणि लिंग यांचे सामरस्य म्हणजे काय, याचे यथार्थ ज्ञान त्याला असले पाहिजे. वीरशैवसिद्धान्तात ज्ञानाइतकेच क्रियेला महत्त्व आहे. म्हणून गुरू इष्टलिंग धारण करणारा, लिंगपूजा करणारा, रुद्राक्षमाळा घालणारा, भस्म लावणारा, सत्य बोलणारा,

षट्स्थलांना जाणणारा असा असला पाहिजे. यालाच वेदान्तशास्त्रात श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ असे म्हटले आहे. श्रोत्रिय म्हणजे सर्व शास्त्रांचे ज्ञान असलेला आणि ब्रह्मनिष्ठ म्हणजे आत्मज्ञान प्राप्त करून घेतलेला. त्याच्याजवळ केवळ शुष्क शास्त्रज्ञान नसावे, तर त्याच्या अंतःकरणात आत्मानुभवाचा ओलावाही असावा. अशा श्रीगुरूला शरण जाऊन नमस्कार केला पाहिजे. श्रीगुरूला अभिवादन केल्याने आयुष्य, विद्या, यश आणि सामर्थ्य वाढते. असे शास्त्रात म्हटले आहे.

भारतीय संस्कृतीत नमस्काराला अत्यंत महत्त्व आहे. आपल्या घरी कोणी अतिथी आला तर आपण त्याला हात जोडून नमस्कार करतो. पहिले स्वागत नमस्काराने केले जाते. श्रीगुरूला नमस्कार केल्यानंतर पुढे काय करावे, हे सांगतात:-

**सेवेत् परमाचार्यं शिष्यो भक्तिभयान्वितः॥६.७॥**

शिष्याने अत्यंत भक्तिभावाने श्रीगुरूंची सेवा केली पाहिजे. सेवेमुळे गुरू प्रसन्न होऊन शिष्याला ज्ञान प्रदान करतात. सेवा किती काळ करावी? गुरुसेवा सहा महिन्यांपर्यंत करावी. या काळात गुरू प्रसन्न झाले नाहीत तर वर्षभर करावी. तेवढ्यानेही गुरुकृपा लाभली नाही तर गुरू प्रसन्न होईपर्यंत सेवा केली पाहिजे. निष्ठेने सेवा करून आदर्शवत् ठरलेल्या काही व्यक्तींची चरित्रे आपल्या प्राचीन साहित्यात आढळतात. राजा दिलीप याच्या सेवेची कथा अशीच एक प्रचलित कथा आहे.

सूर्यवंशात राजा दिलीप नावाचा एक चक्रवर्ती सम्राट होऊन गेला. त्याचा विवाह होऊन बरीच वर्षे झाली, तरी त्याला पुत्रसंतान झाले नाही. म्हणून तो राणीसह आपल्या कुलगुरूकडे- वसिष्ठ मुनींकडे त्यांच्या आश्रमात गेला. मुनींना साष्टांग नमस्कार करून त्याने आपले दुःख त्यांना सांगितले, ''गुरुमहाराज, विवाह होऊन अनेक वर्षे झाली, परंतु राज्याला अजून वारस मिळाला नाही. माझ्याहातून कोणता अपराध घडला हे ठाऊक नाही. आपण मला मार्गदर्शन करावे.''

वसिष्ठ मुनींनी अंतर्दृष्टीने पाहिले, तेव्हा गेल्या जन्मात राजा दिलीपाच्या हातून घडलेला अपराध त्यांना दिसला. ते राजाला म्हणाले, ''राजन्, पूर्वजन्मात तुझ्याकडून एक घोर अपराध घडला आहे. त्यामुळे या जन्मात तुला संतान झाले नाही.''

''कोणता अपराध महाराज?'' राजाने विचारले.

वसिष्ठ म्हणाले, ''गेल्या जन्मात देवासुर युद्धात देवांना मदत करण्यासाठी तू स्वर्गात गेला होतास. असुरांचा पराभव झाल्यावर तू भूलोकाकडे परत येत होतास, त्यावेळी नंदनवनात कामधेनू बसलेली होती. तिला वंदन न करता, तिच्याकडे दुर्लक्ष करून तू सरळ निघून गेलास. आदरणीय व्यक्ती, गुरुजन, वडीलधारी माणसे जर समोर आली तर त्यांना अभिवादन केले पाहिजे. ते केले नाही तर त्यांचा अवमान केल्यासारखे होते. कामधेनू समोर असताना अनवधानाने तुझ्याकडून तिचा अवमान झाला. म्हणून तुला तेव्हा कामधेनूने शाप दिला. त्या शापामुळे तुला या जन्मात संतती झाली नाही.''

''कामधेनूने शाप दिला तो मला ऐकू कसा आला नाही?'' राजाने विचारले.

''त्या ठिकाणी गंगेचा प्रपात कोसळत होता. त्या आवाजामुळे तुला तिची शापवाणी ऐकू आली नाही.''

राजा विचारमग्न झाला. त्याने वसिष्ठ मुनींचे पाय धरले. म्हणाला, ''महाराज, आता यावर उपाय कोणता?''

''कामधेनूची सेवा केली, तरच तू शापातून मुक्त होशील. परंतु कामधेनू सध्या पाताळलोकात आहे. तुला त्या ठिकाणी जाता येणार नाही. माझ्या आश्रमातील गो-धनात नंदिनी नामक कामधेनूची कन्या आहे. तिची

मन:पूर्वक सेवा तुम्ही उभयतांनी केली तर कामधेनू प्रसन्न होऊन तुम्ही शापमुक्त व्हाल.'' वसिष्ठ म्हणाले.

राजाने त्यांची आज्ञा शिरोधार्य मानली आणि त्या दिवसापासून तो राणीसह नंदिनीची सेवा करू लागला. ती सेवा कोणत्या प्रकारची होती? हातात काठी घेऊन गाईच्या मागे मागे जायचे आणि सूर्यास्त झाल्यावर तिला हाकत आश्रमात परत आणायचे, याला सेवा म्हणत नसतात. गाय जिकडे जाईल तिकडे तिच्या मागोमाग सावलीसारखे जावे, ती थांबेल तिथ थांबावे, ती चारा खाईल तेव्हा आपण भोजन करावे, ती पाणी पिईल त्यावेळी आपण पाणी प्यावे आणि ती जेव्हा आश्रमात येईल तेव्हा तिच्या मागे परत यावे. अशी सेवा राजा-राणीने केली. ज्याच्या हाताखाली शेकडो नोकर राबत होते, त्या चक्रवर्ती सम्राटाने नंदिनीची अशी स्वत: सेवा केली. भूक लागल्यावर स्वत:लाच अन्न खावे लागते, दुसऱ्याला जेवायला लावून आपले पोट भरत नाही. त्याप्रमाणे देवपूजा, गुरुसेवा स्वत: करायची असते. अशा प्रकारे राजाने वीस दिवसपर्यंत नंदिनीची सेवा केली.

नंदिनीने राजाची परीक्षा पाहण्याचे ठरवले. दुसऱ्या दिवशी ती आश्रमापासून दूर चरत गेली. राजा दिलीप तिच्या मागे मागे निघाला. राणी आश्रमाच्या सीमेपर्यंत आली. तेथून परत गेली. एकटा राजा नंदिनीच्या मागे मागे निघाला. हिमालयातील एका गुहेत ती शिरली. राजा त्या गुहेत शिरणार, तोच त्याला नंदिनीचा हंबरडा ऐकू आला. हातातील धनुष्यबाण सरसावून राजा आत धावत गेला. पाहतो तो एका सिंहाने नंदिनीवर झेप घेतली होती. तो तिचा गळा पकडण्याचा प्रयत्न करीत होता.

राजाने सिंहाला ठार करण्यासाठी धनुष्यावर बाण लावला आणि प्रत्यंचा ओढली. तेव्हा सिंह मनुष्यवाणीने बोलला, ''राजा, मी कोणी सामान्य सिंह नव्हे. माता भगवतीचे मी वाहन आहे. हिमालयातील झाडे पार्वती मातेने मोठ्या प्रेमाने लावली आहेत. त्यांचे संरक्षण करण्याचे काम तिने माझ्यावर सोपवले आहे. हे पशू येथे येऊन झाडांना अंग घासून त्यांना त्रास देतात. या गाईने असे केल्यामुळे मी हिला खाऊन टाकणार आहे.''

राजा म्हणाला, ''तू सामान्य सिंह नाहीस हे खरे आहे. त्याबरोबरच ही गायदेखील सामान्य गाय नसून ही कामधेनूची कन्या नंदिनी आहे. म्हणून तू हिला सोडून दे, हिच्याऐवजी तू मला खाऊन टाक.''

सिंह म्हणाला, ''राजा, तू सम्राट आहेस. या एका गाईच्या प्राणाची काळजी कशाला करतोस? हिच्याऐवजी हजार गाई तू आपल्या गुरूला अर्पण कर. हिच्या प्राणासाठी स्वत:चा प्राणावर का उदार झालास?''

''मी या नंदिनीचा सेवक आहे. तिचे प्राण वाचवण्याची जबाबदारी माझ्यावर आहे. तेव्हा तू माझे प्राण घेऊन हिला प्राणदान दे.'' असे म्हणून राजा सिंहासमोर गुडघे टेकून, डोळे मिटून बसला.

थोडा काळ गेला. त्याच्या अंगावर फुलांचा वर्षाव होऊ लागला. राजाने डोळे उघडून पाहिले. समोर सिंह नव्हता, फक्त नंदिनी होती. नंदिनी त्याला म्हणाली, ''राजा, मी तुझी परीक्षा पाहिली. तू परीक्षेत पूर्ण उतरला आहेस. आता माझे दूध प्राशन कर, म्हणजे शापमुक्त होशील आणि तुला संतती होईल.''

राजा नंदिनीसह आश्रमात आला. वसिष्ठ मुनींना अंतर्ज्ञानाने सर्व प्रकार कळलेला होताच. त्यांनी दोघांचे स्वागत केले. पुढे यज्ञ करून नंदिनीचे दूध प्रसाद म्हणून राजा-राणीने प्राशन केले. त्यानंतर राजाला संतती झाली, तोच प्रसिद्ध राजा रघू होय. ह्याच्या नावानेच पुढे सर्व घराणे रघुवंश, रघुकुल अशा नावांनी ओळखले जाऊ लागले. याच वंशात पुढे रामासारखा महाप्रतापी राजा झाला. एकनिष्ठेने सेवा केली तर त्याचे फळ कसे मिळते, याचे हे एक उदाहरण आहे. म्हणून शिष्याने गुरूची भक्तिपूर्वक सेवा केली पाहिजे. सहा महिनेपर्यंत, वर्षभर अथवा गुरू प्रसन्न होईपर्यंत. गुरुसेवेशिवाय विद्या कदाचित् प्राप्त होईल, परंतु ती फलप्रद मात्र होणार नाही. गुरू

प्रसन्न झाल्यावर पुढे काय करावे, हे सांगतात:-

> प्रार्थयेदग्रत: शिष्य: प्रांजलिर्विनयान्वित:।
> भो कल्याण महाभाग शिवज्ञानमहोदधे।।
> आचार्यवर्य संप्राप्तं रक्ष मां भवरोगिणम्।
> इति शुद्धेन शिष्येण प्रार्थित: परमो गुरु:।। ६.९-१० ।।

शिष्याने गुरूची प्रार्थना करावी. मी एक भवरोगी असून आपण वैद्य आहात, आपण माझी या रोगातून सुटका करावी, अशी शिष्याने विनंती केली पाहिजे. भवरोग म्हणजे जन्म-मरणाचे दु:ख. हे दु:ख दूर करण्यासाठी श्रीगुरू शिष्याला दीक्षा देतात. वेधदीक्षा, मंत्रदीक्षा आणि क्रियादीक्षा अशी दीक्षा त्रिविध असते. जीवात्म्याला स्थूलशरीर, सूक्ष्मशरीर आणि कारणशरीर अशी तीन शरीरे असतात. स्थूलशरीरात कार्मिक मल, सूक्ष्मशरीरात मायीय मल आणि कारणशरीरात आणव मल असतो. श्रीगुरू शिष्याच्या स्थूलशरीरावर इष्टलिंग धारण करतात. त्यामुळे त्याच्या शरीरातील कार्मिक मल नष्ट होतो, या दीक्षेला 'क्रियादीक्षा' म्हणतात. श्रीगुरू शिष्याला पंचाक्षरी महामंत्राचा उपदेश करतात आणि त्याचा नित्य जप करण्याची आज्ञा शिष्याला देतात. यामुळे त्याच्या सूक्ष्मशरीरातील मायीय मल नष्ट होतो. या दीक्षेला 'मंत्रदीक्षा' म्हणतात. श्रीगुरू उपदेश करून शिष्याला तू देह नसून आत्मा आहेस, हे पटवून देतात. या संस्काराला 'वेधदीक्षा' म्हणतात. अशा प्रकारे स्थूलशरीरावर इष्टलिंग, सूक्ष्मशरीरात प्राणलिंग आणि कारणशरीरात भावलिंग अशी तीन लिंगांची स्थापना केली जाते. गुरूकडून अशी दीक्षा प्राप्त होणे म्हणजेच आपल्याला गुरूच्या करुणेचा, गुरुकारुण्याचा लाभ होणे होय.

दीक्षेमुळे शिवज्ञान होते आणि मल-माया-कर्म या पाशांचा नाश होतो. ज्ञान-क्रियात्मक शक्तीला दीक्षा असे नाव आहे. शुभदिवस आणि शुभतिथी पाहून श्रीगुरू शिष्याला लिंगदीक्षा देतात. शास्त्रोक्त पद्धतीने त्याला विभूती धारण करायला सांगतात.

गुरू या शब्दाचा अर्थ 'अज्ञानरूपी अंधकाराचे निवारण करणारा' असा आहे. जीवाला शिवत्वाची प्राप्ती करून देण्यासाठी भगवान शिवानेच गुरुरूप धारण केले आहे. शिवज्ञानासाठी प्रत्येकाला गुरुशरण व्हावे लागते. गुरू हा चालता बोलता शिवच असतो. शिव मायाशक्तीमुळे आपल्या दृष्टीसमोर येत नाही. गुरू मात्र आपल्याशी बोलतो, आपले शंकासमाधान करतो. ज्ञानोपदेश करण्याचा अधिकार केवळ गुरूलाच असतो. भगवान शिवाच्या क्रोधापासून गुरू शिष्याचे रक्षण करू शकतो, परंतु गुरू ज्याच्यावर रुष्ट झाला त्याचे शिवदेखील रक्षण करू शकत नाही.

गुरुकृपेसाठी गुरूची सेवा केली पाहिजे. गुरूसाठी आयुष्य वेचणाऱ्या आणि गुरुकृपेच्या लाभाने कृतार्थ झालेल्या अनेक गुरुभक्तांच्या कथा भारतीय वाङ्मयात विखुरलेल्या आहेत. आरुणी, सत्यकाम जाबाल, उपमन्यू, पद्मपादाचार्य, ज्ञानेश्वर, नामदेव, शरीफ, उरुलिंगपेद्दी अशा अनेक गुरुभक्तांची नावे सश्रद्धांनी आपल्या हृदयांत जपून ठेवली आहेत. आप्तसेवा, अंगसेवा, स्थानसेवा आणि सद्भावसेवा असे गुरुसेवेचे चार प्रकार आहेत. आपल्या आप्तप्रमाणे गुरूची सेवा करणे ही आप्त-सेवा, स्वत: गुरूचे चरणसंवाहन इत्यादी करणे ही अंग-सेवा, गुरूच्या घराची, तपोभूमीची, शेताची निगा राखणे ही स्थान-सेवा आणि गुरूविषयी सदैव सद्भाव बाळगणे ही सद्भाव-सेवा होय. गुरूला प्रथम प्रणिपात करावा, नंतर सेवा करावी. जो नतमस्तक होतो, त्यालाच विद्या आणि अनुग्रह प्राप्त होतो. जो मुसळासारखा ताठ असतो त्याला कशी विद्या मिळेल?

एकदा सम्राट अशोकाच्या दरबारात एक बौद्ध भिक्षू आला. त्याला पाहताच सम्राटाने सिंहासन सोडले, किरीट काढून ठेवला आणि भिक्षूच्या पायावर डोके ठेवले. ही घटना पाहून सम्राटाचा प्रधानमंत्री नाराज झाला. एवढ्या मोठ्या सम्राटाने एका अकिंचन भिक्षूच्या पायावर डोके ठेवावे म्हणजे काय? मंत्र्याने आपली नाराजी अशोकाजवळ व्यक्त केली. अशोक काही बोलला नाही. काही दिवसांनी त्याने एक बंद पेटी मंत्र्याच्या स्वाधीन करून सांगितले, ''यातल्या सर्व वस्तू बाजारात नेऊन विकून टाक.''

मंत्री बाजारात गेला. पेटी उघडून पाहिल्यावर चकित झाला. पेटीत सर्व प्राण्यांची मुंडकी भरलेली होती. त्यात माणसाचे एक मुंडके देखील होते. लिलाव पुकारून त्याने एकेक करीत सर्व प्राण्यांची मुंडकी विकली. माणसाचे मुंडके मात्र कोणी घेईना. मंत्री परत आला आणि जे घडले ते सर्व सम्राटाला सांगितले.

''माणसाचे मुंडके कोणी विकत घेत नाही?'' सम्राटाने विचारले, ''मग बाजारात जा आणि फुकट देऊन टाक कोणाला.''

त्याप्रमाणे मंत्री बाजारात गेला. परंतु मानवी मुंडके फुकट घ्यायला देखील कोणी तयार झाला नाही. अखेर कंटाळून मंत्री परत फिरला आणि त्याने सर्व हकिकत सम्राटाच्या कानावर घातली. सम्राटाने विचारले, ''इतर प्राण्यांच्या मस्तकाइतकीही किंमत माणसाच्या मस्तकाला नाही काय?''

''नाही महाराज, माणसाचे मस्तक फुकट घ्यायला देखील कोणी तयार झाले नाही.''

अशोक म्हणाला, ''ज्या मस्तकाला बाजारात थोडीदेखील किंमत नाही ते मस्तक गुरुचरणावर ठेवण्यात कोणता कमीपणा आहे? जे कोणी फुकट घ्यायला तयार होत नाही, त्याचा गुरू प्रेमभराने स्वीकार करतात आणि वर आशीर्वादही देतात!''

मंत्री मनोमन काय उमजायचे ते उमजला. गुरू हा भूलोकीचा चालता बोलता शिव होय. 'न गुरोरधिकम्'– गुरूपेक्षा अधिक कोणी नाही– अशी गुरूविषयीची प्रत्यक्ष शंकरांची त्रिवार साक्ष आहे. गुरू ही शिष्याची माऊली असते. आई लेकराचे सर्व लळे पुरवते, त्याची सर्वतोपरी काळजी घेते. चिखलात बरबटून जर मूल घरात आले तर वडील त्याला जवळ करीत नाहीत, त्याला आईकडे पाठवतात. आई मात्र त्या मुलाला स्वत: स्वच्छ करते.

आणव, मायीय आणि कार्मिक या मलांनी जीवात्माही असाच बरबटलेला असतो. तरीही गुरुमाऊली त्याला जवळ करते. त्याच्यावर वेधा, मंत्र आणि क्रिया हे दीक्षासंस्कार करून त्याला मलांपासून मुक्त करते आणि शिवसाक्षात्काराला पात्र बनवते.

गुरू हा ब्रह्मदेव आहे, कारण तो शिष्याच्या मनात उत्तम विचारांची सृष्टी निर्माण करतो. गुरू हा विष्णू आहे, कारण तो शिष्याच्या सद्बुद्धीचे सदैव रक्षण करतो. गुरू हा महेश्वर आहे, कारण तो शिष्याच्या मनातील दुष्प्रवृत्तींचा संहार करतो. गुरू हा साक्षात् परब्रह्म आहे, कारण शिष्याला तो आपले स्व–रूप प्रदान करतो. अशा गुरूची कृपा लाभली तर जीवात्म्याचे पशुत्व दूर होते, त्याच्या ज्ञानदृष्टीला फाटा फुटतो आणि त्याला लिंगांगसामरस्याची प्राप्ती होते. अशा गुरूच्या करुणेत तुम्हीसुद्धा चिंब झाले पाहिजे. तुम्हा सर्वांना गुरुकृपा लाभून तुमचे जीवन उजळून जावो, असा शुभाशीर्वाद देऊन आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

१ ऑगस्ट १९९०

# लिंगधारणस्थल- १

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जीवनात परिवर्तन घडवायचे असेल तर गुरुकृपेची नितांत आवश्यकता असते, गुरू शिष्याला सांसारिक जीवनाकडून पारमार्थिक जीवनाकडे घेऊन जातात. आणव, मायीय आणि कार्मिक अशा तीन मलांनी आवृत्त असल्यामुळे जीवात्मा स्वत:ला संकुचित समजू लागतो. जीवात्म्याच्या कारणशरीरात आणव मल, सूक्ष्मशरीरात मायीय मल आणि स्थूलशरीरात कार्मिक मल असे तीन मल असतात. त्यांची शुद्धी झाल्याशिवाय अध्यात्मात प्रगती होत नाही. म्हणून गुरू मलनिवृत्तीसाठी शिष्यावर दीक्षासंस्कार करतात. दीक्षासंस्कारामुळे जीवात्म्याच्या ठिकाणी असलेले त्रिमल नष्ट होऊन त्याला शिवज्ञान प्राप्त होते. कालच्या आशीर्वचनात गुरू शिष्यावर कशी करुणा करतात, याचा आपण विचार केला. दीक्षेमुळे शिष्याला काय काय प्राप्त होते, याचा विचार आज आपण लिंगधारणस्थलात करणार आहोत.

गुरू शिष्याला काय देतात? संपत्ती देत नाहीत, शेती देत नाहीत. अशा गोष्टी देण्याची वल्गना करणारे, छाछू करणारे गुरू वेगळे आहेत. त्यांच्याकडे लोकांची रीघ लागलेली असते. परंतु शिव हीदेखील एक संपत्ती आहे. पुढे त्रिविधसंपत्तिस्थल नामक एक स्थल येणार आहे. त्यामध्ये गुरू, लिंग आणि जंगम यांना 'त्रिविध संपत्ती' असे संबोधिले आहे. तुमच्या हृदयावरील इष्टलिंग, तुमच्या मनातील प्राणलिंग आणि तुमच्या कारणशरीरातील भावलिंग ही संपत्तीच होय. उपनिषदांत लिंगाला 'धन' असे म्हटले आहे. लिंगरूपी संपत्ती, गुरुरूपी संपत्ती आणि जंगमरूपी संपत्ती जर आपल्याला प्राप्त झाली तर जगात आपल्याएवढा श्रीमंत दुसरा कोणी नसेल. अल्लमप्रभूंनी एका वचनात म्हटले आहे की, सोने-चांदी ही संपत्ती तुझी नव्हे. कारण ती अनंतकाळ तुझ्याजवळ राहणार नाही. शेत-जमीन हीदेखील तुझी नव्हे. कारण जिच्यावर माणूस हक्क सांगतो त्या भूमीतच त्याला चिरविश्रांती घ्यावी लागते. कबीरांचे एक प्रसिद्ध वचन आहे—

> माटी कहे कुम्हारसु तू क्या रौंदे मोहे।
> इक दिन ऐसा आवेगा मैं रौंदुगी तोहे।।

माती तुडवणाऱ्या कुंभाराला पाहून कबीरांना वाटते की, जणू माती कुंभाराला उद्देशून म्हणत आहे-'अरे, तू काय मला तुडवतोस? एके दिवशी मीच तुला तुडवून नष्ट करीन.' तुम्हाला वाटेल, भूमी कधी बोलत असते काय? पण भूमीच काय, सर्व चराचरच आपल्याशी बोलत असते. ते ऐकण्याची, त्यांचे शब्द समजून घेण्याची कुवत आपल्या ठिकाणी नसते. म्हणून अल्लमप्रभू म्हणतात- 'धन, भूमी, स्त्री ह्या गोष्टी तुझ्या नाहीत, तुझ्या आध्यात्मिक प्रवासातील हे गतिरोधक आहेत.' तुझ्याजवळ राहणारी, तुझ्या मालकीची एकच संपत्ती आहे, ती म्हणजे ज्ञान. ज्ञान जशी सर्वश्रेष्ठ संपत्ती तशीच गुरू-लिंग-जंगम ही श्रेष्ठ संपत्ती आहे, असे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे. देवाचे नामस्मरण करणे हीदेखील एक संपत्तीच आहे. तुम्ही मात्र कागदी नोटांना आणि धातूच्या नाण्यांना संपत्ती मानता. ती मिळवण्यासाठी जिवाचा आटापिटा करता. शेवटी ती तुम्हाला सोबत नेता येत नाहीच.

एकदा प्रभू रामचंद्राने हनुमंताला विचारले, ''हनुमंता, तू बुद्धिमान आहेस. जितेंद्रिय आहेस. मला सांग, की

संपत्ती कशाला म्हणतात आणि विपत्ती कशाला म्हणतात?''

हनुमंताने उत्तर दिले, ''प्रभू, तुमचे स्मरण हीच संपत्ती आहे आणि तुमचे विस्मरण ही विपत्ती आहे.''

हनुमंताने किती सुरेख उत्तर दिले आहे! देवाचे स्मरण ही संपत्ती आणि देवाचे विस्मरण ही विपत्ती. तुम्ही देवाचे स्मरण किती काळ करता आणि संसाराचे स्मरण किती काळ करता, हे आठवून पाहा. गुरूला शरण गेल्यावर गुरू आपल्या हाती लिंग ठेवतात. लिंग ही एक संपत्ती आहे. लिंगधारणस्थलात लिंगाचे माहात्म्य खूप सांगितले आहे. 'लिंग' या शब्दाचा अर्थ फार व्यापक आहे.

**लयं गच्छति यत्रैव जगदेतच्चराचरम्।**
**पुनः पुनः समुत्पत्तिं तल्लिंगं ब्रह्म शाश्वतम्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ६.३७)

वेदान्तशास्त्रात ज्याला 'ब्रह्म' म्हणतात त्या तत्त्वाला सिद्धान्तशास्त्रात, आगमांत 'लिंग' असे म्हणतात. ज्या ठिकाणी सर्व जग विलीन होते आणि जेथून ते उत्पन्न होते त्या ब्रह्माला 'लिंग' असे नाव आहे. सर्व प्रपंचाला लिंगतत्त्वच आधारभूत आहे. लिंगाची व्यापकता स्पष्ट करणारी एक कथा 'लिंगपुराणा'त आलेली आहे. लिंगाचे पूर्ण माहात्म्य जाणणे आणि लिंगाचा आदि-अंत शोधणे हे अत्यंत अवघड आहे.

ब्रह्मा आणि विष्णू यांच्यात अहंभाव निर्माण होऊन त्यांची भांडणे सुरू झाली, त्यावेळी एक ज्योतिर्लिंग त्यांच्यासमोर प्रकट झाले. त्यावेळी आकाशवाणी झाली– 'तुमच्यात श्रेष्ठ कोण आहे हे आता समजून येईल. जो कोणी या लिंगाचे मस्तक अथवा पाय पाहून परत येईल तो श्रेष्ठ समजला जाईल.'

ब्रह्मदेवाने हंसपक्ष्याचे रूप घेतले आणि तो लिंगाचे मस्तक शोधण्यासाठी निघाला. विष्णूने वराहरूप घेतले आणि तो लिंगाचे पाय पाहायला निघाला. हजारो वर्षे झाली, परंतु त्यांना आपले गंतव्य मिळेना. विष्णू निष्कपट होता, परंतु ब्रह्मदेव थोडा लबाड होता. त्याने कामधेनू आणि केतकीचे फूल यांना खोटे साक्षीदार बनवले आणि परत फिरून सांगितले की, 'मी लिंगाचे मस्तक पाहून आलो आहे.' कामधेनू आणि केतकीचे फूल यांनी ब्रह्मदेवाची साक्ष दिली. कोर्टात आपण खोटी साक्ष काढतो तशी. हा खोटेपणा पाहून ईश्वराला राग आला. त्याने कामधेनूला शाप दिला, 'तू ज्या मुखाने खोटे बोललीस ते मुख लोकादरास पात्र होणार नाही. लोक तुझ्या मस्तकाची नव्हे तर शेपटीची पूजा करतील.' ईश्वराने केतकी-फुलाला शाप दिला की, 'ईश्वराच्या पूजेत तुझे काहीही स्थान राहणार नाही आणि जेव्हा वाहण्याची वेळ येईल तेव्हा तुझी जीभ चिरून वाहिले जाईल.' नंतर ब्रह्मदेवाकडे वळून ईश्वराने शापवाणी उच्चारली, 'लोक तुझी पूजा करणार नाहीत. कारण तू असत्य बोलला आहेस.'

विष्णू बिचारा परत आला. तो जेथपर्यंत गेला तेथे त्याने एक खूण करून ठेवली. परत येऊन खरे ते सांगितले. विष्णूचा खरेपणा पटून ईश्वराने त्याला आशीर्वाद दिला, 'लोक मला जेवढे पूज्य मानतील तेवढे तुलादेखील मानतील.'

सत्य हाच ईश्वर आहे. ब्रह्मदेव, केतकीचे फूल असत्य बोलले. त्यांनी असत्याचा आश्रय घेतला, म्हणजेच सत्याचा, ईश्वराचा अवमान केला. आपण आज पाहतो की, ब्रह्मदेवाची मंदिरे या देशात क्वचित् कुठे दिसतात. त्या मानाने विष्णुमंदिरे आणि विष्णुभक्त असंख्य आहेत. गाईच्या मुखाची लोक पूजा करीत नाहीत तर शेपटाची करतात. तिचे दर्शनदेखील शेपटीला हात लावून घेतात. तसेच केतकीचे फूल देवपूजेला पवित्र मानले जात नाही. या कथेचे तात्पर्य असे की, ब्रह्मा आणि विष्णू या देवांना लिंगाचा आदि-अंत जाणता आला नाही, तर

सामान्यांना तो कसा जाणता येईल? अशी लिंगाची अपरंपार महिमा आहे.

असत्य बोलल्यामुळे ब्रह्मदेवाची स्थिती कशी झाली, हे ध्यानात ठेवले पाहिजे. तुम्ही म्हणाल, 'महाराज, या जगात खोटे बोलल्याशिवाय भागत नाही. सगळेच खोटे बोलतात. मग मी एकटाच खरे कशाला बोलू?'

'सत्यमेव जयते' हे आपल्या राष्ट्राचे ब्रीदवाक्य आहे. सत्याचा विजय होतो असा त्याचा अर्थ आहे. विष्णू सत्य बोलला म्हणून तो वंद्य ठरला. ज्या लिंगाचा आदि-अंत लागत नाही, असे लिंग आपल्या तळहातावर श्रीगुरूने ठेवले. याविषयीचा आनंद म. बसवेश्वरांनी एका वचनात प्रकट केला आहे. ते म्हणतात:-

**जगदगल मुगिलगल मिगेयगल निम्मगल**
**पाताळदिंदत्तत्त निम्म श्रीचरण**
**ब्रह्मांडदिंदत्तत्त निम्म श्रीमुकुट**
**अगम्य अगोचर अप्रमाण लिंगवे**
**यन्न करस्थळक्के बंदु चुलुकादिरय्या**

संपूर्ण विश्वात व्याप्त असलेले लिंगतत्त्व गुरुकृपेमुळे आपल्या तळहातावर इष्टलिंग होऊन बसले आहे, याविषयी म. बसवेश्वरांनी धन्यता व्यक्त केली आहे. विश्वव्यापक तत्त्व लहान कसे होते, अशी शंका तुम्हाला येईल. तुम्ही सगळे येथे बसलेले आहात. तुम्हाला बसायला कितीतरी मोठी जागा लागली आहे. परंतु जर एखाद्या फोटोग्राफरने तुम्हा सगळ्यांचा एक फोटो काढला तर पोस्टकार्ड आकाराच्या फोटोत तुम्ही सगळे दिसू शकता. माणसाचा पूर्ण फोटो काढला तरी तो त्याच्या देहाच्या आकाराचा नसतो. तळहाताएवढ्या फोटोत पूर्ण उभा मनुष्य जसा मावतो त्याप्रमाणे तळहातावरील इष्टलिंगात विश्वव्यापक लिंगतत्त्व लहान होते. हत्ती आकाराने प्रचंड असतो, परंतु तुम्ही हाती आरसा घेऊन त्यात हत्तीची पूर्ण प्रतिमा पाहू शकता. तसे इष्टलिंगात विश्वव्यापक लिंगतत्त्व सामावलेले असते.

गुरूने दीक्षापूर्वक आपल्या हाती इष्टलिंग दिलेले असते. इष्टलिंग अंगुष्ठप्रमाण म्हणजे अंगठ्याएवढे असले पाहिजे, असे शास्त्रात म्हटले आहे. परंतु अलीकडे तुमचे इष्टलिंग लहान लहान होत चालले आहे. तुमचे शरीर जाड होत आहे आणि तुमचे इष्टलिंग लहान होत आहे. तुम्ही म्हणता, 'महाराज, लिंग फार मोठे नको. लहान द्या. मोठे लिंग शरीराला जड होईल.' तुम्हाला घर मोठे हवे, दुकान मोठे हवे, उद्योगधंदा मोठा हवा; पण देव मात्र छोटा पाहिजे. कांती केल्यावर तुमचे इष्टलिंग अंगठ्याएवढे झाले पाहिजे. त्यामध्ये तुमच्या चेहऱ्याचे प्रतिबिंब तरी पडले पाहिजे. चेहरा पाहण्यासाठी तुम्हाला आरसा किती मोठा लागतो! डोक्यापासून पायापर्यंत पूर्ण शरीर दिसेल एवढा मोठा आरसा तुम्ही घरात वापरता. विश्वव्यापक असे लिंग अंगठ्यापेक्षा आणखी किती लहान करणार?

शिव लहान नाही, परंतु भक्ताला पूजा आणि चिंतन करणे सोयीचे व्हावे म्हणून गुरूने तुमच्या हातावर इष्टलिंग ठेवले आहे. लहान मुलाचा हट्ट पुरवण्यासाठी त्याचा बाप कितीही मोठा अधिकारी असला तरी हात खाली टेकवून, गुडघ्यावर रांगत घोडा होतो, त्याप्रमाणे भक्तावर अनुग्रह करण्यासाठी विश्वव्यापक शिवपरब्रह्म इष्टलिंगाच्या रूपात लहान होते. तुमच्या हातावरील इष्टलिंग लहान दिसत असले तरी ते सर्व विश्वाला व्यापून आहे हे लक्षात घेतले पाहिजे. 'लिंगमध्ये जगत्सर्वम्।' लिंगामध्ये सर्व जग सामावलेले आहे. असे लिंग शिष्याच्या हातावर देऊन गुरू आदेश देतात-

प्राणवद्धारणीयं तत्प्राणलिंगमिदं तव।
कदाचित्कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः ।।६.२६।।

गुरू सांगतात, 'हे इष्टलिंग म्हणजे तुझे प्राणलिंग होय. तू हे प्राणाप्रमाणे धारण केले पाहिजेस. कधीही आणि कोठेही तुझ्या शरीरापासून हे वेगळे होऊ देऊ नकोस.' जेव्हा शरीरावर इष्टलिंग धारण केले जाते तेव्हा ते शरीर सामान्य शरीर राहत नाही तर एक मंदिर होते. गुरुकृपेमुळे आपल्या देहाचे देवालय करण्याची एक संधी आपल्या आयुष्यात आलेली आहे. म्हणून तुम्ही सर्वांनी निष्ठेने इष्टलिंग धारण केले पाहिजे. या स्थलाविषयी आणखी काही विचार उद्या आपण पाहणार आहोत, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
२ ऑगस्ट १९९०

---

## आशीर्वचन एकोणिसावे

## लिंगधारणस्थल– २

जिज्ञासू सद्भक्तांनो,

इष्टलिंगधारण अत्यंत प्राचीन आहे. हडप्पा आणि मोहंजोदारो येथील उत्खननात शरीरावर लिंगधारण केलेल्या प्रतिमा सापडल्या आहेत. त्यावरून पाच हजार वर्षांपूर्वी लिंगधारणाची पद्धत होती असे सिद्ध होते. आजही लिंगधारण करणारे वीरशैव आहेत आणि उद्याही ते राहणार आहेत. म्हणून वीरशैव धर्म हा सनातन आहे. सनातन म्हणजे ज्याचा कधीही लोप होत नाही असा. लिंगधारण केल्यावर ते प्राणाप्रमाणे धारण करावे आणि कोठेही गेलो तरी ते शरारापासून वियुक्त करून नये, अशी गुरू शिष्याला आज्ञा देतात.

गुरू ही आज्ञा देतात त्याचे एक रहस्य आहे. तुम्ही म्हणाल, 'महाराज, आम्ही लिंगाची रोज तळहातावर पूजा करू. पण ते गळ्यात घालून हिंडणे फार जड जाते. मग लिंग देव्हाऱ्यावर ठेवले तर चालणार नाही का?' अजिबात चालणार नाही. लिंग हा तुमचा प्राण होऊन राहतो. लिंग सोडले तर तुम्ही प्राणच सोडला पाहिजे. म्हणून हे व्रत मोठे कठीण आहे. हे व्रत पाळण्यासाठी वीरवृत्ती लागते. तुम्हाला 'वीर'शैव म्हणतात ते याचसाठी. तुम्ही वीरत्व सोडता उपयोगाचे नाही. ज्या लिंगामुळे तुम्हाला वीरशैव म्हटले जाते ते लिंग तुम्ही त्यागले तर तुमच्या वीरशैव असण्याला काय अर्थ आहे? आमचा धर्म श्रेष्ठ आहे, आम्ही श्रेष्ठ आहोत, असे केवळ बडबडणे उपयोगाचे नाही. धर्माच्या श्रेष्ठत्वाला साजेसे वागणे हे महत्त्वाचे आहे.

एका गावात लोकांनी मंदिर बांधले. काशीवरून शिवलिंग आणले. प्रतिष्ठापनेच्या दिवशी लिंगाची मिरवणूक काढली. शिवाचे प्रिय वाहन म्हणजे नंदी. त्याच्याच पाठीवर शिवलिंगाची मिरवणूक काढणे उचित होते. एक धष्टपुष्ट बैल चांगला सजवला, त्याच्या अंगावर झूल घातली. त्याच्या पाठीवर चौरंग बांधून त्यावर शिवलिंग ठेवण्यात आले. वाजत गाजत गावातून मिरवणूक निघाली. घराघरांसमोर लोकांनी बैलाची आणि शिवलिंगाची पूजा केली. त्यांना हार घातले. त्यांच्यावर फुले उधळली. त्यांना साष्टांग नमस्कार केला.

गावाच्या मध्यभागी मिरवणूक आली. बैलाला वाटले, 'आज लोक आपली पूजा करीत आहेत. आपण फार मोठे आहोत. मग पाठीवर हे ओझे कशाला वाहायचे?' त्याने आपले अंग गदगदा हलवले. त्याच्या पाठीवरील शिवलिंग खाली पडले. लोकांनी हे पाहिल्यावर हातात काठ्या घेऊन बैलाला बेदम चोपले. मग बैलाला समजले की जोपर्यंत आपल्या पाठीवर शिवलिंग होते तोपर्यंत लोक आपली पूजा करीत होते. शिवलिंग पाठीवरून खाली पडल्याबरोबर लोकांनी आपल्याला मारायला सुरुवात केली. लिंग अंगावर होते तोपर्यंत आपण पूजनीय होतो. लिंग खाली पडताच आपण पशू झालो.

त्याप्रमाणे तुमच्या ठिकाणचे पशुत्व जावे म्हणून गुरुमहाराजांनी तुमच्या गळ्यात लिंग घातले आहे. तुमच्या कपाळाला भस्म लावले, तुम्हाला अभिषेक केला, तुमच्या डोक्यावर बेलफूल वाहिले. कशामुळे? तर तुमच्या गळ्यात लिंग असल्यामुळे तुमची आज पूजा झाली. गळ्यातले लिंग बाजूला ठेवले की यमधर्म हातात चाबूक घेऊन तुमची पाठ सडकायला तयार आहेच. म्हणून आचार्यांनी सांगितले आहे की, प्राणाप्रमाणे तुम्ही लिंग प्रिय माना. लिंगविरहित शरीर प्रेतासारखे असते. प्राण नसलेले शरीर हालचाल करताना तुम्ही कधी पाहिले आहे काय? मन्मथस्वामींनी म्हटले आहे–

**जयाचा प्राण लिंगी भरला। तो कैसा असे देही उरला।**
**लिंग गेलिया देही संचरला। पिशाचवत् जाणिजे।।**

वीरशैवाचा प्राण लिंगमय होतो. लिंगाशिवाय त्याचा देह वेगळा राहू शकत नाही. शरीरावर लिंग नसताना जर तो जिवंत असेल तर तो पिशाच्चच होय. प्रेताला स्पर्श केल्यावर मनुष्य सुतकी होतो, हे तुम्हाला माहीत आहे. अंत्यसंस्कार करून घरी आलेला माणूस सचैल स्नान करतो. त्याप्रमाणे लिंगविरहित शरीर हे प्रेतासमान आहे, असे मन्मथस्वामी सांगतात. गळ्यात लिंग नसलेली किती प्रेते तुमच्या घरात वावरतात, याचा आपल्या मनाशी विचार करा. भक्तिविहीन घर म्हणजे स्मशानच होय. लिंगधारण शरीराच्या कोणत्या भागावर करावे हे वीरशैवाचार्यांनी सांगितले आहे. लिंग मस्तकावर धारण करावे किंवा कंठात धारण करावे. मंगळसूत्र जसे गळ्यात घातले जाते तसे लिंगदेखील गळ्यात धारण केले जाते. लिंग हे तुमचे आध्यात्मिक मंगळसूत्रच होय. लौकिक पती मृत्यू पावल्यावर त्याची पत्नी विधवा होते. परंतु लिंग अर्थात् शिव हा मृत्यू न होणारा पती आहे. त्याची सती तुम्ही झालात तर तुम्हाला कधीच वैधव्य येणार नाही. म्हणून वीरशैवसिद्धान्तात लिंग हा पती आणि अंग ही सती असा सति-पतिभाव सांगितला आहे. डोक्यावर, गळ्यात, हृदयावर, पोटावर, काखेत अथवा बाहूवर तुम्ही लिंगधारण करू शकता. कमरेच्या खाली मात्र लिंगधारण करू नये. लिंगधारण हे लक्षपूर्वक केले पाहिजे. काही लोकांना लिंगाकारातून लिंगच बाहेर काढता येत नाही. कारण त्यांचा तसा अभ्यास नसतो. आपल्या अंगावर लिंग आहे याचा बऱ्याच जणांना विसर पडतो. काही लोकांचा विसरभोळेपणा पाहून आपण थक्क होतो. एकदा डोळ्यांवर चष्मा घातलेला मनुष्य आपला चष्मा हुडकत होता, हे आम्ही स्वत: पाहिले आहे. गळ्यात लिंग असून त्याला विसरणारे, त्याची कधीही पूजा न करणारे लोक आहेत. लिंगाला कधी पूजा नाही, त्याला कधी आंघोळ नाही, मग त्याचे तीर्थ घेणे दूरच. आंघोळ झाली की लिंगपूजा न करता जेवायला बसतात. काही बहाद्दर तर आंघोळ न करताही जेवतात. हृदयावरील लिंगाचे भान असले तर तुमच्या हातून कोणता अपराध घडणार नाही.

गुरू, लिंग, जंगम, विभूती, रुद्राक्ष, प्रसाद, पादोदक आणि मंत्र अशा अष्टावरणातील लिंग हे एक आवरण

आहे. आवरण म्हणजे रक्षाकवच. वीरशैवाचार्यांनी शिवभक्तांचे रक्षण व्हावे यासाठी एक-दोन नव्हे, तर आठ आवरणे सांगितली आहेत. एखादी मूल्यवान वस्तू सुरक्षित ठेवण्यासाठी ती तुम्ही तिजोरीत ठेवता. त्याप्रमाणे अमूल्य अशा मानवी जीवनाच्या रक्षणासाठी आचार्यांनी अष्टावरणे आपल्याला दिली आहेत. ज्याच्या शरीरावर अष्टावरणे आहेत त्याचे जीवन सुरक्षित राहते.

**यदि प्रमादात् पतिते लिंगे देहान्महीतले।**
**प्राणान् विमुंच सहसा प्राप्तये मोक्षसम्पदः॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ६.२७)

अंगावरील लिंग जर चुकून जमिनीवर पडले तर वीरशैवाने प्राणत्याग केला पाहिजे, असा या श्लोकाचा अर्थ आहे. लिंग खाली पडले तर जीव द्यावा लागतो, म्हणून उद्यापासून तुम्ही गळ्यात लिंगच घालणार नाही. लिंग नको, ते खाली पडणे नको आणि जीव जाणे नको, असेच तुम्हाला वाटेल. याचा अर्थ एवढाच की, तुमचे लिंगावर प्राणाइतके प्रेम असले पाहिजे. लिंगधारण करण्याचे प्रयोजन कोणते? लिंगधारण का करावे? तर 'लिंगस्य धारणं पुण्यम्।' असे म्हटले आहे. अनेक जन्मांत जीवात्म्याकडून दुष्कर्मे घडलेली असतात. लिंगधारणेमुळे सर्व पापे नष्ट होऊन जीव पुण्यवान होतो. लिंगधारण, लिंगपूजा, लिंगध्यान यांमुळे जीवात्मा पापमुक्त होऊन एक पुण्यकुंज बनतो.

एका पापी माणसाची ही कथा आहे. त्याने सर्व प्रकारची पापे केली. एके दिवशी तो मरण पावला. त्याला नेण्यासाठी यमदूत आले. तो खाटेवर निजलेला होता. त्या अवस्थेतच त्याला मृत्यू आला. तो एवढा पापी होता की त्याच्या अंगाला स्पर्श करण्याचे यमदूतांना भय वाटले. त्यांनी खाटेसह त्याच्या सूक्ष्मदेहाला उचलून यमलोकात नेले, यमराजासमोर उभे केले. चित्रगुप्ताने त्याचे खाते उघडले तर त्याच्या नावावर फक्त पापांचीच नोंद होती.

''यमधर्मा, ह्या जीवाने केवळ पापेच केली आहेत. एकाही पुण्यकर्माची नोंद याच्या नावावर नाही.'' चित्रगुप्त म्हणाला.

''याला घोर अशा रौरव नरकात नेऊन टाका.'' यमाने यमदूतांना आज्ञा केली. तेव्हा तो पापात्मा यमराजाला म्हणाला, ''यमराज यमराज म्हणतात ते आपणच का?''

''होय'', यमराज म्हणाला, ''काही विचारायचे आहे काय?''

''होय,'' तो म्हणाला, ''यममहाराज, मी फारशी प्रवचने ऐकली नाहीत. जे थोडेफार ऐकले त्यावरून मला समजले की पांडवाचा ज्येष्ठ भाऊ धर्मराज हा आपला पुत्र होता. हे खरे आहे का?''

''होय.'' यमराज म्हणाला.

''मग सध्या तो कुठे आहे? मला एकदा त्याचे दर्शन घ्यायचे आहे.''

''तो स्वर्गात आहे. तुला स्वर्गात जाता येणार नाही. त्यामुळे त्याला भेटता येणार नाही.'' यमराज म्हणाला.

''त्याला काय म्हणून तुम्ही स्वर्गात पाठवले? तो तुमचा मुलगा आहे म्हणून?'' त्याने विचारले.

''तो पुण्यात्मा होता, त्यामुळे तो स्वर्गात गेला.'' यमराज म्हणाला.

''धर्मराज पुण्यात्मा होता?'' तो हसून म्हणाला, ''त्याने तर खूप पापे केली. तो जुगार खेळत होता. आपली धर्मपत्नी तो जुगारात हरला. असे पापकृत्य कोणीही केले नाही. महाभारत युद्धात 'नरो वा कुंजरो वा' असे खोटे

बोलून आपल्या गुरूच्या, द्रोणाचार्यांच्या मृत्यूला कारणीभूत ठरला. पत्नीला जुगारावर लावणे आणि गुरूचा मृत्यू घडवणे असे भयानक पाप ज्याने केले त्याला तुम्ही स्वर्गात पाठवले. का? तर तुमचा पुत्र आहे म्हणून! वा, यमराज, मृत्युलोकात भ्रष्टाचार आहे हे मला माहीत आहे, परंतु येथेही तो आहे हे पाहून नवल वाटले.''

त्याच्या युक्तिवादासमोर यमराज हतबल झाला. त्याला वाटले की, हा आपले काही ऐकणार नाही. आपल्यापेक्षा मोठ्या अधिकाऱ्याकडे याला पाठवले पाहिजे. म्हणून यमराजाने त्याला यमदूतांबरोबर ब्रह्मदेवाकडे पाठवले. ब्रह्मदेवाची स्तुती करून यमदूतांनी सर्व प्रकार त्यांना सांगितला. तेव्हा ब्रह्मदेव त्या पापात्म्याला म्हणाले, ''तुला नरकात जाण्याची जी शिक्षा यमाने फर्मावली ती बरोबर आहे. तू निमूटपणे नरकात जा.''

तेव्हा त्याने विचारले, ''आपण कोण आहात?''

''मी सृष्टिकर्ता ब्रह्मदेव आहे.''

''बरे झाले,'' तो म्हणाला, ''खूप दिवसांपासून माझ्या मनात एक शंका आहे. ब्रह्मदेवा, आपण सृष्टी निर्माण केली. म्हणजे सृष्टीमधले सर्व जीव आपली लेकरे आहेत. आपली कन्या सरस्वती, आपण तिच्याशीच लग्न केले? पिता आपल्या कन्येबरोबर कधी व्यभिचार करतो काय? असे कृत्य पृथ्वीवरदेखील कोणी केल्याचे ऐकिवात नाही. आपण ब्रह्मदेव असून असे पापकर्म करता. मी असे काही केले नाही तरी मला नरकात पाठवता? वा, ब्रह्मदेवा, तुमचा न्याय अजब आहे!''

त्याच्या युक्तिवादामुळे ब्रह्मदेव गप्प झाले. हा प्राणी आपले ऐकणार नाही हे त्यांना समजले. त्यांनी त्याला सर्वोच्च अधिकाऱ्याकडे, भगवान शिवाकडे घेऊन जाण्यास यमदूतांना सांगितले. त्याप्रमाणे त्याला घेऊन यमदूत कैलासात गेले. शंकर ध्यानमग्न होते. यमदूतांनी स्तुती करून त्यांना जागे केले. भगवान शंकरांना सर्व प्रकार कथन केला. तेव्हा शंकरांनी त्या पापात्म्याला विचारले, ''यमदूत सांगतात त्याप्रमाणे तू पापे केली आहेस का?''

''होय महादेवा,'' तो म्हणाला, ''मी सर्व पापे केली आहेत हे मी कबूल करतो.''

मग शंकर म्हणाले, ''याने आपल्या पापांची कबुली दिली आहे. याला सरळ नरकाकडे घेऊन जा.''

तेव्हा तो पापी म्हणाला, ''मला नरकात पाठवणारे आपण कोण आहात?''

''मी भगवान शंकर आहे, महादेव आहे.''

''तुम्ही खरे महादेव आहात की डुप्लीकेट आहात?'' त्याने विचारले.

''नाही, मी खरा महादेव आहे.''

''देवा,'' तो म्हणाला, ''आम्ही पुराणात असे ऐकले आहे की महादेवाचे एकदा नाव घेतले तर मनुष्याची सर्व पातके नष्ट होतात. आता मी तर आपल्याला प्रत्यक्ष डोळे भरून पाहत आहे. आपले दर्शन घेऊन जर माझी पापे नष्ट होत नसतील तर आपण खरे शंकर कशावरून?''

शंकर हसून म्हणाले, ''तुझे म्हणणे बरोबर आहे. माझे केवळ नाव घेतले तरी जीवांची पापे नष्ट होतात. पण पश्चात्तापपूर्वक पापकर्मांची कबुली दिली पाहिजे. आपल्या हातून पापे घडल्याबद्दल डोळ्यांत पाणी आले पाहिजे. तू यमराजासमोर, ब्रह्मदेवासमोर आणि माझ्यासमोर पापांची कबुली दिली आहेस. शिवाय तुला माझे साक्षात् दर्शन घडले आहे. त्यामुळे तुझी पापे नष्ट होऊन तुला सायुज्यमुक्ती प्राप्त झाली आहे. आता तू इथेच शिवलोकात माझ्यासोबत राहशील.''

पापात्म्याचा क्षणार्धात पुण्यात्मा कसा झाला, हे या कथेत सांगितलेले आहे. म्हणून ज. रेणुकाचार्य सांगतात:-

लिंगस्य धारणं पुण्यं सर्वपापप्रणाशनम्।
आदृतं मुनिभिः सर्वैरागमार्थविशारदैः।।६.२९।।

लिंगधारण करा असे तुम्हाला पुन्हा पुन्हा कशासाठी सांगतात? तर लिंगधारणेमुळे तुमची सर्व पापे नष्ट होऊन पुढे पापाचरणाची बुद्धी होत नाही. तुमचे जीवन पवित्र होऊन तुम्ही जीवन्मुक्त होता, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
३ ऑगस्ट १९९०

---

## आशीर्वचन विसावे

## लिंगधारणस्थल- ३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंगस्य धारणं पुण्यं सर्वपापप्रणाशनम्।
आदृतं मुनिभिः सर्वैरागमार्थविशारदैः।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ६.२९)

लिंगधारणेमुळे सर्व पापांचा नाश होतो. म्हणून शिवागमांचे ज्ञाते असलेल्या ऋषिमुनींनी लिंगधारण केले आहे. शिवत्व प्राप्त करून घेण्यासाठी शिवकृपेची आवश्यकता आहे. शिवकृपेविना 'मी शिव झालो' असे कोणी म्हणत असेल तर 'आकाश गुंडाळून ते मी काखेत घेतले आहे' असे म्हणण्यासारखे होईल. शिवकृपेशिवाय शिवत्व प्राप्त होत नाही. लिंगपूजा कशासाठी करायची असते? सांसारिक वस्तू प्राप्त करून घेण्यासाठी नव्हे, तर शिवप्राप्तीसाठी. 'शिवो भूत्वा शिवं यजेत् ।'- शिव होऊन शिवाची पूजा करा, असे शास्त्रात म्हटले आहे. वीरशैवात कोणी मरण पावला तर 'शिवैक्य झाला, लिंगैक्य झाला' असे शब्दप्रयोग आपण करतो. म्हणजे जीवनाचे अंतिम लक्ष्य शिवरूप होणे हे आहे. जीवनाच्या शेवटी लिंगपूजा करू... लिंगभक्ती करू, असे म्हणून चालत नाही. आयुष्यभर भक्ती केली तर तिचे फळ आयुष्याच्या शेवटी मिळते. गीतेत म्हटले आहे, 'अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्।' जीवनाच्या अंतिम क्षणी भगवंताचे स्मरण करून जो देहत्याग करतो त्याला मुक्ती प्राप्त होते. मग तुम्हाला वाटते की आयुष्यभर देवाचे नाव घ्यायचे काही कारण नाही. मरताना नाव घेतले की झाले... मिळाली मुक्ती! परंतु असे घडत नसते. आयुष्यभर नामस्मरण केले तर ते कदाचित् अंतिम क्षणी फलप्रद होते. लहानपणी कशाला लिंगपूजा करायची, असे म्हणून चालत नाही. लहान मुलाने लिंग मागितले तर ते तुम्ही देत नाही. तुम्ही लिंगपूजा करताना त्याला देवघराबाहेर काढता. तुम्ही कशी लिंगपूजा करता हेदेखील त्याला पाहू देत नाही. वास्तविक जेवण करताना जसे मुलांना आपण जवळ बसवून घेतो त्याप्रमाणे लिंगपूजा करताना देखील त्यांना जवळ बसवून घेतले पाहिजे. लहान मुले अनुकरणप्रिय असतात. तुमची पूजा बघून मुलेही पूजा करू लागतील. परंतु तुम्ही त्यांना बाहेर पिटाळता. सारे बालपण खेळण्याबागडण्यात निघून जाते. तारुण्य

भोग भोगण्यात सरते. म्हतारपण रोग आणि चिंता यांत निघून जाते मग पूजेसाठी, भक्तीसाठी वेळ कुठे शिल्लक राहतो? तुलसीदासांनी म्हटले आहेः-

**जनम जनम मुनि यतन कराहि।**
**अंत राम कहि आवत नाहि।।**

ऋषिमुनी जन्मजन्मांतरात प्रयत्न करतात तरी अंतिम क्षणी त्यांच्या मुखात देवाचे नाव येत नाही. जडभरताने अंतिम क्षणी हरिणीच्या पिलाची आठवण केली होती. त्यामुळे त्याला पुढच्या जन्मात हरीण व्हावे लागले. मृत्यूच्या क्षणी आपली जी मन:स्थिती असते त्यानुसार पुढील जन्म मिळतो. आयुष्याच्या अंतिम क्षणी शिवनामस्मरण करू असे कोणी म्हणत असेल तर ते घडणे शक्य नाही. म्हातारा होईपर्यंत माणूस जगेल याची शाश्वती काय? दुकानातून वस्तू खरेदी करताना तुम्ही गॅरंटी मागता. माणसाच्या देहाची गॅरंटी कोणाकडे मागणार? म्हणून प्रत्येकाने शक्य तेवढ्या लवकर लिंगदीक्षा घेऊन लिंगपूजा केली पाहिजे. लिंगधारण, लिंगपूजा, लिंगध्यान यांच्यामुळे जीवात्मा लिंगरूप होतो. मन्मथस्वामींनी मागणे मागितले आहेः-

**गुरू आणि लिंग जंगमाची सेवा। देई मज देवा जन्मोजन्मी।।**

मन्मथस्वामींनी मुक्तीदेखील मागितली नाही. असंख्य जन्म मिळाले तरी चालतील, परंतु गुरुसेवा-लिंगसेवा-जंगमसेवा घडली पाहिजे, असे मागणे ते मागतात. त्यांनी मुक्ती मागितली नाही तर मुक्तीचे साधन मागितले. देवाला मुक्ती मागायची नसते तर मुक्तीचे साधन मागायचे असते. मुक्ती मागून देखील मिळत नाही. कारण जीवात्मा मुळात मुक्तच आहे. फक्त अज्ञानामुळे त्याला आपल्या मुक्तस्वभावाचा विसर पडला आहे इतकेच. म्हणून अज्ञान नष्ट करण्यासाठी मुक्तीचे साधन मागावे. अज्ञाननिवृत्तीसाठी लिंगपूजा करणे आवश्यक आहे. लिंगधारणपद्धती फक्त 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त सांगितली आहे काय? असे नसून वेद-शास्त्र-पुराणांत आणि आगमांत तिचे प्रतिपादन केलेले आहे, असे ज. रेणुकाचार्य सांगतातः-

**वेदशास्त्रपुराणेषु कामिकाद्यागमेषु च।**
**लिंगधारणमाख्यातं वीरशैवस्य निश्चयात्।।६.५८।।**

ऋग्वेदात इष्टलिंगाला 'पवित्र' असे संबोधिले आहे. शरीर हे मळमूत्राचे कोठार आहे, तो मलकोश आहे. शरीरावरची त्वचा सोलून पाहिली तर आत ते किती असुंदर असते, हे लक्षात येईल. अशा अपवित्र शरीरावर पवित्र इष्टलिंग धारण केले तर शरीर पवित्र होते. लिंगधारी मनुष्याला कोणतेही सूतक असत नाही. घरात मुलाचा जन्म झालेला असो अथवा कोणी मृत्यू पावले असो, लिंगपूजा सोडता येत नसते. वीरशैवसिद्धान्तात पुरुषाइतकेच स्त्रीला स्थान दिलेले आहे. लिंगपूजा करताना स्त्रीने रज:सूतक पाळू नये, असे सिद्धान्तात सांगितले आहे. लिंगधारणेमुळे शरीर सदैव पवित्र असते. 'लिंगधारी सदा शुद्धः।' असे म्हटले आहे. लिंगधारण हे अत्यंत प्राचीन व श्रेष्ठ व्रत आहे. देवीदेवतांनी देखील लिंगधारण केले आहे. पंढरपूरचा पांडुरंग, बार्शीचा भगवंत, कोल्हापूरची महालक्ष्मी या देवतांच्या मस्तकांवर लिंग आहे. भगवान विष्णूंनी देखील हिमालयात हरीश्वरलिंग स्थापन करून त्याची रोज एक हजार आठ कमळे वाहून पूजा केली होती. शेवटच्या दिवशी एक कमळ कमी पडले, तेव्हा विष्णूंनी आपले आपले नेत्रकमल काढून लिंगावर वाहिले, अशी कथा आहे. प्रभू रामचंद्रांनी लंकेवर स्वारी करण्याआधी समुद्रतीरावर रामेश्वरलिंग स्थापन करून त्याची पूजा केली होती. अशी लिंगपूजनाची परंपरा प्राचीन आहे.

इष्टलिंग, प्राणलिंग आणि भावलिंग असे लिंग तीन प्रकारचे आहे. इष्टलिंगाची पूजा करून साधकाने प्राणलिंगापर्यंत पोहोचले पाहिजे. इष्टलिंग ते भावलिंग हा एक प्रवास आहे. बहिरंगाकडून अंतरंगाकडे जावे लागते. एका कन्नड वचनाचा आशय असा आहे : 'पंचपक्वान्ने केळीच्या पानात गुंडाळून पान पोटावर बांधले तर पोट भरते काय?' अन्न जेव्हा पोटात जाते तेव्हाच पोट तृप्त होते. त्याप्रमाणे साधक जेव्हा भावलिंगापर्यंत पोहोचतो तेव्हाच तो मुक्त होतो. इष्टलिंग हा एक आरसा आहे. त्यामध्ये तुमच्या आत्म्याचे प्रतिबिंब तुम्ही पाहत असता. मनोवृत्ती नेहमी बहिर्मुख असते. तिला प्रयत्नपूर्वक अंतर्मुख करावे लागते. ती अंतर्मुख झाल्याशिवाय आत्मदर्शन शक्य नाही. इष्टलिंगपूजा अंतर्मुख होण्यासाठी करावी लागते.

**अन्तर्लिंगानुसन्धानमात्मविद्यापरिश्रम:।**
**गुरूपासनशक्तिश्च कारणं मोक्षसम्पदाम् ।।६.४३।।**

इष्टलिंगाची पूजा करता करता अंतर्लिंगाचे चिंतन केले पाहिजे. अंतर्लिंगाचे ध्यान, स्वाध्याय आणि गुरुसेवा ही तीन साधने मोक्षप्राप्तीला कारणीभूत ठरतात. लागोपाठ तीन वेळा लिंगपूजा करण्याची पद्धती आहे. तुम्ही पूजेला बसता, भस्मधारण करता, हातावर इष्टलिंग ठेवून त्याला स्नान घालता, पूजाद्रव्यांनी त्याची पूजा करता. पुन्हा लिंगाकारात ठेवता. ही झाली पहिली पूजा. त्यानंतर लगेच पुन्हा लिंग बाहेर काढून त्याची वरीलप्रमाणे पूजा करून पुन्हा लिंगाकारात ठेवता. ही झाली दुसरी पूजा. तिसरी पूजा संक्षिप्त असते. लिंगाकारातून लिंग काढून त्याला भस्म लावून त्याचे तीर्थ घेतले की तिसरी पूजा संपली. ही इष्टलिंगाची पूजा झाली. त्यानंतर प्राणलिंगाची पूजा केली पाहिजे. प्राणलिंग कोठे असते, हे ज. रेणुकाचार्यांनी सांगितले आहे. ते म्हणतात:-

**आधारे कनकप्रख्यं हृदये विद्रुमप्रभम् ।**
**भ्रूमध्ये स्फटिकच्छायं लिंगं योगी विभावयेत् ।।६.४०।।**

मूलाधार, हृदय आणि भ्रूमध्य या ठिकाणी क्रमश: सुवर्णासारखे, पोवळ्यासारखे आणि स्फटिकासारखे प्रकाशमान असे प्राणलिंग असते. सत्, चित् आणि आनंद हे आत्म्याचे स्वरूप आहे. इष्ट, प्राण आणि भाव ही लिंगे आत्म्याच्या सत्-चित्-आनंद ह्या तीन लक्षणांची प्रतीके आहेत. इष्टलिंग हे सद्रूप, प्राणलिंग हे चिद्रूप आणि भावलिंग हे आनंदरूप आहे. प्राणलिंगाची पूजा अंतरंग-सामग्रीने करावी लागते. तेथे बाह्यपूजा-सामग्री चालत नाही. प्राणलिंगपूजा ही मानसिक पूजा होय. आपल्या शरीरातील प्राणशक्तिविशिष्ट ज्योत हेच प्राणलिंग आहे. क्षमा (जल), नित्यानित्यवस्तुविवेक (वस्त्र), सत्यवचन (आभूषण), वैराग्य (पुष्पमाला), समाधी (गंधसमर्पण), निरहंकारभाव (अक्षता), दृढश्रद्धा (धूप), आत्मज्ञान (दीप), भ्रांतिनिवृत्ती (नैवेद्य), मौन (घंटानाद), विषयसमर्पण (तांबूल), भेदबुद्धिनिवृत्ती (प्रदक्षिणा), अभेदचिंतनवृत्तीचा विलय (नमस्कार)-अशी भावना करून प्राणलिंगाची पूजा करावी लागते. प्राणलिंगपूजा करणारा साधक अधिक अंतर्मुख होतो आणि भावलिंगाची पूजा करू लागतो. 'शिवोऽहम्'-मी शिवच आहे, अशा शुद्ध भावनेने आत्मस्वरूपाचे अखंड चिंतन करणे हीच भावलिंगाची पूजा आहे.

अशाप्रकारे इष्टलिंगाची पूजा करीत साधक अंतर्लिंगाचे ध्यान करू लागतो. परमात्म्याचा शोध आपण बाहेर घेत असतो. परंतु अंतरंगात वळून पाहता आले तर तो आपल्या आत आहे हे समजेल. सोलापूरच्या वेशीबाहेर, सोलापूरकडे पाठ करून जर एखाद्या मनुष्याने विचारले- 'सोलापूरचा रस्ता कोणीकडे आहे?' तर सांगणारा सांगेल- 'असाच नाकासमोर सरळ चालत गेलास तर पृथ्वी ओलांडून तू बरोबर सोलापूरला पोहोचशील.' तो

जर म्हणाला- 'मला लवकर पोहोचायचे आहे.' तर सांगणारा सांगेल- 'तू पाठीमागे वळ, तू सोलापूरजवळच आहेस.' अशी स्थिती सामान्य मनुष्याची झाली आहे. तो पाठीमागे वळला, अंतर्मुख झाला तर ईश्वर जवळच आहे हे त्याला पटेल. तुमची दृष्टी बाहेर असेल तर तुम्हाला संसार दिसेल, ती अंतर्मुख झाली तर तिला संसार दिसणार नाही. अशा रीतीने लिंगधारणस्थलात लिंगाची प्राचीनता, लिंगधारणेचे महत्त्व, इष्ट-प्राण-भाव या त्रिलिंगाचे स्वरूप आदी विषयांची चर्चा केलेली आहे.

तुम्हा सर्वांना इष्टलिंग प्राप्त झाले आहे. त्याची दिवसातून तीन वेळा पूजा करा. ते शक्य नसेल तर निदान एक वेळ तरी पूजा करा. प्राणलिंगाचे आणि भावलिंगाचे ध्यान करण्याचा प्रयत्न करा. असे केल्यावर हळूहळू तुमची आध्यात्मिक प्रगती होत जाईल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

४ ऑगस्ट १९९०

---

आशीर्वचन एकविसावे

## भस्म-रुद्राक्षधारणस्थल

### भस्मधारणस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालपर्यंत आपण लिंगधारणस्थलाचा विचार केला, आज त्यापुढील भस्मधारणस्थलाचा विचार करणार आहोत. जीवात्म्याला शिवस्वरूप प्राप्त करून घेण्यासाठी षट्स्थलांतून प्रवास करावा लागतो. हा प्रवास करताना त्याला काही साधनांची आवश्यकता लागते. वीरशैवसिद्धान्तातील अष्टावरणे ही वीरशैव साधकाची साधने होत. पतंजली मुनींच्या 'योगसूत्रा'त अष्टांगयोग सांगितलेला आहे. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ही योगाची आठ अंगे मोक्षप्राप्तीची साधने आहेत. त्याप्रमाणे वीरशैवसिद्धान्तात गुरू, लिंग, जंगम, भस्म, रुद्राक्ष, मंत्र, पादोदक आणि प्रसाद ही आठ आवरणे वीरशैवांच्या साधनेत साहाय्यभूत ठरतात. साधकाची ही आठ रक्षाकवचे होत. त्यांपैकी गुरू-लिंग-जंगम ही पूजनीय आहेत, भस्म-रुद्राक्ष-मंत्र ही पूजेची साधने आहेत आणि पादोदक-प्रसाद ही पूजेची फळे आहेत.

भस्मधारण हे वीरशैवांसाठी एक पुण्यकर्म मानले जाते. 'भस्म' हे परमात्म्याचे एक नावदेखील आहे. ज. रेणुकाचार्यांनी 'सोपाधिक भस्मधारण' आणि 'निरुपाधिक भस्मधारण' असे भस्मधारणाचे दोन प्रकार सांगितले आहेत. शरीरावर भस्म लावणे हे 'सोपाधिक भस्मधारण' होय. निर्गुण, निराकार अशा परंज्योतीचे मनात निरंतर चिंतन करणे हे 'निरुपाधिक भस्मधारण' आहे. भस्म शिवाला अत्यंत प्रिय आहे. तो सर्वांगावर भस्मलेपन करतो, म्हणून त्याला 'कर्पूरगौर' म्हणतात. भस्म न लावलेले कपाळ आणि शिवालय नसलेले गाव यांचा आचार्यांनी धिक्कार केला आहे:-

**धिग् भस्मरहितं फालं धिग् ग्रामं अशिवालयम् ।**

ज्या कपाळावर भस्म नाही आणि ज्या गावात शिवालय नाही त्यांचा धिक्कार असो, असे ते म्हणतात. गोमयनिर्मित विभूतीला 'भस्म' असे नाव आहे. या भस्माला 'सोपाधिक भस्म' असे म्हणतात. भारतीय संस्कृतीत गाईला अत्यंत पूज्य मानतात. स्त्री स्वतःच्या बाळाला काही काळपर्यंत दुग्धपान करविते, म्हणून ती माता होय. परंतु गाय सर्व आबालवृद्धांना सर्वकाळ दूध देते, म्हणून ती गोमाता होय. प्राचीन काळात गाईंना 'गोधन' असे संबोधिले जात असे. भगवान शिवाच्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष आणि ईशान या पंचमुखांतून नंदा, भद्रा, सुरभी, सुशीला आणि सुमना अशा पाच गाई उत्पन्न झाल्या. त्या गाईंच्या गोमयांपासून जे भस्म केले जाते त्याला अनुक्रमे विभूती, भसित, भस्म, क्षार आणि रक्षा अशी नावे आहेत.

**विभूतिर्भसितं भस्म क्षारं रक्षेति भस्मनः ।**
**एतानि पंचनामानि हेतुभिः पंचभिर्भृशम् ।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ७.४)

विभूती ही भूती म्हणजे ऐश्‍वर्य देणारी असल्यामुळे तिला 'विभूती' म्हणतात. भसित धारण करणाऱ्या साधकाला सर्वत्र परशिवाचा भास होऊ लागतो, म्हणून तिला 'भसित्' म्हणतात. भस्मधारण केल्याने सर्व पापे जळून जातात, म्हणून त्याला 'भस्म' म्हणतात. क्षार धारण करणाऱ्या साधकाच्या सर्व आपत्तींचा क्षय होतो, म्हणून त्याला 'क्षार' म्हणतात आणि रक्षा धारण करणाऱ्या साधकाचे भूतप्रेतांपासून रक्षण होते, म्हणून ती 'रक्षा' होय. या पाच प्रकारच्या भस्मांपैकी जे भस्म गुरू अथवा जंगम यांच्या पादोदकाने शुद्ध होते तेव्हा त्याला 'क्रियाभस्म' म्हणतात. हे क्रियाभस्म शास्त्रोक्त विधीने धारण केले पाहिजे.

भस्म तयार करण्याच्या चार पद्धती आहेत. तुम्ही विचाराल तर आम्ही तुम्हाला सांगू. तुम्हाला कपाळावर भस्म लावायलाच वेळ नाही, मग तुम्ही भस्म कधी तयार कराल? कल्प, अनुकल्प, उपकल्प आणि अकल्प अशा भस्म तयार करण्याच्या चार पद्धती आहेत. गाईचे शेण भूमीवर पडण्याआधी ते मंत्रपूर्वक गोळा करून, वाळवून, जाळून त्याचा बिल्वपात्रात संग्रह केला जातो. या प्रक्रियेला 'कल्प प्रक्रिया' म्हणतात. या पद्धतीने तयार केलेले भस्म सर्वश्रेष्ठ समजले जाते. अरण्यात पडलेल्या शुष्क गोमयापासून भस्म तयार करण्याच्या विधीला 'अनुकल्प प्रक्रिया' असे नाव आहे. दुकानात मिळणारे भस्म घरी आणल्यावर ते वस्त्रगाळ करून त्यात गोमूत्र मिसळले जाते. ते वाळल्यानंतर पुन्हा जाळून तयार करण्याच्या पद्धतीला 'उपकल्प प्रक्रिया' म्हणतात. या तिन्ही पद्धतींशिवाय भस्म निर्माण करण्याच्या इतर ज्या पद्धती आहेत त्यांना 'अकल्प प्रक्रिया' असे नाव आहे.

भस्मधारणाचे तीन प्रकार आहेत. भस्मस्नान, भस्मोद्धूलन आणि त्रिपुंड्रधारण. जलस्नानानंतर अंग स्वच्छ पुसून घेतले पाहिजे. डाव्या तळहातावर भस्म ठेवून ते उजव्या हाताने झाकावे. दोन्ही हात तसेच उजव्या मांडीवर ठेवावे. मौन धारण करून आठ वेळा पंचाक्षर मंत्र जपत ते अभिमंत्रित करावे. नंतर सर्वांगावर त्याचे सिंचन करून घ्यावे. याला 'भस्मोद्धूलन' म्हणतात. भस्माचा एकही कण भूमीवर पडू देऊ नये. भस्मोद्धूलनाच्या वेळी शरीरावर पडलेल्या भस्मकणांचे सर्वांगावर लेपन करणे याला 'भस्मस्नान' म्हणतात. तीन बोटांनी अंगावर भस्म लावणे म्हणजे 'त्रिपुंड्रधारण' होय.

पाण्याने स्नान करणे हा स्नानाचा एकच प्रकार तुम्हाला माहीत आहे. परंतु शास्त्रात सात प्रकारची स्नाने सांगितलेली आहेत. मंत्रस्नान, भौमस्नान, आग्नेयस्नान, वायव्यस्नान, दिव्यस्नान, वारुणस्नान आणि मानसस्नान.

वैदिक मंत्र म्हणत मस्तकावर पाणी शिंपडून घेणे याला 'मंत्रस्नान' म्हणतात. गंगा-यमुनादी पवित्र नद्यांतील मातीचा तिलक कपाळावर लावणे हे 'भौमस्नान' होय. मागे सांगितलेले भस्मस्नान म्हणजे 'आग्नेयस्नान' आहे. अग्नीमध्ये सर्व वस्तूंचे दहन करण्याची शक्ती असते. त्याप्रमाणे भस्मात सर्व शारीरिक आणि मानसिक दोष जाळून टाकण्याचे सामर्थ्य असते, म्हणून त्याला 'आग्नेयस्नान' म्हणतात. गाईंच्या पावलांमुळे उडालेली धूळ ज्या वायूत असते त्या वायूचा अंगाला स्पर्श झाला तर ते 'वायव्यस्नान' होय. सकाळी अथवा सायंकाळी उन्हात पडणाऱ्या पावसातील स्नान हे 'दिव्यस्नान' आहे. वाहत्या नदीत अथवा तलावात अवगाहन करून केलेले स्नान हे 'वारुणस्नान' आहे. निरंतर परमात्म्याचे चिंतन करणे याला 'मानसस्नान' म्हणतात. अशा सात प्रकारच्या स्नानांत भस्मस्नान श्रेष्ठ मानले जाते कारण मंत्र, भौम, वायव्य, दिव्य, वारुण या स्नानांमुळे केवळ बाह्य मलांचा नाश होतो, तर मानसस्नानामुळे केवळ आंतरिक मल नाहीसे होतात. परंतु भस्मस्नानाने बाह्य आणि आंतरिक अशा दोन्ही मलांचा नाश होत असल्यामुळे ते सर्वश्रेष्ठ मानले जाते.

भस्म हे परिपक्वतेचे आणि परिपूर्णतेचे लक्षण आहे. सर्वांगावर भस्मधारण केलेला आणि मस्तकावर ठसठशीत त्रिपुंड्र लावलेला शिवभक्त पाहिल्यावर मन्मथस्वामींचे मन आनंदाने उचंबळून आले. त्यांनी आपल्या एका अभंगात ही भावना प्रकट केली आहेः-

**भाळी भस्म लिंग गळा। शोभे रुद्राक्षांच्या माळा।**
**त्याचे झालिया दर्शन। पापी उद्धरती जन॥**
**मन्मथ म्हणे हे खरे। भू-ईश्वर अवतरे॥**

कपाळावर भस्म, गळ्यात लिंग आणि अंगावर रुद्राक्षांच्या माळा अशा शिवभक्ताला पाहून हा भूलोकावरचा ईश्वर आहे, अशा शब्दांत मन्मथस्वामींनी त्याला गौरविले आहे. भस्म हे एक आभूषण म्हणजे दागिना आहे. अन्नाचा सूक्ष्म परिणाम म्हणजे मन. मनुष्य ज्या प्रकारचे अन्न खातो त्या प्रकारचे त्याचे मन बनते. राजस आहारामुळे रजोगुणी, तामस आहारमुळे तमोगुणी तर सात्त्विक आहारामुळे सत्त्वगुणी प्रवृत्ती मनात निर्माण होते. सात्त्विक प्रवृत्ती उत्पन्न होण्यासाठी केवळ सात्त्विक आहारच नव्हे, तर सात्त्विक वेषभूषाही आवश्यक असते. वेषाप्रमाणे अलंकारही महत्त्वाचे असतात. भस्म, गंध, रुद्राक्ष हे सात्त्विक अलंकारच होत. याशिवाय दुसरे दागिने राजस आहेत. राजस वेषभूषा आणि राजस अलंकार तुम्हाला लोकांना दाखवावेसे वाटतात. तुमच्या अंगावर जुनी साडी असेल तर तुम्ही घराबाहेर पडणार नाही. तुम्ही नवी, किंमती साडी नेसली तर ती तुम्हाला घरात बसू देणार नाही. शेजारी-पाजारी, या घरी-त्या घरी तुम्ही साडी दाखवत हिंडाल. भस्म-रुद्राक्ष हे अलंकार दाखवत तुम्ही गल्लोगल्ली फिरणार नाही. कदाचित् पूजेच्या वेळी कपाळावर भस्म लावलेले असेल, तर बाहेर पडताना आरशात पाहून, ते पुसून, पावडर फासून तुम्ही बाहेर पडाल. परंतु कपाळावरचे ठसठशीत भस्मवैभव तुम्ही लोकांना दाखवणार नाही. राजस अलंकार तुम्हाला अस्थिर करतात, तर सात्त्विक अलंकार तुम्हाला स्थिरचित्त करतात.

महर्षी व्यासांनी शिवपुराणात अनेक कथांमधून भस्ममाहात्म्य गाइले आहे. आयुष्यात कधीही भस्मधारण न केलेल्या माणसाच्या प्रेतावर कुत्र्याने चिताभस्म उधळले. तेवढ्या कारणासाठी शिवदूतांनी त्या जीवात्म्याला यमदूतांच्या हातून सोडवून शिवलोकात नेले. अशा अनेक कथा व्यासांनी सांगितल्या आहेत. ज्याच्या कपाळावर अधिक काळ भस्म राहते त्याच्या घरात दीर्घकाळ संपत्ती टिकते, असे शास्त्रात सांगितले आहे. तुम्ही पूजेपुरते

भस्म लावता आणि नंतर पुसून टाकता. म्हणजे आपल्या हातानेच तुम्ही संपत्तीला परत पाठवता. दुर्भाग्याचे सौभाग्यात रूपांतर करण्याचे सामर्थ्य भस्मात आहे. म्हणून वीरशैवांनी सदैव त्रिपुंड्र धारण करावे. त्रिपुंड्र धारण करण्याचे दोन प्रकार आहेत. अनुलोम आणि विलोम. तर्जनी, मध्यमा आणि अनामिका या मधल्या तीन बोटांनी डावीकडून उजवीकडे कपाळभर त्रिपुंड्र लावणे, ही एक पद्धत आहे. मध्यमा आणि अनामिका अशा दोन बोटांनी प्रथम डावीकडून उजवीकडे, नंतर अंगठ्याने दोन रेषांच्या मध्ये उजवीकडून डावीकडे त्रिपुंड्र लावणे, ही दुसरी पद्धत आहे. पहिली अनुलोम पद्धत तर दुसरी विलोम पद्धत. कपाळावरची भस्मरेखा एवढी सामर्थ्यशाली असते की ती ललाटरेखादेखील बदलू शकते.

सुदामा हा कृष्णाचा मित्र होता. त्याचें सर्व जीवन दारिद्र्यात खितपत पडलेले होते. पत्नीच्या आग्रहामुळे मूठभर पोहे पुरचुंडीत बांधून तो द्वारकेत कृष्णाच्या भेटीला गेला. कृष्णाने त्याचे चांगले स्वागत केले. प्रेमभराने आलिंगन दिले. आपला हा मित्र एवढा दरिद्री कसा, असा प्रश्न कृष्णाला पडला. त्याने आपल्या अंतर्दृष्टीने सुदाम्याची ललाटरेषा वाचली. तेथे लिहिले होते— 'क्षयश्री'

या शब्दाचा अर्थ असा की याच्या हातात क्षय आहे. धन हातात आले की ते लगेच निघून जाणार. सुदाम्याच्या दुर्भाग्याबद्दल कृष्णाला हळहळ वाटली. आपल्या मित्राचे नशीब बदलण्याचे त्याने ठरवले. कृष्णाने आपल्या तीन बोटांना भस्म लावून ते सुदाम्याच्या कपाळावर लावले. त्यामुळे ललाटरेषेवरील अक्षरे उलटी झाली. 'क्षयश्री' ही मूळची अक्षरे उलटी होऊन ती 'श्रीयक्ष' अशी झाली. 'श्री' म्हणजे संपत्ती आणि 'यक्ष' म्हणजे कुबेर. क्षणात सुदाम्याचे दुर्भाग्य सौभाग्यात परिवर्तित झाले. कृष्णाचा निरोप घेऊन सुदामा आपल्या गावी गेला तेव्हा त्याची झोपडी महाल झाली होती. अशा प्रकारे भस्मधारण केले तर मनुष्याचे भाग्यदेखील बदलते, असे शास्त्रात सांगितले आहे.

शिवभक्ताचा भालप्रदेश भस्मामुळे कसा शोभिवंत दिसतो, हे एका कन्नड वचनात स्पष्ट केले आहे. वचनकार म्हणतो : 'सरोवराला जशी कमळांमुळे शोभा येते, समुद्राला जशी लाटांमुळे शोभा येते, चंद्रामुळे आकाश शोभायमान दिसते, त्याप्रमाणे भस्मामुळे शिवभक्ताचे भाल शोभून दिसते.'

अंगठा आणि करंगळी सोडून मधल्या तीन बोटांनी कपाळभरून भस्म लावले पाहिजे. भस्म लावण्यात कंजूषपणा नको. त्रिपुंड्राच्या रेषा कोरू नयेत. भस्मात लक्ष्मीचा निवास असतो. जो उदारपणाने भस्म धारण करतो त्याच्या घरात लक्ष्मी वास करते. एकदा गुरुमहाराजांनी शिष्याला सांगितले, ''तू कपाळावर भस्म लावल्याशिवाय जेवण करू नकोस.''

''महाराज, हे मला जमणार नाही.'' शिष्य म्हणाला.

मग गुरुमहाराज म्हणाले, ''ठीक आहे. तू कपाळावर भस्म लावू नकोस, परंतु भस्मधारण केलेल्या मनुष्याचे मुखदर्शन केल्याशिवाय जेवू नकोस.''

''हे मात्र जमेल.'' शिष्य म्हणाला. त्या दिवसापासून तो रोज गावभर भटकून भस्मधारकाचा चेहरा पाहून त्याला नमस्कार करीत असे आणि नंतरच घरी येऊन जेवत असे. हा नेम मात्र त्याने निष्ठापूर्वक पाळला. भस्मांकित मुख पाहण्यासाठी त्याला गावभर भटकावे लागे. खरे म्हणजे यापेक्षा स्वत: भस्मधारण करणे अधिक सोपे होते. असे बरेच दिवस गेले. एके दिवशी त्याला गावात एकही भस्मधारक भेटला नाही. दुपार झाली. संध्याकाळ झाली. पोटात अन्नाचा कण नाही. अशा अवस्थेत तो गावाबाहेर पडला. शेतात कोणीतरी शिवभक्त भेटेल असे त्याला वाटले.

एक शिवभक्त कुंभार माती आणण्यासाठी शेतात गेला होता. खोदता खोदता त्याला धनाचा हंडा सापडला.

हंडा बाहेर काढण्याच्या प्रयत्नात तो होता. तेवढ्यात शिष्य त्याच्या थोडा जवळ गेला. कुंभाराचे भस्मांकित कपाळ पाहून 'पाहिलं, पाहिलं' असे म्हणून घरी निघून गेला. धनाच्या हंड्याकडे त्याने पाहिले देखील नाही. कुंभाराला वाटले की, आपल्याला हंडा सापडलेला याने पाहिला. आता हा गावभर बोभाटा करील. याला गप्प केले पाहिजे. म्हणून तो धावत धावत त्याच्या मागोमाग त्याच्या घरी गेला. म्हणाला, "तुम्ही खरंच पाहिलंय का?"

"होय, मी खरंच पाहिलं!" तो म्हणाला. कुंभार हात जोडून म्हणाला, "तुम्ही अर्धे घ्या, मी अर्धे घेतो, पण कोणाला सांगू नका." असे म्हणून त्याने अर्धे धन शिष्याच्या स्वाधीन केले. शिष्य नेम पाळतो की नाही हे पाहण्यासाठी गुरुमहाराज त्याच्या घरी गेले. तेव्हा त्याने भस्मांकित मुखदर्शनामुळे मला हंड्यातील अर्धे धन मिळाले, असे सांगितले. गुरुमहाराज म्हणाले, "भस्म लावलेल्या मुखाचे दर्शन घेऊन तुला अर्धे धन मिळाले, पण स्वतःच्या कपाळावर भस्म लावले असते तर पूर्ण धन मिळाले असते!"

भस्मधारण एक व्रत आहे. ते निष्ठापूर्वक पाळले पाहिजे. फक्त पूजेच्या वेळीच भस्म लावावे असे नाही, तर ते तिन्ही त्रिकाळ लावले पाहिजे. त्यामुळे तुमचा भाग्योदय निश्चित आहे. भस्म हा सात्त्विक अलंकार आहे. सोन्याचांदीचे दागिने हे राजस अलंकार होत. या अलंकारांच्या हव्यासापोटी आपल्या देशात भ्रष्टाचार वाढलेला आहे. पत्नी पतीकडे अनेक प्रकारच्या अलंकारांची मागणी करते. ती पुरवण्यासाठी पती गैरमार्गाने पैसा मिळवतो. शिवभक्त पति-पत्नीने कसा संसार करावा याचे एक उदाहरण कर्नाटकातील शिवशरणाच्या चरित्रात आढळते.

आयदक्की मारय्या आणि त्याची पत्नी लक्कम्मा हे शिवभक्त दांपत्य कल्याण नगरीत राहत होते. उदरनिर्वाहाचे कोणतेच साधन नसल्यामुळे मारय्या शिवभक्तांच्या घरी जात असे. तेथे धान्य निवडताना जे कण खाली पडलेले असत ते गोळा करून घरी आणत असे. लक्कम्मा ते शिजवत असे. जंगमांना भोजन देऊन उरलेले अन्न पति-पत्नी ग्रहण करीत.

एके दिवशी त्यांची स्थिती बसवेश्वरांच्या लक्षात आली. त्यांनी मुद्दामच अधिक तांदूळ खाली पाडले. मारय्याने ते मोठ्या आनंदाने गोळा केले आणि घरी जाऊन लक्कम्माजवळ दिले. नेहमीपेक्षा अधिक धान्य पाहून तिला संशय आला. कोणीतरी मुद्दाम हे कृत्य केले असावे, हे तिने ओळखले. ती पतीला म्हणाली, "एवढे तांदूळ कोठून आणले? अधिक मिळावे अशी हाव राजेमहाराजांना असते. आपण शिवभक्त आहोत, आपल्याला एवढे धान्य कशाला हवे? हे जेथून आणले तेथे परत नेऊन ठेवा." त्याप्रमाणे मारय्याने तांदूळ जेथून मिळाले तेथे परत नेऊन ठेवले.

असा आदर्श संसार तुम्ही केला तर आपल्या देशातला भ्रष्टाचार कमी होईल. म्हणून राजस संपत्तीचा मोह टाळून सात्त्विक संपत्तीचा स्वीकार केला पाहिजे. भस्म ही सात्त्विक संपत्ती असून प्रत्येक शिवभक्ताने अवश्यमेव भस्मधारण केले पाहिजे.

## रुद्राक्षधारणस्थल

भस्माप्रमाणेच रुद्राक्षधारण वीरशैवांना करावे लागते. रुद्राक्ष हे आभूषण आहे. ते शिवाला अत्यंत प्रिय आहे. जो रुद्राक्षधारण करतो तो प्रत्यक्ष शिवच असतो.

> भस्मोद्धूलितसर्वांगा धृतरुद्राक्षमालिकाः।
> ये भवन्ति महात्मानस्ते रुद्रा नात्र संशयः।।७.६५।।

ज्याने सर्वांगावर भस्मोद्धूलन केले आहे आणि गळ्यात रुद्राक्षमाळा धारण केल्या आहेत, असा महात्मा

प्रत्यक्ष रुद्रच आहे यात संशय नाही. रुद्राक्ष हे आभूषण असले तरी ते सुवर्णालंकाराप्रमाणे शरीराच्या सजावटीसाठी धारण केले जात नाही. त्यात प्रदर्शन नसते. रुद्राक्षधारणाने 'मी मोठा श्रीमंत' असा अहंकार मनात निर्माण होत नाही. म्हणून सर्व आभूषणांपेक्षा रुद्राक्ष हे आभूषण श्रेष्ठ आहे.

रुद्राक्षाची निर्मिती शंकाराच्या नेत्रांतून झाली, अशी कथा आहे. त्रिपुरासुरवधाच्या वेळी शंकर अनिमिष दृष्टी लावून बसले होते. तेव्हा त्यांच्या सूर्यनेत्रातून बारा प्रकारचे रुद्राक्ष, चंद्रनेत्रातून सोळा प्रकारचे रुद्राक्ष आणि अग्निनेत्रातून दहा प्रकारचे रुद्राक्ष उत्पन्न झाले. रुद्राक्ष हे असे अडतीस प्रकारचे असतात. अश्रूत मोठी शक्ती असते. अश्रूचे आनंदाश्रू, दुःखाश्रू आणि योगाश्रू असे तीन प्रकार आहेत. शंकरांचे अश्रू हे योगाश्रू होते. ज्याने आनंद दिला त्याचे भले करण्याची शक्ती आनंदाश्रूत असते. ज्याने दुःख दिले त्याचे वाईट करण्याची शक्ती दुःखाश्रूत असते. त्याप्रमाणे दुष्टांचे पारिपत्य करण्याची आणि सुष्टांचे रक्षण करण्याची शक्ती योगाश्रूत असते. जो रुद्राक्षधारण करतो त्याच्या ठिकाणी ही शक्ती उत्पन्न होते. त्याच्या मनातील दुष्टवृत्तींचा नाश होऊन सुष्टवृत्तींचा प्रकर्ष होतो. 'सर्वे सुखिनः भवन्तु' अशी शिवदृष्टी त्याला लाभते.

विशिष्ट वृक्षबीजाला रुद्राक्ष म्हटले जाते. रुद्राक्ष एकमुखापासून चौदा मुखांपर्यंत असतात. वीरशैवाने शिखास्थानी एकमुखी एक रुद्राक्ष; मस्तकावर द्विमुखी, त्रिमुखी आणि द्वादशमुखी प्रत्येकी एकेक असे तीन रुद्राक्ष; कपाळाभोवती अकरा मुखांचे छत्तीस रुद्राक्ष; दोन्ही कानांवर पाच, सात आणि दहा मुखांचे प्रत्येकी दोन असे सहा रुद्राक्ष; कंठात सहा मुखांचे सोळा आणि आठ मुखांचे सोळा असे बत्तीस रुद्राक्ष; वक्षःस्थळावर चार मुखांचे पन्नास रुद्राक्ष; दोन्ही दंडांवर तेरा मुखांचे सोळा-सोळा रुद्राक्ष; दोन्ही मनगटांवर नऊ मुखांचे बारा-बारा रुद्राक्ष धारण करावे. चौदा मुखांच्या एकशे आठ रुद्राक्षांची माळ यज्ञोपवितप्रमाणे शिवभक्ताने सदैव गळ्यात धारण करावी. छिद्र न पडलेले, शुद्ध वर्णाचे, काटेरी आणि पूर्वी कोणी न वापरलेले रुद्राक्षच धारण करण्यास योग्य होत. जो सर्वकाळ रुद्राक्षधारण करतो त्याला पापाचा स्पर्श होत नाही आणि रुद्राक्षधारणाने एक कोटी गोदान केल्याचे पुण्य लाभते, असे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे. अधिकाधिक रुद्राक्ष धारण करणे हे अधिक फलदायी असते. परंतु शिवभक्ताने किमान एक तरी रुद्राक्ष अवश्य धारण केला पाहिजे.

'चंद्रज्ञानागमा'त रुद्राक्षधारणाचे फळ सांगितले आहे. एकमुखी रुद्राक्षधारणाने साधक जितेंद्रिय होतो. द्विमुखी रुद्राक्षधारण केल्याने अर्धनारीश्वराच्या कृपेला पात्र होतो. त्रिमुखी रुद्राक्षधारण केल्याने त्याच्यावर अग्निदेवता प्रसन्न होते. चारमुखी रुद्राक्षधारण केल्याने ब्रह्मदेवाची, पाचमुखी रुद्राक्षधारण केल्याने सदाशिवाची, सहामुखी रुद्राक्षधारणाने कार्तिकेयाची, सातमुखी रुद्राक्षधारणाने सप्तमातृकांची, आठमुखी रुद्राक्षधारणाने अष्टवसूंची, नऊमुखी रुद्राक्षधारणाने दुर्गेची आणि दशमुखी रुद्राक्षधारणाने यमराजाची कृपा होते. अकरामुखी रुद्राक्षधारणाने इंद्रादी देवता संतुष्ट होऊन सौभाग्यवृद्धी होते. बारामुखी रुद्राक्षधारणाने सूर्याची कृपा लाभते, चौदा मुखांचा रुद्राक्ष धारण केल्याने सर्व रोग नाहीसे होऊन आरोग्यप्राप्ती होते. रुद्राक्षमाला धारण करणे आरोग्यदायक असल्यामुळे केवळ वीरशैवांनीच नव्हे तर सर्वांनीच ती धारण केली पाहिजे.

रुद्राक्षधारणाने रक्तदाब, हृदयविकार इत्यादी रोगांना प्रतिबंध होतो, असे विज्ञानाने सिद्ध केले आहे. म्हणून जगात सर्वत्र अधिकाधिक लोक रुद्राक्षधारण करीत आहेत. रुद्रांची संख्या शंभर आहे. म्हणून रुद्राक्षमाळेत एकशे आठ रुद्राक्ष असतात. हाती माळ घेऊन जप केल्याने शरीराचे चलनवलन चालू राहते आणि 'जागृती येण्यासाठी आपण जप करीत आहोत' अशी साधकाची भावना होते. माळेतील रुद्राक्ष जसे सतत फिरत राहतात तशी साधकाला लाभलेली शिवसमदृष्टी एकाच ठिकाणी स्थिर न होता सतत सर्वत्र फिरली पाहिजे. सर्व प्राण्यांमधील,

सर्व वस्तूंमधील समत्व साधकाला जाणवले पाहिजे. रुद्राक्षधारणाने मनुष्याची सर्व पापे नाश पावतात.

रुद्राक्षधारणादेव मुच्यन्ते सर्वपातकैः।
दुष्टचित्ता दुराचारा दुष्प्रज्ञा अपि मानवाः ।।७.४६।।

जे मनाने दुष्ट आहेत, दुराचारी आणि दुष्ट बुद्धीचे आहेत अशा मनुष्यांनी रुद्राक्षधारण केल्याने त्यांची सर्व पापे नाहीशी होतात. 'पातयति इति पातकम्।' म्हणजे जीवाला दुर्गतीत पाडणारे जे कर्म तेच पातक होय. पातकाचे अतिपातक, महापातक, अनुपातक, उपपातक, संकरीकरण, अपात्रिकरण, जातिभ्रंशकरण, मलावह आणि प्रकीर्णक असे नऊ प्रकार आहेत. ब्रह्महत्या, मद्यपान, चौर्य, गुरुपत्नीगमन ही चार महापातके आणि या महापातक्यांचा संसर्ग हे पाचवे महापातक अशी पंचमहापातके होत. ही सर्व पातके रुद्राक्षधारणाने नष्ट होतात. एवढेच नव्हे तर मृतदेहावर असलेले रुद्राक्षसुद्धा जीवात्म्यांना फलदायी ठरते. म्हणून वीरशैवात मृत्यूनंतर मृतदेहावर भस्म, रुद्राक्ष, लिंग ठेवूनच त्याचा अंत्यसंस्कार करतात. भारतीय धर्मपरंपरेत मृत्यूनंतर मनुष्याच्या अस्थी आणि रक्षा यांचे गंगेत विजर्सन करण्याची प्रथा आहे. त्यामुळे जीवात्म्याला सद्गती मिळते, असे शास्त्रवचन आहे. त्याचप्रमाणे मृत्यूनंतर प्रेतावर रुद्राक्ष ठेवून अंत्यसंस्कार केला तर तो जीवात्म्याला फलदायी ठरतो. अंत्यसंस्काराचे प्रयोजन जीवात्म्याला सद्गती मिळावे हेच आहे.

रुद्राक्षधारणामुळे जीवात्म्याला शिवलोक मिळाला, अशा आशयाच्या अनेक कथा 'शिवपुराणा'त आढळतात. जाणता अथवा अजाणता रुद्राक्षधारण केले तरी त्याचे फळ मिळते. रुद्राक्षधारण असे पापनाशक आणि पुण्यदायक आहे. मस्तकावर रुद्राक्ष ठेवून स्नान केले तर गंगास्नानाचे पुण्य मिळते आणि रुद्राक्षप्रक्षाळित पाणी प्याल्याने अकाली मृत्यू दूर होतो, असे शास्त्रात म्हटले आहे. म्हणून वीरशैवांनी रुद्राक्षधारण अवश्य केले पाहिजे. ज्यांच्या कंठात रुद्राक्षमाला शोभून दिसतात असे चालते बोलते शिवच या जगात मांगल्याची पेरणी करू शकतात.

रुद्राक्ष हे समत्वबुद्धीचे प्रतीक असून त्याचे धारण करण्यात वर्णभेद किंवा जातिभेद नाही. 'रुद्र' याचा अर्थ शिव आणि 'अक्ष' याचा अर्थ दृष्टी असा आहे. रुद्राक्ष म्हणजे 'शिवदृष्टी.' सर्व विश्वात समानता पाहणाऱ्या दृष्टीला शिवदृष्टी म्हणतात. रुद्राक्षधारणाने साधकाला शिवसमदृष्टी प्राप्त होते. रुद्राक्षाच्या दर्शनाने, स्पर्शाने, स्मरणाने किंवा धारणाने प्रपंचातील सर्व लोक पापापासून मुक्त होतातः-

दर्शनात् स्पर्शनाच्चैव स्मरणादपि पूजनात्।
रुद्राक्षधारणाल्लोके मुच्यन्ते पातकैर्जनाः ।।७.६१।।

भस्म आणि रुद्राक्ष धारण न करता केलेली नित्य, नैमित्तिक, काम्य इत्यादी सर्व कर्मे निष्फळ होतात. म्हणून वीरशैवांनी रुद्राक्ष हे आभूषणाप्रमाणे धारण करावे. त्याबरोबरच प्राणिमात्रात, ब्रह्मांडात समत्व पाहणारी शिवदृष्टी प्राप्त करून घ्यावी, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
५ ऑगस्ट १९९०

## पंचाक्षरजपस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज अष्टावरणातील मंत्र या आवरणाचा विचार आपण करणार आहोत.

**धृतश्रीभूतिरुद्राक्षः प्रयतो लिंगधारकः।**
**जपेत् पंचाक्षरीविद्यां शिवतत्त्वप्रबोधिनीम्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ८.१)

मंत्रजप कशा प्रकारे करावा, हे या श्लोकात सांगितले आहे. कपाळावर विभूती लावून, गळ्यात रुद्राक्षमाळा घालून, तळहातावर इष्टलिंग घेऊन शिवभक्ताने पंचाक्षर महामंत्राचा जप केला पाहिजे. गुरुमुखातून प्राप्त झालेली दिव्य अक्षरे म्हणजे मंत्र. गुरू जाहीरपणे मंत्रोपदेश करीत नसतात. एकेकट्याला बोलावून त्याच्या उजव्या कानात मंत्र सांगितला जातो. मंत्रोपदेशानंतर मंत्रजप करण्याची गुरू आज्ञा देतात. वीरशैवसिद्धान्तात पंचाक्षरमहामंत्राला विशेष महत्त्व आहे. 'नमः शिवाय' हा पंचाक्षरी मंत्र आहे. या मंत्राच्या पाच अक्षरांमधून पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश ही पंचमहाभूते उत्पन्न झाली आहेत. ब्रह्मांड पंचमहाभूतात्मक आहे, आणि पिंड म्हणजे आपले शरीर हेदेखील पंचमहाभूतात्मक आहे. पंचाक्षरमंत्र पाच अक्षरांचा असला तरी तो विश्वव्यापक आहे. वरवर लहान दिसणाऱ्या वस्तूत मोठे सामर्थ्य दडलेले असते. लहानसा अंकुश महाकाय हत्तीवर नियंत्रण ठेवू शकतो. एक लहानशी ठिणगी कापसाचा प्रचंड ढीग भस्मसात करू शकते. त्याप्रमाणे अनंत जन्मांतल्या पापराशी लहान दिसणारा पंचाक्षरमंत्र नष्ट करू शकतो. म्हणून ज. रेणुकाचार्यांनी म्हटले आहेः-

**सप्तकोटिषु मंत्रेषु मंत्रः पंचाक्षरो महान्।**
**ब्रह्मविष्ण्वादिदेवेषु यथा शंभुर्महत्तरः॥८.४॥**

मंत्रशास्त्रात सात कोटी मंत्र सांगितलेले आहेत. त्या सर्व मंत्रांत पंचाक्षरमंत्र सर्वश्रेष्ठ आहे. हा मंत्र तुम्हाला गुरूकडून मिळालेला आहे. मंत्राची पुनःपुन्हा आवृत्ती करणे याला जप म्हणतात. पंचाक्षर महामंत्राची पाच नावे आहेतः-

**मूलं विद्या शिवः शैवं सूत्रं पंचाक्षरस्तथा।**
**एतानि नामधेयानि कीर्तितानि महामनोः॥८.२३॥**

मूलमंत्र, विद्यामंत्र, शिवमंत्र, शैवसूत्रमंत्र आणि पंचाक्षरमंत्र, अशी या मंत्राची पाच नावे आहेत. तुम्हाला देखील अनेक नावे असतात. आई एका नावाने हाक मारते, वडील दुसऱ्या नावाने हाक मारतात, तर मित्र तिसऱ्याच नावाने हाक मारतात. वेगवेगळ्या नावांनी हाक मारली तरी 'ओ' देणारी व्यक्ती एकच असते. त्याप्रमाणे नावे पाच असली तरी मंत्र एकच आहे. हा मंत्र सर्व मंत्रांचे मूळ असल्यामुळे याला 'मूलमंत्र' असे म्हणतात. या मंत्राचा जप केल्यावर विद्या प्राप्त होते, म्हणून याला 'विद्यामंत्र' असे नाव आहे. या मंत्राचा जप केल्यावर तुम्ही परीक्षेत नक्की पास व्हाल. मग उद्यापासून तुम्ही अभ्यासच करणार नाही. मंत्र जपला की झाला पास! तर असे होणार नाही. विद्याभ्यासामध्ये अनेक विघ्ने उभी राहतात. ती कधी आर्थिक असतात, कधी

शारीरिक असतात तर कधी मानसिक असतात. आर्थिक विवंचनेमुळे, शारीरिक अस्वास्थ्यामुळे आणि मानसिक चिंतेमुळे अभ्यासात लक्ष लागत नाही. या मंत्राचा जप केला तर या अडथळ्यांपासून तुम्ही मुक्त व्हाल, तुमचे लक्ष अभ्यासात लागेल आणि तुम्ही पास व्हाल. अभ्यास न करता केवळ मंत्रजप करून पास होता येत नसते. या मंत्रजपामुळे अभ्यास करण्याला स्फूर्ती येईल, विघ्नबाधा टळतील. आध्यात्मिक अभ्यासात हा मंत्र साहाय्यक ठरतो. प्रवचन ऐकूनदेखील काही लोकांना काहीच कळत नाही. 'काऽऽय सांगतात महाराज काय की? काऽऽही कळत नाही' असे म्हणणारे पुष्कळ लोक असतात. कारण त्यांच्या बुद्धीवर काही संस्कारच नसतात. बुद्धी शुद्ध नसते. ज्याची बुद्धी शुद्ध नसते त्याला तत्त्वज्ञान कळत नाही. बुद्धीच्या शुद्धीसाठी मंत्रजप नितांत आवश्यक आहे.

पंचाक्षरमंत्राला 'शिवमंत्र' असे नाव आहे. शिव म्हणजे कल्याणकारक, मंगल करणारा. या मंत्रजपामुळे आपले कल्याण होते. याचे चौथे नाव आहे 'शिवसूत्र.' देवळाच्या गाभाऱ्यात जाऊन भक्त जेव्हा देवाला हात लावून नमस्कार करू शकत नाही, तेव्हा पुजारी देवाला बांधलेला दोरा भक्ताच्या हाती देतो. त्याला सूत्र म्हणतात. या सूत्राच्या द्वारे भक्त देवाला स्पर्श करीत असतो. त्याप्रमाणे पंचाक्षरमंत्र हा शिव आणि शिवभक्त यांच्यामधले सूत्र असतो. सूत्र तुमच्या हाती आले तर तुम्ही देवाला बांधू शकता. मंत्रजप म्हणजे देवाला मारलेली हाक. गर्दीतल्या एखाद्या माणसाला तुम्ही हाक मारली तर तो वळून तुमच्या दिशेने पाहतो. त्याप्रमाणे मंत्रजप केला तर शिवाची दृष्टी तुमच्याकडे वळते.

एक म्हातारी विश्वनाथाच्या मंदिरात दर्शनासाठी गेली. तिथे तिला दिसले की सर्वच लोक 'दीनबंधू दीनानाथ। मेरी डोरी तेरे हाथ' असा घोष करीत आहेत. आपणही घोष करावा असे तिला वाटले. म्हणून तीदेखील सर्वांसोबत घोष करू लागली. शब्द मागे-पुढे झाले. ती मोठमोठ्याने म्हणू लागली, ''दीनबंधु दीनानाथ। तेरी डोरी मेरे हाथ।।''

शेजारी बसलेल्या पंडिताने तिचा घोष ऐकून म्हटले, ''आजीबाई, तुम्ही उलटे म्हणत आहात. 'तेरी डोरी मेरे हाथ' असे म्हणू नका, 'मेरी डोरी तेरे हाथ' असे म्हणा.''

त्यावर म्हातारी उत्तरली, '''तेरी डोरी मेरे हाथ काय, अन् मेरी डोरी मेरे हाथ' काय, दोरी हाती असली म्हणजे झालं. मग ती कोणाच्या का हाती असेना.''

पंडित गप्प बसला. देव कैलासात असो की वैकुंठात, मंत्ररूपी सूत्र तुमच्या हाती असले तरी तुम्ही त्याला आपल्याकडे खेचू शकता. देव कोठे आहे याची चिंता तुम्ही करू नका. तुम्ही जेथे आहात तेथे देव येईल. पण केव्हा? मंत्ररूपी सूत्र तुमच्या हाती असेल तर.

**तस्याभिधानमंत्रोऽयमभिधेयश्च स स्मृतः।**
**अभिधानाभिधेयत्वान्मंत्रात् सिद्धः परः शिवः।।८.६।।**

पंचाक्षरमंत्र हा शिवाचे अभिधान असून, शिव हा अभिधेय आहे. मुलाचा जन्म झाल्यावर बारशाच्या दिवशी त्याचे नाव ठेवतात. नाव ठेवायला कोणाला बोलावतात? आत्याला. नाव ठेवल्यावर तिच्या पाठीवर बुक्क्या मारतात. अजब न्याय आहे! तुमच्या मुलाचे नाव ठेवायला घरी यायचे आणि तुमच्या बुक्क्या खायच्या. या रूढीचा अर्थ काय असेल? याचा अर्थ असा की, नाव ठेवणे हेच मुळात अयोग्य आहे. आत्म्याला कोणते नाव ठेवणार? आत्मा अजन्मा आहे. त्याला जन्म नाही अन् मृत्यूही नाही. अशा आत्म्याला पाळण्यात घालून 'बाळा जो जो रे' असे म्हणत तुम्ही नाव ठेवता, म्हणून तुमच्या पाठीवर बुक्क्या बसतात. मदालसेने आपल्या पुत्राला

पाळण्यात घालून त्याचे नाव ठेवले. कोणते? तर 'नित्य, बुद्ध, निरंजन' हे. 'संसार हे स्वप्न आहे, मोहनिद्रा त्यागून बाळा जागा हो' अशा अर्थाचे गीतही तिने गायिले. नित्य, बुद्ध, निरंजन ही आत्म्याची लक्षणे आहेत. अशी नावे तुम्ही ठेवत नाही. पूर्वी देवाचे नाव मुलाला ठेवत असत. आता तुमचे देवही वेगळे आणि तुमची नावेही वेगळी!

निर्गुण-निराकार आणि सगुण-साकार अशी ईश्वराची दोन रूपे आहेत. ॐकार हा ईश्वराच्या निर्गुण-निराकार स्वरूपाचे प्रतिपादन करणारा मंत्र आहे, आणि पंचाक्षर हा ईश्वराच्या सगुण-साकार स्वरूपाचे प्रतिपादन करणारा मंत्र आहे. पंचाक्षरमंत्राला प्रणव म्हणजे ॐकार जोडला तर त्याला षडक्षरमंत्र म्हणतात. 'नमः शिवाय' हा पंचाक्षरमंत्र आणि 'ॐ नमः शिवाय' हा षडक्षरमंत्र होय. व्यवहारात ओळख पटवण्यासाठी आणि ओळख पटण्यासाठी नावे ठेवली जातात. कोणाला नावच ठेवले नाही तर त्याला हाक कशी मारायची? म्हणून आपले नाव हे काही आपले खरे नाव नसते. ते व्यवहाराच्या सोयीसाठी दिलेले असते. त्याप्रमाणे 'ॐ' हे शिवाचे खरे नाव असून 'नमः शिवाय' हे व्यावहारिक नाव आहे.

मंत्रजप हा मनापासून आणि श्रद्धापूर्वक केला पाहिजे. तुम्ही मनापासून जप करता की नाही, हे ईश्वर तपासून पाहतो. कारण आपल्या आयुष्यात नाटकीपणा फार असतो. जेवताना कोणी आला तर त्याला 'या जेवायला' असे म्हणतो. हे बोलावणे खरे नसते. तो खरोखरच बोलावल्यावर जेवायला बसला तर पुन्हा त्याच्यापुढे तुम्ही जेवायलाही बसणार नाही. जप करताना कधी संपतो, कधी संपतो असे तुम्हाला वाटत असेल तर तुमच्या जपात जिव्हाळा नाही असे समजा. अशा मंत्रजपाने तुम्ही ईश्वराला आपलेसे करू शकणार नाही. त्याला हाक मारताना तुमच्या शब्दात सामर्थ्य असले पाहिजे. शब्दाला भावस्पर्श झाल्यावर शब्दात सामर्थ्य येते. तुमच्या जपात भावनेचा ओलावा असेल तर जपाचे सार्थक होईल. तो नसेल तर जप निरर्थक ठरेल. नामजपात प्रत्येकाला गोडी वाटली पाहिजे. पण माणूस गलिच्छ बोलण्यात स्वतःला धन्य समजतो. शाश्वत सुख देणारे शिवनाम त्याच्या जिभेवर येत नाही. त्याला शिवनामातली गोडी सांगावी लागते, स्वतःला कळत नाही. मुंगीला मात्र साखरेची गोडी सांगावी लागत नाही.

एका गृहिणीने सर्व स्वयंपाकघरातल्या डब्यांवर लेबले लावून ठेवली होती. डाळ, तांदूळ, साखर, इत्यादी. वस्तू पटकन् सापडावी हा तिचा उद्देश होता. पण तिच्या लक्षात आले की साखरेच्या डब्यात मुंग्या शिरत आहेत. म्हणून तिने साखर दुसऱ्या डब्यात ठेवली. साखरेच्या डब्यात मिरच्यांची पूड ठेवली. लेबल तसेच राहिले.

एकदा पतिराजांना चहा करण्याची लहर आली. एखादे वेळी कपभर चहा करून बायकोच्या हाती ठेवला तर ती खूष होते हे अनुभवाने त्याला माहीत होते. त्यात रात्रीची वेळ, बायकोला खूष करण्याची वेळ. मोठ्या उत्साहाने तो स्वयंपाकघरात गेला. पातेल्यात पाणी ठेवले. 'साखर' असे लेबल पाहून डबा हाती घेतला. तेवढ्यात वीज गेली आणि अंधार झाला. अंधारातच त्याने साखर, चहापूड घातली. वीज आली. दोन कप घेऊन मोठ्या खुशीत तो बायकोजवळ आला. ती कोचावर आरामात बसलेली. कप तिच्या हाती दिला आणि स्वतः कप ओठाला लावून एक घोट घेतला मात्र... त्याला भयंकर ठसका लागला.

बायकोला काय घडले ते क्षणभर कळलेच नाही. ती स्वयंपाकघरात जाऊन पाहते तो 'साखर' लेबल लावलेला डबा शेगडीजवळ पडलेला आणि ज्या डब्यात साखर ठेवलेली त्या डब्याला मुंग्यांची रांग लागलेली. ती बाहेर येऊन त्याला म्हणाली, ''अहो, साखर कुठे आहे हे लहानशा मुंगीलादेखील कळते. पण तुम्हाला मात्र कळलं नाही!''

मुंगीला साखर कोठे आहे ते कळते. ती लेबल पाहून डब्यात शिरत नाही. कारण ती गुणग्राही आहे. मनुष्य

मात्र अक्षरग्राही आहे. शिवनामात सुख आहे, ते त्याला पुन:पुन्हा सांगावे लागते.

परशिवाशी संबंध जोडण्याचे सर्वात सुलभ साधन म्हणजे पंचाक्षरमंत्र होय. कलियुगात धर्माचरण करणे अवघड आहे, परंतु नामस्मरण करणे शक्य आहे. 'नाम लेत भवसिंधु सुखाई।' असे तुलसीदासांनी म्हटले आहे. नामस्मरण केल्यावर संसारसागर आटून कोरडा होतो. असे सामर्थ्य शिवनामात आहे. पंचाक्षरमंत्राचा एकवेळ जप केला तरी सर्व पातकांचा नाश होतो, असे आचार्य सांगतात:-

**सकृदुच्चारमात्रेण पंचाक्षरमहामनोः।**
**सर्वेषामपि जन्तूनां सर्वपापक्षयो भवेत्॥८.३९॥**

पंचाक्षरमंत्र एकवेळ उच्चारल्याने पातकांचा नाश होतो, त्याबरोबरच त्याच्या जपामुळे शिवरूपाची प्राप्ती होते. याविषयी पुराणात एक कथा आली आहे. एका वीरशैव कुटुंबात एकजण सोडून घरातल्या सर्वांनी कुलगुरूंकडून लिंगदीक्षा घेतली होती. आपला एक मुलगा दीक्षा न घेता घरात राहतो याचा कुटुंबप्रमुखाला खेद वाटला. जेव्हा जेव्हा गुरू घरी येत असत तेव्हा तेव्हा तो मुलगा घरातून बेपत्ता होत असे. शेवटी त्याच्या वडिलाने गुरूंना विनंती केली, ''महाराज, आपण एकदा आम्हाला न कळवता अचानक आमच्या घरी या. म्हणजे माझा मुलगा तुमच्या हाती सापडेल. काय वाट्टेल ते करून त्याला मंत्रोपदेश करा आणि त्याच्या मुखातून मंत्र वदवून घ्या.''

गुरूंनी त्यांची विनंती मान्य केली आणि एके दिवशी अचानक ते त्यांच्या घरी आले. गुरू दारात उभे राहिल्यावर मुलगा घाबरला. परंतु त्यांनी दार अडवल्यामुळे त्याला पळून जाता येईना. शेवटी तो देवघरात जाऊन लपला. गुरू त्याच्या मागोमाग देवघरात शिरले. त्यांनी त्याला पकडून खाली पाडले. त्याच्या छातीवर बसले. त्याच्या कानात मंत्रोपदेश करण्याचा प्रयत्न करू लागले. तो आपला चेहरा सारखा इकडे तिकडे हलवू लागला. अखेर गुरूंनी त्याचे मस्तक गच्च पकडले आणि त्याच्या उजव्या कानात पंचाक्षरमंत्र सांगितला. जबरदस्तीमुळे त्याने तो ऐकला. परंतु त्याच्याकडून मंत्र वदवून घेतल्याशिवाय विधी पूर्ण होणार नव्हता. म्हणून गुरू त्याला म्हणाले, ''मी काय सांगितले ते म्हणून दाखव.''

''मी नाही म्हणून दाखवणार.'' मुलगा म्हणाला.

गुरू पुन:पुन्हा विचारत होते, तो सांगण्यास तयार नव्हता. शेवटी पुन:पुन्हा विचारताना गुरूंनी विचारले, ''तू काय म्हणणार नाहीस?'' त्यावेळी अनवधानाने 'काय म्हणणार नाहीस' या प्रश्नाचे त्याने 'नमः शिवाय म्हणणार नाही' असे उत्तर दिले. गुरूंचे काम पूर्ण झाले आणि ते त्याच्या छातीवरून उठले.

अनेक वर्षे उलटली. त्या मुलाचे लग्न झाले. मुलेबाळे झाली, तो म्हातारा झाला. पण त्याने आयुष्यात परत कधीही मंत्रोच्चार केला नाही. एके दिवशी तो मरण पावला. मृताच्या आत्म्याला यमदूतांनी यमासमोर उभे केले. चित्रगुप्ताने त्याचे खाते उघडले. चित्रगुप्त यमराजाला म्हणाला, ''याने आयुष्यात एकदाच जबरदस्तीने पंचाक्षरमंत्राचा उच्चार केला होता. याचे फळ कोणते ते मला माहीत नाही. याला कोणती गती द्यायची ते आपणच ठरवा.''

यमराजाला निर्णय घेता येईना. म्हणून त्याला घेऊन ते सगळे ब्रह्मदेवाकडे गेले. एकदा केलेल्या मंत्रोच्चाराचे फळ कोणते, हे ब्रह्मदेवालाही सांगता येईना. त्यानंतर सगळे भगवान विष्णूकडे गेले. त्यांना सर्व हकीकत सांगितली. विष्णू म्हणाले, 'कर्म करा पण फलाची अपेक्षा बाळगू नका, असा मी आतापर्यंत उपदेश करीत आलो. म्हणून मंत्रोच्चाराचे फळ काय हे मला सांगता येणार नाही. आपण सगळे भगवान शंकराकडे जाऊन त्यांना विचारू.'

हा प्रकार पाहून जीवात्मा म्हणाला, ''मला येथे सगळेच बुद्धिहीन दिसत आहेत. मंत्रोच्चाराचे फळ काय हेच

कोणाला सांगता येईना. आश्चर्य आहे. मला आता तुमच्या सोबत कोठेही यायचे नाही.''

सर्वांनी त्याची समजूत घातली. तो ऐकेचना. शेवटी त्याला पालखीत बसवले आणि पालखी खांद्यावर घेऊन सगळे शिवलोकात गेले. शंकराने दुरून त्यांना पाहिले. कोणती महत्त्वाची व्यक्ती पालखीमध्ये घालून ब्रह्मा, विष्णू, यम आणताहेत हे त्यांना कळेना. ते स्वत:च धावत पालखीजवळ आले आणि आतल्या जीवाला त्यांनी हृदयाशी धरले. सर्वांना आश्चर्य वाटले. सर्व देव शंकराला म्हणाले, ''महादेवा, आम्ही एक प्रश्न विचारण्यासाठी आपल्याकडे आलो होतो. परंतु आपण काही विचार न करता, आम्हाला काही न विचारता या जीवात्माला हृदयाशी धरले. तुम्ही खरोखरच भोळे शंकर आहात. एकवेळ पंचाक्षरमंत्र उच्चारण्याचे फळ काय आहे हे आम्ही विचारणार होतो.''

शंकर हसून म्हणाले, ''मी भोळा आहे, पण तुम्ही खुळे आहात. एकवेळ पंचाक्षरमंत्राचा जप केल्याचे फळच तुमच्या खांद्यावरून माझ्यापर्यंत आले आहे. एकवेळ मंत्रजप केल्यामुळे तुम्हा सर्व देवांच्या खांद्यावर बसून हा जीवात्मा शिवलोकात आला आहे, हेच एकवेळ पंचाक्षरमंत्रजपाचे फळ आहे. आता हा शिवलोकातच राहील.''

जबरदस्तीने एकवेळ पंचाक्षरमंत्र उच्चारला तर त्याचे एवढे फळ मिळते. म्हणून हा मंत्रजप निरंतर केला पाहिजे, असे आचार्य सांगतात.

वाचिक, उपांशू आणि मानसिक असे जपाचे तीन प्रकार आहेत. मंत्रजप दुसऱ्या व्यक्तीला ऐकू येण्याइतका मोठ्याने होत असेल तर तो वाचिक जप होय. स्वत:ला ऐकू येण्यासारखा, ओठातल्या ओठात होत असेल तर तो उपांशू जप. मंत्रजप मनातल्या मनात होत असेल तर तो मानसिक जप होय. तुमच्याकडून मानसिक जप झाला पाहिजे. वाचिक जपाचे फल एकपट, उपांशू जपाचे फल शतपट तर मानसिक जपाचे फल सहस्रपट आहे. म्हणून वीरशैव साधकाने वाचिक जप करता करता उपांशू जप करण्याचा अभ्यास केला पाहिजे आणि उपांशू जप करता करता मानसिक जपाचा अभ्यास केला पाहिजे. साधकाकडून सदोदित मानसिक जप सहजपणे होत राहिला पाहिजे.

एकदा गुरुमहाराजांनी आपल्या शिष्याच्या कानात पंचाक्षर महामंत्राचा उपदेश करून सांगितले, ''हा मंत्र अत्यंत गोपनीय आहे. मी हा कोणाला संगितला नाही, तूही कोणाला सांगू नकोस. मनातल्या मनात याचा जप कर. याचा मोठ्याने उच्चार करू नकोस.''

शिष्य आपल्या गावाकडे जाण्यास निघाला. गावाबाहेर आल्यावर एका नदीवर काही धोबी धुणे धूत बसले होते. ते मोठमोठ्याने पंचाक्षरमंत्राचा जप करीत होते. शिष्याला आश्चर्य वाटले. गुरुमहाराजांनी तर सांगितले होते की, हा मंत्र मी कोणालाही सांगितला नाही. हा मंत्र मोठ्याने उच्चारू नकोस. इथे तर बरीच माणसे मोठमोठ्याने तोच मंत्र म्हणत होती. तो पुढे निघाला तेव्हा एका शेतात एक शेतकऱ्याचे कुटुंब तोच मंत्र मोठ्याने म्हणत होते.

तो परत फिरला. गुरूकडे जाऊन म्हणाला, ''महाराज, नदीवर आणि शेतात काही माणसे तुम्ही मला दिलेला मंत्रच मोठमोठ्याने उच्चारत होती. मग तुम्ही मलाच काय म्हणून मनातल्या मनात जप करायला सांगितले?''

गुरू म्हणाले, ''तुला आता शब्दाने सांगून काही कळणार नाही. एक काम कर. मी तुला एक रत्न देतो. ते घेऊन बाजारात जा. भाजीबाजारात जाऊन एका भाजीवालीला हे रत्न दाखवून त्याची किंमत विचार. त्यानंतर किराणा दुकानदाराला, कापड दुकानदाराला, सराफाला आणि शेवटी रत्नपारख्याला हे रत्न दाखवून याची किंमत

विचार. रत्न कोणालाही विकायचे नाही. फक्त त्यांच्याकडून किंमती ऐकून त्या मला येऊन सांग.''

गुरूच्या आज्ञेप्रमाणे शिष्य भाजीबाजारात गेला. एका भाजीवालीला ते रत्न दाखवून तो म्हणाला, ''बाई, ही वस्तू मला विकायची आहे. तुम्ही किती किंमतीला ही घेणार?''

भाजीवाली म्हणाली, ''ही वस्तू फारच चमकदार आहे. मी घेईन. पण माझ्याकडे पैसे वगैरे काही नाहीत. हिच्या बदल्यात मी तुला एक किलो वांगी देईन.''

''ठीक आहे, मी उद्या येईन,'' असे म्हणून तो कापड दुकानदाराकडे गेला. त्याला वरीलप्रमाणे विचारले, तेव्हा त्याने अडीच मीटर कापड देऊन रत्न घेण्याची तयारी दर्शवली. त्यानंतर शिष्य किराणा दुकानात गेला. त्याला रत्नाची किंमत विचारली. तो म्हणाला, ''याच्या बदल्यात मी तुला एक किलो चहापूड आणि एक किलो साखर देईन.''

शिष्य सराफाकडे गेला. सराफाला रत्नाची थोडीफार पारख होती. शिष्य साधाभोळा आहे असे ओळखून त्याने 'एक हजार रुपये देईन' असे सांगितले. शेवटी शिष्य रत्नपारख्याकडे गेला. त्याला किंमत विचारल्यावर त्याने रत्नाचे पूर्ण परीक्षण केले आणि शिष्याला म्हणाला, ''हे रत्न मी विकत घेईन आणि त्याची किंमत म्हणून तुला एक लक्ष रुपये देईन.''

एकाच वस्तूच्या एवढ्या वेगवेगळ्या किंमती ऐकून शिष्य आश्चर्यचकित झाला. गुरूकडे परत आला आणि भाजीवाली, कापड दुकानदार, किराणा दुकानदार, सराफ आणि रत्नपारखी यांनी सांगितलेल्या किंमती त्यांना सांगितल्या. तेव्हा गुरू म्हणाले, ''पाहिलेस? वस्तू एकच आहे, परंतु तिचे मोल सर्वांनाच समजते असे नाही. एक लक्ष रुपये किंमतीचे रत्न भाजीवालीला एक किलो वांग्याएवढे, कापडवाल्याला अडीच मीटर कापडाएवढे, दुकानदाराला एक किलो साखरेच्या किंमतीचे आणि सराफाला हजार रुपयांचे वाटले. खरे मोल कळले ते रत्नपारख्याला. त्याप्रमाणे मी तुला उपदेशिलेला मंत्र हे अमोल रत्न आहे. लोक कोठेही, कधीही आणि कसाही त्याचा वापर करतात. तू मात्र त्याचे खरे मोल ओळखून त्याचा मनातल्या मनात जप कर.''

म्हणून गुरूने दिलेल्या मंत्राचा जप केवळ मनातल्या मनात केला पाहिजे. मोठ्याने जप करून, परिसरातील शांतता बिघडवून मंत्रजप केला तर तो फलदायी होत नाही. कबीरांनी म्हटले आहे:-

**काँकर पाथर जोरिकै मसजिद लै चुनाय।**
**ता चढि मुल्ला बाँग दे क्या बहरा हुवा खुदाय।।**

दगडावर दगड रचून, उंच मशीद बांधून, तिच्यावर चढून मुल्ला मोठ्याने बांग देतो. ईश्वराला हाक मारतो. ईश्वर बहिरा आहे काय? असा प्रश्न कबीरांनी विचारला आहे. ईश्वर बहिरा नाही आणि ओरडून त्याला हाक मारावी एवढा दूरदेखील नाही. तो तर आपल्या अतिशय जवळ, हृदयातच बसलेला आहे. जवळ बसलेल्या माणसाला जर मोठ्याने हाक मारली तर तो दचकतो. तसे तुम्ही ईश्वराच्या नावाने ओरडायला लागलात तर तोदेखील दचकतो. याविषयी एक मार्मिक कथा सांगितली जाते.

आयुष्यभर ज्याने मोठमोठ्याने देवाच्या नावाचा जप केला असा एक मनुष्य मरण पावला. मृत्यूनंतर त्याच्या जीवात्म्याला ईश्वरासमोर नेण्यात आले. ज्याने कधीही ईश्वराचे नाव घेतले नव्हते असा दुसरा एक माणूसदेखील मरून तेथे आला होता. तो पहिल्याचा शेजारी होता. दोघांच्या पापपुण्यांचा पाढा वाचला गेला. ईश्वराने निर्णय

दिला, ''पहिल्याला नरकात घाला आणि दुसऱ्याला स्वर्गात पाठवा.''

पहिला जीवात्मा कळवळला. म्हणाला, ''देवा, मी आयुष्यभर तुझ्या नावाचा जप केला. मोठ्याने केला. लाऊडस्पीकरवरून तुझे नाव घेऊन लोकांना सतत ऐकवले आणि हा समोरचा माझा शेजारी कधी देवळात गेला नाही, त्याने कधी तुझे नाव घेतले नाही. तरी त्याला स्वर्ग अन् मला नरक? तुझ्या राज्यात अंधारच दिसतो मला. माझ्यावर फार अन्याय होतोय.''

ईश्वर हसून म्हणाला, ''भल्या माणसा, म्हणूनच तर तुला नरकात पाठवत आहे. अरे, तू कधी मला सुखाने झोपू दिले नाहीस. सारखे नाव घेऊन गोंधळ घातलास. या बिचाऱ्याने तेवढे तरी केले नाही, म्हणून तर त्याला स्वर्गात पाठवत आहे.''

मंत्रजप हे प्रदर्शन नाही. ते हृदयातल्या ईश्वराला केलेले आवाहन आहे. म्हणून मंत्रजप मानसिक असला पाहिजे. मानसिक जप करणाऱ्या साधकाला पातकांचा स्पर्श होत नाही, म्हणून हा जप श्रेष्ठ मानला जातो.

अगर्भ, सगर्भ आणि सध्यान असे जपाचे आणखी तीन प्रकार मानले जातात. प्राणायाम न करता केला जाणारा जप 'अगर्भ जप' असून, प्राणायामासह केला जाणारा जप हा 'सगर्भ जप' होय. मंत्रजप करताना शिवध्यान केले जाते तेव्हा त्याला 'सध्यान जप' असे म्हणतात. वाचिक, उपांशू आणि मानसिक या प्रकारांत मानसिक जप श्रेष्ठ आहे, तर अगर्भ, सगर्भ आणि सध्यान या जपांत सध्यान जप श्रेष्ठ आहे. सध्यान मानसिक जप तुम्ही केला पाहिजे. हा जप शीघ्र, अधिकाधिक फलदायक आहे.

सगर्भ जप करताना चाळीस वेळा किंवा पाच वेळा किंवा कमीत कमी तीन वेळा प्राणायाम केला पाहिजे. मंत्रजप करताना गुरूकडून मंत्राचे ऋषी, छंद, देवता, बीज, शक्ती आणि कीलक यांचे ज्ञान करून घेणे आवश्यक अहे. पंचाक्षरमंत्राचे ऋषी वामदेव, छंद पंक्ती, देवता सदाशिव, बीज ॐकार, शक्ती उमा आणि कीलक शिव आहे. या सर्वांना आपल्या विभिन्न अवयवांत आवाहन करून प्रतिष्ठित करावे लागते. यालाच 'न्यास' म्हणतात. न्यास आणि जपविधान गुरूकडून समजून घेतले पाहिजे.

जप कोठे करावा? तर घर, देवघर, गोशाला, पवित्र वन, रम्य पर्वतशिखर, नदीकाठ किंवा देवालय यांपैकी एखाद्या ठिकाणी करावा. जप करताना आपले मुख पूर्वेकडे किंवा उत्तरकडे असले पाहिजे. सूर्य, अग्नी, गुरू, चंद्र, दीप, विप्र किंवा गाय यांच्या साक्षीने जप केला पाहिजे. कृष्णमृगाजिन, व्याघ्रचर्म, कुशासन, कंबलासन यांपैकी एखाद्या आसनावर बसून जप केला पाहिजे.

जपगणना करताना अंगुलीरेखा, कमलबीज, शंखमणी, पोवळे, स्फटिक, मोती, सुवर्णमणी, दर्भमाला अथवा रुद्राक्षमाला यांपैकी एका मालेचा उपयोग करावा. उजव्या हातात रुद्राक्षमाळ घेऊन, डाव्या तळहातावर इष्टलिंग ठेवून त्याच्या साक्षीने केला जाणारा जप अत्यंत फलदायक आहे.

वाचिक जपाकडून मानसिक जपाकडे आणि तेथून सध्यान मानसिक जपाकडे आपली वाटचाल झाली पाहिजे. अशाप्रकारे पंचाक्षरमंत्राचा जप करून तुम्ही आपले जीवन कृतार्थ करून घ्यावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

६ ऑगस्ट १९९०

## भक्तमार्गक्रियास्थल– १

जिज्ञासू सद्भक्तांनो,

पंचाक्षरजपस्थलाचा विचार आपण काल केला आहे. आज त्यापुढील 'भक्तमार्गक्रियास्थल' या उपस्थलाचा विचार करायचा आहे. या स्थलात भक्ताचे लक्षण कोणते आहे आणि त्याच्याकडून कशी भक्ती केली जाते, याचे सुरेख चित्रण केलेले आहे. शिवभक्त कसा असतो, तो कसा दिसतो, याविषयी आचार्य सांगतात:—

**भूतिरुद्राक्षसंयुक्तो लिंगधारी सदाशिवः।**
**पंचाक्षरजपोद्योगी शिवभक्त इति स्मृतः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.१)

शिवभक्त कसा असतो? तर त्याच्या भालप्रदेशावर ठसठशीत त्रिपुंड्र असतो. गळ्यात रुद्राक्षांची माळ असते. हृदयावर इष्टलिंग रुळत असते. पंचाक्षर मंत्रजपात तो लीन असतो. अंतर्बाह्य निर्मल असलेला असा हा शिवभक्त असतो. त्याची भक्ती ही नवविध भक्ती असते. या भक्तीविषयी आचार्य सांगतात:—

**श्रवणं कीर्तनं शंभोः स्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्।।**
**एवं नवविधा भक्तिः प्रोक्ता देवेन शंभुना।**
**दुर्लभा पापिनां लोके सुलभा पुण्यकर्मणाम्।।९.२–३।।**

भक्तीचे नऊ प्रकार आहेत. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन. शिवभक्त या नवविध भक्तीचे आचरण करीत असतो. जे पुण्यात्मे असतात त्यांना ही भक्ती सहजपणे आचरता येते. पापात्म्यांना मात्र तिचे आचरण कठीण वाटते. यामध्ये पहिली भक्ती श्रवणभक्ती आहे. श्रवण म्हणजे ऐकणे. उपनिषदात म्हटले आहे:–

**आत्मा वा अरे दृष्टव्यः श्रोतव्यः मंतव्यः निदिध्यासितव्यः।**

आत्मलाभ करून घ्यायचा असेल तर आत्म्याविषयी प्रथम श्रवण केले पाहिजे. शिवाचे नाम, त्याचे रूप, त्याचे गुण, त्याचा प्रभाव, त्याची लीला, त्याचे रहस्य हे प्रवचन–कीर्तनांतून समजून घ्यावे लागते. श्रद्धेने श्रवण करणे हीच श्रवणभक्ती होय. संत आणि सद्गुरूंच्या मुखातून शिवकथा श्रवण केली तर मनुष्याचे अंतःकरण शुद्ध होते. सांसारिक कथा ऐकल्याने मनुष्य विषयासक्त होतो, तर शिवकथा ऐकल्याने तो विषयमुक्त होतो. विषयांच्या आसक्तीत जीवात्म्याने असंख्य जन्म वाया घालवलेले असतात. ज्याला नाव नसते अशा बालकाला बारशाच्या दिवशी एक नाव ठेवले जाते. त्यानंतर त्या नावाचा अभिमान तो जीव आयुष्यभर वाहतो. तो डोळ्यांनी संसार पाहतो, कानांनी संसारकथा ऐकतो. अशा प्रकारे पंचेंद्रियांनी संसाराचा आणि संसारसुखाचा अनुभव घेता घेता आपल्या मूळ रूपाला म्हणजे आत्मस्वरूपाला पूर्णतः विसरून जातो. मनावरचा सांसारिक संस्कार घालवण्यासाठी खूप प्रयत्न करावे लागतात. संतांचा सहवास आणि आत्म्याच्या गोष्टी पुनःपुन्हा ऐकून त्या समजून घेतल्यावर हळूहळू जुने संस्कार पुसट होऊ लागतात. मग संसारसुखाचा प्रेयमार्ग सोडून तो आत्मसुखाच्या श्रेयमार्गाकडे

वाटचाल करू लागतो. श्रवणभक्ती अनेक ऋषिमुनींनी आणि प्रसिद्ध अवतारपुरुषांनी केलेली आहे. ज. रेणुकाचार्यांकडून महर्षी अगस्त्यांनी, ज. दारुकाचार्यांकडून महर्षी दधचींनी, ज. घंटाकर्णांकडून महर्षी व्यासांनी, ज. धेनुकर्णांकडून महर्षी सानंदांनी, ज. विश्वकर्णांकडून महर्षी दुर्वासांनी, श्रीकृष्णाकडून अर्जुनाने, शुकदेवाकडून परीक्षिताने, सनत्कुमाराकडून महर्षी नारदांनी आत्मतत्त्वाविषयी श्रवण करून आपल्या मनातले संदेह दूर करून घेतले आहेत. म्हणून श्रवण ही पहिली भक्ती आहे.

कीर्तनभक्ती ही नवविध भक्तीतील दुसरी भक्ती आहे. कीर्तन म्हणजे ईश्वराचे गुणगान करणे. वाद्य वाजवून, नृत्य करून, गाणे गाऊन शिवचरित्र आळवणे म्हणजे कीर्तनभक्ती होय. कीर्तनभक्तीमुळे दुराचारी मनुष्य सदाचारी होतो. गीतेत श्रीकृष्णांनी सांगितले आहे:-

अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।
साधुरेव स मंतव्यः सम्यग् व्यवसितो हि सः॥९.३०॥

भगवंताचे भजन-कीर्तन करून दुरात्मादेखील साधुपदवी प्राप्त करून घेतो. प्रेमपूर्वक शिवकीर्तन करणे यासारखे श्रेष्ठ कार्य दुसरे नाही. कीर्तन करता करता कीर्तन करणारा मुक्त होतो आणि कीर्तन ऐकणाऱ्यांनाही मुक्तिलाभ होतो. कीर्तनामुळे घोर पातकांतून जीवात्म्याची सुटका होते. कलियुगात यज्ञ, दान, तप यांसारख्या व्रतांचे आचरण करणे सर्वसामान्यांना शक्य होत नाही. म्हणून कलियुगात नामसंकीर्तनाला अत्यधिक महत्त्व दिलेले आहे.

स्मरणभक्ती ही तिसरी भक्ती आहे. स्मरण म्हणजे ध्यान. शिवाचे नाम, रूप आणि गुण यांचे श्रवण-कीर्तनातून ज्ञान झाल्यावर, शिवाच्या रूपाचे चिंतन करणे म्हणजे स्मरणभक्ती होय. शिवाच्या सगुण-साकार रूपाचे ध्यान करता करता हळूहळू शिवाच्या निर्गुण-निराकार रूपाचे ध्यान होऊ लागते. लोभी माणूस धनाचे, कामी माणूस कामिनीचे जसे उत्कट चिंतन करीत असतो, तसेच शिवाचे चिंतन भक्त करीत असतो. यालाच स्मरणभक्ती म्हणतात.

पादसेवन हा भक्तीचा चौथा प्रकार आहे. सद्गुरूचे चरणसंवाहन करणे, त्यांच्या चरणांची पूजा करणे आणि त्यांचे पादोदक प्राशन करणे हीच पादसेवन भक्ती आहे. या भक्तीमुळे मनुष्याच्या ठिकाणी असलेला अहंकार हळूहळू क्षीण होतो. पादपूजा, पादोदकाचे सेवन, पादधुलीचे मस्तकावर धारण, हे या भक्तीचे प्रकार आहेत. जे पाय सन्मार्गावरून चालत असतात ते पाय पूजनीय असतात. अशा पायांची सेवा करणे म्हणजे पादसेवनभक्ती.

अर्चनभक्ती ही पाचवी भक्ती आहे. आपल्या इष्टदेवाची अनेक उपचारांनी पूजा करणे म्हणजे अर्चनभक्ती होय. वीरशैवसिद्धान्तात बाह्य मूर्तिपूजेला महत्त्व नसून इष्टलिंगपूजेला अधिक महत्त्व आहे. पंचोपचार, अष्टोपचार, षोडशोपचार, राजोपचार असे पूजेच्या उपचारांचे प्रकार होत. परंतु पत्र, पुष्प, फल अथवा तोय या सहजलभ्य उपचारांनी अर्चन केले तरी चालते. मात्र ते मनःपूर्वक असावे. पूजेत उपचारापेक्षा भावनेला प्राधान्य आहे. प्रपंचातील कोणतीच वस्तू जीवाच्या मालकीची नाही, तर ती शिवाच्या मालकीची आहे. भक्त शिवाचीच वस्तू शिवाला अर्पण करीत असतो. म्हणजे तो स्वतःजवळचे काही देत नसतो. म्हणून त्या वस्तूंसोबत आपली भक्तिभावना अर्पण केली पाहिजे. असे केले तरच ती खरी अर्चनभक्ती होते. विदुराच्या पत्नीने भक्तिभावनेने कृष्णाला केळीची साल खायला दिली, शबरीने उष्टी बोरे रामाला अर्पण केली, या कथा सर्वश्रुत आहेत. देवाला आपण काय अर्पण करतो, ते कोणत्या भावनेने अर्पण करतो, याला महत्त्व आहे.

सहावी भक्ती म्हणजे वंदनभक्ती. वंदन म्हणजे नमस्कार. इष्टदेवतेला आणि श्रीगुरूला साष्टांग नमस्कार करणे

याला वंदनभक्ती म्हणतात. वंदनभक्ती करणाऱ्याला दशाश्वमेध-यज्ञाचे फळ मिळते. एकांग, त्र्यंग, पंचांग, साष्टांग आणि प्रदक्षिणा असे वंदनाचे प्रकार आहेत. यामध्ये साष्टांग नमस्कार श्रेष्ठ असून त्याच्यामुळे अहंभाव नष्ट होतो. दास्य ही सातवी भक्ती आहे. गुरू आणि ईश्वर यांचे आपण दास आहोत या भावनेने वर्तन करणे हीच दास्यभक्ती होय. दास्यभक्तीत चार प्रकारे सेवा घडते. आप्तसेवा, अंगसेवा, स्थानसेवा आणि सद्भावसेवा. वीरशैवांच्या पंचाचारातील भृत्याचार हा दास्यभक्तीचाच प्रकार आहे. दास्यभावनेमुळे सांसारिक मोहापासून जीवात्म्याची सुटका होते. लक्ष्मण, हनुमान, अंगद ही रामायणातील दास्यभक्तीची उदाहरणे होत. माता-पिता गुरू आणि ईश्वर यांची दास्यभक्ती केल्याने जीवात्मा परिशुद्ध होतो.

सख्यभक्ती ही आठवी भक्ती आहे. इष्टदेवाला आणि गुरूला आपला सखा मानून भक्ती करणे, ही सख्यभक्ती होय. मनातल्या गोष्टी सांगण्यासाठी प्रत्येकाला एखादा जिवलग मित्र हवा असतो. मित्र हा अत्यंत निःस्वार्थी असावा लागतो. संसारात सगळे स्वार्थी असल्यामुळे सख्यत्वासाठी निःस्वार्थी व्यक्ती मिळणे कठीण आहे. म्हणून भक्ताने गुरूला आणि शिवाला आपला परमसखा मानले पाहिजे. 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया' या मुंडकोपनिषदातील वचनात जीवाचा परमसखा शिव आहे, हे स्पष्ट केले आहे. बिभीषण, सुग्रीव, उद्धव, अर्जुन, सुदामा ही सख्यभक्तीची उदाहरणे प्रसिद्ध आहेत.

आत्मनिवेदन ही नववी भक्ती आहे. आपले तन-मन-धन श्रद्धापूर्वक गुरूला आणि ईश्वराला अर्पण करणे म्हणजे आत्मनिवेदन होय. लाभ-हानी, जय-पराजय, यश-अपयश, मान-अपमान, सुख-दुःख यांच्याविषयी आग्रह न करता जे पदरी पडेल ते शिवप्रसाद आहे असे मानून शिवभक्त प्रसन्न राहतो. आपण केवळ निमित्तमात्र असून कर्ता-करविता शिव आहे, या समर्पणभावनेने शिवाला शरण जाणे, याला आत्मनिवेदन म्हणतात. गोकुळातील गोपी आणि राजा बली ही या भक्तीची उदाहरणे होत. आपले सर्वस्व शिवाला अर्पून स्वतःचे वेगळेपण जो राखत नाही तो आत्मनिवेदक भक्त होय.

वीरशैवसिद्धान्तात भक्तीचे सहा प्रकार सांगितले आहेत. श्रद्धाभक्ती, निष्ठाभक्ती, अवधानभक्ती, अनुभवभक्ती, आनंदभक्ती आणि समरसभक्ती. नवविध भक्तींचा अंतर्भाव या षड्विध भक्तीत होतो. ज. रेणुकाचार्यांनी सांगितलेल्या भक्तिमार्गावर श्रद्धेने वाटचाल करणे हेच भक्तमार्गक्रियास्थल होय.

ज्याच्या अंगी उत्कट शिवभक्ती असते तो खरा शिवभक्त. मग तो ब्राह्मण असो वा शूद्र. भक्ती ही बाह्यभक्ती आणि अंतरंगभक्ती अशी दोन प्रकारची असते. शिवलिंगाची बाह्य उपचाराने पूजा करणे ही बाह्यभक्ती आहे, तर आपल्या हृदयात प्राणलिंगाची मानसपूजा आणि भावलिंगाचे ध्यान करणे, ही अंतरंगभक्ती आहे. बीजापासून अंकुर आणि अंकुरापासून बीज उत्पन्न होते, त्याप्रमाणे शिवप्रसादामुळे मनुष्याच्या अंतःकरणात भक्ती उत्पन्न होते आणि भक्ती केल्यामुळे शिवप्रसादाची प्राप्ती होते.

**प्रसाददेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसंभवः।**
**यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरः॥९.११॥**

सांगा (पूर्ण) भक्ती आणि न्यूना (अपूर्ण) भक्ती, असे भक्तीचे दोन भेद आहेत. नवविध भक्ती ज्यावेळी मनात आणि देहात पूर्णपणे सक्रिय राहते तेव्हा तिला 'सांगा' म्हणजे पूर्ण भक्ती म्हणतात. तिच्यात न्यूनता असेल तर ती 'न्यूना' म्हणजे अपूर्ण भक्ती होय. सांगा भक्ती मानसिक, वाचिक आणि कायिक अशी तीन प्रकारची असते. शिवस्वरूपाचे चिंतन करणे ही मानसिक भक्ती, वाणीने शिवमंत्राचा जप करणे ही वाचिक भक्ती

आणि शरीर झिजवून लिंगपूजा करणे ही कायिक भक्ती आहे. शिवचिंतनात रममाण झालेले मन हेच खरे मन. शिवनामात तल्लीन होणारी वाणी हीच खरी वाणी. भस्म-रुद्राक्षांनी अंकित झालेला, शिवपूजेत तत्पर असलेला देह हाच खरा देह. मन, वाणी आणि शरीर या साधनांद्वारे जी भक्ती केली जाते तिचे आणखी तीन प्रकार मानले आहेत. बाह्य भक्ती, आभ्यंतर भक्ती आणि बाह्याभ्यंतर भक्ती. आपण केलेली लिंगपूजा ही दुसऱ्याने पाहिली तर ती बाह्य भक्ती होय. आपली पूजा इतर कोणालाही न कळता झाली तर ती आभ्यंतर भक्ती आहे. जर आपले मन इष्टलिंगात आणि हृदयकमलातील अंतर्लिंगात आळीपाळीने रत होत असेल तर ती बाह्याभ्यंतर भक्ती होय. अशा प्रकारे भक्तीचे नवविध भक्ती, षड्‌विध भक्ती, त्रिविध भक्ती आणि द्विविध भक्ती असे जे प्रकार आहेत त्यांचा आपण विचार केला. यापुढील विषयांची चर्चा आपण उद्या करणार आहोत, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर
७ ऑगस्ट १९९०

---

## आशीर्वचन चोविसावे

## भक्तमार्गक्रियास्थल- २

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

आचार्यांनी शिवपूजा करण्याचे पाच प्रकार सांगितलेले आहेत. त्यांना 'शिवपंचयज्ञ' असे म्हणतात.

**पंचधा कथ्यते सद्भिस्तदेव भजनं पुनः।**
**तपः कर्म जपो ध्यानं ज्ञानं चेत्यनुपूर्वकम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ३.२२)

तप, कर्म, जप, ध्यान आणि ज्ञान हे शिवपंचयज्ञ होत. तप हा पहिला यज्ञ आहे. महास्वामीजी तपोनुष्ठान करतात हे तुम्ही पाहता. तप करणे हे महास्वामीजींचे कर्तव्य आहे, आपले नव्हे असे तुम्ही समजता, गुरूने तप करावे आणि तुम्ही त्यांच्या पाया पडून त्यांच्या तपाचे फळ मागावे अशीच तुमची आंतरिक इच्छा असते. असे नसून प्रत्येकाने तप केले पाहिजे. तप म्हणजे महिनाभर एके ठिकाणी बसून राहणे नव्हे. तुम्ही आता सत्संगात बसला आहात. तासभर मांडी घालून बसणे अवघड वाटते. पाय लांबवावा, हातांची हालचाल करावी, दोन्ही पाय लांबवून, दोन्ही हात पाठीमागे टेकवून शरीराला आराम द्यावा असे तुम्हाला वाटते. परंतु लोक काय म्हणतील, महास्वामीजींना काय वाटेल या विचाराने तुमही तसे करीत नाही. होणारेकष्ट निमूटपणे सहन करता. यालाच 'तप' म्हणतात. शिवपूजेसाठी बेलाची पाने आणणे, पूजा करताना मांडी घालून बसणे इत्यादी शारीरिक कष्ट आनंदाने सहन करणे म्हणजेच तप होय. तप म्हणजे सहनशीलता होय. कर्म हा दुसरा यज्ञ होय. धर्मशास्त्राने सांगितलेल्या कर्मांचे निष्ठेने आचरण करणे म्हणजे कर्मयज्ञ होय. इष्टलिंगपूजा हे वीरशैवांचे नित्यकर्म असून ते आयुष्यभर आचरावे लागते. उपवास इत्यादी नैमित्तिक व्रते करणे हे नैमित्तिक कर्म होय. आपल्या इच्छापूर्तीसाठी

मनुष्य जी शास्त्रोक्त कर्मे करतो ती काम्य कर्मे होत. या कर्मांचे निष्ठेने आचरण करणे म्हणजे कर्मयज्ञ होय. जप हा तिसरा यज्ञ आहे. मंत्राची पुनःपुन्हा आवृत्ती करणे म्हणजे जप होय. जप हा एक अभ्यास आहे. शिशुवर्गातील मुलाला पाटीवर एक अक्षर पुन्हा पुन्हा गिरवायला सांगतात. अक्षर गिरवल्यामुळे त्याचे अक्षरज्ञान पक्के होते. अक्षरे एकमेकांपासून वेगळी ओळखता आली नाहीत तर 'काला अक्षर भैंस बराबर' अशी आपली स्थिती होते. म्हशीच्या कळपातल्या सगळ्या म्हशी एकसारख्या दिसतात, त्यांच्यातील वेगळेपण ओळखू येत नाही. त्याप्रमाणे निरक्षर माणसाला अक्षरांतील भिन्नत्व ओळखता येत नाही. अक्षर पुनःपुन्हा गिरवले तर मात्र ते पक्के लक्षात राहते. तसा मंत्र पुनःपुन्हा जपला तर त्याचा विसर कधीच पडत नाही. निद्रेमध्ये पडत नाही, स्वप्नामध्ये पडत नाही. अंतकाळी मेंदू बधिर झाल्यावरही पडत नाही. यासाठीच तर मंत्रजप करावा लागतो. म्हणून जप हा एक यज्ञ आहे. गीतेत 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि' – यज्ञांत मी जपयज्ञ आहे– असे श्रीकृष्णांनी म्हटले आहे. इतर यज्ञांत अनेक गोष्टी, अनेक उपचार लागतात. जपयज्ञ हा असा यज्ञ आहे की तो करताना आपल्याला दुसऱ्या कोण्या व्यक्तीची वा वस्तूची गरज नसते.

ध्यान हा चौथा यज्ञ आहे. पूजा करताना, जप करताना आपले मन पूजेत किंवा जपात असेलच असे नाही. ते दूर कोठेतरी भटकत असते. मन पुढे पुढे धावत असते आणि शरीर त्याच्या मागे मागे जात असते. मन लहान मुलासारखे असते. लहान मूल आजोबा–आजीला त्यांचा हात धरून सत्संगात आणून बसवते आणि ते गोळ्या-चॉकलेट खायला बाहेर जाते. सत्संग संपल्यावर मूल पुन्हा येते आणि आजोबा–आजीला घरी घेऊन जाते. मन तुम्हाला इथे आणून बसवते खरे, पण ते बाहेर भटकायला जाते. तुमचे शरीर फक्त इथे बसलेले असते. मन बाहेर हुंदडत फिरते. पूजा–जप करताना जर मन असे बाहेर भटकू लागले तर त्या पूजेला आणि जपाला काय अर्थ आहे? पूजेत आणि जपात मन एकाग्र राहावे म्हणून ध्यानयज्ञ आचार्यांनी सांगितला आहे. ज्याची आपण पूजा करतो आणि ज्याच्या मंत्राचा आपण जप करतो त्या भगवत्तत्त्वाचे हृदयात सतत चिंतन करणे याला ध्यानयज्ञ म्हणतात. किमान एक तास मनात कोणताही सांसारिक विचार न आणता आपण ध्यान करू शकलो तर ते खरे ध्यान होय. पाच मिनिटे, दहा मिनीटे ध्यान करणे हा ध्यान करण्याचा अभ्यास आहे, सराव आहे. एका आसनावर बसून, मनातले विचार बाजूला सारून तासभर हृदयातील अंतर्लिंगाचे चिंतन करणे साधले तर त्याला ध्यानयज्ञ म्हटले पाहिजे.

ज्ञानयज्ञ हा पाचवा यज्ञ आहे. ज्या शिवाचे आपण ध्यान करतो त्या शिवाच्या स्वरूपाचे ज्ञान करून घेतले पाहिजे. अन्यथा ध्यान कसे करणार? तो सगुण आहे की निर्गुण? की सगुण–निर्गुण दोन्ही आहे? किंवा त्या दोन्हीच्या पलीकडचा आहे? त्याचे स्वरूप नेमके कसे आहे याचे ज्ञान करून घेणे आवश्यक आहे. त्यासाठी वेद आणि आगमांचे अध्ययन करावे लागते. हे ग्रंथ संस्कृत भाषेत आहेत. परंतु अनेक संतकवींनी आपापल्या लोकभाषांत त्यांचे सारसर्वस्व शब्दबद्ध केले आहे. तेही आपल्या अनुभूतीच्या मुशीत तावूनसुलाखून. कोणी मराठीत, कोणी कन्नडमध्ये, कोणी तेलुगूत, कोणी हिंदीत तर कोणी गुजराथीत. त्यांच्या ग्रंथांचे अध्ययन केले तरी आपल्याला भगवंताच्या स्वरूपाचे ज्ञान प्राप्त होते. ज्ञान हे अत्यंत पवित्र मानले जाते. 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते।' – ज्ञानाएवढे पवित्र जगात दुसरे काही नाही – असे गीतेत म्हटले आहे. शिवपूजा करता करता, शिवध्यान करता करता जीवात्मा शिवरूप होतो. त्यावेळी तो 'शिवोऽहम् शिवोऽहम्' असे म्हणतो. अशा स्थितीलाच ज्ञान म्हटले जाते.

अशा प्रकारे आचार्यांनी तपयज्ञ, कर्मयज्ञ, जपयज्ञ, ध्यानयज्ञ आणि ज्ञानयज्ञ असे शिवपंचयज्ञ सांगितले आहेत. जो हे यज्ञ करतो तोच शिवभक्त होय. केवळ श्रावणमासात, शिवरात्रीला किंवा सोमवारीच तप केले पाहिजे असे नाही. तुमच्यासाठी सगळे वार सोमवार आहेत, सगळ्या रात्री शिवरात्री आहेत आणि सगळे मास श्रावणमास आहेत. म्हणून तुमचा शिवपंचयज्ञ निरंतर चालत राहिला पाहिजे.

यदा दीक्षाप्रवेशः स्याल्लिंगधारणपूर्वकः।
तदाप्रभृति भक्तोऽसौ पूजयेत् स्वागमस्थितान्।।
स्वमार्गाचारनिरताः सजातीया द्विजास्तु ये।
तेषां गृहेषु भुंजीत नेतरेषां कदाचन।।९.२८-२९।।

शिवभक्ताने व्यवहारात कसे वर्तन करावे, हे आचार्यांनी स्पष्ट केले आहे. गुरूकडून दीक्षापूर्वक लिंगधारण करून घेतलेल्या भक्ताने शिवभक्तांचा आदरसत्कार केला पाहिजे. त्यांच्या सहवासात राहिले पाहिजे. ज्यांच्या मांसपिडाचा मंत्रपिंड झाला आहे. अशा वीरशैवाचारनिष्ठ भक्ताच्या अथवा माहेश्वराच्या घरीच भोजन घेतले पाहिजे. जे शिवाचारनिष्ठ नाहीत त्यांच्या घरी भोजन करू नये अथवा त्यांच्या सहवासात राहू नये.

स्वमार्गाचारविमुखैर्भविभिः प्राकृतात्मभिः।
प्रेषितं सकलं द्रव्यमात्मलीनमपि त्यजेत्।।
नार्चयेदन्यदेवांस्तु न स्मरेन्न च कीर्तयेत्।
न तन्निवेद्यमश्नीयाच्छिवभक्तो दृढव्रतः।।
यद्गृहेष्वन्यदेवोऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत्।
नान्यदेवार्चकान् मर्त्यान् पूजाकाले निरीक्षयेत्।।३.३०-३२।।

या आधी कोणाच्या सहवासात राहावे आणि कोणाच्या घरी भोजन करावे, हे स्पष्ट केले आहे. या ठिकाणी कोणाचा सहवास करू नये हे आचार्य सांगत आहेत. आपल्या गावी असो वा परगावी असो, दुसऱ्याच्या घरी जेवण करण्याचा प्रसंग आला तर ते घर शिवाचारसंपन्न आहे की नाही याची खात्री करून घेतली पाहिजे. खात्री झाली तरच त्यांच्या घरी अन्नसेवन करावे. शिवभक्त नसलेल्याच्या धनाचा स्वीकार करू नये. शिवभक्ताने आपले आराध्य सोडून अन्य कोणत्याही देवेतीच पूजा अथवा स्तुती करू नये. अन्य देवतेचे ध्यान करू नये. दुसऱ्या देवांना अर्पण केलेला प्रसाद घेऊ नये. एवढेच नव्हे, तर ज्यांच्या घरी अन्य देवतेचे पूजन होत असते त्यांच्या घरी जाऊ नये आणि त्यांचे तोडंही पाहू नये, असा आचार्यांनी आदेश दिला आहे. याचे एकच कारण आहे की आपली एकनिष्ठा दृढ झाली पाहिजे. परमात्मतत्त्व एकच आहे, हे खरे असले तरी ज्या रूपात आपण त्याचे अर्चन करतो तेच रूप सदैव ह्रदयाशी धरले पाहिजे. एकाच ठिकाणी शंभर फूटविहीर खोदली तर तिला पाणी लागेल. शंभर ठिकाणी एकेक फूट विहीर खोदली तर ती काय उपयोगाची? श्रम तेवढेच होतात, पण फळ मात्र मिळत नाही. म्हणून इष्टदेवतेच्या रूपातच परमात्मतत्त्वाचे पूजन केले पाहिजे, ध्यान केले पाहिजे. याच कारणासाठी मन्मथस्वामींनी आपल्या अभंगात म्हटले आहेः-

शिवभक्ताचे कुळी जन्मूनि करंटा। न भजे चोरटा शंकरासी।
छपवूनि लिंगा घाली तुळशीमाळ। जन्मता चांडाळ मातेगर्भी।।

ज्याने शिवभक्तांच्या कुळात जन्म घेतला त्याने शंकराचीच भक्ती केली पाहिजे. आपले इष्टलिंग लपवून

तुळशीची माळ गळ्यात घालता कामा नये. परमात्मतत्त्वाची अन्य रूपे कनिष्ठ आहेत असे नव्हे. परंतु इष्टदेवता सोडून अन्य देवतेचे पूजन केल्यास एकनिष्ठेला बाधा येऊन साधकाला सिद्धी प्राप्त होत नाही.

वीरशैवाने इष्टलिंगाशिवाय इतर कोणत्याही स्थावरलिंगाचे निर्माल्य अथवा नैवेद्य स्वीकारू नये. शिवमंदिरावर कोणी आक्रमण केले तर आपल्या प्राणाची पर्वा न करता मंदिराचे संरक्षण केले पाहिजे. आपल्या आराध्यदेवतेची निंदा कानाने ऐकू नये. असे शास्त्र सांगते. कारण त्यामुळे भक्ताची बुद्धी विचलित होऊ शकते. अशा वेळी काय करावे याविषयी हे आचार्य सांगतात:-

**शिवनिंदाकरं दृष्ट्वा घातयेद् अथवा शपेत्।**
**स्थानं वा तत्परित्यज्य गच्छेद् यद्यक्षमो भवेत्॥९.३६॥**

आपल्या इष्टदेवतेची, गुरूची, धर्माची कधीही निंदा करू नये. कोणी निंदा करीत असेल तर त्याला मारून, हाकलून द्यावे. मारण्याची शक्ती नसेल तर त्याचा शब्दांनी निषेध करावा. तेही शक्य नसेल तर ते स्थान सोडून दूर निघून जावे. परंतु कोठल्याही परिस्थितीत आराध्यदेवतेची निंदा कानांनी ऐकू नये. ज्या घरात शिवनिंदा होत असेल त्या घरात जाऊ नये.

निंदा हे अत्यंत निषिद्ध असे कर्म आहे. सामान्य माणसांची निंदा केली तरी मोठा दोष लागतो आणि त्याचा परिणाम म्हणून कोणते तरी दुःख भोगावे लागते. मग विश्वनिर्माता आणि विश्वसंहारक अशा शिवाची निंदा केली तर त्याचा परिणाम काय होईल याची कल्पनाच केलेली बरी. ज्याची निंदा केली जाते त्याची कोणतीही हानी होत नाही, उलट तो दोषमुक्त होतो. परंतु जो निंदा करतो तो मात्र पापाचा भागीदार होतो. कबीरांनी म्हटले आहे,

**'निंदक निअरे राखीये आंगणकुटी छबाय।'**

निंदकाला आपल्या अंगणात घर बांधून दिले पाहिजे, असे कबीर म्हणतात. साबणाशिवाय आणि पाण्याशिवाय निंदक आपल्या जिभेने आपले दोष धुवून काढतो. परंतु शिवभक्ताने शिवनिंदकाजवळ जाऊ नये, राहू नये. कारण त्यामुळे त्याची एकनिष्ठा भंगण्याची शक्यता असते.

शिवदीक्षा घेतलेल्या भक्ताने आपले पूर्वकर्म सोडले पाहिजे. त्याने पूर्वकर्म सोडले नाही तर त्याला आरूढपतित असे म्हणतात. इष्टलिंगाधारकाने अन्य सामान्य पूजाकर्म करू नये. त्याने नेहमी शिवाची स्तुती करावी. नरस्तुती कधीही करू नये. शिवभक्ताने चर्मपात्रात तेल किंवा पाणी कधीही घेऊ नये. कारण चर्मपात्र हे प्राणिहिंसा करून तयार केले जाते.

अशा प्रकारे शिवभक्ताचे व्यवहारात वर्तन कसे असावे हे आचार्यांनी स्पष्ट करून सांगितले आहे. भक्तमार्गक्रियास्थलातील यापुढील विषयाचा विचार आपण उद्या करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीतआहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

८ ऑगस्ट १९९०

## भक्तमार्गक्रियास्थल- ३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

गेल्या दोन दिवसांपासून अंग-षट्स्थलांतर्गत भक्तस्थलातील भक्तामार्गक्रियास्थल या उपस्थलाचा आपण विचार करीत आहोत. शिवभक्ताने शिवाचारनिष्ठ लोकांचाच सहवास करावा, त्यांच्या घरीच भोजन करावे, जो शिवाचारसंपन्न नाही त्याच्यासोबत राहू नये, त्याच्या घरचे अन्नपाणी घेऊ नये, त्याचे तोंडदेखील पाहू नये, शिवाची निंदा कधी ऐकू नये, असा आदेश ज. रेणुकाचार्यांनी वीरशैवांना दिला आहे. यापुढे पंचसूतकांचा विचार करायचा आहे. सूतकांविषयी वीरशैवांची भूमिका काय आहे हे आचार्य सांगतात:-

न तस्य सूतकं किंचित्प्राणलिंगांगसंगिनः।
जन्मनोत्थं मृतोत्थं च विद्यते परमार्थतः।।
लिंगार्चनरतायाश्च ऋतौ नार्या न सूतकम्।
तथा प्रसूतिकायाश्च सूचकं नैव विद्यते।।
गृहे यस्मिन् प्रसूता स्त्री सूतकं नात्र विद्यते।
शिवपादांबुसंस्पर्शात् सर्वपापं प्रणश्यति।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.४३-४५)

प्राणलिंगोपासना करणाऱ्या शिवभक्ताला लिंगपूजा करताना सूतकांची बाधा होत नाही. जननसूतक, मरणसूतक, रजःसूतक, उच्छिष्टसूतक आणि जातिसूतक अशी पचंसूतके शास्त्रकारांनी मानली आहेत. सामान्य लोक ही पाच सूतके पाळतात. वीरशैवसिद्धान्तात स्त्री आणि पुरुष यांना समान अधिकार दिलेला आहे. लिंगपूजा हे नित्यकर्म असल्याने त्याचा त्याग करता येत नाही. मग घरात जन्म झालेला असो किंवा मृत्यू झालेला असो. सूतक-काळात गुरू किंवा जंगम यांचे पादोदक प्रोक्षण करून शुद्ध व्हावे लागते. त्यानंतर लिंगपूजादी कर्मे करावी लागतात. पादोदकाने सर्वदोष नाहीसे हातोत. ऋतुकाळात स्त्री रजःसूतक पाळते. जननसूतक दहा दिवस, मरणसूतक बारा दिवस आणि रजःसूतक चार दिवस सामान्यतः पाळले जाते. या काळात घरातली माणसे अस्पर्श असतात. ऋतुकालात ती स्त्री अस्पर्श असते. या काळात त्यांना कोणत्याही प्रकारचा पूजापाठ करता येत नाही. वीरशैवांना लिंगपूजेचा त्याग करता येत नाही, कारण ते त्यांचे नित्यकर्म आहे. म्हणून अशौच प्राप्त झाले तरी गुरू-जंगमाचे पादोदक घेऊन, शुद्ध होऊन लिंगपूजा करावी लागते. सूतक पाळणारे वैदिक ब्राह्मणसुद्धा काही विशिष्ट पूजाविधीमध्ये सूतकांचा निषेध करतात, हे भाष्यकार श्रीपती पंडिताराध्यांनी दाखवून दिले आहे.:-

स्वेष्टलिंगैकपूजायां नैवाशौचं विधीयते।
पौंडरीके रजः स्त्रीणां स्वाग्निहोत्रे यथा तथा।।
अकरस्पर्शयोग्यपि यथा जिव्हा महेश्वरी।
मंत्रोच्चारणमात्रस्य पूता भवति भूतले।।

तथा सूतकिनः शैवाः पूजामात्रसुनिर्मलाः।
नान्यस्पर्शानुकूलाः स्युरिती वेदानुशासनम्।।

(ब्रह्मसूत्र : श्रीकरभाष्य, १.१.१)

आहिताग्नी ब्राह्मण नित्य अग्निहोत्र करीत असतात. पौंडरीक इत्यादी दीर्घकाल चालणाऱ्या यज्ञविधीत गृहस्थाला सपत्नीक सहभागी व्हावे लागते. अशा वेळी पत्नीला रजःसूतक प्राप्त झाल्यावर सचैल स्नान करून ओलेत्याने होमहवनात सहभागी होण्याचा अधिकार आहे. अग्निहोत्र हे नित्यकर्म असल्यामुळे त्यासाठी सुतक पाळू नये, असे शास्त्र सांगते. वीरशैव स्त्रियांना केवळ लिंगपूजेसाठी सूतकातून मुक्त केले आहे. अन्य व्यवहारात त्यांनी सूतक पाळले पाहिजे, असे एक मत आहे. पूजेसाठी सूतक नाही, परंतु अन्य व्यवहारासाठी सूतक पाळावे, यामध्ये विरोधाभास आहे असे कोणाला वाटेल. याचे उत्तर श्रीपती पंडितांनी वरील श्लोकात दिले आहे. आपली जीभ हाताने स्पर्श करण्यास अयोग्य असली तरी मंत्रोच्चार करण्यासाठी सदैव योग्य असते. त्याप्रमाणे वीरशैव स्त्री अन्य व्यवहारात सुतकी असली तरी लिंगपूजेसाठी ती सुतकी नसते. जननसूतकात देखील तिने लिंगपूजा केली पाहिजे.

प्राणिहिंसा करू नये, मांसभक्षण करू नये, कोणाचे उष्टे खाऊ नये: असे सामान्य आदेश वेदांनी दिले आहेत. तरी काही यज्ञांमध्ये पशुबळी द्यावा, सोमयागामध्ये उच्छिष्ट सोमरस प्यावा, असे विशेष आदेश वेदांनी दिले आहेत. विशेष आदेशापुढे सामान्य आदेश अमान्य केला पाहिजे. याचप्रमाणे वीरशैवसिद्धान्ताने सूतकात इष्टलिंगपूजा करावी असा विशेष आदेश दिला आहे. पावसाळ्यात नदीत स्नान करणे निषिद्ध मानले आहे. कारण पुराच्या पाण्यात मलिनपणा असतो. परंतु गंगानदी सर्वकाळ शुद्ध मानली आहे. कारण ती शिवाच्या जटेतून उत्पन्न झाल्यामुळे पवित्र ठरली आहे. त्याप्रमाणे वीरशैव स्त्री इष्टलिंगधारी असल्यामुळे ती सदैव पवित्र असते. 'लिंगधारणचंद्रिका' या ग्रंथात नंदिकेश्वर शिवाचार्यांनी वीरशैव स्त्री सदैव परिशुद्ध असल्यामुळे तिला कोणतेही अशौच नाही, म्हणून स्वयंपाकादी व्यवहारात देखील तिने सूतक पाळू नये, असे मत व्यक्त केले आहे. सूर्य, अग्नी, वायू हे जसे नेहमी शुद्ध असतात त्याप्रमाणे वीरशैव स्त्री सदैव परिशुद्ध असते, असे नंदिकेश्वर शिवाचार्यांचे मत आहे.

लिंगपुजेसाठी वीरशैवांनी मरणसूतक पाळू नये. घरात कोणी लिंगैक्य झाला तर त्याच्या पार्थिव शरीराला स्नान घालून, त्याच्या इष्टलिंगाची पूजा करून, ते लिंग त्याच्या गळ्यात बांधून समाधिक्रिया केली जाते. त्यानंतर घर स्वच्छ धुवून, घरात कुलगुरूंची इष्टलिंगपूजा आणि त्यांची पादपूजा करून गुरुपादोदकाचे सेवन केले जाते. वीरशैवसिद्धान्तात उच्छिष्टसूतकाचा निषेध केला आहे. दुसऱ्याचे उष्टे खाऊ नये अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. तरीसुद्धा वीरशैवांनी गुरू आणि जंगमाचे पादोदक व प्रसाद सेवन करताना उच्छिष्टसूतक पाळू नये, अशी आचार्यांची आज्ञा आहे. वीरशैवांची पूजापद्धती गुरू-शिष्य यांच्या सामरस्याचे प्रतीक असल्यामुले तेथे उच्छिष्टदोष मानला जात नाही. लौकिक जीवनात विवाहानंतर पति-पत्नीला एका ताटात जेवू घालतात. त्यावेळी उच्छिष्टदोष मानला जात नाही. वैदिक संप्रदायात विशिष्ट यज्ञविधीत हवनानंतर उरलेला सोमरस एकाच पात्रातून सर्वजण प्राशन करतात. तो यज्ञप्रसाद असल्यामुळे तेथे उच्छिष्टसूतक पाळले जात नाही. त्याप्रमाणे पादोदक व प्रसाद यांच्या सेवनात वीरशैवांनी उच्छिष्टसूतक पाळू नये, असा शास्त्रादेश आहे.

जातिसूतक हे पाचवे सूतक आहे. उच्च जातीचे लोक कनिष्ठ जातीच्या लोकांसोबत रोटीबेटी व्यवहार करीत

नाहीत. हिंदुसमाजात जातिभेदव्यवस्था दृढमूल आहे. वीरशैवाचार्यांनी मात्र शिवदीक्षासंपन्न भक्तांमध्ये जातिभेद मानू नये असा आदेश दिला आहे. कोणत्याही जातीचा मनुष्य लिंगदीक्षा घेऊ शकतो. त्याने एकदा लिंगदीक्षा घेतली की त्याची मूळची जात शिल्लक राहत नाही. सर्व प्रकारची लाकडे अग्नीत जाळल्यानंतर ती केवळ अग्निरूप होतात, त्यांचे मूळचे वेगळेपण उरत नाही. लाकूड चंदनाचे असेल किंवा बाभळीचे, ते अग्नीत जाळल्यावर अग्निरूप होते. त्याप्रमाणे कोणत्याही जातीचा मनुष्य असला तरी लिंगदीक्षा घेतल्यावर तो वीरशैव होतो. अशा माणसाशी वीरशैव कुटुंबाने तुसडेपणाने न वागता त्याच्याशी सर्व संबंध जोडले पाहिजे. लिंगदीक्षा जातीच्या आधारावर दिली जात नसून योग्यतेच्या आधारे दिली जाते. म्हणून वीरशैवांनी लिंगदीक्षावंत माणसाशी बरोबरीचा व्यवहार केला पाहिजे. अशा प्रकारे वीरशैवसिद्धान्तात पंचसूतकांचा निषेध केलेला आहे. वीरशैवांनी तीर्थयात्रा करावी की करू नये यासंबंधी आचार्य पूढे सांगतात:-

शिवस्थानानि तीर्थानि विशिष्टानि शिवार्चकः।<br>
शिवयात्रोत्सवं नित्यं सेवेत परया मुदा।।<br>
शिवक्षेत्रोत्सवमहायात्रादर्शनकांक्षिणाम्।<br>
मार्गेऽन्नपानदानं च कुर्यान्माहेश्वरो जनः।।<br>
नान्नतोयसमं दानं न चाहिंसापरं तपः।<br>
तस्मान्माहेश्वरो नित्यमन्नतोयप्रदो भवेत्।।९.४६-४८।।

वीरशैवांनी शिवक्षेत्र असलेल्या काशी, केदार, श्रीशैल, रामेश्वर आदी तीर्थक्षेत्राला अत्यंत श्रद्धेने गेले पाहिजे. त्यांनी शिवस्थाने पाहावीत. तीर्थे करावीत आणि शिवयात्रेचा महोत्सव आवडीने करावा. जे लोक तीर्थयात्रा करतात त्यांना अन्नोदकाचे दान करावे, त्यांचा आदरसत्कार करावा. अन्नोदकाच्या दानासारखे दुसरे श्रेष्ठ दान नाही, अहिंसेसारखे श्रेष्ठ तप नाही. म्हणून शिवभक्तांनी अन्नदान आणि अहिंसा यांचे निष्ठेने आचरण केले पाहिजे. वीरशैवसिद्धान्तात उपचारपूजा आणि समरसपूजा असे पूजेचे दोन विधी सांगितलेले आहेत. मंदिरातील शिवलिंगाची पूजा करणे ही उपचारपूजा आहे तर इष्टलिंगाची पूजा करणे ही समरसपूजा आहे. ह्या दोन्ही पूजा वीरशैवांनी केल्या पाहिजेत. घरी आलेली सून मुख्यतः आपल्या पतीसाठी आलेली असते. तरी तिला सासू, सासरा, दीर यांची सुद्धा सेवा करावी लागते. ती समरसभावनेने पतीची सेवा करते तर उपचारदृष्टीने इतरांची सेवा करते. त्याप्रमाणे शिवभक्तांनी समरसभावनेने इष्टलिंगाची पूजा करावी आणि उपचारभावनेने मंदिरातील शिवलिंग, ग्रामदैवत, कूलदैवत, तीर्थक्षेत्रातील देवता यांची पूजा करावी. असे केले तर दोष लागत नाही. परंतु इष्टलिंगाची पूजा सोडून जर कोणी स्थावरलिंगाचीच पूजा करत असेल तर तो दोषी समजला जातो. पत्नीने पतीची सेवा सोडून इतरांची सेवा करण्यासारखाच हा प्रकार आहे.

वीरशैवाचार्यांनी तीर्थयात्रा करण्याचा आदेश देण्यामागे आणखी एक कारण आहे. तीर्थयात्रा केवळ देवदर्शनासाठी केली जात नाही. तीर्थक्षेत्रात इष्टलिंगपूजा केल्याने पूजेचे अधिक फळ मिळते. घरात इष्टलिंगपूजा करून जे फळ मिळते त्यापेक्षा अधिक फळ मठमंदिरात, नदीच्या काठी, पर्वतशिखरावर, तीर्थक्षेत्री आणि गुरूच्या सान्निध्यात इष्टलिंगपूजा केल्यावर मिळते. तीर्थक्षेत्री गेल्यावर प्रथम इष्टलिंगपूजा करून नंतर क्षेत्रदेवतेची पूजा आणि इतर धार्मिक विधी केले पाहिजेत. यासाठीच वीरशैवाचार्य श्रावणमास, अधिकमास, माघमास, धनुर्मास आदी पर्वकाळांत तीर्थक्षेत्रात महिनाभर राहून अनुष्ठाने करीत असतात. महाशिवरात्रीच्या पर्वकाळी काशीच्या जंगमवाडी

मठात सामूहिक इष्टलिंगपूजा करण्यासाठी हजारो शिवभक्त भारतातील विभिन्न प्रांतांतून दरवर्षी येत असतात.

**स्वमार्गाचारवर्तिभ्य: स्वजातिभ्य: सदाव्रती।**

**दद्यात तेभ्य: समादद्यात् कन्यां कुलसमुद्भवाम्।।**

**एवमाचारसंयुक्तो वीरशैवो महाव्रती।**

**पूजयेत परया भक्त्या गुरुं लिंग च संततम्।।९.४९-५०।।**

आपली कन्या दुसऱ्या घरी देताना आणि दुसऱ्यांची कन्या आपल्या घरी आणताना शिवभक्ताने काय पाहावे, हे येथे आचार्यांनी सांगितले आहे. जे कूळ आपल्यासारखे शिवाचारसंपन्न आहे. अशाच घरी आपली कन्या दिली पाहिजे. आणि शिवाचारसंपन्न घरातली लेकच आपल्या घरी सून म्हणून स्वीकारली पाहिजे. दोन्ही कुळे सदाचारसंपन्न असली तर पुढे होणारी संततीदेखील सदाचारसंपन्न होते. आज समाजात कूलशील पाहिले जात नाही तर हुंड्याची रक्कम किती मोठी आहे हेच पाहिले जाते. धनाच्या बळावर झालेला विवाहसंबंध फार काळ टिकत नाही, असे पूर्वसूरींनी सांगून ठेवले आहे. धनामुळे केवढा अनर्थ होत आहे हे हुंडाबळी स्त्रियांच्या संख्येवरून लक्षात येते. वीरशैवात जुन्या काळी आपल्याच पोटजातीमधली मुलगी करण्याची पद्धत होती. वाणी. तेली, माळी, गवळी, कोष्टी, पंचम अशा अनेक पोटशाखा वीरशैव समाजात आहेत. त्या व्यवसायावर आधारलेल्या आहेत. तेल्याची मुलगी तेल्याच्या घरात दिली तर ती तेलाच्या व्यवसायात उपयोगाची ठरते. म्हणून तेल्याने तेल्याची, माळ्याने माळ्याची, वाण्याने वाण्याची मुलगी करण्याची पद्धत होती. परंतु आता तेली, माळी, गवळी, वाणी ही नावे केवळ आडनावापुरती उरली आहेत. म्हणून वीरशैवांनी पोटशाखेचा विचार न करता शिवाचारसंपन्न घरात आपली मुलगी द्यायला हरकत नाही. त्यामुळे कोणताही अनर्थ होणार नाही. जंगम समाजातील लोकांनीही गुण आणि शीलाचा विचार करून विवाह जुळवले पाहिजेत. अशा प्रकारे वीरशैव भक्तांनी कसे वर्तन करावे हे ज. रेणुकाचार्यांनी भक्तमार्गक्रियास्थल या स्थलात स्पष्ट केले आहे. त्याप्रमाणे सर्व शिवभक्तांनी आचरण करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन आणि भक्तमार्गक्रियास्थलावरील निरूपण समाप्त करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

९ ऑगस्ट १९९०



## उभयस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालपर्यंत आपण भक्तमार्गक्रियास्थल या भक्तस्थलाच्या उपस्थलाचा विचार केला आहे. आज उभयस्थल या उपस्थलाचा विचार करायचा आहे. वीरशैवसिद्धान्तानुसार गुरूची पूजा ही शिवाचीच पूजा आहे. तत्त्वत: शिव आणि गुरू यांच्यात भेद नाही. रूपे दोन असली तरी ते एकच तत्त्व आहे. ज. रेणुकाचार्य त्यांच्यातील एकत्त्वाबद्दल सांगतात:-

> **गुरोरभ्यर्चनेनापि साक्षादभ्यर्चित: शिव:।**
> **तयोर्नास्ति भिदा किंचिदेकत्वात् तत्त्वरूपत:।।५१।।**
> **यथा देवे जगन्नाथे सर्वानुग्रहकारके।**
> **तथा गुरुवरे कुर्यादुपचारान् दिने दिने।।५२।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी. ९.५१-५२)

शिवभक्ताने शिवाएवढी श्रद्धा गुरूवर देखील ठेवली पाहिजे. गुरूची पूजा केली असता साक्षात् शिवाचीही पूजा घडते. गुरुपूजनात शिवपूजन अंतर्भूत असते. शिव आणि गुरू यांच्यात परमार्थत: अभेद आहे. म्हणून सर्व जगावर आपल्या कृपेचा वर्षाव करणाऱ्या परशिवाची जशी आपण पूजा करतो तशीच गुरूची पूजा केली पाहिजे. शिव आणि गुरू यांच्यात जर अभेद असेल तर शिव जसा अव्यक्त आहे तसाच श्रीगुरू देखील अव्यक्त आहे काय? याविषयी जगद्गुरू सांगतात:-

> **अप्रत्यक्षो महादेव: सर्वेषामात्ममायया।**
> **प्रत्यक्षो गुरुरूपेण वर्तते भक्तिसिद्धये।।**
> **शिवज्ञानं महाघोरसंसारार्णवतारकम्।**
> **ध्रियते येन स गुरु: कस्य वंद्यो न जायते।।९.५३-५४।।**

शिव अव्यक्त आहे. तो मायाशक्तीने युक्त असल्यामुळे आपल्याला दिसत नाही. अप्रत्यक्ष असा शिवच गुरूरूपाने प्रकट झाला आहे. म्हणून गुरू हा प्रत्यक्ष शिवच आहे. पातळ तूप थिजले तर त्याचे रूप बदललेले दिसते, परंतु ते तूपच असते. कापूर आकारयुक्त दिसत असला तरी तो मुळात सुगंधच आहे. निराकार असा सुगंध कापराच्या रूपाने जसा साकार होतो, तसा अव्यक्त शिव गुरूच्या रूपाने व्यक्त झाला आहे. संतशिरोमणी मन्मथस्वामी आपल्या 'परमरहस्य' या ग्रंथात म्हणतात:-

> **कापूर आकार दिसे रवा। परि तो परिमळचि आघवा।**
> **तसा लिंगरूपे जाणावा। गुरूचि आकारला।।**

शिव परब्रह्म आहे, परंतु त्याच्याशी भेटणे, बोलणे घडत नाही. त्या निराकाराची पूजा करता येत नाही. संकटकाळात तो आपले सांत्वन करीत नाही. गुरू मात्र आपल्याला भेटतो. आपल्याशी बोलतो. त्याची पूजा करता येते, संकटकाळात तो आपले समाधान करतो. म्हणून शिवापेक्षाही गुरू अधिक आहे. गुरू हा परब्रह्मरूप

आहे याचा विसर भक्ताला पडू नये. मन्मथस्वामी म्हणतातः-

**गुरू माणूस न भाविजे विश्वासे। तयासी स्वये ज्ञान प्रकाशे।**

**मग आपणही होय गुरुरूप सरिसे। गुरुध्याने।।**

गुरूला सामान्य मनुष्य समजू नये. कारण तो स्वयंप्रकाश असे परब्रह्म असतो. गुरूचे ध्यान करता करता शिष्यही गुरुरूप होऊन राहतो. गुरू आपल्या सांसारिक इच्छा पूर्ण करीत नाहीत. परंतु भयानक अशा संसारसागरातून तरून जाणारे ज्ञान तो आपल्याला देतो. जन्म-मृत्यूच्या पीडेपासून मुक्त करतो. ज्याच्या केवळ कृपाकटाक्षाने परशिवाने ज्ञान होते असा गुरू जगात अत्यंत पूज्य मानला जातो. 'साक्षात् भर्गो नराकृतिः' असे वेदवचन असून गुरू हा नररूपातील शिवच होय असा त्याचा अर्थ आहे. म्हणून शिवज्ञानाचा सागर असलेल्या गुरूची देह, वाणी आणि मन अशा त्रिकरणांनी सेवा करावी.

**यत्कटाक्षकलामात्रात् परमानंदलक्षणम्।**

**लभ्यते शिवरूपत्वं स गुरुः केन नार्चितः।।**

**हितमेव चरेन्नित्यं शरीरेण धनेन च।**

**आचार्यस्योपशान्तस्य शिवज्ञानमहानिधेः।।**

**गुरोराज्ञां न लंघेत सिद्धिकामी महामतिः।**

**तदाज्ञालंघनेनापि शिवाज्ञाच्छेदको भवेत्।।९.५५-५७।।**

श्रीगुरूच्या मनाला संतोष होईल असेच शिष्याचे वर्तन असले पाहिजे. तनाने आणि मनाने झिजून त्याची सेवा केली पाहिजे. त्याच्या आज्ञेचे उल्लंघन कधीही करू नये. गुरूच्या आज्ञेचे उल्लंघन म्हणजे प्रत्यक्ष शिवाच्या आज्ञेचे उल्लंघन होय. एक शिष्य गुरूकडे अध्ययनासाठी गेला. तो मुलखाचा आळशी होता. एके दिवशी गुरूने त्याला पाणी भरण्याची आज्ञा केली. तेव्हा हात जोडून तो नम्रतेने म्हणाला, ''गुरुदेव, आपल्या आज्ञेचे उल्लंघन मी केले नसते. परंतु मला पाण्यापासून भय आहे असे एका ज्योतिषाने सांगितले आहे. म्हणून मी पाणी भरू शकत नाही.'' हे ऐकून गुरूने स्वतः निमूटपणे पाणी भरले. एकदा गुरूने त्याला बेलपाने तोडण्यास सांगितले. तेव्हा शिष्य नम्रतेने म्हणाला, ''गुरुदेव, मला पाण्यापासून जेवढे भय आहे तेवढेच झाडापासून देखील आहे. असे ज्योतिषाने सांगितले आहे. तेव्हा बेलपाने तोडणे मला शक्य होणार नाही.'' गुरूने स्वतःच बेलपाने तोडली. असे प्रत्येक वेळी गुरूने काही काम सांगावे आणि शिष्याने काहीतरी सबब सांगून ते टाळावे.

एकदा गावातून एक भक्त आला आणि गुरूला म्हणाला, ''आमच्या घरी आज आपल्या एखाद्या शिष्याला भोजनासाठी पाठवा.'' शिष्याने हे ऐकले. त्याच्या मनात चलबिचल झाली. गुरूने विचार केला की हा आळशी शिष्य आपले कोणतेच काम ऐकत नाही. मग हे काम याला कशाला सांगावे? दुसऱ्या शिष्याला पाठवण्याचा गुरू विचार करीत होते तेवढ्यात आळशी शिष्य म्हणाला, ''गुरुदेव, आपण भोजनाला जाण्याची आज्ञा मला करावी. मी कदापि तिचे उल्लंघन करणार नाही. भोजनापासून मला भय नाही, असे ज्योतिषाने सांगितले आहे.''

शिष्य कसा नसावा याचे हे उदाहरण आहे. आपल्याला अनुकूल आज्ञा पाळणे आणि प्रतिकूल आज्ञा टाळणे याला गुरूची आज्ञा पाळणे असे म्हणत नाहीत. गुरू सांगतील ते काम निःसंदेहबुद्धीने करणे याला गुर्वाज्ञेचे पालन म्हणतात.

उभयस्थल याचा अर्थ काय? उभय म्हणजे दोन. शिव आणि गुरू या दोघांवर समान निष्ठा ठेवणे हेच उभयस्थल होय. शिव हा गुरू असला तरी शिवापेक्षाही गुरुरूप श्रेष्ठ आहे. असे आचार्य सांगतात. स्वाती नक्षत्रातला पाऊसथेंब शिंपल्यात पडला तर त्याचा मोती होतो आणि इतरत्र पडलेला पाऊस वाहून जातो. त्याप्रमाणे गुरूचा उपदेश शिष्यरूपी शिंपल्याने स्वीकारला तर तेथे शिवज्ञानरूपी मोती तयार होतो. ईश्वराच्या उपासनेने ऐश्वर्यप्राप्ती होते, परंतु गुरूच्या उपासनेने मोक्षप्राप्ती होते. शिवाची अवकृपा झाली तर श्रीगुरूच्या अनुग्रहाने तिचे निराकरण होते. शिव भक्ताला प्रत्यक्ष भेटत नाही. परंतु गुरू मात्र प्रत्यक्ष भेटतो, त्याच्याशी बोलतो, त्याचे शंकासमाधानही करतो, गुरूला माता-पिता असे म्हणतात. जन्मदाते माता-पिता पुत्राला सांसारिक मोहात पाडतात, परंतु मातपितृरूप गुरू मात्र त्याची मोहपाशातून सुटका करतो. अग्नीच्या संपर्काने सोने शुद्ध होते त्याप्रमाणे गुरूच्या सान्निध्याने भक्त सर्व दोषांपासून मुक्त होतो.

देवयात्रा, तीर्थयात्रा आणि गुरुयात्रा असे यात्रेचे तीन प्रकार आहेत. त्यांत गुरुयात्रा ही श्रेष्ठ मानली जाते. कारण गुरुयात्रेत विचारांचे आदानप्रदान होते, अज्ञानाचा नाश होतो. आणि शिष्याच्या हृदयात ज्ञानाचा उदय होतो. दुसऱ्या यात्रेत असे घडत नाही. सूर्याचे ऊन पाठीवर घ्यावे आणि अग्नीकडे तोंड करून शेकावे, असे म्हटले जाते. म्हणजे ऊन व अग्नी यांचा स्वीकार बंधने पाळून अंशतः करावा. परंतु श्रीगुरूचे सेवन मात्र सर्वभावाने करावे, असे म्हटले आहे. असा हा श्रीगुरू कसा असतो, हे मन्मथस्वामींनी सांगितले आहे. ते म्हणतात:-

**जेणे कैवल्याचे कैवल्य केले। रंकासी राजेपण दिधले।**
**जीवासी शिवपदी बैसविले। जया गुरुनाथे॥**
**शेखी शिवत्वही नेले। निर्गुणत्व जेणे दिले॥**

कैवल्याचे कैवल्य करणारा, रंकाला राजेपण देणारा, जीवाला शिवपदी बसवणारा आणि शिवत्वभाव संपवून निर्गुणत्व देणारा असा हा गुरू आहे. म्हणून शिष्यासाठी गुरूपरते अन्य दैवत असत नाही. मन्मथस्वामींनी आपल्या अभंगात म्हटले आहे, 'सार सकळ तीर्थांचे। वंद्य पाऊल गुरूचे॥' म्हणून प्रत्येक वीरशैवाने शिव आणि गुरू हे एकच आहेत हे समजून घेऊन त्यांची समान भावाने अर्चना करावी, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

१० ऑगस्ट १९९०

# त्रिविधसंपत्तिस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल शिव आणि गुरू हे दोन दिसत असले तरी ते एकरूप आहेत, एकच आहेत हे आपण पाहिले. आज गुरू, लिंग आणि जंगम हे तीन कसे एकरूप आहेत. याचा विचार करायचा आहे. गुरू, लिंग आणि जंगम वीरशैवांची ही तीन आराध्ये आहेत. तिघे वेगळे असताना त्यांना एक कसे मानायचे, असा प्रश्न तुम्हाला पडेल. यासाठी ज. रेणुकाचार्य स्पष्टीकरण करतात:-

**यथा गुरौ यथा लिंगे भक्तिमान परिवर्तते।**
**जंगमे च तथा नित्यं भक्तिं कुर्याद् विचक्षण:।।**
**एक एव शिव: साक्षात् सर्वानुग्रहकारक:।**
**गुरुजंगमलिंगात्मा वर्तते भुक्तिमुक्तिद:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.५८-५९)

शिव आणि गुरू यांच्यात अभेद मानून त्यांची जशी भक्ती करावी तशीच जंगमाचीही भक्ती केली पाहिजे. गुरू, लिंग आणि जंगम ही तीनही रूपे एकाच शिवतत्त्वाची आहेत. गुरू होऊन तोच आपल्याला दीक्षा देतो, लिंग होऊन तोच आपले आराध्य बनतो आणि जंगम होऊन तोच आपल्याला ज्ञानोपदेश करतो. भुक्ती आणि मुक्ती ह्या दोन इच्छा जीवात्म्याला असतात. पंचेंद्रियांनी संसाराचा, संसारसौख्याचा अनुभव घेणे याला भुक्ती म्हणतात. ती सर्व मनुष्यांच्या ठिकाणी स्वभावत: असते. भुक्ती आणि मुक्ती देण्याचे सामर्थ्य गुरू, लिंग आणि जंगम या तिघांच्या ठिकाणी आहे. ईश्वर भुक्ती देतो तर गुरू-जंगम मुक्ती देतात. गुरू, लिंग, जंगम या तीन रूपांतून एकच शिवतत्त्व प्रकट झाले आहे. ईश्वराने अनेक अवतार घेऊन शस्त्राने दुष्टांचा संहार केला. पण गुरूरूपात त्याने हाती शस्त्र घेतले नाही, तर शास्त्र हाती घेतले. शास्त्र सांगून तो दुष्टांचा नव्हे तर दुष्टबुद्धीचा संहार करतो. जंगमरूपात तो गावोगावी फिरून लोकांना ज्ञानोपदेश करतो. बिल्वदलात तीन पाने असतात. परंतु बिल्वदल एकच असते. त्याप्रमाणे गुरू, लिंग जंगम ही एकाच तत्त्वाची तीन रूपे आहेत.

जंगमाला चरलिंग म्हटले जाते. चरलिंग म्हणजे चालणारे, फिरणारे लिंग. लिंगरूप झालेला जंगम गावोगाव फिरून ज्ञानोपदेश करतो, म्हणून त्याला चरलिंग म्हणतात. सणासुदीच्या दिवशी जंगमाला घरी बोलावून त्याची पादपूजा केली जाते. त्याचे पादोदक घेऊन, त्याला आधी अन्न अर्पण करून मग तो नैवेद्य देवाला दाखवतात. नंतर घरातील सर्व ग्रहण करतात. जंगम हे लिंगाचे मुख आहे. झाडाच्या मुळाला पाणी घातल्यावर ते झाडाच्या अंगांगात शिरते, त्याप्रमाणे जंगमाला भोजन दिल्यावर शिव संतुष्ट होतो.

**शिवयोगिनि संतृप्ते तृप्तो भवति शंकर:।।**
**तत्तृप्त्या तन्मयं विश्वं तृप्तिमेति चराचरम्।।९.९१।।**

प्रसादसेवन करण्याआधी हा मंत्र म्हटला जातो. एक शिवयोगी तृप्त झाला की प्रत्यक्ष शिव तृप्त होतो आणि शिव तृप्त झाल्यावर सर्व चराचर तृप्त होते. म्हणून शुभकार्याच्या आरंभी गुरू आणि जंगम यांना बोलावून त्यांचा

आदरसत्कार केला जातो. त्यामुळे अंगीकृत कार्यात विघ्ने येत नाहीत. शिवयोगी म्हणजे जंगम तृप्त झाला तर तो काय देऊ शकतो याविषयी एक कथा सांगितली जाते.

एका गावात शिवदास नावाची दोन माणसे राहत होती. एक अत्यंत श्रीमंत होता तर दुसरा अतिशय गरीब. श्रीमंत माणसाने अनेक पापकर्मे केली होती. गरीब शिवदासाचा मृत्यू जवळ आला तेव्हा यमदूत भूलोकात आले शिवदास नामक श्रीमंत माणसाचा जीवात्मा यमलोकात घेऊन गेले. माणसाकडून नेहमी चुका होतात. यमदूताकडून कधीच होत नाही. परंतु यावेळी मात्र झाली. आयुष्य संपले होते गरीब शिवदासाचे; परंतु यमदुत घेऊन गेले श्रीमंत शिवदासाला.

यमलोकात गेल्यावर चित्रगुप्ताने त्याचे खाते उघडले तेव्हा त्याच्या लक्षात ही चूक आली. त्याने ती यमधर्माच्या नजरेला आणून दिली. तेव्हा यम म्हणाल, 'हा आता येथे आलेलाच आहे' तेव्हा याला पापकर्माचे फळ किती आणि कसे भोगावे लागते हे दाखवा. याला नरलोकात फिरवून नंतर भूलोकात पाठवा.

त्याप्रमाणे यमदूताने त्याला नरकलोक दाखवला. तेथे असंख्य जीव आपल्या पापकर्मांची फळे भोगत होते. त्याला त्यांच्या यातना पाहवेनात आणि तेथली दुर्गंधी सहन होईना. त्याला नरकलोक दाखवल्यावर यमदुताने भूलोकात पाठवले. त्याने आपल्या मृत शरीरात प्रवेश केला आणि तो पुन्हा जिवंत झाला. मृत शरीर जिवंत झालेले पाहून अंत्यक्रियेला जमलेले लोक 'भूत भूत' असे ओरडत पळत सुटले. परंतु त्याने सत्य सांगितल्यावर सर्वांनी त्याचा स्वीकार केला आणि पूर्वीप्रमाणेच तो आपल्या घरा राहू लागला.

आता हा शिवदास पूर्वीचा शिवदास राहिला नव्हता. यमलोकात जाऊन काही पाहून आणि ऐकून तो आलेला होता. त्यामुळे त्याच्यात आमूलाग्र परिवर्तन झालेले होते.

शिवदासाने पापकर्मांचा समूळ त्याग केला आणि त्याच्या हातून पुण्यकर्मे घडू लागली. त्याने गावात एक मोठे उपवन निर्मिले. त्यात अनेक फळझाडे, फुलझाडे लावली. येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंना, साधुसंतांना स्नान-पूजा करता येईल, विश्रांती घेता येईल अशी व्यवस्था केली. अनेक दाने दिली. त्यानंतर काही वर्षांनी त्याचे आयुष्य संपल्यानंतर यमदूत त्याला यमलोकात घऊन गेले. चित्रगुप्ताने पुन्हा खाते उघडले. सगळा हिशोब करून त्याने यमधर्माला सांगितले, ''महाराज याच्या हातून एवढे पाप घडले आहे की याला अनंतकाळ नरकवासात पाठवावे लागेल. परंतु याने जी थोडीफार पुण्ये केली त्यामुळे तीन दिवसपर्यंत याला शिवलोकात वास्तव्य करता येईल. याला प्रथम कोणीकडे पाठवायचे ते आपण ठरवा.''

यमधर्माने हा निर्णय शिवदासावर सोपवला. शिवदासाने विचार केला की मागे नरकाच्या नुसत्या दर्शनाने आपल्याला भोवळ आली होती. अशा नरकात जर आधी गेलो तर पुन्हा शिवलोकात जाण्याची क्षमता राहणार नाही. म्हणून आधी शिवलोकात गेलेले बरे. त्याने प्रथम शिवलोकात जाण्याचा आपला मनोदय व्यक्त केला. त्याप्रमाणे यमदूत त्याला शिवलोकाच्या दारात सोडून आले.

शिवलोकात शिवदासाचा प्रत्येक क्षण परमानंदात व्यतीत होऊन लागला. त्यावेळी त्याला वाटले की आपण केवळ पुण्यकर्मेच केली असती तर किती उत्तम झाले असते! असे दोन दिवस उलटले आणि तिसरा दिवस उजाडला.

इकडे भूलोकात त्याची मुले त्याने घालून दिलेला पाठ गिरवत होती. साधुसंताचा आदर-सत्कार, दानधर्म

नित्य चालत होता. शिवदासाचा शिवलोकातील तिसरा दिवस होता. त्याच दिवशी इकडे त्याच्या गावात काही शिवयोगी आले. शिवदासाच्या मुलाने त्यांचा आदर-सत्कार केला. आपल्या उपवनात त्यांच्या स्नानाची, पूजेची, निवासाची सोय केली. त्यांच्यापुढे अत्यंत मधुर अशी आम्रफळे ठेवली. त्यामुळे शिवयोगी अत्यंत तृप्त झाले. त्यांनी आशीर्वाद दिला. 'ज्याने हे आम्रवृक्ष लावले त्या माणसाला शिवलोकाचे नित्य वास्तव्य घडो.'

शिवदासाचा शिवलोकातील तिसरा दिवस संपताच यमदूत शिवलोकाच्या दारात हजर झाले. त्यांनी शिवदासाला आपल्या ताब्यात देण्याची शिवदूतांना विनंती केली. त्याप्रमाणे शिवदूताने भगवान शिवाकडे विचारणा केली. तेव्हा शिवाने त्यांना सांगितले, याच्या गाठीशी एवढे पुण्य जमा झालेले आहे की हा आता अनंतकाळ शिवलोकातच राहील. शिवदूतांनी परत जाऊन यमदूतांना निरोप दिला. यमदूत यमलोकात आले आणि त्यांनी यमधर्माला सर्व वृत्तांत कथन केला. तेव्हा यमालाही आश्चर्य वाटले. केवळ तीन दिवस वास्तव्य करण्याएवढेच पुण्य गाठीशी असलेला जीव काहीही न करता शिवलोकात अनंतकाळ राहण्याइतके पुण्य कसे काय संपादन करू शकतो? यमराजाने चित्रगुप्ताला पुन्हा खाते उघडायला सांगितले. चित्रगुप्ताने खाते उघडून पाहिले तेव्हा तो चकितच झाला. शिवदासाच्या खात्यात पुण्याचा रकाना पूर्ण भरलेला होता तर पापाचा रकाना पूर्ण रिकामा झालेला होता!

अनंतकाळ नरकात राहण्याइतके पाप ज्याने गाठीला बांधले होते त्या जीवाला अनंतकाळ शिवलोकात राहण्याइतके पुण्य कोणी दिले? तर संतृप्त शिवयोग्यांनी! शिवयोग्याच्या ठायी एवढे सामर्थ्य असते. एखादा भिक्षुक गृहस्थाच्या दारी उभा राहिला तर त्याच्या झोळीत फार तर मूठभर धान्य पडेल. श्रीमंताच्या दारी गेला तर पायलीभर धान्य त्याच्या झोळीत पडेल. राजाच्या दारी गेला तर राजा एखादे गाव त्याला देईल. परंतु तो जर शिवयोग्याकड गेला तर शिवयोगी त्याला शिवलोक देईल. शिवयोग्याचा साक्षात् शिवाशी संबंध असतो. म्हणून त्याच्या ठायी शिवाचे सामर्थ्य आलेले असते. म्हणून आचार्यांनी सांगितले आहे की गुरूची, लिंगाची आणि जंगमाची समानरूपाने आराधना करा. या स्थलात या तिघांना त्रिविध संपत्ती असे संबोधिले आहे.

गुरू, लिंग आमि जंगम ही वीरशैवांची तीन प्रकारची संपत्ती आहे. अर्थात् ही आध्यात्मिक संपत्ती होय. भौतिक संपत्तीमुळे मनुष्याची तृप्ती होत नाही, परंतु आध्यात्मिक संपत्ती मात्र त्याच्या मनाला पूर्ण तृप्ती, पूर्ण आनंद देते. गुरुपूजेत, लिंगपूजेत आणि जंगमपूजेत मनुष्याला उच्चतर असा आनंद प्राप्त होतो. कारण त्यावेळी त्याच्या मनात सत्त्वगुणाचा प्रकर्ष झालेला असतो. सांसारिक वासनांपासून त्याचे मन मुक्त असते.

जंगम म्हणजे चरलिंग आणि अजंगम म्हणे स्थावरलिंग. स्थावरलिंग हे मातीचे अथवा दगडाचे असते. त्यापेक्षा जंगमलिंग श्रेष्ठ असून ते शिवयोगी या नावाने प्रसिद्ध आहे. शिवयोग्याच्या ठिकाणी सामर्थ्य आणि पावित्र्य असते याचे कारण ते शिवाचेच एक रूप असते. आचार्य सांगतात:-

**अचरे मंत्रसंस्काराल्लिंगे वसति शंकरः।**
**सदाकालं वसत्येव चरलिंगे महेश्वरः॥९.६२॥**

स्थावरलिंगाला जेव्हा मंदिरात प्रतिष्ठित केले जाते तेव्हा त्याच्यावर मंत्रसंस्कार केले जातात. संस्कारामुळे

त्याच्या ठिकाणी देवत्व आणि पावित्र्य उत्पन्न होते. मूर्तिकाराच्या घरी अनेक लिंगे घडवून पडलेली असतात. बऱ्याचदा त्यांच्यावर पाय ठेवून घरातली माणसे वावरत असतात. लिंगाला आकार मिळालेला असतो, परंतु त्याच्या ठिकाणी देवत्व उत्पन्न व्हायचे असते. परंतु जेव्हा ते लिंग मंदिरात संस्कारपूर्वक स्थापले जाते तेव्हा त्याच्यावर मस्तक ठेवतात, पाय लावत नाहीत. स्थावरलिंग पाषाणाचे असते, परंतु चरलिंग सजीव असते. त्याच्या हृदयात शिवाचा निरंतर वास असतो. असा शिवयोगी तृप्त झाला की शिव तृप्त होतो आणि शिव तृप्त झाला तर सारे विश्व तृप्त होते. वीरशैवसिद्धान्तात जेवढे महत्त्व शिवाचे आहे तेवढेच गुरूचे आहे. जेवढे गुरूचे आहे तेवढेच जंगमाचे आहे. जंगमाची भक्ती करणारे अनेक प्रसिद्ध लोक कर्नाटक-महाराष्ट्रात होऊन गेले. महात्मा बसवेश्वर रोज एक लक्ष जंगमांना भोजन घालीत असल्याच्या कथा तुम्ही ऐकल्या असतील. या सिद्धेश्वर मंदिराच्या परिसरात वीरेश्वर शिवशरण यांची समाधी आहे. वीरेश्वर इथेच सोलापूरात राहत असत. ते रोज भिक्षा मागत. प्रत्येक घरातून फक्त मूठभर पीठ ते स्वीकारत असत. जर दोन मुठी पीठ कोणी झोळीत टाकले तर पुढील दोन दिवस ते त्याच्या दारी जात नसत. अशी भिक्षा आणून, स्वयंपाक करून वीरेश्वर आणि त्यांची पत्नी प्रथम जंगमांना भोजन घालत. त्यानंतर जर अन्न उरले तर ते दोघे ग्रहण करीत. घरात अन्न शिल्लक राहणार नाही याची काळजी घेत असत. दुसऱ्य दिवशी भिक्षेनंतरच अन्न घरात दिसे. जंगमप्रेमी असे संत या शतकात देखील आपल्याला आढळतात.

भौतिक संपत्तीची आपण किती काळजी घेतो. ती सुरक्षित आहे की नाही हे नेहमी तपासून पाहतो. पण गुरू, लिंग, जंगम या संपत्तीकडे मात्र आपले अजिबात लक्ष नसते. गळ्यात लिंग आहे की नाही, याची काळजी कोण घेतो? असेल तर ठीक, नसेल तर नसू दे. त्यामुळे काय बिघडते? असे म्हणतो. जी आपली खरी संपत्ती आहे तिला आपण संपत्ती समजत नाही. जी विपत्ती आहे तिलाच संपत्ती मानतो. गुरू लिंग, जंगम या त्रिविध संपत्तीला जो संपत्ती मानतो तो कधीच दरिद्री होणार नाही. भौतिक संपत्ती येईल आणि जाईल, परंतु ही संपत्ती कधीच निघून जाणार नाही.

**शिवयोगिनि यद्दत्तं तदक्षयफलं भवेत्।**
**तस्मात् सर्वप्रयत्नेन तस्मै देयं महात्मने।।**
**यत्फलं लभते जन्तुः पूजया शिवयोगिनः।**
**तदक्षयमिति प्रोक्तं सकलागमपारगैः।।९.६३-६४।।**

वीरशैवाने जंगमांची आराधना केली पाहिजे. गुरू आणि लिंग यांच्याविषयी जेवढा श्रद्धाभाव असेल तेवढाच श्रद्धाभाव जंगमाविषयी ठेवला पाहिजे. जंगमाला तृप्त केले पाहिजे. प्रयत्नपूर्वक त्याला दान द्यावे, त्याचे पूजन करावे. जंगमपूजनाचे शाश्वत फल शिवभक्ताला मिळते.

नावमन्येत कुत्रापि शिवयोगिनमागतम्।

अवमानाद्भवेत्तस्य दुर्गतिश्च न संशयः।।

शिवयोगी शिवः साक्षादिति कैंकर्यभक्तितः।

पूजयेदादरेणैव यथा लिंगं यथा गुरुः।।९.६५-६६।।

जंगमाची कधीही अवहेलना करू नये. शिवयोगी कोठेही भेटला तर नमस्कार करून त्याचे स्वागत करावे. त्याचा अपमान केला तर निश्चित दुर्गती प्राप्त होते. म्हणून जंगम हा साक्षात् शिवस्वरूप आहे असे मानले पाहिजे. त्याबरोबरच गुरू, लिंग आणि जंगम यांना एकरूप मानून ही आपली संपत्ती आहे. असे समजावे. या तिन्हींचे समत्वभावनेने अर्चन करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापू

११ ऑगस्ट १९९०

---

आशीर्वचन अठ्ठाविसावे

## चतुर्विधसारायस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

चतुर्विधसारायस्थलात मानवी जीवनातील चार गोष्टींचे सार सांगितले आहे. सार म्हणजे विस्तृत गोष्टींचे थोड्या शब्दांत विवेचन. गीता हे उपनिषदांचे सार आहे. श्रीसिद्धान्तशिखामणी हे शिवागमांचे सार आहे. त्याप्रमाणे या स्थलात चतुर्विध सार सांगितले आहेत. वीरशैवांसाठी चार सार आहेत. गुरू, लिंग, जंगम आणि या तिन्हींचे पादोदक व प्रसादसेवन. मागे आम्ही तुम्हाला सांगितले आहे की गुरू-लिंग-जंगम हे तीन पूजनीय आहेत. भस्म-रुद्राक्ष-मंत्र ही पूजेची साधने आहेत आणि पादोदक-प्रसाद ही पूजेची फळे आहेत. तुम्ही तासभर पूजा करता ती फळ मिळावे म्हणून. वरील चार गोष्टींना ज्यांनी सार मानले त्यांनी आयुष्यात खूप काही मिळवले आहे. संसार असार आहे. असार संसारात सार आहे ते चतुर्विध सार.

सर्वमंगलमांगल्यं सर्वपावनपावनम्।

सर्वसिद्धिकरं पुंसां शंभोः पादांबुधारणम्।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.६८)

या विश्वात जेवढे काही मंगल असेल, जेवढे काही कल्याणकारक असेल त्या सर्वांत पादोदक अधिक मंगल आणि कल्याणकारक आहे. ते जगातील सर्व पवित्र वस्तूंपेक्षा अधिक पवित्र आहे आणि ते सेवन केल्यावर सर्व सिद्धींची प्राप्ती होते. 'पादोदक' या शब्दाचा विशिष्ट अर्थ आहे. पा म्हणजे पाप, दो म्हणजे दोष, क म्हणजे कर्म आणि द म्हणजे दहन करणारे. पाप, दोष, कर्म यांचे जे दहन करते त्याला पादोदक म्हणतात. वीरशैवाने रोज पादोदक सेवन केले पाहिजे. गुरुपादोदक, लिंगपादोदक आणि जंगमपादोदक असे पादोदक त्रिविध असते.

गुरूची पादपूजा करून त्यांचे पादोदक सेवन केले जाते. तीर्थक्षेत्री गुरूचे पाय मस्तकावर घेऊन भक्त तीर्थस्नान करतात. तीर्थाऐवजी पादोदकाचे अधिक महत्त्व आहे. मन्मथस्वामींनी म्हटले आहे:-

> काशी मेलिया मुक्ति देत। विश्वासे सेविता गुरुतीर्थ।
> तरी साक्षात्कारे पावे मुक्त। न मरताचि।।
> गंगातीर्थी एक अवगुण। खोलिये जाता जाय बुडोन।
> गुरुतीर्थ न बुडविता तारण। करी भावे सेविता।।

काशीक्षेत्रात मुक्ती मिळते, पण त्यासाठी तेथे मरावे लागते. परंतु पादोदक मात्र न मरताच मुक्ती देते. गंगा पवित्र आहे खरी. गंगास्नान केल्यावर मुक्ती मिळते, परंतु गंगेत एक अवगुण आहे. तिच्यात खोल गेले तर ती बुडवते. परंतु गुरुतीर्थात म्हणजे पादोदकात हा दोष नाही. पादोदकाचे भक्तिपूर्वक सेवन केले तर मनुष्य संसारसागरात तरतो.

वीरशैवांसाठी पादोदक हे सार आहे. जेव्हा तुम्ही लिंगपूजा करता तेव्हा पादोदक घेतल्याशिवाय पूजा पूर्ण होत नाही. तळहातावर लिंग घेऊन पूजा झाली की मंत्रजप करावा लागतो. त्यानंतर मंत्राने तीर्थ अभिमंत्रित करून ते पळीने तीन वेळा इष्टलिंगावर घालून नंतर प्राशन करावे लागते. लिंगावर प्रथम तीर्थ घालता घालता 'गुरुपादोदक' असा उच्चार करतात. 'लिंगपादोदक' असे म्हणत दुसऱ्यांदा लिंगावर तीर्थ घातले जाते आणि 'जंगमपादोदक' असे म्हणत तिसऱ्यांदा लिंगावर तीर्थ घालून मग ते प्राशन केले जाते. गुरू आणि जंगम हे रोज उपलब्ध होत नाहीत, तरी ते इष्टलिंगाशी अभिन्न असतात. म्हणून या प्रकारे पादोदक घेण्याची पद्धत आहे. पादोदक घेतल्यावर ओला हात कपड्याला न पुसता आपल्या अंगावर पुसला पाहिजे. पादोदक अंगावर लेपन केल्याने त्याच्या शक्तीमुळे शरीर निरोगी राहते आणि शरीराभोवती एक रक्षाकवच निर्माण होते. रोज पादोदक सेवन केल्याने साधकाच्या अंतरंगातील भक्तिवृक्ष बहरत जातो. म्हणून पादोदक निष्ठापूर्वक आणि सजगतेने सेवन केले पाहिजे.

पवित्र असे पादोदक विशिष्ट पूजाविधीने सिद्ध होते. केवळ गुरूचे पाय धुतलेले पाणी पादोदक होत नाही. गुरू किंवा जंगम यांची पादपूजा करताना त्यांच्या अंगठ्यात रुद्र, तर्जनीत शंकर, मध्यमेत महादेव, अनामिकेत त्र्यंबक, कनिष्ठिकेत ईशान, पायाच्या वरच्या भागात कपर्दिक, पायाच्या तळव्यात सदाशिव, घोट्यांत रुद्र व भर्ग याप्रकारे भावना करावी. कनिष्ठिकेपासून अंगठ्यापर्यंत बोटांनी नकारापासून यकारापर्यंत (नमः शिवाय) पाच अक्षरांचा संबंध करावा. नंतर भस्म, गंध इत्यादींनी पादपूजा करावी. विधियुक्त पूजा संपल्यावर दोन्ही पायांच्या अंगठ्यांवर जलाचा अभिषेक करून खाली एका पात्रात ते साठवावे. याप्रकारे विधियुक्त पादोदक सिद्ध होते. या पादोदकाचे सर्वांनी आदरपूर्वक सेवन केले पाहिजे.

पादोदक पापरूपी पंकाचे शोषक असून ज्ञानज्योतीचे प्रकाशक आहे. पादोदक असे विलक्षण आहे की ते घेतल्याने संसारवृक्ष उन्मळून पडतो. सप्तसागरादी सर्व तीर्थांत स्नाने केल्याने जे फळ मिळते ते पादोदकाच्या सेवनाने मिळणाऱ्या फळाच्या एक सहस्रांशाएवढेही नसते. पाद म्हणजे परमानंद आणि उदक म्हणजे ज्ञान. अर्थात् पादोदक म्हणजे परमानंदाचे ज्ञान असा तात्त्विक अर्थ आहे. पाद म्हणजे गुरू आणि उदक म्हणजे शिष्य असाही एक अर्थ केला जातो. वेधादीक्षेद्वारा गुरु-शिष्याचा ऐक्यबोध होणे हे 'दीक्षापादोदक' आहे. गुरूने उपदेशिलेले परमानंदाचे ज्ञान मननाने दृढ होणे हे 'शिक्षापादोदक' आहे. दृढ झालेल्या ज्ञानाची निदिध्यासाने निरंतर अनुभूती येणे हे

'ज्ञानपादोदक' आहे. दीक्षापादोदक, शिक्षापादोदक, ज्ञानपादोदक ही आत्मानुभूतिरूप असून बाह्य पादोदक हे त्यांच्या प्राप्तीचे साधन आहे. म्हणून मन्मथस्वामींनी म्हटले आहे, 'पादजल पान करिता। मोक्ष चढतसे हाता।।'

**अर्पयित्वा निजे लिंगे पत्रं पुष्पं फलं जलम्।**
**अन्नाद्यं सर्वभोज्यं च स्वीकुर्याद् भक्तिमान्नरः।।**
**गुरुत्वात् सर्वभूतानां शंभोरमिततेजसः।**
**तस्मै निवेदितं सर्वं स्वीकार्यं तत्परायणैः।।९.७१-७२।।**

पादोदकाप्रमाणेच प्रसादाचेही सेवन केले पाहिजे. पान, फूल, जल आणि अन्न इत्यादी भोज्य पदार्थ प्रथम इष्टलिंगाला अर्पण करून मगच शिवभक्ताने ग्रहण केले पाहिजेत. आपण भोजन करणारे नसून प्रसाद घेणारे आहोत. लग्नात भोजनाचे निमंत्रण असते, परंतु मठमंदिरात प्रसादाचे, महाप्रसादाचे निमंत्रण असते. आपल्या पूज्य इष्टलिंगाला नैवेद्य दाखवून भोजन केले तर तो प्रसाद होतो. त्यामुळे मनातले सारे दोष नाहीसे होतात. ईश्वराला नैवेद्य दाखवणे म्हणजे त्याला जेवण घालणे नव्हे. 'तुझ्याकडे हात आणि माझ्याकडे भात!' खायचे आपणच असते, पण ते ईश्वराला दाखवून. ईश्वर जर काही खातच नसेल तर त्याला दाखवण्याची तरी काय गरज आहे? तर जर त्या अन्नात दोष असेल तर तो ईश्वर ग्रहण करतो. ईश्वर दोषग्राही आहे. त्याला चांगले देण्याची गरज नाही. त्याला आपले दोष, दुर्गुण हवे असतात.

निसर्ग आणि परमात्मा या दोन्हीत एक समान गुण आहे. आपण कोणतीही दूषित वस्तू निसर्गाला अर्पण केली तर तो ती वस्तू परिशुद्ध करून आपल्याला परत करतो. फुलझाडाला आपण खत घालतो, ते सुगंधी नसते. दुर्गंधयुक्त पाणीही आपण फुलझाडाला देतो. परंतु त्यावर उमलणारी फुले दुर्गंधी नसतात, ती सुगंधित असतात. उसाच्या शेतात आपण गटारगंगा ओततो, तरीही उसाचा रस मात्र अत्यंत मधुर असतो. गटारगंगेसारखा नसतो. गटाराचे पाणी आपण पिऊ शकत नाही, हुंगणेदेखील शक्य नाही. पण तेच पाणी पिऊन ऊस मात्र गोड रस देतो. आपण तो आवडीने खातो, पितो, तुम्ही दुर्गंध देता त्याचे परिमार्जन करून निसर्ग तुम्हाला सुगंध देतो. तुम्ही नीरस देता. तो तुम्हाला सुरस देतो.

निसर्ग अर्थात् प्रकृती हा परमात्म्याचा एक अंश आहे. पृथ्वी हा परमात्मा आहे, तुम्ही द्याल ते ती शुद्ध करते. परमात्मा जलस्वरूप आहे. तो सारे काही धुवून स्वच्छ करतो. तुम्ही द्याल ते परिशुद्ध करणे हा प्रकृतीचा गुण आहे. तोच गुण परमात्म्याचा ठिकाणी आहे. वाईटातली वाईट वस्तू शुद्ध करून तो आपल्याला परत करतो. ईश्वराला नैवेद्य दाखवण्याचे कारण देखील हेच आहे. मनुष्य अनेक प्रकारची पापे करतो. चोरी करतो, खोटे बोलतो, कोणाची वंचना करतो, भल्याबुऱ्या मार्गाने द्रव्यार्जन करतो. त्या द्रव्याने विकत घेतलेले अन्न तो जेव्हा खातो तेव्हा त्याचे मनदेखील दूषित होऊन जाते. त्या दूषित अन्नाला शुद्ध करण्यासाठी ईश्वराला नैवेद्य दाखवला जातो. अन्नामधला दोष ईश्वर सेवन करतो आणि निर्दोष अन्न आपल्याला देतो.

अन्नातला सर्वात दोष म्हणजे ममत्व. 'हे माझे आहे' ही भावना. प्रत्येक वस्तूमधील ममत्वभाव हा सर्वात मोठा दोष मानला जातो. ज्या क्षणी तुम्ही कमावलेली वस्तू ईश्वराला अर्पण करता त्या क्षणी तो त्यातील 'ममत्व' खाऊन टाकतो. तेव्हा त्या वस्तू वरील तुमचे नाव नष्ट होते, मालकी संपते. ती वस्तू म्हणजे 'ईश्वराचा प्रसाद' होते. अशा प्रसादाचे सेवन केले तर मन प्रसन्न होते.

आपल्या सिद्धान्ताप्रमाणे भोजन करणे हीदेखील एक पूजाच होय. जशी इष्टलिंगाची पूजा पवित्र भावनेने केली जाते तसेच भोजनदेखील पवित्र भावनेने करावे. शुद्ध वस्त्र नेसून, एकाच ठिकाणी बसून जशी पूजा केली जाते त्याप्रमाणे पवित्र वस्त्रात एकाच ठिकाणी बसून भोजन घेतले पाहिजे.

वीरशैवाने प्रसादबुद्धीने वागले पाहिजे. तुम्ही जे काही जे काही घ्याल ते स्वीकारण्याआधी ईश्वराला अर्पण करा आणि प्रसाद म्हणून त्या वस्तूचा स्वीकार करा. खाद्य वस्तू असोत, कपडेलत्ते असोत की औषधे असतो. अशा प्रकारे प्रसादसेवन करण्याची युक्ती साधली तर तुमचे मन प्रसादयुक्त होईल. प्रसाद म्हणजे प्रसन्नता. हे माझे, ते तुझे या भावनेमुळेच आपण अप्रसन्न होत असतो. सर्व काही ईश्वराचे आहे, जे मिळते तो त्याचा प्रसाद आहे अशा भावनेने वर्तन केले तर मनात निश्चित प्रसन्नता नांदते.

अशा प्रकारे गुरुपूजा, लिंगपूजा, जंगमपूजा आणि यांच्या पूजेमुळे लाभणारे पादोदक-प्रसाद असे चतुर्विध सार वीरशैवांनी समजून घेतले पाहिजेत. ज्यांना हे सार प्राप्त होतात त्यांचे जीवन कृतार्थ होते, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर<br>
१२ ऑगस्ट १९९०

---

## आशीर्वचन एकोणतिसावे

### त्रिविधदानस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

अंग-षट्स्थलांतर्गत भक्तस्थलातील चतुर्विधसारायस्थल या उपस्थलाची चर्चा आपण केली. गुरू, लिंग, जंगम आणि पादोदक-प्रसाद हे चतुर्विध सार कसे आहेत, हे आपण पाहिले. आज भक्तस्थलातील त्रिविधदानस्थल या अंतिम उपस्थलाचा विचार करायचा आहे. त्रिविध म्हणजे तीन प्रकारचे. सोपाधिक दान, निरुपाधिक दान आणि सहज दान असे दानाचे तीन प्रकार 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त सांगितले आहे. दान हा एक धर्म आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप, ध्यान अशा दहा धर्मांचा उल्लेख ज. रेणुकाचार्यांनी केला आहे:-

**अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं दया क्षमा।**<br>
**दानं पूजा जपो ध्यानमिति धर्मस्य संग्रहः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.५९)

यांमधील दान या प्रकाराचा आपल्याला विचार करायचा आहे. भक्त-अवस्था परिपक्व होण्यासाठी तीन प्रकारची दाने साधकाला करावी लागतात. निरपेक्ष बुद्धीने एखादी वस्तू दुसऱ्याला देणे म्हणजे दान होय. दान देताना त्या व्यक्तीकडून कोणतीही अपेक्षा केली जात नाही. काही दाने सामान्य असतात तर काही दाने विशेष असतात. त्यांना महादान म्हणतात. सुवर्णदान, भूमिदान, कन्यादान, गजदान, गोदान ही महादाने होत. दान

कशासाठी केले पाहिजे, असा प्रश्न तुम्हाला पडेल. कष्ट करून आपण कमाई करायची आणि ती दुसऱ्याला देऊन टाकायची, याला काय अर्थ आहे? ईशावास्योपनिषदात म्हटले आहे, 'तेन त्यक्तेन भुंजिथाः माघृधः कश्यस्विद्धनम्।' वस्तूचा उपभोग घेण्याआधी ती दुसऱ्याला समर्पित केली पाहिजे. म्हणजेच त्यागबुद्धीने उपभोग घेतला पाहिजे. स्वयंपाक केल्यावर ते अन्न आपण तसेच खायचे नसते. प्रथम ते देवाला अर्पण करून नंतर साधुजंगमांना तृप्त करून नंतर प्रसाद म्हणून आपण स्वीकारायचे असते. आपण भोजनाला बसल्यावर जर कोणी अतिथी आला तर प्रथम त्याला भोजन दिले पाहिजे. त्याला देऊन जर अन्न उरले तर आपण खावे, अन्यथा त्या दिवशी उपवास करावा. असे आपली संस्कृती आहे. स्वतः खाऊन संतुष्ट होण्यापेक्षा दुसऱ्याला देण्यात संतोष मानणारी आपली संस्कृती आहे. भूक लागल्यावर खाणे ही प्रकृती आहे, भूक नसताना खाणे ही विकृती आहे आणि आपण उपाशी राहून दुसऱ्याला खाऊ घालणे ही संस्कृती आहे. आपल्या देशात अनेक दानशूर माणसे होऊन गेली. कर्णाची कथा तुम्हालां माहीत आहे. मरणासन्न अवस्थेत त्याने याचकाला आपले सोन्याचा मुलामा चढवलेले दात पाडून ते दान दिले. शिबीराजाने पक्ष्याचे रक्षण करण्यासाठी आपल्या शरीरावरचे मांस कापून दिले. दधीची ऋषींनी इंद्राला वज्र बनवण्यासाठी आपली हाडे दान दिली. अशा कितीतरी दानशूरांच्या कथा भारतीय वाङ्मयात विखुरलेल्या आहेत. म्हणून दानाविषयी ज. रेणुकाचार्य सांगतातः-

**शिवलिंगे शिवाचार्ये शिवयोगिनि भक्तिमान्।**
**दानं कुर्याद् यथाशक्ति तत्प्रसादयुतः सदा।।९.७९।।**

दान कोणाला करावे हे या ठिकाणी सांगितले आहे. शिवभक्ताने गुरू, लिंग, जंगम यांना यथाशक्ती दान केले पाहिजे. कारण वीरशैवांची ही तीन आराध्ये आहेत. यांना भक्ताने काय दान केले पाहिजे? आपल्याकडे तीन गोष्टी असतात. तन, मन आणि धन, आपल्या तनाकडून गुरुसेवा घडावी, मनाकडून लिंगाचे चिंतन व्हावे आणि जंगमाला धन अर्पण करावे. अशा त्रिविध दानाने गुरू, लिंग, जंगम यांना तृप्त केले पाहिजे. दान दिल्यानंतर दाता निष्कांचन होत नसतो. उलट दिलेले दान त्याला कोणत्या ना कोणत्या रूपात सहस्त्रगुणित होऊन मिळते. एक बी भूमीला दान केले तर ती त्याची शतपटीने परतफेड करते. म्हणून गुरू, लिंग, जंगम यांना केलेले दान निष्फळ होत नाही. या जन्मात आपण जी सुखे भोगतो आहोत ती गेल्या जन्मात केलेल्या धर्मसंग्रहामुळे आणि या जन्मात आपण जो दानधर्म करू त्याचे फळ पुढील जन्मात मिळणार आहे. म्हणून मनुष्याने धर्मसंग्रह केला पाहिले.

अकबराच्या दरबारात नवरत्ने होती. त्यांपैकी बिरबल बादशहाचा आवडता होता. त्यामुळे त्याच्यावर बाकीचे जळत असत. त्यांची जिरवण्यासाठी एकदा बादशहाने सर्वांना बोलावून संगितले, "तुमच्यापैकी जो कोणी मी सांगेन ती सहा माणसे आणून दाखवील तो माझा अत्यंत लाडका होईल."

"आपल्याला कोणती सहा माणसे हवी आहेत जहाँपनाह?" त्यांच्यापैकी एकाने विचारले.

"दोन कालची, दोन आजची आणि दोन न कालची न आजची. अशी सहा माणसे एका आठवड्यात जो प्रथम माझ्यासमोर हजर करील, तो माझा जिवलग होईल." बादशहा म्हणाला.

बादशहाची अपेक्षा ऐकून बिरबल सोडून बाकीचे चक्रावून गेले. कारण बादशहाने काय मागितले हेच त्यांना कळेना.. कालची काय, आजची काय आणि न कालची न आजची काय? त्यांना काहीच कळले नाही.

बिरबलने मात्र सातव्या दिवशी सहा जणांना दरबारात हजर केले. त्यांपैकी दोन राजपुत्र होते, दोन तपस्वी होते आणि दोन उडाणटप्पू मुले होती.

बादशहाला कुर्निसात करून बिरबल म्हणाला, ''खाविंद, आपण सांगितल्याप्रमाणे दोन कालची, दोन आजची आणी दोन न कालची न आजची अशी सहा माणसे मी आपल्यासमोर पेश करीत आहे.''

''बिरबल'' बादशहा म्हणाला, ''तुला काय म्हणायचे आहे ते समजावून सांग.''

दोन राजपुत्रांना पुढे करून बिरबल म्हणाला, ''हे दोघे राजपुत्र आहेत. हे 'कालचे' आहेत. कारण ते या जन्मात कोणतीही कमाई करत नाहीत. गेल्या जन्मातल्या पुण्यकर्माच्या बळावर ते या जन्मात सुखोपभोग भोगत आहेत. थोडक्यात कालची कमाई आज खात आहेत. आज त्यांची कमाई चालू नाही. म्हणून हे दोघे 'कालचे' आहेत.''

''वाहवा! बहोत खूब!'' बादशहा म्हणाला, ''आता 'आजचे' कोण हे सांग.''

बिरबलाने दोन जटाधारी तपस्व्यांना बादशहासमोर उभे केले, म्हणाला, ''हे दोघे 'आजचे' आहेत. हे दोघे पुढील जन्मात काहीतरी लाभ व्हावा म्हणून तपस्या करीत आहेत. राजपुत्राप्रमाणे ते गेल्या जन्मातली कमाई खात नाहीत, तर आज कमाई करून ती ते उद्या खाणार आहेत. म्हणून हे दोघे 'आजचे' आहेत.''

बिरबलाच्या युक्तिवादाला अवघ्या दरबाराने दाद दिली, ''वाहवा! वाहवा!''

नंतर दोन उडाणटप्पू पोरांना बादशहासमोर उभे करून बिरबल म्हणाला, ''हे दोघे काहीही कमाई करत नाहीत. हे शिकले नाहीत. कोणता उद्योगधंदा करीत नाहीत. मागच्या जन्मात यांनी कमाई केली नाही म्हणून या जन्मात यांना खायला देखील मिळत नाही. पुढल्या जन्मात काही मिळवण्यासाठी ते या जन्मात कोणतेच पुण्यकर्म करीत नाहीत. म्हणून हे दोघे 'कालचे' नाहीत आणि 'आजचे' नाहीत.''

बिरबलाचा युक्तिवाद ऐकून बादशहा खूष झाला आणि बिरबलावर जळणाऱ्या लोकांनी माना खाली घातल्या. या कथेचे तात्पर्य हेच की या जन्मात आपण जे काही भोगत आहोत ती आपली गेल्या जन्मातली कमाई आहे. आणि या जन्मात जी कमाई आपण करू ती पुढील जन्मात भोगावी लागणार आहे. पुढील जन्मात उत्तम भोग हवे असतील तर या जन्मात जी कमाई आपण करू ती पुढील जन्मात भोगावी लागणार आहे. पुढील जन्मात उत्तम भोग हवे असतील तर या जन्मात दानधर्मादी कर्मे केली पाहिजेत.

ज. रेणुकाचार्यांनी सोपाधिक, निरुपाधिक आणि सहज असे दानाचे तीन प्रकार सांगितले आहेत. प्रतिफलाची अपेक्षा ठेवून जे दान केले जाते ते सोपाधिक दान होय. हे कर्म केल्यावर त्याचे कोणते फळ आपल्याला मिळेल याचा विचार मनुष्य प्रथम करीत असतो. सोपाधिक दानात फळाची अपेक्षा असते. म्हणून हा दानप्रकार उत्तम मानला जात नाही. ज्या दानात प्रतिफलाची अपेक्षा नसते ते निरुपाधिक दान होय. दान करणे हे आपले कर्तव्य आहे. आपला धर्म आहे अशा भावनेने हे दान दिले जाते. आपण एवढी कमाई करतो त्यापैकी थोडे दान केले पाहिजे अशी बुद्धी या दानामागे असते. या दानाला उत्तम दान मानले जाते.

दान कसे द्यावे हे जसे महत्त्वाचे आहे तसेच दान काय मागावे हे देखील महत्त्वाचे आहे. भस्मासुराने शंकराला जे दान मागितले, त्या दानामुळे तो स्वतः भस्मसात झाला. ज्या दानामुळे आपला सर्वनाश होईल असे दान मागू नये. काही लोक एवढे बिलंदर असतात की ते देवाला देखील फसवतात. एका आंधळ्या माणसावर देव प्रसन्न झाला. देव त्याला म्हणाला, ''मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. तू कोणताही एक वर माग. त्याचे फळ तुला मिळेल.''

आंधळ्याने विचार केला, आपण आंधळे आहोत. दरिद्री आहोत, आपल्याला बायको नाही; पण एका वरात हे सगळे कसे मागायचे? तो बुद्धिमान होता. त्याने विचार करून देवाला एकच वर मागितला, "देवा, मला एकच वर दे." देवाने विचारले, "कोणता?"

आंधळा म्हणाला, "सोन्याच्या वाटीत नातवाला दूध पाजताना मला बघायचे आहे."

"तथास्तु!" देव म्हणाला. एकाच वरात आंधळ्याने सर्व गोष्टी मागून घेतल्या. बघायचे आहे असे मागितल्यामुळे त्याला डोळे मिळाले. सोन्याची वाटी मागितल्यामुळे धन मिळाले. नातवाला बघायचे असे मागितल्याने बायको, संसार, मुलगा यांच्यासह दीर्घायुष्यही मिळाले.

कोणतेही कर्म करताना ते निपेक्षबुद्धीने केले पाहिजे. निरपेक्ष दानालाच निरुपाधिक दान म्हटले आहे. सहजदान हा दानाचा तिसरा प्रकार होय. दान देणारा, दान घेणारा आणि दान ही त्रिपुटी नष्ट होऊन ती शिवमय सहजदान म्हणतात. आपण दान करीत आहोत ही भावनाच या दानात नसते. उजव्या हातातली वस्तू डाव्या हातात ठेवावी आणि डाव्या हातातली वस्तू उजव्या हातात ठेवावी हे जसे सहजपणाने घडते तसे सहजदान केले जाते.

**अदातृदातृदेयानां शिवभावं विचिन्तयन्।**
**आत्मनोऽकर्तृभावं च यद्यत्तं सहजं भवेत्॥९.८३॥**

दान देणारा, दान घेणारा आणि दान हे सर्व शिवरूपी आहे अशा भावनेने घडणारे दान सहजदान होय. सहजदान हे सर्व दानांत श्रेष्ठ मानले जाते. याच भावनेने गुरू, लिंग आणि जंगम यांना दान दिले तर ते सहजदान होय. दान हे सत्पात्र व्यक्तीला दिले पाहिजे. सत्पात्र व्यक्तीला एक हजार मोहरा दान केल्यावर जे फळे मिळते तेच फळ इष्टलिंगावर एक सुंगधित फूल वाहिले तरी प्राप्त होते. शिवाला, गुरूला, शिवयोग्याला दान दिले पाहिजे. शिवयोगी सर्व भूतांना आत्मरूपात पाहत असल्याने त्याला केलेले दान हे सर्व विश्वाला केलेले दान होय. शिवयोगी तृप्त झाले तर शिव तृप्त होतो आणि शिव तृप्त झाला तर चराचर विश्व तृप्त होते, असे आचार्य सांगतात:-

**शिवयोगिनि संतृप्ते तृप्तो भवति शंकरः।**
**तत्तृप्त्या तन्मयं विश्वं तृप्तिमेति चराचरम्॥९.९१॥**

एक गरीब ब्राह्मण होता. घरात अठरा विश्वे दारिद्र्य. रोज खायची भ्रांत. एके दिवशी त्याला समजले की जवळच्या नगरात धर्मक्रेता नावाचा एक श्रीमंत गृहस्थ राहतो. तो पैसे देऊन पुण्य विकत घेतो. ही गोष्ट ब्राह्मणाने सहज आपल्या पत्नीला सांगितली. तेव्हा तिने त्याच्या मागे टुमणेच लावले, "तुम्ही त्या श्रीमंताकडे जा. त्याला तुमचे पुण्य विकून द्रव्य घेऊन या. आपली रोजची ददात तरी मिटेल."

ब्राह्मणाने काही दिवस तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. अखेर एके दिवशी सोबत शिदोरी घेऊन तो नगराकडे निघाला. चालता चालता दुपार झाली. वाटेवर एक विहीर आणि झाडाची सावली पाहून तो थांबला. शिदोरी सोडून जेवायला बसला.

तेवढ्यात एक कुत्री आपल्या लहान लहान पिलांसह तेथे आली. त्याच्याकडे, त्याच्यासमोरील अन्नाकडे आशाळभूतपणे पाहत बसली. तिचे भुकेले डोळे आणि तिची पिलावळ पाहून ब्राह्मणाचा घास कंठाखाली

उतरेना. त्याने भाकरीचा एक तुकडा त्यांच्यापुढे फेकला. तो कुत्रीने चटकन खाल्ला. दुसरा फेकला, पिल्लांनी खाल्ला. असे करता करता सगळी शिदोरी संपली. ब्राह्मण उपाशीच राहिला. पाणी पिऊन त्याने आपले पोट भरून घेतले.

तो नगरात पोहोचला. धर्मक्रेताच्या वाड्यात गेला. त्याचे स्वागत झाले. पुण्य विकण्याची इच्छा त्याने दर्शवली. तेव्हा श्रीमंत म्हणाला, ''तुमच्या पुण्याचे मूल्यमापन माझी पत्नी करील. पुण्य किती आहे आणि त्याचे मोल किती द्यायचे हे सारे माझी पत्नी ठरवते.''

श्रीमंताची पत्नी ब्राह्मणाकडे पाहून पतीला म्हणाली, ''हा ब्राह्मण जर आज दुपारी मिळवलेले पुण्य विकत असेल तर ते एक लक्ष सुवर्णमुद्रा देऊन घ्या.''

''विकणार का आज दुपारचे पुण्य?'' श्रीमंताने विचारले. आज दुपारी आपण कोणते पुण्यकर्म केले ते ब्राह्मणाला उमजेना. तो गोंधळला. श्रीमंत पुन:पुन्हा विचारीत होता. ज्याची किंमत एक लक्ष सुवर्णमुद्रा आहे ते पुण्य विकावे की नाही, या संभ्रमात तो पडला. शेवटी म्हणाला, ''आजचे पुण्य विकायचे की नाही हे मी माझ्या पत्नीला विचारून येतो.''

ब्राह्मण परत फिरला. येताना त्याला जेथे कुत्रीला शिदोरी खाऊ घातली ते ठिकाण लागले. रिकाम्या हाताने परत फिरलो तर पत्नी रागवेल अशी त्याला भीती वाटली. म्हणून त्याने जेथे कुत्री बसली होती तेथले चारसहा दगड उचलून शिदोरीच्या वस्त्रात बांधले. डोक्यावर गाठोडे घेऊन घरी आला. गाठोडे कोपऱ्यात फेकले आणि खाली बसला.

''पुण्य विकून धन आणले का?'' पत्नीने विचारले. त्याने फक्त मान हलवली आणि गाठोड्याकडे बोट दाखवले. गाठोड्यातले दगड पाहून ती आक्रस्ताळेपणा करणार हे त्याला माहीत होते. म्हणून तिच्याकडे पाठ करून तो बसला.

तिने गाठोडे उलगडले आणि हर्षातिशयाने ओरडली, ''काय, इतके सोने आणले? तुम्ही सगळे पुण्य विकले की काय?'' त्याने चमकून वळून पाहिले. शिदोरीच्या वस्त्रात सोन्याच्या लगडी चमचमत होत्या!

सामान्य पशूला अन्नदान केल्याचे हे फळ मिळत असेल तर शिवस्वरूप असलेल्या शिवयोग्याला दान केल्यावर त्याचे किती फळ मिळत असेल? म्हणून वीरशैवाने जंगमाला दान करून संतुष्ट करावे. शिवत्वाच्या प्राप्तीसाठी साधक योग वगैरे कठीण साधना करतात. परंतु सहजदान केल्याने शिवत्व सहज प्राप्त होते.

**निरुपाधिकचिद्रूपपरानन्दात्मवस्तुनि।**
**समाप्तं सकलं यस्य स दानी शंकरः स्वयम्॥९.९३॥**

सच्चिदानंदस्वरूप अशा गुरू, लिंग आणि जंगम ह्यांना क्रमश: शरीर, प्राण आणि धन सहज अर्पण करतो तो शिवभक्त साक्षात शिवस्वरूपच होय. सहजदानामुळे शिवत्व प्राप्त होते म्हणून सहजदान सर्वश्रेष्ठ दान होय. सहजदानामुळे सर्व प्राणिमात्रांना समान लेखणारी समदृष्टी लाभते. त्याच्या मनात समष्टिभाव उत्पन्न होतो आणि साधक शिवस्वरूप होतो. निसर्ग आपल्याला सर्व काही देतो. परंतु त्याची वाच्यता तो कधी करीत नाही. त्याप्रमाणे आपल्या दानाची वाच्यता कधी करू नये.

अन्नदान, वस्त्रदान, सुवर्णदान, भूदान, गोदान, कन्यादान, विद्यादान, दीपदान इत्यादी वस्तूंचे दान करावे, असे शास्त्रात सांगितले आहे. जगात अशी कोणतीही वस्तू नाही की जिचे दान केले जाऊ शकत नाही. आधुनिक

काळात नेत्रदान, रक्तदान, देहदान इत्यादी दानेही दिली जातात. जुन्या धर्मशास्त्रात ही दाने सांगितलेली नसली तरी ही दाने काळाशी सुसंगत आहेत. म्हणून त्यांचाही दानप्रकारांत समावेश केला पाहिजे. जेव्हा सहजदान करण्याची योग्यता अंगी येते तेव्हा भक्तस्थलातला साधक परिपक्व होतो आणि माहेश्वरस्थलात त्याचा प्रवेश होतो.

अशा प्रकारे अंग-षट्स्थलांतर्गत भक्तस्थल या ठिकाणी संपले आहे. या स्थलातील पिंडस्थल, पिंडज्ञानस्थल, संसारहेयस्थल, गुरुकारुण्यस्थल, लिंगधारणस्थल, भस्मधारणस्थल, रुद्राक्षधारणस्थल, पंचाक्षरजपस्थल, भक्तामार्गक्रियास्थल, उभयस्थल, त्रिविधसंपत्तिस्थल, चतुर्विधसारायस्थल आणि त्रिविधदानस्थल या उपस्थलांचा आपण विचार केलेला आहे. साधक शुद्धाचरण स्वीकारून जेव्हा भक्तस्थलात पाऊल ठेवतो तेव्हा त्याची अखेरच्या जन्माकडे वाटचाल सुरू होते. यापुढे तो माहेश्वरस्थलात प्रवेश करतो. अशा प्रकारे प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य अशी षट्स्थलांची वाटचाल संपली की तो शिवस्वरूप होतो. मग त्याला जन्म नसतो आणि मृत्यूही नसतो. एकाच जन्मात मुक्ती मिळते, असे वीरशैवसिद्धान्त सांगतो. तुम्हा सगळ्यांवर शिवकृपा व्हावी आणि तुमचा हा जन्म अखेरचा ठरावा, अशा शुभाशीर्वाद देऊन भक्तस्थलावरील विवेचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

श्रीसिद्धेश्वर मंदिर, सोलापूर

१३ ऑगस्ट १९९०



# भाग २ : अंगषट्स्थलांतर्गत माहेश्वरस्थल

**आशीर्वचन पहिले**

## माहेश्वरस्थल

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।
विश्ववंद्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगदगुरुम्।।

श्रीकाशीज्ञानसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यांपासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा आहे तिला अनंत प्रणिपात करून या सत्संगात उपस्थित असलेल्या समस्त सद्भक्तांनो आणि मातांनो,

श्रावणमासातला आज पहिला सोमवार आहे. श्रवणासाठी निश्चित केलेला महिना हाच श्रावणमहिना होय.

**ॐ भद्रंकर्णेभिः श्रृणुयाम देवाः भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः।**

वेदांची आज्ञा आहे की जोपर्यंत आपण या संसारात जिवंत आहोत तोपर्यंत आपल्या कानांनी मंगलमय शब्द ऐकावे, आपल्या डोळ्यांनी मंगल स्वरूप पाहावे तरच मनुष्य शतायू होईल. माणसाचे आयुष्य शंभर वर्षांचे सांगितले असले तरी फारच कमी माणसे तेवढी वर्षे जगतात. जो मनुष्य साठ वर्षांचा होतो त्याचा षष्ठ्यब्दिपूर्ती समारंभ साजरा करतात. तो साठ वर्षे जगला याचा केवढा आनंद! यापेक्षा जो अधिक जगतो त्याचा अमृतमहोत्सव आणि शंभर वर्षे जगतो त्याचा शतमानोत्सव साजरा करण्याची प्रथा आहे. आयुष्यभर जर निरोगी राहायचे असेल तर आपण आपली बुद्धी निर्मळ ठेवली पाहिजे. त्यासाठी 'भद्रं कर्णेभिः श्रुणुयाम...' सदैव सत्संग करावा, संतवचने ऐकावी. पण हे भाग्य फार कमी लोकांच्या वाट्याला येते. लोकांना एवढा वेळच मिळत नाही. ते आपल्या व्यापात इतके गुंतून, गुरफटून गेलेले असतात की रोज तास देखील ते यासाठी देऊ शकत नाहीत. जर आम्ही संतांची वचने ऐकू शकलो नाही, गुरूंचे शब्द ऐकू शकलो नाही, तर या संसारातून आपली सुटका कदापि होणार नाही. याच उद्देशाने नागपूरच्या वीरशैव समाजाने या पवित्र मासात सकाळी पूजेचे आणि सायंकाळी सत्संगाचे आयोजन केले आहे.

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा महान दार्शनिक ग्रंथ आहे. जगात जेवढे सिद्धान्त आहेत त्या सर्व सिद्धान्तांचा हा शिखामणी आहे, हे त्याच्या नावावरूनच समजते. 'सिद्धान्तः बहुधा प्रोक्तः' सिद्धान्त अनेक प्रकारचे आहेत. त्या सर्वात हा सिद्धान्त श्रेष्ठ मानला जातो. कारण वीरशैवसिद्धान्तात सर्व सिद्धान्तांचा समन्वय आहे, खंडन नाही. द्वैत, अद्वैत, द्वैताद्वैत सर्व सिद्धान्त मनुष्यासाठी आवश्यक आहेत. जोपर्यंत मनुष्य आध्यात्मिक भूमिकेवर आरूढ होत नाही तोपर्यंत भेदबुद्धीची मनुष्याला गरज असते. ईश्वर महान असून आपण लहान आहोत, तो पूजनीय असून मी पूजक आहे, अशी भेदभावना प्राथमिक अवस्थेत असावी लागते. जर भेदच नसेल तर अभेद कसा असेल? म्हणून प्रारंभिक अवस्थेत भक्त आणि भगवान यांच्यात भेदभावना असते. जसजशी उपासना दृढ होत जाते तसतसा जीवात्मा परमात्म्याच्या अधिकाधिक जवळ जातो आणि अंतिम अवस्थेत तो परमात्मस्वरूपच होतो, अद्वैत होतो. द्वैत, द्वैताद्वैत आणि अद्वैत या सर्व सिद्धान्तांचा समन्वय करून जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्त्य

महर्षींना जो उपदेश केला तोच 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ होय. यात सर्व सिद्धान्तांचा समन्वय असल्यामुळे हा सिद्धान्त-शिखामणी आहे.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'त मुख्य सहा भाग आहेत. या साधकाच्या सहा अवस्था होत. भक्त-अवस्था, माहेश्वर-अवस्था, प्रसादी-अवस्था, प्राणलिंगी-अवस्था, शरण-अवस्था आणि ऐक्य-अवस्था. आज आम्ही प्रवचन करणार आहोत माहेश्वरस्थलावर.

**शैवीभक्तिः समुत्पन्ना यस्यासौ भक्त उच्चते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी ५.२६)

आपल्या इष्टदेवतेवर ज्याची श्रद्धा असते तो भक्त होय. वीरशैवसिद्धान्तात भक्तीचे सहा प्रकार मानले आहेत. भागवतादी ग्रंथात भक्तीचे नऊ प्रकार सांगितले आहेत.

**श्रवणं कीर्तनं शंभोः स्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्।।९-२।।**

अशी नवविध अर्थात् नऊ प्रकारची भक्ती आहे. परंतु यातही भक्तीचे सहा प्रकार केले आहेत. पहिली भक्ती ही 'श्रद्धाभक्ती' होय. ज्याची आपण पूजा करतो त्या इष्टदेवतेवर आपली श्रद्धा असली पाहिजे. श्रद्धाविहीन पूजा निष्फळ होते. म्हणून श्रद्धा ही पहिली भक्ती आहे. श्रद्धाभक्ती ज्या साधकाजवळ आहे तोच 'भक्त' होय.

भगवंताविषयी अत्यंत अनुराग असणे हा भक्तीचा अर्थ आहे. 'पूज्येषु अनुरागो भक्तिः।' आपल्यापेक्षा जे मोठे असतात त्यांच्यावर केलेल्या प्रेमाला भक्ती म्हणतात. आपण आई-वडिलांवर, गुरुजनांवर, इष्टदेवतेवर प्रेम करतो. या प्रेमालाच 'भक्ती' असे नाव आहे. अगस्त्य महर्षी येथे प्रश्न विचारतात की, साधक एका स्थलातून दुसऱ्या स्थलात प्रवेश करतो तेव्हा त्यात कोणता भेद होतो? अंतर पडते? भक्ताला माहेश्वर कसे म्हटले जाते?

**केन वा धर्मभेदेन भक्तो माहेश्वरो भवेत्।।१०.१।।**

हा अगस्तींचा प्रश्न आहे. आधी जो 'भक्त' होता तो कोणत्या आचारभेदामुळे 'माहेश्वर' म्हटला जातो? त्यात कोणते स्थित्यंतर होत? कोणत्याही वस्तूचे स्वरूप बदलण्यामागे काही कारणे असतात. पाणी चुलीवर ठेवून त्याखाली अग्नी प्रज्वलित केला तर पाणी गरम होते. त्याच्या अवस्थेत परिवर्तन होते. गार पाण्यात हात घातला तर आपल्याला त्याचा फारसा त्रास होत नाही. कदाचित् हिवाळ्यात होईल. परंतु उन्हाळ्यात गार पाण्यात हात बुडवला तर सुखद अनुभव येतो. हेच पाणी अग्नीच्या संपर्कात आले तर त्यात परिवर्तन होते. हळूहळू ते गरम होते, उकळू लागते. इतकेच नव्हे तर त्याचे तापमान जेव्हा १०० उष्मांक इतके होते तेव्हा ते पाणी 'पाणी' राहत नाही, त्याची वाफ होते. भांड्यात सहजपणे घेता येणारा हा द्रव वाफेच्या रूपाने आकाशगामी होतो. त्याचे मेघात रूपांतर होते.

जे बाष्परूप झाले ते पाणीच आहे. परंतु कोणत्याही भांड्यातल्या पाण्याची वाफ होत नाही. त्यासाठी संस्काराची आवश्यकता आहे. ज्या पाण्याला अग्नीचा स्पर्श होतो त्याचेच रूपांतर वाफेत होते. त्याप्रमाणे भक्तस्थलातला साधक हळूहळू भक्तस्थलातील पंधरा अवांतरस्थले साधनेच्या बळाने ओलांडून अंतिम अवस्थेत

**केवले सहजे दाने निष्णातः शिवतत्परः।**
**ब्रह्मादिस्थानविमुखो भक्तो माहेश्वरः स्मृतः।।१०.२।।**

असा सहजदानी माहेश्वरस्थलात प्रवेश करतो. भक्तस्थलाचे आचरण करणारा साधक सदैव भक्तच राहत नाही तर तो भक्त-अवस्था परिपक्व झाली की 'माहेश्वर' होतो.

पहिल्या इयत्तेत शिकणारा विद्यार्थी वर्षभर अध्ययन करतो, गुरुजनांजवळ शिक्षण घेतो, घरी जाऊन अभ्यास करतो. वर्षातून त्याची एकदा परीक्षा होते. ती एक तासाची, दोन तासांची अथवा तीन तासांची असते. वर्षभर अभ्यास करूनही जर त्याने परीक्षा दिली नाही तर तो दुसऱ्या इयत्तेत जाण्याला पात्र ठरत नाही. त्याला पुन्हा पहिल्याच इयत्तेत बसावे लागते. परीक्षा देऊनही जर त्याने नीट उत्तरे लिहिली नाहीत तर तो अनुत्तीर्ण होऊन दुसऱ्या इयत्तेत जायला अपात्र ठरतो. जो वर्षभर अभ्यास करतो, परीक्षेला बसतो आणि नीट उत्तरे लिहितो तोच दुसऱ्या इयत्तेत जायला अधिकारी ठरतो. पहिल्या इयत्तेतील सर्वच विद्यार्थी दुसऱ्या इयत्तेत जातातच असे नाही. अर्थात् आजची गोष्ट वेगळी आहे. परीक्षा दिली काय अन् न दिली काय, त्याला ढकलत ढकलत वरच्या वर्गात नेतात. पण हे ढकलणे कोठपर्यंत? बोर्डाची दहावीची परीक्षा येईपर्यंत. तेथे मात्र कस लागून तो ढकलगाडीवरचा विद्यार्थी अनुत्तीर्ण होतो आणि बरीच वर्षे तेथेच मुक्काम ठोकून राहतो. ज्याप्रमाणे एकेक इयत्ता ओलांडत विद्यार्थी पुढील इयत्तेत प्रवेश करतो त्याप्रमाणे या संसारात ईश्वरावर, गुरूवर, आईवडिलांवर प्रेम करणारे अनेक लोक असले तरी सर्वजण भक्तस्थलातून माहेश्वरस्थलात जाऊ शकत नाहीत. काही जण आयुष्यभर भक्तस्थलातच राहतात. काही जण भक्ती करतात, परंतु पूर्णांशाने कधी 'भक्त' होऊ शकत नाहीत.

आपल्याला भक्ती अतिशय सोपी वाटते. परंतु ती एवढी सोपी नाही. त्यामध्ये अनेक संकटे वाट अडवून उभी राहतात. जो भक्त नाही, ज्याच्याजवळ भक्ती नाही त्याला कधी संकटांशी सामना करावा लागत नाही. कारण त्याला बाहेर जायचे नसते, संसारात राहायचे असते. ज्याला संसार पार करून जायचे आहे त्याच्यापुढे संकटे उभी ठाकतात. एखाद्या मनुष्याला गाव सोडून जायचे आहे. परंतु त्याने अनेकांकडून कर्ज घेतलेले आहे. तो जोपर्यंत गावात आहे तोपर्यंत कर्ज देणारे लोक त्याच्यामागे कर्ज फेडण्याचा तगादा लावत नाहीत. त्यांना वाटते की, तो आज ना उद्या आपले कर्ज चुकते करील किंवा त्याच्या पश्चात् त्याच्या मुलाबाळांकडून आपण ते वसूल करू, परंतु जर तो गाव सोडून जायला लागला तर सगळे देणेकरी त्याच्या घराजवळ जमून त्याची वाट अडवतात. म्हणतात, ''आधी आमचे कर्ज फेड आणि मग गाव सोडून जा. कर्ज फेडल्याशिवाय तुला गाव सोडू देणार नाही.''

त्याप्रमाणे जन्मलेल्या प्रत्येक जीवावर अनेक प्रकारचे कर्ज असते. ते फेडल्याशिवाय त्याला संसाराबाहेर कसे जाता येईल? भक्तीची वाट जीवात्म्याला संसाराबाहेर नेते. त्या वाटेवर पाऊल ठेवणाऱ्या मनुष्यासमोर आधीचे कर्ज संकटरूपाने उभे राहते. जन्मलेल्या प्रत्येक जीवावर तीन प्रकारचे ऋण असते. तीन ऋणातून जीव जोपर्यंत मुक्त होत नाही तोपर्यंत त्याला मुक्ती मिळत नाही. देवऋण, गुरुऋण आणि पितृऋण ही तीन ऋणे होत. ईश्वराच्या कृपेने आपल्याला मानवजन्म मिळाला म्हणून त्याचे ऋण आपल्यावर आहे. मातापित्यांनी आपला देह घडवला म्हणून त्यांचेही ऋण आपल्यावर आहे. गुरूने आपल्या देहावर मंत्रसंस्कार केला म्हणून गुरूचे ऋण आपल्यावर आहे. जोपर्यंत या तीन ऋणांतून मनुष्य मुक्त होत नाही तोपर्यंत तो मोक्षाचा अधिकारी होऊ शकत नाही.

भक्ती ही एकाच इष्टदेवतेची केली तर ती फलद्रूप होते. पाणी हवे असेल तर एकाच ठिकाणी वीस-पंचवीस फूट जमीन खणली पाहिजे. वीस ठिकाणी एकेक फूट खोदले तर पाणी मिळणार नाही. आपली भक्ती विचलित

असते. दहा देवांच्या मागे धावल्यावर कोणत्या रूपाने देवाने प्रसन्न व्हावे? बसवेश्वर म्हणतात:–

**जगदगल मुगिलगल मिगेयगल निम्मगल**
**पाताळदिंदत्तत्त निम्म श्रीचरण**
**ब्रह्मांडदिंदत्तत्त निम्म श्रीमुकुट**
**अगम्य अगोचर अप्रमाण लिंगवे**
**यन्न करस्थळक्के बंदु चुलुकादिरय्या।**

सर्व वेदान्ताचे सार त्यांनी या एकाच वचनात सांगितले आहे. लिंगाचा अंत कुठे आहे हे ब्रह्मदेवाला देखील कळले नाही. म्हणून त्याला अगम्य, अगोचर असे म्हटले गेले. लिंगपुराणात याविषयी विस्तृत कथा आली आहे. अशा व्यापक लिंगतत्त्वाची उपासना करण्यासाठी आचार्यांनी इष्टलिंगाच्या रूपाने ते आपल्या हातावर ठेवले. इष्टलिंगधारणेची अथवा तळहातावर ठेवून त्याचे पूजन करण्याची परंपरा कशी निर्माण झाली? याची कारणे आहेत. ज्योतिर्लिंगाच्या दर्शनासाठी बारा ठिकाणी आपल्याला हिंडावे लागते. काशी, रामेश्वर, केदार, सोमनाथ अशा कित्येक तीर्थक्षेत्रांना भेटी देऊनसुद्धा मनाला शांती मिळतेच असे नाही. मनोवृत्तीला अंतमुख केल्याविना माणसाला शांती मिळणार नाही. शांती, सुख हे बाहेर नाहीच, ते आत आहे. रात्रभर झोपून सकाळी उठल्यावर मनुष्य म्हणतो की, 'मी सुखाने झोपलो होतो.'

**सुखेन सुप्तोऽहं न किंचिदवेधिषम्।**

निद्रावस्थेतील सुख हा एक मुक्तीचा नमुना आहे, सँपल आहे. व्यापारी आपल्या गोदामातील वस्तूंचे सँपल दुकानात ठेवतात. तसे गाढ निद्रा म्हणजे सुषुप्ति–अवस्था हा समाधिसुखाचा नमुना आहे. या अवस्थेत जीवाला कोणत्याही प्रकारचे दुःख भोगावे लागत नाही. उलट सुखाचा अनुभव येतो. सुखदुःख भोगण्यासाठी आपल्याकडे जागृतावस्था आणि स्वप्नावस्था आहेत. परंतु सुषुप्ति–अवस्था या दोन्ही पलीकडची असून तिच्यात दुःखानुभव येत नाही तर अल्पांशाने आनंदाची अनुभूती येते. हा आनंदच माणसाला दिवसभर उत्साहाचे देणे देऊन जातो. आनंदाने जीवाची निर्मिती होते. आनंदामुळे जीव जिवंत राहतो आणि शेवटी आनंदातच जीव विलीन होतो. म्हणून आनंद हेच ब्रह्म होय.

संसारात सुखदुःख मिळते, परंतु आनंद मिळत नाही. जीवात्म्याला आनंद मिळाला नाही तर तो जिवंत राहणे कठीण. झोप न घेणारा मनुष्य किती दिवस जगू शकेल? चार पाच दिवस तो झोपेवाचून काढील. परंतु सहाव्या दिवशी केव्हा झोप लागली हे त्याला कळणारदेखील नाही. झोप आपल्या आयुष्याला कवटाळून बसली आहे. माणसे पूजा करताना झोपतात, आशीर्वचन ऐकताना देखील छान झोप काढतात. झोपेला स्थळ–काळाचे भान नसते. ती कुठेही, कधीही येते. या झोपेत म्हणजे निद्रावस्थेत माणसाला जो आनंद मिळतो तो मुक्तिसुखाचा एक अंश आहे. एक सँपल आहे. मातेच्या गर्भात मूल चोवीस तास हा आनंद उपभोगते. ते केवळ झोपलेले असते. त्याला कमावण्याची चिंता नसते की खाण्याची. जन्मल्यानंतर ते केवळ दूध पिण्यापुरते जागे असते, नंतर दिवसभर झोप काढते. गर्भातली झोप थोडी कमी होते. जसजसे वय वाढत जाते तसतशी झोप कमी कमी होत जाते. सात-आठ तास झोपेत जे निरंतर सुख मिळते तेवढे सुख संसारातील अन्य कोणत्या ठिकाणी मिळते? कोणत्या विषयांत मिळते?

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय संसारात आहेत. शब्द-श्रवण हे किती काळ आपल्याला आनंद देईल? आज आशीर्वचन चालू होऊन अर्धा तास झाला. तुम्ही आणखी अर्धा तास बसू शकाल. सतत आठ तास श्रवणातला आनंद आपण घेऊ शकत नाही. नाटक, चित्रपट पाहणे हे तीन तासांपुरते. याचप्रमाणे स्पर्श, रस आणि गंध या विषयांपासून मिळणारे सुखदेखील क्षणिक आहे. त्या मानाने निद्रासुख मनुष्याला दीर्घकाळ मिळते. ते सुख हा आत्म्याचाच आनंद आहे. 'तस्यैवानंदस्य मात्रामुपजीवन्ति।'

संसारात ज्याला आम्ही सुख म्हणतो त्यात याच आनंदाचा एक अंश असल्यामुळे आपत्याला ते आनंददायी वाटते. वस्तुत: सुख म्हणजे आनंद नव्हे. जर सुख आत असेल, आत्मरूपात असेल, तर वृत्ती अंतर्मुख केली पाहिजे. त्यासाठीच आचार्यांनी आपल्या इष्टलिंग प्रदान केले आहे. आता तुम्हाला इकडे तिकडे पळण्याची गरज नाही. तुम्हाला ध्यान करायचे असो वा जप करायचा असो, तो या इष्टलिंगाच्या साक्षीने करा. यामुळे काय होईल? शेतात एकाच ठिकाणी पन्नास फूट खोदल्याने जो फायदा होतो तसा फायदा होईल. ज्याची इष्टलिंगावर श्रद्धा नसते त्याची अन्य देवतेवर श्रद्धा असणे शक्य नाही. इष्टलिंगावरील श्रद्धेचा जेव्हा उत्कर्ष होतो तेव्हा तिला 'निष्ठाभक्ती' म्हणतात.

**भक्तेर्यदा समुत्कर्षो भवेद् वैराग्यगौरवात्।**
**तदा माहेश्वर: प्रोक्तो भक्त: स्थिरविवेकवान्।।१०.३।।**

आचार्य सांगतात की, आपल्या मनातील वैराग्यभावनेने भक्तीचा उत्कर्ष होतो तेव्हा श्रद्धाभक्तीच निष्ठाभक्तीत परिवर्तित होते. 'निश्चयेन तिष्ठतीति निष्ठा।'

निरंतर, एकाच ठिकाणी राहणारी भक्ती ती 'निष्ठाभक्ती' होय. जशी तेलाची धार. ती अखंडपणे एकाच ठिकाणी पडत असते. तशी श्रद्धा समग्ररूपाने एकाच दिशेने प्रवाहित होते तेव्हा ती निष्ठा. रुद्राभिषेक करताना जलधारा अखंड शिवलिंगावर वर्षत राहावी अशी योजना आपण करतो. त्याला अर्थ कोणता? तर जशी जलधारा शिवलिंगावर अखंड पडत असते तसे आपले मन त्याच्यावर जडले पाहिजे. असे घडले तर आपल्या ठिकाणी शक्तिसंचार होईल. येथे इतके विजेचे दिवे जळताहेत. पंखा फिरतो आहे, ध्वनिक्षेपकावरून तुमच्यापर्यंत आवाज येतो आहे. हे कोणाचे सामर्थ्य आहे? हे विजेचे सामर्थ्य. बल्बचा संबंध जोपर्यंत विजेशी आहे तोपर्यंत इथे प्रकाश राहील आणि ज्याक्षणी हा संबंध तुटेल त्याक्षणी येथे अंधार पसरेल. त्याचप्रमाणे भगवान शिव सुखाचा, शांतीचा आणि आनंदाचा सागर आहे. त्याच्याशी जेवढा काळ आपला संबंध राहील तेवढा काळ सुखाचा, शांतीचा आणि आनंदाचा. संबंध जेव्हा सुटेल तेव्हा दु:खाचे भयाण, काळोख भरलेले साम्राज्य आपल्यापुढे उभे असेल. हा जुळलेला संबंध अतूट राखण्याचा प्रयत्न म्हणजचे निष्ठाभक्ती होय.

आपण ऐकतो की पाण्याचा थेंबच मोती बनतो. परंतु कुठलेही पाणी मोती होत नाही. स्वाती नक्षत्रातील पाऊसथेंब जेव्हा शिंपल्यात पडतो तेव्हाच तो मोती बनतो. एका सुभाषितकाराने म्हटले आहे:-

**'संतत्पायसि संस्थितस्य पयसो नामापि न ज्ञायते**
**मुक्ताकारतया तदेव नलिनीपत्रस्थितं राजते।**
**स्वात्यां सागरशुक्तिमध्यपतितं तन्मौक्तिकं जायते**
**प्रायेणाधममध्यमोत्तमजन: संसर्गतो जायते।।'**

स्वाती नक्षत्रातील पाऊस कोसळतो आहे. तो तापलेल्या लोहगोळ्यावर पडला तर? त्याची तात्काळ वाफ

होईल. कमलदलावर पडला तर पहाटे एखाद्या रसिकाला मोत्याप्रमाणे भासेल. परंतु वायूच्या एखाद्या झुळकीने हा मोती टपकन् खाली पडून मातीत मिसळेल. समुद्रातल्या शिंपल्यात जर हा पाऊस पडला तर मात्र त्याचे सुंदर मोत्यात रूपांतर होईल. परंतु स्वातीमधला सगळा पाऊस मोती बनत नाही. त्याचप्रमाणे इष्टलिंगावरील श्रद्धाभक्ती जेव्हा निष्ठाभक्ती होते तेव्हा भक्तस्थलातील साधक माहेश्वरस्थलात प्रवेश करतो. भक्त आणि माहेश्वर यांच्यात एकच फरक आहे. जो 'भक्त' असतो त्याची भक्ती इष्टलिंगाबरोबरच अन्य देवतांवरही असते, परंतु 'माहेश्वरा'ची भक्ती केवळ इष्टलिंगावरच असते. म्हणून 'कोणत्या आचारभेदाने भक्त हा माहेश्वर बनतो?' या अगस्त्य मुनीच्या प्रश्नाचे जगद्गुरू रेणुकाचार्यांनी असे उत्तर दिले आहे.

**भक्तेर्यदा समुत्कर्षो भवेद् वैराग्यगौरवात्।**
**तदा माहेश्वरः प्रोक्तो भक्तः स्थिरविवेकवान्।।१०.३।।**

'भक्तस्थला'तील साधकाजवळ वैराग्यभावना कमी असते. त्याच्याजवळ सांसारिक भाव असतो, आशा, अभिप्सा असते. ईश्वराजवळ तो जातो सांसारकि गोष्टी मागण्यासाठी. परंतु 'माहेश्वर' मात्र इतर काही मागण्यासाठी ईश्वराकडे जात नाही. तो ईश्वराजवळ जातो ते ईश्वरालाच मागण्यासाठी. आपण मात्र ईश्वराला वाटेल ते मागतो. माणसे तीर्थयात्रा करतात. कुणी काशीला जातात, कुणी रामेश्वरला. परत आल्यावर सर्व नातलगांना बोलावून मावंदे घालतात, जेवण देतात. ज्या क्षेत्राची आपण यात्रा करतो त्या क्षेत्राची अधिष्ठातृ देवता आपल्या सोबत आलेली असते. परंतु आपण तिला घरात घेत नाही. सर्वांच्या साक्षीने पाहुणचार करून तिला परत पाठवतो. देवतेला परत पाठवणारेही काही भक्त असतात हे लक्षात घ्या. त्यांना ईश्वराची गरज नसते. त्यांना ईश्वराच्या अनुग्रहाने शेत, घर, मुले हे सारे हवे असते. परंतु ईश्वरासाठी ईश्वरावर प्रेम करतो तो 'माहेश्वर' होय.

एक राजा होता. आपल्या पश्चात् उत्तराधिकारी कोणाला नेमावे? असा त्याला प्रश्न पडला. त्याने नगरात दवंडी पिटवली की, 'उद्या सूर्योदयापासून ते सूर्यास्तापर्यंत राजा उद्यानात बसणार आहे. जो कोणी त्याला फक्त स्पर्श करील तो राज्याचा उत्तराधिकारी होईल.'

दवंडी ऐकून नागरिकांना आनंद झाला. राजपद मिळणे किती सोपे आहे? केवळ राजाला स्पर्श केला की झाले. जो तो तयारीला लागला. दिवस उजाडताच प्रत्येकजण उद्यानाकडे धावत सुटला. पण तेथे जाऊन पाहतात तो सगळीकडे दुकानेच दुकाने थाटलेली. पेयांची, मिठायांची, वस्त्रांची, दागिन्यांची. आणि विशेष म्हणजे 'आज जो कोणी जे काही घेईल ते त्याला मोफत मिळेल' अशी सूचना लावलेली.

सर्वांना वाटले, मोफत मिळते तर सोडा कशाला? चांगले खाऊन पिऊन घेऊ पोटभर, वस्त्रे दागिने घेऊ भरपूर आणि नंतर राजाला स्पर्श करू. दिवस पडलाय त्यासाठी. सगळेजण खाण्यापिण्यात, वस्तू जमा करण्यात गुंतले. राजाकडे लक्षच दिले नाही. सूर्यास्त झाला. कोणीच आले नाही म्हणून राजा रागावला. त्याने प्रधानाला विचारले,

''कोणीच कसे आले नाही मला स्पर्श करायला?''

''कसे येतील महाराज?'' प्रधान उत्तरला, ''आपण सर्व वस्तू मोफत ठेवल्या, त्या घेता घेता त्यांना वेळच मिळाला नाही आपल्यापर्यंत पोचायला!''

हे एकताच राजा रागावला. त्याने फर्मावले, ''सर्वांना धरून आणा, त्यांच्याकडून वस्तू हिसकावून घ्या आणि प्रत्येकला शंभर कोरडे मारा.''

प्रधानाने त्याप्रमाणे केले. तेव्हा सर्व लोकांना पश्चात्ताप झाला. क्षुद्र मोहासाठी आपण राज्य घालवले, वस्तूही आपल्याजवळ राहिल्या नाहीत आणि वर कोरडेही खावे लागले.

ही प्रत्येकाच्या जीवनाची कथा आहे. ईश्वराने आपल्याला संसारात पाठवले कशाला? त्याला वाटले की, माणूस आपली पूजा करील, सेवा करील, भक्ती करील. मग आपण त्याला आपले स्वरूप देऊ. परंतु किती जणांना वेळ आहे? सगळे गुंतलेले आहेत आपापल्या व्यापात. त्यांना ईश्वरापेक्षा इतर वस्तूंचाच अधिक मोह. म्हणून सांसारकि वस्तूंसाठी ईश्वरावर प्रेम करणारा 'भक्त' आहे तर ईश्वरासाठी ईश्वरावर प्रेम करणारा 'माहेश्वर' आहे. भक्त आणि माहेश्वर यात एवढेच अंतर आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
१२ ऑगस्ट १९९१

---

## आशीर्वचन दुसरे

# माहेश्वरप्रशंसास्थल– १

जिज्ञासू सद्भक्तांनो,

अगस्त्यांच्या प्रश्नाला उत्तर देताना जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणतात–

**केवले सहजे दाने निष्णातः शिवतत्परः।**
**ब्रह्मादिस्थानविमुखो भक्तो माहेश्वरः स्मृतः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी १०.२)

भक्तस्थलातला साधक माहेश्वरस्थलात आल्यानंतर त्याची योग्यता कोणती हे येथे सांगितले आहे. तो सहजदान करण्यात निष्णात असतो ही पहिली योग्यता होय. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त दानाचे तीन प्रकार सांगितले आहेत. सोपाधिक दान, निरुपाधिक दान आणि सहजदान. 'दाना'विषयी उपनिषदात एक सुंदर कथा आली आहे.

एकदा ब्रह्मदेवाकडे देव, दानव आणि मानव गेले आणि 'आम्हा सर्वांना एकदाच उपदेश करा' अशी त्यांनी प्रार्थना केली. एकेकाला उपदेश करणे सोपे आहे; परंतु समूहाला– त्यातही वेगवेगळे असतील तर उपदेश करणे कठीण आहे. कारण प्रत्येकाची बुद्धी भिन्न प्रकारची असते. प्रत्येकजण उपदेशाचा आपापल्या परीने अर्थ लावत असतो. ब्रह्मदेवांनी तिघांनाही 'द' या एका अक्षराचा उपदेश केला.

'द'चा अर्थ कोणता? देवांनी विचारले.

'दम' ब्रह्मदेवांनी उत्तर दिले. देव हे भोगी असतात. म्हणून त्यांना इंद्रियनिग्रह करा (दम) असा ब्रह्मदेवांनी उपदेश दिला.

'आम्ही' 'द' चा कोणता अर्थ घ्यावा?' दानवांनी विचारले.

'दया' ब्रह्मदेव उत्तरले. दानव क्रूर, दयाहीन असतात, म्हणून त्यांना दया करा असा उपदेश मिळाला.

'आमच्यासाठी अर्थ कोणता?' मानवांनी विचारले तेव्हा ब्रह्मदेव हसून म्हणाले, 'दत्त'. मानव स्वभावत: लोभी असतात. त्यांना त्याग शिकवण्यासाठी दान करा असा उपदेश दिला. तुलसीदासांनी म्हटले आहे:-

**लोभ पापका बाप बखाना दान धर्मका मूल।**

लोभामुळे आणि दानामुळे काय घडते? लोभ हा पापाचा बाप आहे. लोभामुळे पापेच उत्पन्न होतात. लोभी मनुष्य काय करील हे सांगता येत नाही. लोभ हा दुर्गुण आहे. लोभी माणूस स्वत:साठी द्रव्य वेचत नाही तर मग इतरांसाठी काय वेचणार? म्हणून तो इहलोकात सुखी नसतो आणि परलोकातही सुखी होत नाही. म्हणून दान हा धर्म आहे, ते एक कर्तव्य आहे. आपण संपादिलेल्या द्रव्यात चौघे भागीदार असतात. धर्म, राजा, चोर आणि अग्नी. यांत धर्म श्रेष्ठ आहे. तो प्रथम आपल्यापुढे येऊन वाटा मागतो. सगळे मागत नाही. संपत्तीचा केवळ दहावा हिस्सा मागतो. आपण तो देत नाही. मग राजा येतो. राजा म्हणजे सरकार. आपण त्यालाही देत नाही. संपत्ती दडवून ठेवतो. पण चोराच्या नजरेतून संपत्ती सुटत नाही. एकवेळ आपण ठेवलेली वस्तू आपत्याला सापडणार नाही. पण चोराला मात्र नेमकी सापडते. काही जण चोराच्या नजरेला येणार नाही अशा प्रकारे संपत्ती लपवून ठेवतात. नंतर अग्नी येतो आणि सारे काही भस्मसात् करतो. त्याला टाळणे कठीण आहे. म्हणून जो धर्माला प्रथम वाटा देतो त्याची संपत्ती सुरक्षित राहते आणि तो इहपरलोकी सुखी होतो.

शास्त्रे सांगतात की, या जन्मात आपण सुखी का आहोत? तर गेल्या जन्मात आपण केलेल्या दानाचे हे फळ आहे. आपल्या घरासमोर भिक्षा मागायला येणारा भिक्षुक केवळ भिक्षा मागायला येत नाही.

**गृहं गृहमटन् भिक्षु: शिक्ष्यते न तु याच्यते।**
**अदत्वा मादृशो मा भू: दत्वा च त्वादृशो भव।।**

तर शिकवण देण्यासाठी येत असतो. न देऊन माझ्यासारखे भिकारी होऊ नका. तर देऊन तुमच्यासारखे धनिक व्हा. पूर्वजन्मी काही न दिल्यामुळे मी असा दरिद्री झालो, अन्नासाठी मला दारोदार हिंडावे लागते, असे तो सांगत असतो. अशी शिकवण देत भिक्षुक सर्वत्र फिरत असतो. याचा अर्थ असा की या जन्मात आम्ही जी सुखे भोगत आहोत ती या जन्मातली कमाई नसून पूर्वजन्मातली आहे. या जन्मात जी कर्मे आपण करू त्याची फळे पुढील जन्मात भोगावी लागणार आहेत.

एखादा मनुष्य दुकानात नोकरी करतो. त्याला पगार मिळतो. एक तारखेला. ऑगस्टच्या एका तारखेला मिळणारा पगार हा ऑगस्ट महिन्याचा पगार नव्हे. तर जुलै महिन्याचा आहे. ही या जगातील गोष्ट आहे. 'यथा दृश्यते तथा कल्प्यते.' या लोकातल्या व्यवहाराचा विचार करून आपत्याला परलोकाचा विचार करायला पाहिजे. पूर्वजन्मीच्या दानामुळेच आपण या जन्मी श्रीमंत आहोत असे मानले पाहिजे. या जन्मी जर दान केले नाही तर पुढील जन्म दरिद्री ठरलेलाच आहे.

एक सुंदर कथा आहे. एक श्रीमंत मनुष्य होता. धन, भरपूर शेती त्याच्याकडे होती. परंतु कोणाला काही देणे त्यांना माहीत नव्हते. त्यांच्या गल्लीत कोणी भिक्षुक येऊ शकत नव्हता. त्याच्या मुलाचे लग्न झाले. सून सुसंस्कृत घराण्यातली होती. दान देणे, संतांचा आदरसत्कार करणे हा तिचा स्वभाव होता. सासरचे वातावरण तिच्या

स्वभावाशी प्रतिकूल होते. स्वत: शिजवणे आणि स्वत:च खाणे. इतरांचा तिळमात्र विचार नाही. गीतेत म्हटले आह, 'भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात्।'

जे केवळ आपल्यासाठीच अन्न शिजवतात, कोणाला त्यातला कणही देत नसतील तर त्या घरातली माणसे अन्न खात नाहीत तर पापच शिजवतात, पापच खातात आणि शेवटी नरकात जातात. प्रत्येक गृहस्थाने आपल्या अन्नातील थोडा तरी भाग इतरांना देणे हे त्याचे कर्तव्य असते. घरातली पहिली भाकरी पहिल्या मुलाने खाऊ नये आणि शेवटची भाकरी लहान मुलाने खाऊ नये, अशी एक समजूत आहे. याचा अर्थ असा की तुमच्या अन्नाचा आरंभ आणि शेवट दानात व्हायला हवा. पहिली आणि शेवटची भाकरी दान केल्यानंतर मधल्या भाकरी धर्माने परिपूर्ण होतात आणि त्यांच्या सेवनाने आपली धार्मिक भावना वाढीस लागते. कारण 'अन्नमयं हि सोम्य मन: आपोमय: प्राण:।'

आपले मन म्हणजे अन्नाचा सूक्ष्म परिणाम होय. आपण जसे अन्न खाऊ तसे आपले मन बनेल. म्हणून वीरशैवसिद्धान्तात सर्व वस्तू इष्टलिंगाला अर्पण केल्यावरच त्यांचा उपभोग घ्यावा असे म्हटले आहे. मग तो प्रसाद होतो. गीतेत म्हटले आहे, 'प्रसादन्तु प्रसन्नता।' जो प्रतिदिनी प्रसाद सेवन करतो त्याचे मन सदैव प्रसन्न राहते. लोक नेहमी विचारतात, 'महाराज, आमच्या मनात शांती नाही, प्रसन्नता नाही!' याचे कारण काय? तर तुम्ही रोज प्रसादाचे सेवन करीत नाही. जर तुम्ही रोज प्रसाद घेतला तरच तुमचे मन प्रसन्न राहील. शिजवलेला पदार्थ ईश्वरार्पण केला की तो प्रसाद होतो. जोपर्यंत पदार्थात समर्पणभाव नाही तोपर्यंत तो 'पदार्थ' आहे. परंतु समर्पणभाव त्यात आला की तो 'प्रसाद' होतो.

तुम्ही कधी मंदिरात, कधी संताकडे, कधी जगद्गुरूंकडे जाता तेव्हा सोबत काही फळे घेऊन जाता. नारळ, केळी घेऊन मंदिरात जाताना जर कुणी विचारले की, 'तुमच्या हाती काय आहे? आणि हे कोणाचे आहे?' तर तुम्ही उत्तर देता की, 'हे नारळ आहे, केळी आहेत आणि हे माझे आहे.'

मंदिरातून परतताना जर कोणी विचारले, 'तुमच्या हाती काय आहे?' तर तुम्ही सांगता, 'हा प्रसाद आहे.' त्यावेळी तुम्ही केळी, नारळ असे शब्द उच्चारत नाही. त्या सर्वांना केवळ 'प्रसाद' असेच संबोधता. 'हा कोणाचा आहे?' असे विचारल्यावर सांगता, 'हा शिवाचा प्रसाद आहे. जगद्गुरूंचा प्रसाद आहे.' पदार्थ आणि प्रसाद यांत फरक कोणता? तर जोपर्यंत पदार्थांच्या ठिकाणी ममत्वभाव आहे तोपर्यंत तो 'पदार्थ' असतो आणि ममत्व संपून समर्पणभाव आला की तो 'प्रसाद' होतो. 'हा माझा' असे म्हटले की 'पदार्थ' आणि 'हा ईश्वराचा' असे म्हटले की 'प्रसाद' म्हणून ईशावास्योपनिषदात म्हटले आहे, 'तेन त्यक्तेन भुंजिथा: माघृध: कश्यस्विद्धनम्।'

अन्न, वस्त्र इत्यादींचा उपभोग घेण्याआधी ते इतरांना अर्पण करून सेवन करावेत, अशी आपल्याकडे प्राचीन रूढी आहे. त्या श्रीमंत माणसाच्या सुनेला घरातल्या माणसांचे वर्तन योग्य वाटले नाही. या घरात संत येत नाहीत, कोणी भिक्षुक येत नाही, घरातील माणसे कधी मंदिरात जात नाहीत. कोणाला कधी काही देत नाहीत. केवळ स्वत:तच मग्न आहेत. त्यामुळे तिचे मन उबगले.

एके दिवशी अचानक एक भिक्षुक दाराशी आला आणि त्याने साद घातली, 'ॐ भवति भिक्षां देहि.'

सुनेला मोठा आनंद झाला. कोणीतरी भिक्षुक आपल्या दारी आला, हे भाग्यच. परंतु सासूच्या धाकाने तिने त्याला काही वाढले नाही.

''बाबा, पुढल्या घरी जा.'' ती म्हणाली.

''का? तुझ्या घरात अन्न नाही?'', भिक्षुकाने विचारले.

''आहे, पण ते शिळे आहे.'' ती उत्तरली.

''मग शिळेच वाढ. मी कुठे ताजे अन्न मागतोय?'' भिक्षुक म्हणाला.

''बाबा, अन्न थोडेच आहे. पुढे जा.'' सून म्हणाली व भिक्षुक पुढे निघून गेला. हे सारे संभाषण सासूने ऐकले. तिला खूप राग आला. नवरा घरी आल्यावर तिने सुनेबद्दल तक्रार केली, ''ही कुलमर्यादेचे उल्लंघन करते, घरात शिळे अन्न आहे, तेदेखील थोडेच आहे अशी बदनामी करते. हिला माहेरी पाठवा. आपण मुलाला दुसरी बायको करून देऊ.''

सासऱ्याने विचार केला आणि सुनेला बोलावून विचारले, ''तू या घरात आल्यापासून एकदादेखील तुला शिळे अन्न खावे लागले नाही. आपल्या घरी कणगी-पोती भरलेली आहेत. मग तू भिकाऱ्याला असे का म्हणालीस?''

तेव्हा सुनेने उत्तर दिले, ''मी जे बोलले ते खरेच आहे. सकाळी शिजवलेले अन्न संध्याकाळी शिळे होते. तुमच्या घरातले धनधान्य हे पूर्वजन्मातल्या सत्कर्माचे फळ आहे. मग ते ताजे कसे असेल? हे तर गेल्या जन्मातले आहे.''

सासऱ्याच्या थोडे थोडे लक्षात येऊ लागले. हिचे बोलणे साधे नाही. आध्यात्मिक आहे. त्याने विचारले, ''आपल्या घरी थोडेच अन्न आहे असे तू का म्हणालीस?'' सून उत्तरली, ''या जन्मात तुम्ही काही दानधर्म, सत्कर्म करीत नाही. म्हणजे कमाई काहीच नाही. जे आहे तेच खात बसलात. आज ना उद्या केव्हातरी ते सरणारच आहे. म्हणून ते थोडे आहे.''

सासऱ्याच्या डोक्यात प्रकाश पडला. त्याने धान्याच्या कोठाराची किल्ली सुनेच्या हाती देऊन सांगितले, ''आजपासून तू सर्व व्यवहार सांभाळ.''

सुनेने कोठार उघडल्यावर तिला सारे धान्य किडलेले दिसले. तिने तेच धान्य दळून त्याच्या भाकरी करून सासऱ्याला वाढल्या. त्या पाहून सासरा रागवला. या कृत्याबद्दल त्याने सुनेला जाब विचारला. तेव्हा ती म्हणाली, ''या जन्मात तुम्ही दानधर्म केला नाही म्हणून पुढच्या जन्मी तुमच्या नशिबी असेच अन्न येणार आहे. त्याची तुम्हाला सवय व्हावी आणि पुढे जड जाऊ नये म्हणून मी असे अन्न तुम्हाला वाढले.''

सासऱ्याने सुनेचे मोठेपण ओळखलेआणि तिच्या सांगण्यानुसार तो  वागू लागला.

जोपर्यंत मनुष्यात धर्मभावना जागी होत नाही तोपर्यंत तो सुधारणे शक्य नाही. म्हणून ब्रह्मदेवांनी मनुष्याला 'द' म्हणजे 'दत्त' असा उपदेश केला. जोपर्यंत मनुष्य दान करीत नाही तोपर्यंत त्याचे मन विशाल होत नाही. दान न देणाऱ्याला ब्रह्मज्ञान होणे शक्य नाही. कारण ब्रह्म विशाल आहे. एवढ्या विशाल तत्त्वाला जाणण्यासाठी मनही तेवढे विशाल करावे लागेल. दानाचे अंतिम फळ ब्रह्मज्ञानाची प्राप्ती हे आहे.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'त जगद्गुरू रेणुकाचार्यांनी सोपधिक, निरुपाधिक व सहज असे दानाचे तीन प्रकार सांगितले आहेत. प्रतिफळाची अपेक्षा ठेवून केलेले दान हे सोपाधिक दान होय. अपेक्षा ठेवली अथवा न ठेवली तरी दानाचे फळ मिळणारच. परंतु प्रतिफळाची अपेक्षा ठेवून केलेले दान हे सोपधिक दान. प्रतिफळाची अपेक्षा न करता केलेले दान निरुपाधिक दान होय. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' या गीतोक्तीनुसार हे दान केले

जाते. देय वस्तू, देणारा आणि घेणारा असे भेद न राहता घडलेले दान हे सहजदान होय. हे दान अत्यंत कठीण आहे. मी देतो आहे ही भावना देणाऱ्याच्या मनात नसावी आणि मी घेतो आहे ही भावना घेणाऱ्याच्या मनात नसावी. हे कठीण वाटले तरी बुद्धी व्यापक झाली तर हे शक्य होते. डाव्या हातातला रुपया उजव्या हातात ठेवला तर कोणी दिला आणि कोणी घेतला? देणे-घेणे या भावनाच येथे उत्पन्न होत नाहीत. कारण डावा हात व उजवा हात आपलाच आहे. त्याप्रमाणे परकेपणाची भावना जेथे संपुष्टात येते तेथे सहजदान घडते.

जगद्गुरू रेणुकाचार्य सांगतात की, भक्तस्थलातील साधक व माहेश्वरस्थलातील साधक यांच्यात हा फरक आहे. भक्तस्थलातील साधक मी देतो या भावनेने दान देत असतो. त्याची दानक्रिया 'सहज' झाली की तो माहेश्वर होतो. देणाराही शिव, घेणाराही शिव अशी भावना स्थिर झाली की सहजदान घडते. वस्तुत: आत्मा एकच आहे. 'आकाशवत् सर्वगतश्च नित्य:।' जसे आकाश सर्व घराघरांत आणि बाहेर एकच आहे. कर्नाटकातले आकाश आणि महाराष्ट्रातले आकाश यांत भेद नाही. भारतातले आणि इंग्लंडमध्ये आकाश एकच आहे. त्याचप्रमाणे आत्मा एकच आहे.

रामायणात एक प्रसंग आहे. रामाचा राज्याभिषेक झाला त्यावेळी हनुमंताने नमस्कार करताच रामाने विचारले,

'तू कोण आहेस?'

अपरिचिताला विचारावा असा प्रश्न रामाने विचारलेला ऐकून हनुमंताला आश्चर्य वाटले. रामाचे काम झाले, आता त्याला आपण परके वाटणारच असाही विचार त्याच्या मनात येऊन गेला. परंतु हनुमंत बुद्धिमान होता. 'बुद्धिमतां वरिष्ठ:।' त्याने विचार केला की रामाने असे का विचारले असावे? 'तू कोण?' याचे उत्तर मी शरीर, मी जीव, मी आत्मा असेही देता येते. म्हणून त्याने रामाला विचारले,

'आपण जो प्रश्न केला तो शरीरदृष्टीने की आत्मदृष्टीने? देहदृष्टीने मी आपला दास आहे. जीवदृष्टीने मी आपला अंश आहे आणि आत्मदृष्टीने मी आपले स्वरूपच आहे. आपल्यात आणि माझ्यात काही भेद नाही.'

**देहदृष्ट्या तु दासोऽहम्, जीवदृष्ट्या त्वदंशक:।**

**आत्मदृष्ट्या त्वमेवाहम् इति मे निश्चला मति:।।**

हनुमंताचे उत्तर ऐकून रामाला आणि ज्ञानी लोकांना समाधान वाटले. आत्मा एकच असून आत्मा व परमात्मा यांच्यात भेद नाही, असे या कथेचे तात्पर्य आहे.

महेश्वरावर नितातं श्रद्धा ठेवणारा तो माहेश्वर. सर्व देवांचा देव तो महादेव. शिव सर्वांना पूज्य आहे. का पूज्य आहे? कारण शिवाने सर्व काही दान केले. स्मशानात राहणे पसंत केले, सर्पाचे अलंकार घातले. शंकराचे चरित्र हे वैराग्यमय चरित्र आहे. जो त्यागी असतो तो पूज्य होतो. शंकराने केवळ शिकवण दिली नाही तर आचरण करून दाखविले. अशा महेश्वराच्या ठिकाणी नितातं श्रद्धा ठेवणारा तोच माहेश्वर होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

१३ ऑगस्ट १९९१

## माहेश्वरप्रशंसास्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

**विश्वस्मादधिको रुद्रो विश्वानुग्रहकारकः।**
**इति यस्य स्थिरा बुद्धिः स वै माहेश्वरः स्मृतः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.८)

ज्याला आम्ही 'महेश' म्हणतो त्याचे दुसरे नाव 'रुद्र' आहे. ब्रह्मा–विष्णु–महेश असे आपण म्हणतो आणि ब्रह्मा–विष्णु–रुद्र असेही म्हणतो. महेशच 'रुद्र' आहे. रुद्र कसा आहे? तर 'विश्वस्मात् अधिकः।' विश्व या शब्दाचे प्रपंच व नारायण असे दोन अर्थ आहेत. ब्रह्मा निर्माता, विष्णु पालनकर्ता व रुद्र संहार करणारा आहे. 'रोदयतीति रुद्रः।' जो लोकांना रडवतो तो रुद्र होय. सृष्टिसंहार होताना सर्व लोक रडतात. कोणाच्या घरी मृत्यू झाला तर परिवारातील सर्व रडू लागतात. असा हा रडवणारा देव केवळ रडवतच नाही तर 'रुद्र दुःख द्रावयतीति रुद्रः।' आमची सर्व दुःखे दूर करणारा तोच आहे. म्हणून श्रीरुद्राचे पठण–पारायण केल्याने आपली दुःखे दूर होतात.

मृत्यू हा प्रकृतीचा सहजधर्म आहे. गीतेत भगवंताने म्हटले आहे, 'न त्वं शोचितुमर्हसि।' कितीही विचार केला तरी आपण जे टाळू शकत नाही त्याची फार चिंता करू नये. जन्म–मृत्यू हे शरीराचे सहजधर्म आहेत. जो जन्मतो तो निश्चित मृत्यू पावणार. जो उत्पन्न होतो त्याचे सहा विकार शास्त्रात सांगितले आहेत. अस्ति, जायते, विवर्धते, विपरिणमते, अपक्षीयते व विनश्यति. मातृउदरात गर्भसंभव झाला की त्याचे अस्तित्व जाणवते (अस्ति). त्यानंतर त्याचा जन्म होतो (जायते), वाढतो (विवर्धते), परिपक्व होतो (विपरिणमते), ऱ्हास होतो (अपक्षीयते) आणि शेवटी मृत्यू पावतो (विनश्यति). जो आता दिसतो तो कालांतराने दिसेनासा होतो. उत्पन्न झालेले सारे नष्ट होते ही सृष्टिप्रक्रिया आहे. या सृष्टिक्रमात निर्मितीकार्य ब्रह्मदेव सांभाळतो. पालन विष्णू करतो आणि संहारकार्य रुद्र सांभाळतो.

हा संहारक रुद्र म्हणजे भगवान शिव आपल्यावर एकप्रकारे अनुग्रहच करतो. आजवर उत्पन्न झालेल्या जीवांचा संहार झाला नसता तर नंतर जन्मणाऱ्या जीवांना जागा कोठे मिळाली असती? एवढी माणसे मरतात तरीही जागा अपुरीच पडते. म्हणून संहारकार्य हा रुद्राचा जीवांवर केलेला अनुग्रहच मानला पाहिजे. भगवान शिवाची कोणती कृत्ये आहेत? तर सृष्टी, स्थिती, संहार, निग्रह व अनुग्रह. सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान ही भगवान शिवाची पंचमुखे आहेत. पाच मुखांचा अर्थ असा की पाच प्रकारच्या शक्ती त्यांच्या ठिकाणी आहेत. प्रपंचाची निर्मिती, पालन, संहार ही कार्ये भगवान शिव करू शकतात आणि त्याचबोबर प्रपंचाचा निग्रह व त्यावर अनुग्रहदेखील करू शकतात.

शिवाची ही पाच कार्ये म्हणजे त्यांनी जीवावर केलेला अनुग्रहच समजायला हवा. मुलाचा जन्म झाला की आपण तो ईश्वराचा अनुग्रह मानतो. परंतु तो मृत्यू पावला तर मात्र आपण अनुग्रह मानत नाही. शास्त्रे मात्र सदैव सांगत असतात की, सुख होवो अथवा दुःख होवो भक्ताने तो ईश्वरी अनुग्रहच समजला पाहिजे. सुखापेक्षाही दुःखाला ईश्वरी कृपा मानावी. ज्याला अधिक दुःखे भोगावी लागतात त्याने आपल्यावर ईश्वराचा अनुग्रह आहे

असेच म्हटले पाहिजे. पुष्कळ लोक म्हणतात की आम्ही एवढी भक्ती करतो तरी दुःख आमची पाठ सोडत नाही. जो ईश्वराची कधी पूजा करीत नाही तो मात्र अधिक सुखी आहे. जो 'ईश्वर ईश्वर' म्हणतो त्याच्या पाठीमागे मात्र अनेक दुःखे लागलेली दिसतात.

याचे कोणते कारण असेल? दुःखात ईश्वराचे स्मरण अधिक होते. उलट सुखात त्याचे विस्मरणच होण्याचा संभव अधिक, एका कवीने म्हटले आहे:-

**दुःख में सुमिरण सब करे सुखे में करे ना कोय।**
**यदि सुख में सुमिरण करे दुख काहे को होय।।**

जेव्हा अनेक आपत्ती आपत्याला घेरून टाकतात तेव्हा अगतिक होऊन आपण ईश्वराला शरण जातो. प्रपंचात दुःख अधिक आहे, सुख मात्र कमी आहे. दुःख सिंधूएवढे तर सुख बिंदूएवढे. कधीकधी तर दुःखालाच सुख मानून माणसे कवटाळून बसलेली असतात. एक हिंदी कवी म्हणतो:-

**तारीख तुम्हे बतलायेगी दुनिया में सुख का नाम नही।**
**जिस दिल में हवस का शिक्का हैं उस दिलको आराम नही।।**

जन्माला आल्यापासून मरेपर्यंत माणूस सुखाचाच विचार करीत असतो. परंतु अंतिम दिवशी मात्र त्याला हे विदारक सत्य जाणवते की या जगात सुख नाम कोणती गोष्ट नाही. सुखच नव्हे तर सुखाचे नावदेखील नाही. एक पदार्थ असतो व एक नाव असते. काही पदार्थ अस्तित्वात नसतात. केवळ त्यांचे नाव असते. जसे खपुष्प (आकाशफूल), शशशृंग (सशाची शिंगे). या वस्तू अस्तित्वातच नसतात. केवळ त्यांचे नावे आहेत. त्याप्रमाणे प्रपंचात ज्या सुखामागे माणूस सदैव धावत सुटलेला असतो ते सुखच अस्तित्वात नाही. प्रपंचातले सुख म्हणजे सुखाचा केवळ आभास होय. या आभासामागेच माणूस धावत असतो, ते प्राप्त करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असतो.

ईश्वराने या संसारात दुःखच अधिक का बरे भरले? सुख का कमी ठेवले? जन्माला आल्यापासून प्रत्येक व्यक्तीला काही प्रश्न पडले पाहिजेत. कोऽहम्? मी कोण आहे? मला कोठे जायचे आहे? माझे कर्तव्य कोणते? याचा विचार प्रत्येक व्यक्तीने करायला हवा. परंतु याविषयी विचार करायला आमच्या जवळ वेळच नाही. मी कोण आहे? याबद्दल किती लोक विचार करतात बरे? मी जो आहे तो आहे, याबद्दल काय विचार करायचा? अशीच सर्वसामान्यांची भावना असते. आपत्याला काय हवे यासाठीच खूप लोक प्रयत्नशील असतात. या प्रपंचात जन्मणाऱ्या सर्व जीवजंतूमध्ये मनुष्यजन्म सर्वश्रेष्ठ मानला जातो. तो सर्वश्रेष्ठ आहे याचे कारण असे की, याच जन्मात आपली जी जीवनतत्त्वे आहेत ती संपादन करण्यासाठी आपण प्रयत्न करू शकतो. मनुष्यजन्माशिवाय अन्य जन्मांत कोणत्याही प्रकारची साधना करता येत नाही आणि मूलतत्त्वापर्यंत कधीही पोहोचता येत नाही. परंतु मनुष्यजन्म मिळून देखील आपल्या मनात परमतत्त्वांबद्दल कधी विचारदेखील येत नाही असे पाहिल्यावर ईश्वराने विचार केला की याला आपल्याकडे आकृष्ट करण्यासाठी काय बरे करावे? याला जास्तीत जास्त दुःख द्यायला हवे. मग दुःखाने तापलेला जीव कधी ना कधी आपल्याकडे निश्चित येईल!

दुसऱ्या राजाच्या आक्रमणामुळे एक राजा राज्य सोडून पळाला आणि एका गुहेत लपला. गुहेसमोर रस्ता होता, रस्त्यावरून जाणाऱ्या-येणाऱ्यांचे आपल्याकडे लक्ष वेधावे यासाठी राजाने आपल्याजवळच्या तीन रत्नांपैकी एक अमूल्य रत्न रस्त्यावरून जाणाऱ्या दोघांना फेकून मारले. तेव्हा त्या रत्नासाठी भांडण करीत दोघेही

निघून गेले. रत्न कोणी फेकले याकडे कोणीच लक्ष दिले नाही. असाच प्रकार यानंतर दोन वेळा घडला. शेवटी राजाने रागावून येणाऱ्या दोघांना एक दगड फेकून मारला. त्याबरोबर दगड कोणी मारला हे पाहण्यासाठी ते राजाकडे धावत आले. रत्ने फेकली त्यावेळी राजाकडे कोणीच लक्ष दिले नाही. दगड मारल्याबरोबर मात्र त्याचा लोकांनी शोध केला. त्याप्रमाणे ईश्वराने सुख दिले त्यावेळी आपण त्याचा विचारदेखील करीत नाही. मात्र त्याने दुःख दिले की आपल्याला बरोबर त्याची आठवण येते.

या जगात सुखदुःख दोन्ही गोष्टी परमेश्वराने ठेवल्या आहेत. माणसाला अधिक सुख मिळू लागले की त्याला ईश्वराचे सहज विस्मरण होते. सुखी माणूस ईश्वरापासून दूरच राहतो. एखादा पुण्यशील मात्र सुखी व धनिक असून देखील ईश्वराला कधी विसरत नाही. पण अशी माणसे थोडी. ईश्वराचे विस्मरण होणारी, त्याच्या अस्तिवाबद्दल शंका घेणारी माणसेच या जगात अधिक सापडतील. धनिक आणि अधिकारी माणसाला ईश्वराची गरजच कधी भासत नाही. कारण त्याला सारे मिळाले असे वाटत असते. म्हणूनच ईश्वराने या जगात दुःख पेरून ठेवले आहे. ज्याला आपल्याकडे आकृष्ट करायचे असते त्याला ईश्वर दुःख देतो. एवढेच नव्हे तर जेवढे संतमाहात्मे होऊन गेले त्या सर्वांनी ईश्वराकडे कधी सुखाची याचना केली नाही तर दुःख मागितले.

कर्नाटकात अनेक संत होऊन गेले. त्यांमध्ये शिवशरणी म्हणजे स्त्री-संत अधिक होऊन गेले. अक्कमहादेवीचे नाव आपण ऐकले असेल. अक्कमहादेवी आपल्या वचनात आपल्या इष्टदेवाची- मल्लिकार्जुनाची प्रार्थना करतात. त्या वचनाचा आशय असा की देवा, मला घरातल्यांनी घराबाहेर काढावे. माझ्यावर दारोदार भटकून भिक्षा मागण्याची पाळी येऊ दे. एखाद्याच्या घरासमोर मी भिक्षा मागितली तर त्याच्या मनात मला पुढे हाकलून देण्याचे विचार उत्पन्न होऊ दे. मला कोणी  भिक्षा देऊ नये. कोणाच्या मनात मला भिक्षा देण्याचा विचार आला तर माझ्या झोळीत ती पडण्यापूर्वी जमिनीवर पडू दे. जमिनीवर पडलेले अन्न मी उचलण्याआधीच एखाद्या कुत्र्याला खाऊ दे.

अक्कमहादेवीच्या या वचनातील भावना कशा आहेत? सामान्यांपेक्षा निश्चित वेगळ्या आहेत. एक नव्हे तर हजार दुःखे ती मागते. याचे एकच कारण आहे की, दुःखी मन द्रवीभूत होते. दुःखे भोगून मन पाण्यासारखे द्रवते तर सुखे भोगून ते दगडासारखे कठीण बनते. पाणी पेल्यात ओतले तर ते त्याचा आकार धारण करते. तसे दुःखी मन चटकन ईश्वराकार होते. सुखी मन मात्र दगडासारखे टणक. ते आपला आकार बदलायला तयार नसते. ईश्वरासमोर बसून रडणे याला देखील गीतेत 'योग' म्हटले आहे. हा विषादयोग होय. योग म्हणजे संबंध. ईश्वराशी संबंध जुळविणे म्हणजेच योग. आपण ध्यान करून, पूजा करून त्याच्याशी संबंधच जुळवीत असतो. हे न करता केवळ त्याच्यासमोर आपण रडलो तरी त्याच्याशी संबंध जुळतो. सामान्य माणसासमोर रडून काहीच उपयोग नाही. परंतु ईश्वरासमोर बसून रडणे हे 'रडणे' नव्हे तर तो 'योग' आहे. म्हणून संतांनी सुखाऐवजी दुःखाची याचना केली. सुख आपल्याला ईश्वरापासून दूर नेते तर दुःख आपल्याला त्याच्या अधिक जवळ नेते. यासाठीच म्हटले आहे, 'विश्वस्मात् अधिको रुद्रो विश्वानुग्रकारकः।'

सर्वांना रडवणारा रुद्र हा आपल्यावर एकप्रकारे अनुग्रहच करीत असतो. भगवंतांची सृष्टिक्रिया, पालनक्रिया, संहारक्रिया, त्याचा निग्रह- त्याच्याकडून जे जे काही घडते ते सारे- आपल्या कल्याणासाठीच घडते अशी भावना मनात वागवली तरच आपण त्याच्या अनुग्रहाला पात्र होतो. अशा प्रकारची बुद्धी स्थिर झाली की तो 'माहेश्वर' होतो. विचार काही काळापर्यंत आपल्या मनात राहतात आणि नंतर निघून जातात. सत्संगात

बसल्यावर चांगल्या भावना, चांगले विचार मनात मूळ धरतात. परंतु घरी गेल्यावर मात्र भगवंताला शिव्या देण्याइतके आपण बदलतो. आपल्या भावना आणि विचार कधी स्थिर राहत नाही. म्हणून आपण शेवटपर्यंत 'भक्त'च राहतो, पुढची पायरी कधी चढत नाही.

**ब्रह्माद्यैर्मलिनप्रायैर्निर्मले परमेश्वरे।**
**साम्योक्तिं यो न सहते स वै माहेश्वराभिध:।।१०.९।।**

आपल्या इष्टदेवतेला सर्वांत श्रेष्ठ मानायला हवे. तरच आपली भक्ती दृढ होते. आपल्या इष्टदेवतेशिवाय कोणी श्रेष्ठ नाही, ही भावना प्रत्येक भक्ताच्या मनात सदैव नांदली पाहिजे. भक्त शिवाचा असो की विष्णूचा की रामाचा, परंपरेने जी इष्टदेवता आपत्याला लाभली असेल, जिच्यावर आपली श्रद्धा असेल, तिच्यावर गुरूच्या आदेशाप्रमाणे नितांत निष्ठा ठेवली पाहिजे. आपल्या इष्टदेवतेची बरोबरी अन्य कोणताही देव करू शकत नाही ही भावना दृढ झाली पाहिजे. असे घडले तरच भक्तस्थलातील साधक माहेश्वर होतो. ईश्वर एक आहे, नावे अनेक आहेत. 'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति' हे सत्य आहे. ईश्वर एकच आहे मग त्याची उपासना अनेक रूपांत का करू नये? शिवच श्रेष्ठ असे का मानावे? हे सत्य असले तरी अनेक रूपांत उपासना केल्याने साधकाची प्रगती होत नाही. म्हणून प्रगती होण्यासाठी जे इष्ट असेल त्यालाच सर्वश्रेष्ठ मानायला हवे.

महर्षी व्यासांनी अठरा महापुराणे रचली. त्यांनीच शिवपुराण लिहिले आणि विष्णुपुराणदेखील लिहिले. शिवपुराणात सर्व देव शिवाची आराधना करतात तर विष्णुपुराणात सर्व देव विष्णूची आराधना करता. असे का? जगात प्रत्येक माणसाची बुद्धी, भावना भिन्न भिन्न असते. प्रत्येक संप्रदाय, त्याचे आराध्य, त्याची उपासना यात भिन्नत्व आहे. परंतु ज्याला जे आराध्यदैवत परंपरेने मिळाले असेल त्याने त्यावरच संपूर्ण निष्ठा ठेवली पाहिजे. शिवभक्ताने शिवावर तर विष्णुभक्ताने विष्णूवर. म्हणून महर्षी व्यासांनी शिवपुराणात शिव सर्वश्रेष्ठ मानला तर विष्णुपुराणात विष्णू सर्वश्रेष्ठ मानला. जर भक्ताच्या मनात आपल्या आराध्यापेक्षा अन्य दैवत श्रेष्ठ आहे असा केवळ विचार आला तरी त्याचे मन विचलित होऊ शकते. म्हणून वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंग सर्वश्रेष्ठ मानले आहे. कारण 'इष्टार्थ प्रदायकं लिंगं इष्टलिंगम्।' आपली सर्व अरिष्टे दूर करणारे आणि इष्टार्थ देणारे ते 'इष्टलिंग' होय. गुरूने एकदा आपल्या हाती इष्टलिंग दिले की अन्य कोणत्याही देवतेची आपत्याला गरज भासत नाही.

जो इष्टलिंगधारक आहे त्याने अन्य देवतेचे दर्शन घ्यावे की नाही? असा एक प्रश्न उत्पन्न होतो. तो कोठेही जाऊ शकतो. इष्टलिंगपूजेनंतर आपण अन्य देवतेचे दर्शन घेतले तर त्यात दोष आहे असे म्हणता येत नाही. फक्त अन्य देवतेचे दर्शन घेताना आपले इष्टलिंग हाती धरून इष्टलिंगालाच नमस्कार करीत आहोत अशा भावनेने नमस्कार करावा. इष्टलिंगाला विसरून अन्य देवतेला नमस्कार करण्याची परंपरा नाही. याचा अर्थ अन्य देवता कनिष्ठ आहेत असा नाही. आपली श्रद्धा दृढ होऊन त्याचे फळ आपत्याला मिळावे यासाठी आपल्या इष्टदेवतेला सर्वश्रेष्ठ मानावे लागते. ब्रह्मा-विष्णू इत्यादी देव आपल्या इष्टलिंगाच्या बरोबरीचे नाहीत, त्यापेक्षा श्रेष्ठ नाहीत अशी भावना दृढ झाली की भक्तस्थलाचा साधक 'माहेश्वर' म्हटला जातो.

**ईश्वर: सर्वभूतानां ब्रह्मादीनां महानिति।**
**बुद्धियोगात् तदासक्तो भक्तो माहेश्वर: स्मृत:।।१०.१०।।**

ज्या इष्टदेवाची आपण पूजा करतो तो सर्व भूतांत व ब्रह्मादिकांत महान आहे. ब्रह्मदेव सृष्टी निर्माण करतो, विष्णू तिचे पालन करतो आणि रुद्र तिचा संहार करतो. या कार्यात संहार करण्याचा अधिकार फक्त रुद्रालाच

आहे, हे कार्य अन्य कोणी करू शकत नाही. आईवडील मुलाला जन्म देतात, त्याचे पालनपोषण करतात. परंतु त्याला ठार करण्याचा अधिकार त्यांना नसतो. त्यांनी तसे केले तर ते शिक्षेला पात्र होतात. शरीर आपलेच आहे असे समजून कोणी आत्महत्त्या करायला गेला तर काय घडते? आत्महत्त्या करताना तो मेला तर तो सुटला, परंतु वाचला तर त्याला शिक्षा होते. शरीराच्या पालनपोषणाचा आपला अधिकार आहे. परंतु त्याला मारण्याचा अधिकार आपला नाही.

एखादा मनुष्य आजारी असतो. बेशुद्ध झालेला असतो. त्याला शेवटची घरघर लागलेली असते. तो शुद्धीवर येण्याची शक्यता नसते आणि आला तरी काही उपयोग नसतो. अशा अवस्थेत देखील त्याच्यावर औषधोपचार चालू असतात. त्याला जगवण्याचाच सारे प्रयत्न करतात, मारण्याचा नव्हे. म्हणून सृष्टिसंहार हे रुद्राचे कार्य असाधारण आहे, ते करण्याचा अधिकार अन्य कोणाला नाही. अशा महेशाच्या ठिकाणी नितांत श्रद्धा ठेवणारा तोच माहेश्वर होय. सर्व देव मायेच्या आधीन आहेत, परंतु मायेला आधीन ठेवणारा केवळ शिवच होय. तो अनादिमुक्त आहे. अर्थात् मुक्ती मिळविण्यासाठी त्याला को णतीही साधना करावी लागत नाही. जो स्वभावतः मुक्त आहे तोच मुक्ती देऊ शकतो. जो संसारातील मायापाशांनी बद्ध आहे तो मुक्ती कसा देईल? 'किं शिला तारयेच्छिलाम्।' या सुभाषितकाराचे म्हणणे आहे की, पाषाण पाषाणाला पाण्यात कसा तारू शकेल? माझी माया अत्यंत दुस्तर आहे. ती तरणे कठीण आहे, असे भगवंतानी गीतेत म्हटले आहे. म्हणून मायापाशविरहित अशा महेश्वराला शरण गेल्यानेच मायेतून सुटका होऊ शकते.

ज्याच्या ठिकाणी आणव, मायीय व कार्मिक हे तीन मल नाहीत तोच निर्मल आणि अनादिमुक्त होय. प्रत्येक जीव या तीन मलांनी आवृत्त असतो. आत्म्याची व्यापकता विसरून स्वतःला संकुचित समजणे हा आणव मल होय. जीवात्मा संकुचित झाला की त्याच्या ठिकाणी मी व माझे, अहंभाव व ममत्व निर्माण होते, हा मायीय मल होय. वस्तूंच्या ठिकाणी असणारे ममत्व हेच विलक्षण बंधन मानले जाते. जो अधिकाधिक वस्तूंचा संग्रह करतो तो अधिकाधिक बंधनात गुंतत जातो. निजगुणशिवयोगी म्हणतात, 'ममकारदिंद मिक्किन बंधमुंटे.'

ममत्वभावच आपल्या बांधून ठेवतो. सत्संग संपल्यावर तुम्ही आपल्या घरी जाल. तुम्ही आपल्याच घरी का जाता? इतरांच्या घरी का जात नाही? ज्या ठिकाणी आपण वास्तव्य करतो त्या ठिकाणाबद्दल आपल्या मनात ममत्व उत्पन्न होते. मग ते भाड्याचे घर का असेना. भाड्याच्या घरात राहून देखील मनुष्य त्याला 'माझे घर' असेच संबोधत असतो. 'गृह्णातीति गृहः' असे शास्त्रात म्हटले आहे. कितीही दूर गेले तरी जे जवळ खेचते ते 'घर' होय. आकाशातल्या पतंगाचा दोरा आपल्या हाती असावा तसे घर आपत्याला बांधून ठेवत असते. घर स्थूल आहे, परंतु त्याच्या ठिकाणी असलेले ममत्व आपत्याला खेचत असते. वस्तूंच्या ठिकाणी असलेली ममत्वबुद्धी हाच मायामल होय. एका वस्तूतील ममत्व दुसऱ्या वस्तूत जाऊ शकते. परंतु ते कधी मिटत मात्र नाही. आपण ममत्व वाढवत राहतो, ते मिटवण्याचा प्रयत्न कधी करीत नाही. हटवणे आणि मिटवणे यांत खूप अंतर आहे. एखादी वस्तू एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी हलवणे म्हणजे हटवणे. आणि ती संपूर्ण नष्ट करणे म्हणजे मिटवणे. असंख्य जन्म घेऊन देखील आपले ममत्व मिटत नाही. गेल्या जन्मातले घर, वस्तू, पत्नी, मुले वेगळी होती. त्यावेळी त्यांच्या ठिकाणी ममत्वभाव होता. या जन्मात घर, वस्तू, पत्नी, मुले वेगळी आहेत, आता त्यांच्या ठिकाणी ममत्वभाव आहे. जन्मजन्मांतरे घेऊन देखील ममत्व मिटले नाही. वस्तू, व्यक्ती बदलल्या, ममत्व कायम राहिले. हाच मायामल होय. याबरोबरच जीवात्मा शुभाशुभ कर्मे करीत असतो. त्याला कार्मिक

मल म्हणतात. याप्रकारे आणव, मायीय व कार्मिक अशा त्रिमलांनी जीवात्मा आवृत्त असतो. परंतु शिवाच्या ठिकाणी त्रिमल नसून तो 'निर्मल' असतो.

ममत्व मिटवणे कठीण असले तरी अशक्य नाही. 'उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम्।' ममत्वभावाचे उदात्तीकरण केले तर मनुष्य महान होते. म. गांधीना आपण 'महात्मा' ही उपाधी का लावतो? जो केवळ स्वतःच्या सुखदुःखात मग्न न राहता सर्वांच्या सुखदुःखात सामील होतो तो 'महात्मा' होय. पृथ्वी हे एक कुटुंबच आहे अशी ज्याची दृढ भावना असते तो महात्मा. हे तर देहधारी मानवाबद्दल झाले. शिवपरमात्मा ही तर उच्च श्रेणी आहे. तो सर्व मलांपासून मुक्त आहे. दोन दुःखी माणसे एकमेकांजवळ आली तर आपापली दुःखे; सांगतील व रडत बसतील. ते परस्परांना काय देतात? तर दुःख. त्यांच्याजवळ देण्यासाठी सुखच नाही. शिव मात्र असीम सुखसागर आहे. तो सत्-चित्-आनंदस्वरूप, नित्यमुक्त आहे. त्याच्या चिंतनानेच आपण दुःखमुक्त होऊ शकतो. संसार दुःखरूप आहे. त्याचे चिंतन केले तर ते आपल्याला दुःखच देईल. ध्यान करावे. पण कुणाचे? जो शिव आहे, मंगल आहे, कल्याणकारक आहे त्या परशिवाचे. हा परशिव प्रत्येकाच्या अंतःकरणात निवास करतो आणि जीवाला मुक्तिमार्ग दाखवीत असतो.

**बीजे यथांकुरः सिद्धस्तथात्मनि शिवः स्थितः।।५.३६।।**

असे श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे. प्रत्येक बीजात जसा अंकुर असतो त्याप्रमाणे प्रत्येकाच्या अंतःकरणात शिव तिष्ठत असतो. आपल्या हातून प्रमाद घडला तर हा आतला शिव सांगत असतो की हा प्रमाद आहे. जो शिवाचा उपदेश ऐकतो त्याचे जीवन उजळून जाते. जो ऐकत नाही त्याच्या जीवनातला अंधार कधी दूर होत नाही, एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

१४ ऑगस्ट १९९१

---

**आशीर्वचन चौथे**

## माहेश्वरप्रशंसास्थल-३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज १५ ऑगस्ट. हा आपला स्वातंत्र्यदिन आहे. भौतिक दृष्टीने स्वातंत्र्य हवे असते तशीच आध्यात्मिक दृष्टीनेही स्वातंत्र्याची आवश्यकता असते. आज सर्व शासकीय कार्यालयांवर, घराघरांवर तिरंगा ध्वज डौलाने डोलतो आहे. ध्वजावरील तीनही रंगांना विशिष्ट अर्थ आहे. केशरी रंग हा त्यागाचे प्रतीक आहे, पांढरा रंग हा सात्त्विकतेचे, शुद्धतेचे प्रतीक आहे तर हिरवा रंग हा समृद्धीचे प्रतीक आहे. राष्ट्र समृद्ध करायचे असेल तर प्रत्येक व्यक्ती त्यागी व स्वच्छ अंतःकरणाची व्हायला हवी. आमच्या मनात कपट असेल, आपल्या मनात देशप्रेम नसेल तर देश समृद्ध होणार नाही. देशप्रेमाची भावना जागविण्यासाठी, तिची आठवण देण्यासाठी १५ ऑगस्टला मुलामुलींच्या हातात ति रंगा ध्वज आपण देत असतो.

ब्रिटीश शासनाच्या विळख्यातून आपली सुटका होऊन आपण स्वतंत्र झालो हे खरे असले तरी हे स्वातंत्र्य भौतिक आहे. आध्यात्मिक दृष्टीने आपण आजही परतंत्रच आहोत. आपले शरीर, इंद्रिये, बुद्धी, आत्मा यांविषयी विचार केला तर काय दिसते? आमचा आत्मा शरीर, इंद्रिये व बुद्धी यांच्या आधीन आहे. वस्तुतः स्वतंत्र असूनदेखील आपण पारतंत्र्य भोगत आहोत. म्हणून जगद्गुरू रेणुकाचार्यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त आध्यात्मिक स्वातंत्र्याचा मार्ग दाखविला आहे.

निर्मल, सच्चिदानंदरूप महेश्वरावर अनन्यनिष्ठा ठेवणारा माहेश्वर होय, हे आपण काल पाहिले. आता पुढे माहेश्वराचे आणखी गुण सांगतात.

शब्दस्पर्शादिसंपन्ने सुखलेशे तु निःस्पृहः।
शिवानंदे समुत्कंठो वीरमाहेश्वरो भवेत्।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.१४)

एक माहेश्वर आहे तर दुसरा वीरमाहेश्वर. या दोघांत फरक कोणता? प्रपंचातली प्रत्येक व्यक्ती पाच विषयांच्या आधीन राहून आपले जीवन व्यतीत करीत असते. मनुष्य विषयाधीन का होतो? तर विषयामध्ये थोडासा सुखाचा अनुभव येतो. परंतु हे पूर्णसुख नव्हे तर सुखाचा लेश असतो. एका भांड्यातले तेल दुसऱ्या भांड्यात ओतल्यानंतर पहिल्या भांड्याला जे तेल चिकटून राहते तो तेलाचा लेश, अंश असतो. त्याप्रमाणे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या विषयांत जे सुख आहे ते अंशमात्र आहे. विश्वात लेशमात्र सुख आहे. मग पूर्णसुख कोठे आहे? तर ते शिवानंदात, आपल्या आत्म्यात आहे. आत्मा सुखरूप आहे. पूर्णसुख मिळवायचे असेल तर 'स्वतः'जवळ आले पाहिजे. 'दुसऱ्या'जवळ गेल्याने सुख कमी आणि दुःख अधिक मिळते. म्हणून उपनिषदांत इंद्रिये व विषय यांच्याविषयी म्हटले आहे की, इंद्रिये ग्रह असेल तर विषय अतिग्रह आहेत.

राजा जनकाने एकदा ब्रह्मज्ञानी लोकांचा दरबारात बोलावून सन्मान केला. त्यानंतर सभागृहाबाहेर सालंकृत व सवत्स अशा सहस्र गाई उभ्या करून सांगितले, ''जो सर्वश्रेष्ठ ब्रह्मज्ञानी असेल त्याने तशी घोषणा करावी आणि या सहस्र गाई घेऊन जाव्या.''

सर्व ब्रह्मनिष्ठ निश्चल बसून होते. कोणीही उठायला तयार होईना. कारण 'मी ब्रह्मज्ञानी आहे' असे कोणी घोषित केले असते तर तो ब्रह्मज्ञानी नाही हेच सिद्ध झाले असते. 'मी ब्रह्मज्ञानी आहे.' असे बडबडत कोणी रस्त्याने निघाला तर लोक त्याला वेड्यात काढतील. जनकांच्या मनात संदेह उत्पन्न झाला. आपण सर्वांची ब्रह्मज्ञानी म्हणून पूजा केली. यात तर कोणी ब्रह्मज्ञानी दिसत नाही.

काही वेळाने याज्ञवल्क्य ऋषी उभे राहिले आणि त्यांनी शिष्याला आज्ञा केली, ''या गाई आपल्या आश्रमात घेऊन जा.''

मग इतर ब्रह्मज्ञांनी त्यांच्यांशी भांडण करायला सुरुवात केली, ''आपणच तेवढे ब्रह्मज्ञानी आहात, आम्ही नाही काय?''

याज्ञवल्क्य म्हणाले, ''तुमचा ब्रह्मनिष्ठेवर विश्वास होता तर तुम्ही उभे का राहिला नाही? मी सर्वश्रेष्ठ ब्रह्मज्ञानी आहे या भावनेने मी उभा राहिलो नाही. आमच्या आश्रमात हजारो विद्यार्थी शिक्षण घेतात. त्यांच्यासाठी राजा गाई देत आहे. म्हणून मी उभा राहिलो. ब्रह्मज्ञानी म्हणून नव्हे.''

सर्वजण म्हणाले, ''असेच असते तर आम्हीदेखील उभे राहू शकलो असतो. परंतु तुमच्या मनात मी ब्रह्मज्ञानी

आहे असा अहंकार आहे. म्हणून आमच्या प्रश्नांना समर्पक उत्तरे दिली तरच आम्ही गाई घेऊन जायला विरोध करणार नी.''

सर्वांनी याज्ञवल्क्यांना प्रश्न विचारले. शांत चित्ताने त्यांनी सर्व प्रश्नांची समर्पक उत्तरे देऊन ब्रह्मज्ञानी लोकांचे समाधान केले. गार्गी नामक विदुषीने याज्ञवल्क्यांना प्रश्न विचारला, ''कति ग्रहाः? कत्यतिग्रहाः? प्रपंचात ग्रह किती, अतिग्रह किती आणि ते कोणते आहेत?''

ग्रह म्हटले की आपल्याला आकशस्थ ग्रह आठवतात. परंतु याज्ञवल्क्यांनी उत्तर दिले, ''पंच ज्ञानेंद्रिये हे ग्रह आहेत. कारण ते विषयांचे ग्रहण करतात. डोळे रूपाचे, कर्ण शब्दाचे, रसना रसाचे, त्वचा स्पर्शाचे आणि घ्राणेंद्रिये गंधाचे ग्रहण करते. या पंचग्रहांना खाऊन टाकणारे ते अतिग्रह होत. विषय हेच अतिग्रह होत.''

विषय इंद्रियांना खाऊन टाकतात. शब्द ऐकून ऐकून कर्ण शेवटी बधीर होतात. रूप पाहून पाहून डोळे आंधळे होतात. याप्रमाणे रसना, त्वचा व घ्राण यांची ग्रहणशक्ती बोथट होते. परंतु विषय मात्र संपत नाहीत. इंद्रिये थकतात, विषय कधीच थकत नाहीत. ते इंद्रियांपेक्षा बलवान असतात. म्हणून ते अतिग्रह आहेत. इंद्रिये आणि विषय यांचा संबंध संपला की सुख संपून जाते. म्हणूनच या विषयसुखात माहेश्वर कधी गुंतून पडत नाही. यात पूर्णसुख नाही हे त्याला कळलेले असते. सुखाचा भास होतो तो केवळ इंद्रिये व विषय यांचा संबंध असेपर्यंत. ताटात जेवण आहे त्यावेळी स्वाद कळत नाही. जेव्हा जिभेशी अन्नाचा संबंध येतो तेव्हाच स्वाद कळतो. अन्न पोटात गेल्यानंतर त्याचा स्वाद कळत नाही. म्हणजे आधी स्वाद नाही नंतर स्वाद नाही. केवळ जिभेवर अन्न असेपर्यंत स्वाद. मागे-पुढे नाही. सुख असे आहे. म्हणून माहेश्वर या सुखलालसेच्या मागे लागत नाही तर तो पूर्णसुखाची अपेक्षा ठेवतो. माहेश्वरस्थलातला साधक शिवानंदाविषयी उत्कंठित आणि विषयसुखाविषयी अत्यंत निरिच्छ असतो. विषयसुख जवळ असूनही त्यांच्याविषयी वैराग्य दाखविणे ही वीरवृत्तीच होय. माहेश्वर असा वीरवृत्तीने परिपूर्ण असतो म्हणून त्याला 'वीरमाहेश्वर' म्हटले जाते. उपनिषदांत सृष्टिप्रक्रिया सांगितली आहे:

**आत्मन आकाशः संभूतः आकाशाद्वायुः।**
**वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी।**
**पृथिव्यादोषधयः। ओषदिभ्योऽन्नम्। अन्नात् प्रजाः।**

सृष्टी उत्पन्न होते तेव्हा परमेश्वरापासून प्रथम आकाश उत्पन्न होते. आकाशातून वायू, वायूपासून अग्नी, अग्नीपासून जल, जलापासून पृथ्वी, पृथ्वीपासून वनस्पती, वनस्पतीपासून जीवजंतू उत्पन्न होतात. पंचमहाभूतांपैकी पृथ्वीत शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पंचविषय आहेत. जलात शब्द, स्पर्श, रूप, रस हे चार विषय आहेत. गंधविषय नाही. समारंभात गुलाबपाणी शिंपडतात. पाण्यात गंध नसतो, तो मिसळला जातो. पृथ्वीपेक्षा जलात एक विषय कमी आहे. अग्नीत शब्द, स्पर्श, रूप हे तीन विषय आहेत, परंतु रस नाही. अग्नी हातावर घेऊन कोणी त्याची चव चाखत नाही.

अग्नीपेक्षा वायू अधिक सूक्ष्म आहे. त्यात शब्द व स्पर्श हे दोनच विषय आहेत. वायूपेक्षा आकाश अधिक सूक्ष्म असून त्यात केवळ शब्द हा एकच विषय आहे. अन्य चार विषयांचा तेथे अभाव आहे. आपल्याला वायूचा स्पर्श जाणवतो, आकाशाचा जाणवत नाही. आकाशात केवळ शब्द आहे. म्हणून आकाशात स्पर्शगुण नाही. आकाशापलीकडे जो परमात्मा आहे त्याच्याठिकाणी शब्ददेखील नाही. म्हणून परमात्म्याचे वर्णन करताना श्रुती म्हणते- अशब्दम्, अरूपम्, अव्ययम्. असा जो परमात्मा आहे तो परिपूर्ण व सुखरूप आहे. शब्दस्पर्शादी

विषयांतील सुख लेशमात्र आहे. 'तस्यैवानन्दस्य मात्रामुपजीवन्ति।'

आनंद परब्रह्म आहे. परंतु हा आनंद कोठे आहे? तर आपल्या आत्म्यात. माणसाला मात्र विषयात आनंद आहे, असे वाटत असते. कारण त्याची वृत्ती बहिर्मुख असते. जर आत्म्यात आनंद आहे तर जीवाची प्रवृत्ती अंतर्मुख का होत नाही? बहिर्मुखच का होते? श्रुती सांगते ब्रह्मदेवाने सृष्टिनिर्मिती करताना सर्व इंद्रियांना बहिर्मुखच केले. आपण बाह्य रूप पाहू शकतो, परंतु आतले अरूप पाहू शकत नाही. बाहेरचा शब्द ऐकू शकतो, आतला नि:शब्द ऐकू शकत नाही. म्हणून आपल्या इंद्रियांना अंतर्मुख करण्यासाठी आचार्यांनी आपल्या हातात इष्टलिंग दिले आहे. सतत बाहेर वाहणाऱ्या या मनोवृत्तीला कसा बांध घालता येईल? वाहणाऱ्या पाण्याला बांध घालून पाण्याचा साठा करता येतो आणि त्याद्वारे विद्युतनिर्मिती होते, हिरवी क्रांती आणता येते. त्याचप्रमाणे बाहेर वाहणाऱ्या मनाच्या शक्तीचा ऱ्हास होत असतो. तिला शिवयोग, शिवध्यान, शिवचिंतन यांद्वारे अंतर्मुख करून बांध घालावा लागतो.

इष्टलिंगाकडे दहा-पंधरा मिनिटे, अर्धा तास, तासभर जर आपण पाहत राहिलो तर तेवढ्या काळापुरती मनोवृत्ती स्थिर होते, अंतर्मुख होते. ती जसजशी अंतर्मुख होत जाईल तसतशी मन:शक्ती एकत्रित होत जाते. रात्री झोपल्यावर आपण काही पाहत नाही, खात नाही, पीत नाही, स्पर्श करीत नाही. इंद्रियांची सारी द्वारे बंद होतात, त्या काळात बाहेर वाहणारी इंद्रियांची शक्ती आत संग्रहित होत असते. आठ तास संग्रहित केलेल्या शक्तीच्या बळावरच माणूस सोळा तास काम करीत असतो. शक्तीचा ऱ्हास होऊन माणूस थकतो, त्याला झोप येते अणि पुन्हा शक्तिसंचय होत राहतो. ही आपली दिनचर्या आपल्या नित्य अनुभवाचा विषय आहे.

मनोवृत्ती अंतर्मुख झाली की आत्मानंदाचा अनुभव येतो. या आत्मानंदाविषयी उत्कंठित असलेला माहेश्वरच वीरमाहेश्वर होय. अशी वीरमाहेश्वराची लक्षणे यापुढे सांगितली आहेत. परस्त्री व परधन यांपासून तो मुक्त असतो. स्त्री आणि धन यामागे 'पर' हे विशेषण लावलेले आहे. स्त्रीसंगनिर्मुक्त व धनपराङ्मुख असे म्हटले नाही तर परस्त्रीसंगनिर्मुक्त व परधनपराङ्मुख असे म्हटले आहे. गीतेत भगवंताने सांगितले आहे. 'धर्माविरुद्धो लोकेऽस्मिन कामोऽस्मि भरतर्षभ।'

काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर यांना षड्रिपू म्हटले जाते. या शत्रूंना मारण्यासाठी आपल्या आचार्यांनी एक परंपरा चालविली आहे. ज्याला इंद्रियांचा निग्रह करता येत नाही त्याच्याकरिता गृहस्थाश्रम निर्मिला आहे. विवाहसंस्कारातून मिळालेली पत्नी ही 'धर्मपत्नी' असते. धर्मानुकूल कामतृप्ती उचित मानली गेली. वीरमाहेश्वराला संसार सोडावा लागत नाही. तसे असते तर त्याचे लक्षण 'स्त्रीसंगनिर्मुक्त' असे सांगितले असते. परंतु येथे 'परस्त्रीसंगनिर्मुक्त' असे सांगितले आहे. स्वस्त्रीशी रत होणाऱ्याला काही दोष नाही, परंतु जो परस्त्रीची अभिलाषा करतो त्याचा उद्धार होणे कठीण आहे. याविषयी एक सुंदर कथा सांगितली जाते.

एकदा काशीराजाच्या दरबारात एका सेवकाने राणीला पाहिले. तिचे अप्रतिम रूपलावण्य पाहून तो वेडापिसा झाला. घरी जाऊन झोपला. पत्नीने याविषयी खोदून विचारले तेव्हा तो विव्हल होऊन म्हणाला, ''राणीला पाहिल्यापासून मला काही सुचेनासे झाले. ती मिळाल्याशिवाय चैन पडणार नाही. ती मिळाली नाही तर मी आत्महत्त्या करीन.''

पत्नी बिचारी काळजीत पडली. तिला पती गमवायचा नव्हता. तिने मनाशी काही निश्चय केला. अंत:पुरात

जाऊन तिने राणीची दासी होऊन खूप सेवा केली. त्यामुळे राणीने प्रसन्न होऊन तिला 'तुझ्या मनातली इच्छा पूर्ण करीन' असे वचन दिले. तेव्हा तिने आपल्या नवऱ्याची व्याकुळ अवस्था सांगून त्याची अभिलाषा सांगितली. तिची विनंती ऐकून राणी प्रथम हसली. परंतु प्रसंगाचे गांभीर्य ओळखून तिला म्हणाली, ''तुझा पती आणि माझ्यात खूप अंतर आहे. त्याचे कूळ हलके आणि देह मलिन आहे. माझ्याशी रत होण्यासाठी त्याने अत्यंत शुद्ध झाले पाहिजे. त्याला सांग की, माझ्याशी संबंध ठेवायची इच्छा असेल तर नित्य फलाहार करून गंगेच्या किनाऱ्यावर गंगास्नान करून शिवचिंतन कर. जेव्हा तू अत्यंत शुद्ध होशील तेव्हा तुझा–माझा संबंध घडेल.''

पत्नीने घरी येऊन पतीला सांगताच त्याला अत्यंत आनंद झाला. केव्हा न केव्हातरी आपण शुद्ध होऊ आणि राणी आपल्याला मिळेल या आशेने त्याने राणीने सांगितलेल्या व्रताचे आचरण सुरू केले

**गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा।**
**पापं तापं च दैन्यं च हरति साधु समागमः।।**

असे शास्त्रात म्हटले आहे. आपल्या देशातील अनेक नद्यांत गंगेला विशेष महत्त्व आहे. ती पापनाशिनी असून जो गंगेत स्नान करतो त्याचे पाप ती नष्ट करतेच, परंतु जो गंगेपर्यंत जाऊ शकत नाही. त्याने जर गंगेचा त्रिवार घोष केला की त्याचीही पापे नष्ट होतात. 'गंगा गंगेति यो ब्रूयात् योजनानां शतैरपि।' असे काशीखंडात महर्षी व्यास म्हणतात. गंगेत अस्थिविसर्जन केल्याने सद्गती मिळते, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

अशा गंगेच्या किनाऱ्यावर तो सेवक गंगास्नान करून तपश्चर्या करीत बसला. अनुष्ठान, तपश्चर्या विशिष्ट स्थानी केल्याने त्याचे फळ सहस्रपट मिळते. पर्वतशिखरावर, नदीकाठावर, देवालयात, गाईच्या गोठ्यात, बिल्ववृक्षाखाली केलेला जप शतगुणित फल देतो. इष्टलिंग हाती घेऊन केलेला जप तर अगणित फलप्रद सांगितला आहे. त्या सेवकाने तपश्चर्या करायला आरंभ केला. बारा वर्षे लोटली तेव्हा त्याची ख्याती सर्वत्र पसरली. दिव्याचा प्रकाश दूरवर पसरतो तसा तो लोकांत प्रसिद्ध झाला. लोक दर्शनासाठी येऊ लागले. त्याची प्रसिद्धी ऐकून एकेदिवशी राजादेखील राणीसह त्याच्या दर्शनाला आला. राणीने ओळखले की आपल्यासाठी तपस्या करणारा तो हाच. ती म्हणाली, ''महाराज, जिच्या प्राप्तीसाठी आपण एवढे कठोर तप आचरले ती मी तुमच्यासमोर उभी आहे.''

तिने असे म्हणताच त्या साधूने तिच्यापुढे दंडवत घातला आणि म्हणाला, ''माते, तू माझी गुरू आहेस, तुझ्या अभिलाषेपोटी मी तपस्या केली हे खरे आहे. परंतु त्यामुळे मला अत्यानंदाचा लाभ झाला. जे सुख मला हवे होते तो सुखाचा आभास होता हे आता पटले. आता परिपूर्ण असे आत्मसुख मी भोगत आहे. आता कुठली आलीय अभिलाषा आणि क्षुद्र सुखाचा मोह?''

परस्त्रीसंगनिर्मुक्त याचा अर्थ असा आहे. वस्तू परकी आहे तोवर हवीशी वाटते आणि एकदा मिळाली की अळणी वाटते. म्हणून माहेश्वर परस्त्रीपासून सावध, अलिप्त असतो. तसेच परद्रव्याचा अपहार तो कधी करीत नाही. कष्टार्जित संपत्तीचाच तो उपभोग घेतो. संपत्ती जसजशी येत राहते तसतशा इच्छा वाढत राहतात. आधी घर लहान होते. पैसा आल्यावर मोठे घर घेतो. नंतर वस्तूंची एवढी खरेदी आणि गर्दी होते, की घरात माणसांना राहायला जागा उरत नाही. असे घर काय कामाचे? म्हणून माहेश्वर अल्पसंतुष्ट असतो. जेवढे मिळेल तेवढ्यात

तो समाधान मानतो.

**आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृंखला।**
**तया बद्धाःप्रधावन्ति मुक्तास्तिष्ठन्ति कुत्रचित्।।**

सुभाषितकार सांगतो, आशानामक विचित्र शृंखला आहे. तिने बद्ध झाल्यावर मनुष्य खूप धावत सुटतो आणि ती सुटल्यावर एका ठिकाणी स्थिर होतो, असे हे विचित्र बंधन आहे. आशेने मनुष्य अस्थिर होतो. तिची पूर्ती करण्यासाठी जीवाचा आटापिटा करतो. एक पूर्ण होईतोवर दुसरी निर्माण होते. तिला अंतच नाही. समुद्राच्या लाटा जशा अविरत किनाऱ्यावर येऊन आदळत असतात तशी आशा सतत निर्माण होत असते. ४०-५० वर्षे जीवन भोगल्यावर देखील आपल्या आशा क्षीण होत नाहीत. आयुष्य घटत जाते तशी आशा वाढत जाते. यासाठी मनुष्याने योगी व्हायला हवे, योग म्हणजे काय? महर्षी पतंजलींनी सांगितले आहे, 'योगः चित्तवृत्तिनिरोधः।' गीतेत भगवंताने सांगितले आहे, 'तस्माद् योगी भवार्जुन।' सुखाने जीवन घालवयाचे असेल तर योगी व्हायला हवे. योग याचा अर्थ पहाडात जाऊन संन्यासी होणे असा नाही. घरात राहून ऑफिसात काम करून देखील योगी होता येते. 'समत्वं योग उच्यते।' जेव्हा बुद्धीत समत्व येते तेव्हा आपण योगी होतो. चित्तवृत्तीचा निरोध करता आला तर योगी होता येते.

शास्त्रश्रवण, भगवद्पूजन, सत्संग करणे इ. इच्छा परमात्म्याकडे नेणाऱ्या आहेत. त्याशिवाय अन्य सांसारिक इच्छा माणसाला संसारात बुडवणाऱ्या आहेत. एकदा संसारात फसला की त्यातून मुक्त होणे अत्यंत अवघड. म्हणून इच्छा रोखल्या पाहिजेत. प्रयत्न केला तर त्यांचा निरोध अशक्य नाही. हळूहळू वाटचाल केली तरी साधना खूप दूरवर घेऊन जाईल. परद्रव्याची अभिलाषा मनुष्य का करतो? तर आपल्या इच्छापूर्तीसाठी. आपली कमाई कमी पडते तेव्हा दुसऱ्याचे धन मिळवण्याची इच्छा होते. यामुळे आपली भावना दूषित होते. कपडे दूषित झाले की ते चटकन् धुता येतात. शरीर दूषित झाले की अंघोळ करून स्वच्छ करता येते, परंतु मन आणि बुद्धी दूषित झाली तर त्यांच्या शुद्धीसाठी खूप प्रयत्न करावे लागतात. आपला जो सत्संग चालू आहे त्यामुळे मन शुद्ध होते. माहेश्वर शिवार्थकार्यसंपन्न व शिवागमपरायण असतो. तो जो काही व्यवहार करतो ते स्वतःसाठी करीत नाही तर शिवासाठी करतो. प्रपंचातील सर्व व्यक्तींना शिवदृष्टीने पाहण्याची भावना जेव्हा दृढ होते तेव्हाच त्याचे कार्य शिवमय होऊन जाते. पत्नी, मुले, बंधू यांना शिवस्वरूप पाहण्यामुळे त्याचे सर्व कार्य शिवासाठी चाललेले असते. तो शिवागमपरायण असतो. या जगात अनेक प्रकारची पुस्तके आहेत. काही पुस्तके अशी असतात की त्यांना स्पर्श केला की हात धुवावा लागतो आणि काही पुस्तके असतात की त्यांना हात धुतल्यानंतरच स्पर्श करावा लागतो. अश्लील पुस्तके हात धुवायला लावतात तर शिवागम, श्रीसिद्धान्तशिखामणी यासारख्या पवित्र ग्रंथांना शुद्ध होऊन स्पर्श करावा लागतो.

आपले जे शिवागमादी ग्रंथ आहेत त्यांचेही पूजेनंतर थोडे थोडे पारायण, पठण केले पाहिजे. पूजेने आपले अंतःकरण शुद्ध होते आणि ग्रंथपठणाने हृदयात दिव्यज्ञान प्रकाशते. त्याच्या प्रकाशातच आपण आपले आत्मस्वरूप पाहू शकतो. म्हणून माहेश्वरस्थलातील साधक पुनःपुन्हा शिवागमांचे पठण करीत असतो. पारायण का करावे याचे कारण आहे. पुनःपुन्हा वाचताना एखादा नवीनच अर्थ आपल्याला जाणवतो. इथे सत्संगात आपण का येता? ज्याची आपण प्रतीक्षा करीत असतो, ज्याच्याविषयी आपण उत्कंठित असतो अशा एखाद्या प्रश्नाचे उत्तर सहज सत्संगात मिळू शकते. म्हणून वीरशैवांनी यथाशक्ती 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे पारायण करावे.

आपल्या जिभेची रसास्वादन करण्याची प्रवृत्ती असते. गोड, तिखट इत्यादी रसांचा आस्वाद जीभ घेते. परंतु शिवनामाची गोडी तिने कधी चाखली? एका संस्कृत कवीने प्रश्न केला आहे:-

**मृद्वीका रसिता सिता समसिता स्फीतं निपीतं पय:**
**स्वर्यातेन सुधाप्यधायि कतिधा रम्भाधर: खंडित:।**
**सत्यं ब्रूहि मदीय जीव भवता भूयो भवे भ्राम्यता**
**कृष्णेत्यक्षरयोर्द्वयोर्मधुरिमोद्गार: क्वचिल्लक्षित:।।**

पोटभर जेवल्यानंतर माणसाला ढेकरा येतात. त्याचा अर्थ पोटात आता जागा नाही, आत काही टाकू नका. असा होतो. तरीही माणूस खातच असतो. जेवायला बोलावले की मनुष्य खूपच खातो. त्याला वाटत असावे की आज खायला मिळते आहे उद्या मिळते की नाही? 'परान्नं दुर्लभं लोके शरीराणि पुन: पुन:।' खाता खात मृत्यू आला तरी बेहेत्तर. शरीर काय पुन्हा पुन्हा मिळते. परंतु दुसऱ्याचे अन्न पुन्हा मिळेल याची खात्री नाही. परक्याचे असो की घरचे असो अन्न खाऊन आपण असंख्य वेळा ढेकर दिले आहेत, परंतु शिवनामाची गोडी चाखून आपण एकदा तरी ढेकर दिली काय? पोटभर खाल्ल्यावरच ढेकर देतो. त्याप्रमाणे ईश्वरनामाचा भरपूर आस्वाद घेतल्यावरच त्याची ढेकर येईल. शिवस्तुती हा एक प्रकारचा रस आहे. तो मधुर, कटू, आम्ल, तिखट यांपैकी कोणताही नाही, तर शांतरस आहे. शिव शांतस्वरूप आहे. त्याच्या नामस्मरणाने शांतवृत्तीची ढेकर येईल. माहेश्वरस्थलातील साधक शिवस्तुतीतल्या रसाचा आस्वाद घेत असतो. चांगले कपडे घातल्यावर, चांगले अन्न खाल्यावर आपण संतुष्ट होतो तसे शिवपूजा, शिवनामजप यांमुळे आपल्या मनात आनंद भरत असेल तर समजावे की आपण माहेश्वरस्थलाचे साधक आहोत. माहेश्वर अंतर्बाह्य शुद्ध असतो. शरीराने व मनाने. म. बसवेश्वर म्हणतात:-

**कळबेड कोलबेड हुसिय नुडियलुबेड**
**तन्न बण्णिसबेड इदिरु हळियलु बेड**
**मुनियबेड इदे अंतरंगद शुद्धि**
**इदे बहिरंगद शुद्धि इदे नम्म**
**कूडलसंगमदेवर नोलिसुव परि**

याचा अर्थ अत्यंत सरळ आहे. अंतरंग व बहिरंगशुद्धी करायची असेल तर चार-पाच गोष्टींचे पालन करावे लागते. चोरी करू नका. धनाचे अपहरण करू नका, प्राणिहिंसा करू नका, हिंसा शरीराने, वाणीने व मनानेही करता येते. ती करू नका. असत्य बोलू नका, आत्मस्तुती करू नका. दुसऱ्याची निंदा करू नका. एवढे जमले तर अंतरंग व बहिरंग शुद्ध होईल. तेव्हाच तुम्ही 'शूचि' व्हाल. माहेश्वर स्थलातील साधक असा सर्वार्थाने पवित्र असतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

१५ ऑगस्ट १९९१

## माहेश्वरप्रशंसास्थल–४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शिव अनंत मंगल परंपरांचा आश्रय असून त्याचे नाम अत्यंत अर्थपूर्ण आहे. भगवान शिवाची नावे हजार आहेत. शंभू, ईश, पशुपती इत्यादी. शिवाची एकशे आठ नावे आपण रोज ऐकता. परंतु त्यांपैकी फक्त एकाच नावाचा जप करता. 'शिवाय नमः' 'शिव' शब्द चार वेदांचे सार आहे. अप्पय दीक्षितांनी म्हटले आहे, 'विद्यासु श्रुतिरुत्कृष्टा रुद्रैकादशनी श्रुतौ।'

प्राचीन काळात वेदांचे अध्ययन करीत असत. कोणी एका वेदाचे, कोणी तीन तर कोणी चार वेदांचे अध्ययन करीत असत. आज वेदांचे अध्ययन कोणी करीत नाही, तथापि पूर्वसूरींनी केलेल्या अध्ययनाची उपाधी मात्र आजही जिवंत राहिलेली दिसते. द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी ही नावे याची निदर्शक आहेत. ही नावे असलेल्यांना वेदातला एक मंत्रदेखील पाठ नसेल, परंतु नाव मात्र शिल्लक आहे. प्राचीन काळी वेद कंठस्थ करीत असत. ज्ञानभांडारात वेदांचा महिमा अपार आहे. जर वेदाध्ययन करण्याची क्षमता नसेल तर त्यामधील श्रीरुद्राचे पठण करावे. त्याचे पठण वेदाध्ययनाइतकेच फलप्रद आहे. ज्याला श्रीरुद्राचे पठण जमत नसेल त्याने त्यातील 'नमः सोमायच' या आठव्या अनुवाकाचे पठण केले तरी त्याला रुद्रपठणाचे फल मिळते. काहींना तेही कठीण वाटले तर त्यांनी आठव्या अनुवाकांतील 'नमःशिवाय च शिवतराय च' हा मंत्र पाठ केला तर श्रीरुद्रपठणाचे फल प्राप्त होते. 'नमः शिवाय' हाच श्रीपंचाक्षर मंत्र होय. या पंचाक्षरी मंत्राचे सार म्हणजे 'शिव' ही दोन अक्षरे होत. चार वेदांचे सार श्रीरुद्र, श्रीरुद्राचे सार आठवा अनुवाक्, आठव्या अनुवाकाचे सार 'नमःशिवाय च शिवतराय च' हा मंत्र होय. आणि त्या मंत्राचे सार 'शिव' ही दोन अक्षरे आहेत.

शिवदीक्षा देताना गुरू मंत्रोपदेश करतात आणि शिष्याकडून तो वदवून घेतात. बऱ्याच जणांना पंचाक्षर मंत्राचा नीट उच्चारदेखील करता येत नाही. म्हणून नमः सोडून द्या, शेवटचा अय सोडून द्या, केवळ मधली 'शिव' ही दोन अक्षरे उच्चारली तरी वेदांचे पठण केल्याचे फळ मिळेल. म्हणून ज्या मंत्रात ही दोन अक्षरे गुंफली आहेत असा पंचाक्षर मंत्र कोटी मंत्रांत सर्वश्रेष्ठ मानला गेला.

**सप्तकोटिषु मंत्रेषु मंत्रः पंचाक्षरो महान।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ८.४)

शिव कल्याणकारक, शांतिदायक, सुखदायक आहे. सुख शांती, कल्याण यांची अपेक्षा बाळगणाऱ्या मनुष्याने निरंतर शिवनामस्मरण करायला हवे. माहेश्वरस्थलातील साधक निरंतर शिवस्तुती करीत असतो. आम्ही भगवान शिवाची कितीही स्तुती केली तरी ती उणीच ठरेल. शिवमहिम्नस्तोत्रात म्हटले आहेः–

**असितगिरसमं स्यात् कज्जलं सिंधुपात्रे**
**सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी।**
**लिखति यदि गृहित्वा शारदा सर्वकालम्**
**तदपि तव गुणानामीश पारं न याति।।**

अर्थात् मेरुपर्वताएवढे काजळ समुद्राच्या पाण्यात मिसळून त्याची शाई केली आणि कल्पतरुवृक्षाच्या शाखेला लेखणी करून प्रत्यक्ष सरस्वती पृथ्वीरूपी कागदावर लिहीत बसली तरी शिवाचे गुण सरणार नाहीत. पुष्पदन्त गंधर्वाने शिवनिर्माल्याचे उल्लंघन केले होते. आम्ही तर हे किती वेळा करतो याची गणती नाही. शिवाला वाहिलेल्या बेलफुलाचा, निर्माल्याचा अपमान होता कामा नये. त्याला पाय लागू नये व ते ओलांडू नये. पुष्पदन्ताकडून शिवनिर्माल्य ओलांडण्याचा अपराध घडला होता. त्याच्या परिमार्जनासाठी त्याने शिवस्तुती केली. शिवस्तुती केल्याने आपली दुरिते नष्ट होतात.

नामस्मरणात अगाध सामर्थ्य आहे. हिंसाचारी, दुष्ट वाल्ह्या नामस्मरणानेच 'वाल्मीकी महर्षी' झाला. त्याला 'राम' असे नावही घेता येत नव्हते, 'मरा मरा' असा मंत्रजप त्याने केला. तुलसीदास म्हणताः-

**उलटा नाम जपत् जग जाना। वाल्मिकी भयो ब्रह्म समाना।।**

मंत्राचा उच्चार तर स्पष्ट व शुद्ध केला पाहिजे. मग 'मरा' असे उलटे नाम वाल्ह्याला कसे फलप्रद झाले? याबद्दल एक व्यावहारिक उदाहरण तुलसीदासांनी दिले आहे. ते म्हणतातः-

**तुलसी अपने रामको रीज भजो या खीज।**
**भूमि पडे उपजेंगेहि उलटे सीधे बीज।।**

बीज जमिनीत पेरताना ते उलटे, सरळ कसेही पडले तरी ते उगवणारच. उलटे पडलेले बीज उलटे उगवत नाही, सरळच उगवते. त्याप्रमाणे ईश्वरनाम सरळ वा उलटे, कसेही घेतले तरी त्याचे फळ मिळतेच. रामनामाने वाल्ह्याचे आयुष्य संपूर्ण बदलून गेले. रामदेखील ज्याचे नाम घेतो असा शिव आहे. त्या शिवाच्या नामस्मरणाने पापाचे पर्वत भस्मसात् होतात. म्हणून या कलियुगात 'नाम लेत भवसिंधु सुखाये।' असे तुलसीदासांनी म्हटले आहे. नामस्मरण हा सुलभ उपाय असून तुम्ही जेथे ज्या अवस्थेत बसलेले असाल त्या अवस्थेत नामस्मरण करू शकता. कोणालाही त्रास न देता आपण नामस्मरण करीत आपला व्यवहारही करू शकतो. दत्तात्रेयांनी आपल्या जीवनात चोवीस गुरू केले. एकदा भिक्षेसाठी दत्तात्रेय गेले असताना त्या घरातील स्त्री उखळात कांडण करीत असलेली त्यांना दिसली. एका हाताने ती धान्य निवडत होती तर दुसऱ्या हाताने कांडत होती. बोलणेही सुरू होते. तिला त्यांनी गुरू मानले. कशासाठी? तर व्यवहार सांभाळताना आपण ईश्वर नामस्मरण करू शकतो तर काम करताना नामस्मरण का करू शकणार नाही? म्हणून सदासर्वदा पंचाक्षर महामंत्राचा जप करावा. नियम पाळून मंत्रजप करणे चांगलेच आहे, परंतु ते न पाळता मंत्रजप केला तरी काही बिघडत नाही.

एक ब्राह्मण शौचक्रिया उरकून परत येत होता. याप्रसंगी गळ्यातले जानवे कानाला गुंडाळतात. ते अपवित्र होऊ नये हा त्या मागचा अर्थ. यासाठीच इष्टलिंग नाभीच्या वर धारण करावे असे वीरशैव सिद्धान्तात सांगितले आहे. परंतु त्या ब्राह्मणाने जानवे जिभेला गुंडाळले आणि घरी परत निघाला. त्याची विचित्र कृती पाहून एका महात्म्याने त्याला याविषयी विचारले. तेव्हा तो ब्राह्मण उत्तरला, ''माझ्या जिभेला नामस्मरणाचा फार अभ्यास आहे. मी कुठेही बसलो तरी जीभ नामस्मरण करायला लागते. शौचप्रसंगी अपवित्र स्थानी तिने नामस्मरण करू नये यासाठी मी तिला असे बांधून ठेवले आहे.''

शास्त्रे म्हणतात- 'अन्ते या मतिः सा गतिः' मनुष्याची जन्मवेळ आणि मृत्युवेळ अत्यंत महत्त्वाची असते. मूल जन्माला आले की आपण जन्ममुहूर्त पाहतो. अलीकडे विज्ञान प्रगत झाल्यामुळे मुहूर्त पाहूनच मुलाला जन्म

देण्याची सोय झाली आहे. ऑपरेशन करून. परंतु मुलाच्या स्वाभाविक जन्माची वेळ त्याच्या पुढील आयुष्याविषयी भाकीत करणारी असते. म्हणून जन्म चांगल्या मुहूर्तावर व्हावा आणि मृत्युदेखील चांगल्याच मुहूर्तावर व्हावा. दोन्ही वेळा उत्तम असाव्यात. उत्तम याचा अर्थ कोणता? ज्यावेळी आपल्याकडून उत्तम कार्य घडत असते ती उत्तम वेळ. मग त्यावेळी दक्षिणायन असो की उत्तरायण, दिवस असो की रात्र. बाह्य मुहूर्तापेक्षा त्यावेळी आपण काय करीत आहोत हे अधिक महत्त्वाचे. जन्मवेळ तर निघून गेली. त्यावेळी काय केले पाहिजे हे आता ऐकून काय उपयोग? आपल्याला जन्म तर मिळाला. आता मृत्युवेळ मात्र हातात आहे. त्यावेळी काय करायला हवे याविषयी विचार केला पाहिजे. तुलसीदास म्हणतात:-

**जनम जनम मुनि यतन कराहि।**
**अंत राम कहि आवत नाहि।।**

जन्मभर नामस्मरण करून देखील अंतकाळी ईश्वराचे नाम ओठावर येत नाही. स्मरत नाही. असे घडले तर आयुष्यभर केलेले नामस्मरण निष्फळ झाले. मनुष्याला मृत्यू कधी येईल याचा नेम नाही. काही माणसे भजन करताना मरतात, काही दुकानात बसून व्यवहार करताना मरतात, कोणी सत्संग करताना तर कोणी भगवंताचे नाव घेताना मरतात. अंतकाळी आपली जी मानसिक स्थिती असते ती आपल्या पुढील जन्माला गती देत असते.

त्या ब्राह्मणाला महात्म्याने हेच सांगितले की, ''बाबा, मृत्यू कधी येईल याचा नेम नाही. शौच करताना तो आला अन् त्यावेळी तुला नामस्मरण करता आले नाही तर तुला सद्‌गती कशी मिळेल? तू तर जिभेला बांधून ठेवली आहेस, म्हणून अशा प्रकारे जीभ बांधू नकोस.''

या कथेचे तात्पर्य असे की, ज्या ज्या वेळी आपण नामस्मरण करू त्याचा त्यावेळी सदुपयोगच होईल, त्यापासून काही हानी होणार नाही. म्हणून माहेश्वरस्थलातला साधक 'गच्छन् तिष्ठन् निमिषन्नुन्मिषन्नपि' बसताना, उठताना, चालताना, जेवताना केवळ नामस्मरणच करीत असतो. अन्य अनावश्यक शब्दांचा उच्चार करीत नाही. आपल्याला गप्पा मारायला सांगितले तर किती वेळ मारू? रात्रभर बसलो तरी गप्पा सरणार नाहीत. परंतु महाशिवरात्र आहे, जागर करायचा आहे, शिवनामस्मरण करायचे आहे अशा वेळी नेमकी झोप येऊ लागते. गप्पा मारताना मात्र ती कधीच येत नाही. आपले संस्कार बरे नाहीत हेच यावरून सिद्ध होते. म्हणून शिवस्तुतीतील रसाचे आस्वादन करणारा, त्याने मुदित होणारा साधक माहेश्वर होय.

जो शिवनामस्मरणात रंगून गेला त्याचे शरीर पवित्र होते आणि आसपासचा परिसर देखील पवित्र होतो. व्यष्टिपरिवर्तनातूनच समष्टिपरिवर्तन होत असते. एक मनुष्य एका जागी बसून मंत्रजप करील तर त्याला लाभ निश्चित होईल. परंतु शंभर माणसे एका जागी बसून मंत्रजप करतील तर त्यामुळे समष्टिपरिवर्तन होईल. भौतिक वस्तुदेखील मंत्रसंस्काराने प्रभावित होतात. म्हणून मंत्रजपाने मानसिक पावित्र्याचा लाभ होतो.

**शिवोत्कर्षप्रमाणानां संपादनसमुद्यत:।।१०.१६।।**

माहेश्वर काय करतो? आपल्या इष्टदेवाच्या सर्वश्रेष्ठत्वाची प्रमाणे ज्या ग्रंथात आहेत त्यांचा संग्रह करतो. कोणी प्रश्न विचारला तर त्याचे समर्पक उत्तर देण्यासाठी तो सिद्ध असतो. तो निर्मम व निरहंकार असतो. ममत्व आणि अहंकार जन्मजन्मांतरापासून माणसाच्या सदोदित मागे लागलेले आहेत. माणसाला दोन प्रकारची नावे असतात असे म्हणतात. एक जन्मनाव असते तर दुसरे व्यावहारिक नाव असते. जन्मवेळचे नक्षत्र, त्याचे चरण

इत्यादी पाहून जे नाव ठेवले जाते ते जन्मनाव. ते असेल तसे स्वीकारावे लागते. परंतु हाक मारण्यासाठी दुसरे चांगले नाव ठेवले जाते. या दोन नावांपेक्षा आणखी एक नाव आपल्याला असते. ते कोणी ठेवलेले नाही. अनादिकालापासून आपल्याशी जडलेले आहे. जन्मनाव बदलू शकते, व्यवहारनाव बदलता येते. परंतु जन्मजन्मांतरापासून आपत्याला असलेले हे नाव मात्र कधी कोणाला बदलता येत नाही. ते कोणते नाव आहे? अहम्... मी!

आपण कोणाच्या घरी जातो, दरवाजा बंद असतो. तो वाजवल्यावर आतून विचारले जाते– 'कोण आहे?' त्यावेळी आपण म्हणतो– 'मी आहे.' आपल्या आवाजावरून जर आतल्या व्यक्तीने ओळखले नाही आणि पुन्हा विचारले– 'मी म्हणजे कोण? तुमचे नाव काय?' त्यावेळी आपण आपले व्यावहारिक नाव सांगतो. आपले नाव ठेवले गेले ते आपल्यासाठी नव्हे, तर इतरांनी आपत्याला हाक मारावी म्हणून. कोर्टकचेरीत जायचे आहे. इस्टेटीवर नाव लावायचे आहे, बँकेत जाऊन सही करायची आहे, अशा वेळीच आपण आपल्या नावाचा उपयोग करतो. इतर वेळी केवळ 'मी–मी–मी' याच नावाने आपण व्यवहार करीत असतो. एखाद्या वेळी आपल्या व्यावहारिक नावाचा आपत्याला विसर पडू शकेल, परंतु आपल्या 'मी'चा आपत्याला कधीच विसर पडू शकत नाही. 'मी' हे जन्मजन्मांतरापासून, युगानुयुगांपासून जीवाला ठेवलेले नाव आहे. 'मी' च्या बरोबर 'मम'ही येते. मम म्हणजे माझे. मी आणि माझे हा नैसर्गिक लोकव्यवहार आहे, असे शंकराचार्यांनी म्हटले आहे. कोणत्याही देशात, कोणत्याही भाषेत 'मी आणि माझे' असाच लोकव्यवहार आहे, असतो. अहंकार व ममत्व यांनाच 'संसार' असे म्हणतात. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त संसारहेयस्थल असे एका स्थलाचे नाव आहे. संसार हेय, तिरस्करणीय आहे. संसार याचा अर्थ आपले घर, दुकान, मुलेबाळे असा नाही. जी ईश्वरनिर्मित सृष्टी आहे ती ग्राह्य आहे. अग्राह्य नाही. परंतु ईश्वरनिर्मित सृष्टीत जीव स्वत:ची जी सृष्टी निर्माण करतो ती हेय, तिरस्करणीय आहे. उपनिषदे सांगतात, 'ईशावास्यमिदं सर्वं यत्किंचित् जगत्यां जगत्।' या प्रपंचात जे काही आहे ते ईश्वराचे. देवरदासिमय्या म्हणतात:–

**इळे निम्मदान बेळे निम्मदान**
**सुळिदु सूसुव गाळि निम्मदान**
**निम्मदावनुंडु अन्यरनु होगळुव**
**कुन्निगळेनेंबे रामनाथा**

भूमी आपली आहे, वायू आपला आहे, अग्नी, आकाश आपलेच आहे. म्हणजे ईश्वराचे आहे. मग जीवात्मा काय करतो? याच ईशनिर्मित सृष्टितील माती, दगड उचतलो, घर बांधतो, आणि म्हणतो– 'हे माझे घर आहे.' ईशनिर्मित सृष्टीतील वस्तूंचा संग्रह करून त्यावर आपल्या नावाचा शिक्का मारणे हाच 'संसार' होय. संसार सोडणे याचा अर्थ प्रपंच सोडणे असा नाही. प्रपंच कोणीच सोडू शकत नाही. प्रपंच सोडून कोठे जाणार? प्रपंच म्हणजे केवळ गाव नाही, प्रपंच म्हणजे केवळ अरण्य नाही, सर्वत्र प्रपंच आहे. घर, दार, मठ, मंदिर हे सारे सोडून कोठे जाणार? घर सोडून अरण्यात गेलो तरी तेथेही प्रपंच आहेच. म्हणून 'निवृत्त रागस्य गृहं तपोवनम्।' असे भागवतात म्हटले आहे. म्हणजे राग अर्थात् संसारातील ममकार त्याग करून जर घरात राहिलो तरी घर हेच तपोवन होते. रागद्वेषांनी बरबटलेल्या मनाने तपोवनात राहिलो तर ते तपोवन कसे राहील? एक घरच होईल. म्हणून ईशनिर्मित सृष्टीतील वस्तूंचा संग्रह करून त्यावर 'माझे' असा शिक्का जीवात्मा मारतो, तो त्याचा संसार होय. शरीर, इंद्रिये,

बुद्धी, अहंकार यात मी व माझेपण साठले आहे. कधी 'मी' तर कधी 'माझे' कधी म्हणतो 'मी पाहतो'तर कधी म्हणतो 'माझ्या डोळ्यांना दिसत नाही.' एकदा डोळे म्हणजे 'मी' समजतो तर दुसऱ्यांदा डोळ्यांना 'माझे' समजतो. म्हणून इंद्रिये, मन, बुद्धी ही जीवात्म्याच्या ममत्वाची ठिकाणे आहेत. त्यामध्ये 'मीपण' म्हणजे अहंकार हा एक अनात्म पदार्थ आहे. अहंकारातही अहम् आहे आणि आत्म्यात देखील अहम् आहे. या दोन अहम्‌मध्ये नेमके किती अंतर आहे ते कळत नाही. म्हणून त्याला 'हृदयग्रंथी' असे म्हटले जाते.

**भिद्यते हृदयग्रंथि: छिद्यन्ते सर्व संशया:।**
**क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे।।**

अहंकार व आत्मा यांचे समष्टिरूप हीच हृदयग्रंथी होय. आत्म्यातील अहम् हा शुद्ध अहंकार असून अहंकारातील अहम् हा अशुद्ध अहंकार आहे. अहंकारातील अहम्‌मुळे जीवात्मा संसारात येतो तर आम्यातील अहम्‌मुळे तो संसारमुक्त होतो. सद्‌गुरूंच्या उपदेशाने आपत्याला 'तत्त्वमसि' महावाक्याचा बोध होतो तेव्हा आपण म्हणतो, 'अहम् ब्रह्मास्मि.' शिवोऽहम् मीच ब्रह्म आहे, मीच शिव आहे. येथे देखील अहम् आहेच. मी जातो, मी खातो. येथेही अहम् आहे. लौकिक व्यवहारात व्यक्त होणारा अहंकार ही अहंकाराची अहंवृत्ती आहे आणि तत्त्वबोधानंतर निर्माण होणारा अहंकार ही आत्म्याची अहंवृत्ती आहे. म्हणून ती शुद्ध मानली जाते.

माहेश्वरस्थलातील साधकाच्या ठिकाणी लौकिक व्यहारातील अहंकार व ममत्व शिल्लक राहत नाही. म्हणून तो निर्मम व निरहंकार असतो असे म्हटले आहे. तो निरस्तक्लेशपंजर: असतो. क्लेश पाच प्रकारचे आहेत. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश. यांना क्लेश का म्हणतात? मनुष्याला दु:ख देणारे ते क्लेश होत. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश. यांना क्लेश का म्हणतात? मनुष्याला दु:ख देणारे ते क्लेश होत. अविद्या पहिला क्लेश आहे. अविद्या म्हणजे अज्ञान. अविद्येमुळेच अन्य चार क्लेश उत्पन्न होतात. 'मी शिवस्वरूप आहे, मी शिवाचा अंश आहे' हे ज्ञान जीवात्म्याला नाही. मी कोण आहे याचे ज्ञान नसल्यामुळेच जीवात्मा संसारात भरकटत राहतो. म्हणून सर्व क्लेशांचे मूळ अविद्या होय, अंध:कार होय. सर्व भयांचे मूळ अविद्या आहे. दिवसा कोठेही जायला सांगितले तर मनुष्य निर्भय होऊन जातो, परंतु रात्री बाहेर पडायची त्याला भीती वाटते. त्याच्या मनात भय उत्पन्न होते. अंधारात काय आहे आणि काय नाही? दिवसा स्मशानात जाणे सोपे आहे, परंतु रात्री स्मशानात जाणे भीतिदायक वाटते. भय उत्पन्न करणारा अंधार जसा बाहेर आहे तसाच आत देखील अज्ञानाचा अंध:कार आहे. वीज गेल्यावर आपण अंधारात बसून राहत नाही. लगेच मेणबत्ती किंवा दिवा पेटवतो. अंधार आपण सहन करू शकत नाही. बाहेरच्या अंधाराला आपण क्षणभर सहन करीत नाही, परंतु आतला अंधार मात्र युगानुयुगांपासून, जन्मजन्मांतरापासून आपण सहन करीत आहोत. आपल्या आत अंधार आहे हेच आपत्याला मान्य नसते. हा अंधार म्हणजे अविद्या. ही अविद्याच जीवाला अनेक क्लेश भोगायला लावते.

माहेश्वरस्थलातील साधक आपल्या हृदयात शिव आहे हे जाणतो. बीजात अंकुर तसा हृदयात शिव नांदतो. या ज्ञानामुळे त्याच्या आतला अंधार नाहीसा होतो. अविद्या नाही तर अस्मिता नाही, राग नाही, द्वेष नाही, अभिनिवेश नाही. तो मदरहित असतो. मद म्हणजे एक प्रकारचा अभिमान. अधिक धन मिळाल्यामुळे, अधिक विद्या प्राप्त झाल्यामुळे, सत्ता मिळाल्यामुळे मनुष्याला एक प्रकारचा अभिमान वाटतो तोच मद होय. प्रपंचातील सर्व अधिकार आणि धन ईश्वरापुढे लेशमात्र नाही अशी जाणीव माहेश्वराला असते. म्हणून तो सदैव मदरहित

असतो. धन आज आहे उद्या नसेल. अधिकार, सौंदर्य हे सारे आजपुरते, उद्या ते राहणार नाहीत. परमात्म्यापुढे तर ते शून्यच आहेत, म्हणून त्याला कधी मद होत नाही. मत्सर करणे हा दुर्गुण आहे. तो एक प्रकारचा आवेश आहे. मत्सर, क्रोध हे जीवाचे स्वाभाविक गुण नाहीत. ते बाहेरून काही प्रसंगाने त्याच्या ठिकाणी उत्पन्न होतात. एखाद्या मनुष्याला भूत झपाटते असे म्हणतात तशातलाच हा प्रकार. परंतु हे दुर्गुण स्वत:लाही हानी पोहचवतात आणि इतरांना देखील पोचवतात.

एका नदीकिनाऱ्यावर दोन तपस्वी तपश्चर्येला बसले होते. ते दोघेही एकमेकांचा मत्सर करीत. तपस्या म्हणजे स्पर्धाच झाली होती. त्यांच्या घोर तपश्चर्येने शिव प्रसन्न झाले. एका तपस्व्यासमोर प्रकट होऊन ते म्हणाले, ''वरं ब्रूहि. वर माग!''

तपस्व्याने पाहिले. प्रत्यक्ष भगवान शिव समोर उभे. त्याने नमस्कार करून विचारले, ''भगवन्, आपण आधी माझ्याकडे आलात की आधी त्या तपस्व्याकडे जाऊन आलात?'' ''तुला त्याच्याशी काय करायचे? तू आपला वर माग.'' शिव म्हणाले. ''तसे नाही भगवन्,'' तपस्वी म्हणाला, ''आपण आधी त्या समोरच्या तपस्व्याकडे जाऊन त्याला वर मागायला सांगा. तो जे काही मागेल त्याच्या दुप्पट ते मला द्या.''

''तथास्तु.'' असे म्हणून शिव दुसऱ्या तपस्व्यापुढे प्रकट झाले. त्यानेही वरीलप्रमाणे त्यांना विचारले, शिव म्हणाले, ''तू जे मागशील ते दुप्पट त्याने मागिले आहे, आता तू वर माग.''

तपस्व्याने विचार केला. आपण जे मागू त्याच्या दुप्पट त्याला मिळणार. म्हणजे काहीही मागितले तरी त्याचाच लाभ अधिक. त्याला आपल्यापेक्षा दुप्पट लाभ झाला तर आपले काय राहिले? सारी तपश्चर्या फुकट गेली. त्याचा दुप्पट तोटा होईल असेच काहीतरी मागायला हवे. म्हणून तो शिवाला म्हणाला, ''भगवन्, मला एका डोळ्याने आंधळा करा. म्हणजे तो दोन डोळ्यांनी आधंळा होईल.''

याचेच नाव मत्सर. दुसऱ्याचे भले होऊ नये असे वाटणारी जगात खूप माणसे असतात. मत्सरामुळे आपलेही नुकसान होते आणि दुसऱ्याचेही नुकसान होते. ज्याच्या मनात मत्सर आहे त्याची प्रगती कधीच होत नाही. माहेश्वरस्थलातील साधक मात्र मद आणि मत्सर यांपासून सर्वस्वी मुक्त असून तो अत्यंत पवित्र जीवन व्यतीत करीत असतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

१६ ऑगस्ट १९९१



## माहेश्वरप्रशंसास्थल–५

जिज्ञासू सद्भक्तांनो,

माहेश्वरस्थलाची प्रशंसा करताना काल सांगितले होते की,

**अस्पृष्टमदसंबंधो मात्सर्यावेशवर्जितः।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.१७)

शास्त्रात ज्यांना षड्रिपू म्हणतात त्यात मद व मत्सर यांचा समावेश होतो. काही शत्रू आपल्या शरीराबाहेर राहतात, काही शत्रू शरीरातच ठाण मांडून बसतात. बाहेरच्या शत्रूपासून आपण फार सावध असतो. शत्रू कोठे राहतो? काय करतो? आपल्याविषयी कोणता विचार करतो? यासंबंधी कधीच विचार करीत नाही. एक सुभाषितकार म्हणतोः–

**कामः क्रोधश्च लोभश्च देहे तिष्ठन्ति तस्कराः।**
**ज्ञानरत्नापहाराय तस्माज्जाग्रत जाग्रत।।**

रात्री शहरात गस्त घालतात. सर्व झोपले तरी गस्त घालणारा जागी असतो. जो सोता है वह खोता है. चोराने संपत्तीचे अपहरण करू नये म्हणून तो आपल्याला सतत सावध करीत असतो. एका घरातील गृहस्थ बाहेरगावी गेल्यामुळे त्याच्या स्त्रीने आपल्या लहान मुलाला गस्त घालायला पाठवले. तो लहान मुलगा वरील श्लोक म्हणत गस्त घालू लागला. लोकांना जागे करू लागला. उपनिषदे सांगत असतात, 'उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत।'

आपल्यापैकी काही दररोज जागतात तर काही झोपतात. जागृतावस्था ही एक सामान्य अवस्था आहे. प्रयत्न केल्याशिवाय ती सहज प्राप्त होते. परंतु एक जागृतावस्था मात्र अशी आहे की ती प्राप्त करण्यासाठी साधना करावी लागते. त्याला वरजागृतावस्था असे म्हणतात. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्था कर्माधीन आहेत. आपले कर्म जागृतावस्थेतील सुख देणारे असते त्यावेळी आपण जागे असतो. जेव्हा स्वप्नातली सुखदुःखे भोगविणारे कर्म कार्यरत असते त्यावेळी आपण स्वप्नातली सुखदुःखे भोगतो. जेव्हा सुषुप्ती देणारे कर्म पक्व होते तेव्हा आपण गाढ निद्रेचे सुख अनुभवतो. परंतु या तिन्ही अवस्था आपल्या आधीन नसतात. जेव्हा लागेल तेव्हा झोपणे, वाटेल तेव्हा स्वप्ने पाहणे, वाटेल तेव्हा जागे होणे हा अधिकार आपल्याला नाही.

आशीर्वचन ऐकताना झोप येऊ नये अशी तुमची इच्छा असते. परंतु नकळत झोप तुमचा ताबा घेत असते. याचा अर्थ ही अवस्था आपल्या आधीन नाही. काही विद्यार्थी असे असतात की परीक्षेच्या वेळी रात्रभर अभ्यास करतात, वेळ आहे म्हणून झोपतात. परीक्षेची वेळ टळून गेल्यावरच त्यांना जाग येते. दुःस्वप्न पाहण्याची मनुष्याची इच्छा नसते. तरी ती स्वप्ने त्याला पाहावीच लागतात. इच्छा नसताना झोप येणे, इच्छा नसताना दुःस्वप्ने पाहणे आणि इच्छा नसताना झोपेतून जागे होणे यावरून या अवस्था मनुष्याच्या आधीन नाहीत हेच सिद्ध होते. त्या कर्माधीन आहेत. परंतु 'जागृतावस्था' मात्र आपल्या आधीन आहे. जेव्हा आपण साधना कराल, ध्यान कराल, तुमचे अंतःकरण शुद्ध होईल, सद्गुरूंचा उपदेश ऐकाल, हृदयात आत्मज्ञानाचा उदय होईल त्यावेळी तुम्ही जागे होता. ती वरजागृतावस्था तुमच्या आधीन आहे.

गस्त घालणारा बालक सांगत होता, 'जागे व्हा, जागे व्हा. तुमच्या अंतरंगातील ज्ञानरत्नाचे अपहरण करण्यासाठी सहा चोर टपून बसलेत. त्यांच्यापासून सावध राहा, जागे राहा.'

काही तस्कर गेहात राहतात तर काही तस्कर देहात राहतात. गेह म्हणजे गृह. देह म्हणजे शरीर. काही चोर घरात घुसतात काही तर शरीरात. घरात घुसलेल्या चोरांना जागे राहून हाकलता येते, परंतु देहात घुसलेल्या चोरांना तर आपण आपले सगेसोयरे मानतो. अनेक युगांपासून आपण त्यांना पोसलेले आहे. माहेश्वरस्थलातील साधक मात्र या चोरांपासून सावध असतो, जागृत असतो. आत्मानंदात सदैव निमग्न असतो. षड्रिपू त्याला त्रास देत नाहीत.

माहेश्वरस्थलातील साधक निरस्तमदनोन्मेष व निर्धूतक्रोधविप्लव असतो. मदन म्हणजे काम. मदन, मन्मथ, मार, प्रद्युम्न, मीनकेतन अशी कामाची नावे अमरकोशात सांगितली आहेत. जो प्रशांत मनाला विचलित करतो त्याचे नाव मन्मथ. कामदेवाने भगवान शिवावर आक्रमण केल्याची एक कथा शिवपुराणात व कालिदासाच्या कुमारसंभव काव्यात आलेली आहे. तारकासुराच्या त्रासाने त्रस्त होऊन देव ब्रह्मदेवाकडे गेले. तेव्हा ब्रह्माने सांगितले की शंकराचा पुत्र कार्तिकेय त्याला मारू शकेल. परंतु शंकराला पुत्र कसा होणार? म्हणून ते सर्व कामदेवाकडे गेले आणि त्यांनी कामदेवाची प्रार्थना केली. कामदेव आपली आयुधे व रतीसह शंकराकडे आले आणि त्यांनी शंकराला मोहित करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा शंकरांनी आपला तृतीय नेत्र उघडून त्याला भस्मसात केले. म्हणून जे शिवभक्त असतात त्यांच्यापासून काम दूर राहतो.

शास्त्रे सांगतात की, मदनापासून बचाव करण्याचे दोनच उपाय आहेत. पहिला मदनाच्या पित्याला म्हणजे कृष्णाला शरण जाणे आणि दुसरा ज्याने मदनाचे दहन केले अशा शंकराला शरण जाणे. भगवंताला शरण गेल्याशिवाय भक्ताची मदनवेशापासून सुटका होत नाही. निरंतर शिवचिंतन केल्याने शिवाच्या ठायी असलेली शक्ती भक्ताला प्राप्त होते. अग्नीत दाहकता आहे. कोणतीही वस्तू अग्नीत टाकली की भस्म होते. हा अग्नी लाकडात उत्पन्न झाला तर लाकूडदेखील अग्निरूप होऊन वस्तूंना जाळू शकतो. पेटलेले लाकूड घरदेखील जाळते. लोखंडात अग्नी उत्पन्न झाला तर त्याचा स्पर्शही दाहक ठरतो. त्याप्रमाणे शिवचिंतन करणाऱ्या साधकाच्या ठिकाणी शिवाचे सामर्थ्य प्रादुर्भूत होते. याच कारणाने माहेश्वरस्थलातील साधक कामवेगापासून मुक्त होतो. काम व मोह यांना गीतेने 'नरकाची द्वारे' असे म्हटले आहे. 'त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः।'

जो अत्यंत क्रोधी असतो तो नरकात जातो आणि तो जोपर्यंत क्रुद्ध असतो तोपर्यंत नरकातच पिचत राहतो. येथे विचार करायला हवा. मनुष्य एका क्षणी स्वर्गात असतो तर दुसऱ्या क्षणी नरकात. मृत्यूनंतर स्वर्ग-नरक असतीलही, परंतु त्याआधीही ते अस्तित्वात असतात. आपले शरीर जेथे राहते तेथे आपण राहत नाही, तर आपले मन जेथे असते तेथे आपण राहत असतो. तुमचे शरीर आता या वीरशैव भवनात आहे पण मन कोठे आहे? ते तुम्हालाच माहीत. शरीराने तुम्ही येथे आहात याला फारसा अर्थ नाही. मनाने तुम्ही येथे असणे महत्त्वाचे. क्रोधविकार मनात उत्पन्न झाला की शरीर तप्त होते. काम, क्रोध, लोभ हे ज्वर आहेत असे गीतेत म्हटले आहे. रागावलेल्या मनुष्याच्या शरीराचे तापमान आणि ज्वर झालेल्या मनुष्याचे तापमान मोजले तर सारखेच आढळेल. शरीरातली उष्णता वाढली की रक्त उकळू लागेल. क्रोध आला तरी काही मिनिटेच तो शरीरात राहतो. तो एखाद्या वादळासारखा येतो आणि निघून जातो. पण जाताना शरीरातली, मनातली सर्व शांती, समाधान घेऊन

जातो. अनर्थ घडवून जातो. क्रोधाच्या भरात एखादा दगड घेऊन समोरच्या व्यक्तीच्या डोक्यात कोणी घालतो. त्याक्षणी ती व्यक्ती तेथे हजर नसली तर वाचली. क्रोध हा वेडाचा एक झटकाच आहे. ती वेळ निघून गेली की माणूस शांत होतो, माणसासारखा वागतो.

क्रोधाच्या एका क्षणी आपल्या हातून घडलेला अनर्थ सुधारण्यासाठी कित्येक दिवस, कित्येक महिने लागतात. त्यामुळे आपल्या शरीरात उत्पन्न झालेली विकृती दूर करायला पुष्कळ वेळ लागतो. शास्त्रज्ञांनी प्राण्यांवर केलेले प्रयोग हेच सिद्ध करतात. एका मांजराची पचनक्रिया क्ष-किरण यंत्राने तपासली जात होती. मांजर खात होते, त्याची पचनक्रिया व्यवस्थित चालू होती. एवढ्यात त्याच्यासमोर एक कुत्रा आणला गेला. कुत्र्याला पाहून ते मांजर इतके भयभीत झाले की त्याची संबंध पचनक्रिया बिघडली. क्ष-किरण यंत्राने शास्त्रज्ञ हे सारे पाहत होते. नंतर कुत्र्याला मांजरापासून हालवण्यात आले. कुत्रा आता समोर नव्हता तरी त्याचा आघात एवढा होता की मांजराची पचनक्रिया पूर्वस्थितीत येण्यासाठी चोवीस तास लागले. एक क्षणभर आपल्या मनावर कसला आघात झाला, मग तो भयाचा असो, क्रोधाचा असो की कामाचा असो त्यामुळे शरीरात उत्पन्न होणारी विकृती दुरुस्त करायला या प्रकृतीला कमीत कमी चोवीस तास लागतात.

आपण दिवसात किती वेळ रागवतो? याचा मनाशी विचार करावा. त्यामुळेच आपण स्वास्थ्य हरवून बसलो आहोत. म्हणून क्रोध हा एक प्रकारचा ज्वर आहे. भगवंतांनी गीतेत म्हटले आहे- 'युद्ध्यस्व विगतज्वर:' अर्जुना तुझ्या मनात मोहनामक ज्वर आहे त्याचा त्याग कर. या ज्वरावर औषध कोणते आहे? विवेक हेच त्यावरील प्रभावी औषध आहे. म्हणून मनातील दूषितपणा नष्ट करण्यासाठी आपण सत्संगात येतो, त्यावेळी आपले मन प्रसन्न होते. दूषित भावना संपून जाते. चोवीस तास दूषित होणारे शरीर, मन या एका तासाने शुद्ध होते. त्यासाठी चोवीस तास लागत नाहीत. म्हणून सत्संग हा अलभ्य लाभ आहे.

माहेश्वरस्थलातील साधक कधी रागवत नाही. त्याला क्रोधाचा स्पर्शच होत नाही. वातावरण कितीही बिघडले तरी तो शांतचित्त असतो. स्वास्थ्याला हानिकारक वृत्तीपासून तो सदैव सावध असतो. क्रोध आला त्यावेळी मनुष्याने काय करावे? आपल्याला क्रोध येत आहे हे समजते. काही जणांना तर तेही कळत नाही. क्रोध येऊन गेल्यानंतर त्यांना कळते की आपण रागावलो होतो. तो येण्याआधी आपण जर जागे असू तर तो आपल्या मनात प्रवेशच करणार नाही. जो जागा नसतो त्याच्याच मनात क्रोध शिरतो. एखाद्या माणसाचा आपत्याला राग आला तर आपण तो कसा व्यक्त करतो? एकतर हाताने, लाथेने किंवा जिभेने. आपत्याला खूपच क्रोध आला तर शिव्या देण्याच्या आणि हात उगारण्याच्या भानगडीत आपण पडत नाही. त्याला सरळ लाथ मारून मोकळे होतो. अशा वेळी समजावे की क्रोध आपल्या नियंत्रणात नाही, तो अनकंट्रोल्ड आहे. हे त्याचे भयानक रूप आहे. हाताने मारणे हे त्यापेक्षा सौम्य आणि शिव्या देणे हे त्याहीपेक्षा सौम्य. भांडण शिव्यांनी सुरू होते मग हातघाईवर येते आणि शेवटी लाथाळीने संपते. क्रोधाचे हे विविध आविष्कार आहेत.

क्रोध येतो आहे अशी जाणीव होताच मौन धारण करावे आणि आपल्या हातापायांना शांत राहण्याची आज्ञा द्यावी. असे केले तर क्रोध तात्काळ पळून जाईल. कारण त्याला कळेल की याच्या शरीरात प्रवेश करून काहीच उपयोग नाही. मौन राहणे अवघड वाटत असेल तर त्यावेळी तोंडात पाणी घेऊन गप्प राहावे. तोंड मोकळे असेल तर शिव्या बाहेर येऊ शकतात. घराला आग लागली की आपण त्यावर पाणी टाकतो. तसे क्रोधाग्नीवर तोंडात पाणी घेऊन शांत राहणे हा उपाय आहे. हे सारे सांगण्याचा उद्देश इतकाच की क्रोधामुळे आपल्या हातून अनर्थ

घडतो आणि नंतर पश्चात्ताप करण्याची पाळी आपल्यावर येते.

एका घरात सासू आणि सून यांच्यात नेहमी भांडण होत असे. ही प्रत्येक घरातली कथा आहे. सासूने एक शिवी दिली की सून दोन शिव्या देत असे. मग सासू अत्यंत क्राधाविष्ट होऊन सुनेला मारत असे. सुनेने मात्र तिला मारले नाही. एकदा सून एका महात्म्याकडे गेली. म्हणाली, ''महाराज, सासूचे आणि माझे नेहमी भांडण होते. मी काही कमी नाही. परंतु ती कधीही मारते, मी मात्र तिला अजून मारले नाही. मी तिच्यापेक्षा दोन शिव्या जास्त देते म्हणूनच ती मला मारते. माझा क्रोध शांत व्हावा यासाठी एखादा मंत्र द्या, काहीतरी औषध द्या.''

साधूने एका बाटलीत औषध देऊन तिला सांगितले, ''भांडण सुरू होताच हे औषध तोंडात घेऊन गप्प बसून राहा. सासूने कितीही शिव्या दिल्या किंवा मारले तरी तोंड उघडू नकोस.''

सून घरी गेली आणि त्याप्रमाणे तिने प्रयोग सुरू केला. एक-दोन दिवसांतच घरातले भांडण संपले. तिला फार आश्चर्य वाटले. भांडण केव्हा वाढते? जेव्हा दोघे आपापसात देवाण-घेवाण करतात तेव्हा. एकजण शिवी देतो आहे, दुसरा शिवी खातो आहे तर भांडण वाढणार नाही. सून साधूकडे जाऊन म्हणाली, ''महाराज, औषध फार प्रभावी आहे. त्याचे पैसे किती देऊ?''

महाराज म्हणाले, ''कसले पैसे बाई? त्या बाटलीत मी साधे पाणी भरून दिले होते. घरी जा आणि मी सांगितल्याप्रमाणे वाग.''

असा प्रयोग केला तर आपल्याही घरातली भांडणे संपून जातील. ज्याला क्रोधावर नियंत्रण करता येत असेल त्याने अवश्य करावे. परंतु ज्याला नियंत्रण करता येत नसेल त्याने तोंडात पाणी घेऊन गप्प बसावे हे चांगले. कारण त्यामुळे अनर्थ घडणार नाही.

माहेश्वरस्थलातील साधक क्रोधापासून दूर असतो. त्याच्यावर कोणी रागावला तरी तो शांत राहतो. त्यामुळे दुसऱ्याच्या मनात आलेला क्रोधदेखील पळून जातो. म. गांधी म्हणत की, आपल्या एका गालात कोणी मारले तर दुसरा गालही त्याच्यापुढे करावा. एक थप्पड मारणाऱ्याला आपण पुन्हा थप्पड मारली तर चार थपडा आपल्याला खाव्या लागतात. मारणाऱ्याला 'अधिक मार' असे म्हटले तर तो लज्जित होतो. क्रोधावर विजय मिळविण्याचे असे अनेक उपाय आहेत. ते ऐकून त्यांचा वापर केला तरच शास्त्रश्रवणाचे फळ आपल्याला मिळते. अन्यथा ते वृथाश्रवण ठरते.

माहेश्वरस्थलातील साधक कसा असतो? 'सदासंतुष्टहृदय'. तो सदैव संतुष्ट असतो. संतोष ही मोठी संपत्ती आहे. मनुष्य क्वचित् संतुष्ट असतो, पण सदैव असंतुष्ट असतो. कर्मानुसार जे मिळेल त्यात समाधान मानले तरच संतुष्ट राहता येईल. निजगुण शिवयोगी म्हणतात, 'दोरेयलेनदरोळु परिणते दळेउदे चंदमम'.

जे मिळेल तेवढ्यात संतोष मानणे हे सज्जनाचे लक्षण आहे. मनुष्य असे करीत नाही. त्याच्या आकांक्षा वाढत जातात. अंथरूण पाहून तो पाय पसरत नाही. त्याचे पाय अंथरूणाबाहेरच जातात.

एकदा अकबर बादशहाला एका विणकराने एक चादर भेट दिली आणि रोज तीच पांघरून झोपावे अशी विनंती केली. रात्री बादशहा ती चादर अंगावर घेऊन झोपला. तिची लांबी कमी असल्यामुळे ती डोक्यावर ओढली की त्याचे पाय उघडे पडायचे आणि पायावर ओढली की डोके उघडे पडायचे. रात्रभर असा खेळ झाला.

दुसऱ्या दिवशी दरबारात बादशहाने ती चादर दाखवून सांगितले, ''जो कोणी माझे सारे अंग या चादरीने झाकून दाखवील त्याला मोठे बक्षीस मिळेल.'' प्रत्येकाने प्रयत्न केला. बादशहाचे डोक किंवा पाय यांपैकी काहीतरी

उघडे राहायचे. सगळ्यांनी सांगितले, ''खाविंद, चादरीत दोष आहे. तिची लांबी कमी आहे.''

शेवटी बिरबलाचा क्रमांक आला. त्यानेही प्रयत्न केला. परंतु यश मिळाले नाही. तो म्हणाला, ''जहांपन्हां, दोष चादरीत नाही. तुमच्यात आहे. तुम्हाला नीट झोपता येत नाही.''

बादशहा रागावला, म्हणाला, ''मला नीट झोपता येत नाही? मग कसे झोपायचे ते तू शिकव!''

बिरबलाने होकार दिला आणि तो पाय पोटाशी घेऊन झोपला. त्याच्या अंगावर बादशहाने चादर टाकली आणि त्याचे सारे शरीर व्यवस्थित झाकले गेले.

सांगायचे तात्पर्य असे की आपली कमाई, आपले कर्म कमी आहे आणि आकांक्षा अधिक आहेत. पगार हजार रुपये आणि खर्च दीड हजार रुपये. त्यामुळे मनुष्य सदैव असंतुष्ट असतो. आपल्याला राहायला छोटे का असेना घर आह, काही लोकांना फूटपाथवर झोपावे लागते. आपल्याला दोन वेळ पोटभर जेवण मिळते, काहीजणांना एकवेळ देखील मिळत नाही. आपल्याला लज्जारक्षणापुरते कपडे आहेत, काहीजणांजवळ तेवढेही नाहीत. असा जो विचार करतो तोच संतुष्ट राहू शकतो. आपल्यापेक्षा उच्चस्तरीय लोकांकडे पाहून जो जगतो त्याच्या नशिबी असंतोषाशिवाय काही येणार नाही. म्हणून आहे त्यात समाधान मानणे हीच संतुष्ट जीवनाची गुरुकिल्ली होय.

माहेश्वरस्थलातील साधक 'सर्वभूतहितेरत:' असतो. तो केवळ स्वत:चे कल्याण पाहत नाही, तो स्वार्थी नसतो. शिव जसा सर्वांचे हित करणारा आहे तसाच तोही 'बहुजनहिताय बहुजनसुखाय' अशा वृत्तीने जीवन व्यतीत करतो. जे उदारहृदयी असतात ते पृथ्वीलाच एक कुटुंब मानतात. जो व्यष्टि-अभिमानी असतो त्याला दु:ख भोगावे लागते. परंतु जो समष्टि-अभिमानी असतो त्याला दु:ख स्पर्श करीत नाही. प्रपंचातील सर्व प्राण्यांच्या हिताची चिंता वाहणारा माहेश्वर हा विशाल हृदयी असतो. शिवकार्याला विरोध करणारांचे निवारण करून तो शिवाचा अपकर्ष होऊ देत नाही आणि शिवाच्या उत्कर्षाची सामग्री संग्रहित करतो. इष्टदेवासाठी व गुरूसाठी तो प्राणत्याग करायला सिद्ध असतो. सर्वांचा आत्मा हा आपलाच आहे असा समष्टिभाव असलेला साधक माहेश्वर होय. माहेश्वरस्थलातील साधकाच्या ठिकाणी काही उत्कृष्ट गुण असल्यामुळे त्याला 'वीरमाहेश्वर' असे म्हटले जाते. भक्तस्थलातील साधकात जेव्हा उत्कृष्ट गुण उत्पन्न होतात तेव्हा त्याला वीरमाहेश्वर म्हणतात.

माहेश्वरस्थलातील पहिले 'माहेश्वरप्रशंसास्थल' हे उपस्थल येथे संपले. यानंतर त्याची लिंगावर कशी निष्ठा असते हे विशद करणारे उपस्थल म्हणजे लिंगनिष्ठास्थल. त्याचे विवेचन यानंतर करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
१७ ऑगस्ट १९९१



# लिंगनिष्ठास्थल- १

जिज्ञासू सद्भक्तांनो,

माहेश्वरप्रशंसास्थलाचे विवेचन आतापर्यंत आपण ऐकले. उत्कृष्ट गुणांनी युक्त आणि माहेश्वरावर नितांत निष्ठा असणारा भक्तच माहेश्वर अथवा वीरमाहेश्वर होय. आता वीरमाहेश्वराच्या ठिकाणी असलेल्या लिंगनिष्ठेबद्दल ज. रेणुकाचार्य सांगतात:-

**अस्य माहेश्वरस्योक्तं लिंगनिष्ठामहास्थलम्।**
**प्राणात्ययेऽपि संपन्ने यदत्याज्यं विधीयते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.२१)

वीरशैवसिद्धान्तानुसार इष्टलिंगपूजन हे एक महाव्रत आहे. म्हणून याला लिंगनिष्ठामहास्थल असेही म्हणतात. या व्रताचे आचरण करीत असताना जर तुम्ही पूजन कराल तर अनर्थ होईल, असे जर कोणी धमकावले तरी एकवेळ प्राणत्याग घडेल परंतु व्रत सोडले जात नाही. अशा नितातंनिष्ठेमुळेच भक्ताला 'माहेश्वर' म्हटले जाते. म्हणून इष्टलिंगपूजा हे महाव्रत आहे.

काही व्रते नैमित्तिक असतात. श्रावणमासातल्या सोमवारी काही वरदशंकराचे पूजन करतात. कोणी सत्यनारायण घालतात. ही व्रते रोज केली जात नसून निमित्ताने केली जातात म्हणून ती नैमित्तिक व्रते आहेत. परंतु इष्टलिंगपूजा हे नित्यव्रत आहे, नैमित्तिक नव्हे. नित्य याचा अर्थ आहे 'नित्यं यावदायु:।' म्हणजे आयुष्य असेपर्यंत प्रतिनित्य न चुकता केले जाणारे कर्म नित्यव्रत होय. यालाच नित्यकर्महीं म्हणतात. सद्गुरूकडून दीक्षा मिळाली की आपल्याला पूजेचा अधिकार प्राप्त होतो. जोपर्यंत दीक्षा होत नाही तोपर्यंत साधक पूजेचा अधिकारी होत नाही. जर तो पूजा करीत असेल तरी ती पूजा विशेष फलप्रद होत नाही. म्हणून पूजा, जप करण्याअगोदर साधकाने आपल्या कुलगुरूकडून दीक्षा आणि महामंत्राचा उपदेश घ्यायला पाहिजे. दीक्षेवाचून जो शिवपूजन करतो त्याची पूजा भगवान शिव स्वीकारीत नाहीत, असे आगमांत म्हटले आहे. शिवाचा अनुग्रह प्राप्त करायचा असेल तर आधी गुरूचा अनुग्रह प्राप्त करायला हवा, म्हणून बसवेश्वर म्हणतात:-

**शिवपथवनरिवडे गुरुपथवे मोदलु।**

शिवाच्या वाटेने जायचे असेल तर प्रथम गुरूच्या दाराने गेले पाहिजे. गुरूच्या उपदेशाशिवाय आपण गन्तव्यस्थानापर्यंत पोहचू शकत नाही. यासाठी प्रत्येक साधकाने गुरूला शरण गेले पाहिजे. गुरूकडे जाण्याआधी आपल्या ठिकाणी काही योग्यता असायला हवी. गुरू कोणालाही उपदेश देत नसतात. मागे सांगितले आहे, 'शक्तिपातं समालोक्य दीक्षया योजयेदमुम्।'

दीक्षा घेण्यासाठी कोणी आला तरी त्याच्या ठिकाणी शिवाचा शक्तिपात झाला की नाही याचे परीक्षण करावे लागते. ज्याच्यावर शिवाचा अनुग्रह झाला असेल त्यालाच गुरू दीक्षा देतात. शक्तिपात झाल्याची काही लक्षणे आहेत. शिवकथेचे श्रवण करताना डोळे भरून येतात, अंगावर रोमांच येतात. शरीर कंपायमान होते. असा साधक दीक्षेसाठी योग्य असतो. अशाला दिलेली दीक्षा सफल होते आणि त्या साधकाचे जीवन उजळून जाते. प्राचीन काळी शिष्याची अनेक प्रकारे परीक्षा घेत असत. त्यात तो उत्तीर्ण झाला तरच त्याला दीक्षा देण्यात येई.

उपनिषदांत एक सुंदर कथा आहे. एकदा इंद्र व विरोचन हे दोघे ब्रह्मदेवाकडे ब्रह्मज्ञानप्राप्तीच्या इच्छेने येतात. ब्रह्मज्ञान झाले की मृत्युपासून सुटका होते अशी कथा तोपर्यंत प्रचलित झाली होती. देव आणि दानव दोघांनाही मृत्यूची भीती होती. ती टाळण्यासाठी देवराज इंद्र व असुरराज विरोचन ब्रह्मज्ञान मागायला ब्रह्माजवळ गेले. ब्रह्मदेवाने विचारले तेव्हा त्यांनी सांगितले, ''आम्हाला आत्मज्ञान हवे आहे. आम्ही असे ऐकले की आत्मज्ञान झाले की मृत्यूचे भय राहत नाही. आम्हाला मृत्यूची भीती वाटते. म्हणून आम्हाला आत्मज्ञान द्या.''

ब्रह्मदेव म्हणाले, ''आत्मज्ञान हे सुलभ नाही. आता मागितले की लगेच दिले. त्यासाठी व्रतपालन आणि सेवा करावी लागेल.''

दोघांनी मान्यता दर्शवली. तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, ''तुम्ही दोघे बारा वर्षे ब्रह्मचर्याचे पालन करा, सेवा करा. त्यानंतर तुम्हाला ब्रह्मज्ञानाचा उपदेश मिळेल.''

दोघेही त्याप्रमाणे तपस्या करू लागले. बारा वर्षे उलटली. ब्रह्मदेवांनी दोघांना बोलावून त्यांची योग्यता जोखून पाहिली. ते म्हणाले, ''तुम्ही दोघेही उंची वस्त्रे परिधान करा. अलंकार घाला आणि पाण्याचे भांडे समोर ठेवून त्यात बघा. तुम्हाला जे दिसेल तोच आत्मा आहे.''

दोघांनी त्याप्रमाणे केले. पात्रात आपापली प्रतिबिंबे पाहिली. त्यावरून त्यांनी निश्चय केला की आपल्याला पाण्यात शरीर दिसले म्हणजे तोच आत्मा असला पाहिजे. ते दोघेही आपापल्या स्थानी गेले. इंद्राने विचार केला की जे दिसले तो आत्मा नव्हे. जे दिसते ते केव्हा ना केव्हा अदृश्य होते. असा विचार करून इंद्र अर्ध्या वाटेवरून परत फिरला आणि ब्रह्माला शरण गेला. ब्रह्मदेवाने त्याची योग्यता ओळखली आणि त्याला पुढचा उपदेश केला. विरोचन मात्र नगरात जाऊन इतरांना म्हणाला, ''मी बारा वर्षे व्रतपालन केले आणि आत्मज्ञान मिळवून आलो. चांगले कपडे घाला, दागिने अंगावर चढवा आणि एका भांड्यात पाणी घेऊन त्यात पाहा. जे दिसेल तो तुमचा आत्मा आहे. हेच आत्मज्ञान.''

दानवांनी त्याप्रमाणे केले. शरीर हाच आत्मा आहे हे त्यांना कळले.

**यावज्जीवेत् सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्।**

जोपर्यंत जीवन आहे तोपर्यंत सुखाने जगावे. चांगले खावे, प्यावे, सुखाचा भोग घ्यावा, कोणाकडून कर्ज घ्यावे, कर्ज फेडण्याची काळजी करू नये. कारण

**भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः।।**

एकदा देह जळून गेला तर शिल्लक काय उरते? म्हणून मरण हाच मोक्ष आहे. सुखाचा अनुभव हाच स्वर्ग होय. या तत्त्वज्ञानाला चार्वाक किंवा लोकायत तत्त्वज्ञान म्हणतात.

जन्मलेला प्रत्येक जीव प्रारंभी याच तत्त्वज्ञानाचा अनुयायी असतो. कारण हा सिद्धान्त सरळ आहे. शरीर सर्वांच्या अनुभवाला येते. त्यापेक्षा इंद्रियांचा अनुभव कमी प्रमाणात येतो. त्यापेक्षा मनाचा कमी, बुद्धीचा अधिक कमी आणि आत्म्याचा अनुभव तर येतच नाही. म्हणून माणसांची सारी शक्ती आणि ज्ञान शरीराभोवतीच केंद्रित झालेले असते. हजारात एखादा मनुष्य मात्र शरीरापेक्षा अधिक काहीतरी आहे असे समजून त्याच्या प्राप्तीसाठी धडपड करतो. इंद्राने ब्रह्मदेवाच्या उपदेशाप्रमाणे पुन्हा बारा वर्षे तपस्या केली. त्यानंतर ब्रह्मदेव त्याला म्हणाले,

''जे दिसते ते आपण नाही तर जे पाहतो ते आपण आहोत.'' याला दृक्-दृश्यविवेक म्हणतात. दृक् म्हणजे पाहणारा, दृश्य म्हणजे दिसणारे. जे दिसते ते अनात्मा आणि जो पाहतो तो आत्मा.

इंद्राला वाटले शरीर दिसते ते अनात्मा असेल पण डोळे पाहतात. म्हणून डोळे म्हणजे आत्मा आहे. परंतु डोळे सारे पाहतात तरी स्वत:ला पाहू शकत नाहीत हे त्याच्या लक्षात आले म्हणून डोळ्यांना पाहणारा तो आत्मा आहे. मग त्याला वाटले की डोळ्यांना पाहणारे मन आहे, मनच आत्मा आहे. याप्रमाणे मन, बुद्धी यांना त्याने आत्मा मानले. परंतु निद्रावस्थेत बुद्धी सुप्त असते. बुद्धीचा अभाव जाणणारा कोण? तर खरा आत्मा होय असा त्याला साक्षात्कार झाला. गीतेत म्हटले आहे:-

**इंद्रियाणि पराण्याहु: इंद्रियेभ्य: परं मन:।**
**मनसस्तु पराबुद्धिर्योबुद्धे: परतस्तु: स:।।**

शरीराच्या आत इंद्रिये, इंद्रियापलीकडे मन, मनापलीकडे बुद्धी आणि बुद्धीपलीकडे आत्मा आहे. यातले प्रत्येक तत्त्व जाणण्यासाठी इंद्राने प्रत्येकी बारा वर्षे याप्रमाणे साठ वर्षे तपश्चर्या केली. ब्रह्मज्ञान असे दुर्लभ आहे. साठ वर्षे झाली की मनुष्याची इंद्रिये थकतात आणि तो त्यापलीकडे पाहू लागतो. वयाला साठ वर्षे झाली की नोकरीतून निवृत्त करतात. सांसारिक कार्ये करण्याची क्षमता आता संपली, यानंतर आयुष्याचे कल्याण करणारे काहीतरी करा असा इशाराच जणू त्यामधून मिळतो. मनुष्य साठ वर्षांचा झाला की षष्ट्यब्दिपूर्ती समारंभ करतात. पत्नी जिवंत असेल तर त्यांचे पुन्हा लग्न लावले जाते. कशासाठी? तर यापूर्वी लग्न संसारासाठी होते आता समाजासाठी, आध्यात्मिक कार्यासाठी नव्याने गृहस्थजीवन जगा असा संदेश त्यामध्ये आहे. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास असे चार आश्रम पूर्वी होते आणि शंभर वर्षांचे ते चार भाग पाडलेले होते. आता कोणी शंभर वर्षे जगणे कठीण. साठ-सत्तर वर्षे खूप झाली. जुना माणूस सत्तर-ऐंशी जगेल, नव्या पिढीतला जगणे कठीणच.

आज कोणी दीक्षेसाठी आला तर एवढी कठीण परीक्षा केली जात नाही. अलीकडे तर प्रचार करून दीक्षेला बोलावले जाते. पाच तारखेला दीक्षासमारंभ आहे, इच्छुकांनी त्यासाठी यावे. प्रचार ऐकून कोणी दीक्षेसाठी आला तर तो योग्य मानला जातो. प्रचार ऐकूनही कोणी आला नाही तर तो अयोग्य ठरतो. इतका सोपेपणा आजकाल दीक्षाविधीमध्ये आलेला आहे. गुरुदीक्षेच्या वेळी गुरू उपदेश करतात, 'हे व्रत तुला जीवनभर करावे लागेल.'

**अपगच्छतु सर्वस्वं शिरच्छेदनमस्तु वा।**
**माहेश्वरो न मुंचेत लिंगपूजामहाव्रतम्।।१०.२२।।**

लिंगपूजा हे महाव्रत आहे. याला शांभवव्रत, महापाशुपतव्रत असेही म्हटले जाते. इष्टलिंग शरीरावर नित्य धारण करणे व प्रतिदिन त्याची पूजा करणे हे एक महाव्रत होय. बरेच जण दीक्षेच्या वेळी लिंग घेतात, काही दिवस पूजा करतात, नंतर सोडून देतात. त्यामुळे ते व्रतापासून भ्रष्ट होतात. दीक्षित झाल्यानंतर अध:पतन होऊ नये. प्रगती झाली पाहिजे. म्हणून सर्वस्वाचे हरण करू अथवा शिरच्छेद करू अशा धमक्या दिल्या तरी माहेश्वर लिंगपूजेचा कधी त्याग करीत नाही. मुस्लिम शासनात जबरदस्तीने धर्मांतरे झाली. परंतु अशा काळात देखील काही कट्टर लोकांनी आपले व्रत सोडले नाही. इष्टलिंगाच्या सज्जिकेला मशिदीसारखा आकार दिला गेला. परंतु त्याच्या आत इष्टलिंगाने सुखनैव वास्तव्य केले. पूजन थांबले नाही. त्या प्रतिकूल काळात पूर्वसूरींनी इष्टलिंगावरील

निष्ठा सोडली असती तर आज इष्टलिंग पाहायला मिळाले नसते. गुरू राहिला नसता आणि मठमंदिरेही उरली नसती. या धर्माचे अनुयायी बलहीन नव्हते तर शूर होते. प्रसंगी आपले प्राणार्पण करण्याएवढे ते वीर होते. शिवभक्तातील वीर शिर अर्पण करील, परंतु आपली इष्टलिंगपूजा सोडणार नाही. आज मात्र त्याच वीरांच्या वंशात जन्मलेले लोक इष्टलिंगाचा अवमान करतात, ते शरीरावर धारण करीत नाहीत. म्हणून घरातल्या वडीलधाऱ्या माणसावर जन्मलेल्या मुलाला इष्टलिंग धारण करविण्याची जबाबदारी आहे. त्यात कष्ट तरी किती आहेत?

लिंगपूजा हे असे महाव्रत आहे की घरात जन्म होवो अथवा मृत्यू, या व्रताचा त्याग करता येत नाही. जनन, मरण, रज, उच्छिष्ट व जाती या पंचसूतकांपैकी कोणतेही सूतक असेल तर इष्टलिंगपूजन करावे असा आचार्यांचा आदेश आहे. अन्य धर्मियांच्या घरात मृत्यू घडला तर तेरा दिवस सूतक पाळले जाते. या काळात पूजापाठ केला जात नाही. स्त्री रजस्वला झाली की ती पूजा करू शकत नाही. परंतु वीरशैव धर्मात मात्र इष्टलिंगपूजनासाठी सूतकांचा निषेध केला आहे. लिंगदीक्षेत स्त्री-पुरुष समान आहेत. काही धर्मात फक्त पुरुषांवर संस्कार केले जातात, स्त्रियांवर केले जात नाहीत. परंतु आपल्या धर्मात स्त्रीला पुरुषांपेक्षा कनिष्ठ मानलेले नाही तर समान मानले आहे. शिव आणि शक्ती यांची जशी समान योग्यता असते, तशी पुरुष आणि स्त्री यांची असते. स्त्री बाळंत झाल तरी तिने शरीरावर इष्टलिंगधारण करावे आणि रोज त्याची पूजा करावी. इतकेच नव्हे तर स्त्री रजस्वला झाली तरी तिने इष्टलिंगपूजा करावी असे शास्त्र सांगते. या काळात तिने कोणाला स्पर्श करू नये, स्वयंपाक करू नये, या झाल्या व्यावहारिक गोष्टी. तिने स्वयंपाक केला नाही तर दुसरा कोणी करू शकतो. परंतु इष्टलिंगपूजा मात्र इतरांकडून करविली जात नसते, ती स्वतःला करावी लागते. इष्टलिंगपूजा हे जीवनव्रत आहे. ते कोणत्याही कारणासाठी मध्येच सोडता येत नाही. म्हणून वीरशैवसिद्धान्तात पाच प्रकारची सूतके नाकारली आहेत.

गंगा भगवान शिवाच्या जटेतून उत्पन्न झाली. शिवाशी संबंध असल्यामुळे ती पवित्र मानली जाते. नदीला पूर असता तिच्यात स्नान करू नये असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. कारण त्या काळात नदी रजःस्वला असते. परंतु गंगास्नान निरंतर केले जाते. तिच्या बाबतीत हा निषेध नाही. त्याप्रमाणे ज्याच्या शरीरावर इष्टलिंग नाही त्याला सूतके पाळावी लागतात, परंतु ज्याने इष्टलिंगधारण केले आहे त्याला इष्टलिंगपूजेसाठी सूतकांचे बंधन नाही. इष्टलिंगत्याग घडला तर प्राणत्यागच केला पाहिजे असे वीरशैवसिद्धान्त सांगतो. म्हणून शरीरापासून इष्टलिंग कधीही वियुक्त होऊ नये आणि सूतक-काळात देखील त्याची पूजा करायला हवी.

**लिंगपूजामकृत्वा तु ये न भुंजन्ति मानवाः।।**
**तेषां महात्मनां हस्ते मोक्षलक्ष्मीरुपस्थिता।।१०.२३।।**

मुक्तीसाठी अथक प्रयत्न करावे लागतात. मुक्ती ही सहज मिळणारी वस्तू नाही. तिच्या प्राप्तीसाठी जन्मजन्मांतरापासून प्रयत्न करावे लागतात.

**कश्चिद् धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्।**
**व्यावृत्तचक्षुः अमृतत्त्वमिच्छन्।।**

बसवेश्वर म्हणतात, 'लक्षकोब्ब भक्तकोटि गोब्ब शरण.' लाखात एखादा भक्त तर कोट्यवधीत एक शरण

असतो. ऐक्य किती हे तर सांगताही येणार नाही. कित्येक कोट्यवधीत मनुष्यांत एखाद्याला ऐक्यस्थिती प्राप्त होते. मोक्ष एवढा दुर्लभ असला तरी वीरशैवांना तो अत्यंत सुलभ आहे, असे आचार्य म्हणतात. लिंगपूजा केल्याशिवाय मी भोजन करणार नाही असा नित्यनेम करावा. प्रत्येकाचे मन भोजनाविषयी आसक्त असते. सारे काही सोडता येईल पण भोजन सोडता येत नाही. काही जण उपवास करतात. उपवासाच्या दिवशी इतर दिवसापेक्षा ते जास्त खातात. उपवासाचे अन्न वेगळे असते. खाणे मात्र जास्त, कमी नाही. हे रोज मिळणारे नाही म्हणून तो जास्तच खातो. शिवरात्रीला भजनपूजन केले पाहिजे, जागर केला पाहिजे. एवढे भरपेट खाल्ल्यावर जागर कसा होणार? पूजेला बसला म्हणजे आपोआप समाधी लागते. 'निद्रा समाधिस्थिती:।'

उपवास करणे माणसाला कठीण वाटते. उपवासामुळे आपले स्वास्थ्य सुधारते, अधिक खाल्ल्यामुळे बिघडते. आयुर्वेदात तर 'लघनं परमौषधम्' असे म्हटले आहे. पुष्कळ औषधे आपण घेत असतो. पण लहानसहान आजार कमी खाण्याने अथवा अजिबात न खाण्याने दूर होतात. आजची औषधे तर अशी की ती भरपेट खाल्ल्यानंतरच घ्यावी लागतात, उपाशीपोटी चालत नाहीत. आजारी अवस्थेत जर आपण उपाशी राहू शकत नाही तर स्वस्थ अवस्थेत कसे राहू? भोजन करा, पण एक नियम पाळा. लिंगपूजा केल्याशिवाय भोजन करू नका. ज्या दिवशी लिंगपूजा घडणार नाही त्या दिवशी भोजनाला फाटा द्यावा. लिंगपूजा विसरली तर विसरली, भोजन कसे विसरणार? आपण भोजन सोडत नाही. आज पूजा केली नाही, ईश्वराला भोग चढविला नाही तर प्रसाद नाही. प्रसाद नाही तर आपणही काही खायचे नाही. अशा निष्ठेने जर आपण लिंगपूजा कराल तर मोक्षरूपी लक्ष्मी आपल्या हाती येऊन बसेल.

इष्टलिंग मुक्ती देणारे आहे. तुम्ही त्याची पूजा करणार नाही, त्याचे ध्यान करणार नाही, तुम्ही जेवण करीत आहात आणि इष्टलिंग कोपऱ्यात पडले आहे अशा अवस्थेत मुक्ती कशी मिळेल? जो प्रसादभोगी नाही त्याचे मन प्रसन्न राहत नाही. ज्याचे मन प्रसन्न नाही त्याला तत्त्वज्ञानाचा बोध नाही. ज्याला तत्त्वबोध होत नाही त्याला मुक्ती मिळत नाही. लिंगपूजा केल्याशिवाय जो भोजन करीत नाही तो 'महात्मा' होय. ज. रेणुकाचार्य पुढे सांगतात:–

**किमन्यैर्धर्मकलिलै: कीकषार्थप्रदायिभि:।**
**साक्षान्मोक्षप्रद: शंभोर्धर्मो लिंगार्चनात्मक:।।१०.२४।।**

पुष्कळ लोक अनेक प्रकारची व्रते करतात. अन्य सांप्रदायिकांसोबत इतर व्रतवैकल्ये करीत असतात. परंतु क्षुद्र फले देणाऱ्या व्रतांचे प्रयोजन काय? लिंगार्चनात्मक धर्म साक्षात मोक्ष देणारा आहे. धर्म म्हणजे आचरण. लिंगपूजेचे आचरण करणे हाच लिंगार्चनात्मक धर्म होय. म्हणून वीरशैवांबद्दल आगमांत म्हटले आहे, 'एकेन जन्मना मुक्ति: वीरानां तु महेश्वरी।'

पार्वतीला शंकर सांगतात की, जे माझे पूजन दूर राहून करतात त्यांना मुक्ती दूरच आहे. परंतु जे शरीरावर मला धारण करतात त्यांना मुक्ती जवळ आहे. त्यांना एका जन्मातच मुक्ती मिळते. ज्या जन्मात त्यांच्या शरीरावर लिंगधारणा होते त्याच जन्मात त्यांना मुक्ती मिळते. म्हणून लिंगार्चनरूपी धर्म हा सरळ आहे. बसल्याबसल्या त्याचे आचरण करता येते. खाणे, बसणे, उठणे, जाणे, येणे हे सारे आपल्या इष्टदेवाच्या संगतीतच होत असते.

**ॐ सह नाववतु सहनौ भुनक्तु सहवीर्यं करावावहै।**
**तेजस्विनावधितमस्तु मा विद्विषावहै ॐ शांति: शांति: शांति:।।**

या मंत्रात सांगितल्याप्रमाणे भक्त सदैव शिवाच्या सान्निध्यात असतो. भगवान-भक्तांचा वियोग होत नाही. म्हणून वीरशैवांनी स्वत:ला धन्य मानले पाहिजे. या धर्मात जन्म घेणे हे पुण्यच. अशा धर्मात जन्म घेऊनही त्याचे आचरण न करणारा पतित समजला पाहिजे.

आपल्या शरीरासाठी ज्या ज्या वस्तूंची आवश्यकता असते त्या सर्व वस्तू माहेश्वर इष्टलिंगाला अर्पण करतो. कपडे असोत, आभूषणे असोत, अन्न पदार्थ किंवा शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध इ. सर्व भोग्य विषय तो इष्टलिंगाला नियमित अर्पण करतो. आज केले उद्या नाही, असा खेळ त्याच्याजवळ नसतो. वाट दूरची असली तरी पावलागणिक ती सरत जाते. केवळ विचार करीत बसण्यापेक्षा काहीतरी कर्म करायला हवे. लिंगपूजा नित्यनियमाने करायला हवी. ती करता करताच आपली पावलापावलाने प्रगती होते आणि मोक्षापर्यंत आपण पोहचतो. म्हणून ईश्वराचा प्रसाद समजून सर्व वस्तूंचा स्वीकार करायला हवा. वस्त्र परिधान करतो तो शिवाचा प्रसाद, अलंकार धारण करतो तो शिवाचा प्रसाद, अन्न खातो तोही शिवाचा प्रसाद, औषधे घेतो तोही शिवाचाच प्रसाद, अशा वृत्तीने जो वागतो तो महामाहेश्वर होय. एक माहेश्वर, दुसरा वीरमाहेश्वर आणि तिसरा महामाहेश्वर.

माहेश्वर आपल्या इष्टलिंगावर अनन्यनिष्ठा ठेवतो. वीरमाहेश्वर आपले व्रत कधीही सोडत नाही आणि महामाहेश्वर प्रतिदिन नियमपूर्वक पूजन करून निरंतर प्रसाद स्वीकारतो.

**चिन्मये शांकरे लिंगे स्थिरं येषां मन: सदा।**
**विमुक्तितेतरसर्वार्थं ते शिवा नात्र संशय:।।१०.२६।।**

लिंग स्थूल नसून चिन्मय आहे. लिंगात निगूढ चैतन्य वसते. इतकेच नव्हे, तर आपल्या सिद्धान्ताप्रमाणे सर्व सृष्टी चैतन्यमय, चिद्रूप आहे. परंतु तिच्यातील चैतन्य एखाद्याला जाणवते. सगळ्यांना नव्हे. ज्याची दृष्टी स्थूल आहे त्याला वस्तू स्थूल दिसतात. ज्याची दृष्टी सूक्ष्म असते त्याला स्थूलात देखील सूक्ष्म अनुभवता येते. म्हणून लिंग चिन्मय आहे असे मानून ज्याचे मन त्याच्यात स्थिर झालेले असते तो साक्षात् शिव होय. जेवढा काळ तुम्ही एकाग्र चित्ताने शिवपूजन, शिवचिंतन करीत असता तेवढा काळ तुम्ही शिवच असता. तुमचे मन शुद्ध असेल तर तुम्ही स्वर्गात आहात आणि तुमचे मन अशुद्ध असेल तर तुम्ही नरकात आहात असे समजा.

आपल्या भाग्याने मिळालेल्या इष्टलिंगाची पूजा केल्यानंतर ती पूजा मनात निरंतर ताजी राहायला हवी. पूजा संपली की चिंतन संपत नाही. ते सतत चालू असले पाहिजे. पूजेच्या वेळी अन्य विचार मनात येऊ नयेत. शरीर पाण्यात संपूर्ण बुडते त्याप्रमाणे सर्व वृत्ती शिवात्मक झाल्या पाहिजेत. अर्धे शरीर पाण्यात आणि अर्धे बाहेर अशी अवस्था नसावी. निमग्न म्हणजे संपूर्ण बुडालेला, त्याच्या अवतीभवती केवळ शिवच असतो. असे पूजन ज्याच्याकडून घडते तो साक्षात् शिव असतो यात काय संशय?

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
२४ ऑगस्ट १९९१



## लिंगनिष्ठास्थल- २

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जीवाला शिव व्हायचे असेल तर काय करावे? खरे तर जीव हा शिवाचाच एक अंश आहे. अंशरूप जीव आपले परिपूर्ण विकसित जीवन परत प्राप्त करतो तेव्हा तो शिव होतो. जोपर्यंत जीव शिवस्वरूप होत नाही तोपर्यंत त्याला पूर्ण शांती लाभत नाही. ज्या स्थानाचा आपल्याला वियोग झाला त्या स्थानी परत येईपर्यंत आपल्या मनाला शांती मिळत नाही. यात्रेसाठी तुम्ही नागपूर सोडून देश-विदेशात गेलात आणि नागपूरपेक्षाही संपन्न शहरे तुम्ही पाहिली. तरी तुमचे मन तेथे रमणार नाही. तुम्ही शेवटी नागपूरलाच परत याल. याचे कारण काय? तर ज्या ठिकाणी आपला जन्म झाला ते ठिकाण आपल्याला अत्यंत प्रिय असते. लक्ष्मण रामाला म्हणाला, 'लंका ही सुवर्णनगरी आहे. अयोध्येत आपले भाऊ राहतील आणि आपण येथे राज्य करू.' तेव्हा रामाने उत्तर दिले, 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसि।'

आपली आई आणि आपले जन्मस्थान हे स्वर्गापेक्षाही अधिक प्रिय असतात, म्हणून आपल्याला परत गेले पाहिजे. अवतारी पुरुषाची जन्मस्थानाविषयी ही भावना तर सामान्य माणसाची कशी असेल? म्हणून जेथे आपला जन्म होतो तेथे परण्याची स्वभावत: माणसाची भावना असते. आपला पहिला जन्म कोठे झाला? याविषयी विचार केल्यावर काय जाणवते? चिद्रूप परमात्म्यापासून आपला वियोग झाला असून त्याचाच अंश म्हणून आपण अस्तित्वात आहोत. जोपर्यंत परमात्म्यात आपण विलीन होत नाही तोपर्यंत पूर्णसुखाचा अनुभव आपल्याला कधीही येणे शक्य नाही. समुद्राच्या पाण्याची सूर्याच्या उष्णतेने वाफ होते. ते आधी जमिनीवर होते. आता आकाशात उंचावर गेले. मेघरूपाने. तरी त्याला शांती नाही. इकडे-तिकडे सर्वत्र मेघरूपाने फिरत राहते. नंतर पाऊस होऊन खाली कोसळते. त्याला बांध घातला तरी ते बांधावरून वाहू लागते. नदीनाल्याची धाव कोठे आहे? कोठे जाऊन त्यांची गती रुद्ध होणार आहे? 'आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम्।' आकाशातून पडलेले पाणी सागराकडेच सतत धावत असते आणि सागराला मिळाल्यावर त्याची गती समाप्त होते.

**यथा नद्य: स्यन्दमाना नामरूपे विहाय समुद्रे अस्तं गच्छन्ति।**

आकाशातून पडलेल्या पाण्याला कधी गंगा म्हटले जाते, कधी यमुना म्हटले जाते, तर कुठे त्याला दुसरे नाव मिळते. परंतु समुद्रात गेल्यावर त्यांना वेगळे नामरूप राहत नाही. नामरूप समर्पित करून गंगा-यमुनादी सर्व नद्या सागररूप होऊन जातात. नदीने समुद्ररूप धारण केले की तिची गती संपते. तशी जीवात्म्याची स्थिती असते. आपण कोठेही बसलो तरी आपले मन अशांत असते. घरात बसून बसून आपण उबगतो. मग मनोरंजनासाठी काही लोक नाटक-सिनेमा पाहतात तर काहीजण तुमच्यासारखे सत्संगात येऊन बसतात. तास-दोन तास बसून थोडा सुखाचा अनुभव घेतात. पुन्हा घरी गेल्यावर अशांती आपला ताबा घेते.

याचे कारण काय? याचे काण एकच, आपले मूलस्थान न मिळाल्यामुळे आपण गतिमान, अस्थिर, अशांत आहोत. शिवस्वरूप होईपर्यंत जीवाला शांती मिळणे शक्य नाही. म्हणून ते निजरूप, शिवस्वरूप प्राप्त करून घेण्यासाठी आचार्यांनी आपल्याला शिवपूजा सांगितली आहे. जे इष्टलिंग आपल्याला मिळाले ते स्थूल नसून

'चिन्मये शांकरे लिंगे'– चिन्मय आहे असे मानले पाहिजे. ज्याचे मन लिंगाच्या चिद्रूपात स्थिर होऊन ज्याला अन्य विषयांचा विसर पडतो तो प्रत्यक्ष शिव असतो यात संशय नाही. आगमात म्हटले आहे– 'शिवो भूत्वा शिवं यजेत्।'

शिवाची पूजा स्वत: होऊन करावी, रुद्र होऊनच रुद्राचे अर्चन करावे. वीरशैव साधक जेव्हा इष्टलिंगपूजा करतो त्यावेळी त्याची देहाकृती लिंगरूपच असते. पंचसूत्राने निर्मिलेल्या लिंगाचे पीठ, बाण व जलहरी असे तीन भाग असतात. इष्टलिंगपूजक डाव्या हाती इष्टलिंग घेऊन पद्मासन घालून जेव्हा बसतो तेव्हा त्याचा देह पीठिकेसारखा, मस्तक बाणासारखे आणि हात जलहरीसारखा दिसतो. याप्रमाणे लिंगरूप होऊनच लिंगपूजा केली जाते.

लिंगपूजा करीत असताना आपले मन जर लिंगरूप होत नसेल तर पूजा निष्फल होते. आपले मन जेथे असते तेथेच आपले खरे वास्तव्य असते. म्हणून शास्त्रे सांगतात– 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो:।'

मनच माणसाला बांधून टाकते आणि मनच माणसाला मुक्त करते. मन आणि शरीर यांच्यात ताळमेळ नसतो. शरीर एके ठिकाणी तर मन दुसऱ्या ठिकाणी. त्यांच्यात ताळमेळ बसविणे, सुसंवाद प्रस्थापित करणे हीच एक साधना आहे. मन आणि शरीर यांच्या वेगात अंतर आहे. मन हे अत्यंत वेगवान आहे. प्रकाशाचा वेग अत्यंत असतो. एका सेकंदात प्रकाशकिरण एक लक्ष ऐंशी हजार मैलांचा प्रवास करतो. सूर्य उगवल्यानंतर त्याचा प्रकाश पृथ्वीपर्यंत येण्यासाठी आठ मिनिटे लागतात. अत्यंत वेगवान प्रकाशकिरणाला पृथ्वीपर्यंत पोहचायला एवढा वेळ लागतो. तुमचे मन सूर्यमंडळापर्यंत पोहचायला किती वेळ लागतो? हे तुम्हाला माहीत नाही. कारण तुम्ही चालतच नाही. मोटरकारचा वेग तुम्हाला सांगता येईल. घराबाहेर पडलात की रिक्षात बसता, बसमध्ये बसता, गाडीत बसता. ज्याला चालण्याचा सरावच नसतो त्याला आपले शरीर एका तासात किती चालते हे माहीत नसते.

आपले शरीर एका तासात जास्तीत जास्त किती दूर जाईल? पाच किंवा दहा मैल. एका तासात दहा मैल जाणाऱ्या शरीराचा वेग आणि एका सेकंदात कोट्यवधी मैल जाणाऱ्या मनाचा वेग यांत केवढे अंतर आहे! ईश्वराने गंमत केली. अत्यंत मंदगती शरीरात अत्यंत वेगवान मन ठेवले. म्हणून शरीर आणि मन जर एके ठिकाणी राहतील तरच आपली साधना सफल होईल, अन्यथा नाही. यासाठीच साधकाला शिवयोगसाधना करावी लागते.

मनाची गती थांबविणे हाच योग होय. शरीर आणि मन यांना एकाच ठिकाणी ठेवण्यासाठी आपल्याला दोन कामे करावी लागतील. मन जेवढ्या वेगाने धावेल तेवढ्या वेगाने शरीर धावले पाहिजे. किंवा शरीराचा जेवढा वेग असेल तेवढाच मनाचा वेग ठेवला पाहिजे. यात सोपे काय आहे? दोन्ही कठीणच आहे. मनाएवढे शरीर धावणार नाही. बसल्या बसल्या तुम्ही मनाने घरी जाऊन येता. परंतु शरीराने घरी जायला कितीतरी वेळ लागतो. शरीराला एवढा वेग देणे अवघड आहे. म्हणून मनाची गती कमी करणे आवश्यक होऊन बसते. जे कार्य शरीराकडून घडत असते तेच कार्य जर मनाकडून घडू लागले तरच मनाची गती अवरुद्ध होऊ शकेल. मन लावून कार्य करणे म्हणतात ते हेच.

आपल्या मनात अनेक इच्छा-आकांक्षा असतात. एखादी वस्तू मिळाली तरी मन तृप्त होत नाही. मनाला वानराची उपमा दिली जाते. अखंडेश्वर षण्मुखस्वामी या कन्नड संताचे एक सुरेख वचन आहे. त्यांनी त्यात मनाचे चित्रण केले आहे:-

मनवेंब मर्कटवु तनुव्यंब वृक्षवनेरि
इंद्रियंगळेंब शाखे शाखेगे हारि
विषयंगळेंब फलंगळं अनुभविसि
भवदत्त मुखावागि हरियुतिदे नोडा
ई मनवेंब मर्कटव निम्म नेनहेंब
पाशदल्लि कट्टि अुळिहि कोळय्या
अखंडेश्वरा।

वृक्षाला अनेक फांद्या असतात. त्यावर असंख्य फळे लहडलेली असतात. एखादे माकड ती फळे खाऊ लागते. एक फळ खाऊन त्याचे समाधान होत नाही. दुसऱ्या फांदीवर उडी मारून तिथले फळ खाते. सगळे खाणे अर्धवट. कोणतेच फळ पूर्ण खात नाही. ते सतत भ्रमत असते. त्या माकडासारखीच आपल्या मनाची स्थिती असते. पंचज्ञानेंद्रिये या शरीरवृक्षाच्या पाच शाखा आहेत. त्यावर लहडलेले शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे विषय म्हणजे फळ. मन ही फळे खात असते. मनाला असेच भटकू दिले तर ते आपल्याला भवचक्रात फिरवत राहील. म्हणून हे ईश्वरा, तुझ्या ध्यानाच्या लगामाने हे मन काबूत राहावे, अशी कृपा कर.

शिवचिंतन करताना आपल्या मनात विचार येतो की, यामुळे आपल्याला काय मिळणार आहे? पूजा, चिंतन करून ईश्वर प्रसन्न झाला तर त्याला काय मागावे, असा प्रश्न पडतो. ईश्वर अजून आला नाही. त्यापूर्वीच त्याला काय मागायचे याचा विचार मन करते. सांसारिक फळात मनाला जेवढी रुची वाटते तेवढी ईश्वराबद्दल वाटत नाही. ईश्वरासाठी ईश्वराची पूजा करणारा विरळाच. सांसारिक वस्तू मिळवण्यासाठी ईश्वरपूजन करणारेच अधिक. म्हणून येथे म्हटले आहे- 'विमुक्तेतरसर्वार्थम्।' प्रपंचातील सर्व पदार्थाविषयीची आसक्ती सोडून ज्याचे मन शिवचिंतनात मग्न होते तो शिवच आहे. अशा पुरुषाला जगात देखील शिवासारखा मान मिळतो. आपण गुरूंचा सन्मान करतो याचे कारणदेखील हेच आहे.

लिंगे यस्य मनो लीनं लिंगस्तुतिपरा च वाक्।
लिंगार्चनपरौ हस्तौ स रुद्रो नात्र संशयः।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.२७)

शरीर, वाणी आणि मन ही ईश्वराने आपल्याला दिलेली साधने आहेत. ही साधनेच आपल्याला ईश्वरापर्यंत पोचवतात. या त्रिकरणांनी, तीन साधनांनी केल्या जाणाऱ्या पूजाविधीविषयी सांगतात. ज्याचे मन लिंगात लीन झाले आहे, ज्याची वाणी लिंगाची स्तुती करीत आहे आणि ज्याचे हात लिंगपूजा करीत आहेत तो प्रत्यक्ष रुद्रच होय. अशा तिन्ही करणांनी केलेली पूजा परिपूर्ण पूजा असते. हात पूजा करीत आहेत, वाणी स्तुती करीत आहे आणि मन मात्र भलतीकडेच गेले तर ती पूजा परिपूर्ण असणार नाही. ईश्वराने शरीर, वाणी व मन ही त्रिकरणे, तीन साधने त्याच्या पूजा-स्तुति-चिंतनासाठी दिलेली आहेत. त्यांचा सदुपयोग केला नाही तर ती 'करणे' व्यर्थ होत. या करणांचा दुरुपयोग केला तर पुढील जन्मात त्याची अनिष्ट फळे मिळणारच. जो वाणीने अर्वाच्य शब्द उच्चारत नाही, मनाने कोणाचे अकल्याण चिंतत नाही, शरीराने कोणतेही दुष्कर्म करीत नाही त्याची त्रिकरणे शुद्ध होतात. त्याच्यावरच भगवत्कृपा होते. देवालयात जाताना आपण शुचिर्भूत होऊन जातो. केवळ शरीर धुतले म्हणजे आपण शुद्ध होत नाही. त्याबरोबरच मनदेखील शुद्ध पाहिजे. म्हणून इष्टलिंगाची पूजा शुद्ध त्रिकरणांनी करावी. त्यामुळे जीव शुद्ध होऊन शिवस्वरूप होतो.

ज्याला शिवस्वरूपाचा ध्यास लागला आहे अशा माहेश्वराला स्वर्गप्राप्ती देणाऱ्या क्षुद्र कर्मांचे प्रयोजन नसते. स्वर्ग तरी काय आहे? एक भोगभूमी. पूण्यसंचय केलेला जीव स्वर्गात जातो आणि पुण्यसंचय सरल्यावर पुन्हा मृत्युलोकात येतो. लौकिक व्यवहार असाच आहे. खूप पैसे घेऊन तुम्ही मोठ्या शहरात जाऊन मोठ्या हॉटेलात राहिलात, खूप चैन केली. पैसे संपले की ते बाहेरचे दार दाखवतात. एक सेकंददेखील तेथे राहू देत नाहीत. घरी येण्यापुरते पैसे जवळ असले तर बरे. नाहीतर घरी येण्याची सोय नाही अशी अवस्था होते. काही काळापुरते आपण भोगलेले राजेपण. नंतर रंक होऊनच घरी परतायचे. तसे पुण्य शिल्लक आहे तोपर्यंत स्वर्गात जागा आहे, पुण्य सरले की परत घरी– मृत्युलोकात. जिथे जाणे आणि परत येणे आहे तेथे जाऊ नका, असे आपला सिद्धान्त सांगतो. 'यद्‌गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।'

जेथे गेल्यावर पुन्हा परतण्याची शक्यताच नाही अशा ठिकाणी जावे. अशाच ठिकाणी जाऊन बसा की जेथून तुम्हाला कोणी उठवणार नाही.

**स्थानभ्रष्टा न शोभन्ते दन्ता केशा नखा नराः।**
**इति विज्ञाय मतिमान् स्वस्थानं न परित्यज्येत्।।**

एक सुभाषितकार म्हणतो, एखादा मनुष्य स्थानभ्रष्ट झाला आणि दुसऱ्या ठिकाणी बसला तर ते शोभादायक नाही. दात मुखात आहेत तोपर्यंत त्यांना प्रतिष्ठा आहे. पेस्ट लावून चांगले घासू शकतो. दात पडला तर आपण काय करतो? आपलाच दात आहे, याने खूप काळ खाण्यासाठी मदत केली याला कसे फेकायचे? असे म्हणून आपण तो खिशात ठेवून फिरत नाही. त्याला बाहेर फेकावेच लागते. स्थानभ्रष्ट झाला की मर्यादा संपली. केस डोक्यावर आहेत तेव्हा त्यांची काळजी. त्यांनी स्थान सोडले की त्यांचे महत्त्व संपले. आपल्या शरीरात रक्त, मांस आहे. ते शरीरात आहे तोपर्यंत आपण त्यांच्यावर प्रेम करतो. रक्त बाहेर वाहिले, त्याने शरीर सोडले की आपण त्याला स्पर्शदेखील करीत नाही. आत्म्याशी संबंध संपला की वस्तू अपवित्र वाटू लागते. त्याचप्रमाणे दात, केस, नखे यांनी आपापले स्थान सोडले की त्यांना फेकूनच द्यावे लागते. ही झाली सामान्य वस्तूची गोष्ट. तसेच माणसाचे आहे. त्याने स्थान सोडले की त्याची प्रतिष्ठा संपली.

जीवाचे मूलस्थान कोणते? तर ते शिवच आहे. त्याचा संबंध सुटल्यामुळेच जीवाला संसारात भ्रमण करावे लागते. 'पुनरपि जननं पुनरपि मरणम्' या चक्रात तो हिंडत राहतो. म्हणून आपल्या मूलस्थानाशी संबद्ध होण्यासाठी त्याने काही कर्मे केली पाहिजेत. परंतु यज्ञयागादी कर्मांनी स्वर्गाची प्राप्ती होत असली तरी ईश्वराची मात्र होत नाही. म्हणून निश्चित स्थानापर्यंत पोहोचविणारे कर्म लिंगार्चन होय. संसारात मिळणारा आनंद अशाश्वत असतो. शिवानंद मात्र शाश्वत असतो. तो आनंद ज्याला मिळतो त्याला कोणतीच अभिलाषा राहत नाही. गाढनिद्रेत आपल्या इच्छा संपलेल्या असतात, तशी एकदा शिवानंदाची प्राप्ती झाली की मनुष्य इच्छारहित होतो. कारण त्या अवस्थेत माणूस आपल्या मूळस्वरूपात किंचित स्थिर झालेला असतो. त्याला तेथून परतायची इच्छा नसते. परंतु आपले कर्मबंधन तेथून खेचून आणते.

घाण्याच्या बैलाच्या डोळ्यावर पट्टी बांधतात. बैलाला वाटते की आपण खूप दूर चाललो. पण तो तिथल्या तिथेच फिरत असतो. गवताचा हिरवा चारा त्याला खायला मिळत नाही. रोज सुकलेला कडबा खातो. बंधन तोडून बैल पळून गेला तर त्याला झुळझुळ वाहणारे पाणी, हिरवा चारा दिसतो. तो पोटभर खातो व निवांत झाडाच्या सावलीत झोपतो. त्याला कुठलीच चिंता राहत नाही, परंतु बैलाच्या मालकाला मात्र चिंता असते.

तो बैलाचा शोध घेतो, त्याला पकडतो आणि परत घाण्याला जुंपतो. बैलाला परत यायचे नसते, परंतु यावे लागते. जीवात्म्याची अवस्था तशीच आहे. संसार-घाण्याला तो सदैव जुंपलेला असतो. सुषुप्ति-अवस्थेत आनंदाचा अनुभव घेतो. वाटते की निद्रासुख संपूच नये. परंतु त्याचे कर्म त्याला परत खेचून आणते. असे हे कर्मबंधन आहे. सत्कर्म करण्याची इच्छा असून देखील कधी आपल्याला ते करता येत नाही आणि इच्छा असूनही दुष्कर्मापासून आपली सुटका होत नाही. याचे कारण कोणते? दुर्योधन महाभारतात म्हणतो:-

**जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः।**
**केनापि देवेन हृदिस्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि।।**

धर्म काय आहे हे मी जाणतो, परंतु ती माझी प्रवृत्ती नाही. अधर्म काय आहे हे देखील मी जाणतो, परंतु त्यापासून मला निवृत्त होता येत नाही. माझ्या हृदयातील शक्ती जे सांगते तसा मी वागतो.

ही शक्ती कोणती? तर आपले कर्म. आपल्या कर्माची फळे दोन प्रकारची असतात. त्यापासून वासना उत्पन्न होते व दुसरे त्याचे फळ मिळते. दुसऱ्याच्या घरी आपण जेवायला गेलो तर भरपेट उत्तम भोजन करतो. भोजन केल्यावर तृप्ती मिळते. त्याचबरोबर मिष्टान्न खाल्ले त्याविषयी वासनादेखील उत्पन्न होते. कर्मे शुभ व अशुभ असतात. शुभ कर्मांची फळे शुभ असतात व त्यापासून शुभ वासना उत्पन्न होते. त्या वासनेमुळे पुन्हा आपल्या हातून शुभ कर्मे घडतात. त्याचप्रमाणे अशुभ कर्मांची फळे अशुभ मिळतात व त्यापासून अशुभ वासना उत्पन्न होतात. दुर्योधनासारख्या जाणत्या माणसाकडून अशुभ कर्मे घडली याचे हेच कारण आहे. तसेच जीवात्म्याचे कर्म त्याला सुषुप्ति-अवस्थेतून परत आणते. स्वर्गसुख असेच आहे. तेथून शेवटी परत यावेच लागते. म्हणून आचार्य म्हणतात की, हे जाणे-येणे चांगले नाही. कितीवेळा आपण जन्म घेतला आणि कितीवेळा आपण मृत्यू पावलो याची गणतीच करता येणार नाही. निजगुण शिवयोगी म्हणतात:-

**धरेयनेल्लवनु सण्णिसि धूळिमाडलु**
**यनितु परमाणुगळो अनितु देहवनु**
**धरिसुत ओंदोंदु जीव बसुरोळु बंदु**
**मरळि नीनत्त तिरूगदंते रचिसिदे.**

पृथ्वीचा भुगा केल्यावर तिचे जेवढे कण होतील तेवढे मोजता आले तर कदाचित् आपले किती जन्म झाले याचे गणित करता येईल. अर्थात् गणना करणे कठीण आहे. एवढे जन्म घेतले मग त्याचे स्मरण का होत नाही? असे वाटते की आपण हा पहिलाच जन्म घेतला. याचे कारण एकच. जन्माच्या वेळी आपले डोळे बंद असतात आणि मृत्यूच्यावेळीही आपण डोळे मिटतो. येताना मागचे सारे विसरून येतो आणि जाताना इथले सारे विसरून जातो. डोळे बंद होतात याचा अर्थ जन्म आणि मृत्यू अज्ञानात होतात. संत, महात्मे, क्रांतदर्शी यांना मात्र पूर्वजन्माचे स्मरण होऊ शकते. चौऱ्यांशी लक्ष योनी फिरून जीव मनुष्यजन्माला आला असे शास्त्रे सांगतात. एवढे जन्म घेऊन देखील जर या चक्राचा उबग आपल्याला येत नसेल तर आपण पुन्हा या चक्रातच भ्रमत राहणे योग्य. जन्म-मरण या सुखद घटना नाहीत, आचार्य म्हणतात:-

**जन्मदुःखं जरादुःखं जायादुःखं पुनःपुनः।**
**संसारसागरं दुःखं तस्माज्जाग्रत जाग्रत।।**

कितीही वेळ जन्म घेऊ आणि मरू, त्याने काय होते? असे कोणी म्हणेल. पण या घटना सुखद नाहीत, दु:खद आहेत. जन्म हेच पहिले दु:ख आणि मरण हे अंतिम दु:ख. या दोन दु:खांमध्ये अनंत दु:खे आहेत. संसार हाच मुळी दु:खाचा सागर आहे. या जन्म-मृत्यूपासून मुक्त व्हायचे असेल तर जो शिव जन्म-मृत्यूरहित आहे त्याचीच पूजा, त्याचेच चिंतन केले पाहिजे. जन्म-मृत्यू देणारी आणि पुन्हा मृत्युलोकात आणणारी कर्मे यांपासून दूर राहायला हवे.

**लिंगनिष्ठापरं शान्तं भूतिरुद्राक्षसंयुतम्।**
**प्रशंसन्ति सदाकालं ब्रह्माद्या देवता मुदा।।१०.२९।।**

विभूती व रुद्राक्ष शिवाला अत्यंत प्रिय आहेत. तो केवळ त्रिपुंड्रच धारण करीत नाही तर भस्मस्नान, भस्मोद्धूलन करतो. भस्मावर भगवान शिवाचे अत्यंत प्रेम असल्यामुळे जो भस्मधारी आहे अशा शिवभक्तावर देखील त्यांचे प्रेम असते. ईश्वराला प्रिय असलेली आभूषणे अंतकाळी आपल्या शरीरावर असली तर ती आपल्याला सद्गती देतात. याविषयी अनेक कथा पुराणात सांगितल्या आहेत.

एक व्याध आपल्या कुत्र्यासह अरण्यात जातो. तेथे हिंडून हिंडून थकतो व एका झाडाखाली बसतो. तेथेच त्याचे प्राणोत्क्रमण होते. कुत्रा येतो आणि मालकाला उठविण्यासाठी आपले पाय त्याच्या कपाळावर मारतो. कुत्र्याच्या पायाला चिताभस्म लागलेले असते. ते व्याधाच्या कपाळावर लागते आणि त्याचा उद्धार होतो, अशी एक कथा शिवपुराणात आहे. ही कथा केवळ भावना दृढ व्हावी यासाठी सांगितली गेली नाही. त्यात काही वास्तवदेखील आहे. वीरशैवात मृत्यू पावला की त्या मनुष्याला भस्माच्या पिशवीत ठेवले जाते. प्राण गेल्यानंतर देखील शरीराच्या संपर्कात भस्म-रुद्राक्ष असले तरी त्या जीवात्म्याला सद्गती मिळते. अन्य समाजात प्रेतदहन करून त्याच्या अस्थी गंगेत विसर्जित करतात. जन्मभर गंगास्नान घडले नाही तरी शेवटी अस्थींना गंगेचा स्पर्श झाला तरी जीवात्म्याला सद्गती मिळते अशी श्रद्धा आहे.

मृत्यूनंतर फळ मिळते ही गोष्ट वेगळी. परंतु जिवंत असताना तुम्ही भस्म धारण केले, रुद्राक्षमाळ धारण केली, शिवाचे चिंतन करीत आहात तर तुमची स्तुती ब्रह्मादी देवदेखील करतात. शिवचिंतनात मग्न असलेला शिवभक्त साक्षात् शिवस्वरूप असल्यामुळे त्याची स्तुती ब्रह्मादी देव करतात. एवढा तो पवित्र असतो. इष्टलिंगाधारण, त्याचे पूजन, चिंतन सदैव घडावे. शिवदेखील म्हणतात, 'मद्भक्त:ममाधिक:।' माझा भक्त माझ्यापेक्षाही श्रेष्ठ आहे. सर्व प्रपंचाला सामावून घेणारा व्यापक शिव जो आपल्या हृदयात साठवून ठेवतो तो लहान कसा असेल? तो त्यापेक्षाही व्यापक असतो. म्हणून ईश्वराविषयी जेवढी श्रद्धा असते तेवढीच ईश्वरभक्ताविषयी बाळगली पाहिजे. कर्नाटकात जेवढे शिवशरण होऊन गेले ते असेच पूज्य आहेत. बसवेश्वर, अक्कमहादेवी, अल्लमप्रभू आदी कर्नाटकातील शिवशरण आणि मन्मथस्वामी, शिवदास इत्यादी महाराष्ट्रातील वीरशैव संत हे पूज्य आहेत. त्यांच्या छायाचित्रांची पूजा केली जाते, त्यांच्या ग्रंथांची पारायणे केली जातात, हे सारे कशामुळे? तर त्यांनी शिवचिंतन करून शिवस्वरूप प्राप्त करून घेतले होते म्हणून. मानवच नव्हे तर देवदेखील त्यांची पूजा करतात. माहेश्वर असाच पूजनीय असतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
२६ ऑगस्ट १९९१

आशीर्वचन नववे

## पूर्वाश्रयनिरसनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

माहेश्वरस्थलातील माहेश्वरप्रशंसास्थल आणि लिंगनिष्ठास्थल या दोन उपस्थलांवरील आशीर्वचने आपण ऐकली. आता तिसरे स्थल आहे पूर्वाश्रयनिरसनस्थल.

साधनेचा आरंभ केल्यानंतर साधकाच्या पूर्वीच्या आचरणात हळूहळू सुधारणा होत असते. जसेजसे त्याच्या आचरणात परिवर्तन होत जाते तसतशी त्याची प्रगती होत असते. पूर्वाचरणाचा त्याग केल्याशिवाय प्रगतीच शक्य नाही. या इथे वीरशैव भवनात यायचे असेल तर घर सोडावे लागते. एक पाय घरात, एक पाय बाहेर अशा स्थितीत येथे पोहोचता येणार नाही. पुढे जायचे असेल तर घर सोडावेच लागेल. जेथे जन्म झाला, जेथे लहानाचे मोठे झालो, त्या स्थानाच्या मोहात आपण गुंतत गेलो तर गती अवरुद्ध झाली असेच म्हणावे लागते. गतिमान होण्यासाठी पूर्वीचा आश्रय सोडावा लागतो. विद्यार्थ्याला पहिला वर्ग सोडून दुसऱ्या वर्गात जायलाच हवे. अन्यथा जीवनभर तो पहिल्या वर्गाचाच अभ्यास करीत राहील. नुसते अक्षर गिरवत बसणे हे पूर्णज्ञान नव्हे. त्यातून शब्दज्ञान आणि शब्दज्ञानातून वाङ्मयाचा अभ्यास अशी चढती श्रेणी असते. वाङ्मयाचा अभ्यास करता करता वाङ्मयनिर्मितीची शक्ती प्राप्त होते. हे सगळे नाकारून केवळ अक्षरे गिरवत बसणे हाच खरा अभ्यास आहे, असे जो समजतो त्याची प्रगती कदापि होणे शक्य नाही. या पूर्वाश्रयनिरसनस्थलात आचार्य याविषयीच सांगत आहेत:-

**लिंगैकनिष्ठहृदयः सदा माहेश्वरो जनः।**
**पूर्वाश्रयगतान् धर्मांस्त्यज्येत् स्वाचाररोधकान्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.३०)

एका स्थलातून दुसऱ्या स्थलात प्रगती होत असताना आपल्या आचरणात परिवर्तन होत जाते. ज्याच्या हृदयात लिंगनिष्ठा रुजली आहे अशा माहेश्वराने आपल्या सिद्धान्ताशी प्रतिकूल असलेला पूर्वीचा आचार सोडून दिला पाहिजे. माहेश्वरासाठी आराध्य केवळ लिंग आहे. वीरशैवांसाठी तीन आराध्ये आहेत. गुरू, लिंग आणि जंगम. बाह्यतः ही तीन दिसतात, परंतु एकच असतात. 'एकमूर्तिस्त्रयो भागा गुरुर्लिंगं तु जंगमाः।'

बेलाला पाने तीन असतात, परंतु ते एकच असते तसे गुरू, लिंग व जंगम यांची समरसभावाने पूजा घडली पाहिजे. आपल्या सिद्धान्तात समरसपूजा आणि उपचारपूजा असे पूजेचे दोन प्रकार सांगितले आहेत. आपण शिवच आहोत या भावनेने केलेली पूजा ही समरसपूजा आणि बाह्य उपचारांनी भेदवृत्तीने केलेली ईश्वरपूजा ही उपचारपूजा होय. वीरशैवात लिंगनिष्ठेला अपार महत्त्व आहे. तीर्थयात्रेला गेल्यानंतर ज्योतिर्लिंगाला नमस्कार करताना देखील आपले इष्टलिंग हाती धरून नमस्कार करायला हवा. पतिव्रता स्त्रीने आपल्या मंगळसूत्राला स्पर्श करूनच संतांना नमस्कार करावा, अशी परंपरा आहे. कोणालाही नमस्कार करताना ती जणू आपल्या पतीलाच नमस्कार करीत असते. हाच सतिपतिभाव होय. लिंग हा पती आणि लिंगपूजक हा सती या न्यायानेच शिवभक्ताचा सर्व व्यवहार घडायला हवा. अन्यथा त्याची भक्ती व्यभिचारी भक्ती ठरेल. इष्टलिंगालाच आपण

नमस्कार करीत आहोत या भावनेने अन्य देवतेला नमस्कार करावा. हीच लिंगैक्यनिष्ठा होय. या लिगंनिष्ठेला विरोधी असलेल्या आचरणाचा त्याग करायला हवा.

**स्वजातिकुलजान् धर्मान् लिंगनिष्ठाविरोधिन:।**
**त्यजन् माहेश्वरो ज्ञेय: पूर्वाश्रयनिरासक:।।१०.३१।।**

दीक्षाविधी होण्याआधी आपले आचारविचार वेगळे असण्याची शक्यता आहे. गुरूच्या उपदेशाप्रमाणे त्या आचारांचा त्याग करावा. लिंगदीक्षेपूर्वी जात, धर्म, वर्ण, कुल कोणतेही असले तरी लिंगदीक्षेनंतर पूर्वायुष्यातील आचरण सोडून लिंगाचार आचरिला पाहिजे. बसवेश्वर हे पूर्वाश्रमी ब्राह्मणकुलातील होते. परंतु समाजक्रांतीसाठी आपला धर्म पुरेसा नाही असे त्यांना वाटले. ज्यात स्त्री-पुरुष समान आहेत, प्रत्येकांना ईश्वरपूजेचा अधिकार आहे असा वीरशैवधर्म त्यांना समग्र क्रांतीसाठी अनुकूल वाटला आणि जातवेदमुनीकडून त्यांनी लिंगदीक्षा घेतली. त्यावेळी पूर्वीच्या आचरणाचा त्यांनी त्याग केला. भिन्न जातीच्या, धर्माच्या मनुष्याने लिंगनिष्ठा स्वीकारली तर त्याच्यापुढे धर्मसंकट उभे राहते. त्याच्या समाजातले लोक त्याला दोष देतात वा त्याचा उपहास करतात. हे कशाला, एखाद्या वीरशैव घरात कोणी लिंगधारण करीत नाही, भस्म लावत नाही, धर्माकडे दूषित नजरेने पाहिले जाते अशा घरात जर एखाद्या मुलाने लिंगधारण, भस्मधारण इ. गोष्टींचा अंगीकार केला तर घरातील माणसेच त्याची हेटाळणी करतात. अशा विरोधातूनही जो आपला लिंगाचार निष्ठेने पाळतो तो माहेश्वर होय.

प्रल्हादाची कथा हेच सत्य सांगते. त्याचा जन्म दैत्यकुळात झाला होता. परंतु त्याला भगवंताचे वेड होते. त्याने सगळा छळ निमूटपणे सहन केला, परंतु आपली निष्ठा कधी सोडली नाही. तो भगवंताला शरण गेला, आपल्या पित्यासमोर कधीच नमला नाही. परिवार सोडण्याची त्याची सिद्धता होती, परंतु निष्ठा सोडण्याची नव्हती. त्याचे प्रेम परिवारावर नव्हतेच, ते ईश्वरावर होते. मीराबाईला आपले घर का सोडावे लागले? तर तिच्या निष्ठेविरुद्ध आचार तिच्या घरी होत होता. अनेक संतांच्या जीवनात असे घडलेले आहे. वास्तविक आपला पती आपला देवच असतो.

**त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव।**
**त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव त्वमेव सर्वं मम देव देव।।**

हाच भाव बसवेश्वरांनी एका कन्नड वचनात सुंदर रीतीने व्यक्त केला आहे- 'तंदे नीनु ताई नीनु बंधु नीनु बळगनीनु.' बसवेश्वरांनी लिंगनिष्ठेसाठी साऱ्याचा त्याग केला. त्यामुळे त्यांना काही हानी पोचली नाही. सांसारिक वस्तूंचा त्याग केल्याने मनुष्याची हानी होत नाही तर ईश्वराचा त्याग घडल्यामुळे जीवाची हानी झाली आहे. 'विपद्विस्मरणं विष्णो: संपन्नारायणस्मृति:।' धन, घर ही लौकिक संपत्ती ही एका दृष्टीने विपत्तीच आहे. एका सुभाषितकाराने म्हटले आहे:-

**अर्थानामर्जने दु:खमर्जितानां च रक्षणे।**
**आये दु:खं व्यये दु:खं धिगर्या: कष्टसंश्रया:।।**

मोठ्या कष्टाने द्रव्य मिळते. त्याचे रक्षण कष्टप्रद आहे. धन आले तरी दु:ख होते आणि गेले तरी दु:ख होते. एका मनुष्याने खूप धन मिळविले. धनामुळे आपण काहीही विकत घेऊ शकतो असा त्याला भ्रम होता.

आयुष्यातील साठ-सत्तर वर्षे त्याने धनसंग्रहात गमावली. त्याने आपल्या मनाशी विचार केला की एवढी संपत्ती मिळवून देखील आपत्याला सुख लाभले नाही. आता काय करावे? त्याने एक निर्णय घेतला. सर्व धन एका गाठेड्यात बांधून तो एका महात्म्याजवळ गेला आणि आपली व्यथा सांगितली.

महात्म्याने त्याचे गाठोडे घेतले आणि अचानक पलायन केले. आयुष्यभराची कमाई चाललेली पाहून तो मनुष्य जिवाच्या आकांताने महात्म्याच्या मागे धावत सुटला. महात्मा पुढे आणि तो मागे. गावाला दोन-तीन फेरे घालून महात्मा पहिल्या जागी आला आणि त्याने गाठोडे देऊन टाकले. विचारले, ''आता कसे वाटते?''

''अत्यंत समाधान वाटत आहे.'' गाठोडे कुरवाळत मनुष्याने उत्तर दिले.

महात्मा म्हणाला, ''वेड्या, समाधान तुझ्या गाठोड्यात नाही. तेथे असते तर तू इथे कशाला आला असतास? गाठोडे तर आधी तुझ्याजवळच होते. केवळ काही काळ वियोग झाला म्हणून तुझ्या मनाची घालमेल झाली आणि गाठोडे परत मिळाले म्हणून तुला अतीव समाधान वाटले. समाधान गाठोड्यात नाही, तुझ्या मनात आहे.''

लौकिक संपत्तीला चोराचे भय आहे. संपत्ती अशी असावी की जी एकदा मिळाली की ती कोणी चोरून नेऊ नये. धर्म ही अशी संपत्ती आहे. ज्यामुळे इहलोकात आणि परलोकात सुख मिळते तो धर्म होय. धर्माचे दहा प्रकार 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त सांगितले आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप व ध्यान. या सर्वांत ईश्वरनामाचे स्मरण हा सर्वोत्तम मार्ग आहे. त्यासाठी काही करावे लागत नाही. म्हणून नामस्मरण ही अक्षय संपत्ती आहे. जो भगवन्नामाचे स्मरण करतो त्याच्याजवळ ईश्वर राहतो. त्याला सांसारिक सामग्रीही उपलब्ध होते. लक्ष्मी विष्णूची पत्नी आहे. लोकांना केवळ लक्ष्मी हवी असते, विष्णू नको असतो. केवळ लक्ष्मी आली तर ती तुमच्या घरात फार काळ टिकणार नाही. ती आपल्या पतीजवळच राहणार. म्हणून विष्णूला घरी आणले तर लक्ष्मीही त्याच्यासोबत येईल व चिरंतन काळ तुमच्या घरी राहील. तुम्ही अधर्म कराल, लोकांचे अकल्याण कराल तर मात्र ती निघून जाईल. म्हणून भगवन्नाम ही खरी संपत्ती आहे. जेथे ही संपत्ती असते तेथे लक्ष्मीदेखील सुखाने राहते. भगवन्नामाची विस्मृती ही विपत्ती आहे.

**विशुद्धाः प्राकृताश्चेति द्विविधा मानुषाः स्मृताः।**
**शिवसंस्कारिणः शुद्धाः प्राकृता इतरे मताः।।१०.३४।।**

धर्म, जात, वर्ण, परंपरा अशा अनेक प्रकारांनी मनुष्यांची वर्गवारी केली जाते. परंतु आध्यात्मिक दृष्टीने त्याचे दोन वर्ग केले जातात. विशुद्ध मानव आणि प्राकृत मानव. प्राकृत म्हणजे प्रकृतीने जसे निर्माण केले तसे राहणारा. याच्यावर कोणताही संस्कार नसतो. भारतात अनेक धर्म आहेत, त्यांचे अनेक संस्कार आहेत. वीरशैवसिद्धान्तात, जन्मदेखील 'प्राकृत' नसावा तर 'संस्कृत' असावा, असे म्हटले आहे. त्याने 'भवी' म्हणून जन्म घेऊ नये तर 'भक्त' म्हणून जन्म घेतला पाहिजे. मातेच्या गर्भात आठव्या महिन्यातच शिशूवर लिंगसंस्कार केला जातो. याचे कारण काय? बालपणी जेवढे चांगले संस्कार दृढ होतात तेवढे मोठेपणी होत नाहीत. जन्मानंतर झालेल्या संस्कारांपेक्षा जन्मापूर्वीच झालेले संस्कार अधिक परिदृढ होतात. आचार्य म्हणतात की, गर्भात शिशू सात महिन्याचा झाला की त्याला जन्मजन्मांतरांचे ज्ञान होत असते. आतापर्यंत भोगलेल्या दुःखाचे स्मरण त्याला होते. या जन्मदुःखातून मुक्त होण्याची इच्छा त्याच्या मनात उत्पन्न होते. आपण व्यवहारात पाहतोच की ज्याला असाध्य रोग झाला असा मनुष्य मरण मागतो. मरण हा दुःखाचा आणि जीवनाचा अंत नव्हे, तो केवळ एक

स्वल्पविराम आहे. मरण आले तरी सुखदु:खे भोगायला पुन्हा जन्म घ्यावाच लागतो. हा पुढचा विचार न करता काही वेळा माणसे आत्महत्त्या करून मोकळी होतात.

शरीर हे भोगायतन आहे. भोगाचे साधन आहे. सुख भोगणे असो की दु:ख भोगणे असो, त्यासाठी शरीराची आवश्यकता आहेच. शरीरावाचून सुखदु:खे भोगता येत नाहीत. मातेच्या गर्भात जेव्हा शिशूला हे ज्ञान होते तेव्हा आठव्या महिन्यात त्याच्या मनात मृत्यूची इच्छा उत्पन्न होते. मी मेलो पाहिजे अशी प्रबल इच्छा. म्हणून आठव्या महिन्यात मूल जन्मले तर ते वाचत नाही अशी लोकसमजूत आहे. अशा दु:खाने भयभीत झालेल्या बालकास निर्भय करण्यासाठी– दु:खाला भ्यायचे नसते, भ्यायल्यामुळे दु:खे दूर होत नाहीत, भोगूनच ती संपतात किंवा तपश्चर्या करून त्यांचा क्षय केला पाहिजे– अशी जाणीव त्याला करून द्यावी लागते. यासाठी आचार्यांनी संस्कार सांगितला आहे. शिवाचा आश्रय घेतल्यावर तुझे कल्याण होईल, पुढे येणारी दु:खे सुखात परिवर्तित होतील, म्हणून तू सदैव शिवासोबत राहा, अशा भावनेने मातेच्या गर्भावर संस्कार केला जातो. अभिमन्यूने मातृगर्भातच चक्रव्यूहभेदनाची रीत जाणून घेतली होती. गरोदर स्त्रीने सत्संग करावा, सद्ग्रंथांचे पारायण करावे. असे केल्याने गर्भावर उत्तम संस्कार होतात. मूल जन्मल्यावर आम्ही म्हणतो, मुलगा बिघडला, आमचे ऐकत नाही. याचे कारण कोणते? चूक तुमची आहे. तुम्ही आधीच काळजी घेतली असती तर असे घडले नसते. म्हणून गर्भसंस्कार महत्त्वाचा आहे. जन्म घेणारा शिशू हा लिंगधारी होऊनच जन्म घेतो.

अन्य धर्मात वयाच्या आठव्या वर्षी उपनयनसंस्कार केला जातो. त्यानंतर त्याला वेदाध्ययनासाठी गुरूकडे पाठविले जाते. परंतु आठ वर्षे आणि आठ महिने यात अंतर आहे. जन्मानंतर गुरू येऊन त्याला लिंगधारण करवितात. मातृगर्भात धारण केलेले लिंग, पृथ्वीच्या गर्भात गेल्यावर देखील वीरशैवांच्या शरीरावर असते. लिंगाशिवाय अंत्यसंस्कार केला जात नाही. जो लिंगासोबत जन्मतो, तो लिंगासोबतच मरतो. म्हणून महर्षी व्यासांनी महाभारतात आश्चर्य व्यक्त केले आहे:–

**शैलादेन महाभागा विचित्रा लिंगधारका:।**
**शवस्योपरि लिंगं च ध्रियते च पुरातनै:।**
**लिंगेन सह पंचत्वं लिंगेन सह जीवितम्॥**

या प्रपंचात काही लोक असे आहेत की जे लिंगधारण करूनच जन्म घेतात, जीवनभर लिंगासोबत राहतात आणि शेवटी लिंगासोबतच पंचत्वात विलीन होतात. व्यासांनी असे आश्चर्य व्यक्त केले. यावरून या धर्माची प्राचीनता देखील सिद्ध होते.

जे मातृगर्भातच लिंगधारण करून जन्म घेतात ते 'शुद्ध' होत. मातृगर्भात झालेल्या संस्काराच्या बळावर जे पुढील जीवन जगतात त्यांनाच 'शुद्ध मानव' म्हटले जाते. ज्याच्यावर कोणताही संस्कार नाही, ज्याच्या अंगावर कोणतीच धर्मचिन्हे नाहीत तो 'प्राकृत मानव' आहे असे समजावे. त्याच्या शरीरावर लिंग नसते की यज्ञोपवित नसते. त्याच्या कपाळावर ना गंध ना भस्म. जसे निसर्गाने पाठवले तसेच जगणे, हेच त्याच्या जीविताचे सार. पशूदेखील असेच जगतात. बौद्धिक आणि आध्यात्मिक जीवनाची त्यांना प्राप्ती होत नाही. त्याप्रमाणेच हा प्राकृत मानव असतो. पशूवर कोणताही संस्कार केला जात नाही, त्याप्रमाणे संस्कारशून्य मानव पशूसारखेच केवळ प्राकृतिक जीवन जगतो. 'मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति।'

ज्याच्यावर शिवसंस्कार झाला त्याला शुद्ध समजावे आणि जो संस्कारशून्य आहे त्याला प्राकृत मानावे. शुद्ध

आणि प्राकृत असे मानवाचे दोन विभाग या ठिकाणी सांगण्याचे प्रयोजन कोणते? तर माहेश्वराने सदैव शुद्ध मानवाच्या संगतीत राहावे, प्राकृत मानवाच्या राहू नये, हे सांगण्यासाठी. घरातच काही लोक प्राकृत तर काही शुद्ध असू शकतात. घरातली सारी माणसे एका मनोवृत्तीची नसतात. काही पूजा करतात तर काही त्याला विरोध करतात. 'याला धंदा नाही, ऊठसूट पूजाच करीत बसतो, कामे सोडून जगद्गुरूंच्या दर्शनाला, प्रवचनाला जातो' अशी तक्रार करणारेही असतातच. स्वत: आचरण करीत नाहीतच, इतरांनी केले तर दोष देतात. असे लोक प्राकृतच आहेत. अशा वेळी शुद्धाचरण सोडू नये, प्राकृत लोकांचा सहवास सोडावा. ज्यामुळे आपल्या निष्ठा भंग होण्याची शक्यता आहे, असे सारे काही सोडणे म्हणे पूर्वाश्रयनिरसन.

शिवोपदिष्ट धर्माने चालणारे आणि ब्रह्मोपदिष्ट धर्माने चालणारे असे दोन प्रवाह या जगात आहेत. ब्रह्मदेवाने उपदेशिलेला धर्म वर्णात्मक आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र. शिवाने निर्मिलेली सृष्टी ही ब्रह्माच्या आधीची आहे. म्हणून वीरशैवांना 'अतिवर्णाश्रमी' मानले जाते. वीरशैवांत वर्णाश्रमभेद नाही. ज्यांनी इष्टलिंग, रुद्राक्ष, भस्मधारण केले ते सारे समान आहेत, शिवस्वरूप आहेत. माहेश्वरस्थलातील साधक ब्रह्मदेवाने उपदेशिलेला मार्ग सोडून शिवाने उपदेशिलेल्या मार्गाचे आचरण करतो. या अर्थाने पूर्वाश्रयाचा, पूर्वीच्या आश्रयाचा निरास करतो. प्राकृत आचारांचा त्याग आणि उत्कृष्ट आचाराचा स्वीकार यामुळेच आपली प्रगती होणार आहे. प्रवास दूरचा आहे. कारण शिवाला सोडून आपण खूप दूर आलो आहोत. आता जेथपर्यंत जायचे तर ते स्थान जवळ नाही. सुदूर आहे. परंतु प्रत्येक पाऊल टाकत राहिलो तर वाट संपणे अशक्य नाही, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

२७ ऑगस्ट १९९१

---

**आशीर्वचन दहावे**

## सर्वाद्वैतनिरसनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज माहेश्वरस्थलातील सर्वाद्वैतनिरसनस्थलाचे विवेचन करायचे आहे. द्वैत आणि अद्वैत या विचारधारा आपल्या देशात प्रचलित आहेत. काही दार्शनिक द्वैतसिद्धान्ताचे अनुयायी आहेत तर काही अद्वैतसिद्धान्ताचे. कितीही साधना केली तरी जीव कधी शिव होत नाही, त्यांच्यात सदैव भेद असतो; हा द्वैतसिद्धान्त होय. जीव साधना करो अथवा न करो, तो सर्वदा शिवस्वरूपच असतो, फक्त त्याला त्याचे ज्ञान नसते; हा दुसरा सिद्धान्त आहे. महाभारतातला कर्ण कुंतीचाच पुत्र होता. आपण कौंतेय आहोत याची त्याला जाणीवच नव्हती. श्रीकृष्णाने त्याची जन्मकथा सांगितल्यावर त्याला ज्ञान झाले की आपण पांडव आहोत, कुंतीचे पुत्र आहोत. त्याला ज्ञात नव्हते तेव्हाही तो कुंतीचाच पुत्र होता, राधेचा कधीच नव्हता. आता फक्त ज्ञान झाले इतकेच. त्याचप्रमाणे प्रपंचातील सर्व जीव परमात्म्याचीच रूपे आहेत. घराबाहेरील विराट आकाश म्हणजे महाकाश,

गृहातील आकाश म्हणजे गृहाकाश आणि घटातील आकाश म्हणजे घटाकाश होय. या तिन्ही ठिकाणी आकाश वेगळे भासते, परंतु त्यात वेगळेपण नाही.

वीरशैवसिद्धान्तात द्वैत आणि अद्वैत यांचा समन्वय असल्यामुळे या सिद्धान्ताला 'द्वैताद्वैतसिद्धान्त' असे म्हटले जाते. प्रारंभी या सिद्धान्तात अद्वैताचे खंडन आहे, परंतु नंतर मंडनदेखील आहे. जीव हा वस्तुत: शिवच आहे तथापि 'शिवोऽहम्' स्थिती अखेरची आहे, प्रारंभीची नाही. माहेश्वरस्थलातील साधकात इष्टलिंगाविषयी नितांत निष्ठा असते. प्रेम व्यक्त झाले पाहिजे. एखादा पाहुणा आपल्या घरी आला की आपण केवळ शब्दांनीच प्रेम व्यक्त करतो काय? की तुमच्यावर फार प्रेम आहे. त्याला घरात घेतले नाही, चहा पाजला नाही, जेवण दिले नाही. दारातूनच 'फार प्रेम आहे' असे म्हटले की प्रेम व्यक्त झाले का? प्रेम आपल्या क्रियेतून अभिव्यक्त व्हायला हवे, ते शब्दांतून व्यक्त करण्याची गरज नसते. त्याप्रमाणे आपले जर ईश्वरावर प्रेम असेल तर ते आपल्या क्रियेतून व्यक्त व्हायला हवे. माहेश्वरातील साधकाची भक्ती अशाच प्रकारे व्यक्त होते, त्याची निष्ठा कर्मात असते. तो आपले प्रेम क्रियेद्वारा व्यक्त करतो. 'पूज्य पूजकयोर्लिंगजीवयो:।'

येथे एक पूजक आहे, एक पूज्य आहे. अंग आणि लिंग म्हणजे जीव आणि शिव. जीव पूजक तर शिव पूज्य आहे. आपण प्रात:काली इष्टलिंगपूजा करतो. रुद्राभिषेक-रुद्राचे पारायण करतो, एकशे आठ नावे घेत शिवलिंगावर बेल वाहतो. जर देव आणि भक्त यांत भेद नसता तर हे सारे कसे घडले असते? लिंग आणि अंग यांच्यात पूजाक्रिया घडायची असेल तर त्यांच्यात भेद मानला पाहिजे. ईश्वर हा आपल्यापेक्षा महान असून आपण त्यापेक्षा लहान आहोत, हीच भावना भक्ताच्या मनात असते. जेव्हा अद्वैताचे ज्ञान होते तेव्हा ईश्वर-भक्त, लिंग-अंग यांच्यातील भेद नाहीसा होतो. तोपर्यंत मात्र भेदच आपल्या प्रत्ययाला येतो.

**प्रेरकं शंकर बुद्ध्वा प्रेर्यमात्मानमेव च।**
**भेदात् तं पूजयेन्नित्यं न चाद्वैतपरो भवेत्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.३९)

शिव प्रत्येकाच्या हृदयात राहून प्रेरणा देतो. तो प्रेरक आहे. तुम्हाला येथे येण्यासाठी कोणी प्रेरित केले? तुमच्या हृदयातील ईश्वराने. त्याची प्रेरणा नसती तर तुम्ही येथपर्यंत येऊ शकला नसता. त्याच्या प्रेरणेशिवाय तृणाचे पातेदेखील हलत नाही. कारण 'एकोऽहं बहु स्यां प्रजायेय' या त्याच्या संकल्पानेच प्रपंच उत्पन्न झाला. त्यासाठी त्याला काही पूर्वतयारी करावी लागत नाही. कुंभाराला मातीचा घडा बनवायचा असेल तर त्याला माती आणावी लागते, ती मळावी लागते. ईश्वराचे असे नाही. त्याचा केवळ संकल्पच सृष्टिनिर्मितीला कारण ठरतो.

ईश्वर सर्वांचा प्रेरक असेल तर दुष्ट लोकांना दुष्ट कर्मासाठी तोच प्रेरणा देतो काय? असा प्रश्न काहींच्या मनात निर्माण होईल. तो योग्यच आहे. परंतु हे सारे समजून घ्यायला हवे. पंखा फिरतो आणि बल्ब प्रकाश देतो. विद्युत्शक्ती त्यांची प्रेरक आहे. परंतु पंख्याने प्रकाश द्यावा आणि बल्बने फिरावे असे आपण म्हटले तरी तसे घडेल काय? अर्थात्च घडणार नाही. बल्बची रचना प्रकाश देणारी आहे आणि पंख्याची रचना फिरणारी, हवा देणारी आहे. यंत्र ज्या प्रकारे बनविले असेल त्या प्रकारचेच कार्य ते करणार. मग भलेही सगळ्या यंत्रांना एकच विद्युत्शक्ती प्रेरणा देत असेल. जमीन, हवा, पाणी, आकाश एकच असले तरी पेरलेल्या बिया आपापले गुणधर्म घेऊनच उगवतात. एकाच ठिकाणी ऊस आणि मिरची पेरली तरी मिरची गोड होत नाही आणि ऊस तिखट होत नाही. दोन्ही वृक्षांनी एकच पाणी घेतले तरी ऊसात ते गोड झाले आणि मिरचीत तिखट झाले. असे काय घडले?

दोष पाण्याचा नाही तर बियांचा आहे. पृथ्वीत सहा प्रकारचे रस आहेत. परंतु ऊसात पृथ्वीतल्या मधुरसाचे शोषण होते. फुले वेगवेगळ्या रंगांची आणि गंधाची असतात त्याचेही कारण हेच. याप्रमाणे ईश्वर प्रेरक असला तरी जीवाच्या कर्माप्रमाणे तो जीव सुष्टकर्मे अथवा दुष्टकर्मे करतो. पापी मनुष्य पाप करतो आणि पुण्यशील मनुष्य सत्कर्मे करतो.

मग पापी मनुष्याकडून सत्कर्म घडणार नाहीत काय? अवश्य घडतील. त्यासाठी त्याच्या कर्मबीजात परिवर्तन करायला हवे. त्यासाठी त्याला आपली मनोवृत्ती आणि संगत बदलली पाहिजे. पुण्यवान् माणूसदेखील कधीकधी दुष्कर्मात प्रवृत्त होतो ते संगतीमुळे. वाल्ह्याने सत्संग केला, रामनामात तो तन्मय झाला आणि त्याची सगळी दुष्कर्मे सत्कर्मात परिवर्तित झाली. ईश्वराची प्रेरकशक्ती प्रत्येक जीवाकडे आहे. तिचा सदुपयोग करून घेणे हे सज्जनांचे कर्तव्य आहे. आपल्या हातून दुष्कर्म घडू नयेत यासाठी संतसंगतीची आवश्यकता आहे.

**सत्संगत्वे निःसंगत्वम् निःसंगत्वे निर्मोहत्वम्।**
**निर्मोहत्वे निश्चलतत्त्वं निश्चलतत्त्वे जीवन्मुक्तिः।**

जिवंत असताना मुक्ती मिळणे ही जीवन्मुक्ती होय. मेल्यावर मुक्ती मिळत नाही. ती जिवंतपणीच मिळवावी लागते. त्यासाठी काय केले पाहिजे हे वरील श्लोकात सांगितले आहे. आपण कितीही दुर्गुणी असलो तरी संतसमागमामुळे आपल्याला सद्गुणी समजले जाते. एका ग्लासात दूध व दुसऱ्या ग्लासात पाणी आहे. त्यांची योग्यता भिन्न आहे. दुधाच्या भावात कोणी पाणी विकत घेणार नाही. पण दोन्ही एकत्र मिसळले तर? तर पाणीदेखील दूध समजून दुधाच्या भावाने विकले जाते. तांदळातले खडेदेखील तांदळाच्या भावाने विकले जातात. याचे कारण कोणते? चांगल्याच्या सहवासात राहिल्याने त्यांचे मोल वाढले. त्याचप्रमाणे दुर्गुणी व्यक्तीदेखील संतसहवासाने सज्जन समजली जाते. तो संत नसतो, तरी संत समजला जातो. सत्संगतीचा परिणाम निश्चित होतो. त्यामुळे वासना बदलतात. खूप पापे केली आता, त्यापासून मुक्ती हवी असे वाटू लागते. वासना बदलली की कर्म बदलते. सत्संगाने मनुष्य निःसंग होतो. संसारसंगाने आपल्याला संसाराचा मोह होतो. विवेकशक्तीचे हरण करणारा दुर्गुण म्हणजे मोह. 'मा ऊहः मोहः।' ऊहाशक्ती म्हणजे विवेक. तिचे हरण करणारा तो मोह होय.

संतसंगतीने मोह हळूहळू नष्ट होतो. स्मशानात जाऊन बसल्याने काय होते? स्मशानात नित्य येणारी प्रेते पाहून केव्हातरी आपल्यालाही येथे असेच यायचे आहे अशी भावना मनात दृढ होते आणि हळूहळू शरीराविषयी आसक्ती क्षीण होते. शरीर कधीतरी जळून राख होणार किंवा मातीत मिसळले जाणार. शास्त्रे वाचून मी शरीर आहे ही भावना दृढ होण्यासाठी कितीतरी काळ लागतो. परंतु स्मशानात बसून ती चटकन् दृढ होऊ शकते. कारण तो साक्षात् अनुभव आहे. गौतम बुद्धाकडे दीक्षा घ्यायला कोणी आला तर बुद्ध त्याला स्मशानात पाठवत. 'जा, थोडे दिवस तेथे बसून ये.' सहा महिने स्मशानात राहून आल्यावर त्याला 'तू शरीर नाहीस' हा उपदेश करण्याचे प्रयोजनच राहत नसे. तो ते तेथेच शिकून आलेला असे. संतसहवासाने मोह असा नष्ट होतो. मोह नष्ट झाल्यावर मन निश्चल होते आणि मन निश्चल झाले की तीच मुक्ती. मन सतत धावत असते म्हणून आपण संसारात भ्रमत

असतो. मन स्थिर झाले की भगवंताचा साक्षात्कार होतो. हातात आरसा घेऊन आपण चेहरा पाहतो. आरसा सतत हलवत राहिलो तर चेहरा नीट दिसत नाही. तोही हलताना दिसतो. आरसा स्वच्छ आणि स्थिर असला की आपला चेहरा स्पष्ट दिसतो. त्याचप्रमाणे मन, बुद्धी ही साक्षात्काराची साधने आहेत. मन चंचल असल्यामुळे जवळचा ईश्वर दिसत नाही. ईश्वर नाहीच असे वाटू लागते. म्हणून ईश्वर जाणण्यासाठी ज्यांनी ईश्वराला जाणले अशांचा सहवास करावा.

तुम्ही मोठ्या प्रेमाने कपाळावर भस्म लावलेले आहे. हे भस्म कशापासून निर्माण झाले? तर गाईच्या शेणापासून. मग गाईचे शेण कपाळावर लावा असे सांगितले तर तुम्ही लावाल काय? निश्चितच नाही. मग भस्म का लावता? गाईचे शेण जेथे पडले तेथेच राहिले असते तर शेणच म्हणविले गेले असते. परंतु त्या शेणाने सूर्याची उष्णता सहन केली, वाऱ्याचा आघात सहन केला, अग्नीत स्वत:ला जाळून घेतले आणि शेणपण नष्ट होऊन ते शुभ्र भस्म झाले. तेच मोठ्या श्रद्धेने तुम्ही शरीरावर धारण केले आहे. सामान्य शेण सूर्य, वारा, अग्नी यांच्या संगतीने उत्तम भस्म होते त्याप्रमाणे अत्यंत दुराचारी माणसाच्या वासना सत्संगाने बदलतात आणि त्याच्या जीवनात परिवर्तन होते. त्याला जीवन्मुक्त व्हायला फार काळ लागत नाही.

प्रपंचात आल्यापासून आपले सारे व्यवहार ईश्वराच्या प्रेरणेनेच होत आहेत. जर आपल्या हातून दुष्कर्म होत असतील तर आपण त्या प्रेरकशक्तीचा सदुपयोग करून घेतला नाही असेच समजावे. सत्संगानेच परिवर्तन होऊ शकते. ईश्वराची प्रेरणा कर्मामागे आहे अशी जाणीव झाली की हातून सत्कर्मे घडू लागतील. म्हणून भगवान शिवाला प्रेरक मानून भेदभावाने त्यांची अर्चना करावी.

**पतिः साक्षान्महादेवः पशुरेष तदाश्रयः।**
**अनयोः स्वामिभृत्यत्वमभेदे कथामिष्यते।।१०.४०।।**

वीरशैवसिद्धान्ताला 'महापाशुपत सिद्धान्त' असेही म्हणतात. शिव हा पती आहे. नेपाळमध्ये भगवान पशुपतीचे मंदिर आहे. ब्रह्मांडातील सर्व जीव 'पशू' असून भगवान शिव 'पशुपती' आहेत. जीव पशू का आहेत? बाजारात स्वैर हिंडणारे काही पशू असतात. त्यांपैकी काही देवाला वाहिलेले असतात. त्यांचा कोणी मालक नसतो. काही हुशार लोक आपली गाय देखील त्या कळपात सोडून देतात. तिला खायला घालायची कटकट वाचते म्हणून. ती दिवसभर तेथे चरते आणि रात्री निमूटपणे घरी येते. भाजीबाजारात ती गाय स्वैर हिंडते. कुठे तोंड घालून भाजी खाते. भाजीवाला तिला काठी मारतो तरी ती तोंडातला घास सोडत नाही. ती पुढे जाते, दुसऱ्या भाजीत तोंड घालते. तिथे मार खाते. सतत मार खाणे हेच तिचे जीवन. आपण मार का खातो हा विचार करण्याची बुद्धी तिच्याजवळ नाही. म्हणून तिला आपण पशू म्हणतो. जशी पशूंची स्थिती तशीच मनुष्यांची असते. तोदेखील दोन पायांचा पशूच आहे. 'पुच्छविषाणहीनो द्विपादपशुः।'

शिंग व शेपूट नसलेला द्विपाद पशू म्हणजे माणूस. तो किती ठोकरा खातो, किती दुःखे भोगतो. तरी करायचे तेच करत राहतो. पशूला दाव्याने बांधलेले असते त्याप्रमाणे जीवाला तीन पाशांनी बांधलेले आहे. आणव मल, मायील मल आणि कार्मिक मल हे ते तीन पाश होत. या पाशांनी प्रत्येक जीव बांधलेला असतो, म्हणून तो 'पशू' आहे. जीव हा पशू आणि शिव हा पती. एक सेवक तर दुसरा स्वामी. यांच्यात भेद असलाच पाहिजे. तो नसेल तर पशू आणि पती हा भाव कसा राहील? त्यांच्यात अभेदबुद्धी असेल तर पूजा कशी होईल? म्हणून सर्वाद्वैतनिरसनस्थलात भेदाचे समर्थन आणि अद्वैताचे निरसन केलेले आहे. शरणस्थलातील साधकदेखील

स्वत:ला सती आणि शिवाला पती मानतो. सर्व जीव सती आणि शिव हा सर्वांचा पती होय. भेदभाव नसेल तर सतिपतिभाव अथवा पशुपतिभाव दृढ होणार नाही. म्हणून माहेश्वरस्थलातील साधक शिव आणि आपण यांच्यात भेद मानून पूजन करीत असतो.

**साक्षात्कृतं परं तत्त्वं यदा भवति बोधत:।**
**तदाद्वैतसमापत्तिर्ज्ञानहीनस्य न क्वचित्।।१०.४१।।**

अद्वैताचे येथे निरसन केले आहे तर आपल्या सिद्धान्तात अद्वैत मान्य नाही काय? असा प्रश्न येथे उपस्थित होतो. पशू पशूच राहील आणि पती पतीच राहील काय? असे होत नाही. जोपर्यंत तुम्हाला अद्वैताची अनुभूती येत नाही तोपर्यंत तुम्ही भेदभावानेच पूजा करायला हवी. जेव्हा परशिवाचा साक्षात्कार होतो तेव्हा आपण त्याच्यापासून भिन्न राहू शकत नाही. मूलतत्त्व जाणण्याचा प्रयत्न केला तर आपण तेच होऊन राहतो. मिठाच्या पुतळ्याने आपल्या मूलस्थानाचा, समुद्राचा शोध घेतला आणि त्याला मिठी मारली तर काय घडेल? तो आपल्या मूलरूपात म्हणजे पाण्यात विरून जाईल. पाण्यातून निर्माण झालेले मीठ पाण्यात विरघळून जाते. त्याप्रमाणे शिवापासून उत्पन्न झालेला जीव जेव्हा उत्कंठित होऊन त्याची आराधना, त्याचे चिंतन करतो तेव्हा तो भक्त न राहता शिवस्वरूपच होऊन जातो.

**कीटो भ्रमरध्यानेन भ्रमरो भवति ध्रुवम्।**
**मानव: शिवयोगेन शिवो भवति: निश्चयम्।।**

महर्षी व्यास शिवपुराणात सांगतात की, भ्रमराचे चिंतन करता करता कीटक भ्रमर होतो त्याप्रमाणे शिवयोगसाधनेने शिवाचे चिंतन करता करता मानव शिवच होऊन जातो.

अशोक वनातल्या सीतेने जेव्हा हा श्लोक ऐकला तेव्हा ती भयभीत झाली. त्रिजटा नामक राक्षसीला ती म्हणाली, ''सामान्य कीडा जर भ्रमराचे चिंतन करून भ्रमर होतो, तर माझे काय? मी तर सतत रामाचे चिंतन करीत असते. त्याचे चिंतन करता करता जर मी रामच झाले तर माझ्या रामाकरिता दुसरी सीता कोठून आणू?'

तेव्हा त्रिजटा म्हणाली, ''तू फार काळजी करण्याचे कारण नाही. तू जशी रामाचे चिंतन करीत आहेस तसा तिकडे रामदेखील तुझे चिंतन करतो आहे. चिंतन करता करता तू राम झाली तर तो तुझे चिंतन करता करता सीता होईल. शेवटी राम आणि सीता कायमच राहणार. तू कशाला चिंता करतेस?''

तात्पर्य असे की, अद्वैताचे आचरण करावे लागत नाही, अद्वैत सहज होते. साक्षात्कार झाला की तो शिवस्वरूप होतो. त्याच्या मनात काही भावना राहत नाहीत, निरंतर त्याचे मन शिवात लीन होते, त्याच्याकडून कोणतेच क्रियाकर्म घडत नाही. काही लोक केवळ शास्त्र वाचून स्वत:ला अद्वैती समजतात. मी पूजा का करू, असे म्हणतात. आळसासाठी अद्वैताचा आश्रय घेतात, हा त्याचा अर्थ. 'अहं ब्रह्मास्मि'– मी ब्रह्म आहे असे केवळ म्हटल्याने अद्वैताचा साक्षात्कार होत नाही. अद्वैत ही अनुभूती आहे. शंकराचार्यांनी अद्वैताचा प्रचार का केला? त्या काळात समाजात भेदबुद्धी पुष्कळ होती, उच्चनीचभाव होता. तो त्यांना संपवायचा होता. भेदभाव असेपर्यंत समाजात कलह चालूच राहणार. द्वैत आहे तोपर्यंत भय, राग, क्रोध, द्वेष, मत्सर हे सारेच राहणार. दोन माणसे एकमेकांवर प्रेम करतील किंवा एकमेकांचा द्वेष करतील, मत्सर करतील. एकच असेल तर हे कसे घडेल? अद्वैताचे अधिकारी फार कमी असतात. तरीदेखील शंकराचार्यांनी अद्वैताचा प्रचार केला. केवळ अद्वैत तत्त्वज्ञान ऐकण्यासाठी विवेक, वैराग्य, शमादी षट्संपत्ती आणि मुमुक्षुता या चार साधनसंपत्ती जवळ असाव्या लागतात.

नित्य–अनित्य व आत्म–अनात्म हा विवेक त्याच्याजवळ असावा, इह–परलोकातील सुखांविषयी नैराश्य असावे, मुक्तीची प्रबळ इच्छा असावी, तरच तो अद्वैताचा अधिकारी होय. ज्याच्याजवळ हे नाही त्याला दिलेला उपदेश अनर्थकारी ठरतो. अद्वैत नेहमी भावनेत असावे, क्रियेत असू नये. 'भावाद्वैतं समाचरेत् क्रियाद्वैतं न समाचरेत्' व्यवहारात अद्वैत आले तर व्यवहार नीट होणार नाहीत. घरात आई, बहीण, पत्नी या साऱ्यांत स्त्रीरूपच असते. पण प्रत्येकीच्या बाबतीत आपला व्यवहार भिन्न असतो. तेथे अद्वैत असत नाही. व्यवहारात अद्वैत आणले तर केवढा अनर्थ होईल? एक शिष्य गुरूंचे प्रवचन ऐकायला गेला. गुरुजींनी गीतेवर रसाळ प्रवचन केले.

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनी।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिता: समदर्शिन:।।**

विद्यासंपन्न ब्राह्मण असो वा हत्ती असो, या सर्वात ईश्वर राहतो. या श्लोकावर गुरुजींनी रसाळ निरूपण केले. ते ऐकून शिष्य भारावला. प्रवचन संपल्यावर आपल्याच नादात डोलत रस्त्याने निघाला. तेवढ्यात पाठीमागून कोलाहल ऐकू आला, ''बाजूला सरका, हत्ती पिसाळला, बाजूला व्हा.'' हत्तीवर बसलेला माहुत मोठ्याने ओरडत होता. शिष्य नुकताच प्रवचन ऐकून आलेला. त्याला वाटले, हत्ती काय अन् आपण काय, दोघातही ईश्वरच आहे. मग आपल्याला भीती कसली? तो आरामात रस्त्याच्या मध्यावरून चालत राहिला. पिसाळलेल्या हत्तीने त्याला सोंडेने उचलून खाली आदळले. त्याचे हातपाय मोडले. हॉस्पिटलमध्ये ॲडमिट झाला. गुरुजींना आपल्या शिष्याची अवस्था समजली. ते भेटायला गेले. सर्व चौकशी केल्यावर म्हणाले, ''वेड्या, हत्तीमध्ये ईश्वर आहे खरे. पण हत्तीवर बसलेला माहुतदेखील ईश्वरच आहे. तो तुला 'बाजूला हो' सांगत होता. त्या ईश्वराचे तू ऐकले नाहीस, म्हणून तुझी गत अशी झाली.''

अद्वैत व्यवहारात चालत नाही, द्वैतच चालते. गुरू ब्रह्म असतो तसा शिष्यदेखील ब्रह्मच असतो. म्हणून शिष्याने गुरूच्या आसनावर बसायचे नसते. असे अद्वैत प्रपंचासाठी घातक ठरते. तरीदेखील शंकराचार्यांनी भेदभाव नष्ट करून समाजाला एकत्र करण्यासाठी अद्वैताचा प्रचार केला. ज. रेणुकाचार्य सांगतात की, जोपर्यंत अद्वैताचा साक्षात्कार होत नाही तोपर्यंत द्वैतभावानेच व्यवहार केला पाहिजे. दुसऱ्याचा अद्वैतानुभव उसना म्हणून घेता येत नाही. माहेश्वरस्थलातील साधक पूर्णज्ञानी नसल्यामुळे त्याने ईश्वराची अर्चना द्वैतभावनेच करायला हवी. कर्म करण्यासाठी भेदबुद्धीची आवश्यकता असते. इष्टलिंगार्चन हे माहेश्वराचे कर्म आहे, ते भेदबुद्धीशिवाय घडणार नाही.

**पूजादिव्यवहार: स्याद् भेदाश्रयतया सदा।**
**लिंगपूजापरस्तस्मान्नाद्वैते निरतो भवेत्।।१०.४३।।**

जोपर्यंत इष्टलिंगाची पूजा करायची असेल तोपर्यंत द्वैताचा आश्रय घेतला पाहिजे. शिव महान असून त्याची पूजा हेदेखील महान कर्म आहे, या भावनेने पूजा करावी. साक्षात्कार होत नाही तोपर्यंत अद्वैताचा आश्रय घेऊ नये. म्हणून येथे सर्वाद्वैतनिरसन केलेले आहे. हा प्रवास टप्प्याटप्प्याने होणार आहे. एकेक पायरी चढत जायचे आहे. लिंगपूजा करता करता शेवटी लिंगस्वरूपच व्हायचे असते. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

२८ ऑगस्ट १९९१

# आह्वाननिरसनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आपल्या घरात वरदशंकराची नैमित्तिक पूजा असते त्यावेळी देवीदेवतांना आवाहन केले जाते. ज्या पाण्याने पूजा केली जाते त्या पाण्यात पवित्र नद्यांना आवाहन करतात:-

गंगे च यमुनेचैव गोदावरि सरस्वति।
नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु।।

पाणी तुमच्या घरातीलच आहे. खरे तर पूजेसाठी पवित्र नद्यांचे जल हवे असते. पण रोज कोठून आणणार? भावनेने आवाहन केल्यावर देवता दुरून येत असतात. अंतर शरीरासाठी असते, भावनेसाठी नव्हे. भारतीय संस्कृतीत सकाळी, दुपारी आणि संध्याकाळी संध्यावंदन करतात. आपल्या सिद्धान्तात दिवसातून तीनवेळा लिंगपूजेचे विधान आहे. संतशिरोमणी मन्मथस्वामींनी तर दिवसातून सहा वेळा पूजा करावी असे म्हटले आहे. मग तर तुम्ही लिंगपूजाच सोडून द्याल. एकवेळ मोठ्या कष्टाने तुम्ही लिंगपूजा करता. सहा वेळा लिंगपूजा करावी असे मन्मथस्वामी का म्हणतात? तर आपल्या शरीरावर ईश्वर आहे याची जाणीव वारंवार व्हावी म्हणून. हिंदुसंस्कृतीत स्नानानंतर भगवान सूर्याला अर्घ्य देतात. बुद्धिनिष्ठ लोकांना या क्रिया मोठ्या विचित्र वाटतात. ज्यांच्याजवळ केवळ बुद्धी आहे, भावना नाही अशा लोकांना विचार पडतो की, सूर्य कोठे आहे आणि हे लोक अर्घ्य कोठे देत आहेत? नदीचे पाणी सूर्याला अर्पण करून नदीतच सोडतात.

काशीत पर्यटनाच्या उद्देशाने अनेक विदेशी पर्यटक येतात. एक पंडित सूर्याला अर्घ्य देत होता. ते पाहून एका विदेशी पर्यटकाला हसू आले. त्याला वाटले की ही भारतीय माणसे किती बुद्धिहीन आहेत. सूर्य कोट्यवधी मैल दूर असताना त्याला पाणी अर्पण करतात. हे पाणी त्याच्यापर्यंत कसे पोहोचते?

त्याला हसताना पाहून पंडिताला राग आला. त्याने ओळखले की हा मनुष्य बुद्धिजीवी आहे, भावजीवी नाही. पंडिताने विदेशी पर्यटकाला त्याचे नाव-गाव, त्याच्या पत्नीचे नाव विचारले. ती त्याच्या देशात आहे याची खात्री करून घेतली आणि तिच्या नावाने तो अश्लील शिव्या देऊ लागला. त्या ऐकून तो पर्यटक चिडला आणि पंडिताशी भांडू लागला. पंडित म्हणाला, ''तुझी पत्नी येथे कुठे आहे? ती तर परदेशात आहे. तिला माझ्या शिव्या कशा लागल्या? तिच्यापर्यंत त्या पोहोचल्याच कशा?''

प्रिय व्यक्ती दूर असली तरी तिची स्तुती केल्यावर अथवा निंदा केल्यावर त्याचा प्रभाव आपल्या मनावर पडत असतो. सूर्य दूर आहे, आपण अर्पिलेले पाणी येथेच पडत आहे, परंतु भाव मात्र सूर्यापर्यंत पोचलेला आहे. त्याचप्रमाणे आपण भावनापूर्वक घरातील पाण्यात गंगा-यमुनादी नद्यांना आवाहन करीत असतो, समुद्राला आवाहन करतो. तेव्हा सर्व नद्या तेथे येतात. मग ते पाणी विहिरीचे नसते, नळाचे नसते तर पवित्र नद्यांचे असते. त्या पाण्यानेच मग तुम्ही पूजा करता. याचप्रमाणे ज्या देवतेची पूजा करायची असते तिलाही आवाहन करावे लागते. प्रथम पूजेचा मान श्रीगणेशाचा. पानावर सुपारी ठेवून तेथे गणेशाला आवाहन केले जाते:-

**आवाहयामि आवाहितो भव।**
**स्थापयामि स्थापितो भव। अवकुंठितो भव। वरदो भव।**

या प्रकारे गणेशाला आवाहन करतात. वरदशंकराची पूजा असेल तर शंकराला आवाहन करतात. पूजा संपली की विसर्जन करतात. ज्या देवतेला आवाहन केले तिचे विसर्जन करावे लागते. 'गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ पुनरागमनायच।' आता आपण जा. पुन्हा येण्यासाठी जा. आम्ही बोलावू तेव्हा या. या प्रकारे प्रत्येक नैमित्तिक कार्यात आवाहन आणि विसर्जन असते. परंतु येथे आह्वाननिरसनस्थलात आवाहनक्रियेचे निरसन केले आहे. इष्टलिंगपूजा हे नैमित्तिक कर्म नसून नित्यकर्म आहे. इष्टलिंगात पूजेच्या वेळी शिवाला आवाहन केले आणि पूजेनंतर त्याचे विसर्जन केले तर शरीरावर अष्टोप्रहर राहणाऱ्या इष्टलिंगात देवच राहणार नाही. म्हणून आपल्या आचार्यांचे असे सांगणे आहे की, एकदा सद्गुरूंनी दीक्षेच्या वेळी शिवाला आवाहन करून इष्टलिंग दिल्यावर त्याचे कधी विसर्जन केले जात नाही. इष्टलिंगात भगवान शिवाचे निरंतर वास्तव्य असते.

**लिंगार्चनपरः शुद्धः सर्वद्वैतनिरासकः।**
**स्वेष्टलिंगे शिवाकारे न तमावाहयेच्छिवम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.४४)

लिंगपूजापरायण शुद्ध माहेश्वर आपल्या शिवस्वरूपी इष्टलिंगात भगवान शिवाला आवाहन करीत नाही. दीक्षाविधीत 'अंग' आणि 'लिंग' दोन्हींवर दीक्षासंस्कार केला जातो. अंगसंस्कार आणि लिंगसंस्कार. अंगाची शुद्धी व लिंगाची शुद्धी केली जाते. शिळेपासून निर्माण केलेल्या लिंगातील शिलात्वनिवृत्ती होण्यासाठी त्याला प्रथम धान्यात ठेवले जाते, पाण्यात ठेवले जाते आणि नंतर त्यात शिवकलांचे आवाहन केले जाते. निवृत्तिकला, प्रतिष्ठाकला, विद्याकला, शांतिकला, शांत्यतीताकला, शांत्यतीतोत्तराकला अशा सहा कला आहेत. चंद्राच्या सोळा कला आहेत तशा शिवाच्या सहा कला आहेत. कला म्हणजे शक्ती. शिवाच्या ठिकाणी शक्ती अविनाभावसंबंधाने राहते. विश्वनिर्मितीच्या वेळी शिव अर्थात् स्थल हे लिंग आणि अंग असे द्विभाग होते तर शक्ती कला आणि भक्ती अशी द्विभाग होते. लिंगाच्या आश्रयाने राहणारी शक्ती ती 'कला' आणि अंगाच्या आश्रयाने राहणारी शक्ती ती 'भक्ती' होय. जीवात्म्याच्या ठिकाणी असलेली शक्ती म्हणजे भक्तिशक्ती. तिच्याच साहाय्याने जीवात्मा शिवापर्यंत पोहोचू शकतो. शिवाच्या ठिकाणी राहणारी कलाशक्ती ही सृष्टीनिर्मिती करणारी आहे.

दीक्षेच्या वेळी सद्गुरू 'अंगा'वर संस्कार करतात आणि 'लिंगा'वरही संस्कार करतात. त्यामुळे अंगात भक्तीचा न्यास होतो. भक्ती सहा प्रकारची आहे. श्रद्धाभक्ती, निष्ठाभक्ती, अवधानभक्ती, अनुभवभक्ती, आनंदभक्ती आणि समरसभक्ती. दीक्षासमयी लिंगात सहा शक्तीचा आणि अंगात सहा भक्तींचा न्यास होतो. साधकाच्या प्राणाला आवाहन करून त्याची लिंगात प्रतिष्ठापना केली जाते. प्राणावर जेवढे प्रेम आहे तेवढेच प्रेम लिंगावर असले पाहिजे, असा याचा अर्थ आहे. शरीरावरून लिंग पडले अथवा शरीर व लिंग यांचा वियोग झाला तर साधकाने प्राणत्याग करावा असे वीरशैवसिद्धान्तात म्हटले आहे. मोठी कठीण गोष्ट आहे. पूजा करताना बऱ्याच जणांचे लिंग जमिनीवर पडते. कोठे हरवते पत्ताही लागत नाही. आपल्या मनात भावनाच नसते. ती असती तर लिंग हरवल्यावर आपल्या मनाला लागले असते. आपण पश्चात्ताप केला असता. इष्टलिंगाला प्राणलिंग समजावे, असे वीरशैवसिद्धान्त सांगतोः-

**कदाचित् कृत्र चिद्वापि न वियोजय देहत:।।६.२६।।**

कोणत्याही प्रकारे शरीरापासून लिंग विभक्त करू नये. मातृगर्भात असल्यापासून लिंग सोबत आहे आणि भूगर्भात जातानाही सोबतच राहणार आहे. म्हणून हातावर लिंग देताना सद्गुरू म्हणतात– 'प्राणवद्धारणीयं तत् प्राणलिंगमिदं तव' (६.२६) हे तुझे प्राणलिंग आहे. जसा शरीरात प्राण आहे तसे हे लिंग आहे. प्राणविहीन शरीराला प्रेत म्हणतात. भूत वेगळे, प्रेत वेगळे प्रेताचा अर्थ 'प्रकर्षेण इत: गत: प्रेत:' असा आहे. शरीरातून प्राण निघून गेला तर परत येत नाही. प्राण व जीव यांपासून विमुक्त होते ते प्रेत. प्रेताला स्पर्श केला की आपण तसेच घरात वावरत नाही, जेवण करीत नाही. आजकाल करीतही असतील. प्रेतसंस्कार करून आल्यावर स्नान करतात. प्राणरहित शरीराला स्पर्श केल्याने अपवित्रता येते, म्हणून आपत्याला स्नान करावे लागते. त्याप्रमाणे वीरशैव असून शरीरावर लिंग नसेल तर ते शरीर प्रेतासमान मानावे, असे मन्मथस्वामींनी म्हटले आहे. मन्मथस्वामी एवढे कठोर का बोलतात? तर ज्यांच्या ठिकाणी आपल्या धर्माविषयी निष्ठा नाही त्यांच्या ठिकाणी ती उत्पन्न व्हावी या उद्देशाने.

लिंगात प्राण कसा राहतो? असा प्रश्न उपस्थित करता येईल. त्याचे उत्तर असे की ज्या ठिकाणी आपले प्रेम असते त्या ठिकाणी आपला प्राण राहतो. राक्षसाचा प्राण पोपटात राहतो आणि पोपटाला मारल्याशिवाय राक्षस मरत नाही, अशा कथा आपण बालपणी ऐकल्या आहेत. त्या काय केवळ कथाच आहेत? त्यात सत्याचा अंश नाही? आयुष्यभर ज्याने पै पै मिळवून संपत्ती गोळा केली अशा माणसाची सारी संपत्ती जर एका रात्रीत चोरांनी पळवली तर तो माणूस काय जिवंत राहील? त्याच्या शरीराला कोणी धक्काही लावला नाही. तरी तो मरतो. त्याचा प्राण कोठे होता? त्याच्या शरीरात की संपत्तीत? त्याच्या शरीराला स्पर्श न करता तो मेला कसा? याचा अर्थ त्याचा प्राण शरीरात नव्हता तर तो संपत्तीत होता. टी. व्ही. वर रामायण पाहताना राम बेशुद्ध झाल्याचे पाहून कितीतरी लोक मेले. या आजच्या काळातल्या घटना आहेत. क्रिकेटमध्ये भारतीय संघ पराभूत झाला तर काही लोकांना हार्टफेल होतो. कारण त्यांचा प्राण क्रिकेटमध्ये असतो. सांगण्याचे तात्पर्य असे की, शिवभक्ताचे इष्टलिंगावर असे नितांत प्रेम असते. म्हणून लिंगाचा वियोग होताच तो प्राणत्याग करतो. आपले लिंगावर मुळी प्रेमच नसते, म्हणून लिंग हरवल्यावर आपण जिवंत राहतो. शिवकलायुक्त लिंग सद्गुरूने आपल्या हाती दिल्यापासून शिवाचे त्या लिंगात अखंड वास्तव्य असते. म्हणून इष्टलिंगात शिवाला आवाहन करण्याचे कारण नाही.

जीव जे काही कर्म करतो त्याला शिव साक्षी असतो. वीरशैवसिद्धान्तात अष्टावरणे सांगितली आहेत. गुरू, लिंग, जंगम, विभूती, रुद्राक्ष, मंत्र, पादोदक आणि प्रसाद ही आठ आवरणे आहेत. आवरण म्हणजे रक्षाकवच. थंडीपासून शरीराचा बचाव व्हावा म्हणून आपण अंगावर कपडे घालतो, स्वेटर घालतो, शाल पांघरतो आणि दुलईदेखील अंगावर घेतो. त्याप्रमाणे षड्रिपूपासून साधकाचे रक्षण करण्यासाठी आठ आवरणे सांगितली आहेत. गुरू हे पहिले आवरण. गुरू प्रथम रक्षण करतो. गुरू निरंतर आपल्यासोबत राहू शकत नाही. म्हणून आत्म्याची प्रतिकृती असे इष्टलिंग आपल्या हाती देतो. लिंग दिसायला लहान दिसते, परंतु त्याचे माहात्म्य महान आहे. जो ब्रह्मांडात व्याप्त आहे अशा शिवाला उपासनेसाठी छोट्या स्वरूपात आपल्या हातावर दिलेले आहे. त्यात शिवाचे वास्तव्य असल्यामुळे आपल्या शरीरावर ईश्वराचा निरंतर निवास असतो. शिव जेथे निरंतर राहतो त्याला मंदिर म्हणतात, म्हणून शरीर एक मंदिरच आहे. 'देहो देवालय: प्रोक्त:।' वीरशैवाचे शरीर म्हणजे एक चालते बोलते

शिवालयच. शिवालय सदैव पवित्र असायला हवे.

आह्वाननिरसनस्थल का सांगितले आहे? कारण शिवाचे वास्तव्य निरंतर आपल्या इष्टलिंगात असते आणि इष्टलिंग शरीरावर रुळत असते. त्यामुळे आपल्या हातून प्रमाद घडत नाही. एखाद्याला गुन्हा करायची इच्छा असेल तर तो चोरून-लपून करतो. करायचे आहे, परंतु कोणी पाहू नये अशी त्याची इच्छा असते. शाळेत मूले जातात शिकण्यासाठी, परंतु तेथे भांडणच जास्त करतात. त्या वयात भांडण्याची प्रवृत्तीच असते. शिक्षक येण्याआधी वर्गात गोंधळ चालू असतो. शिक्षक लपून राहिला आणि मुलांना तो आपल्याकडे पाहतो आहे हे माहीत नसेल तरी मुले भांडत असतात. परंतु शिक्षक उपस्थित झाला किंवा तो आपल्याकडे लपून पाहतो आहे ही जाणीव असली तरी मुले भांडत नाहीत. त्याप्रमाणे शरीरावर केवळ लिंग असले म्हणून माणूस सुधारत नाही तर त्याची जाणीव असेल तरच सुधारतो. वस्तूचे अस्तित्व असणे आणि वस्तूच्या अस्तित्वाची जाणीव असणे, या वेगवेगळ्या गोष्टी आहेत. म्हणून आचार्यांनी सांगितले आहे- धारयेदवधानेन शरीरे सर्वदा बुध:।।(६.५१)

शरीरावर अवधानपूर्वक लिंगधारण करावे. शरीरावर नुसते लिंग असून काय उपयोगाचे? त्याचे अवधान असले पाहिजे. आपल्या शरीरावर लिंग आहे याची जाणीवच काही लोकांना नसते. जाणीव नसेल तर लिंगधारी असूनही ते लिंगधारी नसतात. वस्तू जवळच असते आणि तिचा शोध घरभर घेतला जातो. शेवटी कळते की अरे, वस्तू तर आपल्याजवळच आहे! शरीरावर इष्टलिंग असूनही त्याची केवळ जाणीव नसल्यामुळे मनुष्य सदैव चुका करीत असतो. माणसांची नजर चुकवून गुन्हा करता येईल, परंतु ईश्वराची नजर चुकवणे कठीण आहे. कारण त्याचे नेत्र सदोदित उघडे असतात. म्हणून आपल्या शरीरावर भगवान शिवाचे वास्तव्य आहे हे अवधान, ही जाणीव सदैव ठेवली पाहिजे. आपण खरे बोलतो तेही तो ऐकतो आहे आणि खोटे बोलतो तेदेखील ऐकत आहे, याचे भान असले पाहिजे. ईश्वराच्या साक्षीने आपल्याला सत्यच बोलायला हवे, सत्कर्मेच करायला हवीत असा भाव माहेश्वराच्या मनात जागृत करण्यासाठी, त्याच्या हातून कधी प्रमाद घडू नयेत यासाठी आह्वाननिरसनस्थलाचे प्रतिपादन केलेले आहे.

**संस्कारेषु लिंगेषु सदा सन्निहित: शिव:।**
**तत्राह्वानं न कर्तव्यं प्रतिपत्तिविरोधकम्।।१०.४६।।**

जर आपण इष्टलिंगात रोज शिवाला आवाहन-विसर्जन करू लागलो तर आपली भक्ती वृद्धिंगत होणार नाही. साधकाच्या हृदयात भक्ती प्रत्येक क्षणी जागृत असली पाहिजे. सकाळी पूजेच्या वेळी ईश्वराला आवाहन केले आणि नंतर विसर्जन केले तर त्यानंतर दिवसभर आपला आणि ईश्वराचा काही संबंध उरत नाही. आपण काहीही करायला मोकळे. सदैव जागृत राहून पवित्र जीवन जगले पाहिजे आणि लिंगपूजा करता करता शेवटी लिंगस्वरूपच झाले पाहिजे. एखाद्या वीरशैवाचे देहावसान झाले तर त्याविषयी 'लिंगैक्य झाला' असा शब्दप्रयोग केला जातो. 'महाराज शिव झाले' असेही म्हणतात. याचा अर्थ लिंगात एकरूप झाला, शिवस्वरूप झाला असा होतो. त्याच्या देहावर लिंग असो-नसो, शब्दप्रयोग मात्र असाच केला जातो. अन्य संप्रदायांत 'वैकुंठवासी झाला' असे म्हणतात. आजपर्यंत जेवढी माणसे मृत्यू पावली त्यांच्याविषयी 'नरकवासी झाला' असे कोणी म्हटलेले नाही. 'स्वर्गवासी' म्हटले असेल. कितीही दुराचारी मनुष्य असो, त्याला भाषेने तरी स्वर्गातच पाठविले, नरकात नव्हे. तसे आपल्यात सगळेच 'लिंगैक्य' होतात.

असा शब्दप्रयोग का केला जातो? तर या मृत्युलोकात जन्म घेतल्यानंतर तुम्ही अशीच कर्मे करा की ज्यामुळे

स्वर्गात जाल, वैकुंठात जाल, अशी जाणीव करून देण्यासाठी. म्हणून ज्याच्या जवळ निरंतर लिंगभावना जागृत असते, माझ्या शरीरावर प्रत्यक्ष शिवाचे नित्य वास्तव्य आहे अशी जाणीव ज्याला असते, असा मनुष्य कधी बेहोष होत नाही. तो जे काही करतो, जगतो ते लिंगासाठी. ईश्वराला आवाहन आणि त्याचे विसर्जन रोज केले तर भक्ती कुंठित होते. म्हणून आचार्यांनी येथे आह्वाननिरसन केले आहे.

**नाह्वानं न विसर्गं च स्वेष्टलिंगे तु कारयेत्।**
**लिंगनिष्ठापरो नित्यमिती शास्त्रस्य निश्चयः।।१०.४७।।**

लिंगनिष्ठ भक्ताने लिंगात ईश्वराला आवाहन व त्याचे विसर्जन करू नये. कारण सद्गुरूने आधीच शिवाला आवाहन करून आपल्या हाती लिंग दिलेले आहे. त्यात शिवाचा नित्यनिवास आहे अशा भावनेने पूजा करावी. भावनेत मोठे सामर्थ्य असते. तिच्याद्वारा ईश्वराचा साक्षात्कार होतो. आपल्या मनात भाव नसेल तर प्रत्यक्ष ईश्वर समोर आला तरी आपला त्याच्यावर विश्वास बसणार नाही. 'भावनाविहितं कर्म पावनादपि पावनम्।'

'श्रीसिद्धान्तशिखामणी'त सांगितले आहे की, आपली कोणतीही कृती भावपूर्ण असावी. भावनेशिवाय केलेली क्रिया निष्फळ होते. कारण भावनेनेच सारे काही मिळणार आहे. यंत्रमानवाच्या हाती इष्टलिंग देऊन पूजापाठ, मंत्रजप यांत्रिक रीतीने करविले तर त्याचा काही उपयोग होईल काय? त्याप्रमाणे मनुष्याच्या हातावर लिंग आहे, तोंडाने मंत्रजप करतो आहे, हातातली रुद्राक्षमाळ फिरत आहे; परंतु मन भलीतकडेच गेले असेल तर? तर ती भावविहीन पूजा होय. यांत्रिक पूजा आहे. अशा पूजेने काहीही लाभ होणार नाही. भावना जागृत ठेवायची असेल तर ईश्वराचे सान्निध्य निरंतर मानावे लागते. ईश्वर समोर असेल तर भावना बहरते, समोर नसेल तर कोमेजून जाते.

मनुष्य काशीयात्रेला जातो. गंगास्नान करावे, भगवान विश्वनाथाचे दर्शन घ्यावे, माता अन्नपूर्णेची भेट घ्यावी या पवित्र इच्छेने. जाताना अनेक गावे पाहत पाहत, वस्तूंची खरेदी करीत जातो. विश्वनाथ मंदिरात गेल्यावर मात्र क्षणभरच त्याची भावना बहरून येते. ज्यासाठी आपण घरून निघालो तो हा क्षण. यात्रेचे सार्थक झाले. मंदिराबाहेर पडला की भावना संपली. पुन्हा या दुकानात, त्या दुकानात. हे घे, ते घे असे सुरू होते. भगवंतापासून दूर झाले की इतर विषयांचे चिंतन सुरू झालेच म्हणून समजावे. ईश्वरदर्शनाच्या आधी सामानाच्या खरेदीतच मनुष्य मग्न असतो. ईश्वराच्या अवतीभोवती असा मायाबाजार असतो की तो चटकन् तुम्हाला देवळातच जाऊ देत नाही. हे पाहा, ते पाहा. हे खरेदी करा, ते खरेदी करा. काही लोक तर याच कामात इतके मग्न होतात की ते जाईपर्यंत मंदिर बंद झालेले असते. त्याला देवदर्शन घेण्यासाठी वेळच नसतो. मग समाधान मानतो की, ईश्वरदर्शन नाही तर नाही, निदान त्याच्या दारापर्यंत तरी येऊन गेलो. मग बाहेरूनच नमस्कार करून खरेदी केलेल्या वस्तू सांभाळत स्वारी गावी परतते. ज्या उद्देशाने तो काशीला आला होता तो उद्देशच सफल होत नाही.

म्हणून मनुष्यजन्माचे प्रयोजन काय, याचा विचार प्रत्येकाने आपल्या मनाशी केला पाहिजे. ईश्वराने सर्व प्राणी निर्माण केले, परंतु ते सारे अज्ञानी होते. आपत्याला कोणी निर्माण केले? कशासाठी? याचे ज्ञान त्यांना नव्हते. म्हणून आपत्याला जाणणारा बुद्धिमान माणूस ईश्वराने घडवला. एखाद्या मनुष्याला दहा-बारा मुले आहेत, परंतु त्यांपैकी कोणी मुका आहे, कोणी बहिरा, कोणी आंधळा. असे सारे अपंग आहेत. एवढी मुले असूनदेखील माता-पित्याचे समाधान होत नाही. त्याप्रमाणे सर्व सृष्टी उत्पन्न करून देखील ईश्वराचे समाधान झाले नाही. आपल्याला जाणणारा, आपली पूजा करणारा, सत्संग करणारा त्यात कोणी नव्हता. म्हणून ईश्वराने माणूस

निर्माण केला. मग त्याचे समाधान झाले. त्याने विचार केला की, याला बुद्धी आहे, भावना आहे, याला शंभर वर्षे आयुष्य आपण दिले आहे, आज ना उद्या केव्हातरी हा आपली आठवण करील. परंतु मनुष्य त्याच्यापेक्षाही भारी ठरला.

एका संताला एका मनुष्याने विचारले, ''महाराज ईश्वर कोठे आहे?''

संत ईश्वराबद्दल सांगून सांगून 'बोअर' झाला होता. इतक्या लोकांना सांगून देखील कोणाच्या मनात कधी ज्ञानाचा उदय झाला नव्हता की भक्तीचा. केवळ आपल्या वाणीला शीण. म्हणून तो कंटाळलेला होता. अशा अवस्थेत एकाने वरील प्रश्न विचारला. त्यावेळी संत म्हणाला, ''ईश्वर जेलमध्ये आहे.''

''ईश्वराने असा कोणता गुन्हा केला की त्याला जेमध्ये जावे लागले?'' गृहस्थाने विचारले.

''ईश्वराने माणसाला निर्माण करून फार मोठा गुन्हा केला. म्हणून तो जेलची हवा खातोय.'' संताने उत्तर दिले.

ईश्वराने माणूस कशाला निर्माण केला? हेच माणूस विसरला आहे. म्हणून मनुष्य असूनदेखील तो पशूतच जमा आहे. ईश्वराचे नित्यनिरंतर अस्तित्व जाणणारा मनुष्यच असू शकतो. म्हणून मनुष्यजन्म अत्यंत दुर्लभ मानला जातो.

या प्रपंचात सारे काही सुलभ आहे. परंतु तीन गोष्टी दुर्लभ आहेत. एक मनुष्य होणे, दोन त्यात मनुष्यत्व असणे आणि तीन त्याला सत्संग मिळणे. मनुष्याकारात माणसे खूप असतात. पण माणुसकी असलेला हजारात एखादाच मनुष्य असतो, म्हणजे त्याच्यात मनुष्यत्व असते. अशा हजारात एखादा सत्संग करतो. त्यातल्या हजारात एखाद्याच्या डोक्यात प्रकाश पडतो. असे तत्त्व दुर्लभ आहे. म्हणून मनुष्याने हे तत्त्व जाणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यासाठीच आपल्या सिद्धान्तात भगवान शिवाची प्रतिकृती असे इष्टलिंग आपल्या हाती दिले आहे. त्यामध्ये एकदा ईश्वराला आवाहन केल्यानंतर त्याचे विसर्जन होत नाही. म्हणून आपल्या शरीरावर नित्यनिरंतर शिव नांदतो अशा भावनेने जो नित्यपूजा करतो त्यालाच शिवाचा साक्षात्कार होतो. भावना नसेल तर पूजेचे फळ मिळणे शक्य नाही. म्हणून क्रिया आणि भाव यांचा समन्वय करावा. भाव नसेल तर ईश्वर दूर आहे. तो कोठे राहतो, पार्वतीने असा प्रश्न केल्यावर शंकरांनी सांगितले:-

**मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि पार्वती।**

जेथे माझा भक्त भक्तिभावाने माझे भजन करतात तेथे मी राहतो. म्हणून इष्टलिंगाची याच भावनेने पूजा करावी. ते शरीरावर सदैव असावे. आपले शरीर म्हणजे मंदिर आहे अशा भावनेने जो वर्तन करतो त्याचे जीवन कृतार्थ होते, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

२९ ऑगस्ट १९९१

## अष्टमूर्तिनिरसनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

दर्शनशास्त्रात भगवत्तत्त्व सर्वत्र दाखविण्याची एक परंपरा आहे. भगवत्तत्त्व अन्यत्र नसून एकाच ठिकाणी आहे असे सांगणारीही दुसरी परंपरा आहे. भगवत्तत्त्व सर्वत्र आहे ही परंपरा माहेश्वरस्थलातील साधकाला विरोधी ठरते. म्हणून येथे तिचे निरसन केले आहे. भारतीय दर्शनशास्त्रात पृथ्वीपासून आत्म्यापर्यंत ईश्वराच्या आठ मूर्ती मानल्या जातात.

**पृथिव्याद्यष्टमूर्तित्वमीश्वरस्य प्रकीर्तितम्।**
**तदधिष्ठातृभावेन न साक्षादेकभावतः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.४९)

पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही पंचमहाभूते, सूर्य, चंद्र आणि आत्मा या ईश्वराच्या अष्टमूर्ती होत. अर्थात् या ईश्वराच्या आठ आकृती आहेत. आपल्या देशात जडाची पूजा होते आणि चैतन्याचीही पूजा होते. जड व चेतन यात ईश्वरत्व समान आहे हे दाखवण्यासाठी जडाची पूजा सांगितली आहे. ज्योतिर्लिंगे बारा आहेत. त्याप्रमाणे पंचमहाभूते ही पंचलिंगे मानली जातात. दक्षिण भारतात ही पाच भौतिक लिंगे प्रसिद्ध आहेत.

पृथ्वी, जल इत्यादींना ईश्वर मानणारी परंपरा का आहे? अत्यंत सूक्ष्म तत्त्व स्थूल दृष्टीच्या मनुष्याला समजावून सांगणे कठीण असते. जे आपल्या दृष्टीला दिसते त्यामध्ये प्रथम भगवत्तत्त्वाचे प्रतिपादन केले पाहिजे. जे स्थूल दृष्टीला दिसत नाही आणि ज्याचा साक्षात्कार होणे अवघड आहे त्यामध्ये भगवत्तत्त्व दाखवल्यावर लोकांना पटत नाही. पंचमहाभूते ही अनुभवगोचर आहेत. पृथ्वीवर आपण राहतो, जलामुळे आपले जीवन आहे, अग्नीमुळे आपण जिवंत आहोत, वायूमुळे आपण श्वसन करतो, आकाशात आपला निवास आहे, सूर्य, चंद्र आपल्याला प्रकाशमान करतात आणि आत्म्यामुळे सारे व्यवहार घडतात. स्थूलातील स्थूलात ईश्वर आहे असे सांगण्याची परंपरा यामुळे निर्माण झाली.

वर्षप्रतिपदेला चंद्राची कोर पाहिली तर ती जशी वृद्धिंगत होत जाते तसे आपले आयुष्य, विद्या, धन वृद्धिंगत होत जाते, असा एक समज आहे. ही प्रतिपदेची कोर अत्यंत सूक्ष्म, एखाद्या रेषेसारखी असती. ती दुसऱ्याला दाखवताना एखाद्या झाडाच्या फांदीसमोर 'तिच्या आसपास पाहा' असे सांगून दाखवावी लागते. यालाच 'शाखा चंद्रन्याय' म्हणतात. सूक्ष्म वस्तू दाखवण्यासाठी प्रथम स्थूल वस्तू दाखवावी लागते. त्याचप्रमाणे सर्वव्यापक चैतन्याला दाखवण्यासाठी प्रारंभिक अवस्थेत 'पृथ्वीच ईश्वर आहे' असे सांगावे लागते. म्हणून पृथ्वीची पूजा केली जाते. सकाळी अंगणात सडा घालून त्यावर रांगोळी घालतात. ही पृथ्वीचीच पूजा होय. सकाळी उठल्यानंतर बिछान्यावरून खाली जमिनीवर पाय ठेवण्याआधी पृथ्वीला नमस्कार करण्याची एक परंपरा आहे:-

**विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादाघातं सहस्व मे।**

पृथ्वी ही विष्णूची पत्नी आहे. तुला मी नमस्कार करतो, कारण आता दिवसभर तुझ्या अंगावर पाय ठेवून वावरायचे आहे, मला क्षमा कर. पृथ्वीत 'क्षमा' हा गुण आहे. म्हणून तिला 'क्षमया धरित्री' असे म्हणतात. ती

सारे काही सहन करते. पृथ्वीला भगवत्तत्त्व मानून तिची पूजा केली जाते. गंगादी नद्यांची अर्थात् जलाची पूजा करतात. स्वयंपाक करण्याआधी चुलीची पूजा करण्याची पद्धती होती. त्यानंतर अग्निपूजा करून स्वयंपाक केला जात असे. अगरबत्ती इत्यादी सुगंधी द्रव्य जाळून वायूची पूजा करतात आणि मौन धारण करणे हीच आकाशाची पूजा होय. शब्द हा आकाशाचा गुण आहे. म्हणून त्याला विश्रांती देण्यासाठी मौन धारण केले जाते. सूर्य-चंद्राची पूजा तर नित्य होत असते. आत्म्याची पूजाही आपण शरीरपोषण करून एक प्रकारे करीत असतो.

पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, सूर्य व आत्मा ही परमेश्वराची रूपेच आहेत. परंपरेने त्यांची पूजादेखील केली जाते. परंतु माहेश्वरस्थलातील साधकासाठी या अष्टमूर्तींच्या पूजेचा निषेध केलेला आहे. जर अष्टमूर्तींची पूजा त्याने केली तर त्याच्या लिंगनिष्ठेला बाधा येऊन त्याचे मन विचलित होण्याची शक्यता आहे. आठ ठिकाणी केली जाणारी पूजा जर मनोभावाने एकाच ठिकाणी केली तर पूजेचे फल लवकर मिळते. म्हणून माहेश्वरासाठी आचार्य सांगतात की, पृथ्वी आदी अष्टमूर्ती म्हणजे साक्षात् शिव नव्हे तर त्या ठिकाणी शिव अधिष्ठातृभावाने वास्तव्य करतो. पृथ्वी ईश्वर नव्हे, तर पृथ्वीत ईश्वर आहे. अशा प्रकारे अष्टमूर्तीत ईश्वराचे अधिष्ठान आहे. शिवालयात गेल्यावर शिवलिंगाचे पूजन हे मुख्य कर्म आहे. परंतु मंदिरात प्रवेश करण्याआधी आपण पायरीला नमस्कार करतो. नंतर मंदिराभोवती प्रदक्षिणा घालतो. मंदिराच्या भिंतीला नमस्कार करतो. मंदिराच्या भिंतीला पाय लागला तरी आपण चूक झाली या भावनेने नमस्कार करतो. घराच्या भिंतीला पाय लागला तर नमस्कार का करीत नाही? एवढेच नव्हे तर काही लोक राग आल्यावर इतरांना मारता येत नाही म्हणून घरातल्या भिंतीवर लाथा घालतात. मंदिर आणि घर यांत अंतर कोणते? तर मंदिरात शिवाचा निवास असतो आणि घरात जीवाचा. ईश्वराच्या वास्तव्यामुळे मंदिरदेखील ईश्वरासारखे पूज्य, वंदनीय मानले जाते. त्याचप्रकारे पृथ्वी, जल, वायू, अग्नी, आकाश, सूर्य व चंद्र यांच्यात ईश्वराचे अधिष्ठान आहे म्हणून ते पूज्य आहेत. परंतु ते प्रत्यक्ष ईश्वर नव्हेत.

प्रपंच हे कार्य आहे, त्यावरूनच आपण त्याच्या कारणाचे अनुमान करीत असतो. अनुमान हे असे प्रमाण आहे की वस्तू प्रत्यक्ष दिसत नसली तरी तिचे ज्ञान आपण मिळवू शकतो. अरण्यात धुरांचा लोट दिसला तर तेथे अग्नी आहे असे आपण अनुमान करतो. अग्नी आपल्या दृष्टीला दिसत नाही. तरी 'यत्र यत्र धूमः तत्र तत्र वन्हिः।' म्हणजे जेथे धूर असतो तेथे अग्नी असतो, या न्यायाने आपल्याला त्याचे ज्ञान होते. याला आधार कोणता? तर आपले स्वयंपाकघर. अलीकडे धूर नसलेल्या चुली म्हणजे स्टोव्ह, गॅस इत्यादीमुळे हे विधान थोडे बदलावे लागेल. परंतु चूल जेव्हा लाकडे घालून पेटवतात तेव्हा तेथे हमखास धूर असतो. म्हणून धूर तेथे अग्नी असलाच पाहिजे. घरातला हा अनुभव अरण्यात उपयोगी पडतो. धूर हे कार्य आणि अग्नी हे कारण. अग्नी नसेल तर धूर राहणार नाही. त्याप्रमाणे एवढा विशाल प्रपंच हे कार्य असेल तर त्याचे कारणदेखील असलेच पाहिजे, असे अनुमान-प्रमाणाने सिद्ध होते. कारणाशिवाय कार्य कधी होत नाही. टेबल-खुर्च्या झाडामधून तयार होऊन पडत नाहीत. त्यांची निर्मिती करणारा कोणीतरी सुतार असतो. म्हणून एवढे महान ब्रह्मांड निर्माण करणारा कोणीतरी विलक्षण निर्माता असला पाहिजे. तो आपल्यापेक्षा महान आहे. आपण पृथ्वी निर्माण करू शकत नाही. वायू, अग्नी, आकाश निर्मू शकत नाही. फार तर दगडमाती घेऊन एखादे घर, मंदिर निर्माण करू शकतो. परंतु दगड-माती आपण निर्माण करीत नाही. म्हणून पृथ्वी, वायू इत्यादी ईश्वर का नाहीत? कारण ते एक कार्य आहे. कार्य

करणारा त्यापेक्षा विलक्षण आहे. वस्त्रे आणि वस्त्रे निर्माण करणारा विणकर हे वेगळे असतात. टेबल-खुर्ची आणि ते घडविणारा सुतार हे वेगळे असतात. त्याप्रमाणे पृथ्वी आदी पंचभूते आणि त्यांची निर्मिती करणारा हे वेगळे आहेत. घट आणि कुंभार यांच्यात भिन्नत्व असते. त्याप्रमाणे पृथ्वी आदी पंचमहाभूते आणि सूर्य-चंद्र हे त्यांच्या निर्मात्यापासून-ईश्वरापासून भिन्न असतात.

पृथ्वी आदी अष्टतत्त्वे मग ईश्वराची काय आहेत? तर ती त्याची शरीरे आहेत. शरीर आणि आत्मा हे वेगळे असतात. त्याप्रमाणे पृथ्वी आदी तत्त्वे आणि ईश्वर यांचा संबंध असून ते परस्परांपासून भिन्न आहेत.

**शरीरभूतादेतस्मात् प्रपंचात् परमेष्ठिनः।**
**आत्मभूतस्य देवस्य नाभेदो न पृथक्स्थितिः।।१०.५२।।**

शरीर व आत्मा एक प्रकारे भिन्न आणि एक प्रकारे अभिन्नदेखील आहेत. शरीर आत्मा नव्हे आणि आत्मा शरीर नव्हे. परंतु शरीराशिवाय आत्म्याला प्रकट होता येत नाही. जीवात्म्याचे सारे व्यवहार शरीराद्वारेच घडतात. म्हणून पृथ्वी आदी अष्टतत्त्वे आणि ईश्वर हे भिन्न आहेत आणि अभिन्नदेखील आहेत. अर्थात् त्यांच्यात भेदाभेद आहे. ते साक्षात् शिवस्वरूप नाहीत.

येथे एक प्रश्न उपस्थित होऊ शकतो. पृथ्वी आदी पंचमहाभूते आणि सूर्य व चंद्र ही सात तत्त्वे ईश्वरापासून भिन्न आहेत हे पटू शकते. परंतु आत्मा हा तर ईश्वरांश आहे, तो ईश्वरापासून भिन्न कसा असेल?

**अचेतनत्वात् पृथ्व्यादेरज्ञत्वादात्मनस्तथा।**
**सर्वज्ञस्य महेशस्य नैकरूपत्वमिष्यते।।१०.५३।।**

जे चेतन असते ते स्पष्टपणे प्रतीत होत नसते. जीवात्म्यात जसे चैतन्य अभिव्यक्त होते तसे ते पृथ्वीत होत नाही. सामान्यतः पृथ्वी जड मानली जाते. यद्यपि तिच्यात देखील चैतन्य आहे, परंतु ते गूढ असल्यामुळे त्याची प्रचीती येत नाही. म्हणून आपण पृथ्वीला जड मानतो. याचप्रकारे अन्य महाभूतांना जड मानतो. परमात्मा चेतन आहे आणि पृथ्वी आदी महाभूते अचेतन आहेत. चेतन आणि अचेतन यांच्यात सामरस्य असू शकत नाही. पाण्यात पाणी मिसळते. दुधात दूध मिसळते. परंतु दोन भिन्न वस्तू समरस होऊ शकत नाहीत. दुधात पाणी मिसळले तरी दूध व पाणी वेगळे करता येते. हंसपक्षी दूध व पाणी वेगळे करतो असे म्हणतात. हंसपक्षी आज सापडणार नाही. परंतु दुधात थोडे मीठ टाकले किंवा लिंबू पिळले तरी दूध आणि पाणी वेगळे करता येईल. म्हणून दोन भिन्न वस्तू वरवर पाहता मिसळलेल्या दिसल्या तरी त्या एकरूप होत नाहीत. वेगळ्या करता येतात. पृथ्वी आदी महाभूते आणि परमात्मा हे समरस होऊ शकत नाहीत. जड असल्यामुळे पृथ्वी आदी परमात्मा नाहीत.

आता प्रश्न राहिला आत्म्याचा. आत्मा तर चेतन आहे. महावाक्यात तर आत्म्यालाच परमात्मा म्हटले आहे. 'तत्त्वमसि श्वेतकेतो।' अर्थात् तूच ब्रह्म आहेस, तूच परमात्मा आहेस. मग आत्मा परमात्मा का नाही? तर जीवात्मा अज्ञ आहे आणि परमात्मा सर्वज्ञ आहे. अज्ञ याचा व्यावहारिक अर्थ येथे अभिप्रेत नाही. कोणताही मनुष्य स्वतःला अज्ञ समजायला तयार नसतो. परंतु प्रत्येकाच्या आत अज्ञान निरंतर वास करते. एखाद्याला वडिलाचे नाव विचारले तर तो सांगू शकेल. मग पुढचा प्रश्न आजोबाचे नाव काय? तो सांगेल. पणजोबाचे नाव काय? खापरपणजोबाचे नाव काय? त्याला सांगता येईल परंतु त्यापुढे विचारत राहिलो तर त्याला सांगता यायचे नाही. त्याला सांगता येत नाही याचा अर्थ त्याला त्याचे ज्ञान नाही म्हणजेच अज्ञान आहे, असे अन्य कोणत्याही

विषयाबद्दल विचारीत राहिलो तर केव्हा ना केव्हातरी स्वत:चे अज्ञान मान्य करावे लागते. बरेच लोक स्वत:ला अज्ञानी मानत नाहीत. परंतु केव्हातरी त्यांचे अज्ञान सिद्ध होते. आपण समोरच्या व्यक्तीला पाहू शकतो. परंतु आपल्या पाठीमागे कोण आहे त्याला पाहू शकत नाही. अर्थात् आपल्या पाठीमागचा परिसर आपल्यासाठी अज्ञातच असतो. इंद्रियापुढे जो विषय येतो त्याचे ज्ञान आपल्याला होते. इंद्रियापलीकडे जे आहे त्याचे ज्ञान सामान्य माणसाच्या कुवतीपलीकडे आहे. योगीपुरुषांना अतींद्रिय वस्तूंचे ज्ञान होऊ शकते. दृष्टी जेथपर्यंत पोहोचते तेवढे ज्ञान आपल्याला मिळते. दृष्टीपलीकडे जे आहे ते ज्ञात होत नाही. काही साधना केल्यानंतर ते होऊ शकेल. योगीपुरुषांना तर पूर्वजन्माचे देखील ज्ञान होते. बौद्धांच्या परिभाषेत या ज्ञानाला 'जातिस्मरण' म्हणतात. धारणशक्तीला मागे मागे ढकलत नेले तर पूर्वजन्माचे ज्ञान होणे अशक्य नाही.

सकाळपासून आपण सतत कर्मे करीत असतो. संध्याकाळी जर कोणी आपल्याला विचारले की, तुम्ही सकाळपासून काय काम केले? तर क्षणभर स्तब्ध राहून आपण स्मरण करतो, नंतर सांगतो की, सकाळी उठून ईश्वराला नमस्कार केला किंवा कोणाला शिवी दिली इत्यादी. समजा विचारले, काल सकाळी उठल्यावर काय केले? परवा सकाळी उठल्यावर काय केले? असे कोणी विचारीत गेला तर चार-पाच दिवसांच्या पलीकडे आपण काही सांगू शकणार नाही. एवढेच सांगू की, आता काही आठवत नाही. याच जन्मात पाच-सहा दिवसांपूर्वीचे स्मरण आपल्याला राहत नाही. कारण आपण सारखे विसरत जातो. आपल्या बुद्धीवर अज्ञानाचे आवरण असते. ते सारखे आपल्या स्मरणाला झाकून टाकत असते. बुद्धीवर अज्ञानाचे पटल असल्यामुळेच प्रत्येक जीवात्मा अज्ञ आहे, अज्ञानी आहे असे म्हटले जाते. या जन्मातलेच ज्ञान त्याला नसते तर पूर्वजन्माचे, त्याच्या पूर्वजन्माचे त्याला ज्ञान कसे असेल? म्हणून जीवात्मा अज्ञ आहे.

जीवात्मा हा परमात्मा का नाही? तर तो अज्ञ असल्यामुळे. अज्ञ जीवात्मा आणि सर्वज्ञ परमात्मा हे एकरूप असत नाहीत. परमात्म्यात समरस होण्यासाठी जीवात्म्याला सर्वज्ञ व्हायला हवे. सर्वज्ञ परमात्माच अल्पज्ञ होऊन जीवात्मा झाला, असे सिद्धान्त सांगतो. बल्बचा प्रकाश सर्वदूर पसरतो, परंतु त्यावर एखादे भांडे झाकले तर? त्याचा प्रकाश फक्त भांड्यापुरता सीमित होईल. त्याप्रमाणे सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व हे भाव आणवादी मलांनी आवृत्त झाल्यामुळे सर्वज्ञ आत्मा अल्पज्ञ झाला, सर्वकर्ता ईश्वर अल्पकर्ता झाला. आपल याला सारे ज्ञान नाही, आपण सारे काही करू शकत नाही. जेवढी आपली बुद्धी तेवढे आपले ज्ञान. जेवढी आपली शक्ती तेवढचे आपले कार्य. स्वत:च्या मनात काय आहे हे आपण थोडे जाणू शकतो. इतरांच्या मनात काय आहे ते जाणता येत नाही. एखाद्या मनुष्याने थोडी साधना केली तर तो फार तर काही लोकांच्या मनात काय चालले आहे ते जाणू शकेल. परंतु सर्वांच्या मनातले भाव जाणू शकत नाही. परमात्मा मात्र सर्वज्ञ असल्याने जाणू शकतो. एकाच वेळी हजारो भक्तांनी प्रार्थना केली तरी ती ईश्वर जाणतो. कबीरांनी म्हटले आहे:-

**मुल्ला हो के बाँग पुकारे अल्ला तो क्या बहरा है?।**
**मुंगीके पाव घुंगरु बजे वो भी अल्ला सुनता है।।**

यांचे तात्पर्य असे की, कितीही हळुवारपणे तुम्ही ईश्वराशी संवाद केला तरी तो ऐकू शकतो, त्यासाठी ओरडण्याची जरुरी नाही. तो सर्वांतर्यामी आहे, सर्वज्ञ आहे. तो सर्वत्र आहे.

**'यत्र यत्र जीव: तत्र तत्र शिव:।'**

जेथे जीव आहे तेथे शिव आहे. उपनिषदांत म्हटले आहे:-

द्वा सुपर्णा सयुजा सखाया
समानवृक्षं परिषस्वजाते।
तयोरन्य: पिप्पलं स्वाद्वत्ति
अनश्नन्नन्योऽभिचाकशीति।।

जीवात्मा आणि परमात्मा अनादिकालापासून मित्र आहेत. त्यांच्यात कृष्णार्जुनाप्रमाणे सख्यभाव आहे. जो सखा असतो तो सुखदु:खात संगत करतो. जीवात्म्याचा खरा सखा परमात्माच आहे. जीव जीवाचा सखा होतो ते स्वार्थासाठी. 'आत्मानस्तु कामाय सर्वं प्रियं भवति।' बृहदारण्यकोपषिदात याज्ञवल्क्य महर्षी सांगतात, प्रपंचातील प्रेमव्यवहार स्वार्थमूलक असतो. नि:स्वार्थ प्रेम कोणी कोणावर करीत नाही. ईश्वराचे प्रेम मात्र नि:स्वार्थ असते. आपल्याकडून त्याला काहीच नको आहे. तुम्ही पूजा केली नाही म्हणून त्याची पूजा होत नाही असे नाही. तुम्ही नैवेद्य दाखविला नाही म्हणून तो उपाशी राहत नाही. तो नित्यतृप्त आहे. त्याला नैवेद्य दाखवायचा तो त्याच्यासाठी नव्हे तर आपल्यासाठी. आपल्या मनाच्या प्रसन्नतेसाठी आपण त्याला नैवेद्य दाखवतो. ईश्वर त्यातले काही खात नाही. 'तुझ्याकडे हात माझ्याकडे भात' अशी मराठीत म्हण आहे. हाताने ईश्वराला नैवेद्य दाखवायचा. नैवेद्य खाणारे दात मात्र आपल्याजवळ असतात. ईश्वराला तुमचा भात नको, भाव हवा. त्याला तुमच्याकडून काही नको, तुम्हालाच त्याच्याकडून काही हवे असते. ईश्वरचिंतन करून तुम्ही कर्म करीत राहिलात तर तुम्हाला काही कमी पडत नाही.

एकदा गुरूने शिष्याला उपदेश केला, ''ईश्वर हाच तुझा खरा सोबती आहे. त्याचे निष्ठेने भजन कर, चिंतन कर. त्यामुळे तुला काही कमी पडणार नाही. स्वत:च्या खाण्यापिण्याचीही काळजी करू नकोस.''

शिष्य एका मंदिरात जाऊन भजन करीत बसला. एक दिवस गेला, दोन दिवस गेले. तिसरा दिवस उजाडला. पोटात भुकेची आग पेटली. तरी गुरुवचनावर विश्वास ठेवून त्याने भजन सुरूच ठेवले. गावातल्या लोकांनी त्याची अवस्था पाहिली. काही जण त्याच्याकडे जेवण घेऊन गेले. त्याला जेवू घातले. लोकही मोठे हुशार असतात. आपल्याकडून भजन-पूजन होत नाही, हा बिचारा भजन करतोय तर निदान त्याला अन्नपाणी देऊन त्याचे थोडे पुण्य आपल्या पदरात पडावे अशा उद्देशाने ते त्याला जेवण देऊ लागले.

गावातल्या एका मनुष्याच्या घरी काही ग्रहपीडा होती. तिच्या शांतीसाठी एका ज्योतिषाला त्याने विचारले. तेव्हा ज्योतिषी म्हणाला, ''ग्रहशांतीसाठी एखादे कांबळे किंवा बकरी दान कर. त्यातही निर्जीव कांबळ्यापेक्षा सजीव बकरीचे दान जास्त योग्य. ज्याच्याजवळ काही नाही अशाला दान करणे फलदायक असते.''

त्या गृहस्थाला वाटले की मंदिरात भजन करणाऱ्या महाराजाजवळ काहीच नाही. तोच दानाला जास्त योग्य आहे. म्हणून त्याने महाराजांना बकरी अर्पण केली. आतापर्यंत त्याच्याजवळ संसाराची काहीच सामग्री नव्हती. फक्त ईश्वर आणि तो दोघेच होते. आता दोघांमध्ये एक बकरी आली. हा पूजेला बसला की बकरी ओरडायची. तिला भूक लागायची, तहान लागायची. लोक महाराजांना जेवण आणून द्यायचे. परंतु बकरीच्या चाऱ्यासाठी महाराजांना फिरावे लागे. थोडे गवत आणायचे, पाणी पाजायचे यात त्याचा वेळ जाऊ लागला. पुढे तर बकरी मोठी होत गेली तेव्हा तिला जास्त खायला लागायचे. हळूहळू महाराज बकरीचीच सेवा करू लागले, ईश्वराची सेवा थांबली. बकरीवर त्यांचे प्रेम बसले. गृहस्थाला मुलाबद्दल प्रेम वाटते त्याप्रमाणे.

एके दिवशी तो पूजेला बसला आणि बकरी पळून गेली. 'माझी बकरी, माझी बकरी' म्हणत तो सर्वत्र शोध

घेऊ लागला. त्याला अनिवार दुःख झाले. 'बकरी बकरी' म्हणत धावताना त्याचे गुरू समोरून आले. त्यांनी त्याची अवस्था पाहिली म्हणाले, ''अरे, तुला ती मी ईश्वराचा सखा व्हायला सांगितले होते. तू तर बकरीचा सखा झालास!''

बकरी पळून जाऊ शकते आणि मरू शकते. परंतु ईश्वर मात्र कधी पळून जात नाही आणि मरत देखील नाही. म्हणून आपला खरा सखा ईश्वरच आहे. 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया'. एका वृक्षावर दोन पक्षी बसलेले आहेत. एक पक्षी फळ खात आहे तर दुसरा त्याला प्रकाशित करतो आहे. फळ खाणारा पक्षी म्हणजे जीवात्मा आहे तसाच परमात्मादेखील आहे. तो सर्वज्ञ असल्याने जीवात्म्याची प्रार्थना ऐकून त्याची पूर्ती करतो. जीवात्मा हा शरीरापुरता मर्यादित आहे. म्हणून तो अज्ञ, अल्पज्ञ आहे. अल्पज्ञ जीव आणि सर्वज्ञ ईश्वर, अल्पकर्ता जीव आणि सर्वकर्ता ईश्वर यांच्यात अभेद असू शकत नाही. जीवाचे अल्पज्ञत्व, अल्पकर्तृत्व नष्ट झाले की तो जीव राहत नाही तर शिव होतो.

ही स्थिती माहेश्वरासाठी अजून दूर आहे. कारण तो दुसऱ्या पायरीवरच आहे. अजून त्याला चार पायऱ्या चढायच्या आहेत. तो परमात्म्याशी समरस होऊ शकत नाही. म्हणनू येथे सांगितले आहे की, पृथ्वी आदी सात तत्त्वे अचेतन असल्यामुळे आणि जीव हा अल्पज्ञ असल्यामुळे ही आठ तत्त्वे ईश्वर नाहीत. परमात्मा या पलीकडचा आहे. या तत्त्वांत परमात्म्याचे अधिष्ठान आहे. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, सूर्य, चंद्र व आत्मा या अष्टमूर्तीपेक्षा परमात्मा भिन्न आहे असे मानणाऱ्या माहेश्वराला 'अष्टमूर्तिनिरासक' म्हटले जाते. पुढे पृथ्वी आदी ईश्वररूप आहेत हे सांगणार आहेत. परंतु हातावरील इष्टलिंग जोपर्यंत ईश्वररूप दिसत नाही, तोपर्यंत सर्व ब्रह्मांड ईश्वररूप दिसणार नाही. ज्याला इष्टलिंगात देव पाहता येत नाही त्याला ब्रह्मांडात ईश्वर कसा पाहता येईल? म्हणून प्रथम इष्टलिंगातच ईश्वर आहे अशी दृढ भावना झाल्यानंतर मग तिचा परीघ वाढत जातो. मंदिरातल्या शिवलिंगात आपण प्रथम ईश्वर पाहतो, नंतर मंदिर पूज्य मानतो. ज्या गावात मंदिर आहे ते गाव, मग प्रदेश, मग देश आणि विश्व हे सारे ईश्वररूप दिसू लागते. काशीला आपण पवित्र मानतो. कारण तेथे भगवान विश्वेश्वराचे नित्य वास्तव्य असते. सीमित भावना विकसित होत गेली की पूर्ण ब्रह्मांड ईश्वररूप दिसू लागते. परंतु त्याआधी ही भावना एकाच ठिकाणी स्थिर करणे आवश्यक असते. ईश्वर इतरत्र कोठेही नाही, तो फक्त इष्टलिंगातच आहे या भावनेचे दृढीकरण करण्यासाठीच आचार्यांनी अष्टमूर्तिनिरसनस्थलाचे प्रतिपादन केले आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
३० ऑगस्ट १९९१



आशीर्वचन तेरावे

## सर्वगतनिरसनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

ईश्वर प्रपंच व जीवात्मा यांच्यापासून वेगळा आहे, हे आपण काल ऐकले. कर्नाटकातील एक संत निजगुणशिवयोगी म्हणतात:-

**आज्ञानीयल्लवे जीवने निनगे सुज्ञानि यंदु नुडिवरे**

जीव हा परमात्म्याचाच एक अंश आहे. 'तदंशो जीव नामक:।' गीतेत म्हटले आहे, 'ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।' प्रत्येक जीव हा परमात्म्याचा अंश आहे. अग्नीपासून ठिणग्या निघतात त्या अग्निरूपच असतात. परंतु चुलीतल्या अग्नीत प्रकाश आणि दाहकता अधिक असते. त्यावर स्वयंपाक करता येतो, पाणी तापवता येते. परंतु ठिणगीवर स्वयंपाक करता येत नाही, पाणीही तापवता येत नाही, तिच्या प्रकाशात काही पाहता येत नाही. स्वत:ला प्रकाशित करण्याइतकाच प्रकाश ठिणगीत असतो. म्हणून ठिणगी अग्नीचा अंश आहे. तिला पूर्ण ज्ञान नाही, केवळ स्वत:चे ज्ञान आहे. ठिणगी शेवटी अग्नीचाच अंश असते, त्याप्रमाणे जीव हादेखील परमात्म्याचाच अंश असतो. मात्र तो स्वत:ला परमात्म्याचा अंश समजत नाही. गुरूने 'तत्त्वमसि' या महावाक्याचा 'तूच ब्रह्म आहेस' असा उपदेश केल्यानंतर देखील जीव विचारतो, 'मी ब्रह्म कसा? मी परमात्मा असा असेन?' ही त्याच्या मनातील विपरीत भावनाच होय. असंभव व विपरीत भावनेमुळे जीव अज्ञ आहे. स्वत:चे चैतन्यरूप विसरून जडदेहातच तो अहंता धारण करतो.

मी जातो, मी येतो, मी खातो ही व्यवहारातील भाषा आणि वर्तन शरीराच्या माध्यमातून घडते. तुम्ही देता, तुम्ही खाता हे हाताचे कर्तव्य. तुम्ही जाता, येता हे पायांर्च कर्तव्य. परंतु तुम्ही पाय नाही, त्यापासून वेगळे आहात. डोळे पाहण्याचे कार्य करतात. परंतु तुम्ही डोळे नाही, त्यापेक्षा वेगळे आहात. शरीराशी तादात्म्य होऊन जीवात्मा व्यवहार करतो. आरशापुढे जाऊन माणूस आपले रूप पाहतो. ते रूप म्हणजेच आपण, अशी भावना त्याच्या मनात असते. या रूपापेक्षा आपण वेगळे आहोत हा भाव त्याच्या मनात लवकर उत्पन्न होत नाही. शरीरापेक्षा मी वेगळा आहे हे बुद्धीने तो जाणतो, परंतु तशी अनुभूती मात्र त्याला येत नाही. शरीराशी नित्य संबंध असल्याने तो स्वत:ला शरीरच समजून बसतो. म्हणून सांगतातः-

**चैतन्यमयनागिर्दु जडपंचभूतदेहविदनीनेंबे**

वस्तुतः तुम्ही चिद्रुप आहात. परंतु जडशरीरात तुम्ही अहंबुद्धी ठेवता, म्हणून तुम्हाला अज्ञ म्हटले जाते. तुमचा आत्मा अत्यंत पवित्र, शुद्ध आहे. तरी विटाळलो असे मानून तुम्ही सूतक पाळता. जनन, मरण, रज, जाती आणि उच्छिष्ट ही पंचसूतके पाळता. सुतकांचा संबंध शरीराशी आहे, आत्म्याशी नव्हे. जन्म होणे, मृत्यू पावणे , रज:स्वला होणे हे सारे शरीराचे धर्म आहेत. शरीर सुतकी झाले की जीवात्मा स्वत:ला सुतकी समजतो. शरीर आहे म्हणून सूतक आहे. शरीर सुटले की या लोकातले सारे संबंध तुटतात. शरीरात असेपर्यंत जीवात्म्याचा अनेकांशी संबंध येतो. परंतु शरीराचे पतन झाले की या लोकांचे संबध तुटले. एखाद्याचा गेलेला प्राण परत आला

तर लोक त्याला पुन्हा स्वीकारत नाहीत, त्याला भूत समजतात, भितात. पाच मिनिटांसाठी एकदा जाऊन प्राण परत आला तर त्यावर विश्वास ठेवला जात नाही. असा कायमचा संबंधविच्छेद होतो. हे सारे संबंध शरीरासाठी, शरीराशी असतात.

परलोकाचा संबंध सूक्ष्मशरीराशी असतो. आपल्या शरीरात एक सूक्ष्मशरीर असते. या जड शरीराला वाहणारे, इकडे तिकडे नेणारे सूक्ष्मशरीरच असते. पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये, पंचप्राण, मन, बुद्धी, चित्त, अहंकार हे सारे सूक्ष्मशरीरात असतात. जीव जड शरीर सोडतो तेव्हा ही सारी सामग्री सोबत नेतो, शरीराकृती मात्र येथेच सोडून जातो. जन्मजन्मांतरांतील पुण्य-पापांचा संचय स्थूलशरीरात नसतो तर सूक्ष्मशरीरात असतो. या जन्मातली पापपुण्याची कमाई सूक्ष्मशरीरात संग्रहित होते. त्याशिवाय जे काही असते ते तेथेच राहते. म्हणून सुभाषितकार म्हणतो:-

**धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे नारी गृहद्वारि जना: स्मशाने।**
**देहश्चितायां परलोकमार्गे धर्मानुगो गच्छति जीव एक:।।**

इहलोक सोडताना जीवात्म्याचे सांगाती कोण असतात? भूमीत गाडलेले धन भूमीतच राहते, गोठ्यातली गुरे गोठ्यातच राहतात. बंधु-मित्र स्मशानापर्यंत येतात. जिवंत असताना त्याने पापपुण्याची जी कमाई केली तीच फक्त त्याच्या सोबत जाते. या पापपुण्याचा संचय सूक्ष्मशरीरात होतो. नंतर तो जीव अन्य लोकांत जातो अथवा पुन्हा जन्म घेऊन सुखदु:खे भोगतो. स्थूल आणि सूक्ष्म या दोन शरीरांपलीकडे जे तत्त्व तो आत्मा होय. आत्मा म्हणजे स्थूल शरीर नव्हे. अज्ञानरूप असे आणखी एक कारणशरीर असते असे सांगतात. या तिन्ही शरीरांपेक्षा वेगळा जो आहे तो आत्मा होय. जीवाला दूरदृष्टी नसल्यामुळे तो स्वत:ला स्थूलशरीर समजतो. फार तर सूक्ष्मशरीर समजतो, परंतु आपण आत्मा आहोत हे ज्ञान त्याच्या ठिकाणी नसते. म्हणून जीवात्म्याला अज्ञ म्हटले जाते.

अज्ञ जीव जोपर्यंत सुज्ञ होत नाही तोपर्यंत तो परमात्मस्वरूप होत नाही. सर्वज्ञ परमात्मा आणि अल्पज्ञ जीवात्मा यांचे तोपर्यंत सामरस्य होऊ शकत नाही. म्हणून अष्टमूर्तिनिरसनस्थलात पृथ्वी आदी पंचमहाभूते, सूर्य व चंद्र हे जसे जड असल्यामुळे परमात्म्यापासून भिन्न आहेत तसाच जीवात्मादेखील अज्ञ असल्यामुळे परमात्म्यापासून भिन्न आहे, असे सांगितलेले आहे. हे जाणून आपल्या इष्टलिंगातच शिव आहे अशा भावनेने त्याचे पूजन करावे, असे आचार्य सांगतात. यानंतरचे स्थल म्हणजे सर्वगतनिरसनस्थल. ईश्वर कोठे आहे? एकदा कबीराचा मुलगा कमाल याने पित्याला विचारले, ''आपण सदैव रामनामाचा जप करता तो राम कोठे आहे?''

कबीर म्हणाले, ''राम सर्वत्र आहे. कण कण में हैं भगवान.''

ईश्वर सर्वत्र आहे. ईश्वर आधार आहे आणि प्रपंच आधेय आहे. आम्ही या व्यासपीठावर बसलो आहोत. व्यासपीठ हा आधार आहे आणि आम्ही आधेय आहोत, तसे सर्व विश्व परमात्म्यात निहित आहे. परमेश्वर व्यापक, महान आहे. 'यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति।'

वेदान्तात परमात्म्याला 'ब्रह्म' म्हटले जाते. जे सर्वांत मोठे, व्यापक आहे ते 'ब्रह्म' होय. जे सर्वांत मोठे असते ते सर्वव्यापक असते. ते सर्वांत असते. म्हणून प्रत्येक कणात परमात्म्याचा निवास आहे, असे कबीर म्हणाले. तेव्हा कमालच्या मनात एक प्रश्न उद्भवला. 'जर सर्वत्र परमात्मा असेल तर शौचासाठी जागा कोणती?' एका लहान मुलाच्या मनातला हा प्रश्न आहे. कबीरांनी त्याचे विलक्षण उत्तर दिले. ते म्हणाले, ''ज्याच्या मुखात

रामनाम नाही ही ती जागा होय.'' जिथे ईश्वराचे नामस्मरण होत नाही तीच अपवित्र जागा होय. असे कबीरांना म्हणायचे आहे. कबीराचे विधान मनुष्याला नामस्मरणाला प्रवृत्त करणारे आहे.

'ईश्वर कोठे आहे?' असा प्रश्न विचारणाऱ्याला 'ईश्वर कोठे नाही?' असा प्रतिप्रश्न विचारता येतो. अर्थात् ईश्वर सर्वव्यापक आहे. सर्व शास्त्रे हेच सांगतात. परंतु आपल्या आचार्यांनी ईश्वराला सर्वत्र पाहण्याच्या अगोदर त्याला प्रारंभी एकाच ठिकाणी पाहण्याविषयी उपदेश केला आहे:-

**सर्वगत्वे महेशस्य सर्वत्राराधनं भवेत्।**
**न लिंगमात्रे तन्निष्ठो न शिवं सर्वगं स्मरेत्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.५५)

माहेश्वराने आपले इष्टलिंगच शिवस्वरूप मानले पाहिजे. त्याच्याशिवाय अन्यत्र शिव आहे असे मानू नये. जर ईश्वराला सर्वव्यापक मानले तर तुम्ही पूजा कशाची कराल? तुम्हाला चालणे फिरणे अवघड होऊन जाईल. जर एखादा मनुष्य मंदिरात शिवलिंगाकडे पाय पसरून बसला तर आपण त्याला हटकतो, 'अरे तिथे देव आहे. पाय कशाला पसरतोस?' म्हणजे मूर्तीत देव आहे आणि बाहेर नाही काय? आहे, पण सर्वत्र तो अव्यक्त आहे आणि मूर्तीत आपण ईश्वर पाहू शकतो, अन्यत्र पाहणे अवघड आहे. पूजाक्रिया ही एकाच ठिकाणी आणि एकाच दिशेने झाली पाहिजे. तरच ती फलप्रद होते. अनेक ठिकाणी ती होत असेल तर फलप्रद होणार नाही. म्हणून ईश्वर सर्वत्र आहे असे मानले तर पूजा सर्व ठिकाणी करावी लागेल. तुम्ही कशाकशाची पूजा कराल? कुणाकुणाची कराल? हे कोठपर्यंत चालेल? ईश्वर सर्वत्र आहे ही भावना ठीक आहे. परंतु पूजेसाठी तो सर्वत्र पाहणे योग्य नाही. त्यासाठी ईश्वराला एकाच ठिकाणी पाहावे लागते. म्हणून माहेश्वराने इष्टलिंगातच ईश्वर पाहावा. सर्वत्र पाहू नये.

**सर्वगोऽपि स्थितः शंभुः स्वाधारे हि विशेषतः।**
**तस्मादन्यत्र विमुखः स्वेष्टलिंगे यजेच्छिवम्॥१०.५६॥**

ईश्वर सर्वत्र व्यापक असला तरी त्याचे प्राकट्य एकाच ठिकाणी असते. प्रल्हादाने ईश्वर सर्वत्र आहे असे सांगितल्यावर हिरण्यकश्यपूने विचारले, ''या खांबात देखील तो आहे का?'' ''होय'' असे प्रल्हादाने उत्तर दिल्यावर सर्व मनोभाव एकत्र करून हिरण्यकश्यपूने खांबावर लाथ मारली आणि ईश्वर प्रकट झाला. ईश्वराचे प्रकटीकरण एकाच ठिकाणी होऊ शकते, सर्वत्र नाही. त्याप्रमाणे इष्टलिंगात तो विशेषत्वाने असतो. अग्नी कोठे असतो? सर्वत्र असतो, परंतु तो प्रकट न झाल्यामुळे आपण जळून जात नाही. तुमच्या खिशात काडीपेटी आहे. तरी तुम्ही जळून का जात नाही? कारण तो प्रकट झाला नाही. कंदिलाची ज्योत पाहून एका मुलाला एका गृहस्थाने प्रश्न विचारला, ''ही ज्योत कोठून आली?'' मुलाने कंदील विझवून त्या गृहस्थाला विचारले, ''ही ज्योत आता कोठे गेली?''

जेथून आली तेथे गेली. अग्नी वायुमंडलातच असतो. कारण अग्नी हे महाभूत आहे. तो कधी प्रकट होऊन दिसतो तर कधी दिसत नाही इतकेच. सूर्यप्रकाशात वस्तूला प्रकाशित करण्याचे सामर्थ्य आणि जाळून टाकण्याचेही सामर्थ्य असते. परंतु सामान्यरूपाने तो वस्तू प्रकाशित करीत असतो. ओले कपडे सूर्यप्रकाशात सुकतात, जळत नाहीत, परंतु त्याची ज्वलनशक्ती प्रकट झाली तर तो वस्तू जाळूनही टाकतो.

ईश्वर सर्वत्र आहे, परंतु एखाद्या विशेष आधारस्थानावर तो प्रकट होतो. अग्नी प्रकट करण्यासाठी आगकाडी व पेटी यांचे घर्षण आवश्यक असते. त्याप्रमाणे इष्टलिंग आणि मन यांच्या एक प्रकारच्या घर्षणातूनच इष्टलिंगात ईश्वर प्रकट होतो. इष्टलिंगात एक प्रकारचा प्रकाश दिसू लागतो ते भावनेच्या सतत घर्षणामुळे. प्राचीन काळात लाकडाच्या घर्षणातून अग्नी निर्माण करीत असत. त्याला अग्निमंथन म्हणत. यज्ञासाठी लाकडे जास्त उपयोगी पडत. अग्नी सर्वत्रच लाकडात निवास करतो, परंतु शमीवृक्षात तो विशेषत्वाने असतो. त्याप्रमाणे ईश्वर सर्वत्र व्याप्त आहे तथापि तो इष्टलिंगात विशेषत्वाने व्यक्त होतो:-

**सर्वगत्वं महेशस्य सर्वशास्त्रविनिश्चितम्।।१०.५८।।**

ईश्वर सर्वत्र व्याप्त आहे असे सर्वच शास्त्रे सांगतात. 'आकाशवत् सर्वगतस्य नित्य:।' जसे आकाश सर्वत्र आहे तसा ईश्वर सर्वत्र आहे. दुधात लोणी आहे. परंतु ते दुधातून सरळ मिळत नाही. त्यावर संस्कार करावे लागतात. दुधाचे दही करावे लागते, ते घुसळावे लागते. मग ताक वेगळे आणि लोणी वेगळे होते. दुधाच्या प्रत्येक थेंबात लोणी असून देखील ते प्राप्त करण्यासाठी काही क्रिया कराव्या लागतात. त्याप्रमाणे ईश्वर प्रकट होण्यासाठी काही साधना करावी लागते. आकाशासारखा ईश्वर सर्वगत आहे. आकाश सर्वत्र सारखे असून पंचमहाभूतांत ते सर्वांत मोठे आहे. प्रांताप्रांतांत माती वेगळी असेल, पाणी वेगळे असेल, वायू वेगळा असेल, परंतु आकाश मात्र सर्वत्र सारखेच असते. आकाश परमात्म्यासारखे आहे. परमात्म्यातून तेच प्रथम उत्पन्न झाले आहे. परमात्म्याचे स्वरूप विषद करण्यासाठी शास्त्रांत आकाश या सूक्ष्मभूताचेच उदाहरण दिले जाते.

पृथ्वी, जल, वायू नष्ट होऊ शकतात. तसे आकाश नष्ट होत नाही. आकाशाला जाळून टाकता येत नाही. त्याचे तुकडे करता येत नाहीत. त्याच्यावर शस्त्राचा प्रहार करता येत नाही. असे आकाश सामान्यत: अविनाशी आहे. त्याप्रमाणे परमात्मा अविनाशी व सर्वव्याप्त आहे, असे शास्त्रे सांगतात. मग तो तसा येथे का मानत नाहीत? कारण आपल्याला पूजा करायची आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप व ध्यान हे दहा धर्म आहेत. धर्म हे ईश्वराचेच एक रूप आहे. भगवत्तत्त्वापर्यंत पोहोचण्यासाठी दहा प्रकारचे धर्म पाळावे लागतात. धर्माचरण न करता ईश्वर प्राप्त होणार नाही. जो खरे बोलत नाही, पूजा करीत नाही, ध्यान करीत नाही त्याला ईश्वर मिळणार नाही. आपले मन साकार वस्तूत अधिक रमत असते. निराकारात ते रमत नाही. एखाद्या देवतेची पूजा आपण दोन-तीन तास करू शकतो, त्यात रमू शकतो, रुद्राभिषेक, बिल्वार्चन, आरती, स्तोत्रपठण यात मन रमते. पूजा ही बाह्यक्रिया असल्यामुळे ती खूप वेळ आपण करू शकतो, त्यात आपले मन रमते, स्थिर होते. परंतु ध्यान, जप खूप वेळ करणे कठीण जाते. त्यात मन फार काळ रमत नाही. डोळे बंद करून कोणी ध्यानाला बसलाच तर दुसऱ्या क्षणी त्याचे मन भलतीकडेच धावत सुटते.

निराकाराची पूजा करण्याचा अभ्यास आपल्या मनाला नसतो. मनाचे सारे व्यवहार आकाराशी संबधित असतात. लहान मुलाच्या हातातले खेळणे काढून घेतले तर ते रडू लागते. कारण त्याच्या वृत्ती खेळण्यावरच केंद्रित असतात. त्याचे रडे थांबवायला त्याच्या हातात दुसरे खेळणे दिले पाहिजे. वेलीला वर चढवायचे असेल तर तिला काहीतरी आधार द्यावा लागतो. त्याप्रमाणे आपल्या अत्यंत तरल, चंचल, सूक्ष्म मनाची एकाग्रता होण्यासाठी त्याला काहीतरी आधार द्यावा लागतो. म्हणून बाहेर वाहणाऱ्या मनोवृत्तीला एकाच ठिकाणी केंद्रित करण्यासाठी आचार्यांनी इष्टलिंगाची निर्मिती केली आहे. इष्टलिंग दिसायला छोटे दिसते, परंतु त्याची महती म. बसवेश्वरांनी एका वचनात गायिली आहे.

तुम्ही सारे येथे एवढ्या प्रशस्त भवनात बसलेले आहात. परंतु एखाद्या फोटोग्राफरने जर तुमचा फोटो काढला तर तळहाताएवढ्या लहानशा फोटोत तुम्ही सगळे सामावले जाल. त्याप्रमाणे सर्वव्यापक अशा परशिवाला शिष्याच्या पूजेसाठी सद्गुरूंनी इष्टलिंगरूपात हातावर दिले आहे. बाह्य मनोवृत्तीला एकत्र करणे आवश्यक आहे. मनोवृत्तीला अंतर्मुख केल्याशिवाय ज्ञानप्राप्ती होत नाही. आपल्या सिद्धान्तात केवळ इष्टलिंगपूजाच सांगितली नाही, तर इष्टलिंगानंतर प्राणलिंगाची, त्यानंतर भावलिंगाची पूजा सांगितली आहे. प्राणलिंग व भावलिंग या बाह्य वस्तू नाहीत. आपल्या चिद्रूपाचे चिंतन करणे ही प्राणलिंगाची पूजा आहे तर स्वत:ला शिवस्वरूप मानून 'शिवोऽहम्' भावनेने ध्यान करणे ही भावलिंगाची पूजा होय. जोपर्यंत मनोवृत्ती अंतर्मुख होत नाही तोपर्यंत प्राणलिंगाची व भावलिंगाची उपासना शक्य नाही. परंतु त्याआधी बाह्य मनोवृत्तीला एकाच जागी केंद्रित करायला हवे. नंतर तिला आत घेऊन जायचे आहे.

बाह्य वस्तू पाहताना आपली दृष्टी बाहेर वाहत असते. परंतु जेव्हा आपण आरशात पाहतो त्यावेळी आपली दृष्टी आरशावरून परावर्तित होऊन आपल्या आत पाहत असते. त्याप्रमाणे इष्टलिंग म्हणजे एक दर्पण आहे. आत्मस्वरूपाच्या साक्षात्काराचे ते एक साधन आहे. येथे आचार्यांनी सर्वत्र परमात्मा पाहू नये असे सांगण्याचे कारण हे की, प्रथम आत्मस्वरूपात परमात्म्याचे दर्शन घेतल्यानंतर मग सर्वत्र परमात्म्याचे दर्शन घेता येईल. डोळ्यावर ज्या रंगाचा चष्मा घातला त्याच रंगाचे जग दिसते. त्याप्रमाणे परमात्म्याचा एकदा साक्षात्कार झाला की दृष्टी बदलते, विचार बदलतात आणि जेथे जेथे दृष्टी पडते तेथे तेथे वस्तू दिसत नाही तर ईश्वरच दिसतो. काही चित्रकार विलक्षण चित्रे काढतात. दोन वृक्षांच्या मध्ये म. गांधींचे चित्र असते. स्थूल मानाने पाहिले तर दोन वृक्ष आणि आकाश एवढेच आपल्याला दिसते. परंतु जर कोणी 'त्यात म. गांधी आहेत, नीट पाहा' असे सांगितले तर खरोखरच तेथे गांधी दिसतात. चित्रकाराचे ते चातुर्य असते. एकदा म. गांधी दिसले की मग मात्र त्या चित्रात वृक्ष दिसत नाहीत की आकाश दिसत नाही. कितीही प्रयत्न केला तरी म. गांधीशिवाय आपण त्यात काही वेगळे पाहू शकत नाही. जोपर्यंत कोणी सांगत नाही तोपर्यंत गांधी दिसत नाहीत आणि एकदा सांगितले की गांधीशिवाय दुसरे काहीच दिसत नाही. हेच दृष्टीपरिवर्तन होय. एकदा दृष्टी बदलली की सर्व सृष्टी शिवमय होऊन जाते. शिवयोग हे दृष्टीपरिवर्तनाचे साधन आहे.

ईश्वर सर्वत्र आहे असे सगळी शास्त्रे सांगतात. परंतु साधना केल्याशिवाय, मन एकाग्र केल्याशिवाय, आपल्या अंतरंगात परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार झाल्याशिवाय केवळ बाहेर पाहून ज्ञान प्राप्त होत नाही. झालेच तर ते बौद्धिक ज्ञान होय. साक्षात्कार नव्हे. म्हणून ईश्वर सर्वत्र आहे याची चिंता न करता प्रारंभी एका निश्चित स्थानी दृष्टी केंद्रित करा. मग तिला हृदयात घेऊन जा आणि आत्मसाक्षात्कार झाला की मग सर्वत्र ईश्वर दिसेल, असे आचार्यांनी सांगितले आहे. त्यासाठी पूजा हा प्रारंभीचा मार्ग आहे. पूजेसाठी ईश्वर सर्वत्र न पाहता इष्टलिंगातच पाहिला पाहिजे.

**नित्यं भासि तदीयस्त्वं या ते रुद्र शिवा तनूः।**
**अघोराऽपापकाशीति श्रुतिराह सनातनी।।१०.५९।।**

'तत्त्वमसि' महावाक्याच्या द्वारा तूच ईश्वर आहेस असे वेद सांगतात. 'तत्त्वमसि' महावाक्याचे अनेक अर्थ होतात. जेवढ्या विभक्ती आहेत तेवढेच अर्थ आहेत. तत् त्वं असि. तत् म्हणजे ईश्वर, त्वं म्हणजे तू आणि असि म्हणजे आहेस. अर्थात् तू ईश्वरच आहेस, असा एक अर्थ. दुसऱ्या विभक्तीने 'तू त्याचा आहेस' असा

अर्थ होतो. तिसऱ्या विभक्तीने 'त्याच्यासाठी तू आहेस' असा अर्थ निघतो. शंकराचार्य म्हणतात– तू म्हणजे मी होऊ शकतो, मी तुझा होऊ शकतो, परंतु तू माझा होऊ शकत नाही. मी जीव तुझा असेन, परंतु तू माझा नाही. कारण तुझे स्वरूप विराट आहे. जसे तरंग समुद्राचे असतात, परंतु समुद्र तरंगांचा नसतो. त्याप्रमाणे येथे सांगितले आहे. आपला जन्म त्याच्यासाठी झाला आहे. त्याची पूजा, ध्यान, चिंतन करण्यासाठी. अन्य पशुपक्षी यांचे जन्म भोगासाठी झाले आहेत. म्हणून त्याची पूजा करणे हे मनुष्याचे कर्तव्य आहे.

माहेश्वराने केवळ इष्टलिंगातच ईश्वर पाहावा. आपल्या साऱ्या मनोवृत्ती त्याच दिशेने एकवटाव्या, अन्य ठिकाणी ईश्वर पाहण्याचा प्रयत्न करू नये हेच सर्वगतनिरसनस्थलात प्रतिपादन केले आहे. वृत्ती अंतर्मुख होणे ही प्रगती आहे. व्यवहारात बहिर्मुख वृत्ती महत्त्वाची मानतात. परंतु अध्यात्मक्षेत्रात अंतर्मुख वृत्तीला महत्त्व आहे. म्हणून बहिर्मुख वृत्ती प्रथम इष्टलिंगावर एकत्रित करून नंतर ती अंतर्मुख करावी. पूजेसाठी इष्टलिंगातच शिव पाहणे इष्ट आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

३१ ऑगस्ट १९९१

---

## आशीर्वचन चौदावे

## शिवजगन्मयथल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

पूजेसाठी साधकाला आपली मनोवृत्ती एकत्रित आणि नियमित करावी लागते. त्यामुळे परशिव सर्वव्यापक असला तरी त्याला इष्टलिंगातच पाहावे, असे सर्वगतनिरसनस्थलात सांगितले आहे. यानंतरचे स्थल म्हणजे शिवजगन्मयस्थल. शिव हा शिवभक्तांच्या आधीन असतो आणि तो इष्टलिंगात राहतो. तो प्रकाशस्वरूपी आणि सर्वव्यापी आहे, अशी माहेश्वराने भावना करायला हवी. पूजा एकाच ठिकाणी घडते. ती सर्वत्र करता येत नाही. म्हणून इष्टलिंगात शिव आहे अशा भावनेने पूजा घडत असली तरी शिव विश्वात व्याप्त आहे हे सत्य आहे.

यस्मादेतत् समुत्पन्नं महादेवाच्चराचरम्।
तस्मादेतन्न भिद्येत यथा कुंभादिकं मृदः।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १०.६३)

हा सारा विश्वप्रपंच ज्या शिवापासून उत्पन्न झाला, त्या शिवापासून तो भिन्न नाही. मातीपासून घडा निर्माण होतो, परंतु तो मातीपासून भिन्न नसतो. त्याप्रमाणे शिवापासून जे जग निर्माण झाले ते शिवापेक्षा भिन्न नाही. ते अभिन्न आहे. कारणापासून कार्य घडते. निर्मितीमागे तीन प्रकारची कारणे असतात. उपादानकारण, निमित्तकारण आणि सहकारीकारण. ज्या कारणात कार्याचे अस्तित्व असते ते उपादानकारण होय. मातीपासून घडा बनला.

घडा हे कार्य माती हे उपादानकारण आहे. घड्याचे नामरूप भिन्न असले तरी वस्तुत: घडा म्हणजे मातीचा आहे. म्हणून माती हे त्याचे कारण होय. उपादान कारणाशिवाय कार्य अस्तित्वात राहू शकत नाही.

कार्यात प्रवेश न करता भिन्न राहून कारणीभूत होणे ते निमित्तकारण होय. मातीपासून घडा बनलेला असला तरी तो घडवणारे हात कुंभाराचे असतात. कुंभार नसता तर घडा घडला नसता. म्हणून कुंभार हे घड्याचे निमित्तकारण आहे. कार्य घडण्यासाठी ज्या अन्य गोष्टी असतात त्यांना सहकारीकारण म्हणतात. कुंभाराला माती गाढवावरून आणावी लागते. चाकावर ती थापून, फिरवून तिला आकार द्यावा लागतो. चाक फिरवायला दांडा लागतो आणि घडा करताना चिंधीदेखील लागते. म्हणून गाढव, चाक, दांडा, चिंधी ही सहकारी कारणे होत. कोणतेही कार्य उपादान, निमित्त व सहकारी अशा तीन कारणांनी घडते. व्यवहारात ही तीन कारणे अस्तित्वात असतात.

प्रपंचनिर्मितीचे कारण कोणते? सृष्टीआधी एकच सद्वस्तू होती असे उपनिषदांत म्हटले आहे. 'सदेव सोम्य अग्र आसीत्।' सृष्टी उत्पन्न होण्याअगोदर केवळ एकमेव सत्य होते. त्यामुळे तेच सृष्टीचे उपादान, निमित्त आणि सहकारी कारण आहे. वीरशैवसिद्धान्तात परशिवाला सृष्टीचे अभिन्ननिमित्तोपादान कारण मानले आहे. कोळी हा एक प्रकारचा कीडा आहे. तो आपल्याभोवती जाळे विणतो. परंतु विणण्यासाठी तो बाहेरून काही आणत नाही, तर त्याच्या शरीरातूनच तो तंतू बाहेर काढून जाळे विणतो. कोळ्याचे शरीर हे जाळ्याचे निमित्तकारण. कोळी आणि जाळे यांचे अभिन्ननिमित्तोपादन कारण समजून घेण्यासाठी उदाहरण दिले जाते. श्रुतीत म्हटले आहे. 'यथोर्णनाभि: सृजते गृह्णतेच।'

कोळी शरीराबाहेर जाळे काढतो आणि नंतर आत घेतो. त्याप्रमाणे परशिवातून हा प्रपंच निर्माण होतो आणि परशिवात विलीन होतो. शक्तिविशिष्ट शिव हेच प्रपंचाचे उपादानकारण व निमित्तकारण आहे. मातीपासून निर्माण झालेला घडा म्हणजे मातीच असते, त्याप्रमाणे शिव-शक्तीपासून उत्पन्न झालेला प्रपंच म्हणजे शिवच असतो. यासाठी ज. रेणुकाचार्य उदाहरण देतात:-

**शिवतत्त्वात् समुत्पन्नं जगदस्मान्न भिद्यते।**
**फेनोर्मिबुद्बुदाकारं यथा सिंधोर्न भिद्यते।।१०.६४।।**

समुद्रातील तरंग, फेस, बुडबुडे हे समुद्रापासून वेगळे नसतात. त्यांच्या रूपाने समुद्रच आपल्यापुढे येत असतो. तसा प्रपंचरूपाने शिवच आपल्यासमोर असतो. वस्त्र तंतूपासून उत्पन्न होते. ते सर्वांगाने तंतुमयच असते, तसा हा सर्व विश्वाकार शिवरूप आहे.

शिव प्रपंचरूपाने कसा विकसित होतो? वीरशैवसिद्धान्तात सृष्टिप्रक्रिया सांगितलेली आहे. शिवाच्या शक्तीचा विकास झाला की सृष्टी उत्पन्न होते आणि तिचा संकोच झाला की सृष्टीचा विलय होतो. सृष्टिनिर्मितीला शक्तिविकास कारणीभूत होतो तर सृष्टिसंहाराला शक्तिसंकोच कारणीभूत होतो. म्हणून शिवापासून निर्माण झालेले जग शिवापेक्षा भिन्न नसून शिवमयच आहे. अंधारात दोरी सापासारखी दिसते आणि झाडाचा बुंधा चोरासारखा दिसतो. दोरी असतेच, फक्त सर्पासारखी दिसते एवढेच. दोष दोरीचा नसून आपल्या दृष्टीचा आहे. अंधाराचा आहे. अंधार नसेल तर दोरी दोरीच दिसेल. साप भासणार नाही. तसे विश्व शिवमय असून देखील

आपत्याला विश्वात शिव दिसत नाही. याचे कारण आपल्या ठिकाणी असलेले आणवादी मल होत.

**पत्रशाखादिरूपेण यथा तिष्ठति पादपः।**

**तथा भूम्यादिरूपेण शिव एको विराजते।।१०.७०।।**

पाने, फुले, फांद्या या रूपाने आपल्यासमोर वृक्ष उभा असतो. तशी ही वैविध्यपूर्ण सृष्टी म्हणजे प्रत्यक्ष शिवच होय. पंचमहाभूते शिवरूपच आहेत. दक्षिण भारतात तर पृथ्वीलिंग, आपलिंग अशी पंचमहाभूतांची लिंगे आहेत. शिवकांचीत एकांब्रेश्वर शिवलिंग मृण्मय आहे. त्याला तैलाभिषेक करतात. पंचमहाभूते ही शिवरूप आहेत, हे दर्शवण्यासाठीच या लिंगाची स्थापना झालेली आहे.

शेतकरी भूमिपूजन करतात ते याच भावनेने. आपल्या देशात जलपूजा, अग्निपूजा केल्या जातात. पंचमहाभूते वेगळी दिसत असली तरी ती शिवस्वरूपच आहेत असे शिवजगन्मयस्थलात प्रतिपादन केले आहे. हात, पाय, नाक, डोळे असे भिन्न भिन्न अवयव असले तरी शरीर एकच असते, त्याप्रमाणे पंचमहाभूते भिन्न असली तरी ती ईश्वरस्वरूपच असतात.

भागवतामध्ये एक सुंदर कथा आहे. कृष्णाने गोवर्धन पर्वताची पूजा केली म्हणून इंद्र रागावला आणि त्याने गोकुळावर प्रचंड पाऊस पाडला. त्यावेळी कृष्णाने गोवर्धन उचलून सर्वांचे रक्षण केले. परंतु त्यावेळी, ही मुले घरी गेली नाहीत तर त्यांच्या आईवडिलांची काय अवस्था होईल, असा कृष्णाने विचार केला. म्हणून त्याने एकट्यानेच सर्व मुलांची रूपे धारण केली, गाई गोपाल, कपडे, काठी... सारे काही तोच झाला. याप्रमाणे सर्व मुले आपापल्या घरी गेली. आईवडिलांना आनंद झाला. खरी मुले तर अरण्यात अडकली होती. त्याप्रमाणे जगातली सर्व रूपे ही शिवाने धारण केली आहेत. मनुष्य, पशू, गण, गंधर्व सारे काही तोच आहे. त्याच्याशिवाय या प्रपंचात दुसरे काहीही नाही. म्हणून पूजा करताना इष्टलिंगातच शिव आहे अशा निष्ठेने पूजा करावी; परंतु शिव सर्वव्यापक आहे, जगन्मय आहे अशी भावना करावी, हेच शिवजगन्मयस्थलाचे सार होय. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

१ सप्टेंबर १९९१



## भक्तदेहिकलिंगस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

घट मृण्मय असतो, त्याच्या कणाकणांत जशी मृत्तिका असते त्याप्रमाणे संपूर्ण चराचरात ईश्वर व्याप्त असतो. त्याची अभिव्यक्ती कोठे होते याविषयी येथे सांगतात. अग्नी सर्वत्र व्याप्त असला तरी दोन लाकडांचे घर्षण जेथे होते तेथेच तो प्रकट होतो. त्याप्रमाणे ईश्वराचे विशेष प्राकट्य कोठे होते हे सांगणारे स्थल म्हणजे भक्तदेहिकलिंगस्थल.

**समस्तजगदात्माऽपि शंकरः परमेश्वरः।**
**भक्तानां हृदयाम्भोजे विशेषेण विराजते॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी१०.७१)

वस्तूंची सामान्य आणि विशेष अशी दोन प्रकारची स्थिती असते. सामान्य स्थिती प्रपंचाला पोषक असते तर विशेष स्थिती अज्ञान व प्रपंचाचा निरास करते. सूर्यप्रकाश सामान्य स्थितीत वस्तू प्रकाशित करतो तर त्याची विशेष स्थिती वस्तू जाळून टाकते. परमात्म्याची सामान्य स्थिती प्रपंचाला पोषक आहे. त्याची विशेष स्थिती प्रपंचभाव संपवते आणि परमात्मभाव प्रकट करते. परमात्म्याच्या प्रकटीकरणाचे मुख्य स्थान कोणते?

**कैलासे मन्दरे चैव हिमाद्रौ कनकाचले।**
**हृदयेषु च भक्तानां विशेषेण व्यवस्थितः॥१०.७२॥**

कैलास पर्वतावर, मंदराचलावर, मेरू पर्वतावर ईश्वर राहतो. निर्जन प्रदेशात बसून जर ईश्वरचिंतन केले तर आपले मन चटकन् एकाग्र होते. मनाची एकाग्रता अथवा चांचल्य याला परिसरदेखील कारणीभूत असतो. पूजास्थान आणि परिसर यांचा मनावर परिणाम होतो. यासाठी घरात काही भाग भोगभूमी असते, काही भाग योगभूमी असतो. जेथे बसल्यावर मनात वासना निर्माण होते ती भोगभूमी. अक्कमहादेवी एका वचनात म्हणते:-

**हगलु नाल्कु जाव अशनक्के कुदिवरु**
**इरुळु नाल्कु जाव व्यसनक्के कुदिवरु**
**अगस नीरोळगिर्दु बायारि सत्तंते**
**तम्मोळगिर्द महाघनवनु अरियदे**
**केट्टरय्या चन्नमल्लिकार्जुना.**

दिवस आणि रात्र आपण कशी घालवतो ते अक्कमहादेवी सांगते. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत प्रत्येकाच्या मनात खाण्यापिण्याचाच विचार असतो. नाश्ता काय बनवायचा? जेवणात काय पाहिजे? दिवस भोजनात जातो, रात्र व्यसनात जाते. असन आणि व्यसनात सर्व काळ व्यतीत करणाऱ्यांना ईश्वराचे ज्ञान कसे होणार? म्हणून आपल्या घरात स्वयंपाकघर, शेजघर, देवघर हे वेगवेगळे असतात. आजकाल देवघराची वाट लागली आहे. जेवणाला मोठा हॉल हवा, झोपायला मोठी बेडरूम हवी, गप्पा मारायला दिवाणखाना हवा; परंतु भजन करायला मात्र काही नको. एवढ्या मोठ्या घरात पूजा करण्याइतकी जागा शिल्लक नसते. कुठेतरी कोपऱ्यात देवाला बसवतात. काहीजण भिंतीवर, फासाला लटकवल्याप्रमाणे देवाला टांगतात. त्याला जागा कोठे आहे? पृथ्वी

त्याची आहे. हवा, पाणी, आकाश सारे त्याचे आहे. परंतु ते सारे घेऊन देखील त्याच्यासाठी घरात जागा नाही. एवढी औदार्यभावना माणसाकडे असेल तर त्याच्यावर ईश्वराची कृपा कशी होईल? खा, प्या, मरा, पुन्हा जन्म घ्या, पुन्हा खा, प्या, मरा याच चक्रात त्याला फिरत राहिले पाहिजे.

प्राचीन काळी नदीकाठावर, पर्वतशिखरावर जाऊन भजन करीत. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास असे चार आश्रम जुन्या काळी होते. ते एकाच माणसासाठी होते. आजकाल संन्यास फक्त मठाधिपतींसाठीच शिल्लक राहिला आहे. इतरांसाठी जणू संन्यासाचे काहीच प्रयोजन नाही. एकदा गृहस्थ झाला की मरेपर्यंत तो गृहस्थच राहतो. पुढची काही प्रगतीच होत नाही.

**शैशवेऽभ्यस्त विद्यानां यौवने विषयैषिणाम्।**
**वार्धके मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम्।।**

शंभर वर्षांती ल आयुष्यात पहिली पंचवीस वर्षे ब्रह्मचर्य, पुढे पंचवीस वर्षे गृहस्थजीवन, त्यानंतर पंचवीस वर्षे वानप्रस्थाश्रम आणि नंतर संन्यासाश्रम अशी विभागणी होती. आज पंचाहत्तर वर्षे जगला तरी खूप आहे. पुढचे काही खरे नाही. म्हणून जेवढी वर्षे आपण जगण्याची शक्यता आहे तेवढ्याचेच चार भाग पाडले पाहिजेत. जीवन हा क्रम आहे. एकाच आश्रमात संपूर्ण जीवन व्यतीत करण्यात काही अर्थ नाही. तुम्ही घर सोडून जाऊ शकता अथवा घरात राहूनच वानप्रस्थ-जीवन जगू शकता. मुले मोठी झाल्यावर त्यांच्यावर जबाबदारी टाकून आपले ओझे हलके करून सत्संगात वेळ घालवला पाहिजे. यालाच आज वानप्रस्थाश्रम म्हटले जाते. देहवसान होण्याआधी पूर्णरूपाने संन्यस्त झाले पाहिजे. भगवे कपडे घालणे म्हणजे संन्यास नव्हे. वासनांचा क्षय झाला तर घरात राहून देखील तुम्ही संन्याशीच असता.

प्राचीन काळी घराबाहेरील एकांतात भजनपूजन करीत असत. बाह्य परिसरामुळे मनात मालिन्य उत्पन्न होऊ शकते आणि मन शुद्धदेखील होऊ शकते. राग-द्वेषांनी बरबटलेल्या माणसांच्या सोबत जर पूजापाठ केला तर त्यांचा प्रभाव आपल्यावर पडतो आणि आपली प्रगती होत नाही. म्हणून तीर्थस्थानी, हिमालयात ऋषिमुनी जात असत. ईश्वरप्राप्तीसाठी एवढ्या दूर जावे लागेल काय? असा प्रश्न काहींना पडेल, परंतु ईश्वर दूर आहे तसाच जवळ देखील आहे.

**तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके।**
**तदन्तरस्य सर्वस्य तदुसर्वस्यास्य बाह्यत:।।**

श्रुती सांगते, परमात्मा अत्यंत दूर आहे आणि एवढा जवळ आहे की तेवढ्या जवळ कोणीच असत नाही. नात्यातील कोणतीच माणसे इतकी निकट नसतात. आपल्या सिद्धान्तात तर अंत्यक्रिया देखील गळ्यात इष्टलिंग बांधूनच करतात. शेवटच्या प्रवासात एवढे जवळ कोण असते? ज्यांना ईश्वराला दुरून पाहायचे त्यांनी काशी-रामेश्वरला यात्रेसाठी जावे. पण ज्यांना जवळून पाहायचे त्याने थोडे आपल्या आत डोकावून पाहावे. आपल्या हृदयकमलात त्याचा निवास असतो. गीतेत म्हटले आहे, 'ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।'

परमेश्वर सर्वांचा प्रेरक आहे. मोटारीचा, यंत्राचा कोणीतरी चालक असतोच. काही यंत्रे स्वयंचलित असतात. परंतु त्याचेही नियंत्रण नसेल तर अचेतन वस्तू स्वत: चालणार नाही. प्रत्येकाच्या हृदयात परमात्मा आहे आणि बाहेरदेखील आहे. सर्वात दूर आहे आणि सर्वांत जवळदेखील आहे. जी वस्तू सर्वव्यापक असते तिची व्याख्या अशीच असणार. सर्वव्यापक तत्त्व इथेही असते आणि तिथेही असते. फक्त साधकाच्या योग्यतेनुसार उपदेश

केला जातो.

एका मद्यप्याने भरपूर दारू ढोसली. इतकीकी त्याला काही सुचेना. तरीही सवयीनुसार भेलकांडत तो कसाबसा आपल्या घरापर्यंत आला आणि अगंणात थकून बसला. रस्त्याने जाणाऱ्यांना विनवू लागला, ''मी फार थकलो आहे. मला कृपा करून माझ्या घरापर्यंत पोचवा.''

लोक म्हणाले, ''बाबा रे, तुझ्या घराबाहेरच तू बसला आहेस. आम्ही आणखी कुठल्या घरी नेऊ? दार उघड आणि घरात जा.''

मद्यप्याला खरे वाटेना. त्याला वाटले, हे आपली चेष्टा करताहेत. आवाज ऐकून त्याची आई घराबाहेर आली आणि त्याची समजूत घालू लागली. परंतु तो एवढा बेभान होता की स्वत:च्या आईला देखील ओळखेना. त्याचा आक्रोश सुरूच होता, ''कोणीतरी मला घरी पोचवा रे. माझी आई वाट पाहत असेल.''

कोणालाच काही सुचेना. रस्त्याने एक महात्मा चालला होता. त्याने त्याची अवस्था पाहिली. या मद्यप्याला उपदेश करून काही उपयोग नाही, याचा त्याला अंदाज आला. तो जवळ जाऊन म्हणाला, ''चल, मी तुला तुझ्या घरी पोचवतो.''

मद्यप्याला खूप आनंद झाला. तो म्हणाला, ''हा खरा माणूस आहे. बाकी सारे माझी चेष्टा करताहेत.''

महात्म्याने एक बैलगाडी आणली. तिच्यात त्याला बसवले आणि गावाभोवती पाच-सहा चकरा मारल्या. हळूहळू तो शुद्धीवर आला. मग त्याला घरासमोर आणले. मद्यपी महात्म्याचे आभार मानू लागला. म्हणाला, ''बघा माझे घर किती दूर होते. लोक विनाकारणच मला 'तू घरासमोर बसलाहेस' असे म्हणत होते. आपले फार उपकार झाले.''

मद्यप्यासारखीच प्रपंचातील सर्व माणसांची स्थिती आहे. तुझ्यातच ईश्वर आहे असे सांगितले तर तो हसतो. माझ्यात ईश्वर कसा असेल? ईश्वर काशीत आहे, केदारला आहे. तेथे गेल्यावरच त्याचे दर्शन होईल, ठीक आहे. काढा तिकीट. फिरत बसा. फिरून फिरून शेवटी तुम्ही कोठे याल? यात्रा संपल्यावर तुम्ही घरीच परत येणार. म्हणून जेव्हा तुम्हाला हृदयात ईश्वर दिसेल तेव्हाच तो बाहेरदेखील दिसू लागेल. ईश्वर आत आहे तसा बाहेरदेखील आहे.

आम्ही नेहमीच सांगतो की, इथली आरती झाल्यावर आरतीचे ताट तुमच्यासमोर आणतात. तुम्हाला वाटते की आरती आली, ताटात पाच-दहा पैसे टाका. परंतु पैशासाठी तुमच्यासमोर आरती आणली जात नाही हे लक्षात घ्या. ज्या ईश्वरावर आता आरती ओवाळली तो ईश्वर तुमच्याही हृदयात आहे. त्याला ओवाळण्यासाठी ती तुमच्यासमोर आणतात. तुम्हाला वाटते पैशासाठी आणतात.

ईश्वराचा निवास बाहेर आहेच. परंतु भक्तांच्या हृदयात तो विशेषरूपाने राहतो. या विषयी एक कथा सांगितली जाते. बहुधा ती काल्पनिकच असणार.

सतत मंदिरात जाऊन भजन-कीर्तन करून भक्त ईश्वराला एवढे त्रास देऊ लागले की त्याची झोप उडाली. तो वैतागला. त्याने देवदेवतांची मिटिंग बोलावली आणि यावर उपाय कोणता? असे सर्वांना विचारले. एकाने सांगितले, ''शंकरा, तुम्ही कैलास पर्वतावर जाऊन बसा. तेथे कोणी मानव येण्याची शक्यता नाही.''

ईश्वराला त्याचा सल्ला पटला. तो कैलासावर जाऊन बसला. भक्तांना कळले की ईश्वर कैलासावर गेले. रस्ते नव्हते, साधने नव्हती. तरी लोक तेथपर्यंत त्याच्या दर्शनासाठी गेले आणि भजन करून त्याची झोप पुन्हा उडवू

लागले. ईश्वराला पुन्हा चिंता पडली. त्याने मिटिंग बोलावून विचारले. एकाने सांगितले, ''देवा तुम्ही समुद्रावर जाऊन बसा. तेथे मानव येणार नाही. तिन्ही बाजूंनी समुद्र असेल असे ठिकाण निवडा.''

ईश्वराला सल्ला मानवला. तो रामेश्वरला जाऊन बसला. भक्तांना हेदेखील समजले. ते रामेश्वरला जाऊन तेथे भजन करू लागले. ईश्वराची झोप उडाली. त्याला काय करावे हे सुचेना. त्याने पुन्हा मिटिंग बोलावली. तेव्हा एक सुज्ञ देवाने सुचवले, ''परमेश्वरा, तुम्ही कोठेही बाहेर गेलात तरी तुमचे भक्त तुमची पाठ सोडणार नाहीत. म्हणून तुम्ही असे करा. भक्ताच्या हृदयातच जाऊन बसा. म्हणजे तो तुम्हाला बाहेर शोधत राहील आणि तुम्ही निवांत त्याची गंमत पाहत आत बसा.''

तेव्हापासून ईश्वर भक्तांच्या हृदयात निवास करू लागला. मग मात्र त्याची झोपमोड झाली नाही. तुम्ही बाहेर जेवढे पाहू शकता तेवढे आत पाहू शकत नाही. आत पाहण्यासाठी तुम्हाला डोळे बंद करून ध्यान करावे लागते. बाहेर वाहणारी मनोवृत्ती आत वळवावी लागते. इंद्रियांची घडणच अशी आहे की त्यांच्याद्वारा बाहेर पाहणे सोपे आहे, आत पाहणे अवघड आहे. म्हणून कोणाला यात्रेला चल असे म्हटले की तो लगेच तयार होतो. पण जरा ध्यान कर असे म्हटले तर होकारच देत नाही. त्याला ध्यान करण्याची भीती वाटते. थोडा वेळ जुलमाने बसला तरी लवकर पळून जातो. ईश्वर आत आहे तसा बाहेर आहे. परंतु आतला ईश्वर पाहणे फार अवघड वाटते. त्यासाठी फार परिश्रम करावे लागतात. परंतु प्रयत्न केला तर हृदयातल्या परमात्म्याचा साक्षात्कार होणे अशक्य नाही. म्हणून अक्कमहादेवी म्हणते:-

**अगस नीरोळगिर्दु बायरि सत्तंते...**

धोबी धुणे धुत असतो. त्याला तहान लागते. पण काम संपवूनच पाणी पिऊ असे तो ठरवतो आणि एका क्षणी पाण्यावाचून मरतो. पाण्यात राहून देखील तो पाण्यावाचून मरतो हे त्याचे बुद्धिहीनत्व आहे. त्याप्रमाणे आपल्या हृदयात राहणाऱ्या परमात्म्याला न जाणल्यामुळे जीव संसारचक्रात भ्रमत राहतो. संसारचक्रातून सुटण्यासाठी ईश्वराचा निवास जसा कैलास, मंदराचल, वाराणसी आदी पवित्र क्षेत्रांत असतो त्याप्रमाणे विशेषत्वाने प्रत्येक व्यक्तीच्या हृदयात त्याचा निवास आहे, हे भक्तदेहिकलिंगस्थलात सांगितले आहे. बीजात अंकुर असतो तसा प्रत्येक जीवाच्या हृदयात शिव निवास करतो.

**सर्वात्माऽपि परिच्छिन्नो यथा देहेषु वर्तते।**
**तथा स्वकीयभक्तेषु शंकरो भासते सदा।।१०.७३।।**

ईश्वर सर्वत्र असला तरी ज्योतिर्लिंगात तो प्रकट होतो. त्याप्रमाणे आपल्या भक्तांच्या हृदयात शिव विशेषरूपाने भासमान होतो. शिवाचा निवास असल्यामुळेच भक्ताचे शरीर एक मंदिर असते. त्याच्या पवित्र शरीरात शिवाची मूर्ती कशी आहे? अघोर. प्रलयकाळात रुद्राचे स्वरूप घोर असते, भयंकर असते म्हणून पाणी अर्पण करताना आपण मंत्र म्हणतो:-

**अघोरेभ्योऽथघोरेभ्यो घोरघोरतरेभ्य:।**
**सर्वेभ्य: सर्वशर्वेऽभ्यो नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्य:।।**

ईश्वर घोर आहे आणि अघोरदेखील आहे. भयंकरात भयंकर आहे, प्रशांतात प्रशांतही आहे. भक्ताच्या हृदयातली मूर्ती मात्र अघोर, प्रशांत आहे. मंगलमय आहे.

अपापानां भक्तानां हृदयेषु काशत इति अपापकाशी।

ज्याच्या हृदयात पाप नाही त्याच्या हृदयात तो प्रकाशमान दिसतो. पापी लोकांच्या हृदयात तो असून देखील प्रकाशत नाही. तेथे तो प्रकटच होत नाही. वाल्मीकि पापी होता तोपर्यंत त्याच्या हृदयात ईश्वर प्रकाशला नाही. परंतु रामनामाने त्याची पापे दग्ध झाल्यावर त्याच्या हृदयात ईश्वर प्रकाशला. पूर्वायुष्यात वाल्मीकीने केवढी हिंसा केली. परंतु नंतर व्याधाने क्रौंचपक्ष्याला बाण मारलेला पाहताच त्याच्या ओठावर शापवाणी आली. हृदयातल्या ईश्वराचा साक्षात्कार झाला की मनुष्य अहिंसक होतो. हिंसा करण्यासाठी भेदबुद्धी हवी, द्वेष हवा, मत्सर हवा. ज्याच्या ठिकाणी हे विकार राहत नाहीत आणि भेदबुद्धी नष्ट होते तेथे हिंसेला वावच नसतो. महावीरांना आपण अहिंसक मानतो. 'अहिंसा परमो धर्म:' असे त्यांनी सांगितले. महावीर पूर्णत: अहिंसक झाले याचा अर्थ ते प्रत्येक ठिकाणी ईश्वराला पाहू लागले. अहिंसा धर्म आहे, सत्य हा धर्म आहे. ज्याला हृदयातल्या ईश्वराचा साक्षात्कार झाला तोच सत्य बोलू शकतो अथवा जो सत्य बोलू लागतो त्यालाच ईश्वराचा साक्षात्कार होतो.

जो सत्याचा आश्रय घेतो तो ईश्वराचाच आश्रय घेत असतो. जो अहिंसेचा आश्रय घेतो तोही ईश्वराचाच आश्रय घेत असतो. दहा प्रकारचे जे धर्म सांगितले आहेत. ते भगवत्साक्षात्काराचेच मार्ग आहेत. ज्याच्या हृदयातून सर्व पापे निघून जातात. त्याच्याच हृदयात ईश्वर प्रकाशतो. श्रुतीत ईश्वराचे निवासस्थान भक्ताचे हृदय हेच सांगितले आहे. परंतु कसे हृदय? निर्दय, लोभी, पापी, क्रोधी अशा हृदयात ईश्वर प्रकट होणार नाही. जो निर्लोभी, उदार, भोगशून्य असतो त्याच्या हृदयात ईश्वर प्रकाशतो. अशा व्यक्तींना आपण संत-महात्मा म्हणतो. ज्याचा आत्मा महान तो महात्मा. केवळ शरीरापुरती त्याची आत्मभावना सीमित नसते. 'आत्मवत् सर्वभूतेषु य: पश्यति स पंडित:।'

आपल्या हृदयात जसा ईश्वर आहे, तसा सर्वांच्या आहे, हे जो जाणतो तोच साक्षात्कारी पुरुष असतो.

विशुद्धेषु विरक्तेषु विवेकिषु महात्मसु।<br>
शिवस्तिष्ठति सर्वात्मा शिवलांछनधारिषु।।१०.७५।।

जो अंतरंगाने व बहिरंगाने शुद्ध आहे, ज्याच्या मनात सांसारकि अनुराग नाही, अर्थात् सांसारिक विषयात जो विरक्त आहे तोच भगवत्प्राप्तीचा अधिकारी होतो. मंदिराच्या गाभाऱ्यात देवाची मूर्ती असते आणि बाहेर त्याच्या वाहनाची मूर्ती असते. शिवलिंगासमोर नंदी असतो तर विष्णूसमोर गरूड असतो. नंदी आणि गरूड यांची मुखे कोणाकडे असतात? लोकांकडे तोंड करून ते बसलेले नसतात. ईश्वराकडे तोंड करून बसलेले असतात. प्रपंचाकडे पाठ फिरवतात आणि ईश्वराला सामोरे जातात. तुम्हाला ईश्वर हवा असेल तर प्रपंचाकडे पाठ फिरवा आणि ईश्वरसन्मुख व्हा. आम्ही तसे वरवर करतो. आमचे तोंड ईश्वराकडे असले तरी मनात प्रपंचाची इच्छा असते. ईश्वराची नसते. हे हवे, ते हवे अशीच इच्छा मनात नांदत असते. मग तुमच्यासमोर ईश्वर कोठे आहे? तुमच्या समोर तर प्रपंचच आहे. अशा रीतीने सांसारिक गोष्टींचा लाभ होईल, ईश्वराचा होणार नाही. ईश्वरप्राप्तीसाठी विरक्तीची जरुरी आहे. विरक्तांच्या हृदयात ईश्वर राहतो.

अंत:करणशुद्धीनंतर हृदयात विरक्ती येते आणि त्यानंतर विवेक जागा होतो. विवेक नित्य-अनित्य विवेक आणि आत्म-अनात्म विवेक असा दोन प्रकारचा असतो. प्रपंचात काही अनित्य वस्तू आहेत आणि एक नित्य वस्तू आहे. काही अनात्म वस्तू आहे, एक आत्मवस्तू आहे. त्याचे ज्ञान झाले की नित्यवस्तूविषयी आस्था आणि अनित्यवस्तूविषयी अनास्था उत्पन्न होते. म्हणून विवेकी पुरुषाच्या हृदयात शिव नांदतो. सर्वांना आत्मरूपात

पाहणारी दृष्टी ज्याच्याजवळ असते तो महात्मा असतो. त्याच्या हृदयात ईश्वर राहतो. इतकेच नव्हे तर जो भस्म, रुद्राक्ष आदी शिवलांछने धारण करतो त्याच्या हृदयात शिव राहतो. व्यावहारिक जीवनात जशी दागदागिन्यांची गरज वाटते त्याप्रमाणे आध्यात्मिक जीवनात देखील या बाह्य आभूषणांची गरज असते. सांसारिक आभूषणे राजस असतात. त्यामुळे आपल्या मनात रजोगुण वाढतो. भस्म, रुद्राक्ष ही सात्त्विक आभूषणे आहेत. त्यांच्यामुळे सत्त्वगुण वृद्धिंगत होतो.

एक कथा आहे. आपण सर्वांनीच ती अनेकदा ऐकली, वाचली असेल. एका स्त्रीने अत्यंत किंमती साडी खरेदी केली आणि नेसून गावभर फिरू लागली. 'साडी कोठून घेतली? किती किंमत आहे?' असे कोणीतरी विचारील असे तिला वाटले. त्यासाठीच तर ती साडी नेसून हिंडत होती. परंतु तिला कोणीच विचारले नाही. ती चिडली आणि आपले घर तिने पेटवून दिले. लोकांची धावपळ सुरू झाली. त्या अग्नीच्या प्रकाशात तिची साडी विशेष चमकू लागली. तेव्हा एका स्त्रीने विचारले, "बाई, तुमची साडी फारच सुरेख आहे? केवढ्याची आहे?"

तेव्हा ती स्त्री म्हणारी, "बाई, हेच जर तू या आधी विचारले असते तर मी घर कशाला पेटवले असते?"

तिच्या मनात हा रजोगुण का उत्पन्न झाला? तर कपड्यामुळे, साडीमुळे. ती साडी जर कमी किंमतीची, जाडीभरडी असती तर? तर तिचे घर जळाले नसते. म्हणून उंची वस्त्रे, आभूषणे यामुळे रजोगुण होतो. तुम्ही दागिने, उंची वस्त्र वापरू नये असे म्हणायचे नाही. कधी लग्नसमारंभात घालायला हरकत नाही. नेहमी वापरल्याने रजोगुण सदैव मनात राहील. म्हणून कपाळावर भस्म आणि गळ्यात रुद्राक्षमाळ सदोदित असली की तुमची भावनाच वेगळी असते. या आभूषणांच्या जाणिवेने तुमच्या हातून दुष्कर्म घडणार नाही. सात्त्विक मनुष्याच्या हृदयात ईश्वराचा निवास असतो.

**नित्यं संतोषयुक्तानां ज्ञाननिर्धूतकर्मणाम्।**
**माहेश्वराणामन्तःस्थो विभाति परमेश्वरः।।१०.७६।।**

ज्यांची हृदये संतुष्ट आहेत, ज्यांच्या मनात ज्ञानाचा उदय झाला आहे अशांच्या हृदयात ईश्वराचा निवास असतो. ज्यांच्याजवळ हे सद्गुण नसतात त्यांच्या हृदयात तो प्रकाशत नाही. ईश्वराचा साक्षात्कार करून घ्यायचा असेल तर तुमचा आहार सात्त्विक असला पाहिजे, वेषभूषा सात्त्विक असावी. परिशुद्ध जीवन असावे. यासाठीच भक्तदेहिकलिंगस्थलाचे विवेचन केले आहे.

येथे माहेश्वरस्थलावरील निरूपण पूर्ण झाले. या माहेश्वरस्थलात तुमचा प्रवेश होवो, असा शुभाशीर्वाद देऊन माहेश्वरस्थलावरील विवरण समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
२ सप्टेंबर १९९१



# भाग ३ : अंगषट्स्थलांतर्गत प्रसादिस्थल

आशीर्वचन पहिले

## प्रसादिस्थल– १

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।
विश्ववंद्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगदगुरुम्।।

श्रीकाशीज्ञानसिंहासनाचे आद्यजगद्गुरू विश्वाराध्यांपासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे तिला अनंत प्रणिपात करून या सत्संगात उपस्थित असलेल्या समस्त सद्भक्तांनो आणि मातांनो,

पवित्र श्रावणमासात महान दार्शनिक ग्रंथ 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील तत्त्वज्ञान आपण सर्वजण श्रद्धेने ऐकत आहात. प्रारंभापासून माहेश्वरस्थलातील उपस्थलांवरील आशीर्वचने आपण विस्तारपूर्वक श्रवण केली आहेत. आजपासून षट्स्थलातील माहेश्वरस्थलानंतर येणाऱ्या 'प्रसादिस्थला'वर विवेचन करायचे आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे श्रोता अगस्त्य महर्षी आहेत, तर वक्ता जगद्गुरू रेणुकाचार्य आहेत. एका स्थलाचे विवेचन संपले की समोर बसलेला श्रोता पुढील स्थलासंबंधी प्रश्न विचारतो. श्रोत्याच्या मनात जिज्ञासू वृत्ती नसेल तर वक्त्याला पुढील विवेचन करता येत नाही. थोडे ऐकून श्रोते तृप्त झाले तर प्रवचन तेथेच संपून जाईल. जीवात्म्याला आपल्या मूलस्थानापर्यंत– शिवापर्यंत– पोहोचायचे असले तर त्याला षट्स्थलाचा प्रवास करावा लागतो. याविषयी प्रारंभीच जगद्गुरू रेणुकाचार्यांनी सांगितले आहे. अगस्त्य हे सामान्य श्रोते नव्हते. वेदवेदान्ताचे अध्ययन केलेले बहुश्रुत, ज्ञानसंपन्न असे महर्षी होते. त्यांच्या मनात जेव्हा द्वैतसिद्धान्त खरा की अद्वैतसिद्धान्त खरा, असा संदेह उत्पन्न झाला त्यावेळी त्यांना द्वैत–अद्वैताचा समन्वय करणाऱ्या द्वैताद्वैत तत्त्वज्ञानाचा म्हणजेच षट्स्थल तत्त्वज्ञानाचा जगद्गुरू रेणुकाचार्यांनी उपदेश केला. माहेश्वरस्थलाचे विवेचन संपताच अगस्त्य महर्षींनी प्रश्न केला:–

उक्तो माहेश्वरः साक्षाल्लिंगनिष्ठादि धर्मवान्।
कथमेष प्रसादीति कथ्यते गणनायक।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ११.१)

अगस्त्य विचारतात की, हे गणनायका रेणुका, इष्टलिंगावर दृढनिष्ठा ठेवणाऱ्या भक्ताला माहेश्वर म्हणतात, हे समजले. परंतु हा माहेश्वर 'प्रसादी' कसा होतो ते समजावून सांगा. या प्रश्नाचे उत्तर जगद्गुरू रेणुकाचार्यांनी दिले आहे:–

लिंगनिष्ठादिभावेन ध्वस्तपापनिबंधन:।
मन:प्रसादयोगेन प्रसादीत्येष कथ्यते।।११.२।।

भक्तीच्या विकासक्रमाने साधकाचा विकास होतो, असे वीरशैवसिद्धान्त सांगतो. 'श्रद्धाभक्ती' ही पहिली भक्ती. 'निष्ठाभक्ती' ही दुसरी भक्ती. तिसरी भक्ती म्हणजे 'अवधानभक्ती'. भागवतादी ग्रंथांत श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन असे भक्तीचे नऊ प्रकार सांगितलेले आहेत. यालाच 'नवविधा भक्ती' असे म्हणतात. परंतु येथे भक्तीचे सहा प्रकार सांगितले आहेत. श्रद्धाभक्ती, निष्ठाभक्ती, अवधानभक्ती, आनंदभक्ती, अनुभवभक्ती आणि समरसभक्ती.

'अवधान' म्हणजे निरंतर जागृत राहणे, सदैव शुद्धीवर असणे. मनुष्य नेहमी बेशुद्ध, बेहोष असतो. त्याच्या मनात कोणता ना कोणता तरी विचार चाललेला असतो. याला एक प्रकारची स्वप्नावस्था मानतात. जागृती, स्वप्न, सुषुप्ती अशा मनाच्या तीन अवस्था आहेत. जागृतीतच एक सुषुप्ती अवस्था असते. पुढील अवस्थांचेही असेच तीन-तीन प्रकार केले जातात.

आपण आता ज्या अवस्थेत बसलो आहोत ही जागृतावस्था होय. या अवस्थेत आपले स्थूल व सूक्ष्म शरीर दोन्ही कार्यरत असतात. स्थूल व सूक्ष्म या दोन्ही शरीरांचा संयुक्तरूपाने जेव्हा व्यवहार होत असतो ती जागृतावस्था. केवळ स्थूल शरीर अंथरूणावर निवांत पडलेले असते. तरीही तुम्ही स्वप्नात फिरता, बाजारात जाता, कोणासोबत भांडता, सत्संग करता. जसा तुमचा व्यवहार असतो तशी तुम्ही स्वप्ने पाहत असता. हे सर्व कसे घडते? तर तुमचे सूक्ष्म शरीर काम करीत असते. स्थूल शरीराविना होणारा व्यवहार हीच स्वप्नावस्था. जेव्हा स्थूल व सूक्ष्म या दोन्ही शरीरांकडून व्यवहार होत नाही तेव्हा ती सुषुप्ति-अवस्था असते. यालाच आपण 'गाढ निद्रा' म्हणतो.

यावेळी आपण सगळे जागृतावस्थेत आहोत हे खरे आहे. परंतु तुमच्यापैकी कितीजण खरेच जागृत आहेत? प्रवचन ऐकत असताना एखादा मनुष्य आपल्या मनाशीच हसत असतो. त्यावेळी कळते की तो किती जागृत आहे? त्याला असे हसताना पाहून आसपासचे इतर लोक हसतात आणि त्याला विचारतात की, 'तू का हसतोस?' प्रवचन सुरू असले तरी तो बिचारा आपल्या विचारात डुंबत असतो आणि मनाशी हसतो. ही एक प्रकारची जागृतावस्थेतील स्वप्नावस्था होय. यालाच 'मनोराज्य' असे म्हटले जाते. याचे एकच कारण आहे, ते म्हणजे मनुष्याचे मन शुद्ध नाही हे. मनुष्य नेहमी जागृत नसतो. म्हणून माणसाला सदैव जागृतीची शिकवण देण्यासाठी हे तिसरे 'प्रसादिस्थल' सांगितले आहे.

या स्थलातील साधकाच्या ठिकाणी जी भक्ती असते ती अवधानभक्ती होय. तो निरंतर जागृत असतो. आपल्याला काय करायचे आहे, आपण काय करीत आहोत याविषयी तो सदैव सजग असतो. या स्थलाला 'प्रसादिस्थल' का म्हणतात? तर 'मन:प्रसादयोगेने प्रसादीत्येष कथ्यते।'

ज्याच्या मनात सदैव प्रसन्नता नांदते त्याचे नाव प्रसादी. प्रसाद हा मनाचा एक गुण आहे. निरंतर प्रसन्नचित्त राहणे हाच प्रसाद्गुण होय. आपण सारेच नेहमी प्रसन्न राहण्याची इच्छा करतो. डॉक्टरदेखील सांगत असतात की, तुमच्या मेंदूवर जास्त टेन्शन येऊ देऊ नका. मन असंतुष्ट असेल तर ते अनेक रोगांना आमंत्रण देते. ज्याचे मन सदैव प्रसन्न असते त्याच्याजवळ रोग फिरकत नाहीत. धातुजन्य रोगांपेक्षा मनोजन्य रोग संख्येने अधिक

आहेत. नव्वद टक्के रोग मानसिक स्वरूपाचे असतात. म्हणून मनाची प्रसन्नता निरामय जीवन जगण्यासाठी अत्यंत आवश्यक असते. आपणदेखील प्रसन्न, हसतमुख राहावे अशी इच्छा करतो. परंतु आपल्याला हसूच येत नाही तर काय करणार?

आपण प्रसन्न का नसतो? याचे कारण आपल्या मनात असंख्य वासना दडून असतात. त्या साऱ्यांची पूर्ती होणे शक्य नसते, त्यात आपण असमर्थ ठरतो. म्हणून मन प्रसन्न ठेवणे अत्यंत कठीण आहे. लहान मुलांचे समाधान करणे किती कठीण असते? तसेच मनाचे समाधान करणे अवघड. गीतेत तर याविषयी म्हटले आहे:–

**चंचलं हि मन: कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम्।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम्।।६.३४।।**

मन अत्यंत चंचल. ज्या वस्तूची अपेक्षा ते करते ती वस्तू मिळाल्यावर ते शांत झाले असे भासते, परंतु दुसऱ्याच क्षणी ते पुन्हा चंचल होते. या जगातील सर्व वस्तू एकाच मनुष्याला बहाल केल्या तरी तो मनुष्य पूर्ण समाधानी होणार नाही. कारण मनुष्याच्या मनाचे समाधान करण्यासाठी हे जगदेखील अपुरे पडते. जग लहान होते, मन त्यापेक्षा मोठे होते. म्हणून मनाला पूर्ण तृप्त करणारी एकच वस्तू आहे, ती म्हणजे परमात्मा. याशिवाय अन्य कोणत्याही वस्तूने ते तृप्त होत नाही. करण्याचा प्रयत्न केला तरीही एखादा कोपरा रिकामाच राहतो.

एक राजा होता. रोज सकाळी जो याचक प्रथम येईल त्याच्या इच्छेप्रमाणे दान करण्याचे त्याचे व्रत होते. म्हणून अनेक जण 'प्रथम याचक' होण्यासाठी धडपडत असत. एके दिवशी एक विलक्षण याचक राजाकडे आला. राजाने विचारले, ''तुला काय हवे?''

''तुम्ही द्याल ते,'' याचक उत्तरला, ''पण ही झोळी भरून द्या.''

राजाने पाहिले त्याची झोळी छोटीशीच होती. राजाने सेवकांना आज्ञा केली, ''धनधान्यवस्त्रांनी या याचकाची झोळी भरून टाका.''

सेवकांनी वस्तू आणायला, ओतायला सुरुवात केली. काही केल्या झोळी भरेचना. धान्याचे कोठार रिकामे झाले, खजिना रिकामा झाला. राजा कंगाल झाला. त्याचा गर्व उतरला. हात जोडून याचकाला विचारले, ''महाराज, ही झोळी दिसायला लहान, पण मोठी विलक्षण दिसते कोणत्या वस्त्रापासून ती बनवली आहे?''

''ही झोळी होय?'' याचक हसून म्हणाला, ''ही साध्या वस्त्रापासून बनवली नाही तर मनाच्या वस्त्रापासून बनवली आहे. म्हणून ती कधीच भरणार नाही.''

''पण महाराज,'' राजाने विचारले, ''जगात एखादी तरी वस्तू असेल की जिच्यामुळे ही झोळी पूर्ण भरेल!''

''होय आहे'' याचक म्हणाला, ''परमात्मा ही वस्तू यात टाकली तरी ही झोळी पूर्ण भरते.''

जगातल्या साऱ्या वस्तू एकाच माणसाला अर्पण केल्या तरी तो पूर्णतृप्त होऊ शकत नाही. ज्याच्या हृदयात परमात्म्याचा निवास आहे तोच पूर्ण संतुष्ट राहू शकतो. त्याला भोगाची सामग्री कमी मिळेल, पण आहे त्यात तो समाधान मानतो. निजगुण शिवयोगी म्हणतात, 'दोरेयलेनदरोळु परिणते दळेउदे चंदमम.'

अर्थात् जे मिळेल त्यात समाधान मानले तरच आपले जीवन सुखी होऊ शकते. कितीही मिळाले तरी त्यात समाधान मानण्याची वृत्ती नसेल तर मनुष्य कधीच सुखी होऊ शकणार नाही.

मनाच्या प्रसन्नतेसाठी आचार्यांनी एक सुंदर युक्ती सांगितली आहे. जर तुम्हाला 'प्रसादी' व्हायचे असेल तर तुमचे मन निरंतर प्रसन्न राहील असा प्रयत्न करा. आपण खूप पयत्न करतो तरी मन प्रसन्न राहत नाही. याचे कारण काय? तर ज्यामुळे मनाची उत्पत्ती होते त्या कारणाची आपण चिकित्सा करीत नाही. ती करायला हवी.

**नैर्मल्यं मनसो लिंगं प्रसाद इति कथ्यते।।**
**शिवस्य लिंगरूपस्य प्रसादादेव सिद्ध्यति।।११.६।।**

मनाची शांति-समाधान-सद्भाव याचेच नाव प्रसाद. हा प्रसादगुण मनात येण्यासाठी तुम्ही प्रसादसेवन केले पाहिजे. उपनिषदांत सांगितले आहे, 'अन्नमयं सोम्य मनः आपोमयं प्राणः।'

जिवंत राहण्यासाठी माणसाला पाण्याची आवश्यकता असते. मन जिवंत ठेवण्यासाठी अन्नाची गरज असते. मनुष्य कितीही ज्ञानी असला तरी तो उपाशीपोटी व्याख्यान देऊ शकत नाही. पोट उपाशी असले तर डोक्यात अन्य विचारच येणार नाहीत, विचार येईल तो फक्त जेवण्याचा.

उपनिषदांत एक कथा आहे. एका महर्षींचा पुत्र दुसऱ्या महर्षींच्या आश्रमात वेदाध्ययन करून परत आला. तेव्हा पित्याने विचारले, "तू काय काय शिकलास? काय पाठ केलेस?"

"वेद, उपनिषदे, पुराणे सारी कण्ठस्थ केली आहेत मी." पुत्राने उत्तर दिले आणि त्याने पित्याच्या सांगण्यावरून पाठ केलेले सारे व्यवस्थित म्हणून दाखवले.

"बाळा." महर्षी म्हणाले, "तुझे मन जागृत आहे म्हणून तुला सर्व अभ्यास आठवतो, त्याची स्मृती आहे. परंतु जेव्हा तुझे मन मूर्च्छित होईल तेव्हा तू सारे काही विसरून जाशील."

"ते कसे होईल? शक्यच नाही."

"तू हळूहळू जेवण कमी कर आणि पंधरा दिवस काहीच न खाता केवळ पाणी पिऊन राहा. मग बघू तुझा अभ्यास!"

पित्याने सांगितल्याप्रमाणे मुलाने पंधरा दिवस उपास केला. नंतर त्याने प्रयत्न केल्यावर काही मंत्र आठवले. काही मंत्र आठवेनात. एवढी सगळी घोकंपट्टी केली ती सर्व विस्मरणात गेली. वडिलांचे म्हणणे त्याला पटले. याचे एकच कारण म्हणजे की, मनाचा पोषक जो आहार तो न मिळाल्यामुळे मन क्षीण झाले आणि त्याचे संस्कार दुर्बल झाले. त्याने पुन्हा जेवण्यास सुरुवात केली, मन प्रसन्न झाले आणि पुन्हा त्याची स्मृती टवटवीत झाली. यावरून 'अन्नमयं सोम्य मनः।' हे सिद्ध होते. आपण आज जे अन्न सेवन करतो तेच चाळीस दिवसांनंतर मनात परिवर्तित होते. जसा आहार असेल तसे मन बनते.

सात्त्विक, राजस व तामस असे आहाराचे प्रकार आहेत. जो आहार घेतल्यावर लगेच झोप येते तो तामस आहार होय. शिळे अन्न खाऊन पूजेला बसले तर झोप येते. राजस आहार घेतल्यावर कोणी विचारले नाही तरी मनुष्य स्वतःबद्दल काहीतरी सांगत राहतो. जेवण्यामुळे तो जेवढा तृप्त होतो त्यापेक्षा कसे आणि किती जेवलो हे दुसऱ्याला सांगण्यामुळे अधिक तृप्त होतो. आपल्या घरात काही गोडधोड केले ते त्याने स्वतःच खाल्ले, इतरांना दिले नाही. तरीही इतरांच्या घरी जाऊन, ते काय जेवले याची चौकशी करून, आपण आज काय खाल्ले हे तो रंगवून सांगत असतो. थोडक्यात जे जेवण घरात स्वस्थ बसू देत नाही ते राजस समजावे. चटकन् पचणारा, मनःशांती देणारा आहार सात्त्विक आहार होय. या आहारामुळे मनात सत्त्वगुण उत्पन्न होतो. ज्याच्या मनात उन्नत विचार येतात तो सात्त्विक आहार सेवन करणारा असतो आणि तो आहारदेखील ईश्वरार्पण करून 'प्रसाद' म्हणून

सेवन करतो.

मनाची निर्मलता म्हणजेच प्रसाद. ही निर्मलता कशी प्राप्त होते? तर सांगतात:-

**शिवस्य लिंगरूपस्य प्रसादादेव सिद्ध्यति।।११.६।।**

आपल्या इष्टलिंगाला नैवेद्य दाखवून भोजन केले तर तो प्रसाद होतो. त्यामुळे मनातले सारे दोष नाहीसे होतात. ईश्वराला नैवेद्य दाखवणे म्हणजे त्याला जेवण घालणे नव्हे. 'तुझ्याकडे हात आणि माझ्याकडे भात!' खायचे आपण असते पण ईश्वराला दाखवून. ईश्वर जर काही खातच नसेल तर त्याला दाखवण्याची तरी काय गरज आहे? ते यासाठी की, जर त्या अन्नात दोष असेल तर तो ईश्वर ग्रहण करतो. ईश्वर दोषग्राही आहे. त्याला चांगले देण्याची गरज नाही. त्याला आपले दोष, दुर्गुण हवे असतात.

निसर्ग आणि परमात्मा या दोहोंत एक समान गुण आहे. आपण कोणतीही दूषित वस्तू निसर्गाला अर्पण केली तर तो ती वस्तू परिशुद्ध करून आपल्याला परत करतो. फुलझाडाला आपण खत घालतो, ते सुगंधी नसते. दुर्गंधयुक्त पाणीही आपण फुलझाडाला देतो. परंतु त्यावर उमलणारी फुले दुर्गंधी नसतात, ती सुगंधित असतात. ऊसाच्या शेतात आपण गटारगंगा ओततो. तरीही ऊसाचा रस मात्र अत्यंत मधुर असतो, गटारगंगेसारखा नसतो. गटाराचे पाणी आपण पिऊ शकत नाही, हुंगणेही शक्य नाही. पण तेच पाणी पिऊन ऊस मात्र गोड रस देतो. आपण तो ऊस आवडीने खातो, त्याचा रस पितो. तुम्ही दुर्गंध देता त्याचे परिमार्जन करून निसर्ग तुम्हाला सुगंध देतो. तुम्ही नीरस देता, तो तुम्हाला सुरस देतो.

निसर्ग अर्थात् प्रकृती हा परमात्म्याचा एक अंश आहे. 'शिवजगन्मयस्थला'त आपण याविषयी ऐकले आहे. पृथ्वी हा परमात्मा आहे, तुम्ही द्याल ते ती शुद्ध करते. परमात्मा जलस्वरूप आहे. तो सारे काही धुवून स्वच्छ करतो. तुम्ही द्याल ते परिशुद्ध करणे हा प्रकृतीचा गुण आहे. तोच गुण परमात्म्याच्या ठिकाणी आहे. वाइटातली वाईट वस्तू शुद्ध करून तो आपल्याला परत करतो. ईश्वराला नैवेद्य दाखवण्याचे कारणदेखील हेच आहे. मनुष्य अनेक प्रकारची पापे करतो. चोरी करतो, खोटे बोलतो, कोणाची वंचना करतो, भल्याबुऱ्या मार्गाने द्रव्यार्जन करतो. त्या द्रव्याने विकत घेतलेले अन्न तो जेव्हा खातो तेव्हा त्याचे मनदेखील दूषित होऊन जाते. त्या दूषित अन्नाला शुद्ध करण्यासाठी ईश्वराला नैवेद्य दाखवला जातो. अन्नामधला दोष ईश्वर सेवन करतो आणि निर्दोष अन्न आपल्याला देतो.

अन्नातला सर्वात मोठा दोष म्हणजे ममत्व. 'हे माझे आहे' ही भावना. प्रत्येक वस्तूमधील ममत्वभाव हा सर्वांत मोठा दोष मानला जातो. ज्या क्षणी तुम्ही कमावलेली वस्तू ईश्वराला अर्पण करता त्या क्षणी तो त्यातील 'ममत्व' खाऊन टाकतो. तेव्हा त्या वस्तूवरील तुमचे नाव नष्ट होते, मालकी संपते. ती वस्तू म्हणजे 'ईश्वराचा प्रसाद' होते. अशा प्रसादाचे सेवन केले तर मन प्रसन्न होते.

आपले मन सदैव चिंताग्रस्त असते. जो क्षीरसमुद्राच्या तीरावर राहतो त्याला गाय पाळण्याची, तिचे दोहन करण्याची जरुरी नसते. त्याच्या स्नानासाठी आणि कपडे धुण्यासाठी दुधच दूध असते. तो कशाला गाईची चिंता करील? त्याप्रमाणे जो सद्गुरूच्या चरणाजवळ निरंतर राहतो त्याच्या चालण्याबोलण्यातून आपल्याला ज्ञान प्राप्त होत असते. केवळ घरात बसून ज्ञानप्राप्ती होणार नाही. म्हणून गुरूचे सान्निध्य हा अलभ्य लाभ मानला जातो. ग्रंथ वाचो अथवा न वाचो, गुरुसंगतीत निरंतर राहणाऱ्या मनुष्याला ज्ञानप्राप्ती होतेच. बऱ्याच जणांना मुक्तीची चिंता असते. आपल्याला मुक्ती मिळेल की नाही? आचार्यांनी सांगितले आहे की, मुक्तीची चिंता करू नका.

अन्न हे पहिले ब्रह्म. अन्न परब्रह्म मानले जाते. अन्न नसेल तर ब्रह्मज्ञान होणार नाही. अन्नाला तुम्ही ईश्वर माना, असे आचार्य सांगतात. स्वयंपाक केल्यानंतर अन्नब्रह्माची पूजा केली जाते. पूर्वी प्रत्येक घरी अशी पूजा केली जात असे. आजदेखील जेथे भंडारा असतो, अन्नदान होते तेथे पूजा केली जाते. घरात अन्न शिजवल्यावर त्याची पूजा करायला हवी. नंतर भोजन केले पाहिजे. परंतु तेवढा वेळ कुणाला आहे? जिथे इष्टलिंगाची पूजा करायला आपल्याला वेळ मिळत नाही तिथे अन्नाची पूजा करायला कसा मिळणार? प्रथम अन्नब्रह्माची पूजा करावी. नंतर ते अन्न शिवार्पण केल्यावर ते अन्न 'अन्न' राहात नाही, तर तो 'अन्नप्रसाद' होतो. म्हणून वचनकार सांगतात की, तुम्ही मुक्तीची चिंता कशाला करता? तुम्ही रोज जर प्रसाद सेवन केला तर मुक्तीची चिंता नको. इथे तर तुम्हाला रोजच प्रसाद मिळतो. 'महाप्रसाद घेतल्याशिवाय घरी जाऊ नये' अशी गोड विनंतीही केली जाते. तुम्ही एवढे भाग्यवान आहात. इथे मिळतो तो प्रसाद, घरी जाऊन तुम्ही जेवता ते अन्न. कारण घरी अन्नब्रह्माची पूजा होत नाही आणि ते अन्न ईश्वरार्पणदेखील केले जात नाही. येथे तसे घडत नाही. प्रथम चुलीची पूजा केली जाते. नंतर अन्नाची पूजा केली जाते. ईश्वराला नैवेद्य दाखवल्यावर मग सर्वांना भोजन वाढले जाते. या साऱ्या क्रिया जर तुमच्या घरी घडल्या तर तुम्हालाही रोज 'महाप्रसाद' प्राप्त होईल.

आपल्या सिद्धान्ताप्रमाणे भोजन करणे ही देखील एक पूजाच होय. जशी इष्टलिंगाची पूजा पवित्र भावनेने केली जाते, त्याप्रमाणे पवित्र वस्त्रात एकाच ठिकाणी बसून भोजन घेतले पाहिजे. कसाही आला, कुठेही बसला, कसाही जेवला, याला काही अर्थ नाही. नंतर म्हणतो की, मनच शांत नाही, मन:स्थिती बरोबर नाही. कशी असेल? तुमची भोजनक्रिया जर व्यवस्थित नसेल तर तुमच्या मनात शांती नांदणार तरी कशी? अन्नाबद्दल पूज्यबुद्धी असावी. त्यामधला एक कणदेखील वाया जाता कामा नये. परंतु आधुनिक युगातले बुद्धिमान लोक मात्र ताटातले अर्धे अन्न खातात, अर्धे तसेच उष्टे टाकतात. ताटातले पूर्ण अन्न संपवले तर लोक आपल्याला अन्नच खायला मिळत नाही असे समजतील, अशी जणू त्यांना भीती वाटत असावी. लोकांच्या भीतीने भूक असली तरी असे लोक उपाशी राहतात. परंतु त्यांनी उष्टे टाकलेले अन्न ना त्यांच्या उपयोगी पडत, ना इतरांच्या.

अन्नाच्या बाबतीत अशी अश्रद्धा असल्यामुळेच मनुष्य या प्रपंचात अधिकाधिक दु:खी झालेला दिसतो. म्हणून अन्नाबद्दल सदैव पूज्यबुद्धी असली पाहिजे. ही प्रसादी दीक्षा जो घेतो तो कधीही कोठेही खात-पीत नाही. स्नान करून पूजा केल्यावरच तो अन्नग्रहण करतो. त्याच्यासाठी स्वयंपाक करणाऱ्या व्यक्तीनेही आधी स्नान-पूजा करायला हवी. म्हणून बऱ्याच लोकांना दीक्षा घेण्याची भीती वाटते. परंतु तुम्हाला जी दीक्षा दिली जाते ती या प्रकारची नाही. साधी आहे. दिवसात केव्हाही स्नान करून इष्टलिंगाची पूजा केल्यावर त्याला अर्पण करून नंतर भोजन करावे. इष्टलिंगाला दाखविल्याशिवाय भोजन करू नये, एवढे एकच बंधन त्यामध्ये आहे.

एका व्यक्तीने प्रसादी दीक्षा घेतली होती. ही दीक्षा मोठी कठीण असते. भोजन करताना अन्नाचा एकही कण खाली पडू नये अथवा ताटामध्ये उरू नये. भोजन करताना तो रोज एक सुई जवळ घेऊन बसत असे आणि भोजन संपल्यावर ती सुई जागेवर नीट ठेवून देत असे. हा प्रकार पाहून पत्नीला मोठे आश्चर्य वाटत असे.

एके दिवशी तो गृहस्थ मरणासन्न अवस्थेत बिछान्यावर पडला होता. याच्या मृत्यूनंतर आपल्या मनातल्या शंकेचे निरसन कधीच होणार नाही या भीतीने पत्नीने त्याला विचारले, ''नाथ, भोजन करण्यापूर्वी आपण रोज एक सुई जवळ ठेवत होता. आजपर्यंत आपण कधीही त्या सुईचा उपयोग केला नाही. मला कधीही ती सुई टोचली नाही किंवा स्वत:लाही कधी टोचून घेतली नाही. पण भोजन करताना सुई जवळ बाळगण्याचे प्रयोजन

कोणते?''

पती म्हणाला, ''जेव्हा माझ्या गुरूंनी मला प्रसादी दीक्षा दिली तेव्हा त्यांनी मला बजावले होते की, ही सुई घे आणि भोजन करताना ती जवळ बाळग. तुझ्याकडून अथवा तुझ्या पत्नीकडून चुकून जरी अन्नाचा एखादा कण खाली पडला तर या सुईने तो तत्काळ उचलून ग्रहण कर व तत्क्षणी प्राणत्याग कर. प्रसादिस्थलात अन्न हे परब्रह्म मानले जाते. चुकून जरी अन्नाचा कण खाली पडला तरी ती अन्नब्रह्माची अवहेलना झाली असे समजावे. माझ्या आयुष्यात माझ्याकडून आणि तुझ्याकडून असे काही घडले नाही. म्हणून त्या सुईचा उपयोग कधीही करावा लागला नाही.''

आपल्या सिद्धान्तात अन्नाबद्दल एवढी श्रद्धा बाळगण्याची परंपरा आहे. परंतु आज मात्र ही परंपरा बदलली आहे. पशूप्रमाणे इकडेतिकडे हिंडत-फिरत हातात प्लेट घेऊन भोजन केले जाते. हे आपल्या सिद्धान्ताविरुद्ध आहे. एकाच ठिकाणी बसून पवित्र भावनेने जशी पूजा केली जाते तसे अन्नाबद्धल श्रद्धा बाळगून भोजन केले पाहिजे. असे केले तरच तुम्ही प्रसादी व्हाल, तुमचे मन प्रसन्न राहील.

**शिवप्रसादं यद् द्रव्यं शिवाय विनिवेदितम्।**
**निर्माल्यं तत्तु शैवानां मनोनैर्मल्यकारणम्।।११.७।।**

ईश्वराला वाहिलेले बेलफूल इत्यादींना 'निर्माल्य' म्हटले जाते. 'अथ निर्माल्य विसर्जनम्' असा मंत्र म्हटला जातो. हे निर्माल्य आपण कुठेही फेकून देतो. परंतु शास्त्रात सांगितले आहे की कुणाच्या पायाचा स्पर्श होणार नाही अशा ठिकाणी निर्माल्य फेकावे अथवा त्याचे सेवन करावे. शिवाला वाहिलेल्या बेल-फुलाला अथवा पाण्याला कोणाचा पाय लागला तर तो मोठा दोष गणला जातो. ईश्वराच्या डोक्यावर वाहिलेली बेलफुले आपल्याही मस्तकावर धारण करावी, हुंगावी अथवा भक्षण करावी. म्हणून जे काही शिवाला अर्पण केले जाते ते जर मस्तकावर धारण केले, हुंगले, भक्षण केले, त्याविषयी आदरभाव दाखविला तर त्यामुळे आपले मन निर्मल होते. मनाच्या प्रसन्नतेसाठी निर्मल शिवज्ञान कारणीभूत होते आणि शिवज्ञानाला कारण शिवनिर्माल्य असते. तुमचे मन जर शुद्ध नसेल, ते प्रसन्न नसेल तर शिवज्ञान कसे प्रकाशणार? म्हणून रोज शिवप्रसाद घेणे मनाच्या प्रसन्नतेसाठी आवश्यक आहे.

मनाच्या प्रसन्नतेसाठी अन्नशुद्धीची आवश्यकता आहे. मन शुद्ध करायचे असेल तर अन्न शुद्ध केले पाहिजे. ईश्वरार्पण केल्यावरच अन्न शुद्ध होते आणि प्रसादान्नाच्या सेवनानेच मन प्रसन्न होते असे प्रसादान्न सेवन करणारा पुरुषच 'प्रसादी' म्हणविला जातो. एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
३ सप्टेंबर १९९१

## प्रसादीस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

अन्नशुद्ध्या हि सर्वेषां तत्त्वशुद्धिरुदाहृता।
विशुद्धमन्नजातं हि यच्छिवाय समर्पितम्।।
तदेव सर्वकालं तु भुंजानो लिंगतत्पर:।
मन:प्रसादमतुलं लभते ज्ञानकारणम्।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ११.९,१०)

मनुष्याच्या जीवनात मन:शांतीची नितांत आवश्यकता असते. आपण जे काही करीत असतो ते मनाच्या समाधानासाठी. लौकिक व्यवहार असो की आध्यात्मिक व्यवहार असो सारी मन:शांतीसाठीच धडपड चाललेली असते. मनाच्या शांतीसाठीच काही लोक शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पंचविषयांच्या मागे लागतात, त्यांचा आश्रय घेतात. या पंचविषयांपासून सुख मिळावे अशी त्यांची धडपड असते. त्यातूनही जेव्हा शांती मिळत नाही तेव्हा आपल्याला मोठे नवल वाटते. ही शांती आहे तरी कोठे? ती कशी बरे मिळेल? असे प्रश्न आपल्याला छळतात.

शांती, समाधान आपल्या बाहेर नाही. तिचा शोध आत घ्यायला हवा. जेव्हा आपले मन अत्यंत निश्चल होते, त्याच्या ठिकाणी असलेली चंचलता शून्य होते तेव्हाच आपल्याला शांती मिळते. मनाची चंचलता नष्ट करण्यासाठी योगशास्त्रात आणि अन्य दर्शनशास्त्रांत वेगवेगळे उपाय सांगितलेले आहेत. परंतु आपल्या आचार्यांनी सर्वांना सुलभ असा उपाय सांगितला आहे. मन:शांतीसाठी ध्यान, धारणा आदी योगाभ्यास केला तरी आपला आहार शुद्ध नसेल तर काय उपयोग? गीतेत देखील भगवंतांनी सांगितले आहे–

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दु:खहा।। गीता,६.१७।।

योगी कोण? आणि योग कोणाला साधेल? तर भोजन किती आणि कसे करायचे हे जो जाणतो तो योगी. तुम्ही तर म्हणाल की, आम्ही भोजनात प्रवीण आहोत. काय काय खायचे आणि किती खायचे हे आम्हाला कोणी सांगायला नको. दिवसभर आमचे तेच काम असते. परंतु शास्त्रकार म्हणतात की, भोजन करायचे तुम्हाला माहीत आहे, पण कसे करायचे हे मात्र तुम्ही जाणत नाही. आपले पोट म्हणजे कचराकुंडी नव्हे. बरेचसे लोक पोटाला असेच समजतात. काहीही मिळाले, कुठेही मिळाले, कोणाचेही मिळाले की टाकले पोटात. रस्त्यावरची कचरापेटी आपली आहे असे कोणी म्हणत नाही. तिच्याविषयी कोणालाही ममत्व नसते. जे आपल्याला नको असते ते टाकायची एक जागा एवढेच. निरुपयोगी वस्तू तिच्यात लोक टाकतात. तिची स्वच्छता करण्याची चिंता कोणी करत नसतो. ते काम कॉर्पोरेशनचे. कचराकुंडी भरण्याचे काम मात्र आमचे. याप्रकारे बरेचसे लोक आपल्या पोटाला कचराकुंडी समजून वागतात. काय खावे? किती खावे? कुठे खावे? कधी खावे? याची चिंता कोणी

करीत नाही. यामुळेच आपण अनेक प्रकारच्या रोगांनी ग्रस्त आहोत आणि आपली मन:शांती गमावून बसलो आहोत.

मन:शांतीसाठी पहिले पथ्य आहे आहार. जेवढे कमीत कमी भोजन तुम्ही कराल तेवढे अधिकात अधिक दिवस जिवंत आणि स्वस्थ राहाल. आपण मात्र याच्या विपरीत वागतो. जास्त जेवणे चांगले. पाहुणा म्हणून कोणाच्या घरी आपण जातो तेव्हा यजमान आपल्याला जास्तीत जास्त खाऊ घालण्याचा प्रयत्न करतो. आपल्या देशातली ही एक चूकच. आतिथ्याच्या नावाने एक प्रकारचा वेडाचार हा! खाणारा 'नको नको' म्हणतो तरी त्याचा हात बाजूला करून त्याच्या ताटात वाढतात. आपल्याला कोणी कंजूष म्हणू नये या काळजीने. खाणारा बिचारा 'नको हो' असे कळवळून म्हणत असतो. तर यजमान त्याला 'नाही नाही आणखी थोडे' असे दम देऊन सांगत असतो. अखेर पोट हे पोटच असते. त्याला हवे तेवढेच दिले पाहिजे. जर अधिक दिले तर पोट हळूहळू आपले काम बंद करील. अजीर्ण होईल. पोट एकदा बिघडले की सर्व रोगांना आमंत्रण! तुमचे पोट चांगले तर समजा सर्व काही ठीक आहे आणि पोट बरोबर नाही तर समजा काहीच ठीक नाही.

भोजन करण्याचा एक विधी आहे. तुमच्या पोटात जेवढी जागा आहे ती अर्धी अन्नाने भरावी. उरलेल्या भागात निम्मे पाणी भरावे बाकी हवेसाठी मोकळी ठेवावी. आपण असे करीत नाही अन्नाच्या जागी अन्न, पाण्याच्या जागेत अन्न आणि हवेच्या जागेतही अन्नच भरून घेतो. काही लोक दुसऱ्याच्या घरी इतके आकंठ खातात की घशात बोट घातले तर अन्नाचा स्पर्श होतो. खाता खाता माणसे मरतात. पण कमी खाऊन अधिक काळ जिवंत राहत नाहीत. आपल्याकडे एक धारणा आहे– दाने दाने पर लिखा हैं खाने वाले का नाम! जन्माला आल्यापासून मरेपर्यंत किती खायचे याचे जणू गणितच ठरलेले असते. तुम्हाला आयुष्यभर लागणारे अन्न ईश्वराने वेगळे ठेवले आहे असे समजा. ते सारे अन्न तुम्ही भरभर खाऊन टाकले तर पुढे काय खाणार? कारण त्यानंतरच्या एकाही दाण्यावर तुमचे नाव लिहिलेले नाही. त्यापुढे मृत्यू हाच एक पर्याय. म्हणून जो जास्त जेवतो तो लवकर मरतो असा याचा सरळ अर्थ आहे. यासाठी कमीत कमी जेवावे आणि जे खायचे ते शुद्ध असावे, अशी काळजी घ्यायला हवी.

अन्न शुद्ध तेव्हाच होते जेव्हा तुम्ही ते ईश्वराला अर्पण करता. जेव्हा अन्न 'प्रसाद' होतो तेव्हा. अन्न आणि प्रसाद यात फरक आहे. थोड्या अन्नाने आपण तृप्त होत नाही, ते भरपेट हवे. परंतु प्रसाद थोडा असेल तरी आपण तृप्त होतो. तो पोटभर खात नाही. तुम्ही कोणाच्या लग्नसमारंभात गेलात आणि तेथे तुम्हाला कमी जेवण मिळाले तर तुम्ही यजमानाला शिव्या द्याल. एखाद्या मंदिरात वा मठात तुम्ही गेलात आणि प्रसाद म्हणून तुम्हाला थोडे अन्न मिळाले तरी ते तुम्ही आनंदाने खाता. आज प्रसाद मिळाला म्हणून तुमचे मन देखील प्रसन्न होते. प्रसाद तुम्हाला पोटभर मिळालेला नसतो, परंतु त्यामुळे मिळालेली तृप्ती कमी नसते, ती भरपूर असते. कमीत कमी मिळाल्यावर देखील पूर्ण तृप्ती करणे हे प्रसादाचे वैशिष्ट्य आहे. महास्वामीजींचा प्रसाद म्हणून साखरेचे दोनच दाणे तुम्ही ओंजळीत घेता पण त्यामुळे तुमचे मन किती तृप्त होतेः प्रसादामुळे जेवढे समाधान, तृप्ती मिळते तेवढी दुसऱ्या कोणत्याही पदार्थामुळे मिळत नाही.

आचार्यांनी यासाठी सोपा उपाय सांगितला आहे. तुम्ही जे काही सेवन कराल ते आपल्या इष्टलिंगाला अर्पण करून नंतर सेवन करा. गळ्यात इष्टलिंग धारण करण्याचे हे देखील एक कारण आहे. तुम्हाला खूप भूक लागली. इष्टलिंगाला नैवेद्य दाखविण्याइतका वेळ तुम्हाला नाही. तरी ताटातून तुमच्या तोंडापर्यंत घास जाताना, गळ्यातील

इष्टलिंगाला नैवेद्य दाखविल्याप्रमाणे जातो. ईश्वर समजून घेतो. तो एवढा उदार आहे की, तुम्ही नैवेद्य दाखविला नाही तरी आपल्याला समर्पित करूनच तो अन्न खात आहे असे तो समजतो. हेच तुम्ही भावनापूर्वक केले तर? तर त्याचे चांगले फळ मिळेल.

पूजेनंतर अन्न, औषधी वा जो कोणता पदार्थ तुम्ही ग्रहण करणार असाल तो इष्टलिंगाला अर्पण करूनच ग्रहण करावा. असे केल्यावर तो प्रसाद होतो.

आत्मभोगाय नियतं यद्यद् द्रव्यं समाहितम्।
तत्तत् समर्प्य देवाय भुंजीतात्मविशुद्धये।।११.११।।

ईश्वराला अन्न समर्पित करून सेवन करण्याचा लाभ कोणता? तर त्यामुळे मन:शुद्धी होते. अन्नाचा सूक्ष्म परिणाम म्हणजे मन. शुद्धान्नाच्या सेवनाने मन शुद्ध होते, प्रसन्न होते, पुष्ट होते. मनाची प्रसन्नता हे ज्ञानाचे कारण होय. आपल्याला ज्ञानाची आवश्यकता आहे. अज्ञानामुळेच जीव नाना प्रकारची दु:खे भोगत असतो. त्याला ज्यावेळी आत्मस्वरूपाचे ज्ञान होईल त्यावेळी त्याला लाभणाऱ्या अपार शांतीची तुलना अन्य पदार्थामुळे मिळणाऱ्या शांतीशी करता येणार नाही. स्वर्गसुख अथवा वैकुंठात मिळणारी सुखे ज्ञानी पुरुषाला मिळालेल्या आत्मसुखाच्या लेशाएवढीही नसतात, असे शास्त्रात सांगितले आहे. आत्मसुख हे अत्यंत श्रेष्ठ सुख आहे. ते मिळण्याची पहिली पायरी म्हणजे प्रसादसेवन ही होय.

आपल्याला स्थूल आणि सूक्ष्म अशी दोन शरीरे असतात. त्या दोन्हींचे आरोग्य सांभाळणे जरुरीचे असते. स्थूल शरीरात बिघाड झाला तर सूक्ष्म शरीरातदेखील बिघाड होतो आणि सूक्ष्म शरीरात बिघाड झाला तर स्थूल शरीरात बिघाड होतो. असा दोन्ही शरीरांत परस्परसंबंध आहे. स्थूल व सूक्ष्म शरीरे एकमेकांना प्रभावित करीत असतात. स्थूल शरीरात रोग निर्माण झाला तर मन बेचैन होते. तुमच्या मनात काम, क्रोध आदी मानसिक विकार उत्पन्न झाले तर त्यामुळे तुमचे स्थूल शरीर बेचैन होते. अशी दोन्ही शरीरे परस्परावलंबी आहेत. प्रसादसेवनाने दोन्ही शरीरांचे स्वास्थ्य टिकून राहते, वृद्धिंगत होते. जो नित्य प्रसादसेवन करतो त्याचे आरोग्य सुधारते आणि अंत:करण देखील शुद्ध होते.

आरोग्यकारणं पुंसामन्त:करणशुद्धिदम्।
तापत्रयमहारोगसमुद्धरणभेषजम्।।११.१३।।

या जगात जन्माला आलेल्या प्रत्येक जीवामागे तीन ताप लागलेले आहेत. आध्यात्मिक ताप, आधिभौतिक ताप आणि आधिदैविक ताप. हे तापत्रय होत. याला 'महाज्वाला' असेही म्हटले जाते. हे तीन प्रकारचे अग्नी आहेत. ते माणसाला नेहमी जाळत असतात. जोपर्यंत सूक्ष्म आणि स्थूल शरीरे आहेत तोपर्यंत कोणत्या ना कोणत्या तापाने मनुष्य ग्रस्त असतो. रस्त्यावर कोणी ओळखीचा चेहरा दिसला की आपण पहिला प्रश्न विचारतो, ''कसं काय ठीक आहे ना? प्रकृती काय म्हणते?''

मुलेबाळे कशी आहेत? हा प्रश्न नंतर. प्रथम प्रकृतीची, आरोग्याची चौकशी. माणसाला चौकशीची अन् त्यावर ठराविक उत्तर देण्याची सवयच पडली आहे.

''कसं काय? प्रकृती कशी आहे?''

''ठीक आहे. उत्तम.''

''कोठे निघालात?''

''दवाखान्यात.''

आरोग्य ठीक असेल तर दवाखान्यात कशाला जातो? तर आपल्याला ही सहज सवय पडली आहे. हा एक शिष्टाचार पडून गेला. पत्रात देखील 'क्षेमकुशल' लिहिण्याची प्रथा आहे. परंतु पत्रात आजारीपणाच्या कथा असतात. दोन्हीचा काय संबंध? ही देखील सवयच.

यावरून हे सिद्ध होते की जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत त्यात कोणतातरी रोग दडलेला असतोच. म्हणून तर आपण सर्वप्रथम आरोग्याची चौकशी करीत असतो. रोगाविना शरीर असतच नाही. बाह्यत: काही रोग दिसत नसला तरी भूक आणि तहान हे रोग शरीरात असतात असे शंकराचार्यांनी म्हटले आहे. भूक आणि तहान हे एक प्रकारचे रोगच आहेत. त्यांची औषधे अन्न आणि पाणी.

आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक हे तिन्ही ताप माणसाला छळतात. परंतु प्रसादसेवनाने या तापत्रयापासून मुक्ती मिळते. प्रसादसेवनाने आपली बुद्धी सात्त्विक होते. 'सत्त्वात् संजायते ज्ञानम्' असे भगवंतांनी सांगितले आहे. ज्ञान कोणाला प्राप्त होते? बरेच लोक प्रवचन ऐकायला येतात. हजार लोक प्रवचन ऐकतात. त्या सगळ्यांना ज्ञान प्राप्त होते का? तसे घडत नाही. हजारात जो सात्त्विक असतो त्याला ज्ञान लाभते. सात्त्विक कोण असतो? तर इथे बसल्यापासून निघून जाईपर्यंत ज्याच्या मनात इतर कोणताही विचार येत नाही आणि जो तन्मय होऊन ऐकतो तो सात्त्विक. घर, दार, शेती, धंदा, भांडणे इत्यादी विचारांपासून तो अलिप्त असतो. येथे बसून जो इतर विचारांनी ग्रासलेला असतो तो सात्त्विक नव्हे. तो येथे येण्यासाठी निघतो तेव्हा सात्त्विक असतो. येथे येऊन बसल्यावर राजस बनतो. कारण त्याच्या मनात सांसारिक विचारांची गर्दी होते. काहीजण येथे आल्यावर छानपैकी झोप काढतात. काही जणांना घरी गोळी घेऊनदेखील झोप येत नाही. पण प्रवचन ऐकताना मात्र छाप झोप येते. आरती सुरू होते तरी ते भाग्यवान निद्रासुखातच रमलेले असतात. येथे येऊन झोपणेदेखील चांगलेच.

गावात एक प्रवचनकाराचे प्रवचन रोज चालू होते. प्रवचनासाठी सारा गाव लोटायचा. एक मनुष्य मात्र काही केल्या येत नसे. सगळा गाव येतो परंतु एकजण येत नाही हे समजल्यावर प्रवचनकाराचा अहंकार दुखावला. त्याने त्याला बोलावणे पाठवले. तरी तो आला नाही.

दुसऱ्या दिवशी प्रवचनकार त्याच्या घरी गेला. इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्या. हळूच ''प्रवचनाला का येत नाही?'' अशी चौकशी केली. त्याने ''फार कामे आहेत. येणे जमत नाही.'' असे उत्तर दिले.

प्रवचनकाराने त्याला हॉटेलात नेऊन खाऊपिऊ घातले आणि रात्री प्रवचनाला येण्याची विनंती केली. ज्याने खाऊ घातले त्याचे तेवढ्यापुरते ऐकायला लावणे हे अन्नाचे वैशिष्ट्य आहे. 'चला याने खाऊ घातले, जाऊ या रात्री' असा विचार करून त्या गृहस्थाने होकार दिला.

रात्री प्रवचन चालू झाले त्यावेळी सर्वांबरोबर कधीही न येणारा तो गृहस्थदेखील येऊन बसला. प्रवचनकाराला बाजी मारल्याचा आनंद झाला. त्याने रसाळ प्रवचन केले. प्रवचन संपल्यावर सारे लोक उठून निघाले तेव्हा त्या गृहस्थाला प्रवचनकाराने मुद्दाम थांबवून घेतले आणि म्हणाला, ''तुम्ही आलात याचा मला खूप आनंद झाला.''

''मला देखील खूप आनंद झाला.'' तो गृहस्थ म्हणाला.

प्रवचनकार मनोमन सुखावला. त्याने खुशीने विचारले, ''माझ्या प्रवचनातला कोणता भाग आवडला तुम्हाला?''

तो गृहस्थ गोंधळून म्हणाला, ''तुमच्या प्रवचनात काय होतं ते माहीत नाही. पण इथे आल्यावर इतकी छान झोप लागली की तशी घरी कधीच येत नाही.''

प्रवचनकाराने आपल्या कपाळावर हात मारून घेतला.

प्रवचन ऐकायला खूप लोक येतात. काहीजण राजस असतात. इथे बसून मनाने घरी, शेतात, परगावी कुठेही जातात, इथे बसून व्यापार करतात, स्वयंपाक करतात. असे विचार येथे बसून मनात येत असतील तर आपण राजस आहोत, सात्त्विक नाही असे निःशंकपणे समजावे. येथे बसून झोप आली तर समजावे की आपण तामस, तमोगुणी आहोत आणि आध्यात्मिक प्रवचनात तुम्ही तन्मय होऊन रंगून गेलात तर समजा की तुम्ही पूर्ण सात्त्विक आहात. कमीअधिक प्रमाणात प्रत्येकजण सात्त्विक, राजस आणि तामस असतो. परंतु हे जाणून सुधारण्याचा प्रयत्न आपण करायला हवा.

**वैराग्यसंपदो मूलं महानन्दप्रवर्धनम्।**
**दुर्लभं पापचित्तानां सुलभं शुद्धकर्मणाम्।।११.१५।।**

पापी माणसाला मनःशांती मिळणे कदापि शक्य नाही. जे तन-मन-भावाने सत्कर्मे करतात त्यांचेच मन परिशुद्ध होते आणि त्यांनाच मनःशांती लाभते. ईश्वराचा प्रसाद केवळ मानवासाठी नाही तर ब्रह्मादी देवता आणि महर्षी देखील प्रसादाची इच्छा करतात. भागवतामध्ये एक सुंदर कथा आली आहे.

एकदा महान क्रोधी तपस्वी दुर्वास द्वारकेत गेले आणि रस्त्यावरून मोठ्याने ओरडत फिरू लागले,

''कोण आहे या नगरात माझे आतिथ्य करणारा? त्याने पुढे यावे.''

महर्षी दुर्वास म्हणजे प्रत्यक्ष क्रोधावतारच! त्यांचे आतिथ्य करण्याची कुणातच हिंमत नव्हती. साऱ्या लोकांनी पटापट दारे, खिडक्या बंद करून घेतल्या. तुझे आतिथ्य करणे नको आणि तुझा शाप घेणेही नको या विचाराने. परंतु नगराचा राजा श्रीकृष्ण समोर आला आणि आणि हात जोडून म्हणाला, ''भगवान, आपण माझ्या राजवाड्यात येऊन आतिथ्याचा स्वीकार करावा.''

दुर्वासांनी एक क्रोधपूर्ण दृष्टिक्षेप त्याच्यावर टाकला आणि म्हणाले, ''जा माझ्यासाठी एक रथ घेऊन ये.'' घोडे जुंपलेला रथ श्रीकृष्णाने आणताच ते रागावून म्हणाले, ''एक घोडा असलेला रथ आण.'' एक घोडा जुंपलेला रथ आणताच ते गरजले, ''माझा रथ घोड्याने नव्हे तर तुझ्या पत्नीने ओढला पाहिजे.''

श्रीकृष्णाने तेही मान्य केले आणि रुक्मिणीला रथ ओढायला लावले. राजवाड्यात गेल्यावर स्नानपूजा झाली आणि दुर्वासांनी फर्मावले, ''माझी पूजा संपताच मला तात्काळ दुधाची खीर खायला द्या. ती खीर उकळती हवी. थोडी देखील गार झालेली चालणार नाही.''

उकळती खीर त्यांच्यासमोर आणली तेव्हा ते चिडून म्हणाले, ''अशी खीर कुणी खाऊ शकतो? जा, तुझ्या सर्वांगावर ती लिंपून घे.'' श्रीकृष्णाने त्याप्रमाणे केले. महर्षींने विचारले, ''तू संपूर्ण शरीराला खीर लावलीस काय?''

''होय. परंतु तळपायाला मात्र लावली नाही. कारण तिथे लावल्यामुळे अन्नब्रह्माचा अपमान होईल.''

श्रीकृष्ण उत्तरला.

महर्षी म्हणाले, ''माझ्या दृष्टिक्षेपाने खिरीत मी सामर्थ्य ओतले आहे. सर्वांगाला ती खीर लावल्यामुळे तू वज्रदेही झालास, परंतु पायाच्या तळव्याला न लावल्यामुळे तू तेथे मात्र कच्चा राहिलास. तुझा मृत्यू तळव्याकडून होईल.''

श्रीकृष्णाचा मृत्यू त्याप्रमाणे घडला. याप्रकारे भागवतादी ग्रंथांत प्रसादाचे माहात्म्य वर्णिलेले आहे. ब्रह्मादी देवतांना दुर्लभ असा हा प्रसाद सेवन केल्याने मन:शुद्धी होते. पान, फूल, फळ, जल, इ. काहीही ईश्वराला अर्पण करून त्याचा प्रसाद म्हणून स्वीकार केल्याने सर्व पातके नष्ट होतात.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यच्छिवाय निवेदितम्।**
**तत्तत्स्वीकारयोगेन सर्वपापक्षयो भवेत्॥११.१७॥**

एखादा भक्त ईश्वराला विचारू शकतो की 'भगवन् आपल्याला भोजनात कोणकोणते पदार्थ हवे?' आम्ही आधीच सांगितले होते की ईश्वर पदार्थभोगी नाही. काही लोकांना विशिष्ट पदार्थांची अत्यंत आवड असते. तशी ईश्वराला नसते. भक्तीने जे काही द्याल ते तो स्वीकारतो. वाळलेले झाडाचे पान असो की साधे सहज उपलब्ध असलेले पाणी. त्याला काहीही चालते. काही लोकांना घरी सण केला की त्या दिवशीच ईश्वराची आठवण येते. देवाला रोज नैवेद्य दाखविणार नाहीत. दाखवतील काय तर दूध आणि साखर. रोज दूधसाखर खाऊन त्याला मधुमेह होण्याची भीती जास्त. ईश्वराला काय फक्त मिठाईच आवडते? भाजी-भाकर, वरण त्याला चालत नाही काय? जर तुम्ही खाऊ शकता तर तो देखील खाऊ शकतो. खरे तर त्याला कशाचीच जरुर नाही. परंतु आपण काही खाण्याआधी त्याला नैवेद्य दाखवून खाणे हा एक विधी आहे. रोज साधा भाजीभाकरीचा नैवेद्य देवाला काय दाखवायचा? असा विचार काही लोक करतात आणि सणासुदीला बिचाऱ्या ईश्वराला नैवेद्य दाखवितात. आजवर झाले ते झाले. यानंतर मात्र स्वयंपाक झाल्यावर जे काही अन्न असेल ते देवघरातील देवाला आणि इष्टलिंगाला आधी अर्पण करा आणि मग त्याचे सेवन करा. ईश्वराचे नाव घेत घेत भोजन करावे आणि त्यावेळी इतर काही बोलू नये असे शास्त्रात सांगितले आहे. परंतु आमची सारी बडबड जेवतानाच होते. घरातील स्त्री नवरा जेवायला बसला रे बसला की आपल्या तोंडाचा पट्टा सुरू करते. घरात काय आहे, काय नाही... सगळ्या गोष्टी सांगून होतात.

भोजन हे एक प्रकारचे यज्ञकर्म आहे. यज्ञकुंडात समिधा आणि हविर्द्रव्ये मंत्रपूर्वक हवन केली जातात. आपल्या आत असलेला जठराग्नी हे ईश्वराचेच रूप आहे. गीतेत भगवंतांनी म्हटले आहे की प्राणिमात्रांच्या जठरातला वैश्वानर मीच आहे. आपले पोट हे कचराकुंडी नाही म्हणून प्रत्येक घास जणू जठराग्नीत हवन करीत आहोत या भावनेने ईश्वरनाम घेत खाल्ला पाहिजे. असे घडले तरच आपले भोजन हे एक यज्ञकर्म होईल.

**ब्रह्मार्पणं ब्रह्महवि: ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्।**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥**

दुसऱ्याला जेवू घातल्यामुळे जसा पुण्यलाभ होतो तसाच स्वत: विधिपूर्वक भोजन केल्याने देखील होतो. आपल्या जठरात वसणाऱ्या वैश्वानररूपी परमेश्वराच्या तृप्तीसाठी मी हवन करीत आहे, या भावनेने केलेले

भोजनच यज्ञकर्म होय. क्रिया एकच असली तरी भावनेत बदल झाला तर क्रियेचा अर्थ बदलतो. ठार करणे ही क्रिया एकच असते. तथापि शत्रूंना ठार करणारा महावीरचक्राचा मानकरी ठरतो तर मनुष्याला ठार करणारा खुनी म्हणून फासावर लटकतो. क्रिया एकच असली तरी भावना वेगळी आहे. ईश्वरस्मरण करीत एक यज्ञकर्म म्हणून जर तुम्ही भोजन कराल तर त्याचा शुभ परिणाम लवकरच दिसून येईल. हा एक प्रयोग आहे. तो करून पाहिला तरच त्यांची सत्यता पटेल. येथे तुम्ही जे ऐकता ते थोडे तरी सोबत घेऊन जा. दक्षिणा म्हणून आम्हालाच देऊन टाकू नका. डोक्यात प्रवचन भरून घ्या आणि येथे ऐकाल त्याचा घरी जाऊन प्रयोग करा. तुम्हाला त्याचे फळ निश्चित मिळेल. 'खूप' ऐकले तर निदान 'थोडे' तरी करून पाहावे. या कानाने ऐकून त्या कानाने सोडू नये. ईश्वराने आपल्याला पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेन्द्रिये दिली आहेत. ज्ञान आणि कर्म यांच्याकरिता सम प्रमाणात इंद्रिये दिली आहेत. ज्ञानासाठी पाच आणि कर्मासाठी चार अशी ही विभागणी विषम नाही. जेवढे ज्ञान असेल तेवढेच कर्म असावे. ज्ञान खूप आहे पण कर्मात ते अभिव्यक्त होत नसेल तर त्याचा उपयोग नाही. ज्ञान आणि कर्म यांची सांगड हवी. नुसते कर्म उपयोगाचे नाही. आपण काम करीत आहोत याचे ज्ञानदेखील हवे. ज्ञानशून्य कर्म घातक ठरू शकते.

'पंचतंत्रात' एक कथा आहे. एका राजाने एक माकड पाळले होते. त्याचा माकडावर फार जीव जडला. जेवताना, झोपताना माकड सदैव राजासोबत असे. एकदा राजा झोपला असताना माकड पहारा देत होते. एक माशी राजाच्या तोंडावर बसली. माकडाने ते पाहिले. हाताने तिला हाकलले तरी ती पुन्हा येऊन बसली. 'राजाच्या तोंडावर बसू नकोस' असे माकडाने आपल्या भाषेत तिला सांगितले. पण तिला त्याची भाषा कळली नाही. शेवटी माकडाने चिडून तलवार उपसली आणि तिच्यावर वार केला. पण त्या वाराने राजाचाच चेहरा छिन्नविच्छिन्न झाला. तो मोठमोठ्याने ओरडू लागला. माकडाला माशीला मारायचे होते. परंतु आपण काय करीत आहोत याचे ज्ञान त्याला नव्हते. म्हणून त्याच्या कृतीने अनर्थ घडला. त्याप्रमाणे केवळ कर्म उपयोगाचे नाही तर कर्मासोबत ज्ञानदेखील हवे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

४ सप्टेंबर १९९१



# गुरुमाहात्म्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आपल्या सिद्धान्ताप्रमाणे तीन आराध्ये असतात. गुरू, लिंग आणि जंगम. जेवढी श्रद्धा आपल्या इष्टलिंगावर असते तेवढीच आपल्या गुरूवर आणि ज्ञानोपदेश करणाऱ्या जंगमावर असली पाहिजे. वीरशैव संतकवी श्रीमन्मथस्वामींनी तर जन्मोजन्मी गुरू-लिंग-जंगमाची सेवा करण्याचे भाग्य लाभावे अशी इच्छा प्रदर्शित केली आहे.

**गुरू आणि लिंग जंगमाची सेवा।**

**देई मज देवा जन्मोजन्मी।।**

या त्रिमूर्तींच्या सेवेसाठी अनेक जन्म घेण्याची तयारी त्यांनी दर्शवली आहे. गुरू-लिंग-जंगमांची सेवा करायची असेल तर मनुष्यजन्मच घ्यावा लागेल. मनुष्यजन्म हा अत्यंत श्रेष्ठ आहे. स्वत: श्रेष्ठ संत असताना आणि पुनर्जन्माची शक्यता नसताना मन्मथस्वामींनी असे मागणे का मागितले असावे? तर जोपर्यंत समजावून सांगत नाही आणि आपल्या कृतीत ते उतरवत नाही तोपर्यंत लोकांना त्याचे आकलन होत नाही. म्हणून मन्मथस्वामींनी सेवेची इच्छा व्यक्त केली आहे.

आचार्य कोण? जो सर्व शास्त्रांचे अध्ययन करून लोकांना उपदेश देण्याअगोदर त्यांचा पूर्ण अनुभव घेऊन मग इतरांना ज्ञानोपदेश करतो तोच आचार्य होय. आपल्याकडे शिवाचार्य असतात आणि महाचार्य देखील असतात. पंचपीठांच्या जगद्गुरूंना महाचार्य असे म्हटले जाते, तर त्या पीठांच्या शाखांवर अभिषिक्त झालेल्या स्वामींना शिवाचार्य असे म्हटले जाते. शिवत्व जाणून आपल्या आचरणाद्वारे जे लोकांना बोध करतात ते शिवाचार्य होत. मन्मथस्वामींचे व्यक्तिमत्व शिवाचार्याप्रमाणेच होते. परमरहस्य इ. ग्रंथ आणि अभंग लिहून त्यांनी महाराष्ट्रात शिवभक्ती जिवंत ठेवली. म्हणून हा धर्म महाराष्ट्रात जिवंत राहिला.

मातृगर्भात असताना गुरूने जे इष्टलिंग प्रदान केलेले असते ते सदैव शरीरावर धारण करावे, त्याचा आणि शरीराचा कदापि वियोग होऊ नये असे आपल्या सिद्धान्तात सांगितले आहे. आपल्या प्राणाप्रमाणेच ते अत्यंत प्रिय मानले पाहिजे. भक्ताला लिंगप्रसाद घेणे आवश्यक असते, त्याप्रमाणेच गुरुप्रसाद आणि जंगमप्रसादाची देखील आवश्यकता असते. म्हणून प्रसादिस्थलात गुरूचे आणि गुरुप्रसादाचे माहात्म्य वर्णिले आहे.

**गुरुरेवात्र सर्वेषां कारणं सिद्धिकर्मणाम्।**
**गुरुरूपो महादेवो यत: साक्षादुपस्थित:।।११.१९।।**

भारतीय संस्कृतीत गुरूला अत्यंत मानाचे स्थान दिलेले आहे. आपल्या आचार्यांनी सांगितले आहे-

**अप्रत्यक्षो महादेव: सर्वेषामात्ममायया।**
**प्रत्यक्षो गुरुरूपेण वर्तते भक्तिसिद्धये।।९.५३।।**

आपल्याला आपली भक्ती समर्पित करायची असते. परंतु जो मायाशक्तिविशिष्ट महेश्वर आहे तो सगळ्या भक्तांच्या समोर येत नाही. मग सामान्यजनांनी आपली भक्ती त्याला कशी समर्पित करावी? म्हणून आपले मायास्वरूप सोडून गुरूंच्या रूपात प्रत्यक्ष शिवच अवतीर्ण होऊन येतो. 'साक्षात् भर्गो नराकृति:' असे आचार्यांनी म्हटले आहे. आपली आचार्य परंपरा प्रत्यक्ष भगवान शिवापासून उत्पन्न झालेली आहे. रेणुकाचार्य, दारुकाचार्य, मरुळाराध्य, पंडिताराध्य आणि विश्वाराध्य हे पंचाचार्य प्रत्यक्ष शिवाच्या पंचमुखापासूनच प्रादुर्भूत झाले आहेत. महर्षी पतंजलींनी भगवान शिवाला या प्रपंचाचा आदिगुरू मानले आहे. जगातील सारे गुरू देहधारी असतात आणि त्यांचा जीवितकाल सीमित असतो. परंतु आदिगुरू भगवान शिवाला मात्र कालमर्यादा नाही. ते काळाचेही काळ असल्यामुळे त्यांना 'महाकाळ' असे म्हटले जाते.

काळ सर्वभक्षक आहे. 'कालो जगद्भक्षक:' असे एका सुभाषितकाराने म्हटले आहे. भोजनाच्या वेळी एका ताटात अनेक पदार्थ ठेवले जातात. मनुष्य आपल्या आवडीनुसार त्यातील पदार्थ खातो. कोणता पदार्थ खावा किंवा खाऊ नये या बाबतीत तो स्वतंत्र असतो, त्याप्रमाणे या जगातील यच्चयावत् प्राणिमात्र म्हणजे काळासमोरील भोज्य पदार्थच होत. तो आपल्या आवडीप्रमाणे त्यांचे भक्षण करतो. जन्मणाऱ्या प्रत्येकाचा मृत्यू अटळ असतो. जगाच्या पाठीवर आपण कुठेही गेलो तरी आपला मृत्यू चुकणे शक्य नाही.

एका राजाला पहाटे एक स्वप्न पडले. त्या स्वप्नात काळाकभिन्न पुरुष येऊन त्याला म्हणाला, ''उद्या संध्याकाळी ५ वाजता तयार रहा, मी तुला न्यायला येणार आहे.'' राजा दचकून जागा झाला. तो अत्यंत घाबरला. त्याने राजज्योतिषाला बोलावून घेऊन त्या स्वप्नाचा अर्थ विचारला.

ज्योतिषाने स्वप्नातला पुरुष म्हणजे मृत्यूच होय असे सांगितले. राजाने घाबरून त्याला विचारले की, ''मी आता काय करू?'' तेव्हा ज्योतिषी म्हणाला, ''महाराज तुम्ही हे शहर सोडून दूर पळून जा.''

राजाने आपल्या पागेतील उत्तम घोडा निवडला आणि त्याच्यावर स्वार होऊन तो वेगाने दौडत निघाला. सायंकाळचे ५ वाजत आले. तो थकून घोड्यावरून खाली उतरला आणि एका झाडाखाली निवांत बसला. त्याला वाटले आपण आपल्या राजवाड्यापासून इतके दूर आलो आहोत आणि मृत्यू तिथे राजवाड्यात शोधायला जाईल. त्याची आणि आपली गाठ पडणे शक्य नाही. सुटलो एकदाचे आपण!

इतक्यात त्याच्या पाठीवर कुणीतरी थाप मारली. राजा वळून पाहतो तो स्वप्नातला काळपुरुष समोर प्रत्यक्ष उभा. राजाने घाबरून विचारले, ''यावेळी तुम्ही राजवाड्यात जाणार होता ना? मग इथे कसे आलात?''

''महाराज'', काळपुरुष उत्तरला, ''तुमची आणि माझी भेट याच ठिकाणी पडणार होती. तुम्ही राजवाड्यापासून इथपर्यंत कसे याल? याचीच मला चिंता होती. पण ते काम तुमच्या घोड्याने केले आहे. चला, आता निघू या.''

आणि शेवटी राजाला काळपुरुषाबरोबर जावेच लागले.

आपण कुठेही गेलो तरी मृत्यूपासून आपली सुटका नाही. म्हणून या लोकाला 'मृत्युलोक' म्हणतात. इथले सारे जीवजंतू कुठेही बसलेले असले तरी ते मृत्यूच्या ताटातील पदार्थच होत. त्याला वाटेल तेव्हा तो ते खाऊन टाकणार. परंतु या मृत्यूचा देखील एक मृत्यू आहे. उपनिषदांत म्हटले आहे की, जो सर्वांना गिळून टाकणारा मृत्यू आहे तो स्वत:देखील ईश्वराच्या समोरील ताटातील लोणच्याप्रमाणे होय. 'मृत्युर्यस्योपसेचनम्'. ताटातील

लोणचे चाटून फस्त करावे त्याप्रमाणे तो मृत्यूला खाऊन टाकतो. तो काळाचाही काळ आहे अशा ईश्वराला शरण गेल्याने मृत्यूचे भय उरत नाही. शरीर केव्हातरी धराशायी होईलच. कारण तो त्याचा धर्म आहे. परंतु शरीराची आसक्ती नष्ट झाल्याने मृत्युभय वाटणार नाही.

आपला मृत्यू सात दिवसांनी होणार हे जेव्हा राजा परीक्षिताला समजले तेव्हा तो अत्यंत सुरक्षित स्थळी जाऊन बसला. त्याकाळात त्याला शुकमुनींनी भागवत ग्रंथ ऐकवला. एक दिवस झाला, दोन दिवस झाले. जसजसा मृत्यू समीप येऊ लागला तसतसे परीक्षिताचे डोळे अश्रूंनी भरून वाहू लागले. असे सहा दिवस लोटले. शुकमुनींना वाटले की, याला आता भागवत ऐकविण्यात अर्थ नाही. म्हणून त्यांनी राजाला एक कथा सांगितली.

एक चक्रवर्ती सम्राट शिकार करता करता अरण्यात वाट चुकला. रात्र झाली. त्याला दूरवर प्रकाश दिसला. त्याने जवळ जाऊन पाहिले. ती एक झोपडी होती. दार ठोठावल्यावर आतल्या मनुष्याने दार उघडले. त्याने राजाला पाहताक्षणीच ओळखलेआणि नमस्कार केला. राजा म्हणाला, ''येथे माझी रात्रभर राहण्याची व्यवस्था होईल का? सकाळी उठून मी निघून जाईन.''

''होय महाराज अवश्य होईल.'' तो मनुष्य उत्तरला आणि त्याने राजाला आत घेतले. झोपडीत सर्वत्र रक्तामांसाचा चिखल पडलेला होता आणि फक्त एकच मनुष्य झोपू शकेल एवढीच जागा मोकळी होती. तो मनुष्य म्हणाला, ''महाराज, आपण आत झोपा मी बाहेर झोपतो.''

रक्तामांसाचा चिखल आणि असह्य दुर्गंधी यामुळे राजाला झोप येईना. त्याने बाहेर झोपलेल्या मनुष्याला विचारले, ''एवढ्या दुर्गंधीत तुला झोप तरी कशी येते?''

''महाराज आम्हाला याची इतकी सवय झाली की आमच्या नाकाला दुर्गंधीची जाणीवच होत नाही. पण तुम्हाला झोप येत नसेल तर झोप येण्याचे औषध माझ्याजवळ आहे ते थोडे घेणार का?''

राजाने होकार देताच त्याने बाटली बाहेर काढली आणि त्यातले पेय राजाला दिले. ते प्यायल्यावर राजा बेहोष झाला आणि निवांत झोपला. दिवस उगवला तरी राजा झोपेतच. दुपार उलटली तरी राजा उठायला तयार नाही. शेवटी त्या मनुष्याने राजाला उठविले. राजा नशेतच होता. त्याने उलट विचारले, ''तू कोण आणि ही झोपडी कुणाची? ही माझीच आहे. मी इथून जाणार नाही.''

ही कथा सांगून शुकमुनींनी परीक्षिताला विचारले, ''महाराज, दुसऱ्याच्या झोपडीत जाऊन त्या झोपडीवर हक्क गाजविणारा हा राजा आपल्याला कसा वाटतो?''

''महामूर्ख!'' परीक्षित उत्तरला.

''महाराज'', शुकमनुी म्हणाले, ''हा राजा दुसरा तिसरा कुणी नसून आपणच आहात. ही तर आपलीच कथा आहे. जीवात्म्याच्या भोवती राहणारे शरीर हे अस्थिमांसरक्ताचेच असते. हे शरीर त्याचे नाही, तरीदेखील ते सोडायला तो तयार नसतो.''

परीक्षिताला आपली चूक उमगली आणि त्याच्या मनात विवेक जागा झाला.

शरीरातले चैतन्य म्हणजे आत्मा. तो कधी मरत नाही. अग्नीत जाळला जात नाही. शस्त्राने मारला जात नाही आणि वायूने शोषला जात नाही. अशा या अमर चैतन्यतत्त्वाचे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान. या आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी श्रीगुरूची अत्यंत आवश्यकता असते. जीवांचा उद्धार करण्यासाठी, त्यांना मुक्तिमार्ग दाखविण्यासाठी मायाशक्तिविरहीत होऊन प्रत्यक्ष शिवच गुरूरूपाने भूतलावर अवतीर्ण होतो. तो सामान्य मनुष्याप्रमाणे दिसतो पण

प्रत्यक्ष शिवच असतो, असे आचार्य सांगतात–

**हस्तपादादिसाम्येन नेतरैः सदृश्यं वदेत्।**
**आचार्यं ज्ञानदं शुद्धं शिवरूपतया स्थितम्।।११.२२।।**

गुरूत आणि आमच्यात काय फरक आहे? आम्हाला दोन पाय आहेत, त्यांनाही दोनच पाय आहेत. आम्ही खातो, तेही खातात. आम्ही झोपतो, तेही झोपतात. फरक आहे कुठे? शारीरिक दृष्टीने गुरू आणि आपण यांच्यात काही भेद दिसत नसला तरी त्यांच्याठायी असलेले ज्ञान आणि भावना आपल्या ठिकाणी नसते.

'गुणाः पूजास्थानं गुणिषु नच लिंगं नच वयः' असे एका सुभाषितकाराने म्हटले आहे. जगातील प्रत्येक मनुष्याला आपण पूज्य व्हावे असे वाटते. परंतु केवळ शरीर हे पूजायोग्य नाही, तर मनुष्याचे गुण पूजनीय असतात. सद्गुण नसलेली व्यक्ती पूज्य म्हणून गणली जाणार नाही.

आपण ज्या इष्टलिंगाची पूजा करतो ते लिंग शिलेपासून निर्माण झालेले असते. शिलेत जे गुण असतात ते जिवंत माणसाच्या ठिकाणी देखील सापडणे अवघड आहे. एक सुभाषितकार म्हणतो–

**न द्विषन्ते न याचन्ते परनिंदां न कुर्वते।**
**अनाहुता नचायान्ति तेनाश्मानोपि देवताः।।**

दोन देवता एका ठिकाणी बसल्यावर द्वेष करीत नाहीत. परंतु दोन माणसे एका ठिकाणी आली तर एकत्र बसू शकत नाहीत. परस्परांचा मत्सर करतील. देव कशाचीही याचना करीत नाही. त्याने जर तुम्हाला काही मागितले तर तुम्ही त्याला घराबाहेर काढाल. याचना न करण्याची वृत्ती जर तुमच्याठायी दृढ झाली तर तुम्ही ईश्वरच व्हाल. देव कोणाला काही मागत नाही. तो कोणाची निंदा करीत नाही. बोलावल्याशिवाय कोणाच्या घरी जात नाही. हे गुण आहेत म्हणून तो पूजनीय आहे. गुरू आणि सामान्य माणूस यांच्यामध्ये असा फरक असतो. जो लौकिक सुखाचा त्याग करून समाजोद्धारासाठी, धर्मजागृतीसाठी जीवन समर्पित करतो तो श्रीगुरू होय.

ईश्वराची दोन रूपे आहेत. सगुण आणि निर्गुण. ईश्वराचे सगुण रूप म्हणजे श्रीगुरू. त्याचे निष्कल, निर्गुण रूप म्हणजे परशिव. निष्कल रूपापर्यंत पोहोचण्यासाठी त्याच्या सगुण रूपाची उपासना करावी लागते. गुरू हाच शिव होय आणि शिव हाच गुरू होय. म्हणून गुरू आणि शिव यांच्यात भेद मानू नये. गुरू नसेल तर इष्टलिंग नाही. मंत्र नाही, विभूती नाही, पादोदक आणि प्रसाद नाही. गुरू नसेल तर अष्टावरणाची प्राप्ती होणार नाही. लौकिक सुखासाठी संपत्तीची आवश्यकता असते, त्याप्रमाणे आध्यात्मिक जीवनात प्रगती होण्यासाठी श्रीगुरूची नितांत गरज असते.

**आचार्यस्यावमानेन श्रेयःप्राप्तिर्विहन्यते।**
**तस्मान्निःश्रेयसप्राप्त्यै पूजयेत् तं समाहितः।।११.२३।।**

गुरूची अवहेलना कधीही करू नये. मान देणे शक्य नसेल तर देऊ नये, परंतु त्यांचा अपमान करू नये. त्यामुळे शिवाचा अपमान केल्यासारखे होईल. त्याचा अपमान केला तर या जगात आपल्यासाठी कोठे जागा आहे? शिव आपल्यावर रुष्ट झाले तर गुरू त्यापासून आपले रक्षण करू शकतात. परंतु गुरू आपल्यावर रुष्ट झाले तर मात्र शिवदेखील आपले रक्षण करू शकणार नाहीत.

आपल्या ठिकाणी गुरुभक्ती उत्पन्न झाली नसेल तर शिवभक्तीही उत्पन्न होणे शक्य नाही. बसवेश्वर म्हणतात- 'शिवपथवनरिवडे गुरुपथवे मोदलु'. शिवज्ञानप्राप्तीसाठी गुरूकडे प्रथम जावे लागते. म्हणून अष्टावरणात गुरूला प्रथम स्थान दिले आहे. वीरशैवांनी गुरू, लिंग आणि जंगम यांना एकरूप मानावे. कपाळावर सदैव भस्म धारण करावे. शिवब्रह्माचे रूप असे इष्टलिंग गळ्यात धारण करावे. रोज न चुकता इष्टलिंगाची पूजा करावी. गुरुपादोदक, लिंगपादोदक व जंगमपादोदक प्राशन करावे. इष्टलिंगाला नैवेद्य दाखविल्याशिवाय भोजन करू नये. असे केल्यामुळेच वीरशैवाचा जन्म सफल होईल, एवढे बोलून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
५ सप्टेंबर १९९१

---

**आशीर्वचन चौथे**

## लिंगमाहात्म्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज प्रसादिस्थलातील लिंगमाहात्म्यस्थलाच्या विवेचनाला आरंभ करायचा आहे. ज्यावर आपली श्रद्धा असते, ज्याची आपण नित्य पूजा करतो त्याच्या महात्म्याचे जर पूर्ण ज्ञान आपल्याला नसेल तर आपली भक्ती टिकणार नाही. लिंगाची महिमा ज्ञात असेल तर त्यावरची आपली श्रद्धा अधिकाधिक दृढ होत जाईल. या आधी भक्तस्थलातील लिंगधारणस्थलात लिंगाचे माहात्म्य ज. रेणुकाचार्यांनी वर्णिले आहे. मग या ठिकाणी लिंगाचे माहात्म्य पुन्हा यायची आवश्यकता काय? ज्यांचा प्रसाद सेवन केल्याने आपले मन अत्यंत प्रसन्न होते असे गुरू, लिंग आणि जंगम यांची महती जाणून घेतल्यामुळे आपली श्रद्धा अधिक दृढ होते आणि श्रद्धापूर्वक प्रसाद सेवन केल्याने आपले मन निरंतर प्रसन्न राहते. याच उद्देशाने येथे लिंगमाहात्म्यस्थलाचा उपदेश केलेला आहे.

**गुरुमाहात्म्ययोगेन निजज्ञानातिरेकतः।**
**लिंगस्यापि च माहात्म्यं सर्वोत्कृष्टं विभाव्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ११.२५)

गुरू आपल्याला लिंग प्रदान करतात. म्हणून त्यांची महती प्रारंभीच वर्णिली आहे. गुरू हा साक्षात शिवच असून शिव आणि गुरू यांच्यात काहीही भेद नाही. गुरूचे हे माहात्म्य जाणल्याने आणि गुरुसान्निध्यात राहिल्याने शिष्याच्या मनात ज्ञानाचा उदय होतो. त्यामुळे आपले लिंग सर्वोत्कृष्ट आहे याची जाणीव शिष्याला होते.

**शिवस्य बोधलिंगं यद् गुरुबोधितचेतसा।**
**तदेव लिंगं विज्ञेयं शांकरं सर्वकारणम्।।११.२६।।**

ज्या लिंगाची आपण पूजा करतो ते सर्वकारण आहे. या प्रपंचाच्या उत्पत्तीचे ते मूळकारण होय. लिंगाची व्याख्या अशी केली जाते- 'लीयते गम्यते यत्र जगदेच्चराचरम्'. चर आणि अचर असा प्रपंच ज्या पासून उत्पन्न

होतो, ज्यात निवास करतो आणि शेवटी ज्यात विलीन होतो ते 'लिंग' होय. आगमशास्त्रात परमतत्त्वाला 'लिंग' असे म्हटले जाते. तर उपनिषदांत त्याच तत्त्वाला 'ब्रह्म' म्हणतात. वेदान्तात ज्याला 'ब्रह्म' म्हणतात त्यालाच 'सिद्धान्ता'त म्हणजे आगमशास्त्रात 'लिंग' असे संबोधिले जाते. निजगुण शिवयोगी म्हणतात की, लिंगतत्त्व जाणायचे असेल तर आगमांना शरण गेले पाहिजे. जर आगमांचे ज्ञान नसेल तर लिंगाचे माहात्म्य पूर्णत्वाने आपण जाणू शकणार नाही. त्यांनी सुरेख शब्दात सांगितले आहे.

**आवमतदवररिवरू आगमवनुळिदु जगदादि लिंगवनु**

लिंग हे 'जगदादि' अर्थात् विश्वनिर्मितीच्या आधीपासून अस्तित्वात आहे. हे जाणण्यासाठी आगमांवाचून अन्य शास्त्रे उपयोगाची नाहीत. म्हणून वेदोपनिषदांत लिंगाविषयी थोडेच विवेचन आढळते. भगवान शिवांनी उपदेशिलेले जे अठ्ठावीस आगम आहेत, ज्यांना 'सिद्धान्त' असेही म्हटले जाते त्यांमध्ये लिंगाविषयी अत्यंत सुरेख वर्णन केलेले आढळते. आगम स्वत: शिवांनीच उपदेशिलेले आहेत. शिवाची जेवढी महिमा स्वत: शिव जाणतात तेवढी अन्य कोण जाणणार? तुम्ही कसे आहात हे तुम्हाला जेवढे माहीत आहे तेवढे इतरांना कसे माहीत असेल? एखाद्या सभेत वक्त्याचा परिचय कोणीतरी करून देतो. परिचय करून देणारा वक्त्यालाच विचारतो की तुमचा परिचय काय आहे? तुम्ही कधी जन्मलात? तुम्ही शिक्षण कोठे घेतले? तुम्ही कोणकोणत्या पदव्या संपादन केल्या? आणि सर्व विचारून झाल्यावर प्रत्यक्ष सभेत परिचय करून देताना अर्धे विसरून जातो. म्हणून आपला खरा परिचय दुसरा कोणी करून देऊ शकत नाही.

**शिवस्य तत्त्वं शिव एव वेत्ति**

शिवाची महिमा शिवच जाणतात. शिवानंतर त्यांची महिमा जाणणारा दुसरा कोण? तर सांगतात की, जो निरंतर शिवाच्या सान्निध्यात राहतो. तो नंदी शिवाची महिमा जाणतो. एखाद्याचे व्यक्तिमत्व जाणून घेण्यासाठी आपण कधी कधी त्या व्यक्तीच्या अत्यंत जवळच्या माणसाकडून माहिती घेतो. म्हणून आगमशास्त्रांत शिवमाहात्म्य आधिक्याने प्रकट झालेले आहे.

लिंग कसे आहे? तर परमपवित्र. या जगात काही वस्तू पवित्र आहेत तर काही वस्तू अपवित्र आहेत. अशुद्ध वस्तू शुद्ध करण्यासाठी आपण पंचमहाभूतांचे साहाय्य घेतो. तुमचे कपडे मलिन झाले तर तुम्ही पाण्याने ते स्वच्छ करता. येथे तुम्ही पंचमहाभूतांपैकी जलतत्त्वाचे साहाय्य घेतले. भांडी मलिन झाली तर राख आणि पाण्याने स्वच्छ केली जातात. वस्तू वारंवार अपवित्र होऊन देखील पुन्हा शुद्ध केल्या जातात. रोज स्वच्छ धुतलेले कपडे घातले तर तुमची मन:स्थिती प्रसन्न राहते. परंतु एकदा कपडे शिवून अंगावर घातले आणि ते फाटेपर्यंत काढलेच नाहीत तर तुमची मन:स्थिती मलिन होणार.

**मलिनैर्वस्त्रैर्नर: यत्र कुत्रापि निषीदति।**

आपले कपडे मलिन असले तर आपण कुठेही बसू शकतो. बसायला चादर, सतरंजी अंथरण्याचे कारण नाही. ट्रकवर क्लिनर असतो. त्याचे कपडे किती मळलेले असतात ते आठवून पाहा. ट्रकची दुरुस्ती करताना किंवा जमिनीवर झोपताना त्याला अंथरुण लागत नाही. तो कोठेही सरळ पसरतो. कपडे मळतील अशी चिंताच त्याला नसते. त्याचे कपडे इतके मळलेले असतात की जमीन त्याचे कपडे अधिक मळवू शकत नाही. उलट त्याच्या कपड्यामुळे जमीन मळण्याचीच अधिक शक्यता असते. ज्याचे कपडे मलिन तो कोठेही बसू शकतो. परंतु ज्याचे

कपडे स्वच्छ धुतलेले असतात, इस्त्री केलेले असतात तो बसण्याआधी जागा स्वच्छ आहे काय ते पाहतो. नसेल तर तो उभ्या उभ्या प्रवचन ऐकतो किंवा हातरुमाल खाली अंथरून त्यावर बसतो. आपले कपडे अस्वच्छ करण्याकडे आपला कल नसतो. कपडे शुद्ध असतील तर शुद्ध जागेवरच बसण्याची इच्छा तुमच्या मनात निर्माण होते आणि कपडे अस्वच्छ असतील तर तुम्ही गलिच्छ ठिकाणावरही सहज बसू शकता.

जगातील काही वस्तू पुन:पुन्हा अपवित्र होतात. त्यांना पुन:पुन्हा पवित्र करावे लागते. परंतु लिंग हे कधीही अपवित्र होत नाही. आपल्या सिद्धान्तात सूतकांचा निषेध यासाठीच केलेला आहे. ज्याच्या शरीरावर इष्टलिंग असेल त्याला कोणतेही सूतक पाळावे लागत नाही. इष्टलिंगपूजेसाठी रज:सूतक, जननसूतक, मरणसूतक यांचा निषेध केलेला आहे. अन्य संप्रदायात कोणाच्या घरात मृत्यू झाला तर काही काळ त्या घरी पूजापाठ केला जात नाही. सूतक पाळले जाते. परंतु इष्टलिंगाची पूजा 'इष्ट' असल्यामुळे ती सदैव करावीच लागते. अशा प्रकारे इष्टलिंग परमपवित्र मानले जाते. काही लोक विचारतात की, स्मशानात जाताना इष्टलिंग घरी खुंटीवर टांगून ठेवावे का? परंतु तसे काहीही नाही. भगवान शिवाचे वास्तव्यच मुळी स्मशानात असते. 'स्मशानवासनिरत: पिशाचानुसहचर:' असे शिवाचे वर्णन केले जाते. जेवढ्या अमंगल वस्तू असतील तेवढ्या भगवान शिवाच्या सान्निध्यात मंगल होतात.

बरेच लोक मरणाला अमंगल मानतात. परंतु तेच मरण जर काशीत आले तर मंगल मानले जाते. 'काश्यां मरणान्मोक्ष:' कारण काशीत येणारे मरण मुक्तिदायक असते. म्हणून स्मशानात जाताना लिंग गळ्यातच घालावे. उठताना, बसताना, कार्य करताना सदोदित लिंग जवळच बाळगले पाहिजे, असे शास्त्र सांगते. लिंग हे परमपवित्र आहे. ते अमर आहे. त्याला कोणतेही मल आवृत्त करू शकत नाहीत. लिंग हे ब्रह्मसनातन आहे. त्याचे नाव शिव आहे. ते चिन्मय, प्रकाशमान आहे. ते आनंदरूप आहे. ते निरंकुश आहे. त्याच्यावर कोणाचेही शासन चालत नाही. त्यानेच प्रपंचाची निर्मिती केली आणि जीवांना ज्ञान देण्यासाठी वेदागमांचे सर्जन केले. ते ज्योतिर्मय आहे. ते ज्योतिर्लिंगाच्या रूपाने बाहेर आहे, आणि योगीलोकांच्या अंतरंगातही आहे. शरीरात तीन ठिकाणी ज्योतिर्लिंगाचे वास्तव्य असते.

**आधारे कनकप्रख्यं हृदये विद्रुमप्रभम्।**
**भ्रूमध्ये स्फटिकच्छायं लिंगं योगी विभावयेत्॥६.४०॥**

आधारचक्र, हृदय आणि भ्रूमध्य अशा तीन ठिकाणी ज्योतिर्लिंग आहे. आपण ज्या इष्टलिंगाची पूजा करतो त्याची कल्पना सर्वप्रथम कशी स्फुरली? ज्योती आपल्या मूलाधारात, हृदयात आणि भ्रूमध्यात असते. शिवयोग्यांनी त्याचा अनुभव घेतलेला आहे. कुणी हटयोगाने, कुणी राजयोगाने तर कुणी शिवयोगाने हा साक्षात्कार करून घेतला आहे. तुम्ही जर तळहातावरील इष्टलिंगाकडे सतत अनिमिष नेत्रांनी पाहण्याचा सराव केला तर हळू हळू तुम्हाला देखील इष्टलिंगाच्या भोवती प्रकाशवर्तुळ दिसू लागेल. हा अभ्यास अधिक दृढ होत गेला तर लिंगाऐवजी तेथे एक ज्योती दिसू लागते. हाच शिवयोग होय. जीवात्म्याचा परमात्म्याशी संबंध जोडणाऱ्या मार्गालाच 'योग' असे म्हणतात. हटयोग आणि राजयोग या मार्गांनी परमात्म्याची प्राप्ती होते. परंतु या योगापेक्षा शिवयोग हा अधिक सुलभ आहे. जी अंगुष्ठमात्र ज्योती आपल्या हृदयात निवास करते त्याच ज्योतीसारखे अंगुष्ठमात्र लिंग श्रीगुरू आपल्या तळहातावर देऊन सांगतात की, 'या लिंगाकडे अत्यंत प्रेमभावाने पाहत राहा.'

लिंगपूजा करण्याआधी लिंगाकडे अत्यंत प्रेमाने पाहिले पाहिजे. तुमच्या हाती हजार रुपये दिले तर त्याकडे

तुम्ही किती प्रेमाने पाहाल! जेवण्याच्या आधी ताटातल्या खाद्यपदार्थांकडे मनुष्य मोठ्या प्रेमाने पाहतो आणि मग त्यावर ताव मारतो. प्रिय, मोद आणि प्रमोद या तीन वृत्ती आहेत. भुकेला मनुष्याला अन्न दिसले की त्यांच्या मनात अन्नाविषयी प्रीती उत्पन्न होते. ही पहिली वृत्ती. त्याच्या हातात अन्न आल्यावर त्याला मोद वाटतो. आणि अन्नसेवनानंतर जी तृप्ती मिळते तोच प्रमोद होय. अन्नाकडे पाहिल्यावर जेवढे प्रेम तुम्हाला वाटते तेवढे लिंगाकडे पाहून वाटले तरी पुरेसे आहे. पण तुम्हाला तेवढा वेळ कुठे आहे? पूजा घाईघाईने करायची आणि भोजन मात्र सावकाश करायचे ही तुमची सवय. मनुष्य यात्रेला गेला तरी देवदर्शन घाईघाईने उरकतो आणि नंतर यात्रेतील फालतू गोष्टी पाहण्यात भरपूर वेळ घालवतो. जे लवकर उरकायचे ते तुम्ही निवांत करता आणि जे निवांतपणे करायचे ते मात्र घाईने करता. यावरून तुमचे प्रेम कशावर आहे हे लक्षात येते. ज्यावर मनुष्याचे प्रेम अधिक असते त्याच्यासोबत मनुष्य अधिक वेळ घालवतो. कुणाचे प्रेम पैशावर, कुणाचे प्रेम मुलाबाळांवर. ज्यावर प्रेम असते त्याच्याशिवाय जगणे अशक्य वाटते. सांसारिक वस्तूंवरील प्रेम लिंगाकडे वळवले तर तीच भक्ती होते.

एक मनुष्य एका महात्म्याकडे जाऊन म्हणाला, ''महाराज, भक्ती कशी करावी ते सांगा.''

महात्मा गालातल्या गालात हसला आणि म्हणाला, ''यहाँसे उखाडो वहाँ लगाओ. येथून उपट अन् तेथे लाव.''

त्या माणसाला काहीच कळेना. त्याने पुन्हा विचारले, महात्म्याने समजावून सांगितले–

''अरे, तुझे कशावर तरी प्रेम असेलच नाही. प्रत्येक माणसाचे कशावर तरी प्रेम असतेच. ते तेथून काढ आणि ईश्वराकडे वळव. हाच भक्तिमार्ग. यहाँसे उखाडो वहाँ लगाओ.''

संत तुलसीदासांची जीवन कथा आपल्याला काय सांगते? आपल्या पत्नीकडे– रत्नावलीकडे ते रात्री जातात. ती त्यांना पाहून हैराण होते आणि म्हणते, ''जेवढे प्रेम माझ्या नश्वर शरीरावर तुम्ही करता त्यापेक्षा थोडे ईश्वरावर केले असते तर तुमची किती प्रगती झाली असती!''

तुलसीदासांना एवढेच पुरेसे होते. ते अंतर्बाह्य बदलले. पत्नीला नमस्कार करून त्यांनी तिला गुरू मानले आणि रामभक्तीच्या वाटेवर त्यांची पावले पडू लागली. त्यांच्या अतीव भक्तिप्रेमाने 'रामचरित्रमानस' ओथंबून गेले आहे.

तळहातावरील लिंगाकडे मोठ्या प्रेमभावनेने पाहून नंतर त्याची पूजा केली तर आपल्या मनात लिंगाविषयीची भक्ती वृद्धिंगत होत जाते. इष्टलिंग बाहेर दिसत असले तरी आपल्या अंतरंगातल्या ज्योतीची ती प्रतिकृती आहे. म्हणून लिंगाकडे टक लावून पाहता पाहता आपली वृत्ती अंतर्मुख होऊ लागते. जे लिंग हातावर असते त्याचाच साक्षात्कार, साधना पक्क होत जाताना भ्रूमध्यात, हृदयात व मूलाधारात होतो. हीच प्राणलिंगोपासना व भावलिंगोपासना होय. इष्टलिंगोपासना ही बाह्य–उपासना तर प्राणलिंगोपासना आणि भावलिंगोपासना ही अंतरंग उपासना आहे.

लिंगाचे पूर्ण माहात्म्य जाणणे आणि लिंगाचा आदिअंत शोधणे हे अत्यंत अवघड आहे. लिंगाचे माहात्म्य वर्णिताना पुराणात एक कथा सांगितली आहे. ब्रह्मा आणि विष्णू यांच्यात अहंभाव निर्माण होऊन त्यांची भांडणे सुरू झाली. त्यावेळी एक ज्योतिर्लिंग त्यांच्यासमोर प्रकट झाले. आकाशवाणी झाली की, ''तुमच्यात श्रेष्ठ कोण आहे हे आता समजून येईल. जो कोणी या लिंगाचे मस्तक अथवा पाय पाहून परत येईल तो श्रेष्ठ समजला जाईल.''

ब्रह्मदेवाने हंसपक्ष्याचे रूप घेतले आणि तो लिंगाचे मस्तक शोधण्यासाठी निघाला. विष्णूने वराहरूप घेतले आणि तो लिंगाचे पाय पाहायला निघाला. हजारो वर्षे झाली परंतु त्यांना आपले गंतव्य मिळेना. विष्णू निष्कपट होता परंतु ब्रह्मदेव थोडा लबाड होता. त्याने कामधेनू आणि केतकीचे फूल यांना खोटे साक्षीदार बनवले आणि परत फिरून सांगितले की, ''मी लिंगाचे मस्तक पाहून आलो आहे.'' कामधेनू आणि केतकीचे फूल यांनी ब्रह्माची साक्ष दिली. कोर्टात आपण खोटी साक्ष काढतो तशी. हा खोटेपणा पाहून ईश्वराला राग आला. त्याने कामधेनूला शाप दिला, ''तू ज्या मुखाने खोटे बोललीस ते मुख लोकादरास पात्र होणार नाही. लोक तुझ्या मस्तकाची नव्हे तर शेपटीची पूजा करतील.'' ईश्वराने केतकी-फुलाला शाप दिला की, ''ईश्वराच्या पूजेत तुझे काहीही स्थान राहणार नाही आणि जेव्हा वाहण्याची वेळ येईल तेव्हा तुझी जिभ चिरून वाहिले जाईल. नंतर ब्रह्माकडे वळून ईश्वराने शापवाणी उच्चारली, ''लोक तुझी पूजा करणार नाहीत. कारण तू असत्य बोलला आहेस.''

विष्णू बिचारा परत आला तो जेथपर्यंत गेला तेथे त्याने एक खूण करून ठेवली. परत येऊन खरे ते सांगितले. विष्णूचा खरेपणा पटून ईश्वराने त्याला आशीर्वाद दिला, ''लोक मला जेवढे पूज्य मानतील तेवढे तुला देखील मानतील.''

सत्य हाच ईश्वर आहे. ब्रह्मा, केतकीचे फूल असत्य बोलले. त्यांनी असत्याचा आश्रय घेतला म्हणजेच सत्याचा, ईश्वराचा अवमान केला. आपण आज पाहतो की, ब्रह्मदेवाची मंदिरे या देशात क्वचित् कुठे दिसतात. त्यामानाने विष्णुमंदिरे आणि विष्णुभक्त असंख्य आहेत. गाईच्या मुखाची लोक पूजा करीत नाहीत तर शेपटाची करतात. तिचे दर्शनदेखील शेपटीला हात लावून घेतात. तसेच केतकीचे फूल देवपूजेला पवित्र मानले जात नाही. कथेचे तात्पर्य असे की, जेथे ब्रह्म आणि विष्णू या देवांना आदि-अंत जाणता आला नाही तर सामान्यांना तो कसा जाणता येईल? अशी लिंगाची अपरंपार महिमा आहे.

**बहुनात्र किमुक्तेन लिंगं ब्रह्म सनातनम्।**
**योगिनो यत्र लीयन्ते मुक्तपाशनिबंधनाः॥११.३१॥**

ज. रेणुकाचार्य सांगतात की, अधिक काय सांगावे, लिंग परब्रह्मस्वरूप असून त्याची उपासना करून शिवयोगी पाशमुक्त होऊन ज्यात विलिन होतात तेच लिंग होय. साधक तेथे पोहोचला की जन्ममृत्यूपासून मुक्त होतो. अशी लिंगाची महिमा आहे.

कांती करण्याआधी जे लिंग असते ते पंचसूत्राने निर्मित असते. पंचसूत्र ही लिंगनिर्मितीची प्रक्रिया आहे. बाण, पीठिका आणि जलहरी असे लिंगाचे तीन भाग असतात. पीठिका ही शक्ती आणि त्यावरील बाण म्हणजे शिव. इष्टलिंग म्हणजे शक्तिविशिष्ट शिवाचे एक रूप आहे. प्रपंच देखील शिवशक्त्यात्मक आहे. म्हणून हे विश्वदेखील एक लिंग मानले जाते. इष्टलिंगाची साधना करता करता विश्वदेखील लिंगरूप आहे असा साक्षात्कार होतो. विश्वातील प्राणिमात्रांवर प्रेम करणे असा लिंगपूजेचा अर्थ आहे. लिंगावर प्रेम करणे म्हणजे प्रत्येक जीवजंतूवर, प्राण्यावर प्रेम करणे, वीरशैवसिद्धान्ताचे हे रहस्य आहे. परस्परांतील द्वेषभाव संपावा यासाठी अनेकानेक विचारवंतांनी अनेक मार्ग सुचविले आहेत. त्याप्रमाणे वीरशैवाचार्यांनी, पंचाचार्यांनी वीरशैवांच्या हाती लिंग देऊन त्याद्वारा विश्वावर, प्राणिमात्रावर प्रेम करण्याचा मार्ग वीरशैवांसाठी सांगितला आहे.

**'विरोधरहितं शैवं वीरशैवं प्रचक्ष्यते।'**

जो कोणाबद्दल वैरभाव बाळगत नाही असा जो इष्टलिंगपूजक तोच वीरशैव होय. म्हणून लिंगपूजा ही संकुचित पूजा नाही तर सर्व ब्रह्मांडाची पूजा आणि सर्वांवर प्रेम करण्याची ही दीक्षा आहे. आपल्या प्राणावरील प्रेम लिंगावर, कुटुंबियांवर, गावावर, देशावर व समस्त विश्वावर असे हे वाढत जाणारे वर्तुळ आहे. अंत:करणातील प्रेमभाव असा वृद्धिंगत करण्यासाठीच येथे लिंगाचे माहात्म्य गायिले आहे. ब्रह्मादी देवांनी शौनकादी ऋषींनी लिंगपूजनाचा विशेष अधिकार संपादन केला. म्हणून लिंग हे सर्व चराचर प्रपंचाचा स्वामी होय, नियामक होय. अशा लिंगाचे नित्य पूजन करणे हेच प्रत्येक वीरशैवाचे परमकर्तव्य आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

वीरशैव समाज भवन, नागपूर

६ सप्टेंबर १९९१

---

आशी:र्वचन पाचवे

## जंगममाहात्म्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

वीरशैव धर्मात गुरू, लिंग व जंगम अशी तीन आराध्ये आहेत. हे तिघे वेगवेगळे दिसत असले तरी तत्त्वत: ते एकच आहेत. बिल्वदलात तीन पाने असतात. परंतु बिल्वदल एकच असते. त्याप्रमाणे गुरू, लिंग व जंगम हे एकच आहेत. 'एकमूर्तिस्त्रयोभाग:' एकाच मूलतत्त्वाचे हे तीन भाग आहेत. एक गुरू होऊन आपल्याला दीक्षा देतो, दुसरा लिंगरूपाने आपल्या शरीरावर निरंतर निवास करून आपले रक्षण करतो आणि तिसरा जंगमरूपाने आपल्याला ज्ञानोपदेश करून संसारसागरात तारून नेतो. अशी कार्ये तीन प्रकारची असल्यामुळे एकाच तत्त्वाला तीन भिन्न नावांनी संबोधिले जाते.

शिव स्वत:चे माहात्म्य पूर्णपणे जाणतात. त्यांच्या सान्निध्यात राहणारे शक्ती, नंदी आणि शिवगणदेखील त्यांच्याविषयी जाणतात. परंतु स्वत:चे ज्ञान शिवाला जेवढे तेवढे इतरांना नसते, हे आपण काल ऐकले आहे. आपण शिवावर जेवढी अधिकाधिक श्रद्धा ठेवू तेवढे शिवाचे माहात्म्य आपल्याला जाणता येईल. एखाद्याच्या अधिक जवळ गेल्यानेच त्याच्या स्वभावाचे आपल्याला ज्ञान होते. या जगात स्वभाव आणि प्रभाव अशा दोन गोष्टी आहेत. दुरून प्रभाव समजतो आणि जवळून स्वभाव समजतो. यासाठीच शिष्याने गुरुसहवासात राहावे असे सांगितले आहे. प्राचीन काळी शिष्य गुरुकुलात बारा वर्षे राहत. आज काय अवस्था आहे? आज दीक्षा घेतली की उद्या आपल्या घरी. पुन्हा गुरूचे तोंड पाहणे नको. एकदा शिष्यत्व स्वीकारल्यानंतर गुरूशी निरंतर संपर्क ठेवायला हवा. प्राचीन काळी गुरू करण्यासाठी शिष्याला गुरुघरी जाऊन एक-दोन वर्षे नव्हे तर बारा वर्षे सेवा करावी लागे. सुरुवातीला सांगितले जाई- सहा महिने गुरुसेवा कर. कारण बारा वर्षे म्हटले तर तो येणारच नाही. गुरूकडे येणारी मुले कशी असत? जी घरात कोणत्या कामाची नाहीत अशीच मुले गुरूकडे पाठविली जात. परंतु

गुरूला साऱ्यांना सांभाळून घ्यावे लागते. जे चांगले असतात त्यांच्यावर गुरूची नजर असते आणि जे वाईट असतात त्यांच्यावर देखील गुरूची नजर असते. जे वाईट असतात त्यांच्याकडे अधिक लक्ष द्यावे लागते. ते कसे सुधारतील याची काळजी गुरू घेतात. बारा वर्षे गुरुसहवासात राहावे हा नियम यासाठी सांगितला आहे की, गुरूचा स्वभाव कसा आहे हे शिष्याला कळावे. स्वभाव जवळून कळतो, दुरून कळत नाही. दुरून डोंगर साजरेच दिसतात. परंतु जवळ गेल्यावर पायात काटे टोचतात, दगडधोंडे मध्ये अडमडतात.

परस्परांना समजून घेतल्याशिवाय जो संबंध होतो तो फार दिवस टिकत नाही. म्हणून विवाहाआधी अनेक प्रकारची खात्री करून घेतली जाते. कारण हा वैवाहिक संबंध आयुष्यभर टिकावा अशी त्यामागे तळमळ असते. म्हणून स्वभाव जवळून समजतो आणि प्रभाव दुरून समजतो. पति–पत्नी असोत वा गुरु–शिष्य असोत त्यांचे संबंध जन्मभर टिकण्याकरिता परस्परांचा स्वभाव जाणून घेणे अत्यंत आवश्यक असते. शिष्याने यासाठीच गुरूची सेवा करायची असते.

त्यानंतर त्याच्यावर गुरूची कृपा होऊन दीक्षा मिळते. गुरू संस्कारपूर्वक जे लिंग शिष्याला देतात ते त्याने निरंतर आपल्या शरीरावर धारण करायचे असते. असे केले तरच त्याला लिंगाच्या माहात्म्याचे ज्ञान होते. लिंग–सहवासाने त्याचा स्वभाव कळतो आणि त्याचा प्रभाव आपल्यावर पडतो. नाहीतर शिवरात्र, सोमवार आणि श्रावणात पूजा केली तेव्हा देव जवळ असतो आणि नंतर तो कुठे असतो याचा पत्ताही नाही. श्रावण महिना आला हे बिचाऱ्या लिंगाचे भाग्यच. कुठेतरी टाकून दिलेले लिंग आता तुमच्या हातावर आले. परंतु या पुढे मात्र ते निरंतर शरीरावर धारण करा, म्हणजे त्यात किती सामर्थ्य आहे हे तुम्हाला कळून येईल. जोपर्यंत तुम्ही लिंगावर प्रेम करणार नाही तोपर्यंत ते तरी तुमच्यावर कसे प्रेम करील? लौकिक जीवनात आपण पाहतो की, एकाने कोणावर प्रेम केले तर तोही त्याच्यावर प्रेम करू लागतो. तुम्ही कोणाकडे लक्षच दिले नाही तर तोही तुमच्याकडे ढुंकून बघणार नाही. भक्त जेवढा ईश्वराच्या निकट राहील तेवढी त्याला लिंगाची महिमा ज्ञात होईल. आता गुरूविषयी तेच सांगतात:–

**जानन्त्यतिशयाद् ये तु शिवं विश्वप्रकाशकम्।**
**स्वस्वरूपतया ते तु जंगमा इति कीर्तिताः।।११.३६।।**

आपल्या सिद्धान्तात जंगमाचे माहात्म्य अपार आहे. 'जंगम' शब्दाचा एक अर्थ लौकिक आहे तर दुसरा तात्त्विक आहे. येथे तात्त्विक अर्थ सांगितला आहे. या प्रपंचात जो प्रकाश आहे तो कोठून आला? 'तस्य भासा सर्वमिदं विभाति'.

भगवान शिवाच्या प्रकाशानेच हे विश्व प्रकाशित होते. विश्व प्रकाशित करणाऱ्या चिद्रूपाचा जो आपल्या हृदयात साक्षात्कार करून घेतो आणि जो परमात्म्याला आपल्या आत्म्याच्या ठिकाणी पाहतो तो जंगम होय. 'ब्राह्मण' हा असाच शब्द आहे.

**जन्मना जायते शूद्रः संस्काराद् द्विज उच्यते।**
**वेदाध्यनाद् भवेद् विप्रः ब्रह्म जानानीति ब्राह्मणः।।**

जन्मतः मनुष्य शूद्र असतो, त्याच्यावर जेव्हा संस्कार होतात तेव्हा तो 'द्विज' होतो. तो वेदाध्ययन करतो तेव्हा

त्याला 'विप्र' म्हटले जाते आणि परमतत्त्व जाणून त्याला तो आत्मरूपात पाहतो तेव्हा 'ब्राह्मण' म्हटले जाते. 'ब्राह्मण' ह्या शब्दाला तात्त्विक आणि लौकिक अर्थ आहेत, त्याप्रमाणे 'जंगम' शब्दालाही वरील दोन अर्थ आहेत. परशिवाला जो आत्मरूपात पाहतो तो जंगम. आज किती ब्राह्मण ब्रह्मज्ञानी आहेत? तसेच शिवाला न जाणणारे जंगम देखील जंगम आहेत. प्राचीन काळी जंगमपरंपरा ही ज्ञानमार्गाची उपासक होती. सांसारिक सुखांचा त्याग करून केवळ ज्ञानाच्या मार्गावर त्यांची वाटचाल चालू असायची. त्यावेळी त्यांच्या चरितार्थाचा भार समाज उचलत असे. कारण ज्ञानसंपादन हे सर्वसामान्यांच्या आवाक्यात नव्हते आणि नाही. येथे सत्संगात बसून तासभर तुम्ही जे ऐकता ते संपादन करायला एक तास पुरा पडत नाही. कित्येक ग्रंथ अभ्यासून त्यावर चिंतन करून वक्ता तासभर व्याख्यान देतो आणि साऱ्या ज्ञानग्रंथांचे सार तुमच्यापुढे ठेवतो. म्हणून त्यावेळी समाजाने केवळ ज्ञानसंपादन करणारे काही लोक जंगम म्हणा, ब्राह्मण म्हणा जणू नियुक्त केले होते. त्यांनी अध्ययन करून समाजाला ज्ञानोपदेश करावा आणि समाजाने त्यांचा शब्द अंतिम मानावा अशी ही परंपरा होती.

हळूहळू भक्तांची भावना कमी होत गेली आणि हा संबंध तुटत गेला. अजूनही थोड्या प्रमाणात ही परंपरा जिवंत आहे. ब्राह्मणाबद्दल, जंगमाबद्दल समाजात श्रद्धाभाव बाळगला जातो. तात्त्विक अर्थाने ते ब्राह्मण अथवा जंगम नाहीत. परंतु ज्यांनी ज्ञानार्जन केले अशाच्या कुळात त्यांनी जन्म घेतला म्हणून त्यांना आज पूज्य मानले जाते. या वंशात एकापेक्षा एक ज्ञानी, तपस्वी होऊन गेले. त्यामुळे आजही त्यांच्या वंशजांना महत्त्व दिले जाते, ते उचितदेखील आहे.

जंगमाचे दुसरे नाव शिवयोगी आहे. शिवाशी सदोदित संबंध ठेवणारा तो शिवयोगी होय. 'योग' याचा अर्थ संबंध जुळणे आणि 'वियोग' याचा अर्थ संबंध तुटणे. जो ईश्वराशी निरंतर संबंध ठेवतो तो परमात्मस्वरूपच असतो. येथे जो बल्ब जळतो आहे याचे कारण काय? तर त्याचा संबंध विद्युतकेंद्राशी आहे, जोपर्यंत हा संबंध कायम आहे तोपर्यंत बल्ब प्रकाश देत राहील आणि ज्यावेळी हा संबंध तुटेल त्यावेळी तो प्रकाशरहित होईल. याप्रमाणे शिवयोग्याचा संबंध निरंतर शिवाशी असतो. परंतु आपले मन ते ग्रहण करीत नाही. जुन्याकाळी ऋषींनी ग्रंथ कसे लिहिले? ग्रंथावरून ग्रंथ लिहिले नाहीत. कारण त्यावेळी ग्रंथच अस्तित्वात नव्हते. परंतु एकेका ऋषीने एकेका शास्त्राची रचना केली आहे. कपिल, कणाद, व्यास अशी कितीतरी नावे सांगता येतील. पतंजलींनी प्रथम व्याकरणशास्त्राची रचना केली. त्याआधी ते शास्त्र होते कोठे? तर शिव हा सर्व ज्ञानाचा सागर आहे. म्हणून पतंजलींनी त्यांना आदिगुरू म्हटले आहे. शिवाच्या ठिकाणी असलेले ज्ञान पतंजलींच्या हृदयात कसे प्रकाशले? त्यांनी काय बरे केले? त्यांनी अंतर्मुख होऊन मनोवृत्ती शिवाशी जोडली. मग शिवापासून ज्ञानाचा प्रवाह त्यांच्या मनापर्यंत पाझरला. जसजसे ज्ञान येत गेले तसतसे ते लिहीत गेले. कपिल, कणाद, पतंजली, व्यास या महर्षींनी किती लेखन केले! भोजन करण्याइतका वेळ त्यांच्याकडे नव्हता. कणाद महर्षी एका कणाएवढे भोजन करीत असत. आपण किती कण खातो? एका घासात शेकडो-हजारो कण असतात. परंतु महर्षी कणाद केवळ एक कण खाऊन राहत आणि कोणतीही बाह्य चिंता न करता निरंतर आपल्या कार्यात मग्न राहात.

ब्रह्मसूत्रावर टीका लिहिण्याऱ्या वाचस्पती मिश्रांची जीवनकथा विलक्षण आहे. त्यांचा विवाह बालवयातच झाला होता. ते कुशाग्र बुद्धीचे होते. ब्रह्मसूत्रावर टीका करण्याची त्यांना प्रेरणा झाली आणि त्यांनी लिहायला प्रारंभ केला. वर्षानुवर्षे ते अत्यंत तन्मय होऊन लिहीत होते. दरम्यान ते तारुण्यात आले म्हणून नातलगांनी

त्यांच्या पत्नीला घरी आणले. ती त्यांची सेवा करू लागली. परंतु वाचस्पती मिश्रांना त्याची जाणीवच नव्हती. अशी बारा वर्षे उलटली. टीका पूर्ण लिहून झाली. ब्रह्मसूत्रांचा प्रभाव त्यांच्या मनावर पडला आणि त्यांनी संन्यास घेण्याचा मनाशी निश्चय केला. टीका पूर्ण झाल्यावर त्यांनी समोर पाहिले तर एक सुंदर युवती पुढ्यात उभी होती. त्यांना आश्चर्य वाटले. त्यांनी विचारले, ''तुम्ही कोण?''

''आपली धर्मपत्नी'' तिने उत्तर दिले. तेव्हा त्यांना आठवले की, आपले लग्न लहानपणीच झाले होते. त्यांनी विचारले, ''इतके दिवस तुम्ही कुठे होता?''

''आपल्याच घरी'' ती उत्तरली,''आपण स्नान केले त्यावेळी आपल्या हाती वस्त्रे मीच देत होते. आपले भोजन मीच बनवत होते. आपण लिहीत असताना दिव्यात तेल मीच घालत होते. गेली बारा वर्षे मी आपल्या अवतीभोवती वावरत होते.''

वाचस्पती मिश्रांच्या दृष्टिसमोर तिची तपश्चर्या उभी राहिली. त्यांना या आधी काहीच जाणवले नव्हते. ते भरल्या स्वरात म्हणाले, ''मी आता संन्यास घेण्याचा निश्चय केला आहे. तुम्हाला संसारसुख देऊ शकणार नाही.''

''आपण माझ्याकडे एकदा पाहिले यातच सारे आले. मला देखील संसारसुखाची इच्छा उरली नाही.'' ती म्हणाली.

''आपला संबंध घडला असता तर एखादा मुलगा झाला असता'', मिश्रा म्हणाले, ''परंतु मुलगा आपले नाव वाढवितो की घालवितो हे काही सांगता येत नाही. वंशपरंपरा टिकणारी नाही. परंतु जोपर्यंत संस्कृत भाषा जगात आहे तोपर्यंत माझा हा ग्रंथ जिवंत राहील. या ग्रंथाला मी तुमचे नाव देतो.''

आणि वाचस्पती मिश्रांनी ग्रंथाला आपल्या पत्नीचे नाव दिले आहे– भामती!

भा म्हणजे प्रकाश आणि मती म्हणजे बुद्धी. ज्याच्या बुद्धीत प्रकाश असतो त्यालाच हा ग्रंथ समजतो. ब्रह्मचर्य पाळून आपल्या कार्यात जीवन व्यतीत करणारी अशी व्यक्ती महान असते.

याचप्रमाणे जागृती, स्वप्न, सुषुप्ती अशा सर्व अवस्थांत जो निरंतर शिवाशी संबंध ठेवतो तो शिवयोगी होय.

**घोरसंसारतिमिरपरिध्वंसनकारणम्।**
**येषामस्ति शिवज्ञानं ते मताः शिवयोगिनः।।११.३८।।**

प्रपंच अंधःकारमय आहे. अमावस्येसारखा काळाकुट्ट. आपल्याला वाटते की आपण ट्युबच्या प्रकाशात बसलो आहोत. कुठे आहे अंधार? परंतु हा प्रकाश बाहेरचा आहे. आत्मज्ञानासाठी आत प्रकाश असावा लागतो. हृदयातला अंधार घनघोर आहे. उपदेश करून हा अंधार जो दूर करतो तो शिवयोगी होय. हृदयात ज्ञानाचा उदय झाला की आपले हृदय संतोषाने भरून जाते. पाणी भरून ओसंडून वाहणाऱ्या घागरीसारखे. प्रकाशाने मन प्रसन्न होते तर अंधाराने विषण्ण होते. काही लोकांना वीज गेली की आनंद होतो, चला अभ्यासापासून सुटका झाली. आता झोपायला हरकत नाही. ज्यांचे अंधारावर प्रेम असते ते सूर्याचा द्वेष करतात, दिवाभीताप्रमाणे. ज्याला अंधार आवडतो त्याची जातकुळी दिवाभीताची असते. ज्याच्या हृदयात अज्ञानाचा अंधार भरलेला असतो त्याला आनंदाचा अनुभव येणे शक्य नाही. आनंदप्राप्तीसाठी हृदयात प्रकाश फुलवला पाहिजे. जेथे प्रकाश असतो तेथे परमात्मा असतो.

ईश्वरासमोर आपण नंदादीप लावतो. काहीजण पूजेपुरता दिवा लावतात तर काहीजण दिवा अखंड तेवत

ठेवतात. विजेचा बल्ब येथे महत्त्वाचा नाही. त्याचा काय भरवसा? आला तर आला, गेला तर गेला. आया राम, गया राम. दक्षिणेकडे तुम्ही गेलात तर दिसेल की गर्भगृहात तुपाचा दिवा तेवत असतो. विद्युतदीपांची रोषणाई बाहेर असते, परंतु देवासमोर गाभाऱ्यात नंदादीप तेवत असतो. विजेला आत प्रवेश नाही. ईश्वरासमोर नंदादीप लावण्याचे एकच कारण म्हणजे ईश्वर हा ज्योतिस्वरूप आहे, प्रकाशमय आहे. त्याच्या पूजेने आपल्या हृदयातील अज्ञानांधःकार दूर होऊन ते प्रकाशित होते. हृदय प्रकाशित झाले की परमात्मा प्रकट होतो. प्रकाश नाही तर परमात्मा नाही.

एका राजाला तीन पुत्र होते. त्यांपैकी कोणाला उत्तराधिकारी करावे ही चिंता राजाला पडली. त्याने मंत्र्याचा सल्ला घेतला. मंत्र्याने त्यांची परीक्षा घ्यावी असे सुचविले. त्याप्रमाणे राजाने पुत्रांना बोलावून त्यांना प्रत्येकी शंभर सुवर्णमुद्रा दिल्या आणि म्हणाला,

''तुम्हाला प्रत्येकाला एकेक महाल दिला आहे. तीन महिन्याच्या मुदतीत तुम्ही आपापला महाल या सुवर्णमुद्रांचा उपयोग करून पूर्ण भरून टाकायचा आहे. तीन महिन्यांनी संध्याकाळी मी प्रत्येकाच्या महालात येईन आणि महाल कशाने भरला ते पाहीन.''

तिन्ही राजपुत्र आपाल्या महालात सुवर्णमुद्रा घेऊन गेले. तीन महिने उलटले. राजा त्यांच्या महालाकडे निघाला. पहिल्या राजपुत्राच्या महालाजवळ जाऊन पाहतो तो महालाचे दार बंद आणि राजपुत्र बाहेर बसलेला.

''काय भरले आहे महालात? बघू'' राजाने विचारले. राजपुत्राने दार उघडले. संबंध महालात केरकचरा भरलेला होता. राजाने स्पष्टीकरण विचारले. तेव्हा राजपुत्र म्हणाला,

''महाराज, आपण फक्त शंभर सुवर्णमुद्रा दिल्या होत्या आणि वेळ देखील थोडा होता. एवढ्या पैशात महाल भरून टाकण्याइतकी स्वस्त वस्तू फक्त कचराच होती, म्हणून मी तो महालात भरला.''

राजा दुसऱ्या पुत्राच्या महालाकडे गेला. तो देखील बाहेरच बसला होता. राजाने विचारले, ''काय भरले हे महालात?''

''महाराज,'' राजपुत्र दीनवाणेपणाने म्हणाला, ''शंभर सुवर्णमुद्रांत महाल पूर्ण भरण्याएवढी वस्तू मिळणे शक्य नव्हते. एवढ्या कमी वेळात शंभर सुवर्णमुद्रांची गुंतवणूक करून त्या वाढविणेही शक्य नव्हते. म्हणून मी एका सुवर्णमुद्रेच्या एक हजार सुवर्णमुद्रा झटपट मिळवण्यासाठी त्या एका जुगारावर लावल्या. खूप पैसा आला की महाल भरून टाकू असा माझा विचार होता. परंतु दुर्दैवाने मी हरलो आणि सगळ्या सुवर्णमुद्रा गमावून बसलो.''

राजाने दुसऱ्या राजपुत्राची योग्यता ओळखली. तो तिसऱ्या राजपुत्राकडे निघाला. तिकडे जातानाच त्याचे मन प्रसन्न होऊ लागले. दूरवरून सुगंध येत होता. जाऊन पाहतो तो तिसरा राजपुत्र हातात पुष्पमाला घेऊन राजाच्या स्वागतासाठी उभा होता. त्याने हार घालून राजाचे स्वागत केले, त्यांचे पाय धुतले आणि तो आदराने त्यांना महालात घेऊन गेला. आत जाऊन पाहतो तो सारा महाल प्रकाशाने उजळून गेला होता आणि सुगंधाने दरवळत होता. राजपुत्राने आपला महाल प्रकाशाने आणि सुगंधाने पूर्ण भरून टाकला होता.

राजाने तिसऱ्या राजपुत्राची बुद्धिमत्ता ओळखली आणि त्याला आपला उत्तराधिकारी नेमले.

या कथेचा एक तात्त्विक अर्थ आहे. राजाप्रमाणेच भगवान शिव देखील चिंतामग्न आहेत. जीवाला आपल्या स्वरूपात विलीन करून घेण्यासाठी. त्यांनी प्रत्येकाला परीक्षेसाठी एकेक महाल दिला. तो म्हणजे आपले शरीर. शंभर सुवर्णमुद्रा म्हणजे आपले शंभर वर्षांचे आयुष्य. तीन महिन्याचा वेळ म्हणजे बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य

या तीन अवस्था. परंतु ईश्वर जेव्हा पाहतो तेव्हा त्याला दिसते की कोणी आपल्या शरीराचा कचरा करून घेतला आहे, तर कोणी आपल्या आयुष्यात अंधार भरून घेतला आहे. एखादाच असतो जो आपल्या जीवनात प्रकाश भरून घेतो. लक्षावधी लोकांत एखादाच ज्ञानाची ज्योत पाजळणारा असतो. अशालाच शिवयोगी अथवा जंगम म्हणतात.

शिवयोगी कसे असतात? तर जितकाम. त्यांच्या मनात कोणत्याही प्रकारची अभिलाषा नसते. भगवान शिवाला वगळता ते अन्य कशाचेही चिंतन करीत नाहीत. त्यांचा मोह नष्ट झालेला असतो आणि त्यांच्या सहवासात जे येतात त्यांचाही मोह ते नष्ट करतात. त्यांच्या दृष्टीत सोने आणि माती यांचे मोल सारखेच असते. सोने फार मौल्यवान आणि माती क्षुद्र असा भाव त्यांच्याठायी नसतो. ते शत्रू आणि मित्र यांना समदृष्टीने पाहतात. ते ज्ञानी असूनही निरहंकारी असतात. ज्ञानाने जर आपला अहंकार दूर होत नसेल तर ते ज्ञान इतरांचा अहंकार कसा दूर करील? ज्ञानाने अहंकार नष्ट होतो, अहंकार वृद्धिंगत होत नाही. ते निःस्पृह असतात. म्हणूनच निष्पक्षपाती असतात.

**दुर्लभं हि शिवज्ञानं दुर्लभं शिवचिंतनम्।**
**येषामेतद् द्वयं चास्ति ते हि साक्षाच्छिवात्मकाः।।११.४१।।**

या प्रपंचात खूप काही सुलभ आहे आणि थोडे दुर्लभ आहे. शिवचिंतन करणे आणि शिवज्ञान प्राप्त करणे हे फार दुर्लभ आहे. या दोन्ही गोष्टी ज्यांना साधल्या असे शिवयोगी प्रत्यक्ष शिवच होत. तुम्ही जेव्हा जंगमाला घरी जेवायला बोलवता त्यावेळी एक मंत्र म्हटला जातो.

**शिवयोगिनि संतृप्ते तृप्तो भवति शंकरः।**
**तत्तृप्त्या तन्मयं विश्वं तृप्तिमेति चराचरम्।।९.९१।।**

एक शिवयोगी जेव्हा तुमच्या घरी तृप्त होतो तेव्हा साक्षात् शिव तृप्त होतो. म्हणून जंगमभोजन अत्यंत महत्त्वाचे मानले जाते. जुन्या काळात कोणाच्या घरी संकट आले तर त्यावेळी शंभर जंगमांना भोजन घालत असत. आज एखाद्या गावात एवढे जंगम मिळणे कठीण. महाराष्ट्रात तर परिस्थिती फारच नाजूक आहे. जसे शिवचिंतन दुर्लभ तसे येथे जंगम मिळणे दुर्लभ. परंतु ज्ञानी जंगमाची पायधूळ ज्याच्या घरात पडते ते घर पवित्र होते. जंगमाचे पादप्रक्षालन करून ते पाणी घरभर प्रोक्षण करण्याची प्रथा याचसाठी पडली आहे. शिवयोग्यांच्या दर्शनाने सिद्धी प्राप्त होतात. त्यांच्या स्पर्शाने पातकांचा नाश होतो आणि त्यांचे पूजन केल्याने मोक्षप्राप्ती होते. अशा शिवयोग्याच्या सान्निध्यात राहिल्यामुळे सर्व फळांची प्राप्ती होते. म्हणून शिवयोग्यांचा सन्मान करावा, त्यांचे पूजन करावे, त्यांच्या विषयी श्रद्धाभाव बाळगावा. असे केले तर त्यांच्यासारखे जीवन प्रकाशाने परिपूर्ण होऊन धन्य होईल. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

वीरशैव समाज भवन, नागपूर
७ सप्टेंबर १९९१

## भक्तमाहात्म्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आतापर्यंत गुरूची महिमा, लिंगाची महिमा आणि जंगमांची महिमा यांचे वर्णन झाले. मग भक्ताची महिमा काय कमी भरते? तिचेही वर्णन येथे केलेले आहे.

**गुरोर्लिंगस्य महात्म्यकथनाच्छिवयोगिनाम्।**
**सिद्धं भक्तस्य माहात्म्यं तथाप्येष प्रशस्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ११.४५)

गुरू, लिंग, जंगम या आराध्यांचे माहात्म्य प्रतिपादन केल्यावर सहजपणे भक्ताचे माहात्म्य सिद्ध होते. भक्तच नसेल तर गुरू नाही, लिंग नाही आणि जंगमदेखील नाही. मंदिरात पूजा करणारा नसेल तर तेथे ईश्वर कसा राहील? भक्त आहे म्हणून ईश्वर आहे. त्याचे अस्त्विच मुळी भक्तांमुळे सिद्ध होते. गुरु-लिंग-जंगमाच्या माहात्म्यात भक्ताचे माहात्म्य अंतर्भूतच आहे. तरीही त्याचे विशेष वर्णन ज. रेणुकाचार्यांनी केले आहे-

**ये भजन्ति महादेवं परमात्मानमव्ययम्।**
**कर्मणा मनसा वाचा ते भक्ता इति कीर्तिता:।।११.४६।।**

ज्याच्या ठिकाणी भक्ती आहे तोच भक्त होय. भक्तीचे तीन प्रकार आहेत. एक कर्मरूपाने अर्चना होणारी भक्ती. दुसरी वाचिक अर्थात् वाणीने स्तुती करणारी भक्ती आणि तिसरी मनाच्या द्वारा ध्यान मानसिक भक्ती. शरीर, वाणी आणि मन अशी त्रिकरणे परमेश्वराने माणसाला प्रदान केली आहेत. या त्रिकरणांनी जो भगवंताची सेवा करतो त्याला 'भक्त' म्हणतात. परमात्मा हा सर्वश्रेष्ठ आहे. प्रपंचात सर्व ठिकाणी तो निवास करतो. परंतु जीवात्मा मात्र केवळ एका शरीरातच राहतो. परमात्मा अव्यय आहे. त्याचा कधी विनाश होत नाही. त्यात कधी परिवर्तन होत नाही. असा अव्यय परमात्मा जो महादेव त्याची शरीराने, वाणीने आणि मनाने जो भक्ती करतो तो शिवभक्त होय. वीरशैव सिद्धान्ताप्रमाणे डाव्या तळहातावर इष्टलिंग ठेवून अधिकारानुसार षोडशोपचारांनी, अष्टविधोपचारांनी अथवा पंचविधोपचारांनी जी पूजा केली जाते ती शारीरिक पूजा होय. हेच शारीरिक कर्म. शिवस्तोत्र म्हणजे अष्टोत्तरशतनामावली म्हणत बिल्वदल अर्पण करणे. ही वाचिक सेवा आहे. हातावरील इष्टलिंगाकडे एकाग्रतेने पाहात ते ज्योतिस्वरूप लिंग आपल्या हृदयात आहे असे चिंतन करणे ही मानसिक पूजा होय. शरीराने अर्चना, वाणीने स्तुती आणि मनाने चिंतन करणे या शारीरिक, वाचिक आणि मानसिक क्रियेला भक्ती असे नाव आहे. अशी भक्ती ज्याच्या हृदयात सदैव नांदते तो भक्त होय.

**दुर्लभा हि शिवे भक्ति: संसारभयतारिणी।**
**सा यत्र वर्तते साक्षात् स भक्त: परिगीयते।।११.४७।।**

संसारभयापासून मुक्त करणारी शिवभक्ती सर्वांना सुलभ नाही. भक्त होणे सोपे नाही. भक्तीच्या दिशेने जेव्हा एखाद्या मनुष्याची वाटचाल सुरू होते तेव्हा ईश्वर त्याची अनेक प्रकारे परीक्षा घेतो. लाकूड कापणाऱ्या आरीसारखी भक्ती कठीण आहे. जाताना अथवा येताना कापत राहणे हेच आरीचे काम. जो भक्ती करतो

त्याच्यावरच अधिक संकटे येतात. लोकांना याचे मोठे आश्चर्य वाटते. जे ईश्वराकडे ढुंकूनदेखील पाहत नाहीत, ज्यांच्या शब्दकोशात 'ईश्वर' हा शब्दच नसतो अशी माणसे अतिशय सुखी असतात. परमार्थात शिरणारी माणसे दुःखे झेलत राहतात. संत बसवलिंगांनी म्हटले आहे-

**परमार्थ हा नोहे लेकुराच्या गोष्टी। येथे व्हावा पोटी अनुताप।।**
**दगडाहूनि जीव करावा कठीण। अंतरीचा शीण सांडूनिया।।**
**संवसारा आगी आपुलेनि हाते। लावूनि मागुते पाहो नये।।**

भक्ती नेभळटासाठी नाही, तर शूरांसाठी आहे. दुःखे सहन करण्याची अपार ताकद भक्तांमध्ये असावी लागते. भक्तांना जे कष्ट झेलावे लागतात तो एक प्रकारचा ईश्वराचा अनुग्रह असतो. सांसारिक सुख हा ईश्वराचा अनुग्रह नव्हे. तर सांसारिक दुःख हा त्याचा अनुग्रह आहे. जेवढी अधिक दुःखे समोर येतात तेवढी ईश्वरभक्ती आपल्या मनात दृढ होत जाते. म्हणून म्हटले आहे- दुख में सुमिरण सब करे सुख में करे ना कोय।

दुःख भोगायची वेळ आली की मनुष्याला ईश्वराची नेमकी आठवण येते. नास्तिकातला नास्तिक म्हणून मिरवणारा देखील संकटकाळात ईश्वराची करुणा भाकू लागतो. सुखात असलेला मनुष्य ईश्वराच्या दारात जात नाही. त्याला वाटते की, कशाला बिचाऱ्या देवाला त्रास द्यायचा? आपल्याला काही कमी नाही, काही मागायचे नाही. तर मग त्याची पूजा कशाला करायची? याप्रकारे सुखी-अवस्थेत मनुष्य ईश्वरापासून दूर जातो आणि दुःखी अवस्थेत तो ईश्वराच्या समीप जातो. म्हणून ईश्वराने संसारात दुःखच दुःख भरले आहे. प्रत्येक जीवाने आपल्याकडे आकृष्ट व्हावे यासाठी तो मनुष्यांना दुःखाचे दाहक चटके देत असतो. तरीही काही बहाद्दर दुःखे भोगून देखील ईश्वराकडे पाहत नाहीत. काही लोक मात्र दुःखाचे चटके सोसत ईश्वरचिंतनात मग्न राहतात. ते भक्त होत. बरेच लोक वेदाध्ययन करतात, काही शास्त्रांचे अध्ययन करतात, काही यज्ञयागादी कर्मे करतात, काही तपश्चर्या करतात, काही अत्यंत कठीण अशी व्रते आचरतात. परंतु अशा लोकांच्या अंतःकरणात जर भक्ती नसेल तर त्याच्या क्रियेला काही अर्थ नाही. आपण काय करतो यापेक्षा कोणत्या भावनेने करतो हे अधिक महत्त्वाचे आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे-

**भावनाविहितं कर्म पावनादपि पावनम्।।१६.६८।।**

श्रद्धेने वेदाध्ययन केले तर ते फलद्रूप होते. शास्त्रांचे अध्ययन करतो परंतु शास्त्रावर विश्वास नाही तर ते शास्त्र अभ्यासकाला कोणते फळ देईल? शास्त्रे पाठ करायची आणि इतरांना शिकवायची. त्याचा स्वतःला काहीच लाभ नाही. हे केवळ पांडित्यदर्शन झाले. म्हणून शास्त्रांवर विश्वास हवा. यज्ञ करण्यामागे देखील हीच भूमिका हवी. यज्ञाचे प्रयोजनच मुळी 'अगोदर इतरांना देऊन मग सेवन करा' हे सांगण्यासाठी आहे. यज्ञाचे अनेक प्रकार आहेत. एक 'अतिथी-ज्ञ' आहे. गृहस्थाने स्वयंपाक सिद्ध झाल्यावर जेवण करण्याआधी काही काळ अतिथीची वाट पाहिली पाहिजे. कोणी अतिथी आला नाही तर ईश्वराला नैवेद्य दाखवून मगच अन्नग्रहण केले पाहिजे. हाच अतिथियज्ञ होय. भोजन हा देखील एक यज्ञ आहे, हे मागे सांगितले आहे.

या सर्व क्रियांच्या मागे भावना हवी, भक्ती हवी. भक्तीशिवाय सर्व क्रिया निरर्थक ठरतात. केवळ शून्य ० हे चिन्ह लिहिले तर त्याला काहीच महत्त्व नाही. परंतु शून्याच्या मागे जर १ आकडा घातला तर शून्याचे महत्त्व वाढते. शून्याच्या मागे आकडा नसेल तर शून्य हे शून्यच राहते. आपल्या सगळ्या क्रिया म्हणजे शून्य आणि

भक्ती म्हणजे आकडा. एकच्या आकड्यासमोरची शून्ये वाढत गेली तर त्याची किंमत कितीतरी पटीने वाढते. आकडा न लिहिता नुसती शून्ये लिहून पाहा. मग शून्याची किंमत कळेल. त्याप्रमाणे सर्व कर्मांमागे भक्ती असेल तरच आपल्या कर्माचे मोल वाढते, ते अनंतपटीने फलद्रूप होते.

**शिवभक्तिविहीनस्य सुकृतं चापि निष्फलम्।**
**विपरीतफलं च स्याद् दक्षस्यापि महाध्वरे।।११.४९।।**

भक्तीशिवाय पुण्यसंचय होणे शक्य नाही. भक्तिशून्य मनुष्याने केलेली सत्कर्मे देखील निष्फळ ठरतात. आणि बऱ्याच वेळा त्याचे विपरीत फळ मिळते. यासाठी उदाहरण म्हणून दक्ष प्रजापतीने केलेल्या यज्ञाचे उदाहरण दिले जाते. 'लिंगाष्टका'तील 'दक्षसुयज्ञविनाशकलिंगम्' हा पाठ योग्य नसून 'दक्षकुयज्ञविकाशकलिंगम्' असे म्हटले पाहिजे. दक्षाचा यज्ञ हा 'सुयज्ञ' नव्हता तर भगवान शिवाचा अधिक्षेप करण्यासाठी केलेला 'कुयज्ञ' होता. सुयज्ञ असेल तर ईश्वर त्याचा विध्वंस करणार नाही. तात्पर्य असे की, दक्षाने यज्ञ केला तरी त्याचे त्याला विपरीत फळ मिळाले. म्हणून कर्मामागे भक्ती असेल तरच ते कर्म सुफलदायक ठरते.

शास्त्रात कर्माचे विहित कर्म आणि निषिद्ध कर्म असे दोन प्रकार सांगितले आहेत. विहित कर्म केल्याने पुण्यप्राप्ती होते तर निषिद्ध कर्म केल्याने पाप होते. कोणी विहित कर्म करताना जर ते शिवद्वेषाने करीत असेल तर त्या कर्माचे त्याला चांगले फळ न मिळता वाईटच फळ मिळेल. आपण काय करतो यापेक्षा आपली भावना कोणती असते याकडे ज. रेणुकाचार्य आपले लक्ष वेधतात. शिवभक्ती केल्याने आपल्या पातकांचा नाश होतो. पूर्वी चण्ड नामक दैत्याने पितृहत्या केली तरी तो त्या पातकापासून शिवभक्ती केल्याने मुक्त होऊन शिवस्वरूप झाला अशी एक कथा आहे.

**सुकृतं दुष्कृतं चापि शिवभक्तस्य नास्ति हि।**
**शिवभक्तिविहीनानां कर्मपाशनिबंधनम्।।११.५१।।**

पुण्यकर्म असो की पापकर्म असो, मनुष्य दोन्ही कर्मांनी बंधनातच पडतो. पुण्यकर्मांनी स्वर्ग मिळतो तर पापकर्मांनी नरक मिळतो. परंतु ही दोन्ही बंधनेच आहेत. ज्याला संसारातून मुक्त व्हायचे आहे त्याला पुण्य-पापाच्या पलीकडे गेले पाहिजे. शिवभक्ताला सत्कर्माच्या फळाची अपेक्षा नसल्यामुळे ते कर्म त्याला बांधून ठेवू शकत नाही. शिवभक्त सात्त्विक प्रवृत्तीचा असतो. त्याच्या हातून जाणिवपूर्वक दुष्कृत्य घडण्याची शक्यता नसते. तथापि अजाणतेपणाने त्याच्या हातून काही दुष्कृत्य घडलेच तर त्या कर्माची त्याला बाधा होत नाही. भगवान शिवावर अनन्यप्रेम करणाऱ्या शिवभक्ताला कर्मपाशाचे बंधन नाही. भक्तिशून्य माणसाला मात्र हे कर्मबंधन जन्मोजन्मी जखडून ठेवते आणि जन्ममरणाच्या रहाटगाडग्यात फिरवीत ठेवते. ज्याच्या जीवनाचे सर्वस्व भगवान शिव असतात आणि कायिक, वाचिक, मानसिक अशा त्रिकरणांनी ज्याचा शिवाशी सदैव संबंध जुळलेला असतो अशा शिवभक्ताचा पुण्य-पापकर्मांशी संबंध नसतो. सूर्यरथाला जुंपलेल्या अश्वांना कधी अंध:काराचे भय नसते. कारण त्यांचा त्या दिव्य तेजोगोलाशी सदोदित संबंध असतो. त्याप्रमाणे ज्याचा शिवाशी प्रत्यक्ष संबंध असतो अशा शिवभक्ताला कर्मबंधनाचे मुळीच भय नसते. एखाद्या मदोन्मत्त हत्तीला नाजूक कमलतंतूंनी कसे बांधता येईल? त्याप्रमाणे शिवभक्तीत तल्लीन झालेल्या भक्ताला कर्म बांधून ठेवू शकत नाही.

शिवभक्तीचा अधिकार प्रत्येक जीवाला आहे. ब्राह्मण असो, क्षत्रिय असो, वैश्य असो वा शूद्र असो कोणीही शिवाची भक्ती करू शकतो. जो शिवभक्ती करतो तो भगवान शिवाप्रमाणेच श्रेष्ठ मानला जातो, शिवस्वरूप

समजला जातो. उच्च वर्णात आणि अंत्यजात देखील अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे शिवभक्त होऊन गेले.

**शिवभक्तिसमावेशे क्व जातिपरिकल्पना।**
**इन्धनेष्वग्निदग्धेषु को वा भेदः प्रकीर्त्यते।।११.५५।।**

कोणाच्या हृदयात जर शिवभक्तीचा उदय झाला तर त्या ठिकाणी जातिकल्पना शून्य होऊन जाते. लाकडे अनेक प्रकारची असतात. आंब्याचे, लिंबाचे, चंदनाचे लाकूड वेगवेगले असते. त्यामध्ये आपण भेद करतो. अग्नीत ती भिन्न प्रकारची लाकडे जाळल्यानंतर त्यांचे वेगळेपण नष्ट होते आणि ती केवळ अग्निरूपाने अस्तित्वात राहतात. त्याप्रमाणे मनुष्य कोणत्याही जातीचा असला तरी जेव्हा तो शिवभक्त होतो तेव्हा त्याची वेगळी जात उरत नाही. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या भिन्न जाती असल्या तरी जेव्हा ते शिवभक्त होतात तेव्हा त्यांची 'शिवभक्त' हीच एकमेव जात असते. तेथे ब्राह्मण-शिवभक्त, अंत्यज-शिवभक्त असा भेद शिल्लक राहत नाही. सामाजिक जातिभेदाला भक्तीच्या माध्यमाने दूर करण्याचा प्रयत्न आपल्या आचार्यांनी केलेला आहे. भक्तिसिद्धान्त समतेचेच प्रतिपादन करीत आलेला आहे. विषमतेला या सिद्धान्ताने कधीही खतपाणी घातले नाही. म्हणून जातिकल्पनेला शून्यवत् करणारी शिवभक्ती अत्यंत श्रेष्ठ होय.

**शुद्धा नियमसंयुक्ताः शिवार्पितफलागमाः।**
**अर्चयन्ति शिवं लोके विज्ञेयास्ते गणेश्वराः।।११.५६।।**

आतापर्यंत सामान्यरूपाने भक्तीचे विवेचन केले. परंतु येथे विशेषरूपाने भक्तीचे माहात्म्य सांगितले आहे. दीक्षा घेऊन जे परिशुद्ध होतात ते 'शुद्ध' होत. भक्तिमार्गात प्रविष्ट होण्याआधी प्रत्येकाला गुरूकडून दीक्षा घ्यावी लागते. ज्याला गुरुदीक्षा प्राप्ती झाली आणि ज्याचे आणव, मायीय आणि कार्मिक मल नष्ट झाले अशा मनुष्याला 'शुद्ध' म्हणतात. भक्तीचे स्वरूप गुरूकडून जाणून घेऊन सर्व नियम पाळतात ते नियमसंयुक्त होत. शिवभक्ती निरपेक्ष असली पाहिजे. शिवासाठी शिवभक्ती असावी, सांसारिक वस्तूंसाठी नसावी. त्यासाठी शिवभक्ती केली तर ती 'व्यभिचारी भक्ती' ठरते. तुम्ही शिवाजवळ गेलात आणि धनसंपत्ती मागितली तर तुमचे प्रेम शिवावर नसून धनावर आहे हे सिद्ध होते. तुम्ही न मागता देखील शिव तुम्हाला संपत्ती देईलच. गीतेत भगवंतांनी सांगितले आहे- जे माझे अनन्यभक्त असतात त्यांचा योगक्षेम मी चालवतो.

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्।। गीता, ९.२२।।**

आपल्याला कोणत्यावेळी काय हवे हे आपल्यापेक्षा ईश्वराला अधिक कळते. म्हणून हावरटपणाने ईश्वराला काहीही मागू नये. मागायचेच असेल तर असे म्हणावे की, ईश्वरा, तुला योग्य वाटेल ते दे. अन्यथा आपली अवस्था भस्मासुरासाखी होईल. त्याने जो 'वर' मागितला तोच त्याच्यासाठी 'शाप' ठरला. हिरण्यकश्यपूचे असेच झाले. 'मला मृत्यू नको' एवढेच मागायचे. ते सोडून 'इथे नको, तिथे नको, त्याच्या हातून नको, याच्या हातून नको' अशा अटी तो घालत बसला. शेवटी बुद्धीला मर्यादा आहेच. त्याने मागताना जी फट सोडली तिथूनच मृत्यू त्याच्यापर्यंत पोहोचला.

खरा भक्त ईश्वराला 'तूच हवा आहेस' हे मागतो आणि आपल्या साऱ्या कर्मांची फळे तो ईश्वरालाच अर्पण करतो. ज्याच्यावर भगवान शिवाची कृपा होते त्याला कशाची उणीव भासेल? काय कमी पडेल? ईश्वरावर जर

अनन्यनिष्ठा असेल तर भक्ताला मागण्याची गरजच नाही. न मागता त्याला सारे काही मिळते. आपल्या घरात लहान मुले असतात. जे मूल सारखे पैसे मागते त्याला एकदा-दोनदा-तीनदा वडील पैसे देतात. चौथ्यांदा एक चापट देतात. पण जे मूल काही मागत नाही त्याला बोलावून प्रेमाने देतात. या व्यवहारातील गोष्टी आहेत. हीच गोष्ट ईश्वरभक्ताच्या बाबतीतही घडते.

म्हणून जे शुद्ध, नियमयुक्त, कर्मफळात निरपेक्ष राहून शिवाची अर्चना करतात तेच शिवाचे गण आहेत असे समजावे, असे ज. रेणुकाचार्य म्हणतात. याप्रमाणे भक्त कसा असतो? त्याचे माहात्म्य कोणते? भक्तीने आपल्या व्यावहारिक जीवनात आपण कशी समता आणू शकतो? भक्त न मागताच सारे काही कसे मिळवतो? याविषयी येथे भक्तमाहात्म्यस्थलात ज. रेणुकाचार्यांनी विवेचन केले आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

जंगमवाडी मठ, वाराणसी

वाराणसी, १ एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन सातवे**

## शरणमाहात्म्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

प्रसादीस्थलातील अवांतरस्थलांवर आपण आशीर्वचन ऐकत आहात. या अगोदर गुरूचे माहात्म्य, लिंगाचे माहात्म्य आणि जंगमाचे माहात्म्य आपण श्रवण केले आहे. आज शरणमाहात्म्यस्थलाचे विवेचन करायचे आहे. ज. रेणुकाचार्य अगस्तीमहर्षींना सांगतात-

**गुरुलिंगादिमाहात्म्यबोधान्वेषणसंगतः।**
**सर्वात्मना शिवापत्तिः शरणस्थानमुच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ११.५७)

गुरू, लिंग, जंगम यांचे माहात्म्य जाणून जो सर्वभावाने शिवाला शरण जातो त्याला 'शरण' असे म्हणतात. आपला संपूर्ण अहंभाव सोडून शरणागत होणारा तो शरण होय. काही साधक आपली परमार्थ-मार्गावरची वाटचाल आपल्या साधनेच्या बळावर होत आहे असे समजतात. तर काही साधक केवळ शिवाच्या अनुग्रहाने सारे घडते अशी भावना हृदयात बाळगून असतात. तेच शरण होत. 'सर्वात्मना शिवापत्तिः'... शरीराने, वाणीने, मनाने तो संपूर्ण शिवाला शरण जातो म्हणून या स्थानाला शरणस्थान, शरणस्थल म्हटले जाते. ब्रह्मा, विष्णू इ. देव हे प्राकृत ऐश्वर्याने युक्त आहेत. भगवान शिव या साऱ्या पलीकडे आहेत हे जाणून अन्य देवतांविषयी उदासीन राहून अनन्यभावाने शिवाचा आश्रय करणारा तो शरण होय.

शरणस्थलातील साधक आपल्या इष्टदेवतेशिवाय अन्य देवतेची उपासना कधीच करीत नाही. सर्व देवता

ज्याचे अर्चन करतात असा शिव आपले आराध्य असताना इतर देवतांच्या उपासनेची गरजच काय? म्हणूनच कर्नाटकातील शरणांनी जो अन्य देवतेची उपासना करतो अशा वीरशैवाची निर्भत्सना केली आहे. महाराष्ट्रातील वीरशैव संतकवी श्रीमन्मथस्वामींनी देखील अशा माणसाला कठोर शब्दांनी फटकारले आहे–

**शिवभक्ताचे कुळी जन्मुनि करंटा। न भजे चोरटा शंकरासी।।**
**छपवूनि लिंगा घाली तुळशीमाळ। जन्मला चांडाळ मातेगर्भी।।**
**सांडोनि भस्माते लावितो चंदन। तयासी बंधन यम करी।।**
**मन्मथशिवलिंग म्हणे तो नर। यमलोकी चोर म्हणती तया।।**

साधना करताना एका देवतेविषयी एकनिष्ठा नसेल तर साधना व्यर्थ जाते. भक्ती एकाच देवतेवर असेल तर ती शीघ्र फलदायी ठरते. पाणी मिळविण्यासाठी एकाच ठिकाणी पन्नास फूट भूमी खोदावी लागते तेव्हाच पाणी मिळते. पन्नास ठिकाणी एकेक फूट खोदले तर श्रम व्यर्थ जातात. हे समजावून सांगण्यासाठीच मन्मथस्वामींना कठोर शब्दांचा प्रयोग करावा लागला. अनेक देवतांची भक्ती करणे हा भक्तिक्षेत्रातील व्यभिचार मानला जातो. म्हणून निष्ठा एकाच देवतेवर असावी लागते. सर्व देवतांना आपल्या इष्टदेवतेच्या रूपात पाहणेच अधिक श्रेयस्कर होय. असे घडले तर आपली भावना विचलित होणार नाही. शरणस्थलातील साधक अशीच दृढ भावना बाळगतो.

**शरण्यः सर्वभूतानां शंकरः शशिशेखरः।**
**सर्वात्मना प्रपन्नस्तं शरणागत उच्यते।।११.५९।।**

या ठिकाणी शरण, शरणागत आणि शरणार्थी अशा तीन अवस्था सांगितल्या आहेत. आतापर्यंत जी लक्षणे सांगितली ती शरणाची होती. आता शरणागताची व्याख्या करीत आहेत. शरण हा शरणागत कधी होतो? भगवान शिव 'शरण्य' आहे. कारण तो शरण आलेल्या सर्व जीवांचे रक्षण करतो. या श्लोकातील 'शशिशेखर' या पदाचा अर्थ 'चंद्राला मस्तकावर धारण करणारा' असा आहेच. परंतु यामागे एका शरणागताची कथाही दडलेली आहे. चंद्राने जेव्हा गुरुपत्नीगमन केले तेव्हा त्याला शाप मिळाला आणि तो क्षयग्रस्त झाला. दिवसेंदिवस तो खंगत गेला. शेवटी तो भगवान शिवाला शरण गेला. शिवांनी त्याला अभय दिले आणि त्याची अवशिष्ट राहिलेली कला आपल्या मस्तकावर धारण केली. पश्चातापदग्ध चंद्राला अभय देऊन त्याचे रक्षण करणारे आणि त्याला मस्तकावर धारण करून त्याचा मान वाढविणारे भगवान शिव सर्व प्राणिमात्रांचे रक्षण करण्यास समर्थ आहेत. अशा अनेक कथा ग्रंथांतून विखुरलेल्या आहेत. अन्य देवतांपासून ज्याला भय आहे अशालाही भगवान शिवांनी आश्रय देऊन त्याचे रक्षण केले आहे. म्हणून केवळ शिव हेच 'शरण्य'– शरण देणारे होत. सर्व प्राणिमात्राचे रक्षण करण्यास शिव समर्थ आहेत असे जाणून तो सर्वभावाने शिवाला शरण जातो तोच 'शरणागत' होय.

**विमुक्तभोगलालस्यो देवतान्तरनिःस्पृहः।**
**शिवमभ्यर्थयन् मोक्षं शरणार्थीति गीयते।।११.६०।।**

प्रथम शरण होता, मग शरणागत झाला आणि आता शरणार्थी झाला. 'अर्थी' म्हणजे याचना करणारा, अपेक्षा ठेवणारा. धनार्थी, विद्यार्थी, मोक्षार्थी यांच्याप्रमाणेच हा शरणार्थी होय. ईश्वराला शरण गेल्यावर काय

मागावे हे येथे स्पष्ट सांगितले आहे. भगवान शिवाची आराधना करणाऱ्याने भोगसामग्रीची अपेक्षा ठेवू नये. भगवान शिव तर विरक्तमूर्ती आहेत. अशा शिवाजवळ जाऊन काय सांसारिक सुखे मागायची? म्हणून सर्व भोगलालसेपासून मुक्त होऊन ब्रह्मादी देवतांविषयी नि:स्पृह राहून जो शिवालाच मोक्ष मानतो तो शरणार्थी होय.

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार पुरुषार्थ पूर्वसूरींनी मानले आहेत. यांपैकी पहिले तीन पुरुषार्थ कोणत्या ना कोणत्या तरी दोषाने ग्रासले जातात. धर्म सकाम दोषाने, अर्थ लोभाने आणि काम मोहाने दूषित होतो. म्हणून हे तीन पुरुषार्थ परम-पुरुषार्थ नव्हेत.

**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम**

जेथे गेल्यावर कोणीच परत येत नाही असे परमधाम म्हणजे मोक्ष असे गीतेत म्हटले आहे. मनुष्याने अशाच ठिकाणी जावे की जेथून त्याला परतावे लागू नये. एका हिंदी कवीने म्हटले आहे-

**बोलना हो तो ऐसे बोलो कोई ना कहे झूठ**
**बैठना हो तो ऐसे बैठो कोई न कहे उठ**

बोलायचे असेल तर असे बोलावे की कोणी त्याला खोटे ठरवू नये आणि बसायचे असेल तर अशा स्थानावर बसावे की तेथून कोणी उठवू नये. आपणही बसतो. पण कुठे? दुसऱ्याच्या जागेवर. कुणीतरी येऊन रिझर्व्हेशन तिकीट दाखवतो. मग निमूटपणे उठतो. चौऱ्यांशी लक्ष योनींतून हा असाच प्रवास चाललेला असतो. प्रत्येक शरीर ही आपली बापजाद्याची इस्टेटच समजत असतो. मृत्यू लाथ मारून उठवतो तेव्हा कळते की अरे, ही आपली जागा नव्हे. चला दुसरी जागा शोधा. असे करीत आपण इथपर्यंत आलो आहोत. आता मात्र अशी जागा शोधा की तेथून कोणी उठवणार नाही.

ध्रुवाची कथा साऱ्यांना माहीत आहे. तो आपल्या पित्याच्या मांडीवर बसायला जातो. त्याच्या पित्याचे नाव उत्तानपाद. त्याला दोन बायका होत्या. सुरुची आणि सुनीती. ध्रुव हा सुनीतीचा पुत्र. सुरुची राजाची आवडती राणी होती. तिचेच तो ऐकत असे. ही कथा लौकिक आहे आणि आध्यात्मिक देखील आहे. लौकिक सुखे सर्वसामान्यांना रुचकर वाटतात. धर्म-नीति-न्यायाच्या गोष्टी लोकांना रुचत नाहीत. विलासी मनुष्याला लौकिक सुखात अधिक रुची वाटते. उत्तानपाद सुरुची प्रिय होती. सुनीती नव्हती.

पित्याच्या मांडीवर बसण्यासाठी जेव्हा ध्रुव गेला तेव्हा सुरुचीने त्याला खाली खेचले. ध्रुवाने आपल्या आईजवळ- सुनीतीजवळ जाऊन झाला प्रकार सांगितला. सुनीती म्हणाली, ''तुझ्या पित्याजवळ समत्वबुद्धी नाही. तो आपल्या पत्नीवर नियंत्रण ठेवू शकत नाही. म्हणून तू सर्वांचा जो परमपिता असा ईश्वर त्याच्याकडे जा. तो तुला कधीही दूर लोटणार नाही.''

पुढे ध्रुवाने तपश्चर्या करून अढळपद मिळविले, ही कथा सर्वांना ज्ञात आहे. मोक्ष हे अढळपद आहे. ते प्राप्त झाले म्हणजे तेथून कोणीही परत येत नाही. शरणार्थी शिवाजवळ जाऊन हेच पद मागतो. म्हणून मुक्तीची कामना करणारा तो शरणार्थी होय. तो मनाने, वाणीने, शरीराने, कर्माने शिवाला शरण गेलेला असतो. म्हणून त्याला यज्ञयागादी सकाम कर्मे करण्याचे प्रयोजनच नसते.

यज्ञयागादीचे फळ म्हणजे स्वर्गप्राप्ती. ऐहिक सुखे भोगून पारलौकिक सुखाच्या आशेने यज्ञ केला जातो. स्वर्गप्राप्ती तरी कोठपर्यंत? जोपर्यंत पुण्यसंचय आहे तोपर्यंतच. त्यानंतर पुन्हा नशिबात मृत्युलोक येणारच. खिसा गरम आहे तोपर्यंत हॉटेलात आपण राहू शकतो, तेथली सुखे भोगू शकतो. पैसे संपले की हॉटेल सोडावे लागते.

तशीच अवस्था स्वर्गाची आहे. 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति'... स्वर्गात दोन दोष आहेत. क्षय आणि पतन. स्वर्गात गेल्यावर पुण्याचा क्षय होतो आणि त्यानंतर जीवाचे पतन होऊन तो मृत्युलोकात परत येतो. म्हणून स्वर्गदेखील नाशिवंत आहे. परंतु शरणाला मात्र अक्षय फळ मिळते. मोक्ष मिळतो. त्यामुळे नाशिवंत स्वर्गसुख संपादन करण्यासाठी जे यज्ञयाग केले जातात ते करण्याची शरणाला गरज नसते.

**प्रपन्नपारिजातस्य भवस्य परमात्मन:।**
**प्रपत्त्या किं न जायेत पापिनामपि देहिनाम्।।११.६३।।**

भगवान शिव कल्पवृक्ष आहेत. जे त्यांना शरण जातात त्याचे मनोरथ पूर्ण होतात. पातक्यातला पातकी मनुष्य जरी त्यांना शरण गेला तरी त्याची पापे नष्ट होतात आणि त्याचे मनोरथ पूर्ण होतात.

एक पापी मनुष्य पश्चात्तापाने पोळला आणि ईश्वरदर्शनासाठी मंदिराकडे निघाला. मंदिराला तीन दारे होती. एका दाराने तो आत जाऊ लागताच तेथील द्वारपालाने त्याला हटकले आणि दारावरची पाटी दाखवली. त्यावर लिहिले होते– भक्तिमार्ग. द्वारपालाने विचारले,

''तू कोण आहेस? भक्त आहेस काय?''

''नाही महाराज, मी पापी आहे.'' त्याने उत्तर दिले.

''मग तुला या दाराने जाता येणार नाही.'' द्वारपाल म्हणाला, ''येथून फक्त भक्तच आत जाऊ शकतो.''

तो मनुष्य दुसऱ्या दारावर गेला. तेथे पाटी होती– वैराग्यमार्ग. तेथेही द्वारपालाने अडविले आणि विचारले,

''तू विरक्त आहेस काय?''

''नाही, मी पापी आहे.''

''मग तुला या दाराने जाता येणार नाही. पुढे जा.'' द्वारपालाने बजावले.

तो तिसऱ्या द्वारावर गेला तेथे पाटी होती– ज्ञानमार्ग. तेथेही द्वारपालाने अडविले. आत जाऊ दिले नाही. मंदिराला चौथे दारच नव्हते. ईश्वर पतितपावन आहे म्हणून तो पापी ईश्वराकडे आला होता. पण त्याच्यासाठी तिन्ही दारे बंद होती. आपली पापातून कधीही मुक्तता होणार नाही या जाणिवेने तो रडू लागला. एका ज्ञानी भक्ताने त्याची चौकशी केली आणि मंदिरात जाऊन तो ईश्वराला म्हणाला, ''प्रभो, भक्त, विरागी आणि ज्ञानी तुमच्यापर्यंत येऊ शकतात. पण पापी माणसाचे काय? तुम्हाला तर 'पतितपावन' म्हणतात आणि पतित मनुष्य तर तुमच्यापर्यंत येऊ शकत नाही. त्याच्याकरिता तुम्ही चौथे दार निर्मिले पाहिजे.''

ईश्वराला पापी माणसाची अवस्था कळली. तो बाहेर आला आणि त्याने पापी मनुष्याला आपल्या हृदयाशी कवटाळले. त्याला आत घेऊन गेला.

तुम्हाला आश्चर्य वाटेल की पापी मनुष्य कसा मुक्त होऊ शकतो? पापी माणूस जर स्वत:ला पापी समजेल तर तो मुक्त होऊ शकतो. पापी असून जो स्वत:ला पापी समजत नाही तो कधीही मुक्त होणार नाही. शास्त्रात सांगितले आहे की, पुण्य अथवा पाप जेव्हा दुसऱ्यापुढे सांगितले जाते तेव्हा त्यांचा क्षय होतो. आपण सत्कर्म केले हे इतरांना ढोल बडवून सांगितले की समजा ते संपले. तसेच दुष्कर्माबद्दलही आहे. 'मी पापी आहे' असे कबूल करणे म्हणजेच पश्चात्ताप. पश्चात्तापाने सारे मनोमालिन्य गळून पडते. म्हणून ईश्वराला शरण जाणारा पश्चात्तापाने पोळलेला असतो, ईश्वरकृपेने त्याची पातके नष्ट होऊन तो शिवस्वरूप होतो. त्याचे मन शिवभक्तीने परिपक्व आणि सुप्रसन्न होते. अशाच्या जन्मालाच 'जन्म' म्हणावे. इतरांचा जन्म व्यर्थ आहे असे समजावे.

**दुर्लभं मानुषं प्राप्य जननं ज्ञानसाधनम्।**
**ये न जानन्ति देवेशं तेषामात्मा निरर्थकः।।११.६५।।**

मानवजन्माचे मुख्य लक्ष्य भगवान शिवाला शरण जाणे हे होय. दुर्लभ असा मनुष्यजन्म प्राप्त होऊन देखील जे शिवज्ञान संपादन करीत नाहीत त्यांचा जन्म निरर्थकच समजला पाहिजे. मुळात मनुष्यजन्म मिळणेच कठीण. त्यातही मनुष्यत्व मिळणे अधिक कठीण. का? त्याचे विवेचन 'नैष्कर्म्यसिद्धी' ग्रंथात केलेले आहे. जन्माला कारणीभूत असते ते आपले कर्म. कर्म हे आपले पुण्यकर्म व पापकर्म असे दोन प्रकारचे असते. चौऱ्यांशी लक्ष योनींत जीव भ्रमण करीत राहतो ते त्याच्या कर्मांमुळेच. सर्व योनींत मनुष्ययोनी श्रेष्ठ मानली गेली. कारण आपला जन्म कोणापासून झाला, कशामुळे झाला आणि जन्मानंतर आपण काय केले पाहिजे हे जाणण्याची शक्ती मनुष्यजन्मातच प्राप्त होते.

ईश्वराने मनुष्य का निर्माण केला असावा? असंख्य जीवजाती निर्माण करूनही त्याचे समाधान झाले नाही. एखाद्या दंपतीला जर बहिरी, आंधळी, मुकी अशी व्यंग असलेली मुले झाली तर ते आईवडील आनंदित राहणार नाहीत. त्यांना आपल्याशी बोलणारा, आपले ऐकणारा असा धडधाकट अव्यंग मुलगा झाला तरच आनंद होईल. त्याप्रमाणे ईश्वराने आपल्याशी संवाद साधू शकणारा, आपले चिंतन करण्याची क्षमता असलेला असा मनुष्य उत्पन्न केला. मनुष्याशिवाय अन्य जीवजंतूमध्ये ही क्षमता नाही. आपल्या आनंदासाठी परमेश्वराने मनुष्य उत्पन्न केला. असे असूनही माणसे ईश्वराकडे जात नाहीत, त्याचे चिंतन करीत नाहीत. देवयोनीत जन्म घेऊन काही उपयोग नाही. जीवनाचे सार्थक करायचे असेल तर मनुष्ययोनीतच जन्म घ्यावा लागतो. पुण्य आणि पाप जेव्हा समप्रमाणात असतात तेव्हाच जीवाला मनुष्यजन्म लाभतो, असे शास्त्र सांगते. म्हणून मनुष्यजन्म लाभणे दुर्लभ होय. अशा मनुष्यजन्मात ज्ञान देणाऱ्या शिवाला जे जाणत नाहीत त्यांचा जन्म अर्थहीनच समजला पाहिजे.

हे जग सोडताना मनुष्य पुण्यपाप सोबत घेऊन जातो किंवा ज्ञान सोबत घेऊन जातो. बाकी काहीच त्याला सोबत नेता येत नाही. अंतकाळी जे ज्ञान सोबत न्यायचे ते जर जन्मभरात मिळाले नाही तर अशा मनुष्याचे येणे आणि जाणे निरर्थक समजू नये तर काय?

**तत्कुलं हि सदा शुद्धं सफलं तस्य जीवितम्।**
**यस्य चित्तं शिवे साक्षाद् विलीनमबहिर्मुखम्।।११.६६।।**

ज्याचे मन अंतर्बाह्य भगवान शिवातच विलीन झालेले असते असा साधक ज्या कुळात जन्म घेतो ते कूळ अत्यंत पवित्र, शुद्ध समजले जाते. अशा शरणाचे जीवन धन्य झालेले असते. शिवाच्या प्राप्तीसाठीच तो शिवचिंतन करतो. असा हा शरणार्थी आपले जीवन, आपले कूळ, आपला परिसर उजळून टाकतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन समाप्त करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

जंगमवाडी मठ, वाराणसी
२ एप्रिल १९९२

## शिवप्रसादमाहात्म्यस्थल

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

प्रसादिस्थलातील अंतिम अवांतरस्थल म्हणजे शिवप्रसादमाहात्म्यस्थल. प्रसादीस्थलाच्या प्रारंभी प्रसादाचे विवेचन केलेले आहे आणि आता शेवटी प्रसादाचेच विवेचन केलेले आहे. परंतु या दोन प्रसादांत खूप अंतर आहे. प्रारंभी सांगितले ते अन्नप्रसादाविषयी. येथे प्रसाद याचा अर्थ आहे भगवान शिवाचा अनुग्रह. वीरशैवसिद्धान्तानुसार साधक केवळ आपल्या साधनेच्या बळावर मुक्ती प्राप्त करून घेऊ शकत नाही. साधना करताना त्याला भगवान शिवाच्या अनुग्रहाची म्हणजे कृपेची आवश्यकता असते. हे समजावण्यासाठीच येथे या स्थलाचे विवेचन केलेले आहे.

**गुरुलिंगादिमाहात्म्यविशेषानुभवस्थितिः।**
**यस्माच्छिवप्रसादात् स्यात्तदस्य महिमोच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ११.६७।।)

गुरू, लिंग, जंगम यांच्या ठिकाणी आणि त्यांच्या प्रसादाविषयी आपल्या मनात दृढ श्रद्धा उत्पन्न होते याचे कारण काय? तर भगवान शिवाच्या अनुग्रहामुळेच आपल्या मनात श्रद्धा जागी होते. शिवाचा अनुग्रह म्हणजेच शिवप्रसाद. त्याची महिमा या ठिकाणी सांगितली आहे. हा प्रसाद कोणाला प्राप्त होतो? ज्याची शिवावर अनन्यनिष्ठा असते, जो गुरुपूजेत तत्पर असतो, ज्याचे आचरण अत्यंत शुद्ध असते आणि जो अनन्यभावाने शिवाला शरण जातो अशा शिवभक्तालाच शिवप्रसादाचा लाभ होतो. भगवान शिव त्याच्यावर प्रसन्न होतात. जे अनन्यनिष्ठ नसतात त्यांच्यावर भगवान शिवाचा अनुग्रह होत नाही.

**प्रसादोऽपि महेशस्य दुर्लभः परिकीर्त्यते।**
**घोरसंसारसंतापनिवृत्तिर्येन जायते।।११.६९।।**

शिवप्रसाद हा अत्यंत दुर्लभ आहे. आपल्याकडे प्रसाद घेण्याची योग्यता नसते म्हणून तो दुर्लभ असतो. शिव तर अनुग्रह करायला सदैव तत्परच आहेत. परंतु आपली सिद्धता नसते. प्रसादामुळे जीवाची सर्व सांसारिक तापांपासून मुक्तता होते. असा शिवप्रसाद दुर्लभ असण्याचे कारण म्हणजे आपली भक्ती दृढ नसते हे होय. ज्याची शिवावर दृढ भक्ती आहे अशा शिवभक्तासाठी शिवप्रसाद अत्यंत सुलभ आहे. प्रसाद आणि भक्ती यात परस्परसंबंध आहे–

**प्रसादादेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसंभवः।**
**यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरः।।९.११।।**

बीज आणि अंकुर यांमध्ये परस्परसंबंध आहे. बीज असेल तर अंकुर आहे. अंकुर असेल तर बीज आहे. त्याप्रमाणे भगवान शिवाच्या प्रसादाने आपल्या मनात भक्तीचा उदय होतो आणि भक्तीमुळे शिवप्रसाद प्राप्त होतो. मग बीज आधी अंकुर आधी? या प्रश्नाप्रमाणेच शिवाचा अनुग्रह आधी की भक्ती आधी? असा प्रश्न निर्माण होतो. भगवान शिव असे तर म्हणत नाहीत की, आधी माझी भक्ती कर मग मी तुझ्यावर अनुग्रह करतो.

आपल्याला मनुष्यजन्म मिळाला हाच मुळी भगवान शिवांनी आपल्यावर केलेला अनुग्रह आहे, असे शास्त्रे सांगतात. असे आहे तर जन्मत:च आपल्यावर ईश्वराचा अनुग्रह झालेला आहे. मग आपण त्याची भक्ती करायलाच हवी. आपण जर भक्ती केली नाही तर विशेषत्वाने आपल्यावर शिवाचा अनुग्रह होणार नाही. भक्ती जसजशी दृढ होत जाईल तसतसा अधिकाधिक अनुग्रह होत जाईल. भगवान शिवाचा अनुग्रह होण्यासाठी त्याला अभिमुख व्हायला हवे. कोणी जर तुम्हाला जबरदस्तीने आशीर्वाद द्यायला तुमच्या घरी आला आणि जर त्याच्याकडे तुम्ही पाठ फिरवून बसाल, तोंड फुगवून बसाल तर तुम्हाला त्याचा आशीर्वाद कसा मिळेल? तुम्ही जोपर्यंत ईश्वरसन्मुख होणार नाही तोपर्यंत त्याचा अनुग्रह होणार नाही.

एक राजा होता. त्याला एकुलता एक मुलगा होता. मुलाचे वागणे अत्यंत विक्षिप्त होते. म्हणून राजाचा राजपुत्रावर रोष झाला आणि राजाने त्याला राज्याबाहेर हाकलून दिले. अनेक वर्षे उलटली. राजाला म्हातारपण आले. राज्याचा उत्तराधिकारी तर राज्याबाहेर हाकलून दिलेला. काय करावे? राजाने मंत्र्याचा सल्ला घेतला. मंत्र्याने सांगितले की, राजपुत्राला सन्मानाने बोलावून घ्यावे आणि त्याच्या हाती राज्यकारभार सोपवावा. राजाने राजपुत्राला आणायची कामगिरी मंत्र्यावर सोपवली.

मंत्र्याने राजपुत्राचा शोध घेतला. तो एखाद्या संन्याशाप्रमाणे जीवन व्यतीत करीत होता. मंत्र्याने राजपुत्राला राजवाड्यात येण्याची विनंती केली. राजपुत्र मनातून राजावर रागावलेला होताच. त्याने विनंती नाकारली. मंत्र्याने राजाकडे येऊन वर्तमान सांगितले. तेव्हा राजा म्हणाला, ''त्याला अर्ध्या वाटेवर घेऊन या. तिथे येऊन मी त्याचे स्वागत करेन.''

मंत्री निरोप घेऊन राजपुत्राकडे गेला. पण त्याने अर्ध्या वाटेवर येण्यास नकार दिला. मंत्री परतला. राजाने पुन्हा निरोप पाठवला, ''अर्ध्या वाटेच्या अर्ध्या अंतरावर ये. तेथे मी स्वागत करेन!''

तरी राजपुत्राचा नकार आला. शेवटी राजाने निरोप पाठवला की, ''माझ्या दिशेने फक्त एक पाऊल पुढे ये मी तुझे स्वागत करेन.''

राजपुत्राने आपल्या मनाशी विचार केला की, राजा एवढ्या जवळ येतो. मग त्याला एक पाऊल अधिक टाकून मला भेटणे काय कठीण आहे? गरज राजाची होती. म्हणून राजपुत्राने पुन्हा नकार कळविला. नकार ऐकून राजा म्हणाला, ''माझ्या दिशेने एक पाऊल देखील टाकण्याची त्याची इच्छा नाही याचा अर्थ माझ्याबद्दल त्याच्या मनात मुळीच प्रेम नाही. म्हणून मलादेखील त्याची गरज नाही.''

या कथेचे तात्पर्य कोणते? शिवाचा अनुग्रह मिळविण्यासाठी मनुष्यानेही उत्कंठा दाखविली पाहिजे. असेल शिवाला गरज तर करावा त्याने अनुग्रह, अशी भावना असेल तर अनुग्रहाची शक्यता नाही. शिवाच्या अनुग्रहासाठी जीवाने सर्वभावाने शिवसन्मुख व्हायला हवे.

**यज्ञास्तपांसि मंत्राणां जपश्चिन्ता प्रबोधनम्।**
**प्रसादार्थं महेशस्य कीर्तितानि न संशय:।।११.७०।।**

शास्त्रात अनेक प्रकारची साधने सांगितली आहेत. यज्ञ, तप, मंत्रजप, चिंतन, प्रबोधन इत्यादी. या साऱ्या साधना कशासाठी? तर भगवान शिवाचा अनुग्रह प्राप्त करण्यासाठी. सर्व प्रकारच्या यज्ञांमध्ये जपयज्ञ श्रेष्ठ आहे. गीतेत भगवंतांनी सांगितले आहे, यज्ञानां जपयज्ञोस्मि. प्राचीन काळी यज्ञ करीत, त्यासाठी सामग्री जमवावी लागे. त्यामध्ये हिंसा होत असे. अशा यज्ञापेक्षा एक सोपा यज्ञ आहे तो जपयज्ञ.

**तज्जप: तदर्थभावनम्।। पातंजल योगसूत्र, १.२८।।**

महर्षी पतंजलींनी म्हटले आहे की, आपण जो मंत्र जपतो त्या मंत्राचे अर्थरूपी जे भगवद्तत्त्व त्याचे चिंतन करीत मंत्राची सतत आवृत्ती करणे हाच जप होय. जप करताना वाणी आणि मन यात एकसूत्रीपणा असायला हवा. वाणीने ज्या मंत्राचा जप चाललेला असतो त्या मंत्राचा अर्थ जो परमेश्वर आहे त्याचे चिंतन मनात सुरू असले पाहिजे. मंत्रार्थाचे चिंतन करीत मंत्राची निरंतर आवृत्ती करणे हा जप आहे. मंत्रजपाने मन प्रकाशाने उजळून जाते आणि जीवावर शिवाचा अनुग्रह होतो.

एखाद्या माणसाला त्याचे नाव घेऊन आपण एक हाक मारतो. एकदा.. दोनदा.. तीनदा. तो मुद्दाम दुर्लक्ष करतो. कारण त्याला आपल्याशी बोलायचे नसते. आपण सारखे हाक मारत राहिले तर अनिच्छेने उठून तो जवळ येतो आणि म्हणतो, ''का माझ्या नावाचा जप करतोस?'' त्याला आपल्याशी बोलायचे नसते. तरीदेखील सतत हाक मारण्यामुळे त्याला आपल्याशी बोलावे लागते. हा साधा व्यावहारिक अनुभव आहे. त्याचप्रमाणे तुम्ही शिवाचे नामस्मरण करीत राहिलात तर शिवाला अनुग्रह करायला यावेच लागते. भगवान शिवाला आपल्याकडे आकृष्ट करण्यासाठी मंत्रजप हे अमोघ साधन होय.

यज्ञ, तप, मंत्रजप, चिंतन, प्रबोधन ही बाहेरून अधिकाधिक आत जाणारी साधने आहेत. यज्ञ हे बाह्य साधन. त्यानंतर तप हे थोडे अंतरंग साधन. मंत्रजप, चिंतन आणि प्रबोधन (ज्ञान) ही क्रमश: अधिकाधिक अंतरंग साधने होय. ही सर्व साधने शिवप्रसादासाठी सांगितलेली आहेत. शिवाचा अनुग्रह हवा असेल तर यज्ञ करावा लागेल, अथवा कठोर तपश्चर्या करावी लागेल, किंवा मंत्रजप करावा लागेल आणि ज्ञान प्राप्त करावे लागेल. या सर्व साधनांनी शिवाचा अनुग्रह अर्थात् प्रसाद सुलभ होतो. काहीही न करता शिवाचा अनुग्रह होईल असे म्हणून बसून राहिला तर जन्मभर तसेच बसावे लागेल. सहजासहजी फुकट शिवप्रसाद प्राप्त होणार नाही.

**प्रसादमूला सर्वेषां भक्तिरव्यभिचारिणी।**
**शिवप्रसादहीनस्य भक्तिश्चापि न सिद्ध्यति।।११.७१।।**

एकाच देवतेची भक्ती करणे ही अव्यभिचारणी भक्ती होय. सोमवारी महादेव, मंगळवारी भवानी, गुरुवारी दत्तमहाराज, शुक्रवारी संतोषीमाता, शनिवारी मारुतीराय आणि रविवारी सूर्यनारायण अशी दररोज देवता बदलत राहिली तर तो व्यभिचार नाहीतर काय? म्हणून निष्ठेने एका देवतेची उपासना करणे ही अव्यभिचारिणी भक्ती होय. आपल्या मनातले प्रेम एकाच ठिकाणी स्थिर व्हायला हवे. शिवानुग्रहासाठी अव्यभिचारिणी भक्तीची आवश्यकता असते. ज्याच्यावर शिवाचा अनुग्रह होत नाही त्याच्याकडून भक्तीही घडणार नाही. खरे तर आपल्याला मनुष्यजन्म लाभला हाच शिवाचा अनुग्रह मानून कृतज्ञता बुद्धीने त्याची भक्ती करायला हवी. त्यानंतर शिवप्रसादाने भक्तीचे दृढीकरण होत जाते, भक्ती करायला हवी. ती अव्यभिचारिणी होते. आपले मनोरथ शिवभक्तीमुळे पूर्ण होत असतील तर आपण अन्य देवतेची उपासना कशाला करतो? गर्भात असो, जन्माला येणार असो, जन्मलेला असो शिवप्रसाद झाल्यावर तो मुक्त होतो. ब्रह्मादी देवतांना शिवप्रसादानेच अधिकार मिळाला असून त्यांना सर्व सिद्धी प्राप्त झालेल्या आहेत.

शिवप्रसाद हा परमानंद देणार आहे. तो सिद्ध झाल्यावर सर्व त्रैलोक्य शिवस्वरूप दिसू लागते. जीव कर्मामुळेच संसारचक्रात भ्रमत असतात. शिवप्रसादानेच जीवाची कर्मापासून सुटका होते. अन्य कोणत्याही साधनाने हे घडत नाही.

**बहुनात्र किमुक्तेन नास्ति नास्ति जगत्त्रये।**
**समानमधिकं चापि प्रसादस्य महेशितुः।।११.७६।।**

फार काय सांगावे शिवप्रसादासारखे किंवा त्यापेक्षा अधिक या त्रैलोक्यात दुसरे काहीच नाही. शिवप्रसाद सर्वश्रेष्ठ आहे. सर्व काही शिवाचा प्रसाद आहे असे जाणून भगवान शिवाला सर्वभावाने शरण जाणाराच शरण होय. ज. रेणुकाचार्य या प्रसादिस्थलाचा शेवटी उपसंहार करतात.

**शिवप्रसादे सति योगभाजि**
**सर्वं शिवैकात्मतया विभाति।**
**स्वकर्ममुक्तः शिवभावितात्मा**
**स प्राणिलिंगीति निगद्यतेऽसौ।।११.७७।।**

ज्याला शिवप्रसाद प्राप्त होतो अशा साधकाला 'प्रसादी' असे संबोधिले जाते. शिवप्रसाद झाल्यावर साधकाला सर्व चराचर विश्व शिवस्वरूप आहे असा प्रत्यय येऊ लागतो. अशा प्रसादिस्थलातील साधकालाच 'प्राणलिंगी' असे म्हणतात. कारण त्याने आणखी एक पायरी ओलांडलेली असते आणि तो परशिवाच्या अधिक जवळ गेलेला असतो. येथे प्रसादिस्थल समाप्त झाले. षट्स्थलांचा सांगोपांग अभ्यास करून एकेक स्थल पार करीत आपली आध्यात्मिक प्रगती करून घेणे हे प्रत्येक वीरशैवाचे कर्तव्य आहे. शिव हेच वीरशैवांचे अंतिम लक्ष्य आहे. नदीने सागरात विलीन होऊन सागररूप व्हावे त्याप्रमाणे शिवभक्ताने शिवस्वरूप व्हावे हीच त्याच्या जीवनाची इतिकर्तव्यता होय. एवढे सांगून आजचे आशीर्वचन अंग-षट्स्थलांतर्गत प्रसादिस्थलावरील विवरण पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

जंगमवाडी मठ, वाराणसी
३ एप्रिल १९९२



# भाग ४ : अंगषट्स्थलांतर्गत प्राणलिंगिस्थल

आशीर्वचन पहिले

## प्राणलिंगिस्थल–१

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।
विश्ववंद्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगदगुरुम।।

श्रीकाशीज्ञानसिंहासनाचे आदिजगद्‌गुरू विश्वाराध्यांपासून विश्वेश्वर शिवाचार्यापर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे, तिला अनंत प्रणिपात समर्पित करून जंगमवाडी मठाच्या पवित्र ज्ञानमंदिरात उपस्थित असलेले पं. अनंत जोशी, विद्वत्संघाचे सर्व विद्यार्थी आणि अन्य उपस्थित जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील प्रसादिस्थलावर आपण आतापर्यंत विचार केलेला आहे. भक्ताला आपले लौकिक अथवा पारलौकिक ध्येय प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर त्याला शिवप्रसादाची नितांत गरज असते. हे आपण यापूर्वी ऐकले आहे. भगवान शिवाच्या अनुग्रहाशिवाय केवळ आपल्या तपस्याबळाने किंवा जपादी साधनाने मी माझ्या ध्येयापर्यंत पोहचेन, या अभिमानाने कोणी साधक वाटचाल करीत असेल तर तो आपल्या लक्ष्यापर्यंत कधीच पोहोचणार नाही. आपल्या साधनेबरोबरच ईश्वराच्या असीम कृपेचा लाभ झाला तरच आपली साधना सफल होईल असा भाव साधकाच्या हृदयात निरंतर नांदला पाहिजे. असे घडले तर साधना सफल होते. अशा शरणागत भावनेने जो साधक शिवाला शरण जातो त्याला 'शरणागत' म्हणतात आणि त्याचेवर झालेला ईश्वरानुग्रह सर्वाधिक मानला जातो.

शिवप्रसादामुळे ज्याची दृष्टी विकसित होऊन ज्याला संपूर्ण विश्व शिवमय दिसू लागते अशा प्रसादिस्थलातील साधकाची प्रगती होऊन जो प्राणलिंगिस्थलात प्रवेश करतो, त्यालाच प्राणलिंगी असे म्हटले जाते.

**भक्तो माहेश्वरश्चेति प्रसादीति निबोधितः।**
**एक एव कथं चैष प्राणलिंगीति कथ्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.१)

ही सारी एकाच साधकाची आंतरिक अवस्थांतरे आहेत. जो भक्त होता तोच 'माहेश्वर' झाला. जो माहेश्वर होता तोच 'प्रसादी' झाला आणि जो प्रसादी आहे तोच आता 'प्राणलिंगी' होणार आहे. महर्षी अगस्त्य ऋषीने हाच प्रश्न वर विचारला आहे. साधक प्राणलिंगी कसा झाला हे आता सांगा.

जो पहिल्या वर्गात उत्तीर्ण होतो त्यालाच दुसऱ्या वर्गात प्रवेश करण्याचा अधिकार आहे. जो दुसऱ्या वर्गात उत्तीर्ण होतो त्यालाच तिसऱ्या वर्गात प्रवेश मिळतो. हे जसे तसेच हेही आहे. येथे भक्तीच्या विकासक्रमाने भक्तच माहेश्वर झाला. माहेश्वरच प्रसादी झाला आणि प्रसादी आता प्राणलिंगी होणार आहे. अगस्त्यांच्या प्रश्नाला ज. रेणुकाचार्यांनी उत्तर दिले आहे–

**भक्तो माहेश्वरश्चैष प्रसादीति च कीर्तितः।**
**कर्मप्राधान्ययोगेन ज्ञानयोगोऽस्य कथ्यते।।१२.२।।**

'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील षट्स्थल सिद्धान्तात दोन भाग केले जातात. भक्त, माहेश्वर व प्रसादी हा एक आणि प्राणलिंगी, शरण व ऐक्य हा दुसरा. वीरशैवसिद्धान्त हा ज्ञानकर्मसमुच्चयात्मक सिद्धान्त आहे. केवळ ज्ञानाने किंवा कर्माने मुक्ती मिळते हे या सिद्धान्ताला मान्य नाही तर ज्ञान आणि कर्म यांच्या समन्वयानेच मोक्ष प्राप्त होतो असे हा सिद्धान्त सांगतो. भक्त, माहेश्वर व प्रसादी या साधकांची साधना क्रियाप्रधान असते. हाच साधक क्रियेसोबत जेव्हा ज्ञानाला प्राधान्य देतो तेव्हा तो प्राणलिंगी, शरण व ऐक्य होतो. कर्मयोगात निष्णात असलेल्या प्रसादिस्थलातील साधकाला ज्ञानयोग प्राप्त झाल्यावर त्याची स्थिती कशी होते, त्याचे अंतरंगसाधन कसे होते हेच या प्राणलिंगिस्थलात सांगितले आहे.

**लिंगं चिदात्मकं ब्रह्म तच्छक्तिः प्राणरूपिणी।**
**तद्रूपलिंगविज्ञानी प्राणलिंगीति कथ्यते।।१२.३।।**

प्राणलिंगी कोणाला म्हणतात? वीरशैव सिद्धान्तात शिव हा शक्तिविशिष्ट अर्थात् शक्तिसहित आहे असे मानले जाते. परशिवब्रह्माची म्हणजे लिंगाची शक्ती ही प्राणरूपिणी आहे. प्राणरूपिणीशक्तीने युक्त असे चिद्रूप ब्रह्म म्हणजे प्राणलिंग. प्राणशक्तिविशिष्ट प्राणलिंगास जाणणाऱ्या साधकाला 'प्राणलिंगी' म्हणतात.

प्राणलिंगिस्थलात पाच अवांतर स्थले आहेत. प्राणलिंगिस्थल, प्राणलिंगार्चनस्थल, शिवयोगसमाधिस्थल, लिंगनिजस्थल आणि अंगलिंगस्थल, प्राणलिंगाच्या स्वरूपाचे अधिक स्पष्टीकरण या पहिल्या प्राणलिंगी-स्थलात केले आहे.

प्राणशक्तिविशिष्ट लिंग म्हणजे प्राणलिंग अशी संक्षेपाने व्याख्या प्रारंभी केली आहे. ज्ञानमार्गाने प्राणलिंगाचे ज्ञान जसे करून घेता येते तसेच यौगिक मार्गानेही त्याला जाणता येते. योगमार्गाने त्याला जाणण्यासाठी प्राणायामादी योगक्रियांत साधकाला निष्णात व्हावे लागते आणि ज्ञानमार्गाने त्याला जाणण्यासाठी आपल्या अंतःकरणशुद्धीची नितांत आवश्यकता असते. योगमार्गानुसार प्राणलिंगाचे स्वरूप कसे आहे ते येथे सांगतात.

**प्राणापानसमाघातात् कन्दमध्याद्यदुत्थितम्।**
**प्राणलिंगं तदाख्यातं प्राणापाननिरोधिभिः।।१२.६।।**

सर्वांना माहीतच आहे की, प्रत्येक माणसाच्या शरीरात पाच प्रकारचे वायू अवस्थित आहेत. प्राण, अपान, उदान, व्यान आणि समान. वायू एकच आहे परंतु तो भिन्न भिन्न स्थानी राहत असल्यामुळे आणि त्याची कार्ये भिन्न असल्यामुळे त्याला वेगवेगळी नावे दिली आहेत; 'हृदि प्राणः' – प्राणवायू हृदयात राहतो आणि नाकापासून हृदयापर्यंत त्याची गती असते. 'गुदेऽपानः' मूलाधारात म्हणजे गुदस्थानात अपान वायू राहतो. 'समानो नाभिमंडले'– समानवायू नाभीस्थानी असतो. 'व्यानः सर्व शरीरगः' व्यान सर्व शरीरात व्याप्त असतो. आणि 'उदानः कंठदेशस्थः' उदान वायू कंठस्थानात राहतो. वायूंची कार्येदेखील वेगवेगळी आहेत. नाकावाटे श्वास–उच्छवासाच्या रूपाने प्राणवायू चोवीस तासात २१,६०० वेळा आत बाहेर जातो असे योगी सांगतात. शरीर प्राणवायूमुळेच जिवंत राहते. प्राणवायूची गती जेव्हा थांबते तेव्हा माणूस मृत झाला असे लोक म्हणतात. शरीराला जीवनदान देणारा म्हणून त्याला 'प्राणवायू' असे म्हटले जाते. गुदस्थानातील अपानवायू मलमूत्रांना बाहेर ढकलतो. अपानवायू जर

दुर्बल झाला मलमूत्र-विसर्जनात अडथळे येतात. नाभीस्थानीील समानवायू अन्नरस, रक्त यांचा सर्व इंद्रियांना योग्य त्या प्रमाणात पुरवठा करतो. व्यानवायू नाडीद्वारे सर्व शरीरात वाहतो. त्यामुळे रक्ताभिसरण व्यवस्थित होते. रक्तदाब कमी-अधिक होऊन शरीरस्वास्थ्य बिघडणे हे व्यानवायूच्या विकृतीचे लक्षण होय, असे योगशास्त्र सांगते. उदान कंठस्थानात राहून ढेकर, शिंक इत्यादींचे नियमन करतो. एकाच वायूच्या भिन्न भिन्न कार्यामुळे अशी भिन्न भिन्न पाच नावे मिळाली आहेत.

प्राण आणि अपान हे वायू जेव्हा एकत्र येतात, संघटित केले जातात, त्यावेळी नाभीस्थानी ज्योत उत्पन्न होते. सुदीर्घ प्राणायामाने प्राणवायू हा हृदयातून खाली नेल्यावर त्याचा अपानवायूवर आघात होतो. त्यावेळी नाभीकंदावर ज्योत उत्पन्न होते. गॅसशेगडीचं बटन सैल केल्यानंतर आगकाडी ओढली की जशी ज्योत पेटते त्याप्रमाणे प्राणवायूचा अपानवायूवर आघात झाला की अपानवायूच ज्योतीसारखा पेटतो आणि ती ज्योत जिवंत ठेवायला प्राणवायू सहाय्यक होतो. ज्योत तेवत राहायला प्राणवायूची आवश्यकता असतेच. प्राणवायू नसेल तर ज्योत तेवत राहणार नाही. अशी ही ज्योत ऊर्ध्वमुख होऊन प्राणवायूसोबत हृदयस्थानी येते. ही ज्योतच 'प्राणलिंग' होय.

**प्राणो यत्र लयं याति भास्करे तुहिनं यथा।**
**तत्प्राणलिंगमुद्दिष्टं तद्धारी स्यात् तदाकृतिः।।१२.७।।**

हृदयातील ही ज्योत प्राणवायूच्या सहाय्याने अखंड तेवत असते म्हणून तिला 'प्राणलिंग' असे म्हटले जाते. प्राणवायूचा पुरवठा होत नसेल तर दिवा विझतो, हे आपल्या अनुभव-क्षेत्रातले उदाहरण आहे. एखाद्या जळत्या ज्योतीवर काचेचे भांडे उपडे ठेवले तर काही वेळानंतर ती ज्योत विझते आणि वरचा भाग उघडा असेल तर ती तेवत राहते. तशीच हृदयातील ज्योत प्राणवायूच्या बळावर तेवत राहते. त्या ज्योतीत प्राणवायूच विलीन होतो. तो कसा? तर हिवाळ्यात गवतपात्यांवर इवले इवले दवबिंदू जमलेले असतात. सूर्य उगवला की त्याच्या प्रखर उन्हात ते विलीन होऊन जातात. त्याप्रमाणे ज्योतीत प्राणवायू विलीन झाल्यावर प्राणवायुविशिष्ट ज्योतीलाच 'प्राणलिंग' म्हणतात. हे ज्योतिर्लिंगच होय. वीरशैव सिद्धान्तात त्याला प्राणलिंग म्हणतात. या प्राणलिंगाला धारण करणारा अर्थात त्याचे ज्ञान असणारा जो साधक तोच 'प्राणलिंगी' होय.

**ज्ञानिनां योगयुक्तानामन्तः स्फुरति दीपवत्।**
**चिदाकारं परब्रह्मलिंगमज्ञैर्न भाव्यते।।१२.८।।**

हृदयातील या प्रकाशमान ज्योतीचा अनुभव सामान्यांना येत नाही. जोपर्यंत ही साधना पक्व होत नाही तोपर्यंत ही ज्योत मनुष्याला अज्ञातच राहते. ज्ञानयोगात जे पारंगत आहेत अशांनाही या ज्योतीचे ज्ञान होत नाही. एखाद्या वस्तूचे ज्ञान असणे आणि तिचा प्रत्यक्षानुभव असणे या भिन्न बाबी आहेत. प्रत्येकाच्या अंतर्यामी प्रकाशरूप आत्मा असतो. त्याच्या प्रकाशातच देह-मनाचे सर्व व्यवहार सूरू असतात. असे असून देखील किती लोकांना त्याचे ज्ञान असते? या आतल्या प्रकाशाची गोष्ट सोडा. बाहेर जो सूर्य प्रकाशतो त्या सूर्याचा तरी अनुभव कितीजणांना असतो? तुम्ही म्हणाल की सर्वांना असतो. परंतु आमचे मत असे आहे की कित्येकांना त्याचे ज्ञानच नसते. आपण सूर्यप्रकाशात कार्य करीत आहोत याची जाणीवच लोकांना नसते. म्हणूनच सूर्याबद्दल कृतज्ञता बाळगा असे शास्त्र सांगते. सूर्याला नमस्कार करा. कारण त्याच्या प्रकाशातच तुमचे जीवनव्यवहार सुरू असतात. मग तुम्हाला जाणीव असो अगर नसो. आदित्य बारा आहेत. म्हणून सूर्य नमस्कारांची संख्या देखील बारा आहे. जो प्रातःकाळी उठून सूर्य नमस्कार घालतो त्याला सूर्याची जाणीव आहे, असे समजा. इतरांना नव्हे.

सूर्यप्रकाशात व्यवहार करूनही लोकांना त्याचे ज्ञान नसते, त्याचे स्मरण नसते. आपण रोज ईश्वरासन्निध बसून त्याचे पूजन, स्मरण तरी का करतो? तर त्याचे ज्ञान होण्यासाठी. त्याचा महिमा जाणण्यासाठी. म्हणून कृतज्ञतापूर्वक श्रद्धेने सूर्यनमस्कार करणारा मनुष्यच सूर्याचा महिमा खऱ्या अर्थाने जाणत असतो. इतर कोणी सूर्यप्रकाशात जीवनव्यवहार करीत असले तरी ते सूर्याविषयी अज्ञानीच असतात असे समजले पाहिजे. एवढ्या मोठ्या सूर्यप्रकाशाची जाणीव लोकांना नसते तर आतल्या त्या स्निग्ध, शांत आत्मप्रकाशाची जाणीव कशी बरे असेल? आपल्या अंतर्यामी जर प्रकाश नसता तर आपण बाह्य प्रकाशात व्यवहार करूच शकलो नसतो. आत्मा ज्योतिरूप, प्रकाशरूप आहे. आपल्या आत्म्याला जाणण्यासाठी बाह्य प्रकाशाची गरज नसते. जसे आपण सर्वजण येथे बसला आहात. अंधार आहे, परंतु विजेचा प्रकाशही आहे. विजेच्या प्रकाशात तुमचे व्यवहार चालू आहेत. समजा, अचानक वीज गेली आणि अंधार झाला तर तुम्हाला समोरचे काही दिसणार नाही. तुमच्याशिवाय इतर कोणतीही वस्तू पाहायला तुम्हाला प्रकाशाची आवश्यकता भासेल. परंतु तुम्ही स्वत: या खोलीत आहात की नाही हे समजण्यासाठी मात्र तुम्हाला प्रकाशाची गरज नाही. अंधार झाला तरी देखील 'मी आहे' ही जाणीव सर्वांना असते. परंतु आपल्याव्यतिरिक्त इतर काही पाहण्यासाठी मात्र प्रकाशाची, मेणबत्तीची, बॅटरीची गरज असते. यावरून हे सिद्ध होते की स्वत:ला जाणण्यासाठी, स्वत:चे अस्तित्व तपासून पाहण्यासाठी दुसऱ्या बाह्य प्रकाशाची जरूर नसते. आपण आपल्या प्रकाशातच स्वत:ला जाणत असतो. यावरून प्रत्येकाचा आत्मा स्वयंप्रकाशित आहे हे सिद्ध होते.

या आत्मप्रकाशाचे ज्ञान करून घेण्यासाठी मनुष्याला योगमार्गाचा अथवा ज्ञानमार्गाचा अवलंब करावा लागतो. प्राणायामाच्या साहाय्याने प्राण आणि अपान यांना संघटित केल्यावर हृदयात ज्या ज्योतीचा आविष्कार होतो तिची अर्थात् प्राणलिंगाची अर्चना योगमार्गाने केली जाते. जो प्राणायामाचा अभ्यास करण्यास असमर्थ असेल तो शास्त्रांच्या अभ्यासाने आपला आत्मा प्रकाशरूप आहे, एवढे तरी जाणून घेऊ शकतो. त्या हृदयस्थ प्रकाशालाच येथे 'प्राणलिंग' असे म्हटले आहे. या प्रकारे आपल्या चिद्रूपाचे चिंतन करणे हीच प्राणलिंगोपासना होय. इष्टलिंगाची उपासना करताना आपण आपल्या सद्रूपाचे चिंतन करीत असतो तर प्राणलिंगाची उपासना करताना आपण आपल्या चिद्रूपाचे चिंतन करीत असतो.

'ज्ञानिनां योगयुक्तानामन्त: स्फुरति दीपवत्' – जो योगमार्गात प्रवीण असतो त्याला या अंतर्ज्योतीचा साक्षात्कार होतो. चर्मचक्षूंनी जसा आपण बाहेर पेटलेला दिवा पाहतो तेवढ्या स्पष्टपणे योगी ही अंतर्ज्योत पाहू शकतो. डोळे बंद करून वृत्ती अंतर्मुख केल्यावर या ज्योतीचा साक्षात्कार होतो. योगशास्त्रात तर हे देखील सांगितले आहे की, आपली वृत्ती बहिर्मुख असते म्हणून आपण हे बाह्य विश्व पाहत असतो. जर आपली मनोवृत्ती बाहेर आलीच नाही तर आपण हे बाह्य विश्व पाहू शकणार नाही. त्याप्रमाणेच जोपर्यंत मनोवृत्ती अंतर्मुख होत नाही तोपर्यंत आपल्या विश्वाचे–अंतर्विश्वाचे दर्शन आपल्याला घडत नाही. त्यासाठी मनोवृत्ती आत वळविली पाहिजे. अतंर्मुख झाली पाहिजे. क्ष–किरण यंत्राने त्वचेआड दडलेले अंतर्शरीर पाहता येते त्याप्रमाणे अंतर्मुख वृत्तीचा योगी आपल्या शरीराच्या आत डोकावून पाहू शकतो, हा अभ्यास आहे. अभ्यासाने सारे काही साध्य होते. ज्याचा योगाभ्यास नाही अशा मनुष्याला हृदयस्थ ज्योतीचे ज्ञान होऊ शकते, परंतु अनुभूती मात्र नसते. या ज्योतीचा साक्षात्कार कसा करून घ्यावा याविषयी आचार्यांनी फार सुरेख विवेचन केले आहे.

**अन्तस्थितं परं लिंगं ज्योतिरूपं शिवात्मकम्।**
**विहाय बाह्यलिंगस्था विमूढा इति कीर्तिता:।।१२.९।।**

येथे प्राणलिंगिस्थलाचे विवेचन करायचे असल्यामुळे त्यावर अधिक भर देऊन रेणुकाचार्य सांगतात की, अंतर्यामी वसणाऱ्या या ज्योतिस्वरूप प्राणलिंगाला सोडून जे केवळ बाह्यलिंगाच्या उपासनेत कालापव्यय करतात ते मूढ होत, अज्ञानी होत, वीरशैवसिद्धान्तात केवळ इष्टलिंगाची अर्चनाच प्रधान नसून त्याबरोबरच प्राणलिंग आणि भावलिंग यांची अर्चनादेखील करावी लागते. स्थूल दृष्टीने इष्टलिंगाची, सूक्ष्म दृष्टीने प्राणलिंगाची आणि सूक्ष्मातिसूक्ष्म दृष्टीने भावलिंगाची अर्चना करायला हवी. याच उद्देशाने येथे 'विमूढ' हा शब्दप्रयोग केला आहे. एखाद्या माणसाला सुधारायचे असेल तर आपण त्याला 'तू मूर्ख आहेस, मूढ आहेस, अडाणी आहेस' असे म्हणतो. त्या मागे त्याची मूढता दूर व्हावी असा उद्देश असतो. तो देखील आपल्याला मूर्ख का म्हणतात हे समजून घेतो आणि मूर्खपणापासून सुटण्याचा प्रयत्न करतो. त्याप्रमाणेच येथे बाह्यलिंगाची अर्चना करणाऱ्या आणि अंतरंगाकडे दुर्लक्ष करणाऱ्या मनुष्याला 'विमूढ' म्हटले आहे.

प्राणिलिंगिस्थलातील साधकाने इष्टलिंगोपासनेबरोबरच अंतर्मुख होऊन प्राणलिंगाची उपासना करायला हवी, अशी ही साधना आहे. योगशास्त्रात 'मुद्रा' ही बाहेर पाहत असताना देखील वृत्ती अंतर्मुख करणारी एक प्रक्रिया आहे. एखादा चिंताग्रस्त माणूस एखाद्या कोपऱ्याकडे टक लावून पाहत असतो. आपल्याला वाटते की तो तेथे काहीतरी पाहतो आहे. परंतु खरी गोष्ट अशी असते की त्याचे लक्ष दुसरीकडेच असते. कौटुंबिक समस्येकडे. पण एकटक पाहत असतो कोपऱ्याकडे. त्याप्रमाणे इष्टलिंगाकडे एकटक पाहणारा शिवयोगी 'मुद्रा'साधनेद्वारा आपल्या मनोवृत्ती अंतर्यामी घेऊन जात असतो आणि तळहातावरील इष्टलिंगाच्या आकाराचे प्राणलिंग आपल्या हृदयात पाहत असतो. सामान्य माणसाला वाटते की तो केवळ इष्टलिंगाकडेच पाहत आहे. इष्टलिंगाकडे अनिमिष नेत्रांनी पाहता पाहता त्याच्याभोवती प्रकाशवर्तुळ दिसू लागते. नंतर हळूहळू इष्टलिंगच ज्योतिस्वरूप दिसू लागते. साधना अधिकाधिक दृढ होत गेली की हा साक्षात्कार होतो. म्हणून इष्टलिंग ही आपल्या आत्मलिंगाचीच प्रतिकृती आहे हे निश्चित समजावे. इष्टलिंगाचे आराधन करता करता आपल्या अंतरंगात प्रवेश करायचा आहे याचे साधकाला भान हवे. एखाद्या अंधार गुहेत प्रवेश करताना आपण सोबत दिवा घेऊन जातो. त्याप्रमाणे अंतरंगात प्रवेश करण्यासाठी, अंतर्मुख होण्यासाठी इष्टलिंग हे प्रमुख साधन आहे. शास्त्रातदेखील सांगितले आहे की, बारा बोटांपेक्षा अधिक दूर दृष्टी जात असेल तर अंतर्मुख होणे अवघड आहे. इष्टलिंगाची पूजा करणारा साधक तळहातावर इष्टलिंग ठेवून जेव्हा त्याकडे एकटक पाहतो तेव्हा ते अंतर बारा बोटांपेक्षा अधिक नसते. म्हणून निष्ठापूर्वक, सदैव इष्टलिंगाची अर्चना करणारा मनुष्य आपली दृष्टी अंतर्मुख करून हृदयस्थ प्राणलिंगाचा साक्षात्कार करून घेऊ शकतो. जेव्हा तुम्ही असे कराल आणि तुमच्याही हृदयात ही ज्योत प्रकाशमान होईल तेव्हा तुम्ही देखील 'प्राणलिंगी' व्हाल. पावलापावलाने पुढे पुढे जाणे हेच प्रत्येक साधकाचे कर्तव्य आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
४ एप्रिल १९९२

## आशीर्वचन दुसरे

## प्राणलिंगिस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धाशिखामणी'तील प्राणलिंगीस्थलावर आपण कालपासून आशीर्वचन ऐकत आहात. कालच्या आशीर्वचनातील अंतिम श्लोक असा होता–

**अन्तस्थितं परं लिंगं ज्योतिरूपं शिवात्मकम्।**
**विहाय बाह्यलिंगस्था विमूढा इति कीर्तिताः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.९)

आपल्या अंतरंगातील प्राणलिंगाकडे दुर्लक्ष करून केवळ बाह्यलिंगोपासनेत जे लोक काळ दवडतात अशांना 'मूढ' अशी संज्ञा दिली आहे. येथे 'बाह्यलिंग' या शब्दाचा अर्थ कोणता? इष्टलिंग की त्यापेक्षा काही वेगळे लिंग? याविषयी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे प्रामाणिक भाष्यकार मरितोंटदार्य यांनी स्पष्टपणे सांगितले आहे–

**'अत्र बाह्यलिंगं इष्टलिंगातिरिक्तं प्राकृतलिंगपरम्,**
**इष्टलिंगस्य चिदानंदघनत्वेन अंतरत्वादिति।'**

इष्टलिंगाला 'बाह्यलिंग' असे म्हटले जात नाही. आपल्या शरीराच्या जे बाहेर आहे त्याला आपण 'बाह्य' म्हणतो. जे आपल्या शरीरावर आहे आणि ज्यामुळे आपली वृत्ती अंतर्मुख होते अशा इष्टलिंगाला 'बाह्यलिंग' म्हणता येत नाही. अंतरंगातील प्राणलिंग आणि भावलिंग यांच्या दृष्टीने इष्टलिंग बाह्य वाटते, परंतु ते आपल्या शरीरापासून पूर्ण विलग नसते. म्हणून त्याला 'बाह्य' असे संबोधता येत नाही. मंदिरात स्थापन केलेले स्थावरलिंग आणि वीरशैवांच्या हृदयावर रुळणारे इष्टलिंग यांच्या उपासनेत खूप अंतर आहे. आपल्या शरीरावरील लिंगाला 'इष्टलिंग' का म्हणतात याविषयी विवेचन मागे झालेले आहे. 'इष्टार्थप्रदायकं लिंगं इष्टलिंगम्' अशी त्याची व्याख्या केलेली आहे. आपल्या इष्टार्थांची पूर्ती त्याच्या पूजेमुळे होते म्हणून त्याला 'इष्टलिंग' असे म्हटले जाते.

परंतु इष्टार्थांची पूर्ती करण्याची शक्ती काय फक्त इष्टलिंगातच आहे? असे निश्चित म्हणता येणार नाही. विश्वेश्वरलिंग, रामेश्वरलिंग, सोमेश्वरलिंग इत्यादी मंदिरातील ज्योतिर्लिंगे आहेत, त्यांचीही लोक पूजा करतात, त्यांच्याविषयी श्रद्धाभाव बाळगतात आणि आपले इष्टार्थ पूर्ण करून घेतात. म्हणून मंदिरात स्थापन केलेली स्थावरलिंगेसुद्धा इष्टार्थप्रदायक आहेत. या अर्थाने त्या लिंगांना देखील 'इष्टलिंग' म्हणता येईल. मग आपण शरीरावरील लिंगालाच 'इष्टलिंग' का म्हणतो? याविषयी सूक्ष्म विचार करताना असे दिसते की, इष्टार्थ हे दोन प्रकारचे असतात. मुख्य इष्टार्थ आहे कैवल्य. ज्याला आपण निःश्रेयस म्हणतो, मुक्ती म्हणतो, सामरस्य म्हणतो. हे देखील जीवात्म्यांचे 'इष्ट' आहे. 'अभीष्ट' आहे. याशिवाय काही प्रापंचि वस्तूंची अभिलाषा मनुष्याच्या मनात जागी असते. ते देखील एक 'इष्ट'च होय. मग 'इष्ट' दोन प्रकारचे झाले. एक प्रापंचिक सुखाची इच्छा आणि दुसरे मुक्तिसुखाची इच्छा.

मुक्तिसुखाच्या अपेक्षेला परमपुरुषार्थ म्हटले जाते. अर्थात् ते सर्वश्रेष्ठ 'इष्ट' आहे. आपल्याला येथे हे पाहायचे

आहे की, मंदिरात स्थापन केलेल्या लिंगापासून 'मुक्ती' मिळते किंवा नाही? जलात जल एकरूप व्हावे, अग्नीत अग्नी विलीन व्हावा तसे जीवात्मा हा परमात्म्याशी एकरूप होणे यालाच 'लिंगांगसामरस्य' म्हणतात, मुक्ती म्हणतात. इष्टलिंगाची उपासना अशा अभेदभावनेने केली जाते. परंतु मंदिरातील लिंगाची पूजा अभेदभावनेने होत नाही. स्थावरलिंग हे आपले आराध्य आहे अशा भेदभावनेने आणि त्याच्या पूजेमुळे काही सांसारिक सुखाचा लाभ व्हावा या इच्छेने भक्त त्याची पूजा करीत असतो. इष्टलिंग तळहातावर ठेवून जेव्हा वीरशैव त्याची पूजा करतो तेव्हा इष्टलिंग आणि मी वेगळे आहोत अशा भावनेने तो पूजा करीत नाही.

**शिवो भूत्वा शिवं यजेत् रुद्रो भूत्वा रुद्रमर्चयेत्।।**

शिव होऊन शिवाची पूजा करा. रुद्र होऊन रुद्राची पूजा करा, असे शास्त्र सांगते. इष्टलिंगाची जलहरी (शाळुंकेचा निमुळता भाग) अंगठ्याकडे करून आपण इष्टलिंगाची पूजा करतो, त्यावेळी इष्टलिंगाची जलहरी (गोमुख शरीराच्या डावीकडे वळलेली असते. परंतु मंदिरात स्थावरलिंगाच्या पूजेसाठी जेव्हा आपण बसतो तेव्हा स्थावरलिंगाची जलहरी (गोमुख) आपल्या उजव्या बाजूकडे असते. इष्टलिंग आणि स्थावरलिंग यांच्या पूजेतील हा फरक लक्षणीय आहे. मंदिरातील स्थावरलिंगाच्या पूजेत भक्त हा लिंगाच्या 'समोर' बसलेला असतो म्हणजे लिंग आणि आपण भिन्न आहोत असा भाव त्याच्या मनात असतो, तर इष्टलिंगाच्या पूजेत भक्त हा इष्टलिंगाच्या 'मागे' बसलेला असतो आणि हे इष्टलिंग म्हणजे मीच असा भाव त्याच्या मनी नांदतो. असे दोन्ही लिंगाच्या आराधनेत अंतर आहे.

इष्टलिंग तळहातावर ठेवून त्याची अर्चना करणाऱ्या साधकाच्या शरीराकृतीविषयी जर आपण विचार केला तर काय जाणवते? त्याचा संबंध देह पंचसूत्रनिर्मित इष्टलिंगाप्रमाणे दिसतो. त्याच्या शरीराचा भाग पीठिका (शाळुंका), मस्तक बाण आणि शरीरापासून दूर आलेला डावा हात जलहरी (गोमुख) प्रमाणे भासतो. म्हणून इष्टलिंगाची पूजा करणारा साधक लिंगरूप होऊनच त्याची पूजा करीत असतो. इष्टलिंग हे आपल्या आत्म्याचेच प्रतीक समजून 'ते म्हणजे मीच' अशा अभेदभावनेने त्याचे पूजन होत असते. इष्टलिंगार्चन समरसभावनेने होते आणि मंदिरातील लिंगाची पूजा औपचारिक असते. समरसभावनेने होणाऱ्या पूजेमूळेच सामरस्याची सिद्धी होते. मनुष्याचे जे सर्वश्रेष्ठ इष्ट 'लिंगांगसामरस्य' याची सहजपणे प्राप्ती इष्टलिंगोपासनेमुळे होते म्हणून 'इष्टार्थप्रदायकं लिंगं इष्टलिंगम्' असे म्हटले आहे. म्हणून मंदिरात स्थापिलेले लिंग हे 'इष्टलिंग' नसते. 'अनुभवसूत्रा'त इष्टलिंगाची वेगळी व्याख्या केली आहे:-

**इष्टि: पूजा तया नित्यं इष्टं पूजितमादरात् इष्टलिंगमिति प्रोक्तम्**

मायिदेवांनी अत्यंत स्पष्टपणे सांगितले आहे की, इष्टि:पूजा, इष्ट्या इष्टं लिंगं= इष्टलिंगम्- इष्टि म्हणजे पूजा. त्याद्वारा ज्याची नित्यपूजा केली जाते त्याला 'इष्टलिंग' म्हणतात. अर्थात् साधकाकडून ज्याची प्रतिदिन नित्यपूजा होते ते इष्टलिंग होय, मंदिरातील लिंगाची पूजा एकाच व्यक्तीकडून नियमित होत नाही. समजा एखाद्या व्यक्तीने पक्का निश्चय केला की रोज गंगास्नान करायचे आणि विश्वेश्वराची नित्यपूजा करायची तरी केव्हा ना केव्हा तरी त्याच्या नित्यनेमात खंड पडू शकतो. सांसारिक माणसाला प्रसंगवशात् कुठे बाहेर गावी जावेच लागते. कधी यात्रेच्या निमित्ताने घराबाहेर पडावे लागते. तर कधी आजारी पडल्यामुळे इस्पितळात दाखल व्हावे लागते. अशा

कारणांमुळे त्याच्या नित्यनेमात विघ्न येण्याचा संभव असतो. आणि त्याच्याकडून लिंगपूजा घडत नाही. एक दिवस जरी पूजेत अंतर पडले तरी ती पूजा नित्यपूजा होत नाही. नित्यकर्मात व्यवधान उत्पन्न होते.

परंतु इष्टलिंग-पूजेत मात्र असे घडत नाही. कोल्लुरू कोडगूसु या शिवभक्ताची कथा आपण ऐकलीच असेल. तिचे वडील मंदिरात नित्य लिंगपूजा करण्यास जात असत. परंतु काही कारणांनी त्यांना बाहेरगावी जावे लागले आणि पूजा करण्याचे दायित्व त्यांना आपल्या मुलीवर सोपवावे लागले. यावरून कितीही प्रयत्न केला तरी मंदिरातील शिवलिंगाची नित्यपूजा एका व्यक्तीकडून घडणे संभवनीय नाही, हेच सिद्ध होते. परंतु श्रीगुरूने दिलेले इष्टलिंग आमच्या शरीरावर सदैव धारण केलेले असल्यामुळे आपण कुठेही गेलो तरी ते आपल्या बरोबरच असते. बिछान्यावर झोपलेलो असताना, तीर्थयात्रेला गेलो असताना अथवा विवाहसमारंभात उपस्थित असताना रात्रंदिवस अष्टौप्रहर ते आपल्या हृदयावर रुळत असते. म्हणून साधकाकडून ज्याचे नित्यपूजन केले जाते अशाच लिंगाला 'इष्टलिंग' असे म्हणतात. त्याची नित्यपूजा करण्याचा एकच उद्देश आहे तो हा की, त्याचे पूजन केल्याने आपण प्राणलिंगाची आणि भावलिंगाची उपासना करू शकतो. त्याच्याशिवाय हे करणे सहज शक्य नाही. आमच्या आचार्यांना आपल्या भ्रूमध्यात आणि हृदयात ज्या अंत-र्ज्योतीचा साक्षात्कार झाला त्याच आकाराचे इष्टलिंग त्यांनी निर्माण केले. जेव्हा श्रीगुरू आपल्या योगशक्तीने इष्टलिंगात शिष्याचीच मस्तकास्थित चित्कला प्रविष्ट करून त्याच्या ते हातावर देतात त्यावेळी हे इष्टलिंग आपल्यापासून भिन्न आहे अशा भावनेने त्याची पूजा होत नाही. म्हणून इष्टलिंग हे साधकाचे एका अर्थाने प्राणलिंग होय.

इष्टलिंगावर जो अत्यंत प्रेम करतो तोच साधक प्राणलिंगी-अवस्था प्राप्त करून घेतो. ज्याचे इष्टलिंगावर प्रेम नसेल त्याच्याकडून प्राणलिंगाची उपासना घडणे शक्य नाही. इष्टलिंग पूजेच्यावेळी त्याच्याकडे अनिमिष दृष्टीने अत्यंत प्रेमभराने पहात रहावे असे शास्त्रात सांगितले आहे. त्याच्याकडे पाहत पाहतच आपली बहिर्मुख मनोवृत्ती अंतर्मुख होऊ लागते. हा एक प्रकारचा अभ्यास होय. आपल्या बहिर्मुख वृत्तीला शरीराच्या आत कानाकोपऱ्यात घेऊन जाणे ही एक साधना आहे. ध्यान करणाऱ्या साधकाला प्रथम हे शिकविले जाते की, आपले मन निर्विषय करा. मन निर्विषय करणे अत्यंत अवघड आहे. म्हणून मनाला बुद्धीच्या आधीन राहायला शिकविले जाते. समजा, तुम्ही येथे बसला आहात बसल्या बसल्या आपल्या मनाला आज्ञा करा की, 'तू गंगेवर जा, स्नान कर, विश्वेश्वराचे दर्शन घे.' तुम्ही येथेच बसला आहात. परंतु तुमचे मन मात्र गंगेत स्नान करते, विश्वेश्वर-मंदिरात जाऊन अभिषेक करते, बुद्धी मनाला जशी आज्ञा देते तसे मन वागते. मनाला बुद्धीच्या आधीन ठेवून त्याच्याकडून काही कर्मे करून घेण्यासाठी अभ्यासाची आवश्यकता असते. मनाला एकदा अशी सवय लागली की ते बुद्धीची आज्ञा ऐकू लागते. ज्याचे आपण पुन्हा पुन्हा स्मरण करतो त्याच ठिकाणी आपले मन राहत असते.

अशा अभ्यासाने आपण आपल्या मनाला पायाच्या अंगठ्यापासून ते मेंदूपर्यंत आणि मेंदूपासून ते पायाच्या अंगठ्यापर्यंत असे संबंध शरीरभर फिरवू शकतो. हाच अभ्यास अधिकाधिक दृढ होत गेला की तुम्ही सांगाल त्याप्रमाणे तुमचे मन ऐकू लागते. याप्रमाणे डाव्या तळहातावर ठेवलेल्या इष्टलिंगावर मन एकाग्र करून ते आपल्या हृदयापर्यंत नेणे शक्य होते.

इष्टलिंग डाव्याच तळहातावर का ठेवावे याबद्दल 'लिंगधारणचंद्रिका' या ग्रंथात बरीच चर्चा केलेली आहे.

डावा हात हा सामान्यत: अशुद्ध, अपवित्र मानला जातो. जर एखाद्या माणसाने दान करताना डाव्या हाताचा उपयोग केला तर आपण लगेच म्हणतो, ''अरे डाव्या हाताने दान का करतोस? उजव्या हाताने कर.'' उजवा हात पवित्र मानला जातो. मग उजव्या हातावर इष्टलिंग ठेवून त्याची पूजा का बरे केली जात नाही? परंतु आपल्या सिद्धान्तात कोणताही हात अपवित्र मानला जात नाही. नमस्कार करताना दोन्ही हात जोडतात. तेथे कुणी म्हणत नाही की, डावा हात अपवित्र आहे आणि त्याने का नमस्कार करतो? सूर्याला अर्घ्य देताना, मूर्तीवर फुले उधळताना अथवा पुष्पांजली वाहताना दोन्ही हातांचा उपयोग केला जातो. अंजली म्हणजे ओंजळ ही एका हाताची नसून ती दोन्ही हातांची असते. ईश्वरावर पुष्पांजली वाहण्यासाठी शास्त्राने डावा हात निषिद्ध मानला नाही यावरून तो हात अपवित्र नाही हेच सिद्ध होते. डाव्या हातावर इष्टलिंग ठेवून त्याची पूजा करण्याचा आणखी एक लाभ असा आहे की आपले हृदय शरीराच्या डावीकडेच असते, म्हणून डाव्या तळहातावरील लिंगाकडे मन केंद्रित करून ते त्याच हाताच्या मार्गाने हृदयापर्यंत आणणे सहज शक्य होते. अशाप्रकारे इष्टलिंगोपासना करणारा साधक प्राणलिंगापर्यंत प्रवास करू शकतो. एखाद्या अंधाऱ्या गुहेत प्रवेश करण्यासाठी हाती दिवा असावा लागतो, त्याप्रमाणे हृदयात प्रवेश करण्यासाठी हाती इष्टलिंग असावे लागते, असे कालच्या आशीर्वचनात आम्ही सांगितले होते. परंतु आपले हृदय म्हणजे अंधारी गुहा नव्हे तर तेथे तर प्रकाशमान असे प्राणलिंग विराजमान आहे. परंतु तेथपर्यंत जाण्यासाठी इष्टलिंग हा जणू एक मार्ग आहे. म्हणून येथे बाह्यलिंगाची पूजा करणारे विमूढ होत, असाच अर्थ येथे अभिप्रेत आहे.

इष्टलिंग सोडून जे मंदिरातील लिंगाची पूजा करतात ते बाह्य होत, कारण त्यांची प्रवृत्ती देखीलच बाह्यच असते. ज्याच्या पूजेमुळे मनुष्याची प्रवृत्ती बहिर्मुख होते ते 'बाह्य' होय. ज्याच्या पूजेमुळे प्रवृत्ती अंतर्मुख होते हे लिंग बाह्य नव्हे. बहिर्मुख प्रवृत्तीला रोखून तिला अंतर्मुख करण्यासाठी इष्टलिंग हे एक साधन होय. म्हणून इष्टलिंगाला 'दर्पण' अशी संज्ञा आहे. दर्पणात म्हणजे आरशात आपण आपले प्रतिबिंब पाहतो. इतर काचेमधून आपण पलीकडचे पाहू शकतो. परंतु दर्पण मात्र आपल्याला पलीकडचे काहीही दाखवत नाही. तर अलीकडचे दाखवितो. आपल्या चेहऱ्यावरची प्रकाशकिरणे एकत्रित करून आरसा पुन्हा आपल्याकडेच ती परावर्तित करतो. त्याप्रमाणे इष्टलिंगदेखील आपल्या बाह्य मनोवृत्तीला अडवून, एकत्रित करून अंतर्मुख बनविते म्हणून इष्टलिंग दर्पण आहे, ते बाह्यलिंग नव्हे.

**संविलिंगपरामर्शी बाह्यवस्तुपराङ्मुखः।**
**यः सदा वर्तते योगी प्राणलिंगी स उच्यते।।१२.१०।।**

इष्टलिंगाच्या पूजेत देखील बाह्यवस्तूंची आवश्यकता असते. स्तोत्रपाठ करून बाह्योपचाराकडे आपण प्रारंभी अधिक लक्ष पुरवितो. परंतु पुढे पुढे हे बाह्योपचार कमी होत जातात. आणि शिल्लक राहते इष्टलिंग आणि आपण. प्रारंभी इष्टलिंगावर श्रद्धा दृढ होण्यासाठी बाह्यसामग्रीची आवश्यकता असते, परंतु एकदा श्रद्धा दृढ झाली की, सामग्रीची गरज उरत नाही. बाह्यसामग्रीकडे दुर्लक्ष करून जो हृदयस्थ चिद्रूप प्राणलिंगाच्या चिंतनात मग्न राहतो तोच प्राणलिंगी होय. बाह्यवस्तूपासून पराङ्मुख का व्हावे या विषयी सांगतात–

मायाविकल्पजं विश्वं हेयं संचिन्त्य नित्यशः।
चिदानन्दमये लिंगे विलीनः प्राणलिंगवान्॥१२.११॥

जेव्हा मनुष्याची मनोवृत्ती बाह्य होते तेव्हा अनेक पदार्थाविषयी त्याच्या मनात मोह उत्पन्न होतो. ज्या ज्या वस्तूंचा माणूस संग्रह करतो त्या त्या वस्तूविषयी त्याच्या मनात ममत्व निर्माण होते, ही ममत्वबुद्धी हाच एक मोह मानला गेला आहे. हा प्रपंच मायानिर्मित आहे. वस्तूविषयी असणारी ममत्वबुद्धी हेय आहे, त्याज्य आहे. आपल्या वीरशैवसिद्धान्तानुसार प्रपंच हेय (त्याज्य) नसून प्रपंचाविषयीचे ममत्व हेच हेय (त्याज्य) आहे. शंकराचार्यांनी प्रपंच मिथ्या मानला, त्यामागे देखील प्रपंचाविषयीची आसक्ती सोडून द्यावी हाच उद्देश आहे. प्रपंच आपला कोठे आहे? तो तर ईश्वरनिर्मित आहे.

ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्॥

या उपनिषद्-वचनाप्रमाणे प्रपंच हा ईश्वराचा आहे आणि तो ईश्वरनिर्मित आहे. प्रत्येक मनुष्य आपल्या कर्माप्रमाणे प्रपंचातील ज्या ज्या वस्तूंचा संग्रह करतो त्या त्या वस्तूविषयी 'ही माझी आहे' असा ममत्वभाव त्याच्या मनात असतो. या 'माझेपणा'मुळेच मनुष्याला दुःख भोगावे लागते. म्हणून बाह्यप्रपंचाविषयीची ममत्वबुद्धी मायिक असून ती हेय समजावी, असे या ठिकाणी सांगितले आहे. ममत्वबुद्धीचा त्याग करून जो केवळ चिद्रूप प्राणलिंगाचे चिंतन करतो तोच प्राणलिंगी होय. प्राणलिंगार्चना करणाऱ्या साधकाला जर बाह्य वस्तूंची अभिलाषा असेल तर त्याच्या मनोवृत्तीची धाव सतत बाहेर राहील. प्रपंचातील साऱ्या वस्तू या ईश्वराच्या आहेत, आपल्या नाहीत असा भाव मनात जागृत झाला पाहिजे. ईश्वराच्या वस्तूचे नव्हे तर ईश्वराचे चिंतन केले पाहिजे. त्याच्या अनुग्रहाने आवश्यक तेवढी उपभोगाची साधने आपल्याला मिळतीलच, असे समजून तोच परमात्मा प्राणलिंगाच्या रूपाने आपल्या हृदयात नांदत आहे या जाणिवेने त्याचे सदैव चिंतन करणाराच प्राणलिंगी होय.

सत्ता प्राणमयी शक्तिः सद्रुपं प्राणलिंगकम्।
तत्सामरस्यविज्ञानात् प्राणलिंगीति कथ्यते॥१२.१२॥

प्रत्यके व्यक्तीच्या शरीरात प्राणशक्ती असते आणि हृदयात शिवलिंग असते. प्राण आणि लिंग यांना एकरूप मानून त्यांची उपासना करणारा तोच प्राणलिंगी होय.

येथे एक गोष्ट जाणून घेणे आवश्यक आहे. ज्याप्रमाणे हृदयातील अंतर्ज्योत ही प्राणलिंग आहे त्याप्रमाणे इष्टलिंग देखील प्राणलिंगच आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त देखील म्हटले आहे-

प्राणवद्धारणीयं तत् प्राणलिंगमिदं तव।
कदाचित् कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः॥

अर्थात् हे जे इष्टलिंग आहे ते तुझे प्राणलिंग देखील आहे. प्राणयोगाने ते धारण केले जाते. इष्टलिंगाचा जर शरीराशी वियोग झाला तर वीरशैवाने प्राणत्याग करावा असा शास्त्रार्थ आहे. बरेच लोक घाबरतात की असे घडले तर प्राण कसा सोडावा? इथे मुद्दाम प्राण सोडायचा नसून इष्टलिंगाचा वियोग होताक्षणी तो सहज गेला पाहिजे एवढे प्रेम इष्टलिंगावर असावे. जाणिवपूर्वक प्राणत्याग करणे हे योग्य नव्हे. ती एक प्रकारची आत्महत्याच ठरेल.

लिंग शरीरापासून वियुक्त झाल्यावर प्राण जातो तरी कसा? असा काहीजणांना प्रश्न पडेल. जर आपले लिंगावर आत्यंतिक प्रेम असेल तर हे घडणे शक्य आहे. जर नसेल तर घडणार नाही. व्यवहारामध्ये आपण पाहतो की एखाद्या मनुष्याचा एखाद्या वस्तूमध्ये जीव असतो. लहानपणी आपण एक कथा ऐकलेली असते. एक राक्षस असतो आणि त्याचा प्राण दूर कुठेतरी झाडावरील पोपटात असतो आणि पोपट मारला की इकडे राक्षस मरतो. हे कसे शक्य आहे? शरीरात प्राण असेल तर पोपटाला मारल्यावर राक्षसाचा प्राण कसा जातो? कुणाचा जीव एखाद्या वस्तूवर असतो. कुणाचा जीव धनावर असतो तर कुणाचा जीव एखाद्या प्राण्यावर असतो आणि जेव्हा वस्तू, धन आणि प्राणी यांना काही हानी पोहोचते तेव्हा त्याचा जीव जाऊ पाहतो. प्राण दोन प्रकारचे असतात. बहिर्प्राण आणि अंतप्राण. श्वासोच्छवास हा एक प्राण तर जीव हा दुसरा प्राण. आपले आपल्या प्राण्यावर आत्यंतिक प्रेम असते. आपल्या शरीराशी संबंधित वस्तूवर आपले प्रेम असते.

'वित्तात् पुत्रः प्रियः' धनापेक्षाही आपल्याला आपला मुलगा प्रिय असतो. मुलावर संकट आले तर आपण त्यासाठी कितीही धन खर्च करतो. 'पुत्रात् पिण्डम्' पुत्रापेक्षाही आपल्या शरीरावर आपले अधिक प्रेम असते. पुत्रावरही आपण प्रेम करतो पण कशासाठी? तर स्वत:साठी 'आत्मनस्तु कामाय पुत्रः प्रियो भवति' आपल्यासाठी आपला पुत्र प्रिय असतो. त्याप्रमाणे पुत्रापेक्षाही आपले शरीर, शरीरापेक्षाही इंद्रिये प्रिय, जर कुणी आपल्याला मारायला आला तर आपण डोळे बंद करून घेऊ. ओंजळीत चेहरा लपवू. शरीराची कमान करून पोटाचे संरक्षण करू. पाठीवर कितीही मारले तरी चालेल. हा इंद्रियांना वाचविण्याचाच प्रयत्न असतो आणि इंद्रियांपेक्षाही प्राण हा अत्यंत प्रिय असतो. जर कुणी अंगावर आला– तुझे दात पाडीन, तुझे डोळे फोडीन, तुझे हातपाय तोडीन, तर आपण म्हणू की ठीक आहे. पण बाबा रे, माझे प्राण मात्र घेऊ नकोस. कधी कधी आपले प्रेम प्राणापलीकडे देखील राहते. म्हणून काही लोक आत्महत्या करतात. त्यांना वाटते की प्राण सोडल्याने सुख मिळेल. मग आता प्रेम कुठे गेले? तर ते प्राणापलीकडच्या आत्म्यापर्यंत. 'प्राणादात्मा परं प्रियः।' आत्मा हा आपल्याला सर्वाधिक प्रिय असतो.

जर मनुष्य आपल्या प्राणाइतके प्रेम आपल्या इष्टलिंगावर करील तर त्याचे इष्टलिंग हे त्याचे प्राणलिंगच होईल. असे प्राणप्रिय इष्टलिंग जर त्याच्या शरीरापासून वियुक्त झाले तर त्याच्याकडून सहज प्राणत्याग घडेल. इष्टलिंगाचा वियोग झाल्यास प्राणत्याग करावा असे शास्त्रात यासाठी सांगितले आहे की, तुम्ही आपल्या प्राणाइतके प्रेम इष्टलिंगावर करा. प्राणत्याग करा हे सांगण्याचा येथे उद्देश नाही. अशा प्रकारे इष्टलिंगाच्या द्वारा आपण हृदयस्थ प्राणलिंगापर्यंत पोहोचू शकतो आणि एका अर्थाने इष्टलिंग हे देखील आपले प्राणलिंगच असते. सामरस्यरूपी जे इष्ट ते प्रदान करणारे लिंग हेच इष्टलिंग होय. अशाप्रकारे इष्टलिंगाची पूजा करता करता हृदयातील ज्योतिस्वरूप प्राणलिंगाची आराधना जो साधक निरंतर करतो तोच प्राणलिंगी होय. येथे प्राणलिंगिस्थलातील पहिले अवांतर स्थल संपले. एवढे बोलून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
५ एप्रिल १९९२



## प्राणलिंगार्चनस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालच्या आशीर्वचनातील अंतिम श्लोक असा होता–

सत्ता प्राणमयी शक्तिः सद्रुपं प्राणलिंगकम्।
तत्सामरस्यविज्ञानात् प्राणलिंगीति कथ्यते।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.१२)

प्राणलिंग हे सत्तारूपी शक्तिविशिष्ट आहे. सत् याचा अर्थ असणे, अस्तित्व. मी आहे हा आपल्या अस्तित्वाचा बोध आहे. त्यालाच 'अहंबोध' म्हणतात. अहंबोधयुक्त ज्योतीलाच येथे प्राणलिंग असे म्हटले आहे. येथे काही वैशिष्ट्ये सांगत आहेत. अद्वैतवेदान्तात परब्रह्माला, आत्म्याला चिद्रूप मानले आहे. परंतु परब्रह्म हे शक्तिविशिष्ट आहे असा शब्दप्रयोग ते करीत नाहीत. मग वीरशैवसिद्धान्तात परब्रह्माला शक्तिविशिष्ट अर्थात शक्तियुक्त का मानले जाते? आचार्य सांगतात की, परब्रह्माच्या ठिकाणी 'अहमस्मि सदाभामि कदाचिन्नहमप्रियः' हे भान त्याला आहे की नाही असा प्रश्न उपस्थित केला जातो. मी आहे, मी चिद्रूप आहे. मी कधीही अप्रिय नाही म्हणजे सदैव परमप्रिय आहे, असा जो बोध आपल्या अंतर्यामी नांदतो तसा परमात्म्याच्या ठिकाणीही तो असला पाहिजे. प्रकाशाला 'मी प्रकाश आहे' असा बोध नसेल तर त्या प्रकाशाला जड म्हटले जाते. दिव्याच्या प्रकाशात आपण सारे व्यवहार करतो, परंतु त्या प्रकाशाला 'मी प्रकाश आहे' असा अहंबोध नसतो. म्हणून दिव्याचा प्रकाश हा जड मानला गेला आहे. परंतु आपला जो प्रकाशमय आत्मा आहे त्याला 'मी आहे, मी प्रकाशमय आहे' मी आनंदरूप आहे. असा बोध असतो. या प्रकारे अस्मि, प्रकाशे, नंदामि अशी जी बोधस्वरूप शक्ती आहे ती शक्ती म्हणजे सत्ता होय. त्या शक्तीसहित प्राणलिंगाला 'चिद्रूप सत्ताशक्तिविशिष्ट प्राणलिंग' म्हटले जाते. आपल्या अस्तित्वाबद्दल मनुष्याला कधीही शंका नसते. त्याप्रमाणे आत्म्याच्याही ठिकाणी हा बोध निरंतर नांदत असतो.

या प्राणलिंगाची अर्चना कशी करावी? जशी इष्टलिंगाची आपण जल, पंचामृत, बिल्वपत्र, धूपदीप इ. उपचारांनी पूजा करतो. तशी प्राणलिंगाची अर्चना कशी करावी? हेच या ठिकाणी प्राणलिंगार्चनस्थलात सांगितले आहे.

अन्तर्गतं चिदाकारं लिंगं शिवमयं परम्।
पूज्यते भावपुष्पैर्यत् प्राणलिंगार्चनं हि तत्।। १२.१३।।

हृदयकमलात विराजमान असलेले चित्स्वरूप शिवमय आणि परमश्रेष्ठ असे जे प्राणलिंग त्याची भावरूपी पुष्पांनी पूजा करणे यालाच प्राणलिंगार्चन असे म्हणतात. प्राणलिंगाची अर्चना बाह्य–उपचारांनी केली जात नाही तर अंतरंग सामग्रीने केली जाते. बाह्यलिंगाची पूजा बाह्य उपचारांनी तर अंतर्लिंगाची उपासना अंतरंग–उपचारांनी केली जाते.

एकदा एका मनुष्याला स्वप्न पडले. स्वप्नात एका विषारी नागाने त्याचा पाठलाग सुरू केला. तो बिचारा जिवाच्या आकांताने धावत सुटला. पाठीमागे प्राणभयाने पाहतो आहे. महाभयंकर सर्प पाठलाग करतोच आहे.

शेवटी मार्ग खुंटला. तो उभा राहिला तेव्हा त्या सर्पाने त्याला दंश केला. तो मूर्च्छित होऊन खाली कोसळला आणि स्वप्नातून जागा झाला. स्वप्न खोटे होते. तरीही त्याच्या देहाला दरदरून घाम सुटला. सर्वांगावर भीतीने काटे आलेले होते. तो धावतच डॉक्टरकडे गेला आणि म्हणाला,

''डॉक्टर, डॉक्टर, माझ्यावर लवकर उपचार करा मला साप चावला आहे?''

''कुठे चावला आहे?'' डॉक्टरने विचारले.

तो दाखवू लागला. परंतु डॉक्टरला दंश केल्याची खूण काही दिसेना. डॉक्टरने विचारले,

''तुम्हाला साप चावला तरी कुठे?''

''स्वप्नात.'' त्याने उत्तर दिले.

''मग तुम्हाला स्वप्नातल्या डॉक्टरकडेच गेले पाहिजे, माझ्याकडे कशाला आलात?'' डाक्टर हसत म्हणाला.

सांगण्याचे तात्पर्य असे की, मानसिक व्यवहाराचे समाधान मानसिक व्यवहारानेच होत असते. आपले प्राणलिंग हे अंतर्लिंग असल्यामुळे त्याची पूजा गंधपुष्पादी बाह्य–उपचारांनी करता येत नाही. त्याच्या उपचारासाठी देखील भस्म, गंध, पुष्प, बिल्वपत्र इत्यादी उपचार हवे असतात, परंतु ते बाह्य नसून अंतरंगातील असतात. प्राणलिंगार्चना करण्यासाठी त्या प्राणलिंगाची कल्पना कशी करावी ते पुढील श्लोकांत सांगितले आहे

**अन्तःपवनसंस्पृष्टे सुसूक्ष्माम्बरशोभिते।**
**मूर्धन्यचन्द्रविगलत्सुधासेकातिशीतले।।१४।।**
**बद्धेन्द्रियनवद्वारे बोधद्विपे हृदालये।**
**पद्मपीठे समासीनं चिल्लिंगं शिवविग्रहम्।**
**भावयित्वा सदाकालं पूजयेद् भाववस्तुभिः।।१५।।**

प्राणलिंग कोठे आहे? तर आपल्या आतील सूक्ष्म आकाशात अर्थात् हृदयकमलात. ते कसे आहे? तर हृदयातील प्राणवायूने व्याप्त आहे. प्राणलिंगज्योत ही ज्वलनात्मक नाही तर ती शीतल आहे. सूर्य हा आपल्या शरीराचा दाह करतो तर चंद्र आपल्या शरीराला शीतलता प्रदान करतो. योगशास्त्रानुसार मनुष्याच्या मेंदूच्या ठिकाणी म्हणजे सहस्रारकमलात चंद्रमा असतो असे म्हटले आहे. समाधिमग्न योगी त्या चंद्रम्याची शीतलता अनुभवू शकतो. येथे तेच स्पष्टपणे सांगितले आहे. मस्तकातील चंद्रामृताचा अभिषेक या प्राणलिंगावर होत आहे. वृत्ती अंतर्मुख केल्यावर प्राणलिंगिस्थलातील साधकाला या शीतलतेचा अनुभव आपल्या हृदयात येतो. त्यासाठी साधकाने काय करावे? तर आपल्या देहाची नऊ द्वारे बंद करावीत आणि वृत्ती आत वळवावी. असे केल्यावर हृदयात बोधाची दीपज्योती प्रज्वलित होते. त्या प्रकाशात हृदयकमलावर मंगलमय चिद्रूप असे प्राणलिंग विराजमान झालेले दिसते. अशी भावना धरून सद्भावरूपी वस्तूंनी त्या प्राणलिंगाची पूजा करावी. ही भावनासामग्री कशी आहे? या विषयी ज. रेणुकाचार्य सांगतात– पूजेसाठी सर्वप्रथम जलाची आवश्यकता असते. 'क्षमाऽभिषेकसलिलं' पाणी कोणते? तर क्षमा हेच पाणी. मनुष्याच्या अंतःकरणात काम, क्रोध, लोभ, मत्सर इत्यादी विकारांबरोबरच क्षमा हा गुणदेखील असतो. प्रत्येकाच्या ठिकाणी काही सद्गुण असतात तर काही दुर्गुण असतात. प्राणलिंगाची पूजा सद्गुणांनी करायची असते. क्षमा म्हणजे सहनशीलता. संसारात आपल्याला अनेक दुःखांचा सामना करावा लागतो. कित्येक वेळा अपमान सहन करावा लागतो. त्याला विरोध करण्याचे सामर्थ्य

आपल्या ठिकाणी नसेल तर क्षमा करून आपण अपमान सहन करतो. विरोध करण्याचे सामर्थ्य असेल तर विरोधाने विरोध वाढत जातो. जर कुणी आपल्या एक थोबाडीत मारली तर आपण त्याच्या थोबाडीत दोन मारतो. तो अधिकच अपमानित होतो आणि आपल्याला मारण्याची शक्ती त्याच्याजवळ नसेल तर तो त्याच्या मित्रांना घेऊन येतो आणि त्यांच्याकडून आपल्या थोबाडीत चार मारतो. दोन व्यक्तीमधला हा द्वेष साऱ्या गावात, समाजात आणि राष्ट्रात देखील पसरू शकतो. म्हणून जिथे काही चूक होत असेल ती तिथेच संपविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्राणलिंगाला अभिषेक करण्यासाठी क्षमारूप जल हवे असे येथे सांगितले आहे. अर्थात् प्राणलिंगार्चना करणाऱ्या साधकाजवळ क्षमा हा गुण असला पाहिजे. हा अर्थ येथे अभिप्रेत आहे. क्षमा आपल्याजवळ नसेल तर आपल्याला प्राणलिंगाचा साक्षात्कार होणार नाही आणि त्याची अर्चनादेखील करता येणार नाही. लिंगाच्या अभिषेकानंतर त्याला कोरडे करण्यासाठी वस्त्राची आवश्यकता असते. येथे वस्त्र कोणते? तर 'विवेको वस्त्रमुच्यते' विवेक हेच वस्त्र. विवेक दोन प्रकारचा असतो. नित्यानित्यवस्तुविवेक आणि आत्मानात्मविवेक. येथे दोन्ही विवेकांची आवश्यकता आहे. विवेकी मनुष्य अनित्य वस्तूंच्या मागे लागत नाही. त्याची प्रवृत्ती नित्य वस्तूकडे म्हणजे आत्म्याकडे असते. आत्मवस्तूकडे जाताना अनात्म वस्तू दूर सारीत जायचे असते. हा देखील विवेक आवश्यक असतो. लिंगावरील पाणी वस्त्राने पुसावे त्याप्रमाणे आपल्या मनातील अभिमान, अहंकार इत्यादी भावना विवेकाच्या वस्त्राने हळूच पुसून टाकाव्यात. जसे यापूर्वी पिंडज्ञानस्थलात सांगितले आहे-

**शरीरात्मविवेकेन पिण्डज्ञानी स कथ्यते।।५.५५।।**

आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक जो करतो त्याला पिण्डज्ञानी असे म्हणतात. शरीरपासून बुद्धीपर्यंत जेवढी तत्त्वे आहेत ती सारी अनात्म आहेत आणि त्यांच्या व्यतिरिक्त 'अहंप्रत्ययवेद्यत्वादनुभूतस्मृतेरपि' ।।५-५७।। मी असे म्हणणारा आत्मा त्या सर्वांपेक्षा वेगळा असतो. कशाला आत्मा म्हणावे आणि कशाला अनात्मा म्हणावे? जेथे अहंभाव असतो तेथे आत्मा आहे आणि जेथे ममत्वभाव असतो तेथे अनात्मा असतो. 'मी' म्हणजे आत्मा आणि 'माझे' (देहापासून बुद्धीपर्यंत जे सारे ते) हा अनात्मा. 'हे माझे पुस्तक आहे' असे म्हणताना 'पुस्तक' आणि 'मी' दोघे भिन्न असतात. प्रारंभी शरीरात देखील अहंभाव असतो. शरीर मध्ये मीच असे मानण्याकडे मनुष्याची प्रवृत्ती असते. देहाभिमानी माणूस आपल्या देहाला अनुलक्षून मी गोरा आहे, मी स्थूल आहे असे म्हणत असतो. यावरून त्याची आत्मबुद्धी शरीराच्या ठिकाणी आहे हे लक्षात येते. प्रसंगविशेषी तोच 'हे माझे शरीर आहे' असे देखील म्हणतो. त्यावेळी तो 'मी' आणि 'शरीर' दोन्ही वेगळे मानतो. आधी ज्याला 'मी' म्हणत होता. त्यालाच आता तो 'माझे' समजतो. शरीरप्रमाणेच त्याचा अहंभाव इंद्रियांच्या ठिकाणी स्थिर होतो. 'मी पाहतो आहे' असा शब्दप्रयोग तो करतो. या ठिकाणी तो स्वतःला 'डोळे' अर्थात इंद्रिय समजतो परंतु जेव्हा डोळ्यात काही बिघाड होतो तेव्हा मात्र तो म्हणतो 'माझे डोळे खराब झाले आहेत.' आता डोळ्यातील अहंभाव जाऊन त्या ठिकाणी ममत्मभाव निर्माण झाला. त्याचप्रमाणे माझे मन, माझी बुद्धी असे शब्दप्रयोग तो करतो. म्हणून ज्याला 'माझे' असे तो संबोधतो ते सारे अनात्म होय आणि ज्याला 'मी' असे संबोधतो तो आत्मा होय.

बुद्धीमध्ये एक वृत्ती असते, तिला 'अहंकार' असे म्हणतात. हा अहंकार म्हणजे अहंबोध नव्हे. अहं आणि अहंकार यामध्ये खूप अंतर आहे. आत्मा हा अहंरूप आहे. तर बुद्धीची वृत्ती अहंकार आहे. 'न अहं अनहं अनहं अहंकरोतीति अहंकारः' अहंकाराची ही व्याख्या आहे. जो अहं नाही, परंतु अहंसारखा भासतो तो अहंकार होय. शिंपला चांदी नव्हे, परंतु चांदीप्रमाणे तो दिसतो. दोरी साप नव्हे सापासारखी भासते, खोड चोर नव्हे पण

चोराप्रमाणे भासतो. हे भ्रमात्मक असे ज्ञान होय. त्याचप्रमाणे अहंकारामध्ये आत्मभ्रम आहे. अहं आणि अहंकार यामध्ये एवढे अंतर आहे. म्हणून शरीरापासून ते अहंकारापर्यंत सर्व तत्त्वे ही अनात्म होत. या व्यतिरिक्त जे तत्त्व आहे ते आत्मा होय. येथे अहंबोध आहे पण अहंकार नाही. अहंकारात अभिमान असतो आणि अहंकार नेहमी अतृप्त असतो. आत्मा सदैव तृप्त असतो, तर अहंकार सदैव अतृप्त असतो. अहंकाराच्या तृप्तीसाठी दुसऱ्यांची आवश्यकता असते. अहंकारी माणसाच्या आसपास स्तुतिपाठक असतात. ते जर निघून गेले तर त्याचा अहंकार कोसळून पडतो, भिंती पडल्यावर शिखर कोसळून पडावे त्याप्रमाणे. यासाठीच संत आणि साधक निर्जन प्रदेशात राहण्याची इच्छा प्रकट करतात. समाजात राहिल्यावर लोक स्तुती करतात, जयजयकार करतात. ते त्यांना नको असते. कारण त्यामुळे अहंकार पुष्ट होत असतो. दुसऱ्याने स्तुती केल्यावर माणसाला बरे वाटते आणि ती त्याने पुन्हा पुन्हा करावी अशी इच्छा प्रबळ होत जाते. दुसऱ्यांकडून स्तुती ऐकून जर तुम्ही स्वतःला मोठे मानीत असाल तर तुम्ही कधीच मोठे होऊ शकणार नाही. ज्या तोंडाने आज तुमची स्तुती होते त्याच तोंडाने तुमची निंदादेखील होऊ शकते. अहंकाराच्या पुष्टीसाठी दुसऱ्या व्यक्तीची आवश्यकता असते. परंतु अहंसाठी तशी गरज नसते. कारण अहं हा स्वयंभू, परिपूर्ण असतो. तो नित्य तृप्त असतो. इतरांच्या शिवाय तो पूर्ण संतुष्ट असतो. ज्याप्रमाणे सुषुप्ती-अवस्थेत म्हणजे गाढ झोपेत आपण इतर कोणाच्याही सहवासाशिवाय अत्यंत आनंदी असतो त्याप्रमाणे. जागृतावस्थेत आणि स्वप्नावस्थेत मात्र अहंकार पुढे येतो आणि अहंप्रमाणे व्यवहार करू लागतो. जो मनुष्य दुसऱ्याशिवाय पूर्ण संतुष्ट असतो तोच विवेकी असतो, तोच आत्मज्ञानी असतो.

याप्रमाणे शरीरापासून अहंकारापर्यंत सारी तत्त्वे अनात्म असून त्यांच्यापेक्षा विलक्षण असे जे तत्त्व तेच 'आत्मा' होय. असे जाणणाऱ्यालाच आपल्या हृदयस्थ प्राणलिंगाचा साक्षात्कार होतो आणि तोच त्याची अर्चना करू शकतो. आपल्या ठिकाणचा दुरभिमान सोडूनच प्राणलिंगाची उपासना करता येते. सर्वकाळ दुरभिमान जरी सोडता आला नाही तर पूजाकाळात मात्र तो सोडायलाच हवा. तरच प्राणलिंगार्चन सफल होईल.

प्राणलिंगाला कोणती आभूषणे घालावीत? तर सत्य हेच आभूषण होय. 'सत्यं वद' असा आदेश फार पूर्वीपासून शास्त्राने दिला आहे. मनुष्याची मूळ प्रवृत्ती सत्य बोलण्याचीच असते. लहान मुले नेहमी खरे बोलतात, परंतु त्यांना त्यांचे आईवडील खोटे बोलायला शिकवतात. वडील घरी असताना दारातून जर कुणी विचारले की, ''तुझे वडील घरी आहेत काय?'' तर लहान मूल उत्तर देईल की, ''होय आहेत.'' तो खरेच बोलत असतो. पण वडील त्याला शिकवतात, दरडावून सांगतात की, ''कुणी विचारले तर सांग की मी घरी नाही.'' खरे बोलणाऱ्या मुलाला खोटे बोलायला कोण शिकवते? तर त्याचे आईवडीलच हे महत्कार्य करीत असतात. नंतर त्या मुलाचा अभ्यास वाढत जातो आणि तो आयुष्यभर खोटे बोलत जातो. काही मुले फार निष्पाप असतात. कुणी विचारल्यावर ती सांगतात की, ''आमचे पप्पा म्हणतात की ते घरात नाहीत.'' हळूहळू ते मूल खोटे बोलणे आत्मसात करते आणि आपल्या वडिलांपेक्षाही सवाई बनते. मुलांची मूळ प्रवृत्ती सत्य बोलण्याचीच असते. ती जे पाहतात, ऐकतात तेच बोलतात. आसपासच्या वातावरणामुळे त्यांची मूळ प्रवृत्ती विकृत होते आणि ती खोटे बोलायला सरावतात, म्हणून मुलांना सुधारण्यापेक्षा घरातील वडीलधाऱ्यांना सुधारणे जास्त महत्त्वाचे आहे.

सत्य ही अत्यंत महत्त्वाची वस्तू आहे. त्याविना मनुष्य जिवंत राहू शकणार नाही.

**सत्यमूलानि धर्माणि सत्यान्नास्ति परं तपः।**
**सत्यमेलोकान् जयति सत्ये सर्वं प्रतिष्ठितम्।।**

शास्त्र सांगते की, सत्य हेच धर्माचे मूळ आहे. सत्यविना कोणतेही धर्माचरण हे धर्माचरण ठरत नाही. द्रोणाचार्यांनी कौरवपांडवांना सांगितले की 'सत्यं वद' हे वचन पाठ करा. त्यांनी परीक्षा घेतली तेव्हा युधिष्ठिराशिवाय सर्वांनी ते वचन पाठ म्हणून दाखवले. परंतु युधिष्ठिर म्हणाला, मला अजून ते पाठ झाले नाही. असा एक महिना उलटला तेव्हा द्रोणाचर्यांनी चिडून विचारले की, ''सर्वांनी पहिल्याच दिवशी हे वचन पाठ म्हणून दाखविले तुला मात्र महिना झाला तरी ते अजून पाठ होत नाही?''

तेव्हा युधिष्ठिराने शांतपणे उत्तर दिले की, गुरुमहाराज, आज मी ते वचन पाठ केले आहे. 'सत्यं वद' ही आपण आज्ञा केल्यानंतर मी प्रत्येक क्षणी आचरणात आणण्याचा प्रयत्न करीत होतो. रोज खोटे बोलणे कमी कमी करीत होतो. आज मात्र मी एकही शब्द खोटे बोललो नाही. म्हणून 'सत्यं वद' हे वचन आज मला संपूर्णपणे पाठ झाले आहे. केवळ जिभेनेच पाठांतर करायचे असते तर इतरांप्रमाणे मी देखील त्याच दिवशी पाठ म्हणून दाखविले असते.

या प्रमाणे शास्त्रवचनाला आचरणात आणण्याचा प्रयत्न करणारा जो मनुष्य असतो त्याचे जीवन सफल असते, बोलणाऱ्यांच्या आणि ऐकणाऱ्याच्या आचरणामध्ये जे उतरते तेच शास्त्र सफल होते. एवढे बोलून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,

६ एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन चौथे**

## प्राणलिंगार्चनस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले की, प्राणलिंगार्चन करण्यासाठी क्षमा हे अभिषेकजल आहे. विवेक हे वस्त्र आहे आणि प्राणलिंगाचे आभूषण सत्य हे आहे. आपण इष्टलिंगाला रुद्राक्ष, स्फटिक अथवा अन्य रत्नांच्या माळाचे अलंकार करतो. परंतु प्राणलिंगार्चनात या आभूषणांची जरुरी नसते. सर्वश्रेष्ठ आभरण कोणते? तर सत्य हे. सदोदित सत्य बोलणे हेच प्राणलिंगाचे एक आभूषण होय. अन्य सोन्यारूप्यांच्या अलंकारांना चोराचे भय असते आणि कधी आर्थिक परिस्थिती हलाखीची झाली तर आपण ते विकायला काढतो. बाह्य आभूषणे अशी क्षणभंगूर असून ती शरीराला फारशी भूषणावह नसतात. सद्गुणांसारखे सुंदर अलंकार जगात कोठेही नाहीत. सद्गुणी मनुष्याच्या अंगावर सोन्याचा एकही अलंकार नसला तरी त्याला समाजात प्रतिष्ठा लाभते. दुर्गुणी माणसाने आपले शरीर अलंकारांनी कितीही सजवले तरी त्याला सामाजिक प्रतिष्ठा मिळत नाही.

**'गुणा: पूजास्थानं गुणिषु न च लिंगं न च वय:'**

एखाद्याला आपण जेव्हा मान देतो तेव्हा तो पुरुष आहे की स्त्री आहे, बालक आहे की वृद्ध आहे हे पाहत

नाही. त्याच्या ठिकाणी असलेले सद्‌गुण पाहतो. सद्‌गुण हे पूजनीय असतात आणि गुणांमुळेच मनुष्य काय पण पशुपक्षीही पूज्य ठरतात.

प्रणिलिंगिस्थलातील साधकाने प्रयत्नपूर्वक सत्य हा सद्‌गुण आपल्या अंगी बाणवला पाहिजे. काल आम्ही सांगितले होते की, सत्याशिवाय कोणी मनुष्य जिवंत राहू शकत नाही. तुम्हाला आश्चर्य वाटेल की आपण सारे नेहमी खोटेच बोलतो तरी जिवंत कसे? येथे एक तत्त्व सांगायचे आहे. जिवंत राहण्यासाठी माणसाला काय हवे असते? शरीर अन्नमय आहे आणि प्राण हे आपोमय असतात. अन्न आणि पाण्याशिवाय आपण जिवंत राहू शकत नाही. अन्नाशिवाय काही दिवस जगू शकू परंतु पाण्यावाचून जगणे अशक्य. 'आपोमय: प्राण:' प्राण जिवंत राहण्यासाठी पाण्याची गरज असते. स्थूल दृष्टीने पाहिल्यावर हेच दिसते की, माणसाला जिवंत राहण्यासाठी कपड्याची, घराची, संपत्तीची गरज नसते तर अन्न-पाण्याची असते. अन्न-पाण्याविषयी जर कोणी खोटे बोलेल तर त्याला मरण्याशिवाय पर्याय नाही. पाहुणा म्हणून आपण कोठे गेलो तर यजमान आपल्यासमोर आधी पाणी ठेवतो. चहा देतो आणि नंतर जेवणाची व्यवस्था करतो. आहार-विहारात मनुष्याने निर्लज्ज व्हावे असे शास्त्रात सांगितले आहे. 'आहारे व्यवहारे च त्यक्त लज्जा सुखी भवेत्'

खाण्यापिण्याच्या बाबतीत लाज बाळगली तर उपाशी मरावे लागते. 'चला जेवण करा' असे यजमानाने म्हटले आणि आपण संकोचाने 'नको नको मला भूक नाही' असे म्हटले तर? भूक आहे पण असत्य बोलतो आहे. तो कितीही खोटे बोलला तरी शेवटी भुकेमुळे त्याला केव्हातरी सत्य बोलावेच लागेल. सत्य बोलले तरच त्याला अन्न-पाणी मिळेल. खोटेच बोलत राहिला तर त्याला उपाशी मरावे लागेल. म्हणून जिवंत राहण्यासाठी माणसाला सत्याची आवश्यकता असते. जीवनाचे मूळ सत्य हेच आहे. एवढे करून देखील माणूस खोटे का बरे बोलतो? चारदोन बंगले बांधायचे आहेत, खूप संपत्ती मिळवायची आहे. त्यासाठी माणसाला असत्याचा आश्रय घ्यावा लागतो आणि असत्य बोलून जे काही कमावले असेल ते सारे येथेच सोडून रिकाम्या हाताने परलोकात जावे लागते. म्हणून शक्य तेवढा प्रयत्न करून माणसाने सत्याच्या मार्गावरच चालावे. असे केले तरच तो प्राणलिंगिस्थलाचा अधिकारी होऊ शकतो. प्राणलिंगार्चनात सत्याची अशी नितांत गरज असते.

'वैराग्यं पुष्पमालिका' प्राणलिंगाला अर्पण करण्यासाठी पुष्पहार कोणता? तर वैराग्य हाच पुष्पहार. ऐहिक आणि पारलौकिक सुखांमध्ये असणारी विरक्ती म्हणजे वैराग्य. ज्याला ऐहिक आणि पारलौकिक सुखांची अपेक्षा असते त्याची मनोवृत्ती अंतर्मुख होणे अत्यंत कठीण असते. त्यामुळे प्राणलिंगार्चन घडणे शक्य नाही. म्हणून येथे वैराग्याला पुष्पहार म्हटले आहे. 'गंध: समाधिसंपत्ति:' समाधि-संपत्ति म्हणजे चित्ताची एकाग्रता. मनाचा स्वभाव चंचल आहे. मन लवकर स्थिर होत नाही. अर्जुनाने श्रीकृष्णाला प्रश्न केला की, कृष्णा, वायूला रोधणे जेवढे कठीण तेवढेच मनाला रोधणे कठीण इतके मन चंचल आहे तर त्याचा निग्रह कसा करावा? भगवंतानी त्याला उत्तर दिले, 'अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते।'

मनाला आपल्या आधीन ठेवण्यासाठी दोन प्रकारची साधने आहेत. अभ्यास आणि वैराग्य. मन बाहेर जाते ते कोणत्यातरी वस्तूच्या अपेक्षेने. जर कोणत्याही पदार्थात आपली आसक्ती नसेल तर आपले मन बाहेर कशाला जाईल? म्हणून वैराग्य देखील बाहेर प्रवाहित होणारी मनोवृत्ती रोखू शकते. ज्याच्या ठिकाणी वैराग्य नसेल तो अभ्यासाने आपल्या मनावर नियंत्रण ठेवू शकतो. तुम्ही ध्यान करीत आहात. तुमचे मन बाहेर धावते. मग तुम्ही

त्याला आत खेचता. अशी सारखी ओढाताण चालू असते. काही दिवसाच्या अभ्यासानंतर जेव्हा मनाला जाणवते की बाहेर जाण्यात आपल्याला कष्टच पडतात. तेव्हा ते आतच स्थिर होऊ लागते.

सुख आणि दुःख हे मनाचे धर्म आहेत. मन सारखे बाहेर धावते तेव्हा ते अधिकाधिक दुःखीच होते. परंतु जेव्हा ते अंतर्मुख होते तेव्हा ते अतीव सुखात न्हाऊन जाते. अभ्यासबळाने जेव्हा मनाला एकाग्रतेमध्येच अधिक सुख आहे असे कळते तेव्हा ते सदोदित एकाग्र होऊन राहते. हा एक प्रकारचा अभ्यासच आहे. यासंबंधी एक कथा सांगितली जाते.

अकबर बादशहाला एक कसली तरी व्याधी झाली आणि त्यावर बकरीचे दूध पिण्याचा सल्ला राजवैद्याने दिला. त्यासाठी राजाने एक बकरी पाळली. तिला घेऊन तो बागेत जात असे. तिथे गेल्यानंतर ती बकरी इतर गवताबरोबरच फुलझाडांची पाने वगैरे खात असे. ती बादशहाला जीवप्राण असल्यामुळे तो तिला मारत नसे. परंतु बादशहाला दुःख होई की बकरीमुळे आपले नुकसान होत आहे. म्हणून त्याने आपल्या दरबारातील लोकांना 'बकरीने बागेतील झाडे खाऊ नये अशी काहीतरी योजना करा' असे सांगितले आणि त्यासाठी बक्षीस देखील जाहीर केले. अनेक लोकांनी प्रयत्न केला, त्या बकरीला भरपूर खाऊपिऊ घातले. परंतु बागेत गेल्यानंतर कितीही पोट भरलेले असले तरी ती फळझाडे, फुलझाडे खातच असे. पोट भरलेले असले तरी मन थोडेच भरलेले असते? आपण कितीही खाल्ले तरी आपली खाण्यावरील इच्छा उरलेलीच असते. पोटात जागा नाही म्हणून आपण पुढे खात नाही इतकेच.

अनेकांनी प्रयत्न करूनही बकरीमध्ये काही सुधारणा होत नाही हे पाहिल्यावर बादशहाने ती कामगिरी बिरबलावर सोपविली. बिरबलाने पंधरा दिवसाची मुदत मागून घेतली. तो बकरीला आपल्या घरी पोटभर गवत खाऊ घालीत असे आणि बागेत घेऊन जात असे. तिने बागेतल्या झाडांना तोंड लावले की हातातल्या काठीने तिच्या डोक्यावर प्रहार करीत असे. काही दिवस गेल्यावर बागेतल्या झाडांना तोंड लावले म्हणजे भयंकर कष्ट होतात हे बकरीला जाणवले आणि तिने बागेतल्या झाडांना तोंड लावणे बंद केले. पूर्ण खात्री झाल्यावर बिरबलाने बादशहाला बोलावून बकरीमध्ये झालेली सुधारणा दाखवली. तेव्हा बादशहाने विचारले–

''बिरबल हिच्यावर कोणता मंत्र टाकलास?''

''ही मंत्राने नव्हे तर माझ्या हातातील काठीने सुधारली.'' बिरबल उत्तरला.

माणसाचे मन हे पाशवी असते. त्यात पशुवृत्ती अधिक असते. भाजीमंडईतल्या मोकाट जनावरांसारखे त्याला कितीही मारले तरी ते सारखे भाजीमध्ये तोंड खुपसतच राहते. आपण का मार खातो? आपल्याला का दुःख होते? याचा विचार जेव्हा मन करू लागेल. तेव्हाच ते बाहेरची धाव सोडून अंतर्मुख होईल. म्हणून चित्ताची एकाग्रता अर्थात् वैराग्य हे प्राणलिंगाचे गंध मानले आहे.

'अक्षता निरहंकृतिः' प्राणलिंगाची अक्षता कोणती? निरहंकारता हीच अक्षता होय. परवा आम्ही सांगितले होते की अहंकार ही बुद्धीची एक वृत्ती होय. कोणतेही कार्य आपल्या हातून घडले तर आपला अहंकार नागाने फणा काढावा तसा जागा होतो. मी हे केले, मी ते केले. मृत्युलोक ही कर्मभूमी आहे. येथे पहिला श्वास घेतल्यापासून तो शेवटचा श्वास सरेपर्यंत प्रत्येकाला कर्म करावेच लागते. कर्मापासून कोणाचीही सुटका नाही. कर्म तर केलेच पाहिजे. परंतु त्याचा अहंकार मात्र होता कामा नये. मी केवळ निमित्तमात्र आहे, माझ्याकडून हे कार्य करवून घेतले जात आहे, मी काहीही करीत नाही असा समर्पणभाव जर असेल तर मोठ्यातले मोठे कार्य

करून देखील माणूस अहंकारापासून दूर राहू शकतो. एखाद्याने आपले कार्य पाहून 'फार चांगले आणि मोठे कार्य तुम्ही केले आहे' असे गौरवोद्‌गार काढले आणि त्यावेळी मी हे केले नाही तर माझ्याकडून परमेश्वराने करवून घेतले अशी भावना आपल्या मनात निर्माण झाली पाहिजे. ही भावना आंतरिक असावी, केवळ वरवरचे शब्द नकोत. काही लोक तसे बोलतातही, परंतु ते सारे बेगडी असते. ही भावनोर्मी जेव्हा खरी असते तेव्हा त्याला निरहंकार भाव असे म्हणता येईल. बोलणे आणि वागणे यात जर अंतर असेल तर मात्र तुम्ही अहंकाराचे पोषणच करीत असता, तो वाढवीत असता. असे करणे म्हणजे असत्याचा आश्रय घेणेच होय. म्हणून जो शब्द आपण उच्चारला त्याच्याशी आपले अंत:करण किती प्रामाणिक आहे, याचे प्रत्येकाने आत्मपरीक्षण करायला हवे. निरहंकार भाव जेव्हा खरोखर मनात जागा होईल, तेव्हा तोच अक्षतारूपाने हृदयातील प्राणलिंगावर वाहिला जाईल.

अहंकार हे सर्व दु:खाचे आणि अनर्थाचे मूळ होय. अहंकार म्हणजे अनर्थ. शंकराचार्यांनी आपल्या भाष्यात म्हटले आहे, 'अहं ममेति नैसर्गिकोऽयं लोकव्यवहार:।' प्रथम अहं नंतर मम आधी 'मी' नंतर 'माझे'. दीपज्योतीचा प्रकाश चारही बाजूंना सर्वत्र पसरलेला असतो. ज्योत विझली की तिचा प्रकाश लुप्त होतो. अहंकार हा ज्योतीसारखा आहे, तर ममत्व त्याच्या पसरलेल्या प्रकाशासारखे होय. नाग जसा आपल्या शरीराचे वेटोळे घालून वर फणा काढून बसलेला असतो. त्याप्रमाणे प्रत्येक मनुष्य जणू आपले ममत्व एकत्र करून आपल्या अहंकाराचा फणा वर काढून बसलेला असतो. मनुष्य एका ठिकाणी असतो, परंतु त्याचे ममत्व मात्र अन्यत्र कोठेही असू शकते. जेथे जेथे तुमच्या आवडीच्या वस्तू असतील तेथपर्यंत तुमचे ममत्व एखाद्या तंबूसारखे विस्तारलेले असते. वस्तू बदलल्या की ममत्वही बदलते. जेव्हा माणूस आपले घर दुसऱ्याला विकून टाकतो तेव्हा त्याचे त्या घरावरील ममत्व संपून जाते. त्या घराविषयी ममत्व पूर्वी होते पण आता मात्र नाही, असेही घडते.

एका श्रीमंत माणसाची गावात अनेक घरे होती. त्यांपैकी बऱ्याच घरात भाडेकरू राहत असत. एकेदिवशी त्याच्या एका घराला आग लागली तेव्हा तो श्रीमंत मनुष्य धावत आला. घर पेटलेले पाहताच मोठमोठ्याने रडू लागला. तेवढ्यात त्याचा थोरला मुलगा आला आणि त्याने विचारले की,

''बाबा तुम्ही का रडता आहात?''

''आपले घर जळत आहे आणि तुला काहीच कसं वाटत नाही?''

''अहो, हे घर मी कालच दुसऱ्याला विकले आहे.'' मुलाने उत्तर दिले. हे ऐकताच त्या श्रीमंत मनुष्याचे रडणे थांबले आणि डोळे पुसून तो हसू लागला. घर विकले, पैसे आले, आता ते जळले तरी आपले काय जाते? बहुधा या विचारानेच. एका क्षणात त्याचे घरावरील ममत्व संपले. ममत्व असे एका वस्तूवरून दुसऱ्या वस्तूवर जात असते. अहंकार आहे म्हणून ममत्व आहे. ज्याचा अहंकार दूर होतो त्याची ममत्वापासून सुटका होते. जोपर्यंत शरीरात जीवात्मा असतो तोपर्यंत शरीरासहित शरीराशी संबंधित सर्व वस्तूंमध्ये त्याचे ममत्व असते. जेव्हा जीवात्मा शरीर सोडून जातो तेव्हा त्याचे शरीराविषयीचे आणि शरीराशी संबंधित वस्तूंविषयीचे ममत्व संपून जाते, नष्ट होते. म्हणून अहंकार हाच ममत्वाचे मूळ आहे आणि सर्व अनर्थांचेही मूळ आहे. अहंकार नष्ट करण्यासाठी आपल्या मनात समर्पणभाव उत्पन्न होणे अत्यंत आवश्यक आहे. अहंकाररहित भावना म्हणजेच निरहंकार भाव ही प्राणलिंगाची अक्षता आहे.

'श्रद्धा धूपो महाज्ञानं जगद्भासि प्रदीपिका।' प्राणलिंगासाठी धूप कोणता? तर श्रद्धा हाच धूप होय. ईश्वरावर

असणारा विश्वास हाच धूप होय. लौकिक व्यवहार असो, किंवा आध्यात्मिक क्षेत्र असो दोन्ही ठिकाणी विश्वासाचीच आवश्यकता असते. विश्वास नसेल तर लौकिक व्यवहार होणार नाहीत आणि पारमार्थिक व्यवहारदेखील होणार नाही.

ज्ञान हाच दीप होय. जर आपल्या ठिकाणी ज्ञान नसेल तर आपण काहीच जाणू शकणार नाही. म्हणून सर्व प्रपंचाला प्रकाशित करणारे ज्ञान हाच प्राणलिंगार्चनातील दीप होय. ईश्वराला आपण दीप दाखवतो तो एवढ्यासाठी की ज्याप्रमाणे बाहेरचा प्रपंच पाहण्यासाठी दीपाची आवश्यकता असते त्याप्रमाणे हृदयातील परमात्म्याला पाहण्यासाठी ज्ञानदीपाची जरूर असते याची जाणीव व्हावी. म्हणून येथे ज्ञानाला दीप असे म्हटले आहे.

'भ्रान्तिमूलप्रपंचस्य निवेद्यं तन्निवेदनम्।' प्रपंचाचे मूळ कारण भ्रांती हे आहे. एखाद्या वस्तूमध्ये दुसरी वस्तू पाहणे ही भ्रान्ती होय. दोरीला साप आहे असे मानणे ही भ्रान्ती. वेदान्तात प्रपंचालाच भ्रान्ती समजतात. परंतु येथे भ्रान्तीचा अध्यास हा अर्थ अभिप्रेत नाही. येथे भ्रांती म्हणजे अज्ञान. मरितोंटदार्यांनी आपल्या टीकेत स्पष्ट म्हटले आहे की, 'अत्र भ्रान्तिशब्देन अज्ञानं लक्ष्यते' अज्ञान कशाला म्हणतात? 'मी ईश्वर नाही, मी शिवस्वरूप नाही असे जे ज्ञान तेच अज्ञान होय. कारण प्रत्येक जीव हा शिवाचाच अंश आहे. अंश म्हणजे ईश्वराचे लहान रूप. अग्नीचा स्फुल्लिंग जसा अग्नीचाच अंश असतो त्याचप्रमाणे जीव हा शिवाचाच अंश असतो. जेव्हा श्रीगुरू वेददीक्षा देतात तेव्हा भावलिंगाचा बोध करून देताना सांगतात की, 'तू परब्रह्मच आहेस, शिवस्वरूप आहेस' त्याचक्षणी जर आपल्याला बोध झाला तर भावलिंगाचा भाव आपल्याला कळतो. आणि जर झाला नाही तर मी कसा ईश्वर असेन? अशी विपरीत भावना निर्माण झाली तर तेच अज्ञान होय. वास्तविक आपल्याला सर्वत्र शिवाचाच साक्षात्कार व्हायला पाहिजे. परंतु भ्रान्तीमुळे पुस्तक, पेन्सिल, मनुष्य, पशू इत्यादी प्रपंचाचा साक्षात्कार होतो. प्रपंच हा परमात्मरूप असताना, शिवमय असताना तो आम्हाला तसा का बरे दिसत नाही? तर त्याचे कारण आहे. आपल्या ठिकाणी असलेले अज्ञान, भ्रान्ती. भ्रान्तीमुळेच तुम्ही स्वतःला शिव मानीत नाही आणि या प्रपंचात देखील तुम्हाला शिव दिसत नाही. जर तुम्ही स्वतःला शिवस्वरूप मानाल तर हळूहळू हा सारा प्रपंच तुम्हाला शिवस्वरूप दिसू लागेल. ज्या रंगाचा चष्मा तुम्ही डोळ्यावर लावाल त्याच रंगाचे जग तुम्हाला दिसेल. 'यथादृष्टिः तथा सृष्टिः' प्रपंच कसा आहे? तो चांगला आहे की वाईट? या विषयी आपण निश्चित काही सांगू शकत नाही. आपली जशी दृष्टी असेल त्यानुसार तो कधी चांगला दिसतो, तर कधी वाईट. अनुकूल घडले तर तो चांगला, प्रतिकूल घडले तर तो वाईट. थंडीच्या दिवसात अंगावर कांबळे घेतले की बरे वाटते. एकापेक्षा दोन असेल तर अधिकच बरे. पण उन्हाळ्यात तेच जर अंगावर घेतले तर किती बरे सुख मिळेल? तुम्ही ते चटकन फेकून द्याल. हिवाळ्यात ज्यामुळे सुख मिळाले तीच वस्तू उन्हाळ्यात दुःख देणारी ठरते. प्रपंच हा असा आहे. 'अनुकूल वेदनीय सुखं प्रतिकूल वेदनीयं दुःखम्।'

आपल्याला जे अनुकूल असेल ते दुसऱ्याला कदाचित् प्रतिकूल असेल आणि आपल्याला जे प्रतिकूल असेल ते कदाचित इतरांना अनुकूल असेल. तुमच्या घरातला केर निरुपयोगी म्हणून तुम्ही फेकून देता. महानगरपालिकेचे कर्मचारी तो घेऊन जातात आणि शेतकरी महानगरपालिकेकडून खत म्हणून तो विकत घेऊन ते शेतात टाकतात.. जे तुम्हाला नको असते ते इतरांना हवे असू शकते. या जगात अनुपयुक्त असे काहीच नाही. पण ते कधी आणि कोठे उपयुक्त ठरेल ते मात्र सांगता येत नाही. म्हणून जगात अनुपयुक्त वस्तू नाही, तशी

कोणतीही व्यक्ती अनुपयुक्त नाही. फक्त तिचा उपयोग करून घेणारा कोणी दूरदृष्टीचा मनुष्य मात्र असावा लागतो. मराठीत एक जुनी ओवी आहे:-

**सुंठ घासायला खापरी येते कामी। जगात रिकामी वस्तू नाही।।**

प्रपंच शिवमय न दिसणे हीच भ्रांती, हेच अज्ञान. परंतु जेव्हा तुम्ही स्वत:ला शिव समजू लागाल तेव्हा तुम्हाला प्रपंचात शिव दिसायला लागेल. जो प्रामाणिक असतो त्याला सारे जग प्रामाणिक दिसते. जो विश्वासघातकी असतो त्याला सारे जग विश्वासघातकी दिसू लागते. आपण जसे असतो तसा आपल्याला प्रपंच भासतो. आपल्याला प्रपंच दिसतो याचे कारण आपण स्वत:ला शिव समजत नाही हे होय. हे अज्ञान, ही भ्रांती म्हणजेच प्राणलिंगाचा नैवेद्य होय. हे अज्ञान नैवेद्य म्हणून प्राणलिंगाला अर्पण केले तर 'मी शिव आहे आणि प्रपंच शिवमय आहे' हे ज्ञान तुम्हाला प्राप्त होईल. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
७ एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन पाचवे**

## प्राणलिंगार्चनस्थल-३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

दोन दिवसांपासून आपण प्राणलिंगिस्थलातील प्राणलिंगार्चनस्थल या उपस्थलाचा विचार करीत आहोत. दूषणरहित अंतरंगसामग्रीने प्राणलिंगाची अर्चना केली जाते. आतापर्यंत आपण धूप, दीप, नैवेद्य इत्यादी अंतरंग-उपचारांविषयी ऐकले आहे. आज त्यापुढील विवेचन करायचे आहे.

**मौनं घंटापरिस्पंदस्ताम्बूलं विषयार्पणम्।।**
**विषयभ्रान्तिराहित्यं तत्प्रदक्षिणकल्पना।**
**बुद्धेतस्तदात्मिका शक्तिर्नमस्कारक्रिया मता।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.१८-१९)

बाहेर लिंगपूजन करताना आपण घंटानाद करतो. त्यावेळी आपण मंत्रपठण करतो-

**आगमार्थं तु देवानां गमनार्थं तु रक्षसाम्।**
**कुर्वे घंटारवं भक्त्या सर्वोपद्रवनाशनम्।।**

घंटानाद आपण का करतो? तर जेथे घंटानाद होतो तेथे दुष्टशक्ती राहत नाही. सात्त्विक शक्तीला आवाहन करणे आणि राजसशक्तीला बाहेर काढणे हा घंटानादामागचा उद्देश आहे. प्राणलिंगार्चनात घंटानाद कोणता आहे? तर मौन. मौनाचा अर्थ आहे 'मुनेर्भाव: मौनम्' जो मौन धारण करतो तो 'मुनी' होय. मुनी हा प्रशांतमनस्क असतो. मौन धारण करणे, गप्प बसणे हे आपल्याला फारच कष्टदायक वाटते. 'मुनी' होण्यासाठी बरेच लोक

मौनाचा अभ्यास करतात. मौनात दोन मुख्य भाग आहेत. आकारमौन आणि काष्ठमौन. मुखातून एकही शब्दाचा उच्चार न करणे हे आकारमौन होय. या मौनात आपण फक्त बोलत नाही. परंतु जे बोलायचे असते ते पाटीवर अथवा कागदावर लिहून दाखवतो. म्हणजे या मौनात फक्त बोलणे बंद असते, पण आपला अंतर्व्यवहार चालूच असतो.

सर्व इच्छांचा उपशम होणे हा मौनाचा खरा अर्थ आहे. जेव्हा आपल्या मनात इच्छा निर्माण होते तेव्हा ती प्रथम वाणीच्या द्वारा शब्दांतून प्रकट होते. कारण वाणी हे सहजसुलभ साधन आहे. इतरांना शिकवण्याकरिता आपण वैखरीचा उपयोग करतो. आपण ऐकले आहे की, प्राचीन काळी उपदेश करताना तो मौनाने करीत. दक्षिणामूर्ति-स्तोत्रात ही कथा आली आहे. नैमिषारण्यातील ऋषिमुनींना काही शास्त्रसिद्धान्ताविषयी संदेह उत्पन्न झाला तेव्हा त्यांनी भगवान शिवाचे चिंतन केले. त्यावेळी भगवान शिव बालरूपात त्यांच्यासमोर प्रकट झाले आणि त्यांनी मौनानेच ऋषिमुनींना उपदेश केला.

**चित्रं वटतोर्मूले वृद्धाः शिष्या गुरुर्युवा।**
**गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्याः सुच्छिन्नसंशयाः।।**

शिष्य वृद्ध होते आणि गुरू बालक होता. गुरूने मौनानेच उपदेश केला आणि शिष्य संदेहमुक्त झाले. मौन धारण करून उपदेश करता येतो का? काही हावभाव करून. कागदावर लिहून मुखाने एक शब्दही न बोलता उपदेश करता येईल. परंतु हावभाव, लेखन इत्यादी न करता उपदेश कसा बरे करता येईल? मौनोपदेश ऐकण्यासाठी, समजण्यासाठी खूपच एकाग्रता हवी.

एका पाश्चात्त्य दार्शनिकाने जेव्हा हा श्लोक वाचला तेव्हा त्याने त्याचा अनुभव घेण्याचे ठरविले. आपल्या सर्व शिष्यांना बोलावून त्याने सांगितले की, ''मी तुम्हाला मौन उपदेश देऊ इच्छितो. आजपासून तुम्ही साऱ्यांनी एका खोलीत राहायचे आहे. कुणी कुणाशी बोलायचे नाही. तुमच्या मनात जर प्रश्न निर्माण झाला तर एक शब्दही न बोलता मनातल्या मनात तो सारखा विचारीत राहा. तुमच्या प्रश्नाचे उत्तर मी मौनानेच देईन, शब्दाने देणार नाही.''

सर्व शिष्यांनी आपल्या गुरूची आज्ञा शिरसावंद्य मानली आणि ते सारे एका खोलीत जमले. गुरूंनी त्यांना एक नियम सांगितला. ते म्हणाले की, ''तुम्ही सारे एकवीसजण आहात. तुम्ही साऱ्यांनी याच खोलीत राहायचे आहे. तुम्हाला वेळच्या वेळी अन्न-पाणी देण्याची व्यवस्था केलेली आहे. आसपास एवढी माणसे असताना प्रत्येक साधकाने या खोलीत मी एकटाच आहे अशी भावना बाळगावी. माझ्याशिवाय दुसरा कुणी या खोलीत आहे असा विचार तुमच्या चित्ताला स्पर्शू नये. जेव्हा तुम्ही दुसऱ्याकडे पाहाल तेव्हा तो दुसरा कोणी नसून मीच आहे अशा भावनेने पाहा. जर तुमच्यापैकी कुणाला ही साधना करताना त्रास झाला तर त्याने इतरांना कष्ट न देता, न बोलता निमूटपणे या खोलीबाहेर निघून जावे.''

एकवीस दिवसात वीस जण अशा प्रकारे बाहेर निघून गेले. आणि एकजण त्या खोलीत राहिला. चार माणसांत राहून मी एकटाच आहे, असा भाव मनात बाळगणे अत्यंत कठीण आहे. त्या खोलीत एकच शिष्य राहिला. तो एका कोपऱ्यात आणि गुरू दुसऱ्या कोपऱ्यात. दोघे एकमेकांशी एक शब्दही बोलत नसत. शिष्य डोळे बंद करून आपल्या मनाशीच प्रश्न विचारीत असे आणि गुरू तो प्रश्न जाणून त्याचे उत्तर मनातल्या मनात देत असे. गुरूने दिलेले उत्तर शिष्याच्या मनात निर्माण होत असे. अशाप्रकारे त्याचा प्रयोग सफल झाला.

हे कसे घडले? याचे आश्चर्य आपल्याला वाटेल. परंतु जो साधना करतो त्याला मात्र त्याचे आश्चर्य वाटत नाही. एखाद्या वेळी आपल्या आयुष्यात देखील असे सहज घडते. कोणीतरी मनुष्य आपल्याकडे येतो आणि आपल्याला वाटते की, तो अमुक काही बोलणार आहे तो नेमके तेच बोलतो. आपल्या आयुष्यात हे केव्हातरी घडते. परंतु साधकाच्या आयुष्यात हे नेहमीच घडते. आता आम्ही बोलत आहोत आणि तुम्ही ऐकत आहात. तुम्हाला थोडा फार बोध होत आहे. काही लोकांना तर सांगून देखील काहीच बोध होत नाही. त्याचे एकच कारण आहे. त्यांचे मन बोलणाऱ्याच्या शब्दांकडे नसते. ज्यांचे मन स्वत:च्या श्रवणेंद्रियाशी जुळलेले नसते त्याच्यासमोर कितीही बडबड केली तरी त्याला काही कळण्याची शक्यता नसते. वैखरीचा उपदेश कळण्यासाठी देखील मनाच्या एकाग्रतेची आवश्यकता असते. मनाची एकाग्रता वाढली की शब्दोच्चारापलीकडला उपदेश केला जात असे. तो ग्रहण करण्याची शक्ती कमी झाली तेव्हा सूत्ररूपाने उपदेश करण्याची प्रथा रूढ झाली. ब्रह्मसूत्र, योगसूत्र, व्याकरणसूत्र इ. सूत्रग्रंथ याचे प्रमाण होत. मनुष्याची प्रवृत्ती अधिकाधिक बहिर्मुख होत गेली. सूत्रांचाही अर्थ त्याला कळेनासा झाला, तेव्हा त्या सूत्रांचे स्पष्टीकरण करणारी भाष्ये लिहिली गेली. भाष्यग्रंथ कळेनासे झाले त्यावेळी त्याला टीका, व्याख्याने लिहिली गेली. अशाप्रकारे साहित्याची निर्मिती होत गेली. मनुष्याची अंतर्मुखता जेवढी कमी होते तेवढे त्याला अधिकाधिक समजावून सांगावे लागते.

प्रवचन महिनाभर चालू असते. त्यात कथा असतात, गाणी असतात, वाद्ये असतात, परंतु विवेचनाचा मूळ गाभा थोडाच असतो. 'सत्य बोलावे' एवढे एक सूत्र समजावून सांगण्यासाठी राजा हरिश्चंद्राची पूर्ण कथा सांगावी लागते. एवढे सांगून देखील मनुष्याच्या मनावर त्याचा प्रभाव पडत नाही. इतके मन विक्षिप्त आहे. त्याच्यावर प्रभाव पाडण्यासाठी इतर अनेक प्रकारचा मालमसाला बनवावा लागतो. आपल्याला भाजी खायची असते ती उकडून समोर ठेवली तर कुणी खाणार नाही. त्याच्यात तेल, मीठ, कांदा, हळद इ. अनेक गोष्टी मिसळाव्या लागतात. मग मात्र माणूस ती आवडीने खातो. 'वा, किती छान भाजी झाली आहे' असे मत व्यक्त करतो. खरेतर भाजीशिवाय इतर पदार्थ आरोग्याला हानिकारक असतात. परंतु तुमच्या जिभेसाठी मात्र ते आवश्यक असतात. ते नसतील तर तुम्ही भाजी खाणारच नाही. म्हणून कथा, उपकथा, पुराणे, महाकाव्ये इत्यादींची निर्मिती एखादे जीवनमूल्य रंगवून सांगावे यासाठीच झालेली आहे.

आपल्या वाणीवर नियंत्रण ठेवणे म्हणजे मौन. महिन्यात एक दिवस, आठवड्यात एक दिवस मौन धारण करणे म्हणजे आपल्या वाणीवर आणि आपल्या इच्छांवर नियंत्रण ठेवण्याचा अभ्यास होय. रोज बोलून बोलून आपण आपली शक्ती खर्च करीत असतो. जेव्हा एक दिवस तुम्ही बोलत नाही तेव्हा तुमचा थोडा शक्तिसंचय होतो. रात्री आपण झोपतो तेव्हा आपल्या सर्व इंद्रियांचे व्यवहार बंद असतात. डोळे पाहत नाहीत, कान ऐकत नाहीत. आणि झोपेत अशाप्रकारे आत्मानंदाचा अनुभव घेतो. दिवसभर इंद्रियांद्वारा जी शक्ती खर्च होते ती रात्री झोप घेतल्यामुळे पुन्हा संचित होते आणि ताजेतवाने होऊन दुसऱ्या दिवशी आपण पुन्हा व्यवहार करू शकतो. एखाद्या हौदात पाणी भरायचे असेल तर त्याचा बाहेरचा नळ बंद केला पाहिजे. तर त्यात पाणी साठेल. बाहेरचा नळ सुरू आहे आणि तुम्ही हौदात पाणी भरत आहात तर तो हौद भरणे कधीही शक्य नाही. आपली इंद्रिये त्या नळासारखी आहेत. दिवसभर त्यामधून शक्ती बाहेर वाहते. परंतु रात्री झोपेत आपण इंद्रियांची दारे बंद करून घेतो, शक्तिसंचय करतो आणि नव्या उमेदीने नव्या दिवसाला सामोरे जातो.

माणूस का थकतो? तर दिवसभर काम करून त्याच्या शक्तीचा ऱ्हास होत असतो. ती पुन्हा मिळविण्यासाठी

त्याला झोपेची नितांत आवश्यकता असते. इंद्रियांच्या द्वारा आपल्या शक्तीचा प्रतिक्षणी ऱ्हास होत असतो. त्यातही आपल्या वागेंद्रियाकडून सर्वाधिक शक्तीचा व्यय होत असतो. म्हणून जो माणूस कमीत कमी बोलतो त्याच्या शक्तीचा ऱ्हास कमी होऊन त्याचे शब्द प्रभावशाली होतात. एखादा मनुष्य आजारी असताना त्याच्या नातलगांना बोलवण्यासाठी समजा पत्र लिहिले की, 'याला अमुक अमुक आजार झाला आहे. तो खूप आजारी आहे. तेव्हा तुम्ही लवकर या, लवकर या' इ. पत्र मिळाल्यावर नातलग वाचतो. आपल्या सोयीने जाऊ असा विचार करतो. परंतु जेव्हा तुम्ही अधिक काही न लिहिता कमीत कमी शब्दांत तार करता Start Immediately.

तर तार हातात पडताक्षणीच मागचा पुढचा विचार न करता तो चट्कन स्टेशनवर जातो, तिकिट काढतो आणि निघून येतो. तारेत शब्द फार कमी असतात, पत्रात खूप असतात परंतु त्यांचा काही प्रभाव पडत नाही. प्रभाव पडतो तो कमी शब्दांचा. पत्रात तुम्ही शंभर शब्द लिहिता. त्यासाठी फक्त पंधरा पैसे खर्च होतात. तारेतल्या प्रत्येक शब्दाला मात्र २५-३० पैसे खर्च कावे लागतात.

यावरून आपल्या लक्षात येते की कमी शब्दाला जास्त किंमत असते आणि जास्त शब्दांना कमी किंमत असते. कमी बोलणाऱ्या मनुष्याचे चारदोन शब्द अत्यंत प्रभावी असतात आणि अखंड बडबड करणाऱ्या माणसाच्या हजारो शब्दांचा थोडादेखील प्रभाव पडत नाही. मौन धारण करणाऱ्या मनुष्याच्या शब्दाला अशी प्रतिष्ठा लाभत असते. मौन धारण करण्याचा आणखी एक लाभ असा आहे की मौनकाळात आपल्याला अंतरात्म्याचे चिंतन करण्याचा अवकाश मिळतो. आपल्या अंतरंगातील अनाहत नादाकडे लक्ष देण्याची संधी मिळते. मरितोंटदार्यांनी येथे म्हटले आहे- 'अनाहत्नादानुसन्धानहेतुत्वात्।'

नादाचे दोन प्रकार आहेत. आहत नाद आणि अनाहत नाद. वाद्यावर आघात करून जो नाद निघतो तो आहत् नाद. वाद्यावर आघात न करता जो नाद निर्माण होतो तो अनाहत् नाद. जेव्हा तुमचे मन अत्यंत एकाग्र होईल तुम्ही मौन धारण कराल तेव्हा बाहेरच्या शब्दांऐवजी तुम्हाला आतला शब्द ऐकू येईल.

प्रथम साधकाला आकारमौनाचा आधार घ्यावा लागेल. माणूस बोलतो अधिक पण लिहितो कमी. मनातील इच्छा प्रकट करण्यासाठी जेव्हा आपण बोलतो तेव्हा शब्दांचा जास्तीत जास्त वापर करतो. परंतु जेव्हा लिहितो तेव्हा मात्र शब्दांचा कमी उपयोग करतो. हेच आकारमौन होय. पुढे मात्र मौन अधिकाधिक दृढ होत गेले पाहिजे. कोणत्याही प्रकारे आपली इच्छा प्रकट होता कामा नये. कुणी जेवण पुढे आणून ठेवले तर जेवावे. आणून ठेवले नाही तर मागू नये. आपल्या इच्छेच्या पूर्तीसाठी काही प्रयत्न करू नये. या प्रकारे तुम्ही राहाल तर तुम्हाला आश्चर्य वाटेल की, तुम्हाला उपाशी मरावे लागणार नाही. वेळच्या वेळी सारे काही मिळेल. आपल्या इच्छेवर नियंत्रण ठेवून हळूहळू आपल्या मनात इच्छाच निर्माण होऊ नये असा प्रयत्न करता करता जेव्हा आपले मन निरीच्छ होते तेव्हा त्या मौनाला काष्ठमौन म्हणतात. काष्ठ म्हणजे लाकूड. लाकडाला आपण जड मानतो. त्याच्यावर कोणी बसले, ते कोणी खाली पाडले, कोणी त्यावर कुऱ्हाडीचा घाव घातला तरी त्या काष्ठाकडून कोणतीही प्रतिक्रिया होत नाही. काष्ठाला जाणीव नसते आणि ते जड (अचेतन) असते, परंतु तुम्हाला सारे काही कळत असून देखील तुम्ही त्या जडाप्रमाणे राहिले पाहिजे. 'जडवत् लोकमाचरेत्'. ज्ञानी पुरुष प्रपंचात जडाप्रमाणे व्यवहार करीत असतो. या प्रकारे आकारमौनाकडून काष्ठमौनाकडे साधकाची वाटचाल झाली पाहिजे. आकारमौन

आणि काष्ठमौन जेव्हा सिद्ध होते तेव्हा तेच प्राणलिंगार्चनेत घंटानाद ठरते. मौनाबद्दल जाणून घ्या. त्याचा अभ्यास करा. हळूहळू प्रगती होईल. मौन जसजसे साधत जाईल तसतशी अंतरंगात साधना दृढ होत जाईल.

विषयार्पण हे प्राणलिंगार्चनेतील तांबूल होय. आपल्या तांबुलात तीन वस्तू प्रमुख असतात. पान, सुपारी, चुना. आपल्या विषयव्यवहारात तीन गोष्टी मुख्य आहेत. प्रमाण, प्रमेय आणि प्रमातृ. याला त्रिपुटी असे म्हणतात. व्यवहार होण्यासाठी या त्रिपुटीची आवश्यकता असते. प्रमेय म्हणजे बाह्यवस्तू. उदा. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध इत्यादी. त्यांना जाणणारी ज्ञानेंद्रिये म्हणजे प्रमाण. उदा. शब्द जाणण्यासाठी कर्णेंद्रिय हे प्रमाण, रूपज्ञानासाठी नेत्रेंद्रिय हे प्रमाण, रसज्ञानासाठी रसनेंद्रिय हे प्रमाण. स्पर्शज्ञानासाठी त्वगेंद्रिय हे प्रमाण. या प्रमाणांच्या द्वारा जो अनुभव घेतो तो प्रमातृ. म्हणजे जीवात्मा हा प्रमाता, प्रमातृ. आपला जीवात्माच डोळ्यांनी पाहतो, कानाने ऐकतो, त्वचेने स्पर्श समजतो, नाकाने गंध हुंगतो आणि जिभेने रससेवन करतो. म्हणून प्रमेय, प्रमाण आणि प्रमातृ या त्रिपुटीशिवाय विषयव्यवहार होत नाही.

यांपैकी एक जरी कमी असेल तरी क्रिया पूर्ण होत नाही. एखाद्या जन्मांधाला डोळे नसतात. त्याची पाहण्याची इच्छाही असते. परंतु तेथे प्रमाण (डोळे) नसते, म्हणून तो पाहू शकत नाही. हीच अवस्था बहिऱ्याच्या बाबतीत सत्य आहे. जर प्रमातृ (जीवात्मा) निद्रा करीत असेल आणि त्यावेळी प्रमेय आणि प्रमाण उपस्थित असतील तर क्रिया घडणार नाही.

ही त्रिपुटी प्राणलिंगाला समर्पित कशी करायची? तर प्रमेयाला (विषयाला) प्रमाणात (इंद्रियांत) विलीन करावे. सर्व जगत् हे आपल्या ज्ञानाच्या आधीन आहे. या ज्ञानमंदिरात हजारो ग्रंथ आहेत. त्यांपैकी काही मुद्रित आहेत, काही हस्तलिखित आहेत. ते ठेवायला एवढी मोठी जागा लागते, एवढी कपाटे लागतात. परंतु त्या ग्रंथांचा अभ्यास करून त्यातील सारे ज्ञान आपण आपल्या छोट्याशा मेंदूत साठवून ठेवू शकतो. एवढ्या कमी जागेत ज्ञानाचा प्रचंड संग्रह करता येतो. अर्थात् सगळे जग हे आपल्या ज्ञानाच्या आधीन आहे. विषय लहान आहे आणि ज्ञान मोठे आहे. म्हणून आपण विषयाला ज्ञानात विलीन करू शकतो. नंतर त्या ज्ञानाला आपल्या प्रमातृमध्ये म्हणजे जीवात्म्यामध्ये विलीन करावे. ज्ञान कोठून निर्माण होते? तर आत्म्यातून निर्माण होते. ते जेथून निर्माण होते तेथेच ते विलीन होऊ शकते. विषय ज्ञानामध्ये विलीन करावे, ज्ञान जीवात्म्यामध्ये विलीन करावे आणि जीवात्म्याला परमात्म्यात विलीन करावे. या प्रमाणे प्रमेय, प्रमाण आणि प्रमातृ हे क्रमाने एकात एक विलीन करून शेवटी प्रमात्याला परमात्म्यात विलीन करणे म्हणजेच विषयसमर्पण होय. असे विषयसमर्पण हाच प्राणलिंगार्चनेत वाहिलेला तांबूल होय.

विषयभ्रान्तिराहित्यं तत्प्रदक्षिणकल्पना। प्रदक्षिणा हा एक नमस्कार आहे. आपण म्हणतो की,

**प्रकृष्टपापनाशाय प्रकृष्ट फलसिद्धये।**
**प्रदक्षिणं करोमीश प्रसीद परमेश्वर।।**

एकांग, त्र्यंग, पंचांग आणि साष्टांग या नमस्काराव्यतिरिक्त एक नमस्कार आहे. तो म्हणजे प्रदक्षिणा. प्रदक्षिणा-नमस्कार तीन प्रकारचा आहे. मंदिरासमोर डावीकडून उजवीकडे जाणे आणि उजवीकडून डावीकडे येणे ही एक प्रकारची प्रदक्षिणा होय. याच प्रकारे उजवीकडून डावीकडे आणि डावीकडून उजवीकडे येणे ही दुसऱ्या प्रकारची प्रदक्षिणा आहे. मंदिरासमोरून डाव्या भागाने निघून मंदिराभोवताली फिरून पुन्हा मूळ स्थानावर येणे ही सर्वसामान्य अशी गोलाकार प्रदक्षिणा होय. ब्रह्मचारी, वानप्रस्थाश्रमी आणि गृहस्थाश्रमी लोकांसाठी वेगवेगळ्या

प्रदक्षिणा सांगितल्या आहेत. परंतु 'शिवार्चनाचंद्रिके'त अप्पय दीक्षितांनी गोलाकार प्रदक्षिणा सर्वांसाठी आहे असे सांगितले आहे. म्हणून ही प्रदक्षिणा सर्वसामान्य ठरली आहे. प्रदक्षिणा करण्यापाठीमागे ईश्वराला सर्वभावे शरण जावे असा उद्देश आहे. भ्रांतीमध्ये एक भेदभ्रांती आहे. जीव-जीवातील भेद, जीव ईश्वरातील भेद, ईश्वर-जडातील भेद, जड-ईश्वरातील भेद आणि जड-जडातील भेद अशी पाच प्रकारची भेद भ्रांती होय. भेदभ्रांतीची निवृत्ती होणे हीच प्राणलिंगाला घातलेली प्रदक्षिणा होय. साऱ्या भेदांपासून मुक्त होऊन सारे भेद भगवद्रूपात विलीन करणे हीच प्रदक्षिणा आहे.

**बुद्धेस्तदात्मिका शक्तिर्नमस्कारक्रिया मता।।१२.१९।।**

आपली बुद्धीशक्ती तदाकार म्हणजे प्राणलिंगरूपी होणे हाच प्राणलिंगार्चनातील नमस्कार होय. प्राणलिंगाशिवाय अन्य कोणत्याही विचाराचा स्पर्श बुद्धीला न होणे आणि बुद्धी प्राणलिंगरूपी होणे हाच प्राणलिंगार्चनातील नमस्कार होय. प्राणलिंगाशिवाय अन्य कोणत्याही विचाराचा स्पर्श बुद्धीला न होणे आणि बुद्धी प्राणलिंगरूपी होणे यालाच येथे नमस्कार अशी संज्ञा दिलेली आहे. या प्रकारे अभिषेक-जलापासून नमस्कारापर्यंत अंतरंग-सामग्रीने प्राणलिंगार्चन कसे करावे या विषयीचे विवेचन केले आहे. शेवटी सांगतात की-

**एवंविधैर्भावशुद्धैरुपचारैरदूषितैः।**
**प्रत्यन्मुखमना भूत्वा पूजयेल्लिंगमान्तरम्।।१२.२०।।**

याप्रमाणे शुद्ध भावनेद्वारा अर्थात अदूषित अंतरंग-उपचारांनी अंतर्मुख होऊन आपल्या हृदयपीठावर विराजमान असलेल्या अंतर्लिंगाची-प्राणलिंगाची अर्चना करावी. प्राणलिंगार्चन करण्यासाठी आतापर्यंत सांगितलेले गुण साधकाने अंगी बाणविणे आवश्यक आहे. प्राणलिंगार्चन करण्यासाठी कोठे जावे लागत नाही, तर ती अंतरंगातील उपासना आहे. आपली खोडी काढणाऱ्या दोषी माणसाला जेव्हा तुम्ही क्षमा कराल तेव्हा समजा प्राणलिंगाला तुम्ही अभिषेक करीत आहात. जेव्हा तुमच्या मनात विवेकाचा उदय होईल तेव्हा समजा की तुम्ही प्राणलिंगाला वस्त्राने पुसत आहात. जेव्हा तुमच्या मनात वैराग्य निर्माण होईल तेव्हा जणू तुम्ही प्राणलिंगावर पुष्पहार अर्पण करीत आहात. जेव्हा तुमचे चित्त एकाग्र होईल तेव्हा समजा तुम्ही गंध लावीत आहात. जेव्हा तुमचा अहंकार नष्ट होऊन तुम्ही निरहंकार व्हाल तेव्हा समजा की प्राणलिंगाला तुम्ही अक्षता वाहिली आहे. जेव्हा तुमच्या मनात श्रद्धा निर्माण होईल तेव्हा असे समजा तुम्ही प्राणलिंगासमोर धूप जाळला आहे. जेव्हा तुमच्या हृदयात ज्ञान प्रकाशेल तेव्हा समजा तुम्ही प्राणलिंगासमोर दीप प्रज्वलित केला आहे. जेव्हा भ्रान्तिमूलक अज्ञान तुम्ही ईश्वराला अर्पण कराल तेव्हा समजा की तुम्ही नैवेद्य दाखवीत आहात. जेव्हा तुमचे मौन सिद्ध होईल तेव्हा समजा प्राणलिंगासमोर तुम्ही घंटानाद करीत आहात. तुम्ही विषयार्पण कराल तेव्हा समजा की तुम्ही तांबूल देत आहात. तुमच्या मनातून भेदभ्रांती नष्ट होईल तेव्हा समजा की प्राणलिंगाला तुम्ही प्रदक्षिणा घातली आणि जेव्हा तुमची बुद्धी प्राणलिंगस्वरूप होईल तेव्हा समजा की प्राणलिंगाला तुम्ही नमस्कार केला आहे. अशा प्रकारे अंतर्मुख होऊन भावपुष्पांनी अंतस्थित प्राणलिंगाची पूजा करावी. व्यवहार करत असताना देखील साधकाने अशी भावपूजा केली पाहिजे. असे उत्तमोत्तम गुण साधकाने आपल्या अंगी बाणविण्याचा प्रयत्न करावा आणि ते सारखे वाढवीत राहावे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
८ एप्रिल १९९२

## शिवयोगसमाधिस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालपर्यंत प्राणलिंगार्चनस्थलावरील विवेचन आपण ऐकले. प्राणलिंगिस्थलातील साधक आपल्या अंगी उत्कृष्ट गुण बाणवतो आणि आपल्या आचरणाने इतरांना सन्मार्गाचा आदर्श घालून देतो. आदर्शाचा उपदेश करणे आणि आदर्शाचे आचरण करणे अशा दोन मार्गांनी लोकप्रबोधन करता येते. केवळ उपदेश करण्यापेक्षा जर आचरण केले तर त्याचा लोकांवर अधिक प्रभाव पडतो. प्राणलिंगार्चनस्थलातील साधक अंतर्मुख होऊन उत्कृष्ट गुणांचा संग्रह करतो आणि लोकांना मार्गदर्शक ठरून त्यांनाही आपले आयुष्य उजळून घेण्याची प्रेरणा देतो. यानंतर त्या साधकाची स्थिती कशी होते याविषयी शिवयोगसमाधिस्थल या पुढील अवांतर स्थलात सांगितले आहे-

**अन्त: क्रियारतस्यास्य प्राणलिंगार्चनक्रमै:।**
**शिवात्मध्यानसम्पत्ति: समाधिरिति कथ्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.२१)

महर्षी पतंजलीचे एक सूत्र आहे- 'योग: चित्तवृत्तिनिरोध:' चित्तवृत्तींचा निरोध करणे यालाच पतंजलींनी योग असे म्हटले आहे. मनोवृत्तीला काहीतरी आलंबन (आधार) हवे. एखादी वेल कोणता तरी आधार घेतल्याशिवाय राहू शकत नाही. मग तो आधार बाह्य असो वा अंतरंगातील असो. लहान मुले मातीत खेळता खेळता माती देखील खातात, त्यांना तेथून उठवून आपण शिक्षा केली तरी ती आपले काही ऐकत नाहीत. मातीऐवजी दुसरे काहीतरी त्यांच्या हाती द्यावे लागते. आपले मन एखाद्या लहान मुलासारखे असते. जागृतावस्था असो की स्वप्नावस्था, मनोव्यापारासाठी काही ना काही आधार लागतोच. जागृतावस्थेत बाह्य वस्तू मनाला आधार देतात, तर स्वप्नावस्थेत मन स्वत:च एक अंतर्विश्व निर्माण करते आणि त्यावर त्याचे मनोव्यापार चालू असतात. सुषुप्ति-अवस्थेत मात्र मनाला कोणतेही आलंबन लागत नाही. मनाला बाह्य वस्तूंच्या चिंतनापासून मुक्त करायचे असेल तर त्याला त्यापेक्षाही उत्कृष्ट असे अंतरंगातील काहीतरी दिले पाहिजे. मनाला काही आधार दिल्याशिवाय रोखता येणे शक्य नाही. त्याला खेळण्यासाठी, आनंद घेण्यासाठी काहीतरी आलंबन हवेच असते. मनाची बाह्य प्रकृती रोखण्यासाठी शिवयोगात त्याला शिवतत्त्वाचे चिंतन करण्याचे वळण दिले जाते. प्राणलिंगार्चनात क्षमा-जलाच्या अभिषेकापासून ते नमस्कारापर्यंत ज्या क्रिया सांगितल्या आहेत त्या बाह्य नसून अंतर्गत आहेत. प्राणलिंगार्चनात अंतरंगक्रिया करण्यात तत्पर असलेल्या प्राणलिंगी साधकाच्या शिवजीवसामरस्याच्या अनुसंधान-संपत्तीला शिवयोगसमाधी असे म्हटले जाते. परमात्म्याला आपल्या आत्मरूपात पाहून त्याचे कसे चिंतन केले जाते त्याविषयी येथे सांगतात-

**सर्वतत्त्वोपरिगतं सच्चिदानन्दभासुरम्।**
**स्वप्रकाशमनिर्देश्यमवाङ्मानसगोचरम्।।१**

उमाख्यया महाशक्त्या दीपितं चित्स्वरूपया।
हंसरूपं परात्मानं सोऽहंभावेन भावयेत्।
तदेकतानतासिद्धिः समाधिः परमो मतः।।१२.२२-२३।।

ज्या परमात्मतत्त्वाचे आपल्या आत्म्याशी तादात्म्य करायचे आहे त्याचे स्वरूप कसे आहे? यापूर्वी आपण ऐकले आहे की, वीरशैवसिद्धान्तात हे संपूर्ण विश्व अर्थात् प्रपंच तत्त्वात्मक आहे असे मानले जाते. पृथ्वीपासून ते शिवापर्यंत सर्वांना 'तत्त्व' असे संबोधिले जाते. भगवान शिवाची दोन रूपे मानली जातात. विश्वात्मा आणि विश्वोत्तीर्ण. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश ही सारी तत्त्वे परमात्मस्वरूप मानणे हेदेखील परमात्मस्वरूपाला एकप्रकारे जाणणेच होय. या सिद्धान्तात जी छत्तीस तत्त्वे सांगितली आहेत ती परमात्म्यापेक्षा वेगळी नाहीत. परमात्माच छत्तीस तत्त्वांच्या रूपात आपल्यासमोर प्रकट झाला आहे. हे परमात्म्याचे रूप विश्वात्मक आहे. यामुळे त्याला 'विश्वात्मा' अशी संज्ञा आहे. परमात्मा जसा तत्त्वात्मक आहे आणि तसाच तो तत्त्वातीतही आहे. छत्तीस तत्त्वात्मक सृष्टीला आपण प्रपंचरूप परमात्मा म्हणू शकतो आणि यापेक्षा विलक्षण असा जो परमात्मा आहे त्याला परशिव, परब्रह्म, परशिवलिंग असे म्हटले जाते. असा हा तत्त्वातीत परमात्मा कसा आहे तर 'सच्चिदानंदभासुरम्'. तो सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप आहे. विश्वात्मा-परमात्मा हा नामरूपात्मक आहे.

प्रपंच पाच प्रकारचा असतो. सत्, चित्, आनंद, नाम आणि रूप. प्रपंच नामरूपात्मक असून सच्चिदानन्दरूपदेखील आहे. परंतु नामरूपापेक्षा विलक्षण असा परमात्मा मात्र केवळ सच्चिदानंदरूपच आहे. तो स्वयंप्रकाशित आहे. प्रत्येक वस्तूला प्रकाशित करण्यासाठी प्रकाशाची आवश्यकता असते. परंतु परमात्म्याला प्रकाशित करण्यासाठी अन्य कोणत्याही प्रकाशाची आवश्यकता नाही. जड पदार्थाला प्रकाशित करण्यासाठी प्रकाश हवा असतो, परंतु जे जड नाही अशा चैतन्याला प्रकाशित करायला दुसऱ्या प्रकाशाची गरज नसते. समजा दोन वेगवेगळ्या घड्यात काही वस्तू ठेवलेल्या आहेत, त्यांपैकी एकात काच, दगड, इत्यादी वस्तू आहेत आणि दुसऱ्यात अत्यंत तेजस्वी असे रत्न ठेवलेले आहे. पहिल्या घड्यातील वस्तू पाहण्यासाठी माणसाला प्रकाशाची आवश्यकता भासते. परंतु दुसऱ्या घड्यातील रत्न पाहण्यासाठी प्रकाशाची आवश्यकता भासणार नाही. कारण ते रत्नच मुळी स्वयंप्रकाशित आहे. सूर्याला पाहण्यासाठी आपल्याला दुसऱ्या प्रकाशाची गरज लागते काय? आपण सूर्याला सूर्याच्याच प्रकाशात पाहत असतो. सूर्याला झाकणारे ढग देखील आपण सूर्याच्याच प्रकाशात पाहत असतो. सूर्याच्या प्रकाशाने संपूर्ण विश्व प्रकाशित होते. सूर्य हा स्वयंप्रकाशित आहे. नक्षत्र-तारे देखील स्वयंप्रकाशीत आहेत असे आपण लौकिकदृष्ट्या मानतो. आपले शास्त्र मात्र असे म्हणते की, सूर्यदेखील स्वयंप्रकाशित नाही. सूर्याला जो प्रकाश मिळाला तो देखील परमात्म्याकडूनच. 'यद्भासा भासते विश्वम्।'

प्रपंचात जो काही प्रकाश आहे तो केवळ परमात्म्यापासूनच आलेला आहे. आपल्याला स्वप्ने पडतात तेथे सूर्य नसतो किंवा अन्य कोणताही प्रकाश नसतो. तरी आपल्याला स्वप्ने कशी दिसतात? कशाच्या प्रकाशात दिसतात? 'न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकम्। नेभा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः।' या श्रुतिवचनाप्रमाणे स्वप्नात सूर्याचा, नक्षत्रांचा, चंद्राचा, विद्युत्दीपांचा अथवा अग्नीचा देखील प्रकाश नसतो तर मग कोणता प्रकाश असतो? तर तो आपल्या आत्म्याचाच प्रकाश होय. अर्थात् आपला आत्माच स्वयंप्रकाशित आहे. तो परमात्मा कसा आहे? तर अनिर्देशम्. म्हणजे तो असाच आहे, तो तसाच आहे असे ज्याच्याविषयी सांगता येत नाही असा. तो मनाचा आणि वाणीचा विषय नव्हे. वाणी आदी इंद्रिये आणि मन यांना तो अप्राप्य आहे. वाक् आणि मन

यांना तो अगोचर आहे. परंतु वाङ्मयात त्याचे वर्णन केलेले आढळते, तर ऋषिमुनींनी आपल्या मनाच्या द्वारा त्या तत्त्वाला जाणले आहे.

जर आपण वाणीने त्याचे वर्णन करू शकत नाही आणि मनाने त्याचे ध्यान करू शकत नाही तर आम्हाला त्याचा काय उपयोग? मग आम्ही परमात्म्याचा कशाला विचार करायचा? प्रपंचातच रमायला काय हरकत आहे? असा प्रश्न काही लोकांना पडेल. येथे सांगण्याचे तात्पर्य असे की, जे मन अशुद्ध आहे त्या मनाला परमात्मा अगोचर आहे. विषयवासनेने बरबटलेले मन अशुद्ध होय. अशा माणसाला कितीही तत्त्वोपदेश केला तरी पालथ्या घड्यावर पाणी ओतल्यासारखे होईल. विषयासक्त मनुष्याच्या मनाचे दारच बंद असते. एका कवीने म्हटले आहे की अंधार पडला की, जशी दृष्टी क्षीण होत जाते तसे व्यसनी व्यक्तीसाठी परमात्म-ज्ञान अंधाराप्रमाणे होते. 'व्यसनिन इव ज्ञानं व्यर्थतामेति चक्षुः' व्यसनमुक्त मनालाच परमात्म्याचा बोध होऊ शकतो.

परमात्मा शक्तिविशिष्ट असून तो उमारूपी चित्स्वरूप महाशक्तीमुळे प्रकाशित दिसतो. परमात्मा हा हंसरूप आहे. हंस जसा मानससरोवरात राहतो तसा भक्ताच्या मनरूपी सरोवरात परमात्मा विहार करतो. म्हणून तो हंसरूपी होय. या हंसाला जे जाणतात त्यांना 'परमहंस' म्हणतात. हंसरूपी परमात्म्याचे चिंतन कसे करायचे? तर 'सोऽहम् = सः अहम्' ('तो मीच आहे') अशा भावनेने. प्रत्येक जीव आपल्या सत्यस्वरूपाला विसरून फक्त 'अहं अहं' असे म्हणत असतो.

मरितोंटदार्यांनी आपल्या व्याख्यानात उत्तम प्रकारे स्पष्टीकरण केले आहे. अध्व हे सहा प्रकारचे आहेत. वर्णाध्व, पदाध्व, मन्त्राध्व, भुवनाध्व, तत्त्वाध्व, कलाध्व. अध्व म्हणजे मार्ग. परमतत्त्वाला जाणण्याचे हे सहा मार्ग होत. त्यामधील तत्त्व जीवात्म्याला बंदिस्त करतात. अकारापासून हकारापर्यंत जे वर्ण आहेत त्यांना वर्णाध्व म्हणतात. या वर्णाध्वरूपी पाशाने जीवात्मा बांधला गेला असल्यामुळे तो सारखा 'अहम् अहम्' असे म्हणत असतो. जागृतावस्था असो की स्वप्नावस्था, त्याचा सारखा 'अहम् अहम्' असाच जप चाललेला असतो. अहम् हे त्याच्या बंधनाचे कारण आहे. या बंधनातून सुटण्यासाठी अहम् सोडून 'सोऽहम्' 'सोऽहम्' असे म्हटले पाहिजे. 'अहम्' म्हटल्याने केवळ शरीर आणि शरीराशी संबंधित वस्तू यातच त्याचा अभिमान राहतो, परंतु 'सोऽहम्' म्हटल्याने त्याच्या अभिमानाची व्याप्ती वाढते.

अहंकार दूर करण्याचे दोन मार्ग आहेत. 'अहम्' म्हणणे सोडून देणे हा एक. हे जमत नसेल तर 'सोऽहम् सोऽहम्' म्हणणे हा दुसरा. 'अहम्' हा मर्यादित आहे तर 'सोऽहम्' हा व्यापक आहे. अहम्‌मध्ये व्यष्टिभाव आहे तर सोऽहम्‌मध्ये समष्टिभाव आहे. ज्याच्याजवळ व्यष्टिभाव आहे तो जीवात्मा आणि ज्याच्याजवळ समष्टिभाव आहे तो परमात्मा. व्यष्टिभावामुळे रागद्वेष इत्यादी विकार निर्माण होतात आणि त्यामुळेच अनुकूल अथवा प्रतिकूल कर्मे मनुष्याकडून घडतात. ज्याविषयी आपल्या मनात अनुराग आहे ते आपल्याला अनुकूल वाटते आणि ज्याविषयी द्वेष आहे ते प्रतिकूल वाटते. राग-द्वेषामुळे अनुकूल-प्रतिकूल ज्ञान होते आणि त्यामुळे आपण काही चांगली कर्मे करतो तर काही वाईट कर्मे करतो. आपल्याला जी अनुकूल वाटतात त्यांच्यासाठी आपण चांगली कर्मे करतो. आपल्याला जे प्रतिकूल वाटतात त्यांच्यासाठी वाईट कृत्ये करतो. शास्त्र-अनुकूल कर्माला 'विहितकर्म' म्हणतात तर शास्त्र-प्रतिकूल कर्माला 'निषिद्ध कर्म' म्हणतात. विहितकर्मातून पुण्य निर्माण होते तर निषिद्ध कर्मातून पाप उत्पन्न होते.

मुनष्याच्या जन्ममरणाला हे पुण्य-पापच कारणीभूत होते. या पुण्य-पापरूपी कर्मामुळेच जीवात्मा 'पुनरपि

जननं पुनरपि मरणं पुनरपि जननी जठरे शयनम्' असा जन्ममरणाच्या चक्रात भरडत राहतो. याप्रमाणे व्यष्टिभाव हा जन्म-मरणाचे कारण ठरतो. जर तुमच्या ठिकाणी समष्टिभाव असेल तर तुम्ही कुणाशी मैत्री कराल? कुणाशी शत्रुत्व कराल? मैत्री करण्यासाठी आपल्यापेक्षा कुणीतरी वेगळा मनुष्य हवा आणि शत्रुत्व करण्यासाठी देखील कुणीतरी वेगळा हवा. समष्टिस्थितीत जाणाऱ्या योग्याच्या दृष्टीत प्रपंचातील सर्व लोक आत्मरूप होतात, म्हणून त्याच्या दृष्टीने कोणी मित्र नसतो की शत्रू. कोणाशी द्वेष नसतो की कुणावर प्रेम. हसंरूप परमात्म्याचे चिंतन करताना व्यष्टिभाव नष्ट होऊन साधकाच्या ठिकाणी समष्टिभाव येतो. व्यष्टिभावाची निवृत्तीच जीवात्म्याच्या कल्याणाचा मार्ग ठरते. व्यष्टिभावाने तो बंधनात पडतो तर समष्टिभावाने तो मुक्त होतो.

सोऽहम् भाव जेव्हा एकतान होतो, तेलाच्या अंखड धारेप्रमाणे होतो. तेव्हा त्याला शिवयोगसमाधी म्हणतात. तुम्ही काहीवेळा 'सोऽहम' 'सोऽहम' म्हणाल. नंतर हळूच कधी 'अहम्' म्हणायला लागाल हे कळणारदेखील नाही. त्यासाठी एकतानता हवी. केवळ ध्यान करतानाच सोऽहंभाव असावा असे नाही तर कोणतेही कार्य करताना देखील तो अखंड असला पाहिजे. जोपर्यंत आपल्या मनात एकाग्रतेने सोऽहम ध्यान होत असते तोपर्यंत त्याला समाधी म्हटले पाहिजे. ही समाधी पाच मिनिटांची असेल, दहा मिनिटांची असेल, दिवसभराची असेल अथवा संबंध आयुष्यभराची असेल. साधना जशी अधिकाधिक वाढत जाते तसतसा हा समाधिकाल वाढत जातो. प्राणलिंगाची अर्चना संपल्यानंतर ते प्राणलिंग म्हणजे मीच आहे असे सोऽहंभावाने त्याचे अखंड चिंतन करणे हीच शिवयोग समाधी होय. प्राणलिंगिस्थलातील साधक समाधीस्थ कसा होतो त्याविषयी पुढे सांगतात-

**परब्रह्म महालिंगं प्राणो जीवः प्रकीर्तितः।**
**तदेकभावमननात् समाधिस्थः प्रकीर्तितः।।१२.२४।।**

प्राणलिंगाची व्याख्या अत्यंत सुरेख केली आहे. प्राण म्हणजे जीव आणि लिंग म्हणजे शिव. मी जो जीव आहे तो शिवच आहे असे सतत चिंतन करणे हीच प्राणलिंगार्चना होय. परशिवब्रह्माला लिंग अथवा महालिंग अशी संज्ञा आहे. प्राण याचा अर्थ जीव असा होय. प्राण आणि लिंग यांच्या एकत्वाचे मनन करणाऱ्या पुरुषाला समाधिस्त शिवयोगी म्हणतात. श्रवण, मनन, निदिध्यास असे तीन टप्पे आहेत. श्रवण म्हणजे ऐकणे, ज्याचे श्रवण केले त्याचेच मनन केले ज़ाते. ऐकलेल्या गोष्टींचे चिंतन करताना त्याशिवाय अन्य मनोवृत्तींना हटविणे म्हणजे मनन होय. प्रतिकूल वृत्तींना दूर सारून अनुकूल वृत्ती कायम ठेवण्याचा निरंतर प्रवास म्हणजे मनन. सोऽहम् म्हणताना अहम् मध्ये आला तर त्याला हटवून सोऽहंभाव सतत जागता ठेवणे हेच मनन होय. अशा साधकालाच समाधिस्थ म्हणतात. समाधिस्थ म्हणजे समाधीत राहणारा. व्यष्टिअहंभाव सोडून समष्टि सोऽहंभावाचे जेवढा काळ तो मनन करतो तेवढ्या काळापर्यंत त्याला समाधिस्थ असे म्हणतात. हृदयस्थ प्राणलिंगाची अर्चना करता करता ऊर्ध्वगामी कसे होता येते आणि योगशास्त्रात सांगितलेल्या षट्चक्रांत साधकाने कोणकोणती भावना करावी याविषयीचा विचार आपण उद्या करू. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
९ एप्रिल १९९२

## शिवयोगसमाधिस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

प्राण म्हणजे जीव आणि लिंग म्हणजे शिव. प्राण–लिंगाचे अभेदभावाने जो चिंतन करतो तोच समाधिस्थ होय, असे आपण काल ऐकले आहे. शिवयोगसमाधीची साधना करणारा साधक आपल्या आत्म्याला परमात्म्याशी एकरूप करतो. या सामरस्याचे चिंतन करण्यासाठी काही प्रक्रिया पुढील श्लोकात सांगितल्या आहेत.

**अन्तः षट्चक्ररूढानि पंकजानि विभावयेत्।**
**ब्रह्मादिस्थानभूतानि भ्रूमध्यान्तानि मूलतः।।**
**भ्रूमध्यादूर्ध्वभागे तु सहस्रदलमम्बुजम्।**
**भावयेत्तत्र विमलं चन्द्रबिम्बं तदन्तरे।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.२५,२६)

ध्यानाची प्रक्रिया शिवयोगानुसार येथे वर्णन केली आहे. आपल्या जड शरीराच्या आत एक सूक्ष्म शरीर असते याची बऱ्याच लोकांना जाणीव नसते. जे दिसते तेच केवळ सत्य आहे असे मानण्याची त्यांची प्रवृत्ती असते. अत्यंत अज्ञ माणसाला देखील आयुष्यात कधीतरी या सूक्ष्म शरीराचा अनुभव येतो. घरात कुणी मरण पावला तर त्याच्या प्रेताभोवती बसून सारेजण शोक करतात. तेव्हा त्यांना जाणवते की हे जे दिसणारे शरीर आहे ते मुख्य नव्हे, या शरीराच्या आत एक चैतन्यतत्त्व होते, त्याने शरीर सोडल्यामुळे हे शरीर अचेतन होऊन पडले आहे. दैनंदिन व्यवहारात मात्र या आतल्या चैतन्याची जाणीव माणसाला नसते. शास्त्राध्ययन करणाऱ्या मनुष्याला आत्मतत्त्वाचे पुनः पुन्हा चिंतन घडते म्हणून त्याला त्याचे सदैव भान असते. सामान्य मनुष्याला मात्र क्वचित कुठे मृत्यू पाहिला तरच त्याचे ज्ञान होते. सतत हालचाल करणारे, सतत बडबड करणारे, ज्याच्या हृदयाचे स्पंदन नित्य होत होते, ज्याच्या रक्तवाहिन्यांमधून प्रचंड गतीने रक्त प्रवाहित होत होते, ज्याचा श्वासोच्छवास अखंड चालू होता असे हे शरीर–यंत्र अचानक कशामुळे बंद पडले? याचा विचार सामान्य माणूस देखील मृत्यू पाहिल्यावर करू लागतो. एरवी मात्र त्याला याची जाणीव नसते.

जर सूक्ष्म शरीराचीच जाणीव सामान्य माणसाला नसते तर त्या सूक्ष्म शरीरात राहणाऱ्या सूक्ष्म चक्रांची जाणीव त्याला कशी असेल? त्या चक्रांचेच भावनामय ध्यान करण्याविषयी येथे सांगितले आहे. सहा चक्रांत सहा प्रकारच्या कमळांची भावना साधकाने करावी. मूलाधारपासून ते भ्रूमध्यापर्यंत सहा चक्रे असून त्या प्रत्येकाच्या ठिकाणी एकेका कमलाची भावना करायला हवी. आपल्या गुदस्थानाला मूलाधार–चक्र अथवा आधार–चक्र म्हणतात. या मूलाधार–चक्रात चार दलांच्या कमलाची भावना करावी. योग्यांनी सांगितल्याप्रमाणे त्या ठिकाणी चार पाकळ्यांच्या कमलाची भावना केली आणि साधना दृढ होत गेली तर तेथे त्या कमलाचा साक्षात्कार होईल. जोपर्यंत त्या ठिकाणी आपण ध्यान देत नाही तोपर्यंत त्याचे आपल्याला ज्ञान होत नाही. आपल्याच घरात अनेक वस्तू आपण ठेवलेल्या असतात. पण एखाद्याने अमुक वस्तू कुठे ठेवलेली आहे असे विचारले तर आपल्याला चटकन सांगता येत नाही. घर आपलेच असते, वस्तू आपणच ठेवलेल्या असतात. तरीदेखील विस्मरणामुळे

आपली अशी अवस्था होते. आपण ठेवलेलीच वस्तू जेव्हा आपल्याला सापडत नाही तेव्हा एका ठिकाणी शांत बसून आपण आपले मन एकाग्र करतो आणि ती वस्तू कोठे ठेवली आहे हे आठवण्याचा प्रयत्न करतो. असे ध्यान केले तर काही वेळाने ती वस्तू कोठे ठेवली ते आपली बुद्धी आपल्याला सांगते. कारण बुद्धीत सारे संस्कार सुरक्षित असतात. तुम्ही जे पाहता, जे ऐकता, जे करता त्याचा संस्कार तुमच्या बुद्धीवर होत असतो. काही संस्कार दृढ असतात. तर काही संस्कार क्षीण असतात. दृढ संस्कारांचे वारंवार स्मरण होते तर क्षीण संस्कारांचे विस्मरण होते. ते संस्कार प्रयत्नपूर्वक आठवून जागे करावे लागतात.

घरातील स्थूल वस्तूंचे स्मरण करण्यासाठी काही प्रयत्न करावे लागतात. त्याप्रमाणे आपल्या शरीराच्या आत काय आहे ते पाहण्यासाठी प्रयत्नांची आवश्यकता असते. आम्ही मागे सांगितले आहे की, ज्याप्रमाणे आपण आपले शरीर संपूर्णपणे पाहू शकतो, त्याप्रमाणे शिवयोगी देखील आपल्या शरीराच्या आतले सारे अवयव प्रत्यक्ष पाहू शकतो, एवढेच नव्हे तर सूक्ष्म शरीराचा देखील त्याला साक्षात्कार होतो. बाहेरची वस्तू पाहायला आपल्याला डोळ्यांची आवश्यकता असते, परंतु शरीराच्या आतले पाहण्यासाठी डोळ्यांची नव्हे तर मनाची, बुद्धीची आवश्यकता असते. मनोवृत्तींना केवळ आत वळवणे एवढेच काम आहे. जसजशी ती आत वळत जाईल तसतसे तिच्यासमोर अंतरंग खुले होत जाते. योगीपुरुषाने मनोवृत्ती अंतर्मुख करून ज्या ठिकाणी ज्या कमळांचे दर्शन घेतले तसे दर्शन घडण्यासाठी आपल्याला त्यांनी सांगितल्याप्रमाणे भावना केली पाहिजे.

गुदस्थानात आधार-चक्रावर चार पाकळ्यांच्या कमलाची भावना करावी. गुह्यस्थानावर स्वाधिष्ठान-चक्रात सहा पाकळ्यांच्या कमलाची भावना करावी. नाभिस्थलावर मणिपूर-चक्रात दहा पाकळ्यांच्या कमलाची भावना करावी. हृदयस्थानी अनाहत-चक्रात बारा पाकळ्यांच्या कमलाची भावना करावी, तर कंठस्थानावर विशुद्धी-चक्रात सोळा पाकळ्यांच्या कमलाची भावना करावी, तर भ्रूमध्यातील आज्ञा-चक्रात दोन पाकळ्यांच्या कमलाची भावना करावी. अशा प्रकारे आधार-चक्र, स्वाधिष्ठान-चक्र, मणिपूर-चक्र, अनाहत-चक्र, विशुद्धी-चक्र आणि आज्ञा-चक्र अशी सहा-चक्रे आपल्या सूक्ष्म शरीरात विद्यमान आहेत.

आधार-चक्रापासून ते आज्ञा-चक्रापर्यंत आपली मनोवृत्ती वर आल्यानंतर तिला आणखी वर न्यायचे आहे. ते कसे? तर भ्रूमध्याच्या वर आपल्या मस्तकात अगदी वर सहस्र पाकळ्या असलेल्या कमलाची भावना करावी. या ठिकाणाला सहस्रार-चक्र असे म्हटले जाते. सहस्रार-चक्राच्या मध्यभागी एका शुभ्र, शीतल चंद्रबिंबाची भावना करावी. त्या चंद्रबिंबाच्या मध्यभागी अत्यंत सूक्ष्म अशा रंध्राची भावना करावी. या सूक्ष्म रंध्रालाच 'कैलास' असे म्हणतात. भगवान शिव हे कैलासवासी आहेत, अर्थात ते कैलास पर्वतावर राहतात असे आपण ऐकतो. कैलास जसा बाहेर आहे तसाच तो आपल्या आत देखील आहे. शास्त्रकारांनी म्हटले आहे की- 'यद्‌यद् ब्रह्मांडे तद्‌तद् पिण्डाडे' जे काही ब्रह्मांडामध्ये आहे ते सारे काही आपल्या पिण्डामध्ये म्हणजे शरीरामध्ये आहे. बहिर्मुखी वृत्तीचा माणूस ब्रह्मांडात शोध घेतो तर अंतर्मुख वृत्तीचा मनुष्य आपल्या पिंडात शोधतो.

सहस्रार कमलाच्या मध्यभागी चंद्रमंडल आहे, चंद्रमंडलाच्या मध्याभागी सूक्ष्म रंध्र आहे. ते रंध्र म्हणजेच कैलास आहे असे मानले पाहिजे. आणि त्याठिकाणी त्या सर्व कारणांचा कारण असा शंभू परमात्मा अर्थात् भगवान शिव विराजमान आहेत अशी भावना करावी. बाह्य विश्वात कैलासपर्वत हा सगळ्यांपेक्षा उन्नत स्थानी आहे, त्याप्रमाणे आपले मस्तक हे शरीरातील सर्वात उन्नत स्थान होय. या प्रकारे आपल्या अधोमुख मनोवृत्तीला आधार-चक्रापासून ते ब्रह्मरंध्रापर्यंत ऊर्ध्वमुख करीत नेले पाहिजे. ज्याची मनोवृत्ती अधोमुख असते त्याचा

बाह्यविश्वाकडे कल असतो परंतु ज्याची मनोवृत्ती ऊर्ध्वमुख असते त्याला अंतर्विश्वामध्ये स्वारस्य वाटते. 'ऊर्ध्व गच्छन्ति सत्त्वस्था:'

सात्त्विक मनुष्याची गती ऊर्ध्व असते, असे गीतेत भगवंतांनी सांगितले आहे. आपण व्यवहारात पाहतो की पाणी जेव्हा बर्फरूपात असते तेव्हा तो बर्फ एका ठिकाणी ठेवता येतो, तो स्थिर राहतो. परंतु ते विरघळून त्याचे पाणी झाले तर ते पाणी मात्र उताराकडे वाहून जाते. त्याच पाण्याला उष्णता दिली तर त्याची वाफ होऊन ते ऊर्ध्वगामी होते. पाण्याच्याच याच या तीन अवस्था होत. बर्फ, पाणी आणि वायू. तमोगुणी मनुष्य हा बर्फासारखा स्थिर (आळशी), रजोगुणी मनुष्य हा पाण्यासारखा वाहणारा, कार्यरत असा आणि सत्त्वगुणी मनुष्य वाफेसारखा वर जाणारा ऊर्ध्वगामी. जो सात्त्विक असतो त्याचे विचार ऊच्च दर्जाचे असतात. आध्यात्मिक क्षेत्रात त्याची प्रगती अत्यंत वेगाने होते.

या प्रकारे मनोवृत्ती ऊर्ध्वगामी करीत आधारचक्रापासून ते सहस्रारकमलापर्यंत न्यावी. येथे सूक्ष्मरंध्र म्हणजे कैलास असून तेथे भगवान शिवाचे वास्तव्य असते अशी भावना करून त्याचे सतत चिंतन करीत जो ध्यानमग्न असतो तोच समाधिस्थ होय.

**बहिर्वासनया विश्वं विकल्पार्थं प्रकाशते।**
**अन्तर्वासितचित्तानामात्मानंद: प्रकाशते।।१२.२८।।**

मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ती बहिर्मुख असते, अंतर्मुख नसते. उपनिषदांत म्हटले आहे-

**परांचिखानि व्यतृणत् स्वयंभू।**
**तस्मात् परांगपश्यति नान्तरात्मन्।।**

वास्तविक आपला आत्मा हाच दर्शन योग्य आहे. 'आत्मा वा अरे द्रष्टव्य: मन्तव्य: निदिध्यासितव्य:' तुम्हाला पाहायचे आहे तर आत्म्याला पाहा. तुम्हाला श्रवण करायचे आहे तर आत्म्याचे वर्णन करणारी शास्त्रे ऐका, तुम्हाला चिंतन करायचे आहे तर आत्मचिंतन करा, त्याचा निदिध्यास करा. आत्मा दर्शनीय असून देखील आत्मदर्शनाकडे लोकांची प्रवृत्ती का नसते? ती सारखी बाहेर का धाव घेते? जेव्हा देवाने सृष्टिनिर्मिती केली तेव्हा त्याने सर्व इंद्रियांना बहिर्मुख बनविले. इंद्रियांची द्वारे देखील बहिर्मुख असल्यामुळे त्यांच्यासोबत राहणारे मन देखील बहिर्मुख झाले. ज्याच्या सहवासात आपण राहतो त्याचे गुण-अवगुण आपल्याला चिकटतात. वाण नाही पण गुण लागतो. मन आत आहे. त्याला आपण अंत:करण म्हणतो. ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये ही बहि:करणे होत. इंद्रियांच्या सहवासाने मन एकदा बाहेर आले, मग बाहेरच राहिले. त्याचा आत राहण्याचा अभ्यास थांबला. बाहेर राहण्याचा अभ्यास वाढला. अशा बहिर्मुख मनाला पुन्हा अंतर्मुख करण्यासाठी योगीपुरुषांना योगसाधना करावी लागली, शिकवावी लागली. मन जर आतच राहिले असते तर त्याला सांसारिक दु:खांचा अनुभव घेण्याची वेळ आली नसती. आपल्याला बाहेर प्रपंच दिसतो. त्याचे कारण आहे वासना. जन्मजन्मांतरीच्या वासनांमुळेच आपल्याला बाहेर प्रपंच दिसतो. वास्तविक प्रपंच प्रपंच म्हणून अस्तित्त्वातच नाही. सारे काही परमात्माच आहे. ज्याच्या बुद्धीत विकल्प आहे, वासना आहे त्याची बुद्धी बहिर्मुख होऊन विकल्पाने बाहेरच्या परमात्मरूपाला प्रपंचरूपात पाहते. जो अंतरंगात शिरतो त्याला आत्मानंदाचा अनुभव येतो. आत्मानंदाच्या अनुभूतीसाठी व्यावहारिक माणसाला दिवसातून एकवेळ तरी आपले क्षेत्र सोडून जावे लागते. अर्थात् अंतर्मुख व्हावे लागते. तुम्ही जर अंतर्मुख होणार नाही तर जिवंत राहू शकणार नाही. निद्रावस्थेत प्रत्येक माणसाला

स्वाभाविकपणेच अंतर्मुख व्हावे लागते. मातेच्या गर्भातले बालक चोवीस तास अंतर्मुख होऊन सुषुप्ति-अवस्थेचा आनंद घेत असते. आईच्या गर्भात मुलाला काही करावे लागत नाही, केवळ झोपच घ्यावी लागते. त्याचा आहार त्याला सहजपणे मिळत असतो. जेव्हा त्याचा जन्म होतो तेव्हा देखील त्याला फार असे काम करावे लागत नाही. त्याला न्हाऊमाखू घालतात, दूध पाजतात आणि झोपवतात. गर्भात चोवीस तास झोपणारे मूल बाहेर आल्यावर वीस-बावीस तास झोपत असते. त्याची जसजशी वाढ होते तसतशी झोप कमी होत जाते. मुलाला जर लहानपणी झोप मिळाली नाही तर त्याच्या शरीराची वाढ होणार नाही, ते जिवंत राहणार नाही. आपल्या शरीरवाढीसाठी सुषुप्ति-अवस्था कारणीभूत ठरते. भूक लागणे आणि झोप येणे ही शरीरस्वास्थ्याची लक्षणे आहेत. ज्याला भूक लागत नाही आणि झोप येत नाही तो रोगी होय.

लहानपणी भरपूर झोप घेणाऱ्या बाळाची वाढ जसजशी होत जाते तसतशी त्याची झोप कमी कमी होत जाते. म्हातारपणी तर ती अतिशय कमी होते. झोप कमी होत गेली तर समजावे आयुष्य कमी होत चालले आहे. अंतर्मुख होऊन मन सुषुप्ति-अवस्थेत गेले तर आत्मानंदाचा अनुभव येतो. सहजरूपाने आपण अंतर्मुख झालो तर आपल्याला आत्मानंदाचा अनुभव येतो. साधनेच्या बळाने जर तुम्ही देखील जागृतावस्थेत समाधीचा अभ्यास कराल तर जागृतावस्थेत देखील तुम्हाला आत्मानंदाचा अनुभव येईल आणि मग बहिर्मुख होण्याची इच्छाच तुमच्या मनात उरणार नाही. अंतर्मुख कसे व्हायचे त्याची एक युक्ती या ठिकाणी सांगतात-

**आत्मारणिसमुत्थेन प्रमोदमथनात् सुधीः।**
**ज्ञानाग्निना दहेत् सर्वं पाशजालं जगन्मयम्।।१२.२९।।**

बाह्यप्रवृत्तीला कारण अशा वासना जोपर्यंत जाळून टाकणार नाही तोपर्यंत मनाला बाहेर यावेच लागेल. पतंग उडवताना तो फार उंच उडवायचा असेल तर आपण दोरा सैल करतो, त्याला जवळ आणायचे असेल तर दोरा खेचून घेतो. पतंगाला दूर पाठवणे आणि जवळ आणणे यासाठी त्याला बांधलेला दोरा आपल्या हाती असणे जरुरीचे आहे. बाह्यप्रवृत्तीला वासनाच कारणीभूत असतात. एकदा पाहिलेले सौंदर्य पुन्हा पुन्हा पाहावेसे वाटते, एकदा ऐकलेले गाणे पुन्हा ऐकावे वाटते, एकदा हुंगलेले फूल पुन्हा हुंगावे वाटते. एकदा ज्याचा अनुभव घेतला त्याचा पुन्हा अनुभव घेण्याची माणसाला इच्छा होते. या इच्छा दूर करण्यासाठी त्यांचे मूळ कारण ज्या वासना त्याच नष्ट करायला हव्यात. त्यांना जाळण्यासाठी अग्नीची आवश्यकता आहे. अग्नी कोणता? तेच येथे सांगितले आहे.

दोन लाकडे एकमेकांवर घासली की अग्नी तयार होतो. आधुनिक काळात अत्यंत संवेदनशील अशी आगकाडी मनुष्याच्या हाती आली आहे. ती आगपेटीवर घासली की चटकन अग्नी प्रकट होतो. लाकडामध्ये अग्नी असतोच जेव्हा दोन लाकडांचे घर्षण केले जाते तेव्हा तो प्रकट होतो. प्रत्येक वस्तूमध्ये अग्नी असतोच. कारण अग्नी हे व्यापक तत्त्व आहे. दगडावर दगड मारला तरी ठिणगी पडते. ज्याप्रमाणे लाकडावर लाकूड घासल्यानंतर अग्नी प्रकट होतो, त्याप्रमाणे आत्मा आणि शिवानंद यांच्या घर्षणाने ज्ञानाग्नी उत्पन्न होतो. खरे तर आत्मा आनंदरूप आहे. परंतु त्याचे विस्मरण झाल्यामुळे आनंदाच्या शोधासाठीच मनोवृत्ती बहिर्मुख होते. बाहेर आनंद मिळत नाही तरी सुख मिळते. सुख आणि आनंद यात बरेच अंतर आहे. सुखाच्या आत दुःख दडलेले असते. सुख हे नेहमीच सुखरूपात राहत नाही तर ते केव्हातरी दुःखरूप होते. पुत्रसुख मिळालेल्या मातापित्यांना आयुष्यात केव्हा तरी पुत्र दुःखदायक देखील ठरू शकतो. म्हणून सुखदुःख बाहेर आहेत आणि आनंद आत्म्याच्या ठिकाणी आहे. जेव्हा साधकाला आपल्या आत्मानंदाचा अनुभव येतो तेव्हा तो बाह्यसुखाकरीता

बहिर्मुख कशाला होईल? संस्कृतमध्ये एक वचन आहे–

**'अक्केचेन्मधु विन्देत किमर्थं: पर्वत व्रजेत्'**

जर आपल्या बागेतच मध मिळत असेल तर त्यासाठी माणसाने अरण्यात कशाला जावे? त्याप्रमाणे आपल्या आतच आनंदाचा सागर भरलेला आहे असे ज्ञान ज्याला होते त्याची वृत्ती बहिर्मुख होत नाही. आनंद आपल्या बाहेर नाही, तो आपल्या आतच आहे. आपला आत्माच आनंदरूप आहे, अशा ज्ञानानेच वासना समूळ जळून जातात. बाह्य सुख परावलंबी आहे. इच्छित वस्तू अथवा व्यक्ती मिळाली तर सुखाचा अनुभव येतो आणि मिळाली नाही तर दुःखाचा अनुभव येतो. बाह्य सुखाच्या अनुभूतीत परावलंबित्व आहे. आत्मानंदासाठी मात्र असे परावलंबित्व नाही. म्हणून मनोवृत्ती अंतर्मुख करून आत्मानंदाचे ज्ञान प्राप्त करून घेतले की त्याच ज्ञानरूपी अग्नीने वासना जळून जातात. वासनांचा असा क्षय होऊन आत्मानंदात सदैव मग्न राहणे हीच शिवयोगसमाधी होय. ही शिवयोगसमाधी साधणे प्रत्येक मनुष्याचे कर्तव्य आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
१० एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन आठवे**

## शिवयोगसमाधिस्थल–

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आत्मानंदरूपी अग्नीने मनातील वासनाबीजे कशी दग्ध करावीत या विषयाचे विवेचन आपण कालच्या आशीर्वचनात ऐकले. इच्छा असून देखील मनुष्य योगसाधनेत प्रवृत्त होत नाही आणि प्रवृत्त झाल्यावर देखील बऱ्याचजणांना त्यात सफलता प्राप्त होत नाही. त्याचे कारण काय? त्यात कोणकोणते अडथळे येतात याविषयी येथे विस्तारपूर्वक सांगितले आहे.

**संसारविषवृक्षस्य पंचक्लेशपलाशिनः।**
**छेदने कर्ममूलस्य परशुः शिवभावना।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.३०)

संसार हा एक विषवृक्ष आहे. वृक्ष विषमय असला तर त्याची पाने, फुले, फळे सारी विषारी असतात. एका सुभाषितकाराने म्हटले आहे–

**संसारविषवृक्षस्य द्वे फले ह्यमृतोपमे।**
**सुभाषितरसास्वादः सज्जनैःसह.. संगतिः।।**

संसार हा विषवृक्ष असून देखील त्यावर दोन अमृतफळे असतात. सुभाषितांचा रसास्वाद आणि सज्जनांची संगती. संसारवृक्षावर राहून देखील जो मनुष्य संतांच्या संगतीत राहतो आणि संतवाणीचा आस्वाद घेतो त्याला

मृत्यू न येता अमृततत्त्वाचा लाभ होतो. या असार संसारात केवळ संतांची संगती आणि संतवाणी या दोनच सार-वस्तू होत. या दोन्हीच्या साहाय्यानेच साधक आत्मतत्त्वाचे ज्ञान करून घेऊन संसारातून मुक्त होतात.

या संसारवृक्षाची पाने कोणती आहेत? पंचक्लेश हीच त्याची पाने होत. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश हे पाच प्रकारचे क्लेश आहेत. ज्याच्यापासून माणसाला सदोदित दुःख मिळते त्याला 'क्लेश' असे म्हणतात. अविद्या हा पहिला क्लेश होय. अविद्येविषयी योगसूत्रात आणि योगसूत्रावरील भाष्यात सुरेख विवेचन केलेले आहे. 'अविद्या चतुष्पदा' ती एक असली तरी चार भेद आहेत. 'अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या' अनित्य वस्तूत नित्यबुद्धी, अशुचीमध्ये शुचीबुद्धी, दुःखात सुखबुद्धी आणि अनात्म पदार्थात आत्मबुद्धी असे अविद्येचे चार पाद आहेत.

अनित्य तत्त्वात नित्यबुद्धी कशी? तर प्रपंच हा अनित्य आहे. तरी तो नित्य आहे असे मानणे. काही लोकांना येथे प्रश्न पडेल की, वीरशैवसिद्धान्तात प्रपंच सत्य मानला जातो आणि येथे तर त्याला अनित्य म्हटले आहे. ते कसे? त्याचे उत्तर असे की, सत्य आणि नित्य यामध्ये खूप फरक आहे. आपण प्रपंचाला सत्य मानतो, परंतु नित्य मानत नाही. नित्य हे त्रिकाल-अबाधित असते. भूत, वर्तमान, भविष्य या काळांत ते एकसारखे असते. जे अस्तित्वात असते ते सत्य होय. प्रपंचात सतत परिवर्तन होत राहते, परंतु तो अस्तित्वात मात्र असतो. म्हणून प्रपंच सत्य आहे परंतु नित्य नाही. मनुष्याच्या बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य अशा तीन अवस्था असतात. व्यक्ती एकच असते पण ती आधी बाल असते, नंतर तरुण होते, नंतर वृद्ध होते. त्याच्या शरीरात परिवर्तन होत असते, बदल घडत असतो. अशी अवस्थांतरे झाली तरी त्याच्या अस्तित्वामध्ये कोणताही बदल होत नाही. त्याचप्रमाणे प्रपंच हा सत्य असला तरी नित्य नसतो. तो सारखा परिवर्तित होत असतो, एकरूप राहत नाही असे वीरशैवसिद्धान्त मानतो.

असा परिवर्तनशील, अनित्य प्रपंच नित्य आहे असे मानणे हा अविद्येचा पहिला प्रकार होय. ज्याच्या मनात अविद्या आहे अशा मनुष्याला अनित्य वस्तू नित्यच आहे असे वाटते. अशुची म्हणजे अपवित्र, जे स्वभावतः अपवित्र आहे ते पवित्र आहे, असे मानणे हा अविद्येचा दुसरा प्रकार आहे. आपले शरीर हे अशुची, अपवित्र आहे. ज्याच्या ठिकाणी देहात्मबुद्धी आहे अर्थात् शरीर म्हणजे मीच अशी ज्याची दृढभावना आहे. तो आपल्या शरीराला सर्वस्व समजतो, पवित्र मानतो. शरीर सजविण्यासाठीच त्याचे सारे आयुष्य खर्ची पडते. शरीर अपवित्र कसे? याचे उत्तर योगशास्त्रात दिले आहे-

**स्थानात् बीजादुपष्टम्भान्निःस्यन्दान्निधनादपि।**
**कायमाधेयशौचत्वात् पंडिता ह्यशुचिं विदुः।। योगसूत्र, भाष्य २.५।।**

शरीराच्या अपवित्रतेची स्थान, बीज, उपष्टंभ, स्यंदन आणि निधन अशी पाच कारणे येथे सांगितली आहेत. ज्या ठिकाणी मनुष्याची उत्पत्ती होते ते मातेचे उदर मलमूत्राने भरलेले असल्याने अपवित्र असते. असे देहाचे जन्मस्थान अपवित्र आहे. ज्याच्या संयोगामुळे देह निर्माण होतो असे रेत आणि रज अपवित्र असते. म्हणून याचे बीज सुद्धा अपवित्र आहे. अन्नपाण्याच्या सेवनाने आपल्या शरीरात रस, रक्त, मांस, मज्जा, मेद, अस्थी आणि रेत असे सप्तधातू उत्पन्न होतात. त्यामुळे शरीराचे पोषण होते. जे अन्न आपल्या शरीराला पोषक असते. ते जर शिजवून एखाद्या भांड्यात काही दिवस ठेवून दिले तर ते अन्न सडते, कुजते. जे अन्न शिजविल्याबरोबर कधी खाऊ, कधी नको असे होते तेच अन्न आठदहा दिवस तसेच ठेवून आपल्यासमोर ठेवले तर आपण ते अन्न दूर

ढकलतो. जर अन्नच काही दिवसानंतर अशुद्ध होते तर त्या अन्नाचा परिणाम, आपल्या शरीरातील धातू कसे पवित्र राहतील? असे त्याचे उपष्टंभ (आधार) देखील अपवित्र आहे. मल, मूत्र, घाम, कफ इ. अपवित्र पदार्थ शरीराच्या बाहेर सतत वाहत असतात. म्हणून शास्त्रात 'स्वभावदुर्गन्धमिदं शरीरम्' असे शरीराबद्दल म्हटले आहे. शरीर स्वभावत: दुर्गंधयुक्त आहे. त्याचा दुर्गंध लपविण्यसाठी आणि ते सुगंधित करण्यासाठी त्याला सतत धुवावे लागते. त्याच्यावर अत्तर शिंपडावे लागते. माणूस सकाळी उठला की पहिल्यांदा आरशासमोर उभा राहून पाहतो की आपण बाहेर जाण्याच्या लायक आहोत की नाही? दूषित द्रव्याचे स्यंदन करणे हा शरीराचा स्वभावच आहे. म्हणून आपल्याला रोज स्नान करावे लागते. सुगंधी द्रव्यांचा उपयोग करावा लागतो. रोज वस्त्रे बदलावी लागतात आणि शरीराच्या संपर्कात वस्त्रे दूषित होतात म्हणून ती धुवावी देखील लागतात. असे शरीर अशुची, अपवित्र आहे. अशा या सप्तधातुयुक्त शरीरावर परमेश्वराने त्वचेची चादर ओढून त्याचे ओंगळवाणेपण झाकून टाकले आहे. त्वचा नसती तर मनुष्य किती भयानक दिसला असता याची कल्पना तुम्ही करू शकता. घर बांधल्यानंतर भिंतींना प्लास्टर करून ती रंगवितात तेव्हा घर चकचकीत आणि सुंदर दिसते, त्याप्रमाणे अस्थी, मांस, मज्जा इत्यादी सारे एकत्र करून परमेश्वराने जणू त्यावर त्वचेचे प्लास्टरच केले आहे. कुणाचे प्लास्टर काळ्या रंगाचे तर कुणाचे गोऱ्या रंगाचे आहे. रंग वेगवेगळे आहेत. परंतु कोणताही रंग वाईट नाही. प्रत्येक रंगाची वेगवेगळी शोभा आहे. काळा रंग खराबच आहे असे नाही आणि गोरा रंग चांगलाच आहे असे देखील नाही. या जगात दोनच रंग आहेत, काळा आणि पांढरा. पांढरा रंग कितीही चांगला वाटो परंतु केस पांढरे झाले की मनुष्य अस्वस्थ होतो आणि ते पुन्हा काळे करण्यासाठी खटपट करतो. मनुष्य-देहातील असुंदरता परमेश्वराने छानपैकी रंगविली आहे. म्हणून ती आपल्याला जाणवत नाही. त्यामुळेच शरीराविषयी आसक्ती उत्पन्न होते. शरीर सुंदर दिसू लागते. याविषयी एक कथा सांगितली जाते.

मलमूत्राने भरलेली हातगाडी घेऊन एक मनुष्य शहराबाहेर निघाला. लोकांना दुर्गंध येऊ नये म्हणून त्यावर छान शुभ्र आच्छादन टाकले होते आणि सुगंधी उदबत्त्या लावल्या होत्या. आसपासचे लोक पाहत होते आणि सगळ्यांना त्याच्या कृतीचे आश्चर्य वाटत होते. एका व्यापाऱ्याला वाटले हा काहीतरी किंमती माल घेऊन चालला म्हणून तो धावत त्याच्याजवळ आला आणि त्याने विचारले, ''आपण कोणता किंमती माल घेऊन चाललात? मला तो दाखवा मी विकत घेऊ इछितो.''

तो मनुष्य म्हणाला, ''माल तर आहे परंतु आपल्या दुकानात ठेवण्याच्या लायकीचा नाही.''

व्यापऱ्याला वाटले काहीतरी किंमती माल असेल आणि हा आपल्याला देऊ इच्छित नाही. म्हणून त्याने वरचे कापड काढून आत हात घातला. बाहेर काढून पाहतो दुर्गंधयुक्त मलाने हात भरलेला. आपली फजिती झालेली पाहून तो व्यापारी तेथून पळून गेला. तात्पर्य असे की, जोपर्यंत मनुष्य आपल्या शरीराबद्दल विचार करीत नाही तोपर्यंत अविद्यारूपी मोह त्याला मोहित करीत असतो. म्हणून शरीर हे स्वभावत: दुर्गंधयुक्त असून दुर्गंध लपविण्यासाठी मनुष्याला त्याची निरंतर स्वच्छता करावी लागते.

शरीराला शेवटी मृत्यू येतो. जन्म आणि मृत्यू हे शरीराचे धर्म होत. सुख-दुःख हे मनाचे धर्म, क्षुधा-तृषा हे प्राणाचे धर्म आणि जन्म-मृत्यू हे शरीराचे धर्म होत. शरीर जन्माला येते आणि शरीरच मरते. जीवात्मा जेव्हा

शरीर सोडून जातो तेव्हा निष्प्राण शरीराला आपण अपवित्र मानतो. जोपर्यंत शरीरात प्राण आहे तोपर्यंत शरीराची अपवित्रता ठळकपणे आपल्या लक्षात येत नाही. प्रेत पाहिल्यावर ती चटकन् लक्षात येते. जीवात्म्याने सोडलेले शरीर म्हणजे प्रेत. प्रेताचा स्पर्श झाला की माणसे स्नान करतात. प्रेतालाच नव्हे तर प्रेताला स्पर्श केलेला मनुष्य आपल्याला शिवला तरी आपण स्नान करतो. याप्रमाणे जन्माच्या आधीपासून मृत्यूपर्यंत हे शरीर अपवित्र मानले जाते. शरीर अपवित्रतेचे मूळ आहे, आधार आहे. परंतु शरीरात अत्यंत पवित्र अशा आत्म्याचे वास्तव्य असल्यामुळे अपवित्र शरीर देखील पवित्र असते.

डोक्यावरचे केस कापून जेव्हा मनुष्य घरी येत असे तेव्हा जुन्या काळी त्याला देखील शिवत नसत. आज काळ बदलला आहे. केस कापल्यावर देखील जेवणाच्या ताटावर माणसे सरळ येऊन बसतात. म्हणतात की, ''केस तर आपलेच आहेत, ते कापले तर आपण कसे काय अशुद्ध होतो?'' केस जोपर्यंत आपल्या डोक्यावर असतात तोपर्यंत ते आपल्याला पवित्र वाटतात कारण केसाचा शरीराद्वारे आत्म्याशी संबंध असतो. परंतु हा संबंध जेव्हा तुटतो तेव्हा केसांना अपवित्रता प्राप्त होते. कापलेल्या केसांना तुम्ही स्पर्शदेखील करणार नाही ते डोक्यावर असताना मात्र त्याला तेल चोपडता, त्यातून कंगवा फिरविता, त्याची निगा राखता. कापल्यावर ते अपवित्र होतात. याचे एकच कारण असे की पवित्र अशा आत्म्याशी त्यांचा संबंध तुटतो. रक्त आणि मांस जोपर्यंत शरीरात असते तोपर्यंत रक्त-मांस अपवित्र वाटत नाहीत. एखादा रक्तमांसाने गच्च भरलेला गुबगुबीत पैलवान तुमच्या समोर आला तर तुम्हाला आनंद वाटेल. त्याच्या अंगावरून हात फिरवाल, त्याच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरवाल. तुम्ही त्याला का बरे मान देत आहात? तर त्याच्या शरीरात अधिक प्रमाणात रक्तमांस भरलेले आहे म्हणून. त्याचे शरीर सशक्त आहे म्हणून तुम्हाला आनंद होतो. त्याच शरीरातील रक्त जर चाकूचा वार करून बाहेर काढले तर त्या रक्तावर तुम्ही प्रेमाने हात फिरवणार नाही. तेच रक्त जेव्हा खाली पडते तेव्हा त्याला स्पर्श करण्याची इच्छादेखील तुम्हाला होणार नाही. स्पर्श केलाच तर चट्कन हात धुवावा लागेल. का?

तेच रक्त जेव्हा शरीरात होते तेव्हा ते तुम्हाला चांगले वाटत होते, पवित्र वाटत होते. तेच शरीराबाहेर आले की अपवित्र झाले! रक्त हे स्वभावत: पवित्र नाही, परंतु शरीरात असल्यामुळे आणि शरीरच्याद्वारा त्याचा आत्म्याशी संबंध असल्यामुळे ते पवित्र वाटत होते. आत्म्याशी संबंध तुटला की ते अपवित्र झाले. आपल्या तोंडात दात आहेत तोपर्यंत ते चांगले आहेत. तुम्ही त्याला मंजन लावाल, पेस्ट लावाल, त्याची स्वच्छता कराल. परंतु एकदा दात पडला की मग मात्र तुम्ही त्याला जवळ ठेवणार नाही. त्याला फेकून द्यावे लागते. आपल्या तोंडात लाळ असते ती आपण निरंतर गिळत असतो. परंतु जेव्हा तुम्ही थुंकता तेव्हा त्या थुंकीला तुम्ही स्पर्श करीत नाही. तुम्ही तुमच्या हातावर जरी थुंकलात तरी तुम्ही तिला परत घेता? घेत नाही. कारण जोपर्यंत ती आपल्या स्थानी होती आणि तिचा आत्म्याशी संबंध होता तोपर्यंत ती पवित्र होती. परंतु आत्म्याचा संबंध सुटल्यावर ती अपवित्र ठरली.

**स्थानभ्रष्टा न शोभन्ते दन्ता केशा नखा नरा:।**
**इति विज्ञाय मतिमान् स्वस्थानं न परित्यजेत्।।**

वस्तू स्थानभ्रष्ट झाली की ती अपवित्र होते. शरीर अपवित्र का आहे? त्याचे जन्मस्थान अशुची आहे, त्याचे बीज अपवित्र आहे, त्याचा उपष्टंभ अपवित्र आहे, त्याच्याबाहेर पडणारे पदार्थ अपवित्र आहेत आणि जेव्हा ते मरते तेव्हा त्यालाच नव्हे, त्याच्या घरात राहणाऱ्यांना ही अशीच, अपवित्रता येते. ज्याच्या घरी मृत्यू झाला

त्याच्या घरी काही खायला देखील लोक जात नाहीत. मेल्यावर त्याचा अंत्यसंस्कार झाला आणि मरून तेरा दिवस झाले तरी तेराव्या दिवशी भोजनासाठी त्याच्या घरी जायला लोक मागेपुढे पाहतात. अशा अपवित्र देहात पवित्रबुद्धी असणे अर्थात् देहाला पवित्र मानणे हीच अविद्या होय. ज्याप्रमाणे अनित्य प्रपंचात नित्यबुद्धी असणे ही अविद्या आहे त्याप्रमाणे अशुची देहात शुचिबुद्धी असणे ही देखील अविद्याच होय.

जे दुःखरूप आहे त्याला सुखरूप मानणे ही देखील अविद्या होय. शब्दस्पर्शादी विषयांत लोकांना सुख वाटते. ही सुखाची साधने आहेत असा त्यांचा समज असतो. शब्दाच्या मागे, स्पर्शाच्या मागे, रूपाच्या मागे युगानुयुगापासून जीवात्मा सतत धावत आहे. सुख मिळविण्यासाठी. तेथे त्याला सुख थोडे मिळाले पण त्याच्या सहस्रपट दुःख देखील मिळाले.

विषय वर वर पाहता अत्यंत रमणीय भासतात. परंतु त्याचे अंतिम फळ काय असते? तर दुःख म्हणून भर्तुहरीने म्हटले आहे 'भोगे रोगभयम्'. भोगाचे फळ कोणते? तर रोग हेच. शरीर अनेक रोगांनी जीर्ण होते. त्या रोगांचे मूळ कारण विषय-भोग हेच आहे. म्हणून दुःख देणाऱ्या शब्दस्पर्शादी विषयांत सुख आहे असे मानणे आणि मृगजळामागे धावावे तसे त्यामागे धावत सुटणे ही अविद्याच होय.

अनात्म पदार्थांत आत्मबुद्धी ठेवणे हा अविद्येचा चौथा प्रकार आहे. शरीरपासून ते बुद्धीपर्यंत सर्व तत्त्वे अनात्म होत. या अनात्म पदार्थांत मनुष्याची आत्मबुद्धी होते, म्हणजे या पदार्थांनाच ते आत्मा मानू लागतात. काही लोक शरीरालाच आत्मा मानतात. चार्वाकमतानुयायी शरीर हाच आत्मा आहे आणि त्याचे पलीकडे काहीही नाही असे मानतात. जोपर्यंत जीवन आहे तोपर्यंत सुखाने जगावे, कर्ज काढून तूप प्यावे, हौसमौज करावी. एकदा देहाचे भस्म झाले की कोणी पुन्हा जन्माला येत नाही. मरण हीच मुक्ती आहे. त्यासाठी फार प्रयत्न करावे लागत नाहीत. मरणासाठी मनुष्याला काय करावे लागते? ते यायच्या वेळी बरोबर येतेच. त्यामुळे मुक्तीची चिंता करायचे कारण नाही. म्हणून मुक्ती मिळेपर्यंत आपले शरीर सांभाळावे. त्याला चांगले खाऊ-पिऊ घालावे. कोणी म्हणेल की मौज करायला आमच्याजवळ पैसा नाही. तर चार्वाक म्हणतो की, कर्ज काढा अन् मौज करा. कर्ज काढले तरी केव्हा तरी ते फेडावेच लागते. चार्वाक म्हणतो त्याची काळजी करू नका एकदा तुम्ही मेल्यावर तुम्हाला कर्ज मागायला कोण येते? कर्ज घेणारा आणि कर्ज देणारा दोघेही मरतातच. त्यांची पुन्हा भेट होत नाही. मग भ्यायचे कशासाठी? हा चार्वाकाचा देहात्मवादी सिद्धान्त होय.

काही लोक थोडे त्यापुढे गेले. त्यांना वाटले की शरीर म्हणजे सर्वस्व नव्हे. शरीर म्हणजे इंद्रियांचा समूह. इंद्रियांच्या समूहालाच आपण शरीर म्हणतो. शरीर नावाचा वेगळा पदार्थच अस्तित्वात नाही. शरीर दाखवा असे म्हटल्यावर आपण काय दाखवतो? तर इंद्रिये. म्हणून शरीर आत्मा नसून इंद्रिये आत्मा आहेत असे त्यांना वाटले. काही लोक थोडे त्यापुढे गेले आणि त्यांनी विचार केला की, इंद्रियांना प्रेरणा देणारी प्राणशक्ती आहे तेव्हा इंद्रिये आत्मा नसून प्राण हाच आत्मा होय. प्राणच नसेल तर इंद्रिये कशी कार्य करतील? उपनिषदात याविषयी एक कथा सांगितली आहे.

एकदा सर्व इंद्रियांत आणि प्राणात भांडण सुरू झाले. तू श्रेष्ठ की मी श्रेष्ठ? प्रत्येक जण मीच श्रेष्ठ आहे असे म्हणू लागला. भांडण ब्रह्मदेवापर्यंत गेले. ब्रह्मदेवाने सांगितले की, ''जो शरीरबाहेर निघून गेल्यावर शरीराचे व्यवहार बंद पडतील तो श्रेष्ठ होय.''

स्पर्धा सुरू झाली. प्रत्येक इंद्रियाने शरीर सोडून पाहिले. नेत्रेंद्रिये बाहेर गेले तरी शरीरव्यवहार थांबला नाही.

श्रवणेंद्रिय बाहेर गेले तरी शरीरव्यवहार थांबला नाही. प्रत्येक इंद्रियांच्या बाबतीत हेच घडले. परंतु जेव्हा प्राण बाहेर जाऊ लागला तेव्हा सर्व इंद्रिये कासावीस झाली. शरीराचे भान हरवू लागले. तेव्हा सर्व इंद्रियांनी प्राणाचे श्रेष्ठत्व मान्य केले, सारे म्हणाले– 'त्वमेव ज्येष्ठ: त्वमेव श्रेष्ठ:'

म्हणून काही लोकांनी प्राण हाच आत्मा मानला. काही लोकांनी त्याही पुढे विचार केला की, प्राण हा जड, अचेतन आहे. तो आत्मा होऊ शकत नाही. एखाद्या स्त्रीच्या नाकातील नथ चोर चोरून नेतो तेव्हा तेथे प्राण उपस्थित असतो. तरी तो त्या चोराविषयी काही सांगू शकत नाही. कारण तो जड आहे, त्याला प्रज्ञा नाही. म्हणून प्राणापलीकडे जे मन आहे ते आत्मा होय. परंतु मन अत्यंत चंचल, अस्थिर आहे. त्यामुळे त्याला आत्मा म्हणता येणार नाही, असे काहींना वाटले, ते बुद्धीला आत्मा मानू लागले, परंतु ती फक्त जागृत आणि स्वप्न या अवस्थांतच विद्यमान असते, सुषुप्तिअवस्थेत नसते, म्हणून बुद्धीपेक्षाही विलक्षण असा आत्मा असला पाहिजे, असे काही विचारवंतांना वाटले आणि ते आत्म्यापर्यंत पोहोचले.

याप्रमाणे शरीर, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी इत्यादी अनात्म पदार्थांत आत्मबुद्धी करणे म्हणजे त्यांना आत्मा मानणे ही अविद्या आहे. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश या पाच प्रकारच्या क्लेशांतील पहिला क्लेश अविद्या हेच इतर सर्व क्लेशांचे मूळ आहे. अविद्याही चार प्रकारची सांगितली आहे. अनित्यत्वाला नित्यबुद्धी, अशुचित्वात शुचिबुद्धी, दु:खात सुखबुद्धी आणि अनात्म्यात आत्मबुद्धी. अशा या अविद्येची निवृत्ती केवळ शिवयोगानेच होऊ शकते, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
११ एप्रिल १९९२

---

आशीर्वचन नववे

## शिवयोगसमाधिस्थल–४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

संसार हा विषवृक्ष असून अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश हे पंचक्लेश त्याची पाने होत, हे आपण कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे. अविद्या हे अन्य चार क्लेशांचे मूळ आहे. अविद्या एक असली तरी ती चार प्रकारे मनुष्याला दु:खदायक ठरते. अविद्येपासून मुक्त होण्यासाठी मनुष्याला स्व-स्वरूपज्ञानाची आवश्यकता असते. लौकिक जीवनात एखादा हितशत्रू आपला हितचिंतक म्हणून जवळ वावरतो आणि वरवर हितकर वाटणारा परंतु मुळात अहितकारक सल्ला आपल्याला देतो. त्याप्रमाणे अविद्या अनादी कालापासून आपल्या आत ठाण मांडून बसली आहे. तिच्यामुळे आपले हित होते असे मनुष्याला वाटते. परंतु वास्तविक पाहता तिच्यामुळे अनर्थच घडून येतात.

अविद्येने आपल्या आत कधी प्रवेश केला हे निश्चित सांगणे अवघड आहे. म्हणून शास्त्रकारांनी तिला 'अनादी' असे म्हटले आहे. ती अनादी असली तरी अनंत नाही. तिचा अंत होतो. तिला आपण मुळासकट छेदू

शकतो. परंतु अद्याप आपण तिला नष्ट केले नाही. संसारविषवृक्षाच्या अविद्यारूपी पर्णांचे छेदन करण्याइतके आपण अजून समर्थ झालो नाही. अविद्या आपली हितचिंतक नसून ती आपले अहित करणारीच आहे याची जाणीव आपल्याला झालेली नाही. म्हणून आपण तिला छेदू शकलेलो नाही. जेव्हा शास्त्रांचा अभ्यास केल्यावर आपल्याला जाणीव होते की आपण अनित्य वस्तूंना नित्य मानीत आहोत, दुःखाला सुख समजत आहोत आणि अनात्म वस्तूला आत्मा मानीत आहोत, हा सगळा विलास अविद्येचाच आहे, असे ज्ञान होईल तेव्हा आपण अनित्य वस्तूला अनित्य मानू, अपवित्र वस्तूला अपवित्र मानू, दुःखाला दुख मानू आणि अनात्म्याला अनात्मा मानायला लागू. त्यावेळी आपली अविद्येपासून सुटका होईल. अविद्येला छेदण्यासाठी शिवभावनेची कुऱ्हाड हवी. अर्थात् जो निरंतर शिवचिंतन करतो त्याला अविद्येचे खरे स्वरूप समजते. तिचे स्वरूप आणि स्वभाव समजल्याविना तिच्यापासून सुटका होणे संभवनीय नाही.

अस्मिता हा दुसरा क्लेश आहे. योगशास्त्रात 'दृकदर्शनशक्त्योरेकात्मतेवास्मिता' (योगसूत्र, २-६० दृक्शक्ती आणि दर्शनशक्ती यांची एकात्मता म्हणजे अस्मिता होय, अशी अस्मितेची व्याख्या केली आहे. दृक् म्हणजे पाहणारा दृश्य म्हणजे दिसणारे. यालाच शास्त्रात दृक्-दृश्यविवेक असे म्हणतात. जे जे सारे दिसते त्याला दृश्य म्हणतात. प्रपंच हा दृश्य आहे. दृश्य असेल तर पाहणारा देखील असतोच. डोळ्यांनी रूप पाहता येते. आपल्याला वाटते की डोळेच पाहतात. परंतु मुळात तसे नाही. डोळे अथवा नेत्रेंद्रिय हे दृक आहेत की दृश्य आहे याचा विचार येथे करता येतो. आपण डोळ्यांनी दृश्य पाहू शकतो परंतु डोळ्यांनी डोळे कसे पाहणार?

या ठिकाणी अनुमान प्रमाणाचा आधार घ्यावा लागतो. ज्या अर्थी आपण पाहू शकतो त्या अर्थी पाहणारे डोळे आपल्याजवळ आहेत असे अनुमान करावे लागते. जे पाहू शकत नाहीत त्यांना डोळे नाहीत. डोळ्यांनी डोळे पाहता येत नाही आणि जे अत्यंत निकट असते ते देखील डोळ्यांनी पाहता येत नाही. एखादे पुस्तक डोळ्यांपासून खूप दूर धरले तर त्यातील अक्षरे वाचता येत नाहीत आणि डोळ्यांच्या खूप जवळ धरले तरी देखील ते वाचता येत नाही. डोळ्यांत घातलेले काजळ देखील डोळ्यांनी पाहता येत नाही. मग डोळे डोळ्यांना कसे बरे पाहू शकतील? डोळ्यात कचरा गेला तर तो काढण्यासाठी आपल्याला दुसऱ्याजवळ जावे लागते. आपल्या डोळ्यांना तो दिसत नाही. कारण तो अत्यंत निकट असतो. डोळ्यात कचरा गेला हे आपल्याला कसे कळते? तर मनाच्या द्वारे. येथे डोळे दृश्य आहे तर मन द्रष्टा म्हणजे पाहणारे आहे. आतापर्यंत बाह्य वस्तू दृश्य होत्या आणि डोळे दृक् होते. जस जसे आपण आत जाऊ तसतसे डोळे दृश्य होतात आणि मन दृक् होते. येथे दृक् असणारे मन आणखी आत गेल्यावर दृश्य बनते.

मन चंचल असे आपण म्हणतो. माझे मन थाऱ्यावर नाही इत्यादी मनाविषयी आपण जे काही बोलतो त्याचे ज्ञान मनाला नसते. डोळ्यांचा साक्षात्कार डोळ्यांना होत नाही. त्याप्रमाणे मनाचा साक्षात्कार मनाला होत नाही. मनापेक्षा वेगळी अशी बुद्धी मनाला जाणत असते. येथे मन दृश्य झाले आणि बुद्धी दृक् झाली. वस्तुतः बुद्धी देखील दृक् नसून ती दृक्शक्तीने युक्त आहे. आत्म्याकडून दृकशक्ती घेऊन बुद्धी दृकप्रमाणे व्यवहार करते. हाती आरसा घेऊन आपण सूर्याची किरणे परावर्तित करून घरात वळवतो. सूर्याचा प्रकाश घरात सरळ येत नाही तर आरशामधून तो येतो. प्रकाश देण्याची शक्ती आरशात नसते. त्याच्यात ती असती तर आरशाने रात्रीही प्रकाश पाडला असता. आरसा फक्त सूर्यकिरणांचे वहन करतो, माध्यम बनतो. आरसा अत्यंत स्वच्छ असल्यामुळे तो सूर्यबिंबाला यथावत् धारण करतो आणि त्याची किरणे परावर्तित करतो. त्याप्रमाणे बुद्धीदेखील आत्म्याची

दृक्‌शक्ती ग्रहण करून ती प्रक्षेपित करतो.

दृक् आणि दर्शनशक्ती यांची एकात्मता आपल्या बुद्धीत झालेली आहे. आपला आत्मा आणि बुद्धी भिन्न आहेत हे आपल्या लक्षात आलेले नाही. आत्म्याच्या अत्यंत जवळ बुद्धी असते. गीतेत भगवंतानी म्हटले आहे.

**इंद्रियाणि पराव्याहुः इंद्रियेभ्यः परं मनः।**
**मनसस्तु पराबुद्धिर्योबुद्धेः परतस्तु सः।।**

सर्वांत बाहेर इंद्रिये आहेत. इंद्रियांच्या आत मन आहे. मनाच्या आत बुद्धी आहे. बुद्धीच्याही पलीकडे आत्मा आहे. हाच क्रम उलटा केला तर आत आत्मा आहे, त्याच्याबाहेर बुद्धी आहे, बुद्धीच्याबाहेर मन आणि आणि मनाबाहेर इंद्रिये आहेत, असा सांगता येईल. आत्म्याची दृक्‌शक्ती बुद्धीमध्ये येते. बुद्धीमधून ती मनामध्ये येते, मनामधून ती डोळ्यांमध्ये येते आणि आपल्याला असे वाटते की डोळे पाहत आहेत. पंचविषयांना समजून घेण्याची शक्ती आपल्या आत्म्यामध्ये असते आणि वर सांगितलेल्या क्रमाने ती आपल्या ज्ञानेंद्रियांपर्यंत येते. आपल्या आता हे लक्षात आले असेल की ज्याप्रमाणे पुस्तक दृश्य आहे त्याप्रमाणेच डोळे आणि मन हे देखील दृश्यच आहेत. परंतु बुद्धीदेखील दृश्य आहे हे मात्र आपल्या लवकर लक्षात येत नाही. कारण बुद्धीमध्ये एक वृत्ती असते ती, म्हणजे अहंकार. अहंकार हा आत्म्यासारखाच आहे, असे भासते. दोन जुळ्या व्यक्ती जर तुमच्यासमोर आल्या तर त्यांच्यामध्ये फरक करणे तुम्हाला अवघड वाटेल. त्यांच्या अत्यंत निकट राहणारे त्यांचे आई-वडीलच त्यांच्यामधला फरक जाणू शकतात. कधी कधी ते देखील गोंधळतात आणि मोठ्याला वेगळे कपडे, लहानाला वेगळे कपडे घालतात. त्यांच्यातले वेगळेपण ओळखण्यासाठी. अहंकार आणि आत्मा यांची देखील अशी अवस्था आहे. बुद्धीमध्ये अहम् आहे आणि आत्म्यात देखील अहम् आहे. दोन्ही अहम्‌रूप असल्यामुळे अहंकार आणि आत्मा यात आपण चटकन भिन्नत्व पाहू शकत नाही.

परवा आम्ही सांगितले की बुद्धीमध्ये अहंकार आहे आणि आत्म्यामध्ये अहम् आहे. अहंकार आणि अहम् यांमध्ये खूप अंतर आहे. जो खरा अहम् आहे तो आत्मा आहे. आणि अहम् नसून जो अहम्‌प्रमाणे व्यवहार करतो तो अहंकार होय. आत्मा दृक(पाहणारा) असून त्याची दर्शनशक्ती घेऊन बुद्धी प्रत्येक व्यवहारात मी पाहते, मी ऐकते, मी हुंगते याप्रमाणे मी, मी, मी- अहम्. अहम् असे करते अशी जी भावना आपल्यामध्ये उत्पन्न होते तिलाच 'अस्मिता' असे म्हणतात. अस्मि, अस्मि, अहम् अस्मि असा जो अहंकार तिच अस्मिता होय. अहंकारच अस्मिता होय. हा एक प्रकारचा क्लेश आहे. आपण समजतो की अहंकार सुखदायक आहे, परंतु वास्तविक तो दुःखदायक आहे. अहंकार हा परावलंबी असून त्याला इतरांकडून तृप्ती हवी असते. परंतु ती नेहमीच मिळते असे नाही. जेव्हा ती मिळत नाही तेव्हा अहंकार दुखावतो. स्तुती हा त्याचा आहार होय. जेव्हा दुसरा कोणी समोर असतो तेव्हा अहंकार जागा होतो. स्तुतीमुळे अहंकार सुखावतो तर निंदेमुळे तो दुखावतो. स्तुति-निंदा अशा दोन्ही प्रसंगी अहंकार जागाच असतो. अहंकार दुखावला की मनुष्य भांडण करतो. असा अहंकार हा दुःखदायक आहे. स्तुती ऐकल्यावर अहंकार फुगतो, त्यामुळे मनुष्याची हानी होते आणि निंदा ऐकल्यावर अहंकार दुखावतो, निंदा करणाऱ्यावर आक्रमण करून त्याची हानी करतो. म्हणून अस्मिता म्हणजे अहंकार हा दुःख देणारा क्लेश आहे.

संसारविषवृक्षाचे तिसरे पान म्हणजे 'राग' हा क्लेश होय. 'सुखानुशयी रागः' असे योगशास्त्रात त्याचे लक्षण

सांगितले आहे. मनुष्याने सुखांचा उपभोग घेतल्यावर त्याचा संस्कार मनावर होतो. मन मोठे विलक्षण आहे. एखाद्या कॅमेऱ्यातील फिल्मसारखे कॅमेऱ्याने एकदा फिल्मवर फोटो घेतला की तो कायमचा झाला. मग त्याच्या कितीही प्रती काढता येतात. मन म्हणजे कॅमेऱ्यातील फिल्मच होय. त्याच्यासमोर जे जे घडते ज्याची जणू एक फिल्मच मनात छायांकित केली जाते. पंचज्ञानेंद्रियांच्या द्वारा शब्दस्पर्शादी विषयांचे ग्रहण मन करते. आणि संस्काररूपाने ते सुरक्षित ठेवते. असे संस्कार सुरक्षित ठेवण्यात हानी कसली? तर मनाने एखादा सुखसंस्कार जपून ठेवला तर त्या संस्कारामुळे त्याला तसा अनुभव पुन्हा घेण्याची अभिलाषा होते. एकदा घेतलेला सुखानुभव त्याला पुन:पुन्हा घ्यावासा वाटतो. सुखाचे साधन असलेल्या विषयांचे आणि सुखाचे सतत स्मरण होण्याचे एकमात्र कारण 'राग' होय. तो सुखाच्या मागे मागे धावतो. तुम्हाला एकदा सुखाचा अनुभव आला तर समजा तुमच्या मनात 'राग' उत्पन्न झाला. म्हणून शास्त्रकारांनी रागाला संसाराचे बीज मानले आहे. निजगुण शिवयोगी म्हणतात– 'रागदिंबेरिन्नु भवबीज मुंटे'

संसारात येण्यासाठी तुम्हाला अधिक काही लागत नाही. एक 'राग' असला म्हणजे पुरे. मग त्यामुळे वारंवार संसारात येणे घडते. एखाद्या व्यक्तीकडे वारंवार जाऊन जेव्हा तुम्ही गप्पा मारीत बसता तेव्हा त्या व्यक्तीविषयी तुमच्या मनात 'राग' आहे हे सहज समजून येते. जर 'राग' नसेल तर पुन: पुन्हा आपण त्या व्यक्तीकडे जाणार नाही. परमेश्वराने कुणाला पन्नास वर्षे, साठ वर्षे, ऐंशी वर्षे, शंभर वर्षे इतके आयुष्य दिलेले असते. एवढ्या कालावधीत रागाचे स्वरूप समजून त्यापासून आपली सुटका करून घेता येते. परंतु मृत्यूपर्यंत माणसाला हे साधत नाही. तो आयुष्यभर 'राग' वाढवीत जातो, मग मृत्युसमय जवळ आल्यावर ही सारी बंधने तोडून जाण्याचे साहस त्याच्याजवळ उरत नाही. आपले संबध येथे ठेवूनच तो जातो. वसतिगृहातले विद्यार्थी किंवा आपल्या या मठातले विद्यार्थी परीक्षा संपून गावी जातात तेव्हा सगळेच सामान सोबत नेत नाहीत. आपली पेटी, बिस्तरा असे काहीतरी खोलीतच ठेवून जातात. कारण पुन्हा परत यायचे असते. परत येण्याचे हे लक्षणच होय. जेव्हा मनुष्य हे जग सोडून जातो तेव्हा जाताना आपला बाड-बिस्तरा येथेच सोडून जातो. याच कारणांसाठी त्याला पुन:पुन्हा जन्म घ्यावा लागतो. म्हणून 'राग' हे जन्माचे मूळ बीज आहे. 'राग' दु:खदायक का आहे?

ठीक आहे. आमचा 'राग' संसारात असू दे. आम्ही पुन: पुन्हा येऊ, त्यामुळे आमचे काय बिघडते? असा विचार जरी तुम्ही कराल तरी वारंवार येणे याचा कोणता अर्थ होतो? पुन:पुन्हा जन्म घेणे आणि पुन:पुन्हा मरणे हा त्याचा अर्थ होतो. जन्म आणि मृत्यू हे सुखदायक आहेत का? याविषयी वरील श्लोकात सांगितले आहे. जन्म हेच पहिले दु:ख आहे. म्हातारपण हे दुसरे दु:ख, पत्नी आणि पत्नीशी संबंधित सारे काही ते सारे दु:खच होय. एवढेच नव्हे तर हा संसारच मुळात दु:खरूप आहे. त्यात सुखदायक असे काय आहे? 'राग' तुमच्या मनात दृढ आहे, म्हणून तुम्ही संसारसागरात परत येता. तो तुम्हाला दु:खसागरात पूर्ण बुडवतो. असा दु:ख देणारा राग एक प्रकारचा क्लेशच होय.

तुम्ही पाहू शकता, ऐकू शकता, रससेवन करू शकता, स्पर्शसुख घेऊ शकता, गंध हुंगू शकता. त्याला प्रतिबंध नाही, परंतु त्याचा संस्कार मनावर उमटू न देण्याची कला जर तुमच्याजवळ असेल तर या संसारात राहून देखील तुम्ही त्यापासून अलिप्त राहू शकता, मुक्त होऊ शकता. साप आणि विंचू आपल्याला चावले तर त्यांचे चावणे हे दु:खदायक वाटत नाही, परंतु त्याने जे विष आपल्या रक्तात ओतलेले असते तेच त्रासदायक, प्राणघातक ठरते. विषयांशी इंद्रियांचा संबंध होणे वाईट नव्हे, परंतु त्या संबंधानंतर जी वासना मनात रुजते ती

वाईट आहे. पुन्हा तो अनुभव घेण्याची लालसा म्हणजेच राग. विषयभोग घेऊन देखील जर त्याचा संस्कार आपल्या मनावर होत नसेल तर तो विषयभोग दुःखदायक ठरत नाही. पण ते इतके सोपे नाही. अजाण मुलाला मोठी माणसे खेळवतात, त्याला जवळ घेतात. ज्या माणसाशी त्याचा हळूहळू दृढ परिचय होतो त्याच माणसाजवळ ते मूल जाते. एकदम परक्या माणसाजवळ जात नाही, कारण घरच्या माणसाला पुनःपुन्हा पाहून त्यांचा संस्कार त्याच्या मनावर दृढ झालेला असतो. त्याप्रमाणे एखादा सुखानुभव आपण घेतला की त्याचे स्मरण आपले मन पुनःपुन्हा करू लागते आणि तो सुखानुभव पुन्हा घेण्याची इच्छा बाळगतो. हाच 'राग' होय. ज्यामुळे आपल्याला सुख मिळते ती सुखसाधने वारंवार मिळवण्याचा मनुष्य प्रयत्न करतो. सुखाविषयी आणि सुखसाधनांविषयी असलेली तृष्णा म्हणजे 'राग'

रागाचे दुसरे रूप म्हणजे द्वेष. राग आणि द्वेष या एकाच नाण्याच्या दोन बाजू होत. जिथे राग असतो त्याठिकाणी द्वेष अवश्य असतो. मनुष्य आणि त्याची सावली जसे निरंतर सोबत राहतात तसे राग-द्वेष एकमेकांच्या सोबत असतात. दोन माणसांत जेव्हा भांडण होते तेव्हा दोघांमध्ये आधी प्रेम अवश्य असते. मैत्री असल्याशिवाय शत्रुत्व संभवत नाही. राग नसेल तर द्वेष उत्पन्नच होणार नाही. आपल्या अनुकूल मार्गात जेव्हा व्यवधान येते त्या वेळी द्वेष उत्पन्न होतो. 'दुःखानुशायी द्वेषः' असे त्याचे लक्षण योगसूत्रात सांगितले आहे. जो दुःखाच्या मागेमागे धावतो तो दुःखानुशयी होय. दुःखात आणि दुःखविषयक साधनांत जी क्रोधभावना असते त्यालाच द्वेष असे म्हणतात. मला दुःख नको आणि दुःख देणारी व्यक्ती देखील नको. या प्रकारे दुःख आणि त्याचे साधन याविषयीचा क्रोध म्हणजे द्वेष. जरी या ठिकाणी राग आणि द्वेष हे वेगवेगळे दाखविले आहेत तरी ते एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. प्रथम जो राग असतो तोच हळूहळू द्वेषात परिवर्तित होत जातो. राग, तो व्यक्तीविषयी असो अथवा वस्तूविषयी, फार काळ टिकत नाही. वैद्य विषाची कॅपसूल बनवतो. मनुष्य विष सरळ पिऊ शकत नाही, म्हणून तो पातळ अशा आवरणात, कॅपमध्ये ते विष टाकून आपल्याला गिळायला देतो. गिळताना काही त्रास होत नाही, परंतु पोटात गेल्यावर वरचे आवरण विरून जाते आणि आतले विष बाहेर पडून त्याचे कार्य चालू होते. त्याप्रमाणे दोन व्यक्तींमधील राग आतून द्वेषाने भरलेला असतो. द्वेषावरचे आवरण अधिक मजबूत असेल तर तो लवकर प्रकट होत नाही. पण पातळ असेल तर तो लवकर प्रकट होतो. दोन मित्रांमधले मित्रत्व बराच काळपर्यंत टिकत असेल तर समजावे की आवरण घट्ट आहे.

अधिक निकट गेल्यामुळे प्रेम हळूहळू कमी होते आणि दूर गेल्यामुळे ते अधिक घट्ट होते. एखाद्या मित्राचे तुम्ही स्वागत करायला जाल आणि मोठ्या प्रेमभराने त्याला आलिंगन द्याल. येथपर्यंत ठीक आहे. परंतु त्याला बराच वेळ जर तसे घट्ट पकडून ठेवाल तर तो तुम्हाला मारायला उठेल. उत्तरभारतात अशी आलिंगन देण्याची प्रथा आहे. तशी दक्षिण भारतात नाही. त्यांना कदाचित माहीत असावे की हे नाटक फार काळ टिकणारे नाही. रागाचे द्वेषात परिवर्तन व्हायला फारसा वेळ लागत नाही. हा द्वेष देखील मनुष्याला कष्ट देणारा असतो. अविद्या, अस्मिता, राग आणि द्वेष हे क्लेश मनुष्याला केवळ क्लेशदायकच ठरतात, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
१२ एप्रिल १९९२

# शिवयोगसमाधिस्थल-५

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शिवयोगसमाधीत येणारी विघ्ने म्हणजे पंचक्लेश होत. त्याविषयी आपण दोन दिवसांपासून चर्चा करीत आहोत.

**संसारविषवृक्षस्य पंचक्लेशपलाशिन:।**
**छेदने कर्ममूलस्य परशु: शिवभावना।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी,१२.३०)

संसाररूपी विषवृक्षाची जी पाच पाने सांगितली आहेत त्यालाच येथे 'क्लेश' म्हटले आहे. पहिल्या चार क्लेशांविषयी आतापर्यंत आपण बरेच काही ऐकले आहे. त्यातील शेवटचा पाचवा क्लेश 'अभिनिवेश' त्याविषयी आज विवेचन करायचे आहे. अभिनिवेशाचे लक्षण योगसूत्रात सांगितले आहे. 'स्वरसवाही विदूषोऽपि तथारूढोभिनिवेश:' अनेक जन्मांत अनुभवलेल्या मरणदु:खाचा जो संस्कार मनावर उमटतो त्याला 'स्वरस' म्हणतात. या संस्कारामुळे मनुष्याला मरणाबद्दल जी भीती वाटते तोच 'अभिनिवेश' होय. सामान्य माणसांप्रमाणेच ज्ञानी माणसांच्याही मनात तो अवस्थित असतो. सारांश, मरणाबद्दल सर्वांच्याच मनात भय असते.

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।**
**जन्तुर्मरणजन्मभ्यां परिभ्रमति चक्रवत्।।५.६३।।**

जन्मानंतर मरण आणि मरणानंतर जन्म हे चक्र सारखे फिरत राहते. या चक्रात सारे जीवजंतू निरंतर भरडले जातात. अनेक जन्मांतरांत मृत्यूचा अनुभव घेऊन त्याचा खोल संस्कार मनावर उमटलेला असल्यामुळे मृत्यूचे नाव घेताच लोक घाबरतात. मरणाचे दु:ख कसे असते याचा या जीवनात तर आपल्याला अनुभव नाही. कारण अजून आपल्याला मरायचे आहे. तरी देखील प्रत्येक मनुष्य मृत्यूचा उच्चार करताच भयभीत होतो. मागच्या अनेक जन्मात जीवात्म्याने मरणदु:ख अनुभवले आहे. कारण मृत्यूनंतच पुन्हा जन्म होत असतो. एका संस्कृत कवीने हे मोठ्या सुंदर रीतीने व्यक्त केले आहे. ईश्वरासमोर जाऊन तो प्रार्थना करतो-

**वपु: प्रादुर्भावादनुमितमिदं जन्मनि पुरा**
**पुरारे न क्वापि क्वचिदपि भवन्तं प्रणतवान्।**
**नमन्मुक्त: सम्प्रत्यहमतनुऽग्रेऽप्यनतिमान्।**
**इतीश: क्षन्तव्यस्तदिदमपराधद्वयमपि।।**

ईश्वराजवळ जाऊन तो क्षमा मागतो की, भगवन्, माझ्याकडून दोन अपराध घडले आहेत. त्याबद्दल मला क्षमा करा. आम्ही जन्म घेतल्यामुळे असे अनुमान करू शकतो की, गेल्या जन्मात आपल्यासमोर येऊन मी कधी शरणागत झालो नाही. ईश्वराला शरण न गेल्यामुळे आम्हाला वारंवार जन्म घ्यावा लागतो. हा एक अपराध झाला. या जन्मात मी आपल्याला शरण आल्यामुळे मला मुक्ती मिळणार आहे. त्यानंतर मला जन्म मिळणार नाही. म्हणून यापुढे शरीरच मिळणार नाही. हा दुसरा अपराध आहे. गेल्या जन्मात मी नमस्कार केला नाही आणि

यानंतर जन्म नसल्यामुळे मी नमस्कार करू शकणार नाही. या दोन अपराधांसाठी भगवन्, मला क्षमा करा.

श्लोकाचे तात्पर्य असे की, गेल्या जन्मात आपल्याला मरण आले म्हणूनच आपल्याला नवा जन्म मिळाला आहे. आपला मृत्यू झालाच नसता तर आपला पुन्हा जन्मदेखील झाला नसता. अशी शेकडो-हजारो मरणे अनुभवल्यामुळे जीवात्म्याच्या मनात मरणदु:ख रुतून बसले आहे. त्यामुळे मनुष्याला मृत्यूबद्दल भय वाटते. म्हणून मनुष्याला मृत्यू नकोसा वाटतो. परंतु जन्म हा जसा शरीराचा धर्म आहे तसाच मृत्यूदेखील शरीराचा धर्म आहे. हे शरीर सोडू नये, शरीराशी संबंधित नातीगोती, घर-शेती इत्यादी सोडून जाऊ नये, असे प्रत्येकाला वाटते. परंतु मृत्यू अटळ असतो. युगायुगांपासून मनुष्याच्या मनात दडलेले मृत्युभय हाच 'अभिनिवेश' होय.

मला मरण नको असे म्हटल्याने मृत्यू यायचा राहत नाही. योग्य वेळ येता तो त्याच्या पावलांनी हळूच येतो आणि मानवी शरीरातील प्राण हरून नेतो. शास्त्रकारांनी म्हटले आहे की, मृत्यूसारखी शाश्वत गोष्ट या जगात दुसरी नाही. विद्या, ऐश्वर्य इ. गोष्टी माणसाला भाग्याने मिळतात. तर कुणाला मिळत नाहीत. परंतु मृत्यू मात्र प्रत्येकाला हमखास मिळतोच. इच्छा असो अथवा नसो, प्रत्येक जीवाला मृत्यूला सामोरे जावेच लागते. मृत्यू कधी एखाद्याच्या घरापर्यंत जातो तर कधी मनुष्याला स्वत:कडे खेचून नेतो. काही लोक घरात बसल्या बसल्या मरण पावतात, तर काही लोक घराबाहेर पडून आपल्या पायाने मृत्यूच्या दाढेत शिरतात. आपण मात्र म्हणतो की, अरेरे, बिचारा घराबाहेर गेला नसता तर मेला नसता. मनुष्य वाचणार असेल तर तो कुठेही वाचतो आणि मरणार असेल तर कुठेही मरतो. मृत्यूच्या अटळपणाविषयी एक कथा सागितली जाते.

बगदादच्या बादशहाचा एक विदूषक अत्यंत आवडता होता. एके दिवशी तो बादशहाकडे धावत धावत आला आणि घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला, ''महाराज, मला आपला अत्यंत वेगवान उत्तम घोडा द्या. मला हे शहर सोडून बसरा शहरात पळून जायचे आहे.''

बादशहाला मोठे आश्चर्य वाटले. त्याने विचारले, ''इतक्या चटकन् हे शहर सोडून जाण्यासारखे काय घडले?'' तेव्हा विदुषकाने सांगितले.

''महाराज इकडे येताना मी तुमच्या बागेतून येत होतो. तेव्हा बागेच्या कोपऱ्यात मला यमदूत दिसला. एखाद्या राक्षसासारखा काळकभिन्न मला बघून तो हसला आणि खूण करून मला जवळ बोलावले. ज्याअर्थी तो मला जवळ बोलावतो त्याअर्थी तो मला मारण्यासाठीच आला आहे. हे मी तात्काळ ओळखले, आणि धावतच तुमच्याकडे आलो. तो या शहरात आहे. त्यामुळे मला मरणाचे भय आहे. महाराज दया करा आणि माझा जीव वाचवण्यासाठी मला आपला घोडा द्या. मी आता निघालो तर संध्याकाळपर्यंत बसरा शहरात पोहोचेन.''

बादशहाला त्याची घाबरगुंडी पाहून दया आली. त्याने आपला उत्तम घोडा त्याला दिला आणि बिचारा विदूषक अत्यंत वेगाने दौडत बसरा शहराकडे निघून गेला. थोड्या वेळाने बादशहा आपल्या बागेत फिरायला गेला तेव्हा त्याला कोपऱ्यात उभा असलेला यमदूत दिसला. बादशहाने यमदूताला विचारले,

''का रे बाबा, माझ्या विदुषकाला का बरे घाबरून सोडलेस?''

''मी काही त्याला घाबरवले नाही. तो मला दिसल्यावर मला त्याला काही विचारायचे होते. पण मी बोलावताच तो घाबरला आणि पळून गेला.'' यमदूताने उत्तर दिले.

''तुला काय विचारायचे होते?'' बादशहाने विचारले.

''मला त्याला हे विचारायचे होते,'' यमदूत म्हणाला, ''की बाबा रे, तुझी माझी भेट आज संध्याकाळी

बसरा शहरी ठरलेले असताना तू अजून बगदादमध्ये कसा काय आहेस?''

''तो तर आत्ताच बसरा शहराकडे निघून गेला.'' बादशहा म्हणाला.

यमदूत समाधानाने हसला आणि म्हणाला, ''मग त्याची माझी बसरा शहरी ठरलेली अपॉइन्टमेन्ट आहे. तिथे तो नक्की भेटेलच.''

मृत्यूपासून दूर पळालेल्या विदुषकाला शेवटी मृत्यूने गाठलेच. मृत्यू हा असा अटळ आहे. त्यापासून कोणीही दूर पळून जाऊ शकत नाही. पिकणे हा फळाचा धर्म आहे. फळ एकदा पिकले की ते हळूहळू खराब होत जाते. तुम्ही त्याला खराब होऊ नये म्हणून एखाद्या लोखंडी आवरणात झाकून ठेवले तरी ते खराब व्हायचे राहत नाही. त्याप्रमाणे शरीर हे विकारी आहे. अस्ति, जायते, विवर्धते, विपरिणमते, अपक्षीयते आणि विनश्यति हे शरीराचे सहा विकार मानले जातात. कितीही प्रयत्न केला तरी शरीर आहे तसे राहत नाही. ते सारखे बदलत असते. मी मरणारच नाही असा कितीही हट्ट केला तरी मृत्यू माणसाला सोडत नाही. वाचण्याचे हजार उपाय केले तरी देखील मृत्यू येतोच. असे मरणासंबंधी भय निर्माण करून 'अभिनिवेश' माणसाला त्रास देत असतो. जर मरणाची भीती नको असेल तर आपल्या ठिकाणी न मरणारे जे तत्त्व आहे त्याचे ज्ञान करून घेतले पाहिजे.

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः।।गीता, २.२३।।**

जेव्हा युद्धभूमीवर अर्जुन मरणभयाने व्याकुळ झाला, मरण स्वतःचे असो की आप्तांचे, त्यावेळी भगवान श्रीकृष्णांनी त्याला उपदेश केला की, मी ज्या तत्त्वाविषयी तुला सांगतो आहे ते जर तू समजू शकलास तर तू शस्त्राने कापला जाणार नाहीस, अग्नी तुला जाळणार नाही. पाण्याने तू भिजणार नाहीस आणि वायू तुला शोषणार नाही. आत्मतत्त्वाच्या अमरत्वाबद्दल श्रीकृष्णाने असे सांगितले. गीतेमधील हा उपदेश आज देखील आपल्या सैनिकांना केला जातो. त्याचे एकच कारण. ते असे की, त्यांना मृत्यूचे भय वाटू नये. गीतेत तर एवढे सांगितले आहे की, योगसाधना करून योग्याला जी स्थिती प्राप्त होते तीच एखाद्या योद्ध्याला आपले कर्तव्यपालन करीत असताना युद्धभूमीवर मृत्यू आल्यानंतर प्राप्त होते. आपल्या शरीराबद्दलचे ममत्व सोडून मातृभूमीसाठी प्राणार्पण करायला जो सिद्ध असतो तो देखील एक प्रकारचा योगीच होय.

**द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ।**
**परिव्राड्योगयुक्तश्च रणेचाभिमुखेहत्ताः।।**

सूर्यमंडल भेदून स्वर्गात जाणाऱ्या, मुक्ती मिळविणाऱ्या दोनच व्यक्ती या जगात आहेत. योगसाधना करणारा सर्वसंगपरित्यागी संन्यासी हा एक आणि युद्धभूमीवर शत्रूशी युद्ध करणारा, आपल्या शरीरावरील आणि प्राणावरील ममत्व सोडून देशासाठी प्राणार्पण करणारा योद्धा हा दुसरा. योगी आणि योद्धा यांमध्ये कोणते साम्य आहे? तर योगी आपल्या योगबळाने शरीरावरील आणि प्राणावरील ममत्वाचा त्याग करतो. त्याप्रमाणे योद्धा देखील आपल्या देशप्रेमाने आपल्या शरीरावरील आणि प्राणावरील ममत्वाचा त्याग करतो. दोघांकडे त्यागबुद्धी समान असल्यामुळे दोघांचीही अंतिम गती एकसारखी असते.

अभिनिवेश माणसाच्या मनात मृत्यूबद्दल भीती निर्माण करतो. ही भीती समूळ नष्ट होण्यासाठी ज्याला मृत्यू नाही अशा अमर आत्मतत्त्वाला जाणण्याची आवश्यकता असते. पृथ्वीमंडली ही कर्मभूमी मानली जाते. येथे जो कुणी आला तो मरणापासून सुटला नाही. योगी असो की भोगी, दोघांचीही शरीरे मृत्यूने खाऊन टाकली आहेत.

काही योग्यांनी मेलेल्यांना जीवदान दिल्याच्या कथा आपण ऐकतो. ज्यांनी इतरांना जीवदान दिले ते तरी स्वत: आज जिवंत आहेत काय? मेलेल्यांना जीवदान देण्याचे सामर्थ्य ज्यांच्याजवळ होते त्यांना देखील मरावेच लागते. योगी चांगदेव चौदाशे वर्षे जगला असे म्हणतात परंतु त्यांनतर काय? शेवटी मृत्यूने त्याच्या शरीराचा घास घेतलाच. म्हणून मृत्यू ही या जगातली शाश्वत गोष्ट आहे.

कन्नडमधील एका वचनाचा आशय असा आहे– एखादे हरीण आपला चारा शोधण्यासाठी जात आहे. त्याच्या पुढे पुढे सिंहदेखील चालला आहे. हरीण हे सिंहाचे भक्ष्य होय. सिंह चालत असताना एखाद्या गाढवाप्रमाणे चालत नाही. तर अधूनमधून तो मागे वळून पाहत असतो. या पाहण्यालाच 'सिंहावलोकन' असे म्हणतात. जो मागेमागे पाहत चाललेला असतो त्याच्यामागे जाऊन हरीण जर जीव वाचवून परत आले तर ते मोठे आश्चर्यच मानले पाहिजे. अर्थात् ते वाचणारच नाही. त्याप्रमाणे मृत्युभूमीत जन्म घेऊन कोणी जिवंत राहणेच शक्य नाही. भोगी माणसे आयुष्यभर जिवंत राहतात किंवा आयुष्य संपण्यापूर्वीही मरतात. योगी लोक आपले आयुष्य वाढवू शकतात. एखाद्याला एक लाख रुपये दिले आणि आयुष्यभर पुरव असे सांगितले तर तो काय करील? एखादा हुशार मनुष्य एखाद्या व्यापारात ते पैसे गुंतविण्याऐवजी किंवा जुगारात उधळण्याऐवजी सुरक्षित ठेव म्हणून बँकेत ठेवील आणि त्याच्या येणाऱ्या व्याजात आपला उदरनिर्वाह करील. तो मुद्दल कायम ठेवून त्याच्या व्याजावर जीवन जगतो. योगीपुरुष आपले आयुष्य याच प्रकारे वाढवत असतो.

तुम्हाला माहीत असेल की संपूर्ण चोवीस तासात एकवीस हजार सहाशे वेळा आपला श्वासोच्छवास होत असतो. एक श्वास हृदयात जातो आणि आघात करून परत येतो. असे चोवीस तासात एकवीस हजार सहाशे वेळा घडते. हे आघात सहन करून आपले हृदय जास्तीत जास्त शंभर वर्षे टिकू शकते. योगी आणि सामान्य माणसात कोणता फरक आहे? योगीपुरुष सहाशे वर्षे, हजार वर्षे, चौदाशे वर्षे जगल्याची उदाहरणे आपल्याला माहीत आहेत. आपल्या श्वासगतीवर नियंत्रण ठेवूनच योगी आपले आयुष्य वाढवीत असतो. दररोज २१,६०० वेळा आघात सहन करून आपले हृदय शंभर वर्षे जिवंत राहू शकते. ही श्वाससंख्या कमी केली तर ते त्यापेक्षाही अधिक काळ जिवंत राहू शकते. एकदा श्वास घेतला की योगी तो आतच पाच दहा मिनिटे अथवा अर्धाएक तास कोंडून ठेवू शकतो. ही 'प्राणायाम' साधना होय. या प्रकारे श्वासोच्छवासांची संख्या कमी करून आपले आयुष्य वाढविता येते, असे योगशास्त्रात सांगितले आहे. आपण जेवढे भरभर श्वासोच्छवास करू तेवढे आपले आयुष्य कमी होईल आणि दीर्घ श्वसन करून त्यांची संख्या जेवढी कमी करू तेवढे आपले आयुष्य वाढेल.

प्राणाचा स्वभावच आहे की तो आत खेचला की अधिक वाढतो. तो आतल्या आत वृद्धिंगत होतो. तो आतल्या आत इतका वाढतो की तुम्ही त्याला रोखू शकत नाही. एकदा श्वास आत घेऊन तो आत रोखून पाहा. तुमच्या लक्षात येईल की, तो आत इतका वाढतो की तुम्हाला तो बाहेर सोडायची घाई होते. आत वाढणाऱ्या प्राणाचा उपयोग करून घेण्याची कला आपल्याला अवगत नसते, म्हणून आपण अधिक काळ तो आत रोधून ठेवू शकत नाही. योगीपुरुष एकदा श्वास घेतो आणि आत वाढलेल्या प्राणवायूचा योग्य तो उपयोग करून घेतो. एका दिवसात त्याने फक्त एक हजार श्वास घेतले तरी त्याचे वीस हजार श्वास वाचतात. हृदयावर श्वासाचे होणारे तेवढेच आघात कमी होतात आणि त्याचे आयुष्य वाढत जाते. असे करून त्याचे आयुष्य शेकडो वर्षे वाढू शकते. असे असले तरीही त्याचे मरण मात्र टळत नाही. त्याला केव्हा ना केव्हा तरी मरावेच लागते. हृदयाची आघात सहन करण्याची शक्ती सरली की त्याचे हृदय निकामी होऊन तो मरतो.

योगबळाने एखादी व्यक्ती दीर्घायुषी होऊ शकते. प्राचीन ग्रंथांत हनुमान, बिभीषण, अश्वत्थामा, बली, व्यास, कृप आणि परशुराम हे सात चिरंजीव मानले आहेत. चिरंजीव याचा अर्थ अमर असा नव्हे. त्या काळापासून ते आजपर्यंत शरीराने जिवंत आहेत असे नाही. शंभर वर्षे जगणारा हजार वर्षे जगेल, परंतु केव्हातरी त्याला मृत्यू येईलच. मृत्यू असे विदारक सत्य आहे. मी मरतो, मी मरतो अशी चिंता करीत काही लोक आयुष्य संपण्याआधी चिंतेनेच मरतात. एकदा एका गावात मृत्यू शिरला. जेव्हा सर्व लोकांना हे समजले तेव्हा ते चिंतातुर झाले. मृत्यू आला आणि त्याने चार-दोन लोकांचे प्राण घेतले. परंतु मृत्यू आला या भीतीने शंभरापेक्षा अधिक लोक मेले. मृत्यूची भीती देखील अशी जीवघेणी असते. एखादा मनुष्य कड्यावरून खाली कोसळतो आणि खाली पडल्यानंतर हातपाय मोडून, कपाळमोक्ष होऊन मरतो- तर एखादा मनुष्य खाली पडता पडता आपण मरणार या भीतीने खाली पडण्याआधीच मरतो. एखादा कितीही उंचावरून खाली पडून जबर दुखापत होऊन देखील मरत नाही. सांगण्याचे तात्पर्य असे की, मृत्यूपेक्षा मृत्यूच्या भीतीनेच माणसे लवकर मरतात. म्हणून मृत्यूची चिंता करू नये तो केव्हातरी येणाराच आहे. वेळ येताच तो येईलच. कितीही प्रयत्न केला तरीही त्याच्यापासून आपली सुटका नाही. अशीच दृढभावना बाळगावी. म्हणून मृत्यूचे भय हाच 'अभिनिवेश' आहे.

हा 'अभिनिवेश' कोणाजवळ असतो? तर तो ज्ञानी माणसाजवळही असतो आणि अज्ञानी माणसाजवळही असतो. जर दोघांजवळही अभिनिवेश असेल तर ज्ञानी आणि अज्ञानी असा फरक कसा करावा? शास्त्रात सांगितले आहे की, जो आत्मज्ञानी असतो त्याच्या ठिकाणी अभिनिवेश नसतो, परंतु जो केवळ शास्त्रज्ञानी असतो त्याच्याजवळ मात्र तो असतो. आत्मज्ञानी मात्र मरणभयापासून अलिप्त असतो. मरण आले की त्याला वाटते बरे झाले. किती दिवस हे शरीर सांभाळायचे? वाढवायचे? खाऊपिऊ घालायचे? या विचाराने तो संतुष्ट होतो. शरणांनी मरणाला महानवमी (नवरात्र-महोत्सव) म्हटले आहे. शरणांना मरण सणाप्रमाणे वाटते तर इतर सामान्य माणसांना ते शिमग्यासारखे वाटते.

अशाप्रकारे हे पाच प्रकारचे क्लेश जीवात्म्याला कोणत्या ना कोणत्या प्रकारे त्रास देतात, म्हणूनच त्यांना क्लेश मानले आहे. त्यांचे छेदन कसे करावे? तर-'छेदने कर्ममूलस्य परशुः शिवभावना।।१२-३०।।'

क्लेशरूपी पानांचे छेदन करण्यासाठी शिवभावनारूप म्हणजे शिवोऽहम् भावनारूप कुऱ्हाडीची आवश्यकता असते. मी शिवस्वरूप आहे या भावनेचे चिंतन जेव्हा तुमच्या मनात निरंतर होऊ लागेल, जेव्हा तुम्ही शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धी यांच्यापेक्षा विलक्षण असलेल्या आत्मरूपाचे ज्ञान प्राप्त करून घ्याल तेव्हा ते पंचक्लेश तुम्हाला त्रास देणार नाहीत. अशा प्रकारे संसारविषवृक्षाच्या क्लेशरूपी पानांचे छेदन केले जाते.

एक इरसाल व्यापारी होता. तो आपल्या दुकानावर कामासाठी एखादा नोकर ठेवून घेत असे आणि त्याला आधीच त्याच्या आईवडिलांचे नाव, त्याची जात विचारून घेत असते. जोपर्यंत महिना पूर्ण होत नाही तोपर्यंत पगार मिळणार नाही, जर मध्ये सोडून गेलास तर एक पैसा देखील मिळणार नाही, असे तो नोकराला सांगत असे. नोकर कामावर आला की दुसऱ्या दिवसापासून तो त्याला शिव्या द्यायला सुरुवात करायचा. त्याच्या आईवर, त्याच्या बापावर, त्याच्या जातीवर. शिव्या ऐकून नोकराला केव्हातरी उबग येत असे. आणि कामही नको आणि शिव्याही नको असा विचार करून नोकर काम सोडून जात असे. कोणी आठ दिवस, कोणी दहा दिवस त्याच्या शिव्या ऐकायचा आणि नोकरी सोडून निघून जायचा.

व्यापाऱ्याला बरेच झाले. कामच्या कामही होते आणि पैसा देखील द्यायला नको. असे अनेक नोकर आले आणि गेले. त्याची कीर्ती ऐकून एकाने त्याच्याकडे मुद्दाम नोकरी धरली. व्यापाऱ्याने विचारले, ''तुला माझे नियम माहीत आहेत की नाहीत?''

''हो, माहीत आहेत आणि मला ते सारे मान्य आहेत.'' नोकराने उत्तर दिले. व्यापाऱ्याने त्याचे नाव, त्याच्या आईवडिलांची नावे आणि जात यांची नेहमीप्रमाणे चौकशी केली. त्यानेही सारे यथास्थित सांगितले.

झाले, दुसऱ्या दिवसापासून व्यापाऱ्याने त्याला शिव्या द्यायला सुरुवात केली. आठ दिवस झाले, पंधरा दिवस झाले, वीस दिवस झाले. व्यापाऱ्याच्या शिव्यांचा त्या नोकरावर काहीच परिणाम होईना. त्याने शिव्या दिल्या की तो हसायचा. व्यापाऱ्याला काहीच कळेना. त्याचा महिना भरू नये आणि त्याला पैसे द्यायला लागू नये म्हणून त्याने जास्त शिव्या द्यायला सुरुवात केली. तरीही नोकर गप्पच. महिना भरायला दोन दिवस राहिले तेव्हा व्यापाऱ्याने नोकराला बोलावून विचारले, ''मी तुला एवढ्या शिव्या दिल्या तरी तुला राग कसा येत नाही? तुझ्या आईवरून, तुझ्या बापावरून, तुझ्या जातीवरून मी रोज शिव्या घालतो. परंतु ते ऐकून तू हसतोस कसा? याचे कारण तरी सांग.''

नोकर हसला आणि म्हणाला, ''दोन दिवस पूर्ण होऊ द्या, नंतर मी तुम्हाला त्याचे कारण सांगेन.'' दोन दिवस भरले. महिना पूर्ण झाला. व्यापाऱ्याने त्याला पगार दिला आणि पुन्हा त्याला वरीलप्रमाणे विचारले. तेव्हा नोकराने हसून उत्तर दिले, ''तुम्ही एवढ्या शिव्या मला दिल्या. परंतु त्या मला लागल्या नाहीत. कारण माझे आणि माझ्या आईबापाचे खरे नावच मी तुम्हाला सांगितले नाही. माझी खरी जातदेखील लपवून ठेवली. त्यामुळे तुम्ही शिव्या देत होता आणि मी कशी जिरवली म्हणून हसत होतो.''

या कथेचे तात्पर्य असे की, तो नोकर शिव्या ऐकत होता. परंतु जिचे नाव घेऊन व्यापारी शिव्या देत होता ते त्याच्या आईचे नाव नव्हते. म्हणून त्याला राग येण्याचे काहीच कारण नव्हते. त्याला त्या नावाविषयी अभिमान नव्हता. म्हणून तो रागावत नव्हता. त्याप्रमाणे जो मनुष्य शरीर-इंद्रिये इत्यादी मध्ये अभिमान करतो त्यालाच पंचक्लेशांचा त्रास होतो. ज्याच्या मनात शिवात्मभावना दृढ झालेली असते त्याच्या ठिकाणी कोणताही अभिमान उरत नाही. त्यामुळे त्याला पंचक्लेशांचा त्रास होत नाही. म्हणून केवळ शिवभावनेनेच अर्थात् शिवभावनारूपी कुऱ्हाडीनेच क्लेशरूपी पानांचे छेदन करता येते.

**अज्ञानराक्षसोन्मेषकारिणः संहृतात्मनः।**
**शिवध्यानं तु संसारतमसश्चण्डभास्करः॥१२.३१॥**

अज्ञानरूपी राक्षसाचा संहार करण्यासाठी शिवध्यान हेच एक मुख्य साधन आहे. माध्यान्हीच्या प्रखर सूर्यप्रकाशात जसा अंधार राहू शकत नाही, त्याचप्रमाणे संसाररूपी अंधार तेजस्वी अशा शिवध्यानापुढे टिकत नाही. याप्रमाणे पंचक्लेशांपासून मुक्त राहून जो शिवध्यानात निमग्न राहतो त्यालाच शिवयोगसमाधिस्थ म्हणतात. या प्रकारे शिवयोगसमाधी साधण्यासाठी प्रत्येक मनुष्याला निरंतर शिवभावना करावी लागते, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ॐ शांतिः शांतिः शांतिः॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१३ एप्रिल १९९२

## शिवयोगसमाधिस्थल–६

जिज्ञासू सद्भक्तांनो,

योग म्हणजे संबंध जोडणे. शिवयोग म्हणजे शिवाशी संबंध जोडणे. ज्याच्याशी आपला संबंध जुळत असतो त्याच्या स्वभावाचा प्रभाव आपल्यावर पडतो. संगती फार महत्त्वाची असते. दुर्जनाशी संगती केली तर मनुष्याला दुःख भोगावे लागते आणि सज्जनांशी संगती केली तर मनुष्याला सुखाचा अनुभव येतो. ज्याच्याजवळ जे भलेबुरे असते तेच तो आपल्याला देत असतो. त्याच्याजवळ जे नाही ते तो आपल्याला देऊ शकत नाही. सांसारिक सुखात सुख थोडे असते आणि दुःख अधिक असते. थोड्या सुखासाठी आपल्याला बरेच दुःख भोगावे लागते. संसार हा दुःखसागर आहे. सागरात बुडाल्यावर त्यातील क्षारयुक्त पाणीच मनुष्याला प्यावे लागते. इच्छा असून देखील त्याला गोडे पाणी प्यायला मिळत नाही. जीवाचा संसाराशी असलेला संबंध तोडून त्याचा शिवाशी संबंध जोडणे हीच शिवयोगसाधना आहे.

शिवाशी आपला संबंध नाही काय? असा प्रश्न येथे उपस्थित होईल. आपल्याला जाणीव असो अथवा नसो, शिव हा सर्वव्यापक आहे. जसे आकाश. आकाश म्हणजे पोकळी. आकाशाशी संबंध ठेवू नये असे तुम्हाला वाटले तरी तुम्ही काय त्यापासून मुक्त होऊ शकता? आकाशातच आपण राहतो, वावरतो, उठतो, बसतो, सर्व क्रिया करतो. असे असताना आकाशाशी आपला संबंध नको असे म्हणून काय उपयोग? जी वस्तू व्यापक असते तिचा सगळ्यांशी संबंध असतो.

विभू म्हणजे व्यापक. पृथ्वी, जल, अग्नी हे वेगवेगळे पदार्थ असून पंचमहाभूतांपासून निर्माण झालेले असंख्य पदार्थ वेगवेगळे आहेत. हे पदार्थ परस्परांशी संबंध आल्याविना राहू शकतात. परंतु या सर्व पदार्थांचा आकाशाशी संबंध असल्यामुळे ते आकाशाशिवाय राहू शकत नाहीत. पंचमहाभूतांत सर्वांत व्यापक भूत आकाश हेच होय. शिवापूसन प्रथम आकाशच उत्पन्न झाले. उपनिषदांत म्हटले आहे– तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः।

ईश्वरापासून आकाश हे पहिले भूत उत्पन्न झाले. म्हणून हे भूत बरेचसे ईश्वरासारखे आहे. ईश्वराच्या ठिकाणी असलेले बरेचसे गुण त्याच्या ठिकाणी विद्यमान आहेत. अस्तित्व आहे, पण दिसत नाही. आपण आकाशातच राहतो, परंतु त्याचा स्पर्श आपल्याला होत नाही. त्याचा कुणाला धक्का लागत नाही. झाडावर अथवा इमारतीवर गाडी आदळून अपघात झाल्याच्या बातम्या तुम्ही ऐकता, वाचता परंतु आकाशावर आदळून कुठे एखादा अपघात झाल्याची बातमी तुम्ही ऐकली आहे का? आकाशाच्या स्पर्शाची जाणीवच माणसाला कधी होत नाही. आकाश हे अत्यंत सूक्ष्मतत्त्व आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय पंचमहाभूतांचे गुण मानले जातात. आकाशाचा गुण शब्द आहे. त्यांच्या ठिकाणी इतर चार गुण नाहीत. परमात्मा हा त्याही पलीकडला आहे. त्याच्या ठिकाणी शब्द हा गुण देखील नाही. 'अशब्दम्– अस्पर्शम्– अरूपम्– अव्ययम्' असे त्याचे वर्णन केले जाते. तो शब्दातीत आहे. आकाशात शब्द हा गुण आहे. परंतु परमात्म्यात तो गुण देखील नाही.

शब्दामुळे आकाश ओळखता येते. प्रतिध्वनी हा आकाशात होतो. वस्तूवर आघात झाल्यानंतर जो ध्वनी होतो त्या ध्वनीचा प्रतिध्वनी याला आकाशाचा शब्दगुण म्हटले जाते. विजापूरच्या गोलघुमटात तुम्ही एकवेळ

कुणाचे नाव घेतले तर त्या घुमटात सातवेळा प्रतिध्वनी होतात. प्रतिध्वनी हा आकाशाचा गुण होय. आकाशात स्पर्शगुण नसल्यामुळे त्याचा स्पर्श आपल्याला होत नाही.

आकाशानंतर वायू उत्पन्न होतो. वायूत दोन गुण आहेत. शब्द आणि स्पर्श. त्याच्यात स्वत:चा एक गुण आहे. आणि त्याने आकाशाचा एक गुण घेतला आहे. वायू वाहतो तेव्हा त्याचा आवाज ऐकायला येतो आणि त्याचा स्पर्शदेखील आपल्याला होतो. वायूनंतर अग्नी उत्पन्न होतो, त्यामध्ये शब्द आणि स्पर्श या गुणाबरोबर रूप हा देखील गुण आहे. वायू दिसत नाही, परंतु अग्नी दिसतो. म्हणजे त्यात रूप हा गुण आला. जे सूक्ष्म आहे ते अधिकाधिक स्थूल होत चालले आहे. अग्नीनंतर जलाची उत्पत्ती होते. जलात शब्द, स्पर्श, रूप या गुणांबरोबरच रस हा देखील गुण आहे. अग्नीत रस नाही, जलात मात्र तो आहे. जेव्हा पृथ्वीची उत्पत्ती होते तेव्हा तिच्यात शब्द, स्पर्श आणि रूप आणि रस या गुणांबरोबरच गंध हा देखील गुण असतो.

जेव्हा मनुष्य आपल्या इंद्रियांच्या द्वारे या प्रपंचाचा अनुभव घेतो त्यावेळी ज्या भूतात अधिकाधिक गुण असतात त्यांचा त्याला चटकन् साक्षात्कार होतो. कारण त्यांचा त्याच्या पाचही ज्ञानेंद्रियांशी साक्षात् संबंध येतो आणि त्याच्या अस्त्विाबद्दल त्याच्या मनात कोणताही संदेह राहत नाही. उदा. पृथ्वी. पृथ्वीत पाचही गुण असल्यामुळे मनुष्याची पाचही ज्ञानेंद्रिये तिचे अस्तित्व नि:संदिग्धपणे मान्य करतात. कारण पाचही इंद्रियांचे विषय पृथ्वीमध्ये विद्यमान आहेत. या पुढेपुढे जेव्हा आपण जाऊ तेव्हा एकेका इंद्रियाचा विषय कमीकमी होत जातो. पृथ्वी सोडून जेव्हा तुम्ही जलतत्त्व पाहाल तेव्हा तेथे गंध नसल्यामुळे घ्राणेंद्रियाला काम राहणार नाही. येथे एक इंद्रिय कुचकामी ठरते. जेव्हा अग्नीकडे पाहाल तेव्हा रसगुण नसल्यामुळे तुमचे रसनेंद्रिय कुचकामी ठरते. त्यानंतर वायूकडे जाल तेव्हा तेथे रूप नसल्यामुळे तुमचे नेत्रेंद्रिय कुचकामी ठरते. त्यापुढे जेव्हा आकाशापर्यंत पोहोचाल तर तेथे स्पर्शगुण नसल्यामुळे तुमचे त्वगेंद्रिय कुचकामी ठरते.

आकाशाचा अनुभव घेण्यासाठी आपले त्वगेंद्रिय, आपले नेत्रेंद्रिय, आपले रसनेंद्रिय आणि आपले घ्राणेंद्रिय यांचा काहीही उपयोग होत नाही. फक्त श्रवणेंद्रियानेच आकाशाचे अस्तित्व जाणता येते. आकाशाचेही आकाश असलेला जो परमात्मा, त्याच्याकडे जर आपण गेलो तर तेथे श्रवणेंद्रियाचाही काही उपयोग होत नाही. तुमच्याजवळ ज्ञान घेण्यासाठी पंचज्ञानेंद्रिये आहेत हे खरे आहे. परंतु जी वस्तू पंचविषयांच्याही पलीकडची आहे तिचे ज्ञान तुमच्या ज्ञानेंद्रियांना कसे होणार? अर्थात् होणारच नाही. तेथे तुमची सारी ज्ञानेंद्रिये कुचकामी ठरतात. 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह' त्याला जाणण्यासाठी ती (ज्ञानेंद्रिये) गेलीत परंतु हाती काही न आल्यामुळे परत आली. मनुष्याचा ज्याच्याशी सहजपणे साक्षात् संबंध येतो त्याच्याशीच तो जोडलेला असतो. शब्दाशी, स्पर्शाशी, रूपाशी, रसाशी, गंधाशी. कारण ते सहज प्रतीत होतात. त्यांच्याशी संबंध जोडायला काही कष्ट पडत नाही म्हणून आपले मन त्याच विषयांत निरंतर रममाण होत असते. परंतु मनाला त्यात रमू देणे हानिकारकच होय.

एखाद्या वृक्षाला अनेक फांद्या असतात. त्यावर असंख्य फळे लागलेली असतात. एक माकड ती फळे खाते. ते एक फळ पूर्ण खात नाही, अर्धवट खाते. एक फळ खाता खाता त्याला दुसरे दिसते. पहिले टाकून ते दुसरे खायला लागते. दुसरे सोडून तिसरे खाऊ लागते. माणसाप्रमाणे एका जागी निवांत बसून शिस्तीत ते आपली भूक भागवून घेत नाही. मनुष्याचे मन देखील तसेच आहे. मन प्रवचन ऐकत असते आणि अचानक जर कोठून खमंग वास आला तर ऐकणे सोडून ते तिकडे पळते. याप्रमाणे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांचा थोडा थोडा

अनुभव घेत ते सारखे फिरत असते. माकडासारखे त्याला तसेच भ्रमू दिले तर संसारातून कधीही सुटका व्हायची नाही. ते 'भवा'कडे धावत सुटते, भगवंताकडे जात नाही. ज्या सुखाच्या अपेक्षेने ते विषयांकडे धावत सुटते ते विषय मिळून देखील त्याची तृप्ती केव्हाच होत नाही, होणे शक्य नाही. असे जन्मजन्मांतरांतून ते कितीही भटकत राहिले तरी त्याला पूर्ण तृप्ती कधीच लाभत नाही. मनाची ही अशी धाव रोखण्यासाठी शिवचिंतनाची आवश्यकता असते. त्याने संसाराचे चिंतन सोडून देऊन जर भगवान शिवाचे चिंतन करायला आरंभ केला तर तोच शिवयोग होय. त्याचा संबंध शिवाशी जुळणे हाच शिवयोग होय.

शिवयोगात तुम्ही तुमच्या शरीराच्या द्वारा, वाणीच्या द्वारा, मनाच्या द्वारा शिवाशी संबंध साधता यावा, यासाठीच आपल्या आचार्यांनी आपल्या हाती इष्टलिंग दिले आहे. केवळ पूजेच्या वेळीच नव्हे तर निरंतर शरीराचा शिवाशी संबंध असावा यासाठीच कंठात इष्टलिंग धारण केले जाते, मंत्रजप आणि शिवस्तुती करताना वाणीचा शिवाशी संबंध जुळतो आणि शिवध्यान, शिवचिंतन करीत असताना मनाचा शिवाशी संबंध साधला जातो. याप्रकारे शरीर, वाणी आणि मन या त्रिकरणांनी शिवाशी संबंध ठेवणे याचेच नाव शिवयोग आहे. शिवयोगसमाधीत जो साधक राहतो त्याला पंचक्लेश दुःखदायक ठरत नाहीत. सदैव शिवचिंतन करणाऱ्या मनुष्याला सांसारिक कष्ट झाले तरीही त्याचे मन शिवाशी संलग्न झाल्यामुळे त्याला दुःखानुभव येत नाही. संसारात राहून देखील दुःखापासून मुक्त राहण्याची कला म्हणजेच शिवयोग.

जाणीव असो अथवा नसो, आपला ईश्वराशी संबंध आहेच. मग तो नव्या रीतीने प्रस्थापित करावा लागतो की काय याविषयी आपण विचार करीत होतो. शिवाचा आपल्याशी निरंतर संबंध आहेच. ज्याप्रमाणे आकाशाशी आपला सदोदित संबंध आहे त्याप्रमाणे. आपल्याला त्याचे ज्ञान नसते इतकेच. हा संबंध अजाणतेपणी आहे. त्याचे ज्ञान करून घेणे हा शिवयोग होय. आपला आकाशाशी निरंतरसंबंध आहे याचे ज्ञान देखील आपल्याला नसते. परंतु जेव्हा घराच्या चार भिंतीमधील पोकळी म्हणजे आकाश होय, असे ज्ञान तुम्हाला होते तेव्हा आपण आकाशातच राहतो, उठतो, बसतो, खातो, पितो, सारे व्यवहार करतो असे ज्ञान होऊन आकाशाच्या आणि आपल्या नित्य संबंधाची तुम्हाला जाणीव होते. त्याचप्रमाणे आकाशालाही अवकाश देणारे परमात्मतत्त्व त्यापेक्षाही सूक्ष्म आहे. त्याचा आणि आपला नित्य संबंध आहेच. फक्त त्याचे ज्ञान आपल्याला नाही एवढेच.

जेव्हा शिवाच्या आणि आपल्या संबंधाचे ज्ञान होते तेव्हाच जीवात्म्यात सुधारणा होते. प्राथमिक शाळेतील मुले वर्गात शिक्षक नसताना कधीही गप्प बसत नाहीत. कुणी कुणाचे केस ओढतो, तर कुणी कुणाचा सदरा ओढतो. कुणी कोणाला चापट मारतो. असा सगळा गोंधळ वर्गात चालू असतो, परंतु जेव्हा शिक्षक वर्गात येतो तेव्हा सारी मुले चिडीचूप होऊन गप्प बसतात. देवासारखी. जणू या आधी काही घडलेच नाही. कुणी काही गोंधळ घातलाच नाही. समजा, शिक्षक वर्गात येऊन लपून बसला. तो वर्गात आहे हे मुलांना माहीत नाही अशा वेळी मुले काय करतात? गोंधळच घालतात. शिक्षक वर्गात आहे तरीही गोंधळ चालूच आहे; तो कशामुळे? शिक्षकाच्या केवळ अस्त्विामुळे मुलांचा गोंधळ थांबत नाही. तर त्याच्या अस्तित्वाचे ज्ञान जेव्हा मुलांना होते तेव्हाच ती शांत होतात. मुलांचा गोंधळ चालू असताना शिक्षक जर लपलेल्या जागेतून बाहेर येऊन त्यांच्यासमोर आला तर मुले लगेच गप्प बसतात. देवासारखी. जणू काही घडलेच नाही अशा चेहऱ्यांनी. त्याप्रमाणे प्रत्येक मनुष्याच्या मनात ईश्वराचे वास्तव्य असते.

बीजात जसा अंकुर असतो त्याप्रमाणे प्रत्येक जीवात्म्याच्या हृदयात भगवान शिवाचा निवास असतो, असे ज. रेणुकाचार्यांनी पिंडज्ञानस्थलात स्पष्टपणे सांगितले आहे. तुम्हाला ज्ञान असो अथवा नसो, तुमच्या हृदयात ईश्वर आहेच. परंतु काही माणसांचे आयुष्य सुधारले आणि काहींचे नाही याचे कारण कोणते? शिवाच्या अस्तित्वाचा बोध नाही हेच ते कारण होय. त्याचा बोध व्हावा यासाठी ज्यावेळी इष्टलिंग धारण केले जाते त्यावेळी 'धारयेदवधानेन शरीरे सर्वदा बुध:'।। (६-५१) अशी श्रीगुरू आज्ञा करतात. हे इष्टलिंग अवधानपूर्वक धारण कर. इष्टलिंगधारी बरेच आहेत. कोट्यावधी आहेत. सगळ्यांच्याच शरीरावर इष्टलिंगे आहेत. परंतु आपल्या शरीरावर इष्टलिंग आहे याचे भान किती लोकांना असते? ते नसतेच मुळी. फार कमी लोकांना असते. लोकांजवळ एवढा जागृतपणा नसतो. हातात किल्ली असून तिचा घरभर शोध घेणारे अनेक महाभाग असतात. ती त्याच्या हातामध्येच असते, पण तो घरभर धुंडाळत असतो. का? तर ती आपल्या हातामध्ये आहे याचे भानच त्याला नसते. त्याचप्रमाणे प्रत्येक मनुष्य ईश्वराचा शोध घेतो. कोठे? काशीमध्ये, केदारेश्वरला, बद्रीनाथला, रामेश्वरमध्ये. आम्ही तीर्थयात्रा कशासाठी करतो? तर ईश्वराला शोधण्यासाठी. काशीमध्ये तो नाही असे नाही. तो आहेच. तुम्ही जेथे जेथे जाल तेथे तेथे तो आहेच. तुम्ही जेथून आलात त्या ठिकाणीही तो आहे. जो मनुष्य शोध घ्यायला निघाला त्याच्या आत देखील तो आहेच.

मंदिरात ईश्वराला आरती ओवाळतात. त्यानंतर ती जमलेल्या भक्तांसमोर आणतात. तुम्हाला वाटते की पुजाऱ्याला पैसे हवे आहेत, म्हणून तुम्ही पाच दहा पैसे त्या थाळीत टाकता. ईश्वरावर ओवाळलेली आरती भक्तांसमोर आणण्याची परंपरा का निर्माण झाली? तर ज्या ईश्वराच्या दर्शनासाठी तुम्ही या मंदिरात आलात तो ईश्वर तुमच्या हृदयात देखील आहे, म्हणून त्यावर ओवाळलेली आरती तुमच्या हृदयात विराजमान असलेल्या ईश्वराला ओवाळण्यासाठी आणली जाते.

याप्रकारे प्रत्येक मनुष्याच्या अंत:करणात ईश्वराचे वास्तव्य असते. त्याच्याशी नव्याने संबंध जुळवण्याची गरज नाही. जोपर्यंत तुम्हाला हृदयस्थ परमात्म्याचे ज्ञान होणार नाही तोपर्यंत तुमचे जीवन सुधारणार नाही. आपल्या सिद्धान्तात 'अष्ट-आवरणे' मानली आहेत. 'आवरण' म्हणजे रक्षाकवच. 'आव्रियते देहादिकं येन तद् आवरणम्'. ज्याने आवृत्त केले जाते म्हणजे झाकले जाते त्याला आवरण म्हणतात. आवरणाचे दोन उद्देश असतात. वस्तूचे स्वरूप लपवणे किंवा तिचे रक्षण करणे. वेदान्तशास्त्रात मायेला आवरण असे म्हटले आहे. ती आत्म्याचे मूळ स्वरूप झाकून टाकते आणि प्रपंचाला दाखविते. परंतु आपल्या सिद्धान्तात 'आवरण' या शब्दाचा अर्थ रक्षा करणारे कवच असा होतो. आपल्या आचार्यांनी एक नव्हे, तर आठ प्रकारची आवरणे सांगितली आहेत. साधक सुरक्षित राहावा हा त्या पाठीमागचा उद्देश आहे. साधक जर सुरक्षित असेल तरच तो आपल्या लक्ष्यापर्यंत पोहोचू शकेल. जर तो असुरक्षित असेल तर आपल्या लक्ष्यापर्यंत पोहोचू शकणार नाही.

गुरू हे रक्षाकवच आहे. आपल्याला दीक्षा देऊन ज्ञानमार्गाचा उपदेश करून तो दुर्मार्गापासून वाचवतो. म्हणून गुरू हे रक्षाकवच म्हणजे आवरण होय. इष्टलिंग हे देखील एक आवरण होय. गळ्यात इष्टलिंग धारण करणारा मनुष्य जर दुष्प्रवृत्त झाला की लगेच त्याला भान येते की आपल्या गळ्यात भगवान शिव विराजमान आहेत आणि आपण दु:ष्कर्म कसे करू शकतो? आपल्याला धर्मानेच वागले पाहिजे. अधर्माने वागून चालणार नाही. या बोधामुळे तुम्ही जागृत होऊन दुर्मार्गापासून दूर राहता, म्हणून इष्टलिंग हे एक आवरण होय. याचप्रमाणे जंगम म्हणजे शिवयोगी. ज्ञानोपदेश करून तो आपल्याला संसार-प्रवृत्तीपासून वाचवतो. म्हणून ते देखील एक आवरण

आहे. भस्म आणि रुद्राक्ष ही देखील आवरणे आहेत. कपाळावर भस्म लावून, गळ्यात रुद्राक्षमाळा घालून जर कुणी मद्यालयात गेला तर तो दुकानदारच त्याला विचारू लागेल, ''तुम्ही इकडे कसे काय आलात?'' भस्म-रुद्राक्ष धारण करणारा मनुष्य देखील अशा ठिकाणी जायला घाबरतो. ईश्वराची भीती वाटली नाही तरी त्यांना लोकापवादाची भीती वाटते. म्हणून भस्म आणि रुद्राक्ष ही आवरणे होत. पादोदक, प्रसाद आणि मंत्र यामुळे आपले अंत:करण अत्यंत परिशुद्ध होऊन आपण दुर्मार्गाकडे वळतच नाही. याप्रमाणे सांसारिक प्रवृत्तींपासून वाचवून आपल्याला ईश्वराकडे नेणारी ही साधने होत. यासाठीच आपल्या आचार्यांनी आपल्या हाती इष्टलिंग दिले आहे, आपल्या हृदयातील प्राणलिंगाचे आणि भावलिंगाचे स्वरूप समजावून सांगितले आहे.

शिवाचा जीवात्म्याशी अखंड संबंध असतो हे विचार केल्यानंतर ध्यानात येते. तुमची दीक्षा होण्याच्या आधी देखील हा संबंध होताच, दीक्षेनंतर त्याला मूर्त स्वरूप लाभले. इष्टलिंगाच्या रूपाने जेव्हा तुमच्या हृदयावर ईश्वराचे वास्तव्य राहते तेव्हा या संबंधाचे तुम्हाला ज्ञान होते. अवधान म्हणजे लक्ष्य. स+अवधान म्हणजेच सावधान. अर्थात् लक्ष्यपूर्वक. जो आपल्या शरीरावर लिंग धारण करतो आणि त्याचे सतत भान ठेवतो तोच अवधानलिंगधारी साधक होय. शिवाशी सदैव संबंध असल्यामुळे तुम्ही शिवयोगीच आहात, परंतु या संबंधाचे ज्ञान नसल्यामुळे स्वत:ला 'शिवयोगी' म्हणण्याचे धैर्य तुमच्याजवळ नाही. आपल्या आत देखील शिव आहे. त्याला जाणण्यासाठीच आपल्या हृदयावर श्रीगुरूने शिवलिंग ठेवले आहे. याच शिवलिंगाच्या द्वारा आपण प्राणलिंगापर्यंत पोहोचू शकतो. असे ज्ञान जेव्हा तुम्हाला होते तेव्हा तुमचा शिवाशी जणू नव्याने संबंध जुळतो. शरीराने, वाणीने आणि मनाने. तेव्हाच तुम्हाला शिवयोगी असे संबोधले जाते.

संसाररूपी विषवृक्षाला छेदण्यासाठी शिवध्यान हे मुख्य साधन आहे. शिवध्यान, शिवभावना हा एक परशू म्हणजे कुऱ्हाड आहे. त्याच्याच साहाय्याने संसाररूपी विषवृक्ष आपण नष्ट करू शकतो. जर आपण शिवध्यान करणार नाही तर आपल्याला सांसारिक दु:ख भोगावे लागते. मनुष्याला सदैव सुख हवे असते. कुणाला संपत्ती हवी असते, तर कुणाला काही. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत. ज्याची पुरुषाकडून मागणी केली जाते ते 'पुरुषार्थ' होत. येथे 'पुरुष' याचा अर्थ स्त्री-पुरुषांतील 'पुरुष' असा नव्हे, तर 'पुरुष' म्हणजे जीवात्मा होय. 'पुरिशेते इति पुरुष:' शरीररूपी पुरात म्हणजे नगरात जो निवास करतो तो 'पुरुष' होय. शरीर स्त्रीचे असू शकते किंवा पुरुषाचे असू शकते. परंतु जीवात्मा मात्र स्त्री अथवा पुरुष नसतो. प्रत्येक पुरुषाला काय हवे असते? धर्म किंवा अर्थ किंवा काम किंवा मोक्ष. एवढे सोडले तर ज्याची इच्छा करावी असे जगात काही उरतच नाही.

हे पुरुषार्थ पुरुषाला कशासाठी हवे असतात? तर सुखासाठी. कुणी धर्माने सुख मिळवू पाहतो, कोणी अर्थार्जन करून सुख मिळवू पाहतो, कोणी कामवासनेमागे लागून सुख मिळवू पाहतो तर कोणी मोक्षाचा मार्ग चोखाळून सुख मिळवू इच्छितो. सुख संसारात देखील असते आणि परमात्म्यात देखील असते. संसारात दिसणारे सुख हे परमात्मसुखाचाच अंशमात्र असते. 'यत्सुखे नानुमोदते'. परमात्म्याच्या ठिकाणचेच थोडे सुख घेऊन संसार सुखरूप होतो, भासतो. लाडू गोड लागतो तो त्याच्यातील साखरेमुळे किंवा गुळामुळे. पण आपण मात्र म्हणतो 'लाडू गोड आहे'. त्यातील रवा, बेसन इत्यादी पदार्थ गोड नसतात. त्याला गोडी येते ती साखरेमुळे, पण आपल्याला त्याचे भान नसते. जेव्हा साखर कमी-अधिक होते तेव्हा मात्र त्यातील साखरेची आपल्याला आठवण होते. लाडवातील माधुर्य साखरेचे किंवा गुळाचे असते, त्याप्रमाणे शब्दस्पर्शादी गुणांमध्ये आणि

सांसारिक पदार्थांमध्ये जे सुख मिळते ते त्या परमात्म्याचेच असते. 'तस्यैवानंदस्य मात्रामुपजीवन्ति' त्याच शिवानंदातील थोडा अंश घेऊन संसार सुखरूप होतो. परंतु सांसारकि सुख भोगून देखील जीवाला त्यापासून अनंत दुःखच मिळते. प्रारंभी विषयांपासून सुख मिळते, परंतु शेवटी ते दुःखदायकच ठरतात. म्हणून आपण जर भगवान शिवाशी संबंध जोडून शिवानंद प्राप्त करून घेतला तर आपण अखंड सुखाचे धनी होऊ शकतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी

१४ एप्रिल १९९२

---

## आशीर्वचन बारावे

## लिंगनिजस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

प्राणलिंगिस्थलातील शिवयोगसमाधिस्थल या अवांतर स्थलाचा आपण कालपर्यंत विचार केला. यापुढील लिंगनिजस्थल हे अवांतरस्थल शिवयोगसमाधिस्थलाचाच एक भाग होय. जो परात्परशिव आहे तोच आपले निजस्वरूप होय असे जाणणे, हा लिगंनिजस्थलाचा सामान्य अर्थ आहे. प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणात परशिवाचा निवास आहे, परंतु त्याचे ज्ञान नसल्यामुळे तो शिवाचा शोध बाहेर करत असतो. आपली मनोवृत्ती हेच त्याचे मूळ कारण होय. आपण अनेकदा हे ऐकले असेल की माणसाचे मनच त्याला संसारबंधनात अडकवते. आणि मनच त्याला संसारातून मुक्त करते. मनोवृत्ती जेव्हा संसाराचे रूप धारण करते तेव्हा मनुष्य संसारी बनतो. तीच वृत्ती जेव्हा परमात्म्याचे चिंतन करू लागते तेव्हा मनुष्य संसारमुक्त होतो. हेच समजावून सांगण्यासाठी आणि त्या मार्गात प्रवृत्त करण्यासाठी योगशास्त्र निर्माण झाले. योग अनेक प्रकारचे असले तरी त्यामध्ये शिवयोग हा अंतिम मानला जातो. योगशास्त्राचे प्रणेते महर्षी पतंजली हे होत. त्यांनी योगाची 'योगः चित्तवृत्तिनिरोधः' अशी व्याख्या केली आहे. चित्तवृत्तींचा निरोध करणे म्हणजे योग. मनाला संपूर्ण रोखणे, त्याला काहीही करू न देणे हा योगाचा अर्थ आहे काय? तर असे नाही. त्याचे स्पष्टीकरण योगशास्त्रात केले आहे.

चित्तवृत्तीचे किती प्रकार आहेत? हे आधी जाणून घेतले पाहिजे. ज्याप्रमाणे 'क्लेश' पाच प्रकारचे आहेत त्याचप्रमाणे चित्तवृत्ती सुद्धा पाच प्रकारची आहे. प्रमाणवृत्ती, विपर्ययवृत्ती, विकल्पवृत्ती, निद्रावृत्ती आणि स्मृतिवृत्ती. या पाच वृत्तींत क्लिष्टवृत्ती आणि अक्लिष्टवृत्ती असे दोन भेद मानले आहेत. क्लिष्टवृत्तीचे लक्षण आहे. 'क्लेशमूला क्लेशफला च वृत्तिः क्लिष्टा' ज्या वृत्तीमुळे मनुष्याला केवळ क्लेश मिळतात, जी क्लेशाचे आणि क्लेशांच्या फळांचे कारण आहे ती क्लिष्टवृत्ती होय. दुःखाला आणि दुःखफलाला कारणीभूत असणारी वृत्ती ही क्लिष्टवृत्ती. ज्या वृत्तीमुळे मनुष्याला क्लेश आणि क्लेशाची फळे मिळत नाहीत ती वृत्ती अक्लिष्टवृत्ती होय. प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती या पाच वृत्तीच क्लिष्ट आणि अक्लिष्ट होतात. या प्रकारे वृत्ती दहा प्रकारच्या असतात. यांपैकी कोणत्या चित्तवृत्तीचा निरोध करावा? क्लिष्ट की अक्लिष्ट? ज्यांच्यामुळे

आपल्याला क्लेश होतात त्याच वृत्तींचा निरोध येथे अभिप्रेत आहे. जिच्यामुळे आनंद मिळतो अशा वृत्तीचा निरोध करायचा नाही.

पहिली वृत्ती 'प्रमाणवृत्ती' होय. 'प्रमाकरणं प्रमाणम्' जी प्रमाज्ञानाचे साधन असते ती प्रमाणवृत्ती. पंचज्ञानेंद्रिये आणि मन ही आपल्या ज्ञानाची सहा 'प्रमाणे' होत. त्यांच्याद्वारा आपण प्रामाणिक ज्ञान प्राप्त करून घेतो. प्रमाणवृत्तीत एक वृत्ती क्लिष्ट असते तर एक अक्लिष्ट. एक प्रमाणज्ञान दुःखदायक तर दुसरे सुखदायक असते. एखाद्याच्या घरात संपत्ती आहे त्याचे आपल्याला यथार्थ ज्ञान झाले तर ते प्रमाणज्ञान होय. परंतु ती संपत्ती चोरावी अशी इच्छा मनात उत्पन्न झाली तर ते प्रमाणज्ञान अथवा प्रमाणवृत्ती क्लिष्ट म्हणजे दुःखदायक असते. चोरी केव्हा ना केव्हा तरी पकडली जातेच आणि चोरी करून जे सुख मिळते त्यापेक्षा ती सापडल्यावर मिळणारे दुःख अधिक असते. अशा क्लिष्टवृत्तीचा निरोध करायला हवा. एखाद्याच्या घरी संपत्ती आहे असे प्रमाणज्ञान झाले तरी त्या संपत्तीवर आपला अधिकार नाही असे समजणे, हाच त्या वृत्तीचा निषेध होय. आत्मरूपात परमात्म्याचा साक्षात्कार होणे हे देखील प्रमाणज्ञानच होय. परंतु ही वृत्ती क्लिष्ट नसून सर्व क्लेशांना दूर करून आणि जीवशिवाच्या ऐक्याचा अनुभव देणारी असल्यामुळे अक्लिष्ट आहे. तिचा निरोध करण्याचे कारण नाही. प्रमाणवृत्तीतील फक्त क्लिष्टवृत्ती रोखणे हाच योग होय.

दुसरी वृत्ती आहे 'विपर्ययवृत्ती'. विपर्ययवृत्ती म्हणजे विपरीतज्ञान. वस्तू आहे एक आणि दिसते दुसरी, याला म्हणतात विपर्ययज्ञान. दोरीला साप समजणे, शिंपल्याला चांदी समजणे आणि लाकडी ओंडक्याला चोर समजणे ही वेदान्तशास्त्रातील विपर्ययज्ञानाची अतिप्रसिद्ध उदाहरणे होत. झाडाच्या खोडाला चोर समजून अथवा दोरीला साप समजून घाबरून पळून जाणे यामुळे मनुष्याला दुःख होऊ शकते. शिंपल्याला चांदी समजून हावरेपणाने घ्यायला गेल्यावर ती चांदी नाही असे समजते आणि निराशेपोटी माणसाला दुःख होते. अशी विपर्ययवृत्ती क्लिष्ट असते. तिचा निरोध अवश्य करावा. परंतु एखाद्या पाषाणखंडात आपण जेव्हा देवत्व पाहतो, तो असतो जड दगड, त्या ठिकाणी आपण चिद्रूप परमात्मस्वरूपाला पाहत असतो हे देखील एक प्रकारचे विपरीतज्ञानच होय. परंतु ही विपर्ययवृत्ती क्लिष्ट नसून ती सुखदायी असल्याने अक्लिष्ट आहे. जी क्लिष्ट विपर्ययवृत्ती आहे तिचा निरोध करावा, परंतु शिवलिंगाच्या ठिकाणी शिवत्व पाहणाऱ्या, मूर्तींच्या ठिकाणी देवत्व पाहणाऱ्या सुखदायी अशा अक्लिष्ट विपर्ययवृत्तीचा निरोध करण्याची आवश्यकता नाही. कारण ही वृत्ती आपल्याला स्थूलाकडून सूक्ष्माकडे नेत असते. म्हणून वेदान्तशास्त्रात संवादीभ्रम आणि विसंवादीभ्रम असे भ्रमाचे दोन प्रकार मानले आहेत. जो यथार्थफल देतो तो संवादीभ्रम आणि जो विपरीत फल देतो तो विसंवादीभ्रम होय. म्हणून शिलामय मूर्तीत अथवा लिंगात भगवत्तत्त्व पाहणे हे विपरीत ज्ञान असले तरी त्यापासून मनुष्याला सुखाचाच लाभ होतो, अशा विपर्ययवृत्तीचा निरोध करायचा नसतो.

याप्रमाणे विकल्पवृत्ती देखील क्लिष्ट आणि अक्लिष्ट अशा दोन प्रकारची आहे. 'विकल्प' म्हणजे मनोराज्य. मन कधीही गप्प बसत नसते. त्याचे काही ना काहीतरी चिंतन चालू असते. तुम्ही गप्प बसाल, पण तुमचे मन कधी गप्प बसणार नाही. सांसारिक सुखाची मनेराज्ये रचणे ही क्लिष्ट विकल्पवृत्ती होय. शेख महंमदाची कथा तुम्हाला माहीतच आहे. त्याच्याकडे थोडेसे काचेचे सामान होते ते विकल्यावर त्याचा उदरनिर्वाह चालत असे. एके दिवशी ते सामान समोर ठेवून तो मनोराज्य रंगवीत बसला– हे सामान मी विकेन, त्या पैशात मी दुसरे सामान आणीन, माझा व्यवहार वाढत जाईल, या गावातील मी मोठा व्यापारी बनेन, बादशहाचा वजीर 'माझी मुलगी

पाहायला चला' असा मला आग्रह करील, त्याच्या वाड्यात मी जाईन, तो माझी मुलगी पाहा असे म्हणेल, मी तिच्याकडे पाहणारच नाही आणि 'तुझ्या मुलीला मी काय समजतो' असे म्हणून त्या मुलीला लाथ मारीन.' असे दिवास्वप्न पाहता पाहता शेख महंमदाने खरोखरच काचेच्या सामानाला लाथ मारली आणि ते खळकन् फुटले. यालाच योगशास्त्रात विकल्पवृत्ती म्हटले आहे. नसलेल्या वस्तूचा विचार करणे हाच विकल्प होय. 'वस्तूशून्य: विकल्प:' शेख महंमदाचे उदाहरण हे क्लिष्ट विकल्पवृत्तीचे उदाहरण होय. परंतु जर एखादा मनुष्य मी येथे ईश्वराचे मंदिर बांधेन, मग येथे पूजापाठ होईल, प्रसन्नता मिळेल; असे मनोराज्य रंगवीत असेल तर ती अक्लिष्ट विकल्पवृत्ती होय. या विकल्पवृत्तीमुळे दुःख होत नाही. येथे क्लिष्ट विकल्पवृत्तीला रोधणे अभिप्रेत आहे.

चौथी वृत्ती 'निद्रा' असून तिचा अर्थ स्वप्न असा होतो. गाढनिद्रा असा होत नाही. काही सुस्वप्ने असतात तर काही दुःस्वप्ने असतात. आपले व्यावहारिक जीवन आणि चिंतन हेच स्वप्नांना कारणीभूत ठरते. व्यवहारात आपण जे पाहतो, अनुभवतो तेच स्वप्नात दिसते असे नाही. ज्याचा विचार देखील आपल्या मनात नसतो असे बरेच काही स्वप्नात पाहायला मिळते. आपण मरण पावलो असे देखील स्वप्नात आपण पाहत असतो. वास्तविक आपला मृत्यू झालेला नसतो. तरी देखील जन्मजन्मांतरीच्या संस्कारामुळे आपल्याला अशी स्वप्ने पडत असतात. दुःस्वप्ने दुःखदायक असतात. ती पाहिल्यावर मनुष्य घाबरतो. स्वप्ने आपल्या आधीन नसतात. आज हेच स्वप्न पाहायचे, असे आपण ठरवून झोपलो तरी तसे स्वप्न आपल्याला पडत नाही. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीनही अवस्थांवर मनुष्याचे नियंत्रण नसते. त्या अवस्था कर्माधीन आहेत. आपल्याला वाटेल तेव्हा आपण झोपू शकत नाही. आपल्याला वाटेल तेव्हा आपण जागे होऊ शकत नाही आणि आपल्या इच्छेप्रमाणे हवी ती स्वप्ने पाहू शकत नाही. रात्री झोपण्यापूर्वी उद्या अमक्या वेळी आपण उठू, असे आपण कितीही ठरविले तरी त्याचवेळी जाग येईल असे नाही. जागे करणारे कर्म जेव्हा पक्व होते तेव्हाच आपण जागे होतो. स्वप्न दाखवणारे कर्म जेव्हा पक्व होते तेव्हाच आपण स्वप्न पाहतो आणि गाढ निद्रा देणारे कर्म जेव्हा परिपक्व होते तेव्हा आपल्याला गाढ झोप लागते. प्रवचन ऐकायला येणारी माणसे ऐकण्यासाठी आलेली असतात, झोपण्यासाठी नव्हे. तरी बिचारे प्रवचन ऐकता एकता निवांत झोप काढतात. याचेही कारण हेच. स्वप्ने अर्थात् निद्रावृत्ती आपल्या प्रयत्नाधीन नसली तरी देखील जागृतावस्थेत ज्या वस्तूचे अधिकाधिक चिंतन घडते तीच वस्तू आपल्या स्वप्नात येते. म्हणून सतत परमात्मचिंतन केले तर दुःस्वप्ने अथवा सांसारिक स्वप्ने नाहीशी होऊ शकतात, असा महर्षी पतंजलींच्या सूत्राचा आशय आहे.

अनुभवाचा जो संस्कार मनावर उमटतो त्याला 'स्मृती' म्हणतात. स्मृती देखील क्लिष्ट आणि अक्लिष्ट म्हणजे दुःखदायक आणि सुखदायक अशी दोन प्रकारची आहे. प्रिय व्यक्तीच्या मिलनाची आठवण जेव्हा येते तेव्हा सुख मिळते आणि प्रिय व्यक्तीच्या वियोगाची आठवण येते तेव्हा दुःख मिळते. ज्या स्मरणामुळे वारंवार दुःख होते ते स्मरण माणसाने करू नये. अशा दुःखदायक म्हणजे क्लिष्ट स्मृतिवृत्तीचा निरोध करावा. परंतु आत्म्याला परमात्मस्वरूप मानून घडलेल्या चिंतनामुळे जे सुख होते ती स्मृतिवृत्ती मात्र आनंददायी असल्यामुळे अक्लिष्ट असते. अशा प्रकारे शिवयोगसमाधिस्थलातून साधक निजलिंगस्थलात प्रवेश करतो.

**स्वान्तस्थशिवलिंगस्य प्रत्यक्षानुभवस्थिति:।**
**यस्यैव परलिंगस्य निजमित्युच्यते बुधैः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणि, १२.३२)

प्रत्येक मनुष्याच्या हृदयात परमात्मस्वरूप जे लिंग आहे त्याला आपल्या आत्मरूपात पाहणे हेच लिंगनिजस्थल होय. अंतरंगातील परमात्म्याचा साक्षात्कार करून घेण्याच्या मार्गात वर सांगितलेल्या पाच क्लिष्टवृत्ती अडथळे आणतात. म्हणून त्यांना रोधून साधकाने सतत शिवचिंतन केले पाहिजे. जेथे जीवात्मा आहे तेथेच परमात्मा आहे. जीवात्मा आणि परमात्मा हे सख्खे मित्र आहेत. 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया'. अर्थात् जीव आणि परमात्मा यांच्यात सख्य आहे. तुम्हाला माहीत आहे की, कृष्ण आणि अर्जुन यांच्यात सख्य होते. अर्जुनाची भक्ती ही सख्यभक्ती होती. सुखदुःखातं जो सदैव सोबत करतो त्यालाच 'सखा' म्हणतात. त्यालाच मित्र, सुहृद् म्हटले जोत. 'शोभनं हृदयं यस्य सः सुहृद'. ज्याचे हृदय अत्यंत सुंदर असते तो 'सुहृद्' होय. जो केवळ सुखात सोबत करतो आणि दुःखात करीत नाही तो 'सुहृद्' नव्हे. मनुष्याला प्रपंचात केवळ सुख किंवा केवळ दुःख मिळत नसते. सुखानंतर दुःख, दुःखानंतर सुख असे चक्र नेहमी चालू असते. मनुष्याला जीवनात अनेक मित्र मिळतात. पण ते सारेच सुहृद नसतात.

**'जन हे सुखाचे दिल्या घेतल्याचे।**
**बा अंतकाळीचे नाही कोणी।।'**

असे एका संताने म्हटले आहे. असे लोक दुःखात साथ सोडून देतात, गंमत पाहत बसतात. परंतु परमात्मा मात्र असा नाही. तो नित्य सखा आहे. तुम्ही जेथे जेथे जाल तेथे तेथे तो तुमचा सांगाती असतो. त्याचे नित्य वास्तव्य मनुष्याच्या हृदयात असल्यामुळे मनुष्य सुख भोगतो तेव्हा तो सोबत असतो आणि दुःख भोगतो तेव्हा देखील तो सोबतच असतो. मनुष्य सुख भोगतो त्यावेळी हृदयस्थ शिव त्याला जागृत करीत असतात, दुःख भोगतो त्यावेळी ते मनुष्याला धीर देत असतात. दुःख भोगताना मनुष्याजवळ धैर्य असावे लागते, सुख भोगताना त्याच्याजवळ विवेक असावा लागतो. मनुष्य जेव्हा सुखाच्या राशीवर लोळत असतो तेव्हा परमात्मा त्याच्या ठिकाणी विवेक जागृत करण्याचा आतून प्रयास करीत असतो, जेव्हा तो दुःख भोगत असतो तेव्हा अपार दुःखे सहन केलेल्या इतिहासातील धैर्यशील व्यक्तींच्या चरित्रांचे स्मरण करून देत असतो. कारण परमात्मा हा जीवात्म्याचा सुहृद् आहे. अशा हृदयस्थ सख्याला बाह्यप्रवृत्तीमुळे आणि क्लिष्टवृत्तींमुळे मनुष्य जाणून घेऊ शकत नाही. अशा वेळी जीवात्म्याची स्थिती कशी असते त्याबद्दल एक कथा सांगतात.

एकदा एका मनुष्याच्या हाती मौल्यवान रत्न देऊन त्याला कुणीतरी सांगितले की, हे रत्न तू अमक्या मनुष्याला नेऊन दे. तो रत्न घेऊन निघाला. जाता जाता आपल्याला कोठे जायचे आणि काय करायचे हे तो विसरला. मनुष्याला नेहमी विस्मरण घडते. बऱ्याच वेळा आपण देखील दर्शनासाठी मंदिरात जायला निघतो, रस्त्यात कुणीतरी मित्र भेटतो आणि बोलता बोलता मंदिरात जायचे विसरून भलतीकडेच जातो. त्याच्या बाबतीतही असेच घडले. कुणीतरी रस्त्यावर केळीची साल फेकलेली होती. तिच्यावर त्याचा पाय पडताच तो घसरला आणि पडला. हातातले रत्न फेकले जाऊन दूर कुठेतरी गटारात जाऊन पडले. उठता उठता त्याने उजव्या हाताची मूठ जेव्हा उघडली तेव्हा त्याला दिसले की आपल्या हातात दहा रुपयांची नोट आलेली आहे. पडल्यामुळे शरीराला मार लागला होता, परंतु दहा रुपये सापडल्यामुळे त्याला आनंद झाला होता. त्याला वाटले, बरे झाले आपण पडलो, दहा रुपये तरी सापडले. तेथून उठून तो आनंदाने आपल्या घरी निघून गेला.

ही कथा आपल्याला काय सांगते? हातातल्या मौल्यवान रत्नाचे मोल न ओळखणारा मूर्ख मनुष्य दहा रुपयाची नोट मिळताच स्वतःला भाग्यवान समजतो. हीच स्थिती सर्वसामान्य माणसांची असते. आपल्या हृदयातील अमूल्य अशा परमात्मतत्त्वाचा त्याला विसर पडतो आणि क्षुद्र सांसारिक सुखांच्या मागे लागून आपले

आयुष्य तो उधळून टाकतो. परमात्मतत्त्वरूपी रत्नाकडे तो दुर्लक्ष करतो आणि शब्दस्पर्शादी पंचविषयांच्या नोटा गोळा करण्यात आनंद मानतो.

**कश्चिद् धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्।**
**व्यावृत्तचक्षुः अमृतत्त्वमिच्छन्॥**

अमृतत्त्वाचा शोध घेणारा लाखामध्ये एखादाच असतो. गीतेत देखील भगवंतांनी हेच सांगितले आहे. हजारांत, लाखांत एखादाच मनुष्य परमात्मतत्त्वाला जाणण्याचा प्रयत्न करतो आणि ते जाणून घेतो.

सूरदासाबद्दल एक आख्यायिका सांगितली जाते. सूरदास जन्मांध होते. त्यांचा आवाज सुरेल होता. लोक त्यांना भजनासाठी घेऊन जात असत. असेच एके ठिकाणी सूरदास भजनानंदात रंगून गेले. स्वतःला भक्त म्हणवणारे इतर लोक कंटाळले आणि आपापल्या घरी निघून गेले. ईश्वराला वाटले की, सूरदास हाच आपला खरा भक्त. आता त्याला त्याच्या घरी कोण पोहोचवणार? म्हणून ईश्वराने स्वतः बालकाचे रूप घेतले आणि सूरदासाजवळ जाऊन तो म्हणाला, ''चला मी तुम्हाला तुमच्या घरी पोहोचवतो.''

सूरदासांनी आपल्या हातातल्या काठीचे एक टोक धरले, दुसरे टोक त्या बालकाने धरले आणि ते रस्त्याने निघाले. जे अंध असतात ते मोठे हुशार असतात. त्यांचे स्पर्शज्ञान अत्यंत तीव्र असते. काठीच्या टोकाला होणारा बालकाचा स्पर्श हा सामान्य मनुष्याचा स्पर्श नाही असे सूरदासांच्या लक्षात आले. त्यांनी काठीवरून हात सरकवत नेला आणि त्या बालकाचा हात घट्ट पकडला. ज्याला आतापर्यंत आपण हृदयातच पाहात होतो तो असा अकस्मात् बाहेर हाती सापडलेला पाहून सूरदासांना आनंद झाला. हे जेव्हा बालरूपातील ईश्वराच्या ध्यानात आले तेव्हा त्याने आपला हात सोडवून घेण्याचा प्रयत्न चालवला. बरीच ओढाताण होऊन त्याने सूरदासांच्या हातून आपला हात सोडवला. त्यावेळी सूरदास म्हटले-

**बांह छुडाके जात है निर्बल जाणि मोही।**
**हृदय छोडके जाय, तो मैं मर्द बखाणु तोही॥**

सूरदास म्हणतात. ईश्वरा तू स्वतःला फार मर्द समजतोस. माझ्या हातून हात सोडवून घेऊन तू पराक्रमी ठरत नाहीस. माझे हृदय सोडून जर तू निघून गेलास तर मी तुला पराक्रमी मानेन.

येथे तर ईश्वराचा पराभवच झाला. हात सोडवून तो निघून जाऊ शकतो, परंतु हृदय सोडून तो कसा जाणार? कारण भक्तांचे हृदय भगवंताचे मंदिर होय. सूरदासाचे वचन ऐकून ईश्वर परत आला. त्याने त्यांच्या डोळ्यांना स्पर्श करताच त्यांना दिसू लागले. ईश्वराचे गोजिरे रूप सूरदासांनी पाहिले. पाहून धन्य झाले. ईश्वराने म्हटले, ''सूरदासा, तुला हवे ते माग.''

सूरदास म्हणाले, ''आता तूच मिळाला आहेस. यापेक्षा आता काय हवे? भक्ताला फक्त भगवान हवा असतो.''

''तरीदेखील तू काहीतरी माग.'', ईश्वराने आग्रह केला. तेव्हा सूरदास म्हणाले, ''ईश्वरा, मला तू दृष्टी दिलीस ती नष्ट करून मला पुन्हा पहिल्याप्रमाणे अंध कर.''

ईश्वराला आश्चर्य वाटले, तो म्हणाला, ''इतर दृष्टिहीन लोक दृष्टी मागतात, तू न मागता मी तुला दृष्टी दिली. मग तुला पुन्हा आंधळा होण्याची इच्छा का व्हावी?''

तेव्हा सूरदास म्हणाले, ''भगवन्, ज्या डोळ्यांनी तुला एकदा पाहिले त्याच डोळ्यांनी पुन्हा प्रपंच कशाला

पहायचा? पुन्हा प्रपंचाकडे पाहत बसलो तर त्याचे स्मरण निरंतर होईल. म्हणून मला पुन्हा अंध कर.''

संतांच्या अनुभवांतून आणि शास्त्रांच्या वचनातून ईश्वर आपल्या अंतरंगातच आहे हे सत्य आपल्याला समजते. प्रत्येक मनुष्याने आपल्या अंतरंगातील परमात्मरूपाला जाणून घेऊन क्लिष्ट मनोवृत्तींना दूर ठेवून आत्मरूपाच्या ठिकाणी परमात्मा पाहावा. आपल्या इष्टलिंगालाच आपल्या प्राणलिंगाचे निजस्वरूप मानणे हेच लिंगनिजस्थल होय. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
१५ एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन तेरावे**

## लिंगनिजस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंगनिजस्थल शब्दाचा अर्थ काल आपण ऐकला. प्रत्येक मनुष्याच्या हृदयात प्राणलिंगाच्या रूपात विराजमान जो परमात्मा आहे त्याला आपले निजस्वरूप मानून त्याचा साक्षात्कार करून घेणे हेच लिंगनिजस्थल होय. हेच या ठिकाणी ज. रेणुकाचार्यांनी स्पष्ट केले आहे.

**स्वान्तस्थशिवलिंगस्य प्रत्यक्षानुभवस्थितिः।**
**यस्यैव परलिंगस्य निजमित्युच्यते बुधैः।।(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२–३२)**

प्रत्येक मनुष्याच्या हृदयकमलात विराजमान असलेला प्राणलिंगरूपी परमात्मा म्हणजे मीच आहे, अशा प्रत्यक्षानुभूतीला विद्वान लोक लिंगनिजस्थल असे म्हणतात. शास्त्रांचे अध्ययन करून आपल्या हृदयात परमात्मा नांदतो असे ज्ञान प्रथम करून घ्यावे लागते. त्यानंतर त्याचा साक्षात्कार करून घेण्यासाठी मनुष्याला प्रयत्न करावे लागतात. एखाद्या गावात जर कुणी तपस्वी मनुष्य आला तर त्याची कीर्ती हळूहळू सर्वत्र पसरते. असा कोणी तपस्वी आला याचे ज्ञान लोकांना जरूर होते, परंतु जोपर्यंत ते त्याचे दर्शन घेत नाहीत, त्याला प्रत्यक्ष पाहात नाहीत तोपर्यंत त्यांची जिज्ञासा तृप्त होत नाही. आणि त्याच्या अस्तित्वाचा साक्षात्कार होत नाही. त्याला पाहिल्यावरच त्याच्या अस्तित्वाची, तपस्येची खात्री लोकांना पटते. त्याप्रमाणे तत्त्वमसि– तत् त्वं असि म्हणजे 'ते तूच आहेस' असे या महावाक्याच्या द्वारा साधकाला ज्ञान दिले जाते. प्रथमतः ईश्वर नाहीच अशीच भावना सर्वांच्या हृदयांत असते. परंतु शास्त्राध्ययन केल्यावर अथवा गुरुमुखाने ऐकल्यावर ईश्वर नाही ही भावना दूर होते आणि तो आहे हे मनुष्याला कळते. जर आहे तर तो का दिसत नाही? असा प्रश्न पुढे निर्माण होतो. त्याचे उत्तर शोधण्यासाठी साधना करावी लागते. त्यासाठीच आपल्या आचार्यांनी शिवयोग सांगितला आहे. त्यामुळेच परमात्म्याचा साक्षात्कार होऊ शकतो. साक्षात्कार दोन प्रकारे होतो. तुम्ही परमात्म्याकडे गेल्यावर किंवा परमात्मा तुमच्याकडे आल्यावर.

यापूर्वी प्राणलिंगिस्थलाचा विचार करीत असताना आपल्या शरीरात सहा चक्रे असून त्या त्या ठिकाणी कमलाची भावना करावी, त्या त्या कमलात एकेका लिंगाचा निवास असतो असे सांगितले आहे. त्यामुळे साधकाला आपल्या आत परमात्मा असतो याचे ज्ञान होते. आपला देह म्हणजे एक देवालयच होय. 'देहो देवालय: प्रोक्त:' आपल्या हृदयात ईश्वर नांदतो याचे ज्ञान आपल्याला झाले, परंतु हे ज्ञान शाब्दिक आहे. शास्त्रावर आपली श्रद्धा आहे म्हणून आपण मान्य केले की आपल्या हृदयात परमात्मा आहे. त्यावर आपला विश्वासदेखील आहे. परंतु जोपर्यंत त्याचा साक्षात्कार होत नाही तोपर्यंत तुमच्या मनातला एक कोपरा संशयाने व्यापलेला असतो. हा संशय समूळ नष्ट करण्यासाठी ज्या ठिकाणी प्राणलिंग आहे असे सांगितले जाते त्या ठिकाणी आपले मन एकाग्र केल्यानंतर केव्हाना केव्हा तरी त्याचा साक्षात्कार अवश्य होतो. ज्यावेळी तुम्हाला त्याचा साक्षात्कार होईल त्यावेळी तुम्ही लिंगनिजस्थली व्हाल.

**ब्रह्मविष्णवादयो देवा: सर्वे वेदादयस्तथा।**
**लीयन्ते यत्र गम्यन्ते तल्लिंगं ब्रह्म केवलम्।।१२.३३।।**

वेद आणि आगम हे आपले प्राचीनतम ग्रंथ होत. भगवान शिवाच्या उच्छवासातून वेदांची निर्मिती झाली आणि शिवाच्याच मुखातून आगमांची उत्पत्ती झाली. वेद हा श्वासरूपी उपदेश आहे तर आगम हा वैखरीचा उपदेश होय. वेद आणि आगम यांची निर्मिती भगवान शिवापासूनच झाली. त्याचप्रमाणे ब्रह्माविष्णू आदी देवता देखील भगवान शिवापासूनच उत्पन्न झालेल्या आहेत. या देवता आणि वेदागम ज्यापासून उत्पन्न झाले अशा परब्रह्मलिंगातच ते प्रलयकाळी विलीन होतात. देवता आणि वेदागम ज्यातून उत्पन्न होतात आणि ज्यात विलीन होतात अशा तत्त्वाला 'परब्रह्मलिंग' म्हणतात. शिव आणि लिंग हे एकच की परस्पर भिन्न अशी शंका कोणाला येऊ नये म्हणून पुढील श्लोकात सांगतात-

**चिदानन्दमय: साक्षाच्छिव एव निरंजन:।**
**लिंगमित्युच्यते नान्यद् यत: स्याद्विश्वसंभव:।।१२.३४।।**

भगवान शिव कसे आहेत? तर चिदानंदमय. येथे 'मयट्' हा जो प्रत्यय आहे तो विकार अशा अर्थाने येतो आणि स्वरूप अशा अर्थाने देखील येतो. उदा. 'मृन्मयघट' असे आपण म्हणतो. मृन्मयघट म्हणजे मातीचा घडा. याचा अर्थ होतो मातीचा विकार. मातीचे रूपांतर घड्यात झाले. म्हणून घडा हा मातीचा विकार होय. येथे 'मयट्' हा प्रत्यय विकार अशा अर्थाने येतो. भगवान शिव चिदानंदमय आहेत असे जेव्हा म्हटले जाते तेव्हा शिव हा चिदानंदाचा विकार आहे की काय असे कुणाला वाटेल. परंतु येथे मयट् प्रत्ययाचा अर्थ स्वरूप असा होतो. म्हणून भगवान शिव चिदानंदस्वरूप आहेत असे समजावे. चिदानंद आणि शिव यांच्यात फरक नाही. सत्, चित् आणि आनंद हे शिवाचे स्वरूपच होय.

भगवान शिव निरंजन आहेत. अंजन म्हणजे काजळ. काजळ हे दोषाचे प्रतीक मानले जाते. 'काजळ फासले' इत्यादी शब्दप्रयोग आपण करतो. भगवान शिव निरंजन आहेत याचा अर्थ त्यांच्या स्वरूपात आणि स्वभावात कुठलेही काळेपण नाही. अर्थात् ते निष्कलंक आहेत. सच्चिदानंदरूप, निरंजन अशा शिवालाच 'लिंग' असे म्हणतात. शिव आणि लिंग यात कसलाही भेद नसून शिव हेच लिंग होय. ज्यातून विश्व निर्माण होते आणि ज्यात ते विलीन होते तेच लिंग होय.

**बहुनात्र किमुक्तेन लिंगमित्युच्यते बुधैः।**
**शिवाभिधं परं ब्रह्म चिद्रूपं जगदास्पदम्॥१२.३५॥**

या परब्रह्मलिंगाविषयी अधिक काय सांगावे? जगाला आधारभूत आणि स्फुरणरूप असणारे परब्रह्मच परशिव असून त्यालाच ज्ञानी लोक निजलिंग असे म्हणतात. 'ब्रह्म' हा शब्द उपनिषदांमधून आला असून 'शिव' हा शब्द आगमांमधून आला आहे. उपनिषदे आपल्या आराध्याला 'ब्रह्म' असे म्हणतात, तर आगम आपल्या आराध्याला 'शिव' असे म्हणतात. म्हणून परशिव आणि परब्रह्म एकच होत. ते चिद्रूप आहे आणि या प्रपंचाचा आधार आहे. प्रपंच त्यातूनच निर्माण झाला असून शेवटी त्यातच त्याचा विलय होणार आहे. असे असून देखील जीवात्म्याला त्याचे भान नसते. त्याला समजावून सांगण्यासाठी किती शास्त्रे निर्माण झालीत, किती ग्रंथ लिहिले गेले! कित्येकवेळा युक्तिवाद करून, कित्येक वेळा उदाहरणे देऊन ते तत्त्व समजावून सांगण्याचा प्रयत्न शास्त्रांनी केला. ते तत्त्व आपल्या आत असून देखील आपल्याला त्याचे भान नसते.

एका गावात एक मनुष्य एका हातात कंदील आणि एका हातात काठी घेऊन गस्त घालत होता. दिवस थंडीचे होते. पण तसाच कुडकुडत तो आपले कर्तव्य पार पाडत होता. त्याला चिलीम ओढण्याचे व्यसन होते. मध्यरात्र झालेली. सारे गाव गाढ झोपलेले. तशातच त्याला चिलीम ओढण्याची लहर आली. त्याने चिलीम बाहेर काढली तिच्यात तंबाखू भरला. पण पाहतो तर काडीपेटी सापडेना. कंदिलाच्या प्रकाशात त्याने बरीच शोधाशोध केली. पण काडीपेटी सापडली नाही. व्यसन मोठे विचित्र असते. ते माणसाला दारोदारी फिरवते. त्याला अगदीच राहवेना, म्हणून काडीपेटी शोधायला कंदील घेऊन तो गावात फिरू लागला. सगळी दारे बंद होती. शेवटी अंगणात झोपलेला एक मनुष्य त्याला दिसला. अंगावर कांबळे घेऊन तो गाढ झोपला होता.

गस्त घालणाऱ्याने त्याला हलवून जागे केले. डोळे चोळत तो उठला, वैतागून म्हणाला, ''काय पाहिजे?''

''मला चिलीम ओढायची आहे, मला जरा काडीपेटी द्या.''

उठलेल्या मनुष्याने एकदा गस्त घालणाऱ्याकडे आणि एकदा त्याच्या हातातल्या कंदिलाकडे पाहिले आणि म्हणाला, ''भल्या माणसा, तुझ्या हातात कंदील आहे आणि काडीपेटी मागायला तू गावभर फिरतोस? अरे, काच थोडी वर केली असतीस, चिलीम पेटविली असती तर माझी झोपमोड तुला कशाला करावी लागली असती?''

त्याच्याजवळ कंदील होताच, पण तो त्याच्याजवळ आहे हे दुसऱ्याने समजावून सांगण्याची गरज होती. त्याप्रमाणे परमात्मा आपल्याजवळ असून देखील आपण त्याला जाणत नाही. जोपर्यंत गुरू उपदेश करून सांगत नाहीत तोपर्यंत आपल्या अंतरंगात आत्मज्योत तेवत आहे याची जाणीव आपल्याला होत नाही. म्हणून भारतीय परंपरेत गुरूला अनन्यसाधारण महत्त्व दिले जाते. कबिराने म्हटले आहे–

**गुरु गोविन्द दोउ खडे काकै लागु पाय।**
**बलिहारी गुरु आपने गोविन्द दियो बताय॥**

ईश्वर आणि गुरू यांच्यात कोणाला श्रेष्ठ मानावे? ईश्वराचा पत्ता गुरूमुळेच मिळतो. गुरू सांगणार नाही तर ईश्वर कुठे आहे हे कळणार नाही. म्हणून प्रथम गुरूवर श्रद्धा ठेवावी. संतांनी म्हटले आहे– 'शिवपथवनरिवडे गुरुपथवे मोदलु'. भगवान शिवाजवळ तुम्हाला जायचे असेल तर प्रथम गुरूकडे गेले पाहिजे.

एखादे लहान मूल धुळीने अंग माखून जर घरात आले आणि वडिलांकडे गेले तर ते त्याला, ''दूर हो, आईकडे

जा.'' असे म्हणतात. परंतु ते मूल आईकडे गेल्यावर ती मात्र त्याला 'दूर हो, वडिलांकडे जा' असे म्हणत नाही. त्याला जवळ घेते, त्याचे अंग स्वच्छ करते, त्याला दुसरे कपडे घालते. आई आणि वडील यांच्यामध्ये हा फरक आहे. म्हणून गुरूला माता म्हणतात आणि ईश्वराला पिता म्हणतात. गुरूकडे न जाता जर मनुष्य सरळ ईश्वराकडे गेला तर त्याला परत फिरावे लागेल. शिष्य गुरूकडे गेल्यावर तो शिष्याच्या ठिकाणी असलेले आणव, मायीय आणि कार्मिक असे तीन प्रकारचे मल वेददीक्षा, मंत्रदीक्षा आणि क्रियादीक्षा देऊन दूर करतो आणि त्याला निर्मल बनवतो. जेव्हा शिष्य निर्मल, मलरहित होतो तेव्हाच तो भगवान शिवाला प्रिय होतो. भारतीय संस्कृतीत गुरूला यासाठी महत्त्व दिले आहे की गुरूशिवाय कोणीही मनुष्य आपल्या आराध्याच्या अनुग्रहाला पात्र होत नाही. गुरूमुळेच शिष्याला आत्मचिंतन करण्याची कला प्राप्त होते.

**वेदान्तवाक्यजां विद्यां लिंगमाहुस्तथाऽपरे।**
**तदसज्ज्ञेयरूपत्वाल्लिंगस्य ब्रह्मरूपिण:।।१२.३६।।**

वेदान्तशास्त्रात ज्ञानालाच परमात्मा मानतात. आमचे आचार्य मात्र असे म्हणतात की, ज्ञान हे परमात्मा नसून ज्ञान हे विशिष्ट-परमात्मा आहे. ज्ञान शिव नसून शिव हा ज्ञानविशिष्ट आहे. वेदान्तात ज्ञान आणि परमात्मा यांच्यात अभेद मानतात, परंतु शक्तिविशिष्ट-सिद्धान्तात ज्ञान आणि परमात्मा यांच्यात भेदाभेद मानतात. उदा. चंद्र आणि त्याची प्रभा यांच्यात जसा तादात्म्य संबंध आहे तसाच परमात्मा आणि ज्ञान यांच्यात आहे.

**अव्यक्तं लिंगमित्याहुर्जगतां मूलकारणम्।**
**लिंगी महेश्वरश्चेति मतमेतदसंगतम्।।१२.३७।।**

सृष्टीचे मूळ कारण अव्यक्त होय. सांख्यसिद्धान्ताप्रमाणे प्रकृती ही अव्यक्त आहे. तिच्यामधूनच विश्व उत्पन्न होते आणि तिच्यामध्येच विलीन होते. म्हणून प्रकृती ही अव्यक्त आहे. परंतु आपल्या शास्त्राप्रमाणे शक्तिविशिष्ट महेश्वर हाच अव्यक्त असून त्याच्यापासून सृष्टी निर्माण होते. सृष्टिनिर्मितीची दोन कारणे असतात. एक उपादानकारण, दुसरे निमित्तकारण. सांख्य आणि वेदान्तशास्त्रात मायेला उपादानकारण आणि पुरुष किंवा परमात्म्याला निमित्तकारण मानले आहे. मातीच्या घड्याचे माती हे उपादानकारण असते आणि ते घडवणारा कुंभार हे निमित्तकारण असते. आपल्या सिद्धान्तात शिव शक्तिविशिष्ट मानलेला असल्यामुळे म्हणजे शिव आणि शक्ती यांच्यात भेद नसल्यामुळे उपादानकारण वेगळे आणि निमित्तकारण वेगळे मानले जात नाही. येथे अभिन्ननिमित्तोपादानकारण मानले जाते. उपादानकारण शिवच होत आणि निमित्तकारण शिवच होय. कोळी आपल्या शरीरातील द्रव्याने तंतू निर्माण करून जाळे विणतो, असे उदाहरण या संदर्भात दिले जाते. कोळ्याने ते तंतू कोठून बाहेरून आणलेले नाहीत. आपल्या शरीरामधूनच त्याने ते बाहेर काढले आहेत. म्हणून येथे कोळ्याचे शरीर हे उपादानकारण आणि त्या शरीरात राहणारे चेतनतत्त्व हे निमित्तकारण होय. त्याप्रमाणे वीरशैवसिद्धान्तानुसार सृष्टिनिर्मितीचे शक्त्यांश हे उपादानकारण आणि शिवांश हे निमित्तकारण असल्यामुळे शिवशक्ती हे अभिन्ननिमित्तोपादानकारण होय.

**न सूर्यो भाति तत्रेन्दुर्न विद्युन्न च पावक:।**
**न तारका महालिंगे द्योतमाने परात्मनि।।१२.३८।।**

लिंगरूप परमात्मा अत्यंत प्रकाशमान आहे. त्याच्या तेजापुढे सूर्य फिका पडून दिसेनासा होतो. एक हजार वॅटचा बल्ब रात्री लावला तर त्याचा कितीतरी प्रकाश पडतो. परंतु तोच जर दिवसा सूर्यप्रकाशात लावला तर निष्प्रभ ठरतो. प्रखर प्रकाशापुढे अल्प प्रकाश निस्तेज होतो. सूर्य हा अत्यंत प्रखर असला तरी त्याला प्रकाशित करणाऱ्या परमात्मतत्त्वापुढे तो निस्तेजच होय. महालिंग स्वयंप्रकाशाने तळपत असता त्याच्या तेजापुढे सूर्य, चंद्र, अग्नी आणि तारका हे सारे प्रभाशून्य होतात. सांगायचे तात्पर्य असे की, सूर्य, नक्षत्र इत्यादींच्या प्रकाशापेक्षाही शिव अथवा महालिंग अत्यंत प्रकाशमय आहे.

**ज्योतिर्मयं परं लिंगं श्रुतिराह शिवात्मकम्।**
**तस्य भासा सर्वमिदं प्रतिभाति न संशयः।।१२.३९।।**

शिवस्वरूप असे हे लिंग ज्योतिर्मय आहे असे श्रुतींमध्ये वर्णन केले आहे आणि जगात प्रकाश देणाऱ्या ज्या काही वस्तू आहेत त्या त्याच्याच प्रकाशाने प्रकाशित होतात.

**लिंगान्नास्ति परं तत्त्वं यदस्माज्जायते जगत्।**
**यदेतद्रूपतां धत्ते यदत्र लयमश्नुते।।१२.४०।।**

लिंगाशिवाय अधिक श्रेष्ठ तत्त्व दुसरे कोणतेही नाही. हा सारा प्रपंच त्याच्यातूनच निर्माण होतो आणि त्याच्यातच लय पावतो. लिंगाचे असे वर्णन केल्यावर शेवटी सांगतात-

**तस्माल्लिंगं परं ब्रह्म सच्चिदानन्दलक्षणम्।**
**निजरूपमिति ध्यानात् तदवस्था प्रजायते।।१२.४१।।**

लिंग हे परब्रह्म, आनंदस्वरूप आहे. ते लिंग निजरूप आहे. अर्थात् माझेच रूप आहे असे जो ध्यान करतो त्याला त्याचा साक्षात्कार होतो. त्याला दु:खदायक जड संसारात कोणतीही आस्था राहत नाही. तो निजगुणात तल्लीन राहून केवळ समाधिसुखच भोगतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
१६ एप्रिल १९९२



## अंगलिंगस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

प्राणलिंगिस्थलातील अंतिम अवांतरस्थल अंगलिंगस्थल हे होय. या स्थलात अंग आणि लिंग यांचे वास्तविक स्वरूप जाणून त्यांचे अभेदचिंतन कसे करावे याचे वर्णन केले आहे–

**ज्ञानमंगमिति प्राहुर्ज्ञेयं लिंगं सनातनम्।**
**विद्यते तद् द्वयं यस्य सांऽगलिंगीति कीर्तितः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.४२)

'ज्ञाना'ला 'अंग' असे म्हणतात, तर सनातन ज्ञेयाला 'लिंग' असे म्हणतात. या ठिकाणी 'ज्ञान' याचा अर्थ ज्ञानवान जीवात्मा असा होय. 'अंग' हा येथे पारिभाषिक शब्द आहे. सामान्यतः अंग हा शब्द उच्चारला की लोकांना शरीर आठवते. परंतु येथे 'अंग' शब्दाचा अर्थ शरीर अथवा शरीरातील अवयव असा नाही. 'अंग' शब्दाची व्याख्या 'अंग गच्छतीति अंगः' अशी केली जाते. ज्याच्याजवळ साधनेने, ज्ञानाने, समाधिस्थितीने परमात्म्याची प्राप्ती करून घेण्याचे सामर्थ्य असते त्याला 'अंग' म्हटजे जात नाही प्रत्येक जीव 'अंग' नसतो. ज्याने गुरुदीक्षा घेतली आहे, ज्याचे आणव, मायीय आणि कार्मिक मल नष्ट झाले आहेत, ज्याच्या मनात परशिवाला जाणण्याची उत्कट जिज्ञासा आहे अशा जीवात्म्यालाच येथे 'अंग' म्हटले आहे. वेदान्तशास्त्रात ज्याप्रमाणे 'अधिकारी' असतो. विवेक, वैराग्य, शम, दम इत्यादी षट्संपत्ती आणि मुमुक्षत्व असे साधनचतुःष्टय ज्याच्याजवळ असतात तो 'अधिकारी' होय. त्याप्रमाणे लिंगात समरस होण्याचा ज्याला अधिकार प्राप्त झाला असा जीवात्माच 'अंग' होय. म्हणून त्याला 'ज्ञान' म्हटले आहे. 'ज्ञान' म्हणजे शिवज्ञानी जीवात्मा. 'ज्ञाना'कडून प्राप्त केले जाणारे परमतत्त्व म्हणजे 'लिंग' होय. शिवज्ञानी आणि लिंग या दोन्हीचे ज्ञान ज्या प्राणलिंगी साधकाला असते त्याला 'अंगलिंगी' असे म्हणतात.

केवळ चिंतन केल्यामुळे शिवाची प्राप्ती होते असे म्हटले तर एक प्रश्न उपस्थित होतो. एखाद्या भुकेल्या मनुष्याने एकाच खोलीत बसून बंद डोळ्यांपुढे भाकरी आणून, 'भाकरी भाकरी' असे चिंतन केले तर त्याला भाकरी मिळते काय? किंवा तहानलेल्या मनुष्याने केवळ 'पाणी पाणी' असे चिंतन केल्याने त्याची तहान भागते काय? याचे उत्तर 'नाही' असे आहे. प्रपंचातील पदार्थ आणि परमात्मा यांमध्ये खूप फरक आहे. जड पदार्थात कोणतीही क्रिया होत नाही. त्याचे तुम्ही हजार वेळा नाव घ्या अथवा चिंतन करा. त्याच्यात कोणतीही हालचाल होत नाही. तो जेथे असतो त्याच ठिकाणी पडलेला असतो. चेतनतत्त्व असे नसते. एखाद्या माणसाला तुम्ही सारखी हाक मारली, ती जर त्याच्या कानावर पडली तर तो उठून तुमच्या जवळ येतो. कारण मनुष्य हा जड नसून चेतन असतो. प्रपंच जड असल्यामुळे त्याचे कितीही चिंतन केले तरी काही उपयोग नाही. जड पदार्थ आपल्या जवळ येत नाहीत. आपल्यालाच त्यांच्याजवळ जावे लागते. परंतु परमात्मा चेतन आहे. चिद्रूप आहे. त्यामुळे तुम्ही ज्या ठिकाणी त्याचे चिंतन करता त्या ठिकाणी तो येतो, ज्या रूपात चिंतन करता त्या रूपात तो येतो. प्रापंचिक

वस्तू जड आहेत आणि परमात्मा शुद्ध चेतन आहे. असे दोन्हीत अंतर आहे. परमात्म्याचे चिंतन करणे हाच प्रत्येक जीवात्म्याचा जीवनोद्देश आहे.

एखाद्या मनुष्याला जर विचारले की, ''तू कोणाचा आहेस?'' तर तो उत्तर देईल, ''मी माझ्या आई-वडिलांचा आहे, अमक्याचा आहे, तमक्याचा आहे, या गावचा आहे, या जातीचा आहे.'' परंतु हे खरे नाही. जीवात्मा कोणाचा आहे? तर तो जेथून आला आहे त्याचा. अर्थात् परमात्म्याचा आहे. कारण जीव हा शिवाचाच अंश आहे. 'तदंशो जीव नामक:' गीतेत देखील भगवंतांनी म्हटले आहे- ममैवांशो जीवलोके जीवभूत: सनातन:' या प्रपंचात जीव म्हणून येण्याआधी आपण परमात्माच होतो. शरीर धारण करून आपण या प्रपंचात आलो आहोत. चोवीस तास प्रपंचातील व्यवहार करताना दिवसातून काही तास तरी आपल्याला परमात्म्याच्या संगतीत राहावे लागते. सद्रूप परमात्म्याशी समरस होणारी जी अवस्था ती सुषुप्ति-अवस्था. तिलाच आपण गाढ निद्रा असे म्हणतो. समजा, एखाद्या माणसाला खूप झोप आली आहे, पण त्याला आपल्याला झोपू द्यायचे नाही. त्याला आपण कितीही धन देऊ केले, काहीही देऊ केले तरी तो जागा राहणे शक्य नाही. कारण ती देखील त्याची एक स्वाभाविक अवस्था आहे. त्या अवस्थेत बाहेरचे सारे काही सोडून जीवात्मा परमात्म्याजवळ जात असतो. जेव्हा तो संसारातून पूर्ण मुक्त होतो तेव्हा आपल्या मूलस्थानी म्हणजे परमात्म्याशीच एकरूप होतो. प्रपंचात येण्याआधी तो परमात्मस्वरूपच होता आणि मुक्त झाल्यावर देखील तो परमात्म्याशीच एकरूप होणार आहे. संसारात राहून देखील त्याचे सर्वाधिक प्रेम परमात्म्यावरच असते, संसारावर नसते. एखाद्या सांसारिक वस्तूवर किंवा व्यक्तीवर मनुष्य किती काळ प्रेम करतो? फार तर पाच मिनिटे, दहा मिनिटे. त्यापेक्षा अधिक काळ त्याला प्रेम करता येत नाही.

सात-आठ तास आपण सुषुप्ति-अवस्थेचा आनंद घेत असतो. एवढा वेळ कोणत्याही सांसारिक वस्तूसोबत जीवात्मा समरस होऊ शकत नाही. मनोरंजनासाठी नाटक, चित्रपट किंवा एखादा खेळ पाहायला आपण गेलो तरी दोनतीन तासांपेक्षा अधिक काळ आपण तो पाहू शकत नाही. परंतु सुषुप्ति-अवस्थेत जीव जेव्हा परमात्म्याशी समरस होतो तेव्हा सहा-सात तास त्याच अवस्थेत असतो. यावरून हे सिद्ध होते की जीवात्मा हा इतर कोणाचाही नसून परमात्म्याचा आहे. म्हणून उत्पत्तीच्या आधी तो परमात्मस्वरूपच असतो. संसारातून मुक्त झाल्यावर तो परमात्म्याशीच एकरूप होतो आणि संसारात असताना देखील वारंवार परमात्म्याजवळ जाण्याचा तो प्रयत्न करीत असतो. मुळात परमात्म्याचाच अंश असलेल्या जीवात्म्याचे परमात्म्याशी सामरस्य करण्यासाठी शिवयोग सांगितलेला आहे.

**अंगे लिंगं समारूढं लिंगे चांगमुपस्थितम्।**
**एतदस्ति द्वयं यस्य स भवेदंगलिंगवान्।।१२.४३।।**

अंगात अर्थात् जीवात्म्यात लिंग अर्थात् परशिव समरसरूपाने राहतो आणि लिंगात अंग देखील समरसरूपात असते. अशा प्रकारे त्यांच्या सामरस्याचे ज्ञान ज्या प्राणलिंगी साधकाला होते त्यालाच 'अंगलिंगी' म्हणतात. या ठिकाणी एक प्रश्न सहज उपस्थित होऊ शकतो. लिंगात अंग राहू शकेल, परंतु 'अंगा'त (जीवात्म्यात) 'लिंग' म्हणजे शिव परमात्मा कसा राहू शकेल? जे व्यापक आहे, मोठे आहे ते लहान वस्तूत कसे राहू शकते? आकाशात सारे काही राहू शकते, परंतु एवढे मोठे आकाश दुसऱ्या वस्तूत कसे राहू शकते? परिच्छिन्न वस्तूत व्यापक वस्तू राहणे शक्य नाही. परंतु येथे दोन्ही गोष्टी घडतात. आकाशात घटदेखील राहू शकतो आणि घटात

आकाश देखील राहू शकते. घट तुम्ही जेव्हा ठेवता तेव्हा तो कशात असतो? तर आकाशात. घटाच्या आत तुम्ही डोकावून पाहिल्यावर आत काय असते? तर आकाशच असते. जी वस्तू सर्वव्यापक असते ती सर्वांमध्ये असते, सर्व वस्तूंमध्ये असते आणि सर्ववस्तू तिच्यामध्ये असतात. त्याचप्रमाणे लिंगतत्त्व सर्वव्यापक असल्यामुळे त्याच्यात 'अंग' असते आणि 'अंगा'त लिंगतत्त्व असते. असे अंग-लिंग यांच्या सामरस्याचे जो चिंतन करतो तोच अंगलिंगी.

**ज्ञात्वा यः सततं लिंगं स्वान्तःस्थं ज्योतिरात्मकम्।**
**पूजयेद् भावयेन्नित्यं तं विन्द्यादंगलिंगिनम्।।१२.४४।।**

अंगात लिंग आहे आणि लिंगात अंग आहे. एवढे ज्ञान झाले की साधना पूर्ण होते काय? तर तेवढे पुरेसे नाही. ही केवळ ज्ञानात्मक जाणीव होय. या ऐक्याचा, अंगलिंगाचा सामरस्याचा साक्षात्कार करून घेतला पाहिजे. अंगात ज्योतिस्वरूप असे लिंग विराजमान आहे याची जाणीव झाल्यावर पूर्वी सांगितलेल्या क्षमाविवेकादी अंतरंगसाधनांनी त्याचे पूजन करावे, निरंतर चिंतन करावे. असे करणारा साधकच अंगलिंगी म्हणविला जातो.

आपल्या सिद्धान्तात भक्ती केल्यावरच जीवात्म्याला मुक्ती मिळते असे सांगितले आहे. प्राणलिंगिस्थलातील साधकाकडून जी भक्ती घडते तिला 'अनुभवभक्ती' असे म्हणतात. श्रद्धाभक्ती, निष्ठाभक्ती, अवधानभक्ती, अनुभवभक्ती, आनंदभक्ती आणि समरसभक्ती असे भक्तीचे सहा प्रकार होत. यांपैकी अनुभवभक्ती ही चौथी भक्ती असून प्राणलिंगिस्थल हे देखील षट्स्थलांपैकी चौथे स्थल आहे. साक्षात् अनुभव घेणे म्हणजे अनुभवभक्ती. ज्याप्रमाणे आपण डोळ्यांनी, कानांनी एखाद्या वस्तूचा प्रत्यक्ष अनुभव घेतो, त्याप्रमाणे आपल्या मनोवृत्तींनी, भाववृत्तींनी प्राणलिंगाचा अनुभव घेऊन त्याचे चिंतन केल्यावर अनुभवभक्तीनेच त्याचा साक्षात्कार होतो. भक्ती प्रारंभी भेद दर्शवत असते. भक्त वेगळा आणि भगवंत वेगळा. त्याच भक्तीच्या द्वारे जेव्हा तुम्ही ईश्वराकडे जाल तेव्हा भक्त-भगवंतामधील अंतर हळूहळू कमी होत जाते आणि शेवटी भक्तच भगवंत होतो. प्रारंभी भेद सांगणारी भक्तीच परिपक्व झाल्यावर अभेद सांगते.

**कीटो भ्रमरध्यानेन भ्रमरो भवति ध्रुवम्।**
**मानवः शिवयोगेन शिवो भवति निश्चयम्।।**

भ्रमराचे चिंतन करता करता कीटक भ्रमर बनतो त्याप्रमाणे परमात्म्याचे चिंतन करता करता भक्तच भगवंत बनतो. जीवात्मा आणि परमात्मा विजातीय नसून सजातीय आहेत. दोघेही सत्‌चित्‌स्वरूप आहेत म्हणून अनुभवभक्तीने जेव्हा प्राणलिंगार्चना घडते तेव्हा ती भक्ती क्रमाक्रमाने अभेदभक्तीत परिवर्तित होते.

**ज्ञायते लिंगमेवैकं सर्वैः शास्त्रैः सनातनैः।**
**ब्रह्मेति विश्वधामेति विमुक्तेः पदमित्यपि।।१२.४५।।**

सर्व शास्त्रे ही लिंगस्वरूपाचेच प्रतिपादन करतात. काही शास्त्रांत त्याला 'ब्रह्म' म्हटले आहे, काहींनी 'विश्वधाम' म्हटले आहे, काहींनी त्याला 'विमुक्ती पद' संबोधिले आहे. नावे भिन्न असली तरी तत्त्व एकच आहे. 'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति.' एकाच तत्त्वाला शास्त्रांनी विविध नावे दिली आहेत.

**मुक्तिरूपमिदं लिंगमिति यस्य मनःस्थितिः।**
**स मुक्तो देहयोगेऽपि स ज्ञानी स महागुरुः।।१२.४६।।**

आपले आराध्य लिंग हे मुक्तिरूपच होय. त्यापेक्षा मुक्ती वेगळी नाही. लिंगाची आराधना करून मुक्ती मिळविण्यासाठी दुसरीकडे जावे लागत नाही. लिंगाची पूजा करता करता लिंगरूप होणे हेच लिंगपूजेचे फल आहे, तीच मुक्ती होय. प्राणलिंगस्वरूपात ज्याचे मी चिंतन करतो तेच मुक्तिधाम असून त्याच्याशिवाय मुक्ती वेगळी नाही, असे ज्याला दृढ ज्ञान झालेले असते त्यालाच 'मुक्त' असे म्हणतात. त्याला शरीर आहे, त्याचे सर्व व्यवहार चालू आहेत तरी देखील तो जीवन्मुक्त असतो. तो सामान्य माणसाप्रमाणे बाह्य जीवन जगत असतो आणि आपल्या अंतरंगात मुक्तिसुख अनुभवत असतो. अशा जीवन्मुक्तालाच ज्ञानी आणि गुरू असे म्हटले जाते. मनुष्याचे प्राणलिंगचिंतन जसजसे वाढत जाते तसतसा तो हळूहळू प्राणलिंगाशी समरस होत जातो. कापराचा आणि अग्नीचा संबंध आल्यावर कापूर पेट घेतो आणि हळूहळू अग्नीमध्ये विलीन होतो. त्याचा कोणताही अवशेष मागे उरत नाही. जीवन्मुक्त पुरुषाला जरी शरीर असले तरी त्याच्या मुक्तस्थितीमध्ये कोणतीही बाधा येत नाही.

**अनादिनिधनं लिंगं कारणं जगतामिति।**
**ये न जानन्ति ते मूढा मोक्षमार्गबहिष्कृता:।।१२.४७।।**

लिंगाचे तादात्म्यचिंतन जो करतो त्याला तर मुक्ती मिळतेच. परंतु जो असे चिंतन करीत नाही त्याची स्थिती काय होते याविषयी येथे सांगतात. लिंग हे अनादी आणि अनिधन असे आहे. ज्याचा जन्म झाला नाही ते अनादी आणि ज्याचा अन्त होत नाही ते अनिधन. ज्याला जन्म असतो त्याला अपरिहार्यपणे मृत्यू येतोच. ज्याचा जन्म होत नाही त्याचा मृत्यूदेखील होत नाही. म्हणून भगवान शिव अजन्मा आहेत, सनातन आहेत 'सदा भव: सनातन:' तो नित्य आहे. त्याचा अभाव कधीही होत नाही. प्राग्भाव, प्रध्वंसाभाव, अन्योन्याभाव आणि अत्यनताभाव असे चार प्रकारचे 'अभाव' सांगितले आहेत. निर्मितीच्या आधी जे नसते तो प्राग्भाव. उदा. मातीचा घडा. निर्मितीपूर्वी त्याचा अभाव असतो, म्हणून मातीमध्ये घड्याचा प्राग्भाव असतो. घडा फुटला तर तो नष्ट होतो, त्याचा ध्वंस होतो. हाच प्रध्वंसाभाव. दोन वस्तूंमधील भेद म्हणजे अन्योन्याभाव, उदा. पुस्तक हे 'पुस्तक' आहे, ते 'पेन्सिल' नाही. पुस्तकाच्या ठिकाणी पेन्सिलचा अभाव आहे आणि पेन्सिलच्या ठिकाणी पुस्तकाचा अभाव आहे. या परस्पर-भेदालाच अन्योन्यभाव असे म्हणतात. हे तीन अभाव ज्याच्या संदर्भात नसतात आणि जे मुळीच अस्तित्वात नसते तो अत्यन्ताभाव होय. उदा. आकाशपुष्प. आकाशाला कधी फूल लागत नाही तरी केवळ 'आकाशफूल' अशी कविकल्पना आहे. वंध्येला म्हणजे वांझ स्त्रीला कधीच पुत्र होत नाही तरी 'वंध्यापुत्र' असे म्हटले जाते. वस्तू जेव्हा अस्तित्वातच नसते तेव्हा त्या वस्तूचा अत्यन्ताभाव असतो.

परमात्म्याच्या ठिकाणी हे चारही अभाव नसतात. ते कधी उत्पन्न होत नाही म्हणून त्याचा प्राग्भाव नसतो. तो कधी नष्ट होत नाही म्हणून त्याचा प्रध्वंसाभाव नसतो. त्याच्याशिवाय दुसरी कोणती वस्तू अस्तित्वात नसल्यामुळे त्यांच्या ठिकाणी अन्योन्याभाव संभवत नाही. अन्योन्याभाव करण्यासाठी दोन वस्तूंची आवश्यकता असते. 'लिंगमध्ये जगत्सर्वम्'. लिंगात सर्व समाविष्ट असल्यामुळे त्याच्याशिवाय दुसरी वस्तू अस्तित्वात नाही. म्हणून तिथे अन्योन्याभाव नसतो. त्याच्या अत्यन्ताभाव देखील नाही, म्हणजे ते अस्तित्वाच नाही असे नाही. त्याचा जर अभाव असेल तर कुणाचा भाव असू शकतो? सगळ्या अभावांचा साक्षी तर तो आहे.

नाटक सुरू होण्याआधी नाट्यगृहातील विद्युत्दीप स्थिरपणे प्रकाश देत असतात. नाटक सुरू होताना प्रेक्षक येतात, नाटक पाहतात, नाटक संपल्यावर प्रेक्षक निघून जातात. नाट्यगृह रिते होते, तेव्हाही ते दिवे संथपणे

तळपतच असतात. आधी नाट्यगृह रिकामे होते. नंतर तुडुंब भरले होते. त्यानंतर पुन्हा रिकामे झाले या साऱ्यांचे जणू ते मूक साक्षीदार असतात. त्याप्रमाणे विश्व निर्माण होण्यापूर्वी, विश्व निर्माण झाल्यानंतर आणि विश्वाचा विलय झाल्यानंतर परमात्मा अस्तित्वात असतोच, तो साऱ्याचा साक्षीदार असतो. त्याच्या प्रकाशातच विश्वाची उत्पत्ती, स्थिती आणि विलय हे सारे घडते. चारही अभावांच्या अतीत असल्यामुळे परमात्मा अनादी आणि अनिधन आहे. परमात्म्याची उत्पत्ती आणि विनाश होत नाही. परंतु ज्याला उत्पत्ती आणि विनाश आहे अशा प्रपंचाचे ते कारण आहे. प्रपंच त्यातूनच उत्पन्न होतो आणि त्याच्यातच विलीन होतो. हे तत्त्व जे जाणत नाही ते मूढ होत. त्यांची बुद्धी मोहग्रस्त असल्यामुळे ते आपल्या हृदयातल्या चैतन्याला जाणू शकत नाहीत. 'मोक्षमार्ग बहिष्कृताः' ते मुक्तिमार्गाचे प्रवासी नसून संसारमार्गावरचे प्रवासी होत. त्यांचा प्रवृत्तिमार्ग असतो, निवृत्तिमार्ग नसतो. त्याचा प्रेयमार्ग आहे, श्रेयमार्ग नव्हे. जो श्रेयमार्ग असतो तोच आपल्याला मुक्तीकडे घेऊन जातो. श्रेय याचा अर्थ सर्वश्रेष्ठ. म्हणून मुक्तीला 'निःश्रेयस्' असे म्हणतात. प्रेयमार्गावर चालणाऱ्यांचा प्रवास अंधाराकडे होत असतो. श्रेयमार्गावर चालणाऱ्यांची मात्र प्रकाशयात्रा असते. म्हणून उपनिषदांत ऋषींनी प्रार्थना केली आहे–

**असतो मा सद्गमाय। तमसो मा ज्योतिर्गमय। मृत्योर्माऽमृतं गमय।**

हे परमेश्वरा, असत्‌कडून सत्‌कडे न्या, अंधाराकडून प्रकाशाकडे न्या आणि मृत्यूकडून अमृततत्त्वाकडे न्या.

जो प्रपंचसन्मुख असतो त्याची वाटचाल मृत्यूकडे होत असते, जो ईश्वरसन्मुख असतो त्याची वाटचाल अमृततत्त्वाकडे होत असते. जे मूढ आहेत, ज्यांची बुद्धी मोहग्रस्त आहे असे लोक मोक्षमार्गावरून बहिष्कृत होतात. अनादी आणि अनिधन अशा लिंगाचे ज्ञान त्यांना कधीही होणे शक्य नाही. ज्यांना लिंगाचे ज्ञान असते तेच केवळ मोक्षमार्गाचे अधिकारी असतात. जो परमात्म्याकडे जातो त्याला मुक्तिलाभ होऊ शकतो. मोक्षमार्गाचा अधिकारी होण्यासाठी मनुष्याला आपल्या व्यावहारिक जीवनात बदल करावा लागतो.

भागवतामध्ये आपण कथा ऐकतो की, नंदाने कृष्णाला गोकुळात आणले आणि यशोदेने त्याचे पालन पोषण केले. या कथेचा तात्त्विक अर्थ देखील समजून घेतला पाहिजे. 'यशोदा'चा अर्थ कोणता? तर 'यशो ददातीति यशोदा' जी सर्वांना यश देते ती यशोदा. जो कुणाचा अपमान करीत नाही अशाच माणसाला भगवंताचा साक्षात्कार होतो. नन्द याचा अर्थ आनंद देणारा. सर्व जगाला जो आनंद देतो अशा उदात्त मनुष्याच्या हृदयातच परमात्म्याचा आविष्कार होतो. जो दुसऱ्यांचा अपमान करतो त्याला केव्हा तरी अपमान सहन करावाच लागतो. जो दुसऱ्यांना दुःख देतो त्याला केव्हातरी दुःख सहन करावेच लागते. तुम्ही लोकांना जे द्याल तेच लोकांकडून तुम्हाला मिळेल. म्हणूनच महर्षी व्यासांनी म्हटले आहे–

**आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत्।**

आपला दैनंदिन व्यवहार कसा असावा? व्यास सांगतात की, ज्या व्यवहारामुळे आपल्याला दुःख होते तसा व्यवहार आपण इतरांशी करू नये. कुणी आपल्याला शिवी दिली तर आपल्याला दुःख होते. त्याप्रमाणे दुसऱ्याला आपण शिवी दिली तर त्यालाही दुःख होईल. हे समजून घेऊन दुसऱ्याला शिवी देऊ नये.

यशोदा आणि नंद यांच्या घरात भगवान श्रीकृष्णांनी आनंदाने वास्तव्य केले, त्याप्रमाणे जे इतरांना यश देतात अर्थात् त्यांच्या कल्याणाचे चिंतन करतात आणि जे इतरांना दुःखदायक न ठरता आनंदच देतात अशा सत्प्रवृत्त मनुष्यांच्याच अंतःकरणात परमात्म्याचा निवास असतो. मंदिरात ईश्वरदर्शनासाठी जाताना आपण स्नान करतो, स्वच्छ कपडे घालतो आणि मगच जातो. हा तर बाह्य व्यवहार आहे. ईश्वरदर्शनासाठी शरीराच्या स्वच्छतेची

गरज असते तशीच मनाच्या शुद्धतेची देखील गरज असते. यालाच अंतरंगशुद्धी म्हणतात. दुर्गुणांचा त्याग केल्यावर जेव्हा आपले हृदय शुद्ध होते तेव्हाच त्यामध्ये परमात्म्याचा आविष्कार होतो. म्हणून जे मूढ असतात अशांच्या हृदयात परमात्मा प्रकाशत नाही. याप्रमाणे सांगून शेवटी प्राणलिंगिस्थलाचा समारोप करतात–

**यः प्राणलिंगार्चनभावपूर्वैर्धर्मैरुपेतः शिवभावितात्मा।**
**स एव तुर्यः परिकीर्तितोऽसौ संविद्विपाकाच्छरणाभिधानः।।१२.४८।।**

प्राणलिंगार्चनासाठी सांगितलेल्या भावपुष्पांनी धार्मिक होऊन आपल्या भावनेत शिवाला साठवून जो नित्य शिवस्मरण करतो अशा प्राणलिंगिस्थलातील साधकाचे ज्ञान परिपक्व झाल्यामुळे तो पुढील शरणस्थलाचा अधिकारी होतो. एखादा कुंभ पाण्याने पूर्ण भरावा त्याप्रमाणे तो आपल्या भावनेत शिवाला भरून घेतो. असा प्रणिलिंगिस्थलातील साधक प्राणलिंगिस्थल पार करून त्या पुढच्या पाचव्या शरणस्थलात प्रवेश करतो.

या ठिकाणी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील प्राणलिंगिस्थल या षट्स्थलांतील चौथ्या स्थलाचे विवेचन पूर्ण झाले आहे. ज्याला आपले जीवन प्रकाशाने उजळून घ्यायचे आहे, ज्याला मृत्यूकडे पाठ करून अमृततत्त्वाचा धांडोळा घ्यायचा आहे, ज्याला सांसारकि दुःखांपासून सुटका करून घेऊन चिदानंदरूपी परशिवात सामावून जायचे आहे अशा संवेदनशील, सत्त्वगुणी मनुष्याने अथकपणे चालावी अशी ही प्रकाशाची वाट आहे. प्रत्येक पावलागणिक ती सरत जाते आणि आदिअन्तहीन अशा अपार शांतीत साधक चिंब न्हाऊन जातो. याच वाटेवरचा यात्रिक होणे हे प्रत्येकाचे इतिकर्तव्य आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन आणि प्राणलिंगिस्थलाचे विवेचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी
१७ एप्रिल १९९२



# भाग ५ : अंगषट्स्थलांतर्गत शरणस्थल

**आशीर्वचन पहिले**

## शरणस्थल

**विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।**
**विश्ववंद्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगदगुरुम।।**

जिज्ञासू सद्भक्तांनो,

श्रीकाशीज्ञानसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे, तिला अनंत प्रणिपात समर्पित करून जंगमवाडी मठाच्या या पवित्र ज्ञानमंदिरात उपस्थित असलेले विद्वत्संघाचे सर्व विद्यार्थी आणि अन्य उपस्थित जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील षट्स्थलांपैकी भक्त, माहेश्वर, प्रसादी आणि प्राणलिंगी या चार स्थलांचा आपण आतापर्यंत विचार केला आहे. प्राणलिंगिस्थलात आपण शेवटी ऐकलेच आहे की–

**अनादिनिधनं लिंगं कारणं जगतामिति।**
**ये न जानन्ति ते मूढा मोक्षमार्गबहिष्कृता:।।**
**य: प्राणलिंगार्चन भावपूर्वैर्धर्मैरूपेत: शिवभावितात्मा।**
**स एव तुर्य: परिकीर्तितोऽसौ संविद्विपाकाच्छरणाभिधान:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १२.४७-४८)

आपल्या हृदयात असलेल्या प्राणलिंगाचा जो साक्षात्कार करून घेतो तोच प्राणलिंगी साधक होय. ज्याचे सगळे अंतर्विश्व शिवमय होऊन जाते आणि जो शिवाशिवाय अन्य कोणताही विचार करूच शकत नाही असा प्राणलिंगीसाधक शरणस्थलात प्रवेश करण्यास पात्र होतो. अगस्ती महर्षी विचारतात–

**माहेश्वर: प्रसादीति प्राणलिंगीति बोधित:।**
**कथमेष समादिष्ट: पुन: शरणसंज्ञक:।।१३.१।।**

आपण आतापर्यंत माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी यांचे निरूपण केले. या सर्वांची लक्षणे मला चांगल्या प्रकारे ज्ञात झाली आहेत. परंतु 'शरण' कोणाला म्हणतात ते कृपा करून मला समजावून सांगा. अगस्ती मुनीचा प्रश्न ऐकून जगद्गुरू रेणुकाचार्य त्यांना सांगतात–

**अंगलिंगी ज्ञानरूप: सती ज्ञेय: शिव: पति:।**
**यत्सौख्यं तत्समावेशे तद्वान् शरणनामवान्।।१३.२।।**

सति–पती न्यायाने या ठिकाणी अंग आणि लिंगाचे सामरस्य वर्णन केले आहे. अंगलिंगी म्हणजे प्राणलिंगाचा

साक्षात्कार करून घेतलेला प्राणलिंगीपुरुष. शिवज्ञानसंपन्न प्राणलिंगीपुरुष हा 'सती' असून भगवान शिव हे तिचे 'पती' होत. सती आणि पती यांच्या सामरस्यातील सुखाचा ज्याला अनुभव येतो तोच शरण होय. शरणस्थलातील साधकाची भक्ती 'आनंदभक्ती' असते. परंतु हा आनंद लौकिक आनंद नव्हे. सती आणि पती या लौकिक उदाहरणाने भक्त आणि भगवंत यांच्यातील एकरूपतेचे येथे वर्णन केले आहे. लौकिकाचा आधार घेऊन अलौकिकाबद्दल सांगण्याचा हा एक प्रयत्न आहे. परिवारात जरी अनेक लोक असले तरी पति-पत्नी यांच्यात जेवढा निकट संपर्क असतो तेवढा इतरांमध्ये नसतो. पतीचे पत्नीवर आणि पत्नीचे पतीवर आत्यंतिक प्रेम असते. ते परस्परांना सदोदित सहकार्य करीत असतात. पती जर आजारी पडला तर त्याची शुश्रूषा पत्नीच करीत असते. त्याच्या आजारपणात त्याला आंघोळ घालणे, खाऊ घालणे अशी त्याची सर्वप्रकारे सेवा अत्यंत समरसभावाने पत्नी करीत असते. पत्नीचे हे महत्त्व शास्त्रकारांनी देखील वर्णिले आहे. 'षड्धर्मयुक्ता कुलधर्मपत्नि:'

पत्नी ही सहा धर्मांनी युक्त असते. ती जेव्हा पतीला अत्यंत प्रेमाने खाऊ घालते तेव्हा ती त्याची आईच असते. पत्नी आई होऊ शकते. परंतु आई मात्र पत्नी होऊ शकत नाही. पत्नी आई होते. पत्नी पत्नीही होते. ती सारे काही होऊ शकते. म्हणून पती आणि पत्नी यांच्यात जो निकट संबंध असतो तसा कुटुंबातील इतर सदस्यांमध्ये नसतो. आपल्या सांसारिक जीवनातील या उदाहरणाने भक्त आणि ईश्वर यांच्यातील निकट संबंध येथे जगद्गुरू रेणुकाचार्य पटवून देत आहेत. म्हणून येथे अंगलिंगी हा सती असून भगवान शिव हे तिचे पती होत.

शरणस्थल, तामसवर्जनस्थल, निर्देशस्थल आणि शीलसंपादनस्थल अशी शरणस्थलाची चार अवांतर स्थले आहेत. या चार अवांतर स्थलांनी युक्त असलेले स्थल म्हणजे शरणस्थल होय.

**सतीव रमणे यस्तु शिवे शक्तिं विभावयन्।**
**तदन्यविमुख: सोऽयं ज्ञात: शरणनामवान्।।१३.५।।**

पत्नीला सर्वप्रकारे जो सुख देतो त्याला पती असे म्हणतात. शिव हा आपल्या भक्ताला परमानंद देतो. म्हणूत तो देखील भक्ताचा पतीच आहे. येथे कोणाला प्रश्न पडेल की, सांसारिक सुख ही वर्ज्य करावीत असे सांगत असतानाच पति-पत्नीची सांसारिक प्रतिमा भक्त-भगवंताच्या संदर्भात का बरे घेतली जाते? परंतु हा समजावून सांगण्याचा प्रयत्न आहे. लौकिक जीवनातील पतिपत्नीचे संबंध दीर्घकाळ टिकतातच असे नाही. मृत्यूदेखील त्यांची ताटातूट घडवून आणू शकतो. कधी पत्नी आधी मरते तर कधी पती आधी मरतो. पतीच्या मृत्यूनंतर त्या धक्क्याने तात्काळ प्राण सोडणारी पत्नी आणि पत्नीच्या मृत्यूनंतर तिच्या वियोगाने प्राण सोडणारा पती अशी अनेक उदाहरणे आपण ऐकत असतो. परस्परांवर आत्यंतिक प्रेम असेल अशावेळीच या घटना घडतात. सांगण्याचे तात्पर्य असे की, लौकिकातील पतिपत्नी एकमेकांची अखंड सोबत करू शकत नाहीत. जेव्हा एखादी स्त्री एखाद्या पुरुषाला आपला पती मानते आणि जेव्हा त्या पुरुषाचे देहावसान होते तेव्हा ती स्त्री विधवा होते. तिची सारी सौभाग्यलेणी हिसकावून घेतली जातात आणि तिला मंगलकार्यापासून दूर ठेवले जाते.

परंतु भगवान शिव मात्र असे पती आहेत की, जे कधी मृत्यू पावत नाहीत. ते अमर पती आहेत. जर कुणी शिवाला आपला पती मानील तर त्या सतिभक्ताचे सौभाग्य कोणीही हिरावून घेऊ शकणार नाही. म्हणूनच अक्कमहादेवीने आपल्या लौकिक पतीचा त्याग केला आणि मल्लिकार्जुनाची अर्थात् भगवान शिवाची सती होऊन ती राहिली. लौकिक जीवनात देखील पतीची आवश्यकता असतेच. शिवयोगी श्रीसिद्धरामेश्वरांच्या चरित्रातील

घटना आपल्या सर्वांना माहीतच आहे.

श्रीसिद्धरामेश्वर नित्य योगसाधना करीत असत. त्यावेळी त्यांच्या साधनास्थलाबाहेर एक युवती रोज सडासंमार्जन करून सुरेख रांगोळी रेखत असते. सिद्धराम जेव्हा बाहेर येत तेव्हा सडा आणि रांगोळी पाहून त्यांना आश्चर्य वाटायचे. परंतु रोज हे कोण करतो हे त्यांना कळेना. एके दिवशी ते मुद्दाम ठरलेल्या वेळेच्या आधीच साधनास्थलाबाहेर आले. तेव्हा एक सुंदर युवती त्यांना रांगोळी घालताना दिसली. त्यांनी तिला विचारले,

''बाई, तू हे रोज का करतेस? कशासाठी करतेस?''

ती युवती म्हणाली, ''महाराज, माझे आपल्यावर मन जडले आहे. मी आपल्यावर प्रेम करते आहे. मला तुमच्याशी लग्न करायचे आहे. म्हणून मी रोज ही सेवा करीत असते.''

शिवयोगी सिद्धराम हसले आणि म्हणाले, ''एका कन्येसोबत दुसऱ्या कन्येचा विवाह झाल्याची घटना या जगात कधी घडलीय का? एका कन्येचा एका वराशी विवाह होऊ शकतो. परंतु दोन कन्या एकमेकींशी विवाह करीत नाहीत. तू जशी एक कन्या आहेस तशीच मी देखील एक कन्याच आहे.''

सिद्धरामेश्वरांनी सांगितलेला विचार हाच सतिपतिभाव होय. त्या अजाण कन्येला ही गोष्ट कळण्यासारखी नव्हती. सिद्धरामेश्वर हे शरणस्थलात होते आणि ज्या क्षणी त्यांनी लिंगदीक्षा घेतली होती त्या क्षणीच त्यांचा आपल्या लिंगाशी विवाह झालेला होता. म्हणून त्यांनी सेवा करणाऱ्या मुलीला वरीलप्रमाणे उत्तर दिले. परंतु त्या बिचारीला ते उमजले नाही.

लिंगाला अर्थात् भगवान शिवाला आपला पती मानणे हा कामभावनेवर विजय मिळविण्याचा एक प्रयत्न आहे. अजिंक्य अशा कामाला जिंकण्यासाठीच वीरशैवसिद्धान्तात सतिपतिभाव सांगितला आहे. स्वत:ला सती समजणारा शरणस्थलातील साधक आपल्या कामभावनेवर विजय मिळवून आणखी उन्नत स्थान प्राप्त करून घेतो. जर एखाद्या स्त्रीने अक्कमहादेवी प्रमाणे किंवा मीरेप्रमाणे जर ईश्वराला पती मानले तर आपल्याला विशेष वाटत नाही. परंतु जर एखादा पुरुष स्वत:ला स्त्री समजून ईश्वराला पती मानीत असेल तर आपल्याला थोडे अवघड वाटते, आश्चर्य वाटते एक पुरुष पत्नी कशी होऊ शकतो? परंतु आध्यात्मिक जीवनात सर्व जीवात्मे सती असून केवळ परमात्मा हाच एकमेव पती आहे असे मानले जाते. स्वत:ला सती समजणे हा ईश्वराच्या अत्यंत निकट नेणारा मार्ग आहे. पति-पत्नी ज्याप्रमाणे एकमेकांच्या अत्यंत जवळ असतात त्याप्रमाणे ईश्वराच्या अत्यंत जवळ जाण्यासाठी त्याची सतिपतिभावनेने उपासना करावी लागते. पतिव्रता स्त्री जशी आपल्या पतीशी एकनिष्ठ असते त्याप्रकारे शिव आपला पती असून आपण सती आहोत अशी ज्याची दृढ भावना असते आणि याशिवाय दुसरा कोणताही विचार ज्याच्या चित्ताला स्पर्शत नाही त्यालाच शरण म्हटले जाते.

**परिज्ञाते शिवे साक्षात् को वान्यमभिकांक्षति।**
**निधाने महति प्राप्ते क: काचं याचतेऽन्यत:।।१३.६।।**

शरणस्थलातील साधक शिवालाच आपले सर्वस्व का मानतो? ज्याला साक्षात् शिवच प्राप्त झाला आहे असा मनुष्य अन्य वस्तूंच्या मागे कशाला लागेल? ज्याच्यामुळे सारे विश्व सुखी आहे. ज्याच्या प्रकाशाने अवघे जग प्रकाशित होत आहे आणि ज्याच्या अस्तित्वामुळे या विश्वाला अस्तित्व लाभले आहे असा भगवान शिव जर प्राप्त होत असेल तर त्याच्याशिवाय दुसऱ्या कशाची अपेक्षा करावी? ज्याला हे ज्ञान नसते तो ईश्वराजवळ जाऊन दुसरेच काहीतरी मागत असतो. तो ईश्वराला मागत नाही. म्हणून भगवत्संपद्भक्त अधिक आहेत.

ईश्वराजवळच्या संपत्तीचे भक्त अधिक आहेत. कुणी धन मागतो. कुणी पुत्र मागतो, तर कुणी स्त्रीची अपेक्षा ठेवतो. ज्याला जे काही हवे ते सारे तो ईश्वराला मागतो. शरणस्थलातील साधक मात्र अशा सामान्य वस्तूंचा मोह धरीत नाही. कारण प्रापंचिक वस्तूमधील क्षणभंगुरत्व त्याने जाणलेले असते. प्रापंचिक वस्तू फार काळ टिकत नाहीत आणि त्यांच्यापासून मिळणारे सुखदेखील क्षणिक असते याचे त्याला भान असते. ज्या माणसाजवळ अत्यंत मौल्यवान रत्ने असतात असा मनुष्य काचेच्या मण्यांचा लोभ बाळगत नसतो. ईश्वरी श्रद्धाच एक महान संपत्ती आहे. त्याच्यापेक्षा श्रेष्ठ अशी दुसरी संपत्ती जगात नाही.

एकदा हनुमंताला कोणीतरी विचारले की, ''संपत्ती कशाला म्हणतात, विपत्ती कशाला म्हणतात?'' तेव्हा हनुमंताने उत्तर दिले, ''विपद्विस्मरण विष्णोः संपन्नारायणस्मृतिः'' भगवंताचे विस्मरण होणे विपत्ती तर त्याचे स्मरण असणे ही संपत्ती. सर्वसामान्य माणसे मात्र सोन्याचांदीच्या तुकड्यांना आणि कागदी नोटांनाच संपत्ती समजतात. ईश्वराजवळ जाऊन त्याला हीच क्षुद्र संपत्ती मागतात. भौतिक संपत्ती ही ईश्वराची एक मायाच आहे. लोक मायेतच गुंतून पडतात. ईश्वराजवळ जाऊन ते त्याची माया मागतात, त्याला मागत नाहीत. मायेच्या ठिकाणी मोहित करण्याची शक्ती असल्यामुळे जीवात्मा मोहित होतो आणि ईश्वराला विसरून मायेच्याच पाठीमागे लागतो. म्हणून जगद्गुरू रेणुकाचार्य आपल्याला विवेक सांगून सावध करीत आहेत. आपल्याजवळ अशी दिव्यसंपत्ती आहे याचे ज्ञान जोपर्यंत माणसाला होत नाही तोपर्यंत त्याला तिचे महत्त्व कळत नाही.

एका मंदिरासमोर एक भिकारी भीक मागत असे. तो कुष्ठरोगी होता. दहा-पंधरा वर्षे एकाच ठिकाणी बसून त्याने भीक मागितली. एकेदिवशी तो मेला. तेव्हा आसपासच्या लोकांनी त्याची अंत्यक्रिया केली. अनेक वर्षे तो एकाच जागी बसला असल्यामुळे काहीजणांना असे वाटले की या मातीत देखील कुष्ठरोगाचे जंतू मिसळले असतील. म्हणून त्यांनी तिथली माती फेकून देण्यासाठी उकरली. तेव्हा तिथे सोन्याच्या मोहरांनी भरलेला एक हंडा मिळाला. त्या भिकाऱ्याची सगळ्यांना दया आली. आयुष्यभर त्याने तिथे बसून भीक मागितली त्याच ठिकाणी जमिनीत सोन्याचा हंडा पुरलेला आहे हे त्या बिचाऱ्याला कळले नाही. तो भीक मागतच मेला.

त्या भिकाऱ्यासारखीच प्रत्येक जीवात्म्याची अवस्था आहे. आपल्या अंतरंगातच सुखनिधान असा आत्मा राहतो. तरी देखील दुसऱ्याकडून सुखाची अपेक्षा करतो. दुसऱ्याजवळ सुखाची भीक मागतो. जेव्हा अंतरंगातील सुखरूप आत्म्याचे आपल्याला ज्ञान होते तेव्हा मात्र बाह्य जगात चाललेला सुखाचा शोध थांबवून आपण आतल्या आत पूर्ण संतुष्ट होऊन राहू. याच गोष्टीची या ठिकाणी आठवण करून दिली आहे-

**शिवानन्दं समासाद्य को वान्यमुपतिष्ठते।**
**गंगामृतं परित्यज्य कः कांगक्षेन्मृगतृष्णिकाम्॥१३.७॥**

वाळवंटात सूर्यकिरणांमुळे पाण्याचा आभास होतो. त्याला मृगजळ म्हणतात. हे आपल्या साऱ्यांना माहीत आहे. तहानलेली हरिणे त्या पाण्याच्या मागे धावतात. म्हणून त्याला मृगजळ असे नाव पडले आहे. जवळ अमृततुल्य गंगा असून जर कोणी मनुष्य मृगजळाच्या मागे धावत असेल तर तो वेडाच म्हटला पाहिजे. त्याचे ते कृत्य केवळ निंदास्पद आहे. त्याप्रमाणे आपल्या अंतरंगात आत्म्याच्या ठिकाणी सुखाचा महासागर असून तो जाणून न घेता जर कोणी बाह्य लौकिक सुखाच्या मागे वेड्याप्रमाणे धावत असेल तर त्याचे ते कृत्यदेखील निंदनीयच होय.

**संसारतिमिरच्छेदे विना शंकरभास्करम्।**
**प्रभवन्ति कथं देवाः खद्योता इव देहिनाम्॥१३.८॥**

संसारातील अज्ञानरूपी अंध:कार दूर करण्यासाठी शिवज्ञानाची आवश्यकता आहे. काजवा तुम्हाला माहीत आहे. त्याच्या देहातच रेडियमसारखा प्रकाश असतो आणि रात्रीच्या अंधारात तो चमकतो. परंतु काजव्याच्या प्रकाशात आपण त्यालाही पाहू शकतो आणि सर्व जगालाही पाहू शकतो. त्याप्रमाणे शंकररूपी सूर्यापुढे संसाररूपी अंधार नाहीसा होतो. शंकर हा सूर्याप्रमाणे तर इतर देवता ह्या काजव्याप्रमाणे आहेत. म्हणून सर्व देवता शंकराचीच उपासना करतात. भगवान शंकराची आराधना करूनच ब्रह्मा, विष्णू इत्यादी देवांनी उच्च स्थान प्राप्त केले आणि स्वत:वर आलेल्या संकटांपासून आपली सुटका करून घेतली. अशा प्रकारच्या कथा शास्त्र-पुराणातून आपण ऐकतो. सर्व देवांवर अनुग्रह करणाऱ्या भगवान शिवाला ज्याने पती मानले आहे अशा मनुष्यासाठी इतर देवतांची उपासना निषिद्ध आहे. म्हणून एक शिव सोडून अन्य देवांपासून जो विमुख असतो तोच शरण होय.

**संसारार्तः शिवं याया द् ब्रह्माद्यैः किं फलं सुरैः।**
**चकोरस्तृषितः पश्येच्चन्द्रं किं तारका अपि।।१३.९।।**

शंकराला शरण गेल्यानेच संसारातील दु:खे नाहीशी होतात. चंद्रकिरणातले अमृत सेवन करणारा चकोर ज्याप्रमाणे आर्त होऊन केवळ चंद्राकडेच पाहतो, अन्य तारकांकडे पाहत नाही. त्याप्रमाणे शंकराला पती मानून त्याच्याच आश्रयाला जो जातो तो शरण होय. तो अन्य देवतांकडे जात नाही. कारण त्याचे आर्त दूर करण्याचे सामर्थ्य केवळ शंकराच्या ठायीच आहे. आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू आणि ज्ञानी असे भक्तांचे चार प्रकार भगवंतांनी गीतेमध्ये सांगितले आहेत. जेव्हा मनुष्य आर्त होतो, दु:खी होतो तेव्हाच तो ईश्वराकडे ओढला जातो. जेव्हा मनुष्य सुखी असतो तेव्हा त्याला ईश्वराची आठवण येत नाही. म्हणून एका हिंदी कवीने म्हटले आहे, 'दु:खात सारेच ईश्वराचे स्मरण करतात. पण सुखात मात्र कोणीच करत नाहीत. जर सुखातही त्याने ईश्वरस्मरण केले तर त्याला दु:ख कसे बरे होईल?'

जेव्हा जीवात्म्याला अनेक प्रकारची दु:खे वेढा घालतात तेव्हाच तो ईश्वराकडे धावत सुटतो. म्हणून 'आर्त' हा पहिला भक्त आहे. भक्तीची सुरुवातच त्याच्यापासून होते. शक्तिपात म्हणजे ईश्वरी अनुग्रह. तो झाल्यानंतर जी लक्षणे साधकाच्या अंगावर दिसतात तीच लक्षणे आर्तभक्ताच्या अंगावरही दिसतात. भयभीत होणे, सर्वांगावर रोमांच उठणे, डोळ्यांमध्ये अश्रू येणे अशी त्याची अवस्था होते. ईश्वराजवळ जाऊन आपली दु:खे सांगणे हा देखील एक प्रकारचा 'योग'च होय. गीतेत यालाच 'विषादयोग' असे म्हटले आहे. एखाद्या माणसाजवळ बसून त्याला दु:ख सांगून रडत बसणे हा मात्र योग नव्हे. दु:खे दूर व्हावीत म्हणून जो ईश्वराकडे जातो तो आर्त भक्त होय. संपत्ती मिळावी म्हणून जो ईश्वराकडे जातो तो अर्थार्थी आहे. ज्ञान मिळावे या इच्छेने जो ईश्वराकडे जातो तो जिज्ञासू आणि आपल्या आत्मरूपात जो ईश्वराला पाहतो तो ज्ञानी भक्त होय. आर्त, अर्थार्थी आणि जिज्ञासू हे तिघेही ईश्वराला स्वत:पासून वेगळे पाहून भेदभावाने त्याची उपासना करतात. तर ज्ञानी भक्त मात्र आत्मरूपातच ईश्वराला पाहून त्याची अभेदभावाने उपासना करतो. शरणस्थलातील साधकाने प्राणलिंगिस्थलातच अभेद चिंतन केलेले असते. म्हणून त्यापुढील शरणस्थलात त्याला भेदचिंतन करण्याचे कारणच नसते. तो सर्वभावाने भगवान शिवाला शरण गेलेला असतो म्हणून त्याला शरण असे म्हटले जाते.

**शिव एव समस्तानां शरण्य: शरणार्थिनाम्।**
**संसाररोगदष्टानां सर्वज्ञ: सर्वदोषहा।।१३.१०।।**

सर्व शरणार्थींना भगवान शिव शरण देतात. एखाद्या देशात शेजारच्या देशातून जेव्हा अधिक संख्येने शरणार्थी येतात तेव्हा त्यांना शरण कसे द्यायचे याची चिंता त्या देशाला पडते. परंतु भगवान शिवाला मात्र कोणतीही सीमा, मर्यादा नसते. तो असीम आहे. असंख्य लोक जरी त्याला शरण गेले तरी त्यांचे ओझे त्याला होत नाही. तो सर्व शरणागतांचा रक्षक आहे. शिवज्ञानाने मिळणाऱ्या आनंदाचा अनुभव घेतल्यावर आनंदमग्न शिवयोगी दुसऱ्या कोणत्याही आनंदात रमत नाही. म्हणून सर्व प्रकारच्या प्रयत्नांनी मन, वाणी आणि शरीर या त्रिकरणांनी शिवाला अभेदभावाने शरण गेलेला साधक अत्यंत सुखाचा अनुभव घेतो. तो अन्य देवांना शरण न जाता फक्त शिवाला शरण जातो. म्हणून त्याला 'शरण' म्हणतात. अशा शरणाप्रमाणेच प्रत्येक मनुष्याने आपले आयुष्य शिवानंदाने परिपूर्ण भरून घेतले पाहिजे एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
१८ एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन दुसरे**

## तामसनिरसनस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल आपण शरणस्थल या पहिल्या अवांतरस्थलावरील निरूपण ऐकले. दुसरे अवांतरस्थल आहे तामसनिरसनस्थल.

**शिवासक्तपरानन्दमोदिना गुरुणा यत:।**
**निरस्यन्ते तमोभावा: स तामसनिरासक:।।**
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १३.१३)

शिवभक्तीमध्ये सदैव निमग्न असल्यामुळे तो आनंदी असतो असा श्रेष्ठ शरण आपल्या मनातून निद्रा, आळस, कलह, मोह इत्यादी तमोगुणांच्या विकारांचे निवारण करतो. म्हणून त्याला तामसनिरासक शरण असे म्हणतात. येथे आपल्याला आश्चर्य वाटेल की जो साधक शरणस्थलापर्यंत पोहोचलेला आहे त्याला देखील आपल्या मनातल्या तमोगुणाचे निवारण करावे लागते? परंतु जो शरीर धारण करतो त्याच्या ठिकाणी प्रकृतिजन्य गुण अवश्यमेव असतात. हा प्रकृतीचा नियम आहे. सत्त्व, रज आणि तम हे प्रकृतीचे तीन गुण आहेत. या तीन गुणांच्या साम्यावस्थेलाच 'प्रकृती' असे नाव आहे. प्रकृती हा मोठा सुंदर शब्द आहे. प्रकृतीच्या विरुद्धार्थी शब्द आहे विकृती. प्रकृती चांगली पण विकृती वाईट. आपल्या देहात असलेले सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण आणि वात, पित्त, कफ हे त्रिदोष जेव्हा सम प्रमाणात असतात तेव्हा आपली 'प्रकृती' उत्तम असते. परंतु जेव्हा त्यांच्यात असंतुलन निर्माण होते तेव्हा आपले शरीर 'विकृत' होऊ लागते. वात, पित्त, आणि कफ यांपैकी जर

एखादा दोष वाढला तर आपली प्रकृती बिघडते. आयुर्वेदशास्त्रात सांगितले आहे की, तीस चाळीस वर्षे वय होईपर्यंत मनुष्यदेहात पित्तप्रकोप असतो. चाळीस ते साठ वयात वात वाढतो आणि त्यानंतर कफ वाढतो. हे त्रिदोष सम प्रमाणात असतात तेव्हा शरीर प्रकृत, स्वस्थ असते. परंतु ते जेव्हा असंतुलित होतात तेव्हा शरीर विकृत, अस्वस्थ होऊ लागते.

सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांची साम्यावस्था म्हणजे प्रकृती होय. त्यावेळी सृष्टी निर्माण झालेली नसते. जेव्हा तिन्ही गुणांचे प्रमाण कमी-अधिक होऊ लागते तेव्हा सृष्टिनिर्माणाला आरंभ होतो. मनुष्यदेहातील तीन गुणसुद्धा कधीच सम प्रमाणात राहत नाही. कोठलातरी एखादा गुण अधिक प्रमाणात असतो आणि अन्य दोन गुण कमी प्रमाणात असतात. सात्त्विक मनुष्याच्या ठिकाणी सत्त्वगुण अधिक प्रमाणात असतो. राजस मनुष्याच्या ठिकाणी रजोगुण अधिक प्रमाणात असतो तर सत्त्व आणि तम या गुणांचे प्रमाण कमी असते. जो तामस असतो त्याच्या ठिकाणी तमोगुणांचे आधिक्य असते आणि सत्त्व आणि रज या गुणांचे प्रमाण अल्प असते. ज्या गुणाचे प्रमाण अधिक असते त्या गुणाचा प्रभाव सर्व शरीरावर असतो.

शरणस्थलातील साधकाच्या मनात सत्त्वगुणाचा प्रकर्ष असतो. त्याच्या ठिकाणी सांसारिक वासना उरलेल्या नसतात. तो सर्वभावाने शिवाला शरण गेलेला असतो. म्हणून आपण त्याला 'सात्त्विक' म्हणतो. परंतु त्याच्याही ठिकाणी थोड्या प्रमाणात तम आणि रज या गुणांचे वास्तव्य असते. थोड्या प्रमाणात का होईना जोपर्यंत हे गुण शरीरात आहेत तोपर्यंत केव्हाना केव्हा तरी त्यांचा परिणाम होतच राहणार. विंचू आणि साप या दोघांच्या ठिकाणी विष असते. सर्पाचे विष तुमचा प्राण घेईल, परंतु विंचवाचे विष तुमचा प्राण जरी घेणार नाही तरी तुम्हाला एका जागी स्वस्थ बसूही देणार नाही. उड्या मारायला लावील, नाचायला लावील. सापाच्या विषाइतके विंचवाचे विष भयावह नसते. तरी देखील त्याचा काहीना काही परिणाम आपल्या शरीरावर होतोच. त्याप्रमाणे शरणाच्या मनात थोड्या प्रमाणात असलेले तम आणि रज हे गुण आपला प्रभाव दाखवतात. शरण सात्त्विक असतोच. परंतु त्याच्याही मनात कधीतरी राजस अथवा तामस भावना उत्पन्न होऊ शकतात. शरणांची वचने वाचल्यानंतर याचा अनुभव आपल्याला येईल. शिवशरणांनी आपल्या वचनसाहित्यातून आपले दोष प्रांजळपणे लोकांच्या समोर ठेवले आहेत. तमोगुण नष्ट करणे याचा अर्थ तरी कोणता? तर ईश्वरासमोर, गुरूसमोर किंवा कोणत्याही व्यक्तीसमोर आपले दोष सांगणे हाच त्यांना बाहेर काढण्याचा एक मार्ग आहे. जोपर्यंत आपण आपले दोष प्रकट करीत नाही तोपर्यंत ते आपल्या आतच दडून बसतात. आपले दोष व्यक्त करण्याचे सामर्थ्य फारच थोड्या लोकांकडे असते. शरणस्थलातील साधक लोकभयापासून मुक्त असतो. लोकांनी केलेली स्तुती अथवा निंदा याच्याशी त्याचे काही देणे-देणे लागत नाही. तो मनमोकळेपणाने आपल्या मनातल्या भावना ईश्वराच्या माध्यमातून लोकांसमोर व्यक्त करतो.

शिवशरणांच्याही मनात कधीतरी सांसारिक भावना उत्पन्न होतात. हे त्यांच्या वचनसाहित्यावरून लक्षात येते. शरणस्थलातील साधकाची मनोवृत्ती रजोगुणाने अथवा तमोगुणाने कधीकधी विकृत होते. परंतु जेव्हा त्याच्या हे ध्यानात येते की आपले मन आपल्या ताब्यात नाही, आपण समजतो तेवढे ते शुद्ध नाही, त्यावर लहान-लहान काळे डाग आहेत त्यावेळी तो ईश्वराजवळ जाऊन आपले दोष सांगतो. जेव्हा दोष अशाप्रकारे प्रकट होतात तेव्हा माणूस त्या दोषांपासून मुक्त होतो. म्हणून कधी-कधी योगशिबिरातून साधकांना आपले दोष कागदावर लिहायला सांगतात. परंतु फारच कमी लोक ते लिहून देऊ शकतात. याप्रकारे मनात निर्माण झालेल्या भावना प्रकटपणे सांगून

त्यापासून जो मुक्त होतो त्यालाच 'शरण' असे म्हटले आहे. तमोगुणापासून आणि त्याच्या परिणामापासून मुक्त होण्याचा ज्याचा प्रयत्न चाललेला असतो त्याला तामसनिरासक शरण असे म्हणतात. तमोगुणापासून कोणते दुष्परिणाम होतात? त्याचे निरसन का करायचे? त्याबद्दल येथे सांगतात–

**यस्य ज्ञानं तमोमिश्रं न तस्य गतिरिष्यते।**
**सत्त्वं हि ज्ञानयोगस्य नैर्मल्यं विदुरुत्तमा:।।१३.१४।।**

ज्ञानी मनुष्य जर सात्त्विक असेल तर त्याचे ज्ञान अत्यंत पारदर्शी, स्पष्ट असते. तमोगुणी ज्ञानी मनुष्याची प्रगती होत नाही. त्याला ज्ञान प्राप्त होते, पण ज्ञानाचे फळ मात्र मिळत नाही.

एकदा चार माणसे भरपूर भांग चढवून एका नावेत बसली. चौघेही तर्र होते. रात्रभर प्रवास करून आपल्या गावी पोहोचण्याचा त्यांचा इरादा होता. चौघांनी हातात वल्ही घेतली आणि ती मारायला सुरुवात केली. रात्रभर असाच खेळ चालला. सकाळी जेव्हा ते भानावर आले तेव्हा त्यांना आढळले की, रात्री आपण ज्या ठिकाणी होतो त्याच ठिकाणी अजूनही आहोत. रात्रभर एवढे परिश्रम केले तरी त्याचा काहीच उपयोग झाला नाही. मग त्याच्या लक्षात आले की आपण नावेची दोरी सोडायला विसरलो. त्यामुळे आपली प्रगती झाली नाही.

त्याप्रमाणे ज्याचे ज्ञान तमोगुणाने आवृत्त असेल त्याला ज्ञानाचे फळ मिळत नाही, त्याची प्रगती होत नाही. तो पुढे जातो आहे असे भासते, परंतु पुढे जात नाही. तो जिथे पूर्वी होता त्याच ठिकाणी नंतरही असतो. जो सात्त्विक असतो त्याचे ज्ञान निर्मल असते. त्याला आपल्या दोषांची जाणीव होते आणि ते दोष दूर करण्याचा प्रामाणिक प्रयत्न तो करतो. तमोगुणी मनुष्य मात्र आपल्या ठिकाणचे दोष समजून घेऊ शकत नाही आणि ते दूर देखील करू शकत नाही. प्रगती होण्यासाठी सात्त्विक गुणाची आवश्यकता असते आणि सात्त्विक होण्यासाठी तमोगुणाचे जे काही संस्कार आपल्या मनात दडलेले असतात ते सारे पुसून टाकावे लागतात. त्यासाठी प्रत्येक माणसाला काही विशेष प्रयत्न करावे लागतात. भगवद्गीतेत या गुणांचे आणि त्यांच्या परिणामांचे सुंदर वर्णन केलेले आढळते. या गुणांच्या वृद्धीचे मुख्य कारण आपला आहार होय. सात्त्विक, राजस आणि तामस असे आहाराचे तीन प्रकार आहेत. शिळे आणि निकृष्ट अन्न खाल्ले तर आपल्या देहात तमोगुणाची वाढ होते. म्हणून अत्यंत सात्त्विक आहार शरणाने सेवन केला पाहिजे. तमोगुणाला ओळखण्यासाठी त्याची लक्षणे समजून घ्यायला हवीत.

तमोगुण जीवात्म्याला बांधून टाकतो. तमोगुण अज्ञानातून उत्पन्न होतो आणि अज्ञान वाढवतो. तो जसजसा वाढतो तसतसे अज्ञान देखील वाढत जाते. सर्व जीवात्म्यांना संमोहित करणारा असा हा तमोगुण आहे. आपल्या मोहजालात तो गुंतवून टाकतो. प्रमाद, आळस आणि निद्रा अशा तीन पाशांनी तो मनुष्याला बांधून टाकतो. प्रमाद याचा अर्थ कोणता? तर स्वत: केलेल्या नियमांचे स्वतःच उल्लंघन करणे हा प्रमाद होय. नियमांचे उल्लंघन माणसाला उच्छृंखल बनवते. नियम पाळणे हा जसा एक अभ्यास आहे तसाच नियम मोडणे हा देखील एक प्रकारचा अभ्यासच आहे. रोज पहाटे चार वाजता उठायचेच असा तुम्ही नियम केला तर त्याआधी घड्याळाचा गजर लावून ठेवावा लागेल. हळूहळू तुम्हाला एक सवय होत जाईल. कालांतराने गजर न लावता देखील तुम्हाला बरोबर पहाटे जाग येईल. असे शिस्तबद्ध, नियमित जीवन जगत असताना जर एखाद्या दिवशी पहाटे उठण्याचा तुम्ही कंटाळा केला तर हळूहळू कंटाळा करण्याचाच सराव तुम्हाला होईल आणि नियमित आयुष्य अनियमित होईल. हाच प्रमाद होय. मनुष्याने दृढ निश्चय केला तर तो प्रमादापासून दूर राहू शकतो. परंतु प्रत्येकाच्या आत तमोगुण वास्तव्य करून राहतो. तो केव्हा ना केव्हातरी प्रमादाच्या रूपाने प्रकट होतो. त्याला दूर करायलाच हवे.

ज्या क्षणी प्रमाद आपल्यासमोर उभा राहील त्याचक्षणी नियमाच्या अधीन आपण राहिलो तर प्रमाद आपल्यावर अधिकार गाजवणार नाही.

स्वाध्याय करणाऱ्या मनुष्याला वेदांनी सांगितले की, स्वाध्याय करताना प्रमाद करू नका, रोज एकशेआठ वेळा मंत्रजप करण्याचा जो नियम असतो तोच एखाद्या दिवशी कंटाळा करून म्हणतो की, आज जप न करता उद्या एकशेआठ ऐवजी दोनशेसोळा वेळा जप करू. प्रमाद त्याला उपाय सुचवतो. प्रमाद मोठा हुशार असतो. कारण त्याला तुमच्या मनावर राज्य करायचे असते. अनादिकाळापासून तो आपल्या आत दडून बसला आहे. तो एवढ्या लवकर आपल्याला मुक्त कसे बरे होऊ देईल? म्हणून तो आपल्यावर एक जाळे फेकतो. 'आज निवांत झोप काढ, उद्या दुप्पट अभ्यास कर'. परंतु आपल्याला हे कळले पाहिजे की, दुप्पट तिप्पट अभ्यास करायला वेळ कसा मिळणार? वेळ कोणाचाच नसतो. आजचा अभ्यास उद्या करायचा असे ठरवले तर त्यासाठी लागणारा वेळ हा दुसऱ्या कामातून काढावा लागेल. मग त्याठिकाणी प्रमाद घडेल. याप्रमाणे एक प्रमाद लपविण्यासाठी दुसरा प्रमाद करावा लागतो. एक खोटे लपविण्यासाठी माणसाला हजारवेळा खोटे बोलावे लागते. तरीदेखील खोटे उघडकीस येते. खोट्याला खऱ्याची प्रतिष्ठा कधीही मिळत नसते.

प्रमाद हा भयानक दुर्गुण आहे. एखादा मनुष्य त्याच्या आधीन झाला की त्याच्या हातून पुन्हा पुन्हा प्रमाद घडू लागतात. म्हणूनच वेदांनी स्वाध्याय करताना प्रमाद करू नका अशी आज्ञा केली आहे. 'कल करे सो आज कर' असे हिंदीत म्हटले जाते. परंतु 'आज करे सो कल कर' असे म्हटले तर तो 'कल' कधी उजाडणारच नाही. म्हणून 'स्वकर्तव्यं अद्य कुर्वीत्' आपले कर्तव्य आधी करा, असे शास्त्रात सांगितले आहे. असे आपण वागलो तरच प्रमादापासून मुक्त होऊ शकतो. नित्यकर्म केल्याने काही विशेष फळ मिळत नाही, परंतु न केल्याने मात्र पाप होते. म्हणून नित्यकर्म हे केलेच पाहिजे. स्वाध्याय, जप, पूजा इत्यादी नित्यकर्मे होत. ही कर्मे योग्यवेळी न करणे म्हणजेच प्रमाद. ती आपण का करत नाही? आळसामुळे. आळसामुळे आपल्याकडून प्रमाद घडतो. म्हणून मनुष्याने आळशी असू नये. कशाला इतकी धावपळ करायची? कशाला रोज अभ्यास करायचा? फर्स्ट क्लास मिळाला काय अन् थर्ड क्लास मिळाला काय आपल्याला सारखेच, असाच विचार आळशी मनुष्य करीत असतो.

**अलसस्य कुतो विद्या अविद्यस्य कुतो धनम्।**
**अधनस्य कुतो मित्रं अमित्रस्य कुतः सुखम्।।**

आळशी माणसाला विद्या प्राप्त होत नाही. अविद्य माणसाला द्रव्यार्जन करता येत नाही. मित्राचा आदर सत्कार करण्याइतके द्रव्य नसेल तर त्याला मित्र मिळत नाहीत आणि ज्याला मित्र नसतात त्याला सुख मिळत नाही. लौकिक जीवनात सुखाने जगायचे असेल तर सखेसोबती लागतात. ज्याला एकही मित्र नाही त्याला सुख मिळणे शक्यच नाही. यासाठी आळसाचा त्याग केला पाहिजे. आळशीपणाच्या आपण अनेक कथा ऐकल्या असतील.

असाच एक आळशी मनुष्य एका झाडाखाली सुस्त होऊन पडला होता. ते झाड बोराचे होते. त्या मनुष्याच्या अवतीभोवती अंगावर बोरेच बोरे पडली होती. बोरे खाण्याची त्याला इच्छा होती. त्याला वाटले एवढी बोरे पडली तरी ते उचलण्याचे कष्ट आपण का करायचे? एखादे तरी बोर आपल्या तोंडात पडेलच. म्हणून तो तोंड उघडून तोंडात बोर पडण्याची वाट पाहू लागला. परंतु त्याच्या तोंडात काही बोर पडले नाही.

जवळच्या रस्त्यावरून एक घोडेस्वार जात होता. एक मनुष्य झाडाखाली पडलेला पाहून त्याला साहाय्य

करण्याच्या इच्छेने तो जवळ आला. तेव्हा आळशी मनुष्य घोडेस्वाराला म्हणाला, ''बरे झाले तुम्ही आलात. माझ्या छातीवर पडलेले बोर माझ्या तोंडात तरी टाकून द्या.''

घोडेस्वार म्हणाला, ''अरे बाबा, तुझ्या छातीवरच बोरे पडली आहेत. तू आपल्या हाताने उचलून ती तोंडात का घालीत नाहीस?''

''मला माझ्या हाताने खायचे असते तर तुला कशाला बोलावले असते?''तो आळशी मनुष्य म्हणाला.

''समज मी तुझ्या तोंडात बोर टाकले तर ते चावणार कोण? ते तर तुलाच चावावे लागेल. समज मी आतले बी काढून बोराचा गर तुझ्या तोंडात टाकला तर तो गिळणार कोण? ते तर तुलाच करावे लागेल. काहीतरी प्रयत्न केल्याशिवाय तुला बोराची गोडी चाखताच येणार नाही.'' असे म्हणून घोडेस्वार भरधाव आपल्या वाटेने निघून गेला.

म्हणून 'न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगा:' असे म्हटले आहे. सिंह अरण्याचा राजा असला तरी त्याला देखील आपले भक्ष्य मिळविण्यासाठी प्रयत्न करावे लागतात. तो जर तोंड उघडून बसला तरी त्याच्या तोंडामध्ये हरीण शिरत नाही. म्हणून जो प्रयत्नवादी असतो तोच आळसापासून दूर राहतो. जर तुमच्या अंगात आळस आला तर समजा की, तमोगुण तुमच्यावर अधिकार गाजवायला येत आहे. म्हणून तुम्ही सदैव सजग राहायला हवे. आळसाला आपल्या अंगात अजिबात थारा देऊ नये.

तिसरा पाश आहे निद्रा. निद्रेची प्रत्येकाला आवश्यकता आहे. जी स्वाभाविक झोप आहे ती येथे अभिप्रेत नाही. काम करून थकलेल्या माणसाला जी झोप लागते आणि जी आवश्यकच असते ती स्वाभाविक झोप होय. येथे निद्रा म्हणजे भयंकर झोपणे असा अर्थ आहे. काही काम नाही म्हणून जो अकारण झोपतो ती अस्वाभाविक निद्रा. ती तमोगुणाचा परिणाम होय. काही काम नाही अशी वेळ माणसावर खरे तर येतच नाही. काम करण्याची इच्छा असेल तर काहीतरी काम निघतेच. झोपाळू मनुष्य हा तमोगुणाचे उदाहरण आहे. काहीच काम न करता रात्रंदिवस झोप काढणारा मनुष्य हा रोगी होईल, योगी होणार नाही. ज्ञानी असो वा अज्ञानी, शरण असो वा भक्त सगळ्यांच्याच देहात थोड्याफार प्रमाणात तमोगुण असतोच असतो. तो ज्याअर्थी आहे त्याअर्थी आपला काहीतरी प्रभाव दाखवणारच.

म्हणून शरणस्थलातील साधकाने सदैव सावध राहायला हवे. आपल्या हातून प्रमाद तर घडत नाही ना? आपल्या देहात आळस तर भरला नाही ना? आपण झोपेत जास्त वेळ दवडत नाही ना? आपले जीवन नियमित आहे की नाही? याचा विचार तो सदोदित करीत असतो. यांचे निरीक्षण तो सदोदित करीत असतो. यंत्राचे निरीक्षण नेहमी केले तर ते यंत्र सुस्थितीत राहील. परंतु त्यावरचे नियंत्रण जर सुटले तर ते बिघडते. त्याप्रमाणे आळस आणि निद्रा ही शरीरयंत्राला बिघडवणारी कारणे आहेत.

शरणस्थलातील साधकाच्या ठिकाणी कमी प्रमाणात तमोगुणाचे वास्तव्य असतेच. जो अत्यंत सात्त्विक असतो त्याला त्याच्या ठिकाणी असलेला तमोगुण देखील अत्यंत त्रासदायक ठरतो. सत्यवचनी माणसाला जर आयुष्यात एखाद्या क्षणी थोडेसे खोटे बोलण्याचा प्रसंग आला तरी तेवढ्यामुळे तो अत्यंत बेचैन होतो. त्याला अन्नपाणी गोड लागत नाही. पांढऱ्या शुभ्र वस्त्रावर एखादा छोटासा तिळाएवढा ढागदेखील ठसठशीतपणे उमटून दिसतो त्याप्रमाणे शरणस्थलातील साधकाच्या मनातील अल्प तमोगुणदेखील त्याला त्रासदायक ठरतो. जो दिवसभर खोटेच बोलतो तो कधी अस्वस्थ होत नाही. कारण खोटे बोलणे हा त्याचा स्वभावच बनलेला असतो.

आपण काही अयोग्य करीत आहोत असा विचारदेखील त्याच्या चित्ताला स्पर्श करीत नाही. म्हणूनच येथे जगद्गुरू रेणुकाचार्य शरणस्थलातील साधकाला सावध करीत आहेत. आपण शरणस्थलात पोहोचलो, आपण फार दूरची मजल गाठली, आता आपली अधोगती होणारच नाही असे शरणाने समजता कामा नये. खूप वर जाऊन देखील अध:पतित होण्याची माणसावर वेळ येते. अशा अध:पतित माणसाला 'आरूढपतित' अशी संज्ञा आहे. संसार असा विचित्र आहे. म्हणून प्रत्येक क्षणी सावध असलेला आणि तमोगुणाचे निरसन करणारा शरणस्थलातील साधकच तामसनिरासक शरण म्हणविला जातो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

ज्ञानमंदिर जंगमवाडीमठ, वाराणसी, १९ एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन तिसरे**

## तामसनिरसनस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालपासून आपण शरणस्थलातील तामसनिरसनस्थल या दुसऱ्या अवांतर स्थलाविषयी ऐकत आहात. तमोगुण प्रत्येकाच्या ठिकाणी कसा असतो, तो मनुष्याच्या प्रगतीत कसे अडथळे उत्पन्न करतो याविषयी आपण काल विचार केला आहे. तमोगुणजन्य आळस, निद्रा आणि प्रमाद यांच्यापासून दूर राहून विश्रांतीसाठी आवश्यक तेवढी झोप घेऊन आपल्या साधनेत मग्न राहण्याविषयी येथे जगद्गुरू रेणुकाचार्यांनी सांगितले आहे. शरणस्थलातील साधक हा उच्च कोटीतील साधक असला तरी त्याच्याही ठिकाणी अल्पप्रमाणात तमोगुण असतो. त्याचा थोडा तरी परिणाम साधकावर होतोच. म्हणून तमोगुणाबद्दल सजग राहण्यासाठी जगद्गुरू रेणुकाचार्यांनी उपदेश केला आहे. तमोगुणाला दूर सारून काही सात्त्विक गुण साधकाने अंगी बाणवावे याविषयी येथे सांगितले आहे.

**शमो दमो विवेकश्च वैराग्यं पूर्णभावना।**
**क्षान्तिः कारुण्यसम्पत्तिः श्रद्धा सत्यसमुद्भवा।।**
**शिवभक्तिः परो धर्मः शिवज्ञानस्य बान्धवाः।**
**एतैर्युक्तो महायोगी सात्त्विकः परिकीर्तितः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणि, १३.१५,१६)

येथे दहा सद्गुणांचे वर्णन केलेले असून हे गुण ज्याच्या ठिकाणी असतात त्यालाच सात्त्विक म्हटले आहे. या सात्त्विक गुणानांच गीतेने दैवी संपत्ती असे म्हटले आहे. दैवी आणि असुरी अशा दोन संपत्तीचे वर्णन गीतेत केलेले आहे. परंतु मानवी संपत्तीचे वर्णन तेथे आढळत नाही. त्याचे कारण असे की, एखाद्या माणसाजवळ दैवी संपत्ती असते आणि एखाद्या मनुष्याजवळ असुरी संपत्ती असते. एखादा मनुष्य देव बनतो तर एखादा असुर. उत्कृष्ट दैवी गुण संपादन करून मनुष्य देव होऊ शकतो आणि निकृष्ट गुण संपादन करून तो असुरदेखील होऊ शकतो.

मनुष्यापुढे हे दोन मार्ग आहेत. तो आपल्या इच्छेप्रमाणे कोणत्याही मार्गावर चालू शकतो. रेल्वे स्टेशनवरून अनेक शहरांकडे लोहमार्ग गेलेले असतात. स्टेशनवर येणारा प्रवासी ज्या गावी जायचे त्याच गावचे तिकीट काढून त्या दिशेने जायला गाडीत चढतो. 'अमक्याच गावाला जा' असा आग्रह त्याला कोणी करू शकत नाही. त्याप्रमाणे मनुष्यजन्म हा एखाद्या रेल्वे जंक्शनसारखा आहे. येथे जन्म घेतल्यावर आपल्या मनाशी विचार करूनच त्याला मार्ग निवडावा लागतो. तमोगुणाला दूर सारून उत्तम गुणांचे संपादन केले तर मनुष्य सात्त्विक होतो आणि सात्त्विक मनातच ज्ञान स्थिर राहते, प्रकाशमान होते. 'सत्त्वात् संजायते ज्ञानम्' असे गीतेत सांगितले आहे.

ज्याला आपण संपत्ती म्हणतो त्या भौतिक संपत्तीवर दुसरा कोणी आपला अधिकार सांगू शकतो किंवा ती संपत्ती दुसरा कोणी हिरावून घेऊ शकतो. परंतु दैवी संपत्ती मात्र कोणी हिरावून घेऊ शकत नाही किंवा तिच्यावर आपला अधिकारही सांगू शकत नाही. म्हणून दैवी संपत्ती ही उत्कृष्ट संपत्ती आहे. त्याच दैवी गुणांचे वर्णन येथे केलेले आहे. पहिला गुण आहे शम. शम म्हणजे अंतरिंद्रियांचा निग्रह. दम म्हणजे बाह्येंद्रियांचा निग्रह. अंतरिंद्रिय याचा अर्थ सर्व इंद्रियांचा स्वामी असलेले मन. मनाची इच्छा असेल तरच इंद्रिये कार्यप्रवृत्त होतात. पाहण्याची इच्छा मनात जेव्हा असते तेव्हाच पापण्या उघडून डोळे पाहू लागतात. ऐकण्याची जेव्हा इच्छा मनाला होते तेव्हाच कान ऐकू लागतात. याप्रकारे पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये ही दहा इंद्रिये मनाच्या अधीन असतात. त्यांच्यावर मनाचे नियंत्रर असते. या दहा इंद्रियांकडूनच सुखदुःखांचा अनुभव मन घेत असते. मन आणि विषय यांच्यामध्ये इंद्रिये एखाद्या पुलासारखी असतात, ती मन आणि विषय यांना सांधतात. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय इंद्रियांच्या पुलावरूनच मनापर्यंत पोहोचतात. मन आत आहे आणि विषय बाहेर आहेत. आत राहणारे मन इंद्रियांचा मालक आहे. आत असल्यामुळेच मनाला अंतरिंद्रिय असे म्हणतात.

या अंतरिंद्रियांचा म्हणजे मनाचा प्रथम निग्रह केला पाहिजे. त्याला रोखले पाहिजे. मनात उठलेला संकल्प जर आपण कृतीत आणू लागलो तर मनाचा निग्रह होणार नाही. मनावर बुद्धीचे नियंत्रण असते. बुद्धी ही मनाचा मालक आहे. ती मनाला आपल्या ताब्यात ठेवू शकते. परंतु मन इतके धूर्त असते की ते जसे आपल्या नोकराला म्हणजे इंद्रियांना ताब्यात ठेवते तसेच आपल्या मालकाला म्हणजे बुद्धीलाही आपल्या काबूत ठेवते. एखाद्या निषिद्ध विषयाचा भोग घेण्यासाठी मन प्रवृत्त होते तेव्हा बुद्धी प्रथम त्याला विरोध करते. हे बरोबर नाही, असे मनाला सांगते. परंतु मन तिला गप्प बसवते आणि विषयाचा भोग घेते. असे वारंवार घडले की मनाला हवे तसे वागण्याची बुद्धी मुभा देते. आणि मग मन रानोमाळ धावत सुटते. बुद्धी म्हणते की, तुला हवे तसे वाग, त्या वागण्याचे भोग शेवटी तुलाच भोगायचे आहेत. एखादा चतुर कर्मचारी वरच्या साहेबाला व्यवस्थित एखादी गोष्ट पटवून देतो आणि त्याला निमूटपणे सही करायला लावतो त्याप्रमाणे मनदेखील बुद्धीला आपल्याला हवे तसे वागण्याची मुभा द्यायला भाग पाडते.

मनावर नियंत्रण ठेवण्यासाठीच ईश्वराने माणसाला बुद्धी दिली आहे. बुद्धिमान मनुष्य आपल्या मनावर नियंत्रण ठेवतो आणि बुद्धिहीन मनुष्य मन सांगेल तसे वागत राहतो. एखाद्याला पहिली पत्नी असताना दुसरे लग्न करण्याची इच्छा झाली तर बुद्धी त्याला विरोध करते. तेव्हा मन तिला समजावते की, राजा दशरथाला देखील तीन बायका होत्या, मग मला करायला काय हरकत आहे? तू रामायण नीट वाचलेले दिसत नाही. मग का मला परमिशन देत नाहीस? पण त्याचवेळी दशरथाचा राम नावाचा एकपत्निव्रती मुलगा होता हे ते बुद्धीला सांगत नाही. कारण ते मनाच्या सोयीचे नसते. बुद्धीची अनुमती घेतल्याशिवाय मनाला काहीच करता येत नाही. कोणत्या ना कोणत्या

प्रकारे मनाला बुद्धीची अनुमती घ्यावीच लागते. परंतु मन तिला आपल्याला अनुमती द्यायला भाग पाडते. मग बुद्धी सत्त्वहीन होऊन त्याला अनुमती देते. अशा प्रकारे बिघडलेले मन बुद्धीला देखील बिघडवून टाकते. मग मनाचा निग्रह कसा करायचा? तर बुद्धीच्या साहाय्याने तो करता येतो. निषिद्ध विषयांचा भोग घेण्यासाठी मन आपल्यावर दबाव आणून आपली अनुमती घेते असे जर बुद्धीच्या ध्यानात आले तर ती मनाला वाटेल तसे वागू देणार नाही. जेव्हा मन बुद्धीच्या नियंत्रणाखाली असेल तेव्हाच अंतरिंद्रियाचाच निग्रह होऊ शकतो. बुद्धीवर सुसंस्कार करून तिला सामर्थ्य प्रदान करू तेव्हाच ती अंतरिंद्रियाचा म्हणजे मनाचा निग्रह करू शकेल. असा निग्रह करणे यालाच 'शम' असे नाव आहे.

दम म्हणजे बाह्येंद्रियांचा निग्रह. पंचज्ञानेंद्रिये आणि पंचकर्मेंद्रिये यांचा निग्रह करणे म्हणजे दम होय. शम आणि दम हे परस्परसापेक्ष आहेत. अंतरिंद्रियाचा निग्रह केला तर बाह्येंद्रियांचा निग्रह होऊ शकतो आणि बाह्येंद्रियांचा निग्रह केला तर अंतरिंद्रियाचा निग्रह होऊ शकतो. मनाचा बाह्य विषयाशी संपर्क आल्यामुळेच त्यांचा पुन्हा पुन्हा भोग घेण्याची इच्छा मनाला होते. बाह्येंद्रियांचा निग्रह करून जर विषयांचा आणि मनाचा संबंध तोडता आला तर विषय भोगायची इच्छा मनाला होणार नाही. म्हणूनच निषिद्ध वस्तू पाहू नये, निषिद्ध गाणे ऐकू नये, निषिद्ध रस पिऊ नये असे शास्त्रात सांगितले आहे. शब्दस्पर्शादी विषयांचा संपूर्ण त्याग करता येत नाही. परंतु त्यामधील जो भाग शास्त्रांनी निषिद्ध मानला आहे त्याकडे जर आपली बाह्येंद्रिये वळू दिली नाहीत तर तो विषय मनापर्यंत पोहोचणारच नाही. जप अथवा ध्यान करताना आपण आसन घालून बसतो आणि आपल्या इंद्रियांना जणू बांधून ठेवतो. डोळे बंद करून ठेवतो, कानावर दुसरा शब्द पडू नये यासाठी घंटानाद करतो. अशावेळी मनाची बाहेर धावण्याची प्रवृत्ती थांबते. जोपर्यंत मनाच्या समोर विषय येत नाही तोपर्यंत ते भोगण्याची इच्छा मनाला होत नाही.

वर्तमान विषयांपासून जरी मनाला दूर ठेवले तरी भूत अनुभूत (पूर्वी अनुभवलेल्या) विषयांचे चिंतन करण्यापासून त्याला आपण रोखून ठेवू शकत नाही. बाहेर जाण्याचे दार बंद असेल तेव्हा मन बाहेर जाणार नाही. परंतु आतल्या आत गप्प देखील बसणार नाही. ते मनोराज्य रचू लागते. जे आधी पाहिले होते, भोगले होते अशा विषयांचे ते पुन्हा पुन्हा चिंतन करून लागते. नवीन विषयांशी जेव्हा संबंध येत नाही तेव्हा त्यांचा मनावर संस्कार होत नाही. याप्रकारे बाह्येंद्रियांचा निग्रह करून आपण मनाची बाहेरची धाव रोखू शकतो आणि त्याच्या आत चाललेल्या मनोराज्यावर बुद्धीच्या द्वारा नियंत्रण ठेवू शकतो. याप्रमाणे बाह्येंद्रियांचा निग्रह आणि अंतरिंद्रियांचा निग्रह परस्परसापेक्ष आहे. जर आपण अंतरिंद्रियांचा निग्रह करू शकलो तर आपले डोळे उघडे असून देखील आपल्याला बाहेरचे काहीही दिसणार नाही. कारण मनाचा निग्रह झालेला असल्यामुळे ते बाहेरचे काही पाहू शकत नाही, काही ऐकू शकत नाही. ते आतल्या आतच लीन झालेले असते. शम आणि दम असे परस्परसापेक्ष गुण आहेत.

तिसरा गुण आहे विवेक. विवेक दोन प्रकारचा आहे. नित्य-अनित्य विवेक आणि आत्म-अनात्म विवेक. विवेकामुळेच मनुष्य शमी आणि दमी होऊ शकतो. अनित्य वस्तूतील मनाची प्रवृत्ती आणि अनात्म वस्तूच्या ठिकाणी असलेली आत्मबुद्धी रोखून मनाला नित्यवस्तूमध्ये आणि आत्मवस्तूमध्ये आसक्त केले तर त्याची चंचलता कमी होते. मनासमोर जेव्हा अनेक विषय असतात तेव्हा ते एका विषयाचा भोग घेईल. दुसऱ्या विषयाचा भोग घेईल. अशाप्रकारे अनेक विषयांचा भोग चंचलपणाने घेईल. परंतु जेव्हा त्याच्यापुढे फक्त एकच

विषय असेल, दुसरा विषयच नसेल तर त्याला एकाच विषयाचे चिंतन केल्यावाचून गत्यंतर नाही. एखाद्या लहान मुलासारखी मनाची अवस्था असते. लहान मुलासमोर अनेक खेळणी टाकली तर ते थोडा वेळ एका खेळण्याशी खेळते. मग ते टाकून दुसरे घेते. त्याच्याशी खेळते. मग ते टाकून देते. असे सारखे खेळत राहते. परंतु जर त्याच्यासमोर एकच खेळणे ठेवले तर ते त्याच खेळण्याशी खेळत राहते. त्याचप्रमाणे विवेकी मनुष्य अनित्य पदार्थाला व अनात्म पदार्थाला आपल्या विवेकाच्या बळावर सोडून देतो तेव्हा त्याच्या हातात केवळ आत्माच शिल्लक राहतो. केवळ नित्य वस्तूच राहते. ज्याची नित्य आणि आत्मवस्तूमध्ये निरंतर रती असते तोच विवेकी मनुष्य होय.

चौथा गुण आहे वैराग्य. विषयांविषयी असलेल्या अभिलाषेचे नियंत्रण करणे म्हणजे वैराग्य होय. विषयसुख ऐहिकही असते आणि पारलौकिक देखील असते. ऐहिक आणि पारलौकिक सुखाच्या मागे न लागता ज्याचे मन आत्मचिंतनात मग्न राहते त्यालाच 'विरक्त' म्हटले जाते. 'निःस्पृहस्य तृणं जगत्'. ज्याच्या मनात कोणतीही स्पृहा नसते, ज्याच्या मनात संपूर्ण विरक्ती बाणलेली असते त्याच्या दृष्टीने संपूर्ण विश्व एखाद्या गवताच्या काडीइतके क्षुद्र असते. म्हणजे त्याचे मन जगातल्या कोणत्याही वस्तूकडे आकृष्ट होत नाही. रस्त्याने चालताना रस्त्यावर पडलेला केरकचरा कोणी मनुष्य उचलून घेत नाही. कारण त्याच्या दृष्टीने त्या कचऱ्याला काही किंमत नसते. त्याचप्रमाणे विरक्ताच्या दृष्टीत ऐहिक अथवा पारलौकिक जगाला काहीच महत्त्व नसते. त्यामुळे तो तेथे आसक्त होत नाही, यालाच वैराग्य म्हणतात.

यापुढील गुण आहे पूर्णभावना म्हणजे अखंड ध्यान. जेव्हा आपण ध्यान करीत बसतो तेव्हा मधून मधून खंड पडतो. शिवलिंगावर जेव्हा अभिषेकपात्रातून संततधार पडत असते तेव्हा ती जलाची असल्यामुळे अखंड नसते. मध्ये मध्ये खंडित होते. परंतु तेलाची धार मात्र अखंड असते, ती मध्ये तुटत नाही. त्या अखंड तैलधारेप्रमाणे ध्यान अखंड असते. ध्यानाला सुरुवात केल्यापासून ध्यान समाप्त होईपर्यंत त्याच्या चित्ताला दुसरा कोणताही विचार स्पर्शत नाही. अखंड भावनेने ईश्वरध्यान करणे अर्थात् आपल्या भावनेत ईश्वराला परिपूर्ण भरून घेणे हीच पूर्णभावना होय.

क्षांती म्हणजे क्षमा. क्षमेची अनेक कारणे असतात. एखाद्या अपराधी व्यक्तीला शिक्षा करण्याऐवजी जेव्हा क्षमा केली जाते, त्यामागे अनेक कारणे असतात. कधी मोह ममतेमुळे क्षमा केली जाते. आपल्या मुलाने एखादा अपराध केल्यावर त्याच्यावरील मोह-ममतेमुळे आईवडील त्याला क्षमा करतात. परंतु ती क्षमा मोहामुळे केलेली असते, ती खरी क्षमा नव्हे. कधी भीतीमुळे क्षमा केली जाते. एखाद्या बलदंड माणसाने तुमची संपत्ती लुटली, तुम्हाला मारहाण केली तर तुम्ही गप्प बसता, त्याला काहीही करत नाही. तुम्ही त्याला क्षमा करता. ही क्षमा भीतीमुळे केली असल्यामुळे ती खरी क्षमा नव्हे. स्वार्थामुळे बऱ्याचदा क्षमा केली जाते. एखादा जवळचा माणूस अपराधी आहे हे जाणूनदेखील त्याला शिक्षा केली तर आपल्या स्वार्थात अडथळा येईल या विचाराने क्षमा केली जाते. ही क्षमा देखील खरी क्षमा नव्हे. मोह, भय, स्वार्थ यांच्यामुळे केली जाणारी क्षमा खऱ्या अर्थाने क्षमा नाही. अपराध्याला शिक्षा करण्याचे पूर्ण सामर्थ्य असूनही ज्यात मोह-ममता नाही, भय नाही, स्वार्थ नाही अशा वेळी केवळ हा मनुष्य सुधारावा या इच्छेने केली जाणारी क्षमा हीच खरी क्षमा होय. शरणस्थलातील साधकाच्या ठिकाणी या प्रकारची क्षमा असते. तो काहीही करू शकतो, कारण त्याचा भगवान शिवाशी साक्षात् संबंध असतो.

एक संत एका नावेतून प्रवास करीत होता. त्याच्या अवतीभोवती टवाळखोर माणसे होती. त्या दुर्जनांमध्ये हा एकटाच संत म्हणजे त्यांची चंगळच. मांजराच्या मध्ये सापडलेल्या उंदरासारखी बिचाऱ्याची अवस्था झाली. कोणी त्याला शिव्या देऊ लागला. कोणी त्याची टवाळी करू लागला. कोणी उपहास करू लागला. तरी देखील संत मात्र शांत होता. शेवटी ईश्वराला आपल्या भक्ताची स्थिती पाहवेना. त्याने संताला विचारले, ''हे सगळे तुझी निंदानालस्ती करताहेत, यांना शिक्षा करण्यासाठी ही नावच मी उलटून टाकू का?''

तेव्हा तो संत म्हणाला, ''भगवन्, उलटूनच टाकायचे असेल तर नाव उलटी करण्यापेक्षा या माणसांची बुद्धी उलटून टाक. त्यांना सुबुद्धी दे.''

क्षमा ही अशी असते. त्यात मोह–ममत्व नाही, भय नाही आणि स्वार्थही नाही. संत एकनाथांचे प्रसिद्ध उदाहरण आहे. ते गोदावरीत स्नान करून घरी निघाले असताना एक निंदक त्यांच्या अंगावर थुंकला. तेव्हा ते शांतपणे परत फिरले आणि पुन्हा स्नान करून आले. तो पुन्हा थुंकला. तेव्हा ते पुन्हा परत फिरले, स्नान करून आले असे शंभरपेक्षा अधिक वेळा घडले. शेवटी त्या निंदकाला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला आणि संत एकनाथांचे पाय धरून तो क्षमा मागू लागला. संत एकनाथांनी त्याला उठवून उभे केले आणि म्हणाले, ''बाबारे, माझी कसली क्षमा मागतोस? उलट मीच तुझे आभार मानतो. तू अंगावर थुंकलास म्हणून इतक्यावेळी मला गंगास्नान घडले. एरव्ही मला ते कसे घडले असते?

शांतिब्रह्म एकनाथांची ही कथा सर्वश्रुत आहे. वारंवार शिक्षा करणारा मनुष्य संत नसतो. संत स्वत: कष्ट सहन करतो, निंदा, अपमान झेलतो आणि अपराध करणाऱ्याला सुधारण्याची संधी देतो.

कारुण्यसंपत्ती म्हणजे भूतदया. प्राणिमात्रांबद्दल असलेली दया हीच कारुण्यसंपत्ती होय. दयाबुद्धी सामान्य माणसाला असते. संतामध्ये असते आणि ईश्वरामध्येही असते. दुसऱ्याचे दुःख पाहून जो कळवळतो आणि ते दूर करण्याचा प्रयत्न करतो तोच भूतदयावादी मनुष्य होय. दयाबुद्धीची अनेक उदाहरणे भारतात प्रसिद्ध आहेत. दयाबुद्धीनेच कर्णाने आपली कवचकुंडले काढून दिली, शिबिराजाने आपले मांस काढून दिले. जीमूतवाहनाने आपले प्राण दिले आणि दधीची महर्षींनी आपल्या अस्थी दिल्या. ही दयाभावनेची उत्तम उदाहरणे होत.

श्रद्धा म्हणजे विश्वास, विश्वासावरच संपूर्ण जगातला व्यवहार चाललेला आहे. परस्परांवरील विश्वास गमावला तर जगाचा व्यवहार सुरळीतपणे चालणार नाही. मी आधी पैसे दिले तर तिकीट मास्तर तिकीट देईल की नाही अशी जर प्रवाशाला शंका आली तर व्यवहारात व्यवधान उत्पन्न होईल. आपण सामान दिल्यावर जर ग्राहकाने पैसे दिलेच नाही तर? असा अविश्वास दुकानदाराच्या मनात निर्माण झाला तर व्यवहार कसा चालेल? आपले पैसे घेतल्यावर स्टेशनमास्तर तिकीट देतोच आणि आपण सामान दिल्यावर ग्राहक पैसे देतोच असा विश्वास असल्यामुळेच जगातील व्यवहार सुरळीत चाललेला आहे. डोळे बंद करून ज्याप्रमाणे तुम्ही जगातील व्यवहारावर विश्वास ठेवता त्याप्रमाणे सत्यपरमात्म्यावर तुमचा अढळ विश्वास बसेल तेव्हाच त्याला श्रद्धा म्हणता येते. विश्वास आणि श्रद्धा यांत थोडासा फरक आहे. नोकरांवर विश्वास ठेवला जातो तर गुरुजनांवर श्रद्धा ठेवली जाते. सर्व मनुष्यांवर आपण विश्वास ठेवतो आणि ईश्वराबद्दल श्रद्धा बाळगतो. ईश्वर जे काही करतो ते सारे आपल्या भल्यासाठीच असते, अशी भक्तांची दृढ श्रद्धा असते. त्याने आपल्याला दुःख दिले तरी त्यामुळे काही चांगलेच घडणार आहे असे भक्त समजतो. शरणांनी तर ईश्वराजवळ दुःखच मागितले आहे, सुख मागितले

नाही.

शिवावर असलेले अनन्य प्रेम म्हणजे शिवभक्ती होय. प्रेमाचीच परिपक्व अवस्था भक्ती आहे. माणसावर प्रेम केले जाते तर अलौकिक अशा ईश्वराची भक्ती केली जाते. आपल्या सिद्धान्तात लिंगाचार, सदाचार, शिवाचार, गणाचार, भृत्याचार असे पंचाचार सांगितले आहेत. त्यांचेच निष्ठेने पालन करणे यालाच येथे परमधर्म म्हटले आहे. आतापर्यंत जे दहागुण सांगितले आहेत ते शिवाज्ञानाचे बंधू होत. हे गुण साधकाजवळ असले म्हणजे त्याचे ज्ञानदेखील दृढ राहते, सुस्थिर राहते. ज्ञान सुस्थिर करायचे असेल तर हे गुण अंगी बाणवणे आवश्यक आहे. हे दहा गुण ज्या शिवयोग्याच्या ठिकाणी असतात, तोच सात्त्विक होय. जो भगवंताच्याजवळ जातो त्याला ही दैवी संपत्ती लाभते. एखाद्या माणसाजवळ तुम्ही गेला तर त्याच्याजवळ जे असते तेच तो तुम्हाला देतो. शरणस्थलातील साधक ईश्वराच्या अत्यंत निकट गेला आहे. यापुढे तो गेला तर प्रत्यक्ष परमात्म्याशीच तो समरस होणार आहे. तो जसजसा भगवंताच्या अधिकाधिक जवळ जाईल तसतसे त्याच्या अंगी ईश्वरीगुण बाणत जातील. परवा आपण ऐकले आहे पंचमहाभूतांपैकी आकाश हे ईश्वराच्या अधिक जवळ आहे, म्हणून ते ईश्वरासारखे आहे. ईश्वराचे स्वरूप सांगताना आकाशाचीच उपमा देऊन सांगितले जाते.
'आकाशवत् सर्वगतस्य नित्यः'

आकाश जसे असून दिसत नाही आणि त्याचा स्पर्श होत नाही, त्याप्रमाणे ईश्वर असतो. तो असूनदेखील अनुभवगम्य नसतो. याप्रमाणे जो शरण ईश्वराच्या अधिक निकट जातो, त्याच्यात ईश्वराचे गुण येतात. जो देवाच्या अधिक जवळ जातो त्यालाच दैवी संपत्ती मिळते. प्राचीन ऋषिमुनींनी आपले मन त्या परमतत्त्वाशी जोडले होते. त्या अपार ज्ञानराशीतून त्यांनी ज्ञानग्रहण केले आणि वेदागमांची, शास्त्रांची रचना केली. आपल्या ऋतंभरा प्रज्ञेने त्यांनी ईश्वराकडूनच ज्ञान संपादन केले. ईश्वराकडून जसे ज्ञान प्राप्त होते तसेच उत्कृष्ट गुणदेखील मिळतात. म्हणून रोज जेवढा वेळ मिळेल तेवढ्या काळात ध्यान करून, पूजा करून, स्तोत्रपाठ करून, जप करून प्रत्येकाने ईश्वराशी संबंध जोडला पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
२० एप्रिल १९९२



## तामसनिरसनस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालच्या आशीर्वचनात सात्त्विक शरणाच्या ठिकाणी कोणते दहा सद्गुण असतात त्याविषयी आपण ऐकले आहे. जे आसुरी गुण असतात ते सात्त्विक शरणाच्या ठिकाणी नसतात. हे समजावून सांगण्यासाठी त्या दुर्गुणांचे येथे वर्णन केले आहे.

**कामक्रोधमहामोहमदमात्सर्यवारणाः।**
**शिवज्ञानमृगेन्द्रस्य कथं तिष्ठन्ति सन्निधौ।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १३.१७)

शिवज्ञान हे एखाद्या सिंहासारखे आहे. सिंहासमोर प्रचंड आकार असलेले हत्ती कधीही उभे राहू शकत नाहीत. सिंह आणि हत्ती यांच्या युद्धात नेहमी सिंहाचाच विजय होतो, हे व्यवहारातील सर्वश्रुत उदाहरण आहे. काम, क्रोध इत्यादी विकार हत्तीसारखे आहेत. पराक्रमी सिंहासमोर बलदंड हत्तीदेखील निष्प्रभ होतात त्याप्रमाणे शिवज्ञानासमोर कामक्रोधादी हत्ती क्षणभर देखील उभे राहू शकत नाहीत. शरणाच्या मनात काम, क्रोध इत्यादी विकार मुळात उद्भवतच नाहीत. परंतु जरी ते उद्भवले तरी शरणस्थलातील साधक त्यांच्यावर नियंत्रण मिळवतो, हे या उदाहरणातून स्पष्ट केले आहे.

काम हा पहिला विकार आहे. काम, क्रोध आणि लोभ या तीन विकारांना गीतेत 'नरकाची द्वारे' अशी संज्ञा दिली आहे. मनुष्याला हे तीन विकार नरकाच्या दिशेने घेऊन जातात. शास्त्रकारांनी या विकारांना शरीरातील शत्रू मानलेले आहे. प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणातील ज्ञानरूपी रत्नाचे हरण करणारे हे तीन चोर होत. ज्यांच्या मनात हे विकार वस्तीला आहेत त्यांच्या मनात ज्ञान प्रकाशित होत नाही. ते मनुष्याला ज्ञानी होऊ देत नाहीत. कामवासनेच्या मागे लागून अनेकांनी आपले आयुष्य उद्ध्वस्त करून घेतले आहे. याचे ज्ञान असून देखील जेव्हा मनुष्य कामवासनेला शरण जातो तेव्हा कामाने त्याच्या ज्ञानाचे जणू हरण केलेले असते. आपण केलेले कर्म अनुचित होते, ते करायला नको होते अशी पश्चात् बुद्धी त्याला होते. परंतु त्यावेळी सारे घडून गेलेले असते. घटनाक्रम उलटा फिरवता येत नसतो.

कामक्रोधांचा आवेग एखाद्या वादळासारखा असतो. वादळात सुकलेले पाने, कागद सापडून फिरत राहतात. वादळात जे जे सापडेल ते ते वादळासोबत उडून जाते. दिल्लीत झालेल्या एका वादळात विजेचे खांबदेखील वाकले होते आणि रस्त्यावर धावणाऱ्या बसगाड्या त्या वादळामुळे गोल गोल फिरत राहिल्या होत्या. त्या वादळाप्रमाणे काम–क्रोध मनुष्याच्या जीवनात येतात त्यावेळी तो आपली विवेक शक्ती हरवून बसतो, त्यांच्यासोबत वाहवत जातो. वादळ जेव्हा संपून जाते तेव्हा मनुष्य पश्चात्ताप करत बसतो. आपल्या हातून असे घडायला नको होते. मनुष्याला जेव्हा कामक्रोधांचा पराक्रम कळतो तेव्हा त्याने जागृत झाले पाहिजे. आपण त्यांच्या अधीन झालो तरी घडलेल्या घटनेतून आपण बोध घेतला पाहिजे. कामाचे पोट मोठे असते. त्यात कितीही अन्न घातले तरी ते भरत नाही. कधीही पूर्ण न होणाऱ्या कामाचा जो दास होतो त्याला अनर्थ भोगावेच लागतात. यासंदर्भात कामवेड्या ययातीची कथा खूप बोलकी आहे. कामवासनेत अखंड लोळून देखील ययातीचे मन भरले नाही.

तेव्हा त्याने एक वाक्य बोलून दाखविले.

**न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते।।**

शंभर वर्षांचे आयुष्य संपल्यावर ययातीचे प्राण हरण करण्यासाठी मृत्यू आला. मृत्यू कोणाला सांगून येत नाही आणि 'येतोस की नाही?' असे तो कोणाला विचारीतही नाही, त्याने असे विचारले असते तर जगातून कोणी गेलेच नसते. उद्या येतो, परवा येतो असे लोकांनी त्याला सांगितले असते. परंतु ययातीसमोर मात्र तो उभा राहिला. ''चल येतोस की नाही?''

तेव्हा ययाती म्हणाला, ''नाही, मी येणार नाही.'' मृत्यू म्हणाला. ''तुझे आयुष्य तर संपले आहे. जर तुझा कोणी पुत्र आपले आयुष्य तुला अर्पण करील तरच तुला जिवंत राहता येईल.''

ययातीने आपल्या शंभर मुलांकडे याचना केली आणि सर्वांत लहान धाकट्या दहा वर्षाच्या मुलाने आपले नव्वद वर्षांचे उर्वरीत आयुष्य आपल्या पित्याला दान केले. असे सांगितले जाते की, ययातीला पुन्हा पुन्हा संधी मिळत राहिली आणि तो हजार वर्षे सुखाचा उपभोग घेत राहिला. त्यानंतरही त्याच्याकडे जाऊन मृत्यूने विचारले की, ''आता तरी तुझे मन भरले आहे का?''

तेव्हा ययाती उत्तरला, ''नाही, अजून भरले नाही. मला आणखी एक संधी दे.'' त्यावेळी ययातीने तो प्रसिद्ध श्लोक उच्चारला. अग्नीत कितीही लाकडे टाकली तरी तो अग्नी विझत नाही, उलट तो भडकत जातो त्याप्रमाणे कामाची कितीही तृप्ती केली तरी तो शांत होत नाही. उलट अधिकच वाढतो. इच्छा कधीही पूर्ण तृप्त होत नसते. एक इच्छा पूर्ण झाली की दुसरी निर्माण होते. ती पूर्ण झाली की तिसरी उत्पन्न होते. भोगामुळे विषयवासना अधिक भडकतात. म्हणून त्यांची तृप्ती करण्याऐवजी त्यांचा निरोध करणे हेच श्रेयस्कर ठरते. कामावर विवेकानेच अंकुश ठेवला पाहिजे.

दुसरा दुर्गुण आहे क्रोध. आपल्या इच्छेच्या कुणी आड आले तर माणसाला क्रोध येतो. ज्याच्या मनात क्रोध उत्पन्न होतो त्याचीच क्रोधामुळे आधी हानी होते, नंतर दुसऱ्याची होते. आपल्या घरात जर आग लागली तर आधी आपले संपूर्ण घर जळून जाते आणि मगच ती आग दुसऱ्याच्या घराला लागते. एखाद्यावर रागावणे हे असेच आहे. आपले घर आधी जाळून घ्यायचे आणि मग दुसऱ्याचे घर जाळायचे. ज्याच्यावर तुम्ही क्रोध करता त्याच्यावर तुमच्या क्रोधाचा दुष्परिणाम नंतर होतो, त्याआधी तुमच्यावर होतो. क्रोधी मनुष्याच्या शरीराचे तापमान वाढते. तापमान वाढले की रक्त जळू लागते. म्हणून एका सुभाषितकाराने म्हटले आहे. क्रोध हाच मनुष्याचा पहिला शत्रू होय. तो देहात राहूनच देहाला जाळून टाकतो. त्यासाठी एक उदाहरण देतात.

लाकडामध्ये असलेला अग्नी लागडालाच जाळून टाकतो. अरणी-मंथन करून म्हणजे लाकडावर लाकूड घासून जेव्हा अग्नी पेटवला जातो तेव्हा त्या अग्नीला काहीतरी आधार लागतो. लाकूड हाच त्याचा आधार बनतो. एखादी आगकाडी जेव्हा आपण पेटवतो तेव्हा उत्पन्न झालेला अग्नी ती काडी जळून जाईपर्यंत अस्तित्वात असतो. काडी जळून गेली की तो गुप्त होतो. हा अग्नी गेला कुठे? अग्नितत्त्व हे सर्वव्यापक आहे. आपण जिथे बसलो आहोत तिथे देखील अग्नी आहेच. परंतु तो आपल्याला जाळीत नाही. कारण तो प्रकट झालेला नाही. एखाद्याच्या खिशात आगपेटी असते. आगपेटी म्हणजे अग्नीचे भांडारच. परंतु तो त्या माणसाला जाळून टाकत नाही. तो प्रकट झाला तरच आपला पराक्रम दाखवतो. लाकडामध्ये राहणारा अग्नी जसा लाकूड जाळून टाकतो

त्याप्रमाणे शरीरात राहणारा क्रोध शरीराला जाळून टाकतो. म्हणून मनुष्याचा पहिला शत्रू क्रोध आहे.

बरेच लोक क्रोधावर नियंत्रण ठेवू शकत नाहीत. क्रोध आणि क्षोभ यात थोडेसे अंतर आहे. लहान मुलाने एखादा अपराध केला तर त्याच्यावर आईवडील रागवतात. याला म्हणतात क्षोभ. परंतु तो क्रोध नव्हे. दुसऱ्याचे वाईट करण्याची ज्वलनात्मक अनिष्टवृत्ती म्हणजे क्रोध होय.

**अन्येषां अनिष्टार्थी प्रादुर्भूतः ज्वलनात्मक चित्तवृत्तिः क्रोधः।**

दुसऱ्याचे अनिष्ट करण्याच्या इच्छेने जी ज्वलनात्मक प्रवृत्ती उत्पन्न होते तिला क्रोध असे म्हणतात. मानसिकवृत्ती अनेक प्रकारची असते. परंतु जी जळणारी वृत्ती असते तीच क्रोध होय. दुसऱ्याचे हित करण्याच्या इच्छेने जेव्हा त्याच्यावर क्रोध केला जातो तेव्हा त्याला 'क्षोभ' असे म्हणतात. आईवडीलांचे मुलावरचे रागावणे त्याच्या हितासाठी असल्यामुले त्या रागावण्याला क्रोध म्हणता येत नाही, तो क्षोभ आहे. त्याच्या हातून पुन्हा चूक घडू नये, तो सुधारावा म्हणून आईवडील त्याला भय दाखवण्यासाठी रागवत असतात.

जेव्हा क्रोध मनात उत्पन्न होईल तेव्हा मनुष्याने त्यावर विवेकानेच नियंत्रण ठेवायला हवे. क्रोध कधी शिव्यांच्या रूपाने प्रकट होतो तर कधी समोरच्या माणसाला हाताने मारून किंवा लाथा मारून कृतिरूपाने प्रकट होतो. एखाद्याला जेव्हा खूपच राग येतो तेव्हा तो समोरच्याला काहीही न म्हणता प्रथम त्याला मारीत सुटतो. मग रागाचा पारा थोडा खाली उतरल्यावर त्याला शिव्या द्यायला सुरुवात करतो. आपल्याला क्रोध येतो आहे हे मनुष्याला समजते. परंतु क्रोध फार काळ मनात राहत नसतो. एखाद्या वादळाप्रमाणे क्रोध मनात उत्पन्न होतो आणि लगेच निघून जातो. ज्याच्यावर रागवायचे ती व्यक्ती जर त्यावेळीच न भेटता कालांतराने भेटली तर आलेला क्रोध केव्हाच शांत झालेला असतो. त्यावेळी भेटला असतास तर तुला चांगला हात दाखविला असता, असे म्हणायची त्याच्यावर वेळ येते. म्हणून विवेकाच्या बळाने क्रोधाची वेळ टाळता आली तर त्याच्यामुळे घडणाऱ्या घटनापासून आपण वाचू शकतो. कोणताही माणूस चोवीस तास क्रोधी राहू शकत नाही. चोवीस तास कामी राहू शकत नाही. कारण ही ज्वलनात्मक मानसिकवृत्ती आहे. एखादी आगकाडी भर्रकन पेटून थोड्याच वेळात जळून संपून जावी अशी कामक्रोधाची अवस्था असते. या भावना फार तर पाच, दहा, पंधरा मिनिटे टिकतात, नंतर पुन्हा शांत होतात.

शीतलता हा जलाचा स्वभाव आहे. पण त्याला जर अग्नीच्या संपर्कात ठेवले तर ते पाणीदेखील हळूहळू गरम होईल. थोड्या वेळाने उकळू लागेल आणि १०० अंश उष्मांकावर त्याची वाफ होईल. उकळत्या पाण्याचा अग्नीशी संबंध तोडला तर ते पाणी हळूहळू पुन्हा थंड होत आपल्या मूळ स्वभावाकडे जाईल. पाण्याला कितीही तापवले तरी काही वेळाने ते थंड होतेच. कारण उष्ण राहणे हा त्याचा स्वभावच नाही. त्याप्रमाणे कोणताही मनुष्य स्वभावतः कामी नसतो, क्रोधी नसतो, लोभी नसतो. प्रसंगवशात् त्याच्या ठिकाणी त्या भावना उत्पन्न होतात. परंतु फार काळपर्यंत त्या मनात टिकून राहत नाहीत. चोवीस तास जर क्रोध मनुष्याच्या शरीरात राहिला तर तो मनुष्य जळून खाक होईल. परंतु असे घडत नाही.

दोन माणसांत केव्हाना केव्हा तरी भांडण होतेच. कारण दोघांचे स्वभाव भिन्न असतात. पिता-पुत्र असो, पति-पत्नी असो की भाऊ-बहीण असो, त्यांच्यात कधीतरी भांडण होतेच. एका घरात नेहमी सासू आणि सून यांचे भांडण होत असे. सासूने एक शिवी दिली तर तिची बहाद्दर सून तिला दोन शिव्या देत असे. सासूला खूप राग आला की मग ती सुनेला चांगली चोपून काढीत असे. शेवटी कंटाळून एके दिवशी सून एका संताकडे गेली.

म्हणाली, ''महाराज, सासूचे आणि माझे नेहमी भांडण होते. ती मला खूप शिव्या देते. मग मी देखील तिला दुप्पट शिव्या देते. माझा राग शांत राहवा म्हणून काहीतरी औषध द्या.''

संताने हसून तिच्याकडे पाहिले आणि एका बाटलीत पाणी भरून तिला दिले. पाणी देऊन तिला सांगितले की, ''भांडण सुरू होताच या बाटलीतले औषध तोंडात घ्यायचे, गिळायचे नाही, सासूने कितीही शिव्या दिल्या तरी हे औषध तोंडाबाहेर टाकायचे नाही.''

सून ते औषध घेऊन घरी गेली आणि त्याचा प्रयोग सुरू केला. सासूने शिवी दिली रे दिली की लगेच ती त्या बाटलीतले पाणी तोंडात घेई आणि गप्प बसून राही. सासूच्या शिव्या ऐकून तिला राग आला आणि सासूला उलटून शिव्या देण्याची तिला उबळ आली तरी तोंडात पाणी असल्यामुळे ती काही बोलू शकत नसे. असे काही दिवस गेल्यावर सून काहीच प्रत्युत्तर करीत नाही असे सासूच्या लक्षात आले. समोरच्यावर शिव्याचा काहीच परिणाम होत नाही असे पाहिल्यावर शिव्या देण्यात तरी काय अर्थ आहे? असे तिला वाटले आणि तिनेही शिव्या देणे सोडून दिले. घरातले भांडण मिटून घर शांत झाले.

सून त्या संताकडे गेली आणि म्हणाली, ''महाराज, तुमचे औषध फारच प्रभावी आहे. आमच्या घरातले भांडण एकदम थांबले.''

क्रोध येताक्षणीच जर मौन धारण केले तर भांडण होणारच नाही. अशाप्रकारे क्रोधावर नियंत्रण ठेवता येते. शरणस्थलातील साधक क्वचित् कधी क्रोध आला तरी आपल्या विवेकाने त्यावर काबू ठेवतो आणि हळूहळू अक्रोधी बनतो.

त्यापुढचा दुर्गुण म्हणजे महामोह. महामोह म्हणजे अज्ञान. हा तमोगुणाचाच परिणाम आहे. जो शरण आपले तामसनिरसन करतो त्याच्या मनात महामोह राहूच शकत नाही. मद म्हणजे अभिमान. कुणाला विद्येचा मद असतो, कुणाला धनाचा, कुणाला रूपाचा, कुणाला अधिकाराचा तर कुणाला आणखी कशाचा मद असतो. एखादी अप्राप्य वस्तू प्राप्त झाली तर तिच्याविषयी मनुष्य मद करतो. अभिमानच जेव्हा वाढतो तेव्हा तिला 'मद' म्हणतात. मदोन्मत्त मनुष्य आपल्या संपत्तीचा, आपल्या अधिकाराचा आणि आपल्या सौंदर्याचा दुरुपयोग करीत असतो. दुसऱ्याची प्रगती सहन न करणे याला 'मत्सर' म्हणतात. एखाद्याला बढती मिळाली तर दुसरा त्याच्यावर जळतो. जो मत्सरी असतो स्वतःचेही कल्याण करू शकत नाही आणि दुसऱ्याचेही कल्याण करू शकत नाही. मनात मत्सर निर्माण झाला तर तो नेहमीच दुःख देणारा असतो. म्हणून काम, क्रोध, महामोह, मदमत्सर यांचे निवारण करायला हवे. हे दुर्गुण मदोन्मत्त हत्तीसारखे आहेत. म्हणून या हत्तीवर आक्रमण करणारे जे सात्त्विक ज्ञान आहे त्याला मृगेंद्र म्हणजे सिंह म्हटले आहे. पूर्वी सांगितलेले दहा सद्गुण ज्या साधकाच्या अंगी असतात त्याच्यावर हे दुर्गुण आक्रमण करू शकत नाहीत. वर सांगितलेले सद्गुण अंगी बाणवणे आणि दुर्गुणांपासून दूर राहणे प्रत्येक मनुष्याचे कर्तव्य आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

ज्ञानमंदिर. जंगमवाडीमठ, वाराणसी,
२१ एप्रिल १९९२

## तामसनिरसनस्थल–४
## निर्देशस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शरणस्थलातील तामसनिरसनस्थल या अवांतर स्थलाविषयी आपण विचार करीत आहोत. शरणस्थलातील साधकाला काम, क्रोध, मोह, मद आणि मत्सर या दुर्गुणांची बाधा होत नाही, हे कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले आहे. रजोगुणी मनुष्य कसा असतो आणि रजोगुणामुळे मनुष्याची कशी हानी होते याविषयी येथे सांगतात.

**यत्र कुत्रापि वा द्वेष्टि प्रपंचे शिवरूपिणि।**
**शिवद्वेषी स विज्ञेयो रजसाविष्टमानसः।।**
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १३.१८)

रजोगुणी मनुष्याचे मन द्वेषाने भरलेले असते. एखाद्याशी भांडण झाल्यावर त्याच्याविषयीची कटू भावना मनात ठेवून त्याचा पाणउतारा करण्याची संधी शोधणे हाच द्वेष होय. द्वेष हा सतत धुमसत राहतो. तो क्रोधाप्रमाणे चटकन् प्रकट होऊन बाहेर पडत नाही. कधी कधी द्वेषच क्रोधाचे रूप घेऊन येतो. द्वेष हे रजोगुणाचेच कार्य आहे. रजोगुणी माणूस सगळ्या लोकांवर प्रेम करू शकत नाही. सात्त्विक मनुष्य मात्र सगळ्यांवर प्रेम करू शकतो. सर्व कलहाचे मूळ मनुष्याचा निर्बुद्धपणा हेच होय. 'नास्ति बुद्धिमतां शत्रुः' असे महर्षी चाणक्याने लिहून ठेवले आहे. जो बुद्धिमान म्हणजे विवेकी असतो, सात्त्विक असतो त्याला जगात कोणीही शत्रू नसतो. युधिष्ठिर वगैरे लोकांना 'अजातशत्रू' असे संबोधले जाते. अजातशत्रू याचा अर्थ ज्याच्या शत्रूचा जन्मच झाला नाही असा. जर कोणी शत्रुत्वभावाने त्याच्याजवळ गेला तरी देखील त्याच्या ठिकाणचे उत्तम गुण पाहून तो शत्रुभाव विसरून त्याचा मित्र बनतो. परस्पर शत्रुभाव असलेले प्राणीदेखील सात्त्विक मनुष्याच्या सहवासात आपले शत्रुत्व विसरतात.

भगवान शिवाच्या परिवाराचे चित्र तुम्ही पाहिले असेल. मोठे विचित्र चित्र आहे ते. भगवान शिव बसलेले आहेत. त्यांच्या डावीकडे पार्वती बसली आहे. शिवाचे वाहन नंदी समोर बसलेला आहे. तर पार्वतीचे वाहन सिंह तोही समोर बसलेला आहे. एका बाजूला गणपती, त्याचे वाहन उंदीर हे बसलेले आहे. दुसऱ्या बाजूला षण्मुख तर त्याच्यासमोर मोर बसलेला आहे. शिवाच्या गळ्यात सर्प आहे तर जटेमध्ये गंगा. शिवपरिवाराचे हे चित्र म्हणजे जणू संसाराचेच चित्र आहे. परस्परांचा द्वेष करणारी माणसे संसारात एकत्र राहतात हेच जणू हे चित्र सांगते. पार्वतीचे वाहन सिंह शिव केव्हा डोळे मिटतात आणि केव्हा नंदीला खाऊन टाकतो याचीच जणू वाट पाहत आहे. मोराचे लक्ष शंकराच्या गळ्यातील सापाकडे आहे. कारण साप त्याचे भक्ष्य आहे. सापाची नजर गणपतीच्या वाहनाकडे– उंदराकडे आहे. जटेतील गंगा पार्वतीकडे जणू सवतीमत्सराने पाहते आहे. आणि पार्वती तिच्याकडे पाहते आहे. माझ्यानंतर तू आलीस आणि डोक्यावर चढून बसलीस? अशा विषम परिस्थितीतदेखील कोणी कोणाशी भांडत नाही. परंतु जर भगवान शिव तेथून उठून गेले तर सगळे परस्परांवर तुटून पडतील. शिवाच्या

अस्तित्वामुळे, त्यांच्या तपस्याबळाने आपापसातील वैरभाव विसरून सगळे कसे गुण्यागोविंदाने एकत्र नांदत आहेत. आपल्या विषम परिवारात भगवान शिव जसे अविचल आणि शांत आहेत त्याप्रमाणे विषमतेने भरलेल्या या जगात आपणदेखील अविचल आणि शांत राहिले पाहिजे.

सर्व संसार शिवमय आहे. पृथ्वीपासून आकाशापर्यंत पंचमहाभूते, सूर्य, चंद्र आणि जीवात्मा या भगवान शिवांच्या अष्टमूर्ती मानल्या जातात. वस्तुत: 'सर्वं खल्विदं ब्रह्म' असे वेदान्त म्हणतो. 'लिंगमध्ये जगत्सर्वम्' असे सिद्धान्त सांगतो. जे काही आहे ते परमात्म्याचेच आहे. सर्व काही परमात्मा आहे. हे ज्ञान प्रत्येक मनुष्याला नसते. म्हणून तो दुसऱ्याचा द्वेष केला तरी शिवाचा द्वेष केल्याप्रमाणे होते. कारण शिवाशिवाय दुसरे काही अस्तित्वातच नाही. प्रत्येक जीव हा शिवाचाच अंश आहे. जर एका जीवात्म्याने दुसऱ्या जीवात्म्याशी भांडण केले तर तो ते भांडण कोणाशी करत आहे? शिवासोबतच करतो आहे. म्हणून सर्व काही शिवच आहे अशी भावना जर तुमच्या मनात दृढ झाली तर द्वेषभावना नष्ट होईल.

एकदा एक तपस्वी गंगेच्या किनाऱ्यावर तपस्या करण्यासाठी गेला. गेला तो गेला नेमका धोबीघाटावर गेला. तेवढ्यात धोबी तेथे आला. म्हणाला, ''हे आमचे कपडे धुण्याचे ठिकाण आहे.''

''या जागेवर तुझे काय नाव लिहिलेले आहे?'' तपस्व्याने विचारले. धोब्याला राग आला. तो तपस्व्याच्या अंगावर धावून गेला. दोघांची गुद्दागुद्दी झाली. कधी हा त्याला खाली पाडायचा, त्याच्या उरावर बसायचा. कधी तो ह्याला खाली पाडायचा, ह्याच्या उरावर बसायचा. दोघांची मारामारी पाहून भगवान शिव तेथे प्रकट झाले आणि त्यांनी दोघांनाही भांडणाचे कारण विचारले. ते सांगितल्यावर भगवान म्हणाले, ''तुमच्यापैकी कोण धोबी आहे आणि कोण तपस्वी आहे? कारण दोघांचेही वर्तन एकसारखेच आहे.''

हे ऐकल्यावर तपस्व्याला स्वत:ची लाज वाटली आणि तो तेथून निघून गेला. तो आधीच असा उठून गेला असता तर हा प्रसंगच आला नसता. दुसरा माणूस तुमच्यासोबत भांडण करायला तयार आहे. परंतु भांडण करण्याची तुमची तयारी नसेल तर भांडण होणारच नाही. तुमच्याविषयी कोणाच्या मनात द्वेष असेल. परंतु तुम्ही त्याचा द्वेष करीत नसाल तर कालांतराने त्याच्या मनातील द्वेष हळूहळू नष्ट होऊन जातो. म्हणून सर्व प्रपंच हा शिवमय आहे आणि आपण जर कोणाचा द्वेष केला तर तो शिवाचाच द्वेष केल्याप्रमाणे होतो असे जो जाणतो त्याच्या मनातून द्वेषभावना कायमची हद्दपार होते. शास्त्रे सांगतात की, जगातील एखाद्या माणसाबद्दल जरी आपल्या मनात द्वेषभावना असेल तर आपल्याला मुक्ती मिळत नाही. मुक्ती म्हणजे सर्वात्मभावना. प्रत्येक प्राणिमात्रात परमात्म्याला पाहणे हीच मुक्ती आहे. जर एखाद्याविषयी तुमच्या मनात द्वेष असेल तर त्याच्यात तुम्ही परमात्मा पाहत नाही हे सहजच सिद्ध होते. तुमचा परमात्मा परिच्छिन्न झाला. मग तुम्हाला मुक्ती कसली? म्हणून सर्व प्रपंचाला शिवमय समजून कोणाचाही द्वेष करू नये.

**यो द्वेष्टि सकलान् लोकान् यो वाऽहंकुरुते सदा।**
**योऽसत्यभावनायुक्त: स तामस इति स्मृत:।।१३.१९।।**

रजोगुणाचे लक्षण सांगितल्यानंतर आता तमोगुणाविषयी सांगतात. जो सगळ्यांचा द्वेष करतो, जो निरंतर अहंकाराने फुगलेला असतो, जो असत्याचा आश्रय घेतो अशा माणसाला 'तामस' असे म्हटले जाते. तमोगुणी माणूस सहृदय नसतो. तो सगळ्यांशी प्रेमाने वागत नाही. तो सगळ्यांशी भांडणच करील. जो इतरांपेक्षा स्वत:लाच

श्रेष्ठ मानील, अहंकाराने सदैव फुगलेला असेल, तो संसारसागरातून तरून जाणार नाही. जो आपल्या आतला अहंकार बाहेर टाकून देईल तोच संसारसागरातून पैलतीरावर जाईल.

एक मनुष्य मोत्यांचा व्यापार करीत असे. त्यासाठी त्याला नेहमी समुद्रावर नावेतून जावे लागे. त्याला पोहणे येत नसे. म्हणून एका साधुपुरुषाने त्याला सल्ला दिला, ''तुला पोहणे येत नाही आणि मोती आणण्याकरिता तुला समुद्रावर जावे लागते. एखाद्या वेळी नाव वादळात सापडली तर तू बुडून मरशील. म्हणून तुझ्या नौकेत तोंड बंद असलेली दोन पिंपे नेहमी ठेवीत जा. त्यात काहीही भरायचे नाही. जेव्हा नाव उलटणार असे वाटेल तेव्हा ही पिंपे कमरेला बांधून तू जर पाण्यात उडी मारशील तर तुझा जीव वाचेल.''

व्यापाऱ्याने तो सल्ला ऐकून रिकामी पिंपे नावेत ठेवली. एकदा तो व्यापाराला गेला असताना त्याला भरपूर फायदा झाला. त्याने नाव भरून रत्ने घेतलीच पण ती दोन रिकामी पिंपेदेखील भरून घेतली. परंतु येताना वादळाला सुरुवात झाली. नाव डगमगू लागली. नाव डगमगू लागल्यावर त्याला साधूचा सल्ला आठवला. परंतु त्याला पिंपातल्या मोत्यांचा मोह सोडवेना. जगायचे असेल तर पिंपे रिकामी करून त्यांची तोंडे बंद करून ती कमरेला बांधली पाहिजे. परंतु त्या लोभी माणसाने मोती भरलेली पिंपेच कमरेला बांधली आणि समुद्रात उडी मारली. परिणाम व्हायचा तोच झाला, तो बुडून मेला.

भरलेल्या भांड्यापेक्षा कधीकधी रिकाम्या भांड्याचे महत्त्व अधिक असते, हेच कधी मनुष्याला कळत नाही. परमेश्वराने आपल्याला देखील मन आणि बुद्धी ही दोन पिंपे दिली आहेत. ती जर भरलेली असतील तर संसारसागरात बुडण्याशिवाय आपल्याला गत्यंतर नाही. ती आपण जर रिकामी करू शकलो तर मात्र त्यांच्या साह्याने संसारसमुद्रातून तरून जाऊ शकू. मन, बुद्धी रिकामी करायची म्हणजे नेमके काय करायचे? तर त्यांच्यात सांसारिक वासना न भरता परमात्म्याला भरून घ्यायचे. त्या पिंपांमध्ये जशी हवा असली तरी चालते परंतु इतर वस्तू मात्र नसाव्यात, त्याप्रमाणे अहंकार, ममत्व, दुर्वासना जर मनबुद्धीत भरलेल्या असतील तर असा तामसी मनुष्य संसारसागरात हमखास बुडतो.

**तमोमूला हि संजाता रागद्वेषादिपादपाः।**
**शवज्ञानकुठारेण छेद्यन्ते हि निरन्तरम्।।१३.२०।।**

राग-द्वेषरूपी जो वृक्ष आहे त्याचे मूळ कारण अज्ञान होय. अज्ञान म्हणजेच तमोगुण. बीजच नसेल तर वृक्ष कसा उत्पन्न होईल? आधी तुमच्या मनात अज्ञान आणि तमोगुण असतो आणि त्यामुळे तुमच्यामध्ये राग-द्वेष निर्माण होतात. शिवज्ञानरूपी कुऱ्हाडीने तमोगुणांचे छेदन करता येते. ते एकदा केले म्हणजे मनात राग-द्वेष रहात नाहीत.

**शिवज्ञाने समुत्पन्ने सहस्रादित्यसन्निभे।**
**कुतस्तमोविकाराः स्युर्महतां शिवयोगिनाम्।।१३.२१।।**

जो शरणस्थलातील उत्तम साधक आहे त्याच्या ठिकाणी तमोगुण येईलच कसा? त्याविषयी येथे सांगतात. शिवज्ञानाचा प्रकाश सहस्र सूर्याइतका असतो. अनेक लोकांना प्रश्न पडेल की एवढा मोठा प्रकाश आपल्या आत आहे तर त्याचा एक किरण देखील का बाहेर येत नाही? प्रखर सूर्यप्रकाशात देखील माणसाला भ्रम होतो आणि मंद प्रकाशात देखील भ्रम होतो. मंद प्रकाशात मनुष्य दोरीला साप समजतो तर झाडाच्या खोडाला चोर समजतो. परंतु प्रखर प्रकाशात देखील शिंपल्याला मनुष्य चांदी समजून भ्रमित होतो. प्रखर सूर्यप्रकाशात देखील माणसाला

भ्रम होऊ शकतो. परंतु आतील आत्मप्रकाशात मात्र कुठलाही भ्रम होण्याचा संभव नसतो. असा सहस्रसूर्यासारखा शिवज्ञानाचा प्रकाश ज्याच्या अंतरंगात असतो त्या शिवयोग्याला तमोगुणातील विकारांचा मुळीच उपद्रव होत नाही. येथे तामसनिरसनस्थल पूर्ण झाले.

## निर्देशस्थल

यानंतरचे अवांतरस्थल आहे निर्देशस्थल. निर्देश म्हणजे दाखवणे. आत्मवस्तू अथवा परमात्मवस्तू यांना जो दाखवतो त्याला निर्देशक असे म्हणतात. तेच या ठिकाणी स्पष्ट केले आहे.

**निराकृत्य तमोभागं संसारस्य प्रवर्तकम्।**
**निर्दिश्यते तु यज्ज्ञानं स निर्देश इति स्मृतः।।१३.२२।।**

संसारात प्रवृत्त करणाऱ्या आणि संसार वाढविणाऱ्या तमोगुणाचे निराकरण करून शिवज्ञानाचा निर्देश केला जातो म्हणजे त्याचे स्वरूप समजावले जाते, हेच निर्देशस्थल होय. अर्थात् शिवज्ञान देण्याऱ्या गुरूचीच महिमा येथे पुन्हा वर्णन केलेली आहे.

**गुरुरेव परं तत्त्वं प्रकाशयति देहिनाम्।**
**को वा सूर्यं विना लोके तमसो विनिवर्तकः।।१३.२३।।**

आपल्या आत्मतत्त्वाकडे निर्देश करणाऱ्या त्याचे स्वरूप समजावून सांगणाऱ्या मनुष्याला आपण गुरू म्हणतो. गुरू हेच मार्गदर्शक असतात. श्रेष्ठ तत्त्व समजावून सांगणारा गुरूच असतो. आपल्या परिवारात आई–वडील, भाऊ–बहीण असे बरेच जण असतात. तरीदेखील आपल्याला गुरूकडेच का जावे लागते? कारण परिवारातील सारेजण आपल्याला संसारप्रवृत्त करणारे असतात. परंतु गुरू मात्र संसारातून मुक्त करणारा असतो. म्हणून प्रत्येक मनुष्याला गुरूकडे जावे लागते. तो जीवात्म्यात असलेल्या परमात्मतत्त्वाला प्रकाशित करतो. सूर्य उगवल्याशिवाय जसा अंधार दूर होऊ शकत नाही. त्याप्रमाणे गुरुबोधाशिवाय कोणालाही ज्ञानप्राप्ती होत नाही. शास्त्रे सांगतात की, आत्मज्ञान मिळवायचे असेल तर गुरूजवळ जायला पाहिजे. त्याच्याशिवाय इतर कुठल्याही ठिकाणी आत्मज्ञानाची प्राप्ती होणे शक्य नाही.

**अन्तरेण गुरुं सिद्धं कथं संसारनिष्कृतिः।**
**निदानज्ञं विना वैद्यं किं वा रोगो निवर्तते।।१३.२४।।**

येथे एक उदाहरण देऊन गुरूचे माहात्म्य वर्णिले आहे. ज्ञानसिद्ध, तपोसिद्ध गुरूशिवाय संसाराची निवृत्ती कशी होईल? अर्थात् सिद्ध गुरूच्या द्वाराच संसारनिवृत्ती होते. रोगाच्या निवृत्तीकरिता आपण वैद्याकडे जातो. काही लोक खरे वैद्य असतात तर काही लोक नावाचे 'वैद्य' असतात. कुठलेही वैद्यकीय प्रमाणपत्र न घेता, कंपाऊंडरचे सुद्धा काम न करता काही लोक दारावर बोर्ड लावतात आणि डॉक्टरकीचा धंदा सुरू करतात. जगात रोगी जास्त आहेत. शरीर हे रोगांचेच घर आहे. प्रत्येकाच्या शरीरात काही ना काही रोग असतोच. अशी रोगी माणसे डॉक्टरांचा बोर्ड पाहून त्यांच्या दवाखान्यात शिरतात. त्याच्याकडे बोर्ड असतो, परंतु रोगाचे निदान आहे की नाही हे बिचाऱ्या रुग्णाला कसे कळावे? निदान न जाणणाऱ्या डॉक्टराकडे जर रोगी गेला तर त्याची स्थिती कशी होईल?

एका गावात एक मनुष्य मरण पावला. तेव्हा गावातले दोन डॉक्टर एकमेकांशी बोलताना म्हणाले की, ''हा माणूस मेलाच कसा? तो तर आपल्याकडे औषधसुद्धा घ्यायला आला नाही.'' त्या डॉक्टरांकडे रोगांचे निवारण

करणारे औषध नव्हते, रोगी मारण्याचे मात्र होते. असे बरेच डॉक्टर असतात. म्हणून येथे म्हटले आहे की उत्तम औषध जाणणाऱ्या वैद्याशिवाय जशी रोगनिवृत्ती शक्य नाही त्याप्रमाणे आत्मज्ञानी गुरूशिवाय संसारनिवृत्ती शक्य नाही.

**अज्ञानमलिनं चित्तदर्पणं यो विशोधयेत्।**
**प्रज्ञाविभूतियोगेन तमाहुर्गुरुसत्तमम्।।१३.२५।।**

प्रत्येक माणसाचे मन एखाद्या दर्पणासारखे, आरशासारखे असते. आरशावर धूळ बसते. आरशात आपला चेहरा पाहण्याआधी आपण त्यावरची धूळ झटकतो. माणसाचे मनदेखील एक आरसाच हाय. परमेश्वराने जेव्हा आपल्याला मन दिले होते तेव्हा ते स्वच्छ होते. त्यावर कोणताही कलंक नव्हता. थोडीदेखील धूळ बसलेली नव्हती. त्यावर हळूहळू धूळ बसत गेली आणि चित्त अपवित्र होत गेले. इतके की मन म्हणजे आरसा आहे हेच लोक विसरून गेले. आपण जर आरशावर चिखल थापला तर त्यात आपला चेहरा कसा दिसेल? चिखल दिसेल, परंतु आरसा दिसणार नाही. त्याप्रमाणेच संसारात देखील प्रत्येक माणसाच्या मनावर अशीच धूळ बसलेली आहे. आपले मन तर आपण कधीच स्वच्छ केले नाही. मनाच्या आरशातून आपले स्वरूप पाहण्याचा आपण कधीही प्रयत्न केला नाही. त्या आरशाप्रमाणेच माणसाचे मनदेखील मलिन झाले आहे.

हे मालिन्य येते कोठून? आपल्या शरीराला जी नऊ द्वारे आहेत त्यांच्यातूनच धूळ आत येऊन आपल्या मनावर साचते. मन मलिन होते. घराला दारे, खिडक्या असतात. त्यातून सारखी धूळ आत येत असते. तुम्हाला घर रोज झाडून स्वच्छ करावे लागते. आज जर झाडले तरी पुन्हा उद्या झाडावे लागते. जर वर्ष-दोन वर्षांनी एकदाच घर झाडले तर त्यावेळी हे घर आहे की कचराकुंडी? असा प्रश्न तुम्हाला पडेल. घराच्या एका दारातून जर एवढी धूळ आत येऊ शकते तर तुमच्या शरीरातल्या नऊ दारांतून किती बरे धूळ आत येत असेल? या नऊ दारांतून केरकचरा आत कोण आणतो? जो आत बसतो तोच आणतो. बाहेरच्या मनुष्याने जर तुमच्या घरात केर आणून टाकला तर तुम्ही गप्प बसाल? बसणार नाही. त्याच्याशी भांडण कराल. जर तुमच्याच पायाने आणि तुमच्याच कपड्यामुळे घरात धूळ आली तर तुम्ही कोणाशी भांडण कराल? तुम्ही ज्याप्रमाणे बाहेरून धूळ आत आणता त्याप्रमाणेच शरीराच्या आत राहणारा जीवात्मा बाहेर जाऊन धूळ, केरकचरा आत घेऊन येतो. तो शरीराबाहेर जातो तोच मुळी केरकचरा आता आणण्यासाठी. त्याला कचऱ्याशिवाय दुसरे काही दिसतच नाही. प्रत्येक इंद्रियाकडून पापमय व्यवहार घडून पापांचा संग्रह होतो. जन्मजन्मांतरापासून इंद्रियांच्या दूषित व्यवहारामुळे धूळ आत येऊन मनरूपी आरशावर इतकी साठली की तो मुळात दर्पण आहे हेच आपण विसरून गेलो आहोत.

जेव्हा शिष्य गुरूजवळ जातो तेव्हा गुरू त्याच्या मनरूपी दर्पणाचे निरीक्षण करतात. त्याच्यावर किती धूळ साठली आहे याचा अंदाज घेतात. त्याला उपदेश करून, काही नियम पाळायला सांगून हळूहळू त्याचा चित्तरूपी दर्पण स्वच्छ करतात. जसजसे मालिन्य दूर होत जाईल तसतसे आपले मन अधिकाधिक स्वच्छ होत जाईल. मग त्या स्वच्छ मनात आपल्या आत्म्याचे प्रतिबिंब पडेल.

एका चित्रकाराची कथा तुम्हाला माहीत असेल. एका देशात परदेशातून एक चित्रकार आला. त्या देशाच्या राजाला भेटून तो म्हणाला की, ''महाराज, तुमच्या देशातल्या उत्तम चित्रकाराची आणि माझी स्पर्धा लावून पहा. तो जिंकतो की मी जिंकतो हे तुम्हाला दिसेलच.''

राजाने आपल्या देशातील उत्तम चित्रकार शोधून आणला. तेव्हा परदेशातील चित्रकार म्हणाला, ''माझी एक अट आहे. ती अशी की, एकाच मोठ्या दिवाणखान्यात एकमेकीसमोरील भिंतीवर आम्ही चित्रे काढू. एका भिंतीवर त्याने चित्र काढायचे. तर त्याच्या समोरील भिंतीवर मी चित्र काढायचे. दिवाणखान्याच्या मध्यावर पडदा सोडायचा आणि चित्र पूर्ण होईपर्यंत कोणीही एकमेकांचे चित्र पाहायचे नाही. स्वत: महाराजांनीच चित्र पूर्ण झाल्यावर आपल्या हाताने मधळलाडदा हटवावा आणि दोन्ही चित्रांची तुलना करावी.''

राजाने चित्रकाराची अट मान्य केली आणि त्याप्रमाणे दोन्ही चित्रकारांनी एकमेकीसमोरील भिंतीवर चित्र काढायला प्रारंभ केला. दोघांनाही सगळे रंगसाहित्य दिले गेले. परदेशी चित्रकाराने मात्र रंगसाहित्य नाकारले. लोकांमध्ये मोठी उत्सुकता पसरली. रंगविण्याचे कोणतेही साधन न घेतला हा परदेशी चित्रकार कसे चित्र काढणार याचे त्यांना आश्चर्य वाटले.

अखेर चित्र पूर्ण झाले. राजाने स्वत: येऊन त्या खोलीमधला पडदा दूर केला. दोन्ही भिंती पाहताच सगळे आश्चर्यचकित झाले. देशातील चित्रकाराने आपल्या भिंतीवर जे चित्र काढले होते तसेच हुबेहूब चित्र परदेशी चित्रकाराच्या भिंतीवर दिसत होते. फरक एवढाच होता की देशातील चित्रकाराचे चित्र भिंतीच्या पृष्ठभागावर होते तर परदेशी चित्रकाराचे चित्र भिंतीच्या पृष्ठभागाच्या आत दहा-बारा फुटांवर दिसत होते.

आश्चर्यचकित झालेल्या राजाने परदेशी चित्रकाराला विचारले, ''हा काय चमत्कार आहे? या भिंतीवरले चित्र तुझ्या लभिंतीवर कसे आणि ते असे आत का दिसते?''

तेव्हा चित्रकार नम्रपणे म्हणाला, ''महाराज, मी चित्र काढलेच नाही. ही भिंत घासून घासून आरशाप्रमाणे गुळगुळीत करून ठेवली. ते समोरचेच चित्र या भिंतीमध्ये प्रतिबिंबित होत आहे. म्हणून ते तुम्हाला दूर दिसते इतकेच.''

असे आपले ज्ञान भिंतीसारखे गुळगुळीत झाले तर त्यामध्ये आत्म्याचे प्रतिबिंब पडते. विभूती लावून जसा आरसा स्वच्छ केला जातो त्याप्रमाणे ज्ञानाची विभूती लावून म्हणजे ज्ञानोपदेश करून गुरू शिष्याच्या मनरूपी दर्पणावरची अज्ञानरूपी धूळ स्वच्छ करतात. चित्ताचे मालिन्य दूर करणारा जो महापुरुष तोच गुरू होय.

**अपरोक्षिततत्त्वस्य जीवन्मुक्तस्वभाविन:।**
**गुरो: कटाक्षे संसिद्धे को वा लोकेषु दुर्लभ:।।१३.२६।।**

ज्यांना परमात्मतत्त्वाचा प्रत्यक्ष साक्षात्कार झालेला आहे, त्यामुळे जो जीवन्मुक्त झाला आहे अशा गुरूचा कृपाकटाक्ष ज्याच्यावर आहे त्या माणसाला कसली उणीव भासणार? गुरूमुळेच शिवाची प्राप्ती होते. म्हणून शिष्याला गुरुकृपेची आवश्यकता भासते.

**कैवल्यकल्पतरवो गुरुव: करुणालया:।**
**दुर्लभा हि जगत्यस्मिन् शिवाद्वैतपरायणा:।।१३.२७।।**

गुरू हा मोक्ष देणारा कल्पतरू आहे. सामान्य कल्पतरू सांसारिक मिळवून देतो. कल्पतरूखाली बसून जर तुम्ही मुक्ती मागितली तर ती कल्पतरू देऊ शकत नाही. परंतु गुरू मात्र कैवल्य देणारा कल्पतरू असतो. तो

अत्यंत दयाळू असतो. शिवाद्वैतात निष्ठा ठेवणारा असा गुरू अत्यंत दुर्लभ असतो.

**क्षीराब्धिरिव सिन्धूनां सुमेरुरिव भूभृताम्।**
**ग्रहाणामिव तिग्मांशुर्मणीनामिव कौस्तुभः।।१३.२८।।**
**द्रुमाणामिव भद्रश्रीर्देवानामिव शंकरः।**
**गुरुः शिवः परः श्लाघ्यो गुरूणां प्राकृतात्मनाम्।।१३.२९।।**

समुद्रांमध्ये क्षीरसागर श्रेष्ठ, पर्वतांमध्ये मेरू श्रेष्ठ, ग्रहांत सूर्य श्रेष्ठ, रत्नांत कौस्तुभरत्न श्रेष्ठ, वृक्षांत चंदनवृक्ष श्रेष्ठ, सर्व देवांत शंकर श्रेष्ठ त्याप्रमाणे जगातल्या लौकिक गुरूपेक्षा शिवज्ञानी असा परमगुरू श्रेष्ठ आहे. असाच गुरू आपल्या आत्म्यापर्यंत आपल्याला घेऊन जातो. म्हणून प्रत्येकाने आपल्या चित्तातील मालिन्य दूर करून अशा श्रेष्ठ गुरूच्या पायाशी बसून आत्मज्ञान प्राप्त करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शातिः।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी,
२३ एप्रिल १९९२

---

**आशीर्वचन सहावे**

## शीलसंपादनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शरणस्थलातील शेवटचे अवांतरस्थल शीलसंपादनस्थल हे आहे. शील म्हणजे काय? शीलवान व्यक्तीला काय म्हणतात याचे या स्थलात विवेचन केलेले आहे.

**जिज्ञासा शिवतत्त्वस्य शीलमित्युच्यते बुधैः।**
**निर्देश्ययोगादार्याणां तद्वान् शीलीति कथ्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १३.३०)

प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी काहीतरी जाणून घेण्याची जिज्ञासा असते. जे सामान्य माणसांना अगोचर आहे अशा तत्त्वाचा शोध लावून त्याची लोकोपयोगिता शास्त्रज्ञांनी सिद्ध केली आहे. भौतिकतत्त्वांचा शोध घेतल्यामुळे मनुष्याला लाभच झाला. त्याप्रमाणे आध्यात्मिक तत्त्वांचा शोध घेतल्यामुळे मनुष्याला लाभच होतो. भौतिक, वैज्ञानिक शोधामुळेच आज आपण दूर असलेल्या व्यक्तींशी प्रत्यक्ष बोलू शकतो. त्याला पाहू शकतो, अंतराळात प्रवास करू शकतो आणि जगाच्या कुठल्याही भागात एका सेकंदात संपर्क साधू शकतो. हे सारे कशामुळे घडले? मानवाच्या जिज्ञासामुळे. आकाशातील सूर्यमाला पाहून माणसाला वाटले आपण तिचा शोध घ्यावा, तिथे काय आहे हे पहावे. मानवाच्या ठिकाणी जिज्ञासा असते. जिज्ञासा म्हणजे जाणून घेण्याची इच्छा. म्हणूनच महर्षी व्यासांनी आपल्या ब्रह्मसूत्रात 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' असे पहिले सूत्र लिहून ठेवलेले आहे.

भौतिक जगाविषयाची जिज्ञासा जेव्हा संपुष्टात येते तेव्हाच मनुष्याला ब्रह्माचा शोध घेण्याचे वेध लागतात. हीच ब्रह्मजिज्ञासा होय. विवेक, वैराग्य, शमदमादी षट्संपत्ती आणि मुमुक्षत्व अशा साधनचतुष्टयांनी मनुष्य संपन्न

होऊन ब्रह्माचा शोध घ्यायला प्रवृत्त होतो. या प्रपंचातून मुक्त होऊन जो मोक्षाची इच्छा व्यक्त करतो तोच या मार्गाकडे वळतो. बाकी सामान्य माणसे आपली भौतिक जिज्ञासा तृप्त करीत आयुष्य घालवितात. येथे 'शिवतत्त्वजिज्ञासा' असे म्हटलेले आहे. वीरशैव सिद्धान्तात संपूर्ण विश्व तत्त्वात्मक आहे असे मानले जाते. पृथ्वीपासून ते शिवापर्यंत अशी छत्तीस तत्त्वे आहेत. त्यामध्ये शिव हे पहिले तत्त्व असून पृथ्वीतत्त्व हे अंतिम आहे. पस्तीस तत्त्वांचा विचार सोडून जेव्हा शिवतत्त्वाची जिज्ञासा मनात जागी होते तिलाच 'शील' म्हटले जाते. शास्त्रांनी परतत्त्वाचे पुन्हा पुन्हा वर्णन केले आहे. ते ऐकून ते जाणण्याची जिज्ञासा मनुष्यामध्ये उत्पन्न होते. हेच तत्त्व जाणून संतमहात्मे मुक्त झाले आणि जे जाणल्यावर जाणण्यासारखे इतर काही शिल्लक राहत नाही, 'एकविज्ञानेन सर्वविज्ञानम्।'– असे तत्त्व जाणण्याची प्रबल इच्छा साधकाच्या मनात उत्पन्न होते. एखाद्या तत्त्वाबद्दल पुन्हा पुन्हा ऐकले की ते तत्त्व जाणण्याची इच्छा उत्पन्न होते. काही लोकांच्या मनात पुन्हा पुन्हा ऐकून देखील जिज्ञासा उत्पन्न होत नाही. ते या कानाने ऐकतात आणि त्या कानाने सोडून देतात. हजारो, लाखो लोकांपैकी एखाद्याच्या मनात ही जिज्ञासा उत्पन्न होते. शिवतत्त्व जाणण्याची जिज्ञासा म्हणजे 'शील' हे शील ज्याच्याजवळ असते तोच शीलवान होय.

**प्रपन्नार्तिहरे देवे परमात्मनि शंकरे।**
**भावस्य स्थिरतायोग: शीलमित्युच्यते बुधै:।।१३.३१।।**

आपल्या मनात शील प्रारंभी जिज्ञासेच्या रूपाने असते, नंतर ते भावनात्मक होते. म्हणजे आपण त्याचीच भावना करू लागतो. त्याला जाणण्यासाठी आपल्याला त्याची भावना करावीच लागते. प्रपंचातील इतर वस्तू प्रत्यक्षात दिसतात. म्हणून त्यांची भावना करावी लागत नाही. परंतु जी वस्तू अतींद्रिय असते तिची मात्र भावना करावी लागते. भावनेला काहीच अगोचर नाही. जो प्रपंच सोडून सर्वभावाने परमात्म्याला शरण जातो त्याची सर्व दुःखे परमात्मा हरण करतो. म्हणून परमात्म्याला 'हर' असे नाव आहे. 'हरतीति हर:।' भक्ताच्या ठिकाणी असलेले दोष, दुःख, पाप यांचे तो हरण करतो, अर्थात् ते दूर करतो. तो परमात्मा आहे, कारण सर्व जगत् आणि सर्व जीवात्मे त्याच्याच ठिकाणी अवस्थित असतात. सर्व काही मीच आहे असा समष्टिभाव जेथे आहे तो परमात्मा. शरीर म्हणजेच मी आहे असा जेथे व्यष्टिभाव आहे तो जीवात्मा. म्हणून परमात्मा व्यापक आहे, मंगलकारक आहे. अशा भावांचे निरंतर चिंतन करणे हेच शील होय. ज्याच्यावर अत्यंत प्रेम असते त्याचे चिंतन आपल्या मनात होत राहते. मग ती एखादी वस्तू असो वा व्यक्ती. घरात जेव्हा प्रिय व्यक्ती येते तेव्हा कितीही अडचण असली तरी तिची राहण्याची व्यवस्था मनुष्य करतोच. जागा कमी असली तरी तिच्यासाठी आवश्यक तेवढी जागा उपलब्ध करून देतो. यावरून आलेली व्यक्ती त्याला अत्यंत प्रिय आहे हेच सिद्ध होते.

एकदा रामकृष्ण परमहंस त्यांचे प्रिय शिष्य स्वामी विवेकानंदासोबत एका घरी जेवायला गेले. तेथे भरपेट खाल्ल्यावर रामकृष्ण परमहंस म्हणाले, ''नरेन्, मी आज एवढा जेवलो की माझ्या पोटात अजिबात जागा शिल्लक नाही. आता अन्नाचा एक कणदेखील पोटात जाऊ शकत नाही.''

तेवढ्यात शेजारची एक महिला जिलेबीने भरलेले ताट घेऊन आली आणि म्हणाली,

''महाराज, मी मोठ्या आवडीने आपल्यासाठी जिलेबी बनवली आहे. आपण तिचा स्वीकार करावा.''

रामकृष्णांनी ताटातल्या दोन जिलेब्या उचलल्या आणि खाल्ल्या. विवेकानंद हा सारा प्रकार पाहत होते ते

अत्यंत जिज्ञासू होते. त्यांनी विचारले, ''आताच आपण म्हणालात की पोटात अन्नाचा एक कण जाऊ शकत नाही. मग या दोन जिलेब्यासाठी जागा कशी बरे झाली?''

रामकृष्ण हसले आणि म्हणाले, ''शहरातल्या रस्त्यावर माणसांची कितीही गर्दी असली तरी जेव्हा गव्हर्नर त्या रस्त्याने जाणार असतात तेव्हा त्यांच्यासाठी गर्दी हटवून रस्ता मोकळा केला जातो. त्याप्रमाणे जिलेबी ही माझी गव्हर्नर आहे. पोटात जागा नसली तरी ती मला अत्यंत प्रिय असल्यामुळे कशीतरी मी माझ्या पोटात जागा केली.''

ज्या वस्तूवर अथवा व्यक्तीवर आपले प्रगाढ प्रेम असते त्या वस्तूसाठी अथवा व्यक्तीसाठी काहीही करायला आपण तयार असतो. लोकांना ईश्वरचिंतन करायला सांगितले तर काहीजण म्हणतात, ''आम्हाला वेळच मिळत नाही'' तर काही म्हणतात, ''आमचे मनच लागत नाही.'' परंतु शरणस्थलातील साधकाचे मन संपूर्ण शिवभावनेने व्यापलेले असते. त्याचे सारे मन परमात्म्याने भरलेले असते. परंतु सामान्य माणसे मात्र आमचे मनच लागत नाही अशी कारणे सांगत बसतात. ईश्वरावर प्रेमच नसेल तर त्याच्या पूजेत, ध्यानात तुमचे मन कसे लागणार? त्यासाठी तुम्हाला वेळ कसा मिळणार? शरणस्थलातील साधक शिवाला आपला पती मानतो. सती जशी सर्वभावाने आपल्या पतीवर प्रेम करतो तसे तो शिवावर करतो. म्हणून त्याचे शिवाशिवाय अन्य कुठल्याही वस्तूवर प्रेम नसते. ईश्वरावाचून जर तो अन्य कोणावर प्रेम करील तर तो व्यभिचार ठरेल. त्याच्या मनात शिवभाव स्थिर झालेला असतो. शिवचिंतन करणाऱ्या सुदृढ भावनेलाच शील म्हटले जाते.

**शीलं शिवैकविज्ञानं शिवध्यानैकतानता।**
**शिवप्राप्तिसमुत्कण्ठा तद्योगी शीलवान् स्मृतः॥१३.३२॥**

तैलधारेप्रमाणे शिवध्यानामध्ये अखंड तल्लीन असणे, शिवप्राप्तीची उत्कट इच्छा असणे हेच शील होय. जिज्ञासा प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी असते. ईश्वराला प्राप्त केले पाहिजे. मिळविले पाहिजे अशी सर्वांची इच्छा असते. परंतु सगळ्यांच्याच इच्छा प्रबळ नसतात. त्या दुर्बल असल्यामुळेच त्यांना शिवाची प्राप्ती होत नाही.

एकदा एक मनुष्य स्वामी विवेकानंदांकडे गेला आणि म्हणाला, ''स्वामीजी, मला ईश्वर दाखवा.'' स्वामीजी हसले. ईश्वर ही काय दाखवण्याची वस्तू नव्हे. खिशातून काढली आणि ठेवली पुढे. हा मनुष्य सामान्य होता पण जिज्ञासू होता. तो सारखा मागे लागला. 'स्वामीजी ईश्वर दाखवा.'

''चल, आपण नदीवर जाऊ या.'' स्वामीजी म्हणाले. ते त्याला नदीवर घेऊन गेले आणि म्हणाले, ''आधी स्नान कर मग तुला ईश्वर दाखवतो.'' स्नान करण्यासाठी तो नदीच्या पाण्यात उतरला. स्वामीजी मागोमाग गेले आणि त्याने पाण्यात डुबकी मारताच स्वामीजींनी त्याचे डोके आपल्या हाताने पाण्यात काहीवेळ दाबून धरले. तो कासावीस झाला. स्वामीजींनी हात काढताच त्याने मान वर काढली व मोठमोठ्याने श्वास घेऊ लागला, तो रागावून स्वामीजींना म्हणाला, ''तुम्ही मला येथे ईश्वर दाखवायला आणले की मारायला आणले?''

स्वामीजी हसले आणि म्हणाले, ''मला एक सांग. जेव्हा मी तुझे डोके पाण्याखाली दाबून धरले होते त्यावेळी तुला कोणत्या गोष्टीची अत्यंत आवश्यकता भासली?''

''हवेची, श्वास घेण्याची.'' तो मनुष्य उत्तरला.

"मग ज्यावेळी तुला श्वासोसारखी ईश्वरभेटीची आत्यंतिक गरज वाटेल त्याचवेळी तुला ईश्वर दिसेल, तोपर्यंत नाही." स्वामीजी म्हणाले.

त्या मनुष्याच्या मनात ईश्वराबद्दल जिज्ञासा होती. परंतु जिज्ञासा म्हणजे उत्कट इच्छा नव्हे. शरणस्थलातील साधकाची उत्कट इच्छा शिवप्राप्तीचीच असते. अन्य कोणतीही नसते. अनेक संतांची, शरणांची चरित्रे तुम्ही वाचली असतील. ती वाचल्यावर हे लक्षात येते की, त्यांच्या जीवनात शिवाशिवाय अन्य कोणाला स्थानच नव्हते.

शिवज्ञानाला उत्तम ज्ञान मानणारा, शिवावाचून अन्य कोणाचेही ध्यान न करणारा आणि शिवप्राप्तीची उत्कट इच्छा बाळगणारा जो पुरुष तोच शीलवान अथवा शीलवंत होय. वीरशैवांची शीलवंत अशी एक पोटशाखा मानली जोते. काही जणांचे आडनाव देखील 'शीलवंत' असे असतेच. मग भलेही त्या शीलवंतात काडीइतकेही शील नसो. त्यांच्या घराण्यात पूर्वी केव्हातरी असे अत्यंत सदाचरणी शीलवंत पुरुष होऊन गेले असावेत. त्यामुळे त्यांचे शीलवंत आडनाव पडले असण्याची शक्यता आहे. शीलवंत ही एक स्थिती आहे, अवस्था आहे. ती कोणीही प्राप्त करून घेऊ शकतो.

**शिवादन्यत्र विज्ञाने वैमुख्यं यस्य सुस्थिरम्।**
**तदासक्तमनोवृत्तिस्तमाहु: शीलभाजनम्।।१३.३३।।**

शिवतत्त्वाला सोडून दुसरे काही जाणण्याची त्याची प्रवृत्तीच नसते. शिवालयात नंदी असतो. त्याचे मुख कायम शंकराकडे असते, तो प्रपंचाकडे बघत नाही. त्याचे सारे लक्ष शिवाकडे असतो. म्हणून शिवाला नंदी अत्यंत प्रिय आहे. त्याच्यावर ते नेहमी आरूढ होतात. मंदिरात जाताना नंदी आपल्याला हेच सांगत असतो की, 'तुम्हाला शिवाकडे जायचे असेल तर माझ्यासारखे जा. तुमच्या सगळ्या मनोवृत्ती शिवाच्या ठिकाणी विलीन करा.' सांसारिक वस्तूंना विमुख होऊन जो केवळ शिवाकडेच आपल्या मनोवृत्ती एकत्रित करतो आणि तिथेच आसक्त राहतो त्याला शीलभाजन असे म्हटले आहे.

**पतिव्रताया यच्छीलं पतिरागात् प्रशस्यते।**
**तथा शिवानुरागेण सुशीलोऽभक्त उच्यते।।१३.३४।।**

पतिव्रतेचे शील तिच्या पतीवरील प्रेमामुळे प्रकट होते. पतीवर प्रेम नसेल तर ती पतिव्रता कसली? तिचे पतीवरील प्रेम जसजसे वृद्धिंगत होत जाते तसतशी तिच्या पातिव्रत्याची शक्ती वाढत जाते. त्याप्रमाणे भक्ताची शिवावर दृढ भक्ती होत गेली की त्याची सुशीलता स्पष्ट होते. तो शिवावर अत्यंत अनुरक्त असतो. तो जे काही करतो ते शिवासाठीच करतो. अन्न शिजवतो ते शिवासाठीच. उद्योग करतो तेही शिवासाठीच. सामान्य व्यवहारात मातापिता जे काही कमावतात ते सारे आपल्या मुलाबाळांसाठी. गुरू जे काही करतो ते आपल्या शिष्यासाठी. त्याप्रमाणे भक्त आपली सारी कर्मे केवळ ईश्वरासाठीच करतो. त्याच्या सर्व व्यवहारापाठीमागे शिवच विद्यमान असतात. तो नवे कपडे आणतो, ईश्वरालाच प्रथम दाखवतो. अन्न शिजवतो तो ईश्वरालाच प्रथम अर्पण करतो. शिवाविषयी अनुरक्ती वाढली की त्याला सुशीलभक्त म्हटले जाते.

**पतिं विना यथा स्त्रीणां सेवान्यस्य तु गर्हणा।**
**शिवं विना तथान्येषां सेवा निन्द्या कृतात्मनाम्।।१३.३५।।**

पतिव्रता जशी केवळ आपल्या पतीचीच सेवा करते त्याप्रमाणे शरणस्थलातील साधक केवळ शिवाचीच सेवा करतो. दुसऱ्या कोणाचीही करत नाही. या ठिकाणी जेव्हा अन्य देवतांचा निषेध केला जातो तेव्हा त्यांची निंदा करण्याचा उद्देश नसतो. आपल्या आराध्यावरील एकनिष्ठा दृढ करण्यासाठी अन्य देवतांचा निषेध केला जातो. पतीशी एकनिष्ठ राहणारी, त्याच्यावर अनुरक्त असलेली पत्नी ही त्याची शोभा असते; त्याप्रमाणे केवळ भगवान शिवाचीच पूजा करणे, त्याचेच चिंतन करणे त्याच्याशिवाय अन्य कोणाकडेही न पाहणे असेच वर्तन एकनिष्ठ भक्ताच्या कडून घडते. शिव हा सर्वव्यापक आहे. साऱ्या देवता त्याचीच रूपे आहेत. परंतु निष्ठा एकाच दिशेने प्रवाहित करण्यासाठी अन्य देवतेकडे पाहून त्याचे चिंतन करू नये असे सांगितले जाते. ईश्वर एक आहे आणि त्याची रूपे अनेक आहेत. त्याच्या एकाच नामरूपावर अनन्यश्रद्धा ठेवली तरच ती फलप्रद होते. त्यासाठीचे येथे पतिव्रतेचे उदाहरण देऊन अनन्यनिष्ठेची माहात्म्य वर्णिले आहे.

**बहुनात्र किमुक्तेन शिवज्ञानैकनिष्ठता।**
**शीलमित्युच्यते सद्भिः शीलवांस्तत्परो मतः।।१३.३६।।**

शीलाविषयी अधिक काय सांगावे? शिवज्ञानावरच जो नितांत निष्ठा ठेवतो त्यालाच सज्जन शीलवान म्हणतात. शिवज्ञानाची प्रत्येकाला नितांत आवश्यकता आहे. ज्या ज्ञानामुळे जीव हा शिव होतो ते शिवज्ञान होय. जीव शिवाला जाणण्याचा प्रयत्न करतो तो प्रत्यक्ष शिवच होतो.

शिवयोग म्हणजे शिवाशी संबंध जोडणे. हा संबंध पूजेमुळे होतो. स्तुतीमुळे होतो, ध्यानामुळे होतो. काया, वाचा आणि मन यांनी जेव्हा शिवाशी संबंध जोडला जातो तेव्हा तो जीव जीव राहत नाही, शिव होऊन जातो. ज्याचे आपण चिंतन करतो तेच आपण होतो. कोणी म्हणेल की घागरीचे चिंतन करता करता काय आम्ही घागर होऊ? म्हशीचे चिंतन करता करता काय आम्ही म्हैस होऊ? होत नाही, असे नाही. जर तुम्ही म्हशीचे सतत चिंतन कराल तर तुमचे मन त्या म्हशीशी तादात्म्य पावेल. म्हशीला कुणी मारले तर तुम्हाला दुःख होईल आणि तुम्ही गप्प बसणार नाही. ममत्व अधिक वाढले तर मनुष्य म्हशीला 'माझी म्हैस' असे समजता समजता तिला स्वतःचा आत्मा मानू लागतो. विद्यारण्य स्वामींनी याविषयी एक सुरेख उदाहरण दिलेले आहे.

एका स्त्रीने एक म्हैस पाळली होती. तिला चारा आणणे, तिला आंघोळ घालणे, तिचे दूध काढणे अशी सर्व कामे तीच करीत असे. एके दिवशी नवऱ्याशी भांडण झाल्यामुळे ती रागारागाने घर सोडून एका मठात जाऊन बसली. तिथेच राहू लागली. मठात रोज गुरुजींचे प्रवचन होत असे. ते प्रवचन ऐकायला ती बसत असे. पण तिचे त्याच्यात मन लागत नसे. विषय पंचीकरणाचा होता. देहातील सर्व तत्त्वांचे विभाजन करून पंचीकरणात सांगितले जाते. गुरुजींचे प्रवचन सगळ्यांना समजत होते. परंतु तिला मात्र समजत नव्हते. ही गोष्ट गुरुजींच्या लक्षात आली. त्यांनी दोन-तीन दिवस तिची ही अवस्था पाहिली आणि मग तिला विचारले, ''बाई, मी रोज पाहतो आहे माझे प्रवचन ऐकायला येतेस खरी, पण माझ्या प्रवचनात तुझे लक्ष नसते, याकडे माझे लक्ष गेले आहे. तुला कोणती चिंता आहे? तू कसला विचार करीत असतेस?''

''गुरुजी'' ती बाई म्हणाली, ''तुम्ही म्हणता ते खरे आहे. मी रागाने घर सोडून आले आहे आणि माझा सारा जीव माझ्या म्हशीत गुंतला आहे. तिला वेळेवर कोणी चारा दिला असेल का? तिला पाणी पाजले असेल का? तिचे दूध काढले असेल का? अशाच प्रश्नांचा मी विचार करीत बसते. तुमच्या प्रवचनातले मला काहीच कळत नाही. उलट तुमचा आवाजच मला माझ्या म्हशीसारखा वाटतो.''

गुरुजींनी ओळखले की, या बाईला मनुष्यदेहाचे पंचीकरण सांगण्यात काही अर्थ नाही. तिला म्हशीच्या देहाचेच पंचीकरण सांगितले पाहिजे. त्याप्रमाणे गुरुजींनी तिला म्हशीच्या शरीरातील तत्त्वांचे विभाजन करून म्हशीच्या देहाचे पंचीकरण समजावून सांगितले.

याप्रमाणे एखाद्या पदार्थाविषयी अथवा प्राण्याविषयी माणसाच्या मनात तादात्म्य भावना निर्माण होते आणि त्या वस्तूला वा प्राण्याला तो जीव की प्राण समजू लागतो. सामान्य व्यवहारात हे घडते, त्याचप्रमाणे आध्यात्मिक व्यवहारात देखील हे घडते. भगवान शिवावर नितांत निष्ठा ठेवणारा शरणस्थलातील साधक जेव्हा त्याचे चिंतन करतो तेव्हा तो स्वत:च शिव होतो.

**शिवात्मबोधैकरत: स्थिराशय:**
**शिवं प्रपन्नो जगतामधीशम्।**
**शिवकैनिष्ठाहितशीलभूषण:**
**शिवैक्यवानेष हि कथ्यते बुधै:।।१३.३७।।**

लिंगागंज्ञानातच एकनिष्ठ असलेला, जगताचा अधीश असलेल्या भगवान शिवाला शरण गेलेला, स्थिर भावयुक्त असा, शिवाला पती आणि स्वत:ला सती मानणारा, शिवाच्या ठिकाणी एकनिष्ठारूपी शीलाचे अलंकार धारण केलेला शरणच पुढे ऐक्यस्थलात प्रवेश करतो.

या ठिकाणी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील शरणस्थल या अंग-षट्स्थलांतील पाचव्या स्थलाचे निरूपण पूर्ण झाले. ही उच्चतर अशी आध्यात्मिक अवस्था आहे. शरणस्थलाचा टप्पा पार केला की साधक ऐक्यस्थलात प्रवेश करतो. अर्थात् शिवाशी एकरूप होतो. हाच क्षण पकडण्यासाठी जन्मजन्मांतरांपासून आपण अखंड धावत आहोत. तुम्हा-आम्हा सगळ्यांचे हे धावणे थांबून, त्या विराट शांतरूपात आपण विलीन व्हावे आणि त्याच्या अस्तित्वातच मिळून जावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन आणि शरणस्थलावरील निरूपण पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडीमठ, वाराणसी
२४ एप्रिल १९९२



# भाग ६ : अंगषट्स्थलांतर्गत ऐक्यस्थल

**आशीर्वचन पहिले**

## ऐक्यस्थल–१

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।
विश्ववंद्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगदगुरुम।।

श्रीकाशीज्ञानसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे तिला अनंत प्रणिपात समर्पित करून या सत्संगात उपस्थित असलेल्या जिज्ञासू सद्भक्तांनो आणि मातांनो,

**तामसत्यागसंबंधान्निर्देशाच्छीलतस्तथा।**
**शरणाख्यस्य भूयोऽस्य कथमैक्यनिरूपणम्।।**
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.१)

'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या चौदाव्या अध्यायात ऐक्यस्थलाचा प्रारंभ होतो. श्रोत्याने प्रश्न विचारला नाही तर वक्त्याला काही सांगावेसे वाटणार नाही. ग्रंथ समाप्त होईल. परंतु येथे ज. रेणुकाचा यांनी शरणस्थलाचे विवेचन संपवल्यानंतर महर्षी अगस्त्यांनी पुढे विचारले की, शरणस्थलातील साधक पुढे ऐक्यस्थलात कसा प्रवेश करतो? शरण ऐक्य कसा होतो? या महर्षी अगस्त्यांच्या प्रश्नाचे उत्तर ज. रेणुकाचार्यांनी दिले–

**प्राणलिंगादियोगेने सुखातिशयमेयिवान्।**
**शरणाख्य: शिवेनैक्यभावनादैक्यवान् भवेत्।।१४.२।।**

शरणस्थलातील साधक प्राणलिंगाची उपासना करीत असतो. प्राणलिंगाविषयी आपण सारे जाणताच. प्रत्येक मनुष्याच्या हृदयात एक ज्योतिर्लिंग विद्यमान आहे, त्यालाच वीरशैवाचार्यांनी 'प्राणलिंग' असे संबोधले आहे. प्राणलिंगाची आराधना करणारा साधक शेवटी प्राणलिंगातच समरस होतो. या सामरस्यालाच 'ऐक्य' असे म्हटले जाते. 'ऐक्य' याचा अर्थ कोणता? तर 'एकस्य भाव: ऐक्यम्।' सारे भेदभाव सरणे हेच ऐक्य होय.

आपण भगवंताशी ऐक्य होण्याची इच्छा का बरे बाळगतो? भगवंताला वेगळे ठेवून त्याची पूजा बांधणे चांले की भगवंताशी समरस होणे चांगले? या दोन गोष्टींचा विचार येथे केला पाहिजे. आपल्याला तर भगवंताला वेगळे ठेवून त्याची पूजा करण्यात आनंद वाटतो. तो महान आहे, आपण लहान आहोत, तो अनुग्रह करणारा आहे, आपण अनुग्रह घेणारे आहोत मग आपण भगवंताची बरोबरी कशी करू शकतो? या भावनेने लोक भगवंताची पूजा करतात. शास्त्र म्हणते की तुम्ही कुठवर भगवंताची पूजा कराल? आयुष्यभर त्याची पूजा करून जर तुम्ही भक्तच राहाल तर त्याच्या पूजेचे प्रयोजनच काय? भगवंताच्या उपासनेने आपण लौकिक वस्तू संपादन करू

शकतो, परंतु त्या वस्तूसोबत आपण आयुष्य कंठू शकत नाही. समजा, ईश्वरी कृपेने तुम्हाला अपार संपत्ती मिळाली तर तिचा उपभोग तुम्ही किती काळ घ्याल? फार तर शंभर वर्षे. शंभर वर्षांपेक्षा अधिक जगण्याची शक्यता कमी. एखादा मनुष्यच शंभर वर्षे जगतो. इतरांची शंभरी आधीच भरते. म्हणून फार फार तर शंभर वर्षे तुम्ही संपत्ती भोगू शकाल. आयुष्य संपल्यावर संपत्ती सोडून निमूटपणे जावेच लागते.

जिचा वारंवार वियोग होतो अशी संपत्ती आपण कित्येक वेळा मिळवली आणि गमावली. जन्मजन्मांतरापासून हाच उद्योग आपण करीत आलो आहोत. म्हणून एकदा अशी संपत्ती मिळवावी की जी मिळवल्यावर कोणी आपल्यापासून ती हिरावून घेऊ शकणार नाही. अशी संपत्ती कोणती? तर ती आहे समरससंपत्ती. तिलाच ऐक्यसंपत्ती अशीही संज्ञा आहे. जोपर्यंत तुम्ही ईश्वरापासून भिन्न राहाल तोपर्यंत तुम्हाला मृत्युभय आहे. शास्त्रात म्हटले आहे- 'द्वितीयाद् वै भयं भवति।'.

प्रत्येकजण क्षणोक्षणी भयभीत होत असतो. उद्या काय होईल? परवा काय होईल? आज ठीक आहे, पुढे कसे? बालपण ठीक, तारुण्य ठीक, पण म्हातारपणी काय? अशी चिंता प्रत्येकाला लागलेली असते. म्हणून 'वृद्धस्तावत् चिंतामग्नः।' असे म्हणतात. प्रत्येकजण कोणत्या ना कोणत्या चिंतेत बुडालेला असतो. चिंतित असतो, भयभीत असतो. ही भय-चिंता कुठपर्यंत राहील? जोपर्यंत भगवंतापासून आपण भिन्न राहू तोपर्यंत.

जेथे दोन आहेत तेथे भय उत्पन्न होते. पहिल्यांदा दोघे मित्रच असतात. नंतर कट्टर शत्रू होतात. प्रपंचातील जीवमात्रांतली मैत्री केव्हातरी शत्रुत्वात परिवर्तित होते. दोघेही ज्ञानी असतील तर असे घडणार नाही. परंतु जगात अज्ञानीच अधिक आहेत, स्वार्थी लोक अधिक आहेत. आपल्या स्वार्थासाठी अज्ञानाने दोन मित्र कुठल्या तरी प्रसंगाने बिथरतात. तेव्हा दोघांना एकमेकांची भीती वाटू लागते. आपण याला मित्र म्हणून सारे सांगितले आहे, याच्यापुढे अंतरंग खुले केले आहे, हा आपल्याला धोका देईल की काय? अशी चिंता वाटू लागते.

प्रपंचातील द्वैत असे भय उत्पन्न करते. मनुष्याला निर्भय व्हायचे असेल, भयापासून मुक्त व्हायचे असेल तर द्वैत सोडायला हवे. अद्वैत स्वीकारायला हवे. अद्वैत कोणासोबत होते? जीवजीवांत पूर्णरूपाने अद्वैत होत नाही. विवाहसंस्कारात आपण दोन व्यक्तींना एकत्र आणतो आणि त्यांना एकमेकांशी बांधून टाकतो. दोन देहांना एकत्र आणून दोन जीवांना समरस करणारा विवाह हा एक संस्कार आहे. विवाहानंतर सारेच खऱ्या अर्थाने समरस होऊ शकत नाहीत, परंतु काहीजण होतात. तरीही त्यांच्यात मतभेद होण्याची शक्यता असतेच. जीवात जीव समरस करण्याचा हा प्रयत्न सफल झाला नाही. एका जीवाचे दुसऱ्या जीवाशी लग्न लावून देखील जर ते समरस होत नसतील तर प्रयत्न व्यर्थ आहे, असे आमच्या आचार्यांना वाटले. म्हणून त्यांनी जीवाचे जीवाशी नव्हे, तर जीवांचे शिवाशी लग्न लावण्याचा मार्ग शोधला.

जीव शिवाशी जोडला जातो. शिव हे व्यापक तत्त्व आणि जीव हे अल्पतत्त्व आहे. दोन अल्पतत्त्वे एकत्र येऊन समरस होऊ शकत नाहीत, ती भांडत बसतात. परंतु एक महानतत्त्व अनेक क्षुद्र तत्त्वांना आपल्यात सामावून घेते, समरस करून घेते. जीव जीवाशी समरस होत नाही, परंतु जीव शिवाशी समरस होऊ शकतो. कारण सर्व जीव हे शिवाचाच अंश आहेत. जीवाची अंतिम गती शिव हीच आहे. समुद्रातील पाण्याची वाफ होऊन ते मेघ बनते, मेघच पुढे पावसाच्या रूपाने पाणी होतो आणि ते पाणी नदीनाल्यांतून वाहत कोठे जाते? तर समुद्रातच.

**नामरूपे विहाय नद्यः समुद्रे अस्तं गच्छन्ति**

समुद्राचेच पाणी मेघ होऊन जेव्हा पाऊस होऊन जमिनीवर बरसते तेव्हा त्याची नावे वेगवेगळी होतात. एका जलस्रोताला 'गंगा' म्हटले जाते, दुसऱ्याला 'यमुना'. कृष्णा, भीमा, मलप्रभा इत्यादी भिन्न भिन्न नावांनी तेच पाणी वाहत असते. परंतु विविध जलस्रोत जेव्हा सागरात विलीन होतात तेव्हा तेथे गंगा सापडत नाही, यमुना सापडत नाही, ना कृष्णा, भीमा, मलप्रभा सापडत! त्यांची नावे हरवून जातात आणि रूपे विरून जातात. नदीचे पाणी कितीही गोड असले तरी ते समुद्रात मिसळले की त्याची चव समुद्राच्या पाण्यासारखीच होते. त्यात थोडीही गोडी शिल्लक राहत नाही. समुद्र हा जलनिधी आहे. जलाचा अपरंपार संग्रह म्हणजे समुद्र. समुद्राचेच पाणी समुद्रापासून वेगळे झाले की भिन्न नामरूप धारण करते आणि त्याच्याशी एकरूप झाले की भिन्नत्व–नामरूप विरून जाते.

समुद्रापासून वेगळे झालेले पाणी सतत अस्वस्थ असते. मेघाकडे पाहा. ते इकडून तिकडे धावत असतात. समाधानी नसतात. त्यांचे पावसात रूपांतर झाले तरी जमिनीवर पडलेले पाणी स्थिर नसते, ते धावतच असते. पाणी अडवायला तुम्ही मोठमोठे बांध घालता. ते त्याच्यावरून उडी घेऊन समुद्राकडे धावत निघतेच. समुद्रात विलीन झाल्यावरच त्याची गती थांबते, अवरुद्ध होते. तसे जीवात्मा कधीच समाधानी नसतो. घरात बसून कंटाळा आला की मनुष्य घराबाहेर फिरायला जातो. काहीजण गावातच फिरतात, गावातली प्रेक्षणीय स्थळे पाहतात. तर काहीजण दुसऱ्या गावात, तीर्थक्षेत्रांना भेटी देतात, देशपर्यटन करतात. स्थलांतर केल्यावर तुम्हाला थोडेसे समाधान नक्की मिळेल. परंतु पूर्ण समाधान मात्र लाभणार नाही.

जवळ धन नसलेला मनुष्य दुःखी असतो. म्हणून हर प्रयत्नाने तो धन मिळवतो, सधन होतो. त्या धनी माणसाला विचारा की, ''बाबा, तू आता सुखी आहेस का?'' तर तो म्हणेल की, ''पूर्वीच अधिक सुखी होतो. आता अधिक दुःखी आहे.'' लौकिक वस्तूंचा संग्रह केल्याने मनुष्य सुखी होतो हे खरे नाही. सुषुप्ति–अवस्थेत माणसाजवळ काहीच नसते, तरी तो त्यावेळी अत्यंत सुखी असतो त्यावेळी त्याला धनाचा, अधिकाराचा, विद्येचा, सौंदर्याचा कोणताही अभिमान नसतो, तो सारे काही विसरत असतो. सुषुप्ति–अवस्थेत तो जेवढा सुखी असतो तेवढा तो कोणत्याच वेळी नसतो. लौकिक जीवनात कितीही प्रगती झाली तरी मनुष्य पूर्ण समाधानी नसतो. कारण तो जेथे पोहोचला ते त्याचे मूलस्थान नसते. मूलस्थानी पोहोचल्यावरच मनुष्याला पूर्ण समाधान मिळू शकते.

यात्रेच्या निमित्ताने तुम्ही बाहेरगावी जाता, मोठमोठ्या हॉटेलमध्ये मुक्काम करता. ते हॉटेल, त्यामधील खोली तुमच्या घरापेक्षाही सुसज्ज आणि सुंदर असते. तेथे राहताना थोडे समाधान मिळते. परंतु घराच्या ओढीने तुम्ही अस्वस्थ होता. कोणत्याही सुसज्ज हॉटेलापेक्षा, सुंदर शहरापेक्षा तुम्हाला तुमचे घर अधिक प्रिय असते. स्वतःच्या घरी तुम्हाला जी शांती, जे समाधान मिळते ते इतर कोठेही मिळू शकत नाही. त्याप्रमाणे जीवात्म्यानेही शांतीचा, समाधानाचा शोध घेतला, परंतु त्याला ते मिळाले नाही. तो जेव्हा आपल्या मूलस्थानाशी–शिवाशी समरस होतो तेव्हाच त्याला शांती प्राप्त होते. शिवाला आपल्यापेक्षा भिन्न मानून त्याची पूजा करण्यात जे सुख मिळते त्यापेक्षा त्याच्याशी समरस होण्यात अवर्णनीय सुख मिळते. यासाठीच आपल्या आचार्यांनी ऐक्यस्थलाचा उपदेश केलेला आहे. या सामरस्यालाच ऐक्यस्थल म्हणतात.

ऐक्यस्थलात चार अवांतरस्थले आहेत. ऐक्यस्थल, आचारसंपत्तिस्थल, एकभाजनस्थल आणि सहभोजनस्थल. ही अत्यंत महत्त्वाची स्थले होत. आपण आता पहिल्या ऐक्यस्थलाचा विचार करणार आहोत.

**विषयानंदकणिकानि:स्पृहो निर्मलाशय:।**
**शिवानन्दमहासिंधुमज्जनादैक्यमुच्यते।।१४.४।।**

प्रत्येक स्थलात प्रवेश करायला अधिकार लागतो. ज्याची जशी योग्यता त्याला तसे स्थल लाभते. ऐक्यस्थलाचा अधिकारी कोण? त्याची योग्यता कोणती? तेच या ठिकाणी सांगितले आहे. पहिली योग्यता आहे विषयभोगात विरक्ती. सुख विषयांत आहे आणि परमात्म्यात देखील आहे. प्रत्येक जीवात्म्याला सुखाची अपेक्षा असते. सुखासाठी तो धर्म पाळतो, सुखासाठी तो धनसंग्रह करतो, सुखासाठी तो कामाचा उपभोग घेतो आणि सुखासाठीच तो मोक्षसाधन देखील करतो. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत. ते जीवात्म्याला सुख देतात. परंतु तीन पुरुषार्थांकडून मिळणारे सुख शाश्वत नाही. म्हणून मोक्षाला परमपुरुषार्थ म्हटले जाते.

सुखाच्या अभिलाषेपोटी जीवात्मा प्रथम विषयांशी संबंध जोडतो. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच प्रकारचे विषय आहेत. या पंचविषयांपासून मनुष्याला सुख मिळते. परंतु सुखाबरोबरच दुःख देण्याचे सामर्थ्य देखील पंचविषयात असते. विषय आपल्याला सुख देतातच, परंतु सुखाबरोबर दुःख देखील देतात. निजगुणशिवयोगींनी कन्नडमध्ये म्हटले आहे–

**बेड बेड भोगदोडनाट नंजुव्यरसिद सवियूट.**

विष मिसळलेले पक्वान्न खाताना आपल्याला आनंद होतो. दुधाची खीर बनवलेली आहे. त्यात सारा मसाला घातलेला आहे. त्यासोबतच त्यात तीव्र जहरदेखील मिसळले आहे. खीर खाताना तुम्हाला गोड लागेल. त्यातील विष जाणवणार देखील नाही. परंतु पोटात शिरलेले विष आपले कार्य केल्याशिवाय राहणार नाही. त्याप्रमाणे विषयात सुख आहेच, परंतु त्यात दुःख देणारे विषदेखील मिसळले आहे. विषयपभोग घेणाऱ्या मनुष्याचा प्रवास मृत्यूकडेच होत असतो.

मनुष्याचे मन विषयलोलुप असते. एखादे माकड जसे या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारत जाते, एके ठिकाणी स्थिर राहत नाही तसे मन चंचल असते. या फांदीवरचे एक फळ थोडे खावे, मग त्या फांदीवरचे एक फळ थोडे खावे, एक फळ पूर्ण कधी खाऊ नये अशी माकडाची प्रवृत्ती असते. त्याप्रमाणे माणसाचे मनदेखील या विषयाचा थोडा भोग घेते. मग त्या विषयाचा थोडा भोग घेते. असे निरंतर विषयामागे धावत असते. मनुष्याचे मन म्हणजे माकड. मनुष्यदेह हा वृक्ष. या वृक्षाला पाच ज्ञानेंद्रिये अशा पाच फांद्या असून त्यावर एकेक विषय म्हणजे एकेक लागलेले फळ. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ही फळे होत. या फळांचे मनरूपी माकड भक्षण करीत असते, असे एक रूपक षण्मुखस्वामी या कन्नड संतकवीने रचले आहे.

मग कोणी म्हणेल की, मनाला विषयरूपी फळे खाऊ द्या. त्याला रोखायचे कशासाठी? विषयसेवन करताना मनाची प्रवृत्ती 'भवा'कडे होत असते, 'शिवा'कडे होत नाही. भव म्हणजे जन्ममृत्यूचे चक्र. विषयभोगी मनुष्य या चक्रातच निरंतर भरडला जातो. 'पुनरपि जननं पुनरपि मरणं। पुनरपि जननिजठरेशयनम्' या संसारचक्रात त्याला वारंवार भ्रमण करावे लागते. म्हणून विषयांत आनंद आहे आणि परमात्म्यातला आनंद शाश्वत आहे, असीम आहे. त्याच्या प्राप्तीसाठी विषयांतील लेशमात्र क्षुद्र आनंदाचा त्याग करायला हवा. इंद्रिये कशी आहेत? तर ग्रहासारखी छांदोग्योपनिषदात त्यांना 'ग्रह' असे म्हटले आहे. जे ग्रहण करतात ते ग्रह. आपले नेत्रेंद्रिय रूपाचे ग्रहण करते, श्रवणेंद्रिय शब्दाचे, त्वगेंद्रिय स्पर्शांचे. रसनेंद्रय रसाचे तर घ्राणेंद्रिय गंधाचे ग्रहण करतात. म्हणून ज्ञानेंद्रिये 'ग्रह' होत.

ज्ञानेंद्रिये ग्रह तर विषय 'अतिग्रह' आहेत. विषयांचे सेवन करण्यासाठी ज्ञानेंद्रिये धावत सुटतात. म्हणून इंद्रियांपेक्षाही विषय अधिक बलवान आहेत. नेत्रेंद्रियापेक्षा रूप अधिक सामर्थ्यशाली आहे. कारण रूप पाहून पाहून नेत्रातील तेज सरत जाते. मग तुम्ही चष्मा घालता. त्यातही नंबर वाढत जातो. पुढे पुढे तर चष्मा घालूनही काही उपयोग होत नाही. नेत्रातले तेज कायमचे हरवते. तरी रूप पाहण्याची इच्छा सरत नाही. ज्याला जन्मत: डोळे नाहीत अशा जन्मांधालाही पाहावेसे वाटते मग ज्याने रूप पाहिले, सृष्टी पाहिली अशा वयामुळे अंधत्व आलेल्या मनुष्याला कसे बरे पाहावेसे वाटणार नाही? पाहून पाहून नेत्रेंद्रिय 'रूपा'ला खाऊ पाहते. परंतु घडते उलटेच. रूपच नेत्रेंद्रियाला खाऊन टाकते. त्याची शक्ती क्षीण करते.

विषयांचा भोग घेण्याचा आपला प्रयत्न असतो. परंतु घडते ते याच्या उलट. ऐकून ऐकून श्रवणेंद्रिय बधीर होते. मग कानाला आपण श्रवणयंत्र बसवतो. याप्रमाणे इतर इंद्रियेदेखील विषयभोग घेऊन थकतात. आपली शक्ती गमावतात. विषयभोग घेणाऱ्या इंद्रियांनाच विषय क्षीण करून टाकतात.

**भोगा न भुक्ता वयमेव भुक्ता:।**

विषयभोग घेऊ पाहणाऱ्या इंद्रियाचाच विषय उपभोग घेतात. काल गेला असे आपण म्हणतो. तो जात नाही तर आपणच जगातून जातो. कालचक्रात किती लोक निघून गेले. काल तर तसाच आहे. तप करताना आपणच तप्त झालो. तृष्णा जीर्ण झाली नाही, आपणच जीर्ण झालो. विषयोपभोग घेणाऱ्या मनुष्याची अशी स्थिती आहे. मग विषयभोग घेऊच नये की काय? असे कोणी विचारील त्याचे उत्तर असे की, तारुण्यात अवश्य घ्यावेत. वंशवृद्धीकरिता, सृष्टिसातत्यासाठी त्याची गरज असते. परंतु त्यानंतर वानप्रस्थ-आश्रम येतो. आज वानप्रस्थाश्रम आणि संन्यासाश्रम हे दोन्ही आश्रम लोप पावले आहेत. ब्रह्मचर्य आणि गृहस्थ हे दोनच आश्रम शिल्लक राहिले आहेत. मनुष्याने एकदा गृहस्थाश्रमात प्रवेश केला की तो मरेपर्यंत गृहस्थच राहतो.

'गृहे तिष्ठतीति गृहस्थ:' हा गृहस्थ शब्दाचा अर्थ आहे. जो सदैव गृहात राहतो तो गृहस्थ. परंतु केवळ एवढाच गृहस्थ शब्दाचा अर्थ नाही. तुमच्या मनात जर 'घरा'ने कायमचे घर केले असेल तर तुम्ही गृहस्थ आहात. घरात राहून देखील जर तुमच्या मनात 'घर' नसेल तर तुम्ही वानप्रस्थ आहात असे समजा. तुम्ही संन्यासी देखील होऊ शकता. म्हणून 'निवृत्त रागस्य गृहं तपोवनम्' असे म्हटले आहे. अरण्याला आपण तपोवन म्हणतो. पण आपले घरदेखील तपोवन होऊ शकते. सांसारिक राग (आसक्ती) जर तुमच्या मनात नसेल तर तुमचे घर तपोवनच होय.

वानप्रस्थ होण्यासाठी तुम्हाला अरण्यात जायची गरज नाही. आता जायचे ठरवले तरी अरण्ये कुठे उरली आहेत? जेथे अरण्य होते तेथे माणसाने घरे बांधली आहेत. म्हणून घर सोडून जाण्याची इच्छा करू नका. घरातच राहा. पण मनात घराला राहू देऊ नका. स्पृहा म्हणजे इच्छा. इच्छा मनात असते. मनामुळेच तर जीवात्मा संसारी होतो आणि मनामुळेच तो मुक्त होतो. विषयानंदात मन आसक्त होते तेव्हा जीव संसारी असतो आणि विषयानंदापासून मन दूर जाते तेव्हा जीव मुक्त होतो.

विषयात आनंद कोठून येतो? त्या आनंदस्वरूप परमात्म्यापासूनच थोडा आनंदलेश घेऊन विषय आनंदरूप होतात. वास्तविक विषयांत आनंद नाही. विषयांतील आनंद हा परमात्म्याच्या ठिकाणी असलेल्या आनंदाचाच अंश होय. तुम्ही घरात लाडू बनवता. बेसनाचे. त्यात साखर किंवा गूळ घालता. लाडू खाताना म्हणता 'व्वा, लाडू किती गोड आहे!' गोडी लाडवाची नसते. ती असते त्यातल्या साखरेची, गुळाची! लाडवातले बेसन गोड नसते. त्याप्रमाणे विषयांतले सुख हे परमानंदाचा अंशमात्र असते.

परंतु विषय हे दुःखद देखील असतात. ज्या व्यक्तीला पाहून तुम्हाला आधी आनंद होत असे त्या व्यक्तीला पाहताच नंतर तुमच्या मनात द्वेष उत्पन्न होतो, उद्वेग होतो. जिचे शब्द ऐकायला तुमचे शब्द कान उत्सुक होते तिचेच शब्द ऐकणे कालांतराने तुम्ही पसंत करीत नाही. जिचा चेहरा पाहायला तुम्ही तळमळत होता त्या व्यक्तीविषयीच 'तिचे तोंडदेखील मला पहायचे नाही' असे तुम्ही म्हणता. असे का बरे घडते? विषय केवळ आनंदच देत नाहीत, ते दुःख देखील देतात. म्हणून विषयांतील सुख आभासमात्र आहे. विषय अनुकूल असेल तर सुखद आणि प्रतिकूल असेल तर दुःखद भासतात.

विषय प्रारंभी अनुकूल वाटतात. म्हणून ते सुख देतात. परंतु हळूहळू ते प्रतिकूल होतात. तेव्हा दुःख देऊ लागतात. हिवाळ्यात तुम्ही स्वेटर घालता. उबदार शाल अंगावर घेता. कांबळे पांघरता. त्यामुळे तुम्हाला उब मिळते आणि स्वेटर, शाल, कांबळे तुम्हाला सुखदायक वाटतात. परंतु हेच कपडे तुम्हाला उन्हाळ्यात दिले तर ते घालाल? नाही. कारण उन्हाळ्यात हे उबदार कपडे तुम्हाला दुःख देतात. जे हिवाळ्यात प्रिय वाटतात ते उन्हाळ्यात नकोसे वाटतात. जे कपडे तुम्हाला सुख देत होते तेच तुम्हाला दुःखही देतात. मग सुखदुःख आहे कोठे? ते उबदार कपड्यात नाही. तुम्ही जेव्हा अनुकूल मानता, तेव्हा सुख होते. हिवाळ्याच्या दिवसात थंडी वाजून अनुकूल मानता तेव्हा सुख होते. हिवाळ्याच्या दिवसात थंडी वाजून आली की माणूस गरम शाल, कांबळे पांघरून झोपतो. अंगाला घाम सुटतो. तरीही कांबळे पांघरल्यामुळे शरीराला सुख मिळते. म्हणून विषय अनुकूल तर सुख आणि प्रतिकूल तर दुःख.

अनुकूल होणे आणि प्रतिकूल होणे हा विषयांचा स्वभाव आहे. परमात्मा मात्र सदैव अनुकूल असतो. कधीही प्रतिकूल नसतो. परमात्मा मिळवायचा असेल तर थोडा त्याग करायला हवा. अल्प सुखाचा त्याग केल्याशिवाय महान सुखाची प्राप्ती होत नाही. जो विषयसुखाचा त्याग करतो त्यालाच पारमार्थिक सुख प्राप्त होते. तुम्ही एका तासासाठी जर घराचा त्याग करणार नाही तर तुम्हाला आशीर्वचनाचा लाभ कसा होईल? इतक्या सकाळी इतक्या दूर कशाला जायचे? असा विचार करून तुम्ही घरातच बसाल तर फार तर चहाचा स्वाद मिळेल. कोणाची निंदा करण्याची अथवा ऐकण्याची वेळ येईल. घरातल्या कटकटींना तोंड द्यावे लागेल. घरात कटकटीशिवाय दुसरे काय असते? परंतु या शिवानुभव मंगल भवनात आलात तर? तर येथे शिवाचा मंगल अनुभव येईल. येथे शिवानुभव मिळेल. भवानुभव मिळणार नाही. घरात भव आहे तर येथे शिव आहे. या शिवानुभवासाठी तुम्हाला तासभर घराचा त्याग करावा लागतो.

शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या विषयांपासून तुम्ही थोडे निवृत्त व्हाल, थोडा वेळ प्रपंचाकडे दुर्लक्ष करून भगवंताकडे लक्ष द्याल, अन्य शब्द ऐकण्याऐवजी भगवन्नाम ऐकाल, अन्य वाग्व्यवहार करण्याऐवजी आपल्या इष्टलिंगाला स्पर्श कराल, थोडा वेळ अन्य काही पदार्थ पेय सेवन करण्याऐवजी भगवंताचा तीर्थप्रसाद सेवन करण्यात काळ व्यतीत कराल तर निश्चित तुम्हाला शिवानुभव येईल. थोड्या संसारत्यागानेच मनुष्याला महान लाभ होतो.

त्यागात अत्यंत सामर्थ्य असते. त्यागानेच शांतीचा लाभ होतो. म्हणून क्षणकाल सुख देणाऱ्या विषयांचा त्याग करायला हवा. हा त्याग एकदम होणार नाही. दिवसभरात एक तास, दोन तास विषयांपासून मुक्त व्हायला शिकले पाहिजे. विषयांचा त्याग घडला की आपले मन अत्यंत निर्मल होते. सांसारिक विषयांचे चिंतन करून आपले मन अत्यंत मलिन झाले आहे. कारण प्रपंच आणि विषय मलिन आहेत. मलिन विषयाच्या चिंतनाने मन देखील मलिन होते. परंतु परमात्मा निर्मल आहे. तो निर्दोष आहे. त्या अनादिमुक्त, निर्मल परशिवाचे चिंतन केल्यावर आपले मन देखील निर्मल होते.

आपल्या मनात अनेक मल आहेत. केरकचऱ्याने भरलेले जसे घरच. ते घर आपण झाडून स्वच्छ करतो तसे मन देखील स्वच्छ करायला हवे. शिवध्यान, शिवचिंतन, जप, सत्संग ही मन स्वच्छ, शुद्ध करणारी साधनेच होत. एक तासभर येथे येऊन तुम्ही सत्संग केला तरी तुमचे मन निर्मल होते. विषयसुखात नि:स्पृह होऊन तो अत्यंत निर्मलमनस्क होतो. तो शिवानंदरूपी महासागरात सदैव डुंबत असतो. विषयांतील आनंद एक कणमात्र आहे तर शिवानंद हा महासागर आहे. बिंदूचा त्याग केल्यावर सिंधू मिळत असेल तर बिंदूचा त्याग का करू नये? परंतु हा त्याग करायला अपार धैर्य हवे. शिवानंद-सागरात अखंड डुंबणे हेच ऐक्यस्थल होय. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर १३ जुलै १९९२

---

**आशीर्वचन दुसरे**

## ऐक्यस्थल-२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

**निर्धूतमलसंबंधो निष्कलंकमनोगत:।**
**शिवोऽहमिति भावेन निरूढो हि शिवैक्याताम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.५)

प्रत्येक साधकाने 'मी शिव आहे' अशी भावना केली पाहिजे. भावनेशिवाय आध्यात्मिक प्रगती होत नाही. मी शिव आहे ही भावना सर्वश्रेष्ठ भावना होय. या भावनेने युक्त असलेला साधक शिवाशी समरस होतो. प्रत्येक जीवात्मा हा मलिन म्हणजे मलयुक्त असतो. आणवमल, मायामल आणि कार्मिकमल असे तीन मल शास्त्रात सांगितले आहेत. स्वत:ला लहान समजणे हाच आणवमल होय. प्रत्येक जीवात्मा शिवच असल्यामुळे मुळात व्यापक आहे. तरीही तो स्वत:ला लहान समजतो. या मलामुळेच मनुष्य स्वार्थी होतो. स्वत:ला इतरांपासून वेगळा मानतो. इतरांचा हेवा करू लागतो. आपण व्यापक आत्मा आहोत हे ज्ञानच त्याला नाही.

आकाश व्यापक आहे. परंतु घरात ते घराएवढे चौकोनी होते, घटात ते घटासारखे गोलाकार, छोटे होते. घरातील आकाश, घटातील आकाश हे वस्तुत: विराट महाकाश आहे. परंतु घर आणि घट यांतील आकाश स्वत:ला लहान समजते. त्याप्रमाणे जीवात्मा व्यापक शिवस्वरूप असून देखील स्वत:ला लहान, क्षुद्र समजतो. हे घडते आणवमलामुळे. स्वत:चे शिवस्वरूप विसरून स्वत:ला जीव मानणे हाच आणवमल होय. मनुष्य जेव्हा 'शिवोऽहम्' मी शिव आहे असे चिंतन करू लागतो तेव्हा हळूहळू त्याचा आणवमल नष्ट होऊ लागतो. 'निष्कलंकमनोगत:' म्हणजे मनात कुठलाही कलंक नसलेला, राग-द्वेष-अभिनिवेश इत्यादी मनातील कलंक होत. पांढऱ्या शुभ्र कपड्यावर एखादा लहानसा डागदेखील ठळकपणे उमटून दिसतो. असे अनेकानेक डाग जर पांढऱ्या वस्त्रावर पडले तर त्याची शुभ्रता पार हरवून जाते. आपले मन प्रारंभी असेच स्वच्छ होते. परंतु त्यावर मल साठून साठून ते इतके मलिन झाले आहे की, त्याचे मूळरूप हरवून गेले. सारे मल हटवून निष्कलंक होऊन

मी शिवस्वरूपच आहे या भावनेने चिंतन करणारा शरणच शिवाशी ऐक्य होतो. कीटक भ्रमराचे चिंतन करून अखेर भ्रमरच होतो त्याप्रमाणे जीव शिवाचे अखंड चिंतन करून शिवस्वरूप होतो.

मनुष्य ज्या वस्तूचे चिंतन करतो त्या वस्तूशी तादात्म्य पावतो. त्या वस्तूलाच स्वतःचा आत्मा मानू लागतो. तादात्म्य झालेल्या वस्तूला वा व्यक्तीला इजा पोचताच मनुष्याला दुःख होते. तुमच्या मुलाला कोणी मारले तर तुम्ही दुःखी होता. दुसऱ्याच्या मुलाला कोणी मारले तर तुम्ही दुःखी होत नाही. तुमच्या मुलाची तुमची तादात्म्यभावना असते. त्यामुळे असे घडते. परशिवाशी असे तादात्म्य साधणे शक्य आहे. जगातील कोणत्याही व्यक्तीशी तादात्म्य साधले तरी अंतिमतः ते दुःखद ठरते. परंतु भगवान शिवाशी तादात्म्य साधले तर जीवात्मा शिवस्वरूप होतो आणि परमानंद-सागरात अखंड डुंबत राहतो. शिवाशी झालेल्या तादात्म्यालाच ऐक्य असे संबोधले जाते.

**शिवेनैक्यं समापन्नश्चिदानंदस्वरूपिणा।**
**न पश्यति जगज्जालं मायाकल्पितवैभवम्॥१४.६॥**

'शिवोऽहम्' भावना जसजशी दृढ होत जाते तसतसे साधकाच्या दृष्टीत परिवर्तन होत जाते. तो पूर्वी जगाकडे ज्या दृष्टीने पाहात होता त्या दृष्टीने आता पाहत नाही. तुम्ही बालपणी जग पाहता, तरुणपणी पाहता आणि म्हातारपणी देखील पाहता. परंतु वयोमानाप्रमाणे जगाकडे पाहण्याची दृष्टी बदलत जाते. त्याप्रमाणे 'शिवोऽहम्' चिंतन करण्याआधी मनुष्याची जगाकडे पाहण्याची जी दृष्टी असते ती चिंतनानंतर बदलते. निरंतर शिवचिंतन करणाऱ्या साधकाला बाह्य प्रपंच दिसतच नाही. तुम्हाला जेव्हा गाढ झोप लागते तेव्हा कोणत्याच बाह्य वस्तूची जाणीव राहत नाही. सारे काही जिथल्या तिथे असते, परंतु त्याचे अस्तित्व जाणवत नाही. त्याप्रमाणे समरससाधना करणाऱ्या साधकाला जगाचे अस्तित्व जाणवत नाही. काही दिसत नाही. याचा अर्थ तो आंधळा होतो की काय? तर तसे नाही. त्याला सारे काही दिसते, पण ते वस्तुरूपात नव्हे तर शिवरूपात. पृथ्वी, आप, तेजादी सारी पंचमहाभूते त्याला महाभूतांच्या रूपात दिसत नाहीत तर शिवरूपात दिसतात.

आपली दृष्टी जशी असेल तशी आपल्याला सृष्टी दिसते. ज्या रंगाचा चष्मा तुम्ही डोळ्यांवर चढवाल त्याच रंगाचे जग तुम्हाला दिसू लागेल. प्रपंचाकडे कसे पाहायचे ते आपल्यावर अवलंबून आहे. आपण त्याकडे 'प्रपंच' म्हणून पाहू शकतो आणि 'शिव' म्हणूनही पाहू शकतो. सृष्टी उत्पन्न होण्याआधी परमात्मा होता, अन्य काहीच नव्हते. एक परमात्माच अनेक रूपांत परिवर्तित झाला. सोने सोनेच असते. परंतु त्याला कारागिराकडून आकार मिळाला की त्याचे नाव बदलते. तुम्ही दुकानात गेल्यावर सोन्याचे विविध अलंकार पाहाता आणि त्या अलंकाराचे नाव घेऊन भाव विचारता. चंद्रहार हातात घेऊन 'या सोन्याचा भाव किती?' असे तुम्ही विचारत नाही तर 'या चंद्रहाराचा भाव किती?' असे तुम्ही विचारता. कारण तुमच्या दृष्टीने तो अलंकार आहे. परंतु विकणाऱ्याच्या दृष्टीत मात्र ते सोने असते. यालाच सुवर्णकुंडलन्याय असे म्हणतात. कुंडलाच्या आकारात परिवर्तित होऊन देखील ते सोनेच असते. त्याप्रमाणे प्रपंचरूपात परिवर्तित होऊन देखील तो परमात्माच असतो.

परमात्मा प्रपंचरूपात परिवर्तित झाल्यावर काही विकार (बदल) होतो की काय? याविषयी दोन वेगळी मते आहेत. एकाला 'अविकृतपरिणामवाद' तर दुसऱ्याला 'विकृतपरिणामवाद' म्हणतात. सांख्यदर्शनाने विकृतपरिणामवाद

मान्य केला आहे. दुधात थोडे विरजण घातले की त्याचे दही होते. दुधाचे मूळ रूप बदलून आता ते दही झाले. म्हणजे त्यात विकार आला. दह्याचे मंथन केल्यावर त्यापासून ताक आणि लोणी निर्माण होते. लोणी तापवले की त्याचे तूप होते. एकदा तूप झाले की तुपाचे परत दूध होत नाही. दूध विकारी आहे. बदलणारे आहे. हे विकृतपरिणामवादाचे उदाहरण होय. परंतु मातीचा घडा बनतो तेव्हा माती विकृत होत नाही. तिचे मूळ रूप बदलत नाही. माती मातीच राहते. त्याप्रमाणे सोने आणि त्याचे अलंकार हे उदाहरण होय. त्यापासून कितीही दागिने बनवले तरी सोन्याचे मूळ रूप बदलत नाही. सोने विकृत होत नाही. त्याप्रमाणे प्रपंचरूपात परिवर्तित होऊन देखील परमात्म्यात कोणतीही विकृती येत नाही. अर्थात् त्याच्या रूपात कोणताही बदल होत नाही. म्हणूनच शिवचिंतन करणाऱ्या साधकाला सर्व प्रपंच शिवस्वरूप दिसू शकतो. त्याच्या दृष्टीत अवघे विश्व शिवमय होऊन जाते. नामरूपात्मक प्रपंच त्याला दिसत नाही. त्याची दृष्टी भेदविरहित होऊन ती समत्वदृष्टी होते. आपपरभेदाला त्याच्या दृष्टीत स्थान नसते.

आपल्या आत्म्याप्रमाणेच तो सर्व जगाकडे पाहतो. आपल्या ठिकाणी जे चैतन्य तेच प्राणिमात्रांच्या अंतरंगात नांदत आहे. या जाणिवेने तो प्रपंचाकडे पाहात असतो. त्याच्या दृष्टीत अवघे विश्व शिवमय झाल्यामुळे त्याला मायानिर्मित प्रपंच दिसत नाही.

**ब्रह्माण्डबुदबुदोद्रेदविजृम्भी तत्त्ववीचिमान्।**
**मायासिन्धुर्लयं याति शिवैक्यवडवानले।।१४.७।।**

वडवानल हा अग्नीचा एक प्रकार आहे. ज्या अग्नीवर आपण अन्न शिजवितो त्याला 'भौतिक अग्नी' असे म्हणतात. आकाशात चमकणाऱ्या विजेला 'दिव्याग्नी' असे म्हटले जाते. त्याचप्रमाणे भूमी खोदून जे सोने मिळवले जाते ते सोनेदेखील एक प्रकारचा अग्नीच मानला जातो. कारण अग्नीत टाकल्यावर जे भस्म होत नाही त्याला अग्नीच म्हटले पाहिजे. सोने आगीत टाकल्यावर ते जळून जात नाही. अग्नीला अग्नी जाळत नसतो. म्हणून सोने देखील अग्नीच होय. त्याला 'आकरजअग्नी' असे म्हणतात. आपल्या पोटात असणाऱ्या अग्नीला 'जठराग्नी' म्हणतात आणि समुद्रातील अग्नीला 'वडवाग्नी' म्हटले जाते.

प्रपंच हा सागरासारखा आहे. सागरात ज्याप्रमाणे फेस, बुडबुडे असतात, त्याप्रमाणे या प्रपंचातील अनेक ब्रह्मांडे म्हणजे बुडबुडे होत. छत्तीस तत्त्वे त्यावरील तरंग होत. प्रपंचाला मायासागर असे म्हणतात. या सागरात जो बुडतो तो मायापाशात कायमचा गुंतून राहतो. प्रपंच प्रत्येकाला बांधून टाकतो. हे बंधन रागाचेही असते आणि द्वेषाचे देखील असते. ज्याच्यावर आपण प्रेम करतो त्याच्यामुळेही आपण बंधनात पडतो. ज्याच्यावर तुमचे प्रेम आहे त्याचे चिंतन तुमच्या मनात निरंतर चाललेले असते आणि तुम्ही ज्याचा द्वेष करता त्याचे देखील चिंतन तुमच्या मनात निरंतर होत असते. राग-द्वेष यांचे चिंतनच जीवात्म्याला बंधनात पाडते. सुख देऊन जो मनुष्याला बांधून टाकतो तो 'राग' होय. दुःख देऊन जो जीवात्म्याला बंधनात टाकतो तो 'द्वेष' होय.

संसारात राग-द्वेष आहेत. म्हणून संसारातून पळून जावे की काय? असा प्रश्न कोणाला पडेल. त्याचे उत्तर असे की तुम्ही संसारात राहिलात तर चिंता करण्याचे कारण नाही, परंतु जर 'संसार' तुमच्या आत असेल तर चिंता करायलाच हवी. संसारात राहून देखील संसाराला आत शिरू न देणे कसे शक्य आहे? शरीर ही एक नौका असून तिला नऊ द्वारे आहेत. नौकेला एक जरी छिद्र असले तरी त्यातून पाणी आत शिरून ती बुडू शकते. इथे तर शरीररूपी नौकेला नऊ छिद्रे आहेत. त्यातून संसारसमुद्रातील पाणी आत शिरून ती लवकरच बुडण्याचे भय

आहे. परंतु ही नवद्वारे बंद करण्याची युक्ती श्रीगुरू आपल्याला सांगत आहेत. मनुष्य राग-द्वेषाने युक्त झाला की या नवद्वारांतून 'संसार' आत शिरतो. राग-द्वेषाला जर मनातून काढून टाकले तर ही नवद्वारे सहज बंद होऊन 'संसार' आत शिरत नाही. एकदा तुमच्या मनात जर राग आला तर त्याच्या पाठोपाठ हळूच द्वेषही येतोच. आपण अनेकदा हे ऐकले आहे की आधी जिवाला जीव देणारे जिवलग मित्र नंतर परस्परांचे कट्टर शत्रू बनतात. याचे कारण प्रत्येकजण स्वार्थी असतो. स्वार्थापोटीच तो कुणाबरोबर प्रेमव्यवहार करतो आणि स्वार्थाच्या आड तो येत असेल तर त्याचा द्वेष करू लागतो. म्हणून जेथे राग आहे तेथे कालांतराने द्वेष येतो. द्वेषाला बोलवावे लागत नाही. तुम्ही रागाला आमंत्रण दिले की त्याच्या पाठोपाठ तो सावलीसारखा येतोच.

रागापाठोपाठ आलेला द्वेष प्रारंभी दिसत नाही. तो रागामागे दडलेला असतो. थोडा काळ गेल्यावर तो प्रकट होतो. आपल्या मनातील रागद्वेषांचे उच्चाटन झाले तर नवद्वारे बंद होऊन संसार आत शिरत नाही. प्रपंचात ज्यांच्या सोबत आपण राहू त्यांच्याबद्दल अधिक राग अथवा अधिक द्वेष बाळगू नये. राग-द्वेषांचे प्रमाण वाढले की त्या ठिकाणी सारे काही बिघडले असे समजावे. शिवोऽहम्भावना दृढ झाली की सांसारिक राग-द्वेषांपासून मनुष्य मुक्त होतो. शिवभावनारूपी वडवाग्नीमुळेच मायारूपी सागराचे शोषण होते. म्हणून प्रत्येक मनुष्याने शिवभावनेने सदैव चिंतन केले पाहिजे.

**मायाशक्तितिरोधानाच्छिवे भेदविकल्पना।**
**आत्मनस्तद्विनाशे तु नाद्वैतात्किंचिदिष्यते१४.८।।**

मायाशक्तीचे मनुष्याच्या बुद्धीवर आवरण पडल्यामुळे त्याच्या बुद्धीत द्वैत निर्माण होते. जीव आणि शिव यांच्यात त्याला भेद दिसू लागतो. मायाशक्तीपासून मुक्त होण्यासाठी शिवाला शरण जायला हवे. कारण मायाशक्ती शिवाच्या अधीन आहे. जो शिवाच्या निकट जातो त्याच्यापासून ती दूर होते. मायाशक्ती शिवाला आवृत्त करू शकत नाही. शिवापासून जे भिन्न असते त्याच्यावरच ती आपले मोहजाल टाकू शकते. मासे पकडण्यासाठी कोळी जेव्हा पाण्यात जाळे फेकतो तेव्हा ते स्वतःच्या पायापासून दूर अंतरावर फेकतो. त्या जाळ्यात मासे सापडतात. परंतु जे मासे पाण्यात उभ्या असलेल्या कोळ्याच्या पायाजवळ घुटमळतात ते मात्र जाळ्यात फसत नाहीत. त्याप्रमाणे जे जीवात्मे भगवान शिवापासून दूर जातात तेच मायाजालात फसतात. परंतु जे शिवाच्या अत्यंत जवळ राहतात ते मात्र मायाजालात सापडत नाहीत.

शिवापासून दूर जाणे याचा अर्थ कोणता? आपण त्याच्यापासून खरोखर दूर जाऊ शकतो काय? तो तर सर्वत्रच आहे. मग त्याच्यापासून दूर कोठे जाणार? शिवचिंतन न करणे म्हणजेच त्याच्यापासून दूर जाणे होय. जो शिवस्मरण, शिवचिंतन, शिवध्यान करीत नाही तोच तर शिवापासून दूर गेलेला असतो. परंतु जो शिवचिंतन करतो तो शिवाच्या अत्यंत निकट असतो. शरीराने जवळ राहणे याला फारसा अर्थ नसतो, मनाने जवळ राहणे अधिक अर्थपूर्ण आहे. एखादा मनुष्य मंदिरात देवासमोर बसलेला असतो, त्यावेळी तो खरोखरच का देवाच्या जवळ असतो? त्याचे शरीर देवासमोर असते, परंतु मन मात्र देवळाबाहेरील ठेवलेल्या चप्पलात गुंतलेले असते. खरे तर आपण सदोदित ईश्वराच्या जवळच असतो, त्याला आपण आपल्या शरीरावर धारण केलेले असते. परंतु आपल्याला त्याचे भान नसते, आपले त्याच्याकडे ध्यान नसते. म्हणून ईश्वराच्या अत्यंत जवळ असून देखील आपण त्याच्यापासून कितीतरी दूर गेलेलो असतो. ईश्वराचे चिंतन, ध्यान, स्मरण करणे हेच त्याच्याजवळ राहणे होय. याप्रकारे जो मनुष्य शिवाच्या जवळ राहतो त्याच्यावर मायाशक्तीचा काहीही प्रभाव पडत नाही. शिवचिंतन

करणाऱ्या साधकाच्या दृष्टीत मायानिर्मित भेद नष्ट होऊन केवळ अद्वैत व्यापून राहते.

**पशुत्वं च पतित्वं च मायामोहविकल्पितम्।**
**तस्मिन् प्रलयमापन्ने कः पशुः को नु वा पतिः।।१४.९।।**

सर्व जीवात्मे पशू असून भगवान शिव त्यांचे पती अर्थात् पशुपती होत, असे पाशुपतसिद्धान्त सांगतो. नेपाळमधील शिवलिंगाला 'पशुपती' असे संबोधले जाते. जीवात्म्याला पशू का म्हणतात? अपराधाची शिक्षा होऊन देखील जो वारंवार अपराध करतो त्याला पशू म्हटले जाते. भाजीमंडईत तुम्ही पाहिले असेल. तेथे मोकाट सुटलेले पशू सगळीकडे हिंडत असतात. एका भाजीत तोंड घातले की त्याला मार मिळतो. मग तो पुढे जातो, दुसऱ्या भाजीत तोंड घालतो तिथे त्याला मारच मिळतो. याप्रकारे मंडईत सगळीकडे फिरून तो सारखा मार खातो. परंतु मार खाऊन तो सुधारत मात्र नाही. मार खाणे हेच आपले जीवन आहे असेच तो जणू समजत असतो. भाजी खाणे आणि त्यासोबत मार खाणे यातच तो संबंध जीवन व्यतीत करतो, कधीही सुधारत नाही. म्हणून त्याला 'पशू' म्हणतात. ही प्रवृत्ती जशी चार पायांच्या पशूमध्ये असते तशीच मनुष्यनामक दोन पायांच्या पशूत देखील आढळते. शेपूट आणि शिंगे नसलेला दोन पायाचा पशू म्हणजे मनुष्य. मनुष्य जीवनात अनेक अपराध करतो. त्याबद्दल त्याला शिक्षादेखील भोगावी लागते. शिक्षा भोगताना पुन्हा अशी चूक करणार नाही असे तो आपल्या मनाशी ठरवतो, परंतु थोडा काळ गेला की पुन्हा त्याच त्या चुका करीत राहतो.

ईश्वराने मनुष्याला शंभर वर्षांचे आयुष्य दिले आहे. आयुष्यात सुधारणा करण्यासाठी हा अवधी पुरेसा आहे. परंतु मनुष्य सुधारत नाही. तो आधी जसा असतो तसाच आयुष्याच्या अंतिम अवस्थेतही असतो. दुर्गुणांनी भरलेला आणि वासनेने वखवखलेला. आपल्या हातून अनंत अपराध घडले, माणूस असूनदेखील आपण काही क्षणी अमानुषपणे वागलो याबद्दल त्याला थोडीही खंत नसते. अशा मनुष्यालाच वीरशैवसिद्धान्तात पशू म्हटले आहे. पशू आणि पती हा भेद प्रारंभिक आहे. मायाजालामुळे जीव पशू होतो आणि शिवाला पशुपती मानू लागतो. हा पशुभाव आणि पतिभाव मायानिर्मित आहे. जेव्हा शिवाच्या अनुग्रहाने मायाजाल विरून जाते तेव्हा जीवात्म्याच्या ठिकाणी असलेला पशुभाव नष्ट होतो. जेथे पशूच नाही तेथे पशुपती कसा काय राहील? हे द्वैत जेव्हा सरते तेव्हा पशूच 'पशुपती' होतो. शिवचिंतनामुळे शिवसान्निध्य लाभते. शिवसान्निध्यामुळे पशुभाव नष्ट होऊन जीव शिव होतो. ऐक्यस्थलात पशुभाव आणि पतिभाव नष्ट होऊन दोहोंचे सामरस्य होते.

मनुष्याने पशू म्हणून जगणे योग्य नव्हे. त्याने आत्मपरीक्षण करावे, साधना करावी. स्वतःमध्ये सुधारणा घडवून आणावी. सदैव जागृत असावे. आयुष्य जसजसे वाढत जाईल तसतशी आपल्यात सुधारणा होत गेली पाहिजे. वृक्ष वाढत जातो, त्याला फुले धरतात, फळे लागतात. फळ पक्व होते आणि झाडावरून गळून पडते. ज्या वृक्षावर फळ उत्पन्न झाले, ज्याच्या जीवनरसाने ते वाढत गेले त्या वृक्षाला पक्व झाल्यावर ते सोडून देते. त्याच्यापासून मुक्त होते. परंतु आपण मात्र कधीही न पिकणारी आणि कधीच गळून न पडणारी अशी पाने आहोत. कुणी जबरदस्तीने जरी आपल्याला संसारवृक्षापासून विलग केले तरी आपण पुन्हा तेथेच जाऊन चिकटू. संसार सोडावा असा याचा अर्थ नव्हे. तर संसारात राहून देखील थोडा वेळ शिवचिंतन, शिवध्यान करावे. तरच आपण संसारापासून मुक्त होऊ. प्रातःकाली, माध्यान्ही आणि सूर्यास्ताच्या वेळी मनुष्याने परमात्म्याचे चिंतन केले पाहिजे. भोजन तीन वेळा हवे असते, परंतु पूजा करण्याची एक वेळ देखील तयारी नसते. शरीर स्वस्थ राहण्यासाठी जशी आहाराची गरज असते तशीच मनःस्वास्थ्यासाठी पूजा, जप, ध्यान यांची आवश्यकता असते. प्रामाणिक

प्रयत्न केला तर मनुष्य आपले जीवन निश्चित सुधारू शकतो. एकदा स्वत:चे आयुष्य उजळून गेले की मग इतरांची आयुष्ये उजळून टाकता येतात. जो स्वत:चे कल्याण साधू शकतो तोच इतरांचे कल्याण करू शकतो. अगस्ती महर्षींच्या निमित्ताने जगद्गुरू रेणुकाचार्यांनी सर्व प्राणिमात्रांना आत्मकल्याणाचा मार्ग दाखवला. म्हणून प्रत्येक मनुष्याने शिवध्यान, शिवचिंतन करून सामरस्याच्या दिशेने वाटचाल करावी एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर १४ जुलै १९९२

---

आशीर्वचन तिसरे

## ऐक्यस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

परमात्म्याशी एकरूप होण्याची इच्छा प्रत्येक माणसाच्या ठिकाणी असते. त्या ऐक्याचा किंचित अनुभव आपल्याला सुषुप्ति–अवस्थेत अर्थात गाढ निद्रेत येतो. त्या काळात आपण अत्यंत सुख अनुभवतो. सुषुप्ती ही सुखदायक अवस्था असून तिथे दुःखाचा किंचितही अनुभव येत नाही. सत्‌चित्–आनंदरूप आत्म्याशी समरस जीवात्म्याला सुषुप्ति–अवस्थेत आनंदाची अनुभूती येते. सुषप्तिअवस्था आपल्या अधीन नाही, हे यापूर्वीच आम्ही सांगितले आहे. वाटेल तेव्हा आपण झोपू शकत नाही. मऊ गादी, पंख्याची हवा इत्यादी सोयी उपलब्ध असताना देखील आपल्याला झोप येत नाही. झोप येण्यासाठी आपण जेवढा अधिकाधिक प्रयत्न करतो तेवढी ती आपल्यापासून दूर दूर पळते. निद्रा ही एक सहजावस्था आहे. ती कोठेही येऊ शकते. बिछान्यावर झोपल्यामुळे ती येतेच असे नाही. बसमधून प्रवास करताना आसपास गवढी गर्दी असून देखील तुम्ही निवांत झोप काढता. रेल्वेप्रवास करताना तुम्हाला निवांत झोप लागते. या झोपेमुळे बऱ्याच लोकांचे सामान देखील चोरीला जाते. तरी त्यांना त्याचा पत्ता नसतो. ही अवस्था आपल्या अधीन नसल्यामुळे आपली इच्छा नसताना ती येते आणि आपली इच्छा असताना येत नाही.

म्हणून शास्त्रकारांनी असा विचार केला की आपल्या पुरुषार्थाच्या बळावर आनंदानुभव देणारी एखादी अवस्था असली पाहिजे आणि ती मिळवली पाहिजे. कबिराचे नाव तुम्हाला माहीत आहेच. त्यांनी आयुष्यभर काशीत वास्तव्य केले. परंतु जेव्हा मृत्युसमय जवळ आला तेव्हा मात्र काशी सोडून ते जवळच्या एका खेड्यात राहायला गेले. त्यांच्या अनेक शिष्यांना या वर्तनाचे आश्चर्य वाटले. त्यांनी विचारले,

''महाराज काशीत मरण आल्याने मुक्ती मिळते, असा काशीचा महिमा सांगितलेला असताना आपण मात्र उतारवयात काशी सोडून का दिली?''

कबिरांनी उत्तर दिले, ''कुणी दिलेली मुक्ती मला नको आहे. सहज मरण यावे आणि मुक्ती मिळावी अशी माझी इच्छा आहे. त्यामुळे काशीक्षेत्र सोडून मी या ठिकाणी आलो.''

ज्याच्या ठिकाणी अद्वैतानुभव असतो त्याने काशीत देहत्याग केला काय, सोलापुरात केला काय, किंवा एखाद्या खेड्यात केला काय, सारखेच. त्यामुळे काहीही फरक पडत नाही. आपण कुठेही देह सोडला तरी

साधनेच्या बळावर मुक्ती मिळू शकते असा दृढविश्वास त्याच्या ठिकाणी असतो. मृत्युनंतर मुक्ती मिळते असे नसून जिवंतपणी देखील मुक्तीचा लाभ होऊ शकतो. त्याला 'जीवनमुक्ती' असे म्हणतात. जो जीवन्मुक्त असतो तोच विदेहमुक्त होतो.

आयुष्यभर पाप करणाऱ्या पापी मनुष्याने काशीत देहत्याग केला तर त्याला तात्काळ मुक्ती मिळेल काय? असा प्रश्न कुणाला पडेल तर तसे घडत नाही. याविषयीची आख्यायिका असे सांगते-पुण्यवान माणसाचे काशीत देहावसान झाले तर त्याला तात्काळ मुक्ती मिळते. परंतु पापी माणसाच्या देहावसनानंतर तो, काशीत जी काळभैरव नाम देवता आहे तिच्या ताब्यात जातो. त्या माणसाला त्याच्या सर्व दुष्कृत्यांचे भोग काळभैरव भोगायला भाग पाडतो आणि नंतर त्याला मुक्ती मिळते. काशीक्षेत्राचे हे वैशिष्ट्य आहे की, येथे देहत्याग करणाऱ्या मनुष्याला त्याच्या कर्मांची फळे तात्काळ भोगावी लागून मुक्ती मिळते. परंतु दुसऱ्या कोणत्याही ठिकाणी जर मनुष्याचा मृत्यू झाला तर त्याला कर्मफळे भोगण्यासाठी नवा जन्म घ्यावा लागतो. नव्या जन्मात पूर्वजन्मातील कर्मफळे भोगताना तो पुन्हा नवी कर्मे करतो आणि पुढील जन्माची शिदोरी बांधून ठेवतो. असे जन्मामागून जन्म घेणे हे चक्र अखंड फिरत राहते. काशीत देहत्याग केल्याने पुनर्जन्म मिळत नाही. परंतु मुक्तीच्या आधी कृतकर्माचा झाडा द्यावा लागतो. कबिरांचा आपल्या ज्ञानावर आणि अद्वैतानुभवावर दृढ विश्वास असल्यामुळे आपण कुठेही देहत्याग केला तरी मुक्ती मिळणारच अशा भावनेने त्यांनी काशीक्षेत्राचा त्याग केला.

सुषुप्ति-अवस्था मुक्तीसुखाचा किंचित् लाभ घडवणारी एक सहजावस्था आहे. ही अवस्था आपल्या अधीन नाही, ती कर्माधीन आहे. सुषुप्ति-अवस्थेचा भोग देणारे कर्म सरले की आपल्याला लगेच जाग येते. म्हणून आचार्यांनी सांगितले आहे की, 'तुम्ही कर्माधीन मुक्तिसुखाची अपेक्षा करू नका. कुणीतरी दिलेली मुक्ती तुम्हाला निरंतर सुख देऊ शकत नाही.' निरंतर मुक्तिसुख हवे असेल तर तुम्हाला ऐक्यस्थलाची साधना केली पाहिजे. ऐक्यस्थलाची प्राप्ती जीवात्म्याला केव्हा होते? तर जीव-जीवांतील भेद, जीव-जडातील भेद, जड-ईश्वरातील भेद या प्रकारचे सारे भेद नष्ट झाल्यावर जीवात्म्याला अद्वैतस्थितीची अर्थात् ऐक्यस्थलाची अनुभूती येते. याविषयीच येथे ज. रेणुकाचार्य सांगत आहेत-

**घोरसंसारसर्पस्य भेदवल्मीकशायिनः।**
**बाधकं परमाद्वैतभावना परमौषधम्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.१०)

येथे संसाराला सर्प म्हटले आहे. प्रथम आपण हे समजून घेतले पाहिजे की 'संसार' कशाला म्हणतात? बाह्यप्रपंच म्हणजे संसार नव्हे. बऱ्याच लोकांचा असा भ्रम असतो की, घरदार, मुलेबाळे, दृश्य जग म्हणजेच संसार. परंतु ते खरे नाही. एक सृष्टी शिवाकडून निर्माण झाली तर दुसरी सृष्टी जीवाने निर्माण केली. आपल्या डोळ्यांना दिसणारे बाह्य विश्व ही शिवनिर्मित सृष्टी आहे. परंतु दुसरे एक विश्व आपल्या आत आहे. ते आपण निर्माण केले आहे. शिवनिर्मित सृष्टी कुणाला दुःखदायक नसते, परंतु जीवनिर्मित सृष्टी मात्र जीवाला दुःख देत असते. तुम्ही व्यवहारात हा अनुभव घेतला असेल की, आपल्या जवळचे लोक आपल्याला जेवढे दुःख देतात तेवढे दुःख परके लोक देत नाहीत. तुम्हाला अधिकात अधिक दुःख देणारी व्यक्ती तुमच्या अत्यंत जवळचीच

असते. गेल्या जन्मातले आपले दुष्मन आणि मित्र या जन्मात आपले सगेसोयरे म्हणून जन्म घेतात. कुणी पुत्र होतो, कुणी कन्या होते, कुणी पत्नी होते, कुणी पती तर कुणी बंधू. आपल्या अवतीभोवती वावरणारे जे सगेसोयरे असतात त्यांपैकी थोडे गेल्या जन्मातले मित्र असतात तर बरेच गेल्या जन्मातले दुष्मन असतात. एकाच आईबापाच्या पोटी जन्म घेणारी दोन मुले एकमेकांचे भाऊ असूनही प्रेमाने राहत नाहीत तर परस्परांचे शत्रू होतात. सख्खे भाऊ पक्के वैरी. गेल्या जन्मातला मित्र किंवा शत्रू आपले मित्रत्व अथवा शत्रुत्व पूर्ण करण्यासाठीच या जन्मात आपला सगासोयरा म्हणून जन्म घेतो आणि आपले कर्तव्य निमूटपणे व्यवस्थित निभावतो. याचा अर्थ असा की आपल्या अत्यंत जवळची व्यक्तीच आपल्याला दुःख देते, आपल्या दूरची व्यक्ती आपल्याला फारसे दुःख देत नाही.

त्याचप्रमाणे बाह्य प्रपंच हा आपल्यापासून दूर आहे. तो आपल्याला दुःख देत नाही, परंतु आपल्या 'आतला प्रपंच' आपल्या अत्यंत जवळ असल्यामुळे आपल्याला दुःखदायक ठरतो. ईश्वरनिर्मित प्रपंच दुःखदायक ठरत नाही. शिवनिर्मित प्रपंचातील वस्तूंचा संग्रह करून त्या वस्तूंविषयी आपण जेव्हा ममत्मभाव बाळगू लागतो तेव्हा ते ममत्वच आपल्याला दुःख देते. ज्याच्या मनात कोणत्याही वस्तूविषयी ममत्वभाव नसतो त्याला कोणतेच दुःख भोगावे लागत नाही. म्हणून 'संसार' याचा अर्थ ममत्व हा होय. हे माझे, ते माझे–हाच संसार. संसार हा एक भयंकर सर्प आहे अशी इथे उपमा दिलेली आहे. सर्पाच्या ठिकाणी जहाल विष असते. तो ज्याला चावतो त्याच्या शरीरातल्या थेंबाथेंबात विष भिनते आणि मनुष्य मरतो. त्याप्रमाणे संसाररूपी सर्प आपल्याला चावल्यामुळे त्याचे विष आपल्या मनात भिनलेले आहे. हा सर्प राहतो कुठे? तर भेदरूपी वारुळात. भेद अनेक प्रकारचे आहेत. जीव–जीवांतील भेद. एक जीव दुसऱ्या जीवासोबत अधिक काळ मिसळून राहू शकत नाही. काही दिवस ते एकत्र राहतील. परंतु नंतर एकमेकांना सोडून जातील. दुसरा प्रकार जीव–जडातील भेद. घर, शेती इ. जड पदार्थ होत. त्या जडाशी जीव समरस होऊ शकत नाही. म्हणून जीव आणि जड यात भेद आहे. जड–जडातील भेद हा तिसरा भेद होय. झाडे–झुडपे, दगड–माती हे जड–पदार्थ होत. त्यांच्यात ऐक्य होऊ शकत नाही. ईश्वर–जडातील भेद हा भेदाचा आणखी एक प्रकार. याचप्रमाणे जीव–ईश्वरातील भेद असाही एक भेद आहे. असे पाच प्रकारचे भेद वेदान्तशास्त्रात सांगितले आहेत. या भेदरूपी वारुळात संसाररूपी सर्प राहतो. सर्पाला मारायचे असेल तर आधी वारुळ खोदले पाहिजे. त्याचे आश्रयस्थान उद्ध्वस्त केल्यावरच सर्प बाहेर येईल, त्याप्रमाणे संसाररूपी सर्प मारण्यासाठी त्याचे आश्रयस्थान असलेली भेदबुद्धी नष्ट करायला पाहिजे. त्यासाठी अद्वैतभाव आपल्या मनात बाणला पाहिजे.

अद्वैतभावनेचा प्रारंभ आपल्या कुटुंबापासून करायला पाहिजे. जगातल्या सर्व व्यक्तींना आपले मानणे ही विशाल भावना आहे. अद्वैतभावना अधिकाधिक व्यापक होत गेली की, सर्व पृथ्वीच एखाद्या कुटुंबासारखी दिसू लागते. 'उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम्'.

अद्वैतभावनेचा क्रमशः विकास करायला हवा. कुटुंबातील व्यक्तीच्याच ठिकाणी प्रथम आत्मरूप पाहायला शिकावे. ही भावना दृढ झाली की हळूहळू शेजारी, गाव, राष्ट्र, विश्व अशी व्यापक होऊन द्वैतभावनेचा संपूर्ण निरास होतो. म्हणून शास्त्रकारांनी सांगितले आहे की, विश्वातल्या एका व्यक्तीविषयी जरी तुमच्या मनात द्वेषभावना असेल तर तुम्हाला मुक्ती मिळणार नाही. ज्याच्याविषयी तुमच्या मनात द्वेषभावना असेल त्याच्या अहिताचेच चिंतन तुम्ही कराल. सर्वांच्या विषयी अद्वैतभावना आहे परंतु शत्रूविषयी नसेल तर अद्वैतभाव परिपक्व

झाला नाही असे समजावे. अद्वैतानुभव घेणारा साधक राग-द्वेषांपासून मुक्त असतो. त्यालाच गीतेने 'स्थितप्रज्ञ' म्हटले आहे. राग, भय, क्रोध हे ज्याच्या ठिकाणी नसतात तो स्थितप्रज्ञ होय, मुनी होय. मुनी म्हणजे मौनाची साधना करणारा. मौन या शब्दाचा सामान्य अर्ध 'न बोलणारा' असा आहे. परंतु ज्याच्या मनात कोणतीच इच्छा, वासना उठत नाही तोच खरा 'मुनी' होय. इच्छा जोपर्यंत आहे तोपर्यंत ती व्यक्त होणारच. तुम्ही तोंड बंद ठेवले तर पाटीवर, कागदावर लिहून द्याल. लिहिणे बंद केले तर हातांनी इशारा कराल. मग तुम्ही 'मुनी' नाही. तुमची मौनसाधना पक्व झाली नाही. तुमच्या साऱ्या इच्छा पूर्ण झाल्या, तुम्ही पूर्णकाम झालात तरच तुम्ही खरे मौनी व्हाल. कारण काही मागायचेच नाही. ज्याच्या मनात कोणतीच इच्छा शिल्लक राहत नाही तोच खरा 'मुनी' होय.

प्रपंचात असंख्य वस्तू आहेत. एखाद्या व्यक्तीला त्या साऱ्या मिळणे शक्य नाही. परंतु ज्याला एक परमात्मा प्राप्त होईल त्याला सारे काही मिळाल्यासारखे होईल.

'एक विज्ञानेन सर्व विज्ञानम्'

एकाला जाणल्याने सारे काही जाणल्यासारखे होते. एकाला प्राप्त केल्याने सारे काही मिळवल्यासारखे होते. अशी एकमेव वस्तू म्हणजे परमात्मा होय. ज्याला परमात्मा प्राप्त होतो असा मनुष्य मौन होतो. त्याच्या दृष्टीने प्रापंचिक विषय निरर्थक असल्यामुळे तो अंतर्मुख होऊन आत्मानंदात निमग्न होतो.

संसाररूपी महासर्प भेदरूपी वारुळात निवास करतो. भेदरूपी वारुळाचा नाश करण्यासाठी अद्वैतभावना हाच अत्यंत प्रभावी उपाय होय. आपण अद्वैत केवळ भावनेत आणू शकतो. व्यवहारात मात्र भेद असतोच. अद्वैत भावनेत असते. व्यवहारात द्वैत असते. जर व्यवहारात अद्वैत आणले तर प्रचंड गोंधळ होईल. व्यावहारिक जगात भेदाची गरज असते तर आध्यात्मिक जगात अभेदाची. दोन शरीरात अद्वैत होत नाही, दोन मनांत, दोन बुद्धीत अद्वैत होत नाही. परंतु दोन आत्म्यांत मात्र अद्वैत होऊ शकते. जेथे समानता असते तेथेच अद्वैत होते. जेथे विषमता असते तेथे अद्वैत होणे शक्य नाही. जगात लक्षावधी प्राणी आहेत. परंतु एकसारखे शरीर दुसऱ्याचे नाही. प्रत्येकाचे शरीर दुसऱ्या शरीरापेक्षा काहीतरी वेगळेपण घेऊन असते. जेवढी शरीरे आहेत तेवढीच मने देखील आहेत. मने देखील परस्पर भिन्न असतात.

'पिंडे पिंडे मतिर्भिन्ना'

एकाच आईवडिलांच्या पोटी जन्म घेणारी मुले शरीराने एकसारखी नसतात, मनानेही नसतात. म्हणून दोन मनांचे अद्वैत होऊ शकत नाही. मनाप्रमाणेच सगळ्यांची बुद्धीदेखील भिन्न भिन्न असते. याची बुद्धी वेगळी, त्याची बुद्धी वेगळी. एकासारखी दुसऱ्याची बुद्धी नसते. दोन वस्तूंत समानता नसेल तर त्यांचे सामरस्य होऊ शकत नाही. म्हणून शरीर-शरीर, इंद्रिये-इंद्रिये, मन-मन आणि बुद्धी-बुद्धी यांचे सामरस्य होऊ शकत नाही. परंतु आत्म्यात आत्मा मात्र समरस होऊ शकतो. कारण प्रत्येकाचा आत्मा सत्-चित्-आनंदस्वरूप असतो. आमचा आत्मा चिद्रूप आहे, तुमचाही आत्मा चिद्रूप आहे. आमचाही आत्मा आनंदरूप आहे आणि तुमचाही आत्मा आनंदरूप आहे. ज्यावेळी समानता असेल त्यावेळी दोन वस्तूंमध्ये सामरस्य होते, अद्वैत होते. पाण्यात पाणी एकरूप व्हावे तसे, दुधात दूध समरस व्हावे तसे. दुधात पाणी मिसळते मात्र ते एकजीव होत नाही. ते वेगळे काढता येते. परंतु दुधात दूध मिसळले तर वेगळे कसे करता येईल? पाण्यापासून पाणी वेगळे करता येत नाही आणि दुधापासून दूध वेगळे करता येत नाही. एका पाण्यात जो गुण असतो तोच गुण दुसऱ्या पाण्याताही असतो. म्हणून समान तत्त्वांतच सामरस्य होऊ शकते.

ज्याप्रमाणे जीवांचा आत्मा सच्चिदानंदरूप आहे त्याप्रमाणे परमात्मा देखील सच्चिदानंदरूप आहे. कारण जीव हा परमात्म्याचाच अंश आहे. अग्नीपासून निघालेल्या ठिणग्या अग्नीसारख्या असतात. अग्नीमध्ये असलेल्या प्रकाश आणि दाहकता ठिणगीच्याही ठिकाणी असते. फरक इतकाच की अग्नीत त्याचे प्रमाण मोठे असते आणि ठिणगीत अल्प असते. त्याप्रमाणे परमात्मा जसा सच्चिदानंदरूप आहे तसेच जीवात्मे देखील सच्चिदानंदरूप आहेत. एवढेच नव्हे तर ज्यांना आपण जड मानतो त्या प्रपंचातील सर्व वस्तूदेखील सच्चिदानंदरूपच आहेत. सत्, चित्, आनंद, नाम आणि रूप ही पाच तत्त्वे आहेत. प्रत्येक वस्तूला नामरूप असते आणि ती सच्चिदानंदरूप असते ज्याच्या आत्म्याचे परमात्म्याशी सामरस्य होते तो प्रपंचातील सर्व जीवात्म्यांशी आणि जडातील चैतन्यतत्त्वाशी समरस होतो. याप्रमाणे अद्वैतभाव दृढ झाला की भेदबुद्धी आपोआप गळून पडते. भेदरूपी वारूळ नष्ट होते.

भेदभावनेचा नाश करण्यासाठी प्रपंच नष्ट करण्याची जरुरी नसते. दोन मातीचे घट वेगवेगळे असतात. त्यातील पोकळी म्हणजे आकाश वेगवेगळे भासते. दोन्ही घटांतील आकाश आणि बाहेरील महाकाश हे एकच आहे, ते भिन्न भासते इतकेच. मग त्यांना समरस करण्यासाठी घट फोडून टाकणे हाच उपाय आहे काय? तर तसे करण्याचे कारण नाही. घटातील आणि बाहेरील आकाश एकच आहे. बाहेरचे महाकाश घटात आहे आणि घटातील आकाश महाकाशच आहे असे ज्ञान झाले म्हणजे पुरे. असे भावनात्मक अद्वैत केले तर मातीचे घट फोडण्याची गरज राहणार नाही. सगळ्यांची शरीरे नष्ट करून, सगळ्यांची मने नष्ट करून आत्म्याचे अद्वैत होणार नाही. प्रपंचाला थोडाही धक्का न लावता आपल्या भावनेत अद्वैत साधता येते. शिवनिर्मित सृष्टीला नष्ट करण्याचा कुणालाही अधिकार नाही. शिवनिर्मित सृष्टी फक्त भगवान शिवच नष्ट करू शकतात, तुम्ही नव्हे. सृष्टीचे सोडा, परंतु तुमचे शरीर देखील नष्ट करण्याचा तुम्हाला अधिकार नाही. कुणी मनुष्य आत्महत्येला प्रवृत्त होत असेल तर त्याच्यावर पोलिसाकडून गुन्हा दाखल केला जातो. तो म्हणेल की, 'हे माझे शरीर आहे, त्याचे मी काहीही करेन.' काहीही करण्यासाठी तुम्हाला परमेश्वराने शरीर दिलेले नाही. काहीतरी चांगले करण्यासाठी दिलेले आहे.

तुम्ही समजता की शरीर माझे आहे. परंतु ते तुमचे नसून तुम्हाला कोणीतरी दिलेले आहे. तुमच्या आईवडिलांनी दिलेले आहे. ते तुम्हाला ईश्वराच्या अनुग्रहाने मिळालेले आहे. त्या शरीरात तुम्हाला राहायचे आहे, उत्तमोत्तम कर्मे करायची आहेत. अद्वैतभावना करून मुक्त व्हायचे आहे. याचा विचार न करता बाह्य प्रपंचाचा नाश करण्यासाठी जर तुम्ही प्रवृत्त व्हाल तर तुम्ही अपराधी ठराल. भेद दूर सारण्यासाठी भावानत्मक प्रक्रियाच श्रेष्ठ होय. अभेदभावनेनेच भेदरूपी वारुळाचा नाश करता येतो. वारुळच नष्ट केल्यावर त्यात राहणाऱ्या सापाला उघड्या मैदानावर येण्यावाचून गत्यंतर नाही. मग त्याला मारणे सोपे आहे.

> भेदबुद्धिसमुत्पन्नमहासंसारसागरम्।
> अद्वैतबुद्धिपोतेन समुत्तरति देशिकः॥१४. ११॥

संसाररूपी सागराची उत्पत्ती कशी झाली? तर तो भेदबुद्धीतून उत्पन्न झाला आहे. भेदबुद्धी नसेल तर संसारसागर असणार नाही. भेदबुद्धी असेल तर तुम्ही संसारसागरात आहात. ज्याक्षणी तुमच्या ठिकाणी अद्वैतभावना जागी होईल, त्याक्षणी तुमच्या दृष्टीने संसारसागर नष्ट होईल. समुद्र तरून जाण्यासाठी नौकेची आवश्यकता असते. त्याप्रमाणे संसारसागर तरून जायचा असेल तर अभेदभावनारूपी नौकेची गरज असते. ऐक्यस्थलात भावनात्मक व्यवहाराला प्राधान्य आहे. मनुष्यजीवनात भावनेला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. मनुष्य भावनेवर जगतो असे म्हणतात. भाषा महत्त्वाची नसते, भावना महत्त्वाची. बोलता बोलता करुणेने जर

एखाद्याचे अंत:करण भरून आले तर तो पुढे बोलू शकत नाही. त्याचे शब्द कंठाशीच अडतात आणि भावना डोळ्यांवाटे बाहेर वाहू लागते. दु:खाच्या क्षणीही असेच घडते. शब्द मुके होतात आणि शब्दाशिवाय त्याचे दु:ख आपल्या अंत:करणातला भिडते. हा सारा भावनेचा प्रभाव आहे. बोलणारा भावनावेगाने रडू लागला तर ऐकणारांचेही डोळे ओले होतात. उत्कट भावनावेगात भाषा रुद्ध होते. मनुष्य आपली भावना भाषेत पूर्णपणे व्यक्त करू शकत नाही. आपली भावना, आपली अनुभूती व्यक्त करण्यासाठीच परमेश्वराने माणसाला वाणी दिली आहे. परंतु कधीकधी भावना व्यक्त करायला ती असमर्थ ठरते. बोलताबोलताच मनुष्य मौन होतो आणि ते मौनच आपल्याला भाषेसारखे ऐकू येते. मौन हीच एक भाषा होऊन जाते.

माणसाच्या जीवनात भावनेचे एवढे महत्त्व आहे. अद्वैतात भावनेलाच महत्त्व असते. तेथे भावनात्मक व्यवहार असतो. म्हणून भावनेत अद्वैत होऊ शकते. परंतु व्यवहारात मात्र अद्वैत होऊ शकत नाही. भावनेत सारे काही एक आहे, व्यवहारात सारे काही भिन्न आहे. हेच तर आपल्या तत्त्वज्ञानाचे वैशिष्ट्य होय. दिसतात सारे भिन्न, पण भावनेत मात्र असतात एक. अभेदभावनेने जो भेदबुद्धी नष्ट करतो तोच ऐक्यस्थलात पोहोचून परमानंदाचा आस्वाद घेतो. म्हणून प्रत्येकाने ऐक्यस्थिती प्राप्त करून घेण्यासाठी प्रयत्नशील राहावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर

१५ जुलै १९९२

---

**आशीर्वचन चौथे**

## ऐक्यस्थल–४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जेथे भेद आहे तेथे संसार आहे आणि जेथे अभेद आहे तेथे परमात्मा आहे. परमात्मा सर्वव्यापक असल्यामुळे त्याच्यात कुठलाही भेद अथवा विभाग आपण करू शकत नाही. पंचमहाभूतांचे खंड करणे जेथे अवघड आहे तेथे परमात्म्याबद्दल तर बोलायलाच नको. एकत्र राहणारे भाऊ जेव्हा वेगळे होतात त्यावेळी जमीन आणि घर वाटून घेतात. वाटणी करताना जमिनीचे किंवा घराचे दोन तुकडे करीत नाहीत. भूमीचे विभाजन आपण कसे करणार? शेतातच मधोमध एक बांध घालतात. इकडचे माझे, तिकडचे तुझे. झाली विभागणी. जर दोघा भावांनी ती शेती विकली तर तो मनुष्य मधला बांध काढून टाकतो आणि पुन्हा दोन शेतांचे एक शेत होते. म्हणजे आपण साध्या भूमीचेही विभाजन करू शकत नाही. भूमी म्हणजे पृथ्वी. पृथ्वी हे एक पंचमहाभूतांपैकी शेवटचे महाभूत होय. परमात्म्यापासून निर्माण झालेले पहिले भूत म्हणजे आकाश आणि शेवटचे भूत म्हणजे पृथ्वी. आकाशाची विभागणी होऊ शकत नाही. परंतु त्याची देखील विभागणी तुम्ही करता. हे माझे घर, ते तुझे घर. घर याचा अर्थ कोणता? भिंती आणि छप्पर म्हणजे घर नव्हे. आपण घरात राहतो याचा अर्थ भिंतीत, छतात राहतो असा नाही. तर मधल्या आकाशातच तुम्ही सतत वावरत असता, राहत असता. अशा प्रकारे आकाशाचेही आपण विभाजन करीत असतो. परंतु असे केल्यामुळे वस्तुत: आकाशाचे तुकडे पडत नाहीत. गीतेत आत्म्याची जी लक्षणे सांगितली आहेत तीच आकाशालाही लागू होतात.

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावक:।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुत:।।

कोणत्याही शस्त्राने आपण आकाशाचे छेदन करू शकत नाही. जर एखाद्या बलशाली माणसाने हाती तलवार घेऊन आकाशाचे तुकडे पाडायचे ठरवले तर त्याचा तो प्रयत्न वृथा ठरेल. आपण आकाशाला अग्नीने जाळू शकत नाही, पाण्याने विझवू शकत नाही, वायूने त्याचे शोषण करू शकत नाही. मुसळधार पावसात देखील आकाश कधी भिजत नसते. एखाद्या घराला जेव्हा आग लागते तेव्हा त्याच्या भिंती आणि छत जळून जाते, आतले आकाश जळत नाही. जर आपण महाभूतांचे विभाजन करू शकत नाही तर त्यांचे उत्पत्तिस्थान असलेल्या परमात्म्याचे विभाजन कसे करू शकणार? तरीही विभाजन झालेले आपल्याला भासते. परमात्म्याचाच अंश जेव्हा देहात वास्तव्य करतो तेव्हा त्याला आपण जीवात्मा असे म्हणतो. जीवात्मा आणव, माया आणि कार्मिक या मलत्रयांनी आवृत्त झाल्यामुळे स्वत:ला परमात्म्यापासून भिन्न समजू लागला. जोपर्यंत ही भेदबुद्धी जीवात्म्याच्या ठिकाणी राहील तोपर्यंत त्याच्या ठिकाणी भय, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे सारे विकार राहणार.

व्यवहारात कधीतरी रागवावेच लागते. काही माणसे दुसऱ्यावर तर रागावतातच पण स्वत:वरही रागावतात. स्वत:वर म्हणजे शरीरावर. आत्म्यावर नाही. आत्म्यावर कुणी रागावू शकत नाही. जोपर्यंत भेदबुद्धी नष्ट होत नाही तोपर्यंत मनुष्याची कामक्रोधादी विकारांपासून सुटका होत नाही. याच उद्देशाने ज. रेणुकाचार्य सांगतात–

भेदबुद्धिसमुत्पन्नमहासंसारसागरम्।
अद्वैतबुद्धिपोतेन समुत्तरति देशिक:।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.११)

संसारसागराची उत्पत्ती भेदबुद्धीमुळे झालेली आहे. अहंकार आणि ममत्व हाच संसार होय. हे तुम्ही कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे. 'मी' आणि 'माझे' याचेच नाव संसार. संसार आजचा नाही तर अनादिकालापासूनचा आहे. 'मी' आणि 'माझे' या शब्दांचा आपल्या जीवनव्यवहारात मनुष्य वारंवार उपयोग करतो. त्याचा हिशोब ठेवणे शक्य नाही. आधी अहं म्हणजे मी. नंतर माझे. यालाच आद्य शंकराचार्यांनी नैसर्गिक लोकव्यवहार असे म्हटले आहे. आपल्या नावाचा उच्चार न करता मनुष्याचे काम भागेल, परंतु 'अहं' शब्दाचा, 'मी'चा उच्चार केल्याशिवाय त्याला व्यवहाराच करता येणार नाही. कुणाच्या दारावर जाऊन तुम्ही दार वाजवले आणि आतल्या व्यक्तीने जर विचारले की, 'कोण आहे?' तर तुम्ही उत्तर देता – 'मी आहे.' आतून जर पुन्हा प्रश्न आला– 'मी म्हणजे कोण?' तर तुम्ही तुमच्या व्यावहारिक नावाचा उपयोग करता. आपले व्यावहारिक नाव आपल्या जन्मानंतर बाराव्या दिवशी ठेवलेले आहे. जन्मल्यानंतर आपल्याला नाव नव्हते. जन्मल्यापासून 'मी' हे नाव निसर्गाने आपल्याला दिलेले आहे. नंतर आईवडिलांनी व्यवहारासाठी आपले नाव ठेवले आहे. जर 'मी' असेल तर 'माझे' ही असणारच. 'मी' आणि 'माझे' ही एक जोडी आहे. 'माझे' असतील तर 'मी' राहीन आणि 'मी' असेन तर 'माझे' राहतील.

'मी' म्हणजे अहंकार आणि 'माझे' म्हणजे ममत्व. मंदिरात नंदादीप तेवत असतो. त्याच्या ज्योतीचा प्रकाश सर्वत्र पसरलेला असतो. ज्योत आणि तिचा प्रकाश यांत जो संबंध आहे तोच संबंध अहंकार आणि यांच्यामध्ये आहे. अहंकार हा मनुष्याच्या आत असतो आणि त्याचे ममत्व बायको–मुले, मित्रपरिवार, नातलग, घर,

मालमत्ता असे सर्वांत पसरलेले असते. आपण एके ठिकाणी बसलेलो असतो, आपले ममत्व आपल्या अवतीभवती पसरलेले असते. काहींचे ममत्व मर्यादित असते तर काहींचे विशाल. एखाद्या रबरी तंबूसारखे ममत्व ताणले जाते. कापडी तंबू आहे तेवढाच असतो, परंतु रबरी तंबू तुम्ही जेवढा ताणाल तेवढा ताणला जातो. ममत्व तसे असते. इंग्रज या देशात प्रथम व्यापार करण्यासाठी आले, तेव्हा जणू आपल्यासोबत एक रबरी तंबू घेऊन आले. देशाच्या एका कोपऱ्यात व्यापार करता करता त्यांनी आपल्या सत्तेचा रबरी तंबू इतका ताणला की संपूर्ण हिंदुस्थान त्याच्या खाली आला. त्याप्रमाणे मनुष्याचे ममत्व रबरी तंबूप्रमाणे वाढतच जाते. आयुष्यभर तो ममत्व वाढवत असतो. 'ममत्वाचा त्याग कर' असे शास्त्र सांगते. त्याचा त्याग करता येत नसेल तर ते इतके वाढवत न्यावे की संपूर्ण चराचर त्याच्या प्रभावाखाली यावे. असे घडले तर सर्व जग तुमचे होते आणि तुम्ही कुणाचाही द्वेष करू शकत नाही.

अहंकार आणि ममत्व हाच 'संसार' शब्दाचा अर्थ आहे. आपल्या शरीरात अहं (मी) असतो तर दुसऱ्याच्या ठिकाणी ममत्व (माझे) असते. हा 'मी' आहे आणि ते 'माझे' आहे. असा हा संसारसागर तरून जाण्यासाठी उपाय करायला हवा. केवळ आपल्या शरीरापुरता मर्यादित न राहता सर्व वस्तू आणि सर्व प्राणी यांच्यात अहंभाव होणे अर्थात् सर्व विश्व म्हणजे मीच अशी भावना करणे हाच शिवोऽहम्भाव होय. त्याच भावनेच्या बळावर क्षुद्र अहंकार आणि ममत्व यांपासून जीवात्मा मुक्त होतो. हाच विषय अनेक उदाहरणांमधून ज. रेणुकाचार्य समजावून सांगत आहेत–

**अज्ञानतिमिरोद्रिक्ता कामरक्षःक्रियाकरी।**
**संसारकालरात्रिस्तु नश्येदद्वैतभानुना।।१४.१२।।**

आतापर्यंत संसाराला सागराची उपमा दिली. येथे संसाराला काळरात्रीची उपमा दिलेली आहे. रात्र माणसाला व्यसनाधीन बनवते. दिवस आणि रात्र यात आपला काळ कसा व्यतीत होतो याविषयी अक्कमहादेवीने सुरेख विवेचन केले आहे. सकाळी उठल्यापासून नाश्ता काय करायचा, भोजन कोणते बनवायचे, दुपारी काय खायचे, रात्री भोजन काय करायचे? असा विचार करण्यातच आपला दिवस निघून जातो. भोजन करण्याची चिंता पुरुषांना असते तर स्वयंपाक करण्याची चिंता स्त्रियांना असते. बिछान्यावरून उठल्याबरोबर मनुष्याचे खाणेपिणे सुरू होते. काही लोक तर खात–खातच, पीत–पीतच उठतात. याप्रकारे दिवसा अशनप्रवृत्ती असते आणि रात्री व्यसनप्रवृत्ती असते. अशन–व्यसनांतच सारे आयुष्य व्यतीत होते, बरबाद होते. अक्कमहादेवीने एका धोब्याचा दृष्टान्त दिला आहे. तो नदीवर अनेकांचे कपडे धुवत असतो. कपडे धुता धुता त्याला खूप तहान लागते. परंतु काम इतके असते की नंतर पाणी पिऊ असा विचार करून तो काम करीत राहतो. आणि शेवटी काम करता करता पाण्यावाचून तळमळत पाण्यात मरून पडतो. त्या धोब्याप्रमाणेच मनुष्याचे सारे आयुष्य अशन–व्यसनांत व्यर्थ जाते आणि स्वतःजवळच आनंदसागर असून तो तसाच तहानेल्या अवस्थेत मृत्यूच्या गावी जातो. एका हिंदी कवीने म्हटले आहे–

**ब्राह्मण के कुलमे जन्म लिया। किया धोबीका काम मैने।।**

ब्राह्मणाच्या कुळात जन्म झाला, परंतु मी ब्राह्मणाचे खरे काम–ब्रह्म जाणणे– केले नाही तर धोब्याचे काम केले. आपले शरीर धुणे, त्याचीच काळजी वाहणे हेच धोबीकाम होय. काहीजण 'आपल्या' शरीराची काळजी

घेतात तर काहीजण 'आपल्यांच्या' शरीराची काळजी घेतात. उठल्यापासून झोपेपर्यंत शरीराला धुणे-पुसणे, त्याला कपडे घालणे, त्याला जेवू घालणे, पाणी पाजणे, फिरवणे, दाखवणे, झोपवणे यांतच आपले आयुष्य सरून जाते. आपली अवस्था कशी असते? जर कुणी तुम्हाला म्हटले की, 'शिवानुभव मंगल भवनात चला, तिथे काशीजगद्गुरू आलेत, काही विद्वान लोकांची प्रवचने होणार आहे.' तर तुम्ही म्हणता, 'आज वेळ नाही उद्या पाहू.' धोबीकाम संपल्याशिवाय तुम्ही कसे येणार? परंतु तुमचे काम संपेपर्यंत इथला सत्संग सुरू असायला हवा. पाण्यात राहणारा धोबी जसा पाण्यावाचून मरतो तशीच आपली अवस्था आहे. प्रत्येक जीवात्म्याची हीच अवस्था आहे. धोब्याला पाणी पिण्यासाठी घरापर्यंत जाण्याची गरज नव्हती. पाणी तर त्याच्या जवळच होते. ओंजळभर पाणी प्याला असता तर जिवंत राहिला असता. परंतु काम संपल्यावर पाणी प्यायचे या विचाराने त्याचा घात केला. आपणही असाच विचार करीत असतो. देवाधर्माकडे आताच कशाला वळायचे? आपले अजून वय कुठे झाले? शंभर वर्षे आपल्याला जगायचे आहे. आता तर फक्त पन्नास झालेत, अजून पन्नास बाकी आहेत, असा विचार करता करताच अळवावरचा थेंब अलगद ओघळून जावा तशी आपल्या आयुष्याची इतिश्री होते. मरेपर्यंत आपल्याला वेळ मिळत नाही. वेळ आपण होऊन येत नसतो, तो काढावा लागतो.

यांप्रकारे अशनात आणि व्यसनात दिवस-रात्री निघून जातात. संसारात मनुष्याची प्रवृत्ती व्यसनाधीन होते, म्हणून त्याला 'काळरात्र' असे म्हटले आहे. संसारात भोगप्रवृत्ती अधिक होते, योगप्रवृत्ती क्वचित्‌च होते. म्हणून गीतेत म्हटले आहे- 'या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी'

आपल्यासाठी जी काळरात्र असते तेथे योगी जागा असतो. अर्थात् तो योगप्रवृत्त असतो, भोगप्रवृत्त नसतो. मनुष्याची स्वाभाविक व्यसन प्रवृत्ती दाखविण्यासाठीच येथे संसाराला 'काळरात्र' असे म्हटले आहे. ही काळरात्र कशी आहे? तर अज्ञानरूपी अहंकाराने भरलेली आहे. आपल्या आत जो अंधार असतो त्याला अज्ञान म्हणतात. अंधारात मनुष्याची वासनात्मक प्रवृत्ती होते. त्या प्रवृत्तीला येथे राक्षस असे म्हटले आहे. एखाद्या माणसाने जास्त जेवण केले तर तुम्ही त्याला 'राक्षस' आहेस की काय?' असे म्हणता. कितीही खाल्ले तरी ज्याची तृप्ती होत नाही त्याला राक्षस म्हणतात. कामरूपी राक्षस असाच आहे. त्याला कितीही भोग दिला तरी त्याची भूक शमत नाही. यासाठीच भर्तृहरीने म्हटले आहे- मी भोग भोगायला गेलो, परंतु भोगानेच माझा भोग घेतला. 'भोगा न भुक्ता वयमेव भुक्ता:'

अग्निकुंडातला अग्नी विझवण्यासाठी जर त्यात तूप ओतले तर तो अग्नी न विझता जसा अधिकाधिक भडकत जातो त्याप्रमाणे भोग भोगून वासना कधीही शांत होत नाही. उलट ती अधिक भडकते, असा या श्लोकाचा अर्थ आहे. कामाची तृप्ती उपभोगून होत नाही तर विवेकाने होते. काम हा एक राक्षस आहे. तो रात्री जागा होतो. त्याला कितीही खाऊपिऊ घातले, भोग दिले तरीही सकाळी तो अतृप्तच राहतो. जोपर्यंत रात्र आहे तोपर्यंत राक्षसाचा व्यवहार चालूच राहणार. कामरूपी राक्षसाचा नाश करायचा असेल तर संसाररूपी काळरात्र नष्ट करायला हवी. अद्वैतसूर्य उगवला की संसाररात्र संपून जाते. सूर्य उगवला की विरून जाणाऱ्या रात्रीसारखी. अद्वैतज्ञानानेच संसाररूपी काळरात्रीचा नाश होऊ शकतो. हा अद्वैतसूर्य उगवावा यासाठी शिवोऽहम् भावनेची साधना करायला हवी. आपला आत्मा शिवस्वरूप आहे असे ज्ञान झाल्यावर संपूर्ण जग म्हणजे मीच आहे असा साक्षात्कार होतो. त्यावेळी संसाररूपी काळरात्र नष्ट होते.

**तस्मादद्वैतभावस्य सदृशो नास्ति योगिनाम्।**
**उपायो घोरसंसारमहातापनिवृत्तये।।१४.१३।।**

येथे संसाराला ‘घोर’ असे म्हटले आहे. घोर आणि अघोर ही दोन रूपे आहेत. शिव घोर आहे आणि अघोरही आहे. जे रूप पाहून मनुष्य भयभीत होतो ते रूप घोर होय. संसार मनुष्याला भयकारक आहे. असा घोर संसार नष्ट करण्यासाठी योगीलोकांना अद्वैतभावनेमुळे आपल्यावाचून दुसरा कुणी शिल्लक राहत नसल्याचे भय वाटण्याचे कारणच उरत नाही.

**अद्वैतभावनाजातं क्षणमात्रेऽपि यत्सुखम्।**
**तत्सुखं कोटिवर्षेण प्राप्यते नैव भोगिभिः।।१४.१४।।**

कोट्यावधी वर्षे सांसारिक भोग भोगून जे सुख मिळते ते तराजूच्या एका पारड्यात आणि क्षणकाल अद्वैत केल्याने जे सुख प्राप्त होते ते दुसऱ्या पारड्यात ठेवून जर तोलून पाहिले तर दुसरे पारडेच भारी भरते, असा योगीलोकांनी निर्णय केला आहे. कोट्यवधी जन्म घेऊन आपण सांसारिक सुख भोगले आहे. मागील जन्माचे सोडा परंतु या जन्मात देखील कित्येक वर्षे सांसारिक सुख भोगून आपली तृप्ती होत नाही. शिवचिंतन केल्यामुळे मनाला जी अपार शांती लाभते तिच्या शतांशाने देखील भोगापासून तृप्ती मिळत नाही. याचा आपण अनुभव घेऊ शकतो. शेवटी या स्थलाचा समारोप करतात–

**चित्तवृत्तिसमालीनजगतः शिवयोगिनः।**
**शिवानन्दपरिस्फूर्तिर्मुक्तिरित्याभिधीयते।।१४.१५।।**

भोगापासून निवृत्त झालेला शिवयोगी आपल्या चित्तवृत्तींना शिवचिंतनात निमग्न करतो. त्यावेळी त्याला शिवानंदाचे जे परिस्फुरण होते त्याला मुक्ती म्हणतात. सांसारिक विषयांपासून सुटका होऊन शिवचिंतनात निरंतर रत होणे हाच मुक्तीचा अर्थ होय. हेच ऐक्यस्थल आहे. शिवचिंतनामुळे आपल्याला व्यावहारिक जीवनात देखील समाधान लाभते आणि आध्यात्मिक जीवनात देखील अपार शांतीचा लाभ होतो. अशी अंतर्बाह्य शांती म्हणजे मुक्ती होय. प्रत्येकाने सकाळी, माध्यान्ही आणि सायंकाळी शिवपूजा करावी, शिवध्यान करावे, मंत्रजप करावा. असे केल्यावर भोगसुख आणि योगसुख यांच्यामध्ये किती अंतर आहे याची कल्पना येते. त्यानंतर तुमचे जीवन योगमार्गानेच व्यतीत करण्याचा तुम्ही निश्चय कराल. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
१६ जुलै १९९२



## आचारसंपत्तिस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

अभेदभावनेच्या बळावर भेदबुद्धी नष्ट करून आपल्या मूळ शिवरूपात विलीन होणे, यालाच मुक्ती म्हणतात. हेच ऐक्यस्थल होय, असे आपण कालच्या आशीर्वचनात ऐकलेले आहे. यानंतरचे अवांतरस्थल आहे आचारसंपत्तिस्थल. जीवन्मुक्ताची दिनचर्या कशी असते? जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत प्रत्येकाला जगावेच लागते. प्रारब्धकर्म भोगल्याशिवाय संपत नाही. उपभोग घेतल्याशिवाय प्रारब्धाचा क्षय होत नाही. ज्या कर्मामुळे आपल्याला देह प्राप्त झाला आहे त्याला 'प्रारब्ध' म्हणतात. जे कर्म परिपक्व होते, फल देण्यासाठी सिद्ध होते त्या कर्माचे फळ म्हणून आपल्याला शरीर मिळालेले असते. शरीराला 'भोगायतन' असे म्हणतात. जीवात्म्याला त्याच्या प्राक्तनाचा भोग घेण्यासाठी शरीर मिळालेले आहे. एकदा भोग सुरू झाला की तो संपेपर्यंत कोणाचीच सुटका होत नाही. एखादा दगड हाती घेऊन तुम्ही भिरकावला तर त्याची गती संपेपर्यंत तो पुढे जातो आणि ती संपताच खाली पडतो. त्याप्रमाणे जोवर प्रारब्ध भोगून संपत नाही तोवर जीवन्मुक्तालाही शरीर वाहावेच लागते. गती संपल्यावरच जसा दगड खाली पडतो त्याप्रमाणे प्रारब्धकर्म संपल्यावरच जीवन्मुक्ताचे देहपतन होते.

आपले शरीर प्रारब्धाच्या अधीन असते. प्रारब्धाच्या दृष्टीत ज्ञानी आणि अज्ञानी असा भेद नसतो. हा अज्ञानी आहे. याला दुःख दिले पाहिजे आणि हा ज्ञानी आहे, याला दुःख देऊ नये, असा पंक्तिप्रपंच प्रारब्धाजवळ नसतो. प्रारब्धाच्या दृष्टीने सारे जीव समान असतात. म्हणून प्रारब्ध निमूटपणे भोगले पाहिजे असे संत सांगतात. 'आलिया भोगासी असावे सादर' असे संत तुकारामांनी म्हटले आहे ते याचसाठी. येथे प्रश्न उपस्थित होतो की, मनुष्य एकदा जीवनमुक्त झाला, तो परमात्म्याशी एकरूप झाला, त्याच्याशी समरस झाला तर त्याचे देहपतन होते की तो तसाच राहतो? जीवन्मुक्त झाल्यावर जर तो मरेल तर जीवन्मुक्ती हा एक रोगच ठरेल. जसे हार्टफेल होताच माणूस मरतो, रक्तदाब वाढल्यावर, रक्तात साखर वाढल्यावर माणूस मरतो त्याप्रमाणे जीवन्मुक्त झाला की मेला असे घडले तर जीवन्मुक्तीला एक प्रकारचा रोग म्हणता येईल. दुसरा प्रश्न असा आहे की जीवन्मुक्त होताच जर जीवात्मा देह सोडत असेल तर ज्ञानी पुरुष या जगात राहणारच नाहीत. मग अज्ञानी लोकांना मार्गदर्शन कोण करील? म्हणून जीवन्मुक्ती ही एक अवस्था मानली जाते. काही जण तर विदेह-मुक्तीलाच खरी मुक्ती मानतात. परंतु ज्ञानपरंपरा चालत राहते, मुक्तीनंतरही ज्ञानी पुरुषांचे पृथ्वीवर वास्तव्य असते. म्हणून जीवन्मुक्तीनंतरही प्रारब्धाचा ऱ्हास होईपर्यंत जीवन्मुक्ताचे शरीर जिवंत असते. अशा जीवन्मुक्ताची दिनचर्या कशी असते? त्याविषयी ज. रेणुकाचार्य येथे सांगतात-

**शिवैकभावनापन्नशिवत्वो देहवानपि।**
**देशिको हि न लिप्येत स्वाचारैः सूतकादिभिः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.१६)

ज्ञानी माणूस कर्म करीत असतो आणि अज्ञानी मनुष्य देखील कर्म करीत असतो. भूलोक ही कर्मभूमी होय. येथे जो कोणी राहील त्याला काही ना काही तरी कर्म करावेच लागते. कर्मापासून कोणाची सुटका नाही. प्रपंचात

राहायचे असेल तर कर्म करावेच लागेल असे उपनिषदांत म्हटले आहे. जर ज्ञानी मनुष्य कर्मे करील तर त्याला कर्माचे फळ भोगावे लागेल आणि ते भोगण्यासाठी पुन्हा जन्म घ्यावा लागेल. अज्ञानी माणूस या जन्मात गतजन्मातल्या कर्माची फळे भोगता भोगता पुन्हा नवीन कर्म करतो आणि पुढील जन्माचे गाठोडे बांधून ठेवतो. ज्ञानी मनुष्यही जर अशीच कर्मे करत असेल तर त्यालाही कर्मफळे भोगण्यासाठी पुन्हा जन्म घ्यावा लागेल की काय? तर येथे ज. रेणुकाचार्य सांगतात की, ज्ञानी पुरुषाने कर्मे केली तरी तो त्या कर्मांनी लिप्त होत नाही. ही कर्म करण्याची एक कला आहे. कर्म तर करायचे, परंतु त्याची फळे मात्र भोगायची नाहीत. गीतेत भगवंतांनी देखील म्हटले आहे–

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।**

कर्मफळाच्या आशेने जर कर्म केले तर मनुष्य कर्माच्या जाळ्यात फसतो. फलाशा सोडून जो कर्म करतो तो मात्र कर्मजालात फसत नाही. म्हणून 'योग: कर्मसु कौशलम्' असे गीतेत सांगितले आहे. कर्म करण्याचे कौशल्य म्हणजेच योग. जो कुशलतेने कर्म करतो तो कर्मबंधनात सापडत नाही. त्यासाठी अनेक उदाहरणे दिली जातात. कमळाच्या पाकळीवर पाण्याचा थेंब पडला तरी कमळदल पाण्याने भिजत नाही, ते त्यापासून अलिप्त असते. कागदाने तयार केलेल्या कमलावर पाण्याचा थेंब पडला तर ते भिजते आणि भिजल्यामुळे त्याचे स्वरूप विकृत होते. ज्ञानी आणि अज्ञानी माणसांत एवढाच फरक आहे. ज्ञानी कमळासारखा असतो तर अज्ञानी कागदी कमळासारखा. अज्ञान्यासमोर जे काही भले–बुरे येते त्याच्याशी तो जोडला जातो. कमळावरील थेंब जसा कमळाच्या आत शिरत नाही, तद्वत् ज्ञानी मनुष्य प्रपंचात राहून देखील 'प्रपंच' त्याच्या आत शिरत नाही. सामान्य माणूस जसा व्यवहार करतो तसाच व्यवहार ज्ञानी मनुष्य देखील करतो, परंतु तो मनाने मात्र अलिप्त असतो.

प्रपंच–व्यवहारात वावरून देखील ज्ञानी पुरुष कसा अलिप्त असतो, हे समजावून सांगण्यासाठी नारळाचे उदाहरण दिले जाते. पूर्ण सुकलेले नारळ फोडले तर आतील नारळाचा डौल (खोबरे) न फुटता पूर्ण निघतो. कारण तो करवंटीला चिकटलेला नसतो. परंतु ओले नारळ जर फोडले तर त्यासोबत आतील खोबरेही फुटते, कारण ते करवंटीला चिकटलेले असते. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाचे मन देहापासून अलिप्त असल्यामुळे देहाकडून घडलेल्या कोणत्याच कर्माने ते लिप्त होत नाही. परंतु अज्ञानी माणसाचे मन ओल्या नारळातील खोबऱ्याप्रमाणे देहाशी जखडलेले असल्याने देहाकडून घडणाऱ्या कर्मांनी ते लिप्त होते. ज्ञानी आणि अज्ञानी दोघांनाही शरीरे असतात आणि ती प्रपंचात वावरत असल्याने त्यांच्याकडून काही ना काही व्यवहार घडतच असतो. तो बरा असो अथवा वाईट. ज्ञानी माणसाचा कर्मव्यवहार मनापर्यंत पोहोचत नाही. तो शरीरापुरताच मर्यादित राहतो. त्यामुळे त्याचा कोणताच परिणाम ज्ञानी माणसावर होत नाही. म्हणून जीवन ही योगकला आहे, कर्म करण्याची कला आहे. कर्म करायचे, परंतु त्यापासून अलिप्त राहायचे.

लिप्त न होता कर्म कसे करावे? कर्म करताना आपल्या मनात दोन प्रकारच्या भावना असतात. कर्तृत्वभावना आणि अभिनेतृत्वभावना. कर्तृत्वभावनेने कर्म घडले तर त्या कर्मफळाशी मनुष्य जोडला गेलाच समजावे. परंतु अभिनेतृत्वभावनेने कर्म घडले, मग ते भले असो वा बुरे, तर त्या कर्माचा जीवात्म्याशी संबंध राहत नाही. याचे

अधिक स्पष्टीकरण करता येते. कर्म करण्याआधी आपण संकल्प करतो. कोणत्या तरी उद्देशासाठी जेव्हा आपण कर्म करतो तेव्हा त्या कर्मफळाशी आपण अपरिहार्यपणे जोडले जातो. परंतु अभिनेता–भावाने जर कर्म केले तर कर्माचा जीवत्म्याशी संबंध राहात नाही. तुम्ही नाटक पाहता. नाटकात भूमिका करणाऱ्या मनुष्याला आपण अभिनेता म्हणतो. अभिनेता म्हणजे अभिनय करणारा, नाटक करणारा. त्याच्यावर जी भूमिका सोपवलेली असते, त्याप्रमाणे तो नाटक करतो. त्याला रावणाचे काम दिले तर तो रावणाप्रमाणे वागतो, त्याला रामाचे काम दिले तर तो रामाप्रमाणे वागतो, तर सीतेची भूमिका दिल्यावर सीतेप्रमाणे अभिनय करतो. त्याला जी भूमिका दिली जाते त्याप्रमाणे तो अभिनय करतो. त्याने एखादा करुण प्रसंग आपल्यासमोर उभा केला तर आपल्या डोळ्यांत अश्रू येतात, आपण रडू लागतो, त्याची भूमिका पाहताना आपल्याला जसे दुःख होते तसे अभिनेत्याला होत नसते. तो उलट खूष असतो. कशामुळे? तर आपण किती उत्तम अभिनय केला, आपल्याला नाटकातले पात्र न समजता लोक खराखुरा दुःख भोगणारा मनुष्यच समजतात या जाणिवेने. पाहणाऱ्याला जेवढे दुःख होते तेवढे नटाला होत नाही. कारण त्याला रोज तोच अभिनय करावा लागतो. खरे तर पाहणाऱ्याला दुःख व्हायला नको, कारण ते फक्त पाहणारे आहेत, द्रष्टा आहेत. करणाऱ्याला दुःख व्हायला हवे, कारण तो करणारा कर्ता आहे. परंतु येथे घडते ते उलटेच. पाहणारे रडतात आणि करणारा हसतो. हे किती अजब आहे!

येथे जो रडतो आहे तो करतो आहे. जो रडत नाही तो काही करत नाही. करून देखील तो काहीच करत नाही. अभिनय करून देखील तो काहीच करीत नाही. जो काही करत नसून रडतो याचा अर्थ काही करतो आहे. प्रपंचात कर्म करून अलिप्त राहण्याची अशीच कला आहे. म्हणून विचावंतांनी जगाला 'रंगभूमी' असे म्हटले आहे. ज्याच्या वाट्याला जी भूमिका आली असेल ती त्याने पार पाडायला हवी. पात्र एक आणि अभिनय दुसरा असे घडले तर नाटक चांगले होणार नाही.

एके ठिकाणी रामायणाचे नाटक सुरू होते. प्रसंग होता सीतास्वयंवराचा. स्वयंवरमंडप भरलेला होता. राम, लक्ष्मण, रावण सगळे येऊन बसलेले होते. राजा जनकाने उभे राहून घोषणा केली की, 'जो कोणी शिवधनुष्य उचलून त्याला प्रत्यंचा लावून दाखवील त्याच्याशी माझी कन्या विवाह करील.'

घोषणा होताच रावण उठला. त्याला तसे शिकवलेलेच होते. घोषणा झाली की उठायचे, शिवधनुष्य उचलण्याचे नाटक करायचे आणि छातीवर घेऊन पडायचे. त्याप्रमाणे तो उठला. पण त्याच्या मनात विचार आला की, प्रत्येक वेळी शिवधनुष्य घेऊन आपणच का पडायचे? खाली पडले की लोक हसतात. आपला अपमान होतो. तो एकदा नव्हे तर प्रत्येक वेळी होतो. हे काही खरे नाही आणि धनुष्य तर किती हलके आहे. ते उचलणेच काय तर मोडून टाकणे देखील सोपे आहे. असे सामर्थ्य असताना देखील आपण रोज अपमान सहन करीत आहोत.

असा विचार त्याच्या मनात आल्याबरोबर तो शिवधनुष्याजवळ गेला आणि त्याने सहज ते एका हाताने उचलले. ते पाहून सगळे आश्यर्यचकित झाले. राजा जनकालाही आश्चर्य वाटले. सारे पाहताहेत तोपर्यंत रावणाने शिवधनुष्य तोडून टाकले देखील. आता सीतेचे लग्न रावणाशी करण्याचा प्रसंग आला. जनकाने विचार केला, नाटक तर बिघडत चाललेय, थोडे सावरले पाहिजे. तो सिंहासनावरून उठून आपल्या सेवकांना म्हणाला,

'अरे हे कोणते धनुष्य आणले तुम्ही? हे शिवधनुष्य नाही, ते आत आहे. ते घेऊन या.'

त्याने असे म्हणता क्षणीच नाटकाचा पडदा पाडला गेला.

प्रेक्षकांना वाटले की खरोखरच चुकून दुसरे धनुष्य आणले गेले असावे. परंतु आत रावणाचे काम करणाऱ्या नटाला भरपूर गुद्दे खावे लागले. सर्वांनी त्याला खडसावले की, तुला धनुष्य उचलायला आणि मोडायला कुणी सांगितले? तुला फक्त अभिनय करायचा होता. तू सगळे नाटक बिघडून टाकलेस.

असे नाटक बिघडवणारे लोक जगात पुष्कळ असतात. नेमून दिलेल्या भूमिकेप्रमाणे जो चोख अभिनय करतो तोच खरा अभिनेता. जो भूमिकेला अनुकूल असा अभिनय करीत नाही त्याचे नाटक बिघडते. म्हणून जग ही रंगभूमी होय. या प्रपंचाची रचना करणारे भगवान शिव हे देखील उत्तम नट आहेत. नाट्यशास्त्रात निपुण आहेत. त्यांच्यापासूनच नाट्यशास्त्राची उत्पत्ती झाली. ते एक कुशल नट आहेत. एवढे विशाल विश्व उत्पन्न करून देखील त्यांच्या ठिकाणी अहंकाराचा लवलेश नाही. ना अहंकार, ना अभिमान, ना मोठेपणाचा सोस. एवढी निर्मिती करून ते कोठे बसले याचा आपल्याला पत्ता देखील नाही. आपण मात्र तसे नाही. थोडे काही केले तर लगेच ढोल बडवायला सुरुवात करतो. प्रचार केल्याशिवाय काही करणे आपल्याला जमतच नाही. प्रकृतीकडे आणि परमात्म्याकडे पाहा. त्यांच्या ठायी निरंतर मौन असते. प्रकृती काही बोलत नाही आणि परमात्माही काही बोलत नाही. मौनातच ही सारी सृष्टी उत्पन्न होते, मौनातच तिचे पालन होते आणि मौनातच तिचा संहार होतो.

सृष्टी निर्माण करणारा काही बोलत नाही, सृष्टी पालन करणारा काही बोलत नाही. सृष्टीचा संहार करणारा देखील बोलत नाही. ते मौन आहेत. परंतु आम्ही मात्र गप्प बसत नाही. एका कन्नड कवीने म्हटले आहे– पृथ्वी असंख्य वृक्षवेलींची निर्मिती करते, परंतु ती एक शब्द देखील उच्चारत नाही. मनुष्य मात्र मुलगा झाला की फार मोठा पुरुषार्थ केला अशा थाटात आरडाओरडा करीत लोकांना सांगत सुटतो, डांगोरा पिटतो. मुलगी झाली की मात्र सुतक्याप्रमाणे चुपचाप बसतो, रडतो. वृक्षवेली सुगंध देतात त्यावेळी काही बोलत नाहीत, फळे देतात त्यावेळी काही बोलत नाहीत. मनुष्याने त्यांना तोडले तरीही काही बोलत नाहीत. त्यांचे सारे काही मौनात चाललेले असते. परंतु मनुय मात्र जेव्हा काही करतो तेव्हा मोठ्याने ओरडत, रडत, हसत करीत असतो. त्याची अखंड बडबड चालू असते. जेवताना, उठताना, बसताना, कर्म करताना. काही लोक तर झोपेत देखील काहीतरी असंबद्ध बडबडत असतात. मराठीत त्याला 'झोपेत उसणला' असे म्हणतात. जो मनुष्य झोपेत देखील बडबड करतो तो जागा असल्यावर कसा गप्प बसेल?

प्रपंचात सारी कर्मे करून जर अलिप्त राहायचे असेल तर मनुष्याने कर्म करण्याची कला शिकायला हवी. कर्मे करावीत पण त्यांच्यापासून अलिप्त असावे. परमेश्वराने आपल्याला जेव्हा देह–मन दिले तेव्हा ते अत्यंत शुद्ध होते. परंतु आपल्या कर्मांनी आपण ते मळवून टाकले आहे. कबिराने म्हटले आहे, 'ज्यों की त्यों धरिदिनी चदरिया'

जेव्हा कबिरांचा मृत्यू समीप आला तेव्हा ते परमेश्वराला म्हणाले की, 'भगवन्, आपण मला जी चादर दिली होती ती आज मी आपल्याला परत करीत आहे. कशी परत करीत आहे? तर ज्यों की त्यों. आपण जशी दिली

होती तशीच, ती थोडी देखील मळलेली नाही.'

कबिरांनी जीवनभर आपले देह–मन शुद्ध ठेवले, परंतु आपण मात्र तसे करीत नाही. परमेश्वराने आपल्याला अत्यंत मौल्यवान वस्त्र–शरीर–मन दिले आहे. ते देखील काही न घेता, मोफत. ते जितके अधिकाधिक मलिन करता येईल तितके मळवून आपण ईश्वराकडे परत द्यायला जातो. एखादी स्त्री शेजारणीला तिची रेशमी साडी एक दिवसापुरती मागते. कारण तिच्याकडे चांगली साडी नसते. शेजारणीची रेशमी साडी घेऊन एक दिवस वापरून तेलाचे डाग पाडून जर परत केली तर ती शेजारीण म्हणते, 'तुम्हाला मी पुन्हा साडी देणार नाही, कारण साडी वापरण्याची तुमची लायकी नाही.'

मनुष्यशरीरासारखे दुसरे सुंदर वस्त्र कोणते असेल? ईश्वराकडून शरीररूपी वस्त्र मिळताना जीवात्मा त्याला सांगतो की, संसाराची यात्रा करून तुमचे हे वस्त्र मी जसेच्या तसेच परत करीन. परंतु पन्नास, साठ, शंभर वर्षांनंतर आपण हे वस्त्र इतके मळवतो की, परत गेल्यावर हे आपणच दिलेले वस्त्र आहे यावर ईश्वराचा विश्वास बसत नाही. याचे कारण आपले मन अलिप्त राहत नाही. प्रत्येक व्यवहारात ते सारखे लिप्त होत असते. जो लिप्त होतो तो बद्ध, संसारी होय. जो अलिप्त असतो तो जीवन्मुक्त असतो. व्यवहारात अलिप्त राहण्याची युक्ती कोणती? कर्तृत्वभावनेने जो कर्म करतो तो लिप्त राहतो. म्हणून जगाच्या रंगभूमीवर जी भूमिका आपल्या वाट्याला आलेली असेल ती अभिनेतृत्वभावनेने करायला हवी. मी काहीच करीत नाही या जाणिवेने करावी. नटाचे नाटकातील नाव वेगळे असते आणि खरे नाव वेगळे असते. नाटकात त्याचे राम असेल तर त्याचे खरे नाव वेगळे असते. त्याचे नाटकात कोणतेही नाव असो, तरी त्याचा अभिमान खऱ्या नावाच्या ठिकाणी राहतो. नाटकातील नावाच्या ठिकाणी राहात नसतो. याप्रमाणे आपला आत्मा शरीर–मनांपासून वेगळा असतो. परंतु शरीरात राहून आपल्या कर्मानुसार त्याला व्यवहार करावा लागतो.

त्याबद्दलच इथे सांगतात की, शिवाशी समरस झालेला जीवात्मा जरी देहधारी असला तरी तो कोणत्याही कर्माने लिप्त होत नाही आणि त्याला कोणत्याही सुतकाचे बंधन नसते. त्याच्यासाठी विधिनिषेध नाहीत. असे करा, तसे करू नका, असे शास्त्रांचे नियम जो जीव असतो त्याच्यासाठी असतात, परंतु जो शिव झाला त्याच्यावर शास्त्राची सत्ता चालत नाही. त्याच्याकरता काहीही निषिद्ध नसते. तो देहधारी असला तरीही विदेही असतो. विदेही जनकाप्रमाणे. विदेही याचा अर्थ देहधारी असून देखील ज्याला देहाचा अभिमान नाही असा. शरीरात आहे, परंतु शरीराचा अभिमान नाही. घरात आहे पण घराचा अभिमान नाही, तो विदेही होय.

व्यास महर्षींनी आपल्या पुत्राला– शुकमुनीला उपदेश घेण्यासाठी राजा जनकाकडे पाठवले. शुकाने दरबारात जाऊन पाहिले. जनक सोन्याच्या सिंहासनावर बसलेला आहे. त्याच्या बाजूला सुंदर दासी चवऱ्या ढाळीत उभ्या आहेत. शुकाला वाटले की सिंहासनावर बसलेला, भोगात रत असलेला हा राजा आपल्याला काय उपदेश देणार? हा तर भोगी दिसतो. आपण तर विरक्त आहोत.

हा विचार त्याच्या मनात आला तो जनकाने ओळखला. त्याला कळले की आपला व्यवहार पाहून हा आपल्यावर संशय घेत आहे. गुरूबद्दल जर शिष्याच्या मनात संदेह असेल तर गुरुपदेशाचा शिष्यावर प्रभाव पडत नाही. राजा जनकाने त्याच्या स्नान, भोजन आदीची व्यवस्था केली.

शुकमुनी जेथे जेवायला बसणार होते त्या ठिकाणी वर छताला अत्यंत बारीक दोऱ्याने एक तीक्ष्ण तलवार

बांधून ठेवली होती. हवेची एक झुळुक आली तर तिच्या आघाताने जेवणाऱ्याच्या डोक्यावर ती पडली असती. शुक जेवायला बसला तेव्हा त्याला ती तलवार दिसली. तो मनातून घाबरला. न जाणो हा दोरा केव्हा तुटेल आणि तळपती तलवार आपल्या मस्तकात घुसेल.

त्याने कसेबसे घाईघाईने भोजन उरकले. नंतर त्याला जनकासमोर नेण्यात आले. राजाने विचारले– ''व्यवस्था छान झाली का? आपण भोजन केले ना? भोजनात कोणकोणते पदार्थ होते?''

त्याने उत्तर दिले, ''कोणते पदार्थ होते हे काही आठवत नाही.''

''तुमचे भोजन तर झाले ना?''

''होय.''

''मग तुम्हाला नुकतेच खाल्लेल्या पदार्थांची आठवण कशी नाही?''

''महाराज'', शुकाने उत्तर दिले, ''भोजन करताना डोक्यावर तलवार टांगलेली होती. तिची दोरी तुटून कदाचित् डोक्यावर पडेल या भीतीने मी सारखा वर पहात होतो. माझ्या मनात केवळ तलवारीचेच विचार होते. त्यामुळे ताटात कोणते पदार्थ आहेत याकडे माझे लक्ष नव्हते!''

राजा हसून म्हणाला, ''मृत्यूच्या भीतीमुळे तुमचे भोजनाकडे लक्ष नव्हते. आपण काय खात आहोत याची देखील स्मृती तुम्हाला नव्हती. मृत्यूच्या चिंतनामुळे जर मनुष्याला संसाराचे इतके विस्मरण होते तर जो परमात्म्याचे चिंतन करतो त्याला संसाराचे स्मरण कसे राहील?''

तेव्हा शुकमुनींना कळले की राज्योपभोगात राहून देखील राजा जनक त्यापासून अलिप्त आहे. नंतर त्याने राजाकडून उपदेश घेतला.

याप्रमाणे संसारात राहून देखील जो अलिप्त राहतो तोच जीवन्मुक्त होय. ऐक्यस्थलातला साधक देहधारी असून देखील संसारापासून अलिप्त असतो, म्हणून तो जीवन्मुक्त होय. देहाकडून घडणाऱ्या कर्माचा त्याला अभिमान नसतो. पाण्यात राहणारे कमळ पाण्यापासून अलिप्त असते त्याप्रमाणे तो अलिप्त असतो. जीवनाची ही कला समजून जो त्याप्रमाणे वागतो त्याचे जीवन सुखी होऊ शकते. दु:खमय संसारात आपल्याला राहायचे असते. दु:खाचा प्रभाव आपल्यावर पडू द्यायचा नसेल तर प्रत्येकाने ही कला शिकायला हवी, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
१७ जुलै १९९२



## आचारसंपत्तिस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आपले मूळ स्वरूप अशा शिवाशी समरस होणे हेच प्रत्येक जीवात्म्याचे अंतिम ध्येय होय. शिवाशी समरस झाल्यानंतर प्रारब्ध–कर्म भोगण्यासाठी जो बाह्यत: जिवंत असतो, अशा जीवन्मुक्ताची दिनचर्या कशी असते याविषयी ज. रेणुकाचार्य सांगत आहेत. बद्ध जीवासाठी आचारसंहिता आहे. जीवात्म्याने नैतिक आचरण कसे करावे याविषयी शास्त्राने उपदेश केलेला आहे. परंतु जो जीवन्मुक्त असतो त्याच्यावर शास्त्राची सत्ता चालते की नाही? असा एक प्रश्न उपस्थित होतो. शास्त्र याचा अर्थ तरी कोणता? साक्षात्कारी पुरुषांनी भगवान शिवापासून ज्ञानग्रहण करून ज्ञानी जीवांच्या उद्धारासाठी केलेला उपदेश म्हणजेच शास्त्र. जे शास्त्रांचा उपदेश करतात अशा ज्ञानी पुरुषांवर कोणाची सत्ता चालते? त्यांचे आचरण कसे असावे?

ज्ञानी पुरुषाने अमुक याप्रकारे वागावे असा शास्त्रांचा कोणताच आदेश नाही. एखादा ज्ञानी भोगी असू शकेल. कृष्ण ज्ञानी होता. पण भोगी होता. शुकमुनी ज्ञानी होते, पण त्यागी होते. राम, जनक इत्यादी राजे प्रशासक होते आणि ज्ञानीदेखील होते. ज्ञानी त्यागी असावा अथवा भोगी असावा असे काही नियम नाहीत. त्याच्या प्रारब्धकर्माप्रमाणे त्याचे वर्तन घडते. तो सामान्य माणसाप्रमाणे कर्म करताना दिसतो. परंतु कर्तृत्वभावनेने तो काही करत नसल्याने कर्मापासून अलिप्त असतो, मग त्याच्याकडून भले अथवा बुरे कोणतेही कर्म घडले तरी. याविषयी आपण कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे–

**शिवाद्वैतपरिज्ञाने स्थिते सति मनस्विनाम्।**
**कर्मणा किं नु भाव्यं स्यादकृतेन कृतेन वा।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.१७)

शिवासोबत ज्याचे अद्वैतज्ञान स्थिर होते अर्थात् मी शिवस्वरूप आहे ही भावना जेव्हा दृढ होते अशा मनस्वी पुरुषाकडून भले अथवा बुरे कोणतेही कर्म घडले तरी त्या कर्माने तो लिप्त होत नाही. भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला ज्यावेळी युद्ध करण्याचा आदेश दिला त्यावेळी हे हिंसाकार्य असून यात अनेकांचे प्राण जातील असा अहिंसेचा उपदेश तो भगवान कृष्णालाच करू लागला. तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले– 'निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्'. तू फक्त निमित्त हो. सारे काही मीच करणार आहे. 'मी करतो' अशी भावना तुझ्या मनात निर्माण झाली तर कर्मफळाशी तू बांधला जाशील. मी काहीच करीत नाही, माझ्याकडून परमेश्वर सारे करून घेत आहे, ही भावना तुझ्या ठिकाणी असेल तर कर्मफळाशी तुझा संबंध राहणार नाही.

युद्धामध्ये दोन सैन्ये एकमेकांशी लढतात. एकाची हार होते तर दुसऱ्याची जीत. ज्या सैन्याचा विजय झाला त्या सैन्याला विजयाचे श्रेय दिले जात नाही. सैन्याचा अभिमान असणाऱ्या राजाला दिले जाते. सैन्य पराभूत झाले तर पराभवाचा कलंक ते सैन्य ज्याचे आहे त्या राजाच्या माथ्यावर लागतो. सैनिकाला कुठला अभिमान नसतो. ते आपले कर्तव्य बजावत असतात. जय–पराजयाचे धनी अखेर राजेच असतात. दुकानावर काम करण्यासाठी नोकर ठेवलेला असतो. दुकानात अधिक नफा झाला तर नोकराला आनंद होत नाही आणि तोटा झाला तर दु:ख

होत नाही. कारण त्याचा दर महिन्याचा पगार घट्ट असतो. नफ्या-तोट्याने ता काही कमीअधिक होणार नसतो. दुकानात मालक देखील बसलेला असतो. दुकानातील व्यवहाराचा जेवढा परिणाम मालकावर होतो तेवढा नोकरावर होत नाही. मालक केवळ बसलेला असतो. तो काम करीत नाही. काम नोकरच करतो. माल आणणे, मोजून देणे, पैसे घेणे. त्याने पैसे घेतले तरी तो ते मालकाकडेच देतो. मालक फक्त पैसे मोजतो आणि ठेवून देतो. दुकानात काही काम न करता देखील नफ्या-तोट्यामुळे मालकाला सुखदु:ख होते आणि दुकानात सारी कामे करून देखील नोकर सुखी अथवा दु:खी होत नाही. यावरून आपल्या लक्षात येईल की नोकराजवळ कर्म करण्याची बुद्धी आहे, परंतु त्याचा त्याला अभिमान नाही. मालक कोणतेही कर्म करीत नसला तरी मनाने सारे काही करतो. म्हणून जो कर्माचा अभिमान धरतो त्यालाच कर्मफळे भोगावी लागतात.

एका माणसाचा रक्तदाब वाढला. त्याने अनेक औषधे घेतली. अनेक डॉक्टर बदलून पाहिले. परंतु त्याचा आजार मात्र कमी झाला नाही. शेवटी कंटाळून तो एका संताकडे गेला आणि त्यांना नमस्कार करून रक्तदाबावर उपाय विचारला. अनेक औषधे घेऊन देखील त्याचा रक्तदाब कमी झाला नाही हे संताला समजल्यावर याचे काही वेगळे कारण असावे असे त्याला जाणवले. त्याने त्या मनुष्याला विचारले,

''तुम्ही कोणते काम करता?''

''मी हॉटेल मालक आहे'', त्याने उत्तर दिले.

''तुमचा रक्तदाब कधी वाढतो?'' संताने विचारले.

''माझ्या हॉटेलसमोर दुसरे एक हॉटेल आहे त्या हॉटेलात गिऱ्हाईकांची गर्दी पाहिली की माझा रक्तदाब वाढतो.'' तो मनुष्य म्हणाला.

संताला त्याच्या आजाराचे खरे कारण समजले. त्याचवेळी त्या मनुष्याच्या समोरचा हॉटेलमालक रक्तदाब वाढला म्हणून त्याच संताकडे आला आणि त्याने पहिल्या हॉटेल-मालकाप्रमाणेच आपली व्यथा सांगितली. दोघेही एकाच आजाराने पीडलेले होते आणि दोघांचाही रक्तदाब एकमेकांच्या हॉटेलातील गर्दी पाहून वाढत होता. संत आपल्या मनात हसले. त्यांना जाणवले की स्वत:च्या हॉटेलमधल्या गिऱ्हाईकांच्या गर्दीकडे न पाहता ते दोघेही समोरच्या हॉटेलमधील गर्दीकडेच पाहात असतात. त्याने दोन्ही प्रतिस्पर्ध्यांना सांगितले-

''तुमचा आजार नक्की बरा होईल. पण मी सांगितल्याप्रमाणे तुम्ही वागले पाहिजे. तुम्ही स्वत:च्या हॉटेलच्या गल्ल्यावर बसू नका. तर जागा बदलून परस्परांच्या गल्ल्यावर बसा.''

दुसऱ्या दिवसापासून ते दोघेही एकमेकांच्या गल्ल्यावर बसू लागले आणि सवयीप्रमाणे समोरच्या हॉटेलकडे पाहू लागले. समोरच्या हॉटेलमधील गिऱ्हाईकांची गर्दी पाहून त्यांना हर्ष होऊ लागला. कारण ते हॉटेल त्यांचे होते. प्रतिस्पर्ध्याचे नव्हते. थोड्याच दिवसात दोघांचाही रक्तदाब कमी झाला.

या कथेचे तात्पर्य असे की, आपल्या शरीरावर आणि मनावर परिणाम होण्याचे एकमात्र कारण म्हणजे अभिमान. ज्या स्थानाविषयी अथवा ज्या व्यक्तीविषयी आपल्या मनात अभिमान असतो त्या स्थानाला अथवा व्यक्तीला थोडी जरी इजा पोहोचली तरी आपले मन अस्वस्थ होते. परंतु ही झाली सामान्य माणसाची कथा. मनस्वी मनुष्याची कथा यापेक्षा वेगळी आहे. 'मनस्वी' याचा अर्थ ज्याचे मन श्रेष्ठ आहे असा. मन प्रत्येकाजवळ असते, परंतु ते श्रेष्ठ असतेच असे नाही. सामान्य माणसाकडे असते ते विकारांनी बरबटलेले निकृष्ट मन. येथे मनस्वीचा अर्थ आहे श्रेष्ठ मन असलेला, सात्त्विक मन असलेला. असा मनस्वी मनुष्य शिवज्ञानसंपन्न असल्यामुळे

अर्थात् मी शिवस्वरूप आहे अशी भावना त्याच्या मनात दृढ असल्यामुळे तो संपूर्ण प्रपंचाकडे समानरूपाने पाहतो. प्रपंचाकडे कसे पाहायचे हे आपल्या मनावर अवलंबून असते. जसे आपले मन असते तशी आपली दृष्टी होते. अशा मनस्वी मनुष्याची कर्मात कर्तृत्वभावना नसल्यामुळे त्याच्याकडून भले-बुरे कोणतेही कर्म घडले तरी त्याचा थोडादेखील स्पर्श त्याच्या मनाला होत नाही. अभिमान सोडून जगण्याची कला हीच जीवन्मुक्तीची कला आहे. म्हणूनच तुकारामांनी म्हटले आहे- 'अभिमान सोडा आणि मुक्ती रोकड घ्या.'

तुम्ही दुकानात पाटी लिहिता- 'आज रोख कल उधार' म्हणजे तुम्हाला उधार नको, रोकड हवे. पैसा द्या आणि माल घ्या. उधार दिल्यामुळे उधारी वसूल होईल की नाही अशी तुम्हाला चिंता असते. संताजवळ जाऊन जर कोणी मुक्ती मागितली तर तो तुकाराम महाराजाप्रमाणेच उत्तर देईल. येथे उधार चालत नाही, सारे रोख लागते. मुक्ती मिळवण्यासाठी काय समर्पित करावे लागते? किती धन द्यावे लागेल? तुकाराम म्हणतात की, तुमचे धन नको. ते तुमच्यापाशीच ठेवा. तुमच्या ठिकाणी असलेला अभिमान अर्पण करा. धनाचा, रूपाचा, सत्तेचा. मुक्ती रोखच घेऊन जा. ती कधी मिळेल याची चिंताच नको. अभिमानामुळेच जीवात्मा बंधनात आहे. अभिमान सुटला की जीवात्मा मोकळा.

ज्याला आपल्या कर्माचा अभिमान असतो त्याच्या मागेच पुण्य-पापाचा ससेमिरा लागलेला असतो. अशा माणसालाच सुख-दु:खे भोगावी लागतात. पुण्य-पाप कोठे राहते? आणि सुख-दु:ख कोण भोगते? याचा थोडा विचार येथे करायला हवा. आपण नेहमी म्हणतो की मी दु:खी आहे. हा दु:खी होणारा कोण? मी म्हणजे शरीर आहे की इंद्रिये? की मन? की बुद्धी? 'मी'चा अर्थ कोणता? 'मी' चा अर्थ कळल्यावर सुख-दु:ख कोठे होतात याचे ज्ञान होते.

अहं म्हणजे मी. ही अंत:करणवृत्ती आहे. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे चार मिळून अंत:करण बनलेले आहे. अहं अथवा मी मनातच आहे. ज्याच्या ठिकाणी अभिमान असतो त्यालाच सुख-दु:ख होते आणि पाप-पुण्यदेखील तेथेच राहते. त्यांची फळेही अंत:करणच भोगते. शरीर, इंद्रिये, अंत:करण या पलीकडे असलेले चैतन्यतत्त्व आपण आहोत. आपण आत्मा आहोत. शरीर म्हणजे आपण नव्हे, इंद्रिये म्हणजे आपण नव्हे, अंत:करण म्हणजे आपण नव्हे. त्यांच्याद्वारे आपण व्यवहार करतो. आपण घरात बसतो. कधी दारे-खिडक्या उघडतो. कधी बंद करतो. दारे-खिडक्या आपोआप उघडत नाहीत अथवा आपोआप बंद होत नाहीत. दारे-खिडक्यांची उघडझाप, घरातल्या पंख्याचे फिरणे-बंद होणे, दिवे लागणे-बंद होणे हे सर्व आपोआप होत नाही. घरात बसलेला कुणीतरी त्याचे नियंत्रण करीत असतो. दार उघडे असेल तर कुणीतरी घरात आहे. दार बंद असेल तर घरमालक एकतर बाहेर गेला असेल किंवा दार बंद करून आत निवांत झोपला असेल. असे आपण ओळखतो. घरांची बाह्य लक्षणे पाहून घरात राहणाऱ्या व्यक्तीविषयी आपण अनुमान करतो. त्याप्रमाणे शरीरदेखील एक प्रकारचे घरच होय. आपल्या घराला एखादे-दुसरे दार असते. या शरीराला तर नऊ दारे आहेत. नऊ दारे असलेल्या शरीररूपी घरात बसलेला जीवात्मा कोणते तरी एखादे दार उघडून आपले व्यवहार करीत असतो.

शरीर, इंद्रिये इत्यादी जीवात्म्याच्या भोगाची साधने होत. जीवात्मा म्हणजे शरीर नव्हे. शरीराला कुणी मारले अथवा शिक्षा दिली तर आपल्याला दु:ख होते. हे दु:ख नेमके कुठे होते? दु:ख शरीराला होत नाही, ते होते मनाला. तुम्ही कधीकधी म्हणता देखील- माझ्या मनाला फार दु:ख झाले. माझ्या शरीराला दु:ख झाले, माझ्या

इंद्रियांना दुःख झाले, असे कोणी म्हणत नाही. सुख-दुःखे मनालाच होतात. सुख-दुःखांना कारणीभूत असलेले पुण्य-पाप मनातच असते. आत्मा मनाच्या समीप असल्याने आणि त्याने मनाच्या ठिकाणी अभिमान धरल्यामुळे सुखदुःखे मन भोगत असून देखील आत्मा मात्र 'ती मीच भोगतो आहे' असे समजतो. मी सुखी आहे, दुःखी आहे असे मानतो. गुरूपदेशाने जेव्हा शिवज्ञान प्राप्त होते त्यावेळी आत्मा आणि मन यांच्या पृथक्‌पणाचे ज्ञान होते. अभिमान धरणारे अंतःकरण आणि अभिमानरहित आत्मा यांच्या वेगळेपणाचे ज्याला ज्ञान होते तो आपल्या सर्व क्रियाकर्मांचा साक्षी होऊन राहतो.

कोर्टात नेहमी साक्षीदाराला बोलावले जाते. साक्षीदार याचा अर्थ प्रत्यक्ष घटना पाहणारा. साक्षीदाराच्या मनात एका पक्षाबद्दल प्रेम आणि दुसऱ्या पक्षाबद्दल द्वेष असू नये. तरच तो खरा प्रामाणिक साक्षीदार. असे नसेल तर त्याची साक्ष प्रामाणिक असणार नाही. आजकाल कोर्टात असे खरे निष्पक्ष साक्षीदार भेटत नाहीत. याचा साक्षीदार एक असतो, तर त्याचा दुसरा. बुद्धिमान न्यायाधीशाला सगळे तपासून त्यातला निष्पक्ष साक्षीदार कोणता हे ठरवावे लागते. त्याप्रमाणेच जीवात्म्याला प्रत्येक व्यवहारात साक्षी बनून राहायला हवे. परंतु जीवात्मा साक्षी बनून राहात नाही. तो कुणीकडे तरी झुकलेला असतो. कधी बुद्धीकडे, कधी मनाकडे, कधी इंद्रियाकडे तर कधी शरीराकडे. त्याच्याकडून जे कर्म घडते ते आपणच करत आहोत असे समजून तो व्यवहार करतो. त्यामुळेच त्याला सुख-दुःखांचा अनुभव येतो. परंतु जो ज्ञानी असतो तो स्वतःचे आत्मस्वरूप जाणून साक्षी म्हणून सर्व व्यवहाराकडे पाहतो. त्यामुळे तो सुख-दुःखांपासून मुक्त असतो.

**शंभोरेकत्वभावेन सर्वत्र समदर्शनः।**
**कुर्वन्नपि महाकर्म न तत्फलमवाप्नुयात्।।१४.१८।।**

ऐक्यस्थलात गेल्यावर जीवात्म्याची दृष्टी बदलते. सर्व व्यवहार दृष्टीचाच आहे. जशी दृष्टी तशी सृष्टी. दृष्टीमुळेच तर माणूस सुख-दुःख भोगत असतो. ज्याची भेददृष्टी असते त्याला आपल्या प्रत्येक कर्माचे फळ भोगावे लागते. परंतु शिवज्ञानसंपन्न शिवयोग्याची दृष्टी कशी असते? तर सांगतात- शिवाची जशी दृष्टी असते तशी शिवयोग्याची दृष्टी असते. शिवाची समदृष्टी आहे. शिवाच्या दृष्टीत विषमता नसते. एकावर अधिक कृपा करायची दुसऱ्यावर कमी, असा प्रकार भगवान शिवाच्या ठिकाणी नसतो.

ईश्वर पावसासारखा आहे. आपण शेतात बी पेरतो. पाऊस आला की ते रुजते, अंकुरते. शेतातील आंबा, लिंब इत्यादी वृक्षदेखील पाऊस आला की तृप्त होतात, वाढतात. कालांतराने त्यांना फुले-फळे धरतात. फळांची चव वेगवेगळी असते. एखादे मधुर तर एखादे आंबट. जमीन एकच आहे, पाणी एकच आहे. मग ते पावसाचे असो, विहिरीचे असो की तलावाचे. एकाच जमिनीत, एकाच पाण्यावर वाढलेल्या वृक्षाच्या फळांचा स्वाद इतका वेगळा कसा? एकाचा मधुर तर दुसऱ्याचा आम्ल! यात दोष असला तर तो कोणाचा असेल? जमिनीचा? पाण्याचा? की बी पेरणाऱ्याचा? यात कोणाचाच दोष नाही. असलाच तर तो बीजाचा आहे. विषमतेचे कारण बीजच होय. जमिनीत पेरलेली बीजे एक प्रकारची नसतात, नाना प्रकारची असतात. ती आपापल्या शक्तीनुसार पृथ्वीतल्या रसांचे ग्रहण करतात.

पृथ्वीत षड्रस आहेत. सर्व प्रकारचे रंगदेखील भूमीत आहेत. परंतु एखादे फूल पांढरे होते, एखादे पिवळे, एखादे गुलाबी, तर एखादे अनेकरंगी. भूमीत सर्व रंग अवस्थित असले तरी एखादे बीज विशिष्ट रंगच शोषून घेते. त्याप्रमाणे फळझाडे देखील आपल्याला अनुकूल असाच रस भूमीतून शोषून घेतात. समदृष्टी असलेल्या शिवाच्या

सृष्टीत आपल्याला अशी विषमता दिसते. प्रपंचात समानता नाही, विषमता आहे. दोन माणसे एकसारखी नसतात. एकासारखी दुसऱ्याची बुद्धी नसते. एकाच्या विचारासारखा दुसऱ्याचा विचार नसतो. जगात जेवढी माणसे आहेत तेवढ्या सगळ्यांची शरीरे, मन, बुद्धी हे सारे परस्परभिन्न, वेगवेगळे आहे. एखाद्या प्रसंगी चार माणसे समान बुद्धीने एकत्र येतात, पण थोडा काळ जाताच ते आपापल्या बुद्धीनुसार वागायला लागतात. म्हणून प्रपंच विषम आहे. परंतु या विषम प्रपंचाची निर्मिती करणारा शिव मात्र समदृष्टी असलेला आहे. ही एक गंमत आहे. समदृष्टी असलेल्याने निर्माण केलेल्या सृष्टीत समानता असायला हवी, परंतु येथे तर विषमता आहे.

यात शिवाचा काहीच दोष नाही. जीवात्म्याच्या प्रारब्धानुसार तो सृष्टिनिर्मिती करतो. तुम्ही दुकानात खरेदीसाठी जाता. तेथे अनेक वस्तूंचा संग्रह असतो. साखरेची पोती भरलेली असतात. एखादे गिऱ्हाईक येऊन साखरचे पोते खरेदी करते, तर दुसरे गिऱ्हाईक एक किलो साखर. हे पाहून तुम्ही दुकानदाराला जर विचारले, 'याला एक पोते का दिले? आणि त्याला एक किलोच साखर का दिली?' तर तो उत्तर देईल- 'ह्याने एक पोते मागितले म्हणून दिले, त्याने एक किलोच मागितली म्हणून त्याला तेवढीच दिली. त्याने एक पोते मागितले असते तर तेही दिले असते.'

मागायला काय, माणूस कितीही मागेल. परंतु त्यासाठी काही द्यायला हवे. काही दिल्याशिवाय मिळाले असते तर लोकांनी सारेच मागून नेले असते. फुकट कोणाला नको असते? परंतु गिऱ्हाईक जेवढे पैसे देईल तेवढेच दुकानदार त्याला देत असतो. त्याप्रमाणे परमेश्वर देखील तुम्ही त्याला जेवढे द्याल तेवढ्या किंमतीचाच माल तुम्हाला देत असतो, अधिक देत नाही. व्यावहारिक जीवनात दुकानदार कधी अधिक पैसे घेऊन कमी माल देऊ शकतो. तोलून देण्यामध्ये इकडे-तिकडे करू शकतो. परंतु ईश्वराचा तराजू मात्र थोडा देखील कमीअधिक होत नही. तो तंतोतंत असतो. तो एक पैचा माल कमी देणार नाही. याचेच नाव समदृष्टी होय. सगळ्यांना सारखे देणे असे नाही, तर जो जेवढे देईल तेवढेच त्याला देणे. ही एक प्रकारची समदृष्टी आहे. आपण कितीही प्रयत्न केला तरी प्रपंचात समानता येणे शक्य नाही, तो सम होणार नाही. कित्येकांनी प्रयत्न केला तरी प्रपंच विषमच राहिला. प्रत्येकाचे प्रारब्ध वेगळे आहे, त्यात सारखेपणा आणता येत नाही.

समजा, एका गावात दहा श्रीमंत आणि हजार गरीब माणसे आहेत. त्यांच्यात समानता आणण्यासाठी त्या श्रीमंतांची सर्व संपत्ती एकहजार लोकांमध्ये सारखी वाटली, तर त्यांच्यात समानता येईल का? हजार लोकांना सहजपणे पैसा मिळाला, सहजपणे संपत्ती मिळाली तर ते जपून ठेवू शकतील काय? त्यांपैकी बहुसंख्य लोक ती चैक-पाण्यात उधळून टाकतील आणि पुन्हा कंगाल होतील. म्हणून कुणाची संपत्ती हिरावून घेऊन ती लोकांत वाटून आपण समानता आणू शकत नाही. तसे केल्यावर काही काळ समानता आल्याप्रमाणे दिसेल इतकेच. प्रत्येकाचा स्वभाव, चारित्र्य, परिश्रमशीलता यांमध्ये फरक असतो. त्यामुळे ते पुन्हा आपल्या स्वभावानुसार वागू लागतात. सृष्टिनिर्मात्या शिवाची दृष्टी सम असली तरी सृष्टीमध्ये येणारे जीवात्मे भिन्न असतात. त्यांचे स्वभाव विषम असतात.

व्यवहारामध्ये आपण पाहतो. एखाद्या मनुष्याला चार मुले असतात. मृत्युपूर्वी तो आपली संपत्ती चौघांना सारखी वाटून टाकतो. कुणाला कमी देत नाही की कुणाला अधिक. वडिलांकडून चौघांना सारखीच मालमत्ता मिळाली असली तरी चौघांचे वर्तन एकसारखे नसते. कुणी मिळालेली संपत्ती कमाई करून वाढवतो तर कुणी

ती गमावतो. त्यामध्ये त्यांच्या वडिलांचा काही दोष नसतो. वडिलांच्या दृष्टीत चौघेही समान असतात. मुलगा बुद्धिमान असो की निर्बुद्ध, तो सगळ्यांना सारखेच वाटून देतो. परंतु कुणी कमावतो तर कुणी गमावतो. आपण आपली कर्म दुसऱ्यांना देऊ शकत नाही किंवा दुसऱ्याचे घेऊ शकत नाही. प्रत्येकाचे प्रारब्धकर्म वेगळे असल्यामुळे या प्रपंचात जी विषमता दिसते ती जीवात्म्यांच्या कर्मामुळे. सृष्टिनिर्मात्या शिवामुळे नव्हे. शिवाच्या ठिकाणी कोणतीही विषमता नाही. त्यांच्या दृष्टीने सारे समान आहेत.

भगवान शिवाप्रमाणे शिवयोग्याची दृष्टी देखील सम असते. त्याचा स्वभाव शिवाप्रमाणे होतो. प्रत्येकाकडे समदृष्टी असायला हवी. समदृष्टीमुळे आपणही सुखी होतो आणि प्रपंचाचील इतर जीव देखील सुखी होतात. प्रत्येकाच्या ठिकाणी असलेला आत्मा सम आहे. त्यात विषमता नाही. शरीरांत वैषम्य आहे, शरीरधर्मांत वैषम्य आहे; इंद्रियांत विषमता आहे. मन, बुद्धी यांमध्ये विषमता आहे. परंतु आत्मस्वरूपात समानता आहे. कोणत्याही जातिधर्माचा मनुष्य असो, त्याचा आणि आपला आत्मा समानच आहे. गीतेत भगवंतांनी म्हटले आहे-

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः।।**

वेदाध्ययन करणारा ब्राह्मण असो, चांडाल असो, कुत्रा असो, की हत्ती असो. जो पंडित असतो तो सर्वांकडे समदृष्टीने पाहतो. सर्वांमध्ये समबुद्धी याचा अर्थ कोणता? हत्तीला कुत्रा आणि कुत्र्याला हत्ती समजणे असे नाही तर त्यांच्या ठिकाणी असलेला आत्मा एकच आहे असे मानणे. व्यवहारात भेद असला तरी अध्यात्मात समानता असते. अद्वैत ही एक दृष्टी आहे. भावाद्वैतं समाचरेत्। क्रियाद्वैतं न समाचरेत्।।

क्रियाकर्मात अद्वैत आणले तर व्यवहार बिघडतो. म्हणून भावनेत अद्वैत असावे. आपला मुलगा आणि कुत्रा यांचा आत्मा एक आहे हे खरे असले तरी भोजन करताना आपण पुत्राला जवळ घेऊन भोजन करतो, कुत्र्याला जवळ घेऊन बसत नाही. परंतु कुत्र्यावर तुम्ही पुत्रवत् प्रेम मात्र करू शकता. तुमच्या प्रेमव्यवहारात तुम्ही भेद करू नका. प्रेम करणे हा देखील भावनेचाच भाग आहे. परंतु व्यवहारात साऱ्यांना एकत्र करू म्हटले तर अनर्थच होण्याची शक्यता आहे.

एकदा गुरूने शिष्याला बोध केला की, तुझ्यात-माझ्यात, हत्तीत-कुत्र्यात राहणारा आत्मा एकच आहे. असा उपदेश ऐकल्यावर शिष्य घरी जाण्यासाठी निघाला.तो रस्त्याच्या मध्यावरून डोलत डोलत गुरूच्या उपदेशाचे मनन करीत चालत होता. तेवढ्यात पाठीमागून एक पिसाळलेला हत्ती धावत आला. हत्तीवर बसलेला माहूत लोकांना मोठमोठ्याने ओरडून सांगत होता, 'बाजूला सरका, बाजूला सरका. हत्ती पिसाळलेला आहे.'

त्याचे ओरडणे ऐकून बाकीचे लोक बाजूला पळाले. परंतु हा मात्र रस्त्यावरच चालत राहिला. त्याने विचार केला की, हत्तीच्या ठिकाणी आणि आपल्या ठिकाणी असलेला आत्मा एकच आहे. तेव्हा आत्म्याला आत्मा कसा मारेल? तो म्हणजे मी आहे. मी म्हणजे तोच आहे.

हत्ती पिसाळलेला होता. त्याला कुणी सापडले नव्हते. रस्त्यावरून डोलत जाणाऱ्या शिष्यालाच त्याने सोंडेने उचलले आणि दूर भिरकावून दिले. शिष्य एका छतावर जाऊन पडला. बिचाऱ्याचे हातपाय मोडले. दुसऱ्या दिवशी हातापायाला बँडेज करून तो गुरूजवळ गेला आणि म्हणाला,

''गुरुदेव, आपला उपदेश ऐकून काल मोठा अनर्थ झाला. तुमच्या अद्वैतबोधामुळे माझे हातपाय मोडले आणि डोक्याला मार लागला.''

''हे कसे काय घडले?'' गुरुजींनी विचारले.

''तुम्हीच तर म्हणालात– हत्तीत, कुत्र्यात, तुझ्यात, माझ्यात, ब्राह्मणात, चांडाळात एकच आत्मा आहे.'' शिष्य म्हणाला. गुरुजींनी विचारल्यावर त्याने सगळी हकीकत सांगितली. ते ऐकल्यावर गुरुजी म्हणाले,

''तू माझा उपदेश पूर्ण ऐकला नाहीस. अर्धे ऐकले, अर्धे सोडून दिले. मी तुला सांगितले की, सगळ्यांच्या ठिकाणी आत्मा आहे. तुला हत्तीमध्ये आत्मा दिसला, परंतु हत्तीवरील माहुतात आत्मा दिसला नाही. 'बाजूला सरका' असे तो माहूत ओरडत होता. तो देखील एक आत्माच होता. त्याचे तू ऐकले नाहीस म्हणून तुझी अशी अवस्था झाली.''

सांगण्याचे तात्पर्य असे की शारीरिक दृष्टीने व्यवहारात आपण समत्वव्यवहार करू शकत नाही. कारण प्रपंच विषम आहे. त्यामधला व्यवहार विषम असणार. व्यवहारात सारे समान झाले तर संघर्ष होईल. जग–व्यवहारात विषमताच महत्त्वाची असते. स्त्री आणि पुरुष अशा भिन्नलिंगी प्राण्यांत विवाह होतो. त्यातही वराचे वय अधिक, वधूचे वय कमी, वराची उंची अधिक, वधूची कमी अशी विषमता पाळली जाते. दोन समान दर्जाची माणसे एकत्र आली तर प्रेमाने राहणार नाहीत, भांडत बसतील. पति–पत्नी समान वयाचे, सारखे शिक्षण घेतलेले आणि समान दर्जाचे असतील तर सामान्यत: त्यांच्यात कलह चाललेला आपल्याला दिसून येतो. परंतु परस्परांना समजून घेण्याची वृत्ती आणि सौहार्द त्यांच्या ठिकाणी असेल तर त्यांच्यात कलह होणार नाही. प्रशासनात देखील एकावर दुसरा अधिकारी, दुसऱ्यावर तिसरा अधिकारी अशा श्रेणी असतात. सगळ्यांना सारखे अधिकार दिले तर प्रचंड गोंधळ होईल. म्हणून व्यवहार विषमतेवर आधारलेला आहे.

प्रपंचातील व्यवहार सुरळीत चालावेत म्हणूनच निसर्गाने विषमता उत्पन्न केली. रेल्वेच्या दोन रूळांमध्ये विशिष्ट अंतर असते. ते कमी करून जर दोन रूळ एकत्र आणले तर आगगाडी धावू शकणार नाही. तिला अपघात होईल. दोन रूळांत अंतर असते म्हणूनच ती सुरळीत चालू शकते. त्याप्रमाणे सृष्टीत आणि प्रपंचात प्रत्येक मनुष्य दुसऱ्यापासून वेगळा आहे. त्यामुळेच सृष्टिव्यवहार सुरळीत चाललेला आहे. परंतु सृष्टीत विषमता असली तरी दृष्टीत मात्र ती असू नये. विषमतेमध्ये समता पाहणे यालाच समदृष्टी म्हणतात. ब्राह्मण श्रेष्ठ आहे, शूद्र कनिष्ठ आहे अशी भावना आपल्या मनात येऊ नये. आपापल्या कर्तव्यांमुळे ते वेगळे आहेत इतकेच. दृष्टी सम झाली तर प्रपंचात विषमता असून देखील ती न दिसता समता दिसू लागेल. जगातला विषमव्यवहार चालत राहील. परंतु शिवयोग्याच्या दृष्टीत मात्र समता तरळत राहील. अशी समदृष्टी लाभलेल्या शिवयोग्याने कर्मे केली तरी तो कर्मबंधनात सापडत नाही. मी काहीच करीत नाही, भगवान शिवच माझ्याकडून सारे करून घेत आहेत, अशा भावनेने तो कर्म करीत असतो आणि जीवन्मुक्तीचा आनंद उपभोगत असतो. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांति: शांति: शांति:।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
१८ जुलै १९९२



## आचारसंपत्तिस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्ताशिखामणी'तील ऐक्यस्थलातील साधकाच्या आचरणासंबंधी आपण ऐकत आहात. जीवन्मुक्त झाल्यावर देखील साधक प्रपंचात वावरत असतो. त्यावेळी त्याची दृष्टी कशी असते? त्याचा व्यवहार कसा असतो? हे पाहूनच आपण ज्ञानी व अज्ञानी यांच्यातील पृथकत्व समजून घेऊ शकतो. ज्ञानी झाल्यावर त्याच्या शरीरात काहीच प्राकृतिक बदल दिसत नाहीत. कोणी तिरुपतीची यात्रा करून आला तर आपण लगेच ओळखतो की हा तिरुपतीहून आला. कारण आपल्या डोक्यावरील केस त्याने बालाजीला अर्पण केलेले असतात. तो सांगो अथवा न सांगो, आपण त्याला विचारतोच, 'काय तिरुपतीला गेला होता काय?' परंतु याप्रकारे केवळ शरीराकडे पाहून आपण ज्ञानी पुरुषाला ओळखू शकत नाही. ज्ञान हे काही बाह्य लक्षण नव्हे, चिन्ह नव्हे की जे सगळ्यांना दिसेल. ती तर अंतरंगाची एक स्थिती आहे. परंतु त्याचा आचार, विचार व दिनचर्या पाहून आपण अनुमान करू शकतो की हा ज्ञानी आहे, जीवन्मुक्त आहे.

आपले ज्ञान हे क्रियेतून अभिव्यक्त होत असते. आपल्या क्रियेद्वारा आपण किती ज्ञानी आहोत, हे जगाला दाखवत असतो. ज्ञानी प्रपंचात राहून कसे वर्तन करतो याचे वर्णन तुम्ही काल ऐकले. भगवान शिवासोबत एकत्व स्थापित करणारा साधक समदर्शी असतो. त्याच्या ठिकाणी कोणाबद्दल विषमता नसते. हेच पुढील श्लोकात अधिक स्पष्टपणे सांगितले आहे–

**सुकृती दुष्कृती वापि ब्राह्मणो वान्त्यजोऽपि वा।**
**शिवैकभावयुक्तानां सदृशो भवति ध्रुवम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.१९)

ज्याने शिवाशी एकत्व प्राप्त करून घेतले आहे त्याच्या दृष्टीत प्रपंचात राहणारे विभिन्न लोक–पुण्यात्मा अथवा पापात्मा, ब्राह्मण अथवा अन्त्यज यांच्यातील बाह्य भेद उरत नाही. तो आत्मदृष्टीने सर्वांकडे पाहतो. कालच आपण ऐकले की व्यवहारात भेद पाहिजे. भेदावाचून, विषमतेवाचून व्यवहार चालणे शक्य नाही. सर्व एक आहेत असे अद्वैत भावनेत असावे, व्यवहारात भेदबुद्धीच चालते. त्यामुळे व्यवहार बाधित होत नाही आणि आपली बुद्धी देखील उत्कृष्ट भावनेने परिपूर्ण राहते.

या जगात पापी आणि पुण्यात्मे असे सर्वच लोक राहतात. पाप आणि पुण्य हे अंत:करणाचे धर्म आहेत. पुण्य–पाप करणारे अंत:करणच असते. शरीर हे केवळ त्याचे साधन आहे. शरीराच्या द्वारा आपण पुण्याची अथवा पापाची कमाई करू शकतो. शरीर हे धर्माचे साधन आहे. शरीर हे धर्माचे साधन असले तरी त्याच्याद्वारा अधर्मदेखील करता येतो. शरीरात अधर्माची प्रवृत्ती होते ती कोणामुळे? तर मनामुळे. कारण मन हे सर्व इंद्रियांचा अध्यक्ष आहे. पंचज्ञानेंद्रिये आणि पंचकर्मेंद्रिये यांवर मनच अधिकार गाजवते.

कर्तृत्व–भोक्तृत्वभाव मनातच असतो. जो करतो तोच भोगता. जो करीत नाही, जो अकर्ता आहे तो अभोक्ताच राहतो. शरीर काही करीत नाही, म्हणून ते भोक्ता नाही. ते केवळ भोगाचे साधन आहे. कर्म करणारे

मन आहे आणि कर्माचे फळ भोगणारेही मनच आहे. म्हणून सत्कृत्याचे फळ मनालाच मिळते, दुष्कृत्याचे फळही मनालाच मिळते. ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीत जी समता असते ती शरीराच्या संबंधात नसते. इंद्रिये, मन, बुद्धी यांच्याही संबंधात नसते. तर या सर्वांपेक्षा विलक्षण असे जे आत्मतत्त्व आहे त्याच्या संबंधात असते.

सर्वांत आधी आम्हाला दिसते ते शरीर. आत्मा सर्वांना प्रथम दिसत नाही. शरीर म्हणजे इंद्रियांचा समूह. शरीर नावाचा एखादा विलक्षण पदार्थ नाही. सर्व इंद्रिये जेथे एकत्र आली त्याचे नाव शरीर. म्हणून इंद्रिये प्रथम दिसतात. त्या पलीकडे मन, मनापलीकडे बुद्धी आणि बुद्धीपलीकडे जे आहे ते आत्मतत्त्व. शरीराकडे पाहून शरीरे समान आहेत असे ज्ञानी समजत नाही. हट्टाने समजले तरी सर्वांची शरीरे समान होत नाहीत. त्याचप्रमाणे मन आणि बुद्धी यांत समानत्व नाही. प्रत्येक व्यक्तीचे शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी हे भिन्न असल्यामुळे त्यात एकत्वभावना करता येत नाही आणि ते एक होऊ शकत नाहीत. परंतु या सर्वांपेक्षा विलक्षण सच्चिदानंदरूप तत्त्व जो आत्मा त्याच्या दृष्टीने मात्र सर्व एक आहे. आपण घर बांधतो. काही लोक झोपडीत राहतात. झोपडी असो की सिमेंटने बांधलेला बंगला असो– त्यांच्या बांधकामात, मटेरियलमध्ये भिन्नत्व असेल, कोणाचे घर लाकडाचे असेल, कोणाचे सिमेंटचे तर कोणाचे दगडाविटांचे असेल– परंतु चार भिंतीत असणारे आकाश मात्र एक असते. झोपडीतले आकाश, या भवनातले आकाश अथवा कुठलेही आकाश हे सारखेच असते.

ज्ञानी पुरुषाची समदृष्टी अशी असते. पापी माणसातही तोच आत्मा आहे आणि पुण्यवान माणसात देखील तोच आत्मा आहे. ब्राह्मणात तोच आत्मा आणि अंत्यजातही तोच आत्मा. आकाश जसे व्यापक असते तसेच परमात्मतत्त्वही व्यापक आहे. परमात्म्याचे वर्णन करताना शास्त्रकारांनी आकाशाचेच उपमान योजिले आहे. पंचमहाभूतांत परमात्म्यासारखे असणारे एकच महाभूत आहे. ते म्हणजे आकाश. परमात्म्यापासून सर्वप्रथम तेच उत्पन्न झाले. म्हणून ते परमात्म्यासारखे व्यापक आहे. परमात्म्याच्या वर्णनात आकाशाचे उदाहरण दिले जाते. उदाहरण दिल्याशिवाय परमात्म्याचा कसा बोध होणार?

परब्रह्मापासून प्रथम आकाश उत्पन्न झाले. आकाशातच आपण राहतो, फिरतो. परंतु कोणालाही त्याचा स्पर्श होत नाही. इतके ते सूक्ष्म आहे. म्हणून त्याचा अनुभव चटकन, सहजपणे येत नाही. पृथ्वी, आप, तेज आणि वायू यांचा अनुभव आपण सहज घेतो. कारण त्यांच्यात गुण म्हणजे विषय आहेत. परंतु आकाशात स्पर्श, रूप, रस, गंध हे गुण नाहीत. त्यात केवळ शब्दगुण आहे. प्रतिध्वनिरूप शब्द हा आकाशाचा गुण आहे. आकाशात एकच गुण आहे. परंतु परब्रह्मात तो देखील नाही. परब्रह्म कसे आहे? तर अशब्दम्, अस्पर्शम्, अरूपम्, अव्ययम. शब्दगुण असलेल्या आकाशाची प्रतीती जर आपल्याला सहज होत नाही तर सर्व गुणांपलीकडच्या निर्गुण परब्रह्माची कशी होईल? अवघड आहे. प्रदेश भिन्न असतील, घरे भिन्न असतील परंतु तेथील आकाश समान आहे. त्याप्रमाणे शरीरे वेगळी असतील, वर्ण, संप्रदाय, इंद्रिये, मन, बुद्धी वेगळे असतील, परंतु शेवटी उरणारे आत्मतत्त्व मात्र समान आहे. त्यात भेद नाही.

जीवाच्या आत राहतो तो जीवात्मा आणि सर्वत्र राहतो तो परमात्मा. जीव आणि परम हे शब्द औपाधिक आहेत. हे दोन शब्द काढून टाकले तर आत्मा हा आत्माच आहे. म्हणून शिवभावसंपन्न साधकाच्या दृष्टीत आत्मरूपाने सर्व समान असतात. सुकृत व दुष्कृत यांचे अर्थ कोणते? तुम्ही पुण्य करा किंवा पाप करा, ते योग्य असा अर्थ येथे नाही. पुण्यात्मा असो की पापात्मा; त्यांचा आत्मा समान आहे, शुद्ध आहे. पुण्यात्माचा आत्मा अधिक पवित्र आणि पाप्याचा आत्मा कमी पवित्र असत नाही. आत्मा सदैव शुद्धच आहे. अशुद्धी असते ती

मनात, बुद्धीत, शरीरात. म्हणून ऐक्यस्थलातील साधक ब्राह्मण-अंत्यज, पुण्यवान-पापी यांच्या अंतरंगातील आत्म्याला जाणून येथे समानता पाहतो.

**वर्णाश्रमसदाचारैर्ज्ञानिनां किं प्रयोजनम्।**
**लौकिकस्तु सदाचारः फलाभावेऽपि भाव्यते।।१४.२०।।**

येथे एक प्रश्न उपस्थित होऊ शकतो. ज्ञानी होण्याला वर्णाश्रमाचा प्रतिबंध नाही. ब्राह्मण असो की अंत्यज, दोघेही ज्ञानी होऊ शकतात. इतिहासात याचे दाखले आहेत. ज्ञानी झाल्यावर वर्णाश्रमानुसार कर्म केले नाही तर दोष घडतो का? हा येथे प्रश्न आहे. ज्ञानी ब्राह्मण संध्यावंदन, वेदाध्ययन करील. आपल्या वृत्तीप्रमाणे वागेल. आणि ज्ञानी चांडाल आपल्या वृत्तीप्रमाणे वागेल. परंतु संध्यावंदना ही कर्मे केल्यावर त्याला पुण्याची प्राप्ती होणार नाही. कारण ज्या आधारावर पुण्य-पाप उभे असतात तो आधारच नष्ट झालेला असतो. पुण्य-पाप उभे असतात मन, बुद्धी, अंतःकरणावर. परंतु ज्ञान्याचे अंतःकरण नष्ट झाल्यामुळे भाजलेले बी जसे उगवत नाही त्याप्रमाणे त्याची कर्मे फलद्रूप होत नाहीत. त्याच्या अंतःकरणात पुण्य-पापांचा संग्रह होत नाही.

ज्ञानी कधी दुराचारी असत नाही. ज्ञान होण्याआधी जो सदाचारी असतो तो ज्ञानप्राप्तीनंतर दुराचारी कसा होईल? दुराचारी होण्याची शक्यताच नाही. प्रारब्धकर्मामुळे तो दुराचारात प्रवृत्त झाला असेल तरी त्याला त्याचे फळ भोगावे लागत नाही.

**निर्दग्धकर्मबीजस्य निर्मलज्ञानवह्निना।**
**देहिवद्भासमानस्य देहयात्रा तु लौकिकी।।१४.२१।।**

निर्मल ज्ञानाग्नीने ज्याची कर्मबीजे दग्ध झाली असा ज्ञानी शरीराने सामान्यासारखा दिसत असला तरी त्याचे देहाशी तादात्म्य नसते. प्रारब्ध संपेपर्यंत त्याचा देहाशी संबंध असतो. परंतु तो 'देही' नसतो. मी या शरीरात राहतो असा भाव ज्याच्या ठिकाणी आहे तो 'देही' होय. परंतु मी सर्वत्र आहे अशी ज्याची भावना असते तो 'विदेही' असतो. त्याची भावना शरीर ओलांडून पुढे गेलेली असते. म्हणून सामान्य लोकांप्रमाणे त्याला कर्मफळे भोगावी लागत नाहीत.

कर्माचा नाश दोन प्रकारे करता येतो. भोग भोगून किंवा ज्ञान प्राप्त करून. भोगून कर्म संपवण्याचा प्रयत्न केला तर भोगता भोगता आपण नवीन कर्म करून ठेवतो. कर्म केल्याशिवाय या कर्मभूमीत कुणी राहू शकत नाही. जो ज्ञानी नसतो आणि भोग भोगून कर्मे नष्ट करण्याचा प्रयत्न करतो तो भोग भोगताना नवीन कर्मे करून ठेवतो. आपण शेतात धान्य पेरतो. पीक आल्यावर घरात साठवून ठेवतो. त्यातलेच थोडे धान्य पुढल्या वर्षी पेरणीसाठी ठेवून देतो. असे कर्मचक्र सतत फिरत राहते. याप्रकारे अज्ञानी लोक पूर्वजन्मातली कर्म भोगता भोगताच नवे कर्म करून ठेवतात आणि ते भोगण्यासाठी पुन्हा नवा जन्म घेतात. असे त्यांचे अखंड भ्रमण चालू असते. परंतु ज्ञानी पुरुष मात्र ज्ञानाग्नीने आपली कर्मबीजे जाळून टाकतो. त्यामुळे त्याने केलेली कर्मे फलद्रूप होत नाहीत. अर्थात् त्याची फळे त्याला भोगावी लागत नाहीत.

ज्याने ज्ञानरूपी अग्नीत आपली कर्मबीजे दग्ध केली अशा ज्ञानी पुरुषाची त्यानंतरची अवस्था केवळ दिसण्यापुरती असते. तो देहधारी दिसतो. परंतु कर्मात त्याचे मन नसते. येथे एक प्रश्न उपस्थित होतो. प्रत्येकाने नित्यकर्म केले पाहिजे असा शास्त्रांचा आदेश आहे. ज्याचा जो वर्ण आणि आश्रम असेल त्याला अनुकूल

नित्यकर्म प्रत्येकाने करायलाच हवे. नित्यकर्म केल्याने विशेष पुण्यलाभ होत नाही. परंतु न केल्यामुळे मात्र पाप होते. त्यामुळे नित्यकर्म सर्वांनी करावे असे शास्त्र सांगते. परंतु ज्ञानी पुरुषाने नित्य कर्म केले नाही तर त्याला मात्र पाप लागत नाही असे येथे सांगितले आहे. वरवर पाहता ज्ञानी पुरुषाचे वर्तन सामान्य माणसाप्रमाणे दिसते. परंतु ते तसे नसते हे समजावण्यासाठी दग्धपटन्याय सांगितला जातो. एकावर एक रचून ठेवलेला कपड्यांचा गठ्ठा काही कारणामुळे जळून गेला तरी दुरून पाहणाऱ्याला तो जसाच्या तसाच दिसतो. परंतु त्याला थोडा धक्का लागला तर तो कोसळून पडतो आणि त्याची राख होते. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाचे शरीर जळून गेलेल्या कपड्याच्या ढिगाप्रमाणे व्यवहारासाठी अनुपयुक्त असते. जळून गेलेले कापड आपण वापरू शकत नाही. त्याप्रमाणे त्याचे शरीर दिसण्यापुरते शरीर असते. त्याच्याकडून पापकर्मही घडत नाही आणि पापांचा आश्रयदेखील ते असत नाही. अशा ज्ञान्याकडून नित्यकर्मे घडली नाहीत तरी त्याला पाप लागत नाही. त्याची कर्मबीजे दग्ध झाल्यामुळे त्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाही. कारण त्याची आधीची कर्मबीजे जळून गेलेली असतात आणि त्याच्याकडून नवीन कर्म घडत नसते. म्हणून त्याच्यापुरते जन्ममृत्यूचे चक्र थांबते.

**शिवज्ञानसमापन्नस्थिरवैराग्यलक्षण:।**
**स्वकर्मणा न लिप्येत पद्मपत्रमिवाम्भसा॥१४.२२॥**

शिवज्ञान आणि वैराग्य ज्याच्या ठिकाणी आहे अशा ज्ञानी पुरुषाचे येथे वर्णन केले आहे. वैराग्य जर विवेकामुळे आले असेल तर ते स्थिर राहते आणि काही तात्कालिक कारणांमुळे आले असेल तर ते अस्थिर असते. पुराणवैराग्य, स्मशानवैराग्य आणि प्रसूतिवैराग्य ही अस्थिर वैराग्याची लोकप्रसिद्ध उदाहरणे होत. पुराण ऐकत असता त्यातील नरकयातनांचे वर्णन ऐकून एखाद्याला वैराग्य येते. आपण पापकर्मे न करता पुण्यकर्मे करावी असे तो ठरवतो. हे वैराग्य काही काळ टिकते आणि पुन्हा तो मनुष्य पूर्वीप्रमाणे कर्मे करू लागतो. याला पुराणवैराग्य–पुराण ऐकून आलेले वैराग्य म्हणतात. दुसरे स्मशानवैराग्य. प्रेतावर अंत्यसंस्कार करण्यासाठी माणूस स्मशानात जातो तेव्हा त्याच्या मनात 'शेवटी आपल्यालाही इथेच यायचे आहे' असा विचार येऊन वैराग्य येते आणि आजपासून सत्कर्मे करण्याचा तो निश्चय करतो. स्मशानातून घरी येताच त्याच्या जवळचे वैराग्य पळून जाते आणि तो पूर्वी जसा वागत होता तसाच वागत राहतो. हे वैराग्य देखील क्षणिक असते. तिसऱ्याला प्रसूतिवैराग्य म्हणतात. अपत्याला जन्म देताना स्त्रीला अपार यातना होतात. त्या यातना भोगताना ती विव्हळत म्हणते– आता पुन्हा मुलाला जन्म देणार नाही. परंतु प्रसूत होताच आपल्या बाळाचे मुख पाहिल्यावर तिचे क्षणिक वैराग्य पार दूर पळून जाते आणि नंतर पुन्हा दुसऱ्या अपत्यसंभवासाठी ती सिद्ध होते. अशी ही तीन क्षणिक वैराग्ये होत. ती स्थिर नसून अस्थिर असतात.

परंतु सारासारविवेकामुळे जेव्हा मनात वैराग्याचा उदय होतो तेव्हा ते स्थिर वैराग्य असते. ऐहिक सुखे आणि पारलौकिक सुखे ही दोन्ही क्षणिक असून ती केव्हातरी संपतात. अशा विचारामुळे येणारे वैराग्य दृढ असते. इहलोकातील सुखे आणि स्वर्गलोकातील सुखे ही आपल्या कर्माच्या अधीन असतात. जोपर्यंत आपल्याकडे पुण्यसंचय असतो तोपर्यंत आपण इहलोकात सुख भोगतो आणि मृत्युनंतर स्वर्गात गेल्यावरही सुख भोगतो. पुण्य संपले की पुन्हा आपली रवानगी मर्त्यलोकात होते. जी सुखे शाश्वत नाहीत त्यांच्या मागे लागून काय उपयोग? असा विचार ज्याच्या मनात येतो, त्याच्या मनात इह–परलोकांतील क्षणिक सुखाविषयी विरक्ती उत्पन्न होते.

शिवज्ञानामुळे ज्याच्या मनात वैराग्य स्थिर झालेले आहे. अशा ज्ञानी पुरुषाकडून पुण्यकर्म घडले अथवा

पापकर्म घडले तरी त्याला त्यांचा लेप लागत नाही. पाण्यात असणारे कमळाचे पान जसे पाण्यात भिजत नाही त्याप्रमाणे पुण्यकर्म आणि पापकर्म यांना ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीने काही अर्थ नसतो. त्याच्याकडून पुण्य घडले-पाप घडले असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा ते पुण्य-पाप आपल्या दृष्टीने असते, त्याच्या नव्हे. आपण काही कर्म करीत आहोत याची जाणीवच जेथे नसते तेथे हे पुण्यकर्म, ते पापकर्म असे म्हणणे निरर्थक ठरते. छांदोग्योपनिषदात याविषयी विवेचन आलेले आहे.

समजा, ज्ञानी पुरुषाच्या देहाकडून पुण्यसंचय अथवा पापसंचय झाला तरी देखील त्यांची फळे त्याला भोगावी लागत नाहीत. मग त्याचा पुण्यसंचय आणि पापसंचय याचे काय होते? तर ज्ञानी पुरुषावर श्रद्धा असलेले काही लोक जगात असतात. तसेच त्यांची निंदा करणारे लोकही असतात. काही भक्त असतात, ते त्याचा आदरसत्कार करतात. काही शत्रू असतात, ते त्याची निंदा करतात, अपमान करतात. ज्ञान्याजवळचे पुण्य जे त्याचे भक्त असतात, त्यांना मिळते आणि त्याच्या जवळच्या पापसंचयाचे धनी त्याचे निंदक होतात. अशा प्रकारे ज्ञानी पुरुषाजवळ पुण्य-पाप साठलेच तर त्याची याप्रमाणे विल्हेवाट लागते आणि तो पुण्य-पापविरहित होतो. समजा, एखाद्या माणसाने आपल्या कोटाच्या दोन्हीकडच्या खिशात खाद्यपदार्थ भरलेले आहेत. जो मागेल त्याला तो ते देतो. डावीकडच्याने मागितले तर तो डाव्या हाताने डाव्या खिशातील पदार्थ काढून त्याला देतो. उजवीकडच्याने मागितले तर उजव्या हाताने उजव्या खिशातील पदार्थ काढून तो देतो. त्याला घ्यायचे काहीच नाही. फक्त द्यायचे आहे. जो स्तुती करतो त्याला ज्ञानी पुरुष आपले पुण्य देऊन टाकतो आणि जो निंदा करतो त्याला आपले पाप देऊन टाकतो. तो रिकामा. याप्रमाणे त्याच्याजवळ पाप-पुण्याचा थोडा देखील अंश शिल्लक राहत नाही. असे छांदोग्योपनिषदात म्हटले आहे. त्यामुळे त्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाही.

येथे दोन प्रकारे प्रतिपादन केलेले आढळते. एकतर ज्ञानी पुरुषाकडून सत्कृत्य अथवा दुष्कृत्य घडतच नाही. त्यामुळे त्याच्याजवळ पुण्य-पापाचा साठा होत नाही म्हणून त्याला पुनर्जन्म नाही. समजा विहित कर्मांमुळे ज्ञानी पुरुषाजवळ पुण्यसंचय आणि निषिद्ध कर्मांमुळे पापसंचय झाला तरी त्यांचा उपभोग न घेता तो आपल्या भक्तांना पुण्य देऊन टाकतो आणि निंदकांना पाप देऊन टाकतो. अशा प्रकारे त्याच्याजवळचा पाप-पुण्याचा साठा संपून तो जीवन्मुक्त होतो आणि त्याला पुनर्जन्म मिळत नाही.

प्रारब्ध संपेपर्यंतच ज्ञानी पुरुषाचे शरीर जिवंत असते. एकदा प्रारब्ध संपून देहपतन झाले की त्या विराट परमात्मरूपात तो विलीन होतो. पावसाचा थेंब महासागरात पडून महासागरच होऊन जावा तसा. हेच साधन्यासाठी ऐक्यस्थलातल्या साधकाची धडपड चाललेली असते. बिंदुरूपात राहण्याचा एखाद्याला वीट येतो आणि त्याला सिंधू होण्याची ओढ लागते. तसा एखादा साधक आपले क्षुद्र लौकिक जीवन त्यागून परशिवाशी समरस होण्याची धडपड करतो. अशी धडपड करणे तुम्हा आम्हा सर्वांचेच अंतिम ध्येय आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
१९ जुलै १९९२

## आचारसंपत्तिस्थल-४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भगवान शिव वैराग्यसंपन्न आहेत. जेवढे वैराग्य भगवान शिवाच्या ठिकाणी आहे, तेवढेच वैराग्य शिवाभावसंपन्न शिवयोग्याच्या ठिकाणी असू शकते. तो शिवचिंतनात मग्न असल्यामुळे त्याच्या अंगी शिवासारखे वैराग्य बाणते. जो शिवयोगी असतो तो पाण्यात राहूनही पाण्याने न भिजणाऱ्या कमलपत्राप्रमाणे, स्वत:च्या कर्मांनी लिप्त होत नाही. सांसारिक वासनांपासून तो अलिप्त असतो. त्याला शरीराविषयी, शरीराशी संबंधित व्यक्तींविषयी आणि सांसारिक वस्तूंविषयी ममत्वभाव नसतो. त्याच्या दृष्टीने सारे शिवमय असल्यामुळे त्याच्या ठिकाणचा अहंकार आणि ममत्व हे देखील शिवमय होऊन जाते. त्यामुळे त्याला शरीराकडून घडणारे कर्म बांधून टाकू शकत नाही. अशा शिवयोग्याच्या आचारासंबंधी पुढे सांगतात-

**गच्छंस्तिष्ठन् स्वपन् वापि जाग्रन् वापि महामति:।**
**शिवाज्ञानसमायोगाच्छिवपूजापर: सदा।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.२३)

शिवाद्वैतसंपन्न शिवयोगी शिवपूजा कधी आणि कशी करतो. साधकदशेत पूजा करताना कोणत्या आसनावर बसावे? कोणत्या दिशेकडे तोंड करावे? याविषयी शास्त्रांनी काही नियम सांगितले आहेत. प्राणायाम करावा, जप करावा इ. सारे नियम साधकासाठी आहेत. साधकांसाठी असेही सांगितले जाते की, रस्त्याने चालताना, भोजन करीत असताना आणि झोपून जप करू नये. परंतु शिवयोग्यासाठी हे कोणतेच नियम लागू नसतात. तो सगळ्या नियमांच्या पलीकडे गेलेला असतो. तो चालता चालता, उभा असताना, अथवा झोपताना देखील पूजा करू शकतो. साधकांसाठी जे निषिद्ध असते ते शिवयोग्यासाठी निषिद्ध नसते. तो झोपतानाही पूजा करतो, जागा असतानाही पूजा करतो. तो निरंतर शिवपूजाच करीत असतो. शिवज्ञानाने त्याचे अंत:करण परिपूर्ण असल्यामुळे शिवचिंतनाशिवाय त्याच्या मनात दुसरी कोणतीच वृत्ती जागी होत नाही. शंकराचार्यांनी 'शिवमानसस्तोत्रात'त फार सुरेख वर्णन केलेले आहे-

**आत्मा त्वं गिरिजा मति: सहचरा प्राणश्शरीरं गृहं**
**पूजा ते विषयोपभोगरचना निद्रा समाधिस्थिति:।**
**संचार: पदयो: प्रदक्षिणविधि: स्तोत्राणि सर्वा गिरो**
**यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम्।।**

मी जे काही करतो ते हे परमेश्वरा, तुमची पूजाच होय. मी चालतो ती प्रदक्षिणा असते. सारेच जण चालतात. परंतु ज्याच्या मनात ही भावना असते त्याचे चालणे देखील प्रदक्षिणा होते. ज्याच्या मनात ही भावना नसते त्याचे चालणे-फिरणे हे केवळ चालणे-फिरणेच असते. प्रदक्षिणा करण्याची एक पद्धती आहे. डोक्यावर भरलेली घागर घेऊन जो माणूस चालतो त्याचे सारे लक्ष घागरीकडेच असते, त्याप्रमाणे प्रदक्षिणा करताना आपले संपूर्ण लक्ष परमेश्वराकडेच असले पाहिजे. शरीर प्रदक्षिणा करीत आहे आणि मन मात्र भलतीकडेच भरकटत आहे. असे घडले तर ती प्रदक्षिणा होणार नाही. शरीर जसे मंदिराभोवती फिरत असते तसे मन देखील ईश्वराभोवती फिरायला

हवे. सामान्य माणसे केवळ शरीराने प्रदक्षिणा करीत असतात. मनाने करीत नाहीत. शिवयोग्याच्या दृष्टीने सर्व प्रपंचच शिवमय असल्यामुळे तो जेथे जाईल तेथे ईश्वरच ईश्वर असतो.

सामान्य साधकाला प्रदक्षिणा घालण्यासाठी मंदिरात जावे लागते. मंदिराशिवाय त्याला दुसऱ्या ठिकाणी ईश्वर दिसत नाही म्हणून तो मंदिरात जातो. मंदिरांतील ईश्वराचे दर्शन घेतो. मंदिराभोवती प्रदक्षिणा घालतो. स्वतःच्या हृदयाबाहेर ईश्वर पाहणाऱ्या मनुष्याची अशी स्थिती होते. परंतु आपल्या हृदयात ईश्वराचे चिंतन करणाऱ्या व्यक्तीला बाहेर सर्वत्र भगवत्तत्त्व दिसू लागते. दृष्टी शिवमय झाली की सृष्टी शिवमय होते. दृष्टी शिवमय नसेल तर सर्वत्र शिवदर्शन होत नाही. शिवभावयुक्त असल्यामुळे तो सदैव शिवपूजनच करीत असतो. तो जे बोलतो ते स्तोत्र होते. तो चालतो तर ती प्रदक्षिणा होते. चालता-फिरता, उठता-बसता, स्वप्नात-जागेपणी त्याची अखंड शिवपूजा चालू असते. शिवयोगसमाधिस्थ साधकाला वेळेचे बंधन नाही. तो निरंतर पूजेतच लीन असतो. साधनेच्या प्रारंभिक अवस्थेत नियमांचे बंधन असते. परंतु अतिम अवस्थेत नियमांचे कोणतेच बंधन राहत नाही. कारण त्याच्याकडून अखंडित शिवचिंतन होत असते.

**यद्यत्पश्यति सामोदं वस्तु लोकेषु देशिकः।**
**शिवदर्शनसम्पत्तिस्तत्र तत्र महात्मनः।।१४.२४।।**

शिवयोगी चालताना झोपताना पूजा कशी करतो त्याविषयी या श्लोकात सांगितले आहे. तो जिकडे पाहतो तिकडे त्याला शिवच दिसतो. वास्तविक सर्वत्र शिवच असताना सर्वांना तो का दिसत नाही? खरे तर दिसायला हवा, पण दिसत नाही. सर्वांना नामरूपात्मक प्रपंचाचाच अनुभव येतो. आपला साक्षात् संबंध परमात्म्याशीच असतो. परंतु तरीही आपल्याला प्रपंचच दिसतो. दोरीच्या ठिकाणी साप दिसावा, शिंपल्याच्या ठिकाणी चांदी दिसावी आणि झाडाच्या ठिकाणी चोराचा भास व्हावा त्याप्रमाणे. सूर्यप्रकाशात शिंपला चांदीप्रमाणे चमकदार भासतो. आपण पाहतो शिंपलाच, परंतु आपल्याला दिसते चांदी. जवळ जाऊन जेव्हा हाती घेऊ तेव्हा हातात शिंपलाच राहील, चांदी नव्हे. अर्धवट प्रकाशात एखादा मनुष्य घरात पडलेल्या दोरीलाच साप समजतो. त्याच्या मनात असलेली सापाची भीतीच त्याला दोरीच्या ठिकाणी साप दाखवत असते. वास्तविक त्याचे डोळे काय पाहत असतात? तर दोरीच पाहात असतात, साप नव्हे. प्रपंच असाच आहे. शिंपल्याच्या ठिकाणी चांदी दिसावी तसा आणि दोरीच्या ठिकाणी साप भासावा तसा.

उपनिषदात म्हटले आहे- 'सर्वं खलु इदं ब्रह्म'. जे काही आहे ते सारे ब्रह्मच होय. 'नेह नानास्ति किंचन'. परमात्म्याशिवाय दुसरे काहीच नाही. आगमांत म्हटले आहे- 'सर्वं लिंगमय जगत्।'. हा सर्व प्रपंच लिंगरूपच आहे. प्रपंच परब्रह्मरूपच आहे. तरीही आपल्याला हे नामरूपात्मक विश्व का दिसते? तर आपल्या ठिकाणी अनादिकालापासून असलेल्या संस्कारामुळे. नामरूपात्मक विश्व आहे कुठे? ते तर परब्रह्माच्या ठिकाणीच आहे. शिंपल्यातच चांदी आहे, दोरीचा साप आहे आणि खोडातच चोर आहे. वास्तविक स्वरूपाचे ज्ञान झाले की चोर दिसेनासा होऊन झाडाचे खोड दिसू लागते. दोरीचे ज्ञान झाले तर साप कुठे पळून जातो का? किंवा सापाला मारावे लागते का? असे काहीच करावे लागत नाही. कारण वास्तविक ज्ञान झाल्यावर आपल्याला दोरीच्या ठिकाणी दोरीच दिसू लागते आणि त्याठिकाणी साप कधी नव्हताच हे सत्य समजते.

**पत्रशाखादिरूपेण यथा तिष्ठति पादपः।**
**तथा भूम्यादिरूपेण शिव एको विराजते।।१०.७०।।**

'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील शिवजगन्मयस्थलात सर्व विश्वच शिवमय आहे याचे सुंदर वर्णन केलेले आहे. मूळ, खोड, फांद्या, पाने हे सारे मिळून जसा वृक्ष एकच असतो, हे सारे मिळूनच त्याचे वृक्षपण साकार होत असते त्याप्रमाणे भूमी इत्यादीच्या रूपाने एक शिवच विराजमान आहे. अर्थात् सर्व जग शिवमय होय. आपल्या अंत:करणातील अज्ञानामुळे आपल्याला तो शिवच प्रपंचरूपात दिसत आहे. अज्ञान समूळ नष्ट झाले की मग सर्वत्र शिवरूप दिसू लागते.

योगशास्त्रात मनोवृत्तींचा निरोध करावा असे सांगितले आहे. पातंजलयोगात यम, नियम, आसन, प्राणायाम इत्यादींच्या साहाय्याने चित्तवृत्तींचा निरोध करावा लागतो. पातंजलयोग आणि शिवयोग यांच्यात थोडासा फरक आहे. बाहेर धावणाऱ्या मनोवृत्तीला अडवून, अंतर्मुख करून आपल्या आत शिवदर्शन घ्यायला पातंजलयोग सांगतो. परंतु शिवयोगात चित्तवृत्तींचा निरोध करायचा नसतो. मन जेथे जाईल तेथे त्याला जाऊ द्यावे. परंतु त्या ठिकाणी त्याने शिव पाहायला हवा. यालाच सहजसमाधी म्हणतात. हा सहजयोग होय. मनाचा निरोध करून समाधी साधली तरी तेवढ्यापुरते मन स्थिर राहील. समाधी उतरली की ते पुन्हा चंचल होईल. धावणाऱ्या घोड्याचे पाय बांधून टाकले तर तेवढ्यापुरते तो गप्प बसेल. त्याचे पाय सोडले की अत्यंत वेगाने दौडत जाईल. मन देखील तसेच आहे. समाधीपुरते गप्प बसेल आणि समाधी उतरल्यावर पुन्हा भरकटत जाईल.

म्हणून मनावर कोणताही दबाव न आणता त्याला सहजपणाने समाधीकडे न्यायला हवे. जसे शिवदर्शन अंतरंगात होते तसे बाह्य जगातही होते. ज्याच्या दृष्टीत प्रपंच शिवरूप होतो त्याला मनाचा निरोध करण्याचे कारणच उरत नाही. ते कुठेही गेले तरी त्याला शिवदर्शनच घडते. हीच सहजसमाधी होय. पातंजलायोगापेक्षा शिवयोगाचे वेगळेपण असे आहे.

**यद्यच्चिन्तयते योगी मनसा शुद्धभावन:।**
**तत्तच्छिवमयत्वेन शिवध्यानमुदाहृतम्।।१४.२५।।**

प्रत्येक कर्म करताना भावनेची आवश्यकता असते. भावना ही एक मानसिक वृत्ती आहे. जेव्हा मानसिक वृत्ती पूर्णपणे शिवचिंतनात मग्न होते तेव्हा तिला शिवभावना म्हणतात. शिवभावनायुक्त शिवयोगी ज्याचे चिंतन करील ते शिवाचेच चिंतन असेल. प्रत्येक वस्तूत आणि व्यक्तीत तो शिवाचीच भावना करीत असल्यामुळे त्याला बाह्य प्रपंचात शिवावाचून दुसरे काहीच दिसत नाही. म्हणून त्याने बाह्य प्रपंचाचे चिंतन केले असे सर्वसामान्यांना वाटले तरी तत्त्वत: त्याचे चिंतन शिवचिंतनच असते.

**यत्किंचिद्भाषितं लोके स्वेच्छया शिवयोगिना।**
**शिवस्तोत्रमिदं सर्वं यस्मात् सर्वात्मक: शिव:।।१४.२६।।**

शिवज्ञानसंपन्न योगी जे जे बोलतो ते ते शिवस्तोत्र होते. काही लोक शिवाचे स्तोत्र गातात. स्तोत्रपाठ का करावा लागतो? शिवाने मनुष्याला वाणी दिली आहे ती त्याचे गुणगान करण्यासाठी. शिवाचे गुणगान तरी कशाला करायचे? तर गुणगान केल्याने त्याच्या ठिकाणी असलेले उत्कृष्ट गुण आपल्या अंगी बाणतात म्हणून. कुणाचे गुण आपल्याला आवडले तरच आपण त्याची स्तुती करतो. गुणवर्णन करणे म्हणजे त्या गुणांना आपल्यात सामावून घेण्याचा प्रयत्न करणे होय. यासाठीच कवी-महाकवींनी ईश्वराची स्तोत्रे रचिली आहेत. ज्यांना स्तोत्र रचता येत नाहीत अशी माणसे दुसऱ्यांनी रचलेली स्तोत्रे गातात. शिवयोग्याला प्रासयुक्त, छंदोबद्ध स्तोत्र म्हणता आले नाही तरी देखील तो जे वेडेवाकडे शब्द उच्चारील ते स्तोत्रच होईल. त्याच्या वाणीतून जे

शब्द निघतील त्यांना स्तोत्रांची प्रतिष्ठा लाभते.

जो भावुक असतो त्याची भाषाच विलक्षण असते. ती भल्याभल्या पंडितांनाही कळत नाही. पंडितांची भाषा वेगळी असते. भाविकांची भाषा वेगळी असते. भाविकाने साध्या भोळ्या शब्दांत केलेली स्तुती ईश्वराला जेवढी प्रिय असते तेवढे पंडिताने केलेले संस्कृतप्रचुर, अलंकारिक, प्रासयुक्त, छंदोबद्ध स्तोत्र प्रिय नसते. कारण त्या रचनेत अहंकार असतो, गर्व असतो– हे मी केले. परंतु भाविकाच्या स्तुतीत अहंकार नसतो. पांडित्याचा दर्प नसतो. मला काहीच येत नाही, असेच तो म्हणतो. लहान मुलांचे बोबडे बोल आपल्या कानाला किती गोड लागतात! लहान मुले कधी शुद्ध बोलत नाहीत. त्यांचे उच्चार स्पष्ट नसतात. ते कधी आईला 'बाबा' तर बाबाला 'आई' म्हणतात. बापाला 'आई' म्हणत जर मुल त्याच्याकडे गेले तर तो त्याला झिडकारत नाही आणि आईला 'बाबा' म्हटले तर तीही झिडकारत नाही. कारण त्याच्या शब्दात कृत्रिमता नसते, केवळ प्रेमरस भरलेला असतो. लहान मुल एखाद्या शब्दाचा जेव्हा बोबडा उच्चार करते तेव्हा तो शब्द आपल्या कानाला अत्यंत गोड लागतो. तेवढा एखाद्या पंडिताने केलेला स्पष्ट उच्चारदेखील गोड लागत नाही.

भगवंताला भक्ताची भाषा अत्यंत प्रिय असते, पंडिताची नसते. म्हणून शिवयोग्याच्या मुखातून जे शब्द बाहेर पडतात ते शिवस्तोत्रच असते आणि शिवाला अत्यंत प्रिय होते. तो जे काही बोलतो ते स्तोत्र कसे काय होते? असा प्रश्न येथे उपस्थित होतो. तर त्याविषयी थोडे सांगितले पाहिजे. शिव सर्वात्मक आहे. त्याच्या दृष्टीत सर्वच शिव असल्यामुळे तो ज्याबद्दल बोलतो तो शिवच असतो. म्हणून तो जे काही बोलतो ते शिवाबद्दलच बोलल्याप्रमाणेच असते. तो कोणासोबत बोलला तरी त्याचे बोलणे म्हणजे शिवस्तुतीच असते. म्हणून शंकराचार्य म्हणतात– 'यद्यत्कर्म करोमि' मी जे करतो– 'तवाराधनम्'. तुमचीच पूजा होय. निरंतर भगवच्चिंतन करणारा साधक जे काही करतो ती भगवंताचीच पूजा असते. तो जे बोलतो ते भगवंताचे स्तोत्र असते. त्याला पूजेचे कोणतेच नियम लागू नसतात.

**या या चेष्टा समुत्पन्ना जायते शिवयोगिनाम्।**
**सा सा पूजा महेशस्य सर्वदा तद्गतात्मनाम्।।१४.२७।।**

शिवयोग्याकडून जी जी क्रिया घडते– चालणे, फिरणे, बोलणे, कळत अथवा नकळत ती शिवपूजाच असते. त्याला एके ठिकाणी बसून काही करावे लागत नाही. त्याला सहजसमाधी प्राप्त झालेली असते. असा शिवयोगसंपन्न मनुष्य सामान्य माणसांप्रमाणे व्यावहारिक कर्मे करीत असतो आणि आपल्या अंतरंगात सहजसमाधी अनुभवत असतो. एखादा व्यापारी अथवा एखादा शेतकरी आपली बाह्य कर्तव्ये सांभाळून देखील शिवयोगी असू शकतो. ही साधना सर्वांसाठी आहे. ती करण्याचा प्रत्येकाला अधिकार आहे. आपली बाह्य वृत्ती कोणतीही असो, तिच्यात जर पवित्र भावना आली तर ती वृत्तीच 'योग' होते. कुशलपूर्वक केलेल्या कर्मालाच योग म्हणतात. मनःपूर्वक केलेले कर्म हा एक योगच होय.

शिवचिंतन, शिवध्यान आपल्या व्यावहारिक जीवनात अडथळा निर्माण करीत नाही. आम्ही जेव्हा लोकांना सांगतो– रोज स्नान करा, नित्यपूजा करा. तर लोक म्हणतात की, 'महाराज, आम्हाला वेळच मिळत नाही.' परंतु अंतरंगात समाधी स्थिर झाली की तुम्ही कोणतेही बाह्य कार्य करू शकता. त्यासाठी मुद्दाम वेळ काढण्याची जरूर नसते. एकदा दत्तात्रेय भिक्षा मागण्यासाठी एका घरासमोर उभे राहिले. त्यांनी आवाज दिला, 'ॐ भवति भिक्षां देहि'.

परंतु बराच वेळ कोणीही बाहेर आले नाही. त्यांनी पुन्हा आवाज दिला, तरीही कोणी बाहेर आले नाही. दत्तात्रेयांना आश्चर्य वाटले. त्यांनी सहज आत डोकावून पाहिले तर त्यांना आत एक दृश्य दिसले. घरधनीन उखळात तांदूळ कांडत शेजारी बसलेल्या स्त्रीशी अत्यंत तन्मयतेने गप्पा मारत होती. तिचे हात कांडण्याचे काम करीत होते आणि तोंड बोलण्याचे. बोलण्यामुळे तिच्या कांडण्यात अडथळा येत नव्हता आणि कांडण्यामुळे बोलण्यात खंड पडत नव्हता. कांडणे आणि बोलणे ही दोन्ही कामे ती उत्तमप्रकारे करीत होती.

दत्तात्रेय तिच्याकडे पाहतच राहिले. तेवढ्यात तिचे लक्ष त्यांच्याकडे गेले आणि ती चपापली. त्यांच्या खांद्यावरची झोळी पाहून कुणी महात्मा भिक्षा मागायला आला आहे हे तिने ओळखले. सुपात थोडे तांदूळ घेऊन तिने ते त्यांच्या झोळीत घातले आणि म्हणाली–

''महाराज, मला क्षमा करा, आपण येऊन बराच वेळ झाला. परंतु आपला शब्द मला ऐकू आला नाही. क्षमा करा!''

दत्तात्रेय म्हणाले, ''तू माझी क्षमा मागू नकोस. कारण मी तुला गुरू मानले आहे.''

तिला आश्चर्य वाटले. ती म्हणाली, ''मी आपली गुरू कशी बरे होईन? आपण काय बोलता तेच मला कळत नाही.''

''तुझे काम पाहून आज मला एक बोध झाला. एकीकडे तुझे कांडण सुरू आहे आणि दुसरीकडे तुझे बोलणे देखील सुरू आहे. काम करताना तुझे बोलणे थांबले नाही आणि बोलत असल्यामुळे तुझा हात थांबला नाही. एकच व्यक्ती एका वेळी दोन कामे उत्तम रीतीने करू शकते हे मला आज प्रथमच समजले. म्हणून मी तुला गुरू मानले आहे.'' दत्तात्रेय म्हणाले आणि तिला हात जोडून निघून गेले.

जर सामान्य संसारी व्यक्ती कांडणे आणि बोलणे अशी दोन्ही कामे कोणताही अडथळा न येता करू शकते, तर परमेश्वराचे नामस्मरण करणारा मनुष्य ते करतानाच सांसारिक कर्मे का बरे करू शकणार नाही? हे देखील घडू शकते, असा बोध त्या सामान्य स्त्रीच्या व्यवहारातून दत्तात्रेयांना झाला. म्हणून त्यांनी तिला गुरू मानले.

जो ज्ञानग्रहण करायला तत्पर असतो अशा माणसाला कोणत्याही वस्तूकडून वा व्यक्तीकडून काही ना काही ज्ञान प्राप्त होतच असते. परंतु ज्ञानग्रहण करणारा मात्र हवा. म्हणून शास्त्रे सांगतात– प्रपंच हा एक गुरूच आहे. आपले शरीर देखील गुरूच होय. शरीर देखील आपल्याला काहीतरी बोध करीतच असते. परंतु आपण ते ऐकण्याचे नेहमी टाळत असतो.

तुम्ही रामायणात ऐकले असेल. राजा दशरथ आरशात बघून जेव्हा आपल्या डोक्यावर मुकुट चढवीत होता तेव्हा त्याला कानाजवळ दोन पांढरे केस दिसले. त्याने आपला मुकुट उतरून ठेवला आणि विचार केला की हे दोन पांढरे केस आपल्याला काय बरे सांगत आहेत? तुझे केस आता पिकले आहेत. तू वृद्ध झाला आहेस. आता वानप्रस्थाश्रम स्वीकारून मुकुटाची काही व्यवस्था कर, असेच जणू ते आपल्या कानात सांगत आहेत असा त्याला बोध झाला.

आपले केस पांढरे होऊन जेव्हा आपल्याला बोध करतात, तेव्हा आपण मात्र त्यांच्या तोंडावर काळी पट्टी चिकटवून टाकतो. त्यांना काळे करून टाकतो. त्यांनी परत बोलूच नये अशी व्यवस्था करतो. मातीचा कण देखील आपल्याला काहीतरी बोध करीत असतो. बोध ग्रहण करण्याची वृत्ती आपल्याकडे असेल तरच तो आपल्याला समजू शकतो. निसर्गातील प्रत्येक गोष्ट, प्रत्येक वस्तू आपल्याला काहीतरी सांगत असते. परंतु ते

ऐकण्यासाठी आपली बुद्धी सजग नसते.

प्रापंचिक व्यवहार करत असताना देखील आपण आध्यात्मिक जीवन जगू शकतो. शिवपूजेसाठी, शिवध्यानासाठी बाह्य व्यवहार प्रतिबंधक ठरत नाही. तुम्ही जेव्हा एखादे काम करीत असता तेव्हा तुमचे मन कोणत्यातरी दुसऱ्या विचारात मग्न असते. मनात चाललेला दुसरा विचार जर तुमच्या कामात अडथळा आणत नाही तर शिवचिंतन तुमच्या व्यवहारात अडथळा कशाला उत्पन्न करील? म्हणून शिवयोग्याचे बाह्य व्यवहार नेहमीप्रमाणे चाललेले असतात आणि अंतर्यामी मात्र तो शिवचिंतनात तल्लीन असतो. हीच सहजसमाधी होय. शिवयोग्याच्या अंतरंगस्थितीप्रमाणे प्रत्येक मनुष्याने आपली प्राप्त कर्तव्ये पार पाडीत, आपले नित्य व्यवहार करीत हृदयात अखंड शिवचिंतन करावे. ज्यांना शिवध्यान, शिवचिंतन करणे शक्य नसेल त्यांनी निदान शिवनामस्मरण तरी केले पाहिजे. नामस्मरण तुमच्या व्यावहारिक कर्मात मुळीच विघ्न आणत नाही. नामस्मरणासाठी कोणतीही वेळ ही अवेळ नसते.

शिवपूजा करतानाच आपल्याला मृत्यू येईल याची काय खात्री आहे?? तो कुठेही आणि कधीही येऊ शकतो. अंतकाळी ईश्वरचिंतन करीत जो देह सोडतो तो ईश्वराशी समरस होतो. आपण सतत शिवचिंतन केले तर आपल्या सगळ्या क्रिया आणि व्यवहार पूजाच होऊन जाते. म्हणून बाह्य व्यवहार करीत असताना प्रत्येकाने आपल्या हृदयात सतत शिवचिंतन केले पाहिजे. असे केले तरच व्यवहार आणि परमार्थ यांची सांगड घातली जाते. व्यवहारामुळे परमार्थात आणि परमार्थामुळे व्यवहारात बाधा उत्पन्न होत नाही. येथे आचारसंपत्तिस्थल हे अवांतरस्थल पूर्ण झाले. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर

२० जुलै १९९२

---

## आशीर्वचन नववे

### एकभाजनस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शिवज्ञानसंपन्न शिवयोग्याकडून कळत नकळत ज्या शारीरिक क्रिया होतात ती सर्व शिवपूजाच होय, असे आपण कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे. शिवयोगी स्वतःला केवळ शिवाशीच समरस झालेला मानतो की त्याची अधिक प्रगती होते? याविषयी पुढील एकभाजनस्थलात विचार केलेला आहे.

**विश्वं शिवमयं चेति सदा भावयतो धिया।**
**शिवैकभाजनात्मत्वादेकभाजनमुच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.२८)

जीव, ईश्वर आणि प्रपंच अशी तीन तत्त्वे चिंतनीय होत. मी कोण आहे? हे दृश्य विश्व म्हणजे काय? आणि त्याचा निर्माता कोण? या तीन प्रश्नांची भारतीय दर्शनशास्त्रांनी दीर्घकाळपर्यंत चर्चा केली आहे. अजून देखील ती होत आहे. ही तीन तत्त्वे वेगवेगळी आहेत की एकच आहेत? तुम्ही यापूर्वी ऐकले आहे की, सृष्टी उत्पन्न होण्याआधी एक परमात्माच होता. तोच जीव झाला आणि तोच प्रपंच झाला. हा सगळा विलास त्याचाच आह.

भोक्ता. भोज्य आणि प्रेरक असे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील भक्तस्थलात विभाजन केलेले आढळते. जीव हा भोक्ता असून प्रपंच भोज्य आहे आणि ईश्वर त्याचा प्रेरक होय. जीव भोक्ता आहे. जो करतो तोच भोगतो. जीवाच्या कर्तृत्वाचा आणि भोक्तृत्वाचा ईश्वर प्रेरक असून साक्षी आहे. प्रत्येकाला ईश्वराकडूनच प्रेरणा होत असते.

एखादा मनुष्य सत्प्रवृत्त अथवा दुष्प्रवृत्त का असतो? त्याची कर्मेच त्याला कारणीभूत असतात. त्याची जशी वासना असेल तशी कर्मे तो करीत राहतो. म्हणून ईश्वर प्रेरक असला तरी त्याला दोष देता येत नाही. जर सारे काही ईश्वराने केले असते तर जीवाचा पुरुषार्थ कसा राहिला असता? तुम्ही तुमच्या मुलाला कुठपर्यंत सांभाळता? तो लहानाचा मोठा होऊन आपल्या पायावर उभा राहीपर्यंत. मग त्याला त्याचा संसार थाटून देता. म्हणता, 'तुझे तू पाहा'. त्याप्रमाणे ईश्वराने देखील जीवात्म्याला पुरुषार्थ करण्यासाठी अवसर दिलेला आहे. काही प्रेरणशक्ती तुझ्यापाठीमागे राहील. चांगले कर्म करशील तर तुझे चांगले होईल. वाईट कर्म करशील तर तुझे वाईट होईल.

याप्रकारे जीव भोक्ता, ईश्वर प्रेरक आणि प्रपंच भोज्य होय. ही सामान्य जीवात्म्याची अवस्था आहे. सामान्य जीवात्म्याच्या दृष्टीने जीव, ईश्वर आणि प्रपंच यांच्यात भेद आहे. जेव्हा ऐक्यस्थलात पोहोचून साधक शिवाशी समरस होतो त्यावेळी त्याच्यात आणि प्रपंचात भेद राहतो की राहत नाही? केवळ शिवाशी समरस झाल्याने अद्वैत पूर्ण होते काय? याचे उत्तर असे की, जर आपण स्वतःला प्रपंचापासून आणि अन्य जीवांपासून भिन्न समजून केवळ ईश्वराशीच एकरूप झालो तर अद्वैत पूर्ण होत नाही. तेच या ठिकाणी स्पष्ट केले आहे.

केवळ मीच शिवस्वरूप आहे असे नसून प्रपंचदेखील शिवस्वरूप आहे. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त ज्ञानागमस्थलात म्हटले आहे–

**शिवात्मकमिदं सर्वं शिवादन्यन्न विद्यते।**
**शिवोऽहमिति या बुद्धिस्तदेव ज्ञानमुत्तमम्।।१६.३१।।**

उत्तम ज्ञान कशाला म्हणतात? तर सर्व प्रपंच शिवमय असून त्याच्याशिवाय काही अन्य अस्तित्वातच नाही. असे ज्ञान हेच उत्तम ज्ञान आहे. समुद्रावर लाटा, बुडबुडे आणि फेस आपल्याला दिसतो. लाटांचे नृत्य पाहून आपल्याला आनंद होतो. लाटा, बुडबुडे अथवा फेस यांपैकी काहीही हाती घेतले तरी ते पाणीच असते. पाण्याचाच आकार थोडा बदलला की त्याला आपण लाटा, बुडबुडे आणि फेस अशी नावे देतो. परंतु नामरूप बदलले तरी शेवटी तो महासागरच असतो. त्याप्रमाणे प्रपंचात अनेक प्रकारचे भिन्न भिन्न जीवजंतू आपल्याला दिसतात. ते शिवावाचून भिन्न नसतात. आपण देखील शिवस्वरूपच आहोत. अहं (जीव), इदं (प्रपंच) आणि तत् (शिव) हे तिन्ही जेव्हा एकरूप होतात त्यालाच 'एकभाजन' असे म्हणतात. वेगवेगळ्या भांड्यात ठेवलेले दूध जेव्हा एकाच मोठ्या भांड्यात ओतले जाते तेव्हा ते एकरूप होते, 'एकभाजन' होते. त्याप्रमाणे जीव, शिव आणि प्रपंच एकरूप होणे म्हणजेच एकभाजन होय. ऐक्यस्थलात एकत्वभाव असतो, द्वैतभाव उरत नाही. मी वेगळा, प्रपंच वेगळा, शिव वेगळा, अशी भावना त्याठिकाणी असत नाही. सर्वभेद नष्ट होऊन सर्वत्र एकच तत्त्व अनुभवाला येणे ही स्थिती म्हणजे 'एकभाजनस्थल'.

ही स्थिती प्राप्त करून घेण्यासाठी तशी भावना सदोदित प्रयत्नपूर्वक करावी लागते. प्रपंच शिवस्वरूप आहे, प्रपंचातील सर्व जीव शिवस्वरूप आहेत आणि मीदेखील शिवस्वरूपच आहे, असे चिंतन केल्याने सर्व काही एकरूप होते. याचा अर्थ व्यवहारातील भेद संपून जातात असे नव्हे, तर केवळ साधकाच्या दृष्टीत, भावनेत सारे

काही एक होऊन जाते. बाह्य भेद कोणीही नष्ट करू शकणार नाही. शरीरे, इंद्रिये इत्यादी भेद राहतीलच, परंतु आत्मरूपाने सारे काही एकरूप होऊन जाईल.

**स्वस्य सर्वस्य लोकस्य शिवस्याद्वैतदर्शनात्।**
**एक भाजनयोगेने प्रसादैक्यमतिर्भवेत्।।१४.२९।।**

असे चिंतन केल्यामुळे आम्हाला काय फायदा होईल? सारे भिन्न भिन्न असताना त्यांना एक करण्यात काय अर्थ? सारे आपापला भोग भोगत आहेत. मग सर्वांशी समरस होण्यात काय लाभ? असा प्रश्न काहींच्या मनात उद्भवेल. याचे फायदे अनेक आहेत. आपले मन नेहमी असंतुष्ट, अप्रसन्न राहते. आपल्यापेक्षा भिन्न अशी जी दुसरी व्यक्ती असते तिच्यामुळेच आपले मन अप्रसन्न होते. कोणत्या ना कोणत्या निमित्ताने द्वैतभावना निवृत्त झाल्याशिवाय मनुष्याचे मन प्रसन्न राहू शकणार नाही. सर्वांशी समरसभाव ठेवल्यामुळे आपले मन प्रसन्न राहते.

आपण आणि प्रपंच शिवस्वरूप आहोत असे मानून शिवयोगी भावनात्मक जीवन जगतो. तेव्हा एकभाजनस्थलामुळे त्याच्या मनात ऐक्य आणि प्रसन्नता निर्माण होते. ही प्रसन्नता फार विलक्षण आहे. व्यवहारात दुसऱ्याबरोबर राहिल्यामुळे आपण प्रसन्न राहू अशी आपली भावना असते. एकटेपणात आनंद मिळत नाही. म्हणून आपण दुसऱ्या व्यक्तीसोबत राहतो. दुसऱ्या व्यक्तीमुळे आपल्याला निरंतर आनंद मिळू शकत नाही. ज्या व्यक्तीपासून आपल्याला प्रारंभी आनंद मिळतो त्याच व्यक्तीकडून नंतर दुःख देखील प्राप्त होते. प्रपंचात ज्याच्याकडून पहिल्यांदा सुख मिळते कालांतराने तोच दुःखदायी ठरतो. खरे म्हणजे सुख देण्याची अथवा दुःख देण्याची शक्ती त्या व्यक्तीत नसते, ती असते आपल्या भावनेत. जोपर्यंत आपल्या मनाप्रमाणे ती व्यक्ती वागते तोपर्यंत ती सुखदायी वाटते आणि जेव्हा ती आपल्या मनाविरुद्ध वागू लागते तेव्हा ती दुःखदायक ठरते.

याचा अर्थ असा की दुसरा मनुष्य आपल्याला निरंतर सुख देऊ शकणार नाही. आपण स्वतःला जेवढे अनुकूल असतो तेवढे अनुकूल आपल्याला दुसरे कोणीही नसते. दुसऱ्या मनुष्याला आपण अनुकूल वाटलो तर तो आपल्याला अनुकूल होतो, जर त्याला आपण प्रतिकूल वाटलो तर तोही आपल्याला प्रतिकूल होतो. कारण प्रपंचातला प्रत्येक मनुष्य स्वार्थी असतो. अनुकूल असलेला मनुष्य केव्हा ना केव्हा प्रतिकूल होतो. त्यामुळे इउतरांकडून मिळालेली प्रसन्नता फार काळ टिकू शकत नाही. ज्याला सदैव प्रसन्न राहायचे असेल त्याने द्वैत सोडून अद्वैताकडे वळले पाहिजे. कधी कधी माणूस दुसऱ्या लोकांना कंटाळून एकटा राहणे पसंत करतो. लोकान्तापेक्षा त्याला एकान्त बरा वाटू लागतो. मला कुणाचीच जरूर नाही असे त्याला वाटू लागते. त्याला एकटेपणात जो आनंद मिळतो तो लोकांमध्ये राहून मिळत नाही.

'प्रसादस्तु प्रसन्नता'. प्रसाद म्हणजेच प्रसन्नता होय. प्रसाद हा एक काव्यातील गुण देखील आहे. जे काव्य वाचताना सहज समजते आणि जे वाचून आपले मन प्रसन्न होते त्या काव्यात प्रसादगुण असतो. अत्यंत सरळ, सहज समजणाऱ्या काव्याला प्रसादिक काव्य अशी संज्ञा आहे. प्रसादगुणामुळे आणि द्वैतभावनेमुळे जी प्रसन्नता आपल्याला मिळते ती क्षणिक असते. परंतु शाश्वत प्रसन्नतेची प्राप्ती मात्र एकभाजनस्थितीमुळे होते. म्हणून प्रत्येकाने ही स्थिती प्राप्त करून घेणे आवश्यक होय.

**शिवे विश्वमिदं सर्वं शिवः सर्वत्र भासते।**
**आधाराधेयभावेन शिवस्य जगतः स्थितिः।।१४.३०।।**

शिव आणि प्रपंच यांच्यात लौकिक दृष्टीने कोणता संबंध आहे ते येथे स्पष्ट केले आहे. महर्षी व्यासांनी देखील

प्रपंचाच्या द्वारे परब्रह्माचा बोध करून दिला आहे- जन्माद्यस्य यतः। (ब्रह्मसूत्र, १-१-१२)

उपनिषदांतील पहिला मंत्रच महर्षी व्यासांनी सूत्ररूपाने मांडला आहे. ज्याच्याद्वारा सृष्टी निर्माण होते, ज्याच्यात ती राहते आणि ज्याच्यात ती विलीन होते त्याला 'ब्रह्म' असे म्हणतात. त्यालाच जाणले पाहिजे, तेच जाणण्याची जिज्ञासा ठेवली पाहिजे. येथे कार्याच्या द्वारे कारणाचे ज्ञान करून दिले आहे. प्रपंच कार्य असून परमात्मा त्याचे कारण होय. जेव्हा 'कारण' सहजपणे अनुभवाला येत नाही तेव्हा 'कार्य' पाहून कारणाविषयी अनुमान केले जाते. अरण्यात जेव्हा लहान बाळाचे रडणे ऐकू येते तेव्हा आपण अनुमान करतो की, ज्याअर्थी येथे लहान मूल आहे त्याअर्थी कुठेतरी जवळपास त्याची आई असलीच पाहिजे. कारण आईवाचून बाळाचा जन्म होणे शक्य नसते. लहान बाळ पाहिल्यावर आपण त्याच्या आईचा शोध घेऊ लागतो. त्याप्रमाणे प्रपंचात प्रारंभी परमात्मा दिसत नाही. फक्त प्रपंचच दिसतो. विशाल सृष्टी पाहून महर्षींच्या मनात विचार आला की एवढा प्रचंड विश्वव्यवहार कसा चालतो? तो कोण चालवतो? तेव्हा त्यांना ज्यातून विश्व निर्माण होते, ज्यात ते स्थिर राहते आणि ज्यात ते शेवटी विलीन होते अशा अंतिम तत्त्वाचा अर्थात् परब्रह्माचा साक्षात्कार झाला. हा सर्व प्रपंच शिवात आहे आणि प्रपंचात शिवदेखील आहे. जे व्यापक असते त्याची व्याख्या एकाच प्रकाराने करता येत नसते. उपनिषदांत याविषयी वर्णन केलेले आढळते. परब्रह्माला पाय नाहीत. परंतु पायाने जो चालतो त्याच्या पुढे पुढे ते चालत असते. त्याला हात नाहीत, परंतु ते सारे काही करते. त्याला डोळे नाहीत पण ते सारे पाहते. सर्व प्रपंच त्याच्यात आहे आणि ते सर्व प्रपंचात आहे. हे वर्णन वाचताना परस्परविरोधी वाटते. परंतु ते तसे नाही. पाय नसून कसे चालता येईल? असा प्रश्न सर्वसामान्यांना पडेल. परंतु जे व्यापक तत्त्व असते ते सर्वत्र असल्यामुळे चालणाऱ्याच्या पुढेच असते. जणू चालतच असते. घराच्या छतावरून जेव्हा आपण आकाशाकडे पाहतो तेव्हा ते एखाद्या तंबूसारखे दिसते. क्षितिजावर आकाश टेकलेले असून त्यापुढे ते नसावे असे वाटते. लहान मुलांना असेच वाटते. जिथे आकाश टेकलेले दिसते तिथपर्यंत धावत जावे आणि त्याला स्पर्श करावा असे त्याला वाटते. परंतु तुम्ही जेवढे धावत जाल तेवढे क्षितिजावर टेकलेले आकाश तुमच्या दृष्टीपुढे धावत जाते. एकप्रकारे आकाश तुमच्या पुढेच धावत असते, चालत असते. त्याला पाय नसतात तरीदेखील. कारण ते व्यापक तत्त्व आहे. तुम्ही जेथे जाल तेथे ते तुमच्या आधी असणारच.

म्हणून येथे सांगितलेले आहे की, शिवात प्रपंच आणि प्रपंचाच शिव आहे. ज्याप्रमाणे आपण आकाशात राहतो आणि आकाश देखील आपल्यात राहते त्याप्रमाणे. तो येथे नाही असे कोणी म्हणू शकत नाही. परंतु कबिरांनी मात्र असे म्हटले आहे- ज्या ठिकाणी नामस्मरण होत नाही त्या ठिकाणी तो नसतो. मराठी भक्तिसाहित्यात एक प्रसिद्ध कथा आहे.

संत नामदेवांनी गुरू केला नव्हता. म्हणून सगळ्या संतांसमोर ते 'कच्चे मडके' ठरले. गुरू करण्यासाठी ते औंढ्याच्या नागनाथ मंदिरात गेले नामदेव भक्त होते. प्रत्यक्ष विठ्ठल त्याने आणलेले भोजन ग्रहण करीत असे. म्हणून जेव्हा विठ्ठलाने गुरू करण्यासाठी नामदेवाला सांगितले तेव्हा नामदेव त्याला म्हणाले-

"देवा, तुला मिळवण्यासाठीच सर्व प्रकारच्या साधना कराव्या लागतात. तू तर माझ्याशी प्रत्यक्ष बोलतोस. माझ्या हातचे खातोस, मग गुरू करण्याचे कारण काय?"

एकदा सगळे संत बसले असताना कोणते मडके कच्चे आणि कोणते पक्के हे संत गोरोबा कुंभाराने पाहिले. मडके वाजवून पाहावे तसे त्याने हातात थापटणे घेऊन प्रत्येकाचे डोके वाजवून पाहिले. सगळ्याच संतांनी गुरू

केलेला होता. केला नव्हता तो फक्त नामदेवांनी. गोरोबा काकांनी सांगितले, ''सगळी मडकी पक्की आहेत. पण एक मडके मात्र कच्चे आहे. कारण त्याने गुरू केलेला नाही. हे कच्चे मडके म्हणजे नामदेव.''

असा अनुभव आल्यावर नामदेवाला विठ्ठलाचे म्हणणे पटले आणि गुरूचा उपदेश घेण्यासाठी तो औंढ्याच्या नागनाथ मंदिरात गेला. तेथे गेल्यावर त्याने पाहिले की, एक वृद्ध गृहस्थ–विसोबा खेचर–शिवलिंगावर पाय ठेवून झोपला आहे. याच गृहस्थाला गुरू करून घेण्याबद्दल त्याला संतांनी सांगितले होते. त्याला वाटले की किती विलक्षण गुरू हा. चक्क देवावर पाय ठेवून झोपलाय. याला गुरू केला तर हा स्वत: नरकात जाईल आणि मला देखील जावे लागेल.

त्याने त्या वृद्ध गृहस्थाला दुरून नमस्कार केला आणि म्हणाला, ''महाराज, मी आपला शिष्य होण्यासाठी आलोय. परंतु आपले पाय शिवलिंगावर आहेत. आपण कृपा करून ते काढावेत.''

तेव्हा ते वृद्ध गृहस्थ म्हणाले, ''माझे पाय कुठे आहेत याचा मला पत्ताच नाही. बरे झाले तू आलास. तूच माझे पाय उचलून जेथे शिवलिंग नाही तेथे ठेव.''

नामदेवांनी त्यांचे पाय उचलून बाजूला ठेवले. तोच त्याला दिसले की तेथे एक शिवलिंग आहे. त्याने ते पुन्हा उचलले आणि बाजूला ठेवण्यचा प्रयत्न केला. परंतु तो जेथे जेथे पाय ठेवायला जाई तेथे तेथे शिवलिंग दिसू लागले. शिवलिंग नाही अशी जागाच त्या मंदिरात शिल्लक राहिली नाही. नामदेवाला आपल्या गुरूचे मोठेपण समजले. त्याचा अहंकार नष्ट झाला. नम्र होऊन तो गुरूला म्हणाला, ''गुरुदेव, जेथे शिवलिंग नाही अशी भूमीवर थोडी देखील जागा शिल्लक नाही. शिवलिंग नाही अशी जागा म्हणजे माझे मस्तक होय. कारण माझ्या मस्तकात– बुद्धीत शिवभाव नाही. तुमचे पाय ठेवले की तेथे शिवलिंग उत्पन्न होते. म्हणून मी आपले पाय माझ्या मस्तकावर ठेवत आहे. आपल्या पदस्पर्शाने येथेही शिवलिंग उत्पन्न व्हावे.''

या कथेचे तात्पर्य असे की, शिवावाचून या जगात कोणतेही स्थान रिक्त नाही. तो अणुअणूंत व्याप्त आहे. विष्णुभक्त प्रल्हादाची कथा सर्वांना माहीत आहे. त्याच्या वडिलाने तपश्चर्या करून 'मी मरणार नाही' असा वर मागून घेतला होता. त्याच्या पोटीच महान विष्णुभक्त प्रल्हादाचा जन्म झाला. त्याच्या विष्णुभक्तीमुळे त्याला ठार करण्याचा अनेक वेळा पित्याने प्रयत्न केला. परंतु प्रल्हादावर त्याचा काहीही परिणाम झाला नाही. शेवटी चिडून हिरण्यकश्यपू प्रल्हादाला म्हणाला, ''मी खडतर तपश्चर्या करून ईश्वराकडून अमर होण्याचा वर मिळवला. त्या तपश्चर्येचे फळ तुला मिळाले की काय? मी इतका प्रयत्न केला तरी तू मरत कसा नाहीस?''

प्रल्हादाने उत्तर दिले, ''मला मारणारे तुम्ही कोण? माझ्या दृष्टीने कोणी मारणाराच नाही. जले विष्णु: स्थले विष्णु: तुम्ही पाण्यात मला फेकले तर तेथे ईश्वरच आहे आणि अग्नीत टाकले तर तेथेही ईश्वरच आहे. रक्षक परमात्माच सर्व ठिकाणी असल्यामुळे मला कोण मारणार? कसे मारणार? मी तपश्चर्या केली नाही. तपश्चर्या तुम्ही केली आहे. परंतु माझ्या मनात सर्वत्र ईश्वर आहे ही दृढ भावना आहे.''

क्रुद्ध होऊन हिरण्यकश्यपूने त्याला विचारले, ''या खांबात देखील तुझा ईश्वर आहे का?''त्याने 'होय' असे उत्तर दिल्यावर हिरण्यकश्यपूने खांबावर लाथ मारली तेव्हा त्यातून नरसिंह प्रकट झाला आणि त्याने हिरण्यकश्यपूला ठार केले.

एखादा शंकेखोर मनुष्य विचारतो की, ईश्वर कोठे आहे? तर त्याला उलट असे विचारले पाहिजे की, ईश्वर कोठे नाही? तो कोठे नाही असे म्हणताच येत नाही. 'पुस्तकं अस्ति' असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा त्याचा

अर्थ परमात्मा असा होतो. 'अस्ति' म्हणजे परमात्माच. सत्-सत्, आहे-आहे. प्रत्येक वस्तूच्या संदर्भात 'आहे' या शब्दाचा आपण प्रयोग करतो. हे आहे, ते आहे, मी आहे, हे 'आहे'च ईश्वर होय. सत् म्हणजे परमात्मा. सत्चा अर्थ आहे सदोदित असणारा.

हे कसे ते समजून घ्या. 'पुस्तक आहे' असे आपण म्हणतो. 'आहे' याचा अर्थ अस्तित्व. अस्तित्व म्हणजे सदैव असणे. पुस्तक काही काळपर्यंत पुस्तकरूपात राहील. ते फाटून गेल्यावर कागदाचे तुकडे तुकडे होतील. तेव्हा पुस्तक अस्तित्वात नसेल, परंतु कागदाचे तुकडे अस्तित्वात असतील. कागदाचे तुकडे कोणी जाळून टाकले तर त्याची राख होईल. त्यावेळी कागदांचे तुकडे अस्तित्वात नसतील, परंतु त्यांची राख अस्तित्वात असेल. म्हणजे काही ना काही तरी अस्तित्वात असतेच. पदार्थाचे अस्तित्व संपूर्णपणे आपण नष्ट करू शकत नाही. असेच करीत गेल्यावर शेवटी जे काही अस्तित्वात असते तेच परब्रह्म. म्हणून अस्ति-आहे या शब्दाचा अर्थ 'परमात्मा' असा आहे. ईश्वर कोठे आहे? या प्रश्नाला काही अर्थ नाही. तो प्रत्येक वस्तूत आहे. सर्व प्रपंचात आहे. प्रत्येक वस्तूत जे 'आहे' म्हणजे 'सत्तत्त्व' तेच परमात्मा होय.

अस्ति, भाति, प्रिय, नाम आणि रूप ही पाच तत्त्वे प्रपंचामध्ये असतात. यांपैकी अस्ति-भाति-प्रिय ही तीन तत्त्वे म्हणजे परमात्मा होय आणि नाम-रूप ही दोन तत्त्वे म्हणजे माया होय. आपल्याला सर्वप्रथम मायाच दिसते. आपल्या दृष्टीवरचे मायापटल जेव्हा दूर होते तेव्हा आपल्याला सत्-चित्-आनंदरूप परमात्म्याचा साक्षात्कार होतो.

गुरूपदेशामुळे नामदेवाला साक्षात्कार झाल्यावर त्याला सर्व प्रपंच परमात्मरूप दिसू लागला. एकदा संत नामदेव भोजन करीत असताना एका कुत्र्याने त्यांच्या ताटातली पोळी पळवली. तेव्हा नामदेव हातात काठी घेऊन कुत्र्याला मारण्यासाठी धावत सुटले नाहीत. उलट हातात तुपाची वाटी घेऊन ते त्याच्या मागे धावत सुटले आणि म्हणू लागले की, 'भगवंता, हे तूप पण खा. नाहीतर तुमचे पोट बिघडेल.'

नामदेवात केवढे परिवर्तन झाले! गुरुबोध होण्याआधी तो फक्त ईश्वराच्या ठिकाणीच ईश्वर पाहात होता. परंतु गुरुबोधानंतर त्यांना कुत्र्यात देखील भगवान दिसू लागला. प्राणिमात्रात आणि वस्तूत ईश्वर आहे या भावनेने आपण त्यांच्याकडे पाहतो म्हणून त्यांच्या ठिकाणी तो असतो असे नाही. तर जेव्हा आपण या दृष्टीने पाहत नसतो तेव्हाही त्यांच्या ठिकाणी ईश्वर असतोच. आपली दृष्टी भगवद्रूप झाली की त्यांच्या ठिकाणचे भगवत्तत्त्व अनुभवाला येते.

प्रपंचाचा आधार शिव असून प्रपंच शिवाचे आधेय होय. याप्रकारे शिव आणि प्रपंच यांच्यात आधार-आधेयभावाचा संबंध आहे. शिवात प्रपंच आहे आणि प्रपंचात शिव आहे. आपल्या शरीराला आकाश आधार आहे आणि आपल्या शरीरात असलेल्या आकाशाला शरीर आधार आहे. याप्रमाणे शरीराला आकाश आधार तर शरीरातील आकाशला शरीर आधार आहे. त्याप्रमाणे शिवात प्रपंच आणि प्रपंचात शिव आहे. अर्थात् अंतर्बाह्य सर्वत्र तोच तो आहे. तिळात तेल असते आणि दुधात तूप असते. परंतु तिळाकडे पाहिल्यावर त्यातील तेल दिसत नाही आणि दुधाकडे पाहिल्यावर त्यातील तूप दिसत नाही. तिळातले तेल आणि दुधातले तूप पाहण्यासाठी आपल्याला काही प्रक्रिया करावी लागते. त्याप्रमाणे भगवत्तत्त्व सर्वत्र व्याप्त असले तरी त्याची अनुभूती येण्यासाठी आपल्याला साधना करावी लागते. भावनात्मक जीवन जगावे लागते. हे शिव आहे, ते शिव आहे, सर्व शिवमय आहे, अशा भावनेने आपण जीवन जगू तेव्हा कुठे आपल्याला सर्वत्र शिवदर्शन होऊ शकते.

चिदेकभाजनं यस्य चित्तवृत्तेः शिवात्मकम्।
नान्यत् तस्य किमेतेन मायामूलेन वस्तुना।।१४.३१।।

ज्याच्या चित्तवृत्तीत केवळ शिव व्यापून राहिलेला असतो त्याला शिवावाचून दुसरे काहीच दिसत नाही. आपल्या मनात जे असते तेच आपल्याला बाहेर दिसते. प्रत्येक वस्तूकडे आपण आपल्या मानसिक भावनेतून पाहत असतो. एखादी वस्तू हवी असेल तर त्या वस्तूकडे पाहण्याची आपली दृष्टी वेगळी असते. एखादी वस्तू नको असेल तर तिच्याकडे पाहण्याची आपली दृष्टी वेगळी असते. आपण पाहतो आपल्या डोळ्यांनीच. वस्तूविषयी आसक्ती असेल तर तिच्याकडे पाहण्याची नजर आणि वस्तूबद्दल विरक्ती असेल तर तिच्याकडे पाहण्याची नजर यात फरक असतो. आपल्या मनावरच सारे काही अवलंबून असते. ज्याच्या चित्तवृत्तीत परमात्मा संचलेला असतो त्याला प्रपंचातील वस्तूंचे प्रयोजन नसते. ज्याच्या हृदयात भगवान शिवाचे वास्तव्य असते त्याला सांसारिक वस्तूंबद्दल तिळमात्र रती नसते. आपल्यापासून जे भिन्न आहे आणि जे अप्राप्य आहे त्याबद्दलच आपल्या मनात इच्छा निर्माण होते. ज्यावेळी सर्व काही मिळालेले असते आणि आपल्यापासून काही भिन्न नसते त्यावेळी मनात इच्छेचा उदय होत नसतो. ज्याच्या मनात शिव नांदतो त्याच्या मनातील संपूर्ण वासनांचा क्षय होतो, इच्छांचा उपशम होतो. अशी ही एकभाजनस्थिती प्राप्त करून सर्वांनी आपले कल्याण करून घ्यावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
२१ जुलै १९९२

---

आशीर्वचन दहावे

## एकभाजनस्थल–२/ सहभोजनस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल आपण एकभाजनस्थल या अवांतरस्थलाविषयी ऐकत होता. या स्थलातील शेवटचा श्लोक असा आहे–

वृत्तिशून्ये स्वहृदये शिवलीने निराकुले।
यः सदा वर्तते योगी स मुक्तो नात्र संशयः।।
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.३३)

मुक्त कोणाला म्हणतात? माणसाचे मन जेव्हा संसाराचे चिंतन करीत असते तेव्हा तो संसारी होतो, बद्ध होतो. तेच मन जेव्हा सांसारिक विषय सोडून शिवतत्त्वाचे चितन करू लागते तेव्हा ते मुक्त होते. विषयांचे चिंतन सुटून शिवचिंतनात लीन होणे हीच मुक्ती होय. परंतु असे कशासाठी करायचे? चिंतन तर सारखेच आहे. ते विषयचिंतन असो की शिवचिंतन. मग आधीचे चिंतन सोडून नव्याने शिवचिंतन कशासाठी करायचे? त्याने कोणता फरक पडतो?

ज्याच्याजवळ आपण जातो, बसतो, उठतो त्याच्या गुणांचा प्रभाव आपल्यावर पडत असतो. संसाराचा

स्वभाव दुःखरूप असून जो त्याच्याशी संबंध ठेवतो तो दुःखीच होतो. याचा विचार करून शास्त्रकारांनी संसारसागर मोठा दुस्तर आहे, जागे व्हा, असा उपदेश दिला आहे. संसारसागर हा एक दुःखसागरच होय. म्हणून त्याच्याशी जेवढा आपला संबंध राहील तेवढा काळ आपल्याला दुःख भोगावे लागते. गरीब असो की श्रीमंत, स्त्री असो की पुरुष, बाळ असो की वृद्ध, दुःखापासून कोणाचीच सुटका नाही. प्रत्येकाच्या दुःखाची कारणे वेगळी असू शकतील, परंतु दुःखभोग मात्र एकच आहे. दुःख कोणाला हवे असते? परंतु नाइलाजाने प्रत्येकाला ते भोगावेच लागते. आपल्याला सुख मिळावे अशी प्रत्येकाची इच्छा असते.

सुखरूप असे या जगात काय आहे? आणि त्याच्याशी आपण कसा संबंध जोडू शकतो? याचा शोध घेतल्यावर आपला आत्मा आणि त्याचे मूळ स्वरूप असा परमात्मा हे आनंदरूप आहे असा बोध होतो. आपला आत्मा सुखरूप आहे याची प्रचीती मनुष्याला दररोज येत असते. दुसऱ्याने सांगावी आणि आपण ऐकावी अशी ही गोष्ट नाही. ती आपल्या अनुभवाला नित्य येत असते. गाढ निद्रेत म्हणजे सुषुप्ति-अवस्थेत हा आनंदानुभव आपण घेत असतो. त्यावेळी कोणतेच बाह्य विषय उपस्थित नसतात. कोणतीही उपाधी नसते. स्वप्न अथवा जागृती या अवस्था नसतात. तरीही आपण आतल्या आत आनंदमग्न असतो. यावरून आपला आत्मा आनंदरूप आहे हे सहज प्रतीत होते. त्याच्याशी संबंध जोडला गेला तर अमाप सुख मिळते. आत्म्यापासून भिन्न असलेल्या शरीर-इंद्रिये-अंत:करण इत्यादींशी आपण समरस झालो तर आपल्याला सुःखाचा अनुभव येतो.

शरीराचा विचार केला तर त्यात अनेक रोग दडलेले असतात असे लक्षात येईल. वात, पित्त, कफ या त्रिदोषांमुळे होणारे रोग तर असतातच त्याशिवाय कर्मजन्म असेही रोग असतात. कुठल्याही औषधाने असे रोग नष्ट होत नाहीत. त्यासाठी ध्यान, पूजा आदी उपायांचा अवलंब करावा लागतो. मी शरीर आहे असा अभिमान ज्याच्या ठिकाणी असतो त्याला दररोज कोणत्या ना कोणत्या तरी शारीरिक दुःखाला तोंड द्यावे लागते. शरीर हे रोगांचे आगर आहे. रोगांचा खजिना आहे, असे निजगुणशिवयोगी या कन्नड संताने म्हटले आहे. शरीरात किती रोग आहेत त्याची गणना करता येत नाही. जोपर्यंत शरीरात सामर्थ्य असते, प्रतिकारशक्ती असते, तोपर्यंत रोगांची जाणीव होत नाही. वयोमानामुळे शरीर क्षीण होऊ लागले की आत दडलेले रोग उसळी मारून बाहेर येतात. मोरोपंत नामक मराठी कवीने याचे सुंदर वर्णन केले आहे-

**कृतांतकटकामलध्वजजरा दिसो लागली।**
**पुरस्सरगदांसवे झगडता तनु भागली।।**

डोक्यावरचे पांढरे केस पाहून कवीला असे वाटते की, यमाच्या सैन्याचा हा ध्वजच आहे. आता हळूहळू आपल्या शरीरावर त्याच्या सैन्याचे आक्रमण होणार. शरीरात दडलेले जुने रोग आता आपले डोके वर काढीत आहेत आणि त्यांच्याशी झगडता झगडता आपले शरीर पार थकून गेले आहे.

याच रोगांमुळे शरीर केव्हातरी नष्ट होते. शरीराबद्दल अभिमान धरला तर मनुष्याला दुःखच अधिक भोगावे लागते. इंद्रियांच्या ठिकाणी अभिमान धरला तरी असेच घडते. काही लोक पंगू असतात तर काही आंधळे. काही जणांना दिसत नाही म्हणून दुःख होते तर काही जणांना दिसते म्हणूनही दुःख होते. मनुष्यस्वभाव असा विचित्र आहे. एका कवीने संसाराला 'लाकडी भुशाचा लाडू' अशी उपमा दिली आहे. हा लाडू खाण्याचा जो प्रयत्न करतो त्याला रडावे लागते आणि ज्याला खायला मिळत नाही तो देखील रडतो. याप्रमाणे शरीर-इंद्रिये-मन

यांच्याशी आपण समरस झालो अर्थात् ते म्हणजे मी आहे असे मानले तर दुःखाशिवाय आपल्या पदरात काहीही पडत नाही. शरीरापासून ते बुद्धीपर्यंत सर्व अनात्मतत्त्वे दुःखदायक ठरतात. म्हणून सुखप्राप्तीसाठी आपला अभिमान आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करायला हवा आणि आत्म्याचा संबंध परमात्म्याशी जोडायला हवा. मुक्ती हवी असेल तर प्रपंचाशी संबंध तोडून परमात्म्याशी संबंध जोडणे हाच एकमेव उपाय आहे. त्यासंबंधीच येथे स्पष्टीकरण केलेले आहे.

समुद्रावर असंख्य तरंग उठत राहतात. त्याप्रमाणे आपल्या मनात अनेक वृत्ती उत्पन्न होत असतात. आज हे हवे तर उद्या ते हवे. अशा असंख्य इच्छा आपल्या मनात निर्माण होतात. या वृत्ती केव्हा शून्य होतात? सुषुप्ति-अवस्थेत काही काळ चित्तवृत्ती शून्य होऊन आपल्याला आनंदाचा अनुभव येतो. एखादी वृत्ती मनात जागी असेल तर रात्रभर आपल्याला झोप येणार नाही. मनात एक वृत्ती उठून ती शिवात विलीन झाली आणि दुसरी वृत्ती उठली नाही, या मधल्या अवस्थेलाच समाधी असे म्हणतात. ही वृत्तिशून्य अवस्था होय. शिवचिंतनामुळे आपल्या मनोवृत्ती शिवात लीन होऊन जातात आणि अंतःकरण निराकुल म्हणजे विकाररहित होते. आपले मन व्याकुळ असते तेव्हा ते अत्यंत क्षुब्ध असते. परंतु ते जेव्हा निराकुल असते तेव्हा ते अत्यंत शांत, स्तब्ध असते. याप्रकारे जो जीवन जगतो तो जीवन्मुक्त होय यात संशय नाही. समुद्र मध्यभागी शांत असतो. त्याच्या किनाऱ्यावर मात्र लाटांचे तांडव सुरू असते. त्याप्रमाणे तुमचे मन जेवढे बाहेर असते तेवढ्या त्यावर वृत्तींच्या लाटा अधिकाधिक उठतात परंतु ते जसजसे आत मध्यभागी, केंद्रस्थानी आत्म्याच्या ठिकाणी जाईल तसतसे ते शांत होत जाते. शरीर हा किनारा आणि आत्मा हे केंद्रस्थान होय. तुम्ही आत जाल तसे अधिक स्थिर व्हाल, अधिक वृत्तिशून्य व्हाल. वृत्तिशून्य होणे हीच मुक्ती होय.

ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास असे चार आश्रम भारतीय संस्कृतीत मानले आहेत. ब्रह्मचर्यात जो स्थिर राहतो तो ब्रह्मचारी. जो गृहात निवास करतो तो गृहस्थ. जे मनुष्याला रोज आपल्याकडे ओढून घेते, खेचते त्याला घर म्हणतात. येथे प्रवचन ऐकायला तुम्ही आलात. ते संपल्यावर तुम्ही कोठे जाल? तर तुमच्या घरी. तुम्हीच नव्हे तर जनावरे देखील आपल्या घरीच जातात. गोठ्यातून बाहेर गेलेली जनावरे सायंकाळी बरोबर गोठ्यात परत येतात. ज्या ठिकाणी तुमचा जन्म झाला त्या स्थानाविषयी तुमच्या मनात ममत्व असते. काही निमित्ताने तुम्हाला दुसऱ्या गावी राहावे लागले तरी तिथले काम संपल्यावर तुम्ही सरळ घरी येता. म्हणून जो घरात राहतो तो गृहस्थ. घर आणि घरातील व्यक्तीविषयीचा जो सदैव विचार करतो, त्यातच गुंतलेला असतो तो गृहस्थ.

तिसरा आश्रम वानप्रस्थाश्रम. जो वनात राहतो तो वानप्रस्थ. जो आपल्या परिवारातील व्यक्तींना सोडून निर्जन प्रदेशात राहून वृक्षवेलींशी संबंध जोडतो तो वानप्रस्थ, वनस्थ होय. प्रत्येकाने आपल्या आयुष्यात काही काळ वनवासी व्हायला पाहिजे. शास्त्रकार म्हणतात की, वनवासाशिवाय आयुष्याला सुवास लाभत नाही. घरात बसून बसून मनुष्य 'दुर्वास' होतो. वनवास भोगल्याशिवाय त्याच्या ठिकाणचा दुर्वास जात नाही. रामायण-महाभारतात आपण काय ऐकतो? बारा-चौदा वर्षे वनवास भोगल्याच्या कथा आपण ऐकतो. आपल्या देशातील या दोन महान ऐतिहासिक ग्रंथांत भावाभावांनी एकमेकांसोबत कसे राहावे हेच समजावून सांगितले आहे. रामायण त्या काळात घडले, या काळात घडत नाही असे नाही. या काळात देखील रामायण तर कधी महाभारत चाललेले असते. या तर आपल्या जीवनाशी अतूट जोडलेल्या कथा होत. कुणी रामायणातले पात्र असते तर कुणी

महाभारतातले.रामायण-महाभारतात वनवासाच्या कथा का बरे सांगितल्या आहेत?

निरंतर संसाराचे चिंतन करून माणसाची बुद्धी विक्षिप्त होत असते. माणसाच्या दृष्टीने जन्मवेळ आणि मृत्युवेळ महत्त्वाची मानली जाते. मुलाचा जन्म झाला की आपण पंचांग पाहतो. त्याच्या मृत्यूचा मुहूर्त कसा आहे? हा एकटाच गेला की सोबत आणखी कुणाला घेऊन जाणार आहे? काहीजण एकटेच जातात तर काहीजण आपल्या सोबत इतरांनादेखील घेऊन जातात. तर काहीजण इतके बेरकी असतात की ते स्वत: घर सोडून यमाच्या दरबारी जातातच, पण घरातल्या काही लोकांवरही आपल्यासारखी घर सोडण्याची वेळ आणतात.

जन्म-मृत्यूच्या वेळा महत्त्वाच्या मानल्या जातात. परंतु आपला जन्म तर होऊन गेला. आता त्याचा मुहूर्त पाहण्यात काय अर्थ आहे? मुहूर्त चांगला असेल किंवा नसेल. आता साधायची ती मृत्युवेळ. ती साधणे तुमच्या हाती आहे. तुमच्या हाती आहे याचा अर्थ असा नव्हे की पंचांग पाहून शुभमुहुर्तावर आत्महत्या करावी. तो मुहूर्त भलाही चांगला असेल, परंतु ते मरण चांगले नाही. चांगला मुहूर्त याचा अर्थ आपली चांगली भावना. मनाची शांत स्थिती. पितामह भीष्माची कथा तुम्हाला माहीत आहे. शरपंजरी पडल्यावर शुभमुहुर्ताची काय आवश्यकता होती? ते बालब्रह्मचारी होते. राजसिंहासनाची लालसा त्यांच्या ठिकाणी नव्हती. तरी देखील दुष्टचक्रात फसले होते. आपल्या प्रतिज्ञेमुळेच ते त्यात अडकले होते. स्वत: अत्यंत पराक्रमी असून देखील अन्याय आणि अधर्म ते रोखू शकले नाहीत. त्यामुळे महाभारत युद्ध झाले. असंख्य लोक मृत्युमुखी पडले. ते पाहून भीष्मांना अत्यंत क्लेश झाले. त्याचवेळी जर त्यांनी शरीर सोडले असते तर त्यांच्या बिघडलेल्या मन:स्थितीमुळे, मनातील वासनांमुळे त्यांना पुनर्जन्म घ्यावा लागला असता. अंतकाळी माणसाच्या मनात जी भावना असते त्याप्रमाणेच त्याला पुढे गती मिळते.

याच्या स्पष्टीकरणासाठी एक उदाहरण आम्ही नेहमी देत असतो. फोटो काढण्यासाठी तुम्ही नटून थटून स्टुडिओत जाऊन बसता. फोटो काढताना फोटोग्राफर 'कॅमेऱ्याकडे नीट पाहा, डोळे बंद करू नका' असे सांगतो आणि क्लिक् करतो. छान फोटो निघाला या समाधानात तुम्ही घरी जाता. फोटोप्रिंट घ्यायला जेव्हा तुम्ही जाता तेव्हा त्या फोटोप्रिंटवर तुमचे डोळे मिटलेले असतात. तुम्ही त्याला विचारता- 'असा कसा फोटो काढला? मी काय आंधळा आहे?' त्याच्याशी भांडत बसता. तो बिचारा म्हणतो- 'मी तर तुम्हाला डोळे उघडे ठेव असे सांगितले होते, ऐन मोक्याच्या क्षणी तुम्ही डोळे बंद केले. त्याला मी काय करू?'

फोटो काढताना जे घडते तो क्षण अत्यंत महत्त्वाचा असतो. तोच आपल्या हातून नेमका निसटून जातो. तुलसीदासांनी म्हटले आहे-

**जनम जनम मुनि यतन कराहि।**
**अंत राम कहि आवत नाही।।**

माणसे आयुष्यभर भगवंताचे नामस्मरण करीत असतात, परंतु अंतकाळी मात्र त्यांना भगवन्नाम आठवत नाही. मग ज्याने आयुष्यभर कधीच त्याचे नाव घेतले नाही त्याला अगदी शेवटच्या क्षणी त्याचे नाव कसे बरे आठवेल? म्हणून जन्म-मृत्यूच्या वेळा या अत्यंत महत्त्वाच्या मानल्या जातात. अंतकाळी आपली जशी स्थिती असेल तशी

आपल्याला गती मिळते. एकदा सांसारिक विषयांचे चिंतन सुटले की मग मुक्तीसाठी फार काळ लागत नाही. बोलावणे आले की लगेच निघून जायचे. परंतु आपण मात्र असे वागत नाही. मृत्यू दाराशी उभा असतो. तो तिकडून आपल्याला ओढत असतो आणि आपण इकडून त्याला ओढत असतो. अशी ओढाताण चालू असते. तुम्ही मृत्यूसोबत किती काळ ओढाताण करू शकाल? तुमची शक्ती थोडी आहे, त्याची अपार आहे. तुम्हाला हरावेच लागते.

शरीर सुटल्यानंतर म्हणजे मृत्यूनंतर मुक्ती मिळते असे नाही. शरीरात राहूनच आपल्याला मुक्त व्हायचे आहे. मग मृत्यूचे भय राहत नाही. जो जिवंतपणी मुक्त नसतो त्यालाच मृत्यूचे भय असते. वृत्ती शून्य होऊन जेव्हा शिवात लीन होतात तेव्हा त्याचे हृदय निराकुल होते. असा शिवयोगी जीवन्मुक्तच असतो यात संशय नाही. अशा प्रकारे सर्वांना एक मानणे हेच एकभाजनस्थल असून ती एकप्रकारची मुक्तावस्थाच होय.

## सहभोजनस्थल

यानंतरचे अवांतर स्थल आहे सहभोजनस्थल. भोजन करताना कधी आपण एकटे भोजन करतो तर कधी इतरांसोबत बसून पंक्तिभोजन करतो. रोज मनुष्य सहसा एकटाच भोजन करतो. परंतु एखाद्या विशेषप्रसंगी मात्र गुरुजन, मित्र, नातलग इत्यादींना आमंत्रण देऊन त्यांच्यासोबत सहभोजन करतो. सहभोजनाची अर्थात् पंगत करण्याची ही प्रथा का बरे निर्माण झाली असावी? कमाई आपणच करायची, खायचे देखील आपणच. मग सगळ्यांना बोलावून आपल्या घरात भोजन कशासाठी घालायचे? आसन घालायचे, त्यांना जेवू घालायचे, त्यांचे उष्टे खरकटे आपण काढायचे. या भानगडी आपण कशाला करायच्या? पण त्यामध्ये मनाचे मोठेपण आहे. आपण शिजवलेले अन्न इतर कोणाला न देता जो स्वतःच खातो, तो अन्न खात नसून पापच खातो, असे गीतेत म्हटले आहे. अशा माणसाला चोर असे म्हटले जाते. रोज तर आपण एकटे भोजन करीत असतो. कधीतरी इतरांना निमंत्रित करून त्यांच्या सोबत भोजन करायला हवे.

त्यामुळे सौहार्दभावना वाढते. तुम्ही जेव्हा एखाद्याला घरी जेवायला बोलावता तेव्हा तो देखील केव्हातरी तुम्हाला भोजनाचे निमंत्रण देतो. व्यवहारातील अशा सहभोजनामुळे परस्परांमध्ये सौहार्दभावना उत्पन्न होते. लग्नाच्या निमित्ताने, एखाद्या सणाच्या निमित्ताने, अथवा अन्य कोणत्या तरी कारणाने सहभोजन घडते. ज्यांना आपल्या हाताने खाता येत नाही अशा बालकांना सोबत घेऊन आईवडील भोजन करतात. स्वतःही खातात. मुलांनाही खाऊ घालतात. लहान मुले म्हणजे आपलेच रूप असते. म्हणून त्याला आपल्या ताटात खाऊ घालतात. तेथे भेदभाव करीत नाहीत. पितापुत्र एक आहेत. म्हणून ते एकाच ताटात जेवतात. लग्नानंतर पतिपत्नीला एकाच ताटात जेवू घालतात. आजवर तुम्ही वेगवेगळे होता. यानंतर मात्र तुम्ही दोघे एकच आहात, हेच जणू त्यांना या पद्धतीतून सांगितले जाते. व्यावहारिक भेद मिटवण्यासाठी अशी भोजनाची परंपरा आहे. व्यवहाराकडे पाहताच आपल्याला अध्यात्म समजून घ्यावे लागते. ज्याचा अनुभव आपल्याला व्यवहारात येत नाही ते अध्यात्मात समजावून सांगणे मोठे कठीण असते. म्हणून व्यावहारिक दृष्टान्त देऊनच अध्यात्म समजावून सांगावे लागते.

आपल्या घरात पति-पत्नी, मुले-बाळे सगळे एकत्र बसून सहभोजन करतात. काही संतसमाजात देखील अशी प्रथा आहे. आपापल्या घरांत शिजवलेले अन्न सगळेजण घेऊन येतात. ते मिसळतात आणि सगळे एकत्र बसून सहभोजन करतात. एकाच गुरूचे अनेक शिष्य विविध जातिजमातीचे असतात. त्यांच्यातला भेद मिटवण्याचा सहभोजन हा उत्तम उपाय आहे. कारण आपला सारा भेदव्यवहार रोटी-बेटी-व्यवहारातच आधारलेला आहे. एखाद्याला मान द्यायचा असेल तर त्याच्या सोबत जेवणे आणि एखाद्याला कमी लेखायचे असेल तर त्याच्या सोबत जेवण न करणे. अशा प्रकारे आपण भेद जोपासत असतो. भेदभाव नष्ट करण्यासाठीच सहभोजनाच्या प्रथेचा अवलंब करण्यात आला. एकाच पंगतीत गुरू आणि त्याचे सर्व जातिजमातीतले शिष्य एकत्र बसून सहभोजन करीत असतात तेव्हा तेथे अभेदभावनेचेच दर्शन घडत असते.

वीरशैव परंपरेत श्रीगुरूची पादपूजा केल्यानंतर त्यांचे पादोदक एका पात्रात घेऊन सर्वजण ते पितात. गुरू देखील तेच घेतात आणि आलेले सर्व शिष्य देखील तेच घेतात. त्या पूजेत सामील झालेल्या भक्तांमध्ये कोणत्याही प्रकारचा भेदभाव केला जात नाही आणि त्यात उच्छिष्टदोष देखील मानला जात नाही. पति-पत्नी आणि पिता-पुत्र जेव्हा एका ताटात जेवतात तेव्हा 'ते एकमेकांचे उष्टे खातात' असे आपण म्हणत नाही. त्याप्रमाणे पादोदकसेवनात उच्छिष्टदोष मानला जात नाही. सोमयागात चमस नामक विशिष्ट पात्रात सोमरस ठेवला जाऊन त्याच पात्राने तो सर्व ऋत्विज प्राशन करतात. तेथेही उच्छिष्टदोष मानत नाहीत. मानसिक स्तर उंचावला की व्यावहारिक भेद लोप पावतात. व्यावहारिक जीवनात सहभोजन करून भेद मिटवण्याचा प्रयत्न केला जातो. आध्यात्मिक जीवनात सहभोजन कसे कले जाते त्याविषयी येथे सांगितले आहे.

**गुरोः शिवस्य शिष्यस्य स्वस्वरूपतया स्मृतिः।**
**सहभोजनमाख्यातं सर्वग्रासात्मभावतः॥१४.३४॥**

शिष्य आणि गुरू यांच्यात प्राथमिक अवस्थेत भेद असतो. उपदेश देणारा गुरू, उपदेश ग्रहण करणारा शिष्य. गुरूच्या उपदेशाप्रमाणे शिष्य जेव्हा भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी आणि शरण ही स्थले ओलांडून ऐक्यस्थलात पोहोचतो त्यावेळी गुरूचा अनुभव हाच शिष्याचा अनुभव होतो. गुरु-शिष्याच्या अनुभवांत अंतर राहत नाही. शिष्य स्वतःला, आपले मूळरूप असलेल्या शिवाला आणि शिवतत्त्वाचा उपदेश करणाऱ्या गुरूला एकरूप मानून शिवाशी आणि गुरूशी तादात्म्यचिंतन करतो. यालाच सहभोजन असे म्हणतात. माझा आत्मा, गुरूचा आत्मा आणि परमात्मा हे भिन्न नसून एकच आहेत असे ज्ञान होणे हेच सहभोजनस्थल होय. बोध्य, बोधक आणि बोधन ही त्रिपुटी संपून सर्वांना समान अनुभूती येते. त्याचा निष्कर्षच पुढे सांगतात-

**शिवं विश्वं गुरुं साक्षाद् योजयेन्नित्यमात्मनि।**
**एकत्वेन चिदाकारे तदिदं सहभोजनम्॥१४.३५॥**

हे सहभोजन कसे करायचे? तर गुरू, शिव आणि विश्व यांना आपल्या आत्मरूपात पाहण्याची साधना करावी. आपला आत्मा आणि गुरूचा आत्मा एकच आहे. आपला आत्मा आणि परमात्मा हे देखील एकच आहे. या प्रपंचाला आधारभूत असे जे परतत्त्व आहे ते देखील आपल्या आत्म्यापासून भिन्न नाही. अर्थात् विश्वाला आधारभूत परमात्मा, त्याचा बोध करून देणारा गुरू आणि गुरूकडून समजून घेणारा मी यांच्यात थोडा देखील भेद नसून सारे एकच आहे. असे एकरूपाने जे चिंतन होते त्यालाच सहभोजन म्हटले जाते.

**अयं शिवो गुरुश्चैष जगदेतच्चराचरम्।**
**अहं चेति मतिर्यस्य नास्त्यसौ विश्वभोजकः।।१४.३६।।**

या सहभोजनस्थलाचा अधिकारी कोण नसतो याबद्दल थोडे व्यतिरेकाने येथे सांगितले आहे. हा गुरू आहे, हा शिव आहे, हा प्रपंच आहे आणि मी त्यापेक्षा वेगळा आहे असा भाव ज्याच्या ठिकाणी असतो तो सहभोजक अथवा विश्वभोजक असू शकत नाही. सहभोजनस्थलात पोहोचण्यासाठी कोणत्याही प्रकारचा भेदभाव असता कामा नये. व्यावहारिक भेद तर राहणारच. तो कोणी मिटवू शकणार नाही. परंतु आध्यात्मिक दृष्टीने आत्मरूपात अभेद पाहता येतो.

एकदा प्रभू रामचंद्राच्या दरबारात हनुमंत आल्यावर रामचंद्रांनी त्याला विचारले की, ''तू कोण आहेस?''

हा प्रश्न ऐकून हनुमंताला आश्चर्य वाटले. तो मनात म्हणाला– इतक्या लवकर रामाला आपला विसर पडला? सीतेचा शोध मी लावला. यांनी दिलेली अंगठी मीच सीतेला नेऊन दिली, लंकेचे दहन मीच केले. राज्याभिषेक होताच प्रभू रामचंद्र हे सर्व विसरले?

असा विचार करून देखील हनुमंताला वाटले की काही विशिष्ट अर्थाने आपल्याला रामांनी हा प्रश्न विचारला असावा. हनुमंत मोठा बुद्धिमान होता. एवढ्या लवकर श्रीरामांना आपला विसर पडणे शक्य नाही हे त्याने ओळखले आणि त्यांच्या प्रश्नाचे तीन प्रकारे उत्तर दिले. तो म्हणाला–

'भगवन्, आपण 'तू कोण' हा प्रश्न मला विचारला तो देहदृष्टीने? जीवदृष्टीने? आत्मदृष्टीने? देहदृष्टीने म्हणाल ती मी आपला दास आहे. जीवदृष्टीने म्हणाल तर मी आपला एक अंश आहे आणि आपण जर आत्मदृष्टीने विचारीत असाल तर मी म्हणजे आपणच आहात. मी आणि आपण यांत भेद नाही'.

हे उत्तर ऐकून श्रीरामचंद्र अत्यंत प्रसन्न झाले. केवळ रामचंद्रच नव्हे तर सभेतील सर्वजण प्रसन्न झाले. कारण सभेत सर्वप्रकारचे लोक होते. कोणी भक्त होते, कोणी साधक होते तर कोणी ज्ञानी होते. हनुमंत कोणते उत्तर देणार? हे सर्वजण उत्सुकतेने ऐकत होते. जर हनुमंत 'मी आपलेच स्वरूप आहे' असे उत्तर दिले असते तर भक्तांना राग आला असता. याला केवळ अहंकार झाला? हा स्वतःला प्रभू रामचंद्राच्या बरोबरीचा मानतो असे त्यांना वाटले असते. म्हणून त्यांच्यासाठी हनुमंताने 'मी प्रभूचा दास आहे', असे उत्तर दिले. जे साधक होते त्यांच्यासाठी 'मी प्रभूचा अंश आहे' आणि जे ज्ञानी होते त्यांच्यासाठी 'मी परमात्मरूपच आहे' असे उत्तर दिले.

याप्रकारे शारीरिक भेद असला तरी आत्मदृष्टीने अभेद देखील असतोच. ज्याच्या मनात हा गुरू, हा शिव, हा मी असा भेद आहे तो सहभोजक होऊ शकणार नाही. शिव, गुरू, प्रपंच आणि आपण यांना एक मानणे हे आध्यात्मिक सहभोजन असून ते शाश्वत सुख देणारे आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
२२ जुलै १९९२

## सहभोजनस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या ऐक्यस्थलातील सहभोजनस्थल या अवांतरस्थलाचा आपण कालपासून विचार करीत आहोत. ज. रेणुकाचार्य पुढे सांगतात–

**अहं भृत्य: शिव: स्वामी शिष्योऽहं गुरुरेव वै।**
**इति यस्य मतिर्नास्ति स चाद्वैतपदे स्थित:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.३७)

सहभोजनस्थल हे अंगषट्स्थलांतील ऐक्यस्थलातले अंतिम स्थल आहे. ऐक्यस्थलात पोहोचण्यासाठी अभेदाची आवश्यकता असते. आधी भेदबुद्धीचे स्वरूप नष्ट करून ती ज्याच्या ठिकाणी नसते तोच ऐक्यस्थलाचा अधिकारी होय, हे ज. रेणुकाचार्यांनी येथे स्पष्ट केले आहे. सर्वसामान्यांच्या मनात आपण सेवक असून शिव आपले स्वामी आहे, अशी भेदभावना असते. हे माझे गुरू असून मी त्यांचा शिष्य आहे, अशी भेदबुद्धी त्यांच्या ठायी असते. जो साधक आपल्या साधनेच्या बळावर ऐक्यस्थलात पोहोचला आहे त्याच्या मनात 'मी शिवच आहे' असा शिवोऽहम्भाव दृढ झालेला असतो.

शिवाचे ध्यान, शिवाचे चिंतन करायचे तरी कशासाठी? तर स्वत:च शिव होण्यासाठी, शिव होणे हेच षट्स्थलांचे लक्ष्य होय. शिवचिंतन करणाऱ्या भक्ताच्या मनात हळूहळू शिवभावना दृढ होते. 'मी शिवाचा सेवक आहे' ही आधीची भावना हळूहळू दूर होते. याचप्रमाणे हे आपले गुरू आणि आपण त्यांचे शिष्य आहोत, असा भेद देखील त्याच्या मनात राहत नाही. मी शिव आणि विश्व शिवमय आहे, या अभेदज्ञानामुळे त्याच्या मनात स्वामी–भृत्यभाव आणि गुरु–शिष्यभाव असा भेद राहत नाही. भेदबुद्धीचे निरसन करून अद्वैतबुद्धी स्थिर करणे हेच सहभोजनस्थलाचे लक्ष्य आहे.

**पराहन्तामये स्वात्मपावके विश्वभास्वति।**
**इदन्ताहव्यहोमेन विश्वहोमीति कथ्यते।।१४.३८।।**

सहभोजनस्थलातील साधकाला सर्वत्र शिवोऽम् भावना करण्यासाठी येथे एक विधी सांगितला आहे. याला 'विश्वहोम' असे म्हटले आहे. या विश्वात जेवढे काही पदार्थ त्या सर्वांची पराहंतारूपी अग्नीत आहुती द्यावी. एक अहंता आहे आणि दुसरी पराहंता. सामान्य मनुष्याच्या ठिकाणी जी अहंता असते तो अहंकार होय. मी करतो, मी देतो, मी पाहतो हा अहंभाव असून तो बंधनकारक आहे. परंतु पराहंता अशी नसते. सारे काही मीच आहे, अशी भावना म्हणजे पराहंता होय. हा समष्टि–अहंभाव असून तो परब्रह्मरूप असतो. विश्व प्रकाशित करणाऱ्या मूलअहंतारूप स्वात्म–अग्नीत अर्थात् ज्ञानाग्नीत इदं अर्थात् ज्ञानाग्नीत इदं अर्थात् हे–हे–हे इत्यादी भेद म्हणजेच प्रपंचातील सर्व वस्तूंचे हवन करावे. अग्निसंपर्कात लाकूड जसे अग्निरूप होते त्याप्रमाणे इदंरूपी प्रपंचाचे हवन केल्यावर तो परमात्मरूपच होतो. परमात्मा हा विश्वापेक्षा व्यापक असल्यामुळे विश्व त्यात सामावून जाते. अशा प्रकारे प्रपंचातील एकेका वस्तूचे हवन केल्यामुळे त्या सर्व अहंस्वरूपच होतात. त्यावेळी अहंशिवाय दुसरे

काहीच शिल्लक राहत नाही. असा आपणच विश्व होत गेल्यावर प्रपंचातील सर्व वस्तूत अहंभाव उत्पन्न होतो. अर्थात् प्रपंचातील प्रत्येक वस्तू म्हणजे मीच आहे, अशी अभेदभावना होते. अशा प्रकारे संपूर्ण विश्वाबद्दल ज्याच्या मनात अहंभाव उत्पन्न होतो त्यालाच 'विश्वहोमी' असे म्हणतात. तो पराहंतारूप आत्मरूपी अग्नीत सर्वांचे हवन करून त्यांना आत्मरूप करतो. या पराहंतेचे स्वरूप कसे आहे याबद्दल पुढे सांगतात–

**अहं शिवो गुरुश्चाहमहं विश्वं चराचरम्।**
**यया विज्ञायते सम्यक् पूर्णाहन्तेति सा स्मृता।।१४.३९।।**

शिव मीच आहे, गुरू मीच आहे, हे चराचर विश्वदेखील मीच आहे. माझ्याशिवाय काहीही भिन्न नाही, असे ज्ञान जिच्यामुळे होते तीच पूर्णाहंता होय. पराहंता म्हणजे पूर्णाहंता. संपूर्ण विश्वाला अहंभावाने पाहणे यालाच पूर्णाहंता म्हणतात. या पूर्णाहंतेमुळेच साधक संपूर्ण विश्वाला आत्मरूपात पाहू शकतो.

**आधारवह्नौ चिद्रूपे भेदजातं जगद्धविः**
**जुहोति ज्ञानयज्वा यः स ज्ञेयो विश्वहव्यभुक्।।१४.४०।।**

ज्याप्रमाणे यज्ञ करणाऱ्या दीक्षिताला हवन करण्यासाठी यज्ञकुंडातील अग्नी आधार असतो त्याप्रमाणे विश्वहोम करण्यासाठी ज्ञानरूप अग्नी आधारभूत असतो. यज्ञ करताना समिधा आणि अन्य हविर्द्रव्ये हवन केली जातात त्याप्रमाणे विश्वहोमात भेदरूपी प्रपंचाचे हवन केले जाते. 'इदं अहं' हे मीच आहे अशी भावना विश्वहोम करताना करतात. अर्थात् आपल्या भावनेला विश्वव्यापक केले जाते. पुस्तक मीच आहे, घर मीच आहे, शेत मीच आहे, सर्व जीवजंतू मीच आहे. याप्रमाणे आपला अहंभाव वृद्धिंगत केला जातो. अहंभाव संकुचित असेल तर तो बंधनाचे कारण ठरतो आणि अहंभाव व्यापक झाला तर तो मुक्तीचे कारण ठरतो. यज्ञकुंडात हवन केलेली द्रव्ये जशी अग्निरूप होतात तशी विश्वहोमात अर्पण केलेला भेदरूपी प्रपंच आत्मरूप होतो. याप्रकारे जो विश्वहोम करतो त्याला विश्वहविर्भोक्ता आणि ज्ञानयज्ञ–दीक्षित म्हटले जाते.

ज्याच्या ठिकाणी केवळ आपल्या आत्म्याबद्दल अहंभाव असतो तो आपण केवळ शरीरातच राहतो असे मानतो. आपण शरीरामध्ये आहोत असे मानणे हाच व्यष्टिभाव होय. व्यष्टिभाव जीवात्म्याला बंधनात टाकतो. ज्याचा अहंभाव विश्वव्यापक होतो, तो स्वतःला विश्वरूप, शिवस्वरूप मानतो. भेदबुद्धीमुळेच जीवात्मा संसारचक्रात भ्रमत राहतो. त्याच्याठिकाणी भेदबुद्धी असते. म्हणून तो काही लोकांना अनुकूल समजतो तर काही लोकांना प्रतिकुल समजतो. अनुकूल व्यक्तीशी तो चांगला वागतो तर प्रतिकूल व्यक्तीशी वाईट वागतो. चांगल्या वर्तनाने पुण्याचा तर वाईट वर्तनामुळे पापाचा धनी होतो. हे पाप–पुण्य त्याला संसारचक्रात भ्रमवीत राहते. म्हणून भेदबुद्धीच नसेल तर तो संसारचक्रात भ्रमत राहणार नाही.

ज्याच्या मनातून भेद पूर्णपणे नष्ट होतो त्याच्या दृष्टीने कुणी अनुकूल–प्रतिकूल नसतो. त्यामुळे त्याच्याकडून पुण्य–पाप घडत नाही आणि पुण्य–पाप न घडल्यामुळे तो जन्ममृत्यूच्या चक्रात सापडत नाही. ज्याला जन्म–मृत्यू नको असतील त्याने भेदभावनेचा त्याग करावा आणि अद्वैतभावना दृढ करावी. सर्व विश्व म्हणजे मीच आहे, अशी पूर्णाहंता ज्याच्या ठिकाणी असते तो विश्वाशी समरस होतो. रामकृष्ण परमहंसाबद्दल एक प्रसंग सांगितला जातो.

एकदा रामकृष्ण परमहंस दक्षिणेकडे निघाले होते. नदी पार करण्यासाठी ते नौकेत बसले. नदीकिनाऱ्यावर काही लोक एका माणसाला मारीत होते आणि तो मोठमोठ्याने ओरडत होता. ते दृश्य पाहताच रामकृष्ण मोठमोठ्याने ओरडू लागले, 'मला मारू नका, मला मारू नका.'

आसपासच्या लोकांना आश्चर्य वाटले. कारण परमहंसांना तर कोणीच मारत नव्हते. त्यांनी विचारले, 'आपल्याला कोण मारत आहे?'

'ते बघा, तिथे मला मारत आहेत.' परमहंस मार खाणाऱ्या माणसाकडे बोट दाखवून म्हणाले.

पूर्णाहंता ही अशी असते. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी अहंभाव दृढ झाला तर त्यांच्या सुखदुःखाशी तो समरस होतो.

अशी पूर्णाहंता प्राप्त करून घेतलेले अनेक महात्मे पृथ्वीतलावर वावरतात. त्यांनी विश्वहोम केलेला असतो. परंतु हे विश्व तर आहे तसेच आहे. मग विश्वहोम झाला, विश्वातील भेद नष्ट झाला हे कसे मानावे? याचे स्पष्टीकरण पुढील श्लोकात करतात–

**चिदाकारे पराकाशे परमानन्दभास्वति।**
**विलीनचित्तवृत्तीनां का वा विश्वक्रमस्थितिः।।१४.४१।।**

विश्वाचा अभाव दोन प्रकारे करता येतो. एक त्याला जाळून, नष्ट करून किंवा आपली चित्तवृत्ती परब्रह्मात विलीन करून चित्तवृत्ती परब्रह्मस्वरूप झाल्यावर त्याला विश्व दिसत नाही. आपल्याला जेव्हा विश्व दिसत नाही तेव्हा ते आपल्यापुरते नष्ट झालेले असते. मग दुसऱ्यासाठी ते अस्तित्वात असेल तर असो. त्याच्याशी आपल्याला काही कर्तव्य नाही. मुक्ती हा व्यक्तिगत अनुभव आहे.

एक भूताकाश आहे तर दुसरे चिदाकाश. भूताकाश म्हणजे आपल्याला दिसणारे आकाश. हे भूताकाश ज्या आकाशात राहते ते चिदाकाश होय. सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप अशा चिदाकाशात ज्याच्या चित्तवृत्ती विलीन झाल्या त्याला विश्वातील कोणत्याही भेदाची जाणीव असत नाही. त्याच्या दृष्टीत परब्रह्माशिवाय अन्य कोणतीही वस्तू अस्तित्वात नसते. अज्ञानी जीवांना प्रपंच दिसत असेल, परंतु ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीत त्याचे अस्तित्व नसते. ज्ञानी पुरुषाकडून विश्व नष्ट केले जात नाही. कारण ते नष्ट करण्याचा कोणाला अधिकार नाही. ही शिवसृष्टी आहे. ही शिवच नष्ट करील. ज्ञानी पुरुष फक्त सृष्टीकडे शिवदृष्टीने पाहतो. त्याला तेथे सृष्टी दिसत नाही, शिव दिसतो. अशी शिवैक्यस्थिती प्राप्त करून घेण्यासाठीच सर्व योगीलोकांची धडपड चाललेली असते. ती प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न आपण देखील करावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
२३ जुलै १९९२



## सहभोजनस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भेदबुद्धीमुळेच मनुष्याला जन्मजन्मांतरांतून फिरावे लागून दुःख भोगावे लागते, हे कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले आहे. जोपर्यंत भेदबुद्धी निवृत्त होत नाही तोपर्यंत माणसाला शाश्वत सुखाचा लाभ होत नाही. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी यांच्या दृष्टीने अद्वैत होणे शक्य नाही. कारण प्रत्येकाचे शरीर आणि मन यांच्या दृष्टीने अद्वैत होणे शक्य नाही. कारण प्रत्येकाचे शरीर आणि मन त्याच्या कर्माप्रमाणे घडलेले असते. म्हणून ते इतरापेक्षा वेगळे असते. परंतु सर्वांचा आत्मा मात्र एकच आहे. मग तो एखाद्या क्षुद्र कीटकाचा असो किंवा स्वतःला सर्वश्रेष्ठ समजणाऱ्या मनुष्याचा. म्हणून आत्मदृष्टीने आपण भावाद्वैत करू शकतो.

सर्वसामान्य माणसे आपल्या शरीरालाच आत्मा समजून शरीर–व्यवहारातच आयुष्यभर गुंतलेली असतात. शरीर हे सर्वस्व नसून एक साधन आहे याची जाणीव फारच थोड्यांना असते. गुरूपदेशामुळे शरीर, इंद्रिये, अंतःकरण यांच्यापेक्षा आपण भिन्न आहोत असे आपल्याला जेव्हा ज्ञान होते तेव्हाच आपली दृष्टी आत्मदृष्टी होते.

महर्षी याज्ञवल्क्यांना विद्वत्संन्यास घ्यायचा होता. त्यांना दोन पत्न्या होत्या. कात्यायनी आणि मैत्रेयी. त्या दोघींना त्यांनी बोलावले. आपल्या संपत्तीचे दोन समान भाग करून ते म्हणाले, ''माझी संपूर्ण संपत्ती तुम्हा दोघींना सारखी वाटून दिली आहे. तुम्ही यानंतरचे आयुष्य सुखात घालवावे. मी संन्यास घेण्यासाठी निघालो आहे.''

त्यांच्या थोरल्या पत्नीने–कात्यायनीने त्यावर 'जशी आपली मर्जी' एवढीच प्रतिक्रिया व्यक्त केली. परंतु त्यांची दुसरी पत्नी मैत्रेयी बुद्धिमान होती. तिने त्यांना विचारले, ''नाथ, आपण सारे काही आम्हा दोघीत वाटून टाकले. आपल्यासाठी आपण काहीच कसे ठेवले नाही? घरात वाटणी करताना मुलांच्या हिश्श्याबरोबरच आईवडील आपलाही हिस्सा ठेवत असतात. कारण आपली मुले आपल्या उदरनिर्वाहाची काळजी करणार नाहीत असे त्यांना वाटते. आपण स्वतःसाठी काहीच न ठेवता आम्हा दोघींना देऊन टाकले. आता आम्हाला सोडून आपण कुठे जाणार आहोत?''

''मी विद्वत्संन्यास घेण्यासाठी चाललो आहे.'' याज्ञवल्क्य म्हणाले.

संन्यास दोन प्रकारचे असतात. विविदिशा संन्यास आणि विद्वत्संन्यास. ज्ञान प्राप्त होण्याअगोदर जो संन्यास घेतला जातो त्याला विविदिशा संन्यास म्हणतात. काहीजण ज्ञानप्राप्तीनंतर जीवन्मुक्तीचा विलक्षण अनुभव घेण्यासाठी संन्यास घेतात. त्याला विद्वत्संन्यास म्हणतात.

याज्ञवल्क्यांनी 'मी विद्वत्संन्यास घ्यायला जात आहे' असे सांगितल्यावर मैत्रेयीने आपल्या मनाशीच विचार केला. एखादी वस्तू सोडून जेव्हा मनुष्य दुसरी वस्तू प्राप्त करण्याची इच्छा करतो तेव्हा पहिल्यापेक्षा दुसरी वस्तू अत्युत्कृष्ट असते म्हणूनच. म्हणून ती म्हणाली, ''नाथ, आपण आम्हाला सोडून जे संपादन करण्यासाठी जात आहात त्यामध्ये मला हिस्सा हवा आहे. या संपत्तीमध्ये नको.''

याज्ञवल्क्यांनी ओळखले की आपली ही पत्नी अत्यंत बुद्धिमान आणि संवेदनशील आहे. ती आपल्या

भौतिक संपत्तीतील वाटा नाकारून आध्यात्मिक संपत्तीत हिस्सा मागत आहे. मग त्यांनी मैत्रेयीला ज्ञानोपदेश केला.

ज्याची बुद्धी जड असते त्याची अद्वैतज्ञानाकडे प्रवृत्ती होत नसते. जडबुद्धी याचा अर्थ निर्बुद्ध अथवा वेडा असा नाही. जो निरंतर जडाचे चिंतन करतो तो जडबुद्धी होय. तो केवळ शरीराचे आणि शरीरसंबंधी व्यक्तीचेच चिंतन करीत असतो. अशा जडबुद्धी मनुष्याला कुणी अद्वैतबोध करू म्हटले तर त्याच्या बुद्धीत तो शिरणारच नाही. जोवर बुद्धीतून 'जड' दूर होत नाही तोवर त्याला अद्वैत समजणे शक्यच नाही. तुम्ही जडाचेच निरंतर चिंतन कराल तर जडाशिवाय या जगात दुसरे काही आहे याची जाणीव तुम्हाला होणारच नाही. तुमच्या मनातून जडाला हटवणे अवघड होईल. तुमच्या हातातली एखादी वस्तू काढून घेऊन ती फेकून देणे सोपे आहे. परंतु तुमच्या मनात रुजलेली गोष्ट माकडाच्या मुठीतल्या वस्तूप्रमाणे असते.

लहान तोंडाच्या मडक्यातील चणे घेण्यासाठी माकड त्यात हात घालते. परंतु मुठीत चणे घेऊन ते जेव्हा मूठ बाहेर काढायला पाहते तेव्हा ती निघत नाही. हातातले चणे टाकून द्यावे वाटत नाहीत आणि मूठ बांधली असल्यामुळे मडक्याच्या लहान तोंडातून हात बाहेर येत नाही. माकडाच्या या मुठीलाच 'कपिमुष्टी' असे म्हणतात. त्याप्रमाणेच मनाच्या हातात एखादी गाष्ट सापडली तर ते ती लवकर सोडत नाही. सुटली तर ती केवळ विवेकामुळेच सुटेल. एरव्ही शक्य नाही. परमेश्वराने प्रपंचात अंधार आणि प्रकाश उत्पन्न केला. देहादी अनात्म वस्तू हा अंधार असून त्याच्या आत वसणारे चैतन्य हा प्रकाश होय. आत्मा देह सोडून निघून जातो तेव्हा आपले शरीर अर्थशून्य होते. ते फार काळपर्यंत घरात कुणी ठेवत नाही. शक्य तेवढ्या लवकर घराबाहेर काढून त्याची विल्हेवाट लावतात. आत्मवस्तुमुळे अनात्म वस्तू अशी प्रकाशमान होते आणि प्रकाशहीनही होते. फार कमी लोक आत्म्याचा शोध घेतात. सर्वसामान्य माणसे एवढी मठ्ठ, जडबुद्धीची असतात की, आयुष्यभरच नव्हे तर जन्मजन्मांतरात ती जड शरीरालाच कवटाळून बसतात. आत्म्याचा एक किरण देखील त्यांच्या गढूळ मनात प्रकाशत नाही. आत्मज्ञान एवढे मूल्यवान असते की, त्याच्या तुलनेने विश्वातील सारी संपत्ती कस्पटासमान क्षुद्र ठरते.

नचिकेताने जेव्हा यमाजवळ आत्मज्ञान मागितले तेव्हा यमाने त्याला अनेक प्रलोभने दाखवली. शंभर वर्षे पुरेल एवढी संपत्ती देतो, आज्ञाधारक पत्नी आणि पुत्र हे देखील तुला देतो, संसारसुखे भोगण्याइतके ऐश्वर्य आणि सामर्थ्य हे सारे काही देईन. परंतु आत्म्याविषयी मात्र काही विचारू नकोस.

नचिकेता जडबुद्धीचा असता तर तो या साऱ्या भौतिक गोष्टी घेऊन आला असता. त्याने विचार केला की, ज्याअर्थी आत्मा सोडून यम सारे काही द्यायला तयार आहे त्याअर्थी सर्वांपेक्षा आत्माच अधिक मूल्यवान असला पाहिजे. म्हणून त्याने त्याच्यासाठीच यमाजवळ हट्ट धरला.

यम म्हणाला, ''आत्मप्राप्तीसाठी मोठमोठ्या ऋषीमुनींनी आपली आयुष्ये पणाला लावली. त्यासाठी संसार सोडून ते गिरिकंदरात जाऊन बसले, अत्यंत कठोर तपश्चर्या केली. याच आत्मप्राप्तीसाठी अंगावर भगवी वस्त्रे चढवून काही लोक आयुष्यभर साधना करतात तर याचसाठी काहीजण अंगावरची वस्त्रे भिरकावून देऊन दिगंबर होतात. म्हणून आत्मज्ञान सोपे नाही. तू परत जा.''

परंतु तरीही नचिकेताने आत्मज्ञानच हवे असा हट्ट धरला. अशी आत्मजिज्ञासा प्रत्येकाच्या ठिकाणी नसते. अणि सामान्यत: प्रत्येक मनुष्याची बुद्धी जडबुद्धीच असते. ज्याच्या मनातले जडाबद्दलचे प्रेम समूळ नष्ट होते

त्याच्याच मनात आत्मजिज्ञासेचा उदय होतो. मैत्रेयीच्या ठिकाणी अशी आत्मजिज्ञासा दिसल्यामुळेच तिला महर्षी याज्ञवल्क्यांनी आत्मज्ञानाचा उपदेश केला.

या प्रात:कालीन धर्मसभेत तुम्ही मोठ्या संख्येने उपस्थित आहात. परंतु आत्मजिज्ञासा असलेले कितीजण तुमच्यामध्ये आहेत? श्रुतीमध्ये म्हटले आहे–

अमृतत्वाचा शोध घेणारा कोट्यावधी मनुष्यांमध्ये एखादाच असतो. तो खरा धीर असतो. कालिदासाने 'कुमारसंभवा'त अत्यंत समर्पक शब्दांत म्हटले आहे–

**विकार हेतौ सति विक्रियन्ते।**
**एषां न चेतांसि त एव धीरा:।।**

पर्वतराजाने आपल्या कन्येला, पार्वतीला भगवान शिवाची सेवा करण्यासाठी पाठवले. त्या प्रसंगावरील हा श्लोक आहे. शिव हे पुरुष, पार्वती कुमारिका आणि अवतीभवतीचा एकान्त यामुळे काही अनर्थ घडणार तर नाही ना? परंतु ते शक्य नाही. कारण भगवान शिव अत्यंत धीर आहेत. विरक्त आहेत. मनाला विकृत करणारी वस्तू अथवा व्यक्ती समोर आल्यावरही ज्याचे मन विकृत होत नाही त्याला 'धीर' असे म्हणतात. भगवान शिव असे धीर होते. म्हणून त्यांची सेवा करण्यासाठी आपली कुमारी कन्या पाठवताना पर्वतराजाला संकोच वाटला नाही. उपनिषदांत देखील याच अर्थाने 'कश्चिद् धीर:' असे म्हटले आहे. प्रापंचिक वस्तू पाहून ज्याच्या मनात मोह उत्पन्न होतो त्याला आत्मदर्शन होणे अवघड आहे. परमेश्वराने एका सुवर्णपात्रात सत्य झाकून ठेवले. सत्यदर्शन घडावे यासाठीच त्याने आपल्याला मनुष्यजन्म दिला. जर मनुष्यजन्मात आपण सत्यदर्शन करून घेऊ शकलो नाही तर मग कुठल्या जन्मात करून घेणार? मनुष्यजन्मातच तुम्ही आत्मसाक्षात्कार करून घेऊ शकता. या जन्मात जर तो करून घेता आला नाही तर तो दुसऱ्या कोणत्याही जन्मात करून घेणे शक्य होणार नाही.

आत्मसाक्षात्कार करून घेण्यासाठीच परमेश्वराने आपल्याला मनुष्यदेह दिला आहे. मनुष्यजन्माचा उद्देश कोणता आहे?

**आहारनिद्राभयमैथुनं च सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम्।**
**ज्ञानं हि तेषामधिको विशेष: ज्ञनेन हीन: पशुभि: समान:।।**

आहार, निद्रा, भय आणि मैथुन या गोष्टी जशा मनुष्याच्या ठिकाणी आहेत तशच पशूच्या ठिकाणी देखील आहेत. याबाबतीत मनुष्य पशूची बरोबरी करू शकत नाही. कारण आहार, निद्रा, मैथुन याबाबतीत पशू अत्यंत नियमित असतात आणि मनुष्य अनियमित. येथे माणसापेक्षा पशूच श्रेष्ठ असे म्हणायची वेळ येते. शरीरस्वास्थ्यासाठी योगशास्त्रात अनेक आसने सांगितली आहेत. त्यामध्ये प्राण्यांच्या नावाने अनेक आसने आहेत. परंतु मनुष्याच्या नावाने एकही आसन नाही. कुक्कुटासन, उष्ट्रासन, भुजंगासन आणि वृक्षासन देखील आहे. परंतु मनुष्यासन मात्र नाही. कारण त्याला धड उठता येत नाही, धड बसता येत नाही, धड झोपता येत नाही. त्याला हे सारे शिकवावे लागते. प्राणी कसे निसर्गत:च नियमबद्ध असतात. म्हणून माणसाला शरीरस्वास्थ्यासाठी पशूचे अनुकरण करावे लागते.

झाडाचे मूळ जमिनीत असते. ते जेवढे घट्ट असेल तेवढे झाड स्थिर राहते. मनुष्य हा उलटा वृक्ष आहे. त्याचे मूळ म्हणजे त्याची बुद्धी. बुद्धी चांगली तर सारे चांगले. ती बिघडली तर खड्ड्यात पडलाच. 'बुद्धिनाशात् प्रणश्यति'. वृक्षाप्रमाणे मुळे खाली करून शीर्षासन करून थोडा काळ तो राहिला तर त्याला आरोग्यलाभ होतो.

पशूंना खाण्यासाठी, बसण्यासाठी कुणी शिकवत नाही. त्यांच्यासाठी कुणी शास्त्र लिहिले नाही. तरी ते जेवढे स्वस्थ जीवन जगतात तेवढे मनुष्य जगत नाही. त्याच्यासाठी शास्त्र निर्माण झाले. त्याला आरोग्याचे सारे नियम शिकवले तरी देखील त्याचे स्वास्थ्य बिघडतेच. आहाराच्या बाबतीत मनुष्यापेक्षा पशूच श्रेष्ठ ठरतात. एकदा पोट भरले की पशू अधिक काही खात नाही. परंतु मनुष्य मात्र पोट भरल्यानंतरही कुणी प्रेमाने आग्रह केला तर आणखी खातो. त्याचे पोट रबरासारखे ताणून अधिकाधिक वाढत जाते. त्यात कितीही अन्न टाकले तरी ते आतच जाऊन बसते.

मनुष्याला धड बसता येत नाही. म्हणून तो लवकर म्हातारा होतो आणि मृत्यूच्या गावी जातो. तुम्ही जेव्हा घर बांधता तेव्हा घराच्या भिंती आणि आर.सी.सी. कॉलम एका सरळ रेषेत उभे करता. घराच्या भिंती जर वेड्यावाकड्या बांधल्या तर त्या पडायला किती वेळ लागतो? त्याप्रमाणे योगशास्त्रात सांगितल्याप्रमाणे जो मनुष्य ताठ बसत नाही त्याचा देहही फार काळ टिकण्याची शक्यता नसते. निसर्गाने नेमून दिलेला आहारच पशू सेवन करतात. काही पशू मांसाहारी असतात तर काही शाकाहारी. शास्त्रात म्हटले आहे की, जो प्राणी जिभेने पाणी पितो तो मांसाहारी असतो आणि जो ओठांनी पाणी पितो तो शाकाहारी असतो. तुम्ही पाहा जे मांसाहारी प्राणी असतात ते आपली जीभ बाहेर काढून पाणी पितात. मनुष्य पाणी कसे पितो? जीभ बाहेर काढून तर पीत नाही. ओठांनीच पितो. म्हणून नैसर्गिक दृष्टीने मनुष्य हा शाकाहारी प्राणी आहे. शाकाहारी प्राण्यासमोर तुम्ही मांस ठेवले तर तो ते कधी खात नाही. मनुष्यापुढे मांस ठेवून बघा. तो जिभल्या चाटत चाटून पुसून खाईल. मनुष्य आपले अन्न खातो आणि पशूचे अन्नदेखील खातो. म्हणून त्याला 'सर्वाहारी' म्हणतात. निसर्गाचे नियम झुगारून देऊन माणसाने आपल्या सवयी बिघडवून घेतल्या आहेत.

मनुष्याने एकदा चूक केली, दोनदा केली तर ती सुधारणे शक्य आहे. परंतु चुका करणे हा जर त्याचा स्वभावधर्मच बनला तर त्याच्यात सुधारणा होण्याची शक्यता नाही. स्वभाव बदलता येत नसतो. जमिनीत जर एखादे बी पडले तर ते उचलून फेकणे सहज शक्य आहे. परंतु जर ते रुजले तर जमिनीच्या खाली आणि वर वाढत जाऊन दृढमूल होते. मग त्याला उपटून टाकणे कठीण जाते. जर त्याचा वटवृक्षच झाला तर त्याची मुळे कोणती आणि फांद्या कोणत्या? असा प्रश्न पडतो. त्याला उपटून टाकणे तर अत्यंत कठीण असते. त्याप्रमाणे केवळ याच नव्हे तर गेल्या अनेक जन्मांतल्या संस्कारांमुळे आपला स्वभाव बनलेला आहे. तो स्वभाव बदलणे किती अवघड आहे! आम्ही अनेकदा सांगतो की मनुष्याच्या ठिकाणी अनेक प्राण्यांचे स्वभावविशेष दडलेले आहेत. तो वेगवेगळ्या प्राण्यांचे आणि पक्ष्यांचे आवाज सहज काढू शकतो. कुत्र्यासारखा भुंकू शकतो. तो इतका चांगला भुंकतो की कुत्रा देखील तेवढा चांगला भुंकू शकत नाही. सगळ्या प्राण्यांचे तो आवाज काढू शकतो आणि त्याला सगळ्या प्राण्यांचे अन्न दिले तर तो ते खाऊ शकतो. ही शक्ती इतर प्राण्यांत नाही. कुत्रा मांजरीप्रमाणे आवाज काढू शकत नाही. एक पोपट सोडला तर दुसऱ्या कोणत्याही पक्ष्याला तुम्ही मनुष्यबोली शिकवू शकत नाही. परंतु मनुष्य मात्र पोपटासारखे बोलू शकतो आणि कावळ्यासारखे ओरडू शकतो.

याचे एकमात्र कारण हे की, असंख्य योनींमधून प्रवास करीत तो शेवटी मनुष्ययोनीत आलेला आहे. याआधी त्याने ज्या ज्या पशुपक्ष्यांच्या देहांत निवास केला ती शरीरे तर सोडली, परंतु त्यांचे संस्कार मात्र सोबत घेऊन आला. त्यामुळेच कदाचित तो पशुपक्ष्यांचे आवाज काढू शकतो आणि ते जे खातात ते खाऊ शकतो. मनुष्य हा पूर्णत्वाने मनुष्य नाही. शास्त्रकाराने म्हटले आहे, 'मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति।'

त्याचा आकार मनुष्याकार आहे, परंतु बुद्धी मात्र पशूसारखी आहे. केवळ आकार माणसाचा आहे म्हणून काही कुणी माणूस ठरत नाही. त्याचे विचार आणि व्यवहार माणसाचे असतील, त्याच्या अंत:करणात माणुसकीची ज्योत तेवत असेल तरच तो खरा माणूस. मनुष्यशरीरात माणुसकी असतेच असे नाही. एखाद्याचे अमानुष वर्तन पाहून आपण त्याला सहज म्हणतो– तुझ्यात थोडी माणुसकी आहे की नाही?

आपण दुकानातून नारळ आणतो तेव्हा चांगले हलवून आत पाणी आहे की नाही? नासके तर नाही ना? याची खात्री करून घेतो. फोडून पाहिल्यानंतर एखाद्या वेळी ते खराब निघण्याचीही शक्यता असते. परंतु विकत घेण्याआधी आपण त्याची पूर्ण परीक्षा करून घेतो. त्याप्रमाणे मनुष्यशरीर हे वरचे कवच असून माणुसकी आतल्या खोबऱ्याप्रमाणे असते. गुरू शिष्याची परीक्षा करताना हेच पाहात असतो. याचे शरीर मनुष्याचे आहे, पण शरीराच्या आत असलेले मन आणि बुद्धी ही मनुष्यत्वाला अनुकूल आहे की नाही? हे तो तपासून घेतो आणि मगच त्याचा शिष्य म्हणून स्वीकार करतो.

सहभोजनस्थलात पोहोचलेल्या साधकाबद्दल आपण विचार करीत आहोत. तो जगाकडे बाह्य दृष्टीने पाहत नसून केवळ अंतरंगदृष्टीने पाहतो. सच्चिदानंदरूप चिदाकाशात त्याच्या चित्तवृत्ती विलीन झालेल्या असतात. म्हणून त्याला बाह्य प्रपंचाची थोडीदेखील जाणीव नसते. पुढे सांगतात–

**निरस्तविश्वसंम्बाधे निष्कलंके चिदम्बरे।**
**भावयेल्लीनमात्मानं सामरस्यस्वभावत:।।**
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १४.४२)

विश्वप्रपंचाची कोणतीही बाधा त्या ठिकाणी नाही. शरीरव्यवहारात, इंद्रियांच्या व्यवहारात, मनोव्यापारात अनेक प्रकारचे अडथळे, अनेक प्रकारच्या बाधा निर्माण होतात. परंतु आत्मव्यवहारात मात्र कोणतीही बाधा उत्पन्न होत नाही. शरीर कितीही शुद्ध असले तरी कोठे ना कोठे तरी ते मळलेले, कलंकित असतेच. इंद्रिये आणि मनाच्या बाबतीतही हेच खरे आहे. परंतु आत्मस्वरूप मात्र निष्कलंक असते. हे चिदाकाश म्हणजे प्रकाशरूप आकाश होय. असा आपला आत्मा परमात्म्यात समरसभावनेने लीन झाला आहे अशी कल्पना करावी. जलात जल समरस व्हावे आणि दुधात दूध एकरूप व्हावे तसे.

**सैषा विद्या परा ज्ञेया सत्तानन्दप्रकाशिनी।**
**मुक्तिरित्युच्यते सद्भिर्जगन्मोहनिवर्तिनी।।१४.४३।।**

याप्रमाणे आत्मा आणि परमात्मा यांचे सामरस्य होणे यापेक्षा अधिक मोठा लाभ कोणता असेल? अर्थात् कोणताच नाही. एक मुक्ती मिळाली तर तिच्यापेक्षा अधिक मिळवण्यासारखे काही शिल्लक राहत नाही. आत्मा-परमात्म्यातील सामरस्यभावनेलाच पराविद्या म्हटले जाते. ती सच्चिदानंदस्वरूप असून सर्व भेदांची निवृत्ती करते. शेवटी या ऐक्यस्थलाचा उपसंहार करतात–

**भक्तादिधामार्पितधर्मयोगात् प्राप्तैकभाव: परमाद्भुतेन।**
**शिवेन चिद्व्योममयेन साक्षान्मोक्षश्रियो भाजनतामुपैति।।१४.४४।।**

भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य ही षट्स्थले आहेत. परमात्मस्वरूपात समरस होण्यासाठी जीवात्म्याला हे सहा टप्पे पार करावे लागतात. भक्तस्थलापासून जीवात्म्याचा प्रवास सुरू होतो आणि

ऐक्यस्थलात येऊन तो परमात्म्याशी समरस होतो. त्यावेळी त्याची यात्रा पूर्ण होते. आपणही त्याच यात्रेतील यात्रेकरू आहोत. परंतु मध्येच कोठेतरी अडकून बसलो आहोत. परशिवाशी समरस होण्यासाठीच तर जीवात्मा यात्रा करीत असतो. यात्रा करताना एखादे प्रसन्न, सुखकारक स्थान पाहून यात्रेकरू तेथेच विसावतो आणि त्याला पुढे चालावेसे वाटत नाही. तशी आपली सर्वांची अवस्था झाली आहे. आपणही असेच भौतिक सुखात कुठेतरी गुंतून पडलो आहोत आणि कुठे जायचे ते देखील विसरलो आहोत.

आपली यात्रा काल सुरू झाली नाही. ती कितीतरी आधीपासून युगायुगांपासून चालू आहे. आणि अजून संपलेली नाही. वाटेवरच्या प्रत्येक गावात जर अनेक वर्षे मुक्काम केला तर यात्रा संपेल तरी कधी? आणि कशी? एक जन्म, एक उभे आयुष्य म्हणजे एक मुक्कामच होय. असे किती मुक्काम आपण आतापर्यंत केले हे देखील आपल्याला माहीत नाही. आणि पुढे किती करणार आहोत याचे भाकीत कुणी वर्तवू शकत नाही. अखंड चालणे आणि चालणे अशी आपल्या सर्वांची भ्रमणगाथा आहे. परंतु तीच ती सुखे आणि तीच ती दुःखे भोगून एखादा संवेदनशील, विवेकी मनुष्य झडझडून जागा होतो. गतजन्मातले प्राक्तन भोगता भोगता आपण नवी कर्मे करतो आणि पुढल्या जन्माचे गाठोडे बांधून ठेवतो हे त्याला जाणवते आणि हे जाणवल्यावरच त्याचा हा जन्म अखेरचा ठरतो.

अनेक जन्मात चालूनही न सरणारा प्रवास थांबवण्यासाठी तो उपाय शोधतो आणि षट्स्थलांत प्रवेश करतो. भक्त होतो, माहेश्वर होतो, प्रसादी होतो, प्राणलिंगी होतो, शरण होतो आणि ऐक्यस्थलात प्रवेश करताच त्या सच्चिदानंदस्वरूप परशिवात समरस होतो. हेच ते ऐक्यस्थल. ज्याच्या प्राप्तीसाठी आपण युगानुयुगे धावत आहोत, असंख्य जन्मांची ओझी वाहत आहोत. येथेच वाट सरून पावलांची गती थांबते. उगवणे-मावळणे, उमलणे-कोमेजणे सरून जाते. जन्म-मृत्यू अर्थशून्य होतात आणि अखेरच्या जन्माचा प्रवास कायमचा थांबतो. तुमचा आमचाही हा अखेरचा जन्म ठरावा, एवढे सांगून आजचे ऐक्यस्थलावरील आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।।ॐ शांतिः शांतिः शांतिः।।

शिवानुभव मंगलभवन, सोलापूर
२४ जुलै १९९२



# भाग ७ : लिंगषट्स्थलांतर्गत भक्तस्थल

आशीर्वचन पहिले

## लिंग–षट्स्थल

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।
विश्ववंद्यं सदा वंदे विश्वाराध्यं जगद्गुरुम्।।

श्रीकाशीसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे तिला अनंत प्रणिपात समर्पित करून श्रावणमासानिमित्त आयोजिलेल्या या धर्मसभेत उपस्थित असलेल्या जिज्ञासू सद्भक्तांनो आणि मातांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा वीरशैवांचा धर्मग्रंथ आहे. वीरशैवसिद्धान्त आगमांत, वेदांत आणि उपनिषदांत देखील आहे. अनेक ग्रंथांत प्रतिपादन केलेला हा सिद्धान्त आपल्याला 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथात समग्र पहायला मिळतो. याच ग्रंथाच्या आधारे मराठी, कन्नड इ. भाषांत संत–साहित्यिकांनी वीरशैवसिद्धान्त समजावून सांगितला आहे. अष्टावरण, पंचाचार आणि षट्स्थल या तिन्ही तत्त्वांचे सविस्तर आणि सुस्पष्ट प्रतिपादन या ग्रंथात केलेले असल्यामुळे या ग्रंथाला आपण धर्मग्रंथ मानतो.

मनुष्याच्या आध्यात्मिक विकासाचे जे टप्पे या ग्रंथात वर्णिले आहेत ते मुख्यत: सहा आहेत. त्यांना 'षट्स्थल' असे म्हणतात. परंतु त्यातील अवांतर स्थले मिळून एकूण १०१ स्थलांची मांडणी या ग्रंथात केली आहे. त्यामध्येही अंगस्थले आणि लिंगस्थले असे दोन भागांत विभाजन केलेले आहे. पहिली ४४ स्थले ही अंगस्थले होत तर नंतरची ५७ स्थले ही लिंगस्थले होत. या आधी अंगस्थलावरील आशीर्वचने आम्ही पूर्ण केली असून त्यांचा मराठी अनुवाद 'जन्म हा अखेरचा' या नावाने प्रकाशित देखील झालेला आहे. त्याचे पुढील भाग देखील यथावकाश प्रकाशित होणार आहेत. आजपासून लिंगस्थलावरील आशीर्वचनाचा प्रारंभ करीत आहोत.

येथे अंग आणि लिंग या दोन शब्दांचे अर्थ स्पष्ट करायला हवेत. वीरशैवसिद्धान्तात जगताचे मूलकारण अशा परब्रह्माला 'स्थल' अशी संज्ञा आहे. ज्यातून प्रपंच उत्पन्न होते, ज्यात तो स्थित राहतो आणि ज्यामध्ये तो विलीन होतो, अशा तत्त्वाला 'स्थल' असे म्हणतात. 'लिंग' हे त्याचेच दुसरे नाव होय. त्याला 'लिंग' म्हणा, 'स्थल' म्हणा, किंवा 'परब्रह्म' म्हणा, ही त्याची पर्यायनामे होत. सृष्टिनिर्मितीपूर्वी हेच एक 'स्थलतत्त्व' होते. त्याच्या ठिकाणी चिच्छक्ती देखील होती. त्या तत्त्वाला लीला करण्याची इच्छा झाली. माणसाला देखील एकटे राहणे आवडत नाही. 'एकाकी नैव रमते' असे शास्त्रात म्हटले आहे.

एकटेपणा माणसाला खायला उठतो. एकटेपणात माणूस कंटाळतो, उबगतो. मग दुसऱ्याजवळ जाऊन गप्पा मारू लागतो. वर्तमानपत्रे किंवा पुस्तक वाचतो. रेडिओ ऐकतो किंवा टी.व्ही. पाहत बसतो. एकटेपणाला माणूस घाबरतो. जप, तप, ध्यान एकान्तात करावे असे शास्त्रात म्हटले आहे. आपण ध्यान करायला एकान्तात बसलो

तर थोड्याच वेळात कंटाळतो. परंतु दोन चार मित्रांसोबत गप्पा छाटत बसलो तर वेळ कसा गेला हे कळत देखील नाही. चार लोकांत बसल्यावर काळ कसा निघून गेला याचा पत्ता देखील लागत नाही आणि एकटे बसल्यावर वेळ जाता जात नाही. ध्यान करताना पाच मिनिटांचा काळ देखील दीर्घकाल वाटू लागतो. तुम्ही डोळे उघडून पाहता तेव्हा फक्त पाच मिनिटे झालेली असतात. एकटेपणामध्ये मनुष्य आनंदी राहू शकत नाही.

त्याप्रमाणे परशिवब्रह्म हे 'स्थलतत्त्व' एकटे होते. ते लीला करण्यासाठी दोन भागांत विभक्त झाले. क्रीडा करण्यासाठी कमीत कमी दोन माणसे तर हवीतच. जेव्हा मनुष्य एकटा असतो आणि त्याला खेळण्याची लहर येते, तेव्हा तो एकटाच दोन्ही बाजूकडून खेळू लागतो. स्वत:च्या बाजूकडून तोच खेळतो आणि भिडूच्या बाजूकडून देखील तोच खेळतो. त्याप्रमाणे भगवंताला जेव्हा दुसरा कुणी मिळाला नाही तेव्हा तोच दोन ठिकाणी विभक्त झाला. त्यांपैकी एकाला 'लिंग' आणि दुसऱ्याला 'अंग' असे म्हटले जाते. एकच स्थलतत्त्व 'अंग' आणि 'लिंग' असे द्विविध झाले. स्थलतत्त्वाप्रमाणेच त्याच्या ठिकाणी असलेली चिच्छक्ती दोन ठिकाणी विभागली गेली. पहिली कला आणि दुसरी भक्ती. कला 'लिंगा'च्या आश्रयाने राहते तर भक्ती 'अंगा'च्या आश्रयाने राहते. लिंग कलाशक्तियुक्त असते तर अंग भक्तिशक्तियुक्त असते.

लिंगतत्त्व पुन्हा सहा ठिकाणी विभागले जाते. आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग आणि महालिंग. अंगदेखील भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य असे सहा भागांत विभागले जाते. यालाच आपण 'षट्स्थल' असे म्हणतो. स्थल एकच असते पण ते सहा ठिकाणी विभागले जाते. लिंगस्थल हे आराध्य होते आणि अंगस्थल हे आराधक होते. 'लिंग' हे पूज्य होते तर 'अंग' हे पूजक होते.

'अंगा'ने 'लिंगा'ची उपासना का करावी? त्याने लिंगाची आराधना का करावी? कारण मुळात 'अंग' हे 'लिंग'च आहे. केवळ लीला करण्यासाठी ते अंग झाले आहे. अंगाला अंगरूपाने राहण्यात जो आनंद मिळतो त्यापेक्षा त्याला लिंग झाल्यावर परमानंद मिळतो. अंगाला लिंगरूप प्राप्त व्हावे यासाठीच अंगाने लिंगपूजा करावी, असे म्हटले आहे. 'अंग' म्हणजे 'जीवात्मा'. आपण येथे बसलेले सारचे जीवात्मे आहेत. अंग आहोत. अंग या शब्दाचा अर्थ आहे. 'अं गच्छतीति अंग:' अं याचा अर्थ परमात्मा, परब्रह्म. आपल्या उपासनेने जो परमात्मस्वरूप प्राप्त करून घेतो त्याला 'अंग' असे म्हणतात. ते 'अंग' भक्ताच्या रूपाने, माहेश्वराच्या रूपाने, प्रसादीच्या रूपाने, प्राणलिंगीच्या रूपाने, शरणाच्या रूपाने आणि ऐक्याच्या रूपाने 'लिंगा'ची पूजा करते, आराधना करते. आराधना करता करताच एके दिवशी 'अंग' हे 'लिंग' होऊन जाते. यालाच 'लिंगांगसामरस्य' म्हटले जाते.

सामरस्य याचा अर्थ कोणता? तो नीट समजून घ्यायला हवा. दोन वस्तू एकमेकीत इतक्या एकजीव होऊन जाव्यात की पुन्हा त्यांना वेगळे करता येऊ नये. पाण्यात पाणी मिसळून जावे अथवा दुधात दूध एकजीव व्हावे त्याप्रमाणे. शिवयोगसाधनेने साधक जेव्हा शिवात विलीन होतो तेव्हा त्याला शिवापासून वेगळे करता येत नाही. अंग आणि लिंग हे एकरूप होतात. हेच लिंगांगसामरस्य होय. यालाच ऐक्य आणि मुक्ती असे म्हणतात.

जीव-शिवाचे ऐक्य घडवून आणणाऱ्या साधनेला 'शिवयोग' असे नाव आहे. शिवाशी संबंध साधण्यासाठी शरीर, वाणी आणि मन अशी तीन साधने आपल्याजवळ आहेत. दीक्षेच्या वेळी आपल्या शरीरावर संस्कार करून जेव्हा श्रीगुरू आपल्या हातावर मंत्रपूर्वक इष्टलिंग देतात तेव्हा आपले शरीर शिवाशी जोडले जाते. एखाद्या मंदिरात शिवलिंगाची स्थापना झाल्यावर त्या मंदिराचा शिवाशी संबंध जोडला जातो. शिवाइतकेच पावित्र्य त्या मंदिराला देखील लाभते. त्याप्रमाणे दीक्षित साधक जेव्हा शरीरावर शिवलिंग धारण करतो तेव्हा त्याचे शरीर

अत्यंत पवित्र होते. त्याचे शरीर जणू एक मंदिरच असते. शरीरावर लिंग धारण करून आपण शरीराने शिवाशी संबंध जोडत असतो.

दीक्षासमयी गुरू आपल्याला मंत्राचा उपदेश करीत असतात. सात कोटी मंत्रांमध्ये अत्यंत श्रेष्ठ असलेल्या शिवपंचाक्षर महामंत्राचा श्रीगुरू आपल्या कानात गूढरीतीने उपदेश करतात आणि त्याचा जप करायला सांगतात. दिवसभरात आपण जेवढे श्वास घेतो तेवढा मंत्रजप करायला हवा. आपल्या श्वासातच मंत्र पेरला पाहिजे. २१,६०० वेळा आपण दिवसभरात श्वासोच्छ्वास करतो. म्हणजे एवढ्या संख्येने प्रतिदिन श्वासासोबत मंत्रजप घडला पाहिजे. आपला एक श्वास देखील वाया जाऊ नये. प्रत्येक श्वास सार्थकी लावायचा असेल तर या श्वासासोबत भगवंताचे नाव घेतले पाहिजे. श्वासासोबत मंत्रजप करणे पहिल्यांदा कठीण वाटेल, परंतु अभ्यासाने त्याची हळूहळू सवय होईल. तुलसीदास म्हणतात, 'करत करत अभ्यास जडमति होत सुजान।'

जडबुद्धीचा मनुष्यदेखील अभ्यासाने म्हणजे प्रयत्नाने ज्ञानी होऊ शकतो. सुरुवातीला श्वासाबरोबर मंत्रजप करणे अशक्यप्राय वाटते. म्हणून श्रीगुरू हाती लिंग देताना 'रोज १०८ वेळा मंत्रजप कर' असे सांगतात. त्यानंतर हळूहळू १००८, ५००८, १०००८ अशी जपसंख्या वाढवण्याचा श्रीगुरू उपदेश करतात. असे करता करतो रोज श्वाससंख्येइतका म्हणजे २१,६०० वेळा जप करण्याइतके आपण समर्थ होतो, तेव्हा जप हेच आपले जीवन होऊन जाते. श्वासोच्छ्वास करायला आपल्याला कष्ट पडत नाहीत. आपण कोणत्याही कामात मग्न असलो तरी तो सहज, अप्रतिहत चालूच असतो. तुम्ही वाचत असता तेव्हा श्वास चालू असतो. गाणे गाता तेव्हा श्वास चालू असतो आणि खात-पित असता तेव्हादेखील चालूच असतो. तुम्ही सारे काम थांबवून जेव्हा झोपता तेव्हाही तो चालूच असतो. झोपल्यावर जर श्वास बंद झाला 'राम नाम सत् है' असे म्हणायची पाळी येईल.

यासाठी निजण्यापूर्वी भगवंताचे चिंतन करावे, असे शास्त्रात म्हटले आहे. झोपेतून जागे झाल्यावर अंथरूणातून उठण्यापूर्वी भगवंताचे ध्यान करायला सांगितले आहे. यामध्ये एक रहस्य आहे. जागेपणी तुम्ही तुमच्या श्वासावर नियंत्रण ठेवू शकाल. अर्थात् श्वासासोबत जप कराल. परंतु निद्रावस्थेत श्वासावर नियंत्रण कसे ठेवाल? बाहेर पडलेला श्वास जर बाहेरच राहिला, पुन्हा आत आलाच नाही तर मोठा कठीण प्रसंग येईल. म्हणूनच आपण ईश्वराची प्रार्थना करतो की 'मला विश्रांतीची गरज आहे. तुला विश्रांती घेण्याची गरज नाही. कारण तू सदैव जागृत असतोस. म्हणून माझा श्वास निरंतर चालावा याकडे तू लक्ष दे. त्यावर नियंत्रण ठेव' अशी प्रार्थना करून आपण झोपतो. जागे झाल्यावर ईश्वराने आपले काम चोख बजावले याबद्दल प्रार्थना करून कृतज्ञता व्यक्त करतो. आठ तास आपण बेहोष होतो तरी ईश्वराने आपल्या श्वासावर नियंत्रण ठेवले आणि आपल्याला हा नवा दिवस दाखवला त्यासाठीच त्याचे स्मरण करून त्याला नमस्कार करावा, असे शास्त्रात म्हटले आहे.

श्वास जसा कधी थांबत नाही, तो अविरत चालूच असतो, त्याप्रमाणे आपला जप देखील सतत चालू राहिला पाहिजे. श्वास घेताना 'ॐ' उच्चारावा आणि उच्छ्वास सोडताना 'नम:शिवाय' म्हणावे. हा अभ्यास दृढ झाला तर तुमचा श्वासोच्छ्वास सुरू असेल आणि तुमच्याकडून मंत्रजप देखील घडत राहील. तुमचा श्वास आणि मंत्र जेव्हा समरस होईल तेव्हा मंत्रजप ही तुमची सहजावस्था होईल. त्यात कृत्रिमता उरणार नाही. या अवस्थेला 'सहजसमाधी' म्हणायला प्रत्यवाय नाही. तुम्ही, खा, प्या, कोणतेही कर्म करीत राहा, 'यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम्।' अशी तुमची अवस्था होईल. तुम्ही जे काही कर्म कराल ती ईश्वराची आराधनाच होईल. ही अवस्था प्राप्त करून घेण्यासाठी श्वासात मंत्र पेरायला हवा. एका कवीने स्वत:लाच प्रश्न विचारला आहे-

**मुद्रीका रसिता सिता समसिता स्फीतं निपीतं पय:**
**स्वर्यातेन सुधाप्यधायि कतिधा रम्भाधर: खंडित:।**
**सत्यं ब्रूहि मदीय जीव भवता भूयो भवे भ्राम्यता**
**कृष्णेत्यक्षरयोर्द्वयोर्मधुरिमोद्गार: क्वचिल्लक्षित:।।**

एक कृष्णभक्त कवी स्वत:लाच विचारतो आहे– 'तू आतापर्यंत षड्रसांचे पोटभर सेवन केलेस आणि पोट भरल्यावर तृप्त ढेकर दिला. परंतु आतापर्यंत कधी असे पोट भरून ईश्वराचे नाव घेऊन आनंदाचा ढेकर दिला आहेस का?' स्वादिष्ट भोजन आपल्याला जितके प्रिय असते तेवढे ईश्वराचे नाव आपल्याला प्रिय वाटत नाही. पंक्तीत बसून गप्पा–टप्पा करीत माणूस पोटभर जेवतो. खाद्यपदार्थांचे वर्णनदेखील करतो. श्रीखंड छान झाले आहे, पुरी छान झाली आहे, असे बोलून पुन्हा त्यावर आडवा हात मारतो. परंतु सामूहिक प्रार्थना करण्यासाठी जर बोलावले तर कितीजण येतील? आलेले लोकदेखील कधी एकदाची ही कटकट संपते याची वाट पाहतील.

याचे एकमात्र कारण असे की, आपल्या मनाला ईशनामाची गोडी कळलेलीच नाही, आपल्या जिभेला षड्रसांचे सेवन करण्याची जेवढी सवय आहे तेवढी शांतरसाचे सेवन करण्याची आपल्या मनाला सवय नाही. परंतु शेवटी आपल्याला शांतरसच जास्त प्रिय वाटणार आहे. आम्ल, कषाय, कटू, तिख्त, मधुर आदी रस अंतिम अवस्थेत बेचव होऊन जातील. अंतिम काळी मनुष्याला शांती हवी असते. शांती मिळवण्यासाठीच तर माणूस भोजन करीत असतो, पाहतो, हुंगतो, सारे काही करीत असतो. त्याला हवी असते शांती. परंतु शब्दामुळे, स्पर्शामुळे, रूपामुळे, रसामुळे आणि गंधामुळे जी शांती त्याला मिळते ती फारच कमी वेळ टिकणारी असते. जीवात्म्याला विषयांमुळे शाश्वत शांती कधी लाभत नाही. परमशांतीच्या लाभासाठी शांतस्वरूप अशा परमात्म्याचे चिंतन करावे लागते. शांतस्वरूप, सत्यस्वरूप, शिवस्वरूप अशा भगवान शिवाचे चिंतन ज्याच्या मनात सदैव चालते त्यालाच त्या परमशांतीचा अनुभव येतो.

सुषुप्ति–अवस्थेत म्हणजे गाढ निद्रेत मनुष्याला जो आनंद मिळतो तो त्या परमानंदाचा एक अंश आहे. त्या अवस्थेत मनुष्य एकटा असतो, तो सारे जग विसरतो. शब्दामध्ये जेवढा आनंद असतो त्यापेक्षाही नि:शब्दामध्ये सहस्रपट आनंद असतो. भगवान शिवाचे स्वरूप कसे आहे? तर अशब्द, अस्पर्श, अरूप, अव्यय. तेथे शब्द नाही, स्पर्श नाही, रूप नाही, रस नाही, गंध नाही. म्हणून पंचविषयांचा त्याग केल्यावरच मनुष्याला शांती प्राप्त होऊ शकते. शांतस्वरूप भगवान शिवाची पूजा करण्यासाठी आपल्या हातावर इष्टलिंग दिले आहे. ही शरीराकडून घडणारी सेवा होय. त्याचे नामस्मरण घडावे म्हणून पंचाक्षर महामंत्राचा उपदेश केला आहे. ही वाणीकडून घडणारी सेवा आहे. त्याचेच निरंतर चिंतन करण्यासाठी प्राणलिंगाचा आणि भावलिंगाचा उपदेश केलेला आहे. प्राणलिंग आणि भावलिंग काय आहे? तर आपल्या चिद्रूपाच्या चिंतनालाच 'प्राणलिंगोपासना' असे म्हणतात आणि आपल्या आनंदस्वरूपाचे चिंतन करणे यालाच भावलिंगोपासना म्हणतात. अशाप्रकारे स्थूलशरीराकडून इष्टलिंगाची, सूक्ष्मशरीराकडून प्राणलिंगाची उपासना ज्या साधकाकडून घडते तो भगवान शिवाच्या निकट जातो आणि शिवस्वरूप होतो. कापूर अग्नीच्या जवळ गेल्यावर अग्निरूपच होतो त्याप्रमाणे.

जीव हा शिवाचाच अंश आहे. जीवाकडून जेव्हा शिवचिंतन घडते तेव्हा जीवच शिव होतो. शिवस्वरूप होणे हेच प्रत्येक जीवात्म्याचे अंतिम लक्ष्य आहे. इष्टलिंगपूजेचे फळ नव्हे. ते तर पूजेचे अवांतर फळ होय. ते सहजप्राप्त आहे. त्यासाठी परिश्रम करावे लागत नाहीत. एकदा भगवंताची प्राप्ती झाली की अन्य सारीच फळे प्राप्त होतात. केवळ

सांसारिक फळांसाठी प्रयत्न केला तर ती फळे मिळतील. परंतु भगवंताचा लाभ मात्र होणार नाही.

एकदा एका राजाने आपल्या राज्यात दवंडी दिली– 'मी माझ्या प्रजेला सुखी पाहू इच्छितो. उद्या सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत मी राजधानीबाहेरच्या बागेत बसणार आहे. बागेत खाद्यपदार्थ, वस्त्रेप्रावरणे, अलंकार सारे काही ठेवलेले असेल. ज्याला जी वस्तू हवी असेल त्याने त्या वस्तूला स्पर्श करावा आणि ती घेऊन जावी.'

दवंडी ऐकून प्रजेला खूप आनंद झाला. दुसऱ्या दिवशी सूर्योदयापूर्वीच त्या बागेजवळ हजारो लाक जमा झाले. राजसेवकाने बागेचे दार उडघताच सगळे आत घुसले. आपल्याला हव्या त्या वस्तूला स्पर्श करून ती वस्तू घरी नेऊ लागले. कुणी धान्य नेले, कुणी वस्त्रे नेली तर कुणी अलंकार नेले. काहीजण धान्य-वस्त्रे-अलंकार सारचे घेऊन गेले. काही जणांचा लोभ फारच दांडगा होता. ते आपल्या गरजेपेक्षा अधिक वस्तू घरी घेऊन गेले. काही तर इतके बेरकी की घरी वस्तू ठेवून पुन्हा धावत आले. फुकटचा माल कोणीही न्या, कितीही न्या, तो कोणाला नको होता?

बागेत मध्यभागी बसलेला राजा हा सर्व प्रकार पहात होता. परंतु त्याच्याकडे पहायला कोणालाच वेळ नव्हता. ज्याने सारे काही दिले त्याची कोणालाच आठवण नव्हती. त्याला स्पर्श करायला मात्र कोणी आले नाही. सूर्यास्त व्हायला आला, तेवढ्यात एक वृद्ध स्त्री हातातली काठी टेकत टेकत बागेत आली. इकडे तिकडे न पाहता ती सरळ राजाजवळ गेली. तिने राजाला स्पर्श केला. राजा हसून म्हणाला, ''बाई मला स्पर्श करून काय उपयोग? इथे साऱ्या वस्तू ठेवलेल्या आहेत. त्यांना स्पर्श करशील तर त्या तुला घरी घेऊन जाता येतील.''

ती म्हणाली, ''महाराज, मला या वस्तूंची गरज नाही. मला तुमची गरज आहे, म्हणून मी तुम्हाला स्पर्श केला. आता तुम्ही माझ्यासोबत माझ्या घरी चला. म्हणजे तुमच्या पाठोपाठ या सगळ्या वस्तू आणि तुमचे राज्यदेखील माझ्या घरी येईल.''

लोक वस्तू नेत होते, परंतु जो साऱ्या वस्तू देऊ शकतो त्या राजाला मात्र विचारीत नव्हते. राजालाच घरी नेले तर त्याच्याबरोबर सारे काही मिळते हे त्या चाणाक्ष म्हातारीने ओळखले. तिच्याएवढी बुद्धिमत्ता दुसऱ्या लोकांकडे नव्हती.

आपण विचार करतो की, घर मिळाले खूप झाले. पैसा मिळाला, खूप झाले. मुलेबाळे मिळाली, खूप झाले. एखादा लहानमोठा अधिकार मिळाला, हे खूप झाले. परंतु जो प्राप्त झाला की सारे काही प्राप्त होते, त्याच्या प्राप्तीची आपण इच्छा करीत नाही.

अमृतत्वाच्या प्राप्तीसाठी एखादा धीर मनुष्य प्रवृत्त होतो. हजारो माणसांमध्ये एखाद्यालाच भगवंताची पूजा करण्याची इच्छा होते. अशा हजारो इच्छुकांत एखाद्यालाच भगवंताची प्राप्ती होते. बाकीचे सारे सांसारिक वस्तू मिळवण्यासाठीच भगवंताचे पूजा करीत असतात. भगवंताला मागावे, मागण्याची मनाई नाही. परंतु भगवंत समजून उमजून जेवढे आपल्याला देतो त्यापेक्षा अधिक आपण मागू शकत नाही. आपल्याला किती हवे याचे आपल्यापेक्षा अधिक ज्ञान भगवंताला असते. म्हणून श्रीकृष्णाने गीतेत म्हटले आहे– 'योगक्षेमं वहाम्यहम्' जो माझे अनन्यचिंतन करतो त्याला जे हवे ते मी देतोच. त्याशिवाय त्याच्या रक्षणाची व्यवस्था देखील करतो.

गीतेत असे देखील म्हटले आहे की, 'तुम्ही तुमचे कर्म निष्ठापूर्वक करा. त्याचे फळ मागू नका. कर्म करण्याचा अधिकार तुम्हाला आहे, परंतु त्याचे फळ देण्याचा अधिकार मात्र माझा आहे.' आपण मात्र आपला अधिकार बजावतोच. परंतु दुसऱ्याच्या अधिकारावरदेखील हक्क सांगतो. यालाच 'अनधिकार चेष्टा' असे म्हणतात.

दुसऱ्याच्या अधिकारावर हक्क गाजवण्याचा प्रयत्न केला तर दुःखच भोगावे लागते.

एका धोब्याच्या घरात एक कुत्रा आणि एक गाढव होते. धोबी श्रीमंत होता. एक चोर चोरी करण्यासाठी त्याच्या घरात घुसला. घराबाहेरच्या अंगणात कुत्रा आणि गाढव झोपले होते. चोर आलेला पाहून गाढव कुत्र्याला म्हणाले,

"तू जोराने भूंक म्हणजे चोर पळून जाईल, नाहीतर तो घरात घुसेल." कुत्रा मालकावर नाराज होता. त्याला घरात कुणी भाकरी घालत नव्हते आणि घाटावर देखील घालत नव्हते. 'धोबी का कुत्ता, न घरका, ना घाटका' अशी म्हणच आहे. घरातल्या लोकांना वाटते की, कुत्र्याने घाटावर भाकरी खाल्ली असेल आणि घाटावरच्या धोब्याला वाटत असते की, कुत्र्याने घरी भाकरी खाल्ली असेल. असा तो दोन्हीकडून उपाशी राहतो. आपण इमाने इतबारे मालकाची सेवा करतो तरीदेखील आपल्याला घरी किंवा घाटावर भाकरी खायला मिळत नाही. त्यामुळे कुत्रा मालकावर नाराज होता. मालकाच्या संपत्तीचे रक्षण कशाला करायचे? ज्याचे आपल्यावर लक्ष नाही त्याच्याकडे आपण कशाला लक्ष द्यायचे? म्हणून तो गाढवाला म्हणाला, "मी स्पष्ट सांगतो मी भुंकणार नाही. चोरी होवो की काहीही होवो, त्याच्याशी मला काहीही कर्तव्य नाही. ना मी त्याचा सेवक, ना तो माझा मालक."

गाढव म्हणाले, "अरे, तुला घरी किंवा घाटावर कधीतरी थोडी भाकरी मिळत असेल, मला तर ती देखील मिळत नाही. मी तर उकिरडे फुंकून मिळेल ते खातो आणि मालकाची सेवा करतो. जोपर्यंत आपल्याला येथे राहायचे आहे तोपर्यंत, जरी मालक आपल्या कर्तव्यात चुकला तरी, आपण आपले कर्तव्य पार पाडायला हवे."

गाढवाच्या उपदेशाचा कुत्र्यावर काहीही परिणाम झाला नाही. चोर घरात घुसू लागलेला पाहताना गाढवाला राहवले नाही. ते मोठमोठ्याने रेकू लागले, ओरडू लागले. परंतु कुत्रा भुंकला तर चोर आला, असे लोक समजतात. गाढव ओरडले तर मात्र तसे समजत नाहीत. मालक उठला आणि चोर पळाला. ज्यासाठी गाढव ओरडले ते काम झाले, परंतु मालक मात्र खूप चिडला. गाढवाने झोप मोडली असे त्याला वाटले. त्याने एक काठी घेऊन गाढवाला बदड बदड बदडले. गाढवाचा एक पाय मोडला.

हा प्रकार पाहून कुत्रा हसत होता. मालक घरात गेल्यावर कुत्रा गाढवाला म्हणाला, "तुला आज इतका मार का खावा लागला माहीत आहे? तू आपला अधिकार सोडून माझ्या अधिकारावर अतिक्रमण केले. चोर आल्यावर भुंकणे हा माझा अधिकार आहे, तुझा नव्हे. तू आज अनधिकार चेष्टा केलीस आणि त्यामुळे आपला पाय मोडून घेतलास."

त्याप्रमाणे भगवंताने मनुष्याला सांगितले आहे की, कर्म करणे हा तुझा अधिकार आहे, त्याचे फळ मागणे हा नव्हे. परंतु आपण मात्र आपल्या अधिकार-मर्यादेचे उल्लंघन करतो. काही लोक ईश्वराची पूजा केल्यावर त्याचे फळ मागतात तर काही बहाद्दर पूजा करण्याआधीच त्याचे फळ मागतात. फळ मागणे देखील वाईट नाही. परंतु कोणते फळ मागावे? जे एकदा मागितल्यावर पुन्हा मागावे लागत नाही आणि ज्यामुळे परमशांती प्राप्ती मिळते असे फळ मागावे. आपल्या पूजेचे फळ कोणते? तर परमात्म्याची प्राप्ती हेच फळ होय. लिंगपूजा करता करता लिंगरूप होणे हेच लिंगपूजेचे फळ होय. यालाच लिंगांगसामरस्य, कैवल्य, मुक्ती म्हणतात. एखादा वीरशैव मृत्यू पावला तर त्याच्याविषयी 'शिवैक्य झाला, लिंगैक्य झाला' असे शब्दप्रयाग आपण करतो. ज्याने आयुष्यभर लिंगपूजा केली, शिवचिंतन केले त्याच्या मृत्यूनंतर त्याला लिंगैक्य किंवा शिवैक्य असेच संबोधले पाहिजे. जीवाने शिव होणे, अंगाने लिंग होणे हे शिवयोग्याचे उद्दिष्ट आहे.

याप्रकारे सृष्टिनिर्मितीपूर्वी जे स्थलतत्त्व होते ते लिंग आणि अंग असे द्विविध झाले. आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग आणि महालिंग असे सहा भागांत 'लिंग' विभक्त झाले. भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य असे सहा भागांत 'अंग' विभागले गेले. भक्तस्थलातील साधकच हळूहळू उपासना करता करता माहेश्वर होतो, प्रसादी होतो, प्राणलिंगी होतो, शरण होतो आणि तो अखेर शिवाशी समरस होऊन ऐक्य होतो. भक्तस्थलापासून ते ऐक्यस्थलापर्यंत 'अंगा'चा प्रवास होऊन ते 'लिंग' होते. भक्तस्थलापासून ते ऐक्यस्थलापर्यंत एकूण ४४ अवांतर स्थले आहेत. ती पार करून अंग (जीव) लिंग (शिव) झाले. 'अंग' हे 'लिगं' झाल्यावर त्याची स्थिती कशी असते? जीवात्मा परमात्म्याशी समरस झाल्यावर त्याची कोणती गती होते? खरे तर त्याची त्यापुढे काय गती होणार? परंतु शिवाशी समरस झाल्यानंतरही तो शरीराने जिवंत असेल तर त्याचे जीवन कसे असते हे समजून घ्यायला हवे. अर्थात् जीवन्मुक्त झाल्यावर त्याचे चालणे-बोलणे कसे असते? तो कसे जीवन व्यतीत करतो? जीवनमुक्ताचे जीवन कसे असते? हे आपल्याला समजून घ्यायचे आहे. यानंतर जी ५७ स्थले आहेत त्यामध्ये जीवन्मुक्ताच्या जीवनाचे विवेचन आहे. या स्थलांना 'लिंग-षट्स्थल' असे म्हणतात. या आधीची षट्स्थले 'अंग-षट्स्थले' असून ती जीवाची षट्स्थले होत तर यानंतरची षट्स्थले जीवन्मुक्ताची षट्स्थले होत. उद्यापासून त्याचे सविस्तर विवेचन आम्ही करणार आहोत, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ॐ शांतिः शांतिः शांतिः॥

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

१ ऑगस्ट १९९२

---

## आशीर्वचन दुसरे

# दीक्षागुरुस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल आपण ऐकले आहे की, 'अंग' नामक जीव गुरूपदेशाने आणि स्वतःच्या साधनाबळावर 'लिंग' होतो, यालाच लिंगागंसामरस्य म्हणतात. जीवात्मा ऐक्यस्थलात पोहोचला तर त्यापुढे काही शिल्लक उरत नाही. म्हणून हे शास्त्र संपले असे अगस्त्य महर्षींना वाटले. मुक्ती मिळवण्यासाठीच तर सारी धडपड असते, मग त्यापुढे आणखी काय होते? असे वाटून अगस्त्य गप्प बसले. परंतु ज. रेणुकाचार्यांना अधिक काही सांगायचे होते. विषयप्रतिपादन तेव्हाच होते जेव्हा श्रोता काही प्रश्न विचारतो किंवा वक्ताच प्रश्न उपस्थित करून त्याचे समाधान करतो. शिष्याच्या मनात शंका उपस्थित झाली तर तो श्रीगुरूला प्रश्न विचारतो. संदेह उत्पन्न होणे हीच ज्ञानाची पहिली पायरी होय.

आपण जेव्हा विचार करतो तेव्हाच आपल्या मनात प्रश्न उपस्थित होतो. ज्याला थोडे कळते आणि थोडे कळत नाही अशाच माणसाला प्रश्न पडतो. ज्याला अजिबात काहीच कळत नाही आणि ज्याला सारे काही कळते अशांना कधी प्रश्न पडत नसतो. म्हणून ज्ञानी आणि अज्ञानी वरवर पाहता सारखेच दिसतात. दोघेही

अबोल असतात, गप्प बसतात. अज्ञानी माणसाला वाटते की, आपण बोललो तर आपले काही चुकेल, म्हणून तो गप्प बसतो. ज्ञानी माणसाला वाटते की, आपल्याला सारे काही कळलेले आहे, आता काय बोलायचे? म्हणून तो गप्प बसतो. जो पूर्ण अज्ञानी नसतो आणि पूर्ण ज्ञानीही नसतो अशा माणसालाच प्रश्न पडत असतो. निराकारण होईपर्यंत प्रश्न जणू त्याचा पाठलाग करीत असतात. परंतु प्रश्न पडल्यावरच ज्ञानाची दारे खुली होतात. सफरचंद खालीच का पडते? आकाशात एवढी मोकळी जागा असताना वर का पडत नाही? असा प्रश्न न्यूटनला पडला आणि त्यामुळे ज्ञानाचे नवे दार उघडले.

भक्तस्थलापासून ऐक्यस्थलापर्यंत ज. रेणुकाचार्यांचा उपदेश ऐकून अगस्त्य महर्षींचे समाधान झाले. त्यांच्या संदेहाचे निराकरण झाले. अगस्त्याकडून प्रश्न विचारला जात नाही हे पाहून ज. रेणुकाचार्यांनी विचार केला की, आपण यांना अर्धेच शास्त्र सांगितले, अजून अर्धे शास्त्र सांगायचे राहिले आहे. म्हणून आपणच यांना प्रश्न विचारण्यासाठी उद्युक्त करायला हवे. म्हणून ते म्हणतात–

**षट्स्थलोक्तसदाचारसंपन्नस्य यथाक्रमम्।**
**लिंगस्थलानि कथ्यन्ते जीवन्मुक्तिपराणि च।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.१)

हे अगस्त्य, आतापर्यंत जीवन्मुक्त होईपर्यंत साधकाच्या कोणकोणत्या अवस्था असतात याविषयी तू ऐकले आहेस. आता जीवन्मुक्तीनंतर कोणत्या अवस्था असतात त्याचे विवेचन आता आम्ही करणार आहोत. आतापर्यंत सांगितलेल्या स्थलांना 'अंगस्थले' म्हणतात. या पुढील स्थलांना 'लिंगस्थले' असे म्हणतात. लिंगरूप झालेल्या पुरुषाची गुरूविषयी, लिंगाविषयी आणि जंगमाविषयी कोणती भावना असते त्याबद्दल येथे सांगणार आहोत. त्यावेळी अगस्त्य प्रश्न विचारतात–

**भक्ताद्यैक्यावसानानि षडुक्तानि स्थलानि च।**
**लिंगस्थलानि कानीह कथ्यन्ते कति वा पुनः।।१५.२।।**

आतापर्यंत भक्तस्थ्लापासून ऐक्यस्थलापर्यंत साधकाच्या अवस्था आपण वर्णन केल्या. अंग लिंगाशी ऐक्य झाले. यानंतरची लिंग–षट्स्थले कोणकोणती आहेत ते ऐकण्याची जिज्ञासा माझ्या मनात उत्पन्न झाली आहे. त्याविषयी मला सांगावे.

मग ज. रेणुकाचार्यांनी दीक्षागुरुस्थलापासून ज्ञानशून्यस्थलापर्यंत ५७ स्थलांचा अगस्त्य महर्षींना उपदेश केला. त्यातील पहिले स्थल आहे दीक्षागुरुस्थल. तुम्ही ऐकले आहे की, ज्याच्यावर गुरूची कृपा होते त्याला शिवाची प्राप्ती होते. ज्याच्यावर गुरू कृपा करत नाही त्याला शिवाचा लाभ होत नाही. म्हणून गुरूजवळ जाण्याशिवाय गत्यंतर नाही. शिष्य जेव्हा गुरूजवळ जातो तेव्हा गुरू त्याला दीक्षा देतात. म्हणून गुरूला 'दीक्षागुरू' असे म्हटले जाते.

**दीयते परमं ज्ञानं क्षीयते पाशबंधनम्।**
**यया दीक्षेति सा तस्यां गुरुर्दीक्षागुरुः स्मृतः।।१५.७।।**

गुरू शब्दाचा अर्थ कोणता? 'गु' म्हणजे अंधःकार. 'रू' म्हणजे त्याचे निवारण करणारे ज्ञान. जीवात्म्याच्या हृदयात जो अज्ञानरूपी अंधःकार आहे त्याचे आपल्या उपदेशाने निवारण करण्याचे सामर्थ्य ज्याच्या जवळ असते तो 'गुरू' होय. जो ज्ञानी असतो तोच गुरू असतो. ज्ञानोपदेश करण्याआधी गुरू शिष्यावर काही संस्कार करतो.

या संस्कारांनाच आपल्या सिद्धान्तात 'दीक्षा' अशी संज्ञा आहे.

गाई, बैल इ. पशूंना आपण दोरीने बांधून ठेवतो. त्यांना हळूहळू त्याची इतकी सवय होते की रानातून चरून आल्यानंतर देखील ते बांधण्याच्या ठिकाणी निमूटपणे येऊन उभे राहतात. त्याप्रमाणे प्रत्येक जीवात्मा हा पशू असून तो पाशांनी बांधलेला आहे. आपल्या सिद्धान्ताला क्वचित् 'पाशुपत सिद्धान्त' असेही म्हटले जाते. त्यानुसार भगवान शिव पशुपती असून प्रत्येक जीव हा पशू होय. आपण पशू आहोत हे ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटेल. आपल्याला तर दोन पाय आहेत. मग आपण पशू कसे? परंतु शास्त्रात म्हटले आहे की, पशू चार पायांचे असतात आणि दोन पायांचेही असतात. मनुष्य हा शेपूट आणि शिंग नसलेला पशूच होय. आपण दिसतो मनुष्यासारखे, पण खरे तर पशूच आहोत. उपनिषदात एक कथा सांगितलेली आहे.

जेव्हा सृष्टी निर्माण झाली तेव्हा ईश्वराने सर्व प्राण्यांना मृत्युलोकात पाठवले. भूलोकात येण्यापूर्वी उच्चस्थानावर बसलेल्या ईश्वराचे दर्शन घेण्यासाठी सर्व प्राणी गेले. त्यावेळी सर्व प्राण्यांना ईश्वराने एकाच प्रकारचा उपदेश केला. तुम्हाला भूक लागेल तेव्हा खा. तहान लागेल तेव्हा पाणी प्या आणि झोप येईल तेव्हा झोपा. याशिवाय काही काम करायचे नाही. ते ऐकून सर्व प्राणी खूष झाले. सर्वात शेवटी मनुष्य उभा होता. त्याला वाटले की आपल्यालाही असाच उपदेश मिळेल. मनुष्य समोर आल्यावर ईश्वर म्हणाला, 'तुला यांच्यापेक्षा अधिक काही सांगायचे आहे. तू थोडा थांब. आतापर्यंत इतर प्राण्यांना मी जे सांगितले तेवढेच तुला करायचे नाही, तर त्यापेक्षा अधिक करायचे आहे.

**आहारनिद्राभयमैथुनं च सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम्।**

भोजन करणे, मुलांना जन्म देणे, भयभीत होणे आणि झोपणे हे जसे सर्व पशूंत आहे तसेच मनुष्यात देखील आहे. परंतु तुला फक्त तेवढेच करायचे नाही. इतर पशूपेक्षा तुझ्यात एक गोष्ट जास्त आहे. ती म्हणजे ज्ञान. पृथ्वीवर गेल्यानंतर तुला ज्ञानी व्हायचे आहे. तेथे ज्या धर्म-संप्रदायात तुझा जन्म होईल त्या संप्रदायातील गुरूजवळ जाऊन दीक्षा घ्यायला हवी, तो सांगेल तसे वागायला हवे.' असा ईश्वराने मनुष्याला उपदेश केला. तेव्हा मनुष्याने ईश्वराशी भांडण केले. तो म्हणाला, ''तुझा माझ्यावर एवढा राग का? माझ्याआधी जेवढे प्राणी गेले त्यांना तू कोणताही उपदेश केला नाहीस. मग मलाच एवढा उपदेश कशाला?''

ईश्वर म्हणाला, ''ते सारे पशू होते, परंतु तू मनुष्य आहेस.''

मनुष्य म्हणाला, ''मग मलाही पशू का बनवले नाहीस? मनुष्य होण्यासाठी मी काय तुला विनंती केली होती? जसे इतर पशू निर्माण केले तसेच मलाही निर्माण केले असते तर काहीच फरक पडला नसता.''

असे ईश्वराशी भांडून मनुष्य पृथ्वीवर आला. म्हणून त्याचे शरीर जरी मनुष्याचे असले तरी त्याची बुद्धी मात्र पशूसारखीच आहे. एका शास्त्रकाराने म्हटले आहे, 'मनुष्यरूपेन मृगाश्चरंति।'

तो मनुष्यासारखा दिसतो, परंतु त्याचा स्वभाव मात्र मनुष्यासारखा नाही. ईश्वराने विचार केला की, आपण मनुष्याला कितीही उपपेश केला तरी त्याच्यात सुधारणा झाली नाही. परंतु त्याला सुधारायला तर हवेच. त्यासाठी ईश्वराला गुरूच्या रूपात अवतार घेणे भाग पडले.

ईश्वराचा उपदेश मनुष्याने ऐकला असता तर ईश्वराला भूतलावर गुरुरूपात येण्याची आवश्यकताच नव्हती. त्याचा उपदेश ऐकला नाही म्हणून मनुष्यासाठी त्यालाही देह धारण करावा लागला. जिथे जिथे शिष्य असेल तिथे तिथे गुरूला धावून जावे लागते, उपदेश करावा लागतो.

गुरू सर्वप्रथम काय करतो? तर शिष्यावर संस्कार करतो. त्याच्या शरीरावर, वाणीवर, मनावर तो संस्कार करतो. संस्कारालाच 'दीक्षा' असे म्हणतात. जेव्हा जीवात्मा गुरूकडून दीक्षित होतो तेव्हा त्याचे तिन्ही पाश गळून पडतात, नष्ट होतात. जोपर्यंत पाश नष्ट होत नाहीत तोपर्यंत मनुष्य पशूसारखेच वर्तन करीत असतो. भाजीमंडईत गेलेला पशू भाजी खातो आणि त्यासोबत मार देखील खातो. तेच त्याचे जीवन असते. असंख्य वेळा मार खाऊन देखील भाजीत तोंड घालायचे तो सोडत नाही. मनुष्य जेव्हा असे वागतो तेव्हा त्याला देखील पशू संबोधले जाते. आपण व्यवहारात पाहतो की, माणूस अनेक वेळा चुका करतो, दुर्व्यव्हार करतो. त्याबद्दल त्याला शिक्षा देखील भोगावी लागते. परंतु असे असूनही तो सुधारत मात्र नाही. पुन्हा तसेच वागू लागतो. पुन्हा मार खातो मग त्याच्या आणि पशूच्या जीवनात अंतर कुठे राहिले? एक चार पायांचा पशू तर दुसरा दोन पायांचा पशू. जीवात्म्याला बांधून टाकलेल्या पाशांचे छेदन करण्यासाठी गुरुदीक्षेची नितांत आवश्यकता असते.

गुरूकडून आपल्याला संस्कार लाभतो, त्या संस्काराने आपले सारे पाश नष्ट होऊन परमज्ञानाची प्राप्ती होते. अशा गुरूला 'दीक्षागुरू' असे म्हणतात. गुरुकृपा झाल्याशिवाय शिवकृपेचा लाभ होत नाही. म्हणून महाराष्ट्रात गुरूला 'माउली' असे म्हणतात. संसारात माता-पिता दोघेही असतात परंतु त्यांच्यात श्रेष्ठ कोण? वेदांनी स्पष्ट केले आहे-

'मातृदेवो भव' आणि त्यानंतर 'पितृदेवो भव'.

पहिला मान मातेला दिलेला आहे. हे महत्त्व का बरे दिले असावे? अपत्याची देखभाल करण्याचे कर्तव्य माताच अधिक पार पाडत असते, पिता नव्हे. चिखलात बरबटून जर मूल घरात आले आणि पित्याकडे गेले तर पिता त्याला जवळ घेत नाही. त्याला आईकडे पाठवतो. परंतु ते आईजवळ गेले तर आई मात्र त्याला पित्याकडे पाठवत नाही. जर तिने तसे केले तर तिला 'माता' न म्हणता 'पिता' म्हणावे लागेल. आपल्या अंगावरच्या किंमती वस्त्राची पर्वा न करता आई चिखलाने बरबटलेल्या मुलाला जवळ घेते, त्याला न्हाऊ घालते, स्वच्छ करते, कपडे घालते. मग ते मूल जेव्हा वडिलांकडे जाते तेव्हा ते त्याला जवळ घेतात. ईश्वर हा पित्यासारखा पण गुरू हा मातेसारखा. गुरुकृपेशिवाय जर आपण शिवाकडे गेलो तर तो आपल्याला जवळ घेणार नाही, गुरूकडे पाठवील.

आणवमल, मायीयमल आणि कार्मिकमल अशा तीन पाशांनी जीवात्मा बद्ध असतो. आपल्या व्यापक स्वरूपाला विसरून जीवात्मा स्वत:ला अणू म्हणजे लहान मानू लागतो. यालाच 'आणवमल' असे म्हणतात. वस्तुत: जीव हा शिवच आहे. परंतु त्याने स्वत: शिव न मानता जीव मानणे हाच 'आणवमल' होय. जीवात्म्याच्या मनात स्वार्थभावना असते. मला सुख मिळावे, माझ्या परिवारातल्या लोकांना सुख मिळावे अशी संकुचित भावना त्याच्या मनात उत्पन्न होते, त्याचे कारण आणवमल हेच होय. जेव्हा श्रीगुरू शिष्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवून 'तू शिव आहेस' असा उपदेश करतात तेव्हा त्याची जीवभावना नष्ट होते. त्याच्या मनात शिवभावनेचा उदय होतो आणि तो सर्वांचे 'शिव' चिंतू लागतो, कल्याण चिंतू लागतो. तो कुणाचे अहित चिंतूच शकत नाही. या दीक्षेला 'वेधदीक्षा' म्हटले जाते. या दीक्षेमुळे शिष्याच्या मनात असलेला आणवमल नष्ट होतो. वेधदीक्षासंपन्न जीवात्मा आपल्याला स्वत:च्या देहाच्याच ठिकाणी न पाहता सर्वत्र पाहतो. 'आत्मवत् सर्व भूतेषु य: पश्यति स पंडित:' सर्व प्राणिमात्रांना जो आपल्यासारखे पाहतो तोच पंडित होय. आपल्या प्रमाणेच तो सर्व विश्वाकडे पाहू लागतो. आपण सुखी आहोत तसे सारे विश्व सुखी व्हावे असे त्याला वाटू

लागते. यालाच शिव-भावना म्हणतात आणि ही वेधदीक्षेद्वारे मनुष्याला प्राप्त होते.

दुसरा जो मल आपल्या ठिकाणी आहे त्याला 'मायीयमल' असे म्हणतात. शिवाश्रित माया, उपाश्रित माया आणि अपाश्रित माया अशा तीन प्रकारच्या मायेबद्दल तुम्ही ऐकले असेल. मायामलामुळेच जीवात्मा मायाप्रपंचात गुंतून पडतो. श्रीकृष्णाने गीतेत म्हटले आहे की, जो मायाजालात फसतो त्याचा उद्धार होणे कठीण आहे. जोपर्यंत त्याच्यावर भगवंताची कृपा होत नाही तोपर्यंत तो मायाजालातून मुक्त होऊ शकत नाही. मायेपासून मुक्त होण्यासाठी शिवालाच शरण जायला पाहिजे. जो शिवाच्या जवळ राहतो तो मायाजालात फसत नाही. जे जीव भगवान शिवापासून दूर पळतात तेच मायाजालात फसतात आणि जे जीव शिवाच्या जवळ राहतात ते मायाजालापासून मुक्त असतात. संसारात जे दुःखी जीव असतात ते शिवापासून दूर असतात, मायाजालात फसलेले असतात. माया ज्याची आश्रित आहे अशा भगवंताचा आपण जेव्हा आश्रय घेऊ तेव्हाच तिच्यापासून मुक्त होऊ.

आपण भगवंताचे दर्शन घ्यायला जेव्हा जातो तेव्हा प्रथम मायाच दृष्टीला पडते. कारण ती दारातच उभी असते. तिला ओलांडून आत गेल्यावरच भगवंताचे दर्शन होते. तुम्ही जेव्हा काशी अथवा रामेश्वरला तीर्थयात्रेला जाता तेव्हा मंदिरात जाण्याआधी तुम्हाला मायाबाजाराचे दर्शन घडते. तऱ्हेतऱ्हेच्या वस्तूंनी तुडुंब भरून दुकाने वहात असतात. तुम्हाला त्यांचाच मोह पडतो. खरेदी करता करता मंदिराचे दार देखील बंद होऊन जाते. मग काय करायचे? दुसऱ्या दिवशी तर थांबायचे नाही. शेवटी दाराचे दर्शन घेऊन तुम्हाला परतावे लागते. विश्वेश्वराचे दर्शन घेण्यासाठी लोक काशीला जातात खरे, परंतु त्यातले बरेचजण दाराचेच दर्शन घेऊन फिरतात. याचे कारण एकच. ते म्हणजे मायाजालात फसलेले असतात. जो माणूस इकडे तिकडे मुळीच न पाहता सरळ मंदिरात शिरतो त्यालाच देवदर्शन घडू शकते. जो मायेत गुंततो त्याची खूप फजिती होते.

एके दिवशी सुदामा कृष्णाकडे गेला आणि म्हणाला, ''कृष्णा, तुझे दर्शन तर मी अनेक वेळा घेतले. परंतु तुझी माया अत्यंत प्रबल आहे, असे मी ऐकले आहे. तिचे दर्शन घडणे शक्य नाही.''

''पण माझी इच्छा आहे, त्यामुळे तुझी माया मला दाखव.''

श्रीकृष्णाने विचार केला की, याची इच्छा आहे तर दाखवू याला थोडीशी माया. याला दुःख भोगावे वाटते तर थोडे भोगू दे. श्रीकृष्ण सुदाम्याला घेऊन अरण्यात गेले. तेथे त्यांनी सुदाम्याला नदीत स्नान करायला सांगितले. सुदाम्याने नदीत डुबकी मारताच त्याच्यावर श्रीकृष्णाने आपले मायाजाल फेकले आणि दुःखभोगाला सुरुवात झाली. तो एका स्वप्नविश्वाचा अनुभव घेऊ लागला.

तो नदीतून वाहात वाहात दूर गेला. किनाऱ्यावर काही लोक नदीत जाळे फेकून वहात येणाऱ्या माणसाचीच जणू वाट पाहात होते. सुदामा त्या जाळ्यात फसला. लोकांनी त्याला किनाऱ्यावर ओढले आणि ते त्याला आपल्या राजधानीत घेऊन गेले. तिथे गेल्यावर प्रधानाने त्याला सांगितले, ''महाराज, आमच्या राजाचे निधन झालेले असून त्याला मुलगा नाही, फक्त मुलगी आहे. राजा होण्यासाठी इथे भांडण लागले आहे. म्हणून सर्वांनी एकमताने ठरवले की आज नदीतून जो कोणी पोहत किंवा वहात येईल त्याला राजा करायचे. त्याप्रमाणे तुम्ही आमच्या हाती लागला आहात. आता आम्ही तुम्हाला राज्याभिषेक करून राजकन्येशी तुमचा विवाह करणार आहोत. तुम्ही हे राज्यपद सांभाळले पाहिजे.''

त्यानंतर सुदाम्याचा राज्याभिषेक झाला. त्याचे राजकन्येशी लग्न लावण्यात आले. यथावकाश त्याला संततीही झाली. एकेदिवशी त्याची पत्नी मरण पावली. त्या राज्याच्या प्रथेप्रमाणे ज्याची बायको मरेल त्याला

तिच्यासोबत सहगमन करावे लागणार होते. ती वेळ सुदाम्यावर आली. प्रधानाने त्याला विनंती केली की, "महाराज, पतीसोबत पत्नीने सती जाण्याच्या कथा तुम्ही ऐकल्या असतील, परंतु आमच्या राज्यात पत्नी मेली की तिच्यासोबत पतीनेही मरावे असा रिवाज आहे. आम्हाला फार दुःख होते, परंतु त्याला इलाज नाही. पत्नीच्या चितेवर आपल्याला सहगमन करावेच लागेल."

तेव्हा सुदाम्याने विचार केला. या राज्यात येण्याची दुर्बुद्धी आपल्याला झाली कशी? सिंहासनावर बसताना त्याने विचार केला नाही. मुलांची पिलावळ जन्माला घातली तेव्हाही त्याने विचार केला नाही. परंतु मृत्यू समोर येऊन उभा राहिल्यावर मात्र तो विचार करू लागला. विचार करून तरी काय उपयोग? त्या राज्याचा रिवाजच तसा होता.

पत्नीच्या प्रेतासोबत सुदाम्यालाही जबरदस्तीने स्मशानात नेले. पळून जाऊ नये म्हणून त्याचे हातपाय घट्ट बांधले आणि तिच्या प्रेतासोबत त्यालाही चितेवर ठेवण्यात आले. चिता पेटवली. अग्निज्वाळा भडकल्या. सुदाम्याचे शरीर पोळू लागले आणि घाबरून ता मोठमोठ्याने ओरडू लागला, रडू लागला.

ज्या ठिकाणी सुदामा नदीत डुंबला होता तेथून तो पाण्यातून बाहेर आला. जागा झाला. किनाऱ्यावर उभे राहून श्रीकृष्ण हसत होते आणि हा पाण्यात उभा राहून थरथर कापत होता, रडत होता.

त्याची अवस्था पाहून श्रीकृष्ण म्हणाले, "तू का रडत आहेस? आत्ता कुठे तू एक डुबकी मारलीस."

"माझी फार मोठी कथा झाली." तो म्हणाला आणि काय घडले ते त्याने कृष्णाला ऐकवले. "मला माया दाखवायला तू इथे आणलेस आणि हे भलतेच काय घडले?"

"अरे ते भलतेच काही नसून माझी माया होती. पाहिलीस का माझी माया?" श्रीकृष्णाने हसून विचारले.

"होय रे बाबा, पाहिली. क्षणभरात एवढे घडले, आता पुन्हा पाहायला नको." सुदामा म्हणाला.

माया दिसत नाही. परंतु खूप काही करून दाखवत असते. शोधायला गेलो तर सापडणार नाही, परंतु तिच्या जाळ्यात प्रत्येक जण फसलेला असतो. 'माया' म्हणजे तरी काय? तात्त्विक दृष्टीने अहंकार आणि ममत्व म्हणजे माया होय. ज्या ठिकाणी अहंकार आणि ममत्व असते त्या ठिकाणीच दुःख असते. ज्याला तुम्ही आपले मानता अशा व्यक्तीचे काही वाईट झाले तर तुम्हाला दुःख होते. 'मी' आणि 'माझे' ही भावना ज्याच्या जवळ असते त्याला दुःखी व्हावेच लागते. अहंकार आणि ममत्व ही दुःखाची दोन कारणे होत. या दोन्हीमुळे माणूस दुःख भोगतो. हाच मायामल होय. त्यापासून मुक्त होण्यासाठी आपल्याला मंत्रदीक्षा घ्यावी लागते. आपल्या कानात गुरू अत्यंत गूढतेने मंत्रोपदेश करतात. मंत्रजप करणारा मनुष्य मायामलापासून मुक्त होतो. मंत्रजप केल्याने आपले रक्षण होते, मंत्र हे रक्षाकवच आहे. म्हणून अष्टावरणांत जी आठ आवरणे म्हणजे रक्षाकवचे आहेत, त्यात मंत्राचा देखील समावेश केलेला आहे. मोठमोठी शस्त्रे देखील मंत्रावर वार करू शकत नाहीत असे मंत्राचे सामर्थ्य आहे. म्हणून मंत्रावर नितांत श्रद्धा ठेवायला हवी. ज्याची मंत्रावर अचल श्रद्धा असते अशा साधकाचेच मंत्र पूर्ण रक्षण करतो. यासाठीच श्रीगुरू आपल्याला मंत्रदीक्षा देऊन प्राणलिंगाची उपासना करायला सांगतात. वेधदीक्षा देऊन ते शिष्याला भावलिंगाचा बोध करून देतात तर मंत्रदीक्षेद्वारा चिद्रूप अशा प्राणलिंगाचा बोध करून देतात.

मायामल नष्ट झाल्यानंतर आणखी एक मल आपल्या ठिकाणी असते, कार्मिकमल. आपल्याकडून घडणारे पुण्यकर्म आणि पापकर्म हाच कार्मिकमल होय. जीवात्मा आपल्या कर्मामुळेच जन्मजन्मांतरांतून भ्रमत असतो.

**जातस्य हि ध्रवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।**
**जंतुर्मरणजन्मभ्यां परिभ्रमति चक्रवत्।।५.६३।।**

'श्रीसिद्धान्तशिखामणी'त ज. रेणुकाचार्य सांगतात की, मनुष्य जन्म घेतो, काही काळ जगता आणि नंतर त्याचा मृत्यू होतो. परंतु मृत्यूनंतर त्याचे जीवन संपत नाही. मृत्यूनंतर जर जीवन खरोखर संपले असते तर आपल्या उद्धारासाठी जप-तप-ध्यान-धारणा करायची आवश्यकताच भासली नसती. मरण हीच मुक्ती ठरली असती तर पुरुषार्थासाठी जीवात्म्याला साधना करायची धडपड करावी लागली नसती. परंतु मरण म्हणजे मुक्ती नव्हे. मृत्यूनंतर जीवात्म्याला पुन्हा जन्म घ्यावा लागतो. घरात मुलगी जन्माला आली तर मृत्यू पावलेल्या आईचे अथवा आजीचे नाव तिला ठेवतात. मुलागा जन्माला आला तर घरातल्या एखाद्या मृतपुरुषाचे नाव त्याला ठेवतात आणि मेलेल्या माणसानेच पुन्हा आपल्या घरात जन्म घेतला असे म्हटले जाते. ज्याची वासना जेथे असते त्याला तेथे पुन्हा यावेच लागते. शुभ अथवा अशुभ कर्म आपल्या हातून घडल्यावर त्याचे दोन भाग होतात. अशुभ कर्मे केल्यावर त्याचे अशुभ फळ 'पाप' तयार होते आणि दुसरी 'अशुभवासना' तयार होते. शुभ कर्म केल्यावर त्यापासून 'पुण्य' आणि 'शुभवासना' निर्माण होते. कर्माची शुभाशुभ फळे सुख:दुखे जीवात्म्याला भोगावी लागतातच. ते भोगता भोगता जीवात्मा पुन्हा शुभ आणि अशुभ कर्मे करतो.

शुभवासनेमुळे जीवात्मा शुभकर्मे करायला प्रवृत्त होतो तर अशुभवासनेमुळे तो अशुभ कर्मे करायला प्रवृत्त होतो. जीवात्म्याला कर्माची फळे टाळता येणे शक्य नाही. परंतु वासना नष्ट करणे मात्र शक्य आहे. वाल्मीकी पूर्वायुष्यात पापाचरणी होते. सत्संगामुळे त्यांची अशुभवासना नष्ट झाली आणि महर्षी म्हणून ते विश्ववंद्य ठरले. चोरी करणारा मनुष्य चोरी सोडून जप करू लागतो याचे कारण कोणते? आपल्या दुष्कर्माची जाणीव झाल्याने त्याची वासना बदलते. अशुभवासना नष्ट होऊन शुभवासना निर्माण झाली तर एखादा हिंसक मनुष्य देखील अहिंसक होतो. हिंसा सोडून तो जप करू लागतो. सत्संगामुळे मनुष्याची वासना अशा प्रकारे बदलू शकते. एखादा सच्छील मनुष्य दु:संगामुळे वाईट वर्तन करू लागतो याचे कारण, त्याची वासना बदललेली असते, हे होय. कार्मिकमल म्हणजेच पुण्य-पाप होय. पुण्य-पापामुळेच आपल्याला हे शरीर मिळालेले आहे. आपल्या कर्माप्रमाणे आपल्याला शरीर लाभत असते.

दुकानात अनेक प्रकारची वस्त्रे असतात. रेशमी, सुती, उली. स्वस्त आणि महागडी. तुमच्याजवळ भरपूर पैसे असतील तर तुम्ही महागडा पोषाख खरेदी करू शकता. परंतु खिशात पाचदहाच रुपये असतील आणि तुम्ही दुकानदाराला किंमती पोषाख मागितला तर तो तुम्हाला हाकलून देईल. म्हणून त्या पैशात विकत घेता येईल असा पोषाखच तुम्हाला घ्यावा लागेल. आपली असंख्य प्रकारची शरीरे म्हणजे तऱ्हेतऱ्हेचे पोषाखच होत. श्रीकृष्णाने गीतेत मनुष्यदेहाला वस्त्र असेच संबोधले आहे- वासांसि जीर्णानि यथाविहाय...

आपल्या शरीराचे कारण आपले कर्मच आहे. जसे आपले कर्म तसे आपले शरीर. आपल्या कर्मांने मिळालेला देह म्हणणे कर्मपिंड होय. या कर्मपिंडालाच 'मासंपिंड' असेही म्हणतात. मांसपिंडावर श्रीगुरू जेव्हा संस्कार करतात तेव्हा मांसपिंड हाच मंत्रपिंड होतो. कर्मपिंडाचे अर्थात् मांसपिंडाचे मंत्रपिंडात परिवर्तन होते. मंत्रसंस्काराने जेव्हा आपले शरीर 'मंत्रपिंड' होते तेव्हा जीवात्म्याला मंत्रजप करण्याचा अधिकार प्राप्त होतो. याप्रकारे गुरूला अर्पण केलेले, भगवंताला अर्पण केलेले प्रसाद-शरीर 'प्रसादशरीर' होते. त्याला 'प्रसादकाय' असे म्हणतात. ईश्वराला अर्पण केलेले पदार्थ जसे प्रसादरूप होतात त्याप्रमाणे ईश्वराला अर्पण केलेले शरीर

प्रसादकाय होते.

मराठीत अशी एक म्हण आहे, 'तुझ्याकडे हात माझ्याकडे भात'. नैवेद्य दाखवताना आपण देवाला फक्त हात दाखवतो आणि भात आपल्याकडे ओढतो. ईश्वर नैवेद्य खात नाही हे आपल्याला माहीत असते. ते खरेही आहे. तरीही ईश्वराला नैवेद्य का दाखवतात? त्याला भूक लागत नाही, कारण तो नित्यतृप्त आहे. तो आपले अन्न खात नाही, परंतु अन्नावर असलेले आपले ममत्व खाऊन टाकतो. आम्ही अनेकदा हे सांगितले आहे की, तुम्ही जेव्हा केळी इ. पदार्थ घेऊन जगद्गुरूंकडे येता तेव्हा येताना जर कुणी विचारले, 'हे काय आहे? कोणाचे आहे' तर त्यावेळी तुम्ही उत्तर देता की, 'ही केळी आहेत आणि माझी आहेत.' केळी जगद्गुरूंना अर्पण केल्यावर ते तीच तुम्हाला प्रसाद म्हणून परत देतात. परत जाताना जर तुम्हाला कुणी विचारले, 'हे काय आहे आणि कोणाचे आहे?' तर तुम्ही पहिल्याप्रमाणे उत्तर देत नाही. 'हा प्रसाद आहे आणि जगद्गुरूंचा आहे.' असे तुम्ही सांगता. तुम्ही त्या पदार्थाचे नावही उच्चारत नाही. जगद्गुरूजवळ जाईपर्यंत तुमच्या मनात त्या पदार्थाविषयी ममत्व होते आणि जगद्गुरूंना अर्पण केल्यावर ते नष्ट झाले, असा याचा अर्थ आहे. त्याप्रमाणे ईश्वराला जेव्हा तुम्ही एखादा पदार्थ अर्पण करता तेव्हा तो त्या पदार्थावरील तुमचे 'ममत्व' काढून घेऊन 'पदार्थ' तुम्हाला परत करतो. जेव्हा दीक्षेच्या वेळी तुम्ही

**भो कल्याण महाभाग शिवज्ञानमहोदधे।**
**आचायवर्य संप्राप्तं रक्ष मां भवरोगिणम्।।६.९।।**

असा मंत्र म्हणून दंडवत घालून श्रीगुरूला शरीर समर्पित करता, त्यावेळी तुमचे शरीर गुरूच्या मालकीची होत असते. शरीरावर संस्कार करून श्रीगुरू आपले शरीर आपल्यालाच परत करतात.

'घेऊन जा परत. पण आता हे शरीर तुझ्या मालकीचे नाही ते श्रीगुरूचे आहे. गुरूचा प्रसाद आहे, हा गुरूचा अनुग्रह आहे. या शरीराने तू जीवनभर आपल्या गुरूची सेवा करावी, भगवान शिवाची सेवा करावी, गुरुमंत्राचा जप करावा, यासाठी तुला हे शरीर प्रसाद म्हणून परत करीत आहे.' असे म्हणून जेव्हा श्रीगुरू आपले शरीर आपल्याला देऊन टाकतात तेव्हा ते मांसपिंड न राहता मंत्रपिंड, प्रसादपिंड होते. याप्रमाणे स्थूल, सूक्ष्म आणि कारण या शरीरांवर संस्कार करून आणव, मायीय आणि कार्मिक या मलांचा नाश करून जो दिव्य ज्ञान प्रदान करतो त्यालाच 'दीक्षागुरू' असे म्हणतात.

**दीयते परमं ज्ञानं क्षीयते पाशबंधनम्।**
**यया दीक्षेति सा तस्यां गुरुर्दीक्षागुरुः स्मृतः।।१५.७।।**

गुरू शिष्यासाठी काय करतात या संबंधीचे विवेचन दीक्षागुरुस्थलात केलेले आहे. यापुढील दीक्षेचे विवेचन उद्याच्या आशीर्वचनात करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
२ ऑगस्ट १९९२

## दीक्षागुरुस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जेव्हा अधर्म प्रबळ होतो आणि सामान्यजन मायामोहात गुंतून पडतात त्यावेळी धर्म प्रतिष्ठित करण्यासाठी आणि सामान्यांना सन्मार्ग दाखवण्यासाठी शिवाला गुरूच्या रूपात अवतार घ्यावा लागतो. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त शिव आणि गुरू हे एकरूप असले तरी त्यांच्यातील अंतर स्पष्ट केले आहे–

**अप्रत्यक्षो महादेवः सर्वेषामात्ममायया।**
**प्रत्यक्षो गुरुरूपेण वर्तते भक्तिसिद्धये।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.५३)

प्रत्येक जीवात्म्याला ईश्वरदर्शनाची ओढ असते. त्यासाठीच ईश्वराची पूजा, त्याच्या नावाचा जप आणि अनेक प्रकारची व्रते केली जातात. तरीही ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन त्याला होत नाही. त्याच्या मूर्तींची पूजा करण्यात आणि त्याच्या चित्राला आरती ओवाळण्यात ते स्वत:ला धन्य मानतात, ईश्वराचे दर्शन लोकांना का बरे होत नाही? कारण तो मायाशक्तीने युक्त आहे. त्यामुळे आपल्याला त्याच्या मायेचेच दर्शन घडते, त्याचे घडत नाही. माया जणू शिवाला लपवून ठेवते आणि पाहणाऱ्याच्या समोर स्वत: येऊन उभी राहते. म्हणून आपल्या भक्तांना भेटण्यासाठी शिवच मायाविरहित होऊन गुरूचे रूप धारण करतो. त्याच गुरूचे माहात्म्य तुम्ही कालपासून ऐकत आहात. दीक्षागुरुस्थलात गुरूचे सुरेख वर्णन केलेले आहे.

**गुणातीतं गुकारं च रूपातीतं रुकारकम्।**
**गुणातीतमरूपं च यो दद्यात् स गुरुः स्मृतः।।१५.८।।**

'गुरू' या पदात दोन अक्षरे आहेत. त्याचा अर्थ नीट समजून घेतला पाहिजे. आपल्या संप्रदायात गुरुभक्ती आणि शिवभक्ती यांना अत्यंत महत्त्व आहे. शिवभक्ती करण्याआधी आपण गुरुभक्ती करतो. गुरूला शिवापेक्षा श्रेष्ठ मानतो. इतर प्रांतांपेक्षा महाराष्ट्रात गुरुभक्ती अधिकच आढळते. म्हणून 'गुरू' शब्दाचा अर्थ नीट समजून घ्यायला हवा. 'गु' म्हणजे गुणातीत आणि 'रू' म्हणजे रूपातीत. निर्गुण निराकार परमात्म्याचा साक्षात्कार घडणाऱ्या महापुरुषाला 'गुरू' म्हटले जाते.

गुण किती आहेत याचाही विचार येथे केला पाहिजे. परमात्म्याजवळ प्रकृती आहे. प्रकृतितत्त्वाला ओलांडून गेल्यावरच परमात्म्याचे दर्शन घडते. प्रकृती त्रिगुणात्मक आहे. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनी ती बनली आहे. प्रकृतीत जसे तीन गुण आहेत तसेच प्रकृतीने घडवलेल्या आपल्या देहात देखील तीन गुण आहेत. आपण सत्त्वगुणी आहोत, रजोगुणी आहोत की तमोगुणी आहोत, हे समजावून घेतले पाहिजे. स्थूलमानाने सांगायचे झाले तर व्यावहारिक जगातील उदाहरण देता येईल. तुम्ही फ्रिजमध्ये पाणी ठेवता. त्या पाण्याचे बर्फाच्या खड्यात रूपांतर होते. बर्फाचा खडा एका ठिकाणी ठेवला तर तो तेथून हलत नाही. त्याच ठिकाणी स्थिर राहतो. थोड्या वेळाने तो हळूहळू वितळतो आणि त्याचे पाणी होऊन ते उताराकडे वाहू लागते. पाण्याला जर तुम्ही गॅसवर ठेवून उष्णता दिली, तर त्याचे वाफेत रूपांतर होऊन ती वर आकाशात जाते. जागेवरून न हलणारा बर्फाचा खडा, उताराकडे वाहणारे पाणी आणि आकाशात जाणारी वाफ ही एकाच पदार्थाची तीन रूपे आहेत. प्रकृतीमध्ये

असणाऱ्या तीन गुणांचा स्वभाव असाच आहे. तमोगुण हा बर्फाच्या खड्यांप्रमाणे माणसाला अचल, आळशी बनवतो. काही माणसे तमोगुणी असतात. ती सदोदित बिछान्यावर पडलेली असतात. स्वयंपाकघरात जाऊन जेवण करीत नाहीत. बिछान्यावर बसूनच जेवतात. तिथेच झोपायचे आणि तिथेच खायचे, अशी त्यांची दिनचर्या असते. निद्रा आणि आळस यांतच ज्यांचे जीवन व्यतीत होते अशी माणसे तमोगुणी म्हणजे तामस होत. तमोगुणात देखील एक प्रकारचे लोक नसतात. काही हालचाल करणारे असतात तर काही बिछान्यावर पडलेले असतात. काही लोक तर इतके आळशी असतात की अन्न खाण्याचे देखील परिश्रम ते करत नाहीत. इतरांकडून भरवून घेतात. अशा लोकांना तमोगुणी म्हटले जाते. ज्याच्या ठिकाणी तमोगुणाचे आधिक्य आहे अशा माणसाचे आयुष्य झोप काढण्यात आणि जागा राहिला तर दुसऱ्याशी भांडण करण्यात व्यतीत होते.

दुसरा गुण आहे रजोगुण. पाणी जसे उताराकडे वाहते म्हणजे हालचाल करते तसा रजोगुणाचा स्वभाव आहे. रजोगुणी मनुष्यात कार्यशक्ती असते, परंतु ती दुसऱ्यांचे अकल्याण करण्यात वेचली जाते. रजोगुणी मनुष्याचे आयुष्य दुराचारात व्यतीत होते. काही माणसे सत्त्वगुणी असतात. त्यांचे जीवन सद्गुणांनी ओतप्रोत असते. सुगंधाने दरवळणाऱ्या फुलासारखे. आकाशात वर जाणाऱ्या वाफेसारखे. त्याची आध्यात्मिक प्रगती होत असते. त्याचे विचार उन्नत असतात. आत्मोन्नती, समाजोन्नती, राष्ट्रोन्नती कशी होईल? जगातील सर्वसामान्य माणसे सुखी कशी होतील? याच विचारात तो सदैव गढलेला असतो. समाजाचे भले होऊन आपलेही आध्यात्मिक कल्याण व्हावे अशी आकांक्षा बाळगणारा माणूसच सत्त्वगुणी, सात्त्विक होय. रजोगुणी आणि तमोगुणी माणसे जगात अधिक संख्येने आहेत. सत्त्वगुणी माणसांची संख्या कमी असते. एखाद्या गावात जर सत्संग चालू असेल तर काही माणसे म्हणतात– पाऊस येतोय, जाऊ द्या. काही लोकांना निमित्त दाखवून अथवा काहीतरी निमित्त काढून राजस आणि तामस माणसे घरातच रहातात. घराबाहेर पडतच नाहीत. घर सोडल्याशिवाय आपल्या जीवनात परिवर्तन होत नसते. संतांनी म्हटले आहे की, वनवास भोगल्याशिवाय जीवनाला सुवास लाभत नाही.

रामायण–महाभारतात वनवासाच्या कथा सांगितल्या आहेत. सीता–रामांना, आणि द्रौपदी–पांडवांना वनवास भोगावा लागला. तोही एक–दोन वर्षे नव्हे, तर बारा–चौदा वर्षे. या कथा रामायण–महाभारतात कशासाठी सांगितल्या आहेत? जीवात्मा जेथे जन्म घेतो, ज्या ठिकाणी आयुष्य घालवतो त्या ठिकाणाविषयी त्याच्या मनात मोह असतो, कुणीही आपले स्थान सोडायला तयार नसतो. काही लोक तर मरण्यासाठी आपल्या घरी येतात. चला, आपल्या घरी जाऊन मरू, काही लोक मरण्यासाठी काशीला जातात तर काही बहाद्दर मरण्यासाठी काशीहून घरी येतात. आपण बांधलेले घर पहात पहात मरण्याची इच्छा काहीजणांना असते तर काहीजण आपल्या मुलांबाळांना पहात मरू इच्छितात. परंतु कुटुंबियांकडे पहातच मेला तर तुम्हाला त्याच घरात पुन्हा जन्म घ्यावा लागेल. म्हणून घराविषयी आणि कुटुंबाविषयी प्रत्येकाच्या मनात जो मोह असतो तो क्षीण करण्यासाठी काही काळ घर सोडून जाणे आवश्यक असते. तीर्थयात्रेच्या निमित्ताने असो, प्रवचन ऐकण्यासाठी असो किंवा देवदर्शन करण्याच्या निमित्ताने असो घर सोडायलाच हवे. कारण केव्हा ना केव्हा तरी आपल्याला कायमचे घर सोडून जायचेच असते. एकाएकी घर सोडायची वेळ आली तर माणसाला जास्त दुःख होते म्हणून काही ना काही निमित्ताने घर सोडण्याचा अभ्यास करावा लागतो. घर सोडून जायचे, पुन्हा परत यायचे, असा थोडाफार अभ्यास झाला तर दुःख होत नाही.

परंतु व्यवहारात आपण असे पाहतो की, मरणारा प्रत्येक जीव अत्यंत दुःखी होऊन घर सोडून जातो. रडत रडत. जीव जन्माला येतो तोही रडत रडत आणि जातो तेव्हाही रडत रडतच. कबिरांनी म्हटले आहे–

**जब तुम आये जगत् मे जग हंसे तुम रोय।**
**ऐसी करनी कर चलो तुम हंसे जग रोय।।**

कबीर स्वत:ला समाजवतात. दुसऱ्याला नव्हे. तू जगात आलास तेव्हा रडत रडत आलास. तुला रडताना पाहून तुझी आई हसत होती. जन्मलेले मूल रडले तर आई हसते. जर ते रडले नाही तर कदाचित् तिला रडावे लागेल. मूल रडते याचा अर्थ त्याचा श्वासोच्छवास चालू आहे, ते रडले नाही तर श्वासोच्छवास बंद आहे. कबीर म्हणतात– तुला रडताना पाहून हे जग हसते. तुला त्याचा सूड घ्यायला पाहिजे. तो कसा घेशील? तर जेव्हा तू हे शरीर सोडशील तेव्हा तू हसत जायला हवे, त्यावेळी जग रडले पाहिजे. कर्तृत्वान माणूस मेल्यावरच जग रडत असते. म्हणून जगाला रडवण्यासाठी तू कर्तृत्व दाखव.

परंतु आपल्या आयुष्यामध्ये असे घडत नाही. आपण रडत येतो आणि रडत जातो. कुटुंबियांना रडवून जातो. आपणही रडतो आणि आसपास बसलेली माणसेही रडतात. रडल्यामुळे आपला मृत्यू चुकत नाही. शास्त्रात म्हटले आहे– 'अंते या मति: सा गति:'

अंतकाळी मनुष्याची जशी मानसिक स्थिती असते तशीच त्याला पुढे गती मिळते. तुम्ही रडत मेला तर पुन्हा रडत रडतच जन्म घ्याल. सॉक्रेटीसबद्दल सांगितले जाते की, जेव्हा त्याचा जन्म झाला तेव्हा तो हसला होता. याचे सामान्यांना फार आश्चर्य वाटते. परंतु जो हसत जातो तोच हसत परत येतो. आपली अंतिम स्थिती जशी असते तशीच आपल्याला पुढे गती मिळते. आपला जेव्हा फोटो काढला जातो तो क्षण अत्यंत महत्त्वाचा असतो. त्याक्षणी जर आपल्या चेहऱ्यावर हसू असेल तर आपला फोटो हसरा येईल, परंतु त्याक्षणी जर आपण गपकन् डोळे मिटले तर आपला फोटो आंधळ्यासारखा येईल. मग 'माझा फोटो असा का काढलास? मी काय आंधळा आहे?' असे फोटोग्राफरशी भांडून काही उपयोग नाही. तो म्हणेल, 'मोक्याच्या क्षणी तुम्ही डोळे मिटले हा काही माझा दोष नाही, तो तुमचा दोष आहे.' म्हणून अंतकाळी आपली मानसिक स्थिती कशी असावी यासंबंधी सावधपणे विचार करावा लागतो.

ईश्वर आपल्याला एकवेळ नाही तर चार वेळा सावध करत असतो. प्रत्येक जीवाच्या बाल्य, तारुण्य, वार्धक्य आणि मरण अशा चार अवस्था असतात. शास्त्रे सांगतात की बालपणी सात्त्विक व्हा, ईश्वराची पूजा करा. पण आपण त्यावेळी शास्त्रांचा उपदेश ऐकत नाही. खेळण्या–बागडण्यातच आपले बालपण घालवतो. बालपणी नाही तर निदान तारुण्यावस्थेत तरी ईश्वरभक्ती करा, असे शास्त्र सांगते. त्यावेळीही आपण त्याकडे दुर्लक्ष करतो. विषयोपभोगातच आपले तारुण्य हरवते. वृद्धावस्थेतही असेच घडते. त्यावेळी मनुष्य अनेक प्रकारच्या चिंतांनी ग्रासलेला असतो. चिंतेमध्येच आपले वार्धक्य सरते. मग शास्त्र सांगते की, बाल्यवस्थेत, वृद्धावस्थेत तुम्हाला ईश्वरभक्तीसाठी वेळ मिळाला नाही तर आता मृत्युसमयी तरी थोडे ईश्वराचे नामस्मरण करा. परंतु त्यावेळी ते कसे करता येईल? कारण आधी नामस्मरणाचा अभ्यासच केलेला नसतो. ऋषिमुनी आयुष्यभर ईश्वराचे नामस्मरण, ध्यान करतात, त्यांना देखील अंतकाळी ईश्वराचा विसर पडतो. मग ज्याने आयुष्यात कधीही देवाचे नाव घेतले नाही त्यांच्या मुखात अंतकाळी ईश्वराचे नाव कसे येणार? ही अशक्य गोष्ट आहे.

अंतकाळी ओठावर भगवन्नाम आले पाहिजे. कारण मृत्युसमय अत्यंत महत्त्वाचा असतो. मुलाचा जन्म झाल्यावर आपण मुहूर्त पाहतो. तो शुभ आहे की नाही याची खात्री करून घेतो. घरात कुणाचा मृत्यू झाला तर त्यावेळी ही मृत्यूची वेळ शुभ की अशुभ? हे आपण पाहतो. हा एकटाच गेला की इतरांनाही घेऊन जाणार?

याची चौकशी आपण करतो. दूषित नक्षत्रावर मृत्यू झाला तर त्याच्या कुटुंबियांना आणि नातेवाईकांना मृत्यू येण्याचा संभव असतो. म्हणून प्रत्येक मनुष्याने शुभमुहूर्तावर जन्म घेतला पाहिजे आणि शुभमुहूर्तावर मृत्यू पत्करला पाहिजे. परंतु हे कोणाच्या हातात आहे? आधुनिक काळात शस्त्रक्रिया करून मुलाला शुभमुहूर्तावर जन्म देणे शक्य झाले आहे. परंतु हा जन्म नैसर्गिक नव्हे. चांगल्या मुहूर्तावर मृत्यू पत्करायचा म्हणजे काय करायचे? गुरुपुष्यामृताचा योग साधून विजेच्या तारेला स्पर्श करायचा? की गळ्याला फाशी लावून मरायचे? परंतु याला शुभमुहूर्तावर मरणे म्हणता येत नाही. चांगल्या मुहूर्तावर मरणे याचा अर्थ, चांगल्या मन:स्थितीत मरावे, असा आहे. मृत्युसमयी बाहेरचा मुहूर्त कसा आहे याला महत्त्व नाही, त्यावेळी आपल्या मनात कोणती भावना आहे, कोणाचे चिंतन चालले आहे याला महत्त्व आहे.

एक कथा तुम्ही यापूर्वी ऐकली असेल. एका म्हाताऱ्याचा मृत्युकाळ समीप आला तेव्हा सारे नातेवाईक त्याच्या भोवती जमले. त्याची खाट ओसरीमध्ये होती. समोर गोठा होता. तो माणूस एकटक गोठ्याकडे पहात होता. त्याची वाणी रुद्ध झाली होती. त्याला काहीतरी सांगायचे होते पण तोंडातून शब्द बाहेर पडत नव्हते. त्याने सारी शक्ती एकवटून बोलण्याचा प्रयत्न केला, तेव्हा त्याच्या मुखातून 'गो..' एवढाच शब्द बाहेर पडला.

जवळ उभ्या असलेल्या माणसाने आपली बुद्धी चालवून म्हटले, 'पहा, बिचाऱ्याला ईश्वराचे नाव घ्यायचे आहे. त्याला 'गोविंद' असे म्हणायचे आहे.'

म्हाताऱ्याने पुन्हा प्रयत्न केला तेव्हा त्याच्या मुखातून फक्त 'वा..' एवढेच अक्षर बाहेर पडले. तेव्हा शेजारचा शहाणा म्हणाला, 'हा, त्याला गोविद म्हणता येईना. म्हणून तो 'वासुदेव' हे नाव घेण्याचा प्रयत्न करतोय.'

म्हाताऱ्याने पुन्हा प्रयत्न केला तेव्हा त्याच्या तोंडून 'के..' एवढेच अक्षर बाहेर पडले. शहाणा म्हणाला, 'पहा बरे, त्याला वासुदेव म्हणता येईना म्हणून तो 'केशवा' म्हणायचा प्रयास करतो आहे.'

म्हाताऱ्याच्या मुलाला वाटले की, काहीही करून आपल्या बापाला मरण्याआधी देवाचे नाव उच्चारता आलेच पाहिजे. त्याला गोविंद-वासुदेव-केशव अशी देवाची नावे घेता आली पाहिजेत. मुलाने डॉक्टरला आणले. डॉक्टरने म्हाताऱ्याला उत्तेजक उंजेक्शन दिले. म्हाताऱ्याच्या देहात अवसान आले आणि तो मुलावर खेकसून म्हणाला, 'मूर्खांनो, मघापासून गोठ्यात वासरू केरसुणी खाते आहे, ते दिसत नाही का तुम्हाला?'

म्हातारा ईश्वराचे नव्हे तर केरसुणीचे चिंतन करत करत मेला.

बऱ्याच लोकांची शेवटची अवस्था अशीच असते. कुणी कशाचे चिंतन करतो तर कुणी कशाचे. लक्षावधी माणसांमध्ये एखादाच भगवच्चिंतन करीत प्राण सोडतो. ज्याने आयुष्यात कधीही देवाचे नाव घेतले नाही त्याच्या ओठावर अंतकाळी देवाचे नाव येणे कसे शक्य आहे? त्यासाठी अभ्यास हवा. म्हणून शास्त्रकारांनी सांगितले आहे की, थोडा वेळ तरी घरदार सोडून सत्संग करावा. सत्संगात आपण जेवढे क्षण घालवू तेवढे आयुष्यातले क्षण सोन्याचे होऊन जातात. त्या क्षणांत जेवढा पुण्यलाभ होईल तेवढे पुण्य दुसऱ्या कोणत्याही उपायाने पदरी बांधता येणार नाही. ना यात्रा करून, ना दानधर्म करून, ना पूजा करून, ना जप करून? जप अथवा ध्यान करायला आपण तासभर बसतो, तेव्हा आपले मन तासभर तेथे स्थिर राहत नाही. ते कुठेतरी बाहेर भटकत जाते. आपण त्याला पुन्हा खेचून आणतो आणि जप करायला लावतो, पण पुन्हा ते भरकटत जाते. अशी तासभर ओढाताण चालू असते. एखादे मूल सतत घराबाहेर धावत असते. आई त्याला पकडून घरात आणते, तरीही ते पुन्हा बाहेर पळून जातेच. आपल्या मनाची अवस्था अशीच असते.

जेव्हा तुम्ही सत्संगात बसता, एखाद्या महापुरुषाचे चरित्र वर्णन असो अथवा तत्त्वज्ञानाचे विवरण असो, ते ऐकत असता, त्यावेळी तुमचे मन संपूर्ण एकाग्र होते. जप-ध्यान करताना तुमचे मन तासभर एकाग्र होणार नाही. परंतु सत्संगात प्रवचन ऐकताना मात्र सारे काही विसरून तुम्ही तन्मय व्हाल. म्हणून एक तासभर सत्संग केला तरी अपार पुण्यलाभ होतो. यासाठीच माणसाला काही काळ तरी घर सोडून चिंतामुक्त होऊन सत्संगात जायला हवे. येणारा प्रत्येक जीव एकटाच आलेला असतो आणि जाताना देखील त्याला एकट्यालाच जावे लागते. सोबत रहाण्याच्या आणाभाका भल्याही घेतल्या जावोत, पण जेव्हा मृत्यू आमंत्रण देतो तेव्हा एकट्यानेच जावे लागते. ज्याला आधी बोलावणे येते तो आधी जातो, ज्याला नंतर बोलावणे येते तो नंतर जातो. कधी ना कधी साऱ्यांना सोडून जायचेच असते. म्हणून थोडे थोडे सोडण्याचा अभ्यास करावा लागतो. रामायण-महाभारतातल्या कथा हेच सत्य सांगतात. मनुष्याने भोगभूमीचा त्याग करून काही काळ तरी योगभूमीत वास्तव्य केले पाहिजे.

आपले घर ही भोगभूमी आहे. खाणे-पिणे-झोपणे इत्यादी भोगांसाठीच आपण घर बांधलेले असते. भोगभूमीत देखील आपण एक लहानशी योगभूमी निर्माण केलेली असते. तिला 'देवघर' असे म्हणतात. ईश्वराच्या पूजेसाठी एक लहान घर आपण बनवतो. आजकाल घराच्या प्लॅनमध्ये देवघर नसते. जे प्लॅन तयार करतात त्यांच्या दृष्टीने देवाची गरज नसते. आपल्यासाठी घरात सारे हवे. गप्पा झोडण्यासाठी प्रशस्त हॉल हवा. खाण्यासाठी डायनिंग हॉल हवा. झोपण्यासाठी बेडरुम हवी. तीही प्रत्येकासाठी वेगवेगळी हवी. परंतु ईश्वरासाठी मात्र आपल्या घरात जागा नसते. ईश्वराला जागेची गरज काय? कोणाला गरज भासलीच तर एखाद्या कोपऱ्यात बिचाऱ्या ईश्वराची स्थापना करतात. काही महाभाग तर तेवढीही जागा न देता भिंतीवर देवाला टांगून ठेवतात. एखाद्याला फासावर लटकवावे त्याप्रमाणे. खरे तर देवघर देवासाठी नसते, तर त्याचे चिंतन करावे म्हणून आपल्यासाठी असते. देवघर नेहमी पवित्र असावे. स्नान करूनच त्या ठिकाणी प्रवेश करावा. म्हणजे त्याच्या भोवती पावित्र्य दरवळत राहते. पवित्र देवघरात शांतचित्ताने डोळे बंद करून ईश्वराचे ध्यान केल्याने ईश्वराला काही लाभत नाही, तर ध्यान करणाऱ्या मनुष्यालाच आनंद लाभतो. ईश्वरचिंतन केल्यामुळे मनुष्य सांसारिक चिंतापासून मुक्त होतो.

चिंतेने माणसाला सदैव ग्रासलेले आहे. बी.पी. वाढल्यावर तुम्ही डॉक्टरकडे जाता. तो तुम्हाला गोळ्या-औषधे देतो आणि पथ्य पाळायला सांगतो. औषधामुळे चिंतेपासून थोडीच सुटका होते? औषधाने थोडीच मनाला शांती मिळते? चिंताही दूर होतील आणि मन:शांतीही मिळेल, पण ती औषधामुळे नव्हे, तर एकांतवासात ईश्वरचिंतन केल्यामुळे. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास अशा मानवी जीवनाच्या चार अवस्था पूर्वसूरींनी सांगितल्या आहेत. वानप्रस्थाश्रमातील मनुष्य वनात जाऊन वास्तव्य करतो. समाजात राहून माणसाची बुद्धी दूषित झालेली असते. त्याच्या मनात कोणाबद्दल प्रेम दाटलेले असते तर कोणाबद्दल द्वेष. राग-द्वेषांमुळेच आपल्या मानसिक चिंता उत्पन्न झालेल्या असतात. त्यापासून दूर राहण्यासाठी माणसाने वनवास भोगायला हवा. परंतु आधुनिक काळात माणूस वनात जात नाही. वनच शिल्लक राहिले नाही तर वनवास कसला? तुम्ही घर सोडून एक तासभर प्रवचन ऐकायला आलात हाच तुमच्यासाठी एक प्रकारचा वनवास आहे. एखाद्या मंदिरात जाऊन तुम्ही पूजा करीत बसलात तर तेवढा काळ तुमचा वनवासच समजायला हवा. पंधरा दिवस-महिनाभर तुम्ही यात्रेला गेलात तर तर तो तुमचा वनवासच होय. घर सोडून बाहेर पडले तर तुमचा वनवासच वनवास.

काही लोक घर सोडतात. पण घराशी असलेला संबंध सोडत नाहीत. आधुनिक काळात तर घराशी संबंध ठेवणे फार सोपे झाले आहे. कारण फोनसेवा, भ्रमणध्वनी उपलब्ध आहे. काही क्षणांत तुम्ही कुठे कुठे संपर्क साधू शकता. तुम्ही येथून काशीला गेलात तरी तेथून घराशी फोनवरून संबंध ठेवू शकता. तुम्ही घर सोडले पण घराचा संबंध सोडला नाही. तुमच्या मनात घराने कायमचे घर केले असेल तर काशीला जाऊन तरी काय उपयोग? जुन्या काळात असे होत नव्हते. एकदा घर सोडून माणूस यात्रेसाठी बाहेर पडला की मग त्याचा पत्ताच लागत नसे. घरातले लोक त्याला विसरूनच जात. जर तो जगून वाचून परत आला तर त्याचे उत्साहाने स्वागत करीत. सगळे लोक त्याच्या पाया पडत. एवढा काळ त्याने घर सोडले तेव्हा त्याचा संबंध कोणाशी होता? ईश्वराशी होता. म्हणूनच सारे लोक त्याला नमस्कार करीत. त्याला ईश्वरच समजले जाई. परंतु जर तुम्ही घरातच रहाल तर तुम्हाला कुणीही नमस्कार करणार नाही. वेळप्रसंगी गालिप्रदान करतील. तुम्ही घर सोडून बाहेर पडलात तरच तुमच्या बद्दल कुटुंबियांच्या मनात आदरभावना निर्माण होते. यासाठी प्रत्येक माणसाने सात्त्विक होण्यासाठी घर सोडून तास-दोन तास तरी सत्संगात आले पाहिजे. काहीजण भाग्यशाली आहेत. असे भाग्य फार कमी लोकांच्या वाट्याला येते. ज्यांना सत्संगासाठी अधिकाधिक वेळ मिळतो ती माणसे धन्य होत.

एखाद्याचा पाय घराबाहेर निघत नाही तेव्हा सहज असे वाटते की घराने पकडले आहे की त्यानेच घराला घट्ट धरून ठेवले आहे? अशा माणसाला श्रीगुरूच घरापासून मुक्त करू शकतात. कारण श्रीगुरू अत्यंत दयाळू असतात. एका श्रीमंत माणसाने एका गावात एका संताची प्रवचने आयोजित केली होती. त्याने त्यासाठी सर्व खर्च केला. संताला जे हवे असेल ते दिले. परंतु तो स्वत: घर सोडून कधी प्रवचन ऐकायला आला नाही. शेवटी संताने विचार केला की, ज्याने एवढ्या मोठ्या सत्संगाचे आयोजन केले तो स्वत: सत्संगापासून अलिप्त कसा? त्याचे घरावरील ममत्व नष्ट करायलाच हवे.

मग संताने एक नाटक केले. एका खांबाला घट्ट मिठी मारून तो मोठ्याने ओरडू लागला, ''मला खांबाने धरले, मला खांबाने धरले.''

इतर सर्वांनी संताला समजावले. परंतु तो ऐकायलाच तयार होईना. शेवटी प्रवचनाला कधीही न आलेला तो श्रीमंत माणूस तेथे आला आणि संताला समजावू लागल, ''महाराज, तुम्हाला खांबाने धरले नाही, तुम्हीच खांबाला धरले आहे. तुमच्या हाताची मिठी सोडली तर खांब तुम्हाला सोडून देईल.''

संताने खांबाला सोडले आणि हसून तो त्या श्रीमंताला म्हणाला, ''मला तुला हेच सांगायचे आहे. घर सोडून तू कधीही बाहेर पडत नाहीस. तुला घराने पकडले नाही तर तूच घराला पकडले आहेस.''

याप्रमाणे गुरू कोणत्या ना कोणत्या तऱ्हेने समजावून सांगत असतो. कधी स्पष्ट उपदेश करून तर कधी छोट्या छोट्या कथा रंगवून सांगून. माणसे आपली घरे सोडून तासभर प्रवचनात येऊन बसली तर त्यांच्या पदरात काहीतरी पडावे असे गुरूला स्वाभाविकपणे वाटते. इथे येऊन तासभर श्रवणभक्ती केली तर आनंदच आहे. परंतु येथे येऊन तासभर झोप काढली तरी काही वाईट नाही. तुम्ही एक तास येथे येऊन निवांत झोप काढता हे बरेच आहे. इथे आला नसता तर घरात बसून कोणाशी भांडत बसला असता, याशिवाय दुसरे काय केले असते? इथे आल्यामुळे भांडणापासून सुटका झाली. काही लोकांना घरी झोप येत नाही इथे बिचाऱ्यांना सुखाने झोप तरी मिळते. झोपेसाठी गोळ्या तर खाव्या लागत नाहीत? सत्संगात आल्यामुळे तुमचा कोणत्या ना कोणत्या प्रकारे लाभच होतो. जर आमचे प्रवचन तुम्हाला समजले तर तुम्हाला ज्ञान

मिळेल. जर आमचे प्रवचन तुम्हाला कळले नाही तर चांगली झोप तर लागेल.

प्रत्येक मनुष्याने सात्त्विक व्हायला हवे. रजोगुणी मनुष्याची प्रवृत्ती संसाराकडे अधिक असते. तमोगुणी माणूस मात्र धड संसारही करीत नाही आणि परमार्थ तर मुळीच करीत नाही. सात्त्विक मनुष्य मात्र सत्संगात येऊन आपले जीवन कृतार्थ करून घेतो. या प्रकारे प्रत्येक प्राण्यात प्रकृतीमधील सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण उतरले आहेत. जीवात्मा तीन गुणांनी युक्त आहे. परंतु परमात्मा मात्र तिन्ही गुणांच्या पलीकडला आहे. याठिकाणी ज. रेणुकाचार्य हेच समजावून सांगत आहेत. आपण जसे त्रिगुणांनी युक्त आहोत तसे भगवान शिव त्रिगुणांनी युक्त नाहीत. त्यांच्या ठिकाणी सत्त्वगुण नाही, तमोगुण नाही, रजोगुण नाही. ते तिन्ही गुणांच्या पलीकडले असल्यामुळे गुणातीत आहेत. शिव आणखी कसे आहेत? तर रूपातीत. त्यांना कोणतेही रूप नाही. आपण आपल्यासाठी त्यांचे रूप निर्मिले आहे. त्यांच्या हातात त्रिशूल दिला, त्यांच्या गळ्यात सर्पहार घातले, त्यांच्या कटीला गजचर्म गुंडाळले. आपल्याला जे सुचले, जे चांगले वाटले ते रूप आपणच त्या अरूपाला दिले आहे. पण खरे तर तो रूपातीत आहे.

आपण ज्या इष्टलिंगाची पूजा करतो त्या इष्टलिंगाला आकार नाही. भगवान शिवाचे निराकार रूप हेच इष्टलिंग होय. तो अरूप आहे. वेदांत म्हटले आहे–

ईश्वराला कोणते रूप नाही, मग आपण त्याला रूप का दिले? कारण आपले मन सदैव रूपावर आसक्त असते. रूपावर आसक्त असलेल्या मनाला रूपावरून हटावायचे असेल तर त्याच्यासमोर दुसरे रूप उभे करायला हवे. माती खाणाऱ्या बालकाच्या हातून जर माती हिसकावून घेतली तर ते रडते, म्हणून त्याचे माती खाणे थांबवायचे असेल तर त्याच्या हातात दुसरा खाद्यपदार्थ–मिठाई ठेवावी लागते. तेव्हाच त्याची माती खाण्याची सवय सुटू शकते. मातीपेक्षा मिठाई अधिक गोड आहे हे त्याला समजले की संपले. त्याप्रमाणे प्रपंचातील रूप शाश्वत नसून ते कधीतरी विकृत होणार आहे, हे मनाला समजावून सांगण्यासाठी त्याच्यासमोर शाश्वत रूप उभे करावे लागते. त्यासाठी आपण ईश्वराला रूप दिले आहे. प्रापंचिक रूपाचे चिंतन सोडून काही काल भगवद्रूपाचे चिंतन जर आपण केले तर हळूहळू त्याच्या अरूपापर्यंत आपण पोहचू शकतो. साकाराकडून निराकाराकडे जावे लागते. सगुणाकडून निर्गुणाकडे जाता येते.

ईश्वराचे निर्गुण आणि निराकार स्वरूप समजावून सांगणाऱ्यालाच 'गुरू' अशी संज्ञा आहे. गुरू या शब्दाचा हा अर्थ होय. दीक्षासंस्कार करणाऱ्याला गुरू म्हणतात असे कालच्या प्रवचनात सांगितले होते. परमात्म्याचे शाश्वत अविनाशी स्वरूप समजावून सांगून परमज्ञान देणाऱ्या आणि सर्व प्राणिमात्रांचे कल्याण करणाऱ्या व्यक्तीला येथे 'गुरू' अशी संज्ञा दिली आहे. म्हणून आपला उद्धार करून घेण्यासाठी गुरूला शरण जाऊन गुरूपदेश घेऊन त्याप्रमाणे प्रत्येक जीवात्म्याने आचरण केले पाहिजे. ज्ञानी, श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा गुरूला शरण जावे असे वेदांत म्हटले आहे. जो श्रीगुरूच्या सान्निध्यात निरंतर राहतो त्याला ज्ञानप्राप्ती व्हायला उशीर लागत नाही. शिष्याला शिवस्वरूप करणे हेच गुरूचे परम कर्तव्य होय. अशा श्रीगुरूवर शिष्याने नितांत श्रद्धा ठेवली पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

३ ऑगस्ट १९९२

## दीक्षागुरुस्थल–३

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

गुणातीतं गुकारं च रूपातीतं रुकारकम्।
गुणातीतमरूपं च यो दद्यात् स गुरुः स्मृतः।।
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.८)

निर्गुण निराकार अशा परमतत्त्वाचा साक्षात्कार जो शिष्याला करून देतो तोच गुरू होय. वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंग हृदयावर धारण केले जाते. शिव प्रत्येकाच्या हृदयात नांदत आहे याची ती एक खूण आहे. ईश्वर हृदयात आहे याचा अर्थ तो अन्यत्र नाही असा होत नाही. तो सर्वत्रच आहे. त्याचे प्राकट्य केंद्र हृदय आहे एवढाच त्याचा अर्थ होतो. मनुष्याच्या हृदयात त्याचा जसा चटकन साक्षात्कार होऊ शकतो तसा अन्यत्र होणे अवघड असते. म्हणून ज. रेणुकाचार्यांनी सांगितले आहे–

बीजे यथांकुरः सिद्धस्तथात्मनि शिवः स्थितः।।५.३६।।

प्रत्येक बीजात जसा अंकुर असतो तसा प्रत्येक जीवात्म्याच्या हृदयात शिवाचा निवास असतो. आपल्या हृदयात शिवाचा निवास असून देखील आपण त्याला जाणत नाही. आपल्या हृदयात त्याला दडवून आपण त्याचा शोध बाहेर मंदिरामध्ये घेत असतो. तो नेमका कुठे राहतो हे जोपर्यंत कळणार नाही तोपर्यंत त्याचा साक्षात्कार आपल्याला होणार नाही.

एकदा एक श्रीमंत माणूस तीर्थयात्रेला निघाला. त्याने आपल्यासोबत भरपूर पैसे घेतले. त्याच गावात एक चोर रहात होता. त्याला वाटले, ही नामी संधी आहे. गावात राहून आपण याचे धन चोरू शकलो नाही, पण प्रवासात आपल्याला ते चोरता येणे शक्य आहे. असा विचार करून तो देखील श्रीमंत माणसासोबत तीर्थयात्रेला जायला तयार झाला.

श्रीमंताने आगगाडीचे फर्स्टक्लासचे तिकीट काढले. चोराने विचार केला की, तो फर्स्टक्लासमध्ये आणि आपण थर्डक्लासमध्ये प्रवास केला तर काय उपयोग? आपल्याला फर्स्टक्लासनेच प्रवास करायला हवा, तरच मनातली गोष्ट साध्य होईल. थोडा पैसा अधिक खर्च होईल. पण पुढे भरपूर पैसा मिळणारच आहे. तेव्हा आता खर्च करायला हरकत नाही. म्हणून चोराने फर्स्टक्लासचे तिकीट काढले आणि ज्या कंपार्टमेंटमध्ये श्रीमंत माणूस होता त्याच कंपार्टमेंटमध्ये चोर जाऊन बसला. त्या ठिकाणी ते दोघेच होते. हा आपल्यासोबत का येतोय हे श्रीमंताने ओळखले. तो चांगलाच पोहोचलेला मनुष्य होता. धन मिळवणे आणि चोरापासून आणि नातलगांपासून ते सुरक्षित ठेवणे यासाठी बुद्धिमत्ता लागतेच. श्रीमंताकडे तेवढी बुद्धिमत्ता होती.

प्रवास सुरू झाला. रात्री झोपण्याआधी श्रीमंताने सारे पैसे बाहेर काढले आणि चोरासमोरच मोजू लागला. एक–दोन–तीन नव्हे, तर पन्नास हजारांच्या कोऱ्या करकरीत नोटा. त्या पाहून चोराच्या तोंडाला पाणी सुटले. श्रीमंताने एका कातडी बॅगेमध्ये त्या नोटा ठेवल्या आणि ती बॅग उशाशी घेऊन तो निवांत झोपला. त्याला गाढ झोप लागली की ती बॅग पळवायची असे चोराने ठरवले. व्यापारी गाढ झोपण्याची तो वाट बघू लागला. चोराला रात्रभर झोप येणे शक्यच नव्हते. दरम्यान तो दोन–तीन वेळा बाथरूमला जाऊन आला.

श्रीमंत माणूस गाढ झोपला असे पाहून चोराने हळूच त्याच्या डोक्याखालची बॅग काढून घेतली. उघडून

पाहिली तर ती चक्क रिकामी होती. त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. श्रीमंताने आपल्या समोर याच बॅगेत पन्नास हजाराच्या नोटा ठेवल्या आणि त्या अचानक गायब कशा काय झाल्या, हेच त्याला कळेना. पण अजून वेळ गेली नाही, उद्या पाहता येईल असा विचार करून त्याने ती बॅग पुन्हा श्रीमंताच्या डोक्याखाली ठेवून दिली.

दुसऱ्या दिवशी रात्री हाच प्रकार घडला. श्रीमंताने त्याच्यासमोर नोटा मोजून बॅगेत ठेवल्या. बॅग उशाशी घेऊन झोपला. रात्री चोराने बॅग उघडली तर ती रिकामीच. चोर पुरता भांबावून गेला. हा काय चमत्कार आहे, ते त्याला कळेना. रोज रात्री याच प्रकारची पुनरावृत्ती होत गेली. शेवटी प्रवास संपल्यावर चोराने हात जोडून श्रीमंताला विचारले,

''मला क्षमा करा. तुमचे पैसे चोरण्यासाठीच मी तुमच्या सोबत एवढा प्रवास केला. त्यासाठी मला कितीतरी खर्च करावा लागला. परंतु मला हे शेवटपर्यंत कळले नाही की तुम्ही माझ्यासमोर बॅगेत पैसे ठेवत होता आणि रात्री ती बॅग उघडून पाहिल्यावर त्यात मला पैसे सापडत नव्हते. हा काय प्रकार आहे, कृपा करून मला सांगाल का?''

तो श्रीमंत गृहस्थ हसला आणि म्हणाला, ''फार साधी गोष्ट आहे. तुझे सारे लक्ष माझ्या बॅगेवर होते हे मला माहीत होते. तुझ्यासमोर नोटा मोजून मी बॅगेत ठेवत होतो खरे, पण त्यानंतर रात्री तू बाथरूमला गेल्यावर साऱ्या नोटा मी तुझ्या उशाखाली ठेवून देत होतो. तुझ्या हे कधी लक्षातच आले नाही. तू माझ्या उशाखाली पैसे शोधलेस, पण तुझ्या उशाखाली कधी शोधले नाहीस, म्हणून तू वेडपट ठरलास.''

आपल्या हृदयात भगवंत आहे. पण त्याचा साक्षात्कार आपल्याला कधी होत नाही. आपण त्याचा आपल्या बाहेर सर्वत्र शोध घेतो. म्हणून तर चोरासारखी आपली फसगत होते. श्रीगुरू आपल्याला भगवंत आपल्या हृदयात आहे, याचा बोध करून देतात. 'यत्र जीवः तत्र देवः' जेथे जीवात्मा असतो तेथेच भगवंताचा निवास असतो. उपनिषदांत हेच सुंदर दृष्टान्ताने स्पष्ट केले आहे. एका वृक्षाच्या एका शाखेवर दोन पक्षी बसलेले आहेत. एक पक्षी वृक्षाचे फळ खात आहे, तर दुसरा त्याचा साक्षी म्हणून निवांत बसला आहे. आपले शरीर हाच एक वृक्ष असून त्याच्या हृदयरूपी फांदीवर जीवात्मा आणि परमात्मा हे दोन पक्षी बसलेले आहेत. जीवात्मा आपल्या कर्माची फळे भोगत आहे, तर परमात्मा त्याचा साक्षी आहे. आपल्या हृदयात जीव आहे तसाच शिव देखील आहे. परंतु आपण जी सुख-दुःखे भोगतो त्याचा आपल्या हृदयातील शिवाशी काहीही संबंध नसतो. शिव केवळ साक्षी आहे. द्रष्टा आहे. तो काही करत नाही आणि काही भोगत नाही. कर्ता-भोक्ता जीवच आहे. आपली कर्मफळे भोगणारा जीवात्मा एवढा मदोन्मत्त झाला आहे की तो आपल्या शेजारी बसलेल्या शिवाकडे पहात देखील नाही.

ईश्वरदर्शन घेण्याची ओढ माणसांमध्ये असते. परंतु त्याला आपल्या हृदयामध्ये पाहण्याऐवजी ते त्याचा शोध आपल्या बाहेर मठ-मंदिरात घेत सुटतात. साऱ्या भारतभर हिंडून येतात, सारी ज्योतिर्लिंगे पाहून येतात. एवढे सारे करून परत आल्यावर, तो जाताना जसा होता तसाच आता देखील आहे असे दिसून येते. त्याच्यात थोडे देखील परिवर्तन झालेले दिसून येत नाही. ज्योतिर्लिंगे जशी बाहेर आहेत तशीच आपल्या आत देखील आहेत. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त सांगतात-

**आधारे कनकप्रख्यं हृदये विद्रुपप्रभम्।**
**भ्रूमध्ये स्फटिकच्छायं लिंगं योगी विभावयेत्।।६.४०।।**

ज्या ज्योतिर्लिंगाचे दर्शन तुम्ही बाहेर घेऊ पाहता ते तुमच्या आतच आहे. डोळे बंद करून अंतर्मुख झाल्यावर

त्याचा साक्षात्कार होतो. परंतु आम्ही डोळे बंद करू इच्छित नाही. झोपल्यावर डोळे बंद होतात एवढेच. ध्यान करण्यासाठी डोळे बंद करणारी माणसे विरळाच. जर कुणाला 'डोळे बंद करून एक तास ध्यान कर' असे सांगितले तर तो काय करील? ध्यान करील-घराचे, मुलांचे, बायकोचे! त्यांचे ध्यान होईल, परंतु ईश्वराचे ध्यान होणार नाही. डोळे उघडून तुम्ही जे पाहता तेच डोळे बंद करून देखील पाहता. तुमचे डोळे उघडे असतात तेव्हा संसार बाहेर असतो आणि जेव्हा तुम्ही ध्यानासाठी डाळे बंद करता तेव्हा संसार हळूच आत शिरतो. भगवंताचे दर्शन घेण्यासाठी आपल्याला अंतर्यात्रा करावी लागते. बाह्य यात्रा आपण मोठ्या आनंदाने करतो. महिना-दोन महिने भारतभ्रमण करतो. एक प्रकारची मौजच असते ती! अंतर्यात्रा करण्यासाठी जर तुम्हाला बोलावले तर कुणी येणारच नाही. ध्यान करण्यासाठी जेव्हा लोक आमच्या सोबत डोळे बंद करून बसतात तेव्हा बडबडच जास्त करतात. आमच्याही ध्यानाचा भंग होतो आणि त्यांना बिचाऱ्यांना तर ध्यान करायचेच नसते. आतल्या ज्योतिर्लिंगाचे दर्शन घेण्यासाठी आपली बाह्यप्रवृत्ती क्षीण करायला हवी. दृष्टी आत वळायला हवी. तेव्हाच आत्मदर्शन घडेल. हृदयातली अविद्येची बेहोषी दूर झाल्याशिवाय आत्मदर्शन घडणार नाही. ईश्वर तुमच्या हृदयात आहे असे त्यांना सांगितले तर त्यावर ते विश्वासच ठेवणार नाही. म्हणून मग गुरू काय करतो? एक बोगी ठरवतो. गुरू यात्रेला निघाला की शिष्यही त्याच्या मागोमाग निघतात. एक बोगी-दोन बोगी कधी कधी पूर्ण ट्रेन भरून भक्तच भक्त. तुम्ही कुठपर्यंत बाहेर भटकत फिराल? जोपर्यंत तुमचे मन एकाग्र होत नाही तोपर्यंत तुमची बाह्ययात्रा चालूच राहणार. बाहेर कितीही भटकलात तरी शेवटी भगवंताचे दर्शन तुम्हाला तुमच्या हृदयातच घ्यावे लागणार, ते बाहेर होणार नाही. हृदयातील भगवंत गुरुकृपेशिवाय सहज आकळणार नाही. प्रत्येक संप्रदायातील गुरू आपल्या उपासनापद्धतीप्रमाणे शिष्याचे बाहेर भटकणारे मन आत वळवत असतो. परमात्म्याचे वास्तव्य असल्यामुळे माणसाचे मन मंदिरच होय. म्हणून एका हिंदी कवीने म्हटले आहे-

**मंदिर तोडो मस्जिद तोडो।**
**मगर किसीका दिल मत तोडो।।**

मंदिरात ईश्वर आहे तसाच तो प्रत्येकाच्या हृदयात देखील आहे. मंदिर तोडल्यावर तुम्हाला जे पाप लागेल त्यापेक्षा सहस्रपटीने अधिक कुणाचे मन तोडल्यावर लागेल. अंतर्यामी परमात्मदर्शन घेण्यासाठी अंतर्यात्रा करावी लागते. गुरू तुम्हाला बाह्ययात्रा घडवतो आणि अंतर्यात्रा देखील घडवतो. ज्या ज्योतिर्लिंगाचे दर्शन तुम्ही बाहेर घेता त्याचा साक्षात्कार तुम्हाला भ्रूमध्यात, हृदयात आणि मूलाधारात होतो. परंतु गुरुकृपेशिवाय हे घडणे शक्य नाही. गुरूला असा साक्षात्कार झालेला असल्यामुळे तोच आपला खरा मार्गदर्शक असतो. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त गुरूचे माहात्म्य गायले आहे. गुरूचेच दुसरे नाव 'आचार्य' असे आहे. तुम्ही तुमच्या गुरूच्या नावापुढे 'शिवाचार्य' असे पद लावता. आचार्य, शिवाचार्य, महाचार्य इत्यादी. 'आचार्य' शब्दाचा अर्थ कोणता? ज. रेणुकाचार्य तो अत्यंत समर्पक शब्दांत सांगतात-

**आचिनोति च शास्त्रार्थानाचारे स्थापयत्यलम्।**
**स्वयमाचरते यस्मादाचार्यस्तेन चोच्यते।।१५.९।।**

जगात अनेक शास्त्रे आहेत. वेद, उपनिषदे, आगमे, पुराणे आणि अनेक दर्शने. या सर्व शास्त्रांचे अध्ययन गुरूला करावे लागते. शास्त्रे अनेक आहेत. त्या साऱ्यांचे अध्ययन गुरूने करायला हवे. परंतु ते शक्य झाले नाही तर स्वत:च्या धर्मशास्त्राचे तरी परिपूर्ण अध्ययन केले पाहिजे. नाहीतर ते गुरुपदाला पात्र ठरणार नाहीत. आपल्या

धर्मग्रंथाचे गुरूला सूक्ष्म अध्ययन करावे लागते. मधमाशी प्रत्येक फुलातला मध गोळा करून पोळ्यात संग्रहित करते. तिच्या मधुसंचयाचा अनेकांना उपयोग होतो. एखादे औषध तुमच्या हातावर देऊन 'हे औषध मधातून घ्या' असे सांगितले तर तुम्ही काय कराल? मधमाशी या जगात अस्तित्वात नसती तर मधाचे पोळेही निर्माण झाले नसते. तुमच्या हाती अनेक फुले देऊन या 'फुलांतील मध काढा आणि त्या मधात औषध घ्या' असे म्हटले तर तुम्ही फुलातला मध काढू शकाल? फक्त मधमाशीच मध गोळा करू शकते. दुसरा प्राणी ते कार्य करू शकणार नाही. तसे सर्व शास्त्रांचे अध्ययन करण्याची कुवत एका माणसात नसते. एक तास प्रवचन ऐकण्याइतका वेळ तुमच्याकडे नसतो तर शास्त्रांचे अध्ययन करण्याइतका वेळ कुठे असणार?

तासभर प्रवचन करायचे असेल तर त्यासाठी चार तास तयारी करावी लागते. लोकांना कसे समजावून सांगायचे याची तयारी करावी लागते, दृष्टान्तकथा आठवून ठेवाव्या लागतात, शास्त्रवचनांचा संग्रह करून ठेवावा लागतो, युक्तिवादाची तयारी करावी लागते. एवढे केल्यावर एक तासभर बोलता येते. ज्यांना एक तास प्रवचन ऐकण्याइतकी फुरसत नाही अशा लोकांसमोर ग्रंथाचा ढीग ठेवून काय उपयोग? बरेच लोक आम्हाला सांगतात की, 'महाराज, तुमचे पुस्तक आम्ही विकत घेतले आहे, पण ते अजून पूर्ण वाचले नाही.' पुस्तकाचे पानच उघडून पाहिलेले नसते तर वाचण्याचे नाव कशाला? वाचायला वेळ मिळाला नाही तरी ग्रंथ घरात ठेवावा. तो तुमच्या नाही तर कुणाच्या तरी उपयोगी पडेलच. खरे तर इष्टलिंगाची पूजा जेवढ्या निष्ठेने करायची असते तेवढ्याच निष्ठेने आपल्या धर्मग्रंथाचे पठण-पारायण देखील करायचे असते. म्हणून इष्टलिंगपूजेनंतर 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील एक श्लोक आणि त्याचा भावार्थ तरी वाचायला पाहिजे. सुरुवातीला त्याचा अर्थ ध्यानात येणार नाही, परंतु पुन्हा पुन्हा वाचत गेल्यावर त्याचे आकलन होऊ लागते. ग्रंथ वाचता वाचता तुमच्यावर गुरुकृपा होईल. तुम्हाला अगदीच काही कळले नाही तर तुम्ही गुरूचे नाव घेऊन रडू शकता. श्रीकृष्णासमोर अर्जुनाला विषाद होऊन तो रडला, हे तुम्हाला माहीत आहेच. आपणही रडतो, पण कुठे? प्रेतासमोर. शवासमोर बसून आपण रडतो, परंतु शिवासमोर बसून रडत नाही. शवासमोर बसून रडले तर तुमचे रडणे ऐकतो काय? ऐकणारे कोणीच नसतात, सारे रडणारेच असतात.

म्हणून तुम्हाला रडायचेच असेल तर शिवासमोर बसून मनसोक्त रडा. तेव्हा तुमचे रडणे देखील एक 'योग' होईल. भगवंताला पाहणे हा जर 'योग' आहे तर भगवंतासमोर रडणे हा देखील एक 'योग' होय. याच योगाला गीतेत 'विषादयोग' असे म्हटले आहे. दुःखाने देखील तुम्ही भगवंताशी संबंध जोडू शकता. आपण रडावे भगवंतासाठी आणि हसावे तेही भगवंतासाठी. 'आपण जो संस्कृतमध्ये उपदेश केला तो मला समजला नाही. त्याचा मराठी भावार्थ देखील मला आकळला नाही. मी काय करू?' या भावनेने तुम्ही रडलात आणि भगवंताचे ध्यान केले तर आजा ना उद्या तुम्हाला त्याचा अर्थ कळू लागेल. ज्यांच्यासाठी ज. रेणुकाचार्यांनी उपदेश केला, त्यांना जर तो कळला नाही तर काय उपयोग? म्हणून श्रद्धेने तुम्ही पठण केले तर तुम्हाला श्लोकार्थ नक्कीच कळेल. जेवढी श्रद्धा तुम्ही ज. रेणुकाचार्यांवर ठेवता तेवढीच श्रद्धा त्यांच्या उपदेशावर- श्रीसिद्धान्तशिखामणीवर- ठेवली पाहिजे. कारण ग्रंथ ही ग्रंथकर्त्याची वाङ्मयी मूर्तीच असते.

काशीत मधुसूदन सरस्वती नावाचे एक महापंडित होते. त्यांची 'मधुसूदनी टीका' प्रसिद्ध आहे. ते गीतेवर भाष्य लिहायला बसले त्यावेळी त्यांच्यासमोर एक श्लोक आला-

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्।। गीता, ९.२२।।

हा श्लोक वाचताच ते थांबले, त्यांना 'वहाम्यहम्' हा शब्द अनुचित वाटला. ईश्वर स्वतः ओझे वाहतो हे काही त्यांना योग्य वाटेना. ईश्वर सर्वशक्तिमान आहे. तो भक्ताच्या घरी धान्य-धन घेऊन कोणालाही पाठवू शकेल. तो कशाला वाहत बसेल असे त्यांना वाटले. म्हणून त्यांनी 'वहाम्यहम्' शब्दावर लेखणीने तीन रेघा मारून तो शब्द खोडला आणि त्याच्याजागी 'ददाम्यहम्' असा शब्द लिहिला. नंतर ते गंगास्नान करायला गेले.

मधुसूदन सरस्वती पंडित होते, परंतु निर्धन होते. आज काय खायचे, अशी भ्रांत त्यांना रोजच पडत असे. इकडे त्यांच्या घरी सावळ्या रंगाचा, आठ वर्षे वयाचा एक तेजस्वी बालक धान्याने भरलेले गाठोडे घेऊन गेला. तो त्यांच्या पत्नीच्या स्वाधीन करून म्हणाला, 'पंडितजींनी माझ्यासोबत हे धान्य पाठविले आहे, ते घ्या, परंतु धान्य पाठवताना माझ्या गालावर त्यांनी चापट मारली. ही बघा, तीन बोटे माझ्या गालावर उमटलेली आहेत.'

त्यांनी पाहिले तो खरेच त्याच्या कोवळ्या गालावर तीन बोटे स्पष्ट उठून दिसत होती. पत्नीला वाटले, आपला नवरा महापंडित आहे पण त्याच्या ठिकाणी थोडी देखील प्रेमभावना नाही असे दिसते. नाहीतर या कोवळ्या बाळाच्या गालावर त्यांनी प्रहार कशाला केला असता?

बालक निघून गेला आणि गंगास्नान करून विश्वेश्वराचे दर्शन घेऊन पंडित घरी आले. तेव्हा पत्नीने घरी घडलेली हकीकत त्यांना सांगितली. ती ऐकल्यावर त्यांना आपली चूक कळून आली. आपण 'वहाम्यहम्' शब्दावर तीन रेघा मारल्या म्हणजे श्रीकृष्णाच्या गालावर जणू तीन बोटे उमटवली. 'वहाम्यहम्' हा शब्द बरोबर आहे हे सिद्ध करण्यासाठी बालकाच्या रूपाने श्रीकृष्णानेच आपल्या घरात धान्य आणून टाकले, हे त्यांनी ओळखले.

गीता हे नुसते पुस्तक नसून ती भगवान श्रीकृष्णाची वाङ्मयी मूर्ती आहे, त्याचेच रूप आहे, असा या कथेचा अर्थ आहे. म्हणून जो ग्रंथ निर्माण करतो त्याचा त्या ग्रंथात निवास असतो. गीतेमध्ये भगवान श्रीकृष्णाचे नित्य वास्तव्य आहे तसेच 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त ज. रेणुकाचार्यांचे नित्य वास्तव्य आहे. म्हणून ग्रंथ वाचता वाचता श्रीगुरूची म्हणजे ज. रेणुकाचार्यांची तुमच्यावर कृपा होईल आणि ग्रंथाचा अर्थ तुम्हाला समजू लागेल. महर्षी अगस्त्यांना ज. रेणुकाचार्यांनी उपदेश केलेला असला तरी तो आज साऱ्या मानवजातीला कल्याणप्रद आहे. म्हणून या ग्रंथावर नितांत श्रद्धा ठेवावी. आपले जीवन उजळून घ्यावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
४ ऑगस्ट १९९२

## दीक्षागुरुस्थल–४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा केवळ ग्रंथ नसून ज. रेणुकाचार्यांचे ते एक रूप आहे, असे कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले आहे. 'आचार्य' शब्दाचे लक्षण एका श्लोकात सांगितले आहे, गुरूचेच दुसरे नाव आचार्य असे आहे. जो शास्त्राचे उत्तम अध्ययन करतो, त्याप्रमाणे स्वत: आचरण करतो आणि शिष्यांना त्याचा उपदेश करून त्यांनाही आचरणाला जो प्रवृत्त करतो त्यालाच 'आचार्य' असे म्हणतात. ज्ञान आणि आचार या दोन्ही गोष्टींना आपल्या जीवनात अपार महत्त्व आहे. आपण खूप ज्ञानी असलो तरी ते ज्ञान जर आपल्या आचरणात उतरले नाही तर आपले ज्ञान कवडीमोलाचे आहे असे म्हटले पाहिजे. विद्यारण्य स्वामींनी 'पंचदशी' या ग्रंथात याविषयी सुंदर दृष्टान्त दिला आहे. ज्ञानी मनुष्य जर दुराचारी असेल तर ते त्याच्या ज्ञानाला जगात किंमत नसते. हे सांगताना ते म्हणतात– गाईचे अमृत मधुर दूध जर मानवी कवटीमध्ये भरून प्यायला दिले तर ते कोणी प्राशन करील काय? गाईचे दूध अत्यंत पवित्र आणि गोड आहे हे खरे, परंतु ते ज्या पात्रात दिले ते पात्र अपवित्र आहे. मग ते कसे प्यायचे? पात्र अशुद्ध असल्यामुळे त्यातील दूध माणूस प्यायला तयार नसतो. त्याप्रमाणे आचारहीन मनुष्याजवळ प्रचंड ज्ञानभांडार असले तरी त्याचा समाजाला काही उपयोग नाही. ज्ञानामुळे तो स्वत: फार तर मुक्त होऊ शकेल, परंतु त्याच्याकडून इतरांचा उद्धार होणार नाही.

म्हणून ज्यांनी लोककल्याणासाठी देहधारण केला आहे अशा आचार्यांना शुद्धाचरण करावे लागते. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त ज. रेणुकाचार्य सांगतात की, आचार हा एक सुंदर अलंकार आहे.

**आचार एव सर्वेषा अलंकाराय कल्प्यते।**
**आचारहीन: पुरुषो लोके भवति निंदित:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.१३)

आचाराला सुंदर अलंकाराची उपमा दिली आहे. आपण उत्तमोत्तम पोषाख धारण करतो. सुवर्णलंकारांनी शरीर भूषवतो. आपण सुंदर दिसावे अशी आपली इच्छा असते. कारण शरीर हे स्वभावत: अमंगल आहे. म्हणून बाहेर जाताना आपले शरीर नीटनेटके आहे की नाही हे आरशात पहावे लागते. शरीराची नवद्वारे सतत काही ना काहीतरी बाहेर टाकत असतात. डोळ्यांतून, कानांतून, नाकातून, तोंडातून, रोमरंध्रांमधून सतत काही ना काही बाहेर वाहत असते. म्हणून शरीराला स्वच्छ धुतात, त्याच्यावर सुगंधी द्रव्ये चोपडतात. त्याला उत्तम कपड्यांनी झाकून टाकतात. चोवीस तास शरीराभोवती लपेटलेली वस्त्रे मलीन होतात. म्हणून शरीराला सजवावे, नटवावे लागते, तेव्हाच ते इतरांसाठी प्रेक्षणीय ठरते. मनुष्य जेवतो ते स्वत:साठी, परंतु कपडे आणि अलंकार घालतो ते दुसऱ्यांसाठी. शरीराला कसे नटवावे याचे तंत्र आपल्याला माहीत आहे. आजच्या काळात तर शरीर नटवण्याची आणि सौंदर्य वाढवण्याची दुकाने निघाली आहेत. 'ब्युटीपार्लर' म्हणजे दुसरे काय आहे? आपल्या सूक्ष्मशरीराला कसे नटवावे, सजवावे याचे दुकान मात्र बाजारात सापडणार नाही. आमचा हा कार्यक्रम म्हणजेच ते दुकान आहे, असे समजायला हरकत नाही.

शरीराला जसे वस्त्रालंकारांनी सजवतात तसेच आपल्या सूक्ष्मदेहाला म्हणजे मनाला सद्‌गुणांनी सजवता येते. ज्याचे आचरण सुंदर तोच खरा सुंदर होय. चेहरा कितीही सुंदर असला आणि चरित्र जर गढूळ असेल तर त्या सौंदर्याला काही अर्थ नाही. शरीरसौंदर्याबरोबरच आपल्या मनाचेही सौंदर्य वाढवायचा प्रयत्न करायला हवा. देहाची आपण जेवढी काळजी घेतो तेवढी मनाची घेत नाही. शरीर हे स्थूल असल्याने साऱ्यांना दिसते, म्हणून आपण त्याची अधिक काळजी घेतो, परंतु मन अत्यंत सूक्ष्म असल्याने इतरांना दिसत नाही, म्हणून आपण त्याच्याकडे दुर्लक्ष करतो. थोडा सर्दी-खोकला झाला की आपण डॉक्टरकडे जातो, औषधे घेतो. डॉक्टर सांगतील त्याप्रमाणे वागून आपण चटकन स्वस्थ होण्याचा प्रयत्न करतो. जसे स्थूलशरीराचे आजार असतात तसेच सूक्ष्मशरीराचे म्हणजे मनाचेही आजार असतात. गीतेत श्रीकृष्णाने अर्जुनाला म्हटले आहे- 'युध्वस्व विगतज्वर:' शस्त्रास्त्रांचा त्याग करून अर्जुन जेव्हा युद्धभूमीवरून पळू पहात होता तेव्हा त्याला काय झाले होते? ज्वर झाला होता. एखाद्याला ज्वर झाला तर त्याला खाणे-पिणे-पहाणे आवडत नाही, तर झोपून रहाणे बरे वाटते. तसा युद्ध सोडून जाऊ पाहणाऱ्या अर्जुनाला मोहज्वर झाला होता. आपल्याच आप्तांना कसे मारायचे? ज्यांना मारल्यानंतर आपण देखील जगू शकणार नाही, त्यांना कसे मारायचे? अर्जुनाची आप्ताबद्दलची ही भावना म्हणजेच मोहज्वर होय. त्याचा मोह नष्ट करण्यासाठीच तर गीतेचा जन्म झाला.

स्थूलशरीराला येणारा ज्वर एक आहे. परंतु सूक्ष्मशरीराला येणारे ज्वर अनेक आहेत. कामज्वर, क्रोधज्वर, लोभज्वर, मदज्वर, मोहज्वर, मत्सरज्वर असे सहाप्रकारचे ज्वर प्रत्येकाच्या सूक्ष्मशरीरामध्ये असतात. ज्वरामुळे शरीरात उष्णता वाढते. शरीरातले पाणी सुकून जाते. शरीराचे तापमान योग्य असते तेव्हाच मनुष्य स्वस्थ असतो. ते वाढले तर त्याचे काही खरे नाही. शरीराला ताप भरला तर मस्तकावर थंड पाण्याची पट्टी ठेवतात. पण मनाला ताप आल्यावर तसे कोणी केले आहे? नाही. मग आपल्या सूक्ष्मशरीराचे औषध म्हणजेच हा सत्संग. सद्ग्रंथांचे अध्ययन, भगवन्नामाचा जप ही सूक्ष्मशरीराच्या रोगांवरील औषधे होत. म्हणून सूक्ष्मशरीरातील रोग दूर करून त्याला सद्‌गुणांनी सजवावे लागते.

आचरण केवळ आचार्यांसाठीच नसते, सर्वांसाठी असते. जो सांगतो आणि जो ऐकतो त्या दोघांसाठीही! आचार्यांचा उपदेश ऐकणे म्हणजेच आचारशील होणे. गुणांनी आपले मन सजवले पाहिजे. ज्ञान आणि आचरण याचा समन्वय ज्यांच्या जीवनात होतो ते सुखी होत. वस्त्रात उभे-आडवे धागे असतात. त्यांना ताणा-बाणा म्हणतात. उभ्या-आडव्या धाग्यांशिवाय वस्त्र विणले जात नाही. त्यासाठी उभ्या-आडव्या दोन्ही धाग्यांची आवश्यकता असते. त्याप्रमाणे ज्ञान आणि आचरण या ताण्या-बाण्यांनी ज्यांचे जीवनवस्त्र विणले जाते ते धन्य होत. केवळ ज्ञान म्हणजे पांडित्यदर्शन आणि केवळ आचार म्हणजे कर्मठपणा. ज्ञानामुळे कर्माला डोळसपणा येतो आणि कर्मामुळे ज्ञान सक्रिय होते. ज्ञानावाचून केलेले कर्म अनर्थकारी असते, हे 'पंचतंत्रा'त राजा आणि माकड या कथेत सांगितले आहे.

एका राजाने एक माकड पाळले होते. ते राजाला अत्यंत प्रिय असते. उठताना, बसताना, जेवताना, झोपताना माकड राजासोबतच रहात होते. एकदा मेजवाणी झोडून राजा गाढ झोपला होता. एक माशी सारखी त्याच्या गालावर बसत होती. माकडाने ते पाहिले. त्याला माशीचा राग आला. त्याने एकदा-दोनदा-तीनदा आपल्या भाषेत माशीला 'उडून जा' असे बजावले. तिला त्याची भाषा कळण्याची शक्यता नव्हती. ती राजाच्या गालावर आरामात बसली. माकडाला राग आला. माशीला चांगलाच धडा शिकवला पाहिजे. असा त्याने विचार केला

आणि जवळची तलवार उचलून त्या माशीवर वार केला. माशी तर उडून गेली, पण राजाचा चेहरा रक्तबंबाळ झाला. मोठ्याने ओरडत तो जागा झाला.

माकडाला राजाचे वाईट करायचे नव्हते. मारायचे होते माशीला. परंतु आपल्या कृत्याने कोणता अनर्थ घडेल याचे ज्ञान माकडला नव्हते. ज्ञानाच्या अभावामुळे राजाचे रक्षण करणाऱ्या माकडानेच राजाला मारले. त्याप्रमाणे आपल्याला आचरणाचे ज्ञान नसेल तर त्यांचा दुष्परिणाम होतो.

भगवान शिव ज्ञानी आणि आचारसंपन्न आहेत. त्यांची कृपा संपादन करायची असेल तर आपल्याला आचारसंपन्न व्हावे लागेल आणि ज्ञानी देखील व्हावे लागेल. ज्ञानी आचारशील पुरुषावर भगवान शिवाची निरंतर कृपा असते. म्हणून ज्यांना समाजाचे कल्याण करायचे आहे अशा व्यक्तीने आचरणशील झाले पाहिजे.

आचार्यांनी सदाचरण करावे आणि ते पाहून शिष्यांनीही त्यांचे अनुकरण करावे. उपदेश दोन प्रकारचा असतो. शब्दांनी सांगता येते आणि आचरणाने दाखवून देता येते. आचरण हा देखील एक प्रकारचा उपदेशच होय. आपण जे सांगतो ते आचरणात आणले तर त्याचा लोकांवर प्रभाव पडतो. म्हणून आचरण हा एक अलंकार मानला जातो. हा अलंकार चोराला चोरून नेता येत नाही आणि अनवधानाने तो हरवत देखील नाही. हे शरीर सोडून आपण दुसरा देह धारण केला तरी हा अलंकार आपल्या सोबत असतो. सुवर्णालंकाराच्या बाबतीत हे घडत नाही. मृत्यू झाल्यावर फार तर स्मशानात नेईपर्यंत शरीरावर अलंकार राहू देतील, नंतर काढतील. सोन्याचे अलंकार जन्मजन्मांतरात सोबत करू शकत नाहीत. मृत्यूनंतर शरीरावर ठेवत नाहीत. कारण शरीर हे मृण्मय असते. ते पंचमहाभूतांनी घडलेले असते आणि मृत्यूनंतर ते पंचमहाभूतांतच विलीन होते. शरीरातला पृथ्वीचा अंश पृथ्वीतत्त्वात, जलाचा अंश जलतत्त्वात, तेजाचा अंश तेजतत्त्वात, वायूचा अंश वायुतत्त्वात आणि आकाशाचा अंश आकाशतत्त्वात विलीन होतो. पाचभौतिक देह येथेच ठेवून जीवात्मा आपल्या कर्माचे गाठोडे घेऊन लोकलोकान्तराच्या प्रवासाला निघून जातो. जीवात्मा जाताना काय घेऊन जातो?

**धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे नारी गृहद्वारि जनाः स्मशाने।**
**देहश्चितायां परलोकमार्गे धर्मानुगो गच्छति जीव एकः।।**

जीवात्मा जेव्हा देह सोडून जातो तेव्हा त्याचे सारे सगेसोयरे इथेच राहतात. धन भूमीत, गुरे गोठ्यात, पत्नी दारात, लोक स्मशानात, देह चितेवर. सारे काही येथेच राहते. त्याच्या सोबत राहते केवळ त्याचे कर्म.

एका राजाने एका माणसाला अपराध केल्याबद्दल मृत्युदंडाची शिक्षा ठोठावली. तेव्हा तो माणूस हात जोडून राजाला म्हणाला, ''महाराज, मी हे कर्म केवळ माझ्यासाठी केले नाही, तर इतरांसाठीही केलेले आहे.'' राजा म्हणाला, ''तसे साक्षीदार तू आणलेस तर मी तुला माफ करीन.''

तो मनुष्य आपल्या मित्रांकडे गेला. तेव्हा पहिला मित्र म्हणाला, ''काय सांगायचे असेल ते मी इथेच सांगेन, राजापर्यंत येणार नाही.''

तो मनुष्य दुसऱ्या मित्राकडे गेला आणि त्याने साक्ष देण्यासाठी आपल्यासोबत येण्याची त्याला विनंती केली. तेव्हा तो मित्र म्हणाला, ''मी येईन, पण राजवाड्याच्या दारापर्यंतच. आत मात्र येणार नाही.''

मग तो माणूस तिसऱ्या मित्राकडे गेला आणि त्याने राजासमोर येऊन आपल्या वतीने साक्ष देण्याची विनंती केली. त्या मित्राने ती मान्य केली.

हे तीन मित्र कोण आहेत? पहिला मित्र म्हणजे घर, शेती या स्थावर गोष्टी होत. तुम्ही खूप शेती खरेदी केली किंवा फार मोठे घर बांधले तरी तुमची साक्ष देण्यासाठी ते तुमच्या सोबत येऊ शकत नाहीत. ''काय सांगायचे ते इथेच सांगू'' असेच ते म्हणतात. दुसरा मित्र म्हणजे त्याच्या परिवारातील माणसे. ते त्याच्यासोबत घरातून बाहेर येऊ शकतात, पण कुठपर्यात? स्मशानापर्यंत. प्रेताला गाडण्यासाठी जे घर बनवतात त्याबद्दल एका हिंदी कवीने म्हटले आहे–

**घर बनाया दरवाजा नही।**
**पडोसी बहोत है लेकीन बात नही।।**

त्या घराला ना दार असते ना खिडकी. जिवंतपणी आपण किती सुरेख घर बांधतो! सुरेख दरवाजे आणि हवा–प्रकाशासाठी प्रशस्त खिडक्या. पण आपल्यासाठी जमिनीत जे घर करतात त्याला दार नसते आणि खिडक्याही नसतात. तिथे अंधारच अंधार असतो. तिथे अवतीभवती अनेक शेजारी असतात. असेच आपापल्या घरात बसलेले. परंतु कुणीही कुणाशी बोलत नसते. त्याने काय केले ते, हा ऐकत नसतो आणि ह्याने काय केले ते, तो ऐकत नसतो. सारे मुक्यांचे साम्राज्य. म्हणून आपले मित्र, नातेवाईक त्या घराच्या दारापर्यंत येतात. परंतु आत मात्र कुणीही येत नाही. आपल्याला त्या अंधाऱ्या घरात आणि त्याच्याही पलीकडे नव्या जीवनात सोबत करणारा एकच जिवाभावाचा मित्र असतो. तो म्हणजे आपले कर्म. ते पुण्य असेल अथवा पाप असेल, पण ते आपली सदैव सोबत करत असते.

म्हणून शास्त्रकार म्हणतात की, तुम्ही असे अलंकार धारण करा की जे कुणी कधी हिरावून घेणार नाही, जे कधी हरवणार नाहीत. आपले सूक्ष्मशरीर आपल्या सोबतच असते. स्थूलशरीर आपण इथेच सोडून देतो. परंतु सूक्ष्मशरीर जीवात्म्याला घट्ट चिकटलेले असते. म्हणून आपण सद्गुण बाणवून घेतले तर ते मृत्यूनंतरही आपली सोबत करतात. शुद्धाचरणाने पुण्यसंचय झाला तर पुढच्या जन्मात सुखी जीवनाचा लाभ होतो. आचार्यांसाठी जशी आचरणाची गरज आहे तशी त्यांच्या भक्तांसाठी देखील आचरणाची गरज आहे. आपले जीवन सुंदर, सुखी बनवण्यासाठी शुद्धाचरण हाच अलंकार धारण करायला हवा. सर्व शास्त्रांचे अध्ययन करणे, त्याप्रमाणे स्वत: आचरण करणे, आपल्या शिष्यांना आचरणशील बनवणे हे आचार्यांचे परमकर्तव्य आहे. ज. रेणुकाचार्यांनी जो उपदेश केला त्याप्रमाणेच त्यांनी आचरण देखील केले. त्यांची ज्ञानधारा युगायुगांपासून वाहत आली आहे. त्यात आपण सुस्नात व्हावे. त्यात सुस्नात झाल्यावर 'सत्यं शिवं सुंदरं' अशा परशिवाच्या साक्षात्कारासाठी आपण पात्र ठरू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
६ ऑगस्ट १९९२



## दीक्षागुरुस्थल–५

जिज्ञासू सद्भक्तांनो,

वीरशैवसिद्धान्तातच नव्हे तर भारतीय संस्कृतीत श्रीगुरूला अत्यंत श्रेष्ठ स्थान दिले जाते. शिष्याला शिवतत्त्वाचे ज्ञान देऊन त्याची आध्यात्मिक प्रगती श्रीगुरूच घडवून आणतात. म्हणून शिष्याने मनोभावे श्रीगुरूंची सेवा करावी. त्याचे चरणतीर्थ घ्यावे. असे केल्याने त्याच्या ठिकाणी असलेला अहंकार हळूहळू नष्ट होत जातो. श्रीगुरूच्या पादतीर्थाचे महत्त्व वीरशैव संतकवी श्रीमन्मथस्वामींनी मोठ्या बहारीने आणि उत्कटतेने गायले आहे. ते आपल्या 'परमरहस्य' या ग्रंथात म्हणतात–

**गंगातीर्थी एक अवगुण। खोलिये जाता जाय बुडोन।**
**परि गुरुतीर्थ तारण। करी भावे सेविता।।**

मन्मथस्वामी म्हणतात– आपली पापे नष्ट करण्यासाठी माणसे गंगेत जाऊन स्नान करतात. त्यामुळे त्यांची पापे नष्ट होतात, हे खरे असले तरी गंगेच्या ठिकाणी एक मोठा दोष आहे. ज्याला पोहायला येत नाही असा माणूस जर चुकून खोल पाण्यात गेला तर तो बुडून मरण्याची शक्यता असते. गंगा पापनाशिनी आहे, परंतु क्वचित् ती जीव देखील घेऊ शकते. गुरूचे चरणतीर्थ मात्र या दोषांपासून अलिप्त आहे. जो त्याचे सेवन करतो तो बुडत नाही तर तरतो, संसारसागर पार करतो.

आपली पापे गंगेत धुतली जातात आणि गंगा दूषित होते. मग ती या पापांचे काय करते? ती ही पापे कुठे धुते? ते जेव्हा सत्पुरुष, सद्गुरू गंगेत आपली पावले बुडवतात तेव्हा ती सारे पापे त्यांच्या चरणी अर्पण करते. तुम्हाला वाटेल की गुरुजनांना पाप लागल्यावर पापांचे काय होते? गुरुचरणांना अग्नीसमान मानले जाते. देवरदासिमय्या नामक कन्नड संताच्या एका वचनाचा आशय असा आहे– जळत्या अग्नीत गवताची काडी टाकली तर ती तत्काळ जळून अग्निरूप होते, त्याप्रमाणे गुरुचरणरूपी अग्नीवर जो आपले मस्तक टेकवतो त्याची सर्व पापे जळून जातात आणि तो लिंगरूप होतो.

संत नामदेवांची कथा तुम्हाला माहीत आहे. त्यांचे गुरू विसोबा खेचर शिवलिंगावर पाय ठेवून झोपले होते. म्हणून नामदेवांनी त्यांचा पाय उचलून बाजूला ठेवला, तर त्या ठिकाणी लिंग उत्पन्न झाले. जिथे जिथे तो पाय ठेवायला गेला तिथे तिथे त्याला शिवलिंग दिसू लागले. 'जिथे शिवलिंग नाही तिथे माझा पाय ठेव' असा गुरूचा आदेश होता. शेवटी नामदेवाला वाटले– लिंग नाही असे एकच स्थान आहे, ते म्हणजे आपले मस्तक. मग त्याने श्रीगुरूचे पाय स्वतःच्या मस्तकावर ठेवले आणि त्याला ज्ञानप्राप्ती झाली. गुरूच्या चरणात एवढे सामर्थ्य असते. 'चरण' या शब्दाचा अर्थ आहे आचार, आचरण. चरणाला 'पाद' असेही म्हणतात.

गुरुजनांच्या आणि माता–पित्यांच्या चरणांचे वंदन रोज सकाळी, सायंकाळी करावे, असे शास्त्रात सांगितले आहे. चरणवंदन हे देखील आध्यात्मिक प्रगतीचे एक साधन मानले जाते. माणसाला काय हवे असते? आयुष्य, विद्या, संपत्ती, शारीरिक आणि मानसिक सामर्थ्य प्रत्येकाला हवे असते. गुरुजनांचे आणि मातापित्यांचे रोज चरणवंदन केले तर हे सारे सहज प्राप्त होऊ शकते. जो नमस्कार करतो त्याच्याबद्दल नमस्कार करवून घेणाऱ्याच्या मनात करुणाभाव उत्पन्न होतो. त्याचे हृदय द्रवते. नमस्कार करणाऱ्याला काहीतरी दिले पाहिजे, असे त्यांना

वाटते. लहान मुले जेव्हा तुमच्या पाया पडतात तुम्ही त्यांना काहीतरी देता. एखादे चॉकलेट, एखादी गोळी, अगदी काहीच नसेल तर त्याच्या मस्तकावर प्रेमाने हात तरी ठेवता. तो देखील एक प्रकारचा आशीर्वाद होतो. तुमचे काही ना काही पुण्य त्याच्यासाठी वेचले जाते. आचारशील असल्यामुळे गुरूचे चरण वंदनीय असतात. प्रत्येकाच्या मनात अहंकार दबा धरून बसलेला असतो. नमस्कार करताना मनुष्य नम्र होतो. त्याचा अहंकार झुकतो, कमी होतो. अहंकाराचा नाश झाल्याशिवाय परमात्म्याची प्राप्ती होत नाही.

एका गावात एक साधुमहाराज आले. एका उंच टेकडीवर झोपडी बांधून राहू लागले. गावातली भोळी भाबडी माणसे त्यांच्या दर्शनासाठी रोज टेकडीवर जाऊ लागली. त्यांचा उपदेश ऐकून धन्य होऊ लागली. त्या गावात एक अत्यंत विद्वान मनुष्य होता. विद्यापीठाच्या सर्व पदव्या त्याने मिळवल्या होत्या. टेकडीवरच्या महाराजाकडे मात्र कोणतीही पदवी नव्हती. ते आपल्या अनुभवानेच काहीतरी शिकले होते.

एके दिवशी त्या विद्वान गृहस्थाला वाटले की, महाराजाच्या ज्ञानाची परीक्षा घ्यावी. म्हणून तो टेकडी चढण्याचे कष्ट घेऊन महाराजांकडे आला. बिचारा पार थकून गेला होता. महाराजांनी त्याचे स्वागत केले. महाराजांना नमस्कार न करताच तो त्यांच्या समोर ताठ उभा राहिला. आणि त्याने महाराजांवर प्रश्नांचा भडिमार केला–

''तुम्ही किती शिकलात? तुम्हाला काय काय येते? तुम्हाला किती भाषा अवगत आहेत? तुम्ही किती शास्त्रांचे अध्ययन केले आहे? ब्रह्म म्हणजे काय? जीव म्हणजे काय? जग कसे निर्माण झाले?''

असे एक नव्हे, अनेक प्रश्न त्याने भराभर विचारले. अर्धा तास त्याने प्रश्न विचारले. याच्या डोक्यात खूप काही भरलेले आहे, हे महाराजांनी ओळखले. प्रश्न विचारून तो गप्प झाला तेव्हा महाराजांनी विचारले, ''तुमचे प्रश्न विचारून संपले? की अजून काही शिल्लक आहेत?''

''जेवढे प्रश्न मी विचारले त्यांची उत्तरे तुम्ही द्या. त्यानंतर मी पुन्हा प्रश्न विचारीन. माझ्याकडे प्रश्नांचा खूप साठा आहे.'' तो म्हणाला.

''तुमच्या प्रश्नांची उत्तरे मी नंतर देईन,'' महाराज म्हणाले, ''तुम्ही टेकडी चढून वर आलात. तुम्हाला थकवा आला असेल. पहिल्यांदा चहा, कॉफी, दूध काहीतरी घ्या. थोडी विश्रांती घ्या. मग मी तुमच्या प्रश्नांची उत्तरे देईन. बोला काय घेणार?''

''आपल्याकडे ही व्यवस्था आहे?'' त्याने विचारले.

''होय'', महाराज उत्तरले, ''तुमच्यासारख्या लोकांसाठी ही व्यवस्था ठेवावीच लागते.''

''मग मी चहा घेईन.''

महाराज आत गेले. एका हातात चहाचे भांडे आणि दुसऱ्या हातात रिकामी कपबशी घेऊन ते बाहेर आले. त्यांनी विद्वान गृहस्थाच्या हातात रिकामी कपबशी दिली आणि तिच्यात ते चहा ओतू लागले. कप पूर्ण भरून चहा बशीत पडू लागला. हळूहळू बशी देखील पूर्ण भरली, तेव्हा तो विद्वान महाराजांना म्हणाला, ''महाराज, तुम्हाला काही कळते की नाही? कपबशी पूर्ण भरली आहे. आता एक थेंब जरी ओतला तर चहा खाली सांडेल. मला थोडा चहा पिऊ द्या. बशी रिकामी झाल्यावर वाटल्यास पुन्हा ओता.''

महाराज हसले. त्यांनी चहा ओतणे थांबवले. त्या गृहस्थाने चहा पिऊन टाकला. त्यानंतर तो महाराजांना म्हणाला, ''महाराज, आता माझ्या प्रश्नांची उत्तरे द्या.''

''तुमच्या प्रश्नांची उत्तरे तर मी मघाच दिली.'' महाराज म्हणाले.

''तुम्ही अजून काही बोललाच नाही तर प्रश्नाचे उत्तर कधी दिले?'' त्याने आश्चर्याने विचारले.

''मी मघा तुमच्या कपबशीत चहा ओतत होतो तेव्हा तुम्ही चहा ओतायला मनाई का केली?''

''आणखी चहा ओतला असता तर तो जमिनीवर सांडला असता.'' गृहस्थ म्हणाला.

''त्या कपबशीप्रमाणेच तुमचे डोके पूर्ण भरलेले आहे.'' महाराज हसून म्हणाले, ''त्यात मी जे काही टाकीन ते खालीच पडणार. मग ते टाकून तरी काय उपयोग? तुम्ही आल्याबरोबर साष्टांग नमस्कार केला असता तर तुमचे डोके झुकल्यामुळे थोडे रिकामे झाले असते. मग मी त्यात काही भरू शकलो असतो. तुमचे डोके आधीच पूर्ण भरलेले आहे. त्यात मी आणखी काय घालणार?''

त्या विद्वान गृहस्थाला आपली चूक उमगली आणि तो खजील झाला.

आपण जेव्हा गुरूकडे जातो तेव्हा प्रथम दंडवत घालतो. नमस्कारांत एकांग, त्र्यंग, पंचांग आणि साष्टांग असे चार प्रकार आहेत. रस्त्याने चालताना गुरूकडे पाहून आदराने मस्तक झुकवणे, केवळ मस्तक हेच एक झुकवणे म्हणजे 'एकांग नमस्कार' होय. दोन्ही हात जोडून मस्तक झुकवून तीन अंगांनी केला जाणारा नमस्कार हा 'त्र्यंग नमस्कार' होय. दोन्ही गुढगे जमिनीवर टेकवून दोन्ही हात जोडून मस्तक खाली झुकवून पाच अंगांनी केलेला नमस्कार म्हणजे 'पंचांग नमस्कार'. आपले शरीर एखाद्या दंडाप्रमाणे म्हणजे काठीप्रमाणे जमिनीवर झोकून देऊन केलेला दंडवत नमस्कार म्हणजे 'साष्टांग नमस्कार' होय. या नमस्कारात दोन हात, दोन पाय, वक्षस्थळ, पोट आणि मस्तक ही सात अंगे जमिनीला टेकतात आणि मन नम्र होते म्हणून याला 'साष्टांग' म्हणतात. तुम्ही जेवढे झुकाल तेवढा तुमचा अहंकार बाहेर पडून तुम्ही रिकामे व्हाल. जे थोडे झुकतात ते थोडे रिकामे होतात आणि त्यांना थोडेच मिळते. जो अधिक रिकामा होईल तो इथून अधिक घेऊन जाईल. गुरूसमोर गेल्यावर नमस्कार करताना लाज बाळगू नये, असे शास्त्रे सांगतात.

लाजलज्जा सोडून गुरूसमोर दंडवत प्रणाम करावा. आम्हाला लोकांना साष्टांग नमस्कार घालायची सक्ती करावी लागते. तीर्थ घ्यायला जेव्हा लोक येतात तेव्हा तसेच सरळसोट उभे राहतात. आम्ही इशारा केल्यावर नाईलाजाने साष्टांग नमस्कार घालतात. मनुष्य जसजसा झुकत जातो, नम्र होत जातो तसतसा त्याच्या मनातला अहंकार दूर होत जातो. एकांग नमस्काराने थोडासा अहंकार दूर होतो, त्र्यंग नमस्काराने त्यापेक्षा अधिक अहंकार दूर होतो. पंचांग नमस्काराने अर्धा अहंकार दूर होतो. साष्टांग नमस्काराने बारा आणे अहंकार नष्ट होतो आणि उर्वरीत अहंकार गुरूचे पादोदक प्राशन केल्याने नष्ट होतो. म्हणून आपल्या सिद्धान्तात गुरुपादोदकाला अत्यंत महत्त्व आहे. साष्टांग नमस्कार करून आणि गुरुपादोदकाचे सेवन करून सारा अहंकार दूर होतो आणि एक विलक्षण आनंद प्राप्त होतो. तुम्ही जोपर्यंत झुकणार नाही तोपर्यंत तुम्हाला कसलाही लाभ होणार नाही. तुम्ही नळावर पाणी भरायला गेलात आणि नळाच्या वर घागर ठेवली तर ती भरेल का? घागर झुकली तरच ती पाण्याने भरू शकेल. तुम्ही म्हणाल– 'माझी घागर अशी आहे, तशी आहे. सोन्याची आहे, चांदीची आहे, मी ती नळाखाली ठेवणार नाही, नळाच्या वरच ठेवीन'. तर ती पाण्याने कशी भरणार? गाईचे दूध दोहून प्यायचे असेल तर तिच्या पायाशीच बसले पाहिजे. तिच्या पाठीवर बसून चालणार नाही. तसे गुरूजवळचे ज्ञान संपादन करायचे असेल तर त्याच्या समोर झुकायला हवे, नम्र व्हायला हवे. अहंकारी मनुष्य झुकत नाही, म्हणून त्याला ज्ञानप्राप्ती होत नाही. ज्ञान संपादन करण्यासाठी, मनुष्याला झुकवण्यासाठी शास्त्रकारांनी सर्व क्रियांपेक्षा नमस्कारक्रियेला अधिक महत्त्व दिले आहे.

शिष्य गुरूजवळ गेला की गुरू त्याला सर्वप्रथम आचरण शिकवतो. एका गावात एक सत्पुरुष, सद्गुरू रहात

असेल तर त्याच्यामुळे संपूर्ण गावाचे आचरण सुधारते. गावात गुरूच नसेल, स्वामी नसेल तर गावाला आचरण कोण शिकवेल? गावात जंगम, शास्त्री किंवा शिवाचार्य असतील तर त्या गावाला आचरणाची दीक्षा मिळते. प्रत्येकाला आचार शिकवावा लागतो. आपल्या देशात अनेक संत होऊन गेले. त्यांच्या शिकवणीमुळे अनेक दुराचरणी लोक सन्मार्गाला लागले आहेत. महाराष्ट्रात मन्मथस्वामीसारखे वीरशैव संत आणि ज्ञानेश्वर–तुकारामांसारखे वारकरी संत होऊन गेले. एकेका संताच्या भोवती लक्षावधी लोक गोळा होतात, त्यांचा उपदेश ऐकून प्रभावित होतात आणि त्यांचे आचरण पाहून त्या मार्गावर चालण्याची प्रेरणा घेतात. 'महाजनो येन गतस्त पंथाः' सामान्य माणसे आपल्यासाठी स्वतंत्र वाट निर्माण करू शकत नाहीत. त्यांच्यासाठी कुणीतरी मार्ग निर्माण केला तरच ते त्या वाटेवर चालू शकतात. संतांनी कितीतरी कष्ट सहन करून आत्मोद्धाराची वाट निर्माण केली आहे. ते त्याच वाटेने चालत गेले आणि इतरांना आपल्या मागे येण्याची प्रेरणा दिली. महाराष्ट्रात ज्ञानेश्वर हे अत्यंत वंदनीय संत होऊन गेले. त्यांच्या 'ज्ञानेश्वरी'चे लोक अत्यंत श्रद्धेने पारायण करतात. पण 'ज्ञानेश्वर' होईपर्यंत त्यांना किती दुःख भोगावे लागले? किती मानहानी पत्करावी लागली? त्यांच्या जन्मामुळे त्यांच्या मातापित्यांना आत्महत्या करावी लागली. एक संत घडवण्यासाठी त्यांच्या परिवारातल्या कितीतरी लोकांना बलिदान करावे लागते, त्याग करावा लागतो. त्यानंतर एक संत निर्माण होतो आणि मग त्याच्याकडून लक्षावधी लोकांचा उद्धार होतो.

अनेक संप्रदायांत, प्रत्येक समाजात असे संत होऊन गेले आणि त्यांनी समाजाला प्रकाशाची वाट दाखवली. म्हणून ज. रेणुकाचार्य म्हणतात– 'आचरे स्थापयत्यलम्'. गुरू शिष्यांना प्रथम आचरण शिकवतो, नंतर ज्ञान देतो. लिंगपूजा कशी करावी, पादपूजा कशी करावी, पादोदकाचे सेवन कसे करावे, हे सारे लोकांना शिकवावे लागते. काही जणांना तर लिंगपूजा करताना लिंग कोणत्या हातावर घ्यावे हे देखील माहीत नसते. डाव्या हातावर लिंग ठेवा, असा आम्ही इशारा करत असतो. पण ते महाभाग उजव्या हातावर लिंग घेऊन आरामात बसलेले असतात. आमचा इशारा त्यांच्या ध्यानातच येत नाही. कारण लिंगपूजा केली तरच कळणार. ते कधी करतच नाहीत. म्हणून प्रत्येक माणसाला शिकवावे लागते.

अक्षरओळख करून देताना गुरू एकदाच अक्षर लिहून देतो, पण विद्यार्थ्याला मात्र ते शंभर वेळा गिरवावे लागते. मग ते अक्षर तो जन्मभर विसरत नाही. तुम्ही शब्द विसराल, परंतु अक्षरांचा विसर कधी पडणार नाही. कारण अक्षरांचा जेवढा अभ्यास केलेला असतो तेवढा शब्दाचा अभ्यास केलेला नसतो. गुरू तुम्हाला एकदा–दोनदा फार तर तीनदा समजावून सांगणार, पण त्यानंतर अभ्यास कोण करणार? तो तर तुम्हालाच करावा लागेल. लिंग डाव्या तळहातावर ठेवून त्याची पूजा केली जाते. काही लोकांना तीर्थ कसे घ्यावे याचे देखील ज्ञान नसते. या हातावरचे तीर्थ त्या हातावर घेऊन सेवन करतात. गुरूजवळ गेल्यावरच पादतीर्थ सेवन करावे असे नाही. तीर्थ तीन प्रकारचे असते. लिंगपादोदक, जंगमपादोदक आणि गुरुपादोदक. तुमच्या घरी कुलगुरू किंवा जगद्गुरू आल्यावर त्यांची पादपूजा करून जे तीर्थ तुम्हाला मिळते ते गुरुपादोदक होय. तुमच्या घरी आलेल्या जंगमाची पादपूजा करून जे तीर्थ मिळते ते जंगमपादोदक होय. गुरू आणि जंगम यांचे सान्निध्य तुम्हाला रोज लाभत नाही. काही प्रसंगविशेषी ते तुमच्या घरी येतात. म्हणून तुम्हाला रोज गुरुतीर्थ आणि जंगमतीर्थ मिळणार नाही. गुरू आणि जंगम घरी आल्यावरच त्यांचे तीर्थ घ्यायचे, रोज घ्यायचे नाही असे नाही. तुम्हाला ते रोजच घेतले पाहिजे. वीरशैवांच्या अष्टावरणांत पादोदक आणि प्रसाद ही पूजेची फळे मानली जातात. म्हणून त्यांचे नित्यसेवन घडले पाहिजे. तुम्ही शेतात एक झाड लावले. त्याला एकदाच पाणी घालून नंतर त्याकडे पूर्ण दुर्लक्ष केले तर

त्याची अवस्था काय होईल? ते सुकून जाईल. त्याप्रमाणे तुमच्या घरी कुलगुरू किंवा जगद्गुरू दहा वर्षांनी आल्यानंतर त्यांचे पादोदक घेतले तर तुमची अवस्था सुकलेल्या रोपट्यासारखी होईल.

वृक्षाला रोज पाणी घालावे लागते. त्याप्रमाणे वीरशैव साधकाला रोज गुरुपादोदक, जंगमपादोदक आणि लिंगपादोदक यांचे सेवन करावे लागते. पादोदकाचे सेवन केल्यावरच तुमची भक्ती देखील टवटवीत, हिरवीगार राहते. हिरव्याकंच वृक्षाकडूनच तुम्हाला फुले, फळे, सावली मिळेल. वठलेला वृक्ष तुम्हाला ते देऊ शकणार नाही. त्याला ना फूल, ना फळ, ना सावली देण्याचे बळ. म्हणून भक्तिरूपी वृक्ष वाढण्यासाठी आपल्याला रोज पादोदक-प्रसादाचे सेवन करावे लागते. तुमच्या घरी गुरू अथवा जंगम जरी आले नाहीत तरी तुमच्या देहावर इष्टलिंग असते. काहीजण श्रावण महिन्यातच खुंटीवरचे लिंग काढून गळ्यात घालतात. काहीजण जगद्गुरूंची पादपूजा करतानाच गळ्यात लिंग घालतात. दांपत्यपूजेसाठी येथे नाव नोंदवले की मग घरात लिंगाचा शोध सुरू होतो. गुरूने दीक्षासंस्कार करून गळ्यात लिंग बांधल्यावर ते शरीरापासून कधीही अलग होऊ नये, असे आपल्या सिद्धान्तात सांगितले आहे. हा देखील एक आचारच होय. याचे नाव आहे 'लिंगाचार'. इष्टलिंग शरीरावर निरंतर धारण करायला हवे. त्याची रोज पूजा करायला हवी. मन्मथस्वामींनी दिवसातून सहा वेळा लिंगपूजा करावी असे सांगितले. आपल्याला दिवसातून एकवेळ करणे देखील शक्य होत नाही. सूर्योदयापासून मध्यरात्रीपर्यंत सहा वेळा इष्टलिंगपूजा करावी, असे मन्मथस्वामी म्हणतात. हे ऐकून तुम्ही म्हणाल की रात्रंदिवस हाच उद्योग करावा की काय? सहा वेळा शक्य नसेल तर तीन वेळा पूजा करावी. ते शक्य नसेल तर दोन वेळा करावी, तेही शक्य नसेल एकवेळा तरी करावी. तीही शक्य नसेल तर स्वतःला वीरशैव अर्थात् लिंगायत म्हणवून घेण्याचे कारण नाही.

तुमच्याजवळ फार वेळ नसेल तर निदान पाच मिनिटे तरी लिंगपूजा करावी. जेवायला अर्धा तास पुरत नाही, लिंगपूजेसाठी पाच मिनिटे नकोत? लोक यात्रेसाठी काशीला येतात तेव्हा म्हणतात, 'चला चला भरभर देवदर्शन करा, मग निवांत जेवण करू.' देवदर्शन घाईघाईने करायचे आणि जेवण मात्र निवांत करायचे. यावरून तुमचे प्रेम जेवणावर अधिक आहे आणि देवावर कमी आहे हे दिसून येते. ज्यासाठी अधिक वेळ द्यायचा तिथे आपण कमी वेळ देतो आणि जिथे कमी वेळ द्यायचा तिथे आपण अधिक वेळ घालवतो. म्हणून दिवसातून एकदा तरी इष्टलिंगाची पूजा करावी. वेळ नसेल तर पाच मिनिटे का होईना पण पूजा करायला हवीच. इष्टलिंगाची एकाच वेळी तीनदा पूजा करावी. देवघरात गेल्यावर सज्जिकेतून लिंग बाहेर काढावे त्यावर पाणी घालून वस्त्राने पुसावे, भस्मादींनी त्याची पूजा करून, त्याला नमस्कार करून परत सज्जिकेत ठेवावे. एवढे केले की तुमची पहिली पूजा संपली. लिंगपूजेआधी तुम्हाला स्वतःच्या देहाची पूजा करावी लागते. 'शिवो भूत्वा यजेत्' तुम्ही तुमच्या मस्तकावर, कपाळावर, छातीवर, भुजांवर इ. पंधरा ठिकाणी त्रिपुंड्र भस्म धारण करता. भस्माने शरीर अलंकृत करावे लागते. भगवान शिवाला भस्म अत्यंत प्रिय आहे. तो ते सर्वांगावर धारण करतो. जे शिवाला प्रिय असते शिवभक्तालाही प्रिय वाटले पाहिजे. मन्मथस्वामी म्हणतात-

**रुद्राक्षांच्या माळा भस्म लावू भाळी। हेची चंद्रमौळी देई मज।।**

ते ईश्वराला मागतात की, माझ्याकडून गुरु-लिंग-जंगमाची सेवा घडावी. रुद्राक्षांच्या माळा धारण करण्यासाठी, कपाळावर भस्म धारण करण्यासाठी अवसर मिळावा. एवढे मला मिळाले की दुसरे काही नको. ज्यांचा आपण जयजयकार करतो, ज्यांच्या प्रतिमेची पूजा करतो, ज्यांच्या ग्रंथाचे पारायण करतो त्यांच्या आचरणाचा थोडा तरी

अंश आपल्या जीवनात उतरायला हवा.

आपल्या शरीराला भस्म लावून, त्यावर रुद्राक्ष धारण करून शरीराला सजवावे, त्याची पूजा करावी. ही दुसरी पूजा झाली. आपले भस्मांकित शरीर पाहून भगवान शिवाला आनंद वाटला पाहिजे. पतिव्रता स्त्री आपल्या पतीसाठी आपले शरीर सजवते, त्याप्रमाणे शिव हे आपले पती आहेत. त्यांना आवडेल तसे आपले शरीर शिवभक्ताने सजवले पाहिजे. आपल्या शरीराची अशी पूजा केल्यावर पुन्हा इष्टलिंग बाहेर काढून त्याची पूजा करावी. त्यानंतर इष्टलिंग तळहातावर ठेवून गुरुमंत्राचा जप करावा. लोक विचारतात की, 'महाराज जप किती करावा?' आम्ही सांगतो– तुम्हाला शक्य आहे तितकाच करावा. कारण अधिक करा असे आम्ही सांगितले तरी तुम्ही करणार नाही. जेवढा अधिकाधिक जप करणे शक्य आहे तेवढा करावा. तुम्हाला एका खोलीत नोटा मोजायला बसवले तर झोप न घेता रात्रभर तुम्ही नोटा मोजत बसाल, कंटाळणार नाही. परंतु तुमच्या हाती रुद्राक्षमाळ देऊन जर तुम्हाला 'आज शिवरात्र आहे, रात्रभर जप करा' असे सांगितले तर? तर तुमच्या हातून माळ केव्हा गळून पडली याचा तुम्हाला पत्ता देखील लागणार नाही. पैसे मोजताना कुणाला झोप येते? कुणालाच येत नाही. नींद हराम होऊन जाते. झोप येत नाही आणि भूकही लागत नाही. त्याचा कंटाळा येत नाही. पैसे मोजताना जर थोडीशी चूक झाली तर मनुष्य पुन्हा सारे पैसे मोजतो. परंतु जप करताना जर एखादी चूक झाली तर पुन्हा पहिल्यापासून माळ जपत नाही. भगवंताचे नाव घेताना किती प्रेम आहे आणि पैशाविषयी किती प्रेम आहे! परंतु तुमच्या सोबत तुम्ही कमावलेले धन येत नाही. येते ते तुमचे इष्टलिंग! तुम्ही आयुष्यभर लिंगधारण केले नाही तरी मृत्युसमयी तुमच्या गळ्यात लिंग घालतात. लिंग घातल्याशिवाय आपल्या संप्रदायात अंत्यसंस्कार केला जात नाही. मातेच्या पोटात असतानाच शिशूला लिंग धारण केले जाते, ते लिंग भूमीच्या पोटात जाताना त्याच्या देहावर असते.

इष्टलिंग अखेरपर्यंत तुमची सोबत करते आणि त्यानंतर तुम्ही केलेला मंत्रजप तुमची सोबत करतो. म्हणून अत्यंत निष्ठेने मंत्रजप करावा. इष्टलिंगावर वाहिलेल्या बेल–फुलांना 'निर्माल्य' म्हणतात. मन निर्मळ करते ते निर्माल्य होय. निर्माल्य तसेच फेकत नसतात. इष्टलिंगावरील बेल–फूल हाती घेऊन मस्तकाला लावावे, नंतर डोळ्यांना लावावे आणि त्यानंतर नाकाने हुंगून भांड्यात ठेवावे. ही पूजा संपल्यावर इष्टलिंगाला पुन्हा पाण्याने अभिषेक करावा. ही तिसरी पूजा झाली.

त्यानंतर मंत्रजप करीत इष्टलिंगावर पळीने तीन वेळा पाणी घालावे. हेच लिंगपादोदक होय. हे पादोदक प्राशन केल्यावर लिंग वस्त्राने पुसून, त्याला भस्म लावून, वस्त्रात घालून सज्जिकेत ठेवावे. त्यावर बेल–फूल अथवा ओले वस्त्र ठेवू नये. तुम्ही ओले कपडे कधी घालता? काही लोक तर लिंगाभोवती वस्त्रही गुंडाळत नाहीत. तसेच ठेवतात. ते सज्जिकेत खडखड वाजत राहते आणि कालांतराने त्याची काय अवस्था होते ती आम्ही जाणतो. कारण ते लिंग घेऊन भक्त आमच्या समोर पूजेला बसतो. तेव्हा त्याचे लिंगावर किती प्रेम आहे हे कळते. काहीजणांना तर सज्जिकेतून लिंगच बाहेर काढता येत नाही. ते तुफान ओढाताण करतात. कारण रोज पूजेसाठी ते लिंगच बाहेर काढत नाहीत. एकदा सज्जिकेत लिंग घातले ते आमच्या समोर बसल्यावरच बाहेर काढतात बिचारे! ते किती लिंगपूजा करतात हे आमच्या ध्यानात येते.

श्रीगुरूंच्या आणि जगद्गुरूंच्या पूजेत का बसायचे? तर ती तुमची एक परीक्षाच असते. वर्षभर अभ्यास केल्यावर तुमची वर्षाअखेर तीन तासांत परीक्षा घेतात तशी. काहीजण परीक्षेत पास होतात तर काहीजण नापास.

परंतु आम्ही कोणाला नापास करत नाही. नापास केले तर ते आमची शाळाच सोडून जातील, म्हणून आम्ही त्यांना नापास करत नाही, थोडे कमी मार्क्स देतो इतकेच.

गुरू असो वा नसो, जंगम असो अथवा नसो, परंतु रोज लिंगपादोदकाचे सेवन करायलाच हवे. नित्य लिंगाची पूजा करावी, वेळ कमी असला तरी प्रेमपूर्वक करावी. पूजा करताना लिंगाकडे अत्यंत प्रेमभराने पाहावे. तुम्ही तुमच्या घराकडे किती प्रेमाने पाहता! कमावलेल्या नोटांकडे, घरातील जिवलगांकडे जसे प्रेमाने पाहता तसेच इष्टलिंगाकडेही प्रेमाने पाहावे. परंतु असे पाहायला तुम्हाला वेळ कुठे असतो? कधी पूजा संपते अन् कधी उठून जातो असे तुम्हाला होते. तुम्ही लिंगावर प्रेम कराल तर लिंग तुमच्यावर प्रेम करील. जग हा बाजार आहे. येथे नित्य देवाण-घेवाण होत असते. तुम्ही भगवंताला काही द्याल तर तोही तुम्हाला देईल. हे सर्व आचार समजावून सांगून शिष्याला आचारसंपन्न करणे हे श्रीगुरूचे कर्तव्य आहे. म्हणून गुरूला 'आचार्य' असे म्हणतात. अशा आचार्यांना शरण जाणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

७ ऑगस्ट १९९२

---

**आशीर्वचन सातवे**

## दीक्षागुरुस्थल-६

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आपल्या आश्रयाला आलेल्या शिष्याला जे आचरण शिकवतात, त्याला आचरणासाठी प्रवृत्त करतात आणि स्वत: आचरून दाखवतात त्यांना 'आचार्य' म्हणतात, हे तुम्ही याआधी ऐकले आहे. वीरशैवसिद्धान्तात आचाराला अलंकार मानले आहे.

**आचार एव सर्वेषामलंकाराय कल्प्यते।**
**आचारहीन: पुरुषो लोके भवति निन्दित:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.१३)

कोणी आपली निंदा करू नये असे आपल्याला वाटते. निंदा करणे चांगले नाही, स्वत:ची निंदा ऐकणे चांगले आहे. त्यामुळे आपले दोष आपल्याला समजतात. दुसऱ्याची निंदा करणे म्हणजे घरच्या भाकरी खाऊन त्याच्या घरातला केरकचरा स्वच्छ करणे होय. निंदा करून त्याची पापेच आपण धुऊन टाकत असतो. आपली कोणी निंदा केली तर आपण स्वच्छ होऊ. म्हणून संतकवी तुकारामांनी म्हटले आहे- 'निंदकाचे घर असावे शेजारी'

निंदा करणाराचे घर आपल्या शेजारी असलेले बरे! एका हिंदी कवीने म्हटले आहे की, जर तुमचा कोणी निंदक असेल तर त्याला तुमच्या शेजारी तुमच्या खर्चाने घर बांधून द्या. वीरशैव संतकवी लक्ष्मण महाराज म्हणतात-

**निंदकाते मानू सखे। आमुचे ते पाठीराखे।।**
**वस्त्रे धुती मोलेविण। आम्हा वंदू ते चरण।।**

निंदक आपले मित्र असतात, जिवलग असतात. ते सदोदित आपली पाठराखण करतात आणि आपले मळके वस्त्र पैसे न घेता धुऊन देतात. म्हणून त्यांचे पाय धरले पाहिजेत. वस्त्र म्हणजे आपले शरीर, मन. आपले दोष दाखवून ते जणू काही आपली मोलाशिवाय चाकरी करीत असतात. निंदेमुळे काय घडते? जो निंदा करतो तो पापी होतो आणि ज्याची निंदा होते तो पवित्र होतो. परंतु आपली निंदा लोक का करतात बरे? जर आपण दुराचाराला प्रवृत्त झालो तर आपली निंदा होते. म्हणून जो आचारहीन असतो त्याची निंदा जग करते. जो आचारशील असतो त्याची सदैव स्तुतीच होत असते. देवदेवतांची लोक स्तुती करतात, साधुसंतांचे स्तोत्र गातात, निंदा करत नाहीत. कारण त्यांचे आचरण उत्तम असल्यामुळे ते स्तुत्य असतात. ज्याचे आचरण चांगले नाही त्याची निंदा होत असते.

आचार हा अलंकार आहे. अलंकाराबद्दल साऱ्यांना अत्यंत प्रेम असते. ते असली असोत की नकली. काही अलंकार असे असतात की आयुष्यभर ते आपल्या अंगावरून कुणी काढू शकत नाही. काही अलंकार असे असतात की आर्थिक परिस्थिती बिघडली तर बाजारात विकावे लागतात. एखादा चोर ते चोरून नेऊ शकतो. काही अलंकार सात्त्विक आहेत, काही राजस तर काही तामस. जे अलंकार धारण केल्यावर मनात सात्त्विक भावना निर्माण होते ते सात्त्विक अलंकार होत. जे अलंकार पाहून लोक स्तुती करतात आणि त्यामुळे आपण आनंदित होतो ते राजस अलंकार होत. नवे कपडे किंवा नवा दागिना अंगावर घातला की आपण घरात बसून रहात नाही. बाहेर पडतो. साऱ्यांनी आपले कपडे, दागिने पाहावे, त्यांची स्तुती करावी असे आपल्याला वाटते. उत्तमोत्तम दागिने घालून रस्त्याने मिरवत निघाल्यावर जर कोणी पहात नसेल तर आपण नाराज होतो. सारे जग आंधळे झाले काय? आपल्याकडे कोणी पहातच नाही. आपल्या सुंदर दागिन्यांकडे कोणी पहायलाच तयार नाही. अंगावर केवळ दागिने घातल्यामुळे आपले समाधान होत नाही. ते पाहून कोणी स्तुती केली तर आपले समाधान होते. असे अलंकार राजस अलंकार होत.

लोकांनी आपले अलंकार पाहावे यासाठी स्वत:चे घर पेटवणाऱ्या स्त्रीची कथा तुम्ही ऐकली असेल. एक स्त्री सोन्याची नथ घालून मिरवू लागली. या घरी जा, त्या घरी जा. ती साऱ्यांच्या घरी जाऊन आली. परंतु कोणी तिच्या नथीकडे लक्ष दिले नाही. तिला खूप राग आला. रागारागाने तिने आपले घर पेटवून दिले. घर विझवण्यासाठी लोक धावून आले. आगीच्या प्रकाशात तिच्या नाकातली नथ चमकू लागली. तेव्हा दुसऱ्या स्त्रीने तिला म्हटले, ''बाई ग, किती सुरेख आहे तुझी नथ!''

ती स्त्री म्हणाली, ''माझे आई, हेच तू दुपारी बोलली असतीस तर मी घर कशाला पेटवले असते?''

असे अनर्थ राजस अलंकारामुळे होतात. म्हणून राजस वेषभूषा नेहमी करू नये. राजस अलंकार नेहमी घालू नयेत. त्यामुळे तुमचे मनोबल कमी होते, तुम्ही अस्वस्थ होता. रजोगुणामुळे माणूस अस्वस्थ होतो. तर सत्त्वगुणामुळे माणूस स्वस्थ होतो. राजस अलंकार कधीतरी वापरावेत. धर्मसंप्रदायातील धार्मिक चिन्हे म्हणजे सात्त्विक अलंकार होत. भस्म, रुद्राक्ष, शिवलिंग हे देखील अलंकारच आहेत. पांढरी स्वच्छ वस्त्रे हीच सात्त्विक वेषभूषा होय. सात्त्विक वेषभूषा आणि सात्त्विक अलंकार यांमुळे मनात सात्त्विक भावना उत्पन्न होते.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'त आचरणाला 'अलंकार' असे म्हटले आहे. हे अलंकार पाच आहेत. यातील एकही अलंकार तुम्हाला माहीत नसेल.

**लिंगाचारः सदाचारः शिवाचारस्तथैवच।**
**भृत्याचारो गणाचारः पंचाचाराः प्रकीर्तिताः।।**

(चंद्रज्ञानागम, क्रियापाद, ९.४)

पाच प्रकारच्या आचारांनाच अलंकार म्हटले आहे. लिंगाचार, सदाचार, शिवाचार, भृत्याचार, गणाचार असे पंचाचार आहेत. अष्टावरण, पंचाचार आणि षट्स्थले ही वीरशैवांची वैशिष्ट्ये केवळ नावानेच तुम्हाला माहीत आहेत. त्याचा तपशील फारच थोड्यांना माहीत असतो. आचाराबद्दल तुम्हाला संपूर्ण ज्ञान दिले तरच आमची 'आचार्य' ही पदवी सार्थ होईल. नाहीतर आम्हाला आणि येथे बसलेल्या शिवाचार्यांना 'आचार्य' कोण म्हणेल. लिंगाचार हा पहिला आचार होय. त्याबद्दलचे थोडे विवरण तुम्ही काल ऐकले आहे.

**गुरुणा दत्तलिंगाद्वै नास्ति देवं महीतले।**
**इति भावानुसंधानं लिंगाचारः स उच्यते।।**

(चंद्रज्ञानागम, क्रियापाद ९.५)

दीक्षेच्या वेळी गुरू जे लिंग आपल्या हाती देतात त्याला 'इष्टलिंग' म्हटले जाते. दीक्षेशिवाय शरीरावर लिंग धारण केले जात नाही. बाजारातून लिंग विकत घेऊन ते गळ्यात घातले तर ते 'इष्टलिंग' नव्हे. एखाद्या कुमारिकेने आपल्या हाताने गळ्यात मंगळसूत्र घातले तर तिला विवाहित म्हटले जात नाही. त्यासाठी विवाहसंस्काराची आवश्यकता असते. म्हणून श्रीगुरूने दीक्षासंस्कार करून दिलेले लिंगच इष्टलिंग होय. त्या इष्टलिंगाची जो निरंतर पूजा करतो तोच लिंगाचारी म्हणवला जातो. स्थूलशरीरावर जसे इष्टलिंग धारण केले जाते तसे सूक्ष्मशरीरावर प्राणलिंग आणि कारणशरीरावर भावलिंग धारण केले जाते. इष्टलिंग डोळ्यांना दिसते परंतु प्राणलिंग आणि भावलिंग दृष्टिगोचर नाही. चिद्रूपाचे चिंतन हेच प्राणलिंग असून 'मी शिव आहे' अशी दृढ भावना बाळगणे हेच भावलिंग होय. जीवात्म्याला शेवटी शिव व्हायचे असते. 'अंगा'ला 'लिंग' व्हायचे असते. अंगाला लिंग करतो तोच लिंगाचार. इष्टलिंगाबरोबरच प्राणलिंगाची आणि भावलिंगाची आराधना करावी लागते. आपल्या हातावरील अंगुष्ठमात्र इष्टलिंगाप्रमाणे आपल्या हृदयात एक ज्योतिर्लिंग विराजमान आहे. त्यालाच प्राणलिंग, भावलिंग म्हणतात. तुम्ही म्हणाल की, ''महाराज, जर प्राणलिंग दिसत नाही त्याची पूजा आम्ही कशी करावी?'' तुम्हाला इष्टलिंगाचीच पूजा नीट करता येत नाही तर प्राणलिंगाची पूजा कशी कराल? ज्याला इष्टलिंगाची पूजा करता येते, त्यालाच प्राणलिंगाची पूजापद्धती समजावून सांगता येते. हटयोग, लययोग या योगांसारखाच वीरशैवांचा 'शिवयोग' हा एक योग आहे. तळहातावरील इष्टलिंगाकडे एकाग्र दृष्टीने पाहात बहिर्मुख मनोवृत्तींना अंतर्मुख करून हृदयापर्यंत घेऊन जाणे हाच शिवयोग होय. बहिर्मुख वृत्तींना रोखण्यासाठीच तर आपल्या हाती इष्टलिंग दिलेले आहे. एखाद्या साध्या काचेतून पाहिल्यावर पलीकडले दृश्य आपल्याला दिसते. चष्म्यातली काच दूरचे दृश्य आपल्याला स्पष्ट दाखवत असते. त्या काचेतून आपली दृष्टी पलीकडे जात असते, परंतु जर त्या काचेच्या मागच्या भागाला पारा लावला आणि त्या काचेतून आपण पाहू लागलो तर आपली दृष्टी पलीकडे जाणार नाही. ती परावर्तित होऊन आपल्याकडेच वळते. म्हणूनच आरशात आपल्याला चेहऱ्याचे प्रतिबिंब पाहता येते. इष्टलिंग हा एक दर्पण आहे. प्राणलिंगाचा साक्षात्कार करून घेण्यासाठी दृष्टियोग करावा लागतो. दृष्टी अंतर्मुख करावी लागते. हा योग साधला की इष्टलिंगाच्या आकाराचेच प्राणलिंग आपल्याला हृदयात दिसू लागते. याप्रमाणे इष्टलिंग, प्राणलिंग आणि भावलिंग यांची नित्य पूजा करणाऱ्या साधकालाच 'लिंगाचारी'

म्हणतात. लिंगाचार हा पहिला आचार, पहिला अलंकार होय.

**सदाचारोऽष्टशीलाढ्यः सेवितः कल्पपादपः।**
**सद्भक्तानां सुमनसां ददातीष्टफलं महत्।।**

(चंद्रज्ञानागम, क्रियापाद, ९.२२।।

सदाचार हा दुसरा आचार आहे. सदाचारात आठ शीले अंतर्भूत आहेत. जो साधक आठ प्रकारच्या सदाचाराचे पालन करतो त्याला आठ ऐश्वर्यांचा लाभ होतो. 'अंकुर' हे पहिले शील आहे. बीजामध्ये अंकुर विद्यमान असतो. बीज भूमीत पेरले की ते अंकुरित होते. तसे हे अंकुर शील आहे. गुरूकडून दीक्षा घेतल्यावर आपला देह मांसपिंड रहात नाही, ता मंत्रपिंड होतो. दीक्षित व्यक्ती स्वतःचे शरीर प्राकृत मानत नाही, तर अप्राकृत मानते. प्राकृत शरीर आणि अप्राकृत शरीर यांच्यात काय अंतर आहे? प्राकृतशरीरी मनुष्य आपल्या आचार-विचारांकडे फारसे लक्ष देत नाही. कसेही राहा, काहीही खा, कुठेही लोळा असे त्याचे वर्तन असते. दीक्षा झाल्यानंतर मात्र त्याला नियमांचे बंधन घालून घ्यावे लागते. आपल्याला बंधनाचे फार भय वाटत असते. दीक्षा ही शिक्षा आहे असे काहीजणांना वाटते. हॉटेलमध्ये चहा पिऊ नये, काहीबाही खाऊ नये, कुठेही पाणी पिऊ नये असली बंधने माणसाला नकोशी वाटतात. म्हणून काहीजण अंतिम अवस्थेत मृत्यूच्या आधी दीक्षा घ्यावी असे म्हणतात. कारण त्यांनतर कुठे बाहेर जाण्याचे प्रयोजनच रहात नाही. परंतु माणसाने आपले शरीर अप्राकृत मानायला हवे. शरीर प्रकृतीने निर्माण केलेले असते. म्हणून जरी ते 'प्राकृत' असते तरी ते सुसंस्कृत बनवता येते. संस्कारशून्य प्राकृत मनुष्य आणि सुसंस्कृत मनुष्य यांच्यात खूप फरक असतो. ज्याचे शरीर दीक्षित, सुसंस्कृत झालेले असते त्याच्या शरीराला मंत्रपिंड, प्रसादकाय असे म्हणतात. त्याचे शरीर प्रसादशरीर झालेले असते. ईश्वराला नैवेद्य दाखवल्यावर तो प्रसाद होतो. त्यावरचे आपले ममत्व नाहीसे होते. प्रत्येकाच्या मनात शरीराविषयी अहंकार आणि शरीरावरील ममत्व असते. अहंकार आणि ममत्व जोपर्यंत मनुष्याच्या ठिकाणी असते तोपर्यंत त्याच्या वाट्याला दुःखभोग येतात.

आपण दान-धर्म करतो, पुण्यसंचय करतो, पण ते करताना शरीरावरील ममत्व आणि अहंकार मात्र सोडत नसतो. 'मी म्हणजे शरीर आहे' असे मानले तर एक कोटी गोहत्येचे पातक लागते. असे शास्त्रात म्हटले आहे. आपण अशा किती गोहत्या केल्या असतील? शरीराला नटवण्यातच आपला दिवस जातो. शरीराला सोडून आपली बुद्धी दुसरीकडे जातच नाही. आपला सर्व जीवनव्यवहार देहात्मबुद्धीनेच होत असतो. कितीही दानधर्म करा, कितीही जप करा, या पापापासून तुमची सुटका होत नाही. ती होईल, पण केव्हा? तुम्ही आत्मस्वरूपाला जाणून घ्याल तेव्हा.

उपनिषदात एक कथा सांगितली आहे. जानुश्रुती नावाचा दानधर्मपरायण राजा होता. त्याने अनेक प्रकारची दाने करून कीर्ती संपादन केली होती. त्याचा त्याला अभिमान झाला होता. एकदा तो राजप्रासादाच्या गच्चीवर विहार करीत असताना आकाशातून पक्ष्याचे एक युगुल उडत चालले होते. राजाकडे पाहून पक्षिणी म्हणाली,

"तो बघ, अत्यंत दानशूर पुण्यवान राजा जानुश्रुती तिथे बसलेला आहे."

तिचे शब्द ऐकून पक्षी म्हणाला, "कसला पुण्यवान आणि कसले काय? शेजारच्या गावात जो महात्मा राहतो त्याच्या पुण्यासमोर या राजाचे पुण्य कस्पटासमान आहे. महात्म्याचे पुण्य सिंधूएवढे आणि राजाचे पुण्य

बिंदूएवढे.''

राजाला पक्ष्याची भाषा अवगत होती. पक्ष्याचे बोलणे ऐकून त्याचा अहंकार डिवचला. माझ्यापेक्षाही पुण्यवान कोण आहे? त्याला पाहू तरी, असा त्याने विचार केला. त्या महात्म्याला आणण्यासाठी त्याने राजसेवकाला पाठवले.

राजसेवकांनी त्या महात्म्याचा खूप शोध घेतला. तो त्यांना एका बैलगाडीखाली नागवा झोपलेला आढळला. त्याच्या देहातून प्रभा बाहेर फाकत होती. एवढा तो तेजस्वी होता. राजसेवकांनी त्याला ओळखले आणि राजाने राजवाड्यात बोलावले, असे सांगितले. तेव्हा तो महात्मा म्हणाला,

''राजाचे माझ्याकडे काम आहे की माझे काम राजाकडे आहे? माझे तर राजाकडे काहीच काम नाही, मग मी कशाला येऊ? राजाचे माझ्याकडे काम असेल तर त्याने येथे यावे.''

राजसेवकांनी खूप आग्रह केला तरी त्याने त्यांना जुमानले नाही. त्यांनी राजाला हे वर्तमान जाऊन सांगितले. सोने-चांदी-हिरे देऊन त्या महात्म्याला प्रलोभन दाखवून त्याला आणावे, अशी राजाने सेवकांना आज्ञा केली. जडजवाहीर घेऊन सेवक महात्म्याकडे आले त्याला ते देऊ लागले. तो हसला. त्याने एकाही वस्तूला स्पर्श केला नाही. जो आशेचा गुलाम असतो तो सर्व जगाचा गुलाम असतो आणि आशा ज्याची गुलाम असते त्याचे सारे जग गुलाम असते, हे तो महात्मा ओळखून होता. सगळे प्रयत्न विफल झाल्यावर राजसेवकांनी परत जाऊन ही गोष्ट राजाच्या कानावर घातली.

शेवटी राजा महात्म्याकडे आला. त्याला नमस्कार करून म्हणाला, ''महाराज, तुमची कीर्ती एका पक्ष्याच्या मुखातून मी ऐकली. तुमच्याइतका पुण्यवान पुरुष भूतलावर नाही, असे तो पक्षी म्हणाला. एवढे पुण्य तुम्ही कसे संपादन केले?''

महात्मा म्हणाला, ''त्यासाठी मी काहीही केले नाही.''

''मग एवढे पुण्य तुम्हाला मिळाले कसे?'' राजाने विचारले.

''जो आत्मज्ञानी असतो त्याची सगळी पापे नष्ट होतात आणि त्याला अपार पुण्यलाभ होतो. आत्मज्ञानाने जेवढे पुण्य मिळते तेवढे कितीही दानधर्म केला तरी मिळणे शक्य नाही.''

''मग मलाही आत्मज्ञानाचा मार्ग सांगा,'' अशी राजाने महात्म्याला विनंती केली आणि महात्म्याने राजाला ज्ञानोपदेश केला.

म्हणून 'मी आत्मा आहे' हे ज्ञानच अपार पुण्य मिळवून देते आणि 'मी शरीर आहे' असा देहाभिमान त्याला पापाचा धनी ठरवते. शरीरावरील ममत्वामुळेच आपण दूषित होतो. देहाभिमानामुळे नाना प्रकारची पापे करतो. म्हणून देहाभिमान सोडायला हवा. जोपर्यंत तुम्ही दीक्षित होणार नाही तोपर्यंत देहाभिमान दूर होणार नाही. गुरूजवळ जाऊन 'मी भवरोगी आहे माझे रक्षण करा' असे म्हणून जेव्हा तुम्ही साष्टांग नमस्कार करता त्यावेळी शरीर तुमचे रहात नाही. ते गुरूचे होते. तुम्ही गुरूला शरीर अर्पण केल्यावर गुरू त्यावर संस्कार करतात. तेव्हा तुमचे शरीर सुसंस्कृत होते. प्राकृत रहात नाही. शरीर संस्कृत झाले की संस्कारसंपन्न व्यक्तीसारखे तुमचे वर्तन झाले पाहिजे. शरीराला सुसंस्कृत करण्यासाठी प्रत्येकाने अवश्य दीक्षा घ्यायला हवी. हे सदाचारामधले पहिले शील आहे.

जन्मापासून आठ वर्षाचा काळ हा दीक्षेसाठी उत्तम काळ, आठ ते सोळा वर्षापर्यंत मध्यम, सोळाव्या वर्षानंतरचा अधम मानला जातो. मृत्युपूर्वी घेतलेल्या दीक्षेला अधमाधम दीक्षा म्हटले जाते. आठव्या वर्षापर्यंत कोणत्याही प्रकारची दूषित भावना मनात येत नाही. शरीर-मन पवित्र आणि संस्कारक्षम असते असे पवित्र शरीर-मन भगवंताला अर्पण करणे चांगलेच. म्हणून दीक्षेसाठी हा काल अत्यंत अनुकूल मानला जातो.

तुमच्यापैकी बहुतेक जण उपवास करतात. कुणी एकादशी, कुणी शिवरात्र, तर कुणी श्रावण सोमवार. उपवासासाठी तुम्ही घरात फळे आणून ठेवलेली असतात. त्यांपैकी काही सडलेली, काही त्यापेक्षा चांगली तर काही ताजी असतात. तुमच्या घरी त्या दिवशी अतिथी आला तर त्याच्यासमोर तुम्ही कोणती फळे ठेवाल? नासलेली की ताजी? ताजी फळे ठेवाल. नासलेली फळे देणारे लोकही जगात आहेत. दानधर्म करताना ते नासकी फळे देतात. फुकट द्यायचे तर चांगले का म्हणून द्यायचे, असे त्यांना वाटते. एक रुपया दक्षिणा द्यायची असते तेव्हा वाईटातली वाईट नोट आपण देतो. चांगल्या नोटा आपल्याजवळ ठेवतो. त्याही आपल्याजवळ कायम राहणार नसतात, याची आपण जाणीवच ठेवत नाही. मळलेली आणि कोरी नोट यांची किंमत एकच असते. त्यात फरक पडत नाही. परंतु देणारा जेव्हा मळकी नोट देतो तेव्हा तो आपले मन किती मळलेले आहे, हे दाखवून देत असतो. ज्याचे मन स्वच्छ असते तो चांगल्या वस्तूंचेच दान करतो. तुम्ही दिलेली नासकी फळे अतिथी खाऊन देखील टाकील, परंतु असे करणे गृहस्थाला शोभत नसते. तुम्ही नासकी फळे खा, पण दुसऱ्याला चांगली फळे देणे हाच गृहस्थधर्म होय. त्याप्रमाणे श्रीगुरूला शरीर अर्पण करायचे तर ते आठ वर्षांपर्यंत ताजे टवटवीत पवित्र शरीर अर्पण करावे. मग ते दीक्षित करून गुरू सुसंस्कृत करतात. काही लोक सोळाव्या वर्षी किंवा त्यानंतर, तर काही लग्नाआधी दीक्षा घेतात. काहीजण लग्न झाले, मुले बाळे झाली, त्यांची लग्ने झाली, सगळे दात पडले, डोळ्यांना दिसेनासे झाले, हातात काठी घेऊन फिरायची वेळ आली अशा वेळी 'अंगं गलितं पलीतं मुंडं दशनविहीनं जातं तुंडम्' अशी शंकराचार्यांनी वर्णन केलेली जराजर्जर अवस्था झाल्यावर म्हणतात की, "महाराज, आम्हाला आता दीक्षा घ्यायची आहे." त्यावेळी कोणती का अवस्था असेना, पण दीक्षा घ्यायला आला असे म्हणून आम्ही त्याला दीक्षा देतो. म्हणून आठ वर्षापर्यंतच दीक्षा घेणे उत्तम होय. तुम्ही उशिरा दीक्षा घेतली असली तरी तुमच्या मुलाबाळांना मात्र आठव्या वर्षापर्यंतच दीक्षा द्या आणि ज्यांनी दीक्षा घेतली नसेल त्यांनी देखील दीक्षा घ्यावीच. अशा प्रकारे दीक्षासंस्कार करून घेणे हेच सदाचारातले 'अंकुर शील' आहे.

दुसरे शील आहे 'उत्पन्न शील'. भूमीत बीज पेरल्यावर त्यातून अंकुर उत्पन्न होतो, तसे हे उत्पन्न शील आहे. पतीने दीक्षा घेतली असेल आणि पत्नीने घेतली नसेल तर त्यांचे गृहस्थजीवन उत्तम नाही असे समजावे. याच्या उलट घटना असेल तेही योग्य नाही. पति-पत्नी सुसंस्कृत असतील तरच मुलेही सुसंस्कृत होतात. अन्यथा ती अर्धसंस्कृत राहतात. पतीने दीक्षा घेतली आणि पत्नी असंस्कृत राहिली तर त्या कुटुंबाची अवस्था कशी होते, ते एका कन्नड संताने आपल्या वचनात सांगितले आहे. त्याचा आशय असा- ज्या भांड्यात मद्य ठेवलेले होते ते रिकामे भांडे एखाद्याला धुवायला द्यावे आणि त्याने आतला भाग तसाच ठेवून वरचा भाग फक्त स्वच्छ करावा. तशी त्या कुटुंबाची अवस्था असते. भांडे वरवर धुण्याची बऱ्याच लोकांना सवय असते. बाहेरून चकचकीत दिसते, परंतु आतून मलीन असते. ते बाहेरून घासले नाही तरी चालेल, परंतु आतून घासले पाहिजे तसे अंतरंग मलिन असेल तर ज्ञानप्राप्तीची शक्यता नसते.

एका गावात एक साधुमहाराज रहात होते. ते घरोघरी भिक्षा मागत असत. एके दिवशी एक श्रद्धाळू महिला

त्यांना म्हणाली, ''महाराज, उद्या तुम्ही कोणाच्याही घरी भिक्षेला जाऊ नका. माझ्या घरी जेवायला या. तुम्हाला चांगले-चुंगले करून मी खायला घालीन. त्यांनतर तुम्ही मला ज्ञानोपदेश करा.''

आज येऊ, उद्या येऊ असे करता करता एके दिवशी साधुमहाराज तिच्या घरी गेले. त्या महिलेने स्वयंपाक केला. स्वादिष्ट खीर केली. महाराज जेवायला बसले. जेवणासाठी त्यांनी आपल्या झोळीतून आणलेली थाळी बाहेर काढली. ती थाळी दगडमातीने भरलेली होती. ती महिला वाढायला आली तेव्हा दगडमातीने भरलेली थाळी पाहून तिला आश्चर्य वाटले. महाराज म्हणाले, ''याच थाळीत वाढ.''

''या थाळीत कसे वाढू? ही तर दगडमातीने भरलेली आहे. अस्वच्छ आहे.'' ती म्हणाली.

''चालेल'' महाराज म्हणाले, ''याच थाळीत वाढ.''

''मी पैसे खर्च करून दूध, तांदूळ, साखर विकत आणली आणि उत्तम खीर बनवली. ती तुमच्या थाळीत टाकल्यावर खराब होईल. ती तुम्ही खाऊ शकणार नाही. तुमची थाळी मी धुऊन स्वच्छ करते, मग वाढते." ती म्हणाली.

त्या महिलेन थाळी स्वच्छ केली. मग महाराजांना वाढले. महाराज पोटभर जेवले. जेवण संपल्यावर जायला निघाले.

''महाराज, तुम्हाला केवळ जेवणासाठी मी बोलावले नव्हते. जेवणानंतर तुम्ही मला उपदेश करावा यासाठी बोलावले होते.'' ती म्हणाली.

ते म्हणाले, ''मी तर उपदेश केला.''

''तुम्ही तर काही बोललाच नाहीत, मग उपदेश कधी केला?'' ती म्हणाली.

''तुला तो कळला नसेल,'' महाराज म्हणाले, ''बाई ग, तुला खीर वाढण्यासाठी स्वच्छ धुतलेली थाळी हवी होती. पाच-दहा रुपये खर्च करून तू बनवलेली खीर वाढण्यासाठी जर स्वच्छ थाळी हवी असते तर आमचे ज्ञान त्या खिरीपेक्षाही श्रेष्ठ आहे. त्या ज्ञानासाठी उत्तम पात्र नको का? खिरीसाठी तू पैसे खर्च केले पण मी ज्ञानप्राप्तीसाठी केवढी तपश्चर्या केली! अध्ययन केले! म्हणून माझे ज्ञान देण्यासाठी चांगलेच पात्र हवे. तू त्याला सुपात्र आहेस का? याचा विचार कर.''

म्हणून प्रत्येक व्यक्तीचे बहिरंग आणि अंतरंग शुद्ध असायला हवे. पती सुसंस्कृत असेल आणि पत्नी नसेल किंवा पत्नी दीक्षित असेल आणि पती नसेल तर ते कुटुंब पूर्ण सुसंस्कृत म्हणता येणार नाही. पति-पत्नीने एकरूप असायला हवे. पति-पत्नी दोघांनीही दीक्षा घेऊन नियमांचे पालन करणे यालाच 'उत्पन्न शील' असे म्हणतात.

'द्विदल शील' हे तिसरे शील होय. अंकुर उत्पन्न झाल्यावर त्याचे दोन भाग होतात, तो द्विदल होतो. धार्मिक चिन्हांना नियमित आणि अचूक धारण करणे हेच द्विदल शील होय. प्रमाद करू नका असा वेदांचा आदेश आहे. जाणिवपूर्वक नियम न पाळणे याला प्रमाद म्हणतात. इष्टलिंग शरीरावर धारण करावे, त्याची मंत्रपूर्वक पूजा करावी, गुरूच्या आदेशाप्रमाणे भस्म-रुद्राक्ष धारण करावे हे माहीत असून देखील मुद्दाम ते न करणे म्हणजे प्रमाद होय. जो जाणिवपूर्वक प्रमाद करतो त्याच्या वाटेला दुःखभोग येतात. म्हणन धर्मचिन्हे धारण करताना प्रमाद करू नये. ते श्रद्धेने धारण करावे. आमच्यासमोर येताना फक्त भस्म लावून यावे असे नाही, तर घरीही भस्म-रुद्राक्ष धारण करावे. भस्म हे परिपक्वतेचे आणि परिपूर्णतेचे लक्षण आहे.

पूर्वी ज्या भांड्यात स्वयंपाक करत त्या भांड्याला भस्म लावत असत. भांड्याला भस्म लावले तर स्वयंपाकघरात पावित्र्य नांदते आहे असे तुम्हाला जाणवेल. भस्म-रुद्राक्ष धारण केलेल्या मनुष्याकडे पाहून तुमचे मन प्रसन्न होईल का अप्रसन्न? प्रसन्नच होईल. तुम्ही कपाळावर आणि देहावर भस्म धारण केले, रुद्राक्ष धारण केले तर तुमचे मनच तुमच्या पावित्र्याची ग्वाही देते. भोजन करून तुमचे पोट भरते, परंतु शिवपूजा करून, शिवचिंतन करून तुमचे मन भरते, तृप्त होते. मनाला तृप्त करणारी शिवावाचून दुसरी कोणतीही वस्तू नाही.

एका राजाकडे एक भिक्षुक गेला. आपली लहानशी झोळी पुढे करून त्याने म्हटले, ''महाराज, ही झोळी भरून मला द्रव्य द्या.'' ती लहानशी झोळी पाहून राजाने सेवकाला त्यात द्रव्य ओतायची आज्ञा केली. सेवकाने द्रव्य ओतायला सुरुवात केली. पण ती झोळी भरेचना, राजा देखील इरेला पेटला. त्याने ती पूर्ण भरण्याची सेवकाला आज्ञा केली. शेवटी राजाचा खजिना रिकामा झाला. तरी झोळी भरली नाही. राजा आश्चर्यचकित झाला. भिक्षुकाला म्हणाला, ''आजपर्यंत हजारो भिक्षुकांच्या झोळ्या मी भरून दिल्या आहेत. परंतु तुझी झोळी मला विचित्रच दिसते. कोणत्या कापडापासून ती बनवलेली आहे.?''

भिक्षुक हसून म्हणाला, ''महाराज, ही झोळी नवी नाही, जुनीच आहे. ही झोळी कापडापासून बनवलेली नाही तर ती माणसाच्या मनापासून बनवलेली आहे. ती तुम्ही कशी भरू शकाल?''

पुणे शहरातली सारी संपत्ती जर एका माणसाला दिली तर त्या माणसाचे मन तृप्त होईल काय? तो मुंबईतली सारी संपत्ती मिळवायचा प्रयत्न करील. त्याला मुंबईची संपत्ती दिली तर त्याला सोलापूरची संपत्ती मिळवण्याची हाव सुटेल. माणसाचे मन मोठे विचित्र आहे. जे मिळेल त्यात ते समाधान मानत नाही. त्याला जेवढे द्याल तेवढे ते अधिकाधिक मागणी करू लागते. हा विश्वसंसार जरी एखाद्याला बहाल केला तरी त्याचे मन अतृप्तच राहील. माणसाचे मन असे अतृप्त का असते? कारण त्याला मिळणाऱ्या साऱ्या वस्तू बाह्य असतात. त्या त्याचे समाधान करू शकत नाहीत. जी वस्तू आत जाऊ शकते तीच त्याचे समाधान करू शकते. संपत्ती, घर, शेत या सगळ्या बाह्य वस्तू आहेत. त्या अंतरंगात शिरू शकत नाहीत. अन्न, पाणी आणि ज्ञानामृत या तीन गोष्टी माणसाला तृप्त करू शकतात. माणूस खाऊन खाऊन किती खाईल? फार तर पोट भरेपर्यंत खाईल. पाणी किती पिईल? तहान शमेपर्यंत. सत्संगात तुम्ही येता आणि प्रवचन ऐकून तुमचे मन भरते. तेव्हा तुम्ही म्हणता की, ''महाराज, आज बस झाले, मन भरले आहे.'' म्हणून एका सुभाषितकाराने म्हटले आहे-

> **पृथ्वियां त्रिणि रत्नाणि जलं अन्नं सुभाषितम्।**
> **मूढैः पाषाणखंडेषु रत्नसंज्ञाभिधियते।।**

पृथ्वीवर तीन रत्ने आहेत. खाण्यासाठी अन्न, पिण्यासाठी पाणी आणि श्रवण करण्यासाठी सुभाषिते, संतांची वचने. मूर्ख माणसे मात्र पाषाणाच्या तुकड्याला रत्न म्हणतात. अन्न, पाणी, सुभाषिते यांच्यामुळे तृप्ती का मिळते? तर या तिन्ही गोष्टी तुमच्या आत जाऊ शकतात. तोंडातून अन्न-पाणी आत जाते आणि कानातून संतवचने आत जातात. अन्न-पाणी एकाच मुखातून आत जाते, तर प्रवचन मात्र दोन कानांतून आत जाते. म्हणून तुमचे मन लवकर भरते. भोजन करताना तुम्ही जास्त वेळ घालवता, पण प्रवचन ऐकताना मात्र जास्त वेळ बसू शकत नाही. कारण दोन कानांतून ते आत जाते व तुमचे मन लवकर भरते.

माणसाचे मन सांसारिक वस्तूंनी कधीही भरत नाही. परंतु प्रवचन ऐकल्याने आणि शिवचिंतन केल्याते ते लवकर भरते. म्हणून येथे भस्म-रुद्राक्ष प्रमादाशिवाय धारण करावीत, असे सांगितले आहे. त्यामुळे आपल्या

मनाला समाधान, शांती लाभते. सदाचारामध्ये आठ आचार आहेत. त्यांपैकी तीन आचारांबद्दल आज ऐकले आहे. उरलेल्या पाच आचाराबद्दल उद्या विवरण करू. आचार इतके आहेत हे ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटले असेल. तुम्हाला एकच 'आचार' माहीत आहे. तो म्हणजे खाण्यातला आचार-लोणचे. लोणचे देखील एक प्रकारचे नसते. ते पण वेगवेगळ्या प्रकारचे असते. खाण्यासाठी वेगवेगळे 'आचार' पाहिजेत तसे वागण्यासाठीही वेगवेगळे आचार नकोत का? म्हणून आपल्या धर्माच्या रक्षणासाठी आपले आचार नीट समजावून घ्यावेत आणि त्याप्रमाणे अचूक आचरण करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

८ ऑगस्ट १९९

---

## आशीर्वचन आठवे

## दीक्षागुरुस्थल-७

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

भगवान शिवाला आचार आणि आचरणशील मनुष्य अत्यंत प्रिय असतो. आचार एक सात्त्विक अलंकार आहे, हे आपण कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे. जे लोक सधन आहेत, ते सोन्याचे अलंकार आपल्या अंगावर धारण करतात, परंतु जे सधन नाहीत त्यांनाही आपल्या देहावर अलंकार असावेत असे वाटते. अशा लोकांसाठी आचार हाच अलंकार होय. अंगावरील सोन्याचे अलंकार हिरावून घेता येतात. तुमच्या मृत्यूनंतर तुमच्या अंगावरील अलंकार तसेच राहू देत नाहीत तर ते काढून घेतात. म्हणून आपण असे अलंकार धारण करावेत की, जे अलंकार जिवंतपणी अथवा मृत्यूनंतर कुणी हिरावून घेऊ शकणार नाही. आचार हा असा अलंकार आहे. ज. पंचाचार्यांनी मानवसमाजासाठी पाच आचार सांगितले आहेत. पहिल्या लिंगाचाराविषयी आपण ऐकले आहे. सदाचार या दुसऱ्या आचारात आठ आचार समाविष्ट आहेत. त्यामधील तीन आचारांबद्दल, शीलाबद्दल तुम्ही ऐकले आहे. आता चौथ्या आचाराचे विवेचन करायचे आहे

'शिवधर्माणां माहात्म्यस्य विभावनं प्रवृद्धं शीलम्।' शिवाचे माहात्म्य ऐकताना तन्मय झाले पाहिजे. तुम्ही नाटक. सिनेमा पाहता त्यावेळी किती तन्मय होता! स्वत:ला विसरून जाता. अभिनय करणाऱ्या नटासोबत तुम्ही तादात्म्य होता. नाटक-सिनेमांत सुखदु:खाचे प्रसंग जेव्हा येतात तेव्हा रडणाऱ्या नटाला पाहून तुम्ही देखील रडू लागता. दु:ख त्याला झालेले असते, तुम्हाला नाही. तरीही तुमच्या डोळ्यांत अश्रू येतात. याचे कारण काय? तर नटाच्या सुखदु:खाशी तुम्ही समरस होत असता. नट तर रडण्याचा अभिनय करीत असतो, नाटक करीत असतो. तुम्ही मात्र खरेखुरे रडत असता. नाटक-सिनेमांशी जर तुम्ही समरस होऊ शकला नाहीत तर त्यामध्ये तुम्हाला गोडी वाटणार नाही. तुम्ही तटस्थ राहिलात तर नाटक-सिनेमा या कलेपासून लाभणाऱ्या आनंदाला तुम्ही मुकाल.

तुम्ही तन्मयतेने नाटक–सिनेमा पाहता त्याप्रमाणे भगवान शिवाचे चरित्र–लीला ऐकताना तन्मय होऊन भावविभोर झाले पाहिजे. हा देखील एक आचार होय. तुमची भावना शिवाशी जसजशी जोडली जाईल तसतसे त्याचे फळ तुम्हाला मिळत जाईल. आपल्या शरीराकडून कर्मे घडत असतात, परंतु कर्म घडताना जशी जशी आपली भावना असते तसेच फळ आपल्याला मिळत असते. शरीराकडून कोणती क्रिया घडते याला फारसे महत्त्व नसून त्यावेळी मनात कोणती भावना असते हे अधिक महत्त्वाचे असते. कारण ती अंतरंगातील घटना आहे. बाह्यत: आपल्या हातून पुण्य होताना दिसते परंतु ते कधी कधी पाप असण्याची शक्यता असते.

एक श्रीमंत मनुष्य देवदर्शन घेऊन देवळाबाहेर पडला. मंदिराबाहेर अनेक भिक्षुक बसलेले हेते. ते त्याला 'दान करा' असे म्हणू लागले. ते मागत होते पैसा दोन पैसे. कारण त्यापेक्षा अधिक मागितले तर कुणी देत नाही, हे त्यांना माहीत असते. त्या श्रीमंताने कुणालाही पैसा दिला नाही. पण एक भिक्षुक मात्र त्याच्या मागेच लागला. तो मंदिराच्या परिसराबाहेर पडला तरी भिक्षुकाने त्याचा पिच्छा सोडला नाही. शेवटी श्रीमंताने खिशात हात घातला तेव्हा त्याच्या हातात एक रुपयाचे नाणे आले. त्याच्याजवळ सुटे पैसे नव्हते. भिक्षुकाला रुपया देऊन त्याच्या पात्रातून सुटे पैसे घेणेही शोभले नसते. भिक्षुक पिच्छा सोडायला तयार नव्हता. हळूहळू त्या श्रीमंताला राग येऊ लागला. अखेर त्याने ते नाणे खिशातून काढले आणि रागारागाने भिक्षुकाच्या तोंडावर फेकून मारले. भिक्षुकाला पैसा मिळाला. श्रीमंत निघून गेला.

तुम्हाला माहीत आहे की, आपण जी कर्मे करतो त्याचा हिशेब ठेवणारे दोघे वर बसलेले असतात. एकाचे नाव 'चित्र' आणि दुसऱ्याचे 'गुप्त' असे आहे. आपण प्रकटपणे जे पुण्य–पाप करतो, त्याचा हिशेब 'चित्र' ठेवतो तर दुसऱ्याला कळू न देता आपण जे पुण्य–पाप करतो त्याचा हिशेब 'गुप्त' ठेवतो.

श्रीमंताच्या कृत्याचे फल जेव्हा 'चित्र लिहू लागला तेव्हा 'गुप्त' त्याला म्हणाला, ''तू काय लिहिणार? पुण्य की पाप?'' तेव्हा चित्र म्हणाला, ''त्याने भिक्षुकाला एक रुपया दान केला तेव्हा त्याच्या खात्यात 'पुण्य' अशीच नोंद करावी लागेल. 'पाप' कसे लिहिता येईल?''

'गुप्त' म्हणाला, ''विचार करून नीट नोंद कर. नाहीतर हिशेबात गडबड होईल. तुझी नोकरी जाईल. कारण तुझा–माझा हिशेब तपासणारा आणखी एकजण आहे. तेव्हा विचार करून हिशेब ठेव.''

'चित्र' म्हणाला, ''त्याने एक रुपया दान केला म्हणून त्याच्या नावावर मी पुण्यच लिहीन.''

'गुप्त' म्हणाला, ''नाही, त्याने रुपया दिला आहे पण कोणत्या भावनेने दिला आहे? त्यावेळी त्याच्या मनात प्रेमभावना नव्हती, क्रोधभावना होती. त्यावेळी जर त्याच्या हातात दगड असता तर त्याने तो भिक्षुकाला मारला असता. त्याच्या हातात रुपया होता म्हणून त्याने रुपया फेकून मारला झतकेच. त्यामुळे एक दगड मारल्यावर जेवढे पाप होते तेवढे पाप त्या श्रीमंताच्या खात्यात तुला लिहावे लागेल.''

'चित्र' ने 'गुप्त'चे म्हणणे मान्य केले. तात्पर्य असे की, आपण काय करतो हे महत्त्वाचे आहे. म्हणून शुद्धभावनेने, समर्पणभावनेने, प्रेमभावनेने आपण कर्म करायला हवे. शिवकथा आणि शिवसिद्धान्त तुम्ही तन्मयतेने श्रवण करायला हवा. यालाच 'प्रवृद्धशील' म्हणतात. या आचारामुळे भक्ती वृद्धिंगत होते.

'इष्टलिंगं अनभ्यर्च्य यद्भोजनं सप्रकाण्डमिदं शीलम्।' इष्टलिंग हे वीरशैवाचे आराध्य होय. आपल्याला भोजन रोज हवे असते. कुणी एकदा भोजन करतात, कुणी दोनदा, कुणी तीनदा तर कुणी अनेकदा. कन्नडमधल्या एका म्हणीचा अर्थ असा आहे– जो एकदा भोजन करतो तो योगी, जो दोन वेळा करतो तो भोगी, जो तीन वेळा करतो तो रोगी आणि जो चार वेळा भोजन करतो त्याला घेऊन जा स्मशानाकडे. जो अधिक वेळा भोजन करतो त्याची

आयुर्मयादा कमी असते. 'दाने दानेपर लिखा है खानेवाले का नाम' अशी हिंदीमध्ये एक म्हण आहे. तुम्ही आयुष्यभरात किती अन्न खायचे ते निसर्गाने निश्चित केले आहे. तुमच्या वाट्याला आलेले अन्न तुम्ही भराभर खाऊन संपवले तर तुम्हाला पुढे अन्नच मिळणार नाही. म्हणजेच तुम्हाला मरावे लागेल. अधिक भोजन करणे ही चांगली गोष्ट नव्हे. त्यामुळे पचनसंस्थेवर अधिक ताण पडून ती लवकर निकामी होते. म्हणून अर्धे पोट अन्नाने भरावे आणि उरलेला निम्मा भाग पाण्यासाठी एक चतुर्थांश हवेसाठी मोकळा ठेवावा. आपण मात्र असे करीत नाही, सगळे पोट अन्नानेच तुडुंब भरतो. आग्रह करून वाढण्याची पद्धत आपल्या देशामध्ये आहे, ती पोटासाठी हानिकारक आहे.

भोजन ही एक कला आहे. ती ज्याला साधते तो योगी होतो. माणसाला ही कला साधत नाही म्हणून तो रोगी होतो. ज्याला भोजनाची कला, बोलण्याची कला साधते त्याचे कुणाशी भांडण होत नाही. ज्यांना नीट बोलता येत नाही अशी माणसे सतत एकमेकांशी भांडत असतात. देवाने तुम्हाला वाणी दिली आहे ती विचारपूर्वक शब्दप्रयोग करण्यासाठी. शब्द हे शस्त्र आहे. शस्त्राने केलेली जखम लवकर बरी होते, भरून निघते, पण शब्दाने केलेली जखम आयुष्यभर भरून निघत नाही. तुम्ही शब्दाचा प्रहार केला तर तुमच्यावरही तो कधीतरी उलटणार हे निश्चित. तो भोगण्याची तुम्ही तयारी ठेवायला हवी. म्हणून वाणीवर संयम ठेवला पाहिजे. जिभेवर आपले नियंत्रण हवे, खाताना आणि बोलताना. त्यामुळे आपण, आपल्या परिवारातील माणसे आणि समाज सुखी होईल. गीतेत म्हटले की, जो योग्य आहार-विहार करतो तोच योगी होय. म्हणून प्रत्येकाने योगी व्हावे. आपल्या बुद्धीत समत्व बाणणे याला 'योग' म्हणतात. परंतु आपल्या बुद्धीत समता नसते, विषमता असते. तराजूने सोने अगदी काटेकोरपणे तोलले जाते. परंतु तेवढ्या काटेकोरपणे भाजी तोलली जात नाही. आपली बुद्धी सोने तोलणाऱ्या तराजूसारखी सम झाली पाहिजे. आसपास रहाणाऱ्या लोकांसोबत आपण जेव्हा समत्वबुद्धीने व्यवहार करू तेव्हा सारेजण सुखी होतील. तुमच्या मनात विषमता आली की तुमचे घर फुटायला आरंभ होतो. एकाची दोन, दोनाची चार घरे होतात. विषमतेमुळे स्वार्थ जागा होतो. भावाभावांची कुटुंबे विभक्त होतात. एवढेच नव्हे तर मुलाच्या संसारातून आई-वडील विभक्त होतात. पुढे आईवडिलांचीही विभागणी होते. आई एका मुलाकडे तर वडील दुसऱ्या मुलाकडे! आपल्या बुद्धीत समता नसल्यामुळे अशा घटना घडतात.

एका माणसाला दोन बायका होत्या. थोरली नावडती होती आणि धाकटी आवडती होती. धाकटीच्या पदरात जरा जास्तच माप पडत होते. पहिली पत्नी काही आजार होऊन मृत्युशय्येवर पडली तेव्हा तिने आपल्या नवऱ्याला विनंती केली, ''मी आता मरणारच आहे. पुढे केव्हातरी तुमचा आणि तुमच्या दुसऱ्या बायकोचाही मृत्यू होणार आहे. माझी शेवटची इच्छा अशी आहे की, आम्हा दोघींच्या समाधीच्या मधोमध तुमची समाधी असावी. तुम्ही जन्मभर दोन्ही बायकांबाबत विषमव्यवहार केला. तिला अधिक दिले, मला कमी. म्हणून मृत्युनंतर तरी तुम्ही समत्वव्यवहार करावा अशी अपेक्षा आहे.''

पहिली बायको मेल्यावर त्या माणसाने तिची समाधी बांधली. पुढे काही वर्षांनी त्याची दुसरी बायको मेली. तेव्हा त्याने मध्ये अंतर सोडून पहिल्या बायकोच्या समाधी शेजारी तिची समाधी बांधली. काही दिवसांनी तो जेव्हा मृत्युशय्येवर पडला तेव्हा त्याने आपल्या मुलांना बोलावून सांगितले, ''माझ्या पहिल्या बायकोच्या इच्छेप्रमाणे माझी समाधी दोन्ही समाध्यांच्या मध्यभागी बांधा, परंतु माझ्या लहान बायकोच्या समाधीच्या किंचित जवळ.''

जिवंतपणीच नव्हे तर मृत्यूनंतर देखील माणूस विषमव्यवहारच करतो. म्हणून गीतेत भगवंताने म्हटले आहे,

'समत्वं योग उच्यते'. बुद्धीत समत्व बाणणे हाच योग होय. जर तुमच्या बुद्धीत समता नसेल तर तुम्ही योगी होणार नाही. भोगी किंवा रोगी व्हाल. म्हणून प्रत्येकाने योग्य तेवढा आहार घ्यावा आणि प्रेमभावनेने भगवच्चिंतन करावे. इष्टलिंगाची पूजा केल्याशिवाय भोजन करू नये. या आचारालाच 'सप्रकाण्ड शील' असे म्हणतात. भोजन करण्याचा अभ्यास प्रत्येकाला असतो, परंतु पूजा करण्याचा नसतो. तुम्ही दिवसातून एकदाच नव्हे तर दोन वेळा, तीन वेळा, चार वेळा भोजन करा. परंतु त्याआधी किमान एकवेळ तरी इष्टलिंगाची पूजा करा.

'इष्टलिंगानर्पितस्य द्रव्यस्य अग्रहणं सशाख शीलम्।' कोणतीही वस्तू वा भोग्य पदार्थ इष्टलिंगाला अर्पण करूनच ग्रहण करावा. तुम्ही जेवण करा, चहा-कॉफी हे सारे इष्टलिंगाला अर्पण करून मग घ्यायला हवे. तुम्हाला वाटेल की सदान् कदा इष्टलिंगाला नैवेद्य कशाला दाखवायचा? पक्वान्ने केल्यावरच त्याचा नैवेद्य दाखवणे बरे! बरेच लोक सणासुदीच्या दिवशी देवाला नैवेद्य दाखवतात, रोज दाखवत नाहीत. घरात काही विशेष खाद्यपदार्थ केलाच नाही तर नैवेद्य दाखवण्याची गरजच काय, असे त्यांना वाटते. परंतु मला रोज नैवेद्य दाखवू नका असे भगवंताने थोडेच सांगितले आहे? भगवंत तर म्हणतात, 'पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति'।। (गीता ९.२६)

प्रेमभावाने पाणी असो वा किंवा झाडाचे सुकलेले पान असो, जर भक्ताने अर्पण केले तर मी ते आनंदाने ग्रहण करतो, असे भगवंत म्हणतात. परंतु आपण मात्र देवाला अर्पण करायला हे योग्य नाही, ते योग्य नाही' असे म्हणत असतो. काही लोक देवाला रोज दूध साखर यांचाच नैवेद्य दाखवतात. भाजी-पोळीचा नैवेद्य दाखवत नाहीत. ते कशाला देवाला अर्पण करायचे? असे त्यांना वाटते. तुम्हाला जे काही खायचे असेल ते भगवंताला अर्पण करूनच खावे, असा शास्त्रांचा आदेश आहे. या आचारालाच 'सशाख शील' असे म्हणतात.

'शिवार्पितप्रसादस्य यत् परित्यागवर्णनं सपुष्पं शीलम्।' 'सपुष्प शील' हा सातवा आचार होय. इष्टलिंगाला जे काही तुम्ही अर्पण करता ते पूर्णपणे सेवन केले पाहिजे. अर्धे खाल्ले, अर्धे टाकले, असे चालत नाही. लिंगार्पित केलेले अन्न 'प्रसाद' होते. प्रसादाबद्दल आपल्या मनात हेयभावना नसावी. वीरशैवसिद्धान्तात 'प्रसादी दीक्षा' सांगितली आहे. जे पट्टाधिकारी असतात त्यांनी प्रसादी दीक्षा घेतलेली असते. काही भक्त देखील ती घेतात. आजच्या काळात दीक्षाच कोणी घेत नाही तर प्रसादी दीक्षा कोण घेणार? जे अन्न भगवंताला अर्पण केले जाते ते प्रसादरूप पावते. म्हणून या अन्नाला परब्रह्म मानले जाते. अन्नच आपला पहिला देव आहे. म्हणून उपनिषदात म्हटले आहे की, अन्नाला परब्रह्म माना. तुम्ही सत्संगाला येताना बहुतेक भोजन करूनच येता. कारण आधी पोटोबा आणि नंतर वेळ मिळाला तर विठोबा! परंतु प्रसादामध्ये भगवद्‌बुद्धी असावी. जो अन्न लिंगार्पित करून ते ग्रहण करतो तो सदोदित प्रसन्न असतो. प्रसादस्तु प्रसन्नता. अन्नाचाच सूक्ष्म परिणाम म्हणजे आपले मन. जसे अन्न आपण खाऊ तसे आपले मन बनेल. म्हणून अन्न पवित्र बनवून ते खावे. शिवाला अर्पण केल्यावरच अन्न पवित्र होते. प्रसाद बनते. प्रसाद सेवन केल्याने मन प्रसन्न होते. म्हणून प्रसादाबद्दल तुच्छता बाळगू नये. प्रसाद पूर्ण भक्षण करावा. आपल्या शास्त्रात तर असे सांगितले आहे की, ज्या ताटात आपण जेवण करतो त्या ताटात पाणी ओतून ताट धुऊन ते पाणी प्यावे. कारण प्रसादान्नाचा एक कण देखील वाया जाऊ नये. आधुनिक विचाराच्या लोकांना हे थोडे विचित्र वाटेल. कधीकधी संस्कारशून्य लोकांच्या घरीही आम्हाला जावे लागते. ताट धुऊन तेव्हा आम्ही पाणी पितो तेव्हा तेथील मुलांना आश्चर्य वाटते. त्याविषयी ती मुले आम्हाला विचारतात. कारण या कृतीबद्दल त्यांना कुणी सांगितलेले नसते. ताटातले अर्धे अन्न खायचे, अर्धे उष्टे टाकायचे,

एवढेच त्यांना माहीत असते. त्यात मुलांचा दोष नसतो. त्यांचे आईवडीलही तसेच करतात. ताट धुऊन पाणी पिताना पाहून 'यांना कधी खायला मिळाले नाही का?' असाच विचार त्यांच्या मनात येत असेल. परंतु अन्न हे प्रसादान्न असते हे त्यांना कोणी शिकवलेच नसते. म्हणून आपल्याला जेवढे अन्न खायचे त्यापेक्षा थोडे कमीच ताटात वाढून घ्यावे, उष्टे टाकू नये. काही लोक उष्टे अन्न भिकाऱ्याला देऊन टाकतात. त्यापेक्षा ते उष्टे न करताच दिले तर काय बिघडते? म्हणून अन्नाबद्दल पूज्य भावना असावी. उत्तम भावनेने भोजन केले तर आपली भोजनक्रिया म्हणजे एक यज्ञच ठरतो. 'मराठी मध्ये एक श्लोक आहे–

**वदनी कवळ घेता नाम घ्या श्रीहरीचे।**
**सहज हवन होते नाम घेता फुकाचे।।**
**जीवन परि जीवित्वा अन्न हे पुर्णब्रह्म।**
**उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म।।**

तोंडात घास घेताना भगवंताचे नाव घ्यावे. म्हणजे तुमचा घास यज्ञकुंडात हवन करणारे द्रव्यच होते. म्हणून अन्नाला पूर्णब्रह्म मानून जर त्याचे भक्षण केले तर आपले भोजन हे केवळ उदरभरण न ठरता ते पवित्र यज्ञकर्म होते, असा या श्लोकाचा अर्थ आहे. यज्ञामध्ये हविर्द्रव्य अर्पण करताना रुद्राय स्वाहा, ब्रह्मणे स्वाहा, शिवाय स्वाहा अशी परमेश्वराची नावे घेतली जातात. ईश्वराला काही समर्पित करणे म्हणजे यज्ञ होय. भगवंताला अन्न अर्पण करून ते आनंदाने जे खातो तो यज्ञच करीत असतो.

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ हुतम्।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना।।**

(गीता, ४.२४)

याला 'ब्रह्मयज्ञ' असेही म्हणतात. म्हणून प्रत्येकाने भोजन करताना सजग, जागृत रहावे. अन्नापासूनच मन तयार होत असते. आपण वाईट अन्न खाल्ले तर मन वाईट होईल. मन वाईट झाले तर जीवन वाईट होईल. मन हेच जीवात्म्याच्या बंधनाचे आणि मोक्षाचे कारण असते. मनात सुधारणा घडवून आणायची असेल तर आहारात शुद्धी आणावी लागते. इष्टलिंगाला अर्पण केल्यावरच आहार शुद्ध होतो, प्रसाद होतो, प्रसादान्नाचा एक कण देखील वाया जाऊ नये. अशा प्रकारे पूर्ण जागृत राहून भोजन करावे.

एका गृहस्थाने प्रसादी दीक्षा घेतली. रोज भोजन करताना तो जवळ एक लहानशी सुई घेऊन बसत असे आणि भोजन संपल्यावर ताट धुऊन ते पाणी पिऊन सुई व्यवस्थित एका जागी ठेवून देत असे. त्या सुईचा त्याने कधीही उपयोग केला नाही. त्याच्या पत्नीला त्याचे मोठे आश्चर्य वाटायचे. पण त्याबद्दल बिचारीने आयुष्यभर त्याला कधी विचारले नाही. तो गृहस्थ जेव्हा मृत्युशय्येवर पडला तेव्हा तिला राहवले नाही. तिने विचारले,

''मला एक गोष्ट नीट कळली नाही, ती तुम्ही कृपा करून सांगा. भोजन करताना तुम्ही एक सुई जवळ घेऊन बसत होता, ती कशासाठी? ती सुई तुम्ही मला कधी टोचली नाही, स्वतःला टोचून घेतली नाही. तिचा कधीही उपयोग केलेला मी पाहिला नाही. याचे कारण काय?''

पती म्हणाला, 'जेव्हा गुरूकडून मी दीक्षा घेतली, तेव्हा त्यांनी मला अन्नब्रह्माचे महत्त्व पटवून दिले आणि सांगितले की, इष्टलिंगाला अर्पित केलेले अन्न हे प्रसादान्न असते. त्याचा एक कण देखील जमिनीवर पडता कामा नये. तुझ्याकडून अथवा वाढणाऱ्याकडून अनवधनाने जरी एक कण भूमीवर पडला तर तो सुईने उचलून ती सुई

गिळून तू प्राणत्याग केला पाहिजेस. म्हणून मी ती सुई जवळ ठेवत होतो. परंतु तुझ्या हातून अन्न वाढताना आणि माझ्याकडून जेवताना कधीही अन्नाचा कण जमिनीवर पडला नाही. त्यामुळे सुईचा उपयोग करण्याचा प्रसंगच आला नाही.''

अन्नाचा किंचित देखील अपमान करू नये, असे या कथेचे तात्पर्य होय. प्रसादावर एवढी निष्ठा ठेवणारे लोक आपल्या धर्मात होऊन गेले आहेत. म्हणून तर आपला धर्म टिकला आहे. दहा माणसांच्या कुटुंबात एकाने जरी धर्मपालन केले तरी त्याच्या पुण्याईने कुटुंब सुखी होईल. म्हणून प्रसादान्नाचे सेवन सजगपणे करावे. आजच्या काळात भोजनपद्धतीच बिघडून गेली आहे. योगाभ्यास करताना एके ठिकाणी स्थिर बसावे लागते. त्याप्रमाणे भोजन करताना बसावे, अशी आपली परंपरा आहे. परंतु पाश्चात्यांच्या अनुकरणामुळे आपण आपली परंपरा विसरलो आहोत. अलीकडे हातात प्लेट घेऊन इकडे तिकडे फिरत भोजन करण्याची प्रथा बोकाळली आहे. जनावर एके ठिकाणी बसून चारा खात नाही, इकडे तिकडे फिरत खाते. त्याप्रमाणे माणसे हल्ली जेवतात आणि स्वत:ला आधुनिक समजतात. माणसाचे व्यवहार पशूसारखे होत चालले आहेत. त्यांच्यापेक्षा पशू बरे असे म्हणायची वेळ आली आहे. आपल्याला पशू म्हणू नव्हे तर माणूस म्हणून जगायला हवे. माणसांची मानसिक स्थिती अलीकडे बिघडत चाललेली दिसते. याचे कारण त्याचे खाणे-वागणे-बोलणे नीट नाही, हे आहे. त्यामुळे तो स्वत:ही दु:खी होतो आणि इतरांनाही दु:खी करतो. म्हणून आचार्यांनी सांगितलेल्या सदाचाराचे निष्ठेने पालन करावे. इष्टलिंगाला अर्पण केलेले अन्न निष्ठेने भक्षण करणे हे सदाचाराचे सातवे शील होय.

'गुरुजंगमलिंगानां यदेकत्वेन भावनं सफलं शीलम्।' सदाचारातील आठवा आचार म्हणजे 'सफल शील'. वीरशैवसिद्धान्तात गुरू, लिंग, जंगम ही तीन आराध्ये आहेत. हे वेगवेगळे दिसत असले तरी एकच होत. तुम्ही शिवाला बिल्वदल वाहता.

**त्रिदलं त्रिगुणाकारं त्रिनेत्रं च त्रियायुधम्।**
**त्रिजन्मपाप संहारं एक बिल्वं शिवार्पणम्।।**

बिल्व एक आहे पण त्याच्यात दले तीन आहेत. दले तीन असली तरी त्याला एकच मानले जाते. त्याप्रमाणे गुरू, लिंग, जंगम ही त्रिदले आहेत. त्यांचे मूळ एकच आहे. भगवान शिव दीक्षा देण्यासाठी गुरू झाला आहे. भक्तांकडून पूजन करून घेण्यासाठी इष्टलिंग झाला आहे आणि लोकांना उपदेश करण्यासाठी जंगम झाला आहे. म्हणून गुरु-लिंग-जंगमांत भेद न करता तिघांवरही दृढ श्रद्धा ठेवावी. इष्टलिंगावर अधिक निष्ठा आणि गुरु-जंगमावर कमी, असे झाले तर तुमची इष्टलिंगपूजा व्यर्थ जाईल. गुरू आणि जंगम हे इष्टलिंगाचे मुख आहे. लिंगाला तृप्त करायचे असेल तर गुरू आणि जंगम यांना तृप्त करावे लागते. म्हणून प्रत्येक वीरशैवाने इष्टलिंगाएवढीच गुरूवर आणि ज्ञानोपदेश करणाऱ्या जंगमावर श्रद्धा ठेवली पाहिजे. सदाचारात सांगितलेल्या आठ शीलांचे जो प्रमादरहित आचरण करतो तोच सदाचारी होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
१० ऑगस्ट १९९२

## दीक्षागुरुस्थल–८

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज आम्ही शिवाचाराबद्दल सांगणार आहोत. शिवाचार हा एक महत्त्वाचा आचार होय. प्रपंचात शिवाला पाहणे, शिवभावनेने रहाणे आणि शिवाला सर्वोत्तम मानणे याचेच नाव शिवाचार आहे. जर आपल्या इष्टदेवतेला सर्वोत्तम मानले नाही तर आपली भावना विचलित होते. आपल्या इष्टदेवतेवरच भक्ताची दृढ भावना रहावी यासाठी हा आचार सांगितलेला आहे. ईशावास्योपनिषदात म्हटले आहे–

**'ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्।'**

हा प्रपंच कुणाचा आहे? आणि प्रपंचात काय आहे? या दोन प्रश्नांनीच या उपनिषदाची सुरुवात झाली आहे. आपल्याला दिसणाऱ्या प्रपंचात ईश्वरच भरून राहिलेला आहे. कणाकणांत तोच व्याप्त आहे. अशा सर्वव्यापक शिवतत्त्वाचे भक्तिपूर्ण भजन आपण केले पाहिजे आणि त्याच्या कृपेने मिळालेल्या सांसारिक वस्तूंवरील ममत्वाचा त्याग केला पाहिजे. अहंकार आणि ममत्व हीच बंधनाची कारणे होत. मनुष्य जेव्हा बोलतो तेव्हा सर्वप्रथम त्याचा अहंकार प्रकट होतो. नंतर ममत्व व्यक्त होते. पहिल्यांदा 'मी', त्यानंतर 'माझे'. जर 'मी'च नसेन तर 'माझे'ला काही अर्थ राहणार नाही. जर 'मी' असेन तरच 'माझे' पदार्थ, व्यक्ती इ. असतील. देवघरात नंदादीप तेवत असतो. त्याची एक ज्योत असते आणि तिचा प्रकाश देवघरात पसरलेला असतो. अहंकार (मी) म्हणजे ज्योत ममत्व (माझे) म्हणजे प्रकाश. अहंकाराच्या अवतीभवती ममत्व पसरलेले असते. आपण जिथे बसलेलो असतो तिथे आसपास आपले ममत्व पसरलेले असते. एखादा सर्प अंगाचे वेटोळे घालून त्याच्यावर फणा काढून बसतो त्याप्रमाणे आपल्या अवतीभवती ममत्व पसरून त्याच्या मध्यावर आपला अहंकार बसलेला असतो. आपण मोठे घर बांधतो. त्यातल्या एका खोलीत एका खुर्चीवर आपण बसलेले असतो. आपण संपूर्ण घरभर बसू शकत नाही. परंतु आपले ममत्व मात्र संपूर्ण घरभर पसरलेले असते. 'हे घर माझे आहे.' तुम्ही घरातल्या एका कोपऱ्यात बसाल, परंतु तुमचे ममत्व अवघे घर व्यापून टाकते. तुमचे नातलग, तुमची मालमत्ता इतर अनेक गावांत असेल, परंतु तुम्ही जर तुमच्या घरात एके ठिकाणी बसलेले असलात तरी तुमचे ममत्व मात्र तुमच्या नातलगांना आणि मालमत्तेला व्यापून रहाते. अहंकार आणि ममत्व यांच्यामुळे जीवात्म्याचे कल्याण होत नाही. या दोहोमुळेच जीवात्म्याला वारंवार जन्म घ्यावा लागतो आणि मृत्युदेखील पत्करावा लागतो. अहंकार आणि ममत्व दूर करण्यासाठीच आपल्या आचार्यांनी शिवाचार सांगितला. जो शिवभक्त निष्ठेने शिवाचार पाळतो त्याची अहंकार–ममत्वापासून सुटका होते.

शिवाचाराचे सोळा प्रकार सांगितले आहेत. उपभोग्य वस्तूंना संस्काराने शुद्ध करून, त्या शिवाला अर्पण करून, शिवाचा प्रसाद म्हणून स्वीकार करणे, हाच शिवाचार होय. हे सोळा पदार्थ कोणते आहेत? त्यांची शुद्धी कशी करायची? याविषयी तेथे विवेचन करायचे आहे. पहिला प्रकार आहे द्रव्यशुद्धी.

'फलमूलादीनां भस्मप्रोक्षणेन शुद्धिकरणं द्रव्यशुद्धिः।' तुम्ही बाजारातून भाजी–फळे आदी पदार्थ आणता. ती आणल्या बरोबर खाऊ नयेत. काही लोक बाजारात फळे घेतल्यानंतर ती खात–खातच घरी येतात. घरी येण्यापूर्वी अर्धी पिशवी रिकामी होते. शिवाचार सांगतो की, बाजरात फळे खाऊ नयेत. ती घरी आणावीत, स्वच्छ

धुवावीत. अत्यंत भक्तीने त्यावर भस्मप्रोक्षण करून ती शिवाला अर्पण करावीत. नंतर खावीत. यालाच द्रव्यशुद्धी म्हणतात. तुम्ही तुमच्या शरीरावरच भस्मप्रोक्षण करीत नाही तर फळांवर कधी करणार? स्नान झाल्यावर पूजा करण्याआधी भस्मोद्धूलन करावे, असे शास्त्रात सांगितले आहे. भस्मोद्धूलनानंतर भस्मस्नान करावे आणि भस्मस्नानानंतर त्रिपुंड्र धारण करावे. भस्मोद्धूलन, भस्मस्नान, त्रिपुंड्रधारण करून जसे आपले शरीर आपण शुद्ध करून घेतो तसे आणलेल्या वस्तूंवर भस्म शिंपडून त्या वस्तू शुद्ध करून घेण्याची आपल्याकडे परंपरा आहे. अलीकडे लोकांना या आचाराचा विसर पडलेला आहे. त्यामुळे वस्तू कशी शुद्ध करावी, हे त्यांना माहीत नसते. प्रकृतीने सहज उत्पन्न केलेले पदार्थ म्हणजे प्राकृतिक पदार्थ होत. ते तसेच सेवन करणे हे दीक्षावंत वीरशैवांसाठी योग्य नव्हे. जे दीक्षा घेऊन सुसंस्कृत झाले आहेत त्यांनी खाण्या-पिण्याचे पदार्थ देखील शुद्ध करूनच सेवन केले पाहिजेत. म्हणून बाजारातून आणलेली फळे स्वच्छ धुवून त्यावर भस्म प्रोक्षण करून त्यानंतर ती खावीत. भस्मप्रोक्षण केल्यामुळे काय होते? भस्मप्रोक्षण केल्याने तो पदार्थ परमात्म्याचा होतो. भस्म हे भगवान शिवाला अत्यंत प्रिय असलेले चिन्ह आहे. पदार्थाला भस्म लावले की तो पदार्थ शिवाचा होतो. शरीरावर भस्मधारणा केल्यानंतर शरीर शिवाचे होते त्याप्रमाणे. अशाप्रकारे तो पदार्थ शिवाचा झाल्यामुळे त्यावरील आपले ममत्व नष्ट होते.

'क्षेत्रस्य चतुष्कोणे नंदिमुद्रांकित शिलान्यासकरणं क्षेत्रशुद्धिः।' जेव्हा तुम्ही एखादी भूमी, शेतासाठी किंवा घर बांधण्यासाठी खरेदी करता तेव्हा तिच्या चारही कोपऱ्यांवर, ज्यावर शिवलिंग व नंदी कोरलेले आहेत अशा दगडांची स्थापना करावी. अलीकडे ही परंपरा मठ आणि मंदिरे बांधताना पाळली जाते, सामान्य माणसे ती पाळत नाहीत. चार दगडांच्या मधली भूमी ही शिवाची आहे असे समजून त्या ठिकाणी आपण घर बांधावे अथवा शेती करावी. शेती करताना देखील ही शेती शिवाची असून ती शिवाने आपल्याला उपभोगासाठी दिलेली आहे, अशी भावना ठेवावी. याला 'क्षेत्रशुद्धी' असे म्हणतात.

'गृहस्य महाद्वारे शिवलिंगांकनं गृहशुद्धिः।' घराच्या प्रवेशद्वारावर वरच्या बाजूला एकीकडे शिवलिंग आणि दुसरीकडे नंदी यांची चित्रे अंकित करावीत. घरी येणाऱ्यांना हे शिवभक्ताचे घर आहे असे समजले पाहिजे. जुन्या काळी अंगणात सडा घालून त्यावर सुरेख रांगोळी रेखून दाराला भस्म लावून त्याची पूजा करीत असत. शरीरावर लिंगधारण, भस्मधारण करावे त्याप्रमाणे ज्या घरात आपण राहतो त्या घरालाही लिंगधारण, भस्मधारण करावे. त्यामुळे हे घर आपले नसून शिवाचे मंदिर आहे, अशी भावना मनात उत्पन्न होते आणि घरावरील ममत्व नष्ट होते. याला 'गृहशुद्धी' म्हणतात.

'भोजनपानोपयोगी पात्रेष्वपि शिवलिंगांकनं भाण्डशुद्धिः।' घरातील भांड्यावर आपण आपले नाव घालतो. हे माझे आहे, अशी भावना त्यामागे असते. कुणाला भेट म्हणून जेव्हा आपण भांडे देतो तेव्हा त्यावरही आपण आपले नाव घालून देतो. अमक्याची तमक्याला सप्रेम भेट. तुमच्या मित्रांना भांड्यांवर नाव घालून भेट देता ते ठिक आहे. परंतु गुरुजनांना देताना मात्र त्यावर नाव घालू नये. त्यावर केवळ गुरूचेच नाव घालून गुरूला द्यावे. एखाद्या मठाला अथवा मंदिराला जर भांडे दान करायचे असेल तर त्याच्यावर त्या त्या मठाचे किंवा मंदिराचेच नाव घालून आपले नाव गुप्त ठेवावे. गुप्तदानाचे मोल अधिक मानले जाते. शास्त्रात म्हटले आहे- 'धर्म क्षरति कीर्तनात्।' दुसऱ्यांना सांगितल्यामुळे पुण्य-पापांचा क्षय होतो. आपले पुण्यकर्म आपण दुसऱ्यांना सांगत सुटतो, परंतु आपले पापकर्म मात्र आपण कोणालाही सांगत नाही. ते लपवून ठेवतो. जे तुम्ही दुसऱ्यांना सांगाल त्याचा क्षय होईल आणि जे तुम्ही लोकांना सांगणार नाही ते तुमच्या जवळ कायम राहील. तुम्ही लोकांना फक्त पुण्य सांगता म्हणून तुमच्या पुण्यकर्माचा नाश होतो. पाप कुणाला सांगत नाही. म्हणून ते तसेच तुमच्या आत साठून

राहिलेले असते. म्हणून पुण्य सांगू नये, पाप सांगावे.

खरे तर घरातील भांड्यावर आपले, आपल्या वडिलांचे अथवा आडनाव घालू नये, परंतु हे या काळात शक्य नाही. म्हणून ज्या भांड्यात अन्न शिजवायचे असते त्या भांड्याला भस्म लावून त्याच्या आत ॐ आणि पंचाक्षरी मंत्र लिहून मगच त्यात अन्न शिजवावे. त्यामुळे ते अन्न शिवार्पित होते आणि प्रसादरूप होते. ज्या थाळीत तुम्ही जेवता त्या थाळीला देखील भस्म लावण्याची प्रथा आहे. खाण्यापिण्याच्या भांड्यावर नंदीसहित शिवलिंग अंकित करणे याला 'भाण्डशुद्धी' असे म्हणतात.

'गवां भक्षभूतस्य तृणस्य भस्मप्रोक्षणं तृणशुद्धिः।' तुमच्या घरात गाय असेल तर तिच्यासमोर रानातून गवत आणून तसेच टाकू नये. ते देखील शुद्ध करून घ्यावे. याला 'तृणशुद्धी' म्हणतात. यावरून आचारात किती बारकावे आहेत, हे ध्यानात येईल. आपल्या संप्रदायात आचारांचे काटेकोरपणे पालन करणारे शिवाचार्य, पट्टाधिकारी होऊन गेले. स्वामीचा स्वयंपाक करण्यासाठी जर एखादा मनुष्य तयार झाला तरी त्याला स्वामी चाळीस दिवस स्वयंपाक करू देत नसत. स्वामी स्वतः स्वयंपाक करून त्या सेवकाला चाळीस दिवस भोजन घालत. त्यांनतर मात्र सेवकाने शिजवलेले अन्न स्वामी ग्रहण करीत. हा प्रकार तुम्हाला उलटा वाटेल. कारण येथे गुरू शिष्याची सेवा करताना दिसतो. या कृत्याचा उद्देश कोणता? तो स्पष्ट आहे. सेवा करायला आलेला कोणता संस्कार घेऊन आला, त्याने आतापर्यंत काय काय खाल्ले असेल, खाल्लेल्या अन्नामुळे त्याचे शरीर आणि मन कसे घडले असेल, हे आपल्याला माहीत नसते. म्हणून चाळीस दिवसपर्यंत, त्याला स्वतः शिजवलेले अन्न खायला घालून, स्वामी त्याच्या देह-मनात अनुकूल परिवर्तन घडवून आणतात आणि नंतरच त्याच्या हातचे अन्न सेवन करतात. शरीरातल्या रक्तबिंदूत परिवर्तन होण्यासाठी चाळीस दिवस लागतात, आज खाल्लेल्या अन्नाचे चाळीस दिवसानंतर रक्तादी सप्त धातूंत रूपांतर होते, असे आयुर्वेद शास्त्र सांगते. त्यामुळे स्वामी चाळीस दिवसपर्यंत, त्यांची सेवा करायला आलेल्या सेवकाला स्वतः केलेले अन्न खायला घालून, त्याची सेवा करीत असत. आचारातील सूक्ष्मता कळावी यासाठी हे उदाहरण सांगितले आहे. गाईचे दूध आपल्याला प्यावे लागते. म्हणून ती जे गवत खाते ते गवत देखील शुद्ध करायला पाहिजे. तिने दूषित चारा खाल्ला तर तिचे दूध दूषित होईल आणि ते दूषित दूध आपण प्यायलो तर त्यामुळे आपले शरीर-मन दूषित होईल. एवढा सूक्ष्म विचार आपल्या आचार्यांनी करून ठेवला आहे. म्हणून आपल्या आसपास जे पशू वावरतात त्यांचे खाद्यपदार्थ शुद्ध करून घेतले पाहिजे. अर्थात् त्यावर भस्मप्रोक्षण केले पाहिजे. यालाच 'तृणशुद्धी' म्हणतात.

'भस्मप्रोक्षित काष्ठ परिग्रहणं काष्ठशुद्धिः।' चुलीत घालायची लाकडे भस्म शिंपडून शुद्ध करणे याला 'काष्ठशुद्धी' असे म्हणतात. शिवभक्ताने बनवून दिलेला विडा खाणे अथवा इतर कोणी दिलेला विडा भस्म शिंपडून शुद्ध करून खाणे याला 'वीटिकाशुद्धी' म्हणतात. शिवदीक्षा घेतलेले अन्न ग्रहण करणे याला 'पाकशुद्धी' असे म्हणतात. म्हशीचे दूध, दही, ताक, तूप टाळून गायीचेच दूध, दही, ताक, तूप खाणे यालाच 'रसशुद्धी' म्हणतात. म्हैस इत्यादी पशू तामसी असतात, परंतु गाय सात्त्विक आणि तिच्या देहात देवतांचा निवास असल्यामुळे पवित्र मानली जाते. म्हणून गाईचेच दूध उत्यादी सेवन करावे.

यानंतर भवशुद्धी. म्हणजे जन्म-मरण. जन्म-मरणाला कसे शुद्ध केले जाते? वारंवार जन्म आणि मृत्यू जीवात्म्याला भोगावे लागतात. कर्म हे जन्म-मृत्यूचे कारण आहे. कर्माचे अनेक प्रकार आहेत. काम्यकर्म, निष्कामकर्म, निषिद्धकर्म. शास्त्रात सांगितलेले कर्म हे विहितकर्म होय. विहितकर्माचे काम्य आणि निष्काम असे

दोन प्रकार होतात. शास्त्रविहित कर्मे निष्काम भावनेने करावीत. फळाची अपेक्षा न ठेवता निष्काम भावनेने शिवपूजा करावी, असे शास्त्रात सांगितले आहे. कर्म केले तर त्याचे फळ का मागू नये? असे आपल्याला वाटते. परंतु जो मागतो त्याला कमी मिळते आणि जो मागत नाही त्याला अधिक मिळते. तुमच्या घरात एखादे मूल सारखे खाऊ मागणारे असेल तर तुम्हाला त्याचा राग येतो. जे मूल खाऊ मागत नाही त्याला तुम्ही आपण होऊन देता. तसेच जो भक्त भगवंताजवळ जाऊन मागत बसतो त्याच्यावर भगवंत रुष्ट होतात. करण्यापेक्षा हा मागतोच अधिक, असे त्याला वाटते. काही मुले अशी असतात की त्यांना काम सांगण्याआधी त्यांच्या हातावर खाऊ ठेवावा लागतो, मग ती काम करतात. तर काही मुले अशी असतात की, ती काम करून गप्प बसतात. त्यांच्यावर खूष होऊन तुम्हीच त्यांना काहीतरी देता. आधी देणे आणि नंतर देणे यात फार अंतर असते. आपण आधी देतो ते नाईलाज म्हणून आणि नंतर देतो ते खूष होऊन. जे संतोषाने मिळते ते सुखदायक असते आणि जे नाराजीने मिळते ते घेणाऱ्याला आणि देणाऱ्याला दु:खदायक ठरते. म्हणून भगवंताला काही मागू नये. तुम्हाला काय द्यायचे, किती द्यायचे हे तुमच्यापेक्षा भगवंतालाच अधिक ज्ञात असते. मागितले तर फसगत होते आणि मागितले नाही तर त्याची असीम कृपा लाभते.

मृत्यूलोक ही कर्मभूमी आहे. येथे प्रत्येकाला कर्म करावेच लागते. कर्म केल्याशिवाय कुणी जगूच शकत नाही. सकाम भावनेने कर्म केले तर त्यामुळे जन्म-मृत्यूचे रहाटगाडगे सुरू होते. परंतु निष्काम भावनेने कर्म केले तर ते कर्म पुनर्जन्माचे कारण ठरत नाही. निष्काम भावनेने कर्म करणे यालाच 'भवशुद्धी' म्हणतात.

'सर्वभूतदयालुत्वं भूतशुद्धि:।' सर्व प्राणिमात्रांविषयी दयाभावना असावी. दयाभावना नसेल तर आपल्या हातून प्राण्यांची हिंसा घडू शकते, त्यांचा अपमान होऊ शकतो. जसा आपला प्राण आपल्याला प्रिय असतो तसाच प्रत्येक प्राण्याला देखील स्वत:चा प्राण प्रिय असतो. आपल्याला प्रतिष्ठा हवी असते तशीच ती प्रत्येक प्राण्यालाही हवी असते. कुणालाच अपमान नको असतो. कुणालाच मरण नको असते. ज्याच्या मनात दया नांदत नाही असा निर्दयी मनुष्य कुणाची हत्या करू शकतो, अपमान करू शकतो. अपमान करणे आणि हत्या करणे हा अधर्म होय. म्हणून कुणाचा अपमान, हत्या न करणे, प्राणिमात्रांविषयी दयाभाव बाळगणे याला 'भूतशुद्धी' म्हणतात.

प्रत्येकाच्या मनात भावना असते. सद्भावना आणि दुर्भावना असे भावनेचे दोन प्रकार आहेत. एखाद्याचे शुभचिंतन करणे ही सद्भावना तर एखाद्याचे अशुभचिंतन करणे ही दुर्भावना, माणसाच्या मनात दुर्भावनाच अधिक असते, सद्भावना कमी असते.

दोन मित्र होते. ते एकमेकांपासून जेव्हा दूर रहात होते तेव्हा त्यांचे संबंध प्रेमाचे होते. नंतर त्यांनी एकमेकांच्या शेजारी घरे बांधली आणि त्यांच्यातले प्रेम संपले. लहानसहान कुरबुरी होऊन मोठे भांडण झाले. ते एकमेकांचे वैरी झाले, स्पर्धक झाले. एकमेकांना पाण्यात पाहू लागले. त्यांच्यापैकी एक तपश्चर्येला गेला. म्हणून मग दुसराही तपश्चर्येला जाऊन बसला. दोघांची तपश्चर्या चालू झाली. पहिल्यावर भगवान शिव प्रसन्न झाले. त्याच्या समोर प्रकट होऊन म्हणाले, ''वत्सा, मी तुझ्यावर प्रसन्न झालो, वर माग.''

त्याने हळूच एक डोळा उघडून पाहिला तर प्रत्यक्ष भगवान शंकर उभे होते. मग त्याने दुसराही डोळा उघडला. तो म्हणाला, ''भगवन्, तुम्ही प्रथम माझ्याकडे आलात की त्याच्याकडेही जाऊन आलात?''

''नाही वत्सा, मी प्रथम तुझ्याकडेच आलोय.'' भगवान म्हणाले.

''भगवन्,'' तो आनंदून म्हणाला, ''मग काही हरकत नाही. पण आता तुम्ही प्रथम त्याच्याकडे जा आणि

तो ते मागेल तेच मला दुप्पट द्या.''

शिव भगवान दुसऱ्या माणसासमोर प्रकट झाले. त्याने डोळे उघडून पाहिले आणि त्यांना तोच प्रश्न विचारला, ''तुम्ही त्याच्याकडे आधी गेला होतात काय?''

''होय,'' भगवान म्हणाले, ''पण त्याने तू जे मागशील त्याच्या दुप्पट मला द्या, असा वर मागितला आहे.''

त्याने मनाशी विचार केला की आपण कोणतीही चांगली वस्तू किंवा पैसे मागितले तर आपल्या प्रतिस्पर्ध्याला त्याच्या दुप्पट मिळणार. मग आपल्या तपश्चर्येचा उपयोगच काय? आपण असे काही मागावे की त्यामुळे त्याचा दुप्पट तोटा झाला पाहिजे. तो ईश्वराला म्हणाला, ''भगवन्, मला एका डोळ्याने आंधळा करा, मला एका हाताने लुळा करा आणि एका पायाने लंगडा करा.''

''तथास्तु'' असे म्हणून भगवान अंतर्धान पावले. हा एक डोळ्याने आंधळा झाला तेव्हा त्याचा प्रतिस्पर्धी दोन डोळ्यांनी आंधळा झाला. याचा एक हात गेला तर त्याचे दोन्ही हात गेले. याने एक पाय गमावला तर त्याचे दोन्ही पाय गेले. अशा प्रकारे आपल्या प्रतिस्पर्ध्याला त्याने आंधळा-लुळा-लंगडा करून ठेवले. दोघेही दुःखी झाले. हे कशाचे फळ आहे? तर दुभार्वनेचे. भगवंत प्रसन्न होऊनही त्याने सुख मिळवले नाही. आपल्यापेक्षा दुसरा कुणी सुखी होऊ नये, तो आपल्यापेक्षा खालच्या स्थानावरच राहावा अशी दुर्भावना मनात ठेवली तर तुम्हाला सुख मिळणार नाही आणि दुसऱ्यालाही सुख मिळणार नाही. म्हणून सतत शिवचिंतन करावे. ही सद्भावना होय. यालाच 'भावशुद्धी' असे म्हणतात.

यानंतर मार्गशुद्धी, मार्गावरून चालताना विचारपूर्वक सांभाळून पावले टाकावीत, असा शास्त्राचा आदेश आहे. मार्गावर कितीतरी जीवजंतू असतात. आपले त्यांच्याकडे लक्षच नसते. बरेच लोक मोठमोठ्या जीवांना गाडीच्या चाकाखाली चिरडतात, तिथे लहान-सहान जीवजंतूंची दखल कोण घेतो? परंतु प्रत्येक जीवाला जगण्याचा नैसर्गिक अधिकार आहे. म्हणून मार्गावरून चालताना चुकूनही एखादा जीवजंतू आपल्या पायाखाली चिरडू नये इतक्या सावधपणे चालले पाहिजे. यालाच 'मार्गशुद्धी' म्हणतात.

'कालशुद्धी' म्हणजे अगदी पहाटे उठून स्नान वगैरे उरकून प्रसन्न चित्ताने शिवपूजा करणे. परंतु तुम्ही असे करत नाही. तुम्हाला उठल्याबरोबर खायला हवे, प्यायला हवे. काही लोक तर दात स्वच्छ न करताच खात-पित असतात. आपल्या अनियमित वागण्यामुळे अनेक आजार उत्पन्न होत असतात. दंतधावन करून, स्नान करून इष्टलिंगपूजा केल्यानंतरच आपण इतर कामाला लागले पाहिजे. यानंतर 'वाक्शुद्धी' सांगितली आहे. ईश्वराने माणसाला जीभ दिली आहे, ती कुणाला शिव्या देण्यासाठी नव्हे तर ओव्या गाण्यासाठी. खरे बोलण्यासाठी, गोड बोलण्यासाठी. आपली जीभ जेवढी मऊ असते तेवढीच आपली वाणी देखील मृदू असावी. ज्याचे जीवन मृदू असते तो दीर्घजीवी ठरतो.

एकदा गुरू शिष्याला मृदू जीवनाबद्दल समजावून सांगत होते. ''माझ्या मुखात काय दिसते ते पाहा'' असे शिष्याला सांगून त्यांनी आपले तोंड उघडले. शिष्यांनी त्यांच्या तोंडात पाहिले. गुरू म्हातारे होते. त्यांच्यामुखात एकही दात नव्हता. गुरूने विचारले, ''काय आहे माझ्या मुखात?''

''तुमच्या मुखात फक्त जीभ आहे. दात नाहीत.'' शिष्याने उत्तर दिले.

''जन्मल्याबरोबर आधी जीभ असते की दात?'' गुरूने विचारले,

''जीभ'' तो म्हणाला.

जन्मल्याबरोबर आपल्याला जीभ असते, दात नसतात. ते नंतर काही महिन्यांनी येतात. दात नंतर येतात

आणि अगोदर पडतात. तर जीभ मात्र आधीपासून शेवटपर्यंत असते. याचे कारण कोणते? तर जिभेत मृदुपणा असतो. दातात मृदुपणा नसतो. जो कोणी भेटेल त्याच्याशी ते भांडत बसतात. तोंडात जे काही पडेल त्याच्याशी पहिल्यांदा भांडण करतात ते दातच. दात जेव्हा त्याचे पूर्ण चूर्ण करतात तेव्हा जीभ ते हळूच उचलून पोटात ढकलते. दात एखाद्या मिक्सरप्रमाणे काम करतात. प्रत्येक कठीण वस्तूंशी दातच झगडतात. काही लोक शर्यत लावून दगड देखील खातात. म्हणून दात लवकर पडतात. जो कठोरपणे वागतो तो लवकर संपतो, पण जो मृदुपणे वागतो तो दीर्घजीवी ठरतो. अशा मृदू जिभेने आपण लोकांशी मृदू बोलावे. यालाच 'वाक्शुद्धी' म्हणतात.

'आसने शयने याने गोष्ठ्यां सर्वत्र सर्वदा सद्भक्तजनसांगत्यं जनशुद्धिः।' 'जनशुद्धी' हा शिवाचारातील शेवटचा आचार होय. ज्यांचे संस्कार, विचार आपल्यासारखेच आहेत अशा लोकांच्या संगतीत रहाणे म्हणजे जनशुद्धी होय. ज्यांचे विचार आपल्याशी जुळत नाहीत, त्यांच्याशी जर आपण व्यवहार ठेवला तर भांडण होण्याचाच संभव असतो. अशा प्रकारे शिवाचारात सांगितलेला प्रत्येक आचार नीट समजावून घेऊन त्याप्रमाणे वागावे. शक्य होईल तेवढा शुद्ध व्यवहार ठेवावा. त्यामुळे जीवन शिवमय होईल. प्रत्येकाचे जीवन शिवमय करणे हाच शिवाचाराचा उद्देश होय. तुम्ही सर्वांनी शिवाचाराचे पालन करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

११ ऑगस्ट १९९२

---

आशीर्वचन दहावे

## दीक्षागुरुस्थल-९

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंगाचार, शिवाचार आणि सदाचार या तीन आचारांविषयी, त्यातील सूक्ष्म भेदांविषयी तुम्ही आशीर्वचने ऐकली आहेत. आता 'गणाचार' या चौथ्या आचाराविषयी तुम्हाला सांगणार आहोत. मनुष्यजन्म घेतल्यावर प्रत्येकाला आचारसंपन्न व्हावे लागते. तुम्ही ऐकलेले आचार केवळ वीरशैवांसाठी सांगितलेले नाहीत तर सर्व मानवसमाजासाठी सांगितले आहेत. या आचारांचे पालन करून कोणीही मनुष्य परमपदाची प्राप्त करून घेऊ शकतो. आचारांचे पालन न करता जो मनुष्य आपले जीवन व्यतीत करतो, तसाच मरण पावतो त्याची फार मोठी हानी होत असते. मनुष्यजन्म घेऊन जे करायचे तेच केले तर मनुष्याला फार मोठा लाभ होतो. शिवप्राप्ती हाच मोठा लाभ होय. ज्याला मिळवले म्हणजे सारे काही मिळते अशा शिवाच्या प्राप्तीसाठी धर्माचरण करावे लागते. आचारविहीन मनुष्य पशूच होय. आचारशून्य मनुष्याला मराठी संतांनी 'गर्दभ' म्हणजे गाढव असे संबोधले आहे. गाढव चांदणे पडले असताना सावलीत उभे रहाते आणि वैशाखातल्या उन्हात पीक नसलेल्या शेतात चरत बसते. म्हणून त्याला बुद्धिहीन प्राणी समजतात. ज्यावेळी बुद्धिहीनता दिसते त्यावेळी आपण 'गाढव' शब्दाचा प्रयोग करीत असतो. याच अर्थाने अज्ञानी आणि अनाचारी मनुष्याला मराठी संतांनी 'गर्दभ' म्हटले आहे. माणसाने आपल्या आचरणाबद्दल विवेक बाळगावा. अनाचाराबद्दल त्याला लाज वाटावी आणि आपले आयुष्य त्याने

सुधारून घ्यावे, यासाठीच संतांनी कठोर शब्दांचा वापर केलेला आहे.

गणाचार हा एक महत्त्वाचा आचार असून सामान्य माणसांना तो कठीण वाटतो.

**शिवस्य शिवभक्तस्य शिवधर्मादिकस्य च।**
**न श्रृणोति च यन्निन्दां च गणाचार उच्यते।।**

(चंद्रज्ञानागम, क्रियापाद, ९.५)

शिवाच्या गणांनी ज्याचे आचरण केले तो गणाचार होय. रेणुक, दारुक, एकोराम, वीर, नंदी, भृंगी, वृषभ, स्कंद आदी शिवाचे गण होत. ते शिवाच्या निकट राहतात. त्यांनी आचरिलेला आचार म्हणजेच गणाचार होय. आपणही शिवभक्त असल्याने आपल्याला गणाचाराचे पालन करावे लागते. आपल्या इष्टदेवतेची, धर्मग्रंथाची, गुरूची निंदा ऐकू नये, हा गणाचाराचा साधा अर्थ आहे. निंदा करणाऱ्याला जेवढे पाप लागते त्यापेक्षाही अधिक पाप निंदा ऐकणाऱ्याला लागते. कारण तुम्ही निंदा ऐकायला उत्सुक असता, म्हणूनच तुमच्यासमोर बोलणारा दुसऱ्याची निंदा करीत असतो. तुम्ही ऐकणार नाही तर पुढचा बोलेलच कशाला? त्याने निंदा करायला सुरुवात केली आणि तुम्ही उठून गेलात तर निंदा आपोआप बंद होईल. म्हणून शिवाची, शिवसिद्धान्ताची, गुरूची निंदा शिवभक्ताने श्रवण करू नये. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त स्पष्ट म्हटले आहे–

**शिवनिंदाकरं दृष्ट्वा घातयेत् अथवा शपेत्।**
**स्थानं वा तत्परित्यज्य गच्छेद् यद्यक्षमो भवेत्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.३६)

शिवनिंदा चालू असेल तर शिवभक्ताने दोन कामे करावीत. सामर्थ्य असेल तर निंदा करणाऱ्याचा शिरच्छेद करावा आणि सामर्थ्य नसेल तर ते स्थान सोडून निघून जावे. वीरभद्राने याच कारणासाठी दक्षाचा शिरच्छेद केला, त्याच्या कुयज्ञाचा विध्वंस केला. तुम्हाला हे शक्य झाले नाही तर निंदा करणाऱ्याला वाक्ताडन करावे. तेही शक्य नसेल तर तेथून निघून जावे. परंतु कोणत्याही परिस्थितीत शिवनिंदा ऐकू नये. यालाच 'गणाचार' म्हणतात.

गणाचारात चौसष्ट शीले सांगितलेली आहेत. त्यामध्ये वाणीचे सात आचार आहेत. त्यात पहिला आचार आहे 'यथार्थ भाषण'. सत्य बोलणे हा गणाचारातील पहिला आचार होय. सत्य हा एक धर्म आहे. दहा धर्मांमध्ये त्याचा समावेश केलेला आहे. सत्याला सर्वश्रेष्ठ धर्म मानले आहे. सत्य सर्व धर्मांचे मूळ आहे. सत्य बोलण्यासारखी मोठी तपश्चर्या दुसरी नाही. तुम्ही रोज जप–ध्यान कराल, परंतु व्यवहारात सतत खोटे बोलाल तर तुमचे जप-ध्यान निष्फळ ठरेल. असत्य बोलण्याने वाणी दग्ध होते. दग्ध वाणीत सामर्थ्य असत नाही. म्हणून सत्य बोलण्याचा अभ्यास करावा. जो कमीत कमी असत्य बोलण्याचा प्रयत्न करतो त्यालाच सत्य बोलणे साधते. आपण खोटे बोलण्याचा अभ्यासच केलेला असतो. म्हणून तर खोटे बोलत असतो. आता खरे बोलण्याचा अभ्यास केला पाहिजे. अभ्यासाने वाटेल ते साध्य होऊ शकते.

महाभारतामध्ये एक रोचक कथा आहे. कौरव–पांडवांना गुरू द्रोणाचार्य शिक्षण देत होते. एकदा त्यांनी सर्वांना आदेश दिला की, उद्या सर्वांनी 'सत्यं वद, धर्मं चर' हे वाक्य' पाठ करून यावे.

दुसऱ्या दिवशी युधिष्ठिर सोडून सर्वांनी ते वाक्य गुरूंना पाठ म्हणून दाखवले. युधिष्ठिर म्हणाला, ''माझे पाठांतर झाले नाही.''

गुरुजींनी त्याला आणखी एक दिवस दिला. परंतु दुसऱ्या दिवशीही त्याचे पाठांतर झाले नाही. असे बरेच दिवस गेले. शेवटी गुरू म्हणाले, ''तुझ्यापेक्षा बुद्धीने उणे असलेल्या विद्यार्थ्यांनी हे वाक्य पाठ केले. मग तुला हे वाक्य कसे पाठ करता येईना?''

''का होईना कुणास ठाऊक, पण होईना खरे.'' युधिष्ठिर म्हणाला. शेवटी गुरूने त्याला विचारणे सोडून दिले.

एक दिवस तो स्वत:च गुरूजवळ गेला आणि म्हणाला, ''गुरुदेव, आज मी ते वचन पाठ केले आहे. 'सत्यं वद' अशी आपण आज्ञा केल्यानंतर मी प्रत्येक क्षणी ती आचरणात आणण्याचा प्रयत्न करीत होतो. खोटे बोलणे कमी कमी करण्याचा अभ्यास रोज करत होतो. आज मी एकही खोटा शब्द बोललो नाही. म्हणून 'सत्यं वद' हे वाक्य आज मला पूर्ण पाठ झाले आहे.''

ही अध्ययनाची प्रक्रिया आहे. म्हणून खोटे बोलण्याचे प्रमाण दिवसागणिक कमी करण्याचा अभ्यास केला तर एके दिवशी तुम्ही संपूर्ण सत्यवादी निश्चित व्हाल. यानंतर दुसरे शील आहे– 'सत्यं प्रियं हितं च भाषणम्'. सत्य हे बोलावेच, परंतु ते प्रिय आणि हितकर असावे. तुम्ही सत्य बोलाल, परंतु त्यामुळे जर कोणाचा संसार उध्वस्त होत असेल किंवा कुणाचे मन दुखत असेल तर त्याचा काही उपयोग नाही. सत्य बोलणे प्रिय असावे आणि त्यामुळे व्यक्तीचे आणि समाजाचे हित देखील साधले जावे. तिसरे शील आहे– 'प्रत्यहं वेदागमादिसच्छास्त्र पठणम्।'. वेदागमांचे, धर्मग्रंथांचे रोज पठण–पारायण करावे. त्यासाठीच आपल्याला ईश्वराने वाणी दिली आहे.

चौथे शील आहे– 'शिवस्य शिवभक्तानां गुरौश्च प्रशंसनम्'. तुम्हाला प्रशंसा करायचीच असेल तर ती शिवाची, गुरूची करा. मंत्रजप करून किंवा भजन करून शिवभक्ताने शिवाची आणि गुरूची स्तुती करावी. पाचवे शील म्हणजे 'अन्य देवानां सामान्य मनुष्याणां प्रशंसावर्जनम्।'. जी आपली इष्टदेवता नाही त्या देवतेची प्रशंसा करू नये आणि सामान्य मनुष्याची स्तुती करण्यात वेळ दवडू नये. अन्य देवतांची प्रशंसा केली तर तुमची एकनिष्ठा भंग पावते आणि सामान्य माणसाची प्रशंसा केली तर तुमचे भावजीवन संपुष्टात येऊन तुम्ही पूर्ण व्यावहारिक बनता. म्हणून स्तुती केवळ भगवान शिवाचीच करावी. काय मागायचे असेल ते त्यालाच मागावे. सामान्य माणसाला मागू नये. यासंबंधी एक कथा तुम्ही ऐकली असेल.

एक फकीर एका राजाकडे भिक्षा मागण्यासाठी गेला. तेव्हा राजा म्हणाला, ''थोडा वेळ थांब, माझी प्रार्थनेची वेळ झाली आहे. प्रार्थना संपली की तू मागशील ते मी तुला देईन.''

त्याप्रमाणे फकीर बाजूला जाऊन उभा राहिला. राजा ईश्वराची प्रार्थना करू लागला, ''देवा मला सुखी ठेव, माझ्या परिवाराला सुखी ठेव. माझी सत्ता आमरण टिको. माझा राजकोष संपत्तीने भरून टाक.''

प्रार्थना संपवून तो फकिराकडे वळला आणि म्हणाला, ''हं, तुला काय हवे ते माग.''

''मला तुझ्याकडून काहीही नको,'' फकीर म्हणाला.

''का बरे?'' राजाने आश्चर्याने विचारले, ''थोड्या वेळापूर्वी तर तूच भिक्षा मागत होतास?''

''त्यावेळी तू श्रीमंत असशील असे मला वाटले होते'', भिकारी म्हणाला, ''पण आता मला कळले की तू श्रीमंत नाहीस तर माझ्यापेक्षाही मोठा भिकारी आहेस. मी तुझ्याकडे भीक मागायला आलो होतो. परंतु आता मला दिसले की तू ईश्वराकडे भीक मागतोस. एका भिकाऱ्याने दुसऱ्या भिकाऱ्याकडे भीक मागू नये असा भिकाऱ्यांच्या जगातला नियम आहे. तू देवाकडे भीक मागणार आणि त्यातलीच मला थोडी देणार. त्यापेक्षा मी सरळ देवालाच मागितलेले बरे.'' असे म्हणून भिकारी तिथून निघून गेला.

सामान्य मनुष्य आपल्याला काहीतरी देऊ शकतो, म्हणून आपण त्याची प्रशंसा करतो.. परंतु शास्त्रांचा आदेश आहे की सारे काही शिवाचेच आणि त्यानेच ते तुम्हाला दिले आहे. म्हणून केवळ त्याचीच स्तुती करा, त्याचेच स्मरण करा.

सहावे शील आहे– 'आत्मस्तुतिवर्जनम्।' प्रत्येकाला दुसऱ्याने आपली स्तुती केली तर गोड वाटते. दुसऱ्यांनी आपली स्तुती केली तर हरकत नाही. परंतु काही लोक स्वतःच स्वतःची स्तुती करतात. हे अनुचित होय. आत्मस्तुती कधीही करू नये. तुमचे कार्य पाहून दुसऱ्याने तुमची स्तुती केली तर तुम्ही दोषी नाही, परंतु आपली आपणच स्तुती करणे निंदनीय आहे. ते आत्महत्येसारखे पाप मानले जाते. सातवे शील आहे– 'परनिंदादिराहत्यं चेति सप्तविधं वाचिकं शीलम्'. आपली आपण स्तुती करू नये त्याप्रमाणेच दुसऱ्याची निंदा करू नये. आत्मस्तुती केल्यावर जेवढा दोष लागतो तेवढाच दुसऱ्यांची निंदा केल्यावर लागतो. ही सात वाचिक शीले असून त्यामुळे आपली वाणी शुद्ध होते.

यापुढे पाच प्रकारची 'पाणिगत शीले' सांगितली आहेत. वाणी नंतर पाणि. पाणि म्हणजे हात. ईश्वराने आपल्याला हात कशासाठी दिले आहेत? हे देखील आपण नीट समजून घेतले पाहिजे. हात अतिशय महत्त्वाचा असतो. सकाळी उठल्याबरोबर आपल्या हाताचे दर्शन घ्यावे, असे शास्त्र सांगते. 'प्रभाते करदर्शनम्'. आपले जीवन घडवणे किंवा बिघडवणे आपल्याच हातात असते. तुमच्या हातांनी सत्कर्मे घडली तर तुमचे जीवन घडेल आणि दुष्कर्मे घडली तर बिघडेल. दुसऱ्याने आपल्याला 'हात' दाखवू नये यासाठी तरी आपण सकाळी उठल्याबरोबर आपले हात बघावेत. म्हणून या ठिकाणी हातांची पाच कर्तव्ये सांगितली आहेत. पहिले शील आहे, 'गुरुलिंगजंगमानां नमस्कृतिः।' नमस्कार करताना आपल्याला सर्वप्रथम हातांचाच उपयोग करावा लागतो. नमस्कार कोणाला करावा? तर गुरू, लिंग, जंगम यांना. रोज गुरूला, गुरू नसतील तर जंगमाला, जंगम नसेल तर इष्टलिंगाला नमस्कार करावा हा पहिला आचार होय.

दुसरे शील आहे– 'पूजोपकरणानां संपादनम्।'. इष्टलिंगपूजेसाठी बेल, फूल, गंध आदी सामग्री आपल्या हाताने संपादन करावी, संग्रहित करावी. हाताकडून घडणारा हा पवित्र आचार होय. तिसरे शील आहे– 'रुद्राक्षमालया मूलमंत्रस्य अन्वहं जपः।' ईश्वराने आपल्याला बोटे दिली आहेत. बोटे नसती तर आपण एखादी वस्तू धरू शकलो नसतो किंवा जेवणही करू शकलो नसतो. रुद्राक्षमाळ घेऊन बोटांनी तिच्यातला एकेक मणी सरकवत पंचाक्षरी महामंत्राचा जप करावा. चौथे शील आहे– 'गुरुलिंगजंगमानां प्रत्यहं आराधनम्।'. केवळ नमस्कार करून कर्तव्य संपत नाही, तर गुरूची, जंगमाची पादपूजा आणि इष्टलिंगाची पूजा नियमित केली पाहिजे. पाचवे शील आहे– 'गुरुजंगमयोः शिवधर्माय च यथाशक्तिदानम्'. दान करणे हा हाताचा पाचवा आचार होय. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त दानाचे महत्त्व वर्णिले आहे. सोपाधिक दान, निरुपाधिक दान आणि सहजदान असे दानाचे तीन प्रकार आहेत. आपण केलेल्या दानाची परतफेड होईल या इच्छेने केलेले दान म्हणजे सोपाधिक दान होय. तुम्हाला परत मिळेलही, परंतु त्या भावनेने देऊ नये. तुम्ही एका हाताने द्याल तर ईश्वर तुम्हाला सहस्र हातांनी देईल. तो देण्यासाठीच बसला आहे. जो मागतो तो जीव, जो देतो तो देव. कधी कधी देणारा देव देखील जीवाकडे मागायला येतो. जीवाने कुठपर्यंत जीव म्हणून राहावे? त्याने देखील देणारा देव व्हावे, असे त्याला वाटते. त्याला देव होण्याची संधी द्यायला तो त्याच्याकडे मागायला येतो. भगवान शिवच जंगमाचे रूप घेऊन ज्याला आपण दिले आहे त्या जीवाकडे मागायला येतात. आपण मात्र त्यांना गालिप्रदान करून हाकलून लावतो.

देणाऱ्याचे देखील तीन प्रकार सांगितले आहेत. गो-उदार, मेघोदार आणि नारिकेलोदार. रानात चरून नदीचे पाणी पिऊन गाय घरी येते आणि आपल्याकडून कसलीही अपेक्षा न ठेवता आपल्याला मधुर दूध देते. त्याप्रमाणे मागितल्याशिवाय जो सहजपणे देतो तो 'गो-उदार' होय. हे स्वेच्छादान होय. एका हिंदी कवीने म्हटले आहे-

**'सहज मिला तो दूध समान।**
**मांग लिंगा तो पानी समान।**
**खींच लिया तो रक्त समान।'**

जे सहज मिळते ते दुधासारखे, जे मागितल्यावर मिळते ते पाण्यासारखे आणि जे जबरदस्तीने घेतले जाते ते रक्तासारखे दान होय. म्हणून सहज देतो तो गो-उदार होय. दुसरा प्रकार मेघोदार. पाऊस पडण्यापूर्वी आकाशातील ढग काळेकुट्ट होतात आणि गरजतात. मग पाऊस पडतो. वर्गणी मागायला तुम्ही कुणाच्या घरी गेलात तर घरमालकाचा चेहरा काळाठिक्कर पडतो, मेघासारखा. वर्गणी मागितल्यावर तो मोठमोठ्याने ओरडू लागतो. शिव्या देतो, परंतु वर्गणी देतोच. असे लोक 'मेघोदार' होत. नारळाच्या झाडाखाली जाऊन तुम्ही उभे राहिलात तर तुम्हाला नारळ सहजासहजी मिळत नाही. झाडावर चढून तोडून घ्यावे लागते. त्याला सोलावे लागते आणि नंतर ते फोडल्यावर तुम्हाला थोडे खोबरे मिळते. काहीतरी मिळतेच, परंतु त्यासाठी महत्प्रयास करावे लागतात. काही लोक मेघोदाराप्रमाणे शिव्या देऊन आरडाओरडा करून देखील काहीच देत नाहीत आणि पश्चात्ताप होऊन जेव्हा देतात तेव्हा देखील थोडेच देतात, असे लोक 'नारिकेलोदार' होत.

जो धार्मिक कार्यासाठी सहज दान देतो तो दाता उत्तम आणि ते दानही उत्तम. दान हे एक कर्तव्य आहे. आपण मिळवलेल्या धनात इतरांचाही वाटा असतो. धर्माचा, राजाचा, चोराचा आणि अग्नीचा. धर्म प्रेमाने मागतो, जबरदस्तीने मागत नाही. परंतु काही लोक धर्माला वाटा देत नाहीत. त्यावेळी इतर तिघे त्याच्या कमाईवर हक्क सांगतात. राजा कररूपाने आपला वाटा नेतो, काहीजण तोही देत नाहीत, संपत्ती दडवून ठेवतात. मग घरात चोर घुसतो. कधी कधी आश्चर्य वाटते की आपण ठेवलेल्या वस्तूच आपल्याला सापडत नाहीत, परंतु चोराला मात्र त्या कशा सापडतात? काही लोक चोरांपासून संपत्ती सुरक्षित ठेवतात. शेवटी अग्नी येतो आणि घरासह सारे जळून भस्मसात करतो. म्हणून अग्नीपासून, चोरापासून आणि राजापासून तुम्हाला तुमचे धन वाचवायचे असेल तर ते सर्वप्रथम धर्मासाठी वेचले पाहिजे. जो निष्ठेने धर्मकार्य करतो त्याच्यावर राजा, चोर आणि अग्नी आक्रमण करीत नाहीत. दान हे हाताचे आभूषण मानले जाते.

**श्रोत्रं श्रुतेनैव कुंडलेन दानेन पाणिर्नतु कंकणेन।**

सुभाषितकार म्हणतो- तुम्हाला दोन कान परमेश्वराने कशासाठी दिले आहेत? केवळ त्यात सोन्याची कुंडले घालावीत म्हणून नव्हे, तर सोन्यापेक्षाही अमोल अशी संतवचने ऐकण्यासाठी. तुमचा हात कंकणे घातल्यामुळे सुशोभित दिसत नाही तर दान केल्याने सुशोभित दिसतो. याचा अर्थ कानात अलंकार घालू नयेत असा नव्हे. अवश्य घाला. परंतु त्याचबरोबर संताची वाणी आणि सुभाषिते ऐकण्याचा अभ्यास करा. संतवाणी ऐकणे हेच खरे कर्णभूषण होय. सोन्याचे कंकण हाताचे भूषण नव्हे तर दान करणे हेच हाताचे भूषण होय. म्हणून प्रत्येकाने धार्मिक, सामाजिक कार्यासाठी यथाशक्ती दान केले पाहिजे. आपण दान देतो हे इतरांसाठी नसून ते आपल्यासाठी असते. दानाने पुण्यलाभ होतो. पुण्य-पापामुळेच तुमचे पुढले आयुष्य घडत असते. गेल्या जन्मातल्या कर्मांमुळेच तुम्हाला या जन्मात सुखदु:खाचा लाभ झाला आहे. नोकरदारांना एक तारखेला पगार मिळतो तो त्या महिन्यातला

नसतो तर मागील महिन्यातला असतो. महिनाभर काम केल्यावर त्याचे फल त्याला पुढच्या महिन्यात मिळते. जे रोजदार असतात त्यांनाही काम संपल्यावर सायंकाळी पगार मिळतो. आधी मिळत नाही. त्याप्रमाणे या जन्मात आपण जे काही भोगतो ते म्हणजे गेल्या जन्मातला हिशेब होय. आपले आयुष्य आज सुखाचे आहे असे म्हणून चालणार नाही. पुढले आयुष्य देखील सुखाचे मिळावे, यासाठी आज दान केले पाहिजे. तुम्हाला भिक्षा मागणारा भिक्षुक जणू तुम्हाला सांगत असतो की, 'तुम्ही दान करून तुमच्यासारखे व्हा. दान न करून माझ्यासारखे होऊ नका. मी गेल्या जन्मात दान केले नाही म्हणून माझ्यावर या जन्मात मागायची वेळ आली.' देण्याची इच्छा असेल तर मनुष्य कमी अथवा अधिक काहीतरी देतोच. दातृभावना महत्त्वाची आहे. दान करणे हे सुलभ आहे. तपस्या करणे, ध्यान करणे, यज्ञ करणे ही कठीण कर्मे होत. परंतु एक पैसा, लक्ष रुपये अथवा एक कोटी रुपये दान केले तरी ते दानच होय. किती दिले यापेक्षा दिले हे महत्त्वाचे असते. म्हणून यथाशक्ती दान केले पाहिजे. खाऊन पिऊन आपल्या इच्छा आकांक्षा तृप्त झाल्यावर जे उरेल त्यांपैकी थोडे दान करावे. दान ही आपल्या कुटुंबावरील आपत्ती ठरू नये. सर्वज्ञ नामक एका कन्नड संताने यासाठी एक सुरेख उदाहरण दिले आहे. देवघरातल्या नंदादीपात आपण थोडे थोडे तेल घालतो. डब्यातले सारे तेल आपण त्यात ओतत नाही. ओतले तर दिवा विझून जाईल. म्हणून नंदादीपात थोडे थोडे तेल घालावे लागते. त्याप्रमाणे दान करताना सारेच देऊन टाकू नये, परंतु दिल्याशिवाय राहूही नये. दानामुळे आपल्या संसाराला कष्ट होऊ नये आणि मागणारा विन्मुख जाऊ नये. एका हिंदी कवीने म्हटले आहे–

**साई इतना दीजिए जा मे कुटुंब समाय्।**
**मै भी भूखा न रहूं साधु भूखा न जाय।।**

तो ईश्वराला मागतो, 'देवा, मला तेवढेच दे की ज्यामुळे माझे कुटुंब तृप्त होईल. मला उपवास घडू नये आणि दाराशी आलेला भिक्षुक विन्मुख जाऊ नये.' तो अधिक मागत नाही. आवश्यक तेवढेच मागतो. त्याग करूनच वस्तूंचा उपभोग घ्यावा असे शास्त्रात सांगितले आहे. नवे कपडे घालण्याआधी किंवा नवीन साडी वापरण्याआधी दुसऱ्याला वापरायला देण्याची प्रथा होती. अलीकडे कुणी असे करीत नाही. नवे कपडे आणले की कधी एकदा घालतो असे लोकांना वाटते. दुसऱ्यांना द्यायचे नसतील तर ते ईश्वराला दाखवा. घरात भाजलेली पहिली भाकरी थोरल्या मुलाने खाऊ नये आणि शेवटची भाकरी धाकट्या मुलाने खाऊ नये, असे शास्त्र का सांगते? तर पहिली आणि शेवटची भाकरी दान करावी यासाठी. प्रारंभ धर्माने व्हावा आणि शेवट देखील धर्मानेच व्हावा. तुमच्याकडे दोनच भाकरी असतील तर पहिल्या भाकरीचा एक घास आणि दुसऱ्या भाकरीचा एक घास दान करावा. करपलेले, नासलेले अन्न दान करू नये. अन्न, कपडा किंवा अन्य वस्तू सर्वप्रथम आपल्या इष्टदेवतेला अर्पण करून मग त्यांचा उपभोग घ्यावा. वस्तूचे दान करून उपभोग करण्याची भावना आपल्या मनात रुजली की जीव शिव होऊ लागतो. 'देव' होण्यासाठी दान केले पाहिजे. याप्रमाणे गुरूला, जंगमांना यथाशक्ती दान करावे. या पंचशीलांना 'पाणिगत शील' असे संबोधले जाते. हे आचार सर्वांनी नीट समजावून घेऊन त्याप्रमाणे आचरण करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
१२ ऑगस्ट १९९२

## दीक्षागुरुस्थल–१०

जिज्ञासू सद्भक्तांनो,

गणाचारातील चौसष्ट आचारांचे विवेचन तुम्ही कालपासून ऐकत आहात. शरीर, वाणी आणि मन यांची शुद्धी करणे हाच या आचारांचा उद्देश आहे. शरीर, वाणी आणि मन ही त्रिकरणे परमेश्वराने मनुष्याला दिली आहेत. करण म्हणजे साधन. शरीर–वाणी–मन या त्रिकरणांनी आपण सांसारिक व्यवहार करू शकतो आणि परमार्थ देखील साधू शकतो. कालिदासाने म्हटले आहे– 'शरीरं आद्यं खलु धर्म साधनम्।'

पार्वतीच्या कठोर तपस्येचे वर्णन करताना त्याने हे वचन लिहिले आहे. तपस्या अशी करावी जी आपले शरीर स्वस्थ रहावे आणि तपस्येचे फळ भोगण्यासाठी ते समर्थ देखील असावे. शरीर स्वस्थ नसेल तर मन स्वस्थ रहात नाही. मन अस्वस्थ असेल तर शरीर स्वस्थ रहात नाही. शरीर आणि मन परस्परावलंबी आहेत. म्हणून शरीराचे रक्षण करणे हे मनुष्याचे आद्य कर्तव्य आहे. आपल्याला शरीराने, वाणीने आणि मनाने भगवान शिवाला स्पर्श करायचा आहे, त्याच्याशी संबंध जोडायचा आहे. हाच शिवयोग होय. योग म्हणजे संबंध. जीवाचा शिवाशी संबंध जुळणे म्हणजे योग. शिवाला त्रिकरणे समर्पित करायची असतील तर ती शुद्ध राखली पाहिजेत. दूषित त्रिकरणे आपण शिवाला समर्पित करू शकत नाही. तुम्ही स्नान करून शूचिर्भूत होऊनच स्वयंपाक करता आणि नंतरच देवाला नैवेद्य अर्पण करता. शूचिर्भूत होऊनच तुम्ही देवाची पूजा करता, त्याआधी करत नाही.

शुद्धी दोन प्रकारची आहे. बाह्यशुद्धी आणि अंतरंगशुद्धी. इष्टलिंगाची पूजा करण्यासाठी आपले शरीर शुद्ध असावे, मंत्रजप करण्यासाठी आपली वाणी शुद्ध असावी. आणि प्राणलिंग–भावलिंगाचे चिंतन करण्यासाठी आपले मन देखील शुद्ध असायला हवे. आपला आचार शुद्ध असेल तर आपले शरीर, वाणी, मन शुद्ध रहाते. या त्रिकरणांना शुद्ध करण्यासाठीच आचारांचे प्रतिपादन केलेले आहे. वाणी शुद्ध करण्यासाठी सात प्रकारचे आचार आणि पाणि म्हणजे हात शुद्ध करण्यासाठी पाच प्रकारचे आचार सांगितले आहेत. यानंतर चार प्रकारच्या पादगत शीलांचे विवेचन करायचे आहे. शरीराचा पाय हा अवयव देखील महत्त्वाचा मानला जातो. नमस्कार करताना पायावर डोके ठेवतात, डोक्याला डोके लावत नाहीत. कधी कधी गुरूच्या चरणाला स्पर्श करता आला नाही तर त्यांच्या अंगाला स्पर्श करून किंवा ते गाडीत बसल्यावर गाडीला स्पर्श करून देखील नमस्कार केला जातो. ते ठीक असले तरी मनुष्याच्या पायाला वेगळे महत्त्व आहे. 'पाद' याचा अर्थ आचरण असाही होतो. पाय आहेत म्हणून तुम्ही चालू शकता. पायच तुम्हाला चांगल्या ठिकाणी घेऊन जातात, पायच तुम्हाला वाईट ठिकाणी देखील घेऊन जातात. पाणी उताराकडे वाहते त्याप्रमाणे मनुष्याचा कल सन्मार्गापेक्षा दुर्मार्गाकडे अधिक असतो. तुमच्यासमोर दोन मार्ग आहेत. पहिला मार्ग ओबडधोबड, दगडधोंड्यांनी आणि काट्याकुट्यांनी भरलेला आहे. या मार्गाने तुम्ही गेलात तर तुम्हाला ठेचा लागतील. पायात काटे मोडतील. परंतु हा मार्ग तुम्हाला उन्नतीकडे, यशाकडे घेऊन जाईल. दुसरा मार्ग गुळगुळीत स्वच्छ आणि सुखदायी आहे. त्यावरून चालताना तुम्हाला कसलेही दुःख होणार नाही. परंतु हा मार्ग तुम्हाला शेवटी खड्ड्यात नेऊन घालील. पहिल्या मार्गाला 'श्रेयमार्ग' तर दुसऱ्या मार्गाला 'प्रेयमार्ग' म्हणतात. प्रेयमार्ग सांसारिक सुखाकडे घेऊन जातो. तो प्रारंभी फार प्रिय वाटतो. परंतु हळूहळू अप्रिय होत जातो. ऊस खाताना वरच्या भागाकडून खात खात खालच्या भागाकडे गेले

पाहिजे. वरच्या भागात गोडी कमी असते. खालच्या भागात गोडी अधिक असते. शेंड्याकडून बुडाकडे ऊस खात गेलो तर ऊसाची गोडी वृद्धिंगत होत जाते आणि बुडाकडून शेंड्याकडे खात गेलो तर गोडी कमी होत जाते. श्रेयमार्ग आणि प्रेयमार्ग यांच्या बाबतीत असेच म्हणता येते. शेंड्याकडून बुडाकडे ऊस खात जाणे हा श्रेयमार्ग, तर बुडाकडून शेंड्याकडे ऊस खात जाणे हा प्रेयमार्ग.

संसार प्रारंभी फार गोड वाटतो. परंतु शेवटी तो कटू होत जातो. अध्यात्म प्रारंभी कटू भासते, परंतु ते शेवटी अत्यंत मधुर आहे असे प्रत्ययाला येते. शरीर स्वस्थ आणि इंद्रिये समर्थ आहेत तोपर्यंत संसार रसपूर्ण भासतो. शरीर थकत जाते, इंद्रियांना शैथिल्य येते तेव्हा संसारात नीरसता जाणवू लागते. श्रृंगार, करुणा, हास्य, बीभत्स, शांत असे अनेक रस आपल्या जीवनात असतात. परंतु म्हातारपणी मनुष्याला शांतरस अधिक प्रिय वाटू लागतो. हे जग सोडून जात असताना शांतीशिवाय अन्य कोणतीही अपेक्षा माणसाला रहात नाही. अध्यात्ममार्गावर चालताना प्रारंभी खूप विघ्ने येतात. घरातली माणसेच म्हणतात की, 'कशाला सत्संगात जातोस? तिथे जाऊन काय मिळणार? घरीच टी.व्ही. पहा, मौज कर.' परंतु जो सत्संगाची गोडी एकदा चाखतो तो सत्संग कधी सोडत नाही. ज्याने ती गोडी चाखलीच नाही त्याला ती कशी कळेल? अंतकाळी शांतरस सोडून सारे रस नीरस होऊन जातात. संसार संपल्यावर अध्यात्माकडे वळू असे काही जणांना वाटते. परंतु संसार कधीच संपत नाही. त्याआधी माणूसच संपून जातो. तुम्ही संपण्याआधी तुमचा वारसा मुलाबाळांना देऊन जाता. घर–संसार–शेती. इतकेच नव्हे तर तुमचे कुणाशी वैर असेल तर त्याचा देखील वारसा तुम्ही मुलाबाळांना देऊन जाता. वैर कायम ठेवा. जाताना देखील आपण मुलांना चांगले संस्कार देऊन जात नाही. ते संसारात कायमचे गुंतून पडावेत असाच वसा त्यांना देतो. संसारासाठी शरीराचा तेवीस तास उपयोग करा, परंतु तासभर तरी ते अध्यात्मासाठी उपयोगात आणा. एक तासात तुम्हाला एवढे सामर्थ्य मिळेल की ते तेवीस तासांत केलेल्या दुष्कर्मांचे निराकरण करील. सांसारिक जीवन जगतानाच आध्यात्मिक जीवनाचा देखील स्वाद घ्यायला हवा.

दोन स्त्रिया दोन जात्यांवर बसून हरभरे दळत बसल्या होत्या. त्यांपैकी पहिली स्त्री दळता–दळता थोडे हरभरे खात होती. ते पाहून दुसरी स्त्री म्हणाली, 'तुला कसे कळत नाही? हरभरे दळून पीठ करायचे आहे. त्याचा लाडू बनवून देवाला नैवेद्य दाखवायचा आहे आणि तू तर आधीच हरभरे खातेस.'

पहिली स्त्री म्हणाली, 'चांगले वाईट मला काही कळत नाही. लहानपणी माझी आई जेव्हा मला दळणासाठी बोलावत असे तेव्हा काहीतरी खायला देत असे. तेव्हापासून दळताना खाण्याची सवय मला जडलेली आहे. मी जर हरभरे खाल्ले नाहीत तर माझे हात काम करणार नाहीत.'

दोघींनी दळण संपवले. टोपलीत पीठ भरून दोघींनी टोपली आपापल्या डोक्यावर घेतली आणि घरी जायला निघाल्या. पाऊस पडल्यामुळे रस्त्यात चिखल झाला होता. त्यामुळे फारच सावधपणे एकेक पाऊल टाकीत त्या चालल्या होत्या. परंतु दोघींचाही पाय घसरून त्या खाली पडल्या. टोपल्यातले पीठ मातीत मिसळले. त्यावेळी एक स्त्री रडू लागली. दुसरी थोडी हूस लागली. तुम्ही ओळखले असेल की, कोण रडले आणि कोण हसले ते! जिने मघाशी थोडे हरभर खाल्ले होते ती हसत होती. पीठ सांडले तर सांडले पण थोडे तरी आपल्या पोटात आधी गेले, या विचाराने. जिने खाल्ले नाही ती रडत होती. यातले थोडे देखील आपल्या पोटात गेले नाही, या विचाराने.

या कथेप्रमाणेच आपण संसारात दळण दळत असतो. रोज तोच तो धंदा. सकाळी उठणे, चहा पिणे, फिरून येणे. स्वयंपाक करणे, जेवण करणे, झोपणे. तुम्ही जर दैनंदिनी लिहायला सुरुवात केली तर त्यात काय लिहाल?

हेच रोजचे दळण! हे दळण दळताना कधीतरी सत्संग मिळाला तर त्याचा थोडा स्वाद घ्यायला हवा. नाहीतर तुमचा अंतकाळ कसा असेल? दोघांनाही मरायचेच असते. संसार करणाऱ्याला आणि सत्संग करणाऱ्याला! परंतु एकजण रडत मृत्यू स्वीकारतो आणि दुसरा हसत मृत्यूला सामोरा जातो. ज्याच्या पदरात अध्यात्माचे सुवर्णकण पडलेले असतात तोच हसत जातो. कारण त्याला संसाराचा, जन्म-जन्मांतराचा अर्थ कळलेला असतो. वस्त्रे जुनी झाली की ती टाकून नवी धारण करायची असतात, हे त्याने ओळखलेले असते. जीर्ण देह टाकताना तो कष्टी होत नाही. म्हणून प्रत्येकाने सत्संग करावा आणि सत्संगात सांगितलेले आचार जीवनात बाणवण्याचा प्रयत्न करावा.

येथे पादगत चार शीलांविषयी सांगितले आहे. पहिले शील आहे- 'गुरौः महेश्वरस्य अभिगमनम्'. आपल्या गुरूच्या इष्टदेवतेच्या दर्शनासाठी चालत जाणे हे पायांचे पहिले कर्तव्य मानले आहे. मनात इच्छा असेल तर पाय गुरुगृहाकडे किंवा मंदिराकडे वळतात. मनात उत्कट इच्छा नसेल तर यात अनेक विघ्ने येतात. तुम्ही निघालात गुरुदर्शनासाठी आणि गेलात भलत्याच्याच दर्शनासाठी, असेही घडू शकते. सत्संगात विघ्ने फार असतात. बऱ्याच जणांच्या कानावर प्रवचनातले शब्द पडतात, परंतु त्याचा अर्थ त्यांच्या मनात उतरत नाही. सत्संगात विघ्न बाहेरून येत नाही तर आतून म्हणजे आपल्या मनातून येते. तुम्ही देहाने या ठिकाणी बसला आहात, परंतु तुमचे मन मात्र बाहेर भटकायला गेले आहे. प्रवचनातील कथा ऐकून सारे लोक हसतात. त्यांपैकी बरेच जण दुसरे हसले म्हणून हसतात. त्यांना कथा कळलेली नसते. आपण हसलो नाही तर महाराज काय म्हणतील? या भीतीने बिचारे हसतात. म्हणून सत्संगाला आपले मनच विघ्नकारक असते. परंतु गुरुदर्शनाची, शिवदर्शनाची उत्कट इच्छा ज्यांच्या मनात वसते त्यांचे पाय सहज गुरुगृहाकडे, मंदिराकडे वळतात. हा पायाचा पहिला आचार होय.

दुसरा आचार आहे- 'गुरौः महेश्वरस्य प्रदक्षिणीकरणम्'. गुरुदर्शन, शिवदर्शन घेतल्यावर तसेच परत फिरू नये. तर त्यांना प्रदक्षिणा घालावी. हा पायाचा दुसरा आचार आहे. मोठमोठी पापे नष्ट करण्याचे सामर्थ्य प्रदक्षिणा-नमस्कारात असते. प्रदक्षिणेचा मंत्रच स्पष्ट सांगतो-

**प्रकृष्टपापनाशाय प्रकृष्टफलसिद्धये।**
**प्रदक्षिणं करोमीश प्रसीद परमेश्वर।।**

प्रकृष्ट पाप नष्ट करणारा आणि उत्कृष्ट फल देणारा नमस्कार म्हणजे प्रदक्षिणा होय. भगवंताच्या दर्शनानंतर त्याच्या मंदिराभोवती परिक्रमा करतात हीच 'प्रदक्षिणा' होय. भगवंताच्याभोवती जसे आपले शरीर फिरत असते तसेच आपले मन देखील त्याच्या भोवती फिरत राहिले पाहिजे. आपले मन निरंतर भ्रमत असते. तुम्ही बसला असाल, पण तुमचे मन बसलेले नसते. तुम्ही झोपला असता, पण तुमचे मन झोपलेले नसते. मनच तर तुम्हाला स्वप्न दाखवत असते. लोक स्वप्नात देखील संसार करीत असतात, उद्योगधंदा करीत असतात. जागेपणी जे करतात तेच स्वप्नातही करतात. आपण पूजा करीत आहोत, ध्यान करीत आहोत, प्रवचन ऐकत आहोत अशी स्वप्ने फारच थोड्या लोकांना पडत असतील. इतरांचे स्वप्नात देखील दळण दळणे चालूच असते. माशी सतत घाणीभोवती फिरत असते. तसे आपले मन सांसारिक गोष्टी भोवती फिरत असते. मधमाशी मात्र फुलाभोवती फिरत असते आणि फुलांमधला मध गोळा करीत असते. आपल्याला माशी व्हायचे आहे की मधमाशी ते आपणच ठरवायचे आहे. म्हणून तुम्ही जेव्हा मंदिराभोवती प्रदक्षिणा घालत असता तेव्हा शरीराप्रमाणेच तुमचे मन देखील

ईश्वराभोवती फिरले पाहिजे. तेव्हा कुठे तुम्ही मधमाशी व्हाल. डोक्यावर पाण्याने भरलेला घडा घेऊन जेव्हा स्त्री चालत असते त्यावेळी तिचे सारे लक्ष डोईवरल्या घड्याकडे असते. त्याप्रमाणे प्रदक्षिणा करताना आपले संपूर्ण लक्ष परमेश्वराकडे असायला हवे. त्याचे चिंतन करीतच अत्यंत मदंगतीने प्रदक्षिणा करावी. ती घाईघाईने उरकू नये.

आपण काय करीत आहोत याचेच मनुष्यला ध्यान नसते. नांदेडला पंचाचार्यांचा अड्डपालखी महोत्सव साजरा झाला. त्यावेळी भक्तगण जयघोष करीत होते.

**पायी हळू हळू चाला। मुखाने शिव शिव बोला।।**

तोंडाने सर्वजण 'हळूहळू चाला' असे म्हणत होते. परंतु कोणीही हळू चालत नव्हता. सारे धावत होते. आपण मुखाने काय उच्चारतो आहोत आणि काय करत आहोत याचे लोकांना भान नसते ते असे. म्हणून प्रदक्षिणा करताना अत्यंत मंदगतीने करावी. त्यावेळी आपले मन शिवचिंतनात मग्न असावे. अशी प्रदक्षिणा हा पायाचा आचार होय. त्यामुळे आपल्या पादाची शुद्धी होते.

तिसरे शील आहे- 'पूजापरिकराणां संपादनाय गमनम्।' इष्टलिंगपूजेसाठी अथवा गुरूच्या पादपूजेसाठी लागणारी बेल, फुले आदी सामग्री स्वत: जाऊन आणणे हा देखील पायांचा एक आचार आहे. नोकराकडून तुम्ही हे मागवू शकता. पण मग ती सेवा घडत नाही. नोकरांकडून सांसारिक वस्तू तुम्ही मागवा. परंतु पूजा स्वत: करायची असते आणि पूजासामग्री देखील स्वत: आणायची असते. असे केले तरच पूजेचे पूर्ण फळ लाभते. तुमचे भोजन तुम्ही करता की नोकराला करायला सांगता? नोकर पोटभर जेवला तर तुमचे पोट भरते का? त्याप्रमाणे पूजासामग्री स्वत: आणून स्वत:च पूजा करायची असते. चौथे शील आहे- 'इष्टलिंगपूजार्थं स्थिरमासनम्'. आपण जेव्हा खाली बसतो तेव्हा पायाचाच आधार घेत असतो. पद्मासन, वज्रासन, सुखासन इत्यादी कोणत्याही आसनावर बसायचे असेल तर पायांचाच उपयोग करावा लागतो. इष्टलिंगपूजा करताना स्थिर आसन घालून बसणे हा पायाचा आचार असून त्यामुळे पादशुद्धी होते. हात-पाय पसरून पूजा करू नये. त्यासाठी स्थिर आसन असावे आणि शरीर देखील स्थिर असावे.

अशा प्रकारे पायांचे चार आचार असून त्वचेचे दोन आचार सांगितले आहेत. त्यांपैकी पहिला 'नित्यं इष्टलिंगस्य अवियोगत: स्पर्शनम्।' हा होय. त्वचेला कोणता ना कोणता तरी स्पर्श हवा असतो. हिवाळ्यात त्वचेला उष्णस्पर्शाची गरज असते आणि उन्हाळ्यात शीतस्पर्शाची गरज भासते. स्पर्शानुभवासाठी त्वचा सदैव उत्सुक असते. कधी उष्णस्पर्श, कधी शीतस्पर्श, कधी मृदुस्पर्श, कधी कठीणस्पर्श. त्वचेला नित्य इष्टलिंगाचा स्पर्श होणे, हा एक आचार होय. एकदा गळ्यात इष्टलिंग घातले तर ते शरीरापासून कधीही विलग करू नये. मंदिरात शिवलिंगाची स्थापना केली जाते. आज स्थापना केली आणि दुसऱ्या दिवशी ते शिवलिंग कुणी काढून घेतले असे घडले आहे काय? मंदिरात स्थापन केलेले शिवलिंग कधीही हटवले जात नाही. त्याप्रमाणेच इष्टलिंगाला आपल्या शरीरावरून कधीही काढू नये. दीक्षेच्या वेळी धारण केलेले लिंग, श्रीगुरू दृष्टीआड जाताच, लोक खुंटीला टांगून ठेवतात. त्यांना त्याचे महत्त्वच कळत नाही. म्हणून कधी असे वाटते की, दीक्षेच्या वेळी एखाद्या डॉक्टरला बोलावून आणून त्याच्या हाताने शस्त्रक्रियेद्वारा शिष्याच्या छातीत इष्टलिंग ठेवून द्यावे. म्हणजे मग तो ते कधीही काढू शकणार नाही. गुरूसमोर लिंगधारणा करणे आणि गुरू निघून गेले की ते काढून ठेवणे, हा एक गुरुद्रोह होय. एखाद्या विवाहितेने पतीसमोर आपल्या गळ्यात मंगळसूत्र घालावे आणि पती बाहेर गेल्यावर ते काढून ठेवावे, तसा हा प्रकार होय. लिंग कधीही गळ्यातून न काढणे म्हणजेच त्याचा त्वचेला सतत स्पर्श

होणे, हा त्वचेचा पहिला आचार आहे.

त्वचेसंबंधी दुसरे शील आहे– 'इष्टलिंगस्पर्शजन्यरोमांचसमलंकृतिश्चेति द्विविधं त्वक्संबद्धं शीलम्।'. इष्टलिंगाचा स्पर्श झाल्यावर अंगावर रोमांच उठले पाहिजेत. लिंगाविषयी तुमच्या मनात अपार श्रद्धा असेल तरच तुमचे शरीर त्याच्या स्पर्शाने रोमांचित होईल. जिवलग मित्र फार दिवसांनी भेटला तर त्याला आलिंगन देण्याची प्रथा आपल्याकडे आहे. एकमेकांना पाहून त्यांच्या अंगावर रोमांच उठलेले असतात आणि हा रोमांचस्पर्श एकमेकांना देण्यासाठीच जणू ते आलिंगन देत असतात. मित्राविषयी उत्कट प्रेम असेल तरच हा अनुभव येतो. त्याप्रमाणे इष्टलिंगस्पर्शाने रोमांचित होणे हा त्वगेंद्रियाचा एक आचार होय. इष्टलिंगाच्या सतत स्पर्शाने सर्वांग रोमांचित झाले तर त्यामुळे त्वचा शुद्ध होते. या प्रकारे पादगत चार शीले आणि त्वचेसंबंधी दोन शीले याविषयीचे विवेचन आज तुम्ही ऐकले आहे. उद्याच्या आशीर्वचनात यापुढील शीलासंबंधी अधिक विवेचन करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
१३ ऑगस्ट १९९२

---

**आशीर्वचन बारावे**

## दीक्षागुरुस्थल–११

जिज्ञासू सद्भक्तांनो,

गणाचारात चौसष्ट शीले सांगितली आहेत. त्यांपैकी सात वाचिक शीले, पाच पाणिगत शीले आणि दोन त्वक्संबद्ध शीले यांची माहिती तुम्हाला झाली आहे. यानंतर चक्षुर्गत म्हणजे नेत्रासंबंधी दोन शीले सांगितली आहेत. पंचेन्द्रियांत श्रोत्रेन्द्रिय आणि नेत्रेंद्रिय ही दोन इंद्रिये अत्यंत प्रबल मानली जातात. मनावर प्रभाव गाजवणारी ही दोन इंद्रिये होत. आपण काही पाहून प्रभावित होतो आणि काही ऐकून प्रभावित होतो. रूप आणि शब्द आपल्यावर प्रभाव पाडतात. म्हणून नेत्रांनी काय पहावे, याविषयी येथे सांगतात.

नेत्रविषयक पहिले शील आहे– 'अत्रान्तं सानुरागं इष्टलिंगनिरीक्षणम्।'. इष्टलिंगपूजा विविध उपचारांनी केली जाते. काही जणांना पूजासामग्री मिळत नाही. त्यावेळी केवळ जलाचा अभिषेक करून इष्टलिंगाची पूजा करावी. त्यामुळे शिव तृप्त होईल. परंतु तुम्हालाही काही समाधान मिळायला हवे. त्यासाठी तुम्ही इष्टलिंगाकडे एकाग्र दृष्टीने पाहिले पाहिजे. परमेश्वराने आपल्याला डोळे दिले आहेत ते केवळ प्रपंच पहावा म्हणून नव्हे. हा विशाल प्रपंच ज्याने निर्माण केला आहे त्याला पहाण्याची इच्छादेखील मनात उत्पन्न झाली पाहिजे. त्यामुळे इष्टलिंगपूजा करताना इष्टलिंगाकडे अत्यंत प्रेमभराने, एकाग्रतेने पहावे, असे आपल्या सिद्धान्तात म्हटले आहे. तुमची प्रिय व्यक्ती समोर आल्यावर तिच्याकडे तुम्ही किती प्रेमाने पाहाता!

एखादी वस्तू वा व्यक्ती वारंवार पाहावी असे मनुष्याला वाटते. त्यासाठी त्या वस्तूकडे वा व्यक्तीकडे पुन्हा पुन्हा जाण्याची इच्छा होते. तिच्या ठिकाणी रमणीयत्व असते म्हणून ती वारंवार पाहावीशी वाटते. जिच्याकडे

सतत पहात रहावे अशी वस्तू म्हणजे आत्मा. आत्म्याइतके सुंदर या जगात काही नाही. आपण गावोगाव भटकतो, देशभ्रमण करतो ते कशासाठी? डोळ्यांना काही रमणीय पाहावेसे वाटते म्हणून. बाहेर जेवढे सौंदर्य आहे त्यापेक्षा सहस्रपट अधिक सौंदर्य आपल्या आत– आत्म्यात आहे, असे शास्त्रकार म्हणतात. परंतु मनुष्याची दृष्टी बहिर्मुख असल्यामुळे तो सौंदर्याचा शोध बाहेर घेत हिंडतो. आपल्या आत कधी डोकावून पहात नाही.

ईश्वराने मनुष्य घडवला तेव्हा त्याने इंद्रियांना बहिर्मुख बनवले. नेत्र बाह्यरूप पाहतात, अंतरंग पहाण्याची शक्ती त्यांच्या ठिकाणी नाही. कान बाह्य शब्द ऐकतात, आतला शब्द ऐकू शकत नाहीत. मनुष्याची प्रवृत्ती बहिर्मुख असते. शरीरात आत्मा असतो म्हणून शरीर सुंदर दिसते. आत्मा निघून गेला तर त्या शरीराची लोकांना भीती वाटू लागते. आत्मा निघून गेल्यावर सुरूप शरीर कुरूप होऊ लागते. शरीरापेक्षाही सुंदर अशी आत्मज्योत तुमच्या हृदयात प्राणलिंगाच्या आणि भावलिंगाच्या रूपात विराजमान आहे. हातावरल्या इष्टलिंगाकडे पाहत पाहत तुमची दृष्टी अंतर्मुख करा आणि आत्मसौंदर्याचे दर्शन घेऊन धन्य व्हा, असे शास्त्र सांगते. म्हणून इष्टलिंगाकडे एकाग्र दृष्टीने पहाणे हा नेत्रेंद्रियांचा आचार होय. इष्टलिंगाकडे प्रेमभराने पाहत पाहत डोळ्यांमध्ये आनंदाश्रू यावेत. हा नेत्रेंद्रियाचा दुसरा आचार होय. प्रेमाने पाहिले तरच डोळ्यांत आनंदाश्रू येतात. आनंदाश्रू, दुःखाश्रू आणि योगाश्रू असे अश्रूंचे तीन प्रकार आहेत. हृदयात दुःख दाटून आल्यावर डोळ्यांतून बाहेर येणारे अश्रू म्हणजे दुःखाश्रू. एखाद्या जिवलगाकडे प्रेमभराने पहाताना किंवा त्याचा उत्कर्ष ऐकताना डोळ्यांत दाटणारे अश्रू म्हणजे आनंदाश्रू आणि ईश्वराकडे, इष्टलिंगाकडे पहात असताना भावाकुल होऊन डोळ्यांतून ओघळणारे अश्रू म्हणजे योगाश्रू. असे अश्रू डोळ्यांत येणे हा नेत्रांचा एक आचार आहे.

भगवान शिवाला अर्पण केलेले अन्नच प्रसाद म्हणून स्वीकारणे याला 'जिव्हागत शील' म्हणजे जिभेचा आचार म्हणतात. इष्टलिंगावर वाहिलेले गंध, पुष्प आदी निर्माल्य हुंगणे हे घ्राणगत शील म्हणजे घ्राणेंद्रियाचा आचार आहे. गुरू, शिव आणि शिवभक्त यांचे प्रतिदिन स्तोत्र ऐकणे आणि त्यांची निंदा श्रवण न करणे, ही श्रोत्रगत शीले म्हणजे कर्णेंद्रियाचे आचार होत.

यानंतर पाच प्रकारची 'कायिक शीले' सांगितली आहेत. मनुष्याचे शरीर मोक्षाचे एक साधन आहे. शरीर हे स्वभावतः अपवित्र असते. त्याच्या अपवित्रतेची स्थान, बीज, उपस्तंभ, स्यंदन आणि निधन अशी पाच कारणे सांगितली जातात. मनुष्याचे उत्पत्तिस्थान म्हणजे मातेचे उदर मलमूत्राने भरलेले असल्यामुळे अपवित्र असते. त्याचे बीज म्हणजे रेत आणि रज अपवित्र असते. अन्नामुळे शरीरातील धातू उत्पन्न होतात. त्याच्या देहातून मल, मूत्र, घाम, कफ इ. अपवित्र पदार्थ सतत वाहत असतात. म्हणून ते स्वभावतः दुर्गंधयुक्त असते. शरीरावर परमेश्वराने त्वचेची चादर ओढून त्याला झाकून टाकले आहे म्हणून बरे. घर बांधल्यावर भिंतींना प्लॅस्टर करून ते रंगवतात तेव्हा ते चकचकीत आणि सुंदर दिसते तसे अस्थी, मांस, मज्जा यांवर परमेश्वराने त्वचेचे प्लॅस्टर केले आहे, त्याला रंगवले आहे. कुणाचा रंग काळा तर कुणाचा रंग गोरा.

एका कवीने म्हटले आहे की, परमेश्वराने जर मनुष्यदेहावर त्वचेचे पांघरुण घातले नसते तर त्याला हातात काठी घेऊन माशांना, कुत्र्यांना, कावळ्यांना हाकलण्याचेच काम करावे लागले असते. परमेश्वराने आपला कितीतरी वेळ वाचवला आहे. तो कशासाठी? तर ध्यान करण्यासाठी. देह भयानक आणि अपवित्रच असतो. शरीराला शेवटी मृत्यू येतो. जीवात्मा देह सोडून जातो तेव्हा शरीराला 'प्रेत' म्हणतात. प्रेताचा स्पर्श झाला तर अंघोळ करावी लागते. देहातला पवित्र आत्मा निघून गेला की शरीर अपवित्र ठरते. जोपर्यंत देहात आत्म्याचा निवास असतो तोपर्यंत देहाला पावित्र्य लाभलेले असते. स्वभावतः अपवित्र असलेले शरीर शुद्ध करण्यासाठी

पाच प्रकारचे आचार सांगितले आहेत. यालाच ‘कायिक शीले’ म्हणतात.

‘गुरौः इष्टलिंगस्य जंगमस्य च प्रसादतः कायसंशोधनम्।’ शरीराची शुद्धी अन्नामुळे होते. शरीराला ‘अन्नमय कोष’ असे म्हटले जाते. अन्नाचा परिणाम म्हणून शरीर उत्पन्न झाले, अन्नग्रहण करूनच ते जिवंत रहाते आणि शेवटी अन्नाच्या उत्पत्तीला कारण असणाऱ्या पंचमहाभूतांत विलीन होते. म्हणून शरीराला अन्नमय कोष, अन्नमय शरीर म्हणतात. अन्नामुळे उत्पन्न झालेले शरीर शुद्ध करायचे असेल तर प्रथम अन्न शुद्ध करायला हवे. शुद्धान्नाच्या सेवनाने शरीर शुद्ध होते आणि शिजवलेले अन्न शिवार्पित केल्याने ते शुद्धान्न होते, प्रसाद होते. प्रसाद सेवन करता करता आपल्या अपवित्र मांसपिंडाचे प्रसादशरीरात रूपांतर होते. गुरू, शिव, इष्टलिंग यांच्या सान्निध्यामुळे शरीर मंत्रमय होते. यालाच ‘प्रसादकाय’ असेही म्हणतात. प्रसादकायेचा दुरुपयोग करू नये, कारण ते शरीर गुरूचे असते. गुरूला, जंगमाला, इष्टलिंगाला अन्न समर्पित करून तो प्रसाद सेवन केला तर आपले शरीर शुद्ध होते. गुरू, लिंग, जंगमांचा प्रसाद सेवन करणे हा शरीराचा एक आचार मानला जातो.

‘निषिद्धविषयेभ्य इंद्रियनिग्रहः।’ आपल्याला पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेंद्रिये आहेत. ज्ञानेंद्रियांनी आपण ज्ञान ग्रहण करतो आणि कर्मेंद्रियांनी कर्मे करतो. आपल्या इंद्रियांचा व्यवहार शास्त्रविहित मार्गानेच झाला पाहिजे. शास्त्राने जे निषिद्ध ठरवले आहे ते पाहू नये, ऐकू नये, खाऊ नये, करू नये. बऱ्याच वेळा केवळ फॅशन म्हणून किंवा आधुनिक समाजातली रूढी म्हणून मनुष्य अपेयपान आणि अभक्ष्यभक्षण करतो. लष्करात जाण्याआधी निर्व्यसनी असलेले लोक लष्करात गेल्यावर व्यसनासक्त होतात. म्हणून केवळ खोट्या प्रतिष्ठेपायी आपण आचारशून्य होऊन आपल्या शरीरस्वास्थ्याची, समाजाची आणि कुटुंबाची हानी करू नये. मांसाहार करण्यासाठी आपले दात आणि दाढा योग्य नाहीत, असे शरीरशास्त्र सांगते. म्हणून मनुष्याने शाकाहार करावा, त्यातही सात्त्विक आहार सेवन करावा आणि तोही अल्प प्रमाणात करावा. अन्न प्रसादरूप झाले तर त्याच्या अल्पसेवनाने तुम्ही तृप्त व्हाल. मंदिरात तुमच्या हातावर थोडा प्रसाद ठेवतात. तरी त्यामुळे तुम्हाला अपार तृप्ती लाभते. प्रसाद थोडा मिळाला तरी मनुष्य त्याबद्दल तक्रार करत नाही, परंतु लग्नाच्या जेवणावळीत थोडे कमी पडले तर तो भांडत बसतो. प्रसादाला कुणी नाव ठेवत नाही. तो कसाही असला तरी त्याचे अत्यंत श्रद्धेने लोक सेवन करतात. भगवंताला अर्पण केल्यावरच साधे अन्न हे प्रसादान्न होते, शुद्ध होते आणि त्याच्या सेवनाने आपला देह शुद्ध होतो. त्याचबरोबर निषिद्ध विषयांचे सेवनही करू नये, असे हा दुसरा आचार सांगतो.

‘अस्पृश्यवस्तु संस्पर्शे जलेन भस्मना वा स्नानम्।’ जलस्नान आणि भस्मस्नान असे शरीरशुद्धीचे दोन मार्ग आहेत. शास्त्रात सात प्रकारची स्नाने वर्णिली आहेत. त्यात भस्मस्नानाला श्रेष्ठ मानून त्याला ‘आग्नेय स्नान’ असे संबोधले आहे. जलस्नानाने शरीर शुद्ध होते तसेच भस्मस्नानाने देखील शरीर शुद्ध होते. चोवीस तासात आपले शरीर मलिन होते, म्हणून ते पाण्याने स्वच्छ करावे लागते. तसे दिवसभरच हात धुणे, पाय धुणे, तोंड धुणे चाललेले असते. परंतु चोवीस तासांत एकदा तरी डोक्यापासून पायापर्यंत शरीराला स्वच्छ धुतले पाहिजे. मन्मथस्वामींनी तर सहा वेळा स्नान करायला सांगितले आहे. कमीत कमी एकवेळ तरी जलस्नान करायलाच हवे. तसेच भस्मस्नान देखील केलेच पाहिजे. अशुद्ध वस्तूचा स्पर्श झाल्यावर जलस्नान आणि भस्मस्नान करावे. हा कायेचा तिसरा आचार आहे.

‘आसने शयने गोष्ठ्यां भविसंबंधवर्जनम्।’ आपल्या आचार्यांनी मनुष्यसमाजाची दोन भागांत विभागणी केली आहे. निसर्गाने स्त्री आणि पुरुष अशी विभागणी केली आहे. परंतु आचार्यांनी त्यांना समान मानले आहे. पुरुष

जेवढा श्रेष्ठ आणि मुक्तीचा अधिकारी, तेवढीच स्त्री देखील श्रेष्ठ आणि मुक्तीची अधिकारी आहे. जैनसिद्धान्तात फक्त पुरुषांनाच मुक्ती मिळते, असे मानतात. परंतु वीरशैवसिद्धान्त स्त्रीला मुक्ती मिळते असे सांगतो. हे ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटेल. परंतु तात्त्विक अर्थ समजून घेतला तर तुम्ही म्हणाल की, बरोबर आहे. जैनमुनीला केशलुंचन करावे लागते, अन्नत्याग करून शेवटी देहत्याग करावा लागतो. नंदादीपातले तेल संपल्यावर ज्योत हळूहळू विझत जावी आणि शेवटी संपूर्ण नष्ट व्हावी त्याप्रमाणे शरीर झिजत जाऊन देहत्याग घडणे याला 'महानिर्वाण' म्हणतात. यासाठी जो कठोरपणा लागतो तो पुरुषाकडे असतो, स्त्रियांकडे नसतो. म्हणून पुरुषांनाच किंवा पुरुषाप्रमाणे कठोर वागू शकणाऱ्या स्त्रियांना मुक्ती मिळते, असे जैनसिद्धान्त मानतो.

आपल्या सिद्धान्तात स्त्रियांना मुक्ती मिळते, पुरुषाला मिळत नाही, याचा अर्थ काय? वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंगाला 'पती' आणि भक्ताला 'सती' मानले जाते. पुरुष असो अथवा स्त्री, प्रत्येकाने इष्टलिंगाला 'पती' मानून स्वतःला 'सती' मानले पाहिजे, असे वीरशैवसिद्धान्त सांगतो. सोलापूरच्या श्रीसिद्धरामेश्वरांच्या जीवनात एक मजेशीर घटना घडली आहे. ते योगसाधना करीत, तेव्हा त्यांच्या साधनागृहाबाहेर एक युवती सडासंमार्जन करून रांगोळी घालत असे. सिद्धरामांना आश्चर्य वाटले. एके दिवशी त्यांनी पाळत ठेवली. तेव्हा एक स्त्री रांगोळी घालताना दिसली. त्यांनी विचारले, ''तू रोज रांगोळी का घालतेस? कशासाठी?''

''माझे तुमच्यावर प्रेम आहे. तुमच्याशी विवाह करण्याची माझी इच्छा आहे. त्यासाठी मी ही सेवा करत आहे!'' ती म्हणाली.

''हे कसे शक्य आहे?'' सिद्धराम हसून म्हणाले, ''स्त्रीचे पुरुषाशी लग्न करता येईल. पण एका स्त्रीचे दुसऱ्या स्त्रीशी कसे लग्न होईल? तू स्त्री आहेस तशी मी देखील एक स्त्रीच आहे!''

''ते कसे?'' त्या मुलीने विचारले.

''जेव्हा माझा दीक्षासंस्कार झाला तेव्हाच माझे इष्टलिंगाशी लग्न लागले आहे. इष्टलिंग माझा 'पती' आहे आणि मी त्याची सती आहे. तेव्हा आपला विवाह होणे अशक्य आहे.''

अशा प्रकारे शरणांनी कामभावनेवर विजय मिळवण्यासाठी सतीची भूमिका स्वीकारली. म्हणून आपल्या सिद्धान्ताप्रमाणे 'सती'ला म्हणजे स्त्रीला मुक्ती मिळते. आपल्या आचार्यांनी स्त्री आणि पुरुष असे समाजात विभागणी केली नाही. जो वारंवार जन्म घेतो तो 'भवी' होय. अज्ञानी, दीक्षासंस्कार न झालेला, गळ्यात इष्टलिंग धारण न केलेला जीव म्हणजे 'भवी'. दीक्षासंपन्न, इष्टलिंगधारक जीव म्हणजे 'भक्त'. भक्ताने भक्ताचीच संगत करावी, भवीची करू नये. बसणे-बोलणे इत्यादी सारे भक्ताशी करावे. भवीची संगत टाळावी. कारण त्याच्या संगतीमुळे तुमची निष्ठा भंग पावण्याची शक्यता असते.

'विभूति-रुद्राक्ष-इष्टलिंगानां शरीरे सर्वदा धारणम्'। शरीर पवित्र राखण्यासाठी शरीरावर भस्मधारण करावे, इष्टलिंगधारण करावे, फार नाही पण एक रुद्राक्ष तरी शरीरावर धारण करावा. या प्रकारे भस्म-रुद्राक्ष-इष्टलिंग धारण करून शरीर पवित्र ठेवावे. हे आचार नीट समजावून घेऊन ते पाळून तुम्ही हळूहळू आपले शरीर शुद्ध करून घ्यावे. तरच तुम्ही 'भक्त' या संज्ञेला पात्र ठराल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

१४ ऑगस्ट १९९२

## दीक्षागुरुस्थल-१२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

गेल्या काही दिवसांपासून तुम्ही वीरशैवांच्या आचारांबद्दल ऐकत आहात. ऐकायला एवढे दिवस लागतात तर ते अमलात आणायला किती दिवस लागतील? सारे आयुष्यच लागेल. आज केले, उद्या नाही, असे चालत नाही. आचार नियमित पाळण्याचा प्रत्येकाने प्रयत्न केला पाहिजे. आतापर्यंत शरीर आणि इंद्रिये यांना शुद्ध करणारे आचार सांगितले. यानंतर मन शुद्ध करणाऱ्या पस्तीस आचारांचे विवेचन करायचे आहे. गणाचारात एकूण ६४ शीले आहेत. त्यांपैकी निम्म्यापेक्षा अधिक मनावर आधारलेली आहेत. यावरून शरीर आणि इंद्रिये यांच्यापेक्षाही मनाला अधिक महत्त्व आहे हे ध्यानात येते. शास्त्रकारांनी पुन्हा पुन्हा सांगितले आहे- 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो:।'

मनामुळेच मनुष्याचे अध:पतन आणि उन्नती होते. मनात जसे विचार असतील तशीच मनुष्याला गती मिळते. शास्त्रविहित आचरण करण्याचा मनाला अभ्यास झाला तर आपले सांसारिक जीवन सुखी होते आणि सद्गतीदेखील मिळते. म्हणून मनाच्या पस्तीस आचारांचा आपण विचार करू.

'निषिद्धभोगविषये संकल्पराहित्यम्।' मन कशाला म्हणतात? तर 'संकल्पविकल्पात्मकं मन:' आपल्या मनात काही ना काही संकल्प होत असतो. एक 'संकल्प' असतो तर दुसरा 'विकल्प' असतो. अस्तित्वात असलेल्या विषयावर जो विचार आपण करतो त्याला 'संकल्प' म्हणतात. विषय नसताना जो विचार आपण करतो त्याला 'विकल्प' म्हणतात. योगशास्त्रात म्हटले आहे- 'वस्तुशुन्य: विकल्प:।' वस्तू नाही, पण विचार चालू असतो तो विकल्प. वस्तू असो अथवा नसो, मन सतत विचार करीतच असते. विकल्प म्हणजे काय हे समजावे म्हणून एक कथा सांगितली जाते.

एका शहरात पति-पत्नी रहात होते. ते दोघेही एकमेकांशी अत्यंत प्रेमाने वागत. पण एके दिवशी त्यांच्यात भांडण पेटले. त्या दोघांचा चढलेला आवाज ऐकून शेजाऱ्याला मोठे आश्चर्य वाटले. चार-पाच वर्षांपासून मोठ्या प्रेमाने रहाणारे पति-पत्नी आज का बरे भांडत आहेत? त्यांचा आजपर्यंत कधीही आवाज चढलेला नव्हता. त्यांनी भांडण करावे असे काय बरे घडले असेल? असा विचार करून शेजारी त्यांच्या घरी गेला. त्याने विचारले, ''काय हो, तुम्ही का बरे भांडत आहात?''

''मुलाला वकील बनवायचे की डॉक्टर याबद्दल आमचे भांडण चालू आहे.'' पती म्हणाला, ''मला वाटते की माझ्या मुलाने वकील व्हावे.''

''नाही, अजिबात नाही,'' पत्नी संतापून म्हणाली, ''वकील खोट्याचे खरे आणि खऱ्याचे खोटे करतात. माझ्या मुलाला कोणत्याही परिस्थितीत मी वकील होऊ देणार नाही.''

''बिलकुल नाही, माझ्या मुलाला मी वकीलच करणार.'' पती ओरडून म्हणाला.

दोघेही एकमेकांचे ऐकायला तयार नाहीत असे पाहून शेजारी म्हणाला, ''तुम्हाला मुलाने वकील व्हावे असे वाटते आणि तुम्हाला मुलाने डॉक्टर व्हावे असे वाटते. पण तुमच्या मुलाची काय इच्छा आहे? हे त्याला विचारले पाहिजे. त्याला वकील किंवा डॉक्टर यांपैकी काहीच व्हायचे नसून तिसरेच काही व्हायचे असेल तर?

म्हणून तुमच्या मुलाला बोलवा. आपण त्याला विचारू.'' तेव्हा दोघेही म्हणाले, ''आम्हाला अजून मूल झालेच नाही. मुलगा झाल्यावर त्याला काय करायचे याबद्दल आम्ही भांडत होतो.''

मूल अस्तित्वातच नाही, तरीही त्याच्यासंबंधी विचार चाललेला असतो यालाच 'विकल्प' म्हणतात. अस्तित्वात असलेल्या विषयासंबंधी आपल्या मनात विचाराचे जे मोहोळ उठलेले असते त्याला 'संकल्प' म्हणतात. मन कधी संकल्प करते तर कधी विकल्प. मनाला विकल्पापासून दूर ठेवावे असे शास्त्र सांगते. कारण त्यामध्ये मन:शक्तीचा व्यय होत असतो. म्हणून साधकाने विकल्प करू नये. परंतु संकल्प तर केलाच पाहिजे. तो कसा करावा, हेच या ठिकाणी सांगितले आहे. मनाला सतत कशाचा तरी उपभोग घ्यावासा वाटतो. त्याला शब्द हवा असतो, स्पर्श हवा असतो, रूप हवे असते, रस हवा असतो, गंध हवा असतो. शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध यांचा भोग घेतल्याशिवाय मन गप्प रहात नाही. एक सुषुप्ति-अवस्था सोडली तर जागृतावस्थेत आणि स्वप्नावस्थेत मन सतत काहीतरी मागत असते. विषयांमध्ये काही विषय विहित असतात तर काही निषिद्ध असतात. शास्त्रांनी मान्य केलेले विषय विहित तर शास्त्राने अमान्य केलेले विषय निषिद्ध होत. मनाला शब्द ऐकायची इच्छा झाली तरी जे ऐकतो ते विहित आहे की निषिद्ध आहे, याचा विचार करावा लागतो. शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध यांच्या बाबतीतही असाच विचार केला पाहिजे. ते शास्त्रनिषिद्ध असतील तर उपभोगाच्या इच्छेचा म्हणजे संकल्पाचा त्याग करायला हवा. निषिद्ध विषयांचा भोग तर दूरच, परंतु त्यांच्या उपभोगाची इच्छा देखील मनात उत्पन्न होऊ नये. विषय समोर नसले तरीही मन आतल्या आत कल्पनेने त्याचा आस्वाद घेत असते. बागेतली फळे पाहून माणसाच्या तोंडाला पाणी सुटते. ती फळे प्रत्यक्षात खाता आली नाहीत तरी कल्पनेने ती खाल्ल्याचा आनंद तो घेऊ शकतो. म्हणून म्हटले आहे- 'दिल गया तो जाने दो, शरीर तू मत जा।'

निषिद्ध विषयांकडे मन गेले तर जाऊ दे, पण शरीराने अजिबात जाऊ नये. साधनेच्या दृष्टीने विषयांचा भोग घेण्यापेक्षाही विषयांचे चिंतन करणे अधिक अनर्थकारक ठरते. मुळात संकल्पच उत्पन्न झाला नाही तर निषिद्ध विषयांकडे मन धावणार नाही आणि शरीरही जाणार नाही. म्हणून संकल्पापासून मनाला दूर ठेवणे हे पहिले मानसिक शील होय.

'भक्तिरतौ कामो न विषयेषु।' मनुष्याच्या मनात कामक्रोधादी षड्रिपू वास्तव्य करतात. काम-क्रोधांचा त्याग करणे अत्यंत अवघड आहे. म्हणून त्यांचे रूपांतर करण्याविषयी येथे सांगितले आहे. तुमच्या मनात काम असेल तर त्याला विषयाकडे जाऊ न देता भगवंताकडे वळवावे. प्रेम आणि भक्ती तरी काय आहे? 'पूज्येषु अनुरागो भक्ति:।' आपल्या हृदयातले प्रेमच भक्तीमध्ये रूपांतरित होते. सामान्य विषयांवर प्रेम असेल तर त्याला 'रती' म्हणतात. परंतु तीच रती भगवंताकडे वळवली तर तिला 'भक्ती' म्हणतात.

एक संसारी मनुष्य एका महात्म्याकडे गेला. त्यावेळी तो महात्मा आपल्या शेतात कांद्याची रोपे एका ठिकाणाहून उपटून दुसऱ्या ठिकाणी लावत होता. गृहस्थाने महात्म्याला विचारले,

''महाराज, मी सामान्य संसारी मनुष्य आहे. पण माझा ईश्वरभक्तीकडे ओढा आहे. तेव्हा ईश्वरभक्ती कशी करावी, ते मला सांगा.''

महात्म्याने हसून त्याच्याकडे पाहिले आणि कांद्याचे एक रोप उपटून दुसरीकडे लावत त्याला सांगितले, ''यहां से उखडो, वहां लगाओ.''

त्या गृहस्थाला त्या शब्दांचा अर्थ कळला की नाही कुणास ठाऊक? परंतु तुम्ही-आम्ही मात्र तो समजून

घ्यायला हवा. तुम्ही प्रेम करणे सोडू नका, त्याची दिशा बदला, असे त्या महात्म्याला सांगायचे होते. तुमची विषयातली आसक्ती विषयांकडून भगवंताकडे वळवा. म्हणजे ही आसक्तीच भक्तीचे रूप घेईल. 'यहां से उखाडो, वहां लगाओ' याचा हा अर्थ आहे. विषयचिंतन केल्याने मनाचे अध:पतन होते आणि परमात्मचिंतन केल्याने मनाचे उन्नयन होते. कामना विषयांकडून भगवंताकडे वळवणे दुसरे मानसिक शील होय.

'अधर्मे क्रोधो न वैरिषु।' माणसाच्या मनात क्रोध दबा धरून बसलेला असतो. क्रोध प्रकृतीसाठी हानिकारक असतो. जो शारीरिक दृष्टीने अशक्त असतो त्याला अधिक क्रोध येतो. जो शरीराने स्वस्थ असतो त्याला फारसा क्रोध येत नाही. क्रोध झपाट्याने येतो आणि काहीतरी अनर्थ घडवून जातो. चोवीस तास कुणी क्रोधी असू शकत नाही. थोडा वेळ आलेला क्रोध आपल्या शरीरातले रक्त विषमय करून टाकतो. म्हणून आयुर्वेदिक औषधे देताना एक पथ्य सांगतात- क्रोध करू नका. हे खाऊ नये, ते खाऊ नये या पथ्यासारखेच 'कुणावर रागावू नये' असे पथ्य सांगितले जाते. क्रोध म्हणजे पेटलेले अग्निकुंड. एका घराला लागलेली आग शेजारचे घर जाळून टाकते, तसा क्रोध आपल्याला आधी जाळतो, नंतर समोरच्या माणसालाही जाळतो. म्हणून क्रोध आपला शत्रू आहे. तुम्हाला रागवायचे असेल तर माणसावर रागवू नका. तुमच्या हातून घडणाऱ्या अधर्मावर रागवा.

'शिवस्य आराधने लोभ: न धनादिषु।' काम, क्रोध आणि लोभ यांना 'नरकाची द्वारे' संबोधले जाते. वय वाढले की काम, क्रोध कमी होतात, परंतु लोभ मात्र म्हातारपणीही टवटवीत असतो. म्हणून शंकराचार्यांनी म्हटले आहे- 'वृद्धो गच्छति गृहित्वा दण्डं तदपि न मुंचति आशापिडम्।'

मरणासन्न झाल्यावर देखील माणसाचा लोभ कमी होत नाही. लोभी मनुष्य इहलोकात सुखी नसतो आणि परलोकातही सुखी होत नाही. लोभी मनुष्य स्वत:ही खात नाही आणि दुसऱ्यांनाही खाऊ देत नाही. म्हणून त्यांना आपण कंजूष म्हणतो. हिंदीत त्यांना 'मख्खीचूस' म्हणतात. तूपात माशी पडली तर ती चोखून फेकणारा म्हणजे मख्खीचूस. ऐहिक आणि पारलौकिक सुखे गमावणारा दुर्गुण म्हणजे लोभ. हा सर्वात मोठा दुर्गुण होय. लोभ प्रमाणात असेल तर ठीक. पण जर अति-लोभ झाला तर तो स्वत:चे आयुष्य आणि इतरांचे आयुष्य नासवून टाकतो. लोभी मनुष्याकडूनच अधिकाधिक पापकर्मे घडतात. तो बापाला जाणत नाही, पत्नीला ओळखत नाही. तो ओळखतो फक्त धनाला. तो धनासाठी पत्नीची, पुत्राची आणि गुरूची देखील हत्या करू शकतो. लोभामुळेच जास्त पापकर्मे घडतात. कबिरांनी म्हटले आहे- 'लोभ पाप का बाप बखाना। दान धर्म का मूल।' दान हे धर्माचे मूळ आहे तर लोभ पापांचा बाप. यासंबंधी एक कथा तुम्ही ऐकली असेल.

काशीमध्ये वेदाध्ययन करून संस्कृत पंडित होऊन एक तरुण आपल्या गावी आला. त्याला लग्न करायचे होते. पण कमी शिकलेली मुलगी नको होती. त्याला संस्कृत विदुषी हवी होती. त्याने अनेक मुली पाहिल्या. शेवटी त्याला हवी तशी मुलगी मिळाली. अनेक प्रश्न विचारून त्याने तिला भंडावून सोडले. तिने विचार केला की, ठीक आहे. लग्नानंतर याला 'पाहून घेऊ'. तुम्ही देखील मुलगी पाहता फार तर तासभर. मग ती तुम्हाला जन्मभर 'पाहून घेते'.

त्यांचे लग्न झाले एके दिवशी जेवताना बायकोने विचारले, ''तुम्ही फार ज्ञानी आहात. तर मला सांगा, पापाचा बाप कोण?''

प्रश्न ऐकून पंडिताला उत्तर सुचेना. तो म्हणाला, ''उद्या जेवणाच्या वेळी या प्रश्नाचे उत्तर देईन.''

त्याला काही सुचेना, पत्नी आपला अपमान करते आहे असे त्याला वाटले. त्याने सगळ्या पोथ्या काढल्या

आणि त्यांमध्ये शोधू लागला, पापाचा बाप कोण? परंतु त्याला एकाही ग्रंथात या प्रश्नाचे उत्तर आढळले नाही. त्याला उत्तराशिवाय पत्नीला तोंड दाखवणे योग्य वाटेना. शेवटी घर सोडून तो काशीला गेला. त्याने आपल्या गुरुजनांना विचारले. परंतु त्यांनाही पापाचा बाप कोण ते सांगता आले नाही. बापड्या पंडिताला वेडच लागले. जो भेटेल त्याला तो विचारू लागला– 'पापाचा बाप कोण?' त्याच्या या प्रश्नवेडाने लोकांनी त्याला वेडा ठरवले आणि त्याचे नाव ठेवले 'पापाचा बाप कोण?' तो दुरून येताना दिसला तर मुले म्हणायची 'अरे तो पहा 'पापाचा बाप कोण' आला.' शेवटी काही टारगट लोकांनी त्याच्या गळ्यात एक फलक लटकवला. त्यावर लिहिले होते– 'पापाचा बाप कोण?'

पंडित गावभर भटकत असे. एकदा तो वेश्यावस्तीतून जात असताना एका वेश्येला त्याची दया आली. तिने त्याला घरात बोलावले. तो जायला तयार होईना. परंतु 'तुझ्या प्रश्नाचे उत्तर मी देते' असे म्हटल्यामुळे तो तिच्या घरात गेला. ती त्याला म्हणाली,

"तुम्ही ज्ञानी पंडित आहात. तुमच्या प्रश्नाचे उत्तर तुम्हाला निश्चित मिळेल. पण काही दिवस तुम्हाला इथे रहावे लागेल. माझ्या नव्या स्वतंत्र घरात तुमच्या निवासाची मी व्यवस्था करते. तुम्ही काही दिवस तिथे सुखाने रहा. माझ्या व्यवसायाचा तुम्हाला तिथे काहीही त्रास होणार नाही."

पंडित तिच्या नव्या घरात राहू लागला. भिक्षा मागून तो उदरनिर्वाह करीत होता. एके दिवशी वेश्या त्याच्याकडे आली आणि म्हणाली, "महाराज, तुमचे हाल मला पहावत नाहीत. म्हणून चांगला स्वयंपाक करून तुम्हाला भोजन घालावे अशी माझी इच्छा आहे. त्यामुळे मला समाधान लाभेल."

"नाही, ते शक्य नाही?" पंडित रागावून म्हणाला, "तू वेश्या आहेस, तुझ्या हातचे अन्न मी खाल्ले तर नरकात जाईन." ती हसली आणि आपल्या घरी निघून गेली. दुसऱ्या दिवशी तिने ताट भरून सोन्याची नाणी आणली. सोबत स्वयंपाकाचे साहित्य आणले. सोन्याची नाणी पाहून पंडिताला लोभ सुटला. तो आशाळभूतपणे त्या नाण्यांकडे पाहू लागला. वेश्या हसून म्हणाली, "महाराज, तुम्हाला माझ्या हाताने स्वयंपाक करून जेवू घातले तर मी धन्य होईन. ब्राह्मणाला भोजन घालून दक्षिणा द्यावी असे म्हणतात. तुम्हाला दक्षिणा देण्यासाठी मी ताटभर सोन्याची नाणी आणली आहेत. स्वीकाराल ना माझ्या हातचे भोजन?"

पंडिताला नाही म्हणवेना. शेवटी तो जेवायला तयार झाला. वेश्येने आपल्या हाताने स्वयंपाक केला. त्याला वाढले. नमस्कार करून त्याच्यासमोर सोन्याची नाणी ठेवली. त्याने जेवायला सुरुवात केली. पहिला घास तोंडात घालणार तोच वेश्येने त्याचा हात पकडला आणि त्याच्या थोबाडात एक ठेवून दिली. तो पुरता भांबावला. ही असे का वागते, हेच त्याला कळेना. वेश्या त्याला म्हणाली, "पापाचा बाप कोण हे आता तरी तुम्हाला कळले का? माझ्यासारख्या वेश्येच्या हातचे भोजन तुम्ही करायला तयार झालात ते कशामुळे? या सोन्याच्या लोभामुळे. म्हणून लोभ हाच पापाचा बाप आहे."

पंडिताला आपल्या प्रश्नाचे उत्तर मिळाले. त्याला जे मोठमोठ्या ग्रंथात सापडले नाही ते एका सामन्य वेश्येने दिले. वेश्येला गुरू मानून उत्तर सापडल्याच्या आनंदात तो घरी गेला.

ज्याच्या मनात लोभ असतो त्याच्याकडून काही ना काही पाप घडतेच. म्हणून धनाचा लोभ ठेवू नये. लोभ असावा पण तो शिवपूजेचा. आपण जेवढे प्रेम धनावर करतो त्यापेक्षाही अधिक प्रेम ईश्वरावर केले पाहिजे. धन आज असेल, उद्या नसेल. परंतु ईश्वर मात्र सदैव आपल्या संगतीला असतो. ईश्वराचा लोभ धरणे हा एक

मानसिक आचार होय.

'भक्तजने मोहः न कान्तादिविषयेषु।' माणसाच्या मनात मोह उत्पन्न झाला की त्याची विचारशक्ती कुंठित होते. मोहामुळेच शस्त्र सोडून अर्जुन युद्धभूमीवरून पळू पहात होता. गीतेचा उपदेश संपल्यावर अर्जुनाने म्हटले आहे– 'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत।' तुमच्या उपदेशामुळे माझा मोह नष्ट झाला आहे. तुम्ही सांगाल तसे वागायला मी तयार आहे, असे अर्जुन म्हणतो. म्हणून बायको–मुले, आप्त–स्वकीय यांच्याबद्दल मोह न धरता शिवभक्तांबद्दल मोह बाळगावा. भक्ताला भक्ताचा मोह असावा. या मोहामुळे आपली संसारबंधनातून सुटका होते.

'करणेष्वेव मात्सर्यं न जनेषु।' आपल्या मनात मत्सरबुद्धी असते. कुणाचे भले झाले तर आपल्याला पहावत नाही. तुम्हाला मत्सर करायचा असेल तर तो इतरांचा करू नका. तुमच्या इंद्रियांचा करा. कारण तुमची इंद्रिये सारखी निषिद्ध विषयांकडे वळत असतात. यानंतरचे शील आहे– 'मायाजये मदो न धर्मे नापि संपदि'. मद म्हणजे एक प्रकारचा अभिमान. धनमद, यौवनमद, रूपमद, अधिकारमद असे अनेक मद आपल्या मनात नांदत असतात. धर्माविषयी मद बाळगू नये. अर्थात् मी एवढे धर्मकार्य केले, असा अभिमान बाळगू नये. म्हणून धर्म अथवा संपत्ती यांच्या ऐवजी मायेवर विजय संपादन केल्याबद्दल मद बाळगावा.

'गुरौ जंगमे वा गुणागुणविमर्शत्यागः।' माणसाला दुसऱ्याचे अवगुण दिसतात, पण स्वतःचे मात्र दिसत नाहीत. माणसाला निर्माण केल्यावर परमेश्वराने त्याच्या खांद्यावर जणू एक विलक्षण झोळी अडकवून त्याला पृथ्वीवर पाठवले आहे. ती समोरही आहे आणि मागेही आहे. समोरच्या भागात त्याने त्या माणसाचे गुण भरले आहेत आणि मागच्या भागात त्याचे अवगुण. आपण जेव्हा चालतो तेव्हा आपले समोरचे गुण आपल्याला दिसतात आणि आपल्या समोर चालणाऱ्या माणसाच्या झोळीतले अवगुण दिसतात. दुसऱ्याचे गुण घ्यावे पण अवगुण घेऊ नयेत. आपल्या जवळ गुणग्राहकता असली पाहिजे. आपल्या गुरूच्या आणि जंगमाच्या ठिकाणी काही अवगुण असण्याची शक्यता असते. परंतु त्यांच्या अवगुणाकडे दुर्लक्ष करून त्यांच्या सद्गुणांकडेच लक्ष द्यावे. किंबहुना गुणावगुणाचा विचारच करू नये.

'प्राणिनो अहिंसा भावना।' अहिंसा हा एक धर्म आहे. अहिंसेचे अनेक प्रकार आहेत. हिंसा करू नये एवढ्या पुरतीच अहिंसा मर्यादित नाही. शरीराकडून जशी हिंसा घडते तशी वाणीकडून आणि मनाकडूनही हिंसा घडते. तुम्ही कुणाला शस्त्राने मारता, ते शक्य नसेल तेव्हा त्याला शिव्या देता. जो सशक्त असतो तो मारहाण करतो, जो अशक्त असतो तो शिव्या देतो. शिव्या देणे ही देखील हिंसाच आहे. आणि मनातल्या मनात एखाद्याचे अनिष्टचिंतन करणे ही देखील हिंसाच मानली जाते. शारीरिक, वाचिक आणि मानसिक अशी हिंसा तीन प्रकारची असते. मनात हिंसाभावना उत्पन्न न होणे हे एक मानसिक शील आहे. त्यामुळे मन शुद्ध होते.

'प्राणिदुःखवीक्षायां दया।' दुःखी जीवांविषयी दया बाळगावी. दया हा देखील एक धर्म होय. दयेसारखा श्रेष्ठ दुसरा धर्म नाही. म्हणून दुःखीकष्टी जीवाबद्दल आपल्या मनात दयाभावना असावी. त्याचे दुःख दूर करण्याचा आपण प्रयत्न करावा. यापुढील शील आहे– 'क्रियायां वचने च आर्जवम्।' आर्जव याचा अर्थ आहे सरलता. मनुष्याला सामान्यतः सरळपणा नसतो. त्याचा स्वभावच वाकडा. दिसायला तो सरळ दिसतो, परंतु त्याचे विचार–वागणे वाकडे असते. श्रीकृष्णाने अर्जुनाला गीता सांगितली. 'अर्जुन' याचा अर्थ ज्याचा स्वभाव सरळ आहे असा. जो स्वभावाने साधा–सरळ असतो त्यालाच अध्यात्म सांगितले जाते. ज्याचे वागणे–बोलणे सरळ नसते

त्याला उपदेश करणे शक्य नसते. भगवान शिव अत्यंत सरळ आहेत. महात्मा आणि दुरात्मा यांच्यातील अंतर एका श्लोकात स्पष्ट केले आहे–

वचस्येकं मनस्येकं कर्मण्येकं महात्मनः।
वचस्यन्यत् मनस्यन्तत् कर्मण्यन्यत् दुरात्मनः।।

ज्याचे बोलणे, विचार आणि क्रिया एक असते तो महात्मा आणि ज्याच्या बोलण्यात, विचारात आणि वागण्यात मेळ नसतो तो दुरात्मा. जे सरळ असतात त्यांच्या वाणीकडून, मनाकडून आणि शरीराकडून एकाच प्रकारचा व्यवहार घडतो. त्याच्या जीवनात सुसंवाद असतो. समाजात महात्मे कमी, दुरात्मेच अधिक असतात. म्हणून प्रत्येकाने आपल्या व्यवहारात सरतला आणावी. 'रिपौ निजसुते वापि वैषम्यविवर्जनम्।' मनुष्याच्या मनात विषमतेची भावना असते. आपले–तुपलेपणा असतो. हे माझे, ते तुमचे अशी विभागणी तो करत असतो. तो प्रत्येकाकडे वेगवेगळ्या दृष्टीने पहातो. परंतु शिवभक्ताने विषमतेला आपल्या मनात थारा देऊ नये. स्वतःचा मुलगा असो अथवा शत्रू असो, दोघांकडेही समभावाने पहावे.

'गुरुपदिष्टेषु निगमागमवचनेषु विश्वासः।' विश्वास, श्रद्धा हा मनाचा एक मोठा गुण आहे. विश्वास नसेल तर लौकिक आणि आध्यात्मिक कोणताच व्यवहार होऊ शकत नाही. दुकानदार आपल्याला सामान देणार या विश्वासानेच आपण त्याला आधी पैसे देत असतो. विश्वासावरच सारे व्यवहार चाललेले असतात. आपण गुरुवचनावर आणि शास्त्रावर विश्वास ठेवला पाहिजे. तुमच्या शरीरस्वास्थ्याची काळजी वाहणाऱ्या डॉक्टरवर तुम्हाला विश्वास ठेवावाच लागतो. तो जे औषध देईल ते विश्वासाने घ्यावे लागते. गुरूला देखील 'भवरोगवैद्य' असे नाव आहे. आपल्या सूक्ष्मशरीराला म्हणजे मनाला जे आजार होतात ते श्रीगुरू दूर करतात आणि आपल्याला मनःस्वास्थ्य मिळवून देतात. म्हणून श्रीगुरूवर आणि त्यांच्या उपदेशावर आपण श्रद्धा ठेवावी. गुरूप्रमाणेच शास्त्रावर देखील श्रद्धा ठेवावी. भली–बुरी कर्मे करून आपण पुण्य–पाप मिळवतो. पुण्य–पाप कोणाला दिसत नाहीत. ते अदृश्य असतात. परंतु जेव्हा शास्त्र सांगते की, हे कर्म करू नकोस त्यामुळे पाप लागेल, तेव्हा त्यावर आपण विश्वास ठेवला पाहिजे. जेव्हा शास्त्र सांगते की, हे कर्म कर त्यामुळे पुण्य मिळेल, त्यावर विश्वास ठेवायला पाहिजे. आपण मनःपूत वागू लागलो तर आपण पापाचे धनी होण्याची शक्यता अधिक. श्रीगुरू तुम्हाला फसवण्यासाठी काही सांगत नसतात. तुमची दिशाभूल करण्यासाठी शास्त्रकारांनी शास्त्रे लिहिली नाहीत. ती लिहिली आहेत तुम्हाला दिशा दाखवण्यासाठी. आचार्यांना आणि शास्त्रकारांना तुमच्याकडून काही मिळवायचे नाही. त्यांना तुम्हाला कल्याणाचा मार्ग दाखवायचा आहे. म्हणून गुरुवचनावर आणि शास्त्रांवर विश्वास ठेवावा. तुमचा विश्वास जेवढा दृढ होईल तेवढे त्याचे अधिक फळ तुम्हाला मिळेल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
१६ ऑगस्ट १९९२

## दीक्षागुरुस्थल–१३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालच्या आशीर्वचनात तुम्ही विश्वासाचे, श्रद्धेचे महत्त्व ऐकले आहे. श्रीगुरूंच्या उपदेशावर आणि शास्त्रांच्या वचनांवर श्रद्धा ठेवली तरच ज्ञानलाभ होतो. श्रद्धावंतालाच ज्ञान लाभते. अश्रद्ध माणसाने कितीही श्रवणभक्ती केली किंवा कितीही ग्रंथ वाचले तरी त्याला ज्ञान मिळत नाही. गणाचारातील यापुढचे शील आहे–

**'दुरन्तायां आपद्यपि धर्मस्य अवर्णनरूपा धृतिः।'** धृती म्हणजे धैर्य. कितीही संकटे आली तरी आचार सोडू नये. आचारांचा त्याग करण्यासाठी माणसाला थोडेही निमित्त चालते. इष्टलिंगधारण आणि इष्टलिंगपूजा हे वीरशैवांचे महाव्रत आहे. कितीही मोठी आपत्ती आली तरी वीरशैवाने आपले व्रत सोडू नये. यालाच 'धृती' अथवा 'धैर्य' असे म्हणतात. धृतीबद्दल 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त माहेश्वरस्थलात म्हटले आहे की, सारी संपत्ती लुटण्याचे अथवा जिवे मारण्याची जरी कुणी धमकी दिली तरी लिंगपूजेचा त्याग करू नये. धनापेक्षा आणि प्राणापेक्षाही इष्टलिंग अधिक मूल्यवान आहे. म्हणून अशी धीरवृत्तीने इष्टलिंगपूजा करणे हे मनाचे एक शील आहे.

**'अपकारिष्वपि वैरिजनेषु अदूषणरूपा क्षमा।'** क्षमा म्हणजे सहनशीलता. सामान्यतः मनुष्याच्या ठिकाणी क्षमेची उणीव असते. ज्याचे मन संकुचित असते तो अक्षमी असतो. मन विशाल होत जाते तशी सहनशीलताही वाढत जाते. मन लहान असेल तर ते मोठे करता येणे शक्य आहे. ज्याचे मन मोठे असते त्यालाच आपण 'महात्मा' म्हणतो. परमात्मा सर्वव्यापक आहे, विशाल आहे. त्याचे चिंतन करायचे असेल तर मन देखील विशाल हवे. महासागर एखाद्या लहानशा कमंडलूत मावत नाही. संपूर्ण महासागर हवा असेल तर त्याच्यासाठी त्यापेक्षाही मोठे पात्र हवे. त्याप्रमाणे भगवच्चिंतन करायचे असेल, त्याला मनात साठवायचे असेल तर त्यासाठी आपले मन विशाल झाले पाहिजे. आपले मन छोटे असते, म्हणूनच आपण दुःखी असतो. आपले लहानसे मन आपण सांसारिक वस्तूंनी भरून टाकतो. त्यात परमात्म्याला ठेवत नाही. आपण भगवंताचे चिंतन किती काळ करतो? आणि संसाराचे चिंतन किती काळ करतो? दीक्षा घेतल्यावर भक्त आम्हाला विचारतात, 'महाराज, रोज जप किती वेळा करावा?' आम्ही सांगतो, 'किमान एकशेआठ तरी करा.' रोज एकशेआठ जप करणे देखील त्यांना अवघड वाटते. परंतु एकशेआठ जप हा तर प्रारंभ आहे. तुमचा व्यवहार चालू असताना प्रत्येक श्वासासोबत मंत्रजप घडला पाहिजे. संसार दुःखरूप आहे. त्याचे चिंतन केले तर दुःखाशिवाय तुमच्या वाट्याला काय येणार? म्हणून परमात्मचिंतन केले पाहिजे. त्यासाठी अंगात सहनशीलता पाहिजे. मनुष्य जेव्हा अविवाहित असतो तेव्हा त्याला केवळ स्वतःच्या खाण्या–पिण्याचीच काळजी असते. पुढे मुलेबाळे झाल्यावर त्याला कुटुंबाच्या खाण्या–पिण्याची चिंता करावी लागते. यावेळी त्याचा स्वार्थ कमी झालेला असतो. त्याप्रमाणे ज्यांचे मन विशाल असते त्यांना संपूर्ण विश्वाची चिंता वहावी लागते. 'वसुधैव कुटुंबकम्' अशी भावना त्यांच्या मनात रुजलेली असते. म्हणून सर्व जग सुखी असावे, अशी मंगल कामना ते करत असतात. कुणी अपराध केला तरी ते त्याला क्षमा करतात. म्हणून दुसऱ्याचे अपराध पोटात घालून त्याला क्षमा करणे हे एक मानसिक शील आहे.

**'मानसे भोगसक्तिच्युतिः।'** शब्द–स्पर्शादी पंचविषय भोगायची लालसा प्रत्येक मनुष्यात असते. मनात सदैव

विषयोपभोगाचेच चिंतन चालू असते. परंतु वीरशैव साधकाच्या बाबतीत असे घडू नये. विषयभोग घेताना देखील त्याच्या मनात शिवचिंतन चालू असले पाहिजे. विषयोपगभोग घेताना त्या त्या इंद्रियाच्या ठिकाणी असलेल्या लिंगाला विषय अर्पण करून तो प्रसाद म्हणून स्वीकारण्याची प्रक्रिया वीरशैवसिद्धान्तात सांगितली आहे. त्यामुळे वीरशैवांना 'लिंगभोगोपभोगी' असे म्हटले जाते. केवळ अन्नच लिंगार्पित करावे असे नसून शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध या पंचविषयांना देखील लिंगार्पित करावे लागते. म्हणून वीरशैव साधक विषयांचा भोग 'विषय' म्हणून घेत नाही तर 'प्रसाद' म्हणून घेतो. शब्दप्रसाद, स्पर्शप्रसाद, रूपप्रसाद, रसप्रसाद, गंधप्रसाद. त्यामुळे त्याची भोगासक्ती नष्ट होते.

**'क्रियायां वचने वापि प्रमादराहित्यम्।'** प्रमाद म्हणजे अपराध. योग्यवेळी योग्य काम न करणे याला 'प्रमाद' म्हणतात. आळशी माणसाकडून सतत प्रमाद घडत असतात. एखाद्याने संकष्टी चतुर्थीचे व्रत घेतले तर ते प्रमाद न करता पाळायला हवे. समजा एखाद्या चतुर्थीला त्याने आधीच जेवण केले, तर त्याने प्रमाद केला असे म्हणावे लागते. कारण तो सजग, जागृत नव्हता. व्रत घेतले तर चतुर्थी कधी आहे हे नीट ध्यानात ठेवलेच पाहिजे आणि प्रमाद घडला तर पश्चात्तापपूर्वक जप-ध्यान करून निष्ठेने व्रतपालन केले पाहिजे. म्हणून लिंगधारण, लिंगपूजा हे व्रत वीरशैवांनी प्रमाद न करता निष्ठेने पाळले पाहिजे. हा एक मानसिक आचार होय.

**'शिवादन्यवस्तुनां प्राप्तिसंकल्पवर्जनरूपो दमः।'** 'शम' म्हणजे बाह्येंद्रियांचा निग्रह. 'दम' म्हणजे अंतरिंद्रियांचा निग्रह. मनात संकल्प असेल तरच आपण ऐकतो, स्पर्श करतो, पहातो. संकल्पाशिवाय आपल्या शरीराकडून कोणतीही क्रिया घडत नसते. पंचज्ञानेंद्रिये आणि पंचकर्मेंद्रिये या दहा इंद्रियांचे अध्यक्ष मन आहे. मन सांगेल तशी इंद्रिये वागतात. म्हणून मनात शिवाशिवाय दुसऱ्या कोणत्याही वस्तूच्या प्राप्तीचा संकल्प उठू नये. शिव सोडून अन्य वस्तूंच्या संकल्पाचा त्याग करणे हे मानसिक शील आहे.

**'परद्रव्य परिग्रहं रूपं अस्तेयम्।'** 'स्तेय' याचा अर्थ चोरी करणे हा होय. अस्तेय म्हणजे परद्रव्याची अभिलाषा न बाळगणे. आपला सर्व जीवनव्यवहार द्रव्यावर आधारलेला असल्यामुळे मनुष्याला जेव्हा पैसा कमी पडतो तेव्हा तो चोरी करायला प्रवृत्त होतो. चोर बाहेरचे असतात आणि घरातले देखील असतात. म्हणून उत्तम व्यवहाराने धन मिळवावे आणि धार्मिक कृत्यासाठी ते खर्च करावे. दुसऱ्यांच्या द्रव्याची अभिलाषा धरू नये. भोगविलासासाठी कितीही धन मिळाले तरी ते कमीच पडते. म्हणून संयमी जीवन जगावे. संयमी मनुष्य जेवढा सुखी असतो तेवढा विलासी मनुष्य सुखी नसतो. आपल्या इच्छा मर्यादित ठेवल्या तर इतराच्या धनाचा अपहार करण्याकडे प्रवृत्ती होत नसते. म्हणून साधेपणाने जीवन जगण्याचा प्रयत्न करावा.

**'अप्राप्तवस्तुविषयव्यसनाभावरूपा संतुष्टिः।'** प्रपंचात असंख्य वस्तू आहेत. परंतु प्रत्येकाला त्या मिळत नाहीत. तुम्हाला जे हवे आहे ते मिळेलच असे नाही. कुणाला एक हवे असते तर मिळते दुसरेच. प्रपंचात एकपट सुख आहे तर तीनपट दुःख आहे. तुम्ही मऊ बिछान्यावर झोपता, तेव्हा तुमच्या शरीराची डावी-उजवी बाजू आणि पोट-पाठ यांपैकी कोणता तरी एकच भाग बिछान्यावर टेकलेला असतो. शरीराच्या एकाच भागाला बिछान्याच्या मऊपणाचे सुख लाभत असते. एकाच वेळी संपूर्ण शरीराला ते मिळणे शक्य नाही. त्याप्रमाणे प्रपंचात सुख फार असले तरी आपल्या वाट्याला त्यातले थोडेच येत असते. एकाच मनुष्याला सर्व प्रापंचिक सुखे मिळणे शक्य नाही. जे सुख आपल्याला मिळाले नाही, त्यासाठी असंतुष्ट होऊ नये. जेवढे सुख आपल्या पदरात पडले तेवढ्यावरच शिवभक्ताने संतुष्ट रहावे. कारण संतोष ही सर्वश्रेष्ठ संपत्ती आहे.

**'नित्यं परमेश्वरनामरूपयो: स्मरणम्।'** आपल्या मनात निरंतर स्मरण चालू असते. आपले मन वर्तमानकाळाचे स्मरण करीत नसते. भूतकाळाचे किंवा भविष्यकाळाचे स्मरण अखंड करीत असते. ते स्मरण देखील संसाराचे असते. संसारस्मरणामुळे दु:ख मिळते तर परमेश्वराच्या स्मरणामुळे अपार शांतीचा लाभ होतो. म्हणून स्मरण करायचेच असेल तर भगवंताच्या नामाचे आणि रूपाचे स्मरण करावे.

**'शंभोर्नामगुणादिनां अनवरतं चिंतनम्।'** मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांना 'अंत:करण' असे म्हणतात. चिंतन करणाऱ्या मनोवृत्तीला 'चित्त' असे नाव आहे. चित्ताने संसारचिंतन सोडून केवळ शिवाच्या गुणाचे, नामाचे निरंतर चिंतन करावे.

**'सदा शंभो: पादसंवाहनभावनम्।'** पादसंवाहन म्हणजे पाय दाबणे. ही पादसेवा होय. माता-पित्याचे, घरातील व्यक्तीचे अंग दुखत असेल, डोके दुखत असेल तर ते आपण दाबून देतो, त्याप्रमाणे शिवाचेही पादसंवाहन करावे. ईश्वराला शरीरच नाही तर त्याची पादसेवा कशी करता येईल? परंतु आपल्या भावविश्वात शिव आपल्या घरी विश्रांती घेत आहेत, आपण त्यांचे पाय चुरत आहोत, अशी कल्पना करणे हीच पादसेवा होय. त्यामुळे भगवच्चिंतन घडून मनाला अपार शांती मिळते.

**'शंभोरावाहनादिना मानसिकं अर्चनम्।'** आपले शरीर आणि वाणी जेव्हा शिवपूजेसाठी असमर्थ असते तेव्हा आपण मानसपूजा केली पाहिजे. मानसपूजा सर्वश्रेष्ठ मानली जाते. येथे सारे काही मनानेच करायचे असते. तळहातावर आपण इष्टलिंग ठेवले आहे, त्याला जल वाहिले आहे, भस्म-बिल्व अर्पण केले आहे, अशी दृढ कल्पना करणे हीच 'मानसपूजा' होय. शंकराचार्यांच्या 'शिवमानसस्तोत्रा'त मानसपूजेचे अत्यंत सुंदर वर्णन आले आहे. मानसपूजा साधली तर आपण आपल्या हातून जे जे कर्म घडते ते शिवाची पूजाच होते. शरीर आणि वाणीपेक्षाही मन अधिक महत्त्वाचे असते. म्हणून मनाकडून घडणारी पूजा सर्वश्रेष्ठ समजली जाते. त्यामुळे भगवद्कृपेचा लाभ होतो.

**'नित्यं शिवस्य पादब्जयोर्मानसिक: प्रणाम:।'** शिवचरणाचे चिंतन करीत त्याला मानसिक प्रणाम करावा. शंकराला स्वामी समजून आणि स्वत:ला त्याचा दास मानून त्याची मानसिक सेवा करणे हे 'दास्यशील' होय. घरात काम करणारा नोकर घरमालकापेक्षाही अधिक काम करीत असतो. परंतु त्याच्या मनात घराविषयी ममत्व नसते. त्याप्रमाणे ममत्वशून्य होऊन आपण शिवाचे सेवक आहोत या भावनेने कर्म करावे. दास्यभाव अंगी बाणला तर आपला अहंकार क्षीण होऊन नष्ट होतो. सर्व जगाचे कल्याण करणारे भगवान शिव आपले सखा, मित्र आहेत, अशी भावना बाळगणे हेच 'सख्यशील' होय. जशी दास्यभक्ती असते तशीच सख्यभक्तीही असते. लौकिकात देखील आपल्याला मित्र असतात. परंतु ती मैत्री दीर्घकाळ टिकणारी नसते. कधीकधी दोन जिवलग मित्रच कालांतराने एकमेकांचे कट्टर शत्रू होतात. शुंभ-निशुंभ या दैत्यांची कथा तुम्हाला माहीत आहे. दोघे जिवलग मित्र होते. परंतु एकाच स्त्रीवर त्यांचे मन जडल्यामुळे ते परस्परांचे वैरी बनले आणि त्यांनी एकमेकांना ठार केले. व्यवहारातील पति-पत्नीचे, पिता-पुत्राचे संबंध देखील स्वार्थासाठीच असतात, असे बृहदारण्यकोपनिषदात म्हटले आहे. स्वत:ला सुख मिळावे यासाठीच मनुष्य दुसऱ्यासोबत संबंध ठेवत असतो. परंतु भगवंत मात्र स्वार्थापोटी भक्तावर प्रेम करत नाही. त्याला तुमच्याकडून काहीच मिळवायचे नसते. कारण तो नित्यतृप्त आहे. तुम्ही त्याला नैवेद्य दाखवला नाही तर तो उपाशी रहात नाही. त्याला दाखवलेला नैवेद्य देखील तुम्हालाच खावा लागतो. म्हणून मैत्री करायची असेल तर शिवाशी करावी. लौकिकातले मित्र तुम्हाला सोडून दूर जाऊ शकतात.

परंतु शिव तर तुमच्या हृदयातच बसलेला आहे. तो तुम्हाला सोडून कुठे जाईल? तुम्ही जिथे जाल तिथे तो तुमच्या सोबतच असेल. म्हणून भगवान शिव आपला परम सखा आहे असे मानावे.

बंध आणि मोक्ष यांचे ओझे भगवान शिवावर टाकून देणे हे 'आत्मार्पण शील' होय. मला बंधनात ठेवायचे की मुक्ती द्यायची हे तू ठरव, असे शिवाला सांगावे. एका कन्नड संताने म्हटले आहे, 'हे ईश्वरा, तू मला क्षीरसागरात बुडव की, जलसागरात, मला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. एकदा माझे शरीर–वाणी–मन मी तुला अर्पण केले आहे. त्याचे काय वाटेल ते करण्याचा तुला अधिकार आहे. मग मी उगाच चिंता का वहात बसू?' याप्रकारे बंधमोक्षाची चिंता सोडून भगवंताला पूर्ण समर्पण करणे यालाच 'आत्मार्पण शील' म्हणतात.

**'मूलमंत्रस्य सदा मानसिको जपः।'** मनःशुद्धीसाठी निरंतर मंत्रजप केला पाहिजे. ज्याच्या मनात निरंतर शिवचिंतन चाललेले असते त्याला कधीही पापाचा स्पर्श होत नाही आणि घडलेले पाप हळूहळू नष्ट होते. म्हणून कोणतेही कार्य चालू असताना शिवनामाचा जप करावा. आपले काम जपात व्यत्यय आणत नसते. भगवान शिवाच्या दिव्यरूपाचे निरंतर चिंतन करणे हेच 'ध्यान शील' होय. जपानंतर ध्यान करावे लागते. जप करण्याआधी तुम्ही ध्यान करू लागलात तर तुमचे मन स्थिर होणार नाही. परंतु जपानंतर ध्यान केले तर मन स्थिर झाल्याचा अनुभव येईल. याविषयी एक सुंदर कथा सांगितली जाते–

एका माणसाने अघोरी साधना केली, तेव्हा त्याच्यावर पिशाच्च प्रसन्न झाले. त्याच्यासमोर पिशाच्च प्रकट होऊन म्हणाले, ''आजपासून मी तुझा दास आहे. तू जे काम सांगशील ते मी तात्काळ करीन. परंतु मला सतत काम सांगितले पाहिजेस. ज्याक्षणी तू मला काम सांगणार नाहीस त्याक्षणी मी तुला खाऊन टाकीन.''

पिशाच्च आपल्या मुठीत आले आहे हे पाहून त्या माणसाला अत्यानंद झाला. त्याने पिशाच्चाला कामे सांगायला सुरुवात केली. त्याने काम सांगितले की एका क्षणातच पिशाच्च ते काम करून येई. त्यामुळे पुढे पिशाच्चाला काय काम सांगावे? असा प्रश्न त्याला पडला. पिशाच्च आपल्याला खाऊन टाकील अशी भीतीही त्याला वाटू लागली. म्हणून एका महात्म्याला त्याने आपली कर्मकथा ऐकवली. तेव्हा महात्मा म्हणाला,

''तू एक काम कर, तुझ्या घरापुढे एक उंच खांब गाडून ठेव, आणि पिशाच्चाला 'मी थांब म्हणेपर्यंत या खांबावर चढ, खाली उतर' असे सांग. त्याला थांबायला सांगू नकोस. असे केले तरच तुझी त्याच्यापासून सुटका होईल.''

त्या माणसाने त्याप्रमाणे केले आणि पिशाच्च कायमचे खांबावर अडकवून ठेवले.

आपले मन पिशाच्चासारखे आहे. एखादे काम करण्यासाठी शरीराला अधिक वेळ लागतो. परंतु ते काम मन एका क्षणात करू शकते. तुम्हाला शरीराने काशीला जायला दोन–तीन दिवस लागतील. परंतु मनाने तुम्ही तिथे क्षणात पोहचाल. त्यामुळे मनावर नियंत्रण ठेवावे लागते. त्याला त्या पिशाच्चासारखे गुंतवून ठेवावे लागते. जप करणे म्हणजे मनाला गुंतवून ठेवणेच होय. जप हा एक अभ्यास आहे. मनाला निरंतर शिवनामजपात गुंतवले पाहिजे. त्यामुळे ते स्थिर होते. आधी जप केल्यावर जर ध्यान केले तर ध्यान चांगले साधते. म्हणून शिवाच्या दिव्य रूपाचे सतत ध्यान करावे.

**'तैलधारावत् अविच्छिन्नं शिवमूर्तेर्मनसि धारणम्।'** ज्या शिवरूपाचे आपण ध्यान करतो, ते शिवरूप मनात निरंतर नांदणे याला 'धारणा शील' म्हणतात. ध्यान परिपक्व होणे हीच धारणा होय. तेलाची धार जशी अखंड असते, ती मध्ये कुठेही तुटत नाही, त्याप्रमाणे शिवरूप अखंड हृदयात रहाणे याला 'धारणा' म्हणतात. मनाच्या शुद्धीचा हा एक आचार आहे.

**'निवातदीपवद् ध्यानै चेतसः स्थितिरूपा समाधिः।'** समाधी ही धारणेनंतरची अवस्था आहे. निवांत खोलीत दिव्याची ज्योत अंखड तेवत रहावी, त्याप्रमाणे ध्यान करताना मनाची जी एकाकार स्थिती होते तिला 'समाधी' म्हणतात. हे 'समाधी शील' होय. 'मी शिवच आहे' या भावनेने शिवाचे ध्यान करावे. मी काही करत नाही तर माझ्याकडून शिवच करवून घेतो अशी भावना ठेवून वर्तन करावे. भगवान शिवाच्या सर्वव्यापक रूपाचे सतत चिंतन करावे.

**'अनंत रूपस्य देवस्य निजरूपतो भावनमित्येतत् पंचत्रिंशविधं मानसिकं शीलमुच्यते।'** भगवान शिवाची रूपे अनेक आहेत. पृथ्वी त्याचेच रूप आहे. जल त्याचेच रूप आहे. पाचभौतिक प्रपंच त्याचेच रूप आहे. जे जे दिसेल त्या त्या ठिकाणी शिवाला पाहणे आणि त्यामुळे मिळणाऱ्या शिवानंदाने विश्वाला आणि स्वतःला विसरणे, हे गणाचारातील शेवटचे शील होय. केवळ ध्यान करतानाच नव्हे तर व्यवहार करताना देखील प्रत्येक वस्तूला आणि व्यक्तीला शिवरूपात पहावे. यालाच 'सहजसमाधी' म्हणतात. थोडक्यात सर्वत्र शिवदर्शन घ्यावे, असा याचा अर्थ आहे. या शीलाचे जो आचरण करतो त्याच्या दृष्टीत अवघी सृष्टी शिवमय होऊन जाते. हे एकूण चौसष्ट आचार गणाचार होत. गणाचाराच्या पालनामुळे साधक शिवस्वरूप होतो. म्हणून निष्ठेने गणाचाराचे पालन करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

१७ ऑगस्ट १९९२

---

**आशीर्वचन पंधरावे**

## दीक्षागुरुस्थल–१४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

या प्रपंचात जन्म घेतल्यावर, आपल्याला भगवंताचे भक्त झालेच पाहिजे. आपण अभक्त होऊ नये आणि त्याच्यापासून विभक्तही राहू नये. इच्छा असली तरी आपण भगवंतापासून विभक्त होऊ शकत नाही. पुरोगामित्वाचा आव आणून तुम्ही शरीरावर इष्टलिंगधारण केले नाही तरी प्राणलिंग–भावलिंगाच्या रूपात ते तुमच्या हृदयात प्रकाशत असतेच. तुम्ही इष्टलिंगापासून विभक्त व्हाल, हृदयातच नव्हे तर प्रपंपातल्या अणुरेणूंत व्याप्त असलेल्या भगवंतापासून तुम्ही विभक्त कसे व्हाल?

एकदा अकबर बादशहा बिरबलला म्हणाला, ''बिरबल, मी ईश्वरापेक्षाही श्रेष्ठ आहे.''

''होय, आपण ईश्वरापेक्षाही श्रेष्ठ आहात.'' बिरबल म्हणाला.

''मी ईश्वरापेक्षा श्रेष्ठ कसा ते सांग.'' अकबर म्हणाला.

''खाविंद'', बिरबल म्हणाला, ''मी कुठे तसे म्हटले? आपणच तसे म्हणालात. मी फक्त आपली री ओढली. कारण मी आपला नोकर आहे. आपण म्हणाल तसे मला बोललेच पाहिजे.''

''नाही, तू तसा नाहीस'', अकबर म्हणाला, ''एखादी गोष्ट पटल्याशिवाय तू हो म्हणणार नाहीस. सांग, मी

ईश्वरापेक्षा श्रेष्ठ कसा?''

''जहाँपनाँह, एखाद्या माणसाने जर अपराध केला तर त्याला तुम्ही तुमच्या इच्छेप्रमाणे राज्याबाहेर हाकलून देऊ शकता. तुमच्याकडे एवढे सामर्थ्य आहे. परंतु ईश्वराजवळ एवढे सामर्थ्य नाही. एखाद्याने कितीही मोठा अपराध केला तरी त्याला ईश्वर आपल्या राज्याबाहेर हाकलून देऊ शकत नाही. म्हणून त्याच्यापेक्षाही तुम्ही श्रेष्ठ आहात.'' बिरबल म्हणाला.

बिरबलचे उत्तर ऐकून बादशहा खूष झाला. परंतु बिरबलचा व्यंगार्थ त्याच्या ध्यानात आला नाही. बादशहा ईश्वरापेक्षाही श्रेष्ठ आहे असे सांगत सांगत त्याने बादशहा ईश्वरापेक्षा कनिष्ठ कसा आहे, हे सांगितले आहे. बादशहाचे राज्य सीमित आहे, लहान आहे. परंतु ईश्वराचे साम्राज्य असीम आहे. त्याचे राज्य जेथे नाही, असा कणभर देखील प्रदेश विश्वात नाही. म्हणून आपल्या राज्याबाहेर तो कुणाला हाकलून देऊ शकत नाही. म्हणून भक्त असो किंवा अभक्त, कुणीही ईश्वरापासून विभक्त होऊ शकत नाही. ईश्वराचा आपल्याशी नित्यसंबंध आहे याची जाणीव अभक्ताला नसते, म्हणून तो स्वत:ला ईश्वरापासून विभक्त मानतो. ज्याला ईश्वराच्या नित्यसंबंधाची जाणीव असते तो भक्त होय. त्यासाठीच त्याला शरीरावर लिंगधारण करावे लागते, हृदयात प्राणलिंगाचे आणि भावलिंगाचे चिंतन करावे लागते. भक्तालाच मुक्ती मिळते. मुक्ती मिळवण्यासाठी आपल्या आचार्यांनी पंचाचार सांगितले आहेत. आतापर्यंत तुम्ही चार आचारासंबंधी ऐकले आहे. आज भृत्याचार या पाचव्या आचाराचे आम्ही विवेचन करणार आहोत.

शिव माझा स्वामी आणि मी त्याचा सेवक आहे, असे मानणे हा 'भृत्याचार' होय. सर्व प्रपंच शिवाचाच आहे. तोच जगताचा स्वामी आहे, मालक आहे. जगात जन्मलेले सर्व जीवजंतू त्याचे सेवक आहेत. ते जगाचे मालक होऊच शकत नाहीत. परंतु आपण मालक आहोत अशा भ्रमात आपण असतो. संपूर्ण सृष्टी शिवाचीच आहे. तिच्यातले थोडे फार आपण ताब्यात घेतो आणि स्वत:ला मालक समजून बसतो. ज्यांनी आपल्या बाहुबलाने प्रचंड साम्राज्ये उभी केली त्यांची खरी मालकी किती भूमीवर होती, हे त्यांना मृत्युसमयी समजले. देह पुरण्यासाठी जेवढी जागा लागते तेवढ्याच भूमीचे आपण खरे मालक! सम्राटांनी साम्राज्ये मिळवली, त्यांनाही जाताना ती इथेच सोडावी लागली. ज्यांनी प्रचंड संपत्ती मिळवली, त्यांना जाताना ती इथेच सोडावी लागली. कारण मुळात ती त्यांच्या मालकीची नव्हतीच. म्हणून मालकपणाचा खोटा अभिमान सोडून देणेच योग्य होय. आपले शरीर, वाणी आणि मन हे ईश्वराच्या मालकीचे असून आपण त्याचे भृत्य आहोत, सेवक आहोत, असा भाव आपल्या मनामध्ये असावा. यालाच 'भृत्याचार' म्हणतात.

**'शिवभक्तजना: सर्वे वरिष्ठा: पृथिवीतले।**
**तेषां भृत्योऽहमिति यद् भृत्याचार इति स्मृत:।।**

(चंद्रज्ञानागम, क्रियापाद, ९.९)

भगवान शिव आणि त्याचे भक्त यांचा मी भृत्य आहे, सेवक आहे, अशी भावना जेव्हा आपल्या मनात दृढ होते तेव्हाच आपण भृत्याचारी म्हणवले जातो. सधन माणूस गुरूला किंवा संताला आपल्या घरी येण्याची प्रार्थना करतो. ते आल्यावर त्यांची पूजा करून त्यांच्यासमोर अन्न ठेवून साष्टांग नमस्कार घालून अन्नग्रहण करण्याची प्रार्थना करतो. साष्टांग घालून गुरू जोपर्यंत उठण्याची आज्ञा देत नाहीत तोपर्यंत तो उठत नाही. हा प्रकार काही जणांना चमत्कारिक वाटेल. खाऊ घालणाऱ्याच्या मनात 'हे माझे आहे' असा अभिमान नसावा. मी खाऊ

घालतो अशी भावना त्याच्या मनात आली तर त्याच्या खाऊ घालण्याला काही अर्थ रहात नाही. 'हे माझे नसून आपलेच आहे, यामधले थोडे प्रसाद म्हणून आपण सेवन करा.' अशा दास्यभावाने नमस्कार करणे याला 'भृत्याचार' म्हणतात. अहंकारामुळे मनुष्याचे अध:पतन होते. सारे काही जवळ असूनही हे माझे नसून शिवाचे आहे असे जो समजतो तो भृत्य होतो. जो भगवंताची सेवा करतो त्याची भगवंत सेवा करतो. आपल्याला सेवा करण्याची कलाच माहीत नसते. आपण मालक होण्याचा प्रयत्न करतो आणि त्यामुळे आपल्याला सतत अपमानित व्हावे लागते.

एका तपस्व्याने एका श्रीमंताच्या घरासमोर उभे राहून साद घातली– ''ॐ भवति भिक्षां देहि.''

घरमालक अत्यंत क्रोधी होता. साधुसंतांना पाहून त्याच्या तळपायाची आग मस्तकात जात असे. हे काही कामधाम करीत नाहीत, केवळ भीक मागतात असे त्याला वाटत असे. म्हणून तो आपल्या गल्लीत कोण्या भिक्षुकाला फिरकू देत नसे. कोणी भिक्षुक आलाच तर त्याचा अपमान करून तो परत पाठवत असे. परंतु आता आलेला भिक्षुक कोणी सामान्य नव्हता. मोठा तपस्वी होता. तो श्रीमंत माणूस गादीवरून उठून बाहेर आला आणि तपस्व्याला म्हणाला, ''तुला माहीत नाही का या गल्लीत कोणी भिक्षुक येत नाही ते? तू इथून निघून जा.''

''मी आलोच आहे तर इथून काहीतरी घेऊनच जाईन'', तपस्वी म्हणाला, ''रिकाम्या हाताने परत जाणार नाही.''

आपल्या दाराशी येणारा भिक्षुक कधीच रिकाम्या हाताने परत जात नाही. तुम्ही त्याला वाढले तर तो पदार्थ घेऊन जातो, परंतु काहीच न देता तुम्ही त्याला विन्मुख पाठवले तर तो तुमचे पुण्य घेऊन जातो. त्या श्रीमंताने तपस्व्याला गालिप्रदान केले. तरीही तो जागेवरून हलला नाही. मग त्याने नोकरांना बोलावून तपस्व्याला उचलून गल्लीबाहेर नेऊन टाकायला सांगितले. तपस्व्याचा अपमान झाला. त्याचा त्याला काही खेद वाटला नाही. परंतु या श्रीमंताचे अध:पतन थांबवले पाहिजे याची त्याला जाणीव झाली आणि तो आश्रमात निघून गेला. तो सिद्ध तपस्वी होता. त्याने हुबेहूब त्या श्रीमंताचे रूप धारण केले आणि श्रीमंत बाहेर गेल्याची संधी साधून त्याच्या घरात प्रवेश केला. घरात गेल्यावर त्याने सगळ्यांना सांगितले की, ''आपल्या गावात एक बहुरूपी आला असून तो कुणाचेही रूप घेतो. माझे रूप घेऊन जर कुणी दारात आला तर त्याला लाथा घालून हाकलून द्या.''

नोकर-चाकरांना भिक्षुकांना मारण्याची सवय होतीच. थोड्या वेळाने तो श्रीमंत घरी आला. दारात येताच नोकराने त्याला हटकले. ते त्याला हाकलून देऊ लागले. ''मीच तुमचा मालक, तुम्ही मला कसे ओळखत नाही?'' असे त्याने विचारले,

नोकर हसून म्हणाले, ''आमचे मालक तर घरात बसले आहेत.'' श्रीमंताला काहीच घोळ कळेना. हुबेहूब एकासारखे दोन मालक. घराचा ताबा तर तपस्व्याने घेतला होता. त्यामुळे श्रीमंताला घरात कोणीच येऊ देईना. तोच खोटा ठरला. प्रकरण कोर्टात गेले तेव्हा न्यायाधीशालाही प्रश्न पडला की, खरा कोण आणि तोतया कोण?

तेव्हा श्रीमंताचे रूप घेतलेला तपस्वी म्हणाला, ''न्यायाधीश महाराज, इतकी वर्षे जो त्या घरात राहिला त्याला घरातल्या प्रत्येक गोष्टींची माहिती असते. याला विचारा की, घराला दारे किती आहेत? खिडक्या किती? जिन्याच्या पायऱ्या किती? घरात किती खोल्या आहेत? किती कपाटे आहेत? कोणकोणत्या कपाटात काय काय ठेवले आहे? ह्याने जर हे बिनचूक सांगितले तर हा खरा घरमालक ठरेल आणि मी सांगितले तर मी खरा

घरमालक ठरेन.''

न्यायाधीशाला हे योग्य वाटले आणि त्याने श्रीमंताला हे सारे प्रश्न विचारले. पण श्रीमंताला त्याची नीट उत्तरे देता आली नाहीत. कारण एवढे सारे कोण लक्षात ठेवतो. परंतु त्या प्रश्नांची बिनचूक उत्तरे तपस्व्याने दिली. कारण जातानाच तो दारे, खिडक्या, पायऱ्या, कपाटे मोजून गेला होता. शेवटी कोर्टात तपस्वी हाच खरा मालक ठरला आणि श्रीमंत तोतया. श्रीमंताला तुरुंगात टाकले. आपल्या दैवाला दोष देत बिचारा रडू लागला. तुरुंगातून सुटल्यावर तो गावाबाहेर नदीतीरावर अत्यंत दुःखीकष्टी होऊन अश्रू ढाळत बसला. आत्महत्येचा विचार त्याच्या मनात आला. तेवढ्यात तपस्वी आपल्या खऱ्या वेषात तेथे आला. त्याला पाहून श्रीमंताला पश्चात्ताप झाला. तो म्हणाला, ''महाराज, मी तुमचा अपराध केला, म्हणूनच हे दुःख माझ्या वाट्याला आले. आता मी आत्महत्या करणार आहे.'' तपस्वी हसून म्हणाला, ''हे सारे काही मीच केले आहे. पण आता सारी संपत्ती, घर माझे आहे. सारे माझेच आहे असे म्हणत तू तिथे जाशील तर पुन्हा लाथा खाव्या लागतील. तुला सारे सन्मानपूर्वक परत देण्याची माझी तयारी आहे. तुझी पत्नी-मुले तुला ओळखतील. तुझे नोकरचाकर तुला पहिल्याप्रमाणे मान देतील. पण यानंतर 'हे माझे' असा अभिमान तू धरायचा नाही. तुला सगळे मालक मानतील, तरीही तुला मी माझा नोकर म्हणून तिथे नेमले आहे.''

''कसेही ठेवा, पण मला जिवंत राहू द्या. नोकरच काय पण नोकराचा नोकर होण्याची माझी तयारी आहे.'' श्रीमंत म्हणाला.

''तू आता घरी जा. जुझ्या रूपात मी घरी नाही. त्यामुळे सगळे तुला पहिल्याप्रमाणे मान देतील.'' तपस्वी म्हणाला.

त्याप्रमाणे तो श्रीमतं घरी गेला आणि पूर्वीप्रमाणचे आनंदाने राहू लागला. परंतु 'मी या घराचा मालक आहे' असा अहंकार आता त्याच्या मनात राहिला नव्हता. हे सारे तपस्व्याचे आहे आणि ते त्याने मला दिले आहे, अशी भावना त्याच्या मनात घर करून राहिली होती.

त्याप्रमाणे आपल्याला जे काही मिळाले आहे ते आपले नसून ते भगवान शिवाचे आहे, आपण त्याचे सेवक आहोत, अशा भावनेने जो वर्तन करतो तो अत्यंत सुखी होतो. तुम्ही स्वतःला मालक समजाल तर निश्चित दुःखी व्हाल. नोकर जेवढा सुखी असतो तेवढा मालक नसतो. नोकर काम करून निवांत झोपून जातो. मालकाला मात्र झोप येत नाही. हे दार बंद आहे का? ते दार बंद आहे का? याची त्याला काळजी असते. नोकर चटकन झोपतो, परंतु मालकाला किती आले, किती गेले याचा हिशेब करीत बसावे लागते. म्हणून आपण शिवाचे भृत्य आहोत या भावनेने वर्तन करणे हेच चांगले होय. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे-

**शिवयोगी शिवः साक्षादिति कैंकर्यभक्तितः।**
**पूजयेदादरेणैव यथा लिंगं यथा गुरुः॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.६६)

वीरशैवसिद्धान्तात गुरू, लिंग आणि जंगम ही तीन आराध्ये आहेत. तन, मन आणि धन अशी तीन साधने आपल्याकडे आहेत. शरीर आणि मन हीदेखील संपत्तीच होय. धनसंपत्ती सगळ्यांना माहीतच आहे. ह्या तिन्हीवरील ममत्व सोडून तन गुरूला, मन इष्टलिंगाला आणि धन जंगमाला अर्पण करावे. गुरूला शरीर अर्पण

केल्यावर शरीराला गुरूचा हस्तस्पर्श होताच शरीर 'प्रसाद' होते. त्यावरील ममत्व संपते. इष्टलिंगपूजा ही केवळ शारीरिक पूजा नसून ती मानसिक पूजा आहे. पूजेत मन नसेल तर तुमची पूजा केवळ शारीरिक क्रिया ठरते. म्हणून इष्टलिंगाला मन अर्पण करावे. तुम्ही मन इष्टलिंगाला अर्पण करता तेव्हा मन 'प्रसाद' होते. धन जेव्हा जंगमाला समर्पित करता तेव्हा, ते आपल्याजवळ असून देखील, 'हे जंगमाचे आहे' या भावनेने त्यावरील ममत्व नष्ट होते. याप्रमाणे तन गुरूला, मन इष्टलिंगाला आणि धन जंगमाला अर्पण करून, त्यावरील ममत्व सोडून भृत्यभावाने वर्तन करावे.

एक भृत्यभाव आहे तर दुसरा वीरभृत्यभाव आहे. मी शिवाचा सेवक आहे, अशी भावना ठेवणे हा भृत्यभाव तर आपले तन-मन-धन गुरु-लिंग-जंगम यांना अर्पण करून ममत्वशून्य होऊन सेवकभावनेने वर्तन करणे हा वीरभृत्यभाव होय. आपल्याला भृत्यभावच येत नाही तर वीरभृत्यभाव कसा येईल? मालकाकडून सुख मिळो अथवा दुःख, जो त्याबद्दल तक्रार करत नाही तो खरा भृत्य होय.

एका राजाला त्याचा एक सेवक अत्यंत प्रिय होता. खाताना, पिताना, झोपताना तो सेवकाला जवळ ठेवत असे. एकदा काही निमित्ताने दोघे अरण्यात गेले. राजाला आणि सेवकाला खूप भूक लागली. परंतु खायला काहीच मिळाले नाही. शेवटी काकडी त्यांना सापडली. सेवकाने त्याचे तुकडे केले आणि राजाकडे दिले. राजाने सेवकाला एक तुकडा देऊन खायची आज्ञा केली. तो त्याने खाऊन टाकला. राजाला वाटले की, आपल्यापेक्षा याला जास्त भूक लागली असेल. म्हणून त्याने दुसरा तुकडाही त्याला दिला. तो त्याने खाल्ला. शेवटी स्वत:साठी एक भाग ठेवून राजाने सर्व तुकडे त्याला दिले. ते त्याने खाल्ले. शेवटी उरलेला तुकडा राजाने तोंडात घालताच त्याचे तोंड कडवट झाले आणि तो त्याने थुंकून टाकला. कारण काकडी अत्यंत कडू होती. इतकी कडू काकडी चेहऱ्यावर किंचितही कडवटपणा न दर्शवता सेवकाने कशी खाल्ली याचे राजाला आश्चर्य वाटले. त्याने विचारले,

"या काकडीचा एक घाससुद्धा मी खाऊ शकलो नाही, इतकी ती कडू आहे. तुला ती कडू लागली नाही?"

"महाराज," सेवक म्हणाला, "आपण माझे स्वामी आहात, मी आपला भृत्य आहे. आपल्या हाताचा ज्या वस्तूला स्पर्श होतो ती मला अमृतासमान वाटते. तुमच्या हातून मिष्टान्न मिळो अथवा कदान्न त्याच्याबद्दल सुख-दुःख व्यक्त करणे हे भृत्याचे लक्षण नव्हे. आपण जे द्याल ते मी प्रसाद म्हणूनच सेवन करतो."

सर्व प्राण्यांना ईश्वराने सुख आणि दुःख दिले आहे. सुखात माणूस ईश्वराला विसरतो. सुख आपल्या पुरुषार्थाने मिळाले आहे असे त्याला वाटते. परंतु दुःख मात्र ईश्वर देतो असा त्याचा समज असतो. दुःख भोगायची वेळ आली की तो ईश्वराला शिव्या देऊ लागतो. मी एवढे स्तोत्रपाठ केले, पूजा केली तरी देखील ईश्वरा, तू मला इतके दुःख देतोस? अशी तक्रार करतो. सुख मिळो अथवा दुःख, तो ईश्वराचा प्रसाद आहे, असे समजून त्याचा स्वीकार करतो तो भृत्य होय. जो ईश्वराबद्दल तक्रार करतो तो त्याचा भक्त असूच शकत नाही. ईश्वर आपल्याला दुःख देतो ते आपले कल्याण करण्यासाठी या भावनेने जो दुःखाचा स्वीकार करतो तो भक्त असतो. आपण ईश्वराचे खरे भक्त नसतोच. त्याने निर्मिलेल्या सांसारिक वस्तूंचे भक्त असतो. कुणी संपत्तीचे भक्त तर कुणी जमिनीचे भक्त. जे होते ते भल्यासाठीच अशी दृढ भावना ठेवावी आणि सारी सुख-दुःखे ईश्वराचा प्रसाद म्हणून स्वीकारावीत. सारे काही आपल्या मनासारखे घडत नसते. बऱ्याच वेळा आपल्या मनाविरुद्धही काही घडते. मनासारखे घडले तर आपल्याला सुख होते आणि मनाविरुद्ध घडले तर दुःख. सुख-दुःखे ही पुण्य-पापांची फळे होत. तुम्ही सुख भोगता तेव्हा तुमच्या पुण्याचा क्षय होत असतो आणि दुःख भोगता तेव्हा पापाचा क्षय होतो.

समजा, एकाला पाच वर्षांसाठी उच्चस्थान मिळाले आणि दुसऱ्याला पाच वर्षांसाठी तुरुंगात जावे लागले तर त्यावेळी काय घडलेले असते? उच्चस्थानावरील मनुष्य पाच वर्षे आपल्या पुण्याचे फळ भोगत असतो तर तुरुंगात गेलेला मनुष्य आपल्या पापाचे फळ भोगत असतो. जसजसे दिवस निघून जातील तसतसा कुणाला आनंद होईल? आणि कुणाला दुःख होईल? आपला सत्ताकाळ कमी कमी होत आहे हे पाहून उच्चपदस्थ मनुष्याला दुःख होईल आणि आपला तुरुंगवास संपत चाललेला पाहून तुरुंगातील मनुष्याला आनंद होईल. तुरुंग हे पापाच्या परिमार्जनाचे स्थान आहे. तर उच्चपद हे पुण्यक्षयाचे स्थान आहे. तुरुंगवासातच भगवान श्रीकृष्णाचा जन्म झाला. तुरुंगातच लोकमान्य टिळकांनी 'गीतारहस्य' लिहिले आणि तुरुंगातच स्वा. सावरकरांनी 'कमला' हे खण्डकाव्य लिहिले. म्हणून तुरुंग हे अगदीच वाईट स्थान आहे, असे म्हणे अवघड आहे. याचा अर्थ तुम्ही गुन्हा करून तुरुंगात जावे, असा नाही. तुरुंगातल्या एकांतात मनन, चिंतन करण्याची संधी मिळते. तुरुंगवासामुळेच अरविंदाचे 'महर्षी अरविंदा'त रूपांतर झाले, याची तुम्हाला कल्पना असेल. अशा प्रकारे सुख भोगताना पुण्यक्षय होतो तर पाप भोगताना पापक्षय होतो. म्हणून दुःख समोर आल्यावर भगवंताचा प्रसाद म्हणून ते स्वीकारावे. सुख आपल्या पुरुषार्थाने मिळाले असे मानू नये आणि दुःख परमेश्वराने दिले असे म्हणू नये.

सुख-दुःख ही ईश्वराची कृपा समजावी. आपला जन्म असो अथवा मृत्यू, ही देखील त्याचीच कृपा आहे. सामान्यत: कोणी मृत्यू पावला तर माणसे रडतात. परंतु जो भृत्य आहे त्याने मात्र मृत झालेल्या व्यक्तीवर रुद्राने अनुग्रह केला आहे, असे मानले पाहिजे. आपले सर्व जीवनव्यवहार परमेश्वरालाच समर्पित करावेत. आपल्या मनातला भृत्यभाव शिवसायुज्य प्राप्त करून देतो. जो संपूर्ण समर्पण करतो त्याच्यावरच भगवंताची कृपा होते. परंतु आपण मात्र आपला संपूर्ण भार ईश्वरावर टाकत नाही. त्यातला बराच भार आपल्या शिरावर घेतो. तुमच्या शिरावर घेतलेले ओझे शेवटी त्याच्या शिरावरच असते.

एक माणूस घोड्यावर बसून चालला होता. त्याने डोक्यावर गाठोडे घेतले होते. रस्त्यावरच्या एका माणसाने त्याला विचारले, ''बाबारे, तू डोक्यावर गाठोडे का घेतले आहेस? ते घोड्यावर का ठेवत नाहीस?''

''तुला कसे कळत नाही,'' घोड्यावरचा माणूस म्हणाला, ''मी पण घोड्यावर बसू आणि गाठोडे पण त्याच्यावर ठेवू तर मग घोड्यावर दुप्पट वजन होणार नाही का? घोड्याला ओझे होऊ नये म्हणून मी गाठोडे डोक्यावर घेऊन बसलो आहे.

आपली अवस्था त्या घोडेस्वारासारखी असते. गाठोडे डोक्यावर घेतले काय किंवा घोड्यावर ठेवले काय, त्यामुळे घोड्याच्या दृष्टीने काहीच फरक पडत नाही. त्याला दोन्ही ओझी वागवावी लागतात. तसे तुम्ही डोक्यावर ओझे घेतले तरी ते शेवटी ईश्वराच्या शिरावरच असते. तुम्ही विनाकारण डोक्यावर ओझे वागवत असता. म्हणून वस्तूवरील ममत्वाचा त्याग करणे हे भृत्याचे लक्षण होय. जेव्हा भावा-भावांत वाटणी होते तेव्हा शेताची विभागणी होते. हे माझे, हे तुझे. एका सुभाषितकाराने म्हटले आहे की, त्यावेळी भूमी हसत असते, ती जणू म्हणत असते- तुमच्या सारखे वाटणी करणारे कितीतरी लोक माझ्याच पोटात झोपले आहेत. तुम्हालाही केव्हा ना केव्हा तरी माझ्याच कुशीत यावे लागेल. माझे तुकडे करणे तुम्हाला शक्य होणार नाही.

भूमीचे विभाजन आपण कधी करू शकत नाही. मध्येमध्ये बांध घालून आपण तिचे विभाजन केल्याचे समाधान मानतो इतकेच. ते बांध देखील इकडे तिकडे हलवता येतात. ते काही खरे विभाजन नव्हे. तुम्ही सारे व्यवहार पाळा. शेतात बांध घाला. वाटणी करताना घरात भिंत बांधा. परंतु तुमच्या मनात मात्र भिंत बांधू नका.

तुमचे मन विशाल ठेवा. व्यवहारात वाटणी करायची वेळ आली तर व्यवहार पाळा. परंतु तुमच्या मनात मात्र या विशाल भूमातेची कुणी वाटणी करू शकत नाही हे सत्य प्रकाशू द्या. अवघे विश्व भगवान शिवाचे आहे आणि आपण त्याचे भृत्य आहोत या भावनेने वर्तन करा.

भृत्याचार हा पंचाचारातील शेवटचा आचार आहे. याचे एक महत्त्वाचे कारण आहे. पहिल्या चार आचारांचे पालन करता करता साधकाच्या मनात अभिमान उत्पन्न होण्याची शक्यता असते. माझे शरीर शुद्ध आहे, माझी वाणी शुद्ध आहे, माझे मन शुद्ध आहे, मी सारे आचार निष्ठेने पाळतो; असा अहंभाव साधकाच्या मनात उत्पन्न होऊ शकतो. त्या अभिमानाचा नाश करण्यासाठीच सर्वात शेवटी भृत्याचार सांगितला आहे. आपले आचारपालन ही भगवंताची कृपा आहे आणि मी त्याचा सेवक आहे, या भृत्यभावामुळे अहंभाव नष्ट होतो. लौकिक व्यवहारात भृत्यभाव कनिष्ठ मानला जात असला तरी वीरशैवसिद्धान्तात तो अत्यंत श्रेष्ठ मानला जातो. म्हणून वीरशैवांनी भृत्याचाराचे काटेकोर पालन करून शिवसायुज्यता साधावी. या सर्व पंचाचारांचे शिष्यांना ज्ञान देऊन जो त्यांना आचारशील बनवतो आणि स्वतःही तसेच आचरण करतो त्याला 'आचार्य' म्हणतात, असे ज. रेणुकाचार्य सांगतात. म्हणून आपल्या संप्रदायात पट्टाधिकाऱ्यांना 'शिवाचार्य' अशी पदवी दिली जाते. कारण शिवाने उपदेशिलेल्या आचाराचे ते निष्ठेने पालन करतात. तुम्ही सर्वांनी आचरणांना अलंकार समजून त्यांचे निष्ठेने पालन करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
१८ ऑगस्ट १९९२

---

**आशीर्वचन सोळावे**

## दीक्षागुरुस्थल–१५

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील लिंग–षट्स्थलातील दीक्षागुरुस्थलावर तुम्ही आशीर्वचने ऐकत आहात. गुरूला 'आचार्य' का म्हणतात हे तुम्हाला आता कळले आहे. वीरशैवांच्या पंचाचारातील सर्व अवांतर आचारांचे जो स्वतः निष्ठेने पालन करतो, त्याविषयी शिष्यांना समजावून सांगून त्यांच्याकडून पालन करवून घेतो, अशा व्यक्तीला 'आचार्य' म्हणतात. आचार्यांचे दुसरे नाव 'देशिक' असेही आहे.

**षडध्वातीतयोगेने यतते यस्तु देशिकः।**
**मायाब्धितारणोपायहेतुर्विश्वगुरुः शिवः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.१०)

'देशिक' म्हणजे दाखवणारा. जे आपल्याला सहज दिसत नाही ते दाखवण्याचे सामर्थ्य गुरूकडे असते. खरे तर प्रत्येक जीवात्मा स्वभावतः मुक्त असतो. त्याला त्याचे ज्ञान नसते इतकचे. गुरू हे ज्ञान त्याला देतो. मुक्ती म्हणजे तरी काय? सांसारिक विषयांचे चिंतन सोडून भगवच्चिंतन करणे हीच मुक्ती होय. संसारचिंतनामुळे मन

दूषित होते. मनात राग-द्वेष उत्पन्न होतात. त्यामुळे मनुष्याचे अध:पतन होते. मनुष्याला पतित व्हायचे नसून पावन व्हायचे आहे. शिव व्हायचे आहे. जो संसारचिंतन करतो तो दु:खी आणि जो भगवच्चिंतन करतो तो सुखी होतो. त्या परमसुखाचा मार्ग जो दाखवतो तो देशिक होय. 'ज्ञानेन भक्तिमार्ग दीशतीति देशिक:।' जो उपदेश करून, ज्ञान देऊन भक्तिमार्ग दाखवतो तो देशिक होय.

अज्ञानामुळे आपण बंधनात पडलेले असतो. ज्ञान आपल्याला मुक्ती देत असते. आपले आत्मस्वरूप विसरणे हेच बंधन होय. तुम्हाला जर कुणी विचारले, तुम्ही कोण? तर तुम्ही उत्तर देता- माझे नाव अमुक, माझ्या आईवडिलांचे नाम अमुक, मी या गावी राहतो इत्यादी. तुम्ही दिलेला परिचय तुमच्या शरीराचा असतो, जीवात्म्याचा नसतो. शरीराची उत्पत्ती कुठे झाली? त्याचे जनक कोण आहेत हे तुम्ही सांगत असता. आपण शरीराच्या पलीकडले आहोत याचे भान कुणालाच नसते. शरीर म्हणजे मी, असेच लोक मानतात. कुणाचा मृत्यू झाला तर तो पाहून तुम्ही म्हणता- 'हा बिचारा जगातून निघून गेला.' त्याचे शरीर तर तुमच्या समोरच असते. त्यावेळी आपल्याला कळते की शरीर म्हणजे आपण नाही. शरीरातून जीवात्मा निघून गेला तर शरीर काही पाहू शकत नाही, ऐकू शकत नाही, चालू शकत नाही. मृत्यू झाल्यावरच आपल्याला कळते की, शरीरात राहणारा कुणी दुसरा होता. परंतु जिवंत असेपर्यंत याची जाणीव आपल्याला होत नाही. जीवात्मा एक शरीर सोडून दुसरे धारण करतो. अशी असंख्य शरीरे धारण करत त्याचा जन्मजन्मांतराचा प्रवास चालू असतो. जीवात्मा किती वेळा जन्म घेतो हे निजगुणशिवयोगी या कन्नड संताने सांगितले आहे. ते म्हणतात की, 'या पृथ्वीचे चूर्ण केल्यावर जेवढे कण होतील ते मोजून पहा. तेवढे जन्म एक जीवात्मा घेत असतो.' आपण किती वेळा जन्म-मृत्यूला सामोरे गेलो याचा हिशेब ठेवणे कठीण आहे. अनंत शरीरे धारण करून देखील जीवात्म्याला आपण शरीरापासून भिन्न आहोत याची जाणीव होत नाही. याची जाणीव करून देण्यासाठी गुरूची आवश्यकता असते.

शरीर म्हणजे काय? इंद्रिये किती आहेत? अंत:करण कशाला म्हणतात? आणि या सर्वांपेक्षा आत्मा कसा वेगळा आहे? हे गुरू समजावून देतात. जोपर्यंत कोणी समजावून सांगत नाही तोपर्यंत आपल्या चुका आपल्याला कळत नसतात. अज्ञानामुळे जीवात्मा पुन्हा पुन्हा चुका करतो. आपण जे करत आहोत ते योग्यच आहे असे त्याला वाटते. आपण जे करतो ते सारे बरोबरच असते, असे नव्हे. तेच गुरू आपल्याला समजावून सांगतात. निषिद्ध कर्मे करणाऱ्या माणसाला जेव्हा गुरुकृपेचा लाभ होतो तेव्हा त्याला कृतकर्मांचा पश्चात्ताप होऊन तो सन्मार्गावर चालू लागतो. त्यावेळी त्याचे जीवन उजळून जाते.

बुद्धचरित्रामध्ये अंगुलीमालाची एक कथा आलेली आहे. अंगुलीमाल हा देवीभक्त होता. देवीला एक हजार करंगळ्यांची माळ अर्पण करण्याचा त्याने निश्चय केला होता. अरण्यात कोणी मनुष्य आला तर त्याची हत्या करून तो त्याची करंगळी कापून घेत असे. अशा नऊशे नव्याण्णव करंगळ्या त्याने मिळवल्या होत्या. फक्त एका करंगळीची उणीव होती. अंगुलीमालाच्या भीतीने अरण्यात कुणी जात नसे. परंतु एकदा त्या अरण्यातून गौतम बुद्ध जात होते. अंगुलीमालाने त्यांना अडवले. आपला निश्चय सांगितला. तुला ठार मारून मी तुझी करंगळी कापून घेणार आहे आणि एक हजार अंगुलींची माळ देवीला अर्पण करणार आहे, असे त्याने बुद्धाला सांगितले.

गौतम बुद्ध हसले. ज्याला मृत्यूचे भय नसते त्याला कोण भीती घालू शकणार? अंगुलीमालाने आतापर्यंत

ठार केलेली नऊशे नव्याण्णव माणसे सामान्य होती. हा हजारावा मनुष्य मात्र केवळ असामान्य होता. मरणाला जिंकणाऱ्या त्या महापुरुषाला अंगुलीमाल मृत्यूचे भय दाखवत होता. तो म्हणाला, ''हे भिक्षू, तुला मी आता ठार मारणार आहे. परंतु तुझा प्राण घेण्याआधी तुझी शेवटची इच्छा काय आहे ते सांग. मारलेल्या प्रत्येक माणसाला आधी त्याची इच्छा मी विचारली. ती पूर्ण केली आणि मगच त्यांना मारले. सांग तुझी अंतिम इच्छा.''

''त्या समोरच्या झाडावरचे फक्त एक पान मला तोडून आणून दे.'' गौतम बुद्ध म्हणाले.

''तुझी इच्छा विचित्रच दिसते.'' अंगुलीमाल म्हणाला, ''एकच काय पण हजार पाने तोडून आणून देतो.''

अंगुलीमाल गेला आणि त्याने झाडाची पाने तोडून आणून दिली. तेव्हा बुद्ध म्हणाले,

''मी तुला एकच पान तोडून आणायला सांगितले होते. मला एकच पान हवे. ते मी घेतो. इतर नऊशे नव्याण्णव पाने झाडाला जशीच्या तशी चिकटवून दे.''

''हे कसे शक्य आहे?'' अंगुलीमाल म्हणाला, ''तू म्हणशील तर आणखी हजार पाने मी तोडून दाखवतो. पण पुन्हा ती झाडाला चिकटवणे शक्य नाही.''

'' मग तू ती तोडलीच कशाला?'' बुद्ध म्हणाले, ''तुला जर एक पान जोडता येत नाही तर तुला पाने तोडायचा अधिकार कुणी दिला? जर एका व्यक्तीला जीवदान देण्याचे सामर्थ्य तुझ्यात नसेल तर हजार व्यक्तींचे प्राण हरण करण्याचा तुला काय अधिकार आहे? जो जीव देऊ शकतो तोच जीव घेऊ शकतो. ज्याला जीव देता येत नाही त्याला घेण्याचा अधिकार नाही.''

बुद्धाची वाणी ऐकून अंगुलीमालाच्या हृदयातील अज्ञान दूर झाले. त्याला स्वतःची चूक उमगली. त्याला पश्चात्ताप झाला. त्याने गौतम बुद्धांना साष्टांग नमस्कार केला आणि पुढे तो बुद्धाचा अनुयायी झाला. अशा अनेक कथा प्राचीन वाङ्मयात विखुरलेल्या आहेत. वाल्ह्या कोळ्याचा वाल्मीकी असाच झाला. नारदाच्या उपदेशामुळे त्याने दुराचरण सोडले, तपस्या केली आणि जगातला पहिला छंदोबद्ध श्लोक रचणारा आदिकवी वाल्मीकी अशी प्रतिष्ठा मिळवली.

गुरुपदेशामुळे दुराचारी माणूस देखील चारित्र्यसंपन्न होतो. जो पापी लोकांना देखील सन्मार्ग दाखवतो, दिशा देतो त्याला 'देशिक' असे म्हणतात. त्याला 'विश्वगुरू' असेही एक नाव आहे. समुद्रामध्ये विलीन झाल्यावर नद्यांचे नावरूप हरपून त्या समुद्ररूप होतात, त्याप्रमाणे गुरूला शरण गेल्यावर पाप्यातला पापी देखील गुरूच्या मार्गदर्शनाने शिवरूप होतो. गुरू हा देखील साक्षात् शिवच असतो. शिव तुम्हा-आम्हाला दृष्टिगोचर नाही. परंतु गुरू मात्र आपल्यासमोर साक्षात् उभे असतात. त्यामुळे शिवापेक्षाही गुरूला अधिक महत्त्व दिले जाते. शिवाकडे गेल्यावर शिव पुढे येण्याआधीच त्याची माया पुढे येते आणि मनुष्य मायेतच गुंतून पडतो. कारण शिव मायाशक्तिविशिष्ट आहे. म्हणून शिवसाक्षात्कार करून घ्यायचा असेल तर मायाविरहीत गुरूला शरण जावे लागते. प्रपंचाला 'मायासमुद्र' असे म्हणतात. मायासमुद्रातून तरून जायचे असेल तर गुरूलाच शरण गेले पाहिजे. आपल्या मनात मायेविषयी आत्यंतिक मोह असतो. त्या मोहाचा नाश श्रीगुरूच करू शकतात.

एखादा मनुष्य मरण पावला तर त्याचे सारे नातेवाईक त्याच्या घरी जमतात. नानापरीने सांगून शोकाकुल कुटुंबियांचे सांत्वन करतात. त्यामुळे रडणारे लोक हळूहळू सावरतात. आपले दुःख विसरतात. कुणी आजारी पडला तर आपण त्याला भेटायला जातो. धीर देतो. 'यातून तू नक्की बाहेर पडशील' असे सांगतो. त्याचा आजार

काही आपण घेऊ शकत नाही, परंतु दोन धीराचे शब्द त्याला देऊ शकतो. त्यामुळे तो आजाराशी झगडायला सिद्ध होतो. याचा अर्थ असा की, आप्तस्वकीयांच्या आणि थोरामोठ्यांच्या उपदेशामुळे दु:खी माणसांना धीर येतो, त्यांचा मोह नष्ट होतो आणि त्यांना उमेदीने जगण्याचे बळ लाभते. अर्जुनाचा मोह श्रीकृष्णाने असाच नष्ट केला. त्याबद्दल 'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा।'– माझा मोह नष्ट झाला, अशी अर्जुनाने कबुली दिली. मनुष्य अज्ञानाने रडतो. परंतु त्याला ज्ञान दिले तर त्याचे रडणे थांबते आणि प्राप्त कर्तव्याला तो सामोरा जातो. गुरूच्या उपदेशाने शिष्याच्या मनातला मोहरूपी अंधकार हळूहळू नष्ट होतो. एखाद्या अंधाऱ्या खोलीत झिरोचा बल्ब लावला तर थोडा प्रकाश पडून अंधार कमी होतो. त्योपेक्षा मोठा बल्ब लावला तर अंधार अधिक कमी होतो आणि शंभर वॅटचा बल्ब लावला तर अंधार पळूनच जातो. तो तुमच्या नजरेला पडतच नाही. त्याप्रमाणे रोज सत्संग करून, रोज प्रवचन ऐकून आपल्या मनातला मोहांधकार हळूहळू दूर होतो. गुरूच्या ज्ञानोपदेशामुळेच मोह दूर होतो. विश्वातील मानवमात्राचा उद्धार गुरूमुळे होतो. म्हणून गुरूला 'विश्वगुरू' अशी संज्ञा आहे.

**अखण्डं येन चैतन्यं व्यज्यते सर्ववस्तुषु।**
**आत्मयोगप्रभावेण स गुरुर्विश्वभासकः।।१५.११।।**

विश्वगुरू म्हणजेच जगद्गुरू. गुरूला जगद्गुरू का म्हणतात? याबद्दल इथे सांगितले आहे. प्रपंचात असंख्य पदार्थ आहेत. पंचमहाभूते आहेत. त्याचप्रमाणे पंचमहाभूतांपासून बनलेले अगणित पदार्थ देखील आहेत. पदार्थ वेगवेगळे असले तरी त्यातील तत्त्व मात्र एकच आहे. आपण फुलांची माळ बनवतो. त्यातली फुले वेगवेगळ्या आकाराची, रंगाची असतात. परंतु त्यात ओवलेला दोरा, सूत्र मात्र एकच असते. त्याप्रमाणे विश्वातल्या भिन्न भिन्न पदार्थांत परमात्मा हे एकच सूत्र असते. म्हणून शास्त्रात परमात्म्याला 'सूत्रात्मा' असे एक नाव दिलेले आहे. फुलांची माळ पहाताना आपल्याला फक्त फुलेच दिसतात. आतला दोरा दिसत नाही. आपण फुलांची प्रशंसा करतो. त्यांच्या गंधांचे, रंगांचे कौतुक करतो. जे वरवर असते त्याची आपण प्रशंसा करतो. परंतु ज्यामुळे माळ तयार झाली त्या दोऱ्याचे मात्र आपल्याला विस्मरण होते. त्याचप्रमाणे दृश्य प्रपंच हा अदृश्य परमात्म्यावर आधारलेला आहे. वृक्षाकडे पहाताना आपल्याला काय दिसते? त्याचे खोड, फांद्या, पाने, फुले, फळे. परंतु ज्याच्या आधारावर तो वृक्ष उभा आहे, ते त्याचे मूळ मात्र आपल्याला दिसत नाही. वृक्षाच्या दिसणाऱ्या भागाचेच आपण कौतुक करतो. जमिनीत दूरवर पसरलेल्या, त्याला आधार देणाऱ्या मुळांचे कधी करत नाही.

एका स्त्रीने स्वतःच्या हाताने रोपे लावून एक सुंदर बाग तयार केली होती. त्या बागेवर तिचे जिवापाड प्रेम होते. एकदा ती आजारी पडली. तेव्हा तिने आपल्या मुलाला बागेची देखभाल करायला सांगितली. ती म्हणाली, ''मी आजारी असेपर्यंत तू बागेची निगा राख. तुझ्या शरीराची तू जशी निगा राखतोस तशी बागेतल्या झाडांची काळजी घे.''

मुलगा बागेत गेला. यापूर्वी तो बागेत कधी आलाच नव्हता. वृक्षाच्या पालनपोषणाविषयी त्याला किंचितही ज्ञान नव्हते. त्याला वाटले की, आपण गरम पाण्याने स्नान करतो, साबण लावतो, अंगावर अत्तर शिंपडतो. तशीच झाडांची देखभाल केली पाहिजे. तुझ्या शरीरासारखी झाडांची काळजी घे, असे आपल्या आईनेच तर सांगितले आहे. त्या दिवसापासून तो रोज पानांना, खोडांना साबण लावून गरम पाण्याने अंघोळ घालू लागला. त्यांच्यावर अत्तर शिंपडू लागला. दिवस उन्हाळ्याचे होते. झाडाच्या मुळांना थेंबभर पाणी घातले नाही. परंतु

झाडाला न्हाऊ घातले. काही दिवसातच बागेला अवकळा आली. त्याची आई दुखण्यातून बरी झाली तेव्हा ती अनावर ओढीने पहिल्यांदा बागेत गेली. तेव्हा तिला सगळी बाग सुकून गेलेली दिसली. तिने त्याबद्दल आपल्या मुलाला विचारले, तेव्हा तो म्हणाला, ''तुझ्या शरीरासारखी काळजी घे असे तूच तर सांगितलेस. म्हणून मी बागेतल्या सगळ्या झाडांना रोज सकाळी गरज पाण्याने न्हाऊ घातले, त्यांच्यावर अत्तर शिंपडले. तरीही ही झाडे का सुकून गेली ते मला माहीत नाही.'' आई म्हणाली,

''बाळा, वृक्षावर प्रेम करण्याची रीत तुला माहीत नाही. पाने धुतल्यामुळे वृक्ष प्रफुल्लीत होत नसतो. आपल्याला जे दिसते त्याला काहीच करायचे नसते, जे दिसत नाही त्याला फक्त पाणी द्यायचे असते. वृक्षाला 'पादप' म्हणतात. आपण जसे तोंडाने पाणी पितो तसा वृक्ष पायांनी म्हणजे मुळांनी पाणी पितो. म्हणून त्याला पादप म्हणतात. तू तिथे पाणी घालायचे सोडून भलतीकडेच पाणी घातले. तहानलेल्या माणसाच्या तोंडात पाणी घालायचे असते, पायावर ओतून काय उपयोग? तशी तू बागेची अवस्था केली आहेस.''

आपल्याला प्रपंच दिसतो. परंतु प्रपंचात लपलेला परमात्मा आपल्याला दिसत नाही. फुलांची माळ आपल्याला दिसते, परंतु फुलांना एकत्र बांधून ठेवणारा दोरा आपल्याला दिसत नाही. आपल्याला शरीरे दिसतात, परंतु शरीराच्या आतला सूत्रात्मा मात्र दिसत नाही.

जो जगद्गुरू असतो त्यालाच प्रत्येक वस्तूत आणि व्यक्तीत सूत्ररूपाने रहाणाऱ्या परमात्म्याचा साक्षात्कार झालेला असतो. प्रत्येक वस्तू आणि व्यक्तीमधील सूत्रात्मा हा आपलाच आत्मा होय, अशा आत्मदृष्टीने तो त्यांच्याकडे पाहतो. अशा व्यक्तीलाच विश्वगुरू अथवा जगद्गुरू म्हणतात. लिंग-षट्स्थलातील दीक्षागुरुस्थलात गुरूच्या अनेक नावांची स्पष्टीकरणे दिलेली आहेत. अज्ञान दूर करतो म्हणून 'गुरू', शिष्यांना आचार सांगूत ते आचरण्याची प्रेरणा देतो आणि त्यांचे स्वत:ही आचरण करतो म्हणून 'आचार्य', मुक्तिमार्ग दाखवतो म्हणून 'देशिक', जगतातील पदार्थात आणि प्राणिमात्रात आत्मरूप पहातो म्हणून 'जगद्गुरू'. अशी गुरूच्या नामांची स्पष्टीकरणे आहेत. अशा उद्धारक श्रीगुरूला सर्वांनी शरण गेले पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
१९ ऑगस्ट १९९२



## शिक्षागुरुस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंगस्थलावरील आशीर्वचने तुम्ही ऐकत आहात. लिंगस्थलातील दीक्षागुरुस्थल या अवांतरस्थलाविषयी तुम्ही आतापर्यंत बरेच काही ऐकले आहे. यानंतरचे स्थल आहे शिक्षागुरुस्थल. दीक्षा देऊन जो गुरू आपल्याला सुसंस्कृत करतो तो जेव्हा ज्ञानोपदेश करतो तेव्हा त्याला 'शिक्षागुरू' म्हणतात.

ज्ञानोपदेशाने शिष्याला जो प्रशासित करतो तो 'शिक्षागुरू' होय. गुरू आणि शिष्य यांचा संबंध येथे ज. रेणुकाचार्य समजावून सांगत आहेत. मनुष्याचा कुणा ना कुणाशी तरी संबंध असतोच. संबंधाशिवाय तो जगू शकणार नाही. संबंध दोन प्रकारचा असतो. सांसारिक आणि आध्यात्मिक. पिता–पुत्र, माता–पुत्र, भाऊ–बहीण यांचे संबंध हे रक्तसंबंध होत. हे संबंध मनुष्याला जेव्हा अनुकूल असतात तेव्हा सुखदायक वाटतात आणि जेव्हा प्रतिकूल असतात तेव्हा दुःखदायक ठरतात. संबंधाची व्याख्याच अशी आहे– 'सम्यक् बंधः संबंधः' ज्याच्यामुळे मनुष्य बांधला जातो तो संबंध होय. एकदा संबंध झाला की त्यातून सुटका नाही. विवाहप्रसंगी वधूचा पदर आणि वराचा शेला यांची गाठ मारतात. लग्नगाठ म्हणतात ती हीच. परंतु ती गाठ काही तासांपुरतीच असते. पदर आणि शेला यांचा संबंध काही काळच असतो, परंतु पति–पत्नीचा जो मानसिक संबंध निर्माण होतो तो जन्मभर सुटत नाही. संबंध कधी अनुकूल असतो तर कधी प्रतिकूल. सांसारिक संबंध सतत वाढत जातो. संबंध कधी अनुकूल होऊन सुखद होतो तर कधी प्रतिकूल होऊन दुःखद होतो. कितीही दुःख झाले तरी संबंध तुटता तुटत नाहीत.

एकदा भगवान विष्णू वैकुंठात एकटेच निवांत बसले होते. तिथे नारदमुनी आले. विष्णूला एकटे पाहून ते म्हणाले, ''भगवन्, तुम्ही एकटेच बसलात. तुम्हाला कुणी भक्त वगैरे नाही का? मी पृथ्वीवरून पाच-पन्नास भक्तांना घेऊन येतो.''

विष्णू हसले. म्हणाले, ''नारदा, तू प्रयत्न कर, पण एकही भक्त वैकुंठात यायला तयार होणार नाही. जा आणि घेऊन ये भक्तांना.''

नारद विमानात बसून पृथ्वीवर आले. जिथे सत्संग चालू होता. तिथे बाहेर थांबले. आत भक्त महाराजांचे प्रवचन ऐकत होते, आरती, प्रसाद संपल्यावर बाहेर निघालेल्या भक्ताला नारदांनी विचारले, ''भक्तराज, मी वैकुंठाहून आलो आहे. भगवंतांनी तुम्हाला आणण्यासाठी विमान पाठवले आहे. चला विमानात बसा. विमानाला तिकीट नाही. फ्री ऑफ चार्ज.''

''मी घरी सांगून येतो.'' असे म्हणून तो भक्त निघून गेला. एक एक करून असे सगळेच भक्त सटकले. शेवटी एक जख्ख म्हातारा उरला. नारदाला वाटले तरुण आणि प्रौढ लोक वैकुंठात काही येणार नाहीत. पण हा म्हातारा मात्र मरणाला टेकला आहे. हा नक्कीच वैकुंठात येईल. असे वाटून त्यांनी म्हाताऱ्याला विनंती केली. तेव्हा म्हातारा लुटूलुटू मान हलवत म्हणाला,

''येईन रे बाबा. आता काय माझं वय झालंच आहे, पण आज नाही येणार. एक वर्षाने येईन.''

नारदाला वाटले. चला, एक वर्षाने का होईना, पण एकतरी भक्त वैकुंठात यायला तयार आहे. एक वर्षानंतर

नारद म्हाताऱ्याकडे गेले. तेव्हा म्हातारा म्हणाला, ''मी तुला वर्षाने येईन असे म्हटले होते. वर्षापूर्वीच माझ्या मुलाचे लग्न झाले आहे. पण अजून त्याला मूलबाळ झाले नाही. नातवाचे तोंड पाहिल्याशिवाय मी येणार नाही. तू पुढच्या वर्षी ये, मग मी तुझ्या सोबत येईन.''

नारदाने ते मान्य केले आणि एक वर्षाने ते पुन्हा म्हाताऱ्याकडे गेले. त्यावेळी म्हातारा मेला होता. नारदाला वाटले, म्हातारा मेला तरी त्याचे घरावर, मुलावर आत्यंतिक ममत्व होते. तेव्हा त्याने जरी पुनर्जन्म घेतलेला असला तरी तो इथेच जवळपास कुठे तरी असणार. नारदाने अंतर्दृष्टीने पाहिले तेव्हा त्यांना दिसले की, घरात एक कुत्री व्याली आहे आणि तिचे पिलू म्हणून म्हाताऱ्याने जन्म घेतला आहे. त्या पिलापाशी जाऊन नारद म्हणाले, मी तुम्हाला ओळखले आहे. नवा जन्म कुत्र्याचा मिळाला. कुत्र्याला वैकुंठात न्यायची परवानगी नाही. तरी देखील मी तुम्हाला शब्द दिला होता, म्हणून विमानातून न्यायला तयार आहे, तुम्ही येणार का?''

''सध्या मला वेळ नाही.'' ते पिलू म्हणाले, ''माझ्या मुलाने खूप संपत्ती मिळवली आहे. तिचे रक्षण करणे भाग आहे. दुसरी कुत्री प्रामाणिकपणे काम करणार नाहीत. म्हणून मलाच या घराची आणि संपत्तीची रखवाली करावी लागणार आहे. तू नंतर ये मग मी तुझ्याबरोबर येईन.''

नारद हात हलवत परत गेले. काही वर्षानंतर ते पुन्हा त्या घरी आले. तेव्हा कुत्रा मेला होता. नारदांनी त्याचा शोध घेतला. इथेच कुठे तरी दुसऱ्या रूपात म्हातारा नक्कीच सापडेल. नारदांनी शोध घेतला तेव्हा त्यांना तो म्हातारा बेडूक होऊन न्हाणीच्या मोरीबाहेर बसलेला आढळला. नारदांनी त्याला ओळखले आणि त्याच्याजवळ जाऊन ते म्हणाले, ''म्हातारबुवा, तुमची ही काय दशा झाली आहे! तुम्ही आधी चांगले मनुष्य होता, नंतर कुत्र्याच्या जन्माला गेलात आणि आता चक्क न्हाणीच्या मोरीत बेडकाचा जन्म घेऊन बसलात. आता तरी घराचा मोह सोडा. तुम्ही घरात गेला तर कुणी तुम्हाला ओळखणार नाही. बाहेर फेकून देतील. आता तरी चला माझ्याबरोबर वैकुंठात. तुम्हाला इथे काय सुख आहे?''

बेडूक म्हणाला, ''इथे मी फार आनंदात आहे. माझी मुले, नातू न्हाणीघरात आंघोळ करतात. त्यांच्या अंगावरील पाणी माझ्या अंगावरून जाते. तेव्हा जे सुख वाटते ते सांगता येत नाही. गंगास्नान देखील या स्नानापुढे तुच्छ आहे.''

नारद हसून म्हणाले, ''बाबा, आता या क्षुद्र सुखाचा मोह सोडून द्या आणि चला माझ्याबरोबर.''

तेव्हा तो बेडूक चिडून म्हणाला, ''ए बाबा, तुला माझ्याशिवाय जगात कुणी सापडले नाही का? मी मनुष्य होतो तेव्हा माझ्यामागे लागलास. कुत्रा झालो तरी माझा पिच्छा सोडला नाहीस आणि आता बेडूक झालो तरीही मला सुखाने बसू देत नाहीस. काय आहे रे तुझ्या वैकुंठात? जा पळ इथून.''

नारद बिचारे तोंड लहान करून हात हलवत वैकुंठात परत गेले.

''ये नारदा, ये.'' विष्णू म्हणाले, ''आणलेस का भक्ताला?''

''नाही भगवन्,'' नारद म्हणाले, ''वैकुंठात येण्याची सर्वांची इच्छा असली तरी येण्याची तयारी मात्र नाही. मी हरलो.''

सांसारिक संबंध असे चिवट असतात. त्यांच्यापासून मनुष्याची सुटकाच होत नाही. त्यासाठी गुरुपदेशाची आवश्यकता असते. गुरू जेव्हा शिष्याला बोध करतो आणि गुरु-शिष्याचा जेव्हा संबंध घडतो तेव्हा त्या

संबंधामुळेच सांसारिक संबंधांपासून मुक्ती मिळते.

**बोधकोऽयं समाख्यातो बोध्यमेतदिति स्फुटम्।**
**शिष्ये नियुज्यते येन स शिक्षागुरुरुच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.१३)

शिष्य आणि गुरू यांच्यामध्ये रक्तसंबंध नसतो, तर बोध्य-बोधक संबंध असतो. गुरू बोध करतो, तर शिष्य बोध ऐकतो. शिष्याला ज्ञानाचे काजळ घालून त्याच्या अज्ञानरूपी तिमिराचा गुरू नाश करतो आणि त्याचे डोळे उघडतो. लहान बाळाचे मिटलेले डोळे काजळ घालण्याच्या निमित्ताने आई उघडते त्याप्रमाणे. तुमचे चर्मचक्षू आई उघडते किंवा तुम्हीही ते उघडू शकता. हृदयातील आत्म्याला आणि प्रपंचात व्याप्त असलेल्या परमात्म्याला चर्मचक्षूंनी पहाता येत नाही. उपनिषदात म्हटले आहे- 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह।'

सर्व इंद्रियांना आत्मतत्त्व अप्राप्य आहे. हृदयातील अज्ञानाचा अंधार जोपर्यंत दूर होत नाही तोपर्यंत सूक्ष्म आत्मतत्त्व दृष्टिगोचर होत नाही. गुरू ज्ञानोपदेश करून शिष्याचे अज्ञान दूर करतो. त्याच्यावर शासन करतो. सत्ता गाजवतो. कारण शिष्य ज्ञानोपदेशासाठी योग्य आहे की नाही याची परीक्षा करावी लागते. अनधिकारी मनुष्याला ज्ञान सांगून काय उपयोग? जो प्रेमभराने गुरूची सेवा करतो, तोच गुरुकृपेचा अधिकारी ठरतो. गुरुसेवेने जी विद्या मिळते ती अत्यंत उत्कृष्ट मानली जाते. पैसे देऊन शाळा-कॉलेजात जी विद्या मिळते ती श्रेष्ठ मानली जात नाही. आपली विद्या देऊन दुसऱ्याची विद्या मिळवली तर ती कनिष्ठ विद्या मानली जाते. गुरू शिष्याला तत्काळ ज्ञान देत नाही. त्याच्याकडून आपली सेवा करून घेतो. गुरुसेवेने शिष्याचे अंत:करण निर्मळ होते मग त्याला गुरू ज्ञान देतात. शिष्य तऱ्हेतऱ्हेचे असतात. काही बहाद्दर गुरुसेवा करत नाहीत तर गुरूकडूनच आपली सेवा करून घेतात.

असाच एक आळशी शिष्य गुरुकुलात जाऊन राहिला होता. गुरूने त्याला आपली वस्त्रे धुण्याचे काम सांगितले. एक दोन दिवस त्याने गुरूची वस्त्रे धुतली. त्याला वाटले की, आपल्याला बहुतेक जन्मभर धोब्याचेच काम करावे लागणार. ह्यातून सुटका करून घेण्याचा त्याने निश्चय केला. काही लोकांची बुद्धी अशा बाबतीत फारच चालते. म्हणून तो गुरूजवळ गेला आणि म्हणाला,

"महाराज, आपण आम्हाला वंद्य आहात. आपल्या कुठल्याही वस्तूला आमचा पाय लागला तर आपला अपमान केल्यासारखे होते. याउलट आपला पाय आमच्या कोणत्याही वस्तूला लागला तर ती पवित्र होते. आपली वस्त्रे धुताना माझे पाय सतत आपल्या वस्त्रांना लागत असतात. हे काही योग्य नाही, त्यापेक्षा आपले पाय माझ्या वस्त्रांना लागले तर माझी वस्त्रे पवित्र तरी होतील. म्हणून आपली वस्त्रे मी धुण्यापेक्षा आपणच माझी वस्त्रे धुतली तर योग्य होईल."

काही शिष्य असेही असतात. परंतु अशा शिष्यांना गुरूकडून ज्ञान लाभत नाही. ज्याचे अंत:करण शुद्ध असते त्यालाच ज्ञानप्राप्ती होते. गुरू शिष्याला जेवढे अधिक कष्ट देतील तेवढे शिष्याला ते कल्याणकारक ठरतात. सर्वज्ञ नामक एका कन्नड संताने म्हटले आहे की, गुरुसेवेसाठी मला मनुष्याचाच काय पण बैलाचा जन्म लाभला तरी चालेल. पूर्वी बैल हे वाहन होते. गुरू आपल्या पाठीवर बसले तरी आपले कल्याण होईल असे सर्वज्ञांना वाटते. ज्या वृक्षापासून खडावा तयार होतील त्या वृक्षाचा जन्मही मला चालेल. गुरुचरणाइतकेच गुरूंच्या खडावांनाही महत्त्व असते. अतिसामान्य वस्तूला गुरूंच्या पादस्पर्शाने महानता लाभते. दुधात पाणी मिसळले की पाणीदेखील दुधाच्या भावाने विकले जाते त्याप्रमाणे. धान्यात मिसळलेले खडे देखील धान्याच्याच भावाने

विकले जातात. म्हणून गुरूच्या खडावा होणे हे देखील भाग्याचे लक्षण आहे, असे सर्वज्ञ म्हणतात. ही भावना ज्याच्या मनात असते, अशा शिष्यावरच गुरू शासन करतो, त्याची परीक्षा घेतो आणि त्याला ज्ञान देतो. अशाप्रकारे शिष्याकडून सेवा घेऊन, त्याला परिशुद्ध करून, त्याच्यावर प्रशासन करून त्याला ज्ञानामृत देणारा जो गुरू असतो त्याला शिक्षागुरू असे म्हणतात.

**संसारतिमिरोन्माथिशरच्चन्द्रमरीचयः।**
**वाचो यस्य प्रवर्तन्ते तमाचार्यं प्रचक्षते।।१५.१४।।**

शरदऋतूमध्ये टिपूर चांदणे पडलेले असते. त्यावेळचा चंद्रप्रकाश अत्यंत स्वच्छ आणि शीतल असतो. त्या चांदण्यासारखा गुरूचा उपदेश संसाररूपी अंधाराचा नाश करतो. गुरूची अमृतवाणी चांदण्याप्रमाणे शीतल असते. उन्हात पोळलेल्या माणसाला जर शारदीय चांदण्यात बसवले तर त्याला किती शीतल वाटेल! त्याप्रमाणे संसारतप्त शिष्याला गुरूची वाणी शीतलता प्रदान करते. त्याच्या मनात जन्मजन्मांतरापासून वसणारा अज्ञानाचा गूढ अंधकार नष्ट करते, त्याला शांतीचा अनुभव देते. आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक असे तीन प्रकारचे ताप मनुष्याला संतप्त करीत असतात. या तापत्रयांनी संतप्त मनुष्य गुरूजवळ जातो, त्याच्या वचनामृताचे सेवन करतो तेव्हा त्याच्या मनातील अज्ञानांधकार नाहीसा होऊन गुरू त्याला परमानंदाचा अनुभव देतो. शिष्याला हा अनुभव देण्याऱ्या गुरूलाच 'शिक्षागुरू' म्हणतात. उपदेश असा असावा की, करणाऱ्याला आणि ऐकणाऱ्यालाही तो सुखद वाटावा. केव्हा एकदाची बडबड संपते, असे शिष्याला वाटू नये आणि कधी एकदा ही कटकट संपते असे गुरूला वाटू नये. चांदणे जसे सर्वांना प्रिय असते तसा गुरूचा उपदेश असावा.

**ददाति यः पतिज्ञानं जगन्मायानिवर्तकम्।**
**अद्वैतवासनोपायं तमाचार्यवरं विदुः।।१५.१५।।**

श्रीगुरू शिष्याला पति-ज्ञान आणि पशु-ज्ञान देतात. आणवमल, मायामल आणि कार्मिकमल या तीन पाशांनी बांधलेला मनुष्य म्हणजे पशू. पशूला एकाच पाशाने बांधले जाते, परंतु जीवात्म्याला मात्र तीन पाशांनी बांधले जाते. त्यामुळे त्याची संसारातून लवकर मुक्तता होत नाही. गुरू शिष्याला या पाशांचा त्याग करायला सांगतात. पशुभावाचा त्याग करण्यासाठी पशुपतीच्या ज्ञानाची आवश्यकता असते. गुरू सांगतात की, तुला आता पशू म्हणून रहायचे नाही तर पशुपती व्हायचे आहे. शिव व्हायचे आहे. या प्रकारे शिष्याला शिवजीवैक्याचा बोध करून जो त्याचे अज्ञान दूर करतो तोच 'शिक्षागुरू' होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
२१ ऑगस्ट १९९२

## शिक्षागुरुस्थल-२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

दीक्षा देणारा दीक्षागुरू, शिक्षा देणारा शिक्षागुरू आणि ज्ञान देणारा ज्ञानगुरू असे तीन गुरूंचे वर्णन 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त केले आहे. परंतु गुरू एकच असतो. त्याची कार्ये त्रिविध असतात. एकच गुरू दीक्षा देतो, शिक्षा देतो आणि ज्ञान देतो. शिष्याची बुद्धी पवित्र करण्यासाठी तो सर्वप्रथम त्याला सेवाकार्य सांगतो. वडीलधाऱ्यांची सेवा करण्याची संधी मिळणे हे परमाभाग्य मानले जाते. माता, पिता, गुरू, दीनदलित यांची सेवा मन:पूर्वक करावी. त्यामुळे आपले शरीर, मन शुद्ध होते, स्वार्थभावना नष्ट होऊन सर्वांकडे आत्मवत् पाहण्याची दृष्टी लाभते. सेवाभाव जागा करणे हाच शास्त्रकारांचा उद्देश आहे. मनुष्य जेवढा अधिक स्वार्थी होत जाईल तेवढा तो स्वत: अस्वस्थ होईल आणि समाजाला देखील अस्वस्थ करील. व्यक्ती आणि समाज दोन्ही स्वस्थ रहाण्यासाठी सेवाभावना उपयोगी पडते.

प्राचीन काळात गुरुकुले होती. राजपुत्र असो की दासपुत्र असो, दोघांनाही गुरुकुलात समान वागणूक मिळत असे. सर्वांना गुरूची सेवा करावी लागत असे. ज्याच्या सेवेने गुरू संतुष्ट होत त्याला ते ज्ञान देत असत. सेवा निरभिमान होऊन केली तरच ती फलप्रद होते. गुरुसेवेविना एखाद्या वेळी विद्या प्राप्त होईलही, परंतु गुरुकृपा झाल्याशिवाय तिचे फळ मिळणार नाही. पुस्तकात वाचून मंत्र पाठ करता येतात, पाठ केल्यानंतर ते उच्चारता येतात, परंतु त्याच्यात सामर्थ्य मात्र नसते. ते निर्जीव असतात. म्हणूनच गुरुसेवा करून गुरुकृपा संपादन करायची असते. त्यासाठी प्राचीन काळी गुरुगृही जाण्याची पद्धत होती. आजच्या काळात मात्र जिथे विद्यार्थी आहेत तिथे जाऊन गुरूला शिकवावे लागते. एक पिरियेड संपला की दुसऱ्या वर्गावर. विद्यार्थी एका ठिकाणी बसलेले असतात. गुरू मात्र या वर्गावरून त्या वर्गावर सारखा फिरत असतो. आज गुरूला 'गुरू' समजत नाहीत तर 'नोकर' समजतात. जबरदस्तीने विद्या प्राप्त होत नसते आणि झाली तरी ती फलदायक नसते. लौकिक विद्या असो की आध्यात्मिक विद्या, ती तुम्हाला नम्र झाल्यानेच प्राप्त होईल.

प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी पशुभाव असतो. अलीकडे तर मनुष्य पशूच होत चाललेला दिसतो. त्याच्यात मनुष्यत्वाचा आढळ क्वचित्च होतो. म्हणून सर्वप्रथम त्याच्यात मनुष्यत्व आहे की नाही याची गुरू परीक्षा घेतो. तुम्ही दुकानावर साधे नारळ घ्यायला जरी गेलात तरी ते हलवून पहाता. त्यात पाणी आहे की नाही, आत खोबरे चांगले असेल की नाही याचा अंदाज घेता. एवढे पाहूनही कधीकधी ते खराब निघते. 'देवाला पावले' असे म्हणून आपण गप्प बसतो. खराब निघाले तर देवाला द्यायचे आणि चांगले निघाले तर पुजाऱ्याशी भांडून नारळाच्या दोन्ही वाट्या मागून घ्यायच्या! चांगली वस्तू स्वत:साठी आणि वाईट वस्तू देवासाठी! यावरून आपली भावना किती शुद्ध आहे ते सिद्ध होते. म्हणून तुम्हाला ईश्वर चांगले काही मागतच नाही. जे जे वाईट असेल ते मागतो. तुमचे विकार, तुमचे अवगुण तो मागतो.

शिष्याच्या ठिकाणी मनुष्यत्व आहे की नाही हे गुरू परीक्षून पहातात. नंतर त्याचा पशुभाव दूर करण्यासाठी त्याला शिवज्ञानाचा उपदेश करतात. भगवान शिव महान आहेत. त्यांना काहीही मागितले तरी ते देतात. त्यांच्याकडे अक्षय संपत्ती आहे. ती देऊन कधी संपत नाही. गुरू शिष्याला शिवज्ञान का देतो? तर शिवज्ञान

दिल्यावर त्याची संकुचित भावना नष्ट होऊन त्याच्या मनात त्यागभावना उत्पन्न होते. प्रत्येक संसारी जीवाला दु:ख भोगावेच लागते. संसारात विषमता असते, समता नसते. घरातल्या प्रत्येकाचे विचार वेगवेगळे असतात. क्वचित् एखाद्या कुटुंबात समविचारी लोक असतीलही, परंतु तो अपवाद होय. सामान्यत: एकाचे दुसऱ्याशी पटत नसते. अशा विषम–व्यवहारात देखील आपले मानसिक संतुलन ढळू न देता वागावे लागते. भगवान शिवाचा परिवार देखील विषम आहे. शिवाच्या अंकावर पार्वती बसली आहे तर डोक्यावर गंगा. त्या दोघींमध्ये सवति–मत्सर आहे. शिवाचे वाहन नंदी तर पार्वतीचे वाहन सिंह. त्यांच्यात वैर आहे. शिवाच्या गळ्यात सर्प आणि गणपतीचे वाहन उंदीर. उंदीर हे सापाचे आवडते भक्ष्य. कधी ही एकत्र न येणारे हे जीव भगवान शिवासोबत मात्र शांत बसले आहेत. कारण भगवान शिवच मुळात शांत आहेत. शिवाप्रमाणेच शिवभक्तानेही शांत रहायला हवे. शिवभक्ताने शिवच झाले पाहिजे. त्याचा पशुभाव नष्ट होऊन मनात पतिभाव बाणला पाहिजे.

**पूर्वपक्षं समादाय जगद्भेदविकल्पनम्।**
**अद्वैतकृतसिद्धान्तो गुरुरेष गुणाधिक:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.१६)

शिष्याच्या मनात अनेक शंका असतात. त्या तो गुरूला विचारतो. त्याच्या शंका म्हणजे पूर्वपक्ष आणि त्याची गुरूने दिलेली उत्तरे म्हणजे उत्तरपक्ष होय. पूर्वपक्षाचे उत्तरपक्षात खंडन केले जाते. शिष्य प्रश्न विचारतो की, हे सारे जग दिसत असताना देखील ते नाही असे मानायचे आणि जो परमात्मा दिसत नाही तो आहे असे मानायचे, असे काय? शिष्याच्या शंकेचे निरसन गुरूला करावे लागते. सामान्यत: माणसे प्रत्यक्ष–प्रमाणालाच अधिक महत्त्व देतात. ईश्वर तुम्हाला दिसला का? असाच प्रश्न सामान्य माणूस विचारतो. प्रत्येक वस्तूचे अस्तित्व प्रत्यक्ष–प्रमाणाने सिद्ध करता येत नाही. आपल्याला डोळे आहेत, परंतु डोळे स्वत:ला पाहू शकत नाहीत. आरशात डोळ्यांचे प्रतिबिंब दिसते. वस्तुत: डोळ्यांना डोळे दिसत नाहीत. प्रत्यक्ष–प्रमाण प्रत्येक बाबतीत उपयोगाचे नाही. काही वेळा अनुमान–प्रमाणाचा उपयोग करावा लागतो. दूर डोंगरातून निघणारा धुराचा लोट पाहिला तर त्या ठिकाणी अग्नी आहे, असे मानावे लागते. कारण 'यत्र यत्र धूम: तत्र तत्र वन्हि:।'– जिथे धूर असतो तिथे अग्नी असतो– असा नियम आहे. त्या ठिकाणी अग्नी प्रत्यक्ष दिसत नसला तरी धुरावरून आपण त्याचे अस्तित्व मान्य करतो. अग्नी हे 'कारण' आहे तर धूर हे त्याचे 'कार्य' आहे. त्याप्रमाणे प्रपंच हे 'कार्य' आहे तर परमात्मा हे 'कारण' आहे. डोळ्यांसमोर एवढे प्रचंड 'कार्य' असून त्याला 'कारण' नाही असे कसे म्हणता येईल?

अशा प्रकारे शिष्याने विचारलेल्या प्रश्नांना पूर्वपक्ष समजून गुरू त्याच्या प्रश्नांची युक्तीवादाने उत्तरे देतो. त्यांचे बोलणे हा उत्तरपक्ष असतो. प्रत्येक पदार्थातील त्यांची भेदबुद्धी नष्ट करून त्याला शिवाद्वैताचा उपदेश करतो. द्वैतामुळे आपल्या मनात भय उत्पन्न होते. जिथे दोघे असतात तिथे संघर्ष असतो. त्यामुळे माणसाला दुसऱ्याचे भय वाटते. परंतु जिथे एकच तत्त्व असते, अद्वैत असते तिथे कुणाचे भय वाटणार? भेदबुद्धीमुळेच जगात अशांती नांदत आहे. परंतु प्रपंचातील प्रत्येक वस्तूत एकच तत्त्व आहे, अशी अभेददृष्टी प्रत्येकाला लाभली तर हे जग सुखी होईल. त्यासाठीच गुरू शिष्याला शिवाद्वैताचा बोध करीत असतात.

**संदेहवनसंदोहसमुच्छेदकुठारिका।**
**यत्सूक्तिधारा विमला स गुरुणां शिखामणि:।।१५.१७।।**

गुरू आपल्या मनातील संदेहाचे निराकरण करतात. ज्ञानरूपी कुऱ्हाडीने आपल्या मनातील संदेहरूपी वृक्ष ते छेदून टाकतात. डोळ्यांत गेलेले कुसळ आणि पायात मोडलेला काटा पटकन् काढावा त्याप्रमाणे आपल्या मनातला संदेह मनात न ठेवता त्याचे उत्तर शोधून तो मनातून काढून टाकावा. गुरूला शंका विचारताना संकोच करू नये. गुरूला विचारणार नाही तर कुणाला विचाराल? शिष्याच्या मनातल्या प्रत्येक शंकेचे उत्तर गुरूजवळ असते. तो शिष्याला उपदेश करून 'नि:संदेह' करतो. कधी कधी प्रवचन ऐकतानाच मनातल्या मनात शंका नष्ट होतात.

**यत्सूक्तिदर्पणाभोगे निर्मले दृश्यते सदा।**
**मोक्षश्रीर्बिम्बरूपेण स गुरुर्भवतारक:।।१५.१८।।**

शिक्षागुरूला 'भवतारक' असे म्हणतात. तो शिष्याला संसारसागरातून तारून नेतो. गुरूचा उपदेश दर्पणासारखा असतो. दर्पणासमोर उभे राहिल्यावर आपले प्रतिबिंब तो पटकन् दाखवतो आणि तिथून दूर झाल्यावर प्रतिबिंबही नष्ट होते. त्याप्रमाणे गुरूचा उपदेश तत्काळ मोक्षमार्ग दाखवतो.

**शिष्याणां हृदयालेख्यं प्रद्योतयति य: स्वयम्।**
**ज्ञानदीपिकयाऽनेन गुरुणा क: समो भवेत्।।१५.१९।।**

अंधार असलेल्या मंदिरातली मूर्ती तिथे असूनही दिसत नाही. नंदादीप पेटवला तर त्याच्या शांत प्रकाशात ती दृष्टिगोचर होते. त्याप्रमाणे परमात्मा आपल्या हृदयातच वास्तव्य करतो. परंतु अज्ञानाच्या अंधारामुळे तो आपल्याला दिसत नाही. आपण विचारतो की, कुठे आहे परमात्मा? शास्त्रे सांगतात की, तो तर तुमच्या हृदयात नांदत आहे, तो आहे म्हणून तुमचे शरीर जिवंत आहे. ज्याच्या शक्तीमुळे तुमचा शरीर-व्यवहार चाललेला असतो त्याचे ज्ञान तुम्हाला नाही? त्याचे ज्ञान गुरूशिवाय होणे अशक्य आहे. भगवत्तत्त्व आपल्या आतही आहे आणि बाहेरही आहे. बाहेरचे भगवत्तत्त्व जाणणे अत्यंत अवघड आहे. परंतु तुमच्या आत नांदणाऱ्या भवत्तत्त्वाचा साक्षात्कार करून घेण्यासाठी तुम्हाला दूर धावावे लागणार नाही. तुमची मनोवृत्ती अंतर्मुख केली की ते दिसते. जप, ध्यान हे मनोवृत्तीला अंतर्मुख करणारे उपाय होत.

**परमाद्वैतविज्ञानपरमौषधिदानत:।**
**संसाररोगनिर्माथी देशिक: केन लभ्यते।।१५.२०।।**

शिवज्ञानाचा बोध करणारा गुरू सहज उपलब्ध होत नाही. जे जिज्ञासू असतात त्यांनाच अशा गुरूचा लाभ होतो. गुरू परमाद्वैत शिवज्ञानाचे औषध देतो. मनुष्याला कोणता ना कोणता तरी रोग असतो. संपूर्ण निरोगी व्यक्ती जगात नाही. शंकराचार्य म्हणतात की, मनुष्याला दुसरा कोणताही रोग नसला तरी त्याला भूक आणि तहान हे दोन रोग असतातच. उपवास करणारा असो किंवा रोज जेवणारा असो, त्याला काहीतरी खावेच लागते. मरेपर्यंत हे दोन रोग पिच्छा सोडत नाहीत. भिक्षान्नाचे भक्षण करूनच हा रोग दूर होतो. जुन्या काळी अन्न शिजवल्यावर त्याची पूजा केली जात असे. त्या अन्नाला अन्नपूर्णा म्हणत असत. अन्नपूर्णेला नमस्कार करून अन्नपूर्णेची भिक्षा मागावी हेच भिक्षान्न होय. अन्नपूर्णेला भिक्षा मागण्यात लाज कसली? भगवान शिव देखील अन्नपूर्णेला भिक्षा

मागतात. आपले आराध्य जर भिक्षान्नाचे सेवन करतो तर आपण देखील भिक्षान्नच खाल्ले पाहिजे.

भूक आणि तहान या रोगाप्रमाणेच मनुष्याला आणखी एक रोग झालेला आहे तो म्हणजे संसाररोग. संसार म्हणजे जन्म-मरण. हा रोग शिवाद्वैतरूपी औषध देऊन गुरू दूर करतो. अशा गुरूला शरण जाऊन त्याची सेवा करावी, त्यांचा उपदेश ग्रहण करावा आणि आपले कल्याण साधावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
२२ ऑगस्ट १९९२

---

आशीर्वचन एकोणिसावे

## ज्ञानगुरुस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज ज्ञानगुरुस्थल या अवांतरस्थलाचे आपल्याला ज्ञान करून घ्यायचे आहे. ज्या मनुष्याला ज्ञान नसते, त्याला शास्त्रकारांनी पशू असे संबोधले आहे. तुम्ही म्हणाल- 'आम्हाला काय ज्ञान नाही? खायचे-प्यायचे, पैसे मिळवायचे, व्यवहार करायचा हे सारे ज्ञान तर आम्हाला आहे. तरीही तुम्ही आम्हाला अज्ञानी का म्हणता?' जीवन जगण्याचे ज्ञान पशूला देखील असतेच. कसे खावे आणि किती खावे हे पशूला सांगावे लागत नाही. पोट भरले की तो खाणे थांबवतो. आपण मात्र असे करत नाही. पोट भरले तरी आपण खातच असतो. वाढणारी व्यक्ती पोट भरले तरी आग्रह करीतच असते. 'घ्या महाराज, आणखी घ्या.' मग महाराज तरी काय करणार? खातच बसणार. खाण्यापिण्याच्या बाबतीत माणूस पशूपेक्षाही बाद आहे. ज्याला आध्यात्मिक ज्ञान नसेल तर तो पशूच होय. लौकिक ज्ञानाबरोबरच आत्मज्ञान देखील झाले पाहिजे. ज्या ज्ञानामुळे संसारदुःखापासून मुक्ती मिळते ते ज्ञान मिळवायचा प्रत्येक मनुष्याला अधिकार आहे. ते ज्ञान मिळवण्यासाठीच तर त्याला मनुष्यजन्म मिळाला आहे. म्हणून आपले आचार्य शिष्याला दीक्षा देऊन सुसंस्कृत करतात, त्याच्याकडून धर्मग्रंथाचे अध्ययन करून घेतात आणि त्याला आत्मज्ञान देतात.

**उपदेष्टोपदेशानां संशयच्छेदकारकः।**
**सम्यग्ज्ञानप्रदः साक्षादेष ज्ञानगुरुः स्मृतः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.२१)

शास्त्राचा रहस्यार्थ श्रीगुरू आपल्या प्रिय शिष्याला समजावून सांगतात. परंतु त्याआधी रहस्यार्थ श्रवण करण्यासाठी तो योग्य आहे की नाही, ते परीक्षून पाहतात. नचिकेत जेव्हा यमलोकात गेला तेव्हा यम बाहेर गेलेला होता. नचिकेताला तीन दिवस वाट पहावी लागली. तीन दिवसानंतर जेव्हा यम आला तेव्हा त्याने नचिकेताचे स्वागत केले आणि नचिकेताला तीन वर मागायला सांगितले. नचिकेताने आपल्या पित्याचे पाप नष्ट होऊन त्याला स्वर्गप्राप्ती व्हावी, असा पहिला वर मागितला. मला आत्मज्ञान द्या, असा दुसरा वर मागितला.

त्यावेळी यम म्हणाला, ''तुला शंभर वर्षे पुरेल एवढी संपत्ती देतो, आज्ञाधारक पत्नी आणि पुत्र देतो, संसारसुखे भोगण्याइतके सामर्थ्य देतो, परंतु आत्मज्ञानाविषयी काही विचारू नकोस.''

परंतु नचिकेताने आपला हट्ट सोडला नाही. तेव्हा यमाने नचिकेताची योग्यता ओळखून त्याला आत्मज्ञान दिले. नचिकेत प्रलोभनाला बळी पडला नाही. म्हणून त्याला आत्मज्ञानाची प्राप्ती झाली. ज्ञानोपदेश करण्याआधी गुरू शिष्याचे परीक्षण करतो. सांसारिक विषयांबद्दल विरक्ती नसेल तर आत्मज्ञान होणार नाही. शास्त्रांचा रहस्यार्थ सांगून त्याच्या मनातल्या संशयाचे निराकरण करून त्याला जो सम्यक् ज्ञान देतो अशा गुरूला 'ज्ञानगुरू' म्हणतात. सम्यक् ज्ञान म्हणजे व्यावहारिक ज्ञान नव्हे. व्यवहार कुणाला समजावून सांगावा लागत नाही. अध्यात्म मात्र समजावून सांगावे लागते. ज्ञानगुरूजवळ गेल्यावर अज्ञान नष्ट होते. दिवा पेटल्यावर अंधार नष्ट होतो त्याप्रमाणे.

**निरस्तविश्वसंभेदं निर्विकारं चिदम्बरम्।**
**साक्षात्करोति यो युक्त्या स ज्ञानगुरुरुच्यते।।१५.२२।।**

प्रपंचात द्वैत आहे. द्वैत म्हणजे संसार. अद्वैत म्हणजे परमात्मा. ज्याच्या मनात द्वैतबुद्धी असते तो प्रापंचिक. परमात्माच प्रपंचरूपात परिवर्तित झाला आहे. परंतु त्यामुळे त्याच्या ठिकाणी कोणतीही विकृती आली नाही. दुधाचे दही. दह्याचे लोणी आणि ताक होते. लोण्याचे तूप होते. दुधामध्ये विकृती निर्माण होते. दह्याचे पुन्हा दूध होत नाही. परमात्म्यात असा बदल होतो काय? परंतु असे होत नाही. कोणतीही विकृती झाल्याशिवाय शिव प्रपंचरूप होतो. सोन्याचे अलंकार केले तरी सोने विकृत होत नसते. सोन्यापासून कंकण, कुंडल, अंगठी इत्यादी अलंकार तयार होतात, परंतु सोन्यामध्ये कसलीही विकृती येत नाही. सोनाच्या दृष्टीने अंगठी काय आणि कंकण काय, सोनेच असते. तो ते तोलून तुम्हाला जी किंमत सांगतो ती सोन्याची असते. आपल्या दृष्टीने मात्र ती अंगठी किंवा कंकण असते. ते पसंत नसेल तर मोडून आपण दुसरे अलंकार बनवू शकतो. सोने विकारी नाही. त्याप्रमाणे परमात्मा प्रपंचरूप होऊनही अविकृत आहे. समुद्रावर लाटा, फेस उत्पन्न होतात. ते समुद्राचेच रूप असते. त्यामुळे समुद्रात कोणताही विकार उत्पन्न होत नाही. त्याप्रमाणे परमात्मा निर्विकार आहे.

परमात्मा चिदम्बर आहे. दक्षिणेकडे चिदम्बरम् नामक एक क्षेत्र आहे. तिथे आकाशलिंग आहे. पंचमहाभूतांमधील आकाश यालाच एक लिंग मानले जाते. या आकाशाचे देखील एक आकाश आहे, ते म्हणजे चिदाकाश, परमात्मा. आकाश निर्विकार असते. ते कलंकित होत नाही. परमात्मा आकाशाप्रमाणेच निर्विकार, निराकार, निष्कलंक असून सर्वांना अवकाश देणारा आहे. अनेक युक्त्या-प्रयुक्त्यांनी परमात्मा कसा निर्विकार आहे हे पटवून देऊन त्या चिदाकाशाचे जो ज्ञान करून देतो त्याला 'ज्ञानगुरू' असे म्हणतात. शिवज्ञान कसे असते याविषयी आता सांगतात-

**कलंकवानसौ चंद्रः क्षयवृद्धिपरिप्लुतः।**
**निष्कलंकस्थितो ज्ञानचंद्रमा निर्विकारवान्।।१५.२३।।**

शिव जसा निर्विकार आणि चिदंबर आहे, त्याप्रमाणे त्याचे ज्ञानदेखील तसेच निर्विकार आणि चिदंबर आहे. चंद्र कलंकित असल्यामुळे त्याचा प्रकाश देखील कलंकित आहे. शुक्लपक्षात चंद्र वृद्धिंगत होतो तर कृष्णपक्षात त्याचा क्षय होतो. परंतु गुरूच्या उपदेशाने शिष्याच्या चिदाकाशात उगवलेला ज्ञानचंद्र मात्र निष्कलंक असून त्याचा क्षय होत नाही आणि वृद्धी होत नाही. मनात शिवज्ञान पूर्ण प्रकाशल्यावर ते कधीही नाहीसे होत नाही.

लौकिक ज्ञान नष्ट होते. विद्यार्थी जो अभ्यास करतात तो परीक्षेपर्यंत त्यांच्या लक्षात राहतो. नंतर मात्र त्यांना त्याचा विसर पडतो. लौकिक ज्ञानाची क्षय-वृद्धी होते. लौकिक ज्ञान वेगवेगळ्या प्रकारचे असते, परंतु आध्यात्मिक ज्ञान मात्र एकच असते. सगळ्यांचा आध्यात्मिक अनुभव एकच असतो.

**पार्श्वस्थतिमिरं हन्ति प्रदीपो मणिनिर्मितः।**
**सर्वगामि तमो हन्ति बोधदीपो निरंकुशः।।१५.२४।।**

दीप आणि ज्ञानदीप यांची येथे तुलना केली आहे. आपण घरात दीप पेटवला किंवा एखादा रत्नदीप घरात ठेवला, तर तो किती अंधार नष्ट करू शकेल? फार तर त्याच्या अवतीभवतीचा काही भाग प्रकाशित होईल. जिथे दीप आहे तिथे अंधार रहाणार नाही. दीप उचलून नेला तर तिथे पुन्हा अंधार पसरेल.

एका गावात लग्नासाठी वऱ्हाड आले. त्यांना गावाशेजारच्या शाळेत उतरायला जागा दिली. गावात वीज नव्हती. रात्री अंधार पडल्यावर वऱ्हाडी मंडळींनी वधुपित्याला निरोप दिला, इथे फार अंधार पडला आहे. दिवाबत्तीची व्यवस्था करा.

वधुपित्याने एका नोकराजवळ गॅसबत्ती देऊन त्याला सांगितले, ''गॅसबत्ती घेऊन जा आणि ज्या खोलीत अंधार असेल तिथे ठेव.''

नोकर थोडा वेडसर होता. तो गॅसबत्ती घेऊन गेला. प्रत्येक खोलीत गॅसबत्ती घेऊन तो फिरला. पण त्याला कुठेही अंधार सापडला नाही. खोलीतून लोक त्याला बोलावायचे- ''इकडे ये, बघ, इथे अंधार आहे.'' हा पठ्ठ्या गॅसबत्ती घेऊन त्या खोलीत जायचा आणि म्हणायचा, ''इथे कुठे अंधार आहे दाखवा बरे? खोटे बोलता काय? माझ्या मालकाने जिथे अंधार आहे तिथेच गॅसबत्ती ठेवायला सांगितली आहे.''

अखेर त्याला अंधार कुठेच सापडला नाही. गॅसबत्ती घेऊन तो परत गेला. दिवा फक्त आपल्या अवतीभोवतीचा अंधःकार दूर करू शकतो. सर्व अंधार तो दूर करू शकत नाही. मणिदीप असो, तेलाचा दिवा असो की विद्युतदीप असो, काही मर्यादेपर्यंतच ते अंधार दूर करू शकतात. परंतु ज्ञानदीप मात्र हृदयातला आणि हृदयाबाहेरचा संपूर्ण अंधार नष्ट करतो. ज्याच्या हृदयात ज्ञानदीप प्रज्वलित होतो त्याला सर्व प्रपंचात परमात्मतत्त्व दिसू लागते. त्याच्यासाठी अवघा प्रपंच ज्ञानमय होऊन जातो. जो ज्ञानदीप प्रज्वलित करतो तोच ज्ञानगुरू होय.

**सर्वार्थसाधकज्ञानविशेषादेशतत्परः।**
**ज्ञानाचार्यः समस्तानामनुग्रहकरः शिवः।।१५.२५।।**

जो शरणागत होऊन येतो त्याच्यावर श्रीगुरू अनुग्रह करतात. गुरू सर्व शिष्यांकडे समदृष्टीने पहातात. त्यांच्यात भेद न करता त्यांना ज्ञानदान करतात. परंतु जे जागे असतात त्यांनाच ज्ञानलाभ होतो, जे झोपी जातात ते त्यापासून वंचित रहातात. ज्ञानग्रहणासाठी जागे रहायला हवे. डोळ्यांनी टकमक पाहणे आणि मान हलवत ऐकण्याचा अभिनय करणे म्हणजे जागे रहाणे नव्हे. ते वरचे सोंग होय. तुमचे मन कुठे भटकायला गेले असेल तर तुम्ही झोपल्यातच जमा आहात. गुरू सर्वांना समान रूपाने ज्ञान वाटतात. घेणारे भांडे मोठे असेल तर त्यात अधिक ज्ञान पडते आणि लहान असेल तर कमी. त्यातही एखादे भांडे गळके असते. म्हणून काही काळाने ते पूर्ण रिकामे होते. काही भांडी तर इतकी गळकी असतात की एकीकडे भरता भरता दुसरीकडे रिकामी होत असतात. 'नळी फुंकली सोनारे, इकडून तिकडे गेले वारे' अशी त्यांची अवस्था होते.

आपल्या मनाच्या भांड्याला राग आणि द्वेष ही दोन छिद्रे आहेत. ती छिद्रे प्रथम बंद केली पाहिजेत.

कुणाबद्दलही अति-प्रेम किंवा अति-द्वेष नसावा. राग-द्वेषविरहित माणसालाच ज्ञानप्राप्ती होते, आणि त्याच्याच ठिकाणी ज्ञान टिकते. तुम्ही मात्र घर सोडून येता, इथे बसून ज्ञान ग्रहण करता आणि ते वाटेवर सांडत सांडत रिकामे होऊन घरी जाता. मनाची छिद्रे बुजवल्याशिवाय त्यात ज्ञान टिकणार नाही. गुरू सर्वांना सारखेच ज्ञान देतात. परंतु घेणाऱ्यांना आपल्या योग्यतेप्रमाणे कमी-अधिक मिळते.

**कटाक्षचंद्रमा यस्य ज्ञानसागरवर्धनः।**
**संसारतिमिरच्छेदी स गुरुर्ज्ञानपारगः॥१५.२६॥**

पौर्णिमेला चंद्रोदय झाल्यावर समुद्राला भरती येते त्याप्रमाणे गुरूच्या ज्ञानचंद्राच्या दर्शनाने शिष्याच्या ज्ञानसागराला भरती येते. याचे तात्पर्य असे की, शिष्य जोपर्यंत गुरूच्या सान्निध्यात असतो तोपर्यंत त्याचे ज्ञान वृद्धिंगत होत जाते. गुरूच्या कृपाकटाक्षाने शिष्याला ज्ञानामृताचा लाभ होतो. शिष्याला असे ज्ञानामृत देणारा गुरूच ज्ञानगुरू होय.

**बहिस्तिमिरविच्छेत्ता भानुरेष प्रकीर्तितः।**
**बहिरन्तस्तमश्छेदी विभुर्देशिकभास्करः॥१५.२७॥**

सूर्याच्या प्रकाशात अवघे विश्व प्रकाशित होते. परंतु त्याच्या प्रकाशाने एकाही हृदयातला अंधःकार नाहीसा होत नाही. जन्मजन्मांतरापासून आपल्या हृदयात साचलेला अज्ञानाचा गाढ अंधःकार गुरूच्या ज्ञानरूपी सूर्यामुळे नाहीसा होतो. संसार शिवरूप नाही, हाच बाह्य अंधःकार होय आणि मी शिव नाही, हा मनातील अंधःकार होय. या दोन्ही अंधःकारांचा गुरू नाश करतो म्हणून गुरू सूर्यापेक्षाही श्रेष्ठ आहे.

**कटाक्षलेशमात्रेण विना ध्यानादिकल्पनम्।**
**शिवत्वं भावयेद्यत्र स वेदः शाम्भवो मतः॥१५.२८॥**

गुरू ज्ञानाचा सागर आहे. सागराचे पाणी कोणी कितीही भरून नेले तरी ते संपत नाही. तसे गुरू जवळचे ज्ञान कधीही संपत नाही. इतर वस्तू दुसऱ्यांना दिल्या तर त्या कमी होतात. तर ज्ञान दुसऱ्याला दिल्याने वृद्धिंगत होते. 'व्यये कृते वर्धतैव नित्यं विद्याधनं सर्वधनप्रधानम्।'

ज्ञान कुणाला दिले तर त्याचा क्षय होत नाही, ते कुणाला दिले नाही तर कमी होते. ज्ञानदानामध्ये कंजूषपणा चालत नाही. तुम्ही जेवढे ज्ञानदान कराला तेवढे ज्ञान वृद्धिंगत होत जाते. गुरुपदेशामुळे शिष्याला निर्मल ज्ञान प्राप्त होऊन तो जीवन्मुक्त होतो. आपल्याला मेल्यानंतर मुक्त व्हायचे नाही तर मुक्त होऊन मरायचे आहे. ज्याला जिवंतपणी मुक्त होता येत नाही तो मृत्यूनंतर कसा मुक्त होईल? शिष्य कितीही अज्ञानी असला तरी ज्ञानगुरू त्याच्या हृदयातील अज्ञानाचा अंधार दूर करतात आणि त्याला शिवज्ञान देऊन जीवन्मुक्त करतात. शिष्य पूर्ण तृप्त होईपर्यंत, त्याने कबुली देईपर्यंत गुरूचा उपदेश सुरू असतो. 'नष्टो मोहः' अशी ज्यावेळी अर्जुनाने कबुली दिली त्यावेळी श्रीकृष्णाने आपला उपदेश थांबवला. प्रत्येकाने गुरूच्या ज्ञानोपदेशाने असेच तृप्त व्हावे. ज्ञानगुरुस्थलात ज. रेणुकाचार्यांनी ज्ञानाचे महत्त्व गायले आहे. म्हणून गुरूला शरण जाऊन, त्यांचा ज्ञानोपदेश ग्रहण करून प्रत्येकाने जीवन्मुक्तीचा विलक्षण आनंद उपभोगावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
२३ ऑगस्ट १९९२

## क्रियालिंगस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

क्रियालिंगस्थल हे लिंगस्थलातील तिसरे अवांतरस्थल होय. क्रिया आणि लिंग यांचा अर्थ कोणता? इष्टलिंगाला क्रियालिंग का म्हटले जाते? त्याचे महत्त्व कोणते? याविषयी या स्थलात विस्तारपूर्वक विवेचन केले आहे.

**गुरोर्विज्ञानयोगेन क्रिया यत्र विलीयते।**
**तत्क्रियालिंगमाख्यातं सर्वैरागमपारगैः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.३०)

विज्ञान या शब्दाचा आधुनिक अर्थ सायन्स असा होत असला तरी येथे विज्ञान म्हणजे गुरूकडून प्राप्त झालेले विशेष ज्ञान असा अर्थ होय. इष्टलिंगाविषयी आपल्याला सामान्य ज्ञान असते. याला 'इष्टलिंग' म्हणतात, याची पूजा करावी लागते या ज्ञानाला सामान्य ज्ञान म्हणतात. इष्टलिंगाच्या वास्तविक स्वरूपाचे ज्ञान म्हणजे विज्ञान होय. त्याला विशेष ज्ञान असेही म्हणतात. अंग-षट्स्थलातील ज्ञान हे सामान्य ज्ञान असून लिंग-षट्स्थलातील ज्ञान हे विशेष ज्ञान होय. म्हणून इष्टलिंगाच्या सूक्ष्म स्वरूपाविषयी या ठिकाणी विचार केलेला आहे.

आपण अनेक प्रकारच्या क्रिया करीत असतो. विविध धर्मांत, संप्रदायांत सांगितलेल्या क्रिया वेगवेगळ्या असल्या तरी मानवांसाठी नित्यकर्म आवश्यक असते. गुरूंनी दीक्षा दिल्यानंतर इष्टलिंगधारण आणि त्याची पूजा नित्यनेमाने घडली पाहिजे. नित्यकर्म जन्मभर करावे लागते. नित्यकर्म केल्याने विशेष फळ मिळत नाही. परंतु नित्यकर्म केले नाही तर पाप होते. पाप टाळण्यासाठी प्रत्येकाला नित्यकर्म करावेच लागते. गुरूने दिल्ल्या विशेषज्ञानामुळे जिथे क्रिया लय पावते ते क्रियालिंग होय. क्रिया अनेक असल्या तरी सर्व क्रियांची पूर्ती इष्टलिंगपूजेनंतरच होते. जो वीरशैव इष्टलिंगपूजा करत नसेल त्याच्या सर्व क्रिया व्यर्थ होत. कारण इष्टलिंगपूजा हीच वीरशैवांची प्रमुख क्रिया होय. सर्व क्रियांना या क्रियेनेच पूर्णत्व प्राप्त होते. सर्व क्रिया पूर्ण करणारे, सर्व क्रियांना आधारभूत असलेले इष्टलिंग हेच क्रियालिंग होय. हातावरले इष्टलिंग लहान आहे. आपल्या हृदयात अंगुष्ठमात्र ज्योतिर्लिंग आहे. म्हणून त्याच आकाराचे इष्टलिंग तळहातावर ठेवून त्याची पूजा करावी, असे शास्त्र सांगते. परंतु अलीकडे इष्टलिंग फार लहान होत चालले आहे. त्याची अनेक कारणे आहेत. चांदी महाग होत चालली आहे, इष्टलिंग मोठे केले तर त्याच्या सज्जिकेसाठी अधिक चांदी लागेल, देवाने तर आपल्याला कमी पैसा दिला आहे, म्हणून देवालाच लहान करा, असे तुम्हाला वाटत असेल. कसे का असेना इष्टलिंग हे इष्टलिंगच असते. ते दिसायला लहान असले तरी त्याचे स्वरूप विराट आहे. त्याविषयी येथे सांगतात-

**परानंदचिदाकारं परब्रह्मैव केवलम्।**
**लिंगं सद्रूपतापन्नं लक्ष्यते विश्वसिद्धये।।१५.३१।।**

उपनिषदांत परात्पर परमात्म्याला 'ब्रह्म' असे म्हटले आहे. ब्रह्म म्हणजे सृष्टिनिर्मिती करणारा ब्रह्मदेव नव्हे.

'बृहत्वात् ब्रह्म'. जे सर्वांपेक्षा बृहत् म्हणजे मोठे आहे, ते ब्रह्म होय. सर्व तत्त्वांपेक्षा विशाल असलेले तत्त्व म्हणजे ब्रह्म. प्रत्येक मनुष्याच्या अंतर्यामी हेच ब्रह्म नांदत असते. म्हणून प्रत्येक मनुष्याला 'मोठे' होण्याची इच्छा असते. पण त्यांना 'मोठे' होण्याचा योग्य मार्ग सापडलेला नसतो. ते खूप संपत्ती मिळवून, सग्यासोयऱ्यांचा गोतावळा वाढवून आणि कीर्ती संपादन करून 'मोठे' व्हायचा प्रयत्न करत असतात. परंतु यामुळे मनुष्य खऱ्या अर्थाने मोठा होत नसतो. जीव ब्रह्म होईल तेव्हाच तो मोठा होईल. नदी समुद्रात विलीन झाल्यावर समुद्राएवढी विशाल होईल. नदीला समुद्र होण्याची ओढ असते ती नदीरूपात राहू इच्छित नाही. त्यासाठी कष्ट झेलण्याची तिची तयारी असते. त्याप्रमाणे जो जीवात्मा कष्ट करण्याची तयारी ठेवतो, तपस्या करतो तोच अखेर ब्रह्मरूप होतो. ब्रह्मापेक्षा मोठे दुसरे काहीही नाही. मोठे व्हायची इच्छा माणसात का असते? लहान रहाण्यात त्याला सुख मिळत नसते म्हणून. मोठे होण्यात सुख असते. मोठे व्हायचे असेल तर सर्वांत मोठे व्हावे, ब्रह्मच व्हावे. ते सर्वांत मोठे आहे म्हणूनच त्याला 'ब्रह्म' म्हणतात. आगमांत परब्रह्मालाच 'लिंग' असे म्हटले आहे. चराचर प्रपंच लिंगातून उत्पन्न होतो, लिंगात स्थिर रहातो आणि लिंगात विलीन होतो. भक्ताकडून होणाऱ्या क्रिया सफल करण्यासाठी ते लिंगच क्रियालिंग अर्थात् इष्टलिंगरूपाने प्रतीत होते.

**लिंगमेव परं ज्योतिर्भवति ब्रह्म केवलम्।**
**तस्मात् तत्पूजनादेव सर्वकर्मफलोदय:।।१५.३२।।**

आपल्याला पूजा करायचीच असेल तर ती सर्वांत मोठ्या देवाची करावी. इष्टलिंगाची पूजा केल्याने सर्व सत्कर्मे केल्याचे फळ प्राप्त होते.

**किं यज्ञैरग्निहोत्राद्यै: किं तपोभिश्च दुश्चरै:।**
**लिंगार्चनरतिर्यस्य स सिद्ध: सर्वकर्मसु।।१५.३५।।**

अन्य संप्रदायांत यज्ञक्रिया करायला सांगितली आहे. यज्ञ करताना अग्नीची पूजा करावी लागते. यज्ञात आहुती देऊन ते आपल्या इष्टदेवतांना संतुष्ट करतात. अग्नी हे एक महाभूत असून त्याची उत्पत्ती लिंगापासून म्हणजे परब्रह्मापासून झाली आहे. ज्याच्या जवळ सर्व कर्मांना आश्रय असलेले इष्टलिंग असते त्याला यज्ञ करण्याची, अग्निहोत्र घेण्याची आणि इतर तपाचरणे करण्याची आवश्यकता नसते. वैदिक परंपरेत होमहवन केले जाते. तरी त्याला प्राधान्य देण्यात येत नाही. दीक्षासंस्काराच्या वेळी, वास्तुशांतीच्या वेळी हवन केले जाते. परंतु ते नैमित्तिक असते. प्रधान नसते. जपाचे पुरश्चरण करण्याची एक परंपरा आहे. अनेकांना याबद्दल माहीतीच नसते. गुरूने उपदेश केलेल्या मंत्रात जेवढी अक्षरे असतात त्यातल्या एकेका अक्षराबद्दल एक लक्ष जप आणि त्या एकूण संख्येच्या चौपट जप केला पाहिजे. उदाहरणार्थ, पंचाक्षरी मंत्रात पाच अक्षरे असतात. त्यातल्या प्रत्येक अक्षरासाठी एक लक्ष याप्रमाणे पाच लक्ष होतात. पाच लक्षांच्या चौपट वीस लक्ष होतात. संकल्पपूर्वक कालावधी ठरवून एवढा जप केला की एक पुरश्चरण होते. पुरश्चरण सहा महिन्यात पूर्ण करा, एक वर्षात पूर्ण करा अथवा अथवा त्यापेक्षा अधिक कालावधीत पूर्ण करा. पुरश्चरण पूर्ण झाल्यावर त्याच्या एक दशांश तर्पण, त्याच्या दशांश होम आणि त्याच्या दशांश सदक्षण भोजन करून त्याची शांती करण्याचा एक विधी आहे. यामध्ये होम करावा लागत असला तरी ते प्रधान कर्म नव्हे, ते अवांतर कर्म होय. प्रधानरूपाने यज्ञ करण्याची आणि अग्निहोत्र घेण्याची वीरशैवांना गरज नाही. त्याचप्रमाणे तपाचरण करण्याची आवश्यकता नाही. तप म्हणजे शरीर शुष्क करणे होय. वीरशैवसिद्धान्तात कठोर उपवास मान्य नाही. तसेच अतिभोजन देखील मान्य नाही. पूर्ण उपवास

केला आणि अतिभोजन केले तर इष्टलिंगार्चनात विघ्न येऊ शकते. म्हणून शरीराचे स्वास्थ्य राखून योग्य प्रमाणात आहार घ्यावा. तुम्ही उपाशी राहिलात तर तुमच्या इष्टलिंगालाही उपाशी रहावे लागते. मोठमोठे यज्ञ करून आणि तपाचरण करून जे फळ मिळते ते वीरशैवांना अत्यंत प्रेमभराने इष्टलिंगपूजा केल्यावर प्राप्त होते. म्हणून लिंगपूजेत रती असावी, प्रीती असावी. शरीरावर इष्टलिंग अत्यंत प्रेमाने धारण करावे. तुम्हाला इष्टलिंगाबद्दल किती प्रेम आहे ते आम्ही रोज पहात आहोत. सोन्याचा दागिना किती प्रेमाने तुम्ही गळ्यात घालता! तो लोकांना दिसला पाहिजे याची काळजी घेता. इष्टलिंग मात्र लपवून ठेवता. ते कुणाला दिसू नये अशी खबरदारी घेता. तुमचा मृत्यू झाल्यावर तोळाभर सोने देखील कुणी तुमच्या अंगावर ठेवणार नाही. कानातला दागिना लवकर निघत नसेल तर तो खसकन् ओढून कान देखील फाडतील. पण सोने काढून घेतील. परंतु इष्टलिंग मात्र तुमच्या बरोबर येईल. तुम्ही सांसारिक वस्तूवर कितीही प्रेम केले तरी त्या वस्तू तुमच्या बरोबर येणार नाहीत आणि तुम्ही इष्टलिंगावर प्रेम केले नाही तरी तेच तुमच्याबरोबर येईल. म्हणून लिंगपूजा करावीच, परंतु ती अत्यंत प्रीतिपूर्वक करावी. त्यामध्ये आनंद असला पाहिजे. लिंगपूजा करण्याची उत्सुकता असावी, लिंग तळहातावर घेतल्यावर आनंद व्हावा आणि लिंगपूजा करताना परमानंद व्हावा. लिंगपूजा ही आनंददायक क्रिया व्हावी.

सानंदादी योग्यांनी अन्य सर्व क्रियांचा त्याग करून इष्टलिंगपूजन स्वीकारले. ते इष्टलिंगपूजेत रत झाले. यज्ञक्रियेमुळे प्राप्त होणारे फल हे अंशफल होय. एका भाकरीचे शंभर तुकडे केले तर त्यामधला एक तुकडा म्हणजे यज्ञक्रियेचे फल होय आणि संपूर्ण भाकरी म्हणजे लिंगपूजेचे फळ होय, असे म्हणता येईल. परब्रह्म हे पूर्ण असल्यामुळे त्याची आराधना केल्यावर पूर्ण फळाचा लाभ होतो. इष्टलिंग हेच परब्रह्म आहे. इष्टलिंग हेच क्रियालिंग आहे. कारण ते सर्व क्रियांचा आधार आहे. शेवटी सांगतात-

**ब्रह्मविष्णवादय: सर्वे विबुधा लिंगमाश्रिता:।**
**सिद्धा: स्वस्वपदे भान्ति जगत्तंत्राधिकारिण:।।१५.३६।।**

सृष्टी निर्माण करणारा ब्रह्मदेव आणि सृष्टीचे पालन करणारा विष्णू हे लिंगपूजेमुळेच आपापली कार्ये करण्यात समर्थ ठरले आहेत. विष्णूने सहस्रकमळांनी लिंगपूजेचा संकल्प केला होता अशी कथा आहे. तो रोज सहस्रकमळांनी लिंगपूजा करीत असे. त्याच्या व्रताची सांगता ज्या दिवशी होती त्या दिवशी तो शिवपूजेला बसला. त्यावेळी कमळ वाहताना एक कमळ कमी पडले. तेव्हा विष्णूने आपला नेत्र काढून ते नेत्रकमळ शिवाला अर्पण केले. त्यामुळे शिव प्रसन्न झाले आणि त्यांनी त्याला सृष्टिपालनाचे सामर्थ्य आणि सुदर्शन चक्र दिले. जगाचे नियमन करणारे सर्व देव आपापल्या स्थानी प्रतिष्ठित झाले ते लिंगपूजन केल्यामुळेच. जर सर्व देवीदेवतांना लिंगपूजेचे फल मिळाले, त्यांचे कल्याण झाले तर आपण मानवाने लिंगपूजा का करू नये? म्हणून अत्यंत प्रेमाने लिंगधारण करावे, लिंगपूजा करावी. आपले शरीर आणि मन पवित्र करून घ्यावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
२४ ऑगस्ट १९९२

# भावलिंगस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल तुम्ही क्रियालिंगस्थलाविषयी ऐकले. आज आपल्याला भावलिंगस्थलाचा विचार करावयाचा आहे.

**क्रिया यथा लयं प्राप्ता तथा भावोऽपि लीयते।**
**यत्र तद्देशिकैरुक्तं भावलिंगमिति स्फुटम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.३७)

इष्टलिंगपूजेनंतर क्रिया शिल्लक रहात नाही, म्हणजे दुसरी कोणतीही क्रिया करण्याचे कारण नाही. म्हणून इष्टलिंगाला 'क्रियालिंग' म्हणतात. ज्याप्रमाणे क्रियालिंगात सर्व क्रिया समाप्त होतात, त्याप्रमाणे आपल्या भावना ज्या ठिकाणी लय पावतात त्याला 'भावलिंग' असे म्हणतात. या ठिकाणी भावलिंग म्हणजे इष्टलिंग-प्राणलिंग-भावलिंग यामधील भावलिंग नव्हे, तर प्राणलिंगालाच इथे 'भावलिंग' असे संबोधले आहे. यापुढे भावलिंगासाठी 'ज्ञानलिंग' असाही शब्द योजिला आहे. म्हणून येथे भावलिंग म्हणजे प्राणलिंग होय. इष्टलिंगाची पूजा आपण बाह्य-उपचारांनी करतो, परंतु आपल्या हृदयात जे भावलिंग (प्राणलिंग) आहे त्याची पूजा बाह्योपचारांनी करता येत नाही. त्यासाठी अंतरंग सामग्रीची आवश्यकता असते.

**भावेन गृह्यते देवो भगवान् परमः शिवः।**
**किं तेन क्रियते तस्य नित्यपूर्णो हि स स्मृतः।।१५.३८।।**

सूक्ष्म परमतत्त्वाला आपण केवळ भावनेनेच जाणू शकतो. सूक्ष्मतत्त्वाला आपण स्पर्श करू शकत नाही, त्याच्यावर बेल-फूल वाहू शकत नाही. त्याला अभिषेक करायचा असेल तर तो भावनेनेच करावा लागतो. भस्म, बेल, फुले भावनेनेच वहावी लागतात. भावलिंगाच्या पूजेसाठी बाह्यसामग्रीची आवश्यकता नसते.

**अखंडपरमानंदबोधरूपः परः शिवः।**
**भक्तानामुपचारेण भावयोगात् प्रसीदति।।१५.३९।।**

भावलिंग अखंड असते. ते कधी खंडित होत नाही. इष्टलिंग कधी भंग होऊ शकते. वरची कांती किंवा आतले पंचसूत्री लिंग स्थूल असल्यामुळे ते भग्न होण्याची शक्यता असते. परंतु प्राणलिंग अखंड आहे. ते चिद्रूप आहे, ज्ञानरूप आहे. आपल्या हृदयातील ज्ञानालाच प्राणलिंग असे म्हटले जाते. चिद्रूप याचा अर्थ काय? जे स्वयंप्रकाशित ते चित् होय. त्याची प्रचीती येण्यासाठी दुसऱ्या प्रकाशाची आवश्यकता नसते. इष्टलिंग पहाण्यासाठी दीप प्रज्वलित करावा लागतो. परंतु प्राणलिंग पहाण्यासाठी मात्र दीपाची गरज नसते. कारण ते प्रकाशरूप आहे. प्रत्येकाच्या हृदयात ज्योतिस्वरूप प्राणलिंग अखंड प्रकाशते आहे. तरीही त्याचे ज्ञान मात्र आपल्याला नाही. त्याच्याच प्रकाशात आपले सारे व्यवहार चाललेले असतात. आपल्याला व्यवहारासाठी प्रकाशाची गरज असते. दिवसा सूर्यप्रकाशात आणि रात्री दिव्याच्या प्रकाशात आपण सर्व व्यवहार करतो. दिवा विझवून झोपल्यावर आपल्याला स्वप्न पडते. स्वप्नात देखील आपला व्यवहार चालू असतो. त्यावेळी कोणता प्रकाश असतो?

स्वप्नजगतात सूर्याचा, नक्षत्रांचा, चंद्राचा, विद्युल्लतेचा किंवा अग्नीचा प्रकाश नसतो. मग तिथे कोणता प्रकाश असतो? तर शास्त्रे सांगतात– 'अत्रायं पुरुषः स्वयं ज्योतिः।' प्रत्येकाचा आत्मा स्वयंप्रकाशित असतो. आत्म्याला दुसऱ्या प्रकाशाची आवश्यकता नसे. अंधारात आपल्याला दुसऱ्या वस्तू दिसणार नाहीत. परंतु स्वतःच्या अस्तित्वाचे ज्ञान मात्र असतेच. अंधारात बसलेला मनुष्य 'दिवा आणा, मी कोण आहे हे मला पाहू द्या' असे कधी म्हणतो काय? म्हणून आत्मा प्रकाशरूप आहे. ज्योतिस्वरूप आत्म्यालाच 'प्राणलिंग' असे नाव आहे. बोधस्वरूप प्राणलिंगाची पूजा करण्यासाठी आपल्याला डोळे बंद करून बसायला हवे. जे लोक इष्टलिंगाची पूजा करीत नाहीत ते जर डोळे बंद करून बसले तर त्यांना प्राणलिंग सापडणार नाही. त्यांना इष्टलिंग कुठे ठेवले तेच सापडत नाही तर प्राणलिंग कसे सापडणार? प्राणलिंगाचे चिंतन करायचे असेल तर मनोवृत्ती अंतर्मुख करावी लागते.

**मृच्छिलाविहिताल्लिंगाद् भावलिंगं विशिष्यते।**
**निरस्तसर्वदोषत्वाद् ज्ञानमार्गप्रवेशनात्॥१५.४०॥**

इष्टलिंग हे शिलामय लिंग होय. शिला, स्फटिक, नर्मदेतील बाण इत्यादी पासून लिंग निर्माण केले जाते. पाषाणनिर्मित लिंगात भौतिक दृष्टीने काही दोष असू शकेल. परंतु ज्ञानमय लिंगात अर्थात् प्राणलिंगात कोणत्याही प्रकारचा दोष नसतो, ते सर्वस्वी निर्दोष असते. प्राणलिंगार्चन करणारे साधक इष्टलिंगपूजा संक्षेपाने करतात आणि प्राणलिंगार्चनात अधिक काळ घालवतात.

**विहाय बाह्यलिंगानी चिल्लिंग मनसि स्मरन्।**
**पूजयेद् भावपुष्पैर्यो भावलिंगीति कथ्यते॥१५.४१॥**

प्रारंभावस्थेत इष्टलिंगपूजेसाठी अधिक वेळ द्यावा लागतो. बाहेर वाहणारी मनोवृत्ती इष्टलिंगावर केंद्रित करण्याचा अभ्यास करावा लागतो. ती तिथे स्थिर झाली की मग आत वळवता येते. परंतु नंतर मात्र इष्टलिंगपूजेत अधिक वेळ न दवडता साधकाने प्राणलिंगपूजेत अधिक काळ घालवला पाहिजे. प्राणलिंगाला बाह्यद्रव्ये अर्पण करावी लागत नाहीत. भावद्रव्यांनी त्याची पूजा केली जाते. लिंग बाह्य असेल तर त्याच्या पूजेसाठी बाह्य सामग्री लागते. लिंग आत असेल तर त्याच्या पूजेसाठी अंतरंग सामग्री लागते. बाह्यपूजेसाठी अंतरंग सामग्री आणि प्राणलिंगपूजेसाठी बाह्य सामग्री उपयोगी पडत नाही.

एका माणसाला स्वप्न पडले. स्वप्नात त्याला एक महाभयंकर सर्पाने दंश केला. त्यामुळे तो मनुष्य घाबरून किंचाळत उठला, झोपेतून जागा झाला आणि डॉक्टरकडे धावत सुटला. म्हणाला, ''डॉक्टर, मला एक महाभयानक साप चावला आहे. माझ्या सर्वांगात विष चढते आहे. मला ताबडतोब औषध देऊन वाचवा.''

डॉक्टरने त्याला तपासले. तेव्हा त्याच्या अंगावर कुठेही साप चावल्याची निशाणी आढळली नाही. डॉक्टरने विचारले, ''तुमच्या अंगावर तर कुठेही साप चावल्याची खूण नाही. तुम्हाला कोणत्या ठिकाणी साप चावला? घरात की रानात?''

''घरात नाही अन रानात नाही. स्वप्नात चावला.'' त्या मनुष्याने उत्तर दिले.

''स्वप्नात?'', डॉक्टर हसून म्हणाले, ''मग तुम्ही औषध घ्यायला स्वप्नातल्या डॉक्टरकडेच गेले पाहिजे. माझा तुम्हाला काही उपयोग होणार नाही.''

त्याप्रमाणे तुम्हाला प्राणलिंगाची पूजा करायची असेल तर बाह्यसामग्री उपयोगाची नसते. त्याची पूजा

भावनेनेच करावी लागते. जो भावफुलांनी प्राणलिंगाची पूजा करतो तो भावलिंगी म्हणजे प्राणलिंगी होय. प्राणलिंगस्थलातील साधक इष्टलिंगाची पूजा केल्यावर ध्यान करत प्राणलिंगाची पूजा करतात. प्राणलिंग कोठे असते? त्याचे नेमके स्थान सांगायला हवे. नाहीतर त्याचा शोध जन्मभर केला तरी ते सापडणार नाही. म्हणून त्याचे निश्चित स्थान पुढील श्लोकात सांगतात–

**मूलाधारेऽथवा चित्ते भ्रूमध्ये वा सुनिर्मलम्।**
**दीपाकारं यजन् लिंगं भावद्रव्यैः स योगवान्।।१५.४२।।**

आपल्या शरीरात प्राणलिंगाची तीन स्थाने सांगितली आहेत. मूलधारचक्र, हृदय आणि भ्रूमध्य. तुम्ही म्हणाल की यांपैकी कोणत्या ठिकाणी आम्ही प्राणलिंगाला पहावे? तुम्हाला ज्या ठिकाणी शक्य असेल त्या ठिकाणी पहा. काही जणांचे मन मूलाधारात एकाग्र होईल, काहींसे हृदयात, तर काहींचे मन भ्रूमध्यात एकाग्र होईल. कुठल्या तरी एका स्थानी मन स्थिर करण्याचा अभ्यास करावा. अलीकडे फार मोठ्या विहिरी कोणी खोदत नाहीत तर बोअरवेल खोदतात. भूमीच्या पोटात जलस्रोत कुठे आणि कसा वहात आहे याचा नेमका अंदाज भूगर्भशास्त्रज्ञ घेतात आणि एक केंद्र निश्चित करून त्या ठिकाणी बोअरवेल खोदतात. तिथे हमखास पाणी लागते. त्याप्रमाणे आपल्या आचार्यांनी प्राणलिंगाची मूलाधार, हृदय आणि भ्रूमध्य अशी तीन केंद्रे निश्चित केली आहेत. तीनपैकी कुठल्याही एका केंद्रावर आपले मन एकाग्र झाले तर तिथे प्राणलिंगाचा साक्षात्कार होतो. प्राणलिंग हे ज्योतिस्वरूप आहे. ज्योतीच्या आकाराइतकेच इष्टलिंग ज्योतीचे प्रतीक म्हणून आपल्या हातावर दिलेले आहे.

इष्टलिंगपूजा केल्याशिवाय प्राणलिंगाची पूजा करता येणे शक्य नाही. इष्टलिंगपूजनाचा अभ्यास केला तरच ध्यान परिपक्व होते. तुम्ही जेव्हा भात शिजवता तेव्हा एका भांड्यात पाणी घालून तांदूळ घालता आणि मग त्या भांड्याला उष्णता देता. तेव्हा भात तयार होतो. तांदूळ आगीत टाकले तर भात शिजणार नाही. भात शिजवण्यासाठी अग्निसंस्काराची गरज असते. त्याप्रमाणे प्राणलिंगार्चनासाठी दीक्षासंस्काराची आणि इष्टलिंगपूजेची आवश्यकता असते. इष्टलिंगपूजा करता करता तुमचे मन एकाग्र होईल. तुमची पूजेत रती वाढेल. इष्टलिंगाचे सूक्ष्मस्वरूप पहाण्याची इच्छा तुमच्या मनात उत्पन्न होते तेव्हा तुम्हाला प्राणलिंगार्चना सांगितली जाते.

**स्वानुभूतिप्रमाणेन ज्योतिर्लिंगेन संयुतः।**
**शिलामृद्दारुसंभूतं न लिंगं पूजयत्यसौ।।१५.४३।।**

कुणाला मूलाधारात, कुणाला हृदयात, तर कुणाला भ्रूमध्यात प्राणलिंगाचा साक्षात्कार होतो. साक्षात्कारी मनुष्य बाह्यलिंगार्चनेपेक्षा प्राणलिंगार्चनेतच अधिकाधिक काल घालवतो. परंतु तो बाह्यलिंगपूजेचा त्याग मात्र करत नाही. याआधी आचार्यांनी आदेश दिला आहे की तुम्ही ज्ञानी असाल आणि प्राणलिंगार्चना करण्याचे सामर्थ्य तुमच्याकडे असेल तरी धर्माचरण सोडू नये. गुरू आचरण करीत नसेल तर शिष्य करणार नाही. माता-पिता आचरण करीत नसतील तर मुले करणार नाहीत. म्हणून प्राणलिंगार्चनेत अधिक काळ घालवण्याची अधिक प्रवृत्ती असली तरी इष्टलिंगार्चनेसाठी देखील थोडा वेळ दिला पाहिजे. भावलिंगस्थलाचा समारोप करताना ज. रेणुकाचार्य म्हणतात–

**क्रियारूपा तु या पूजा सा ज्ञेया स्वल्पसंविदाम्।**
**आन्तरा भावपूजा तु शिवस्य ज्ञानिनां मता।।१५.४४।।**

सगळेच लोक ज्ञानी नसतात. सगळ्यांची वृत्ती अंतर्मुख नसते. ज्याची वृत्ती बर्हिमुख असते त्याला आपल्या हृदयातील प्राणलिंगाचे ज्ञान नसते. म्हणून त्याने इकडे तिकडे भटकू नये यासाठी त्याच्या शरीरावर लिंगधारण केले जाते. इष्टलिंग पूजा करता करता त्याच्या मनात ज्ञानाचा उदय होतो आणि तो प्राणलिंगार्चनेसाठी प्रवृत्त होतो. इष्टलिंग, प्राणलिंग आणि भावलिंग अशा तिन्ही लिंगांची पूजा वीरशैव साधकाला करावी लागते. ज्यांना प्राणलिंगाचे आणि भावलिंगाचे ज्ञान नसते त्यांच्यासाठी आचार्यांनी इष्टलिंगाचीच तीन वेळा पूजा करावी असे सांगितले आहे. याविषयी यापूर्वी आम्ही सांगितले आहेच. स्नान करून पूजेसाठी आसनावर बसावे. इष्टलिंगाला जलाभिषेक करावा. त्याला भस्म लावावे. संक्षिप्त जप करून लिंगाकारात ठेवावे. ही पहिली पूजा होय. त्यांनतर भस्म-रुद्राक्ष धारण करून इष्टलिंगाची पुन्हा अधिक उपचारांनी पूजा करावी. रुद्राभिषेक करावा, मंत्रजप करून इष्टलिंगावर वाहिलेले बेल-फुलादी निर्माल्याचे अवघ्राण करून ते आदरपूर्वक पात्रात ठेवावे. ही दुसरी पूजा होय. त्यांनतर इष्टलिंगावर पळीने पाणी घालून ते गुरुपादोदक म्हणून प्राशन करावे. दुसऱ्यांदा पाणी घून लिंगपादोदक म्हणून आणि तिसऱ्यांदा पाणी घालून जंगमपादोदक म्हणून प्राशन करावे. लिंगाला भस्म लावून ते वस्त्रासहित लिंगाकारात ठेवावे. ही तिसरी पूजा होय. पहिली पूजा इष्टलिंगाची, दुसरी पूजा प्राणलिंगाची आणि तिसरी पूजा भावलिंगाची असे मानले जाते. याप्रमाणे सर्वांनी आचरण करून धर्मपालन करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे

२५ ऑगस्ट १९९२

---

**आशीर्वचन बाविसावे**

## ज्ञानलिंगस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग-षट्स्थलातील दीक्षागुरू, शिक्षागुरू, ज्ञानगुरू, क्रियालिंग आणि भावलिंग या पाच स्थलांवरची आशीर्वचने तुम्ही ऐकली आहेत. आज ज्ञानलिंगस्थलाचा विचार करायचा आहे. ज्ञानलिंग म्हणजे ज्ञान हेच एक लिंग होय. ज्ञानाने आपण सारे काही जाणणे, हेच ज्ञानलिंग होय. आपल्या आचार्यांनी ज्ञानलिंगाला 'भावलिंग' असेही संबोधले आहे. ज्ञानलिंगाचे (भावलिंगाचे) स्वरूप समजून घेतल्यावर इष्ट, प्राण आणि भाव यांची आराधना पद्धती स्पष्ट होते, पूर्ण होते.

**तद्भावज्ञापकज्ञानं लयं यत्र समश्नुते।**
**तज्ज्ञानलिंगमाख्यातं शिवतत्त्वार्थकोविदैः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.४५)

भावलिंगाचे (प्राणलिंगाचे) ज्ञान ज्या ज्ञानामुळे होते आणि ते ज्ञान ज्या ठिकाणी लय पावते त्याला 'ज्ञानलिंग' म्हणतात. शिवतत्त्व जाणणारे शिवयोगी याला ज्ञानलिंग किंवा तृप्तिलिंग असे म्हणतात.

त्रिमूर्तिभेदनिर्मुक्तं त्रिगुणातीतवैभवम्।
ब्रह्म यद् बोध्यते तत्तु ज्ञानलिंगमुदाहृतम्।।१५.४६।।

ब्रह्मा, विष्णू आणि रुद्र या त्रिमूर्ती असून या भेदापलीकडले, सत्त्व-रज-तम या त्रिगुणांच्या अतीत असे त्याचे वैभव आहे. वैभव देखील तीन प्रकारचे असते. सात्त्विक, राजस आणि तामस. त्याबद्दल तुम्ही मागील आशीर्वचनात ऐकलेलेच आहे. या तिन्ही गुणांच्या पलीकडे परात्पर परब्रह्म आहे. ब्रह्मज्ञानी लोक त्याला 'ब्रह्म' म्हणतात तर वीरशैवाचार्य 'ज्ञानलिंग' म्हणतात.

स्थूले क्रियासमापत्तिः सूक्ष्मे भावस्य सम्भवः।
स्थूलसूक्ष्मपदातीते ज्ञानमेव परात्मनि।।१५.४७।।

क्रियालिंगात म्हणजे इष्टलिंगात सर्व क्रिया विलीन होतात. अर्थात् त्यापेक्षा दुसरी कोणतीही क्रिया श्रेष्ठ नसते. त्याप्रमाणे भावलिंगाला म्हणजे ज्ञानलिंगात आपल्या सर्व भावनांचा लय होतो. लौकिक भावनेपेक्षा शिवभावना ही श्रेष्ठ असते. प्राणलिंगार्चन करताना आपल्या मनात कोणतीही सांसारिक भावना उद्भवत नाही. त्यावेळी केवळ प्राणलिंगाचेच चिंतन सुरू असते. म्हणजेच प्राणलिंगात आपल्या भावनांचा लय झालेला असतो. इष्टलिंग हे स्थूल आहे. प्राणलिंग हे सूक्ष्म आहे. तर ज्ञानलिंग हे स्थूलसूक्ष्मातीत आहे. ज्ञानलिंगाची प्रतीती केवळ ज्ञानानेच होते आणि ते ज्ञान देखील ज्ञानलिंगातच लय पावते. त्यानंतर ज्ञानच मुळी अस्तित्वात रहात नाही.

कल्पितानि हि रूपाणि स्थूलानि परमात्मनः।
सूक्ष्माण्यपि च तैः किं वा परबोधं समाचरेत्।।१५.४८।।

इष्टलिंग, भावलिंग (प्राणलिंग) असे विभाग करून सांगितले आहेत. ते साधकाची अध्यात्ममार्गात उत्तरोत्तर प्रगती व्हावी यासाठी. परब्रह्माची स्थूल आणि सूक्ष्म ही रूपे कल्पित आहेत. म्हणून ज्याला मुक्तीची ओढ आहे, अशा साधकाने स्थूलसूक्ष्मापलीकडे असलेल्या ज्ञानलिंगाचीच उपासना करावी.

परात्परं तु यद् ब्रह्म परमानंदलक्षणम्।
शिवाख्यं ज्ञायते येन ज्ञानलिंगीति कथ्यते।।१५.४९।।

परब्रह्माचे स्वरूप श्रेष्ठतम आहे. परमानंद हे त्याचे लक्षण आहे. त्या परशिवाला जो जाणतो म्हणजे ज्याला त्याचा साक्षात्कार होतो त्याला 'ज्ञानलिंगी' असे म्हणतात. आपल्या शरीरावर इष्टलिंग असते. त्यामुळे इष्टलिंग पाहून इतर लोक आपल्याला 'लिंगधारी' म्हणतात. ज्यांच्या गळ्यात इष्टलिंगच नाही त्यांना काय म्हणावे? तुम्ही यात्रेला गेलात आणि तुमचा मृत्यू झाला तर? होऊ नये, पण झालाच तर? म्हणून यात्रेला एकटे जाऊ नये. पूजा एकट्याने करावी. परंतु यात्रा मात्र चौघांनी करावी. यात्रेत एखाद्याचे बरे वाईट झाले तर इतर तिघे त्याची व्यवस्था तरी करू शकतात. तुम्ही यात्रेला एकटे गेलात, तुमच्या गळ्यात लिंग नसेल आणि तुमचा मृत्यू झाला तर बाकीच्या लोकांनी तुमचे काय करावे? तुम्हाला जाळावे की पुरावे? गळ्यात इष्टलिंग असेल तर लोकांना तुमची ओळख पटते. मग ते स्वामींना बोलावतात आणि त्याची अंत्यक्रिया करतात. अशा कितीतरी घटना घडतात. म्हणून तुम्ही अवश्य लिंगधारण केलें पाहिजे. तुम्हाला प्रथम लिंगी व्हावे लागेल, मग प्राणलिंगी व्हावे लागेल, त्यानंतर तुम्हाला ज्ञानलिंगी (भावलिंगी) व्हावे लागेल. शेवटी आचार्य सांगतात-

**बाह्यक्रियां परित्यज्य चिन्तामपि च मानसीम्।**
**अखण्डज्ञानरूपत्वं यो भजेन्मुक्त एव सः।।१५.५०।।**

इष्टलिंगाची पूजा केल्यानंतर जो प्राणलिंगाचे आणि भावलिंगाचे चिंतन करतो त्याला 'ज्ञानी' म्हणतात. तोच खरा मुक्त होय. ज्यांना ही ज्ञानावस्था प्राप्त झाली त्यांच्यासाठी हे सांगणे आहे. तुमच्यासाठी नाही. तुम्ही काल तर लिंगदीक्षा घेतली आहे आणि आज आमचे प्रवचन ऐकून लिंग गळ्यातून काढून खुंटीला टांगून ठेवाल. 'बरे झाले महाराज! आम्ही मुक्त झालो' असे म्हणाल. कशातून? संसारातून नव्हे तर लिंगपूजेतून. तुम्हाला लिंग दिले आहे ते संसारातून मुक्त होण्यासाठी. म्हणून इष्टलिंगाची नित्यनेमाने पूजा करा. त्याबरोबर प्राणलिंगाचे चिंतन करा आणि शेवटी ज्ञानलिंगाचे चिंतन करीत तुम्ही जेव्हा ज्ञानी व्हाल तेव्हा तुम्हाला संसारातून मुक्ती मिळेल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

कै. भिकुबाई मेनकुदळे मंगल कार्यालय, पुणे
२७ ऑगस्ट १९९२

---

**आशीर्वचन तेविसावे**

## स्वयस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

साधक भक्तस्थलात प्रवेश करून एकेक स्थल पार करीत ऐक्यस्थलात पोहोचतो. ऐक्यस्थलात त्याला लिंगांगसामरस्य प्राप्त होते. परंतु त्यानंतरही त्याचे शरीर जिवंत असल्यामुळे तो जीवन्मुक्त म्हणवला जातो. जीवन्मुक्तीनंतरही त्याची साधना सुरूच असते. त्याची स्थिती कशी असते हे ज. रेणुकाचार्यांनी इथे सांगितले आहे. पहिली स्थिती आहे स्वयस्थल, दुसरी चरस्थल आणि तिसरी परस्थल. याला स्वयस्थिती, चरस्थिती, परस्थिती असेही आपण म्हणू शकतो. यांपैकी पहिले स्थल आहे स्वयस्थल. जीवात्म्याने स्वतःच्याच ठिकाणी असणे याला 'स्वयस्थल' म्हटले जाते. तुम्ही गृहस्थ, वनस्थ, संन्यस्त हे शब्द ऐकले आहेत. घरात राहून जो शास्त्रविहित कर्मांचे आचरण करतो तो गृहस्थ होय. वनात राहून सांसारिक वासनांवर विजय मिळवून जो तपस्या करतो तो वनस्थ होय. सर्वांशी संबंध त्यागून जलातील कमळाप्रमाणे जो अलिप्त राहतो तो संन्यस्त होय. या पलीकडे आणखी एक स्थिती आहे, तिला 'स्वस्थ' असे म्हणतात. 'स्वस्मिन् तिष्ठतीति स्वस्थः' जो आपल्याच ठिकाणी स्थिर असतो, म्हणजे आत्मचिंतनातच मग्न असतो तो स्वस्थ होय. 'स्वस्थ' या शब्दाचा एक सामान्य अर्थ आहे जो शरीराशी संबंधित आहे. दुसरा आध्यात्मिक अर्थ आहे जो आत्म्याशी संबंधित आहे.

तुम्ही स्वस्थ आहात का? असे जेव्हा कुणी आपल्याला विचारतो तेव्हा आपली प्रकृती, आपले आरोग्य बरे आहे काय? असे त्याला विचारायचे असते. सांसारिक किंवा आध्यात्मिक कार्यासाठी शरीरस्वास्थाची आवश्यकता असतेच. तुम्ही स्वस्थ आहात काय? याचा दुसरा अर्थ होतो, तो म्हणजे तुम्ही आत्मस्वरूपात स्थिर आहात काय? आपला 'स्व' विसरून दुसऱ्या वस्तूत तर स्थिर झाला नाहीत ना? व्यवहारात आपण पाहतो

की माणूस एकांतवासात फार काळ राहू शकत नाही. त्याला दुसऱ्या माणसाच्या सहवासाची ओढ असते. सुखानुभवासाठी त्याला दुसऱ्या व्यक्तीची गरज भासते. ज्ञानेंद्रियांच्या सहाय्याने सुखानुभव घेण्याचाच तो प्रयत्न करीत असतो. जेव्हा आपले मन दुसऱ्या वस्तूशी एकरूप होते त्यावेळी आपण 'स्वस्थ' नसतो, त्यावेळी तुम्ही तुमच्या शरीरात नसता तर त्या वस्तूमध्ये असता. आपले शरीर कोठे आहे याला फारसे महत्त्व नसते. आपले मन कोठे आहे याला अधिक महत्त्व असते. ज्याच्या मनात विषयांचे चिंतन चालू असते तो मनुष्य बद्ध असतो आणि ज्याचे मन निर्विषय होऊन आत्मचिंतनात मग्न असते तो मनुष्य मुक्त असतो.

सामान्यत: मनुष्याची मनोवृत्ती बहिर्मुख असते. ती मोठ्या प्रयासाने अंतर्मुख करावी लागते. आपण जशी बाह्ययात्रा करतो तशीच अंतर्यात्रा देखील करण्याची आवश्यकता असते. तीर्थयात्रेच्या निमित्ताने तुम्ही घर सोडून जेव्हा बाहेर पडता तेव्हा एक प्रकारे गृहत्याग करून वनवास भोगायचाच अनुभव तुम्ही घेत असता. तीर्थक्षेत्रात तुम्ही एक दिवस जरी अनुष्ठान केले तरी घरात राहून वर्षभर केलेल्या अनुष्ठानाइतके फळ प्राप्त होते. वर्षातून एक दोनदा तरी तीर्थयात्रा घडावी. ही झाली बाह्ययात्रा. ही सोपी आहे. परंतु यापेक्षाही अवघड यात्रा आहे, अंतर्यात्रा. अमरनाथाचे दर्शन घेऊन येणे ही एक कठीण यात्रा आहे, परंतु त्यापेक्षाही मनोवृत्ती अंतर्मुख करून अंतरात्म्यापर्यंत जाणे ही अवघड यात्रा आहे. स्वयस्थलातील साधकाने अंतर्यात्रा करण्याची पूर्ण तयारी केलेली असते. 'स्व' मध्ये रममाण होण्याचा त्याचा स्वभाव बनलेला असतो. त्याच्याविषयी येथे सांगतात–

**स्वच्छन्दाचारसंतुष्टो ज्योतिर्लिंगपरायण:।**
**आत्मस्थसकलाकार: स्वाभिधो मुनिसत्तम:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.५२)

स्वयस्थलातील साधक स्वच्छंदाचारसंतुष्ट असतो. मनात येईल तसे तो वर्तन करतो. त्याच्या मनात जे येते ते शास्त्रविहितच असते. शास्त्रात सांगितलेले आचार तरी कसे निर्माण झाले आहेत? उच्चकोटीतले सिद्ध-साधक जे वर्तन करतात तेच शास्त्रांनी सामान्यांसाठी आचार म्हणून सांगितले आहेत. म्हणून त्याचा स्वच्छंदाचार हा स्वैराचार नसतो. त्याला दुसऱ्याच्या उपदेशाची गरज नसते, एवढाच त्याचा अर्थ. आपण शास्त्रविहित मार्गाने चालत नसतो. म्हणून आपल्याला दुसऱ्याच्या उपदेशाची गरज असते.

तो ज्योतिर्लिंगपरायण म्हणजेच ज्योतिर्लिंगात तल्लीन असतो. ज्योतिर्लिंग हा शब्द उच्चारला की तुम्हाला बारा ज्योतिर्लिंगाचे स्मरण होते. आपल्या अंतरंगात देखील एक ज्योतिर्लिंग असते. प्रत्येक मनुष्याच्या मूलाधारचक्रात, हृदयात, भ्रूमध्यात ज्योतिर्लिंगाचे वास्तव्य असते, हे तुम्ही ऐकलेच आहे. जे साधना करतात त्यांना ज्योतिर्लिंगाचा साक्षात्कार होतो. वीरशैव साधकाने इष्टलिंगार्चन करता करता प्राणलिंगार्चन देखील केले पाहिजे. या विषयी प्राणलिंगिस्थलात विस्तारपूर्वक विवेचन आलेले आहे. स्वयस्थलातील साधक अंतर्मुख असल्यामुळे त्याची प्रवृत्ती इष्टलिंगपूजेपेक्षा प्राणलिंगाच्या चिंतनाकडे अधिक असते. तो सारे विश्व आपल्या आत्म्याच्या ठिकाणीच पाहतो. त्याला जे काही दिसते त्याकडे तो आत्मदृष्टीने पहातो. असाच साधक मुनिश्रेष्ठ होय.

जो मौन धारण करतो तो मुनी. मनात कोणत्याही इच्छेचा उदय न होणे हे खरे मौन होय. बोलणे बंद आहे परंतु मनात मात्र इच्छेच्या वावटळी उठल्या आहेत, असे मौन हे खरे मौन नव्हे. स्वयस्थलातील साधक मात्र खरा मुनी असतो. तो आत्मानंदात रममाण असतो. खरा आनंद आत्म्याच्याच ठिकाणी असतो. विषयांशी जेव्हा

आपले मन एकाग्र होते, त्यावेळी विषयांपासून आनंद मिळतो असे आपल्याला भासते. परंतु तो आनंद देखील आत्म्यातूनच आलेला असतो. सुषुप्ति-अवस्थेत म्हणजे गाढ निद्रेत मिळणारा आनंद देखील आत्मानंदाचाच एक अंश असतो. जेवढा काळ आपण गाढ निद्रेत असतो तेवढा काळ आपण अखंडपणे आनंद अनुभवत असतो. या काळात तिथे आपल्या शिवाय दुसरे कुणीही नसते. यावरून आनंदानुभवासाठी दुसरी व्यक्ती अथवा वस्तू याची गरज नसते, हे सिद्ध होते. सुषुप्तिअवस्था ही मुक्तिसुखाचा एक नमुना आहे. स्वप्नविरहित गाढ निद्रेत प्रत्येक मनुष्य शिवरूपच असतो असे शंकराचार्य म्हणतात. सुषुप्ति-अवस्था आपल्या अधीन नाही. आपल्याला हवी तेव्हा ती प्राप्त होत नाही. परंतु आपल्याला पाहिजे त्यावेळी आत्मानंदाचा लाभ ज्यामध्ये मिळतो ती 'स्वस्थावस्था' होय. हेच स्वयस्थल होय. त्यासाठी प्रत्येक मनुष्याने सांसारिक विषयांचा त्याग करून आत्मचिंतन करण्याचा प्रयत्न करावा. ही अवस्था प्राप्त करण्यासाठी अनुष्ठान केले जाते. म्हणून प्रत्येकाने ही अवस्था प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२० जुलै १९९३

---

## आशीर्वचन चोविसावे

# स्वयस्थल-२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

स्वेच्छेने वर्तन करणारा, इष्टलिंगार्चनापेक्षा प्राणलिंगार्चनाकडे अधिक प्रवृत्ती असलेला, विश्वाला आत्मरूपात पहाणारा जो मुनिश्रेष्ठ आहे तो स्वयस्थलातील साधक होय. त्याच्याविषयी येथे सांगतात-

**निर्ममो निरहंकारो निरस्तक्लेशपंचकः।**
**भिक्षाशी समबुद्धिश्च मुक्तप्रायो मुनिर्भवेत्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.५३)

तो निर्मम आणि निरहंकार असतो. म्हणजे त्याच्या ठिकाणी ममत्व आणि अहंकार नसतो. अहंकार आणि ममत्व यांचा या आधी आपण बराच विचार केला आहे. जोपर्यंत मनुष्याचा अहंकार आणि ममत्व नष्ट होत नाही तोपर्यंत त्याला मुक्ती मिळत नाही. 'मी' आणि 'माझे' असे शब्दप्रयोग करून देखील तो अहंकार-ममत्वापासून मुक्त असतो. या जीवनकलेचे नाव 'शिवयोग' आहे. कर्तृत्वभावनेने केलेली कर्मे मनुष्याला संसारबंधनात पाडतात तर अभिनेतृत्वभावनेने केलेली कर्मे त्याला संसारातून मुक्त करतात. नाटकात काम करणारा नट केवळ अभिनय करत असतो. अशा भावनेने जर आपल्या हातून कर्मे घडली तर त्या बंधनात आपण पडणार नाही. नाटकातल्या सुखदुःखाचा अभिनेत्याच्या खऱ्या जीवनाशी संबंध नसतो. परंतु त्याचा अभिनय पाहून मात्र प्रेक्षक सुखानुभव किंवा दुःखानुभव घेतात. जग ही एक रंगभूमी आहे आणि ईश्वराने प्रत्येकाला आपापल्या भूमिका वठवण्यासाठी पाठवले आहे, अशी दृढ भावना ज्याच्या मनात असते तो सारे करून अकर्ता असतो, सारे भोगून अभोक्ता असतो. स्वयस्थलातील साधकाचे वर्तन या प्रकारचे असते. त्याची कर्मे अभिनेतृत्वभावनेने होत असतात. अहंकार आणि

आत्मा हे सर्वस्वी भिन्न आहेत याची त्याला जाणीव असते. तो आत्मरूपात रमलेला असल्यामुळे त्याच्या ठिकाणी अहंकार रहात नाही आणि संपूर्ण विश्व हे ईश्वराचे आहे हे ज्ञान त्याला असल्यामुळे प्रपंचातल्या कोणत्याही पदार्थांविषयी त्याला ममत्व वाटत नाही. आपण काही सांसारिक वस्तू गोळा करून त्याविषयी ममत्व बाळगतो. 'हे माझे आहे' असे म्हणतो. परंतु हे ममत्व कुठपर्यंत टिकते? आपल्या शरीराचा प्राण आहे तोपर्यंतच. ज्याक्षणी तुमच्या देहातून प्राण निघून जाईल त्याक्षणी जे तुमचे होते तेच तुम्हाला परके होईल. हे व्यावहारिक जगातले सत्य आहे. एखादी वस्तू आपल्या मालकीची असते तोपर्यंत तिच्याविषयी आपल्या मनात ममत्व असते. जेव्हा ती वस्तू आपण विकतो तेव्हा तिच्यावरील ममत्व नष्ट होते. मेल्यानंतर ममत्व संपणारच असते, तर आधीच त्याचा त्याग कशाला करायचा? असा प्रश्न तुम्हाला पडेल. परंतु हे अज्ञान होय. मृत्यू पावल्यानंतर अज्ञानी माणसाचे सारे संबंध सुटतात, परंतु ज्ञानी माणूस त्याच्यासारखा वागत नाही. तो जिवंतपणीच ममत्वाचा त्याग करतो. म्हणून तो 'स्वस्थ' असतो.

तो क्लेशापासून मुक्त असतो. क्लेश पाच प्रकारचे आहेत. ज्याच्यामुळे मनुष्याला दुःख भोगावे लागते त्याला 'क्लेश' म्हणतात. आपल्याला दुःख देणाऱ्या असंख्य गोष्टी प्रपंचात आहेत. परंतु त्यांची वर्गवारी करून शास्त्रकारांनी पाच प्रकार केले आहेत. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश. अविद्या म्हणजे अज्ञान. एखाद्या अंधाऱ्या खोलीत जाताना मनुष्य तसाच जात नाही तर दिवा घेऊन जातो. अंधार माणसाला भयभीत करून दुःख देतो. मग अनादिकालापासून आपल्या हृदयात दाटलेला अज्ञानाचा अंधःकार दुःख देणारच. अविद्या दुःख कशी देते? तर अनित्य, अशुची, दुःख आणि अनात्म यांच्यामध्ये विपरीत बुद्धी देऊन ती आपल्याला दुःख देते. अनित्य वस्तूत नित्यबुद्धी निर्माण करून, अशुचीमध्ये शुचित्व दाखवून, दुःखात सुखाचा आभास देऊन आणि अनात्म पदार्थात आत्मबुद्धी दृढ करून ती दुःख देत असते.

भूत, वर्तमान, भविष्य या काळांत जी वस्तू अस्तित्वात असते ती नित्य होय. परंतु प्रपंचातील प्रत्येक वस्तू अनित्य आहे. दहा वर्षांपूर्वी तुम्ही जसे होता तसे आज नसता. प्रत्येक व्यक्तीत आणि वस्तूत क्षणाक्षणाला सूक्ष्म परिवर्तन होत असते. आपले शरीर देखील अनित्य आहे. या सर्व अनित्य वस्तूंत मनुष्याची नित्यबुद्धी असते. म्हणून त्या वस्तू जेव्हा नाश पावतात तेव्हा त्याला दुःख होते. शरीर अनित्य आहे ही जाणीव असेल तर मात्र मनुष्य दुःखी होत नाही. याप्रमाणे अनित्य वस्तूत नित्यबुद्धी उत्पन्न करून अविद्या आपल्याला दुःख देते. त्यानंतर अशुचीमध्ये शुचित्वभावना निर्माण करून ती दुःख देते. शरीर मलमूत्राने भरलेले आणि स्वभावतः दुर्गंध असलेले आहे. शरीरावर घातलेले स्वच्छ कपडे देखील शरीराच्या संगतीने मलिन होतात. जन्मापासून ते मृत्यूपर्यंत शरीर अशुची, अपवित्र असते. अपवित्र शरीराचे कोडकौतुक करण्यात आपण विनाकारण वेळ दवडला, असे मरताना माणसाच्या लक्षात येते. त्यामुळे तो दुःखी होतो. याप्रकारे अशुची शरीरात शुचिभावना उत्पन्न करून अविद्या मनुष्याला दुःख देत असते.

जे दुःखरूप आहे त्याला सुखरूप मानणे ही देखील अविद्या होय. शब्द, स्पर्श आदी विषयांच्या द्वारा मनुष्याला सुख भोगायचे असते. विषय जेव्हा अनुकूल असतात तेव्हा त्याला सुख मिळते आणि विषय जेव्हा प्रतिकूल होतात तेव्हा त्याला दुःख होते. आज जे अनुकूल आहे ते उद्या प्रतिकूल होईल आणि पुन्हा दुःखाला सामोर जावे लागेल. सुख पदार्थात नसते, तो पदार्थ तुम्हाला अनुकूल असेल तर सुख मिळते आणि प्रतिकूल असेल तर दुःख मिळते. स्वेटर हिवाळ्यात अंगात घातला तर सुख देतो आणि उन्हाळ्यात अंगात घातला तर

दुःख देतो. विषय हे दुःखदायक आहेत. परंतु त्यांच्या ठिकाणी सुखाचा भ्रम दाखवून अविद्या आपल्याला दुःख देत असते. अनात्मा पदार्थात आत्मभावना निर्माण करून अविद्या माणसाला दुःख देत असते. सामान्य माणसे शरीरालाच आत्मा मानतात. परंतु शरीर म्हणजे आत्मा नव्हे. शरीर आत्म्याचे घर आहे. आपण घरात रहातो पण आपण घर नव्हे. आपण शरीरावर कपडे धारण करतो, परंतु कपडे म्हणजे शरीर नव्हे. याप्रमाणे शरीरात आपण राहतो. परंतु आपण शरीर नव्हे. जे शरीराला आत्मा मानतात त्यांना दुःखच दुःख भोगावे लागते. याप्रमाणे अविद्या एक असली तरी ती अनित्य पदार्थात नित्यबुद्धी, अशुचीमध्ये शुचिबुद्धी, दुःखात सुखबुद्धी आणि अनात्म पदार्थात आत्मबुद्धी निर्माण करून मनुष्याला दुःख देत असते.

पंचक्लेशांमधील 'अविद्या' हा पहिला क्लेश असून तो चार प्रकारचे माणसाला दुःख देतो. अविद्याच दुःखाचे मूळ कारण आहे. सर्व क्लेशांचे मूळ आहे. क्लेशांपासून मुक्ती हवी असेल तर सर्वप्रथम अविद्येचा नाश करावा लागतो. शिवध्यान, शिवचिंतन आपल्याला अविद्येपासून मुक्ती देतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

२२ जुलै १९९३

---

## आशीर्वचन पंचविसावे

## स्वयस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

पंचक्लेशांपैकी अविद्या या पहिल्या क्लेशाचे स्वरूप आपण समजावून घेतले आहे. अस्मिता हा दुसरला क्लेश होय. अभिमान, अहंकार हा अस्मितेचा सामान्य अर्थ आहे. मी आहे, मी जातो, मी खातो या विधानातील 'मी' म्हणजे अस्मिता. 'अहम्' या शब्दात सामाय अहंकार आणि आत्म्याचा अहम् समाविष्ट आहे. 'अहं ब्रह्मास्मि'– मी ब्रह्म आहे– या ज्ञानी पुरुषाच्या उद्गारात देखील 'अहम्' आहे. अज्ञानी माणसे शरीराला आत्मा समजून अहम् हा शब्दप्रयोग करतात. मी पहातो, मी चालतो असे म्हणताना आपण स्वतःला शरीर समजत असतो. 'माझे डोळे पहातात, माझे पाय चालतात' असे आपण म्हणत नाही. आत्मा शरीरापासून भिन्न आहे याची जाणीव न ठेवता शरीर आणि उंद्रियांशी तादात्म्य होऊन अज्ञानी मनुष्य व्यवहार करतो. परंतु जेव्हा ज्ञानी मनुष्य 'अहम् ब्रह्मास्मि' असे म्हणतो तेव्हा तो स्वतःला आत्मा समजत असतो. 'मी आत्मा आहे' या जाणिवेने मनुष्याला सुख प्राप्त होते तर 'मी शरीर आहे' या अहंकारामुळे तो दुःखी होतो. दुःख देणाऱ्या अहंकारालाच 'अस्मिता' म्हणतात. व्यवहारात जर 'माझे डोळे पहातात, माझे पाय चालतात' असा शब्दप्रयोग केला तर लोक तुम्हाला वेड्यात काढतील. म्हणून बोलण्यामध्ये व्यावहारिपकण असावे, परंतु भावनेत अद्वैत असावे. ज्ञानी मनुष्य स्वतःला अहंकारापासून दूर ठेवतो आणि शरीराकडून घडणाऱ्या कोणत्याही कर्माचे कर्तृत्व स्वतःच्या शिरावर घेत नाही. त्यामुळे त्याला अस्मितेचा स्पर्श होऊन तो दुःखी होत नाही.

'राग' हा तिसरा क्लेश होय. 'सुखानुशयी रागः' सुख आणि सुखांच्या साधनांविषयी मनात उत्पन्न होणारी

इच्छा म्हणजे राग होय. जीवाला जन्म-मरणाच्या चक्रात 'रागा'मुळेच भ्रमावे लागते. संसाराचे मूळ कारण 'राग'च होय. तुम्ही श्रीखंड खाल्ले तर तुम्हाला सुख मिळते. त्यावेळी तुमच्या मनात राग उत्पन्न होतो. तुम्हाला पुन्हा श्रीखंड खावेसे वाटते. सुख मिळवण्याची आणि ज्यामुळे सुख मिळाले ती वस्तू मिळवण्याची इच्छा हाच राग होय. ''द्वेष' हा चौथा क्लेश होय. दुःख आणि दुःख देणारी साधने यांच्याविषयी मनात असलेली अनिच्छा म्हणजे द्वेष होय. प्रत्येकाला दुःख होऊ नये असेच वाटते. पण सुख हवे असते. दुःख आणि दुःखविषयक साधनांबद्दल असलेया क्रोधभावनेला 'द्वेष' म्हणतात. द्वेषामुळे माणसाला दुःखच होते. ज्या वस्तूबद्दल प्रथम 'राग' वाटतो कालांतराने त्याच वस्तूबद्दल द्वेष उत्पन्न होतो. राग आणि द्वेष या एकाच नाण्याच्या दोन बाजू होत.

'अभिनिवेश' हा पाचवा क्लेश होय. अभिनिवेश म्हणजे एक प्रकारचा हट्ट. मनुष्याला मृत्यूचे भय वाटते. परंतु या जन्मात तर तो मेलेला नसतो. मग त्याला मृत्युभय का वाटावे? याचे एकमात्र कारण असे की, गेल्या अनेक जन्मांत त्याने मृत्युसमयी होणाऱ्या कष्टांचा अनुभव घेतलेला असतो. त्यामुळे त्याच्या मनावर मृत्यूच्या दुःखाचा संस्कार उमटलेला आहे. या संस्कारामुळेच मनुष्याला मरणाबद्दल भीती वाटते. ही भीती म्हणजेच 'अभिनिवेश' होय. याप्रमाणे अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश या पाच क्लेशांमुळेच मनुष्याला अत्यंत दुःख भोगावे लागते. परंतु स्वयस्थलातील साधक मात्र पंचक्लेशांपासून अलिप्त असल्यामुळे त्याला दुःख भोगावे लागत नाही. तो भिक्षान्नावर निर्वाह करतो. भिक्षा याचा अर्थ दारोदारी जाऊन अन्न मागणे एवढाच मर्यादित नाही. आपल्या घरी शिजवलेले अन्न देवासमोर ठेवून ते भगवती अन्नपूर्णेला मागणे हे भिक्षान्नच होय. आपल्या ठिकाणचे ममत्व जावे यासाठी साधकाने भिक्षान्नावर निर्वाह करावा. स्वयस्थलातील साधकाजवळ समबुद्धी असते. बुद्धीत विषमता व्यापून राहते. परंतु स्वयस्थलातील साधक सुख असो वा दुःख, मान असो वा अपमान, या द्वंद्वांत देखील स्थिर बुद्धीने रहातो.

समबुद्धी प्राप्त करून घेण्यासाठी प्रयत्न करावे लागतात. संसार विषम असला तरी परमात्मा मात्र सम आहे. शरीरे वेगवेगळी दिसत असली तरी त्यांच्यातील आत्मतत्त्व मात्र एकच असते. घरे भिन्न भिन्न असले तरी त्यांच्यातले आकाश मात्र एकच आहे. विषमता बहिरंगात असते, समता अंतरंगात असते. ज्याच्या मनात विषम-संसाराचे चिंतन चालू असते त्याची बुद्धी विषम असते. जो सम-परमात्म्याचे चिंतन करतो त्याच्या बुद्धीत समता बाणते. व्यवहारात समता आणि विषमता या शब्दांना वेगळे अर्थ आहेत. आर्थिक समता-विषमता, सामाजिक समता-विषमता इत्यादी. इथे मात्र जो संसारातील पदार्थांना भिन्न भिन्न मानतो त्याची विषम दृष्टी आणि ज्याला प्रत्येक व्यक्तीमधील, वस्तूमधील आत्म्याचा साक्षात्कार होतो त्याची समदृष्टी असे अर्थ अभिप्रेत आहेत. अशा समदृष्टीचा साधक देहात राहून देखील, प्रपंचातील सर्व व्यवहार करून देखील मुक्तच असतो.

**यदृच्छालाभसंतुष्टो भस्मनिष्ठो जितेंद्रियः।**
**समवृत्तिर्भवेद् योगी भिक्षुके वा नृपेऽथवा॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणि, १५.५४)

स्वयस्थलातील साधक सहज जो लाभ होतो त्यात संतोष मानतो. ज्ञानी मनुष्याच्या दृष्टीने आणि धंदेवाईक माणसाच्या दृष्टीने लाभ भिन्न भिन्न असतात. कमी असो की अधिक, लाभ हा लाभच असतो. सांसारिक मनुष्याला कमी लाभ नको असतो. त्याला अधिकाधिक लाभ हवा असतो. एखादा व्यापारी माल खरेदी करून विकतो. माल विकून ऐक लाख रुपये नफा मिळेल असा त्याचा अंदाज असतो. परंतु जर त्याला पन्नास हजार

रुपये नफा झाला तर तो कष्टी होतो. पन्नास हजरांचे नुकसान झाले असे त्याला वाटते. ही त्याची स्वतःची विचारपद्धती असते. वास्तविक त्याला पन्नास हजार रुपये नफा मिळालेला असतो. परंतु त्याची अपेक्षा अधिक असल्यामुळे त्याला तो तोटा वाटतो. ज्ञानी आणि सामन्य माणूस यांच्या बुद्धीमध्ये असेच अंतर असते. ज्ञानी माणूस थोड्या लाभला देखील लाभ समजतो आणि अज्ञानी माणूस मोठ्या लाभाला देखील तोटा समजतो. म्हणून जेवढे मिळेल त्यात समाधान मानले तर सुख मिळते. अन्यथा दुःख वाट्याला येते. अल्पसंतुष्ट मनुष्य सदैव आनंदी असतो आणि असंतुष्ट मनुष्य सदैव दुःखी असतो.

स्वयस्थलातील साधक भस्मनिष्ठ असतो. भस्माचे दोन अर्थ आहेत. शुद्ध गोमयापासून निर्मिलेले भस्म आपण सर्वांगावर धारण करतो ते भस्म होय. भस्माचा दुसरा अर्थ आहे – भस्मज्योती. भस्मज्योती म्हणजे परिपूर्ण परमात्मा. तो देहावर भस्मधारण करतो आणि अंतरंगात भस्मज्योतीचे म्हणजे परमात्म्याचे चिंतन करतो. म्हणूत तो भस्मनिष्ठ होय. तो जितेंद्रिय असतो. इंद्रियांनी विषयांचा भोग घेतला तर दुःख भोगावे लागते याची त्याला जाणीव असते. म्हणून तो विवेकाने आपल्या इंद्रियांवर नियंत्रण ठेवतो. भिक्षान्न मागणारा भिक्षुक असो की राज्य करणारा राजा असो, दोघांशी तो समत्ववृत्तीने वागतो. एक भिक्षुक झाला आणि एक राजा झाला हा कर्माचा खेळ आहे, हे तो जाणतो. एकच परमात्मा दोघांच्याही अंतर्यामी नांदतो या सत्याचे त्याला ज्ञान असल्यामुळे तो दोघांशी समतेने वागतो.

**पश्यन् सर्वाणि भूतानि संसारस्थानि सर्वशः।**
**स्मयमानः परानन्दे लीनात्मा वर्तते सुधीः॥१५.५५॥**

संसारातील सर्व प्राणिमात्रांना तो परमात्म्यापेक्षा भिन्न मानत नाही. कारण परमात्माच असंख्य शरीरांत जीवात्म्याच्या रूपाने विद्यमान आहे, याचे त्याला ज्ञान असते. तो परानंदात लीन असतो. परानंद म्हणजे सर्वश्रेष्ठ आनंद. उपाधीमुळे मिळणारा आनंद हा अपर–आनंद होय. तर उपाधी नसताना मिळणारा आनंद हा पर–आनंद होय. विषयांपासून मिळणारा आनंद हा अपर–आनंद. भगवच्चिंतनामुळे मिळणारा आनंद हा परानंद. तो परमानंदात लीन होऊन रहातो. अशा स्वयस्थलातील साधकाला काय हवे असते. ते सांगतात–

**ध्यानं शैवं तथा ज्ञानं भिक्षा चैकान्तशीलता।**
**यतेश्चत्वारि कर्माणि न पंचममिहेष्यते॥१५.५६॥**

त्याला चार गोष्टी हव्या असतात. शिवचिंतन करणे, शिवाचे ज्ञान मिळवणे, भिक्षेवर उदरनिर्वाह करणे आणि एकान्तात वास्तव्य करणे या चार गोष्टीच स्वयस्थलातील साधकाला हव्या असतात. याशिवाय त्याला आणखी काही नको असते. सामान्य माणूस एकान्तात फार काळ बसू शकत नाही तर ज्ञानी पुरुष फार काळ लोकान्तात राहू शकत नाहीत. अंतर्मुख वृत्तीच्या मनुष्याला एकान्तवासाची ओढ असते तर बर्हिमुख वृत्तीच्या माणसाला लोकान्तात रहाण्याचे वेड असते. ज्याला ज्ञानाची आणि ध्यानाची आवड असते त्यांनाच एकान्ताची ओढ असते. स्वयस्थलातील साधकाची जी लक्षणे आपण पाहिली ती केवळ श्रवणाचा विषय राहू नये, तर आचरणाचा विषय व्हावा. जो अभ्यास करतो त्याला प्रत्येक गोष्ट साध्य होते. म्हणून प्रत्येकाने स्वयस्थलातील साधकाची लक्षणे अंगी बाणवायचा अभ्यास करावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२३ जुलै १९९३

## चरस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

स्वयस्थलातील साधक आत्मज्ञानी होऊन जेव्हा सर्वत्र संचार करतो तेव्हा त्याला 'चरस्थली' म्हणतात. पाण्याने वाहत रहावे आणि साधूने चालत रहावे, अशी म्हण आहे. वाहणारे पाणी स्वच्छ असते आणि प्यायला योग्य असते. त्याप्रमाणे लोकांचे अज्ञान दूर करण्यासाठी ज्ञानी पुरुषाला सर्वत्र संचार करावा लागतो. एखाद्या विशिष्ट स्थानाबद्दल त्याच्या मनात ममत्व नसते. ज्ञानी पुरुषाबद्दल छांदोग्योपनिषदात वर्णन आले आहे-

**आत्मरतिः आत्मक्रीडः आत्ममिथुनः आत्मानंदः।**

त्याची आपल्या आत्म्यावरच प्रीती असते, तो आत्म्याशीच क्रीडा करतो, आत्म्याशीच रत होतो आणि आत्मानंदात निमग्न असतो. एखाद्या चक्रवर्ती सम्राटाप्रमाणे ता सार्वभौम असतो. त्याच्यावर कोणाचेही शासन चालत नाही. अध्यात्मक्षेत्रात आत्मज्ञानी पुरुषच चक्रवर्ती असतो. तो जिथे राहील तिथे आपल्या इच्छेप्रमाणे वागतो. वातुलोत्तर-आगमात म्हटले आहे-

**स्वयमेव स्वयं भूत्वा चरतीति चरः स्मृतः।**

आत्मानंदात मग्न होऊन जो सर्वत्र भ्रमण करतो त्याला 'चर' म्हणतात. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त हेच पुढील श्लोकात सांगितले आहे-

**स्वरूपज्ञानसम्पन्नो ध्वस्ताहंममताकृतिः।**
**स्वयमेव स्वयं भूत्वा चरतीति चराभिधः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.५७)

आपल्याला बाह्यज्ञान खूप असते. परंतु स्व-रूपज्ञान मुळीच नसते. तू खरा कोण आहेस? असा प्रश्न कुणी विचारला तर उत्तर देणे कठीण जाते. तुम्ही उत्तर दिलेच तर ते तुमच्या शरीराशी संबंधित असते. नाव, गाव इत्यादी. लौकिक दृष्टीने हे बरोबर असले तरी आध्यात्मिक दृष्टीने बरोबर नाही. 'मी आत्मा आहे' असे उत्तर तुम्ही दिले तर ती पोपटपंची ठरेल. कारण तुम्हाला तुमच्या स्व-रूपाचा-आत्म्याचा-साक्षात्कार झालेला नसतो. परंतु चरस्थलातील साधक आत्मज्ञानी असल्यामुळे त्याला स्व-रूपाचे ज्ञान असते. अहंता आणि ममता यांच्यापासून तो मुक्त असतो. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, अहंकार या सर्वांपेक्षा विलक्षण असलेला आत्मा म्हणजे 'मी' आहे त्याचा त्याला साक्षत्कार झालेला असल्यामुळे शरीरादीवर त्याचे ममत्व नसते. मग शरीराशी संबंधित वस्तूंवर आणि व्यक्तींवर कसे असेल? तो कुणाला सोबत न घेता एकटाच भ्रमण करतो. म्हणून त्याला 'चर' असे नाव दिले आहे.

**कामक्रोधादिनिर्मुक्तः शांतिदांतिसमन्वितः।**
**समबुद्ध्या चरेद् योगी सर्वत्र शिवबुद्धिमान्।।१५.५८।।**

शांती म्हणजे शम आणि दांती म्हणजे दम. शम-दम म्हणजे अंतरिंद्रियांचा आणि बाह्येंद्रियांचा निग्रह. मन जे मागेल ते द्यायचा प्रयत्न केला तर असंख्य दुःखाना सामोरे जावे लागेल. त्यामुळे इंद्रिये भरकटत जातात. मन

जे मागेल त्याने आपण सुखी होणार की दु:खी, याचा विवेक केला तर इंद्रियांचा निग्रह होतो. विवेक नसेल तर इंद्रियांचा निग्रह होणे अशक्य. म्हणून अंतरिंद्रियांचा आणि बाह्येंद्रियांचा साधकाने निग्रह करावा. चरस्थलातील साधकाच्या मनात कोणतीही इच्छा उद्‌भवत नाही आणि विषय पाहिला तरी त्याची इंद्रिये त्यावर आसक्त होत नाहीत. त्याच्या मनात कामना नसल्यामुळे त्याला क्रोध येत नाही. गीतेत मनुष्याच्या अध:पतनाचे टप्पे सांगितले आहेत. मनात प्रथम संकल्प उत्पन्न होतो, मग इच्छा उत्पन्न होते. त्यातून काम, कामातून क्रोध, क्रोधातून मोह. मोहामुळे बुद्धिभ्रंश होतो आणि बुद्धिभ्रंशामुळे विनाश होतो. वस्तू किंवा व्यक्तीवरील असेलेला कामच पुढे क्रोधाचे रूप घेतो. मनात संकल्पच उद्‌भवला नाही तर पुढला अनर्थ टळतो. संकल्प असावा परंतु तो विषयभोगाचा नव्हे, तर जगत्‌कल्याणाचा. कामक्रोधाचा समूळ त्याग करावा. काम, क्रोध आणि लोभ हे शरीरात रहाणारे चोरच होत. ते ज्ञानरत्नाचे अपहरण करतात. म्हणून प्रत्येकाने जागे राहिले पाहिजे. कामक्रोधादी विकारांमुळे मनुष्य आपली विवेकशक्ती गमावून बसतो. म्हणून त्यांच्यापासून ज्ञानी पुरुष दूर रहातो. चरस्थलातील साधक सर्व विश्वाला शिवरूपात पाहतो. ज्याला आपल्या हृदयात शिव दिसतो त्याला विश्वात सर्वत्र शिव दिसू लागतो. तुम्ही डोळ्यावर लाल रंगाचा चष्मा घातला तर तुम्हाला सारी सृष्टी लाल दिसू लागते त्याप्रमाणे.

**इदं मुख्यमिदं हीनमिति चिन्तामकल्पयन्।**
**सर्वत्र संचरेद् योगी सर्वं ब्रह्मेति भावयन्।।१५.५९।।**

ही वस्तू श्रेष्ठ, ही वस्तू कनिष्ठ अशी भावना त्याच्या मनात नसते. ज्याची बुद्धी जड असते त्याला प्रपंचात सगळीकडे श्रेष्ठ-कनिष्ठ, लहान-मोठे असे भेद दिसतात. परंतु ज्याची बुद्धी चेतन असते त्याला मात्र हे भेद दिसत नाहीत. सर्व जग ब्रह्ममयच आहे अशा वृत्तीने तो सर्वत्र संचार करीत असतो.

**न सम्मानेषु सम्प्रीतिं नावमानेषु च व्यथाम्।**
**कुर्वाणः संचरेद् योगी कूटस्थे स्वात्मनि स्थितः।।१५.६०।।**

जो सर्वत्र भ्रमण करतो त्याला मान-अपमान सहन करण्याची तयारी ठेवावी लागते. कुणी त्याला आदराने भिक्षा घालतो, तर कुणी अपमान करतो. ज्ञानी पुरुष मात्र कुणी सन्मान केला तर आनंदी होत नाही आणि कुणी अपमान केला तर दु:खी होत नाही. मान-अपमान हे पुण्य-पापाचे फळ आहे, हे तो जाणतो. ज्ञानी पुरुषाचे प्रारब्धकर्म भोगल्याशिवाय नष्ट होत नाही. म्हणून जेव्हा त्याचा सन्मान होतो किंवा त्याचा अपमान होतो त्यावेळी आपल्या प्रारब्धकर्माचा क्षय होतो हे त्याला माहीत असते. त्यामुळे आनंदी अथवा दु:खी होण्याचे काहीच कारण नसते. तो कूटस्थ आत्म्यात स्थिर होऊन संचार करत असतो. त्याच्या ठिकाणी जीवबुद्धी नसल्यामुळे त्याच्या मनात कोणताच विकार उद्‌भवत नाही.

**अप्राकृतैर्गुणैः स्वीयैः सर्वं विस्मापयन् जनम्।**
**अद्वैतपरमानंदमुदितो देहिवच्चरेत्।।१५.६१।।**

सन्मानामुळे आनंदित न होणाऱ्या आणि अपमानामुळे दु:खी न होणाऱ्या ज्ञानी पुरुषाला पाहून सामान्य लोकांना मोठे आश्चर्य वाटते. त्याचे अलौकिक गुण पाहून ते स्तिमित होतात. तो मात्र परमानंदात निमग्न असतो. वरवर पाहता तो सामान्य मनुष्यासारखा दिसतो. परंतु अंतरंगात मात्र सामान्यांपेक्षा विलक्षण असतो.

**न प्रपंचे निजे देहे न धर्मे न च दुष्कृते।**
**गतवैषम्यधीर्धीरो यतिश्चरति देहिवत्।।१५.६२।।**

हा प्रपंच आहे आणि हा आपला देह आहे अशी भेदबुद्धी त्याच्या ठिकाणी नसते. त्याने पुण्य केले काय आणि पाप केले काय, त्यामुळे तो लिप्त होत नाही. त्याच्या ठिकाणी विषमताबुद्धी नसल्यामुळे त्याच्या हातून घडलेल्या पुण्य-पापाचा तो धनी होत नाही. मी हे कर्म करत आहे असा कर्तृत्वभाव ज्याच्या ठिकाणी असतो तो कर्माने बांधला जातो. त्याच्या मनात कर्तृत्वभाव नसल्यामुळे त्याला पुण्य होत नाही आणि पापही होत नाही. या स्थलाचा येथे उपसंहार करतात-

**प्राकृतैश्वर्यासम्पत्तिपराङ्मुखमनःस्थितिः।**
**चिदानंदनिजात्मस्थो मोदते मुनिपुंगवः।।१५.६३।।**

प्राकृतिक ऐश्वर्यापासून तो विमुख झालेला असतो. सामान्य संसारी जीवाला ज्याचे विलक्षण आकर्षण वाटते, त्याचे त्याला मुळीच आकर्षण वाटत नाही. प्राकृतिक संपत्ती संपत्ती नसून विपत्ती असते. ती मिळवणे, तिचा संग्रह करणे, ती चोरापासून सुरक्षित ठेवणे असे अनेक कष्ट तिच्यासाठी घ्यावे लागतात आणि मृत्युसमयी ती इथेच सोडून रिकाम्या हाताने निमूटपणे निघून जावे लागते. भगवंताचा नामजप करणे आणि त्याचे ज्ञान प्राप्त करणे ही खरी संपत्ती होय. ती कोणी चोरून नेत नाही आणि मृत्यूनंतरही आपल्यासोबत येते. म्हणून खरी संपत्ती मिळवण्याचा प्रत्येकाने प्रयत्न करावा. आत्मज्ञानी असून देखील लोकांना ज्ञानोपदेश करण्यासाठी ज्ञानी पुरुष सदैव भ्रमरण करीत असतो. म्हणून त्याला 'चर' असे संबोधले जाते. यापुढील जी स्थिती आहे तिला 'परस्थल' म्हणतात. त्या स्थलाविषयी उद्या विचार करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२४ जुलै १९९३

---

**आशीर्वचन सत्ताविसावे**

## परस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शिवज्ञानसंपन्न शिवयोगी एक चालते-बोलते तीर्थक्षेत्र असतो. एक स्थिरक्षेत्र असते तर एक चरक्षेत्र असते. काशी, ज्योतिर्लिंगे ही स्थिरक्षेत्रे होत. जो स्थिरक्षेत्रात जातो त्याचाच उद्धार स्थिरक्षेत्र करते. परंतु चरक्षेत्र असे आहे की, माणूस जवळ आला नाही तरी त्याच्याजवळ जाऊन ते त्याचा उद्धार करते. म्हणून स्थिरक्षेत्रापेक्षा चरक्षेत्राचे महत्त्व अधिक आहे. चरस्थलातील साधक हाच चरक्षेत्र होय. सदैव शिवचिंतनात मग्न असल्यामुळे ते 'पवित्र क्षेत्र' होय. त्याच्या वाणीतून प्रकटणारे ज्ञानामृत हे 'तीर्थ' होय. गंगास्नान केल्यामुळे मनुष्याची पापे नष्ट होतात. तशीच ज्ञानोपदेश ऐकून देखील बरीच पापे नष्ट होतात. शास्त्रात म्हटले आहे- 'श्रुतं हरति पापानि।' तुम्ही रोज सत्संग केला, ज्ञानी पुरुषांचा उपदेश श्रवण केला तर त्यामुळे तुमची पापे नष्ट होतील. सत्संग केल्यामुळे मनुष्याला प्रपंचात कसे वागावे हे कळते, कृतकर्मांचा पश्चात्ताप होतो आणि सत्कर्म करण्याची प्रेरणा मिळते. पश्चात्ताप झाला तरच मनुष्य सुधारतो.

सूर्य, चंद्र, नदी, वृक्ष हे मनुष्यांवर उपकार करीत असतात. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष देखील लोकांचे कल्याण करण्यासाठी सर्वत्र संचार करीत असतो. अशा महापुरुषाला 'चरस्थली' असे म्हटले जाते. चरस्थलातील साधक परस्थलात कसा प्रवेश करतो त्याविषयी येथे विचार करायचा आहे. अमृतबिंदू-उपनिषदात एक वचन आहे- 'तद् ब्रह्माहमिति ज्ञात्वा ब्रह्म संपद्यते परम्।'

'पर' म्हणजे सर्वश्रेष्ठ. ज्याच्यापेक्षा दुसरे काही श्रेष्ठ असत नाही त्याला 'पर' असे म्हणतात. म्हणून आपण ब्रह्माला 'परब्रह्म', 'परशिव' असे म्हणतो. सर्वोच्च, सर्वोत्कृष्ट स्थानावर जाण्याची प्रत्येक मनुष्याची इच्छा असते. लौकिक जीवनामध्ये सर्वोच्च स्थानावर एकच मनुष्य जाऊ शकतो. त्यापेक्षा अधिक माणसे जाऊ शकत नाहीत. आपल्या देशात राष्ट्रपतिपद सर्वोच्च आहे. त्या पदावर पाच वर्षेपर्यंत एकच मनुष्य बसू शकतो. राष्ट्रपती होण्याची योग्यता अनेकांमध्ये असली तरी एकावेळी एकालाच राष्ट्रपती होता येते. एकाच वेळी दोन राष्ट्रपती राहू शकत नाहीत. परंतु परब्रह्मपद एकच काय पण सहस्रावधी, लक्षावधी माणसे प्राप्त करू शकतात. परब्रह्मपद हे सर्वोच्च स्थान आहे. हे सर्वोच्च पद कसे प्राप्त करावे? मी परब्रह्म आहे असा साक्षात्कार झाला की, ते पद सहज प्राप्त होते. परंतु आपण देह आहोत असा अभिमान प्रत्येक जीवात्म्याच्या ठिकाणी दृढ झालेला असतो. तो नष्ट झाला की, भावना व्यापक होऊ लागते आणि साधना केल्यावर परब्रह्मपद प्राप्त होते. आत्मज्ञानी पुरुषच या जगात सर्वश्रेष्ठ होय. शिवयोगी परब्रह्माला जाणतो म्हणूनच त्याला येथे 'परस्थली' असे संबोधले आहे.

**स्वयमेव स्वयं भूत्वा चरतः स्वस्वरूपतः।**
**परं नास्तीति बोधस्य परत्वमभिधीयते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.६४)

त्याला आपल्याशिवाय भिन्न अशी दुसरी व्यक्ती दिसत नाही. तो स्वतःशिवाय दुसऱ्या व्यक्तीकडे पाहत नाही म्हणजे तो स्वार्थी असतो, असा अर्थ नाही. त्याच्या दृष्टीने दुसरी व्यक्ती नसतेच. तो जिकडे पाहील तिकडे त्याला स्वतःचेच रूप दिसते. आपल्या आत्म्यासारखे जो इतरांना पहातो तोच 'ज्ञानी' होय. आपल्याला कुणी शिवी दिली तर जसे दुःख होते तसेच आपण दुसऱ्याला शिवी दिली तर त्यालाही दुःख होते, हे जाणून जो व्यवहार करतो तो ज्ञानी. त्याप्रमाणे आपल्या ठिकाणी जे आत्मतत्त्व आहे तेच जगातल्या प्रत्येक जीवात विद्यमान आहे. असा त्याला साक्षात्कार झालेला असतो. शरीर, मन, बुद्धी भिन्न असली तरी आत्मा मात्र एकच असतो. फुलांच्या माळेत फुले वेगवेगळी असतात परंतु त्यांना एकत्र बांधणारा दोरा एकच असतो त्याप्रमाणे. परस्थलातील साधक स्वतःमध्ये आत्मदर्शन घेतो तसे इतरांमध्येही आपले आत्मरूप पहातो. आपल्यापेक्षा 'पर' म्हणजे दुसरे काहीही नाही हे तो जाणतो, म्हणून त्याला 'परस्थली' असे म्हणतात. शरीर अनेक अवयवे मिळून बनलेले असते. तरीही शरीर एकच आहे असे आपण मानतो आणि त्याप्रमाणे व्यवहार करतो. तसेच शरीरे अनेक असली तरी त्यामधून एकच आत्मा व्यवहार करीत असतो. कारण आत्मा एकच आहे. तो शरीरात दिसतो तेव्हा त्याला 'जीवात्मा' म्हणतात. शरीराबाहेर जाणवतो तेव्हा त्याला 'परमात्मा' म्हणतात. घरात, घटात, मठात असलेले आकाश आणि बाहेरचे विराट आकाश भिन्न दिसते इतकेच. मुळात ते एकच असते. त्याप्रमाणे प्रत्येक शरीरातले चैतन्य आणि शरीराबाहेरचे चैतन्य एकच असते. ते भिन्न भासते इतकेच. ज्ञानी पुरुषाला आपल्यापेक्षा पर असे काही दिसत नाही म्हणून तो 'परस्थली' होय.

**स्वतंत्रः सर्वकृत्येषु स्वं परत्वेन भावितः।**
**तृणीकुर्वन् जगज्जालं वर्तते शिवयोगिराट्।।१५.६५।।**

शिवयोग्याचा शिवाशी सदैव संबंध असतो. इष्टलिंगाची पूजा करून तो शरीराने शिवाशी संबंध जोडतो. मंत्रजप करून वाणीने शिवाशी संबंध जोडतो आणि चिंतन करून मनाने शिवाशी संबंध जोडतो. शरीर, वाणी आण मन या त्रिकरणांनी शिवाशी संबंध साधणे यालाच 'शिवयोग' असे म्हणतात. प्रत्येक वीरशैवाचा शिवाशी संबंध असतोच, परंतु कोणाचा थोडा काळ असतो, कोणाचा अधिक काळ असतो, तर कोणाचा अखंड संबंध असल्यामुळे त्याला 'शिवयोगीश्वर' असे म्हटले जाते. शिवयोगीश्वर म्हणजे शिवयोग्यात सर्वश्रेष्ठ. सर्व कार्यात तो स्वतंत्र असतो. त्याने काय करावे आणि काय करू नये असा आदेश त्याला शास्त्रे देऊ शकत नाहीत. तो स्वतःला परब्रह्मरूप मानत असल्यामुळे तो सर्व प्रपंचाला तृणवत् मानून निःस्पृहपणे वर्तन करतो. 'निःस्पृहस्य तृणं जगत्।' असे एका सुभाषितकाराने म्हटले आहे. निःस्पृह माणसाला जगातली संपत्ती गवताच्या काडीइतकी क्षुद्र वाटते. जो परमात्म्याशी जवळीक साधतो त्याला प्रपंचाची मातब्बरी कशी वाटणार? परमात्मा सर्वश्रेष्ठ आहे. प्रपंचाला त्याची बरोबरी कशी करता येईल? ध्यानाने, चिंतनाने जो परमात्म्याला प्राप्त करून घेतो त्याच्याइतका श्रीमंत दुसरा कोणी नसतो. परमात्मा ही सर्वश्रेष्ठ संपत्ती आहे. ती प्राप्त झाल्यावर सामान्य संपत्तीत त्याला स्वारस्य वाटत नाही. जो अमृताची गोडी चाखतो तो कांजीसाठी लाळ घोळत नसतो. म्हणून ज्याला परब्रह्म प्राप्त होते त्याच्या दृष्टीने प्रपंचातील संपत्ती आणि सत्तास्थाने कवडीमोलाची ठरतात.

**वर्णाश्रमसमाचारमार्गनिष्ठापराङ्मुखः।**
**सर्वोत्कृष्टं स्वमात्मानं पश्यन् योगी तु मोदते।।१५.६६।।**

लौकिक जीवनात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे चारवर्ण आणि ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास असे चार आश्रम मानले जातात. ही एक सामाजिक व्यवस्था आहे. परस्थलातील साधकावर वर्णाश्रमाचे बंधन नसते. त्याने वर्णाश्रमाचे पालन केलेच पाहिजे असे नाही. कारण तो वरच्या अवस्थेला पोहचलेला असतो. त्याला आपले आत्मस्वरूप सर्वोत्कृष्ट वाटते. अशी स्थिति प्राप्त झालेल्या ज्ञानी पुरुषालाच 'परस्थली' असे म्हणतात, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२६ जुलै १९९३



## परस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

सर्वोत्कृष्ट अशा आपल्या आत्म्याचा साक्षात्कार करून घेऊन शिवयोगी आनंदविभोर होतो, हे तुम्ही कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे. सामान्य माणसाचा आत्मा आणि आत्मज्ञानी पुरुषाचा आत्मा एकच, एकसारखा आहे. मग इथे शिवयोग्याच्या आत्म्याला सर्वोत्कृष्ट असे का म्हटले आहे? हे समजण्यासाठी एक लौकिक उदाहरण देता येईल. गंगेचा उगम हिमालयातून होतो. तिला मध्ये अनेक नदीनाले मिळतात. ते पवित्र नसतात. परंतु गंगेशी एकरूप झाल्यामुळे त्यांनाही गंगेचे पावित्र्य लाभते. लोक त्यांना गंगाजलच म्हणतात. रस्त्यावरून वाहणारे गढूळ पाणी देखील गंगेत मिळाल्यावर गंगाच होते, पवित्र होते. दुधात पाणी मिसळल्यावर पाण्याला देखील दुधाचा भाव येतो. सामान्य माणसाने संताची संगत केली तर लोक त्याला सन्मान देतात आणि चांगल्या माणसाने दुर्जनाची संगत धरली तर लोक त्याला दोष देऊ लागतात. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाचा आत्मा परमात्म्याशी संबंध जुळल्यामुळे सर्वोत्कृष्ट मानला जातो. आत्मज्ञानी पुरुषाची पूजा करावी, त्यांना वंदन करावे, असे शास्त्रात म्हटले आहे. कारण त्यामुळे आपल्याला लौकिक आणि अलौकिक सुखांची प्राप्ती होते. त्याला परमात्म्याचे सामर्थ्य प्राप्त झालेले असते.

**विश्वातीतं परं ब्रह्म शिवाख्यं चित्स्वरूपकम्।**
**तदेवाहमिति ज्ञानी सर्वोत्कृष्टः स उच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १५.६७)

परमात्मा चित्स्वरूप आहे. प्रपंच जड आहे, परमात्मा चिद्रूप आहे. ज्याला स्वतःचे ज्ञान असते आणि दुसऱ्याचेही ज्ञान असते त्याला 'चित्' म्हणतात. ज्याला स्वतःचे ज्ञान नसते आणि इतरांचे देखील ज्ञान नसते त्याला 'जड' असे म्हणतात. तुम्ही या ज्ञानमंदिरात सतरंजीवर बसलेले आहात. तुम्हाला आपण कोण आहोत, काय करीत आहोत, कोठे बसलो आहोत याचे ज्ञान आहे. म्हणून तुम्ही 'चित्' आहात. परंतु ज्या सतरंजीवर तुम्ही बसला आहात तिला मात्र आपण कोण आहोत, कोठे आहोत, आपल्यावर कोण बसले आहे याचे ज्ञान नाही. म्हणून ती 'जड' आहे. प्रपंचाला ज्ञान नसल्यामुळे तो जड आहे. शरीर चेतन दिसते ते त्याच्या आत नांदणाऱ्या चिद्रूप आत्म्यामुळे. परंतु शरीर जडच आहे. त्याला स्वतः काही करता येत नाही, कोणतेही ज्ञान नाही. त्याच्यातून आत्म्याने बहिर्गमन केले तर त्याला स्वतःला चालता येत नाही. चार माणसे त्याला उचलून नेतात. पंख्याचा आणि बल्बचा विद्युतशक्तीशी संबंध आला तरच पंखा फिरतो आणि बल्ब प्रकाशित होतो, त्याप्रमाणे जडाशी चैतन्याचा संबंध आला तरच जड चेतन दिसू लागते.

परमात्मा चिद्रूप आहे, चेतन आहे. तो विश्वातीत म्हणजे विश्वाच्या पलीकडे आहे. तो विश्वात आणि विश्वातीतही आहे. व्यापक तत्त्व सर्वत्र असते. ते अंतर्बाह्य व्यापून रहाते. आकाश आपल्या आत आहे आणि बाहेर देखील आहे. ते सर्वांना व्यापून आहे. त्याप्रमाणे परमात्मा विश्वात असूनही विश्वातीत आहे. सर्वोत्कृष्ट परमात्मा आणि आपण यात भेद नसून अभेद आहे असा साक्षात्कार झाल्यामुळे ज्ञानी सर्वोत्कृष्ट होतो. तो परब्रह्माशी अभिन्न असतो.

अचलं ध्रुवमात्मानमनुपश्यन्निरन्तरम्।
निरस्तविश्वविभ्रान्तिर्जीवन्मुक्तो भवेन्मुनिः।।१५.६८।।

आत्म्याची स्थिती कशी आहे? तर तो अचल म्हणजे स्थिर असतो. जे अचल असते त्यावरच दुसरी वस्तू भ्रमत असते. गाडीच्या चाकांना आख असते. ती स्थिर असते आणि तिच्यावरच चाके फिरत असतात. त्याप्रमाणे आपला आत्मा स्थिर आहे आणि शरीर अस्थिर आहे. आत्मा नित्य आहे. त्याच्यात परिवर्तन होत नाही. अशा आत्म्याचे जो निरंतर चिंतन करतो त्याच्या मनात प्रपंचाची भ्रांती रहात नाही. भ्रांतीमुळेच तर जीवात्म्याला दुःख भोगावे लागते. वस्तू असते एक आणि आपण समजतो दुसरी, यालाच 'भ्रांती' म्हणतात. दोरीला सर्प समजणे, शिंपल्याला चांदी समजणे, ही वेदान्तातील भ्रांतीची उदाहरणे होत. पाहतो दोरी पण समजतो साप, पाहतो शिंपला पण समजतो चांदी. त्याप्रमाणे प्रपंच हा परमात्मरूपच आहे, परंतु अज्ञानामुळे आपण त्याला प्रपंचरूपात पहात असतो. प्रपंचाचे नाम-रूप वगळले तर तो परमात्माच आहे. 'सर्वं खलु इदं ब्रह्म।' असे वेदान्त सांगतो. सर्व प्रपंच म्हणजे ब्रह्मच होय. 'सर्वं लिंगमयं जगत्।' असे सिद्धान्त सांगतो. सर्व प्रपंच लिंगरूप आहे. तरीही भ्रांतीमुळे तो आपल्याला प्रपंचरूप दिसतो. तो जे आत पहातो तेच बाहेर पहातो. ज्ञानी पुरुष जीवन्मुक्त असतो. तो आनंदी जीवन व्यतीत करतो. जीवन्मुक्ताला वर्णाश्रमाचे बंधन नसते. मग तो आपल्या वर्णाश्रमानुसार वर्तन करत नसेल तर त्याच्यावर देवता रुष्ट होत नाहीत काय? या प्रश्नाचे उत्तर ज. रेणुकाचार्य देतात-

ब्रह्माद्याः किं नु कुर्वन्ति देवताः कर्ममार्गगाः।
कर्मातीतपदस्थस्य स्वयं ब्रह्मस्वरूपिणः।।१५.६९।।

जो अज्ञानावस्थेत कर्म करतो त्याला ब्रह्मादी देवता त्याच्या कर्माचे फळ देतात. जो ज्ञानी असतो त्याला त्याच्या कर्माचरणाबद्दल या देवता काही करू शकत नाहीत. कारण तो कर्मातीत आहे. तो स्वतःच परब्रह्मस्वरूप झालेला असतो. त्याला या देवता काय करू शकणार? कारण या देवता परब्रह्माच्या अधीन असतात. सर्वोच्चस्थानी असलेल्या व्यक्तीशी ज्याची मैत्री असते त्याचे अनहित खालचे अधिकारी कसे करू शकणार? त्याप्रमाणे कर्मकांडाचे पालन न करणाऱ्या शिवयोग्यांचे ब्रह्मादी देवता अहित करू शकत नाहीत.

स्वेच्छाया संचरेद् योगी विमुंचन देहमानिताम्।
दर्शनैः स्पर्शनैः सर्वानज्ञानपि विमोचयेत्।।१५.७०।।

जो आत्मज्ञानी स्वेच्छाचारी असतो. त्याची इच्छा असेल तर तो चालत राहील, त्याची इच्छा असेल तर तो एकाच स्थानी गप्प बसून राहील. त्याच्यासाठी कोणताही विधिनिषेध नाही. कारण तो देहाभिमानापासून मुक्त असतो. मनुष्याच्या मनात जोपर्यंत देहाभिमान असतो तोपर्यंत त्याच्यावर शास्त्रांची सत्ता चालते. तो देहाभिमान सोडतो त्यावेळी मात्र शास्त्रे त्याच्यावर सत्ता गाजवू शकत नाहीत. देहाभिमानापासून जीवात्मा लवकर मुक्त होत नाही. जीवात्मा एका देहात पन्नास-शंभर वर्षे राहतो. मनुष्य ज्या ठिकाणी राहतो त्या ठिकाणाबद्दल त्याच्या मनात अत्यंत प्रेम निर्माण होते. भाड्याच्या घरात दहा-वीस वर्षे माणसे रहातात आणि स्वतःचे नवे घर बांधून झाले तरी भाड्याचे घर सोडायची त्यांची तयारी नसते. त्या घराशी त्यांचे स्नेहबंध जुळलेले असतात. त्यांच्या सुखदुःखात जणू ते घर वाटेकरी असते. ही तर बाहेरच्या स्थावर घराची कहाणी आहे. मग ज्या देहात जीवात्मा आयुष्यभर रहातो तो देह सोडायला तो कसा तयार होईल? देह सोडणे दूरच, पण देहावरचा अभिमान सोडायची देखील त्याची तयारी नसते. इच्छा असो वा नसो, केव्हा ना केव्हा तरी देह सोडावाच लागणार म्हणून देहात

राहून देखील 'मी देह नाही' अशा दृढ भावनेने देहाभिमान सोडणे हे महत्त्वाचे आहे. जो देहात राहून देहाभिमान सोडतो तो ज्ञानी. जो देहाभिमान धरून देहात रहातो तो अज्ञानी.

देहाभिमानामुळे दुःखच प्राप्त होते, सुख नव्हे. 'अभिमानं सुरापानम्' असे अभिमानाबद्दल म्हणतात. मद्यपी माणूस अतिमद्य प्राशन करून बेहोष होतो. तो स्वतःला आणि इतरांना ओळखत नाही. त्याप्रमाणे अभिमानी मनुष्य स्वतःचे खरे स्वरूप ओळखत नाही आणि इतरांचेही स्वरूप त्याला आकळत नाही. परमात्मा अभिमानशून्य आहे, त्याप्रमाणे प्रत्येकाने झाले पाहिजे. सर्व सृष्टी निर्माण करून देखील त्याला अभिमान होत नाही. पण मनुष्य मात्र कर्म केले की 'मीच केले म्हणून झाले' असा अभिमान वाहतो आणि तसे बडबडत सुटतो. असंख्य बीजांना अंकुरित करणारी पृथ्वी कधीही अभिमान वाहत नाही. सर्वांना जीवन देणारी नदी, विश्वाला उजळून टाकणारा सूर्य कधीही आपल्या कृत्याचा टेंभा मिरवत नाहीत. एवढे करूनही ते मौन आहेत. मनुष्याला 'फक्त कर्म कर, बडबडू नकोस' असा जणू ते उपदेश करीत असतात. परंतु मनुष्य मात्र करतो थोडे, बडबडतोच अधिक. कारण त्याला अभिमान वाहायचा असतो. परंतु ज्ञानी मात्र अभिमानापासून मुक्त असतो. जो अभिमान सोडतो त्यालाच मुक्ती प्राप्त होते. ज्ञानी पुरुष आपल्या ज्ञानोपदेशाने इतरांचे अज्ञान दूर करतातच, परंतु आपले दर्शन देऊन आणि त्यांना स्पर्श करूनही त्यांचे अज्ञान दूर करू शकतात. त्यांच्यात एवढे सामर्थ्य असते. ते स्वतः मुक्त असतात आणि इतरांना मुक्त करतात.

> **नित्ये निर्मलभावने निरुपमे निर्धूतविश्वभ्रमे**
> **सत्तानंदचिदात्मके परशिवे साम्यं गतः संयमी।**
> **प्रध्वस्ताश्रमवर्णधर्मनिगलः स्वच्छंदसंचारवान्**
> **देहीवाद्भुतवैभवो विजयते जीवन्विमुक्तः सुधीः।।१५.७१।।**

परस्थलातील ज्ञानी नित्य, निर्मल, निरुपम, विश्वभ्रमरहित, सच्चिदानंदरूप अशा परशिवाशी एकरूप होतो. वर्णाश्रमाच्या शृंखला तोडून मानवरूपाने स्वच्छंद संचार करतो. देहधारी असून देखील तो जीवन्मुक्त असतो. आपल्या अद्भुत वैभवाने सर्वत्र विजयी होतो.

स्वय, चर आणि पर ही स्थले म्हणजे शिवज्ञानसंपन्न शिवयोग्याला तीन अवस्था होत. आपल्या अंतर्यामी नांदणाऱ्या परमात्म्याला जाणतो म्हणून तो स्वयस्थली, ज्ञानोपदेशासाठी भ्रमण करतो म्हणून चरस्थली आणि स्वेच्छाचरणी होऊन दर्शन-स्पर्शनाने अज्ञानी लोकांचे अज्ञान दूर करतो म्हणून परस्थली होय. ज्ञानी पुरुषाच्या या तीन अवस्था होत.

असा हा जीवन्मुक्ताचा मार्ग आहे. या मार्गावर वाटचाल करण्याचा प्रत्येकाला अधिकार आहे. या मार्गावर चालून जिवंतपणी 'याचि देही याचि डोळा' तुम्ही सर्वांनी जीवन्मुक्ती अनुभवावी, अशी इच्छा व्यक्त करून परस्थलावरील आजचे आशीर्वचन आणि लिंग-षट्स्थलातील भक्तस्थलावरील आशीर्वचने पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंमवाडी मठ, वाराणसी
२७ जुलै, १९९३

# भाग ८ : लिंग–षट्स्थलांतर्गत माहेश्वरस्थल

**आशीर्वचन पहिले**

## क्रियागमस्थल–१

**विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।**
**विश्ववंद्यं सदा वंदे विश्वराध्यं जगद्गुरुम्॥**

श्रीकाशीज्ञानसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे, तिला अनंत प्रणिपात समर्पित करून श्रावणमासानिमित्त आयोजिलेल्या या धर्मसभेत उपस्थित असलेल्या जिज्ञासू सद्भक्तांनो आणि मातांनो,

षट्स्थलांत अंग–षट्स्थल आणि लिंगषट्स्थल असे दोन भाग आहेत. आतापर्यंत आपण लिंग–षट्स्थलातील भक्तस्थलावर आशीर्वचने ऐकली आहेत. येथून पुढे लिंग–षट्स्थलातील दुसऱ्या माहेश्वरस्थलावरील आशीर्वचनांचा प्रारंभ होत आहे. भक्तस्थलातील परस्थलाचे विवेचन संपल्यानंतर महर्षी अगस्त्यांनी ज. रेणुकाचार्यांना प्रश्न विचारला–

**स्थलानां नवकं प्रोक्तं भक्तस्थलसमाश्रयम्।**
**माहेश्वरस्थले सिद्धं स्थलभेदं वदस्व मे॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.१)

'लिंग–षट्स्थलातील भक्तस्थलाच्या नऊ अवांतरस्थलाविषयी आपण विवेचन केले आहे. आता माहेश्वरस्थलाचे स्थलभेद आणि त्यातील विषय आपण मला समजावून सांगावते.' त्यावेळी ज. रेणुकाचार्य म्हणाले, 'हे तपस्वी अगस्त्या, या माहेश्वरस्थलात देखील क्रियागमस्थल, भावागमस्थल, ज्ञानागमस्थल, सकायस्थल, अकायस्थल, परकायस्थल, धर्माचारस्थल, भावाचारस्थल आणि ज्ञानाचारस्थल अशी नऊ अवांतरस्थले आहेत.'

पहिले अवांतरस्थल आहे क्रियागमस्थल. क्रिया म्हणजे काय? ज्ञान आणि कर्म हे शब्द आपण अनेकदा ऐकतो आणि त्यावर चर्चा देखील करतो. ज्याच्यामुळे स्व–रूपाचा बोध होतो त्याला 'ज्ञान' म्हणतात. ज्ञान प्राप्त करण्यासाठी योग्यता लागते. ती मिळवण्यासाठी आपल्याला काही क्रिया करावी लागते, शास्त्रविहित कर्मे करावी लागतात. या कर्मांनाच 'क्रिया' असे म्हणतात. शास्त्रात सांगितलेल्या विहित कर्मांचेच आचरण करावे. निषिद्ध कर्मांचे करू नये. 'सत्यं वद, धर्म चर, अतिथी देवो भव, मातृदेवोभव, पितृदेवो भव' हे शास्त्राचे आदेश आहेत. या आदेशांचे पालन केले पाहिजे. मांसभक्षण, मद्यपान, चौर्यकर्म, असत्यभाषण इत्यादी निषिद्ध कर्मांपासून दूर राहिले पाहिजे. शास्त्र 'करा' असे ज्याबद्दल सांगते ते विहित कर्म होय. आणि 'करू नका' असे ज्याबद्दल सांगते ते निषिद्ध कर्म होय. निषिद्ध कर्म केल्यामुळे पाप घडून दुःख भोगावे लागते तर विहित कर्म केल्यामुळे पुण्यप्राप्ती होऊन सुख मिळते. आपण सुखी असावे असे प्रत्येक मनुष्याला वाटत असते. परंतु केवळ सुखी होण्याच्या

इच्छेमुळेच कर्मे करावी लागतात. शास्त्रविहित कर्मेच मनुष्याला सुख देऊ शकतात. वातुलतंत्रात एक वचन आहे– 'अल्पक्रिया बहुफलं वीरशैवं महेश्वरी।'

शंकर पार्वतीला सांगतात की, कर्मे अनेक प्रकारची आहेत. माणसाच्या प्रवृत्तीप्रमाणे आणि फलप्राप्तीनुसार कर्माचे अनेक प्रकार आहेत. परंतु वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंगपूजा आदी जी कर्मे सांगितली आहेत ती 'अल्पक्रिया बहुफल' अशा प्रकारची आहेत. त्यामध्ये श्रम कमी परंतु फल अधिक आहे. कमी श्रम करून अधिक फळ मिळावे असे प्रत्येक मनुष्याला वाटत असते. परंतु 'अल्पक्रिया बहुफल' अशा कर्माचे त्याला ज्ञान नसते. हे ज्ञान झाले तर अल्पश्रमात त्याला भरपूर फळ मिळणे शक्य आहे. आता क्रियागम या शब्दाचा अर्थ सांगतात–

**शिवो हि परमः साक्षात् पूजा तस्य क्रियोच्यते।**
**तत्परा आगमा यस्मात् तदुक्तोऽयं क्रियागमः।।१६.५।।**

परस्थलालत प्रवेश केलेला ज्ञानी साक्षात् शिवस्वरूपच होतो. अशी उत्कृष्ट स्थिती प्राप्त झाल्यानंतर देखील तो इष्टलिंगपूजा आदी कर्मांचे आचरण करत असतो. ते कर्म म्हणजेच 'क्रिया' होय. ज्ञानी पुरुषाच्या क्रिया विशद करणारे जे शास्त्र आहे त्यालाच 'क्रियागम' असे म्हणतात. ज्ञानी पुरुषाचे कर्म हे विहित कर्मच असते आणि विहित कर्म ज्यात ग्रथित केलेले असते तेच शास्त्र होय, क्रियागम होय. क्रियागमस्थलात सामान्य मनुष्यापासून ज्ञानी पुरुषापर्यंत सर्वांच्या क्रिया विशद केलेल्या आहेत. क्रिया का करावी ? तिचे कोणते महत्त्व आहे ? याविषयी पुढे सांगतात–

**प्रकाशते यथा नाग्निररण्यां मथनं विना।**
**क्रियां विना तथान्तस्थो न प्रकाशो भवेच्छिवः।।१६.६।।**

प्रत्येक जीवात्म्याच्या हृदयात भगवान शिवाचे वास्तव्य असते. बीजात अंकुर असतो तसा जीवात्म्याच्या हृदयात ईश्वराचा निवास असतो आणि तो आपल्या मायेने, यंत्रचालकाने यंत्र चालवावे त्याप्रमाणे, शरीररूपी यंत्र चालवतो, असे गीतेत म्हटले आहे. असे असले तरी आपल्या हृदयात परमात्म्याचे वास्तव्य असते याची जाणीव माणसाला नसते. अत्यंत जवळची अथवा अत्यंत दूरची वस्तू आपल्याला दिसत नाही. विमानाचा आवाज कानावर आला तरी डोळे बारीक करून आकाशात पाहिल्यावर विमान दिसते. पण क्षणभरच. पुन्हा दिसत नाही. कारण ते अत्यंत दूर गेलेले असते. त्याप्रमाणे जी वस्तू आपल्या अतिशय जवळ असते ती देखील आपल्याला दिसत नाही. आपण जर पुस्तक अगदी डोळ्यांजवळ धरले तर ते वाचता येत नाही, त्याप्रमाणे परमात्मा अत्यंत जवळ असल्यामुळे तो देखील सामान्य माणसांना दिसत नाही. जीवात्म्याची प्रवृत्ती बर्हिमुख असल्यामुळे त्याला आपल्या हृदयात नांदणाऱ्या परमात्म्याचे दर्शन होत नाही. हृदयस्थ परमात्म्याचा साक्षात्कार करून घेण्यासाठी काही क्रिया, साधना करावी लागते. हेच उदाहरण देऊन येथे सांगितले आहे.

प्राचीन काळी यज्ञासाठी अरणीमंथन करून अग्नी उत्पन्न करीत असत. दोन लाकडे एकमेकांवर घासणे म्हणजे अरणीमंथन होय. अग्नी उत्पन्न करणे ही अतिशय कठीण बाब होती. आजच्या विज्ञानयुगात अत्यंत सहजपणाने अग्नी पेटवता येतो. आगपेटीने अथवा लायटरने. परंतु त्यामध्येही घर्षणक्रिया असते. अग्नी हे सर्वव्यापक तत्त्व आहे. परंतु जोपर्यंत घर्षणक्रिया होत नाही तोपर्यंत तो प्रकट होत नाही. अरणीमंथन केल्यावर जसा अग्नी प्रकट होतो त्याप्रमाणे पूजा इत्यादी शास्त्रविहित क्रिया केल्याशिवाय हृदयस्थ परमात्म्याचा साक्षात्कार होत नाही.

प्राणलिंगाची आणि भावलिंगाची पूजा घडण्यासाठी इष्टलिंगपूजा करणे आवश्यक असते. चेहरा पाहण्यासाठी आरशाची गरज असते त्याप्रमाणे प्राणलिंग पाहण्यासाठी, तेथपर्यंत पोहोचण्यासाठी इष्टलिंगपूजेची आवश्यकता असते.

आपल्या बाहेर जाण्याऱ्या वृत्तींना एकत्र करण्यासाठी, एकवटण्यासाठी वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंगपूजा सांगितली आहे. बाहेर वाहणाऱ्या प्रवृत्तींना प्रथम एके ठिकाणी स्थिर करावे लागते. मनुष्याची बुद्धी चंचल असते. तो ईश्वराला एकाच ठिकाणी पाहत नाही तर अनेक ठिकाणी पाहत असतो. त्याचा शोध अनेक ठिकाणी घेत असतो. खरे तर ईश्वर सर्वत्रच आहे. परंतु जोपर्यंत आपली बुद्धी स्थिर होऊन त्याचा एका ठिकाणी साक्षात्कार करून घेत नाही तोपर्यंत त्याचे सर्वत्र दर्शन घडत नाही. म्हणून आपल्या बाह्य प्रवृत्तींना एकत्र करण्यासाठी आपल्या हाती इष्टलिंग दिलेले आहे. इष्टलिंग हे सर्व प्राप्त करून देणारे आणि सर्व अनिष्ट दूर करणारे आहे. इष्ट प्राप्त होणे आणि अनिष्ट दूर होणे यापेक्षा मनुष्याला दुसरे काय हवे असते? त्यासाठीच तर त्याची सारी धडपड चाललेली असते. म्हणून आपल्या सर्व वृत्ती इष्टलिंगातच केंद्रित झाल्या पाहिजेत. इष्टलिंगामुळे आपण अंतर्मुख होऊ शकतो. मूलाधारात, हृदयात आणि भ्रूमध्यात प्राणलिंगाचा साक्षात्कार योग्यांना झाला आहे. त्याच प्राणलिंगाच्या आकाराएवढे इष्टलिंग श्रीगुरू आपल्या हाती देतात. म्हणून इष्टलिंगपूजा करता करता साधकाची वृत्ती अंतर्मुख होते आणि त्याला आपल्या मूलाधारात, हृदयात किंवा भ्रूमध्यात प्राणलिंगाचा साक्षात्कार होतो.

कोणतेही शास्त्र घ्या. त्यात हेच सांगितले आहे की परमात्म्याचा शोध प्रपंचात घेण्यापेक्षा आपल्या हृदयात घ्या. ब्रह्मांडात त्याचा शोध कुठे कुठे घ्याल? जे ब्रह्मांडात आहे तेच आपल्या पिंडांडात आहे. मानवी शरीर ही ब्रह्मांडाची एक छोटी प्रतिकृतीच होय. व्यापक वस्तू आत–बाहेर सर्वत्र असते. म्हणून परमात्म्याचा शोध बाहेर घ्यायला गेलो तर खूप श्रम होतील. त्यापेक्षा निश्चल बसून मन एकाग्र केले तर त्याचे दर्शन आपल्या आतच घडेल. मनाची एकाग्रताच आपल्याला परमात्म्यापर्यंत घेऊन जाते. इष्टलिंगपूजा ही क्रिया अंतर्लिंगाच्या चिंतनासाठी साहाय्यक ठरते. जोपर्यंत इष्टलिंगाची पूजा घडत नाही तोपर्यंत अंतर्लिंगपूजेची योग्यता प्राप्त होत नाही. बाह्य क्रिया आपल्या अंत:करणाला परिपक्व करत असते. भात करण्यासाठी एका भांड्यात तांदूळ व पाणी एकत्र घालतात आणि ते अग्नीवर ठेवतात. अग्नीचा तांदळाशी साक्षात् संबंध येत नाही. त्याचा संबंध भांड्याशी येतो. अग्नीमुळे भांडे तापते आणि भांडे तापल्यामुळे आतील तांदूळ शिजतात. पक्व होतात. भांड्याला बाहेरून उष्णता दिल्यावर त्याच्या आतील तांदूळ शिजतात त्याप्रमाणे आपल्या शरीराकडून घडलेल्या बाह्य क्रियांमुळे आपले मन, आपली बुद्धी शुद्ध होते. मन शुद्ध झाले की जशी बाहेर इष्टलिंगाची पूजा घडते तशीच आत प्राणलिंगाची पूजा होऊ लागते. बाह्य क्रियांचे महत्त्व असे आहे. अरणीमंथन केल्यावरच अग्नी लवकर प्रकट होतो. त्याप्रमाणे पूजा इत्यादी बाह्य क्रियांमुळे आपल्या हृदयातील परमात्म्याचा साक्षात्कार होतो. क्रिया कशी करावी त्याविषयी पुढे सांगतात–

**न यथा विधिलोप: स्याद्यथा देव: प्रसीदति।**
**यथागम: प्रमाणं स्यात्तथा कर्म समाचरेत्।।१६.७।।**

कर्म करताना ते योग्य रीतीने करावे लागते. काहीही केले, कसेही केले तर त्याचे फळ मिळत नाही. स्वयंपाक करताना देखील क्रमवार करावा लागतो तरच स्वादिष्ट भोजन तयार होते. जे आधी करायचे ते नंतर केले, जे नंतर

करायचे ते आधी केले तर स्वयंपाक चांगला होणार नाही. म्हणून आपल्या सर्व क्रिया पद्धतशीरपणेच व्हायला हव्यात. पूजा कधी करावी, कशी करावी यासंबंधी शास्त्रात विधिविधान सांगितले आहे. वैदिक शिवपूजाविधी वेगळा आणि संक्षिप्त शिवपूजाविधी वेगळा आहे. ज्याच्याकडे वेळ कमी असेल तो संक्षिप्त रीतीने करील. वैदिक असो की संक्षिप्त, शास्त्रोक्त विधीप्रमाणेच आपण पूजा केली पाहिजे. आधी लिंगावर जलाभिषेक करावा, मग गंध लावावे, मग बिल्वपत्र वाहावे, याप्रमाणे शास्त्राने पूजेचा क्रम सांगितला आहे. त्याप्रमाणेच पूजा करायला हवी. आधी बेल वाहिला, नंतर भस्म लावले नंतर पाणी वाहिले असे केले तर पूजाविधीचे पालन होणार नाही. विधी पाळला नाही तर पूजेचा क्रम बिघडतो आणि ज्याची आपण पूजा करतो तो अप्रसन्न होतो.

शिवभक्ताने सहा वेळा लिंगपूजा करावी असे शास्त्रात सांगितले आहे. सर्वांनाच ते करणे शक्य नाही. संसारी माणसाला एवढा वेळ कुठे मिळणार? परंतु त्यांच्यासाठीही पूजाविधी सांगायला हवा. ज्यांना सहा वेळा शक्य नाही त्यांनी तीन वेळा करावी, ज्यांना तीन वेळा शक्य नाही, त्यांनी दोन वेळा करावी आणि ज्यांना दोन वेळा शक्य नाही त्यांनी किमान एकवेळ पूजा करावी. यात मात्र शास्त्राने 'कन्सेशन' दिलेले नाही. तुम्ही म्हणाल आम्ही फक्त सोमवारीच पूजा करू किंवा महाशिवरात्रीला वर्षातून एकदाच पूजा करू, तर ते शास्त्राला मान्य नाही. नैमित्तिक पूजा महिन्यातल्या एखाद्या तिथीला केली जाते, परंतु नित्यपूजा मात्र नित्य केली जाते. त्यासाठी विशिष्ट महिन्याची अथवा तिथीची गरज नसते. इष्टलिंगपूजा हे नित्यकर्म आहे. शरीरात प्राण आहे तोपर्यंत इष्टलिंगपूजा केली पाहिजे. ती केली नाही तर दुरिताची प्राप्ती होते. म्हणून जन्मभर त्याचे पालन करावे लागते.

पूजेसंबंधी शास्त्रात अनेक प्रकारे विधिविधान सांगितले आहेत. त्यात उपचारांचीही संख्या सांगितली आहे. पंचोपचारांनी, अष्टोपचारांनी, षोडशोपचारांनी आणि राजोपचारांनी पूजा करता येते. ज्याचे जसे सामर्थ्य त्याची तशी पूजा. ज्याच्याकडे अधिक वेळ असतो तो अधिक वेळा पूजा करू शकतो. जगात अशाही लोकांची आवश्यकता असते. सगळ्या संसारी, क्षुद्र सुखोपभोगाच्या मागे धावणाऱ्या गर्दीत अशी चार-दोन माणसे वेगळी उठून दिसतात. त्यामुळे समाजात संतुलन राहते. अजिबात पूजा न करणारे लोक जगात राहतात. त्यामुळे रात्रंदिवस केवळ पूजाच करणाऱ्या लोकांमुळे संतुलन टिकून राहते, असे म्हणायला हवे. पूजा विधिपूर्वक करावी. एवढेच नव्हे तर आपल्या पूजेमुळे ईश्वर प्रसन्न व्हावा. केवळ विधिपूर्वक पूजा केल्यामुळे ईश्वर प्रसन्न होत नसतो. तुम्ही जर तुमचे मन त्याला दिले तर मात्र तो प्रसन्न होतो. तुम्ही विधिपूर्वक पूजन केले, रुद्राचे पठण केले, खूप काही केले, परंतु तुमचे मन जर ईश्वराकडे नसेल तर ते करणे देखील व्यर्थ होईल. तुमचे मन त्याला द्याल तेव्हा त्याला तुमच्या उपचारांची गरज नसते. त्याला हवी असते तुमच्या मनातील गाढ प्रीती, भक्ती.

मग पूजासामग्रीची गरज काय? असे कोणाला वाटेल. तुमचे मन काही काळ ईश्वराच्या ठिकाणी एकाग्र व्हावे, गुंतून राहावे यासाठी पूजासामग्रीची आवश्यकता असते. पूजासामग्री असून देखील तुमचे मन एकाग्र होत नाही तर ती नसल्यास कसे होईल? आपल्या मनात ईश्वराबद्दल प्रेम असायला हवे. त्याच्याबद्दल प्रेम नसेल तर त्याची आपल्यावर कृपा होणार नाही. घरी आलेल्या पाहुण्याचा आदर-सत्कार जर प्रेमपूर्वक केला नाही तर त्या सत्काराला काही अर्थ नाही. आदर-सत्कार स्वीकारून देखील पाहुणा अप्रसन्न राहतो. आपण सांसारिक वस्तू मोठ्या प्रेमाने गोळा करतो, कुणी जिवलग भेटल्यावर त्याला प्रेमाने मिठी मारतो. एवढे देखील प्रेम ईश्वरावर केले तर तो अत्यंत प्रसन्न होईल. माणसाला संसार अत्यंत प्रिय असतो. तो ईश्वराकडे जातो ते देखील सांसारिक वस्तू

मागण्यासाठीच. भगवंताकडे जाणाऱ्या माणसाच्या मनात भगवंताबद्दल प्रेम असेल तरच त्याची कृपा होईल. म्हणून पूजा करताना ती विधिपूर्वक करावी, एकाग्रतेने करावी आणि ती करताना ईश्वराबद्दल प्रेम असावे. आपली पूजा आगममान्य असावी. ज्यामुळे ईश्वराची कृपा होत नाही, ज्यात विधीचा लोप होतो, जी आगममान्य नसते अशी पूजा करणे निरर्थक होय.

**विधिः शिवनियोगोऽयं तस्माद् विहितकर्माणि।**
**शिवराधनबुद्ध्यैव निरतः स्याद् विचक्षणः।।१६.८।।**

विधी ही शिवाची आज्ञा, शासन होय. शिवाने केलेला उपदेश आहे. विहित कर्म करावे असा शिवाचा आदेश आहे. म्हणून प्रत्येक मनुष्याने आपण जे कर्म करीत आहोत ते भगवान शिवाला मान्य आहे की नाही याचा सर्वप्रथम विचार करावा. विहित कर्मांचे पालन करावे आणि निषिद्ध कर्मांचा त्याग करावा. आपली बुद्धी शिवराधनेकडे असावी. आपली बुद्धी जर सदोदित शिवराधनेत राहिली तर व्यवहाराचे काय? असा प्रश्न काही जणांना पडेल. जीवात्म्याला व्यवहार तर सांभाळला पाहिजे. येथे थोडा सूक्ष्म विचार करावा लागतो. शिवाची आराधना म्हणजे एखाद्या मूर्तीची आराधना नव्हे. शिव म्हणजे कल्याण. जो सर्वांचे कल्याण करतो आणि सर्वांकडे समदृष्टीने पाहतो तो शिव होय. सर्वांचे कल्याण करणाऱ्या आणि सर्वांना समदृष्टीने पाहणाऱ्या भगवत्तत्त्वालाच 'शिव' असे संबोधले जाते. शिवराधनेची बुद्धी निरंतर असावी याचा अर्थ, तुम्ही रात्रंदिवस पूजा करावी, असा नाही. शिवपूजा करणाऱ्याची भावना शिवमय होऊन जाते. ज्या हातांनी शिवाची पूजा केली त्या हातांनी शिवकार्येच (पवित्र कार्ये) घडतात, अशिव कार्ये घडत नाहीत. त्यामुळे सर्वांचे कल्याणच होते. कोणाचेही अकल्याण होत नाही. त्याच्या मनाने कोणाचेही अशुभ चिंतन घडत नाही. सर्व सुखी असावेत अशी जी मनाची भावना तीच शिवमय भावना होय. ही भावना निरंतर मनात राहणे हीच अखंड शिवाराधना होय. सामान्य मनुष्य फक्त पूजेच्या वेळीच पूजा करीत असतो, परंतु असामान्य शिवयोगी मात्र पूजेच्या वेळी पूजा तर करतोच पण इतर वेळीही त्याच्या मनात अखंड पूजा सुरू असते. जो सर्वांचेच कल्याण चिंततो, सर्वांवर उपकार करतो, कोणाशी अनादराने बोलत नाही, तो निरंतर शिवपूजाच करत असतो. त्याच्या मनात सदैव शिव नांदत असतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२८ जुलै १९९३



आशीर्वचन दुसरे

## क्रियागमस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

नित्य शिवपूजा हीच वीरशैवांची मुख्य क्रिया होय. ती शिवपूजारूपी क्रिया कशी करावी यासंबंधी येथे सांगतात–

**गुरुरादेशमासाद्य पूजयेत् परमेश्वरम्।**
**पूजिते परमेशाने पूजिताः सर्वदेवताः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.९)

आपल्या इष्टलिंगाची पूजा करण्याचा अधिकार आपल्याला आपल्या सद्गुरूकडून प्राप्त होतो. जोपर्यंत साधकाला गुरूकडून शिवदीक्षा, मंत्रोपदेश आणि इष्टलिंगधारणा होत नाही तोपर्यंत तो पूजेचा अधिकारी होत नाही. गुरूची आज्ञा घेऊन ते पूजेचा जो विधी सांगतील त्याप्रमाणेच पूजा करायला हवी. अनेक पुस्तकांत शिवपूजेची वेगवेगळी विधिविधाने सांगितलेली असतात. ती वाचून साधकाच्या मनात संदेह उत्पन्न झाला तर त्याने आपल्या गुरूचा निर्णय शिरसावंद्य मानावा. आपल्याला सारे काही गुरूनेच दिलेले असते म्हणून त्यांची जशी आज्ञा असेल त्याप्रमाणे शिवपूजा करावी.

जगात अनेक देवी–देवता आहेत, मग एकच शिवाची पूजा करून कसे चालेल? वेगवेगळ्या प्रसंगी वेगवेगळ्या देवांची पूजा कशी करावी त्याचे उत्तर देतात– 'पूजिते परमेशाने पूजितः सर्व देवताः।'

भगवान शिवात सर्व देवता समाविष्ट आहेत. म्हणून त्याला महादेव असे नाव आहे. 'देवानां देवः महादेवः।' जो सर्व देवांचा देव तो महादेव होय. त्याचे पूजन सर्व देव करतात. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या लिंगधारणस्थलात सांगितले आहे की, ब्रह्मादी देव आणि लक्ष्म्यादी देवता यांनी आपल्या मस्तकांवर शिवलिंगे धारण केलेली आहेत. शिवपूजा ही प्राचीन परंपरा आहे. ज्याची पूजा सर्व देव करतात अशा महादेवाची पूजा केल्यावर सर्व देवांची पूजा केल्यासारखी आहे. 'लिंगमध्ये जगत्सर्वम्' म्हणजे लिंगामध्ये समग्र विश्व अवस्थित आहे. सर्व देवता याच विश्वात असल्यामुळे लिंगपूजा केल्यावर सर्व देवतांची पूजा घडते. त्यामुळे लिंगपूजकाला अन्य देवतांची पूजा करण्याची आवश्यकता नाही. यानंतर एक प्रश्न उपस्थित होतो की, लिंगपूजेचे फळ कोणते? प्रत्येक कर्माच्या फळाची इच्छा मनुष्याला असते. अगदी निर्बुद्ध मनुष्यदेखील आपण हे कर्म केले तर त्याचे कोणते फळ मिळेल, याचा विचार करत असतो. एका सुभाषितकाराने म्हटले आहे– 'प्रयोजनमनुद्दिश्य मंदोऽपि न प्रवर्तते।' प्रयोजनाशिवाय मंदबुद्धीचा मनुष्य देखील कर्म करण्यास प्रवृत्त होत नाही. प्रत्येक कार्यात कोणते ना कोणते तरी प्रयोजन असतेच. लौकिक कार्यात लौकिक प्रयोजन असते तर आध्यात्मिक कार्यात आध्यात्मिक प्रयोजन असते. मनुष्याला कुठले तरी प्रयोजन हवे असते. मग शिवलिंगपूजन करण्याचे प्रयोजन कोणते? याचे उत्तर येथे देतात–

**सदा शिवार्चनोपायसामग्रीव्यग्रमानसः।**
**शिवयोगरतो योगी मुच्यते नात्र संशयः।।१६.१०।।**

शिवपूजा हा योग असून त्याला शिवयोग म्हणतात. शिवयोग म्हणजे शिवाशी साक्षात् संबंध जुळवणे. कोणतीही बाह्य क्रिया न करता आपल्या मनात शिवचिंतन करणे यालाच काही लोक शिवयोग समजतात. भ्रमराचे ध्यान करून कीडा जसा भ्रमररूप होतो त्याप्रमाणे शिवचिंतन करणारा साधक देखील शिवरूप होतो, असे एक उदाहरण या संदर्भात दिले जाते. शिवयोगाची ही अंतिम अवस्था होय. परंतु येथे क्रियागमस्थल या कर्मप्रधान स्थलाचे निरूपण चालले आहे. शिवपूजा ही एक महत्त्वपूर्ण क्रिया आहे असे प्रतिपादन करायचे असल्यामुळे येथे कर्माला प्राधान्य देऊन शिवयोगाची व्याख्या केली आहे. शिवपूजेला लागणारी सामग्री संपादन करण्यात जो सदैव मग्न असतो तो 'शिवयोगी' होय. ही सामग्री मिळवताना देखील त्याच्या मनात शिवाशिवाय दुसरा कोणताही विचार नसतो. शिवपूजेसाठी दूध हवे, बेल हवा, भस्म हवे असाच विचार त्याच्या मनात सदैव नांदत असतो. बाह्य सामग्री मिळवून जो शिवाची भक्तिपूर्वक पूजा करतो तो देखील एक शिवयोगीच होय. अशा पूजेने साधक मुक्त होतो अर्थात् शिवरूप होतो. मुक्ती हेच शिवपूजेचे प्रयोजन असते. येथे आणखी एक प्रश्न उपस्थित होतो. मोक्षप्राप्तीसाठी ज्ञानाची आवश्यकता असते. शास्त्रात म्हटले आहे– 'ज्ञानादेवऋते ज्ञानान्न मुक्तिः।'

जीवात्म्याला केवळ ज्ञानानेच मुक्ती मिळू शकते. ज्ञानावाचून मिळत नाही. येथे तर तुम्ही सांगत आहात की शिवपूजा–कर्माने मुक्ती मिळते. मग त्यात खरे कोणते? मुक्ती ज्ञानाने मिळते की कर्माने? याचे उत्तर असे की, ज्ञान आणि कर्म ही मुक्तीची दोन साधने होत.

**न कर्मरहितं ज्ञानं न ज्ञानरहिता क्रिया।**
**अपश्यन् अन्धको दग्धः पश्यन् पंगुश्च दह्यते।।**

ज्ञानाशिवाय केलेले कर्म फलप्रद होत नाही आणि कर्मावाचून होणारे ज्ञान देखील फलदायक ठरत नाही. याविषयी आध्यात्मिक क्षेत्रात अंध–पंगू दृष्टान्त दिला जातो. जो दोन्ही डोळ्यांनी आंधळा होता असा अंध मनुष्य आणि जो दोन्ही पायांनी पांगळा होता असा पंगू मनुष्य एका अरण्यात राहात होते. अरण्यात वणवा लागला. झाडे भस्मसात होऊ लागली अग्नी सर्वत्र पसरू लागला. पांगळ्यांला डोळे होते. सारे उत्पात तो पाहत होता. परंतु त्याच्या ठिकाणी पळून जाण्याची शक्ती नव्हती. आंधळ्याकडे पाय होते परंतु दृष्टी नसल्यामुळे कुठल्या दिशेने पळून गेले म्हणजे आपला जीव वाचेल हे त्याला समजत नव्हते. पांगळ्याकडे ज्ञान होते, परंतु तो क्रियेवाचून लंगडा होता. आंधळ्याकडे क्रियाशक्ती होती, परंतु तो ज्ञानावाचून आंधळा होता. शेवटी दोघेही त्या प्रलयंकर वणव्यात जळून गेले.

प्रत्येक जीवात्म्याला मुक्तीपर्यंत मजल मारायची आहे. परंतु त्या वाटेवर संसाररूपी वणवा लागलेला आहे. या अग्नीत केवळ ज्ञान मिळवणारा मनुष्य भस्म होतो आणि केवळ कर्म करणारा मनुष्य देखील भस्म होतो. मग या संसाररूपी अग्नीपासून सुटका कशी होईल? तर जो ज्ञान आणि क्रिया यांचा समन्वय आपल्या जीवनात करील तोच या संसार–अग्नीपासून सुटू शकेल. हेच अतिशय स्पष्टपणे पुढे सांगतात–

**अंधपंगुवदन्योन्यसापेक्षे ज्ञानकर्मणी।**
**फलोत्पत्तौ विरक्तस्य तस्मात् तद्द्वयमाचरेत्।।१६.११।।**

अंध आणि पंगू दोघांनाही परस्परांच्या सहकार्याची गरज असते. अंध–पंगू अरण्यात जळून गेल्याची वार्ता जेव्हा दुसऱ्या अंध–पंगूंना कळली तेव्हा त्यांनी पहिल्यांचे अनुकरण केले नाही. त्यांनी परस्परांशी विचारविनिमय

केला. पांगळा आंधळ्याच्या खांद्यावर बसला आणि त्याला वाट दाखवू लागला. डावीकडे वळ, उजवीकडे वळ, समोर चल, सरळ चालत राहा इत्यादी. त्याप्रमाणे आंधळा चालत राहिला आणि दोघेही वणव्यातून सुरक्षित बाहेर पडले. त्यावेळी त्या दोघांमध्ये जणू तादात्म्य झाले होते. चालणाऱ्याला वाटत होते की, मी पाहात आहे आणि पाहणाऱ्याला वाटत होते की, मी चालत आहे. दोघे जणू एकजीव झाले होते. त्याप्रमाणे जर संसारातून मुक्त व्हायचे असेल तर अंधपुंगूसारखा ज्ञान आणि कर्म यांचा समन्वय करायला हवा.

येथे एक प्रश्न उपस्थित होतो की, ज्ञानप्राप्ती झाल्यावर जर ज्ञानीपुरुष कर्म करत राहील तर तो पुन्हा कर्मबंधनात पडणार नाही काय? कर्मामुळेच तर जीवात्मा बंधनात पडतो. याचे उत्तर येथे दिलेले आहे. फलाची अपेक्षा सोडून जर कर्म केले तर ते बंधनकारक ठरत नाही. कर्म करणे हा जीवात्म्याचा अधिकार आहे, फळ मागणे हा त्याचा अधिकार नव्हे. फळ देणे हा परमेश्वराचा अधिकार आहे. म्हणूनच भगवंतांनी गीतेत सांगितले आहे की, निष्काम भावनेने कर्म केले तर कर्मबंधनात पडत नाही. ज्ञानाशी सकाम कर्माची मैत्री जुळत नसली तरी ज्ञानाला निष्काम कर्माचे वावडेही नाही.

इष्टलिंपूजारूपी नित्यकर्म काही विशेष फळाच्या उद्देशाने केले जात नाही. गुरूकडून जेव्हा लिंगदीक्षा दिली जाते तेव्हा 'हे लिंगपूजाव्रत जीवनभर आचर' असा आदेश शिष्याला मिळतो. इष्टलिंगाला शरीरापासून कधीही वियुक्त करू नये आणि इष्टलिंगातच आपले सर्वस्व सामावले आहे अशी भावना ठेवावी, असा आदेश गुरू देतात. ज्ञानप्राप्तीनंतर, आता मी शिवरूप झालो आहे, मला इष्टलिंगपूजेची गरज नाही असे शिवयोग्याला म्हणता येत नाही. कारण गुरूच्या आज्ञेप्रमाणे 'देहात प्राण आहे तोपर्यंत मी इष्टलिंगपूजा करीन' असा संकल्प त्याने केलेला असल्यमुळे त्याला इष्टलिंगपूजा करावीच लागते. इष्टार्थाच्या प्राप्तीसाठी आणि अनिष्टाच्या निवारणासाठी इष्टलिंगाची पूजा केली जाते. आपली सारे अनिष्टे दूर झाली आहेत आणि आपल्याला इष्टार्थाची–लिंगांगसामरस्यरूपी सर्वश्रेष्ठ इष्टार्थाची प्राप्ती झाली आहे, मग यापुढेही आता इष्टलिंगपूजा करण्यात अर्थ काय आहे? त्याचे फळ तर मिळालेच आहे, असे कुणाला वाटेल. या प्रश्नाचे समाधान मंत्रशास्त्रात केलेले आहे.

प्राचीन काळी पाऊस पडावा म्हणून यज्ञ केला जात असे. यज्ञारंभी वीस दिवस किंवा तीस दिवस यज्ञ करू, असा संकल्प सोडला जाई. यज्ञ सुरू केल्यानंतर आठ दिवसांतच जर पाऊस पडला, यज्ञाचे फळ प्राप्त झाले तर यज्ञ चालू ठेवायचा की संपवायचा? या प्रश्नाचे उत्तरही तेव्हा दिले गेले. यज्ञ सुरू केल्यानंतर त्याचे फळ अगदी आरंभी अथवा मध्ये अथवा अंती केव्हाही मिळाले तरी यज्ञक्रिया मात्र संकल्पानुसारच पूर्ण करायला हवी. त्याप्रमाणे वीरशैवाला दीक्षासमयी लिंगांगसामरस्याच्या प्राप्तीसाठी लिंग दिलेले आहे. एखाद्या साधकाला त्याच्या आयुष्यमध्यावरच लिंगांगसामरस्याची प्राप्ती झाली तर त्याने इष्टलिंगपूजा करावी की नाही? याचे उत्तर 'करावी' असे आहे. कारण देहात प्राण असे तो लिंगपूजा करण्याचा संकल्प त्याने केलेला असतो. म्हणून पूजेचे फळ मिळाल्यानंतर देखील त्याला पूजेचा त्याग करता येत नाही.

**ज्ञाने सिद्धेऽपि विदुषां कर्मापि विनियुज्यते।**
**फलाभिसन्धिरहितं तस्मात् कर्म न सन्त्यजेत्।।१६.१२।।**

ज्ञान प्राप्त झाल्यानंतर देखील ज्ञानी पुरुषाने कर्म करीत राहिले पाहिजे. त्यावेळी त्याला कर्माची काही गरज नसते. परंतु वडीलधाऱ्या माणसाचे वर्तन पाहून त्याप्रमाणे घरातील लहान मुले वागत असतात, हे वडील माणसाला लक्षात ठेवावे लागते. ज्ञानप्राप्तीनंतर जर एखाद्याने आपल्या गळ्यातील लिंग काढून खुंटीवर टांगून

ठेवले तर त्याचा सामान्य माणसावर काय परिणाम होईल? ते म्हणतील की एवढ्या मोठ्या ज्ञानी पुरुषाने गळ्यातले लिंग काढून टाकले तर मग आपल्यासारख्या सामान्य माणसाने काढून टाकले तर काय बिघडले? मोठ्या माणसांनीच सद्‌वर्तनाचा त्याग केला तर लहान माणसे तशीच वागू लागतील. त्यामुळे समाजात विपरीत भावना बळावण्याची शक्यता असते. म्हणून ज्ञानी पुरुषाला स्वत:साठी नाही पण इतरांसाठी मार्गदर्शन करण्यासाठी तरी लिंगपूजा करावीच लागते.

एखाद्या शिक्षकाची जेव्हा प्राथमिक शाळेत नियुक्ती होते तेव्हा त्याला वर्गातल्या मुलांना अ आ इ ई ही अक्षरओळख करून द्यावी लागते. त्यांना नीट समजावून सांगून त्यांच्याकडून अक्षरे गिरवून घ्यावी लागतात. शिक्षकाला त्या अक्षरज्ञानाची काही गरज नसते. त्याला केव्हाच, तो प्राथमिक शाळेत असतानाच अक्षरओळख झालेली असते. बरेच शिक्षण घेऊन तो जेव्हा प्राथमिक शाळेत शिकवायला येतो तेव्हा त्याला पुन्हा अ आ इ ई म्हणावी लागते, शिकवावी लागते. या अक्षरांचा पुन्हा पुन्हा उच्चार करणे ही अक्षरे पुन्हा पुन्हा फलकावर लिहिणे या क्रियांचा शिक्षकाला काहीच उपयोग नसतो. तरी देखील तो मुलांना शिकवण्यासाठी त्या क्रिया करत असतो. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाला लिंगपूजादी क्रियांची गरज नसली तरी तो इतरांना मार्गदर्शन करण्यासाठी त्या क्रिया करत असतो. त्याच्या क्रियेमुळे इतरांनाही प्रेरणा मिळत असते. ज्ञानी पुरुषानेही ज्ञानोत्तर कर्मे करावीत असा शास्त्रांचा आदेश आहे, तर मग अज्ञानी माणसाने तर ती करायलाच हवीत. क्रियेला एवढे महत्त्व का? याचे स्पष्टीकरण पुढे केले आहे-

**आचार एव सर्वेषामलंकाराय कल्प्यते।**
**आचारहीनः पुरुषो लोके भवति निन्दितः।।१६.१३।।**

येथे ज्ञान आणि आचरण या दोन महत्त्वपूर्ण बाबी आहेत. एखाद्याकडे ज्ञान आहे, परंतु त्याचे आचरण या दोन महत्त्वपूर्ण बाबी आहेत. एखाद्याकडे ज्ञान आहे, परंतु त्याचे आचरण ज्ञानानुसार नसेल तर त्याच्या ज्ञानाला काही अर्थ नाही. ते ज्ञान ना त्याच्या उपयोगाचे ना इतरांच्या उपयोगाचे. म्हणून येथे आचार हा एक अलंकार मानला आहे. आपले शरीर छान दिसावे म्हणून आपण ते वस्त्रालंकारांनी सजवतो, नटवतो. स्थूल शरीर वस्त्रालंकारांनी सजवणे चांगलेच आहे, परंतु मनुष्याला एक अंत:शरीर देखील असते. त्याला 'सूक्ष्मदेह' म्हणतात. स्थूलदेहावर तुम्ही उत्तम कपडे घालाल, सुवर्णालंकारांनी सजवाल. परंतु तुमचा सूक्ष्मदेह मात्र वस्त्रालंकारांनी सजवता येत नाही. जोवर तुमचे सूक्ष्मशरीर सुंदर होत नाही, ते अलंकृत होत नाही तोवर तुमच्या स्थूलशरीरावर तुम्ही कितीही अलंकार घातले, ते कितीही नटवले तरीही समाजात तुम्हाला पूज्यता लाभणार नाही. बाहेरच्या अलंकारापेक्षा आतले अलंकार अधिक महत्त्वाचे असतात. त्यामुळे व्यक्तीचेही कल्याण होते आणि समाजाचेही कल्याण होते. एखादा आचारशून्य मनुष्य शास्त्रनिषिद्ध मार्गावरच चालत असेल, सर्वांचे अकल्याण चिंतीत असेल तर अशा माणसाने आपले शरीर सुवर्णालंकारांनी कितीही नटवले तरी ते शोभायमान दिसणार नाही. भगवान शिवाच्या अंगावर कोणतीही बाह्य आभूषणे नाहीत एवढेच नव्हे तर त्यांच्या अंगावर वस्त्रेदेखील नाहीत.

'दिगंबरत्वेन निवेदितं वसु।' असे महाकवी कालिदासाने भगवान शिवाचे वर्णन केले आहे. शिवाच्या प्राप्तीसाठी जेव्हा पार्वती तपस्या करते तेव्हा एका ब्राह्मणाचे रूप घेऊन शिव तेथे येतात. त्याला पार्वतीच्या निष्ठेची परीक्षा घ्यायची असते. त्यावेळी भगवान शिवाबद्दल काही चमत्कारिक उद्‌गार काढलेले आहेत. पार्वती ही पर्वतराजाची कन्या. तिच्यापुढे सर्व लौकिक सुखे हात जोडून उभी असताना ती शंकराच्या प्राप्तीसाठी का तपस्या

करते? याचे आश्चर्य वाटून तो ब्रह्मचारी हसून म्हणतो की, ''हिची तपस्या व्यर्थ आहे. रत्नपारख्याने आणि ग्राहकाने रत्नाचा शोध घ्यायचा असतो. रत्नाने ग्राहकाचा शोध घ्यायचा नसतो. येथे तर एक कन्यारत्न वराच्या प्राप्तीसाठी तपस्या करीत आहे. म्हणून ही तपस्या व्यर्थ होय. बरे, ज्याच्यासाठी ती तपस्या करते आहे तो वर तरी कसा आहे? 'वपुर्विरूपाक्ष अलक्ष जन्मत: दिगंबरत्वेन निवेदित वसु।'

''वराच्या ठिकाणी ज्या रूप-गुणांची अपेक्षा असते, त्यांपैकी एक देखील शिवाच्या ठिकाणी नाही. वर देखणा असावा, सुस्वरूप असावा. परंतु हा तर विरूपाक्ष आहे. तीन डोळे असलेला शिव सुरूप कसा असेल? तो विरूपच असणार. बरे, नसू दे सुंदर, परंतु तो श्रीमंत तरी असावा. याच्याकडे तर अंगावर घालण्याइतकी वस्त्रेसुद्धा नाहीत. यावरून त्याच्या श्रीमंतीची कल्पना येते. तेही सोडून दिले तर निदान उत्तम कुळातला तरी असावा. याचा कुलीनपणा काय सांगावा? याच्या मायबापाचा पत्ता नाही. याचा जन्म कुठे झाला? कधी झाला? कोणत्या वंशात झाला? हे त्याला देखील सांगता येत नाही. रूप, ऐश्वर्य आणि कुल यांपैकी एकही लक्षण याच्यापाशी नाही. अशा वराच्या प्राप्तीसाठी तपस्या करणे व्यर्थ नाही तर काय?''

ब्रह्मचाऱ्याचे रूप घेऊन शंकराने पार्वतीसमोर जी शिवनिंदा केली ती दुसऱ्या अर्थाने निंदा नसून स्तुतीदेखील आहे. समग्र विश्वाला भस्म करण्याचे सामर्थ्य ज्याच्याकडे आहे, आकाशच ज्याचे वस्त्र होऊ शकते असा जो विशाल आहे आणि जो जन्ममृत्यूच्या अतीत आहे अशा शिवपरब्रह्माचे हे वर्णन होय. सांगायचा मुद्दा असा की, जे शिवभक्त आहेत त्यांनी शिवाची वैशिष्ट्ये समजून घ्यावीत. शिवाला बाह्य अवडंबर आवडत नाही. त्याला बाह्य आभूषणे प्रिय नाहीत. विशुद्ध आचरण हाच भगवान शिवाचा एक अलंकार होय. म्हणून शिवभक्ताने शुद्धाचरण करून त्याच्या द्वारा आपले सूक्ष्मशरीर अलंकृत करावे. आपले अंत:करणच शिवाला अर्पण करायचे असते. तेच जर सुंदर नसेल तर बाह्य सौदर्याला काय अर्थ आहे. क्रियागमस्थलाचा समारोप करताना पुढे सांगतात-

ज्ञानेनाचारयुक्तेन प्रसीदति महेश्वर:।
तस्मादाचारवान् ज्ञानी भवेदादेहपातनम्।।१६.१४।।

शुष्क ज्ञानामुळे शिव प्रसन्न होत नाहीत, तर सदाचारयुक्त ज्ञानाने ते संतुष्ट होतात. याची मर्यादा देखील सांगतात. जोपर्यंत देहात प्राण आहेत तोपर्यंत सदाचारण करावे. मी ज्ञानी आहे, मी कसाही वागलो तरी चालते असे मानून जो मन:पूत वर्तन करतो त्याच्यावर शिव प्रसन्न होत नाहीत.

याप्रमाणे क्रियागमस्थलात क्रियेचे महत्त्व वर्णिले आहे. इष्टलिंगपूजा हीच क्रिया असून तिचे आजन्म परिपालन करणे म्हणजे सदाचरण होय. अंत:करणात आणि बुद्धीत सद्भावनांची आणि सद्विचारांची पेरणी केली तर सर्वेंद्रियांकडून सदाचरण घडू लागते. ज्याने आपल्या अंत:करणात सुगंध भरून घेतला असेल त्याच्या आचरणातून जगावर सुगंधाचीच बरसात होत असते. म्हणून ज्ञानाची सदाचरणाशी गाठ घालावी. अशा माणसावरच भगवान शिवाची पूर्ण कृपा होते. ज्ञान आणि आचरण अशा दोन पंखांनीच परमात्म्यापर्यंत झेप घेता येते. म्हणून प्रत्येकाने आपल्या जीवनात ज्ञान आणि कर्म यांचा समन्वय साधावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२९ जुलै १९९३

## भावागमस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीक्षेत्रात हा जो सत्संग चालू आहे त्याचे अपार महत्त्व आहे. मास देखील पवित्र आहे आणि क्षेत्र देखील पवित्र आहे. त्यातही ज्ञानपीठात हा सत्संग सुरू आहे. येथे जमलेले भक्त पवित्र भावनेने आलेले आहेत. पवित्र मास, पवित्र क्षेत्र आणि पवित्र भक्त असा हा त्रिपुटीयोग आहे. जो फळाची अपेक्षा सोडून निष्काम भावनेने कर्म करतो त्याच्यावर भगवंताची कृपा होते, असे कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले आहे. निष्काम कर्म केल्यामुळेच मनुष्याचे अंत:करण शुद्ध होते. जोपर्यंत तुमच्या मनात एखाद्या वस्तूची वासना आहे तोपर्यंत तुमचे मन शुद्ध होत नाही. ज्याच्या वृत्तीत संपूर्णपणे भगवंताची इच्छा मुरलेली असते त्याच्या वृत्तीलाच शुद्ध मानले जाते. पवित्र वस्तूचे चिंतन करणारी वृत्ती पवित्र असते तर अपवित्र वस्तूचे चिंतन करणारी वृत्ती अपवित्र असते. संसार पवित्र नाही, शुची नाही; परंतु परमात्मा मात्र पवित्र, शुची आहे. ऋग्वेदात म्हटले आहे- 'पवित्रं विततं ब्रह्मणस्पते।'

वीरशैवांच्या इष्टलिंगाचे एक पर्यायनाम 'पवित्र' असे आहे. अपवित्र वस्तूंनाही पवित्र करण्याचे सामर्थ्य त्याच्या ठायी असल्यामुळे त्याला 'पवित्र' असे म्हणतात. गंगेला आणि काशीक्षेत्राला आपण पवित्र मानतो ते कशासाठी? तर पाप्यातल्या पापी मनुष्याने येथे येऊन प्राश्चित घेतले, गंगास्नान केले तर त्याची पापे नष्ट होतात; म्हणून गंगा आणि काशीक्षेत्र पवित्र मानले जातात. इष्टलिंगही असेच पवित्र आहे. कर्माच्या उद्देशामुळे ते कर्म पवित्र की अपवित्र, ते ठरत असते. अपवित्र संसाराचे चिंतन करणारी वृत्ती अपवित्र तर पवित्र परमात्म्याचे चिंतन करणारी वृत्ती पवित्र होय. निष्काम भावनेने केलेले कर्मच पवित्र होय. गीतेत भगवंतांनी 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' असे जोर देऊन का म्हटले आहे? तुझा केवळ कर्मावरच अधिकार आहे असा 'च'कार (एव) जोडून कर्मावर भर दिला आहे. तो यासाठी की फळाची अपेक्षा धरून तुम्ही माझ्याजवळ याल तर तुमच्या मनात केवळ संसारच भरलेला असेल, मी नव्हे. जोपर्यंत मी तुमच्या मनात येणार नाही तोपर्यंत तुम्ही पवित्र होणार नाही. जीवात्मा परमात्म्याचाच अंश असल्यामुळे त्याला शुद्ध करण्याची इच्छा परमात्म्याच्या ठिकाणी असते. एवढेच नव्हे तर प्रत्येक जीवात्म्याला जवळ घ्यावे, त्याला आपले स्वरूप प्रदान करावे अशी इच्छा देखील परमात्म्याच्या ठायी असते. म्हणून भगवंतांनी सर्व शास्त्रांची, वेदागमांची निर्मिती केली.

केवळ भगवद्प्राप्तीसाठी जे कर्म केले जाते ते निष्काम कर्म होय, असे तुम्ही कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे. निष्काम कर्म केल्यावर मनुष्याची कोणती प्रगती होते या विषयी या भावागमस्थलात वर्णन केले आहे. निष्काम कर्म करता करता जीवात्म्याच्या ठिकाणी एक शिवमय वृत्ती निर्माण होते. तिला भाव असे नाव आहे. भाव याचा अर्थ काय आहे? 'भावो मानसचेष्टात्मा परिपूर्ण: शिवात्मक:।' अन्तर्बाह्य परमात्म्याचे चिंतन कराणाऱ्या वृत्तीला 'भाव' असे म्हणतात. आपला भाव जसा असेल तसे आपण होऊ. बृहदारण्यक उपनिषदात म्हटले आहे- 'यं यथोपासते तदेवभवति यद्भावं तद्भवति।' उपास्याची उपासना करणारा उपासक शेवटी उपास्यच होतो आणि ज्याची जशी भावना तो तसा होतो. याच संदर्भात योगज-आगमात म्हटले आहे- 'शिवभावानुसंधानात् शिवो भावे प्रकाशते।'

शिवमय भावनेने तुम्ही शिवचिंतन कराल तर तुमच्या मनात शिव प्रकाशमान होईल. ज्ञान आणि कर्म ही मुक्तीची साधने मानली जातात. ज्ञानाने मुक्ती मिळते असे काही जण मानतात तर ज्ञान आणि कर्म यांच्या समन्वयाने मुक्ती मिळते असे काही जण मानतात. परंतु 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त ज्ञान आणि कर्म यांच्या बरोबरच 'भाव' हे एक मुक्तीचे साधन मानले आहे.

**भावचिन्हानि विदुषो यानि सन्ति विरागिण:।**
**तानि भावागमत्वेन वर्तन्ते सर्वदेहिनाम्।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.१५)

कर्मफलाची अपेक्षा न ठेवता कर्म करणाऱ्या ज्ञानी पुरुषाची जी मानसिक स्थिती असते तिला 'भाव' असे म्हणतात. फळाची अपेक्षा तुमच्या मनात असेल तर तुमची भावना शुद्ध राहणार नाही. फळाच्या अपेक्षेमुळे आपली मानसिक स्थिती बिघडत असते. एखादे समान कर्म करीत असताना आपल्यापेक्षा दुसऱ्याला अधिक फळ मिळालेले पाहिले तर आपले मानसिक संतुलन बिघडते. म्हणून कोणतीही फलापेक्षा न ठेवता कर्म करीत असताना जी मानसिक स्थिती असते तिलाच उत्तम भावना असे म्हणतात. अशा उत्तम भावनेचे प्रतिपादन करणाऱ्या स्थलाला 'भावागमस्थल' असे नाव आहे.

**शिवोऽहमिति भावोऽपि शिवतापत्तिकारणम्।**
**न ज्ञानमात्रं नाचारो भावयुक्त: शिवो भवेत्।।१६.१६।।**

शिवत्व प्राप्त करून घेणे हे प्रत्येक जीवात्म्याचे परमलक्ष्य होय. संसारातील सारे भोग भोगून झाल्यावर जेव्हा भोगण्यासाठी काही उरत नाही त्यावेळी जीवात्म्याला शिवत्वाची ओढ लागते. हे देखील काही जणांच्या बाबतीत खरे आहे. साऱ्यांनाच ही ओढ लागते असे नाही. ज्याने जन्मजन्मांतरात साधना करून शरणस्थलात प्रवेश केला आहे अशा जीवात्म्यालाच, संसारात काही अर्थ नाही, असे वाटू लागते. त्यानंतर शिवत्वाची प्राप्ती हेच त्याचे जीवनध्येय होते, त्याचे अंतिम लक्ष्य होते. त्याला शिवत्वाची प्राप्ती करून घेण्यासाठी काय केले पाहिजे ते येथे सांगतात. वेदान्तात चार महावाक्ये आहेत. त्यांपैकी 'तत्त्वमसि' हे महावाक्य होय. ते (ब्रह्म) तूच आहेस, असा याचा अर्थ आहे. परिपक्व अंत:करणाचा शिष्य जेव्हा गुरूकडून हे महावाक्य ऐकतो तेव्हा त्याचे आपल्या अंत:करणात चिंतन करू लागतो.

'शिवोऽहम्' – मी शिवच आहे, असे चिंतन त्याच्या मनात चालू राहते. यालाच शिवोऽहम् भावना असे म्हटले जाते. शिवोऽहम् भावना दृढ झाली की शिवत्वाची प्राप्ती होते. केवळ ज्ञानाने किंवा केवळ कर्माने मुक्ती मिळत नाही तर त्यासाठी भावाचीही आवश्यकता असते. हे कसे? असा प्रश्न कुणाला पडेल तर त्याविषयी पुढे सांगतात–

**ज्ञानं वस्तुपरिच्छेदो ध्यानं तद्भावकारणम्।**
**तस्माद् ज्ञाते महादेवे ध्यानयुक्तो भवेत् सुधी:।।१६.१७।।**

वस्तूचे यथार्थ स्वरूप जाणणे म्हणजे ज्ञान होय आणि तदाकार होऊन चिंतन करणे म्हणजे ध्यान होय. म्हणून ज्ञानानंतर ध्यानाची आवश्यकता असते. परमात्मा सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप आहे असे शास्त्रे सांगतात. परमात्मा सच्चिदानंदरूप आहे, याचे ज्ञान तुम्हाला झाले, त्याच्या स्वरूपाचे ज्ञान तुम्हाला मिळाले तरी तुमच्या अंतरात्म्याशी त्याचे तादात्म्य झाले नाही. तुमच्यासमोर भाकरी ठेवलेली आहे. ती भाकरी आहे हे ज्ञान तुम्हाला आहे आणि ते खाल्ल्यामुळे पोट भरते याचेही तुम्हाला ज्ञान आहे. परंतु हे ज्ञान झाल्यामुळे तुमचे पोट भरत नाही.

जोपर्यंत ती भाकरी तुम्ही खाणार नाही तोपर्यंत तुमचे पोट भरणार नाही आणि तुम्हाला तृप्ती मिळणार नाही. हा तर आपल्या व्यवहारातला अनुभव आहे. आपल्याला परमात्म्याला काही द्यायचे नसते. परमात्मा जसा सत्, चित्, आनंदरूप आहे तसाच आपला आत्मादेखील सच्चिदानंदरूप आहे. दोघांच्या स्वरूपातं साम्य आहे. असे असले तरी आत्मा आणि परमात्मा या दोहोंचे सामरस्य करण्यासाठी साधना करायला हवी, चिंतन करायला हवे. उपनिषदात म्हटले आहे– 'आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्य: मन्तव्य: निदिध्यासितव्य:'

आत्मदर्शन हे तर प्रत्येक माणसाचे अंतिम ध्येय होय. म्हणून अत्यंत दर्शनीय वस्तू म्हणजे आपला आत्माच होय. आत्मदर्शन घेण्यासाठी प्रथम त्याचे श्रवण केले पाहिजे. नंतर त्याचे मनन केले पाहिजे. त्यानंतर त्याचे चिंतन केले पाहिजे. जर श्रवणानेच ज्ञान होत असेल तर पुढे मननाची आणि निदिध्यासाची आवश्यकता काय? ज्ञानानेच मुक्ती मिळत असेल तर आपल्याला आत्म्याचे आणि परमात्म्याचे ज्ञान तर झाले आहे. मग पुढे त्याचे मनन करावे, निदिध्यास करावा, असे उपनिषदांत का सांगावे लागले?

आत्मा परमात्म्याचे ज्ञान झाले तरी आपली वृत्ती तदाकार राहत नाही. ती अन्याकार होऊ शकते, प्रपंचात शिरू शकते. परमात्मचिंतन करताना आपल्या मनात अन्य विषयांचे चितंनही होऊ लागते. पूजा करताना अथवा भगवत्कथा ऐकताना काही काळ तुमचे मन त्यात रमते. त्यानंतर मात्र त्याच्या संस्कारानुसार ते दुसरीकडे वळते. जेव्हा तुमच्या लक्षात येते की, आपण आपल्या मनाला जे काम करायला सांगितले ते काम हे करत नसून दुसरेच काही करत आहे, तेव्हा तुम्ही त्याला पुन्हा पकडून पहिल्या कामाला लावता. अन्याकार होणाऱ्या वृत्तीला पुन्हा पुन्हा पकडून भगवंताच्या चिंतनास लावण्यासाठी जीवात्म्याची निरंतर चाललेली धडपड म्हणजेच मनन होय. ही धडपड एकदोन दिवसांची नसते तर आयुष्यभराची असते. जेव्हा ध्यानाला बसल्यावर तुमची वृत्ती आत्मकार राहील, अन्य कोणत्याही विषयाकडे किंचितदेखील वळणार नाही, तेव्हा समजा की, तुमचे मनन पक्व झाले आहे.

त्यानंतर तुम्हाला निदिध्यास करावा लागतो. अखंड तैलधारेप्रमाणे कुठेही खंडित न होता आपल्या मनात सदोदित परमात्म्याचे जे चिंतन चाललेले असते त्याला 'निदिध्यास' म्हणतात. तुमची वृत्ती जेव्हा अखंडपणे शिवचिंतनात मग्न होते, कुठलाही अन्य विषय मध्ये प्रवेश करीत नाही तेव्हा तीच शिवोऽहम् भावना होय. ज्ञानानंतर जर तुमच्या मनात शिवोऽहम् भावनेचा उगम झाला नाही, ती दृढ झाली नाही तर तुम्हाला मुक्ती प्राप्त होणार नाही. केवळ शुष्क ज्ञान तुम्हाला मुक्ती देऊ शकत नाही. आपल्या देशाचे राष्ट्रपती कोण आहेत, याची सामान्यत: सर्वांना माहिती असते. त्याच्या रूपाबद्दल, कामकाजाबद्दल आणि दैनंदिन जीवनाबद्दल तुम्हाला ज्ञान झाले तरी ते तुम्हाला लाभदायक ठरत नाही. परंतु जेव्हा तुमचा राष्ट्रपतींशी प्रत्यक्ष परिचय होईल, त्यांच्या मनात तुमच्याबद्दल सौहार्दभाव उत्पन्न होईल, त्यांच्या सान्निध्यात तुम्ही राहाल तेव्हा त्यांच्याकडून तुमचे कल्याण होईल. हे व्यवहारातील उदाहरण होय. त्याप्रमाणे तुम्हाला परमात्म्याचे केवळ ज्ञान झाले तर त्यापासून काही लाभ मात्र होणार नाही. ज्ञान तुम्हाला मिळेल ग्रंथ वाचून, सत्संगात जाऊन. परंतु आपला आत्मा आणि परमात्मा एकच आहे अशी भावना जर तुमच्या मनात दृढ झाली तरच तुम्हाला परमानंदाची प्राप्ती होईल. म्हणून येथे म्हटले आहे की वस्तूचे यथार्थ स्वरूप जाणणे म्हणजे ज्ञान आणि तन्मय होऊन वस्तूत निमग्न होणे म्हणजे ध्यान. परमात्म्याचे ज्ञान होऊन देखील जर तुमच्या मनात सांसारिक विषयांचे ध्यान होत असेल तर ज्ञान होऊन देखील तुम्हाला दु:खच भोगावे लागेल.

महाभारतात एक कथा आलेली आहे. पांडव वनवासात असताना एके दिवशी अर्जुन काही कामानिमित्त हिमालयात गेला. त्याच दिवशी बृहदश्व महर्षी पांडवाच्या पर्णकुटीत आले. सर्वांनी त्यांचे यथोचित स्वागत करून जलपानाची, फलाहाराची व्यवस्था केली. महर्षी फार दुरून अनवाणी पायांनी चालत आले हे जाणून युधिष्ठिर त्यांचा श्रमपरिहार करण्यासाठी त्यांचे चरणसंवाहन करू लागला, त्यांचे पाय चुरू लागला. थोड्या वेळाने त्याच्या डोळ्यांतील अश्रू महर्षींच्या पायावर पडले तेव्हा महर्षींनी चमकून युधिष्ठिराकडे पाहिले. त्याचे डोळे अश्रूंनी भरलेले होते. वास्तविक एक तपस्वी त्यांच्या पर्णकुटीत अतिथी म्हणून आला होता. त्याचे आतिथ्य करण्याचे भाग्य लाभल्यामुळे युधिष्ठिराला आनंद व्हायला हवा होता. मग तो दुःखी का बरे झाला असावा? असा महर्षींना प्रश्न पडला.

''युधिष्ठिरा, तू का बरे रडत आहेस?'' महर्षींनी विचारले.

''महाराज, आज सकाळीच माझा बंधू अर्जुन हिमालयात गेला तो अजून परतलेला नाही. त्याच्या आठवणीने व्याकुळ माझ्या डोळ्यांत अश्रू आले. क्षमा असावी.'' युधिष्ठिर म्हणाला.

बृहदश्व म्हणाले, ''युधिष्ठिरा, संसार तर असाच आहे. जेव्हा जेव्हा तुझ्या भावनेत संसार शिरेल तेव्हा तो तुला रडवल्याशिवाय राहणार नाही. म्हणून संसाराला आपल्या भावनेत प्रवेश करू देऊ नये. तू भलेही संसारात राहा, पण तुझ्या भावनेत संसार राहू देऊ नकोस. तू कसाही असलास तरी संसार तुला रडवल्याशिवाय राहणार नाही.''

''पण महाराज, या दुःखाला विसरावे कसे?'' युधिष्ठिराने विचारले.

''युधिष्ठिरा,'' बृहदश्व म्हणाले, ''आपले दुःख विसरण्यासाठी आपल्यापेक्षाही जे अधिक दुःखी आहेत त्यांच्याकडे पाहायला शिकले पाहिजे. आपल्यापेक्षा कितीतरी जीव संसारात अधिक दुःख भोगत असतात, सुख-दुःख तर आपल्या प्रारब्धाने आपल्याला मिळत असतात. ते जाणून आपल्या भावनेत संसाराला घुसू न देता तिथे निरंतर परमात्मचिंतन व्हावे असा प्रयत्न केला तर आपल्याला दुःख भोगावे लागणार नाही.''

सांगण्याचे तात्पर्य असे की, जीवात्मा जन्मजन्मांतरापासून अनेक भलीबुरी कर्मे करत, नवनवे देह धारण करत, कर्मांची फळे भोगत आलेला असतो. त्याला जे काही मिळते ते त्याच्या प्राक्तनामुळेच मिळते. मिळायच्या वेळीच ते मिळते आणि जेवढे मिळायचे तेवढेच मिळते. आधी काही मिळत नाही आणि अधिक काही मिळत नाही. मृत्यूच्या वेळी घर, दार, आप्तेष्ट, संपत्ती आणि देहदेखील येथेच सोडून जीवात्म्याला जावे लागते. परंतु भल्याबुऱ्या कर्मांचे संस्कार मात्र तो घेऊन जातो. संस्कार म्हणजे वासना. ही वासना जीवाला पुन्हा पुन्हा जन्म घ्यायला भाग पाडते आणि दुःख भोगवते. जीवात्म्याने जन्मजन्मांतरात अधिकाधिक संसारचिंतनच केलेले असते. क्वचित् काही काळ परमात्मचिंतन केले असते. माणसे जागृतावस्थेत संसारचिंतन करतातच, परंतु झोपल्यावर स्वप्नातदेखील संसारच पाहात असतात. प्रामाणिकपणे आत्मपरीक्षण केले तर असे दिसून येईल की, आपण संसाराचे अधिक चिंतन करतो आणि भगवंताचे अगदी थोडे चिंतन करतो.

भगवंताचे ध्यान करणे म्हणजे चिंतन आणि संसाराचे ध्यान करणे म्हणजे चिंता. चिंतन आणि चिंतेत खूपच अंतर आहे. जिच्यामुळे जीवात्म्याला दुःखच दुःख मिळते तिला 'चिंता' असे म्हणतात. चिंता आणि चिता या दोन शब्दांत एका अनुस्वाराचा फरक आहे. चिता माणसाला मेल्यावर एकदाच जाळते तर चिंता माणसाला जिवंतपणी सतत जाळत राहते. जी जाळते ती 'चिंता' होय. म्हणून शास्त्रकार म्हणतात की, चिंता सोडा चिंतन करा. संसार करण्याला मनाई नाही. संसार अवश्य करा. परंतु तो करताना भगवच्चिंतन देखील करा. प्रत्येक

जीवाला आपापली कर्तव्ये पार पाडावीच लागतात. संसार करताना भगवच्चिंतन केले तर संसार तुमचे काहीही बिघडवू शकत नाही. बाहेर संसार आणि आत भगवंत. ही एक जीवनकला आहे. तुम्ही संसारात राहा आणि तुमच्या आत परमात्म्याला राहू द्या. त्यामुळे संसारही चालेल आणि परमार्थही चालेल. कर्नाटकातल्या निजगुणशिवयोगी या संताने म्हटले आहे की, जो लौकिक आणि पारमार्थिक अशी दोन्ही जीवने एकाच वेळी जगत असतो तोच बुद्धिमान होय. संसार सर्वांसाठी आहे. प्रत्येकाचा संसार वेगवेगळा असतो. गृहस्थाचा संसार वेगळा. ब्रह्मचाऱ्याचा संसार वेगळा, वानप्रस्थाश्रमाचा संसार वेगळा आणि संन्याशाचा संसार वेगळा. त्यांची कर्तव्ये करणे हाच संसार होय. हृदयात भगवच्चिंतन चालले असताना बाहेर कर्मेदेखील चालू असावीत.

अनेक जन्मांतील संस्कारांमुळे जीवात्म्याच्या ठिकाणी देहाबद्दल आणि इंद्रियांबद्दल अभिमान दृढ झालेला असतो. म्हणून तो त्यांचेच अधिकाधिक चिंतन करीत असतो. आयुष्यात परिवर्तन घडवायचे असेल तर संस्कारात बदल करावा. अभ्यासामुळे दृढ संस्कार नष्ट होऊ शकतात. आपल्या हातून घडणारे एखादे लहान धर्मकार्य देखील आपले एखादे मोठे पाप नष्ट करू शकते. अग्नीची ठिणगी लहान असली तरी ती कापसाचा पर्वत भस्मसात करून नामशेष करू शकते. जन्मजन्मांतरातील पापांचे पर्वत भगवच्चिंतनामुळे नष्ट होतात. परमात्म्याचे ज्ञान झाले तरी परमात्म्याचे ध्यान केले पाहिजे. ध्यान म्हणजे अंतर्यात्रा होय. काशी, रामेश्वर, ज्योतिर्लिंग इत्यादी यात्रा बाह्य आहेत. ह्या यात्रा आपण नेहमीच करीत असतो. त्या यात्रा केल्यामुळे मानसिक समाधान मिळते. बाह्ययात्रा केल्याने जर तुम्हाला एवढे समाधान मिळते तर अंतर्यात्रा केल्याने किती समाधान मिळेल? प्रत्येकाचे शरीर म्हणजे एक क्षेत्र आहे असे गीतेत म्हटले आहे. ते क्षेत्र का? तर तेथे तीर्थ आहे, तेथे भगवंत आहे. पवित्र मन म्हणजे तीर्थ होय आणि देहात नांदणारा आत्मा म्हणजेच परमात्मा हा तिथला देव होय. जेथे परमात्मा नित्य राहतो त्याला तीर्थक्षेत्र म्हणतात. जो परमात्मा बाह्य क्षेत्रामध्ये आहे तोच परमात्मा आपल्या देहरूपी क्षेत्रात देखील वास्तव्य करतो. परमात्मा सर्वव्यापक असल्यामुळे तो केदारला आहे तसा काशीला आहे. काशीला आहे तसा रामेश्वरलाही आहे, तो बाहेर आहे तसाच आत देखील आहे. बाह्य यात्रेत माणसाला सुख मिळते त्यापेक्षाही सहस्रपटीने अधिक सुख अंतर्यात्रा केल्याने मिळते.

ध्यान हाच अंतर्यात्रेचा मुख्य मार्ग आहे. वृत्ती अंतर्मुख झाल्यावर आत्मा आणि परमात्मा यांच्या सामरस्याचे ज्ञान होते आणि हृदयात सतत भगवच्चिंतन चालू होते तेव्हा आपले शरीर हे एक तीर्थक्षेत्रच होऊन राहते. कोणत्याही बाह्य क्षेत्रात तुम्ही काही काळ राहू शकाल, परंतु नंतर क्षेत्राचा त्याग करावाच लागतो. म्हणून शास्त्रकाराने म्हटले आहे की, तीर्थक्षेत्र सोडण्याआधी तुम्ही स्वतःच तीर्थक्षेत्र होऊन गेलात तर पुन्हा येथे येण्याची आवश्यकता भासणार नाही. त्यावेळी तुम्हाला क्षेत्रात जाऊन देवदर्शन करण्याऐवजी तुमच्या हृदयातच आत्मदर्शन होऊ लागेल. म्हणून परमात्म्याचे स्वरूपज्ञान झाल्यावर त्याचे सतत ध्यान करावे लागते, त्याला आपल्या भावनेत सदैव वागवावे लागते. यालाच भावागमस्थल म्हणतात. भावनेचे काय महत्त्व आहे आणि भावनेशिवाय राहणाऱ्या मनुष्याची स्थिती कशी असते याविषयी उद्या विचार करू. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

३० जुलै १९९३

## भावागमस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालच्या आशीर्वचनात 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील भागवागमस्थलावर थोडा प्रकाश टाकला आहे, ज. रेणुकाचयार्यांचे म्हणणे असे की, केवळ ज्ञानामुळे परमानंदाची प्राप्ती होत नाही. ज्याचे ज्ञान आपल्याला झाले आहे त्याच्याशी जर आपण समरस होऊ शकलो नाही तर परमानंद प्राप्त होणारच नाही. आनंदप्राप्ती हेच तर जीवात्म्याचे ध्येय आहे. 'आनंदाद्येव भूतानि जायन्ते आनंदेन जातामि जीवन्ति।'

परब्रह्माची स्थिती कशी आहे याचा शास्त्रात विचार केला आहे. शास्त्रे सांगतात– 'आनंदं प्रयन्तभिविशन्ति तस्माद्विजिज्ञासस्व आनंदं ब्रह्मेति।'

आनंद हेच परब्रह्म होय. आनंद ब्रह्म आहे तर विषयांत देखील आनंद मिळतो म्हणून विषयदेखील ब्रह्म मानायला हवेत का? तर सांगतात की, विषयांच्या ठिकाणी जो आनंद प्रतीत होतो तो ब्रह्मानंदाचा अंशमात्र असतो. ती त्याची एक झलकच असते. गूळ आणि साखर सर्वांगाने मधुर असते. साखरेचा एक कण जिभेवर ठेवला तरी त्याचे माधुर्य आपल्या अनुभवाला येते. लाडवात जी गोडी असते ती गुळाची. लाडवातील इतर पदार्थ गोड नसतात, परंतु लाडू खाताना जरी गूळ दिसत नसला तरी त्याच्याच गोडीचा आस्वाद आपण घेत असतो. त्याप्रमाणे परमात्म्याच्या ठिकाणी असलेल्या आनंदसागराचा अंशमात्र विषयांच्या ठिकाणी असतो. म्हणूनच विषय आनंदरूप भासतात. विषयांतील आनंद परमानंद नाही, शाश्वत आनंद नाही आणि वास्तविक आनंद देखील नाही. काही काळापूर्वी सुखरूप वाटणारे विषयच कालांतराने दुःखरूप वाटू लागतात. विषय जेव्हा अनुकूल असतात तेव्हा ते सुखरूप भासतात आणि जेव्हा प्रतिकूल असतात तेव्हा ते दुःखरूप भासतात. हिवाळ्यात जे ऊन सुखदायक वाटते तेच उन्हाळ्यात दुःखदायक ठरते. त्याप्रमाणे विषय सुखाचे साधन आहे तसेच दुःखाचेही साधन आहे. विषय अनुकूल असतील तर सुख आणि प्रतिकूल असतील तर दुःख. परमानंदाची प्राप्ती कशी करून घ्यावी या विषयी येथे सांगत आहेत–

**अन्तर्बहिश्च सर्वत्र परिपूर्णं महेश्वरम्।**
**भावयेत् परमानन्दलब्धये पण्डितोत्तमः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.१८)

येथे 'पण्डितोत्तमः' असे पंडिताला विशेषण लावले आहे. एक असतो पंडा, दुसरा असतो पंडित आणि तिसरा असतो पंडितोत्तम. जो काशीयात्रेला येतो त्याला पंड्याचा परिचय होतो. 'पण्डा' या शब्दाचा अर्थ आज बदलला आहे. पंडा म्हणजे फसवणारा असे लोक समजतात. परंतु पंडा या शब्दाचा हा अर्थ नव्हे. ज्याच्या जवळ सारासारविवेकबुद्धी असते तो पंडा होय. पंडा ही बुद्धीची एक स्थिती आहे. तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी जो पंडा आढळतो तो मूलतः चांगलाच होता. प्राचीन काळी आजच्यासारख्या यात्रा कंपन्या नव्हत्या. त्यावेळी तीर्थयात्रेला जाणाऱ्या व्यक्तीला काय पाहावे, कोणता विधी करावा यांचे मार्गदर्शन करून तिची सेवा करून, ती व्यक्ती संतुष्ट होऊन जे देईल ते पंडा घेत असे. तो यात्रेकरूचा मार्गदर्शक आणि सेवक होता. परंतु आधुनिक काळात पंडे बिघडले असून त्यांची व्याख्याही बदलली आहे.

पंडा म्हणजे ज्याच्या जवळ विवेकबुद्धी आहे असा मनुष्य. विवेकबुद्धी असलेला, दुसऱ्यांना साहाय्य करणारा, ज्ञान देणारा, क्षेत्रमाहात्म्य सांगणारा, यात्रापद्धती समजावून देणारा जो मनुष्य तो 'पंडा' होय. अनेक ग्रंथांचे अध्ययन करून जो शास्त्रव्रत सांगतो तो 'पंडित' होय. परंतु जो स्वतःला जाणतो तो 'पंडितोत्तम' होय. पंडितोत्तम म्हणजे आत्मज्ञानी व्यक्ती. केवळ आत्मज्ञानामुळे परमानंद प्राप्त होत नाही. त्यासाठी काहीतरी करावे लागते. त्याविषयी येथे सांगतात- 'अन्तर्बहिश्च सर्वत्र परिपूर्णं महेश्वरम्'.

ईश्वर आत आहे तसाच बाहेरही आहे. जी वस्तू व्यापक असते ती अंतर्बाह्य सर्वत्र असते. आकाश हे व्यापक तत्त्व आहे. ते येथे काशीत आहे तसेच रामेश्वरात देखील आहे. आपल्या देशात आहे तसेच परदेशात देखील आहे. किंबहुना सर्व विश्वात भरून राहिले आहे. ईश्वर हे आकाशापेक्षाही व्यापक तत्त्व आहे. ते अंतर्बाह्य सर्वत्र व्याप्त आहे. ईश्वराचे व्यापकत्व सांगताना आकाशाचेच उदाहरण दिले जाते. कारण आकाश ही आपल्या नित्य अनुभवाला येणारी वस्तू आहे. आकाश हे अविकृत तत्त्व आहे. पृथ्वी, आप, तेज आणि वायू ही तत्त्वे प्रदूषित होऊ शकतात, आकाश नव्हे. कितीही पाऊस पडला तरी आकाश भिजत नाही. सूर्य कितीही तापला तरी आकाश तापत नाही. आत्म्याची स्थिती जशी आहे तशीच आकाशाची देखील आहे. आत्म्याप्रमाणेच आकाशाला अग्नी जाळू शकत नाही, पाऊस भिजवू शकत नाही, वायू शोषू शकत नाही आणि शस्त्र छेदू शकत नाहीत. आकाशाची स्थिती जवळ जवळ आत्म्यासारखीच असते. कारण परमात्म्यापासून प्रथम आकाशच निर्माण झाले. म्हणून जसा परमात्मा तसे आकाश आहे. परमात्मा निर्गुण आहे. परंतु आकाशात मात्र एक गुण आहे. शब्दगुण. पुढे महाभूते निर्माण होत गेली आणि गुण वाढत गेले. पृथ्वीत शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच गुण आहेत. तर आकाशात एकच शब्दगुण आहे. त्यापलीकडे असलेल्या परमात्म्यात तर एकही गुण नाही. परमात्मा अशब्द आहे. आकाश जसे सर्वत्र व्याप्त आहे तसाच परमात्मादेखील सर्वव्यापक आहे.

आपण परमात्मरूपात पूर्ण एकरूप झालो आहोत, असे जीवात्म्याने ध्यान केले पाहिजे. आपल्या आतही परमात्मा आहे आणि आपल्या बाहेरदेखील परमात्मा आहे, अशी भावना दृढ केली पाहिजे. गंगेच्या प्रवाहात घडा टाकला तर तो गंगाजलाने पूर्ण भरतो आणि गंगेतच बुडतो. त्याच्या आतबाहेर सर्वत्र गंगाजलच असते. त्याप्रमाणे प्रपंचातील प्रत्येक जीवात्म्याच्या आत आणि बाहेर परमात्माच आहे. गंगेच्या गार पाण्यात डुंबणाऱ्या माणसाला प्रखर उन्हाळ्यात देखील शीतलतेचाच अनुभव येत असतो. जोपर्यंत तो पाण्यात असतो तोपर्यंत त्याच्या सर्वांगाला शीतलता वेढून राहिलेली असते. तो पाण्याबाहेर आला तर त्याला उन्हाचे चटके बसतात. त्याप्रमाणेच जीवात्मा जोपर्यंत आत्मस्वरूपाचे चिंतन करीत असतो तोपर्यंत त्याला परमानंदाची प्राप्ती होत असते, परंतु जेव्हा आत्मस्थिती सोडून तो बहिर्मुख होतो तेव्हा त्याला सांसारकि दुःखाचे चटके सोसावे लागतात. म्हणूनच येथे सांगितले आहे की आपल्या आत आणि बाहेर केवळ परमात्माच आहे अशी भावना दृढ करावी. असे केल्यावरच त्याला परमानंदाची प्राप्ती होईल. प्रत्येकाला परमानंद हवा असतो. परंतु जो भावना दृढ करतो त्यालाच आनंदाची प्राप्ती होते. जो भावना करीत नाही त्याला आनंद दुर्लभ असतो. म्हणून परमानंदप्राप्तीसाठी परमात्मा सर्वत्र आहे, अशी भावना दृढ करण्याचा अभ्यास केला पाहिजे. परमात्मा आनंदरूप असल्यामुळे त्याच्या भावनेमुळे जीवात्म्याला आनंद मिळतो, तर प्रपंच दुःखरूप असल्यामुळे त्याच्या चिंतनाद्वारे जीवात्म्याला दुःखच दुःख मिळते. ज्याच्या ठिकाणी भावना नसते अशा व्यक्तीची स्थिती कशी असते या विषयी पुढे सांगतात-

**अर्थहीना यथा वाणी पतिहीना यथा सती।**
**श्रुतिहीना यथा बुद्धिर्भावहीना तथा क्रिया।।१६.१९।।**

या ठिकाणी तीन उदाहरणे दिली आहेत. 'अर्थहीना यथा वाणी'. आपल्या वाणीतून प्रकट झालेले शब्द जर अर्थशून्य असतील तर त्याला काहीही महत्त्व नसते. शब्द अर्थपूर्ण असावेत. अर्थहीन, अन्यार्थ, अवाच्य आणि अश्लील शब्दांचा प्रयोग आपल्या वाणीने करू नये. सर्व प्राण्यांत केवळ मनुष्यालाच वाणीची देणगी मिळाली आहे. म्हणून मनुष्याने या देणगीचा सदैव सदुपयोग केला पाहिजे. आपल्या वाणीमुळे आपल्याला आणि इतरांना आनंदच मिळावा अशा प्रकारे अर्थपूर्ण शब्दांचा प्रयोग करावा.

दुसरे उदाहरण आहे– 'पतिहीना यथा सती'. एखादी पत्नी जर पतीला सोडून राहात असेल तर तिचे जीवन अर्धभग्न असते. लौकिक जीवनात पतिपत्नीची समरसताच महत्त्वाची असते. एखाद्या वस्तूचे दोन तुकडे केले तर त्या वस्तूची जशी अवस्था होते तशीच गृहस्थजीवन स्वीकारलेल्या परंतु पतीपासून वेगळ्या राहणाऱ्या पत्नीची अवस्था असते. अध्यात्मसाधना करणारा साधक गृहस्थजीवन नाकारू शकतो. परंतु याच्या दृष्टीने परमेश्वर हाच त्याचा पती असतो. म्हणून लौकिक जीवनातील स्त्री असो अथवा आध्यात्मिक क्षेत्रातील साधक असो, कुणीही पतीवाचून राहू शकत नाही. अध्यात्मजीवन उच्चकोटीतले असते म्हणून त्याची गोष्ट वेगळी. परंतु लौकिक जीवनात पतियुक्त सतीला जेवढे महत्त्व असते तेवढे पतीपासून वियुक्त झालेल्या स्त्रीला नसते. तिचे जीवन अर्धवट मानले जाते.

तिसरे उदाहरण आहे– 'श्रुतिहीना यथा बुद्धिः'. वेदाध्ययनाचा संस्कार न झालेली बुद्धी असंस्कृत आणि व्यर्थ असते त्याप्रमाणे भावनेशिवाय केलेली कृती व्यर्थ असते. तुम्ही कोणते कर्म करीत आहात हे फारसे महत्त्वाचे नसून तुम्ही ते कोणत्या भावनेने करीत आहात हे महत्त्वाचे असते. भावनाशून्य होऊन केलेले सत्कर्मदेखील उत्तम फल प्रदान करीत नसते. म्हणनू एक कन्नड संताने म्हटले आहे–

**माडि माडि केट्टरु मनविल्लदे**
**नीडि नीडि केट्टरु निजविल्लदे**

काही लोक कर्म करून देखील त्याचे फळ मिळवू शकत नाहीत. लोकांना उत्तम भोजन घालून देखील त्या कर्माचे फळ काही लोकांना मिळत नाही. याचे कारण तो लोकांना भावनेने, प्रेमभावनेने खाऊ घालत नसतो हे होय. तो कर्म करतो, परंतु त्याची भावना चांगली नसल्यामुळे त्या कर्माचे फळ त्याला मिळत नाही. आपण मंदिरात जातो आणि दर्शन घेऊन बाहेर येतो. त्यावेळी मंदिराबाहेर ओळीने भिकारी बसलेले असतात. बिचाऱ्यांना पोटासाठी भीक मागावीच लागते. ते मोठ्या अजिजीने देवाच्या आणि धर्माच्या नावाने भीक मागत असतात. एखाद्याची काहीच देण्याची इच्छा नसते तरीही एखादा भिकारी त्याच्या मागे चिवटपणाने लागतो. अशा वेळी भिकाऱ्यापासून सुटका व्हावी म्हणून त्या मनुष्याने खिशातून एक रुपयाचे नाणे काढले आणि भिकाऱ्याच्या थाळीत फेकले तर त्याला कर्माचे कोणते फळ मिळेल? त्याने भिकाऱ्याला प्रेमाने दान दिले नाही तर रागाने दिले. त्याच्याजवळ नाण्याऐवजी जर दगड असता तर कदाचित् तोच त्याने भिकाऱ्याला फेकून मारला असता. त्याने दान केले, परंतु त्या मागची त्याची भावना शुद्ध नव्हती. म्हणून त्याला त्या दानामुळे पुण्य मिळणार नाही तर पापच

मिळेल. रागाने दगड फेकून मारल्यामुळे जेवढे पाप होते तेवढेच पाप, त्याने अशुद्ध भावनेने भिकाऱ्याला दान दिल्याबद्दल त्याला मिळेल. दानापुळे पुण्य मिळते हे खरे असले तरी अशुद्ध भावनेने केलेले दान आपल्या पदरी पापच बांधते हेही तेवढेच खरे. क्रिया चांगली असली तरी ती जेव्हा भावशून्य असते अथवा अशुद्ध भावनायुक्त असते तेव्हा कर्त्याला तिचे चांगले फळ मिळत नाही. म्हणून आपण कोणती क्रिया करीत आहोत आणि ती कोणत्या भावनेने करीत आहोत याचे प्रत्येकाने भान ठेवले पाहिजे. हाच विषय पुढे अधिक सोपा केला आहे-

**चक्षुर्हीनो यथा रूपं न किंचिद्वीक्षितुं क्षमः।**
**भावहीनस्तथा योगी न शिवं द्रष्टुमीश्वरः॥१६.२०॥**

येथे काही चांगल्या उपमा देऊन आशय स्पष्ट केला आहे. बाह्य वस्तू पाहण्यासाठी डोळ्यांची आवश्यकता असते. डोळ्यांशिवाय आपण रूप पाहू शकत नाही. ज्याप्रमाणे आंधळा मनुष्य रूप पाहण्यास असमर्थ असतो त्याप्रमाणे भावनाशून्य मनुष्य परमात्म्याला पाहू शकत नाही. म्हणून ज्ञानी होऊन देखील जर भावना नसेल तर त्याला परमानंदाची प्राप्ती होणार नाही. ज्ञानप्राप्तीनंतर जो सूक्ष्म अहंभाव ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी असतो तो नष्ट करण्यासाठी भावनेची आवश्यकता असते. तुलसीदासाने 'रामचरितमानसा'त या विषयी सुंदर विवेचन केले आहे.

प्रसंग आहे सीतास्वयंवराचा. शिवधनुष्य उचलून त्याला प्रत्यंचा लावण्यास मोठमोठे वीर असमर्थ ठरले. त्यावेळी श्रीरामाने ते शिवधनुष्य सहज उचलले आणि प्रत्यंचा लावण्यासाठी वाकवताच ते मोडले. श्रीरामाने पण जिंकला म्हणून त्यांना वरमाला घालण्यासाठी आपल्या दोन सख्यांसह सीता त्यांच्यासमोर गेली. श्रीराम उंच होते तर सीता त्यांच्यापेक्षा ठेंगणी. तिने वरमाला घालावी म्हणून श्रीरामांनी आपली मान खाली झुकवली. सीता लवकर माळ घालीचना. म्हणून श्रीराम म्हणाले, ''वरमाला घालायला उतका उशीर कशाला लावतेस?''

''आपण शिवधनुष्य तोडताना किती उशीर लावला? सारे लोक उत्सुकतेने पाहात होते. केव्हा तोडतात! केव्हा तोडतात! म्हणून मी देखील वरमाला घालायला उशीर लावत आहे.''

''सीते'', हसून श्रीराम म्हणाले, ''शिवधनुष्य मोडणे हे फार कठीण काम होते. वरमाला घालणे हे अत्यंत सोपे काम आहे. त्यासाठी इतका उशीर कशाला?''

''मोडणे फार सोपे असते, परंतु जोडणे मात्र कठीण असते. आपल्याला फक्त शिवधनुष्य मोडायचे होते. परंतु मला मात्र दोन घराण्यांचे चिरंतन नाते जोडायचे आहे. म्हणून उशीर होत आहे.'' सीता उत्तरली.

या दोघांच्या संभाषणात तुलसीदासांनी आपले मनोगत प्रकट केले आहे. सीता लवकर वरमाला घालत नाही. त्यामुळे श्रीरामाला बराच वेळ मान खाली झुकवून उभे राहावे लागते. याप्रसंगी तुलसीदासांनी सीतेच्या मुखात पुढील वाक्य घातले आहे-

''आपण ज्ञान आहात, मी भक्ती आहे. भक्तीसमोर ज्ञानाला नम्र झालेच पाहिजे. म्हणून तर मी येथे वरमाला घालायला उशीर लावत आहे.''

जे नम्र होत नाही ते ज्ञानच नव्हे, हेच तुलसीदासांनी या प्रसंगी समजावून सांगितले आहे. ज्यांना शिवधनुष्य पेलता आले नाही असे अनेक राजे सभामंडपात मान ताठ करून बसलेले होते आणि ज्याने शिवधनुष्य पेलून पण जिंकला तो श्रीराम मात्र मान घाली झुकवून उभा होता.

अज्ञानी माणसे अहंकारानी फुगलेली असतात तर ज्ञानी मात्र नम्र असतात हेच तुलसीदासांना सूचित करायचे

आहे. जो वृक्ष फळांनी लहडलेला असतो तो खाली झुकलेला असतो आणि ज्याला एकही फळ धरलेले नसते तो वृक्ष मात्र ताठ उभा असतो. ज्ञानी पुरुष फळांनी लहडलेल्या वृक्षासारखा नम्र असतो तर अज्ञानी माणूस निष्फल वृक्षासारखा अहंकारी असतो. जो नम्र आहे तोच जगात सुखासमाधानाने जीवन व्यतीत करू शकतो. जो अहंकारी असतो तो फार काळ सुखी राहू शकत नाही. आपल्या मुखात जीभ आणि दात असतात. जीभ जन्मापासून असते तर दात नंतर येतात. म्हातारपणी जीभ जशीच्या तशीच असते, परंतु दात मात्र पडून जातात. उशिरा आलेले दात लवकरच पडतात, परंतु जीभ मात्र तशीच असते. याचे कारण काय? दातांच्या ठिकाणी मृदुता नाही, विनम्रता नाही. जिभेच्या ठिकाणी ती आहे. दात कठोर असतात. जे काही समोर येईल त्याच्याशी ते झगडतात, युद्ध करतात. म्हणून ते लवकर पडतात. जो जिभेसारखा नम्र असतो तो फार काळ जिवंत राहतो आणि जो दातांसारखा कठोर असतो तो फार काळ जगत नाही.

'महापुरे झाडे जाती। तेथे लव्हाळे वाचती' असे एका संताने म्हटले आहे. महापुरात आणि वादळात मोठमोठे वृक्ष उन्मळून पडतात. कारण ते झुकत नाहीत, ताठ असतात. परंतु त्यावेळी नम्र होणारे लव्हाळे मात्र टिकून राहतात. आपल्या भावनेत जर परिवर्तन केले नाही तर आपली अवस्थाही अशा वृक्षासारखी होईल. म्हणून येथे भावनेला खूप महत्त्व दिले आहे. शिवयोग्याजवळ जर भावना नसेल तर त्याला भगवद्दर्शन होणार नाही. भावनाबळानेच भगवंताला वश करता येते. म्हणून म्हटले आहे– 'भावनाविहितं कर्म पावनादपि पावनम्।'

अर्थात् भावनायुक्त होऊन केलेले कर्म सर्व पवित्र कर्मांत पवित्र होय. ज्याची भावना शिवमय असते त्यालाच शिवाचा सर्वत्र साक्षात्कार होतो. यासाठी पुढे सांगतात–

**भावशुद्धेन मनसा पूजयेत् परमेष्ठिनम्।**
**भावहीनां न गृह्णाति पूजां सुमहतीमपि।।१६.२१।।**

भावशुद्धीने भगवंताची पूजा केली जाते. पूजा करण्याआधी सामान्यत: सर्वांना शुद्ध व्हावे लागते. स्नान करून, स्वच्छ धुतलेली वस्त्रे परिधान करून आपण पूजेला बसतो. शुद्धी दोन प्रकारची आहे. बाह्यशुद्धी आणि अंतरंगशुद्धी. बाह्यशुद्धी सोपी आहे. गंगास्नान करून तुम्ही शुद्ध होऊ शकता किंवा घरी न्हाणीघरात बसून 'गंगे च यमुने चैव गोदावरी सरस्वती' असे म्हणत स्नान करून शुद्ध होऊ शकता. स्नान करून बहिरंगशुद्धी होऊ शकते, परंतु अंतरंग शुद्धी झाल्याशिवाय पूजा सफळ होत नाही. तुम्ही फार मोठी पूजा करीत आहात. चार तास, सहा तास, बारा तास पूजेत घालवता, परंतु जर तुमचे मन शुद्ध नसेल तर तुमची पूजा भगवंताला प्रिय होणार नाही. तुमची पूजा मोठी असेल, परंतु भगवंताला प्रिय होणार नाही. तुमची पूजा मोठी असेल परंतु भावना मात्र छोटी आहे. आपण भगवंताला जे अर्पण करतो, हजार बिल्वपत्रे असो की हजार कमळफुले, ते भगवंताचेच असते. पाणी त्याचेच आहे, बेल त्याचाच आहे, फुले त्याचीच आहेत. आपण जे काही त्याला अर्पण करीत असतो ते सारे त्याचेच असते. त्याचे त्यालाच द्यायचे असते, परंतु ते देताना त्याच्यासोबत आपली भावना जोडून द्यायची असते. तरच त्या पूजेचे फळ आपल्याला मिळते. भगवंताला आपल्या उपचारांपेक्षा आपली भावना हवी असते. म्हणून भावना अत्यंत श्रेष्ठ आहे असे शास्त्रांत म्हटले आहे. पूजेचे विधिविधान लहान असेल पण आपली भावना मोठी, उत्कट असेल तर पूजेचे अधिकाधिक फळ आपल्याला प्राप्त होईल.

**नैरन्तर्येण संपन्ने भावे ध्यातुं शिवं प्रति।**
**तद्भावो जायते यद्वत् क्रिमेः कीटस्य चिंतनात्।।१६.२२।।**

भावनेमुळे काय घडू शकते याचे एक सुंदर उदाहरण येथे दिले आहे. एक सामान्य कीटक भ्रमराचे चिंतन करता करता शेवटी भ्रमरच होतो. मग जो जीवात्मा परमात्म्याचे निरंतर चिंतन करतो तो जीवात्मा परमात्मा का बरे होणार नाही? आपले संपूर्ण व्यक्तित्व बदलण्याचे सामर्थ्य ध्यानामध्ये असते. प्रत्येकाला महान व्हायचे असते, आपले व्यक्तित्व विशाल करून घ्यायचे असते. मोठ्याचे चिंतन कराल तरच मोठे व्हाल. लहानाचे चिंतन कराल तर लहानच व्हाल. जगात सर्वांत मोठे काय आहे? उपनिषदांत म्हटले आहे की, जो सर्वांत मोठा आहे तोच परमात्मा होय, तोच आनंदरूप आहे. प्रपंच लहान आहे. जे लहान आहे ते दुःखरूप आहे. जे सर्वांत मोठे असते त्यालाच 'ब्रह्म' म्हटले जाते. म्हणून सर्वांनी परब्रह्माचेच चिंतन केले पाहिजे. भावागमस्थलाचा समारोप करताना शेवटी सांगतात–

**निष्कलंकं निराकारं परब्रह्म शिवाभिधम्।**
**निर्ध्यातुमसमर्थोऽपि तद्विभूतिं विभावयेत्।।१६.२३।।**

भगवंताचे चिंतन करणे योग्य आहे. परंतु जो निष्कलंक आणि निराकार आहे त्याचे ध्यान कसे करावे? आपल्या मनाला निराकाराचे ध्यान करण्याचा अभ्यास नसतो. ते सदोदित आकाराचे चिंतन करीत असते. मग निराकाराचे ध्यान कसे करावे? त्याविषयी येथे सांगितले आहे. जर निराकाराचे ध्यान करण्याइतके सामर्थ्य आपल्यामध्ये नसेल तर भगवंताच्या ऐश्वर्ययुक्त सगुण रूपाचे ध्यान करावे. ज्याच्यापासून सृष्टी उत्पन्न झाली, ती ज्याच्यात स्थिर आहे आणि शेवटी ती ज्याच्यात विलीन होणार आहे असा तो परमात्मा कसा असेल? असे ध्यान केले तरी ते फलप्रद होऊ शकते. हा सर्व प्रपंच म्हणजे परमात्म्याचे ऐश्वर्य होय, विभूती होय. म्हणून प्रपंचाकडे परमात्मभावनेने पाहण्याचा अभ्यास केला तर साकारातून निराकाराकडे जाण्याचा मार्ग दिसू लागेल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
३१ जुलै १९९३



## ज्ञानागमस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कर्म, भाव आणि ज्ञान ही भगवत्प्राप्तीची तीन साधने होत. ज्ञान आणि कर्म यांच्याविषयी बऱ्याच ग्रंथांत चर्चा केलेली आढळते. परंतु भावाविषयी मात्र ते ग्रंथ मौन राहिले आहेत. गेले दोन दिवस भावाचे महत्त्व आपण ऐकले आहे. आजपासून ज्ञानागमस्थलाचा आरंभ होत आहे. या स्थलात ज्ञानाचे माहात्म्य महत्त्व वर्णिले आहे. शास्त्रांत म्हटले आहे–

**यथेह कर्मचितो लोकः क्षीयते।**
**एकमेवामुत्र पुण्यचितो लोकः क्षीयते।।'**

कर्म करून जे काही संपादन केले जाते त्याचा कालांतराने क्षय होतो. कर्मे करून जीवात्मा पारलौकिक भोगांच्या इच्छेने पुण्यसंचय करतो, स्वर्गादी लोकांत जाऊन त्यांचा भोग घेतो आणि पुण्यक्षय होताच पुन्हा भूतलावर येतो. इहलोक ही कर्मभूमी होय. येथेच कर्म करून सारे काही मिळवायचे असते. पाप असो, पुण्य असो की ज्ञान असो, तुमच्याकडून घडलेल्या पापांचा दुःख भोगूनच क्षय होतो आणि तुमच्याकडून घडलेल्या पुण्याचा सुख भोगूनच क्षय होतो. सुख–दुःख देऊन पुण्य–पाप दोन्ही नष्ट होतात. त्यानंतर पुन्हा मनुष्यजन्म घ्यावा लागतो. शास्त्रकार विचारतात की तुम्ही किती वेळा जन्म घेणार? माणूस किती जन्म घेतो याची गणना करणे अत्यंत कठीण आहे. माणसाची जन्मजन्मांतरे मोजताना शास्त्रकार देखील थकून गेले आहेत. अंत्यक्रिया कार्यासाठी पृथ्वीदेखील अपुरी पडावी इतक्या वेळा एक जीवात्मा देह धारण करतो, असे म्हटले जाते.

महाभारतात एक कथा आहे. कर्ण जेव्हा अंतिम श्वास सोडत होता त्यावेळी भगवान श्रीकृष्ण त्याच्याजवळ दान मागण्यासाठी गेले. कारण कर्ण दानशूर होता अशी त्याची ख्याती होती. एखाद्या तत्त्वाचे निष्ठेने पालन करून काही लोकांनी त्या तत्त्वाशी आपले नाव कायम जोडून घेतले. सत्यवादी हरिश्चंद्र, धर्मराज युधिष्ठिर, दानशूर कर्ण इत्यादी. कर्णाने आजवर अनेकांना अनेक प्रकारची दाने केली, परंतु हे दान अंतिम होते. अंतिम काळी केले जाणारे दान सर्वश्रेष्ठ असते. म्हणून एखादा मनुष्य अस्वस्थ होऊन त्याचे जगण्याचे चिन्ह दिसत नसेल तर घरातील इतर माणसे त्याच्या नावाने दानधर्म करतात. युद्धभूमीवर त्यावेळी श्रीकृष्णांनी कर्णाला दान मागितले, ''मला काही तरी दान दे.''

''मी आपल्याला काय दान देऊ?'' कर्ण म्हणाला, ''माझ्याजवळ आता काय आहे?''

कृष्णाने त्याला आठवण दिली. ते म्हणाले,

''तुझे दोन दात सोन्याचे आहेत. तू जवळ काही नाही म्हणतोस. तुझ्या दातात सोने आहे, हेच मला दे.''

त्यावेळी कर्णाने एक दगड घेऊन आपले दोन्ही दात पाडले आणि श्रीकृष्णला देऊन टाकले. त्यावेळी भगवान श्रीकृष्ण प्रसन्न होऊन त्याला म्हणाले, ''तुझी दानशूरता पाहून मी प्रसन्न झालो आहे. तुला काही वर मागायचे असेल तर माग.''

''मी आयुष्यभर दान देत आलो, कुणाकडे कधी याचना केली नाही. मी दाता आहे, याचक नाही.'' कर्णाने उत्तर दिले.

''देवाचा एक स्वभाव आहे. न देता जो जातो तो देव नव्हे, जो केवळ घेऊन जातो तो जीव आहे आणि जो देऊन जातो तो देव आहे. मी देव असल्यामुळे तुला काही दिल्याशिवाय जाऊ शकत नाही. म्हणून तुला काय हवे ते सांग.'' श्रीकृष्ण म्हणाले.

''मला काही मागायची इच्छा उरलेली नाही.'' कर्ण म्हणाला, ''परंतु भगवान होऊन तुम्ही हट्ट धरून बसलात म्हणून मी असे मागतो की पूर्वी जिथे कधीच कुणावर अंत्यसंस्कार केले नसतील त्याच ठिकाणी माझ्या देहावर अंत्यसंस्कार करावे.''

असे म्हणून कर्णाने आपला प्राण सोडला आणि भगवान कृष्ण चिंतेत पडले. त्याचा देह घेऊन ते अंत्यक्रियेसाठी जागा शोधू लागले. ज्या ज्या ठिकाणी ते देह खाली ठेवत त्या त्या ठिकाणी भूमीतून आवाज येई– 'इथे अशा हजारो कर्णांवर अंत्यसंस्कार केले आहेत.' साऱ्या पृथ्वीवर ते फिरले, पण त्यांना योग्य अशी जागा मिळाली नाही.

सांगण्याचे तात्पर्य असे की, आपण असंख्य वेळा जन्म घेतो आणि असंख्य वेळा मरणे भोगतो. आपल्यावर इतके वेळा अंत्यसंस्कार केले गेले की सारी पृथ्वीच आपल्यासाठी स्मशानभूमी बनली आहे. आपल्या अगणित जन्मांची आपल्याला आठवण नसली तरी जे ज्ञानी आहेत, ज्यांनी योगसाधना केली आहे, ज्यांना जन्मजन्मांतराचे स्मरण आहे अशा लोकांना मात्र याची जाणीव असते. जन्मृत्यूच्या चक्रातून सुटण्यासाठीच तर ज्ञानमार्गाचा अवलंब केला जातो. आतापर्यंत कर्म आणि भाव यांच्याविषयी आपण ऐकले आहे. आता येथून पुढे ज्ञानाचा विचार करायचा आहे.

**भावेन किं फलं पुंसां कर्मणा वा किमिष्यते।**
**भावकर्मसमायुक्तं ज्ञानमेव विमुक्तिदम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.२५)

केवळ भावनेने आणि केवळ कर्माने भगवत्प्राप्ती होणार नाही. भावना आणि कर्म यांनी युक्त जे ज्ञान तेच मुक्तीचे साधन ठरते. या ठिकाणी अतिशय सुरेख रीतीने त्रिपुटी वर्णिली आहे. प्रथम कर्म, मध्ये भाव आणि शेवटी ज्ञान. भाव मध्यभागी ठेवलेला आहे. तो उभयान्वयी आहे. ज्याची कर्मालाही आवश्यकता आहे आणि ज्ञानालादेखील. भावयुक्त कर्म फलप्रद असते आणि भावयुक्त ज्ञान मुक्तिप्रद असते. भावरहित कर्म आणि भावरहित ज्ञान काही उपयोगाचे नाही. म्हणूनच कर्म आणि ज्ञान या दोहोंना सांभाळणारा भाव मध्यभागी ठेवलेला आहे. ज्ञानाविषयी येथे सांगितले आहे–

**केवलं कर्ममात्रेण जन्मकोटिशतैरपि।**
**नात्मनां जायते मुक्तिर्ज्ञानं मुक्तेर्हि कारणम्।।१६.२६।।**

कुणी म्हणेल की कर्म करून आम्ही मुक्ती प्राप्त करून घेऊ. तर त्यांनी विचार करावा की शेकडो कल्प लोटले तरी मुक्ती मिळणे असंभव होय. कर्मचक्र मोठे विलक्षण आहे. संचित, प्रारब्ध आणि आगामी अशी तीन प्रकारची कर्मे आहेत. ती परस्परांशी संबंधित आहेत.

प्रत्येकजण या जन्मात जे आयुष्य भोगत असतो ते प्रारब्धकर्माच्या बळावर. मनुष्य या जन्मात जे आयुष्य भोगत असतो ते प्रारब्धकर्माच्या बळावर. मनुष्य या जन्मात जे सुखदु:ख भोगता ते या जन्मातला कर्माचे फळ नसते. तो गतजन्मातल्या कर्माचे फळ भोगत असतो. यालाच 'प्रारब्ध' असे म्हणतात. फल देण्यासाठी जे सिद्ध झाले ते कर्म प्रारब्ध होय. गतजन्माची कर्मफळे भोगता भोगता मनुष्य नवीन कर्मे करीत असतो. कर्मापासून कोणाचीही सुटका नाही. शुभाशुभ कर्मे प्रत्येकाकडून घडतातच. प्रारब्धकर्माचा भोग घेताना मनुष्याकडून जी नवी कर्मे घडतात त्या कर्मफळांचा संचय होत जातो. तेच संचित कर्म होय. संचित कर्मातलेच थोडे कर्म प्रारब्धकर्म होते. कर्मचक्रात फसलेला मनुष्य त्यापासून लवकर मुक्त होत नाही. संचित कर्म नष्ट करूनू नव्या कर्माची फळे मिळू नयेत अशी खबरदारी घेऊन आणि प्रारब्धकर्म भोगून जो संपवतो त्यालाच मुक्ती मिळते. अशाच मनुष्याची कर्मजालातून सुटका होते. केवळ ज्ञानानेच कर्मजालातून जीवात्मा मुक्त होऊ शकतो.

ज्ञानाला शास्त्रांमध्ये 'अग्नी' असे म्हटले आहे. जेव्हा ज्ञानाग्नी प्रकट होतो तेव्हा तो सर्व कर्मांना भस्म करतो. सर्व कर्म म्हणजे संचित कर्म, प्रारब्ध कर्म नव्हे. जर ज्ञानाग्नीने प्रारब्धकर्म नष्ट झाले तर मनुष्याला ऐहिक जीवन जगताच येणार नाही, त्याला मरावेच लागेल. ज्ञानामुळे जर ज्ञानी पुरुषाचा मृत्यू झाला तर ज्ञानपरंपरा कशी चालत राहील? प्रारब्धकर्म ज्ञानी आणि अज्ञानी दोघांत भेद करत नाही. म्हणून आपण जगात पाहतो की भल्या भल्या ज्ञानी पुरुषांना देखील मोठे कष्ट सहन करावे लागतात, दु:ख भोगावे लागते. एवढ्या मोठ्या ज्ञानी पुरुषांना देखील इतके दु:ख का भोगावे लागते? असा प्रश्न सामान्य माणसाला पडतो. परंतु प्रारब्धकर्म भोगूनच संपवावे लागते. त्याशिवाय ते संपत नाही. प्रारब्धकर्माला थोडेफार बदलण्याचे सामर्थ्य योगी पुरुषांकडे असते. काल, कर्म आणि माया या तिन्हींना शिवभक्त पार करू शकतो, असे निजगुण शिवयोगींनी म्हटले आहे. ईश्वराबद्दल जर अनन्य भक्ती असेल तर प्रारब्धकर्माला थोडीशी मुरड घालता येते. सामान्य व्यवहारात आपण पाहतो की एखाद्या आजारी मनुष्याला औषधोपचार करून देखील उतार पडत नाही. एखादे अनुष्ठान केल्यावर मात्र त्याला बरे वाटू लागते. उत्कट भक्तीमुळे एखाद्या वेळी प्रारब्धकर्मात किंचित बदल होऊ शकतो इतकेच.

**ज्ञानहीनं सदा कर्म पुंसां संसारकारणम्।**
**तदेव ज्ञानयोगेन संसारविनिवर्तकम्।।१६.२७।।**

ज्ञानशून्य कर्म हे संसाराचे कारण ठरते. तेच कर्म ज्ञानयुक्त झाले तर संसारसागर तरून जाण्याचे एक साधन ठरते. एखादा लोखंडाचा गोळा खांद्यावर घेऊन जर आपण नदीत उतरलो तर तो आपल्याला बुडवतो. परंतु त्याच लोखंडाचा पत्रा करून जर नाव बनवली तर ती आपल्याला नदीच्या पैलतीरी नेते. त्याप्रमाणे कर्मासोबत ज्ञान असेल तर ते आपल्याला संसारातून तारून नेते.

अज्ञानी मनुष्याची कर्मे बंधनकारक आहेत आणि ज्ञानी पुरुषांची कर्मे बंधनकारक का नाहीत? कर्तृत्वभावना बंधनाचे कारण असते. हे कर्म मी करीत आहे अशा अहंकारी भावनेने अज्ञानी मनुष्य कर्म करीत असतो. हीच कर्तृत्वभावना होय. परंतु ज्ञानी पुरुष मात्र कर्तव्यभावनेने कर्म करीत असतो. कर्तृत्वभावना आणि कर्तव्यभावना यांच्यामध्ये महदंतर आहे. भगवान श्रीकृष्णाने युद्धभूमीवर अर्जुनाला 'कर्तव्यभावनेने युद्ध कर' असे सांगितले. कारण युद्ध करून दुष्टांचा नाश करणे आणि सुष्टांचे पालन करणे हे क्षत्रियांचे कर्तव्य होय. मी माणसांचा संहार करतो अशी भावना मनात न आणता मी माझे नियत कर्तव्य करतो अशा भावनेने जर तू युद्ध केलेस तर तुला

पाप लागणार नाही, असे श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले. म्हणून ज्ञानी मनुष्य कर्तृत्व भावनेने कर्म करीत नसतो तर कर्तव्यभावनेने करत असतो. त्यामुळे त्यांना कर्मफलांचा उपभोग घ्यावा लागत नाही.

**फलं क्रियावतां पुंसां स्वर्गाद्यं नश्वरं यतः।**
**तस्मात् स्थायिफलप्राप्त्यै ज्ञानमेव समभ्यसेत्॥१६.२८॥**

आगमांमध्ये पशुकर्म आणि पतिकर्म असे कर्माचे दोन भाग केले आहेत. एखाद्या वस्तूच्या अभिलाषेने अथवा स्वर्गादी भोगाच्या इच्छेने जे यज्ञयागादी कर्म केले जाते ते पशुकर्म होय. पशूमध्ये भोगलालसा अधिक असते. भाजी मंडईत एखादा पशू भाजीत तोंड घालतो, त्यासाठी मार खातो तरी, पुन्हा पुन्हा तेच कर्म करत राहतो. मनुष्य हा देखील दोन पायांचा पशूच आहे. एखादे अनुचित कर्म केल्याबद्दल शिक्षा भोगून देखील तो पुन्हा पुन्हा तेच कर्म करतो. त्याच्या कडून घडणारे कर्म पशुकर्म होय. पतीच्या प्राप्तीसाठी केले जाणारे कर्म हे पतिकर्म. भगवान शिव हे पशुपती आहेत. सर्व जीव पशू असून भगवान शिव त्यांचे पती आहेत. जीवाला प्रिय असणारे कर्म पशुकर्म आहे तर शिवाला प्रिय असणारे कर्म पतिकर्म आहे. पशुकर्म म्हणजे सामान्य सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीसाठी केले जाणारे स्वार्थप्रेरित कर्म होय, तर पतिकर्म म्हणजे भगवान शिवाला प्रसन्न करण्यासाठी, त्यांच्याशी समरस होण्यासाठी केले जाणारे परमार्थप्रेरित कर्म होय. भगवान शिव प्रसन्न झाले की अवघे विश्व आपल्याला मिळाले असे होते. परंतु माणसांना एवढे ज्ञान नसते. ते ईश्वराजवळ जाऊन देखील त्याच्या कृपेची याचना करीत नाहीत. त्याला मागतात पुन्हा सांसारिक वस्तू आणि सांसारिक सुखच. पतीजवळ जाऊन देखील त्यांची पशुभावना सुटलेली नसते. सत्त्वगुणी झाल्याशिवाय मनुष्याची पशुभावना सुटणार नाही. बऱ्याच माणसांचे शरीर मनुष्याचे असते, परंतु विचार आणि भावना मात्र पशूच्या असतात. शास्त्रे सत्य सांगतात. सत्य कटू असते म्हणून माणसांना ते अप्रिय वाटते. परंतु शास्त्राने जीवात्म्यांना त्यांच्या उद्धाराचा मार्ग नेहमीच दाखवून दिला आहे.

पशुकर्म जीवात्म्याला जन्ममरणाच्या चक्रात भरडत असते. पतिकर्म मात्र त्याची संसारचक्रातून सुटका करते. वीरशैवांच्या इष्टलिंग पूजेला 'पतिकर्म' म्हणतात. कारण लिंगस्वरूप होणे हेच लिंगपूजेचे अंतिम फळ होय. 'अंगा'चे (जीवाचे) 'लिंगा'शी (शिवाशी) सामरस्य साधण्यासाठीच इष्टलिंगपूजा, प्राणलिंगपूजा आणि भावलिंगपूजा केली जाते. याशिवाय जी अन्य कर्मे आहेत ती पशुकर्मे होत. माणसाला संपत्तीचा अनिवार लोभ असतो. त्याला लोभ सोडता सोडवत नाही. या विषयी एक कथा सांगण्यात येते.

एका राजच्या दरबारात एक बालकवी गेला आणि एक स्वरचित कविता गाऊन त्याने वाहवा मिळवली. राजा खूष झाला. त्याने प्रधानाला जवळ बोलावून सांगितले की ''या बालकवीला घेऊन खजिन्यात जा आणि एक घटकेपर्यंत त्याला जे हवे ते नेऊ दे.' मात्र घटका संपताच खजिना बंद झाला पाहिजे.''

प्रधान त्या बालकवीला घेऊन खजिन्याकडे निघाला. जड जवाहीर नेण्यासाठी बालकवीने प्रधानाकडून प्रचंड मोठे पात्र मागून घेतले. ते त्याला नीट उचलता येईना. प्रधानाने खजिन्याचे दार उघडले आणि दारात बसून तो बालकवीला म्हणाला,

''तुला या खजिन्यातले जे काही हवे असेल ते तू नेऊ शकतोस. परंतु फक्त एक घटके पर्यंतच. त्याच्या आत तुला जे घ्यायचे ते घेऊन तू बाहेर आला पाहिजेस. घटका संपताच मी दार बंद करून घेणार.''

संपत्ती पाहून बालकवीला मोह आवरेना. आधी त्याने भांड्यात मोती भरून घेतले. त्याला वाटले सोने यापेक्षा मौल्यवान आहे. मग त्याने भांड्यात सोने भरून घेतले. मग त्याला वाटले हिरे सोन्यापेक्षा मौल्यवान आहेत. त्याने

भांड्यातले सोने काढून हिरे भरले, परंतु ते भांडे याला उचलता येईना. त्यानंतर हे काढ, ते ठेव असे करता करता एक घटका सरली. प्रधान दारातून म्हणाला, ''ए बाळा, तुझ्या एवढ्याशा देहात किती प्रचंड लोभ भरलेला आहे. रिकामे असून देखील उचलता येणार नाही असे मोठे भांडे तू आणलेस आणि ते गच्च भरून घेतलेस. तुझा लोभ किंचित जरी कमी असता तर तू गळ्यात, हातात दागिने घालून, गाठोड्यात हिरे, जडजवाहीर बांधून तू सहज नेऊ शकला असतास आणि तेवढे तुला मौजमजा करण्यासाठी आयुष्यभर पुरले असते. पण तुझा प्रचंड लोभ नडला. आता ठेव ते भांडे तिथेच आणि निघ बाहेर.

असे म्हणून प्रधानाने त्याला बाहेर काढले आणि खजिन्याचे दार बंद करून घेतले.

ऐकायला ही एक कथा आहे, परंतु तिच्यात आशय देखील भरला आहे. आपल्याला मनुष्यजन्म मिळाला आहे, तो रत्नांचे खडे वेचण्यासाठी नव्हे तर ज्ञानरत्नांचा संग्रह करण्यासाठी. ज्ञान संपादन करून नंतर तुम्ही काहीही केले तरी ते हानिकारक ठरत नाही. पण आपण म्हणतो की एवढ्या लवकर ज्ञान कशाला मिळवायचे? रिटायर्ड झाल्यानंतर करू त्याचा विचार. परंतु तोपर्यंत आपल्या जगण्याचा भरवसा नाही हे आपण ध्यानात घेत नाही. सर्व माणसे त्या बालकासारखी लोभी असतात आणि मिळवता येईल तेवढी संपत्ती, कुणाला लुबाडून, फसवून, खोटे बोलून कमावतात. भरलेले पात्र येथेच ठेवून जीवात्म्याला निमूटपणे रिकाम्या हाताने इहलोक सोडावा लागतो. 'मुठ्ठी बांध के आया था। हाथ पसार के जायेगा।।' असे कबीरांनी म्हटले आहे. कबीर म्हणतात की, जेव्हा बाळाचा जन्म होतो तेव्हा तो मूठ बांधून येतो, काही ना काही सोबत घेऊन येतो, परंतु जाताना मात्र हात पसरून जातो. मेलेल्या माणसाची मूठ बांधण्याचा कितीही प्रयत्न केला तरी ती बांधली जात नाही. प्रकृती माणसाला सतत ज्ञान देत असते ते समजून घेण्याची क्षमता मात्र माणसाजवळ नसते. राजा असो की रंक, तो जिवंत असेपर्यंत सांसारिक वस्तूंचा उपभोग घेत असतो. परंतु त्या सोबत मात्र नेऊ शकत नाही. तुम्ही हॉटेलमध्ये जाऊन खाद्यपदार्थ खाऊ शकता चहा पिऊ शकता. परंतु ज्यात खाद्यपदार्थ खाता ती प्लेट, चमचे आणि कपबशी घरी नेऊ शकत नाही. तुम्ही एक प्लेट मागवलेली असते आणि त्याचे पाच रुपये मोजलेले असतात. ते पाच रुपये खाद्य पदार्थांचे असतात, प्लेटचे नसतात. हॉटेलमध्ये खाण्याचा, पिण्याचा अधिकार तुम्हाला आहे. प्लेट, कपबशी घरी नेण्याचा अधिकार मात्र नाही. त्याप्रमाणे संसारात आल्यावर जीवात्म्याला सांसारिक पदार्थांचा उपभोग घेण्याचा अधिकार आहे. परंतु मृत्युसमयी ते सोबत घेऊन जाण्याचा अधिकार नाही.

म्हणून सर्वांनी प्रामाणिकपणे विचार करावा. आपल्याला सर्वश्रेष्ठ असा मनुष्यजन्म मिळाला म्हणून त्याचा सदुपयोग करून घ्यावा. ज्ञान संपादन करावे, ज्ञानयुक्त कर्मच आपल्याला तारणारे आहे हे समजून घ्यावे. पशुकर्म न करता पतिकर्म करण्यातच आपले कल्याण आहे याची जाणीव ठेवावी. ज्ञानाइतकी पवित्र वस्तू दुसरी कुठलीही नाही. ज्ञानच आपल्या अभ्युदयाचा मार्ग आहे हे ओळखून ज्ञानसाधना करावी, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१ ऑगस्ट १९९३



## ज्ञानागमस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

ज्ञान हे सर्वश्रेष्ठ आहे असे कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले आहे. लौकिक ज्ञानाशिवाय मनुष्य जगात सुखी होऊ शकत नाही आणि आध्यात्मिक ज्ञानाशिवाय त्याला मुक्ती मिळत नाही. सुखी होण्यासाठी आणि मुक्त होण्यासाठी ज्ञानाची आवश्यकता असते. म्हणून सुभाषितकाराने म्हटले आहे– 'ज्ञानेन हीनाः पशुभिः समानः' ज्याच्याजवळ ज्ञान नाही त्याचे शरीर मनुष्यासारखे असले तरी त्याची गणना पशूतच केली जाते. ज्ञानामुळेच मनुष्याला फार मोठा लाभ होतो. ज्ञानाची प्राप्ती कशी होते या विषयी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे–

**शास्त्राभ्यासादियत्नेन सद्गुरोरुपदेशतः।**
**ज्ञानमेव समभ्यस्येत् किमन्येन प्रयोजनम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.२९)

'मला ज्ञान हवे, मला ज्ञान हवे' असा केवळ घोष केल्याने ज्ञान प्राप्त होत नाही. शास्त्राभ्यास आणि सद्गुरूची कृपा यांमुळेच ते प्राप्त होऊ शकते. त्यासाठी प्रथम शास्त्राध्ययन करायला हवे. शास्त्रे अनेक आहेत. त्याविषयी म्हटले आहे– 'शब्दजालं महारण्यं चित्तभ्रमणकारणम्'

शास्त्रांना 'शब्दजाल' अशी संज्ञा दिली आहे. एखाद्या घोर अरण्यात नवखा मनुष्य चुकून शिरला तर त्या अरण्याच्या बाहेर येण्याचा मार्ग त्याला सापडत नाही, तो पुरता भांबावून जातो. तशीच अवस्था शास्त्रांचा अभ्यास करणाऱ्या नवख्या अभ्यासकाची होते. एका शास्त्राच्या परिपूर्ण अभ्यासासाठी एक आयुष्य देखील पुरत नाही. व्याकरण, ज्योतिष, आयुर्वेद, न्याय, सांख्य, वैशेषिक, वेदान्त, जैन, बौद्ध, चार्वाक अशी कितीतरी शास्त्रे आहेत. आयुष्यभर अनेक शास्त्रांचा अभ्यास केला तरी शेवटी अध्यात्मशास्त्रच माणसाचे कल्याण करू शकते.

आद्यशंकराचार्य जेव्हा प्रथम काशीला आले तेव्हा ते नगरात कोण काय करीत आहे हे पाहण्यासाठी भ्रमण करू लागले. एका गल्लीतून जाताना त्यांना दिसले की ८०–९० वर्षांचा एक वृद्ध व्याकरणाच्या सूत्रांचा अभ्यास करीत बसला होता. त्याच्या वयाकडे पाहता तो मृत्यूच्या अगदी समीप गेला होता आणि अध्ययन मात्र करीत होता व्याकरणाचे. सर्व शास्त्रांत व्याकरणाचा अभ्यास प्रथम करायचा असतो, परंतु तो वृद्ध मात्र आयुष्याच्या संध्याकाळी त्याचे अध्ययन करीत होता. त्यावेळी त्याच्याजवळ जाऊन शंकराचार्य म्हणाले, "हे व्याकरणशास्त्र सोडून द्या आणि ईश्वराचा नाम जप करा.

**भज गोविन्दम् भज गोविन्दम्। गोविन्दम् भज मूढमते।।**

आयुष्याच्या संध्याकाळी ईश्वराचे नाव न घेता तुम्ही अन्य शास्त्रांचे अध्ययन करीत आहात. यामुळे तुमचे कल्याण होण्याची शक्यता नाही. म्हणून आता निवांत बसून परमात्मचिंतन करा, ज्ञान संपादन करा, तरच तुमचे कल्याण होईल."

प्रत्येकाला शास्त्रांचा अभ्यास करावा लागतो. आपण नित्य पूजापाठ करतो तसे रोज थोडे फार धर्मग्रंथाचे अध्ययन केले पाहिजे. जर धर्मग्रंथाचे अध्ययन कोणी करत नसेल तर तो त्याचा प्रमाद होय. आयुष्याच्या अंतिम काळात स्वाध्याय करावा लागतो, असा काही लोकांचा गैरसमज असतो. परंतु जशी नित्य शिवपूजा करतात

तसाच स्वाध्याय देखील नित्य केला पाहिजे आणि तो देखील प्रमादरहित. त्यामध्ये आळस करू नये. आज पारायण राहू दे, उद्या करू, असा विचार माणूस करत असतो. आपल्या जीवनात 'उद्या' उजाडेल की नाही याची फिकीर तो करीत नाही. एकदा आळसाची सवय झाली तर मनुष्य कायमचा आळशी बनून जातो. एकदा प्रमादाची सवय झाली की मनुष्याकडून पुन्हा पुन्हा प्रमाद होत राहतात. म्हणून स्वाध्याय, अभ्यास कधीही सोडू नये. अभ्यासामुळेच तर ज्ञान प्राप्त होते. 'करत करत अभ्यास। जडमति होत सुजाण' असे तुलसीदासांनी म्हटले आहे. अभ्यासामुळे जडबुद्धी मनुष्य देखील ज्ञानी होऊ शकतो.

शास्त्रे अनेक असली तरी त्याच्यामध्ये दोनच महत्त्वाची आहेत. पहिले, वेदांचा अंतिम भाग म्हणजे 'वेदान्त' आणि दुसरे, आगमांतील अंतिम भाग म्हणजे 'सिद्धान्त'. भगवान शिवांच्या श्वासोच्छवासातून वेदांची उत्पत्ती झाली आणि त्यांच्या मुखातून आगमांची निर्मिती झाली. वेद आणि आगम हे भगवान शिवाचेच उपदेश होत. वेदांचा अंतिम उपदेश 'वेदान्त' आणि आगमांचा अंतिम उपदेश 'सिद्धान्त' होय. ज्याला वेदान्त इष्ट असेल त्याने वेदान्ताचे अध्ययन करावे आणि ज्याला सिद्धान्त इष्ट असेल त्याने सिद्धान्ताचे अध्ययन करावे. जे वेदान्ताचा अभ्यास करून प्राप्त होते तेच सिद्धान्ताचा अभ्यास करून प्राप्त होते. वेदान्तात ज्याला 'ब्रह्म' म्हणतात त्यालाच सिद्धान्तात 'लिंग' म्हणतात. ब्रह्म आणि लिंग यात काहीही भेद नाही.

म्हणून प्रत्येक मनुष्याने शास्त्राभ्यास केला पाहिजे. प्रयत्न करून देखील शास्त्रांचा अर्थ कळत नसेल तर सद्गुरूला शरण गेले पाहिजे. स्वाध्याय करून जे समजत नाही ते गुरूच्या उपदेशामुळे ध्यानात येते. हृदयस्थग्रंथी आणि शास्त्रग्रंथी या दोन्ही ग्रंथी गुरूपदेशामुळे मोकळ्या होतात, सुटतात. शास्त्रांच्या बाबतीत आणि आत्म्याच्या व परमात्म्याच्या अस्त्विाच्या बाबतीत आणि आत्मा-परमात्म्याच्या ऐक्याच्या बाबतीत आपल्या मनात जे संदेह असतात ते गुरूपदेशामुळे नष्ट होतात. या ग्रंथाचे श्रोता महर्षी अगस्त्य हे काही सामान्य नव्हते. सर्व शास्त्रांचे अध्ययन केलेले ते एक विद्वान होते, तरी देखील त्यांच्या मनात काही संदेह उत्पन्न झाले होते. जेव्हा जगद्गुरू रेणुकाचार्य त्यांच्या आश्रमात येतात तेव्हा त्यांचे पूजन करून, त्यांना नमस्कार करून अगस्त्य विचारतात,

'मी सर्व आगमांचे आणि वेदान्ताचे अध्ययन केले आहे तरी माझ्या मनात संदेह आहे तो दूर करण्यासाठी सर्व सिद्धान्ताचे जे सारसत्त्व आहे, जे ऐकल्यावर माझे सगळे संशय नष्ट होऊन मी कृतकृत्य होईन आणि ज्यामुळे माझाच नव्हे तर सर्व प्रपंचाचा उद्धार होईल असा उपदेश आपण मला करावा.'

अशी अगस्त्यांनी प्रार्थना केली. अगस्त्यांसारख्या महर्षींना स्वाध्याय करून देखील जेव्हा शास्त्र कळले नाही तेव्हा त्यांना सद्गुरूला शरण जावे लागले. त्यावेळी सद्गुरूंनी जो उपदेश केला तो केवळ महर्षी अगस्त्यांनाच नव्हे तर विश्वातल्या सर्व प्राणिमात्रांना उपकारक ठरला. आज अगस्त्य नाहीत आणि जगद्गुरू रेणुकाचार्यही नाहीत. परंतु 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या रूपाने त्यांचा ज्ञानप्रवाह आज देखील वाहात राहिला आहे. सद्गुरूंची करुणा हीच त्यांची कृपा असते. अभ्यासात थोडे न्यून असले तरी सद्गुरूच्या कृपेने ते पुरते होते. म्हणून शास्त्रावर आणि आपल्या इष्टदेवतेवर साधक जेवढी श्रद्धा ठेवतो त्यापेक्षाही अधिक श्रद्धा त्याने गुरूवर ठेवली पाहिजे. अशा प्रकारे शास्त्राभ्यास करून आणि सद्गुरूंची कृपा संपादन करून ज्ञान प्राप्त करून घ्यायला हवे.

**ज्ञानं परशिवाद्वैतपरिपाकविनिश्चयः।**
**येन संसारसम्बन्धविनिवृत्तिर्भवेत् सताम्।।१६.३०।।**

शिवाद्वैत निश्चित होणे हेच ज्ञान होय. सर्व प्रपंच शिवमय आहे हेच शिवाद्वैत होय. शिवाशिवाय दुसऱ्या

कशालाही अस्तित्व नाही अशा दृढ ज्ञानालाच येथे 'ज्ञान' असे म्हटले आहे. शिवाद्वैत ज्ञानामुळे संसारबंधने गळून पडतात. जीवात्म्याचे संपूर्ण लक्ष शिवाकडे लागले म्हणजे त्याची संसारातून सुटका होते. आपले मन एकावेळी एकाच विषयाशी समरस होऊ शकते, अनेक विषयांशी नव्हे. आपले मन ज्या ठिकाणी असते त्याच ठिकाणी आपले खरे वास्तव्य असते. मग आपला देह घरात असला आणि आपले मन बाजारात असले तर आपण खरे बाजारात असतो, घरी नव्हे. जेव्हा तुमच्या दृष्टीने सर्व प्रपंच शिवमय होतो तेव्हा प्रपंच शिल्लक राहातच नाही, प्रपंचरूपात देखील शिवच विद्यमान असतो. मग त्यावेळी तुमचा प्रपंचाशी संबंध राहत नाही. अशा प्रकारे शिवाद्वैत ज्ञानामुळे प्रपंचातून सुटका होते.

प्रपंचाशी संबंध का बरे तोडून टाकावा? असा प्रश्न एखाद्याच्या मनात उत्पन्न होईल. तर जोपर्यंत प्रपंचाशी संबंध राहील तोपर्यंत आपल्याला क्षणिक सुखांचा मोह पडत राहील. परंतु जेव्हा प्रपंचापासून मुक्त होऊन तुमचे मन शिवाशी समरस होईल तेव्हा अखंड परमानंदाची प्राप्ती होते. अखंड आनंद मिळावा अशी जीवात्म्याची इच्छा असते. परमात्म्याशी अखंड संबंध जुळला तरच अखंड आनंद मिळू शकतो. ज्या सांसारिक वस्तूपासून वा व्यक्तींपासून तुम्हाला आनंद मिळत असतो ती वस्तू किंवा व्यक्ती दूर गेल्यावर तुम्हाला दुःख होते. सांसारिक वस्तू तुम्हाला अखंड सुख केव्हाही देऊ शकणार नाही. ज्याची निर्मिती अथवा जन्म होतो त्याचा विनाशही अटळपणे होतो. त्यामुळे वस्तू आणि व्यक्ती यांचा वियोग देखील अटळ आहे. सांसारिक वस्तू काही काळ आनंद देतात आणि सर्वकाळ दुःखच देतात. एकदा परमात्म्याशी मन समरस झाले की ते तेथून दूर होत नाही. कारण जेथे जेथे तुमचे मन जाईल तेथे तेथे परमात्माच विद्यमान असतो. जेथे जेथे मन जाते तेथे तेथे त्याला परब्रह्माचेच दर्शन होते.

**शिवात्मकमिदं सर्वं शिवादन्यन्न विद्यते।**
**शिवोऽहमिति या बुद्धिस्तदेव ज्ञानमुत्तमम्।।१६.३१।।**

सर्व प्रपंच शिवमय असून त्याच्याशिवाय दुसरी कोणतीही वस्तू अस्त्वितच नाही. मी देखील शिवस्वरूपच आहे, हेच सर्व श्रेष्ठ ज्ञान होय. उत्तम ज्ञान होय. हीच अद्वय स्थिती आहे. जगत्, जीवात्मा आणि परमात्मा असे तीन पदार्थ चिंतनयोग्य आहेत, असे शास्त्रात म्हटले आहे. माणूस एकतर स्वत:विषयी विचार करील– मी कोण आहे? माझे स्थान काय आहे? इत्यादी. किंवा प्रपंचाविषयी विचार करील– प्रपंच केव्हा उत्पन्न झाला? कसा उत्पन्न झाला? कुणी उत्पन्न केला? इत्यादी. अथवा प्रपंचाच्या कर्त्याविषयी विचार करील. हा एवढा मोठा प्रपंच दृष्टीपुढे उभा आहे तो काय सहजासहजी, आपोआप उत्पन्न झाला असेल? प्रपंच हे कार्य मानले तर त्याचे कारण काहीतरी असलेच पाहिजे. प्रचंड वटवृक्ष पाहिला तर त्याच्या बीजाचा विचार जिज्ञासू माणसाला सुचतो. विश्वाच्या कारणाला ईश्वर म्हणा की परब्रह्म म्हणा. एकंदरीत जगत्, जीव आणि ईश्वर या तीन वस्तूबद्दलच मनुष्य विचार करीत असतो. या तीनही वस्तू एकरूपच आहेत, अर्थात् शिवमय आहेत, हेच येथे सांगितले आहे. असे ज्ञान उत्तम ज्ञान असून त्याच्यामुळेच जीवात्म्याला मुक्ती मिळते आणि तो कृतार्थ होतो. असे उत्तम ज्ञान ज्याला प्राप्त होत नाही त्याची स्थिती कशी असते हे पुढील श्लोकात सांगतात–

**अन्धो यथा पुरस्थानि वस्तूनि च न पश्यति।**
**ज्ञानहीनस्तथा देही नात्मस्थं वीक्षते शिवम्।।१६.३२।।**

जन्मांधासमोर कितीही सजावट करून ठेवली तरी तो त्यातली एकही वस्तू पाहू शकत नाही. त्याप्रमाणे ज्ञानहीन मनुष्य आपल्या हृदयात आणि प्रपंचात असलेल्या शिवतत्त्वाला पाहू शकत नाही. परमात्मा ब्रह्मांडात

आहे तसाच पिंडात–शरीरात देखील आहे. जेथे जीव आहे तेथेच शिव देखील आहे. जीव आणि शिव हे दोन पक्षी वृक्षाच्या शाखेवर बसले असून त्यांपैकी एक फळे चाखत तर दुसरा त्याच्याकडे पाहात स्तब्ध बसला आहे; असे उपनिषदात विशद केले आहे. आपल्या हृदयात जो जीवात्मा आहे तो कर्मफळे चाखून सुखदुःख भोगत आहे तर आपल्या हृदयातला परमात्मा त्याच्याकडे साक्षीभूत होऊन पाहात आहे.

एक महात्मा एका गावातून जात होता. गावातल्या पारावर टवाळखोर बसलेले असतात. त्यांपैकी एकाने त्यांना पाहिले आणि शिव्या द्यायला सुरुवात केली.

महात्मा तेथेच थांबला आणि शांतपणे ऐकू लागला. त्यामुळे शिव्या देणाऱ्याला अधिकच चेव आला. संत–महात्म्यांना शिव्या देणे सोपे असते. सामान्य माणसाला शिवी दिली तर तो कानशिलाखाली आवाज काढतो. संत बिचारे गप्प बसतात.

त्या महाभागाने शिव्या देण्याचा सपाटा सुरूच ठेवला. पण त्याचा महात्म्यावर काहीही परिणाम झाला नाही. शेवटी शिव्या देणारा कंटाळला आणि चिडून म्हणाला, ''मी तुम्हाला इतक्या शिव्या दिल्या तरी तुम्ही चिडत कसे नाही? तुम्ही मला शिव्या का देत नाही? आतापर्यंत मी ज्यांना शिव्या दिल्या त्यांनी मला परत शिव्या दिल्या आहेत? मी एखाद्याला शंभर शिव्या दिल्या तर त्याने मला किमान दहा शिव्या तरी दिल्या आहेत. मग तुम्ही मला का शिव्या देत नाही?''

''भल्या माणसा'', तो महात्मा हसून म्हणाला, ''एखाद्या माणसाला तू भेटवस्तू दिलीस तर ती स्वीकारणे किंवा न स्वीकारणे हे कुणाच्या मर्जीवर अवलंबून असते? देणाऱ्याच्या की घेणाऱ्याच्या?''

''घेणाऱ्याच्या'', त्या माणसाने उत्तर दिले.

''मग मी तू दिलेली भेट स्वीकारलीच नाही तर ती तुला परत कशी करू?'' असे म्हणून तो महात्मा हसत आपल्या मार्गाने निघून गेला.

सांगण्याचे तात्पर्य असे की, प्रत्येकाची मानसिक स्थिती भिन्न असते. शिव्या देणाऱ्या माणसाची मानसिक स्थिती वेगळी तर शिव्या ऐकून त्यांचा प्रतिवाद न करणाऱ्या महात्म्याची मानसिक स्थिती वेगळी होती. याप्रमाणे शिवाला प्रपंचरूपात पाहणाऱ्या आणि प्रपंचात शिवरूप पाहणाऱ्या दोघांच्या दृष्टीत अंतर असते. आंधळा जशी समोरची वस्तू पाहू शकत नाही तसाच अज्ञानी देखील प्रपंचरूपाने दृष्टीपुढे उभ्या असलेल्या आणि प्राणलिंगाच्या रूपाने हृदयात विराजमान असलेल्या शिवाला पाहू शकत नाही. अज्ञानी माणसे तर ईश्वराबद्दल आणि त्याच्या नावाबद्दलही भांडण करीत असतात.

एका गावात सर्व गावकऱ्यांनी मिळून विश्वस्त मंडळ, ट्रस्ट स्थापन केला. त्या गावात कोणत्याच देवाचे मंदिर नव्हते. म्हणून गावात सर्वप्रथम मंदिर बांधायचे असे ट्रस्टींनी ठरवले. मंदिर बांधून झाले. मंदिरात कोणत्या देवतेची मूर्ती स्थापन करायची यावर चर्चा झाली. रामभक्त म्हणाले– रामाची करा. कृष्णभक्त म्हणाले– कृष्णाची करा. अशी अनेकांनी अनेक देवतांची नावे सुचवली. शेवटी ट्रस्टींनी निर्णय घेऊन मंदिरात रामाची मूर्ती स्थापन केली

गावातले सगळे रामभक्त रोज पूजेसाठी आणि दर्शनासाठी मंदिरात येऊ लागले. परंतु कृष्णभक्त मात्र येईनात. कारण कृष्णमूर्तीची स्थापना न केल्यामुळे ते नाराज झाले होते. शेवटी कृष्णभक्तांच्या आग्रहाला बळी पडून ट्रस्टींनी रामाच्या मूर्तीचे विसर्जन केले आणि त्या ठिकाणी कृष्णाच्या मूर्तीची स्थापना केली.तेव्हापासून गावातील झाडून सारे कृष्णभक्त पूजा–दर्शनासाठी रोज मंदिरात येऊ लागले. परंतु रामभक्तांनी मंदिरात जाणे बंद केले. सर्व

गावकऱ्यांनी मंदिरात यावे अशी ट्रस्टींची इच्छा होती. शेवटी प्रत्येकाच्या मागणीप्रमाणे मंदिरातील मूर्ती बदलली गेली. जेवढ्या म्हणून देवता आहेत त्या साऱ्यांच्या मूर्तींची स्थापना मंदिरात क्रमाक्रमाने झाली. परंतु मंदिरात जी मूर्ती असे तिचेच भक्त दर्शनासाठी मंदिरात येत, बाकीचे येत नसत. राम हाच कृष्ण आहे, कृष्ण हाच शिव आहे, शिव हीच शक्ती आहे, याचे भान कुणालाच नव्हते. सत्य एकच आहे पण त्याची नावे भिन्न आहेत हे ज्ञान कुणाला नव्हते. ट्रस्टींना तर सर्व गावकऱ्यांनी मंदिरात यावे असे वाटत होते.

मग ट्रस्टींनी मिळून विचार केला की मंदिरात सर्व गावकरी एकत्र येतील यासाठी काय करावे? आणि मग सर्वांनी मिळून ठरवून मंदिराचे हॉटेलमध्ये रूपांतर केले. मग मात्र सगळे गावकरी तेथे खाण्या-पिण्यासाठी, विड्या फुंकण्यासाठी एकत्र येऊ लागले!

ही अज्ञानी लोकांची कहाणी आहे. ईश्वराविषयी ज्ञान नसल्यामुळे त्याच्या भिन्न नामरूपाविषयी अडाणी माणसे भांडत असतात. परमात्म्याची भिन्न नामरूपे, लोकांनी आपापसात भांडावे यासाठी नाहीत. नामरूपे भिन्न असली तरी तत्त्व मात्र एकच आहे. प्रत्येकाची रुची भिन्न असल्यामुळे कुणाला शिवलिंगाच्या रूपात, कुणाला रामाच्या रूपात, कुणाला कृष्णाच्या रूपात तर कुणाला देवीच्या रूपात भगवंताची पूजा-ध्यान करायला आवडते. त्यामुळे त्यांच्यासाठी त्यांच्या रुचीनुसार परमात्म्याची नावरूपे भिन्न आहेत. परंतु ज्ञानी पुरुषाला मात्र या भिन्न नामरूपांत एकच तत्त्व वसत आहे याचा साक्षात्कार होतो. त्यांना वेगळेपणा जाणवत नाही. शरीरे भिन्न असली, बुद्धी, इंद्रिये, विचार यांमध्ये तफावत असली तरी प्रत्येकाच्या अंतरंगी नांदणारे चैतन्य मात्र एकच असते. आत्म्याच्या अस्तित्वातच सगळा व्यवहार चाललेला असतो. अशा आत्म्याला पाहण्याचे ज्ञान ज्याच्याजवळ असते त्यालाच 'ज्ञानी' म्हणतात. अज्ञानी माणसांना भगवंताच्या मूर्तीत देखील भगवंताचा साक्षात्कार होत नाही. जोपर्यंत माणसांना ज्ञान लाभणार नाही तोपर्यंत जगातले कलह थांबणार नाहीत. परमेश्वराच्या नामावरून, रूपावरून त्याच्या उपासना पद्धतीवरून अज्ञानी माणसे झगडत असतात. हा कलह थांबवण्यासाठी तत्त्वज्ञानाची आवश्यकता आहे. भेदबुद्धी नष्ट करून समग्र मानवजातीला सुखी करण्यासाठीच आचार्य प्रयत्नशील राहिलेले आहेत.

**शिवस्य दर्शनात् पुंसां जन्मरोगनिवर्तनम्।**
**शिवदर्शनमप्याहुः सुलभं ज्ञानचक्षुषाम्।।१६.३३।।**

ज्याला ज्ञानदृष्टी प्राप्त झालेली असते त्याला शिवदर्शन होते. शिवदर्शनामुळे जन्म-मरणरोगाचे निवारण होते. जन्म आणि मरण हे दोन्ही रोग आहेत. जीवात्म्याला त्यांच्यामुळे वारंवार दुःख भोगावे लागते. या रोगांच्या निवारणासाठी शिवदर्शनाची आवश्यकता असते आणि शिवदर्शनासाठी शिवज्ञानाची गरज असते. या ज्ञानागमस्थलाचा शेवटी समारोप करतात-

**दीपं विना यथा गेहे नान्धकारो निवर्तते।**
**ज्ञानं विना तथा चित्ते मोहोऽपि न निवर्तते।।१६.३४।।**

अंधार पडल्यावर माणूस स्वस्थ बसत नाही. सूर्य अस्ताला गेल्यावर रात्र हळूहळू दाट होऊ लागते. अशा वेळी मनुष्य विद्युत्‌दिव्याचे बटन तरी दाबतो, अन्यथा पणती तरी पेटवतो. घर प्रकाशित झाल्यावरच तो निवांत बसतो. दिवा लावल्याशिवाय जसा घरातला अंधार दूर होत नाही त्याप्रमाणे शिवज्ञान झाल्याशिवाय मनुष्याच्या मनातील मोह, अज्ञान नष्ट होत नाही. गीतेचा संपूर्ण उपदेश अर्जुनाच्या ठिकाणी असलेल्या मोहाचे निवारण

करण्यासाठीच झालेला आहे. गीतेच्या शेवटी अर्जुन म्हणतो– 'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत।' हे अच्युता, तुझ्या प्रसादामुळे माझा मोह नष्ट होऊन मला पूर्वस्मृती प्राप्त झाली आहे.

मोह निवारणासाठी ज्ञान हे अमोघ साधन होय. जोपर्यंत ज्ञानप्राप्ती होत नाही तोपर्यंत माणसाची मोहातून सुटका होत नाही. जो विवेकशक्तीला नष्ट करतो त्याला 'मोह' म्हणतात. मोहाच्या अधीन होऊन 'हे माझे, हे माझे' असे म्हणत ममत्व वाढत जाते. 'हे माझे आहे' म्हणत जीवात्मा बंधनात पडतो तर 'हे माझे नाही' असे म्हटल्यावर तो बंधनातून मुक्त होतो. प्रपंच ईश्वराचा आहे. त्यातील वस्तूचा उपभोग घेताना 'ही माझी नसून ईश्वराची आहे' आणि 'ही मला माझ्या प्रारब्धाने ईश्वराचा प्रसाद म्हणून मिळाली आहे' अशा भावनेने तिचा उपभोग घेतला पाहिजे. मोहाच्या निवृत्तीसाठी प्रत्येकाला ज्ञानाची आवश्यकता असते. ज्याला ज्याला ही ज्ञानदृष्टी लाभते त्याच्या दृष्टीने विश्वातले सारे भेद नष्ट होतात. जर सर्वांनाच अशी ज्ञानदृष्टी लाभली तर जगातले कलह क्षणार्धात थांबतील आणि विश्वात शांती प्रस्थापित होईल. म्हणून प्रत्येकाने स्वाध्याय करून आणि सद्गुरूला शरण जाऊन हे उत्तम ज्ञान संपादन करण्याचा प्रामाणिकपणे प्रयत्न केला पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२ ऑगस्ट १९९३

---

## आशीर्वचन सातवे

# सकायस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले आहे की प्रत्येक माणसाला अध्यात्मज्ञानाची नितांत गरज असते. सर्व शास्त्रांचे ज्ञान होऊन देखील जर अध्यात्मज्ञान नसेल तर मनुष्याला सुखशांतीचा लाभ होणार नाही. म्हणून प्रत्येकाने आत्मचिंतन, परमात्मचिंतन आणि त्या दोहोंचे अभेदचिंतन करून आत्मज्ञान प्राप्त करून घ्यायला हवे. जोवर आत्मज्ञान होत नाही तोवर मनातला मोह नष्ट होत नाही आणि मोह नष्ट झाल्याशिवाय मनुष्याला सुखशांती भेटत नाही. ज्ञानागमस्थलात ज्ञानाचे प्रयोजन आणि ज्ञानाची प्राप्ती याविषयी आपण ऐकले आहे. आज सकायस्थलाचे निरूपण करायचे आहे. सामान्यतः या ग्रंथातील स्थलांची नावे श्रोत्यांना थोडी चमत्कारिक वाटण्यासारखी आहेत. परंतु अत्यंत विचारपूर्वक ही नावे योजण्यात आली आहेत. आत्मज्ञान झाल्यानंतर शरीराचे प्रयोजन कोणते आहे? असा प्रश्न येथे उपस्थित होतो. आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठीच तर जीवात्म्याला मानवजन्म घ्यावा लागतो. मनुष्यजन्म घेऊन जर आत्मज्ञान मिळवले नाही तर जीवात्म्याची फार हानी होते, असे उपनिषदांत म्हटले आहे. आत्मज्ञान प्राप्त केल्यानंतर मग अन्य कोणतेही प्राप्तव्य उरत नाही. जे मिळवायचे ते मिळवल्यानंतर मग या देहाचे काय करायचे? तो सांभाळायचा की टाकून द्यायचा तर त्याविषयी सांगतात–

**परस्य या तनुर्ज्ञेयाऽदेहकर्माभिमानिनः।**
**तया सकायो लोकोऽयं तदात्मत्वनिरूपणात्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.३५)

ज्ञानप्राप्तीनंतर देखील ज्ञानी पुरुषाने आपल्या कायेचे, देहाचे रक्षण केले पाहिजे, असा येथे उपदेश केला आहे. शरीरधारी जीवात्म्यांचे गीतेत चार प्रकार केले आहेत. आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू आणि ज्ञानी. कुणी आर्त म्हणजे दु:खी असतो, कुणी अर्थार्थी म्हणजे धनप्राप्तीची इच्छा ठेवणारा असतो. कुणी जिज्ञासू म्हणजे ज्ञानप्राप्तीची उत्कट इच्छा बाळगणारा असतो. तर कुणी ज्ञानी म्हणजे ज्ञानप्राप्ती करून घेतलेला असतो. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त मात्र मनुष्यदेहाची विभागणी तीन प्रकारांत केली आहे. देह, तनू आणि काय. या तिन्ही शब्दांत गूढ अर्थ दडलेला आहे. काही लोक 'देहधारी' आहेत, काही लोक 'तनुधारी' आहेत तर काही लोक 'कायधारी' आहेत. शब्दकोशाच्या दृष्टीने मात्र 'देह' शब्दाचा पर्याय 'काय' हा आहे, परंतु या शब्दात जो गूढार्थ आहे त्यावरून त्या त्या व्यक्तींच्या व्यक्तित्वाचा परिचय होतो. शरीर तर सर्वांनाच आहे, परंतु शरीरात राहणाऱ्या जीवात्म्याची स्थिती कशी आहे आणि त्याची आपल्या देहासंबंधी कोणती भावना आहे यावरून त्याच्या योग्यतेचा निर्णय केला जातो.

काही जीवात्मे देहभावाने राहतात. शरीर म्हणजे मीच आहे, अशी त्यांची दृढ भावना असते. यांना देहात्मवादी असे म्हणतात. देह हाच आत्मा आहे असे हे लोक मानतात. चार्वाकदर्शनाने देहात्मवादाचा पुरस्कार केलेला आहे. तो सर्वसामान्य माणसाला आपलासा वाटण्याची शक्यता आहे. जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत मौजमजा करा. मौजमजा करण्यासाठी पैसे नसतील तर कर्ज काढा. जे खायचे-प्यायचे असेल ते भरपूर खा, प्या. कर्ज फेडण्याची काळजी करू नका. एकदा देहाचे भस्म झाल्यावर तुम्हाला कोण कर्ज मागायला येतो? जो कर्ज देतो त्याच्या देहाचे एके दिवशी भस्म होईल आणि जो कर्ज घेतो त्याचाही देह एके दिवशी चितेत जळतो. त्यावेळी घेण्या-देण्याचा व्यवहारच शिल्लक राहाणार नाही. यालाच 'चार्वाकसिद्धान्त' असे म्हणतात. देहाचे पालनपोषण करणे, त्याला सजवणे हेच त्यांचे उद्दिष्ट असते. त्यांच्या दृष्टीने देह हाच त्यांचा आत्मा असतो. अज्ञानी आणि ज्ञानी दोघेही देहाचे पोषण करतात, परंतु त्या दोघांच्या भावनेत महदंतर असते. देहाभिमानी जीवात्मा आपल्या शरीरालाच सर्वस्व समजतो. पहिलवान जसा आपल्या देहाच्या कोडकौतुकातच मग्न असतो. खूप व्यायाम करतो, भरपूर खातो, दंडावरील बेटकुळी फुगवून पाहतो. त्याप्रमाणे देहधारी जीवात्मा देहाच्या कौतुकातच मग्न असतो. पहिलवानाच्या शरीरसाधनेमागे निदान उद्दिष्ट तरी असते. परंतु देहधारी मात्र खाऊन पिऊन शरीर बेडौल करण्यातच धन्यता मानतात. अशा लोकांना आत्मा आणि परमात्मा यांच्याविषयी किंचित देखील जाणीव नसते.

यानंतर तनुधारी लोकांचा क्रमांक येतो. तनू म्हणजे सूक्ष्म. जसे काही लोक आपल्या शरीराला तट्ट फुगवणारे असतात तसे काही लोक आपल्या देहाला झिजवणारे देखील असतात. उपवास करून, व्रतवैकल्ये करून, तपश्चर्या करून ते आपल्या देहाला शुष्क करीत असतात. शरीरशोषण करणे हेच त्यांच्या जीवनाचे लक्ष्य असते. योगाभ्यास करून, उपवास करून, अनेक नियमांचे पालन करून ते दैनंदिन व्यवहारात आपल्या देहाला बांधून ठेवतात. अधिक खायचे नाही, अधिक प्यायचे नाही, खायचे तेवढेच प्यायचे तेवढेच, असे नियम स्वत:वर लादून घेऊन जे आपले शरीर कृश करीत असतात त्यांना 'तनुधारी' म्हणतात. त्यांचे शरीर तपश्चर्येने 'तनू' म्हणजे कृश झालेले असते.

'काय' शब्द हा यापेक्षाही विलक्षण आहे. जन्मजन्मांतरात तपश्चर्या केल्यावर ज्याच्यावर दीक्षासंस्कार होऊन श्रीगुरूंची कृपा झालेली असते अशा शरीराला 'काय' असे म्हणतात. काय हा 'मांसपिंड' नसून 'मंत्रपिंड' असतो. जेव्हा दीक्षासंस्कार होतो तेव्हा त्याच्या प्रत्येक अंगावर संस्कार केले जातात. जेव्हा ही तिन्ही शरीरे सुसंस्कृत होतात तेव्हा त्या जीवात्म्याच्या शरीराला 'काय' असे संबोधले जाते. सारांश, जे देहालाच आत्मा समजून त्याचे कोडकौतुक करून मौजमजा करतात ते 'देहधारी' होत. जे यमनियमांचे पालन करून तपश्चर्येने आपले शरीर कृश करतात ते 'तनुधारी' होत आणि गुरूकडून दीक्षा घेऊन जे सुसंस्कारित झालेले असतात व ज्यांना सद्गुरुकृपा लाभलेली असते ते 'कायधारी' होत. आत्मज्ञानप्राप्तीसाठीच सद्गुरूकडून दीक्षासंस्कारयुक्त काया मिळालेली असते. ती ज्ञानप्राप्तीनंतर टाकून द्यावी की तशीच ठेवावी याविषयी येथे विचार केलेला आहे-

**कायं विना समस्तानां न क्रिया न च भावना।**
**न ज्ञानं यत्ततो योगी कायवानेव संचरेत्॥१६.३६॥**

जर तुम्हाला श्रीगुरूंकडून दीक्षित शरीर म्हणजे 'काय' मिळाले नसेल तर त्याच्याशिवाय तुम्हाला लिंगपूजादी क्रिया करता येणार नाहीत, भावना करता येणार नाही आणि ज्ञानप्राप्तीदेखील होणार नाही. पूजा करण्यासाठी, भावना करण्यासाठी आणि ज्ञानप्राप्तीसाठी 'काये'ची आवश्यकता आहे. ज्ञानप्राप्तीनंतर देखील जोपर्यंत प्रारब्धकर्म संपत नाही तोपर्यंत 'काये'चे रक्षण करावे, ते सोडू नये असे शास्त्रात सांगितले आहे. ज्ञानप्राप्ती होईपर्यंत त्याचे शरीर स्वत:साठी उपयोगी होते. ज्ञानप्राप्तीनंतर त्याच्या शरीराचा इतरांसाठी उपयोग झाला पाहिजे. 'शरीरं आद्यं खलु धर्मसाधनम्' असे कालिदासाने म्हटले आहे. पार्वती अत्यंत कठोर तपाचरण करून जेव्हा कृश झाली तेव्हा तिची अवस्था पाहणाऱ्या आईच्या मुखातून वरील श्लोक कालिदासाने वदवला आहे. आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी, परमात्म्याच्या प्राप्तीसाठी शरीर हे साधन आहे. ते जर कठोर तपश्चर्येने शोषून टाकले आणि अकाली मरण आले तर त्या शरीराचा साधनेसाठी उपयोग होत नाही. म्हणून शरीर स्वस्थ राखून त्याला भगवंताच्या पूजन-भजन-कीर्तनात लावले पाहिजे. शरीराला त्रास देऊन जर रुग्ण बनवून ठेवले तर त्या शरीराने तुम्हाला धड संसार करता येणार नाही की परमार्थ. आपल्या 'काये'संबंधी साधकाने काळजी वाहिली पाहिजे. सुसंस्कृत 'काय' आणि 'आत्मा' यांच्या संबंधालाच 'काययोग' असे म्हणतात. तुम्हाला हठयोग, राजयोग, मंत्रयोग, लययोग, भक्तियोग यांच्यापैकी कोणताही योग साधायचा असेल तर प्रथम तुमचा 'काययोग' स्थिर असला पाहिजे. तुमचा 'काययोग' सुरक्षित नसेल तर तुम्हाला कोणताही योग साधता येणे शक्य नाही. अज्ञानी मनुष्य शरीर म्हणजे आपणच आहोत असे म्हणून देहाचे पालन पोषण करतो आणि ज्ञानी मनुष्य देह म्हणजे आपण नाही हे माहीत असून देखील साधनेसाठी देहाचा उपयोग आहे हे समजून त्याचे पालन करतो.

**शिवैकज्ञानयुक्तस्य योगिनोऽपि महात्मनः।**
**काययोगेने सिद्ध्यन्ति भोगमोक्षादयः सदा॥१६.३७॥**

तुम्ही योगी असाल, महात्मा असाल, शिवयोगी असाल, पण तुम्हाला मुक्ती प्राप्त होते ती 'काये'मुळेच. मुक्ती दोन प्रकारची असते. जीवन्मुक्ती आणि विदेहमुक्ती. देह सोडल्यानंतर जी मुक्ती मिळते ती विदेहमुक्ती होय. त्यावेळी जीवात्म्याला काही आनंद होत नाही. आनंदाचा उपयोग करण्यासाठी, आनंद व्यक्त करण्यासाठी देहाची

आवश्यकता असते. सुख-दुःख भोगण्यासाठी शरीराची नितांत गरज असते. भोग आणि मोक्ष यांची प्राप्ती शरीरामुळेच होते. जीवन्मुक्तीचा आनंद उपभोगायचा असेल तर देहाचे रक्षण करायलाच हवे.

**काष्ठं विना यथा वह्निर्जायते न प्रकाशवान।**
**मूर्तिं विना तथा योगी नात्मतत्त्वप्रकाशवान्।।१६.३८।।**

प्राचीन काळी अग्नी उत्पन्न करण्यासाठी दोन लाकडे एकमेकांवर घासावी लागत. याला अरणी-मंथन असे म्हणत. अग्नी प्रकट होण्यासाठी जशी लाकडाची आवश्यकता असते त्याप्रमाणे आत्मतत्त्व प्रकट होण्यासाठी शरीराची आवश्यकता असते. अग्नीला प्रकाशित होण्यासाठी काष्ठाचे आलंबन (आधार) हवे असते.

**मूर्त्यात्मनैव देवस्य यथा पूज्यत्वकल्पना।**
**तथा देहात्मनैवास्य पूज्यत्वं परयोगिनः।।१६.३९।।**

आपल्याला देवतेची पूजा करायची असेल तर त्याची मूर्ती घडवावी लागते. तुम्हाला शिवाची पूजा करायची असेल तर शिवलिंग निर्माण करावे लागेल. विष्णूची पूजा करायची असेल तर विष्णूची मूर्ती निर्माण करावी लागेल. देवीची करायची असेल तर देवीची मूर्ती घडवावी लागेल. मूर्ती केल्याशिवाय तुम्हाला कोणत्याही देवतेची पूजा करता येणार नाही. निराकाराची पूजा करणे केवळ अशक्य आहे. निराकार अशा परमात्म्याला मूर्तिरूपात साकार करूनच त्याची पूजा करावी लागते. मूर्तीशिवाय भगवंताची पूजा करता येत नाही, तशी शरीराशिवाय ज्ञानी पुरुषाची पूजा करता येत नाही. आपल्या संस्कृतीत भगवंताच्या पूजेएवढीच ज्ञानी पुरुषांची पूजा श्रेष्ठ मानली जाते. म्हणूनच सद्गुरूची पूजा, त्यांची पादपूजा केली जाते. ज्या शरीराच्या द्वारा ज्ञान प्रकट झाले आहे असे शरीर मांसतुल्य नसून साक्षात ज्ञानमूर्तीच असते. म्हणून अशा शरीराची पूजा केली जाते. त्याच्या मृत्यूनंतर देखील त्याच्या समाधीची मोठ्या भक्तीभावाने पूजा केली जाते. ज्या सद्गुरूकडून ज्ञान प्राप्त करून घेतले, जे शरीर इतरांना ज्ञानप्राप्तीसाठी साहाय्यक ठरले ते शरीर आपण इतरांसारखे कुठेही जाळुन-पुरून टाकत नाही, तर त्याला आदरपूर्वक एका स्थानी विधियुक्त समाधी देतो. केवळ सद्गुरूलाच नव्हे तर ज्याच्या गळ्यात शिवलिंग आहे त्याचे देखील दहन केले जात नाही. ज्याने आयुष्यभर शिवलिंग आपल्या अंगावर धारण केले, शिवमंत्राचा जप केला अशा शिवभक्ताची देखील समाधिक्रिया केली जाते. जशी एखाद्या सत्पुरुषाची केली जाते त्याप्रमाणे.

शरीराला मंदिर मानले जाते. ज्या शरीरावर सद्गुरूने मंत्रपूर्वक लिंगधारण केलेले असते ते शरीर एखाद्या मंदिराप्रमाणे पवित्र असते. एखाद्या मंदिरात मूर्तीची प्रतिष्ठापना केल्यानंतर त्या मंदिराभोवती प्रदक्षिणा केली जाते, त्याप्रमाणे सद्गुरूभोवती देखील प्रदक्षिणा करावी असे शास्त्रात म्हटले आहे. मंदिराला जेवढे महत्त्व असते त्यापेक्षाही अधिक महत्त्व सद्गुरूच्या शरीराला असते. सद्गुरूचे शरीर म्हणजे चालते बोलते मंदिरच होय. त्याप्रमाणेच ज्याने शरीरावर लिंगधारण केले आहे आणि जन्मभर शिवभक्ती केली आहे अशा शिवभक्ताचे शरीर देखील मंदिराइतकेच पवित्र मानले जाते. एखादे मंदिर भग्न झाले अथवा मूर्तिविहीन झाले तर ते जसे जाळले जात नाही त्याप्रमाणे. ज्या शरीराच्या द्वारा आत्मकल्याण आणि समाजकल्याण झाले अशा योग्याचे शरीर समाधिक्रिया करून एक प्रकारे सुरक्षित ठेवले जाते. ते जाळून नष्ट केले जात नाही.

**निष्कलो हि महादेवः परिपूर्णः सदाशिवः।**
**जगत्सृष्ट्यादिसंसिद्ध्यै मूर्तिमानेव भासते।।१६.४०।।**

सदाशिव हा परिपूर्ण, निष्कल (सर्वविकाररहित), सर्वव्यापक, कल्याणकारक असून जेव्हा सृष्टिनिर्मिती करायची असते तेव्हा त्यालाही दिव्यदेह धारण करावा लागतो. त्याला शरीरधारण केल्याशिवाय सृष्टी करता येत नाही, तिचे पालन करता येत नाही आणि संहारही करता येत नाही. म्हणून शरीर सद्‌गुरूसाठी आणि सामान्य माणसासाठी देखील महत्त्वाचे आहे.

**ब्रह्माद्या देवता: सर्वा मुनयोऽपि मुमुक्षव:।**
**कायवन्तो हि कुर्वन्ति तप: सर्वार्थसाधकम्॥१६.४१॥**

ब्रह्मादी देवता आणि मुक्तीची इच्छा करणारे सर्व महर्षी यांना तपश्चर्येसाठी शरीराचाच अत्यंत उपयोग होतो. शरीराशिवाय त्याला देखील कोणती साधना करता येत नाही. या स्थलाचा समारोप करताना शेवटी सांगतात–

**तपो हि मूलं सर्वासां सिद्धीनां यज्जगत्त्रये।**
**तपस्तत्कायमूलं हि तस्मात् कायं न सन्त्यजेत्॥१६.४२॥**

अणिमा, महिमा, लघिमा, गरिमा, प्राकाम्य, ईशत्व, वशित्व इत्यादी अनेक सिद्धींचे वर्णन योगशास्त्रात केलेले आहे. यातली एखादी सिद्धी जरी कुणाला प्राप्त करून घ्यायची असेल तर ते तपश्चर्येविना शक्य नाही. तपश्चर्येशिवाय अलौकिक सिद्धीची प्राप्ती होत नाही. बऱ्याचदा वरवर सामान्य दिसणाऱ्या माणसांच्या ठिकाणी अलौकिक सिद्धीचे वास्तव्य असते. परंतु त्यापाठीमागे त्याची तपस्या असते याची आपल्याला कल्पना नसते. तपश्चर्या हे सर्व सिद्धीचे कारण आहे आणि तपश्चर्येसाठी शरीर कारणीभूत ठरते. शरीरच नसेल तर तपश्चर्या कशी करणार?

तुमच्यापैकी पुष्कळ जण अनुष्ठान करण्यासाठी, सत्संग करण्यासाठी, तपस्या करण्यासाठी या पवित्र काशीक्षेत्रात आले आहात. तपश्चर्या कुठेही करता येते, परंतु जेव्हा ती एखाद्या क्षेत्रात केली जाते तेव्हा शतपटीने फलदायक होते. ज्या ठिकाणी अनेक महापुरुषांनी तपस्या केलेली असते त्या ठिकाणी बसल्यावर रजोगुणी मनुष्याचे मन देखील सात्त्विक होते. महर्षींच्या आश्रमात परस्परभिन्न प्रवृत्तींचे पशू– गाय, सिंह, साप, मुंगूस–देखील एकत्र वावरल्याचे वर्णन आपण ग्रंथात वाचतो. महर्षींच्या तपस्येमुळे तेथील वातावरणात मैत्र, करुणा इत्यादी भावना पसरलेल्या असतात, हाच याचा अर्थ होय. महर्षींच्या ठिकाणी असलेल्या सात्त्विक वृत्तीमुळे इतर प्राण्यांतही सात्त्विकतेचा उदय झालेला असतो. हे तपश्चर्येचे परिणाम होत. परंतु तपश्चर्येला शरीर हेच मूळ कारण असते. शरीराचे असे महत्त्व असल्यामुळे कोणीही जाणून बुजून त्याचा त्याग करू नये अर्थात् देह सोडू नये. ज्ञानप्राप्तीनंतर देखील ज्ञानी पुरुषाने प्रारब्धकर्म संपेपर्यंत देहाचे रक्षण करावे आणि लोकोद्धारासाठी त्याचा उपयोग करावा. देह हा आत्मा नव्हे हे खरे असले तरी आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी देहाची आवश्यकता असते आणि ज्ञानप्राप्तीनंतर लोकल्याणासाठी त्याचा सदुपयोग करता येतो, हे ध्यानात घेऊन साधकांनी आणि ज्ञानी पुरुषांनी आपल्या देहाची निगा राखावी असे शास्त्रात म्हटले आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
३ ऑगस्ट १९९३

## अकायस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील एकेका स्थलात मनुष्याच्या उन्नतीचा मार्ग दाखवला आहे. अनेक मजले असलेल्या इमारतीच्या छतावर जायचे असेल तर त्या इमारतीचे सर्व जिने चढावे लागतात. तेव्हा कुठे आपण छतावर पोहोचू शकतो. त्याप्रमाणे मुक्तीचे शिखर गाठण्यासाठी या ग्रंथात अनेक स्थले, आचार, विचार सांगितलेले आहेत. आत्मप्राप्तीसाठी शरीर एक साधन आहे. सर्व प्राण्यांच्या शरीरात मनुष्यशरीर श्रेष्ठ समजले जाते. 'भागवत' ग्रंथात 'काये'ला नौका असे म्हटले आहे. नौका अछिद्र आणि उत्तम असली तर तिच्यात बसून नदी आणि समुद्र पार करता येतो. संसार हा देखील एक सागरच आहे. संसारसागरातून प्रवास करताना शरीरनौकेला थोडादेखील धक्का पोहोचू नये अशी काळजी घेतली पाहिजे. शास्त्रविहित मार्गावर चालणारा सात्त्विक मनुष्यच आपली शरीरनौका सुरक्षित राखून तिच्याद्वारा मुक्ती प्राप्त करून घेऊ शकतो.

नाव तर आम्हाला मिळालेली आहे, परंतु ती सुरक्षित ठेवणे आपले कर्तव्य आहे. तुम्ही तिला छिद्र पाडत बसाल तर पाणी आत शिरून तुम्हाला ती तळाशी घेऊन जाईल, तारणार नाही. प्रत्येक जीवात्म्याला ही शरीररूपी नाव अनेकदा मिळाली आहे. परंतु तो तिला सारखी छिद्रे पाडत बसला आणि त्यामुळे स्वत: जन्मजन्मांतरात बुडत राहिला. मनुष्यदेह ही अमूल्य नौका आहे. ती मिळवण्यासाठी अगणित पुण्य वेचावे लागते. चौऱ्यांशी लक्ष योनींतून फिरता फिरता जीवात्म्याला जेवढे पुण्य गाठीशी बांधता आले ते सारे मनुष्यदेहरूपी नौका विकत घेण्यात खर्च झाले आहे. शरीराला केवळ सांभाळणे एवढेच काम नसून शरीराकडून पुढे देखील अधर्माचरण होऊ नये याकडेही लक्ष दिले पाहिजे. शरीराशिवाय मनुष्य क्रिया करू शकत नाही, भावना करू शकत नाही आणि ज्ञान देखील मिळवू शकत नाही. म्हणून ज्ञानोत्तर अवस्थेत देखील शिवयोग्याने आपले शरीर जतन केले पाहिजे, असे कालच्या आशीर्वचनात सांगितले आहे. त्या स्थलाचे नाव होते सकायस्थल. आज 'अकायस्थला'विषयी निरूपण करायचे आहे. शरीर धारण करून देखील जो अशरीरी होतो त्याला 'अकायस्थल' असे म्हणतात. मार्मिक रीतीने हे पुढील श्लोकात स्पष्ट केले आहे–

**औपचारिकदेहित्वाज्जगदात्मत्वभावनात्।**
**मायासम्बन्धराहित्यादकायो हि परः स्मृतः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.४३)

या ठिकाणी तीन गोष्टी सांगितल्या आहेत. या तीन गोष्टी जर आपण आचरणात आणू शकलो तर शरीरात राहून देखील आपण अशरीरी होऊ यालाच 'अकायस्थिती' असे म्हणतात. यामधील पहिली गोष्ट आहे 'औपचारिकदेहित्वात्'. ज्या शरीरात जीवात्मा राहतो त्या शरीरातले आपले वास्तव्य औपचारिक आहे असे त्याने मानावे. शरीर आपले सर्वस्व नाही, त्याचे कोडकौतुक करणे हेच आपल्या जीवनाचे परम लक्ष्य नाही. घरी अतिथी आला तर त्याचे तेवढ्यापुरते आतिथ्य करणे हा एक उपचार असतो. त्याप्रमाणे जीवात्म्याने शरीराशी केवळ औपचारिक संबंध ठेवावा, त्याच्याशी तादात्म्य होऊ नये. तुम्ही जर शरीराशी तादात्म्य झालात तर तुमच्या मनात शरीरभाव निर्माण होतो आणि अज्ञानी माणसासारखे वर्तन तुमच्याकडून घडू लागते.

दुसरी गोष्ट आहे 'जगदात्मत्वभावना।' हा सर्व प्रपंच म्हणजे शिवशक्तीचा विलास होय. प्रपंचातल्या कणाकणांत शिवशक्ती अवस्थित आहे. हा सर्व प्रपंच शिवापासूनच झाला आहे. म्हणून तो शिवस्वरूप आहे. साखरेची बाहुली केली तर ती दिसायला वेगळी दिसली तरी अंतर्बाह्य साखरच असते. महाराष्ट्रात गुढीपाडव्याला जसे साखरेचे हार करतात तसे कर्नाटकात काही प्रसंगी देविदेवतांच्या मूर्ती केल्या जातात. तबकात मूर्ती ठेवून देवीची आरती करतात. घरी आल्यावर ती साखरेची मूर्ती खाण्यासाठी मुले आपापसात भांडतात. मूर्ती रूपाने आणि आकाराने वेगवेगळ्या असतात. परंतु विकणारा मात्र त्या एकाच भावाने तराजूत तोलून देत असतो. मग ती ईश्वराची मूर्ती असेल, घोड्याची असेल अथवा मंदिराची असेल. घेणारा आपल्या पसंतीप्रमाणे मूर्ती विकत घेत असतो. कोणी देवाची, कुणी घोड्याची, कुणी माकडाची तर कुणी कशाची. वस्तुत: साऱ्या मूर्ती साखरेच्या असून त्यांच्यात एक प्रकारची गोडी असते. त्यांच्यामध्ये मूलत: कोणताही भेद नसतो. त्याप्रमाणे हा सर्व प्रपंच शिव-शक्तीचा विलास होय. जड पदार्थ असो, वृक्ष-वल्लरी असो, पशुपक्षी असो की मनुष्य असो, सर्व चराचर, दृश्य-अदृश्य सारा प्रपंच शिव-शक्तीचेच रूप आहे.

एवढे ज्ञान झाले की मनुष्य कुठल्याही वस्तूवर आसक्त होत नाही. तो सहज वर्तणूक करू लागतो. साखरेच्या मूर्तीसाठी मुले भांडण करतात, कुणी म्हणतो मला घोडा हवा, कुणी म्हणतो मला माकड हवे, तर कुणी म्हणतो मला माणूस हवा. त्यांचे भांडण पाहून मोठी माणसे मनाशी हसतात. कारण त्यांना माहीत असते की मूर्ती वेगळ्या असल्या तरी त्या साखरेच्याच आहेत. मुलांचे भांडण निरर्थक आहे. त्याप्रमाणे अज्ञानी माणसांच्या दृष्टीला प्रपंचात भेद दिसतो. परंतु ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीला मात्र विश्व शिवशक्तीचे स्वरूप आहे असा साक्षात्कार होत असतो. म्हणून तो जगताला परमात्मस्वरूप अर्थात् आत्मस्वरूप मानतो.

तिसरी गोष्ट आहे 'मायासंबंधराहित्य'. मायेच्या संबंधापासून जो दूर आहे असा जीवात्मा शरीरात राहात असला तरी तो 'अकाय' आहे. अर्थात कायेच्या स्वभावाचा, तिच्या गुणांचा त्याच्यावर थोडादेखील प्रभाव नसतो. मायेसंबंधी शास्त्रात खूप वर्णन केलेले आहे. तिची रूपे अनेक आहेत. कोणत्या रूपाने, कोणत्या प्रकारे ती मनुष्याला मोहात पाडील ते सांगता येत नाही. ती कोणत्या ना कोणत्या रूपात मनुष्यासमोर उभी राहते आणि त्याच्यावर आपली अधिसत्ता गाजवते. शिवभक्त रावण शिवाचे आत्मलिंग प्राप्त व्हावे म्हणून कठोर तपश्चर्या करीत होता. तेव्हा भगवान विष्णूंनी आपली मायाशक्ती त्याच्या ठिकाणी संचरवली. त्यावेळी प्रसन्न झालेल्या शंकराला रावणाने आत्मलिंग न मागता पार्वती मागितली. अशा अनेक कथांत मायेच्या जालाचे वर्णन केलेले आढळते. जेव्हा तुमच्यावरील मायेचा प्रभाव पूर्णपणे नष्ट होईल तेव्हाच तुम्हाला अकायस्थिती प्राप्त होईल.

कर्नाटकातील प्रसिद्ध शिवशरणी अक्कमहादेवीची कथा तुम्हाला माहीतच आहे. तिला जेव्हा मल्लिकार्जुनाचा साक्षात्कार झाला तेव्हा तिच्या ठिकाणी शरीरभाव उरला नाही. तिचा पती एक राजा होता. त्याच्या वागण्याची घृणा येऊन तिने त्याचा आणि राजवैभवाचा त्याग केला. ती जेव्हा बाहेर पडली तेव्हा तिच्या अंगावर एकही वस्त्र नव्हते. ती तशाच विवस्त्र स्थितीत कल्याणीला अनुभवमंटपात आली. अनुभवमंटपाचे अध्यक्ष अल्लमप्रभू होते. तिची विवस्त्र अवस्था पाहून त्यांना देखील आश्चर्य वाटले. परंतु तिच्या ठिकाणी शरीरभाव उरलाच नव्हता. त्यामुळे माझे शरीर विवस्त्र आहे, ते वस्त्रांनी झाकले पाहिजे अशी जाणीवच तिला नव्हती. ज्याची काय 'प्रसादकाय' होते तो शरीरात राहून देखील असा 'अकाय' झालेला असतो. शरीरावरील ममत्व नष्ट होऊन ते भगवंताला अर्पण केले तर ते 'प्रसादकाय' होते. मंदिरात जाऊन देवाला पदार्थ अर्पण केले म्हणून तेच प्रसाद

होतात असे नव्हे, तर वीरशैवसिद्धान्तात सर्व काही प्रसाद होऊ शकते. तुमचे शेत प्रसाद होऊ शकते, तुमच्या साऱ्या वस्तू देखील प्रसाद होऊ शकतात. जे जे काही तुम्ही भगवंताला अर्पण कराल ते ते सारे प्रसाद होईल. बसवेश्वरांनी मार्मिक शब्दांत म्हटले आहे–

**कूडलसंगमदेवरनु वलिस बंद प्रसादकायवनु केडिसलागदु।**

भगवंताच्या प्राप्तीसाठी जे शरीर प्राप्त झाले आहे ते 'प्रसादकाय' होय, असे बसवेश्वरांनी म्हटले आहे. ज्यासाठी हे शरीर मिळाले आहे त्याच कामी ते लावले पाहिजे असे स्पष्ट शब्दांत त्यांनी सांगितले आहे. म्हणून ज्याचे शरीर प्रसादकाय होते तो कायेत राहून देखील 'अकाय' होतो. आपले शरीर आपले नसून भगवंताचे आहे अशी ज्याची भावना दृढ होते तो 'अकाय' होतो. हेच तत्त्व अधिक स्पष्ट शब्दांत सिद्धरामेश्वरांनी सांगितले आहे. निर्देह्याला देह समर्पण केल्यावर देही देखील निर्देही बनतो, असे त्यांनी म्हटले आहे. निर्गुण निराकार परमात्मा निर्देही आहे. त्याला जो शरीर अर्पण करतो तो 'काय' असून देखील 'अकाय' होतो. त्याच्या शरीराकडून कर्मे तर घडतातच, परंतु 'कर्मे मी करीत आहे' अशी भावना त्याच्या ठायी नसते. सर्व प्रपंच परमात्म्याचाच आहे. कर्मे तर आपल्याला करावीच लागतात. परंतु ती करताना हे काम आपल्यावर सोपवलेले आहे, आपल्याला ते सेवाभावाने करावे लागेल, अशी भावना ठेवली पाहिजे. असा मनुष्य संसारात राहून देखील असंसारी होईल. 'काये'त राहून देखील त्याला 'अकाय' स्थिती प्राप्त होईल. त्याचे जीवन विलक्षण असते.

ज्याच्या गृहात चिंतामणी रत्नाचे वास्तव्य असते तो ज्याचे चिंतन करील ते त्याला प्राप्त होते, ज्याच्या हातात कल्पवृक्ष असतो, तो ज्याची इच्छा करील ते त्याला त्वरित मिळेल. धनपती कुबेर ज्याचा दास असतो त्याला धनाची चिंता नसते. मायाबंधनापासून मुक्त झालेल्या आणि भगवंताला पूर्ण समर्पित झालेल्या मनुष्याची स्थिती अशीच असते. अशा मनुष्याच्या पायदळी स्वर्ग असतो, त्याच्या हातात सर्व सिद्धींचे वास्तव्य असते आणि तो भगवद्रूपच झालेला असतो. 'अकाय' स्थलातील पुरुषाचे शरीर भगवंताच्या मूर्तीसारखे पूजनीय मानले जाते.

**परस्य देहयोगेऽपि न देहाश्रयविक्रिया।**
**शिवस्येव यतस्तस्मादकायोऽयं प्रकीर्तितः॥१६.४४॥**

भगवान शिव अनेक मूर्ती धारण करून लीला करतात, परंतु त्यांना कोणत्याही विकारांचा लेप लागत नाही. त्याप्रमाणे 'काये'त राहणारा 'अकाय' जीवात्मा 'काये'च्या गुणांपासून आणि विकारांपासून मुक्त असतो. 'काय' 'माये'ला समर्पित केले तर 'सकाय' होते आणि 'मायी'ला समर्पित झाले तर ते 'अकाय' होते. माया ही परमात्म्याची एक विलक्षण शक्ती असून तिच्या साहाय्यानेच प्रपंचाची निर्मिती होते. ज्याचे शरीर मायेला अर्पित असते तो तिच्या जाळ्यात फसतो आणि जन्मजन्मांतरातून भटकत राहतो. परंतु ज्याचे शरीर 'मायी'ला, मायेच्या पतीला अर्थात् परमात्म्याला समर्पित असते त्याच्यावर मायाजालाचा प्रभाव पडत नाही.

जे मला शरण येतात ते 'माये'मधून मुक्त होतात, असे भगवंतांनी गीतेत म्हटले आहे. जे भगवंताला शरण न जाता केवळ मायेपासून मुक्त होण्याचा प्रयत्न करतात ते अधिकाधिक मायाजाळात गुंतत जातात. जो भगवंताच्या जवळ जातो तो मायेपासून मुक्त होतो आणि जो भगवंतापासून दूर जातो तो मायेच्या तावडीत सापडतो. मायेला समर्पित होणे म्हणजे मायाजालात फसून 'काय'वान होणे होय, तर 'मायी'ला म्हणजे

परमात्म्याला समर्पित होणे म्हणजे मायाजालातून मुक्त होऊन 'अकाय' होणे होय. शरीरात राहून देखील शरीरांच्या विकारांपासून मुक्त राहून कसे 'अकाय' होता येते याचा विचार येथपर्यंत केला. याचा अधिक विचार उद्याच्या आशीर्वचनात करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
४ ऑगस्ट १९९३

**आशीर्वचन नववे**

## अकायस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीला ज्ञानाची खाण असे म्हटले जाते. तुलसीदास म्हणतात– 'ज्ञान खाण अघहानिकर जहं बस संभुभवानी।'

प्रपंचातील सर्व प्राणिमात्रांची पापे नष्ट करून त्यांना ज्ञान प्रदान करण्यासाठी शंकर–पार्वती येथे निवास करतात. येथे भगवान विश्वनाथ सर्वांना मंत्रोपदेश देतात तर भगवती अन्नपूर्णा सर्वांना भिक्षा वाढते. ज्ञानसंपादन करण्यासाठी साधकाला जे हवे असते ते सारे येथे मिळते. जो काशीक्षेत्रात वास्तव्य करून अधिकाधिक साधना करतो त्याला अधिकाधिक ज्ञान मिळून त्याची सर्व पापे नष्ट होतात. मोक्षदायक सप्तपुऱ्यांमध्ये काशी सर्वश्रेष्ठ मानली जाते. काशी सोडून अन्य सहा मोक्षपुऱ्या आहेत. तप:साधना करताना साधकाला मृत्यू आला तर त्याला पुढील जन्म काशीत मिळतो आणि काशीत तपश्चर्या करून तो मुक्त होतो, असे काशीचे माहात्म्य आहे.

'एषां क्वापि गतिर्नास्ति तेषां वाराणसी गतिः।' ज्यांना अन्य ठिकाणी मुक्ती मिळत नाही त्यांना काशीत मुक्ती मिळते. सर्व जगताचे गुरू भगवान शिव येथे निवास करतात आणि भक्तांना ज्ञान प्रदान करतात. म्हणून अन्य क्षेत्रांपेक्षा काशीक्षेत्राचे महत्त्व विशेष आहे. अशा पवित्र काशीक्षेत्रात सुरू असलेल्या या ज्ञानसत्रात 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील सूक्ष्म स्थलांचा आपण विचार करत आहोत. परशिवाशी समरस झाल्यावर ज्याला परावस्था प्राप्त झाली आहे असा जीवन्मुक्त देहधारी असूनही विदेही असतो, 'काये'सोबत त्याचा संबंध असूनही तो 'अकाय' असतो. भगवान शिव अनेक मूर्ती आणि दिव्यदेह धारण करतात तरी ते देहाच्या विकारांपासून मुक्त असतात. त्याप्रमाणेच शिवाशी समरस झालेला जीवन्मुक्त ज्ञानी पुरुषदेखील देहात असूनही देहाच्या विकारांपासून मुक्त असतो. कामक्रोधादी षड्रिपू हे मनुष्यदेहात नांदणारे विकारच होत. त्यांच्याविषयी शास्त्रकारांनी खूप विचार केलेला आहे. एखाद्या अशक्त माणसाला क्रोध आला तर तो समोर उभ्या असलेल्या आडदांड माणसाच्या गालफडात एक ठेवून देतो आणि नंतर त्याच्या मनात विचार येतो की आपल्या अशक्त देहात एवढी ताकद कोठून आली? काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर यांच्यात एवढी ताकद कशी येते? तेवढी भक्तीत का बरे येत नाही? आपण ईश्वराची भक्ती देखील करतो, परंतु आपल्या ठिकाणी असलेल्या कामात आणि क्रोधात जेवढे सामर्थ्य आहे तेवढे आपल्या भक्तीत नसते. भक्ती ही एक मानसिक वृत्ती आहे, त्याप्रमाणे क्रोधदेखील एक मानसिक वृत्तीच आहे. मग क्रोधात जेवढे सामर्थ्य आहे तेवढे भक्तीत का नाही?

यावर शास्त्रकारांनी चिंतन करून निर्णय दिला आहे. मनाच्या अनेक वृत्ती आहेत. परंतु जेव्हा क्रोध येतो त्यावेळी मनाच्या इतर वृत्ती तटस्थ होतात आणि शरीरातील समस्त ऊर्जा क्रोधाच्या दिशेने एकवटली जाते. ज्ञानेंद्रियांतून आणि कर्मेंद्रियांतून शरीरातील ऊर्जा सतत बाहेर वाहात असते. एखाद्या वीजकेंद्रातील वीज वेगवेगळ्या विद्युत्वाहिन्यांतून वाहात असते तशी. जेव्हा मनुष्याला क्रोध येतो तेव्हा ऊर्जेची अन्य दारे बंद होऊन ती संपूर्णपणे क्रोधाला मिळते. त्यावेळी क्रोध मोठ्या भयानक रूपात प्रकट होतो आणि त्याच्या हातून अघटित असे घडते.

परंतु मनुष्य जेव्हा ईश्वराचे भजन करायला बसतो, पूजन अथवा ध्यान करायला बसतो तेव्हा मात्र ही ऊर्जा एकवटत नाही. भक्ती करताना काही महापुरुषांच्या बाबतीत मात्र शरीरातील सर्व ऊर्जा एकवटते आणि त्यांची अत्यंत वेगाने आध्यात्मिक प्रगती होते. हजारो मनुष्यांमधला एखादाच मनुष्य असा असतो की ज्याची समग्र ऊर्जाशक्ती भक्तीत, ध्यानात एकवटते. आपण मात्र पन्नास-साठ वर्षांपासून पूजा, जप, ध्यान करत असलो तरी आपली यत्किंचितही प्रगती होत नाही. याचे कारण आपल्या समग्र चित्तवृत्ती एकवटत नाहीत हे होय. ज्ञानमार्गात, भक्तिमार्गात फार कमी लोक जातात. बहुतेक माणसे कामक्रोधादी विकारांत आपल्या शरीरातील सर्व ऊर्जा खर्च करत असतात. म्हणून येथे म्हटले आहे- 'देहाश्रयविक्रया'. शरीरापासून होणारे कामक्रोधादी विकार जोपर्यंत आपण परशिवाशी एकरूप होत नाही तोपर्यंत आपल्यावर प्रभाव गाजवतात. म्हणून प्रत्येक मनुष्याला सदोदित जागृत राहिले पाहिजे.

सौभर्य नामक ऋषी पाण्यात बसून तपश्चर्या करत असत. त्यांनी जलस्तंभिनी विद्या संपादन केली होती. एकदा त्यांनी पाण्यात माशांची कामक्रीडा पाहिली. त्यावेळी त्यांच्या मनात विचार आला की, आपण आपले सारे आयुष्य तपश्चर्येसाठी वेचले, आता आपण वृद्ध झालो आहोत, परंतु पाण्यातील हे क्षुद्र मासे जो आनंद उपभोगतात त्या आनंदाचा एक क्षण देखील आपल्या वाट्याला आला नाही. आपल्या तपश्चर्येला काही अर्थ नाही. असा विचार करून सौभर्य ऋषी उठले आणि त्या देशाच्या राजाकडे, राजा मान्धाताकडे गेले. वार्धक्यामुळे थकलेले शरीर, शुभ्र दाढी, मिशा आणि जटा, चेहऱ्यावर पडलेल्या सुरकुत्या असे ऋषींचे रूप होते. दरबारात आल्यावर राजाने त्यांचे स्वागत केले, आदर सत्कार केला. त्यांची इच्छा विचारली तेव्हा ऋषी म्हणाले, ''हे राजा, मला लग्न करायचे आहे. तुला अनेक मुली आहेत. त्यांपैकी एका मुलीशी माझा विवाह लावून दे.''

राजाला आश्चर्य वाटले. तो म्हणाला, ''महाराज, आपण आता वृद्ध झालात. या वयात लग्न करण्याची इच्छा आपल्या मनात कशी निर्माण झाली? आपले थकलेले शरीर लग्न करण्यासाठी योग्य नाही हे आपण ध्यानात घ्यावे.''

''राजा'', ऋषी म्हणाले, ''तुला त्याच्याशी काय करायचे आहे? तुझ्या मुलींना येथे बोलाव. त्यांच्यापैकी एकीची मी निवड करतो तिच्याशी माझे लग्न लावून दे.''

राजाला 'नाही' म्हणणे शक्य नव्हते. त्याने नकार दिला असता तर ऋषींनी शाप देऊन त्याचे काही वाईट केले असते. तेव्हा तो सावधगिरीने म्हणाला,

''महाराज, मला पन्नास कन्या आहेत. त्यांना मी येथे बोलावतो. त्यांच्यापैकी जी आपल्याला पसंत करील तिच्याशी मी आपले लग्न लावून देईन.''

ऋषींनी राजाची अट मान्य केली. राजाने आपल्या सर्व कन्यांना दरबारात बोलावले आणि ऋषी कोणाला

पसंत आहेत ते विचारले. ऋषींचे थकलेले शरीर आणि एकूण रूप पाहून एकाही मुलीने त्यांना पसंत केले नाही. ऋषींना हे खटकले. मग त्यांनी आपल्या तप:सामर्थ्याने अत्यंत राजबिंडे असे रूप धारण केले. त्यांचे देखणे रूप पाहून राजाच्या सर्व कन्यांनी त्यांना पसंत केले आणि त्यांच्याशी विवाह करण्याची इच्छा प्रकट केली.

ऋषींच्या आणि कन्यांच्या इच्छेपुढे राजाचे काही चालले नाही. त्याने आपल्या सर्व मुलींचा विवाह ऋषींशी लावून दिला. ऋषींनी आपल्या पत्न्यांसोबत विविध प्रकारे क्रीडा केली. त्यांना त्यांच्यापासून खूप संतती झाली. त्यानंतर ऋषी आपल्या मनाशी विचार करू लागले की, इतके भोग भोगूनही आपले मन प्रारंभी जसे होते तसेच उपाशी आहे.

कितीही भोग भोगले तरी मनाचे समाधान होणे शक्य नाही. शरीरातील कामक्रोधादी रिपूंना त्यांचे विषय अनंत काळ भोगायला दिले तरी त्यांची भूक कधीही भागणार नाही. म्हणून संयमाने आणि त्यागभावनेने त्यांच्यावर मात केली पाहिजे, त्यांना जिंकले पाहिजे. असा विचार केल्यावर त्यांनी आपल्या पत्नी–पुत्रांना समोर बसवून ज्ञानोपदेश केला आणि त्यांना मुक्त करून स्वत:ही मुक्ती मिळवली.

कोणाच्या मनात कधी कोणती विकृती उत्पन्न होईल हे सांगता यायचे नाही. म्हणून मनुष्याने सदैव सावध, सजग राहिले पाहिजे. जो आपली मानसिक वृत्ती भगवंताच्या ठायी स्थिर करतो तो कामक्रोधादी विकृत्तींपासून दूर राहतो. तो शरीरात राहून देखील शरीराभिमान नसल्यामुळे 'अकाय' असतो.

**परलिंगे विलीनस्य परमानन्दचिन्मये।**
**कुतो देहेन सम्बन्धो देहिवद्भासनं भ्रम:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.४५)

ज्याची वृत्ती परशिवब्रह्मात विलीन झाली आहे आणि ज्याला परलिंगाची प्राप्ती होत आहे त्याचा शरीराशी संबंध राहत नाही. पाण्यात राहणाऱ्या कमळासारखा. त्याच्या पाकळीवर पाण्याचा थेंब पडला तरी थेंब ते शोषून घेत नाही. जलात राहूनही ते जलापासून अलिप्त असते. त्याप्रमाणे शरीरात राहून देखील शिवयोग्याच्या शरीराशी संबंध नसतो. तो शरीरापासून अलिप्त असतो. 'काय'धारी असूनही 'अकाय' असतो. ज्ञानी पुरुष देहधारी असल्यामुळे ते देखील आपल्यासारखेच आहेत असा सामान्य माणसांचा समज असतो. ज्ञानी पुरुष बहिरंगाने सर्वसामान्यांसारखा दिसत असला तरी अंतरंगाने त्यांच्यापेक्षा भिन्न असतो. बहिरंगापेक्षा अंतरंगच अधिक महत्त्वपूर्ण असते. आपले शरीर कुठल्या ठिकाणी आहे यापेक्षा आपले मन कुठल्या ठिकाणी आहे ते अधिक महत्त्वाचे असते. तुमचे शरीर काशीत आहे आणि तुमचे मन घरी असेल तर तुम्ही काशीत असून देखील घरी आहात आणि तुमचे शरीर घरात आहे. परंतु तुमचे मन जर काशीत असेल तर घरी असून देखील तुम्ही काशीत आहात. मनुष्याच्या मानसिक स्थितीवरून त्याचे मूल्यमापन केले जाते, त्याच्या शारीरिक स्थितीवरून नव्हे. ज्ञानी पुरुष शरीरात राहून सर्व व्यवहार करतो, परंतु तो शरीरापासून अलिप्त असतो. तो शरीरधारी आहे हा स र्वसामान्य माणसांचा एक भ्रम असतो.

**देहाभिमानहीनस्य शिवभावे स्थितात्मन:।**
**जगदेतच्छरीरं स्याद् देहेनैकेन का व्यथा।।१६.४६।।**

मी शरीर आहे असा देहाभिमान ज्याने सोडला आहे, मी शरीरापेक्षा वेगळा आहे, असा भाव ज्याच्या मनात दृढ झाला आहे आणि ज्याचे मन शिवात विलीन झाले आहे त्याच्या दृष्टीने समग्र प्रपंच हेच एक शरीर असते.

तो केवळ आपल्या एका शरीरात राहात नसतो तर प्रपंचातल्या सर्व शरीरात त्याचे वास्तव्य असते. ममत्वापासून मुक्त होण्याचे दोन मार्ग शास्त्रकारांनी सांगितले आहेत. ममत्व सोडून देणे हा एक आणि ममत्व सोडता येत नसेल तर ते समग्र विश्वाएवढे व्यापक करणे, वाढवणे हा दुसरा मार्ग. तुमचे ममत्व जर प्रपंचाला व्यापून राहिले तर तुम्ही परमात्मस्वरूपच व्हाल. परमात्मा आणि आपण यामध्ये एवढाच फरक आहे. आपण केवळ आपल्या घरालाच स्वतःचे घर मानतो, परंतु परमात्म्याच्या दृष्टीने प्रपंचातील समस्त घरे त्याचीच असतात. हे घर माझे, हे घर दुसऱ्याचे असा भेद त्याच्या ठिकाणी नसतो. जीवात्म्याच्या ठिकाणी व्यष्टिभावना असते तर परमात्म्याच्या ठिकाणी समष्टिभावना असते. एखाद्या दुकानात जाऊन एका ताग्यातून तुम्ही शर्टसाठी कापड विकत घेतले. ते शिवून अंगात घातले. जर त्या दुकानात आग लागली आणि इतर कापडांबरोबर ज्या ताग्यातून तुम्ही कापड घेतले तो तागाही भस्म झाला तर तुम्हाला दुःख होत नाही. आपले शर्ट सुरक्षित आहे, ते जर जळाले नाही तर बस झाले, असे तुम्ही समाधान मानता. यालाच व्यष्टिभाव म्हणतात. परंतु संपूर्ण दुकान जळाल्यामुळे दुःख होणे याला 'समष्टिभाव' म्हणतात. केवळ आपल्या शरीरालाच स्वतःचे न मानता प्रपंचातील सर्व शरीरांना स्वतःचे मानतो म्हणून तो शरीरात असून देखील अशरीरी होय.

**शिवज्ञानैकनिष्ठस्य नाहंकारभवभ्रमः।**
**न चेन्द्रियभवं दुःखं त्यक्तदेहाभिमानिनः।।१६.४७।।**

अहंकाराशी युक्त होऊन जीवात्मा जेव्हा इंद्रियांच्या द्वारा व्यवहार करतो तेव्हा त्याला दुःख भोगावे लागते. आपण केलेल्या कार्याबद्दल 'हे मीच केले' असा जो अहंभाव त्याला 'अहंकार' म्हणतात. कार्यामागील प्रेरकशक्ती परमात्म्याची असते, जीवात्म्याची नसते. परमात्म्याच्या प्रेरणेशिवाय गवताचे पाते देखील हलत नाही. तोच प्रत्येकाच्या हृदयात राहून शरीररूपी यंत्र चालवीत असतो. ज्याच्या प्रेरणेने सर्व व्यवहार चालतो त्याला आपण विसरतो आणि म्हणतो की हे सर्व मीच करत आहे. घोड्यावर बसलेल्या मनुष्याने घोड्याला ओझे होऊ नये म्हणून आपले सामान डोक्यावर घेतले आणि तो जर म्हणाला, ''मी पण घोड्यावर बसायचे, माझे सामान पण घोड्यावर लादायचे. मग घोड्याला ओझे होणार नाही काय? घोड्याला ओझे होऊ नये म्हणून मी माझे सामान डोक्यावर घेऊन घोड्यावर बसलो आहे'' तर त्याला तुम्ही आम्ही हसू. कारण त्याने युक्तिवाद केलेला असला तरी त्याचे स्वतःचे ओझे तर घोड्यावर आहेच. परंतु त्याने डोक्यावर घेतलेल्या सामानाचेही ओझे घोड्यावरच आहे; ही वस्तुस्थिती आहे. आपले सारे ओझे खरे तर परमात्माच वाहात असतो. परंतु आपण मात्र म्हणत असतो- मी नसलो तर कसे होणार?

तुमच्यासारखे कित्येक लोक आले आणि गेले, परंतु जगाचा कारभार चाललेलाच आहे. तुमचा बाप गेला, आजा गेला, पणजोबा गेला, खापरपणजोबा गेला. तरीही जग आपल्या गतीने चाललेलेच आहे. उद्या तुम्ही जाल, तुमचा मुलगा जाईल, मुलाचा मुलगा जाईल. तरी या जगाचे काही बिघडणार नाही. जग चालतच राहील. म्हणून एखादे कार्य करीत असताना 'हे मी करीत आहे' अशी भावना न ठेवता 'माझ्याकडून हे कार्य करून घेतले जात आहे' अशी भावना ठेवावी. असे घडले तर तुमच्यावर कोणतेही ओझे पडणार नाही. परंतु अज्ञानी माणसे मात्र, अकारण घोड्यावर बसून डोक्यावर ओझे वाहणाऱ्या माणसाप्रमाणे, ओझे वाहतात.

'निश्चयेन तिष्ठतीति निष्ठाः।' असा निष्ठा या शब्दाचा अर्थ आहे. मानसिक वृत्ती अत्यंत स्थिर होणे याला निष्ठा म्हणतात. स्वाती नक्षत्रातला पावसाचा थेंब शिंपल्यात पडला की मोती होतो. एकदा मोती झाल्यावर तो पुन्हा

पाणी होत नाही. त्याप्रमाणे एकदा तुमचे मन परमात्म्याच्या ठिकाणी स्थिर झाले तर ते किंचित्काल देखील दुसरीकडे वळत नाही. हीच निष्ठा होय. ज्याची निष्ठा परशिवावर असते त्याच्या मनात अहंकार उत्पन्न होत नाही. सारे काही त्याचेच आहे असे तो मानतो. 'नहि कुछ मेरा सब कुछ तेरा' अशीच भावना त्याच्या मनात असते. आपण मात्र असे म्हणत नाही. 'तेरा भी मेरा और मेरा भी मेरा' असे म्हणत असतो. शिवावर अत्यंत निष्ठा असल्यामुळे त्याच्या मनात अहंकाराची भावना उत्पन्न होत नाही. ज्याच्या ठिकाणी अभिमान नसतो त्याला दुःख भोगावे लागत नाही. अभिमानी माणसाला सांसारिक सुखदुःखे भोगावी लागतात आणि निरभिमानी माणसाची त्यांच्यापासून सुटका होते. जोपर्यंत एखादी वस्तू आपली नसते तोपर्यंत तिच्याविषयी आपल्या मनात अभिमान नसतो. जेव्हा ती आपली होते तेव्हा तिच्या विषयीचा अभिमान आपल्या मनात दृढमूल होतो. तिला थोडाही धक्का पोहोचला तर आपल्याला दुःख होते. जर त्या वस्तूविषयी तुमच्या मनात अभिमान नसेल तर तिचे काहीही बरे वाईट झाले तरी तुम्हाला सुख-दुःख होणार नाही.

अज्ञानी माणसे अभिमानी असल्यामुळे त्यांच्या इंद्रियांच्या व्यवहारामुळे त्यांना सुख अथवा दुःख भोगावे लागते. ते सुख-दुःखातच कायमचे गुंतलेले असतात. परंतु ज्ञानी मात्र निरभिमानी असल्यामुळे सुख-दुःखापासून मुक्त असतो. आपले नाव गाव घेऊन जर कुणी शिवी दिली तर आपल्याला राग येतो. कारण नावाच्या आणि गावाच्या ठिकाणी आपण अभिमान धरलेला असतो. जन्मानंतर काही दिवसांनी आपल्याला एक नाव दिलेले असते. त्याच्या आधी आपल्याला कोणते नाव असते? तुम्हाला ठेवलेले नाव हे तुमचे एकट्याचेच थोडे असते? तेच नाव इतर हजारो लोकांचेही असते. जन्मानंतर तुमचे जे नाव असते आणि मृत्यूनंतर जे नाव राहात नाही त्या नावाविषयी जर अभिमान धरला तर सांसारिक दुःखे भोगल्यावाचून गत्यंतर नाही. शरीराचा अभिमान सुटला की ऐहिकाचा संबंध तुटतो. स्थूलशरीराचा अभिमान सोडला तर इहलोकांशी आपला संबंध सुटतो आणि सूक्ष्मशरीराचा अभिमान सोडला की परलोकांशी असलेला संबंध सुटतो. म्हणून निरहंकार होणे हे सुखाचे एक साधन होय. या अकायस्थलाचा पुढील श्लोकात समारोप करतात-

**न मनुष्यो न देवोऽहं न यक्षो नैव राक्षसः।**
**शिवोऽहमिति यो बुद्ध्यात् तस्य किं देहकर्मणा।।६.४८।।**

आपल्या ह्दयात वास्तव्य करणारा आत्मा मनुष्य, देव, राक्षस किंवा यक्ष नाही. त्या आत्म्याला वेढणारे शरीर मात्र मनुष्याचे असेल, देवाचे असेल, राक्षसाचे असेल किंवा यक्षाचे असेल. शरीर वेगळे आहे आणि 'शरीरी' म्हणजे शरीर धारण करणारा आत्मा वेगळा आहे. आत्मा शिवरूप आहे. परमात्मस्वरूप असा आत्माच आपले खरे स्वरूप आहे. बाह्य शरीर म्हणजे आपण नव्हे असे ज्याला ज्ञान होते त्याला शरीराकडून घडलेल्या कर्माची बाधा होत नाही. अशा प्रकारे ज्ञानी मनुष्य शरीरात राहून अशरीरी, 'काये'त राहून 'अकाय' असतो. शरीरात राहून देखील शरीराचा अभिमान सोडून अशरीरी कसे होता येते, याचे सुरेख प्रतिपादन अकायस्थलात केलेले आहे. याचे प्रत्येकाने मनन करावे, निदिध्यास करावा आणि कायेत राहून देखील 'अकाय' होण्याचा प्रयत्न करावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
५ ऑगस्ट १९९३

## परकायस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

तुम्ही काशीक्षेत्रात राहून या ज्ञानसत्राचा लाभ घेत आहात. संसार असार आहे असे ज्ञानी पुरुष मानतात. परंतु या असार संसारातही त्यांनी काही सार शोधून काढले आहे.

**असारे खलु संसारे सारमेतत् चतुष्टयम्।**
**काश्यां वास: संता संग: गंगांभ: शिवपूजनम्।।**

असार अशा प्रपंचात काशीवास, संतसहवास, गंगास्नान आणि शिवपूजा ही चार सारतत्त्वे आहेत. काशीत वास्तव्य करण्याचे भाग्य मिळाले तर गतजन्मातील पुण्य फलप्रद झाले आहे असे समजावे. काशीत नुसते वास्तव्य करून उपयोग नाही. येथे संताचा संग घडला पाहिजे. एवढेच नव्हे तर येथे परमपावन गंगेत स्नान केले पाहिजे आणि क्षेत्राधिपती शिवाची पूजा केली पाहिजे. या चारही गोष्टी विधिवत् घडल्या तर जे अप्राप्य असते ते देखील प्राप्त होऊ शकेल. स्वत: कमावून भोजन करणे, कुणावरही क्रोध न करणे आणि कोणाची निंदा न करणे हे तीन नियम पाळले तरच काशीला वास्तव्य केल्याचे खरे पुण्य मिळते. हे नियम पाळून जो वर्षभर काशीत वास्तव्य करतो त्याला, सत्ययुगात एक सहस्र वर्ष तपस्या केल्यावर जे पुण्य मिळते, तेवढा पुण्यलाभ होतो.

तुलसीदासांचे काशीत वास्तव्य होते. ते नित्य गंगास्नान करीत. भिक्षा मागून जी कोरडी भाकरी मिळत असे तिचा नैवेद्य ईश्वराला दाखवून ती प्रसाद म्हणून खात. श्रीराम ही त्यांची इष्टदेवता होती. प्रतिदिवशी ते नऊ लक्ष मंत्रजप करत असत असे सांगतात. त्यांच्या भक्तीने प्रसन्न होऊन एके दिवशी ईश्वर प्रकट झाले आणि म्हणाले, ''तुलसीदासा, रोज तुझी कोरडी भाकरी खाऊन फार कंटाळा आला. तिच्या सोबत तोंडी लावायला भाजी नसते की लोणचे. भाजी तर सोडाच पण त्यात मीठ देखील नसते.''

तुलसीदासाला हे ऐकून क्रोध आला. असे म्हणतात की त्यांनी रागाने ईश्वराच्या गालावर प्रहार केला आणि त्याला म्हणाले, ''तू एवढा रसिक केव्हापासून झालास? भक्ताला जे मिळेल तेच तो तुला देईल. त्याच्याजवळ जे नसते ते त्याला मागण्यात काय अर्थ आहे? मी तुझा उपासक नाही तर तुझ्या नामाचा उपासक आहे. मीठ नसलेली कोरडी भाकरी खायची असेल तर माझ्या घरात राहा, नाहीतर तुला दुसरीकडे कोठे जायचे असेल तेथे जा.''

भक्ताच्या ठिकाणी किती निष्ठा असते याचे हे उदाहरण आहे. कोरडी भाकरी खाऊन तुलसीदासांनी जे 'रामचरितमानस' लिहिले ते मात्र अमृतमय आहे. त्यांनी कोरडी भाकरी खाल्ली असेल परंतु त्यांच्या वाणीतून प्रकटलेले शब्द मात्र रसपूर्ण जणू अमृतात ओथंबलेले आहेत! हे माहात्म्य आहे काशीवासाचे, तुलसीदासांच्या तपश्चर्येचे आणि त्यांनी केलेल्या नामजपाचे. म्हणून काशीत वास्तव्य करताना भोगविलासाची भावना दूर सारून संयमाने जीवन व्यतीत केले तर या असार संसारातील सार आपल्याला प्राप्त होईल. तुम्ही गंगास्नान करता, अनुष्ठान करता, शिवपूजन करता, सर्व सिद्धान्तांचा शिखामणी असा 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथावरील आशीर्वचनेही श्रवण करता. त्यामुळे तुम्हाला चतुर्विध सारांचा सहज लाभ होतो.

देहाभिमान नसल्यामुळे शरीरात राहून देखील ज्ञानी पुरुष अशरीरी असतो. 'अकाय' असतो, असे कालच्या

आशीर्वचनात आपण ऐकले आहे. या अशरीरी अवस्थेच्या पलीकडे जी उन्नत अवस्था आहे तिच्यासंबंधी आज विचार करायचा आहे. आजचे जे स्थल आहे त्याचे नाव आहे परकायस्थल.

**वशीकृतत्वात् प्रकृतेर्मायामार्गातिवर्तनात्।**
**परकायोऽयमाख्यातः सत्यज्ञानसुखात्मकः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.४९)

ज्याने परशिवब्रह्माचा आपल्या आत्मरूपात साक्षात्कार करून घेतला आहे त्याचे शरीर देखील परब्रह्मासारखे होते. अन्य शास्त्रांपेक्षा थोडा वेगळा विचार येथे मांडला आहे तो समजून घेतला पाहिजे. ज्याला परमात्म्याचा साक्षात्कार होतो त्याचा आत्मा परमात्मस्वरूप होतो असे सर्व शास्त्रे मानतात. येथे शैवाचार्य एक पाऊल अधिक पुढे गेले आहेत. परब्रह्मस्वरूप झालेला आत्मा ज्या शरीरात वास करतो ते शरीर देखील परब्रह्मस्वरूप झालेले असते, असे वीरशैवाचार्य म्हणतात. त्याचे कारण देखील येथे सांगितले आहे. ज्याला परब्रह्माचे ज्ञान झालेले आहे अशा ज्ञानी पुरुषाचे प्रकृतीवर स्वामित्व असते, प्रकृती त्याला वश असते, तो प्रकृतीच्या अधीन नसतो. मन, बुद्धी ही आपली प्रकृती आहे. अज्ञानी माणसावर मन-बुद्धीचा प्रभाव असतो. मन-बुद्धी सांगेल तसा तो वागतो. परंतु ज्ञान्यांच्या शरीरावर आत्म्याचे प्रभुत्व असते, मन-बुद्धीचे नसते. त्याचे मन-बुद्धीवर नियंत्रण असते. तो पाठवेल तेथे त्याचे मन जाते. मनाच्या मागे तो धावत नसतो. त्याची बुद्धी देखील उत्तम विचारांचाच अंगीकार करते. ज्ञानी पुरुष मायेच्या पलीकडे गेलेला असतो. त्याने सच्चिदानंदरूप अशा आत्म्याला जाणलेले असते. तो सच्चिदानंदरूपच झालेला असतो, म्हणून त्याचे शरीर देखील आत्म्याइतकेच पवित्र असते.

शरीर स्वभावतः अपवित्र असते असे शास्त्रे सांगतात. परंतु ते सतत आत्म्याच्या संपर्कात असल्यामुळे त्याच्यात पावित्र्य दृग्गोच्चर होते. आपण व्यवहारात पाहतो की नख, केस, रक्त यांचा शरीराशी संबंध सुटला तर ते अपवित्र मानले जातात. जी वस्त्रे आपण दिवसभर अंगावर घालतो ती दुसऱ्या दिवशी स्नान करण्याआधी उतरवून ठेवतो. स्नान केल्यावर त्या वस्त्रांना आपण स्पर्श देखील करत नाही. असे का? वस्त्रे तर आपलीच आहेत. ती आपणच अंगावर घातली होती मग त्यांना अपवित्र का मानायचे? तर त्यांचा शरीराशी संबंध सुटला म्हणून. जोवर ती शरीराशी जडलेली होती तोवर ती पवित्र होती. त्याप्रमाणे शरीर मूलतः अपवित्र असले तरी त्याचा आत्म्याशी संबंध असल्यामुळे ते पवित्र असते आणि आत्म्याशी संबंध असेपर्यंत ते पवित्र राहते. शरीरातून आत्मा एकदा निघून गेला की शरीर अपवित्र, अस्पर्श होते.

परंतु ज्या शिवयोग्याने आपल्या आत्मरूपात परशिवब्रह्माचा साक्षात्कार करून घेतला आहे त्याचे शरीर देखील आत्म्याइतकेच पवित्र असते, असे या ठिकाणी म्हटले आहे. त्यांचा आत्मा जेवढा पवित्र आणि शुद्ध असतो तेवढेच त्यांचे शरीर देखील पवित्र आणि शुद्ध असते. अशुद्ध व्यक्तींना शुद्ध करण्याचे सामर्थ्य त्यांच्या शरीरात असते. अशा महापुरुषांच्या पायाची धूळ श्रद्धेने मस्तकावर धारण केली जाते. घरात धूळ साठली तर ती आपण केरसुणीने झाडून बाहेर फेकून देतो. परंतु संध्याकाळी गायी जेव्हा रानातून परत येतात तेव्हा त्यांच्या पावलांनी उडालेली धूळ पवित्र मानली जाते. ही धूळ अंगावर घेणे याला शास्त्रात 'वायव्यस्नान' म्हणतात. हा एक पवित्र मुहूर्त देखील मानला जातो. त्याला 'गो-रज मुहूर्त' म्हणतात. म्हणजे गायीच्या पावलांनी जेव्हा धूळ उडालेली असते ती वेळी, तो मुहूर्त. त्याप्रमाणे सद्गुरूंच्या पावलांची धूळ अत्यंत पवित्र मानली जाते. तिच्यामुळे शिष्याच्या ठिकाणी असलेला रजोगुण क्षीण होतो. रजोगुणापासूनच कामक्रोधादी विकार उत्पन्न होतात. साधना

करून सत्त्वगुणाचा उत्कर्ष करून रजोगुण कमी करता येतो. श्रीगुरूंची पायधूळ (रजःकण) मस्तकी धारण करून सुद्धा रजोगुण नष्ट होतो. ज्याच्या जवळ रजोगुण किंचितही नसतो अशा सद्गुरूच्या पदरजाचा स्पर्श आपल्या शरीराला झाला तर देहातला रजोगुण नाहीसा होतो. आपल्या सिद्धान्तात असे म्हटले आहे की, केवळ गंगास्नान केल्याने तुम्हाला पुण्यलाभ होत नाही, तर श्रीगुरूचा पाय मस्तकावर घेऊन जेव्हा गंगास्नान कराल तेव्हाच तीर्थस्नानाचे पुण्य लाभते. अशा प्रकारे सद्गुरूचे शरीर आत्म्याइतकेच पवित्रतम मानले जाते. ज्याचे शरीर परब्रह्मस्वरूप झाले आहे अशा ज्ञानी पुरुषाला 'परकायस्थली' म्हटले जाते.

**परब्रह्मवपुर्यस्य प्रबोधानन्दभासुरम्।**
**प्राकृतेन शरीरेण किमेतेनास्य जायते॥१६.५०॥**

ज्याचे शरीर परब्रह्मस्वरूप झाले असते त्याच्या शरीरात परब्रह्माइतके सामर्थ्य येते. म्हणून वेदांत म्हटले आहे- 'अयं मे हस्तो भगवत्तरः।' तुमचे हात भगवंतस्वरूपच आहेत. जेव्हा भगवंताला तुमचे हात समर्पित होतात आणि भगवंताच्या कार्यात सहभागी होतात तेव्हाच तुमचे हात भगवत्सवरूप होतील. म्हणून सकाळी उठल्याबरोबर सर्वप्रथम आपले हात पाहावे, असे शास्त्रे सांगतात- 'प्रभाते करदर्शनम्'. आपला हातच आपल्याला पुण्यात्मा किंवा पापात्मा बनवतो. तुमचे हात भगवंताला अर्पण केले तर त्यांच्यात एवढे सामार्थ्य येते की एखादा संकल्प करून तुम्ही कोणाच्या मस्तकावर हात ठेवला तर त्याची कार्यसिद्धी होऊ शकते. ज्ञानेश्वरांनी रेड्याच्या मस्तकावर हात ठेवून त्याच्या मुखातून वेद वदवले ही कथा सर्वश्रुतच आहे. म्हणून संतांकडे आपण जेव्हा जातो तेव्हा त्यांच्या पायावर डोके ठेवतो आणि त्यांचा वरदहस्त डोक्यावर ठेवून घेतो. त्यांच्या पायाची धूळ आपल्या मस्तकावर लागल्यामुळे आपल्या ठिकाणचा रजोगुण नष्ट होतो आणि भगवंताची पूजा करून त्यांच्या हातात जे सामर्थ्य आलेले असते त्यामुळे आपले मनोरथ पूर्ण होतात.

शिवयोग्याचे मन आनंदाने तुडुंब भरलेले असते. कुठल्या वस्तूची प्राप्ती होवो अथवा न होवो, तो आनंदसागरात डुंबलेला असतो. बाह्य वस्तूच्या प्राप्तीमुळे सामान्य माणसांना आनंद होतो आणि तिच्या वियोगामुळे दुःख होते. परंतु असे ज्ञानी पुरुषांच्या बाबतीत मात्र घडत नाही. तो ज्ञानानंदात सदैव निमग्न असतो. त्याला जो आनंद मिळतो त्याची तुलना कोणत्याही सांसारिक सुखाशी करता येत नाही. सांसारिक संबंध सोडल्यामुळे त्याला अत्याधिक आनंदाची प्राप्ती होते. सुषुप्ति-अवस्थेत जवळजवळ सर्व सांसारिक संबंध तुटलेले असतात तेथे जीवात्म्याला जो आनंद मिळतो तो एकटेपणातला आनंद असतो. म्हणून शरीरधारी असूनही ज्ञानी पुरुष केवळ आत्मानंदात निमग्न असल्यामुळे तो सांसारिक संबंधापासून मुक्त असतो आणि परब्रह्मस्वरूप आत्मा त्याच्या देहात नांदत असल्यामुळे त्याचा देह देखील परब्रह्मस्वरूपच असतो.

**सम्यग्ज्ञानाग्निसन्दग्धजन्मबीजकलेवरः।**
**शिवतत्त्वावलम्बी यः परकायः स उच्यते॥१६.५१॥**

'परकाय' कुणाला म्हणतात त्याचे येथे स्पष्टीकरण केले आहे. राग आणि द्वेष यांना जन्माचे कारण मानले जाते. जन्म म्हणजे या प्रपंचात येणे आणि मृत्यू म्हणजे या प्रपंचातून निघून जाणे. एकदा मनुष्यजन्म मिळाल्यानंतर कशीही कर्मे केली तरी पुढला जन्म मनुष्याचाच मिळतो, असा काही लोकांचा समज आहे. परंतु कर्मानुसार पुढील जन्म निश्चित होतो, असे कर्मसिद्धान्त सांगतो. एखाद्या रेडिमेड कपड्याच्या दुकानात तुम्ही जेव्हा जाता तेव्हा तुमच्या मापाचा आणि तुमच्याजवळ असलेल्या पैशात विकत येईल असाच पोशाख तुम्ही खरेदी करता.

तुमच्या मापाचा नसलेला आणि तुमच्या खिशाला न परवडणारा असा पोशाख तुम्ही घेत नाही. त्याप्रमाणेच जणू ईश्वर एका दुकानात सर्व प्राण्यांच्या शरीराकृती घेऊन बसलेला असतो. तुम्ही मनुष्यजन्मात केलेले कर्म घेऊन जेव्हा त्याच्याजवळ जाता तेव्हा त्या कर्मानुसार तो तुम्हाला देहाकृती देतो, मग ती मनुष्याची असेल अथवा अन्य प्राण्यांची. जो उत्कृष्ट कर्मे करतो त्याला उत्कृष्ट देह मिळतो आणि जो निकृष्ट कर्मे करतो त्याला निकृष्ट देह मिळतो.

जन्माला कारणीभूत असतो आपला राग (आसक्ती). जीवात्मा जेव्हा शरीर सोडून जातो तेव्हा त्याचे ज्या वस्तूशी आणि व्यक्तीशी संबंध असतात ते जर तुटलेले नसतील तर पुन्हा त्याच ठिकाणी त्याला जन्म घ्यावा लागतो. म्हणून 'राग'हे जन्माचे मूळ कारण आहे. जेथे 'राग' असतो तेथे 'द्वेष' असतोच. जेथे राग असतो तेथे कालांतराने द्वेष येतोच. द्वेष हे रागाचेच दुसरे रूप आहे. सामान्यत: जेथे मैत्री असते तेथे कालांतराने काही ना काही कारणाने भांडणे होण्याची शक्यता असते. परंतु सामान्यांच्या बाबतीमध्ये हे घडते. ज्याचे राग-द्वेष ज्ञानाग्नीत जळून गेले आहेत अशा ज्ञानी पुरुषांची कहाणी वेगळी असते. भाजलेले बी जमिनीत पेरले तर ते अंकुरत नाही. ज्ञानी पुरुषांचे संचित कर्म भाजलेल्या बियांप्रमाणे नि:सत्त्व होऊन जाते. पुनर्जन्म देण्याचे सामर्थ्य त्यांच्यात राहात नाही. ज्याने शिवज्ञान प्राप्त करून घेतले आहे त्याची सर्व कर्मे दग्ध होऊन जातात, तो शिवतत्त्वावलंबी असतो. प्रत्येकाला कोणते ना कोणते तरी आलंबन (आधार) हवे असते.

खेळणे हा मुलांचा स्वभाव असतो. मूल चिखलाशीही खेळते आणि खेळण्यांशीही खेळते. चिखलात खेळणे चांगले नाही हे त्याला कळत नसते. तुम्हाला त्याचे चिखलात खेळणे बंद करायचे असेल तर त्याच्या हातात दुसरी आकर्षक, उत्तम वस्तू दिली पाहिजे. मग ते चिखलाशी खेळणे सोडून चांगल्या वस्तूशी खेळू लागते. त्याप्रमाणे संसारात राहणारा जीवात्मा शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पाच विषयांशी सदैव खेळत असतो. त्याच्या मनाला विषय हेच आलंबन असतात. तो एकतर पाहात बसेल, ऐकत बसेल, कुणाशी बोलत बसेल, कुणाला स्पर्श करीत राहील किंवा काहीतरी हुंगत राहील. त्याच्या हातून हे विषय काढून घेतले तर तो रडत बसेल. त्याच्या हातून शब्द काढून घ्यायचा असेल तर त्याचा अशब्दाशी परिचय करून द्यावा लागेल. रूपावरून त्याची दृष्टी वळवायची असेल तर त्याला अरूपाचे दर्शन घडवायला हवे. अशब्द-अरूप-अव्यय असा जो परमात्मा आहे त्याच्याशी जर जीवात्म्याचा संबंध जडला तर शब्दस्पर्शादी पंचविषयांपासून तो मुक्त होऊ शकेल. त्यासाठी त्याला शिवतत्त्वावलंबी झाले पाहिजे. ज्याचा संबंध शरीराशी नसतो, ज्याचा संबंध विषयांशी राहात नाही असा अविषयी जो ज्ञानी पुरुष आहे त्याची कर्मे ज्ञानाग्नीत दग्ध झाल्यामुळे त्याला पुढील जन्म मिळत नाही. त्याचे शरीर परब्रह्मस्वरूप असते. त्याला 'परकाय' असे म्हणतात.

अशा ज्ञानी पुरुषाच्या दर्शनाने आणि स्पर्शाने सर्व जीवांचा उद्धार होतो. अशा महापुरुषचा सहवास तुम्हा आम्हा सर्वांना लाभावा आणि आपले जीवन धन्य व्हावे अशी सदिच्छा व्यक्त करून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

६ ऑगस्ट १९९३

## परकायस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भारतीय साहित्यात महर्षी व्यासांपासून अनेक ग्रंथकारांनी काशीचे माहात्म्य वर्णिले आहे. बृहज्जाबालोपनिषदात नवखंड पृथ्वीवर काशी सर्वश्रेष्ठ आहे असे म्हटले आहे. भगवान शंकरांनी आपल्या त्रिशूलावर काशीनगरी तोलून धरली आहे असे तेथे वर्णन केलेले आहे. शूल म्हणजे ताप. त्रिशूल म्हणजे जीवात्म्याला दु:ख देणारे त्रिविध ताप. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आदीदैविक हेच ते तीन ताप होत. भगवान शिवाच्या हाती त्रिशूल आहे याचा अर्थ, शिव त्रिशूलाच्या अधीन नसून त्रिशूल शिवाच्या अधीन आहे, असा आहे. अर्थात् हे तीन ताप भगवान शिवाला त्रास देऊ शकत नाहीत. म्हणून जो काशीत निवास करतो त्याला त्रिताप दु:ख देऊ शकत नाहीत. मृत्यूची वार्ता एरव्ही दु:खद मानली जाते, परंतु काशीत मृत्यू आला तर तो मंगल मानला जातो. एखाद्याला मरणोत्तर मुक्ती मिळाली असेल तर ती आनंदवार्ताच मानायला हवी.काशीत येणारा मृत्यू मंगल आहे. विभूती येथले आभूषण आहे. जिचे धारण केल्यामुळे आपली कर्मे नाश पावतात आणि आपले भाग्य उजळते अशी विभूती काशीचा अलंकार मानली जाते. येथल्या कौपिनधारी तपस्व्यांपुढे भरजरी वस्त्रे धारण केलेला धनवान देखील क्षुद्र ठरतो. अशा काशीनगरीत वास्तव्य करण्याची इच्छा कोणाला बरे होणार नाही? अर्थात् सर्वांनाच होईल. भाग्यानेच काशीचे वास्तव्य आपल्याला लाभते. म्हणून तुम्ही सर्वजण भाग्यवान आहात. आपल्या इष्टलिंगाच्या रूपात भगवान शिवाची पूजा करीत आहात, रोज गंगास्नान करीत आहात आणि या ज्ञानगंगेत सुस्नात होत आहात.

आपण कालपासून परकायस्थलाचा विचार करीत आहोत. जो ज्ञानी, शिवयोगी असतो तो परकाय होतो. अर्थात् परमेश्वर जेवढा श्रेष्ठ असतो तेवढेच ज्ञानी पुरुषाचे शरीरदेखील श्रेष्ठ असते. 'पर' म्हणजे श्रेष्ठ आणि 'काय' म्हणजे शरीर. ज्याला श्रेष्ठ शरीर लाभलेले आहे तो 'परकाय' होय. शरीरे तर सर्वांची सारखीच असतात. जसे गुरूचे शरीर असते तसेच शिष्याचे शरीर असते. पाप्याचे शरीर आणि तपस्व्यांचे शरीर सारखेच दिसते. त्यांच्यामध्ये बाह्यत: कोणताही फरक आढळत नाही. असे असले तरी सद्गुरूंचे शरीर विलक्षणच असते. एका कन्नड संताने म्हटले आहे– 'कल्लु देवरादरे काय देवरागदे'

जर दगड देव बनतो तर सद्गुरूचे शरीर देव का बनणार नाही? ज्याच्या अमृतहस्ताने पाषाणाच्या मूर्तीला शिवत्व लाभते आणि त्या मूर्तीची आराधना केल्याने मनुष्याला आपले अभीष्ट प्राप्त होते, अशा सद्गुरूचे शरीर शिवाइतकेच पवित्र आणि श्रेष्ठ मानले जाते. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे–

> **अप्रत्यक्षो महादेवः सर्वेषामात्ममायया।**
> **प्रत्यक्षो गुरुरूपेण वर्तते भक्तिसिद्धये।।**
>
> (श्रीसिद्धान्तशिखामणी, ९.५३)

भगवान शिवाचा साक्षात्कार सर्वांना होत नाही, कारण शिव मायाशक्तीने युक्त आहेत. परंतु सद्गुरूंच्या रूपाने प्रत्यक्ष शिवच आपल्याला दृग्गोचर होतात. ज्या शरीराकडून केवळ विहित कर्मेच घडलेली आहेत, निषिद्ध कर्मे मुळीच घडली नाहीत, असे सद्गुरूचे शरीर अत्यंत पवित्र मानले जाते. त्यांच्या हस्तस्पर्शाने अपवित्राला पावित्र्य

लाभते. पापी मनुष्य पुण्यात्मा होतो. म्हणून सद्‌गुरूचे शरीर बाह्यत: सामान्य माणसाच्या शरीरासारखे दिसत असले तरी ते सामान्य नसते, असामान्य असते. त्या शरीरात विलक्षण सामर्थ्य असते आणि त्याचा अनुभव लोक घेत असतात. असा जो श्रेष्ठकाय आहे अर्थात् ज्याचे शरीर परब्रह्मस्वरूप झालेले आहे अशा सद्‌गुरूला 'परकाय' असे म्हटले जाते. काल तुम्ही ऐकले आहे की ज्ञानाग्नीमुळे ज्याचे कर्म-मायादी दग्ध झाले आहेत अशा ज्ञान्याचे शरीर परब्रह्मस्वरूप झालेले असते.

आपल्याला येथे थोडा विचार करायला हवा. ज्ञानाला 'अग्नी' म्हटले जाते तर संसाराला 'सागर' म्हटले जाते. ज्ञान 'अग्नी' आहे तर संसार 'पाणी' आहे. अग्नीवर पाणी टाकले तर अग्नी विझून जातो, याचा अनुभव आपण नेहमी घेत असतो. तुमचे ज्ञान दृढ नसेल तर त्याव संसार आक्रमण करतो. अनेक महात्म्यांच्या जीवनात अशा घटना घडलेल्या आहेत. म्हणून ज्ञानप्राप्तीनंतर अहंभाव बाळगू नये. ज्ञानाच्या दृढीकरणासाठी सदैव सत्संगात राहावे लागते. अग्नीचा आणि पाण्याचा प्रत्यक्ष संबंध आला अर्थात् अग्नीवर पाणी टाकले तर अग्नी विझून जातो, हे खरे आहे. परंतु जर एका मोठ्या भांड्यात पाणी भरून त्याच्या खाली अग्नी पेटवला तर हळूहळू अग्नीसारखेच पाणी तापत जाते आणि हळूहळू पाण्याची वाफ होऊन पाणी नष्ट होते. अग्नीत असे सामर्थ्य आहे. त्याप्रमाणे सत्संग हे जणू एक भांडे आहे, संसार त्यातील पाणी आहे आणि ज्ञान म्हणजे अग्नी आहे. सत्संगरूपी भांड्यात संसाररूपी जल घालून ज्ञानाग्नीने त्याला हळूहळू नष्ट करायला हवे. ज्ञानी झाल्यावर देखील ज्ञान दृढ होईपर्यंत ज्ञानी पुरुषाने सत्संगात राहिले पाहिजे. त्यामुळे त्याला संसारापासून कोणताही धोका होणार नाही.

**इन्द्रियाणि मनोवृत्तिवासना: कर्मसंभवा:।**
**यत्र यान्ति लयं तेन सकायोऽयं परात्मना।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.५२)

आपली इंद्रिये विषयभोगात प्रवृत्त होतात त्याचे कारण कोणते? डोळे रूप पाहू इच्छितात, कान ऐकू इच्छितात, जीभ स्वाद चाखू पाहाते, नाक गंध हुंगण्याची इच्छा धरते आणि त्वचा स्पर्शानुभव घेऊ पाहाते. याचे कारण काय? तर वासना हेच त्याचे मूळ कारण होय. अनेक जन्मांत जीवात्मा जे जे काही भोगत आला आहे त्या साऱ्यांचे संस्कार त्याच्या मनावर झालेले असतात. जो संस्कार प्रबळ होतो त्याप्रमाणे वर्तन करण्याची त्याची इच्छा होते. जीवात्म्याने अगणित जन्म घेतलेले असतात, त्या जन्मांत असंख्य कर्मे केलेली असतात. केवळ विषयभोग घेण्याचे कर्मच त्याने केले असते तर त्याला पुन्हा जन्म घेण्याची गरज राहिली नसती. म्हणून एका कवीने म्हटले आहे-

**वपु: प्रादुर्भावादनुमितमिदं जन्मनि पुरा**
**पुरारे न क्वापि क्वचिदपि भवन्तं प्रणतवान्।**
**नमन्मुक्त: सम्प्रत्यहमतनुऽग्रेप्यनतिमान्**
**इतीश: क्षन्तव्यस्तदिदमपराधद्वयमपि।।**

कवी ईश्वराजवळ जाऊन प्रार्थना करतो की, परमेश्वरा माझ्याकडून दोन अपराध घडले आहे, त्याबद्दल मला क्षमा करा. मला हे शरीर लाभल्यामुळे मी असे अनुमान करू शकतो की याआधी मी जेवढे जन्म घेतले आहेत त्या जन्मांत मी आपल्याला कधीही नमस्कार केलेला नाही, आपले नाम जपले नाही, आपले ध्यान केले नाही.

त्यामुळेच मला हा जन्म घ्यावा लागला. हा एक अपराध माझ्याकडून घडला आहे. आता या जन्मात मी आपल्याला नमस्कार करीत आहे. आपले भजन करीत आहे, नामस्मरण करीत आहे. म्हणून मला विश्वास आहे की यानंतर मला पुनर्जन्म मिळणार नाही, तर मुक्ती मिळणार आहे. त्यामुळे पुढील जन्मात मी आपल्याला नमस्कार करू शकणार नाही. हा दुसरा अपराध माझ्याकडून घडला आहे. म्हणून या दोन अपराधांबद्दल परमेश्वरा, मला क्षमा करा.

याचे तात्पर्य असे की ईश्वरभक्ती न केल्यामुळे जीवात्म्याला वारंवार जन्म घ्यावा लागतो. जन्माचे मूळ कारण वासना होय. वासनेचे मूळ कर्म आहे. आपण जी कर्मे करतो त्यामुळे आपली वासना निर्माण होते. येथे आणखी एक सूक्ष्म विचार केला पाहिजे. बऱ्याच वेळा दैववादी आणि प्रयत्नवादी लोकांमध्ये भांडण चाललेले असते. प्रारब्ध श्रेष्ठ की कर्म श्रेष्ठ? जर प्रारब्ध बलिष्ठ असेल आणि त्याप्रमाणेच आयुष्य घडणार असेल तर प्रयत्न, कर्म कशाला करायचे? असे एक पक्ष म्हणतो. तर कर्म करून आपण आपले प्रारब्ध बदलू शकतो, असे दुसरा पक्ष म्हणतो. यासंबंधी येथे सूक्ष्म चिंतन केलेले आहे.

मनुष्य जेव्हा कर्म करतो तेव्हा त्याच्या कर्मफलाचे दोन भाग होतात. त्याने विहित कर्म केले तर त्याचे एक फल असते पुण्य आणि त्याचा दुसरा भाग असतो शुभवासना. त्याने जर निषिद्ध कर्म केले तर त्याचे फल असते पाप आणि त्याचा दुसरा भाग असतो अशुभवासना. फल आणि वासना असे कर्माचे दोन भाग असतात. फळ प्रत्येकाला भोगावे लागते. पुण्यकर्माचे फळ सुख असून पापकर्माचे फळ दुःख आहे. ते जीवात्म्याला भोगावेच लागते. कर्माचे फळ आपण पुरुषार्थाने, प्रयत्नाने बदलू शकत नाही. परंतु आपली वासना मात्र आपण प्रयत्न करून बदलू शकतो. अशुभवासनेचे शुभवासनेत परिवर्तन करता येते आणि शुभवासनेचे अशुभवासनेत परिवर्तन करता येते. एखाद्या शुभवासना असलेल्या मनुष्याभोवती जर अशुभवासना असलेल्या माणसांची गर्दी झाली तर हळूहळू त्याची शुभवासना अशुभवासनेत परिवर्तित होते. एखाद्या दुरात्म्याने जर सत्संग केला तर हळूहळू त्याची अशुभवासना बदलून ती शुभ होते. वाल्याचा देखील वाल्मीकी होतो. या प्रकारे वासना बदलण्यात आपला पुरुषार्थ सफल होतो. वासना कर्मामुळे बनते, म्हणून मनुष्याने असेच कर्म करावे की ज्याचे शुभ फळ मिळेल आणि शुभवासना बनेल. आपल्या हातून घडणारे कर्मच पुढे आपले दैव बनणार असते. म्हणून आपणच आपल्याला घडवतो आणि आपणच आपल्याला बिघडवतो. आपण दुसऱ्यांमुळे बिघडलो या म्हणण्याला काही अर्थ नाही. प्रत्येक मनुष्य आपापल्या कर्मसूत्राने बांधलेला असतो. कर्मामुळे वासना बनते आणि वासनेप्रमाणे इंद्रिये कर्मात प्रवृत्त होतात.

म्हणून येथे सांगितले आहे की, ज्याची कर्मे आणि कर्मजन्य वासना केवळ शिवार्पित झालेली असते त्याचा देह 'परकाय' झालेला असतो. त्याची सर्व कर्मे भगवंतासाठी, त्याच्या तृप्तीसाठी असतात, स्वतःसाठी नसतात. अशा कर्मालाच शास्त्रात 'निष्काम कर्म' असे म्हटले जाते. त्याची कर्मे भवदर्पण भावनेने होत असतात आणि त्याची वासना देखील भगवदर्पण झालेली असते. कर्म आणि वासना भगवदर्पण झाल्यामुळे त्याचे शरीर देखील भगवद्रूप झालेले असते.

**परहन्तामनुप्राप्य पश्येद् विश्वं चिदात्मकम्।**
**सदेहोऽतिभ्रमस्तस्य निश्चिता हि शिवात्मता।।१६.५३।।**

अहंकार हा ज्ञानी आणि अज्ञानी दोघांच्याही ठिकाणी असतो. परंतु अज्ञानी माणसाच्या ठिकाणी असलेला अहंकार क्षुद्र असतो तर ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी असलेला अहंकार महान असतो. म्हणून त्याला 'पराहंता' असे म्हणतात. क्षुद्र अहंकाराला 'अपराहंता' तर महान अहंकाराला 'पराहंता' असे म्हणतात. व्यष्टीमधला अहंभाव म्हणजे अपराहंता आणि समष्टीमधला अहंभाव म्हणजे पराहंता होय. ज्याचे मी-पण केवळ शरीरालाच वेढून राहिलेले असते तो अज्ञानी. ज्याचे मी-पण समग्र विश्वात व्यापून राहिलेले असते तो ज्ञानी. हा आपला आणि हा परका अशी क्षुद्र भेदभावना अज्ञानी माणसाच्या मनात असते. परंतु विश्व हेच ज्याचे कुटुंब झालेले असते अशा महापुरुषाच्या मनात आपपरभाव उरलेला नसतो. आपल्या कुटुंबावर आपले जसे प्रेम असते तसेच त्याचे विश्वातल्या समग्र जीवजंतूंवर असते. त्याच्या मनात कुठलाही भेद शिल्लक राहत नाही. तर केवळ अभेदभावना असते. म्हणून त्याला 'पराहंता' असे म्हटले जाते. संसारातील अहंभाव दूर करण्यासाठी जीवात्म्याला परमात्म्याजवळ जावे लागते.

वाळवंटात जमीन समतल असते. म्हणून तेथे एखादा उंट भल्यामोठ्या पहाडाप्रमाणे दिसतो. परंतु त्याच उंटाला जर हिमालयाजवळ उभे केले तर त्याचे खुजेपण चटकन जाणवते. त्याप्रमाणे मनुष्य जेव्हा आपल्यापेक्षा सर्वार्थाने लहान असलेल्या माणसाजवळ बसतो तेव्हा तो अहंकाराने फुगत जातो. मी यांच्यापेक्षा मोठा आहे असे त्याला वाटते. परंतु तो जेव्हा त्याच्यापेक्षा महान व्यक्तींच्या समोर जाऊन बसतो तेव्हा त्याला आपण किती लहान आहोत हे कळू लागते. तुमच्यापेक्षा लहान लोकांत तुम्ही बसाल तर तुमचा अहंकार वाढीस लागेल. तुमच्यापेक्षा महान लोकांत तुम्ही बसाल तर तुमचा अहंकार कमी होत जाईल. म्हणून आपल्यापेक्षा जो मोठा आहे त्याच्याजवळ जाऊन बसले पाहिजे. श्रीगुरू हाच सर्वात मोठा आहे. गुरू याचा अर्थ मोठा. लघु म्हणजे लहान आणि गुरू म्हणजे महान. गुरूला परमेश्वरापेक्षाही श्रेष्ठ मानले जाते. कबिरांनी म्हटले आहे-

**गुरु गोविन्द दोऊ खडे काकै लागु पाय।**
**बलिहारी गुरु आपने गोविन्द दियो बताय।।**

जेव्हा आपल्यापुढे दोघे उभे असतील तर प्रथम कुणाला नमस्कार करावा? तर प्रथम श्रीगुरूला नमस्कार करावा असे कबीर सांगतात. गुरू म्हणेल तर देवाला करा. भारतीय संस्कृतीत सद्गुरूला सर्वश्रेष्ठ स्थान दिलेले आहे. स्वत: भगवान शिव म्हणतात, 'मदादि सर्व लोकांना जगद्गुरुवरोत्तमा:।'

एकदा पार्वतीने शिवाला विचारले, ''या प्रपंचात सर्वात मोठा कोण?'' तेव्हा भगवान शिव म्हणाले-

**न गुरोधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकम्।**
**शिवशासनत: शिवशासनत: शिवशासनत:।।**

गुरूपेक्षा या जगात अधिक मोठा कोणी नाही. याला मीच प्रमाण आहे, असे त्रिवार भगवान शिवांनी सांगितले आहे. सर्व शास्त्रांचा निर्माता शिवच असल्यामुळे सद्गुरू सर्वश्रेष्ठ आहे. ही त्यांची आज्ञा सर्वांनी मान्य केली पाहिजे. गुरू सर्वात मोठा का आहे? तर त्याने सर्वात मोठी अशी जी वस्तू-परब्रह्म-प्राप्त करून घेतली आहे. त्यामुळे तो सर्वात मोठा ठरला. परब्रह्मस्वरूप निर्गुण-निराकार परमात्मा लोकांना उपदेश करू शकत नाही. म्हणून त्याचे महत्त्व गुरूपेक्षा कमी आहे. परंतु गुरू सर्वांना ज्ञानोपदेश करीत असल्यामुळे तो परमात्म्यापेक्षा श्रेष्ठ मानला जातो. ज्याला स्वत:चा अहंकार दूर करायचा असतो त्याने सद्गुरूच्या चरणांजवळ जाऊन बसले पाहिजे.

आपल्या संस्कृतीत मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्य देवो भव, असे उपदेश दिलेले आहेत. माता, पिता आणि गुरू आपल्यापेक्षा मोठे असतात. त्यांच्या सन्निध राहून त्यांची सेवा केल्याने आपला अहंकार दूर होतो. आपल्यापेक्षा मोठ्या लोकांच्या सहवासात राहिल्यानेच आपला अहंकार नष्ट होऊ शकतो. सद्गुरूच्या सेवेमुळेच अपराहंता दूर होऊन पराहंता लाभते.

जो परकायस्थली साधक आहे त्याला पराहंता लाभलेली असते. त्याच्या दृष्टीने सारे विश्व शिवमय असते, अशिव काहीही नसते. त्याला परशिवाचा साक्षात्कार झालेला असतो. त्याला सर्वत्र शिवच शिवच दिसू लागतो. ज्याला असा साक्षात्कार होत नाही त्याला आपल्या अवतीभोवती प्रपंच दिसत असतो. प्रपंच आणि परमात्मा यांच्यात एवढाच फरक आहे. ज्याला परशिव प्राप्त होतो तो सदैव सुखसागरात डुंबत असतो, त्याच्या ठिकाणी किंचितदेखील दुःख नसते. परंतु संसारातील अत्यंत श्रीमंत मनुष्यदेखील दुःखी असतो, याचे कारण काय? याचे कारण हे आहे की, प्रपंच कुणालाही संपूर्णतः मिळत नसतो. परमात्मा मात्र प्रत्येकाला पूर्णपणे मिळतो.

प्रपंचात अनेक सुखे असतात. जीवाला आपल्या प्रारब्धकर्मानुसार त्यातली काही मिळतात. संसारातील समग्र सुखे एका व्यक्तीला कधीच मिळत नाही. मग तो चक्रवर्ती सम्राट असला तरी देखील. सम्राटाला देखील सर्व काही मिळत नसते, त्याला कशा ना कशाची तरी उणीव असतेच. कमी असणे हाच संसार होय. तुम्ही जेव्हा पलंगावर झोपता तेव्हा पलंगावरील उबदार शय्येचा स्पर्श तुमच्या केवळ एका भागाला होत असतो. तुम्ही उताणे झोपलात तर तुमच्या पाठीमागच्या भागाला शय्येचा मऊपणा जाणवतो, पुढच्या भागाला तो स्पर्श लाभणार नाही. पालथे झोपलात तर शरीराच्या पुढील भागाला शय्येचा सुखद स्पर्श होईल, पाठीला होणार नाही. डाव्या कडेवर झोपलात तर फक्त त्याच बाजूला शय्येचे स्पर्शसुख मिळेल, उजव्या कडेला, पाठीला आणि पोटाला मिळणार नाही. अशा प्रकारे तुमचे शरीर जेव्हा मृदू शय्येचे सुख अनुभवत असते तेव्हा ते सुख शरीराच्या केवळ एका भागालाच मिळत असते, तीन भागांना मिळत नसते. त्याप्रमाणे संसारातील सुख मनुष्याला पूर्णांशाने कधीही मिळत नसते. त्यात काही ना काहीतरी उणीव असतेच आणि त्याचे शल्य प्रत्येकाच्या मनात राहते.

परमात्मा असा नाही. तो ज्याला प्राप्त होईल त्याला संपूर्णतः लाभेल. म्हणून संसारी मनुष्य कितीही ऐश्वर्यसंपन्न असला तरी तो दुःखी असतो आणि परब्रह्माची प्राप्ती झालेला मनुष्य कितीही दरिद्री असला तरी तो पूर्णसुखी असतो. कारण सुखरूप अशा परमात्म्याचा त्याला पूर्णलाभ झालेला असतो. म्हणून सुखमय परमात्म्याचा लाभ झालेल्या सद्गुरूजवळ 'सर्व काही मीच आहे' अशी पराहंता उत्पन्न होते. जो सर्व विश्वाला आपल्या रूपात पाहतो अशा सद्गुरूला सामान्य देहधारी समजणे हा भ्रम होय.

**स्वस्वरूपं चिदाकारं ज्योतिः साक्षाद्विचिन्तयन्।**
**देहवानपि निर्देहो जीवन्मुक्तो हि साधकः।।१६.५४।।**

आत्मा प्रकाशरूप आहे. दीपज्योत जशी आपल्या भोवतीचा अंधार दूर करते त्याप्रमाणे हृदयकुहरातील अज्ञानांधकार आत्मा दूर करतो. अशा चिद्रूप, ज्ञानरूप आत्म्याचे ध्यान करणारा साधक देहधारी असला तरी तो विदेही म्हणजे जीवन्मुक्त असतो. राजा जनकाला 'विदेही जनक' म्हणत असत. तो बाह्यतः राजव्यवहार करीत असला तरी मनाने त्याच्यापासून संपूर्ण अलिप्त होता. सामान्याच्या दृष्टीला तो 'देही' दिसत असला तरी 'विदेही' होता. त्याप्रमाणे ज्याच्या ठिकाणी देहाभिमान नसतो तो देहधारी असून देखील विदेही असतो.

**देहस्तिष्ठतु वा यातु योगिन: स्वात्मबोधिन:।**
**जीवन्मुक्तिर्भवेत् सद्यश्चिदानन्दप्रकाशिनी।।१६.५५।।**

परकायस्थली शिवयोग्याचे शरीर अनंतकाळ जिवंत राहते असे नाही ते केव्हा ना केव्हा नष्ट होणारच असते. मरणे हा तर शरीराचा धर्मच आहे. ज्ञानी असो वा अज्ञानी, प्रत्येकाला केव्हा ना केव्हा तरी शरीर सोडावेच लागते. ब्रह्मस्वरूप झालेल्या योग्याला शरीर सोडावे लागत नाही असे नाही. प्रकृतीच्या नियमांचा त्याच्या शरीरावरही अंमल असतो. काही योगीपुरुष योगसामर्थ्याने आपले आयुष्य वाढवू शकतात. जगद्गुरू रेणुकाचार्य सातशे वर्षे प्रकट आणि सातशे वर्षे अप्रकट असे चौदाशे वर्षांचे आयुष्य जगले अशी कथा आहे. काही महात्मे दोनशे-चारशे वर्षे जगल्याच्या कथाही आपल्याला माहीत आहेत. याविषयी येथे फारसा विचार करण्याचे प्रयोजन नाही. शरीर असो अथवा नसो, परकायस्थली शिवयोग्याचे सामर्थ्य अबाधित असते. शरीर जिवंत असताना शरीरात जेवढे सामर्थ्य असते तेवढेच त्याच्या मृतशरीरात असू शकते.

**आत्मज्ञानावसानं हि संसारपरिपीडनम्।**
**सूर्योदयेऽपि किं लोकस्तिमिरेणोपरुद्ध्यते।।१६.५६।।**

संसारदु:ख कुठपर्यंत असते? तर आत्मज्ञान होईपर्यंत. एकदा आत्मज्ञान झाले की त्याला सांसारिक दु:खे स्पर्श करू शकत नाहीत. तो संसारात असला तरी त्याला आत्मज्ञान झाल्यामुळे त्याला मुक्ती प्राप्त झालेली असते. त्यामुळे सांसारिक पीडेपासून तो मुक्त असतो. सूर्य उगवला की अंधार नाहीसा होतो त्याप्रमाणे आत्मज्ञान झाले की संसारदु:ख नाश पावते. शेवटी या स्थलाचा समारोप करतात-

**देहाभिमाननिर्मुक्त: कलातीतपदाश्रय:।**
**कथं याति परिच्छेदं शरीरेषु महाबुध:।।१६.५७।।**

परकायस्थली साधक देहाच्या मर्यादित राहत नसतो. त्याने देहाचा अभिमान सोडलेला असतो. त्याने निवृत्ती, प्रतिष्ठा, विद्या, शांती आणि शांत्यतीत अशा पंचकलांच्या अतीत असे परब्रह्मपद प्राप्त केलेले असते. तो शरीरात असला तरी त्याच्या ठिकाणी देहाभिमान नसतो. म्हणून 'मी या एका शरीरातच आहे' अशी परिमित भाषा त्याच्या ठिकाणी नसते. अशा देहधारी ज्ञानी पुरुषाला देहधारी समजणे हा भ्रम होय. अशा प्रकारे ज्ञानी पुरुषाच्या शरीराला त्याच्या आत्म्याइतकेच श्रेष्ठ मानले जाते. अशा परकायस्थलाच्या साधकाच्या स्थितीचे प्रत्येकाने चिंतन करावे आणि ती स्थिती प्राप्त करून घ्यावी, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
७ ऑगस्ट १९९३



## धर्माचारस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आपल्या देशात धार्मिक दृष्टीने काशीनगरीचे विशेष महत्त्व आहे. महर्षी व्यासांनी 'काशीखंड' ग्रंथात काशीचे माहात्म्य वर्णिले आहे. काशीत वास्तव्य करणाऱ्या मनुष्याचा ईश्वराच्या गर्भात निवास असतो, असे भगवान शंकर म्हणतात. माता आपल्या गर्भातल्या शिशूचे सर्वप्रकारे रक्षण करते, त्याप्रमाणे काशीत वास्तव्य करणाऱ्या शिवभक्तांचे भगवान शंकर रक्षण करतात. येथे पुण्यकर्मे करणारेही आहेत तसेच पापकर्मे करणारे आहेत. येथे स्तुती करणारे आहेत तसेच निंदा करणारे देखील आहेत. सर्वांचे रक्षण भगवान शिव करतात. काशीत वास्तव्य करणाऱ्या जीवाला कसलेही भय नसते.

पापी माणसाला देखील काशीत मुक्ती मिळते. मन:पूत वर्तन करावे आणि काशीत येऊन मरावे म्हणजे मुक्ती मिळते, असा याचा अर्थ नाही. जे पुण्यवान असतात त्यांना काशीत मरण आले तर ते तत्काळ मुक्त होतात, परंतु जे पापी असतात त्यांना काशीत मृत्यू आला ते जीवात्मे कालभैरवाच्या ताब्यात जातात. कालभैरव त्यांना एक यातनाशरीर देऊन त्यांच्या पापकर्मांची फळे भोगवतो आणि नंतर ते जीवात्मे शुद्ध होऊन त्यांना शिवसायुज्याची प्राप्ती होते. काशीत मृत्यू आला तर मुक्ती मिळते. तुम्ही सगळे नित्य गंगास्नान, इष्टलिंगार्चन आणि सत्संग करीत आहात. यामुळे तुम्ही लवकरच मुक्तिपदाचे अधिकारी व्हाल.

काल तुम्ही परकायस्थली शिवयोग्यासंबंधी काही विचार ऐकले आहेत. असा शिवयोगी आपले उर्वरित जीवन कसे जगतो आणि त्याच्यापासून इतरांना कोणती प्रेरणा मिळते हे विशद करणारे स्थल आहे धर्माचारस्थल.

**तस्यैव परकायस्य समाचारो य इष्यते।**
**स धर्म: सर्वलोकानामुपकाराय कल्प्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.५८)

परकायस्थली शिवयोग्याचे आचरणच समजात 'धर्म' मानले जाते. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत. धर्म हा पहिला पुरुषार्थ. 'धर्मं चर' अशी वेदांनी आज्ञा केली आहे. धर्माने वागावे म्हणजे नेमके काय ? तर परकायस्थली शिवयोगी जसे वागतो तसे वागणे म्हणजेच धर्माचरण होय. सामान्य लोक अनुकरणप्रिय असतात. ते उपदेश ऐकत नसतात. एखाद्याचे वर्तन पाहून त्याप्रमाणे वागायचा प्रयत्न करतात. एखाद्या अजाण बालकाला घेऊन तुम्ही मंदिरात गेलात आणि 'देवाला नमस्कार कर' असे सांगितले तर ते बालक नमस्कार करणार नाही. कारण त्याला नमस्कार या शब्दाचा अर्थ आणि नमस्कारक्रिया यांपैकी काहीच माहीत नसते. परंतु जेव्हा तुम्ही त्याला नमस्कार करून दाखवता तेव्हा मात्र तुमच्याकडे पाहून ते नमस्कार करते. लहान मुले स्वभावत: अनुकरणप्रिय असतात. तुम्ही व्यवहारात पाहता की लहान मुले नवरा–बायको होऊन खेळत असतात. नवरा म्हणजे काय आणि बायको म्हणजे काय याचे त्यांना थोडे देखील ज्ञान नसते. प्लॅस्टिकच्या बाहुलीला लहान मूल समजून ते न्हाऊ–माखू घालतात, पाळण्यात घालून निजवतात. त्यांचे खेळणे मनोरंजनासाठी चाललेले असते. परंतु ते खेळतात मात्र मोठ्या माणसांचे वर्तन पाहून. म्हणून जो मोठा असतो त्याच्यावर अधिक जबाबदारी असते. माता–पिता, वडील बंधू यांच्यावर मोठी जबाबदारी असते. कारण त्यांचे वर्तन पाहूनच लहान

मुळे वागत असतात. जो मोठा असतो त्याला फार सावधपणे वागावे लागते.

येथे वेदाची आज्ञा आहे– ‘धर्मं चर’ धर्म काय आहे? तर वडीलधाऱ्यांचे आचरण हाच धर्म होय. धर्माची व्याख्या अशी केली आहे– ‘यतोभ्युदय नि:श्रेयस: सिद्धि स धर्म:।’

ज्याच्या आचरणामुळे मनुष्याला ऐहिक सुखांची प्राप्ती होते आणि मुक्तीचाही लाभ होतो तो ‘धर्म’ होय. अभ्युदय आणि नि:श्रेयस या दोन मनुष्याच्या अभिलाषा असतात. प्रपंचातील सर्व सुखे आणि सर्व सुखाची साधने आपल्याला मिळावीत असे प्रत्येकाला वाटते. सांसारिक सुखे भोगलेल्या जीवाच्या मनात कधीतरी मुक्तीची इच्छा उत्पन्न होते. मनुष्यजीवनाचे अंतिम लक्ष्य भोग हे नाही. परमेश्वराने तुम्हाला भोग यासाठी दिले आहेत की तुम्ही कधीतरी त्यापासून मुक्त व्हावे. वासनेचा नाश होऊन विरक्ती उत्पन्न व्हावी यासाठी ईश्वराने मनुष्याला भोग प्रदान केले आहेत. मनुष्याला ऐहिक भोग (अभ्युदय) आणि मुक्ती (नि:श्रेयस) हे दोन्ही हवे असतात. त्यासाठी धर्माचे पालन करावे लागते. ज्याच्यामुळे तुमचा ऐहिक अभ्युदय होतो आणि अंती मुक्ती मिळते त्याला ‘धर्म’ असे म्हणतात. धर्मकार्य करण्याचा अधिकार केवळ मानवालाच आहे. अन्य कोणत्याही जीवमात्राला नाही. कारण मानवयोनी सोडून अन्य जीवयोनी या केवळ भोगयोनी होत. त्यांना केवळ आपल्या कृतकर्मांची फळे भोगण्यासाठीच शरीर मिळाले असते, कर्म करण्यासाठी नव्हे. परंतु मनुष्याला मात्र कर्मफळे भोगण्यासाठी आणि त्याबरोबरच नवी कर्मे करण्यासाठी शरीर मिळालेले असते. मनुष्य हा ‘भोक्ता’ असतो तसाच ‘कर्ता’ देखील असतो.

सर्व पशुपक्ष्यांत मनुष्य का बरे वेगळा आहे? त्यालाच धर्माचरण करायला का सांगितले जाते? तुम्ही पाहता की, काही प्राण्यांना दोन पाय आहेत तर काही प्राण्यांना चार पाय आहेत. कृमिकीटकांना तर अनेक पाय असतात. पाय सर्वांना आहेत. परंतु हात मात्र केवळ मनुष्यालाच मिळाले आहेत. भलेही काही प्राणी हाताचे काम पायांनी करत असतील. परंतु पाय म्हणजे हात नव्हेत. माकड हा उत्क्रांतीच्या दृष्टीने मनुष्याच्या आधीचा टप्पा मानला जातो. त्याला अविकसित स्वरूपातील दोन हात मिळालेले आहेत. हातात फळ घेऊन तो ते खाऊ शकतो. काही काळ मागच्या दोन पायांवर उभे राहून चालू शकतो. परंतु शेवटी तो आपल्या हातांचा उपयोग पाय म्हणूनच करतो. इतर प्राणी मात्र हात नसल्यामुळे तोंडानेच खाऊ शकतात. उत्क्रांतीच्या दृष्टीने माकड म्हणजे अर्धविकसित मनुष्यच आहे. पुढे त्याचाच शरीरविकास होऊन मनुष्याला दोन स्वतंत्र हात आणि पाय मिळाले. त्याला चालण्यासाठी दोन पाय आहेत आणि कर्म करण्यासाठी दोन हात आहेत. कोणतेही धर्मकृत्य हातानेच करावे लागते. धर्माचरण करण्याचा अधिकार केवळ मानवालाच मिळाला आहे. म्हणून मनुष्याने धर्माचरण करावे असे शास्त्र सांगते.

जर मनुष्य धर्माने वागणार नाही तर त्याचे कल्याण कदापि होणार नाही. विश्वातल्या प्रत्येक पदार्थात कोणता ना कोणता तरी धर्म असतोच. पृथ्वीत असलेली गुरुत्वाकर्षणशक्ती हा तिचा धर्मच होय. प्रकृती आपला धर्म कधीही सोडत नाही. परंतु मनुष्य मात्र आपला धर्म सोडून वागतो. याची असंख्य उदाहरणे आहेत. धर्म सोडून वागतो म्हणून तो दु:खी होतो. ‘धर्मेन हीन: पशुभि: समान:।’

जो धर्माचरण करीत नाही तो दिसायला मनुष्य असला तरी पशूसमान असतो. इहलोक सोडून जाताना धर्मच आपली सोबत करीत असतो. अन्य कोणतीही वस्तू आपल्याबरोबर येत नाही. एका सुभाषितकाराने म्हटले आहे–

विद्या मित्रं प्रवासेषु भार्या मित्रं गृहेषु च।
व्याधितस्यौषधं मित्रं धर्मो मित्रं मरिष्यत:।।

प्रवासात विद्या मित्र असते. प्रवास करताना तुमच्या जवळचे सामान चोर हिरावून घेतील, परंतु तुमच्या जवळची विद्या अर्थात् ज्ञान मात्र ते चोरून नेऊ शकत नाहीत. सर्वस्व लुटून नेले तरी ज्ञानी मनुष्य आपल्या विद्येच्या बळावर ते परत मिळवतो, रडत बसत नाही. म्हणून प्रवासात विद्या ही मित्रवत् असते. गृहस्थांसाठी पत्नी मित्र असते. कोणताही विचारविनिमय दोघे मिळून करीत असतात. औषध हे रोग्यांचा मित्र असतो. इतर मित्र येतील, बोलतील आणि जातील. परंतु रोग्याचा खरा मित्र औषधच असते. त्याप्रमाणे मरणाऱ्या माणसाचा धर्म हाच एकमेव मित्र असतो. तोच त्याला मृत्यूनंतर सद्‌गती देऊ शकतो. प्रपंच सोडून जाताना जीवात्मा कोणासोबत जातो? तो धर्मासोबत जातो. त्यावेळी आपल्यासोबत केवळ आपला धर्मच येत असतो. दुसरा कोणीही येऊ शकत नाही. ना धन, ना घर, ना पत्नी, ना पुत्र. तुमच्या पुत्राने तुमच्या मृत्यूनंतर जर दान-धर्म केला तर तो मात्र तुमच्या सोबत येईल. तुमच्या अंगावरील सुवर्णालंकार ते ओढून काढतील. मेल्यावर याला अलंकारांचा काय उपयोग? असे म्हणतील. कमावलेली सारी संपत्ती तुम्हाला इथेच सोडून द्यायची आहे. तुमच्या मृत्यूनंतर तुमची सोबत करीत नाही. ज्या शरीराचे तुम्ही जन्मभर कोडकौतुक करता, त्याला खाऊपिऊ घालता, वस्त्रालंकारांनी सजवता त्या तुमच्या शरीराची अखेर मातीच होते किंवा ते अग्नीत भस्मसात केले जाते.

शेवटी तुमच्यासोबत तुमचा धर्मच येतो. केव्हा ना केव्हा तरी, आज ना उद्या, प्रत्येकाला इहलोक सोडून जावेच लागते. ज्यांनी मृत झालेल्या जीवांना तप:सामर्थ्याने जीवदान दिले अशा महात्म्यांना देखील अखेर मृत्यूच्या घरी जावेच लागले. यावरून 'मरणं प्रकृति: शरीरिणाम्।' मरण हा शरीराचा धर्मच होय हेच सिद्ध होते. मरण हा शरीराचा स्वभाव आहे आणि जीवन ही विकृती आहे असे शास्त्र सांगते. माणूस मेला की आपण आश्चर्यचकित होतो. परंतु विचारवंतांना मात्र माणूस इतकी वर्षे जगलाच कसा? याचे आश्चर्य वाटते. हा आता खात होता, माझ्याशी बोलत होता आणि अचानक कसा गेला? याचे आपण नवल करीत असतो. परंतु विचारवंताना मात्र इतकी वर्षे याच्या देहात प्राण राहिलाच कसा याचे नवल वाटत असते. श्वासोच्छ्‌वास अर्थात् प्राणवायूचे वहन हेच आपल्या जिवंतपणाचे लक्षण असते. प्राणवायूचे वहन थांबले तर प्राणोत्क्रमण होते असा अनुभव आहे. एखाद्या फुग्यात हवा भरली की तो टम्म फुगतो आणि त्याला एक टाचणी टोचली की सारी हवा बाहेर पडते. केवळ एका छिद्रामुळे फुग्यातली हवा बाहेर येते. मग आपल्या शरीराला तर नऊ द्वारे आहेत, नऊ छिद्रे आहेत. असे असताना देखील शरीरात इतकी वर्षे प्राण राहिलाच कसा? असे विचारवंतांना वाटते.

चाळीस-पन्नास वर्षे एका शरीरात प्राणवायूचे आत-बाहेर वाहणे चालू असते. तो एकदा नाकाबाहेर गेला आणि परत आलाच नाही तर? तर जीवनच संपून जाईल. शास्त्रे सांगतात की, दिवसातून २१६०० वेळा प्राणवायू आत-बाहेर वाहत असतो. तो इतके वेळा आत-बाहेर करतो याचाही गंमतशीर विचार काही लोकांनी केला आहे. कधीतरी एकदा कायमचे बाहेर जायचेच असते म्हणून तो बाहेर जाण्याची जणू 'रिहर्सल' करीत असतो. एकदा तो कायमचा बाहेर गेला तर शरीर 'प्रेत' होते.

मृत्यू अनिवार्य आहे. मृत्यूनंतर देखील एक वेगळे जीवन प्रत्येकाला जगावे लागते. जिवंत असताना काही वस्तूंची आपल्याला आवश्यकता असते. त्याप्रमाणे मृत्यूनंतर देखील कशाची तरी गरज भासतेच. तुम्ही येथे यात्रेसाठी आला आहात. येताना तुम्ही सर्व संपत्ती सोबत आणलेली नाही. आवश्यक तेवढेच धन तुम्ही घेऊन

आला आहात. इथे येण्याचा प्रवासखर्च, राहण्याचा-खाण्याचा खर्च, परत जाताना लागणारा प्रवासखर्च असा सारा हिशोब करूनच तुम्ही योग्य तेवढे पैसे सोबत आणता. सारे धन काही सोबत आणत नाही. देशांतराला जाताना कमावलेल्या धनाचा काही भाग तुम्ही सोबत घेऊन जाता, त्याप्रमाणेच लोकांतराला जाताना तुम्ही इहलोकात जी कमाई केलेली असते तिचा काही भाग सोबत न्यावा लागतो. तुम्ही येथून काही नेणार नाही तर तुमचे हाल होणार हे निश्चित. इहलोक सोडताना प्रत्येक जीवात्मा इथे केलेले पुण्य-पापाची कमाई सोबत घेऊन जातो. काही कमाई केल्याशिवाय जीवात्मा इहलोकात राहूच शकत नाही. त्याने शुभकर्मे केली तर त्याला त्याचे शुभफल भोगावे लागते. अशुभकर्मे केली तर अशुभफल भोगावे लागते. परलोकात सद्‌गती हवी असेल तर मनुष्याला धर्माचरणच केले पाहिजे. म्हणून धर्म हाच मरणोत्तर जीवनात साहाय्यक ठरणारा मित्र होय.

धर्म म्हणजे काय? धर्माचा संग्रह कसा करावा? याविषयी येथे विचार केलेला आहे. धर्मसंग्रहाचे एकूण दहा मार्ग येथे सांगितले आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप आणि ध्यान हे दहा धर्माचार होत. तुम्हाला धार्मिक व्हायचे असेल, धर्माचा संग्रह करायचा असेल तर त्यासाठी हे दहा मार्ग आहेत. यांपैकी कोणत्याही एका मार्गाने तुम्ही धर्मसंग्रह करू शकता.

**अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं दया क्षमा।**
**दानं पूजा जपो ध्यानमिति धर्मस्य संग्रहः।।१६.५९।।**

'अहिंसा' हा पहिला धर्म होय. मनुष्य अत्यंत स्वार्थी असतो. दुसऱ्याला दुःख देऊन तो सुख मिळवू पाहतो. दुसऱ्यांना दुःख देणे ही मनुष्याची सामान्य प्रवृत्ती असते. तिचे नियंत्रण करण्यासाठी अहिंसा हा पहिला धर्म सांगितला आहे. म्हणून 'अहिंसा परमो धर्मः' असे म्हटले जाते. प्रत्येक मनुष्यात निर्माणशक्ती आणि विनाशशक्ती असते. मनुष्य काही घडवू शकतो आणि काही बिघडवू शकतो. घडवणे चांगले, बिघडवणे वाईट. माणसाने सतत काही घडवले पाहिजे. दुसऱ्याने काही घडवले तर ते बिघडवू नये. सामान्यतः बिघडवण्याचीच प्रवृत्ती मनुष्यात अधिक आढळते.

एखाद्या जीवाचा प्राण घेणे म्हणजे हिंसा होय. हिंसा हा अधर्म आहे. मनुष्याने कधी हिंसा करू नये. ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांची सृष्टी, पालन आणि संहार अशी अनुक्रमे तीन कार्ये आहेत. त्यांपैकी पहिली दोन कार्ये करण्याची शक्ती मनुष्याला प्राप्त झाली आहे. जीवाची निर्मिती करण्याचे आणि त्याचे पालन करण्याचे सामर्थ्य मनुष्याजवळ आहे. परंतु रुद्राची संहारक शक्ती मात्र त्याला प्राप्त झालेली नाही. एका मनुष्यापासूनच आज अब्जावधी माणसे उत्पन्न झाली आहेत. मनुष्याजवळ जननक्षमता असल्यामुळे तो ब्रह्मदेवाचे कार्य करू शकतो. त्यासाठी कुणी त्याच्यावर आक्षेप घेऊ शकत नाही. अलीकडे आपल्या देशाची लोकसंख्या वाढत चाललेली आहे. म्हणून 'हम दो हमारे दो' असा प्रतिबंध केला आहे तो भाग वेगळा. परंतु सामान्यतः मुलांना जन्म देणे हा काही गुन्हा नाही. अन्न, वस्त्र, निवारा देऊन रक्षण करणे हे विष्णूचे कार्य आहे. आपल्या कुटुंबाचे आणि समाजाचे रक्षण करणे हे काम देखील मनुष्य करू शकतो. त्याबद्दलही त्याला कोणी दोष देणे शक्य नाही. परंतु जीवमात्राचा संहार करण्याचा अधिकार मात्र कोणत्याही मनुष्याला नाही. अधिकार नसला तरी मनुष्य प्राणिहिंसा करीत असतो. आपण ब्रह्मदेवाचे कार्य करू शकतो, विष्णूचे करू शकतो तर मग रुद्राचेच कार्य का करू नये? असे त्याला वाटत असावे. जे करण्याची तुम्हाला अनुमती दिलेली आहे ते कार्य तुम्ही केले तर तुम्ही अपराधी ठरत नाही. परंतु ज्याची अनुमती नाही असे काम केले तर तुम्ही शिक्षेस पात्र व्हाल.

हिंसा, ती दुसऱ्याची असो की स्वतःची, केल्यावर तुम्हाला शिक्षा भोगावीच लागेल. हत्या करा की आत्महत्या करा, तुमच्या नावावर अपराधच जमा होणार हे निश्चित. तुम्ही म्हणाल की, 'शरीर माझे आहे, त्यातला प्राण माझा आहे, त्याचे काय वाट्टेल ते मी करीन, तुम्हाला काय करायचे?' असे म्हणून तुम्ही आत्महत्येला प्रवृत्त झालात आणि मेलात तर सुटलात. परंतु आत्महत्या करताना जिवंत राहिलात तर मात्र तुरुंगाची हवा खावी लागेल. आत्महत्या हा कायद्याने देखील गुन्हा मानलेला आहे. हत्या आणि आत्महत्या हे दोन्ही गुन्हे आहेत. अर्थात् संहार करण्याचा अधिकार केवळ रुद्राचा आहे, मनुष्याचा नव्हे. प्रकृती माणसाला मरण देते. त्यात तिचा स्वार्थ अथवा वाईट हेतू नसतो. परंतु मनुष्य जेव्हा कोणाला ठार करतो तेव्हा त्याचा त्यात हमखास वाईट हेतू असतो. हिंसेचे अनेक प्रकार आहेत. जो स्वतः हिंसा करतो तो हिंसक आहेच, जो दुसऱ्याकडून हिंसा करवतो तोही हिंसक आहे आणि जो हिंसेचे अनुमोदन करतो, तिचे समर्थन करतो तो देखील हिंसकच होय.

मनुष्यात हिंसेची प्रवृत्ती का निर्माण झाली याची कारणे योगशास्त्रात नोंदविलेली आहेत. लोभामुळे, क्रोधामुळे आणि मोहामुळे मनुष्य हिंसेला प्रवृत्त होतो. लोभ हे हिंसेचे पहिले कारण होय. धन मिळवण्याच्या लोभापायी मनुष्य हिंसा करतो. प्राण्यांचे मांस, कातडे आदी विकण्यासाठी तो हिंसेला प्रवृत्त होतो. क्रोध हे हिंसेचे दुसरे कारण होय. एखाद्या व्यक्तीचा मनुष्य आत्यंतिक द्वेष करतो आणि क्रोधाने आंधळा होऊन त्याची हिंसा करतो. मोह हे हिंसेचे तिसरे कारण आहे. स्वर्गादी पारलौकिक सुखे मिळवण्याच्या मोहापायी यज्ञात प्राणिहिंसा केली जाते. स्त्रीच्या मोहासाठी देखील हिंसा केली जाते.

यज्ञवेदीतील पशुहिंसेसंबंधी प्राचीन काळी मजेशीर प्रश्न विचारला गेला– ''यज्ञात तुम्ही पशुबळी दिल्यावर तुम्हाला स्वर्ग मिळेल, परंतु बळी गेलेल्या बिचाऱ्या पशूला कोणती गती मिळेल?''

''त्याला देखील स्वर्ग मिळेल.'' यज्ञकर्त्यांने उत्तर दिले. पुढे त्या चाक्षाक्ष प्रश्नकर्त्याने विचारले, ''मुक्या पशूचा बळी दिल्यावर जर त्याला स्वर्ग मिळतो तर मग तुमच्या घरात बायको–मुले आहे त्यांची यज्ञात आहुती का देत नाही? त्या पशूप्रमाणेच त्यांनाही सहज स्वर्गप्राप्ती होईल.''

स्वर्ग इत्यादी पारलौकिक सुखांच्या मोहामुळे देखील हिंसा केली जाते. म्हणून लोभ, क्रोध आणि मोह ही हिंसेची तीन कारणे होत. अशा प्रकारे हिंसेचे ऐंशी प्रकार सांगितले आहेत. हिंसा हा शब्द ऐकायला आणि वाचायला एक असला तरी त्याचे प्रकार अनेक आहेत. कधीही, कोणत्याही प्रकारची हिंसा न घडणे याला 'अहिंसाव्रत' म्हटले जाते. हिंसेचे जे सूक्ष्म भेद आहेत त्यासंबंधी अधिक विचार उद्या करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

८ ऑगस्ट १९९३



## धर्माचारस्थल-२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीक्षेत्राला 'कामधेनू' असे संबोधले जाते. आपल्या सर्व इच्छा पूर्ण करणारी कामधेनू आहे, त्याप्रमाणे काशीदेखील एक कामधेनू होय. गाईला आपण चारा खाऊ घालतो तेव्हा ती आपल्याला दूध देते. मग या काशीरूपी कामधेनूचा चारा कोणता? तर ती इथे येणाऱ्या भक्ताजवळचा पुण्य-पापरूपी चारा खाऊन त्यांना मोक्षरूपी अमृतमय दूध देते. येथे पुण्यात्म्याला आणि पापात्म्याला देखील मुक्ती मिळते. याप्रमाणे कलियुगात काशीला कामधेनू मानले जाते. तपश्चर्या करणे ही मनुष्याची काशीक्षेत्रात सहज स्थिती मानली जाते. काशीत येऊन तुम्ही प्राणायाम, ध्यान, धारण इ. करता ते ठीकच आहे. परंतु येथे जो साधक आपला सर्व भार भगवान विश्वनाथावर सोपवून निश्चितपणे झोपतो त्याची निद्रा देखील येथे एक 'योग' ठरतो. काशीत बसून काही गप्पा मारल्या तर त्या गप्पा देखील येथे जप ठरतात. अन्य क्षेत्रांत जप केल्याने जेवढा पुण्यलाभ होतो तेवढाच काशीला बसून केलेल्या सामान्य गप्पांमुळे होतो.

**योगोऽत्र निद्रा जपः प्रलज्पः स्वेच्छाशनं नैवेद्यं शयनं प्रणामःय**

जो मनुष्य आपल्या इच्छेनुसार येथे भोजन करतो, ते भोजनच इथला नैवेद्य होय. दंडवत प्रणाम हा सर्वश्रेष्ठ प्रणाम मानला जातो. एकांग त्र्यंग, पंचांग, आणि अष्टांग असे नमस्काराचे चार प्रकार आहेत. साष्टांग (स+अष्टांग=साष्टांग. म्हणजे आठ अंगांसह केलेला नमस्कार) हा सर्वात श्रेष्ठ नमस्कार मानला गेला आहे. काशीत जर कुणी जमिनीवर सरळ झोपला तर तोच त्याचा साष्टांग नमस्कार होय, असे म्हटले आहे. धर्मसंग्रह करण्यासाठी काशीक्षेत्रात केवढी सवलत दिली आहे ते पाहा. तुम्ही येथे केवळ झोप काढली तरी ईश्वर समजतो की तुम्ही नमस्कार केला. येथे बसून तुम्ही इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्या तरी ईश्वर मानतो की तुम्ही त्याचा नामजप करीत आहात. तुम्ही स्वत:साठी जरी भोजन केले तरी ईश्वर मानतो की तुम्ही त्याला नैवेद्य दाखवता. खाऊन-पिऊन तुम्ही येथे गाढ झोपलात तरी ईश्वर समजतो की तुम्ही योगनिद्रेत लीन झाला आहात. ईश्वर इतका भोळा आहे की तुम्ही जे काही करता त्याचा तो चांगलाच अर्थ घेतो.

या क्षेत्राचा अधिपती तुमच्यावर एवढा विश्वास ठेवतो, म्हणून तुम्ही त्याचा विश्वासघात करू नये. जो तुमच्या शयनाला नमस्कार समजतो, जो तुमच्या भोजनाला स्वत:चा नैवेद्य मानतो, तुमच्या सामान्य गप्पागोष्टींना जप समजतो, तुमच्या गाढ निद्रेला योगनिद्रा समजतो अशा भोळ्या ईश्वराला कधी धोका देऊ नये. जो कपटी असतो त्याच्याशी कपट करणे एकवेळ योग्य मानले जाऊ शकते, परंतु जो भोळाभाबडा असतो त्याच्याशी कपट करणे कधीही योग्य नाही. म्हणून भोळ्या ईश्वराशी कधी कपट करू नये. परंतु ईश्वर जेवढा भोळा आहे तेवढाच चतुरदेखील आहे. त्याच्या हाती त्रिशूल आहे याचे आपण भान ठेवायला हवे. एकदा त्याला समजले की हा केवळ झोप काढतो, एकवेळ देखील ध्यान करीत नाही, हा केवळ स्वत:साठीच खातो, एकदा देखील नैवेद्य दाखवत नाही, हा केवळ गप्पाच मारतो, एकदा देखील आपला नामजप करीत नाही, हा केवळ जमिनीवर अंग टाकतो, परंतु एकदाही साष्टांग नमस्कार करत नाही, तेव्हा मात्र तुमची फजिती झाल्याशिवाय राहणार नाही. म्हणून या भोलेबाबाच्या नगरीत आल्यावर केवळ धर्माचरण करा, अधर्माने वागून त्याला फसवण्याचा प्रयत्न करू

नका.

या काशीनगरीत येऊन तुम्ही धर्मकार्य तर करीतच आहात, परंतु त्याचबरोबर धर्म आणि धर्माचरण याविषयी ज. रेणुकाचार्यांनी जो उपदेश केला आहे तो देखील श्रवण करीत आहात. धर्माचाराविषयी तुम्हाला काही माहिती नसेल तरी त्याचे प्रबोधन येथे होत आहे. धर्माचे दहा प्रकार सांगितलेले आहेत.

**अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं दया क्षमा।**
**दानं पूजा जपो ध्यानमिति धर्मस्य संग्रहः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.५९)

धर्माचा एक अर्थ असाही सांगितला जातो– 'पतितं पतन्तं पतिष्यन्तं धरतीति धर्मः।

जो पतित झाला आहे, जो पतित होत आहे आणि जो पुढे पतित होणार आहे अशा तिघांचा जो उद्धार करतो त्याला 'धर्म' असे म्हणतात. जो पापी आहे त्याचा धर्म उद्धार करतो आणि जो पापी होत आहे, जो पुढे पापी होणार आहे अशा लोकांना धर्म सजग करतो. मनुष्याची संपूर्ण उन्नती ज्यामुळे होते त्याला 'धर्म' असे नाव आहे. तुम्हाला धर्म करायचा असेल, धर्मात्मा व्हायचे असेल तर सर्वप्रथम अहिंसेचे पालन करावे लागेल. कालच्या आशीर्वचनात तुम्ही ऐकले आहे की लोभामुळे, क्रोधामुळे आणि मोहामुळे मनुष्य हिंसक बनतो. म्हणून जोपर्यंत लोभ, क्रोध आणि मोह मनुष्याच्या मनात दबा धरून बसले आहेत तोपर्यंत त्याच्या हातून हिंसा होतच राहणार. रोगाचे खरे कारण कळल्याशिवाय आणि ते दूर केल्याशिवाय रोगमुक्त होता येत नाही. त्याप्रमाणे लोभ, क्रोध, मोह ही हिंसेची कारण दूर केल्याशिवाय आपल्याला पूर्णपणे अहिंसक होता येणार नाही. एखाद्या प्राण्याचा जीव घेणे ही तर हिंसा आहेच, परंतु अर्वाच्य शब्द वापरून कोणाचे मन दुखवणे ही देखील हिंसाच होय. तुमच्या वाणीतून कदाचित अर्वाच्य शब्द बाहेर पडत नसतील, परंतु जर मनातल्या मनात तुम्ही कोणाचे अकल्याण चिंतत असाल तर ती देखील हिंसाच आहे. पहिली शारीरिक हिंसा, दुसरी वाचिक हिंसा तर तिसरी मानसिक हिंसा होय. परमेश्वराने मनुष्याला शरीर, वाणी आणि मन ही जी त्रिकरणे दिली आहेत ती शुद्ध झाल्याशिवाय मनुष्य परमात्म्यापर्यंत पोहोचू शकत नाही. म्हणून कायावाचामनाने जो अहिंसा व्रताचे पालन करतो तोच मनुष्य खरा धार्मिक असतो.

सामान्यतः मनुष्य जेव्हा हिंसेसाठी प्रवृत्त होतो तेव्हा आपण काय करीत आहोत याचे त्याला भान नसते. आपल्या हातून अधर्म घडतो आहे याची त्याला जाणीव नसते. जेव्हा त्याला अधर्माची स्पष्ट जाणीव होईल तेव्हाच तो हिंसेपासून परावृत्त होईल. भगवान गौतम बुद्धांच्या चरित्रात अंगुलीमालाची कथा आलेली आहे. त्याने नऊशे नव्यान्नव व्यक्तींची हत्या केली होती. एक हजार माणसांच्या करंगळ्या तोडून त्याची माळ तो देवीला अर्पण करणार होता. त्याला भेटलेला हजारावा मनुष्य गौतम बुद्ध होता. त्यांनी त्याला झाडाची पाने तोडायला सांगितले. त्याने बरीच पाने तोडून आणल्यावर गौतम बुद्धांनी ''पाने परत झाडाला चिकटव'' असे सांगितले. ''पाने तोडता येतात परंतु, पुन्हा ती झाडला चिकटवता येत नाहीत'' असे अंगुलीमालाने म्हणताच गौतम बुद्धांनी त्याला विचारले की, ''जर तुला कोणाला प्राण देता येत नसतील तर प्राण घेण्याचा अधिकार तुला कोणी दिला?'' गौतम बुद्धांच्या प्रश्नाने अंगुलीमालाला आपल्या हातून अधर्म घडतो आहे याची स्पष्ट जाणीव झाली आणि हिंसावृत्तीचा त्याग करून तो गौतमबुद्धांचा अनुयायी झाला. हिंसक मनुष्य देखील अहिंसेचा पूर्ण बोध झाला तर संपूर्ण अहिंसक होऊ शकतो, हेच सत्य अंगुलीमालाची कथा सांगते. जगण्याचा प्रत्येकाला हक्क आहे, म्हणून सर्वांना जगू द्यावे आणि सर्वांसोबत आपणही जगावे. सगळ्यांबरोबर सौहार्द भावाने वर्तन करणे हेच अहिंसेचे

मुख्य धर्म होय.

'सत्य' हा दुसरा धर्म आहे. 'सत्यमेव जयते' हे आपल्या राष्ट्राचे बोधवाक्य आहे. जेथे सत्य आहे तेथेच विजय असतो, तेथेच श्रेय असते. सत्याबद्दल एका सुभाषितात असे म्हटले आहे–

**सत्येन धार्यते पृथ्वी सत्येन तपते रविः। सत्येन वायवो वान्ति सर्वं सत्ये प्रतिष्ठितम्।।**

शेषाने आपल्या मस्तकावर पृथ्वी धारण केली असे आपली पुराणे सांगतात. शेष म्हणजे काय? सर्वांत शेवटी जे 'शेष' राहते त्यालाच 'सत्य' म्हणतात. मनुष्य मेल्यावर आपण 'राम नाम सत् है' म्हणतो. सारे काही संपल्यावर शेवटी जे उरते ते सत्य असते, या अर्थाने सत्याने पृथ्वी धारण केली आहे आणि सत्यामुळेच ती आजवर टिकली आहे असे म्हटले पाहिजे. अनादिकालापासून सूर्य प्रकाशतो आहे तो सत्यामुळेच. सत्यामुळेच वारा वाहतो आणि सत्यामुळेच सर्वांना प्रतिष्ठा लाभली आहे. सत्यामुळेच सारे काही टिकून राहिले आहे.

**सत्य मूलानि धर्माणि सत्यान्नास्ति परंतपः। सत्येन लोकां जयति सत्ये सर्वं प्रतिष्ठितम्।।**

तुम्ही भले धर्म पाळत असाल, परंतु जर सत्य बोलत नसाल तर तुमचे धर्माचरण व्यर्थ होय. असत्य बोलण्यामुळे तुम्ही केलेल्या धर्मकार्याचे फळ तुम्हाला लाभत नाही. सत्यासाठी राजा हरिश्चंद्राने किती हाल अपेष्टा सहन केल्या, परंतु त्याने सत्य सोडले नाही.

एका माणसाला एकुलता एक मुलगा होता. तो नेहमी खोटे बोलत असे. मुलाच्या खोटेपणाला बाप कंटाळून गेला. त्याने मुलाला परोपरीने समजावले. परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही. एकदा त्या गावात 'राजा हरिश्चंद्र' हे नाटक लागले. मुलाला हे नाटक दाखवले तर तो खोटे बोलणे सोडून देईल असे बापाला वाटले. म्हणून त्याने मुलाला पैसे दिले अन् 'नाटक पाहून ये' असे सांगितले.

मुलगा नाटक बघायला गेला खरा, पण उशिरा. तो नाट्यगृहात जाऊन बसला तेव्हा राजा हरिश्चंद्र राज्य गमावून अरण्यात भटकत होता. मुलाने शेजारच्या माणसाला विचारले– ''हा कोण आहे? याची अशी दशा का झाली?''

''हा चक्रवर्ती राजा हरिश्चंद्र आणि सत्य बोलण्यासाठी दुःख भोगतो आहे.'' शेजाऱ्याने सांगितले.

मुलाला वाटले की, खरे बोलल्यामुळे एवढ्या मोठ्या राजाची इतकी वाईट अवस्था झाली, त्यामुळे खोटे बोलणे हेच चांगले आहे. आता यापुढे अधिक काय बघायचे? असा विचार करून तो झोपी गेला. नाटक संपल्यावर शेजाऱ्याने त्याला उठवले आणि मग तो घरी गेला.

सकाळी बापाने विचारले की, ''नाटक कसे होते? ते पाहून तुला काय वाटले?''

''बाबा'', मुलगा म्हणाला, ''नाटक काही चांगले नव्हते. एवढा मोठा चक्रवर्ती राजा, पण खरे बोलल्यामुळे वाया गेला. त्याला खोटे बोलता आले असते ते त्याचे राज्य वाचले असते आणि त्याला दुःखही भोगावे लागले नसते.''

बापाने कपाळावर हात मारून घेतला, मुलगा सुधारण्यापलीकडे गेला होता.

अलीकडे असत्य बोलण्याची प्रवृत्ती फार वाढलेली दिसते. असत्यालाच सत्याची प्रतिष्ठा लाभली आहे की काय असे वाटू लागले आहे. एखादा सत्य बोलत असला तरी त्याला असत्य बोलतो असे मानले जात आहे. परंतु मनुष्याने सत्यावर निष्ठा का ठेवावी हे नीट समजून घ्यायला हवे. सत्य हा मानवी जीवनाचा आधार आहे. असत्य बोलून माणसाला संपत्ती आणि सत्ता मिळेल, परंतु सुख–समाधान मात्र मिळणार नाही.

सत्यामुळेच मनुष्य जिवंत राहतो. कोणी 'जेवायला या' असे म्हटले तर आपण 'भूक नाही' किंवा 'माझे

जेवण झाले आहे' असे सहज बोलून जातो. भूक लागलेली असूनही 'भूक लागली नाही' असे म्हणणे हा शिष्टाचाराचा भाग झाला, सत्याचाराचा नव्हे. तुम्ही सत्याचार न पाळता शिष्टाचार पाळाल तर उपाशी मरायची वेळ येईल. म्हणून माणसाला जेव्हा अन्नपाण्याची गरज असते तेव्हा त्याला सत्य बोलावेच लागते. अर्थात् सत्यामुळेच मनुष्य जिवंत राहू शकतो हे यावरून सिद्ध होते. म्हणून वेदांनी 'सत्यं ब्रूयात्, सत्यं वद, धर्मं चर।' अशी आज्ञा दिलेली आहे.

सत्य बोलावे, परंतु ते अप्रिय असू नये. वाणीमुळे मनुष्याला प्रतिष्ठा लाभते आणि वाणीमुळेच मिळालेली प्रतिष्ठा गमावली जाते. म्हणून आपल्या जिव्हेवर कठोर शब्द येऊ नयेत याची दक्षता घ्यावी लागते. परमेश्वराने आपल्याला मृदू जिव्हा दिली आहे. म्हणून मृदू बोलावे, कठोर बोलू नये. एखाद्या वाट चुकलेल्या जीवाला सन्मार्ग दाखवण्यासाठी कठोर शब्दांचा उपयोग करावा लागतो हे खरे आहे, परंतु त्यामागची भावना शुद्ध असते. अप्रिय सत्य मात्र बोलू नये, असे शास्त्र सांगते. आपण जे बोलतो ते ज्यावेळी ऐकणाऱ्याला अप्रिय वाटण्याची शक्यता असते त्यावेळी मौन राहावे. आपल्या देशात अनेक साधु-सत्पुरुषांनी सत्य ही आपल्या जीवनाची आधारशिला मानून तपश्चर्या केली. माणसाचा हात जसा महत्त्वाचा असतो तशीच त्याची जीभ देखील महत्त्वाची असते. इतर प्राण्यांना जीभ असते. परतुं मनुष्याला जीभ असते ती केवळ रसास्वाद घेण्यासाठी नव्हे, तर बोलण्यासाठीही असते. म्हणून जिभेने नेहमी सत्य बोलावे आणि सत्यस्वरूप अशा परमात्म्याचे नामस्मरण करावे. सत्यस्वरूप परमात्म्याची आपल्या जिभेवर प्रतिष्ठापना करणे हाच सत्य बोलण्याचा खरा अर्थ होय. परमात्म्याची प्रतिष्ठापना करणे हाच सत्य बोलण्याचा खरा अर्थ होय. परमात्म्याची प्रतिष्ठापना कोठे केली जाते? तर जेथे सत्य आहे तेथे. जेथे सत्य नाही तेथे परमात्म्याचे अस्तित्व संभवत नाही. म्हणून जिभेने सत्य बोलावे आणि सत्यस्वरूप परमात्म्याचे सदैव नामस्मरण करावे.

परमात्म्याने दिलेल्या शरीर, वाणी आणि मन या त्रिकरणांचा जेव्हा दुरुपयोग होतो तेव्हा त्याचा जीवात्म्यावर दुष्परिणाम होतो. वाणीचा दुरुपयोग झाला तर मनुष्याला पशुपक्ष्याचा जन्म लाभतो असे म्हटले जाते. ज्यामध्ये आपली सुख-दुःखे सांगता येत नाहीत अशा वाणी नसलेल्या योनीत त्याला जन्म घ्यावा लागतो. मनुष्यजन्म ही जणू एक मधली अवस्था आहे. इथून उच्च योनीतही जाता येते आणि हीन योनीतही जाता येते. रेल्वे जंक्शनवरून तुम्हाला हव्या त्या मार्गाने जाता येते. हैद्राबादचे तिकीट काढाल तर हैद्राबादला जाल, वाराणशीचे तिकीट काढाल तर वाराणशीला जाल. त्याप्रमाणे मनुष्यजन्म घेऊन तुम्ही जी कर्मे कराल त्यानुसार तुम्हाला पुण्य-पापाचे तिकीट मिळेल आणि उच्च योनी अथवा हीन योनी लाभेल. ज्या गाडीचे तिकीट घेतले आहे त्याच गाडीत तुम्ही बसले पाहिजे. दुसऱ्या गाडीत बसाल तर तुम्हाला उतरून दिले जाईल. म्हणून असे म्हटले गेले आहे-

**जिव्हाग्रे वर्तते लक्ष्मी जिव्हाग्रे मित्र बांधवाः। जिव्हाग्रे बंधनप्राप्तिः जिव्हाग्रे मरणं ध्रुवम्।।'**

जिभेमुळे माणूस काय काय मिळवतो? तुमच्या जिभेवर लक्ष्मीचा निवास असतो. तुमचा सारा व्यवहार जिभेवरच अवलंबून असतो. तुम्ही योग्य बोलाल, तोलून मापून बोलाल तर तुम्हाला लक्ष्मी प्राप्त होईल. तुमच्या जिभेचा व्यवहार चांगला नसेल तर तुमच्या जवळ असलेली लक्ष्मीदेखील तुम्हाला सोडून जाईल. जिभेमुळेच तुम्ही मित्र जोडू शकता. ज्याचा मित्रपरिवार मोठा असतो त्याची वाणी चांगली असते असे निश्चित समजावे. गोड बोलल्यानेच मित्र लाभत असतात. म्हणून ज्याची वाणी गोड असते, त्याच्या अवतीभोवती मित्रमंडळीचा आणि बांधवांचा वेढा पडलेला असतो. ज्याची वाणी चांगली नसते त्याला घरातली माणसे देखील बाहेर

हाकलून देतात. जिभेमुळेच बंधनात पडावे लागते. गोड वाणी असलेल्या पोपटाला लोक पिंजऱ्यात बंदिस्त करून ठेवतात. कर्कश ओरडणाऱ्या कावळ्याला पिंजऱ्यात घालून घरात ठेवले जात नाही. म्हणून आपली जीभ ही बंदिवासाचो कारण देखील ठरू शकते आणि जिभेमुळेच माणसाचे मरण देखील ओढवते. एखाद्या मोठ्या माणसाविषयी काही अपशब्द उच्चारले तर ते मृत्यूला आमंत्रण ठरू शकते. अशा प्रकारे जिभेमुळेच लक्ष्मीची प्राप्ती होते, मित्रपरिवार जोडला जातो, जिभेमुळेच बंदिवासात पडावे लागते आणि जिभेमुळेच मरणदेखील प्राप्त होते. परंतु यापेक्षा एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे जिभेमुळेच तुम्हाला मुक्ती देखील प्राप्त होऊ शकते. तुम्हाला जे हवे ते तुम्ही जिभेच्या साहाय्याने मिळवू शकता. म्हणून परमेश्वराने केवळ मनुष्यालाच दिलेल्या या अमूल्य देणगीचा, वाणीचा दुरुपयोग करू नये.

वाणीमुळे मनुष्याची प्रतिष्ठा वाढते असे शास्त्र सांगते. म्हणून तिचा सदुपयोग कराल तर तुमच्यासाठी मुक्तीची पहाट उजाडेल आणि दुरुपयोग कराल तर अंधारलेली वाट तुडवावी लागेल. बरेचसे लोक केवळ वाणीमुळेच दुःख भोगत असतात. ते पाहून वाणीचा दुरुपयोग करू नये हे जाणून घेतले पाहिजे. जोपर्यंत तुम्हाला त्याची जाणीव नव्हती तोपर्यंत ठीक आहे. परंतु यापुढे मात्र आपल्या वाणीने अर्वाच्य, कटू आणि कर्कश शब्दांचा प्रयोग टाळावा. जे बोलाल ते मृदू बोला आणि कमीत कमी बोला. तुमच्या जिभेला असत्य बोलण्याची सवय असेल तर ती सोडण्यासाठी काही उपाय आहेत. पहिला उपाय म्हणजे मौन पाळणे आणि दुसरा उपाय म्हणजे कमीत कमी बोलणे अर्थात मितभाषी असणे. तुम्हाला चांगले, गोड बोलता येत असेल तर तुम्ही अधिक बोलायला हरकत नाही, परंतु तुमच्या जिभेला वाईट बोलण्याची खोड असेल तर मात्र तोंडातून शब्द बाहेर पडू देऊ नये याची दक्षता घ्यावी. म्हणजे मौन धारण करावे. वाणीवर संयम ठेवूनच आपण वाणी–दोषांपासून मुक्त होऊ शकतो. वाणीने सदोदित भगवन्नामाचा जप घडला तर वाणीच्या दुर्व्यवहारापासून आपला बचाव होऊ शकतो. 'जपतो नास्ति पातकम्' असे जपाचे माहात्म्य सांगितले आहे. भगवन्नामाचा जप केल्याने वाणी शुद्ध होऊन पातकाचा नाश होतो. वाणी शुद्ध झाली तर ती केवळ सत्यच बोलू शकते. म्हणून आपल्या वाणीने नेहमी भगवंताचा नामजप आणि त्याचे भजन केले पाहिजे.

सत्य हे मानवाचे जीवनमूल्य आहे. आपल्या आसपास सगळीच माणसे असत्य बोलत असताना आपणच तेवढे सत्य का बोलावे? असा प्रश्न तुम्हाला पडेल, परंतु असत्य बोलण्याने माणसाची कशी दुर्गती होते हे जाणून तुम्ही असत्यापासून दूर राहिले पाहिजे. सत्य बोलताना प्रथम थोडे कष्ट पडतील, परंतु अभ्यासाने हळूहळू आपल्या वाणीत सत्य बाणवता येईल. रोज शंभर वेळा खोटे बोलण्याची सवय असेल तर खोटे बोलण्याच्या पाच वेळा टाळाव्यात. त्यामुळे खोटे बोलण्याची प्रवृत्ती हळूहळू कमी होत जाईल. तुमच्या जवळ हजारो रुपये असतील आणि त्यातले रोज पाच रुपये तुम्ही खर्च करीत राहिलात तर ते केव्हातरी संपतीलच. त्याप्रमाणे खोटे बोलण्याची प्रवृत्ती हळूहळू कमी होते. म्हणून आपण रोज किती खोटे बोलतो ते मोजून ठेवावे. मग खोटे बोलणे कमी करीत जावे. त्यासाठी आत्मपरीक्षण करणे आवश्यक आहे. जेव्हा तुमच्या जिभेवरील असत्य संपूर्ण पुसले जाईल त्याक्षणी तुम्ही सहज सत्यवादी व्हाल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

९ ऑगस्ट १९९३

## धर्माचारस्थल-३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

पवित्र श्रावणमासानिमित्त या काशीक्षेत्री आपण ज्ञानसत्रात सहभागी झाला आहात. पृथ्वीवर अनेक तीर्थक्षेत्रे आहेत. परंतु त्या सर्वांत काशीक्षेत्राचे माहात्म्य विशेष आहे. असे तीर्थक्षेत्र या जगात दुसरे नाही. अन्य क्षेत्रांत ईश्वराच्या दर्शनासाठी जेव्हा भक्त जातात तेव्हा त्यांच्या मनात सांसारिक इच्छांची पूर्ती व्हावी असा उद्देश असतो, परंतु काशीला येणाऱ्या यात्रेकरूंच्या मनात मात्र ज्ञान आणि वैराग्य यांच्या प्राप्तीची इच्छा असते. येथे भगवती अन्नपूर्णा साधकांना भिक्षा प्रदान करते. त्या प्रसाद-भिक्षेमुळे साधकाच्या मनात वैराग्य उत्पन्न होऊन ज्ञान प्रकाशते. म्हणून या क्षेत्राचे 'काशी' हे नाव सार्थ आहे.

'काश्यते प्रकाश्यते इति काशी।' येथे भक्ताच्या मनात ज्ञान स्फुरते. अन्य क्षेत्रांत ज्ञानप्राप्तीला विलंब लागतो. परंतु काशीत मात्र शीघ्र ज्ञानलाभ होतो. जीवात्म्याच्या हृदयात ज्ञान प्रकाशित करण्याचे अत्याधिक सामर्थ्य या क्षेत्रात असल्यामुळे याला 'काशी' नाव आहे. येथे त्वरित ज्ञानलाभ होत असल्यामुळे काशीची महती फार मानली जाते.

काशी दोन प्रकारची आहे. ब्रह्मांडातील काशी आणि पिंडांडातील काशी. ब्रह्मांडातील काशी कुठे आहे? तर उत्तर प्रदेशात, उत्तरवाहिनी गंगेच्या किनाऱ्यावर आहे. उत्तर दिशेकडून आलेली गंगा पुन्हा उत्तर दिशेकडे वाहाते. वरुणा आणि अस्सी या दोन नद्यांमध्ये जो भूप्रदेश आहे त्याला वाराणसी म्हणतात. त्यात गंगा उत्तरेकडे वाहाते. येथे गंगा उत्तरवाहिनी असल्यामुळे काशीला फार महत्त्व आलेले आहे. गंगोत्रीपासून सागरात विलीन होईपर्यंत गंगेच्या दीर्घ प्रवाहात लोक स्नान करतात. परंतु काशीत गंगा उत्तरवाहिनी असल्यामुळे उत्कृष्ट मानली जाते. नदी ज्या ठिकाणी उत्तरवाहिनी आणि पश्चिमवाहिनी असते तेथे दिव्य क्षेत्र असते. ही झाली ब्रह्मांडातील काशी. परंतु प्रत्येकाच्या हृदयात एक काशी असते ती पिंडांडातील काशी होय.

जेथे भगवान विश्वेश्वराचे नित्य वास्तव्य असते ती काशी आहे. जसे संपूर्ण विश्वात विश्वेश्वराचे वास्तव्य आहे तसेच प्रत्येक जीवात्म्याच्या हृदयात देखील त्याचे वास्तव्य आहे. प्रत्येक बीजात जसा अंकुर असतो त्याप्रमाणे प्रत्येक जीवात्म्याच्या हृदयात भगवान शिवाचा नित्य निवास असतो. आपल्या हृदयात परमात्मा राहतो, हे ज्ञान ज्याला असते त्याचे हृदय हे काशीक्षेत्र असते. ज्याला हे ज्ञान नसते त्याच्या हृदयाला 'काशी' मानले जात नाही. काशीमध्ये जशी गंगा उत्तरवाहिनी आहे त्याप्रमाणे ज्याच्या मनोवृत्ती ऊर्ध्वमुखी, उत्तरवाहिनी आहे त्याचे हृदयच काशी होय. सामान्यत: माणसाची मनोवृत्ती अधोमुख असते. फार थोड्या लोकांची वृत्ती ऊर्ध्वमुख असते. सात्त्विक मनुष्याची मनोवृत्ती ऊर्ध्वमुख असते. काशीत गंगादेखील उत्तरेकडे म्हणजे ऊर्ध्वदिशेकडे वाहात आहे. ज्याची मनोवृत्ती ऊर्ध्वमुख असते आणि ज्याला अवघ्या ब्रह्मांडात व्यापून राहिलेले भगवत्तत्त्व आपल्या हृदयात नांदत आहे असे ज्ञान असते त्याचे हृदय 'काशी' होय. ही काशी स्थूलकाशी आहे तर भक्ताच्या हृदयातील काशी जंगमकाशी आहे. जो भक्त जेथे जेथे जाईल तेथे तेथे ती काशी त्याच्यासोबत जाते. त्याला काशीमागे जाण्याची आवश्यकता नसते. काशी त्याच्या मागे मागे असते. तुम्ही सारेजण काशीला आला आहात. तुमच्या मनात वैराग्य आणि ज्ञान यांच्या प्राप्तीची इच्छा असली पाहिजे. सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीचा

मोह नसावा. त्या तर तुम्हाला सहज प्राप्त होतील. परंतु जे दुर्लभ आहे त्याच्या प्राप्तीची इच्छा धरावी.

श्रीमद् आद्य शंकराचर्यांचा जन्म सुदूर केरळात झाला. ते काशीला येऊन राहिले. जेव्हा ते भिक्षेसाठी बाहेर पडत तेव्हा भिक्षा वाढणाऱ्या प्रत्येक स्त्रीला माता अन्नपूर्णा मानून भिक्षा मागत–

**'ज्ञानवैराग्यसिद्ध्यर्थं भिक्षां मे देहि पार्वति।'**

मला अन्य काही नको. ज्ञान आणि वैराग्याच्या प्राप्तीसाठी मी काशीला आलो आहे.

आद्य शंकराच्यांना भगवान शिवाचा अवतार मानले जाते. अशा अवतारी पुरुषांनी देखील काशीला येऊन ज्ञान आणि वैराग्याची भिक्षा मागितली आहे. आपण महापुरुषांचे अनुकरण केले पाहिजे. जो काशीयात्रेला येईल त्याने आपल्या हृदयातील काशी ओळखावी आणि परत जाताना काशीला सोबत घेऊन जावे. याच उद्देशाने तुम्ही सर्वजण नित्य गंगास्नान करीत आहात, गुरुपादोदकाचे सेवन करीत आहात आणि सायंकाळी या ज्ञानगंगेत सुस्नात होत आहात. तेव्हा तुम्हाला ज्ञान आणि वैराग्य याची प्राप्ती निश्चितच होईल. ज्ञान-वैराग्याच्या प्राप्तीसाठी मनुष्याला धार्मिक व्हावे लागते. तो जर धर्माचरण करीत नसेल तर त्याला काही लाभ होणार नाही. म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त धर्माविषयी उपदेश केलेला आहे–

**अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं दया क्षमा।**
**दानं पूजा जपो ध्यानमिति धर्मस्य संग्रहः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.५९)

दहा धर्माचारांपैकी अहिंसाधर्माबद्दल तुम्ही ऐकले आणि सत्यधर्माबद्दल ऐकत आहात. सत्यासारखा दुसरा धर्म नाही, असे संत म्हणतात. 'धर्म ना दुसर जाणिये।'. सत्याचा शोध घेण्यासाठीच जीवात्म्याला जन्म मिळाला आहे. जेव्हा परमेश्वराने मनुष्याला पृथ्वीतलावर पाठविले तेव्हा त्याला सांगितले की, 'भूलोकात जाऊन सत्याचा शोध घेऊन ते प्राप्त करून घे'. सत्य म्हणजे तरी काय? सत्य याचा अर्थ परमात्मा. परमेश्वराने सत्याचा शोध घेण्यासाठी माणसाला भूतलावर पाठवले हे खरे, परंतु त्याचबरोबर त्याची सत्याकडे किती प्रवृत्ती आहे याची परीक्षा घेण्यासाठी एक नाटक देखील केले. त्याने सुवर्णपात्रात सत्य ठेवून त्यावर घट्ट झाकण लावले. उपनिषदांत म्हटले आहे– 'हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्।' सुवर्णपात्रात सत्य दडवून परमेश्वराने माणसाला सांगितले. 'जा, तेथे सत्याचा शोध घे.' जीवात्मा सत्य शोधण्यासाठी आला, परंतु सुवर्णाचे पात्र पाहून मोहात पडला. सत्याचा शोध घेण्याचे भान त्याला राहिले नाही. आपले शरीर हेच ते सुवर्णपात्र होय. या शरीरातच परमेश्वराने सत्य दडवून ठेवले आहे. सत्याचा शोध घेण्यासाठी कोठे दूर जाण्याची आवश्यकता नाही. परंतु तो वरच्या आवरणातच गुंतून पडला आणि शरीराचे कोडकौतुक करण्यात रममाण झाला. एका हिंदी कवीने म्हटले आहे–

**ब्राह्मण के कुल में जन्म लिया। किया धोबी का काम मैने।**
**बना चम्हार तभी पहचाना। छिपा हुआ मुझको मै।।**

मोठी अर्थपूर्ण कविता आहे ही. कवी म्हणतो की, मी ब्राह्मणकुळात जन्म घेतला हे खरे, परंतु ब्राह्मणोचित कर्मे न करता धोब्याचे काम केले. म्हणजे दुसऱ्याची निंदा करीत बसलो, त्याचे धुणे धूत बसलो. धोब्याचे काम सोडून जेव्हा मी चांभार झालो, देहावरल्या चर्माचा शोध घेताना आत डोकावून पाहिले तेव्हा तेथे 'मी' मला सापडलो. याचा अर्थ काय आहे? ब्रह्म जाणण्यासाठी मनुष्याचा जन्म झालेला आहे. जो ब्रह्म जाणतो तो

ब्राह्मण. या अर्थाने प्रत्येक जीवाचा जन्म ब्राह्मणकुळात झाला आहे. परंतु तो ब्रह्म जाणण्यासाठी काहीच करीत नाही. तो करतो धोब्याचे काम. धोबी काय करतो? तर गावातले सारे मळके कपडे घेऊन नदीवर जाऊन धूत बसतो. दिवसरात्र त्याला हेच काम असते. ज्याप्रमाणे धोबी आयुष्यभर दुसऱ्यांची धुणी धूत असतो त्याप्रमाणे मनुष्य शरीराची व्यवस्था पाहण्यात आयुष्य घालवत असतो.

जुनी वस्त्रे फेकून मनुष्य जसा नवी वस्त्रे धारण करतो त्याप्रमाणे जीवात्मा वृद्धावस्थेतील जीर्णशीर्ण शरीराचा त्याग करून नवा देह धारण करतो आणि नवजात शिशूच्या रूपाने पुन्हा इहलोकात येतो. अंगावरच्या वस्त्राचे जेवढे महत्त्व तेवढेच शरीराचे. अंगावरची वस्त्रे म्हणजे मीच, असे म्हणणाऱ्याला आपण वेडा समजून हसतो. तसेच शरीरात नांदणाऱ्या आत्म्याला न जाणता 'देह म्हणजे मीच आहे' असे म्हणणाऱ्या जीवात्म्याला, संत अज्ञानी समजतात.

सत्य प्राप्त करून घेण्यासाठी जीवात्मा भूतलावर आला. परंतु त्याने या सुवर्णपात्रावरचे झाकण उघडून आत बघितले नाही. त्या पात्रासोबतच खेळ खेळत तो आपले आयुष्य घालवतो. सत्याची प्राप्ती सहज होत नाही. 'नायमात्मा प्रवचनेन लभ्य: नायमात्मा बलहीनेन लभ्य:।'

शास्त्र सांगते की, आत्मा दुर्बळांना प्राप्त होत नाही. येथे अत्यंत शक्तिशाली माणसाची आवश्यकता असते. अर्थात् मनोनिग्रहाची गरज असते. ज्याचे मन अत्यंत चंचल आहे त्याला कदापि आत्मज्ञान होत नाही, म्हणून सत्य अत्यंत महत्त्वाचे मानले जाते. काल तुम्ही ऐकले आहे की, सत्याच्या प्राप्तीसाठी सत्य बोलावेच लागते. जोपर्यंत सत्य बोलण्याचा अभ्यास होत नाही तोपर्यंत सत्यस्वरूप अशा भगवंताच्या नावाचा अखंड जप केला पाहिजे. जेव्हा तुमच्या जिव्हेवर सत्य प्रतिष्ठित होईल तेव्हा तुमची जिव्हा कधी असत्य बोलणार नाही आणि सत्य बोलता बोलता तुम्हाला सत्याची प्राप्ती होईल.

'अस्तेय' हा तिसरा धर्म होय. अस्तेय म्हणजे अचौर्य, चोरी न करणे. 'स्तेयं परस्वापहरणं तदभावो अस्तेयम्। दुसऱ्याच्या संपत्तीचे हरण करणे म्हणजे स्तेय. स्तेयाचा अभाव म्हणजे अस्तेय. उपनिषदांत म्हटले आहे की, तुमच्याजवळ संपत्ती असेल तर तिचा तुम्ही त्याग करावा, परंतु दुसऱ्याच्या धनाचे कधीही अपहरण करू नये. चोरी करण्याची भावना मनात उत्पन्न झाली की मनुष्य भयभीत होतो. अत्यंत निर्भय माणसाला देखील चोरी करताना भीती वाटू लागते. एखाद्या चोराने चोरी करण्यासाठी एखाद्या घरात प्रवेश केला, घरातील सर्वजण गाढ झोपलेले असले आणि त्याच वेळी जर एखादे लहान मूल झोपेत किंचाळले तर भीतीने चोर पळून जातो. धैर्यधराच्या धीरवृत्तीला क्षीण करण्याचे सामर्थ्य चौर्यकर्मात आहे, चोरी करून धन मिळवणे ही अधर्माची कमाई होय. धन कोणत्याही मार्गाने मिळवता येते, असत्य बोलून, दुसऱ्यांना फसवून. आपण धन कशासाठी मिळवतो? तर सुखासाठी, समाधानासाठी. ज्या धनामुळे आपल्याला किंचित् देखील सुख मिळत नाही, केवळ दुःखच दुःख मिळते त्या धनाचा काय उपयोग?

धनाला 'लक्ष्मी' असे म्हणतात. लक्ष्मीचे तीन प्रकार मानले आहेत. अलक्ष्मी, लक्ष्मी आणि महालक्ष्मी. खोटे बोलून दुसऱ्याला फसवून संपत्ती मिळवणे म्हणजे 'अलक्ष्मी'. थोडे चांगल्या मार्गाने आणि थोडे खोट्या मार्गाने मिळवलेले धन म्हणजे 'लक्ष्मी' होय. अत्यंत शुद्ध मार्गाने, कष्टाने कमावलेले धन म्हणजे 'महालक्ष्मी'. दीपावलीच्या रात्री व्यापारी लक्ष्मीची आणि सरस्वतीची पूजा करतात. त्यावेळी त्या देवतांना 'महालक्ष्मी' आणि 'महासरस्वती' असे संबोधले जाते. ज्या दिवशी व्यापार सुरू केला जातो त्या दिवशी आपण, महालक्ष्मी आणि महासरस्वती मिळावी, अशी प्रार्थना करतो. खातेपुस्तकात 'श्रीमहालक्ष्मी प्रसन्न' आणि 'श्रीमहासरस्वती प्रसन्न'

असे लिहितात. स्वस्तिक काढून एकीकडे 'शुभ', एकीकडे 'लाभ' असे लिहून पूजा करतात. महालक्ष्मी प्राप्त करून घेण्यासाठी व्यापाऱ्याला एक विधी सांगितला जातो. प्रथम 'शुभ' आणि नंतर 'लाभ'. व्यापारी जेथे बसतो त्या गादीच्या पाठीमागच्या भिंतीवर मध्ये स्वस्तिक काढून एकीकडे 'शुभ' दुसरीकडे 'लाभ' असे लिहिले जाते. आपल्याला प्रथम 'शुभ' हवे आणि नंतर 'लाभ' हवा, असा त्याचा अर्थ आहे. पूजेनंतर जेव्हा काही मोजून देतात तेव्हा पहिले माप मोजताना व्यापारी 'एक' असे न म्हणताना 'लाभ' असे म्हणतात. खरे तर पहिल्या मापाला 'शुभ' असे म्हणायला हवे. दुसऱ्या मापाला 'लाभ' असे म्हटले पाहिजे. नंतर तीन, चार, पाच असे म्हणायला हवे. पूजाप्रसंगी संकल्प करताना प्रथम 'शुभ हवे' असे तोंडाने म्हणतात परंतु व्यापार सुरू करताना मात्र पहिल्या मापाला 'लाभ' म्हणतात आणि नंतर दोन, तीन, चार असे मोजतात.

जेथे प्रथम 'लाभ' येतो तेथे हळूहळू 'लोभ' वाढत जातो. 'लाभात् लोभः प्रवर्धते।' मनुष्याला जसजसा लाभ होतो तसतसा त्याचा लोभ वाढत जातो. सर्व दुर्गुणांत लोभ हा मोठा दुर्गुण मानला जातो. निजगुण शिवयोगी म्हणतात– 'कडुलोभदिंदे दुर्गुणमन्यमुंटे।'

लोभाइतका मोठा दुर्गुण नाही. लोभी माणूस कमावलेले धन स्वतःसाठी खर्च करत नाही. इतरांसाठी देखील खर्च करत नाही. ज्या दुर्गुणामुळे मनुष्याला ऐहिक सुखे मिळवण्यासाठी पैसे खर्चावे लागतात आणि पारलौकिक सुखे मिळवण्यासाठी दानधर्मादी कृत्ये करावी लागतात. लोभी मनुष्य दोन्ही करीत नसल्यामुळे तो ऐहिक आणि पारलौकिक सुखांपासून वंचित राहतो. अति-लोभामुळे मनुष्य चोरी करतो, दुसऱ्याची मालमत्ता हडप करतो. इच्छा नसताना एखाद्याकडून जबरदस्तीने पैसे घेणे ही देखील एक प्रकारची चोरीच होय. एवढेच नव्हे, तर तुम्ही एखाद्याला दिलेली वस्तू पुन्हा परत मागणे ही देखील चोरीच आहे.

रामायणामधली कथा तुम्हाला माहीतच असेल. रावणाचा वध करून लंकेवर संपूर्ण विजय मिळवल्यानंतर राम-लक्ष्मण आणि वानरसैन्य परत निघाले. निघण्यापूर्वी काही काळ ते समुद्रकिनाऱ्यावर विश्रांतीसाठी थांबले. तेव्हा वानरांनी आपापसात विचारविनिमय केला. एकजण म्हणाला, ''आपण लंकेवर विजय मिळवून अयोध्येला जात आहोत, परंतु असे रिकाम्या हाताने जाणे योग्य नव्हे, जाताना येथली अत्यंत मौल्यवान वस्तू अयोध्येला घेऊन गेले पाहिजे. म्हणजे तेथे ती आपल्या विजयाचे स्मारक ठरेल आणि लंकाविजयाची सतत आठवण देत राहील.''

यावर सर्वांचे एकमत झाले. दुसरा म्हणाला, ''लंका ही तर सोन्याची नगरी आहे. त्यामध्ये सर्वांत मूल्यवान काय आहे हे आपल्याला माहीत नाही. हनुमंताने मात्र संपूर्ण लंकानगरी अंतर्बाह्य न्याहाळली आहे तेव्हा लंकेतील मूल्यवान वस्तू कोणती ते सांगावे.''

हनुमंत म्हणाला, ''माझ्या मते लंकेतील सर्वात मूल्यवान वस्तू रावणाचे सिंहासन आहे.''

सर्व वानरांनी हनुमंताला सिंहासन घेऊन येण्याचा आग्रह केला. राम-लक्ष्मण हा सर्व प्रकार पाहत होते. ते काही बोलले नाहीत. हनुमंताने एकवार त्यांच्याकडे पाहिले आणि त्यांची मूक संमती आहे असे समजून तो लंकेकडे निघाला. वाटेत त्याला जांबुवंत भेटला आणि त्याने हनुमंताला ''कुठे निघालास?'' असे विचारले. तेव्हा हनुमंताने सर्व प्रकार सांगितला.

जांबुवंत वृद्ध आणि अनुभवी होता. त्याने इतरांपेक्षा अधिक पावसाळे पाहिले होते. त्याने हनुमंताला विचारले, ''तू रावणाचे सिंहासन आणायला निघालास खरा, पण त्यासाठी प्रभू रामचंद्रांची अनुमती घेतली आहेस का?''

''आमची सर्व चर्चा त्यांनी ऐकली. त्यावर ते काही बोलले नाहीत आणि मी इकडे निघाल्यावर त्यांनी मला अडवले नाही. यावरून त्यांची याला संमती आहे असे सिद्ध होते.'' हनुमंत म्हणाला.

''हनुमंता'', जांबुवंत हसून म्हणाला, ''काही गोष्टी गृहीत धरणे उचित नव्हे, त्यासाठी स्पष्ट आज्ञा घ्यायला हवी. चल, आपण प्रभू रामचंद्राकडे जाऊन त्यांनाच विचारू.''

दोघेही श्रीरामाकडे आले. जांबुवंताने सर्व प्रकार श्रीरामांना कथन केला. तेव्हा श्रीराम म्हणाले, ''त्यात एवढे ते काय?''

''प्रभू'', जांबुवंत हात जोडून म्हणाला, ''अशी घटना याआधी कधी घडली नाही, हे विपरीत आज घडत आहे. लंकेवर विजय मिळवण्याआधी बिभीषण आपल्याकडे आला असताना आपण सर्वांच्या साक्षीने बिभीषणाच्या डोक्यावर समुद्रजलाने अभिषेक करून 'या नगरीचा तू अधिपती आहेस' असे घोषित केले होते. त्यामुळे रावणाच्या सिंहासनावर आता बिभीषणाचा अधिकार आहे. रावणाचे सिंहासन आपण बिभीषणाला दिले आहे. एकदा दिलेली वस्तू परत घेणे वीरपुरुषाला शोभत नाही. दिलेली वस्तू परत घेणे ही एक प्रकारची चोरीच होय.''

जांबुवंताचे म्हणणे श्रीरामाला पटले आणि पुढील सर्व प्रकार टळला.

धर्म इतका सूक्ष्म असतो. 'धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम्।' धर्म इतका सूक्ष्म असतो की, बऱ्याच वेळा सामान्य बुद्धीच्या माणसांना आपण धर्माने वागतो की अधर्माने हेच कळत नाही. आपण धर्म करीत आहोत असे समजून ते अधर्मच करीत असतात म्हणून 'स्तेय' हा अधर्म होय. प्रत्येकाने त्यापासून अलिप्त राहिले पाहिजे. मनुष्याने स्वावलंबी बनावे. कष्ट करून धन मिळवावे आणि कमावलेल्या धनातला थोडा भाग इतरांसाठी खर्च करावा, परंतु परधनाचा अपहार कधीही करू नये. चोरी केलेले अन्न जर तुम्ही खाल्ले तर ते तुमच्या रक्तात भिनते आणि तुमचा वंश बिघडून जातो. एवढा सूक्ष्म विचार धर्मशास्त्राने केला आहे. कारण आपले शरीर हे अन्नाचाच परिणाम होय. आपण जे अन्न खातो त्याचेच रक्त तयार होऊन ते सर्व शरीरभर खेळते. म्हणून प्रत्येकाने सावध राहून अस्तेयधर्म अंगी बाणवावा. याबद्दल प्राचीन काळापासून आपले ऋषिमुनी सांगत आलेले आहेत. परंतु या कानाने ऐकून त्या कानाने सोडून देण्याची सवयच माणसाला लागलेली आहे.

बरेच जण तर उपदेश देणाऱ्यालाच त्याचा उपदेश परत करून रिकाम्या हाताने परत जातात. 'फार चांगले झाले, फार चांगले झाले', असे म्हणतात. काय चांगले झाले? तुमच्या आत काही चांगले शिरलेच नाही. अन् चांगले काय झाले? जोपर्यंत आपल्यात चांगुलपणा निर्माण होत नाही तोपर्यंत दुसऱ्याच्या चांगुलपणाला काय अर्थ आहे? प्रत्येकाने आत्मनिरीक्षण करायला हवे. कर्म करताना सूक्ष्म विचार करावा. आपल्या हातून चोरी तर होत नाही ना? आपण कमावलेल्या संपत्तीत चोरीचा काही भाग तर मिसळला नाही ना? असा प्रतिक्षणी विचार करून जो वागतो तोच अस्तेयव्रताचे पालन करीत असतो. अस्तेयव्रताच्या पालनामुळे आपले मन आणि शरीर शुद्ध होते, पवित्र होते. जो अस्तेयाचे पालन करतो तो संपूर्ण निर्भय असतो. जो धर्माने वागतो तो कोणालाही भीत नसतो. परंतु जे अधर्माने वागतात ते सतत भयग्रस्त असतात. चोरी न करण्याचा संकल्प करणे हे देखील धर्माचे साधन होय. धर्माचा मार्ग कठीण असतो म्हणून मनुष्याने अधर्ममार्गावर चालू नये.

अधर्माने वागल्यावर प्रारंभी सुख मिळते, परंतु शेवटी दुःखच वाट्याला येते. त्यावेळी वाटते की अधर्माने वागायला नको होते. माणसासाठी दोन मार्ग आहेत. एक अधर्माचा आणि दुसरा धर्माचा. पहिल्या मार्गावर प्रारंभी फारच सुख दिसते. परंतु शेवटी दुःखच दुःख वाट्याला येते. दुसऱ्या मार्गात प्रारंभी क्लेश जाणवतात, परंतु शेवटी

सुखच सुख असते. आपण व्यवहारात पाहतो की जे धार्मिक असतात त्यांच्या जीवनात दुःख असते. परंतु अंतिमतः त्यांना परमसुखाची प्राप्ती होते. येथे तुम्ही तपस्येसाठी आला आहात. येथे सर्वांना गार पाण्याने स्नान करावे लागते, गरम पाणी कोणाला मिळत नाही. घरी रोज गरम पाण्याने स्नान करण्याची सवय असणाऱ्यांना देखील येथे गार पाणीच मिळते. त्यामुळे तुम्हाला थोडे कष्ट होतील. सर्दीची बाधा होईल. परंतु शेवटी पापे नष्ट होऊन सुखच प्राप्त होईल. काही लोक काशीला येऊन देखील गंगास्नान करीत नाहीत. नळाला येणारे पाणी गंगेचेच असते, मग गंगास्नान करायला कशाला जा, असे त्यांना वाटते. आपल्या अनुकूलतेप्रमाणे ते धर्माचे विचार करतात. पाणी गार वाटले तर गरम करून घेतात. परंतु गंगास्नान करणे थोडे कष्टदायक वाटले तरी शेवटी तेच आपल्याला पुण्यलाभ करवते. नळाला येणाऱ्या पाण्यात ते सामर्थ्य नसते.

तीर्थक्षेत्रात घेतलेले कष्ट अंतिमतः पुण्यप्रदच असतात. घरात तुम्ही जसे जेवण घेता तसे जेवण तुम्हाला तीर्थक्षेत्रात मिळणार नाही. तुम्हाला भिक्षान्न स्वीकारावे लागेल. परंतु घरचे सुग्रास भोजन हे केवळ अन्न असते तर मठ-मंदिरातील भिक्षान्न हे प्रसादान्न असते. धर्माचा मार्ग प्रारंभी कष्टदायक वाटला तरी शेवटी तोच अत्यंत सुखकारक असतो. धर्माचरण करणाऱ्या पुरुषांच्या कथा आपल्या प्राचीन ग्रंथांत आढळतात. त्यामध्ये त्या त्या महापुरुषांच्या नशिबात प्रारंभी कष्टच आलेले दिसतात. परंतु शेवटी मात्र त्यांचे जीवन परमसुखाने दरवळून गेलेले आढळते. म्हणून प्रत्येकाने शास्त्रांच्या आदेशानुसार, गुरूच्या आदेशानुसार धर्माचरण करावे. अस्तेयव्रताचे पूर्ण पालन करावे आणि आपल्या कमाईतील प्रत्येक पैसा धर्माने आणि स्वकष्टाने मिळवावा. त्यात चौर्याचा थोडा देखील अंश असू नये याबद्दल दक्ष राहावे.

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थात 'धर्म' हा पहिला परुषार्थ आहे. सर्वप्रथम धर्माचा संग्रह करावा, असे सांगितले आहे. धर्माचा संग्रह कोणत्या वयात करावा? आपल्याला वाटते की म्हातारपणी धर्मसंग्रह करावा. परंतु म्हातारपणी आपल्या हातून धर्म होत नाही, धर्मसंग्रह होतो तो तारुण्यातच. धर्म हा पहिला पुरुषार्थ आहे. अर्थ आणि काम हे नंतर आहेत. म्हणजे गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वी तुम्ही धर्मसंग्रह सुरू केला पाहिजे. जो बाल्यावस्थेत धर्म करतो तो उत्तरायुष्यात कधीही अधर्मी होत नाही. ज्याला अधर्माची सवय झालेली असते तो म्हातारपणात देखील अधर्मच करतो. युवावस्थेत धर्माचा संग्रह करावा अशी वेदांची आज्ञा आहे. म्हणून प्रत्येकाने आपल्या तारुण्यावस्थेतच धर्मसंग्रह केला पाहिजे. ज्याच्या आयुष्यात धर्म प्रथम येतो तो कधी हिंसा करीत नाही, असत्य बोलत नाही, चोरी करीत नाही. येथे जे दहा धर्म सांगितले आहेत त्यांचे पालन करूनच तुम्ही धार्मिक होऊ शकाल आणि धर्मामुळेच तुम्हाला ऐहिक आणि पारलौकिक सुखाचा लाभ होईल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

१० ऑगस्ट १९९३



## धर्माचारस्थल–४

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीक्षेत्राचे एक नाव 'महास्मशान' असे आहे. स्मशान प्रत्येक गावात असते, परंतु महास्मशान मात्र काशीक्षेत्र हेच होय. स्मशानात चितेवर मनुष्याचा केवळ स्थूलदेहच जळतो, परंतु काशीच्या स्मशानात मात्र सूक्ष्मदेह देखील जळून जातो, म्हणून काशीला 'महास्मशान' असे म्हणतात. सूक्ष्मदेह जळून जातो याचा अर्थ मनुष्याला पुनर्जन्म मिळत नाही. जोपर्यंत सूक्ष्मदेह जिवंत असतो तोपर्यंत जीवात्म्याला मुक्ती मिळत नाही. कारण सूक्ष्मदेहातच सगळ्या वासना, सगळे संस्कार भरलेले असतात. जीवात्मा जेव्हा स्थूलदेह सोडतो तेव्हा आपल्या सूक्ष्मदेहासोबत साऱ्या वासना, संस्कार घेऊन जातो. नवा जन्म घेताना नव्या शरीरात आपल्या सूक्ष्मदेहासह प्रवेश करतो. अन्य स्मशानात केवळ स्थूलदेह जळतो तर काशीच्या स्मशानात स्थूलदेहासह सूक्ष्मदेह देखील नष्ट होतो. अर्थात् जीवात्म्याची जन्ममृत्यूच्या चक्रातून सुटका होते. म्हणून काशीला 'महास्मशान' अशी संज्ञा आहे.

भगवान शिवाचे काशीक्षेत्रात नित्य वास्तव्य आहे. शिवाला स्मशान अत्यंत प्रिय आहे. ते स्मशानात राहून तिथल्या पिशाच्चादिकांशी क्रीडा करतात. शिवाला स्मशान का बरे प्रिय असते? याचा थोडा विचार करायला हवा. काही माणसे मंदिरात जातात, काही मशिदीत तर काही चर्चमध्ये. काहीजण कुठेच जात नाहीत. ते जन्म घेतात, इकडे–तिकडे हिंडतात, मौजमजा करतात आणि एके दिवशी यमराजाचे निमंत्रण येताच निमूटपणे निघून जातात. आयुष्यात एकदाही मंदिरात न जाणारे आणि ईश्वराचे एकदाही दर्शन न घेणारे अनेक लोक जगात असतात. परंतु ईश्वर सर्वव्यापक आहे. तो जसा मंदिरात आहे तसाच मंदिराबाहेर देखील आहे. त्याची नावे अनेक असली तरी आणि त्याला अनेक रूपांत लोक भजत असले तरी तो 'एक' आहे. 'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति।' बरेच लोक आपापल्या परंपरांप्रमाणे कुणी मंदिरात, कुणी मशिदीत तर कुणी चर्चमध्ये जाऊन परमेश्वराची प्रार्थना करतात. परंतु जे लोक शिवाची प्रार्थना तर सोडाच पण त्याचे दर्शन देखील घ्यायला जात नाहीत त्यांचे काय? जो मठात जात नाही, जो मंदिरात जात नाही त्याला कधी ना कधी स्मशानात तर जावेच लागणार. म्हणून ईश्वराने विचार केला की प्रत्येकाला जेथे यावेच लागते तेथेच आपण जाऊन बसलो तर त्या बिचाऱ्यांना शेवटी तरी आपले दर्शन घडेल. जीवांवर अशी कृपा करण्यासाठी भगवान शिव स्मशानात जाऊ बसले आहेत.

ज्ञान प्राप्त करण्यासाठी वैराग्याची आवश्यकता असते. स्मशान हे असे स्थान आहे की जेथे बसल्यावर मनुष्याच्या अंगी वैराग्य सहज बाणू शकते. एक माणूस मरतो तेव्हा त्याला अंतिम निरोप देण्यासाठी हजार माणसे स्मशानात जातात. कामधंदा सोडून इतक्या लोकांनी स्मशानात जाण्याची काय आवश्यकता आहे? प्रेताला खांदा द्यायला चार माणसे गेली तरी काम भागण्यासारखे आहे. परंतु एवढी माणसे जातात याचे हे एक कारण आहे की, तेथे गेल्यावर माणसाला थोडे फार ज्ञान आणि वैराग्य यांचा लाभ होतो. मृत शरीर गाडताना पाहून एके दिवशी आपल्याला देखील येथेच यायचे आहे, याचे भान माणसाला येते. याप्रकारे स्मशानात अनेकदा जाऊन त्याला वैराग्य आणि ज्ञान प्राप्त होते. परंतु हे वैराग्य क्षणिक असते आणि फार तर स्मशानातून घरी जाईपर्यंत टिकते. म्हणून या क्षणिक वैराग्याला 'स्मशानवैराग्य' असेही म्हटले जाते. गौतम बुद्धाकडे जेव्हा दीक्षा घ्यायला कुणी येत असे तेव्हा ते त्याला सहा महिने स्मशानात राहायला सांगत. कारण तेथे राहिल्यावर रोज येणारी प्रेते पाहून

पाहून त्याच्या मनातील वैराग्य दृढ होत असे. मनुष्याला ज्या ठिकाणी वैराग्याचा सहज लाभ होतो त्या ठिकाणी जाऊन बसावे, असे भगवान शंकरांना वाटले. म्हणून त्याचे वास्तव्य स्मशानात असते. काशीक्षेत्रातही भगवान शिवाचे सदैव वास्तव्य असल्याने या क्षेत्राला 'महास्मशान' असे म्हटले आहे. येथे जो देह सोडतो त्याला पुनर्जन्म घ्यावा लागत नाही. अशा सहज मुक्ती देणाऱ्या या पवित्र क्षेत्रात तुम्ही 'श्रीसिद्धाशिखामणी'वर आशीर्वचने ऐकत आहात.

आपण धर्माचारस्थलासंबंधी विचार करीत आहोत. मनुष्याला धार्मिक व्हायचे असेल तर त्याला धर्माचे पालन करावे लागते. 'सत्यं वद, धर्मं चर' असे शास्त्र सांगते. सत्य बोलावे आणि धर्माचे आचरण करावे. म्हणून आचरणालाच 'धर्म' असे म्हणतात. आतापर्यंत तुम्ही अहिंसा, सत्य आणि अस्तेय या धर्माविषयी बरेच काही ऐकले आहे. आता यापुढे ब्रह्मचर्य, दया, क्षमा आदी धर्मांचा विचार करायचा आहे. शारीरिक तपश्चर्येत ब्रह्मचर्याचा समावेश केला जातो.

'ब्रह्मचर्यहिंसा च शारीरं तप उच्यते।' असे गीतेत भगवंताने म्हटले आहे. ब्रह्मचर्य आणि अहिंसा यांचे पालन करणे हे शारीरिक तप होय. तप तीन प्रकारचे आहे. वाचिक, मानसिक आणि शारीरिक. देव, गुरू आणि अतिथी यांचा सत्कार करणे, सेवा करणे आणि ब्रह्मचर्याचे पालन करणे हे शारीरिक तप असून त्यामुळे शरीराची शुद्धी होते. ब्रह्मचर्याबद्दल योगशास्त्रात म्हटले आहे- 'गुप्तेंद्रियस्य उपस्थस्य संयमः ब्रह्मचर्यम्।' ज्या इंद्रियांमुळे मनुष्याची विषयांकडे अधिक प्रवृत्ती होते त्या सर्व इंद्रियांवर नियंत्रण ठेवणे म्हणजे ब्रह्मचर्य होय. पाण्याने पूर्ण भरलेल्या घड्याला जर चार-पाच छिद्रे पाडली तर हळूहळू आतले पाणी बाहेर पडून घडा रिकामा होतो. त्याप्रमाणे माणसाच्या, आतली शक्ती इंद्रियांद्वारे हळूहळू बाहेर पडून क्षीण होते. अंतरंगात स्फूर्ती नसेल तर मेधाशक्ती प्राप्त होत नाही आणि मेधाशक्ती जोवर प्राप्त होत नाही तोवर ब्रह्मज्ञानाचा लाभ होत नाही. बृहदारण्यक उपनिषधात एक सुरेख कथा आली आहे.

एकदा प्रजापती ब्रह्मदेवाकडे देव, दानव आणि मानव गेले. तेव्हा त्या सर्वांना ब्रह्मदेवाने एकाक्षरी उपदेश केला. देव, दानव आणि मानव अशा तिघांवर एकेक दृष्टिक्षेप टाकून त्यांनी 'द, द, द' असा त्रिवार उच्चार केला. मग त्यांनी देवांना विचारले की, 'तुम्हाला 'द' चा कोणता अर्थ कळला?'

'भगवन्', देव म्हणाले, 'आम्ही देव आहोत. स्वर्गातले सुखोपभोग घेण्याकडे आमची अधिक प्रवृत्ती आहे. म्हणून आपण 'द' हा उपदेश करून आम्हाला 'इंद्रियांचे दमन करा' असा आपण उपदेश केला.'

याप्रमाणे ब्रह्मदेवाने मानवांना विचारले. तेव्हा त्यांनी 'द' चा अर्थ 'दान करा' असा सांगितला. तर असुरांनी आपली स्वाभाविक प्रवृत्ती दुसऱ्याला पीडा देण्याची असल्याने ती दूर करण्यासाठी 'द' म्हणजे 'दया करा' असा अर्थ सांगितला याप्रमाणे अत्यंत सूक्ष्म उपेदशदेखील देव-दानव-मानवांना समजला याचे कारण त्यांनी उपदेश श्रवण करण्याआधी तीस वर्षे इंद्रियनिग्रह करून ब्रह्मचर्यव्रताचे पालन केले होते. ब्रह्मदेवाचा एकाक्षरी उपदेश त्यांच्या संबंध जींवनाचा मार्गदर्शक ठरला. म्हणून ज्याला ब्रह्मज्ञानप्राप्ती हवी असेल त्यांनी ब्रह्मचर्यव्रत पाळले पाहिजे.

आपल्या संस्कृतीत जी आश्रमव्यवस्था सांगितली आहे त्यांमध्ये पहिला आश्रम आहे ब्रह्मचर्याश्रम. त्यापुढे गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास असे तीन आश्रम आहेत. ब्रह्मचर्य, वानप्रस्थ आणि संन्यास या तीन आश्रमांत इंद्रियांचा संयम होतो. परंतु फक्त गृहस्थाश्रमात मात्र वंशवृद्धीसाठी ब्रह्मचर्य पालन करू नये, असा शास्त्राचा आदेश

आहे. मुले मोठी होऊन ती कर्ती झाल्यावर मनुष्याने वानप्रस्थाश्रम स्वीकारून पुढे पुन्हा ब्रह्मचर्याचे पालन करावे, असे शास्त्र सांगते. जीवनाचा क्रम कसा असावा याबद्दल महाकवी कालिदास सांगतो–

**शैशवेभ्यस्त विद्यानां यौवने विषयैषिणाम्।**
**वार्धके मुनिवृत्तिनां योगेनान्ते तनुत्यजाम्।।**

बाल्यावस्थेत ब्रह्मचर्याचे पालन करून विद्याध्ययन करावे, तारुण्यात विषयभोग भोगून वंशवृद्धी करावी, वार्धक्यात मौन धारण करून मुनीसारखे आचरण करावे आणि अंतकाळी योगसाधना करत देहत्याग करावा, अशी आपली प्राचीन परंपरा कालिदासाने सांगितली आहे. हा एक जीवनक्रम आहे. जे या क्रमाने जीवन जगतात त्यांना सुख लाभते आणि जे हा क्रम बिघडवून जीवन जगतात त्यांना दुःखाना सामोरे जावे लागते. प्रजोत्पत्तीपुरता अपवाद करून जो गृहस्थ ब्रह्मचर्य पाळतो तो ब्रह्माचारीच होय. इंद्रियांचा संयम केल्याशिवाय चित्त एकाग्र होत नाही आणि चित्त एकाग्र होत नसेल तर ब्रह्मज्ञान प्राप्त होत नाही. म्हणून ज्याला ब्रह्मज्ञानप्राप्तीची इच्छा असेल त्याने आपल्या आश्रमानुसार ब्रह्मचर्याचे पालन केले पाहिजे.

यानंतरचा धर्म आहे 'दया'. या प्रपंचात अनेक दुःखीकष्टी जीव राहात असतात. एखाद्याचे दुःख पाहून जर तुमचे हृदय करुणेने पाझरत नसेल तर तुम्हाला 'माणूस' म्हणता येणार नाही. दुःखी जीवांविषयी आपल्या मनात सहवेदना, सहानुभूती निर्माण व्हायला हवी. त्यापेक्षाही 'समानाभूती' निर्माण व्हावी. दुःखी माणसाजवळ चार सांत्वनपर शब्द बोलणे याला 'सहानुभूती' म्हणतात, तर दुःख भोगणाऱ्या माणसाला पाहून तेवढे दुःख आपल्या अंतर्यामी उत्पन्न होणे ही 'समानाभूती' होय. दुःखी माणसाला मदत करण्याची इच्छा म्हणजे दया. तुमच्या हृदयात दया नसेल तर तुम्हाला ब्रह्मज्ञान कदापि प्राप्त होणार नाही. कारण सर्व प्राणिमात्रात आत्मदर्शन घेणे ही भावना दृढ होणे हीच तर ब्रह्मज्ञानाची एक पायरी आहे. दया हे सर्व धर्मांचे मूळ आहे. तुमच्या मनात दया नसेल तर तुम्ही धार्मिक होणार नाही. ज्याच्या हृदयाला पाझर फुटतो त्यालाच हृदयात भगवद्दर्शन होते. तुम्ही तुमचे प्रतिबिंब पाण्यात पाहू शकता, दगडात नव्हे. प्रतिबिंबित करण्याची शक्ती पाण्यात असते. जे हृदय पाझरते तिथेच भगवंत दिसू लागतो. हृदयात दया नसेल तर भगवंत दूर जाईल. म्हणून प्रत्येक साधकाने आपल्या मनातली दयाभावना दृढ करावी. एखाद्याने अपराध केल्यावर त्याला शिक्षा करण्याचे सामर्थ्य आपल्यात असूनदेखील त्याच्याविषयी दया दाखवणे याला 'क्षमा' म्हणतात. ज्याच्याजवळ सहनशक्ती नसते त्यालाही भगवंताची प्राप्ती होत नाही. कारण भगवंताच्या प्राप्तीसाठी अनंत कष्ट सहन करावे लागतात.

संत केवढे सहनशील असतात! त्यांना कुणी शिव्या दिल्या किंवा मारहाण केली तरी ते शांत राहतात. सामान्य माणूस शिवीला उत्तर म्हणून शिवी देतो. परंतु संत मात्र कुणी 'शिवी' दिली तरी त्याला 'ओवी' देतात, शिवी देत नाहीत. त्यांच्याजवळ शाप देण्याचे सामर्थ्य असते, परंतु ते कधीही शापवाणी उच्चारत नाहीत. यालाच 'क्षमा' असे म्हणतात. संताजवळ परिपूर्ण क्षमा असते. परंतु गृहस्थाजवळ मात्र अत्यंत कमी क्षमा असते. गृहस्थजीवनात असे अनेक प्रसंग येतात, त्यावेळी जर आपल्याजवळ क्षमा नसेल तर आपले जीवन उद्ध्वस्त होऊन जाते. म्हणून प्रत्येक मनुष्यासाठी क्षमा हे धर्माचे साधन मानले गेले आहे.

यानंतरचा धर्म आहे 'दान'. दुसऱ्याला न देता स्वतःच खाणे हा अपराध मानला जातो. जो केवळ स्वतःसाठी अन्न शिजवतो आणि फक्त स्वतःच खातो तो अन्न खात नसून पाप खातो, असे गीतेत म्हटले आहे. दुसऱ्याला देण्याइतकी उदारभावना तुमच्याजवळ नसेल तर निदान खाण्यापूर्वी देवाला नैवेद्य तरी अर्पण करावा. देव खात नाही

हे तुम्हाला चांगले माहीत आहे. तो खात नाही म्हणून तर तुम्ही देवाला नैवेद्य दाखवता! त्याने खाल्ले असते तर तुम्ही त्याला दिले नसते. 'तुझ्याकडे हात माझ्याकडे भात' अशी मराठीत एक म्हण आहे. देव काही खात नाही अशी आपली समजूत आहे. पण ती खरी नाही. देव अर्पण केलेल्या पदार्थावरील आपले ममत्व खाऊन टाकतो आणि तो पदार्थ 'प्रसाद' म्हणून आपल्याला परत करतो. नवीन कपडे स्वत: घालण्याआधी दुसऱ्याला वापरायला देण्याची एक प्रथा जुन्या काळी होती. वस्तूवरील ममत्व कमी व्हावे हाच हेतू त्यामागे होता. परंतु आज मात्र असे नाही. आपले कपडे आपण घालतो आणि दुसऱ्याचेही कपडे आपणच घालतो. तुम्हाला दुसऱ्याला कपडे वापरायला द्यायचे नसतील ते गायीच्या अंगावर टाकून स्वत: वापरावेत किंवा आधी देवाला अर्पण करून मग वापरावेत.

दान हा धर्म आहे, तसाच तो व्यवहार देखील आहे. जग म्हणजे देण्या-घेण्याचा बाजार होय. जगात तुम्ही कोणाला काही देणार नाही आणि दुसऱ्याकडून काही घेणार नाही तर व्यवहारच होणार नाही. श्वासोच्छवास करणे हे देखील एक प्रकारचे घेणे-देणेच आहे. तुम्ही नाकाने हवा आत घेतली आणि ती बाहेर सोडलीच नाही तर? तर मृत्यू पत्करावा लागेल. बाहेर हवा सोडल्यानंतर पुन्हा आत घेतली नाही तरी देखील मरावेच लागेल.

ईश्वर देतो आणि घेतो. तो एका हाताने देतो तर दुसऱ्या हाताने घेतो. हे जग म्हणजे त्यानेच आपल्याला बहाल केलेले वैभव आहे. ईश्वर आधी देतो मग मागतो. मनुष्य मात्र आधी मागतो मग देतो, तर कधी देत देखील नाही. ईश्वर तुम्हाला देतो खूप. पण मागतो कमी. आपल्या कमाईतला दहावा हिस्सा धर्मासाठी खर्च करावा, असे शास्त्र सांगते. धर्म हा ईश्वर मानला तर- कारण धर्म हा ईश्वरच होय- तो तुम्हाला शंभरपट देतो आणि त्यातले फक्त दहापट मागतो. म्हणून आपल्या कमाईतला दहावा भाग धर्मासाठी खर्च करावा. दान केल्याशिवाय कलियुगात धर्मपालन होत नाही.

महाभारतात यक्षाने युधिष्ठिराला काही प्रश्न विचारले. त्यामध्ये 'माणसाचा मृत्यनंतर मित्र कोण?' हादेखील प्रश्न होता. माणसाला जिवंतपणी मित्र लागतात. मित्र नसेल तर तुमचे दु:ख तुम्ही कुणाजवळ सांगून हलके कराल? तुमचा शत्रू थोडाच तुमचे दु:ख ऐकून घेणार असतो? तुमचा मित्रच तुमचे दु:ख सह्रदयपणे ऐकतो, तुमच्या दु:खात सहभागी होतो. सुखात सगळे सहभागी असतात, परंतु दु:खात मात्र केवळ खरा मित्रच सहभागी होतो. यक्षाने जेव्हा विचारले, 'मरणाऱ्या माणसाचा मित्र कोण?' तेव्हा युधिष्ठिराने उत्तर दिले, 'दान हाच मरणाऱ्याचा मित्र होय.'

मरणाऱ्याचा मित्र दानच आहे. अंतकाळी दान केल्यावर जे पुण्य लाभते त्यामुळेच जीवात्म्याला पुढे सद्गती मिळते. म्हणून प्रत्येकाने आपल्या शक्तीप्रमाणे आयुष्यभर दान केले पाहिजे. लोभ हे सर्व पापांचे मूळ आहे. लोभी मनुष्य कोणालाच काही देत नाही हे खरे. परंतु मेल्यावर तो एक फुटकी कवडीदेखील घेऊन जाऊ शकत नाही. एका सुभाषितकाराने म्हटले आहे-

**कृपणस्य समो दाता न भूतो न भविष्यति।**
**अस्पृशन्नेव वित्तानि य: परेभ्य: प्रयच्छति।।**

कृपणासारखा दाता या जगात आजपर्यंत कधी झाला नाही आणि यापुढे कधी होणार देखील नाही. कारण इतर दानी माणसे आपल्या हाताने थोडे दान करतात, परंतु कृपण मात्र हातांचा उपयोग न करता मृत्यूनंतर आपले सर्वस्वच इतरांना दान देऊन जातो, एवढा तो दानशूर असतो. या सुभाषितात अप्रत्यक्षरीत्या लोभी माणसाची

टवाळी केली आहे. लोभामुळेच मनुष्याकडून पापे घडतात. म्हणून एका हिंदी कवीने, 'लोभ पाप का बाप बखाना। दान धर्म का मूल।' असे म्हटले आहे. एखाद्या वृक्षाची मुळे तोडून टाकली तर तो जिवंत राहणार नाही, त्याप्रमाणे दानधर्माचा त्याग केला तर आपले धर्मजीवन सुकून जाईल. तुम्ही जेव्हा दान करता तेव्हा ते व्यर्थ जात नाही. एखादे बीज जर तुम्ही भूमीला दान केले तर भूमी सहस्रपटीने त्याची परतफेड करते. तसे तुम्ही केलेले दान वृद्धिंगत होऊन तुम्हालाच परत मिळते.

उपनिषदात एक सुंदर कथा आहे. एका माणसाने सणानिमित्त देव-दानवांना भोजनाचे आमंत्रण दिले. देवांना अग्रमान दिल्यामुळे दानवांना राग आला ते म्हणाले, 'आम्ही देवांपेक्षा ज्येष्ठ आहोत म्हणून आम्हाला भोजनाला आधी बसवा.'

त्या माणसाने ते मान्य केले. परंतु एक अट घातली. तो म्हणाला, भोजनात मी तुम्हाला अग्रमान देईन, परंतु त्याआधी तुमच्या हातांना मी काठी बांधीन. ती बांधल्यावरच तुम्ही जेवावे अशी माझी अट आहे.'

दानवांनी ते मान्य केले आणि ते प्रथम जेवायला बसले. ठरल्याप्रमाणे त्यांच्या दोन्ही हातांना खांद्यापासून मनगटापर्यंत सरळ काठी बांधण्यात आली. त्यामुळे दानवांचा हात ताटापर्यंत पोहोचत होता, परंतु तो वाकत नसल्यामुळे तोंडात घास जात नव्हता. त्यांनी खूप वेळ प्रयत्न केला, परंतु त्यांना खाणे जमले नाही. शेवटी कंटाळून काहीच न खाता ते उठले. त्यानंतर देवांची पंगत बसली. देवांच्याही हातांना काठ्या बांधण्यात आल्या. देव कसे जेवणार हे उत्सुकतेने दानव पाहू लागले. परंतु देव होते बुद्धिमान. काठीने बांधल्यामुळे हातात घेतलेला घास स्वतःच्या तोंडापर्यंत येत नाही परंतु तो दुसऱ्याच्या तोंडापर्यंत जाऊ शकतो, हे त्यांनी ओळखले आणि समोरासमोर बसून ते एकमेकांना घास भरवू लागले. हे पाहिल्यावर अशी बुद्धी आपल्याला का सुचली नाही याचे दानवांना दुःख झाले.

तुमच्या ताटातले अन्न दुसऱ्याला न देता तुम्हीच खाल तर तुमची अवस्था दानवांप्रमाणे होईल. तुम्ही दुसऱ्यांना खाऊ घालाल तर दुसरा कुणी तुम्हाला खाऊ घालेल. ज्याच्या घरात नेहमी अन्नदान होते असा मनुष्य दुसरीकडे कुठेही गेला तरी उपाशी राहात नसतो. कोणत्या ना कोणत्या प्रकारे त्याच्या भोजनाची व्यवस्था होत असते. जो कधीही अन्नदान करीत नाही त्याची बाहेर निश्चित उपासमार होते. म्हणून दान हा अत्यंत महत्त्वाचा धर्म आहे. त्यामुळे आपल्या मनाला उदारपणा लाभतो. दानामुळेच आपले हृदय विशाल होऊ शकते. तुमचे हृदय विशाल नसेल तर तुम्ही ब्रह्माला कसे जाणाल? ब्रह्म तर अत्यंत व्यापक आहे. त्याला तुमच्या हृदयात साठवून ठेवायचे असेल तर तुमचे हृदय देखील तेवढेच विशाल झाले पाहिजे. संपूर्ण समुद्र एका कमंडलूत मावणार नाही. पूर्ण समुद्र हवा असेल तर समुद्राएवढेच भांडे आणावे लागेल. अन्यथा समुद्र कमंडलूत मावत नाही म्हणून रडत बसावे लागेल. त्याप्रमाणे क्षुद्र हृदयात व्यापक परमात्मा राहूच शकणार नाही. त्यासाठी हृदय विशाल करायला हवे आणि दान केले तरच हृदय विशाल होईल. म्हणून प्रत्येकाने यथाशक्ती दान करून आपले धार्मिक जीवन विकसित केले पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

११ ऑगस्ट १९९३

# धर्माचारस्थल–५

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीक्षेत्राचे माहात्म्य आपण प्रतिदिनी श्रवण करीत आहात. काशीच्या अनेक नावांपैकी एक नाव आहे 'अविमुक्तक्षेत्र'. 'अविना मुक्तः अविमुक्तः' असे या नामाचे एक स्पष्टीकरण दिले जाते. अवि म्हणजे पाप. अर्थात् हे क्षेत्र पापमुक्त आहे अथवा या क्षेत्रात आल्यावर पापांपासून मुक्ती मिळते, असा वरील व्युत्पत्तीचा अर्थ होतो. भगवान शिव काशीक्षेत्रात आले तेव्हापासून ते हे क्षेत्र सोडून गेले नाहीत. म्हणून या क्षेत्राला 'अविमुक्तक्षेत्र' म्हणतात. हा दुसरा अर्थ आहे. भगवान शिवाला प्रिय असलेल्या या पवित्र क्षेत्रात आपण सत्संग करीत आहात हे विशेष पुण्यप्रद होय.

अंतरंगशुद्धीसाठी जे आचार सांगितले आहेत त्यांनाच 'धर्म' असे म्हणतात. त्यांच्या आचरणांने मनुष्याचे अंतःकरण अत्यंत सुंदर होते. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप आणि ध्यान हे धर्म अंतरंगसौंदर्य वृद्धिंगत करणारे आहेत. एका सुभाषितकाराने म्हटले आहे–

**हस्तस्य भूषणं दानं सत्यं कण्ठस्य भूषणम्।**
**श्रोत्रस्य भूषणं शास्त्रं भूषणैः किं प्रयोजनम्।।**

आपले शरीर अलंकारांनी नटवावे अशी इच्छा प्रत्येकाच्या मनात असते. अलंकार अनेक प्रकारचे असतात. हातातले अलंकार वेगळे, कानातले वेगळे तर कंठातील वेगळे. शक्य तेवढ्या अलंकारांनी श्रीमंत मनुष्य आपले शरीर सजवत असतो. परंतु हे अलंकार क्षणिक असून त्यांच्यामुळे मनुष्याला गर्व होतो आणि त्याच्या मनाचे सौंदर्य उणे होते. दान हा खरा हाताचा अलंकार होय. तुमच्या हातात सोन्याच्या बांगड्या असतील, परंतु तुमच्या हातून जर दान घडत नसेल तर त्या बांगड्या घालून काय उपयोग? माणसाने सत्कार्यासाठी यथाशक्ती दान द्यावे आणि ते सत्पात्राला द्यावे. दानाशिवाय जे उपभोग घेतले जातात ते फारसे सुखावह होत नाहीत.

दानाचे तीन प्रकार आहेत. सोपाधिक दान, निरुपाधिक दान आणि सहजदान. सहजदान' हे विलक्षण दान होय. फळाची इच्छा ठेवून दिले जाणारे दान 'सोपाधिक दान' आहे. फळाची अपेक्षा न ठेवता कर्तव्यभावनेने जे दान केले जाते ते 'निरुपाधिक दान' आणि सहजदान हे या दोन्ही दानांपेक्षा उच्चकोटीतले आहे. पहिल्या दोन दानांत 'मी दाता आहे' अशी अहंभावना असते. परंतु सहजदानात मात्र ही अहंभावना मुळीच नसते. घेणारा आणि देणारा हे दोन्ही भाव ज्या ठिकाणी लोप पावतात ते सहजदान होय. प्रत्येकाचे शरीर, इंद्रिये आणि बुद्धी भिन्न असली तरी सर्वांच्या अंतर्यामी असलेला आत्मा मात्र एकच असतो. डोळ्यांना दिसणारे भेद वरवरचे असतात. जो ज्ञानी असतो त्याच्या दृष्टीने प्राणिमात्रांत भेद नसून एकत्व असते.

ज्ञानी पुरुषाने दान दिले अथवा घेतले तरी त्याच्या बुद्धीत 'देणारा' आणि 'घेणारा' असा भेद नसतो. म्हणून या दानाला 'सहजदान' असे म्हणतात. समजा, तुमच्या उजव्या हातात एक रुपया आहे. चालता चालता तुम्ही तो डाव्या हातात घेतला. थोड्या वेळाने खिशात ठेवला. येथे कोणी कोणाला दान केले? रुपयाचे स्थान बदलले तरी तो तुमच्या जवळच राहिला. 'रुपया कोणाला दान केला' अशी भावना तुमच्या मनात निर्माण झाली नाही. कारण उजवा हात तुमचाच आहे, डावा हात तुमचाच आहे आणि खिसादेखील तुमचाच आहे. त्याप्रमाणे

सहजदानाची स्थिती असते. ज्ञानी पुरुषाजवळ समष्टिभाव असल्यामुळे ज्याला दान दिले त्याच्या शरीरात देखील आपणच आत्मरूपाने नांदत आहोत या सत्याची प्रचीती आलेली असते. म्हणून त्याने केलेल्या दानात 'मी दाता आहे' असा अहंभाव नसतो. अशा दानाला 'सहजदान' म्हणतात.

अशा प्रकारे ज्ञानी पुरुषाकडून सहजदान घडते तर सामान्य लोकांकडून सोपाधिक आणि निरुपाधिक दान घडत असते. कोणत्या का प्रकारचे असेना, पण माणसाने यथाशक्ती दान केले पाहिजे. कारण दानामुळे माणसाचे हृदय उदार होते; विशाल होते. मनाची विशालताच आपल्याला भगवंताकडे घेऊन जाते. म्हणून प्रत्येक मनुष्याने दान करावे. परंतु ते सत्पात्राला, सत्कार्यासाठी करावे. अपात्र व्यक्तीला दान दिले तर त्याचा उपयोग होत नाही. गाईने गवत खाल्ले तर त्या गवताचे रूपांतर अमृतासमान दुधात होते. तेच दूध जर सापाला पाजले तर त्याचे रूपांतर विषात होते. त्याप्रमाणे योग्य माणसाला दान दिले तर ते सत्कारणी लागते आणि अपात्र माणसाला दान दिले तर ते वाया जाते.

दानानंतरचा धर्म आहे 'पूजा'. एक बाह्य-पूजा असते तर दुसरी अंतरंग-पूजा असते. आपण इष्टलिंगाची पूजा करतो, त्याला अभिषेक करतो, गंध लावतो, बेल वाहतो. तन्मय होऊन इष्टदेवतेची जी अर्चना केली जाते तिला 'पूजा' म्हणतात. ज्याची जशी इष्ट देवता असेल त्याने तिची तशी पूजा केली पाहिजे. इष्टदेवतेची मूर्ती दिसायला स्थूल असली तरी तिच्या ठिकाणी आपली भावना जागृत झाल्यामुळे तिच्यात चैतन्याची प्रचीती येते. चैतन्य सर्वत्र व्याप्त आहे. ते जसे अत्यंत सूक्ष्म अशा अणूत आहे तसेच अत्यंत मोठ्या वस्तूत आहे. ते जडात आहे तसेच चेतनात देखील आहे. जेथे मनुष्याची भावना एकवटते तेथे सत्-चित्-आनंदरूप परमात्मा प्रकट होतो. म्हणून एके ठिकाणी भावना केंद्रित करणे हा भगवंताच्या साक्षात्काराचा मार्ग होय. जोपर्यंत तुम्हाला निर्गुण-निराकाराची पूजा कशी करावी याचे ज्ञान नाही, जोपर्यंत तुमचे मन निराकाराची कल्पना करू शकत नाही तोपर्यंत भगवंताच्या सगुण-साकार रूपाचीच पूजा तुम्ही करायला हवी. सगुण-साकाराची पूजा करता करता निर्गुण-निराकाराकडे जाण्याचा मार्ग तुम्हाला सापडतो. संसाराचे चिंतन सोडून भगवंताच्या सगुण रूपाच्या ठिकाणी जेव्हा तुमचे मन स्थिर होते तेव्हा एकाग्र चित्ताने तुम्ही स्थूलाकडून सूक्ष्माकडे सहज जाऊ शकता.

बाह्यपूजेसाठी भस्म, गंध, बेल इत्यादी बाह्यसामग्री असते त्याप्रमाणे अंतरंगपूजेसाठी अंतरंगसामग्री असते. अंतरंगपूजेला 'मानसपूजा' असेही म्हणतात. स्थूलशरीराकडून बाह्यपूजा केली जाते त्याप्रमाणे सूक्ष्मशरीराकडून अंतरंगपूजा कशी केली जाते हे नीट समजून घेतले पाहिजे. जोपर्यंत मानसपूजा तुमच्या सूक्ष्मशरीराकडून घडत नाही तोपर्यंत तुमची भावना शुद्ध होत नाही. बाह्यपूजा करता करता मानसपूजा करण्याचाही अभ्यास करायला हवा. वृद्धावस्थेत तुम्हाला कदाचित स्नान करता येणार नाही, सरळ बसून तुम्ही पूजा करू शकणार नाही तेव्हा काय कराल? पूजा तर केलीच पाहिजे. अशा वेळी तुम्ही बिछान्यावर पडलेले असाल तरीही मानसपूजा करू शकता. त्यामुळे पूजेत खंड पडणार नाही. म्हणून स्थूलपूजा करता करता मानसपूजा करण्याचा अभ्यास केला पाहिजे.

भगवंताची पूजा करून आपले कार्य संपत नाही. पूजेनंतर त्याच्या नामाचा जपदेखील केला पाहिजे. ज्याच्या जिभेवर निरंतर भगवंताचे नाम नांदत असते अर्थात् जो सतत नामजप करीत असतो त्याला पातकाचा स्पर्श होत नाही. प्रकाशाजवळ अंधार राहात नाही त्याप्रमाणे भगवन्नामाचा जप करणाऱ्याजवळ पाप राहात नाही. भगवन्नाम

हे भगवत्स्वरूपच असते. भगवंत वेगळा आणि त्याचे नाम वेगळे, असे असत नाही. नाम हेच त्याचे रूप होय. सद्गुरूकडून नाममंत्राचा लाभ झाला की भगवंताची प्राप्ती झाली असे समजावे. भगवन्नामात जेवढे सामर्थ्य आहे तेवढे भगवंतात देखील नाही. भगवंताने अवतार घेतला आणि तो समाप्तही झाला. परंतु त्याचा नामजागर मात्र आजदेखील चालूच आहे. भगवंताच्या अवतारासमयी भलेही आपण उपस्थित नसू, परंतु त्याच्या नामजपामुळे आपला त्याच्याशी साक्षात् संबंध येतोच आहे.

नाम म्हणजे भगवंताशी संबंध साधणारे एक सूत्र होय. एखाद्या मंदिरात पूजेसाठी बसल्यावर आपण मूर्तीला स्पर्श करू शकत नाही. त्यावेळी अभिषेक करताना आपल्या हाती एक सूत्र दिले जाते. सूत्र धरून तुम्ही गाभाऱ्याबाहेर बसलात तरी आत जी पूजा चाललेली असते ती तुम्हीच करीत आहात असे समजले जाते. त्याप्रमाणे नाम हे भक्त आणि भगवंत यांना जोडण्याचे काम करत असते. म्हणून पंचाक्षरी महामंत्राला 'शैवसूत्र' असे एक नाव दिलेले आहे.

मनुष्य जेव्हा भगवन्नामाचा जप सुरू करतो त्यावेळी त्याचा भगवंताशी संबंध जोडला जातो. तुम्ही इतके जण आमच्यासमोर बसलेले आहात. तुमच्यापैकी एकाचे नाव घेऊन जर आम्ही हाक मारली तर तो जागा होईल आणि उठून आमच्याकडे येईल. ज्याचे नाव घेतले तोच येईल, दुसरा येणार नाही. नामात एवढे सामर्थ्य असते. तुमचे नाव घेऊन तुम्हाला इथपर्यंत खेचून आणता येते. एकवेळ नाव उच्चारले तर तुम्ही आमच्याजवळ येता तर हजारवेळा, लक्षवेळा तुम्ही भगवंताचे नाम घेतले तर तो तुमच्याजवळ का बरे येणार नाही? भगवंताला आपल्या सन्मुख करण्याचा नाम सर्वात सोपा उपाय आहे. म्हणून नाम हे भगवंताशी संबंध साधणारे सूत्र होय.

भगवन्नामाची पुन्हा पुन्हा आवृत्ती करणे यालाच 'जप' असे म्हणतात. भगवन्नामाचा सतत जप केल्याने आपल्या हृदयात एक विलक्षण ऊर्जा उत्पन्न होते. येथे आपण पंखा फिरताना पाहतो, ट्यूब प्रकाशित होताना पाहतो. ही किमया विद्युतशक्तीची आहे. विद्युत् कशी निर्माण होते? तर एक चक्र सतत स्वत:भोवती फिरल्यामुळे. मग ते चक्र पाण्याच्या धारेखाली फिरणारे विद्युत्जनित्रातील चक्र असो की जनरेटरमधील चक्र असो. एक चक्र सतत स्वत:भोवती फिरल्यामुळे जशी विद्युत्शक्ती उत्पन्न होते त्याप्रमाणे भगवन्नामाचा सतत जप केल्याने आपल्या आत एक विलक्षण ऊर्जा निर्माण होते. त्या शक्तीमुळे साधकाचे सर्व मानसिक दोष दूर होतात. म्हणून माणसाच्या मनात परिवर्तन करण्यासाठी धर्माचरणाची नितांत आवश्यकता आहे.

वेशभूषा करून आपण आपल्या सौंदर्यात परिवर्तन करू शकतो. परंतु बाह्य-अलंकार धारण करून मनात परिवर्तन करता येत नाही. वस्त्रालंकारांनी आपण आपले मूळ स्वरूप काही काळ लपवू शकतो, परंतु थोड्या काळाने ते प्रकट झाल्याशिवाय राहात नाही. रामायणातील शूर्पणखेने राम-लक्ष्मणांसमोर जाताना सुंदर रूप धारण करून आपले खरे स्वरूप लपवले होते. परंतु ते दोघे वश होत नाहीत हे लक्षात येताच तिने आपले मूळस्वरूप प्रकट केले. शिवलिंगावर बसलेला, भगवान शिवाच्या सान्निध्यात राहणारा विंचू नांगीने डंख करण्याची आपली वृत्ती थोडीच सोडून देत असतो? म्हणून बाह्य आभूषणे काही काळपर्यंतच मनुष्याचा स्वभावदोष झाकून ठेवू शकतात. ते त्याच्या स्वभावात परिवर्तन घडवू शकत नाहीत. परंतु अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य इत्यादी अंतरंगातील आभूषणे मात्र आपले अंतरंगसौंदर्य वृद्धिंगत करीत असतात. भलेही शरीरावर एकही सुवर्णाचे आभूषण नसले तरी देखील. धर्मालंकार ज्याच्याजवळ असतात त्याला त्याचा लाभ होतोच, परंतु इतरांनाही

त्यामुळे लाभ होतो. बाह्य अलंकार मात्र अनेक दृष्टीने हानिकारक ठरतात. अंत:करणातील दोष दूर करून त्याला सात्त्विक करणारे हे दहा धर्मालंकार होत.

'जप' हा देखील एक सात्त्विक अलंकार होय. जपामुळे साधकाचे मन पवित्र होते. जप कधीही आणि कुठेही करता येतो. सकाळी स्नान केल्यानंतर लिंगपूजा करून तुम्ही जप करता हे योग्य आहे. परंतु इतर वेळीही काम करीत असताना सतत जप केला पाहिजे. अंतकाळी भगवंताचे नाम जिभेवर यावे यासाठी जन्मभर सतत जप करावा लागतो. आयुष्यभर नामजप करून देखील अंतकाळी ते जिभेवर येईलच याची खात्री देता येत नाही. 'जनम जनम मुनि यतन कराहि। अंत राम कहि आवत नाहि।।' असे तुलसीदासांनी म्हटले आहे. अंतकाळी आपली जशी बुद्धी असते तशीच पुढे गती मिळते. ती सद्‌गती असेल वा दुर्गती. आयुष्यभर भगवंताचा नामजप करून देखील मृत्यूच्या क्षणी संसाराचे स्मरण होण्याचा संभव असतो. त्यावेळी संसार आठवला तर पुन्हा जन्म-मृत्यूचे चक्र मागे लागते.

ज्याच्यावर तुमचे अत्यंत प्रेम असते त्याचेच तुम्हाला वारंवार स्मरण होत असते. तुम्हाला जर संसाराचे सतत स्मरण होत असेल तर तुमचे प्रेम संसारावर आहे. भगवंताचे सतत स्मरण होत असेल तर तुमचे प्रेम भगवंतावर आहे असे समजा. संसाराची सतत आठवण होत असेल तरी अजून वेळ गेलेली नाही. जोपर्यंत तुमचे शरीर स्वस्थ आहे, जोपर्यंत तुम्हाला आयुष्य आहे, तोपर्यंत तुम्ही बरेच काही करू शकता. विद्यार्थी वर्षभर अभ्यास करतो तेव्हा शेवटी त्याला तीन तासांत परीक्षा द्यावी लागते. जर तो तीन तासांत प्रश्नांची उत्तरे नीट लिहू शकला नाही तर त्याचा वर्षभरातला अभ्यास वाया गेल्यात जमा आहे. जसे लौकिक जीवन आहे तसेच पारलौकिक जीवन आहे. म्हणून आपल्याजवळ अजून वेळ आहे. एक वर्ष नसेल, पण महिना असेल. महिना नसेल तर एक दिवस तरी असेल. एक दिवस नसेल तर निदान एक तास तरी असेल. या एका तासात आपण बरेच काही करू शकतो.

आपली भावना उत्कट असेल तर एका तासात आपण आपले सबंध जीवन बदलून टाकू शकतो. कदाचित् आपल्याजवळ एक तासदेखील नसेल, केवळ एक मिनिट असेल तर तेही पुरेसे आहे. सत्संगाला फार वेळ नको. अत्यंत कमी वेळात देखील तो तुम्हाला बरेच काही देऊ शकतो. अहिंसा, सत्य, पूजा, यांच्यात तुम्ही कमीत कमी वेळ घालवला तरी तेवढ्या काळात जो धर्मसंग्रह होतो त्याच्यामुळे भयावह संसारापासून जीवात्म्याला मुक्ती मिळते. म्हणून ज्याला भगवंताशी संबंध जोडायचा असेल त्याच्यासाठी नामजप हे अत्यंत सोपे साधन आहे. गीतेत भगवंतांनी म्हटले आहे, 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।'

यज्ञ अनेक प्रकारचे आहेत. काही यज्ञांत तर पशुहिंसाही होते. यज्ञ करण्यासाठी अनेक प्रकारची सामग्री जमवावी लागते. गरिबांना यज्ञ करणे शक्य होत नाही. परंतु गरिबातल्या गरीबदेखील करू शकेल असा यज्ञ म्हणजे 'जपयज्ञ' होय. जपयज्ञ म्हणजे भगवंताचे नामस्मरण. ते केल्याने मनुष्याला अपार पुण्यलाभ होतो. म्हणून आपल्या जिभेवर भगवंताच्या नामाची स्थापना करावी. उठताना, बसताना, जेवताना, झोपताना प्रत्येक क्षणी त्याचा नामजप करावा. सांसारिक कार्य करताना भगवन्नामाचा जप सहज करता येतो. नामजपामुळे कामात किंवा कामामुळे नामजपात विघ्न येत नाही. तुम्ही दुसऱ्याशी बोलता बोलता जसे काम करीत असता किंवा काम करता करता जसे दुसऱ्याशी बोलत असता त्याप्रमाणे.

यानंतरचा धर्म आहे 'ध्यान'. ज्याच्या नावाचा आपण सतत जप करत असतो त्याच्या अलौकिक रूपाचे

त्यामुळे लाभ होतो. बाह्य अलंकार मात्र अनेक दृष्टीने हानिकारक ठरतात. अंत:करणातील दोष दूर करून त्याला सात्त्विक करणारे हे दहा धर्मालंकार होत.

'जप' हा देखील एक सात्त्विक अलंकार होय. जपामुळे साधकाचे मन पवित्र होते. जप कधीही आणि कुठेही करता येतो. सकाळी स्नान केल्यानंतर लिंगपूजा करून तुम्ही जप करता हे योग्य आहे. परंतु इतर वेळीही काम करीत असताना सतत जप केला पाहिजे. अंतकाळी भगवंताचे नाम जिभेवर यावे यासाठी जन्मभर सतत जप करावा लागतो. आयुष्यभर नामजप करून देखील अंतकाळी ते जिभेवर येईलच याची खात्री देता येत नाही. 'जनम जनम मुनि यतन कराहि। अंत राम कहि आवत नाहि।।' असे तुलसीदासांनी म्हटले आहे. अंतकाळी आपली जशी बुद्धी असते तशीच पुढे गती मिळते. ती सद्गती असेल वा दुर्गती. आयुष्यभर भगवंताचा नामजप करून देखील मृत्यूच्या क्षणी संसाराचे स्मरण होण्याचा संभव असतो. त्यावेळी संसार आठवला तर पुन्हा जन्म-मृत्यूचे चक्र मागे लागते.

ज्याच्यावर तुमचे अत्यंत प्रेम असते त्याचेच तुम्हाला वारंवार स्मरण होत असते. तुम्हाला जर संसाराचे सतत स्मरण होत असेल तर तुमचे प्रेम संसारावर आहे. भगवंताचे सतत स्मरण होत असेल तर तुमचे प्रेम भगवंतावर आहे असे समजा. संसाराची सतत आठवण होत असेल तरी अजून वेळ गेलेली नाही. जोपर्यंत तुमचे शरीर स्वस्थ आहे, जोपर्यंत तुम्हाला आयुष्य आहे, तोपर्यंत तुम्ही बरेच काही करू शकता. विद्यार्थी वर्षभर अभ्यास करतो तेव्हा शेवटी त्याला तीन तासांत परीक्षा द्यावी लागते. जर तो तीन तासांत प्रश्नांची उत्तरे नीट लिहू शकला नाही तर त्याचा वर्षभरातला अभ्यास वाया गेल्यात जमा आहे. जसे लौकिक जीवन आहे तसेच पारलौकिक जीवन आहे. म्हणून आपल्याजवळ अजून वेळ आहे. एक वर्ष नसेल, पण महिना असेल. महिना नसेल तर एक दिवस तरी असेल. एक दिवस नसेल तर निदान एक तास तरी असेल. या एका तासात आपण बरेच काही करू शकतो.

आपली भावना उत्कट असेल तर एका तासात आपण आपले सबंध जीवन बदलून टाकू शकतो. कदाचित् आपल्याजवळ एक तासदेखील नसेल, केवळ एक मिनिट असेल तर तेही पुरेसे आहे. सत्संगाला फार वेळ नको. अत्यंत कमी वेळात देखील तो तुम्हाला बरेच काही देऊ शकतो. अहिंसा, सत्य, पूजा, यांच्यात तुम्ही कमीत कमी वेळ घालवला तरी तेवढ्या काळात जो धर्मसंग्रह होतो त्याच्यामुळे भयावह संसारापासून जीवात्म्याला मुक्ती मिळते. म्हणून ज्याला भगवंताशी संबंध जोडायचा असेल त्याच्यासाठी नामजप हे अत्यंत सोपे साधन आहे. गीतेत भगवंतांनी म्हटले आहे, 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।'

यज्ञ अनेक प्रकारचे आहेत. काही यज्ञांत तर पशुहिंसाही होते. यज्ञ करण्यासाठी अनेक प्रकारची सामग्री जमवावी लागते. गरिबांना यज्ञ करणे शक्य होत नाही. परंतु गरिबातल्या गरीबदेखील करू शकेल असा यज्ञ म्हणजे 'जपयज्ञ' होय. जपयज्ञ म्हणजे भगवंताचे नामस्मरण. ते केल्याने मनुष्याला अपार पुण्यलाभ होतो. म्हणून आपल्या जिभेवर भगवंताच्या नामाची स्थापना करावी. उठताना, बसताना, जेवताना, झोपताना प्रत्येक क्षणी त्याचा नामजप करावा. सांसारिक कार्य करताना भगवन्नामाचा जप सहज करता येतो. नामजपामुळे कामात किंवा कामामुळे नामजपात विघ्न येत नाही. तुम्ही दुसऱ्याशी बोलता बोलता जसे काम करीत असता किंवा काम करता करता जसे दुसऱ्याशी बोलत असता त्याप्रमाणे.

यानंतरचा धर्म आहे 'ध्यान'. ज्याच्या नावाचा आपण सतत जप करत असतो त्याच्या अलौकिक रूपाचे

सतत चिंतन करणे म्हणजे 'ध्यान' होय. भगवंताचे ध्यान केल्याने त्याचे आपल्या हृदयातील अस्तित्व जाणवते. आपण संसाराचे ध्यान केले तर संसार आपल्या आत शिरेल. भगवंताचे ध्यान केले तर भगवंत आपल्या आत शिरेल. प्रत्यक्षात आपल्या जवळ वस्तू नसल्या तरी त्याचे ओझे आपण आपल्या मनात वागवत असतो. घर, शेत, मुले इत्यादी. हे सारे आपल्यापासून दूर असतात. तरी आपल्या मनात ओझे होऊन बसलेले असतात. आपण भगवंताचे ध्यान करीत नाही. संसाराचे करतो.

म्हणून संसार आपल्या मनात दबा धरून बसलेला असतो. आपल्या मनात एकतर संसार राहील किंवा भगवंत राहील. दोन्ही एकावेळी राहणे शक्य नाही. परंतु भगवंत असा विलक्षण आहे की तो जर एकदा आपल्यात शिरला तर संसाराला मनातून कायमचा हद्दपार करतो. परंतु तुम्ही भगवंताला आमंत्रणच देत नाही. तो तर तुमच्याजवळ येण्यासाठी उत्सुक आहे. तुम्ही जेव्हा त्याचे ध्यान कराल, ध्यानाद्वारे त्याला आवाहन कराल तेव्हा तो तुमच्याजवळ येईल. भगवंत हा मंगलधाम आहे. तो जेव्हा तुमच्या हृदयात प्रतिष्ठित होईल तेव्हा तुमचा संसारदेखील मंगल होईल आणि शेवटी तुम्हाला परममांगल्याची प्राप्ती होईल.

याप्रमाणे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त अहिंसेपासून ते ध्यानापर्यंत दहा धर्म सांगितले आहेत. शिवज्ञानसंपन्न योगीदेखील या धर्मांचे आचरण करतात. आपले आचरण पाहून अन्य लोक धर्माचरण करीत असतात याची जाणीव असल्यामुळेच ते धर्माचरण करीत असतात. ज्ञानीपुरुषाच्या धर्माचरणामुळे सामान्य माणसाला धर्माचरणाची प्रेरणा मिळत असते. म्हणून सर्वांनी आपल्या आत्मोन्नतीसाठी अवश्य धर्माचरण केले पाहिजे. दहा धर्मांपैकी एका धर्माचे जरी पालन करायला सुरुवात केली तरी हळूहळू प्रगती होऊन तुम्ही महान धार्मिक व्हाल. या धर्मपालनामुळेच तुम्हाला ऐहिक आणि पारलौकिक सुखांची प्राप्ती होईल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१२ ऑगस्ट १९९३



## धर्माचारस्थल–६

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीक्षेत्राच्या अनेक नावांपैकी एक नाव आहे 'वाराणसी'. दक्षिणवाहिनी गंगा काशीक्षेत्रात उत्तरवाहिनी होते. त्याचप्रमाणे वरुणा आणि अस्सी या दोन नद्या काशीक्षेत्राच्या दोन बाजूंनी वाहात असतात. या दोन नद्यांच्या मधल्या भूप्रदेशालाच 'वाराणसी' (वरुणा–अस्सी) असे म्हणतात. गंगानदीत अनेक जलचर प्राणी राहतात. परंतु काशीक्षेत्राजवळच्या प्रवाहात मात्र एखाद्या जलचर प्राण्याने माणसाचा घात केल्याचे उदाहरण नाही. भगवान विश्वेश्वराची ही कृपाच होय. अशा पवित्र काशीक्षेत्रात आपण धर्माचरण, सत्संग करीत आहात. धर्म मनुष्याला पशुत्वाकडून देवत्वाकडे नेत असतो. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त जे दहा धर्म सांगितलेले आहेत त्यांचे आचरण का बरे करावे? केले नाही तर चालणार नाही काय? असा प्रश्न कोणाला पडेल. या प्रश्नाचे उत्तरच जणू ज. रेणुकाचार्यांनी पुढील श्लोकात दिले आहे–

**शिवेन विहितो यस्मादागमैर्धर्मसंग्रहः।**
**तस्मात्तमाचरणन् विद्वान् तत्प्रसादाय कल्प्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.६०)

वेद आणि आगम हे आपल्या देशातील सर्वांत प्राचीन वाङ्मय होय. परमेश्वराच्या श्वासातून वेद निर्माण झाले आणि त्याच्या कंठातून आगम निर्माण झाले अशी पारंपारिक श्रद्धा आहे. वेद आणि आगम म्हणजे परमेश्वराची आज्ञा होय. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप आणि ध्यान या दहा धर्मांचे प्रतिपादन आगमांत केलेले आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ अठ्ठावीस शिवागमांचे सार आहे. त्यामुळे या ग्रंथात देखील या दहा धर्मांचे पालन करावे असे प्रतिपादन केलेले आहे. हे दहा धर्म म्हणजे परमेश्वराचा आदेश होय. म्हणून त्याचे पालन केले पाहिजे. जीवात्म्याला भगवान शिवाचा अनुग्रह आणि कृपा हवी असते. शिवाच्या अनुग्रहाशिवाय आणि प्रसादाशिवाय जीवात्म्याला कैवल्य प्राप्त होत नाही. शिवाची कृपा संपादन करण्यासाठी दहा धर्मांचे पालन करावे लागते. सर्व जीव 'पशू' असून शिव 'पशुपती' आहेत. पशूंचा उद्धार करण्यासाठीच तर भगवान शिवांनी धर्मोपदेश केलेला आहे. आपले पशुत्व नष्ट करायचे असेल तर धर्मपालन अवश्य केले पाहिजे. कारण धर्म पतितांचा उद्धार करतो. शिवाने उपदेशिलेल्या धर्मांचे जो पालन करतो त्याच्यावर शिवाची कृपा होते. जे ज्ञानाने आणि कर्माने प्राप्त होत नाही ते भगवान शिवाच्या कृपेने सहज प्राप्त होते. शिवप्रसादाने सर्व दुःखे आणि सर्व संकटे दूर होतात. शिवाची कृपा हवी असेल तर त्याच्या आज्ञेचे पालन करायला हवे. मालकाची मर्जी सांभाळायची असेल तर सेवकाने मालकाची आज्ञा तंतोतंत पाळली पाहिजे, त्याप्रमाणे धर्माचरण करणे म्हणजे शिवाज्ञा पाळणे होय. ज्याच्या आचरणात धर्म नसतो त्याची तुलना पशूसोबत केली जाते. धर्माचरण केले तरच पशुत्वापासून मुक्ती मिळू शकते. एक सुभाषितकार म्हणतो–

**आश्वर्यमेतद् मनुष्यलोके अमृतं परित्यज्य विषं पिबन्ति।**
**धर्मं प्रसंगादपिनाचरन्ति पापं प्रयत्नेन समाचरन्ति।।**

सुभाषितकाराला माणसाचे वर्तन पाहून आश्चर्य वाटते. धर्माचरण करण्याचा प्रसंग येऊन देखील माणूस

धर्माचरण करीत नाही आणि प्रसंग नसताना देखील प्रयत्नपूर्वक पापाचे आचरण करतो. सहज प्राप्त झालेल्या अमृताकडे पाठ फिरवून हट्टाने विष पिण्यासारखीच ही गोष्ट आहे. म्हणून शिवकृपा संपादन करण्यासाठी माणसाने धर्माचरण केलेच पाहिजे.

**अधर्मं न स्पृशेत् किंचिद् विहितं धर्ममाचरेत्।**
**तं च कामविनिर्मुक्तं तमपि ज्ञानपूर्वकम्॥१६.६१॥**

जीवनात अधर्माचरण करण्याचा प्रसंग आला तरी अधर्माचरण करू नये. हिंसा करण्याची, खोटे बोलण्याची वेळ आली तरी तसे करणे टाळावे. 'जे करा' असे शास्त्र सांगते अशा विहित कर्मांचे प्रयत्नपूर्वक आचरण करावे. पूजा, जप, ध्यान आदी धर्मांचे आचरण फळाची अपेक्षा न ठेवता करावे. थोडे केल्यावर फार मिळावे अशी वृत्ती व्यापाऱ्याची असते, साधकांची नसते. परमात्मा तर द्यायलाच बसलेला आहे. त्याने आतापर्यंत बरेच काही दिले. हा सारा प्रपंच त्यानेच आपल्याला दिलेला आहे. त्याने इतके काही दिले आहे की त्याला स्वतःच्या अंगावर घालण्याइतके वस्त्रदेखील शिल्लक राहिलेले नाही. राहायला घर राहिले नाही. म्हणून तो स्मशानात जाऊन बसला. सर्व काही देऊन तो दिगंबर झाला तरीदेखील त्या दिगंबरालाच लोक सारखे काहीतरी मागतच असतात. कर्म करणे हे मनुष्याचे कर्तव्य आहे तर त्याचे फळ देणे हे ईश्वराचे काम आहे. न मागता त्याने इतके दिले तरी तुम्ही त्याला सारखे मागतच असता. मग त्याने तुमच्यावर नाराज का बरे होऊ नये? सतत बापाजवळ काही ना काही मागणाऱ्या मुलावर बाप नाराज होतो त्याप्रमाणे. म्हणून पुन्हा पुन्हा मागून, देणाऱ्याचा अवमान करू नये. जो केलेल्या कर्माच्या फळाची आशा ठेवतो त्याला शास्त्रकाराने कृपण असे संबोधले आहे. 'कृपणाः फलहेतवः।' जो कृपण असतो तो वारंवार काहीतरी मागत असतो. मनुष्याने उदार व्हावे, कृपण होऊ नये.

परमेश्वर उदार आहे. त्याच्याजवळ उदार होऊनच गेले पाहिजे. स्वभाव आणि गुण सारखे असतील तरच दोघांत मैत्री होऊ शकते. तसे नसेल तर मैत्री संभवत नाही. परमेश्वर उदार आणि तुम्ही कृपण असाल तर तुमच्यात सख्य कसे निर्माण होईल? म्हणून वीरशैवसिद्धान्तात 'शिव होऊन शिवाची पूजा करावी' असे म्हटले आहे. जीवभावाने शिवपूजा कराल तर काहीतरी मागण्याची इच्छा होईल. शिवाजवळ जसे उत्तम गुण आहेत, तसे उत्तम गुण संपादन करून शिवाजवळ जायला हवे. मागणाऱ्याला फारसे काही मिळत नाही, परंतु न मागणाऱ्याला मात्र सारे काही मिळते. म्हणून निष्काम भावनेने धर्माचरण करावे आणि ते ज्ञानपूर्वक करावे. आपण काय करीत आहोत याचे ज्ञान नसेल तर त्यामुळे अनर्थ घडू शकतो.

पंचतंत्रात एक प्रसिद्ध कथा आहे. झोपलेल्या राजाचे रक्षण करणाऱ्या माकडाला राजाच्या चेहऱ्यावर बसलेल्या माशीला हाकलायचे होते. त्याने माशीला अनेकदा उडवले. परंतु ती पुन्हा राज्याच्या चेहऱ्यावर बसली. हे पाहून त्याने तलवारीने तिच्यावर वार केला. परिणामी राजाचा मृत्यू ओढवला. माकडाचा उद्देश चांगला होता. परंतु आपण जे करीत आहोत त्याचा कोणता परिणाम होईल याचे त्याला ज्ञान नव्हते. त्यामुळे तो राजाचा प्राणरक्षक न ठरता प्राणभक्षक ठरला. म्हणून आपले प्रत्येक कर्म जाणिवपूर्वक केले पाहिजे.

**आत्मवत् सर्वभूतानि संपश्येद् योगवित्तमः।**
**जगदेकात्मताभावान्निग्रहादिविरोधतः॥१६.६२॥**

आपल्या आत्म्याप्रमाणेच इतर सर्व भूतांना मानले पाहिजे. कारण अवघे विश्व चैतन्याने भरून गेलेले आहे. तेथे मूलतः कोणताच भेद नाही. जेव्हा सर्व भूतांत आत्मरूप दिसू लागते तेव्हा सारे भेद मावळून जातात. मग

कोणाबद्दल मनात द्वेष राहत नाही की कोणाबद्दल राग राहत नाही. सर्व जीवात्म्यांना आत्मरूप मानणारी भावना दृढ झाली तर आपल्या हातून कुणालाही इजा पोहोचत नाही आणि कुणाचेही अकल्याण होत नाही. सर्व भूतांत आत्मरूप पाहणे हेच ज्ञान होय.

**एक एव शिवः साक्षाज्जगदेतदिति स्फुटम्।**
**पश्यतः किं न जायेत ममकारो हि विभ्रमः।।१६.६३।।**

प्रपंच निर्मितीपूर्वी एकमेव ब्रह्म होते. पुढे 'एक'च 'अनेक' झाले. म्हणून अनेकांत आपण एकालाच पाहिले पाहिजे. हे सर्व विश्व म्हणजे साक्षात् शिवच आहे, अशी भावना दृढ करावला हवी. जो या दृष्टीने प्रपंचाकडे पाहतो त्याच्या मनात विशिष्ट वस्तूबद्दल ममत्व असत नाही.

**धर्म एव समस्तानां यतः संसिद्धिकारणम्।**
**निस्पृहोऽपि महोयोगी धर्ममार्गं च न त्यजेत।।१६.६४।।**

ज्याला सांसारिक गोष्टींशी काही देणे-घेणे नसते अशा अत्यंत निःस्पृह माणसाने धर्माचरण करण्याची जरुरी काय? असा प्रश्न कोणी उपस्थित केला तर त्याचे येथे उत्तर दिले आहे. माणसाला भोग आणि मोक्ष दोन्ही हवे असतात. इहलोकात असताना त्याला सुखोपभोग हवे असतात तर परलोकात जाताना त्याला सद्‌गतीची अपेक्षा असते. धर्म या दोन्ही अपेक्षा पूर्ण करतो. ज्याच्या आचरणामुळे माणसाचा अभ्युदय होतो आणि अंती मुक्ती प्राप्त होते त्यालाच 'धर्म' असे म्हणतात. अशा सर्वसिद्धिदायक धर्माचे आचरण जो निःस्पृह आहे अशा माणसाने देखील केले पाहिजे. आपण निःस्पृह आहोत म्हणून धर्माचा त्याग करण्याचा त्याला अधिकार नाही.

**ज्ञानामृतेन तृप्तोऽपि योगी धर्मं न सत्यजेत्।**
**आचारं महतां दृष्ट्वा प्रवर्तन्ते हि लौकिकाः।।१६.६५।।**

ज्ञान ही अंतिम व्यवस्था आहे. शिव-जीवाच्या अभेदाचा बोध हेच खरे ज्ञान होय. या ज्ञानाने पूर्ण तृप्ती लाभते. ज्याला ज्ञानामृताने तृप्ती लाभली अशा ज्ञानसंपन्न पुरुषाने धर्माचरण करावे काय?

एकदा एका सत्पुरुषाच्या आश्रमात एक ज्ञानी पुरुष गेला. भोजनाची वेळ झाल्यावर आश्रमातील सेवकांनी त्याला हातपाय धुण्यास सांगितले. तेव्हा तो म्हणाला, ''मी ज्ञानगंगेत सुस्नात झालो आहे. मला हातपाय धुण्याची काय गरज आहे?''

सेवक बिचारे गप्प बसले. त्यांनी त्याला तसेच जेवायला वाढले. परंतु त्याच्यासमोर पाणी मात्र ठेवले नाही. ज्ञानी पुरुष जेवू लागला. जेवता जेवता त्याला तहान लागली. त्याने पाणी मागितले. त्यावेळी एक सेवक म्हणाला,

''महाराज, तुम्ही ज्ञानगंगेत स्नान केलेले आणि ज्ञानामृताने तृप्त झाला आहात. तुम्हाला या वरच्या पाण्याची काय गरज आहे?''

आपली विद्या आपल्यालाच फळली याची त्या ज्ञानी पुरुषाला जाणीव झाली.

ज्ञानी पुरुषालादेखील आचरणाची आवश्यकता असते. म्हणून त्यांनी आचरणाचा त्याग करू नये. अज्ञानी माणसाला ज्ञानी होण्यासाठी धर्माचरणाची गरज असते. मग ज्ञान प्राप्त झाल्यानंतर त्याने धर्माचरण सोडून कसे चालेल? त्याचे आचरण पाहूनच इतर सामान्य माणसे वागत असतात. ज्ञानी पुरुषाकडून जर अधर्माचरण होत

असेल तर सामान्य माणसाला अधर्माचरणासाठी एक आयतेच निमित्त मिळेल. म्हणून त्याने निष्ठापूर्वक धर्माचरण करायला हवे. शेवटी धर्माचारस्थलाचा समारोप करताना ज. रेणुकाचार्य म्हणतात–

**सदाचारप्रियः शम्भुः सदाचारेण पूज्यते।**
**सदाचारं विना तस्य प्रसादो नैव जायते।।१६.६६।।**

भगवान शिव आचारप्रिय आहेत. लिंगाचार, सदाचार, शिवाचार, गणाचार आणि भृत्याचार असे पाच आचार वीरशैवसिद्धान्तात सांगितलेले आहेत. त्यामधील सदाचार या आचाराविषयी येथे सांगितले आहे. भगवान शिव हे सदाचारप्रिय आहेत. सदाचारी होऊनच त्यांची पूजा केली पाहिजे. दुराचरण करणाऱ्याची पूजा भगवान शिवाला मान्य होत नाही. सदाचारी झाल्याशिवाय भगवान शिवाची कृपा आपल्यावर होणार नाही. म्हणून जे शिवाला प्रिय आहेत आणि ज्यामुळे मनुष्याचे शरीर, वाणी आणि मन ही त्रिकरणे शुद्ध होतात अशा धर्मांचे आचारण मनुष्याने करायला हवे. मन पवित्र असेल तरच भगवत्कृपेचा लाभ होतो. स्नान करून, स्वच्छ धुतलेली वस्त्रे नेसून जेव्हा आपण पूजेला बसतो तेव्हा आपल्या मनात प्रसन्नता दरवळत राहते. स्नान केल्याने शरीरावरचा मळ धुतला जाऊन शरीर स्वच्छ, शुद्ध होते परंतु मनावर साचलेला मळ मात्र बाहेरच्या पाण्याने नष्ट होत नाही. तो नष्ट होतो केवळ धर्माचरण केल्याने. धर्माचारस्थलात सांगितलेले जे दहा धर्म आहेत ते शिवाज्ञा मानून त्यांचे प्रत्येकाने निष्ठेने आचरण केले पाहिजे. दहा धर्मांतल्या एका धर्माला जरी आपले जीवनमूल्य मानून त्याप्रमाणे आपण आचरण केले तरी खूप काही साधले जाईल. उसाच्या एका पेरातून दुसरे पेर सहज उगवते त्याप्रमाणे एका धर्माच्या आचरणाचा अंगीकार केला तरी त्यातूनच पुढे दुसऱ्या धर्माचेही सहज आचरण घडू लागते. एका धर्माचे आचरण केले तरी पुढील नऊही धर्म हाताशी येतात. परंतु जर आरंभच केला नाही तर काहीच घडणार नाही. म्हणून साधकाने दहांपैकी निदान एका धर्माच्या आचरणाला तरी आरंभ करावा. एका सुभाषितकराने म्हटले आहे–

**निशायां दीपकश्चंद्रः प्रभाते दीपको रविः।**
**त्रैलोक्ये दीपको धर्मः सुपुत्रः कुलदीपकः।।**

चंद्र रात्रीला प्रकाशित करतो, सूर्य दिवसाला प्रकाशित करतो, सुपुत्र आपल्या कुळाला उजळून टाकतो. त्याप्रमाणे धर्म त्रैलोक्याला प्रकाशित करणारा असतो. आपल्या जवळचा धर्म जणू हातात घेतलेल्या दिव्यासारखा असतो. हातात दिवा घेऊन तुम्ही अंधारात निघालात तर तो दिवा अंधार दूर करतो. त्याप्रमाणे तुमच्या जवळचा धर्म तुम्ही जेथे कुठे जाल तेथले अज्ञान आणि अधर्म नष्ट करतो. रात्र कितीही अंधारलेली असली तरीही तुमच्या मुठीतला प्रकाश तुम्ही ज्या वाटेवर चालाल ती वाट उजळून टाकतो. हाती प्रकाश असेल तर अंधाराचे भय बाळगायचे कारण नाही. तुमची वाट पावलापावलांवर उजळत जाईल. हातात प्रकाश नसेल तर दगडधोंड्यांना ठेचकाळण्याशिवाय गत्यंतर नाही. त्याप्रमाणे तुमच्या हृदयातला धर्म तुम्हाला आत्मोद्धाराची वाट दाखवत असतो. सुखी व्हायचे असेल तर प्रत्येकाने धर्माचरण करायला हवे. केवळ धर्मच त्रैलोक्याला उजळून टाकू शकतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन आणि धर्माचारस्थलाचे विवरण पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

१३ ऑगस्ट १९९३

## भावाचारस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीला 'आनंदकानन' असे म्हणतात. कानन म्हणजे अरण्य. सर्वांना परमानंद देणाऱ्या भगवान शिवाचे वास्तव्य काशीला असल्यामुळे सर्वांना येथे केवळ आनंदाचीच प्राप्ती होते. दुःखापासून मुक्ती मिळवण्यासाठी सारे लोक काशीला येत असतात. काशीला आनंद मिळत नसेल तर मग कुठे मिळेल? आनंदप्राप्तीसाठी आपल्याला काही साधना करावी लागते. केवळ मागितल्याने आनंद मिळत नसतो. आनंद सर्वांना हवा असतो, परंतु ज्यामुळे आनंदाची प्राप्ती होते ते धर्माचरण मात्र कुणाला नको असते, असे महाभारतात म्हटले आहे. धर्माचरणाशिवाय आनंद प्राप्त होत नाही. मोबदला दिल्याशिवाय या जगात काहीही मिळत नाही. तुम्ही शारीकि कष्ट करणार नसाल, काही तपस्या करणार नसाल, उपवासादी व्रते करणार नसाल तर तुम्हाला अलौकिक आनंद कसा प्राप्त होईल? लौकिक सुखाला तिलांजली दिल्याशिवाय अलौकिक सुख हाती लागणार नाही. म्हणून काशीक्षेत्रात तुम्हाला आनंदाची प्राप्ती होईल, परंतु ती होण्यासाठी तुम्हाला नियमबद्ध वर्तन करावे लागेल. काशीला येणाऱ्या जीवांचे दुःख दूर करून त्यांना भगवान शिव परमानंद देतात. म्हणून काशीला 'आनंदकानन' अशी एक संज्ञा आहे. गंगास्नान, भगवान विश्वेश्वराचे दर्शन आणि जंगमवाडी मठातला सत्संग या साऱ्यांचा लाभ तुम्हाला नित्य होत आहे. यापेक्षा मोठा आनंद दुसरा कोणता असेल?

धर्म म्हणजे काय? त्याचे आचरण कसे करावे? याविषयी कालच्या आशीर्वचनात आपण विचार केलेला आहे. यानंतरचे स्थल आहे भावाचारस्थल.

**भाव एवास्य सर्वेषां भावाचारः प्रकीर्तितः।**
**भावो मानसचेष्टात्मा परिपूर्णः शिवाश्रयः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.६७)

भाव म्हणजे भावना. भाव ही मनाची वृत्ती होय. वृत्ती जेव्हा सांसारिक विषयांचे ग्रहण करणारी असते तेव्हा तिला वैषयिक वृत्ती म्हणतात. परंतु जेव्हा ती वृत्ती भगवान शिवाचा आश्रय घेते तेव्हा तिला 'भाव' अशी संज्ञा दिली जाते. प्रत्येक मनुष्याजवळ चित्त आणि वित्त असते. चित्त म्हणजे मन आणि वित्त म्हणजे धन. वित्त तुम्ही अनेकांना वाटून देऊ शकता. परंतु चित्त मात्र केवळ एकालाच म्हणजे भगवान शिवालाच दिले पाहिजे. जेव्हा चित्तवृत्ती संपूर्णपणे भगवंताला अर्पण केली जाते तेव्हा ती भावना होते. धर्माचरणात शारीरिक क्रियांना प्राधान्य असते. खोटे न बोलणे, हिंसा न करणे इत्यादी. भावाचारस्थलात सूक्ष्मशरीराचा व्यवहार कसा असावा, याविषयी सांगितलेले आहे. स्थूलशरीराला काही कर्म करायचे असेल तर त्यासाठी सूक्ष्मशरीराचे साहाय्य लागते. सूक्ष्मशरीराशिवाय स्थूलशरीराकडून कोणतेही काम घडले तरी ते न केल्यातच जमा असते. हेच पुढे सांगतात-

**भावनाविहितं कर्म पावनादपि पावनम्।**
**तस्माद् भावनया युक्तं परधर्मं समाचरेत्।।१६.६८।।**

सत्य बोलावे, अशी शास्त्राज्ञा आहे. तुम्ही जेव्हा सत्य बोलता तेव्हा ते मनापासून बोलता की केवळ शास्त्राज्ञा

पाळायची म्हणून बोलता? यात देखील फरक आहे. तुम्ही पूजा करता तेव्हा केवळ करायची म्हणून करता की अगदी मन:पूर्वक करता? केवळ शास्त्राज्ञा पाळण्यासाठी तुम्ही एखादे कर्म करीत असाल आणि त्यात जर तुमचे मन नसेल तर त्या कामाला काही अर्थ नाही. एखाद्या नोकराला झाडायला सांगितले, त्याचे त्यात मन असेल तरच त्याच्या हातून काम चांगले होईल, अन्यथा होणार नाही. त्याचे कामत मन नसेल तर मालकाला त्याच्या मागे उभे राहून 'इथले झाडून काढ, तिथले झाडून काढ' असे सांगावे लागते. म्हणून केवळ आज्ञा पाळणे महत्त्वाचे नसून त्या कामात माणसाची श्रद्धा, भावना असली पाहिजे. नोकर अगदी मन लावून म्हणजे भावनापूर्वक काम करतो अशी मालकाची खात्री झाली तर त्याचा नोकरावर पूर्ण विश्वास बसतो. त्याप्रमाणे भगवान शिवाने पूजा करा, जप करा इत्यादी ज्या आज्ञा आगमशास्त्रात दिलेल्या आहेत त्या आपण भावपूर्वक पाळल्या पाहिजेत. आपण पूजा करतो, ध्यान देखील करतो. परंतु ध्यान करता करता कुठून कुठे जातो याचा पत्ता देखील लागत नाही. म्हणजेच आपले कर्म भावनापूर्वक होत नाही. दुसऱ्या माणसाला तुमची भावना दिसत नाही, केवळ तुमचे कर्म दिसे. आपण करीत असलेल्या कार्यात जर आपले मन गुंतले नसेल तर ते कार्य निष्फळ होईल हे निश्चित.

तुम्ही काशीला आला आहात तेव्हा येथले प्रसिद्ध तुलसीमानसमंदिर पाहून घ्या. तुम्ही मंदिरात जाल तेव्हा डावीकडेच तुलसीदासांची एक मूर्ती दिसेल. मूर्तीसमोर तुलसीरामायण ठेवलेले आहे. ध्वनिवर्धकावरून रेकॉर्डद्वारे तुलसीरामायणाचा पाठ चाललेला असतो. त्यावेळी मूर्तीचे ओठ हलत असतात. यांत्रिक पद्धतीने तशी सोय केलेली आहे. जणू तुलसीदासांची मूर्तीच रामायण गात आहे असे पाहणाऱ्यांना वाटते. परंतु विचार केला तर काय दिसते? मूर्तीचे ओठ हलत असतात. कोणता दोहा आपल्या मुखातून बाहेर पडत आहे आणि त्याचा अर्थ काय आहे? हे काहीही मूर्तीला कळत नसते. मूर्तीच्या हातातली तुळसीमाळ देखील यांत्रिकपणे फिरत असते. परंतु त्यामुळे मूर्तीकडून जप घडत असतो काय? मूर्तीच्या सगळ्या क्रिया यांत्रिक असतात. अशा पद्धतीने मूर्तीचे ओठ हजारो वर्षे हलत राहिले, तिच्या हातातली माळ कितीही फिरत राहिली तरी त्या पाठाचे आणि जपाचे कवडीइतकेही फळ मूर्तीला मिळणार नाही हे उघड आहे. कारण तिथे भावना नाही, अंत:करण नाही, सूक्ष्मशरीर नाही.

सूक्ष्मशरीरातच तर धर्म-अधर्माचा संग्रह होत असतो. स्थूलशरीर हे केवळ साधन होय. त्याप्रमाणे जेव्हा एखादा मनुष्य पूजा, जप, ध्यान करतो आणि पाहणाऱ्याला जर तो कर्म करताना दिसतो तरी त्याला त्या कर्माचे काहीही फळ मिळत नाही. कर्मात आपली भावना आहे की नाही हे पाहणाऱ्याला कळणे शक्य नाही. म्हणून आपणच आत्मपरीक्षण करायला हवे. आपण जे करीत आहोत ते भावनापूर्वक करीत आहोत की नाही? तुम्ही थोडेसेच धर्मकार्य करा. परंतु त्यात तुमची भावना ओता. तेव्हा तुमचे ते कर्म अत्यंत पवित्र आणि फलप्रद असेल. म्हणून धर्माचरण भावनापूर्वक करावे. तुम्हाला, शंभर वेळा-हजार वेळा जप करा, असे का बरे सांगितले जाते? हजार वेळा मंत्रजप केला तर निदान दहावेळा तरी तुम्ही कदाचित भावनापूर्वक कराल. तुम्ही एक लक्ष जप केला तर त्यातला निदान दहा हजार जप तरी तुम्ही भावनापूर्वक केला असण्याचा संभव असतो. भावनेने जेवढे कराल तेवढेच तुम्हाला फळ देणारे असेल. बाकीचा केवळ शीण. भावना सर्वश्रेष्ठ मानली जाते. तुमचे शरीर येथे असेल परंतु तुमचे सूक्ष्मशरीर दुसऱ्या ठिकाणी असेल तर तुमचे स्थूलशरीर इथे असून काय उपयोग? तुमचे सूक्ष्मशरीर जेथे गेले असेल तेथलेच फळ तुम्हाला मिळेल, येथले मिळणार नाही. म्हणून प्रत्येकाने भावनापूर्वक म्हणजे मन लावून धर्माचरण केले पाहिजे.

**भावेन हि मनःशुद्धिर्भावशुद्धिश्च कर्मणा।**
**इति संचिन्त्य मनसा योगी भावं न संत्यजेत्।।१६.६९।।**

भावनेमुळेच मनुष्याचे मन शुद्ध होते. भगवंताच्या रूपाचे तुम्ही चिंतन कराल तेव्हा तुमची भावना तदाकार होऊन शुद्ध होईल. भावना विषयाकार होते तेव्हा ती अशुद्ध असते आणि जेव्हा ती भगवदाकार होते तेव्हा ती शुद्ध असते. तिचा विषय अशुद्ध असेल तर ती अशुद्ध आणि तिचा विषय शुद्ध असेल तर ती शुद्ध असते. पाऊस आकाशातून कोसळतो तेव्हा त्याला कोणताही रंग नसतो. परंतु मातीत पडून तो वाहू लागतो तेव्हा त्याला गढूळ रंग येतो. काळ्या मातीत मिसळला तर काळा आणि लाल मातीत मिसळला तर लाल होतो. जेथे केवळ खडक आहेत तेथे कोसळला तर खडकाशी एकरूप न होता तसाच राहतो. त्याप्रमाणे लहान बालकाची मनोवृत्ती अत्यंत शुद्ध असते. वय वाढल्यावर आणि विषयांशी परिचय झाल्यावर त्याची भावना वैषियिक होते. अशुद्ध वस्तूशी संबंध आल्यावर मुळात शुद्ध असलेली वृत्ती अशुद्ध बनते. भावनेने भगवान शिवाचा आश्रय घेतला तर ती मात्र अत्यंत शुद्ध, पवित्र होते.

**शिवभावनया सर्वं नित्यनैमित्तिकादिकम्।**
**कुर्वन्नपि महायोगी गुणदोषैर्न बाध्यते।।१६.७०।।**

संध्यासमयी इष्टदेवाची पूजा करावी अशी शास्त्राज्ञा आहे. संध्यावंदन या शब्दात, संध्याकाळी थोरामोठ्यांना आणि जो सर्वात मोठा आहे अशा भगवंताला वंदन करावे, असाच अर्थ भरलेला आहे. संध्या तीन प्रकारची आहे. प्रातःकालीन संध्या, मध्यान्हकालीन संध्या, सायंकालीन संध्या. अरुणोदय झाला, परंतु सूर्योदय मात्र झाला नाही असा संधिकाल म्हणजे प्रातःकालीन संध्या'. सूर्यास्त झाला परंतु अंधार मात्र पडलेला नाही असा संधिकाल म्हणजे 'सायंकालीन संध्या' होय, आणि सूर्य जेव्हा मध्यान्हकाळी, दोन्ही संध्यांच्या मध्यावर असतो ती 'मध्यान्हकालीन संध्या'. मनुष्याने सदासर्वदा शिवपूजा, शिवचिंतन करावे. परंतु ते शक्य झाले नाही तर निदान या तिन्ही संध्यासमयी तरी करावे. रात्री झोपल्यानंतर श्वासोच्छवासावर आपले नियंत्रण राहात नाही. कदाचित् रात्री उच्छवास सोडल्यानंतर पुन्हा आत श्वास घेतला न जाण्याचा संभव असतो. परंतु परमेश्वराने रात्रभर आपला श्वास नियंत्रित आणि नियमित ठेवला याबद्दल त्याच्याविषयी सकाळी उठल्याबरोबर कृतज्ञता व्यक्त करायला हवी. हेच प्रातःकालीन संध्याकर्म होय. दुपारी भोजन करण्यापूर्वी परमेश्वराचे स्मरण करायला हवे. 'आधी पोटोबा नंतर विठोबा' असे करू नये. सगळे काही करण्यासाठी आपल्याला वेळ असतो, परंतु देवपूजा करण्यासाठी अजिबात वेळ नसतो. भगवंताचे पूजन केल्याशिवाय भोजन करणे ही पशुवृत्ती होय. पशू केव्हाही खातात त्यांच्यासाठी कधी खावे आणि कसे खावे याचे नियम नाहीत. मनुष्यासाठी मात्र, अन्न भगवंताला अर्पण करून ते प्रसाद म्हणून भक्षण करावे, असा नियम आहे. असे केले तरच तुमचे मन प्रसन्न राहील. म्हणून मध्यान्हकाळी परमेश्वराची पूजा आणि चिंतन करावे. त्याचप्रमाणे संध्याकाळी देखील भगवंताचे पूजन आणि स्मरण करावे. जसा आकाशात सूर्य असतो तसा आपल्या अंतःकरणात देखील ज्ञानसूर्य आहे. त्याचा कधी अस्त होत नाही. त्याला भगवद्रूप मानून त्याची आराधना करावी. हे देखील एक आगळे संध्यावंदनच आहे.

**आत्मज्योतिषि सर्वेषां विषयाणां समर्पणम्।**
**अन्तर्मुखेन भावेन होमकर्मेति गीयते।।१६.७२।।**

संध्यावदनानंतर काही लोक होम देखील करतात. बाह्यहोम आणि आंतरहोम असा दोन प्रकारचा होम आहे.

यज्ञकुंड सिद्ध करून, त्यात मंत्राग्नी चेतवून परमेश्वराचे नाव घेत त्यात समिधा आणि हविर्द्रव्ये अर्पण करणे हा बाह्यहोम होय. परंतु एवढ्याने होमक्रिया पूर्ण होत नाही. आपल्या अंतर्यामी वसणारे जे अवगुण आहेत, त्यांचा होम करणारी एक वेगळी होमक्रिया आहे. यज्ञक्रियेबद्दल एक विचार येथे नमूद करावासा वाटतो. काही जणाचा यज्ञाला विरोध असतो. माणसाला खायला तूप मिळत नाही आणि तुम्ही मात्र यज्ञात तूप जाळून टाकता, असा त्यांचा आक्षेप असतो. परंतु मनुष्याचे जीवनदेखील एक यज्ञ–जीवनयज्ञ होय. यज्ञ करणे याचा अर्थ, त्यागभावना दृढ करणे, असा आहे. यज्ञात एखादी वस्तू भगवंताच्या नावाने जेव्हा अर्पण केली जाते तेव्हा ती समष्टिरूप म्हणजे व्यापक होते. यासाठी काही दृष्टान्त देता येतील. एक मिरची जर एखाद्या माणसाने खाल्ली तर त्याच्या डोळ्यांतून–नाकातून पाणी येईल, त्याला ठसका लागेल. पण तीच मिरची जर पेटलेल्या अग्नीत टाकली तर तिथे बसलेल्या सर्वांनाच ठसका लागतो. अग्नीत अर्पण केल्याने वस्तूचे सामर्थ्य जणू काही वाढते.

विद्युत्‌शक्ती हे अग्नीचेच एक रूप आहे. तिच्यामुळेच आपला आवाज हजार–दहा हजार–लक्ष लोकांपर्यंत पोहोचू शकतो. रेडिओद्वारे, टी.व्ही.द्वारे ध्वनी आणि रूपदेखील कोट्यवधी लोकांपर्यंत पोहोचते. या व्यापकतेमागे विद्युत्‌शक्ती आहे, हे मान्य करावे लागते. ती नसेल तर सर्व क्रिया ठप्प होते. त्याप्रमाणे अग्नीत जेव्हा भगवंताला आवाहन करून आपण काही अर्पण करतो तेव्हा ते समष्टिरूप, सर्वव्यापक होते. कारण भगवंतच मुळात समष्टिरूप आहे. त्याला अर्पण केलेली वस्तू सर्वांनाच फळ देणारी ठरते. म्हणून शास्त्रात म्हटले आहे, 'यज्ञाद् भवति पर्जन्य: पर्जन्याद् अन्नसंभव:।'

प्राचीन काळी पाऊस पडावा म्हणून यज्ञ करीत असत. यज्ञामुळे पाऊस होई आणि पावसामुळे अन्न पिकत असे. आपल्याजवळ जे आहे ते भगवंताला देणे याचा अर्थ, त्यागभावनेची जोपासना करणे, असा आहे. आज यज्ञप्रथा लुप्त झाली असली तरी क्वचित् कुठे अजूनही यज्ञ होताना दिसतो. हा यज्ञ बाह्य होय. परंतु दुसरा यज्ञ आंतरिक यज्ञ आहे. आपल्या हृदयात जी आत्मरूप ज्ञानज्योत आहे तिच्यात विषयांचे अर्पण करणे हाच आंतरिक यज्ञ होय. विषयांना ज्ञानाग्नीत का अर्पण करावे? शास्त्र सांगते की विषय हे विषरूप आहेत. विषयभोगी मनुष्याचा अंतकाल लवकर होतो. 'मृत्योर्माऽमृतं गमय'– मृत्यूकडून मला अमृतत्वाकडे ने– अशी उपनिषदांत प्रार्थना केली आहे. मृत्यूकडे जाणाऱ्या माणसांना अमृतत्वाकडे नेले पाहिजे. शब्दस्पर्शादी विषयांकडे ज्या मनुष्याची प्रवृत्ती असते तो मनुष्य, विषय नव्हे तर विषाचे सेवन करीत असतो. काही विषांचा चटकन् परिणाम होतो तर एखादे विष हळूहळू परिणाम करत असते. त्याप्रमाणे विषयसेवनामुळे आपले शरीर जर्जर होते, इंद्रिये थकतात आणि बुद्धी देखील क्षीण होते. मनुष्य ज्ञानप्राप्तीची साधने गमावून बसतो. परंतु जर विषमय विषय भगवंताला अर्पण केले तर मात्र त्या विषाचे अमृत होते. मीराबाईच्या हाती दिलेला विषाचा प्याला अमृतमय झाला अशी कथा आहे. अशुद्धाला शुद्ध करण्याचे सामर्थ्य परमेश्वराजवळ आहे. मनुष्याला रूप पाहावे लागते, शब्द ऐकावा लागतो, स्पर्शानुभव घ्यावा लागतो, रस चाखावे लागतात आणि गंध हुंगावे लागतात. त्यापासून मनुष्याची सुटका नाही हे खरे असले, तरी त्याच्या भावनेत परिवर्तन झाले तर विषय अमृतमय होतात. म्हणून भगवान शिवाला विषय अर्पण करणे, हाच एक प्रकारचा होम होय.

वीरशैवसिद्धान्तात इष्टलिंगपूजा तर सांगितलीच आहे परंतु त्याशिवाय प्रत्येक इंद्रियात एकेका लिंगाची भावना करावी, असेही सांगितले आहे. आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग आणि महालिंग. मनात महालिंगाची भावना आणि अन्य इंद्रियांत आचारलिंगादी लिंगांची भावना केली जाते. या भावनेमुळे जेव्हा डोळे रूप पाहतात तेव्हा ते केवळ रूप न राहता रूपप्रसाद होतो. त्याचप्रमाणे स्पर्शप्रसाद, रसप्रसाद, गंधप्रसाद आणि

शब्दप्रसाद असे विषय प्रसादरूप होतात. विषय प्रसादरूप झाल्यावर त्यांचा भोग घेतल्यावर मनात वासना उत्पन्न होत नाही. म्हणून भोजन करण्यापूर्वी ते जसे लिंगार्पित करावे लागते त्याप्रमाणे विषय सेवन करण्याआधी ते लिंगांना अर्पण करून नंतर प्रसाद म्हणून सेवन केले पाहिजेत.

'आहार' याचा अर्थ केवळ भोजन नव्हे. बाहेर जे जे म्हणून काही आहे ते आपल्या आत घेणे म्हणजे आहार होय. नेत्राचा आहार रूप होय, श्रोत्राचा आहार शब्द आहे, त्वचेचा आहार स्पर्श आहे, घ्राणाचा आहार गंध आहे, रसनेचा आहार रस आहे. म्हणून सर्व प्रकारचे आहार भगवंताला अर्पण केले तर ते आहार न राहता 'प्रसाद' होतात. केवळ विषयांचा भोग घेणे वेगळे आणि प्रसादरूपी विषयांचा भोग घेणे वेगळे. येथे भावनेत अंतर पडते. विषयांना प्रसाद करण्याचे सामर्थ्य आपल्या भावनेत आहे. विषयांचा तसाच भोग घेतला तर ते अनंतकाळ दुःखदायक आहेत याची प्रचीती येते. म्हणून विषयांचा प्रसाद म्हणून स्वीकार केला तर ते दुःखदायक ठरत नाहीत. विषयवासनेचा मनावर संस्कार होत नाही. संस्कार म्हणजे तो विषय पुन्हा भोगण्याची इच्छा होणे. विषय-वासनेपेक्षा प्रसाद-वासना चांगलीच आहे. ती वासना शांतिप्रद आणि मुक्तिप्रद आहे. म्हणून हृदयातील ज्ञानाग्नीत विषयांची आहुती देऊन म्हणजेच विषयांना भगवदर्पण करून त्यांना प्रसादरूप करणे हाच एक प्रकारचा आंतरिक होम होय. हा होम करण्यासाठी थोडा अभ्यास करावा लागेल. प्रयत्नाने हळूहळू तो साध्य होईल. म्हणून प्रत्येकाने कर्म करताना ते भावनायुक्त करावे म्हणजे त्याचे पूर्ण फळ मिळेल, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

१४ ऑगस्ट १९९३

---

## आशीर्वचन एकोणिसावे

# भावाचारस्थल-२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीचे एक नाव 'आनंदकानन' आहे हे यापूर्वी सांगितलेले आहे. आनंदकाननातील एका विभागाला 'जंगमवाटिका' असे नाव आहे. वाटिका म्हणजे उपवन. जंगमवाटिकेचेही महत्त्व अनन्यसाधारण आहे. जंगमांचे हे वास्तव्यस्थान होय. 'जंगम' या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त या शब्दाचा एक अर्थ सांगितला आहे-

**जानन्त्यतिशियाद् ये तु शिवं विश्वप्रकाशकम्।**
**स्वस्वरूपतया ते तु जंगमा इति कीर्तिताः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, ११.३६)

सर्व विश्व प्रकाशित करणाऱ्या भगवान शिवाला जो आत्मरूपाने जाणतो अशा ज्ञानी पुरुषाला 'जंगम' असे म्हणतात. आनंदकाननातील या जंगमवाटिकेत असे अनेक तपस्वी, चारित्र्यसंपन्न जंगम शिवयोगी होऊन गेले आहेत. जंगमवाटिकेलाच अलीकडे 'जंगमवाडी' असे नाव मिळाले आहे. या पीठाचे मूळ संस्थापक श्रीविश्वाराध्य

हे भगवान शिवाच्या ईशान मुखातून उत्पन्न झाले. विश्वातल्या समस्त प्राणिमात्रांकडून जे पूजिले जातात ते 'विश्वाराध्य' होत. जगात पूजा कोणाची केली जाते? एक सुभाषितकार म्हणतो, 'स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते।'

राजा केवळ आपल्या राज्यातच पूजनीय असतो तर विद्वानाची पूजा सर्वत्र केली जाते. जगद्गुरू विश्वाराध्यांनी येथे जे पीठ स्थापन केले आहे त्याला 'ज्ञानपीठ' अशी संज्ञा आहे. या पीठाकडून अनेक ऋषिमुनींना तत्त्वबोधाचा उपदेश लाभला आहे. कैलासमंटपात जी गुरुगादी आहे, जिची भक्तगण सतत पूजा करतात तिच्यावर बसूनच ज. विश्वाराध्यांपासून आजवर अनेक आचार्यांनी धर्मोपदेश केलेला आहे. दुर्वासासारख्या अत्यंत क्रोधी तपस्व्याला देखील याच पीठाकडून उपदेश लाभला आहे. क्रोधावर विजय मिळवायचा असेल तर ज्ञानसंपादन करायला हवे. ज्यावेळी तुम्हाला अत्यंत क्रोध येईल त्यावेळी समजा की दुर्वास तुमच्या मनातच दडलेला आहे. हृदयात ज्ञान प्रकाशल्याशिवाय कामक्रोधादी विकार नाहीसे होणार नाहीत. दुर्वास मुनींना इथे ज्ञानोपदेश लाभला याचा अर्थ असा होतो की क्रोध–काम इत्यादी अवगुण घेऊन जरी कोणी आला तरी त्याला येथे ज्ञान प्राप्त होऊन त्याची विकारांपासून मुक्तता होते. या पीठपरंपरेवर जे आचार्य होऊन गेले त्या सर्वांच्या वाणीतून आणि कृतीतून ज्ञानगंगा वाहात आली आहे. जंगम म्हणजे ज्ञानी. अशा ज्ञानी पुरुषांचे वास्तव्यस्थान म्हणजे जंगमवाटिका, जंगमवाडी. अशा पवित्र जंगमवाटिकेत बसून श्रद्धायुक्त मनाने तुम्ही ज्ञानोपदेश श्रवण करीत आहात, हा आनंदकाननात लाभणारा आनंदच होय.

कालपासून आपण भावाचारस्थलाचा विचार करीत आहोत. या स्थलाबद्दल ज. रेणुकाचार्य पुढे सांगतात–

**भावयेत् सर्वकर्माणि नित्यनैमित्तिकानि च।**
**शिवप्रीतिकराण्येव संगराहित्यसिद्धये।।१६.७३।।**

कर्म अनेक प्रकारचे असून त्याचे विहित कर्म आणि निषिद्ध कर्म असे वर्गीकरण केले जाते. 'जे करा' असे शास्त्र सांगते ते विहित कर्म आणि 'जे करू नका' असे शास्त्र सांगते ते निषिद्ध कर्म. काय करावे आणि काय करू नये हे माणसांना कळत नाही, म्हणून परमेश्वराने वेद–आगमांच्या द्वारा ते विवरून सांगितले आहे. जे निषिद्ध कर्म आहे ते कधीही करू नये, परंतु विहित कर्म सदोदित करावे. विहित कर्माचे नित्य, नैमित्तिक, काम्य आणि प्रायश्चित्त असे चार भाग केले जातात. जे नित्य करावे लागते आणि न केले तर मनुष्य दोषास्पद ठरतो ते नित्यकर्म होय. इष्टलिंगपूजन, धर्मग्रंथाचा स्वाध्याय ही वीरशैवांची नित्यकर्मे होत. याप्रमाणे अन्य धर्मीयांची नित्यकर्मे आहेत. काही निमित्ताने करावी लागणारी कर्मे 'नैमित्तिक कर्मे' होत. श्रावण महिन्यात, अधिक मासात, अनुष्ठान–व्रत करणे, तीर्थयात्रा करणे इत्यादी नैमित्तिक कर्मे होत. अशी इतरही नैमित्तिक कर्मे आहेत. लौकिक आणि पारलौकिक सुखांच्या अपेक्षेने केले जाणारे कर्म हे 'काम्यकर्म' होय. स्वर्गप्राप्तीच्या इच्छेने कर्म करणे हे तर काम्यकर्म आहेच, परंतु तुम्ही ईश्वराला लौकिक सुखे मागण्यासाठी जे काही कर्म करता ते देखील काम्यकर्मच होय. भगवंतालाही आपण लालूच दाखवतो. व्यवहारात लालूच दाखवण्याची जी सवय जडली तिचा परमार्थात देखील उपयोग करतो. ईश्वराला वाटते की ठीक आहे– लालूच दाखवायाला आणि खूप काही मागायला तरी आपल्याकडे येतोय ना, तर येऊ दे. मागितल्यावर याच्या कामना पूर्ण होतील आणि कधीतरी कामना संपून हा निष्काम होईल. ज्यात काहीतरी कामना असते त्याला 'काम्यकर्म' म्हणतात.

चौथे कर्म 'प्रायश्चित्त कर्म' होय. आपल्या हातून निषिद्ध कर्म घडल्यावर त्याच्या परिमार्जनासाठी जे कर्म केले जाते ते प्रायश्चित्त कर्म होय. शास्त्रात अनेक प्रायश्चित्ते सांगितली आहेत. त्यात साधारण प्रायश्चित्त आणि असाधारण प्रायश्चित्त असे दोन भाग पडतात. मनुष्याकडून पापकर्म घडल्यानंतर त्याच्या परिमार्जनासाठी जे विशेष प्रायश्चित्त आचरावे लागते त्याला 'असाधारण प्रायश्चित्त' म्हणतात. या प्रायश्चित्ताने त्या विशिष्ट पापाचेच परिमार्जन होते, दुसऱ्या पापकर्माचे होत नाही. जन्मजन्मांतरात मनुष्याकडून जी पापकर्मे घडतात आणि ज्यांची त्याला जाणीव देखील नसते अशा पापकर्मांच्या परिमार्जनासाठी घेतले जाणारे प्रायश्चित्त म्हणजे 'साधारण प्रायश्चित्त कर्म' होय. सर्व दुष्कृत्यांच्या परिमार्जनासाठी, एखाद्या ब्रह्मास्त्रासारखे हे प्रायश्चित्त कर्म आहे. पवित्र नद्यांत स्नान करणे, तीर्थक्षेत्रांतील देवतांचे पूजन करणे इत्यादी कर्मांना साधारण प्रायश्चित्त कर्म म्हटले जाते.

मनुष्याने कोणतीही कर्मे केली नाहीत तरी त्याला नित्यकर्मे आणि नैमित्तिक कर्मे करावीच लागतात. ती कर्मे करताना मनुष्याची भावना कशी असावी याबद्दल या श्लोकात सांगितले आहे. कुठलीही अपेक्षा न ठेवता केवळ शिवकृपा व्हावी म्हणून नित्य, नैमित्तिक कर्मे करावीत. अशा कर्मांनी संसारापासून मुक्ती मिळते. जन्मजन्मांतरांपासून आपल्याला संसाराचा संग जडलेला आहे. आपले मन दिसायला लहान दिसते, परंतु त्यात जन्मजन्मांतरांच्या संस्कारांचा प्रचंड साठा असतो. कॉम्प्युटरच्या फ्लॉपीवर- जी लहान दिसते- प्रचंड माहिती साठवून ठेवता येते त्याप्रमाणे. आपण जेवढे जन्म घेतले, त्यामध्ये जेवढ्या व्यक्तींशी आपला संबंध आला, त्या जन्मांत आपण काय काय भोगले या साऱ्या संस्कारांचा संग्रह आपल्या मनात साठलेला आहे. मनाच्या तळातून ज्यावेळी जो संस्कार पृष्ठभागावर येईल तेव्हा त्या संस्कारानुसार वागण्याची माणसाला इच्छा होते. हे सारे संसारसंगामुळे झाले आहे. संसाराशी संग तोडायचा असेल तर भगवंताशी संग जोडायला पाहिजे. जीवात्म्याला एकतर संसाराशी संग करावा लागेल, नाहीतर भगवंताशी. म्हणून संसाराचा संग सोडण्यासाठी प्रत्येक मनुष्याला फळाची अपेक्षा न ठेवता केवळ शिवकृपेच्या लाभासाठी नित्य-नैमित्तिक कर्मे करावी लागतात.

**शिवे निवेश्य सकलं कार्याकार्यं विवेकतः।**
**वर्तते यो महाभागः स संगरहितो भवेत्॥१६.७४॥**

संसारात राहून देखील संसारापासून अलिप्त राहता येते. ज्ञानी पुरुष वरवर पाहता सामान्य माणसाप्रमाणे दिसतो, परंतु त्याची अंतरंगस्थिती सामान्यापेक्षा वेगळी असते. कृष्ण ज्ञानी असून देखील भोगी होता. परंतु अंतरंगात तो विरक्त होता. अंतर्यामी आसक्ती नसेल तर भोगी देखील विरागी असतो. शुक त्यागी होता तरी तो ज्ञानी होता. राम अणि जनक राजभोगी होते, तरी देखील ते राजयोगी होते. प्राचीन काळी जे चक्रवर्ती राजे होऊन गेले, त्यांनी गुरुगृही जाऊन विद्याध्ययन केले होते. ते योगाभ्यास करीत असत. राज्य सांभाळून, राजभोग भोगून, शेवटी योगसाधना करीत देहत्याग करीत असत. अशी भारतीय परंपरा आहे. शरीराने भोगसक्त दिसणारा मनुष्य मनाने अत्यंत विरक्त असू शकतो, हे अनेक ज्ञानी पुरुषांनी आपल्या जीवनक्रमाने सिद्ध केले आहे. अज्ञानी माणसापेक्षा ज्ञानी मनुष्य अधिक चांगला संसार करू शकतो. म्हणून संसारात राहायचे असेल तर ज्ञानी होऊन राहिले पाहिजे. संसारात राहिल्यामुळे ज्ञानी पुरुषाचे काहीही नुकसान होत नाही.

ज्ञानी पुरुष संसारात वावरताना कर्माबद्दल अहंभाव बाळगत नाही. अर्थात् 'हे कर्म मी करत आहे' असे तो मानत नाही. कर्म आपल्या द्वारा घडत आहे, ईश्वर ते आपल्याकडून करवून घेत आहे, अशी भावना त्याची

असते. आपण केवळ निमित्तमात्र आहोत अशी त्याची भावना असते. अज्ञानी मनुष्य मात्र देहाभिमान आणि कर्माबद्दल अहंभाव बाळगतो. म्हणून त्याला दुःख भोगावे लागते. भावना शिवमय झाली तर ज्ञानी पुरुषाकडून घडणाऱ्या प्रत्येक कार्यात शिवतत्त्वाचा साक्षात्कार होतो आणि कर्म करून देखील तो अकर्ता ठरतो. म्हणून योग्याकडून घडणारे कार्य आणि भोग्याकडून घडणारे कार्य यात अंतर पडते. तुलसीदासांनी संसारात अलिप्तपणाने कसे जगावे हे सांगताना एक सुंदर दृष्टान्त दिला आहे-

**तुलसी जग मे यूं रहो रसना मुख माहि।**
**खाती है घी तेल नित फिर भी चिकनी नाहि।।**

आपल्या मुखातील जिभेप्रमाणे आपले वर्तन असावे. आपली जीभ तेल-तूप खाऊन देखील कधी तेलकट होत नाही. आपल्या हाताला जर तेल-तूप लागले तर हात तेलकट होतो. तो गरम पाण्याने साबण लावून धुवावा लागतो. परंतु तेल-तूप खाल्ल्यानंतर कोण्या मनुष्याने आपली जीभ साबणाने स्वच्छ धुतली असे तुम्ही कधी ऐकले आहे का? तेल-तूप खाऊन देखील जीभ त्यापासून अलिप्त राहते. म्हणून जिभेला गुरू मानून त्याप्रमाणे वर्तन करावे. सारा प्रपंचच आपला गुरू होऊ शकतो. आपले शरीर देखील आपला गुरू आहे. ते प्रत्येक क्षणी आपल्याला उपदेश करीत असते. तो आपण ऐकत नाही हा भाग वेगळा. संसारात जगणे ही देखील एक कला आहे. जोपर्यंत आयुष्य आहे तोपर्यंत संसारात राहावेच लागणार. संसारात शरीर लिप्त होत नाही. इंद्रिये लिप्त होत नाहीत, लिप्त होते ते मन आणि बुद्धी. संसाराशी मनाचा प्रत्यक्ष संबंध येत नाही. तो इंद्रियांच्या द्वारे येतो. सारी इंद्रिये मनाचे समाधान करण्यासाठी रात्रंदिवस धडपडत असतात. परंतु मन मात्र कधीही तृप्त होत नाही. ते सदोदित अतृप्तच असते.

महर्षी याज्ञवल्क्यांनी विद्वत्संन्यास घ्यायचे ठरवले. त्यांनी आपली संपत्ती दोन्ही स्त्रियांना वाटून टाकली. त्यांची पहिली पत्नी कात्यायनी यावर काही बोलली नाही, परंतु दुसरी पत्नी मैत्रेयी त्यांना म्हणाली,

''महाराज, आपण जे धन आम्हाला दिले आहे त्यामुळे आम्हाला अमृतत्वाची प्राप्ती होईल का?''

''धनामुळे अमृतत्व मिळत नाही तर ते त्यागामुळे मिळते.'' याज्ञवल्क्य म्हणाले.

''जर यामुळे अमृतत्व मिळत नसेल तर हे धन घेऊन मी काय करू?'' मैत्रेयी म्हणाली.

जगातली सारी संपत्ती जरी आपण एका माणसाला दिली तरी त्याचे मन तृप्त होणार नाही. मनाची हाव इतकी मोठी आहे की त्यासाठी सारा प्रपंच देखील कमी पडतो. परिपूर्ण असे परब्रह्म मिळाले तरच मन तृप्त होऊ शकते. मनाच्या झोळीत कितीही दान टाकले तरी ती रिकामी ती रिकामीच राहते. आजवर सांसारिक वस्तूंनी मन तृप्त झाल्याचे एकही उदाहरण नाही. ज्याच्या मनात शिवभावनेचा उदय होतो आणि ज्याला शिवपरब्रह्माची प्राप्ती होते असा मनुष्य मात्र पूर्ण तृप्त असतो. त्याला अन्य कोणत्याही विषयांची किंवा वस्तूंची आवश्कता नसते. शिवभावनायुक्त होऊन जो कर्मे करतो तो संसार-संगापासून मुक्त होतो. अर्थात् त्याच्या मनात सांसारिक वस्तूंविषयी आसक्ती राहात नाही. शरीराचा संसाराशी संबंध असावा, परंतु मनाने संसारापासून अलिप्त राहावे. हीच योग्यांची जीवनकला आहे. ही कला ज्याला साधते त्याला संसाराची बाधा होत नाही.

संसारी माणसे 'हे मी केले नाही' असे वरवर म्हणतात. परंतु त्यांच्या मनात मात्र कर्माबद्दल अहंभाव जागा असतो. एखाद्याने घर बांधले आणि तुम्हाला दाखवले तेव्हा तुम्ही सहज म्हणता की, ''छान बांधले आहे घर'' तेव्हा तो म्हणतो, ''छे! मी कुठे काय केलं, ही तर ईश्वराची कृपा आहे.'' तो ईश्वराला श्रेय देतो ते केवळ वरवर

बोलण्यातून. परंतु त्याच्या मनात मात्र 'हे माझे कर्तृत्व आहे' असा अहंकार असतो. कर्तृत्वभावना जेव्हा जागी होते तेव्हा मनात अहंकार दाटतो. मद्यपान केल्यावर जसा मनुष्य झिंगतो त्याप्रमाणे अहंकार झाल्यावर देखील झिंगतो. शास्त्राने कर्म करण्याला प्रतिबंध केलेला नाही. फक्त ते करताना 'हे मी केले असा अहंभाव टाळा' एवढीच अट घातली. अहंकारशून्य कृती ही लोककल्याणकारीच असते यात शंका नाही. शेवटी या स्थलाचा समारोप करताना ज. रेणुकाचार्य म्हणतात–

**आत्मानमखिलं वस्तु शिवमानंदचिन्मयम्।**
**एकभावेन सततं संपश्यन्नेव पश्यति।।१६.७५।।**

आत्मसाक्षात्कार कुणाला होतो? जीव, शिव आणि जगत् असे तीन पदार्थ आहेत. हे दिसतात तीन परंतु मुळात एकच आहेत. शिवपरब्रह्मच जीव आणि जगत् या रूपात अभिव्यक्त झालेले आहे. प्रेरयिता, भोक्ता आणि भोज्य अशी नावे शिव, जीव आणि जगत् या तीन पदार्थांना 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त दिलेली आहेत. एक शिवपरब्रह्मच या तीन रूपांनी नटले आहे. एकच तीन होतात. 'मी शिव असून प्रपंच शिवमय आहे, शिवाशिवाय दुसरे काहीही अस्तित्वात नाही' अशा दृढ भावनेने जो तीन तत्त्वांतील एकत्व पाहतो तोच खऱ्या अर्थाने शिवाला जाणतो. जीवांच्या रूपाने आणि प्रपंचाच्या रूपाने आपल्या समोर शिव परब्रह्मच उभे आहे याची जाणीव होणे अत्यंत महत्त्वाचे आहे. ही भावना आपल्याला शिवसाक्षात्कारापर्यंत घेऊन जाते. ज्याला ही भावना करता येत नसेल त्याला शिवसाक्षात्कार होणे शक्य नाही. तुकडोजी महाराजांचे एक प्रसिद्ध भजन आहे–

**मनी नाही भाव, म्हणे देवा मला पाव,**
**देव अशानं भेटायचा नाही रे।**
**देव बाजारचा भाजीपाला नाही रे।।**

बाजारात जाऊन भाजीपाला खरेदी करावा तसा तुम्हाला देव सापडणार आहे का? बाजारात जाऊन तुम्हाला फार तर देवाची मूर्ती विकत घेता येईल. ती मूर्ती घरी आणून तिची देव्हाऱ्यात प्रतिष्ठापना केल्यावर तिच्यामध्ये देवत्वाची भावना करावी लागेल. भावनाबळाने भगवंत भेटले. ती बाजारात खरेदी करता येण्यासारखी वस्तू नाही. म्हणून शिव, जीव आणि प्रपंच हे तिन्ही एकच आहेत अशी दृढ भावना केली पाहिजे. वेदान्तात प्रपंच मिथ्या मानला आहे परंतु सिद्धान्तात मात्र प्रपंच शिवस्वरूप मानला आहे. प्रपंचाला मिथ्या म्हणणारे कितीतरी लोक प्रपंच सोडून गेले, परंतु प्रपंच अजून आहे तसाच आहे. म्हणून त्याला मिथ्या मानण्यापेक्षा शिवस्वरूप मानणेच अधिक योग्य होय. प्रपंच शिवस्वरूप मानला तर कोणालाही तुच्छ मानण्याची बुद्धी होत नाही. म्हणून सर्वत्र शिवभावनेने पाहावे, असे भावाचारस्थलातील प्रतिपादन आहे. तुम्हा सर्वांच्या हृदयात या शिवभावनेचा उदय होऊन तुमच्या दृष्टीपुढे शिव परब्रह्म सदोदित उभे राहावे, असा आशीर्वाद देऊन आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१५ ऑगस्ट १९९३

## ज्ञानाचारस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

तुम्ही प्रतिदिनी काशीक्षेत्राचे माहात्म्य आणि 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वरील आशीर्वचन ऐकत आहात. काशीक्षेत्राइतकेच जंगमवाटिकेचेही महत्त्व आहे. वीरशैवांसाठी हे एक देवक्षेत्र आहे आणि गुरुक्षेत्र देखील आहे. सर्व यात्रांमध्ये गुरुयात्रा ही श्रेष्ठ यात्रा होय. आपण देवदर्शनाला गेले तर तेथे दर्शन होईल, आपली श्रद्धा तेथे समर्पित करता येईल, परंतु आपल्या मनात काही शंका असतील तर त्यांचे निरसन मात्र होणार नाही. म्हणून शास्त्राने श्रीगुरूला चालता बोलता देव मानला आहे. गुरूच आपल्या मनातील शंकांचे निरसन करून आपल्याला आत्मकल्याणाची वाट दाखवत असतो. काशीच्या जंगमवाटिकेत होऊन गेलेल्या जगद्गुरूंनी समस्त मानवजातीला आत्मकल्याणाचा मार्ग दाखवून दिलेला आहे. काल तुम्ही ऐकले आहे की जगद्गुरू विश्वाराध्यांनी या ज्ञानपीठाची स्थापना केली आहे. आपले जीवितकार्य संपवण्याआधी त्यांनी आपले पट्टशिष्य श्रीमल्लिकार्जुन महास्वामीजींना पीठाधिकार दिला. त्यानंतर जगद्गुरू विश्वाराध्य विश्वेश्वर लिंगात विलीन झाले.

जगद्गुरू मल्लिकार्जुन महास्वामीजी तीनशे अकरा वर्षे पीठाधिकारी होते असे इतिहासात नमूद आहे. त्यानंतर त्यांनी संजीवन समाधी घेतली. कैलासमंटपात ज. विश्वाराध्यांच्या मूर्तीखाली त्यांची समाधी आहे. श्रद्धाळू, साधक आणि सिद्ध इत्यादी लोकांना त्यांचे दर्शन घडल्याचेही सांगण्यात येते. त्यानंतर झालेल्या अनेक जगद्गुरूंनी 'मल्लिकार्जुन महास्वामीजी' हेच नाव धारण करून कार्य केले. जवळ जवळ सत्तर जगद्गुरूंनी हेच नाव धारण केले होते. एक्कावन्नाव्या जगद्गुरूंच्या काळात काशीच्या जयनंददेव नरेशाने गाई चारण्यासाठी भूमी दान केली. त्या दानपत्रात त्या भूमीला 'जंगमपूर' असे म्हटले असून आज त्या जागेवर काशी हिंदू विश्वविद्यालय उभे आहे. अनादिकालापासून या पीठावर ज्ञानी आणि तपस्वी जगद्गुरूंची परंपरा चालत आली आहे. त्यांच्याच कृपाशीर्वादाने आज देखील या ज्ञानपीठाद्वारे धर्मप्रसार-प्रचार कार्य अखंड चालू आहे. अशा ज्ञानपीठातील या ज्ञानमंदिरात तुम्ही एक महिन्यापासून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर आशीर्वचने ऐकत आहात. लिंग-षट्स्थलंतर्गत माहेश्वरस्थलातील 'ज्ञानाचारस्थल' या अंतिम स्थलाचा आज विचार करायचा आहे.

ज्याप्रमाणे मनुष्याला क्रिया करावी लागते, भावना करावी लागते त्याचप्रमाणे त्याला ज्ञानदेखील संपादन करावे लागते. या आधी धर्माचाराविषयी आणि भावाचाराविषयी आपण विचार केला आहे. आज ज्ञानाचारासंबंधी बोलायचे आहे. भावाचारसंपन्न अशा शिवयोग्याचा ज्ञानयुक्त आचरच इतरांसाठी ज्ञानाचार ठरतो.

**शिवाद्वैतपरं ज्ञानं ज्ञानमित्युच्यते बुधैः।**
**सिद्धेन वाप्यसिद्धेन फलं ज्ञानान्तरेण किम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १६.७७)

प्रत्येक जीवात्म्याला काही ना काही ज्ञान असतेच. परंतु ज्या ज्ञानामुळे केवळ पोट भरता येते त्याला 'ज्ञान' म्हटले जात नाही. ज्या ज्ञानामुळे जीवात्मा संसारपाशातून मुक्त होतो ते खरे ज्ञान होय. मनुष्याला सांसारिक ज्ञान भरपूर आहे. तरी देखील त्याला कसे खावे, किती खावे, कसे बसावे हे शिकावेच लागते. माणसाला खाता येते,

परंतु कसे खावे हे मात्र माहीत नसते. माणसाला जे ज्ञान असते तेवढ्याने त्याच्या जीवनाला पूर्णत्व लाभत नाही. आपला जन्म होतो, आपण शिकतो, काही ग्रंथ वाचतो. त्यामुळे उपजीविकेचे साधन मिळते. परंतु तेवढे पुरेसे नाही. जे संपादन केल्यावर आपल्याला कृतकृत्यता वाटेल असे ज्ञान प्राप्त करून घ्यायला हवे. जीव आणि शिव यांच्यातील ऐक्याचे ज्ञान हेच खरे ज्ञान होय. परंतु सामान्य माणसांजवळ मात्र जीव वेगळा आणि शिव वेगळा असे भेदज्ञान असते. भेदज्ञानामुळेच तर जीवात्म्याला जन्मजन्मांतरातून प्रवास करावा लागतो. जन्ममरणरूपी संसारातून मुक्त होण्यासाठी अद्वैतज्ञानाची आवश्यकता असते. त्याच अद्वैतज्ञानाला येथे 'शिवाद्वैतज्ञान' अशी संज्ञा दिली आहे. हे दोन शिवांचे अद्वैत आहे. ज्याला आपण 'जीव' म्हणतो तो जीव नसून शिवच आहे. आद्य शंकराचार्यांना कुणी एकाने विचारले,

''आपण मोठमोठे जाडजूड ग्रंथ लिहिले आहेत, परंतु ते वाचायला आम्हाला वेळ नाही. म्हणून त्यांचे सार फक्त एका श्लोकात सांगा.''

शंकराचार्य हसून म्हणाले, ''एका श्लोकात तरी कशाला? अर्ध्या श्लोकातच सांगतो-

**श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथ कोटिभि:।**
**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापर:।।**

केवळ अर्ध्या श्लोकात श्रीशंकराचार्यांनी आपल्या ग्रंथाचे सार सांगितले आहे- ब्रह्म सत्य आहे, जग मिथ्या आहे आणि जीव ब्रह्म आहे. जीव स्वत:ला जीव म्हणवतो, परंतु वस्तुत: तो जीव नसून शिवच आहे. जीवावस्थेत देखील तो शिवाचाच अंश असतो. जीव हा शिव आणि शिव तर शिवच आहे. अशा दोन्ही शिवांचे जे अद्वैत तेच शिवाद्वैत. जीवाने शिवत्व प्राप्त करून घेतल्यावरच त्याला शिवाशी समरस होता येते. पाण्यात पाणी, दुधात दूध एकरूप व्हावे त्याप्रमाणे. जो शिव बाह्य जगतात आहे तोच आपल्या आत्मरूपात देखील आहे. हे ज्ञान ज्याला होते तोच शिवज्ञानी होय. हे ज्ञान सोडून अन्य ज्या कशाला ज्ञान असे म्हटले जाते ते ज्ञान नसून अज्ञान आहे. तुम्हाला गणिताचे ज्ञान नसले, विज्ञानाचे ज्ञान नसले आणि जगातील विभिन्न भाषांचे ज्ञान नसले तरी एक शिवाद्वैत ज्ञान असले तरी ते पुरेसे आहे आणि जर तुम्हाला शिवाद्वैतज्ञान नसेल आणि इतर सारे ज्ञान असले तरी ते काही उपयोगाचे नाही. 'एक विज्ञानेन सर्व विज्ञानम्।' एकाला जाणल्याने सर्व ज्ञान होते अशी वस्तू परब्रह्म हीच होय. एका शिवाला जाणले म्हणजे सर्व प्रपंचाला जाणले असे होते. जगातल्या सर्व पदार्थांचे ज्ञान एका माणसाला होणे शक्य नाही, ते अवघड आहे. परंतु एका परमात्म्याला जाणणे मात्र सोपे आहे. परंतु माणसाला तेच अवघड वाटते. जगातले अन्य ज्ञान प्राप्त झाले नाही तरी चालेल. परंतु एक शिवाद्वैतज्ञान मात्र प्राप्त करून घेणे महत्त्वाचे आहे.

**निर्मलं हि शिवज्ञानं नि:श्रेयसकरं परम्।**
**रागद्वेषादिकलुषं भूय: संसृतिकारणम्।।१६.७८।।**

सांसारिक ज्ञानापेक्षा शिवाद्वैतज्ञान अधिक महत्त्वाचे का आहे? तर ते निर्मल होय. शिव अत्यंत पवित्र आहे. म्हणून त्याचे ज्ञान देखील तेवढेच पवित्र आहे. ज्ञानाचे पावित्र्य आणि निर्मलता त्याच्या विषयावर अवलंबून असते. शरीर अपवित्र मानले जाते. शरीरातून आत्मा निघून गेल्यावर शरीराला 'प्रेत' म्हणतात. प्रेताला स्पर्श केल्यावर मनुष्य स्नान करून शुद्ध होतो. परंतु जिवंत माणसाला स्पर्श केल्यावर मात्र कोणी स्नान करीत नाही.

कारण शरीर जोपर्यंत पवित्र आत्म्याच्या सान्निध्यात असते तोपर्यंत पवित्र असते. पवित्र आत्म्याचा संपर्क तुटला की शरीर अपवित्र होते.

शिवाद्वैतज्ञान हे अत्यंत पवित्र आहे, निर्दोष आहे. प्रयत्नपूर्वक हे ज्ञान का प्राप्त करून घ्यावे ? कारण त्यामुळे सर्वश्रेष्ठ वस्तूचा लाभ होतो. एक प्रेय असते तर दुसरे श्रेय असते. प्रपंचातील सर्व भोग्य वस्तू म्हणजे प्रेय होत, कारण त्या प्रिय वाटतात. परंतु त्या श्रेयस्कर नव्हेत. जिच्यामुळे जन्म-मृत्यूच्या चक्रातून जीवात्म्याची सुटका होते ती मुक्ती म्हणजे नि:श्रेयस होय. मुक्तीचा लाभ केवळ शिवज्ञानामुळेच होईल. अन्य कोणत्याही ज्ञानामुळे नव्हे. शिवाद्वैतज्ञानाशिवाय अन्य जे काही ज्ञान आहे ते राग-द्वेषयुक्त आहे. त्यामुळे जीवात्म्याला संसारचक्रात भ्रमावे लागते. शिवाद्वैतज्ञानी पुरुषाजवळ राग-द्वेष नसतो. राग-द्वेष करण्यासाठी भेदबुद्धी हवी, अनुकूल-प्रतिकूल ज्ञान हवे. आधी भेदबुद्धी, मग अनुकूल-प्रतिकूल ज्ञान, मग अनुकूल व्यक्तीविषयी राग आणि प्रतिकूल व्यक्तीविषयी द्वेष उत्पन्न होईल. भेदज्ञान राग-द्वेषाचे कारण होय. भेदज्ञानाला अज्ञान कारण होय. शिवाद्वैत भक्तीने ज्याचे अज्ञान नष्ट झाले आहे त्याच्याजवळ भेदज्ञान नसते. अज्ञान नाही म्हणून भेदज्ञान नाही, भेदज्ञान नाही म्हणून अनुकूल-प्रतिकूल ज्ञान नाही, अनुकूल-प्रतिकूल ज्ञान नाही म्हणून राग-द्वेष नाही आणि राग-द्वेष नाहीत म्हणून जन्म-मरण नाही. शिवाद्वैतज्ञानामुळे सारे भेद मावळून जातात. हे ज्ञान नि:श्रेयस प्राप्त करून देणारे आहे, म्हणून शिवाद्वैत ज्ञान प्राप्त करण्यासारखे आहे.

**परिपूर्णं महाज्ञानं परतत्त्वप्रकाशकम्।**
**अवलम्ब्य प्रवृत्तो यो ज्ञानाचार: स उच्यते।।१६.७९।।**

परतत्त्व हे सर्वश्रेष्ठ तत्त्व होय. वीरशैवसिद्धान्तात सर्व प्रपंचाला तत्त्वात्मक मानले आहे. पृथ्वीपासून ते शिवापर्यंत छत्तीस तत्त्वे सांगितली आहेत. छत्तीस तत्त्वांमधील उत्कृष्ट तत्त्व 'शिवतत्त्व' असून ते महाज्ञानाने प्राप्त होते. शिवतत्त्व हे परिपूर्ण आहे. प्रपंचातील अन्य वस्तू मात्र अपूर्ण आहेत. कालपरिच्छेद, वस्तुपरिच्छेद, देशपरिच्छेद इत्यादींनी त्या परिच्छिन्न झालेल्या आहेत. इथे आहे तर तिथे नाही. या काळात आहे तर त्या काळात नाही. तुम्ही घर सोडून इथे आलात म्हणून तुमचे अस्तित्व घरात नाही. इथून तुम्ही घरी जाल तेव्हा तुमचे इथले अस्तित्व नष्ट होईल. या काळात आपण आहोत, भावी काळात आपण नसू. दोन वस्तू परस्परभिन्न असतात. त्या एक नसतात. अशा प्रकारे देशपरिच्छेद, कालपरिच्छेद आणि वस्तुपरिच्छेद यांच्यामुळे प्रपंचातील प्रत्येक वस्तू अपूर्ण आहे. कुठलीही सांसारिक वस्तू पूर्ण ब्रह्मांडाला व्यापून राहू शकत नाही. परंतु परमात्मा ही एकच वस्तू अशी आहे की जी परिपूर्ण आहे. तो एक आहे, तो इथे तिथे सर्वत्र आहे. तो मागील काळात होता, या काळात आहे, पुढील काळातही असणार आहे.

परमात्म्याचे स्वरूप सांगण्यासाठी आकाशाची उपमा दिली जाते. आकाश काशीत आहे, तसेच तुमच्या गावात, सर्वत्र आहे. ते सर्वत्र समान आहे. त्याच्यात कोणताही भेद नाही. हवेत फरक असतो, पाण्यात फरक असतो, पृथ्वीत फरक असतो. माणूस दुसऱ्या गावाला गेला तर त्याची प्रकृती बिघडते. त्याबद्दल त्याला विचारल्यावर तो सांगतो की, 'जरा हवा पाण्यात बदला झाला म्हणून प्रकृती बिघडली.' परंतु आकाशात मात्र कोणताही बदल होत नाही. म्हणून परमात्म्याचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी आकाशाचेच उदाहरण दिले जाते. आकाश सर्वत्र आहे, पूर्ण आहे. परमात्मा तर आकाशाचा आकाश आहे. साऱ्या ब्रह्मांडाला अवकाश देणाऱ्या

आकाशाला परमात्मा अवकाश देतो. म्हणून परमात्मा परिपूर्ण मानला जातो. तो सर्व काळांत, सर्व वस्तूंत आणि सर्वत्र व्याप्त आहे. म्हणून त्याचे ज्ञानदेखील परिपूर्ण आहे. अशा परमात्म्याचे ज्ञान प्राप्त करणे हे जीवात्म्याचे लक्ष्य होय. त्याच्या स्वरूपाविषयी पुढे सांगतात–

**निर्विकल्पे परे धाम्नि निष्कले शिवनामनि।**
**ज्ञानेन योजयेत् सर्वं ज्ञानाचारी प्रकीर्तितः।।१६.८०।।**

सर्व परमात्मस्वरूप आहे असे मानले तरी आपल्याला प्रत्येक वस्तू भिन्न दिसत असते. मग यासाठी काय करावे? त्यासाठी परमात्मदृष्टी मिळवावी लागेल. परमात्मा निर्विकल्प आणि निष्कल आहे. वस्तूचे नाम-रूप वगळून तिच्यातील अस्ति–भाति–प्रिय यांचा अनुभव घ्यावा लागतो. यालाच सत्–चित्–आनंद असेही म्हणतात. प्रत्येक वस्तूच्या बाबतीत 'ही वस्तू अस्तित्वात आहे, ती दिसते आणि ती मला हवी' अशी मनुष्याची भावना असते. परमात्म्याच्या अस्तित्वामुळेच प्रपंचातील वस्तूला अस्तित्व असते. त्याच्यामुळेच ती प्रकाशित होते आणि त्याच्या ठायी असलेला आनंदच वस्तूंत प्रतीत होत असतो.

**यद्भासा भासते विश्वं यत्सुखेनानुमोदते।।१.४।।**

परमात्म्याच्या प्रकाशानेच विश्व प्रकाशित होत आहे आणि त्याच्या ठायी असलेल्या सुखामुळेच जग सुखी होत आहे, हे ज्ञान जेव्हा तुम्हाला होईल तेव्हा सर्व प्रपंच निर्विकल्प, निष्कल अशा शिवरूपात दिसू लागेल. परंतु त्यासाठी शिवभावना दृढ करण्याचा अभ्यास करायला हवा. श्रवण, मनन, निदिध्यास करून जो साधना करतो त्याची दृष्टी हळूहळू अंतर्मुख होऊ लागते. मग त्याला सर्व प्रपंच शिवमय दिसू लागतो. तुमची दृष्टी जर बहिर्मुख असेल तर तुम्हाला तुमच्या हृदयातला शिवदेखील दिसणार नाही.

**ज्ञानं मुक्तिप्रदं प्राप्य गुरुदृष्टिप्रसादतः।**
**कः कुर्यात् कर्मकार्पण्ये वांछा संसारवर्धने।।१६.८१।।**

ज्ञानप्राप्तीसाठी जशी परिश्रमाची गरज असते तशीच गुरूच्या कृपादृष्टीची आवश्यकता असते. गुरुकृपा नसताना कितीही अभ्यास केला तरी नीट आकलन होत नाही. गुरूवर नितांत श्रद्धा ठेवून, त्यांच्याकडून श्रवण करून, जो साधना करतो त्यालाच मुक्तिप्रद ज्ञान लाभते. अशा ज्ञानी पुरुषाकडून ज्यांच्यामुळे पुनर्जन्म मिळतो अशी कर्मे घडत नाहीत. त्याची कर्मे ज्ञानमय असतात. ज्ञानरूपी सामग्रीने ज्ञानरूप अशा परमात्म्याची तो सदैव पूजा करीत असतो.

**कर्म ज्ञानाग्निना दग्धं न प्ररोहेत् कथंचन।**
**यदाहुः संसृतेर्मूलं प्रवाहानुगतं बुधाः।।१६.८२।।**

ज्याला गुरुकृपेने आणि परिश्रमाने ज्ञान लाभते त्याची सारी कर्मे दग्ध होतात. ज्ञानाग्नीत मोठे सामर्थ्य असते. माणूस जन्माला येतानाच आपल्या मनात जन्मजन्मांतरातील संचितकर्म घेऊन येतो. ते भोगता भोगता नवीन कर्मे करून संचितकर्मात पुन्हा भर घालत राहतो आणि पुढल्या जन्माची शिदोरी बांधून घेतो. म्हणून कर्माची गती अत्यंत गहन आहे असे म्हटले जाते. आपल्या हातून कोणते कर्म घडले आहे, ते कधी पक्व होईल आणि त्यांच्यामुळे आपल्याला कोणता जन्म मिळेल, हे जाणून घेणे अत्यंत कठीण आहे. म्हणून कर्माला जाणण्याऐवजी ते जाळणे हे अधिक महत्त्वपूर्ण मानले जाते. सर्व कर्मांना जाळणारे एकमेव ब्रह्मास्त्र म्हणजे ज्ञानाग्नी. एखादे बी

भाजले आणि नंतर ते पेरले तर उगवत नाही, हे आपण व्यवहारात पाहतो. त्याप्रमाणे ज्याच्या हृदयात ज्ञानाग्नी प्रकट होतो त्याच्या मनातले संचित संस्कार, वासना आणि कर्म हे सारे जळून जाते. त्यानंतर त्याला पुनर्जन्म मिळत नाही. असंख्य जन्मे देणारा जो कर्मसाठा आपल्या आत आहे तो कितीही कर्मे केली तरी नष्ट होत नाही. ज्ञानाग्नीने मात्र सर्व संचित कर्मे दग्ध होतात. संचित कर्मे दग्ध झाल्यावर ज्ञानी पुरुषाकडून नवा कर्मसंचय होत नाही. त्याच्याकडून कर्मे घडली तरी त्या कर्मात कर्तृत्वभाव नसल्यामुळे त्याची फळे त्याला भोगावी लागत नाहीत. मग शेवटी उरते ते प्रारब्धकर्म. ते मात्र भोगल्याशिवाय संपत नाही. ते ज्ञानी आणि अज्ञानी दोघांनाही भोगावे लागते. प्रारब्धकर्म भोगता भोगता जर मृत्यू आला तर उर्वरित प्रारब्ध भोगण्यासाठी पुन्हा जन्म घ्यावा लागतो. ज्ञानी पुरुषांचे विदेहावस्थेतील अवतार म्हणजे अवशिष्ट प्रारब्धकर्म भोगण्यासाठी घेतलेले जन्मच होत. याप्रमाणे ज्ञान झाल्यानंतर संचितकर्मे जळून जातात. नव्या कर्मांचा संचय होत नाही आणि प्रारब्धकर्मे भोगून ज्ञानी पुरुष मुक्त होतो. त्यानंतर त्याचे पुन्हा गर्भवासाचे संकट टळते.

**ज्ञानेन हीनः पुरुषः कर्मणा बद्ध्यते सदा।**
**ज्ञानिनः कर्मसंकल्पा भवन्ति किल निष्फलाः।।१६.८३।।**

'मी करतो' अशा भावनेने जो कर्म करतो म्हणजे ज्याच्या मनात कर्माबद्दल अहंभाव असतो असा अज्ञानी मनुष्यच कर्मबंधनात सापडतो. परंतु ज्ञानी पुरुषांच्या कर्मात कर्तृत्वभावना नसल्याने त्यांना कर्मे बांधून ठेवू शकत नाहीत. शेवटी ज्ञानाचारस्थलाचा समारोप करताना ज. रेणुकाचार्य म्हणतात–

**शुद्धाचारे शुद्धभावो विवेकी**
**ज्योतिः पश्यन् सर्वतश्चैवमेकम्।**
**ज्ञानध्वस्तप्राकृतात्मप्रपंचो**
**जीवन्मुक्तश्चेष्टते दिव्ययोगी।।१६.८४।।**

शुद्ध आचार, शुद्ध भाव आणि शुद्ध ज्ञान यांचा समन्वय येथे सांगितला आहे. विहित कर्म करणे हा शुद्ध आचार होय. कर्म करताना अहंभाव न ठेवता हे शिवकृपेसाठी करीत आहोत अशी शिवभावना ठेवणे ही शुद्ध भावना होय. शरीर, मन आणि बुद्धी यांच्या पलीकडे असलेले आत्मरूप म्हणजे आपण आहोत हे शुद्ध ज्ञान होय. शरीरातून चैतन्य बाहेर प्रकटलेले पाहून काही लोकांनी शरीरालाच आत्मा मानले. काही लोकांनी इंद्रियालाच आत्मा मानला. त्यानंतर काही लोकांनी इंद्रियांचे संचलन करणाऱ्या मनाला आत्मा मानले. त्यापुढे काही लोकांनी मनाला प्रेरणा देणारी बुद्धी हीच आत्मा होय असे मानले. परंतु त्यापुढे विवेकी पुरुषांनी शोध घेतला आणि त्यांना बुद्धी पलीकडच्या स्वतंत्र, स्वयंभू आत्म्याचा शोध लागला. आत्मा हेच परतत्त्व आहे हे त्यांना जाणवले.

**इंद्रियाणि परान्याहुः इंद्रियेभ्यः परं मनः।**
**मनसस्तु परा बुद्धि या बुद्धे परतस्तु सः।।**

असे गीतेत म्हटले आहे. मनुष्याने अंतर्मुख कसे व्हावे हेच जणू इथे सांगितले आहे. मनुष्याला सर्वप्रथम आपले शरीर दिसते. शरीर हेच सर्वस्व आहे असे त्याला वाटते. परंतु विचार केल्यावर त्याला जाणवते की ज्याला आपण शरीर म्हणतो ते म्हणजे इंद्रियांचा समूह होय. इंद्रिये वेगळी काढली तर शरीराला अस्तित्वच राहत नाही.

म्हणजे त्याची दृष्टी थोडी शरीरापलीकडे गेली. मग पुढे त्याला समजते की इंद्रिये स्वतंत्र नाहीत. त्यांच्याद्वारे मन कार्यरत असते. मन जागेवर नसेल तर डोळ्यांनी पाहूनही त्यांना काही दिसत नाही, कानांनी ऐकूनही त्यांना काही ऐकू येत नाही. ज्या इंद्रियांच्या व्यवहारात मन नसते त्या इंद्रियाकडून काहीही घडले तरी त्याचा आपल्याला पत्ता लागत नाही. म्हणून विवेकी मनुष्य इंद्रियांच्या अध्यक्षाला म्हणजे मनाला आत्मा मानू लागतो. मन हे चंचल आहे ते कधी स्थिर राहात नाही. परंतु त्याच्या पलीकडची बुद्धी स्थिर दिसते. म्हणून विवेकी मनुष्य मनालाच आत्मा मानू लागतो. परंतु बुद्धी जड असून ती सुषुप्ति-अवस्थेत विलीन होते हे त्याच्या लक्षात येते. कितीही बुद्धिवादी मनुष्य असला तरी गाढ निद्रेत त्याची बुद्धी जागी राहात नाही, त्याची अवस्था अजाण बालकासारखी असते आणि नंतर त्याला कळते की ज्याच्यामुळे बुद्धी प्रकाशित होते असे स्वयंभू, स्वतंत्र चैतन्य पलीकडे आहे, तेच आत्मा होय.

याप्रमाणे शुद्ध आचार, शुद्ध भावना आणि शुद्ध ज्ञान यांच्या साहाय्याने जो मनुष्य आपल्या हृदयातील अंतर्ज्योतीचा साक्षात्कार करून घेतो त्याला कोणतीही कर्मे बांधून ठेवू शकत नाहीत. तो जीवनमुक्त अवस्थेत विचरण करीत असतो. बाह्यदृष्टीने पाहिले तर तो जीवन जगत असतो आणि अंतर्दृष्टीने पाहिले तर तो जीवन्मुक्त असतो. याप्रमाणे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील ज्ञानाचारस्थलात ज्ञानाचे आणि ज्ञानी पुरुषाचे माहात्म्य वर्णिले आहे. तुम्ही सर्वजण शुद्ध आचार, शुद्ध भावना आणि शुद्ध ज्ञान यांच्या साहाय्याने, सद्गुरुकृपेने शिवाद्वैतज्ञान संपादन करावे आणि जीवन्मुक्त व्हावे, अशी शुभकामना व्यक्त करून ज्ञानाचारस्थलावरील हे आशीर्वचन आणि लिंग-षट्स्थलातील माहेश्वरस्थलावरील आशीर्वचने पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१६ ऑगस्ट १९९३



# भाग ९ : लिंग–षट्स्थलांतर्गत प्रसादिस्थल

आशीर्वचन पहिले

## कायानुग्रहस्थल–१

विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।
विश्ववंद्यं सदा वंदे विश्वाराध्यं जगद्गुरुम्।।

श्रीकाशीसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यापर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे तिला अनंत प्रणिपात समर्पित करून पवित्र आषाढमासानिमित्त सोलापूरच्या शिवानुभव मंगल भवनात आयोजित केलेल्या या धर्मसभेत उपस्थित असलेले शिवाचार्य, योगीनाथ भक्त मंडळाचे सदस्य, भवनाचे विश्वस्त, जिज्ञासू सद्भक्तांनो आणि मातांनो,

सोलापूर शहरात या पवित्र आषाढ महिन्यात एक शिवयोग ध्यान शिबीर आयोजित केले आहे. त्याचबरोबर शिवयोग्याची शारीरिक आणि मानसिक स्थिती कशी असते याचे निरूपण करणाऱ्या 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील लिंग-षट्स्थलातल्या प्रसादिस्थलावर आशीर्वचने ऐकण्याचा सुयोग देखील प्राप्त झाला आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त सतराव्या परिच्छेदात या स्थलाचा विचार केलेला आहे. ईश्वर जसा भक्तावर अनुग्रह करतो तसाच शिवयोगी देखील लोकांवर अनुग्रह करतो. अशा शिवयोग्याची शारीरिक आणि मानसिक अवस्था कशी असते? तो कसा योगसंपन्न असतो? या विषयावर आजपासून आशीर्वचनाला प्रारंभ होत आहे. वीरशैवसिद्धान्तातील भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणिलिंगी, शरण आणि ऐक्य या षट्स्थलांची तुम्हा सर्वांना माहिती आहेच. जेव्हा साधक भक्त आदी स्थलांतून ऐक्यस्थलात पोहोचतो तेव्हा तो भगवान शिवाशी एकरूप होतो. शिवध्यान करता करता तो स्वत: शिवरूपच होतो.

व्यावहारिक जगातला तुम्हाला अनुभव आहे. मनुष्य व्यवहारात इतका व्यस्त आणि मस्त होतो की, त्याला कशाचीच शुद्ध राहात नाही. व्यवहाराची मस्ती चढल्यामुळे त्याला भूक लागत नाही की तहान. घरी जाण्याची आठवणदेखील त्याला होत नाही. त्याला वाटते की, आणखी व्यापार करावा, आणखी संपत्ती मिळवावी. धनासारख्या सामान्य वस्तूमुळे माणसाची अशी अवस्था होते. धनाबद्दल म्हटले आहे–

धनानां अर्जने दुःखं अर्जिता नां च रक्षणे।
आये दुःखं व्यये दुःखं धिगर्था: कष्टसंश्रया:।।

धन संपादन करण्यासाठी मनुष्याला मोठे कष्ट करावे लागतात. धन संपादन केल्यावर त्याचे कष्टाने रक्षण करावे लागते. धन मिळवताना माणसाला कष्ट होतात आणि ते खर्च करताना मनुष्याला त्रास होतो. अशा सर्वप्रकारे दुःख देणाऱ्या धनाच्या अर्जनात जर तहानभूक विसरून मनुष्य मग्न होतो तर सदोदित सुख देणाऱ्या शिवध्यानरूपी धनाच्या अर्जनात शिवयोगी किती मग्न होत असेल? ज्ञानप्राप्ती झाल्यानंतर शिवयोगी जेव्हा मुक्त होतो तेव्हा

त्याचे वर्तन कसे असते? याविषयी या आधी भक्तस्थलांवरील आणि माहेश्वरस्थलांवरील आशीर्वचनात आपण विचार केला आहे. आजपासून ज्ञानोत्तर प्रसादिस्थलांवरील आशीर्वचने तुम्ही ऐकणार आहात.

येथे जगद्गुरू रेणुकाचार्य वक्ता आहेत तर अगस्त्य श्रोता आहेत. वक्ता आणि श्रोता दोघेही असाधारण आहेत. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ऐकताना जर आपली भावना महर्षी अगस्त्यांसारखी असेल तरच आपल्याला पूर्ण ज्ञान होईल. अगस्त्य विचारतात–

**स्थलानि तानि चोक्तानि यानि माहेश्वरस्थले।**
**वदस्व स्थलभेदं मे प्रसादिस्थलसंश्रितम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.१)

'हे आचार्य, आपण माहेश्वरस्थलातील अवांतरस्थले मला समजावून सांगितली, आता प्रसादीस्थल आणि त्याची अवांतरस्थले कोणती आहेत ते मला सांगा.' अगस्त्यांचा प्रश्न ऐकून जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणाले की, प्रसादिस्थलाचे नऊ भेद आहेत. कायानुग्रहस्थल, इंद्रियानुग्रहस्थल, प्राणानुग्रहस्थल, कायार्पितस्थल, करणार्पितस्थल, भावर्पितस्थल, शिष्यस्थल, शुश्रूषस्थल आणि सेव्यस्थल. पहिले स्थल आहे कायानुग्रहस्थल. या स्थलाचे लक्षण सांगतात–

**अनुगृह्णाति यल्लोकान् स्वकायं दर्शयन्नसौ।**
**तस्मादेष समाख्यातः कायानुग्रहनामकः।।१७.५।।**

आपल्या शरीराच्या द्वारा शिवयोगी लोकांवर अनुग्रह करतो. म्हणून त्याला 'कायानुग्राहक' असे म्हटले जाते. लोकांवर कोण अनुग्रह करू शकतो? ज्याच्याजवळ देण्यासारखे खूप असते तोच इतरांना काही देऊ शकतो. ज्याच्यजवळ भरपूर धन असते तो त्यातले थोडे धन दान करीत असतो. आपल्या सांसारिक गरजा भागवल्यानंतर जे धन शिल्लक राहते ते मनुष्य दान करतो. त्याप्रमाणे आशीर्वाद देणाऱ्याजवळ अनुग्रहशक्ती असावी लागते. अनुग्रह करणाऱ्या योग्याच्या शारीरिक अवस्थेबद्दल कैवल्योपनिषदात असे वर्णन आलेले आहे–

**सुखासनस्थः शुचिः समग्रीवशिरश्शरीरः।**
**अत्याश्रमस्थाः सकलेद्रिंयाणि निरुद्ध्य।।**

अनुग्रह करणारा योगी 'सुखासनस्थ' असतो. योगशास्त्रांत आसनाला विशेष महत्त्व आहे. जोपर्यंत मनुष्याला नीट बसता येत नाही तोपर्यंत त्याला ध्यान करता येत नाही किंवा लौकिक व्यवहार देखील करता येत नाही. शिवयोगी एकाच आसनावर बराच वेळ बसलेला असतो. यासाठी आसनसिद्धीची आवश्यकता असते. आपण हातपाय ताणून, मांडी बदलून सारखी हालचाल करीत असतो. आपले आसन स्थिर नसते. जोपर्यंत आसनात स्थैर्य येत नाही तोपर्यंत मन स्थिर होत नाही. शरीराच्या स्थैर्यावर मानसिक स्थैर्य अवलंबून असते. आसन स्थिर असावे आणि सुखप्रदही असावे. पद्मासन, सिद्धासन अथवा कुठल्याही आसनावर तुम्ही बसलात तर प्रथम तुमचे पाय दुखू लागतात. कारण त्या आसनावर बसण्याचा तुम्हाला अभ्यास नसतो. आसनावर बराच वेळ बसल्यानंतर जेव्हा तुम्हाला कोणताही त्रास होत नाही तेव्हा ते आसन सुखासन होते. शरीराला एखाद्या ठिकाणी पीडा होत असेल तर आपले मन त्या ठिकाणी पोहोचते. तेथल्या वेदनेचाच विचार करू लागते, दुसरा विचार करू शकत नाही. म्हणून ज्याचे शरीर स्वस्थ आहे असा मनुष्यच योगसाधना करू शकतो, असे योगशास्त्रात म्हटले आहे.

जो स्वस्थ असतो तोच शरीराला विसरू शकतो. जो स्वस्थ नसतो तो शरीराला मुळीच विसरू शकत नाही. जेव्हा दाढा दुखू लागतात तेव्हा मनुष्याचे लक्ष चोवीस तास दाढांकडेच असते आणि जेव्हा कान दुखू लागतात तेव्हा कानाकडे. शरीराच्या ज्या भागाकडे आपले सारखे लक्ष जाते तेव्हा तिथे निश्चित काहीतरी विकृती असतेच. शरीराच्या ज्या भागाचे वारंवार स्मरण होत नाही तेव्हा तो भाग स्वस्थ असतो. तुम्ही डॉक्टरकडे जाण्याआधी तुमचे शरीरच तुम्हाला कुठे दुःख आहे ते सांगत असते. म्हणून आपले शरीर हे एक डॉक्टरच होय. शिवयोगी सुखासनस्थ असतो याचा अर्थ, त्याने आसन सिद्ध केलेले असते, हा आहे. आसनावर बसल्यामुळे त्याला कोणताही शारीरिक त्रास होत नसतो.

यानंतर त्याचे लक्षण सांगितले आहे- 'शूचि:' केवळ कित्येक तास एका आसनावर बसता येते म्हणून काही कोणी योगी होत नाही. तसे असते तर पृथ्वीवरचे दगड-धोंडे आणि वनस्पती योगी ठरल्या असत्या. कारण ते कित्येक तासच नव्हे तर जिवंत असेपर्यंत किंवा कोणी हालवे पर्यंत त्याच ठिकाणी बसलेले असतात. हे शिवानुभव मंगलभवन निर्माण झाल्यापासून आहे तसेच आहे. ते थोडेसे इकडे तिकडे सरकले काय? नाही. मग आपण या भवनाला योगी म्हणू शकतो? नाही म्हणू शकत. म्हणून एके ठिकाणी स्थिर बसता येत असल्यामुळे कोणी योगी ठरत नाही. आसनसिद्धीबरोबरच त्याच्या ठिकाणी पावित्र्य असले पाहिजे. शुचि म्हणजे 'पावित्र्य' शारीरिक, वाचिक आणि मानसिक असे पावित्र्य त्रिविध असते. शरीर, वाणी आणि मन ही तीन साधने आपल्याला परमेश्वराने दिली आहेत. ही तिन्ही साधने पवित्र ठेवायला हवीत.

शरीर शुद्ध कसे ठेवावे? आपल्या आहारामुळे आपले शरीर बनत असते. तुम्ही जसे अन्न सेवन करता तसे तुमचे शरीर बनते. शिवयोग्याचा आहार अत्यंत पवित्र आणि सात्त्विक असतो. म्हणून त्याचे शरीर पवित्र असते. त्याची वाणी शुद्ध असते. तो ज्या साहित्याचा अभ्यास करतो ते पवित्र असते आणि तो वाणीने ज्या शब्दाचा उच्चार करतो ते शब्ददेखील पवित्र असतात. अध्यात्म, परमात्मा, आत्मा, नीती आदी विषयांवर तो निरंतर बोलत असतो. म्हणून त्याची वाणी शुद्ध असते. संतांच्या आणि महापुरुषांच्या वाणीला आपण 'अमृतवाणी' असे म्हणतो. जी वाणी श्रवण केल्यावर आपल्या मनात प्रसन्नता दरवळत राहते आणि आपल्याला अमृतत्वाची ओढ लागते ती अमृतवाणी होय. आपण घरात देखील बोलत असतो. परंतु त्याचा परिणाम काय होतो? एकाचे बोलणे ऐकून दुसऱ्याला राग येतो तर दुसऱ्याचे बोलणे ऐकून तिसरा जळफळत राहतो. माय-बापांत, बाप-लेकांत, भावा-भावांत सारखी भांडणे चालू असतात. आपल्या सर्वांना एकत्र राहायचे आहे, हे माहीत असूनदेखील त्यांच्यात कुरबुरी सुरू असतात. दुसऱ्याला प्रक्षुब्ध करणाऱ्या शब्दांचाच आपल्या घरात प्रयोग होत असतो. म्हणून बऱ्याच वेळा आपले घर भोगभूमी न राहता रणभूमी बनलेली असते. परंतु ती योगभूमी कधीच नसते. वाणीवर नियंत्रण ठेवून गोड शब्दांचा प्रयोग केला तरच आपले घर योगभूमी होऊ शकते. योग्याच्या मुखातून कोणाला अपमानित करणारे अथवा क्रोध आणणारे शब्द प्रकटत नाहीत. त्यांची वाणी अमृतमय असते. म्हणून त्याची वाणी पवित्र असते.

शिवयोग्याचे मन देखील पवित्र असते. त्याच्या मनात जगत्कल्याणाचेच सतत चिंतन चाललेले असते. म्हणून त्याचे मन पवित्र असते. बऱ्याच लोकांच्या मनात दुसऱ्याचे अनिष्टचिंतन होत असते. एखाद्याला मारण्यापेक्षा किंवा शिवी देण्यापेक्षा त्याचे अकल्याण चिंतणे हे अधिक वाईट आहे. जो दुसऱ्याचे वाईट इच्छितो त्याचे प्रथम वाटोळे होते, असे शास्त्रात म्हटले आहे. योगी नेहमी प्रसन्न असतो आणि संसारी मनुष्य नेहमी अप्रसन्न असतो,

याचे कारण काय? सामान्य माणूस थोडा लाभ झाला की आनंदित होतो आणि थोडा तोटा झाला की दुःखी होतो. परंतु शिवयोगी मात्र जवळ काही असो अथवा नसो, शिवानंदात निमग्न असल्यामुळे सदैव प्रसन्न असतो. त्याच्या मनात सर्वांच्या कल्याणाचेच चिंतन चालू असते. त्यामुळे त्याचे मन पवित्र असते. ज्याचे मन पवित्र असते तो सदैव प्रसन्न असतो. अशा प्रकारे शिवयोग्याचे शरीर, वाणी आणि मन ही त्रिकरणे पवित्र असतात.

पुढले लक्षण आहे– 'समग्रीवशिरश्शरीर:' इथे सर्वजण बसलेले आहेत परंतु कोणीही डोके, मान आणि शरीर एका रेषेत ठेवून ताठ बसलेला नाही. कोणी हातपाय ताणून, कोणी गुडघे वर करून, कोणी पाठीचे पोक काढून तर कोणी दोन्ही हात मागे ठेवून बसलेला आहे. पाठीचा कणा ताठ ठेवून, डोके आणि मान सरळ रेषेत ठेवून कोणीच बसलेला नाही. म्हणून तुमच्यापैकी कोणीही 'समग्रीवशिरश्शरीर' नाही. जो ताठ बसू शकत नाही त्याला योग साधणार नाही. आपले शरीर वेडेवाकडे असेल तर शरीरात संचार करणारा प्राणवायू देखील वेडावाकडा होतो. वायू आणि पाणी यांना कोणता आकार नसतो. तुम्ही ज्या भांड्यात पाणी ओताल त्या भांड्याच्या आकाराचे पाणी होते. थाळीत ओताल तर थाळीसारखे, पेल्यात ओताल तर पेल्यासारखे, घड्यात ओताल तर घड्यासारखे, ओंजळीत घ्याल तर ओंजळीसारखे. त्याप्रमाणे आपल्या शरीरात राहणारा प्राणवायू आपल्या शरीरासारखाच वेडावाकडा आहे. जेव्हा तुमचे शरीर सरळ होईल तेव्हाच तुमच्या शरीरातला प्राणवायू सहळ होईल. प्राणवायू सरळ नसेल तर तुमचे मन सरळ असणार नाही. शरीर, प्राण आणि मन हे परस्परसंबद्ध आहेत. शरीर सरळ तर प्राणवायू सरळ आणि प्राणवायू सरळ तर मन सरळ. शरीराच्या स्थितीवर प्राणवायूची स्थिती आणि प्राणवायूच्या स्थितीवर मनाची स्थिती अवलंबून आहे.

शिवयोग ध्यान शिबिर आयोजित करण्याचा हाच एक उद्देश आहे. आम्ही तुम्हाला सांगतो की, ताठ बसा, ध्यान करा. परंतु जोपर्यंत तुम्हाला कोणी ताठ बसून दाखवत नाही तोपर्यंत तुम्हाला कसे बसावे हे कळणार नाही. श्वास घेऊन कोणी दाखवणार नाही तोपर्यंत श्वास कसा घ्यावा हे तुम्हाला कळणार नाही. कसे बसावे? तर खांबासारखे ताठ बसावे. आम्ही बऱ्याच वेळा सांगतो की, मनुष्य घर बांधताना किती काळजी घेतो. पिलर्स सरळ असावेत, भिंती सरळ असाव्या, प्लॅस्टर गुळगुळीत असावे. घराकडे आपण जेवढे लक्ष देतो तेवढे लक्ष आपण आपल्या शरीराकडे देत नाही. घर आपल्यासाठी असते, घरात राहून ज्या शरीराच्या द्वारे आपण सुखोपभोग घेतो त्या शरीराची आपण काळजी घेत नाही. योगशास्त्र तुम्हाला सांगते, –प्रथम सरळ बसा. शिर, मान आणि पाठीचा कणा एका रेषेत असणे म्हणजे सरळ बसणे होय. ज्याच्या पाठीचा कणा वाकलेला असतो त्याच्या शरीरात रोगांचे वास्तव्य असते. चालताना, बसताना शरीर ताठ असावे. जो जास्तीत जास्त काळ ताठ बसतो त्याला थकवा जाणवत नाही. जेव्हा आपले शरीर असंतुलित होते, जेव्हा त्याचे समत्व संपते तेव्हा ते थकते. शिवयोग्याला मात्र एकदम ताठ बसण्याचा अभ्यास असतो.

यापुढचे लक्षण आहे 'अत्याश्रमस्थ' ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास असे चार आश्रम भारतीय जीवनपद्धतीने मानले आहेत. जो विद्या, बल यांचा संग्रह करतो तो ब्रह्मचर्यस्थ. जो गृहात राहून संसार करतो तो गृहस्थ. गृहस्थ चोवीस तास घरात राहत नसतो. तो बाजारात जातो. दुकानावर बसतो, ऑफिसात काम करतो परंतु तो कुठेही असला तरी त्याचे मन मात्र घरातच असते, म्हणून तो गृहस्थ. वानप्रस्थ म्हणजे वनात राहणारा. आजच्या काळात वन याचा अर्थ शब्दश: घेण्याचे कारण नाही. जो सांसारिक मोह सोडून निर्मोही होतो आणि समाजाची, राष्ट्राची सेवा करतो तो वानप्रस्थ होय. प्राचीन काळी पन्नास–साठ वर्षानंतर लोक घरदार सोडून वनात

जात असत. त्यामध्ये राजे लोक सुद्धा असत. आपल्या देशाला भोगभूमी नव्हे तर योगभूमी मानले जाते. अध्यात्माची आणि योगसाधनेची जेवढी चर्चा या देशात झाली तेवढी अन्यत्र कुठेही झाली नाही. इथे घराघरांत प्रवचनकार आढळतात, गावागावांत योगसाधक सापडतात. या योगभूमीत वास्तव्य करणाऱ्यांच्या मनात पन्नास-साठ वर्षांनंतर वैराग्याचा उदय झाला पाहिजे आणि तसा तो बऱ्याच लोकांच्या मनात होतो. प्राचीन काळी राजेदेखील वनात जाऊन वानप्रस्थ, वनस्थ होत असत. आज काळ बदलला आहे. वने उरली नाहीत आणि राज्यकर्ते देखील वनात जात नाहीत. राज्यकर्ते वनात गेले तर या देशाचे भले होण्याचा संभव आहे.

वानप्रस्थ ही एक मानसिक अवस्था आहे. केवळ वनात राहिल्यामुळे कोणी वानप्रस्थ ठरत नसतो. तसे असते तर वनात जन्मणारे आणि मरणारे पशु-पक्षी देखील वानप्रस्थ ठरले असते. ज्याची घरादाराच्या मोहातून सुटका होते आणि जो जगातल्या सर्व प्राणिमात्रांवर प्रेम करण्याइतकी व्यापक भावना हृदयात बाळगतो तो वानप्रस्थ होय. घरात राहूनदेखील वनस्थ होता येते. त्यासाठी घरातून मन मात्र काढले पाहिजे. परंतु आपल्याकडून हे कधी घडते? या जन्मात तर सोडाच पण मेल्यावरदेखील आपण त्याच घरात पुन्हा पुन्हा जन्म घेतो. घरात राहून असो की वनात राहून, प्रत्येक मनुष्याने आपला आध्यात्मिक विकास करून घेण्यासाठी वानप्रस्थ झालेच पाहिजे. आपले घर भोगभूमी असेल तर घरातले देवघर योगभूमी असते. त्या ठिकाणी बसून भगवद्भजन, भगवच्चिंतन केल्याने आपल्याला अपार मानसिक बळ प्राप्त होते. या योगभूमीशी ज्याचे मन निगडित असते तो वानप्रस्थ होय.

सारे सांसारिक संबंध तोडून ज्याने केवळ भगवंताशी संबंध जोडलेला असतो तो संन्यस्त होय. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यस्त या चार आश्रमांपलीकडे आणखी एक आश्रम आहे. तो म्हणजे 'स्व-स्थ'. स्वस्थ म्हणजे स्वत:च्या ठिकाणी अर्थात् आत्म्याच्या ठिकाणी स्थिर असलेला. येथे शिवयोग्याला 'अत्याश्रमी' म्हणजे सर्व आश्रमांच्या पलीकडचा असे म्हटले आहे. ते याच अर्थाने. तो आपल्या आत्म्याच्या ठिकाणीच मग्न असतो. आत्मचिंतनाशिवाय तो दुसरे कोणत्याही वस्तूंचे चिंतन करू शकत नाही. केवळ आपल्यातच रमतो याचा अर्थ योगी स्वार्थी असतो काय? तर तसे नाही. तो साऱ्या विश्वालाच आपल्या आत्मरूपात पाहत असतो.

**शिवात्मकमिदं सर्वं शिवादन्यन्न विद्यते।**
**शिवोहऽमिति या बुद्धिस्तदेव ज्ञानमुत्तमम्॥१६.३१॥**

हा सर्व प्रपंच शिवात्मक असून शिवावाचून दुसरे काहीच अस्तित्वात नाही. मी देखील शिवरूपच आहे, अशी शिवात्मक भावना योग्याच्या ठिकाणी असते. या भावनेत जो राहतो तोच स्व-स्थ, अत्याश्रमस्थ होय. या अत्याश्रमापर्यंत जाण्यासाठी अन्य चार आश्रम साहाय्यक ठरतात. योग्याच्या मनात राग नसतो, द्वेष नसतो, जुगुप्सा नसते. जो स्वत:ला सर्वत्र पाहतो तो कोणाचा द्वेष करील? तो कोणाशी वैर धरील? जड असो की चेतन सर्व वस्तू शिवमय असून मी देखील शिवरूपच आहे, असे ज्ञान प्राप्त होऊन जो शिवात विलीन झालेला असतो, जो चार आश्रमांच्या पलीकडे गेलेला असतो, तो अत्याश्रमी असतो.

तुम्ही स्वस्थ आहात ना? असा एक प्रश्न लोक एकमेकांना विचारीत असतात. त्याचा गूढार्थ 'तुम्ही आपल्या आत्मरूपात आहात काय?' असा होतो. आपण आपल्या आत्मरूपातही नसतो आणि आपल्या ठिकाणीही नसतो. आपण दुसऱ्याच्या स्थानावर बसलो आहोत. आपले मूळस्थान विसरून गेलो आहोत. दुसऱ्याच्या स्थानालाच आपण आपले स्थान मानत आहोत. भाड्याच्या घरात राहणारा भाडेकरू जसा स्वत:ला घरमालक

समजतो त्याप्रमाणे. घरमालक भाडेकरूनला 'घर खाली करा' असे आर्जवाने म्हणतो तर भाडेकरू त्याला कोर्टात जाण्याची धमकी देतो. त्याला वाटते की आपल्या पाठीमागे सरकार आहे. सरकार तुमच्या मतावर उभे असते. म्हणून ते तुमच्या मागे उभे असते. परंतु वर जे ईश्वराचे सरकार आहे ते काही तुमच्या मतांवर निवडून येत नाही. ते स्वयंशासन आहे. ते शासन जेव्हा म्हणेल तेव्हा तुम्हाला घर खाली करावे लागेल. अर्थात् शरीर सोडून जावे लागेल. तेथे कोर्टाचा 'स्टे' आणता येत नाही. आज नाही उद्या सोडतो, अशी विनंतीही चालत नाही. 'सोडा' म्हटले की तात्काळ सोडावे लागते. म्हणून आधीपासूनच जर मनाने आपण घर सोडू शकलो तर स्वस्थ राहू शकतो.

सोडणे याचा अर्थ देहत्याग करणे असा नव्हे तर मानसिकदृष्ट्या सोडणे असा आहे. शरीरात राहून देखील शरीराचा संबंध सोडणे, घरात राहूनदेखील घराशी संबंध तोडणे, ही स्व-स्थ होण्याची कला आहे. शरीराऐवजी आत्म्याच्या ठिकाणी मन स्थिर करण्याचा अभ्यास केला तर आपण स्व-स्थ होऊ. यापुढील लक्षण आहे- 'सकलेंद्रियाणि निरुद्ध्य' पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये आणि या दशेंद्रियांचा अध्यक्ष मन अशी अकरा इंद्रिये माणसाजवळ आहेत. ही एकादश इंद्रिये होत. आता आषाढ महिना चालू आहे. आषाढी एकादशी येणार आहे. बरेच लोक पायी चालत पंढरपूरला जातात. दिंड्या पताका घेऊन हरिनामाचा गजर करीत पालख्यांसोबत लोक पंढरपूरला जातात. कशासाठी? तर आषाढी एकादशीला भगवंताचे दर्शन घेण्यासाठी. आषाढ महिन्यातील शुक्लपक्षात जो अकरावा दिवस येतो त्याला आपण 'एकादशी' म्हणतो. परंतु ही भौतिक एकादशी होय. दुसरी अंतरंग-एकादशी आहे. आपली एकादश इंद्रिये भगवंताकडे एकवटणे ही खरी एकादशी होय. पंढरपूरला ही एकादशी घडते काय? एवढ्या दुरून माणसे दर्शनासाठी येतात त्यांना देवाकडे पाहायला, त्याचे दर्शन घ्यायला किती वेळ मिळतो? एक सेकंददेखील मिळत नाही. गाभाऱ्यात गेला की ढकलला पुढे. परंतु भगवंताच्या दर्शनासाठी रांगेत उभे राहिल्यावर मात्र तेवढा काळ भगवंताचे चिंतन घडते, हे एक बरे आहे. ऊन, वारा, पाऊस न जुमानता सारे कष्ट सहन करीत वारकरी पंढरपूरला जातोच आणि आषाढी एकादशीला एक सेकंद का होईना भगवंताचे दर्शन घेऊन धन्य होतो.

ही एकादशी वर्षातून एकदाच येते. वर्षभर काहीही करा आणि वर्षात एकदाच आषाढी एकादशी करा, असे नाही. आषाढी-कार्तिकी एकादशी केल्यावर आपल्या आयुष्यात रोज एकादशी घडली पाहिजे. याचा अर्थ, रोज भोजन न करता फराळ करा, असा नाही. निव्वळ खाद्यपदार्थ बदलणे म्हणजे एकादशी करणे नव्हे. आपल्या एकादश इंद्रियांची प्रवृत्ती बदलणे, ती ईश्वराभिमुख करणे ही एकादशी होय. ज्या इंद्रियांकडून आपण केवळ सांसारिक व्यवहारच केला ती इंद्रिये ईश्वरसन्मुख करणे हा एकादशीचा खरा अर्थ आहे. पायांनी मंदिराच्या दिशेने चालावे, वाणीने भगवंताचे गुण गावे, हातांनी टाळ्या वाजवाव्यात, डोळ्यांनी त्याचे रूप पाहावे, मनाने त्याचे चिंतन करावे. अशी सर्वेंद्रिये जेव्हा भगवंताकडे एकवटतात तेव्हा आपल्याला एकादशी घडते. इंद्रियांना त्यांच्या विषयांपासून वळवून भगवंताकडे लावणे म्हणजे त्यांचा निरोध करणे होय. लोकांवर अनुग्रह करणारा शिवयोगी असाच सर्वेंद्रियांचा निरोध करत असतो. म्हणून त्याला 'सकलेंद्रियाणि निरुद्ध्य' असे म्हटले आहे. त्याने सारी इंद्रिये भगवदर्पण केलेली असतात. ज्याची एकादश इंद्रिये भगवंताचे चिंतन करीत असतात त्याला रोजच एकादशी घडत असते. रोज अशी एकादशी घडावी म्हणूनच संतांनी आपल्याला आषाढी-कार्तिकी एकादशी

करायला सांगितले आहे. एकादशीच्या दिवशी कमीत कमी आहार घ्यावा, तो सात्त्विक असावा आणि दिवसभर भगवंताचे चिंतन करावे, असा एकादशीचा नियम आहे. वर्षातून दोनदा एकादशी करून बाकीचे दिवस मोकळे सोडणे बरे नव्हे. दिवसातील चोवीस तासांत निदान एक तास तरी एकादशी करावी. ते शक्य नसेल तर अर्धा तास करावी. तेही शक्य नसेल तर किमान पंधरा, दहा किंवा पाच मिनिटे तरी अवश्य करावी. त्या पाच मिनिटांत तुमची एकादश इंद्रिये जर भगवदर्पण झाली तर तुम्हाला एकादशी घडली असे समजा. करणाऱ्यांसाठी एकादशी रोज येते, क्वचित् करणाऱ्यांसाठी ती वर्षातून दोनदा येते, तर न करणाऱ्यासाठी ती जन्मात कधीच येत नाही. वैष्णवांनी अशी एकादशी करावी आणि शैवांनी याच प्रकारे शिवरात्र करावी, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर

१६ जुलै १९९४

---

आशीर्वचन दुसरे

## कायानुग्रहस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

कालपासून लिंग–षट्स्थलातील प्रसादिस्थलावर तुम्ही आशीर्वचन ऐकत आहात. यातील पहिले अवांतरस्थल कायानुग्रहस्थल हे आहे. प्रत्येक माणसाला अनुग्रह हवा असतो. अनुग्रह म्हणजे 'आशीर्वाद', 'कृपा'. आपल्यावर अनुग्रह करणारे जगात दोघेच आहेत. एक आपले सद्गुरू आणि दुसरे आपले इष्टदेव अर्थात् ईश्वर. त्यानंतर माता–पिता आणि वडीलधारी माणसे यांचा क्रम लागतो. शिवज्ञानसंपन्न, योगसाधना करणारा शिवयोगी लोकांवर कसा अनुग्रह करतो, यासंबंधी आपण विचार करीत आहोत. सर्वेंद्रियांचा निग्रह केल्यामुळे त्याला अनुग्रहशक्ती प्राप्त झालेली असते. तुम्हाला याची कल्पना आहे की ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये जेव्हा कार्यरत असतात तेव्हा त्यांच्याद्वारे मनुष्याच्या मनःशक्तींचा ऱ्हास होत असतो. पाहताना, ऐकताना, बोलताना, हुंगताना, खाताना, देताना, घेताना, चालताना शक्तीचा व्यय होत असतो. कार जेव्हा रस्त्यावरून धावत असते तेव्हा ती पेट्रोल–डिझेल खात असते. म्हणजे ती धावताना इंधन खर्च होत असते. मोबदला दिल्याशिवाय मनुष्याला या जगात काही मिळत नाही. त्याप्रमाणे माणसाची संचित शक्ती इंद्रियांद्वारे खर्च होत असते. दिवसातले सोळा तास मनुष्य आपली शक्ती खर्च करीत असतो. त्या शक्तीचा पुन्हा संचय करण्यासाठी तो आठ तास निद्राधीन होत असतो. सुषुप्ति–अवस्थेत अर्थात् गाढ निद्रेत हा शक्तिसंचय होत असतो. त्यावेळी इंद्रियांची कार्ये ठप्प असतात आणि इंद्रियाध्यक्ष मनदेखील गप्प बसलेले असते. पाण्याच्या टाकीच्या वाहणाऱ्या तोट्या बंद करून टाकीमध्ये पाणी साठविले जाते, त्याप्रमाणे इंद्रियांची द्वारे बंद करून आपल्या आत शक्तिसंचय होतो.

निद्राधीन होऊन सामान्य मनुष्य जसा शक्तिसंचय करतो त्याप्रमाणे योगीदेखील आपल्या एकादश इंद्रियांचा निग्रह करून अपार शक्ती प्राप्त करून घेतो. या शक्तीमुळेच तो लोकांवर अनुग्रह करू शकतो. भगवान शिवाजवळ

पाच शक्ती आहेत. सृष्टिशक्ती, पालनशक्ती, संहारशक्ती, निग्रहशक्ती आणि अनुग्रहशक्ती. या शक्ती म्हणजे शिवाची पंचमुखे होत. सद्योजात, वामदेव, तत्पुरुष, अघोर आणि ईशान अशी पौराणिक दृष्ट्या शिवाची पाच मुखे मानली जातात. परंतु तात्त्विक दृष्ट्या ती मुखे नसून शक्ती आहेत. ईश्वर आपल्या सृष्टीशक्तीने कोणत्याही साधनाशिवाय विश्वनिर्मिती करतो. आपल्यासारख्या सामान्य माणसाला एखादे वस्त्र विणायचे असेल तर कितीतरी वस्तू आणि साधने जमा करावी लागतात. पहिल्यांदा धागा. धाग्यासाठी कापूस आणि असे बरेच काही. परंतु ईश्वराने ही सृष्टी दुसऱ्या कोणत्याही वस्तूशिवाय उत्पन्न केली आहे. ईश्वर जसा सृष्टिनिर्माता आहे तसाच तो पालनकर्ताही आहे. जो जन्म देतो तो पालन करतोच. माणसाला वाटते की, आपण कमाई करतो म्हणून आपले पोट भरते, परंतु तो जेव्हा आईच्या पोटात असतो तेव्हा तो किती कमाई करीत असतो? त्याचे पोट कसे भरत असते? त्याचा जन्म झाल्यावर तो काय काम करीत असतो, कुठे नोकरी करीत असतो? कमाई नाही म्हणून काय तो उपाशी मरत असतो? नाही. त्याला वेळच्या वेळी दूध, अन्नपाणी मिळत असते. ही व्यवस्था व्यवहारातली भासत असली तरी ती निसर्गनिर्मित अर्थात् ईश्वरनिर्मित आहे. जो जन्माला घालतो तो जन्मलेल्या जीवाचे पालन करतो. म्हणून ईश्वराजवळ पालनशक्ती असते. त्याचप्रमाणे त्याच्याजवळ संहारशक्ती असते. जो सृष्टी करतो, जो पालन करतो त्यालाच संहार करण्याचा अधिकार असतो. एखादा दुष्ट मनुष्य सज्जनांना त्रास देत असेल तर त्याच्यावर अंकुश ठेवण्यासाठी ईश्वराकडे निग्रहशक्ती असते आणि शरणागत झालेल्या जीवांवर कृपा करण्यासाठी त्याच्याजवळ अनुग्रहशक्ती असते. अशा प्रकारे पंचशक्तींच्या साहाय्याने ईश्वर विश्वाचे संचालन करीत असतो. शिवाजवळ असलेल्या या पाच शक्ती काही प्रमाणात शिवभक्ताजवळ वास करतात. योग्यांमध्ये, भगवद्भक्तांमध्ये ईश्वराचे सामर्थ्य काही अंशी आल्यामुळे ते ईश्वराचे कार्य थोडेफार करू शकतात. येथे विशेषत्वाने अनुग्रहाविषयी सांगत आहेत.

**अनुगृह्णाति यल्लोकान् स्वकायं दर्शयन्नसौ।**
**स्मादेष समाख्यातः कायानुग्रहनामकः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.५)

शरीराद्वारे लोकांवर अनुग्रह करणाऱ्या शिवयोग्याला 'कायानुग्राहक' असे संबोधले जाते. शरीराच्या द्वारा शिवयोगी कसा अनुग्रह करतो हे उदाहरणादाखल पुढे सांगतात–

**यथा शिवोऽनुगृह्णाति मूर्तिमाविश्य देहिनः।**
**तथा योगी शरीरस्थः सर्वानुग्राहको भवेत्।।१७.६।।**

सकाळी स्नान, पूजा करून तुम्ही भगवंताचे दर्शन घेता आणि प्रार्थना करता आणि तो प्रसन्न होऊन तुमच्यावर जेव्हा अनुग्रह करतो तेव्हा तुमच्या मनातले इष्टार्थ पूर्ण होतात. हे का घडते? तर मूर्तिरूपात भगवान शिवच विद्यमान असल्यामुळे. शिल्पकाराने घडवलेली मूर्ती मंदिरात तशीच बसवली जात नाही तर तिच्यावर संस्कार केला जातो. प्राणप्रतिष्ठा हा एक संस्कार होय. मूर्तीवर अथवा शिवलिंगावर अभिषेक करून एखाद्या सत्पुरुषाच्या हस्ते त्याची मंदिरात प्रतिष्ठापना केली जाते. त्यावेळी मूर्तीच्या ठिकाणी परमेश्वराला आवाहन केले जाते-
'आवाहितो भव, सन्निहितो भव, संमुखो भव।'

हे भगवंता, इथे या, स्थिर राहा आणि आम्हाला सदैव संमुख राहा. अशी प्रार्थना करून प्राणप्रष्ठिापना केली

जाते. या संस्कारानंतर मूर्तीकडून भक्तांना अनुग्रह प्राप्त होऊ लागतो. भगवान शिव अव्यक्त असले तरी मूर्तिरूपाने भक्तांवर अनुग्रह करतात, त्याप्रमाणे शिवयोगी देखील आपल्या देहाच्या द्वारे लोकांवर अनुग्रह करतो. मूर्ती हे ईश्वराचे शरीर आहे आणि सद्गुरूचे शरीर ही मूर्ती आहे. म्हणून जशी ईश्वराच्या मूर्तीची पूजा केली जाते. तशीच सद्गुरूच्या, शिवयोग्याच्या शरीराची पूजा केली जाते. ईश्वर मूर्तीत आहे की नाही, हा प्रश्न महत्त्वाचा नाही. ईश्वर सर्वत्रच आहे. परंतु मूर्तीत तो विशेषत्वाने प्रकटलेला असतो. आगपेटी तुमच्या खिशात असते. परंतु जोपर्यंत तुम्ही घर्षण करीत नाही तोपर्यंत तिथे अग्नी प्रगट होत नाही. अस्तित्वात असणे आणि प्रगट होणे या दोन भिन्न गोष्टी आहेत. ईश्वर अणू-रेणूंत व्याप्त आहे. परंतु त्याचे प्राकट्य मात्र मूर्तीतून होत असते. शिवयोगी आपल्या शरीराच्या द्वारे अनुग्रह करतो म्हणून तो कायानुग्राहक होय.

**शिव: शरीरयोगेऽपि यथा संगविवर्जित:।**
**तथा योगी शरीरस्थो निसंगो वर्तते सदा॥१७.७॥**

ज्याच्या सोबत आपण राहतो त्याचा गुण किंवा दोष आपल्याला लागत असतो. सत्संगामुळे सद्गुण अंगी बाणतात तर कुसंगामुळे दोष अंगी लागतात. मनुष्याला संग तर करावाच लागतो. म्हणून ज्यांच्याकडे सद्गुण आहेत आणि आपल्यापेक्षा अधिक ज्ञान आहे अशा सज्जनांची संगत धरावी. ज्या लाकडापासून, शिळेपासून, धातूपासून मूर्ती घडवली जाते त्या लाकडात, शिळेत, धातूत काही ना काही दोष असतोच. मग मूर्तीत प्रविष्ट होणाऱ्या ईश्वराला त्या दोषांचा स्पर्श होतो काय, याचा या श्लोकात विचार केला आहे. ज्या शिळेपासून शिवलिगं बनते ती शिळा 'जड' असते. जडाची व्याख्या अशी केली जाते- 'स्वपरज्ञप्तिशून्यत्वं जडत्वम्।' ज्याला स्वत:चे आणि इतरांचे ज्ञान नसते ते जड होय.

तुम्ही आता फरशीवर म्हणजे दगडावर बसलेले आहात. आपल्यावर कोण बसलेले आहे याचे ज्ञान त्या दगडाला नाही. तुम्ही माझ्या अंगावर बसलात म्हणून माझे अंग दुखले, अशी तक्रार कोणत्या दगडाने आतापर्यंत केली आहे काय? दगड जर असे बोलू लागला तर त्या दगडाला तुम्ही घरात ठेवणार नाही, बाहेर फेकून द्याल. शिळा, धातू, लाकूड हे जड पदार्थ होत. परंतु त्यांच्यापासून जेव्हा मूर्ती तयार केली जाते आणि त्या मूर्तीत ईश्वराचा प्रवेश होतो तेव्हा त्या वस्तूचे जडत्व ईश्वराला स्पर्श करीत नाही. जडात राहूनदेखील भगवंताला जडत्व येत नाही. त्याप्रमाणे शरीरात राहणारा योगी शरीराच्या गुणदोषांपासून अलिप्त असतो. जो शरीराचा अभिमान धरतो त्याला शरीराचा संगदोष लागतो. परंतु ज्याच्या मनात शरीराभिमान नसतो त्याला शरीराचे गुणदोष चिकटत नाहीत. शरीराला दु:ख झाले की आपण दु:खी होतो. शरीराला सुख झाले की आपण सुखी होतो; याचे कारण काय? तर शारीरिक विकारांमध्ये आपण अभिमान धरतो, हे होय. शरीर विकारी आणि मलिन असते. त्याला कितीही वेळा धुतले तरी ते पुन्हा पुन्हा मळत राहते. अशा शरीरात आत्मरूपाने जो परमात्मा नांदतो तो मात्र मलापासून मुक्त असतो. कारण परमात्मा अलिप्त असतो, आकाशाप्रमाणे. आकाश पाण्याने भिजत नाही, अग्नीत जळत नाही. तुमचे घर आगीत भस्मसात होते, परंतु घरातले आकाश मात्र जळून जात नाही. उन्हाळ्यात तुमच्या घराच्या भिंती तापतात, घरातल्या वस्तू आणि तुमचे शरीर देखील तापते; परंतु घरातले आकाश मात्र तापत नाही. कारण आकाश अलिप्त असते. परमात्म्याचे स्वरूप समजावून सांगताना आकाशाची उपमा दिली जाते. आकाश सर्वत्र असते आणि अविकारी असते तसाच परमात्मा असतो. शरीरात राहणारा आत्मा शस्त्राने कापला जात नाही, अग्नीत जळून जात नाही, वायूचा त्यावर प्रभाव चालत नाही; परंतु शरीर मात्र शस्त्राने कापले जाते,

अग्नीत जळून जाते. आत्मा त्या विकारांपासून अलिप्त असतो. ही सामान्य गोष्ट आहे. कधी कधी भगवच्चिंतनात रममाण झालेल्या भक्ताच्या शरीरावर देखील शस्त्रादिकाचा प्रभाव पडत नाही, हे भक्त प्रल्हाद आदी भक्तांच्या कथांवरून दिसून येते. शरीराचा अभिमान धरल्यामुळे मनुष्याला सुख-दुःख भोगावे लागते. शरीरदोषांपासून अलिप्त राहणाऱ्या शिवयोग्याची मूर्ती आपल्यासमोर उभी करून, तुम्ही देखील योगी व्हाल असा संदेश ज. रेणुकाचार्य आपल्याला देत आहेत. योगी व्हायचे असेल, मुक्ती मिळवायची असेल तर शरीराचा अभिमान सोडायला हवा.

आशीर्वचन संपल्यानंतर तुम्ही तुमच्या घरी जाता. तुम्ही स्वतःच्या घरीच का जाता? दुसऱ्याच्या घरी का जात नाही? कारण घराविषयी तुम्हाला अभिमान असतो. एखाद्या अदृश्य दोराप्रमाणे अभिमान आपल्याला घराकडे खेचून नेतो. अभिमानरूपी दोराने बांधलेला पशू म्हणजे मनुष्य. या अदृश्य बंधनालाच 'राग' असे दुसरे नाव आहे. 'राग' म्हणजे आसक्ती. अशा सहस्रावधी दोरांनी मनुष्य बांधलेला असतो. जो दोर खेचला जाईल तिकडे मनुष्याला पळावे लागते. योगी आणि संसारी यांच्यात एवढाच फरक आहे की योगी शरीरात राहून देखील शरीरापासून अलिप्त असतो आणि संसारी मनुष्य शरीरातच गुरफटलेला असतो. शरीर हाच आत्मा आहे असे त्याला वाटत असते. शरीरात 'मी' आहे हे बऱ्याच जणांना माहीत नसते. शरीर म्हणजे 'मी' आहे, असेच त्यांना वाटत असते.

याचा अधिक विचार केला तर असे दिसते की काही लोक शरीरालाच नव्हे तर शरीराशी संबंधित असलेल्या व्यक्तींना आणि वस्तूंना देखील आत्मा मानतात. वेदान्तशास्त्रात म्हटले आहे- 'पुत्रात्मा कलत्रात्मा क्षेत्रात्मा धनात्मा इंद्रियात्मा शरीरात्मा'...

कोणी पुत्राला, कोणी कलत्राला, कोणी शेतीला तर कोणी धनाला आपला आत्मा मानतात. शरीरापेक्षा भिन्न असलेल्या वस्तूला काही झाल्यावर जर तुम्हाला त्रास होत असेल तर त्या वस्तूविषयी तुम्हाला अभिमान आहे असे निश्चित समजावे. शहरात अनेक लोक मरत असतात, परंतु त्यामुळे शहरातील सर्व नागरिक रडत नाहीत. ज्यांच्याघरी मृत्यू होतो तेच फक्त रडतात. शेजारीपाजारी त्यांचे सांत्वन करायला जातात आणि थोडे रडून येतात. ते कशासाठी? तर आपल्या घरी मृत्यू झाल्यावर हे लोक येऊन रडले होते म्हणून. ही एक प्रकारे रडण्याची परतफेडच असते. आपण यावेळी रडलो नाही तर लोक काय म्हणतील, या काळजीने लोक रडत असतात. ही सामान्य माणसाची कथा आहे. दुःख पाहून योग्याच्या डोळ्यांत देखील अश्रू येतात, परंतु ते सामान्य माणसांसारखे नसतात. योग्याच्या चेहऱ्यावर देखील कधीकधी क्रोधादी विकार उमटलेले दिसतील. परंतु त्यामुळे योगी लिप्त होत नसतो, शरीराचे विकार त्याला स्पर्शत नसतात. शरीर मलकोष असल्यामुळे अपवित्र भासते. शरीर मलिन असले तरी आत्मा मलिन नसतो. शिवयोगी आत्मरूपात रममाण असल्यामुळे शरीरदोषांपासून मुक्त, अलिप्त असतो. गीतेत स्थितप्रज्ञाची लक्षणे वर्णिली आहेत. तो कसा बोलतो, कसा चालतो, कसा खातो-पितो इत्यादी. त्याचा आदर्श समाजापुढे ठेवून माणसांनी स्थितप्रज्ञ व्हावे, असा बोध गीतेत केला आहे. श्रेष्ठाचा आधार पाहून त्याप्रमाणे आपले आचरण बदलणे हाच शिष्टाचार होय.

**शिवभावनया युक्तः स्थिरया निर्विकल्पया।**
**शिवो भवति निर्धूतमायावेशपरिप्लवः।।१७.८।।**

जीव शिव कसा झाला याविषयी येथे सांगितले आहे. जोपर्यंत मनुष्याच्या मनात शिवभावनेचा उदय होत नाही

तोपर्यंत तो शिव किंवा शिवयोगी होऊ शकत नाही. मानवी जीवनात भावनेला अनन्यसाधारण महत्त्व आहे. जीवनातून भावना वगळली तर जीवन झाडा-झुडुपासारखे होईल. म्हणून त्याने प्रत्येक कर्म भावनापूर्वक म्हणजे मन:पूर्वक केले पाहिजे. आपली मनोवृत्ती जेव्हा संपूर्णपणे परशिवाकडे एकवटते तेव्हा तिला 'भावना' म्हणतात. भगवान शिवाची उपासना, भजन करणे ही जशी शिवभावना आहे तशीच जगातल्या प्राणिमात्रांचे मंगलचिंतन करणे ही देखील शिवभावना होय. शिवाची उपासना करणे, त्याचे चिंतन करणे म्हणजे प्रपंचातील प्राणिमात्रांवर प्रेम करणेच होय. शिवाराधनेमुळे सर्वांवर प्रेम करण्याची दीक्षा मिळते. दक्षाने शिवाचा अपमान करण्यासाठी यज्ञ केला होता. तो सुयज्ञ नसून कुयज्ञ होता. कुणाचा अपमान करण्यासाठी केलेला यज्ञ 'सुयज्ञ' कसा असेल? त्या यज्ञाचा परिणाम काय झाला? तर दक्षाचे शिर कापले गेले आणि त्याच्या धडावर बकऱ्याचे शिर बसवले गेले. त्याची बुद्धी पशूची आहे असेच जणू या कथेत सूचित केले आहे. म्हणून जो सर्वांचे मंगल करतो त्याचे अमंगल कधी होत नाही. शिवयोगी स्थिर शिवभावनायुक्त असतो, निर्विकल्प असतो. त्याच्या मनात मायेचा आवेश नसतो. ज्याच्या मनात माया शिरलेली असते त्याची अवस्था भूतसंचार झाल्यासारखी होते. प्रत्येक जीवात मायेने प्रवेश केलेला असतो. म्हणून तर तो मुळात शिव असून जीवभावाने राहत असतो. तो शिवाला विसरून प्रपंचात रमलेला असतो. कोणा जीवात्म्यात मायेचा प्रवेश झालेला नाही? ईश्वराजवळ जाऊन देखील लोक ईश्वराची मागणी करीत नाहीत, त्याची 'माया' मागतात. तो ईश्वरदेखील आपला मायाबाजार फैलावून निवांत बसलेला असतो. तो विचार करतो की यांना निवांत मायेसोबत खेळू देत, जेव्हा कंटाळून माझ्याकडे येतील तेव्हा यांच्यावर अनुग्रह करू. म्हणून वेदांत म्हटले आहे- 'न कर्मणा न प्रजया न धनेन त्यागेनैके अमृतत्वमानषु'।।

जो सर्वस्वाचा त्याग करतो त्यालाच अमृतत्वाची प्राप्ती होते. सर्व भोगांविषयी आसक्ती ठेवून अमृतत्वाची इच्छा करता येत नाही. केली तरी ती निरर्थक, निष्फळ ठरते. प्रपंचातील सर्व जीवांत मायेचा आवेश असतो. मंदिरात देवदर्शनासाठी जाणारा मनुष्य सभोवतालच्या बाजारात, दुकानांत रमतो आणि देवाला विसरतो. 'करने चले रामभजन ओटन लगे कपास' अशी आपली अवस्था असते.

एक मनुष्य मंदिरात देवदर्शनासाठी निघाला होता. त्याचे हात रिकामे होते. देवदर्शनाला जाताना काहीतरी घेऊन गेले पाहिजे, रिक्त हस्ते जाऊ नये, असा संकेत आहे. शेजारच्या दुसऱ्याच्या शेतातला थोडा कापूस वेचून न्यावा म्हणजे देवासमोर वात लावता येईल, असे त्याला वाटले. त्याप्रमाणे तो शेतात शिरला आणि कापूस वेचू लागला. कापूस वेचताना त्याच्या मनात विचार आला की नुसती वात करून काय उपयोग? दिव्यात घालायला तेल देखील हवे. तेल तर आपण आणले नाही. याच शेतातला अधिक कापूस वेचून तो जर मंदिराशेजारच्या दुकानात विकला तर तेल विकत घेता येईल असे त्याला वाटले. मग तो अधिक कापूस वेचण्याच्या मागे लागला. माणसाच्या मनात लोभ दडून बसलेला असतो. शेत दुसऱ्याचे आणि रखवालदार कुणी नाही असे असताना अधिक कापूस वेचला तर काय बिघडते, असा विचार त्याच्या मनात आला. त्याने शेतातला सर्व कापूस वेचला आणि तो विकून पैसा मिळवला. तो पैसा उद्योगधंद्यात घालून आणखी कमाई सुरू केली. या सर्व व्यापात त्याचे देवदर्शन मात्र राहून गेले. निघाला होता देवदर्शनासाठी, पण गुंतून पडला माया-बाजारात!

अशीच सर्व जीवांची स्थिती असते. मातृगर्भातला जीवात्मा 'ईश्वरा मला यातून मुक्त कर, मी बाहेर पडताच तुझे स्मरण नित्य करीन' अशी प्रार्थना करीत असतो. परंतु गर्भाबाहेर पडताच तो सारे विसरून जातो. इतका विसरून जातो की कुणी त्याला 'देवदर्शनाला चल' असे म्हटले तर तो 'मला वेळ नाही' असे म्हणतो. त्याच्या

आत प्रवेशलेल्या मायेचा हा प्रताप आहे. भगवंतावर प्रेम करायला प्रारंभ केला की माया हळूहळू काढता पाय घेते.

मायेच्या अधिपतीला– परमेश्वराला शरण गेल्यावर मायासागर तरून जाता येतो, असे गीतेत म्हटले आहे. भगवंतापासून दूर गेल्यामुळेच मनुष्य मायाजालात फसतो. पूजा, ध्यान, जप, भजन हे परमेश्वराजवळ नेणारे मार्ग आहेत. जो हे करीत नाही तो परमेश्वरापासून दूर गेलेला असतो. म्हणून मायेपासून मुक्त होण्यासाठी परमेश्वरालाच शरण गेले पाहिजे.

माया सामान्य मनुष्याच्या मनात दडून बसलेली असली तरी शिवयोग्याच्या मनात मात्र तिला प्रवेश नसतो. शिवयोगी मायेच्या आवेशापासून मुक्त असतो. त्याच्या हृदयात केवळ परशिवाचे वास्तव्य असते. तो सर्वांच्या कल्याणाची इच्छा करतो आणि सर्वांकडे शिवमय दृष्टीने पाहतो. याप्रमाणे शिवयोगी आपल्या कायेच्या द्वारे भक्तांवर अनुग्रह करतो, त्यांना आशीर्वाद देतो, त्यांच्यात आपली शक्ती संक्रमित करतो, त्यांना सन्मार्ग दाखवतो. यासाठी शिवयोग्याला 'कायानुग्राहक' अशी संज्ञा दिली आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
१७ जुलै १९९४

---

## आशीर्वचन तिसरे

# कायानुग्रहस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मनुष्याच्या मनात जेव्हा मायेचा प्रवेश होतो तेव्हा तो ईश्वरापासून विमुख होतो, असे आपण कालच्या आशीर्वचनात ऐकले आहे. जन्माला येणाऱ्या सर्व जीवांची प्रवृत्ती स्वाभाविकपणे प्रपंचाकडे असते. ज्याच्या मनात विवेकाचा उदय होतो असा मनुष्य ईश्वरसन्मुख होतो. प्रपंचापासून थोडे मुक्त होता येते तेव्हाच ईश्वराशी थोडे युक्त होता येते. शिवोपासनेमुळे जी आनंदविभोर अवस्था होते तिची तुलना सांसारिक सुखाशी करता येत नाही. मनात सात्त्विक भावना उदय पावते. यापूर्वी कधी न अनुभवलेले एक वेगळे समाधान, एक वेगळी तृप्ती मनात नांदू लागते आणि अपार प्रसन्नतेने हृदय दरवळून जाते. ईश्वराचा थोडा सहवास आपल्याला एवढी तृप्ती देऊन जातो तर त्याच्या नित्य सहवासात राहिल्यावर किती लाभ होईल? याच विषयी पुढे सांगितले आहे-

**चित्तवृत्तिषु लीनासु शिवे चित्सुखसागरे।**
**अविद्याकल्पितं वस्तु नान्यत् पश्यति संयमी।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.९)

सर्व इंद्रिय–व्यवहारावर जो नियंत्रण ठेवतो तो संयमी होय. संयमी शिवयोग्याचा सर्व मानसिक व्यापार आनंदरूप अशा शिवात विलीन झालेले असतात. त्यामुळे मायानिर्मित अशी कोणतीही वस्तू त्यांच्या दृष्टीला दिसत नाही. शिव हा चित्सागर आणि सुखसागर आहे. चित् म्हणजे ज्ञान. शिव ज्ञानसागर आहे, सर्वज्ञ आहे.

भगवान शिवापासूनच सर्व विद्या उत्पन्न झाल्या. समुद्रात अथांग पाणी असते त्याप्रमाणे शिवाचे ज्ञान अगाध असते. समुद्रातले पाणी कधी कमी होत नाही की अधिक. ईश्वराला सागराची उपमा दिलेली आहे. संसाराला देखील सागराची उपमा दिली जाते. ईश्वर हा ज्ञानाचा व सुखाचा सागर आहे, तर संसार हा अज्ञानाचा व दुःखाचा सागर आहे. प्रत्येक मनुष्याला ज्ञान आणि सुख हवे असते. अज्ञान आणि दुःख कोणालाही नको असते. सर्वांना सुखी आणि ज्ञानी व्हायचे असते. परंतु प्रपंचसंमुख होऊन ज्ञानाची आणि सुखाची प्राप्ती होणे शक्य नाही. ज्याच्या समोर तुम्ही बसता त्याचा प्रभाव तुमच्यावर पडतो. प्रपंच संमुख झाल्यावर अज्ञान आणि दुःखच मिळणार आणि ईश्वरसंमुख झाल्यावर ज्ञानाचा आणि सुखाचा लाभ होणार.

शिवयोगी चित्सागर आणि सुखसागर अशा शिवात आपले मन विलीन करतो. तो आपल्या चित्ताच्या द्वारे शिवाशी संबंध जोडतो. त्यामुळे त्याला शिवाचे गुण प्राप्त होतात. सोलापूर शहराला हिप्परगा तलावातून आणि भीमा नदीतून पाणीपुरवठा केला जातो. घरात बसून तुम्ही नळाची तोटी फिरवता. भीमेचे पाणी पडू लागते. नदी खूप दूर आहे. परंतु मोठमोठ्या पाईपांद्वारे नदीशी संबंध जोडून तिचे पाणी घराघरांत पोहोचवले जाते. पाईपलाईनने नदीशी संबंध जोडलेला आहे. असा संबंध नसेल तर तुमच्या घरात पाणी कसे येईल? त्याप्रमाणे आपले चित्त जेव्हा भगवान शिवाशी जोडले जाते, तेव्हा त्याचे गुण आपल्या ठिकाणी उतरतात. भगवंताची पूजा करावी, त्याचा नामजप करावा, त्याचे ध्यान करावे हे सारे याचसाठी सांगितले जाते. त्याचे नामस्मरण केल्याने, त्याच्या मूर्तीला स्पर्श करून पूजा केल्याने आणि त्याच्या निर्गुण-निराकार रूपाचे ध्यान केल्याने त्याच्याशी आपला संबंध जोडला जातो. असा संबंध जोडणे यालाच 'योग' म्हणतात. मनाने, वाणीने आणि शरीराने शिवाशी संबंध जोडला पाहिजे.

वीरशैवसिद्धान्ताप्रमाणे जेव्हा श्रीगुरू शिष्याला इष्टलिंग प्रदान करतात तेव्हा त्याचा शरीराने शिवाशी संबंध जोडला जातो. एकदा लिंगधारण केले की त्याचा कधीही त्याग केला जात नाही. मृत्यूनंतर देखील त्याच्या प्रेताची इष्टलिंगासोबत समाधिक्रिया केली जाते. दीक्षेनंतर अशा प्रकारे शरीराने शिवाशी नित्यसंबंध जोडला जातो. श्रीगुरू जेव्हा पंचाक्षरी मंत्राचा उपदेश करतात तेव्हा मंत्रजपाने वाणीचा शिवाशी संबंध जोडला जातो. मंदिरात, तीर्थक्षेत्री, पर्वतशिखरावर जप करावा असे शास्त्रात सांगितले आहे. परंतु भगवंताचे नामस्मरण करण्यासाठी कसलेही स्थळकाळाचे बंधन नाही. कुठेही आणि कधीही केले तरी चालते. परंतु मंदिरात, तीर्थक्षेत्री अथवा पर्वतशिखरावर जप केला तर त्याचे अधिक फळ मिळते, असे शास्त्र का बरे सांगते? तर तिथे जप करतांना तेथील प्रसन्न परिसराचा प्रभाव आपल्या मनावर पडतो आणि मन अधिक एकाग्र होते. घरात जप केला तर सांसारिक व्यवधाने त्यात अंतराय उत्पन्न करू शकतात. मग ज्यांना मंदिरात, नदीतीरावर, तीर्थक्षेत्री अथवा पर्वतशिखरावर जाणे शक्य होत नाही त्यांनी नामजप करू नये काय? तर असे नाही. त्याच स्थितीत आणि आहे त्याच ठिकाणी तुम्ही जप करू शकता. जप अखंड चालू पाहिजे. जेवढे श्वास आपण घेतो तेवढे नामस्मरण आपल्याकडून घडले पाहिजे. जप करणे म्हणजे वाणीने भगवंताशी संबंध जोडणे होय.

याप्रमाणे जेव्हा तुम्ही भावलिंगाची आणि प्राणलिंगाची मानसपूजा करता तेव्हा तुमच्या मनाचा भगवान शिवाशी संबंध जोडला जातो. अशाप्रकारे शरीर, वाणी आणि मन या त्रिकरणांचा शिवाशी संबंध जुळल्यावर ही त्रिकरणे पवित्र होतात. वेदांत इष्टलिंगाला 'पवित्र' अशी संज्ञा दिलेली आहे. इष्टलिंगाच्या संपर्कामुळे शरीर पवित्र होते. भगवन्नामाचा जप केल्याने वाणी पवित्र होते आणि तिच्यात सामर्थ्य निर्माण होते. मन जेव्हा भगवान

शिवाचे चिंतन करू लागते तेव्हा ते देखील पवित्र आणि प्रसन्न होते. ज्या मनात ज्ञानरूप आणि आनंदरूप भगवंताचे चिंतन चाललेले असते तेथे दुःख प्रवेश करू शकत नाही. ज्याच्या मनात जडाचे चिंतन चाललेले असते तेथे दुःखच दुःख भरलेले असते. एकदा यदू नामक राजाने दत्तात्रेयांना विचारले,

''महाराज, आपल्याजवळ जर काहीच नाही, तरी आपण नेहमी प्रसन्न दिसता. माझ्याजवळ सत्ता-संपत्ती सारे काही आहे, परंतु माझ्या मनात दुःखच भरलेले आहे याचे कारण काय?''

दत्तात्रेयांनी त्याला सुरेख उत्तर दिले, ते म्हणाले, ''राजा, तुझा नित्यसंबंध ज्या वस्तूंशी आहे त्या जड आहेत. जड वस्तू परिवर्तनशील असतात. त्यांच्या ठिकाणी अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते, विनश्यति असे सहा विकार असतात. त्या जन्मतात आणि नष्ट होतात. त्यात सुख नाही. दुःखरूपी वस्तूंशी तुझा नित्य संबंध असल्यामुळे तू दुःखी आहेस, माझ्या मनाचा संबंध नित्य परमात्म्याशी असतो. परमात्मा चित्सागर आहे, सुखसागर आहे. त्यामुळे मी सर्वदा आनंदी असतो.''

संसार जड आहे. जडात अव्यक्त राहणारा परमात्मा चिद्रूप आहे. जडापासून जो आनंद मनुष्याला मिळतो तो परमात्म्याच्या आनंदाचा अंश असतो. शिवयोग्याचे चित्त चित्सागर आणि सुखसागर अशा परशिवात विलीन झालेले असते. म्हणून तो जे काही पाहतो ते शिवरूप असते. जशी दृष्टी तशी सृष्टी असते. आपली मनोवृत्ती जशी असते तसा आपल्याला प्रपंच दिसत असतो. हृदयात भगवंत भरून राहिला असेल तर दृष्टी भगवन्मय होते. तुलसीदासांनी म्हटले आहे की, या दुःखमय संसारात पाच रत्ने मौल्यवान आहेत.

**तुलसी इस संसार में पांच रतन है सार।**
**साधुमिलन हरिभजन दया धर्म उपकार।।**

दुःखमय संसारात आनंद देणारी पाच रत्ने संतांनी शोधून काढली आहेत. साधुसंग, हरिभजन, दया, धर्म आणि उपकार ही पंचरत्ने होत. ज्ञानी-अज्ञानी सर्व जीवांना संसारात राहावे लागते. संसार म्हणजे सुखदुःखाचे मिश्रण. या संसारात संतांनी सुखाचा शोध घेतला आहे तर सांसारिकांनी दुःखाचा शोध घेतला आहे. म्हणून सामान्य माणसाच्या अवतीभोवती दुःखच दुःख भरलेले असते. आपल्याजवळ किती दुःखे आहेत हे सांगणे देखील अवघड आहे. एका कन्नड संताने म्हटले आहे की आपण दुःख अंथरतो आणि दुःखच पांघरतो. त्यामुळे आपल्याला शांत झोप कधी लागत नाही. तुलसीदासांनी मात्र संसारातील पाच सुखरत्नांचा शोध घेतला. साधुमिलन म्हणजे संतसहवास. संतांच्या संगतीत सुखाचा लाभ होतो. संत हे सुखानुभवी असतात, म्हणून त्यांच्या सहवासाने सुख लाभते. जीवनात इतर काहीही न मिळता केवळ संतसंग लाभला तरी सारे काही मिळाल्यासारखे होते. म्हणून संतसंग हे संसारातील एक अमूल्य रत्न आहे.

दुसरे रत्न आहे 'हरिभजन' संतांकडे गेल्यावर ते आपल्याला भगवद्भक्तीचा मार्ग दाखवतात. वाल्मीकीला जेव्हा नारदाची संगत लाभली तेव्हा त्यानी त्याला नामजपाचा उपदेश केला. आपल्या इष्टदेवतेचे भजन करणे म्हणजे तिच्या प्रतिमेची पूजा करणे, तिच्या नामाचा जप करणे, तिच्या निराकार रूपाचे चिंतन करणे, शरीर, वाणी आणि मन या त्रिकरणांनी भगवंताची सेवा करणे म्हणजे हरिभजन होय. 'दया' हे तिसरे रत्न आहे. तुम्ही हरिभजन करता, संतसंग करता, परंतु जर तुम्हाला दीनदुबळ्यांची दया येत नसेल तर तुमचे भजन, तुमचा सत्संग व्यर्थ आहे. देवघरात देवाची मनोभावे पूजा करणाऱ्या मनुष्याने दारात आलेल्या भिकाऱ्याला वाक्ताडन केले, हाकलून दिले तर त्याच्या पूजेला काय अर्थ आहे? दया हा एक श्रेष्ठ धर्म आहे. प्राणिमात्रांविषयी दयाभावना

ठेवली पाहिजे. दया करणे म्हणजे दुसऱ्याला सुख देणे. जो दुसऱ्याला सुख देऊ शकत नाही तो स्वत: सुखी होऊ शकत नाही. दयेमुळे दया करणारा आणि ज्याच्यावर दया केली जाते तो असे दोघेही सुखी होतात म्हणून दया हे तिसरे सुखरत्न होय.

चौथे सुखरत्न आहे 'धर्म'. धर्म म्हणजे उत्तम आचरण. सत्य बोलणे, हिंसा न करणे, इष्टदेवतेची पूजा करणे, गुरुमंत्राचा जप करणे, ध्यान करणे, दान करणे हे सारे धर्म होत. धर्माचे दहा प्रकार सांगितलेले आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप आणि ध्यान. या धर्माचरणामुळे पुण्यप्राप्ती होते आणि पुण्यप्राप्तीमुळे सुखलाभ होतो. आपल्याला सुखी व्हायचे असते, परंतु ज्यामुळे सुख प्राप्ती होते ते धर्माचरण मात्र नको असते.

**पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यं नेच्छन्ति मानवा।:**

पुण्याचे फळ सर्वांना हवे असते पण पुण्य करणे कोणालाच नको असते. दान करा, ध्यान करा, जप करा असे सांगितले तर त्यांचे एकच उत्तर असते- 'नाही'. सुख असे थोडेच मिळते? चांगले काम केले तर पगार मिळतो. वाईट केले तर मिळत नाही. इहलोकात जे घडते तेच परमार्थजगात घडत असते. पुण्य कराल तर सुख मिळेल, अन्यथा नाही. याच्या उलट आणखी एक गोष्ट आहे-

**पापस्य फलं नेच्छन्ति पापं कुर्वन्ति यत्नत:।**

पापाचे फळ दु:ख हे आहे. दु:ख कोणालाही नको असते. ईश्वरापुढे जाऊन देखील 'दु:ख नको' अशी प्रार्थना करतात. पापाचे फळ म्हणजे दु:ख कोणाला नको असते, परंतु पाप मात्र यत्नपूर्वक करतात. शास्त्रनिषिद्ध कर्मामुळे मनुष्य पापात्मा होऊन दु:ख भोगतो आणि शास्त्रविहित कर्मामुळे तो पुण्यात्मा होऊन सुख भोगतो. धर्माचरण असे सुखदायक असल्यामुळे ते एक सुखरत्न होय. 'उपकार' हे एक पाचवे सुखरत्न होय. नुसती पाने उलटत बसले तरी आयुष्यभर संपणार नाहीत एवढे ग्रंथलेखन महर्षी व्यासांनी केले आहे. आपल्या सर्व ग्रंथांचे सार अर्ध्या श्लोकात सांगितले आहे-

**अष्टदश पुराणाणां सारो व्यासेन कीर्तित:।**
**परोपकार: पुण्याय पापाय परपीडनम्।।**

विस्तारपूर्वक लिहणारे व्यासमहर्षी संक्षेप करण्यात देखील कुशल होते. सर्व वेदपुराणांचे सार त्यांनी एका श्लोकार्धात सांगितले आहे. परोपकार करणे हे पुण्य आणि दुसऱ्याला दु:ख देणे हे पाप. पुण्य-पापावरच सर्व प्रपंच उभा असतो. पुण्य-पापामुळेच आपल्याला शरीर मिळालेले असते. काही वाचू नका, काही शिकू नका, काही करू नका; परंतु दुसऱ्यावर उपकार करणे हे मात्र विसरू नका. त्याचप्रमाणे प्रवचन ऐकले नाही तरी चालेल, पूजा केली नाही तरी चालेल, ध्यान केले नाही तरी चालेल; परंतु दुसऱ्याला दु:ख देऊ नये. एवढे केले तरी चालेल. पूजा करा, ध्यान करा, उपवास करा, दुसऱ्याला दु:ख दिले की सारे व्यर्थ जाते. म्हणून दुसऱ्यावर उपकार करणे हे सुखरत्न आहे. तुम्हाला दु:ख हवे असेल तर दुसऱ्याला दु:ख द्या, सुख हवे असेल तर दुसऱ्याला सुख द्या. आपल्याला पुण्य चांगले वाटते, पण ते करायला नको असते. हेच तर मोठे अवघड आहे. म्हणून तुलसीदासांनी उपकार करा असे सांगितले. संताचा सहवास, हरिभजन, प्राणिमात्रावर दया, धर्माचे आचरण आणि परोपकर ही असार संसारातील पाच रत्ने होत. या पंचरत्नांचा संग्रह संत करतात म्हणून ते सुखी असतात. आपण मात्र ही पंचरत्ने सोडून बाकी साऱ्या पदार्थांचा संग्रह करतो म्हणून दु:खी होतो. त्यामुळे संसारी जीव

दुःखी असतो तर योगी सुखी असतो. शिवयोगी सुखसागर अशा परशिवात आपले चित्त विलीन करतो म्हणून, त्याची भावना शिवमय होऊन जाते. शिवमय भावनेमुळे त्याला अविद्यानिर्मित प्रपंच न दिसता शिवच दिसतो. सर्व प्रचंच शिवमय कसा दिसतो याविषयी पुढे सांगतात.

**नेदं रजतमित्युक्ते यथा शुक्तिः प्रकाशते।**
**नेदं जगदिति ज्ञाते शिवतत्त्वं प्रकाशते।।१७.१०।।**

या श्लोकात एक दृष्टान्त देऊन ज. रेणुकाचार्यांनी विचार स्पष्ट केला आहे. रस्त्याच्या कडेला पडलेली शिंप उन्हात चांदीसारखी चमकते. चांदी हस्तगत करण्यासाठी जर कोणी जवळ गेला तर त्याला तिचे खरे स्वरूप समजते. शिंप ही शिंपच असते. ती चांदी कधीच नसते. परंतु उन्हात ती चांदीसारखी भासते. ही चांदी नाही, असे ज्ञान झाले की चांदी अदृश्य होऊन शिंप हाती येते; त्याप्रमाणे जग हे 'जग' नसून 'परमात्मा' आहे असे ज्ञान झाल्यावर जगाच्या ठिकाणी परमात्मा दिसू लागतो. ज्याची दृष्टी शिवमय होते, त्याला अणूपरमाणूंत शिव दिसू लागतो. प्रपंच हा मायाकल्पित असून त्याचे अधिष्ठान परमात्मा आहे याचे ज्ञान त्याला होते.

**यथा स्वप्नकृतं वस्तु प्रबोधेनैव शाम्यति।**
**तथा शिवस्य विज्ञाने संसारं नैव पश्यति।।१७.११।।**

वेदान्तात प्रपंचाला मिथ्या मानले जाते. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या।' हे शंकराचार्यांचे वचन सुप्रसिद्धच आहे. परंतु वीरशैव सिद्धान्तात प्रपंच मिथ्या मानला जात नाही; तर प्रपंच देखील शिवच आहे, असे मानले जाते. ही तर पाहण्याची दृष्टी आहे. प्रपंचाला बाद करून परमात्म्याला पाहणे ही वेदान्ताची दृष्टी आहे तर सर्व प्रपंचाला परमात्मरूपात पाहणे ही सिद्धान्ताची म्हणजे आगमाशास्त्राची दृष्टी होय. म्हणून वीरशैवसिद्धान्तात जगताला मिथ्या मानत नाहीत. मूळ, खोड, फांद्या, पाने, फुले इ. सर्व मिळून जसा वृक्ष एक असतो, त्याप्रमाणे या विश्वाच्या रूपाने एक शिवच विराजमान असतो. हे ज्ञान होणे म्हणजे एक प्रकारची जागृती आहे. स्वप्नातील दुःखापासून मुक्त व्हायचे असेल तर अन्य काही न करता फक्त जागे व्हावे लागते. जागे होताक्षणीच स्वप्नदुःखापासून मुक्ती मिळते, त्याप्रमाणे प्रपंच शिवमय आहे असे भान आले की प्रपंचदुःखापासून सुटका होते.

जागेपणाविषयी एक सुरेख कथा सांगितली जाते. तुम्ही देखील ती ऐकली असेल. एका माणसाला सकाळी सहा वाजता उठून शिवानुभव मंगल भवनात योगाभ्यास करायला जायचे होते. त्याने त्यासाठी नावनोंदणी केली होती. रात्री आपल्या पत्नीला त्याने सांगितले की, 'उद्या पहाटे चारला मला उठव. स्नान-पूजा आटपून, सकाळी सहा वाजता मंगल भवनात मला जायचे आहे.'

पत्नीने स्वतःजवळ घड्याळ ठेवले आणि ती जागी राहण्याचा प्रयास करू लागली. नवरा मात्र निवांत झोपला. झोपेत त्याला एक स्वप्न पडले. मित्रासोबत तो चोरी करायला निघाला. चोरी करताना अचानक पोलीस आले. त्यांच्या हाती हा सापडला. त्यांनी त्याला पोलीस-ठाण्यात बंद केले. कोर्टात खटला चालला आणि त्याचा गुन्हा शाबीत झाला. न्यायधीशांनी त्याला सक्त मजुरीची शिक्षा फर्मावली. पोलीस त्याला तुरुंगाकडे घेऊन गेले आणि तुरुंगाचे दार उघडून त्याला आत घालणार तोच-

घड्याळात चार वाजले आणि पत्नीने त्याला हलवून जागे केले. उठल्याबरोबर तो भयभीत नजरेने इकडेतिकडे पाहू लागला आणि 'पोलीस पोलीस' असे बरळू लागला. हा असे का करतो हेच पत्नीला कळेना. तिने त्याला नीट जागे करून 'काय झाले' हे विचारले. तो भानावर आला. त्याला कळले की आपण जे पाहिले

ते स्वप्न होते. आसपास पोलीस वगैरे कोणी नाही. स्वप्नात जे घडले ते सारे त्याने पत्नीला सविस्तर कथन करून तो म्हणाला, ''बरे झाले, तू मला झोपेतून जागे केलेस. मला उठवायला तू उशीर केला असतास तर मला तुरुंगाची हवा खावी लागली असती. तू फार चांगले केलेस, अगदी वेळेवर उठवलेस.''

आपली जागृतावस्था हे देखील दीर्घकालीन स्वप्न मानले जाते. स्वप्नातील दुःखापासून सुटका करून घेण्यासाठी जागे होणे आवश्यक आहे. स्वतःला जाग येत नसेल तर दुसऱ्या कोणीतरी जागे करायला हवे. जागे झाले की स्वप्न आणि दुःख विरून जाते. त्याप्रमाणे संसाराच्या दीर्घ स्वप्नातून जाग आल्यावर संसारदुःख नाहीसे होते आणि सर्वत्र शिवच शिव दिसू लागतो. सकाळी सकाळी दोघांची भेट झाली की एक दुसऱ्याला विचारतो, 'काय जागे झालात काय?' दुसरा म्हणतो, 'होय, झालो.' पण खरे तर कोणीच जागे झालेले नसते. बिछान्यावर उठून बसणे म्हणजे काही खरे जागे होणे नव्हे. असे तर आपण असंख्य वेळा जागे झालो आहोत. त्याला काही अर्थ नाही. प्रपंचात परमात्मदर्शन घेणे हे खरे जागेपण होय. वेदांनी 'उत्तिष्ठत् जाग्रत्'– उठा जागे व्हा– असे या अर्थाने म्हटले आहे. हे खरे जागणे आहे. या प्रकारे जो जागा होतो तो पुन्हा निद्रावश होत नाही. आपण तर कितीवेळा झोपेतून जागे होतो आणि कितीवेळा झोपतो याला मर्यादा नाही. जागा झालेल्या मनुष्याच्या दृष्टीसमोरून जसे स्वप्न नाहीसे होते त्याप्रमाणे शिवज्ञानसंपन्न शिवयोग्यासमोरून हे विश्व अदृश्य होते. मग हे विश्व नष्ट होते की काय? तर तसे नाही. विश्व आहे तसेच असते. परंतु शिवयोग्याला ते परमात्मरूपात दिसत असते. आपल्या जवळ येणाऱ्या जीवाकडे तो 'शिव' म्हणून पाहात असतो. त्याचे हृदय विशाल असते. त्याची दृष्टी व्यापक असते. असा शिवयोगीच आपल्या शरीराने सर्वांवर अनुग्रह करत असतो.

**अज्ञानमेव सर्वेषां संसारभ्रमकारणम्।**
**तन्निवृत्तौ कथं भूयः संसार भ्रमदर्शनम्।।१७.१२।।**

प्रपंच सर्वांना दिसतो याचे कारण काय? जन्मतः डोळे उघडल्यापासून ते डोळे मिटेपर्यंत आपण प्रपंच पाहत असतो. प्रपंच दिसतो तो अज्ञानामुळे. आपल्या स्वरूपाचा विसर पडणे हेच अज्ञान होय. संसारविषयीचे ज्ञान आपल्या ठिकाणी भरपूर आहे. जगातल्या सर्व पदार्थांचे ज्ञान जरी एखाद्याला असले तरी तो अज्ञानीच होय. लौकिक ज्ञान कितीही असले तरी एका आत्मज्ञानावाचून मनुष्य अज्ञानीच असतो. एका परमात्म्याला जाणले तर सर्व प्रपंचाचे ज्ञान होते. ज्याला परमात्मज्ञान नसते तो अज्ञानी. त्याला पशू म्हणतात. जोवर त्याला पशुपतीचे ज्ञान होत नाही तोवर तो पशूच असतो. अध्यात्मविद्या नसेल तर सर्व विद्या असूनदेखील उपयोग नाही. लौकिक विद्या नसल्या तरी चालतील, परंतु अध्यात्मविद्या मात्र हवी. केवळ तिच्यामुळेच मनुष्याला मुक्ती मिळू शकते.

सर्व विद्यांचे अध्ययन केलेला एक पंडित आपले सर्व ग्रंथ घेऊन यात्रेला निघाला. प्रवासात एके ठिकाणी नदी ओलांडायची होती. एका नावेत भाडे ठरवून आपल्या ग्रंथांसह तो बसला. नावेत दोघेच होते. एक पंडित, दुसरा नावाडी. पंडिताला आपल्या पांडित्यदर्शनाची उबळ आली. समोर निरक्षर नावाडी होता. त्यामुळे त्याच्या अहंकाराने अधिकच फणा काढला. तो नावाड्याला म्हणाला,

''हे बघ माझे ग्रंथ. मला गणितशास्त्र येते, साहित्यशास्त्र येते, नाट्यशास्त्र पाठ आहे. मी व्याकरणशास्त्रात प्रवीण आहे. जगातल्या सर्व विद्या मी संपादन केल्या आहेत. तुला काय येते? लिहिता वाचता येते?''

''नाही महाराज'', नावाडी म्हणाला, ''मला शिकायला कोठे वेळ मिळाला? पोटासाठी भाकरी मिळवण्यातच माझी जिंदगी बरबाद झाली. मला अजिबात लिहिता वाचता येत नाही.''

''अरेरे!'' पंडित त्याच्या अज्ञानाची कीव करत म्हणाला, ''तुला काहीच येत नाही? तू दोन पायांचा पशू आहेस. तुझ्या आयुष्याला काही अर्थ नाही.''

बिचारा नावाडी पंडिताचे पांडित्य ऐकून गप्प बसला. तेवढ्यात वादळवारे वाहू लागले. पाण्यात उंच लाटा उसळू लागल्या. नाव डगमगू लागली. पंडित घाबरला. त्याचे घाबरणे नावाड्याने बरोबर हेरले. तो पंडिताला म्हणाला, ''महाराज, तुम्हाला पोहणे येते की नाही?''

''नाही.'' निराशेने पंडित उद्गारला.

''काय? तुम्हाला पोहता येत नाही? अशा प्रसंगी तर पोहोण्याची विद्याच जीव वाचवू शकते. नेमकी तीच तुम्हाला येत नाही. इथे तुमच्या बाकी साऱ्या विद्या व्यर्थ आहेत. वाचवा आता विद्यांच्या बळाने आपला जीव.''

असे म्हणून नावाड्याने पाण्यात उडी मारली. पोहत तो किनाऱ्यावर पोहोचला. पंडित मात्र आपल्या सर्व ग्रंथांसह नदीत बुडून मरण पावला. त्याने संपादन केलेली एकही विद्या त्याचे प्राण वाचवू शकली नाही.

अध्यात्मविद्या ही पोहोण्याची विद्या आहे. ती आपल्याला संसारसागरातून तारून नेते. तुमच्या जवळ साऱ्या विद्या आहेत, धन आहे, शेती-वाडी आहे; परंतु एक अध्यात्मविद्या नसेल तर सर्व व्यर्थ आहे. हे कितीजणांना माहीत आहे? मृत्यू एक थप्पड देऊन आपले सर्वस्व एका क्षणात हिरावून घेते. तुमची आयुष्यभराची कमाई एका क्षणात शून्यवत् होते. वासनेमुळे जीवात्म्याला पुन्हा पुन्हा जन्म घ्यावा लागतो. विष माणसाला एकदाच मारते. परंतु वासना वारंवार मारते. वासना पूतनेसारखी असते. ती प्रारंभी समोर येते तेव्हा मायावी सौंदर्य दाखवते आणि नंतर आपले विक्राळ स्वरूप प्रकट करते. तारुण्यात सुख देणारी वासना वृद्धावस्थेत विकृत होऊन दुःख देऊ लागते. अध्यात्मविद्या वासनेचा क्षय करते. वासनेचा क्षय झाला की जन्म-मृत्यूचे रहाटगाडगे थांबते. म्हणून संसारभ्रमाला अज्ञान कारणीभूत असते. अध्यात्मविद्येने अज्ञानाचा नाश झाला की संसारभ्रम विसरून जातो.

**गलिताहंकृतिग्रंथि: क्रीडाकल्पितविग्रह:।**
**जीवन्मुक्तश्चरेद् योगी देहिवन्निरुपाधिक:॥१७.१३॥**

आत्मज्ञान झाले की अहंकाराची ग्रंथी सुटून मोकळी होते. अहंकार म्हणजे अभिमान. मी अमुक आहे, माझ्याजवळ हे आहे इत्यादी. अहंकार मनुष्याला पतित करतो. शिवयोगी निरहंकारी असतो. त्याची अहंकारग्रंथी गळून गेलेली असते. त्याचे जीवन एखाद्या क्रीडेसारखे असते. जीवन आणि क्रीडा हे वेगवेगळे असतात. काम करून मनुष्य थकतो तेव्हा त्याला खेळावेसे वाटते. मुले खेळतात त्याप्रमाणे. अलीकडे खेळ अनेक प्रकारचे झाले असून त्यांचे स्वरूप बदलले आहे. खेळातदेखील अभिमान असतो. मी-तूपणा असतो आणि मारामारीही असते. क्रीडा मनोविनोदनासाठी असते. त्यात कोण हरतो आणि कोण जिंकतो हे महत्त्वाचे नसते. जिंकणाऱ्यालाही आनंद मिळावा आणि हरणाऱ्यालाही आनंद मिळावा, यासाठी खेळ खेळला जातो. हरणाऱ्याला दुःख आणि जिंकणाऱ्याला अभिमान होत असेल तर खेळ खेळ राहाणार नाही. तो व्यवहार होईल.

ज्याचा अहंकार गलीत होतो असा शिवज्ञानी क्रीडेसारखे जीवन व्यतित करतो. अभिमानामुळे जीवन हा 'व्यवहार' ठरतो, तर अभिमानशून्यतेमुळे जीवन क्रीडा होते. अहंकारशून्य झाल्यामुळे ज्ञानी पुरुषाच्या क्रिया क्रीडा होऊन जातात. जीवन्मुक्त झाल्यामुळे तो देही असूनही विदेही असतो. क्रीडाभावाने जीवन व्यतीत केले तर मुक्तीचा मार्ग खुला होतो. लहान मुले किती निरागसपणे खेळतात? ते पतिपत्नी होतात. त्यांना मुलेही

होतात. त्यांचा खेळ सहजपणे चाललेला असतो. त्यात निष्पापपणा असतो. पतिपत्नीचा व्यवहार आणि लहान मुलांचे पतिपत्नी होऊन खेळणे यात खूप अंतर असते. एक व्यवहार असतो तर दुसरा खेळ. लहान मुलांच्या निष्पाप खेळासारखे शिवयोगी आपले जीवन व्यतित करतो. लोकांवर अनुग्रह करणासाठीच त्याने देह धारण केलेला असतो. तो आपल्या शरीराने आपल्यावर श्रद्धा ठेवणाऱ्या भक्तांवर अनुग्रह करतो. म्हणून या स्थलाला 'कायानुग्रहस्थल' असे म्हणतात. येथे कायानुग्रहस्थल पूर्ण झाले, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
१८ जुलै १९९४

---

**आशीर्वचन चौथे**

## इंद्रियानुग्रहस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग-षट्स्थलातील प्रसादिस्थलाचे दुसरे अवांतरस्थल आहे इंद्रियानुग्रहस्थल. याविषयी ज. रेणुकाचार्य सांगतात–

**दर्शनात् परकायस्य करणानां विवेकतः।**
**इंद्रियानुग्रहः प्रोक्तः सर्वेषां तत्त्ववेदिभिः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.१४)

ज्याचे शरीर परब्रह्मस्वरूप झालेले आहे अशा परकाय, शिवयोग्याच्या दर्शनाने सामान्यांच्या ठिकाणी इंद्रियव्यवहारासंबंधी विवेक उत्पन्न होतो. हा विवेक संयमशील इंद्रियांचा अनुग्रह असल्यामुळे उत्पन्न होतो, म्हणून या स्थलाला 'इंद्रियानुग्रहस्थल' असे म्हणतात. इंद्रिये आणि त्यांचे विषय यांच्याविषयी ज्याच्या मनात विवेक उत्पन्न होतो तो आपल्या इंद्रियांच्या द्वारा भक्तांवर अनुग्रह करू शकतो. हा विवेक कसा करावा याविषयी पुढे सांगतात–

**इंद्रियाणां समस्तानां स्वार्थेषु सति संगमे।**
**रागो वा जायते द्वेषस्तौ योगी परिवर्जयेत्।।१७.१५।।**

ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये जेव्हा आपापल्या विषयांशी संबद्ध होतात तेव्हा मनुष्याच्या मनात राग अथवा द्वेष या भावना उत्पन्न होतात. श्रवणेंद्रियांशी जेव्हा शब्दांचा संबंध येतो तेव्हा जर शब्द अनुकूल असतील म्हणजे कोणी स्तुती करीत असेल, तर तेव्हा त्या मनुष्याविषयी आपल्या मनात राग (प्रीती) उत्पन्न होतो. परंतु शब्द जेव्हा प्रतिकूल असतील म्हणजे जर कोणी आपली निंदा करीत असेल, तर तेव्हा त्या माणसाविषयी आपल्या मनात द्वेष उत्पन्न होतो. याचप्रमाणे रूप, रस आणि गंध या विषयांच्या बाबतीत घडते. ते अनुकूल असतील तर आपल्या मनात प्रेम आणि प्रतिकूल असतील तर द्वेष उत्पन्न होतो. विषयांची अनुकूलता-प्रतिकूलता हेच राग-द्वेषांचे कारण असते. एक मनुष्य आयुष्यभर कोणाचा द्वेष करू शकत नाही किंवा कोणावर प्रेमही करू

शकत नाही. तो कधी त्याच्याविषयी प्रेम प्रकट करील तर कधी द्वेष. राग-द्वेष उत्पन्न झाले तर काय बिघडते? असा प्रश्न एखाद्याला पडेल. परंतु संतांनी वारंवार सांगितले आहे की, राग-द्वेष हेच पुनर्जन्माचे कारण होय. ज्याच्या मनातून राग-द्वेषाचे उच्चाटन झालेले असते त्याला पुन्हा जन्म घेण्याचे कारण उरत नाही. मनुष्य पुन्हा जन्म घेतो ते रागामुळे अथवा द्वेषामुळे. तुम्ही जेव्हा एखाद्याला वारंवार भेटायला जाता ते त्याच्याविषयी अनुराग असल्यामुळे. जेव्हा एखादा माणूस तुमच्याकडे पुन्हा पुन्हा येतो ते तुम्हाला त्याच्या द्वेषाचा बळी बनवण्यासाठी. याप्रमाणे या प्रपंचात वारंवार येण्यासाठी राग-द्वेष कारणीभूत असतात.

राग पहिले तर द्वेष हे दुसरे कारण आहे. ज्याच्या विषयी तुमच्या मनात प्रथम अनुराग नसेल त्याच्या विषयी नंतर द्वेष उत्पन्न होण्याचे कारण नाही. म्हणून राग हे भवबीज अर्थात् संसाराचे कारण मानले जाते. रागामुळे जीवात्मा असंख्य वेळा जन्म घेतो आणि असंख्य वेळा मरतो. जन्म-मृत्यूचा एवढा प्रवास करून मनुष्य थकत नाही हेच मोठे आश्चर्य होय. सामान्यांच्या मनात राग-द्वेष असतात, परंतु योग्याच्या मनात मात्र ते नसतात. योग्याचे आणि सामान्य माणसांचे दैनंदिन व्यवहार सारखेच दिसत असले तरी त्याच्या मनात राग-द्वेष नसल्यामुळे त्याच्या आणि सामान्य माणसाच्या व्यवहारात खूप अंतर पडलेले असते. ज. रेणुकाचार्य या निमित्ताने सर्व मानवांना उपदेश करतात की इंद्रियांचा आणि विषयांचा संबंध झाला तरी हरकत नाही. परंतु मनात राग-द्वेष असू नये. इंद्रिय-विषय संबंधामुळे जर मनावर राग-द्वेषाचे ओरखडे उमटले तर तो संबंध वाईट होय. अक्कमहादेवीने म्हटले आहे की, सापाशी खेळणे धोकादायक नाही. परंतु त्याचे विषारी दात आधी काढावेत. त्याप्रमाणे शब्दस्पर्शादी विषयांचा भोग घेणे वाईट नाही, परंतु त्यामुळे राग-द्वेष उत्पन्न होत नसतील तर. भगवान शिव विषारी सर्पांना आपल्या अंगावर अलंकाराप्रमाणे धारण करतात, तर विष्णू विषारी शेषशय्येवर सुखनिद्रा घेतात. शिव-विष्णूंना विषाची बाधा होत नाही याचे कारण भोग्य वस्तूंच्या सहवासात राहूनही ते भोगी नाहीत. त्यांच्या मनात कशाबद्दल राग नाही आणि द्वेषही नाही. राग-द्वेष उत्पन्न होत नसतील तर इंद्रियांचा विषयाशी संबंध आला तरी तो बाधक ठरत नाही. सामान्य माणसाच्या बाबतीत इंद्रिय-विषयांच्या संबंधाने राग-द्वेष उत्पन्न होतो, परंतु योग्यांच्या बाबतीत मात्र असे घडत नाही.

विचार केला असता असे आढळून येईल की, प्रत्येक मनुष्य कुणावर तरी प्रेम करतो आणि कुणाचा तरी द्वेष करतो. राग-द्वेषामुळेच जन्म घ्यावा लागतो आणि त्यांच्यामुळेच मृत्यू पत्करावा लागतो. रात्री कमळाच्या पाकळ्यात बंदिस्त झालेला भुंगा तेथेच आपले प्राण सोडतो, परंतु कमळाची पाकळी भेदून बाहेर मात्र येत नाही. याचे कारण त्याच्या मनात कमळाविषयी अनुराग असतो हे आहे. अशीच अवस्था सर्व मनुष्यांची असते. राग-द्वेषामुळेच पुण्य-पापे घडतात आणि पुण्य-पापामुळे जन्म-मृत्यूचे चक्र मागे लागते. शिवयोग्याच्या मनातून राग-द्वेष नष्ट झाल्यामुळे त्याच्या इंद्रियांत भक्तांवर अनुग्रह करण्याचे सामर्थ्य येते.

**इंद्रियाणां बहिर्वृत्तिः प्रपंचस्य प्रकाशिनी।**
**अन्तः शिवे समावेशो निष्प्रपंचस्य कारणम्।।१७.१६।।**

आपली इंद्रिये बहिर्मुख असतात म्हणून आपल्याला प्रपंच दिसत असतो. जेव्हा आपण झोपतो तेव्हा आपल्या दृष्टीसमोरून जग नाहीसे झाले असते. जेव्हा आपल्याला गाढ झोप लागते तेव्हा बाह्य जग दिसत नाही की स्वप्नातले जग. बहिर्मुख इंद्रियांतून आपले मन प्रपंचाकडे पाहत असते. मनच नेत्राद्वारे रूपाचा, कानाद्वारे शब्दाचा, रसनेद्वारे रसाचा, नाकाद्वारे गंधाचा आणि त्वचेच्या द्वारे स्पर्शाचा अनुभव घेत असते. मन इंद्रियांद्वारे

जेव्हा बाहेर पाहते तेव्हा त्याला प्रपंच दिसत असतो. जागेपणी आपण जग पाहत असतो आणि स्वप्नातही तेच पाहत असतो याचे एकच कारण आहे. आपली मनोवृत्ती अंतर्मुख नाही. निर्मितीच्या वेळी मनुष्याची इंद्रिये बहिर्मुख करून ठेवली आहेत, म्हणून तो बाह्यरूप पाहू शकतो; परंतु त्याला आतले रूप मात्र दिसत नाही. बाहेरचा शब्द ऐकू शकतो, परंतु आतला अशब्द ऐकता येत नाही. बाह्यस्पर्श अनुभवू शकतो, परंतु आतला अस्पर्श त्याला अनुभवता येत नाही. बहिर्मुख इंद्रियांशी मनाचा संबंध असल्यामुळे आपल्याला प्रपंच दिसत असतो.

प्रपंच दिसला तर काय बिघडते? दिसतो तर आम्ही पाहतच राहू, असे कोणी म्हणेल. परंतु प्रपंच दुःखरूप असल्यामुळे त्याच्या दर्शनाने दुःखाची प्राप्ती होते. दुःखी व्यक्तीजवळ तुम्ही जाऊन बसलात तर तुम्हाला दुःखच मिळेल आणि सुखी व्यक्तीजवळ तुम्ही जाऊन बसलात तर तुम्हाला सुख मिळेल. त्याप्रमाणे दुःखरूप प्रपंच आपल्याला सुख कमी आणि दुःख जास्त देतो. गाढ निद्रेत प्रपंचाचा विसर पडून सुखाचा अनुभव येतो. आपण प्रपंचाला जेवढे विसरू तेवढे अधिक परमात्म्याच्या जवळ जाऊ, अधिक सुखानुभव घेऊ. याचा अर्थ प्रपंच सोडून निघून जावे, असा नाही. प्रपंच पाहू नये याचा अर्थ डोळे बंद करून बसावे, असा होत नाही तर प्रपंचाकडे परमात्मदृष्टीने पाहावे असा होतो. मनोवृत्ती अंतर्मुख होऊन शिवाचा साक्षात्कार झाला की सर्व प्रपंच शिवमय दिसू लागतो. शिवयोग्याच्या हृदयात शिव नांदत असतो. म्हणून त्याला बाहेर सर्वत्र शिवच दिसत असतो. अंतर्मुख करणे यालाच योग असे म्हणतात. अंतर्मुख व्यक्ती स्वस्थ असते तर बहिर्मुख व्यक्ती अस्वस्थ. म्हणून प्रत्येकाने अधिकाधिक अंतर्मुख होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. बहिर्मुख वृत्तींना अंतर्मुख करणे यालाच 'योग' असे म्हणतात. मन अंतर्मुख असेल तर प्रपंच नाही आणि मन बहिर्मुख असेल तर प्रपंच आहे.

तुम्ही प्रपंच पाहाल तर तो तुम्हाला दिसेल, तुम्ही पाहणार नाही तर तो दिसणार नाही. तो पाहावा की पाहू नये हे सर्वस्वी तुमच्यावर अवलंबून आहे. सुख हवे असेल तर प्रपंच पाहू नका, दुःख हवे तर पाहा. प्रपंच पाहिल्यावर तो दुःख देतोच, परंतु त्याचे स्मरण देखील दुःखदायक असते. एखाद्या प्रिय व्यक्तीचा मृत्यू होऊन अनेक वर्षे लोटून गेली तरी तिची आठवण झाल्यावर डोळे भरून येतात, त्याप्रमाणे प्रपंचाचे स्मरण दुःख देते. म्हणून शास्त्रकारांनी 'परमात्म्याचे स्मरण करा' असे सांगितले आहे. 'प्रपंचाचे स्मरण करा' असे सांगितलेले नाही. परमात्मा सुखरूप असल्यामुळे त्याचे स्मरण सुखदायक असते. परंतु प्रपंचाचे-स्मरण मात्र प्रारंभी सुखदायक वाटले तरी नंतर अनंत काळ दुःखदायक ठरते.

प्रपंच विषयरूप आहे. उपनिषदांत विषयांना 'अतिग्रह' असे म्हटले आहे. आपल्याला आकाशातील ग्रह माहीत आहेत. त्याचप्रमाणे 'जावई' नावाच्या 'दशमग्रहा'चीही कल्पना आहे. इंद्रिये विषयग्रहण करतात, म्हणून त्यांना 'ग्रह' अशी संज्ञा आहे. परंतु विषय मात्र 'अतिग्रह' आहेत. कारण विषयसेवन करून करून इंद्रिये थकतात. परंतु विषय मात्र सरत नाहीत. आजपर्यंत असंख्य लोकांनी आपल्या इंद्रियांच्या द्वारे विषयांचे सेवन केले. ती माणसे थकली आणि मेली, परंतु विषय मात्र आहेत तसेच राहिले. इंद्रिये विषयसेवन करून थकतात, परंतु मन मात्र अतृप्त राहिलेले असते. तुम्ही वृद्ध व्हाल, परंतु तुमचे मन मात्र कधीच वृद्ध होणार नाही. मन कधीच भरत नाही. आधी ते पोटभर जेवण मागेल, पोट भरल्यावर दुसरे काहीतरी मागत राहील. मन मागेल ते देण्याचा मनुष्य आयुष्यभर प्रयत्न करतो तरी देखील मृत्यूच्या क्षणी मन अतृप्तच असते. फार कमी माणसे तृप्त मनाने हे जग सोडतात. हसत हसत मृत्यूला सामोरे जाणारे किती लोक असतात? रडणारेच अधिक असतात. जो रडत रडत मरण पावतो तो दुसरा जन्म घेताना रडतच या जगात येतो. जन्मानंतर हसणारे मूल कोणी पाहिले आहे काय? या जन्मातील अंतिम स्थिती जशी असेल तशीच दुसऱ्या जन्मातील प्रारंभीची स्थिती असते. रडत

जातो तो रडतच येतो. जन्माची सुरुवातच रडण्याने होते आणि पुढे आयुष्यभर रडणेच येते. जीवनाचा उपक्रम रडणे आणि उपसंहार देखील रडणेच. आदी, मध्य आणि अंत असा रुदनमय असल्यामुळे पुढचा जन्म देखील मागील पानावरून पुढील पानावर ओढल्याप्रमाणे रुदनमय ठरतो. प्रपंच असा सर्वांना रडवतो. प्रपंचातील सारेजण रडतात. एखादाच हसणारा असतो. सगळेच रडणारे असतात तेव्हा एखादा हसणारा आणि हसवणारा पाहिजे असतो. हसणे ही आनंदाची अभिव्यक्ती असते. तर रडणे हा दुःखाचा आविष्कार असतो. ज्याचा चेहरा विषादाने काळवंडलेला असतो त्याच्या मनात दुःख साचून राहिलेले असते. ज्याच्या चेहऱ्यावर प्रसन्नता ओसंडत असते त्याच्या हृदयात आनंद भरून राहिलेला असतो. दुःखमय प्रपंचात मन सुखाचा शोध घेत असते. प्रपंच म्हणजे दुःखाचा बाजार. कोणत्याही दुकानात जा, तेथे दुःखच मिळेल, सुख नव्हे. त्या दुःखावर सुखाचे झिरझिरीत आवरण असेल. या बाजारात सर्वजण मागणारेच आहेत. देणारे कोणी नाही.

'नहि भिक्षुकः भिक्षुकं याचते।' एक भिकारी दुसऱ्या भिकाऱ्याकडे भीक मागू शकत नाही. मागितली तर तो म्हणेल, 'मीही भिकारीच आहे, मला का मागतोस?' सर्वजण भिकारी असतात. दोन भिकारी एकत्र आले तर सुखी होणार नाहीत. ह्याच्याकडून त्याला काही मिळणार नाही आणि त्याच्याकडून ह्याला काही मिळणार नाही. सारे जीव मागणारे आहेत. देणारा फक्त एकच आहे. परमेश्वरला जोपर्यंत मागण्याची प्रवृत्ती आपल्याजवळ असेल तोपर्यंत आपण 'जीव'च राहणार. देणारा 'देव' काही होणार नाही. जीव जगात येऊन सुखप्राप्तीसाठी कितीतरी वस्तूंचा संग्रह करतो. घर, जमीन, शेती. तरीदेखील त्याला पूर्ण तृप्ती देणारे सुख लाभत नाही. मन प्रपंचापेक्षा मोठे असल्यामुळे ते तृप्त होत नाही. मनाच्या तुलनेत प्रपंच फार लहान आहे. एखादी वस्तू मिळाली की मन तृप्त झाल्यासारखे दिसते. परंतु नंतर पाहावे तर ते आपले उपाशीच असते. मन म्हणजे रबराचा तंबू. जेवढा ताणाल तेवढा ताणतो. सारे मिळून देखील मन अतृप्त राहते. ज्या मनात भगवंताचा निवास असतो तेच मन पूर्ण तृप्त होऊ शकते. प्रपंचापेक्षा मोठे असलेले मन परमात्म्यासमोर मात्र अत्यंत लहान ठरते. परमात्म्याच्या लाभाने मन पूर्ण तृप्त होते आणि प्रापंचिक वृत्तींपासून ते विमुख होते. म्हणून असे म्हटले आहे की मनाची बहिर्वृत्ती प्रपंचाचे दर्शन घडवते तर त्याची अंतर्वृत्ती परमात्म्यापर्यंत घेऊन जाते. ज्याला शिवाचा अनुभव लाभतो तो पूर्ण तृप्त होतो. तो कोणाला काही मागायला जात नाही. सुखाचा खजिनाच त्याच्याजवळ असल्यामुळे तो दुसऱ्याला काय मागणार? तो आतल्या आत आनंदाने उचंबळत असतो. शिवयोगी दिवसाचे चोवीस तास अंतर्मुख होऊन शिवानंदात रमलेला असतो. सामान्य माणसाला हे साधणार नाही; परंतु त्याने दिवसातून काही तास, काही मिनिटे तरी अंतर्मुख झाले पाहिजे. सुषुप्ति-अवस्थेत सामान्य माणसाला देखील सुखानुभव येत असतो. परंतु ती अवस्था आपल्या अधीन नसते. आपण मागू त्यावेळी आपल्याला गाढ निद्रा लागेलच असे नाही. म्हणून प्रयत्नपूर्वक साधना करून ही अवस्था मिळवावी लागते. निष्प्रपंच परमात्म्याचे ध्यानच मनुष्याला आनंदाची प्राप्ती करून देते.

**क्षणमंतः शिवं पश्यन् केवलेनैव चेतसा।**
**बाह्यार्थानामनुभवं क्षणं कुर्वन् दृगादिभिः॥१७.१७॥**

अंतर्मुख झाल्यावर शिवयोगी प्रपंच पाहात नाही काय? दारे खिडक्या बंद करून घरात बसावे त्याप्रमाणे सर्व इंद्रिये बंद करून तो बसलेला असतो का? तर तसे नाही. शुद्ध मनाने शिवयोगी अंतर्मुख होऊन हृदयस्थ शिवाचे दर्शन घेतो, दुसऱ्या क्षणी बर्हिमुख होऊन इंद्रियांच्या द्वारे प्रपंच देखील पाहतो. दोन वस्तू समोरासमोर ठेवून निरीक्षण केल्यावर त्या वस्तूंमध्ये काय फरक आहे हे समजू शकते. आपण प्रपंच ही एकच वस्तू पाहत असतो

आणि याच्यापेक्षा काही मोठे नाही असे समजत असतो. दुसरी वस्तू म्हणजे परमात्मा आपण पाहिलेला नसतो. विहिरीतल्या बेडकासारखी आपली अवस्था असते. हे पाचभौतिक विश्व, त्यातील शब्दस्पर्शादी विषय हेच खूप मोठे आहेत असे आपल्याला वाटते. त्याचा आपण अभिमान वाहतो. आपल्यापेक्षा जगात कोणी मोठा नाही असे आपल्याला वाटते. परंतु ज्याक्षणी मृत्यू आपले प्राण हरवून घेतो त्याक्षणी आपण सर्वात लहान होऊन जातो. त्यावेळी आपले स्वत:चे असे काही राहत नाही. भौतिक वस्तूंचा संग्रह केल्यामुळे मनुष्य मोठा होत नाही. तो मोठा होतो ईश्वरचिंतन केल्यामुळे. 'महात्मा' हा शब्दप्रयोग आत्मोद्धार आणि लोकोद्धार यांची तळमळ असणाऱ्या आणि महान अशा परमात्म्यास जाणणाऱ्या महामानवासाठी केला जातो. जो महत्तत्त्वाला जाणतो तोच महान असतो. उपनिषदांत म्हटले आहे- 'यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति।' जो सर्वात मोठा आहे तो सुखदायक आहे. जो लहान आहे तो दु:खदायक आहे. मनुष्याला मोठे व्हावेसे वाटते. मोठे घर बांधून, खूप संपत्ती मिळवून, शेतजमीन खरेदी करून तो मोठा होऊ पाहतो. परंतु त्यामुळे मोठेपण काही लाभत नसते. सर्वात महान तत्त्वाला जाणतो तोच केवळ मोठा असतो. सर्वात मोठे तत्त्व परमात्मतत्त्व होय. त्याच्यातूनच ही सृष्टी उत्पन्न झाली आहे. त्याच्यातच ही स्थिर आहे आणि त्याच्यातच ही विलीन होणार आहे. सृष्टी मोठी नसून तिच्यावर अनुग्रह करणारा परमात्मा मोठा आहे. तोच परमात्मा आत्मरूपाने तुमच्या हृदयात विद्यमान आहे. तुम्ही अंतर्मुख होता तेव्हा त्याच परमात्म्याचा साक्षात्कार होतो आणि बहिर्मुख होऊन पाहता तेव्हा प्रपंच दृष्टीला पडतो. प्रपंच हे 'कार्य' असून परमात्मा हे 'कारण' होय.

शिवयोगी क्षणभर अंतर्मुख होऊन अंतरंगातल्या शिवाचे दर्शन घेतो तर दुसऱ्या क्षणी बहिर्मुख होऊन प्रपंच पाहतो. दोन्हीची जणू तुलना करतो. परमात्मा मोठा की प्रपंच मोठा? याच्यामुळे सुख मिळते की त्याच्यामुळे? आणि शिवासमोर त्याला सर्व प्रपंच तुच्छ वाटतो. शिवज्ञानसंपन्न योग्याला सारे जग तृणासारखे क्षुद्र वाटते. शिवदर्शन झालेल्या इंद्रियांनी तो जगावर अनुग्रह करतो. ज्या इंद्रियांना शिवाचा अनुभव येत नाही त्या इंद्रियांजवळ अनुग्रहाचे सामर्थ्य नसते. ज्या हातांनी भगवंताची पूजा होत नाही, ते हात आशीर्वाद द्यायला असमर्थ ठरतात. जे पाय मंदिराच्या दिशेने चालत नाहीत आणि मंदिराची परिक्रमा करत नाहीत त्या पायांवर डोके ठेवून कोणाचे कल्याण होत नसते. जी दृष्टी भगवंताचे रूप न्याहाळते त्या दृष्टीत आणि जी वाणी भगवंताचे गुणगान करते त्या वाणीत अनुग्रह करण्याचे सामर्थ्य असते. शिवयोगी दर्शन देऊन, स्पर्श करून, आशीर्वाद देऊन भक्तांवर अनुग्रह करतो. इंद्रियांच्या द्वारा अनुग्रह करण्याचे सामर्थ्य त्याच्या जवळ असल्यामुळे त्याला 'इंद्रियानुग्राहक' असे म्हटले जाते.

**सर्वेंद्रियनिरूढोऽपि सर्वेंद्रियविहीनवान्।**
**शिवाहितमना योगी शिवं पश्यति नामपरम्।।१७.१८।।**

शिवयोग्याची सर्व इंद्रिये जेव्हा शिवमय होतात तेव्हा तो इंद्रिये असून देखील इंद्रियरहित होतो. त्याच्या इंद्रियांना शिवाशिवाय दुसरे काहीच दिसत नाही. शिवयोगी इंद्रियांनी भक्तांवर अनुग्रह करतो, म्हणून या स्थलाला 'इंद्रियानुग्रहस्थल' असे म्हणतात. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
१९ जुलै १९९४

## इंद्रियानुग्रहस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आपण कालपासून इंद्रियानुग्रह या अवांतरस्थलाविषयी ऐकत आहात. ज्याची इंद्रिये अंतर्मुख होऊन हृदयस्थ शिवाचे दर्शन घेतात असा शिवयोगी आपल्या इंद्रियांनी भक्तावर अनुग्रह करतो. हा शिवयोगी जरा-मरणाच्या पलीकडे कसा गेलेला असतो याचे वर्णन ज. रेणुकाचार्य करतात–

**न जरा मरणं नास्ति न पिपासा न च क्षुधा।**
**शिवाहितेंद्रियस्यास्य निर्मानस्य महात्मनः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.१९)

शिवयोग्याचे इंद्रियव्यापार शिवामध्ये विलीन झालेले असतात. त्याच्या ठिकाणी देहाभिमान नसतो, म्हणून त्याला जरा आणि मरण देखील नसते. सामान्य माणूस देहाभिमानी असल्यामुळे आपल्याला वार्धक्य आले, मरण आले, असे त्याला वाटत असते. प्रतिक्षणी क्षीण होत जाणे हा देहाचा धर्मच आहे. शरीर जसजसे विनाशाच्या दिशेने वाटचाल करू लागते तसतसे जरा म्हणजे वार्धक्य त्याच्यावर पसरत जाते. अरण्यात वाघाला पाहून माणसाला भीती वाटते, त्याप्रमाणे वृद्धावस्था आलेली पाहून मनुष्य मरणाच्या शंकेने भयभीत होतो. शरीरदेखील आपला एक गुरूच होय. ते प्रतिक्षणी आपल्याला काहीतरी सांगत असते. आपण ऐकत नसतो इतकेच. गुरूचे शब्द जिथे ऐकले जात नाहीत तिथे शरीराचा मूक उपदेश कोण ऐकणार? कवी मोरोपंत एके ठिकाणी म्हणतात–

**कृतांतकटकामलध्वजजरा दिसो लागली।**
**पुरस्सरगदांसवे झगडता तनु भागली।।**

डोक्यावरचा पहिला पांढरा केस म्हणजेच यमराजाच्या पहिल्या पथकातला जणू ध्वजच! हा ध्वज पाहिला की यमाचे सैन्य हळूहळू आपल्या दिशेने येत आहे असे समजावे. शरीरातल्या जुनाट रोगांसोबत झगडून देह थकून गेला, असा वरील ओळींचा आशय आहे. जरा आणि मरण हे शरीराचे धर्म होत. जरेनंतर मरण अटळ आहे. जीवात्मा शरीरात प्रविष्ट होतो तो 'जन्म' आणि जीवात्मा शरीर सोडून जातो ते 'मरण' अशा जन्म-मरणाच्या सोप्या व्याख्या आहेत. गीतेने तर जुने वस्त्र त्यागणे म्हणजे मरण असे म्हटले आहे. जन्मल्यापासून मरेपर्यंत मनुष्य अंगावर किती वस्त्रे धारण करतो आणि टाकून देतो याची गणना कोणी केली आहे का? त्याप्रमाणेच या संसाराच्या प्रवाहात जीवात्म्याने असंख्य देह धारण करून ते टाकून दिलेले असतात. नवे शरीर मिळाले तरी आपण त्याला वापरून वापरून वस्त्र फाडावे तसे पुन्हा जीर्ण करत असतो. सर्व डॉक्टरांनी मिळून कितीही प्रयत्न केला तरी ते सुधारणार नाही अशी त्याची अवस्था करून टाकतो. कबिराने मात्र शरीर सोडताना भगवंताला म्हटले, 'ज्यों की त्यों धरीदिनी चदरिया।'

प्रभू, तू जे शरीर मला दिले आहे ते जसेच्या तसे पवित्र ठेवून मी तुला परत करीत आहे. आपल्यावर देखील शरीर परत करण्याची वेळ कधीतरी येतेच. पंचमहाभूतांकडून ते घेतलेले असते. म्हणून त्यांना ते परत करावेच

लागते. योगी शरीर परत करतो आणि भोगीदेखील परत करतो. फरक इतकाच की भोग्याने परत केलेले शरीर ज्यों की त्यों- जसेच्या तसे- राहिलेले नसते. ते जीर्ण-शिर्ण अपवित्र करून देतो. जीर्ण होणे हा शरीराचा स्वभाव आहे. मरण येते तेव्हा भोगी भयभीत होतो, योगी होत नाही. योग्याच्या दृष्टीने मरण म्हणजे एका उपाधीचा त्याग करणे असते, परंतु भोग्याच्या दृष्टीने सर्व व्यक्ती आणि वस्तूंचा तो चिरवियोग असतो. घर-दार, मुले-बाळे, शेत-जमीन इ. सारे सोडून जाताना तो व्याकूळ होतो. योग्यांना मात्र जरा-मरणाची अणुमात्र क्षिती वाटत नाही. कारण त्याच्या ठिकाणी देहभिमान उरलेलाच नसतो. त्यामुळे शरीराचे काहीही झाले तरी त्याविषयी ते निश्चिंत असतात.

क्षुधा-तृषा सर्वांना असते. योग्यालाही भूक-तहान लागते. भोगी आणि योगी यांच्यात एवढाच फरक आहे की 'मला भूक-तहान लागली' असे भोगी म्हणतो तर आपल्या देहाला भूक-तहान लागली असे योगी मानतो. क्षुधा-तृषा हे प्राणाचे धर्म आहेत. ज्या शरीरात प्राण असतो अशा शरीराला भूक-तहान लागते. ज्या शरीरातून प्राण निघून गेलेला असतो अशा शरीराला भूक तहान लागत नसते. क्षुधा-तृषा हे प्राणाचे धर्म आहेत, जरा-मरण हे देहाचे धर्म आहेत, सुख-दुःख हे मनाचे धर्म आहेत. असा विवेक योग्याच्या ठिकाणी असतो. म्हणून त्याला भूक नसते की तहान, जरा नसते की मरण. हा मी आहे आणि हे माझे आहे- हा अभिमान होय. योग्यांच्या ठिकाणी अभिमान नसल्यामुळे शरीर जीर्ण झाले तरी शरीर म्हणजे मी नाही आणि शरीर माझे नाही आणि मी पंचमहाभूतांपासून वेगळा असल्यामुळे शरीर म्हणजे मी नाही; असा विचार तो करतो. अभिमान हे बंधनाचे कारण आहे तर निरभिमान हे मुक्तीचे साधन. मुक्ती मिळवायची असेल तर अभिमान सोडला पाहिजे. जीव अभिमानी असतो तर शिव निरभिमानी. एक घर बांधले की मनुष्य 'हे मी केले हे मी केले' असा अभिमान वाहत बसतो, परंतु एवढी सृष्टी निर्माण करूनदेखील शिव निरभिमानी असतो. प्रकृती आणि परमात्मा प्रचंड कार्य करतात, परंतु ते कोठे बोलून दाखवत नाहीत. एक लहानसे बीज भूमीत पेरले तर त्यापासून महाकाय असा वृक्ष उत्पन्न होतो, जो सर्वांना थंडगार सावली आणि मधुर फळे देतो. एवढे निर्माणकार्य करून देखील प्रकृती मौन असते, बोलून दाखवत नाही. तो वृक्षदेखील मी इतक्या लोकांना सावली दिली, फळे दिली असे बोलत नाही. परमात्मा आणि प्रकृती यांचे कार्य मौनपणे चालू असते

माणूस मात्र कधी मौन राहत नाही. म्हणून त्याला मौन राहायला सांगावे लागते. दिवसभर मौन पाळ, आठवडाभर मौन पाळ. कुठलीही इच्छा व्यक्त न होणे हे खरे मौन होय. हावभाव करून अथवा कागदावर लिहून इच्छा व्यक्त करू नये. शब्द न उच्चारणे ही पहिली पायरी आहे. परमात्मा आणि प्रकृती मौन राहून जणू 'मौन राहा' असे आपल्याला सांगत असतात. माणूस भगवद्दर्शनासाठी तीर्थयात्रा करतो. काशी-केदार-रामेश्वर. परत आल्यावर कित्येक लोकांसमोर, कित्येक वेळा आपल्या तीर्थयात्रेचा डांगोरा पिटत असतो. तुम्ही एकदा त्याला पाहता तर हजार वेळा सांगत सुटता. तो असंख्य वेळा तुम्हाला पाहत असतो, परंतु एकदाही बोलत नसतो. ज्याचे आपल्या वाणीवर, मनावर नियंत्रण नसते तो भगवंताजवळ जाऊ शकत नाही किंवा भगवंतही होऊ शकत नाही. म्हणून इंद्रियानुग्रहस्थलाचे दोन अर्थ आहेत. इंद्रियांचा निग्रह करणे म्हणजे इंद्रियांवर अनुग्रह करणेच होय. हा एक अर्थ आहे. ज्यांनी इंद्रिय निग्रह केला असे शिवयोगी इंद्रियांच्या द्वारे भक्तांवर अनुग्रह करतात, हा दुसरा अर्थ होय.

निरभिमानी योग्याच्या दृष्टीने जरा-मरण नाही. याचा अर्थ योगी मरत नाही असा होत नाही. मृत्यू हा तर शरीराचा धर्म आहे. ज्यांनी दुसऱ्यांना जीवदान दिले त्यांना देखील मृत्यू पत्करावा लागतो. कोणाचा अकस्मात

मृत्यू झाला तर तो अचानक कसा मेला, याबद्दल आपल्याला आश्चर्य वाटते. परंतु तो इतके वर्षे जिवंत कसा राहिला, याचे आश्चर्य वाटले पाहिजे. देहाला नऊ द्वारे आहेत. त्यातल्या एकातून देखील प्राण बाहेर जाऊ शकतो. फुग्याला केवळ एक टाचणी टोचली तरी सारी हवा बाहेर जाते; परंतु नवद्वार असलेल्या देहात इतकी वर्षे प्राण टिकला कसा, याचे विवेकी मनुष्याला आश्चर्य वाटते. म्हणून भोगी आणि योगी दोघांची शरीरे मृत्युमुखी पडतात. योग्याच्या ठिकाणी देहाभिमान नसल्यामुळे त्याला मृत्यूचे भय नसते इतकेच.

**मनो यत्र प्रवर्तेत तत्र सर्वेंद्रियस्थितिः।**
**शिवे मनसि सल्लीने क्व चेंद्रियविचारणा।।१७.२०।।**

इंद्रियांचा निग्रह करायचा असेल तर प्रथम इंद्रियांचा अध्यक्ष असलेल्या मनाचा निग्रह केला पाहिजे. जिथे जिथे आपले मन जाते तिथे तिथे इंद्रिये धावत सुटतात. कोंबडीच्या मागे तिची पिल्ले धावत सुटतात त्याप्रमाणे. मनाच्या साहाय्याशिवाय इंद्रियांना कार्य करता येत नाही. डोळ्यांना रूप पाहायचे असेल तर मनाचा सहयोग हवा. मन नसेल तर डोळ्यांनी रूप पाहायचे असेल तर मनाचा सहयोग हवा. मन नसेल तर डोळ्यांनी पाहून उपयोग नाही. सत्संगात येण्यासाठी मन तयार पाहिजे, तसेच इथे बसण्यासाठीही मनाची तयारी हवी. बरेच लोक इथे येऊन बसतात आणि लगेच निघून जातात. निघून जातात याचा अर्थ उठून जातात, असा नाही तर त्यांचे शरीर इथे बसलेले असते आणि मन भलतीकडेच गेलेले असते. अशा अवस्थेत आम्ही काय सांगतो हे कळणेच शक्य नाही. बरेच जण इथे येतात आणि आपल्या विचारात मग्न होऊन जातात. प्रवचनातील एखादी गोष्ट ऐकून जेव्हा इतर लोक हसतात तेव्हा त्यांना जाग येते. म्हणून मनाला वगळून स्वतंत्रपणे व्यवहार करण्याचे सामर्थ्य इंद्रियांत नाही. मनाच्या सहकार्याशिवाय इंद्रिये कार्य करू शकत नाहीत. मनाला जे हवे असते ते कार्य मन इंद्रियांकडून करून घेते. सर्व इंद्रियांच्या द्वारे विषयोपभोग घेणारे मनच असते.

मन जेथे राहते तेथेच सारी इंद्रिये राहतात. म्हणून इंद्रियनिग्रहाचा एक सोपा उपाय येथे सांगितला आहे. इंद्रियांच्या मागे लागण्यापेक्षा इंद्रियाध्यक्ष मनालाच पकडा आणि मनाला भगवान शिवात विलीन करा. मग इंद्रिये देखील मनाच्या मागे येतात आणि त्यांचे बाह्य व्यवहार बंद होतात. गाढ निद्रेत आपले सारे इंद्रियव्यवहार थांबलेले असतात. त्यावेळी आपण खात नसतो, पीत नसतो, पाहत नसतो. काहीच करत नसतो. इंद्रियव्यवहार त्यावेळी बंद का असतात? याचे कारण म्हणजे इंद्रियांच्या द्वारे विषय सेवन करणारे मन त्यावेळी आत्मरूपात विलीन होऊन आनंदमग्न झालेले असते. हा अनुभव सगळ्यांना येतो. जेव्हा मन विलीन होते तेव्हा इंद्रियव्यापार थांबतात. त्याप्रमाणेच भगवान शिवात मन विलीन झाले की इंद्रियविकारांचा योग्याला त्रास होत नाही.

**यद्यत् पश्यन् दृशा योगी मनसा चिन्तयत्यपि।**
**तत्तत् सर्वं शिवाकारं संविद्रूपं प्रकाशते।।१७.२१।।**

मन शिवमय झाले तर शिवयोग्याला सारा प्रपंच शिवमय दिसू लागतो. मन संसारमय झालेले असेल अशा वेळी भगवंत समोर आले तरी आपण त्याला ओळखणार नाही. त्याला आपण सामान्य माणूस समजू. म्हणून सर्व व्यवहार मनावरच अवलंबून असतात. शिवयोग्याला अंतरंगात आणि बहिरंगात सर्वत्र शिवाचाच साक्षात्कार होत असतो.

**करणैः सहितं प्राणं मनस्याधाय संयमी।**
**योजयेत् स शिवः साक्षाद् यत्र नास्ति जगद्भ्रमः।।१७.२२।।**

वेदान्तात प्रपंचाला 'भ्रम' असे म्हटले आहे. वस्तूचे रूप असते एक आणि भासते दुसरे. याला 'भ्रम' असे म्हणतात. दोरीला पाहून सापाचा भास होणे, झाडाचा बुंधा पाहून चोराचा भास होणे आणि उन्हात चमकणारा शिंपला पाहून चांदी भासणे हे भ्रम होत. भ्रम म्हणजे अध्यास. शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान म्हणजे अध्यासवाद होय. जगातला प्रत्येक मनुष्य भ्रमित झालेला आहे. सत्-चित्-आनंदस्वरूप अशा परमात्म्याला तो विसरतो आणि असत्-अचित्-दुःखस्वरूप अशा प्रपंचाला चिकटून राहिलेला असतो. केवळ ज्ञानामुळेच भ्रमाची निवृत्ती होऊ शकते. भ्रमनिवृत्तीची तीन साधने येथे सांगितलेली आहेत. इंद्रिये, मन आणि प्राण. इंद्रियांचा अध्यक्ष मन आहे आणि मनाचा अध्यक्ष प्राण आहे. इंद्रियांचा निग्रह करायचा असेल तर मनाचा निग्रह करावा लागतो. इंद्रियांना विषयांपासून परावृत्त करायचे असेल तर आधी मनाला परावृत्त करावे लागते. मनावर नियंत्रण ठेवण्यासाठी प्राणावर नियंत्रण ठेवावे लागते. यासाठी योगशास्त्रात प्राणायाम प्रक्रिया सांगितली आहे.

पूजा करताना आचमन करून प्राणायाम करावा लागतो. परंतु नुसते नाक दाबून इकडून तिकडून भरभर श्वास सोडणे म्हणजे प्राणायाम नव्हे. प्राणायामप्रक्रिया नीट समजून घेऊन ती आचरिली पाहिजे. प्राणावर नियंत्रण ठेवले तर मनावर नियंत्रण ठेवता येते. मनावर नियंत्रण ठेवण्यासाठीच योगशास्त्राने प्राणनियंत्रणाचा मार्ग शोधून काढला आहे. मन अत्यंत चंचल असते. तरुणांचे मन चंचल असते, यात नवल पाही. परंतु म्हाताऱ्याचे मन तरुणांपेक्षाही अधिक चंचल असते, हे एक आश्चर्यच होय. शरीर म्हातारे झाले तरी मन म्हातारे व्हायला तयार नसते. ज्याचे मनावर नियंत्रण असते त्याचे सर्वावर नियंत्रण असते. मन वायुतत्त्वाचे बनलेले आहे. वायूला संस्कृत भाषेत 'सदागति' असे एक नाव आहे. सतत चालणारा म्हणजे सदागती. वायूचा अत्याधिक अंश मनात असल्यामुळे मनदेखील सतत चालत असते. कधीही गप्प बसत नाही. म्हणून ते चंचल असते. शरीर गप्प बसेल, पण मन नाही. ते तुम्हाला इथे ठेवून दुसरीकडे निघून जाईल. वायूला बांधून ठेवणे जेवढे कठीण तेवढेच मनाला बांधून ठेवणे अवघड. परंतु जो वायूला बांधून ठेवू शकतो तो मनाला देखील बांधून ठेवतो. म्हणून येथे सांगितले आहे की, इंद्रिये, मन आणि प्राण यांना शिवार्पित करावे. प्राणाला शिवार्पित कसे करावे? तर श्वासासोबत मंत्रजप केला पाहिजे. श्वास आणि मंत्र यांचा संयोग झाला तर प्राण भगवंताला अर्पित होतो. जेवढे श्वास आपण घेतो तेवढे भगवन्नाम घेतले पाहिजे. आपण श्वास घेतो ही भगवंताची कृपा आहे.

इंद्रियांवर आणि मनावर नियंत्रण ठेवणे म्हणजेच त्यांच्यावर अनुग्रह करणे होय. बिघडलेल्या मुलाला शासन करून जेव्हा ताळ्यावर आणले जाते तेव्हा त्याच्यावर आईवडील उपकारच करत असतात. इंद्रियनिग्रह व मनोनिग्रह याच प्रकारचा असतो. शास्त्र म्हणजे भगवंताचा उपदेश. कसे वागावे आणि कसे वागू नये, हे शास्त्र सांगत असते. परंतु शास्त्राप्रमाणे वागणारे लोक संख्येने कमी आहेत आणि शास्त्रविरुद्ध वागणारेच अधिक आहेत. आपण योग्य वर्तन करीत आहोत असेच त्यांना वाटत असते. जगात अशा वेड्यांची संख्या अधिक असते.

एका नगरात एक तपस्वी महात्मा गेला. तेथे त्याला कोणीही भिक्षा घातली नाही. उलट त्याचा पदोपदी अपमान करण्यात आला. तपस्व्याने सर्व नागरिकांना धडा शिकवण्याचे ठरवले. ज्या विहिरीतून सर्व नगराला पाणीपुरवठा होत असे त्या विहिरीतले पाणी त्याने अभिमंत्रित केले. जो हे पाणी पिईल त्याला वेड लागेल. झाले, दुसऱ्या दिवशी सगळे ते पाणी प्याले आणि सर्व नागरिकांना वेड लागले. अंगावरचे कपडे फाडून सर्वजण दिगंबर झाले. राजाच्या नावाने ओरडत नागरिकांचा जथा राजवाड्याकडे निघाला.

राजाने आणि प्रधानाने त्यांना येताना पाहिले. त्यांना आश्चर्य वाटले. राजवाड्यात वेगळी विहीर असल्यामुळे तेथील लोकांना वेड लागलेले नव्हते. आपल्या प्रजेची दिगंबर अवस्था पाहून राजाने त्यावर चौकशी केली, तेव्हा त्याला खरा प्रकार समजला. सर्व प्रजा वेडी झाल्यामुळे आपण शहाणे राहून यांच्यावर राज्य करण्यात अर्थ नाही, हे त्याला उमगले. तो प्रधानाला म्हणाला,

''जा, माझ्यासाठी देखील त्या विहिरीतले पाणी घेऊन ये. सर्व प्रजा दिगंबर आणि पागल असताना मी अंगावर कपडे ठेवून आणि शहाणा राहून त्यांच्यावर राज्य करू शकत नाही. कारण हे बहुसंख्य आहेत आणि मी एकटा आहे. ज्या ठिकाणी सगळेच वेडे असतात तेथे एक शहाणा वेडा ठरतो. कारण बहुमताने ठराव करून ते शहाण्याला वेडा ठरवू शकतात.''

आपली अशीच स्थिती असते. शास्त्राच्या आदेशाचे नव्याण्णव टक्के लोक उल्लंघन करतात. केवळ एकच मनुष्य शास्त्रादेश पाळत असतो. ज्यांची संख्या अधिक त्यांचेच आचरण बरोबर आहे असे मानले जाते. मनुष्यसमाज सुधारायचा असेल तर त्यांची पागल बुद्धी सुधारायला पाहिजे. शास्त्राचे शासन बुद्धीवर हवे आणि बुद्धीचे इंद्रियांवर. तेव्हाच आपले जीवन सुधारू शकते. म्हणून आपली सर्व इंद्रिये, मन आणि प्राण भगवदर्पण केले पाहिजे. इंद्रियांनी भगवंताची पूजा घडावी, मनाने भगवंताचे चिंतन व्हावे आणि श्वासोच्छवासासोबत भगवंताचे नामस्मरण करावे. जप किती करावा? कमीत कमी १०८ वेळा करावा, असे आम्ही सांगतो. नामस्मरण हा एक अभ्यास आहे. तो वाढत गेला पाहिजे. परंतु बरेच लोक १०८ च्या पुढे जातच नाहीत. मरेपर्यंत १०८ च जप करतात. एखादा बुद्धू मुलगा वर्षानुवर्षे पहिल्याच वर्गात राहतो, त्याची प्रगती होत नाही. तसेच हे आहे. काही महाभाग तर पहिल्या वर्गातून वर तर जात नाहीत, उलट खालच्या वर्गात, बालवाडीत येतात. म्हणतात, ''महाराज, काय करावे? प्रपंच वाढलाय. रोज १०८ जप करणे जमत नाही. म्हणून ५० च करतो, चालेल का?'' आम्हाला वाटते ''नाही म्हणावे तर हे देखील सोडतो. म्हणून आम्ही म्हणतो, 'हो चालेल' काही लोक ५० वरून २५ वर येतात तर काही जण ५ वरच येतात.

आपल्या नामस्मरणाची अशी अवस्था आहे. ही प्रगती आहे की अधोगती? व्यापारात जास्तीत जास्त नफा मिळवणे याला प्रगती म्हणतात. नामस्मरण असेच वाढवावे लागते. तुम्ही व्यापारात कितीही पैसे मिळवले तरी ते शेवटी उपयोगी पडणार नाहीत. समजा तुमच्याकडे दहा लक्ष रुपये आहेत. परंतु अंतकाळी त्या दहा लक्षाला मूल्य नाही. त्यावेळी तुम्ही केलेला दहा हजार जप अधिक मौल्यवान असतो इहलोक सोडून जाताना कोणाला धनदौलत घेऊन जाता येत नाही. त्याला केवळ धर्म घेऊन जाता येते. यासाठीच आपल्याला इंद्रिये, मन आणि प्राण भगवदर्पण करावे लागतात. आपल्याला संसारही करायचा असतो आणि परमार्थ देखील साधायचा असतो. जशी भौतिक प्रगती करून घेतली पाहिजे, तशीच आध्यात्मिक प्रगतीही झाली पाहिजे. पहिल्या वर्षी १०८ जप करीत असाल तर दुसऱ्या वर्षी २०८ करावा, तिसऱ्या वर्षी ३०८ करावा. नामजपाचा अभ्यास असा वाढता ठेवावा. भगवन्नामात मुक्ती देण्याचे सामर्थ्य आहे तसेच भुक्ती अर्थात् सुखोपभोग देण्याचे सामर्थ्यही आहे.

जन्मल्याबरोबर आपली कुंडली तयार केली जाते. कुंडलीतील बारा स्थाने म्हणजे आपल्या जीवनाचे बारा पैलू असतात. मातृ-पितृ, संतती, लाभ, शत्रू, मित्र, मृत्यू इत्यादींचे एकेक स्थान असते. त्या स्थानी असलेल्या ग्रहांच्या प्रभावाखाली सर्व गोष्टी घडत असतात. कुंडलीतले ग्रह कोणाही ज्योतिष्याला बदलता येत नाहीत. बरेच ज्योतिषी तर गावभर सर्वांची भविष्ये पाहून आपला हात दुसऱ्या ज्योतिषाला दाखवत असतात. कुंडलीतील ग्रहांची स्थाने कुणालाही बदलता येणे शक्य नाही. परंतु भगवन्नामात मात्र ते सामर्थ्य आहे. एका

स्थानासाठी एक कोटी जप करावा, असे शास्त्रात म्हटले आहे. अशा प्रकारे बारा स्थानांसाठी बारा कोटी जप करावा लागेल. परंतु एवढे पुरेसे नाही. त्यापुढे भगवंताची प्राप्ती हे लक्ष्य असले पाहिजे. त्यासाठी आणखी एक कोटी जप करायला हवा. अशाप्रकारे तेरा कोटी जप केल्यावर भगवंताची प्राप्ती होते. नामजपात एवढे सामर्थ्य असताना 'महाराज, रोज पाच वेळा जप केला तर चालेला ना' असे काही महाभाग विचारतात. आम्ही म्हणतो, 'चालेल'. कारण त्यामुळे काही होत नाही. जात नाही. आपल्या जीवनात प्रगती झाली पाहिजे. इंद्रिये मन आणि प्राण भगवदर्पित झाल्यावर सर्व प्रपंच भगवद्रूप दिसू लागतो. शेवटी या स्थलाचा समारोप करतात.

**सर्वेंद्रियप्रवृत्त्या च बहिरन्तः शिवं यजन्।**
**स्वच्छन्दचारी सर्वत्र सुखी भवति संयमी।।१७.२३।।**

ज्याचे जीवन संयमित असते असा शिवयोगी अंतर्बाह्य सर्वत्र शिवदर्शन घेत असतो. तो बाहेरचा व्यवहार करतो आणि अंतरंगात ध्यान देखील करतो. तो स्वच्छंदाचारी होऊन शिवसुखाचा अनुभव घेत असतो. इंद्रियनिग्रहामुळे त्याचे जीवन संयमी झाले असते. योग्यासाठी संयम अत्यंत आवश्यक असतो. ह्याप्रकारे ह्या इंद्रियानुग्रहस्थलात इंद्रिये, मन आणि प्राण यांना कसे नियंत्रित करावे हे सांगितले आहे. येथे इंद्रियानुग्रहस्थल समाप्त झाले, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२० जुलै १९९४

---

**आशीर्वचन सहावे**

## प्राणानुग्रहस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मनाला सदैव प्रसन्न ठेवणे, हा प्रसादिस्थलाचा सामान्य अर्थ आहे. ज्याचे मन सदोदित प्रसन्न असते तो 'प्रसादी' होय. जे अन्न आपण सेवन करतो त्याचा सूक्ष्म परिणाम म्हणजे मन. अंग-षट्स्थलातील प्रसादिस्थलात मनःशुद्धीसाठी शुद्धान्न कसे सेवन करावे, याविषयी विवेचन केलेले आहे. आता लिंग-षट्स्थलातील प्रसादिस्थलात मनाला कसे नियंत्रित करावे, हे सांगितले आहे. आतापर्यंत कायानुग्रह व इंद्रियानुग्रह या अवांतरस्थलांविषयी आपण विचार केला आहे. आज प्राणानुग्रहस्थलाविषयी चर्चा करायची आहे. प्रथम कायानुग्रह, नंतर इंद्रियानुग्रह आणि त्यानंतर प्राणानुग्रह असा ह क्रम आहे. इंद्रिये आणि प्राण यांच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी सर्वप्रथम शरीर स्थिर करावे लागते. जर एका आसनावर अधिक काळ आपले शरीर स्थिर बसू शकत नसेल, तर पुढील इंद्रिये आणि प्राण यांच्यावर नियंत्रण शक्य होत नाही. म्हणून योगशास्त्रात प्रथम आसन, नंतर प्राणायाम असा क्रम ठेवलेला आहे. कायेचा म्हणजे शरीराचा आपल्यावर अनुग्रह असला पाहिजे. योगी लोक आपल्या कायेने इतरांवर अनुग्रह करतात ही गोष्ट वेगळी आहे. आपल्याला मात्र कायेचा अनुग्रह, कायेची कृपा हवी असते. शरीर साथ देत नसेल तर सर्व साधना विफल होतात. ईश्वरकृपा, गुरुकृपा, वेदकृपा यांच्या बरोबरच

अंतःकरणकृपा देखील असली पाहिजे, असे वेदान्तशास्त्रात म्हटले आहे.

आपल्याला मनुष्यशरीर मिळणे, तत्त्वविवरण करणारा गुरू लाभणे आणि मुक्तिमार्ग दाखविणाऱ्या ग्रंथांची प्राप्ती होणे, ही सर्व ईश्वरकृपाच होय. प्रसन्नचित्ताने श्रीगुरू ज्ञान देतात तेव्हा ती गुरुकृपा असते. वेदादी सद्ग्रंथांच्या ग्रंथकारांची कृपा म्हणजे शास्त्रकृपा, वेदकृपा होय. या बरोबरच आपल्यावर मनाची कृपा हवी. ती नसेल तर सर्व व्यर्थ होईल. मनाची कृपा नसेल, मन स्थिर होत नसेल तर गुरू बिचारा काय करील? ईश्वर तरी काय करणार? वेदान्तात जशी चार प्रकारची कृपा वर्णिली आहे त्याप्रमाणे सिद्धान्तात तीन प्रकारची कृपा सांगितली आहे. शरीरकृपा, इंद्रियकृपा व प्राणकृपा. अधिकात अधिक काळ शरीर स्थिर राहत असेल तर समजावे की शरीरकृपा होत आहे. शरीर म्हणजे इंद्रियांचा, अवयवांचा समूह. शरीर स्थिर बसेल पण इंद्रियांचे काय? ध्यानासाठी डोळे बंद करून पाहावे आणि ते किलकिले राहिले तर? तर इंद्रियांची कृपा झाली नाही असे समजावे. म्हणून कायानुग्रहानंतर इंद्रियानुग्रह सांगितला आहे. इंद्रियानुग्रह सांगताना काल प्राणानुग्रहाचा उल्लेख झाला. शरीर आणि इंद्रियांप्रमाणे प्राणाने देखील भगवंताची पूजा केली पाहिजे. श्वासासोबत मंत्राचा संयोग झाला की प्राणाद्वारे भगवंताची अर्चना सुरू होते. केवळ वाणीने मंत्रजप करणे हा जपाचा मध्यम प्रकार होय. वाणी, मन आणि प्राण हे तिन्ही मिळून जर मंत्रजप करू लागले तर तो उत्तम जप आहे. वाणीने जप करताना त्याच्यासोबत प्राण जुळावा आणि मंत्राच्या अर्थाने मनाने चिंतन करावे, हा खरा मंत्रजप.

कालच्या आशीर्वचनात आपण ऐकले आहे की, कुंडलीत तनुस्थान, धनस्थान, सहजस्थान, मातृस्थान, संततिस्थान, शत्रुस्थान, जायास्थान, मृत्युस्थान, भाग्यस्थान, पितृस्थान, लाभस्थान आणि व्ययस्थान अशी बारा स्थाने असतात. त्या त्या स्थानी असलेल्या ग्रहांचा प्रभाव मानवी आयुष्यावर होतो. ग्रह अनुकूल नसतील तर आपल्याला सुख मिळत नाही. संपत्ती, भाऊबंद, संतती इत्यादींपासून सुख मिळत नाही. या प्रतिकूल ग्रहांना बदलून अनुकूल ग्रहांचा समावेश कुंडलीत करता येत नाही. कुंडलीतील ग्रह बदलण्याचे सामर्थ्य आपल्याजवळ असते. आपणच आपले भाग्यविधाता असतो. काल, कर्म, माया यावर भगवद्भक्तीने विजय मिळवता येतो, असे कन्नड कवी निजगुण शिवयोगी यांनी म्हटले आहे. नामजप हा भगवद्भक्तीचा अत्यंत सोपा उपाय आहे. कुंडलीतील बारा स्थानांच्या शुद्धीसाठी तेरा कोटी जप करावा, असे सांगितले आहे. एखाद्याला एवढा जप करणे शक्य नसेल तर त्याने तेरा लक्ष जप करावा. तेही शक्य नसेल तर तेरा हजार, तेराशे देखील करता येतो. पण त्यामानाने लाभ कमी होतो. जपात सवलत मिळेल, पण लाभात घट देखील होईल. बारा कोटी जप कुंडलीतील ग्रहांच्या शुद्धीसाठी आहे, तर पुढचा एक कोटी जप भगवद्प्राप्तीसाठी आहे. श्वासासोबत मंत्रजप होत राहिला तर दररोज २१,६०० या प्रमाणे तेरा कोटी जप होणे अशक्य नाही.

प्राणानुग्रह याचा अर्थ आहे प्राणावर अनुग्रह करणे हा. आजवर प्राण सरळ वाहत नव्हता, प्राणायामामुळे त्यात सुसूत्रता आली, तो सुधारला. हा झाला प्राणावर अनुग्रह. दुसरा अर्थ आहे नियंत्रित झालेला प्राण आपल्याला भगवंताकडे घेऊन जातो, हा प्राणाने आपल्याला केलेला अनुग्रह होय. प्राण नियंत्रित झाला की मन नियंत्रित होते. कारण प्राण हा मनाचा अध्यक्ष आहे. इंद्रिये मनाचा आदेश पाळतात तर मन प्राणाचा आदेश पाळते. पशु-पक्ष्यांच्या शरीरात जीवात्म्याचे मन शुद्ध झाले नाही. म्हणून परमेश्वराने त्याला मानव शरीर दिले. मानव याचा अर्थ आहे- 'मत्वा करोतिति मानवः।' जो विचारपूर्वक कार्य करतो तो 'मानव' होय. जो विचार

करू शकत नाही तो मानव नव्हे. परमेश्वराने मानवाला सर्वाधिक आयुष्य दिले. सांसारिक सुखे भोगण्यासाठी साठ वर्षे आणि मनाच्या शुद्धीसाठी चाळीस वर्षे. संसारातील सुख-दु:खे भोगून मन अत्यंत मलिन झालेले असते. साठ वर्षांतील राग-द्वेषांमुळे आलेले मालिन्य दूर करण्यासाठी चाळीस वर्षे लागतात. शरीर पूर्ण सुदृढ होण्यासाठी वीस वर्षे लागतात. पुढील चाळीस वर्षे शरीर-मन मलिन करण्यासाठी आणि शेवटची वर्षे मन:शुद्धीसाठी. असा हा शंभर वर्षांचा हिशेब आहे.

इंद्रियांना सुधारणे म्हणजे काय? तुम्ही डोळे सुधारू शकता? कान सुधारू शकता? ते तर वृद्धत्वामुळे क्षीणच झालेले असतात. परंतु इंद्रियांद्वारे व्यवहार करणारे मन सुधारले जाऊ शकते. ज्याचे मन सुधारते त्याचे सारे जीवन सुधारते. मन हेच बंध-मोक्षाचे कारण आहे. तुम्हाला येथे शिवानुभव मंगल भवनात आणणारे तुमचे मनच आहे आणि कशाला उगीच झोपमोड करायची, असे म्हणून घरी बसवणारे तुमचे मनच होय. तुम्ही इथे आला यावरून तुमच्या मनाला सुधारण्याची इच्छा दिसते. आपल्याला सुधारण्याची संधी मन देत आहे की नाही हे दैनंदिन व्यवहारावरून आपल्या लक्षात येते. ज्याक्षणी मन सुधारते त्याक्षणी तुमच्या जीवनाचे सार्थक होते. मन नियंत्रित करण्यासाठी प्राणनियंत्रण करावे लागते. तुम्ही प्राणावर अनुग्रह कराल तर प्राणाचा तुमच्यावर अनुग्रह होईल. प्राणायामात वायू आत खेचून कुंभक करावा लागतो. तीच क्रिया शिवयोगी कशी करतो ते येथे सांगितले आहे.

**शिवस्य परकायस्य यत् तात्पर्यावलोकनम्।**
**तत्प्राणानुग्रहः प्रोक्तः सर्वेषां तत्त्वदर्शिभिः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.२४)

ज्याला परस्थिती प्राप्त झालेली असते अशा शिवयोग्याला परशिवयोगी म्हणतात. परशिवयोगी आपल्या प्राणाला भगद्रूपात विलीन करतो. हाच त्याने केलेला कुंभक होय. तो दृश्यमान विश्वाकडे हे शिवमय आहे अशा तात्पर्यदृष्टीने पाहतो. तात्पर्य फार छोटे असते. एक तास प्रवचन ऐकून त्याचे तात्पर्य म्हणजे सारांश दोन वाक्यांत सांगता आले पाहिजे. मनुष्याने तात्पर्य काय आहे, सार काय आहे, याचा विचार केला पाहिजे. योगाचे तात्पर्य काय? सर्व प्रपंचाला शिवरूपात पाहणे हे योगाचे तात्पर्य आहे. कुणाविषयी अनुराग बाळगणे तर कुणाचा द्वेष करणे हा जीवाचा स्वभाव. तो कुणाचा आदर करतो तर कुणाचा अवमान. परंतु शिव मात्र कुणाचा अनादर करत नाही. तो सर्वांचा परमादर करतो. सर्वांकडे समान दृष्टीने पाहतो. म्हणून त्याचे नाव 'शिव' आहे. जीवाचा शिव होतो तेव्हा तो सर्व प्रपंच परब्रह्मस्वरूपात पाहतो. जेव्हा प्रत्येक जीवाच्या ठिकाणी योगी आत्मरूप पाहतो तेव्हा त्याला कोणाबद्दल राग नसतो, द्वेष नसतो. राग-द्वेषासाठी द्वैताची गरज असते. परंतु इथे तर अद्वैत संचलेले असते. तुमचे स्वत:वर जेवढे प्रेम असते तेवढे विश्वावर आणि प्राणिमात्रावर करू लागाल तर तुम्हीही योगी व्हाल. यासाठीच हृदयस्थ शिवतत्त्वाचे दर्शन घ्यावे लागते. डोळे बंद करून त्या आत्मारामाला न्याहाळावे लागते. आत काय नाही? आत सारेच भरलेले आहे. ब्रह्मांडात जे आहे ते सारे या पिंडात सामावलेले आहे. तुम्ही तीर्थयात्रेला जाता. यात्रेला अवश्य गेले पाहिजे. त्यामुळे भोगभूमी सोडण्याची थोडी सवय आपल्याला होते. घर सोडायचा हा अभ्यास प्रत्येकाने करायला हवा म्हणजे मग शेवटी जेव्हा कायम घर सोडायचा प्रसंग येतो तेव्हा फार दु:ख होत नाही.

आपले घर भोगभूमी असते तर तीर्थक्षेत्र योगभूमी असते. तेथे गेलेच पाहिजे. परंतु जशी बाह्य यात्रा आपण

करतो तशीच अंतर्यात्रा देखील केली पाहिजे. बाह्ययात्रेत कष्ट अधिक आणि आनंद कमी असतो. महाशिवरात्रीच्या दिवशी काशीविश्वेश्वराचे दर्शन घ्यायला तुम्ही येता. कारण तो भगवान शंकराचा अवतारदिन असतो. त्या दिवशी भगवान अधिक प्रसन्न असतात. जसे तुम्ही तुमच्या जन्मदिवशी अधिक प्रसन्न असता त्यासारखे. रामनवमीच्या दिवशी जशी रामाची पूजा बांधली जाते तेवढी इतर दिवशी बांधली जात नाही. त्याप्रमाणे महाशिवरात्रीला जशी भगवान शिवाची पूजा करतात तशी एरव्ही करत नाहीत. वर्षातून एकदाच करायची असते. त्यादिवशी लक्षावधी माणसे दर्शनासाठी जमलेली असतात. गर्दीत तासन् तास उभे राहून, इतरांचे धक्केबुक्के सहन करीत दर्शन झाले, न झाले; अशा परिस्थितीत आपण दर्शन घेत असतो. त्यात कष्ट अधिक आहेत.

ज्योतिर्लिंगाच्या रूपात जसा परमेश्वर बाहेर आहे तसाच अंतर्लिंगाच्या रूपाने आत देखील आहे. मूलाधारात, हृदयात आणि भ्रूमध्यात ज्योतिर्लिंग विद्यमान आहे. असे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'मध्ये म्हटले आहे. डोळे बंद केल्यावरच या ज्योतिर्लिंगाचे दर्शन होते. प्राणायामाच्या साहाय्याने मूलाधार, हृदय, भ्रूमध्य या तीन स्थानांवर शुद्धीही करावी लागते. वर्षभर आपले घर बंद असेल तर त्यात कितीतरी केर साचलेला असतो. मनाचे मंदिर तर किती वर्षांपासून आणि जन्मांपासून बंद असते. मग त्यात किती केरकचरा साठला असेल? व्यापारी आपले दुकान रोज थोडे झाडून काढतो आणि वर्षातून एकदा दिवाळीच्या वेळी पूर्ण स्वच्छ करून त्याला रंग देऊन नवेपणा आणतो. दुकानाची आणि घराची काळजी जेवढी घेतो त्याच्या शतांशानेही मन स्वच्छ करण्याची खबरदारी घेत नाही. त्यामुळे मन स्वच्छ करण्यासाठी वर्षानुवर्षे लागतात. म्हणून रोज घरासारखे मनदेखील स्वच्छ करीत गेले पाहिजे. आपल्या देहात जी षट्चक्रे आहेत ती परमात्मदर्शनाची मुख्य स्थाने मानली जातात. काशी, केदार, रामेश्वर आदी ठिकाणी दर्शनासाठी जावे असे का बरे म्हटले जाते? तर ती स्थाने पवित्र असतात आणि असंख्य लोकांनी तेथे बसून भगवच्चिंतन केलेले असते. परमेश्वर सर्वत्र व्यापून आहे. तो अणु-परमाणूंत भरलेला आहे. तरीही त्याचे विशेष प्रकटन काशी-केदार-रामेश्वरादी पवित्र स्थानी झालेले असते. म्हणून ती स्थाने दर्शनीय, वंदनीय असतात त्याचप्रमाणे अंतरंगातील ज्योतिर्लिंगाचे दर्शन घेण्यासाठी मूलाधार, हृदय आणि भ्रूमध्ये ही तीन स्थाने पवित्र मानली जातात.

मन आणि प्राण यांच्या संयोगाने अंतर्लिंगाचे दर्शन घेता येते. मनाला बाहेर जाण्यासाठी प्राणाचे साहाय्य लागते तसेच अंतर्मुख होण्यासाठी देखील प्राणाचेच साहाय्य घ्यावे लागते. अंधाऱ्या गुहेत प्रवेश करताना हाती दिवा घ्यावा लागतो. त्याप्रमाणे अंतरंगात जाताना प्राणाचा दिवा न्यावा लागतो. जेवढा श्वासोच्छवास दीर्घ होईल तेवढा अंतरंगातला प्रवेश सोपा होतो.

**प्राणो यस्य लयं याति शिवे परमकारणे।**
**कुतस्तस्येन्द्रियस्फूर्तिः कुतः संसारदर्शनम्॥१७.२५॥**

आपल्याला नेहमी प्रपंचाचे दर्शन होत असते आणि आपले मन अधिकाधिक चंचल होत असते. याचे कारण प्राणावर आपले नियंत्रण नसते हे आहे. त्यामुळे आपली प्रवृत्ती बहिर्मुख होऊन प्रपंच पाहत असते. प्राणायामात श्वास घेऊन त्याचा हृदयात कुंभक करायचा असतो. कुंभक म्हणजे हृदयात प्राणवायू रोधून धरणे. रोधणे याचा अर्थ एकेठिकाणी स्थिर करणे. प्राणाचा कुंभक साधला की मन प्राणासोबत तेथेच थांबते आणि

मनासोबत इंद्रियेदेखील तेथेच राहतात. प्राण स्थिर झाला की मन स्थिर होते आणि मनासोबत इंद्रिये स्थिर होतात. एकावर दुसरे अवलंबून असल्यामुळे प्राणानुग्रहस्थलात प्राण स्थिर करण्यावर भर दिला आहे. इंद्रियांसह मन आणि मनासह प्राण जेव्हा परशिवात विलीन होतो तेव्हा शिवयोग्याला बाह्य प्रपंचाचे दर्शन होत नाही. त्याला सर्वत्र भगवतत्त्वाचाच साक्षात्कार होत असतो.

**करणेषु निवृत्तेषु स्वार्थसंगात् प्रयत्नतः।**
**तैः समं प्राणमारोप्य स्वान्ते शान्तमतिः स्वयम्॥१७.२६॥**

सर्व इंद्रिये आपापल्या विषयांपासून परावृत्त होऊन अंतर्मुख होतात. आपल्या मनाची अवस्था लहान मुलासारखी असते. ते खेळता खेळता माती खाते. माती खाण्याचे दुष्परिणाम त्याला माहीत नसतात. केवळ मुलेच नव्हे तर मोठी माणसेही कधी कधी माती खातात. ती एक सवय असते. मातीत त्याला काय गोडी मिळते कुणास ठाऊक. काही मुलांना अंगठा चोखण्याची सवय असते. अंगठ्यातून काय दूध येते? पण ती सवय जडलेली असते. लाभ काहीच नसतो. तरी सवय सवयच असते. लहानपणी ठीक आहे, पण मोठेपणी ही सवय राहिली तर हसे होते. बिचाऱ्या मायबापांना चिंता वाटते की, कुणी वधुपिता आपल्या मुलाला पाहायला आणि अन् त्याने सवयीनुसार तेथे अंगठा चोखायला सुरुवात केली तर? मोठा झाला तरी सवय जात नसते. मुले सर्वांसमोर अंगठा चोखतात, तर मोठा माणूस कोणी पाहत नसेल तेव्हा अंगठा चोखतो. आदतसे मजबूर, दुसरे काय? सवय लहानपणीच घालवता येते. माती खाणाऱ्या मुलाच्या हातून माती काढून त्याच्या हाती खडीसाखरेचा खडा ठेवला तर मूल खडीसाखरेची गोडी जाणते आणि माती खाणे सोडून देते.

आपल्या मनाची अवस्था अशीच असते. त्याला विषयांत फार गोडी वाटते. ती त्याची सवयच बनून जाते. परंतु जर त्याला थोड्या प्रयासाने परमात्म्याकडे वळवले आणि जर त्याला तेथील सुखाची गोडी कळली तर ते पुन्हा विषयाकडे वळत नाही. कमळदळाच्या पात्रावर चंद्रकिरणातले अमृतसेवन करणारा चकोर वाळवंटाचे चुंबन घेत नसतो. ज्याने अमृताची गोडी चाखलेली असते तो कांजीसाठी लाळ घोटत नसतो. परमात्मसुखाचा अनुभव आल्यावर मनाची अवस्था अशीच होते. ते विषयसुख सोडून परमात्मसुखात डुंबत राहते. त्याला परमात्म्याकडे नेण्याचे कार्य प्राण करतो. म्हणून येथे सांगितले आहे की, कुंभकाने शिवात प्राण विलीन होतो आणि इंद्रिये आपापले विषय सोडून अंतर्मुख होतात. अशी अंतर्मुख इंद्रिये असलेला शिवयोगी इंद्रिये प्राणात विलीन करून आतल्या आत शांत होऊन राहतो. ही स्थिती प्राप्त करून घेण्याचा प्रत्येकाने प्रयत्न करावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२१ जुलै १९९४



## प्राणानुग्रहस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मनुष्याच्या जीवनात प्राणाला अधिक महत्त्व आहे. ज्याक्षणी प्राण शरीर सोडून जातो, त्याक्षणी जीवात्म्याचा इहलोकाशी असलेला संबंध संपुष्टात येतो. प्राणाला सांभाळण्यासाठी आणि त्याच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी प्राणायामाची आवश्यकता आहे. प्राणायामाचे तीन भाग आहेत. श्वास आत घेणे याला 'पूरक' आणि श्वास बाहेर सोडणे याला 'रेचक' म्हणतात. पूरकाला आत रोधूण ठेवणे याला 'कुंभक' म्हणतात. रेचक केल्यानंतर काही काळ पूरक केला नाही अर्थात् श्वास बाहेर रोधून ठेवला तर 'बहि:कुंभक' होय. पूरक आणि रेचक हे तर जन्मापासून सतत नकळत चाललेले असतात. त्यांना एक शिस्त लावून कुंभकाचे स्वरूप समजावून घेणे महत्त्वाचे असते. याविषयी ज. रेणुकाचार्य पुढे सांगतात.

शान्तत्वात् प्राणवृत्तीनां मन: शाम्यति वृत्तिभि:।
तच्छान्तौ योगिनां किंचिच्छिवादन्यन्न दृश्यते।।
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.२७)

प्राणवृत्तीच्या निरोधावर मनोवृत्तीचा निरोध अवलंबून आहे. प्राणवृत्तींचा निरोध झाल्याशिवाय मनोवृत्तीचा निरोध होणे शक्य नाही. जी निरंतर चाललेली असते तिला 'वृत्ती' म्हणतात. विषयांच्या आकारात मनाची वृत्ती निरंतर वाहात असते. देवघरात अखंड नंदादीप लावलेला असतो. ती ज्योत ऊर्ध्वमुख होऊन वाहत असते. पन्नास–शंभर वर्षांपासून जरी ती अखंड तेवत असली तरी आजची ज्योत नवी असते. कारण ती सतत ऊर्ध्वमुख वाहत असते. वाहत्या प्रवाहातील पाणी सतत बदलत असते. म्हणून ते कधी शिळे राहत नाही तर नित्यनूतन असते. परंतु आपल्याला पाणी एकच आहे असे वाटत असते. ज्योत एकच आहे असे आपण मानत असतो. माणसाचेही असेच आहे. महास्वामीजींना मी चाळीस वर्षांपासून पाहतो, वीस वर्षांपासून पाहतो, पाच वर्षांपासून पाहतो, असे म्हणणारे लोक असतात. चाळीस वर्षांपूर्वी जे महास्वामीजी होते ते आज नसतात. काल होते ते आज नाहीत. हे तर सोडाच, आम्ही थोड्या वेळापूर्वी इथे येऊन बसलो तसे याक्षणी आम्ही नाही. कारण शरीरात प्रत्येक क्षणी परिवर्तन होत असते. हे परिवर्तन आपल्या दृष्टीला पडत नाही इतकेच. एखाद्या माणसाला आपण रोज पाहतो. त्यामुळे त्याच्यात होणारे परिवर्तन आपल्याला जाणवत नसते. भेटीत पाच दहा वर्षांचे अंतर पडले तर मात्र त्याच्यात झालेला बदल स्पष्ट दिसतो. 'किती मोठा झालास', 'किती उंच झालास', 'किती लठ्ठ झालास' इ. प्रश्न आपण त्याला विचारतो. त्याला रोज पाहणारा असे प्रश्न विचारत नाही. कारण त्याला प्रतिक्षणी होणारे बदल जाणवत नसतात.

सृष्टीला 'जगत्' अशी संज्ञा आहे. 'गच्छतीति जगत्' जे निरंतर जात असते, प्रवाही असते ते 'जगत्'. याचप्रमाणे प्राण आणि मनोवृत्ती प्रवाहित होत असतात. पूरक आणि रेचक या प्राणाच्या दोन वृत्ती होत. मनाच्या अनेक वृत्ती आहेत. जन्मल्यापासून प्राणाचे वहन चालू असते. जन्मत: पहिला श्वास घेऊन आपण रडतो आणि अंतकाळी शेवटचा श्वास घेऊन इतरांना रडवतो. दिवसभरात आपण किती श्वास घेतो ? इथे कोणाला मोजायला

वेळ आहे? श्वास मोजायला नाकावर एखादे गणकयंत्रच बसवले पाहिजे. छापखान्यात किती प्रती छापल्या गेल्या हे मोजणारे यंत्र बसवलेले असते. एक प्रत छापून झाली की एक आकडा बदलतो. इतक्या प्रचंड प्रमाणावर मुद्रण कार्य सुरू आहे की कोणाला हाताने मोजायला वेळ नाही. आता तर मंदिरात किती भक्त दर्शनासाठी येऊन गेले हे मोजण्यासाठी यंत्र लावले आहे म्हणतात. त्याप्रमाणे आपले श्वास मोजण्यासाठी यंत्र लावले पाहिजे काय?

तुम्हाला श्वासांची संख्या मोजायला वेळ नसेल; परंतु शास्त्रकारांनी ती पूर्वीच मोजून ठेवली आहे. दिवसभरात २१६०० वेळा मनुष्य श्वास घेतो. तुम्ही काम करीत असा, स्वस्थ बसलेले असा की झोपलेले असा श्वासाचे वहन अखंड चाललेले असते. आत जाणारा प्राण हृदयाला एक धक्का देऊन बाहेर येत असतो. त्याचा थोडा फार परिणाम हृदयावर होतच असतो. एखाद्या झाडावर जर सहज कुऱ्हाडीने हलके घाव घालत राहिलो तर कालांतराने केव्हा तरी त्याच्या परिणामाने वृक्ष खाली पडणारच असतो. त्याप्रमाणे दररोज प्राणाचे २१६०० धक्के खाऊन आपले हृदय प्रतिक्षणी दुबळे होत असते. अखेर ते इतके दुबळे होते की एका क्षणी आपले कार्य थांबवते. म्हणून जे प्राणावर नियंत्रण करू शकत नाहीत ते अल्पायुषी ठरतात आणि जे प्राणावर नियंत्रण ठेवतात ते दीर्घायुषी होतात. परमेश्वराने प्रत्येक मनुष्याला शंभर वर्षांचे आयुष्य दिले आहे. परंतु काही लोक चाळीसाव्या वर्षी, काही साठाव्या वर्षी मरण पावतात. क्वचित एखादा शंभरी गाठतो. योगी लोक शेकडो आणि हजारो वर्षे जिवंत राहतात. शरीर एकच आहे मग एखादे शरीर वर्षानुवर्षे जिवंत कसे राहाते? प्राण आपल्या जीवनाचा आधार आहे. सामान्य माणूस भरभर श्वास घेऊन आपले आयुष्य संपवून टाकतो तर योगी मात्र श्वासाचे नियमन करून आपले श्वास वाचवतो. हे बँकेमध्ये फिक्स डिपॉझीट ठेवून त्याच्या व्याजावर उदरनिर्वाह करण्यासारखे आहे. पैसा कसा वाचवावा? याचे आपल्याला ज्ञान असते. परंतु श्वास कसे वाचवावेत आणि आयुष्य कसे वाढवावे? याचे ज्ञान मात्र नसते. दहावेळा भरभर श्वास घेण्याऐवजी जर एकच दीर्घ श्वास घेतला तर श्वाससंख्या मर्दादित करता येते, हेच प्राणायाम प्रक्रिया आपल्याला सांगत असते.

सहज एका मिनिटात आपण किती श्वास घेतो आणि आसनावर नीट बसून ॐकार ध्वनी करत किती श्वास घेतो, हे पडताळून पाहा. तुम्हाला आढळून येईल की सहज तुम्ही जेवढे श्वास घेता त्यापेक्षा ॐकार ध्वनीसहित तुम्ही कमी श्वास घेता. अशाप्रकारे योगी श्वासाची बचत करतात आणि एका श्वासातल्या प्राणाचा अधिकाधिक उपयोग करून घेतात. वाढणे हा प्राणाचा स्वभाव आहे. तुम्ही श्वास घेऊन जर आत रोधून धरला तर थोड्या वेळाने हृदयात खूप काही वाढले आहे अशी जाणीव तुम्हाला होऊन श्वास केव्हा बाहेर सोडतो आणि केव्हा नाही, असे तुम्हाला होईल. श्वास घेताना एवढा त्रास होत नाही. परंतु आत कोंडल्यावर तो वाढतो, त्याला ठेवण्याइतकी जागा आपल्या फुफ्फुसात नसते, म्हणून आपण घाईघाईने तो बाहेर सोडतो. प्राण रोधून ठेवल्यानंतर वाढलेल्या प्राणाचा कसा उपयोग करून घ्यावा हे योगी लोकांना माहीत असते. योग्याला आणि भोग्याला परमेश्वराने सारखीच श्वाससंख्या दिलेली असते. परंतु भोगी भरभर श्वास घेऊन आपले आयुष्य घटवतो तर योगी कमी श्वास घेऊन आपले आयुष्य वाढवतो.

प्राणाच्या पूरक आणि रेचक या वृत्तींना शांत करावे, असे या श्लोकात सांगितले आहे. पूरक रेचक न करणे म्हणजेच त्यांना शांत करणे होय. हा निरोध कुंभकामुळे होतो. जेव्हा प्राणवृत्ती अशा शांत होतात तेव्हा प्राणाच्या बळावर उड्या मारणारे मनदेखील आपल्या वृत्तीसह शांत होते. घोडेस्वाराला थांबवायचे असेल तर घोड्यालाच

थांबवले पाहिजे. घोडा थांबला की घोडेस्वाराची गती थांबते. त्याप्रमाणे मनाची गती थांबवण्यासाठी प्राणाची गती थांबवली पाहिजे. मनाच्या अनेक वृत्ती आहेत. परंतु त्यात प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती या पाच प्रमुख आहेत, असे योगशास्त्रात म्हटले आहे. दैनंदिन व्यवहारात आपल्या मनाची एकेक वृत्ती प्रकट होत असते. त्या वृत्तींच्या साहय्यानेच आपला व्यवहार चाललेला असतो. या वृत्तीचे क्लिष्ट आणि अक्लिष्ट असे दोन प्रकार आहेत. जिच्यामुळे क्लेश होतात ती क्लिष्ट वृत्ती होय. ज्या वृत्तीमुळे सुख मिळते ती अक्लिष्ट वृत्ती होय. हे शब्द तुम्हाला नवे वाटतील. महाराजांनी कोठून शोधून आणि कशाला शोधून आणले, असे तुम्हाला वाटेल. शब्द तुम्हाला नवखे असतील परंतु या वृत्तींचा अनुभव तुम्ही प्रतिक्षणी घेत असता.

यर्थाथ ज्ञान होते हे प्रमाणवृत्तींमुळे. 'प्रमाण' म्हणजे ज्ञानाचे साधन. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती व अनुपलब्धी अशी सहा 'प्रमाणे' म्हणजे ज्ञानाची साधने शास्त्रात सांगितली आहेत. याशिवाय आपली ज्ञानेंद्रिये आणि मन ही देखील प्रमाणेच होत. रूपाच्या यथार्थ ज्ञानासाठी नेत्राची आवश्यकता असते. याप्रमाणेच शब्दासाठी कर्णाची, स्पर्शासाठी त्वचेची, रसासाठी जिव्हेची आणि गंधासाठी नाकाची गरज असते. बाह्य प्रपंचाच्या ज्ञानासाठी ज्ञानेंद्रियाची गरज आहे. अंतरात्म्याला मन जाणते. मन हे अंत:करण असून ते दिसत नाही. दिसत नाही हेच बरे आहे. आपल्या मनात काय आहे हे जर दुसऱ्याला दिसले असते तर तिथचे गुद्दागुद्दी सुरू झाली असती. मनातले विचार लपवता येतात ही किती चांगली गोष्ट आहे! मन असे अदृश्य अंतरंग-साधन आहे. म्हणून आत्म्याला जाणणे केवळ मनालाच शक्य आहे. आत्म्याचे यथार्थ ज्ञान मनाला होत असल्यामुळे मन देखील एक 'प्रमाण' आहे. आत्मज्ञान ही अक्लिष्ट प्रमाणवृत्ती आहे. दुसऱ्याच्या घरातील धनाचे यथार्थ ज्ञान होणे हे देखील प्रमाणज्ञान आहे. परंतु ते झाल्यावर धन चोरण्याची इच्छा मनात उद्भवते आणि त्यामुळे क्लेश होतात. म्हणन धनाचे ज्ञान ही क्लिष्ट प्रमाणवृत्ती होय. प्रपंचाचे ज्ञान क्लेशदायक असते म्हणून प्रपंचज्ञान देणारी प्रमाणवृत्ती 'क्लिष्ट प्रमाणवृत्ती' आहे आणि आत्मज्ञान देणारी प्रमाणवृत्ती 'अक्लिष्ट प्रमाणवृत्ती' आहे.

मनाची दुसरी वृत्ती 'विपर्यय वृत्ती' आहे. वस्तू असते एक आणि भासते दुसरी, हा विपर्यय होय. दोरी पाहताना सापाचा भास होणे, खोड पाहून चोराचा भास होणे, शिंप पाहून चांदीचा भास होणे; हे विपर्ययज्ञान होय. परंतु या ज्ञानामुळे मनुष्याला दु:खच मिळते. म्हणून ही 'क्लिष्ट विपर्यय वृत्ती' आहे. परंतु दुसरे विपर्ययज्ञान हे सुखदायक असते. मंदिरातील मूर्ती शिळेची असते. शिलामूर्तीला ईश्वर मानणे हे देखील विपर्ययज्ञान आहे. आहे एक आणि भावना करतो दुसऱ्याची. परंतु या विपर्ययज्ञानाने आनंद मिळतो म्हणून ही 'अक्लिष्ट विपर्ययवृत्ती' होय.

'विकल्प' ही मनाची तिसरी वृत्ती होय. 'वस्तुशून्य विकल्प:' पदार्थ अस्तित्वात नाही, परंतु मनात विचार होत आहे, हा विकल्प महंमदाचे मनोराज्य हे विकल्पवृत्तीचे उदाहरण आहे. शेख महंमदाने थोडे काचेचे सामान खरेदी केले आणि ते पायाशी ठेवून तो मनोराज्य रचत बसला. -हे काचेचे सामान आपण विकू. त्यात खूप नफा होईल. मग पुन्हा सामान आणू, मग दुकान लावू. खूप पैसा मिळेल. मग मोठे घर बांधू. बादशहाचा वजीर आपल्या मुलीसाठी मागणी घालायला येईल. आपण मुलगी पाहायला जाऊ आणि तिचा चेहरा पाहून 'हॅट्र अशी मुलगी मी करतोय होय' असे म्हणून लाथ झाडू-

मनोराज्यात दंग झालेल्या महंमदाने खरोखरच लाथ मारली आणि पायाजवळच्या काचेच्या सामानाचा चक्काचूर झाला. शेख महमंद पुन्हा भीक मागण्यासाठी मोकळा झाला.

अस्तित्वात नसलेल्या वस्तूबद्दल केलेला हा विचार, मनोराज्य म्हणजे विकल्प. असे दुःखदायक मनोराज्य म्हणजे 'क्लिष्ट विकल्पवृत्ती' होय. परंतु जर कोणी- मी व्यापार करीन, पैसा मिळवीन. मग त्यातून एक मंदिर उभे करीन- असे मनोराज्य रचत असेल तर ती 'अक्लिष्ट विकल्पवृत्ती' होय.

यानंतरची वृत्ती आहे 'निद्रावृत्ती'. येथे निद्रा याचा अर्थ गाढ झोप नसून स्वप्नावस्था असा आहे. आपल्याला झोपेत स्वप्ने पडतात. त्यापैकी काही स्वप्ने चांगली असतात तर काही वाईट. तीर्थयात्रेला गेलो, मंदिरात जाऊन देवदर्शन घेतले, ही चांगली स्वप्ने आहेत तर कोणाच्या घरी चोरी केली, पोलीस मागे लागले, विहिरीत पडलो ही वाईट स्वप्ने होत. स्वप्नावस्थेत आपल्याला सुखदुःख भोगावे लागते. भजन करणारी माणसे स्वप्नातही भजन करतात तर भांडणारी माणसे स्वप्नातही भांड भांड भांडतात. ज्या निद्रेमुळे मनुष्याला क्लेश होतात ती निद्रावृत्ती क्लिष्ट होय. ज्या स्वप्नामुळे मनुष्याला आनंद होतो ती अक्लिष्ट निद्रावृत्ती आहे.

'स्मृती' ही पाचवी मनोवृत्ती आहे. संस्कारजन्य ज्ञान म्हणजे स्मृती. आधी पाहिलेले, अनुभवलेले जे असते त्याचा मनावर संस्कार होतो. जिच्या स्मरणाने आपल्याला दुःख मिळते ती 'क्लिष्ट स्मृती' होय आणि जिच्या स्मरणाने सुख मिळते ती 'अक्लिष्ट स्मृती वृत्ती' होय. प्रिय व्यक्तीचे स्मरण सुखदायक तर अप्रिय व्यक्तीचे स्मरण दुःखदायक. प्रपंचात एकच व्यक्ती कधी प्रिय तर कधी अप्रिय असते. पति-पत्नी मध्ये, पिता-पुत्रात, माता-पित्यात, माता-पुत्रात, भावा-भावात मतभेद होत असतात. एका घरात राहून देखील सर्वजण निष्ठेने भांडत असतात. मनुष्य स्वभाव म्हणजे कुत्र्याचे शेपूट वाकडे ते वाकडेच.

माणसा-माणसातील संबंध नेहमीसाठी चांगले राहतीलच असे नाही. परस्परातील संबंध सुधारण्याची संधी वर्षातून २-३ वेळा येते. 'तिळगूळ घ्या गोड गोड बोला' असे गोड बोलायला लावणारा संक्रांतीचा सण येतो. तिळात स्नेह आणि गुळात गोडी असते. तिळगूळ दिल्यावर एकमेकांतील स्नेह दृढ व्हावा आणि स्नेहाचे माधुर्य प्रत्ययास यावे असा उद्देश असतो. येथे देखील 'मी आधी द्यायचा की तू आधी द्यायचा' असा अभिमान उत्पन्न होण्याची शक्यता असते. परंतु हा अभिमान बाजूला ठेवून दोघांपैकी कोणीही दुसऱ्याच्या तोंडात तिळगूळ घातला तर प्रश्न मिटू शकतो.

विजयदशमीचा सण असाच आहे. शमीवृक्षाची पाने सोने म्हणून घरोघरी वाटण्याची प्रथा आहे. परस्परातील आदर व्यक्त करीत 'तू पण सोन्यासारखा आहेस आणि मी पण सोन्यासारखा आहे', असे ही प्रथा सूचित करते. काही दिवस सोन्यासारखे जातात, परंतु पुन्हा लोखंड उघडे पडते. मग येतो होळीचा सण. मनातील सारे अश्लील बाहेर फेकून देणारा हा दिवस आहे. वर्षातून एकदा घर स्वच्छ करतात आतला सारा केरकचरा बाहेर फेकून द्यावा, त्याप्रमाणे मनातील सारे अश्लील भाव या दिवशी बाहेर फेकून द्यायचे असतात. यादिवशी कुणी कुणाला कितीही शिव्या दिल्या तरी त्याचे वाईट मानत नसतात. रात्री बारा वाजता स्नान करून नवे कपडे घालून ज्यांना दिवसा शिव्या दिल्या त्यांना गुलाल लावून पेढे देतात. याला 'होलीमिलन' असे म्हणतात. अंगावर गुलाल टाकून सारे एकमेकांच्या गळ्यात पडतात. माणसामाणसांतील संबंध सुधारण्यासाठी ऋषीमुनींनी या सणांची निर्मिती केली आहे.

आपण स्मृतीवृत्तीबद्दल चर्चा करीत आहोत. प्रिय व्यक्तीच्या स्मृतीने सुख मिळते तर अप्रिय व्यक्तीच्या स्मृतीने दुःख मिळते. आज सुख देणारी व्यक्ती उद्या अप्रिय झाली की दुःख देते. म्हणून संसारातील कोणत्याही

मनुष्याची आणि पदार्थांची स्मृती दुःखदायक असते. म्हणून ही क्लिष्ट स्मृती वृत्ती होय. तुम्हाला ध्यान करणे शिकवले जाते. डोळे बंद करा, भगवंताचे रूप डोळ्यांसमोर आणा, त्याचे चिंतन करा, त्याचे नामस्मरण करा. भगवंताचे स्मरण कोणाला दुःख देत नाही. कधीही आणि कोठेही ते दुःखदायक ठरत नाही. भगवंताशी असलेले संबंध बिघडण्याची शक्यता नसते. भगवंताचे स्मरण अपार आनंद देणारे असल्यामुळे ती 'अक्लिष्ट स्मृतीवृत्ती' होय. म्हणून क्लिष्ट स्मृतीवृत्ती यांचा निरोध केला पाहिजे. जेव्हा समाधी अवस्था लाभते किंवा प्राप्त होते तेव्हा क्लिष्ट-अक्लिष्ट असे काही राहत नाही. जेव्हा प्राण पूरक-रेचक वृत्तीपासून मुक्त होतो, जेव्हा मन क्लिष्ट-अक्लिष्ट वृत्तींपासून मुक्त होते तेव्हा शिवयोग्याच्या आत आणि बाहेर शिवच शिव भरून राहतो. त्याला प्रपंचाचे दर्शन न घडता तेथे शिवरूपच दिसू लागते. दुःखदायक संसाराचे विस्मरण होणे आणि सुखदायक परमात्म्याचे स्मरण करणे हेच योगसाधनेचे उद्दिष्ट आहे. प्राणवृत्तींचा आणि मनोवृत्तींचा निरोध करून शिवयोगी ज्याप्रमाणे अपार शांतीचा आणि सुखाचा अनुभव घेतो त्याप्रमाणे आपण सर्वांनी प्राणायाम आदी साधना करून तो आनंदानुभव घ्यावा, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२२ जुलै १९९४

---

## आशीर्वचन आठवे

### प्राणानुग्रहस्थल-३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

प्राणाचे आपल्या शरीरात अत्यंत महत्त्व आहे. त्याविषयी येथे सांगतात-

**प्राण एव मनुष्याणां देहधारणकारणम्।**
**तदाधारः शिवः प्रोक्तः सर्वकारणकारणम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.२८)

जीवात्मा देह धारण करतो याचा अर्थ शरीरात प्राणाचा संचार होतो आणि जीवात्मा देह सोडतो याचा अर्थ शरीरातून प्राण निघून जातो. मनुष्याच्या देहधारणासाठी प्राण हाच मुख्य आधार आहे. शरीराचा आधार प्राण आहे तर प्राणाचा आधार कोण आहे? आम्ही ज्या आसनावर बसलो आहोत त्याचा आधार हा चबुतरा आहे. चबुतऱ्याचा आधार जमीन आहे. जमिनीचा आधार कोण आहे? तो आपल्याला दिसत नाही. परंतु दिसत नसेल तरी जमीन निराधार मात्र नाही. दृश्य विश्व हे अदृश्य विश्वावर आधारलेले असते. झाडाचे खोड, फांद्या, पाने, फुले हे सारे आपल्याला दिसते, परंतु ज्याच्या आधारावर तो वृक्ष उभा असतो ती मुळे मात्र आपल्याला दिसत नसतात. ज्याने झाड लावले त्याला मात्र त्याच्या मुळाची कल्पना असते. तो पाणी मुळाला घालतो. फांद्यावर किंवा पानांवर शिंपडत नाही. त्याप्रमाणे प्रत्येक वस्तूंचे एक मूळ असते, आधार असतो. पंचमहाभूते एकावर एक अशी आधारलेली असतात. पृथ्वीचा आधार जल, जलाचा आधार तेज, तेजाचा आधार वायू, वायूचा आधार

आकाश आणि आकाशाचा आधार परब्रह्म होय. आणि परब्रह्माचा आधार? दुसरे परब्रह्म मानावे काय? मग दुसऱ्या परब्रह्माचा आधार तिसरे परब्रह्म होईल. असा अनवस्था प्रसंग येईल. शेवटी एक असा आधार मानावा लागतो ज्याला दुसऱ्या कशाचाही आधार नाही; परंतु जो सर्वांना आधारभूत आहे. पंचमहाभूते परमात्म्यातून निर्माण झाली. ती त्याच्यातच स्थिर आहेत आणि शेवटी त्याच्यामध्येच विलीन होणार आहेत. म्हणून परमात्मा पंचमहाभूतांचा आधार होय. शरीराचा आधार प्राण आहे तर प्राणाचा आधार परमात्मा आहे. भगवान शिव हे सर्व कारणांचे कारण आहे.

**निराधारः शिवः साक्षात् प्राणस्तेन प्रतिष्ठितः।**
**तदाधारा तनुर्ज्ञेया जीवो येनैव चेष्टते।।१७.२९।।**

शिव हा निराधार अर्थात् आधाररहित आहे. मंदिरात मूर्तींची प्राणप्रतिष्ठापना केली जाते. जोपर्यंत प्राणप्रतिष्ठापना होत नाही तोपर्यंत मूर्तीच्या पूजेचे फल मिळत नाही. दुकानात देवतांच्या अनेक मूर्ती पडलेल्या असतात. त्यांची कुणी पूजा करीत नाही, कुणी आरती करीत नाही की त्यांना काही मागत नाही. त्यांना देवतेचा आकार मिळालेला असतो, परंतु त्यांच्यावर संस्कार झालेला नसतो. प्राणप्रतिष्ठापना न झाल्यामुळे त्या मूर्त्या पूजनीय नसतात. मूर्तीची प्राणप्रतिष्ठापना संतांच्या अथवा श्रीगुरूच्या हस्ते होते त्याप्रमाणे शरीरात प्राणाची प्रतिष्ठापना कुणी केलेली असते? जो आधाररहित असून सर्व जगताचा आधार आहे अशा भगवान शिवाकडून प्रत्येक जीवात्म्याच्या शरीरात प्राणाची प्रतिष्ठापना झाली आहे. जड शरीरात प्राणाचा प्रवेश झाल्यामुळे ते रसरशीत आणि चैतन्यमय दिसू लागते. केवळ प्राणच नव्हे तर त्याच्यासोबत स्वतः भगवान शिव देखील प्रत्येकाच्या हृदयात वास्तव्य करू लागले. गर्भातील बालकाच्या मस्तकाच्या मध्यातून प्राण शरीरात प्रवेश करतो, असे शास्त्रात म्हटले आहे. म्हणून बाळाच्या जन्मानंतर त्याची तेलाने टाळू भरली जाते. मस्तकाच्या रंध्रातून प्राणाने पुन्हा बाहेर जाऊ नये, म्हणून ते रंध्र जणू बंद केले जाते. केवळ योगीच शरीरात जेथून प्राण प्रविष्ट झाला तेथून प्राण बाहेर नेऊ शकतो. सामान्य मनुष्याचा प्राण नवद्वारांपैकी कुठल्याही एका द्वाराने बाहेर जात असतो. मस्तकरंध्राला 'ब्रह्मरंध्र' असे नाव असून ते देहातील दहावे द्वार होय.

'अष्टचक्रः नवद्वारः देवानां पुरयोद्धया।' मनुष्यशरीर ही एक अयोध्या नगरी आहे. आठ चक्र असलेले नऊ दारांचे देवाचे हे पूर आहे. एका मराठी पदात म्हटले आहे– 'नऊ दरवाजे दहावी खिडकी आत मूर्ति बसविली' देह म्हणजे नऊ द्वारे आणि एक दहावी खिडकी असलेले मंदिर असून त्यात आत्मारामाची प्रतिष्ठापना केलेली आहे, असा या पदाचा अर्थ आहे. ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये आणि मन–बुद्धी–चित्त–अहंकार या अंतःकरण चतुष्टयात एकेका देवतेचा निवास असतो असे वेदान्तशास्त्र म्हणते. नेत्र हे इंद्रिय, रूप हा विषय आणि अग्नी ही देवता. अशा प्रकारे प्रत्येक इंद्रियात एकेक देवता मानली आहे. वीरशैवसिद्धान्तात प्रत्येक इंद्रियाच्या ठिकाणी एकेका लिंगाचा निवास असतो असे म्हटले आहे. आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग ही पंचज्ञानेंद्रियांमधील पाच लिंगे असून मनामध्ये महालिंग वसते. इंद्रियांचे नियंत्रण करण्यासाठी सर्व इंद्रियांत भगवान शिव वास्तव्य करतात, परंतु याचा आपल्याला पत्ता नसतो. म्हणून मनुष्य–शरीर हे देवांचे नगर आहे. त्याला 'अयोध्या' म्हटले आहे. 'योध्या न भवतीति अयोध्या'. जेथे युद्ध होत नाही, जेथे परस्परांशी भांडण होत नाही ती 'अयोध्या'. अयोध्या शब्दाचा हा अर्थ असताना 'अयोध्या' हे शहर आज मात्र दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडून संघर्षाचे केंद्र ठरले आहे.

आपल्या शरीराची 'अयोध्या' करायची असेल तर कुणाशी झगडता कामा नये, कुणाला शब्दाने दुखवू नये, दुसऱ्याला आदराने वागवले पाहिजे तरच तुमचे शरीर 'अयोध्या' होईल. जिथे मत्सर आणि क्रोध नांदतात तिथे

भगवंत नांदत नाही. जेथे सहृदयता आणि प्रेम आहे तेथेच भगवान राहतात. द्वेष करणाऱ्या घरात आणि मनात भगवंत राहत नाही. तो गुणीजनांच्या सहवासात राहतो.

शरीराच्या नवद्वारांपैकी कोणत्या द्वारातून प्राण बाहेर जाईल हे प्रत्येकाच्या कर्मावर अवलंबून असते. शरीरात प्राणाची प्रतिष्ठापना भगवान शिवांनी केली आणि त्याला प्रेरणा देण्यासाठी ते देखील शरीरात येऊन राहिले. शरीरात प्राण आहे म्हणून शरीराचे चलनवलन चालू असते. शरीरातून प्राण निघून गेला तर ते थांबते. 'मरण' हा शब्द वापरला नाही तरी वस्तुस्थिती लपून राहत नाही. 'मरण' हा शब्द उच्चारला नाही तरी ते जेव्हा येते तेव्हा निमूटपणे पत्करावे लागते. शरीरातून प्राण निघून जाणे म्हणजे मरण. शरीरव्यवहारासाठी प्राणाची गरज असते. प्राण गेल्यावर शरीराचे चलन-वलन थांबते. मग ते निष्प्राण शरीर घराबाहेर काढून स्मशानात नेतात. जेथे त्याच्यावर अंत्यसंस्कार करतात. प्राण निघून गेला की शरीर निकामी होते. मग ते शरीर सांसारिकाचे असो की योग्याचे. प्राणाचे श्रेष्ठत्व सांगणारी एक कथा उपनिषदात आली आहे.

एकदा इंद्रिये आणि प्राण यांच्यात भांडण लागले. 'तू मोठा की मी मोठा?' असा वाद उत्पन्न झाला. आपसांत चर्चा करून निर्णय लागण्याची शक्यता नव्हती. सर्वजण ब्रह्मदेवाकडे गेले. भांडणाचे कारण ऐकून घेतल्यावर ब्रह्मदेव म्हणाले,

''तुमच्यात कोण श्रेष्ठ आहे हे तुम्हीच ठरवू शकता. प्रत्येकाने काही काळ शरीराबाहेर जावे. तो गेल्याचा शरीरावर काय परिणाम होतो, हे इतरांनी न्याहाळावे. जो शरीराबाहेर गेल्यावर शरीराची पूर्ण हालचाल थांबेल, तो तुमच्यात सर्वश्रेष्ठ समजावा.''

ब्रह्मदेवाचे म्हणणे सर्वांनी मान्य केले. दुसऱ्या दिवसापासून एकेक इंद्रिय शरीराबाहेर जाऊ लागले. पहिल्यांदा नेत्रेंद्रिय गेले. शरीराला आंधळेपण आले. पण फारसे काही बिघडले नाही. नेत्रेंद्रिय परत आल्यावर कर्णेंद्रिय बाहेर गेले. शरीराला बहिरेपण आले. पण त्यामुळे सर्व हालचाल थांबली नाही. याप्रमाणे क्रमाक्रमाने सर्व इंद्रिये बाहेर जाऊन आली. परंतु त्यांच्या जाण्यामुळे शरीराचे चलनवलन थांबले नाही. सर्वांत शेवटी प्राण बाहेर जायला निघाला. तो निघताक्षणीच सर्व इंद्रिये कासावीस झाली. डोळ्यांतले तेज विझू लागले. कानाची श्रवणशक्ती क्षीण होऊ लागली. हातपाय थंड पडू लागले. शरीराची हालचाल मंदावू लागली. तेव्हा सर्व इंद्रियांनी प्राणाची विनवणी केली, ''तू श्रेष्ठ आहेस, तू ज्येष्ठ आहेस, तुझ्याशिवाय आम्ही जगू शकणार नाही.''

प्राणाचे श्रेष्ठत्व अशाप्रकारे सिद्ध झाले. प्राण नसेल तर ज्ञानेंद्रिये, कर्मेन्द्रिये आणि मन, बुद्धी काहीच कार्य करू शकत नाही.

**शिवे प्राणो विलीनोऽपि योगिनो योगमार्गतः।**
**स्वशक्तिवासनायोगाद् धारयत्येव विग्रहम्।।१७.३०।।**

शिवात प्राण विलीन झाल्यानंतर सर्व शरीरव्यवहार थांबणार काय? असा प्रश्न कोणाला पडेल. त्याचे उत्तर या श्लोकात दिले आहे. ज्याने शरीरात प्राण घातला आणि जो प्राणालाही प्राण देतो असा शिव शरीराच्या आतच वास करतो. तो नेत्राचा नेत्र आहे, श्रोत्राचा श्रोत्र आहे, मनाचे मन आणि आणि प्राणाचा प्राण आहे. त्याच्या प्रेरणेशिवाय गवताचे पातेदेखील हलत नाही. अशा भगवान शिवात शिवयोगी कुंभक करून आपला प्राण विलीन करतो. तरीही त्याचे शरीरव्यवहार चालू असतात. शिव शरीरातच असल्यामुळे त्याच्यात विलीन झालेला प्राण देखील शरीरातच असतो. त्याच्या शक्तिसंस्काराच्या बळावर त्याचे शरीर टिकून असते. प्राण शरीराचा रक्षक आहे. शरीर कितीही जीर्ण-शिर्ण होऊन पडले, त्याच्या आसपास कोणी नसले, तरीही शरीरात जोपर्यंत प्राण

आहे तोपर्यंत त्याच्याजवळ कावळा येत नाही की कुत्रा. ज्याक्षणी प्राण शरीर सोडून जातो तेव्हा ते शव होते आणि त्याला कुरतडण्यासाठी कावळे-कुत्रे-मुंग्या जवळ येतात. प्राण असलेल्या शरीराजवळ मात्र ते येत नाहीत. प्राण असा शरीराचा रक्षक आहे. म्हणून प्राण शिवात विलीन झाला तरी त्याच्या शक्तिसंस्काराच्या बळावर शिवयोग्याचे शरीरव्यवहार चालू असतात.

**स चाभ्यासवशाद् भूयः सर्वतत्त्वातिवर्तिनि।**
**निष्कलंके निराकारे निरस्ताशेषविक्लवे।।**
**चिद्विलासपरिस्फूर्तिपरिपूर्णसुखाद्वये।**
**शिवे विलीनः सर्वात्मा योगी चलति न क्वचित्।।१७.३१-३२।।**

शिवयोग्याच्या निश्चल स्थितीचे वर्णन या श्लोकांत केले आहे. वायू आत घेणे, त्याला आत रोधून कुंभक करणे आणि नंतर रेचक करणे; असे वारंवार करीत राहणे यालाच 'अभ्यास' म्हणतात. एक श्लोक पुन्हा पुन्हा वाचला की पाठ होतो. अभ्यासाने संस्कार दृढ होतो. कुंभक करून जीवाचा आधार असलेला प्राणवायू शिवयोगी परशिवात विलीन करतो. हा परशिव कसा आहे? तो भूमी आदी छत्तीस तत्त्वांच्या अतीत आहे. तो निष्कलंक आहे. निराकार आहे. म्हणून सर्व आकारांत एकाच परमेश्वराची पूजा केली जाते. आकार कुठलाही असो, मूर्ती कोणतीही असो; तिची केली जाणारी पूजा म्हणजे निराकार परब्रह्माची पूजा असते. परंतु माणसाच्या वेडेपणाला आणि आंधळेपणाला मर्यादा नाहीत. ते मूर्तीच्या आकार-प्रकारांवरून एकमेकांशी भांडत असतात. माझा देव मोठा की तुझा देव मोठा? हा त्यांच्या संघर्षाचा मुद्दा असतो. आपला मालक कोणताही वेष घालून आला तरी कुत्रा त्याला बरोबर ओळखतो. परंतु मनुष्य मात्र दुसरा आकार घेऊन येणाऱ्या परमेश्वराला ओळखत नाही. 'तू माझा परमेश्वर नाहीस' असे तो त्याला बजावतो. कुत्रा वेषांतर केलेल्या मालकाला ओळखतो; परंतु स्वतःला बुद्धिमान समजणारा माणूस मात्र आपल्या मालकाला ओळखू शकत नाही. त्याला मान्य असलेल्या रूपात आणि वेषात जर परमेश्वर आला तरच तो परमेश्वराला ओळखतो. ईश्वराला वस्तुतः कोणताही आकार नसतो.

शिव मायातीत आहे. तो सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप आहे. तो अद्वय आहे. म्हणजे त्याच्याशिवाय दुसरे तत्त्व अस्तित्वात नाही. तो एकमेव आहे. अशा लक्षणांनी युक्त शिवामध्ये शिवयोग्याचे प्राण विलीन होतात तेव्हा तो निश्चल होऊन राहतो. तो समाधीत मग्न होतो. शेवटी या स्थलाचा समरोम करतात.

**प्रध्वस्तवासनासंगात् प्राणवृत्तिपरिक्षयात्।**
**शिवैकीभूतसर्वात्मा स्थाणुवद्भाति संयमी।।१७.३३।।**

जो योगाभ्यास करतो त्याच्या मनातील सांसारिक वासना हळूहळू क्षीण बनत जातात. सांसारिक वासना मनुष्याला कधी पूर्ण तृप्त करू शकत नाही. त्या त्याला सदैव अतृप्त ठेवतात. कितीही खाल्ले तरी पोट भरत नाही. त्याप्रमाणे कितीही खाल्ले तरी मन भरत नाही. खाण्याची इच्छा तशीच असते. पोटात जागा नाही म्हणून कोणी अधिक खात नाही, इतकेच. वासनेत तृप्त करण्याचे सामर्थ्यच नाही तर ती तृप्त कशी करील? ही सामान्य माणसाची कथा आहे. शिवयोग्याच्या वासना मात्र नष्ट होतात. त्याने प्राणाला कुंभक करून शिवात विलीन केलेले असल्यामुळे प्राणाच्या पूरक व रेचक या वृत्तींचा क्षय झालेला असतो. पाण्यात पाणी एकरूप व्हावे त्याप्रमाणे तो शिवात समरस होतो. जीवात्मा हा शिवाचाच अंश असतो. जेव्हा तो शिवाशी समरस होतो तो

सर्वात्मा होतो. सर्वांच्या आत्म्यातून तोच प्रकाशित होत असतो. असा शिवयोगी वठलेल्या झाडाच्या बुंध्याप्रमाणे निश्चल होतो.

शिवयोगी शिवाशी तादात्म्य झाल्यामुळे तो शिवासारखा होतो. अशाप्रकारे प्राणानुग्रहस्थलात प्राणाच्या पूरक-रेचक वृत्तींना रोधून शिवात प्राण विलीन केला जातो. प्राण स्थिर होतो आणि त्याबरोबर मन देखील स्थिर होते. प्राणाचा असा अनुग्रह झाला की निश्चल स्थिती प्राप्त होते. या बरोबरच प्राणानुग्रहस्थल या ठिकाणी संपले, असे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२३ जुलै १९९४

---

## आशीर्वचन नववे

## कायार्पितस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग-षट्स्थलांतील प्रसादिस्थलाचे यापुढील अवांतरस्थल आहे कायार्पितस्थल. काय म्हणजे शरीर. आपले शरीर इष्टदेवतेला अर्पण करणे म्हणजेच कायार्पितस्थल.

**शिवस्य पररूपस्य सर्वानुग्राहिणोऽर्चने।**
**त्यागो देहाभिमानस्य कायार्पितमुदाहृतम्॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.३४)

शरीराभिमानाचा त्याग करणे हेच कायार्पण होय. शिवरूप झालेला, काया, इंद्रिये आणि प्राण यांच्यावर अनुग्रह करणारा शिवयोगी शिवार्चन करताना शरीराभिमानाचा त्याग करतो, तेव्हा त्याला 'कायार्पितस्थल' असे म्हणतात. गुरुपदेशानुसार जो साधक आपल्या कायेला शिवार्पित करतो त्याला 'शैव' म्हणतात, अशा साधकाला मुक्ती मिळते, त्याला पुनर्जन्म घ्यावा लागत नाही, असे 'योगज आगमा'त सांगितले आहे. आपल्या देशात प्रत्येकाची इष्टदेवता वेगवेगळी असते. कोणी शिवाची, कोणी बुद्धाची, कोणी विष्णूची, कोणी शक्तीची तर कोणी ख्रिस्ताची उपासना करतात. त्यामुळे शैवदर्शन, वीरशैवदर्शन, वैष्णवदर्शन, शक्तिदर्शन, गाणपत्यदर्शन, कापालिकदर्शन, जैनदर्शन, बौद्धदर्शन अशी अनेक दर्शने-तत्त्वज्ञाने निर्माण झाली. आम्ही पुन्हा पुन्हा सांगतो की, उपासनापद्धती आणि इष्टदेवतेची रूपे भिन्न असली तरी त्यामधून व्यक्त होणारे तत्त्व एकच आहे. एकाच मूलतत्त्वाला अनेकांनी अनेक रूपांत पाहिले आहे, अनेक नामांनी बोलाविले आहे. हे सत्य ध्यानी घेऊन सर्व उपासकांनी परस्परांच्या मतांचा आणि देवतांचा आदर केला पाहिजे.

'शिव' म्हणजे सर्वांना समान दृष्टीने पाहणारे, सर्वांचे कल्याण चिंतणारे परमतत्त्व होय. शिवानुभव हा मंगल अनुभव आहे. जो स्वतःला शिवार्पित करतो तो शैव होय. शैवांत जो 'वीर' असतो त्याला 'वीरशैव' म्हणतात. वीरशैव हा भक्तिक्षेत्रातील 'वीर' आहे. सामान्य शैव मंदिरात जाऊन शिवोपासना करतात परंतु वीरशैव मात्र

शरीरावर लिंगधारण करून आपल्या शरीराचेच मंदिर करतो. त्याचे शरीर इष्टलिंगापासून कधीही विभक्त होत नाही. शरीराचे मंदिर करण्याचे वीरत्व त्याच्या ठायी असल्यामुळे तो 'वीरशैव' ठरतो.

समर्पण का करावे लागते? तर जे त्याचे आहे ते त्याला परत करण्यासाठी. शरीर भगवंताला समर्पित करायचे. शरीर कोणाचे आहे? शरीर मातापित्याचे आहे. माता-पित्याचे शरीर त्यांच्या माता-पित्याचे आहे, असे मागे मागे जाता जो सर्वांचा माता-पिता आहे त्याच्याजवळ येऊन आपण थांबतो. 'त्वमेव माता च पिता त्वमेव'. सर्वांचा माता आणि पिता भगवंतच आहे. मनुष्यशरीर माणसाला प्रयोगशाळेत निर्माण करता येणार नाही. शरीर ही परमेश्वराची एक सुंदर कलाकृती आहे. हे अद्भुत शरीर-यंत्र त्याने कसे निर्मिले कुणास ठाऊक! त्यासाठी कोणकोणती द्रव्ये वापरली हे त्यालाच माहीत. अस्थी, मज्जा, मांस, त्वचा आणि विलक्षण सामर्थ्यशाली मेंदू. अशी अद्भुत रचना त्याने केली आहे. मातेच्या गर्भात तिळाएवढा जीव मूळ धरतो आणि हळूहळू त्याला आकार येतो. हे काही मानवी कर्तृत्व नव्हे. स्त्री आणि पुरुष या निर्मितीची फक्त माध्यमे असतात, हे विचार केला तर लक्षात येते. शरीरेही असंख्य आणि त्यांची चेहरेपट्टी आणि परस्परांपासून भिन्न. कारखान्यातून एकसारख्या एक मोटारींचे उत्पादन व्हावे तशी एका छापाची ही निर्मिती नाही. गाडीचा नंबर पाहिल्याशिवाय तिचे वेगळेपण कळू शकत नाही. परंतु एकसारखा एक मनुष्य असत नाही. एकाच मातृगर्भातून जन्म घेतलेल्या मुलांची चेहरेपट्टी वेगवेगळी असते. इथे डुप्लीकेट काही नसते. असा हा विलक्षण निर्माता आहे.

शरीर हे भगवंताने निर्माण केले. ते त्याचे आहे. म्हणूनच ते त्याला अर्पण केले पाहिजे, हेच कायार्पण होय. भगवंताने आपल्याला शरीर दिले हे ठीक आहे. मग हे त्याला अर्पण तरी का करायचे? तर यासाठी करायचे की तुम्हाला भगवंत व्हायचे आहे. भगवंताने दिलेले शरीर भगवंताला अर्पण करायचे असते. नदीतील पाणी घेऊन नदीलाच अर्पण करावे त्याप्रमाणे. सर्व प्रपंच त्या ईश्वराचा आहे. म्हणून काहीही अर्पण केले तरी ते त्याचेच असणार. अर्पण केल्याने आपल्या मनात समर्पणभाव आणि उदारभाव उत्पन्न होतो. आई लहान मुलाला खाऊ देते आणि गंमतीने 'त्यातला थोडा मलाही दे' असे म्हणते. मूल उदार असेल तर आईला देईल. कंजूष असेल तर देणार नाही. खाऊ आईनेच थोड्या वेळापूर्वी दिलेला आहे. तरी तो परत द्यायला मूल नाखूष असते. तुम्हाला परमेश्वराने शरीर दिले त्याला किती वर्षे होऊन गेली? कुणाला चाळीस, कुणाला पन्नास, कुणाला सत्तर. इतकी वर्षे शरीराचा उपभोग घेऊन देखील ते परत करायला आपण राजी नसतो. परंतु ते परत केलेच पाहिजे. शरीर भगवंताला अर्पण करण्यात तुमचाच लाभ असतो. आईने खाऊ मागितल्यावर जर मुलाने दिला तर आई तो खात नसते, मोठ्या प्रेमाने त्यालाच परत करते. म्हणून तर ती आई असते. भगवंत आपला मायबाप आहे. त्याने दिलेले शरीर त्याला परत करण्यात आपलाच फायदा होतो. शरीरार्पण केल्यावर भगवंत काय देतो हे पुढील श्लोकात सांगतात.

**यदा योगी निजं देहं शिवाय विनिवेदयेत।**
**तदा भवति तद्रूपं शिवरूपं न संशयः ।।१७.३५।।**

शिवयोगी आपले शरीर शिवार्पण करतो. तेव्हा तो स्वतः शिवस्वरूपच होतो. कापराने स्वतःला अग्नीत अर्पण केल्यावर तो अग्निरूप होतो त्याप्रमाणे. आपण जे शिवाला अर्पण करतो त्याच्या विषयीचा अभिमान आपल्या मनातून नष्ट होतो. आपणही कोणाला काही देतो, परंतु त्याचा जबरदस्त अहंकार बाळगतो. एखाद्याला सत्काराच्या निमित्ताने आपण शाल पांघरतो. त्यानंतर तो मनुष्य जेव्हा शाल पांघरून आपल्यासमोर येतो, तेव्हा

दुसऱ्याला 'ती पहा त्याच्या अंगावरची शाल! ती मीच त्याला दिली आहे बर कां.' असे न विसरता आपण सांगत असतो. शाल देऊन टाकल्यावर आपला तिच्यावर काय अधिकार? तरीदेखील त्या शालीत आपण आपले ममत्व शोधत असतो. त्यामुळे ती देऊन देखील न दिल्यासारखीच असते. दुसऱ्याला वस्तू दान केल्यावर तिचा विसर पडायला हवा. परंतु असे घडत नसते. दान देऊन, पूजा करून, आपण आहोत त्याठिकाणीच असतो. आपली थोडीदेखील प्रगती होत नाही.

अभिमानाचा त्याग केला तर आमचा व्यवहार कसा चालेल? असा प्रश्न कुणाला पडेल. 'मी'. 'माझे' हे शब्द वापरले नाही तर व्यवहार कसा करता येईल? मी आणि माझे म्हटल्यामुळे काही बिघडत नाही. परंतु हे शब्द केवळ जिभेवर असावेत, त्यांचा अंत:करणाला स्पर्श होऊ नये. हे जर अंत:करणात शिरले तर जन्मजन्मांतरात पाठलाग करीत राहतात. व्यवहार-जीवन आणि अभिनय-जीवन यांच्यात अंतर असते हे नीट समजून घेतले पाहिजे. रामाची भूमिका करणारा हा केवळ अभिनय करत असतो. त्याच्या ठिकाणी रामाचा एकही गुण नसतो. दूरदर्शनवर भूमिका करणाऱ्या नटाच्या व्यक्तिगत जीवनात 'राम' नसतो. नक्कल वेषभूषेची करता येते, स्वभावाची करता येत नाही. विवेकानंद, महात्मा गांधी यांच्या वेषभूषेची नक्कल करता येणे शक्य आहे. बंगलोरमध्ये हुबेहुब महात्मा गांधीसारखा दिसणारा एक मनुष्य विधानभवनाजवळ घुटमळत असतो. अनेकजण त्याच्यासोबत आपले छायाचित्र काढून घेतात. ती छायाचित्रे पाहिल्यावर आजच्या काळातली माणसे खरोखर महात्मा गांधीच्या समवेत उभी आहेत असा भास होतो. त्याच्याकडे महात्मा गांधीचा चेहेरा आहे; परंतु म. गांधाचा स्वभाव आहे का? रामाची वेषभूषा केल्यावर रामाचा स्वभाव अंगी बाणत नसतो. त्याचा स्वभाव वेगळा असू द्या आणि अभिनय वेगळा करा. मी आणि माझे शब्दप्रयोग अभिनय केल्याप्रमाणे करा आणि 'मी पण, माझे पण हे आपले नाही' भाव मनात दृढ असू द्या. म्हणून अहंकार-ममत्व हे केवळ शब्दांतून व्यक्त झाले तरी चालेल. परंतु अंत:करणाला मात्र त्यांचा स्पर्श होऊ देऊ नये.

देहाबद्दलचा अभिमान आणि देहाशी संबंधित वस्तू-व्यक्तींवरील ममत्व यांचा त्याग करायला हवा. शरीर शिवार्पण केले तर हे घडते. शिवाला शरीर अर्पण केल्याने शिवरूप लाभते. मनुष्याने केवळ 'शैव' राहू नये तर शिव व्हावे, 'वैष्णव' राहू नये तर विष्णू व्हावे, 'शाक्त' राहू नये 'शक्ती' व्हावे, 'गाणपत्य' राहू नये 'गणपती' व्हावे, 'जैन' राहू नये 'जिन' व्हावे, 'बौद्ध' राहू नये 'बुद्ध' व्हावे. 'ख्रिश्चन' राहू नये 'ख्रिस्त' व्हावे. याचा अर्थ नीट समजून घेतला पाहिजे. शिव आणि विष्णू यांच्यात कधी संघर्ष झाला आहे काय? शक्ती आणि गणपती, जिन आणि बुद्ध यांच्यात संघर्ष झाल्याचे उदाहरण नाही. परंतु शैव आणि वैष्णव मात्र एकमेकांशी भरपूर भांडले आहेत. तसेच शाक्त आणि गाणपत्य, जैन आणि बौद्ध यांच्यात भांडणे झाली आहेत. देवता भांडत नाहीत, त्यांचे उपासक मात्र परस्परांशी भांडतात हे कशामुळे घडते? तर उपासक आपल्या देवतेशी समरस न झाल्यामुळे. आपल्या देवतेचा अवश्य जयजयकार करावा. परंतु त्याबरोबरच देवतेशी समरस कसे होता येईल याचाही विचार करावा. अन्यथा तत्त्व बाजूला राहते आणि देवतेच्या नावाने समाजात गोंधळ माजतो.

शिव म्हणजे सर्वांचे कल्याण करणारा. शिवोपासकाच्या मनात सर्वांच्या कल्याणाची इच्छा उत्पन्न झाली तरच ते 'शिव' होतील, अन्यथा केवळ 'शैव' राहतील. याप्रमाणे विष्णू, जिन, बुद्ध यातील तत्त्वे जाणून त्यांच्या उपासकांनी केवळ वैष्णव, जैन, बौद्ध न राहता विष्णू, जिन, अेणि बुद्ध व्हावे. देवतेच्या नामाचा अभिमान कितीही वाहिला तरी तो आपल्याला मूलतत्त्वापर्यंत घेऊन जाणार नाही. येशू ख्रिस्ताने स्वत:चे शरीर क्रूसावर

खिळवून परमेश्वराला पूर्ण समर्पण केले. शरीर क्रूसावर अर्पण करणे आणि शरीरावर क्रूस मिरवणे यांत खूप अंतर आहे. सामान्यांच्या लक्षात हेच येत नाही आणि त्यामुळे धर्मतत्त्वांची अकारण बदनामी होते. सांगण्याचे तात्पर्य असे की, तुम्ही शैव असा की वैष्णव, जैन असा की बौद्ध, ख्रिश्चन असा की अन्यपंथीय, आपापल्या देवतेला समर्पित झाले पाहिजे. म्हणून जो शिवाला आपले शरीर अर्पण करतो तो शिवरूप होतो असे या ठिकाणी म्हटले आहे.

**इंद्रियप्रीतिहेतूनि विषयासंगजानि च।**
**सुखानि सुखचिद्रूपे शिवयोगी निवेदयेत्।।१७.३६।।**

शरीर अर्पण करणे याचा अर्थ शरीरातील इंद्रियांची सुखे अर्पण करणे. इंद्रिये आणि विषय याचा अर्थ संयोगातून जे सुख प्राप्त होते ते शिवार्पित केले पाहिजे. ही सुखे देखील नैवेद्य म्हणून शिवाला अर्पण करावीत. केवळ खाद्यपदार्थ अथवा वस्त्रप्रावरणे शिवाला अर्पण करावीत असे नाही; तर आपण जे काही भोगतो ते आणि त्यापासून जे मिळते ते, हे सारे शिवाला अर्पण केले पाहिजे. तुम्ही शब्द शिवाला अर्पण करा. शब्दार्पण, स्पर्शार्पण, रूपार्पण, रसार्पण आणि गंधार्पण देखील करावे. विषय आणि विषयांपासून मिळणारे सुख शिवार्पण करावे.

**दर्शनात् स्पर्शनाद् भुक्तेः श्रवणाद् घ्राणनादपि।**
**विषयेभ्यो यदुत्पन्नं शिवे तत्सुखमर्पयेत्।।१७.३७।।**

विषयांपासून जे सुख मिळते ते आपल्यासाठी नसून शिवासाठी असते, अशी भावना दृढ झाली पाहिजे. मी शब्द ऐकत आहे, माझ्यासाठी नव्हे तर शिवासाठी. मी भोजन करतो ते शिवासाठीच. मी जे काही करतो ते सारे शिवासाठी करतो, ही भावना म्हणजेच शिवार्पण वृत्ती होय. असे जेव्हा घडते तेव्हा सर्व क्रिया म्हणजे एक पूजा होऊन जाते. आचारसंपन्न व्यक्तीची प्रत्येक क्रिया हीच पूजा होऊन राहते. त्याचे सहज चालणे ही प्रदक्षिणा असते, त्याचे सहज बोलणे हे स्तोत्र असते. म्हणून येथे सांगितले आहे की पाहणे, स्पर्श करणे, उपभोग घेणे, श्रवण करणे, हुंगणे इत्यादी विषयांच्या उपभोगामुळे उत्पन्न होणारी सर्व सुखे शिवाला अर्पण करावी.

**देहद्वारेण यद्यत् स्यात् सुखं प्रासंगमात्मनः।**
**तत्तन्निवेदयन् शम्भोर्योगी भवति निर्मलः।।१७.३८।।**

शरीराकडून घडणारे प्रत्येक कर्म आणि सुखे आणि त्यामुळे मिळालेली सुखे शिवाला नैवेद्य म्हणून अर्पण केल्यामुळे शिवयोगी निर्लिप्त होतो, निर्मळ होतो. परमात्मा आणि प्रकृती दूषित वस्तूला निर्मल करत असतात. मनुष्य मात्र प्रदूषण करीत असतो. दुर्गंधीयुक्त पाणी झाडाच्या मुळाशी घातले तरी त्याचे फळ मात्र मधुर आणि स्वादिष्ट होत असते. उच्छ्वासावाटे बाहेर पडणारा कर्बाम्लवायू वनस्पती शोषून घेतात आणि त्याचे प्राणवायूत रूपांतर करून तो परत करतात. विष्णुपुराणात वृक्षाचे महत्त्व सांगताना असे म्हटले आहे की, 'दहा विहिरीपेक्षा एक तलाव मोठा असतो. दहा तलावांपेक्षा एक पुत्र मोठा असतो आणि दहा पुत्रांपेक्षा एक वृक्ष मोठा असतो'. तुमच्या अंगणात एक वृक्ष उभा असेल तर तो एकटाच दहा मुलांची बरोबरी करतो. तुमचा पुत्र तुम्हाला सुख देईल अथवा न देईल, परंतु तुमच्या अंगणातला वृक्ष मात्र केवळ सुखच देईल. वृक्षाचे एवढे महत्त्व आहे. प्रकृतीला तुम्ही घाण दिली तरी ती निर्मल करून ती परत करते. एक बीज तुम्ही पृथ्वीला दिले तर त्याची परतफेड ती शंभरपटीने करते. त्याप्रमाणे भगवंताला तुम्ही जी वस्तू अर्पण करता ती वस्तू निर्मल करून तो तुम्हाला परत

करतो. त्यामुळेच त्याला 'पतितपावन' असे म्हणतात. तो पाप्यांचा उद्धार करतो. तुम्ही जे त्याला देता तेच तो शुद्ध करून तुम्हाला देतो.

नैवेद्य घेऊन तुम्ही मंदिरात जाता, तो देवाला दाखवता आणि परत घरी येता, तेव्हा त्यातले अन्न कमी झालेले असते काय? तर तसे होत नाही. तसे झाले असते तर देवाला नैवेद्य दाखवण्याचे धाडस कोणी केले नसते. हा खाणारा देव आहे म्हणून त्याच्याकडे दुर्लक्ष केले असते. न खाणाऱ्यावर आपण अधिक प्रेम करतो, खाणाऱ्यावर करत नाही. जडावर आपले अधिक प्रेम असते, चैतन्यावर नसते. देवाला रोज दैवेद्य दाखवला जातो. परंतु गुरूला मात्र वर्षातून एखाद्या वेळी निमंत्रण असते. देव काही बोलत नाही, म्हणून तो फार चांगला असतो. तुम्ही देवाला जेव्हा नैवेद्य दाखवता तेव्हा तो नैवेद्य खात नाही, त्यावरील तुमचे ममत्व खातो. त्याला नैवेद्य नको असतो. जगातले सारे पदार्थ त्याचे असून ते त्यानेच निर्मिलेले असतात. तो नित्य तृप्त आहे. म्हणून जो भगवंताला शरीर अर्पण करतो तो निर्मल होतो. पंचमहाभूते माणसाला निर्मल करीत असतात. मग त्या महाभूतांचा स्रष्टा सर्वांना निर्मल करील यात काय संशय! म्हणून येथे सांगितले आहे की आपले शरीर, आपली इंद्रिये आणि इंद्रियजन्य सुखोपभोग शिवयोगी शिवाला अर्पण करतो त्यामुळे तो निर्मल होतो. शरीर शिवार्पण केल्याने ते प्रसादरूप होते आणि मग सर्व जीवन प्रसन्नतेने अखंड दरवळून जाते. ही स्थिती तुम्ही सर्वांना प्राप्त होवो, असा शुभाशीर्वाद देऊन आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२४ जुलै १९९४

---

आशीर्वचन दहावे

## करणार्पितस्थल–१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल आपण कायार्पितस्थलासंबंधी ऐकले आहे. जो शिवाला शरीर अर्पण करतो तो शरीराच्या अभिमानापासून मुक्त होतो. शरीर शिवार्पित केल्याने आपला काय लाभ होतो? मनुष्याची बुद्धी लाभ काय होईल, याचा शोध घेत असते. म्हणून पोथ्या, पुराणे, स्तोत्रे यांच्या शेवटी त्यांच्या पठणांची फलश्रुती सांगितलेली असते. द्वादश ज्योतिर्लिंगाचे एक छोटे स्तोत्र आहे. त्याच्या शेवटी हे स्तोत्र पठण केल्यावर सात जन्मांतील पापे नष्ट होतील, अशी फलश्रुती सांगितली आहे. स्तोत्राच्या रचनाकर्त्यांना देखील हे माहीत होते की फलाचे प्रलोभन दाखवल्याशिवाय स्तोत्र कुणी वाचणार नाही. निर्बुद्ध मनुष्य देखील फळाची अपेक्षा ठेवतो तेथे सुबुद्ध माणसाने ठेवली नाही तरच नवल! कायार्पण केल्याने कोणते फळ मिळते? तर त्यामुळे योगी निर्मळ होतो, असे फल काल सांगितले आहे.

शरीर हा एक मलकोष आहे. मांस, मज्जा, अस्थी, कफ, पित्त असे बरेच काही शरीरात भरलेले आहे. मलीन शरीर भगवदर्पण केल्यावर ते निर्मल होते. मांसपिंडाचे मंत्रपिंडात रूपांतर होते. संताच्या स्पर्शाने अपवित्र वस्तूदेखील पवित्र होते. भगवंताला बाह्यवस्तू कितीही अर्पण केल्या, परंतु जर स्वतःला अर्पण केले नाही तर

काही उपयोग नाही. बेल–फूल, पेढा, केळी याबरोबरच आपले शरीर देखील अर्पण केले पाहिजे. मग शरीर 'प्रसादकाय' होते. त्यावेळी शरीराभिमान शिल्लक राहात नाही. शरीर प्रसादकाय झाल्यावर मन प्रसन्नतेने भरून जाते. कायार्पणामुळे असा मोठा लाभ होतो. शरीराप्रमाणेच भगवान शिवाला इंद्रियेदेखील अर्पण करावी लागतात. हे सांगणारे स्थल 'करणार्पितस्थल' होय.

**आसज्जनं समस्तानां करणानां परात्परे।**
**शिवे यत् तदिदं प्रोक्तं करणार्पितमागमे।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.३९)

भगवान शिवात सर्व 'करणे' म्हणजे इंद्रिये समर्पित करणे याला 'करणार्पितस्थल' म्हणतात. करण म्हणजे साधन. करणाचे दोन प्रकार आहेत. बहि:करण आणि अंत:करण. ही दोन्ही प्रकारची करणे शिवार्पित करावीत असा या श्लोकांचा अभिप्राय आहे.

शरीर हा इंद्रियांचा समूह होय. शरीर एकदा शिवार्पित केले तर त्याबरोबर इंद्रिये आपोआपच समर्पित होतात. मग पुन्हा इंद्रिये समर्पित करण्याची आवश्यकता काय? असा प्रश्न तुम्हाला पडेल. परंतु तसे होत नाही. केवळ इंद्रिये अर्पण करणे म्हणजे करणार्पण नव्हे. इंद्रियाकडून जे वैषयिक सुख मिळते, ते सुख शिवार्पित करणे म्हणजे करणार्पण होय. इंद्रियांना आगमात 'अश्व' अर्थात् घोडा असे म्हटले आहे. घोडा हा सामर्थ्यशाली आणि वेगवान प्राणी आहे. यंत्रांची शक्ती मोजताना देखील 'हॉर्स पॉवर'– अश्वशक्ती– या शब्दांनी निर्देशिली जाते. अमुक इंजिन अमुक इतक्या हॉर्स पॉवरचे आहे इत्यादी. रथाला जसे घोडे जुंपलेले असतात त्याप्रमाणे शरीररूपी रथाला पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये हे दहा घोडे जुंपलेले असून मन त्यांचा सारथी आहे, असे आगमांत म्हटले आहे. घोडा इंद्रियाचे प्रतीक मानला गेला. लग्नाच्या वेळी नवरदेव घोड्यावर बसून लग्नमंडपाकडे येतो. 'तू आता गृहस्थाश्रमात प्रवेश करीत आहेस, इंद्रियरूपी घोड्यावर नियंत्रण ठेव', असे जणू यातून सूचित केले जाते. म्हणून म्हटले आहे–

**यस्तु विज्ञानवान् भवति युक्तेन मनसा सदा।**
**तस्येंद्रियाणि वश्यानि सद्श्वयुवसारथे:।।**

जो इंद्रियांचा निरोध करतो अशा योग्याची इंद्रिये रथाला जोडलेल्या उत्तम घोड्याप्रमाणे त्याच्या ताब्यात राहतात. कधी कधी भल्या भल्या माणसांनाही इंद्रिये चकवतात, फशी पाडतात. ज्ञानी पुरुषांचाही त्यांच्यामुळे अध:पात होतो.

जगन्नाथ पंडित नावाचे एक संस्कृत विद्वान दिल्ली नरेशाच्या पदरी होते. गंगालहरी, रसगंगाधर इ. त्यांच्या रचना प्रसिद्ध आहेत. राजदरबारात त्यांना फार मान होता. एकदा राजासोबत ते चर्चा करीत होते. राजाला तहान लागली तेव्हा एक दासी पाण्याने भरलेला कुंभ कडेवर घेऊन तिथे आली. राजा पाणी प्याला. कुंभ रिकामा झाला आणि ती पुन्हा कडेवर घेऊन जाऊ लागली. तिच्याकडे पाहताना राजाला वाटू लागले, कुंभ रिकामा असून ती अशी चालते आहे की जणू कुंभात पाणी भरलेलेच आहे. राजाने पंडिताचे लक्ष या गोष्टीकडे वेधले आणि त्यावर काव्य रचायला सांगितले. पं. जगन्नाथाने एक सुरेख काव्य लिहून राजासमोर ठेवले. त्याचा आशय असा– तारुण्याने मुसमुसलेली ही प्रमदा कडेवर कुंभ घेऊन जेव्हा आली तेव्हा कुंभ पाण्याने भरलेला होता आणि परत जाताना रिकाम्या कुंभात आमची मने भरून ती नेत आहे.

राजाला हे काव्य अत्यंत आवडले. 'तुला काय हवे ते माग' असे खूष होऊन तो पंडिताला म्हणाला, पंडित

म्हणाले, ''मला संपत्ती नको, हत्ती घोडे नको, मला ही तुमची दासीच पाहिजे.''

राजाला आश्चर्य वाटले. तो म्हणाला, ''तुम्ही पंडित, चतुर्वेदी आणि ब्राह्मणकुलोत्पन्न आहात. ही स्त्री यवन आहे. हिच्याशी तुम्ही विवाह केला तर समाजात तुमची प्रतिष्ठा राहणार नाही.''

''काय वाटेल ते होवो'', पंडित म्हणाले, ''पण मला हीच हवी. हिच्याशी माझा विवाह लावून द्या.''

पंडिताची प्रबळ इच्छा पाहून राजाने तिच्याशी पंडिताचा विवाह लावून दिला. त्यानंतर व्हायचे तेच झाले. यवन स्त्रीशी विवाह केल्यामुळे पं. जगन्नाथांची निंदानालस्ती सुरू झाली. ज्यांना समाजात अत्यंत प्रतिष्ठा होती त्यांचा लोक अनादर करू लागले.

इंद्रिये अशी बलवान असतात. ज्ञानी पुरुषाला देखील ती अध:पतनाकडे घेऊन जातात. म्हणून इंद्रियांवर नियंत्रण ठेवणे वाटते तेवढे सोपे नाही. त्यासाठी खूपच तयारी करावी लागते.

पं. जगन्नाथांच्या वृत्तीत त्यानंतर परिवर्तन झाले. दिल्ली सोडून त्यांनी काशीत वास्तव्य केले. नित्य गंगास्नान केल्याने आपल्याला पापापासून मुक्ती मिळेल असे त्यांना वाटले. गंगेच्या घाटावर बसून ते पापनाशिनी गंगामातेला आळवू लागले. तेच त्यांचे 'गंगालहरी' नामक काव्य होय. आख्यायिका अशी सांगते की, त्यांनी एक श्लोक रचला की गंगेचे पाणी एक पायरी वर येत असे. त्यांचे काव्य पूर्ण होईपर्यंत ते जेथे बसले त्या ठिकाणी गंगेचे पाणी आले आणि त्यांना बसल्या ठिकाणीच गंगास्नान घडले.

पं. जगन्नाथांच्या आत्यंतिक श्रद्धेचे हे उदाहरण होय. श्रद्धा फार महत्त्वाची असते. ती जेव्हा तुमच्याजवळ असते तेव्हा तुमच्या घरातले पाणी देखील गंगा होऊन जाते. ती जेव्हा तुमच्या जवळ नसते तेव्हा गंगेत बुडी मारून देखील उपयोग नसतो. पूजेच्या आधी कलशावर हात ठेवून

**गंगे च यमुने चैव गोदावरिसरस्वति।**
**नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु।।**

असे गंगा आदी नद्यांना आवाहन केले जाते. आपल्या प्रार्थनेने पवित्र नद्या आल्या नसत्या तर हा मंत्र कशाला लिहिला गेला असता? भावनेत फार मोठी शक्ती असते.

येथे सांगण्याचा मुद्दा वेगळा आहे. इंद्रिये ज्ञानी लोकांना देखील चकवतात आणि फशी पाडतात. म्हणून इंद्रियांचे लगाम घट्ट धरून ठेवावे लागतात. अर्जुनाने श्रीकृष्णांच्या हाती आपल्या घोड्याचे लगाम दिले होते. याचा अर्थ त्याने आपली इंद्रिये भगवान श्रीकृष्णाला अर्पण केली होती. जो समर्पित होतो त्याचा अभिमान ईश्वर घेतो. जेव्हा एकजण स्वत:ला दुसऱ्याला समर्पित करतो तेव्हा त्याची सर्व जबाबदारी दुसऱ्याला पत्करावी लागते.

विवाहमंडपात आपण आपल्या कन्येचा हात वराच्या हाती देऊन हेच सांगत असतो की आता ही तुला समर्पित केली आहे. हिची सर्व जबाबदारी तुझ्यावर आहे. सर्वांच्या साक्षीने आपण हे करीत असतो. लग्न समारंभात निमंत्रण देऊन लोकांना बोलावतात, ते साक्षीदार म्हणून. 'मी हिचे पाणिग्रहण केले नाही', असे जर वराने नंतर म्हटले तर साक्षीदार म्हणून सर्व लोकांना बोलावता येते. याशिवाय आणखी एका देवतेची साक्ष असते. काही समाजात अग्नीच्या साक्षीने विवाह केला जातो. वीरशैव समाजात पंचकलशांच्या साक्षीने विवाहसमारंभ साजरा होतो. पंचकलश ही पंचाचार्यांची प्रतीके असतात. पंचाचार्य हे पंचमहाभूतांचे अधिपती मानले जातात. पंचमहाभूतांपैकी अग्नी हे एक महाभूत आहे. परंतु पंचाचार्य हे पंचमहाभूतांचे अधिपती आहेत. त्यांच्या साक्षीने वीरशैवाचा विवाह संपन्न होतो. त्यावेळी वधुवरांनी प्रतिज्ञा करायची असते– 'धर्मे च अर्थे च कामे च

नातिचरितव्यम्।' धर्म, अर्थ आणि काम या तिन्ही पुरुषार्थांचे आम्ही मर्यादेने पालन करू, असा या प्रतिज्ञेचा अर्थ होतो. पत्नी आपल्या पतीला जसे पूर्ण समर्पण करते त्याप्रमाणे जीवात्मा देखील शिवाला जेव्हा पूर्णसमर्पण करतो तेव्हा त्याचा सर्व भार भगवान शिवाला उचलावा लागतो. वीरशैवसिद्धान्ताप्रमाणे जीवात्मा हा 'सती' असतो आणि शिव हा 'पती' असतो. षट्स्थलातील शरणस्थलात जेव्हा साधक पोहोचतो तेव्हा त्याला स्वत:ला सती–स्त्री मानावे लागते. मग प्रत्यक्षात तो स्त्री असो किंवा पुरुष. दीक्षासंस्कार म्हणजे जीवाचे शिवाशी लागलेले लग्नच असते. मन्मथस्वामींनी म्हटले आहे–

**लिंगांगासी लग्न गुरुनाथे लाविले। तेथे ध्याता भले एकनिष्ठ।।**
**लिंगार्पित कर्म परम हाचि धर्म। जाणूनिया कर्म सुखावला।।**
**मन्मथ शिवलिंग लिंग आणि अंग। करून अभंग ऐक्य झाला।।**

अशाप्रकारे अंग (जीव), लिंगाशी (शिव) लग्न करून समरस होते. जीव जेव्हा शिवाला पूर्ण समर्पित होतो तेव्हा त्याचा भार शिवाला वाहावा लागतो. इंद्रिये बलवान असल्यामुळे ते ज्ञान्याचाही अध:पात घडवतात. म्हणून 'हे परमेश्वरा, माझ्या सर्वेंद्रियांवर तूच नियंत्रण ठेव' अशी प्रार्थना करून शिवाला शरण जावे लागते. त्यानंतर इंद्रियांकडून जे सुख मिळते ते सारे शिवाचे आहे असे समजून ते त्याला अर्पण करावे लागते. याला 'करणार्पण' असे म्हणतात.

**अहंकारमदोद्रिक्तं अन्त:करणवारणम्।**
**बध्नीयाद् य: शिवालाने स धीर: सर्वसिद्धिमान।।१७.४१।।**

सर्व इंद्रिये शिवार्पण करायची असतील तर एक गोष्ट करावी, मन शिवार्पित करावे. मन हे इंद्रियांचा अध्यक्ष आहे. युद्धात शत्रुसेनेच्या सर्व सैनिकांना पकडण्यापेक्षा त्यांच्या सेनापतीला पकडणे अधिक महत्त्वाचे असते. सेनापतीला पकडले की सैन्याला आदेश देणारा कोणी राहत नाही. सेनेमध्ये शिस्त असते. सैनिकांनी फक्त सेनापतीचे आदेश पाळायचे असतात. ऑर्डर इज ऑर्डर. एका सेनापतीला कैद केले तर बाकी सारे सौनिक हातातली शस्त्रे टाकून शरण येतात. त्याप्रमाणे एक मन शिवर्पित केले तर त्याच्या अधीन असलेली सर्व इंद्रिये सहज शिवार्पित होतात. अंत:करण मन, बुद्धी, चित्त, अहंकार यांनी मिळून बनलेले असते. अंत:करण हे एखाद्या मदोन्मत्त हत्तीसारखे असते. मदोन्मत्त हत्तीला एका मजबूत खांबाला जखडून ठेवण्यात येते. त्याप्रमाणे अहंकारमदाने उन्मत्त झालेल्या अंत:करणाला शिवरूपी खांबाला बांधून टाकावे लागते. शिवासारखे अचल, स्थिर दुसरे काही नाही. सर्व प्रपंच हा अस्थिर आहे. प्रपंचातील कोणत्याही वस्तूशी मन जोडले तर ती वस्तू मनाला फरफटत दूर घेऊन जाईल. परंतु जर ते भगवान शिवाशी जोडले तर ते शिवासारखेच स्थिर होईल. मदोन्मत्त हत्ती त्या बळकट खांबाला उखडू शकत नाही त्याप्रमाणे मनाने कितीही प्रयत्न केला तरी त्याला शिवाला सोडून जाता येत नाही.

यासाठीच शिवाजवळ जायला मन तयार नसते. तेथे एकदा गेलो की आपली सुटका नाही हे त्याला माहीत असते. लहान मूल आपल्याला चुकवत इकडे तिकडे धावत असते. त्याला आपल्या हाती सापडायचे नसते. तसे मन भगवंतापासून दूर पळत असते. तुमचे शरीर मंदिरात असते, परंतु मन घाबरून बाहेर पळून जाते. भगवंताने एकदा पकडले तर सुटका नाही, हे त्याला माहीत असते. आपण स्थिर झालो तर प्रपंचातील रसास्वादाला मुकतो हे त्याला माहीत आहे. परंतु तरीही मनाला पकडून स्थिर करता येते. लहान मुलाला पकडायला धावताना जर आपला वेग कमी पडला तर जो आपल्यापेक्षा गतिमान आहे त्याला 'मुलाला धरून आण' असे आपण सांगतो.

तसे मन जेव्हा अस्ताव्यस्त धावत असते, तेव्हा प्राणाला सांगून त्याच्या करवी आपण मनाला जेरबंद करू शकतो. योगशास्त्रात प्राणाच्या साहाय्याने मनावर अशा प्रकारे नियंत्रण ठेवले जाते. जो इंद्रियांसहित मन शिवाला अर्पण करतो तो धैर्यशील असतो. त्याला सर्व सिद्धी प्राप्त होतात. सत्संगात सर्वजण येतात, योगाभ्यास अनेकजण करतात. परंतु जो अत्यंत धैर्यशील असतो, त्यालाच आत्मज्ञानाची प्राप्ती होते.

**इंद्रियाणां समस्तानां मनः प्रथममुच्यते।**
**वशीकृते शिवे तस्मिन् किमन्यैस्तद्वशानुगैः।।१७.४२।।**

सर्व इंद्रियांत मन हे प्रधान आहे. ते जेव्हा शिवात विलीन होते तेव्हा त्याच्या अधीन असलेल्या इंद्रियांना शिवार्पित करण्यासाठी वेगळे प्रयत्न करावे लागत नाहीत. इंद्रिये सहजच शिवार्पित होतात. एका दोऱ्यात फुले ओवून फुलमाला तयार केली जाते. तो दोरा तुम्ही मूर्तीच्या गळ्यात घातला तर त्याबरोबरच सर्व फुले गळ्यात घातली जातात. त्याप्रमाणे मन शिवार्पित केले तर इंद्रिये शिवार्पित होतातच होतात.

**इंद्रियाणां वशीकारो निवृत्तिरिति गीयते।**
**लक्षीकृते शिवे तेषां कुतः संसारगाहनम्।।१७.४३।।**

इंद्रियांना वश करून ताब्यात ठेवणे याला 'निवृत्ती' म्हणतात. एक 'प्रवृत्ती' असते तर दुसरी 'निवृत्ती' असते. संसारात चालत राहणे ही प्रवृत्ती होय. तेथे परत येण्याचे नाव नसते. निवृत्ती म्हणजे जिथून प्रवास सुरू केला तेथे परत येणे. जीवात्म्याची यात्रा मोठी दीर्घ आहे. या यात्रेला केव्हा आरंभ केला याची आठवण देखील त्याला राहत नाही. यात्रेत कोठे सुख असते? असते ती केवळ दगदग, मात्र घरी आल्यानंतरच सुख मिळते. जीवात्म्याचे घर कोणते? त्याचे मूळस्थान कोणते? 'यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।' जेथे गेल्यावर जीव पुन्हा संसारात येत नाही ते त्याचे मूलस्थान होय. जन्मजन्मांतरात भटकत राहणे हा जीवाचा प्रवास आहे, यात्रा आहे. त्याने एखाद्या जन्मात बांधलेले घर हे काही त्याचे मूलस्थान नव्हे. जीवाने त्याच्या मूलस्थानाचा शोध घ्यायला हवा. तू कोण? कोठून आलास? या प्रश्नांची खरी उत्तरे आपल्या जवळ नसतात. आपण आपले नाव आणि घरचा पत्ता सांगतो. एकदा आपण निघालो ते पुढे पुढेच जात आहोत. आपले मूळस्वरूप आणि मूलस्थान विसरून गेलो आहोत. प्रत्येक जीवाचे मूलस्थान अमृतरूप परमात्मा हेच होय. सर्व जीव अमृताचे पुत्र होत, शिवाचेच अंश होत. शिव आणि जीव दोघेही सनातन आहेत. सनातन म्हणजे सर्व काळांत ज्याचे अस्तित्व असते ते. परंतु आपल्याला मात्र वाटते की, आपला जन्म अमक्या तारखेला झाला आहे. हा जन्म म्हणजे आपल्या या देहाचा एक जन्म असतो. असे कित्येक जन्म आपण घेतले आहेत, कित्येक देह आपण सोडून दिले आहेत. शरीरे बदलली असतील परंतु तुम्ही आहात तसेच आहात, सनातन आहात. जोपर्यंत जीव आपल्या मूलस्थानी जाणार नाही तोपर्यंत तो पूर्णसुखी कधीच होऊ शकणार नाही.

सत्ताधीशांना आणि लक्ष्मीपुत्रांना विचारा– 'तुम्ही पूर्ण समाधानी आहात काय?' ते म्हणतील– 'नाही'. सर्व मिळून देखील माणसे असमाधानी असतात. त्यांना आपल्या घरापेक्षा दुसऱ्यांच्या घरात अधिक सुख दिसत असते. लौकिकदृष्ट्या सर्वश्रेष्ठ स्थानावर जरी मनुष्य जाऊन बसला तरी तो पूर्ण समाधानी होऊ शकत नाही, असमाधानीच असतो. लौकिकातील श्रेष्ठ स्थान म्हणजे उपाधी असते. 'उपाधिस्तु महाव्याधिः।' असे शास्त्रात म्हटले आहे. उपाधी म्हणजे मोठा रोग होय. ज्याच्याकडे अधिक उपाधी असतात तो अधिक रोगग्रस्त आहे असे समजावे. तुम्ही आपली भौतिक प्रगती करून घेऊ नये, असा याचा अर्थ नाही. सर्वश्रेष्ठ स्थान मिळवण्याचा तुम्ही

अवश्य प्रयत्न करा. परंतु त्याबरोबरच हे लक्षात ठेवा की, हे स्थान म्हणजे आपले मूलस्थान नव्हे आणि या स्थानावर राहून आपण पूर्ण तृप्त होणार नाही. जर आपण आपले मन भगवंताला अर्पण केले तरच आपण पूर्ण तृप्त होऊ शकतो.

जप अथवा ध्यान करायला आपण जेव्हा बसलो तेव्हा कितीतरी वेळा आपल्या बंद डोळ्यासमोर प्रपंच येतो-जातो. ठीक आहे त्याला येऊ द्या. जाऊ द्या. परंतु मन हळूहळू स्थिर होत जाईल आणि संसारापासून तुम्हाला मुक्ती मिळेल. लहान मूल एखादी वस्तू मिळवण्यासाठी आकांत करते. ती वस्तू मिळाल्यारवर शांत होते. झोपताना देखील ती वस्तू हातात घट्ट धरून ठेवते. परंतु त्याला जेव्हा गाढ झोप लागते तेव्हा त्याच्या हातून वस्तू गळून पडते. आपल्या मनाची देखील अवस्था अशीच आहे. ते जागे आहे तोपर्यंत संसारासाठी त्रागा करील, परंतु एकदा शिवात विलीन झाले तर ते संसारापासून मुक्त होईल. प्रपंचाचा विसर पडला तर मन शिवार्पित झाले असे समजावे. म्हणून येथे म्हटले आहे की एकदा इंद्रिये आणि मन शिवार्पित झाले की मग संसारसागरात बुडण्याची भीती राहत नाही. ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये आणि मन अशी एकादश इंद्रिये भगवंताला अर्पण करणे हीच एकादशी होय. अशी एकादशी दिवसातून एकदा तरी घडली पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२५ जुलै १९९४

---

**आशीर्वचन अकरावे**

## करणार्पितस्थल-२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

ज्ञानसंपादनासाठी आणि व्यवहारासाठी प्रत्येक मनुष्याला पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये व मन अशी अकरा इंद्रिये दिली आहेत. मन हे अंत:करण आहे तर ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये ही बहि:करणे आहेत. परमेश्वराला इंद्रिये समर्पित करावीत असा विचार करणार्पितस्थलात व्यक्त झाला आहे. या विषयी ज. रेणुकाचार्य पुढे सांगत आहेत.

**संसारविषकांतारसमुच्छेदकुठारिका।**
**उपशांतिर्भवेत् पुंसामिन्द्रियाणां वशीकृतौ।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.४४)

संसार हे विषयरूपी विषवृक्षांनी भरलेले गहन अरण्य आहे. विषवृक्षाची फळे विषारीच असतात. विषफळे खाल्ली तर मरण निश्चित येणार. प्रपंचात जो जन्म घेतो त्याच्या जन्माचे पर्यवसन मृत्यूत होते. मरण हा शरीराचा स्वभाव होय. जन्म-मृत्यू देहाचे धर्म होत. विषयवृक्षाची फळे खाऊन खाऊन जीवाला किती वेळा मृत्यू पत्करावा लागला याची गणना करता येत नाही. वारंवार जन्म घेणे, विषयवृक्षाची विषफळे सेवन करणे आणि मृत्यूला पुन्हा पुन्हा सामारे जाणे, ही जीवात्म्याच्या जन्म-मृत्यूची गाथा आहे. जोपर्यंत संसार-अरण्य नष्ट केले जात नाही तोपर्यंत त्याची फळे जीवाला चाखावीच लागणार. संसार नष्ट करणे म्हणजे त्याचा विध्वंस करायचा की काय?

तर तसे करता येणार नाही. संसार अर्थात् हे जग शिवनिर्मित आहे. त्याचा विध्वंस करण्याचा अधिकार कोणालाही नाही. ज्याने सृष्टी निर्माण केली तोच तिचा नाश करू शकतो. जो निर्माण करू शकत नाही त्याला संहार करण्याचा अधिकार नाही. म्हणून जर कोणी मनुष्यहत्या केली तर त्याला शिक्षा भोगावी लागते. प्रपंचातील भोग्य पदार्थांचा उपभोग घेण्याचा हक्क जीवाला आहे, परंतु इहलोक सोडताना सोबत काहीही घेऊन जाण्याचा अधिकार नाही. घर, शेती, संपत्ती सारे इथेच सोडून जावे लागते. कोणी नेण्याचा प्रयत्न केला तरी तो हास्यास्पद ठरेल.

एक खेडूत मनुष्य आयुष्यात प्रथमच हॉटेलमध्ये गेला. त्याने खाद्यपदार्थांची चौकशी केली, भाव विचारले. वेटरने सांगितले– अमुक प्लेटचे इतके रुपये इत्यादी.

त्या खेडुताने दोन–चार वेगवेगळ्या प्लेट्स् मागवल्या. त्या खाल्ल्या. व चहा प्याला आणि टेबलवरून उठता उठता सर्व प्लेट्स्, चमचे, कप आपल्या जवळच्या पिशवीत घातले. पैसे द्यायला तो काउंटरजवळ गेला. इकडे वेटरच्या लक्षात आले की टेबलावरच्या प्लेट्स् इत्यादी वस्तू गायब आहेत. त्याने खेडुताजवळ येऊन विचारले, ‘‘टेबलावरच्या प्लेट्स् कुठे आहेत?’’

‘‘या बघा माझ्या पिशवीत.’’ त्याने उत्तर दिले. पिशवी दाखवली.

‘‘या वस्तू तुम्हाला नेता येणार नाहीत.’’ मालक म्हणाला.

‘‘का बरे?’’ त्याने विचारले, ‘‘तुमच्या वेटरनेच मला प्लेट्स्चे भाव सांगितले. उपमा– एक प्लेट– चार रुपये, वडा सांबार– एक प्लेट– चार रुपये. मी प्लेट्स्चे पैसे तुम्हाला दिले. म्हणून मी प्लेट्स् घेऊन चाललो, माझे काय चुकले?’’

मग मालकाने त्याला समजावले, ‘‘भल्या गृहस्था, प्लेट याचा अर्थ प्लेटमधला पदार्थ. बरेच लोक हॉटेलात येतात. प्लेटमधील पदार्थ खातात आणि प्लेट–चमचे इथेच ठेवून निघून जातात. तुझ्यासारखे हुशार लोक जर माझ्या हॉटेलात आले तर माझे दिवाळे निघायला वेळ लागायचा नाही.’’

खेडुताला ‘प्लेट’चा अर्थ समजला व तो सर्व वस्तू परत करून निघून गेला.

जीवात्मा संसारात जन्म घेतो. त्याचे घर, धन, पत्नी, मुले हॉटेलातील प्लेट्ससारखी असतात. त्यांच्याकडून मिळणारे सुखदुःख तुम्ही भोगू शकता. परंतु अंतकाळी त्यांपैकी काहीच सोबत नेता येत नाही. ‘मी घर बांधले म्हणून मरणाच्या आधी मी ते पाडून टाकतो’ असे जर कोणी म्हणेल तर त्याची मुले त्याला वेड्यात काढतील.

संसाररूपी अरण्याचे छेदन कसे करायचे? घर पाडून, बायका–मुलांना ठार करून? असा अर्थ होत नाही. जो इंद्रियांना वश करून मनाला अंतर्मुख करतो त्याच्या दृष्टीने संसार संपतो. समजा, तुम्ही डोळे घट्ट बंद केले तर समोर प्रपंच अस्तित्वात असून देखील तुम्हाला दिसणार नाही. तुम्ही कान बंद केले तर शब्द अस्तित्वात असूनही तुम्हाला ऐकू येणार नाही. अशाप्रकारे बर्हिमुख इंद्रियांना अंतर्मुख केले तर संसाररूपी अरण्य तुमच्यापुरते नाहीसे होते. त्यासाठी संसाराची मोडतोड करावी लागत नाही. इंद्रिये अंतर्मुख झाल्यावर जी मन:शांती मिळते तीच संसार–अरण्याचे छेदन करणारी कुऱ्हाड होय. संसारनिवृत्ती झाल्यावर जीवात्म्याला एक विलक्षण शांती प्राप्त होते. शांती हवी असेल तर सर्व इंद्रियांना शांत करावे लागते. इंद्रियांचा बाह्यव्यवहार चालू असेल तर शांती मिळणे शक्य नाही. एखाद्या मंदिरात, मठात, पर्वतशिखरावर, नदीकिनाऱ्यावर तुम्ही जाता तेव्हा तुम्हाला शांतीचा अनुभव येतो. तुमच्यासोबत बोलणारे तेथे कोणी नसते. तरी तुम्हाला शांतीचा अनुभव येतो. घरात, कामाच्या

धकाधकीत अशी शांती तुम्हाला दुर्लभ असते. यासाठीच योगशास्त्राने 'इंद्रियांना अंतर्मुख करा' असे सांगितले आहे.

अंत:करण आणि बहि:करण परस्परांशी संबंधित असतात. बहि:करणांचा निग्रह केला तर अंत:करण शांत होते आणि अंत:करणावर संयम ठेवला तर बहि:करणे अंतर्मुख होतात. म्हणून शम आणि दम या दोहोंचा प्रयोग करावा लागतो. शम म्हणजे अंतरिंद्रियांचा निरोध आणि दम म्हणजे बाह्येंद्रियांचा निरोध. बाह्येंद्रियांचा निग्रह करून अंतरिंद्रियांचा निग्रह केला जातो तर अंतरिंद्रियांच्या निग्रहाने बाह्येंद्रियांचा निग्रह केला जातो. या ठिकाणी बाह्येंद्रियांचा निग्रह सांगितलेला आहे. पंचज्ञानेंद्रियांच्या द्वारांनी मन बाहेर धावत असते. इंद्रियांची द्वारे बंद करून, लहान मुलाला घरात कोंडून ठेवावे तसे, मनाला आतल्या आत बांधून ठेवता येते. परंतु असे केले तरी मन गप्प बसणार नाही ते मनोराज्य रचत बसेल किंवा पूर्व घटनांचे स्मरण करत बसेल. बाह्येंद्रियांचा निरोध केल्याने एकच गोष्ट घडते की मनाचा बाह्यजगाशी संबंध येत नाही. जुन्यासंबंधांची ते उजळणी करत बसते. सर्वेंद्रियांना शिवार्पित करणे हाच एक प्रकारचा इंद्रियनिग्रह होय. त्यामुळे मनाला शांती प्राप्त होते.

**इंद्रियैरेव जायन्ते पापानि सुकृतानि च।**
**तेषां समर्पणादीशे कुत: कर्मनिबन्धनम्।।१७.४५।।**

इंद्रियांचा निग्रह का करायचा, याचे कारण या श्लोकात सांगितले आहे. मनुष्य आपल्या आयुष्यात पाप-पुण्याची कमाई करतो. त्याला आपली एवढीच कमाई इहलोक सोडताना घेऊन जाता येते. इंद्रियांच्या द्वारे पुण्य-पापाची कमाई केली जाते. पुण्यकर्म कोणते आणि पापकर्म कोणते याचा निर्णय मनुष्याने करायचा नसतो. तो शास्त्राने केव्हाच करून ठेवला आहे. शास्त्रविहित कर्मे ही पुण्यकर्मे होत तर शास्त्रनिषिद्ध कर्मे पापकर्मे होत. वेद आणि आगम यांना 'शास्त्र' अशी संज्ञा आहे. परमेश्वराच्या नि:श्वासातून वेदाची निर्मिती झाली तर त्यांच्या वाणीतून आगमांची निर्मिती झाली. प्राचीन काळी मौखिक परंपरेने म्हणजे कंठस्थ करून शास्त्राचे जतन केले गेले. पुढे लिपीचा शोध लागल्यावर शास्त्रे लिहून ठेवली गेली. द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी अशी आज रूढ असलेली आडनावे वेदपाठ करणाऱ्या परंपरेची द्योतक आहेत. जेव्हा लेखनकला अस्तित्वात नव्हती तेव्हा पाठ करण्यावाचून गत्यंतरच नव्हते. परंतु अलीकडे बुद्धीचीही धारणशक्ती लोपत चाललेली दिसून येते. माणूस अधिकाधिक यंत्रावर अवलंबून राहत आहे. एखादा शब्द उच्चारता क्षणीच तो तात्काळ रेकॉर्ड करण्याचा हा जमाना आहे. त्यामुळे मानवी बुद्धीला स्मरणशक्तीचेच विस्मरण होत चालले आहे. प्रवचनात ऐकलेले शब्द लगेच विसरून जाण्याची सवय सर्वांना लागली आहे.

शास्त्र ही शिवनिर्मित आहेत. वेदागम म्हणजे परमेश्वराचा आदेश. त्यामध्ये जे कर्म करावे असे सांगितले ते विहित कर्म आणि जे करू नये असे सांगितले ते निषिद्ध कर्म होय. विहित कर्म केल्याने पुण्य होते आणि निषिद्ध कर्म केल्याने पाप. सत्य बोला, धर्माचरण करा, स्वाध्याय करा; असे शास्त्रादेश आहेत. अलीकडे स्वाध्यायाची परंपरा लोप पावत चालली आहे. आपण पूजा करतो, ध्यानधारणा करतो, स्वाध्याय मात्र करीत नाही. धर्मग्रंथाचे रोज थोडे अध्ययन करणे म्हणजे स्वाध्यायच होय. काही लोक काही ग्रंथांची पारायणे करतात. पारायण म्हणजे स्वाध्यायच होय. पारायण म्हणजे केवळ वाचन नव्हे तर अर्थ समजून वाचणे हे खरे पारायण होय. पारायण करताना बऱ्याचदा ते कधी पूर्ण होते अन् कधी नाही अशी माणसाला घाई झालेली असते. स्वाध्याय करा, मंत्रजप करा, इष्टदेवतेची पूजा करा, इत्यादी शास्त्रांचे आदेश आहेत. विहित कर्माचरणाने पुण्य तर निषिद्ध

कर्माचरणारने पाप मिळते. पुण्य-पाप इंद्रियांकडून होतात आणि पुण्य-पापामुळेच वारंवार जन्म घ्यावा लागतो. इंद्रियांकडून जोपर्यंत पुण्य-पाप घडत राहील तोपर्यंत जीवाला शरीर मिळतच राहणार. ज्याचे जसे पुण्य-पाप असेल त्याप्रमाणे त्याला शरीर मिळते. इंद्रियांना शिवार्पण केले तर त्यांच्याकडून पुण्य-पाप घडत नाही. पुण्य-पाप नसल्याने नवा जन्म मिळत नाही. जन्म नाही म्हणून मृत्यूही नाही. जन्म-मृत्यूपासून सुटका हीच मुक्ती.

**प्रकाशमाने चिद्वह्नौ बहिरन्तर्जगन्मये।**
**समर्प्य विषयान् सर्वान् मुक्तवज्जायते जनः।।१७.४६।।**

या ठिकाणी मुक्तीचा आणखी एक मार्ग सांगितला आहे. शिव हा चिदग्नी असून तो जगाला अंतर्बाह्य व्यापून आहे. या चिदग्नीत जे अर्पण केले जाते ते सारे नाश पावते. मग ते विषय असोत की पुण्य-पाप. जो अर्पण करतो तो देखील जन्म-मरणापासून मुक्त होतो. बाहेर जसे जग असते तसेच आत देखील एक जग असते. जे बाहेर असते तेच आत असते. तुमच्याजवळ एक लक्ष रुपये असतात. ते तुम्ही बँकेत अथवा घरात ठेवलेले असतात. परंतु आता तुम्ही प्रवचनाला येऊन बसलेले असता तरी 'मी लक्षाधीश आहे' ही भावना तुमच्या मनात जागी असते. रुपये तुमच्या सोबत नाहीत, ते दूर आहेत. तरीही माझ्याकडे एवढे धन आहे ही भावना तुमच्या जवळ आहे. अशाप्रकारे घर, शेतीवाडी, भाऊ-बहीणी, पत्नी-पुत्र हे सगळे बाहेर असते, तसे आपल्या आत देखील असते. बाह्य आणि अंतर विषयांना अंतरंगातील चिद्‌अग्नीत समर्पण केल्यावर जीवात्मा मुक्त होतो. ही एक प्रकारची यज्ञक्रिया सांगितली आहे. यज्ञात हवन करताना 'इदं अग्नये न मम।' हे अग्नीचे आहे माझे नाही- असे म्हटले जाते. यज्ञात जे अर्पण केले जाते त्यावरील ममत्वाचा त्याग केला जातो. असाच एक अंतरंग-यज्ञ या श्लोकात सांगितला आहे. हा यज्ञ करण्याचा सर्वांना अधिकार आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या विषयांचे आपल्या हृदयातील चैतन्यरूपी अग्नीत हवन केले पाहिजे.

**चित्तद्रव्यं समादाय जगज्जातं महाहविः।**
**चिद्वह्नौ जुह्वतामन्तः कुतः संसारविप्लवः।।१७.४७।।**

सर्व काही शिवमय आहे. शिववाचून भिन्न काहीच नाही. मीदेखील शिवस्वरूप आहे. असे शिवाद्वैत ज्ञान हाच अंतरंगातील अग्नी होय. या ज्ञानाग्नीत 'हे माझे नाही' असे म्हणून विषय अर्पण करावे लागतात. शरीर मी नाही आणि हे माझे नाही. इंद्रिये म्हणजे मी नव्हे आणि इंद्रिये माझी नव्हेत. मन म्हणजे मी नव्हे आणि मन माझे नाही. 'मी' आणि 'माझे' असे शब्दप्रयोग आपण नेहमी करत असतो. मला दिसत नाही असे आपण कधी म्हणतो, तर कधी माझ्या डोळ्यांना दिसत नाही असे उद्‌गार आपण काढतो. काही असले तरी आत्मा आणि अनात्मा यांच्यात फरक आहे. ज्यात नित्य परिवर्तन होत असते, ते अनात्मा होय. प्रत्येक जीव मात्र सत्-चित्-आनंदरूप असा आत्मा असतो. जो हृदयस्थ चिदग्नीत विषयसुखांचे हविर्द्रव्य अर्पण करतो त्याला संसाराचे बंधन राहत नाही. योगी आणि सामान्य माणूस दोघेही याच जगात राहतात. परंतु योगी निरभिमानी असल्यामुळे त्याला संसाराची बाधा होत नाही आणि सामान्य माणूस अभिमानी असल्यामुळे सुखदुःखे भोगत असतो.

**आत्मज्योतिषि चिद्रूपे प्राणवायुनिबोधिते।**
**जुह्वन् समस्तविषयान् तन्मयो भवति ध्रुवम।।१७.४८।।**

अंतरंगातल्या चिदग्नीला प्रज्वलित करण्याची प्रक्रिया येथे सांगितली आहे. निखारा प्रज्वलित करायचा असेल अथवा अग्नी अधिक पेटवायचा असेल तर त्यावर फुंकर घातली जाते. त्याप्रमाणे प्राणायाम केल्याने

प्राणवायूमुळे चिदग्नी प्रज्वलित होतो. प्राणायामाने चिदग्नी प्रज्वलित होतो याचा अर्थ काय? प्राणायामामुळे मन अंतर्मुख होऊन ज्ञानाग्नीचा साक्षात्कार होतो. आत्मज्योतीत सर्व इंद्रियजन्य सुखांचे जो हवन करतो तो शरीरधारी असला तरी शिवस्वरूपच होय. या स्थलाचा समारोप करताना शेवटी सांगतात-

**इंद्रियाणि समस्तानि शरीरं भोगसाधनम्।**
**शिवपूजांगभावेन भावयन् मुक्तिमाप्नुयात्।।१७.४९।।**

शरीराला 'भोगायतन' असे नाव आहे. भोगायतन म्हणजे भोगाचे साधन. शरीर नसेल तर सुख-दु:ख भोगता येत नाही. शरीर सोडल्यानंतर अतृप्त आत्मे भूत बनून कुणाच्या तरी अंगात शिरतात आणि हवे ते मिळवण्याचा प्रयत्न करतात. शरीराशिवाय उपभोग घेता येत नाही. भोगसाधन अशा शरीराला पूजासाधन बनवायचे आहे. सामान्य माणूस शरीराने केवळ सुखदु:खाचा भोग घेत असतो तर साधक आपल्या शरीराचा सुखदु:खाच्या उपभोगाबरोबरच योगासाठीही उपयोग करीत असतो. तो डोळ्यांनी भगवंताचे रूप पाहतो, कानांनी त्याचे गुण श्रवण करतो, वाणीने त्याची स्तुती करतो. भगवंताला अर्पण केलेला नैवेद्य प्रसाद म्हणून ग्रहण करतो. शास्त्राने म्हटले आहे की, स्त्री आणि संपत्ती ही केवळ उपभोगासाठी नसून भक्तीचे साधन देखील आहे. गृहस्थजीवनात शारीरिक उपभोगाबरोबरच पति-पत्नी जोडीने धर्माचरण करतात. तीर्थयात्रा करतात, सत्संग करतात, संसार करता करता परमार्थदेखील करतात. कित्येक संत हे गृहस्थाश्रमी होते आणि आहेत. शरीराद्वारे भोग भोगता येतात तसेच योग देखील साधता येतो, असे अनेकांनी आपल्या आचरणातून दाखवून दिले आहे.

संसार करता करता थोडी भक्तीदेखील करावी. भोग भोगता थोडा योग देखील साधण्याचा प्रयास करावा. भक्त हे भगवंतापेक्षाही मोठे असतात असे भगवद्गीतेत म्हटले आहे. गंमतीने असे म्हटले जाते की पृथ्वी मोठी आहे. पृथ्वी म्हणते- मी कसली मोठी? मी तर शेषाच्या डोक्यावर उभी आहे, शेष माझ्यापेक्षा मोठा. शेष म्हणतो- मी कसला मोठा? मी तर पार्वतीच्या बोटातल्या अंगठीवर बसलेला आहे. माझ्यापेक्षा पार्वती मोठी. पार्वती म्हणते- मी कसली मोठी? मी तर शंकराच्या एका मांडीवर बसलेली आहे. माझ्यापेक्षा शंकर मोठा. शंकर म्हणतात- मी कसला मोठा? मला तर माझा भक्त हृदयातल्या एका कोपऱ्यात बसवतो, माझ्यापेक्षा भक्त मोठा.'

सांगण्याचे तात्पर्य असे की, ज्याच्या हृदयात भगवंताची मूर्ती स्थापित होते त्याचा सारा व्यवहार भगवंताला अर्पण होतो. समर्पण केल्याशिवाय अभिमान नष्ट होत नाही. आपल्या शरीराला आणि मनाला भगवंताच्या पूजनात, ध्यानात, चिंतनात लावले पाहिजे. त्याला सारी इंद्रिये, अर्पण केल्यानंतर ती प्रसादरूप होतात. मग इंद्रियांकडून जो व्यवहार होतो त्यामुळे प्रसन्नतेचाच लाभ होतो. अर्पणसद्भाव हा श्रेष्ठभाव होय. आपण सर्वांनी आपली इंद्रिये शिवार्पित करून प्रसन्नतेचा लाभ घ्यावा, असा आशीर्वाद देऊन आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२६ जुलै १९९४

## भावार्पितस्थल

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

आपण याआधी कायार्पण आणि करणार्पण या स्थलांविषयी विचार केलेला आहे. साधकांच्या दृष्टीने समर्पण फार महत्त्वाचे असते. जोवर पूर्ण समर्पण होत नाही तोवर भगवंताची कृपा लाभत नाही. लौकिकातही समर्पणाचे महत्त्व आहे. जो समाजासाठी, देशासाठी, धर्मासाठी समर्पण करतो त्याच्याकडे समाज आदराने पाहतो. समर्पणात त्याग असतो. त्याग या एका गुणामुळेच पशू, पाषाण, नदी भगवंतासारखे पूज्य ठरतात. हिमालयात उगम पावलेली गंगा सागराला मिळेपर्यंत कित्येकांचे कल्याण करीत असते. कोणी तिच्यात स्नान करून पवित्र होतात, कोणी आपली तहान भागवतात, कोणी तिच्या पाण्यावर आपली शेती जोपासतात. सर्वांना काहीतरी देत ती आपले सर्वस्व सागरात समर्पित करते. जणू मानवांना ती सांगत असते की, जन्म झाल्यापासून मृत्यू होईपर्यंत आपले जीवन कोणाच्या तरी उपयोगी पडावे असे वागा. पंचमहाभूतात्मक सृष्टी प्रत्येकाला सतत काहीना काही देत असते. तिच्या ह्या समर्पण वृत्तीमुळेच आपण पंचमहाभूतांची पूजा बांधत असतो.

परंतु हा मूक उपदेश मानवांना कळला नाही. म्हणून त्यांच्यासाठी वेद आणि आगम यांची निर्मिती झाली आहे. प्रत्येक धर्माच्या ग्रंथात समर्पणभाव सांगितलेला आहे. भक्तिशास्त्रात श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन अशी नवविधा भक्ती सांगितली आहे. यातील आत्मनिवेदन म्हणजे समर्पण. जो भगवंताला समर्पित होतो तो भगवद्रूपच होतो. आपण जर स्वत:ला क्रोधाला समर्पित केले तर आपण क्रोधी होऊ, कामाला समर्पित केले तर कामी होऊ, लोभाला समर्पित केले तर लोभी होऊ. समर्पण तर आपण करतच असतो, परंतु भगवंताला नव्हे तर विकारांना. जन्मजन्मांतरातून आपण हेच करीत आलो आहोत. परंतु ज्याला भगवद्रूप व्हायचे आहे अशा साधकाने मात्र स्वत:ला भगवंताला समर्पित केले पाहिजे. आतापर्यंत कायार्पितस्थल आणि करणार्पितस्थल यांचे विवेचन झाले. यापुढील स्थल आहे. भावार्पितस्थल. शिवाला भाव कसा अर्पण करावा ते येथे सांगितले आहे.

**शिवे निश्चलभावेन भावानां यत्समर्पणम्।**
**भावार्पितमिदं प्रोक्तं शिवसद्भाववेदिभि:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.५०)

जो निश्चलपणे आपले सर्व भाव शिवार्पित करतो त्याला भावार्पितस्थल असे म्हणतात. सद्‌भावना ठेवणाऱ्या योग्याने भाव अर्पण करण्याच्या क्रियेला हे नाव दिले आहे. ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये यांच्याकडून घडणाऱ्या क्रिया जर भावपूर्ण नसतील तर त्यांना मिळणारे ज्ञान आणि त्यांचे कर्म चांगले राहणार नाही. ज्ञानप्राप्तीसाठी आणि शुद्ध कर्माचरणासाठी भावनेची गरज असते. तुम्ही सगळे सत्संगासाठी इथे आलेले आहात. कुणी प्रेमाने आले तर कुणी जबरदस्तीने. येथे बसून पाहणे आणि ऐकणे एवढेच तुमचे काम आहे. परंतु जर या दोन क्रियांत भावना नसेल तर तुम्हाला डोळे उघडे असून काही दिसणार नाही आणि कानाने ऐकून देखील ऐकू येणार नाही. तुमचे शरीर इथे आहे, इंद्रिये इथे आहेत परंतु भाव नसेल तर इथे तुम्हाला काही लाभ होणार नाही. म्हणून निश्चलतेने

भावार्पण करावे लागते.

भावनेला एखादा आधार लागतो. द्राक्षवेलीला ज्याप्रमाणे शेतात आधारासाठी मांडव घालतात त्याप्रमाणे भावनेला एखादा आधार लागतो. मनुष्य कोणत्या ना कोणत्या विषयाचे सतत चिंतन करत असतो, पण ते विषय सांसारिक असतात. जागेपणी तो सांसारिक विषयांचे चिंतन करतो तसेच स्वप्नातदेखील तेच करतो. नोटा मोजताना मनुष्य किती तन्मय होतो! तुम्ही बँकेत पैसे आणायला गेलात तर कॅशिअर तुमच्यासमोर नोटा मोजून देतो. तो मोजत असताना तुम्हीही लक्ष ठेवून असता- बरोबर मोजतो की नाही? त्याने नीट मोजले आहे हे माहीत असताना हाती घेतल्यावर तुम्ही स्वत: नोटा मोजून पाहता. कुणाला पैसे देताना त्याच्यासमोर नोटा मोजून देता. घेणारा पुन्हा त्या नोटा मोजून पाहतो. किती तन्मयता आहे ही! तुमचे नोटांवर अधिक प्रेम असते हेच याचे कारण आहे. सांसारिक वस्तूंसंबंधी आपली भावना अशीच असते. परंतु सांसारिक वस्तू फार काळ आपल्याला सुख देऊ शकत नाहीत म्हणून त्यांना आपली भावना अर्पण करण्यापेक्षा सुखरूप अशा परमात्म्याला निश्चलतेने भावार्पण केले पाहिजे.

**चित्तस्थसकलार्थानां मननं यत्तु मानसे।**
**तदर्पणं शिवे साक्षान्मानसो भाव उच्यते।।१७.५१।।**

मनात पदार्थांचे अनुभवरूपाने चाललेले चिंतन म्हणजे भाव होय. सांसारिक पदार्थांचे मन चिंतन करीत असते. हेच चिंतन संसाराकडून भगवान शिवाकडे वळवायचे असते. मनाचा संसाराशी असलेला संबंध किती जुना आहे याची आपल्याला कल्पना नाही. किती वर्षे होऊन गेलीत, किती युगे उलटून गेलीत, किती जन्म घेऊन झाले कुणास ठाऊक! सृष्टीच्या आरंभापासून जीवात्मा जन्म घेत आला असून त्याच्या मनाचा संसाराशी संबंध जुळलेला आहे. संसाराचा त्याग करून जेव्हा अक्कमहादेवी बाहेर पडली तेव्हा तिच्या मार्गात काम क्रोधादी विकार उभे राहिले. तेव्हा ती म्हणाली- हे काम, माझ्या मार्गातून बाजूला हो. हे क्रोध, माझा रस्ता सोड, हे लोभ, मला जाऊ दे. मी परमात्म्याकडे एक पत्र घेऊन चालले आहे म्हणून माझी वाट सोड. मी जाऊन परत येईन तेव्हा तुमच्याशी व्यवहार करीन. परंतु ती अशा ठिकाणी निघाली होती की जेथून कधीच परत येणार नव्हती.

जेव्हा असा प्रसंग तुमच्यावर येईल तेव्हा तुम्ही सावध राहिले पाहिजे. सत्कर्म करायचे असेल तर त्वरित करावे. शुभस्य शीघ्रम्. परंतु दुष्कर्म दाराशी आले असेल तर त्याला पुन्हा 'उद्या ये' म्हणावे. दारात बोर्डच टांगून ठेवावा- उद्या ये. ही 'उद्या' कधीच उजाडणार नाही. काम, क्रोध, लोभ इत्यादींना आपण एक नव्हे तर अनेक जन्मांत आपली भावना समर्पित केली आहे. आता ह्या जन्मात उर्वरित आयुष्यात भावना शिवार्पण करावी. विकारांना अर्पित केलेले उष्टे शरीर, उष्टी इंद्रिये आणि उष्टी भावना भगवंत स्वीकारील का? असा प्रश्न पडण्याचे कारण नाही. श्रीरामचंद्रांनी शबरीची उष्टी बोरे खाल्ली ही कथा पुरेशी बोलकी आहे. तुम्ही जे अर्पण कराल त्याला भगवंत कधीही नकार देत नसतो. तुमची भावना पाहूनच तो तृप्त होतो.

**भाव एव हि जन्तूनां कारणं बन्धमोक्षयो:।**
**भावशुद्धौ भवेन्मुक्तिर्विपरीते तु संसृति:।।१७.५२।।**

भगवंताला भावना का अर्पण करावी? तर भावना अर्पण केल्यावर मुक्ती प्राप्त होते. भावनाच मनुष्याला संसारात फसवते आणि भावनाच संसारातून मुक्त करते. योगाभ्यास करण्याच्या आणि सत्संग करण्याच्या इच्छेने

तुम्ही इथे आला आहात. म्हणून तुमची भावना शुद्ध आहे. परंतु भावना जेव्हा संसारात रमेल तेव्हा संसार मलिन असल्यामुळे तीदेखील अशुद्ध होईल. पवित्र आणि निर्मल अशा शिवाला भावना अर्पण केली तर ती अत्यंत शुद्ध होते. भावनेची शुद्धी कशी करावी हे ज. रेणुकाचार्य पुढे सांगतात.

**भावस्य शुद्धिराख्याता शिवोऽहमिति योजना।**
**विपरीतसमायोगे कुतो दुःखनिवर्तनम्।।१७.५३।।**

भावनेचा आधार शुद्ध असेल तर ती शुद्ध असते आणि तिचा आधार अशुद्ध असेल तर ती अशुद्ध होते. पाण्याला स्वतःचा रंग नसतो. लाल मातीवरून वाहणारे पाणी लाल दिसते तर काळ्या मातीवरून वाहणारे पाणी काळे दिसते. अशीच स्थिती भावनेची असते. सांसारिक वस्तूंच्या आणि काम-क्रोधादी दुर्गुणांच्या संबंधामुळे भावना मलिन होते. परंतु जेव्हा ती शिवोऽहम्- मी शिव आहे- असे चिंतन करू लागते तेव्हा ती शिव होते. 'शिवोऽहम्' आणि 'अहं ब्रह्मास्मि' असे चिंतन जी भावना करते ती शुद्ध भावना होय. भावना शुद्ध होण्यासाठी मन शुद्ध झाले पाहिजे. मन तेव्हाच शुद्ध होईल जेव्हा ते शुद्ध वस्तूला अर्पण केले जाईल. मी शिवस्वरूप आहे अशी भावना जेव्हा मनात निर्माण होते तेव्हा मन महान होते. संकुचित भावनेपासून ते मुक्त होते. मंदिरात देवदर्शनासाठी का बरे जायचे असते? हे सारे आपले मन विशाल करण्यासाठी करायचे असते. शिवोऽहम् भावनेमुळे आपले मन अत्यंत विशाल होते. मोठे घर बांधून कुणीही मोठे होत नसते. उच्चपदावर बसून कुणीही मोठे होत नाही. ज्याचे मन मोठे तो मोठा.

तन, मन आणि धन अशा तीन वस्तू आपल्या जवळ असतात. तन मध्यम ठेवा, मन महान करा आणि धन कमी करा. तरच तुम्ही साधक होऊ शकाल. तन मध्यम ठेवणे म्हणजे काय? ते अत्यंत कृश नसावे. अत्यंत लठ्ठ नसावे. याचा अर्थच ते निरोगी असावे. आसन, प्राणायाम इत्यादी साधना शरीर मध्यम राखायला मदत करतात. धन कमी करावे, असे म्हटले आहे. आपण मात्र अधिकाधिक धन मिळवण्याचा प्रयत्न करतो आणि त्यासाठी वाटेल त्या मार्गाचा अवलंब करतो. धन अधिक असेल तर मन सर्वकाळ त्यातच गुंतून जाते. धन कमी करणे म्हणजे आपल्या अपेक्षा कमी करणे. दुसऱ्याच्या घरातील वस्तू पाहून त्या आपल्या घरात हव्या अशी अपेक्षा करू नये. त्यांच्या घरी फ्रीज आहे, मग आपल्याही घरात हवा. कशासाठी? ज्याला रोज ताजी भाजी आणायची असते त्याने फ्रीज कशासाठी घ्यावा? ज्यांना ताजे अन्न शिळे करून पुन्हा खायचे असते त्यांना फ्रीज पाहिजे असतो. बऱ्याच अनावश्यक वस्तू आपण केवळ प्रतिष्ठेसाठी विकत घेत असतो. आपल्या अपेक्षावर नियंत्रण ठेवण े म्हणजे धन कमी करणे होय. याचाच अर्थ असा की, आवश्यक तेवढा धनसंग्रह करावा.

मन मात्र मोठे करावे. मन महान होईल तरच तुम्ही मोठे व्हाल. संकुचित मनाचा माणूस स्वार्थी असतो. विशाल मनाचा माणूस मात्र निःस्वार्थी असतो. महात्मा गांधीचा जगाने 'महात्मा' म्हणून गौरव केला. काय होते गांधीजीकडे? सर्वांग झाकतील एवढी वस्त्रेदेखील नव्हती. परंतु आपले देशबांधव सुखी व्हावेत अशी तळमळ त्यांच्या मनाला लागून राहिली होती. त्यांनी जन्मभर स्वतःची नव्हे, तर देशबांधवांची चिंता वाहिली. त्यांच्याच कल्याणाचे चिंतन केले. म्हणून जगाने त्यांना 'महात्मा' म्हटले. ज्याचे मन विशाल असते तोच महात्मा असतो. प्राचीन ऋषीमुनींनी देखील विश्वकल्याणाची कामना व्यक्त केली आहे-

**सर्वेऽपिः सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु न कश्चिद् दुःखभाग् भवेत्।।**

म्हणून साधकांसाठी म्हटले आहे की धन कमी करा आणि मन विशाल करा. भगवंताला मन समर्पित केले की ते भगवंताएवढे मोठे आणि अर्पण करणारा भगवद्रूप होतो.

**भोक्ता भोग्यं भोजयिता सर्वमेतच्चराचरम्।**
**भावयन् शिवरूपेण शिवो भवति वस्तुत:।।१७.५४।।**

भोक्ता, भोज्यपदार्थ आणि भोजयिता अशा तीन वस्तू या प्रपंचात आहेत. जो आपल्या कर्माची फळे भोगतो तो 'भोक्ता' हाय. भोक्ता म्हणजे जीवात्मा. तो आपल्या पुण्य-पापांचे फळ भोगत असतो. शब्दस्पर्शादी सुख-दु:ख भोगण्याची सामग्री म्हणजे 'भोग्य पदार्थ' होत. हा अवघा प्रपंच म्हणजे भोज्य आहे. भोक्ता व भोज्याच्या मागे प्रेरणा देणारा ईश्वर आहे तो 'भोजयिता' होय. लहान मुलाला घास भरवावेत त्याप्रमाणे तो जीवात्म्याला त्याच्या पुण्य-पापांची फळे भोगवत असतो. तुम्ही म्हणाल- ईश्वर कोठे आमच्या घरी येऊन आम्हाला खाऊ घालतो? आम्ही तर आमच्या हातानेच खातो. परंतु हात कोणाचा आहे? तुमचा? किती रुपये देऊन तुम्ही तो विकत घेतला आहे? विचार केला तर लक्षात येईल की आईवडिलांच्या माध्यमातून आपल्याला देह लाभला असला तरी त्यामागे परमेश्वरी कृपा आहे. म्हणून जरी आपण आपल्या हातांनी खात असलो तरी भगवान शिव आपल्याला भरवीत आहेत असे समजावे. चालताना, बोलताना, पाहताना अशीच भावना ठेवली पाहिजे. हीच पवित्र भावना. म्हणून गीतेत भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला सांगितले की, मी कर्म करतो ही भावना सोडून तू कुठलीही भावना कर, तुला काही बाधा होणार नाही. तू केवळ निमित्तमात्र हो, सारे काही मीच करीन.

अशी भावना जेव्हा मनात दृढ होते तेव्हा सारे विश्व शिवमय दिसू लागते. भोक्ता शिव आहे, भोज्य शिव आहे आणि भोजयितादेखील शिवच आहे अशा भावनेने तुम्ही संसारात राहाल तर तुमच्या अवतीभोवती शिवावाचून दुसरे काही असणार नाही. तुम्हीदेखील शिवरूप व्हाल. उदाहरण अगदी चपखल नसले तरी आशय स्पष्ट करणारे आहे. दुधात पाणी टाकले, पाणी दुधाला समर्पित झाले तर ते दुधाचे रूप धारण करते. ते मुळात पाणी असले तरी आता त्याला कोणीही पाणी म्हणत नाही. दुधाचे सगळे गुण त्याच्या ठिकाणी उतरलेले असतात. त्याप्रमाणे जीवात्मा जेव्हा आपले शरीर, इंद्रिये आणि भाव शिवाला अर्पित करतो तेव्हा तो स्वत: शिवरूपच होतो. दूध आणि पाणी यांच्यात मूलत: भेद आहे तसा जीव आणि शिव यांच्यामध्ये नसतो. जीव हा शिवाचाच अंश आहे. सिंधूचा अंश बिंदू असतो त्याप्रमाणे. बिंदू सिंधूत समरस झाला की सिंधुरूप होतो तसे जीव-शिवाचे ऐक्य होते.

**मिथ्येति भावयन् विश्वं विश्वातीतं शिवं स्मरन्।**
**सत्तानन्दचिदाकारं कथं बद्धुमिहार्हति।।१७.५५।।**

भगवान शिव जसे विश्वात आहेत तसे विश्वातीत देखील आहेत. उजव्या हाताची मूठ करून अंगठा वर करून, नमस्कार करण्याची एक पद्धत आहे. मूठ हे पंचमहाभूतांचे प्रतीक आहे. कनिष्ठिका म्हणजे पृथ्वी, अनामिका म्हणजे आप, मध्यमा म्हणजे तेज, तर्जनी म्हणजे वायू, मुठीतला पोकळ भाग म्हणजे आकाश आणि वरचे अंगुष्ठ म्हणजे भगवान शिव होय. विश्वमय आणि विश्वातीत भगवान शिवाला अशाप्रकारे नमस्कार केला जातो. नामरूपात्मक विश्व मिथ्या आहे अशी भावना करून विश्वातीत असलेल्या सच्चिदानंदरूप शिवाचे जो स्मरण करतो त्याला कोणते पाश बांधून ठेवू शकतील? प्रपंच मिथ्या आहे याचा अर्थ तो अस्तित्वात नाही असा नाही. ज्यांनी प्रपंचाला मिथ्या मानले ते इहलोक सोडून निघून गेले; परंतु हे जग आहे तसेच राहिले. विश्व

शिवनिर्मित असल्याने ते मिथ्या कसे असू शकते? प्रपंच मिथ्या नसून प्रपंचाबद्दलचा अभिमान आणि ममत्व हे मिथ्या होय, असा येथे अर्थ आहे. ममत्व म्हणजेच तर संसार होय. प्रपंच कुणाला दुःख देत नसतो. प्रपंचावरील ममत्व हे दुःखदायक ठरते. विश्वावरील ममत्वाचा त्याग करणे याचा अर्थ प्रपंच मिथ्या मानणे होय. अशा भावनेने शिवचिंतन केले तर प्रपंच आपल्याला बांधून ठेवू शकत नाही.

**सर्वं कर्मार्चनं शम्भोर्वचनं तस्य कीर्तनम्।**
**इति भावयतो नित्यं कथं स्यात् कर्मबंधनम्।।१७.५६।।**

प्रपंचाला मिथ्या मानून काही न करता स्वस्थ बसावे असे नाही. तुम्ही सारे काही करा, नोकरी करा, शेती करा. तुमचा व्यवसाय तुम्ही निष्ठेने करा. सर्व करताना आपण भगवान शिवाची पूजा करीत आहोत अशी भावना ठेवावी. उद्योग-व्यवसाय करणे ही भगवंताची पूजा आहे. शेतात काम करणे ही भगवंताची पूजा आहे. शाळा-कॉलेजात मुलांना शिकवणे ही देखील पूजाच आहे. स्वयंपाकघरात स्वयंपाक करणे ही देखील भगवंताची पूजाच आहे. श्रद्धापूर्वक कर्म केले तर ती भगवंताची पूजाच असते. म्हणून 'मानसस्तोत्रा'त म्हटले आहे- 'यद्यत् कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम्।'

मी जे काही करतो ते परमेश्वरा, तुझीच आराधना आहे. मी इथून तिथवर चालतो म्हणजे तुलाच प्रदक्षिणा घालत असतो. प्रदक्षिणा हा एक नमस्कार आहे. भगवंताला केंद्र मानून त्याच्याभोवती आपले शरीर आणि आपली मनोवृत्ती भ्रमत ठेवणे ही खरी प्रदक्षिणा आहे. विश्वात शिवरूप पाहणाऱ्या शिवयोग्याचे सहज चालणे हीच प्रदक्षिणा असते. परंतु तुम्ही जेव्हा घरापासून दुकानापर्यंत जाता तेव्हा 'मी प्रदक्षिणा घालत आहे' असे तुम्हाला वाटत असते काय? असे वाटत नाही. कारण तुम्ही भगवंताला फक्त मंदिरातच पाहत असता, त्याला विश्वात पाहत नसता. ज्याची भावना शिवमय झालेली असते तो भगवान शिवाला सर्वत्र पाहत असतो. म्हणून त्याचे जाणे-येणे प्रदक्षिणा होऊन जाते. त्याचे बोलणे हे स्तोत्र होते. अशा शिवमय भावनेने कर्म करणाऱ्या शिवयोग्याला कर्मे बंधनकारक होत नाहीत. या स्थलांचा समारोप करताना शेवटी सांगतात-

**सर्वेन्द्रियगतं सौख्यं दुःखं वा कर्मसंभवम्।**
**शिवार्थं भावयन् योगी जीवन्मुक्तो भविष्यति।।१७.५७।।**

संसारात आल्यावर मनुष्याला सुखदुःख भोगावे लागते. सुखदुःख या भावना आहेत. अनुकूल भावना सुखदायक असते तर प्रतिकूल भावना दुःखदायक. भावना शिवार्पित केली तर सुखदुःख प्रसादरूप बनतात. सुख हा शिवाचा प्रसाद तसाच दुःख देखील शिवाचा प्रसाद असतो. जो भावना शिवार्पित करतो त्याचे सुख-दुःख शिवार्पित होते आणि तो जीवन्मुक्त होतो. म्हणून काया शिवार्पित करावी, इंद्रिये शिवार्पित करावी आणि भावनादेखील शिवार्पित करावी. व्यावहारिक कर्म असो की योगसाधना असो, ती भावपूर्ण रीतीने केली पाहिजे. आपली सर्व कर्मे भावनापूर्ण असावीत असे या भावार्पित स्थलाचे तात्पर्य आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

शिवानुभव मंगल भवन, सोलापूर
२७ जुलै १९९४

# शिष्यस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

माणसाचे अनेकांशी संबंध असतात. पिता-पुत्र, पति-पत्नी, भाऊ-भाऊ इत्यादी. हे सर्व संबंध मनुष्याला बांधून ठेवणारे आहेत, परंतु गुरु-शिष्य हा मात्र असा संबंध आहे की जो मनुष्याला बंधनमुक्त करतो. म्हणून मनुष्याने आयुष्यात केव्हातरी सद्गुरूचा शिष्य झाले पाहिजे. आपल्या संस्कृतीत भगवंताची पूजा केली जाते तशीच श्रीगुरूची देखील केली जाते. जो भगवंतावर प्रेम करतो तो 'भक्त' होय, तर जो गुरूवर प्रेम करतो तो 'शिष्य' होय. ईश्वर सांसारिक भोग प्रदान करतो तर गुरू सर्व भोगांपासून मुक्त करतो. म्हणून ईश्वरापेक्षाही अधिक मोठेपण गुरूला दिले जाते. तुमच्याजवळ सारे काही आहे, परंतु श्रीगुरूच्या पदकमलात जर तुमचे मन रत होत नसेल तर सारे काही व्यर्थ आहे असे शंकराचार्यांनी म्हटले आहे.

**शरीरं सुरूपं तथा वा कलत्रम् धनं मेरुतुल्यं यशश्चारुचित्रम्।**
**गुरोरंध्रि पद्मे मनश्वेन्न लग्नम् तत: किं तत: किं तत: किं तत: किम्।।**

तुम्हाला देखणे शरीर लाभले असेल, सुस्वरूप पत्नी लाभली असेल, मेरूपर्वताएवढी संपत्ती तुमच्याजवळ असेल, दाहीदिशांत तुमची कीर्ती पसरलेली असेल, तरी देखील श्रीगुरूच्या पादकमलात तुमचे मन नसेल तर सारे व्यर्थ आहे. म्हणून मनुष्याने गुरुभक्ती अवश्य केली पाहिजे. यासाठीच लिंग-षट्स्थलांतर्गत प्रसादिस्थलात शिष्यस्थल हे उपस्थल सांगितले आहे. शिष्य कोणाला म्हणावे, ते येथे सांगतात:-

**शासनीयो भवेद्यस्तु परकायेन सर्वदा।**
**तत्प्रसादात्तु मोक्षार्थी स शिष्य इति कीर्तित:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.५८)

गुरूच्या आधीन राहून जो गुर्वाज्ञेचे पालन करतो आणि गुरूच्या अनुग्रहाने मोक्षाची इच्छा बाळगतो त्याला शिष्य म्हणतात. आपल्यावर गुरुकृपा झाली हे कसे समजावे, तर जेव्हा आपल्या मनात मोक्षप्राप्तीची इच्छा उत्पन्न होईल तेव्हा निश्चित गुरुकृपा झाली असे समजावे. मोक्षाची अपेक्षा करणारे खूप कमी असतात. सामान्य माणसांना सर्व काही हवे असते, परंतु मोक्ष नको असतो. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांत मोक्षाचा क्रमांक शेवटचा आहे. ज्यांना धर्म पाहिजे असतो अशी माणसे कमी असतात. अर्थ-कामाची इच्छा असणारे बहुसंख्य असतात. परंतु मोक्षाची इच्छा असणारा लक्षावधीत एखादाच असतो. बहुसंख्य लोकांना धन, कीर्ती, सत्ता इ. हवे असते. सर्व भोगांचा उबग आल्यावर मनुष्य मोक्षप्राप्तीची कामना बाळगतो. सांसारिक वासनांपासून मुक्त झाल्याशिवाय मोक्षाची इच्छा उत्पन्न होत नाही. या नाशिकच्या 'मुक्तिधामा'त बसून आपण मोक्षाचा विचार करीत आहोत. इथे बसलेल्या सर्वांच्या मनात मोक्षाची इच्छा असण्याची शक्यता आहे, परंतु इच्छा प्रबळ हवी तरच प्रगती होण्याची शक्यता आहे.

एकदा विवेकानंदांकडे एक मनुष्य आला आणि म्हणाला, ''स्वामीजी मला ईश्वर दाखवा. ईश्वरदर्शन करण्याची माझी इच्छा आहे.''

''तुझ्या मनात ईश्वरदर्शनाची प्रबळ इच्छा आहे काय?'', स्वामीजींनी विचारले.

''होय.'' तो गृहस्थ म्हणाला. स्वामीजी स्नानासाठी नदीवर निघाले होते. त्यांनी गृहस्थाला आपल्या बरोबर येण्यास सांगितले. नदीवर गेल्यावर 'नदीत उतरून प्रथम स्नान कर', अशी स्वामीजींनी आज्ञा केली.

तो गृहस्थ नदीत उतरला. स्नान करू लागला. तेवढ्यात स्वामीजी त्याच्याजवळ आले आणि त्यांनी त्या गृहस्थाचे डोके पाण्याखाली दाबून धरले. तो कासावीस झाला. मग त्यांनी त्याला सोडले. असे दोन तीन वेळा स्वामीजींनी केल्यावर तो गृहस्थ घाबरून पाण्याबाहेर आला. आणखी एक दोन वेळा जर स्वामीजींनी त्याच्यावर हा प्रयोग केला असता तर तो बिचारा खरोखरच ईश्वराकडे गेला असता. त्याने स्वामीजींना विचारले,

''तुम्ही मला ईश्वर दाखवण्यासाठी आणले की पाण्यात बुडवून मारण्यासाठी?''

''भल्या गृहस्था, तुला मारून मला काय मिळणार?'' स्वामीजी म्हणाले, ''पण मला हे सांग, तुझे डोके जेव्हा पाण्याखाली होते तेव्हा तुला कशाची आत्यंतिक आवश्यकता होती?''

''श्वासाची'' त्या गृहस्थाने उत्तर दिले, ''मला त्यावेळी काही नको होते फक्त श्वास घ्यायचा होता.''

तेव्हा स्वामीजी म्हणाले, ''तुला जेव्हा त्या श्वासाप्रमाणे ईश्वराशिवाय दुसरे काही नको असेल तेव्हा माझ्याकडे ये, मग मी तुला ईश्वर दाखवतो.''

मुक्तीची इच्छा अशी प्रबळ हवी. मुक्तीशिवाय जेव्हा दुसरे काहीही नको असते तेव्हाच मुक्ती मिळते. आपल्याला मात्र सर्व काही हवे असते. घर-दार, शेती-वाडी, धन-संपत्ती आणि सांसारिक भोग. ह्या सर्वांबरोबर मिळाला तर ईश्वर हवा असतो. तुम्हाला एक तर संसार मिळेल किंवा परमात्मा. परमात्मा हवा असेल तर संसार थोडा मनाबाहेर ठेवायला हवा. हाती इष्टलिंग घेऊन तुम्ही जेव्हा पूजेला बसता तेव्हा तुमच्या मनात जर सांसारिक विचार येत असतील तर तुमची पूजा सफल होणार नाही. ज्याचे स्मरण तुम्ही करता त्याचीच पूजा त्यावेळी करत असता. संसाराचा विसर पडला तरच तुम्हाला परमात्मचिंतनासाठी अवसर मिळू शकतो. एकाच वेळी संसार आणि परमात्मा मनात राहू शकणार नाही. सुखाने गाढ झोप घ्यायची असेल तरी देखील प्रपंचाला विसरावे लागते. मग संसार मनात ठेवून परमात्मा कसा मिळेल? आपल्या मनात मोक्षाची इच्छा असते, परंतु ती दुर्बल असते. एखाद्या अशक्त रोगजर्जर माणसाला इच्छा असूनदेखील प्रवचन ऐकण्यासाठी येथे येणे जमत नाही त्याप्रमाणे मोक्षाची इच्छा जर अशक्त असेल तर तिच्यामुळे लाभ होणार नाही. ज्याच्या मनात मोक्षाची इच्छा अत्यंत तीव्र असते त्याला 'शिष्य' म्हटले जाते.

मंदिरात जाणारा भक्त भगवंताकडे कशासाठी जात असतो? तो देवाला नमस्कार करतो आणि नंतर हळूच आपल्या मागण्यांचे निवेदन सादर करतो. मला हे हवे, मला ते हवे. तुमची इच्छा पूर्ण करण्याचे सामर्थ्य भगवंताजवळ आहे. तुम्ही पूजा-पाठ करून सांसारिक इच्छा पूर्ण करून घेऊ शकता. परंतु भोग्य पदार्थांमुळे आपण तृप्त होऊ शकतो काय? गेल्या हजारो जन्मात आपण भोगच भोगत आलो आहोत. तरी देखील आपले मन तृप्त झाले नाही. राजा ययातीने वार्धक्य आल्यावर आपल्या पुत्रांचे आयुष्य मागून घेतले आणि हजार वर्षे देहभोग भोगत राहिला. परंतु तरीही त्याची तृप्ती झाली नाही. अग्नीत तूप आणि लाकडे टाकत राहिलो तर तो अधिकाधिक प्रज्वलित होतो त्याप्रमाणे वासना तृप्त व्हावी म्हणून भोगाची कितीही आहुती दिली तरी वासना शांत होत नाही. उलट अधिकच वाढते. किती जन्मांत आपण भगवंताला भोगसामग्री मागत राहिलो, परंतु तरीही आपले मन भरले नाही. भोगातून मुक्त होण्यासाठी आपल्याला सद्गुरूकडेच जावे लागते. त्याचा शिष्य व्हावे

लागते. शिष्याच्या सेवेने जेव्हा गुरू संतुष्ट होऊन अनुग्रह करतात तेव्हा शिष्याच्या मनात मोक्षाची प्रबल इच्छा उत्पन्न होते, तो मोक्षार्थी होतो. जो गुरूजवळ येतो तो मोक्षार्थी होतोच. कारण गुरू उपदेश करीत असतात. मंदिरात गेलात तरी ईश्वर तुमच्याशी बोलत नाही. परंतु गुरूजवळ गेलात तर तो तुम्हाला 'आत्मकल्याण करून घ्या' असा उपदेश करतो. ईश्वरभक्त होणे सोपे आहे, परंतु गुरुभक्त होणे कठीण, ईश्वराची पूजा आपण रोज करतो, परंतु गुरूची पूजा मात्र वर्षातून एखादे वेळी करतो. ईश्वर काही बोलत नाही. तुम्ही पूजा केली काय आणि न केली काय. नैवेद्य दाखवला काय अन् नाही दाखवला काय. तो तुम्हाला नाव ठेवत नाही. तो बोलत नाही, म्हणूनच तुम्ही त्याला घरात ठेवत असता. उद्यापासून जर तो बोलू लागला, तुमच्या चुका सांगू लागला तर तुम्ही त्याला अखेरचा दंडवत घालून रामराम करणार हे निश्चित. दोन बोलणारे फार काळ एकत्र राहू शकत नाहीत. तुम्ही काही केले तरी ईश्वर बोलत नाही, परंतु गुरू मात्र तुमच्या चुका सहन करीत नसतो. तो तुम्हाला बोलतो. गुरूचे बोलणे सहन करण्याची शक्ती शिष्याजवळ असावी लागते. ती नसेल तर तो फार काळ शिष्य राहू शकणार नाही.

गुरुकृपा संपादन करण्यासाठी शिष्याला एक-दोन नव्हे तर बारा वर्षे सेवा करावी लागते. अधिक सहवासाने गुरूला शिष्याच्या आणि शिष्याला गुरूच्या स्वभावाचा परिचय होतो. जो गुरूची मनोभावे सेवा करतो त्याच्यावर गुरूचा अनुग्रह होतो आणि त्यामुळे तो मोक्षार्थी बनतो.

**भावो यस्य स्थिरो नित्यं मनोवाक्कायकर्मभिः।**
**गुरौ निजे गुणोदारे स शिष्य इति गीयते।।१७.५९।।**

गुरू हा गुणांचा आगर असतो. आपण गुरुपूजा करतो म्हणजेच गुरूच्या ठिकाणी असलेल्या उत्तमोत्तम गुणांची पूजा करीत असतो. गुरूच्या गुणांवर ज्याची अत्यंत निष्ठा असते. तो शिष्य असतो. शरीर, वाणी आणि मन या त्रिकरणांनी गुरुसेवा करावी लागते. शरीराने गुरूची पूजा, वाणीने गुरूची स्तुती आणि मनाने गुरूच्या रूपाचे चिंतन घडले पाहिजे. गुरू गुणांमुळे मोठे असतात. गुरूसारखा वेष केल्याने कुणी मोठे होत नसते. काही फुले सुंदर दिसतात, परंतु त्यांच्यात गंध नसतो. त्याप्रमाणे संत, गुरू हे बाह्यवेषाने गुरू ठरत नाहीत तर सद्गुणांनी ठरतात. नाटक-सिनेमात गुरूची भूमिका करणे सोपे आहे, परंतु सद्गुण अंगी बाणवून गुरू होणे मात्र अवघड आहे.

रामायणामध्ये पार्वतीने रामाची परीक्षा घेतल्याची एक कथा आली आहे. रावणाने सीतेचे अपहरण केल्यानंतर वृक्षवेलींना सीतेचा ठावठिकाणा विचारणारा शोकाकुल राम जेव्हा पार्वतीने पाहिला तेव्हा तिला त्याची दया आली. सीतेचे रूप घेऊन ती त्याच्यासमोर उभी राहिली. पार्वतीने सीतेचे रूप घेतले खरे, परंतु सीतेचे गुण तिच्या अंगात नव्हते. रस्त्याने चालताना सीता रामाच्या मागून चालत असे. सीतेचे रूप घेतलेली पार्वती मात्र रामाच्या पुढे पुढे चालू लागली. एवढ्यावरून रामाने ती सीता नाही हे ओळखले. सीतेचे रूप घेणे सोपे आहे परंतु सीता होणे मात्र कठीण आहे.

काशीत अनेक घाट आहेत. त्यामध्ये एक धोबीघाट देखील आहे. तेथे प्रत्येक धोब्याने आपला एक दगड ठेवलेला असतो आणि त्यावर ते धुणी धुत बसलेले असतात. एक साधू असाच भटकत तेथे आला आणि एका धोब्याच्या दगडावर बसून ध्यान करू लागला. तो दगड ज्या धोब्याचा होता तो धोबी कपडे धुण्यासाठी म्हणून तिथे आला आणि त्याचे ध्यान संपण्याची वाट पाहू लागला. त्याने एक-दोनदा हाक मारली, परंतु ती साधूला

ऐकू आली नाही. शेवटी त्याने रागाने साधूला ढकलले, तेव्हा साधू खवळला आणि दोघात हाणामारीला सुरुवात झाली. कधी धोब्याच्या छातीवर साधू बसायचा तर कधी साधूच्या छातीवर धोबी बसायचा. धोब्याला धुणे बडवायची सवय होती. तो साधूला चांगले बडवून काढू लागला. शक्ती कमी पडल्यावर साधूला देवाची आठवण झाली. त्याने मोठ्याने टाहो फोडला, ''हे ईश्वरा, मला वाचव हा धोबी माझा जीव घेत आहे.''

त्यावेळी आकाशवाणी झाली, ''तुमच्यात कोण धोबी आणि कोण साधू हे मला अगोदर सांगा. मला तर दोघेही धोबीच दिसत आहेत. वेषभूषेने एकजण साधू दिसतो खरा, पण त्याच्यात साधूचा एकही गुण दिसत नाही. धोब्याने एक शिवी दिली तर साधू दहा शिव्या देतो. धोब्याने एक लाथ घातली तर साधू पाच लाथा घालतो. जो साधू आहे त्याचेच मी रक्षण करतो, परंतु तुझ्यात साधुत्वाचे एकही लक्षण दिसत नाही.''

वेषभूषेने मोठेपण लाभत नाही, ते लाभते अंगात उत्तम गुण बाणवल्याने. शिष्याच्या मनात गुरूविषयी अतीव श्रद्धा असावी. एकदा गुरुमंत्र घेतला की काम संपले. गुरू तिकडे आणि हा इकडे. असेच शिष्य संख्येने अधिक असतात. गुरुचिंतनामुळे गुरूचे उत्तम गुण शिष्याच्या अंगी बाणतात. जेथे अगरबत्ती लावली अशा ठिकाणी तुम्ही बसलात तर तुम्हाला सुगंधाचा नित्य अनुभव येतो. त्याप्रमाणे गुरूच्या सान्निध्यात तुम्ही जितके काळ राहाल तेवढा काळ तुमच्या ठिकाणी गुरूच्या गुणांचा प्रादुर्भाव होईल. म्हणून इष्टदेवतेचा भक्त व्हावे आणि गुरूचा शिष्य व्हावे. गुरुकृपेमुळेच शिष्यापुढे मोक्षाची द्वारे मोकळी होतात, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

मुक्तिधाम, नाशिक रोड
६ ऑक्टोंबर १९९४

---

आशीर्वचन चौदावे

## शिष्यस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

उत्तम शिष्य कसा असावा याविषयी कालपासून आपण विचार करीत आहोत. उत्तम शिष्य लाभला तर गुरूचेही महत्त्व अधिक वाढते. सुसंस्कारसंपन्न पुत्र ज्यांना लाभतो अशा आई–वडिलांचे नाव लोक घेत असतात, परंतु कुसंस्कारित मुलगा झाला तर घराण्याला नावे ठेवली जातात. म्हणून गुरूदेखील उत्तम शिष्य लाभावा अशी कामना करीत असतात. उत्तम शिष्याची लक्षणे कोणती? तीच ज. रेणुकाचार्य येथे सांगत आहेत.

**शान्तो दान्तस्तपश्शील: सत्यवाक् समदर्शन:।**
**गुरौ शिवे समानस्थ: स शिष्याणामिहोत्तम:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.६०)

उत्तम, मध्यम, आणि कनिष्ठ असे शिष्यांचे तीन प्रकार केले जातात. येथे उत्तम शिष्याची लक्षणे सांगितली आहेत. शांत, दांत, तपस्वी, सत्यवचनी, समदर्शनी आणि गुरू व शिव यांच्यात अभेद पाहणारा असा शिष्य उत्तम असतो. शांत म्हणजे काय? याचा विचार करू. ज्ञानेंद्रिये आणि कर्मेन्द्रिये ही बाह्य इंद्रिये आहेत तर मन हे

आंतरइंद्रिय आहे. ज्याचे मन अत्यंत शांत असते त्याला 'शांत' असे म्हटले जाते. गुरू शांत असावा आणि शिष्यही शांत असावा. गुरू शांतचित्ताने उपदेश करीत आहेत आणि शिष्य मात्र अशांत आहे, इकडे तिकडे पाहत आहे, अशा वेळी गुरूचे मन देखील चंचल होते. गुरूसमोर शिष्याने एखाद्या स्तंभासारखे निश्चल बसावे, पण मनाने मात्र अत्यंत जागृत असावे. ज्याचे शरीर अस्थिर असते त्याचे मनदेखील अस्थिर असते, पाणी भरलेले भांडे जर हलवले तर आतले पाणीदेखील हलते. त्याप्रमाणे शरीर हलले तर मनही हलते. पाणी भरताना नळाखाली ठेवलेली घागर स्थिर पाहिजे तसाच नळदेखील स्थिर पाहिजे. दोहोंपैकी एक जरी अस्थिर झाले तर घागरीत पाणी भरले जाणार नाही. त्याप्रमाणे गुरू-शिष्यांचे मन अत्यंत शांत असले पाहिजे. मनात कोणताही तरंग नसावा. प्रवचन ऐकताना, ध्यान करताना, जप करताना शरीर स्थिर असावे. ते जेवढा काळ स्थिर राहते तेवढा काळ मन स्थिर राहते.

'दान्त' म्हणजे इंद्रियांवर नियंत्रण असलेला. ज्ञानेंद्रिये आणि कर्मेन्द्रिये यांच्यावर शिष्याचे नियंत्रण असावे. काय पाहावे, काय पाहू नये? काय ऐकावे, काय ऐकू नये? काय करावे, काय करू नये? याचे त्याला ज्ञान असावे. इंद्रियांवर नियंत्रण नसेल तर मन शांत राहू शकणार नाही. बाह्येंद्रियांच्या व्यवहारावरच आपल्या मनाचे स्वास्थ्य अवलंबून असते. ध्यान-जप करताना, प्रवचन ऐकताना तुम्हाला आसन घालून बसावे लागते. इकडे-तिकडे फिरत तुम्ही ध्यान-जप करू शकणार नाही आणि प्रवचनही ऐकू शकणार नाही. कर्मेन्द्रिये बांधून ठेवली तरच आसन स्थिर होते. शरीराला त्रास होईल असे आसन निवडू नये. 'स्थिरं सुखं आसनम्' असे आसनाचे लक्षण महर्षी पतंजलींनी सागितले आहे. ज्या आसनावर बराच काळ स्थिर राहता येते आणि जे आसन सुखावह वाटते त्या आसनावर बसावे. म्हणून कर्मेन्द्रियांचा आणि ज्ञानेन्द्रियांचा निग्रह केला पाहिजे. जीवनव्यवहारात आपण निग्रह करणे विसरून गेलो आहोत. निषिद्ध व्यवहारापासून इंद्रियांना रोखणे यालाच 'निग्रह' म्हणतात.

वाईट ऐकायला आणि पाहायला मनुष्य उत्सुक असतो. चांगले शब्द ऐकायला लोक येथे येणार नाहीत. पण वाईट गोष्टी पाहायला पैसे खर्चून जातील. सिनेमा-गृहासमोर लागलेल्या लोकांच्या रांगा आणि प्रवचनात आलेले मूठभर लोक यावरूनच याची कल्पना येईल. मनुष्याला 'उत्तम' नको असते, 'उत्तान' हवे असते. जेथे उत्तानपणा आहे तेथे प्रचंड गर्दी दिसते तर जेथे उत्तमपणा आहे तेथे माणसांचा दुष्काळ पडलेला असतो. निषिद्ध कर्मांकडे मनुष्याची प्रवृत्ती का असते? कारण अनेक जन्मांत त्यांनी हीच कमाई केलेली असते म्हणून. तुम्हाला संसारचक्रात भ्रमत राहायचे असेल तर अवश्य तिकडे जा. परंतु मोक्षमार्गावरील यात्रेकरू व्हायचे असेल तर मात्र इकडे-गुरूकडे या. येथे आल्यावर काही पथ्य पाळावे लागते. आयुर्वेदात पथ्याला अधिक महत्त्व आहे. 'लंघनं परमौषधम्'- काही न खाता उपवास करणे हेच मोठे औषध आहे असे आयुर्वेद सांगते. परंतु ॲलोपॅथीचे डॉक्टर 'सर्व काही खा आणि औषधही खा' असे सांगतात. शरीराचा आजार औषध घेतल्याने दूर होतो. परंतु या स्थूल शरीराच्या आत आणखी एक सूक्ष्म शरीर असते. कामक्रोधादी विकाराने ते आजारी पडलेले असते. बाह्येंद्रियांवर नियंत्रण नसल्यामुळे मनाला कामक्रोधादी विकारांनी ग्रासलेले असते. म्हणून बाह्येंद्रियांचा निग्रह करण्याचे पथ्य पाळण्याचा श्रीगुरूंचा आदेश असतो. गुरूंचा आदेश पाळला तरच सूक्ष्मदेहाचा आजार दूर होईल.

मन अन्नाचा परिणाम आहे. म्हणून मन शुद्ध करण्यासाठी शुद्ध आहार घ्यावा लागतो. शुद्ध आहारासाठी अर्थार्जन शुद्ध असावे लागते. व्यापार करताना ग्राहकांची फसवणूक करून कमाई केली तर ती शुद्ध कशी असेल?

त्या पैशांनी घेतलेले अन्न शुद्ध असणार नाही आणि अन्न शुद्ध नाही म्हणून मनदेखील शुद्ध होणार नाही. यावर एक उपाय आहे. अन्न प्रथम भगवंताला अर्पण केले तर ते शुद्ध होते. शिवार्पित अन्नाचे प्रसाद म्हणून सेवन केले तर मनात प्रसन्नता भरून राहते. भगवंत तुमचे अन्न खात नसतो आणि आपणदेखील त्याने खावे म्हणून देत नसतो. त्याला दाखवून म्हणजे अर्पण करून आपण तो प्रसाद म्हणून घ्यायचा असतो. देवाला अन्न दाखवल्याने अन्नातील दोष नाहीसे होतात आणि अन्न शुद्ध होते. प्रसादान्न सेवन केल्याने मन प्रसन्न राहते.

अलीकडे अन्नसेवनाची पद्धती पार बदलून गेली आहे. हातात प्लेट घेऊन उभे राहून माणसे भोजन करतात. सगळ्यात गंमतीची गोष्ट अशी की 'हे करू नको' असे सांगितले तर मनुष्य ते नक्कीच करतो. 'कोणत्याही वस्तूला हात लावू नये' अशी पाटी पाहिली तर तो त्या वस्तूला मुद्दाम हात लावून बघणार. 'सिगारेट ओढणे स्वास्थ्याला हानिकारक आहे' असे पाकिटावर छापलेले असते. तरीदेखील ज्यांना वाचता येते अशी शिक्षित माणसे सिगारेट ओढतात. खाण्यापिण्यात जोपर्यंत सात्त्विकता येत नाही तोपर्यंत आपले मन सात्त्विक होत नाही. ज्याला शिष्य व्हायचे आहे त्याने 'शान्त' आणि 'दान्त' झाले पाहिजे. गुरुदीक्षा घेतल्यानंतर तुमच्या वर्तनात सात्त्विकता आली पाहिजे. शिष्य तपस्वी असावा. तप म्हणजे सहनशीलता. एखादा योगी दहा दहा वर्षे एकाच जागी बसून राहतो असे आपण ऐकत असतो. त्याच्या ठिकाणी सहन करण्याची ताकद असते. तप तीन प्रकारचे असते. कायिक, वाचिक आणि मानसिक. शरीराने माता-पित्याची, श्रीगुरूची, भगवंताची सेवा करणे हे कायिक तप होय. भगवन्नामाचा जप करणे, भजन करणे, कुणाला शब्दाने न दुखवणे, सत्य व प्रिय बोलणे हे वाचिक तप होय.

सत्य बोलणे हे अत्यंत कठीण असते. सारे जग खोटे बोलत असताना आपणच सत्य का बोलावे, असा प्रश्न अनेकांना पडलेला असतो. सर्व जगात अंधार पडलेला असताना आपण तेवढा दिवा का लावायचा? अशा प्रश्नासारखा हा प्रश्न होय. स्वतःपासून सुरुवात केली पाहिजे. परंतु आपण मात्र घरातल्या लहान मुलांना देखील खोटे बोलण्याची दीक्षा देत असतो. ते मूल खोटे बोलण्याला हळूहळू सरावते आणि मोठे झाल्यावर मायबापाशीच धादांत खोटे बोलू लागते. 'सत्यमेव जयते' हे आपल्या राष्ट्राचे ब्रीदवाक्य आहे. याची आठवण कोणालाच राहिलेली नाही. राजकारणी लोकांना तर राहिली नाहीच, परंतु सामान्य लोकांना देखील राहिलेली नाही. सत्य बोलण्यासारखी दुसरी तपश्चर्या नाही. असत्य बोलणे कमी कमी करीत गेलो तर आपण आपोआप सत्यवादी होतो. म्हणून सत्य बोलणे हे वाचिक तप होय.

भगवंताचे सतत चिंतन करणे आणि विश्वातील प्राणिमात्राबद्दल सद्भावना बाळगणे हे मानसिक तप होय. कुणाला काही देऊ नका, परंतु त्याचे कल्याण होवो अशी मंगल कामना करा, तरीदेखील तुम्हाला मानसिक तपश्चर्या घडेल. अशाप्रकारे शरीर, वाणी आणि मन यांच्याद्वारे जो कायिक, वाचिक आणि मानसिक तप करतो तोच शिष्य असतो. ज्याला काही सहन करता येत नाही त्याच्याकडून तप घडण्याची शक्यता नाही. शिष्यांनी गुरूंनी घेतलेल्या कठोर परीक्षांत आपली सहनशक्ती सिद्ध करून दाखविल्याच्या अनेक कथा प्राचीन साहित्यात आढळून येतात.

धौम्य ऋषींकडे उपमन्यू नामक शिष्य विद्याध्ययनासाठी आला. तेव्हा धौम्यांनी त्याला आश्रमातील गाई चारण्यासाठी वनात घेऊन जा, असा आदेश दिला. दिवसभर वनात गाई चारून उपमन्यू परत आला. तेव्हा गुरूंनी त्याला बोलावून विचारले,

''तू आश्रमात काम करतोस, पण जेवण कुठे करतोस?''

''आश्रमातच'', उपमन्यूने उत्तर दिले.

''हे काही बरोबर नाही'', गुरू म्हणाले, ''आश्रमात सेवा करायची आणि आश्रमातच खायचे. म्हणजे तुझ्या सेवेचा मोबदला दिल्यासारखेच झाले. तुला सेवा कशी घडणार? म्हणून उद्यापासून तू आश्रमात भोजन करू नकोस.''

दुसऱ्या दिवसापासून त्याने आश्रमात भोजन घेणे बंद केले. दोनचार दिवस उलटले तरी त्याच्या चेहऱ्यावरचे तेज कमी झाले नाही. गुरूंना आश्चर्य वाटले. त्यांनी त्याला बोलावून विचारले,

''तू आश्रमात भोजन घेत नाहीस तरी तुझा चेहरा भुकेल्या माणसासारखा दिसत नाही, याचे कारण काय आहे?''

''महाराज'', उपमन्यू म्हणाला, ''मी गावात जाऊन भिक्षा मागतो आणि त्या भिक्षान्नावर उदरनिर्वाह करतो.''

''वत्सा'', धौम्य म्हणाले, ''तुला भिक्षेचा नियम माहीत नाही असे दिसते. भिक्षा मागून आल्यानंतर ती प्रथम गुरूला अर्पण करावी आणि गुरूने त्यामधील काही भाग परत केला तर तो ग्रहण करावा.''

दुसऱ्या दिवसापासून उपमन्यूने भिक्षा मागून ती गुरूसमोर ठेवायला सुरुवात केली. गुरूला त्याची परीक्षाच घ्यायची होती. त्यांनी ती सगळी भिक्षा ठेवून घेतली. त्याला परत काही केले नाही. असे रोज घडू लागले. चारपाच दिवसांनी गुरूंनी शिष्याला विचारले, ''तू आणून ठेवलेली भिक्षा मी स्वतः ठेवून घेतो. त्यामधले काहीही तुला परत करत नाही. तरीही तुझा चेहरा तजेलदार दिसतो आहे. भुकेलेपणाचे एकही लक्षण तुझ्या शरीरावर दिसत नाही. याचे काय कारण आहे?''

''गुरुदेव'', उपमन्यू म्हणाला, ''आपल्याला भिक्षा अर्पण केल्यानंतर मी पुन्हा गावात जाऊन भिक्षा मागतो आणि त्यावर उदरनिर्वाह करतो.''

''उपमन्यू'', गुरू म्हणाले, ''गृहस्थांना एकवेळ भिक्षा वाढणे जड जाते आणि तू मात्र दिवसातून दोनवेळा त्यांच्याकडून भिक्षा मागून आणतोस? हे काही बरोबर नाही. उद्यापासून तू एकदाच भिक्षेला जात जा.''

दुसऱ्या दिवसापासून एकवेळ भिक्षा मागून ती गुरूसमोर ठेवायचा क्रम त्याने सुरू ठेवला. नेहमीप्रमाणेच गुरूंनी सर्व भिक्षान्न ठेवून घेतले. चारपाच दिवसानंतर गुरूंनी शिष्याला विचारले, ''तू एकदाच भिक्षा मागतोस, ती माझ्यासमोर ठेवतोस, मी त्यातले काही तुला परत करत नाही. तरीही तुझा चेहरा प्रसन्न दिसतो आहे. तू दुसरीकडे कुठे काही खातोस काय?''

''महाराज'', उपमन्यू म्हणाला, ''मी आता खाणे सोडून दिले आहे. मी वनात जातो. मी वनात गेल्यावर गाईचे दूध पित असतो.''

''उपमन्यू'', गुरू रागावून म्हणाले, ''गाईचे दूध हे वासरांसाठी असते. त्यांना उपाशी ठेवून तू दूध पितोस हे योग्य नाही. उद्यापासून दूध पिणे बंद कर.''

''आज्ञा गुरुदेव'', उपमन्यू म्हणाला आणि त्याने दूध पिणे बंद केले.

चार-पाच दिवसांनी गुरू पाहतात तो त्याच्या चेहऱ्यावरचे तेज कायमच होते. त्यांनी विचारले, ''तू दूध पित नाहीस तरी तुझ्या चेहऱ्यावरचे तेज कायम आहे. दुसरे काय खातोस-पितोस?''

''गुरुदेव'', शिष्य म्हणाला, ''मी दूध पित नाही हे खरे आहे. परंतु वासरू जेव्हा दूध पिते तेव्हा त्याच्या

तोंडातून फेस गळत असतो. तो फेस खाऊन मी माझी भूक भागवतो.''

''उपमन्यू'', धौम्य म्हणाले, ''गाईची आणि वासरांची तू फार काळजी घेतोस, म्हणून ते तुझ्यावर प्रेम करतात. वासरे स्वत: उपाशी राहून तुझ्यासाठी अधिक फेस गाळतात. म्हणून तू फेस खाणे बंद कर.''

दुसऱ्या दिवसापासून उपमन्यूने तेही बंद केले. एक दिवस तो उपाशी राहिला, परंतु दुसऱ्या दिवशी त्याला भूक आवरेना. शेवटी त्याने रुईच्या झाडाची पाने खाल्ली. ती खाताना त्याचा चिक डोळ्यात जाऊन तो आंधळा झाला. संध्याकाळ झाली तशा गाई आश्रमाकडे परतल्या. उपमन्यू मात्र स्वैर भटकत एका कोरड्या विहिरीत जाऊन पडला. उपमन्यू परत आला नाही म्हणून धौम्याला काळजी पडली. हातात दिवटी घेऊन ते त्याच्या शोधार्थ बाहेर पडले. त्याच्या नावाने हाका मारल्या. तेव्हा त्यांना उपमन्यूने विहिरीतून प्रतिसाद दिला. धौम्य विहिरीत डोकावून पाहतात तो त्यांच्या दृष्टीला आंधळा झालेला उपमन्यू पडला. धौम्यांनी विचारल्यावर सर्व हकीकत उपमन्यूने सांगितली. धौम्यांनी त्याला सांगितले,

''तू इथेच बसून अश्विनी मंत्राचा जप कर त्यामुळे देवांचे धन्वंतरी अश्विनीकुमार येऊन तुला दृष्टिदान करतील.''

असे म्हणून धौम्य निघून गेले. त्यानंतर उपमन्यूने अश्विनीमंत्राचा जप केला. अश्विनीकुमारांनी त्याला दृष्टी देऊन विहिरीतून बाहेर काढले. उपमन्यू आश्रमात परतला. धौम्य त्याची वाटच पाहात होते. तो आल्यावर त्यांनी इतक्या स्नेहार्द दृष्टीने त्याच्याकडे पाहिले की एका क्षणात उपमन्यूला सर्व विद्या प्राप्त झाल्या. उपमन्यू हा उत्तम शिष्य होऊ शकेल हे धौम्यांनी त्याला पाहताक्षणीच ओळखले होते, त्यामुळे त्याला अधिक तपस्वी, अधिक सहनशील करण्यासाठी त्यांनी त्याला कष्ट दिले. त्यामागे त्याचा छळ करावा असा उद्देश नव्हता. गुरू शिष्याची परीक्षा पाहतात ती अशी. गुरूने दिलेले कष्ट ही एक प्रकारची शारीरिक तपश्चर्या होय. गुरूने दिलेले कष्ट सहन करण्याची ताकद जोपर्यंत शिष्यात येत नाही तोपर्यंत त्याला विद्या प्राप्त होत नाही.

शिष्य समदर्शी असावा. मनुष्य सर्वांकडे समानदृष्टीने पाहात नाही. प्रत्येकजण आपले-तुपले करीत असतो. त्यामुळेच एका घराची दोन घरे होतात, हे माझे, ते तुझे. शिष्याने मात्र प्रत्येकाकडे समानदृष्टीने पाहिले पाहिजे. कोणत्याही कारणाने त्याने माणसामध्ये भेद करता कामा नये. शिष्याने गुरू आणि भगवान शिव यांच्यात अभेद मानला पाहिजे. गुरू हाच शिव आहे आणि शिव हाच गुरू आहे, अशी त्याची दृढ भावना असली पाहिजे. अशाप्रकारे शान्त, दान्त, सत्यवचनी, समानदृष्टी असलेला आणि गुरू-शिव यांच्यात अभेद मानणारा शिष्यच सर्वोत्तम शिष्य असतो. तोच पुढे गुरुपदाला पात्र ठरतो. जोपर्यंत शिष्यावर गुरुकृपा होत नाही तोपर्यंत त्याच्यावर शिवकृपा देखील होत नाही. त्यामुळे भगवद्‌भक्त होण्याआधी गुरुभक्त झाले पाहिजे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

मुक्तिधाम, नाशिक रोड

७ नोव्हेंबर १९९४

## शिष्यस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

गुरू–शिष्य यांचा संबंध प्रपंचातला सर्वोत्कृष्ट संबंध असून या संबंधामुळे शिष्याला मुक्ती मिळते. सगळीच माणसे शिष्य असतात असे नाही. परंतु ज्याला शिष्य होण्याची संधी मिळते. त्याचे जीवन कृतार्थ होते. उत्तम शिष्याची लक्षणे येथे ज. रेणुकाचार्य सांगत आहेत.

**गुरुमेव शिवं पश्येच्छिवमेव गुरुं तथा।**
**नैतयोरन्तरं किंचिद्विजानीयाद्विचक्षण:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.६१)

जो उत्तम शिष्य असतो तो गुरू आणि शिव यांच्यात अभेद पाहतो. गुरूत शिव आणि शिवात गुरू असे अद्वैत त्याला दिसत असते. भगवान मायाशक्तीने युक्त असल्यामुळे त्यांचे दर्शन आपल्याला होत नाही. भगवान शिवच जेव्हा मायाशक्तीचा त्याग करून ज्ञानशक्तीने युक्त होऊन गुरुरूपाने अवतार घेतात तेव्हा त्यांचे दर्शन सर्वांना होते. गुरू म्हणजे प्रकट झालेले शिवच असतात. शिष्याच्या दृष्टीने गुरूपेक्षा कोणीही मोठा नसतो. शिष्य तन मन धनाने श्रीगुरूला शरण जातो. जेव्हा गुरूला साष्टांग नमस्कार घालतो तेव्हा माझे सारे गुरूचेच आहे असा भाव व्यक्त करीत असतो. गुरूच त्याचा देव असतो. ज्याने धनाला जीवन समर्पित केलेले असते त्याच्या दृष्टीने धन हाच देव असतो. धन हाच त्याचा गुरू असतो. याचा अर्थ मनुष्याने धनार्जन करू नये, असा नव्हे. सुखप्राप्तीसाठी धर्म हवा असतो, अर्थ म्हणजे धन हवे असते, काम हवा असतो त्याप्रमाणे शेवटी मोक्षदेखील हवा असतो. आवश्यक तेवढे अर्थार्जन करणे योग्य आहे. परंतु धनाला जीवनाचे एकमेव लक्ष्य मानणे अनुचित आहे. काही लोकांनी निषिद्ध कर्मानाच आपले देव मानलेले असते. पुत्रासाठी माता–पिता हे देव असतात, पतिव्रतेसाठी पती हा देव असतो त्याप्रमाणे शिष्यासाठी गुरू हाच देव असतो. गुरू हा सर्वश्रेष्ठ देव मानला जातो. शिष्यासाठी गुरूपरते अन्य दैवत नसते, एवढेच नाही तर गुरूला ब्रह्मा, विष्णू आणि महादेवासमान मानून त्याला परब्रह्माची पदवी दिलेली आहे. गुरू शिष्याला दीक्षा देऊन त्याच्या डोक्यात उत्तम विचारांची सृष्टी करतो म्हणून तो ब्रह्मा होय. शिष्याचे दुष्ट प्रवृत्तींपासून गुरू रक्षण करतो म्हणून तो विष्णू होय. शिष्याच्या मनातील दुष्टभावनांचा संहार तो करतो म्हणून तो रुद्र होय. शिष्याला शेवटी परब्रह्मरूप करतो म्हणून श्रीगुरू परब्रह्म आहे.

अज्ञानरूपी अंधकाराने मनुष्याचे ज्ञाननेत्र बंद झालेले असतात. तो शिष्याचे ज्ञाननेत्र उघडतो म्हणून तो सर्वश्रेष्ठ होय. माता–पिता गुरू असतील परंतु ते मोक्ष देऊ शकत नाहीत. म्हणून शिष्याने गुरूचे ध्यान करावे, गुरूची पूजा करावी आणि गुरुमंत्राचा जप करावा. गुरुकृपेशिवाय कुणालाही मुक्ती मिळू शकत नाही. गुरुवचनावर शिष्याची एवढी निष्ठा असावी की गुरुमुखातून निघालेला प्रत्येक शब्द त्याला मंत्रासारखा वाटला पाहिजे. याबद्दल एक आख्यायिका सांगितली जाते.

नांदेड जवळ उरुलिंगदेव नावाचे सत्पुरुष राहात असत. अनेक शिष्यांना त्यांनी दीक्षा आणि मंत्र दिलेला होता. त्यांची कीर्ती सर्वदूर पसरली होती. उरुलिंग पेद्दी नावाच्या एका सामान्य माणसाला त्यांच्याकडून गुरुदीक्षा घ्यावी

असे तीव्रतेने वाटले. म्हणून तो उरुलिंगदेवाकडे गेला आणि म्हणाला, ''गुरुदेव, आपण मला इष्टलिंग आणि मंत्र द्यावा. मला आपले शिष्यत्व पत्करायचे आहे.''

उरुलिंगदेवांना वाटले, हा अडाणी माणूस. याला लिंगदीक्षा देऊन काय उपयोग? त्याला टाळण्यासाठी ते म्हणाले, ''तू पुढच्या आठवड्यात ये. मग बघू.''

तो परत गेला. एक आठवड्यानंतर पुन्हा आला. गुरूने त्याला एक महिन्याने यायला सांगितले. असे सतत घडत राहिले. तो आला की गुरू त्याला टाळण्यासाठी 'नंतर ये' असे सांगायचे. तो काहीही कुरकुर न करता परत जात असे आणि गुरूने बोलावलेल्या दिवशी न चुकता हजर होत असे.

एके दिवशी तो आला तेव्हा गुरू मठात नव्हते. शेतात गेले होते. तो शेतात गेला आणि नित्याप्रमाणे त्याने गुरूला दीक्षा देण्याची विनंती केली. हा आपला पिच्छा सोडणार नाही याची जाणीव गुरूंना झाली. त्यांनी दगड घेऊन त्याच्या दिशेने भिरकावला आणि म्हणाले, ''घे दगड, जा.''

त्याने अत्यंत आदराने तो दगड उचलून घेतला, घरी गेला. देवघर तयार करून मोठ्या भक्तिभावाने तो दगड तेथे ठेवला. रोज त्याची पूजा करू लागला. त्याबरोबरच गुरूने उच्चारलेले शब्द– 'घे दगड, जा' याचा मंत्राप्रमाणे जप करू लागला. त्याचा हा क्रम जीवनभर सुरू होता.

एकदा त्या भागात पाऊस पडला नाही. दुष्काळ पडला. माणसांना प्यायला पाणी मिळेना. तेव्हा उरुलिंगदेवांनी एक विहीर खोदण्याचे काम सुरू केले. त्यांचे सर्व शिष्य राबू लागले. विहीर खोदता खोदता एक मोठा धोंडा लागला. अनेक प्रयत्न करून देखील तो हलवता येईना. त्याच्या खालीच फार मोठा झरा आहे, असे पाणाड्याने सांगितले होते. प्रयत्न करूनही तो तसूभर हालला नाही. शेवटी सर्वजण उदास होऊन विहिरीभोवती बसले. त्यावेळी उरुलिंगपेद्दी गुरुदर्शनासाठी आला. त्याने गुरूला नमस्कार केला आणि सर्वांच्या चिंतेचे कारण विचारले. त्याने गुरूला विचारले, ''मी प्रयत्न करून पाहू का?''

गुरुजींना आणि बाकीच्या लोकांना हसू आले. तरीही त्यांनी त्याला 'प्रयत्न करून पाहा' अशी आज्ञा केली. उरुलिंगपेद्दी धावत घरी गेला आणि देव्हाऱ्यातील दगड मोठ्या भक्तिभावाने घेऊन आला. तो दगड त्याने मोठ्या धोंड्यावर ठेवला आणि तिथे बसून 'घे दगड, जा' या मंत्राचा मोठमोठ्याने जप करू लागला. सर्वजण आश्चर्यचकित होऊन पाहत होते. त्याच्या बडबडण्याचा अर्थ तर कुणालाच कळेना. काही काळ गेला आणि चमत्कार घडला. जो धोंडा कुणालाही हलवता येत नव्हता. तो हळूहळू हलू लागला. तो मोकळा झाला. जमलेल्या लोकांनी मोठ्या उत्साहाने तो सहज बाजूला करताच तिथून पाण्याचा प्रवाह बाहेर आला.

ही कथा त्या परिसरात सत्य घटना म्हणूनच सांगितली जाते. गुरुवचनावर उरुलिंगपेद्दीची एवढी अतीव श्रद्धा होती की गुरूचे सामान्य शब्द देखील त्याच्यासाठी मंत्ररूप झाले. अशी श्रद्धा शिष्याच्या ठिकाणी असावी. शिष्याच्या जीवनात गुरुपेक्षा सर्वश्रेष्ठ स्थान दुसऱ्या कुणाला नसते.

**शिवाचारे शिवध्याने शिवज्ञाने च निर्मले।**
**गुरोरादेशमात्रेण परां निष्ठामवाप्नुयात्॥१७.६२॥**

गुरूच्या आदेशातूनच शिष्याला तत्त्वज्ञान आणि आचार यांची माहिती मिळते. लिंगाचार, सदाचार, शिवाचार, गणाचार आणि भृत्याचार असे पंचाचार वीरशैवसिद्धान्तात सांगितलेले आहेत. षट्स्थल, अष्टावरण आणि

पंचाचार याविषयी बरीच माहिती तुमच्या कानावरून गेलेली असेल. गुरूने उपदेशिलेले शिवाचार, शिवध्यान आणि शिवज्ञान यावर शिष्याने नितांत निष्ठा ठेवावी. भक्तीचे श्रद्धाभक्ती, निष्ठाभक्ती, अवधान भक्ती, अनुभवभक्ती, आनंदभक्ती आणि समरसभक्ती असे सहा प्रकार आहेत. जेव्हा भक्ती सुदृढ होते तेव्हा तिला 'निष्ठाभक्ती' म्हणतात. स्वाती नक्षत्रातला एक पाऊस थेंब जेव्हा शिंपल्यात पडतो तेव्हा त्याचा मोती बनतो. इतर कुठेही पडलेला पाऊस मोती होत नसतो. त्याप्रमाणे गुरूचा शब्द न् शब्द जो आपल्या हृदयात जपून ठेवतो तो निष्ठावान शिष्य होय. श्रद्धाभक्ती परिणत झाली की निष्ठाभक्ती होते. आपल्या सर्व संपत्तीचे हरण केले आणि आपला कोणी शिरच्छेद केला तरीदेखील लिंगपूजेचा त्याग न करणे यालाच निष्ठाभक्ती म्हणतात. गुरुपदेशावर शिष्याची अशी नितांत निष्ठा असली पाहिजे.

**ब्रह्मांडबुद्बुदोद्भूतं मायासिन्धुं महत्तरम्।**
**गुरोः कवलयत्याशु कटाक्षवडवानलः।।१७.६३।।**

संसाराला सागराची उपमा दिली जाते. पाण्याची वाफ करायची असेल तर अग्नीची आवश्यकता असते. दिवाग्नी, भूताग्नी, आकरजअग्नी, जठराग्नी, वडवाग्नी असे पंचाग्नी मानले जातात. आकाशात चमकणारी वीज म्हणजे 'दिव्याग्नी' होय. खाणीमध्ये सापडणारे सुवर्ण हे 'आकरजाग्नी' होय. सोने अग्नीत जळून जात नाही. अग्नी अग्नीला जाळत नसतो. म्हणून सोने हा अग्नी होय. पोटात राहणारा, अन्नपचन करणारा अग्नी हा 'जठराग्नी' तर समुद्रातील अग्नी हा 'वडवाग्नी' होय. वडवाग्नी जसा समुद्रातील पाणी जाळून नाहीसे करतो त्याप्रमाणे संसाररूपी सागरातले पाणी जाळणारा अग्नी कोणता आहे? मायारूप महासागरावर ब्रह्मांडरूपी बुडबुडे उत्पन्न होत असतात आणि नाश पावत असतात. समुद्रात मोठमोठ्या मगरी असतात. त्याप्रमाणे मायासमुद्रात देखील कामक्रोधादी विकार या मगरी असतात. त्यांच्या तावडीतून सुटणे अत्यंत कठीण असते. क्रोधासाठी, कामासाठी, लोभासाठी, मोहासाठी, मदासाठी आणि मत्सरासाठी आपण आपले जीवन कितीवेळा वाया घालवले याची गणती करता येणार नाही. परंतु याची जाणीव झाल्यावर मायासागरात तरून जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मायासागराला शोषण्याचे सामर्थ्य गुरूच्या कृपादृष्टीत असते. म्हणून गुरुकृपादृष्टी हा मायासमुद्राचे शोषण करणारा वडवाग्नी होय. जेव्हा शिष्य गुरुकृपेला पात्र ठरतो, तेव्हा त्याला गुरुकृपेचा लाभ होतो. त्याच्या दृष्टीने संसारसागर आटतो.

**गुरोः कटाक्षवेधेन शिवो भवति मानवः।**
**रसवेधाद् यथा लोहो हेमतां प्रतिपद्यते।।१७.६४।।**

गुरुकृपाकटाक्षाने सामन्य मनुष्य देखील शिवस्वरूप होतो हे सांगण्यासाठी येथे उदाहरण दिलेले आहे. लोखंडावर विशिष्ट वनस्पतींचा रस टाकून त्याचे सोने करण्याची प्रक्रिया किमयाशास्त्रात सांगितली आहे. लोखंडाचे सोने करण्याचे सामर्थ्य जसे वनस्पतीच्या रसात असते त्याप्रमाणे शिष्याला शिवरूप करण्याचे सामर्थ्य गुरूच्या कृपाकटाक्षात असते.

चोरी करण्याच्या उद्देशाने एक चोर राजमहालात शिरला. योगायोगाने ज्या महालात राजाराणी निद्रा करीत होते त्याच महालात तो पोहोचला आणि लपून राजाराणीचे संभाषण ऐकू लागला. दोघे आपल्या कन्येच्या लग्नाबद्दल बोलत होते. राजाला संस्कारसंपन्न जावई पाहिजे होता. ज्या राजपुत्रांनी राजकन्येला मागणी घातली होती ते संस्कारसंपन्न नव्हते. म्हणून राजा चिंताग्रस्त होता. राणी त्याला म्हणाली, ''महाराज, आपल्याला संस्कारसंपन्न

राजपुत्र मिळत नाही आणि जावई तर संस्कारसंपन्नच हवा आहे. मग आपण राजपुत्रांच्या मागे का लागतो? आपल्या राज्यात जे गुरुकुल आहे तिथे अनेक संस्कारसंपन्न ब्राह्मण तरुण आहेत. त्यांच्यापैकी एखादा वर का बरे निवडत नाही?''

राजाला राणीचे बोलणे मनोमन पटले. तो म्हणाला, ''तू म्हणतेस ते योग्य आहे. आपण दोन तीन दिवसांत गुरुकुलात जाऊन योग्य असा वर शोधून आणू.''

राजा-राणीचे संभाषण चोर ऐकत होता. त्याला वाटले की आपण चोरी करून राजाचे किती धन घेऊन जाणार? त्यातही सैनिकांच्या हाती सापडण्याची भीती आहे. त्यापेक्षा आश्रमात जाऊन एका कुटीत राहावे आणि राजाचा जावई होऊन सारे राज्य ताब्यात घ्यावे. नशीब अजमावून पाहायला काय हरकत आहे? असा विचार करून चोर निघून बाहेर पडला आणि गुरुकुलात पोहोचला. गुरुकुलात प्रत्येक शिष्याला ध्यानधारणा करता यावी यासाठी स्वतंत्र कुटी बांधून देण्यात आली होती. चोराचे नशीब बलवत्तर होते म्हणून त्यावेळी त्यापैकी एक कुटी रिकामी होती. गुरुकुलात सर्व साधक होते. ते ध्यानधारणेत इतके रमलेले होते की बाह्य घटना आणि हालचाली त्यांच्या लक्षात येणे शक्य नव्हते. याचाच फायदा चोराने घेतला आणि एका कुटीत निवांत राहू लागला. देखाव्यापुरती का होईना साधकाची दिनचर्या आचरू लागला. मात्र आतुर होऊन राजाच्या येण्याची वाट पाहत होता. ठरल्याप्रमाणे राजा, राणी आणि राजकन्या तिघेही गुरुकुलात आले. गुरूचे दर्शन घेऊन त्यांनी आपला मनोदय व्यक्त केला तेव्हा गुरू म्हणाले, ''गुरुकुलातील सर्व साधक विरक्त आहेत. त्यांपैकी कुणी राजकन्येशी विवाह करण्याचा संभव नाही. तरीदेखील आपण आलाच आहात तर प्रत्येक कुटीत जाऊन साधकाला विनंती करून पाहा. त्यांपैकी जर कुणी विवाह करण्याला तयार झाला तर त्याला इथे घेऊन या, मी आशीर्वाद देईन.''

राजा, राणी व राजकन्या तिघे मिळून एकेका कुटीत जाऊन विनंती करू लागले. परंतु प्रत्येक ठिकाणी त्यांना नम्रपणे नकार देण्यात आला. शेवटच्या कुटीत राहणारा चोर सर्वांवर नजर ठेवून होता. क्षणोक्षणी अस्वस्थ होत होता. त्याला वाटले की जर कुणी आधीच होकार दिला तर आपली संधी कायमची निघून जाईल. राजा निराश होऊन कुटीबाहेर पडला की चोराला आनंद होत असे. सर्व कुट्या शोधून झाल्या आणि राजा शेवटच्या कुटीकडे वळला. त्याच्या चेहऱ्यावर निराशेचे सावट आलेले होते. चोर मात्र मनातल्या मनात खूष होता. राजाने कुटीत प्रवेश करण्यापूर्वीच चोराने डोळे बंद करून ध्यानस्थ झाल्याचे ढोंग सुरू केले. तिघेही समोर येऊन बसल्याचे त्याला जाणवले. त्याने काही काळ आपले ढोंग चालूच ठेवले. थोड्या वेळाने डोळे उघडून राजाकडे आश्चर्याने पाहिले. राजाने सर्व साधकांना केलेली विनंती त्यालाही केली, तेव्हा सुरुवातीला थोडे आढेवेढे घेऊन त्याने अखेर राजाची विनंती मान्य केली.

राजाला मोठा आनंद झाला. तो कुलगुरूकडे येऊन म्हणाला, ''आपल्या एका शिष्याने माझी विनंती मान्य करून राजकन्येसोबत विवाह करायला होकार दिला आहे. गुरूंना मोठे आश्चर्य वाटले. त्यांनी शिष्याला आपल्या समोर घेऊन येण्यास सांगितले. चोर मनातून पार घाबरला होता. आपले पितळ उघडे पडेल अशी त्याला भीती वाटली. धैर्य एकवटून तो गुरूसमोर येऊन बसला. गुरू त्याच्याकडे त्याच्या डोळ्यांना डोळे भिडवून एकटक पाहात राहिले. हळूहळू गुरूचे योगसामर्थ्य त्याच्या देह-मनात प्रविष्ट होऊन त्याच्या ठायी वैराग्य उत्पन्न झाले. गुरूंनी त्याला विचारले, ''राजकन्येशी विवाह करण्यास तू तयार आहेस काय?'' तेव्हा त्याने दृढनिश्चयाने उत्तर दिले,

''नाही.'' गुरूच्या कृपादृष्टीने त्याचे सर्व पूर्वसंस्कार नष्ट होऊन तो वैराग्यसंपन्न झाला.

गुरुकृपाकटाक्षाचे असे महत्त्व आहे. लोहाचे सुवर्ण व्हावे त्याप्रमाणे गुरुकृपादृष्टीने सामान्य जीवाचे सोने होऊन जाते.

**न लंघयेद् गुरोराज्ञां ज्ञानमेव प्रकाशयन्।**
**शिवासक्तेन मनसा सर्वसिद्धिमवाप्नुयात्।।१७.६५।।**

शिष्याने गुरूच्या आज्ञेचे उल्लंघन कधीही करू नये. कारण गुरूच्या आदेशानेच त्याचे कल्याण होणार असते. शिवरूप गुरूच्या ठिकाणी दृढभक्ती ठेवल्यामुळे शिष्याला सर्वसिद्धी प्राप्त होतात.

**शिवादन्यज्जगन्मिथ्या शिवः संवित्स्वरूपकः।**
**शिवस्त्वमिति निर्दिष्टो गुरुणा मुक्त एव सः।।१७.६६।।**

गुरू शिष्याला उपदेश करतात की, हे जग शिवस्वरूप आहे. तू देखील चिद्रूप असल्यामुळे शिवस्वरूपच आहेस. असा ज्ञानोपदेश गुरूकडून शिष्याला प्राप्त होतो. ह्या गुरुपदेशाचे श्रवण करणारा शिष्य जीवन्मुक्त होतो. अर्थात् त्याला पुनर्जन्माचे भय राहत नाही. शेवटी या शिष्यस्थलाचा समारोप करताना ज. रेणुकाचार्य म्हणतात–

**गुरोर्लब्ध्वा महाज्ञानं संसारामयभेषजम्।**
**मोदते यः सुखी शान्तः स जीवन्मुक्त एव हि।।१७.६७।।**

गुरूने दिलेले ज्ञान हे संसाररूपी रोगावरचे औषध असते. पुन्हा पुन्हा जन्म घेणे आणि पुन्हा मरणे हा जीवात्म्याला झालेला एक मोठा रोग आहे. जन्म–मरणरूपी रोगाने जीवात्मा ग्रस्त झालेला असतो. जन्म–मरणाच्या चक्राला 'संसार' असे नाव आहे. संसाररोगापासून मुक्ती देणारे औषध म्हणजे गुरूचा उपदेश. या औषधामुळे शिष्याला शिवानंदाचा लाभ होतो आणि रागद्वेषविरहित होऊन तो जीवन्मुक्त होतो. संसारात सुखशांती मिळते, पण ती क्षणिक असते. परंतु ज्याला परमसुख आणि परमशांती हवी असते त्याने श्रीगुरूलाच शरण गेले पाहिजे. गुरूला सर्वस्व मानणारा शिष्यच सर्वोत्तम होय. अशी शिष्यलक्षणे आपल्या सर्वांच्या अंगी बाणावीत, असा आशीर्वाद देऊन आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

मुक्तिधाम, नाशिक रोड
८ नोव्हेंबर १९९४

## शुश्रूषुस्थल-१

जिज्ञासू सद्भक्तांनो,

गेले तीन दिवस शिष्य-लक्षणे सांगणाऱ्या शिष्यस्थलासंबंधी आपण बराच विचार केलेला आहे. यापुढचे अवांतरस्थल आहे शुश्रूषुस्थल. याविषयी प्रारंभीच ज. रेणुकाचार्य सांगतात-

**बोध्यमानः स गुरुणा परकायेन सर्वदा।**
**तच्छुश्रूषारतः शिष्यः शुश्रूषुरिति कीर्त्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.६८)

परब्रह्म अशा सद्गुरूकडून उपदेश घेणाऱ्या शिष्याला गुरुपदेश ऐकण्याची आसक्ती असते म्हणून त्याला 'शुश्रूषुस्थल' असे म्हटले आहे. श्रवणाविषयी जो अत्यंत आसक्त असतो तो शुश्रूषु. आत्मदर्शनाची इच्छा उत्पन्न झाल्यावर प्रथम काय करावे? उपनिषदे म्हणतात- 'श्रोतव्यः मंतव्यः निदिध्यासितव्यः।' सर्वप्रथम श्रवण केले पाहिजे. एका सुभाषितकाराने म्हटले आहे, 'श्रोत्रं श्रुतेनैव न कुंडलेन।'

कानाची शोभा कुंडले वापरण्यात नसून श्रवण करण्यात आहे. कानात सोन्याचे अलंकार तुम्ही घालता. परंतु ते अलंकार टिकणारे नसतात. आर्थिक अडचण आली तर ते विकावे लागतात. समजा आयुष्यभर अशी अडचण आली नाही तरी तुमच्या मृत्यूनंतर ते कानातून काढले जातात. हे अलंकार सदैव सोबत करीत नाहीत, परंतु तुम्ही जी श्रवणभक्ती करता, सद्ग्रंथाचे श्रवण करता, गुरूचा उपदेश ऐकता हा अलंकार मात्र मृत्यूनंतर देखील तुमची सोबत करतो. कानात अलंकार अवश्य घाला. परंतु त्याबरोबरच गुरूंचा उपदेश देखील कर्णात धारण करा. पाच ज्ञानेंद्रियांत नेत्र आणि कान ही दोन महत्त्वाची इंद्रिये आहेत. सतत काहीतरी पाहण्याची आणि सतत काहीतरी ऐकण्याची प्रबळ इच्छा मनुष्याच्या ठिकाणी असते. तुमच्या घरात पाहण्यासाठी आणि ऐकण्यासाठी काय कमी आहे बरे? दूरदर्शन रात्रंदिवस पाहता आणि ऐकता येते. त्यामुळे काही वेळ तुमचे मनोरंजन होऊन सांसारिक दुःखाचा विसर पडतो. परंतु काही काळपर्यंतच. दुःखनिवृत्तीसाठी संसार सोडणे हा उपाय नाही. तुम्ही घरदार, मुलेबाळे यांना सोडून जाल, परंतु तुमच्या कृतकर्मापासून कसे पळून जाल? ते तर सावलीसारखे तुमचा पाठलाग करत असते. घर सोडून दुःखापासून मुक्ती मिळत नाही. जेव्हा तुम्ही जागृत होता तेव्हा साऱ्या दुःखापासून मुक्ती मिळते. म्हणून 'भागना नही जागना' असे संतांनी सांगितले आहे. श्रीगुरू आपल्या अमृतोपदेशाने शिष्याला जागे करीत असतात. म्हणून शिष्याने गुरूचा उपदेश श्रद्धेने श्रवण केला पाहिजे. यासाठी उपनिषदांनी श्रोतव्यः- श्रवण करा- असा उपदेश केलेला आहे. गुरुपदेश म्हणजे अमूल्य रत्न होय. ते ज्याला प्राप्त होते त्याचे कल्याण होते. म्हणून श्रवणेंद्रिय श्रीगुरूला अर्पण करावे. नेत्रेंद्रिय आणि श्रवणेंद्रिय यांच्या द्वारेच सर्व बाह्यप्रपंच आपल्या मनात जाऊन बसतो. तुम्ही येथे प्रवचन ऐकायला आला आहात. तुमचे घर संपत्ती इ. सारे आहे त्या ठिकाणी आहे; परंतु त्यांच्याविषयी अभिमान तुम्ही इथेही सोबत घेऊन आला आहात. घर माझे आहे, माझ्याकडे एवढी संपत्ती आहे इत्यादी. याचा अर्थ वस्तू जशा बाहेर आहेत तशाच तुमच्या मनात देखील आहेत. वस्तू बाहेर असली तरी तिच्यावरचे ममत्व आणि अभिमान आमच्या मनात वसत असतो.

जेव्हा जीवात्मा इहलोक सोडून जातो तेव्हा घर-संपत्ती तर सोडाच, स्वतःचे शरीर देखील इथेच ठेवून जातो. त्याच्याविषयीची आसक्ती मात्र मनात घेऊन जातो. माणूस जेव्हा जन्म घेतो तेव्हा मूठ बांधून येतो आणि जाताना

मोकळ्या हाताने जातो, असे म्हटले जाते. याचा अर्थ असा की तो इथली कुठलीही भौतिक वस्तू सोबत नेऊ शकत नाही. परंतु आसक्तीचे गाठोडे मात्र मनात सोबत घेऊन जातो. आसक्तीमुळेच गेलेला पुन्हा या प्रपंचात जन्माला येतो. त्याने किती जन्म घेतले याची गणतीच नाही. नवा जन्म घेतल्यावर पूर्वजन्माचा मनुष्याला पूर्णत: विसर पडतो. पूर्वजन्माचे विस्मरण झाले नसते तर मनुष्याच्या मेंदूत प्रचंड गोंधळ झाला असता. भोगलेले पूर्वजीवन आणि भोगत असलेले नवे जीवन यांच्या चमत्कारिक गुंत्यात तो अडकला असता. त्यामुळे अनेक भानगडी उत्पन्न झाल्या असत्या. पूर्वजन्माचे पूर्ण विस्मरण होते म्हणूनच मनुष्य नवा जन्म सुखाने जगू शकतो. नाहीतर गेल्या जन्मातली आई या जन्मी मुलगी होऊन जर आईसारखी वागू लागली असती तर गोंधळच गोंधळ उडाला असता. पूर्वजन्माचे विस्मरण झाल्यामुळे समाजजीवनाचा गाडा सुरळीत चाललेला असतो.

ज्याक्षणी जीवात्मा शरीर सोडून जातो, त्याक्षणी त्याचे घर, संपत्ती, शेती सारे दुसऱ्याचे होऊन जाते. जोपर्यंत शरीरात प्राण आहे तोपर्यंत त्याचा सर्वांवर अधिकार असतो. एकदा प्राण निघून गेला की त्याचे स्वत:चे काही राहत नाही. ज्या शरीरातून तो गेला त्याच शरीरात पुन्हा येत नाही. जर असे घडले तर 'भूत भूत' म्हणून आपण ओरडत सुटतो. सांगण्याचे तात्पर्य असे की, जीव आहे तोपर्यंत सारे आपले. जीव गेला की दुनिया बुडाली. 'आप मरे दुनिया डुबी।' जन्म-मरणातून मुक्ती हवी असेल तर सद्गुरूचा उपदेश श्रवण केला पाहिजे. संसाराला आतापर्यंत कान दिलेले असतात. आता कान गुरूला द्या. गुरू उपदेश कानामध्येच करत असतात. 'कान फुंकणे' याचे दोन अर्थ भाषेत प्रचलित आहेत. कान फुंकले म्हणजे गुरूने मंत्र उपदेश केला, असा एक अर्थ होतो; तर काही वेडेवाकडे शिकवणे असा दुसरा अर्थ होतो. सासूला नेहमी असे वाटत असते की आपली शेजारीण आपल्या सुनेचे कान फुंकते. परंतु श्रीगुरू कान फुंकून शिष्याला बिघडवत नाहीत तर घडवतात. शिष्याच्या कानात ते तारक मंत्र सांगतात.

गुरूचा उपदेश हा मंत्ररूप असतो. 'मंत्रमूलं गुरोर्वाक्यम्।' गुरूच्या मुखातून जे शब्द बाहेर पडतात ते मंत्रच असतात. म्हणून गुरूचे वाक्य लक्ष देऊन श्रद्धेने ऐकावे लागते. ह्या कानाने ऐकून त्या कानाने सोडून देण्यासारखे गुरूचे वाक्य नसतात. तुम्ही सगळे येथे मुक्तिधामात बसून रोज प्रवचन ऐकता. घरी गेल्यावर त्यापैकी किती तुमच्या आठवणीत राहते? हे आपल्या मनाला विचारून पाहा. आपलीही अवस्था 'इकडून तिकडे गेले वारे' अशीच असते.

एका राजाकडे एक मूर्तिकार आला त्याने हुबेहूब माणसासारख्या तीन मूर्ती दाखवल्या. तो राजाला म्हणाला, ''महाराज, ह्या तिन्ही मूर्त्या अगदी सारख्याच आहेत, परंतु त्यांच्यात एक सूक्ष्म फरक आहे. त्यामुळे यांपैकी एका मूर्तीची किंमत एक रुपया, दुसरीची शंभर रुपये आणि तिसरीची एक लाख रुपये आहे. कोणती मूर्ती किती किंमतीची आहे, हे आपल्या दरबारातील विद्वानांनी ओळखून सांगावे.''

राजाला आश्चर्य वाटले. त्याने दरबारातील विद्वानांना आवाहन केले. त्यानुसार सगळ्या विद्वानांनी त्या मूर्त्यांची बारकाईने पाहणी केली. परंतु त्यांना त्याच्यात काहीही फरक आढळला नाही. त्या दरबारात एक वृद्ध गृहस्थ होता. तो म्हणाला, ''महाराज, मला मूर्तीची तपासणी करू द्या. मी त्याच्यातील फरक सांगेन.''

राजाने त्याला संधी दिली. त्या गृहस्थाने हातभर लांबीची लोखंडी तर मागवून घेतली. ती त्याने एका मूर्तीच्या कानात घातली तेव्हा ती तिच्या दुसऱ्या कानातून बाहेर आली. तो वृद्ध राजाला म्हणाला, ''महाराज, ही मूर्ती एका कानाने ऐकून दुसऱ्या कानाने सोडून देणारी आहे. म्हणून हिची किंमत फक्त एक रुपया आहे.''

नंतर त्याने दुसऱ्या मूर्तीच्या कानात तार घातली, तेव्हा ती तिच्या तोंडातून बाहेर आली. तेव्हा तो म्हणाला,

''महाराज, ही मूर्ती कानाने जे ऐकते ते पटकन तोंडाने बोलून टाकते. म्हणून हिची किंमत फक्त शंभर रुपये आहे.''

शेवटी त्याने तिसऱ्या मूर्तीच्या कानात तार घातली. तेव्हा ती मूर्तीच्या दुसऱ्या कानातून किंवा तोंडातून बाहेर आली नाही. ती आतच गडप झाली. वृद्ध म्हणाला, ''महाराज, ही मूर्ती कानाने जे ऐकते ते आपल्या हृदयात जतन करून ठेवते, म्हणून हिची किंमत एक लाख रुपये आहे.''

वृद्धाच्या मूर्तिपरीक्षेमुळे राजा खूष झाला आणि मूर्तिकारालाही समाधान वाटले. आमच्यासमोर तुमच्या रूपाने अनेक मूर्त्या बसलेल्या आहेत. आपली किंमत किती आहे- एक रुपया, शंभर रुपये, एक लाख- हे घरी जाऊन तुम्हीच ठरवा. काहीजण इथे प्रवचन ऐकून इथेच सोडून देतात. काहीजण प्रवचनात काय काय सांगितले, हे आठवणीने सांगतात आणि नंतर विसरतात. काहीजण प्रवचनात जे ऐकतात ते आपल्या मनात ठेवून त्याचे मनन करतात.

श्रवणानंतर मनन केले पाहिजे. जे ऐकले त्यावर वारंवार विचार करणे याला मनन म्हणतात. मननामुळे ज्ञान दृढ होते. ऐकल्यावर 'मनन' करतो तो खरा श्रोता. वडिलांनी मुलाला ''जा दुकानातून साखर आण.'' असे सांगितले आणि त्यानंतर मुलगा तिथेच बसून राहिला तर त्याच्या ऐकण्याचा फायदा काय? तो फक्त ऐकतो, कृती मात्र काही करत नाही. आपलेही श्रवण असे असेल तर काय कामाचे? गीतेचा उपदेश केल्यावरदेखील अर्जुन स्वस्थ बसलेला पाहून श्रीकृष्णाला विचारावे लागले, ''मी जे सांगितले ते तू नीट ऐकले आहेस ना? तुझ्या ठिकाणी असलेली क्षात्रवृत्ती जागी व्हावी. तू हाती शस्त्र घेऊन युद्ध करावे यासाठीच तर मी गीता सांगितली आहे.''

हे ऐकल्यावर अर्जुन उठून म्हणाला, ''होय, तुझे बोलणे मी लक्षपूर्वक ऐकले आहे. तुझ्या सांगण्याप्रमाणे मी वागणार आहे- करिष्ये वचनं तव।'

याप्रमाणे आपण लक्षपूर्वक गुरुपदेश ऐकला पाहिजे. त्याचे मनन केले पाहिजे आणि नंतर आचरण. चोरी करू नये, असत्य बोलू नये अस उपदेश ऐकून देखील माणसावर काही परिणाम होत नाही. ते याच जन्मात नव्हे तर गेल्या अनेक जन्मांत हेच ऐकत आलेले असतात. परंतु त्यांच्यावर त्याचा काहीही परिणाम झालेला नसतो. जो उत्तम शिष्य असतो तो लक्षपूर्वक गुरुपदेश श्रवण करतो, त्याचे मनन करतो आणि त्यानुसार आचरण करतो. गुरुजवळ गेल्यावर काय विचारावे, कसा प्रश्न करावा, हे पुढील श्लोकात सांगतात:-

**किं सत्यं किं नु वासत्यं क आत्मा क: पर: शिव:।**
**इति श्रवणसंसक्तो गुरो: शिष्या विशिष्यते।।१७.६९।।**

सत्य काय? असत्य काय? आत्मा कोण आणि परमात्मा कोण? असे प्रश्न शिष्याने गुरूला विचारावेत. गुरूला काही व्यावहारिक गोष्टी विचारू नयेत काय? असा प्रश्न कोणाला पडेल. तर त्या अवश्य विचाराव्यात. परंतु केवळ तेवढ्यावरच थांबू नये. संसाराविषयी गुरूचे मार्गदर्शन मिळावे परंतु संसार अनित्य आहे हेदेखील जाणून घ्यावे. सत्य आणि असत्य, नित्य आणि अनित्य याचे मिश्रण करून परमेश्वराने ते आपल्यासमोर ठेवलेले आहे. बाजारातून तुम्ही धान्य आणता. त्यात व्यापाऱ्याने भेसळ केलेली असते. तुम्ही ते निवडता. त्यातले खडे बाजूला काढता आणि मग ते शिजवता. धान्यातले खडे कसे काढावेत याचे ज्ञान तुम्हाला असते. याचप्रमाणे संसार करीत असताना सत्य काय, असत्य काय, नित्य काय, अनित्य काय याचा निवाडा करावा लागतो.

प्रपंचात दोन्ही गोष्टी आहेत. सत्य असा आत्मा आहे आणि असत्य असे शरीरदेखील आहे. परमात्मा सत्य

आहे आणि संसार असत्य आहे. शरीर असत्य का आहे? तर जन्माआधी तुम्हाला शरीर नव्हते आणि मृत्यूनंतर ते राहणार नाही. केवळ जन्मापासून मृत्यूपर्यंत शरीर तुम्हाला चिकटलेले असते. त्याच्या अलीकडे आणि पलीकडे ते नसते. म्हणून ते असत्य होय. परंतु अनेक शरीरे धारण करणारा आत्मा मात्र सत्य आहे. कारण शरीर असो अथवा नसो आत्मा मात्र अस्तित्वात असतो. शरीराला वस्त्राची उपमा देऊन गीतेने हा विचार अतिशय सुंदर रीतीने प्रतिपादन केलेला आहे. शरीर हे एक वस्त्र आहे. वस्त्र नवे असते तेव्हा ते मोठे छान असते. परंतु पुढे वापरल्यानंतर ते मळत जाते, जीर्ण होत जाते. त्याप्रमाणे देहदेखील नवा असतो तेव्हा ताजा टवटवीत दिसतो. परंतु पुढे हळूहळू तो जीर्ण होत जातो. टाकून देण्याच्या लायकीचा होतो.

**अंगं गलितं पलितं मुंडं दशनविहीनं जातं तुंडम्।**
**वृद्धो याति गृहीत्वा दंडं तदपि न मुंचति आशापिंडम्।।**

असे शंकराचार्यांनी वृद्ध शरीराचे वर्णन केलेले आहे. गात्रे थकली, डोके पांढरे झाले, तोंडातले दात गेले असा वृद्ध हाती काठी घेऊन चालत असला तरी त्याच्या आशा सुटलेल्या नसतात. बालपणाचे ताजे टवटवीत शरीर म्हातारपणी कसे कळाहीन होऊन जाते, याचा आपल्याला अनुभव येत असतो. एकाच मनुष्याचे बालपणी काढलेले छायाचित्र म्हातारपणी काढलेल्या छायाचित्राजवळ ठेवून पाहिले तर एका शरीरात किती फरक पडला हे लक्षात येईल. अशी शरीरे आपण किती बदलली कुणास ठाऊक! म्हणून एका जन्मात आपले शरीर श्रीगुरूला अर्पण केले पाहिजे. शरीर हे असत्य आहे.

श्रीगुरूला विचारले पाहिजे परमात्मा कोण आहे? तेव्हा श्रीगुरू सांगतील की परमात्मा सर्व चराचरात व्यापून आहे आणि तुझा आत्मा म्हणजे त्याचाच अंश आहे. मनुष्याला शरीराविषयी अभिमान वाटत असतो. त्यामुळे त्याला दु:ख भोगावे लागते. शरीर हे दु:खाचे मूळ असले तरी शरीर सोडून द्यायचे मात्र नसते. सोडायचा असतो तो शरीराचा अभिमान. या मांसल शरीरात अमृतमय असा आत्मा नांदत असतो. म्हणून गुरूला हे प्रश्न विचारून त्यांची उत्तरे नीट समजावून घेतली पाहिजेत.

**श्रुत्वा श्रुत्वा गुरोर्वाक्यं शिवासाक्षात्क्रियावहम्।**
**उपशाम्यति य: स्वान्ते स मुक्तिपदमाप्नुयात्।।१७.७०।।**

गुरूजवळ जाऊन त्यांचा उपदेश पुन्हा पुन्हा श्रवण केला पाहिजे. जोपर्यंत ज्ञान दृढ होत नाही तोपर्यंत गुरुपदेश पुन्हा पुन्हा ऐकला पाहिजे. तुम्ही जेवण करता तेव्हा किती काळ खात असता? पोट भरेपर्यंत. तृप्त होईपर्यंतच मनुष्य खात असतो. तहान भागेपर्यंत तृषार्त मनुष्य पाणी पित असतो. काय खातो? किती खावे? याचे आपल्याला चांगले ज्ञान असते. परंतु गुरूचा उपदेश किती ऐकावा याविषयी काही माहीत नसते. गुरूचा उपदेश वारंवार ऐकावा. आत्मज्ञान होईपर्यंत श्रवण करावा. जागे झाल्यापासून झोपेपर्यंत ऐकावा. जन्म झाल्यापासून मरेपर्यंत ऐकावा. जोपर्यंत श्रवण करण्याची शक्ती आहे तोपर्यंत ऐकावा. एवढेच नाही तर आत्मज्ञान झाल्यावर देखील ऐकावा. जो गुरुपदेश ऐकतो त्याला शिवसाक्षात्कार होऊन अपार शक्तीचा लाभ होतो. सांसारिक गोष्टी ऐकून आपले मन अशांत झालेले आहे. ते शांत होण्यासाठी गुरूचा उपदेशच ऐकला पाहिजे.

असाच नवरात्रोत्सव एका गावात सुरू होता. गुरूच्या उपदेशाने संसारातून सुटका होते असा उपदेश प्रवचनकाराने रंगवून, फुलवून सांगितला. त्याचा श्रोत्यांवर खूप प्रभाव पडला. श्रोत्यांपैकी दोघेजण याच विषयाची चर्चा करीत घराकडे निघाले. एका श्रीमंताच्या दारात पिंजरा टांगलेला होता. त्या पिंजऱ्यातल्या पोपटाने दोघांचे बोलणे

ऐकले. त्याला वाटले की गुरूच्या उपदेशाने जर संसारातून सुटका होते तर या पिंजऱ्यातून का बरे होऊ नये? आपल्यासाठी गुरू काही उपदेश करू शकतील काय? पोपटाने त्या दोघांना बोलावून विचारले, ''तुम्ही गुरूच्या उपदेशाचे महत्त्व सांगत होतात ते मी ऐकले. गुरूच्या उपदेशाने माझी पिंजऱ्यातून सुटका होईल काय?''

''ते आम्हाला सांगता यायचे नाही.'' एकजण म्हणाला.

''मग उद्या तुम्ही प्रवचन करणाऱ्या गुरूंना माझ्यासाठी काय उपदेश आहे ते विचारून याल काय?'' पोपटाने विचारले.

''होय.'' असे सांगून ते दोघे घरी गेले. दुसऱ्या दिवशी प्रवचन संपल्यावर सगळेजण निघून गेले तरी ते दोघेजण तिथेच थांबले. तेव्हा प्रवचनकाराने त्यांना थांबण्याचे कारण विचारले. तेव्हा त्यांनी पोपटाची कहाणी सांगितली. त्याची पिंजऱ्यातून सुटका होण्यासाठी उपदेश द्या, अशी विनंती केली. ती ऐकून गुरू विचारात पडले. डोळे बंद करून ध्यान करू लागले. अचानक तोल जाऊन खाली पडले.

ते दोघेजण घाबरले. अचानक गुरूंना काय झाले हेच त्यांना कळेना. यांना काही झाले तर आपल्यावर बोल येईल या भीतीने ते तेथून बाहेर पडले आणि घाबरलेल्या मन:स्थितीत घराकडे जाऊ लागले. रस्त्यात पोपटाने त्यांना हाक मारली, तो त्यांना म्हणाला,

''माझ्यासाठी गुरूने उपदेश दिला काय?''

''कसला उपदेश अन् काय? तुझ्यासाठी उपदेश करा असे सांगितल्यावर ते जीव गेल्याप्रमाणे खाली पडले आणि आम्ही घाबरून निघून आलो.''

एवढे बोलून ते तेथून निघून गावाबाहेरच्या एका झाडाखाली जाऊन बसले. दोघे विचार करत होते. गुरूला काय झाले असावे? असा बराच काळ गेला. त्यांना झाडावर पोपटाचा आवाज ऐकू आला.

''सद्‌गृहस्थांनो, मी तुमचा फार ऋणी आहे.''

त्यांनी आश्चर्याने वर पाहिले तर पिंजऱ्यातला पोपट झाडाच्या फांदीवर बसून बोलत होता. दोघांनी विचारले, ''तू इथे कसा काय? पिंजऱ्यातून कसा काय सुटलास?''

''भल्या माणसांनो'', पोपट म्हणाला, ''तुम्ही माझा प्रश्न विचारल्यावर गुरू निश्चेष्ट पडले. हा माझ्यासाठी उपदेशच होता. तो तुम्हाला समजला नाही पण मला बरोबर समजला. मी पिंजऱ्यात काही हालचाल न करता जीव गेल्याप्रमाणे पडून राहिलो. तेव्हा मालकाने मी मेलो असे समजून मला पिंजऱ्याबाहेर काढून फेकून दिले. त्याने फेकल्याबरोबर मी हा इथे तुमच्यासमोर आलो.''

गुरूचा उपदेश असा असतो. कधी ते शब्दाने बोलतात तर कधी शरीराने कधी त्यांचे बोलणे स्पष्ट असते तर कधी सूचक. म्हणून शिष्याने गुरूचा उपदेश अत्यंत ध्यान देऊन ऐकला पाहिजे. जोपर्यंत मी शिव आहे असा साक्षात्कार होत नाही तोपर्यंत श्रवण करावा. सांसारिक गोष्टी कितीही ऐकल्या तर त्यामुळे संसारात अधिकाधिक फसाल पण गुरुपदेश ऐकाल तर संसारमुक्त व्हाल. तुम्हीही अशी श्रवणभक्ती करावी, असा आशीर्वाद देऊन आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

मुक्तिधाम, नाशिक रोड
९ ऑक्टोंबर १९९४

# शुश्रूषुस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शब्दामुळेच मनुष्य घडतो आणि शब्दामुळेच मनुष्य बिघडतो. शास्त्रांचे शब्द ऐकून शास्त्रविहित वर्तन केले तर मनुष्याचे जीवन सुसंस्कारसंपन्न होते. सांसारिक शब्दांनी मात्र मनुष्य बिघडण्याचीच शक्यता असते. पाणी उताराकडे वाहते त्याप्रमाणे शास्त्रनिषिद्ध कर्मे करण्याकडे मनुष्याचा कल असतो आणि पाणी उंचवट्याकडे नेण्यासाठी खास प्रयत्न करावे लागतात, त्याप्रमाणे सत्प्रवृत्ती वाढण्यासाठी अधिक कष्ट घ्यावे लागतात. शेतात गवत आपोआप उगवते, पेरावे लागत नाही. परंतु जे पीक घ्यायचे असते ते प्रयत्नपूर्वक पेरून त्याची काळजी घ्यावी लागते. दुष्प्रवृत्ती आणि सत्प्रवृत्ती यांच्या बाबतीत देखील असे आहे. वाममार्गाकडून सन्मार्गाकडे जाण्यासाठी किती कष्ट पडतात याची साधकाला जाणीव असते. 'पद्मासनावर बसून जप करा' असे तुम्हाला सांगितले तर एक हजार जप होईपर्यंत तुमचे मन कुठे कुठे भटकून आले हे तुमच्या ध्यानात येईल. आपले मन वाटेल तसे भटकत जाते परंतु त्याला रोखण्याचा थोडा देखील प्रयत्न आपण करत नसतो. मनाप्रमाणे तुम्ही वागलात तर ठीक. त्याच्याविरुद्ध तुम्ही वागायला सुरुवात केली तर मन त्रास देऊ लागते. केवळ बुद्धीनेच मनावर नियंत्रण ठेवता येणे शक्य आहे.

नाभी, हृदय आणि बुद्धी ही शरीरातील तीन केंद्रे महत्त्वाची आहेत. मूल जेव्हा गर्भात असते तेव्हा त्याच्या नाभीला जोडलेल्या नाळेतून अन्नद्रव्य पोहोचवले जाते. त्यावेळी नाभीकेंद्र महत्त्वाचे असते. जन्मानंतर मुलाचा आईच्या हृदयाशी संबंध येतो. ते दूध पिऊ लागते. त्यामुळे त्याचेही हृदय जणू विशाल होते. आई मुलाला दुधासोबत ममतादेखील पाजत असते. लहान मुलाच्या ठिकाणी इतके प्रेम भरलेले असते की त्याला पाहताच आपल्या मनात प्रेमाला भरते येते. मग ते मूल आपले असो की दुसऱ्याचे. मूल मोठे झाल्यावर त्याचा बुद्धिविकास होऊ लागतो. मग त्याचा संबंध बुद्धीशी येतो. बुद्धिविकासासाठीच त्याला शाळा-कालेजात पाठवले जाते. अक्षरओळख करून घेऊन विश्वविद्यालयाची अंतिम पदवी तो संपादन करतो. त्याने संपादन केलेली विद्या ही लौकिक विद्या असते. परंतु लौकिक विद्या पुरेशी नसते. शरीराशी संबंधित अशा सर्व गोष्टी माहीत असल्या आणि शरीराचे खूप कोडकौतुक केले तर तेवढ्याने भागत नाही.

एका संताने एकदा एका माणसाला विचारले, ''तू काय करतोस?''

''मी कॉलेजात प्राध्यापक आहे.'', त्याने उत्तर दिले.

''तू पुढे काय करशील?''

''लग्न.''

''त्यापुढे?''

''मुलांचे संगोपन.''

''त्यापुढे?''

''मुलांना शिक्षण देईन.''

''त्यापुढे?''

"मुलासाठी नोकरी पाहीन."

"त्यापुढे?"

"मुलाचे लग्न करीन."

"त्यापुढे?"

त्या गृहस्थाने उत्तर दिल्यावर संत सारखा "त्यापुढे? त्यापुढे?" असे विचारत होता. शेवटी कंटाळून त्या गृहस्थाने म्हटले.

"मरून जाईन."

"त्यापुढे?", संताने पुन्हा प्रश्न केला.

"मरेपर्यंतच तर सारे करायचे असते. त्यापुढे काय आहे हे कुणाला माहीत असते?" गृहस्थ म्हणाला.

संत म्हणाला, "तू जी विद्या संपादन केली आहेस तिचा उपयोग मृत्यूपर्यंतच होऊ शकतो. तू अध्यात्मविद्या मिळवली नसल्याने मृत्यूनंतर काय होते याची तुला कल्पना नाही."

जीवनात आपल्याला अनेक गुरू मिळतात. प्राथमिक शाळेत, माध्यमिक शाळेत, कॉलेजात, विद्यापीठात. बऱ्याच गुरूंशी आपला संबंध येत असतो. याशिवाय उद्योग-व्यवसायात लौकिक जीवनात अनेक गुरू मिळतात. चांगली विद्या असो की चोरी करण्याची विद्या असो, ती शिकवणारा एखादा गुरू असतोच. परंतु या साऱ्या विद्या लौकिक जीवनात सुख देण्यासाठी आणि उदरभरणासाठी असतात. परंतु केव्हा ना केव्हातरी शरीराचा त्याग करून जावेच लागते. त्यानंतर आपले काय होते? हे जाणण्यासाठीच तर सद्गुरूकडे जावे लागते. तोच विचार आपण या ठिकाणी करत आहोत.

**न बुध्यति गुरोर्वाक्यं विना शिष्यस्य मानसम्।**<br>
**तेजो विना सहस्रांशोः कथं स्फुरति पंकजम्।।**<br>
**सूर्यस्योदयमात्रेण सूर्यकांतः प्रकाशते।**<br>
**गुरोरालोकमात्रेण शिष्यो बोधेन भासते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.७१, ७२)

गुरूजवळ गेल्यानंतर शिष्याच्या बुद्धीचा कसा विकास होतो, हे दोन उदाहरणे देऊन सांगितले आहे. सूर्याच्या किरणांच्या स्पर्शाने कमळ उमलते आणि सूर्यप्रकाशात सूर्यकांत मण्यातून अग्नी प्रकट होतो. सूर्यकांत आणि चंद्रकांत मणी हे प्रत्यक्षात कुणी पाहिलेले नाहीत. प्राचीन साहित्यात त्यांची वर्णने आलेली आहेत. चंद्रकांतमणी चंद्रप्रकाश पडल्यावर वितळतो तर सूर्यकांत मण्यावर सूर्यप्रकाश पडल्यावर त्यातून अग्नी प्रकट होतो. एखादे जाड काचेचे भिंग घेऊन जर तुम्ही सूर्यप्रकाशात धरले तर काचेतून पलीकडे गेलेला सूर्यप्रकाश एका विशिष्ट ठिकाणी केंद्रित होतो. काचेतून गेलेली सूर्यकिरणे त्या ठिकाणी एकवटतात. त्या केंद्रस्थानी जर एखादे वस्त्र अथवा कापूस ठेवला तर तो पेटतो. असेच काहीसे सूर्यकांत मण्याचे रूप असावे. रात्रीच्या अंधारात मात्र तो मणी तळपत नाही. कमल विकसित होण्यासाठी आणि सूर्यकांत मणी प्रकाशित होण्यासाठी सूर्याची गरज असते त्याप्रमाणे शिष्याची बुद्धी प्रकाशित होण्यासाठी गुरुपदेशाची आवश्यकता असते.

कमळाचे उदाहरण विकसित होण्याचे आहे तर सूर्यकांत मण्याचे प्रकाशित होण्याचे आहे. बुद्धी विकसित व्हावी आणि ती ज्ञानाने प्रकाशित व्हावी. प्रपंचाने आपल्या बुद्धीचा विकास होत नाही आणि त्याने बुद्धी

प्रकाशितही होत नाही. प्रपंचातील सर्व सुखसाधने मिळाली तरी मनुष्याला पूर्ण सुख लाभत नाही. म्हणून प्रपंचाने मन विकसित होत नाही. ज्यामुळे मन विकसित आणि प्रकाशित होते असा केवळ परमात्माच आहे. गुरूच्या उपदेशाने बुद्धी विकसित आणि प्रकाशित होते. मग त्याला संसाराचे अनित्यत्व आणि आत्म्याचे नित्यत्व जाणवते. प्रपंच जड आहे तर परमात्मा चेतन आहे. जडाचे चिंतन केले तर बुद्धी जड होते आणि परमात्म्याचे चिंतन केले तर ती चैतन्यमय होते. चैतन्याचा थोडा अनुभव आला तरी मन प्रसन्न होते. गाढ निद्रेत जागृती व स्वप्न नसते. त्यावेळी मनुष्य आत्म्याच्या जवळ जात असतो. तेथे प्राप्त होणारा आनंद माणसाला उल्हासित, प्रफुल्लित करतो. गुरुपदेशाने शिष्याचे हृदय असे प्रफुल्लित आणि प्रकाशित होत असते. शिष्याने हात जोडून गुरूसमीप जावे आणि अद्वैताचा परमानंद कसा मिळेल? असा त्यांना प्रश्न करावा. त्यावर त्यांनी सांगितलेला उपाय ऐकावा.

**किं तत्त्वं परमं ज्ञेयं केन सर्वे प्रतिष्ठता:।**
**कस्य साक्षात्क्रिया मुक्तिः कथयेति समासतः।।१७.७४।।**

गुरूजवळ जाऊन त्यांना तीन प्रश्न विचारावेत. ज्याला जाणल्याने परमसुख प्राप्त होते असे सर्वश्रेष्ठ तत्त्व कोणते? या सर्व प्रपंचाचा आधार कोणता? कोणाच्या साक्षात्काराने जीवात्म्याला मुक्ती मिळते? गुरूंना असे प्रश्न विचारल्यावर पहिल्या प्रश्नाचे गुरू उत्तर देतात.

**इति प्रश्ने कृते पूर्वं शिष्येण नियतात्मना।**
**ब्रूयात् तत्त्वं गुरुस्तस्मै येन स्यात् संसृतेर्लयः।।१७.७५।।**

जो परमतत्त्वाविषयी प्रश्न करतो त्यालाच त्या तत्त्वाविषयी सांगितले पाहिजे. सामान्य माणसे गुरूजवळ येऊन सांसारिक समस्येबद्दल प्रश्न विचारतात. गुरूने तत्त्वज्ञान सांगायला सुरुवात केली तर त्यांना झोप येऊ लागते. ज्या ठिकाणी प्रवचन सुरू असते त्या ठिकाणी एक दोन माणसे तरी झोपलेली असतात. प्रवचनात सांगितलेले न कळल्यामुळे त्यांना झोप आलेली असते. प्रवचन ऐकताना आनंद होतो हे जेवढे खरे तेवढेच प्रवचन सुरू असताना झोपी जाण्यात आनंद असतो, हेही खरेच. घरी काही भानगडी करीत बसण्यापेक्षा प्रवचनाला येऊन झोप घेणे चांगलेच म्हटले पाहिजे. काही महाभाग तर प्रवचन चालू असताना ह्याला चिमटा घे, त्याला चिमटा घे; अशा कुरापती करीत असतात. कुठेही गेला तरी माणसाचा स्वभाव बदलत नाही हेच खरे. सत्संगात आल्याने तुमचा फायदाच होतो. प्रवचन समजले तरी सुख मिळते आणि झोप आली तरी सुखच मिळते.

प्रपंचाविषयी मनुष्य बरेच काही जाणत असतो. तरीदेखील त्याच्या दृष्टीने अज्ञात असे बरेच काही असते. एखाद्याला सतत प्रश्न विचारले आणि त्याचे उत्तर तो देत राहिला तर कधीतरी तो निरुत्तर होतो. समजा एखाद्याला विचारले- ''तुझ्या वडिलांचे नाव काय?'' तर तो नाव सांगेल. याप्रमाणे आजोबांचे, पणजोबांचे, खापरपणजोबांचे नाव विचारल्यावर तो कदाचित सांगू शकेल. पण खापरपणजोबाच्या बापाचे नाव विचारले तर त्याला ''मला माहीत नाही'' असे उत्तर द्यावे लागेल. कुठल्याही वस्तूबद्दल असे प्रश्न विचारल्यावर शेवटी अज्ञानच हाती येते. म्हणून अशा एका तत्त्वाला जाणावे की ज्यामुळे सर्व प्रपंचाचे ज्ञान होईल. परमात्मा हे असे तत्त्व आहे. त्याला जाणले तर सर्व काही जाणल्यासारखे होते आणि त्याचे ज्ञान नसेल तर सर्व विश्वाचे ज्ञान असून देखील नसल्यासारखेच असते. आपण एखाद्या बावळटाला मूर्खशिरोमणी असे म्हणत असतो, मृत्यूच्या क्षणी कोठे जायचे? कसे जायचे? याचे ज्ञान कुणालाच नसते. ज्याला जगाने 'मूर्ख' ठरवले अशा माणसाला नसते आणि

जगाने 'पंडित' म्हणून गौरव केला अशा विद्वानालाही नसते. मृत्यूच्या क्षणी सगळेच एका पातळीवर येतात. सगळेच मूर्ख ठरतात. परमतत्त्वाचे ज्ञान जोपर्यंत आपल्याला होत नाही, तोपर्यंत ही पदवी आपल्याला चिकटलेली असते. शिष्याने परमतत्त्व कोणते? असा प्रश्न विचारल्यावर गुरू सांगतात–

**शिव एव परं तत्त्वं चिदानन्दसदाकृतिः।**
**स यथार्थस्तदन्यस्य जगतो नास्ति नित्यता।।१७.७६।।**

या प्रपंचात भगवान शिव हेच एक परमतत्त्व होय. वीरशैवसिद्धान्तात प्रपंच तत्त्वात्मक आहे, असे मानले जाते. पंचमहाभूते म्हणजे पाच तत्त्वेच होत. पृथ्वीतत्त्व, आपतत्त्व, तेजतत्त्व, वायुतत्त्व आणि आकाशतत्त्व ही तत्त्वे होत. एकापेक्षा दुसरे मोठे आहे. आकाश हे पहिल्या चार तत्त्वांपेक्षा अधिक व्यापक तत्त्व आहे. आकाशापेक्षा अधिक व्यापक तत्त्व म्हणजे परमात्वतत्त्व आहे. त्या परमतत्त्वातूनच आकाश निर्माण झाले आणि आकाशातून पुढली चार तत्त्वे उत्पन्न झाली. हा परमात्मा कसा आहे? तर सच्चिदानंदरूप आहे. सत् म्हणजे नित्य अस्तित्व असलेला, चित् म्हणजे प्रकाशमय, आणि आनंद म्हणजे परमसुख देणारा. प्रपंच नित्य नाही. त्याचे अस्तित्व काही काळापुरते असते. आपण एखादे घर बांधतो. त्या घराला एक आयुष्य असते. त्यानंतर ते घर पडते. याचा अर्थ घर बांधण्यापूर्वी ते अस्तित्वात नव्हते आणि पडल्यानंतर ते अस्तित्वएधन्य क्वजतज. च्छंचचचठ अउद्गृथच अचणि च्छंचचतठउ च्त्यजक छदचथर्चंचठ अउद्गृथच अएठच अत्र्कतज. छअंतथ छअमचत्ट्यचचज अझदृतत्ऊ मचत्र त्रिकचउबचधित अत्र्कतज.

च्छंच जड अचक्ज तअ छअमचत्मच च्कचएण छ अचक्ज. अचत्रठच्यच अंधचअचत अचछत्यचउच कचक्ठ दित्र्कत नचक्ठ. छअंतथ दृउन्नचत मचत्र अचछत्यचउच त्र्क्वअज कचक्ठ दित्र्कत अत्र्कतज. तिथज त्र्क्ष्यर्य-चंद्र नत्र्कतचत. तअठ कत्र्क्ज दित्र्कतज? तअ त्यच ठिकचणठ अचछत्यच अचत्ट्यचच्यच च्कचएचत अचछण त्र्क्वअज छ्चक्तचज. त्र्क्ष्यर्य–तचड्ड्यचंनच च्कचएित कअणचअच छअमचत्मच च्कचएण छ अचक्ज. छअमचत्मच अचनंदण छ अचक्ज. च्छंचचत दन्न:ख अचक्ज तअ छअमचत्ट्यचत अचनंद अचक्ज. त्यच अचनंदत्र्क्वगअचचठ त्र्क्वमचन्य मचणत्र्क्वउच कत्छनचदजखठउ कअतच यजणचअ नचक्ठ. च्छंच अनित्य अचक्ज. त्यचच्यचत गणचजगणठ छिअर्ऊन क्वजत अत्र्कतज. मनथत्यचचच दजकजत्र्क्व कचउ अत्र्कतचज तत्र्क्व अचज नत्र्कतचज. छअंतथ छअमचत्मच मचत्र झदृथअ अचक्ज, नित्य अचक्ज. एित्यचनज ङजद्र तत्ऊ कचजणतज अत्र्क्ज उिन्वचअत्यचऊअ गुरू शिवतत्त्वाची महती सांगत असतात. शिवतत्त्वातूनच सर्व तत्त्वे उत्पन्न झाली आणि शेवटी ती त्यातच विलीन होणार आहेत, म्हणून शिवतत्त्व हे परमतत्त्व होय. ते जाणल्याने परिपूर्ण ज्ञान होते, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

मुक्तिधाम, नाशिक रोड
१० नोव्हेंबर १९९४



# शुश्रूषुस्थल–३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

शिष्य श्रीगुरूजवळ जाऊन तीन प्रश्न विचारतो, हे आपण काल ऐकले आहे. या तीन प्रश्नांची उत्तरे मिळाल्यावर पुढे प्रश्नच उत्पन्न होत नाहीत. प्रपंचात आल्यावर कोणते तत्त्व जाणावे? हा पहिला प्रश्न आहे. याचे थोडे उत्तर तुम्ही काल ऐकले आहे. शिव हे सर्वश्रेष्ठ तत्त्व आहे. हे त्याचे उत्तर होय. दुसरा प्रश्न आहे– या सर्व प्रपंचाचा आधार कोणता? तो कशावर स्थिर आहे?

प्रपंचात राहून देखील आपल्याला हा प्रश्न पडत नाही. या प्रश्नाचा विचार करायला कोणाला वेळ नसतो. खा, प्या, मौज करा, आपली कामे करा– यातच आपण गुंतून गेलेलो असतो. उगाच डोकेफोड कशाला करायची? परंतु कधी ना कधी तरी हा प्रश्न तुम्हाला पडेल. प्रत्येक वस्तूला आधार असतो. पुस्तक टेबलावर असते, म्हणून पुस्तकाचा आधार टेबल असते. टेबल जमिनीवर असते, म्हणून टेबलाचा आधार जमीन असते. जमिनीचा आधार कोणता? पुढे काही माहीत नसते पण तिलाही काही आधार असेलच. तसा प्रपंच कशाच्या आधारावर उभा आहे, या प्रश्नाचे उत्तर येथे सांगतात.

**अयथार्थप्रपंचोऽयं प्रतितिष्ठति शंकरे।**
**सदात्मनि यथा शुक्तौ रजतत्त्वं व्यवस्थितम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.७७)

प्रपंचाचे स्वरूप प्रथम सांगून नंतर त्याचा आधार कोणता याचे स्पष्टीकरण केले आहे. प्रपंच कसा आहे? तर अयथार्थ. यर्थाथ म्हणजे जसा आहे तसा दिसणारा. अयथार्थ म्हणजे असते एक आणि दिसते दुसरेच असा. मनुष्य तरी यापेक्षा वेगळा कुठे असतो? तो असतो एक आणि दाखवतो दुसरेच. प्रपंचात राहून मनुष्याचा व्यवहार देखील अयथार्थ झाला आहे. प्रपंच परिवर्तनीय आहे, म्हणून तो अयथार्थ होय. प्रपंचातील प्रत्येक वस्तूत अस्ति, जायते, विवर्धते, विपरिणमते, अपक्षीयते, विनश्यति हे सहा विकार असतात. हे षड्भावविकार होत. 'अस्ति' म्हणजे असणे, अस्तित्व जाणवणे. मातेच्या गर्भात बाळाचे अस्तित्व जाणवत असते. काहीतरी 'आहे' असे वाटत असते. त्यानंतर 'जायते' म्हणजे त्याचा जन्म होतो. 'विवर्धते' म्हणजे वाढ होत जाते. वाढ एका मर्यादेपर्यंत होते. ही अवस्था म्हणजे 'विपरिणमते'. त्यानंतर 'अपक्षीयते' म्हणजे क्षय होऊ लागतो आणि शेवटी 'विनश्यति' म्हणजे मरण पावतो. नष्ट होतो. आपल्या देहाची ही कहाणी आहे. उत्पन्न होण्याआधी तो नसतो, मग जन्मतो, वाढतो आणि शेवटी मृत्यूनंतर अस्तित्वहीन होतो. म्हणून प्रपंच परिवर्तनशील आहे. त्याच्यात क्षणोक्षणी परिवर्तन होत असते. नदीतील पाणी प्रतिक्षणी बदलत असते तरीही पाणी एकच आहे असा भास आपल्याला होत असतो. तसा प्रपंच परिवर्तनीय असून देखील तो स्थिर आहे असे आपल्याला वाटत असते.

फिरणाऱ्या चाकाला एक लोखंडी आस आधारभूत असते. तिच्या भोवती चाक फिरत असते. त्याप्रमाणे परिवर्तनीय प्रपंचाला अपरिवर्तनीय असा आधार असतो. प्रपंचाचा आधार भगवान शिव होय. शिवाच्या आधारावरच हा सर्व प्रपंच टिकून राहिलेला आहे. तुम्ही म्हणाल– 'कुठे असतो हा शिव? आम्हाला तर कधी

दिसला नाही. आम्हाला दिसतो फक्त प्रपंच.' शिव आपल्याला दिसत नाही हे खरे. आपल्या बुद्धीवर एक मोहाचे पटल आलेले असते. तुमच्यामध्ये आणि आमच्यामध्ये एक पडदा लावला तर आपण एकमेकांना येथे असूनदेखील पाहू शकणार नाही. प्रपंचाने परशिवाला असेच आपल्यापासून झाकून ठेवले आहे. ढगाने सूर्य झाकून ठेवावा त्याप्रमाणे. आपल्या बुद्धीवर मोहाचे पटल आलेले आहे. प्रपंचावर अत्याधिक प्रेम असणे म्हणजेच मोह. मोह प्रपंचाविषयी आहे, परमेश्वराविषयी नाही. मायेने अशी सर्वांना मोहिनी घातली आहे. आत्मज्ञान करून घ्यावे यासाठी मनुष्यजन्म मिळालेला असतो; परंतु जन्माला आल्यावर मनुष्य प्रपंचज्ञानातच गुरफटून जातो, गुंतून पडतो. भगवद्भजनात त्याला रस नसतो, रस असतो भोजनात. तो देवदर्शन घाईने करतो आणि जेवतो मात्र सावकाश, सर्व पदार्थांचा स्वाद चाखत. म्हणून एका कवीने स्वत:ला प्रश्न विचारला आहे–

'तू द्राक्षाचे माधुर्य, साखरेची गोडी, दुधाचा स्वाद आणि अमृताची माधुरी चाखली आहेस. परंतु शिवनामाची गोडी चाखून तृप्त होऊन ढेकर दिला आहेस काय?'

पण आपल्याला अनुभवाला हे कधी येत नाही. भरभर जप करून मोकळे होण्याचीच प्रत्येकाला घाई असते. शिवनाम हेदेखील एक अमृतच होय. ते घेताना शांतरसाची अनुभूती येते. भगवान शिव अत्यंत शांत आहेत, म्हणून त्यांचे नाम शांती प्रदान करते. परंतु मनुष्य मात्र सदैव अशांत असतो. शिव एवढे शांत की ते एक शब्दही उच्चारत नाहीत, परंतु मनुष्य मात्र अखंड बडबड करत असतो. दुसऱ्याचे ऐकण्यापेक्षा आपले ऐकवण्यात त्याला अधिक रस असतो. माणसांचे बोलणे म्हणजे बहुधा दोन बहिऱ्यांनी केलेली बडबडच असते. एकजण बोलत असताना दुसरा गप्प असतो. त्याचे बोलणे केव्हा संपते याची वाट पाहात असतो. कारण त्यानंतर त्याला बोलायचे असते. या बाह्य गोष्टीत आपण एवढे गुंतून गेलो आहोत की या प्रपंचाचा आधार कोणता, याचा विचार करण्याची शुद्ध आपल्याला राहिलेली नाही. आपल्या बुद्धीवर मोहाचा पडदा पडल्यामुळे प्रपंचाशिवाय आपण दुसऱ्या कशाचा विचारच करू शकत नाही.

मनुष्याच्या मनात संसाराची आसक्ती असल्यामुळेच तो संसाराची चिंता आणि चिंतन करीत असतो. मंदिरात देवदर्शनाला गेल्यावर तो सांसारिक वस्तूंचीच मागणी करीत असतो. कामना घेऊनच तो देवाकडे जात असतो. म्हणून कामनारहित होऊन कर्मे करा, असे गीतेला सांगावे लागले. कर्म करण्याचा मनुष्याला अधिकार आहे, परंतु त्याचे फळ देण्याचा अधिकार मात्र देवाला आहे. तुम्ही तर पूजा करण्याआधीच त्याचे फळ मागत असता. आपले विचार आणि भावना प्रपंचाभोवतीच घुटमळत असतात. त्यामुळे प्रपंचाला आधारभूत असलेल्या शिवतत्त्वाकडे आपले लक्ष जात नाही. वृक्षाचे मूळ जमिनीत दडलेले असते. ते दिसत नसते परंतु त्याच्याच आधारावर वृक्ष उभा असतो. मुळापासून जर वृक्षाला अलग केले, तोडले तर त्या वृक्षाची काय अवस्था होईल? प्रपंच फळाफुलांचा आस्वाद घेतो. परंतु त्याचे मूळ त्याचा आधार आहे काय, याचा कधीही विचार करीत नाही.

प्रपंचाला परमात्मा आधारभूत आहे तसा त्या परमात्म्याचा अंश आत्म्याच्या रूपाने शरीराला आधारभूत असतो. आत्मा जोपर्यंत शरीरात असतो तोपर्यंत शरीराचे कोडकौतुक चाललेले असते. आत्मा शरीर सोडून निघून गेला तर त्या शरीराची लवकर विल्हेवाट लावली जाते. जिवंत शरीरावर सर्वांचे प्रेम असते, मृत शरीरावर कुणाचेही प्रेम नसते. मृत शरीर अपवित्र मानले जाते. त्याचा सर्वांनाच विटाळ होतो. शरीरात जोपर्यंत पवित्र आत्मा नांदत असतो तोपर्यंतच त्याचे पावित्र्य टिकून असते. त्याप्रमाणेच हा प्रपंच आपल्याला सत्य, चैतन्यमय

आणि आनंदरूप दिसतो तो परमात्म्यामुळे. त्याचे सत्यत्व, शिवत्व आणि सौंदर्य वस्तुत: परमात्म्याचे आहे. प्रपंच मुळात असत्य, जड, दु:खरूप आहे. आत्म्यामुळे देह चैतन्यमय दिसतो तसा परमात्म्यामुळे प्रपंच चैतन्यमय भासतो. एखादा स्फटिक जर लाल वस्त्रावर ठेवला तर तो लालभडक दिसू लागतो. स्फटिकाला कोणताही रंग नसतो. परंतु त्याला रंग चढलेला दिसतो तो त्याच्यामागील वस्त्रामुळे. त्याप्रमाणे या प्रपंचात सत्यत्व, चैतन्य आणि आनंद दिसतो तो परमात्म्याचा असतो. या सर्व प्रपंचाचा आधार कोणता? या प्रश्नाचे उत्तर परमात्मा हाच प्रपंचाचा आधार होय हे आहे. उन्हामुळे शिंपल्यावर चांदीचा आभास होतो त्याप्रमाणे परशिव ब्रह्मावर या नामरूपात्मक प्रपंचाचा आभास होत असतो. कोणाच्या साक्षात्काराने मुक्ती मिळते? असा तिसरा प्रश्न आहे. त्याचे उत्तर पुढे देतात.

**शिवोऽमिति भावेन शिवे साक्षात्कृते स्थिरम्।**
**मुक्तो भवति संसारान्मोहग्रन्थेर्विभेदत:।।१७.७८।।**

शिवज्ञान झाल्यानेच मुक्ती मिळते, मी शिवच आहे आणि शिवावाचून दुसरे काही अस्तित्वात नाही हे ज्ञान शिवज्ञान होय. शिवज्ञानाच्या प्राप्तीसाठी कैलासात जाण्याची गरज नाही. तुमचे शरीरच कैलास होऊन जाते. ज्या शरीरात शिवाचा साक्षात्कार होतो ते शरीर कैलास होते. ज्याप्रमाणे प्रत्येक बीजात अंकुर विद्यमान असतो त्याप्रमाणे प्रत्येक शरीरात भगवान शिवाचे आत्मरूपाने वास्तव्य असते. आपण शिवाला शोधतो मंदिरात आणि तीर्थक्षेत्रात. परंतु आपले शरीर देखील एक क्षेत्रच आहे याचे आपल्याला भान नसते. जिथे भगवंताचे वास्तव्य असते त्या स्थळाला 'क्षेत्र' अशी संज्ञा आहे. आपल्या शरीरातदेखील भगवंताचे वास्तव्य असते, म्हणून शरीर हे क्षेत्र होय. अणूपरमाणूत सर्वत्र परमात्मा व्याप्त आहे. परंतु ज्ञानदृष्टी नसल्यामुळे सर्वत्र सोडाच, मंदिरात देखील त्याचे दर्शन आपल्याला होत नाही.

मी शिव आहे असे ज्ञान दृढ झाल्यावर मोहग्रंथी नष्ट होते. विवेकशून्यतेचेच दुसरे नाव 'मोह' हे होय. शरीर म्हणजे मी आहे असे मानून शरीराचे कोडकौतुक करणे म्हणजे मोह. आत्मरूपाचे ज्ञान झाले तरच शरीराचा मोह सुटू शकतो. परंतु मनुष्य मात्र देहाचे कोडकौतुक करण्यातच गुंतून पडलेला असतो.

प्रत्येक जीवाचा जन्म ब्राह्मणकुळात होतो. ब्रह्म जाणणारा तो ब्राह्मण होय. मनुष्याचा जन्म ब्रह्म जाणण्यासाठी झालेला आहे. पण तो ब्राह्मणाचे काम करीत नाही तर धोब्याचे करतो. धोबी ज्याप्रमाणे दुसऱ्याचे कपडे धूत बसतो त्याप्रमाणे मनुष्यदेखील जन्मभर आपल्या शरीराची निगा राखत असतो. ब्राह्मणकुळात जन्म घेऊन देखील तो धोब्याचे काम करीत असतो. एखाद्या चर्मकाराला कातडे पाहिल्यावर ते कातडे ज्या देहावर होते त्या देहाची नश्वरता पटते. त्याप्रमाणे शरीरात असलेल्या मांस, मज्जा, अस्थी यांचा विचार केल्यावर शरीरापलीकडे असलेल्या आत्म्याचे भान येते. वेदान्तशास्त्रात यासाठीच 'पंचीकरण' सांगितले आहे. देहातला एकेक अवयव वेगळा करून तेथे विचार केला जातो. शरीर हे पंचमहाभूतांनी बनलेले असते. परंतु आत्मा पंचमहाभूतांच्या पलीकडे असतो. शरीर पंचमहाभूतांचे असते म्हणून ते आपले नसते. ते आपले असते तर शेवटी आपल्याला सोबत घेऊन जाता आले असते, नाही का? परंतु जाताना आपण ते महाभूतांना अर्पण करून जातो. शरीर आपले नसूनदेखील ते आपण आपले मानतो, हाच तर मोह होय. जेव्हा शरीराचा मोह नष्ट होतो तेव्हा बुद्धी आत्मरूपात स्थिर होते.

आत्मा हाच शिव आहे आणि आपण आत्मरूप आहोत, हे ज्ञान आत्मज्ञान होय. हे आत्मज्ञान शरीरातच होत असल्यामुळे हेच कैलास होऊन जाते. शरीर मी नाही आणि शरीर माझे नाही, असे ज्ञान होणे हीच मुक्ती आहे. 'मी' आणि 'माझे' ही भावना बंधनकारक असते. मुक्ती कशामुळे मिळते? अंतर्यामी शिवाचा साक्षात्कार झाला की मुक्ती मिळते.

**शिवं भावय चात्मानं शिवादन्यं न चिन्तय।**
**एवं स्थिरे शिवाद्वैते जीवन्मुक्तो भविष्यसि।।१७.७९।।**

गुरू शिष्याला सांगतात– तू स्वत:ला शिवस्वरूप मान, शिवाशिवाय अन्य वस्तूचे चिंतन करू नकोस. असे शिवाद्वैतज्ञान स्थिर झाल्यावर तू जीवन्मुक्त होशील. मनुष्य प्रपंचाची चिंता करीत असतो. परंतु भगवंताची चिंता करावी लागत नाही, तर चिंतन करावे लागते. चिंता माणसाला जाळते, पण चिंतन मनुष्याला प्रफुल्लित करते. चिता निर्जीव शरीराला जाळते तर चिंता सजीव शरीराला जाळत असते. चिंतेमुळेच मनुष्याला अनेक रोगांशी सामना करावा लागतो. जो चिंतामुक्त होतो तो रोगांपासून मुक्त होतो; एवढेच नव्हे तर भवरोगापासून देखील मुक्त होतो. जो स्वत:ला शिवस्वरूप मानून केवळ शिवाचेच चिंतन करतो तो चिंतामुक्त होऊन मोक्षाचा अधिकारी ठरतो. जो भगवंताचे चिंतन करतो तो चिंतामुक्त होऊन मोक्षाचा अधिकारी ठरतो. जो भगवंताचे चिंतन करतो त्याच्या उदरनिर्वाहाची चिंता भगवंताला करावी लागते. म्हणून शिष्याने भगवंताचे चिंतन दृढभावाने केले पाहिजे. त्यामुळे तो जीवन्मुक्त होतो. शेवटी या स्थलाचा समारोप करतात.

**एवं प्रचोदित: शिष्यो गुरुणा गुणशालिना।**
**शिवमेव जगत् पश्यन् जीवन्मुक्तोऽभिजायते।।१७.८०।।**

जो शिवाचे चिंतन करतो त्याला सर्व प्रपंच शिवमय दिसू लागतो. त्याची दृष्टी शिवमय होऊन त्याला सर्वत्र शिव दिसू लागतो. कर्तव्यकर्म अवश्य केले पाहिजे. ते करताना मनात शिवचिंतन करावे. गुणवान अशा गुरूकडून शिष्य उपदेश श्रवण करतो आणि जगाला शिवरूपात पाहत जीवन्मुक्त होतो. आपण सर्वांनी देखील सारासारविचार केला पाहिजे. परशिव हाच ज्ञानाचा विषय आहे, तोच प्रपंचाचे अधिष्ठान आहे आणि त्याचा साक्षात्कार झाल्यावरच मनुष्याला मुक्ती मिळते, हे जाणून घ्यावे आणि शिवचिंतनात मग्न व्हावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

मुक्तिधाम, नाशिक रोड
११ नोव्हेंबर १९९४

# सेव्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग-षट्स्थलातील अंतिम स्थल 'सेव्यस्थल' हे आहे. जे सेवा करण्याला योग्य आहे ते 'सेव्य' होय.

**गुरुवाक्यामृतास्वादात् प्राप्तबोधमहाफलः।**
**शुश्रूणुरेव सर्वेषां सेव्यत्वात् सेव्य उच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १७.८१)

जो गुरुपदेश श्रवण करून जीवन्मुक्त होतो तो लोकांत पूज्य ठरतो, सेव्य होतो. आपण व्यक्तींची पूजा करतो असे वरवर दिसत असले तरी ती व्यक्तिपूजा नसते, तर त्या व्यक्तीच्या ठिकाणी वसणाऱ्या गुणांची पूजा असते.

**गुणाः पूजास्थानं गुणिषु नच लिंगं न च वयः।**

पूजा गुणांची होत असते. भलेही ती वृक्षाची पूजा, मूर्तीची पूजा किंवा गुरूची पूजा असेल. वृक्षाची पूजा आपण का करतो? तर त्यासाठी म्हटले आहे-

**त्यागाद् जगति पूज्यन्ते पशुपाषाणपादपाः।**

पशू, पाषाण, वृक्ष यांच्या ठिकाणी त्याग हा गुण असल्यामुळेच त्यांची जगात पूजा होते. वृक्ष लोकांना फूले, फळे आणि छाया देतात. मधुर फळे आणि शीतल छाया देणाऱ्या वृक्षाला तुम्ही काय देता? नदी उगमापासून सागराला मिळेपर्यंत सर्वांवर उपकार करीत असते. चारा खाऊन, पाणी पिऊन गाय आपल्याला अमृततुल्य दूध देत असते. म्हणून या सर्वांची पूजा केली जाते. त्याचप्रमाणे ज्या मनुष्याच्या ठिकाणी उत्तम गुण असतात त्याचीही पूजा केली जाते. 'गुरू' याचा अर्थ गुणवान. जो उत्तम गुणांनी मंडित असतो तो गुरू होय. गुरूच्या ठिकाणी ज्ञान हा सर्वोत्कृष्ट गुण असतो. 'गु' म्हणजे अज्ञान. 'रू' म्हणजे निवारण करणारा. ज्ञानोपदेशाने अज्ञान दूर करण्याचे सामर्थ्य ज्याच्या अंगी असते तो 'गुरू' होय. गुरुपदेश श्रवण करणारा हळूहळू स्वतः गुरूच होतो. सामान्यतः ज्याच्या जवळ आपण बसतो त्याचा प्रभाव आपल्यावर पडत असतो. कालचा विद्यार्थीच आज शिक्षक झालेला असतो. हा शिक्षकाच्या सान्निध्याचाच प्रभाव असतो. गुरुपदेश हा अमृतासारखा असतो. स्वर्गामध्ये अमृत असते. चंद्रकिरणात अमृत असते; असे आपण ऐकत-वाचत असतो. त्या सर्वांपेक्षा गुरुवचनातील अमृत श्रेष्ठ होय. समुद्रमंथनातून अमृत निघाले, परंतु त्या अमृतामुळे समुद्राचे खारट पाणी मधुर झाले नाही. चंद्रकिरणात अमृत आहे असे म्हणतात. त्या अमृतामुळे चंद्राला लागलेला क्षयरोग बरा झाला नाही. स्वर्गात अमृत आहे असे म्हटले जाते, परंतु स्वर्गस्थ देवांना आपले पुण्य क्षीण होऊन देवलोक सोडावा लागेल असे भय असते. मग असे अमृत काय कामाचे? म्हणून जीवाला अमृतत्व म्हणजे मोक्ष मिळवून देते असे गुरुवचनामृत सर्वश्रेष्ठ होय. या अमृतामुळे जन्ममरणातून सुटका होते. गुरूची अशी अमृतवाणी जो श्रवण करतो त्याला ज्ञानरूपी श्रेष्ठ फल प्राप्त होते.

ज्ञान हे सर्व फळांत सर्वश्रेष्ठ फळ होय. त्याचा कधीही नाश होत नाही. म्हणून त्याला अक्षय फल म्हणतात. एकदा आत्मज्ञान झाले की ते ज्ञान नाश पावत नाही. हे महाफल ज्या शिष्याला प्राप्त होते, तो गुरूप्रमाणेच इतरांकडून सेवा करण्यास योग्य असा 'सेव्य' होतो.

**गुरूपदिष्टे विज्ञाने चेतसि स्थिरतां गते।**
**साक्षात्कृतशिव: शिष्यो गुरुवत् पूज्यते सदा।।१७.८२।।**

गुरूचा उपदेश जेव्हा शिष्याच्या मनात स्थिर होतो, तेव्हा शिष्याला शिवसाक्षात्कार होऊन तो गुरूप्रमाणेच पूज्य होतो. तू शिव आहेस असाच उपदेश गुरू करतात. सुवर्णाच्या अलंकारामध्ये जसे सोने असते त्याप्रमाणे या विश्वामध्ये शिव भरून राहिलेला असतो. मी शिव आहे अशी भावना ज्याच्या मनात दृढ होते तो स्वत: शिवरूप होतो. लिंगपुराणात म्हटले आहे–

**कीटो भ्रमरध्यानेन भ्रमरो भवति ध्रुवम्।**
**मानव: शिवयोगेन शिवो भवति निश्चयम्।।**

कीटक जसा भ्रमराचे चिंतन करीत भ्रमर होतो त्याप्रमाणे मनुष्य शिवाचे चिंतन करीत शिव होतो. चेतन वस्तूंचे चिंतन केल्यावर तिचे स्वरूप मानवाला प्राप्त होते. जड वस्तूचे चिंतन केल्यावर असे होत नाही. मातीचे चिंतन करून अथवा दगडाचे चिंतन करून मनुष्य माती अथवा दगड होत नसतो. आपले स्वरूप प्रदान करण्याचे सामर्थ्य जड वस्तूच्या ठिकाणी नसते. प्रतिसाद देणे हा चैतन्याचा गुणधर्म आहे. एखाद्या व्यक्तीला तुम्ही हाक मारली तर ती तुमच्याकडे पाहील अन तुमच्याजवळ येईल. परंतु एखाद्या दगडाला हाक मारली तर तो तुमच्याकडे पाहणार नाही आणि तुमच्याजवळ येणार नाही. तुम्ही प्रपंचाचे कितीही चिंतन केले तरी तुम्ही प्रपंचरूप होणार नाही. कारण प्रपंच हा जड आहे. परंतु जर तुम्ही शिवाचे चिंतन केले तर शिवरूप निश्चित व्हाल. कारण शिव हे चेतनतत्त्व आहे. प्राचीन ऋषींनी सर्व शास्त्रांच्या मूलग्रंथांची रचना केली ते ज्ञान त्यांना शिवज्ञानातून प्राप्त झाले होते. त्यांचे ज्ञान अनुभवजन्य होते. अनुभवातून निर्माण झालेले होते. आकाशवाणी आणि दूरदर्शन ही मानवाच्या कुशाग्रबुद्धीची निर्मिती आहे. मानवाच्या अथक प्रयत्नांचा बुद्धिवैभवाचा हा आविष्कार होय. आश्चर्य एवढेच की एखाद्या बुद्धिमान माणसाच्या अशा निर्मितीसमोर बाकीची कोट्यवधी माणसे बुद्धिहिन होऊन बसतात. आपली निर्मितीक्षमता हरवून बसतात. हातात कॅलक्युलेटर आला की पाढे पाठ करणे सोडून देतात. यंत्र हा मानवाच्या बुद्धिसामर्थ्याचा चमत्कार आहे. परंतु सारी मानवी बुद्धी त्या यंत्राचा गुलाम होण्याचाही धोका आहेच.

मानवी बुद्धीत असे अद्भुत सामर्थ्य आहे. कोट्यवधी जन्मांतील संस्कार तिच्यात दडले आहेत. कॉम्प्युट्र हे मानवी बुद्धीसमोर ठेवून निर्मिलेले एक यंत्र होय. आपल्या बुद्धीत जन्मजन्मांतराचे संस्कार साठलेले आहेत. कॉम्प्युटरला 'कमांड' दिल्यावर त्याने 'आऊटपुट' द्यावा त्याप्रमाणे बुद्धीतले संस्कार चिंतन करून स्मरणाच्या पातळीवर आणता येतात. बौद्ध संप्रदायात 'जातिस्मरण' नामक एक साधनापद्धती आहे. स्मरणशक्तीला मागे मागे नेत पूर्वजन्माचे स्मरण करण्याची ती प्रक्रिया आहे. परंतु त्यासाठी एकाग्र चिंतनाची गरज असते. जर तुम्हाला 'काल सकाळी आठ वाजता तुम्ही काय करत होता?' असा प्रश्न विचारला, तर तुम्हाला मन एकाग्र करून विचार करावा लागेल. परवाबद्दल विचारले तर अधिक एकाग्र व्हावे लागेल. आपण जे काही करतो, त्याची

सर्व नोंद आपल्या बुद्धीमध्ये असते. एकाग्र बुद्धीला 'व्यवसायात्मिका बुद्धी' असे म्हटले जाते. तीच बुद्धी प्राचीन ऋषीमुनींकडे होती. त्यांनी ध्यान करून, एकाग्रता साधून परशिवाशी संबंध जोडला आणि ज्ञान प्राप्त करून घेतले. इथे ट्यूब प्रकाशित झालेली दिसते, पंखा फिरताना दिसतो; हे विद्युतशक्तीचे सामर्थ्य आहे. वीजनिर्मिती केंद्रापासून वीजपुरवठा केंद्रापर्यंत आणि तेथून इथपर्यंत तार जोडून वीज आणली जाते. म्हणजे पंख्याचा आणि ट्यूबचा संबंध वीजनिर्मिती केंद्राशी आहे. त्याप्रमाणे भगवान शिव हा ज्ञानाचा सागर आहे. आपण मनाने त्या ज्ञानसागराशी संबंध जुळवू शकलो, तर ते ज्ञान आपल्यापर्यंत पोहोचू शकते. प्राचीन ऋषीमुनींनी या मार्गानेच ज्ञानसंपादन केले आणि आजचा आधुनिक काळातील शास्त्रज्ञ देखील एकाग्रचित्त होऊनच ज्ञानाचे नवे क्षितिज धुंडाळत असतो. म्हणून येथे म्हटले आहे की जो शिवाचे चिंतन करतो तो चिंतन करता करता शिवरूप होतो. हे शिवज्ञान गुरूच प्रदान करीत असतात. ज्ञान हाच गुरू असतो. गुरूचे शरीर हे आपला गुरू नसते. तर त्या शरीरातले ज्ञान हे आपले गुरू असते. ज्ञानामुळेच शरीराला पूज्यता लाभत असते. म्हणून ज्ञान प्राप्त झालेला शिष्य देखील गुरूप्रमाणे पूज्य होतो.

आत्मज्ञान देणाऱ्या गुरूला कोणतीही उपमा साजेशी नाही. परीस लोखंडाचे सोने करतो ते खरे असले तरी तो लोखंडाचा परीस करू शकत नाही. अर्थात् आपले रूप त्याला देऊ शकत नाही. परंतु एक ज्योत मात्र दुसरी ज्योत चेतवू शकते. एक गुरू इहलोक सोडण्याआधी दुसरा गुरू निर्माण करू शकतो. नारळ आणि केळी देवाला अर्पण केली जाणारी फळे होत. या फळांची निर्मिती उष्ट्या बीजांपासून होत नाही. आंब्याची कोय कुणीतरी रस खाऊन चोखलेली असते. त्या उष्ट्या कोयीतून आंब्याचे झाड उगवते. केळीमध्ये बीज नसते. केळीचे झाड मरण्याआधी दुसऱ्या झाडाला जन्म देऊन नष्ट होते. नारळाची वेगळी पद्धती आहे. संबंध नारळ जमिनीत पुरून त्याचे रोप केले जाते. म्हणजे नारळ देखील अन्य फळांप्रमाणे उष्ट्या बीजामधून उत्पन्न होत नाही. नष्ट होण्याआधी केळीचे झाड चारपाच झाडांना जन्म देऊन जाते. त्याप्रमाणे एक सद्‌गुरू दोनचार शिष्यांना गुरुत्व प्रदान करून जातात.

**ज्ञानादाधिक्यसम्पत्तिर्गुरोर्यस्मादुपस्थिता।**
**तस्माज्ज्ञानागमाच्छिष्यो गुरुवत् पूज्यतां व्रजेत्॥१७.८३॥**

गुरूएवढेच ज्ञान शिष्याला प्राप्त झालेले असते. त्यामुळे शिष्यदेखील गुरूइतकाच पूजनीय होतो. लौकिक जीवनात आपण पाहतो की एखादा हुशार विद्यार्थी आपल्या शिक्षकांकडून विद्या संपादन करतो आणि पुढे त्याच्या तोडीस तोड असा शिक्षक होतो. गुरू आणि शिष्य यांचा संबंध पिता-पुत्र संबंधासारखा असतो. शिष्य हा गुरुपुत्र असतो. पितृवंश अनेकदा खंडित झालेला दिसतो. म्हणजे एखाद्या कुटुंबात जर पुत्र जन्माला आला नसेल तर पुढे त्या कुटुंबाची वंशपरंपरा खंडित होते. परंतु गुरुवंश मात्र कधीही खंडित होत नाही. गुरुपरंपरा अखंड चालू असते. शिष्याशिवाय जर एखाद्या मठाचे गुरू शिवैक्य झाले आणि काही काळपर्यंत जरी त्या गादीवर कुणी गुरू नसले तरी पुढे एखादे गुरू तेथे येतात, गुरुपरंपरा पुढे चालत राहते. त्या गादीवर जो कुणी बसतो त्याला पूर्वीच्या गुरूइतकाच मान दिला जातो.

**शिवोऽहमिति भावस्य नैरन्तर्याद् विशेषत:।**
**शिवभावे समुत्पन्ने शिववत् पूज्य एव स:।।१७.८४।।**

जेव्हा गुरू शिष्याला 'तत् त्वम् असि'– 'ते तूच आहेस'– असा उपदेश करतात तेव्हा शिष्य आपल्या मनात शिवोऽहम् भावना दृढ करीत राहतो. 'शिवोऽहम् शिवोऽहम्' असा तो जप करू लागतो. वेदान्तात 'अहं ब्रह्मास्मि।'– 'मी ब्रह्म आहे' असा उपदेश केला जातो. दोन्हीचा अर्थ एकच आहे. वेदान्तात ज्याला 'ब्रह्म' म्हणतात सिद्धान्तात 'शिव' आणि 'लिंग' असे म्हणतात. ब्रह्म, शिव आणि लिंग ही एकाच अंतिम तत्त्वाची पर्यायनामे होत. नामे भिन्न असली तरी अर्थ एकच आहे. जो शिवोऽहम् भावना करतो तो शिवच होतो. त्यामुळे भगवान शिव जेवढे पूज्य असतात तेवढाच तो देखील पूज्य होतो.

**विषयासक्तचित्तोऽपि विषयासंगवर्जित:।**
**शिवभावयुतो योगी सेव्य: शिव इवापर:।।१७.८५।।**

आपण पाहतो की जगात ज्ञानी लोक अनेक असतात. परंतु त्यांची जीवनरीत, आचरण एकमेकांपेक्षा भिन्न असते. शुकमुनी ज्ञानी होते पण विरक्त होते. जनक ज्ञानी होता पण गृहस्थ होता आणि श्रीकृष्ण ज्ञानी असूनही भोगी होता. ज्ञानाने हे तिघेही समान आहेत, परंतु जीवनव्यवहारात ते एकमेकांपासून भिन्न आहेत. प्राचीन काळी राजे लोक तत्त्वज्ञानाचे अध्ययन करीत असत. त्यामुळे त्यांना एक समानदृष्टी प्राप्त होत असे. प्रजेमध्ये कुठलाही भेदभाव न करता ते प्रजेच्या कल्याणाची चिंता वाहात असत. परंतु हल्लीच्या राज्यकर्त्यांना मात्र तत्त्वज्ञानाच्या अध्ययनाची आवश्यकता वाटत नाही. त्यामुळे त्यांना समदृष्टी प्राप्त होत नाही. धर्म, जात, भाषा असे सारे भेद पोसत आणि वाढवत ते केवळ आपल्या खुर्चीची चिंता करीत असतात. शासक जर योगी असेल तरच त्याचे शासन समताधिष्ठित आणि प्रजा कल्याणकारी राहील. ज्ञानी लोकांचे आचरण एकसारखे नसते. परंतु त्याच्या ठिकाणी दृढ शिवभावना असल्यामुळे तो शिवाप्रमाणेच पूजनीय होतो. वरवर पाहताना तो विषयमग्न दिसतो, कारण त्याच्या इंद्रियांचा संबंध विषयांशी येत असतो. परंतु त्याचे मन शिवात लीन झाल्यामुळे तो विषयासक्त नसतो. आचरणसंपन्न अशा ज्ञानी पुरुषाला समाजात अधिक सन्मान मिळत असतो. ज्या पात्रात दूध द्यायचे ते पात्रदेखील दुधासारखे पवित्र असले पाहिजे. एखाद्या चामड्याच्या पात्रात जर दूध प्यायला दिले तर कसे वाटेल? त्याप्रमाणे ज्याच्या अंतरंगात शिवज्ञान भरलेले आहे, त्याचे बाह्य आचरणदेखील शुद्ध असले पाहिजे. शेवटी लिंग–षट्स्थलांतर्गत प्रसादिस्थलाचा समारोप करताना ज. रेणुकाचार्य म्हणतात–

**मुक्त: संशयपाशत: स्थिरमना बोधे च मुक्तिप्रदे**
**मोहं देहभूतां दृशा विघटयन् मूलं महासंसृते:।**
**सत्तानन्दचिदात्मके निरुपमे शैवे परस्मिन् पदे**
**लीनात्मा क्षयितप्रपंचविभवो योगी जनै: सेव्यते।।१७.८६।।**

मनुष्याला जेव्हा शिवज्ञान होते तेव्हा त्याचे सारे संसारपाश तुटून जातात. मनुष्याच्या मनात अनेक संदेह असतात. गुरूजवळ जाऊन आपल्या संदेहांचे निरसन शिष्याने करून घेतले पाहिजे. डोळ्यांत गेलेले कुसळ आणि

मनात असलेला संदेह यांच्याकडे दुर्लक्ष करू नये. डोळ्यात खडा तसाच राहिला तर त्यामुळे डोळा खराब होऊ शकतो आणि मनात संशय कायम राहिला तर मन विकृत होऊ शकते. म्हणून ज्याला शिवज्ञान प्राप्त होते त्याच्या मनातील सर्व संदेह नष्ट होतात. त्याचे मन मुक्तिप्रद अशा शिवज्ञानात स्थिर होते. तो आपल्या कृपादृष्टीने जीवांचा मोह नष्ट करू शकतो. मोहामुळेच आपण पुन्हा पुन्हा जन्म घेत असतो. तो उपदेशाने मोहाचा नाश करतो. निरुपम, सच्चिदानंदरूप अशा परशिवात त्याचा आत्मा लीन झालेला असतो. परशिव हे एकमेव तत्त्व असल्यामुळे त्याला दुसऱ्या कशाची उपमा देता येत नाही. म्हणून ते निरुपम आहे. त्याचे सर्व प्रपंचाचे वैभव विलीन होऊन तो सर्वांकडून सेवा घेण्यास योग्य होतो.

अशाप्रकारे गुरुपदेशाने अज्ञान नष्ट होऊन तो शिवस्वरूप होतो. तो शिवाप्रमाणे पूज्य होतो. एखाद्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केल्यावर ती देवतास्वरूप होते. तिच्यासमोर हात जोडून सारेजण उभे राहतात. त्याप्रमाणे एक सजीव व्यक्ती शिवचिंतन करते आणि गुरू नामक शिल्पकार तिच्या जीवनाला आकार देत असतो. शिवज्ञानसंपन्न शिष्य ही जणू श्रीगुरूची एक कलाकृती असते. आपणही सारे असे शिष्यत्व पत्करून गुरुरूप आणि शिवरूप व्हावे, अशी मंगल कामना करून आजचे आशीर्वचन आणि लिंग-षट्स्थलातील प्रसादिस्थलावरील आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

मुक्तिधाम, नाशिक रोड
१२ नोव्हेंबर १९९४



# भाग १० : लिंग–षट्स्थलांतर्गत प्राणलिंगिस्थल

**आशीर्वचन पहिले**

## आत्मस्थल–१

**विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।**
**विश्ववंद्यं सदा वंदे विश्वाराध्यं जगद्गुरुम्।।**

श्रीकाशीसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यांपासून विश्वेश्वर शिवाचार्यापर्यंत जी गुरुपरंपरा चालत आली आहे तिला अनंत प्रणिपात समर्पित करून कार्तिकमासानिमित्त 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर आशीर्वचन श्रवण करणाऱ्या सद्भक्तांनो आणि मातांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी' च्या अठराव्या परिच्छेदात लिंग–षट्स्थलातील प्राणलिंगिस्थलाविषयी निरूपण केलेले आहे. महर्षी अगस्त्यांनी प्रश्न केला–

**प्रसादिस्थलसंबद्धाः स्थलभेदाः प्रकीर्तिताः।**
**प्राणलिंगिस्थलारूढान् स्थलभेदान् वदस्व मे।।**
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.१)

अगस्त्य विचारतात की प्रसादिस्थलाच्या अवांतरस्थलाचे निरूपण मी ऐकले आहे. मला आता लिंगषट्स्थलांतर्गत प्राणलिंगी स्थलांची अवांतरस्थले श्रवण करण्याची इच्छा आहे, त्याविषयी मला सांगावे. श्रोत्यांच्या मनात जसजसे प्रश्न उभे राहतात आणि तो ते व्यक्त करतो तसतसा वक्ता अधिकाधिक बोलत जातो. जेथे प्रश्न उपस्थित होत नाही तेथे पुढील बोलणे थांबून जाते, तेथे शास्त्र मौन धारण करते. महर्षी अगस्त्यांच्या मनात प्रसादिस्थलाचे निरूपण ऐकल्यावर त्यापुढील प्राणलिंगिस्थलाचे निरूपण ऐकण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली. त्यांची जिज्ञासा तृप्त करण्यासाठी ज. रेणुकाचार्य म्हणाले की प्राणलिंगी स्थलात नऊ अवांतरस्थले आहेत. आत्मस्थल, अंतरात्मस्थल, परमात्मस्थल, निर्देहागमस्थल, निर्भावागमस्थल, नष्टागमस्थल, आदिप्रसादिस्थल, अंत्यप्रसादिस्थल आणि सेव्यप्रसादिस्थल. यांपैकी एकेका स्थलांची लक्षणे तुला मी सांगतो.

पहिले स्थल आहे आत्मस्थल. संसारातून मुक्त होण्यासाठी प्रत्येक मनुष्याला आत्म्याचे स्वरूप जाणण्याची गरज आहे. मनुष्याला तीन गोष्टींचा विचार करावा लागतो. परमात्मा, आत्मा आणि प्रपंच. या तीन पदार्थांविषयी माणसाच्या मनात जिज्ञासा असते. या तिन्ही शिवाय दुसऱ्या कशालाही अस्तित्व नाही. माणसाच्या मनात आत्म्याबद्दल जिज्ञासा असते. यांपैकी एकाचे परिपूर्ण ज्ञान जर झाले तर अन्य दोन्ही तत्त्वांचे ज्ञान आपोआप होते. तीन पदरांना पीळ देऊन दोरी वळली जाते, म्हणजे एका दोरीचे मुळात तीन भाग असतात. त्याप्रमाणे आपल्या विचारविश्वाचे जणू तीन भाग केलेले आहेत. आत्मा, परमात्मा आणि प्रपंच. पदार्थ दिसायला तीन असले तरी ते मुळात एकच आहेत. याचे विवेचन याआधीच आलेले आहे.

**एक एव शिव: साक्षाच्चिदानन्दमयो विभु:।**
**निर्विकल्पो निराकारो निर्गुणो निष्प्रपंचक:।।५.३४।।**

सृष्टीच्या आरंभी परमात्मा एकच आहे. परंतु सृष्टिनिर्मितीच्या वेळी तो परमात्मा, जीवात्मा आणि प्रपंच अशा तीन ठिकाणी विभक्त होतो. तो शुद्धसत्त्वउपाधियुक्त असतो म्हणून 'परमात्मा', अशुद्ध सत्त्व अथवा मिश्र उपाधियुक्त असतो तेव्हा 'जीवात्मा' आणि तमोगुणयुक्त असतो तेव्हा त्याला 'प्रपंच' म्हणतात. अशा प्रकारे तीन पदार्थ दिसत असले तरी ते सर्व मिळून एकच पदार्थ होय. त्यामुळे या तीनपैकी कोणत्याही एका पदार्थाविषयी जिज्ञासा उत्पन्न झाली तरी ती दुसऱ्या दोन पदार्थांकडे घेऊन जाते. म्हणून येथे आत्मस्थलाविषयी प्रथम सांगितले आहे.

**जीवभावं परित्यज्य यदा तत्त्वं विभाव्यते।**
**गुरोश्च बोधयोगेन तदात्मायं प्रकीर्तित:।।१८.५।।**

सद्गुरूच्या उपदेशाने जेव्हा जीवभाव नाहीसा होऊन आत्मभाव स्थिर होतो तेव्हा त्याला आत्मस्थल असे म्हणतात. छांदोग्योपनिषदात आत्म्याची लक्षणे सांगितली आहेत. आत्म्याला पापाचा किंचित देखील स्पर्श नसतो. कारण पाप-पुण्याचा आधार मनुष्याचे अंत:करण असते. अंत:करणच पुण्य-पाप करते आणि सुख-दु:ख भोगते. अंत:करण जड आहे तर आत्मा चेतन आहे. जड वस्तू स्वत:च्या बळाने काही कर्म करू शकत नाही. परंतु आत्म्याच्या सान्निध्यात अंत:करण असल्यामुळे त्याच्याकडून कर्मे घडतात. दिव्याच्या प्रकाशात मनुष्य कर्मे करतो त्याप्रमाणे आत्म्याच्या सान्निध्यात अंत:करणाकडून कर्मे होतात. मनुष्याच्या भल्याभल्या कर्माचा दोष जसा दिव्याला लागत नाही त्याप्रमाणे आत्म्याच्या सान्निध्यात अंत:करणाकडून कोणतीही कर्मे घडली तरी त्याचा लेप आत्म्याला लागत नाही. त्या कर्मांचे सुख-दु:ख अंत:करणच भोगत असते. म्हणून आत्मा पापांपासून मुक्त आहे.

आत्म्याला जरा-मरण नाही, हे त्याचे दुसरे लक्षण होय. जरा (वार्धक्य) आणि मरण हे शरीराचे धर्म होत. आत्मा तहान-भुकेपासून मुक्त आहे. कारण तहान-भूक हे प्राणाचे धर्म आहेत. त्याच्या ठिकाणी शोक, मोह नाही. तो सत्यसंकल्प, सत्यस्वरूप आहे. आत्म्याची एवढी लक्षणे आहेत. आपण खरोखर आत्मस्थितीत आहोत की नाही याचा विचार पडतो. प्रत्येक मनुष्य मी पापी आहे, पुण्यवान आहे असे म्हणत असतो. त्याला तहान-भूक लागते. दु:ख झाल्यावर तो रडतो. लोभ-मोहादी विकार त्याच्या ठिकाणी असतात. आपण मरणार आहोत असे त्याला वाटत असते. मनुष्य जेव्हा बोलतो तेव्हा तो आत्म्याबद्दल बोलत नसून शरीर-मनाबद्दल बोलत असतो. शरीर आणि मन म्हणजेच आपण आहोत असे त्याला वाटत असते. मी कर्मे करतो असे जेव्हा तो म्हणत असतो तेव्हा तो स्वत:ला अंत:करण समजत असतो. मला भूक-तहान लागली असे जेव्हा तो म्हणत असतो तेव्हा तो प्राणाचे धर्म आपल्यावर ओढवून घेत असतो. मी म्हातारा झालो असे जेव्हा तो म्हणतो तेव्हा तो स्वत:ला शरीर समजत असतो. कारण वृद्धावस्था हा शरीराचा धर्म आहे, आत्म्याचा नव्हे. अशाप्रकारे पुण्य-पापापासून मुक्त असलेल्या, जन्म-जरारहित, तहान-भूक-शोक आदींपासून मुक्त अशा आत्म्याचे ज्याला ज्ञान होते तो आत्मरूपात स्थिर होतो.

आत्मज्ञान झाल्यावर मनुष्याला भूक लागत नाही, तो म्हातारा होत नाही, तो मरत नाही; असे नाही. सामान्य मनुष्याच्या आणि ज्ञानी मनुष्याच्या अनुभवात अंतर असते. ज्ञानी पुरुषाला भूक लागत नाही तर त्याच्या प्राणाला

भूक लागते. त्याचे भोजन एखाद्या त्रयस्थाला जेऊ घालावे त्याप्रमाणे अलिप्तपणाचे असते. तो म्हातारा होतो तेव्हा शरीराला म्हातारपण आले आहे असे तो मानतो. आपण म्हातारे झालो आहोत असे तो म्हणत नाही. ज्ञानी पुरुषाचे वर्तन असे सामान्य माणसापेक्षा वेगळे असते. तो सर्वसामान्य माणसाप्रमाणे सर्व व्यवहार करीत असतो; परंतु सारे व्यवहार आपल्या शरीर-मनाकडून होत असतात, हे त्याला उमजलेले असते. अशा प्रकारे निरभिमान वृत्तीने ज्ञानी पुरुषाचे व्यवहार चाललेले असतात.

**वालाग्रशतभागेन सदृशो हृदयस्थित:।**
**अश्नन् कर्मफलं सर्वमात्मा स्फुरति दीपवत्।।१८.६।।**

आत्मा व्यापक आहे, परंतु आत्म्यात जेव्हा जीवभाव येतो तेव्हा तो संकुचित होतो. हेच याठिकाणी स्पष्ट केले आहे. आत्मा केवढा आहे? त्याचे परिमाण किती? अणुपरिमाण, मध्यपरिमाण आणि विभुपरिमाण अशी तीन परिमाणे आहेत. काहीजण आत्म्याला अणूएवढा मानतात. काही जण त्याला मध्यम आकाराचा मानतात तर काही तत्त्वज्ञ त्याला अत्यंत व्यापक समजतात. आत्म्याच्या आकाराबद्दल वेगवेगळ्या तत्त्वज्ञांची वेगवेगळी मते आहेत. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा, वेदान्त या दर्शनशास्त्रांत आत्म्याला विभू मानले जाते. वेदान्तात आत्मा विभू आणि एक मानला आहे तर अन्य दर्शनांत आत्म्याला व्यापक मानून देखील आत्मे अनेक आहेत, असे म्हटले आहे. जेवढी शरीरे आहेत तेवढे आत्मे आहेत, असे त्यांचे म्हणणे आहे. जैन तत्त्वज्ञानात आत्मा मध्यम आकाराचा मानला जातो तर वीरशैव तत्त्वज्ञानात आत्मा अणुप्रमाण आहे असे मानले जाते. ही सगळी मते पाहिल्यावर आत्म्याला अणुप्रमाण मानावे, मध्यमप्रमाण मानवे की विभू मानावे, असा प्रश्न पडतो.

न्याय-वैशेषिक दर्शने आत्म्याला अनेक व जड मानतात. आत्मा आणि मन या दोन्ही जडांचा संयोग झाला की ज्ञानगुण उत्पन्न होतो. दोन दगड एकमेकांवर घासले तर ठिणगी उत्पन्न होते त्याप्रमाणे. परंतु सांख्यदर्शन मात्र आत्म्याला अनेक व चेतन मानते. काही दर्शने आत्म्याला मध्यम आकाराचा मानतात. मध्यम याचा अर्थ जेवढे शरीर तेवढाच आत्म्याचा आकार. माशीचा आत्मा तिच्या देहाएवढा तर हत्तीचा आत्मा त्याच्या एवढा. शरीरस्थ आत्मा शरीराबाहेर राहण्याइतका व्यापक नाही असे ते म्हणतात. आत्मा नित्य आहे. नित्य म्हणजे सर्वकाळात अस्तित्वात असलेला. जोपर्यंत जीवात्म्याला मुक्ती मिळत नाही तोपर्यंत त्याला 'नित्य' मानावेच लागते. लहानात लहान शरीरात आणि मोठ्यात मोठ्या शरीरात आत्म्याचे वास्तव्य असते. म्हणून वीरशैवसिद्धान्तात त्याला अणुप्रमाण मानले जाते. शरीराबाहेर आत्म्याचे अस्तित्व मानले, म्हणजे तो विभू (व्यापक) आहे असे मानले तर अन्य शरीरांतील अनुभव आपल्याला येत नाहीत, म्हणून आत्मा हा शरीरापुरता आणि अणुप्रमाण मानावा, असे वीरशैवसिद्धान्त म्हणतो.

जीवात्मा किती लहान आहे? तर केसाच्या अग्राचे शंभर भाग केल्यावर ते जेवढे लहान होतील तेवढ्या आकाराचा. अर्थात् आत्मा हा अणूपेक्षाही लहान आहे, असा याचा अर्थ होय. अणुप्रमाण आत्म्याचे वास्तव्य हृदयात असते. जीवात्मा अणुएवढा लहान असेल आणि तो हृदयातच असेल तर सर्व शरीरव्यवहाराचे ज्ञान त्याला कसे होईल बरे? या शंकेचे निरसन एका उदाहरणाने केले आहे. दिवा घरात एका कोपऱ्यात ठेवलेला असतो तरी त्याचा प्रकाश घरभर पसरलेला असतो. त्याप्रमाणे हृदयस्थ आत्म्याचा प्रकाश सर्व शरीरात व्याप्त असतो. जीवात्मा अणुएवढा असल्याने प्रत्येक शरीरातला जीवात्मा वेगळा असतो आणि तो नित्य असतो. जीवात्म्याच्या प्रगती-उत्क्रांती या अवस्थांसाठी त्याच्या नित्यत्वासाठी आणि प्रत्येक शरीरातील त्याच्या

अस्तित्वासाठी जीवात्म्याला अणुप्रमाण मानणेच अधिक संयुक्तिक ठरते. जीवभाव असलेला आत्मा (जीवात्मा) हृदयात वास्तव्य करून सर्व दुखदु:खांचा अनुभव घेत असतो.

जीवभाव असलेल्या आत्म्याची म्हणजे जीवात्म्याची अशुद्ध जीव, शुद्ध जीव आणि मुक्त जीव अशी विभागणी केली जाते. गुरुदीक्षा न घेतलेला आणि कर्माचा अहंकार वाहणारा जीव अशुद्ध जीव होय. गुरुदीक्षा घेतलेला, निरभिमान वृत्तीने कर्म करणारा, शास्त्रनिष्ठ साधक म्हणजे शुद्ध जीव आणि लिंग-अंगाचे सामरस्य प्राप्त करून घेतलेला जीवात्मा मुक्त जीव होय. अशुद्ध जीवालाच बद्धजीव असेही म्हणतात, त्याविषयी पुढे सांगितले आहे-

**आत्मापि सर्वभूतानामन्त:करणमाश्रित:।**
**अणुभूतो मलासंगादादिकर्मनियंत्रित:।।१८.७।।**

आत्मा सर्व भूतांमध्ये विद्यमान असून सर्व भूतांच्या उत्पत्तीचे कारण आहे. श्रुतीत म्हटले आहे-

**आत्मन: आकाश संभूत:। आकाशात् वायु:।**
**वायोरग्नि:। अग्नेराप:। अद्भ्य: पृथ्वी।**
**पृथ्व्या ओषध:। ओषधिभ्यो अन्नम्। अन्नाद् प्रजा:।**

हा सृष्टीचा क्रम आहे. ज्या आत्म्यापासून पंचमहाभूतांची उत्पत्ती झाली तो आत्मा किती मोठा असेल? उत्पन्न होणाऱ्यापेक्षा उत्पन्न करणारा मोठा असलाच पाहिजे. बाळापेक्षा आई मोठी असते. आकाश किती व्यापक आहे ते सर्वत्र सर्वांमध्ये अंतर्बाह्य व्यापून आहे. असे सर्वव्यापक आकाश ज्यापासून उत्पन्न झाले तो आत्मा किती व्यापक असेल बरे? सर्व महाभूतांच्या उत्पत्तीचे कारण असलेला व्यापक आत्मा अंत:करणात अणुरूपाने वास्तव्य करतो. आणव, मायीय आणि कार्मिक या मलत्रयांच्या संगाने अत्यंत शुद्ध, व्यापक आत्मा अणुरूप झाला आहे. आत्मा शुद्ध, बुद्ध, नित्य, मुक्त आहे; हे खरे आहे. परंतु आणवादी मलांमुळे तो बद्ध, अनित्य भासू लागतो. आणवमल याचा अर्थ स्वत:ला अणुरूप, लहान समजणे. आपल्या विभू (व्यापक) रूपाचा विसर पडणे. समष्टिभावाचा विसर पडून त्याच्यात व्यष्टिभाव येतो. जो लहान (व्यष्टिरूप) असतो तो स्वार्थी होतो. जो मोठा (समष्टिरूप) असतो तो सर्वांचे कल्याण इच्छित असतो. अवघ्या जगाच्या कल्याणासाठी प्रार्थना करणारे संत समष्टिरूप असतात. म्हणजे त्यांच्या ठायी आत्मभाव स्थिर झालेला असतो. एकच आत्मा भिन्न भिन्न शरीरांत वेगवेगळा भासतो. सूर्य एकच असतो, परंतु अनेक आरशांत त्याची अनेक प्रतिबिंबे पडलेली असतात. एखादा आरसा फुटला तर त्या आरशातला सूर्यदेखील फुटलेला दिसतो. परंतु खरोखर सूर्य फुटतो काय? आरशात सूर्य लहान दिसतो. पण तो तेवढा लहान असतो काय? अशीच आत्म्याची अवस्था आहे. शुद्ध आत्मा अत्यंत व्यापक (विभू) आहे. परंतु त्याच्या ठिकाणी जीवभाव आला की तो जीवात्मा होऊन शरीरापुरता संकुचित दिसू लागतो. वस्तुत: एकच आत्मा असंख्य शरीरांतून प्रतिबिंबित होत असतो. ज्यांच्या हृदयाला या व्यापकतेचा स्पर्श झालेला असतो असे संत विश्वकल्याणाची कामना बाळगत असतात. दुसऱ्यांना सुखी पाहून ते आनंदी होतात आणि त्यांची दु:खे पाहून व्यथित होतात. म्हणून संतांनी 'सर्वे सुखिन: भवन्तु' अशी प्रार्थना केली आहे. त्यांच्या जवळ कोरडी शाब्दिक सहानुभूती नसते तर समानुभूती असते. ते सर्वांना आत्मवत् जाणतात, पाहतात.

आणवमलामुळे जीवात अणुभाव येतो आणि तो स्वत:ला देहापुरता संकुचित समजू लागतो. त्याचप्रमाणे त्याच्या ठायी मायामोह उत्पन्न होतो. यालाच 'मायीय मल' म्हणतात. 'हे माझे' असे ममत्व म्हणजे मायीय मल.

थोडक्यात, शरीर म्हणजे मी असा देहात्मभाव म्हणजे आणवमल. 'हे माझे ते तुझे' असा आपपरभाव म्हणजे मायामल आणि आणव व मायीयमलांमुळे त्याच्याकडून घडणारी कर्मे म्हणजे कार्मिकमल होय. मग आपल्या कर्मांनीच तो बद्ध होतो, बांधला जातो. कीटक जसा आपल्या शरीरातून स्रवणाऱ्या द्रवाने स्वत:भोवती कोष बांधून घेतो त्याप्रमाणे. मागील जन्मांत केलेल्या कर्माप्रमाणे आपल्या या जन्मातला व्यवहार चाललेला असतो. आत्म्यात अणुभाव कधी आला? त्याने कर्मात स्वत:ला कधी बांधून घेतले? या प्रश्नांची उत्तरे कोणालाही देता येत नाहीत. आपल्या कर्मांच्या अधीन असलेला जीवात्मा या प्रपंचात सुखदु:खे भोगत जन्मजन्मांतरात भ्रमत असतो एवढे मात्र खरे. तो अंत:करणाचा आश्रय घेतो तेव्हा तो अहंकारी बनतो. पाणी शुद्ध असते; परंतु रंगाच्या संबंधाने काचेच्या प्याल्यात ते लाल दिसते तर हिरव्या प्याल्यात ते हिरवे दिसते. त्याप्रमाणे अंत:करणाशी संबंध आल्यावर आत्म्यात अंत:करणाचे गुणधर्म दिसू लागतात. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांच्या समुच्चयाला 'अंत:करण' म्हणतात. हेच 'अंत:करण चतुष्टय' होय.

संकल्प-विकल्प करणे हा 'मना'चा धर्म आहे. निश्चय करणे हा 'बुद्धी'चा धर्म, चिंतन करणे हा 'चित्ता'चा धर्म तर अभिमान करणे हा 'अहंकारा'चा धर्म होय. अहंकारामुळेच जीवात्मा बद्ध होतो. 'ममेति बद्ध्यते जंतु: न ममेति विमुच्यते।'

'मी' आणि 'माझे' हे तर जीवात्म्याच्या बंधनाचे कारण आहे. अनादिकालापासून हाच त्याचा स्वभाव बनलेला आहे. माणूस आपले नाव एखाद्या क्षणी विसरेल, परंतु मी-पण विसरणे कधी शक्य नाही. बऱ्याचदा एखाद्याचे ठेवलेले नाव वेगळे असते आणि घरातली माणसे त्याला वेगळ्याच नावाने हाक मारीत असतात. मुलाचे चांगले 'सदाशिव' असे नाव ठेवायचे आणि त्याला 'बाब्या' म्हणून हाक मारायची, हे घराघरात पाहायला मिळते. माणसाला अनेक नावे असतात. ती सारी तो विसरू शकतो परंतु 'मी' मात्र कधीही विसरत नाही. 'मी' हे व्याकरणात सर्वनाम आहे. त्याचा स्त्री-पुरुष, वृद्ध-बालक सर्वजण उपयोग करू शकतात. अनादिकाळापासून हे 'मी'पण आपल्यामागे लागलेले आहे. अंत:करणाचा आश्रय घेतल्यामुळे जीवात्मा संकल्प-विकल्प करतो, निश्चय करतो, चिंतन करतो आणि मी-पणाचा अभिमान देखील वाहतो. अभिमान हेच बंधनाचे कारण आहे आणि अहंकारशून्य होणे हे मुक्तीचे कारण आहे. जीवात्म्याचा पहिला संबंध येतो अहंकाराशी. तो प्रथम 'मी आहे' असे म्हणतो आणि नंतर 'हे माझे' असे म्हणतो. अहंकार आत्म्याच्या अत्यंत जवळ असतो. त्यानंतर चित्त, बुद्धी, मन, प्राण व इंद्रिये यांचा क्रमांक लागतो. शरीर सर्वात बाहेर आहे. इंद्रियांचा समूह म्हणजे शरीर. तुम्हाला 'शरीर दाखवा' असे म्हटले तर तुम्ही जेथे जेथे हात ठेवाल तेथे एखादे इंद्रिय असेल. सर्व इंद्रियांचा समूह हेच शरीर होय. इंद्रिये बाहेर आहेत. त्याच्या आत क्रमश: मन, बुद्धी आहे आणि त्यानंतर आत्मा. आत्म्याचा संबंध सर्वप्रथम बुद्धीशी येतो. बुद्धियुक्त आत्म्याचा संबंध मनाशी होतो आणि मन-बुद्धियुक्त आत्म्याचा संबंध शेवटी शरीराशी येतो. असा हा क्रम आहे. जीवात्मा प्रथम 'अहं' (मी) म्हणतो, नंतर 'मम' (माझे) म्हणतो. जीवात्म्याचा अहंकाराशी संबंध कसा होतो याविषयी पुढे सांगतात-

**जपायोगाद्यथा राग: स्फटिकस्य मणेर्भवेत्।**
**तथाऽहंकारसंबंधादात्मनो देहमानिता।।१८.८।।**

स्फटिकमणी अत्यंत नितळ, शुद्ध असतो. तो जर लाल रंगाच्या फुलावर ठेवला तर तो लाल रंगाचा दिसतो.

लाल रंग हा वस्तुत: स्फटिकाचा गुण नव्हे. परंतु फुलामुळे तो रंगीत दिसतो. त्याप्रमाणे अहंकाराच्या सान्निध्यामुळे मुळात शुद्ध असलेल्या आत्म्यात देहाभिमान दृग्गोचर होतो. मी शरीर आहे असे त्याला वाटू लागते. हाच व्यष्टि–अहंभाव होय. अशा प्रकारे सर्वव्यापक असणारा आत्मा अहंकाराच्या संबंधाने आणवादी मलांमुळे अणुरूप होतो आणि शरीर हेच आपले वास्तव्यस्थान आहे असे मानू लागतो. आत्मा हा सर्व जगाचा आश्रय असला तरी अणुभावामुळे तो अंत:करणाचा आश्रित होतो. त्यानंतर जीवात्म्याचा जन्मजन्मांतराचा प्रवास सुरू होतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

५ नोव्हेंबर १९९४

---

**आशीर्वचन दुसरे**

## आत्मस्थल–२

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जन्म झाल्यापासून माणूस सतत काही ना काही जाणण्याचा आणि काही मिळवण्याचा प्रयत्न करीत असतो. परंतु ज्याला जाणल्यावर सर्व ज्ञात होऊन जाणण्याजोगे काही उरत नाही आणि ज्याचा लाभ झाल्यावर अधिक उत्तम लाभ कोणताच नसतो अशा आत्म्याला जाणणारे फारच कमी असतात. म्हणून श्रुतीत म्हटले आहे–

**क्वचित् धीर: प्रत्यगात्मानमैक्षत्।**
**व्यावृत्तचक्षु: अमृतत्वमिच्छन्।।**

जगात जन्मलेल्या कोट्यवधी जीवांपैकी क्वचित एखादा धीरपुरुषच आत्म्याला जाणतो. आत्मा जाणण्यासाठी मनोवृत्तींना अंतर्मुख करावे लागते. इंद्रिये तर बहिर्मुखच असतात. बाहेरचा शब्द ऐकणे, बाहेरचा स्पर्श अनुभवणे, बाह्य रूप पाहणे, बाहेरचा रस चाखणे आणि बाह्य गंध हुंगणे हा इंद्रियांचा स्वभाव आहे. यासाठी मनुष्याला काही लिहिता–वाचता येण्याची काही अट नाही. अडाणी मनुष्यदेखील हे अनुभव सहज घेत असतो. आत्मज्ञानावाचून कितीही बाह्य ज्ञान मिळवले तरी मनुष्य अज्ञानीच राहतो. मनुष्य सदोदित 'मी–मी' म्हणत असतो. परंतु त्याला 'मी'चा खरा अर्थ कळत नसतो. श्रुतीत म्हटले आहे, 'आत्मा वा अरे द्रष्टव्य:'

आत्मा हा दर्शनीय आहे. सारे जग डोळ्यांनी पाहून देखील तुम्ही तृप्त होणार नाही. आत्मदर्शनाने मात्र पूर्ण तृप्त व्हाल. म्हणून स्वत:कडे पाहावे असे उपनिषदे सांगतात. आम्हाला स्वत:कडे पाहायला वेळ मिळत नाही. हे ठीक आहे, परंतु काही महाभागांना तर आपल्या शरीराकडे पाहायला देखील वेळ मिळत नाही हे फारच नवल आहे. पैसे मिळवण्याची धुंदी डोळ्यांवर अशी चढलेली असते की, पैशाने मिळालेली सुखे ज्या शरीराने भोगायची त्या शरीराकडेच दुर्लक्ष होते. ज्यांचे शरीराकडे लक्ष नाही असे लोक आत्म्याकडे कसे लक्ष देतील? जोपर्यंत वृत्ती अंतर्मुख होत नाही तोपर्यंत आत्मज्ञान होणे अशक्य आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त आत्म्याविषयी म्हटले

आहे–

**अशरीरोऽपि सर्वत्र व्यापकोऽपि निरंजनः।**
**आत्मा मायाशरीरस्थः परिभ्रमति संसृतौ।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.९)

आत्मा जन्ममरणरूपी चक्रात भ्रमत आहे. परंतु त्याचे स्वरूप मुळात कसे आहे ते येथे सांगतात. आत्म्याला शरीर नाही, तो अशरीरी आहे. तो सर्वव्यापक आहे. आकाश हे पंचमहाभूतांतील सर्वांत मोठे भूत आहे. जेथे भूमी नाही, वायू नाही, अग्नी नाही तेथे आकाश मात्र आहेच आहे. अशा सर्वव्यापी आकाशालाही व्यापणारा आत्मा आहे. आकाशाची उत्पत्ती आत्म्यापासनू झाली आहे. आत्मा असा 'मोठा' आहे. प्रत्येकाला मोठे व्हावेसे वाटते. कोणालाही लहान राहावे असे वाटत नाही. असे प्रत्येकाला का वाटते? तर मनुष्याचे वास्तविक रूप–आत्मरूप–मोठे असल्यामुळे त्याला मोठे व्हावेसे वाटत असते. त्याच्या 'मोठे' हेण्याच्या कल्पना वेडगळ असतात एवढेच. 'मोठे' कसे व्हावे हे त्याला माहीत नसते. त्याला वाटते एखादे राजकीय उच्चपद मिळाले तर आपण 'मोठे' होऊ. आपले शरीर कोणत्या खुर्चीवर बसले यावर आपले मोठेपण अवलंबून नाही. खुर्चीवरील मोठेपण हे लौकिक आहे, बाह्य आहे. एखादे उच्चपद मिळवून, खूप संपत्ती मिळवून, भरपूर प्रसिद्ध मिळवून माणसे 'मोठी' होऊ पाहतात. परंतु हे मोठेपण उगवत्या सूर्यापुढे उभे राहिल्यवर आपल्या शरीराची सावली जशी मोठी दिसते त्या सावलीसारखे असते. ते काही खरे नसते. सत्ता, संपत्ती, प्रसिद्धी काही काळ टिकते. सत्ता असेपर्यंत माणूस मोठा असतो. सत्ता गेल्यावर लहान होतो. हे कसले मोठेपण? भले भले सम्राटदेखील सत्ता गेल्यावर लहानात लहान झाले आणि कैदी म्हणून त्यांना उर्वरित आयुष्य कंठावे लागते. म्हणून सत्ता, संपत्ती यांच्यामुळे लाभणारे मोठेपण क्षणभंगुर असते. औपाधिक असते. परंतु न भंगणारे मोठेपण हवे असेल तर आत्मरूप जाणणे हाच एकमेव मार्ग आहे. हे मोठेपण संपादन करण्यासाठी सत्ता–संपत्तीची गरज नसते. लौकिकात तुम्ही लहान, दरिद्री असलात आणि झोपडीत राहत असलात तरी हे मोठेपण मिळवू शकता. तुम्हाला आत्मरूपाचे ज्ञान झाले की तुम्ही जगात सर्वांत मोठे होता. आत्मज्ञानी पुरुषाएवढा मोठा जगात कोणीही नाही.

उपनिषदात एक कथा सांगितली आहे. राजा जानुश्रुती आणि महर्षी रैक्व यांची. जानुश्रुती हा पुण्यवान राजा होता. एकदा राजमहालाच्या गच्चीवर तो शतपावली करीत होता. त्यावेळी आकाशातून दोन पक्षी उडत निघाले होते. एक नर होता तर दुसरी मादी. राजाला पाहून मादी नराला म्हणाली, ''आपण थोडे बाजूने उडत जाऊ या. राजाला ओलांडून जायला नको. कारण हा राजा अत्यंत पुण्यवान आहे.''

नर म्हणाला, ''हा कसला पुण्यवान अन् मोठा? राजपद मिळाले आणि दान देत सुटला म्हणजे थोडाच कोणी मोठा होतो? या राजापेक्षा महर्षी रैक्व मोठे आहेत. त्यांच्या तुलनेने हा राजा कस्पटासमान आहे.''

असे म्हणून ते पक्षी राजाच्या डोक्यावरून उडत निघून गेले. राजाला पक्ष्यांची भाषा कळत होती. त्याची जिज्ञासा जागी झाली. त्याने आपल्या मंत्र्यांना रैक्वाचा शोध घ्यायला पाठवले. खूप गावे पालथी घातल्यावर मंत्र्यांना रैक्व सापडले. विवस्त्र अवस्थेत एका बैलगाडीखाली ते झोपले होते. मंत्र्यांनी त्यांना जागे करून राजाने बोलावल्याचा निरोप दिला. तेव्हा महर्षी म्हणाले,

''माझे तर राजाकडे काहीच काम नाही. मग मी कशाला येऊ? हं, जर तुमच्या राजाला माझ्याकडे काम

असेल तर त्याने इकडे यावे!''

मंत्र्यांनी परत जाऊन राजाला रैक्वाची अवस्था आणि निरोप सांगितला. राजाला आश्चर्य वाटले. परंतु त्याला खात्री होती की पक्षी खोटे बोलत नाहीत. माणूस खोटे बोलतो. म्हणून राजा सर्व लवाजमा घेऊन महर्षींच्या भेटीला आला. त्यांना नमस्कार करून म्हणाला,

''महाराज, आपण अत्यंत पुण्यवान आहात असे मी पक्ष्याकडून ऐकले आहे. परंतु आपल्याकडे पाहिल्यावर असे दिसते की आपल्याकडे तर काहीच नाही. मग आपण मोठे कसे झालात?''

''राजा'', रैक्व म्हणाले, ''काही कमावून माणूस मोठा होत असेल तर ते गमवून तो पुन्हा लहानच होतो. म्हणून असे मोठे व्हावे की पुन्हा कधीच लहान होऊ नये. शास्त्रे सांगतात की, शरीराला आत्मा मानणाऱ्या माणसाला एक कोटी गोहत्त्येचे पातक लागते. जगातली सर्व संपत्ती दान केली तरी एवढे पातक नष्ट होणार नाही. परंतु मी व्यापक आत्मा आहे हे जाणणाऱ्या मनुष्याला एवढा पुण्यलाभ होतो की, एवढे पुण्य, दान, जप, तप यांमुळे देखील लाभत नाही. आत्मज्ञानी पुरुषाएवढा मोठा या जगात कोणीही नाही. मी आत्म्याला जाणले आहे.''

राजाला खरा मोठा कोण आहे हे उमजले आणि तो महर्षींना शरण गेला. अशा प्रकारे आत्मा हा सर्वात मोठा, व्यापक आहे. आत्मा निरंजन अर्थात् निष्कलंक आहे. सर्वव्यापक आणि निष्कलंक असूनही आत्मा संसारात परिभ्रमण का करतो? तर मायाशक्तीमुळे. शिव आणि शक्ती यांच्यापासून ही सृष्टी उत्पन्न झाली. शिवाची शक्तीच सृष्टिनिर्मितीसाठी मायेचे रूप धारण करते. जे असंभव आहे ते घडवण्याचे सामर्थ्य मायाशक्तीच्या ठिकाणी आहे. ज्या क्षणी 'मी एक आहे, मला अनेक व्हायचे आहे' असा संकल्प शिवाच्या ठिकाणी निर्माण झाला त्याच क्षणाला सृष्टिनिर्मिती झाली. असे क्षणार्धात सृष्टी उत्पन्न करण्याचे सामर्थ्य मायाशक्तीजवळ आहे. प्रपंच मुळात शिवरूप असूनही त्याचे आपल्याला दिसणारे रूप म्हणजे माया होय. ती जीवात्म्याला पंचविषयांच्या द्वारे आकर्षित करते. मायेमुळे मोह उत्पन्न होतो. जो विवेक नष्ट करतो तो मोह होय. मायेने परमात्म्याला जणू झाकून टाकले आहे. आत्मा हा परमात्मा आहे आणि देह ही माया आहे. देहाने आत्म्याला असे झाकून टाकले आहे की देहाच्या आत आत्मा नांदतो हे जड बुद्धीला पटूच नये. मायेचे सर्व व्यवहार शिवाच्या सामर्थ्यानेच चालू असतात. परंतु त्याला झाकून तीच आपल्यासमोर विश्वाचे लाघवी रूप होऊन उभी असते. सूर्याला ढगांनी आच्छादून टाकल्यावर आपल्याला सूर्य दिसत नाही, त्याला झाकणारे ढग दिसतात. परंतु ढग तर सूर्यप्रकाशामुळेच दिसत असतात. तशी अवस्था मायेची आहे. ती शिवाला लपवते, परंतु तिचे अस्तित्व आणि व्यवहार शिवावरच अवलंबून असतात. आपण हा प्रपंच पाहतो तो आत्म्याच्या सामर्थ्यानेच; परंतु आत्म्याचे ज्ञान आपल्याला नसते. आपण मायेच्या अधीन असतो. त्यामुळे आत डोकावून पाहत नाही. केवळ बाहेरच पाहत असतो.

रावणाने आत्मलिंगाच्या प्राप्तीसाठी कठोर तपस्या केली तेव्हा भगवान शंकर प्रसन्न होऊन त्याच्यासमोर उभे राहिले आणि त्याला 'वरं ब्रूहि' म्हणाले. त्याच क्षणी मायेने रावणाच्या मनात प्रवेश केला आणि आत्मलिंग मागण्याऐवजी त्याने पार्वती मागितली. मायेचा प्रताप असा आहे. रावणाची अशी अवस्था पाहून आपण हसतो; परंतु आपली स्थिती यापेक्षा वेगळी कुठे असते? मनुष्य मंदिरात जातो तेव्हा तो सारी सुखे आणि सुखसाधने मागत असतो. सुखे देण्याचे सामर्थ्य असलेला परमेश्वर मात्र त्याला नको असतो. त्याला हवे असते धन, संपत्ती, बुद्धी आणि आणखी खूप काही. परमेश्वराची पूजा करून, त्याची स्तुति-स्तोत्रे गाऊन माणूस त्याला आवाहन करतो

आणि तो आल्यावर त्याची माया मागतो. सर्व प्रपंच ही त्याचीच माया आहे. या मायेमुळे परमात्मा आहे की नाही असा संदेह माणसाच्या मनात उत्पन्न होत असतो. शरीर हे मायाप्रदत्त आहे. जोपर्यंत मायेला ओलांडून पुढे जात नाही, तोपर्यंत परमात्म्याची प्राप्ती होत नाही. आत्मा जेव्हा मायारूपी शरीरात प्रवेश करतो तेव्हा स्वत:ला शरीर समजून बसतो. त्याच्या ठिकाणी असा शरीरात्मभाव दृढ झाला की, जरा-मरण आदी विकार त्याच्या मागे लागतात, त्याला ग्रासून टाकतात. अशा प्रकारे सर्वव्यापक आणि निष्कलंक असून देखील मायाशरीर प्राप्त झाल्यामुळे आत्मा संसारात भ्रमण करीत असतो.

**आत्मस्वरूपविज्ञानं देहेंद्रियविभागत:।**
**अखंडब्रह्मरूपेण तदात्मप्राप्तिरुच्यते॥१८.१०॥**

आत्मा मायाशरीरात प्रविष्ट झाल्यावर त्याला स्व-रूपाचे ज्ञान कसे होईल? स्व-रूपाचा विसर पडल्यामुळेच तर त्याचा शरीराशी संबंध जडला. स्व-रूपाला विसरून तो शरीराला आत्मा मानू लागला आहे. काही लोक शरीराला आत्मा मानतात, काही इंद्रियांना आत्मा मानतात, काही प्राणाला, काही मनाला तर काहीजण बुद्धीला आत्मा मानतात. आत्म्याला 'आत्मा' मानणारे संख्येने थोडे आहेत. आत्मानात्मविवेकाने आपण आत्म्याला जाणू शकतो. शरीर, मन, प्राण, बुद्धी या अनात्म-तत्त्वांना जोपर्यंत आपण नीट समजून घेत नाही तोपर्यंत आपल्याला आत्म्याच्या स्वरूपाचा बोध होत नाही. चार्वाकदर्शनाने शरीरालाच आत्मा मानले आहे. त्यांच्या मते मरण हीच मुक्ती होय. ऋण काढून खावे-प्यावे, मौज करावी, ऋण फेडण्याची चिंता करू नये. कारण ऋणको आणि धनको या दोघांच्याही शरीराची मृत्यूनंतर राख होत असते. म्हणून त्यावेळी घेण्या-देण्याचा व्यवहार शिल्लक राहत नाही. असे चार्वाकाचे तत्त्वज्ञान आहे. जे केवळ शरीराविषयीच विचार करतात ते चार्वाक होत.

शरीर हा आत्मा का नाही? श्रुतीत म्हटले आहे की, आत्मज्ञान झाल्यावर शोक-मोह नष्ट होतो. परंतु शरीराला आत्मा मानणाऱ्यांच्या ठिकाणी हे विकार उपस्थित असलेले दिसतात. सगळ्यांच्या डोळ्यांमध्ये अश्रू असतात. माणसे प्रथमदर्शनी एकमेकाकडे पाहून हसतात. छान छान बोलतात. परंतु नंतर सहज त्यांच्या काळजाला स्पर्श झाला की मग त्यांचे डोळे भरून येतात. ते दुसऱ्यांसमोर आपले दु:ख व्यक्त करतात. शरीराला आत्मा मानणारा कोणी मनुष्य शोक-मोहापासून मुक्त नाही. आत्मज्ञानाने शोक-मोह नष्ट होतात असे श्रुती सांगते. परंतु शरीराच्या ज्ञानाने हे विकार नष्ट झाल्याचे एकही उदाहरण सापडत नाही. म्हणून शरीराला आत्मा मानणे उचित नव्हे. जन्माला येताना प्रत्येक जण रडत येतो; परंतु मरताना जो रडत जातो तो देहात्मवादी असतो, आत्मज्ञानी नव्हे. शरीर म्हणजे इंद्रियांचा समूह. म्हणून काही जण इंद्रियांना आत्मा मानतात. परंतु इंद्रियांच्या ज्ञानामुळेही शोक-मोह नष्ट होत नाही. त्यामुळे इंद्रियांनाही आत्मा मानणे योग्य ठरत नाही. हीच गोष्ट प्राणाच्या बाबतीत घडते. मन आणि बुद्धीच्याही बाबतीत हे खरे आहे. त्यामुळे प्राण, मन आणि बुद्धी यांनाही आत्मा मानता येत नाही.

वेदान्तशास्त्रात आत्मानात्मविवेक सांगितला जातो. आत्मा काय आहे? आणि अनात्मा काय आहे? तर जो पाहतो तो 'आत्मा' आणि जे दिसते ते 'अनात्म' होय. हे जरा नीट समजावून घ्यावे लागते. डोळे वस्तू पाहतात, म्हणून वस्तू 'अनात्मा' आणि डोळा 'आत्मा' आहे असे क्षणभर मानू. परंतु डोळ्यांकडून पाहण्याची क्रिया नंतर निरंतर घडत नाही. डोळे डोळ्यांना पाहू शकत नाहीत. डोळ्यांत कचरा गेला तर त्याचे ज्ञान आपल्याला होते.

ते कसे होते बरे? तर डोळ्यांना पाहणारे मन असते. डोळे प्रपंचाला पाहतात तर डोळ्यांना मन पाहते. अशाप्रकारे मनाला बुद्धी पाहते आणि बुद्धीला जाणणारे तत्त्व म्हणजे आत्मा होय. शरीरापेक्षा इंद्रिये सूक्ष्म, इंद्रियांपेक्षा मन सूक्ष्म, मनापेक्षा बुद्धी सूक्ष्म आणि बुद्धीपेक्षा आत्मा सूक्ष्म आहे. यालाच 'दृश्यादृश्यविवेक' म्हणतात. पाहणारा म्हणजे द्रष्टा आत्मा आहे. जे दृश्य आहे ते अनात्मा आणि जो द्रष्टा आहे तो आत्मा होय. नेत्राच्या दृष्टीने प्रपंच अनात्मा, मनाच्या दृष्टीने नेत्र अनात्मा, बुद्धीच्या दृष्टीने मन अनात्मा आणि आत्म्याच्या दृष्टीने बुद्धी अनात्मा होय. याप्रमाणे शरीर, मन, बुद्धी असे विभाग करीत त्यांच्याविषयी विचार केल्यावर आत्मा काय आणि अनात्मा काय याचे ज्ञान होते.

स्थूल महाभूतांपासून शरीर बनलेले असते त्याप्रमाणे सूक्ष्म महाभूतांपासून इंद्रिये बनलेली असतात. अशा प्रकारे प्राण, मन आणि बुद्धी यांची अवस्था आहे. आत्मानात्मविवेकाने शरीर, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी हे अनात्म पदार्थ असून यांच्यापलीकडे जे चैतन्य आहे ते आत्मा होय, असे ज्ञान होते. आत्मा कसा आहे? तर अखंड ब्रह्मरूप. ब्रह्म आणि आत्मा यात भेद नाही. जे सर्वांत मोठे तत्त्व ते 'ब्रह्म' होय. आत्मादेखील सर्वव्यापक आहे. तो वेगवेगळ्या शरीरात दिसतो. परंतु मुळात तसा नाही. तो ब्रह्म असल्याने एकच आहे आणि अखंड आहे. त्याचे विभाजन होऊ शकत नाही. भूतांचे विभाजन करणे शक्य नाही तर आत्म्याचे विभाजन कसे करता येईल? भावाभावांत भांडण झाल्यावर शेतजमिनीची वाटणी करतात. त्यावेळी शेताचा एक तुकडा तोडून थोडाच देता येतो? त्याच शेतात बांध घालून हे माझे-ते तुझे अशी वाटणी करतात. पृथ्वीचे विभाजन करता येत नाही. हेच आकाशाच्या संदर्भात खरे आहे. घर बांधले की आकाश वेगळे झाले असे वाटते. पण खरेच आकाशाचा तुकडा पडलेला असतो काय? जेथे महाभूतांचे विभाजन होत नाही तेथे सर्वव्यापी आत्मतत्त्वाचे विभाजन कसे होईल? आत्मा असा अखंड आहे. तो ब्रह्मरूप आहे याचा अर्थ सर्व प्राणिमात्रात, चराचरात तो व्याप्त आहे. आत्मज्ञानाने ज्याची दृष्टी ब्रह्मरूप झालेली असते तो सर्व चराचराकडे समदृष्टीने पाहत असतो. ब्राह्मण असो की गाय, हत्ती असो की चांडाळ त्या सर्वांकडे तो समत्वबुद्धीनेच पाहतो. शारीरिक दृष्टीने सारे भिन्न असतात. परंतु त्यांच्या ठिकाणी असलेला आत्मा एक असतो. कोणी राजमहाल बांधलेला असेल तर कोणी झोपडी, परंतु राजमहालातले आणि झोपडीतले आकाश मात्र एक असते. त्याप्रमाणे शरीरे वेगळी असली तरी सर्वांचा आत्मा एक असतो, अखंड असतो, हे ज्ञान ज्याला होते त्याला आत्म्याची प्राप्ती झाली असे समजावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
६ नोव्हेंबर १९९४



## आत्मस्थल – ३

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आत्मज्ञान प्राप्त करणे हे मनुष्याचे अंतिम ध्येय आहे. मनुष्यदेहाशिवाय अन्य कोणत्याही देहात आत्मज्ञान प्राप्त करणे शक्य नाही. त्यामुळे मनुष्यजन्म अत्यंत श्रेष्ठ मानला जातो. लक्षावधी मनुष्यांत एखादाच आत्मज्ञान मिळवतो. बाकी सारे शरीराला आत्मा मानूत जन्ममरणाची अंखड यात्रा करीत असतात. अशांचे जन्म-मरणदुःख पाहून ज. रेणुकाचार्यांना त्यांचा कळवळा आला आणि महर्षी अगस्त्यांचे निमित्त करून त्यांनी अखिल मानवजातीला आत्मज्ञानप्राप्तीचा मार्ग दाखवून दिला. गेले दोन दिवस आत्मस्थलाचा विचार आपण करीत आहोत. आत्मा सर्वव्यापक, अखंड आहे हे काल तुम्ही ऐकले आहे. आता हा अखंड आत्मा खंडित, परिच्छिन्न का दिसतो, हे ज. रेणुकाचार्य सांगत आहेत.

**न चास्ति देहसंबंधो निर्देहस्य स्वभावतः।**
**अज्ञानकर्मयोगेन देही भवति भुक्तये॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.११)

आत्मा हा निर्देही आहे. देह हा भौतिक असतो. पंचमहाभूतांनी बनलेला असतो. काही शरीरांत परिस्थितीप्रमाणे एखाद्या भूताचा अंश अधिक असतो. मनुष्यशरीरात पृथ्वीचा अंश अधिक आहे तर जलचर प्राण्यांत जलांशाचे आधिक्य आहे. परंतु कोणतेही शरीर पाचभौतिक असते हे खरे. देह भौतिक असल्यामुळे आणि आत्मा महाभूतांच्या पलीकडला असल्यामुळे वस्तुतः आत्म्याला शरीर नसून तो अशरीरी आहे. त्याचा कोणत्या शरीराशी संबंधदेखील नाही. शरीर नसूनही आत्मा अज्ञान आणि कर्मांमुळे 'शरीरी' झाला आहे. अज्ञानामुळे आत्मा स्वतःचे व्यापक स्वरूप विसरतो आणि स्वतःला संकुचित देह समजू लागतो. मग त्याच्याकडून शुभाशुभ कर्मे घडतात. शुभाशुभ कर्मांना शास्त्रात विहित कर्म आणि निषिद्ध कर्म अशी नावे आहेत. जी कर्मे करा असे शास्त्र सांगते ते विहित कर्म आणि जे करू नका असे शास्त्र सांगते ते निषिद्ध कर्म होय. विहित कर्माचरणामुळे पुण्यप्राप्ती होते तर निषिद्ध कर्माचरणाने पाप होते. पुण्य-पापानेच मनुष्याच्या जीवनाची दिशा निश्चित होते. सामान्यतः मनुष्याची प्रवृत्ती निषिद्ध कर्मे करण्याकडे असते. उद्योग-व्यवसाय करून संपत्ती मिळवायला उशीर लागतो. म्हणून माणूस चोरी करून किंवा भ्रष्टाचार करून लवकरात लवकर श्रीमंत होण्याचा प्रयत्न करतो. कमी कष्टाने पटकन धन मिळत असेल तर कशाला पुण्य-पापाची काळजी करायची, आहे तो क्षण भोगून घ्यावा असा विचार तो करीत असतो. क्षणिक भोगांकडेच त्याची प्रवृत्ती असते. परंतु पुढील आयुष्यात त्याच्यावर पश्चात्ताप करण्याची पाळी येते. पाणी उताराकडे वाहते त्याप्रमाणे मनुष्याचा स्वाभाविक कल निषिद्ध कर्माचरणाकडे असतो. पाण्याला टेकडीवर नेताना जसे श्रम पडतात त्याप्रमाणे विहित कर्मे निश्चयाने, श्रमाने करावी लागतात. थोडे विहित आणि बरेचसे निषिद्ध अशी कर्मे जीवात्म्याकडून घडतात. हे अज्ञानामुळे होते. म्हणून तो शरीरी होतो. कारण शरीराशिवाय कर्मफलांचा भोग घेता येत नाही. शरीर हेच सुख दुःखभोगाचे साधन आहे. म्हणून कर्मफळे भोगण्यासाठी अशरीरी आत्म्याला शरीरी व्हावे लागते. भोक्ता होण्याआधी कर्ता व्हावे लागते. जो कर्म करतो

त्यालाच त्याचे फळ भोगावे लागते.

सर्वव्यापी आणि अशरीरी आत्मा संकुचित आणि शरीरी कसा होतो ? याचे उत्तर वीरशैवाचार्यांनी दिले आहे. ते म्हणतात, ही भगवान शिवाची लीला आहे. सृष्टी भगवंताची लीला आहे. सृष्टीत असलेले जीव परमात्म्याचे अंश होत. अखंड परब्रह्मच मनोविनोदनासाठी जणू खंडित होऊन असंख्य जीवांच्या रूपांनी सृष्टीत आले आहे. एखादा सम्राट गंमत म्हणून मनोरंजनासाठी लहान मुलांसोबत लहान होऊन खेळतो. त्यावेळी तो लहान मूल असतो. परंतु त्याचे सम्राटपद हरवलेले नसते. त्याप्रमाणे परमात्मा अखंडत्व कायम राखून मनोविनोदासाठी जीवात्मा होऊन खेळत आहे. प्रपंचाकडे पाहण्याची दृष्टी अशी वेगळी असू शकते. प्रपंच दुःखमय आहे, त्यामुळे दुःख तर भोगायचेच आहे. शरीर आहे म्हणून कर्मे घडणार. कर्मे घडणार म्हणून सुखदुःखे भोगावीच लागणार. त्यातून सुटका नाही. परंतु ही सारी क्रीडा आहे आणि ही आनंदासाठी चालली आहे अशा दृष्टीने या विश्वसंसाराकडे पाहिले तर सर्व दुःखे हसत सहन करण्याची शक्ती आपल्याला प्राप्त होते. त्यासाठीच ही परमात्म्याची क्रीडा आहे असे समजायचे.

**नासौ देवो न गंधर्वो न यक्षो नैव राक्षसः।**
**न मनुष्यो न तिर्यक्च न च स्थावरविग्रहः।।१८.१२।।**

जीव नेमका कसा आहे, हे या श्लोकात ज. रेणुकाचार्यांनी सांगितले आहे. जीव हा देव नाही, गंधर्व नाही, यक्ष नाही, राक्षस नाही. तो मनुष्य नाही, खेकड्यासारखा तिर्यक प्राणी नाही. झाड, दगड यासारखा स्थावर पदार्थ देखील नाही. तो या सर्वांपेक्षा वेगळा आहे. जेव्हा आत्म्याला आपल्या पुण्यकर्मामुळे देवाचे शरीर मिळते तेव्हा त्याला देवशरीर समजले जाते. याप्रमाणे आत्मा गंधर्वाच्या शरीरात प्रविष्ट होतो तेव्हा त्याला गंधर्व म्हणतात. यक्षाच्या शरीरात जातो तेव्हा यक्ष म्हणतात. राक्षसाच्या शरीरात जातो तेव्हा राक्षस म्हणतात. त्याला मनुष्यशरीर मिळाले तर तो मनुष्य म्हणून ओळखला जातो. प्राण्यांच्या शरीरात त्याला प्राणी म्हणतात. वृक्ष आणि इतर स्थावर शरीरात तो त्या त्या नावाने ओळखला जातो. देव, राक्षस, मनुष्य ही शरीरांची नावे आहेत, आत्म्याची नव्हेत. तो स्त्री नाही, तो पुरुष नाही. ज्या शरीरात तो प्रविष्ट होतो त्या शरीराच्या नावाने तो ओळखला जातो. शरीरे आत्म्याला आपल्या कर्मानुसार मिळालेली असतात. दुकानात विविध आकाराची आणि कमीअधिक किंमतीची वस्त्रे असतात. परंतु आपल्या मापाची आणि आपल्या खिशाला परवडणारी वस्त्रेच आपण विकत घेत असतो. त्याप्रमाणे जशी कर्मे असतील तसे शरीर जीवात्म्याला मिळत असते.

जीवात्मा देहधारण कसे करतो याविषयी येथे विचार केला पाहिजे. शास्त्राच्या मते सूक्ष्म रूपाने जीवात्मे सर्वत्र वावरत असतात. ते अन्नासोबत आपल्या शरीरात प्रवेश करतात. मानवी शरीरात जणू अचेतनाला चेतन करण्याची क्रिया सुरू असते. अन्न हे निर्जीव असते, परंतु अन्नापासूनच अस्थी, मांस, मज्जा, रक्त, शुक्र इ. धातूंची निर्मिती होते. शुक्राणू आणि बीजांडे यांच्या संयोगाने मातेच्या गर्भाशयात शरीराची निर्मिती होते. शुक्राणू हा अतिसूक्ष्म जीवात्माच असतो. त्याचे अणू शरीर हे देखील एक प्रकारचे शरीरच असते. हा शुक्राणू बीजांडात शिरल्यावर स्वतःच्या कर्मानुसार, आपल्याला हवे तसे तेथील द्रव्यातून शरीर बनवून घेतो. एखाद्या साच्यात मूर्ती बनवावी त्याप्रमाणे जणू आपल्या कर्माच्या साच्यात तो देह घडवतो. सापाच्या शरीरावरची कात जशी सापाच्या आकाराचीच असते त्याप्रमाणे शुक्राणूरूपी जीवात्म्याचे सूक्ष्म शरीर जसे असेल तसे त्याचे स्थूल शरीर उत्पन्न होते. याच कारणामुळे सख्ख्या भावांची शरीरे एकसारखी नसतात. आणि मूल म्हणजे सर्वार्थाने आईबापांची

प्रतिकृती नसते. ते एक स्वतंत्र व्यक्तिमत्व असते. पुरुषाच्या शुक्रात असंख्य जीवाणू असतात. त्यापैकी एखाद्यालाच जन्म घेण्याची संधी प्राप्त होते. अशाप्रकारे अन्नासोबत पुरुषाच्या शरीरात जीवात्मा प्रवेश करतो, त्याच्या शुक्रात जीवाणू म्हणून राहतो, नंतर स्त्रीच्या बीजांडात प्रवेश करून तिच्या गर्भाशयात शिरतो आणि तेथे आपल्या सूक्ष्मशरीराप्रमाणे स्थूलशरीर बनवून घेतो. चमत्कार वाटावा अशा या विलक्षण प्रक्रियेने मनुष्याचे स्थूल शरीर उत्पन्न होते. जीवाला जन्म देताना परमेश्वराला किंवा त्याच्या प्रकृतीला किती विचार करावा लागला असेल!

विशिष्ट जीवात्मा विशिष्ट पुरुषाच्या शरीरातच का प्रवेश करतो, अर्थात् जीवात्मा एका ठराविक पुरुषाची 'बाप' म्हणून निवड का करतो? हे एक गूढ आहे. कदाचित् समोर अनेक वाटा असल्या तरी त्या बंद करून फक्त एखादीच वाट चालण्यासाठी शिल्लक ठेवावी त्याप्रमाणे जीवात्म्याला विशिष्ट पुरुषाच्या देहात प्रवेश करण्याशिवाय दुसरा पर्यायच राहात नसावा. हे कसे घडते याची आपल्याला माहिती नाही, परंतु आपल्या जगात गुन्हा केलेल्या कैद्याला तुरुंगाधिकारी जशी एका विशिष्ट खोलीत राहण्याची सक्ती करतो त्याप्रमाणे कदाचित सूक्ष्म जगात एखादी व्यवस्था असेल. परंतु हा केवळ एक तर्कच. प्रत्यक्षात काय घडते ते कुणालाही सांगता येणार नाही. आश्चर्य हे की पुरुषाच्या शुक्रात असलेल्या असंख्य शुक्राणंपैकी जन्म घेणारे थोडे असतात आणि मरणारेच अधिक असतात. जगातल्या सगळ्या पुरुषांच्या शरीरांतील सर्व शुक्राणूंना जर जन्म घेण्याची संधी मिळाली तर पृथ्वीवर पाय ठेवायला देखील जागा मिळणार नाही इतकी प्रचंड गर्दी होईल. परमेश्वराच्या प्रकृतीने या धोक्याचाही विचार आधीच करून ठेवलेला असावा. त्यामुळे धृतराष्ट्राच्या शंभर मुलांचा अपवाद सोडला तर एका शरीरातील अधिक शुक्राणूंनी जन्म घेतल्याचे दुसरे उदाहरण सापडत नाही.

जीवात्म्याला तत्त्वज्ञानात 'पुरुष' अशी संज्ञा आहे. येथे पुरुष म्हणजे पुल्लिंगी व्यक्ती नव्हे. पुर म्हणजे शरीर, जो पुरात राहतो तो पुरुष अर्थात् आत्मा. आत्मा हा चेतन असतोच. परंतु झाडे, दगड आदी जड वस्तूही चैतन्यमय असतात. त्यातील चैतन्य सूक्ष्म असते. म्हणून येथे पाषाणादी जड पदार्थांनाही स्थावर शरीर म्हटले आहे. या अर्थाने संपूर्ण विश्व चैतन्यमय आहे. 'जड' म्हणता येईल असे काहीच अस्तित्वात नाही.

**नानाकर्मविपाकाश्च नानायोनिसमाश्रिताः।**
**नानायोगसमापन्ना नानाबुद्धिविचेष्टिताः।।१८.१३।।**
**नानामार्गसमारूढा नानासंकल्पकारिणः।**
**अस्वतंत्राश्च किंचिज्ज्ञाः किंचित्कर्तृत्वहेतवः।**
**लीलाभाजनतां प्राप्ताः शिवस्य परमात्मनः।।१८.१४।।**

जीव असंख्य आहेत त्याप्रमाणे त्यांची कर्मेही असंख्य आहेत. सर्व जीवात्म्यांना एकाच प्रकारची शरीरे का मिळाली नाहीत? सर्व जीवात्मे पशू का झाले नाहीत? सर्व 'देव' का झाले नाहीत? परंतु जीवांकडून घडलेली कर्मे भिन्न भिन्न असल्यामुळे कर्मानुसार त्यांना वेगवेगळ्या योनीत जन्म घ्यावा लागतो. मनुष्यजन्म मिळाला तरी दोन मनुष्यांची शरीरे सारखी नसतात.

इतके वैविध्य सृष्टीमध्ये आहे. मनुष्यशरीर म्हणजे एखाद्या कारखान्यातून काढलेला एक प्रकारचा माल नव्हे. एकाच आईबापाच्या पोटी जन्म घेणारी चार मुले शरीराने आणि प्रवृत्तीने भिन्न असतात. याचे कारण कर्मे वेगवेगळ्या प्रकारची असतात हे होय. जो जसे कर्म करतो तसे त्याला शरीर मिळते आणि कर्मानुसार त्याचे जीवन नियत होते. झाडावरची फळे पिकल्यावर खायला योग्य होतात. त्याप्रमाणे मनुष्यांच्या असंख्य कर्मांपैकी जी कर्मे पक्व होतात त्यांची फळे त्याला भोगावी लागतात. कर्माप्रमाणेच जीवात्मा कधी देव होतो, कधी मानव तर कधी राक्षस. कर्मामुळेच तो कधी पशू होतो, कधी वृक्ष तर कधी दगड. असे चौऱ्यांशी लक्ष योनींतून त्याचे अखंड भ्रमण चाललेले असते. त्याचे अनेकांशी अनेक प्रकारचे संबंध असतात. प्रत्येकाची बुद्धी भिन्न भिन्न असते. अनेक जीव वेगवेगळ्या संप्रदायांचे अनुयायी असतात. भिन्न भिन्न सांप्रदायिक एकमेकाशी 'तुझा देव मोठा की माझा' म्हणून भांडत असतात. जेव्हा दुसरा कोणी भांडायला मिळत नाही तेव्हा काही तरी निमित्त काढून स्वत:च्या संप्रदायातील लोकांशी लोक भांडत बसतात. संप्रदाय भिन्न असले तरी त्यांचे लक्ष्य मात्र एकच असते, हे वेड्या लोकांना उमगत नाही. आकाशातून पडलेला पाऊस विविध नद्यांच्या रूपाने एकाच समुद्रात जाऊन मिळतो. त्याप्रमाणे शैव, वैष्णव, शाक्त आदी सर्व संप्रदायांचे प्रमुख ध्येय आत्मज्ञानप्राप्ती हेच असते. ज्यांनी संप्रदायांची स्थापना केली ते महापुरुष परस्परांशी कधी भांडले नाहीत. शिव, विष्णू, राम, देवी आदी विविध संप्रदायांच्या उपास्यदेवांनी संघर्ष केल्याचे कुठे नमूद नाही. सर्व धर्म-संप्रदायांनी सदैव मनुष्याच्या मुक्तीचीच मंगलकामना केली आहे. तरीही सांप्रदायिक अभिनिवेशाने माणसे भांडत बसतात, हे मोठे नवल होय.

मग इतक्या संप्रदायांची गरज काय? असा प्रश्न कोणाला पडेल. मानवाच्या विविध प्रवृत्तींचा आणि विविध भावनांचा विचार करून वेगवेगळ्या संप्रदायांची निर्मिती झाली आहे. एका गावात दहा डॉक्टर असले तरी काही बिघडत नाही. कारण प्रत्येकाकडे येणारे रुग्ण वेगवेगळे असतात. सर्व डॉक्टर आपापल्या रुग्णांवर उपचार करून गावाचे एकूण स्वास्थ्य सांभाळत असतात. परंतु एकाच रोग्यावर जह दहा डॉक्टरांनी एकाच वेळी उपचार करायला सुरुवात केली तर त्या रोग्याला राम म्हणण्याशिवाय गत्यंतर नाही. घोटाळा होतो तो इथेच. एकच मनुष्य जेव्हा पक्ष बदलावे तसा संप्रदाय बदलत फिरतो तेव्हा त्याला काहीच लाभ होत नाही. उलट कोणत्याच संप्रदायात अर्थ नाही असा त्याचा समज होऊन तो विकृत होण्याचा संभव असतो. यासाठी धर्मोपदेशकाची दृष्टी विशाल असावी लागते. कोणत्याही मताचे, संप्रदायाचे खंडन करण्याची वृत्ती त्यांच्या ठिकाणी नसावी. म्हणून ज. रेणुकाचार्यांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त प्रारंभीच म्हटले आहे-

**सांख्यं योगः पांचरात्रं वेदाः पाशुपतं तथा।**
**एतानि मानभूतानि नोपहन्यानि युक्तिभिः।।५.४।।**

सांख्य, योग, पांचरात्र (वैष्णवसिद्धान्त), आणि पाशुपत मत यांचे कोणी खंडन करू नये. एखाद्या मताचे खंडन करणे यात विशेष काही नाही. परंतु सर्व मतांचा समन्वय करणे हे मात्र विशेष आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त कोणत्याही मताचे खंडन न करता सर्वांचा समन्वय करून आपल्या मताचे प्रतिपादन ज. रेणुकाचार्यांनी केले आहे. सर्व संप्रदाय आपल्या अनुयायांना आत्मज्ञानाकडेच नेत असतात. परंतु जो आपला संप्रदाय असतो त्याचेच अनुसरण करण्यात हित असते. यासाठी प्रत्येकाने आपल्या संप्रदायाशी एकनिष्ठ असले पाहिजे. ज्याला एका संप्रदायाशी निष्ठा राखता येत नाही असा मनुष्य दुसऱ्या संप्रदायाशी तरी कशी निष्ठा राखू शकेल? ज्या संप्रदायात

आपला जन्म झाला तोच आपला उत्कृष्ट धर्म आहे असे मानून त्याचे आचरण केले पाहिजे. आपला धर्म, आपले गुरू यांना सर्वश्रेष्ठ मानावे, परंतु अन्य धर्माचा आणि गुरूंचा कदापि अवमान करू नये.

अशा प्रकारे जीवांचे संप्रदाय भिन्न भिन्न असतात. प्रत्येकांचे संकल्प देखील वेगवेगळे असतात. जीव स्वतंत्र नसतात. ते कर्मपाशांनी बांधलेले असतात. कर्म जिकडे नेईल तिकडे त्यांना निमूटपणे जावे लागते. व्यवहारात याचा अनुभव आपण नेहमी घेत असतो. कितीही प्रयत्न केला तरी आपण एखाद्या ठिकाणी वेळेवर पोहोचू शकत नाही. नेमके सांगायचे झाले तर नियतीने ठरवून दिलेल्या वेळीच आपण तिथे पोहोचतो, आपण ठरवलेल्या वेळी नव्हे. तुम्ही वेळेवर स्टेशनवर पोहोचलात परंतु आगगाडी लेट झाली तर? आपण स्वतंत्र नसून परतंत्र आहोत असा अनुभव आपल्याला बऱ्याचदा येत असतो. जीवात्मा कर्माधीन असल्यामुळे स्वतंत्र नाही. जीवात्मा अल्पज्ञ आहे. कोणत्याही मनुष्याला जगातल्या सर्व विषयांचे ज्ञान असू शकत नाही. जीवात्मा अल्पज्ञ आहे तसाच अल्पकर्ता देखील आहे. त्याचे कर्तृत्व मर्यादित आहे. असे असंख्य जीव कर्मानुसार नाना योनीत जन्म घेतात. नाना प्रकारच्या साधना करतात, नाना संप्रदायांचे अनुसरण करतात आणि अल्पज्ञ व अल्पकर्तृत्व होऊन भगवान शिवाच्या जगरूपी नाटकाच्या खेळातले पदार्थ होऊन राहतात.

**आम्ही बाहुल्यांच्या जाती। सूत्रदोरी तुझे हाती।।**

अशी संत शिवदासांनी वर्णिल्याप्रमाणे जीवांची स्थिती असते.

**चोदिताः परमेशेन स्वस्वकर्मानुरूपतः।**
**स्वर्गं वा नरकं वापि प्राणिनो यान्ति कर्मिणः।।१८.१५।।**

ज्याचे जसे कर्म असते तसा त्याला जन्म मिळतो. ज्याचे कर्म उत्कृष्ट असते तो देव होऊन स्वर्गात राहतो. तर ज्याचे निकृष्ट असते त्याला नरकवास मिळतो. हे सर्व परमेश्वराच्या प्रेरणेने होत असते. स्वर्ग-नरक-मृत्युलोक असा जीवाचा प्रवास सतत चालू असतो.

**पुनः कर्मावशेषेण जायन्ते गर्भकोटरात्।**
**जाता मृताः पुनर्जाताः पुनर्मरणभाजिनः।**
**भ्रमन्ति घोरसंसार विश्रांति कथया विना।।१८.१६।।**

जीव स्वर्गात किंवा नरकात आपल्या कर्मांची फळे जेव्हा भोगतात तेव्हा त्यांच्या अवशिष्ट कर्माने ते पुन्हा जन्म घेतात, पुन्हा मरतात. मनुष्य तीर्थयात्रेला जातो तेव्हा जवळचे सगळे पैसे खर्च करतो, परंतु घरी परत येण्यासाठी प्रवासाइतके पैसे शिल्लक ठेवतो. त्याप्रमाणे स्वर्गात किंवा नरकात गेलेला जीवात्मा तेथे कर्मांची फळे भोगल्यावर नवा जन्म घेतो. जन्म घेतला की मृत्यू आलाच. मृत्यू आला की पुन्हा जन्म आलाच. असे जन्म-मरणाचे चक्र अखंड भ्रमत राहते. जीवात्म्याला थोडी देखील विश्रांती मिळत नाही. अशी त्याची अवस्था का झालेली असते? तर तो आपले मूलस्थान विसरलेला असतो म्हणून. जे स्थानभ्रष्ट होतात त्यांच्या नशिबी अशी भ्रमंती येत असते. आत्मभावाचा विसर पडून जीवभाव दृढ झाल्यामुळे जीवात्म्याच्या मागे जन्ममरणाचे संसारचक्र लागले आहे. संसार घोर आहे. घोर म्हणजे भयंकर. संसारात कष्ट अधिक आहेत. सुख मात्र अत्यल्प आहे. थोडे सुख मिळवण्यासाठी खूप दुःख सोसावे लागते. घोर संसारात जीवात्म्याला सतत यावे-जावे लागते. अशा

या घोर संसारातून सुटका कशी करून घ्यावी हे पुढील शेवटच्या श्लोकात सांगतात–

**जीवत्वं दुःखसर्वस्वं तदिदं मलकल्पितम्।**
**निरस्यते गुरोर्बोधाज्ज्ञानशक्तिः प्रकाशते।।१८.१७।।**

जीवभाव हे दुःखसर्वस्व आहे. मनुष्याचे जीवन दुःखाने भरलेले आहे. घर, शेती, धन अशा मालमत्तेला व्यवहारात 'सर्वस्व' असे म्हणतात. दुःख हेच जीवाचे सर्वस्व होय, असे या ठिकाणी सांगितले आहे. अत्यंत दुःख देणारा जीवभाव आणव, मायीय आणि कार्मिक या तीन मलांमुळे प्राप्त झालेला आहे. मग या दुःखापासून जीवात्म्याची कधीच सुटका होणार नाही काय? तर गुरूच्या उपदेशाने आणि गुरूकडून मिळालेल्या दीक्षेने या दुःखाचा परिहार होतो. मलत्रयांच्या निवृत्तीसाठी वीरशैवांना दीक्षा दिली जाते.

तीन मलांना 'पाश' अशीही संज्ञा आहे. प्रत्येक मल नष्ट करण्यासाठी एक दीक्षा संस्कार केला जातो. आणवमल नष्ट करण्यासाठी वेधदीक्षा दिली जाते. शिष्याच्या मस्तकावर आपला पवित्र हात ठेवून श्रीगुरू त्याला भावलिंगाचा उपदेश करतात. 'मी शिव आहे' ही भावना म्हणजे भावलिंग होय. 'तू शिव आहेस' हा बोध हीच शिवदीक्षा होय. मायामल नष्ट करण्यासाठी मंत्रदीक्षा दिली जाते. मनात प्रत्येक वस्तूबद्दल मोह उत्पन्न झालेला असतो. हा मोह मंत्रामुळे नष्ट होतो. शिव आणि जीव यांचा संबंध जोडणारे सूत्र म्हणजे मंत्र. मन जेव्हा मंत्रजप करू लागते तेव्हा सांसारिक वस्तूवरील त्याचा मोह नष्ट होऊन ते परशिवाशी जोडले जाते. मंत्राच्या बळाने आपल्या प्राणलिंगाचे अर्थात् चित्रूपाचे चिंतन घडू लागते. कार्मिकमल म्हणजे शुभ–अशुभ वासनारूप कर्मे. कर्माला प्रवृत्त करणारी वासना हाच कार्मिक मल होय. हा मल नष्ट करण्यासाठी क्रियादीक्षा दिली जाते. क्रियादीक्षेने मनुष्याच्या वासनेत बदल होतो. अशुभ वासनेचे शुभवासनेत रूपांतर होते. त्यासाठी श्रीगुरू शिष्याला 'इष्टलिंग' प्रदान करतात. इष्टलिंगाच्या उपासनेने कार्मिक मल नष्ट होतो. अशाप्रकारे गुरुपदेशाने व गुरूने दिलेल्या दीक्षेने त्रिविध मल नष्ट होतात. त्यावेळी जीवाला ज्ञानप्रकाशाचा लाभ होतो. सर्व जीवात्मे हे माझाच आत्मा होय, असे व्यापक ज्ञान लाभते. त्यावेळी तो जीवभावातून मुक्त होऊन आत्मस्थितीत रममाण होतो. याप्रकारे आत्मस्थिती जाणून त्या स्थितीत निरंतर राहणे हे 'आत्मस्थल' होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
७ नोव्हेंबर १९९४



## अंतरात्मस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

या पवित्र कार्तिकमासात ज्ञानगंगेत सुस्नात होऊन आपण सर्वजण अज्ञानरूपी दोष दूर करीत आहात. गेले तीन दिवस आत्मस्थलाविषयी आपण विचार केला आहे. आत्मज्ञान हे जगातील सर्वश्रेष्ठ ज्ञान होय. 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते' असे भगवद्गीतेत श्रीकृष्णांनी सांगितले आहे. ज्ञानाइतके पवित्र जगात अन्य काही नाही. ज्ञान म्हणजे आत्मज्ञान. आत्मज्ञान हे अत्यंत दुर्लभ आहे. कारण येथे श्रोता आणि वक्ता दोघेही दुर्मिळ आहेत. आत्मज्ञानप्राप्तीची इच्छा बाळगणारे आणि आत्मज्ञान देणारे दोघेही दुर्लभ आहेत. मनुष्य सर्व प्रपंचाचे ज्ञान मिळवतो, परंतु त्याला स्वत:चे मात्र ज्ञान नसते. दिव्याखाली अंधार अशी त्याची अवस्था. जुन्या काळात दिव्याच्या खाली अंधार होता. आजच्या काळात दिव्याच्या (बल्बच्या) वर अंधार असतो. खाली असो की वर, जो सर्वांना प्रकाश देतो त्या दिव्याजवळ अंधार असतो एवढे मात्र खरे. त्याप्रमाणे आत्म्याच्या प्रकाशानेच मनुष्याला सर्व जगाचे ज्ञान होते. परंतु त्याला आत्म्याचे मात्र ज्ञान नसते. गुरुपदेश आणि गुरुदीक्षा यांच्यामुळे जीवात्म्याचे आणव, मायीय आणि कार्मिक मल जेव्हा नष्ट होतात तेव्हा त्याला आत्मज्ञान होऊन त्याची जन्ममृत्यूपासून सुटका होते. आता दुसरे स्थल आहे अंतरात्मस्थल. या स्थलाविषयी ज. रेणुकाचार्य सांगतात-

**यदा निरस्तं जीवत्वं भवेद् गुर्वनुबोधत:।**
**तदान्तरात्मभावोऽपि निरस्तस्य भवेद् ध्रुवम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.१८)

गुरूच्या उपदेशाने जीवात्मा जीवभावापासून मुक्त होतो आणि त्याला अंतरात्मभाव प्राप्त होतो. प्रथम त्याच्याजवळ जीवभाव दृढ होता आता त्याच्याठायी आत्मभाव दृढ होतो. आत्मभाव दृढ झाल्यावर त्याला कोणतेही दोष लागत नाहीत. सूर्याच्या प्रकाशाने अवघे जग उजळून जाते. तो पवित्र वस्तूंना प्रकाशित करतो तसाच अपवित्र वस्तूंनाही प्रकाशित करतो. परंतु अपवित्र वस्तूंमुळे सूर्य अपवित्र होत नाही. आत्मा सर्व जगात व्याप्त आहे. परंतु जीवांच्या दु:खाने तो कधीही लिप्त होत नाही. जीवभाव असलेला जीवात्मा सुखदु:खे भोगताना दिसतो; परंतु शुद्ध आत्मा मात्र त्या सर्वांपासून अलिप्त असतो. घटातल्या पाण्यात सूर्याचे प्रतिबिंब पडल्यावर पाण्याच्या गढूळपणामुळे प्रतिबिंब मलीन दिसेल. पण त्याचा सूर्यबिंबावर कोणताही परिणाम होत नाही. त्याप्रमाणे आत्मा हा बिंब तर जीवात्मा हा प्रतिबिंब होय. सूर्याकडे पाहणाऱ्या दृष्टीत दोष असू शकेल, परंतु त्या दृष्टिदोषाने सूर्य लिप्त होत नाही. सूर्याप्रमाणेच आत्मा देखील सर्व प्रपंच प्रकाशित करतो. मनुष्याजवळ आत्मप्रकाश नसेल तर तो कोणतीही वस्तू पाहू शकणार नाही. आपण जेव्हा स्वप्न पाहात असतो तेव्हा तिथे सूर्यचंद्राचा अथवा अग्नीचा प्रकाश नसतो. तरी देखील स्वप्न आपल्याला दिसते. आत्मप्रकाशामुळे आत्मा प्रकाशरूप आहे याचा अनुभव मनुष्याला स्वप्नातच येत असतो. बाहेर कितीही प्रकाश आणि आत आत्मप्रकाश नसेल तर मनुष्य काहीच पाहू शकणार नाही. सर्व प्रकाशित करणारा आत्मा मात्र सर्व दोषांपासून अलिप्त असतो.

**देहस्थितोऽप्ययं जीवो देहसंगविवर्जितः।**
**बोधात् परात्मभावित्वादन्तरात्मेति कीर्तितः॥१८.१९॥**

आत्मा असंग, अकर्ता असून स्वयंप्रकाशित आहे असे ज्ञान गुरुपदेशाने ज्याला होते त्याचा आत्मा देहासोबत असला तरी त्याचा देहाशी संबंध राहत नाही. आकाशाचे उदाहरण देऊनच हे समजून द्यावे लागते. आकाश सर्वत्र व्याप्त आहे परंतु ते कशानेही लिप्त होत नाही. कितीही पाऊस कोसळला तरी आकाश भिजत नाही. गावेच्या गावे जळून गेली तरी आकाश जळून जात नाही. आकाश सर्वांत आहे आणि सर्व आकाशात आहे. परंतु सर्व दोषांपासून आकाश मुक्त आहे. आकाशाला रंग द्यायचा असेल तर कसा देणार? वायूचा स्पर्श आपल्याला जाणवतो, परंतु आकाशाचा स्पर्श आपल्याला जाणवत नाही. कारण त्यात स्पर्शगुण नाही. म्हणून आकाश रंगवता येत नाही, मळवता येत नाही, जाळता येत नाही. ते सर्वव्यापक असून देखील सर्वांपासून अलिप्त असते. आत्म्यापासून प्रथम आकाश उत्पन्न झाले. आत्मा निर्गुण आहे, परंतु आकाशात एक गुण-शब्दगुण आला. वायूत शब्द व स्पर्श हे गुण आले. अग्नीत शब्द, स्पर्श आणि रूप हे तीन गुण आले. जलात शब्द, स्पर्श, रूप आणि रस हे चार गुण तर पृथ्वीत शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध पाच गुण आले. उलट्या क्रमाने पाहिले तर प्रत्येक भूतात एकेक गुण कमी होत जाताना दिसतो. पृथ्वीत पाच गुण, जलात चार, अग्नीत तीन, वायूत दोन, आकाशात एक गुण आहे आणि आत्म्यात एकही गुण नाही, म्हणून तो निर्गुण आहे. ज्याप्रमाणे आकाश सर्वात राहून सर्वांपेक्षा अलिप्त असते त्याप्रमाणे आत्मा देहात राहून देखील देहापासून अलिप्त असतो.

आत्म्याला येथे 'अंतरात्मा' आणि या अवस्थेला 'अंतरात्मस्थिती' असे म्हटले आहे. जीवात्मा जीवभावापासून मुक्त झाला आणि त्याला परमात्म्याचे ज्ञान झाले, परंतु अजून त्याला पूर्ण बोध झाला नाही. अशी ही मधली अवस्था असल्यामुळे या अवस्थेला 'अंतरात्मस्थिती' आणि या अवस्थेतील जीवात्म्याला 'अंतरात्मा' अशा संज्ञा येथे दिलेल्या आहेत. याचेच पुढे अधिक स्पष्टीकरण केले आहे.

**आत्मान्तरालवर्तित्वाज्जीवात्मपरमात्मनोः।**
**योगादुभयधर्माणामन्तरात्मेति कीर्तितः॥१८.२०॥**

सुखी, दुःखी, कर्ता, भोक्ता ही जीवात्म्याची लक्षणे आहेत तर असंग, अकर्ता, अभोक्ता ही परमात्म्याची लक्षणे आहेत. या दोन्हीच्या मधली अवस्था अंतरात्म्याची असते. जीवभाव आणि परमात्मभाव दोन्हींना तो जाणत असतो. तो बहिर्मुख असतो तेव्हा तो जीवभावात असतो, तो अंतर्मुख होतो तेव्हा तो परमात्मभावात असतो. दोन्ही भावांचा अनुभव तो घेत असतो. त्याला आत्मज्ञान झालेले असले तरी तो सदोदित आत्मानंदाचा अनुभव घेत नसतो. मनाची बहिर्मुख प्रवृत्ती मोडून पूर्णतः अंतर्मुख झाल्यावर आत्मानंद निरंतर प्राप्त होतो. गाढ निद्रेचा पूर्ण अनुभव घ्यायचा असेल तर बाह्य प्रवृत्तींना रोखून निश्चिंत व्हावे लागते. तेव्हाच सुषुप्ति-अवस्थेचा आनंद मिळतो. त्याप्रमाणे आत्मानंदासाठी जीवात्म्याला पूर्णतः अंतर्मुख व्हावे लागते. जोपर्यंत मनात वासना असते तोपर्यंत ते बहिर्मुख असते. वासनेचा क्षय झाल्यावर मात्र मन अंतर्मुख होते. वासना एवढी प्रबळ असते की तुम्ही कोठे बसलात, काय ऐकत-पाहत आहात याचा विसर पाडून तुम्हाला बाहेर खेचून नेते.

एक शिष्य आपल्या गुरूची मनोभावे सेवा करीत असे. पूर्वायुष्यात त्याच्याकडून अनेक पापे घडली होती. गुरुसेवेत रममाण झाल्याने नवी पापे होत नव्हती. परंतु जुन्या पापकर्मांची फळे केव्हा तरी भोगावी लागणार होती.

शिष्याच्या सेवेने गुरू प्रसन्न झाले. परंतु शिष्याला विडी ओढण्याचे व्यसन होते. वेळात वेळ काढून तो विडी ओढून येत असे. गुरूंनी त्याला या व्यसनापासून परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु या बाबतीत तो काही सुधारला नाही. एवढी गोष्ट सोडली तर त्याची गुरुसेवा अप्रतिम होती. अनेक वर्षे लोटली. गुरू वृद्ध झाले, शिष्यही वृद्ध झाला. त्याचे विडी-प्रेम मात्र कायम होते. शिष्याने गुरूंना विनंती केली कर, ''महाराज, कधीतरी आपल्या दोघांनाही देह सोडावा लागणार आहे. तेव्हा माझ्यावर कृपा करा. मृत्यूनंतर तुम्हाला ज्या लोकात स्थान मिळेल त्याच लोकात मलाही तुमच्याजवळ स्थान द्या. मी तुमच्यावाचून राहू शकणार नाही.''

गुरूंनी शिष्याची विनंती मान्य केली. त्यासाठी त्यांना थोडे पुण्य खर्चावे लागणार होते इतकेच. गुरू मृत्यूनंतर शिवलोकात गेले. शिष्याचा मृत्यू झाल्यावर गुरूंच्या विशेष अनुग्रहाने शिष्यासाठी शिवलोकात प्रवेश मिळाला. तेथे गेल्यावर गुरूंनी शिष्याला बजावून सांगितले की, ''इकडे तिकडे कुठेही पाहू नकोस. डोळे घट्ट मिटून घे. कोणत्याही प्रलोभनाला बळी पडू नकोस.''

त्याप्रमाणे शिष्य डोळे मिटून बसू लागला. परंतु त्याने केलेल्या पापकर्माबद्दल त्याला नरकात नेण्यासाठी यमदूत आले होते. त्यांना शिवलोकात प्रवेश करता येईना. त्याला नरकात नेण्यासाठी पकडायचे असेल तर त्याला शिवलोकाबाहेर आणले पाहिजे. तो पठ्ठ्या तर तिकडे डोळे घट्ट मिटून बसलेला. कुणाकडे पाहायलाच तयार नाही. यमदूतांनी विचार केला की याला बाहेर काढायचे असेल तर काहीतरी युक्ती केली पाहिजे. त्यांनी मृत्यूपूर्वी त्याला काय आवडत होते याची चौकशी केली. तेव्हा त्याच्या विडी-प्रेमाची त्यांना माहिती मिळाली. यमदूतांनी भूलोकातून विडी-तंबाखू आणली आणि शिवलोकाच्या दाराबाहेर बसून ते आरामात विडी ओढू लागले. तंबाखूचा वास हळूहळू दरवळू लागला. डोळे घट्ट मिटून बसलेल्या शिष्याच्या नाकात शिरला. डोळे उघडून पाहायचे नाही, एवढेच गुरूंनी सांगितले होते. नाक थोडेच डोळ्यासारखे बंद करता येते? तंबाखूच्या वासाने शिष्य अस्वस्थ होऊ लागला. त्याने हळूच एक डोळा उघडून पाहिले तेव्हा दाराबाहेर धूम्रवलये दिसू लागली. विडी ओढताना अनेकांची ब्रह्मानंदी टाळी लागलेली दिसू लागली.

शिष्याने दुसरा डोळा उघडून पाहिले. गुरू डोळे मिटून ध्यानस्थ बसले होते. त्याला राहवेना. गुरूंचे ध्यान संपेपर्यंत आपण बाहेर जाऊन एक झुरका मारून यावे म्हणून तो हळूच उठला. इकडे तिकडे पाहात बाहेर पडला. बाहेर सारे त्याचीच वाट पाहात होते. तो बाहेर आला मात्र, सगळ्यांनी हातातल्या विड्या फेकल्या अन् त्याच्यावर झडप घातली. त्याची मानगूट पकडून नरकात रवानगी केली.

वासनेच्या मागे माणूस कसा धावत सुटतो याची गंमत या कथेत सांगितली आहे. काही महाभागांना तर आठवण आली की आवरत नाही. ते पटकन विडी पेटवून झुरके घेऊ लागतात. समोर महास्वामीजींचे आशीर्वचन चालू असते आणि हा पठ्ठ्या विडी ओढण्यात तल्लीन झालेला असतो. विडी ओढणारे विडी ओढतात, तंबाखू खाणारे तंबाखू खातात, पान खाणारे पान चघळत बसतात. प्रवचनात एक तासभर ते व्यसन सोडू शकत नाहीत. एवढी वासना प्रबळ असते. प्रवचन ऐकता ऐकता काहीजण मनाने कुठल्या कुठे निघून जातात याचा कोणाला पत्ता लागत नाही. प्रवचनात त्यांचा देह बसलेला दिसतो इतकेच. आत्म्याचे ज्ञान झाले तरी जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत वासनेचा अंश विद्यमान असतो. थोडा अविद्येचा लेश असतोच. एखाद्या भांड्यात अत्तर ठेवले आणि नंतर ते काढून भांडे खूप घासून-पुसून स्वच्छ केले तरीही अत्तराचा वास शिल्लक राहतोच. त्याप्रमाणे आत्मज्ञानानंतर वासनेचा, अविद्येचा अंश थोडासा उरलेला असतो. वासनेमुळे जीवात्म्याची बाहेर प्रवृत्ती होते. मूर्च्छित मनुष्य

अधुनमधून शुद्धीवर यावा आणि पुन्हा बेशुद्ध व्हावा, असा हा प्रकार. त्याप्रमाणे जीवात्म्याचा या अंतरात्मस्थितीत जीवभाव आणि परमात्मभाव असा दोहोंशी संबंध असतो. त्याची वासना राजस असेल तर त्याची प्रवृत्ती व्यावहारिक असते, त्याची वासना तामस असेल तर निद्रा–आळस यांत तो प्रवृत्त होतो आणि वासना सात्त्विक असेल तर भजन–पूजन, सत्संगात त्याची प्रवृत्ती होते. अशाप्रकारे शरीरस्थ जीवात्मा वासनेचा उदय झाला की बाहेरचा अनुभव घेतो आणि ध्यानस्थ होतो तेव्हा परमात्म्याचा अनुभव घेतो. त्याचा जीवधर्म आणि शिवधर्म दोन्हीशी संबंध असतो. जीवदशा आणि शिवदशा या दोहोंच्या मध्यावर तो असल्यामुळे त्याला 'अंतरात्मा' असे म्हणतात.

**अहंकारस्य संबंधान्मनुष्यत्वादिविभ्रमः।**
**न स्वभाव इति ज्ञानादन्तरात्मेति कथ्यते।।१८.२१।।**

परिच्छिन्न अशा अहंकाराने जीवात्म्याच्या ठिकाणी मनुष्यभाव आलेला असतो. तरी मनुष्यत्व हा स्व–भाव नाही, स्व–रूप नाही, ते आगंतुक आहे याची जाणीव त्याला असते. पशूचे शरीर मिळाले तर पशुभाव येतो, पक्ष्याचे शरीर मिळाले तर पक्षिभाव येतो. जे शरीर मिळेल त्या शरीराचा भाव मनात दृढ होतो. शरीरभाव दृढ होण्याचे अहंकार हे कारण आहे. आपले शरीर मनुष्याचे असले तरी आपण मनुष्य नाही, मनुष्यभाव हा भ्रांतिमूलक आहे असे ज्ञान प्राप्त झाल्यामुळे जीवात्म्याला 'अंतरात्मा' म्हटले जाते.

**यथा पद्मपलाशस्य न संगो वारिणा भवेत्।**
**तथा देहजुषोऽप्यस्य न शरीरेण संगतिः।।१८.२२।।**

कमळ पाण्यात उत्पन्न होते, परंतु ते पाण्यापासून अलिप्त असते. कमलदलावर पाण्याचा थेंब पडला तरी तो वेगळा असतो आणि पटकन् ओघळून जातो. वस्त्रावर पाण्याचा थेंब पडला तर तो शोषला जातो. तसे कमळ करीत नाही. त्याप्रमाणे शरीरात राहून अंतरात्मा अलिप्त असतो. तो देहसंबंधरहित असतो. जीवात्म्याने शरीराभिमान वाहिला तरच तो बिघडतो, अन्यथा तो शुद्ध असतो.

राजा जनक सम्राट होते तरी राजयोगी होते. एकदा शुकमुनी आणि जनक स्नानासाठी नदीवर गेले. ते स्नान करीत असताना एका सेवकाने घाबरत येऊन सांगितले, ''महाराज, आपल्या महालाला आग लागली आहे.''

हे ऐकून जनक थोडेदेखील विचलित झाले नाहीत. विरक्त असलेले शुकमुनी मात्र आपली वस्त्रे तर जळून गेली नाहीत ना, या विचाराने अस्वस्थ झाले. जनक म्हणाले, 'मिथिलायां प्रदग्धायां न मे किंचित् प्रदह्यते।'

मिथिला नगरी जळून गेली तरी त्यामुळे मी जळून जाणार नाही, अशी भावना जनकांनी व्यक्त केली. प्रपंचात राहत असताना कधी लाभ होईल तर कधी हानी. लाभ–हानी यामुळे विचलित होतो त्यालाच 'जीव' म्हणतात. परंतु विचलित न होता आपले कार्य करीत राहतो तो ज्ञानी होय. ज्ञानी पुरुषाची परीक्षा संसारातच होते, अरण्यात होत नाही. ज्ञानी संसारात, शरीरात राहून देखील कमलासारखा अलिप्त असतो. पक्व नारळातले खोबरे करवंटीपासून वेगळे असते त्याप्रमाणे देहात राहून ज्ञानी पुरुष देहापासून वेगळा असतो.

**नीडस्थितो यथा पक्षी नीडाद्भिन्नः प्रदृश्यते।**
**देहस्थितस्तथात्मायं देहादन्यः प्रकाश्यते।।१८.२३।।**

नीड म्हणजे घरटे. घरट्यात राहणारा पक्षी घरट्यापासून भिन्न असतो. त्याचे घरट्याशी तादात्म्य नसते. त्याप्रमाणे शरीरात अंतरात्मा राहतो. शरीर हे जीवात्म्याचे घरटेच होय. तो घरट्यात राहतो आणि ते सोडूनही देतो. अशा किती घरट्यांत तो राहिला आहे याची गणती नाही. पक्ष्याला ज्याप्रमाणे आपण घरटे नाही अशी जाणीव

असते त्याप्रमाणे अंतरात्म्याला आपण शरीर नाही असे दृढ ज्ञान झालेले असते. म्हणून शारीरिक क्रियेमुळे तो विकृत होत नाही. विकृत करणारी परिस्थिती असताना जो विकृत होत नाही तो खरा 'धीर', खरा धैर्यधर होय. जो धैर्यशील आहे त्यालाच आत्मज्ञान लाभते. आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी फार मोठ्या धीरवृत्तीची आवश्यकता असते. देहस्थ अंतरात्मा कोणत्याही शारीरिक क्रियेने विकृत न होता देहात अलिप्तपणे राहतो.

**आच्छाद्यते यथा चंद्रो मेघैरासंगवर्जितैः।**
**तथात्मा देहसंगातैरसंगपरिवेष्टितः।।१८.२४।।**

आकाशातला पूर्ण चंद्र काळ्या दाट मेघांनी आच्छादला जातो. परंतु मेघांचा आणि चंद्राचा प्रत्यक्ष संबंध नसतो. मेघ आणि चंद्र यांच्यात लक्षावधी मैलांचे अंतर असते. त्याप्रमाणे जीवभाव नाहीसा झालेला अंतरात्मा देहातीत असूनदेखील देहवरणात दिसत असतो.

**निर्ममो निरहंकारो निरस्तोपाधिविक्लवः।**
**देहस्थोऽपि सदा ह्यात्मा शिवं पश्यति योगतः।।१८.२५।।**

शरीरात राहून अंतरात्म्याचा शरीराशी संबंध नसतो, मग तो शरीरात राहतो तरी कशाला? शरीरात राहून तो काय करतो? याविषयी येथे सांगतात. अंतरात्मा निर्मम आहे, अर्थात् त्याचे शरीरावर ममत्व नाही. तो निरहंकार आहे, अर्थात् त्याच्याजवळ मी-पणा नसतो. 'मी' खातो, पितो, जातो, करतो, यामधला 'मी' म्हणजे अहंकार त्याच्याठायी नसतो. शरीरादी जेवढे अनात्म पदार्थ आहेत त्यांच्याबद्दल तो अहंकार आणि ममत्व बाळगत नाही. सर्व उपाधींपासून तो मुक्त असतो. शरीर, इंद्रिये, मन या उपाधी आहेत. या उपाधींपासून मुक्त असून तो देहात राहतो आणि निरंतर शिवचिंतन करीत असतो. यालाच 'शिवयोग' म्हणतात. देहाशी संबंध नसतानाही तो देहात राहतो तो यासाठी.

**भोक्तृभोज्यपरित्यागात् प्रेरकस्य प्रसादतः।**
**भोक्तृताभावगलितः स्फुरत्यात्मा स्वभावतः।।१८.२६।।**

भोक्ता, भोज्य व प्रेरयिता ही तीन तत्त्वे आहेत. तत्त्वे तीन दिसली तरी ते मुळात एकच तत्त्व आहे. अंतरात्मा स्वतःला भोक्ता समजत नाही आणि भोज्यही समजत नाही. प्रसाद म्हणजे शिवाचा अनुग्रह. कोट्यवधी जीवात एखादा जीव परमात्म्याकडे प्रवृत्त होतो तेव्हा त्या जीवावर परमात्मा अनुग्रह करतो. साधना आणि अनुग्रह या दोहोंच्या बळावर तो आत्मज्ञान प्राप्त करून घेतो. शिवानुग्रहाने त्याचा भोक्तृत्वभाव नाहीसा होतो. मग तो प्रकाशरूप आत्मचिंतनात तल्लीन होऊन राहतो.

**सर्वेषां प्रेरकत्वेन शंभुरन्तःस्थितः सदा।**
**तत्परिज्ञानयोगेन योगी नंदति मुक्तवत्।।१८.२७।।**

जेथे जीवात्मा आहे तेथे परमात्माही आहेच. सर्व जीवांच्या अंतःकरणांत शिव प्रेरकरूपाने विद्यमान आहे. याचे ज्ञान झाल्यानंतर योगी मुक्तात्म्यासारखा आनंदाचा अनुभव घेते. अशा प्रकारे जीवात्मा आणि परमात्मा या दोन्हींच्या मधली अवस्था म्हणजे हे अंतरात्मस्थल होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
८ नोव्हेंबर १९९४

## परमात्मस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल आपण अंतरात्मस्थलाचा विचार केला. घरट्यात राहणारा पक्षी जसा घरट्यापासून वेगळा असतो तसा देहात राहणारा अंतरात्मा देहापासून अलिप्त असतो. एक पक्षी घरट्यात राहतो तर दुसरा पिंजऱ्यात. कोणीतरी त्याला मनोविनोदनासाठी पिंजऱ्यात बंदिस्त करून ठेवलेले असते. घरट्यातला पक्षी स्वतंत्र असतो तर पिंजऱ्यातला पक्षी पर-तंत्र असतो. त्याला वेळच्या वेळी पाणी मिळते, डाळ मिळते. परंतु शेवटी तो असतो कैदीच. पिंजऱ्यात राहून राहून तो उडणे देखील विसरून गेलेला असतो. त्याला कोणी पिंजऱ्याबाहेर काढले तर तो घाबरून पुन्हा पिंजऱ्यात जाऊन बसतो. संसारी माणसाची अवस्था पिंजऱ्यातल्या पक्ष्यासारखीच असते. त्याला कोठेही नेले तरी घाईघाईने तो संसारात परत येतो. परंतु अंतरात्म्यासाठी उदाहरण दिले आहे ते घरट्यात राहणाऱ्या स्वतंत्र पक्ष्याचे. मनात आले तर घरट्यात राहील. मनात आले तर निळ्या अंतराळात स्वच्छंद विहार करील, त्याच्या घरट्याला दार नसते. अशी स्थिती अंतरात्म्याची असते. वासनेमुळे तो कधी देहभानावर असतो तर कधी देहभान हरवून आत्मचिंतनात मग्न होतो. यापुढील स्थल आहे परमात्मस्थल.

**निर्धूते तत्प्रबोधेन मले संसारकारणे।**
**सामरस्यात् परात्मस्थात् परमात्मायमुच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.२८)

मल हे संसाराचे कारण असतात. अंतरात्मस्थलातील साधक ज्ञानप्राप्तीमुळे मलांपासून मुक्त होतो आणि परमात्म्याशी समरसभाव साधल्यामुळे 'परमात्मा' म्हणवला जातो. अंतरात्मस्थलातील साधक तसाच निवांत राहत नाही, तर समरसभावाने परमात्म्याचे चिंतन करतो. परम म्हणजे श्रेष्ठ. परमात्मा याचा अर्थ सर्वश्रेष्ठ तत्त्व. आत्मा हा मुळात परमात्माच असतो. तो अज्ञानामुळे आपले व्यापक स्वरूप विसरून स्वत:ला जीवात्मा समजू लागतो नंतर गुरुपदेशाने त्याला स्व-रूपाची ओळख होते म्हणून तो अंतरात्मा होतो आणि समरसभाव दृढ झाल्यावर तोच परमात्मा होतो. वीरशैवसिद्धान्तात ऐक्यस्थितीला सामरस्य असे नाव आहे. पाण्यात पाणी अथवा दुधात दूध एकरूप व्हावे तसे जीव-शिवाचे सामरस्य होते. ज्याचा आत्मा महान आहे तो परमात्मा होय. तो सर्व प्रपंचाकडे समरसदृष्टीने पाहत असतो. सामरस्यानंतर स्थिती कशी होते याचे वर्णन मरितोंटदार्यांनी आपल्या भाष्यात केले आहे. ते म्हणतात, परमात्मा अखंड, अद्वितीय, निष्कल आहे हे जाणून जो त्याचे समरसभावाने चिंतन करतो, तो चिंतन करता करता परमात्मा होतो. ज. रेणुकाचार्य हळूहळू ऐक्यस्थितीकडे घेऊन जात आहेत. ऐक्य म्हणजे एक होऊन राहणे, अद्वैत होणे. व्यवहारात आपण पाहतो की माणसाला एकटेपणाचा उबग येतो. मग तो मित्रमंडळ, नातलग जमवून त्यांच्यात जीवन व्यतीत करू लागतो. पुढे पुढे त्याला गर्दीचा कंटाळा येऊन एकांतात राहावे अशी ओढ लागते. त्याप्रमाणेच परमात्मा आधी एकटा होता. मग त्याच्या ठायी संकल्प उत्पन्न झाला- 'एकोऽहं बहुस्याम्' मी एकटा आहे, मला अनेक व्हायचे आहे. त्यामुळे हा सारा विश्वसंसार, असंख्य जीवजंतू, माणूस यांची निर्मिती झाली. 'एका'चे अनेक होणे ही जशी एक परमात्म्याची लीला आहे तशीच 'अनेका'चे एक होणे ही त्याचीच लीला आहे. माणसाला एकटेपणात आनंद लाभतो. तो एकटा जेव्हा गाढ निद्रेत

असतो तेव्हा सर्वाधिक आनंदी असतो. भगवान शिवाचे चिंतन करता करता अंतरात्मा शिवस्वरूप होतो. हीच शिवाद्वैतस्थिती होय. या स्थितीतच जीवाला परमानंद मिळतो आणि ही स्थिती प्राप्त करून घेणे हेच त्याच्या जीवनाचे परमध्येय असते. या स्थितीलाच येथे परमात्मस्थल अशी संज्ञा दिली आहे. परमात्मा कसा आहे याचे वर्णन पुढील श्लोकात केले आहे.

**सर्वेषामात्मभेदानामुत्कृष्टत्वात् स्वतेजसा।**
**परमात्मा शिवः प्रोक्तः सर्वगोऽपि प्रकाशवान्॥१८.२९॥**

परमात्मा स्वयंप्रकाशित आहे. ब्रह्मांडात जेवढे आत्मे आहेत त्या सर्वांत तो अत्यंत तेजस्वी, प्रकाशमान आहे. तो सर्वव्यापक आणि सर्वश्रेष्ठ असल्यामुळे त्याला 'परमात्मा' असे म्हटले जाते. जगातल्या असंख्य माणसांत एखादा मनुष्य अत्यंत तेजस्वी असतो. त्याचे शरीर माणसाचेच असते, त्याचे बोलणे-वागणे आदी व्यवहार सामान्यच असतात. तरीदेखील तो इतरांपेक्षा वेगळा, श्रेष्ठ का वाटतो? तर त्याच्या ठिकाणी आत्मतेज अधिक प्रमाणात प्रकटलेले असते. त्यामुळे सर्वजण त्याच्याबद्दल आदरभाव व्यक्त करीत असतात. ज्ञान, शील, तपस्या यांच्यामुळे त्याच्या ठिकाणी परमात्म्याचे तेज प्रकट झालेले असते. वृक्षांमध्ये अश्वत्थ वृक्ष- पिंपळाचे झाड- सर्वश्रेष्ठ मानले जाते. 'सर्व वृक्षांत अश्वत्थ मी' असे भगवंतांनी गीतेत म्हटले आहे. पिंपळ सर्वश्रेष्ठ का? तर तो चोवीस तास प्राणवायू सोडत असतो, असे वनस्पतिशास्त्र सांगते. दुसरे वृक्ष दिवसा प्राणवायू आणि रात्री कर्बाम्लवायू सोडत असतात. परंतु पिंपळ मात्र केवळ प्राणवायूच. पिंपळाच्या आसपासचा प्रदेश प्राणवायूने भरलेला असतो. पिंपळ म्हणजे प्राणवायूचा प्रचंड साठा असे काहीतरी वैशिष्ट्य असले की श्रेष्ठत्व लाभते. ते उगाच मिळत नसते. त्याप्रमाणे एखादा मनुष्य लोकांकडून घेतो कमी, आणि त्यांना देतो अधिक. तो देतो ज्ञान, शील आणि तपस्येची प्रेरणा. म्हणून तो सर्वश्रेष्ठ मानव असतो. सर्व जीवात्मे सतत काहीतरी मागत असतात. परमात्मा मात्र केवळ देणे जाणतो, देतच असतो.

माणूस देवळात जाऊन देवाला काही तरी मागत असतो. परंतु संसार असा आहे की, काही दिल्याशिवाय येथे मिळत नाही. कमी देऊन जास्त मिळवण्याची माणसाची प्रवृत्ती असते. पाच पैशाने भाजी स्वस्त मिळाली की त्याला जणू परमानंद होतो. खूप पुरुषार्थ केला असे वाटते. भाजी घ्यायला पैसे द्यावे लागतात. मग परमात्मा मिळवायला काहीतरी द्यावेच लागेल. देणे म्हणजे त्याग करणे. त्याग केल्याशिवाय परमात्म्याची प्राप्ती होणे नाही. आपल्या देशात तर जो स्वतःसाठी काही न ठेवता दुसऱ्यासाठी सर्वस्व उधळतो अशा त्यागी पुरुषाची पूजा केली जाते. जो सर्वांना देतो तोच महान होतो, परमात्मा होतो. परंतु माणूस कसा वागतो? तो देवळात गेला तर ईश्वरालाही फसवू पाहतो.

एका श्रीमंत मनुष्याला मूलबाळ होत नसते म्हणून त्याने भगवान विश्वेश्वराला साकडे घातले.

''देवा, मला जर मूल झाले तर मी पाचशे एक चांदीची नाणी तुला अर्पण करीन.''

कर्मधर्मसंयोगाने त्याच्या पत्नीला दिवस गेले आणि नऊ महिन्यांनी तिने एका गोंडस बाळाला जन्म दिला. श्रीमंताचा आनंद गगनात मावेना. मूल तर झाले पण आता विश्वेश्वराला कबूल केलेल्या पाचशे एक नाण्याचे काय? तो मनुष्य श्रीमंत होता तसाच भयंकर कंजूषही होता. लांड्यालबाड्या करून, पै पै साठवीत त्याने धन जमा केले होते. नवस करताना काही वाटले नाही; पण विश्वेश्वराला नाणी अर्पण करणे जिवावर आले. त्याने बराच विचार केला. शेवटी प्रत्येकाला मार्ग सापडतोच. त्यालाही एक युक्ती सुचली.

नाणी घेऊन तो विश्वेश्वराच्या देवळात गेला. म्हणाला ''परमेश्वरा, तू एवढा श्रीमंत आहेस की तुझ्यापुढे मी कोण लागावा? तुला पैशाची काय गरज आहे? तरीही कबूल केल्याप्रमाणे मी पाचशे एक चांदीची नाणी घेऊन आलो आहे. ही नाणी तुझ्याजवळ ठेवून जाणे मला योग्य वाटत नाही. ठेवली तर दुसराच कोणी घेऊन जाईल. म्हणून मी तुझ्यासमोर नाणी उधळतो. तू जर आपल्या हाताने ती उचलून घेतली तर माझे काही म्हणणे नाही. परंतु घेतली नाहीस तर तुला त्यांची गरज नाही असे म्हणून मी परत नेईन. मी तुझ्यापेक्षा गरीब आहे. ही नाणी मलाच उपयोगी पडतील!''

असे बोलून त्या श्रीमंताने विश्वेश्वरासमोर नाणी उधळली. अर्थातच विश्वेश्वराने ती हातांनी उचलून घेतली नाहीत. मग श्रीमंताने नाणी गोळा केली आणि मुलगा तर मिळालाच पण नाणीही परत मिळाली, मुलगा फुकटात पडला अशा समाधानाने तो घरी निघून गेला.

जो दुसऱ्याला फसवतो त्याचीही कोणीतरी फसवणूक करतोच. देवाला वाटले, याने आपली फसवणूक केली. मग यालाही थोडा धडा शिकवायला काय हरकत आहे? त्या रात्री श्रीमंताला स्वप्न पडले. शेजारच्या हनुमानाच्या देवळात एक मनुष्य पोथी वाचीन होता. श्रोता एकही नव्हता. तो जणू ईश्वरालाच पोथी ऐकवत होता. त्याच्या स्वप्नात प्रभू श्रीरामचंद्र हनुमंताला म्हणाले की, 'तुझा हा भक्त महिनाभर पोथी वाचतो आहे, परंतु श्रोता तर एकही दिसत नाही. उद्या याच्या पोथीची समाप्ती आहे. याला दक्षिणा तरी मिळेल की नाही?'

तेव्हा हनुमंत श्रीरामाला म्हणाले, ''देवा, उद्या या भक्ताला हजार रुपये दक्षिणा मिळणार आहे, मी त्याची व्यवस्था करून ठेवली आहे.''

श्रीमंताने हे सारे स्वप्नात पाहिले आणि त्याच्यातला व्यापारी जागा झाला. तो सकाळी उठून शेजारच्या देवळात गेला तर तिथे खरेच एक माणूस पोथी वाचत बसलेला दिसला. श्रीमंत त्याला म्हणाला, ''भल्या माणसा, आज तुझ्या पोथीची समाप्ती आहे असे मला कळाले. आपण एक सौदा करू. मी तुला पाचशे रुपये देतो त्याच्या मोबदल्यात इथे जी दक्षिणा जमा होईल ती तू मला दिली पाहिजे.''

''शेठजी'', तो मनुष्य म्हणाला, ''मी महिनाभर पोथी वाचत आहे. या काळात कोणीही इथे फिरकले जाही. मग आज इथे कोण दक्षिणा द्यायला येईल बरे? तुमचे पाचशे रुपये फुकट जातील.''

श्रीमंताने आपला हट्ट सोडला नाही. त्याने त्याच्या हातात पाचशे रुपये कोंबले. आणि तिथेच बसून राहिला. पोथी वाचून संपली. एकही मनुष्य तिथे आला नाही. दुपार झाली, संध्याकाळ झाली. एक पैसाही दक्षिणा मिळाली नाही. श्रीमंत मनुष्य तर पाचशे रुपये देऊन हजार रुपये मिळवण्याचा हिशेब करून आलेला होता. शेवटी देवाने फसवले असे म्हणून तो रागावला आणि रागारागाने मारुतीला लाथ मारण्यासाठी त्याने पाय उचलला. तोच चमत्कार घडला. थिजल्यासारखा त्याचा पाय हवेतच स्थिर राहिला. एक पाय जमिनीवर आणि एक पाय हवेत. श्रीमंताला काही हालचाल करता येईना. त्याची अवस्था चमत्कारिक झाली. कोणीतरी गुणगुणल्यासारखा त्याचा कानात आवाज आला, 'तुला या अवस्थेतून सुटका घ्यायची असेल तर पोथी वाचणाऱ्या माणसाला आणखी पाचशे रुपये दे. तरच तू मुक्त होशील.'

श्रीमंताने खिशातले पाचशे रुपये काढून त्या माणसाच्या हाती ठेवताच त्याचा पाय मोकळा झाला. पाचशे रुपयाच्या मोबदल्यात हजार रुपये मिळवण्यासाठी आलेला तो श्रीमंत हजार रुपये गमावून घरी निघून गेला. जो दुसऱ्याला फसवतो त्याची अशी फसगत होत असते.

जो मागतो तो जीवात्मा असतो आणि जो देतो तो परमात्मा. परमात्म्याचे समरसभावाने चिंतन करणारा अंतरात्माच शेवटी परमात्मा होतो.

**ब्रह्मांडबुद्बुदस्तोमा यस्य मायमहोदधौ।**
**उन्मज्जन्ति निमज्जन्ति परमात्मा स उच्चते।।१८.३०।।**

ज्याच्या मायारूपी महासागरात ब्रह्मांडाचे असंख्य बुडबुडे उत्पन्न होतात आणि विलय पावतात त्याला परमात्मा म्हणतात. ब्रह्मांडाची उत्पत्ती, स्थिती आणि लय यांना कारणीभूत असलेला शिव हाच परमात्मा होय. ब्रह्मांडे किती आहेत याची गणतीच नाही. रात्री आकाशात दिसणारे असंख्य तारकासमूह म्हणजे ब्रह्मांडे होत. या ब्रह्मांडाची अवस्था समुद्रात उत्पन्न होणाऱ्या क्षणभंगुर अगणित बुडबुड्यांसारखी असते. बुडबुड्यांच्या तुलनेत समुद्र किती विशाल असतो. किती बुडबुडे निर्माण झाले आणि किती नष्ट झाले हे समुद्राच्या खिजगणतीत नसते. परमेश्वराच्या मायारूपी महासागरात किती ब्रह्मांडे उत्पन्न होतात आणि नष्ट होतात याची गणती करता येत नाही. परमात्म्याची माया एवढी विशाल आहे तर तो किती विशाल असेल? म्हणून परमात्मा सर्वात मोठा आणि श्रेष्ठ आहे.

**यस्मिन् ज्योतिर्गणाः सर्वे स्फुलिंगा इव पावकात्।**
**उत्पत्य विलयं यान्ति तद्रूपं परमात्मनः।।१८.३१।।**

अग्नीपासून अनंत स्फुलिंगे निर्माण होतात आणि विलयही पावतात त्याप्रमाणे असंख्य ज्योतिस्वरूप जीवात्मे त्या परमात्म्यापासून उत्पन्न होतात आणि त्याच्यातच विलीन होतात. परमात्मा हा जीवात्म्याच्या उत्पत्ती, स्थिती आणि लय यांचे कारण होय.

**यस्मिन् समस्तवस्तूनि कल्लोला इव वारिधौ।**
**सम्भूय लयमायान्ति तद्रूपं परमात्मनः।।१८.३३।।**

समुद्रात प्रचंड लाटा उत्पन्न होतात आणि समुद्रातच त्या विलीन होतात त्याप्रमाणे भूमी आदी तत्त्वे परमात्म्यातून उत्पन्न होतात आणि त्याच्यातच लय पावतात. अग्नी, जल, पृथ्वी आदी पंचमहाभूते सामर्थ्यशाली आहेत. वीरशैवसिद्धान्तात महाभूतांना 'तत्त्वे' म्हणतात. सर्व तत्त्वे परशिवाची रूपे होत. शिव हे मूलतत्त्व आहे. त्या मूलतत्त्वापासून उत्पन्न झालेल्या महाभूतांना 'तत्त्व' हीच संज्ञा दिली पाहिजे. कारण

**तथा भूम्यादिरूपेण शिव एको विराजते।।१०.७०।।**

पाने, फांद्या, खोड आदी रूपांनी जसा वृक्ष विद्यमान असतो तसा पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, सूर्य, चंद्र आणि आत्मा या सर्व ब्रह्मांडाच्या रूपात एक शिवच विराजमान आहे. वीरशैव तत्त्वज्ञान विश्वाला मिथ्या, आभासमय मानत नाही तर सत्य मानते. परमात्म्याला जाणण्याचे दोन मार्ग आहेत. उपदेशाचेही दोन प्रकार आहेत. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश हे परमात्मा नाही असे सांगणे हा एक प्रकार. तर पृथ्वी आदी परमात्मरूप आहेत हे सांगणे हा दुसरा प्रकार. परमात्मतत्त्व सर्वत्र व्यापक आहे. त्याच्याशिवाय अन्य काही अस्तित्वातच नाही. पंचमहाभूते इत्यादी तत्त्वे, समुद्रात लाटा उत्पन्न व्हाव्या आणि त्या समुद्रातच विलीन व्हाव्या, त्याप्रमाणे परमात्म्याच्या ठायी उत्पन्न होतात आणि त्याच्यातच विलीन होतात.

**निरस्तमलसंबंधं नि:शेषजगदात्मकम्।**
**सर्वतत्त्वोपरि प्रोक्तं स्वरूपं परमात्मन:।।१८.३३।।**

परमात्म्याच्या ठायी आणवादी मल नाहीत. तो सर्व चराचर प्रपंचाला जीवनभूत आहे. असा तो नि:शेष आहे. शिवापासून ते भूमीपर्यंत जी छत्तीस तत्त्वे आहेत त्या तत्त्वांपेक्षा तो श्रेष्ठ आहे. सर्व तत्त्वांना व्यापून तो त्यापलीकडे दशांगुळे उरलेला आहे. अनेक दृष्टान्तांनी परमात्म्याचे स्वरूप येथपर्यंत स्पष्ट केले आहे. आता परमात्मा कसा प्रकाशित होतो ते सांगतात.

**यथा व्याप्य जगत्सर्वं स्वभासा भाति भास्कर:।**
**तथा स्वशक्तिभिर्व्याप्य परमात्मा प्रकाशते।।१८.३४।।**

सूर्य आपल्या तेजाने सर्व जगाला व्यापून प्रकाशतो त्याप्रमाणे परमात्मा आपल्या अनंत शक्तींनी विश्व व्यापून प्रकाशित होतो. सूर्य अवघ्या जगताला प्रकाशित करतो तर परमात्मा सूर्याला प्रकाशित करतो.

सर्व जग प्रकाशित करणाऱ्या सूर्याला प्रकाश कोठून मिळाला? वैज्ञानिक सांगतील की सूर्य स्वयंप्रकाशित आहे. परंतु अध्यात्म सांगते की सूर्याला परमात्मा प्रकाशित करतो. केवळ परमात्मा हाच स्वयंप्रकाशित आहे, अन्य कोणीही नाही. तुम्ही सिनेमा पाहता. सिनेमात सूर्य उगवला की त्याच्या प्रकाशाने एखादे गाव प्रकाशित झालेले दिसते. परंतु सिनेमतल्या सूर्याला प्रकाशित करणारा प्रकाश सिनेगृहातल्या मशीनमधून येत असतो. तो प्रकाश नाहीसा झाला तर सिनेमातला सूर्य प्रकाशित होणार नाही. त्याप्रमाणे सूर्य-तारकांना, सर्व प्रपंचाला प्रकाश देणारा परमात्मा आहे. केवळ परमात्माच प्रकाशरूप आहे. ज्या वस्तूत आपल्याला प्रकाश दिसतो त्या वस्तूत प्रकाशाचा अंश असतो, संपूर्ण प्रकाश नव्हे. परमात्म्याच्या प्रकाशाचा थोडासा अंश घेऊन ती वस्तू प्रकाशित झालेली असते. तुम्हाला वाटते की बल्ब प्रकाशित आहे. परंतु बल्बमध्ये ते सामर्थ्य नाही. विद्युत्केंद्रातून आलेल्या वीजप्रवाहाने बल्ब प्रकाशित होत असतो. विद्युतकेंद्रात वीज येते विद्युत्निर्मिती केंद्रातून. तेथे विद्युत्यंत्रातून विजनिर्मिती होते. विद्युतयंत्रे जलप्रवाहाने फिरत असतात. आता आपण आलो जलतत्त्वापर्यंत. आणखी पुढे गेले तर काय दिसते? जल अग्नितत्त्वापासून उत्पन्न झाले. अग्नी वायुतत्त्वापासून तर वायू आकाशतत्त्वापासून उत्पन्न झाला आणि आकाश उत्पन्न झाले परमात्मतत्त्वापासून. याचा अर्थ, आपल्याला दिसतो तो प्रकाश परमात्म्याचा असतो, असा होतो. बाहेरचा भौतिक प्रकाश परमात्म्याचाच आणि हृदयातला ज्ञानाचा प्रकाशदेखील त्याचाच होय. म्हणून सर्व विश्वात प्रकाशरूपाने परमात्मा विद्यमान आहे. शेवटी या परमात्मस्थलाचा समारोप करतात.

**विश्वतो भासमानोऽपि विश्वमायाविलक्षण:।**
**परमात्मा स्वयंज्योतिरूपो जीवात्मनां भवेत्।।१८.३५।।**

परमात्मा सर्व विश्वात प्रकाशमान होत असला तरी तो या विश्वाच्या मायेच्या पलीकडे आहे. जो स्वयंजोतिरूप असून सर्व जीवात्म्यांना ज्ञान प्रदान करणारा असल्याने त्याला परमात्मा म्हणतात. ऋषिमुनींनी या अवस्थेत परमात्म्याशी नाते जुळवले म्हणून त्यांना ज्ञानप्राप्ती झाली. सर्व ज्ञान परमात्म्याचे आहे. तो ज्ञानरूप आहे. सर्वश्रेष्ठ, सर्वव्यापक, विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचे कारण असे तत्त्व म्हणजे परमात्मा होय. जीवभाव विसरून महान होण्यासाठी परमात्म्याचे चिंतन करायचे असते. जोपर्यंत माणसे आपला संकुचितपणा सोडणार नाहीत तोपर्यंत जगात शांती नांदणार नाही. सर्वांना आत्मज्ञान होऊन जगातील कलह थांबावे यासाठीच

अध्यात्मशास्त्र परमात्मतत्त्वाचा शोध घ्यायला प्रवृत्त करते. सर्व प्राणिमात्रांत मीच आत्मरूपाने विद्यमान आहे अशा अद्वैतज्ञानानेच मनुष्य महान होणार आहे. अंतरात्मस्थलातील साधक परमात्म्याचे चिंतन करता करता परमात्मा होतो. यापुढे अधिकाधिक सूक्ष्म विचार करायचा आहे. तेव्हा आपण सर्वांनी एकाग्रतेने श्रवण करून त्यावर चिंतन करावे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
९ नोव्हेंबर १९९४

---

**आशीर्वचन सहावे**

## निर्देहागमस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज निर्देहागमस्थलाचा विचार करायचा आहे. स्थलाचे नावही सुरेख आहे. निर्देहागमस्थल. स्थूल, सूक्ष्म आणि कारण असे तीन देह जीवात्म्याला असतात. ज्या क्षणी जीवात्म्याचा या देहांशी संबंध आला त्याक्षणीच जीवात्म्याने या शरीरांचा अभिमान वाहायला सुरुवात केली. मी आणि माझे असा दोन प्रकारे तो अभिमान वाहतो. अनात्म पदार्थांशी तादात्म्य होऊन जीवात्मा त्यांच्या गुणधर्मांचा अभिमान वाहू लागतो आणि त्यामुळेच त्याला संसारात सुख-दुःखे भोगीत भ्रमण करावे लागते. या तीन शरीरांपासून जोपर्यंत सुटका होत नाही तोपर्यंत जीवात्म्याला मुक्ती मिळत नाही. स्थूलशरीरापासून तर मनुष्याची असंख्य वेळा सुटका होते. इच्छा असो अथवा नसो, मृत्यूच्या क्षणी स्थूल शरीराचा त्याग करावाच लागतो. हे असंख्य वेळा घडलेले असते आणि मुक्ती मिळत नाही तोपर्यंत वारंवार घडणार असते.

अंगावरची वस्त्रे उतरवून ठेवावीत त्याप्रमाणे एक स्थूलशरीर सोडून आपण दुसऱ्या स्थूलशरीराची खोळ धारण करून नवा जन्म घेत असतो. परंतु सूक्ष्मशरीर आणि कारणशरीर मात्र वारंवार सोडता येत नाही. एकदा ही दोन शरीरे जीवात्म्याला चिकटली की मुक्ती मिळेपर्यंत ती गळून पडत नाहीत. अनेक भलेबुरे संस्कार या शरीरांत साचलेले असतात. ज्याप्रमाणे स्थूलशरीर जीवात्म्याची इच्छा असो अथवा नसो, मृत्युक्षणी गळून पडते, तसे सूक्ष्म आणि कारण ही शरीरे गळून पडत नाहीत. त्यासाठी साधना करावी लागते. ही दोन शरीरे ज्ञानाग्नीनेन जळून जाऊ शकतात. भौतिक अग्नीत स्थूलशरीर जळते तर ज्ञानाग्नीत सूक्ष्म आणि कारण शरीरे जळतात. शरीराला देह असे म्हणतात. 'दह्यते इति देहः' जो जळून जातो तो देह. परमात्मज्ञानामुळे सूक्ष्म आणि कारण ही शरीरे जळून गेली तर ज्ञानी पुरुषाचे जीवन संपुष्टात येते काय? परंतु ज्ञानप्राप्तीनंतर देखील ज्ञानी पुरुष जीवन जगताना आपण पाहत असतो. त्यांच्या सूक्ष्म आणि कारण शरीरांकडून कसा व्यवहार घडत असतो? ज्ञानाग्नीने दोन्ही शरीरे जळून गेली तरी ती जणू न जळल्यासारखी शिल्लक असतात. दोरखंड अग्नीत जाळले तर ते जळून जाते तरीही मूळ स्वरूपाप्रमाणे दिसत असते. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाच्या सूक्ष्म व कारण देहाची स्थिती असते. प्रारब्धकर्म जोपर्यंत

शिल्लक असते तोपर्यंत ज्ञानी पुरुषांची तिन्ही शरीरे जिवंत असतात. अशी तिन्ही शरीरे ज्याला असतात असा ज्ञानी कसा असतो याचे वर्णन या निर्देहागमस्थलात केलेले आहे.

'निर्गतः देहभावः यस्मात् सः निर्देहः।' ज्याच्या मनातून देहभावाचे निर्गमन झाले तो निर्देही होय. गमन आणि निर्गमन यांत थोडे अंतर आहे. जो गमन करतो त्याचे पुन्हा आगमन होते. परंतु जो निर्गमन करतो कधीच परत येत नाही. एकदा गेला की गेलाच. देहभावाचे निर्गमन म्हणजे समूळ उच्चाटन. त्याच्या ठिकाणी पुन्हा देहभाव उत्पन्न होणे शक्य नाही.

**देहिनोऽपि परात्मत्वभाविनो निरहंकृते।**
**निरस्तदेहधर्मस्य निर्देहागम उच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.३६)

देहात राहूनदेखील त्याची भावना परमात्म्याशी समरस झालेली असते. भावना जेथे असते तेथे मनुष्य राहत असतो. शरीराकडून एखादी क्रिया घडत असेल आणि मन दुसऱ्या विचारात मग्न असेल तर त्यावेळी मानसिक क्रियाच महत्त्वाची ठरते. देहाच्या क्रियेला अर्थ नसतो. कर्म करणारे मनच असते. शरीर हे कर्माचे साधन असते. ज्ञानी पुरुष स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिन्ही शरीरांत राहत असला तरीही त्याची भावना त्या शरीरात नसते. तो देहधर्मांपासून मुक्त झालेला असतो. स्थूल, कृश, काळा, गोरा, सुरूप, कुरूप हे देहाचे धर्म होत. या देहधर्माचा त्याने त्याग केलेला असतो. परमात्म्याशी समरस झालेली अक्कमहादेवी विवस्त्रावस्थेत सर्वत्र भ्रमण करीत होती. तिच्या ठिकाणी देहभावच उरला नव्हता. तिच्या ठिकाणी शरीराभिमान असता तर ती आपले राणीपद सोडून अशा अवस्थेत भटकली नसती. ज्याचा देहभाव नष्ट होतो त्याचे जणू या लोकांशी असलेले नाते तुटून जाते. तो शरीराने कोणाचाच नसतो. परंतु आत्मरूपाने सर्वत्र विद्यमान असतो. सगळी नाती गोती देहाशी संबंधित असतात. जोवर देह आहे तोवर ती कायम असतात. एकदा देह सुटला की सारी नाती-गोती अर्थहीन होतात. त्याचा मृत्यू झाला की सगळे एकत्र जमून थोडावेळ रडतात. जसजसे दिवस उलटत जातात तसतसा त्याचा विसर सगळ्यांना पडू लागतो. असे त्याचे जगाशी संबंध तुटून जातात. ज्याक्षणी मनुष्य देह सोडतो त्याक्षणी त्याचे सारे संबंध संपतात. जर एखादा मनुष्य मेल्यानंतर पुन्हा जिवंत झाला तर लोक त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहीत. त्याला 'भूत' ठरवून त्याच्यापासून दूर पळून जातील. मनुष्याचे सारे संबंध शरीराशी निगडित असतात. अक्कमहादेवीचा देहभाव सुटला होता म्हणून तिचेही सारे लौकिक संबंध संपले. अंगावर वस्त्रे आहेत की नाहीत, राहायला कुठे जागा मिळेल की नाही, खायला अन्न मिळेल की नाही, हे सारे प्रश्न तिच्या दृष्टीने एका क्षणात निरर्थक ठरले.

काही कामानिमित्ताने घर सोडण्याची वेळ आल्यावर आता आपले कसे होईल, वेळेवर जेवण मिळेल की नाही, अशी चिंता माणसाला लागून राहते. जेव्हा अशी चिंता वाटेल तेव्हा घर सोडण्याची आपली मानसिक तयारी नाही असे निश्चित समजावे. ज्याचा देहाभिमान नाहीसा होतो त्याला अशी चिंता पडत नाही. ज्यासाठी शरीर मिळाले त्या परमात्मज्ञानाची प्राप्ती झाल्यावर मग शरीराची चिंता कशाला वाहायची? म्हणून देहधर्मांचा त्याग केल्यामुळे देहात असूनदेखील ज्ञानी पुरुष निर्देही असतो.

**गलिते ममताहन्ते संसारभ्रमकारणे।**
**पराहन्तां प्रविष्टस्य कुतो देहः कुतो रतिः।।१८.३७।।**

जीवात्म्याला संसारचक्रात भ्रमत ठेवायला अहंकार आणि ममत्व कारणीभूत असतात. परमात्मज्ञानाने जेव्हा या दोहोंचा नाश होतो तेव्हा त्याच्या ठिकाणी पराहन्तेचा उदय होतो. सर्वत्र आत्मरूपाने मी व्याप्त आहे अशा अहंभावाला पराहन्ता म्हणतात. मी देह आहे ही देहाची अहन्ता संसाराचे कारण आहे तर पराहन्ता हे मुक्तीचे कारण आहे. अहंभाव देहाबाहेर पडून विश्वव्यापक झाला तर क्षुद्र देहाहन्ता नष्ट होते. असे घडल्यावर कसला देह आणि कसले देहाचे प्रेम? अशी त्याची अवस्था होते. अर्थात् त्याला शरीराचा अभिमान नसतो आणि शरीराबद्दल ममत्वही नसते. स्थूलशरीराचे देहधर्म त्यागल्यामुळे त्याचा स्थूलशरीराचा अभिमान नष्ट होतो तसा अहंकार-ममत्व नष्ट झाल्यामुळे सूक्ष्म व कारण शरीराचा अभिमानही सुटतो. स्थुलशरीराभिमान नष्ट झाल्यामुळे याचा इहलोकाशी संबंध सुटतो तर सूक्ष्म व कारण शरीराचा अभिमान सोडल्यामुळे त्याचा परलोकाशी असलेला संबंध सुटतो. कारण परलोकात जाणारे येणारे शरीर सूक्ष्मशरीर असते. स्थूलशरीर तर इहलोकात जन्माला येते आणि इहलोकातच मरते. त्याच्या दृष्टीने स्वर्ग, वैकुंठ, कैलास आदी लोकांना अर्थ राहत नाही.

**केवले निष्प्रपंचौघे गंभीरे चिन्महोदधौ।**
**निमग्नमानसो योगी कथं देहं विचिन्तयेत्॥१८.३८॥**

शरीरात राहून शरीराची चिंता कशी नसते? असा प्रश्न काही जणांना पडतो. घरात राहून घराची चिंता कशी बरे नसेल? तो शरीराला कसे काय विसरतो? असे सामान्य माणसाला वाटेल. या शंकेचे छान समाधान येथे केले आहे. ज्याचे मन केवळ निष्प्रपंच आणि गंभीर अशा चैतन्यसागरात पूर्ण विलीन झाले आहे असा ज्ञानी आपल्या शरीराची चिंता कशाला करीत बसेल? हे समजून घेणे कठीण नाही. आपल्या मनाची स्थिती चार प्रकारची असते. आसक्ती, अनुरक्ती, मग्न आणि निमग्न.

लहान मुलांची खेळण्यात आवड असते. भूक लागली तरी ते खेळतच राहतात. तरुणांना तरुणीचे आकर्षण असते. तिच्याशिवाय जगात दुसरे काही आहे याची त्याला जाणीव नसते. तो तिच्यासाठी वेडा झालेला असतो. लहान मूल आसक्त असते तर तरुण अनुरक्त. आसक्तीपेक्षा अनुरक्ती अधिक गहिरी असते. लहान मुले पती-पत्नी होऊन खेळतात. परंतु ते खेळण्यापुरते असते. नंतर त्यांना त्याचा विसर पडतो. परंतु तरुण मात्र काही विसरत नसतो. त्याला कुणी जीव लावला असेल किंवा त्याचा जीव कोणावर जडला असेल तर तो आयुष्यभर विसरत नाही. लहान मुले एकमेकांशी भांडतात नंतर विसरून जातात. परंतु तरुण जेव्हा कोणाशी भांडतो तेव्हा तो ते सहज विसरत नाही. तो दीर्घद्वेषी होऊन सूड घेतो. या जन्मात शक्य झाले नाही तर दुसऱ्या जन्मात त्याचा वैरी बनून येतो. वृद्धावस्थेत मनुष्य चिंतामग्न होतो. मग्न होणे म्हणजे बुडून जाणे. वृद्ध माणसाजवळ तुम्ही बसलात तर तो गेलेल्या काळाच्या गोष्टी सांगत राहतो, हे तुमच्या लक्षात येईल. त्याला स्वत:च्या उदरनिर्वाहाची, भविष्याची आणि पुढील पिढीची चिंता असते. तो सदैव चिंतेत बुडून गेलेला असतो. शंकराचार्य म्हणतात, मुले क्रीडेत आसक्त असतात, तरुण तरुणीवर अनुरक्त असतात, वृद्ध भविष्याच्या चिंतेत मग्न असतात, परंतु कोणी एखादाच परब्रह्माची आवड असलेला असतो. अधिकाधिक माणसे आसक्त, अनुरक्त आणि मग्न असतात. परब्रह्माशी संलग्न एखादाच असतो.

ज्ञानी परब्रह्मात निमग्न असतो. आसक्त, अनुरक्त, मग्न आणि निमग्न या एकापेक्षा एक गहिऱ्या अवस्था आहेत. संसाराच्या चिंतेत मग्न झालेला माणूस परमात्म्याला जाणू शकत नाही. त्याप्रमाणे परमात्म्याच्या चिंतनात निमग्न

झालेला ज्ञानी संसाराची चिंता वाहत नाही. प्रपंचामुळे परमात्म्याचा विसर पडतो तर परमात्म्यामुळे प्रपंचाचा विसर पडतो. परमात्म्याचा विसर पडतो तेव्हा दुःखच दुःख वाट्याला येते, परंतु जेव्हा प्रपंचाचा विसर पडून परमात्म्यात निमग्न होतो तेव्हा परमसुखाची प्राप्ती होते. त्या परमसुखामुळे ज्ञानी पुरुषाला देहाचा आणि प्रपंचाचा विसर पडतो. हे मग्न होणे नव्हे तर निमग्न होणे आहे. निमग्न म्हणजे आणखी आत, आणखी खोल जाणे. इतके की पुन्हा बाहेर येणे नाही, पुन्हा देहभाव नाही. ही अवस्था किती खोल असते ते अनुभवानेच कळू शकेल. समुद्रातून प्रवास करताना समुद्राच्या खोलीचा अंदाज येण्याची शक्यता नसते. त्याप्रमाणे जो परब्रह्मात निमग्न होतो त्यालाच निमग्न होण्याचा खरा अर्थ कळलेला असतो. परब्रह्मात निमग्न झाल्यामुळेच त्याला शरीराची चिंता नसते.

**अपरिच्छेद्यमात्मानं चिदंबरमिति स्मरन्।**
**देहयोगेऽपि देहस्थैर्विकारैर्न विलिप्यते।।१८.३९।।**

महासागराचे उदाहरण देऊन याआधीच्या श्लोकात परब्रह्माची गंभीरता सांगितली आहे तर या श्लोकात आकाशाचे उदाहरण देऊन परब्रह्माचा अलिप्तपणा स्पष्ट केला आहे. 'आपला आत्मा अपरिच्छिन्न चिदाकाशरूप आहे' असे चिंतन शिवयोगी करीत असतो. त्यामुळे तो देहधारी असला तरी इंद्रियांच्या विकारांनी लिप्त होत नाही. अपरिच्छिन्न म्हणजे अखंड, ज्याचे विभाग किंवा तुकडे होऊ शकत नाही असा. देशपरिच्छेद, कालपरिच्छेद आणि वस्तुपरिच्छेद असे तीन परिच्छेद मानले जातात. हा प्रदेश आणि तो प्रदेश यांच्यात भिन्नत्व असते. तुम्ही आता वाराणशीला आहात, म्हणजे तुम्ही सध्या सोलापूर, पुणे, मुंबई या ठिकाणी नाही. हा देशपरिच्छेद भूतकाळात आणि भविष्यकाळात नाही, ते आहे वर्तमानकाळात. आपला देह जन्माआधी नव्हता आणि मरणानंतर नसेल. याला कालपरिच्छेद म्हणतात. चष्मा आणि पुस्तक ह्या दोन वस्तू आहेत. चष्मा पुस्तक नव्हे, पुस्तक चष्मा नव्हे. दोन्ही वस्तूंत भेद आहे. हा वस्तुपरिच्छेद होय. देश-काल-वस्तू यांनी प्रपंच परिच्छिन्न झालेला आहे. परंतु परमात्मा मात्र अपरिच्छिन्न आहे. तो देश-काल-वस्तूंनी विभाजित होत नाही. तो सर्व देशात, सर्व काळांत आणि सर्व वस्तूंत आहे. तो सर्व अणुरेणूत व्याप्त आहे. 'परमेश्वराला अस्तित्व नाही' असे जो ठामपणे सांगत असतो तो स्वतःच परमात्मरूप असतो. खरे तर कोणीही नास्तिक असत नाही. सारे आस्तिकच असतात. परमेश्वराला नाकारणारा पण विश्वाला अस्तित्व आहे असे म्हणणारा एक प्रकारे परमात्म्याच्या अस्तित्वाची ग्वाहीच देत असतो. कारण विश्व म्हणजे परमात्म्याशिवाय दुसरे काय आहे? विश्व परमात्मरूपच आहे, हे सर्व दर्शनांनी, साक्षात्कारी पुरुषांनी वारंवार गर्जून सांगितले आहे.

एक मनुष्य फार नास्तिक होता. त्या नास्तिकाचे प्रवचन गावकऱ्यांनी ठरवले. नास्तिकाचे प्रवचन ऐकायला खूप माणसे येतात, आस्तिकाचे प्रवचन ऐकायला फार थोडे येत असतात. कारण आस्तिकाचे प्रवचन ऐकल्यावर काहीतरी करावे लागते. देवपूजा, ध्यानधारणा इत्यादी. परंतु नास्तिकाचे प्रवचन ऐकल्यावर काहीच करावे लागत नाही. म्हणून त्याच्या प्रवचनाला गर्दी होते. त्या नास्तिकाने सुरेख प्रवचन केले. ईश्वर अस्तित्वात नाही हे त्याने सिद्ध केले. त्याच्या प्रवचनाला आलेल्या चारदोन आस्तिकांनाही 'खरेच ईश्वर नाही' असे वाटू लागले.

प्रवचन संपवून तो व्यासपीठावरून उतरला तेव्हा सगळे नास्तिक-आस्तिक त्याच्या भोवती गोळा झाले. नास्तिकांनी तर त्याच्या प्रवचनाची स्तुती केलीच परंतु आस्तिकदेखील त्याला म्हणाले, ''खरेच, तुमचे प्रवचन अत्यंत सुंदर होते. आज आम्हाला खरे ज्ञान मिळाले. आतापर्यंत आम्ही उगाच ईश्वर आहे असे मानत होते.

पूजा करा, नमस्कार करा, ध्यान करा, दान द्या, दक्षिणा द्या. एक ना हजार कटकटी. आज त्या सगळ्या कटकटीतून सुटलो. आपले प्रवचन खरोखरच सुंदर होते.''

ही सारी स्तुती ऐकून तो प्रवचनकार भारावून म्हणाला, ''कसले काय, ही तर भगवंताची कृपा!''

परमात्म्याचे अस्तित्व नाही असे सांगणारा माणूसदेखील सहज नकळत त्याची कृपा मान्य करीत असतो. म्हणून जगात कोणीही नास्तिक नाही. स्वत:चे अस्तित्व जो अमान्य करू शकतो तोच खरा नास्तिक होऊ शकतो. ईश्वर आहे की नाही ते सोडा परंतु 'मी नाही' असे जो ठामपणे म्हणू शकतो तो खरा नास्तिक. असा नास्तिक जगात कोठेही सापडणार नाही. जो 'आहे आहे' म्हणतो तो आस्तिक आणि जो 'नाही नाही' म्हणतो तो नास्तिक. अणुरेणूंत परमात्मा व्याप्त आहे. त्याचे अस्तित्व सर्वत्र आहे. तो इथे आहे- तेथे नाही, अशी त्याची अवस्था नाही. म्हणून परमात्मा अपरिच्छिन्न आहे. अशा परमात्म्याचे चिंतन शिवयोगी करीत असतो. म्हणून तो देहाच्या विकारांनी लिप्त होत नाही. अभिमान असेल तरच लेप लागतो. कोणी शिवी दिली परंतु तुम्ही ती ग्रहणच केली नाही तर तुम्हाला राग येणार नाही. तुम्हाला न कळणाऱ्या भाषेत जर तुम्हाला कोणी कचाकच शिव्या दिल्या तर? तर तुम्ही हा काय बोलतो आहे, याचाच विचार करीत बसाल. भाषाज्ञान नसल्यमुळे तो शिव्या देत आहे हे कळत नाही. न कळल्यामुळे तुम्हाला रागही येणार नाही. अशीच अवस्था परब्रह्मात निमग्न झालेल्या शिवयोग्याची असते. इंद्रिये आपापली कर्मे करीत असतात, परंतु त्या कर्मांचा विकारांचा लेप त्याला लागत नाही.

**अखंड संविदाकारमद्वितीयं सुखात्मकम्।**
**परमाकाशमात्मानं मन्वान: कुत्र मुह्यति।।१८.४०।।**

परमात्म्याचे ज्ञान झाल्यावर त्याच्या मनात कोणताही मोह राहत नाही. अखंड, ज्ञानस्वरूप, अद्वितीय, आनंदरूप, परकाशरूप असा आपला आत्मा आहे. हे जाणणारा ज्ञानी कशाने बरे मोहित होईल? मोहित होण्यासाठी दुसऱ्या वस्तूची, व्यक्तीची आवश्यकता असते. ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीत आपल्यापेक्षा भिन्न असे काही नसते. त्यामुळे तो मोहित होण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

**उपाधिविहिता भेदा दृश्यन्ते चैकवस्तुनि।**
**इति यस्य मति: सोऽयं कथं देहमितो भवेत्।।१८.४१।।**

आकाशाची वारंवार उपमा दिल्यामुळे जिज्ञासू श्रोत्यांच्या मनात शंका उपस्थित होऊ शकते. परमात्मा हा आकाशाप्रमाणे आहे. परंतु आकाश तर परिच्छिन्न असते. घटाकाश, मठाकाश, महादाकाश असे परिच्छिन्न होताना दिसते. मग आत्मा आकाशासारखा कसा? याचे समाधान या श्लोकात केले आहे. उपाधीमुळे एका वस्तूत अनेक भेद दिसू लागतात. आकाशात देखील भेद दिसतो तो घट, मठ, गृह या उपाधीमुळे. आकाश घटाकाश, मठाकाश, गृहाकाश असे वेगवेगळे भासते. जेथे या उपाधी नसतात तेथे आकाश महाकाश असते.

विशेषण आणि उपाधी ही वेदान्ताची परिभाषा आहे. विशेषण विशेष्यात मिसळून जाते. उदाहरणार्थ- लाल वस्त्र. लाल रंग हे वस्त्राचे विशेषण आहे. लालरंग हा वस्त्राशी एकरूप होतो, मिसळून जातो. परंतु उपाधी मात्र अशी एकरूप होत नाही. ती भिन्न राहून भेद दाखवत असते. घट, मठ या उपाधी आकाशाशी एकरूप होत नाहीत. त्या वेगळ्या राहून आकाशात भेद करीत असतात. 'एक' जेव्हा 'अनेक' दिसू लागते तेव्हा तो भेद उपाधिकृत असतो असे समजावे. भेद हे उपाधिकृत असतात असे मानणारा शिवयोगी देहाभिमानी कसा असेल? अर्थात् त्याच्या ठिकाणी देहबुद्धी नसते.

**भेदबुद्धिः समस्तानां परिच्छेदस्य कारणम्।**
**अभेदबुद्धौ जातायां परिच्छेदस्य का कथा॥१८.४२॥**

उपाधीमुळे भेद दिसतो. परंतु ज्याला शिवज्ञान होते त्याच्या दृष्टीने भेद नष्ट होतो. तो सर्वत्र एकाच परमात्म्याचे दर्शन घेत असतो. त्याची अद्वैतभावना असल्यामुळे तेथे द्वैताला थारा नसतो. शेवटी या स्थलाचा समारोप करतात.

**शिवोऽहमिति यस्यास्ति भावना सर्वगामिनी।**
**तस्य देहेन संबंधः कथं स्यादमितात्मनः॥१८.४३॥**

मी शिवस्वरूप आहे अशी शिवाद्वैतभावना ज्या शिवयोग्याची असते त्या परमात्मस्वरूप शिवयोग्याला देहाचे विकार कसे असतील? त्याचा देहाशी संबंध कसा असेल? शरीरात राहून देखील त्याचा शरीराशी संबंध नसतो. या अवस्थेला 'निर्देहागमस्थल' म्हटले आहे. निर्देही झाल्यावर पुन्हा जन्म नाही आणि जन्म नाही म्हणून मरण नाही. अशी निर्देहावस्था आपणा सर्वांना लाभावी अशी शुभकामना व्यक्त करून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१० नोव्हेंबर १९९४

---

**आशीर्वचन सातवे**

## निर्भावागमस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'त एकापेक्षा एक सूक्ष्मातिसूक्ष्म स्थले आहेत. काल आपण निर्देहागमस्थलावरील निरूपण ऐकले आहे. आजचे स्थल आहे निर्भावागमस्थल. भावना विकारमुक्त होणे म्हणजे निर्भाव होणे. या स्थितीचे वर्णन करणाऱ्या स्थलाला 'निर्भावागमस्थल' असे म्हणतात.

**व्यतिरेकात् स्वरूपस्य भावान्तरनिराकृतेः।**
**भावो विकारनिर्मुक्तो निर्भावागम उच्यते॥**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.४४)

जीवात्म्याला परमात्म्यापर्यंत भावनाच घेऊन जात असते. शरीर, वाणी आणि मन अशी तीन साधने परमेश्वराने जीवात्म्याला दिलेली आहेत. स्थूलशरीराने आपण भगवंताच्या मूर्तीची पूजाअर्चा करू शकतो, मूर्तीला स्पर्श करू शकतो. परंतु भगवंताच्या गुणांना स्थूलशरीर स्पर्श करू शकत नाही. सर्वज्ञता, अलुप्तशक्तिमत्त्व, नित्यतृप्तत्व इत्यादी गुणांना आपली वाणी स्पर्श करू शकते. वाणी भगवंताचे गुण गाऊ शकते. परमात्मा चिद्रूप व व्यापक आहे. त्याच्या चिद्रूपाला वाणी स्पर्श करू शकत नाही. तेथे मन उपयोगी पडते. मन परमात्म्याच्या चिद्रूपाचे चिंतन करू शकते. कोणी जर परमात्म्याचे ध्यान करायला बसला तर अधुनमधून त्याचे मन संसाराचेही चिंतन करू

लागते. जन्मजन्मांतरात मनाने संसाराचेच चिंतन केलेले असते. त्यामुळे असे घडते. शास्त्र सांगते की केवळ आत्माच दर्शनीय, श्रवणीय आणि चिंतनीय आहे. आत्मसाक्षात्कारासाठी श्रवण, मनन आणि निदिध्यास हे तीन उपाय आहेत. श्रवण म्हणजे एकाग्र चित्ताने ऐकणे. श्रवण केलेल्या विषयाशी मन एकरूप होणे म्हणजे मनन होय. अनात्माकार होण्यापासून मनाला दूर ठेवून त्याला आत्माकार होऊ देण्याचा प्रयत्न करणे ही मननप्रक्रिया आहे. मनन दृढ झाले की मन अनात्मकार न होता अखंड आत्मचिंतन करू लागते तेव्हा त्याला निदिध्यास असे म्हणतात. तैलधारेसारखे हे चिंतन अखंड असते. निर्भावागमस्थल म्हणजे ही निदिध्यासावस्था होय. अनात्म्यापासून मनाला दूर करण्याची क्रिया निर्देहागमास्थलात घडलेली असते आणि निर्भावागमस्थलात मन पूर्ण आत्माकार झालेले असते. आपल्या आत्मस्वरूपाशिवाय अन्य भावांचे निराकरण होऊन विकाररहित अशी भावना म्हणजे निर्भावागम होय.

भावनेचा आधार जेव्हा विकृत असतो तेव्हाच भावना विकृत होते. समोर जी वस्तू अथवा व्यक्ती येईल त्या वस्तूसारखी अथवा व्यक्तीसारखी आपली भावना होते. भावना एकदा परमात्माकार झाली तर तिला विकार स्पर्शत नाही. निर्भाव म्हणजे भावनारहित नव्हे, तर विकारांपासून मुक्त अशी शुद्ध भावना. योगशास्त्रात सतत बाहेर धाव घेणाऱ्या भावनेला केंद्रित करण्यासाठी शरीरात सहा चक्रे आहेत असे सांगितले आहे. आधारचक्र, स्वाधिष्ठानचक्र, मणिपूरचक्र, अनाहतचक्र, विशुद्धिचक्र, आज्ञाचक्र आणि सहस्रारचक्र. यांपैकी आधार, अनाहत आणि सहस्रार ही चक्रे प्रमुख मानली जातात. साधनेच्या प्रारंभावस्थेत या तीन चक्रांवर मन केंद्रित करावे असे साधकाला सांगितले जाते. निर्भावागमस्थलातील साधकाला मात्र या तिन्ही स्थानी भावना केंद्रित करायची नसते. सर्व भेदांपासून मुक्त होऊन भावनेला निराश्रय करायचे असते. भावनेला निराश्रय करणे म्हणजे तिचा आधार काढून घेणे. तिचा आधार काढून घेतला की ती आपोआप सहज आत्म्याच्या ठिकाणी स्थिर होते. एखाद्या माणसाला बाहेरच्या साऱ्या घरांची दारे बंद झाल्यावर आपल्याच घरात निमूटपणे बसावे लागते त्याप्रमाणे.

**अहं ब्रह्मेति भावस्य वस्तुद्वयसमाश्रयः।**
**एकीभूतस्य चिद्व्योम्नि तदभावो विनिश्चितः।।१८.४५।।**

सद्गुरूच्या उपदेशामुळे शिष्य 'अहं ब्रह्मास्मि' असा जप करू लागतो. तेव्हा भावनेत अहं आणि ब्रह्म असे दोन भाग असतात. परंतु पुढे तो अहंभाव विसरतो आणि त्याच्या ठायी केवळ ब्रह्मभावच केवळ उरतो. 'मी शिव आहे' असा वारंवार जप करणारा जीव शिवच होतो. त्याच्या भावनेतले द्वैत संपून ती एकाकार होते. हीच निर्भावस्थिती होय. भावनेबद्दल 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे–

**भावो मानसचेष्टात्मा परिपूर्णः शिवाश्रयः।।१६.६७।।**

भावना म्हणजे मनाची एक वृत्ती होय. ज्या वृत्तीत परिपूर्ण शिव भरून राहिलेला आहे, ती वृत्ती म्हणजे भावना होय. भावना जेव्हा शिवमय होते तेव्हा मन जणू मौन होते. मनाला मौन करण्यासाठीच आधी वाणीचे मौन पाळावे लागते. वाणीचा व्यवहार थांबल्याशिवाय मनाचा व्यवहार थांबत नाही. वाणी मौन झाली तरी माणसाचे मन बोलत असतेच. मौन धारण केलेला मनुष्य कधी कागदावर लिहून आपली भावना व्यक्त करतो तर कधी हावभाव करून आपले मनोगत प्रकट करतो. वाचा मौन आहे, पण मन मात्र बोलते आहे अशी ही अवस्था आहे. परंतु

मौन परिपक्व झाल्यावर हळूहळू मन देखील मौन होते. त्याच्याकडून कोणतीही इच्छा व्यक्त होत नाही. ज्याक्षणी मन मौन होते त्याक्षणी ते आत्म्याशी समरस होते.

महर्षी अष्टावक्राची कथा तुम्हाला माहीत असेल. एकदा राजा जनकाने जाहीर केले की, ''सुसज्ज योद्ध्याला घोड्यावर बसण्यासाठी जेवढा काळ लागेल तेवढ्या काळात जो मला ज्ञान देईल त्याला मी आपला गुरू मानेन.''

महर्षी अष्टावक्राच्या कानी ही वार्ता गेल्यावर ते राजा जनकाच्या दरबारात आले. महर्षी परमज्ञानी होते. परंतु त्यांचे शरीर आठ ठिकाणी वाकडे होते. त्यामुळेच त्यांचे नाव अष्टावक्र पडले होते. ते दरबारात गेल्यावर त्यांचे शरीर पाहून सगळे दरबारी हसू लागले. त्यांचे हसणे पाहून अष्टावक्र राजाला म्हणाले,

''राजा तुझ्या दरबारात एकही ज्ञानी नाही. सारे चर्मकारच आहेत.''

राजाला आश्चर्य वाटले. महर्षींचे स्वागत करून तो म्हणाला, ''महाराज माझ्या दरबारात तर ब्राह्मण आणि क्षत्रिय आहेत. चर्मकार कोणीच नाही. मग आपण असे कसे म्हणालात?''

''राजन्'', अष्टावक्र म्हणाले, ''माझ्या शरीराकडे पाहून तुझे सारे दरबारी हसले. त्यांनी माझे वक्र शरीर पाहिले. परंतु माझ्या ठिकाणी नांदणारे ब्रह्म त्यांना दिसले नाही. त्यांनी ब्राह्मणकुळात जन्म घेतलेला असेल परंतु ते ब्रह्म जाणत नाहीत. त्यांच्याकडे ब्रह्मदृष्टी नसून चर्मदृष्टी आहे. त्यांना माझ्या शरीरावरचे फक्त चर्मच दिसले, म्हणून ते सारे चर्मकार होत.''

महर्षींचा युक्तिवाद ऐकून राजा प्रभावित झाला. त्यांचा आदर-सत्कार करून त्यांना दरबारात येण्याचे कारण विचारले. त्यांनी ''तुला ज्ञान देण्यासाठी आलो आहे'' असे सांगताच राजाने विचारले, ''सुसज्ज योद्ध्याला घोड्यावर बसायला जेवढा वेळ लागेल तेवढ्या वेळात मला ज्ञान हवे, ही अट आपल्यला माहीत आहे ना?''

''होय'', महर्षी म्हणाले, ''परंतु त्याआधी मला गुरुदक्षिणा दिली पाहिजे.''

''आपल्याला कोणती गुरुदक्षिणा हवी?'' राजाने विचारले.

''हे राजन्, शरीर, वाणी आणि मन या त्रिकरणांसह तुझी सारी संपत्ती मला अर्पण करशील, तुझे स्वतःचे म्हणून काही शिल्लक राहणार नाही असा तू निर्धन, निर्देह, निर्भाव होशील तर मी तुला ज्ञान देईन.''

त्याप्रमाणे राजाने संकल्पपूर्वक तन, मन, धन महर्षींना अर्पण केले. त्यानंतर महर्षी म्हणाले, ''राजा, तू शरीर मला अर्पण केले म्हणून तुझे शरीर आता माझे झाले. तुझी सारी संपत्ती आता माझ्या मालकीची आहे, आणि हे सारे अर्पण केल्यामुळे तुझे मन माझे झाले आहे. मग आता मला सांग की तुझ्या मनात याक्षणी आता कोणता विचार आहे?''

''मी माझे सर्वस्व आपल्याला अर्पण केले आहे हा.''

''राजा'', महर्षी म्हणाले, ''जे मन तू मला अर्पण केले आहेस त्या मनाने तू विचार कसा करीत आहेस? मला अर्पण केलेल्या मनाने तू विचार करू नकोस. तुला मनाचा संपूर्ण विसर पडेल, तुझे मन मौन राहील त्याक्षणी तुला ज्ञान प्राप्त होईल.''

त्यानंतर राजाचे मन ज्या क्षणी निर्विचार झाले तत्क्षणी त्याला ज्ञान प्राप्त झाले. या क्षणाच्या तुलनेने सुसज्ज योद्ध्याला घोड्यावर बसायला लागणारा वेळ कितीतरी अधिक होता.

आत्मज्ञानप्राप्तीसाठी फार मोठा काळ लागत नाही. आत्मज्ञान तर क्षणार्धात होते. परंतु मनाची अशी तयारी करण्यासाठी मात्र कित्येक जन्म लागतात. मौन व्हायला मन तयारच नसते. शरीर सोडून जाताना मनाला अत्यंत

वेदना होतात. शरीर तर सोडावेच लागते. तरीही शरीराला चिकटून राहण्याचा मन प्रयत्न करीत असते. एवढी देहासक्ती मनुष्याच्या मनात असते. परमात्म्याविषयी मनाला किंचित देखील आसक्ती नसते. मनात संसाराची आसक्ती ठेवून जो शरीराने देवपूजा करीत असतो त्याची पूजा निरर्थक असते. सर्व विकारांपासून मन निर्विकार होते, ते मौन होते तेव्हाच साधक निर्भाव होतो.

**एकभावनिरूढस्य निष्कलंके चिदंबरे।**
**क्व जातिवासनायोग: क्व देहित्वं परिभ्रम:।।१८.४६।।**

समुद्रात असंख्य तरंग असतात त्याप्रमाणे मनाच्या वृत्तीही अगणित असतात. एक वस्तू मिळाली की मन दुसरी वस्तू मागत असते. मनातल्या विषयवासना जेव्हा सरून जातात तेव्हा मनात केवळ एकच वृत्ती उरते. निष्कलंक, चिद्रूप अशा परमात्म्याशी एकरूप असलेली. परमात्मा निष्कलंक आहे. कितीही प्रयत्न केला तरी आकाशाला रंग लावता येत नाही. त्याप्रमाणे काम-क्रोधादी विकारांनी मन कलंकित होत असले तरी मनापलीकडचा आत्मा मात्र कलंकित होत नाही. अशा निष्कलंक, चिद्रूप परमात्म्याशी ज्याची भावना समरस होते त्याला कुठली जात? कुठला वर्ण? कुठले शरीर? आणि कसले संसारभ्रमण? तो या सर्वांपासून अलिप्त असतो.

आद्य शंकराचार्यांच्या चरित्रात एक आख्यायिका आहे. अद्वैततत्त्वज्ञानाचा प्रसार-प्रचार करण्यासाठी शंकराचार्यांचे काशीत वास्तव्य होते. गंगास्नान करून भगवान विश्वेश्वराचे दर्शन ते घेत असत. अनेक अद्वैतपर ग्रंथ लिहून देखील त्यांच्या मनातला ब्राह्मण्याचा अहंकार गेला नव्हता. विश्वेश्वराला वाटले की एवढा ज्ञानी पुरुष असून देखील त्याच्या मनात अहंकार दबा धरून बसलेला आहे. त्यांचा अहंकार नष्ट करायलाच हवा. मग विश्वेश्वराने एक नाटक केले.

एके दिवशी गंगास्नान करून शंकराचार्य विश्वेश्वर मंदिराकडे निघाले होते. अरुंद गल्लीतून ते जात असताना समोरून एक चांडाल येत होता. काशीतल्या गल्लीबोळांची तुम्हाला कल्पना आहेच. काशीचे माहात्म्य प्राचीन काळापासून विख्यात आहे. येथे माणूस मरतो तेव्हा सारे नियम बाजूला ठेवून त्याला मुक्ती मिळते. मुक्ती देणारेच जिथे नियम पाळत नाहीत तेथे रहिवासी कसले नियम पाळणार? ते बहाद्दर सारे नियम मोडून रस्त्यावरच घर बांधतात. त्यांनी नियम पाळले असते तर काशीनगरीत एवढे अरुंद गल्ली बोळ कसे निर्माण झाले असते?

अशाच अरुंद गल्लीतून शंकराचार्य जात होते. तेव्हा समोरून एक चांडाल येत होता. तो आडवा आलेला पाहताच शंकराचार्य त्याला म्हणाले, ''बाजूला हो, मला जायला वाट दे.''

चांडालाने शंकराचार्यांकडे हसून पाहिले. तो सामान्य चांडाल नव्हताच. त्याच्या वेशात भगवान विश्वेश्वर आले होते. चांडाल शंकराचार्यांना म्हणाला,

''मी बाजूला होतो. त्याबद्दल माझे काही म्हणणे नाही. परंतु आपण 'बाजूला व्हा' असे नेमके कशाबद्दल म्हटले? माझ्या शरीराला की माझ्या आत्म्याला? यापैकी कोणाला बाजूला करायचे? माझ्या शरीराबद्दल म्हणत असाल तर जसे आपले शरीर आहे तसेच माझेही शरीर आहे. अस्थी, मांस, चर्म हे जसे आपल्या शरीरात आहे तसेच माझ्याही शरीरात आहे. आपल्या शरीरात जी आत्मवस्तू आहे तीच माझ्याही शरीरात आहे. आपले आणि माझे शरीर एकसारखे असल्यामुळे 'शरीर बाजूला घे' असे आपण म्हणत असाल तर त्यात काही अर्थ नाही आणि 'आत्म्याला बाजूला कर' असे म्हणत असाल तर तेदेखील निरर्थक आहे.''

शंकराचार्यांनी ओळखले की हा काही सामान्य चांडाल नाही. हे विश्वेश्वरच आहेत. या घटनेपासून ब्राह्मण असो की चांडाल, तो आत्मज्ञानी असेल तर त्याला नमस्कार केला पाहिजे असा शंकराचार्यांनी विचार केला आणि त्यावेळी त्यांच्या मनातला ब्राह्मणत्वाचा अहंकार नष्ट झाला. जोपर्यंत जातीचा, वर्णाचा अहंकार असतो तोपर्यंत कोणी आत्मज्ञानी होऊ शकत नाही. जेव्हा तो आत्मज्ञानी होतो त्याच्या ठिकाणी कुठलाही संकुचितपणा राहत नाही. शरीर माणसाचे असेल, पक्ष्याचे असेल अथवा पशूचे असेल परंतु त्या शरीरात आत्मतत्त्वच नांदत आहे याची जोपर्यंत जाणीव होत नाही तोपर्यंत परमात्मस्वरूपाचे आकलन होत नाही. निर्भावागमस्थलातील शिवयोग्याच्या मनात जात-वर्ण-शरीर-संसार यासंबंधी किंचितदेखील वासना नसते. तो निर्देही, निर्भाव असल्यामुळे संसारचक्रात भ्रमत नाही. वासनाच संसारात जन्म घ्यायला भाग पाडते. परंतु निर्भावागमस्थलातील शिवयोग्याचा वासनाक्षय झालेला असतो. म्हणून तो जन्म-मृत्यूपासून मुक्त होतो.

**शून्ये चिदंबरे स्थाने दूरे वाङ्मानसाध्वनः।**
**विलीनात्मा महायोगी केन किं वापि भावयेत्।।१८.४७।।**

वाणी, मन यांच्या पलीकडची ही स्थिती आहे. परब्रह्माविषयी म्हटले जाते- 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह।' शरीर, वाणी यांना परमात्मा गोचर नाही. वाणीला अर्थात् शब्दाला परमात्मा अगोचर असेल तर शास्त्रे परमात्म्याचे दर्शन कसे घडवतील? असा प्रश्न कोणाला पडेल. तो बरोबर आहे. शास्त्र परमात्म्यापर्यंत घेऊन जात नाही तर दुरून परमात्मा दाखवत असते. प्रतिपदेचा चंद्र दाखवण्याची एक पद्धत आहे. अमावस्येच्या दिवशी चंद्र-सूर्याचे उदयास्त एकाच वेळी होतात. म्हणून अमावस्येच्या रात्री चंद्रदर्शन होत नाही. परंतु दुसऱ्या दिवशी सूर्य-चंद्राच्या भ्रमणगतीत अंतर पडते आणि सूर्यास्तानंतर पूर्वक्षितिजावर एक रेषेसारखी बारीक चंद्रकोर दिसू लागते. मोठ्या प्रयत्नाने डोळे बारीक करून ही चंद्रकोर पाहावी लागते. ती पाहावी असे शास्त्र का सांगत असते? तर प्रयत्नपूर्वक क्षितिजावरची सूक्ष्म चंद्रकोर पाहावी तशीच आपल्या अंतर्यामी विद्यमान असलेला आत्मचंद्रदेखील पाहावा, हे शास्त्र सुचवत असते. ज्याला प्रतिपदेची चंद्रकोर दिसते तो दुसऱ्याला एखाद्या झाडाची फांदी दाखवून तिच्या साहाय्याने चंद्रकोर दाखवण्याचा प्रयत्न करतो. यालाच 'शाखाचंद्रन्याय' म्हणतात. सूक्ष्म चंद्रकोर दाखवण्यासाठी स्थूल फांदीचा आधार घ्यावा लागतो. कधी एखादी इमारत तर कधी एखाद्या देवळाचे शिखर दाखवून त्याच्या आधाराने चंद्रकोर दाखवली जाते. त्याप्रमाणे शास्त्रे मनुष्याला परमात्मतत्त्व दाखवत असतात. वाणीच्या, मनाच्या पलीकडे असलेल्या आकारशून्य चिदाकाशात ज्याची वृत्ती विलीन झालेली असते त्याने कशाची भावना करावी? अर्थात् त्याला कोणत्याच प्रकारे कोणत्याही वस्तूची भावना होत नाही.

**अविशुद्धे विशुद्धे वा स्थले दीप्तिर्यथा रवेः।**
**पयत्येवं सदाद्वैती सर्वत्र समवृत्तिमान्।।१८.४८।।**

जात-वर्ण-शरीर यांचा संबंध सुटलेल्या शिवयोग्याची व्यावहारिक स्थिती कशी असते, याविषयी येथे सांगितले आहे. सूर्याचा प्रकाश शुद्ध अथवा अशुद्ध स्थानी समानतेने पडतो. त्याप्रमाणे शिवाद्वैती असलेल्या ज्ञान्याच्या दृष्टीने कोणताही भेद नसतो. निर्भावस्थितीतील सिद्धाच्या दृष्टीत सर्वदा समानता असते. या स्थलाचा शेवटी समारोप करतात.

न बिभेति जरामृत्योर्न क्षुधाया वशं व्रजेत्।
परिपूर्णनिजानंदं समास्वादन् महासुखी।।१८.४९।।

निर्भावस्थितीतील योगी वार्धक्य आणि मृत्यू यांना भीत नाही. कारण त्याच्याठायी देहाभिमान नसतो. त्याच्या दृष्टीने मरण हा एक उत्सव असतो. अनेक संतांनी मृत्यूला 'महानवमी' म्हटले आहे. शरीर ही उपाधी असते. या उपाधीचा त्याग करताना त्यांना आनंदच होतो. शरीर असते तोपर्यंत ते जीवन्मुक्त असतात. शरीर सुटले की ते विदेहमुक्त होतात. म्हणून ते वृद्धावस्था आणि मृत्यू यांना भीत नसतात. ते तहान-भुकेला वश होत नाहीत. आत्मानंदाचा आस्वाद घेत महासुखी होतो. आनंद आत्म्याच्या ठायीच असतो. परंतु आत्मज्ञान नसलेला मनुष्य सुखाचा शोध बाहेर घेत असतो. त्या वेड्याला वाटत असते की सुख वस्तूमध्ये आहे, व्यक्तीमध्ये आहे. परंतु कोणीच कोणाला सुख देत नसतो. सुख प्राप्त होत असते ते आतून. मात्र याचे ज्ञान कोणाला नसते. ज्याची वृत्ती शांत असते त्याला सुख मिळते, जो अशांत असतो त्याच्या नशिबी दुःख असते. संसारात सुख प्रतीत होते तो खरा आत्मानंदाचा अंश असतो. लाडवातील गोडी गुळाची असते, त्यातील रव्याची अथवा बेसनाची नसते त्याप्रमाणे. निर्भावागमस्थलातील योगी निरंतर आत्मानंदाचा आस्वाद घेत असतो. म्हणून तो महासुखी होय. येथे निर्भावागमस्थल पूर्ण होते. उद्या पुढील स्थलाचा विचार करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
११ नोव्हेंबर १९९४

---

## आशीर्वचन आठवे

## नष्टागमस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काल आपण निर्भावागमस्थलावरील निरूपण ऐकले. यापुढील स्थलाचे नाव आहे नष्टागमस्थल. या स्थलाविषयी ज. रेणुकाचार्य म्हणतात-

भेदशून्ये महाबोधे ज्ञात्रादित्रयहीनकः।
ज्ञानस्य नष्टभावेन नष्टागम इहोच्यते।।

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.५०)

ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी आहे. यालाच प्रमाता, प्रमेय आणि प्रमाण असेही नाव आहे. लौकिक ज्ञान असो की आध्यात्मिक ज्ञान असो, त्या ठिकाणी त्रिपुटी असतेच. परंतु शिवयोग्याच्या ज्ञानात त्रिपुटी नष्ट होते. म्हणून या स्थलाला नष्टागमस्थल असे म्हणतात. परमात्म्याचे ज्ञान म्हणजेच महाबोध होय. त्याच्या एवढे मोठे, महान असे काही नाही. उपनिषदात म्हटले आहे, 'यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति'

जे सर्वांत महान आहे ते सुखरूप आहे, जे लहान, अल्प आहे ते दुःखरूप आहे. त्यापासून थोडे सुख मिळते

आहे असे वाटते, परंतु नंतर केवळ दुःखच मिळते. प्रपंचातील कोणतीही वस्तू सुखरूप नाही. ती जेव्हा सुख देते असे वाटते त्यावेळी ती दुसऱ्याकडून उधार घेऊन सुख देत असते. एखाद्या मनुष्याने दुसऱ्याकडून पैसे उसने घेऊन दान करावे आणि दानशूर म्हणून मिरवावे, तसा हा प्रकार आहे. प्रपंच परमात्म्यापासून सुख घेऊन ते मनुष्याला देत असतो. म्हणून परमात्मा सुखरूप तर प्रपंच दुःखरूप आहे. महान अशा परमात्म्याचे ज्ञान म्हणजे महाबोध होय. ज्ञानाचा विषय लहान असेल तर अल्पज्ञान मिळेल. ज्ञानाचा विषय महान असेल तर ज्ञान देखील महान असेल. परमात्मज्ञानात कोणताही भेद नाही.

सजातीय, विजातीय आणि स्वगत असे भेदाचे तीन प्रकार आहेत. मनुष्य ही एक जाती आहे. मनुष्यजातीतील प्रत्येक मनुष्य एकमेकापासून भिन्न आहे. हा सजातीय भेद होय. मनुष्य, पक्षी, पशू या वेगवेगळ्या जाती आहेत. मनुष्यात मनुष्यत्व आहे तर पशूत पशुत्व आहे. म्हणून त्यांच्यातील भेद विजातीय भेद आहेत. यानंतर तिसरा स्वगत भेद होय. वस्तू, व्यक्ती एकच असले तरी तिच्यात भिन्नत्व असते. उदा. झाड एकच आहे परंतु त्याचे मूळ, खोड, फांद्या, पाने, फुले हे एकमेकांपासून भिन्न आहेत. याला स्वगत भेद असे म्हणतात. परमात्म्याच्या ठिकाणी स्वजातीय, विजातीय अथवा स्वगत यांपैकी कोणताही भेद नसतो. सामान्य माणसाच्या दृष्टीला प्रपंच आणि परमात्मा यांच्यात भेद दिसतो. परंतु जो निर्भावस्थलात पोहोचतो त्याच्या दृष्टीत प्रपंच परमात्मरूप असतो. प्रपंच आणि परमात्मा असा भेद त्याच्या दृष्टीत प्रपंच परमात्मरूप असतो. प्रपंच आणि परमात्मा असा भेद त्याला जाणवत नाही. परमात्मा असा भेदशून्य आहे. भेदशून्य अशा ज्ञानात ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय अशी त्रिपुटी नसल्यामुळे शिवयोग्याच्या ज्ञानात भेदज्ञान नष्ट होते. म्हणून या स्थलाला नष्टागमस्थल म्हणतात.

**अद्वैतवासनाविष्टचेतसां परयोगिनाम्।**

**पश्यतामन्तरात्मानं ज्ञातृत्वं कथमन्यथा।।१८.५१।।**

परमात्म्याला जाणणारा शिवयोगी कसा असतो ते या श्लोकात सांगतिलेले आहे. त्याच्या ठिकाणी किंचित देखील द्वैत नसते. त्याचे मन अद्वैतवासनेने परिपूर्ण भरलेले असते. तो केवळ आपल्या अंतरात्म्यालाच पाहात असतो. त्याशिवाय त्याला अन्य पदार्थांची जाणीव नसते. म्हणून त्याच्याकडून त्रिपुटी-व्यवहार होत नाही. त्रिपुटी-व्यवहार कसा असतो हे जाणून घेतल्यानंतर त्रिपुटीशून्य होणे म्हणजे काय हे समजेल. घट समोर असतो आणि त्याकडे मनुष्य पाहत असतो तेव्हा त्या ठिकाणी कायकाय उपस्थित असते आणि काय घडत असते? मी घट पाहात आहे, असे वाक्य मनुष्य उच्चारतो. त्यावेळी तेथे एक पाहणारा असतो; म्हणजे 'ज्ञाता' असतो. दुसरा घट असतो; म्हणजे 'ज्ञेय' असते, आणि डोळ्यांच्या द्वारे मन घटापर्यंत पोहोचून घटाकार होते, त्याला समजून घेते हे 'ज्ञान' असते. ज्ञाता-ज्ञेय-ज्ञान याला त्रिपुटी म्हणतात. जी वस्तू आपल्या समोर असते त्या आकाराची आपली मनोवृत्ती होते. घट असेल तर घटाकार, पट असेल तर पटाकार आणि मनुष्य असेल तर मनुष्याकार. जड वस्तूत साक्षात् होण्याचे सामर्थ्य नसते. केवळ चेतनच साक्षात् होऊ शकते. अर्थात् केवळ परमात्माच साक्षात् होऊ शकतो. मनुष्याला विषयावच्छिन्न चैतन्याचा साक्षात्कार होत असतो. याचा अर्थ तिन्ही चैतन्य एक होणे असा आहे. प्रमातृचेतन, प्रमाणचेतन आणि प्रमेयचेतन अशी तीन चैतन्ये होत. ज्यात जीवात्मा अधिष्ठित आहे ते प्रमातृचेतन, ज्यात वृत्ती अधिष्ठित आहे ते प्रमाणचेतन, ज्यात विषय अधिष्ठित आहे ते प्रमेयचेतन आहे. जेव्हा प्रमातृचेतन प्रमाणचेतनाच्या द्वारे प्रमेयचेतनाच्या आकाराचे होते तेव्हा मी घट पाहात आहे हे ज्ञान होते. सोप्या शब्दात सांगायचे तर आपले मन डोळ्यांच्या द्वारे घटापर्यंत पोहोचून जेव्हा घटाकार होते तेव्हा मी घट जाणतो

असे जीवात्म्याला ज्ञान होते. सोप्या शब्दात सांगायचे तर आपले मन डोळ्यांच्या द्वारे घटापर्यंत पोहोचून जेव्हा घटाकार होते तेव्हा मी घट जाणतो असे जीवात्म्याला ज्ञान होते. जीवात्मा आणि विषय यांचा संबंध जोडण्याचे काम मनोवृत्ती करत असते. जोपर्यंत मनोवृत्ती विषयाकार होत नाही तोपर्यंत विषयज्ञान होत नाही. विहिरीतील पाणी पाटातून वाहत जाऊन झाडापर्यंत पोहोचते त्याप्रमाणे मनाची वृत्ती इंद्रियांच्या द्वारे बाहेर पडून वस्तूपर्यंत पोहोचते.

नेत्रेंद्रिय आणि श्रवणेंद्रिय या दोन इंद्रियाद्वारे मनोवृत्ती बाहेर जात असते आणि रूपज्ञान व शब्दज्ञान मिळवत असते. परंतु अन्य इंद्रियांद्वारे मनोवृत्ती बाहेर जात नाही, ते तो विषय जेव्हा इंद्रियांपर्यंत येतो तेव्हाच त्याचे ज्ञान होत असते. समोर मिठाईचे ताट असले तरी जोपर्यंत मिठाई जिभेपर्यंत जात नाही तोपर्यंत तिचा आस्वाद घेता येत नाही. तसे घडले असते तर पैसे खर्च न करता लोकांनी मिठाई खाल्ली असती. रसास्वादनासाठी पदार्थ जिभेपर्यंत पोहोचावे लागतात. परंतु नेत्रेंद्रिय मात्र दुरूनच रूपाचा आस्वाद घेऊ शकते. त्वचेंद्रियाला देखील वस्तूचा स्पर्श झाल्याशिवाय ज्ञान होत नाही. त्याचप्रमाणे घ्राणेंद्रियाला गंधज्ञान फूल नाकाजवळ नेले तर होते. कधी फूल दूर असले तरी वाऱ्यावर गंध तरंगत आला तरी गंधज्ञान होते. रसना, घ्राण आणि त्वचा ही इंद्रिये विषयांपर्यंत जात नाहीत, विषयानेच त्यांच्याजवळ यायला पाहिजे. या इंद्रियांजवळ विषय आले की वृत्ती विषयाकार होऊन त्यांचे ज्ञान प्राप्त होते. अशाप्रकारे ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय या त्रिपुटीच्या द्वारे जीवात्म्याला बाह्यज्ञान होत असते. परंतु आत्मज्ञानासाठी मनोवृत्तीला बाहेर धाव घेण्याची आवश्यकता नाही. मी घट जाणतो, यामध्ये 'मी' हा ज्ञाता, 'घट' हे ज्ञेय आणि 'जाणणे' हे ज्ञान होय. परंतु जेव्हा आत्म्याच्या संदर्भात 'मी आत्मा जाणतो' असे म्हटले जाते तेव्हा ज्ञाता 'आत्मा' असतो. येथे ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय हे तिन्ही एकरूप होतात, म्हणून तेथे भेद राहत नाही. घटज्ञान आणि आत्मज्ञान यांच्यामध्ये एवढे अंतर आहे. याठिकाणी वृत्ती आत्माकार झालेली असते. आत्मज्ञानात आत्म्याशिवाय अन्य वस्तूचे ज्ञान आणि त्रिपुटीचा व्यवहार नसतो.

**अकर्ताऽहमवेत्ताऽहमदेहोऽहं निरंजनः।**
**इति चिन्तयतः साक्षात् संविदेव प्रकाशते।।१८.५२।।**

त्रिपुटीरहित महाबोधाची प्राप्ती झालेल्या ज्ञानी पुरुषाच्या स्थितीचे वर्णन केले आहे. ज्ञानी पुरुष कृतकृत्य झालेला असतो. त्याच्यासाठी करण्याजोगे काही उरलेले नसते. म्हणून तो अकर्ता असतो. त्याच्यासाठी जाणण्यायोग्य काहीही नसते, कारण त्याने सर्वकाही जाणलेले असते. म्हणून तो अवेत्ता असतो. अर्थात् तो काही जाणत नाही. स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिन्ही देहांचा अभिमान त्याच्या ठिकाणी नसल्यामुळे तो अदेही म्हणजे देहरहित असतो. जीवात्मा केवळ देहात निवास करतो या कारणासाठी तो 'देही' नसतो. तो देहाभिमान बाळगतो म्हणून 'देही' असतो. घरात अनेकजण राहत असतात. स्त्री-पुरुष, बाल-वृद्ध, नोकर-चाकर. घराचा उपभोग सर्वजण घेत असतात, परंतु घराचा मालक मात्र कर्ता पुरुषच असतो, इतर लोक नसतात. कारण जो मालक असतो त्याच्या ठिकाणी 'हे घर माझे आहे' असा अभिमान असतो. केवळ घरात राहिल्यामुळे कोणी घराचा मालक ठरत नाही, त्याप्रमाणे केवळ देहात राहिल्याने जीवात्मा 'देही' ठरत नाही, देहाचा अभिमान बाळगल्यामुळे तो देही ठरतो. आत्मज्ञानी पुरुषाजवळ देहाभिमान नसतो, म्हणून तो अदेही असतो. त्याच्या ठिकाणी कोणताही दोष नसतो म्हणून तो दोषरहित, निष्कलंक असतो. दोष शरीरात असेल, मनात असेल, बुद्धीत असेल; परंतु आत्म्यात नसतो. म्हणून आत्मस्वरूप असा शिवयोगी दोषरहित असतो. मी कर्ता नाही, मी जाणणारा नाही, मी अदेही आणि निष्कलंक आहे असे चिंतन करणारा शिवयोगी ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय या

त्रिपुटीविरहित होतो आणि त्याला सर्वत्र शिवाद्वैताचा साक्षात्कार होतो. आत्मस्वरूपाशिवाय त्याला दुसरे काहीही प्रतीत होत नाही. त्याची भावना पूर्णाहंता होऊन राहते. परमात्मज्ञानात त्रिपुटीचा अभाव असल्याने याला नष्टागम असे म्हटले जाते.

**निरस्तभेदजल्पस्य निरीहस्य प्रशाम्यत:।**
**स्वे महिम्नि विलीनस्य किमन्यज्ज्ञेयमुच्यते।।१८.५३।।**

वादकथा, जल्पकथा आणि वितंडकथा असे तीन कथा-प्रकार आहेत. ज्ञानप्राप्तीसाठी केलेली चर्चा म्हणजे 'वादकथा' होय. वाद म्हणजे भांडण नव्हे. कोणी जिज्ञासू प्रश्न विचारतो आणि कोणी ज्ञानी उत्तर देतो, याला 'वाद' म्हणतात. जिंकण्याच्या इच्छेपोटी जी स्पर्धा होते ती 'जल्पकथा' होय. आपल्या मताचे मंडन न करता केवळ दुसऱ्याच्या मताचे खंडनच केले जाते तेव्हा ती 'वितंडकथा' होय. कोणी द्वैत मानणारा असतो, कोणी अद्वैती असतो तर कोणी आणखी एखादा मत मानणारा असतो. ते परस्परांशी वाद करीत असतात. 'माझेच मत खरे' असे प्रतिपादन करीत असतात. समोरचा मनुष्य निरुत्तर झाल्यावर आपला विजय झाला असे दुसऱ्याला वाटते. प्राचीन काळापासून आपल्या देशात हेच चालत आलेले आहे. अशी 'जल्पकथा' सर्वत्र चाललेली असते. आपले ज्ञान हे भेदज्ञान असते. जो घट नाही तो पट, जो पट नाही तो घट. जो अंधार नाही तो प्रकाश आणि जो प्रकाश नाही तो अंधार. अशाप्रकारे आपण ज्ञान मिळवत असतो. पदार्थ दोन असतात तेव्हा भेद दाखवता येतो. परंतु जेव्हा दुसऱ्या वस्तूला अस्तित्वच नसते अशा अद्वैतदृष्टीत भेदज्ञान कसे राहील? म्हणून आत्मज्ञानी पुरुष भेदज्ञान आणि जल्पकथा यांच्यापासून मुक्त असतो. तो नि:स्पृह असतो. त्याच्या मनात कसलीही इच्छा, काही प्राप्त करण्याची कांक्षा उरलेली नसते. त्याची वृत्ती शांत असते. त्याच्या वृत्तीत रागद्वेषादी विकार उद्‌भवत नाहीत. तो आपल्या स्वरूपमहिमेत विलीन झालेला असतो. त्याला काही प्राप्तव्य नसते. म्हणून त्याच्या मनात वृत्ती उठत नाहीत. आत्मज्ञान झाल्यामुळे त्याने जाणावे असे काही उरलेले नसते.

**एकीभूते निजाकारे संविदा निष्प्रपंचया।**
**केन किं वेदनीयं तद्‌वेत्ता क: परिभाष्यते।।१८.५४।।**

शिवयोग्याचे ज्ञान निष्पप्रंच असते. तो निष्प्रपंच अशा शिवाद्वैतज्ञानात समरस झालेला असतो. मग त्याने कशाचे ज्ञान प्राप्त करून घ्यायचे? आणि ते कशाने करून घ्यायचे? आणि ज्ञान कोणी प्राप्त करून घ्यायचे? कारण तेथे ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय अशी त्रिपुटी राहिलेली नसते. म्हणून शिवयोग्याला त्रिपुटीरूप प्रपंच दिसत नसतो. त्याला दिसते ते केवळ आत्मरूप.

**महासत्ता महासंविद् विश्वरूपा प्रकाशते।**
**तद्‌विना नास्ति वस्त्वेकं भेदबुद्धिं विमुंचत:।।१८.५५।।**

परमात्मा सत्‌रूप आहे. तो महासत्ता असून त्याचे सर्वकाळात अस्तित्व आहे. त्याच्या सत्तेवाचून कोठेही काहीही घडत नाही. सिनेमा पाहण्यासाठी पडद्याची आवश्यकता असते. पडदा नसेल तर चित्र कोठे दाखवता येईल? त्याप्रमाणे प्रपंच दिसतो तो परमात्मरूपी पडद्यावर. परमात्माच नसेल तर प्रपंचाला आधार राहणार नाही. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त प्रारंभीच शिवाला नमन करताना म्हटले आहे-

**त्रैलोक्यसंपदालेख्यसमुल्लेखनभित्तये।**
**सच्चिदानंदरूपाय शिवाय ब्रह्मणे नम:।।१.१।।**

परब्रह्म शिव म्हणजे त्रैलोक्याचे चित्र ज्यावर पडते अशी आधारभिंत होय. प्रपंचाचा आधार परमात्मा आहे. सृष्टीचे उपादानकारण आणि निमित्तकारण परमात्माच आहे. सृष्टी परमात्म्यापासून झाली म्हणून परमात्मा हे सृष्टीचे उपादानकारण आहे तर सृष्टी परमात्म्यामुळे झाली म्हणून तो सृष्टीचे निमित्तकारण आहे. म्हणून परमात्मा हा सृष्टीचे अभिन्ननिमित्तोपादान कारण होय. तोच सृष्टीचा आधार, अधिष्ठाता आहे. त्यामुळे परमात्म्याला येथे 'महासत्ता' म्हटले आहे. त्याच्या सत्तेच्या आधीन सर्व सत्ता असतात. सत् म्हणजे अस्तित्व असणे. सर्व सत्‌चे सत् म्हणजे परमात्मा. तो ज्ञानरूप आहे. विश्वाच्या रूपाने तोच प्रकाशित होत आहे. अशा सद्रूप, ज्ञानस्वरूप, विश्वरूपाने प्रकाशणाऱ्या अशा परब्रह्माशिवाय शिवयोग्याला दुसरी वस्तू दिसत नाही. आत्मज्ञानाने सर्व भेद विरून जातात आणि शिवयोगी परमात्मरूप होतो, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

१२ नोव्हेंबर १९९४

---

## आशीर्वचन नववे

# आदिप्रसादिस्थल

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

पवित्र कार्तिकमासानिमित्त काशीच्या जंगमवाडी मठात आपण

'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर आशीर्वचने ऐकत आहात. हा ग्रंथ तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात अत्यंत महत्त्वाचा आहे. केवळ वीरशैव संप्रदायापुरता मर्यादित असलेला हा ग्रंथ नसून मानवमात्राला आत्मकल्याणाची वाट दाखवणारा हा ग्रंथ आहे. या ग्रंथातील लिंग-षट्स्थलातील प्राणलिंगिस्थलाच्या अवांतरस्थलांचा विचार आपण करीत आहोत. आज आदिप्रसादिस्थलावर निरूपण करायचे आहे.

आदिप्रसादी याचा अर्थ आधी नीट समजून घेतला पाहिजे. ज्याला प्रसाद म्हणजे अनुग्रह मिळाला तो प्रसादी होय. कोणाचा प्रसाद? कोणाचा अनुग्रह? तर जो सृष्टीला आदि आहे, जो सृष्टिनिर्मितीपूर्वी होता, जो तिचे मूळ असून ज्याच्यापासून ती निर्माण होते, ज्यात स्थित असते आणि ज्यात विलीन होते असे आदितत्त्व म्हणजे परशिवब्रह्म. त्याचा अनुग्रह, प्रसाद ज्याला प्राप्त झाला आहे तो आदिप्रसादी होय. परशिवब्रह्माची कृपा संपादन केलेला ज्ञानी म्हणजे आदिप्रसादी. त्याच्याविषयी आता ज. रेणुकाचार्य सांगत आहेत.

**सर्वाधिष्ठातृकः शंभुरादिस्तस्य प्रसादतः।**
**आदिप्रसादीत्युक्तोऽयं निर्विकारपदे स्थितः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.५६)

सर्वांना सुख देणारा परमात्मा म्हणजे शंभू. तो सर्व प्रपंचाचे अधिष्ठान आहे. नष्टागमस्थलसंपन्न शिवयोग्याला शंभूचा प्रसाद प्राप्त होतो तेव्हा त्याला आदिप्रसादी म्हणतात. त्यावेळी त्याची स्थिती निर्विकार होते. या श्लोकावर भाष्य करताना मरितोंटदार्यांनी श्वेताश्वर उपनिषदातील वचनाचा आधार दिला आहे. ब्रह्मदेवाने

सृष्टिनिर्मिती केली. परंतु ब्रह्मदेवाला कोणी निर्माण केले? सृष्टीच्या उत्पत्ति-स्थिति-प्रलयाला कारण असलेल्या ब्रह्मा-विष्णू-महेश यांच्या उत्पत्तीचे कारण परशिवब्रह्म होय. सृष्टिनिर्मिती करण्यासाठी त्याने ब्रह्मदेवाला वेदागमांचा उपदेश केला. शिवाच्या श्वासातून वेद निर्माण झाले तर त्याच्या ईशानमुखातून आगमांची निर्मिती झाली. मग ब्रह्मदेवाने सृष्टिनिर्मिती केली. असा परशिव जीवात्म्याच्या बुद्धीला प्रकाशित करतो. मुमुक्षू त्यालाच शरण जातात. जो सर्वांत मोठा आहे त्यालाच शरण गेले पाहिजे. विशाल वृक्षाचा आश्रय घेतला तर त्याची सावली मिळते आणि फळेही मिळतात, म्हणून जो सर्व देवांत समर्थ आहे अशा परमात्म्याला शरण जाण्यातच आपले हित असते. ज्याला मुक्तीची कांक्षा असते अशा मुमुक्षू मनुष्याने जगातील कोणत्याही सत्ताधीशाला शरण जाण्याची गरज नसते, तो जातही नसतो. तो शरण जातो प्रपंचाला व्यापून असलेल्या विश्वरूप आणि विश्वातीत अशा परब्रह्म शिवाला. त्या आदितत्त्वाला. अशा सर्वांचे अधिष्ठान असलेल्या परशिवाचा प्रसाद लाभल्यामुळे आदिप्रसादी शिवयोगी निर्विकार होतो. शिवाची कृपा संपादन करण्यासाठी मनुष्याला काही करावे लागते. तो जर समर्पित होऊ शकला नाही, काही देऊ शकला नाही तर त्याला काही प्राप्त होणार नाही. लोक मंदिरात जातात, पूजापाठ करतात आणि ईश्वराचा प्रसाद घेऊन तृप्त मनाने घरी जातात. परंतु एवढे पुरेसे नाही. जीवात्म्याला मुक्तीसाठी परमात्म्याचा अनुग्रह प्राप्त झाला पाहिजे. हा अनुग्रह घ्यावा याविषयी पुढे सांगतात.

**अनेक जन्मशुद्धस्य निरहंकारभाविनः।**
**अप्रपंचस्यादिदेवः प्रसिदति विमुक्तये।।१८.५७।।**

परमात्मा अत्यंत शुद्ध असल्याने जो शुद्ध जीवात्मा आहे त्याच्यावर तो कृपा करतो. अनेक जन्मात मनुष्य स्वतःला अशुद्ध करीत आलेला आहे. खरे तर त्याला अंतःकरणशुद्धीसाठी एका जन्मात शंभर वर्षांचे आयुष्य मिळालेले असते. शंभर वर्षांचे आयुष्य काय केवळ शरीरभोगासाठीच दिलेले असते? वासना असल्यामुळे त्यांनी भोग भोगावेत; परंतु वासनेचा क्षय करून अंतरंगशुद्धीसाठीही प्रयत्न करायला हवेत. अंतःकरण अशुद्ध होते ते आपल्या कर्मांमुळे आणि ते शुद्ध होईल ते देखील आपल्या कर्मांनीच. निषिद्ध कर्मे करून अंतःकरण अशुद्ध होते. अशुद्ध कर्मांनी वासना अशुभ होते आणि अशुभ वासनेमुळे जीवात्म्याकडून निषिद्ध कर्मे घडू लागतात. शास्त्रात जी कर्मे करा असे सांगितले आहे ती विहित कर्मे होत. विहितकर्मांचे नित्यकर्म, नैमित्तिक कर्म, काम्यकर्म इ. प्रकार आहेत. जीव कर्मे करतो, कर्मफळे भोगण्यासाठी पुन्हा जन्म घेतो. असे कर्मचक्र सतत फिरत राहते. कर्माची गती गहन आहे, असे यामुळेच म्हणतात. ज्या कर्मात कामना असते ते काम्यकर्म होय. विशेष प्रसंगी करावे लागणारे कर्म हे नैमित्तिक कर्म होय तर रोज करावे लागणारे कर्म हे नित्यकर्म होय. नित्यकर्म केल्याने विशेष पुण्यलाभ होत नाही. परंतु ते न केल्यामुळे पाप मात्र लागते. नित्यकर्म केल्याने अंतःकरणातील मलिनता जाऊन अंतःकरण शुद्ध होते. कर्म केल्यावर त्याचे फळ भगवंताला अर्पण केले जाते तेव्हा त्याला निष्काम कर्म म्हणतात.

अनेक जन्मांत निष्काम कर्म केल्यामुळे अंतःकरण शुद्ध होते. त्यामधले मालिन्य समूळ निघून जाते. कर्म केल्यानंतर 'हे कर्म मी केले' असा अहंकार जागा होत नसेल तर अंतःकरण शुद्ध झाले असे समजावे. निष्काम कर्म करून मी एवढे कर्म केले परंतु त्याचे फळ मागितले नाही, असा अभिमान जर वाहिला तर त्या निष्काम कर्माचा काही उपयोग नाही. निरहंकारता हे अंतःकरणशुद्धीचे लक्षण होय. थोडे कर्म केले की मनुष्य 'मी हे केले-मी ते केले' अशी बडबडच फार करतो. एवढी विशाल सृष्टी निर्माण करून देखील परमात्मा कोणाला 'मी हे केले'

असे सांगत नाही. विश्वातल्या घडामोडी करून निसर्ग आपल्या कर्माची प्रौढी मिरवत नाही. एक धान्यबीज पेरल्यावर निसर्ग शंभर दाणे देऊन त्याची परतफेड करतो. परंतु त्याबद्दल अवाक्षरदेखील उच्चारत नाही. जर एखाद्या मनुष्याने दुसऱ्या माणसाला एक रुपयाच्या मोबदल्यात शंभर रुपये दिले तर तो ते पन्नास ठिकाणी सांगत फिरेल, 'बघा, बघा, त्याने मला एक रुपया दिला, पण मी त्याला शंभर रुपये दिले.' कर्माचा अहंकार संपूर्णपणे नष्ट होईल तेव्हाच अंतःकरण शुद्ध झाले असे समजावे. ही एक आत्मपरीक्षाच आहे. कितीही मोठे कार्य हातून झाले तर ते भगवंताचे कृपेने घडले असे वाटले पाहिजे. करावे लागते आपल्यालाच; परंतु त्याचे कर्तृत्व भगवंतला अर्पण केले पाहिजे. गीतेत भगवंताने अर्जुनाला हेच सांगितले आहे. 'ही हिंसा आहे, ती केल्याने मला पाप लागेल, याचा विचार तू करू नकोस. माझी आज्ञा मानून हे कर्म कर.' कोण पाप करतो आणि कोण पुण्य करतो याचा निर्णय परमात्मा घेतो. शास्त्र हा भगवंताचा आदेशच असतो. शास्त्राधारे वर्तन घडले तर कर्ता होऊन देखील मनुष्य अकर्ता होतो. अनेक जन्मांत निष्काम कर्म करून ज्याचे अंतःकरण शुद्ध होते तो निरहंकार आणि निष्प्रपंच होतो. त्याच्या मनात प्रपंच राहत नाही. असा शुद्ध अंतःकरणाच्या निरहंकारी निष्प्रपंच अशा जीवावर त्याला मुक्ती देण्यासाठी परमात्मा कृपा करतो. भगवंताची कृपा हवी असेल तर निष्काम कर्म करावे लागते, निरहंकार व्हावे लागते आणि निष्प्रपंच व्हावे लागते. ज्याला भगवंताचा प्रसाद प्राप्त होतो तो सहज मुक्त होतो. भगवत्कृपा संपादन केलेल्या शिवयोग्याला 'आदिप्रसादी' असे म्हणतात.

**शिवप्रसादसंपत्त्या शिवभावमुपेयुषि।**
**शिवादन्यज्जगज्जालं दृश्यते न च दृश्यते।।१८.५८।।**

भगवत्कृपा ही एक संपत्तीच आहे. ती शिवानुग्रहसंपत्ती एकदा संपादन केली की ती मनुष्याला सोडून जात नाही. कोणी चोर तिला चोरून नेऊ शकत नाही. ती संपत्ती मिळाल्यावर शिवयोग्याच्या मनात शिवभाव दृढ होतो. तो चिंतन करील ते शिवाचे, तो बोलेल ते शिवाविषयी, तो कर्म करील ते शिवासाठी. त्याची भावना अशी शिवमय होऊन जाते. त्याला विश्वप्रपंच दिसत नाही. प्रपंचरूपाने त्याच्या दृष्टिसमोर शिवच उभा असतो. दृष्टीत परिवर्तन झाले तर सृष्टीत देखील परिवर्तन होते. एकाच वस्तूकडे पाहण्याची अनेकांची दृष्टी अनेक प्रकारची असते. प्रपंचात शिवाचा साक्षात्कार होण्यासाठी दृष्टिपरिवर्तनाची गरज असते. सृष्टीत आपण परिवर्तन करू शकत नाही, दृष्टीत मात्र करू शकतो. सामान्य मनुष्याची दृष्टी वस्तूप्रमाणे बदलत जाते. रस्त्याने चालताना पालापाचोळा, चिंधी अथवा कागदाचा बोळा दिसला तर त्या वस्तूविषयी माणसाच्या मनात लोभ उत्पन्न होत नाही. परंतु जर रस्त्यात पाच-पंचवीस पैशाचे नाणे पडलेले असले तर मात्र माणूस ते पटकन् उचलून खिशात घालतो. कारण पैशाबद्दल त्याच्या मनात लोभ असतो. पैसे मिळवण्याची हाव माणसाला असते. एका सुभाषितकाराने म्हटले आहे-

**आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृंखला।**
**यथा बद्धाः प्रधावन्ति मुक्तास्तिष्ठन्ति पंगुवत्।।**

आशा म्हणजे माणसाच्या पायातली चमत्मारिक बेडी आहे. आशा म्हणजे तृष्णा किंवा लोभ. या बेडीने जे जखडलेले आहेत ते धावत सुटतात आणि ज्यांच्या पायातली ही बेडी गळून पडली ते पांगळ्यासारखे स्थिर बसून राहतात. अर्थात् तृष्णेमुळे माणूस इकडेतिकडे सर्वत्र धावत सुटतो आणि तृष्णा संपली की त्याचे धावणे थांबून

तो स्थिर होतो. मनुष्याच्या मनात आशा असेल तर तीच त्याला इकडे तिकडे भटकायला भाग पाडते. शिवभावनायुक्त योगी मात्र प्रपंचाकडे शिव म्हणूनच पाहत असतो. त्याला शिवावाचून अन्य काहीच दिसत नाही. तो प्रपंचाला परमात्मरूपात पाहत असतो. डोळे हे दृष्टीचे साधन आहे. डोळ्यांच्या द्वारे पाहण्याचे काम मनच करत असते. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध याविषयींचा भोग इंद्रियांच्या द्वारे मन घेत असते. मनात आसक्ती असेल तर ते विषयासक्त होते; नसेल तर ते अनासक्त होते. शिवयोग्याच्या मनात केवळ शिवभाव असल्यामुळे त्याची दृष्टी शिवमय झालेली असते. त्यामुळे त्याला प्रपंच शिवरूप दिसत असतो.

**शंभोः शिवप्रसादेन संसारच्छेदकारिणा।**
**मोहग्रंथिं विनिर्भिद्य मुक्तिं यान्ति विवेकिनः।।१८.५९।।**

सर्वसुखदायक अशा शिवाचा प्रसाद हा संसाराचे छेदन करणारा आहे. अशा शिवाच्या प्रसादाने मोहग्रंथीचा नाश होऊन मोक्ष मिळतो. हृदयग्रंथी सुटल्याशिवाय मोक्ष मिळत नाही. आत्मा आणि अहंकार एकरूप आहे ही जाणीव म्हणजे हृदयग्रंथी होय. ज्याक्षणी मनुष्याला आत्मा वेगळा आणि अहंकार वेगळा असे ज्ञान होते त्याक्षणी हृदयग्रंथी नाश पावते. अहं अहंकारात आहे तसा आत्म्यात देखील आहे. अहंकार हे आत्म्याच्या अत्यंत निकट असलेले अनात्मतत्त्व आहे. एकाच नावाची दोन माणसे एखाद्या सभेत जवळजवळ बसलेली असली आणि जर कोणी त्यापैकी एकाला नाव घेऊन हाक मारली तर दोघेही ओ देतात. नेमकी कोणाला हाक मारली हे दोघांनाही कळत नाही. प्रत्येकाला वाटते की मलाच हाक मारली असावी. अशीच अवस्था आत्म्याच्या ठिकाणी असलेल्या अहम्‌ची आणि अहंकाराची आहे. व्यवहारात मनुष्य जेव्हा 'मी' म्हणतो तेव्हा बुद्धिवृत्तीतला अहंकार कार्यरत असतो. 'अहं ब्रह्मास्मि' किंवा 'शिवोऽहम्' मी ब्रह्म आहे, मी शिव आहे असे म्हणताना जो अहम् (मीपण) असतो तो अहंकार नसतो. अहंकार हा ब्रह्म नव्हे तर अहंवृत्ती असलेला आत्मा हा ब्रह्म होय. एखाद्या माणसाचे वृक्षावर पुत्रासारखे प्रेम असते. वृक्ष म्हणजे खरोखर पुत्र नसतो. त्याला पुत्र मानलेले असते त्याप्रमाणे अहंकार हा अहम् नव्हे. तो अहम्‌कार आहे.

**न अहंअनहं, अनहं अहं करोतीति अहंकारः।**

अहम् नसूनदेखील जो अहम्‌सारखा व्यवहार करतो तो अहंकार होय. आत्मा नसूनदेखील तो आत्म्यासारखा व्यवहार करीत असतो. दोन जुळ्या भावांत विलक्षण साम्य असते. त्यामुळे त्यांना ओळखण्यात बहुतेकांची फसगत होते. तसेच अहम् आणि अहंकार यांच्याबाबतीत घडत असते. अहम् मुळात आत्म्याचा असून त्याच्याशी एकरूपता दाखवून अहंकार व्यवहार करीत असतो, याची सर्वसामान्य माणसांना जाणीव नसते. जेव्हा मनुष्य आत्मा आणि अनात्मा यांच्यातला भेद ओळखतो तेव्हा त्याची हृदयग्रंथी मोकळी होऊन त्याला अहम् आणि अहंकार यांच्यात अंतर जाणवू लागते. हृदयग्रंथी सुटणे म्हणजेच आत्मा आणि अहंकार यांच्यातले अंतर ओळखणे. हृदयग्रंथी सुटल्यावर प्रपंचातील कोणत्याही गोष्टीविषयी मोह राहत नाही. असा आत्मानात्मविवेक करणारा शिवयोगी शिवप्रसादाने मुक्तीचा अधिकारी होतो.

**विना प्रसादमीशस्य संसारो न निवर्तते।**
**विना सूर्योदयं लोके कुतः स्यात् तमसो लयः।।१८.६०।।**

शिवप्रसादाशिवाय मुक्ती मिळत नाही. सूर्योदय झाल्याशिवाय जगातील अंधार नष्ट होत नाही, त्याप्रमाणे

शिवप्रसादाची प्राप्ती झाल्याशिवाय जीवाला मुक्ती मिळत नाही. वीरशैवसिद्धान्तात जसे साधनेला महत्त्व आहे तसाच शिवानुग्रह देखील महत्त्वाचा मानला जातो. साधकावर जोपर्यंत शिवाचा अनुग्रह होत नाही तोपर्यंत त्याला मुक्ती मिळत नाही. शेवटी शिवप्रसादाचेच अधिक महत्त्व विशद करीत या स्थलाचा समारोप करतात.

**सर्वानुग्राहकः शंभुः केवलं कृपया प्रभुः।**
**मोचयेत् सकलान् जंतून् न किंचिदिह कारणम्।।१८.६१।।**

भगवान शिव सर्व प्राण्यांवर अनुग्रह करणारे आहेत. भगवान शिव स्वतंत्र आहेत. कर्तुम्–अकर्तुम्–अन्यथाकर्तुम असे सामर्थ्य भगवान शिवाच्या ठिकाणी असल्यामुळे ते स्वतंत्र आहेत. ज्या मनुष्याचे अंत:करण शुद्ध नाही, ज्याने निष्काम कर्म केलेले नाही अशा जीवावरही भगवान शिव विशेष अनुग्रह करून त्याला मुक्ती देऊ शकतात. एखाद्या गुन्हेगाराला सर्वोच्च न्यायालयाने फाशीची शिक्षा सुनावल्यानंतर जर त्याने राष्ट्रपतींकडे दयेचा अर्ज केला तर राष्ट्रपती आपल्या विशेष–अधिकाराने त्याची शिक्षा कमी करू शकतात अथवा माफ करू शकतात. त्याप्रमाणे भगवान शिव एखाद्या पतित जीवाला त्याने कोणतीही साधना केलेली नसताना मुक्ती देऊ शकतात. भगवान शिवाच्या मनात आले तर विश्वातल्या समस्त जीवांना ते क्षणार्धात मुक्ती प्रदान करू शकतात. परंतु सामान्यत: साधकाला साधना करावी लागते आणि ती करता करता भगवान शिवाची कृपा संपादन करावी लागते. एखादा मनुष्य शुभकर्मे न करताही आपल्या दुष्कर्माबद्दल पश्चात्तापदग्ध झाला तर तेवढ्यामुळे देखील त्याच्यावर शिवाचा अनुग्रह होऊ शकतो. आपण केलेली दुष्कर्मे मान्य करणे यासारखे सत्कर्म कोणते असू शकते? एवढ्या सत्कर्मासाठी, एवढ्या सत्कर्माने देखील शिवानुग्रह प्राप्त होऊ शकतो. अर्थात् ते सर्वस्वी भगवान शिवावर अवलंबून असते. प्रत्येक जीवमात्रात परमात्मरूप पाहिले तरी शिव कृपा करतात. शिवमय दृष्टी, निरहंकारता, निष्काम कर्मे ही सारी शिवकृपाप्राप्तीची साधने आहेत. अशाप्रकारे आदितत्त्व अशा परशिवाचा अनुग्रह संपादन करून जो मुक्तीच्या दिशेने वाटचाल करत असतो तोच आदीप्रसादी होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१३ नोव्हेंबर १९९४



## अन्त्यप्रसादिस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथात अठ्ठावीस शिवागमांतील वीरशैवसिद्धान्ताचे सार एकवटलेले आहे. वीरशैव विचारविश्वाचे दर्शन घडवणारा हा नितांतसुंदर ग्रंथ आहे. या ग्रंथाचे वाचन-मनन केल्याविना वीरशैव तत्त्वज्ञानाची ओळख होणार नाही. याच ग्रंथावरील आशीर्वचने आपण ऐकत आहात. काल आदिप्रसादिस्थलाविषयी आपण ऐकले आहे. आज ज. रेणुकाचार्य अन्त्यप्रसादिस्थलाचे निरूपण करणार आहेत.

ज्यातून ही सृष्टी उत्पन्न होते त्यातच ती शेवटी विलीन होते. परशिव जसा सृष्टीचा 'आदि' आहे तसाच तो 'अन्त्य' देखील आहे. आदिभूत परशिवाचा अनुग्रह प्राप्त करणे हे आदिप्रसादिस्थल आहे. त्याप्रमाणे सृष्टीच्या विलयानंतर अवशिष्ट राहणाऱ्या अन्त्य परशिवाचा अनुग्रह प्राप्त करणे, त्याला जाणणे यालाच येथे अन्त्यप्रसादिस्थल असे म्हटले आहे.

**लयः सर्वपदार्थानामन्त्य इत्युच्यते बुधैः।।**
**प्रसादोऽनुभवस्तस्य तद्वानन्त्यप्रसादवान्**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.६२)

सर्व पदार्थांचा लय ज्यामध्ये होतो ते अन्त्य होय, असे ज्ञानी म्हणतात. सृष्टीच्या अंती राहणारे शिवतत्त्व हे माझे आत्मरूप आहे असा येणारा अनुभव म्हणजे प्रसाद होय. हा अनुभव ज्याला येतो त्याला अन्त्यप्रसादी म्हणतात. आदिप्रसादिस्थलात जे सांगितले आहे तेच या अन्त्यप्रसादिस्थलात सांगितले आहे. मग येथे पुनरावृत्ती नाही काय? असे कोणाला वाटेल. आदितत्त्व वेगळे आणि अन्त्यतत्त्व वेगळे आहे, असा भ्रमही कोणाच्या मनात उत्पन्न होईल. परंतु असे होऊ नये. जो 'आदी' आहे तोच 'मध्य' आहे आणि तोच 'अन्त्य' देखील आहे. ज्याला पारमार्थिक 'सत्य' असे नाव आहे ते तिन्ही काळांत विद्यमान असते. भूत, भविष्य व वर्तमान या तीनही काळांत ज्याची सत्ता अबाधित असते तेच 'सत्य' होय. सृष्टिनिर्मितीच्या आधी जे आदितत्त्व होते तेच निर्मितीनंतर मध्यकाळात विश्वरूपाने प्रकट झाले आहे. जे उत्पन्न होते ते कधीतरी नाश पावते. येथे नाश म्हणजे विलय. सृष्टीचा लय झाल्यावर काय उरते? जे आधी होते तेच उरते. जे आदितत्त्व आहे तेच अन्त्यतत्त्व आहे आणि मध्यकाळात त्याच्यातच प्रपंच टिकून होता. असे तीनही काळांत अबाधित असलेले तत्त्व म्हणजे परशिवब्रह्म होय, हे प्रतिपादन करण्यासाठीच येथे अन्त्यप्रसादिस्थलाचे निरूपण केले आहे.

काल तुम्ही ऐकले आहे की एखाद्याची योग्यता नसताना देखील त्याच्यावर भगवान शिवाचा विशेष अनुग्रह होऊ शकतो. तेथे योग्यतेपेक्षा परशिवाची कृपाच महत्त्वाची ठरते. मातृदेवो भव-पितृदेवोभव-आचार्यदेवो भव असे आपण व्यवहारात म्हणत असतो. माता-पिता-गुरू हे देव का असतात? तर देव सर्वत्र व्याप्त आहे. जर त्याला तुमचे वर्तन समाधानकारक वाटले तर तो मातेच्या रूपाने तुमच्यावर अनुग्रह करतो, पित्याच्या रूपाने आणि गुरूच्या रूपाने अनुग्रह करतो. कधी अतिथीच्या रूपात अनुग्रह करण्यासाठी तो दारात उभा राहतो. ज्याला मातेचा, पित्याचा, गुरूचा अनुग्रह लाभतो असा मनुष्य काही विशेष कार्य करतो, असा व्यवहारातला अनुभव आहे. शिवाची कृपा लाभली तर साधकाच्या श्रमाचे चीज होते, त्याचे परिश्रम सफल होतात. ज्याला माता-

पिता-गुरू यांची कृपा लाभत नाही अशा माणसाला आपल्या कार्यात फारसे यश लाभत नाही, हे आपण पाहत असतो.

कर्णाची कथा तुम्हाला माहीत आहे. कर्ण परशुरामाजवळ धनुर्विद्या शिकायला गेला होता. परशुरामांच्या मनात क्षत्रियांबद्दल राग होता. त्यांनी एकवीस वेळा भूमी निःक्षत्रिय केली होती असे सांगतात. ते कोण्या क्षत्रियाला धनुर्विद्या देणे शक्य नव्हते. म्हणून कर्णाने आपण ब्राह्मण आहोत असे सांगून त्यांचे शिष्यत्व पत्करले. परशुरामांनी कर्णाला पूर्ण विद्या दिली. परंतु शेवटी एक असा प्रसंग आला की कर्णाचे विद्यासंपादन निष्फळ ठरले. विद्येसाठी वेचलेली आयुष्यातली मूल्यवान वर्षे वाया गेली.

एकदा परशुराम कर्णाच्या मांडीवर डोके ठेवून निद्राधीन झाले. त्यांना गाढ झोप लागली. आणि नेमक्या याचवेळी कर्णाच्या पूर्वकर्मांनी फळे द्यायला सुरुवात केली. एक कीडा आपल्या अणकुचीदार दातांनी कर्णाची मांडी खालून पोखरू लागला. कर्णाला वेदना होऊ लागली. परंतु जर आपण हालचाल केली तर गुरूंची झोप मोडेल म्हणून तो स्थिरचित्ताने वेदना सहन करू लागला. किड्याने त्याची मांडी आरपार भेदली. रक्ताचा ओघळ वाहू लागला. शेवटी किड्याने परशुरामाच्या कानाला दंश करताच ते खडबडून जागे झाले. उठून पाहतात तो किड्याने कर्णाच्या मांडीला छिद्र पाडलेले आणि रक्ताचा ओघळ मांडीखालून वाहत गेलेला. परशुरामांनी ओळखले की हा ब्राह्मण नव्हे. ब्राह्मणात एवढी सहनशीलता असणे शक्य नाही. हा क्षत्रियच असला पाहिजे. परशुरामांनी खडसावून विचारताच कर्णाने आपण ब्राह्मण नाही याची कबुली दिली. विद्यासंपादनासाठी असत्याचा आश्रय घेतला. म्हणून परशुरामांनी कर्णाला शाप दिला, ''मी तुला विद्या दिली खरी. परंतु ऐन युद्धाच्या प्रसंगी तुझी विद्या निष्फळ होईल.''

पुढे महाभारतात युद्धात असेच घडले. ऐनवेळी कर्णाला मंत्रांचे विस्मरण झाले. विद्या मिळाली परंतु गुरुकृपा न लाभल्याने कर्णाने संपादन केलेली विद्या निष्फळ ठरली. गुरू विद्या देतो आणि शिष्य परिश्रम करतो, हे ठीक आहे, परंतु विद्येबरोबरच गुरुकृपा लाभली तरच विद्या सफल होते. गुरुकृपेचे माहात्म्य असे आहे. संत ज्ञानेश्वरांनी अत्यंत काव्यमय शब्दांत गुरुकृपेचे वर्णन केले आहे. ते म्हणतात-

**म्हणौनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे।**
**श्रीगुरुकृपा काय नोहे। ज्ञानदेव म्हणे।।**

'ज्ञानेश्वरी' सारखे अप्रतिम गीताभाष्य रचून झाले यात नवल काय? श्रीगुरूची कृपा लाभली तर माझा प्रत्येक श्वास-उच्छवास म्हणजे एकेक प्रबंध होईल. गुरूच्या कृपेत एवढे सामर्थ्य आहे. गुरुकृपा लाभली नाही तर कोणता अनर्थ घडतो, हे कर्णाची कथा आपल्याला सांगते. अशा अनेक घटना आपल्याला आसपास पाहायला-अनुभवायला मिळतात. परंतु जेव्हा मातृकृपा, पितृकृपा, गुरुकृपा होते तेव्हा सामान्य माणूस देखील उच्चस्थानी पोहोचतो. त्याच्या हातून फार मोठे कार्य घडते.

एका गावात शिवदास नावाची दोन माणसे राहत होती. एक अत्यंत श्रीमंत होता तर दुसरा अतिशय गरीब. श्रीमंत माणसाने अनेक पापकर्मे केली होती. गरीब शिवदासाचा मृत्यू जवळ आला तेव्हा यमदूत भूलोकात आले आणि शिवदासनामक श्रीमंत माणसाचा जीवात्मा यमलोकात घेऊन गेले. माणसाकडून नेहमी चुका होतात. यमदूताकडून कधीच होत नाही. परंतु यावेळी मात्र झाली. आयुष्य संपले होते गरीब शिवदासाचे; परंतु यमदूत घेऊन गेले श्रीमंत शिवदासाला.

यमलोकात गेल्यावर चित्रगुप्ताने त्याचे खाते उघडले, तेव्हा त्याच्या लक्षात ही चूक आली. त्याने ती यमधर्माच्या नजरेला आणून दिली. तेव्हा यम म्हणाले, ''हा आता येथे आलेलाच आहे तेव्हा याला पापकर्माचे फळ किती आणि कसे भोगावे लागते हे जरा दाखवा. याला नरकलोकात फिरवून आणि नंतर भूलोकात पाठवा.''

त्याप्रमाणे यमदूताने त्याला नरकलोक दाखवला. तेथे असंख्य जीव आपल्या पापकर्मांची फळे भोगत होते. त्याच्या यातना पाहवेनात आणि तेथली दुर्गंधी सहन होईना. त्याला नरकलोक दाखवल्यावर यमदूताने भूलोकात पाठवले. त्याने आपल्या मृत शरीरात प्रवेश केला आणि तो पुन्हा जिवंत झाला. मृत शरीर जिवंत झालेले पाहून अंत्यक्रियेला जमलेले लोक 'भूत भूत' असे ओरडत पळत सुटले. परंतु त्याने सत्य सांगितल्यावर सर्वांनी त्याचा स्वीकार केला आणि पूर्वीप्रमाणेच तो आपल्या घरात राहू लागला. आता हा शिवदास पूर्वीचा शिवदास राहिला नव्हता. यमलोकात जाऊन काही पाहून आणि ऐकून तो आलेला होता. त्यामुळे त्याच्यात आमूलाग्र परिवर्तन झालेले होते.

शिवदासाने पापकर्मांचा समूळ त्याग केला आणि त्याच्या हातून पुण्यकर्मे घडू लागली. त्याने गावात एक उपवन निर्मिले. त्यात अनेक फळझाडे, फुलझाडे लावली. येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंना, साधुसंतांना स्नान-पूजा करता येईल, विश्रांती घेता येईल अशी व्यवस्था केली. अनेक दाने दिली. त्यानंतर काही वर्षांनी त्याचे आयुष्य संपल्यानंतर यमदूत त्याला घेऊन यमलोकात गेले. चित्रगुप्ताने पुन्हा खाते उघडले. सगळा हिशेब करून त्याने यमधर्माला सांगितले की, ''महाराज याच्या हातून एवढे पाप घडले आहे की याला अनंतकाळ नरकवासात पाठवावे लागेल. परंतु याने जी थोडीफार पुण्ये केलीत त्यामुळे तीन दिवसपर्यंत याला शिवलोकात वास्तव्य करता येईल. याला प्रथम कोणीकडे पाठवायचे ते आपण ठरवा.''

यमधर्माने हा निर्णय शिवदासावर सोपवला. शिवदासाने विचार केला की मागे नरकाच्या नुसत्या दर्शनाने आपल्याला भोवळ आली होती. अशा नरकात जर आधी गेलो तर पुन्हा शिवलोकात जाण्याची क्षमता राहणार नाही. म्हणून आधी शिवलोकात गेलेले बरे. त्याने प्रथम शिवलोकात जाण्याचा आपला मनोदय व्यक्त केला. त्याप्रमाणे यमदूत त्याला शिवलोकाच्या दारात सोडून आले.

शिवलोकात शिवदासाचा प्रत्येक क्षण परमानंदात व्यतीत होऊ लागला. त्यावेळी त्याला वाटले की आपण केवळ पुण्यकर्मेच केली असती तर किती उत्तम झाले असते! असे दोन दिवस उलटले आणि तिसरा दिवस उजाडला.

इकडे भूलोकात त्याची मुले त्याने घालून दिलेला पाठ गिरवत होती. साधुसंतांचा आदर-सत्कार, दानधर्म नित्य चालत होता. शिवदासाचा शिवलोकातील शेवटचा दिवस होता. त्याच दिवशी इकडे त्याच्या गावात काही शिवयोगी आले. शिवदासाच्या मुलाने त्यांचा आदर-सत्कार केला. आपल्या उपवनात त्यांच्या स्नानाची, पूजेची, निवासाची सोय केली. त्यांच्यापुढे अत्यंत मधुर अशी आम्रफळे ठेवली. त्यामुळे शिवयोगी अत्यंत तृप्त झाले. त्यांनी आशीर्वाद दिला- ज्याने हे आम्रवृक्ष लावले त्या माणसाला शिवलोकाचे नित्य वास्तव्य घडो.

शिवदासाचा शिवलोकातील तिसरा दिवस संपताच यमदूत शिवलोकाच्या दारात हजर झाले. त्यांनी शिवदासाला आपल्या ताब्यात देण्याची शिवदूतांना विनंती केली. त्याप्रमाणे शिवदूताने भगवान शिवाकडे विचारणा केली. तेव्हा शिवाने त्यांना सांगितले- 'याच्या गाठीशी एवढे पुण्य जमा झालेले आहे की हा आता अनंतकाळ शिवलोकातच राहील.'

शिवदूतांनी परत जाऊन यमदूतांना निरोप दिला. यमदूत यमलोकात आले आणि त्यांनी यमधर्माला सर्व वृत्तांत कथन केला. तेव्हा यमालाही आश्चर्य वाटले. केवळ तीन दिवस वास्तव्य करण्याएवढेच पुण्य गाठीशी असलेला जीव काहीही न करता शिवलोकात अनंतकाळ राहण्याइतके पुण्य कसे काय संपादन करू शकतो? यमदूताने चित्रगुप्ताला पुन्हा खाते उघडायला सागितले. चित्रगुप्ताने खाते उघडून पाहिले तेव्हा तो चकितच झाला. शिवदासाच्या खात्यात पुण्याचा रकाना पूर्ण भरलेला होता तर पापाचा रकाना पूर्ण रिकामा झालेला होता!

हे कशाचे फळ आहे? हे फळ आहे अनुग्रहाचे, कृपेचे, प्रसादाचे! जो अहंकारशून्य होऊन कर्मे करतो त्याच्यावर भगवान शिवाची कृपा होते. सृष्टीचा विलय झाल्यानंतर जे अवशिष्ट राहते ते शिवतत्त्व आपले आत्मरूप आहे असे जाणून जो शिवाच्या साक्षात्काररूपी प्रसादाचा अनुभव घेतो तो अन्त्यप्रसादी होय.

**देवतिर्यङ्मनुष्यादिव्यवहारविकल्पना।**
**मायाकृता परे तत्वे तल्लये तत्क्षयो भवेत्।।१८.६३।।**

सर्व सृष्टी मायानिर्मित आहे. परशिवाच्या संकल्पानुसार मायाशक्ती सृष्टिनिर्मिती करते. देव, तिर्यक, मनुष्य, पशू, पक्षी हे सारे मायेने निर्मिलेले आहेत. शिवयोगी लयचिंतन करतो. पृथ्वीचा जलात लय, जलाचा तेजात, तेजाचा वायूत, वायूचा आकाशात लय करणे, आकाशाचा मायेत लय करणे आणि मायेचे परशिवब्रह्मात लय करणे; हे लयचिंतन होय. सृष्टी ज्या क्रमाने उत्पन्न होते त्याच्या उलट क्रमाने केलेले चिंतन म्हणजे लयचिंतन, लयचिंतनात जेव्हा माया परब्रह्मात लीन होते तेव्हा शिवयोग्याच्या दृष्टीत सृष्टीचा विलय होतो. विलयानंतर अन्ती शेष राहणाऱ्या परशिवतत्त्वाला शिवयोगी आत्मरूपात पाहतो. मायेचा लय कसा होतो हे पुढे सांगतात.

**साक्षात्कृते परे तत्त्वे सच्चिदानंदलक्षणे।**
**क्व पदार्थपरिज्ञानं कुतो ज्ञातृत्वसंभवः।।१८.६४।।**

परमात्मा सत्-चित्-आनंदस्वरूप आहे. सत् म्हणजे सदैव अस्तित्व असलेला. चित् म्हणजे प्रकाशरूप आणि आनंद म्हणजे सुखरूप. अशा सच्चिदानंदरूप परब्रह्माचा शिवयोग्याला साक्षात्कार झाल्यावर मायेचा विलय होतो. त्याच्या भावनेत केवळ सच्चिदानंदरूप परमात्माच असल्यामुळे मायानिर्मित पदार्थाचे ज्ञान त्याला कसे असेल? अर्थात् त्याच्या दृष्टीत पदार्थांना अस्तित्व नसते. भावनेला फार महत्त्व असते. मंदिरात पाषाणाच्या मूर्तीची स्थापना केली जाते. परंतु मूर्तीची पूजा पाषाण म्हणून केली जात नाही. मुर्तीला नमस्कार करणारा मनुष्य दगडाला नमस्कार करीत नसून परमात्म्याला करीत असतो. ज्याच्या भावनेत परमात्मा भरलेला असतो त्याला दगडात देखील परमात्म्याचे दर्शन होत असते. ज्याच्या भावनेत परमात्मा नसतो त्याला शिळेशिवाय तिथे काय दिसणार? परंतु शिवयोगी मात्र केवळ मंदिरातील मूर्तीतच नव्हे तर संपूर्ण विश्वात परमात्मदर्शन घेत असतो. म्हणून त्याच्या दृष्टीत परमात्म्याशिवाय कोणत्याही पदार्थांना अस्तित्व नसते. जो केवळ मंदिरातल्या मूर्तीत भगवंत पाहतो तो भक्त तर जो संपूर्ण विश्वात भगवंत पाहतो तो ज्ञानी होय. तो पदार्थाकडे पदार्थदृष्टीने पाहत नाही तर परमात्मदृष्टीने पाहतो. जेथे पदार्थाला म्हणजे ज्ञेयाला अस्तित्व नाही तेथे ज्ञान आणि ज्ञाता कसे अस्तित्वात असतील. ज्ञेय आणि ज्ञाता हे परस्परसापेक्ष आहेत. ज्ञेय असेल ज्ञाता, पुत्र असेल पिता. कोणी एकाने एका पित्याला विचारले– 'तुमचा जन्म आधी झाला की तुमच्या पुत्राचा?' सामान्य पिता असता तर त्याने उत्तर दिले असते– 'माझा जन्म आधी झाला, नंतर माझ्या पुत्राचा झाला.' परंतु हा पिता चतुर होता तो म्हणाला, 'आधी मला पुत्र झालाए मग मी पिता झालो.'

हे असे परस्परावर अवलंबून असते. पुत्राशिवाय कोणी पिता होत नसतो. पत्नीशिवाय कोणी पती होत नसतो आणि पतीशिवाय कोणी पत्नी होत नसते. त्याप्रमाणे ज्ञेयाशिवाय ज्ञात्याला अस्तित्व नसते. प्रपंचरूप ज्ञेयच नसल्यामुळे त्याचे ज्ञान घेणारे ज्ञातृत्व शिल्लक राहत नाही. हेच स्पष्ट करण्यासाठी पुढे एक दृष्टान्त दिला आहे-

**सुषुप्तस्य यथा वस्तु न किंचिदपि भासते।**
**तथा मुक्तस्य जीवस्य न किंचिद्वस्तु दृश्यते।।१८.६५।।**

ज्ञानी-अज्ञानी अशा सर्वांना समजेल असे एक उदाहरण येथे दिलेले आहे. माणूस झोपल्यावर त्याला सामान्यत: स्वप्ने पडतात. त्या अवस्थेला स्वप्नावस्था म्हणतात. परंतु जेव्हा त्याला गाढ निद्रा लागते तेव्हा त्या अवस्थेला सुषुप्ति-अवस्था असे नाव आहे. ज्ञानी-अज्ञानी, रोगी-भोगी, स्त्री-पुरुष सर्वांना गाढ निद्रेत काहीही दिसत नाही असाच अनुभव येतो. गाढ निद्रेत मनुष्य आपल्यापेक्षा भिन्न अशी कोणतीही वस्तू पाहात नाही, त्याला कशाचेही भान नसते. त्याप्रमाणे जो जीवन्मुक्त आहे त्याला प्रपंचातील कोणत्याही पदार्थाची जाणीव नसते.

**यथाकाशमविच्छिन्नं निर्विकारं स्वरूपत:।**
**तथा मुक्तस्य जीवस्य स्वरूपमवशिष्यते।।१८.६६।।**

आकाश निर्विकार आणि अखंड असते. कितीही प्रयास केला तरी त्याला विकृत करता येत नाहीत. त्याचप्रमाणे त्याचे खंड, विच्छेद करता येत नाही. आकाशासारखेच जीवन्मुक्त शिवयोग्याचे स्वरूप अखंड प्रकाशित होत असते.

**न किंचिदपि मुक्तस्य दृश्यं कर्तव्यमेव वा।**
**सुखस्फूर्तिस्वरूपेण निश्चला स्थितिरुच्यते।।१८.६७।।**

जीवन्मुक्त शिवयोग्याला काही दृश्य होत नाही. त्याच्या दृष्टीत प्रपंचाला अस्तित्व नसते आणि त्याला काही कर्तव्यही नसते. असे वाग तसे वाग याप्रमाणे शास्त्रही त्याला काही सांगू शकत नाही. करण्यासारखे जे आहे ते सारे करून तो कृथार्थ झालेला असतो. तो सदैव आनंदानुभवात मग्न असतो. त्याला कसलेही कर्तव्य नसते. म्हणून तो निश्चल असतो. या स्थलाचा समारोप करताना ज. रेणुकाचार्य म्हणतात-

**शिवाद्वैतपरिज्ञानशिथिलाशेषवस्तुन:।**
**केवलं संविदुल्लासदर्शिन: केन को भवेत्।।१८.६८।।**

शिवाद्वैतज्ञानाने परिपूर्ण असल्याने प्रापंचिक वस्तूचे ज्ञान शिथिल म्हणजे नष्ट होते. त्याला जे काही दिसते ते सारे शिवरूप असते. त्यामुळे शिवाद्वैतज्ञानात लीन झालेल्या शिवयोग्याला कोणत्याही इंद्रियव्यापाराचे प्रयोजन नसते आणि त्याच्यापासून त्याला काहीही लाभ होत नसतो. सृष्टीच्या विलयानंतर जे अंत्यतत्त्व असते त्या परशिवब्रह्माला आपल्या आत्मरूपात पाहतो तोच अंत्यप्रसादी होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१४ नोव्हेंबर १९९४

## सेव्यप्रसादिस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग-षट्स्थलांतर्गत प्राणिलिंगिस्थलातील अंतिम अवांतरस्थल आहे सेव्यप्रसादिस्थल. 'सेवितुं योग्य: सेव्य:' असा सेव्य शब्दाचा अर्थ आहे. जो सर्वांकडून सेवा करून घेण्याच्या योग्यतेचा आहे तो 'सेव्य' होय. प्रपंचातील सर्व जीवांकडून ज्याची सेवा केली जाते असा सेव्य श्रीगुरूच असू शकतो. म्हणून येथे सेव्य म्हणजे श्रीगुरू असा अर्थ आहे. गुरूचा उपदेशरूपी प्रसाद ज्याने प्राप्त करून घेतला आहे त्याला सेव्य असे म्हणतात. सद्गुरूची सेवा करून, त्याचा उपदेश प्राप्त करून गुरू आणि शिव यांच्यातील अद्वैताचा जो अखंड अनुभव घेत असतो तो सेव्यप्रसादी होय. प्रत्येक संप्रदायात श्रीगुरूला अनन्यसाधारण महत्त्व असते. गुरूशिवाय कोणतीही परंपरा चालू होत नाही. म्हणून भारतीय परंपरेत श्रीगुरूला सर्वोच्च स्थान दिलेले आहे. गुरूची महती सांगताना ज. रेणुकाचार्य म्हणतात-

**सेव्यो गुरुः समस्तानां शिव एव न संशयः।**
**प्रसादोऽस्य परानन्दप्रकाशः परिकीर्त्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १८.६९)

प्रपंचातील सर्व जीवांकडून सेवा घेण्याला योग्य असे एक श्रीगुरूच होत. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तल्या गुरुकारुण्यस्थलात म्हटले आहे-

**सेवेत परमाचार्यं शिष्यो भक्तिभयान्वितः।**
**षण्मासान् वस्तरं वापि यावदेष प्रसीदति।।६.७।।**

आपल्या आत्मकल्याणासाठी जेव्हा शिष्य प्रथम गुरूकडे जातो. तेव्हा त्याला गुरूची सेवा करावी लागते. त्याच्या सेवेमुळे श्रीगुरू संतुष्ट होऊन त्याला विद्यादान करतात. एका सुभाषितकाराने विद्याप्राप्तीचे तीन उपाय सांगितलेले आहेत. गुरूची सेवा करून, गुरूला धन अर्पण करून आणि आपली विद्या दुसऱ्याला देऊन विद्या संपादन करता येते. हे तीन उपाय सोडले तर विद्याप्राप्तीचा चौथा उपाय नाही. गुरूला धन अर्पण केल्याची एक कथा 'रघुवंशा'त सांगितली आहे.

महर्षी वरतंतूकडे कौत्स नामक शिष्याने विद्याध्ययन केले. अध्ययन संपल्यानंतर त्याने श्रीगुरूला 'आपल्याला काय गुरुदक्षिणा देऊ? असे विचारले.

''कौत्सा'', गुरू म्हणाले, ''तू ब्रह्मचारी आहेस. तू केलेली सेवा हीच माझी गुरुदक्षिणा आहे असे समज.''

परंतु शिष्य ऐकायला तयार नव्हता. तो सारखा गुरूच्या मागे लागला. इतका की शेवटी गुरूला क्रोध आला. ते रागारागाने म्हणाले,

''तू आश्रमात चौदा वर्षे राहिलास. गुरुदक्षिणा देण्याचा तुझा हट्ट आहेच तर चौदा कोटी सुवर्णमुद्रा मला आणून दे.''

शिष्य जे देईल त्यात गुरू संतुष्ट असतात. त्यांना 'किती पाहिजे' असे शिष्याने विचारू नये. कारण ते फार

महागात पडते. गुरू हे गुरूच असतात. गुरू म्हणजे मोठा, महान. त्यांचे सारेच मोठे असते. लहान–सहान गोष्टी तिथे चालत नाहीत. हा शिष्य तर गुरूला विचारून अडचणीत सापडला. आता त्याला चौदा कोटी सुवर्णमुद्रा आणून देण्याशिवाय गत्यंतर नव्हते. शेवटी निष्कांचन शिष्य एवढ्या मुद्रा आणणार तर कोठून? तो गेला रघु राजाकडे.

रघू राजाने नुकताच सर्वस्वदक्षिणा नावाचा यज्ञ केला होता. आपली सर्व संपत्ती दान करून तो स्वतः निष्कांचन झाला होता. जेव्हा एक बटू राजमहालाच्या दाराशी आला हे त्याला कळले तेव्हा तो त्याच्या स्वागतासाठी दारात गेला. त्याच्या हातात खापराची थाळी होती आणि तिच्यात पूजाद्रव्ये ठेवलेली होती. शिष्याला राजाची अवस्था पाहून विस्मय वाटला. परंतु राजाचा आदरसत्कार त्याने स्वीकारला. रात्री विश्रांती घेताना त्याच्या मनात विचार आला की ज्या राजाला खापराच्या थाळीत जेवण करावे लागते त्या राजाकडे चौदा कोटी सुवर्ण मुद्रा कशा काय मागायच्या? म्हणून येथून निमूटपणे निघून गेलेले बरे.

सकाळी जेव्हा तो जायला निघाला तेव्हा राजसेवकाने राजाला कळवले. राजाने येऊन त्याला नमस्कार केला आणि 'आपण कशासाठी आला होता?' असे विचारले. शिष्य काही सांगेना. परंतु राजाने जेव्हा फार आग्रह केला तेव्हा त्याने सारी परिस्थिती कथन केली. ते ऐकल्यावर राजा म्हणाला, ''आपल्याला इथून असे रिक्त हस्ताने मी जाऊ देणार नाही. आज माझा राजकोश रिकामा असला म्हणून काय झाले, माझ्या बाहूत उदंड सामर्थ्य आहे. आपण काही दिवस आमचे आतिथ्य स्वीकारा. आपल्याला हवी तेवढी संपत्ती मी आपल्या पायाशी आणून ठेवतो.''

शिष्याला थांबणे भाग पडले. रघू राजाने आपले सेनादल सज्ज केले आणि त्याला जगातल्या सर्वात श्रीमंत अशा कुबेराच्या राजधानीकडे कूच करण्याची आज्ञा दिली. कुबेराला रघु राजाचा पराक्रम ज्ञात होता. ते स्वारी करायला येणार आहे हे कळताच कुबेर गर्भगळित झाला. राजाच्या स्वारीचे कारण जेव्हा त्याला समजले तेव्हा त्याने युद्ध टाळण्यासाठी राजाचा खजिना संपत्तीने भरून टाकला. राजसेवकाने ही वार्ता राजाला सांगताच स्वारीचा बेत रद्द करून राजा सैन्यासह माघारी आला.

राजाने कौत्साला हवे तेवढे धन घेण्यास सांगितले. परंतु कौत्साने आवश्यक तेवढेच धन घेतले. राजा हा दातृत्वाचा आदर्श होता तर कौत्स हा भिक्षुकाचा आदर्श होता. त्याने चौदा कोटी सुवर्णमुद्रा घेऊन गुरूला अर्पण केल्या. गुरूला धन अर्पण केल्याची कथा कालिदासाने 'रघुवंशा'त सांगितली आहे.

धन देणे हा विद्याप्राप्तीचा एक मार्ग असला तरी गुरूची सेवा केल्यानेच विद्याप्राप्ती होते. गुरुसेवेचे आप्तसेवा, स्थानसेवा, अंगसेवा आणि सद्भावसेवा असे चार प्रकार आहेत. आपले घर जसे आपण स्वच्छ राखतो त्याप्रमाणे गुरुगृहाची स्वच्छता करणे याला 'स्थानसेवा' म्हणतात. जेव्हा आपला एखादा आप्त आपल्या घरी येतो तेव्हा मोठ्या प्रेमाने आपण त्याचा आदर–सत्कार करतो, त्याला प्रेमाने खाऊ–पिऊ घालतो. त्याप्रमाणे गुरू आपल्या घरी आल्यावर त्याची आप्तासारखी सेवा करणे ही 'आप्तसेवा' होय. आपले आपल्या शरीरावर आणि अवयवांवर अत्यंत प्रेम असते. आपले हातपाय कोणी दाबले तर आपल्या शरीराला सुख मिळते त्याप्रमाणे स्वतःच्या हातांनी गुरूचे चरणसंवाहन करणे याला 'अंगसेवा' म्हणतात. 'सद्भावसेवा' ही या तिन्हीपेक्षा श्रेष्ठ सेवा आहे. स्थानसेवा, आप्तसेवा आणि अंगसेवा करताना जर मनात सद्भाव नसेल तर त्या सेवांना काही अर्थ राहत नाही. गुरूची सेवा किती काळ करावी? सहा महिने, वर्षभर आणि जर एवढ्या काळात गुरुकृपा लाभली नाही तर गुरुकृपा लाभेपर्यंत

करावी. त्याला कसलीही कालमर्यादा नाही. कारण गुरुकृपा लाभल्यावर परमात्मवस्तूचा लाभ होतो. ती सर्वश्रेष्ठ वस्तू होय. म्हणून त्यासाठी कितीही काळ गुरुसेवा करावी लागली तरी त्यासाठी गुरुसेवा करण्याची तयारी असावी. जोपर्यंत गुरुकृपा होत नाही तोपर्यंत परमात्मज्ञान प्राप्त होत नाही. म्हणून श्रीगुरू या जगात सेव्य आहे. गुरू म्हणजे प्रत्यक्ष शिवच होय. एकच तत्त्व गुरू, इष्टलिंग आणि जंगम या तीन रूपात प्रकट झाले आहे. गुरू-लिंग-जंगम हे रूपाने भिन्न असले तरी तत्त्वत: एकच आहेत. म्हणून गुरू म्हणजे प्रत्यक्ष शिवच होय यात कसलाही संशय नाही. अशा गुरूचा प्रसाद परमानंदाचा प्रकाशक असतो. गुरुप्रसादाने ज्ञानप्राप्ती झालेला शिवयोगी सेव्यप्रसादी होय.

**सेव्यो गुरुः स्मृतो ह्यस्य प्रसादोऽनुभवो मतः।**
**तदेकावेशरूपेण तद्वान् सेव्यप्रसादवान्।।१८.७०।।**

शिवस्वरूप सद्‌गुरू सर्वांकडून सेव्य असून त्याचा उपदेश हाच प्रसाद आहे, ज्ञानप्रसाद आहे. गुरूचा हस्तस्पर्श झालेली वस्तू प्रसाद असते. आपली वस्तू प्रसादरूप करून घ्यायची असेल तर आपण ती गुरूला किंवा परमेश्वराला आधी अर्पण करतो, नंतर ती प्रसाद म्हणून स्वीकारतो. ज्यावर आपले ममत्व असते तो 'पदार्थ' असतो आणि ज्या पदार्थावरील आपले ममत्व नाहीसे होते तो 'प्रसाद' असतो. गुरूचा हस्तस्पर्श झालेली फुले-फळे देखील आपण प्रसाद म्हणून स्वीकारत असतो. यापेक्षाही मोठा प्रसाद म्हणजे गुरूकडून प्राप्त होणारे ज्ञान होय. गुरू आणि गुरूचा प्रसाद यात जो अभेद मानतो त्याला 'सेव्यप्रसादी' म्हणतात.

**गुरुदेवः परं तत्त्वं परतत्त्वं गुरुः स्मृतः।**
**तदेकत्वानुभावेन न किंचिदवशिष्यते।।१८.७१।।**

गुरू हे परमतत्त्व आहे. म्हणून गुरूची स्तुती करताना गुरू महादेव आहे, गुरू सदाशिव आहे, गुरूसारखा दुसरा देव नाही असे म्हटले जाते. एवढेच नव्हे तर शिष्यासाठी गुरू हाच ब्रह्मा-विष्णू-महेश असतो. गुरू हे साक्षात् परब्रह्मच होय. ब्रह्मदेव सृष्टीची निर्मिती करतो, विष्णू तिचे पालन करतो आणि महेश तिचा संहार करतो. त्याप्रमाणे शिष्याच्या मनात गुरू सद्‌विचारांची निर्मिती करतो. म्हणून गुरू ब्रह्मदेव आहे. शिष्याच्या सद्‌विचारांचे रक्षण गुरू करतो. वीरशैवांच्या अष्टावरणात गुरू हे एक आवरण आहे. आवरण म्हणजे रक्षाकवच. गुरूच्या निरंतर उपदेशामुळे शिष्याच्या हृदयातील ज्ञान अधिकाधिक तेजस्वी होत जाते ते कधीही नष्ट होत नाही. एका शरण-संताने म्हटले आहे की जो क्षीरसागरात राहतो तो गाईची चिंता कशाला वाहील? हे खरेच आहे. ज्याच्या अवतीभोवती दुधाचा महासागर उचंबळत असतो तो गाय दूध देते की नाही याची काळजी करीत नसतो. त्याप्रमाणे सद्‌गुरूच्या सान्निध्यात राहणाऱ्या शिष्याने आपल्याला विद्या येईल की नाही याची चिंता करण्याचे कारण नसते. त्याला प्रत्येकक्षणी गुरूकडून ज्ञान प्राप्त होत असते आणि त्याच्या ज्ञानाचे रक्षण गुरू करत असतो. म्हणून शिष्यासाठी गुरू विष्णू आहे. शिष्याच्या ठिकाणी असलेल्या दुर्बुद्धीचा गुरू संहार करतो म्हणून तो शिष्यासाठी महेश असतो. ब्रह्मा-विष्णू-महेश या त्रिमूर्तींचे मूलकारण परब्रह्म आहे. श्रीगुरू साक्षात् परब्रह्मरूप असतो. सृष्टीचा आदि-मध्य-अंत असलेले जे सच्चिदानंदरूप परब्रह्म आहे त्याचे स्वरूप गुरू शिष्याला समजावून सांगतो. म्हणून गुरू परब्रह्मरूप आहे.

म्हणून येथे सांगितले आहे की, गुरू हे परतत्त्व आहे आणि परतत्त्व हेच गुरू आहे. 'साक्षात् भर्गो नराकृतिः'

असे वेदवचन आहे. प्रत्यक्ष परब्रह्मच गुरूच्या रूपाने प्रकट झाले आहे. दुष्टांचा संहार करण्यासाठी ईश्वराला अवतार घ्यावा लागतो त्याप्रमाणे माणसांच्या दुर्बुद्धीचा संहार करण्यासाठी गुरूला मनुष्यरूपात यावे लागते. देव दुष्टांचा संहार करतात तर गुरू दुर्बुद्धीचा संहार करतात. म्हणून देवांच्या हाती शस्त्र असते तर गुरूच्या हाती शास्त्र असते. रामाच्या हाती धनुष्य, कृष्णाच्या चक्र, शिवाच्या हातात त्रिशूल तर देवीच्या हातात अनेक आयुधे असतात. दुष्टांचा संहार करणे हेच देवांचे कर्तव्य असते. दुष्टांचा एकदा संहार झाला तरी त्याचे जीवन नष्ट होत नाही. तो पुन्हा नवा जन्म घेऊन दुष्टकर्मे करू लागतो. कारण मृत्यूच्या क्षणी जशी मनोवस्था असते तसाच पुढे जन्म मिळत असतो. चौथा वर्ग पास झालेला विद्यार्थी पाचव्या वर्गात जाताना पास झाल्याचे प्रमाणपत्र घेऊन जातो. मृत्यूच्या क्षणी असलेली बुद्धी म्हणजे प्रमाणपत्र. हे प्रमाणपत्र जसे असेल तसा त्याला पुढे जन्म मिळतो. जन्माला आलेली मुले स्वभावत: सुष्ट आणि दुष्ट का असतात याचे हे कारण आहे. एखाद्या छोट्या मुलाला लहानग्या मुंगीला चिरडून टाकण्यात मजा वाटते तर दुसऱ्या मुलाला मुंगीची हालचाल पाहण्यात गंमत वाटते. मनोवृत्तीतील हा फरक पूर्वजन्माशी निगडित असतो.

म्हणून दुष्टांचा कितीही संहार केला तरी दुष्टपणा नाहीसा होत नाही. दुष्टबुद्धी नाहीशी झाली तरच दुष्टांचा खरा अंत होऊ शकतो. त्यासाठीच हातात शस्त्र नव्हे तर शास्त्र घेऊन गुरूने अवतार घेतला आहे. कितीही दुष्ट मनुष्य असला तरी गुरुपदेशाने त्याच्यात आमूलाग्र बदल होतो. वाल्ह्याचा वाल्मीकी झाला. नारदासारखा सद्गुरू त्याला भेटला आणि सद्गुरूच्या उपदेशाने दुष्ट वाल्ह्याचे आदिकवी वाल्मीकीत परिवर्तन झाले. गुरू कधी शिक्षा करून तर कधी उपदेश करून शिष्याच्या दुर्बुद्धीचा संहार करीत असतो. केवळ मारल्यावर मूल सुधारत नसते. कशासाठी मारले आहे हे ज्ञान त्याला दिले तरच ते सुधारू शकते. त्यामुळे कसलाही दुष्ट मनुष्य जर सुधारत असेल तर तो उपदेशाने, ज्ञानाने, अन्य कशानेही नाही. कदाचित परमेश्वरानेही हे ओळखले असेल. एवढे अवतार घेऊन दुष्टांचा संहार केला तरी दुष्ट जिवंतच आहेत, त्यांना मारताना आपली शस्त्रे झिजून, मोडून गेली; पण उपयोग काही नाही. म्हणून परमेश्वराने गुरुरूपाने अवतार घेतला.

गुरू हा सामान्य माणसासारखाच असतो. त्याच्या या रूपवेषांत काही वेगळेपण नसते. परंतु आत्मानुभूतीने आणि शिवज्ञानाने तो संपन्न असतो. त्याने उपदेश करून दुर्बुद्धीचा संहार केला की मनुष्याचा संहार करण्याची आवश्यकता राहत नाही. उलट दुर्बुद्धी नष्ट झालेल्या मनुष्याच्या हातून उत्तमोत्तम कर्मे घडतात. म्हणून गुरू हाच परशिव आणि परशिव हाच गुरू असा अभेदभाव शिष्याच्या मनात असायला हवा. असा अभेदभाव ज्याच्या मनात दृढ झालेला असतो त्या शिवयोग्याने जाणून घ्यावी अशी वस्तू जगात उरलेली नसते.

**अपरिच्छेद्यमात्मस्थमवाङ्मनसगोचरम्।**
**आनंदं पश्यतां पुंसां रतिरन्यत्र का भवेत्॥१८.७२॥**

गुरू आणि शिव यांना एकरूप मानून जो गुरूच्या बोधामृताचे प्राशन करतो त्याची स्थिती कशी होते हे या ठिकाणी वर्णिले आहे. त्याच्या अंतरंगात आनंदच भरून राहिलेला असतो. दु:ख होते ते भेदबुद्धीमुळे, विषमतेमुळे. भेदबुद्धीच नसल्यामुळे तेथे दु:खाची वार्ता उरत नाही. हा आनंद अखंड असतो. तो कशानेही शबलित होत नाही. वाणी आणि मन यांना तो अगोचर आहे. परमानंद किती आणि कसा आहे हे शब्दांत सांगता येत नसते. गाढ झोप घेतलेल्या माणसाला जागे झाल्यावर विचारून पाहा– 'तुला किती आनंद झाला?' तर तो

सांगेल- खूप खूप झाला. यापेक्षा अधिक त्याला सांगता येणार नाही. ही तर सामान्य निद्रानंदाची गोष्ट आहे, मग परमानंद शब्दांत कसा सांगता येईल? हा आनंद आत्म्यातच असतो. अशा अखंड, वाणी-मनाला अगोचर असलेल्या, स्वस्वरूपानंदाचा अनुभव घेणाऱ्या शिवयोग्याला अन्य विषयाची अभिलाषा कशी असेल? अर्थात् नसतेच. आपल्या अंतर्यामी आनंद असेल तर त्याचा शोध घ्यायला रानोमाळ कशाला भटकायचे? म्हणून आत्मरत, आत्मतृप्त अशा शिवयोग्याची दुसऱ्या कोणत्याही विषयांत प्रीती नसते.

**ज्ञानामृतेन तृप्तस्य किमन्यैर्भोज्यवस्तुभिः।**
**ज्ञानादेव परानंदं प्रकाशयति सच्छिवः।।१८.७३।।**

जो शिवयोगी ज्ञानामृताने तृप्त झालेला असतो त्याला इतर भोज्य वस्तूंचे प्रयोजन नसते. अर्थात् त्याची कोठेही आसक्ती नसते. गोड पदार्थ खाणे वेगळे आणि गोड पदार्थात आसक्ती असणे वेगळे. ज्ञानामृताने तृप्त झाला म्हणून ज्ञानी काही खातपित नाही, असा याचा अर्थ नाही. अज्ञानी माणूस एकदा गोड पदार्थ खाल्ला की तो पुन्हा पुन्हा खाण्याची इच्छा करतो. तो कधी उपवास करतो तरी त्यावेळी दुसऱ्या दिवशी काय काय खायचे याचे चित्र मनाशी रंगवीत बसतो. केवळ खाणे आणि आसक्त होऊन खाणे यामध्ये अंतर असते. जो ज्ञानामृताने तृप्त झालेला असतो तो सामान्य माणसाप्रमाणे खातो-पितो. परंतु खाद्यपदार्थात आसक्त नसतो. म्हणून त्याचे खाणे न खाण्यासारखे असते. शिवज्ञानाने त्याच्या हृदयात परमानंद प्रकाशित झालेला असतो. तो परमानंदात सदैव निमग्न असतो.

**मुक्तिरेव परा तृप्तिः सच्चिदानंदलक्षणा।**
**नित्यतृप्तस्य मुक्तस्य किमन्यैर्भोगसाधनैः।।१८.७४।।**

सत्-चित्-आनंदरूपी आत्म्याची प्राप्ती ही मुक्ती होय, परातृप्ती होय. मनुष्य केवळ आत्मानंदानेच पूर्णतृप्त होऊ शकतो. विषयभोगाने त्याला तृप्ती मिळत नसते. पोट भरले तरी जोपर्यंत मन भरत नाही तोपर्यंत माणूस तृप्त होत नसतो. एखादा आवडलेला खाद्यपदार्थ मनुष्य पोटभर खातो. तरीही त्याला अधिक खावेसे वाटते. पोटात जाणे शक्य नसते तेव्हा तो पदार्थ चोरून घरी नेतो आणि पोट रिकामे झाल्यावर पुन्हा खात बसतो. मन जोवर भरत नाही तोवर तृप्ती नाही. मन कशानेही भरत नाही. विषयांचा भोग घेतल्याने आसक्ती वाढत जाते. आसक्तीमुळे सहस्रावधी जन्म घेऊन जीवात्मा भोग भोगतो. तरीही त्याचे मन तृप्त होत नाही. म्हणून निर्विषय होऊन जो आत्मानंदात मग्न होतो तोच तृप्त होतो. ज्याचे मन तृप्त होते तो नित्यतृप्त असतो. केवळ परमात्म्यामुळेच मन पूर्ण तृप्त होऊ शकते. मन इतके मोठे आहे की त्याला सारा प्रपंच दिला तरी ते भरत नाही. परंतु परमात्मा मात्र मनाच्या आत-बाहेर सर्वत्र व्याप्त आहे. म्हणून जर परमात्मलाभ झाला तरच मन पूर्ण तृप्त होते. मग त्याला अन्य काहीही नको असते. जो नित्यतृप्त असतो तो दुसऱ्या भोगसाधनांचा विचार देखील करीत नाही.

**न बाह्यकर्म तस्यास्ति न चान्तर्नैव कुत्रचित्।**
**शिवैक्यज्ञानरूढस्य देहभ्रान्तिं विमुंचतः।।१८.७५।।**

ज्याला शिवैक्यज्ञानाची प्राप्ती होते त्याला बाह्य आणि आंतरिक कर्मे करण्याची आवश्यकता नसते. ज्याच्याजवळ देहाभिमान असतो त्याच्यासाठी बाह्यकर्मे असतात आणि जो मनाविषयी अभिमान धरतो त्याच्यासाठी अंतरंगकर्मे असतात. जो सर्व अभिमानापासून निवृत्त झालेला असतो त्याला कोणतीही कर्मे करावी लागत नाहीत. शेवटी या स्थलाचा समारोप करतात.

**न कर्मबंधे न तपोविशेषे**
**न मंत्रयोगाभ्यसने तथैव।**
**ध्याने न बोधे च तथात्मतत्त्वे**
**मनःप्रवृत्तिः परयोगभाजाम्॥१८.७६॥**

शिवयोग्याला कोणत्याही कर्माचे बंधन नसते. त्यासाठी तपश्चर्येचे बंधन नाही. त्याला योगाभ्यासाची गरज नाही. मंत्र, जप, ध्यान करण्याचे कारण नाही. कारण जे प्राप्त करायचे ते त्याने प्राप्त करून घेतलेले असते. तो सर्वोत्कृष्ट अशा आत्मस्वरूपात निमग्न असतो. अशाप्रकारे सद्गुरूच्या ज्ञानामृताचे प्रसाद म्हणून सेवन करणारा, शिव आणि गुरू यांना अभेदबुद्धीने पाहणारा, नित्यतृप्त मुक्त असा पुरुषच सेव्यप्रसादी होय.

लिंग–षट्स्थलांतर्गत प्राणलिंगिस्थलातील नऊ अवांतरस्थले म्हणजे नऊ मानसिक अवस्था होत. या अवस्था ज्याला प्राप्त होतात तो लिंग–षट्स्थलातील प्राणलिंगी होय. अंग–षट्स्थलातील षट्स्थले ही मुक्तीची साधने आहेत तर लिंग–षट्स्थलातील षट्स्थले मुक्तीच्या आनंदानुभवाची स्थले होत. मुक्तीचा आनंदानुभव सर्वांना लाभावा अशी शुभकामना व्यक्त करून सेव्यप्रसादिस्थलावरील आशीर्वचन आणि लिंग–षट्स्थलातील प्राणलिंगिस्थलावरील आशीर्वचने पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१५ नोव्हेंबर १९९४



# भाग ११ : लिंग–षट्स्थलांतर्गत शरणस्थल

**आशीर्वचन पहिले**

## दीक्षापादोदकस्थल

**विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।**
**विश्ववंद्यं सदा वंदे विश्वाराध्यं जगद्गुरुम्।।**

श्रीकाशीसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यापर्यंत चालात आलेल्या गुरुपरंपरेला अनंत प्रणिपात समर्पित करून या पवित्र कार्तिक महिन्यात काशीच्या सुप्रसिद्ध ज्ञानपीठात 'श्रीसिद्धान्तशिखामणी' वरील या ज्ञानसत्रात उपस्थित असलेल्या जिज्ञासू सद्भक्तांनो,

आजपासून लिंग–षट्स्थलांतर्गत शरणस्थलावर बोलायचे आहे. जीवन्मुक्तीच्या विलक्षण अवस्थेचे वर्णन या स्थलात केलेले आहे. एकूण सर्व षट्स्थले जीवन्मुक्तीविषयीच बोलत आहेत. शरणस्थल आणि त्यामधील अवांतरस्थले अतिशय महत्त्वाची आहेत. प्राणलिंगिस्थलावरील जगद्गुरू रेणुकाचार्यांचे विवरण ऐकल्यावर महर्षी अगस्त्यांनी प्रश्न केला:

**स्थलभेदाः समाख्याताः प्राणलिंगिस्थलाश्रयाः।**
**कथय स्थलभेदं मे शरणस्थलसंश्रितम्।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.१)

प्राणलिंगिस्थलाचे उपस्थलांसह आपण विवेचन केले. आता शरणस्थलाविषयी मला सविस्तर सांगावे, अशी महर्षी अगस्त्यांनी जगद्गुरू रेणुकाचार्यांना विनंती केली. तेव्हा आचार्यांनी आपल्या उपदेशाला आरंभ केला.

**शरणस्थलमाश्रित्य स्थलद्वादशकं मया।**
**उच्यते नाम सर्वेषां स्थलानां शृणु तापस।।१९.२।।**

हे तपस्वी अगस्त्य, शरणस्थलात बारा अवांतरस्थले म्हणजे उपस्थले आहेत. ती अशी– दीक्षापादोदकस्थल, शिक्षापादोदकस्थल, ज्ञानपादोदकस्थल, क्रियानिष्पत्तिस्थल, भावनिष्पत्तिस्थल, ज्ञाननिष्पत्तिस्थल, पिंडकाशस्थल, बिंद्वाकाशस्थल, महाकाशस्थल, क्रियाप्रकाशस्थल, भावप्रकाशस्थल आणि ज्ञानप्रकाशस्थल.

यातील पहिले स्थल आहे दीक्षापादोदकस्थल. तुम्हाला दीक्षेविषयी माहिती आहे आणि पादोदकाविषयीचेही ज्ञान आहे. परंतु दीक्षापादोदकस्थलाबद्दल मात्र माहिती नाही. दीक्षा आणि पादोदक या शब्दांचे अर्थ आपल्याला माहीत आहेत. परंतु दीक्षापादोदकस्थल मात्र अधिक सूक्ष्म असा विचार आपल्याला सांगत आहे. श्रीगुरूचे चरणतीर्थ म्हणजे पादोदक, हा सामान्य अर्थ आहे. परंतु येथे मात्र 'पाद' म्हणजे गुरू आणि 'उदक' म्हणजे शिष्य असा असून गुरु–शिष्यातील अभेद दर्शविणाऱ्या स्थलाला 'दीक्षापादोदकस्थल' असे म्हणतात. 'पाद' या

शब्दाचा अर्थ 'गुरू' कसा होतो? तर श्रीगुरूच्या सर्व अवयवांत पाद किंवा पाय यांना विशेष महत्त्व आहे. नमस्कार करताना तो पायावर डोके ठेवून केला जातो. श्रीगुरूची पादपूजा केली जाते. सामान्यत: पाय हा शरीराचा कनिष्ठ अवयव मानला जातो. कारण तो शरीराचे ओझे वाहणारा अवयव आहे. मस्तक हे उत्तमांग मानला जाते. परंतु श्रीगुरूचे पाय मात्र अतिशय पवित्र मानले जातात. पाय चालतात-इकडून तिकडे. पाय म्हणजे चालणे. म्हणून 'पाद' याचा अर्थ चालचलणूक- वर्तन-आचरण असाही होतो. मस्तकात 'ज्ञान' आहे तर पायात 'आचरण' आहे. मग ज्ञान श्रेष्ठ की आचरण श्रेष्ठ? गीतेत तर सांगितले आहे, 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते।' ज्ञानाइतके पवित्र या जगात दुसरे काही नाही, असे गीता सांगते. परंतु येथे मात्र केवळ ज्ञानापेक्षा आचरण अधिक महत्त्वपूर्ण आहे, असे प्रतिपादन केलेले आहे. केवळ ज्ञान असून काय उपयोग? ज्ञानासारखे आचरणही हवे. मस्तकात ज्ञान ठासून भरले आहे. परंतु आचरणात मात्र ते किंचितदेखील उतरत नसेल तर ते ज्ञान काय कामाचे? म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे:-

**ज्ञानाचारयुक्तेन प्रसीदति महेश्वरः।**
**तस्मादाचारवान् ज्ञानी भवेदादेहपातनम्।।१६.१४।।**

ज्ञानासारखे तुमचे आचरण असेल तरच तुमच्यावर भगवान शिवाची कृपा होऊ शकते. म्हणून ज्ञानी पुरुषाने सदाचारसंपन्न राहावे, असे 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त सांगितलेले आहे. कोठपर्यंत सदाचारसंपन्न राहावे? तर शरीरात प्राण आहेत तोपर्यंत. आचरणाला एवढे महत्त्व का बरे दिले असावे?

तुम्ही जो विचार करता तो कुणाला दिसत नाही. तुमचे ज्ञान हे अदृश्य असते. परंतु तुमचे आचरण मात्र सर्वांना दिसते. अज्ञानी माणसे ज्ञानी पुरुषाच्या आचरणाचे अनुकरण करीत असतात. अज्ञानी माणूस लहान मुलासारखा असतो. लहान मुलांना उपदेश करून फारसा उपयोग होत नसतो तर त्यांच्यासमोर वर्तन करून दाखवावे लागते. तुम्ही लहान मुलाला मंदिरात घेऊन गेलात आणि त्याला सांगितले की, "बाळा, नमस्कार कर." तर ते काही करणार नाही. परंतु तुम्ही नमस्कार करून दाखवला तर मात्र ते अनुकरण करील. मुले अनुकरणप्रिय असतात. ते जे डोळ्यांनी पाहतात तसे वागतात. त्याप्रमाणे सामन्य अज्ञानी माणसांना उपदेश करण्यापेक्षा आचरण करून दाखवावे लागते. त्यांना सदाचाराचा अर्थ आणि महत्त्व कळणार नाही, परंतु ती अनुकरणाने सदाचारसंपन्न होऊ शकतात. केवळ ज्ञानी पुरुषांनीच सदाचारी असावे असे नाही, तर सर्वसामान्य अज्ञानी माणसेही सदाचारी झाली पाहिजेत. म्हणून उपदेशकाने केवळ ज्ञानी असून भागत नाही तर त्याने सदाचारसंपन्नही असले पाहिजे. तरच त्याचा प्रभाव सर्वांवर पडेल. केवळ ज्ञानामुळे आत्मोद्धार होईलही, परंतु लोकोद्धार करण्यासाठी मात्र सदाचरणाची आवश्यकता आहे. गाईचे दूध हे पृथ्वीवरील अमृत आहे. अतिशय पवित्र आहे. ते स्वच्छ, चांगल्या पात्रातून दिले तर लोक सेवन करतील. पण पवित्र असे दूध जर कातड्याच्या भांड्यात अथवा पशू-मानवाच्या कवटीत ओतून प्यायला दिले तर ते कोणी घेईल काय? ते दूध स्वत:पुरते पवित्र असले तरी इतरांच्या उपयोगी पडत नाही. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाचे ज्ञान आचरणात नसेल तर स्वत:पुरते मर्यादित होते, ते सर्वसामान्य लोकांच्या उपयोगी पडत नाही. पण तेच जर आचरणात उतरले तर लोकांचा उद्धार करते.

केवळ आत्मकल्याणासाठी ज्ञान संपादन करणाऱ्याला 'आचार्य' म्हणत नाहीत. जो सर्व शास्त्रांचे अध्ययन

करतो, त्याप्रमाणे स्वतः आचरण करतो आणि त्याचा इतरांना बोध करतो तो 'आचार्य' होय. तोच गुरू होय. शिष्याचे अज्ञान दूर करून त्याला सज्ञान करतो म्हणून त्याला 'गुरू' म्हणतात. ज्याच्या ज्ञानाचा इतरांना उपयोग होत नाही तो 'ज्ञानी' असला तरी 'आचार्य' अथवा 'गुरू' मात्र ठरत नाही. केवळ आत्मकल्याण हादेखील एक प्रकारचा स्वार्थच आहे. ज्ञानसंपादन स्वतः करावे पण ते ज्ञान समाजाला द्यावे. त्यासाठी ज्ञान आचरणात उतरले पाहिजे. ते आचरणात उतरले तरच प्रभावी ठरते. आचारशून्य ज्ञान्याची बडबड म्हणजे केवळ वाचाळपणा. 'क्रियेविण वाचाळता व्यर्थ आहे' असे एका संताने सांगून ठेवले आहे. क्रियायुक्त ज्ञान मात्र अत्यंत प्रभावी असते.

येथे 'पाद' या शब्दाचा अर्थ 'गुरू' असा केलेला आहे. शुद्ध आचारसंपन्न जो असतो तोच गुरू होय, असे येथे प्रतिपादन केलेले आहे. म्हणून मस्तकापेक्षा येथे पायाला अधिक महत्त्व आहे. मस्तकात असलेले ज्ञान जर आचरणात प्रकट झाले तर तो मनुष्य पूजनीय ठरतो. मनुष्याला पायच इकडून तिकडे घेऊन जात असतात. ते त्याला चांगल्या ठिकाणीही नेतात आणि वाईट ठिकाणीही नेतात. हे पायच त्याला सत्संगात घेऊन जातात आणि सिनेमागृहाकडेही घेऊन जातात. मंदिराकडेही नेतात आणि मद्यालयात देखील नेतात. ते त्याला दान करण्यासाठी जसे घेऊन जातात तसेच चोरी करण्यासाठीही घेऊन जातात. चालणे ही क्रिया एकच असते. परंतु ती कोणत्या उद्देशाने आणि कोणत्या दिशेने चालली आहे यावर तिचे मूल्यमापन केले जाते. श्रीगुरूचे पाय हे सदैव उत्तम स्थानाकडेच चालत असतात आणि त्या चालण्यामागे उत्तम विचार असतो. म्हणून त्यांच्या पायाला अत्याधिक महत्त्व दिलेले आहे.

राम-सीता वनवासात होते तेव्हाची गोष्ट आहे. एके दिवशी कोणाचे पाय सुरेख आहेत या विषयी राम-सीतेत चर्चा सुरू झाली. दोघांनीही आपले पाय सुंदर आहेत असा दावा केला. राम आणि सीता दोघेही स्पर्धक असल्यामुळे बिचाऱ्या लक्ष्मणाला न्यायाधीश होणे भाग पडले. निर्णय देणे कठीण खरेच, पण देणे भाग होते. दोघांच्या पायांचे बरेच वेळ निरीक्षण करून शेवटी लक्ष्मणाने निर्णय दिला,

''सीतेचे पाय अधिक सुंदर आहेत.''

सीतेला अहंकार झाला आणि राम नाराज झाले. लक्ष्मण पुढे म्हणाला, ''सीतेचे पाय अधिक सुंदर आहेत याचे कारण तिच्या शेजारी रामाचे पाय आहेत म्हणून.''

सीतेचा अहंकार ओसरला आणि रामाची छाती फुगली. लक्ष्मणाने पुढे सांगितले,

''रामाचे पाय सुंदर आहेत याचेही एक कारण आहे. पित्याचे वचन खरे ठरावे यासाठी त्या पायांनी राजसिंहासन लाथाडले आणि अनवाणी होऊन ते अरण्यात भटकतात, म्हणून ते सुंदर आहेत.''

रामाचा अभिमान ओसरला. पण लक्ष्मणाने सत्य तेच सांगितले. जी पावले सन्मार्गावर पडतात, कर्तव्यकर्म करण्यासाठी चालत राहतात तीच सुंदर असतात. यासाठीच श्रीगुरूचे पाय श्रेष्ठ मानले जातात. ज्या ठिकाणी श्रीगुरूची, शिवयोग्याची पावले पडतात ते स्थान पवित्र होऊन जाते. श्रीगुरूच्या पावलांना चिकटलेल्या धुलीकणांनाही असेच पावित्र्य लाभले आहे. धूळ पवित्र नसते, परंतु गुरुचरणाचा स्पर्श झाल्यावर ती पवित्र ठरते. संध्याकाळी गाई गावात परत येत असताना त्यांच्या पावलांनी जी धूळ उडते ती अंगावर घेणे म्हणजे एकप्रकारचे स्नान होय, असे शास्त्रात म्हटले आहे. ह्याच वेळेला गो-रज मुहूर्त असे म्हटले जाते. काशीच्या जंगमवाडी मठाजवळ 'गोदोलिया चौक' आहे. खरे तर हा 'गो-धूली'चा अपभ्रंश आहे. संध्याकाळी इथे गायी जमल्यावर त्यांच्या पावलांनी धूळ उडत असे. म्हणून या भागाला 'गो-धूली' असे संबोधीत. धूळ मुळात पवित्र नसली तरी

गायीच्या पावलामुळे ती अशाप्रकारे पवित्र मानली जाते. त्याप्रमाणेच गुरुचरणांचा स्पर्श झालेली वस्तू पवित्र मानतात. गुरूचे पाय असे श्रेष्ठ आहे. गुरूचे पाय शिष्यांना उत्तम स्थानाकडेच घेऊन जातात, म्हणून येथे श्रीगुरूला 'पाद' असे नाव दिले आहे. 'पूज्यपाद' असेही त्यांना म्हटले जाते. ज्यांचे पाय पूज्य आहेत असे श्रीगुरू असतात.

गुरूला 'पाद' असे नाव दिले आहे तर शिष्याला 'उदक' असे नाव दिले आहे. शिष्याला 'उदक' का बरे म्हटले असावे? उदक म्हणजे पाणी. पाण्याला जो गुण असतो तो जर शिष्यामध्ये असेल तरच तो 'उदक' असतो. सर्वच शिष्य 'उदक' नसतात. पाणी हे अत्यंत तरल असते. ज्या भांड्यात तुम्ही पाणी ओताल त्या भांड्याचा आकार पाणी धारण करते. ताटात ओताल तर ताटासारखे, पेल्यात ओताल तर पेल्यासारखे, सुरईत ओताल तर सुरईच्या आकाराचे. पाण्याला स्वतःचा आकार नसतो. ते ज्या त्या भांड्याच्या आकाराचे होते. पाण्यात आणखीही गुण आहेत. त्याचा एक थेंब जर मातीवर टाकला तर काय घडते? मातीचे वेगवेगळे कण एकरूप होतात. पाण्याच्या ठिकाणी दूर ढकलण्याचा नव्हे, तर एकत्र करण्याचा गुण आहे. शिष्य हा पाण्यासारखा असला पाहिजे. स्वतःचे वेगळे अस्तित्व मिटवून त्याला श्रीगुरूच्या उपदेशासारखे होता यावे आणि आपल्या वर्तनाने त्याला सर्व लोकात एकात्मता साधता यावी. ज्याचा स्वभाव पाण्यासारखा असतो अशा शिष्यालाच 'उदक' म्हणतात.

पाणी मूलत: पवित्र असते. परंतु ते अन्य पात्राच्या संगतीने अपवित्र होते. गटारातील पाणी अपवित्र असते आणि गंगेचे पाणी पवित्र असते. पाणी गटाराचा आश्रय घेईल तर ते अपवित्र ठरेल आणि गंगापात्राचा आश्रय घेईल तर ते पवित्र ठरेल. म्हणून शिष्याने सर्वदा गुरुचरणाचाच आश्रय घेतला पाहिजे. जेव्हा उदक (शिष्य) पादाशी (गुरूशी) एकरूप होते तेव्हा 'पादोदक' होते. मग जेवढे सामर्थ्य 'पादा'त असते तेवढेच सामर्थ्य 'उदका'लाही लाभते. पापांचे, दोषांचे निवारण करणे, कर्माचे दहन करणे इत्यादी सामर्थ्य पादोदकात असते. अशाप्रकारे 'पाद' म्हणजे गुरू आणि 'उदक' म्हणजे शिष्य असा येथे अर्थ आहे. 'पादोदक' म्हणजे गुरु-शिष्याची अद्वैतावस्था, त्यांची अभेदस्थिती. गुरू-शिष्य असा भेदभाव नाहीसा होणे यालाच 'पादोदक' म्हणतात.

सामान्य पादोदक-क्रियेत देखील ही अभिन्नता दिसून येते. शिष्य गुरूची पादपूजा करतो आणि गुरू शिष्याकडून पादपूजा करून घेतो त्यावेळी 'पादोदक' सिद्ध होते. हे पादोदक गुरु-शिष्याच्या अभेदस्थितीचे फळ असते. व्यवहारात पति-पत्नी यांच्या अभिन्नत्वाचे फळ म्णजे त्यांचा पुत्र असतो. ते दोघेही त्याचे निर्माते असतात. दोघांचेही त्याच्यावर सारखेच प्रेम असते. त्याप्रमाणे पादोदक हे गुरु-शिष्य-अभेदाचे फळ असते. पादोदक सिद्ध झाल्यावर त्याला गुरू नमस्कार करतात आणि शिष्यही नमस्कार करतो. पादोदकाचे प्राशन प्रथम गुरू करतात. नंतर ते शिष्याला देतात. शिष्यामुळे आपल्याला पादोदक मिळाले अशी गुरूची भावना असते.

पादोदकासाठी गुरू व शिष्य या दोघांची आवश्यकता असते. पुत्रजन्मासाठी केवळ स्त्री अथवा केवळ पुरुष असून चालत नाही तर दोघेही आवश्यक असतात त्याप्रमाणे. पादोदकाचे प्राशन गुरु-शिष्य दोघेही करतात. त्यामुळे गुरु-शिष्याचे अभिन्नत्व या क्रियेत आहे हे सिद्ध होते. पूजेत सहभागी होणाऱ्या सर्व शिष्यांना पादोदक दिल्यावर उरलेले पादोदक गुरू प्राशन करतात व पुन्हा ते शिष्याला देतात. या क्रियेत उच्छिष्ट दोष-सूतक नसते.

जननसूतक, मरणसूतक, रजःसूतक, जातिसूतक व उच्छिष्टसूतक ही पंचसूतके आहेत. वीरशैव धर्मात ही

पंचसूतके पाळली जात नाहीत. घरात कोणी स्त्री बाळंत झाली तर त्या घरात काही दिवस सूतक पाळतात. पूजापाठ करीत नाहीत. परंतु वीरशैव सिद्धान्तात इष्टलिंगपूजा हे नित्यकर्म असल्यामुळे अशा काळातही पूजा करावी असे सांगितलेले आहे. बाळंत झालेल्या स्त्रीने आणि घरातील सर्वांनी इष्टलिंगपूजा करावी, सूतक पाळू नये. अशाप्रकारे जननसूतक नाकारले आहे. त्याचप्रमाणे ज्या घरात मृत्यू झाला त्या घरातील सर्व लोकांनीही इष्टलिंगाची पूजा केलीच पाहिजे. मरणसूतक पाळू नये. स्त्री विटाळशी झाल्यावर रज:सूतक पाळत असते. चार दिवस ती घरातील कोणतेही काम, पूजापाठ करीत नाही. परंतु वीरशैव सिद्धान्ताने रज:सूतकही नाकारले आहे. या काळात देखील स्त्रीने पूजापाठ केला पाहिजे, असा वीरशैव सिद्धान्ताचा आग्रह आहे. वीरशैवदीक्षा घेतल्यावर जातिसूतक पाळले जात नाही. ज्यांनी दीक्षा घेतली ते सर्व वीरशैव होत. त्यांच्या पूर्वजातीवरून त्यांना हिणवणे किंवा कमी लेखणे वीरशैव सिद्धान्ताला मान्य नाही. सर्वांना समदृष्टीने पाहणे हीच खरी लिंगदीक्षा होय. कुणाचे उष्टे अन्न वा पदार्थ गुरूने व जंगमाने ग्रहण करताना उरलेला असेल तर तो 'प्रसाद' मानला जातो. उच्छिष्ट समजला जात नाही. जर कोणाच्या मनात प्रसादाबद्दल 'हे उष्टे अन्न आहे' अशी भावना निर्माण झाली तर त्याला रौरव नरकाची प्राप्ती होते, असे म्हटले आहे. प्रसादाबद्दल उच्छिष्टभाव नसावा, असा याचा अर्थ आहे. इष्टलिंगाला जो दगड समजतो, श्रीगुरूला जो मानव मानतो आणि प्रसादाला इउष्टे समजतो तो घोर नरकात पडतो, असे वीरशैवाचार्य सांगतात. ते यासाठी की, तशी भावना बाळगू नये. म्हणून पादोदक प्राशन करताना उच्छिष्ट भावना बाळगू नये. ज्या ठिकाणी दोन व्यक्ती अत्यंत समरस होतात तेथे उच्छिष्टभाव नसतो. आपल्या लहानग्या बाळाचे चुंबन घेताना मातापित्याच्या मनात कुठे उष्टेपणाची भावना असते? बाळाच्या ताटातले इउच्चष्टे अन्न जेव्हा पिता खात असतो किंवा पत्नी पतीच्या ताटातले अन्न खात असते तेव्हा कुठे उष्टेपणाची भावना असते? त्याप्रमाणे गुरु-शिष्य यांच्यात अभेद निर्माण झाल्याने उच्छिष्ट सूतक पाळले जात नाही. याप्रमाणे पादोदक-क्रियेत गुरु-शिष्याचा व्यवहार अभेदभावाने होत असतो. शरणस्थलातील 'पादोदक' याचा अर्थ गुरु-शिष्यांचा अभेद असाच आहे. सूत्ररूपाने हे असे सांगता येईल.

पाद=गुरू. उदक=शिष्य. पादोदक=गुरु-शिष्याचे ऐक्य.

पादोदक-क्रियेत प्रत्यक्ष गुरुचरणाचे तीर्थ घेतले जाते. पण शरणस्थलात गुरु-शिष्य यांच्या अभेदबोधाची स्थिती प्राप्त झालेली असते. ही स्थिती कशी प्राप्त होते? तर दीक्षेमुळे. गुरू शिष्याला चिन्मयी दीक्षा देतो. तू माझ्यशी एकरूप आहेस, तू माझेच रूप आहेस अशा भावनेने गुरू शिष्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवतात. त्यावेळी दोघे अभिन्न होतात. गुरूच्या चिन्मय दीक्षेमुळे गुरु-शिष्यांच्या अभेदस्थितीचा बोध प्राप्त होतो. त्यालाच 'दीक्षापादोदकस्थल' म्हणतात.

**दीक्षयाऽपगतद्वैतं यज्ज्ञानं गुरुशिष्ययोः।**
**आनंदस्यैक्यमेतेन दीक्षापादोदकं स्मृतम्।।१९.६।।**

गुरूने दिलेल्या चिन्मय दीक्षेमुळे गुरु-शिष्यांतील द्वैतभाव नष्ट होतो. जे ज्ञान गुरूला असते तेच ज्ञान शिष्याला प्राप्त झालेले असते. म्हणून त्यांच्यात द्वैत, वेगळेपण उरत नाही. या जगात गुरू हीच अशी व्यक्ती आहे की जी आपल्यापुढे येणाऱ्या शिष्याला गुरुत्व प्रदान करते. म्हणून गुरूने शिष्याला दिलेल्या ज्ञानामुळे दोघेही एका समान पातळीवर येऊन ऐक्यज्ञानाचा आनंद उपभोगतात. स्वयंपाक करणारा आणि भोजन करणारा असे दोघेही

अन्नपदार्थाचा आस्वाद घेत असतात. त्याप्रमाणे ज्ञान देणारा गुरू आणि ज्ञान घेणारा शिष्य दोघेही अद्वैताचा आनंद अनुभवतात. त्यांचा आनंद एकरूप होतो. अशा स्थितीला दीक्षापादोदक म्हटले जाते. मरितोंटदार्यांनी गुरु-शिष्य-अभेदासाठी व्याकरणातील संधीचे उदाहरण दिले आहे. व्याकरणात एका स्वरासमोर जेव्हा दुसरा स्वर येतो तेव्हा दोन्ही स्वर एकरूप होतात. जसे-

अ+अ=आ

चर+अचर=चराचर

येथे पहिला 'अ' म्हणजे गुरू आणि त्याच्यासमोर आलेला दुसरा 'अ' म्हणजे शिष्य. या दोघांत विद्या संधी निर्माण करते. गुरुशिष्यांच्या अभेदानंदाचे दर्शन घडविणारे स्थल हेच दीक्षापादोदकस्थल होय.

**अथवा पादशब्देन गुरुरेव निगद्यते।**
**शिष्यश्चोदकशब्देन तयोरैक्यं तु दीक्षया।।१९.७।।**

पाद या शब्दाचा गुरू आणि उदक या शब्दाचा शिष्य असा अर्थ असून चिन्मय दीक्षेने दोघांचे ऐक्य सूचित केलेले असल्याने याला दीक्षापादोदकस्थल म्हणतात.

**परमानंद एवोक्तः पादशब्देन निर्मलः।**
**ज्ञानं चोदकशब्देन तयोरैक्यं तु दीक्षया।।१९.८।।**

परमानंद म्हणजे निर्मल असे परब्रह्म. परब्रह्माच्या ठायी सर्वश्रेष्ठ आनंद असतो. तेवढा आनंद अन्य कोणत्याही ठिकाणी नसतो. परमानंदामुळे सर्व दुःखांचे निवारण होते. 'पाद' म्हणजे परमानंद आणि 'उदक' म्हणजे त्याचे ज्ञान. आपल्या ठिकाणीही परमानंद आहे, परंतु आपल्याला त्याचे ज्ञान नाही. जमिनीत गाडलेल्या धनावर बसून भीक मागणाऱ्या भिकाऱ्यासारखी आपली अवस्था आहे. प्रत्येकाच्या जवळ परमानंद आहे. पण त्याचे ज्ञान नाही. केवळ श्रेष्ठ वस्तूंच्या असित्वाने आनंद होत नसून ती वस्तू आपल्या जवळ आहे या ज्ञानाने आनंद होतो. घरात प्रचंड संपत्ती आहे, पण तिचे ज्ञान नसेल तर आनंद कसा होणार? परंतु आपल्याजवळ प्रचंड संपत्ती आहे हे कळल्यावर त्याला किती आनंद होईल? त्याप्रमाणे परमात्म्याने प्रत्येकाच्या हृदयात परमानंद भरून ठेवलेला आहे. गुरूच्या उपदेशाने त्याचे ज्ञान झाल्यावर परमानंदाची अनुभूती येते.

पाद=परमानंद आणि उदक=त्याचे ज्ञान.

म्हणजे आपल्या अंतरंगातील परमानंदाचे ज्ञान होणे हेच 'पादोदक' होय. गुरूच्या दीक्षेमुळे हे ज्ञान प्राप्त होते, म्हणून त्याला दीक्षापादोदक म्हणतात. ज्याची गुरु-चरणावर श्रद्धा असते तोच गुरुवचनावर विश्वास ठेवतो. म्हणून परमानंद-पादोदक सांगण्याआधी वीरशैवाचार्यांनी गुरुचरणाचे तीर्थ घेणारी पादोदक-क्रिया सांगितली आहे. मी परमानंदस्वरूप आहे, असे अनुभव-ज्ञान हेच पादोदक होय.

**परसंवित्प्रकाशात्मा परमानंदभावनाम्।**
**अधिगम्य महायोगी न भेदं क्वापि पश्यति।।१९.९।।**

दीक्षापादोदकसंपन्न महायोग्याच्या ठिकाणी भेदबुद्धी नसते. जो गुरूशी एकरूप होतो तो कुणाशी भेद करतो असे म्हणायचे कारण नाही. कारण तो अद्वैतस्थितीत गेलेला असतो.

**देशकालाद्यवच्छेदविहीनं नित्यनिर्मलम्।**
**आनंद प्राप्य बोधेन नान्यत् कांक्षति संयमी।।१९.१०।।**

हा आनंद कसा आहे? तर देश, काल व वस्तू यांनी वेढलेला नाही. तो नित्य आहे. म्हणजे आता आहे, मग नाही असा प्रकार येथे नाही. तो सर्व काळात, सर्व ठिकाणी विद्यमान असतो. हा आनंद नित्य आहे. तो आला आणि मग गेला अशा प्रकारचा नाही. सुख येते आणि जाते. कारण सुखापाठोपाठ दुःख येत असते. सुख-दुःख हे द्वंद्व आहे. जिथे सुख असते तिथे दुःख असणारच. जिथे जन्म असतो तिथे मृत्यू असणारच. परंतु आनंद हे द्वंद्व नव्हे. 'आनंद' या शब्दाला विरुद्धार्थी शब्द नाही. म्हणून तो नित्य आहे. निर्मल आहे. प्रापंचिक सुखात दोष असतो, तसा आनंदात नसतो. या ब्रह्मानंदाची प्राप्ती ज्ञानाने होते. ज्याला या ब्रह्मानंदाचा लाभ होतो असा संयमी शिवयोगी दुसऱ्या कशाची अपेक्षा करीत नाही. कारण त्याच्या दृष्टीला ब्रह्माशिवाय दुसरे काही दिसत नाही.

दीक्षापादोदकस्थलाचा समारोप करताना शेवटी ज. रेणुकाचार्य सांगतातः

**ज्ञानामृतमपि स्वच्छं गुरुकारुण्यसंभवम्।**
**आस्वाद्य रमते योगी संसारामयवर्जितः।।१९.११।।**

निर्मल असे ब्रह्मज्ञानाचे अमृत गुरुकृपेने प्राप्त होते. त्याचा आस्वाद दीक्षा पादोदकसंपन्न शिवयोगी घेत असतो. त्यामुळे तो संसारापासून मुक्त होऊन आत्मरूपात रममाण झालेला असतो. गुरूच्या चिन्मय दीक्षेने आपल्या अंतरंगातील परमानंदस्वरूपाला ज्याने जाणलेले असते त्यालाच दीक्षापादोदकसंपन्न शिवयोगी म्हटले जाते.

अशा प्रकारे या स्थलात पाद आणि उदक यांचे तात्त्विक अर्थ स्पष्ट केलेले आहेत. आपल्या ठिकाणी असलेल्या परमानंदाचा आस्वाद घेणे हा या स्थलाचा सारांश होय, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१९ नोव्हेंबर १९९४



# शिक्षापादोदकस्थल, ज्ञानपादोदकस्थल

## शिक्षापादोदकस्थल

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

लिंग-षट्स्थलांतर्गत शरणस्थलातील दुसरे स्थल आहे शिक्षापादोदकस्थल. याठिकाणी 'पादोदक' शब्दाचा अर्थ काल सांगितल्याप्रमाणेच आहे. पाद म्हणजे गुरू, उदक म्हणजे शिष्य आणि पादोदक म्हणजे गुरु-शिष्याचे सामरस्य. दीक्षेमुळे पादोदकाची प्राप्ती होते त्याप्रमाणे गुरूने दिलेल्या शिक्षेमुळे अर्थात् उपदेशामुळे पादोदकाचा लाभ होतो. म्हणून या स्थलाला 'शिक्षापादोदक' असे म्हटले आहे. जगद्‌गुरू रेणुकाचार्य अगस्त्य महर्षींना सांगतात:

**गुरुशिष्यमयं ज्ञानं शिक्षा योगिनमीर्यते।**
**तयो: समरसत्वं हि शिक्षापादोदकं स्मृतम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.१२)

या श्लोकात 'मय' हा शब्द योजिला आहे. मृण्मय म्हणजे मातीपासून बनलेला. मातीचा घट हा मृण्मय असतो. याप्रमाणेच सोन्यापासून जे बनवले जाते त्याला सुवर्णमय असे म्हणतात. मय हा प्रत्यय किंवा विकार आहे. परंतु या ठिकाणी मात्र मय या शब्दाचा अर्थ 'स्वरूप' असा आहे. गुरू आणि शिष्य या दोघांचा बोध जेव्हा एक होतो तेव्हा त्यांचे आत्मस्वरूप एक होऊन जाते. त्यांच्यामध्ये भेद नसून केवळ अभेद असतो. गुरूच्या शिक्षणामुळेच शिष्याला प्रेरणा मिळते. गुरूला गुरु-शिष्य सामरस्याचे ज्ञान प्राप्त झालेले असते. तेच शिष्याला प्राप्त होते. शिक्षण आणि ज्ञान यांच्या समरसतेलाच 'शिक्षापादोदक' असे म्हणतात. ही सामरस्याची स्थिती वर्णन करणारे स्थल शिक्षापादोदकस्थल होय. हे शिक्षण कसे मिळते या संबंधी पुढील श्लोकात उदाहरण देऊन सांगतात:

**मथिताच्छास्त्रजलधेर्युक्तिमंथानवैभावात्।**
**गुरुणा लभ्यते बोधसुधा सुमनसां गणै:।।१९.१३।।**

श्रीगुरूकडून प्रेरणा घेऊन शिष्य जेव्हा शास्त्ररूपी समुद्राचे युक्तीच्या रवीने मंथन करतो तेव्हा त्याला ज्ञानरूपी अमृत प्राप्त होते. देव आणि असुर यांनी मिळून पूर्वी समुद्रमंथन केले अशी कथा आहे. महर्षी दुर्वासाच्या शापाने इंद्राची सर्व संपत्ती समुद्राच्या तळाशी जाऊन पडली. ती वर काढण्यासाठी समुद्रमंथन करावे लागले. त्यावेळी अनेक रत्ने, अमृत त्यामधून मिळाले. मंदराचल पर्वताची रवी आणि वासुकीची दोरी करून देव-असुरांनी समुद्रमंथन केले. त्यावेळी वासुकीच्या मुखातून जे हलाहल बाहेर पडले ते भगवान शंकरांनी प्राशन केले. त्यामुळे त्यांचा कंठ निळा होऊन त्यांचे नाव नीलकंठ असे पडले.

मंथन केल्याशिवाय आत काय दडलेले आहे याचा पत्ता लागत नसतो. त्याप्रमाणे सर्व शास्त्राचे मंथन

केल्याशिवाय त्यामधील ज्ञान प्राप्त होत नसते. एखाद्या ग्रंथाचा पहिला श्लोक वाचला आणि शेवटचा श्लोक वाचला तर त्या ग्रंथातील ज्ञान कसे प्राप्त होईल? केवळ आदि-अंत पाहिल्याने ग्रंथगत तत्त्वांचे आकलन होत नसते. शास्त्राचे सतत अध्ययन करावे लागते. ते पुन्हा पुन्हा वाचावे लागते. त्याचा अभ्यास करावा लागतो. विषय पूर्ण आकलन होईपर्यंत सतत वाचन करीत राहणे यालाच अभ्यास असे म्हणतात. जो अधिक परिश्रम करतो त्याला अधिक विद्या प्राप्त होते.

ज्ञान हे अनंत आहे. ते सर्वच्या सर्व एका व्यक्तीला एका जन्मात प्राप्त होत नसते. ज्ञानसागर असा अपार आहे. तो संपूर्ण मिळणे शक्य नसले तरी निदान ज्या धर्मात आपण जन्म घेतला त्या धर्माचे सिद्धान्तग्रंथ तरी अभ्यासले पाहिजेत. वीरशैवांचे मूळ धर्मग्रंथ २८ शैवागम होत. याशिवाय अनेक संस्कृत ग्रंथ देखील आहेत. या सर्व ग्रंथांचे युक्तिपूर्वक मंथन करून त्यांचा रहस्यार्थ समजून घेतला पाहिजे. मंथन करण्यासाठी रवीची आणि दोरीची आवश्यकता असते. स्मृतिकाराने म्हटले आहे की, 'तपश्चर्या करताना मनुष्य एकटा असावा, अध्ययन करताना दोघे असावेत आणि यात्रेला जाताना दोघांपेक्षा तिघे असले तर उत्तमच!' अभ्यास करताना कोणी जोडीदार असेल तर अभ्यास चांगला होऊ शकतो. शिष्याला अभ्यासात गुरूची साथ मिळत असते. म्हणून शिष्याने युक्ति-प्रयुक्तीने शास्त्राचे मंथन करून ज्ञानामृत मिळवले पाहिजे. गुरूचा उपदेश ग्रहण करून गुरूच्या मार्गदर्शनाखाली शास्त्राचे अध्ययन करून ज्ञानामृत प्राप्त करणे हेच शिक्षापादोदकाचे उद्दिष्ट होय.

**ज्ञानचंद्रसमुद्भुतां परमानंदचंद्रिकाम्।**
**पश्यंति परमाकाशे मुक्तिरात्रौ महाधियः।।१९.१४।।**

या श्लोकात सर्वांच्या अनुभवाला येणाऱ्या चांदण्याची उपमा देऊन परमानंदाचे स्वरूप स्पष्ट केले आहे. चांदणे हे सर्वांच्या अनुभवाचा विषय आहे. सर्वजण ते पाहू शकतात. परंतु शहरी लोकांना मात्र चांदण्यांचा आस्वाद घेता येत नाही. कारण रात्रभर विद्युत्दीप शहरात तळपत असतात. त्यामुळे पौर्णिमा असली काय किंवा अमावस्या असली काय, शहरी लोकांना त्याचा अनुभव येत नाही. त्यांची पौर्णिमा म्हणजे कॅलेंडरवरचे गोल वर्तुळ आणि अमावस्या म्हणजे कॅलेंडरवरचा काळा ठिपका. परंतु ज्या गावात विद्युत्दिवे नसतात, त्या गावात शरदऋतूमधील चांदणे अंगावर घेता येते. त्या चांदण्यात मुक्तपणे न्हाता येते. चतुर्थी, अष्टमी, पौर्णिमा आणि अमावस्या यांचा अनुभव घेण्यासारखा असतो. परंतु तो जेथे विजेचे दिवे नाहीत त्या ठिकाणीच फक्त घेता येतो. चांदण्यामुळे ताप नष्ट होऊन शीतलता प्राप्त होते. त्याप्रमाणेच जो मनुष्य संसारतापाने पोळलेला असतो त्याला परमानंदरूपी चांदण्याचा लाभ झाला तर तो तापमुक्त होतो. गुरूच्या कृपेने शिवयोगी मुक्तिरूप रात्रीत आपल्या ह्दयाच्या आकाशात शिवाद्वैत ज्ञानचंद्रापासून उत्पन्न झालेल्या परमानंदरूप चांदण्याचा अनुभव घेतात. मुक्ती हीच जणू शिवयोग्याची रात्र असते. ह्दय हे जणू आकाश, शिवाद्वैतज्ञान हा चंद्र आणि परमानंद हे त्याचे चांदणे होय. अशी कल्पना केलेली आहे. ह्दयातील या चांदण्याचा अनुभव ज्ञानी पुरुषांनाच येतो. सामान्यांना हे चांदणे पाहता येत नाही. ज्यांना बाहेरचा चंद्रदेखील पाहता येत नाही त्यांना आतल्या चंद्राचे दर्शन कसे घडेल?

**दृष्टे तस्मिन् परानंदे देशकालादिवर्जिते।**
**द्रष्टव्यं विद्यते नान्यच्छोतव्यं ज्ञेयमेव वा।।१९.१५।।**

परमानंदरूपी चांदण्यांचा साक्षात्कार झाल्यानंतर त्याच्यासाठी दुसरे काही पाहण्यायोग्य, ऐकण्यायोग्य आणि जाणण्यायोग्य राहत नाही. हेच या श्लोकात स्पष्ट केले आहे. देशकालाची मर्यादा नसलेल्या परमानंदाचा

साक्षात्कार ज्याला होतो त्याला दुसऱ्या कुठल्या साक्षात्काराची गरज नसते. जोवर आत्मदर्शन होत नसते तोवरच इतर वस्तूंच्या दर्शनाची अभिलाषा माणसाच्या मनात असते. परंतु जाणावे असे दुसरे काही अस्तित्वातच राहत नाही. ज्याचे दर्शन घ्यावे अशी वस्तू केवळ आत्माच होय, असे उपनिषदांत म्हटले आहे. ज्याला आत्मदर्शन झालेले नसते त्याच्या मनात इकडे जावे-तिकडे जावे, याला पाहावे- त्याला पाहावे, हे ऐकावे- ते ऐकावे अशी लालसा असते. परंतु आत्मदर्शनानंतर तो पूर्णत: तृप्त होतो. कुठलीही वस्तू तात्कालिक तृप्ती देते. ती मनुष्यापासून वेगळी झाल्यावर त्याला दु:ख देते. आत्मा ही मात्र अशी वस्तू आहे की जिचा कधीही वियोग होत नसतो. कारण आत्मा हेच आपले सत्य स्वरूप असते. म्हणून आत्मदर्शनानंतर दुसरे काही दर्शनीय राहत नाही. तसेच दुसरे काही श्रवणीय आणि ज्ञेय देखील राहत नाही. माणसाला काय मिळेल अशी चिंता असते, परंतु जेव्हा तो स्वत:लाच म्हणजे आत्म्याला प्राप्त करून घेतो तेव्हा दुसरे काही मिळवण्यासारखे शिल्लक राहत नाही. असा आत्मतृप्त शिवयोगी केवळ आत्म्यालाच पाहतो, त्याच्याविषयीच ऐकतो आणि त्याचेच निरंतर चिंतन करतो. हाच विचार पुढील श्लोकात एक उदाहरण देऊन स्पष्ट केला आहे.

**आत्मनंदेन तृप्तस्य का स्पृहा विषये सुखे।**
**गंगाजलेन तृप्तस्य कूपतोये कुतो रति:।।१९.१६।।**

मनुष्याचे मन नेहमी विषयांकडे धावत असते. कधी शब्दाकडे, कधी स्पर्शाकडे, कधी रूपाकडे, कधी रसाकडे तर कधी गंधाकडे. विषयांपासून आपल्याला आनंद मिळेल असे त्याला वाटत असते, परंतु विषयांपासून जो आनंद मिळतो असे वाटते, तो आनंद विषयांतील नसतो. विषयसेवन करताना मनाची एकाग्रता होते. त्या एकाग्रतेमध्ये आत्मानंदाचे प्रतिबिंब पडलेले असते. विषयांपासून मिळणारा आनंद हा मुळात आत्मानंदाचा आभास मात्र असतो. हा विचार अधिक स्पष्ट करून दाखवण्यासाठी थोडे चमत्कारिक पण अर्थपूर्ण उदाहरण दिले जाते.

कुत्र्याला मृत प्राण्याच्या हाडाविषयी अत्यंत प्रेम असते. तो हाडाचा एखादा तुकडा खाण्यासाठी पळवतो आणि चघळत बसतो. दातांनी हाड मोडल्यानंतर त्याच्या बारीक बारीक तुकड्यांनी कुत्र्याच्या हिरड्यावर जखमा होऊन रक्त वाहू लागते. हे रक्त हाडाचे आहे असे समजून कुत्रा पीत असतो. वास्तविक रक्त त्याचे स्वत:चेच असते. परंतु त्याला वाटते की हाडांपासून ते आपल्याला मिळत आहे. विषयसुखात आनंद शोधणाऱ्या मनुष्याची अवस्थादेखील अशीच असते. कुत्र्याला स्वप्नात देखील हाडेच दिसत असतात. त्याप्रमाणे माणसांना देखील स्वप्नात विषयांचेच दर्शन होय असते. कुत्र्याला स्वप्नात हाडच दिसणार आणि मांजरला उंदीर. ज्याची आपल्या मनात अत्यंत आसक्ती असते तेच आपण स्वप्नात पाहत असतो. विषयी माणसाची अशीच अवस्था असते.

माणसाचे पामर, विषयी, जिज्ञासू, ज्ञानी आणि मुक्त असे चार प्रकार केले जातात. केवळ विषयांपासूनच सुख मिळते एवढीच जाणीव ज्याला असते तो 'पामर' होय. निर्विषयात देखील सुख आहे याची जाणीव असलेल्या परंतु विषयात अनुरक्त असलेला तो 'विषयी' मनुष्य. विषयात सुख नसून ते आत्म्यात आहे अशी जाणीव बाळगून जो आत्मसुखाची इच्छा करतो तो 'जिज्ञासू'. गुरुपदेश श्रवण करून आत्मज्ञानाची प्राप्ती करून घेणारा तो 'ज्ञानी' आणि मुक्ती मिळवलेला तो 'मुक्त' पुरुष. ही चढती श्रेणी आहे. पहिल्यापेक्षा दुसरा श्रेष्ठ, दुसऱ्यापेक्षा तिसरा श्रेष्ठ याप्रमाणे मुक्त पुरुष हा सर्वश्रेष्ठ होय. शिवयोग्याची अवस्था अशी असल्याने त्याला विषयसुखात मुळीच गोडी नसते. विषयभोग तर दूरच पण विषयभोगाची कल्पना देखील त्याच्या चित्ताला स्पर्शत नाही. तो आत्मानंदातच

तृप्त असतो. ज्याचे घर गंगेच्या काठावर असते तो विहीर खोदण्याचा अथवा विहिरीचे पाणी आणण्याचा प्रयास कशाला करील? समोर अमृतासारखा गंगेचा प्रवाह आहे आणि हा पाण्यासाठी विहीर खोदतो आहे, असे घडले तर लोक त्याला वेड्यात काढतील. विषयासक्त मनुष्य असा वेडा असतो, कारण आपल्या अंतरंगात आनंदाचा स्रोत आहे याची जाणीवच त्यांना नसते. परंतु शिवयोगी अंतरंगातील आनंदजलात चिंब भिजलेला असतो. त्याच्या मनात विषयसुखाची कणभर अभिलाषा नसते.

**यस्मिन्नप्राप्तकल्लोले सुखसिंधौ निमज्जति।**
**सामरस्यान्महायोगी तस्य सीमा कुतो भवेत्।।१९.१७।।**

शिवानंदरूपी सागरावर राग-द्वेष इत्यादी विकारांचे तरंग उठत नाहीत. अशा त्या प्रशांत सुखसागरात जो समरस झालेला असतो त्याच्या आनंदाला मर्यादा कशी असेल? लौकिक व्यवहारात मर्यादा, सीमा असतात. हे तुझे घर-हे माझे घर, ही तुझी शेती- ही माझी शेती इत्यादी. परब्रह्माला आणि त्याच्या आनंदाला मात्र कोणती सीमा नसते, या स्थलाचा समारोप करताना शेवटी सांगतात:

**गुरुप्रसादचंद्रेण निष्कलंकेन चारुणा।**
**यन्मनःकुमुदं नित्यबोधितं तस्य को भ्रमः।।१९.१८।।**

आकाशत चंद्रोदय झाला की चंद्रकमळ उमलते त्याप्रमाणे निष्कलंक, अशा गुरुप्रसादरूपी चंद्रामुळे ज्याच्या मनाचे कमळ विकसित झालेले असते अशा शिवयोग्याच्या ठिकाणी भेदभ्रांती उरत नाही. आकाशातल्या चंद्रावर कलंक आहे. आकाशातील चंद्र फक्त रात्रीच उगवतो आणि कृष्णपक्षात कलेकलेने क्षीण होत जातो. परंतु गुरुप्रसादरूपी चंद्र मात्र एकदा उगवला तर कधीही मावळत नाही. त्यामुळे शिष्याचे चित्तकमळ सदैव उमललेले असते.

त्याच्या मनात थोडा देखील भ्रम राहिलेला नसतो. विपरीत ज्ञानामुळे भ्रम उत्पन्न होत असतो. त्यामुळे वस्तू असते एक पण भासते दुसरी, अशी अवस्था होत असते. दोरीला साप समजणे हे विपरीत ज्ञान होय. परंतु वस्तूच्या खऱ्या स्वरूपाचे दर्शन जेव्हा घडते तेव्हा तेथे भ्रम कसा राहील?

अशाप्रकारे गुरूच्या मार्गदर्शनाखाली शास्त्रांचे मंथन करून, त्यातील सारसत्त्व समजून घेऊन जो आत्मसाक्षात्कार करून घेतो त्याला शिक्षापादोदक म्हणतात. यानंतरचे स्थल आहे ज्ञानपादोदकस्थल.

## ज्ञानपादोदकस्थल.

**तदैक्यसंपदानंदज्ञानं ज्ञानगुरुर्मतः।**
**तत्सामरस्यं शिष्यस्य ज्ञानपादोदकं विदुः।।१९.१९।।**

या ठिकाणीही पाद म्हणजे गुरू, उदक म्हणजे शिष्य आणि पादोदक म्हणजे गुरु-शिष्याचे ऐक्य असाच अर्थ आहे. ज्ञानामुळे या पादोदकाची प्राप्ती होत असल्याने याला 'ज्ञानपादोदक' असे म्हणतात. आनंदाचे ज्ञान हाच ज्ञानगुरू होय. शिक्षापादोदकसंपन्न शिष्याला होणारे ज्ञान आणि आनंदाचे ऐक्य यालाच शिवज्ञानी लोक 'ज्ञानपादोदक' असे म्हणतात. एका गुरूच्याच तीन कार्यांवरून त्याची तीन रूपे मानली जातात. दीक्षा देणारा म्हणून दीक्षागुरू, शिक्षा (शिक्षण, उपदेश) देणारा म्हणून शिक्षागुरू आणि ज्ञान देणारा म्हणून ज्ञानगुरू. गुरूच्या

ठिकाणी असलेले ज्ञान हेच गुरू असते. गुरू ही संज्ञा शरीराच्या गुरुत्वावरून, त्याच्या लठ्ठपणावरून दिली जात नाही. तर त्या शरीरात वास्तव्य करणाऱ्या ज्ञानावरून दिली जाते. गुरूचा केवळ अभिनय केल्याने कुणी गुरू होत नाही. ज्याच्या हृदयात ज्ञान तेजाळत असते तोच गुरू असतो. ज्ञानाच्या किरणाने शिष्याच्या हृदयातील अज्ञान-अंधकार जो दूर करतो त्याला गुरू म्हणतात.

**अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया।**
**चक्षुरुन्मिलितं येन तस्मै श्री गुरवे नमः।।**

शिष्याचे अज्ञान दूर करून त्याला ज्ञान प्रदान करण्याचे सामर्थ्य गुरूजवळ असते. हे सामथ्ये ज्याच्या जवळ नसेल तो केवळ आकारामुळेच गुरू ठरेल. मनुष्याचा देह असला तरी माणुसकी नसलेल्या मनुष्यासारखी ही अवस्था आहे. देवाचे शरीर असेल तर त्यात देवत्व हवे, मनुष्याचे शरीर असेल तर त्यात मनुष्यत्व हवे. त्याप्रमाणे गुरूच्या शरीरात गुरुत्व हवे. आत्मज्ञान हेच गुरुत्वाचे लक्षण होय. दाढीजटा वाढवणे, डोक्यावर फेटा बांधणे, अंगावर विविध रंगांची वस्त्रे घालणे ही काही गुरुत्वाची लक्षणे नाहीत. गुरूच्या वेषभूषेचे अनुकरण केल्याने शिष्य गुरू होत नसतो. गुरूच्या हृदयकमलातील ज्ञान जेव्हा त्याच्या हृदयात प्रकाशते तेव्हाच तो गुरू होतो. ज्ञानहीन मनुष्य पशूच असतो. आहार, निद्रा, भय, मैथुन या गोष्टी सर्व प्राण्यांत समान असतात. मनुष्य आणि इतर पशू या बाबतीत सारखेच असतात. परंतु मनुष्यामध्ये ज्ञान हा गुण असल्यामुळे तो इतर प्राण्यांहून श्रेष्ठ ठरला आहे. सामान्य ज्ञानामुळे मनुष्यप्राणी प्राण्यांपेक्षा श्रेष्ठ ठरतो आणि आत्मज्ञानामुळे सर्व मनुष्यांना गुरू श्रेष्ठ ठरतात.

**'स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते'**

राजाची पूजा केवळ त्याच्या राज्यातच होत असते, परंतु विद्वान मात्र सर्वत्र पूज्य मानले जातात. कारण त्यांच्या अंगी ज्ञान वसत असते. म्हणून येथे आत्मज्ञान हेच गुरूचे मुख्य लक्षण सांगितले आहे. गुरूकडून प्राप्त झालेल्या ज्ञानाने शिष्य ऐक्याची स्थिती प्राप्त करून घेतो. याला ज्ञानपादोदकस्थल असे म्हणतात.

**अविद्याराहुनिर्मुक्तो ज्ञानचंद्रः सुनिर्मलः।**
**प्रकाशते पराकाशे परानंदमहाद्युतिः।।१९.२०।।**

चंद्रग्रहणाच्या वेळी राहू चंद्राला ग्रासतो अशी जुन्या काळात समजूत होती. ज्ञान हा चंद्र मानला तर अविद्या हा राहू ठरतो. अविद्या कधीही ज्ञानाला ग्रासू शकत नाही. ज्ञानचंद्र हा अविद्यारूपी राहूपासून मुक्त असतो. अविद्यारूपी राहूपासून मुक्त, अत्यंत निर्मल परमानंदप्रकाशाने तेजस्वी झालेला शिवाद्वैतरूपी चंद्र शिष्याच्या हृदयाकाशात प्रकाशित होतो.

**अज्ञानमेघनिर्मुक्तः पूर्णज्ञानसुधाकरः।**
**आनंदजलधेर्वृद्धिमनुपश्यन् विभासते।।१९.२१।।**

आकाशत पूर्णचंद्र प्रकाशल्यावर समुद्राला भरती येते. त्याप्रमाणे ज्ञानचंद्र उगवल्यावर काय घडते हे या श्लोकात सांगितले आहे. जे ज्ञान पूर्णत्व प्राप्त करून देते तेच पूर्ण ज्ञान होय. आत्मसाक्षात्कार ही पूर्णत्वप्राप्ती असल्यामुळेच आत्मज्ञान हेच पूर्ण ज्ञान आहे. आत्मप्राप्तीमुळेच मनुष्य परिपूर्ण होतो.

**पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते।।**

यामध्ये विलक्षण हिशेब केलेला आहे. यात अधिक करा किंवा उणे करा अथवा गुणाकार करा, या हिशोबात काहीही परिवर्तन होत नाही. २ या आकड्यात २ मिळवले तर ४ होतात. ४ ला ४ ने गुणल्यावर १६ होतात. ८ मधून ४ उणे केल्यास ४ शिल्लक राहतात. हे गणित वाढणारे आणि कमी होणारे असे आहे. परंतु उपनिषदातील वरील श्लोकात मात्र कधीही न वाढणारे आणि कधीही न घटणारे असे गणित सांगितले आहे. परमात्मा हा पूर्ण आहे. त्याच्यापासून निर्माण झालेली सृष्टी पूर्ण आहे. पूर्णातून पूर्ण काढले तरी पूर्ण शिल्लक राहते. अधिक उणे करून देखील येथे काहीच फरक पडत नाही. गणितशास्त्रामधील ० (शून्य) ही संकल्पना यासारखी आहे. उदा:

०+०=०　　० गुणिले ०=०　　०-०=०

शून्यात शून्य मिळवले, शून्याला शून्याने गुणले, शून्यातून शून्य उणे केले तरी शून्य राहते. परंतु परब्रह्म हे शून्य नसून परिपूर्ण आहे. शून्याचा अर्थ 'नाही' असा होतो. परंतु परब्रह्माचा मात्र 'आहे' असा अर्थ निघतो. परब्रह्म म्हणजे शून्य नव्हे. केवळ समजण्यासाठी शून्याचे उदाहरण घेतले एवढेच.

दुसरे उदाहरण आकाशाचे देता येते. आकाश हे सर्वत्र विद्यमान आहे. ते वाराणशीत आहे तसेच तुमच्या गावावर देखील आहे. आकाशात कधीही वृद्धी होत नाही किंवा ते कधी कमी होत नाही. समजा, तुम्ही वाराणशीत मातीचे घडे घेतले. त्या घड्यात वाराणशीतील आकाश आहे हे लक्षात घेऊन त्याची तोंडे बंद केली. घड्यामध्ये वाराणशीतील आकाश घेऊन तुम्ही तुमच्या गावी गेलात आणि तेथील आकाशत घडे फोडून वाराणशीतील आकाश मिळविण्याचा प्रयत्न केला तर तेथील आकाशत वृद्धी होईल काय? किंवा याच्या उलट तुमच्या गावातील आकाश वाराणशीत आणून ते येथील आकाशात मिळवण्याचा प्रयत्न केला तर येथील आकाश वाढणार आहे काय? आकाश हे जसे परिपूर्ण आहे ते कमीअधिक होत नाही, त्याप्रमाणे परब्रह्म देखील परिपूर्ण आहे. त्यात काही केले तरी वाढ-घट होत नाही. हे स्पष्ट करण्यासाठीच पूर्णाचे उदाहरण वरील श्लोकात दिले आहे. परमात्मा असा परिपूर्ण आहे. म्हणून या श्लोकात 'पूर्णज्ञानसुधाकर:' असा उल्लेख केलेला आहे. आकाशातील चंद्र पौर्णिमेच्या दिवशीच फक्त पूर्ण असतो. इतर दिवशी त्याच्या रूपात क्षय अथवा वृद्धी होत असते. परंतु ज्ञानचंद्र मात्र परिपूर्ण आहे. पूर्णचंद्र उगवल्यावर जशी समुद्राला भरती येते त्याप्रमाणे ज्ञानचंद्राचा उदय झाल्यावर आनंदसागराला भरती येते. या आनंदसागराच्या भरतीत ज्ञानी पुरुष लीन झालेला असतो.

**ज्ञानचंद्रोदये जाते ध्वस्तमोहतमोभरा:।**
**पश्यंति परमां काष्ठां योगिन: सुखरूपिणीम्।१९.२२।।**

आकाशात चंद्र उगवल्यावर अंधार नाहीसा होतो त्याप्रमाणे ज्ञानचंद्राचा उदय झाल्यावर चंद्र उगवल्यावर अंधार नाहीसा होतो. ज्ञानी पुरुषाच्या मनात कुठल्याही वस्तूची आसक्ती उरत नाही. मोहापासून मुक्त होऊन तो परमानंदात विलीन झालेला असतो.

**मायारजन्या विरमे बोधसूर्ये प्रकाशिते।**
**निरस्त सर्वव्यापारश्चित्रं स्वपिति संयमी।।१९.२३।।**

बोधसूर्याचा उदय झाल्यावर मायारूपी रात्र संपून जाते. त्यावेळी सर्व जगव्यवहारापासून मुक्त होऊन संयमी निद्राधीन होतो हे एक आश्चर्यच होय. सूर्य उगवल्यावर झोपेतून जागे व्हायचे असते की झोपी जायचे असते? सामान्यत: लोक सूर्य मावळल्यानंतर झोपतात आणि सूर्य उगवल्यावर उठतात. परंतु इथे मात्र उलटा प्रकार सांगितला आहे. ज्ञानसूर्य उगवल्यावर संयमी शिवयोगी झोपी जातो. असाच एक श्लोक गीतेमध्ये आलेला आहे.

**या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः।।**

संयमी म्हणजे योगी पुरुष ज्या रात्री सर्व लोक झोपलेले असतात त्यावेळी जागा असतो आणि ज्यावेळी सर्व जागे असतात त्यावेळी तो झोपलेला असतो. असा या श्लोकाचा अर्थ आहे. जागे राहणे म्हणजे व्यवहार करणे आणि झोपणे म्हणजे अलिप्त राहणे. ज्या सांसारिक व्यवहारात सामान्य लोक जागे असतात, त्यावेळी त्या व्यवहारात योगी अलिप्त असतो आणि ज्या परमार्थ व्यवहारात लोक झोपलेले असतात त्यावेळी योगी जागा असतो. ज्या परमतत्त्वाला अज्ञानी माणसे विसरलेली असतात ते तत्त्व योगी जाणत असतो आणि जो प्रपंच अज्ञान्यांना माहीत असतो त्याचा विसर योग्याला पडलेला असतो. प्रपंचाचे विस्मरण आणि परमात्म्याचे स्मरण करणे यात आनंद आहे. परंतु सामान्य माणसे मात्र याच्या उलट वागत असतात. आनंदरूप परमात्म्याला ते विसरलेले असतात आणि दु:खरूप प्रपंचाला घट्ट धरून बसलेले असतात. दु:खाला कवटाळून बसल्यावर आनंद कसा मिळेल? योगी मात्र लौकिक व्यवहारात तटस्थ राहतात आणि आत्मिक व्यवहारात स्वस्थ राहतात.

एकदा एका राजाकडे एक योगी पुरुष गेले. राजाने त्यांचा आदर-सत्कार केला. त्यांना उच्चासनावर बसवले. त्यांना नमस्कार करून तो म्हणाला, ''योगीमहाराज, आम्ही फार लहान आहोत. आपण फार मोठे आहात. आम्ही परमात्म्याला विसरलो आहोत. आपण परमात्म्याचे सदैव स्मरण करीत असता. आपण थोर आहात आणि आम्ही लहान आहोत.''

त्यावेळी योग्याच्या चेहेऱ्यावर स्मित तरळले. ते राजाला उद्देशून म्हणाले, ''मी थोर आहे हे तुझे म्हणणे बरोबर असले तरी माझ्यापेक्षा तूच अधिक मोठा आहेस. कारण मी लहान वस्तूंचा त्याग केला आहे. घराचा, धनाचा, संसाराचा. परंतु तू मात्र जी सर्वात मोठी वस्तू परमात्मा तिचा त्याग केला आहेस. त्यामुळे तूच माझ्यापेक्षा अधिक मोठा आहेस. माझा त्याग फार लहान आहे. पण तुझा त्याग मात्र फार मोठा.''

यातील व्यंगार्थ लक्षात घ्या. योगी पुरुषांपेक्षाही सामान्य माणसे महान त्यागी ठरतील काय? परमात्मा हीच सर्वाधिक मोठी वस्तू असून तिला जो जाणतो त्याच्या मनात सांसारिक वस्तूंची अभिलाषा नसते.

**अनाद्यविद्याविच्छित्तिवेलायां परयोगिनः।**
**प्रकाशते परानंदः प्रपंचेन विना कृतः।।१९.२४।।**

अनादी अशी अविद्या जेव्हा निवृत्त होते त्यावेळी योग्याला प्रपंचाविना निरुपाधिक अशा परमानंदाचा अनुभव येतो. सामान्य माणसाला विषयांपासून जो आनंद मिळतो तो मिश्रित असतो. अज्ञानी माणसांना विषयांवाचून आनंद मिळत नाही. परंतु योग्यांना मात्र विषयांशिवाय आनंद लाभतो.

**नित्यानंदे निजाकारे विमले परतेजसि।**
**विलीनचेतसां पुंसां कुतो विश्वविकल्पना।।१९.२५।।**

योग्यांच्या मनाला प्रपंचाचा स्पर्श का होत नाही, हे या ठिकाणी स्पष्ट केले आहे. नित्य आनंदरूप असलेल्या, स्वतःच्या रूपात विलीन झालेल्या अशा शिवयोग्याला संसाराची कल्पना कशी असेल? अर्थात् असणार नाही. त्यांना लाभलेला आनंद दुसऱ्या कोणालाही मिळत नाही, हे पुढील श्लोकात सांगितले आहे.

**कुतो ब्रह्मा कुतो विष्णुः कुतो रुद्रः कुतो रविः।**
**साक्षात्कृतपरानंदज्योतिषः साम्यकल्पना।।१९.२६।।**

ज्याला आत्मानंद प्राप्त झालेला आहे अशा व्यक्तीची तुलना कोणाशीही करता येत नाही. आत्म्याच्या स्वरूपानंदाचे तेज सूर्यापेक्षाही अधिक असते. कुठला ब्रह्मदेव, कुठला विष्णू, कुठला रुद्र आणि कुठला सूर्य? आत्मानंद हा असा महासागर आहे की ब्रह्मा-विष्णु-रुद्रादी देव हे त्याच्यावरील तरंग ठरतील. आत्मानंदाची बरोबरी कुठल्याही व्यक्तीला अथवा वस्तूला करता येत नाही.

**अपरोक्षपरानंदविलासस्य महात्मनः।**
**ब्रह्मविष्ण्वादयो देवा विशेषाः सुखबिंदवः।।१९.२७।।**

शिवयोग्याला आत्मस्वरूपाचा आनंद अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्षपणे मिळालेला असतो. परोक्ष म्हणजे दुसऱ्याने सांगितलेला आणि अपरोक्ष म्हणजे स्वतः अनुभवलेला. ईश्वर आहे हे ज्ञान परोक्ष ज्ञान आहे. तो कुठे आहे आणि कसा आहे हे माहीत नसते. परंतु जेव्हा आपला आत्मा हाच ईश्वर आहे हे ज्ञान होते तेव्हा ते अपरोक्ष ज्ञान असते. परोक्ष ज्ञानाने आनंद मिळतो. परंतु त्यापेक्षाही अधिक आनंद अपरोक्ष ज्ञानाने मिळतो. अपरोक्षपणे जो आत्मस्वरूपाच्या आनंदमहासागरात डुंबत असतो त्याला ब्रह्मा-विष्णू वगैरे देवांना मिळणारी सुखे बिंदूसारखी क्षुद्र वाटतात. या स्थलाचा समारोप करताना शेवटी सांगतात:

**यन्मात्रासहितं लोके वांछन्ति विषयं नराः।**
**तदप्रमेयमानंदं परमं को न वांछति।।१९.२८।।**

विषयसुखात आत्म्याचाच आनंद अंशरूपात असतो. सामान्य माणसांना विषयसुखाचीच अधिक अभिलाषा असते. मग अपरिमित सर्वश्रेष्ठ अशा चिदानंदाची अपेक्षा कोण करणार नाही? सामान्य विषयसुखात जर एवढा आनंद मिळतो तर असामान्य अशा आत्मसुखात किती आनंद असेल? अन्य कसलीही अपेक्षा न करता शिवयोगी आत्मानंदातच रममाण झालेला असतो. अशाप्रकारे ज्ञानाच्या द्वारा परमानंदाचा अनुभव घेणारे हे स्थल असल्यामुळे याला ज्ञानपादोदकस्थल असे म्हणतात, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२० नोव्हेंबर १९९४

# क्रियानिष्पत्तिस्थल, भावनिष्पत्तिथल

## क्रियानिष्पत्तिस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

क्रियानिष्पत्तिस्थल हे शरणस्थलातील एक महत्त्वाचे स्थल आहे. जगद्गुरू रेणुकाचार्य आपल्याला शिवाद्वैत सिद्धान्ताच्या वास्तविकतेकडे घेऊन जात आहेत. क्रियानिष्पत्ती म्हणजे काय? क्रिया म्हणजे कर्म. निष्पत्ती म्हणजे पूर्णत्व, समाप्ती, परिपक्वता. ज्या अवस्थेत आल्यावर कर्मांना पूर्णत्व लाभते, सर्व कर्मे परिपक्व होतात आणि पुन्हा कर्मे करण्याचे प्रयोजन राहत नाही अशी अवस्था सांगणारे स्थल हे क्रियानिष्पत्तिस्थल आहे. ही स्थिती सांगताना जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणतात:

**परकाये क्रियापत्तिः कल्पितैव प्रकाशते।**
**रज्जौ भुजंगवद् यस्मात् क्रियानिष्पत्तिमानयम्॥**
(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.२९)

शिवयोग्याकडून जी कर्मे घडतात त्यावरून वर वर पाहता तो कर्मे करीत आहे असे भासते. परंतु त्याच्या क्रिया सामान्य माणसासारख्या क्रिया नसतात. दग्धपटन्यायाने हा विचार स्पष्ट केला जातो. कपड्याच्या ढिगाला आग लागून तो जळून गेला तरी दुरून पाहणाऱ्याला तो जसाच्या तसा दिसतो. जोवर त्याला धक्का लागत नाही तोवर तो पूर्वी रचून ठेवल्यासारखाच दिसतो. शिवयोग्याच्या क्रिया अशा दग्ध झालेल्या कापडासारख्या असतात. वरवर पाहता त्या खऱ्या वाटल्या तरी त्यांच्यापासून कोणतीही फलनिष्पत्ति होत नसते. वेड्यावाकड्या पडलेल्या दोरीच्या ठिकाणी सर्पाचा भास होतो, परंतु तेथे वास्तविक सर्प नसतो. त्याप्रमाणे ज्ञानपादोदकसंपन्न शिवयोग्याकडून क्रिया घडतात, परंतु त्यांच्या ठिकाणी फळ देण्याचे सामर्थ्य नसते. सामान्य पादोदक क्रियेत पादोदक सिद्ध झाल्यावर क्रियेची समाप्ती होते. कारण पादोदक आणि प्रसाद हीच पूजाक्रियेची फळे असतात. त्यानंतर क्रिया करण्याचे प्रयोजन राहात नाही. त्याप्रमाणे येथे देखील शिवाद्वैत पादोदकाची प्राप्ती झाल्यावर पुन्हा नव्या कर्मांचा आरंभ होत नाही. शिवयोगी कर्म करताना दिसतो, परंतु त्या क्रियांपासून तो सर्वथा अलिप्त असतो.

**ज्ञानिनां यानि कर्माणि तानि नो जन्महेतवः।**
**अग्निदग्धानि बीजानि यथा नांकुरकारणम्॥१६.३०॥**

शिवयोग्यानी केलेली कर्मे त्याच्या पुढील जन्माचे कारण बनत नाहीत. कर्मामुळे जीवात्म्याला वारंवार जन्म घ्यावा लागतो. कर्माचा भोग संपला की तो शरीर सोडून देतो आणि नव्या कर्मांच्या भोगासाठी पुन्हा जन्म घेतो. अनादिकालापासून जन्म-मरणाचे चक्र सतत फिरत आहे. त्यात कधीही खंड पडला नाही. केलेल्या कर्माचा भोग भोगणे अटळ असते. कर्माची फळे भोगूनच कर्म संपवता येते. परंतु हे काम करीत असताना नवी कर्मे करून ठेवली तर त्यांच्या भोगासाठी पुन्हा जन्म घ्यावा लागतो. शिवयोगी मात्र आपल्या ठिकाणी असलेल्या ज्ञानरूपी अग्नीत कर्माची बीजे दग्ध करून टाकतो. प्रत्येक बीजात अंकुरण्याचे आणि निर्मितीचे सामर्थ्य असते त्याप्रमाणे प्रत्येक

कर्मात एक नवा जन्म देण्याचे बळ असते. या जन्मात केलेली कर्मे ही पुढील जन्मांची जणू पेरणीच असते. परंतु जर बीज अग्नीमध्ये भाजले अथवा जाळले तर त्याच्या ठिकाणचे अंकुरण्याचे सामर्थ्य नष्ट होते. भाजलेली बीजे कधीही उगवणे शक्य नाही. ज्ञानाच्या अग्नीत कर्मांची बीजे जाळली तर कर्मफळे भोगावी लागत नाहीत. सर्व कर्मे याचा अर्थ प्रारब्ध कर्म सोडून अन्य कर्मे असा घेतला जातो. संचित कर्म, प्रारब्ध कर्म आणि क्रियामाण कर्म असे कर्माचे तीन प्रकार आहेत. जन्मजन्मांतरात झालेल्या कर्मांचा संग्रह हे 'संचित कर्म' होय. जे कर्म परिपक्व होऊन फळ देण्यास सिद्ध झालेले असते आणि देत असते ते 'प्रारब्ध कर्म' होय. प्रारब्ध कर्माचा भोग भोगत असताना जीवात्मा जी कर्मे करत असतो ते 'क्रियामाण कर्म'. हे कर्म पुढील जन्माचे कारण ठरते. शिवज्ञान झाल्यामुळे शिवयोग्याचे संचित कर्म जळून नष्ट होते आणि क्रियामाण कर्मात 'मी हे कर्म करीत आहे' अशी त्याची भावना नसल्यामुळे ते निष्फल होते. कर्तृत्वभावना- मी हे कर्म करीत आहे ही भावना- असेल तर ते कर्म बाधक ठरते आणि ही भावना नसेल तर ते निष्फल ठरून पुढील जन्माचे कारणच नष्ट होते. मग शिल्लक राहिलेले प्रारब्ध कर्म भोगून संपल्यावर तो मुक्त होतो. अशाप्रकारे संचित कर्म ज्ञानाग्नीने दग्ध होते, कर्तृत्वभावना नसल्यामुळे क्रियामाण कर्म निष्फल होते. प्रारब्धकर्म भोगणे जोवर चालू असते तोवर ज्ञानी पुरुषाचा देह जिवंत असतो.

**कर्मणा किं कृतेनापि ज्ञानिनो निरहंकृतेः।**
**विक्रिया प्रतिबिंबस्था किं करोति हिमद्युतेः।।१९.३१।।**

ज्ञान्याकडून घडणारे कर्म नव्या जन्माचे कारण कसे ठरत नाही, हे इथे स्पष्ट केले आहे. ज्ञान्याची कर्मे निरहंकार वृत्तीने घडतात. त्यामुळे ती बाधक ठरत नाहीत. ज्याच्या जवळ अहंकार असतो तो मनुष्य मूढ असतो. गीतेत म्हटले आहे, 'अहंकार विमूढात्मा कर्ताहमिति मन्यते।'

मी कर्म करीत आहे अशी भावना अहंकारामुळेच निर्माण होते. अहंकारी मनुष्य हा मूढ-अडाणी असतो. कर्म हे प्रकृतिधर्मानुसार घडत असते, ते आपण करीत नसतो, हे त्याला कळत नसल्यामुळे तो मूढ असतो. शिवयोगी मात्र निरहंकारी असतो. त्याच्या ठिकाणचा व्यष्टि-अभिमान (वैयक्तिक अभिमान) हा समष्टि-अहंकारात (वैश्विक अहंकार) परिवर्तित झालेला असतो. व्यष्टि-अहंकारामुळे संसारबंधन पडते तर समष्टि-अहंकारामुळे संसारातून मुक्ती मिळते. शिवयोगी कर्मापासून कसा मुक्त असतो हे एका उदाहरणाने येथे सांगितले आहे. रात्री एखाद्या सरोवरात चंद्राचे प्रतिबिंब पडलेले असते. कोणा मनुष्याने जर त्या सरोवरात खडा टाकला तर ते प्रतिबिंब शतखंडित झालेले दिसते. परंतु असे घडले तरी त्याचा चंद्रबिंबावर काहीही परिणाम होत नसतो. हाच विचार पुढे आणखी एक दृष्टान्त देऊन समजावून सांगितला आहे:

**चंद्रस्य मेघसंबंधाद् यथा गमनकल्पना।**
**तथा देहस्य संबंधादारोप्या स्यात् क्रियात्मनः।।१९.३२।।**

आकाशात चंद्र जेव्हा ढगाआड असतो आणि ढग हवेमुळे एका दिशेने सरकत असतात त्यावेळी चंद्र चालतो आहे असा भास होतो. वस्तुतः ढगांच्या तुलनेने चंद्र स्थिर असतो. परंतु ढगांच्या गतीमुळे तो वेगाने पळताना दिसतो. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष अकर्ता असून देखील त्याच्या शरीरामुळे तो कर्म करीत आहे असे भासते. तो इकडून तिकडे गेला तरी त्याने कर्म केले आहे असे वाटते. हे चालणे शरीराचे असते. आत्म्याचे नसते. खरे पाहता आत्मरूपात स्थिर झालेला योगी कुठेही जात येत नसतो. त्याचे शरीर मात्र प्रकृतिधर्माप्रमाणे फिरत असते अथवा

कर्मे करीत असते. रेल्वेने अथवा बसने प्रवास करताना क्षितिजाजवळची झाडे आपल्यासोबत धावताना आपल्याला दिसतात. परंतु ती स्थिर असतात आणि आपली रेल्वे धावत असते. रेल्वेगाडी स्टेशनवर उभी असताना शेजारच्या रूळावरून जर दुसरी गाडी जात असेल तर आपली गाडी चालल्याचा भास होतो. यासारखीच ही स्थिती आहे.

हिंडणे-फिरणे, कर्मे करणे ह्या गोष्टी देहाशी संबंधित आहेत. त्यांचा आत्म्याशी काही संबंध नसतो. आकाशात चंद्र धावतो असे लहान मुले म्हणतात आणि वृद्ध माणसेही म्हणतात. ती वृद्ध झाली तरी त्यांचे ज्ञान लहान मुलांएवढेच असते. ज्ञानी पुरुषांची कर्मे फक्त शरीराकडून घडतात तर अज्ञानी माणसाची कर्मे शरीर+मन+बुद्धी यांच्याकडून घडतात. त्यामुळे योग्याला जो अलिप्तपणा साधलेला असतो तो सामान्य माणसाला साधत नाही.

**ज्ञानी कर्मनिरूढोऽपि लिप्यते न क्रियाफलैः।**
**घृतादिना यथा जिह्वा भोक्त्री चापि न लिप्यते।।१९.३३।।**

ज्ञानी मनुष्य कर्म करतो, परंतु कर्मफळांनी तो लिप्त होत नाही. मनुष्याची जीभ तेलाचा अथवा तुपाचा स्वाद घेते, परंतु ती कधीही तेलकट-तुपकट होत नाही. तेल-तूप खाऊन देखील अलिप्त राहण्याची कला तिला साधलेली असते. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष अकर्तृत्वभावनेने कर्मे करीत असल्याने त्याला कर्मफळांचा लेप लागत नाही.

**तुलसी जगमें यूं रहो। जैसे रसना मुखमाहि।**
**खाती घी और तेल नित। फिर भी चिकनि नाहि।।**

असे संत तुलसीदासांनी तेलतूप खाऊन अलिप्त राहणाऱ्या जिभेचे कौशल्य सांगितले आहे. जो जिभेसारखा वागतो त्याच्या भोवती कर्मफलाचा फास पडत नाही. ज्ञानी पुरुषाचे वर्तन जिभेसारखे असते.

**निरस्तोपाधिसंबंधे जीवे या या क्रियास्थितिः।**
**सा सा प्रतीतिमात्रेण निष्फला चात्र लीयते।।१९.३४।।**

शिवयोगी उपाधिरहित असल्याने अर्थात् त्याने उपाधींचा अभिमान सोडल्यामुळे तो निरुपाधिक झालेला असतो. त्याच्याकडून क्रिया घडताना दिसतात पण त्या साऱ्या निष्फल असतात. त्या क्रियांचे कोणतेही फळ त्याला मिळत नाही. त्याच्या क्रिया लोककल्याणासाठी असू शकतात, परंतु स्वतःसाठी अजिबात नसतात. जर ज्ञानी पुरुषाला कर्मफळ नको असते तर त्याने कर्मच का करावे? असा प्रश्न जिज्ञासूंना पडू शकतो. त्याने काहीच करू नये, निवांत पडून राहावे, कर्म का बरे करावे? असे ज्यांना वाटते त्यांनी पुढील श्लोकात उत्तर दिले आहे.

**गच्छंस्तिष्ठन् स्वपन् वापि न निष्कर्मास्ति कश्चन।**
**स्वभावो देहिनां कर्म ज्ञानिनां तत्तु निष्फलम्।।१९.३५।।**

या जगात कर्मापासून कुणी दूर राहू शकत नाही. कर्म तर प्रत्येकाला करावेच लागते. माणूस चालतो, पाहतो हे कर्मच असते. श्वासोच्छ्वास करतो, डोळ्यांची उघडझाप करतो हे कर्मच होय. कर्म केल्याशिवाय कोणीही क्षणभर राहू शकत नाही, असे गीतेत म्हटले आहे. काही न करता कोणी झोपून राहिला तर झोपणे ही देखील एक क्रियाच आहे. मनुष्य कर्म केल्यावाचून क्षणभरही राहू शकत नाही. कर्म करणे हा शरीराचा स्वभाव आहे.

शरीर बसले, उभे राहिले, झोपले तरी ते सारे कर्मच असते. काही न करणे हे देखील एक प्रकारचे कर्मच असते. कर्मापासून शरीराची सुटका नाही. ज्ञान्यालाही शरीर असते आणि अज्ञान्यालाही शरीर असते. ज्ञान्याचे शरीर कर्मरत असेल तर ज्ञानी आणि अज्ञानी यांच्यात फरक काय? अज्ञानी माणसाला कर्माची फळे भोगावी लागतात आणि ज्ञानी माणसाला ती भोगावी लागत नाहीत, एवढाच त्यांच्यातला फरक आहे. ज्ञानी पुरुषांची कर्मे निष्फल ठरल्याने त्याला पुनर्जन्म घ्यावा लागत नाही. शेवटी या स्थलाचा समारोप करतात:

**परिपूर्णमहानंदभाविन: शुद्धचेतस:।**
**न भवेत् कर्मकार्पण्यं नानाभोगफलप्रदम्।।१९.३६।।**

शिवयोगी हा निर्मल अंत:करणाचा असून नित्य परिपूर्ण आनंद अनुभवत असतो. त्याच्याकडून कर्म घडत असते. परंतु त्या कर्माची फळे त्याला भोगावी लागत नाहीत. सुकर्म असो की दुष्कर्म त्यांच्या फळांपासून शिवयोगी मुक्त असतो. पुण्य-पापांच्या कर्माची पीडा त्याला होत नाही. अशाप्रकारे क्रियानिष्पत्तिस्थलातील शिवयोगी हा कर्मयोगी होतो. फलाविषयी आसक्ती न ठेवता कौशल्याने कर्म करणे हाच कर्मयोग होय. कमळ पाण्यात उगवते. परंतु ते पाण्यापासून अलिप्त असते. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष संसारात राहून देखील संसारापासून अलिप्त असतो. म्हणून या स्थलाला क्रियानिष्पत्तिस्थल असे म्हणतात. या पुढचे स्थल आहे भावनिष्पत्तिस्थल.

## भावनिष्पत्तिस्थल

भावनिष्पत्तिस्थल ज्या मनोवृत्तीत केवळ परमात्माच भरलेला आहे तिला 'भाव' असे म्हणतात. भावनिष्पत्ती म्हणजे भावनेची स्थिरता. ज्या भावनेत चलनवलन नसते आणि जी एका ठिकाणी स्थिर असते तिची अवस्था सांगणारे स्थल म्हणजे भावनिष्पत्तिस्थल होय. हेच जगद्गुरू रेणुकाचार्य पुढील श्लोकात सांगत आहेत.

**भाव: प्रतीयमानोऽपि परकाये तु कल्पित:।**
**शुक्तौ रजतवद् यस्माद्भावनिष्पत्तिमानयम्।।१९.३७।।**

क्रियानिष्पत्तीने परिशुद्ध झालेल्या शिवयोग्याच्या ठिकाणी जो भाव दिसतो तो शिंपल्यामध्ये भासणाऱ्या चांदीसारखा प्रतीत होतो. म्हणून त्याला भावनिष्पत्तीवान असे म्हणतात. त्याच्या भावात विचलन नसून स्थिरता असते. भावनेची स्थिरता सांगणारे स्थल हेच भावनिष्पत्तिस्थल होय.

**भावेन नास्ति संबंध: केवलज्ञानयोगिन:।**
**तथापि भावं कुर्वीत शिवे संसारमोचके।।१९.३८।।**

शरीर, इंद्रिये ही जशी उपाधी आहे तशीच भावना ही देखील एक उपाधी आहे. त्याने शरीराचा अभिमान सोडलेला असतो, परंतु भावनेला मात्र घट्ट धरून ठेवलेले असते. भाव म्हणजे शिवोऽहम्- मी शिव आहे- ही भावना. हा भाव जर उपाधी असेल तर योगी तो जवळ का बाळगतो? म्हणून येथे सांगितले आहे की शिवयोग्याचा शिवाद्वैतभावनेशी काही संबंध नसतो. तरीदेखील त्याने परमात्म्याच्या ठिकाणी भाव ठेवला पाहिजे. भावनेमुळे संसारबंधन पडते आणि भावनेमुळेच संसारातून मुक्ती मिळते. गीतेत म्हटले आहे की, मन हेच बंधाचे आणि मोक्षाचे कारण आहे. मनाची प्रपंचविषयक रती त्याला बंधनात घालते तर त्याची संसारविषयक विरती त्याला मुक्ती मिळवून देते.

शिवयोग्याने भावनेचे जतन का करावे ? याचे एक कारण आहे. जोपर्यंत प्रारब्ध कर्म भोगून संपत नाही तोपर्यंत देह आणि मन यांचे पदर कायम असतात. जर शिवाद्वैतभावनेचा त्याग केला तर कदाचित् दुसरी एखादी भावना उत्पन्न हेण्याची शक्यता असते. भावना अशी दूषित होऊ नये म्हणून शिवयोग्याने सदैव शिवभावना केली पाहिजे. कारण ही भावना संसारमोचक असते.

**परिपूर्ण प्रबोधेऽपि भावं शंभौ न वर्जयेत्।**
**भावो हि निहितस्तस्मिन् भवसागरतारकः।।१९.३९।।**

परिपूर्ण शिवज्ञान झाले तरी शिवयोग्याने शिवभावनेचा त्याग करू नये. या भावनेमुळेच त्याला शिवाद्वैताचे ज्ञान प्राप्त झालेले असते. त्याच्या ठिकाणी संसारसागरातून तारून नेण्याचे सामर्थ्य असते. म्हणून जोपर्यंत शरीरादी उपाधी आहेत तोपर्यंत शिवयोग्याने निरंतर शिवभावना ठेवली पाहिजे.

**निवर्त्य जन्मजं दुःखं भावः शैवो निवर्तते।**
**यथा काष्ठादिकं दग्धवा स्वयं श्याम्यति पावकः।।१९.४०।।**

मानवी जीवनात अनेक दुःखे असतात. किंबहुना, जन्म आणि त्याच्या पाठोपाठ येणारे मरण हे देखील दुःखच असते. या दुःखांपासून शिवभावनेने मुक्ती मिळते. सर्व दुःखांचे निवारण झाल्यावर शेवटी शिवभावना देखील लुप्त होते. लाकूड जाळणारा अग्नी शेवटी स्वतःही नाहीसा होतो त्याप्रमाणे. जोपर्यंत लाकडाचा आधार असतो तोपर्यंत अग्नी अस्तित्वात असतो. परंतु आधार पूर्ण जळून गेल्यावर त्याचे अस्तित्व राहत नाही. तो कुठे जातो हे कळत देखील नाही. तो ज्या अव्यक्तामधून आलेला असतो त्याच अव्यक्तामध्ये परत जातो. त्याप्रमाणे शिवोऽहम् भावना जन्म-मृत्यू इत्यादी सर्व दुःखे जळून लीन होते. त्यानंतर योग्याला विदेहावस्था प्राप्त होते. तो निर्भाव होतो.

**ब्रह्मानंदी लागली टाळी। कोण देहाते सांभाळी ?।।**

अशी त्याची अवस्था होते. कित्येक संत-सत्पुरुषांनी या विदेहावस्थेचा अनुभव घेतला आहे, हे त्यांच्या चरित्रावरून दिसून येते. ही स्थिती प्राप्त करून घेण्यासाठी मी शिव आहे ही भावना करावी लागते. भावना हळूहळू दृढ होत गेली की मग विदेहस्थिती प्राप्त होते त्यावेळी भावनेचे प्रयोजन राहत नाही. प्रारंभी संसाराकडून भावना वळवून ती परमात्म्याकडे स्थिर करावी लागते. ती भावना सर्व दुःखे नाहीशी करून लीन होते.

**प्रकाशिते शिवानंदे तद्भावैः किं प्रयोजनम्।**
**सिद्धे साध्ये चिरेणापि साधनैः किं प्रयोजनम्।।१९.४१।।**

एखादे साध्य साधायचे असल्यास त्यासाठी साधनाची गरज असते. साध्य सिद्ध झाल्यावर मग साधनांची आवश्यकता उरत नाही. विद्यार्थी परीक्षेपूर्वी सर्व पुस्तके जवळ घेऊन अभ्यास करीत बसतो आणि परीक्षा संपल्यावर ती पुस्तके दूर ढकलून देतो. त्या पुस्तकातील विषयांचे पुन्हा पुन्हा स्मरण करण्याचे काहीही कारण राहत नाही. त्याप्रमाणे शिवाद्वैताचा आनंद शिवभावनेमुळे मिळतो. तो आनंद प्राप्त झाल्यावर भावनेचे काही प्रयोजन उरत नाही. भाव विलीन झाल्यावर त्याची स्थिती कशी होते हे पुढील श्लोकात सांगतात:

**एकीकृते शिवे भावे ज्ञानेन सह संयमी।**
**विस्मितात्मसमावेश: शिवभावे विभासते।।१९.४२।।**

भाव वेगळा असतो त्यावेळी भावनेलाच शिवाचा आकार द्यावा लागतो, ती शिवाकार करावी लागते. पुढे भाव दृढ झाल्यावर शिव आणि भावना एकाकार होते, त्यांच्यामध्ये द्वैत राहत नाही. ज्ञानामुळे शिव आणि भाव एकरूप झाल्यावर त्यावेळी शिवयोगी स्वत:ला विसरून शिवभावात लीन होतो. तो शिवच होतो. या स्थलाचा शेवटी समारोप करतात:

**न भावेन विना ज्ञानं न भावो ज्ञानमंतरा।**
**मोक्षाय कारणं प्रोक्तं तस्मादुभयमाश्रयेत्।।१९.४३।।**

भाव नसेल तर ज्ञान होत नाही आणि ज्ञान नसेल तर भाव होत नाही. ज्ञान आणि भावना ही दोन्ही मुक्तीची साधने होत. प्रथम सत्–चित–आनंद स्वरूप अशा शिवाचे ज्ञान प्राप्त होते आणि नंतर 'तो शिव मीच आहे' अशी दृढ भावना करावी लागते. भावनेचे दृढीकरण झाले की शिवाद्वैत ज्ञान प्राप्त होते. ज्ञानामुळे भावना आणि भावनेमुळे ज्ञान होते. ज्ञानामुळे भावना आणि भावनेमुळे ज्ञान असा हा संबंध आहे. मोक्षासाठी या दोन्हींची आवश्यकता असते. म्हणून साधकाने या दोन्ही साधनांचा उपयोग करावा असे या स्थलात सांगितले आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२१ नोव्हेंबर १९९४

---

**आशीर्वचन चौथे**

## ज्ञाननिष्पत्तिस्थल, पिंडाकाशस्थल

### ज्ञाननिष्पत्तिस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज ज्ञाननिष्पत्तिस्थलाचे विवरण करायचे आहे. परिसमाप्ती आणि परिपूर्णता असे 'निष्पत्ती' या शब्दाचे अर्थ आहेत. येथे एका ज्ञानाची समाप्ती होते तर दुसरे ज्ञान परिपूर्ण होते. लौकिक व्यवहाराचे ज्ञान समाप्त होते आणि आत्मस्वरूपाचे ज्ञान परिपूर्ण होते. या स्थितीचे वर्णन करणारे हे ज्ञाननिष्पत्तिस्थल होय. जगद्गुरू रेणुकाचार्य अगस्त्य मुनींना निमित्त करून जगातील सर्व मानवांना उपदेश करीत आहेत:

**ज्ञानस्य व्यवहारेऽपि ज्ञेयाभावात् स्वभावत:।**
**स्वप्नवज्ज्ञाननिष्पत्त्या ज्ञाननिष्पन्न इत्यसौ।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.४४)

ज्ञान स्वतंत्र नसते, त्याला ज्ञेयाची गरज असते. व्यवहारातही तुम्ही कुणाला विचारले की, 'मला ज्ञान मिळवायचे आहे' तर तो तुम्हाला विचारील की 'कशाचे ज्ञान? कोणत्या विषयाचे ज्ञान?' ज्ञान ही एक प्रक्रिया

आहे. ज्ञेयाचे ज्ञान ज्ञाता मिळवत असतो. म्हणून ज्ञेय हे ज्ञानाचा आधार असतो. ज्ञेय म्हणजे तुम्ही ज्याचे ज्ञान मिळवू इच्छिता ती वस्तू. ज्ञेयच नसेल तर ज्ञान कशाचे मिळवणार? जागृत अवस्थेत समोरील वस्तूंचे ज्ञान मनुष्य घेत असतो तर स्वप्नावस्थेत स्वप्नातील वस्तूंचे ज्ञान घेत असतो. स्वप्नावस्थेतून बाहेर येताना स्वप्नातील वस्तू नष्ट झाल्याने स्वप्नातील ज्ञानही नष्ट होते. एखादा भिक्षुक देखील स्वप्नात आपण राजा झालो हे पाहत असतो. त्यावेळी तो हत्तीवर अंबारीत बसून मिरवणुकीत सामील होत असतो; दरबारात सिंहासनावर बसलेला असतो. त्याच्या भोवती सुंदर दासी चवऱ्या ढाळीत उभ्या असतात. त्याची एखादी लाडकी पट्टराणी असते. परंतु जेव्हा तो जागा होतो तेव्हा हत्ती, सिंहासन, दासी, राणी हे सारे नाहीसे झालेले असते. स्वप्न संपले की स्वप्नज्ञानही नष्ट होते. त्याप्रमाणे प्रपंच आणि प्रपंचव्यवहार हे देखील एक दीर्घ स्वप्न आहे असे ज्ञानी लोक मानतात. झोपेत पडलेले स्वप्न अल्पकालीन असते. त्या स्वप्नातील दृश्य सारखे बदलत असते. परंतु मानवी जीवन हे असे दीर्घ स्वप्न आहे, की जे मृत्यूपर्यंत आपण पाहत असतो. आत्मज्ञानी मनुष्य प्रपंचाला प्रपंचरूपात न पाहता परमात्मरूपात पाहतो. अशाप्रकारे प्रपंचज्ञान नष्ट होऊन परमात्मज्ञान स्थिर होणे यालाच ज्ञाननिष्पत्ती म्हणतात. हेच पुढील श्लोकात स्पष्ट केले आहे:

**स्वप्नजातं यथा ज्ञानं सह स्वार्थैर्निवर्तते।**
**तथात्मनि प्रकाशे तु ज्ञानं ज्ञेयं निवर्तते।।१९.४५।।**

स्वप्नातून जागे झाल्यावर ज्याप्रमाणे स्वप्नपदार्थ व त्यांचे ज्ञान नष्ट होते, त्याप्रमाणे आत्मज्ञान प्रकाशित झाल्यावर प्रपंचातील पदार्थ व त्यांचे ज्ञान दोन्हीही विलय पावतात. ज्ञान आणि ज्ञानाचा आधार असे ज्ञेय दोन्हींचा विलय होतो.

**परिपूर्णे महानंदे परमाकाशलक्षणे।**
**शिवे विलीनचित्तस्य कुतो ज्ञेयान्तरे कथा।।१९.४६।।**

ज्ञानी पुरुषाला व्यावहारिक प्रपंच का दिसत नाही? तोही शरीरधारी असून या प्रपंचातच राहत असतो. त्याला हा प्रपंच दिसत कसा नाही, हे या श्लोकात स्पष्ट केले आहे. प्रपंच सर्वांना दिसावा असा काही नियम नाही. जो पाहतो त्यालाच तो दिसतो. जो पाहत नाही त्याला तो दिसत नाही. तुमचे डोळे उघडे आहेत तर तुम्हाला प्रपंच दिसतो आहे, जर तुम्ही डोळे बंद करून घेतले तर तो जबरदस्तीने तुम्हाला पाहायला लावील का?– मी आहे, तुम्हाला पाहावेच लागेल, असे म्हणेल का? एक इंद्रिय बंद केले तर समोरचा प्रपंच अदृश्य होतो. तुम्ही कान बंद करून घेतले तर आम्ही कितीही जोरजोराने प्रवचन केले तरी तुम्हाला एकही शब्द ऐकू येणार नाही. तुमच्यापुरती आवाजाची दुनिया नाहीशी होईल.

कान बंद केले तर शब्दज्ञान नाहीसे होते. डोळे बंद केले तर रूपज्ञान नष्ट होते. जोपर्यंत जिव्हेला खाद्यपदार्थांचा स्पर्श होत नाही तोपर्यंत त्याची चव कळत नाही. पदार्थ स्वादिष्ट आहे की कडू आहे, की गोड आहे हे कळत नाही. पदार्थ समोर असून देखील त्याचे रुचिज्ञान आपल्याला होत नाही. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पंचविषयांशी इंद्रियांचा व मनाचा संबंध आला तरच त्यांचे ज्ञान होते. अन्यथा होत नाही. इंद्रिय आणि विषय यांचा संबंध होऊनही जर मन त्यांच्याशी जोडलेले नसेल तर त्यांचे ज्ञान होत नाही. सामान्य माणूस डोळे बंद करून प्रपंच पाहणे नाकारतो. परंतु ज्ञानी मात्र असे करत नाही. त्याची सर्व इंद्रिये कार्यरत असतात. पण त्याचे मन मात्र प्रपंचाभिमुख नसून ईश्वराभिमुख असते. त्याची मनोवृत्ती बहिर्मुख नसून अंतर्मुख असते. त्याचे

डोळे प्रपंच पाहत असतात. पण प्रपंच त्याच्या मनात शिरत नसतो. मनुष्य एखाद्या विचारात गढलेला असला तर तो एखाद्या दिशेला एखाद्या वस्तूकडे टक लावून पाहत असतो. परंतु त्याच्या डोळ्यासमोर दुसरेच काहीतरी असते. अशा मनुष्याच्या समोरून एखादी व्यक्ती आली-गेली तरी त्याला ती दिसत नसते. रस्त्यात चालताना तुम्ही कितीतरी वस्तूंकडे पाहत असता. पण हे पाहणे वरवरचे असते. त्या पाहण्यात मन असेल तरच पाहिलेली वस्तू अथवा व्यक्ती आठवणीत राहते. ज्या वस्तूचे स्मरण तुम्हाला राहते ती वस्तू तुम्ही मन:पूर्वक पाहिली आहे असे समजावे. जी वस्तू पाहिल्यावर तिचा मनावर संस्कार होत नाही ती पाहून न पाहिल्यासारखीच असते. हाच विचार या ठिकाणी सांगितला आहे.

परिपूर्ण, महानंदस्वरूप, परमाकाशरूप अशा परशिवात शिवयोग्याचे चित्त लीन झाल्यामुळे त्याने जाणून घ्यावा असा कोणताही पदार्थ नसतो. तो केवळ परशिवाला पाहत असतो. म्हणून त्याला प्रपंच दिसत नसतो. त्याची चित्तवृत्ती प्रपंच बघण्यासाठी बाहेर येत नसते आणि बाहेर आलीच तर तिला सर्व प्रपंच शिवमय दिसत असतो. म्हणून सामान्य माणूस ज्या दृष्टीने प्रपंच पाहतो आणि त्याला प्रपंच ज्या रूपात दिसतो त्या दृष्टीने आणि तशा रूपात शिवयोगी प्रपंच पाहात नसतो. मग त्याला ज्ञान कसे आणि कोणते होते हे पुढील श्लोकात सांगितले आहे:

**अखंडानंदसंवित्तिस्वरूपं ब्रह्म केवलम्।**
**मिथ्या तदन्यदित्येषा स्थितिर्ज्ञानमिहोच्यते।।१९.४७।।**

परब्रह्म हे अखंड, आनंदरूप व संवित्तिरूप आहे. त्याच्याशिवाय भिन्न असलेले सर्व मिथ्या आहे असे शिवयोगी जाणतो. म्हणून त्याचे ज्ञान सर्वत्र शिवरूप पाहणारे असते. तो प्रपंचाकडे पाहतो तेव्हा प्रपंच त्याला शिवरूप दिसतो. हा घट आहे, हा पट आहे असे भेदज्ञान त्याच्याजवळ राहत नाही. सर्व काही परब्रह्मरूप आहे- 'सर्वं खलु इदं ब्रह्म'-हीच त्याची भावना असते. प्रपंचातदेखील परब्रह्मच असते. हे पुढील श्लोकात स्पष्ट केले आहे.

**सत्तात्मनाऽनुवृत्तं यद् घटादिषु परं हि तत्।**
**व्यावर्तमाना मिथ्येति स्थितिर्ज्ञानमिहोच्यते।।१९.४८।।**

सत् म्हणजे अस्तित्व. प्रपंचातील प्रत्येक वस्तूमध्ये सत् भरून राहिले आहे. आपण भाषेत 'आहे' या क्रियापदाने अस्तित्व सूचित करीत असतो. तो आहे, मी आहे, अमूक वस्तू आहे इत्यादी. फुले अनेक असली तरी त्यांना ओवणारा धागा एकच असतो त्याप्रमाणे प्रपंचात नानाविध वस्तू असल्या तरी त्यांच्यामध्ये अस्तित्वाचा समान धागा असतो. अस्तित्व हे परब्रह्माचे असते. परंतु प्रपंचातील वस्तूवर ते भासमान होत असते. म्हणून वस्तू खरोखर अस्तित्वात आहे असे आपल्याला वाटत असते. परब्रह्माचे सत्‌रूपच प्रपंचाच्या रूपात आपण पाहत असतो. परब्रह्माच्या सत्-चित् व आनंद अशा तीन रूपांचे ज्ञान मनुष्याला जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांत होत असते. जेव्हा तो जागा असतो तेव्हा प्रपंचाच्या रूपात तो परमेश्वराचे सद्रूप पाहत असतो. स्वप्नावस्थेत तो परमेश्वराचे अर्थात् आपल्या आत्म्याचे चिद्रूप (चित्‌रूप) पाहत असतो. स्वप्नात कुठलाही बाह्य प्रकाश नसताना मनुष्य स्वप्न पाहत असतो. त्याला स्वप्न दिसत असते ते आत्मप्रकाशामुळे. अर्थात् चिद्रूपामुळे सुषुप्ति-अवस्थेत म्हणजे गाढ निद्रेत परमात्म्याच्या आनंदरूपाची अनुभूती मनुष्याला येत असते. गाढ झोपेतून जागे झाल्यावर आपण किती आनंदात होतो, याची जाणीव आपल्याला होते. गाढ निद्रेतला आनंद काही केल्यामुळे मिळत नाही तर सर्व काही सोडून दिल्यामुळे मिळतो. कारण गाढ निद्रेत मनुष्य काहीच करीत नसतो.

जगव्यवहार करीत नसतो आणि स्वप्नदेखील पाहत नसतो. खाद्यपदार्थ खाल्ल्यामुळे, सौंदर्यदृश्य पाहिल्यामुळे अथवा जिवलग व्यक्तीला भेटल्यामुळे होणारा आनंद मात्र निरूपाधिक असतो. त्यात ऐकणे, स्पर्श करणे, पाहणे, चाखणे, हुंगणे इत्यादी कोणतीही क्रिया घडत नसते. त्यावेळी केवळ आत्मानंदाचा अनुभव येत असतो.

अशाप्रकारे जागृतावस्थेत प्रपंचरूपाने परमात्म्याचे सत्‌रूप, स्वप्नावस्थेत त्याचे चित्‌रूप आणि सुषुप्ति-अवस्थेत त्याचे आनंदरूप मनुष्य अनुभवत असतो. परंतु अज्ञानामुळे त्याला ही परमात्म्याची रूपे आहेत हे कळत नसते, एवढेच. हेच या श्लोकात सांगत आहेत. प्रपंचातील घट इत्यादी सर्व वस्तूंत जे तत्त्व अनुस्यूत आहे ते परब्रह्मच होय. सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी ते सद्‌रूप होते आणि प्रपंचरूपात ते आपले अस्तित्व दाखवत आहे. तेच एक सत्य आहे. ते सोडून सर्व पदार्थांची नामरूपे मिथ्या आहेत. एक पदार्थ दुसऱ्याला व्यावृत्त करीत असतो. हे पेन आहे, हे पुस्तक नव्हे- अशाप्रकारे एक पदार्थ नाकारून दुसऱ्या पदार्थाचे ज्ञान आपण करून घेत असतो. परंतु परब्रह्म हे एकमेव असते. प्रपंचरूपाने तेच प्रकाशित होत असते. इतर पदार्थांची नामरूपे आभासमय असतात. नामरूप दूर सारून परब्रह्माचे सत्यरूप ओळखणे हेच खरे ज्ञान होय.

**अकारणमकार्यं यदशेषोपाधिवर्जितम्।**
**तद् ब्रह्म तदहं चेति निष्ठा ज्ञानमुदीर्यते।।१९.४९।।**

परमात्मा कसा आहे? तर तो अकारण, अकार्य आहे. तो सर्व उपाधींपासून मुक्त असा निरुपाधिक आहे. कार्यकारण भावविहीन सर्व उपाधीविरहित जे परब्रह्म आहे तेच मी आहे आणि तेच चराचर प्रपंचही आहे, अशी दृढ निष्ठा हेच उत्तम ज्ञान होय. निष्ठा अत्यंत महत्त्वाची असते. निष्ठेसाठी स्वाती नक्षत्रातील जलबिंदूचे उदाहरण दिले जाते. स्वाती नक्षत्रातला पाऊसथेंब शिंपल्यामध्ये पडतो आणि नंतर त्याचे मोत्यात रूपांतर होते. एकदा थेंबाचा मोती झाला की पुन्हा मोत्याचा थेंब होत नाही. निष्ठा अशीच असते. मी परब्रह्मरूप आहे अशी निष्ठा दृढ झाली की मग मी मनुष्य आहे अशी भावना त्या ठिकाणी उत्पन्न होऊच शकत नाही. या स्थलाचा समारोप करताना शेवटी सांगतात:

**ज्ञाताप्यहं ज्ञेयमिदमिति व्यवहृतिः कुतः।**
**अभेदब्रह्मस्वारस्ये निरस्ताखिलवस्तुनि।।१९.५०।।**

ज्या वेळी प्रापंचिक भेदरहित अशा अद्वितीय परब्रह्माशी शिवयोगी एकरूप होतो तेव्हा त्यावेळी संपूर्ण वस्तूंचा निरास होतो. त्याची मनोवृत्ती कोणताही पदार्थाकार धारण करीत नाही. ती परब्रह्माकार झालेली असते. अशावेळी मी ज्ञाता आहे, परब्रह्म हे ज्ञेय आहे असा व्यवहार संभवत नाही. ज्ञान घेणारा आणि ज्ञेय वस्तू शिल्लक राहत नाही. अशाप्रकारे व्यावहारिक ज्ञानाची निवृत्ती आणि आत्मज्ञानाची प्राप्ती यांचे वर्णन करणारे हे ज्ञाननिष्पत्तिस्थल आहे.

### पिंडाकाशस्थल

**यथा पिंडस्थ आकाशस्तथात्मा पूर्ण उच्यते।**
**एतदर्थविवेको यः पिंडाकाशस्थलं विदुः।।१९.५१।।**

आकाश सर्वत्र व्याप्त असते. ते घरात असते, मठात असते, घटात असते आणि बाहेर देखील असते. घर, मठ आणि घट या उपाधीने युक्त असून देखील ते एकच असते. घरातले आकाश वेगळे आणि बाहेरचे आकाश

वेगळे असे म्हणता येत नाही. आकाशाचे तुकडे पडलेले नसतात. त्याप्रमाणे सर्व प्राणिमात्रांच्या अंतरंगात आत्मरूपाने जे चैतन्य वसत असते ते वस्तुत: एकच असते. आत्मा हा पिंडात म्हणजे देहात जरी राहत असला तरी तो परिपूर्णच आहे, असे ज्ञान ज्याला असते त्याला 'पिंडाकाशी' म्हणतात आणि ज्यामध्ये याचे विवरण केलेले असते त्या स्थलाला 'पिंडाकाशस्थल' असे म्हणतात.

आत्मा एकच असतो, परंतु तो प्रत्येक देहात वेगळा भासत असतो. आकाशातल्या एकाच चंद्राची पाण्याने भरलेल्या घड्यांत जशी अनेक प्रतिबिंबे दिसतात त्याप्रमाणे. हे जो जाणतो तो पिंडाकाशी होय.

**घटोपाधिर्यथाकाश: परिपूर्ण: स्वरूपत:।**
**तथा पिंडस्थितो ह्यात्मा परिपूर्ण: प्रकाशते।।१९.५२।।**

अनेक घटांमध्ये आकाश असते. परंतु आकाशाचे तुकडे पडलेले नसतात. त्याप्रमाणे प्रत्येक पिंडात (शरीरात) जीवात्मा असतो. अज्ञानामुळे तो स्वत:ला दुसऱ्यापासून वेगळा मानतो. अनेक पिंडामध्ये अनेक जीवात्मे आहेत अशी त्याची समजूत असते. परंतु ज्याला आत्मज्ञान झालेले असते त्याला मात्र प्रत्येक पिंडात आत्मरूपाने आपणच आहोत याची जाणीव असते. अनेक घटांमध्ये असलेले आकाश जसे एकच असते त्याप्रमाणे सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात विराजमान असलेला आत्मा एकच असून तो आपण आहोत असा ज्याला अनुभव येतो त्याला पिंडाकाशी म्हणतात.

**अंत:स्थितं पराकाशं शिवमद्वैतलक्षणम्।**
**भावयेद् य: सुमनसा पिंडाकाश: स उच्यते।।१९.५३।।**

हृदयातील पराकाशरूपी अद्वितीय अशा परशिवाचे जो शुद्ध मनाने ध्यान करतो त्याला पिंडाकाशी म्हणतात. ज्याचे मन शुद्ध नसते त्याला अद्वैतभावनेचा अनुभव येणे शक्य नाही. अज्ञानी मनुष्य एकाला अनेक रूपांमध्ये पाहतो तर ज्ञानी मनुष्य अनेकाला एका रूपात पाहतो. यामुळेच अज्ञानी मनुष्य दु:खी असतो आणि ज्ञानी मनुष्य आनंदी. दु:ख आणि भय द्वैतामुळे निर्माण होते. आपल्यापेक्षा कुणी वेगळा असला तर त्याचे भय वाटते आणि त्याच्या वर्तनामुळे दु:ख होते. ज्याच्या हृदयात परमात्म्याचा नित्य निवास असतो आणि ज्याच्या दृष्टीत अद्वैत भरून राहिलेले असते त्याला कुणाचे भय नसते की कशाचे दु:ख. सर्व पिंडांमध्ये एकच परमात्मा निवास करीत असून सर्व प्रपंचात तोच व्याप्त आहे. तो परिपूर्ण परमात्मा आपल्या हृदयात आहे असे ज्ञान झालेला शिवयोगीच पिंडाकाशी होय. आपल्या पिंडातच तो पराकाशरूप परमात्म्याचे दर्शन घेत असतो. त्याच्या पिंडाचे महत्त्व सांगतात:

**शिवागारमिदं प्रोक्तं शरीरं बोधदीपितम्।**
**षट्त्रिंशत्तत्त्वघटितं सुमन:पद्मपीठकम्।।१९.५४।।**

ज्या पिंडात म्हणजे शरीरात ज्ञानी पुरुषाला साक्षात्कार झालेला असतो त्या पिंडालाही आगळे महत्त्व असते. विटा, सिमेंट, लाकूड, लोखंड इ. सामग्री घर बांधण्यासाठीही लागते आणि मंदिरनिर्मितीसाठीही लागते. ज्या वास्तूत भगवंताच्या मूर्तीची प्रतिष्ठापना होते तिला 'मंदिर' आणि ज्या वास्तूत माणूस संसार उभा करतो तिला 'घर' म्हणतात. मंदिराविषयी जशी श्रद्धाभावना असते तशी घराविषयी नसते. बऱ्याच वेळा भक्त मंदिरातील मूर्तीचे दर्शन न घेता कळसाचेच दर्शन दुरून घेतो. मंदिराला नमस्कार केला जातो आणि त्याच्या भोवती प्रदक्षिणा

घातली जाते. मंदिराविषयी असा पूज्यभाव लोकांच्या मनात का निर्माण झाला? मंदिरापेक्षाही अधिक भव्य, अधिक खर्च करून घर बांधलेले असले तरी त्याला कोणी नमस्कार करत नाही. याचे एकच कारण आहे- मंदिरात भगवंताचा निवास असतो आणि घरात माणसांचा. या जगात असंख्य शरीरधारी जीव आहेत, परंतु त्यांच्या शरीराची पूजा केली जात नाही. गुरूच्या, शिवयोग्याच्या शरीराची मात्र पूजा केली जाते. महात्म्याच्या वास्तव्याने एखादी वास्तू पवित्र ठरते त्याप्रमाणे आत्मसाक्षात्कारी जीव ज्या शरीरात राहतो ते शरीर देखील पूज्य ठरते. असामान्य वस्तूच्या संगतीने सामान्य वस्तूही असामान्य ठरावी त्याप्रमाणे येथे घडते. दुधात पाणी मिसळले तर त्या पाण्याला दुधाची किंमत येते. फुले मातती पडली तर ती मातीला सुगंधित करतात. 'फुलासंगे मातीस वास लागे' अशी मराठीमध्ये एक म्हण आहे. त्याप्रमाणे सर्वांची शरीरे सारखी असली तरी ज्ञानी पुरुषाचे शरीर आत्मतेजाने झळाळून गेल्यामुळे ते पूजनीय ठरते. म्हणून शिवयोग्याचे शरीर हे शिवालय मानले जाते. आपल्या हृदयात परब्रह्माचा साक्षात्कार करून घेतलेल्या पिंडाकाशस्थली शिवयोग्याचे शरीर शिवालय बनलेले असते.

मंदिरात अखंड नंदादीप तेवत असतो तो यासाठी की परमात्मा ज्योतिस्वरूप आहे हे लोकांना कळावे. शिवयोग्याचे शरीर शिवालय असते आणि त्याच्या हृदयात ज्ञानाची ज्योत सतत तेवत असते. छत्तीस तत्त्वांनी बनलेल्या त्याच्या शरीरात राहणारे शुद्ध मन हेच भगवंताचे पीठ असते. याप्रमाणे शिवयोग्याचे शरीर हेच शिवालय असून त्याचे शुद्ध मन हे भगवंताचे आसन असते आणि त्याच्या हृदयातील ज्ञानज्योत हाच तेथील नंदादीप असतो. मंदिरात नित्य जाणाऱ्या मनुष्याचे शरीर हेच एक दिवस मंदिर बनावे अशी अपेक्षा पूर्वसूरींनी केली आहे. गीतेत देखील ज्ञानी पुरुषाच्या शरीराला 'क्षेत्र' असे म्हटले आहे. क्षेत्र म्हणजे तीर्थक्षेत्र. जेथे भगवंताचा नित्य निवास असतो तेच तीर्थक्षेत्र असते. आयुष्यभर तीर्थयात्रा करून जर आपल्या देहाला तीर्थक्षेत्र बनवता आले नाही तर त्या तीर्थयात्रेचा काय उपयोग? म्हणून देहाचेच मंदिर झाले पाहिजे. ही जाणीव करून देण्यासाठीच गळ्यात इष्टलिंग धारण करावे असे वीरशैव सिद्धान्तात सांगितले आहे. हृदयावर ज्या ठिकाणी बाहेरून इष्टलिंग धारण केले जाते त्याच ठिकाणी अंतरंगात प्राणलिंग व भावलिंग असते हे वीरशैवाने ध्यानात घ्यायचे असते. इष्टलिंगात शिवाला पाहता पाहता अंतरंगात शिव प्रकाशमान होतो आणि त्याचे शरीर देवालय बनून राहते. शिवयोगी तृप्त झाल्यावर शिव तृप्त होतो, असे का म्हटले जाते? तर ज्याच्या भावनेत अंतर्बाह्य शिवच शिव भरून राहिलेला असतो त्याची तृप्ती म्हणजे प्रत्यक्ष शिवाचीच तृप्ती होय हे आपल्याला समजावे म्हणून.

**पराकाशस्वरूपेण प्रकाशः परमेश्वरः।**
**हृदाकाशगुहालीनो दृश्यतेऽन्तः शरीरिणाम्।।१९.५५।।**

ज्याचे शरीर शिवालय झालेले असते त्याच्या हृदयाच्या गुहेत परब्रह्मरूप चिदाकाश लीन झालेले असते. गुहेत जसे आकाश विलीन झालेले असते त्याप्रमाणे त्याच्या हृदयरूपी गुहेत परमात्मा विलीन झालेला असतो.

**एतच्छिवपुरं प्रोक्तं सप्तधातुसमावृतम्।**
**अत्र हृत्पंकजं वेश्म सूक्ष्मांबरमनोहरम्।।१९।।**
**तत्र सन्निहितं साक्षात् सच्चिदानंदलक्षणम्।**
**नित्यसिद्धः प्रकाशात्मा जलस्थाकाशवच्छिवः।।१९.५६-५७।।**

शिवयोग्याचे सप्तधातूंनी युक्त असे शरीर जणू एक पूर-नगर आहे. पुरामध्ये राहतो तो पुरुष. या शिवपुरात शिव

राहतो. म्हणून शरीर ही शिवाची राजधानी आहे. त्यातील हृदयकमल हेच राजगृह-निवासस्थान होय. त्यात जे सूक्ष्म आकाश आहे तेच अंत:पुर आहे. त्यात नित्य परिपूर्णतेने सत्-चित्-आनंदस्वरूप परशिव पाण्यात दिसणाऱ्या आकाशाप्रमाणे प्रकाशमान होऊन स्थित आहे. हृदयातून परमात्मा कधीच बाहेर जात नाही. जे सर्वत्र व्याप्त असते ते कुठेही जात-येत नाही. ते सर्व ठिकाणी नित्य वास्तव्याला असते. पाण्यात आकाश दिसते तसेच पाण्याबाहेर देखील ते असते. त्याप्रमाणे विश्वव्यापक परमात्मा शिवयोग्याच्या हृदयात परिपूर्णतेने वास्तव्य करून असतो. या स्थलाचा शेवटी समारोप करतात:

**अंतराकाशबिंबस्थमशेषोपाधिवर्जितम्।**
**घटाकाश इवच्छिन्नं भावयेच्चिन्मयं शिवम्।।१९.५८।।**

बाहेरचे महाकाश घट-मठ इत्यादी उपाधींमुळे भिन्न व खंडित भासते. उपाधी नष्ट झाल्यावर आकाश एकच दिसते. त्याप्रमाणे सर्व उपाधिरहित, चिन्मय असा परशिव हृदयाकाशात स्थित होऊन उपाधीमुळे परिच्छिन्न दिसतो, असे जाणले पाहिजे. पिंडाकाशस्थलात एक अवस्था वर्णिली आहे.

शरीर हे मंदिर आहे, हृदयपीठ हे परमात्म्याचे निवासस्थान आहे, ज्ञानरूपी नंदादीप त्याच्यासमोर अखंड तेवत आहे. बाहेर कितीही मंदिरे पाहिली, तरी एक दिवस मनुष्याला आपल्या देहमंदिरातील भगवंताला ओळखावे लागते. यासाठी मनोवृत्ती अंतर्मुख करावी लागते. भगवंत कोणाला नको असतो? प्रत्येकाला हवा असतो. चोर-दरोडेखोराला देखील भगवंत पाहिजे असतो. परंतु अंत:करण मलिन असल्याने त्याला हृदयस्थ भगवंताचा साक्षात्कार होत नाही. कधीतरी मनुष्याला अंतस्थ भगवंताची ओळख व्हावी, या उद्देशानेच संत-महात्म्यांनी गावागावात मंदिरांची स्थापना केली. पण खरे भगवद्दर्शन होते ते आपल्या अंतरंगातच. अंतरंगातील भगवंताचा साक्षात्कार झाला की मग सर्वत्र भगवंत दिसू लागतो. प्रत्येकाचे शरीर हे भगवंताचे मंदिर आहे हे जेव्हा माणसांना उमगेल तेव्हा शरीर-मंदिराची मोडतोड कोणी करणार नाही. दुसऱ्याला दु:ख, पीडा देण्याची वृत्ती सहज नष्ट होईल. मातृदेवो भव, पितृदेवो भव, अतिथी देवो भव यासारखेच एक वचन आहे- परस्पर देवो भव. एकमेकांच्या ठिकाणी ईश्वर पाहायला शिका, हा याचा अर्थ होय. बाह्य मंदिरातील देवांच्या मूर्ती, रूपे वेगवेगळी आहेत. परंतु शरीररूपी मंदिरांतील आत्मा मात्र एकच आहे. अशा आत्मबुद्धीने सर्वत्र पाहणाऱ्या दृष्टीचे पिंडाकाशस्थलात विवरण केले आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२२ नोव्हेंबर १९९४



# बिंद्वाकाशस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आपण षट्स्थलांतील उपस्थलांचा विचार करीत आहोत. यापुढे अधिकाधिक सूक्ष्म शब्दांत परशिवाचे वर्णन केले आहे. आतापुढील स्थल आहे बिंद्वाकाशस्थल. सृष्टिनिर्मितीपूर्वी सर्व सृष्टी मयूरांडरसन्यायाने (मोराचे सर्व अवयव त्याच्या जन्माआधी अंड्यात बीजरूपाने असतात त्याप्रमाणे) ज्यात सामावलेली असते अशा बृहत्तत्त्वाला या ठिकाणी 'बिंदू' असे म्हटले आहे. नाद, बिंदू, कला हे तीन शब्द तुमच्या कानावर केव्हातरी पडले असतील. गुरूच्या वर्णनात 'नादबिंदुकलातीतम्' असे शब्द येतात. नाद व बिंदू हे शिव आणि शक्ती यांचे वाचक शब्द आहेत. शिव आणि शक्ती हे शब्द स्थूल आहेत. सृष्टिनिर्मिती होत असताना त्यांना शिव-शक्तीचे रूप लाभते. सृष्टिनिर्मितीआधी त्या तत्त्वांना नाद व बिंदू या शब्दांनी संबोधिले जाते. कुठे कुठे 'नाद' याचा अर्थ शिव आणि 'बिंदू' याचा अर्थ शक्ती असा सांगितला गेला, तर काही ठिकाणी 'नाद' म्हणजे शक्ती आणि बिंदू म्हणजे शिव असेही स्पष्टिकरण केलेले आहे. याचा अर्थ इतकाच की या दोहोत भेद नाही. नाद व बिंदू ही दोन भिन्न तत्त्वे नसून ते एकच तत्त्व आहे. एका नाण्याला दोन बाजू असतात त्याप्रमाणे शिव आणि शक्ती एकाच तत्त्वाची दोन रूपे आहेत. नादाशिवाय बिंदू आणि बिंदूशिवाय नाद राहू शकत नाही. चंद्र आणि चंद्रिका (प्रकाश), फूल आणि गंध जसे एकरूप असतात त्याप्रमाणे नाद आणि बिंदू एकरूप आहेत. याच तत्त्वाला सृष्टिनिर्मितीनंतर 'शिवशक्ती' या नावाने संबोधिले जाते.

नाद आणि बिंदू यांच्या आश्रयाने निर्माण झालेली सृष्टी हीच 'कला' होय. एखादे सुंदर चित्र पाहताना तुम्ही सहज उद्गार काढता- किती सुंदर कला आहे! कलावंताच्या अमूर्त भावनांचा मूर्त आविष्कार म्हणजे कला. देव-देवतांची जी चित्रे आहेत ती कलावंतांनी रेखाटली आहेत. त्यांच्या अमूर्त भावनाच चित्ररूपात मूर्त झालेल्या आहेत. याला आपण 'कला' म्हणतो. ही अवघी सृष्टी नाद-बिंदूरूप शिवशक्तीत अमूर्त होती तीच पुढे जगत्रूपात व्यक्त झाली. म्हणून 'कला' याचा अर्थ सृष्टी, चराचर विश्‍व. नाना रूपरंगांनी नटलेले चराचर विश्‍व म्हणजे शिवशक्तीची एक सुंदर कलाकृतीच होय.

शिवाचे सूक्ष्म रूप या अर्थाने येथे 'बिंदू' हा शब्द योजिलेला आहे. बिंदू हा नादयुक्त आहे. बिंदूरूप परमात्म्याचे स्वरूप स्पष्ट करताना आकाशाचे उदाहरण दिले जाते. कारण आकाश हे सूक्ष्म तत्त्व असल्यामुळे ते थोडेसे परमात्मतत्त्वाशी मिळते-जुळते आहे. प्रत्येकाच्या हृदयात बिंदुरूपाने राहणाऱ्या शिवाची ओळख बाह्य आकाशाचे उदाहरण देऊन येथे करून दिलेली आहे. म्हणून या स्थलाला 'बिंद्वाकाशस्थल' असे म्हणतात.

**यथाकाशो विभुर्ज्ञेयः सर्वप्राण्युपरि स्थितः।**
**तथात्मेत्युपमानार्थं बिंद्वाकाशस्थलं विदुः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.५९)

सर्व भूतांत व्यापक आकाश हेच आहे. ते विभू म्णजे व्यापक आहे. पृथ्वी, आप, तेज आणि वायू या तत्त्वांपेक्षा ते व्यापक आहे. ते प्रत्येकाच्या आत आहे तसेच बाहेर देखील आहे. उपनिषदांत म्हटले आहे,

**तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वंतिके। तंदतरस्य सर्वस्य तदु सर्वसास्य बाह्यतः।।**

एखादे कोडे घालावे त्याप्रमाणे येथे परमतत्त्वाचे स्वरूप स्पष्ट केले आहे. –ते (परमतत्त्व) जात आहे, (तदेजति), ते कुठेही जात नाही (तन्नैजति), ते खूप दूर आहे (तद्दूरे), ते अत्यंत समीप आहे (तद्वंतिके), ते सर्वांच्या आत आहे आणि सर्वांच्या बाहेरही तेच आहे. परमात्म्याचे सर्वव्यापकत्वच येथे सांगितले आहे. परमात्मा फार दूर आहे हे सांगण्यासाठी कैलास, वैकुंठ अशा दिव्य स्थानांची वर्णने केली जातात. तेथील शिवसभेचे आणि विष्णुसभेचे रसाळ वर्णन केले जाते. कोण कसे बसले आहे, कोण कुठे उभे आहेत इत्यादी. तेथे शिव आणि विष्णू यांना जर विचारले की, देवा आपण कुठे राहता? तर ते सांगतात–

**नाहं वसामि कैलासे नच मेरौ नच मंदूरे।**
**मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि पार्वति।।**

शिव पार्वतीला सांगतात की, मी कैलासात राहत नाही, मेरू पर्वतावर नाही की कुठल्या मंदिरात. माझे भजन करणाऱ्या भक्तांच्या ह्रदयात माझे नित्य वास्तव्य आहे. याचा अर्थ एवढाच की, शिव कैलासात आहे, मंदिरात आहे तसाच ह्रदयात देखील आहे. भक्तिशून्य मनाने मंदिरात गेलात तर तो तुम्हाला भेटणार नाही, पण भक्तिपूर्ण अंत:करणाने त्याला आळवाल तर तो तुम्हाला घरातच दर्शन देईल. तुमचे ह्रदय हेच त्याच्या दर्शनाचे स्थान असेल. तुमचे मन पवित्र, प्रसन्न असेल, भगवंताचे भजन करण्याची उत्कट इच्छा तुमच्या मनात असेल तर ज्या ठिकाणी तुम्ही बसलेले असाल तेच स्थान कैलास होईल, मंदिर होईल. शेवटी तुमचे शरीर हेच मंदिर होऊन जाईल.

म्हणून परमात्मा दूर आहे, तसाच अत्यंत जवळ देखील आहे. कोणी काशीला येऊन विश्वेश्वराचे दर्शन घेईल तर कुणाला आपल्या अंतरात्म्याच्या ठिकाणी त्याचे दर्शन घडेल. तो सर्वत्र आहे. त्याला कोठे पाहावे हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. म्हणून उपनिषदे सांगतात की, सर्व काही त्याच्या आत आहे आणि तो सर्वांच्या आत आहे. याचा अर्थ एवढाच की तो सर्वत्र आहे. कोणी त्याला कैलासात पाहावे, कोणी त्याला मेरू पर्वतावर पाहावे, कोणी त्याला काशीत पाहावे, कोणी त्याला मंदिरात पाहावे तर कोणी आपल्या ह्रदयात. ज्याप्रमाणे आकाश सर्वांच्या आत आणि बाहेर असते, आकाशात सर्व असते आणि आकाश सर्वत्र असते. त्याप्रमाणे परमात्म्याचे स्वरूप असते. परमात्मा असा सूक्ष्म आहे. एखाद्या बिंदूसारखा. परमात्मा नामरूपातीत आहे तरी त्याला एखादे नाव द्यावे लागते. जन्म झालेल्या मुलाचे आपण नाव ठेवले नाही तरी कोणत्या तरी नावाने आपण त्याला हाक मारतोच. त्याला मूल म्हणतो, मुलगा म्हणतो किंवा मुलगी म्हणतो. बारशाच्या वेळी मग आपल्या आवडीप्रमाणे त्याचे नामकरण करतो. त्याप्रमाणे शिव–शक्ती हे एक परमात्म्याला दिलेले सुंदर नाव आहे.

सृष्टिनिर्मिती होत असताना जी छत्तीस तत्त्वे उत्पन्न होतात त्यांपैकी पहिले तत्त्व शिव असून दुसरे शक्ती हे आहे. त्यानंतर सदाशिव, त्यानंतर ईश्वर, त्यानंतर शुद्ध विद्या इत्यादी. एकच परमात्मा छत्तीस तत्त्वांतून अभिव्यक्त होतो. छत्तीस शुद्ध विद्या इत्यादी. एकच परमात्मा छत्तीस तत्त्वांतून अभिव्यक्त होतो. छत्तीस तत्त्वांत अभिव्यक्त होण्यापूर्वी तो बिंदुरूपात होता त्या बिंदूला आकाशाचे उपमान देऊन स्पष्ट करणारे हे स्थल असल्यामुळे याला बिंद्वाकाशस्थल असे नाव आहे.

**यथैको वायुराख्यात: सर्वप्राणिगतो विभु:।**
**तथात्मा व्यापक: साक्षात् सर्वप्राणिगत: स्वयम्।।१९.६०।।**

आकाशाचे उदाहरण देऊन परमात्मतत्त्वाचे स्पष्टीकरण केले, तसेच आता आकाशापेक्षा स्थूल अशा

वायुतत्त्वाचे उदाहरण देऊन परमतत्त्वाचे स्पष्टीकरण येथे केले आहे. ज्यांना बिंदू आणि आकाश ही सूक्ष्म तत्त्वे नीट कळत नाहीत अशांसाठी त्यांना कळणाऱ्या वायूचे उदाहरण दिले आहे. पृथ्वी, अग्नी, जल या तत्त्वांपेक्षा वायुतत्त्व अधिक व्यापक असते, परंतु आकाशापेक्षा मात्र लहान असते. वायू हे सर्वांना समजणारे, अनुभूत होणारे तत्त्व आहे. प्राणवायूच्या रूपाने तेच प्राणिमात्रांना जीवन देत असते. प्राणवायू निघून गेला की मनुष्याला मृत घोषित केले जाते. वायू एकच असला तरी त्याला कार्यभिन्नतेमुळे प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान अशी नावे दिली आहेत. हे मुख्य प्राण आहेत. याशिवाय नाग, कूर्म, क्रकर, देवदत्त, धनंजय हे उपप्राण आहेत. वायू म्हणजेच प्राण. वायूमुळेच जीवमात्र जिवंत असतात. वायू एक असून तो सर्व प्राणिमात्रांत विद्यमान असतो त्याप्रमाणे एकच आत्मा सर्वांत अहम्‌रूपाने वास करतो. वायूचा अनुभव सर्वांना येतो, तसा आत्म्याचा येत नाही. म्हणून सर्वांना समजण्यास सोपे असे वायूचे उदाहरण दिले आहे. वायू एक आहे, व्यापक आहे आणि सर्व प्राणिमात्रांत त्याचे वास्तव्य आहे, त्याप्रमाणेच आत्मा एकच असून व्यापक आहे आणि सर्वांच्या हृदयात तो निवास करतो. अत्यंत सूक्ष्म अशा बिंदुरूपाने आत्मा प्राणिमात्रांत विराजमान असतो. कठोपनिषदात अशा अर्थाचा एक श्लोक आहे:

**वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव।**
**एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहुश्च।।**

वायू या भुवनात प्रविष्ट असला तरी त्याची रूपे अनेक आहेत. शरीरातील प्राणवायूची जशी अनेक रूपे आहेत त्याप्रमाणे बाहेरील वायूचीही अनेक रूपे आहेत. तो कधी मंदपणे वाहत असतो तर कधी वादळ होऊन येत असतो. अनेक रूपांतील वायू जसा एकच असतो त्याप्रमाणे सर्व प्राणिमात्रांच्या आत नांदणारा आत्मा एक असून सर्वव्यापक असतो. बिंदुरूपातील हृदयस्थ आत्म्याला जाणणे हेच मनुष्याचे ध्येय असले पाहिजे. हाच विचार पुढील श्लोकात अग्नितत्त्वाचे उदाहरण देऊन अधिक स्पष्ट केला आहे:

**यथा वह्निरमेयात्मा सर्वत्रैकोऽपि भासते।**
**तथा शम्भुः समस्तात्मा परिच्छेदविवर्जितः।।१९.६१।।**

अग्नीचे रूप अपरिमित असते. तो किती मोठा आहे याचे मोजमाप कोणी करू शकत नाही. तो ठिणगीच्या रूपानेही दिसतो आणि मोठमोठी शहरे बेचिराख करणाऱ्या जगड्व्याळ रूपातही दिसतो. अग्नी एकच असला तरी त्याची रूपे असंख्य आहेत. आकाशात तळपणारी वीज हा दिव्याग्नी आहे. ती अंगावर पडली तर शरीराचा कोळसा होतो. तिच्या केवळ गर्जनेनेच काळजाचा थरकाप होतो. ती खूप दूर असली तरी तिच्या प्रकाशात क्षणभर का होईना, सर्व वस्तू स्पष्टपणे दिसतात. समुद्रामध्ये जो अग्नी असतो त्याला वडवाग्नी म्हणतात. त्याच्यात समुद्र सुकविण्याचे सामर्थ्य असते. जो अग्नी सर्वांना परिचित आहे तो म्हणजे जठराग्नी. पोटात भुकेचा अग्नी उसळला की, हे खाऊ की ते खाऊ अशी माणसाची विचित्र अवस्था होते. स्वयंपाक करणाऱ्यावर, वाढणाऱ्यावर तो संतापत राहतो. या अग्नीत अन्नपाणी टाकाल तर तो ते जाळतो. नाहीतर शरीरातील चरबीच खातो. उपवास करणारा मनुष्य कृश होतो याचे हे कारण आहे. ज्याला भूक लागत नाही त्याचा अग्नी मंद झाला आहे असे म्हटले जाते. मानवी प्रेताला जाळणाऱ्या अग्नीला कालाग्नी म्हणतात.

अग्नीची स्वरूपे अशी भिन्न असली तरी अग्नी एकच असतो. तो सर्वत्र व्याप्त असतो. आपण ज्या ठिकाणी बसलो आहोत येथील कणाकणात अग्नी आहे. फक्त तो प्रकट होत नाही इतकेच. तुम्ही खिशात आगपेटी घेऊन

बसता म्हणजे अग्नीच घेऊन बसलेले असता. मग तुमचा खिसा का बरे जळून जात नाही? तर तेथे अग्नी अप्रकट असतो म्हणून. आतली काडी काढून आगपेटीवर घासली की अग्नी तात्काळ प्रकट होतो. काडी जळून जाईपर्यंत तो तुम्हाला दिसतो, नंतर अदृश्य होतो. तुम्ही पाहत असताना तो येतो आणि तुम्ही पाहत असतानाच जातो. तो आला कुठून आणि गेला कुठे? आपल्या अवती-भवतीच तो सर्वत्र अव्यक्त असतो. व्यक्त होण्याचे साधन मिळाले तरच तो प्रकट होतो. त्याप्रमाणे आत्मा सर्वत्र व्याप्त असतो.

**सर्वेषां देहनामन्तश्चित्ततोयं प्रकाशते।**
**तस्मिन् प्रतिफलत्यात्मा शिवो दर्पणवद् विभुः॥१९.६२॥**

शुद्ध स्वच्छ पाण्यात उत्तम प्रतिबिंब दिसत असते. प्राचीन काळी स्वच्छ पाण्यातच लोक आपले रूप न्याहाळात असत. त्या काळात दर्पण अस्तित्वात नव्हते. पाण्यात पडणारे आपले प्रतिबिंब पाहूनच माणसाला आरसा तयार करण्याची कल्पना सुचली असावी. पाण्यात सर्व वस्तूंचे प्रतिबिंब उमटते. पाणी शुद्ध, स्वच्छ आणि स्थिर असले पाहिजे. पाणी असे नसेल तर त्यात प्रतिबिंब उमटणार नाही. त्याप्रमाणे चित्तरूपी जलात आत्म्याचे प्रतिबिंब पडते. सर्व जीवांच्या हृदयात चित्तरूपी निर्मल जल विद्यमान असते. आरशात प्रतिबिंब दिसावे त्याप्रमाणे निर्मल चित्तात व्यापक परशिवाचे आत्म्याच्या रूपाने प्रतिबिंब पडते. आरशात प्रतिबिंब असते तर आरशासमोर बिंब असते. आत्मा हे बिंब आहे आणि अंतःकरणात प्रतिबिंबित झालेला जीव हे प्रतिबिंब आहे.

**एको वशीकृतः संवित्प्रकाशात्मा परात्परः।**
**सर्वप्राणिगतो भाति तथापि विभुरुच्यते॥१९.६३॥**

परमात्म्याचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी आकाश, वायू, अग्नी आणि जल यांची उदाहरणे दिली आहेत. ज्यांना ही उदाहरणे समजत नाहीत त्यांना काही कळण्याची शक्यता नाही. शिव सर्वश्रेष्ठ आहे, ज्ञानप्रकाशरूप आहे, एकमेव आहे, तो स्वतंत्र आहे, व्यापक आहे. तो सर्व प्राणिमात्रांच्या हृदयकमलात निवास करतो. तरीही तो खंडित होत नाही. शेवटी या स्थलाचा समारोप करतात.

**एक एव यथा सूर्यस्तेजसा भाति सर्वगः।**
**तथात्मा शक्तिभेदेन शिवः सर्वगतो भवेत्॥१९.६४॥**

सूर्य एक असतो तरी त्याचा प्रकाश सर्व जगाला व्यापून राहतो. त्याप्रमाणे परशिव एक असून त्याच्या इच्छा, ज्ञान, क्रिया या शक्तींनी जो सर्व जग व्यापून असतो. बिंदुरूप असा शिवच आकाशाप्रमाणे व्यापक आहे असे जाणणे हेच बिंद्वाकाशस्थल होय. जो सर्वत्र व्यापक आहे तोच आपल्या सर्वांच्या हृदयात वास्तव्य करतो. छोट्याशा बीजात सर्व वृक्ष सामावलेला असतो, त्याप्रमाणे परमात्म्याच्या बिंदुरूपात अवघे विश्व सामावलेले असते. म्हणून त्याला येथे 'बिंदू' असे म्हटले आहे. बिंदू हा परिपूर्ण असतो, तसा परमात्माही परिपूर्ण असतो. अशा बिंदुरूपाची आकाशासारखी व्यापकता समजून घेणे हेच या स्थलाचे उद्दिष्ट आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२४ नोव्हेंबर १९९४

## महाकाशस्थल

जिज्ञासू सद्‌भक्तांनो,

आज महाकाशस्थलाचा विचार करायचा आहे. बिंद्वाकाशस्थलात परमातत्त्वाला 'बिंदू' असे म्हटले आहे. सामान्य माणूस बिंदू म्हणजे अत्यंत लहान वस्तू असा अर्थ घेत असतो. बिंदू म्हणजे लहान आणि सिंधू म्हणजे मोठे असा अर्थ त्याच्या मनात असतो. परमात्मा अणूपेक्षाही लहान आहे आणि महानापेक्षाही महान आहे. हे समजावून सांगण्यासाठी येथे महाकाशस्थलाचे विवेचन केले आहे. जगद्‌गुरू रेणुकाचार्य सांगतात:

**पिंडांडस्थं यथाकाशं न भिन्नं तद्वदात्मनः।**
**अभिन्नः परमात्मेति महाकाशस्थलं विदुः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.६५)

पिंड म्हणजे शरीर आणि ब्रह्मांड म्हणजे विश्व. पिंडात जसे आकाश आहे तसे ब्रह्मांडातही आकाश आहे. पिंडातले आकाश ब्रह्मांडातल्या आकाशापेक्षा वेगळे नाही. 'पिंडी ते ब्रह्मांडी' या म्हणीप्रमाणे जे पिंडात आहे तेच ब्रह्मांडात आहे आणि जे ब्रह्मांडात आहे तेच पिंडात आहे. त्याप्रमाणे आत्म्यापेक्षा परमात्मा वेगळा नाही आणि परमात्म्यापेक्षा आत्मा वेगळा नाही, हे सांगणारे स्थल महाकाशस्थल होय. देविकालोत्तर पुराणात एक महत्त्वाचे वचन आलेले आहे. ते असे:

**व्योमाकारं महासूक्ष्मं व्यापकं यो न भावयेत्।**
**संसारे स भवेल्लोके बीजकोशक्रिमिर्यथा।।**

आपले व्यापक आत्मस्वरूप न जाणता जो स्वत:ला लहान समजतो अशा जीवात्म्याची कोणती गती असते हे या श्लोकात सांगितले आहे. आत्मस्वरूपाला जो जाणत नाही तो धान्यातल्या किड्यासारखा वारंवार संसारात जन्म घेत असतो. किड्यासारखे निरर्थक जीवन त्याच्या वाट्याला येते. आकाशासारखे व्यापक आत्मस्वरूप जो जाणतो तोच संसार चक्रातून मुक्त होतो.

**यथा न भिन्नमाकाशं घटेषु च मठेषु च।**
**तथांडेषु च पिंडेषु स्थितो ह्यात्मा न भिद्यते।।१९.६६।।**

ज्याप्रमाणे आकाश कुठेही असो- घटात, मठात, पिंडात, ब्रह्मांडात- ते वेगळे नसते, तर एकच असते. घटातील आकाश वेगळे आणि मठातील आकाश वेगळे असे वरवर पाहणाऱ्याला भासत असले तरी मुळात आकाश एकच असते. त्याप्रमाणे पिंडात असणारा आत्मा आणि ब्रह्मांडाला व्यापून असणारा आत्मा हे भिन्न नसून एकच असतात. देहाची उपाधी असल्यामुळे त्याला 'आत्मा' असे म्हणतात आणि निरूपाधिक असल्यामुळे त्याला 'परमात्मा' असे म्हणतात. अशा आत्म्याचे कोणते लक्षण असते हे सुरेख रीतीने पुढील श्लोकात सांगितले आहे:

**अनिर्देश्यमनौपम्यमवाङ्मानसगोचरम्।**
**सर्वतोमुखसंपन्नं सत्तानंदं चिदात्मकम्।।**

कालातीतं कलातीतं क्रमयोगादिवर्जितम्।
स्वानुभूतिप्रमाणस्थं ज्योतिषामुदयस्थलम्।।
शिवाख्यं परमं ब्रह्म परमाकाशलक्षणम्।
लिंगमित्युच्चते सद्भिर्यद्विना न जगत्स्थितिः।।१९.६७-६८-६९।।

परब्रह्माला 'महाकाश' असे नाव आहे तसेच 'महालिंग' असेही नाव आहे. त्याला 'घनलिंग' असेही म्हटले जाते. महालिंग कसे आहे? अनिर्देश्य. त्याचा निर्देश करता येणार नाही. संसारातील पदार्थांचा निर्देश करता येतो. एखादी वस्तू बोटाने स्पर्श करून अथवा वस्तूकडे बोट करून दाखवता येते. त्या वस्तूपर्यंत आपण जाऊ शकतो. परंतु अशा प्रकारे परमात्मा दाखवता येत नाही आणि त्याच्या पर्यंत चालत जाता येत नाही. एखाद्या वस्तूचे ज्ञान मिळवायचे असेल तर तिच्या ठिकाणी लक्षणे असावी लागतात आणि त्यासाठी प्रमाणे लागतात. याठिकाणी अनिर्देश्य, अनुपम्य, अवाङ्मानसगोचर अशा तीन शब्दांचा प्रयोग केला आहे. हे समजावण्यास कोणतेही प्रमाण समर्थ नाही, हेच या ठिकाणी सांगितले आहे. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती, अनुपलब्धी ही सहा प्रमाणे आहेत. या सहा प्रमाणांच्या आधारेच आपण सर्व काही जाणत असतो.

प्रत्यक्ष हे पहिले आणि सर्वात प्रबळ असे प्रमाण आहे. जर कोणी एखाद्या वस्तूविषयी काही सांगत असेल तर आपण त्याला पटकन विचारतो, 'तुम्ही ती वस्तू पाहिली आहे का?' प्रत्यक्ष प्रमाणाचा उपयोग सर्वजण करू शकतात. 'चक्षुर्वैसत्यम्'- म्हणजे डोळ्यांनी जे पाहिले असते ते सत्य असते. पंचज्ञानेंद्रियांनी आपण हे जग पाहात-अनुभवत असतो. ज्ञानेंद्रिये ही प्रत्यक्ष प्रमाणांची साधने होत. परंतु प्रत्यक्ष प्रमाणाच्या द्वारे परमात्मा दाखवता येत नाही. डोळे रूप पाहू शकतात. परंतु जे अरूप आहे ते त्यांना कसे दिसेल? शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पंचविषय, पंचगुण आहेत. परमात्मा यांच्या पलीकडे असल्यामुळे त्याला निर्गुण असे म्हणतात. म्हणून तो ज्ञानेंद्रियांना सापडत नाही. प्रत्यक्ष प्रमाणाने त्याचा निर्देश करता येत नाही.

अनुमान हे दुसरे प्रमाण आहे. परंतु हे प्रमाण देखील जी वस्तू दिसते तिच्या विषयीच अनुमान करू शकते. डोंगरावरील झाडीतून बाहेर येणारा धुराचा लोट पाहून तेथे अग्नी असला पाहिजे असे अनुमान प्रमाण सांगते. 'यत्र यत्र धूमः तत्र तत्र वह्निः'- हे अनुमान प्रमाण आहे. ज्याअर्थी हे विश्व निर्माण झाले त्या अर्थी त्याचा निर्माता कोणीतरी असला पाहिजे असे अनुमान करून आपण परमात्म्याला जाणायचा प्रयत्न करतो. परंतु त्यामुळे परमात्म्याचा निर्देश मात्र करता येत नाही. उपमान प्रमाणाने परमात्म्याला जाणायचा प्रयास करावा तर परमात्म्याच्या तोडीची दुसरी वस्तू असायला हवी. परंतु तशी वस्तू नसल्यामुळे उपमा देऊन परमात्म्याला जाणता येत नाही. म्हणून तो अनुपमेय आहे. या जगात ज्या असामान्य गोष्टी आहेत त्यांनाच उपमा देणे शक्य नाही तर परमात्म्याला कशी उपमा देणार? खरेच समुद्राला कशाची उपमा द्यावी? ज्याने आयुष्यात कधी समुद्र पाहिला नाही त्याला कोणतीही उपमा देऊन समुद्र समजावून सांगता येणार नाही. समुद्राशी तुलना होईल अशी दुसरी वस्तू या जगात नाही. म्हणून समुद्राला समुद्राचीच उपमा द्यावी लागेल. तशीच आकाशालाही आकाशाचीच उपमा द्यावी लागते, दुसरी देता येत नाही.

समुद्राची आणि आकाशाची जर अशी अवस्था आहे तर परमात्म्याला कशाची उपमा देता येईल बरे? त्यामुळे उपमान प्रमाणाने परमेश्वराला जाणता येत नाही. सांगायचे झालेच तर परमात्मा परमात्म्यासारखाच आहे असे म्हणता येईल. खरे तर या प्रपंचातील प्रत्येक वस्तू दुसऱ्या वस्तूपासून भिन्न असते. तिचे कशाशीही सादृश्य नसते.

मग परमात्म्याबद्दल काय बोलावे?

परमात्मा अवाङ्मानसगोचर आहे. तो वाणीने अर्थात् शब्दाने जाणता येत नाही. शब्दप्रमाण हे प्रबळ प्रमाण असले तरी ते परमात्म्याचे नेमके वर्णन करू शकत नाही. ते जेव्हा नेमके वर्णन करू पाहते तेव्हा स्वरूपकथनापेक्षा शब्दांची कसरतच करीत असते. वेदांना शब्दप्रमाण मानले जाते. परंतु परमात्म्याचे स्वरूप स्पष्ट करताना वेद देखील ' न इति न इति' (नेति नेति) आणि 'न इदम् न इदम्' हेच आपल्याला सांगत असतात. परमात्म्याजवळ जाताच श्रुतीदेखील मौन होते. देवरदासिमय्याचे एक सुंदर वचन आहे.

**आडबारद बयलु नोडबारद बयलु**
**नुडियबारद बयलु हिडियबारद बयलु**
**इ वडलिल्लद बयलोळगेअडगिप्पभेदव**
**इ लोकद जडरत्तबल्लरै रामनाथा.**

महाकाशस्थलाचे या वचनात सुरेख वर्णन केलेले आहे. बयलु म्हणजे आकाश. देवरदासिमय्या म्हणतात, परमात्मरूपी आकाशाबद्दल काही बोलता येत नाही. ते कोणाच्या हाताला लागत नाही. ते अशरीरी आहे. जडबुद्धीचे लोक त्याला जाणू शकत नाहीत. ज्या बुद्धीत जडाचे-जड असलेल्या प्रपंचाचे सतत चिंतन चाललेले असते ती जडबुद्धी होय. अत्यंत सूक्ष्म अशा परमतत्त्वाचे ज्ञान जडबुद्धीला होणे शक्य नाही. परंतु जडबुद्धीचे रूपांतर प्रयत्न केला तर सूक्ष्मबुद्धीत होऊ शकते. पहिल्या वर्गात घातलेल्या विद्यार्थ्याला अक्षरओळख देखील नसते. परंतु अभ्यासाने तो हळूहळू अक्षरे शिकतो, शब्द शिकतो, वाक्यरचना शिकतो आणि पुढे शब्दांवर प्रभुत्व गाजवणारा साहित्यिक देखील होतो. अभ्यासात असे सामर्थ्य असते. त्याप्रमाणे प्रयत्न केल्यावर बुद्धीतील जडत्व नाहीसे होऊन ती परमात्म्याला जाणण्याइतकी सूक्ष्म होते.

शब्द हे ज्ञानाचे सर्वात सुलभ आणि मोठे साधन आहे. मनुष्यजीवनातून भाषा वजा केली तर पशुजीवनच होईल. भाषेतच परमात्म्याचे स्वरूप समजावून सांगावे लागते. परंतु जेव्हा श्रुती 'नेति नेति' म्हणते तेव्हा शब्दांचे सामर्थ्यही किती उणे आहे याची जाणीव होते. परब्रह्माचे वर्णन करताना श्रुती सांगते, 'परब्रह्माला पाय नाहीत, परंतु ते जोराने धावत असते. त्याला हात नाहीत, परंतु ते हाताने सर्व घेत असते. त्याला कान नाहीत, परंतु ते सारे काही ऐकत असते. ते कोणाला जाणत नाही आणि त्याला कोणी जाणू शकत नाही. असा महान पुरुष म्हणजे परमात्मा होय.'

परब्रह्माचे स्वरूप सांगणे अत्यंत कठीण असले तरीही श्रुतीने ते सांगण्याचा मात्र प्रयत्न केला आहे. परमात्मा शब्दाप्रमाणे जसा सांगता येत नाही तसा तो मनानेही जाणता येत नाही. परमात्मा सर्वतोमुख आहे. अर्थात् तो सर्वांना सन्मुख आहे. तुम्ही जेव्हा दिव्याची ज्योत पेटवता तेव्हा तिचे मुख कुणीकडे असते? इकडे-तिकडे सर्वत्र आपल्या प्रकाशरूपी मुखाने ती स्पर्श करीत असते? त्याप्रमाणे परमात्मा सर्वत्र पाहत असतो. परमात्म्याचे स्वरूप कसे आहे? तर सत्-चित्-आनंद हेच त्याचे रूप आहे, हेच त्याचे लक्षण आहे. तो कालातीत आहे. सर्व कालात आणि कालापलीकडे त्याचे अस्तित्व आहे. कालाच्या संदर्भात महाभारतात यक्षाने युधिष्ठिराला एक प्रश्न विचारला आहे. यक्ष विचारतो, 'का वार्ता:?' या प्रपंचाची वार्ता कोणती? बातमी काय?'

युधिष्ठिराने उत्तर दिले, 'भूतानि काल: पचतीति वार्ता:' काळ सर्व भूतांना शिजवीत आहे. मोहाच्या कढईत सर्व प्राणिमात्रांना घालून शिजवतो आहे. सर्वांना मारीत आहे, हीच प्रपंचाची वार्ता आहे.'

जगातील प्रत्येक वस्तू, आणि व्यक्ती काळाच्या अधीन आहे, काळाने बांधलेले आहे. परंतु परमात्मा मात्र कालातीत आहे. तो काळाचाही काळ आहे, महाकाळ आहे. काळ सर्वांना मारतो, पण काळालाही मारणारा परमात्मा आहे. मार्कंडेयाचे प्राण घ्यायला जेव्हा काळ आला तेव्हा शिवानी त्याला त्रिशूलाने मारले, अशी कथा आहे. काळ सर्वभक्षक आहे. हे विश्व एक ताट असून सर्व जीव त्यामधले पदार्थ आहेत. मनाला येईल तसे हे पदार्थ काळ गट्ट करीत असतो. त्याचा हात कुणाकडे जाईल हे सांगता येत नाही. ज्याच्याकडे त्याचा हात जाईल तो जीव संपला असे समजायचे. काळ असा जगद्भक्षक आहे. काळासमोर सर्व प्रपंचाचे ताट असले तरी भगवंतासमोर काळ लोणच्यासारखा आहे. लोणचे सहज तोंडी लावतात, चाखतात त्याप्रमाणे परमात्मा काळाला तोंडी लावतो, चाखतो. जी वस्तू काळाच्या अधीन असते ती कोणत्यातरी काळात नसते, इथे असेल तर तिथे नसते. शास्त्रामध्ये प्राग्भाव, प्रध्वंसाभाव, अन्योन्याभाव, अत्यंताभाव असे अभावाचे प्रकार सांगितले आहेत. उत्पन्न होण्याआधी अस्तित्व नसणे म्हणजे प्राग्भाव. नाहीसे झाल्यावर इतर अस्तित्व नसणे म्हणजे प्रध्वंसाभाव. आपल्यासमोर माती आहे, परंतु घट नाही. मातीच्या ठिकाणी घटाचा प्राग्भाव आहे. मातीमध्ये घट नाही. परंतु जेव्हा मातीपासून तो निर्माण होतो तेव्हा प्राग्भाव नष्ट होतो. घट फुटल्यावर त्याचे अस्तित्व नाहीसे होते. वस्तूचा अभाव असणे म्हणजे अन्योन्यभाव होय. घटात पट नसतो आणि पटात घट नसतो. घटात पटाचा अभाव असणे आणि पटात घटाचा अभाव असणे हा अन्योन्याभाव होय. मुळीच अस्तित्व नसणे म्हणजे अत्यंताभाव. आकाशकुसुम (आकाशाचे फूल), वंध्यापुत्र (वांझ स्त्रीचा मुलगा) असे शब्दप्रयोग केले जातात. परंतु ह्या गोष्टींना अस्तित्व नसते. म्हणून त्यांचा अत्यंताभाव असतो. परमात्मा कालाचा अधीन नसल्यामुळे त्याच्या बाबतीत हे अभाव संभवत नाहीत.

परमात्मा कलातीत आहे. वीरशैव सिद्धान्ताने सहा कला मानल्या आहेत. विश्वनिर्मितीपूर्वी परब्रह्म 'स्थल' रूपात असते. स्थल म्हणजे परब्रह्म शिव. सृष्टिनिर्मितीच्या वेळी स्थल अंग आणि लिंग असे दोन भागात विभक्त होते. यालाच अंगस्थल आणि लिंगस्थल म्हणतात. परमात्मा शक्तियुक्त आहे. त्याची शक्ती देखील भक्ती आणि कला अशा दोन रूपांत विभक्त होते. भक्ती अंगस्थलाचा आश्रय घेते तर कला लिंगस्थलाचा आश्रय घेते. या कला सहा आहेत. सहा कला, सोळा कला, बत्तीस कला, अडतीस कला या सर्व कलांच्या पलीकडे परमात्मा असतो.

निर्मिती, स्थिती आणि संहार या क्रमाच्या पलीकडे परमात्मा असतो. प्रत्येक वस्तू आणि व्यक्ती उत्पन्न होते, नंतर काही काळ स्थिर राहते आणि शेवटी नष्ट होते. परमात्म्याच्या ठिकाणी हा क्रम नाही. सूर्य-चंद्र आणि अंतरिक्षातील असंख्य नक्षत्रे यांचे परमात्मा हे उदयस्थान आहे. विश्वप्रकाशित करणाऱ्या नक्षत्रमंडलाला परमात्मा प्रकाशित करतो. चंद्र सूर्याकडून प्रकाश घेऊन प्रकाशतो आणि आपल्याला प्रकाश देतो, हे सर्वांना माहीत आहे. सूर्याला आपण स्वयंप्रकाशित मानतो, परंतु तत्त्वज्ञ मात्र सूर्य-तारे देखील परमात्म्याच्या तेजाने प्रकाशित होत असतात असे सांगतात.

इंद्रिये, वाणी, मन यांना परमात्मा अगोचर आहे तर मग त्याचे ज्ञान कसे होते? असा प्रश्न पडेल. त्याचे उत्तर इथे दिले आहे. परमात्मा आपल्याला अनुभूतीने समजतो. जेथे सर्व प्रमाणे थांबतात तेथे आपला अनुभव हेच प्रमाण असते. सुषुप्ति-अवस्थेत जो आनंद प्रत्ययाला येतो त्याला अनुभूती हेच प्रमाण असते. प्रत्यक्ष, अनुमान, शब्द इत्यादी प्रमाणे तेथे उपस्थित नसतात. केवळ आपला अनुभव हेच प्रमाण असते. परमात्मा असाच

अनुभवगम्य आहे. अशा परब्रह्माला शिव, परब्रह्म, पराकाश, लिंग अशी नावे आहेत. सर्व सृष्टी ज्यातून उत्पन्न होते, ज्यात स्थिर राहते आणि ज्यात विलय पावते त्याला 'लिंग' असे नाव आहे. सर्वश्रेष्ठ असल्याने त्यालाच 'महालिंग' असेही म्हणतात. त्याच्याशिवाय जगाला अस्तित्व नाही. हे दृश्य जग त्या अदृश्य महालिंगावरच अधिष्ठित आहे. जो त्याचे अस्तित्व नाकारील त्याला स्वत:चे अस्तित्व नाकारावे लागेल. स्वत:चे अस्तित्व कुणीही नाकारू शकत नाही. म्हणून सर्व प्रपंचाला आधारभूत असलेले परतत्त्वाचे अस्तित्व कुणाला नाकारता येत नाही.

**परमाकाशमव्यक्तं प्रबोधानंदलक्षणम्।**
**लिंगं ज्योतिर्मयं प्राहुर्लीयंते यत्र योगिनः।।१९.७०।।**

ते महालिंग महाकाशरूप आहे. सत्-चित्-आनंद या लक्षणांनी युक्त आहे. त्यालाच ज्योतिर्लिंग असे म्हणतात आणि याच महालिंगात शिवयोगी ऐक्य पावतो. बारा ज्योतिर्लिंगाची तुम्ही यात्रा करता. त्यासाठी कितीतरी श्रम घेता. परंतु आपल्या हृदयात देखील ज्योतिर्लिंग आहे याची आपल्याला जाणीव नसते. ज्योतिर्लिंगाची यात्रा अवश्य करावी, परंतु त्याबरोबरच हृदयस्थ ज्योति:स्वरूप आत्मलिंगाचे दर्शन घेण्याचाही प्रयत्न करावा. बाह्ययात्रा करता करता अंतर्यात्राही घडली पाहिजे. शिवयोगी याच हृदयस्थ ज्योतिर्लिंगाशी एकरूप होतो.

**संविदेव परा काष्ठा परमानंदरूपिणी।**
**तामाहुः परमाकाशं मुनयो मुक्तसंशयाः।।१९.७१।।**

जेव्हा परमात्मा प्राप्त होतो तेव्हा परमानंदाचाही लाभ होतो. जेथे ज्ञान असते तेथे आनंद असतो. जेथे अज्ञान आणि अंधकार असतो तेथे दुःख आणि भय असते. ज्ञानामुळे प्रसन्नता आणि आनंद यांचा लाभ होतो. त्यामुळे प्रत्येक मनुष्याला ज्ञानार्जनाची इच्छा असते. लौकिक ज्ञान तो मिळवतो. त्यामुळे त्याला उच्चपद, नोकरी मिळते. जीवनातील बहुतेक सुखेही प्राप्त होतात. परंतु आत्मज्ञानामुळे जो आनंद मिळतो त्याची बरोबरी कुठल्याही आनंदाशी करता येत नाही. अशा परमानंदरूप चैतन्याला मुनी महाकाश या नावाने ओळखतात.

**तरंगादि यथा सिंधोः स्वरूपान्नातिरिच्यते।**
**तथा शिवाच्चिदाकाशाद् विश्वमेतन्न भिद्यते।।१९.७२।।**

समुद्रावरील लाटा आणि समुद्र हे एकमेकांपासून वेगळे नसतात. लाटांना वेगळा आकार असतो, लाटांचा वेगळा आकार दिसतो. परंतु त्या समुद्रापासून वेगळ्या करता येत नाहीत. त्याप्रमाणे चिदाकाश स्वरूप परमात्म्यापेक्षा हे भिन्न नाही.

**यथा पुष्पपलाशादि वृक्षरूपान्न भिद्यते।**
**तथा शिवात् पराकाशाज्जगतो नास्ति भिन्नता।।१९.७३।।**

समुद्र-तरंग हा दृष्टान्त दिल्यावर वृक्ष-शाखा या दृष्टान्ताने येथे तोच विचार स्पष्ट केला आहे. एखादे बीज तुम्ही लावता, ते अंकुरल्यावर त्यातून पाने उत्पन्न होतात, ते रोपटे हळूहळू वाढून पुढे विशाल वृक्ष बनते. फांद्या, पाने, फुले असे सर्वांगाने ते बहरते. पाने-फुले-फांद्या वेगवेगळ्या दिसत असल्या तरी त्या वृक्षापासून भिन्न नसतात. त्याप्रमाणे परशिवापासून उत्पन्न झालेले हे जग त्याच्यापासून वेगळे नसते. फुले, पाने, फांद्या हे सर्व मिळून वृक्षपण साकारलेले असते. त्याप्रमाणे या जगताच्या रूपाने परब्रह्म शिवच आपल्या दृष्टिपुढे उभा असतो. केवळ आपला आत्माच शिवरूप आहे असे नसून सर्व विश्वच शिवमय आहे असे वीरशैव सिद्धान्ताचे प्रतिपादन आहे.

**यथा ज्योतींषि भासंते भूताकाशे पृथक् पृथक्।**
**तथा भांति पराकाशे ब्रह्मांडानि विशेषत:।।१९.७४।।**

आकाशात असंख्य नक्षत्रे प्रकाशत असतात. त्याप्रमाणे परमात्मरूपी महाकाशात अनेक ब्रह्मांडे अवस्थित असतात. आकाशातली नक्षत्रे मोजणे हे मानवी बुद्धीच्या पलीकडचे काम आहे. म्हणून विश्व अनादी व अनंत आहे. परमात्मा सृष्टीपेक्षाही व्यापक आहे. हे या ठिकाणी स्पष्ट केले आहे. शेवटी या स्थलाचा समारोप करतात:

**निरस्तोपाधिसंबंधं निर्मलं संविदात्मकम्।**
**पराकाशं जगच्चित्रविलासालंबभित्तिकम्।।१९.७५।।**

परब्रह्मरूपी महाकाश जगदूपाने दिसत असले तरी सर्व उपाधिरहित असते. उपाधिरहित असल्यामुळे ते निर्मल म्हणजे मलापासून मुक्त आहे. तसेच ते ज्ञानरूप आहे. नामरूपात्मक विश्वाचे चित्र ज्यावर रेखले जाते अशी भिंत म्हणजे हे महाकाश होय. जग हे जणू चित्र आहे आणि हे चित्र परब्रह्मरूप भिंतीवर रेखाटले आहे. अशी कल्पना येथे केली आहे. याचा अर्थ एवढाच की, परब्रह्म महाकाश हे या जगाला आधारभूत आहे. अशाप्रकारे आपला आत्मा अत्यंत व्यापक असून आत्मा म्हणजेच परमात्मा आहे, हे आकाशाची उपमा देऊन सांगणारे हे महाकाशस्थल होय. ही स्थिती जो प्राप्त करून घेतो त्याला महाकाशी म्हणतात, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२५ नोव्हेंबर १९९४

---

**आशीर्वचन सातवे**

## क्रियाप्रकाशस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज क्रियाप्रकाशस्थलाचा आरंभ होत आहे. यापूर्वी क्रियानिष्पत्तिस्थलावर निरूपण झाले आहे. क्रियानिष्पत्ती आणि क्रियाप्रकाश यात काय भेद आहे हे समजून घेतले पाहिजे. फलाची अपेक्षा न करता कर्म करावे, हे क्रियानिष्पत्तिस्थलात सांगितले आहे. येथे शिवयोग्यासाठी आत्मानुसंधान अर्थात् आत्म्याचे चिंतन हे एकमेव कर्म उरले आहे, हे स्पष्ट करायचे आहे. परब्रह्माला आकाशाप्रमाणे व्यापक मानून ते महाकाशच आपल्या आत्म्याच्या रूपाने आणि बाह्यजगताच्या रूपाने प्रकाशत आहे असे महाकाशस्थलातील शिवयोग्याने जाणलेले असते. परंतु केवळ जाणून घेणे महत्त्वाचे नसून त्यामधला आनंद सर्वकाळ तदाकार होऊन अनुभवला पाहिजे. जोपर्यंत आत्मचिंतन चाललेले असते तोपर्यंत शिवयोग्याला अमर्याद परमानंदाची अनुभूती येत असते. जीवन्मुक्त स्थिती लाभल्यावर मिळणाऱ्या परमानंदाचे वर्णन करण्यासाठीच तर पुढील स्थले सांगितली आहेत.

सामान्य माणसे विषयांमध्ये आनंद शोधत असतात. परंतु शिवयोग्याला मात्र आपल्या अंतरंगातच आनंदसागर सापडलेला असतो. विषयसुख भोगण्यासाठी स्वत:शिवाय दुसरी वस्तू वा व्यक्ती यांची गरज असते. परंतु

आत्मानंद भोगण्यासाठी फक्त स्वत:चीच गरज असते. वस्तूच्या अथवा व्यक्तीच्या माध्यमातून जे सुख मिळते ते कधीतरी संपणारे असते. कारण कोणतीही वस्तू किंवा व्यक्ती दीर्घकाळ आपली सोबत करू शकत नाही. करू शकली तरी तिच्यापासून मिळणारे सुख उणावलेले असते. ज्यांचा संयोग होतो त्यांचा कधीतरी वियोग होणारच असतो. पति-पत्नी, पिता-पुत्र, भाऊ-बहीण हे ऋणानुबंधनाने एकत्र आलेले असतात. ऋणानुबंध संपला की त्यांचा वियोग अटळ असतो. या जगात जन्म घेणाला जीव काहीतरी देण्यासाठी अथवा घेण्यासाठी आलेला असतो. ज्ञानी पुरुषांनी हा विचार अनेक प्रकारांनी समजावून सांगितला आहे. या जगाला कुणी बाजाराची उपमा दिली आहे. भाजी बाजारात कुणी विक्रेता असतो तर कुणी ग्राहक. काही काळ एकत्र राहून घेण्या-देण्याचा व्यवहार करतात. नंतर आपल्या वाटेने निघून जातात. त्याप्रमाणे ऋणानुबंधनाने कोणी पती होतो, कोणी पत्नी होते, कोणी मुलगा तर कोणी मुलगी. ते एकमेकांना काही देण्यासाठी किंवा काही घेण्यासाठी एकत्र येतात. व्यवहार संपला की आपापल्या वाटेने निघून जातात. हाच विचार एका मराठी कवीने मोठ्या सुरेख शब्दांत स्पष्ट केला आहे:

**दोन ओंडक्यांची होते सागरात भेट। एक लाट तोडी दोघा पुन्हा नाही गाठ**

**क्षणिक तेवी आहे बाळा मेळ माणसांचा। पराधीन आहे जगती पुत्र मानवाचा!**

समुद्रात दोन लाकडी ओंडके दोन दिशांकडून वाहात एकत्र येतात. काही काळ ते सोबत वाहात राहातात. मध्येच एखादी लाट तडाखा देऊन त्यांना एकमेकांपासून दूर फेकून देते. त्यानंतर त्यांची कधीही गाठ पडत नाही. अशीच जगातील माणसांची अवस्था असते. मनुष्य हा नियतीच्या हातातील बाहुले असतो. परंतु त्याचे हे जीवन त्यानेच मागील जन्मातील कर्मांनी घडवलेले असते.

माणसे एकत्र आली तरी फार काळ एकमेकांना आनंद देऊ शकत नाहीत. परंतु शिवयोगी एकटा बसलेला असताना परमानंदाचा आस्वाद घेऊ शकतो. या आनंदासाठी त्याला दुसऱ्या कोणाची आवश्यकता नसते. आत्मचिंतनामुळे त्याला परमानंद मिळत असतो. तो आत्मचिंतन ही एकच क्रिया करीत असतो. ही क्रिया त्याच्याकडून प्रकाशित होत असते. त्याच्या शरीराकडून अन्य क्रिया घडत असल्या तरी त्या महत्त्वाच्या नसतात. जिथे माणसाचे मन असते तिच क्रिया महत्त्वपूर्ण ठरते. हातांनी भगवंताची पूजा केली आणि वाणीने त्याची स्तुती केली तरी या क्रियेत मन समाविष्ट नसेल तर त्या क्रिया वरवरच्या ठरतात. पूजा शारीरिक क्रिया आहे आणि भजन ही वाचिक क्रिया आहे. या दोन्ही क्रियांपेक्षा मनाने केलेले भगवद्‌चिंतन हे सर्वश्रेष्ठ असते. म्हणून आत्मचिंतन ही एकच क्रिया प्रकाशित करणारे हे स्थल असल्यामुळे याला क्रियाप्रकाशस्थल असे नाव आहे. याचे स्वरूप स्पष्ट करताना जगद्‌गुरू रेणुकाचार्य सांगतात:

**शिवस्य परिपूर्णस्य चिदाकाशस्वरूपिण:।**

**आत्मत्वेनानुसंधानात् क्रियाद्योतनवान् यमी।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.७६)

शिव परिपूर्ण आहे आणि ज्ञानाकाशस्वरूप आहे. तो प्रकाशरूप आहे. बाह्य आकाशात कधी प्रकाश असतो

तर कधी अंधार. बाह्य आकाश हे परप्रकाशित आहे. चिदाकाश मात्र स्वयंप्रकाशित असते. परिपूर्ण ज्ञानप्रकाशस्वरूप असा शिव म्हणजे मीच आहे. असे निरंतर ध्यान करणाऱ्या महाकाशस्थली शिवयोग्याला क्रियाप्रकाशवान् म्हणतात. शिवयोगी हा यमी असतो. यमी म्हणजे यमनियम इत्यादी संपत्तीने युक्त असा. ज्याचे आपल्या बाह्येंद्रियांवर आणि अंतरेंद्रियांवर नियंत्रण नसते त्याला आत्मचिंतन करणे शक्य होत नाही. त्याने प्रयत्न केला तरी त्याच्या मनात हळूच संसाराचे चिंतन सुरू होईल. याचा अर्थ एवढाच की, त्याचे सारे प्रेम संसारावर आहे, भगवंतावर नाही. ज्याच्यशी आपला घनिष्ठ संबंध असतो त्याचेच आपल्याला वारंवार स्मरण होत असते. तुमचा प्रपंचाशी घनिष्ठ संबंध असेल तर तुमच्या ध्यानात प्रपंचच उभा राहील. परंतु इंद्रियांचे नियंत्रण करून आत्म्याशी संबंध साधला तर हळूहळू आत्म्याविषयी प्रगाढ प्रेम मनात जागे होईल. आत्म्याशी एकदा संबंध जुळला की मग अष्टौप्रहर आत्मचिंतनच घडू लागते. डोळे मिटून ध्यानस्थ बसलेला मनुष्य भगवंताचेच ध्यान करीत असेल याची खात्री नसते. शिवयोगी मात्र आत्म्याचे ध्यान ही एकमेव क्रिया करीत असतो.

**निष्कलंकचिदानंदगगनोपमरूपिण:।**
**शिवस्य परिपूर्णस्य वृत्तिश्चैतन्यरूपिणी।।१९.७७।।**

शिव कसा आहे? तर निष्कलंक, चिदानंदस्वरूप आणि परिपूर्ण. परशिव मीच आहे असे चिंतन करणारी मनोवृत्ती शिवासारखी ज्ञानरूप होते. चिद्रूपाचे चिंतन करता करता वृत्ती देखील चिद्रूप होते. चित्तवृत्तींचा निरोध करा, असे योगशास्त्रात सांगितले आहे. परंतु येथे मात्र चित्तवृत्ती चैतन्यरूप बनवावी असे प्रतिपादन केले आहे. योगशास्त्रात आसन, प्राणायाम, ध्यान यांच्या साहाय्याने मनोवृत्तींचा निरोध कसा करावा हे शिकवले जाते. मनोवृत्ती बाहेर जाऊ नये याची अधिकाधिक काळजी घ्यावी असे सांगितले जाते. परंतु शिवयोग हा एक सहजमार्ग आहे.

'दृष्टीं ब्रह्ममयीं कृत्वा पश्चेद् ब्रह्ममयं जगद्।' दृष्टी ब्रह्ममय झाली की अवघा प्रपंच ब्रह्ममय दिसू लागतो. आपल्या मनात जे असते तेच आपण बाहेर पाहत असतो. मनात प्रपंच भरलेला असेल तर बाहेरही प्रपंचच दिसतो आणि मनात परमात्मा भरलेला असेल तर बाहेरही तोच दिसतो. वृत्ती जेव्हा परब्रह्ममय होते तेव्हा परब्रह्माशिवाय दुसरे काहीही दिसत नाही. अशा प्रकारे योगशास्त्र चित्तवृत्तींचा निरोध करा असे सांगते, तर शिवयोग वृत्ती चैतन्यमय करा असे सांगते. योगाभ्यासी व्यक्तीचे मन अभ्यास सुरू आहे तोपर्यंतच आत राहते. जर अभ्यास सुटला तर पुन्हा स्वैरपणे बाहेर उधळते. एखाद्या मस्तवाल घोड्याला बांधून ठेवले तर बंधन असेपर्यंत तो तिथे उभा राहतो. नुसता उभा राहत नाही तर आपले अंग इकडे तिकडे हलवीत राहतो. तो शंभर टक्के स्थिर राहत नाही. त्याला मुक्त करताक्षणीच तो वायुवेगाने दौडत जातो. मनाची अवस्था अशीच असते. योगाभ्यासाने त्याला जबरदस्तीने स्थिर करता येते हे खरे असले तरी अभ्यास सुटताच ते बंधमुक्त होऊन पुन्हा विषयांकडे धावत सुटते. काही लोक श्रावण महिन्यात महिनाभर उपवास करतात. उपवास करायचा म्हणून ते करतात. तो मन:पूर्वक असतोच असे नाही. कांदा, लसूण, मीठ वर्ज्य करतात. ते उपवास करतात खरे, पण श्रावण महिना कधी संपतो असे त्यांना होते. आम्ही असे बरेच लोक पाहिले की जे श्रावण महिना संपला रे संपला की दुसऱ्या दिवशी वर्ज्य केलेल्या पदार्थांवर तुटून पडतात. त्यावेळी त्यांना स्वर्गातले अमृत मिळाल्यासारखे वाटते. जबरदस्तीने केलेली गोष्ट म्हणजे 'जुलुमाचा राम राम' असतो. जबरदस्तीने मन डांबून ठेवायचे नाही तर मनोवृत्तीच शिवमय करावी, असे येथे प्रतिपादन केलेले आहे. शिवमय वृत्ती बाहेर आली तरी तिला सर्व प्रपंच शिवमयच दिसतो.

शिवयोग्याची मनोवृत्ती अशी चैतन्यमय झालेली असते.

**निष्कलंके निराकारे नित्ये परमतेजसि।**
**विलीनचित्तवृत्तस्य तथा शक्तिः क्रियोच्यते।।१९.७८।।**

शिव हा निष्कलंक आहे, निराकार आहे; नित्य आहे, तेजोरूप आहे. अशा परिशिवात शिवयोग्याची चित्तवृत्ती विलीन होते. लोखंडाचा तुकडा जर अग्नीत टाकला तर अग्नीच्या संपर्काने तो अग्निरूपच होतो. पाहणाऱ्याला तो विस्तव आहे असेच वाटते. त्याच्या ठिकाणी विस्तवाचा गुणदेखील उतरतो. त्याला हात लावताच हात पोळतो. लोखंडी तुकडा अग्नीत विलीन झाल्यामुळे असे घडते. त्याने आपले अस्तित्व अग्नीत समर्पित केलेले असते. याप्रमाणे शिवयोगी आपली चित्तवृत्ती परशिव ब्रह्मात समर्पित करतो. त्याची आत्मानुसंधानाची जी क्रिया असते तिलाच क्रियाशक्ती असे म्हणतात. ती परशिवाप्रमाणे तेजोरूप असते. शिवयोगी क्रियाशक्तीने परशिवाची उपासना करीत असतो. म्हणून शिवयोग्याची क्रिया सामान्य नसते. अशा शिवयोग्याची स्थिती कशी असते हे पुढील श्लोकात सांगितले आहे:

**सर्वज्ञः सर्वकर्ता च सर्वगः परमेश्वरः।**
**तदैक्यचिन्तया योगी तादृशात्मा प्रकाशते।।१९.७९।।**

परशिव सर्वज्ञ आहे. सर्वकर्ता आहे आणि सर्वत्र व्यापून राहिलेला आहे. अशा परशिवाचे चिंतन करता करता शिवयोगी त्याच्याशी तादात्म्य पावतो. परशिवाशी तादात्म्य साधल्यामुळे त्याच्या ठिकाणी देखील परशिवाचे सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व आणि सर्वव्यापकत्व हे गुण प्रविष्ट होतात. सामान्य मनुष्य जे करू शकत नाही ते असामान्य योगी करतो ते यामुळेच. आकाशगमन, परकायप्रवेश इत्यादी सिद्धी त्याला प्राप्त होतात. सर्व सिद्धिसामर्थ्य परशिवाजवळ असते. त्याच्याशी समरसता साधल्यावर ते सामर्थ्य शिवयोग्याला प्राप्त होते. व्यवहारात आपण पाहतो की एखाद्या अधिकारी पुरुषाच्या जवळ जो मनुष्य राहतो तो देखील अधिकाराचा वापर करीत असतो. त्याने दिलेल्या आज्ञा लोकांना पाळाव्या लागतात. वास्तविक त्याला तसा अधिकार नसतो, परंतु अधिकारी व्यक्तीच्या सान्निध्यामुळे तो थोडाफार अधिकार गाजवत असतो. ही सामान्य व्यवहारातली गोष्ट आहे. शिवयोगी तर प्रत्यक्ष परशिवाशी एकरूप झालेला असतो. मग त्याच्या ठिकाणी शिवाचे सामर्थ्य आले तर त्यात नवल ते काय?

**सर्वेंद्रियाणां व्यापारे विद्यमानेऽपि संयमी।**
**प्रत्युन्मुखेन मनसा शिवं पश्यन् प्रमोदते।।१९.८०।।**

शिवयोग्याच्या शरीराकडून व्यवहार होत असतो. तो चालत असतो, ऐकत असतो, खात-पित असतो. त्याचे इंद्रियव्यापार चालू असतात. परंतु तो संयमी असल्याने शिवाशी सदैव सन्मुख असतो. चर्मचक्षूंनी आपण ज्या पातळीवर बाहेर पाहत असतो त्याच ठिकाणी दृष्टी अंतर्मुख केली तर आत एक पश्चिमशिखाचक्र दिसू लागते. सामान्य माणूस डोळे उघडून बाहेर पाहतो आणि योगी पुरुष डोळे बंद करून दृष्टी आत वळवून पश्चिमशिखाचक्राचे दर्शन घेतो. त्याला अंतर्दृष्टीने शिवदर्शन घडते आणि त्यामुळे तो अत्यंत प्रमोदित होतो.

प्रिय, मोद आणि प्रमोद अशी तीन प्रकारची वृत्ती असते. अपेक्षित वस्तूला पाहिल्यावर मनुष्याच्या मनात जी वृत्ती निर्माण होते ती प्रियवृत्ती होय. भुकेल्या माणसाला अन्नपदार्थ दिसल्यावर त्याच्या मनात निर्माण होणारी वृत्ती

म्हणजे प्रियवृत्ती होय. अन्नपदार्थ हाती आल्यावर त्याच्या मनात निर्माण होणारी वृत्ती म्हणजे मोदवृत्ती होय आणि अन्नपदार्थ खाल्ल्यावर त्याच्या मनात निर्माण होणारी वृत्ती ही प्रमोदवृत्ती होय. या वृत्तींमध्ये चढत्या श्रेणीने आनंद वाढत जातो. प्रियवृत्ती पेक्षा मोदवृत्तीत अधिक आनंद आणि मोदवृत्तीपेक्षा प्रमोदवृत्तीत अधिक आनंद. सामान्य माणसाच्या नित्य व्यवहारात ज्या वृत्ती असतात, तशाच शिवयोग्याच्या परमार्थव्यवहारातही त्या असतात. परमात्म्याच्या अस्तित्वाचे जेव्हा ज्ञान होते तेव्हा त्याच्या मनात प्रियवृत्ती उत्पन्न होते. परमात्मा आहे पण कोठे आहे, असा प्रश्न त्याला पडतो. आपल्या हृदयात तो आत्मरूपाने आहे हे ज्ञान जेव्हा त्याला होते तेव्हा त्याच्या मनात मोदवृत्ती निर्माण होते. त्यानंतर तो निरंतर शिवध्यान करू लागतो. शिवध्यान करता करता तो शिवाच्या निकट जातो तेव्हा त्याच्या मनात प्रमोदवृत्ती निर्माण होते. शिवयोग्याला ज्या शिवाचा साक्षात्कार होतो त्या शिवस्वरूपाचे वर्णन पुढील श्लोकात केलेले आहे.

**कूटस्थमचलं प्राज्ञं गुणातीतं गुणोत्तरम्।**
**शिवतत्त्वं स्वरूपेण पश्यन् योगी प्रमोदते।।१९.८१।।**

परशिव कूटस्थ असतो. कूटस्थ म्हणजे सर्व विकारांपासून मुक्त असा साक्षिरूप. तो अचल आहे. तो प्राज्ञ आहे. सत्त्व-रज-तम या तीन गुणांपलीकडला आहे. सर्वज्ञत्व, नित्यतृप्तत्व, अनादिबोधत्व, स्वतंत्रता, अलुप्तशक्तिमत्व इत्यादी श्रेष्ठ गुणांनी युक्त आहे. यापेक्षा उत्कृष्ट गुण अस्तित्वात नाहीत. अशा परशिवाला आपल्या आत्मरूपाच्या ठिकाणी पाहत शिवयोगी आनंदित झालेला असतो. शेवटी या स्थलाचा समारोप करताना सांगतात:

**परात्मनि क्रिया सर्वा गंधर्वनगरीमुखा।**
**प्रकाशत इति प्रोक्तं क्रियायास्तु प्रकाशनम्।।१९.८२।।**

आत्मानुसंधान करता करता शिवयोग्याकडून दुसऱ्या काही क्रिया घडल्या तरी त्या आकाशातील गंधर्वनगरासारख्या असतात. आकाशातील ढगांचे आकार हवेमुळे सारखे बदलतात. ते ढग कधी एखाद्या घरासारखे, नगरासारखे, मनुष्यासारखे, झाडासारखे तर कधी भुतासारखे दिसतात. हे गंधर्वनगर अस्थिर असते. पाहाता पाहाता ते उत्पन्न होते आणि पाहाता पाहाता नाहीसे होते. 'अरे हा बघ वाघ' असे कुणाला दाखवायला जावे तर त्याने तिकडे पाहीपर्यंत त्याचा कोल्हा झालेला असतो. त्यामध्ये अजिबात स्थैर्य नसते. त्याप्रमाणे आत्मानुसंधान ही एक क्रिया सोडून शिवयोग्याकडून ज्या शारीरिक क्रिया घडतात त्या गंधर्वनगरासारख्या केवळ भासमान होणाऱ्या असतात. जसे येथे प्रत्यक्ष नगर नसते त्याप्रमाणे शिवयोग्याच्या क्रिया केवळ सहजपणे घडत असतात. त्या क्रियांचा कुठलाही लेप त्याच्या मनाला लागत नसतो. आत्मानुसंधान ही एकच क्रिया तो मन:पूर्वक करीत असतो. या क्रियेचे प्रकाशन करणारे हे स्थल असल्यामुळे याला क्रियाप्रकाशस्थल असे म्हणतात, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२६ नोव्हेंबर १९९४

## भावप्रकाशस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

क्रियाप्रकाशस्थलानंतरचे स्थल आहे भावप्रकाशस्थल. मनुष्य जेव्हा कोणतीही क्रिया करतो तेव्हा त्यावेळी भावनेची आवश्यकता असते. भावनेशिवाय घडलेली क्रिया फलप्रद ठरत नाही. क्रिया आणि ज्ञान या दाहोंच्यामधे भाव असतो. क्रिया करणाऱ्यांना भावनेची गरज असते तशीच ज्ञान संपादन करणाऱ्यांनाही भावनेची गरज असते. भावनेशिवाय कर्म घडत नाही आणि ज्ञानही प्राप्त होत नाही. कर्म आणि ज्ञान यांचा संबंध जुळवणारे आणि या दोहोंना सफल करणारे हे भावप्रकाशस्थल अतिशय महत्त्वपूर्ण स्थल आहे. याआधी भावनिष्पत्तिस्थलाचा विचार केलेला आहे. अन्य भावना निवृत्त होऊन शिवभावना परिपक्व होणे याला भावनिष्पत्ती म्हटले आहे. शिवभावना पक्व झाली की ती प्रकट होते, प्रकाशत राहते. एखादे फळ पिकले की त्याचा घमघमाट सुटतो त्याप्रमाणे. शिवभावनेने प्रकटीकरण करणारे हे स्थल आहे.

मनुष्याच्या शरीरावरून देखील त्याच्या मनात कोणती भावना आहे याचा अंदाज येतो. डोळ्यांतून, चेहऱ्यावरून, कृतीवरून माणूस आपली भावना व्यक्त करीत असतो. ज्ञानी पुरुषाचे मुखमंडल पाहून देखील हा ब्रह्मनिष्ठ आहे हे सर्वांना कळते. याप्रकारे परिपक्व शिवभावना प्रकट करणारे हे स्थल आहे. जगद्गुरू रेणुकाचार्य या भावप्रकाशस्थलाविषयी सांगतात:

**तरंगाद्या यथा सिंधौ न भिद्यन्ते तथात्मनि।**
**भावा बुद्ध्यादयः सर्वे यत्तद् भावप्रकाशनम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.८३)

समुद्रावर तरंग, फेस, बुडबुडे उत्पन्न होतात. परंतु ते समुद्रापासून भिन्न नसतात. त्याप्रमाणे शिवयोग्याच्या मनात भावनेचा तरंग उठला तरी तो त्याच्या आत्मचैतन्यापेक्षा, परब्रह्म शिवापेक्षा भिन्न नसतो. परिपूर्ण शिवमय झालेली मनोवृत्ती म्हणजेच भावना अथवा भाव होय. तरंगात समुद्रच असतो त्याप्रमाणे शिवयोग्याच्या भावनेत केवळ शिवच असतो. त्याशिवाय अन्य काही असत नाही. त्याच्या भावनेचा आधार परशिवच असतो. त्याची भावना केवळ शिवालाच प्रकाशित करीत असते. म्हणून या स्थलाला भावप्रकाशस्थल असे म्हणतात.

**शिव एव जगत्सर्वं शिव एवाहमित्यपि।**
**भावयन् परमो योगी भवदोषैर्न बाध्यते।।१९.८४।।**

शिवयोगी सर्व प्रपंच परमात्मरूपात पाहत असतो. त्याची दृष्टी बहिर्मुख झाली तरी त्या दृष्टीला हा जड प्रपंच दिसत नाही, तर प्रपंचरूपाने उभे असलेले विश्वात्मक शिवस्वरूप दिसते. प्रपंच शिवस्वरूप आहे आणि मी देखील शिवस्वरूप आहे, ही भावना त्याच्या ठायी दृढ झालेली असते. त्याने डोळे बंद केले तरी तो शिवाला पाहत असतो आणि डोळे उघडले तरी त्याला शिवच दिसत असतो. त्याची भावना काम, क्रोध, लोभ आदी दोषांनी लिप्त होत नाही.

**शिवभावे स्थिरे जाते निर्लेपस्य महात्मन:।**
**ये ये भावा: समुत्पन्नास्ते ते शिवमया: स्मृता:।।१९.८५।।**

शिवभावना स्थिर झालेला शिवयोगी विषयांपासून अलिप्त असतो. त्याच्या ठिकाणी उत्पन्न होणारी भावना शिवमय असते. तो आकाशासारखा निर्लेप असतो. आकाश कधी मळत नाही की एखाद्या रंगात रंगत नाही. त्याप्रमाणे शिवयोग्याकडून प्रपंचव्यवहार घडला तरी त्यामुळे ते लिप्त होत नाही. सामान्य मनुष्याचे सर्व व्यवहार त्याचे मन नियमित करीत असते. मनाला जे पाहावे वाटेल ते मनुष्य पाहतो, जे ऐकावे वाटेल तेच ऐकतो. मन इंद्रियांचा अध्यक्ष असल्याने इंद्रिये मनाच्या आज्ञेप्रमाणे वागतात. मनाला तृप्त करण्यासाठी त्यांची धडपड चाललेली असते. विषयभोगामुळे इंद्रियांना तृप्ती मिळत नसून मनाला तृप्ती मिळत असते. विषय आणि मन यांचा संबंध जोडणे एवढेच इंद्रियांचे काम असते. ऑफिसमधला टेलिफोन ऑपरेटर जसा बाहेरून आलेला फोन साहेबांना जोडून देतो, त्याप्रमाणे इंद्रिये विषय आणि मन यांच्यात संपर्क प्रस्थापित करीत असतात. विषयभोगामुळे मिळणारे सुख अथवा दु:ख इंद्रिये भोगत नाहीत तर मन भोगत असते. इंद्रिये ही मनाची साधने आहेत. मन म्हणेल तसे त्यांना वागावे लागते. मनाला रूप पाहण्याची इच्छा झाली की डोळे उघडतात आणि मनाचा रूपाशी संबंध जोडून देतात. मनाला काही ऐकण्याची इच्छा झाली की कर्णेन्द्रिय सतर्क होते आणि मनाचा शब्दाशी संबंध जोडून देते. इंद्रियांच्या द्वारेच मन बाहेर धावते आणि सुखदु:ख भोगते. इंद्रियांची दारे बंद केली तर मन अंतर्मुख होते आणि त्याला अंतरंगातील आनंदसागर सापडतो. म्हणून शिवयोगी सदैव अंतर्मुख असतो. परंतु त्याची भावना शिवमय झाल्यामुळे तो बहिर्मुख झाला तरी त्याला सर्वत्र शिवच दिसत असतो.

**अद्वितीयशिवाकारभावनाध्वस्तकर्मणा।**
**न किंचिद्भाव्यते साक्षात् शिवादन्यन्महात्मना।।१९.८६।।**

परशिवासारखी अत्युत्कृष्ट अशी दुसरी वस्तू प्रपंचात नाही. म्हणून शिव अद्वितीय आहे. अशा अद्वितीय शिवाशी शिवयोगी समरस झालेला असतो. त्यामुळे त्याची सर्व कर्मबंधने ध्वस्त झालेली असतात आणि तो शिवाशिवाय अन्य कशाचीही भावना करीत नाही.

**गलिताज्ञानबंधस्य केवलात्मानुभाविन:।**
**यत्र यत्रेंद्रियासक्तिस्तत्र तत्र शिवात्मता।।१९.८७।।**

शिवयोगी केवळ आत्मानुसंधान करीत असतो. शिवाद्वैतज्ञानाने त्याचे अज्ञानबंधन ध्वस्त झालेले असते. अंधारकोठडीतील अंधार दिवा लावला की दूर होतो तसे जीवात्म्याच्या ठिकाणी असलेले अज्ञान ज्ञानामुळे नष्ट होते. स्वस्वरूपाला म्हणजे आत्मरूपाला न जाणणे हेच अज्ञान होय. अज्ञान हा बंध आहे तर ज्ञान ही मुक्ती आहे. शिवयोग्याचे अज्ञानबंधन जळून जाते. मग शिवयोग्याची इंद्रिये ज्या ज्या ठिकाणी जातात त्या त्या ठिकाणी त्याला परमशिवाशिवाय काही अनुभवाला येत नाही. तो जे पाहील ते शिव, तो जे ऐकील ते शिवच. तो स्वत: शिव झालेला असल्यामुळे त्याला अवघी सृष्टी शिवमय दिसत असते. हा विचार स्पष्ट करण्यासाठी एक कथा सांगितली जाते. तुम्हीही ती कधी ऐकली असेल.

एक राजा अरण्यात शिकारीसाठी गेला. त्यावेळी पादत्राणांचा शोध लागला नव्हता. अनवाणी पायांनीच तो अरण्यात फिरत सावज शोधत होता. त्यावेळी त्याच्या पायात काटा रुतला. तो वेदनेने विव्हळला. हा अनुभव तो प्रथमच घेत होता. घोड्यावर बसून तो राजधानीत परत आला आणि त्याने दरबारात आपला रक्ताळलेला पाय

दाखवला. अरण्यात नेहमीच जावे लागणार आहे. मग पुन्हा काटा रुतला तर काय करावे? असे त्याने दरबारी विद्वानांना विचारले. विद्वानही राजासारखेच होते. त्यांनी चर्चा केली, खूप खल केला आणि शेवटी उपाय शोधला. ते म्हणाले,

''महाराज, आपल्याला अरण्यात तर जावेच लागेल. तेथे काटेही असणारच. मग आपल्याला काटा रुतू नये म्हणून एकच उपाय आहे. राजधानीपासून ते अरण्यापर्यंत सर्व जमिनीवर आणि अरण्यातील सर्व जमिनीवर चामडे अंथरले पाहिजे. मग मात्र आपल्याला काटा अजिबात रुतणार नाही.''

हा उपाय राजाला पंसत पडला. त्याने आज्ञा दिली की सर्व जमीन चामड्याने झाकून टाका. पण चामडे आणायचे कुठून? ती तर निसर्गनिर्मित वस्तू नाही. प्राण्यांच्या अंगावर कातडी असते. मग राजाज्ञाने मुक्या प्राण्यांची हत्या सुरू झाली. सैनिकांनी युद्धभूमीवर लढणे सोडून दिले आणि ते मुक्या प्राण्यांना ठार करण्यात शौर्य दाखवू लागले. राज्यातील सर्व लोक चामडे स्वच्छ करणे, ते शिवणे ही कामे करू लागले. नगरात चामड्यांचा भयानक दर्प पसरला. मृत प्राण्यांच्या हाडामासांचे ढीग साचू लागले. ही अपूर्वाई राजा आनंदाने पाहत होता.

त्या नगरात एक महात्मा आला. पाहतो तो सारे वातावरण दुर्गंधीने भरलेले. हाडामांसाचे ढीग साचलेले आणि सर्व लोक चांभार झालेले. त्याने चौकशी केल्यावर त्याला सर्व कथा समजली. एक काटा रुतून राजाला वेदना झाली होती. त्यासाठी असंख्य प्राण्यांना मरणवेदना देणे चालू होते. एका काट्याची वेदना सहन न झालेल्या राजाला शस्त्रांच्या घावांनी मुक्या प्राण्यांना मरणप्राय वेदना होत आहेत हे कळत नव्हते. महात्मा हळहळला. त्याने चामड्याचा एक जोडा तयार केला आणि तो घेऊन दरबारात गेला. राजाने महात्म्याचा सत्कार केला. त्याला उच्चासनावर बसवले. महात्मा म्हणाला,

''राजा, तुला एक काटा तो काय रुतला आणि तेवढ्यासाठी तू राज्यातील सर्व पशूंचे प्राण घ्यायला उद्युक्त झाला आहेस. राज्यातील पशुपक्षी देखील तुझीच प्रजा आहे. त्यांचे रक्षण करणे हे तुझे कर्तव्य आहे. या मुक्या प्राण्यांची हत्या प्रथम थांबव.''

''महाराज'', राजा म्हणाला, ''मला काटे रुतू नयेत यासाठी सर्व जमिनीवर चामडे अंथरायचे आहे. त्यासाठी चामडे कुठून आणणार? प्राण्यांना मारावेच लागेल.''

''राजा'', महात्मा हसून म्हणाला, ''तुझ्या सारखा मूर्ख माणूस मी आजवर पाहिला नाही. तुझ्या दरबारातील हे सारे विद्वान देखील तुझ्याच लायकीचे आहेत. अरे, काटा रुतू नये यासाठी सर्व जमीन झाकण्यापेक्षा तुझ्या पायांनाच थोडे चामडे लपेटून घेतले तर भागणार नाही का?''

असे म्हणून सोबत आणलेले जोडे महात्म्याने राजाला दिले. ते त्याला पायात घालायला लावले. आणि मग म्हणाला,

''आता कुठेही जा, अरण्यात जा की स्मशानात. तुझ्या पायात काटा रुतणार नाही.''

राजा जोडे घालून आनंदाने नाचू लागला आणि त्याने मुक्या प्राण्यांची हत्या थांबवण्याचा आदेश दिला.

ही कथा काय सांगते? सर्व जमीन कातड्याने झाकण्यापेक्षा आपली दोन पावले चामड्याने झाकली तरी पुरे असते. त्याप्रमाणे सर्व जग ब्रह्ममय करीत बसण्यापेक्षा आपली भावना ब्रह्ममय करून घेतली तरी पुरेसे असते. भावना शिवमय झाली की दृष्टी शिवमय होते आणि दृष्टी शिवमय झाली की सृष्टी शिवमय दिसू लागते. पायात जोडा घातलेल्या व्यक्तीसाठी सर्व जमीन चामड्याने झाकल्यासारखीच असते, त्याप्रमाणे हे आहे. शिवयोग्याला

शिवदृष्टी लाभलेली असल्यामुळे त्याची इंद्रिये जिथे जिथे जातात तिथे तिथे त्याला परशिव दिसत असतो.

**रागद्वेषादयो भावा: संसारक्लेशकारणम्।**

**तेषामुपरमो यत्र तत्र भाव: शिवात्मक:।।१९.८८।।**

भावना अनेक प्रकारच्या असतात. रागात्मक भावना, द्वेषात्मक भावना, क्रोधात्मक भावना, लोभात्मक भावना इत्यादी. राग (अनुराग, प्रेम) आणि द्वेष या भावना म्हणजे क्लेश होत. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश हे पाच क्लेश आहेत, असे योगशास्त्र सांगते. ज्याच्यामुळे पीडा होते त्याला क्लेश म्हणतात. क्लेशांमुळे मनुष्याला दु:ख भोगावे लागते. तो स्वत: दु:खी होतो आणि इतरांनाही दु:खी करतो. राग-द्वेषांमुळे जीवात्मा संसारात वारंवार येत असतो. जीवात्मा संसारात येतो तेव्हा त्याला जन्म म्हणतात आणि संसारातून निघून जातो. तेव्हा त्याला मृत्यू म्हणतात. जन्म घेतल्यावर जीव रडतो आणि मरण आल्यावरही रडतो. याचा अर्थ जन्म-मरण हे दु:खदायक आहे असा होतो.

घरात चोर घुसू नये म्हणून जागे राहिले पाहिजे. झोप घ्यावी पण ती अशी नसावी की चोर येऊन घर धुवून नेले तरी पत्ता नाही. हा निवांत झोपलेलाच. बाह्य संपत्ती चोरीला जाऊ नये म्हणून जसा मनुष्य काळजी घेतो त्याप्रमाणे अंतरंगातील संपत्तीची चोरी होऊ नये म्हणून दक्ष राहायला हवे. कामक्रोधादी चोर मनुष्याच्या अंतरंगातील ज्ञानरूपी रत्नाचा अपहार करायला टपलेले आहेत. माणसाच्या विवेकबुद्धीवर कामक्रोधांनी मात केली तर अनर्थ घडतात. त्यामुळे सावध राहायला हवे. राग-द्वेषादी भावना संसारक्लेशाला कारणीभूत ठरतात. म्हणून त्यांच्यापासून दूर राहिले पाहिजे. राग-द्वेषांमुळे जीवात्मा संसारात येतो तेव्हा त्याला सुख थोडेच मिळते? संसारच मुळी दु:खरूप आहे. तर तो सुख देईल कसा? 'संसारसागरं दु:खं तस्माद् जाग्रत जाग्रत।'

संसारात दु:ख खूप आहे, सुख अगदी थोडे आहे. 'सुख पाहता जवापाडे। दु:ख पर्वताएवढे' अशी संसाराची अवस्था आहे. त्यातील कणभर सुखासाठी मनुष्य मणभर दु:ख भोगत असतो. परंतु आपल्या अंतरंगातील आनंदसागराचा शोध तो कधीही घेत नाही. लक्षावधी मनुष्यात एखादा मनुष्य आत्मरूपाचा शोध घेऊन सुखसागरात वास्तव्य करतो.

राग-द्वेष ह्या एकाच नाण्याचा दोन बाजू आहेत. पूतना राक्षसी बाळकृष्णाला ठार करण्याच्या उद्देशाने गोकुळात गेली होती, त्यावेळी तिने अत्यंत सुंदर रूप धारण केले होते. कृष्णाने जेव्हा तिचे प्राण शोषले तेव्हा ती आपल्या मूळच्या भयंकर रूपात मरून पडली. एकाच पूतनेची ही दोन रूपे होती. त्याप्रमाणे एकाच भावनेचे राग (अनुराग) हे सुंदर रूप आहे आणि द्वेष हे भयंकर रूप आहे. एकाच नाण्याच्या या दोन बाजू आहेत. राग मोहक असतो तर द्वेष भयानक असतो. दोन जिवलग मित्रांमध्ये साता जन्माचे वैर कसे निर्माण होते? एकत्र राहणारे, बसणारे, फिरणारे दोन जिवलग मित्र असतात. त्यांना एकमेकांवाचून करमत नसते. पण कुठेतरी काहीतरी घडते. त्यांची मने गढूळ होतात. मग ते एकमेकांची तोंडे देखील पाहत नाहीत. इतकेच नव्हे तर ते दोघे आधी एकमेकांसाठी प्राणार्पण करायला तयार होते, आता एकमेकांचे प्राण घ्यायला उठतात. राग (प्रेम) आणि द्वेष हे एकमेकांचे किती जिवलग मित्र आहेत, हे यावरून लक्षात येते. कुणावर प्रेम (राग) करण्यासाठी कुणाचा तरी सूड घेण्यासाठी (द्वेष) जीवात्मा संसारात जन्म घेत असतो. म्हणून या संसाराबद्दल राग बाळगू नये तसा त्याचा द्वेषही करू नये. कारण काहीही करायला गेलो तर तो आपल्याला आकर्षित करणारच. राग-द्वेष तुम्हाला सोडताच येत नसतील तर त्या भावना परमात्मा विषयी कराव्या. राग (प्रेम) करा पण परमात्म्याचा. द्वेष करा तोही

परमात्म्याचा. त्यामुळे मुक्ती मिळेल. परमात्म्याचा द्वेष करणे ही देखील एक भक्तीच होय. तिला 'वैरभक्ती' अथवा 'विरोधभक्ती' असे नाव आहे.

शिवयोग्याच्या मनातून संसारक्लेशकारक अशा रागद्वेषादी भावना नाहीशा झालेल्या असतात. त्याच्या मनाला केवळ शिवभावनाच व्यापून असते. शेतकरी पेरणीपूर्वी काय काय करतो हे तुम्हाला माहीत आहे. तो आधी जमिनीतील कंद, तण उपटून काढतो. मग जमीन नांगरतो, ती स्वच्छ करतो, मृदू करतो. नंतर पेरणी करतो. पाऊस पडला की मग बीजे रुजतात आणि भरघोस पीक येते. त्याप्रमाणे शिवज्ञानाचे पीक तुम्हाला घ्यायचे असेल तर प्रथम हृदयरूपी जमीन स्वच्छ केली पाहिजे. तिच्यातील कामक्रोधाचे कंद उपटून काढले पाहिजेत. विकारांचे तण काढले पाहिजे. विवेकाने हृदय नांगरले पाहिजे. मग शिवभावनारूपी बीजाची पेरणी करावी लागते. त्यावर भक्तीची जलशिंपण झाली की मग शिवज्ञानाचे भरघोस पीक अंतरंगात डोलू लागते. ज्यांना हृदयरूपी भूमी नीट करता येत नाही त्यांच्या अंतरंगात वासना-विकारांचेच उदंड गवत उगवते. राग-द्वेष नष्ट झाल्यावरच शिवभावना रुजू शकते. शिवभावनाच संसारापासून मुक्ती देते. शिवयोग्याच्या मनात तीच निर्मळपणे सदैव नांदत असते. शेवटी या भावप्रकाशस्थलाचा समारोप करतात.

**यथा सूर्यसमाक्रांतौ न शक्नोति तमः सदा।**
**तथा प्रकाशमात्मानं नाविद्याक्रमति स्वयम्।।१९.८९।।**

सूर्य उगवल्यावर अंधार नाहीसा होतो. अंधार कधी सूर्याला आवरण घालू शकत नाही, त्याप्रमाणे प्रकाशरूप आत्मस्वरूपाला अज्ञानाचा अंधकार झाकू शकत नाही. अंधार आणि प्रकाश यांच्यात निवर्त्य-निवर्तक विरोध आहे. अंधार हा निवर्त्य म्हणजे निवृत्त होणारा, निघून जाणारा आहे तर प्रकाश हा निर्वतक म्हणजे निवृत्त करणारा, घालवून देणारा आहे. प्रकाश आला की अंधार निघून जातो. अंधार सूर्याला कधी ग्रासू शकत नाही त्याप्रमाणे अज्ञानरूपी अंधार आत्मरूपी सूर्याला ग्रासू शकत नाही.

अशाप्रकारे शिवभावनेचे प्रकाशन करणारे असे हे भावप्रकाशस्थल आहे, उद्या लिंग-षट्स्थलांतर्गत शरणस्थलातील अंतिम ज्ञानप्रकाशस्थलाचा विचार करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२७ नोव्हेंबर १९९४



आशीर्वचन नववे

## ज्ञानप्रकाशस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

काशीच्या या पवित्र जंगमवाडी महामठात कार्तिक मासानिमित्त 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथावर ज्ञानसत्र सुरू आहे. लिंग-षट्स्थलांर्गत शरणस्थलाच्या उपस्थलांची चर्चा करीत आपण त्याच्या अंतिम उपस्थलापर्यंत आलो आहोत. अंतिमस्थल आहे ज्ञानप्रकाशस्थल. अंग (जीव) आणि लिंग (शिव) यांच्यातील अद्वैत प्रतिपादन करणारे हे स्थल आहे. शिव-जीव यांच्यातील अभेद लक्षार्थाने या स्थलात समजावून दिला आहे. जगद्गुरू रेणुकाचार्य महर्षी अगस्त्यांना सांगतात.

**मुख्यार्थेऽसंभवे जाते लक्षणायोगसंश्रयात्।**
**तज्ज्ञानयोजनं यत्तदुक्तं ज्ञानप्रकाशनम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, १९.९०)

शब्दामध्ये अर्थ समाविष्ट असतो. शब्दाचा अर्थ माहीत नसेल तर शब्द ऐकून देखील काहीच कळणार नाही. जोपर्यंत तात्पर्य कळत नाही तोपर्यंत ज्ञान होत नाही. व्यवहारात वस्तूचे ज्ञान करून घेण्यासाठी शब्दाचा उपयोग केला जातो. उदाहरणार्थ- घट. घट हा एक पदार्थ आहे आणि घट हे एक नावही आहे. घट या शब्दाचा अर्थ जोपर्यंत कळत नाही तोपर्यंत घट या वस्तूचे ज्ञान होणार नाही. संस्कृत न जाणणाऱ्या माणसाला 'घट आनय' असे सांगितले तर त्याला काहीच कळणार नाही. कारण त्याला त्या शब्दांचे अर्थ माहीत नसतात. दोन संस्कृत जाणणाऱ्या माणसांसोबत संस्कृत न जाणणारा माणूस काही काळ राहिला तर ऐकून आणि पाहून त्यालाही शब्दांचे अर्थ हळूहळू कळू लागतात.

अर्थाचे तीन प्रकार आहेत. वाच्यार्थ, लक्ष्यार्थ आणि व्यंग्यार्थ. एका शब्दात असे तीन अर्थ असतात. शब्दांचा मुख्य अर्थ म्हणजे वाच्यार्थ होय. वाच्यार्थ सर्वांना सहजपणे समजतो. मुलांना जेव्हा भाषा शिकवली जाते तेव्हा त्यांना प्रथम वाच्यार्थच शिकवला जातो. त्यानंतर पुढे लक्ष्यार्थ आणि व्यंग्यार्थ यांचे ज्ञान त्याला दिले जाते. वाच्यार्थ समजणे जेव्हा कठीण जाते तेव्हा त्याचा लक्ष्यार्थ पाहावा लागतो. 'त्याचे घर गंगेवर आहे'- या वाक्याचा वाच्यार्थ पाहिला तर काय दिसते? गंगेच्या प्रवाहावर घर आहे, असा अर्थ निघतो. परंतु गंगेच्या प्रवाहावर घर कसे काय असेल? पाण्यावर कुठे घर असते? या वाक्याचा वाक्यार्थ जेव्हा नीट कळत नाही तेव्हा आपण त्याचा लक्ष्यार्थ पाहतो. 'गंगेवर' या शब्दाचा अर्थ आपण 'गंगेच्या काठावर' असा घेतो. मग आपल्याला समजते की 'गंगेवर घर आहे' म्हणजे गंगेच्या काठावर घर आहे.' बोलायचे एक पण ते विरुद्ध अर्थाने, याला व्यंग्यार्थ म्हणतात. एखाद्या निरक्षर माणसाला उद्देशून 'हा आला बघा, पंडित' असे म्हटले जाते तेव्हा पंडित या शब्दाचा ज्ञानी असा वाच्यार्थ होत नसून त्या मनुष्याला व्यंग्यार्थाने मूर्ख म्हटलेले असते.

जीव हा शिव आहे असे जेव्हा गुरू शिष्याला सांगतात तेव्हा त्याला त्याचा वाच्यार्थच कळतो. केवळ वाच्यार्थाने जीव-शिवाच्या ऐक्याचे ज्ञान होत नाही. वाच्यार्थामुळे फक्त माहिती समजते. ज्ञान मात्र अनुभवाने प्राप्त होते. म्हणून जीव-शिवाचे ऐक्य लक्ष्यार्थाने समजून घ्यावे लागते. मातीचा घट आणि सोन्याचा घट हे एक

आहेत असे म्हटले तर त्याचा काय अर्थ होतो? त्यांना एक करण्याचा प्रयत्न केला तर ते एकमेकात मिसळतील काय? 'नाही' हे या प्रश्नाचे उत्तर आहे. परंतु दोन्ही घटांतील आकाश मात्र एकच असते. हे आपण समजून घेऊ शकतो. घट सोन्याचा असो की मातीचा, तो आकाशाची उपाधी असतो. त्यामुळे उपाधीसह दोन्ही घटांतील आकाश कितीही प्रयत्न केला तरी एक होऊ शकत नाहीत. त्याप्रमाणे या प्रपंचातील असंख्य जीवात्मे शरीर आणि मन या उपाधींमुळे एकमेकांपासून भिन्न भासतात. त्या सर्वांची शरीरे नष्ट करून त्यांच्या आत्म्यांना एक करता येत नाही. ज्याप्रमाणे दोन घटांतील आकाश ते घट एकमेकांवर आपटले तरी एक होत नाही त्याप्रमाणे जीवात्म्यांची शरीरे नष्ट करून देखील त्यांच्यातला आत्मा एक होत नसतो. आत्म्याचे एकत्व लक्षणानेच समजावून घ्यावे लागते. एखाद्या माणसाला जर तुम्ही सांगितले की तू म्हणजे शिव आहेस, तर तो हसून तुमची चेष्टा करील. तुम्हाला वेड लागले आहे असे काही तरी म्हणेल किंवा असे म्हणेल की, मी कसा शिव असेन? शिव तर कैलासात बसलेला आहे आणि मी तर इथे आहे.

शरीर आणि मन या उपाधींमुळे जीवात्म्याला आपण शिवरूप आहोत हे पटत नसते. मी अल्पज्ञ आहे, अल्पकर्ता आहे ही भावना जोपर्यंत मनुष्याच्या मनात दृढ असते तोपर्यंत तो सर्वज्ञ, सर्वकर्ता अशा परशिवाशी समरस होऊ शकत नाही. उपाधीसह शिव आणि जीव यांच्यात ऐक्य होत नाही. तेव्हा यामधील वाच्यार्थ सोडून द्यावा लागतो. त्यांचे ऐक्य लक्ष्यार्थाने समजावून घ्यावे लागते. मातीचा घट आणि सोन्याचा घट यांच्यात ऐक्य आहे. म्हणजे त्यांच्यामधले आकाश एक आहे. हे लक्ष्यार्थाने समजून घ्यावे लागते. दोन्ही घटांची तोडफोड करायची नसते. वाच्यार्थाचा त्याग करून लिंग आणि अंग यांच्यातील अद्वैताचे लक्ष्यार्थाने ज्ञान प्राप्त करून घेणे म्हणजेच ज्ञानप्रकाश होय. मरितोंटदार्यांनी आपल्या भाष्यात गाईंचे उदाहरण दिले आहे. गाईचे रंग भिन्न असतात. कुणाचा तांबडा, कुणाचा काळा, कुणाचा पांढरा. रंग कोणताही असला तरी सर्वांचे दूध पांढरेच असते. रंग ही त्यांची उपाधी असते. परंतु दूध मात्र एक असते, त्याप्रमाणे जीव अल्पज्ञ, अल्पकर्ता आणि शिव सर्वज्ञ, सर्वकर्ता असला तरी या उपाधींच्या पलीकडील चैतन्य मात्र एक असते. अशाप्रकारे लक्ष्यार्थाने जीव-शिवाचे अभेदज्ञान प्राप्त करून घेणे हेच ज्ञानप्रकाशस्थल होय.

**मुक्तस्य ज्ञानसंबंधो ज्ञेयाभावः स्वभावतः।**
**उपाधिसहितं ज्ञानं न भेदमतिवर्तते॥१९.९१॥**

व्यवहारात ज्ञेय वस्तू आणि ज्ञान यांच्यात भेद असतो. परंतु आत्मज्ञानात मात्र ज्ञेय आणि ज्ञान अभिन्न असतात. आत्माच मुळात ज्ञानरूप असतो. ज्ञान हाच आत्मा आणि आत्मा हेच ज्ञान असे अभिन्नत्व तेथे नांदत असते. सूर्याच्या प्रकाशात आपण सारे विश्व पाहत असतो. पण सूर्याला कोणाच्या प्रकाशात पाहत असतो? तर सूर्यालाही आपण सूर्याच्याच प्रकाशात पाहत असतो. त्याला पाहण्यासाठी दुसऱ्या कोणाच्या प्रकाशाची गरज नसते. त्याप्रमाणे आत्म्याच्या ज्ञानानेच आपण सर्व ज्ञान घेत असतो. आत्मा निरुपाधिक असल्यामुळे ज्ञेय आणि ज्ञान असा भेद तेथे नसतो. प्रपंचातील वस्तूंचे आपल्याला होणारे ज्ञान भेदज्ञान असते. कारण वस्तू आपल्यापासून भिन्न असते. परंतु आत्मा आणि आपण वेगळे नसल्यामुळे त्याचे ज्ञान भेदज्ञान नसून अभेदज्ञान असते. हाच विचार पुढील श्लोकामध्ये अधिक स्पष्ट केलेला आहे.

**ज्ञानमित्युच्यते सद्भिः परिच्छेदोऽपि वस्तुनः।**
**परात्मन्यपरिच्छेदे कुतो ज्ञानस्य संभवः॥१९.९२॥**

वस्तूच्या भिन्नतेमुळे आपल्याला वस्तुज्ञान होत असते. घट म्हणजे पट नव्हे, पट म्हणजे घट नव्हे. अशाप्रकारचे भेदज्ञान आपण करून घेत असतो. वस्तूचे स्वरूप समजून घेण्यासाठी ती वस्तू दुसऱ्या वस्तूंपासून भिन्न आहे हे आपण समजून घेत असतो. मी परमात्मा आहे असे समजून तुम्ही व्यवहार कराल तरी 'मी' हा परमात्माच असतो. येथे भेद संभवत नाही. ज्ञेय वस्तू आपल्यापेक्षा भिन्न असेल त्यावेळीच ज्ञेय आणि ज्ञान असे भेदज्ञान अस्तित्वात असते. परंतु जेव्हा ज्ञेय वस्तू आपण (आत्मा) असतो तेव्हा ज्ञेय, ज्ञान यामध्ये अभिन्नत्व असते. प्रापंचिक वस्तूंचे ज्ञान ज्या रीतीने आपण घेत असतो त्या रीतीने आत्म्याचे ज्ञान घेत नसतो. 'मी घट जाणतो' यामध्ये 'मी' आणि 'घट' वेगवेगळे असतात. 'मी आत्मा जाणतो' यामध्ये 'मी' आणि 'आत्मा' एकरूप असतो. असे प्रपंचज्ञान आणि आत्मज्ञान यामध्ये अंतर आहे. म्हणून आत्मज्ञानात ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान ही त्रिपुटी नसते.

**ज्ञानस्याविषये तत्त्वे शिवाख्ये चित्सुखात्मनि।**
**आत्मैकत्वानुसंधानं ज्ञानमित्युच्यते बुधैः।।१९.९३।।**

चिद्रूप परमात्मा हा ज्ञानाचा विषय नाही. मग त्याचे ज्ञान कसे होते? असा प्रश्न काही लोकांना पडेल. त्याचे उत्तर येथे दिले आहे. आत्मा आणि परमात्मा यांच्या अद्वैताचे चिंतन करणे हेच आत्मज्ञान होय. असे चिंतन करता करता ते दृढ झाले की त्याला दृढ आत्मज्ञान म्हणतात. गुरूच्या उपदेशामुळे आत्मा हा परमात्मा आहे असे ज्ञान झाले तरी सतत चिंतन करून त्याचे दृढीकरण करावे लागते.

जन्म घेतलेल्या बाळाला नाव नसते. पण आपण त्याला एक नाव देतो. त्या नावाने सतत हाक मारतो. मग हे आपलेच नाव आहे हे त्याच्या मनावर पक्के ठसते. त्या नावाशी तो तादात्म्य पावतो आणि ज्या शरीराला ते नाव दिलेले असते त्या शरीराशीही तो तादात्म्य झालेला असतो. इतका की, नाव आणि शरीर (नाम-रूप) म्हणजे मीच, अशी दृढ भावना त्याची होते. नाव आणि शरीर यांच्याशिवाय आपल्याला अस्तित्व नाही, नामरूप नष्ट झाले की आपण संपलो, असे त्याला वाटत असते. शरीरालाच आत्मा समजून त्याचे वर्तन होत असते. परंतु गुरुपदेशाने नाव हे शरीराला दिलेले आहे, आपल्याला नव्हे, शरीर म्हणजे आपण नसून आत्मा म्हणजे आपण आहोत, हे ज्ञान त्याला होते. नामरूपातीत, सच्चिदानंदस्वरूप अशा आत्म्याचे ज्ञान त्याला होते. मग तो आत्मचिंतन करू लागतो. त्याच्या ठिकाणी आत्मभाव दृढ होतो. अज्ञानी मनुष्याच्या मनात देहात्मभाव दृढ असतो, तसा ज्ञान्याच्या ठिकाणी आत्मभाव दृढ झालेला असतो. आत्मा-परमात्मा यांचे अभेदज्ञान त्याच्या हृदयात दृढ होते. प्रारंभी स्वतःला शरीर समजणारा जीवात्माच आत्मानुसंधान करीत करीत अखेर शिवरूप होतो. लिंग-अंग यांचे सामरस्य-लिंगांगसामरस्य- यालाच ज्ञान म्हणतात.

**अपरिच्छिन्नमानंदं सत्ताकारं जगन्मयम्।**
**ब्रह्मेति लक्षणं ज्ञानं ब्रह्मज्ञानमिहोच्यते।।१९.९४।।**

सर्व प्रपंच ब्रह्मरूपात पाहणे हेच ब्रह्मज्ञान आहे. ज्याच्या ठिकाणी अखंड आनंद नांदतो, जे अपरिमित आहे, जे सर्व प्रपंचात सत्‌रूपाने अस्तित्वात असते आणि ज्याच्यात त्रैलोक्याचा लय होतो असे तत्त्व म्हणजे परब्रह्म होय. ते परब्रह्मच जगताच्या रूपाने प्रकाशत असते. सोने अलंकाराच्या रूपाने आपण पाहत असतो त्याप्रमाणे. सोन्याकडे आपण 'अलंकार' म्हणून पाहतो आणि सोनार आपल्या अलंकाराकडे 'सोने' म्हणून पाहत असतो.

सोनाराकडे अंगठी घेऊन जा की सुवर्णहार घेऊन जा, तो त्याचे वजन करतो. देवाची मूर्ती घेऊन गेलात तरी तो तोलून पाहतो. त्याच्या दृष्टीत सर्व अलंकार हे सोने असते. त्याप्रमाणे अज्ञानी माणसाच्या दृष्टीत पृथ्वी वेगळी, आकाश वेगळे, वायू वेगळा असतो. प्रत्येक पदार्थ त्याला भिन्न दिसत असतो. परंतु ब्रह्मज्ञानी पुरुषाच्या दृष्टीत सर्व जग ब्रह्मरूप असते. तो जगाकडे जग म्हणून पाहत नाही तर ब्रह्म म्हणून पाहतो. परब्रह्म विश्वरूपाने त्याच्या समोर उभे असते. विश्वाचे नामरूप बाजूला सारून पाहिले तर तो ब्रह्मरूप आहे हेच दिसून येईल.

**ब्रह्मज्ञाने समुत्पन्ने विश्वोपाधिविवर्जिते।**
**सर्वं संविन्मयं भाति तदन्यन्नैव दृश्यते।।१९.९५।।**

ब्रह्मज्ञान उत्पन्न झाल्यावर सर्वत्र ज्ञानमय शिवस्वरूप दिसू लागते. कोठेही पाहिले की चिन्मय शिवच दिसतो. त्यावेळी दृष्टीत परिवर्तन होते. दृष्टीत परिवर्तन झाले की सृष्टी शिवरूप दिसू लागते.

**तस्मादद्वैतविज्ञानमपवर्गस्य कारणम्।**
**भावयन् सततं योगी संसारेण न लिप्यते।।१९.९६।।**

शिवाद्वैताचे ज्ञान हे मोक्षप्राप्तीचे कारण आहे. म्हणून शिवयोगी सदैव शिवभावना बाळगत असतो. मग त्याला संसारदु:खाचा स्पर्श होत नाही. संसाराचा संबंध शरीराशी झालेला दिसतो. परंतु संसाराशी आपले शरीर नव्हे तर मन जखडलेले असते. ते चिवटपणे संसाराला घट्ट चिकटून बसलेले असते. विवाहाला 'संबंध' असे म्हटले जाते. दोन जिवांचा तो संबंध असतो. भटजी बोहल्यावर पति-पत्नी म्हणून त्यांची वस्त्रगाठ बांधतो. परंतु खरे तर त्यांच्या मनाचीच घट्ट गाठ बसलेली असते. ही माझी आहे आणि हा माझा आहे- अशी भावना वधू-वरांच्या मनात उत्पन्न होते आणि मग आयुष्यभर ते एकमेकांच्या बंधनात पडतात. वस्तूवर आणि व्यक्तीवर मन आपला मालकी हक्क प्रस्थापित करते आणि त्या वस्तूच्या आणि व्यक्तीच्या बंधनात स्वत:ला अडकवून घेते. मनाच्या द्वारेच संसाराचा लेप होत असतो. शिवयोग्याचे मन ब्रह्मरूप झाल्यामुळे त्याला संसारात राहून देखील संसाराचा स्पर्श होत नाही. शेवटी जगद्गुरू रेणुकाचार्य या स्थलाचा समारोप करतात:

**नित्ये निर्मलसत्त्वयोगिषु परे निर्वासने निष्कले**
**सर्वातीतपदे चराचरमये सत्तात्मनि ज्योतिषि।**
**संविद्व्योम्नि शिवे विलीनहृदयस्तद्भेदवैमुख्यत:**
**साक्षात् सर्वगतो विभाति विगलद्विश्व: स्वयं संयमी।।१९.९७।।**

शिवयोग्याच्या हृदयात शिवाद्वैतभावना प्रकाशित झालेली असते. त्या शिवाचे स्वरूप कसे आहे, हे या श्लोकात स्पष्ट केले आहे. शिव नित्य आहे. तो सर्व कालात विद्यमान आहे. शिवयोग्याच्या निर्मल सात्त्विक हृदयात तो वास्तव्य करून आहे. तो वासनारहित आहे, निरवयव आहे. तो सर्वश्रेष्ठ असे स्थान आहे. त्याच्यापेक्षा अधिक उच्च स्थान अस्तित्वात नाही. स्थावर-जंगम, चर-अचर प्रपंचात तो अन्युस्यूत आहे, तो सर्वांत विद्यमान आहे. तो सर्व प्रकाशाचा प्रकाश आहे, सर्वांना प्रकाशित करणारा आहे. तो ज्ञानाचे आकाश आहे. अशा शिवात ज्याचे मन ऐक्य पावले आहे असा शिवयोगी अभिन्नत्वाने त्या शिवाला स्वस्वरूपात पाहत असतो. तो शिवस्वरूप असतो आणि जगही शिवस्वरूप असते. म्हणून तो स्वस्वरूपच सर्वत्र पाहत असतो.

अशा प्रकारे वाच्यार्थ बाजूला सारून आत्मा आणि परमात्मा यांचे अद्वैत ज्ञानप्रकाशस्थली शिवयोग्याने

जाणलेले असते. आत्मानुसंधान करताना त्याची दृष्टी अशी व्यापक होते की त्याला सर्वत्र आत्मरूपच दिसू लागते. ज्ञानाची अशी परिपूर्ण अवस्था त्याला लाभलेली असते.

पवित्र अशा कार्तिक मासात आणि पवित्र अशा जंगमवाडी मठात तुम्ही सर्वांनी लिंग-षट्स्थलातील शरणस्थलावरील आशीर्वचने श्रवण केली. काशीक्षेत्री निवास, गंगास्नान आणि ज्ञानगंगेत अवगाहन असे तिहेरी भाग्य तुम्हाला लाभले आहे. या श्रवणभक्तीमुळे तुमच्या हृदयात शिवज्ञानाचा उदय व्हावा, दृष्टीवरील भेदाचे पडळ फिटून तुमची दृष्टी शिवदृष्टी व्हावी आणि आत्मचिंतनाच्या बळाने शरणस्थलापर्यंत तुमचा आध्यात्मिक प्रवास व्हावा अशी मंगल कामना व्यक्त करून शरणस्थलावरील आशीर्वचने पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
२८ नोव्हेंबर १९९४



# भाग १२ : लिंग–षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थल

आशीर्वचन पहिले

## स्वीकृतप्रसादिस्थल

**विश्वेशलिंगसंभूतं विश्वविद्याविबोधकम्।**
**विश्ववंद्यं सदा वंदे विश्वाराध्यं जगद्गुरुम्।।**

श्रीकाशीसिंहासनाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंत जी गुरुपरंपरा झाली आहे तिला अनंत प्रणिपात समर्पित करून, या पवित्र अश्विन महिन्यात काशीच्या या ज्ञानपीठात 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर आजपासून सुरू होणाऱ्या आशीर्वचन–कार्यक्रमात उपस्थित असलेल्या जिज्ञासू सद्भक्तांनो,

दर्शनशास्त्रांतील 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा एक पवित्र आणि प्रामाणिक असा ग्रंथ आहे. जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्त्य महर्षींना निमित्त करून सर्व मनुष्यमात्रांच्या कल्याणासाठी जो उपदेश केलेला आहे तो या ग्रंथात संग्रहित केलेला आहे. मुख्यत: षट्स्थल सिद्धान्ताचे प्रतिपादन या ग्रंथात केलेले आहे. या ग्रंथातील लिंग–षट्स्थलातील शरणस्थलापर्यंत आपण आशीर्वचने ऐकली आहेत. लिंग–षट्स्थलातील शेवटच्या ऐक्यस्थलाचा विचार आजपासून करायचा आहे. 'एकस्य भाव: ऐक्यम्।' जीवात्म्याच्या मनात ईश्वर आणि आपण वेगळे आहोत असा जो द्वैतभाव असतो त्यामुळे त्याला दु:ख भोगावे लागते. दु:खातून मुक्ती मिळवण्यासाठी ऐक्यस्थिती प्राप्त करून घ्यावी लागते. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या विसाव्या परिच्छेदात महर्षी अगस्त्यांनी प्रश्न केला:–

**स्थलभेदास्त्वया प्रोक्ता: शरणस्थलसंश्रिता:।**
**ऐक्यस्थलगतान् ब्रूहि स्थलभेदान् गणेन्द्र मे।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.१)

सर्व गणांत श्रेष्ठ असणाऱ्या गणेंद्रा, आतापर्यंत शरणस्थलांतील उपस्थलांविषयी आपण मला उपदेश केला. आता मी ऐक्यस्थलातील उपस्थले जाणू इच्छितो. तरी आपण मला त्याविषयी सांगावे. हा महर्षी अगस्त्यांचा प्रश्न ऐकून जगद्गुरू रेणुकाचार्यांनी ऐक्यस्थलांतील उपस्थलांची नावे सांगितली:–

**स्थलानां नवकं चैक्यस्थलेऽस्मिन परिकीर्त्यते्।।**
**तत्स्वीकृतप्रसादैक्यस्थलमादौ प्रकीर्तितम्।**
**शिष्टोदनस्थलं चाथ चराचरलयस्थलम्।**
**भाण्डस्थलं तत: प्रोक्तं भाजनस्थलमुत्तमम्।**
**अंगालेपस्थलं पश्चात् स्वपराज्ञास्थलं तत:।।**
**भावाभावविनाशं च ज्ञानशून्यस्थलं तत:।**
**तदेषां क्रमशो वक्ष्ये शृणु तापस लक्षणम्।।२०.२–५।।**

शरणस्थलातील साधकांना ऐक्यस्थिती प्राप्त करून घेण्यासाठी नऊ प्रकारच्या स्थलांची साधना करावी लागते. स्वीकृप्रसादिस्थल, शिष्टैदनस्थल, चराचरलयस्थल, भाण्डस्थल, भाजनस्थल, अंगालेपस्थल, स्वपराज्ञस्थल, भावाभावविनाशस्थल, ज्ञानशून्यस्थल अशी नऊ उपस्थले या ऐक्यस्थलात आहेत. यामधील पहिल्या स्वीकृतप्रसादिस्थलाचा आपल्याला विचार करायचा आहे.

**मुख्यर्थो लक्षणार्थश्च यत्र नास्ति चिदात्मनि।**
**विशृंखलतया तस्य प्रसादः स्वीकृतो भवेत्।।२०.६।।**

प्रसाद याचे दोन अर्थ होतात. आपले उदरभरण करणाऱ्या अन्नाला 'प्रसाद' असे म्हणतात. हा एक अर्थ झाला. मनाला शांती आणि समाधान देणारी वृत्ती यालाही 'प्रसाद' असे म्हटले जाते. अन्न-प्रसादाने मनुष्याचे उदरभरण आणि पोषण होते तर ज्ञान-प्रसादाने बुद्धीला शांती आणि समाधान प्राप्त होते. या स्थलातील प्रसाद याचा अर्थ ज्ञानरूपी प्रसाद असा आहे. ज्ञानाचा प्रसाद स्वीकारल्यामुळे या स्थलातील साधकाला 'स्वीकृतप्रसादी' असे म्हटले जाते.

परब्रह्माचे ज्ञान संपादन करण्यासाठी कोणते प्रमाण स्वीकारावे याची थोडी चर्चा या ठिकाणी केली आहे. कोणतेही ज्ञान मिळवण्यासाठी प्रमाणांचे साहाय्य घ्यावे लागते. दर्शनशास्त्रात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, अनुपलब्धी, अर्थापत्ती आणि शब्द अशी सहा प्रमाणे मानली आहेत. पहिले प्रमाण 'प्रत्यक्ष' आहे तर शेवटचे प्रमाण 'शब्द' आहे. व्यवहारात प्रत्यक्ष-प्रमाणाला अधिक महत्त्व दिले जाते. एखादी गोष्ट कोणाला सांगितली तर तो विचारतो, ''तुम्ही स्वत: प्रत्यक्ष पाहिले का?''

प्रत्यक्ष प्रमाण देखील सहा प्रकारचे असते. शब्द-प्रत्यक्ष, स्पर्श-प्रत्यक्ष, रस-प्रत्यक्ष, गंध-प्रत्यक्ष आणि मानस-प्रत्यक्ष. कोणतीही वस्तू जाणण्यासाठी मनुष्याला कोणत्या तरी प्रमाणाची मदत घ्यावी लागते. परब्रह्माला आत्मरूपात पाहण्याचे ज्ञान प्राप्त करायचे असेल तर त्यासाठी प्रत्यक्षादी प्रमाणांचा काही उपयोग होत नाही.

'यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह।' परब्रह्मापर्यंत कोणतेही प्रमाण पोहोचू शकत नाही. तो प्रमाणांना अगोचर आहे. प्रमाणांना एक मर्यादा आहे. एका मर्यादेजवळ जाऊन प्रमाणे थांबतात. काही अलीकडे, तर काही थोडे पलीकडे. सहा प्रमाणांपैकी शब्द-प्रमाण मनुष्याला परमात्म्यापर्यंत घेऊन जाणारे प्रमाण आहे. म्हणून सर्व प्रमाणांमध्ये शब्द-प्रमाण प्रबळ मानले जाते. जी वस्तू आपल्या इंद्रियांच्या पलीकडे आहे, जी इंद्रियगोचर नाही, अशी वस्तू देखील शब्द-प्रमाणाने अनुभवगोचर होते. व्यवहारात तुम्ही पाहता की, एखाद्या व्यक्तीच्या खुशालीची तुम्हाला चिंता असते. त्या व्यक्तीला भेटून आलेल्या माणसाला जर 'ती व्यक्ती खुशाल आहे' असे शब्दाने सांगितले तरी तुमचे समाधान होते, तुम्ही चिंतामुक्त होता. असे का बरे घडते? तुम्ही त्या व्यक्तीला प्रत्यक्ष पाहिलेले नाही, परंतु तिच्या खुशालीविषयी शब्द मात्र ऐकले. म्हणून शब्द-प्रमाण महत्त्वाचे आहे. अपरोक्ष वस्तूसंबंधी आपापल्या जे ज्ञान होते ते केवळ शब्द-प्रमाणामुळे.

क्रिकेट हा जगातला लोकप्रिय खेळ आहे. आज तुम्ही तो टी.व्ही.वर प्रत्यक्ष पाहू शकता, मग तो कुठल्याही देशात चाललेला असला तरी. परंतु वीस-पंचवीस वर्षांपूर्वी टी.व्ही. नसल्यामुळे लोक क्रिकेटचे धावते वर्णन रेडिओवर ऐकत असत. क्रिकेट चालू असताना मैदानावर निवेदक आपल्या डोळ्यांनी खेळ पाहून त्याचे वर्णन रेडिओवरून ऐकवत असे. बॉल कुणी फेकला, तो कोणत्या बॅटस्मनने टोलवला, तो कोणत्या दिशेला गेला,

कुणी अडवला, कसा परत फेकला, बॅटस्मनने किती धावा काढल्या- इत्यादी सारा तपशील निवेदक केवळ शब्दांच्या माध्यमाने लोकांपर्यंत पोहोचवत असे. जे क्रिकेटशैकीन रेडिओला कान लावून बसलेले असत त्यांना वाटे की आपण प्रत्यक्ष सामना पाहत आहोत. प्रत्यक्ष सामना पाहणाऱ्यांना जेवढा आनंद मिळत असे तेवढाच आनंद रेडिओवरून ऐकणारे श्रोते लुटत असत. हे कशामुळे घडत असे? तर केवळ शब्दांमुळे. जे दिसत नाही, जे अतींद्रिय आहे ते इंद्रियगोचर करण्याचे सामर्थ्य शब्दांमध्ये आहे. शब्दांमुळे आपण जणू मानसिक दृष्टीने तो अनुभव घेत असतो.

अशा प्रकारे लौकिक व्यवहारात देखील शब्दांचे मोठे महत्त्व आहे. त्याप्रमाणेच परमार्थ-व्यवहारात देखील शब्दप्रमाण शास्त्रकार महत्त्वाचे मानतात. परब्रह्माचे स्वरूप समजून घेण्यासाठी शब्द-प्रमाणच उपयोगी पडते. त्यामुळे ज्ञानप्राप्ती होते. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे- 'तस्माद् अद्वैतविज्ञानं अपवर्गस्य कारणम्।' संसारात दुःख भोगणाऱ्या जीवात्म्याची दुःखातून मुक्ती मिळावी अशी इच्छा असते. दिवसभर काम करून जो थकतो त्याला विश्रांतीची गरज असते, हे आपण व्यवहारात पाहतो. थकलेल्या माणसाला शारीरिक वा बौद्धिक असे कोणतेच काम नको असते. त्याला हवी असते फक्त विश्रांती. यावरून मनुष्याला विश्रांतीची गरज असते हे सिद्ध होते.

मनुष्य रोज आठ तासांची विश्रांती घेतो, परंतु संसारात दुःखाने थकलेल्या जीवाला चिरविश्रांती हवी असते. त्यालाच मुक्ती, मोक्ष आणि अपवर्ग असे म्हणतात. द्वैतामुळेच जीवात्मा दुःख भोगत असतो. जोपर्यंत 'मी शिव आहे' असे ज्ञान त्याला होत नाही, तोपर्यंत त्याची दुःखातून सुटका होत नाही. अद्वैतज्ञानाला 'विज्ञान'असे म्हणतात. ज्ञान म्हटल्यावर नुसते शब्दज्ञान होईल, परंतु अनुभवजन्य ज्ञान हेच खरे विज्ञान. हे विज्ञानच जीवात्म्याला परमानंदाची प्राप्ती करून देते. म्हणून अद्वैतज्ञानाची आवश्यकता असते. मी अकर्ता आहे, मी अभोक्ता आहे, अशा अनुभवज्ञानाने मनुष्य मुक्त होत असतो. अद्वैतविज्ञानाच्या प्राप्तीसाठी शब्दांचा आश्रय घ्यावा लागतो. जेव्हा ज्ञानप्राप्तीच्या इच्छेने शिष्य गुरूकडे जातो तेव्हा श्रीगुरू त्याला अद्वैताचा उपदेश करतात. 'तत्त्वमसि' या महावाक्याचा गुरू उपदेश करतात. तूच परब्रह्म आहेस, परमात्म्याशिवाय तू वेगळा नाहीस, असा या महावाक्याचा अर्थ आहे. हे ज्ञान शब्दाच्या माध्यमातून दिले जाते. शब्दांच्या द्वारा जो अर्थबोध होतो त्याविषयी येथे सांगितले आहे.

शब्दाचे तीन अर्थ होतात. मुख्यार्थ किंवा वाच्यार्थ, लक्ष्यार्थ आणि व्यंग्यार्थ. ज. रेणुकाचार्यांनी या श्लोकात मुख्यार्थाविषयी सांगितले आहे. जेव्हा प्रथम शब्द ऐकला जातो तेव्हा प्रथम त्याच्या मुख्यार्थाचा बोध होतो. जेव्हा मुख्यार्थ लोपलेला असतो तेव्हा त्याचा लक्ष्यार्थ समजून घ्यावा लागतो. या पलीकडे शब्दाला व्यंग्यार्थ देखील असतो. शास्त्रात एक प्रसिद्ध वाक्य आहे 'गंगायां घोषः।' गंगेत झोपडी असा याचा अर्थ आहे. गंगा तर एक प्रवाह आहे. प्रवाहात झोपडी कोण बांधून राहील? झोपडी तर जमिनीवर बांधली जाते. म्हणून 'गंगेत झोपडी' हा वाच्यार्थ आपण सोडून देतो आणि त्याचा लक्ष्यार्थ पाहू लागतो. सांगणाऱ्याचा अभिप्राय काय असेल बरे? गंगेच्या किनाऱ्यावर झोपडी आहे, असे त्याला सांगायचे असेल. म्हणून येथे 'गंगाया' या शब्दाचा अर्थ 'गंगेत' असा नसून 'गंगेच्या काठावर' असा आहे, हे समजून घ्यावे लागते. अशा प्रकारे व्यवहारात बऱ्याच वेळा शब्दाचा वाच्यार्थ आपण सोडून देतो आणि त्याचा लक्ष्यार्थ ध्यानात घेतो.

गुरू जेव्हा शिष्याला 'तत् त्वम् असि' असा उपदेश करतात तेव्हा त्याचा वाच्यार्थ 'ते तू आहेस' असा होतो.

तत् (ते) म्हणजे मायाशक्तिविशिष्ट ईश्वर आणि त्वम् (तू) म्हणजे अविद्याशक्तिविशिष्ट जीव. यालाच वीरशैव तत्त्वज्ञानाच्या परिभाषेत मायाशक्तिविशिष्ट लिंग आणि अविद्याशक्तिविशिष्ट अंग असे म्हटले जाते. येथे माया हीच अविद्या आहे. या दोन्ही उपाधींनीयुक्त अशी दोन तत्त्वे एक कशी काय होतील? लिंगाची उपाधी माया आहे तर अंगाची उपाधी अविद्या आहे. उपाधीमुळे लिंग आणि अंग यांच्या ऐक्यामध्ये बाधा उत्पन्न होते. घट आणि मठ या आकाशच्या उपाधी आहेत. घट आणि मठ हे कधी एकरूप होऊ शकत नाहीत. परंतु त्यांच्यातील आकाश मात्र एकरूप होऊ शकते. घट आणि मठ यांना एकरूप करणे हे आपले ध्येय नाही अथवा सांगण्याचे तात्पर्यही नाही. घटातील आणि मठातील आकाश एक आहे, हे समजावून देणे हा उद्देश आहे. म्हणून येथे वाच्यार्थ सोडून लक्ष्यार्थच घ्यावा लागतो. येथला वाच्यार्थ 'उपाधिविशिष्ट चैतन्य' असा आहे तर लक्ष्यार्थ 'उपहित चैतन्य' हा आहे. माया आणि अविद्या या उपाधी वगळल्या तर लिंग आणि अंग हे एकच असते. म्हणून येथे शिव आणि आत्मा, शिव आणि जीव, लिंग आणि अंग एक आहे असा लक्ष्यार्थ घ्यावा लागतो.

येथे लक्ष्यार्थाच्याही पलीकडची गोष्ट सांगितली आहे. एकदा लक्ष्याची प्राप्ती करून घेतल्यावर मग लक्ष्यार्थ्याला काय अर्थ उरतो? लक्ष्य प्राप्त केल्यावर लक्ष्यार्थाचा विसर पडतो. आपल्याला जर कुणी जेवणाचे निमंत्रण दिले तर आपण त्याआधी कितीतरी विचार करीत असतो. भोजन कुणी तयार केले असेल? ते उत्तम असेल का? तेथील जागा स्वच्छ असेल का? आपल्या आजुबाजूला कोणती माणसे बसतील? इत्यादी. हा सर्व विचार करून आपल्याला सर्व अनुकूल आहे असे कळल्यावर आपण भोजनाला जाऊन बसतो. जेवण वाढेपर्यंत आपण हा विचार करीत असतो. प्रत्यक्ष जेवणाला सुरुवात झाल्यावर मात्र कोणताही विचार आपण करीत नसतो. तेथे स्वाद घेण्यात मनुष्य तल्लीन होतो. परमात्म्याची प्राप्ती होईपर्यंत वाच्यार्थ, लक्ष्यार्थ, व्यंग्यार्थ इत्यादींचा विचार मनुष्य करीत असतो. परंतु एकदा परमात्मप्राप्ती झाली की मग कुठल्याही अर्थाचा विचार शिल्लक राहत नाही. शिल्लक राहतो फक्त परमात्म्याशी एकरूपतेचा अनुभव. मग त्याठिकाणी कोणतेही व्यवधान राहत नाही. तो आनंदरूप होऊन आनंदाचा आस्वाद घेत असतो. तो शिवोऽहम् भावनेने ऐक्याचा आनंद घेत असतो त्यालाच विशेष प्रकारचा प्रसाद म्हटले जाते. भोजन हा एक प्रसाद आहे तसा मी शिवस्वरूप आहे या अनुभवाचा आस्वाद घेणे हा देखील एक प्रसादच आहे. त्याला ज्ञानप्रसाद म्हणतात. शिवयोगी शिवजीवैक्याच्या ज्ञानरूपी प्रसादाचा अखंड स्वीकार करीत असल्यामुळे त्याला 'स्वीकृतप्रसादी' असे म्हणतात. हाच विषय पुढे अधिक स्पष्ट केला आहे. तेथे व्यवधान कसे नसते?

**मातृमेयप्रमाणादिव्यवहारे विहारिणीम्।**
**संवित्साक्षात्कृतिं लब्ध्वा योगी स्वात्मनि तिष्ठति।।२०.७।।**

जोपर्यंत ज्ञान होत नाही तोपर्यंत प्रमेय, प्रमाता आणि प्रमाण या त्रिपुटीचा विचार चाललेला असतो. प्रमेय म्हणजे शिव, प्रमाता म्हणजे जीवात्मा आणि प्रमाण म्हणजे शब्दादी प्रमाणे, ज्ञानोत्तर अवस्थेत प्रमेय, प्रमाता आणि प्रमाण एकरूप होऊन जातात. त्यांच्यामध्ये भेद उरत नाही. प्रमेय, प्रमाता आणि प्रमाण परमात्मरूपच होऊन जातात. त्यामुळे त्यांचा विचार अंतिम अवस्थेत होत नाही. शिवयोगी आत्मरूपात स्थिर झाल्यामुळे वाच्यार्थ, लक्ष्यार्थ, व्यंग्यार्थ इत्यादी कोणताही विचार त्याच्या मनाला स्पर्श करीत नाही. त्यांच्या पलीकडे तो स्वात्मानुभवात तल्लीन झालेला असतो.

**अद्वैतबोधनिर्धूतभेदावेशस्य योगिनः।**
**साक्षात्कृतमहासंवित्प्रकाशस्य क्व बन्धनम्॥२०.८॥**

आवेश म्हणजे संचार होणे. एखाद्याच्या अंगात भूताचा आवेश होतो. म्हणजे संचार होतो. भूत एखाद्याच्या शरीरात प्रवेशले तर ते मूळ व्यक्तीला आपल्या मनाप्रमाणे वागू देत नाही, तर स्वतःच्या इच्छेप्रमाणे त्याला वागायला भाग पाडते. त्याप्रमाणे जीवात्म्याच्या ठिकाणी द्वैताचा आवेश म्हणजे संचार झाला आहे. जीव–जीवांत भेद, जीव–ईश्वरात भेद, जड–ईश्वरात भेद, जड–जडात भेद असे अनेक प्रकारचे भेद प्रपंचात दिसतात. अद्वैत स्थितीत हे कोणतेही भेद उरत नाहीत. याचा अर्थ असा की, भेद जीवात्म्याच्या ठिकाणी कायम स्वरूपात राहात नसतात. मनुष्याच्या अंगात शिरलेले भूत तरी त्याच्या अंगात कायम कोठे राहते? तेच कधी कंटाळून निघून जाते. तर कधी मांत्रिक त्याला बाहेर काढतो. त्याप्रमाणे जीवात्म्याच्या ठिकाणी संचारलेले भेदाचे भूत अद्वैताचा बोध करून श्रीगुरूरूपी मांत्रिक बाहेर काढतात. जेव्हा अद्वैतभाव हृदयात स्थिर होतो तेव्हा द्वैतभाव आपोआपच बाहेर पडतो. वधू आणि वर विवाहाआधी भिन्न असतात. परंतु जेव्हा सर्वांच्या साक्षीने त्यांचा विवाह होतो तेव्हा ते एकरूप होतात, परस्परांचे अर्धांग बनतात. एकाला दुःख झाले त दुसऱ्याच्या डोळ्यांत अश्रू येतात. याचा अनुभव आपण व्यवहारात घेत असतो. हा सर्व भावनेचा प्रभाव आहे. पति–पत्नी असो, गुरु–शिष्य असो की पिता–पुत्र असो, त्यांच्यातील एकरूपत्वाची भावना नष्ट झाली तर ते वेगवेगळे होतात. त्यांच्यातील प्रेम नष्ट होते.

अनादी कालापासून जीवात्म्याच्या मनात शिव आणि आपण वेगळे आहोत अशी भेदभावना दृढपणे रुजलेली आहे. श्रीगुरू जेव्हा तू आणि परब्रह्म एकच आहे, तुझ्या आत्मरूपात आणि परमात्म्यात किंचितदेखील भेद नाही असा शिष्याला बोध करतात तेव्हा त्याच्या मनातील भेदभावना हळूहळू नष्ट होते. ज्याच्या मनातील भेदभावना नष्ट होते त्याला आत्मप्रकाशाचा अनुभव येऊ लागतो. मग त्याला कोणत्याही प्रकारचे बंधन राहत नाही. भेदबुद्धी बंधनाचे कारण असते आणि बंधन हे दुःखाचे कारण असते. बंधन काही काळ सुखदायक वाटते, परंतु नंतर ते दुःखदायक वाटू लागते. स्वच्छंद विहार करणाऱ्या एखाद्या पक्ष्याला जर पिंजऱ्यात बंदिस्त केले तर प्रथम त्याला त्यामध्ये आनंद वाटेल. बाहेर असताना पोट भरण्यासाठी फार धावपळ करावी लागते. पिंजऱ्यात मात्र सहज पेरू आणि डाळ खायला मिळते. म्हणून त्याला बाहेरच्या मुक्त जीवनापेक्षा पिंजऱ्यातले बंदिस्त जीवन प्रारंभी सुखदायक वाटते. परंतु हळूहळू त्याला पिंजरा जाचक वाटू लागतो. आपल्या पंखातले बळ हरवले आहे अशी जाणीव होऊ लागते. मग तो उदास होऊन समोर फळ ठेवले तरी खात नाही. म्हणून प्रारंभी सुखदायक वाटले तरी नंतर बंधन दुःखदायकच ठरत असते. पिता–पुत्र, पति–पत्नी, गुरु–शिष्य ही सारी बंधनेच आहेत. गुरु–शिष्याचा संबंध मात्र बंधने दूर करणारा संबंध आहे. हे बंधन असे आहे की ज्यामुळे इतर सर्व बंधने तुटतात.

भेदबुद्धी नष्ट झाली की बंधन नष्ट होते, बंधन नष्ट झाले की दुःख दूर होऊन आनंदाची प्राप्ती होते. निद्रावस्थेत मनुष्याला आनंद मिळतो तो तेथे कोणतेही बंधन नसल्यामुळे. वस्तू वा व्यक्तीचे चिंतन हेच एक बंधन असते. असे चिंतन बंद झाले, मनुष्याचे मन निर्विचार झाले तर त्याची दुःखापासून सुटका होते. सुषुप्ति–अवस्थेत मनाकडून कोणतेही चिंतन अथवा चिंता केली जात नाही. म्हणून त्या ठिकाणी मनुष्याला आनंदाची अनुभूती येत असते. जागृतावस्थेत मनुष्याची बुद्धी भेदात गुंतलेली असते. भेद आला की अनुकूल–प्रतिकूल विचार आला. हा आपला, तो परका असे चिंतन सुरू झाले. अद्वैतज्ञानामुळे भेदभावनेपासून जीवात्मा मुक्त होतो आणि सर्वकाळ सुखाचा अनुभव घेत राहतो. अशा शिवयोग्याला स्वीकृतप्रसादी असे म्हणतात.

**चिदात्मनि शिवे न्यस्तं जगदेतच्चराचरम्।**
**ज्ञायते तन्मयं सर्वमग्नौ काष्ठादिकं यथा।।२०.९।।**

अद्वैतज्ञान झाल्यानंतर भेदज्ञान कसे नष्ट होते, ते येथे सांगितले आहे. लाकडे अनेक प्रकारची असतात. आंब्याचे, लिंबाचे, बाभळीचे लाकूड इत्यादी. पेटलेल्या अग्नीत ही विविध लाकडे टाकली तर ती अग्निरूप होतात. त्यांचे वेगळेपण शिल्लक राहत नाही. आधी त्यांचे ठिकाणी भेद होता, परंतु अग्नीत जाळल्यावर सर्व लाकडे अग्निरूप होऊन एकरूप होतात. त्यावेळी हे आंब्याचे लाकूड, हे लिंबाचे, हे बाभळीचे असा भेद उरत नाही. त्याप्रमाणे अभेदज्ञान झाल्यावर भेदज्ञान जळून जाते. अग्नी लाकडाचे भेद नष्ट करतो. त्याप्रमाणे परमात्मरूपी अग्नी शिव-जीवातील भेद नष्ट करतो. शिव हा चिदग्नी आहे. आपण पाहतो तो अग्नी भूताग्नी होय. सोने चांदी अग्नीत जळत नाहीत. म्हणून त्याला आकरज-अग्नी म्हणतात. आकाशातली वीज म्हणजे दिव्याग्नी असतो आणि आपल्या पोटातला अग्नी हा जठराग्नी असतो. या सर्व अग्नीपेक्षा सर्वश्रेष्ठ असा म्हणजे चिदग्नी (चित्-अग्नी) होय. स्मशानातला अग्नी हा चिताग्नी आहे तर आपल्या मनाला जाळणारा अग्नी चिंताग्नी होय. या सर्व अग्नींना अग्निरूप देणारा अग्नी चिदग्नी होय. अग्नीचा स्वभावच असा आहे की त्याच्यात जे काही टाकाल त्याला तो स्वत:चे स्वरूप प्रदान करतो, अग्निरूप करतो. लोखंड अग्नीत टाकले तर ते अग्निरूप होते.

शिवज्ञानसंपन्न असा शिवयोगी काय करतो? तर अग्नीत एकेक वस्तू टाकून अग्निरूप करावी त्याप्रमाणे चिद्रूप अग्नीत प्रपंचातील सर्व वस्तूंचे हवन करतो. अर्थात जे काही त्याच्या दृष्टीस पडते ते शिवरूपभावाने पाहतो. अग्नीएवढे सामर्थ्य त्याच्या भावनेत असते. अग्नी वस्तूला आपले रूप देतो त्याप्रमाणे त्याची शिवभावना सर्व प्रपंचाला शिवरूप करीत असते. भेदभावनेने जगाकडे पाहिले तर जगात भेद दिसतो आणि अभेदभावनेने जगाकडे पाहिले तर जगात अभेद दिसतो. ऐक्यस्थलातील शिवयोगी सर्व जगाकडे शिवभावनेने पाहत असतो. त्याला सर्व जग शिवरूप दिसत असते. 'यत्र यत्र मनोयाति तत्र तत्र ब्रह्मदर्शनम्।' दृष्टी ब्रह्ममय झाली की सर्वत्र ब्रह्मदर्शन होऊ लागते. जशी दृष्टी तशी सृष्टी दिसते.

सृष्टि-दृष्टिवाद असा एक वाद आहे तर दृष्टि-सृष्टिवाद असा दुसरा वाद आहे. सृष्टी जशी आहे तसे पाहणे हा एक मतप्रवाह आहे. हे पुस्तक आहे, हा पलंग आहे, या प्रकारे वस्तू जशी आहे तशी पाहणे हा पहिला वाद आहे. ही दृष्टी नैसर्गिक आहे. यासाठी कोणती साधना करण्याची गरज नाही. कसल्याही ध्यान-पूजेची आवश्यकता नाही. डोळ्यांनी दिसते ते पाहणे, हे सर्व प्राणिमात्रांना ज्ञान असते. परंतु दुसरी दृष्टी अशी आहे की तुम्हाला हव्या त्या स्वरूपात जग दिसू लागते. हाच दृष्टि-सृष्टिवाद होय. जशी दृष्टी असते तशी सृष्टी दिसते. प्रपंचात शिव पाहण्याची दृष्टी असेल तर सर्व प्रपंच शिवरूप दिसू लागतो. काही लोक शिवाला प्रपंचरूपात पाहतात. त्यांना शिव प्रपंचरूपाने दिसतो. दृष्टी अशी महत्त्वपूर्ण असते. दृष्टीत शिव भरून घेतला तर अवघी सृष्टी शिवमय दिसू लागते. हेच पुढील श्लोकात अधिक विस्ताराने स्पष्ट केले आहे.

**न भाति पृथ्वी न जलं न तेजो नैव मारुत:।**
**नाकाशो न परं तत्त्वं शिवे दृष्टे चिदात्मनि।।२०.१०।।**

चिद्रूप दृष्टीने परमात्म्याला पाहिल्यावर, त्या महालिंगाला आपल्या आत्म्याच्या ठिकाणी स्वानुभूतीने जाणले तर आपली दृष्टी लिंगरूप झाली, शिवरूप झाली असे समजावे. दृष्टी शिवरूप झाल्यावर पृथ्वी पृथ्वीरूपात न दिसता परमात्मरूपात दिसू लागते. अशा प्रकारे जल, अग्नी, वायू आणि आकाश ही सर्व महाभूते परमात्मरूप

दिसू लागतात. पंचमहाभूते आणि सूर्य–चंद्र–आत्मा यांना शिवाची अष्टमूर्ती म्हटले जाते. ते अशासाठी की दृष्टी शिवरूप झाली की अष्टमूर्ती अर्थात सर्व आंतर आणि बाह्य विश्व शिवरूप दिसते. ज्या रंगाचा चष्मा तुम्ही वापराल त्या रंगाचे जग तुम्हाला दिसेल. सृष्टीमध्ये परिवर्तन होत नसते. प्रत्येक वस्तूला तुम्ही शिव बनवू शकणार नाही. वस्तू आहे तशीच राहते, केवळ तिच्याकडे पाहण्याची दृष्टी बदलते. अद्वैतज्ञानामुळे अशी शिवरूपदृष्टी प्राप्त होते.

**ज्योतिर्लिंगे चिदाकारे ज्वलत्यन्तर्निरन्तरम्।**
**विलीनं निखिलं तत्त्वं पश्यन् योगी न लिप्यते।।२०.११।।**

हृदयातील ज्योतिर्लिंगात ज्याचे चित्त निरंतर लीन असते तो शरीराने कुठेही असला, जगातील भोगसाधनांत वावरत असला तरी लिप्त होत नाही. लिप्त होण्यासाठी मन कारणीभूत असते, देह कारणीभूत नसतो. आपण कशाला स्पर्श करतो हे महत्त्वाचे नसते, तर आपले मन कशाला स्पर्श करते हे अधिक महत्त्वाचे असते. जिथे आपले मन असते तेथे आपण खऱ्या अर्थाने वावरत असतो. जेथे शरीर असते तेथे आपण असतोच असे नाही. शरीर, इंद्रिये आणि मन या त्रिकरणांत मन अत्यंत प्रभावी आणि श्रेष्ठ मानले गेले. मन हेच मनुष्याच्या बंधनाचे आणि मोक्षाचे कारण आहे असे म्हटले जाते. शिवयोग्याचे मन हृदयातील ज्योतिर्लिंगाच्या चिंतनात मग्न झालेले असते. त्यामुळे त्याचे शरीर एखाद्या वस्तूला स्पर्श करीत असेल तरी त्या स्पर्शाचा लेप त्याच्या मनाला लागत नाही. मनाच्या व्यवहारामुळेच मनुष्याला बंधन पडते. मनाचा व्यवहार होत नसेल तर मनुष्य बंधनात पडणार नाही. शिवयोग्याचे मन आत्मचिंतनात मग्न असल्यामुळे त्याच्या शरीराकडून काहीही घडले तरी त्या कर्माचा लेप त्याच्या मनाला स्पर्शत नाही. ज्याप्रमाणे अग्नीला कोणताही लेप लागत नाही त्याप्रमाणे शिवयोग्याला कोणतेही सांसारिक बंधन वा दोष स्पर्श करू शकत नाही.

**अन्तर्मुखेन मनसा स्वात्मज्योतिषि चिन्मये।**
**सर्वानप्यर्थविषयान् जुह्वन् योगी प्रमोदते।।२०.१२।।**

येथे एक प्रकारचा हवनविधी सांगितला आहे. शिवयोग्याकडून शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध इत्यादी विषयांचे सेवन केले गेले आणि त्यांच्याविषयी काही व्यवहार घडला तरी त्याचा लेप त्याला लागत नाही. कारण त्याचे चित्त हृदयातील चिन्मय अशा ज्योतिर्लिंगाच्या चिंतनात लीन झालेले असते. जोवर शरीर आहे तोवर शरीराकडून व्यवहार घडणारच. परंतु स्वीकृतप्रसादी–स्थलातील शिवयोगी सर्व पदार्थ परमात्म्याला अर्पण करून त्याचा प्रसाद म्हणून स्वीकार करीत असतो. शब्दस्पर्शादीचा स्वीकार तो 'विषय' म्हणून करीत नसतो, तर 'प्रसाद' म्हणून करीत असतो. पदार्थ जेव्हा प्रसाद होतो तेव्हा त्या पदार्थाविषयी व्यक्तीच्या मनात अहंकार आणि ममत्व राहत नसते. मी आणि माझे या भावना जेथे समाप्त होतात त्याला प्रसाद असे म्हणतात. शिवयोगी पंचविषयांना आत्मार्पण करून त्यांचे हवन करतो. हवन करताना एखाद्या देवतेचे नाव घेऊन वस्तू अर्पित केली जाते. 'रुद्राय स्वाहा, रुद्राय इदं न मम' असे म्हटले जाते. हे रुद्रासाठी आहे, हे इंद्रासाठी आहे, हे अग्नीसाठी आहे, हे शिवासाठी आहे– माझ्यासाठी नाही, अशी भावना त्या ठिकाणी असते. विषय स्वत:साठी आहेत असे समजून जो भोगतो त्या मनुष्याला विषयांचा लेप होतो. विषय माझ्यासाठी नाहीत असे म्हणून जो ईश्वरार्पण करतो आणि नंतर त्यांचा भोग घेतो तेव्हा विषयांचे बंधन मनुष्याला पडत नाही. मी विषयांचा अनुभव घेत आहे अशी जाणीव देखील शिवयोग्याला नसते. मनाला जाणीव न होता त्याचा शरीर–व्यवहार सहजपणे चाललेला असतो.

ज्योतिर्लिंगरूपी आत्म्यात तो विषयांचे हवन करीत असतो. म्हणून तो अतिशय आनंदी असतो.

प्रिय, मोद आणि प्रमोद या मनाच्या वृत्ती आहेत. आवडणारी वस्तू जेव्हा डोळ्यांना दिसते तेव्हा मनुष्याच्या मनात प्रियवृत्ती उत्पन्न होते. वस्तू त्याच्या हाती येते तेव्हा त्याच्या मनात मोदवृत्ती उत्पन्न होते. पहिल्या वृत्तीपेक्षा ही वृत्ती अधिक आनंद देणारी असते. त्या वस्तूचा जेव्हा तो आस्वाद घेतो तेव्हा त्याच्या मनात प्रमोदवृत्ती उत्पन्न होत असते. एकापेक्षा एक अशा अधिक आनंददायक या वृत्ती आहेत. शिवयोग्याला प्रमोद होत असतो, परंतु तो विषयसेवनानंतर होणाऱ्या आनंदासारखा सामान्य नसतो. तो असामान्य असा परमानंद असतो. सर्व काही परमात्म्याचे आहे, परमात्म्यासाठी मी हे करीत आहे, परमात्म्यालाच मी हे अर्पण करीत आहे अशा वृत्तीने शिवयोग्याचा व्यवहार चाललेला असतो. काही लोकांना पदार्थ खाऊन आनंद मिळतो. तर काही लोकांना दुसऱ्याला पदार्थ देऊन आनंद मिळतो. स्वत: खाऊन आनंद मिळवणे ही काही जणांची प्रवृत्ती असते तर दुसऱ्याला देऊन आनंद मिळवणे ही देखील काही जणांची प्रवृत्ती असते. शिवयोगी स्वत:साठी काही करीत नसल्यामुळे त्याला शरीराकडून घडणाऱ्या कर्माचे बंधन पडत नाही. शेवटी ज. रेणुकाचार्य या स्थलाचा समारोप करतात–

**सच्चिदानन्दजलधौ शिवे स्वात्मनि निर्मल:।**
**समर्प्य सकलान् भुंक्ते विषयान् तत्प्रसादत:।।२०.१३।।**

याआधी अग्नीचा दृष्टान्त देऊन विषय स्पष्ट केला आणि आता समुद्राचा दृष्टान्त देऊन विषय स्पष्ट करीत आहे. समुद्र अनेक प्रकारचे असतात. लवणसमुद्र, क्षीरसमुद्र, घृतसमुद्र अशा समुद्रांचे वर्णन पुराणात सापडते. आपल्याला एकच लवणसमुद्र माहीत आहे. बाकीचे कुठे आहेत याची कल्पना नाही. शिव हा देखील सच्चिदानंदरूप असा समुद्र आहे. प्रपंच हा दु:खाचा समुद्र आहे. संसाराला दु:खसागर म्हटले जोत. शिव मात्र सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप असा समुद्र आहे. ज्या समुद्रात तुम्ही बुडी घ्याल त्याचाच तुम्हाला स्वाद मिळेल. संसारसागरात उडी घ्याल तर दु:खच मिळेल. जीवात्मा संसारात येताना रडत येतो आणि जाताना रडतच जातो. जन्म आणि मृत्यू यांच्यामध्ये तर रोज रडतच असतो. संसार म्हणजे एक रडणेच असते. परंतु जेव्हा मनुष्य संसार विसरतो तेव्हा मात्र तो आनंदी होतो. परमात्मरूपी समुद्रात बुडी घेणारा शिवयोगी अत्यंत आनंदित असतो. मी परमात्मस्वरूप आहे अशा भावनेमुळे तो निर्मल झालेला असतो. संसारचिंतन जीवात्म्याला मलीन करते तर परमात्मचिंतन त्याला निर्मल करते. आपण गंगास्नान का करतो? तर शरीराचे आणि मनाचे मालिन्य घालवण्यासाठी. गंगेत हे सामर्थ्य कोठून आले? तर तिचा संबंध भगवान शिवाशी आल्यामुळे, शिवाच्या जटेतून ती उत्पन्न झाली म्हणून ती पापनाशिनी ठरली. त्याप्रमाणे शिवयोग्याचा संबंध शिवाशी आल्यामुळे तो अत्यंत निर्मल होतो. तो ज्ञानप्रसाद स्वीकारतो, शब्दस्पर्शादी विषयांचा प्रसाद म्हणून स्वीकार करतो म्हणून त्याला स्वीकृतप्रसादी असे म्हटले जाते. त्याचे शरीर प्रपंचात असले तरी त्याचे मन मात्र परशिवात लीन झालेले असते. म्हणून त्याला कोणत्याही सांसारिक विषयांचा लेप लागत नाही. असे हे स्वीकृतप्रसादिस्थल ऐक्यस्थलातील पहिली पायरी आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
१ नोव्हेंबर १९९६

## शिष्टौदनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या लिंग-षट्स्थलातील अंतिम ऐक्यस्थलावर आपण कालपासून विचार करीत आहोत. ऐक्यस्थलातील पहिल्या स्वीकृतप्रसादी-स्थलाचा आपण काल विचार केला. यामधील दुसरे उपस्थल आहे शिष्टौदनस्थल. भगवान शिवांच्या चिद्रूपाविषयी आणि त्यांचे चिद्रूप आपल्या आत्मरूपाच्या ठिकाणी आहे असे जो जाणतो त्याला स्वीकृतप्रसादी म्हणतात, असे कालच्या आशीर्वचनात आम्ही सांगितले आहे. भगवान शिवाला जाणल्यावर काही अवशिष्ट राहते काय, याचा विचार शिष्टौदनस्थलात केलेला आहे. भोजनाला बसलेला मनुष्य ताटात अनेक पदार्थ वाढलेले असले तरी त्यामधून स्वत:ला आवडणारे पदार्थ खातो आणि बाकीचे ताटातच ठेवतो. भोजन संपल्यानंतर ताटात जे शिल्लक राहते त्याला शिष्टौदन असे नाव आहे. अन्न हा प्रसाद असतो, म्हणून ताटामध्ये उरलेले अन्न हे देखील अवशिष्ट प्रसादच असते. भगवान शिवाला शिवप्रसाद म्हणून, शिवप्रकाश म्हणून शिवयोग्यांनी स्वीकारलेले असते. शिवतत्त्वाचा स्वीकार केल्यानंतर अवशिष्ट अशी जी मायाशक्ती आहे तिच्या संबंधी येथे विचार केला आहे. येथे मायाशक्ती हीच अवशिष्ट ओदन आहे, म्हणून तिलाच शिष्टोदन असे म्हटले आहे.

**प्रकाशते या सर्वेषां माया सैवोदनाकृति:।**
**लीयते तत्र चिल्लिंगे शिष्टं तत्परिकीर्तितम्।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.१४)

प्रपंचात राहणाऱ्या जीवांना मायेचे स्पष्ट दर्शन घडत असते. तिला पाहण्यासाठी त्यांना परिश्रम करावे लागत नाहीत. 'माया' पाहण्यासाठी कष्ट पडत नाहीत, परंतु 'मायी'ला म्हणजे शिवाला पाहण्यासाठी मात्र कष्ट पडतात. ईश्वराचे रूप लपवून त्याची शक्ती आपले स्वरूप दाखवीत जीवा-समोर उभी असते. युगायुगांत, अनेक जन्म घेणाऱ्या जीवात्म्याचा मायेशीच नित्य संबंध आला आहे. त्याने केवळ मायेचे वैभवच पाहिलेले आहे. अशा प्रकारे माया सर्वांच्या समोर नित्य प्रकट होत असते, परंतु मायी मात्र जणू तिच्या आड लपलेला असतो. म्हणून जगद्गुरू रेणुकाचार्यांनी या पूर्वीच्या स्थलात सांगितले आहे, 'अप्रत्यक्षो महादेव: सर्वेषां आत्ममायया।'

मायाशक्तिविशिष्ट असल्यामुळे सर्वांना दिसत नाहीत, दिसते ती फक्त माया. सूर्य ढगाआड दडलेला आपल्याला दिसतो. ते ढग देखील आपण सूर्यप्रकाशामुळेच पाहत असतो. सूर्याला झाकून टाकणारे ढग सूर्यप्रकाशातच दिसत असतात. त्याप्रमाणे भगवान शिवाला झाकून टाकणारी माया शिवप्रकाशामुळेच आपल्याला दिसत असते. तो दिसत नाही, पण ती मात्र स्पष्टपणे डोळ्यांपुढे उभी असते. शिव आणि जीव यांच्यामध्ये ती ढगासारखी उभी असते.

माया आपल्यासमोर कशी उभी असते? मरितोंटदार्यांनी आपल्या व्याख्यानात सांगितले आहे की, तनू, करण, भुवन आणि भोग यांच्या रूपाने माया आपल्या दृष्टीपुढे उभी असते. तनू म्हणजे शरीर, करण म्हणजे इंद्रिये, भुवन म्हणजे चौदा भुवने किंवा ब्रह्मांड आणि भोग म्हणजे शब्दस्पर्शादी पंचविषयांचे भोग. एका रूपात माया जीवासमोर येत नसते, तर सारखी अनेक रूपे बदलत येते. मायावी मनुष्य ज्याप्रमाणे अनेक रूपे घेत असतो

त्याप्रमाणे जीवाला बद्ध करण्यासाठी माया अनेक रूपे धारण करून येत असते. तिचे पहिले रूप आहे शरीर. एक नव्हे तर चौऱ्यांशी लक्ष प्रकारच्या शरीरांनी तिने जीवांना बांधून टाकले आहे. मानव शरीर, दानव शरीर अशी कितीतरी शरीरे. उद्‌भिज, अंडज, स्वेदज आणि जारज अशा विविध योनी. प्रत्येक योनीत २१ लाख प्रकारची शरीरे मानली जातात. एकूण ८४ लक्ष शरीरे पृथ्वीतलावर आहेत असे म्हटले जाते. काही शरीरे सूक्ष्म असतात तर काही शरीरे स्थूल असतात. काहीही असले तरी शरीरांच्या रूपाने माया आपल्याला दिसत असते. याप्रमाणेच करण म्हणजे इंद्रियांच्या रूपाने माया दिसत असते. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार अशी चौदा इंद्रिये आहेत. सर्वांना आपली इंद्रिये दिसत असतात, जाणवत असतात. इंद्रियांच्या द्वारेच जीवात्म्याचे सर्व व्यवहार चालतात. म्हणून इंद्रिये सर्व जीवांना प्रत्यक्ष असतात.

अशा प्रकारे इंद्रियांच्या रूपाने माया सर्वांसमोर असते. याचप्रमाणे अंत:करणाच्या रूपानेही तिचा अनुभव जीवांना येत असतो. भुवने चौदा आहेत. सात ऊर्ध्वलोक आणि सात अधोलोक. भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक ही वरची सात भुवने आहेत. अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल आणि पाताल असे सात अधोलोक आहेत. या भुवनांच्या रूपाने माया जीवाच्या दृष्टीसमोर उभी असते. याप्रमाणेच शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पंचविषय म्हणजे भोग होत. या भोगांच्या रूपाने माया जीवाला दृष्टिगोचर होत असते. अशा प्रकारे तनू, करण, भुवन आणि भोग अशा रूपांत माया सर्वत्र प्रकाशत असते. आपण डोळे उघडल्यावर जे पाहतो ते सर्व मायाच असते. बाह्य प्रपंचात मायेचा अंश अधिक प्रमाणात असल्यामुळे मनुष्याची बुद्धी व्यक्त अथवा वस्तू पाहून मोहित होत असते. विश्वाच्या उत्पत्ती, स्थिती आणि विलयाचे कारण माया असते. शिवयोगी आपल्या आत्मरूपात परशिवब्रह्माचे दर्शन घेत असतो. त्यानंतर अवशिष्ट राहिलेल्या मायेला तो सोडून देतो. या अवशिष्ट मायेलाच शिष्टोदन असे म्हटले आहे.

**जगदंगे परिग्रस्ते मायापाशविजृम्भिते।**
**स्वात्मज्योतिषि बोधेन तदेकमवशिष्यते।।२०.१५।।**

जग हे भगवान शिवाचे अंग होय. शिवाचे अंग असलेला हा प्रपंच मायापाशाने बद्ध आहे. शिवयोगी शिवाचे अंग असलेला स्थूल प्रपंच सोडून देतो आणि त्याच्या चिद्रूपाला आत्मरूपांत पाहतो. त्यावेळी माया अवशिष्ट राहते.

**अखण्डसच्चिदानन्दपरब्रह्मस्वरूपिण:।**
**जीवन्मुक्तस्य धीरस्य माया कैंकर्यवादिनी।।२०.१६।।**

शिवाला आत्मरूपात जाणल्यावर माया शिवयोग्यावर आक्रमण करते काय? त्याला पुन्हा जन्मजन्मांतरे भोगायला लावते काय? असा प्रश्न उपस्थित होतो. वेदान्तात देखील या विषयी विचार केलेला आहे. अद्वैतज्ञान झाल्यावर ज्ञानीपुरुष सामान्य माणसाप्रमाणेच प्रपंचव्यवहार करीत असतो. वरवर पाहिल्यावर ज्ञानी आणि अज्ञानी यांच्यामध्ये काहीच फरक दिसून येत नाही. ज्ञानी आणि अज्ञानी यांच्यातला फरक कसा ओळखावा? या प्रश्नाचे उत्तर येथे दिले आहे. मूळ अविद्येचा नाश झाल्यानंतर देखील तिचा किंचित लेश शिल्लक राहिलेला असतो. 'सिद्धान्तलेशसंग्रह' या वेदान्तग्रंथात याविषयी विचार केलेला आहे. ज्ञानोत्तर स्थितीत देखील शरीर असेपर्यंत मायेचा अंश शिल्लक राहतो.

कुंभाराच्या चाकासारखी ही अवस्था असते. कुंभार फिरणाऱ्या चाकावर घट बनवत असतो. घट बनवून झाला की तो हलकेच काढून घेतो. परंतु चाकाला गती असल्यामुळे ते फिरतच राहते. त्याच्या फिरण्याचा आता घटाच्या निर्मितीशी काही संबंध नसतो. त्याप्रमाणेच आत्मज्ञान झाल्यावर देखील ज्ञानी पुरुषाचे शरीर प्रारब्धकर्म संपेपर्यंत जिवंत असते. ज्ञानी असो की अज्ञानी, प्रारब्धकर्मापासून कोणाचीच सुटका नसते. फरक एवढाच असतो की अज्ञानी मनुष्य सुखदुःखांनी विचलित होत असतो तर ज्ञानी मनुष्य सुखदुःखांकडे साक्षीदार होऊन पाहत असतो.

घटनिर्मिती झाल्यानंतर देखील कुंभाराचे चक्र फिरतच राहते त्याप्रमाणे ज्ञानप्राप्तीनंतरही ज्ञानी पुरुषाच्या मनात मायेचा अंश शिल्लक राहतो. एखाद्या बाटलीत अत्तर भरून ठेवलेले असते. ते संपल्यानंतर बाटली कितीही स्वच्छ धुतली तरी गंधाचा अंश शिल्लक राहतोच. बाटलीत अत्तर नसून देखील अत्तराचा वास येतच असतो. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणी, मूळ अविद्या नष्ट होऊन देखील मायेचा किंचित अंश शिल्लक राहतो. हा अंश त्याला पुन्हा संसारचक्रात ढकलू शकत नाही. प्रारब्धकर्म संपेपर्यंतच तो राहतो. ज्ञानी पुरुष जीवन्मुक्त असतो. त्याचे जीवन चाललेले असते आणि तो मुक्तस्थितीचा अनुभव देखील घेत असतो. बाह्यत: त्याचे शरीर यंत्रवत् कर्म करीत असते, परंतु अंतरंगात मात्र तो परशिवब्रह्माशी एकरूप झालेला असतो. त्यामुळे शरीराकडून घडणाऱ्या कर्माचा लेप त्याला लागत नाही. तो धीर असतो, अधीर नसतो. कोणतेही विषय त्याला मोहात पाडू शकत नाहीत म्हणून तो धीर असतो. सामान्य माणसाप्रमाणे विषयभोगासाठी तो अधीर नसतो. त्याचे मन आत्मचिंतनात रममाण झालेले असल्यामुळे त्याच्या शरीराकडून घडणाऱ्या कर्मात त्याचे मन गुंतलेले नसते. सामान्य माणसे मायेचे दास असतात तर माया ही शिवयोग्याची दासी असते. एका सुभाषितकाराने म्हटले आहे:-

**आशाया ये दासा ते दासा सन्ति सर्व लोकस्य।**
**आशा एषां दासी तेषां दासायते लोकः।।**

जे आशेचे दास असतात ते जगाचे दास असतात आणि आशा ज्यांची दासी असते त्यांचे सर्व जग दास असते. आशा मनुष्याला गुलाम बनवते, त्याला लाचार करते, दुसऱ्यासमोर हात पसरायला भाग पाडते. परंतु जो आशेचा त्याग करतो तो कोणाचाही गुलाम राहत नाही. त्याला कोणाशी काही घेणेदेणे नसते. काही मिळवण्यासाठी एखाद्यासमोर कमरेतून वाकावे लागत नाही. आशामुक्त मनुष्य स्वतंत्र असतो आणि आशाबद्ध मनुष्य गुलाम असतो.

जीवात्मा मायेच्या पुढे दासाप्रमाणे वागत असतो. शिवयोगी मात्र मायेचा दास नसतो. त्याच्या मनात कोणती इच्छा, वासना शिल्लक नसते. केवळ प्रारब्धकर्म संपेपर्यंत त्याला शरीरात राहायचे असते. ज्ञान झाल्यावर शरीर सोडता येत नसते. प्रारब्ध तर सर्वांनाच भोगावे लागते. 'ना भुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटी शतैरपि।' प्रारब्ध कर्म भोगल्याशिवाय ते नष्ट होत नाही, असे शास्त्र सांगते. म्हणून शिवयोग्याचे शरीर प्रारब्धकर्म भोगण्यासाठी जिवंत असते. त्यामुळे त्याच्या ठिकाणी अविद्येचा थोडा लेश राहिलेला असतो. प्रारब्धकर्म संपले की तो लेशही पूर्णत: नष्ट होतो. अशा शिवयोग्या-समोर माया दासी होऊन राहते. ती त्याच्यावर आपला अधिकार चालवू शकत नाही. माया ही शिवाच्या आधीन आहे, त्याप्रमाणे जो प्रत्यक्ष शिवरूप झाला अशा शिवयोग्याच्या पुढे किंकर होते.

**विश्वसंमोहिनी माया बहुशक्तिनिरंकुशा।**
**शिवैकत्वमुपेतस्य न पुरः स्थातुमीहते।।२०.१७।।**

मायेच्या स्वरूपाचे येथे वर्णन केले आहे. माया विश्वाला संमोहित करणारी आहे. संमोहनविद्या जाणणारा मनुष्य एखाद्या माणसावर प्रयोग करतो. त्याला मिरची खायला देऊन 'गोड आहे का?' असे विचारले तर तो म्हणतो 'होय, गोड आहे.' त्याला मीठ खायला देऊन 'ही साखर आहे काय?' असे विचारल्यावर तो 'होय' म्हणतो. संमोहन करणाऱ्या मनुष्याचा आदेश तो पाळत असतो. एक सामान्य संमोहनविद्या जाणणारा माणूस दुसऱ्या माणसावर आपला अधिकार गाजवतो, त्याला आपल्या मनाप्रमाणे वागायला भाग पाडतो, तर शिवाची शक्ती असलेली माया जीवांना किती संमोहित करीत असेल! याची कल्पना केलेली बरी. माया अशी विश्वमोहिनी आहे. ती अत्यंत सामर्थ्यशाली आहे. तिच्याजवळ अनेक शक्ती आहेत. इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती, मनुष्याच्या ठिकाणी ज्या शक्ती दिसतात त्या मायेच्याच अंशमात्र असतात. याशिवाय आदिशक्ती, पराशक्ती, चिच्छक्ती इत्यादी सूक्ष्मशक्ती देखील असतात. माया अशी अनंत शक्तींनी युक्त आहे. ती निरंकुश आहे. ती कोणत्याही जीवात्म्याच्या आधीन नाही तर सर्व जग तिच्या आधीन आहे. भगवंताच्या कृपेशिवाय स्वतःच्या बळावर कोणी मायेला जिंकू पाहात असेल तर त्याची फसगत होते. जीवात्मा भगवंताची कृपा संपादन करूनच मायेला जिंकू शकतो. जे जीव भगवंतापासून दूर जातात ते मायेच्या जाळ्यात फसतात, परंतु जे भगवंताजवळ राहतात त्यांना माया आपल्या जाळ्यात गुंतवू शकत नाही.

संत कबीर एकदा भिक्षा मागण्यासाठी एका घरी गेले. दारात उभे राहून त्यांनी पाहिले तर घरधनीन जात्यावर बसून दळत होती. ती मुठीमुठीने जात्यात धान्य टाकीत होती. ते भरडले जाऊन खालून पीठ बाहेर येत होते. कबीरांचे मन कवीचे होते. धान्य भरडलेले पाहून त्याच्या डोळ्यांत अश्रू आले. ते तेथेच उभे राहिले. तेवढ्यात बाईचे लक्ष त्यांच्याकडे गेले. दळण थांबवून ती त्यांच्याजवळ आली आणि म्हणाली, ''तुम्ही का बरे रडता?''

''जात्यात धान्य भरडलेले पाहून मला वाईट वाटले. असे वाटले की मनुष्याची अवस्था पण अशीच आहे. मृत्यूच्या दाढेत माणसे अशीच चिरडली जात आहेत. असा विचार मनात येऊन माझ्या डोळ्यात अश्रू आले.''

ती बाई हसली. तिने कबीरांना घरात बोलावले. जात्याची वरची पाळी उचलून आत पाहण्यास सांगितले. तेव्हा कबीरांना दिसले की जात्याच्या मध्यभागी खुंटीजवळ काही धान्याचे कण न भरडले जात सुरक्षित होते. ते पाहून कबीरांना आश्चर्य वाटले. बाई म्हणाली,

''पाहा, जे धान्याचे कण खुंटीला धरून राहिले ते भरडले गेले नाहीत. याप्रमाणे जी माणसे स्थिर अशा भगवंताला धरून राहतात त्यांचे मरण चुकते आणि जे भगवंताला स्मरत नाहीत त्यांना मरण चुकत नाही.''

एका गृहिणीने एवढ्या सहजपणे कबीरांना मरण चुकवण्याचे रहस्य सांगितले.

श्रीकृष्णांनी गीतेत म्हटले आहे– 'मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते।' जे माझ्या आश्रयाला येतात त्यांना माया काही करू शकत नाही. जे माझ्यापासून दूर जातात त्यांची मात्र मायेपासून सुटका नाही. शिवज्ञानसंपन्न मनुष्य मायेपासून मुक्त असतो. त्याच्यासमोर माया मोहक रूपात उभी राहत नाही. ज्याला शिवज्ञान नसते त्याची दृष्टी मोहदृष्टी असते आणि ज्याला शिवज्ञान झालेले असते त्याची दृष्टी शिवदृष्टी असते. शिवदृष्टीला माया दिसण्याची शक्यता नाही.

**ज्योतिर्लिंगे चिदाकारे निमग्नेन महात्मना।**
**भुज्यमाना यथायोगं नश्यन्ति विषया: स्वत:।।२०.१८।।**

शिवयोगी चिद्रूप अशा ज्योतिर्लिंगात निमग्न असतो. पाण्यात बुडलेल्या मनुष्याच्या अवतीभोवती जसे पाणीच पाणी असते त्याप्रमाणे शिवयोग्याच्या आतबाहेर केवळ शिवच भरून राहिलेला असतो. निमग्नता यालाच म्हणतात. अशा मनुष्याला महात्मा म्हणतात. ज्याच्या मनात समष्टिभावना असते, जो नि:स्वार्थ असतो, सर्व प्राणिमात्राच्या कल्याणाचे जो चिंतन करतो, तोच महान आत्मा असतो. सर्व सुखी असले तर आपण सुखी राहू शकतो, सर्व निरोगी असले तर आपण निरामय जीवन जगू शकतो. आपल्या आसपास केवळ दु:खवेदना असतील तर आपण सुखी कसे राहणार? म्हणून प्राचीन ऋषिमुनींनी 'सर्वेऽपि सुखिन: सन्तु' अशी शुभकामना व्यक्त केली आहे. लोककल्याणाचे चिंतन ज्यांनी केले अशाच व्यक्ती महात्मा ठरल्या.

शिवयोगी प्रारब्धकर्माने जे प्राप्त होते त्याचा भोग घेत असतो. इच्छा-प्रारब्ध, अनिच्छा-प्रारब्ध आणि परेच्छा-प्रारब्ध असे प्रारब्धाचे तीन भेद आहेत. आपल्या इच्छेने मागून ज्याचा भोग घेतला जातो ते इच्छा-प्रारब्ध. इच्छा नसताना दुसऱ्याच्या इच्छेने जे भोगावे लागते ते परेच्छा-प्रारब्ध. आपली इच्छा नसते, परंतु दुसरा माणूस एखादी वस्तू हाती देऊन खाण्याचा आग्रह करतो. त्याच्या इच्छेखातर आपण ती खातो. हेच परेच्छा-प्रारब्ध होय. याशिवाय तिसरे असते ते अनिच्छा-प्रारब्ध. दोघांची इच्छा नसताना जे भोगावे लागते ते अनिच्छा-प्रारब्ध होय. प्रवासात दोन माणसे एकमेकांना भेटतात. हा त्याला खायला देतो, तो ह्याला खायला देतो. हे इच्छेने नव्हे तर अनिच्छेने घडत असते. शिवयोग्याला परेच्छेने अथवा अनिच्छेने प्रारब्धकर्म भोगावे लागते, स्वत:च्या इच्छेने तो ते भोगत नसतो. विषयभोग घेतल्यानंतर त्याच्या मनात त्याचा संस्कार शिल्लक राहत नाही. त्यामुळे विषयभोगाची वासना उरत नाही. सामान्य माणसांचे असे नसते. विषयभोगानंतर त्यांच्या मनावर संस्कार उमटतात. त्यामुळे पुन्हा पुन्हा विषय भोगण्याची लालसा त्यांच्या मनात उत्पन्न होते. साप अथवा विंचू दंश करून जातात, परंतु अंगात विषाचा अंश ठेवून जातात त्याप्रमाणे विषय सामान्य माणसांच्या मनात वासना निर्माण करून जातात. शिवयोग्याच्या जीवनात त्यांच्या इंद्रियांचा विषयांशी संबंध आला तरी तो तेवढ्यापुरता असतो. त्या संबंधाचा संस्कार होत नाही. कारण त्याच्या मनात भगवान शिवाशिवाय अन्य कुठल्याही वस्तूला स्थान नसते.

**शब्दादयोऽपि विषया भुज्यमानास्तदिन्द्रियै:।**
**आत्मन्येव विलीयन्ते सरित: सागरे यथा।।२०.१९।।**

शिवयोग्यांच्या इंद्रियांकडून विषयांचा भोग सहजपणे होत असतो. तो कानाने शब्द ऐकतो, त्वचेने स्पर्श अनुभवतो, डोळ्यांनी रूप पाहतो, जिभेने रस अनुभवतो आणि घ्राणाने गंधाचा आस्वादही घेतो. परंतु विषय भोगल्यानंतर ते त्याच्या आत्म्यातच विलीन होतात. ते कसे? तर नदी जशी समुद्राला मिळून त्याच्याशी एकरूप होते, तसे. नदी आपल्या नामरूपासह समुद्रात विलीन होते. आपले सर्वस्व त्याला समर्पित करते. त्याप्रमाणे शिवयोगी शिवार्पणवृत्तीने विषयाचा भोग घेतो, त्यामुळे त्याच्यासाठी विषय प्रसादरूप होतात. आणखी एक उदाहरण देऊन या स्थलाचा समारोप करतात.

**अर्थजातमशेषं तु ग्रसन् योगी प्रशाम्यति।**
**स्वात्मनैवास्थितो भानुस्तेजोजालमशेषत:।।२०.२०।।**

शिवयोगी सर्व पदार्थांचा स्वस्वरूपाने उपभोग घेऊन परमशांत होतो. विषयभोग घेणाऱ्या मनुष्याच्या मनात

पुन्हा विषय भोगण्याची लालसा उत्पन्न होत असते. परंतु या ठिकाणी त्याच्या उलट प्रकार सांगितला आहे. अग्नीत तो शांत करण्यासाठी कितीही लाकडे टाकली तरी तो अधिकच भडकतो, त्याप्रमाणे इंद्रियांच्या अग्नीत विषयांची कितीही आहुती दिली तरी वासना भडकतच जाते. ती शांत होत नाही. सामान्य माणसाच्या बाबतीत अशी स्थिती असते. परंतु विषयभोग घेऊन देखील शिवयोगी अत्यंत शांत असतो. त्याच्या मनात विषयभोगाची किंचितदेखील लालसा नसते. इच्छा हेच अशांतीचे मूळ आहे. उपभुक्त विषय पुन्हा भोगण्याची इच्छा शिवयोग्याच्या मनात उद्भवत नाही. म्हणून तो कधीही अशांत होत नाही. तो अंतर्बाह्य पूर्ण शांत असतो. कसा? तर सूर्य, मावळताना आपले सर्व किरण जसे आपल्यातच सामावून घेतो त्याप्रमाणे. सूर्य उगवल्यावर आपल्या किरणांचे जाळे सर्वत्र पसरतो, ते अधिक घट्ट करतो आणि सायंकाळी ते आवरून मावळतो. त्याप्रमाणे जन्माला आल्यावर शिवयोगी सर्व इच्छा घेऊन येतो, संसारात त्या वाढवत राहतो, त्यानंतर ज्ञान प्राप्त करून घेतो, इच्छा क्षीण होतात आणि शेवटी सर्व आवरून परमशांत होतो. शिष्टौदनस्थलातील साधकाची अंतिम अवस्था अशी असते. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

२ नोव्हेंबर १९९६

---

**आशीर्वचन तिसरे**

## चराचरलयस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज चराचरलयस्थल या लिंग-षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थलातील तिसऱ्या उपस्थलाविषयी विचार करायचा आहे. चर आणि अचर अशा दोन भागांत हा सर्व प्रपंच विभागलेला आहे. याला स्थावर आणि जंगम असेही म्हटले जाते. जो चालतो-फिरतो तो चर आहे, जंगम आहे तर जे अनंत काळ एकाच ठिकाणी स्थिर आहे ते अचर आहे, स्थावर आहे. अशी चराचरात्मक सृष्टी परमात्म्याने निर्मिली आहे. ती कोणासाठी? ती त्याने स्वत:साठी निर्मिलेली नाही. विद्यारण्यमुनींनी 'पंचदशी'मध्ये म्हटले आहे- 'ईशकार्यं जीव भोग्यं जगद्वाभ्यां प्रकीर्तितम्।' सृष्टी हे ईश्वराचे कार्य (निर्मिती) आहे. जीवात्म्याच्या उपभोगासाठी ईश्वराने ती निर्माण केली आहे. प्रपंचात जीवात्मा सुखदु:ख भोगतो, ईश्वर त्याचा साक्षीदार असतो.

चराचराचा लय कोण करतो? ज्याने हे निर्माण केले आहे तो ईश्वर कल्पाच्या शेवटी चराचर सृष्टीचा लय करतो. परंतु तोपर्यंत जीवात्म्याने थांबायचे काय? तर असे नाही. स्वत:पुरता चराचराचा लय जीवात्मा करू शकतो आणि सुखदु:खांचा भोग थांबवू शकतो. जीवात्मा बहिर्मुख होऊन प्रपंचव्यवहार करीत असतो तोपर्यंत त्याला सुखदु:खे भोगावी लागतात. असे त्याने अनेक जन्म घेतलेले आहेत. एखाद्या जन्मात त्याला सद्गुरूचा लाभ होतो आणि त्यांच्या उपदेशाने तो साधना करू लागतो त्यावेळी ज्ञानप्राप्ती होऊन त्याला आत्मरूपात परमेश्वराचा साक्षात्कार होतो. मग त्याची प्रवृत्ती प्रपंचभोगात राहत नाही. 'आत्मतृप्तस्य का स्पृहा' असा प्रश्न

उपनिषदात विचारलेला आहे. स्पृहा म्हणजे इच्छा. ती कोणाला होते? ज्याला तृप्ती मिळत नाही त्याला इच्छा होत असते. भोजन करून जो तृप्त होतो त्याच्या मनात भोजनाची इच्छा उरत नाही. जीवात्म्याला पूर्ण तृप्त करील असा प्रपंचात एकही विषय नाही. शब्दस्पर्शादी विषय मनुष्याला पूर्ण संतुष्ट कधीच करीत नाहीत, तर ते त्याला अतृप्त ठेवतात. म्हणून मनुष्य पुन्हा पुन्हा विषयभोगासाठी उतावीळ होत असतो, त्याच्या मागे सतत धावत असतो. अशी धावपळ करताना त्याने अनेक जन्म गमावलेले असतात.

संसाराची असारता जाणून शिवयोगी आपल्या आत्मरूपात शिवाचे दर्शन घेतो तेव्हा तो आपल्या चित्ताला आवरतो. अंतर्मुख करतो. चित्त बहिर्मुख असते म्हणून तर जीवात्म्याला संसार दिसत असतो. चित्त अंतर्मुख झाले की संसार त्याच्यापुरता संपलेला असतो. गाढ झोपेतल्या माणसाला बाहेरच्या जगाचे भान नसते. कारण त्यावेळी त्याचे चित्त बहिर्मुख नसून अंतर्मुख झालेले असते. जणू त्याच्यापुरता बाह्य जगाचा विलय झालेला असतो. याप्रमाणे बाह्य जग आहे तसेच ठेवून त्याचा विलय करता येणे शक्य आहे. विलय करायचा म्हणजे जग उद्ध्वस्त करायचे, असे नाही. ते उद्ध्वस्त करण्याचा कोणाला अधिकार नाही. ज्याने त्याची निर्मिती केली तोच त्याला नष्ट करू शकतो. म्हणून बाह्य जगाला धक्का लावण्याचा जीवात्म्याला काही हक्क नाही. बाहेरचा संसार जीवात्मा इंद्रियांच्या द्वारे आत घेऊन जात असतो. जन्म घेतल्यापासून मृत्यू होईपर्यंत त्याचे हेच कार्य चाललेले असते. बाहेर जे काही घडते, जे काही दिसते त्याचे संस्कार मन:पटलावर उमटत असतात. अशा प्रकारे हे बाह्य विश्व तो अंतरंगात नेऊन ठेवत असतो. बाहेरचा स्थूल प्रपंच अंतरंगात वासनेच्या रूपाने सूक्ष्म होऊन राहिलेला असतो. बाहेरचा संसार आपल्याला दु:ख देत नसतो, तर आतला संसार आपल्या दु:खाचे कारण असतो. नावेतून प्रवास करताना नावेच्या बाहेर, अवतीभवती पाणी असले तरी काही बिघडत नसते. बाहेरचे पाणी जर नावेत शिरले तर मात्र जिवाला धोका असतो. त्याप्रमाणे मन ही एक नाव आहे. मनरूपी नावेला राग (प्रेम) आणि द्वेष अशी दोन छिद्रे आहेत. या दोन छिद्रांतून बाहेरचा संसार हळूहळू मनात शिरत असतो. लक्षावधी जन्मांत जीवात्म्याने या दोन छिद्रांतून भरपूर संसार आपल्या आत भरून घेतलेला असतो. मन एवढे मोठे असते की त्यात कितीही भरले तरी ते पूर्ण भरले जात नाही. जन्मजन्मांतरापासून त्याने जे संस्कार भरून घेतले आहेत त्यामुळेच त्याला पुन्हा पुन्हा जन्म घ्यावा लागतो.

चराचराविषयी जीवात्म्याच्या मनात असलेली ममत्व भावना नाहीशी करणे, या उद्देशाने येथे चराचरलयस्थलाचे प्रतिपादन केले आहे. चराचराचा मनातून लय करायचा आहे, त्याचे लयचिंतन करायचे आहे. 'हे माझे नसून ईश्वराचे आहे' अशा भावनेने जो चराचराचे लयचिंतन करतो त्याच्या मनातून हळूहळू चराचराचा विलय होतो. या स्थितीचे वर्णन करणारे हे स्थल आहे. जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणतात:-

**लिंगैक्ये तु समापन्ने चरणाचरणे गते।**
**निर्देही स भवेद्योगी चराचरविनाशक:।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.२१)

चराचरात्मक अशा प्रपंचरूप शिवाशी शिवयोगी समरस होतो, ऐक्य होतो तेव्हा तो विदेही होतो. त्याने देह सोडलेला नसतो, तरीही तो विदेही झालेला असतो. त्याने शरीराभिमान सोडलेला असतो, म्हणून तो विदेही होतो. वस्तू व व्यक्तीविषयी अभिमान मनात असेल तर त्यांच्यापासून दूर राहून देखील त्यांचा त्याग घडत नसतो.

आपला मठ, तेथील संपत्ती, तेथील भक्तलोक हे सर्व सोडून एका पेटीत सामान घेऊन तुम्ही येथे काशीला आला आहात. तुमची पेटी छोटी आहे, परंतु अभिमान मोठा आहे. मठ, संपत्ती त्या ठिकाणी असली तरी त्यांच्याविषयीचा अभिमान मात्र येथे तुमच्या मनात भरून राहिलेला आहे. वस्तुविषयक अभिमान असेल आणि वस्तू जवळ नसेल तर ती जवळ असल्यासारखीच आहे. आणि अभिमान नसताना वस्तू जवळ असेल तर ती जवळ नसल्यासारखीच आहे. त्याप्रमाणे शिवयोगी देहधारी असला तरी त्याच्या ठिकाणी देहाभिमान नसल्यामुळे तो विदेहीच असतो. सर्व भोग भोगणाऱ्या राजा जनकाला विदेही म्हटले जात असे ते याच कारणामुळे. जो विदेही होतो त्याच्यासाठी चराचर प्रपंच नाहीसा होतो.

'मी' आणि 'माझे' हा अभिमान आहे. यालाच अहंकार आणि ममत्व असे म्हणतात. जर 'मी'च शिल्लक राहत नसेल तर 'माझे' कसे शिल्लक राहील? दिव्याची ज्योत म्हणजे अहंकार आणि त्याचा प्रकाश म्हणजे ममत्व होय. ज्योत जेवढी मोठी, तेवढा प्रकाश अधिक. अहंकार जेवढा मोठा, तेवढे त्याचे ममत्वही मोठे. व्यवहरात आपण पाहतो की माणूस जोपर्यंत जिवंत असतो तोपर्यंत त्याची त्याच्या संपत्तीवर मालकी असते. त्याचा प्राण गेला की त्याची मालकी संपते आणि तिच्यात वाटेकरी निर्माण होतात. त्याच्या संपत्तीसाठी त्याच्या मुलामुलांत भांडणे लागतात. त्याने शरीर सोडल्यावर त्याचे काही राहत नाही. त्याप्रमाणे परमार्थात शरीर सोडावे लागत नाही तर शरीराचा अभिमान सोडावा लागतो. शरीराभिमान सोडला तरी व्यक्ती, वस्तू व संपत्ती त्याची राहत नाही. ते सर्व त्याच्याजवळ असते, परंतु अभिमान नसल्यामुळे त्याचे नसते.

चराचर याचा अर्थ आहे प्रपंच, तर दुसरा सूक्ष्म अर्थ आहे द्वंद्वात्मक दुःख. प्रपंच हा द्वंद्वात्मकच असतो. सुख-दुःख, जन्म-मरण, तहान-भूक. द्वंद्वात्मक दुःखापासून सुटका करून घेणे म्हणजे चराचराचा लय करणे, असाही अभिप्राय या ठिकाणी आहे. शिवयोगी विदेही असल्यामुळे त्याला कोणतीही सांसारिक सुखदुःखे भोगावी लागत नाहीत. मानसिक दृष्ट्या अलिप्तपण दृढ झाले तर राजमहालात राहून देखील योगी होता येते आणि अलिप्तपणा नसेल तर झोपडीत राहून देखील मनुष्य भोगीच असतो. शिवयोगी मानसिक दृष्टीने चराचरापासून मुक्त झालेला असतो, म्हणून त्याला चराचरविनाशक असे म्हटले जाते.

**अनाद्यविद्यामूला हि प्रतीतिर्जगतामियम्।**
**स्वात्मैकबोधात् तन्नाशे कुतो विश्वप्रकाशनम्।।२०.२२।।**

शिवयोग्याला चराचर प्रपंच दिसत नाही, जाणवत नाही; हे कसे शक्य आहे? या प्रश्नाचे समाधान या श्लोकात केले आहे. प्रपंच प्रतीत होतो तो अविद्येमुळे. ज्याच्या मनात अविद्या असते त्याला प्रपंच दिसत असतो. परंतु ज्याच्या मनातून अविद्या नष्ट होते त्याला प्रपंच जाणवत नाही. उपादान कारण नष्ट झाले तर कार्यदेखील नष्ट होते, असा नियम आहे. मातीपासून घट तयार होतो, सोन्यापासून अलंकार तयार होतात, तंतूपासून वस्त्र तयार होते. माती हे घटाचे उपादान कारण, सोने हे अलंकाराचे उपादान कारण आणि तंतू हे वस्त्राचे उपादान कारण होय. मातीच नसेल तर घट कसा तयार होईल? सोनेचे नष्ट झाले तर अलंकार कसा शिल्लक राहील? तंतू नाहीसा झाला तर वस्त्र कसे उरेल? प्रपंचाचे मूळ कारण असलेली अविद्या जर मनातून नष्ट झाली तर तिचे कार्य असलेला प्रपंच शिल्लक राहणार नाही. लिंगांगसामरस्य झाल्यावर मूळ अविद्या नष्ट होते. याआधी अविद्या अवशिष्ट होती म्हणून साधक शिष्टौदनस्थलात होता. आता चराचरलयस्थलात अवशिष्ट माया देखील

पूर्ण नष्ट झाली आहे. आत्मा आणि शिव एकरूप आहेत असा बोध झाल्यामुळे अविद्या नष्ट होते. विद्या आणि अविद्या, प्रकाश आणि अंधार एकत्र राहू शकत नाहीत. त्यांच्यात सहअनवस्थायी विरोध असतो. म्हणजे ते दोघे एका ठिकाणी एकत्र राहू शकत नाहीत. एकतर अंधार असेल किंवा प्रकाश असेल, विद्या असेल किंवा अविद्या असेल. लिंगांगसामर स्यरूपी विद्येचा जोपर्यंत हृदयात उदय होत नाही तोपर्यंत तेथे अविद्या राहू शकते. जोपर्यंत अविद्या आहे तोपर्यंत त्याच्यासाठी प्रपंचही उपस्थित आहे. अविद्या नष्ट झाली की तिच्यावर आधारलेला प्रपंचही नष्ट होतो. चराचरलयस्थलातील साधकाच्या अंत:करणापासून मूळ अविद्या संपूर्णपणे नष्ट झाल्यामुळे बाहेर प्रपंच उपस्थित असूनही त्याच्यापुरता तो नाहीसा झालेला असतो, त्याला प्रपंच प्रतीत होत नाही.

**यथा मेघा: समुद्भूता विलीयन्ते नभस्तले।**
**तथात्मनि विलीयन्ते विषया: स्वानुभाविन:।।२०.२३।।**

आकाशात मेघ उत्पन्न होतात आणि आकाशातच विलीन होतात. वर्षा ऋतूत आकाश मेघांनी झाकोळलेले असते. पण तेच आकाश शरद् ऋतूत निरभ्र, स्वच्छ असते. अज्ञानी मनुष्याचे मनाकाश देखील असे संसाराने भरलेले असते. परमात्म्याविषयी त्याच्या मनात रुची नसते. त्याच्याविषयी काही ऐकण्याची इच्छाही नसते. तो कधी सत्संग करीत नसतो. त्याच्या मनात अविद्येने जबरदस्त ठाण मांडलेले असते. परंतु तोच मनुष्य जेव्हा सत्संग करतो तेव्हा हळूहळू त्याचे मनाकाश स्वच्छ होत जाते. अत्यंत आसक्त मनुष्य अनासक्त होऊ शकतो.

जो आत्मानुभवी असतो त्याच्या मनातून विषय नष्ट झालेले असतात. तो विषयांचे किंचितदेखील चिंतन करीत नसतो. ज्या वस्तूचा वा व्यक्तीचा आपल्याशी नित्य निकट संबंध असतो त्याच वस्तूचे वा व्यक्तीचे चिंतन आपल्या मनात चालू असते. आत्मानुभव आल्यावर विषयांचे चिंतन सुटते, विषयभोगाची इच्छा उरत नाही. आकाश निरभ्र व्हावे त्याप्रमाणे शिवयोग्याचे चित्त विषयांपासून मुक्त होते.

**स्वप्ने दुष्टं यथा वस्तु प्रबोधे लयमश्नुते।**
**तथा सांसारिकं सर्वमात्मज्ञाने विनश्यति।।२०.२४।।**

ज्याचा जसा संस्कार असतो तसे त्याला स्वप्न पडत असते. स्वप्न ही एक अवस्था आहे. स्वप्नावस्थेत जीवात्मा व्यवहार करीत असतो. जोपर्यंत मनुष्य स्वप्नात असतो तोपर्यंत त्याला स्वप्न सत्यच वाटत असते. स्वप्नावस्थेतून तो जेव्हा जागृतावस्थेत येतो तेव्हा स्वप्नातील जग पूर्णत: नष्ट होते. त्याप्रमाणे जेव्हा मनुष्य तुर्यावस्थेत जातो तेव्हा त्याला जागृता-वस्थेतील व्यवहार स्वप्नवत् वाटतात. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांचा सर्वांना अनुभव येतो. परंतु या पलीकडे आणखी एक अवस्था असते, तिला तुर्यावस्था म्हणतात. सुषुप्ति-अवस्थेत जीवात्म्याचा परमात्म्याशी संबंध जुळून त्याला आनंदानुभव येतो, परंतु जागा झाल्यावर त्याच्यासमोर पुन्हा संसार उभा राहतो. तुर्यावस्था मात्र अशी अवस्था आहे की जिच्यात मनुष्य गेला तर त्याला पुन्हा संसारात परत यावे लागत नाही.

ज्ञानाच्या सात भूमिका आहेत. मनाच्या उच्च स्थितीला 'भूमिका' असे म्हणतात. शुभेच्छा, सुविचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ती, असंसक्ती, पदार्थाभावनी, तुर्यगामिनी अशा सात भूमिका आहेत. पूजा, सत्संग, सद्ग्रंथांचे अध्ययन यांची इच्छा म्हणजे शुभेच्छा. ही इच्छा जर तुमच्या मनात निर्माण झाली असेल तर समजा की तुम्ही ज्ञानाच्या भूमिकेकडे जात आहात. इच्छा चांगली असेल तर विचार देखील चांगले होतात. शुभेच्छेनंतरची

भूमिका आहे सुविचारणा. मनात सुविचार येणे म्हणजे सुविचारणा. देहापेक्षा आत्मा वेगळा आहे असा विचार दृढ होणे म्हणजे तनुमानसा. सत्त्वापत्ती म्हणजे ज्ञानप्राप्ती. या भूमिकेत जीवात्म्याला ज्ञान प्राप्त होते. संसाराविषयी अनासक्ती निर्माण होणे म्हणजे असंसक्ती होय. प्रपंचात आसक्ती न राहिल्यामुळे प्रपंचाचा अभाव होतो, म्हणजेच चराचराचा लय होतो. ही अवस्था म्हणजे पदार्थाभावनी. चित्त अंतर्मुख झाल्यामुळे चित्त आत्मरूपात विलीन होणे म्हणजे तुर्यगा अथवा तुर्यावस्था होय. शिवयोगी तुर्यावस्थेत असतो. म्हणून त्याला प्रपंच प्रपंचरूपात न दिसता परमात्मरूपात दिसत असतो. तो आधी परमात्म्याला प्रपंचरूपात पाहत होता, आता प्रपंचाला परमात्मरूपात पाहतो. वस्तुतः प्रपंच हा शिवच असतो. मायागुणामुळे तो प्रपंचरूपात दिसत असतो. ज्याच्या मनातून माया नष्ट होते त्याला केवळ शिवच दिसतो.

**जाग्रत्स्वप्नसुषुप्तिभ्यः परावस्थामुपेयुषः।**
**किं वा प्रमाणं किं ज्ञेयं किं वा ज्ञानस्य साधनम्।।२०.२५।।**

या ठिकाणी तुर्यावस्थेबद्दल सांगितले आहे. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांच्या पलीकडे असलेली परावस्था म्हणजे श्रेष्ठ अवस्था जेव्हा शिवयोग्याला प्राप्त होते तेव्हा प्रमेय, प्रमाता आणि प्रमाण असा त्रिपुटी व्यवहार शिल्लक राहत नाही. जोपर्यंत वृत्ती बहिर्मुख असते तोपर्यंत त्रिपुटीव्यवहार चाललेला असतो. वृत्ती अंतर्मुख झाली तर तो सहजपणे थांबतो. म्हणून म्हटले आहे की तुर्यावस्थेत पोहोचलेल्या शिवयोग्याला कसले प्रमाण, कोणती ज्ञेय वस्तू आणि साधन तरी कोणते? त्याच्या दृष्टीने सर्व काही आत्मरूपच असते. सर्व काही आत्माच असेल तर कोणी कोणाला पाहायचे? कोणी कोणाचे शब्द ऐकायचे? कोणी कोणाला स्पर्श करायचा? सर्व आत्मरूप असल्याने त्या ठिकाणी भेदव्यवहारच उरलेला नसतो. म्हणून शिवयोग्याला भेदमय अशा प्रपंचाचे दर्शन होत नाही.

**तुर्यातीतपदं यत्तद् दूरं वाङ्मनसाध्वनः।**
**अनुप्रविश्य तद्योगी न भूयो विश्वमीक्षते।।२०.२६।।**

तुर्येपलीकडचे पद कसे आहे? तर तेथे वाणी, मन पोहोचू शकत नाही. ते वाणी आणि मनाला अगोचर असते. वाणी-मनाची गती ही जागृती आणि स्वप्न या अवस्थांपर्यंतच असते. सुषुप्ती आणि तुर्या या अवस्थांपर्यत ते पोहोचू शकत नाही. ही अवस्था प्राप्त झालेल्या शिवयोग्याला प्रपंच प्रतीत होत नाही. तो आपल्या आत जे पाहत असतो त्याचेच दर्शन बाहेर घेत असतो. अर्थात् त्याला अंतर्बाह्य आत्मरूपच दिसत असते. तुर्यावस्थेतून तो बाह्य प्रपंचापर्यंत येत नाही. सावलीत बसण्याची सवय असलेला मनुष्य जर उन्हात उभा राहिला तर थोड्याच वेळात ऊन सहन न होऊन तो लगेच सावलीत येतो, त्याप्रमाणे प्रसंगवशात् शिवयोगी बहिर्मुख झाला तरी लगेच पुन्हा अंतर्मुख होतो. साप हा थंड रक्ताचा प्राणी आहे. तो ऊष्ण वातावरणात फार काळ राहू शकत नाही. थंडगार अशा वारुळात अथवा बिळात तो राहतो. कदाचित बाहेर आला तरी लगेच बिळात परत जातो. त्याप्रमाणे शिवयोग्याला बहिर्मुख व्हावे लागले तरी फार काळ तो त्या स्थितीत न राहता पुन्हा अंतर्मुख होतो. तो बहिर्मुख झाला तरी बाहेर आत्मरूपच पाहत असतो, प्रपंच पाहत नसतो. प्रपंचाला परमात्मरूपातच पाहत असतो.

**नान्यत् पश्यति योगीन्द्रो नान्यज्जानाति किंचन।**
**नान्यच्छृणोति सन्दृष्टे चिदानन्दमये शिवे।।२०.२७।।**

शिवयोगी परमात्म्याशिवाय अन्य काहीही पाहत नसतो आणि त्याच्याशिवाय दुसरे काहीही जाणत नसतो. जे एक जाणल्याने सर्व ज्ञान होते तर इतर सर्व जाणण्याची गरजच काय? 'एक विज्ञानेन सर्व विज्ञानम्।' एका परमात्म्याला जाणल्यावर समग्र विश्वाला जाणल्यासारखेच होते. त्यामुळे अन्य कशाचे ज्ञान मिळवण्याचे कारण नसते. परतत्त्वाशिवाय तो दुसरे काहीही ऐकत नसतो. म. बसवेश्वरांनी आपल्या वचनात म्हटले आहे–

**मत्तुंदनु केळदंते अत्तलित्त नोडदंते अत्तलित्त होगदंते.**

याचा अर्थ असा की परमात्म्यावाचून दुसऱ्या कोणत्याही दिशेने माझे पाऊल पडू नये. त्याच्याशिवाय अन्य काही दिसू नये, अन्य काही ऐकू येऊ नये. ही अवस्था अत्युत्कृष्ट अवस्था होय. परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावर शिवयोगी अन्य काही पाहू, ऐकू इच्छित नाही. त्याची सर्व वृत्ती परमात्म्यातच विलीन झालेली असते. शेवटी या स्थलाचा समारोप करतात.

**असदेव जगत् सर्वं सदिव प्रतिभासते।**
**ज्ञाते शिव तदज्ञानं स्वरूपमुपपद्यते।।२०.२८।।**

प्रपंच परमात्म्यापेक्षा वेगळा नाही. परमात्मसत्तेपेक्षा प्रपंचाची सत्ता भिन्न नाही. तरी सामान्य माणसाला प्रपंचाची सत्ता वेगळी आहे असे अज्ञानामुळे वाटत असते. शिवयोगी मात्र परमात्मसत्तेपेक्षा अन्य काहीही जाणत नसल्यामुळे त्याला प्रपंच परमात्म्यापासून भिन्न दिसत नाही तर तो परमात्मरूपच दिसतो.

अशाप्रकारे या चराचरलयस्थलात शिवयोग्याच्या तुर्यातीत अवस्थेचे वर्णन केले आहे. पूर्णत: अंतर्मुख झालेला शिवयोगी परमात्म्याशिवाय अन्य काहीही जाणत नाही. म्हणून त्याच्यासाठी चराचर प्रपंच लय पावलेला असतो. प्रपंच जेथे आहे तेथे असतो, परंतु शिवयोग्याच्या दृष्टीला तो परमात्मरूप दिसत असतो. अशी स्थिती सांगणारे हे चराचरलयस्थल होय. येथे साधकाची सातवी भूमिका स्पष्ट केली आहे, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
३ नोव्हेंबर १९९६



## भाण्डस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भगवान शिवाच्या विमर्श शक्तीचे स्वरूप स्पष्ट करणारे हे चौथे उपस्थल म्हणजे भाण्डस्थल होय. शिवाच्या जवळ राहणाऱ्या शक्तीला 'कला' असे म्हणतात. तर जीवाच्या जवळ राहणाऱ्या शक्तीला 'भक्ती' असे म्हणतात. साधक आपल्या ठिकाणी असलेल्या भक्तीचा विकास करीत तिचे परिवर्तन कलाशक्तीमध्ये करतो, तेव्हा तो लिंगरूप होतो. विमर्शशक्तीलाच विमर्शकला असेही म्हटले जाते. तिलाच या ठिकाणी 'भाण्डस्थल' असे नाव दिले आहे. भाण्ड म्हणजे भांडे, पात्र. आपण एखाद्या भांड्यात खाद्यपदार्थ शिजवतो, निर्माण करतो त्याप्रमाणे अनंत ब्रह्मांडे विमर्शशक्तीमध्ये निर्माण होतात, म्हणून तिला 'भाण्ड' असे नाव या ठिकाणी दिले आहे.

**ब्रह्माण्डशतकोटीनां सर्गस्थितिलयान् प्रति।**
**स्थानभूतो विमर्शो यस्तद्भाण्डस्थलमुच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.२९)

ब्रह्मांडे किती आहेत याची गणती अजून कोणी करू शकला नाही. पिंडांची (शरीरांची) पूर्ण गणना अजून आपल्याला करता आली नाही. भारताची लोकसंख्या ९० कोटी आहे असे आपण म्हणतो. तेव्हा ती भारतामधील फक्त मनुष्यांची गणना असते, पशुपक्ष्यांची नसते. पृथ्वीच्या पाठीवर असंख्य जीवजंतू राहतात. त्यांची संख्या आजवर कोणी मोजली आहे? ती मोजणे अशक्य आहे. कारण जीवजंतू असंख्य आहेत. त्याप्रमाणे ब्रह्मांडे देखील अनंत आहेत. ब्रह्मांडाची विशालता जाणल्यावर मनुष्याचा अहंकार नष्ट होतो. ब्रह्मांडाची व्यापकता पाहिली तर आपण या विश्वात य:कश्चित आहोत असे वाटू लागते. आपले गावातले प्रशस्त घर- जे आपल्याला मोठे वाटते- ते गावाच्या तुलनेत पाहिले तर लहान होते. तालुका, जिल्हा, प्रांत यांच्याशी तुलना केली तर अधिकच लहान होते. आपल्या घराचा नकाशा कागदावर काढलेला असतो, तो किती मोठा वाटतो! परंतु जगाचा नकाशा समोर ठेवून त्यात आपले घर शोधून पाहिले तर ते सापडेल का? तेथे आपले गाव सापडणे अवघड आहे तर घर से सापडेल? आपली दृष्टी जसजशी व्यापक होत जाते तसतसे आपले लहानपण आपल्याला जाणवते. आपण स्वत:ला किती मोठे समजत असतो! अहंकाराने फुरफुरत असतो. परंतु या अनंत विश्वाशी तुलना करून पाहिली तर आपण जणू अस्तित्वातच नाही असे वाटू लागते. जेथे पृथ्वी धुलीकणाएवढी असते तेथे आपण किती मोठे असू शकतो?

अहंकारामुळे मनुष्याचे पतन होते आणि अहंकारत्यागामुळे तो महान होतो. भाण्डस्थलामध्ये साधकाला अहंकाराचा त्याग करून महान कसे होता येते, हे सांगितले आहे. विमर्शशक्ती हीच पूर्णाहंता, पराहंता असते. कोणाची अहंता शरीरापुरती असते, कोणाची घरापुरती, कोणाची गावापुरती, कोणाची राष्ट्रापुरती, कोणाची विश्वापुरती असते. आपल्या ठिकाणची अहंता अशी व्यापक हेऊन ती पूर्णाहंतेत परिवर्तित झाली पाहिजे. जो शिवयोगी तुर्यावस्थेमध्ये पोहोचलेला असतो त्याची अहंता ही पूर्णाहंता असते. त्याच्या ठिकाणी समष्टिभाव असतो. विश्वरूपाने शिवच प्रकाशमान होत असतो याचा अनुभव शिवयोग्याला आलेला असतो. 'तो शिव मीच आहे' अशी त्याची अनुभूती असते. म्हणून त्याची अहंता पूर्ण-अहंता, पराहंता असते. व्यष्टि-अहंकार संकुचित

असून दुःखदायक असतो, तर समष्टि-अहंकार परमानंददायक असतो. व्यष्टि-अहंकार दूर करून समष्टि-अहंकार सांगणारे हे भाण्डस्थल आहे. अनंत ब्रह्मांडांची उत्पत्ती, स्थिती आणि लय विमर्शशक्तीमध्ये होतो. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या पंचमहाभूतांमध्ये आकाश हे सूक्ष्म महाभूत आहे. आकाशातच सर्वांची उत्पत्ती होते, आकाशातच सर्व स्थिर राहतात आणि आकाशातच त्यांचा विलय होतो. आकाश हे एक महाभूत असल्यामुळे त्याला देखील उत्पत्ती, स्थिती आणि लय या अवस्था असतात. परंतु त्या सूक्ष्म महाभूत असल्यामुळे आपल्याला त्या दिसत नाहीत इतकेच. त्याप्रमाणे अंनतकोटी ब्रह्मांडाच्या उत्पत्ती, स्थिती व लय याला कारणीभूत असलेल्या विमर्शशक्तीला येथे भाण्डस्थल असे म्हटले जाते. विमर्शशक्तीलाच महामाया, कुण्डलिनी, शब्दब्रह्म, शुद्धमाया, परबिंदू अशी पर्यायनामे आहेत.

**विमर्शाख्या पराशक्तिर्विश्वोद्भासनकारिणी।**
**साक्षिणी सर्वभूतानां समिन्धे सर्वतोमुखी।।२०.३०।।**

विमर्शशक्तीच विश्वाला प्रकाशित करते. तीच सर्व भूतांना साक्षिभूत असते. तीच सर्वतोमुखी होऊन प्रकाशित होते. सर्व प्रपंचव्यवहार विमर्श-शक्तीच्या साक्षीनेच होत असतात. ती सर्वत्र अभिव्यक्त होत असते. जिकडे पाहाल तिकडे तीच दिसत असते. ती विश्वाचे कारण असल्यामुळे भाण्डरूपाने ती विश्वाला आधारभूत असते. अनंतकोटी ब्रह्मांडे तिच्यामुळेच प्रकाशित होतात आणि सर्व जीवांच्या व्यवहाराला तीच साक्षी असते. तिला माहीत न होता जगात कुठलाही व्यवहार घडत नाही. जीवाच्या व्यवहाराला तीच साक्षी असते. जीवाच्या अवतीभोवती सर्वत्र तीच उपस्थित असते, म्हणून तिला येथे सर्वतोमुखी असे म्हटले जाते.

**विश्वं यत्र लयं याति विभात्यात्मा चिदाकृतिः।**
**सदानन्दमयः साक्षात् सा विमर्शमयी कला।।२०.३१।।**

विश्वाचा विलय विमर्शशक्तीमध्ये होतो. जेथून ते उत्पन्न झालेले असते तेथेच ते लय पावते. शिव सत्-चित्-आनंदरूप आहे. त्याच्या ठिकाणी जी चिद्रूपता आहे ती विमर्शशक्तीमुळे. चित् म्हणजे स्वस्वरूपज्ञान असणे. शिवाच्या ठिकाणी विमर्शशक्ती अविनाभावसंबंधाने राहते. ती मानली नाही तर शिवामध्ये चिद्रूपता लक्षण दिसणार नाही. मी आहे, मी मला जाणतो, मी आनंदरूप आहे असा बोध परशिवाच्या ठिकाणी असतो. तो विमर्शशक्तीमुळेच असतो. त्याच्या ठिकाणी हा बोध नाही असे मानले तर तो जड ठरेल. शिवाप्रमाणेच विमर्शशक्तीदेखील सच्चिदानंदरूपिणी आहे. शिव आणि शक्ती दोन तत्त्वे नसून एकच आहेत. ती अभिन्न आहेत. 'न शिवेन विना शक्तिः न शक्तिरहित शिवः।' शिवाशिवाय शक्ती आणि शक्ती-शिवाय शिव भिन्न नाहीत. दोघांमधला संबंध अविनाभावसंबंध होय. चंद्र आणि चंद्रिका, पुष्प आणि सुगंध हे जसे एकरूप असतात त्याप्रमाणे शिव आणि विमर्शशक्ती एकरूप असतात. तिच्यामुळेच शिव सच्चिदानंदरूपाने प्रकाशित होतो आणि सर्व प्रपंच तिच्यातच लय पावतो.

चराचरलयस्थलातील शिवयोग्याच्या मनातून चराचराचा लय होतो त्याचे कारण देखील विमर्शशक्तीच आहे. त्यामुळे त्याच्यासमोर शिवपरब्रह्म उभे राहते. चराचराचा लय झाला, दृष्टीतून सृष्टी निघून गेली तर दृष्टीसमोर जे तत्त्व उरते ते शिवपरब्रह्म असते. शिवाच्या सच्चिदानंदरूपाचे दर्शन त्याला घडत असते. शिवसाक्षात्कारासाठी विमर्शशक्तीची आवश्यकता असते. विमर्शशक्तीमुळेच शिवयोग्याच्या ठिकाणी पराहंता उत्पन्न होते. मग जीव शिवरूप होतो, अंग लिंगरूप होते.

**पराहन्तासमावेशपरिपूर्णविमर्शवान्।**
**सर्वज्ञः सर्वगः साक्षी सर्वकर्ता महेश्वरः।।२०.३२।।**

शिवाच्या ठिकाणी सर्वज्ञता, सर्वगामित्व, साक्षित्व, सर्वकर्तृत्व हे गुण विमर्शशक्तीमुळेच असतात. हे गुण त्याच्या ठिकाणी नसते तर तो स्फटिकासारखा जड ठरला असता. तो संपूर्ण विमर्शशक्तीने युक्त असतो, म्हणूनच सर्वज्ञ, सर्वकर्ता, सर्वव्यापक आणि सर्वसाक्षी होतो. त्याच्या ठायी विमर्शशक्ती नसती तर तो जडरूप झाला असता.

**विश्वाधारमहासंवत्प्रिकाशपरिपूरितम्।**
**पराहन्तामयं प्राहुर्विमर्शं परमात्मनः।।२०.३३।।**

विश्वाला आधारभूत असलेल्या, महाज्ञान प्रकाशाने परिपूर्ण असलेल्या परशिवाच्या विमर्शशक्तीला शिवयोगी पराहंता असे म्हणतात. परशिवाच्या ठिकाणी अविनाभाव संबंधाने राहणारी विमर्शशक्ती, पराहंता ज्याला प्राप्त होते तो प्रत्यक्ष परशिवच होतो. भांड्यासारखी विमर्शशक्ती सर्वाला आधारभूत असते. तिचे हे स्वरूप जाणणाऱ्या शिवयोग्याला 'भाण्डस्थली' असे म्हणतात.

**विमर्शभाण्डविन्यस्तविश्वतत्त्वविजृम्भणः।**
**अनन्यमुखसम्प्रेक्षी मुक्तः स्वात्मनि तिष्ठति।।२०.३४।।**

शक्तितत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत सर्व तत्त्वे विमर्शशक्तिरूप भांड्यात राहतात. वीरशैव तत्त्वज्ञानात पंचमहाभूते इत्यादी पदार्थांना 'तत्त्व' अशी संज्ञा आहे. जे कल्पित नसते ते तत्त्व आणि जे कल्पित असते ते अतत्त्व. वीरशैव तत्त्वज्ञानाने छत्तीस तत्त्वे मानली आहेत. ही तत्त्वे विमर्शशक्तिरूप भांड्यात राहतात, असे या स्थलात सांगितले आहे. भाण्डस्थलातील शिवयोग्याची स्थिती कशी असते? सर्वप्रथम तो विश्वाला तत्त्वरूपात पाहतो. पृथ्वीतत्त्व, जलतत्त्व, तेजतत्त्व, वायुतत्त्व आणि आकाशतत्त्व. शिवापासून पृथ्वीपर्यंत सर्वांना तो 'तत्त्व'रूपाने जाणतो. नंतर छत्तीस तत्त्वांनी युक्त अशी अनंत ब्रह्मांडे विमर्शशक्तिरूप भांड्यात अवस्थित आहे, अशी भावना तो करतो. शिव शक्तिविशिष्ट असल्यामुळे विश्वनिर्मिती होते. म्हणून विश्वाचे उपादान कारण विमर्शशक्तीच आहे. विमर्शशक्तीमधून विश्व निर्माण झाले आहे, म्हणून ते तिच्यातच स्थित असते आणि तिच्यातच लय पावणार असते. म्हणून शिवयोगी विमर्शशक्तिरूपी भांड्यात विश्व ठेवलेले आहे, अशी भावना करतो आणि अनन्यपणे अंतर्मुख होऊन आत्मरूपात स्थिर होतो.

अशा प्रकारे या भाण्डस्थलात विमर्शशक्तीचे महत्त्व स्पष्ट केले आहे. समग्र विश्वाच्या उत्पत्ती, स्थिती व लयाचे कारण विमर्शशक्ती असून तिच्यामुळेच शिवपरमात्मा सच्चिदानंदरूपाने भासतो. तिच्यामुळेच भगवान शिव विश्वनिर्मिती करू शकतात. हे जाणल्यामुळे शिवयोग्याच्या ठिकाणी पूर्णाहंता म्हणजे पराहंता निर्माण होते. त्यामुळे त्याला सर्व चराचर आत्मरूप दिसू लागते. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

४ नोव्हेंबर १९९६

## भाजनस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंगषट्स्थलांतर्गत ऐक्यस्थलातील भाण्डस्थल या उपस्थलाचा काल आपण विचार केला. परशिवब्रह्मात अविनाभावसंबंधाने राहणारी जी विमर्शकला आहे, तिलाच 'भाण्ड' या शब्दाने संबोधिले आहे. आज भाजनस्थल या उपस्थलाचा विचार करायचा आहे. 'भाण्ड'चा जो आधार आहे, त्यालाच येथे 'भाजन' असे म्हटले आहे. सर्व ब्रह्मांडाचा आधार भाण्ड आहे तर भाण्डचा आधार भाजन आहे.

आम्ही या सिंहासनावर बसलो आहोत. सिंहासन हा आमचा आधार आहे आणि जमीन या सिंहासनाचा आधार आहे. आपल्या प्राचीन शास्त्राप्रमाणे पृथ्वीचा आधार जल, जलाचा आधार अग्नी, अग्नीचा आधार वायू आणि वायूचा आधार आकाश होय. सामान्यत: पृथ्वीवर भूभागापेक्षा पाण्याचे प्रमाण अधिक म्हणजे ७० टक्के आहे, याची सर्वांना कल्पना असते. मातीचे ढेकूळ पाण्यात टाकले तर ते विरघळते. म्हणून पृथ्वीपेक्षा जलतत्त्व मोठे असे मानले जाते. जलापेक्षा अग्नितत्त्व मोठे आहे. ते जलाचा आधार आहे. ऊन खूप तापले तर पाऊस अधिक होतो, याचा अनुभव आपल्या सर्वांना येत असतो. म्हणून अग्नी हा जलाचा आधार होय. अग्नीचा आधार वायू आहे, असे मानले जाते. वायूमुळेच अग्नी प्रज्वलित होतो. धगधगता राहतो. वायू नसेल तर अग्नी विझून जातो. म्हणून वायू हा अग्नीचा आधार होय. वायू आकाशात उत्पन्न होतो. आकाशात राहतो आणि आकाशातच लय पावतो. म्हणून आकाश हा वायूचा आधार होय. अशा प्रकारे पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश ही पंचमहाभूते एकावर एक आधारलेली आहेत. परशिवाच्या ठिकाणी असलेली विमर्शशक्ती ही आकाशाचा आधार आहे. एकात एक याप्रमाणे एका भांड्यात दुसरे भांडे, दुसऱ्यात तिसरे भांडे ठेवल्यावर बाहेरून पाहिले असता एकच भांडे दिसते. त्याप्रमाणे ही सर्व पंचमहाभूते विमर्शशक्तीमध्येच सामावलेली आहेत. विमर्शशक्तीचा आधार कोणता? तर परशिवब्रह्म हाच विमर्शशक्तीचा आधार होय. या भाजनस्थलामध्ये याच विचाराचे प्रतिपादन केले आहे.

**समस्तजगदण्डानां सर्गस्थित्यन्तकारणम्।**
**विमर्शो भासते यत्र तद्भाजनमिहोच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.३५)

समस्त विश्वाच्या उत्पत्ती, स्थिती आणि लयाचे कारण विमर्शशक्ती होय. तिचा जो आश्रय आहे त्याला 'भाजन' असे नाव आहे. भाजनाच्या ठिकाणीच 'भाण्ड' म्हणजे विमर्शशक्ती अविनाभावसंबंधाने राहते. हा आश्रय-आश्रयी संबंध आहे. जो आधार घेतो तो आश्रयी आणि जो आधार देतो तो आश्रय. पृथ्वीचा आश्रय जल, जलाचा आश्रय अग्नी, अग्नीचा आश्रय वायू, वायूचा आश्रय आकाश, आकाशचा आश्रय विमर्शशक्ती आणि विमर्शशक्तीचा आश्रय परब्रह्मशिव. शिवाचा आश्रय कोण? हे सांगणे कठीण आहे. एका शिवाचा आश्रय दुसरा शिव, दुसऱ्या शिवाचा आश्रय तिसरा शिव, तिसऱ्या शिवाचा आश्रय चौथा शिव, असे मानत बसलो तर अनवस्था प्रसंग येईल. राजकन्येच्या कधीही न संपणाऱ्या कथेसारखी कथा होईल.

एका राजकन्येला कथा ऐकण्याची अत्यंत आवड होती. जो मला न संपणारी कथा सांगेल त्याच्याशीच मी लग्न करीन, असा निश्चय तिने केला होता. भले भले आले, तिला कथा सांगून गेले. पण प्रत्येकाच्या कथेला शेवट होताच. न संपणारी कथा कोणी सांगू शकेना. अखेर खेड्यातला एक गुराखी तिचे आव्हान स्वीकारून आला. त्याने कथा सांगायला सुरुवात केली.

''एक धान्याचे कोठार होते. तेथे प्रचंड धान्य साठवलेले होते. त्याच्या आसपास चिमण्या राहत होत्या. एक चिमणी आली, कोठारात शिरली, धान्याचा एक दाणा चोचीत धरून बाहेर पडली. दुसरी चिमणी आली, कोठारात शिरली, धान्याचा एक दाणा चोचीत धरून बाहेर पडली. तिसरी चिमणी आली, कोठारात शिरली, धान्याचा एक दाणा चोचीत धरून बाहेर पडली...''

अशी कथा सुरू झाली. कथा संपेचना. 'हं ह' करता करता राजकन्या कंटाळली. शेवटी त्याला म्हणाली, ''तुझी कथा संपणार तरी केव्हा?''

''कोठारातले सर्व धान्य संपल्यावर,'' त्याने उत्तर दिले.

''कोठारातले धान्य केव्हा संपेल?'' तिने विचारले.

''कोणास ठाऊक? कदाचित काही वर्षे लागतील.'' तो म्हणाला.

शेवटी राजकन्या कंटाळली. त्याने न संपणारी कथा सांगितल्यामुळे राजकन्येला त्याच्याशी लग्न करावे लागले.

एका शिवाला दुसरा शिव, दुसऱ्या शिवाला तिसरा शिव आधार आहे, असे म्हणत बसलो तर या कथेसारखी अवस्था होईल. म्हणून परब्रह्मशिव हा सर्वांचा आधार असला तरी तो स्वत: मात्र निराधार आहे. त्याचा आधार दुसरे काही नाही. सर्व विश्वाच्या उत्पत्ति-स्थिती-लयाचा आधार असलेली विमर्शशक्ती ज्याच्या ठिकाणी प्रतीत होते तो परब्रह्म शिव भाजन होय.

**विमर्शाख्या परा शक्तिर्विश्ववैचित्र्यकारिणी।**
**यस्मिन् प्रतिष्ठिता ब्रह्म तदिदं विश्वभाजनम्।।२०.३६।।**

विश्वामध्ये वैविध्य, वैचित्र्य आहे त्याचे कारण विमर्शशक्ती होय. सृष्टीमध्ये विविधता आहे. एकासारखे दुसरे नाही. प्रत्येक मनुष्य, पशू, पक्षी एकसारखे नाहीत. कारखान्यात एखादे उत्पादन काढले जाते ते एकासारखे एक असते. एकाच्याच सगळ्या नकला असतात. परंतु सृष्टीत तसे नाही, ईश्वर असा महान कलाकार आहे की ज्याची प्रत्येक निर्मिती स्वतंत्र असते. सृष्टीतील वैचित्र्याचे कारण विमर्शशक्ती आहे. ही विमर्शशक्ती ज्या परब्रह्मात प्रतिष्ठित असते त्याला 'भाजन' असे नाव आहे.

**अंत:करणरूपेण जगदंकुररूपत:।**
**यस्मिन् विभाति चिच्छक्तिर्ब्रह्मभूत: स उच्यते।।२०.३७।।**

विश्व हा एक अंकुर असून तो ज्या चिच्छक्तीमध्ये प्रतिभासित होतो, त्या चिच्छक्तीलाच 'ब्रह्म' असे म्हणतात. त्या ब्रह्मालाच येथे 'भाजन' असे म्हटले आहे. हे विश्व आपल्याला प्रचंड विस्तारलेले दिसते, परंतु परब्रह्मशिवासमोर ते एखाद्या अंकुराइतके लहान असते, हे या ठिकाणी सूचित केले आहे. शिव हा विश्वरूप आहे तसाच विश्वोत्तीर्ण देखील आहे, तो विश्वातीत देखील आहे. अनंत ब्रह्मांडाला आधारभूत असलेल्या विमर्शशक्तीपेक्षा

शिव व्यापक असल्यामुळे त्याला येथे भाजन असे म्हटले आहे. शिव आणि विमर्शशक्ती यांचा संबंध कसा आहे हे या पुढील श्लोकात दृष्टान्तरूपाने स्पष्ट केले आहे.

**यथा चन्द्रे स्थिरा ज्योत्स्ना विश्ववस्तुप्रकाशिनी।**
**तथा शक्तिर्विमर्शात्मा प्रकारे ब्रह्मणि स्थिता।।२०.३८।।**

चंद्राची प्रभा विश्व प्रकाशित करते. चंद्र आणि चंद्रिका (प्रभा) यांच्यात भेद नाही. चंद्र उगवला आणि चंद्रिका मागे राहिली, असे कधी घडत नाही. चंद्र उगवल्याबरोबर त्याचा प्रकाश सर्व पृथ्वीवर पसरतो. चंद्रिका ही चंद्रातच स्थिर असते, त्याच्यापासून वेगळी नसते. त्याप्रमाणे विमर्शशक्ती परब्रह्म शिवाच्या ठिकाणी विद्यमान आहे, स्थिर आहे. चंद्र आणि चंद्रिका, पुष्प आणि गंध यांच्यातील संबंधाला 'अविनाभाव' संबंध म्हणतात. संबंध अनेक प्रकारचे असतात. संयोग संबंध, समवाय संबंध, संयुक्त संबंध, संयुक्त-समवेत संबंध. तादात्म्य संबंध इत्यादी. न्यायशास्त्र पाहिले तर त्यात संबंधच संबध दिसतील. नैय्यायिकाजवळ जो जाईल त्याच्याशी तो संबंध जोडतो. काहीतरी संबंध जोडल्याशिवाय तो गप्प बसत नाही. म्हणून न्यायशास्त्राचे सर्वांशी संबंध असतात, मग भलेही ते प्रेमसंबंध असतील किंवा वादसंबंध. सर्व प्रकारचे संबंध जाणून घेण्यासाठी न्यायशास्त्राचा अभ्यास केला पाहिजे. संबंधाविषयी एक कथा सांगितली जाते.

एक न्यायशास्त्री एकदा एका अपरिचित माणसाच्या घरी गेला. न्यायशास्त्र्याला ओळख लागत नसते, कारण तो सगळ्यांशी काही ना काहीतरी संबंध जोडतोच. तो घरात गेला, बसला. घरधन्याने विचारले, ''तुम्ही कोण आहात? मी तुम्हाला ओळखले नाही.''

न्यायशास्त्री म्हणाला, ''मी कोण आहे, हे तुम्हाला माहीत नाही का? आपण दोघे संबंधी आहोत.''

घरधन्याला आश्चर्य वाटले. तो म्हणाला, 'आमचा तुमचा कधी संबंध झाला? आम्ही तुमच्या घरात आमची मुलगी दिली नाही, तुमची मुलगी आम्ही सून करून घेतली नाही. आपले काही देण्याघेण्याचे व्यवहार नाहीत. आपण एकमेकांचे भाऊ नाही, मित्र नाही आणि शत्रूदेखील नाही. मग आपला संबंध कसा असेल?''

न्यायशास्त्री म्हणाला, ''नाही कसा? मी ज्या बैलगाडीत बसून आलो ती गाडी निंबाच्या लाकडापासून बनवलेली आहे आणि तुमच्या अंगणात निंबाचे झाड आहे. मी निंबाचा अधिपती आहे आणि तुम्ही देखील निंबाचे अधिपती आहात. त्यामुळे आपण एकमेकांचे संबंधी आहोत.''

न्यायदर्शनाचा अभ्यास करणारे अशा प्रकारे एकाचा संबंध दुसऱ्याशी लावत असतात. येथे 'निंबाधिपत्य संबंध' लावून दाखविलेला आहे. यामधला विनोद सोडून दिला तर असे लक्षात येते की जगात पुष्कळ प्रकारचे संबंध आहेत. त्या सर्व संबंधांत अविनाभाव संबंध हा सर्वोत्कृष्ट संबंध मानला जातो. एकाशिवाय दुसऱ्याला अस्तित्व नसते असा जो संबंध असतो तो अविनाभाव संबंध होय. याला तादात्म्य संबंध आणि नित्य संबंध असेही म्हटले जाते. चंद्र आणि चंद्रिका यांचा जसा संबंध असतो तसा शिव आणि शक्ती यांचा संबंध असतो. यामुळेच वीरशैव सिद्धान्तात, परशिव शक्तिविशिष्ट आहे, असे म्हटले जाते.

**अकारः शिव आख्यातो हकारः शक्तिरुच्यते।**
**शिवशक्तिमयं ब्रह्म स्थितमेकमहं वदे।।२०.३९।।**

अहंता दोन प्रकारची असते. एक व्यष्टि-अहंता, दुसरी समष्टि-अहंता. एक अपूर्ण असते तर दुसरी पूर्ण

असते. म्हणून तिला पूर्णाहंता अथवा पराहंता म्हणतात. ज्याने आत्मरूपात परमात्म्याला जाणलेले असते त्याची अहंता ही पूर्णाहंता असते. असा शिवयोगी अहं या शब्दाचा प्रयोग कसा करतो हे या ठिकाणी सांगितले आहे. 'अहं' (मी) या शब्दातील 'अ' म्हणजे परशिव, परब्रह्म आणि 'ह' म्हणजे विमर्शशक्ती.

वर्णामधील पहिला वर्ण 'अ' आहे आणि तो स्वर असल्यामुळे व्यंजनांचा नीट उच्चार होण्यासाठी त्याची अत्यंत गरज असते. क्, ख्, ग्, घ् ही व्यंजने अपूर्ण असतात. त्यांच्यात अ हा स्वर मिसळल्यावरच त्यांचा क, ख, ग, घ असा पूर्ण उच्चार करता येतो. अकारामुळे वर्णोच्चार सुलभ होतात. सर्व वर्णातला तो पहिला वर्ण आहे म्हणून श्रीकृष्णांनी गीतेत 'वर्णामध्ये मी अकार आहे' असे म्हटले आहे. 'अहं' या शब्दातील 'हं' याचा अर्थ शक्ती असा आहे.

सामान्य माणसाच्या 'अहं' मधील अ म्हणजे आत्मा आणि हं म्हणजे अंत:करण. त्याचा अहंकार हा व्यष्टि-अहंकार असतो. परंतु सर्व काही मीच आहे असा अनुभव घेणाऱ्या शिवयोग्याचा अहं मात्र शिव आणि शक्ती यांना व्यापणारा असतो.

**अहन्तां परमां प्राप्य शिवशक्तिमयीं स्थिराम्।**
**ब्रह्मभूयंगतो योगी विश्वात्मा प्रतिभासते।।२०.४०।।**

शिवयोग्याची अहंता शिवशक्तिमय असून स्थिर असते. परब्रह्माला जाणणारा योगी हा विश्वात्मा होतो. त्याचा अहं विश्वात्म झालेला असतो. त्याची अहंता स्वत:च्या शरीरापुरती मर्यादित नसते. ती सर्व सृष्टीला व्यापून असते.

रामकृष्ण परमहंसांच्या जीवनातील एक प्रसंग असा आहे. ते एकदा आपल्या काही शिष्यांबरोबर नावेत बसून जात होते. नदीच्या किनाऱ्यावर काही माणसे एका माणसाला मारत होती. नावेत बसलेले रामकृष्ण परमहंस किंचाळू लागले, ''मला मारू नका, मला मारू नका.''

नावेत बसलेल्या शिष्यांना आश्चर्य वाटले. ते म्हणाले, ''आपल्याला कोण मारत आहे? आम्हाला तर कोणी दिसत नाही.''

रामकृष्ण म्हणाले, ''ते पाहा, तेथे किनाऱ्यावर मला मारत आहेत.''

''मला येथे मारत नाहीत, तर तेथे किनाऱ्यावर मारत आहेत.'' हे त्यांचे उद्‌गार त्यांची अहंता पूर्णाहंता होती हे सिद्ध करणारे आहेत. ज्या माणसाला मारत होते त्याच्या पाठीवर उमटलेली चिन्हे परमहंसांच्या पाठीवर उमटली. महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध संत ज्ञानेश्वर यांच्या चरित्रात तर एका रेड्याला मारल्यावर त्याचे वळ ज्ञानेश्वरांच्या पाठीवर उमटले, अशा घटनेचे वर्णन आढळते. संतपुरुषाची अहंता प्राणिमात्रांशी अशी समरस झालेली असते. सामान्य लौकिक व्यवहारात आपण पाहतो की मुलाला काही दु:ख झाले तर आईच्या डोळ्यांत अश्रू येतात. येथे केवळ रक्तसंबंधामुळे असे घडते. आध्यात्मिक क्षेत्रात मात्र आत्मसंबंधामुळे असे घडलेले आढळते. शेवटी भाजनस्थलाचा समारोप करतात.

**वृक्षस्थं पत्रपुष्पादि वटबीजस्थितं यथा।**
**तथा हृदयबीजस्थं विश्वमेतत् परात्मन:।।२०.४१।।**

एका छोट्याशा बीजात संपूर्ण वटवृक्ष सूक्ष्मरूपाने सामावलेला असतो. बीजाशी माती आणि पाणी यांचा संबंध आल्यावर ते बीज विशाल वृटवृक्षात परिवर्तित होते. एका बीजात पाने, फुले यांसह संपूर्ण वटवृक्ष जसा

सामावलेला असतो त्याप्रमाणे परब्रह्मरूप झालेल्या भाजनस्थलातील शिवयोग्याच्या हृदयात संपूर्ण चराचर विश्व बीजरूपाने स्थित असते. शिवयोग्याला ही जी स्थिती प्राप्त होते ती चिंतनामुळे. चिंतनामध्ये असे सामार्थ्य आहे. शक्तिविशिष्ट परशिवाला आपल्या आत्मरूपात जाणून त्या स्थितीत राहणाऱ्या साधकाला भाजनस्थली असे म्हणतात. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
५ नोव्हेंबर १९९६

---

**आशीर्वचन सहावे**

## अंगालेपस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग–षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थलातील अंगालेपस्थल या सहाव्या उपस्थलाचा विचार आज करायचा आहे. ज्ञानी पुरुषाला प्रारब्धकर्माचा क्षय होईपर्यंत या जगात राहावे लागते. त्यामुळे त्यांच्या शरीराकडून काही व्यवहारदेखील घडत असतात. या व्यवहारात तो कसा अलिप्त राहतो याचे प्रतिपादन करणारे हे अंगालेपस्थल होय. या स्थलाचा प्रारंभ करताना जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणतात:–

**दिक्कालाद्यनवच्छिन्नं चिदानन्दमयं महत्।**
**यस्य रूपमिदं ख्यातं सोऽगालेप इहोच्यते।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.४२)

ज्ञानी पुरुष सर्व कर्मव्यवहारात अलिप्त असतो त्याप्रमाणे प्रपंचातील अनेक सामान्य वस्तू अलिप्तपणा जपताना दिसतात. कमळाची पाने पाण्यात राहतात, परंतु ता पाण्यापासून अलिप्त राहतात. पाण्याचा थेंब जर कमळाच्या पानावर टाकला तर तो लगेच ओघळून जातो, त्याला चिकटून बसत नाही. कमळपानावरील जलबिंदू मोत्यांसारखे सुरेख दिसतात. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष सर्व प्रपंचव्यवहारात अलिप्त राहतो हे या स्थलात स्पष्ट केले आहे. अलिप्त होण्यासाठी अपरिच्छिन्न व्हावे लागते. जे परिच्छिन्न आहे ते अलिप्त राहू शकत नाही.

परिच्छेद म्हणजे मर्यादा, मिती. वस्तुपरिच्छेद, कालपरिच्छेद, देशपरिच्छेद आणि दिक्परिच्छेद असे परिच्छेदाचे प्रकार आहेत. जगातील प्रत्येक पदार्थ हा दुसऱ्या पदार्थांपासून वेगळा असतो. त्यांचा अन्योन्य अभाव असतो. ते एकरूप होऊ शकत नाहीत. म्हणून पदार्थांच्या ठिकाणी वस्तुपरिच्छेद असतो. याप्रमाणेच भूत, भविष्य आणि वर्तमान असे तीन काळ असतात. मनुष्य एकावेळी एकाच कालात राहू शकतो. सर्व कालांत राहू शकत नाही. खरे सांगायचे तर मनुष्य फक्त वर्तमान काळातच राहत असतो. मागचा क्षण भूतकाळात गेलेला असतो तर येणारा क्षण भविष्यकाळात असतो. त्या दोन क्षणांच्या मधला जो क्षण असतो तो वर्तमानकाळ होय. माणूस याच काळात जगत असतो. नदीच्या ज्या पाण्यात तो पाऊल ठेवतो त्याच पाण्यातून तो पाऊल बाहेर काढत नसतो. कारण पाण्यात पाऊल ठेवल्यावर त्याच्या पायाभोवती असणारे जलबिंदू वाहत पुढे निघून गेलेले असतात आणि नवे आलेले असतात. असा हा कालप्रवाह आहे. दिव्याची ज्योत ५० वर्षांपूर्वी आपण जर पेटवली असेल तर

आज ती नवी असते. कारण ज्योतदेखील ऊर्ध्वगतीने वाहातच असते. स्थूल दृष्टीने पाहिले तर आपले शरीर हे कालपरिच्छिन्न असते. जन्माआधी ते अस्तित्वात नसते आणि मृत्यूनंतरही ते अस्तित्वात राहणार नसते. म्हणून भौतिक जगातील प्रत्येक वस्तू आणि व्यक्ती कालपरिच्छिन्न असतात.

प्रत्येक मनुष्य आणि पदार्थ एकदेशीय असतो म्हणजे आपण कुठल्या तरी एका ठिकाणी उपस्थित असतो, सर्व ठिकाणी एकाच वेळी उपस्थित राहू शकत नाही. मनुष्य भारतामध्ये असेल तर त्यावेळी तो अमेरिकेत नसतो. महाराष्ट्रात असेल तर कर्नाटकात नसतो. शहराच्या एका भागात असेल तर दुसऱ्या भागात नसतो. घरातल्या एका खोलीत असेल तर दुसऱ्या खोलीत नसतो. खोलीतल्या एका कोपऱ्यात असेल तर दुसऱ्या कोपऱ्यात नसतो. यालाच देशपरिच्छेद असे म्हणतात. पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण या चार दिशा आहेत तर ईशान्य, आग्नेय, नैऋत्य, वायव्य या चार उपदिशा आहेत याशिवाय अध: आणि ऊर्ध्व यादेखील दिशा आहेत तर सर्व दिशा मिळून दहा दिशा होतात. मनुष्य पूर्वेकडून तोंड करून बसला असेल तर त्याचे अन्य दिशांकडे तोंड असू शकत नाही. घरातल्या घरात तो उत्तरेकडे बसला असेल तर दक्षिण, पश्चिम इत्यादी अन्य दिशांकडे नसतो. यालाच दिक्‌परिच्छेद म्हणतात. उत्पन्न झालेल्या सर्व वस्तू अशा चार परिच्छेदांनी बद्ध असतात. परब्रह्म शिव मात्र उत्पन्न झालेला नाही. म्हणून वस्तू, काल, देश, दिशा या परिच्छेदांच्या पलीकडे आणि अस्ति, जायते, विवर्धते, विपरिणमते, क्षीयते, विनश्यति या सहा विकारांच्या पलीकडे शिव असतो. तो सर्व देशांत आहे, सर्व कालांत आहे, सर्व वस्तूंत आहे आणि सर्व दिशांत आहे. तो असा अपरिच्छिन्न आहे. 'ईश्वर कोठे आहे?' असा प्रश्न जर कोणी विचारला तर 'तो कोठे नाही?' असा प्रतिप्रश्न त्याला विचारला पाहिजे. विश्वाच्या कणाकणांत, अणुरेणूंत तो अवस्थित आहे.

तो चिदानंदमय आहे. म्हणजे सच्चिदानंदरूप आहे. अस्तित्व, प्रकाश आणि आनंद ही त्याची लक्षणे आहेत. त्याच्यापेक्षा दुसरे काहीही मोठे नसल्यामुळे तो महान आहे. तो अपरिच्छिन्न, सच्चिदानंदरूप असल्यामुळे तो अलिप्त आहे. अशा परब्रह्माला जो आत्म्याच्या ठिकाणी जाणतो तो शिवयोगी देखील परब्रह्मरूप होतो. म्हणून तो देखील परशिवाप्रमाणेच अलिप्त असतो. तो कशापासून अलिप्त असतो? तर कर्मापासून. सामान्य मनुष्य कोणताही व्यवहार, कर्म राग (प्रेम) आणि द्वेष या भावनेने करीत असतो. त्यामुळे पाप-पुण्याची फळे त्याला भोगावी लागतात. ज्याच्या मनात राग-द्वेष आहेत, अनुकूल-प्रतिकूल प्रवृत्ती आहेत त्याच्याकडून घडणाऱ्या कर्मांनी पाप-पुण्य उत्पन्न होऊन त्यांचा लेप त्याच्या अंत:करणाला लागतो. शिवयोगी मात्र राग-द्वेषविरहित असल्यामुळे त्याच्या कडून कोणतेही कर्म घडले तरी त्याचा स्पर्श त्याच्या अंत:करणाला होत नाही. म्हणून त्याला पाप-पुण्याची फळे भोगावी लागत नाही. त्याच्या अंत:करणाला कोणताही लेप होत नाही, हे सांगणारे हे अंगालेपस्थल होय.

**समस्तजगदात्माऽपि संविद्रूपो महामतिः।**
**लिप्यते नैव संसारैर्यथा धूमादिभिर्नभः।।२०.४३।।**

ज्ञानरूप, महाबुद्धीशाली असा शिवयोगी सर्व जगाचा आत्मा असतो. संसारातील कोणत्याही कर्माने तो लिप्त होत नाही. तो कसा लिप्त होत नाही हे स्पष्ट करण्यासाठी येथे एक उदाहरण दिले आहे. सामान्य माणसांच्या डोळ्यांत धूर गेला तर त्याच्या डोळ्यांची जळजळ होते, डोळ्यांत पाणी येते. अशा प्रकारे धुराचा लेप, धुराचा

परिणाम त्याच्या शरीरावर होतो. परंतु आकाशात कितीही धूर दाटला तरी धुराचा कुठलाही लेप आकाशाला लागत नाही. उंच पर्वतावर गेल्यावर मेघांचा स्पर्श जेव्हा आपल्या शरीराला होतो तेव्हा आपले अंग थंडगार होते. परंतु आकाशात नेहमी ढग राहतात तरी त्यांचा परिणाम आकाशावर होत नाही. आकाश असे निर्लेप असते. आकाश हे असे महाभूत आहे की ज्याच्यात सर्व व्यवहार होऊन देखील ते पूर्णतः अलिप्त राहते. म्हणून परब्रह्मला नेहमी आकाशाची उपमा दिली जाते. आकाशाप्रमाणेच शिवयोगी अलिप्त राहून प्रपंचात वावरत असतो.

**न विधिर्न निषेधश्च न विकल्पो न वासना।**
**केवलं चित्स्वरूपस्य गलितप्राकृतात्मनः।।२०.४४।।**

प्राकृतिक कर्माकडे ज्याची प्रवृत्ती नसते, जो केवळ चित्स्वरूप होऊन राहिलेला असतो अशा शिवयोग्याला विहितकर्म नसते, निषिद्ध कर्म नसते, संकल्प नसतो की विकल्प नसतो. त्याला वासनाही नसते. सामान्य माणसांसाठी शास्त्रविहित आणि शास्त्रनिषिद्ध अशी कर्मे असतात. नित्य नैमित्तिक कर्मे ही शास्त्रविहित असतात तर मांसभक्षण, हिंसा इत्यादी शास्त्रनिषिद्ध कर्मे असतात. विहितकर्मे करावीत आणि निषिद्ध कर्मे करू नयेत, असा शास्त्रांचा आदेश आहे. पण हा आदेश कोणासाठी आहे? तर ज्याला आत्मसाक्षात्कार झालेला नाही अशा सामान्य माणसांसाठी. परब्रह्मरूप झालेल्या शिवयोग्यावर शास्त्रादेश पाळण्याचे बंधन नाही आणि त्याला आदेश देण्याचा अधिकार देखील शास्त्राला नाही. जो मुळात अत्यंत परिशुद्ध असतो, सर्व प्राणिमात्रांना आत्मवत् पाहत असतो त्याच्याकडून जीवांना अहितकारक असे पापकर्म घडण्याची शक्यताच नसते. असे असले तरी त्याने हे कर्म करावे अथवा हे कर्म करू नये असे सांगण्याचा अधिकार शास्त्राला नाही. शिवयोग्याच्या मनात कोणताही विकल्प नसतो आणि वासना नसते. वासनेमुळेच तर जीव जन्मजन्मांतरात भटकत असतो. शिवयोग्याच्या ठिकाणी वासनेचा पूर्ण अभाव असून तो आपल्या चैतन्यरूपात निमग्न असतो.

**घटादिषु पृथग्भूतं यथाकाशं न भिद्यते।**
**तथोपाधिगतं ब्रह्म नानारूपं न भिद्यते।।२०.४५।।**

शिवयोगी सर्वसामान्य माणसांप्रमाणे देहधारी असतो, तो प्रपंचात राहत असतो. एका देहात राहणाऱ्या आत्म्याला परब्रह्म, परमात्मा, देश-काल अपरिच्छिन्न असे कसे काय म्हटले जाते? असा प्रश्न तुमच्या मनात स्वाभाविकपणे निर्माण होऊ शकतो. या प्रश्नाचे समाधान येथे केले आहे. हजारो घट निर्माण झाले तर प्रत्येक घटात एक एक आकाश उपस्थित असते. हजारो घरे निर्माण झाली तर प्रत्येक घरात एकेक गृहाकाश असते. मनुष्य घरात राहतो म्हणजे घरातल्या पोकळीत अर्थात आकाशात राहत असतो. तो भिंतीत किंवा छतात राहत नसतो. चार भिंती घालून वर छप्पर घातले की आपले घर तयार होते. आकाशाला अशा प्रकारे मर्यादित केले आहे असे आपल्याला वाटते. आपण घर बांधत असतो, आकाश निर्माण करीत नसतो. किंवा ते आपल्या घरात भरतही नसतो. अमर्याद, अफाट असे महाकाशच आपल्या घरात चार भिंतीच्या मध्ये छोटेसे होऊन राहते. प्रत्येक घरात ते वेगवेगळे भासते. परंतु खरोखर आकाशाचे तुकडे पडलेले असतात काय? तर तसे नसते. दोन घडे घेऊन ते एकावर एक आपटून फोडले तर त्यातील आकाश एक होते काय? हजारो घट निर्माण केले तरी त्या गावातील

आकाश कमी होत नाही, किंवा हजारो घट आणून एखाद्या गावात फोडले तर घटातील आकाश तेथील आकाशत मिसळून ते आकाश वृद्धिंगत होत नाही. आकाश घटात आणि मठात वेगवेगळे भासत असले तरी ते परिच्छिन्न होत नसते. त्याप्रमाणे सर्व जीवांत आत्म्याच्या रूपाने एकच परमात्मा विद्यमान असतो. महाकाशच प्रत्येक घटात घटाकाशाच्या रूपाने उपस्थित असते तसे प्रत्येक जीवांत आत्मरूपाने परशिव ब्रह्म अवस्थित असते. ते नाना रूपांत दिसत असले तरी परिच्छिन्न होत नसते. असे हे अभेदज्ञान वासनारहित शिवयोग्याचे स्वरूप असते.

**अनश्वरमनिर्देश्यं यथा व्योम प्रकाशते।**
**तथा ब्रह्मापि चैतन्यमत्र वैशेषिकी कला।।२०.४६।।**

आकाश कसे आहे? तर अनश्वर. अनश्वर म्हणजे नाश नसलेले. ज्या वस्तू नाश पावतात त्यांना नश्वर म्हणतात, ज्या नाश पावत नाहीत त्यांना अनश्वर म्हणतात. आकाश हे देखील एक भूत असल्यामुळे ते केव्हातरी नाश पावणारच असते. परंतु अन्य भूतांच्या तुलनेने ते अनश्वर असते एवढाच अर्थ येथे अभिप्रेत आहे. आकाशाचा नाश कसा होतो याचा अनुभव आपल्याला येत नाही. म्हणून ते अनश्वर आहे असे म्हटले जाते. आकाश कसे आहे हे सांगताना ते आकाशासारखेच आहे असे सांगावे लागते. त्याला दुसरी देण्यासारखी उपमा या जगात अस्तित्वात नाही. म्हणून ते अनिर्देश्य आहे. त्याप्रमाणे परमात्मा देखील अनश्वर आणि अनिर्देश्य आहे. तो कधी उत्पन्न झालेला नाही. म्हणून तो नश्वर नाही. तो स्थिर आहे. सतत फिरणाऱ्या चाकाला जसा एक स्थिर आधार लागतो त्याप्रमाणे तो नश्वर नाही. तो स्थिर आहे. सतत फिरणाऱ्या चाकाला जसा एक स्थिर आधार लागतो त्याप्रमाणे या परिवर्तनशील विश्वाला देखील एक स्थिर आधार लागतो. चाकाबरोबर जर आस फिरू लागला तर काय होईल याची कल्पना तुम्ही करू शकता. म्हणून उत्पत्ती, स्थिती, लय होणाऱ्या विश्वाला उत्पत्ति-स्थिति-लय नसलेल्या स्थिर आधाराची गरज असते. हा आधार म्हणजे परमात्मा होय. तो दिसत नसला तरी असतो, हे मात्र खरे. जमिनीवरचा विशाल वृक्ष आपल्याला दिसतो, परंतु त्याला आधार देणारी मुळे दिसत नाहीत. म्हणून ती नसतात असे थोडेच आहे? अविनाशी, उपमारहित अशा आकाशाप्रमाणेच परब्रह्मही अविनाशी आणि उपमातीत असते. त्यालाच महालिंग, चिदाकाश असेही म्हटले जाते.

आकाशाची उपमा देऊन परब्रह्माचे वर्णन येथे केले आहे. यावरून आकाशाप्रमाणेच परब्रह्म हे देखील एक भूत, एक तत्त्व आहे काय? असा प्रश्न उपस्थित होतो. भूताकाश आणि परमात्मा यांच्यात फरक आहे काय? तर सांगतात की, दोन्हीत फरक आहे. भूताकाश हे जड आहे तर परमात्मा हा चैतन्यरूप आहे. म्हणून त्याला 'चिदाकाश' असे म्हणतात. आकाश सर्वत्र व्याप्त असले तरी त्याला स्वतःच्या अस्तित्वाचा बोध नसतो. कारण ते जड आहे. परमात्म्याचे स्वरूप समजावून सांगण्यासाठी आकाशाची उपमा दिली जाते. परंतु आकाशाची उपमा ही नीतोपमा आहे, परमात्म्याच्या बरोबरीची नाही. समुद्राचे स्वरूप समजावून देताना तलावाचे उदाहरण दिले तर समुद्राची कल्पना येईल, परंतु तलाव ही समुद्राच्या बरोबरीची उपमा होणार नाही. तरी देखील समजावून देण्यासाठी उपमा द्यावी लागते इतकेच. त्याप्रमाणे नित्य अनुभवाला येणाऱ्या आकाशाची उपमा परमात्मरूप स्पष्ट करण्यासाठी दिली जाते. म्हणून आकाश आणि परमात्मा तुल्यबल आहेत, असा मात्र अर्थ घेता येत नाही. आकाश हे जडाकाश आहे तर परमात्मा हा चिदाकाश आहे. आकाशाला कोणताच लेप लागत नाही, ते निर्लेप

आहे. ते पाण्याने भिजत नाही, रंगाने रंगत नाही, अग्नीने जळत नाही. त्याप्रमाणे परब्रह्मरूप झालेला शिवयोगी देखील संसारातील कोणत्याही कर्माने लिप्त होत नाही. या अंगालेप स्थलाचा पुढील श्लोकात समारोप करतात:-

**न देवत्वं न मानुष्यं न तिर्यक्त्वं न चान्यथा।**
**सर्वाकारत्वमाख्यातं जीवन्मुक्तस्य योगिन:।।२०.४७।।**

आतापर्यंत ज्याचे खूप गुणवर्णन केले आहे असा शिवयोगी हा कोण आहे? तो देव आहे, मनुष्य आहे की आणखी कोणी? हे येथे स्पष्ट केले आहे. तो देव नसतो, मनुष्य नसतो आणि तिर्यक् देखील नसतो. ज्याचे पुण्य अधिक असते त्याला देवयोनी प्राप्त होते. ज्याचे पापपुण्य समप्रमाणात असते त्याला मनुष्ययोनी प्राप्त होते आणि ज्याचे पाप अधिक असते त्याला तिर्यकयोनी(पापयोनी) मिळते. शिवयोगी हा पापपुण्यापासून अलिप्त असल्यामुळे त्या तिन्ही योनीत त्याची गणना होत नाही. शिवज्ञानामुळे त्याची संचितकर्मे नष्ट झालेली असतात आणि त्याचे प्रारब्धकर्म भोगून नष्ट होत चाललेले असते. नवे कर्म तर त्याच्याकडून घडतच नसते. म्हणजे कर्म घडत असले तरी त्याचा लेप त्याला लागत नसतो. म्हणून तो देव नसतो, मनुष्य नसतो, तिर्यक् देखील नसतो. परंतु सर्वांचा अंतरात्मा मात्र असतो. या अर्थाने तो देव, मनुष्य, तिर्यक् या सर्वांच्या ठिकाणी आत्मरूपाने असतो. अशा निर्लेप स्थितीलाच अंगलेपस्थ असे नाव आहे. एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी
६ नोव्हेंबर १९९६

---

**आशीर्वचन सातवे**

## स्वपराज्ञस्थल, भावाभावलयस्थल

### स्वपराज्ञस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग-षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थलातील स्वपराज्ञस्थल या सातव्या उपस्थलाचा आज आपण विचार करणार आहोत. जगद्गुरू रेणुकाचार्य अगस्त्य महर्षींना निमित्त करून अत्यंत सूक्ष्म विषयाकडे आपल्याला घेऊन जात आहेत. स्वपराज्ञस्थल याचा सामान्य अर्थ काय आहे, हे येथे सांगत आहेत-

**'स्वपरज्ञानविरहात् स्वपराज्ञस्थलं विदु:'**

जगात आपण पाहतो की माणसे काही लोकांना आपले समजतात तर काही लोकांना परके समजतात. ज्यांना ते आपले समजतात त्यांच्याशी ते चांगले वागतात आणि ज्यांना परके समजतात त्यांच्याशी चांगले वागत नाहीत. राग-द्वेष यांना अनुसरून जीवात्मा कर्मे करतो आणि त्याचे फळ भोगण्यासाठी जन्मजन्मांतरात फिरत राहतो. स्व आणि पर, आपला आणि परका या भेदज्ञानावरच संसार चाललेला असतो. स्व आणि पर ही भेदवृत्ती जोपर्यंत समूळ नष्ट होत नाही तोपर्यंत जीवात्म्याला पुन्हा पुन्हा जन्म घ्यावा लागतो. स्व आणि पर ही भावना, म्हणजेच राग आणि द्वेष या वृत्तीच प्रपंचाची बीजे आहेत. शिवयोगी आपले राग-द्वेष नष्ट करून जी स्थिती प्राप्त

करून घेतो तिचे वर्णन या स्थलात केले आहे.

अंगालेपस्थलात पोहोचलेला शिवयोगी त्यापेक्षाही उच्चतर अशी अवस्था प्राप्त करून घेतो. 'मी आहे' अशी जाणीव त्याच्या मनात राहत नाही आणि 'तो आहे' ही जाणीव देखील राहत नाही. ज्याला स्वत:चे ज्ञान नाही आणि इतरांचेही ज्ञान नाही त्याला शास्त्रात 'जड' (उ अचेतन) मानले जाते. 'स्वपराज्ञशून्यत्वं जडत्वम्' असे जडाचे लक्षण शास्त्रात सांगितले आहे. दगड हा जड असतो. त्याला स्वत:चे आणि इतर वस्तूचे ज्ञान नसते. स्वपरज्ञान नसलेला शिवयोगी दगडाप्रमाणे जड झाला की काय? परंतु वस्तुस्थिती अशी नाही. शिवयोगी हा चिद्रूप असतो, परंतु बाह्यत: मात्र तो जडासारखा भासतो. 'जडवल्लोकमाचरेत्'. लौकिक दृष्टीला तो जडाप्रमाणे वर्तन करताना दिसतो. परंतु तो अंतर्यामी चिद्रूप असतो.

सुषुप्ति-अवस्थेतील म्हणजे गाढ झोपेतील मनुष्याला बाह्य जगाचे ज्ञान नसते, स्वत:चेही ज्ञान नसते. तो जिवंत असतो, कारण त्याचा श्वासोच्छवास चालू असतो. परंतु सद्रूप अशा परमात्म्याशी अर्थात् आपल्या आत्म्याशी तो इतका एकरूप झालेला असतो की त्याला स्व-पर यांची जाणीव राहिलेली नसते. त्याच्या जवळ कोणी मित्र गेला तर तो उठून त्याचे स्वागत करीत नाही किंवा त्याच्याजवळ शत्रू गेला तर तो त्याचा प्रतिकारही करत नाही. कोणतीही प्रतिक्रिया त्याच्याकडून घडत नाही. या अवस्थेचा सर्वांना अनुभव असतो, मग तो ज्ञानी असो अथवा अज्ञानी, पंडित असो किंवा निरक्षर. या अवस्थेचे कारण कोणते? तर त्याचे मन अमनस्क झालेले असते. मन आणि बुद्धी यांचा व्यवहार जोपर्यंत आत्म्याशी असतो तोपर्यंत मी आणि परका असा भेद राहतो. बुद्धी ही करण (इंद्रिय) आहे. ती अंत:करणाचा एक भाग असून आत्म्याच्या व्यवहारात सहाय्यभूत ठरते. मनुष्याची बहि:करणे जेव्हा बंद असतात तेव्हाही अंत:करणाचा व्यवहार मात्र चालू असतो. स्वप्नावस्था हे सत्य सूचित करते. झोपेत शरीर एकेठिकाणी पडलेले असले तरी अंत:करण कार्यरत राहून स्वप्नव्यवहार होत असतात. सुषुप्ति-अवस्थेत मात्र मनबुद्धी उपस्थित नसते. आत्मा आणि परमात्मा यांच्या समरसप्रसंगी एरव्ही कायम सोबत करणारे अंत:करण सोबत करीत नाही. मंत्री अथवा अधिकाऱ्याच्या सोबत सदैव असणारा अंगरक्षक मंत्री शयनकक्षात गेल्यावर त्याच्यासोबत राहत नाही त्याप्रमाणे. जीवात्मा जागृतावस्थेत बहि:करण आणि अंत:करण यांच्या मार्फत व्यवहार करतो, स्वप्नावस्थेत केवळ अंत:करणामार्फत त्याचे व्यवहार चालतात आणि सुषुप्ति-अवस्थेत मात्र बहि:करण आणि अंत:करण हे दोन्हीही त्याच्या सोबत नसतात. सुषुप्ति-अवस्था मनुष्याला क्वचितच भोगायला मिळते कारण ती अवस्था त्याच्या आधीन नसून कर्माधीन असते. सुख देणारे कर्म पक्व होऊन त्याचा भोग चालू असतो. तोपर्यंत मनुष्य गाढ निद्रा (सुषुप्ति-अवस्था) घेत असतो. त्या कर्माचा भोग संपला की कोणीतरी येऊन त्याला उठवतो आणि तो गाढ निद्रेचे सुख गमावतो. मनुष्याला कधीतरी हे सुख भोगायला मिळते. परंतु स्वपराज्ञस्थलातील शिवयोगी मात्र अष्टौप्रहर आत्मसुखात बुडालेला असतो. त्यामुळे त्याच्या मनातील स्व आणि पर हा भेद नष्ट होतो.

**अप्रमेये चिदाकारे ब्रह्मण्यद्वैतवैभवे।**
**विलीन: किं नु जानाति स्वात्मानं परमेव वा।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.४८)

परब्रह्म शिव अप्रमेय आहे. मेय म्हणजे ज्याचे मोजमाप करता येते असे आणि अप्रमेय म्हणजे ज्याला मोजता येत नाही असे. ज्याला लांबी, रुंदी, उंची असते त्या वस्तूला आपण मोजू शकतो, परंतु जी वस्तू निराकार असते

तिला कोणी मोजू शकत नाही. निराकाराला कसे मोजणार? परब्रह्माला आपण किलोग्रॅमध्ये कसे मोजू शकणार? पृथ्वीचे, जलाचे, वायूचे वजन करता येणे शक्य आहे, परंतु आकाशाचे मात्र वजन करता येत नाही. आकाशाचे मोजमाप करता येत नाही तर परब्रह्माचे कसे बरे करता येईल? मोजमाप करण्याची जेवढी परिमाणे आहेत त्यापैकी कुठलेही परिमाण परब्रह्माला लागू होत नाही. म्हणून ते अप्रमेय आहे. मग त्याला कोणताच आकार नाही काय? तर सांगतात की, आहे, ते चिदाकार आहे. चित्-रूप हाच त्याचा आकार आहे. शिवयोग्याची मनोवृत्ती ब्रह्माकार झाली असे म्हटले जाते. संपूर्ण विश्व हे चिद्रूप आहे. परमात्मरूप आहे असे जाणणे म्हणजे चिदाकार होणे होय.

परब्रह्माजवळ अद्वैताचे वैभव असते. आपल्याजवळ जे वैभव असते ते द्वैतवैभव असते. घर, जमीनजुमला इत्यादी. द्वैतवैभव हे अस्थिर, अशाश्वत आणि दुःखदायक असते. त्यामुळे सुख मिळते असे वाटते. परंतु सुखापेक्षा ते दुःखच अधिक देत असते. द्वैतवैभव मिळवण्यासाठी खूप कष्ट करावे लागतात, त्याचे रक्षण करण्यासाठी त्रास सहन करावा लागतो आणि जर ते आपल्या हातून गेले तर दुःखाशिवाय काय शिल्लक राहते? ते येते दुःख घेऊन आणि जाते दुःख घेऊन. 'आये दुःखं व्यये दुःखम्' असे त्याचे स्वरूप असते. खरे तर द्वैतवैभवाला वैभव संबोधणेच बरोबर नाही. खरे वैभव असते ते अद्वैतवैभव. ते ज्याला प्राप्त होते त्याच्या मनात ना राग असतो, ना द्वेष. हे वैभव कोणी चोरून नेऊ शकत नाही. हे मिळवण्यासाठी कोणावर आक्रमण करावे लागत नाही. सुषुप्ति-अवस्थेत या वैभवाचा मनुष्याला कधी कधी अनुभव येतो. 'तस्यैव आनंदस्य मात्रां उपजीवन्ति'. द्वैतवैभावात जे सुख प्रतीत होते ते अद्वैतवैभवातील सुखाचाच किंचित अंश असतो. बेसनाच्या लाडवातील गोडी ही त्याच्यात मिसळलेल्या साखरेची असते, इतर बेसन-तूप इत्यादी पदार्थांची नसते. त्याप्रमाणे प्रापंचिक वैभवात जे माधुर्य अनुभवाला येते ते परमात्म्याच्या माधुर्याचाच अंशमात्र असते.

**यद्भासा भासते विश्वं यत्सुखेनानुमोदते।**
**नमःस्तस्मै गुणातीतविभवाय परात्मने।।१.४।।**

'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या मंगलाचरणातील हा श्लोक आहे. परब्रह्माच्या तेजानेच विश्व प्रकाशित होते, त्याच्या सुखानेच ते आनंदित होते, असा या श्लोकाचा अर्थ आहे. प्रपंचात भासणारे सुख हे मुळात परमात्म्याचेच सुख असते. शिवयोगी अद्वैतवैभवात लीन झालेला असतो. त्याच्या बाहेर येण्याची त्याची किंचित देखील इच्छा नसते. एअरकंडिशण्डध्ये बसलेल्या माणसाची बाहेरच्या उन्हात जाण्याची इच्छा होत नाही. गारपणातले सुख सोडून तो धगधगत्या वातावरणात कशाला जाईल? त्याप्रमाणे अंतरंगात अद्वैतसुख अनुभवणारा शिवयोगी बाह्य प्रपंचातील द्वैतदुःखात कशाला जाईल? शिवयोगी स्व आणि पर या भेदज्ञानाच्या पलीकडे जाऊन स्व-स्वरूपात विलीन झालेला असतो. अशा स्थितीला स्वपर-अज्ञस्थल म्हणतात.

**यत्र नास्ति भिदायोगादहंत्वमिति विभ्रमः।**
**न संयोगो वियोगश्च न ज्ञेयज्ञातृकल्पना।।२०.४९।।**

शिवयोग्याच्या मनात मी वेगळा आणि परमात्मा वेगळा असा भेदभ्रम नसतो. म्हणून त्याचा कोणाशी संयोग होत नाही आणि वियोगही होत नाही. जेथे भेद असतो तेथे संयोग-वियोग होत असतो. दोन माणसे जेव्हा एकेकांना भेटतात किंवा एखादा पक्षी एखाद्या वृक्षावर जाऊन बसतो तेव्हा तेथे कर्मजन्य संयोग घडतो. जेथे संयोग असतो तेथे वियोग असतोच. तुम्ही येथे आशीर्वचन ऐकण्यासाठी येऊन बसला आहात, हा एक संयोगच आहे. आशीर्वचन संपल्यानंतर तुम्ही हे स्थळ सोडून आपापल्या घरी जाल, तर तो एक वियोगच असेल. व्यवहारात

अनुकूल व्यक्तीबरोबर संयोग झाला तर मनुष्याला सुखानुभव येतो, प्रतिकूल व्यक्तीबरोबर संयोग झाला तर दुःखानुभव येतो. याच्या उलट अनुकूल व्यक्तीचा वियोग दुःखदायक तर प्रतिकूल व्यक्तीचा वियोग सुखदायक ठरतो. अशा प्रकारे संयोग आणि वियोग हे दोन्हीही सुखदायक व दुःखदायक ठरत असतात. परंतु भेदभावशून्य अशा स्थितीत कोणाचा कोणाशी संयोग होत नाही की वियोग होत नाही. या अवस्थेत ज्ञेय आणि ज्ञाता असा भेद देखील उरत नाही. परमात्मा हे ज्ञेय आणि जीवात्मा हा ज्ञाता अशी भावनाच येथे शिल्लक राहत नाही.

**न बन्धो न च मुक्तिश्च न देवाद्यभिमानिता।**
**न सुखं नैव दुःखं च नाज्ञानं ज्ञानमेव वा।।२०.५०।।**

अद्वैतस्थिती प्राप्त झालेल्या शिवयोग्यासाठी बंध नसतो आणि मुक्ती देखील नसते. जो कधी बांधलेलाच नव्हता तो मुक्त तरी कसा होणार? याचा अर्थ असा की, त्याच्या मनात मी आधी बद्ध होतो, आता मुक्त झालो आहे, अशी भावना नसते. तुरुंगातला कैदी शिक्षा संपून मुक्त झाला तर त्याला सुटकेचा आनंद होतो. परंतु अशी मुक्तीची भावना शिवयोग्याच्या मनात नसते. ज्याच्या दृष्टीत सर्व प्रपंच शिवमय झालेला असतो त्याला कुठला आला आहे बंध आणि कुठली आली आहे मुक्ती? त्याच्या ठिकाणी सुखभावना नसते की दुःखभावना नसते. ज्ञान आणि अज्ञान हे दोन्हीही तेथे गळून पडतात.

**नोत्कृष्टत्वं हीनत्वं नोपरिष्टान्न चाप्यधः।**
**न पश्चान्नैव पुरतो न दूरे किंचिदन्तरे।।२०.५१।।**

हे श्रेष्ठ आणि हे कनिष्ठ अशी भावना त्याच्या मनात नसते. त्याला उच्चस्थान दिले तर 'मी उच्च आहे' अशी भावना त्याला स्पर्शत नाही आणि निम्नस्थान दिले तर 'मी कनिष्ठ आहे' असे त्याला वाटत नाही. सर्वात पुढे स्थान दिले तर 'मी सर्वांच्या पुढे आहे' असे त्याला वाटत नाही आणि सर्वांच्या मागे त्याला बसवले तर 'मी सर्वात मागे आहे' असे तो समजत नाही. सामान्य माणसाला मात्र अशी वागणूक दिली तर तो फुशारतो किंवा खिन्न होतो. तो कोणापेक्षा दूर नसतो की कोणाच्या जवळ नसतो. परमात्म्याचे स्वरूप सांगताना शास्त्र म्हणते की तो फार दूर आहे आणि अत्यंत जवळ देखील आहे. इतका जवळ की आपले शरीर देखील तेवढे आपल्या जवळ नसते. आपले अंत:करण देखील एवढे जवळ नसते. तो सर्वव्यापी असल्यामुळे जवळ दूर, वर खाली सर्वत्रच तो उपस्थित आहे. शिवयोगी परमात्मरूप झाल्यामुळे त्याच्या बाबतीत कोणताही भेदव्यवहार संभवत नाही.

**सर्वाकारे चिदानन्दे सत्यरूपिणि शाश्वते।**
**पराकाशमये तस्मिन् परे ब्रह्मणि निर्मले।।२०.५२।।**

आकाशाला कोणताच आकार नसतो. जसे भांडे असेल तसा ते आकार धारण करते. घटात घटाच्या आकाराचे, मठात मठाच्या आकाराचे, घरात घराच्या आकाराचे असे ते वेगवेगळे आकार धारण करते. याचे कारण मुळात ते निराकार असते. परब्रह्म शिव देखील असाच असतो. आरसा जसा समोरच्या वस्तूचा आकार धारण करतो, त्याचे प्रतिबिंबरूप होतो त्याप्रमाणे परब्रह्म सर्वाकार असते. ते सद्रूप आहे, चिद्रूप आहे आणि आनंदरूप आहे. तो शाश्वत आहे, त्याचा कधीही अभाव होत नाही. ते पराकाश असून निर्मल आहे.

**एकीभावमुपेतानां योगिनां परमात्मनाम्।**

**परापरपरिज्ञानपरिहासकथा कुतः॥२०.५३॥**

अपरिच्छिन्न व्यापक अशा परमात्म्याशी एकरूप झालेल्या परब्रह्मरूप शिवयोग्याची स्थिती एकभाव असते. आप-परभाव संकुचित मनाच्या माणसामध्ये असतो. हे माझे आहे, ते दुसऱ्याचे आहे, असा व्यवहार अल्पबुद्धी माणसाकडून होतो. महान अशा शिवयोग्याच्या ठिकाणी मात्र असा संकुचित भाव नसतो. तो प्रत्येक वस्तूमध्ये आत्मरूप पाहत असतो, अनुभवत असतो. स्व आणि पर या व्यवहार-कथेला त्याच्या जीवनात स्थान नसते. तो या दोन्ही जाणिवांच्या पलीकडे पोहोचलेला असतो.

**देशकालानवच्छिन्नतेजोरूपसमाश्रयात्।**

**स्वपरज्ञानविरहात् स्वपराज्ञस्थलं विदुः॥२०.५४॥**

देश, काल, वस्तू या परिच्छेदांविरहित म्हणजे सर्व देशांत, सर्व कालांत व सर्व वस्तूंत राहणाऱ्या आणि चिद्रूपाने सर्वत्र विराजमान असलेल्या परमात्म्याशी समरस झालेल्या शिवयोग्याला स्व आणि पर हे भेदज्ञान नसते. म्हणून त्याला स्वपराज्ञस्थली असे म्हटले जाते. स्व आणि पर ही भावना म्हणजेच संसार. मनातून ही भावना नष्ट झाली की त्याच्यापुरता संसार संपतो. या ठिकाणी स्वपराज्ञस्थल पूर्ण झाले. यानंतर भावाभावलयस्थल या उपस्थलाचा आपण विचार करणार आहोत.

### भावाभावलयस्थल

या स्थलाविषयी जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणतात-

**त्वन्ताहन्ताविनिर्मुक्ते शून्यकल्पे चिदम्बरे।**

**एकीभूतस्य सिद्धस्य भावाभावकथा कुतः॥२०.५५॥**

भाव आणि अभाव कशाला म्हणतात हे प्रथम समजून घेतले पाहिजे. याआधी स्व आणि पर या शब्दांचा प्रयोग केलेला आपण पाहिला. स्वभाव आणि परभाव शिवयोग्याच्या ठिकाणी नसतात. देह म्हणजे मीच आहे अशी दृढ भावना म्हणजे 'अहंभाव' आणि शरीराच्या शिवाय आत्म्याला अस्तित्व नाही असे मानणे म्हणजे 'अभाव'. अशा प्रकारचा अहंभाव आणि अभाव यापासून शिवयोगी मुक्त असतो. अहं आणि त्वम् या दोन्ही भावना मनात नसतील तर काय शिल्लक राहील? शिल्लक राहते फक्त शून्य. या शून्याचेच संपादन करावे असे 'शून्यसंपादने' या कन्नड ग्रंथाचा आशय होय. 'शून्य' याचा अर्थ- 'काहीही नाही, पूर्ण अभाव' असा होत नाही. शून्य म्हणजे परिपूर्ण. सामान्य मनुष्याच्या मनात जसा अहंभाव आणि परभाव असतो तसा शिवयोग्याच्या मनात नसतो, असा या ठिकाणचा अभिप्राय आहे.

**अहंभावस्य शून्यत्वादभावस्य तथात्मनः।**

**भावाभावविनिर्मुक्तो जीवन्मुक्तः प्रकाशते॥२०.५६॥**

शरीर हाच आत्मा आहे असा अहंभाव सामान्य मनुष्याच्या मनात असतो. त्याबरोबरच आत्म्याला अस्तित्व नाही अशी भावना ही त्याच्या मनात वसत असते. याप्रकारचा भाव आणि अभाव शिवयोग्याच्या मनात नसतो. त्यामुळे तो जीवन्मुक्त असतो.

**सुखदुःखादिभावेषु नाभावो भाव एव वा।**

**विद्यते चित्स्वरूपस्य निर्लेपस्य महात्मनः।।२०.५७।।**

सुखदुःखाच्या बाबतीत भाव अथवा अभाव शिवयोग्याच्या मनात नसतो. म्हणजे– मी सुखी आहे अथवा मी दुःखी आहे अशी भावना त्याच्या मनात नसते. त्याप्रमाणेच मी सुखी नाही अथवा मी दुःखी नाही अशी भावनाही त्याच्या मनात नसते. तो चित्स्वरूप असून निर्लेप असतो. भावाभाव स्थितीच्या पलीकडे तो गेलेला असतो.

**यस्मिन् ज्योतिषि चिद्रूपे दृश्यते नैव किंचन।**

**सद्रूपं वाप्यसद्रूपं भावाभावं विमुंचतः।।२०.५८।।**

त्याच्या मनात चिद्रूप अशी ज्योती प्रकट झालेली असते. त्यामुळे त्याला दुसरे काहीही दिसत नाही. त्याला सद्रूप दिसत नाही की असद्रूप दिसत नाही. भाव–अभाव अशी कोणतीही वृत्ती त्याच्या मनात निर्माण होत नाही. शिवयोग्याची ही स्थिती म्हणजे निर्विकल्प समाधीच असते. मनुष्याची मनोवृत्ती समोरच्या वस्तूकडे पाहताना तदाकार होते. म्हणजे त्या वस्तूच्या आकाराची होते. समजा, एखाद्या मनुष्याला त्याच्या लहानपणापासून ते प्रौढपणापर्यंत तुम्ही पाहत आहात. तुम्हाला वाटते की आपण एकाच व्यक्तीकडे पाहत आहोत. परंतु त्या व्यक्तीत झालेला बदल तुमच्या नजरेत भरत नाही. कारण त्या व्यक्तीचे रूप जसजसे बदलत जाते तसतशी त्याच्याशी तदाकार होणारी तुमची मनोवृत्तीही बदलत जाते. एकाच मनोवृत्तीने एकाच व्यक्तीकडे आपण फार काळ पाहू शकत नाही. नदीचा प्रवाह सारखा बदलत असला तरी तो जसा एकच आहे असे आपल्याला वाटते. त्याप्रमाणे मनोवृत्तीत सतत बदल घडत असला तरी प्रवाहित्वामुळे ती एकच आहे असे आपल्याला वाटते. वृत्ती भावरूप असते किंवा अभावरूप असते, सुखरूप असते किंवा दुःखरूप असते, सद्रूप असते किंवा असद्रूप असते. शिवयोगी वृत्तिशून्य असतो. परब्रह्माच्या प्राप्तीची वृत्ती त्याच्या मनात प्रथम उठते. परमात्मप्राप्ती झाल्यावर लय पावते. त्यानंतर त्याच्या मनात कोणतीही वृत्ती उठत नाही. या वृत्तिविरहित स्थितीलाच 'भावाभावलयस्थल' असे म्हटले जाते.

**प्रतीयमानौ विद्येते भावाभावौ न कुत्रचित्।**

**लिंगैक्ये सति यत्तस्माद् भावाभावलयस्थलम्।।२०.५९।।**

परशिवब्रह्माशी समरस झालेल्या शिवयोग्याला बाह्य प्रपंचात कोठेही भावाभाव दिसत नाही. अशा अवस्थेला भावाभावलयस्थल असे म्हणतात. शिवयोग्याची वृत्ती आधीच्या सर्व वृत्तींचा लय करून परब्रह्मरूप झालेली असते. गढूळ पाण्यात तुरटीचा खडा फिरवला तर तो पाण्यातील मातीच्या कणांना घेऊन तळाशी जाऊन बसतो. त्याप्रमाणे शिवयोग्याची अंतिम वृत्ती आधीच्या सर्व वृत्तींचा लय करून ब्रह्ममय होते. हेच भावाभावलयस्थल होय. उद्या ऐक्यस्थलातील ज्ञानशून्यस्थल या अंतिम स्थलाचा विचार करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

७ नोव्हेंबर १९९६

## ज्ञानशून्यस्थल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

लिंग-षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थलातील उपस्थलांचा विचार करीत आपण शेवटच्या ज्ञानशून्यस्थलापर्यंत येऊन पोहोचलो आहोत. जगद्गुरू रेणुकाचार्य सांगतात-

**परापरसमापेक्षभावाभावविवेचनम्।**
**ज्ञानं ब्रह्मणि तन्नास्ति ज्ञानशून्यस्थलं विदुः।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २०.६०)

प्रपंचव्यवहार द्वैतामुळेच होत असतो. द्वैताशिवाय व्यवहार संभवत नाही. ज्ञानाचा व्यवहार देखील दोन प्रकारे होतो. 'स्व'चे ज्ञान किंवा 'पर'चे ज्ञान. भावाचे ज्ञान किंवा अभावाचे ज्ञान. आपले ज्ञान हे सापेक्ष असते. जेव्हा कोणी 'मला माझ्या स्वरूपाचे ज्ञान आहे' असे म्हणतो तेव्हा त्याचे ज्ञान सापेक्ष असते. तो इतरांना स्वतःपासून भिन्न मानत असतो. जेव्हा कोणी 'मला सर्वांचे ज्ञान आहे' असे म्हणतो तेव्हाही तो स्वतःला इतरांपासून भिन्न मानत असतो. स्व म्हटला की पर आला. स्व आणि पर परस्परसापेक्ष आहेत. 'स्व' नसेल तर 'पर' असणार नाही. 'पर' नसेल तर 'स्व' असणार नाही. १ हा आकडा उच्चारला की २ हा आकडा तेथे उपस्थित असतोच. जेव्हा १ चा उच्चार होणार नाही तेव्हा तेथे २ ही असणार नाही. प्रपंचातील प्रत्येक वस्तू, प्रत्येक गोष्ट सापेक्ष असते. भाव हा अभावावर आधारलेला असतो तर अभाव हा भावावर आधारलेला असतो. जेथे द्वैत असते तेथे स्व-पर, भाव-अभाव असतो. जेथे अद्वैत असते तेथे स्व-परसापेक्ष भावाभाव व्यवहार होत नसतो. परब्रह्मरूप झालेल्या शिवयोग्याला या सापेक्ष व्यवहाराचे ज्ञान होत नसते. जो लिंगाशी समरस झाला त्याच्या ठिकाणी स्व-पर, भाव-अभाव यांचे किंचित देखील ज्ञान नसते. म्हणून या स्थलाला 'ज्ञानशून्यस्थल' असे म्हटले जाते. आत्मज्ञानसंपन्न शिवयोगी स्व-रूपात स्थिर असतो. त्याला हा मी- तो दुसरा, हा आपला- तो परका अशा भेदांची जाणीव नसते. कारण त्याच्या दृष्टीत दुसरी वस्तूच अस्तित्वात नसते. तो स्वतःच विश्वरूप झालेला असतो. तो स्वतः ज्ञानरूप असला तरी त्याच्याकडून ज्ञानव्यवहार घडत नाही. अशा शिवयोग्याची अवस्था कशी असते? तो कसा राहतो? हे पुढील श्लोकात सांगितले आहे:-

**जले जलमिव न्यस्तं वह्नौ वह्निरिवार्पितम्।**
**परे ब्रह्मणि लीनात्मा विभागेन न दृश्यते।।२०.६१।।**

पाण्यामध्ये पाणी मिसळावे, अग्नीमध्ये अग्नी एकरूप व्हावा त्याप्रमाणे भावाभावरहित शिवयोगी परब्रह्माशी एकरूप होतो, त्याचे निराळे अस्तित्व राहत नाही. पाण्यात पाणी मिसळले तर ते वेगळे करता येत नाही, परंतु पाण्यात दूध मिसळले तर मात्र ते वेगळे करता येते. हंस आपल्या चोचीने पाण्यातील दूध वेगळे करतो अशी समजूत आहे. आपण हंस नसलो तरी दुधात मिठाचा खडा टाकला की त्यातील पाणी आणि दूध वेगळे दिसू लागते. पाण्यात पाणी मिसळले तर मात्र असे करता येत नाही. कारण पाण्याचा स्वभाव आणि स्वरूप एक असते. दूध आणि पाणी एकत्र मिसळतात, परंतु ते एकरूप मात्र होत नाहीत. पाण्यात पाणी मिसळते त्याप्रमाणे शिवयोगी

परब्रह्माशी एकरूप होतो. अखंड समरस स्थितीत असल्यामुळे त्याच्या ठिकाणी भेदज्ञान राहत नाही. म्हणून या स्थितीला ज्ञानशून्यस्थल असे म्हणतात.

परशिवब्रह्म आणि शिवयोगी यांची समरसता ही हानी किंवा वृद्धी होणारी समरसता नाही. एका भांड्यातले पाणी दुसऱ्या भांड्यात टाकल्यावर पहिल्या भांड्यातले पाणी कमी होते आणि दुसऱ्या भांड्यातले पाणी वाढते. जीव–शिवाच्या समरसतेत अशी हानी–वृद्धी नसते. जीवात्मा परमात्म्याशी कसा एकरूप होतो हे सांगताना समुद्रात विलीन होणाऱ्या नदीचे उदाहरण दिले जाते. नदीतील पाणी समुद्रात जाऊन नदीत हानी आणि समुद्रात वृद्धी होत असते. स्पष्ट करण्यासाठी उदाहरण द्यावे लागते हे खरे, परंतु तुल्यबल नसते, हेही लक्षात घेतले पाहिजे. जीव–शिवाशी एकरूपता समान समरसभावाने होते.

**सर्वात्मनि परे तत्त्वे भेदशंकाविवर्जिते।**
**ज्ञात्रादिव्यवहारोत्थं कुतो ज्ञानं विभाव्यते।।२०.६२।।**

सर्वांच्या अंतर्यामी आत्मरूपाने परब्रह्म उपस्थित असते. सर्वांचा आत्मा हा परमात्माच आहे. महाकाशापेक्षा घटाकाश आणि मठाकाश भिन्न नसते. त्याप्रमाणे आत्मा परमात्म्यापासून भिन्न नसतो. अशा परमात्मतत्त्वात भेदशंका नसते. मग ज्ञेय, ज्ञाता आणि ज्ञान अशा त्रिपुटीने उत्पन्न होणारे भेदज्ञान कसे असेल? व्यवहारासाठी त्रिपुटीची गरज असते. विषय, विषय ग्रहण करणारी इंद्रिये आणि विषयभोग घेणारा जीवात्मा अशा तीन गोष्टी जेव्हा असतात तेव्हा व्यवहार घडतो. या तिन्हीपैकी एक जरी अनुपस्थित असेल तर व्यवहार घडणार नाही. दृश्य नसेल तर डोळ्यांच्या माध्यमाने जीवात्मा काय पाहील? डोळे नसतील तर जीवात्मा दृश्य कसे पाहील? आणि दृश्य व डोळे असतील, परंतु जीवात्मा जागृत नसेल तर दृश्य कोण पाहील? म्हणून व्यवहारासाठी त्रिपुटीची आवश्यकता असते. शिवयोगी परशिवब्रह्माशी समरस झाल्यामुळे तो ज्ञाता नसतो, तो ज्ञाता नसतो म्हणून त्याची इंद्रिये विषय ग्रहण करीत नाहीत. त्रिपुटीजन्य ज्ञान नसल्यामुळे या स्थलाला ज्ञानशून्यस्थल म्हणतात.

**निर्विकारं निराकारं नित्यं सीमाविवर्जितम्।**
**व्योमवत् परमं ब्रह्म निर्विकल्पतया स्थितम्।।२०.६३।।**

त्रिपुटीजन्य ज्ञान नसलेला शिवयोगी कसा असतो, हे या ठिकाणी स्पष्ट केले आहे. तो निर्विकार असतो. कामक्रोधादी विकार त्याच्या मनाला स्पर्शत नाहीत. तो निराकार असतो, तो नित्य असतो. शिवयोग्याच्या शरीराची ही लक्षणे नसून त्याच्या आत्मस्वरूपाची आहेत. शिवयोगी असीम असतो. परमात्म्याला कोणतीही सीमा नाही. परमात्मरूपाशी समरस होणाऱ्या शिवयोग्यालाही कोणती सीमा नसते. विकाररहित, आकाररहित, नित्य, सीमातीत असे परब्रह्म आकाशाप्रमाणे निर्विकल्प असते. त्या परब्रह्माशी समरस झालेला शिवयोगीही तसाच निर्विकल्प असतो.

**न पृथ्व्यादीनि भूतानि न ग्रहा नैव तारकाः।**
**न देवा न मनुष्याश्च न तिर्यंचो न चापरे।।२०.६४।।**

शिवयोग्याची दृष्टी शिवमय झालेली असते. म्हणून त्याच्या दृष्टीत पृथ्वी, सूर्य, नक्षत्रे, देव, मनुष्य आणि पशुपक्षी असे भेद उरलेले नसतात. 'सर्वं खलु इदं ब्रह्म'– सर्व ब्रह्ममय आहे, 'लिंगमध्ये जगत्सर्वम्'– लिंगात संपूर्ण विश्व अवस्थित आहे, याचा त्याला अनुभव आलेला असतो. तो सर्व विश्वाकडे परमात्मा म्हणूनच पाहत असतो. लौकिक व्यवहारात ग्रह, ग्रहपीडा, ग्रहस्थिती, शुभनक्षत्र इत्यादींना स्थान असते. सामान्य माणसे

ग्रहशांती देखील करतात. ज्याच्यापासून ग्रह उत्पन्न झाले अशा परब्रह्माशी समरस झालेल्या शिवयोग्याला ग्रहांचे महत्त्व तरी काय? तो त्यांच्याकडे ग्रह म्हणून पाहत नसतो. त्याच्या दृष्टीत कोणी देव नसतो की देवता. त्याला मनुष्य दिसत नाही की जीवजंतू. तो सर्वांकडे परमात्मदृष्टीने पाहत असतो.

**तस्मिन् केवलचिन्मात्रसत्तानन्दैकलक्षणे।**
**त्वन्ताहन्तादिसंरूढं विज्ञानं केन भाव्यते।।२०.६५।।**

केवळ सच्चिदानंद स्वरूप परब्रह्मात मी-तू असे भेदज्ञान कोणापासून होईल? आणि ते कोण अनुभवील? कारण त्या ठिकाणी द्वैत नसते. त्यामुळे कोणते ज्ञेय नसते, कोणी ज्ञाता नसतो आणि कसले ज्ञानही नसते. म्हणून या स्थलातील शिवयोग्याला ज्ञानशून्यस्थली असे नाव आहे.

**ज्ञेयाभावाद्विशेषेण शून्यकल्पं विभाव्यते।**
**ज्ञातृज्ञेयादिभिः शून्यं शून्यं ज्ञानादिभिर्गुणैः।।**
**आदावन्ते च मध्ये च शून्यं सर्वत्र सर्वदा।**
**द्वितीयेन पदार्थेन शून्यं शून्यं विभाव्यते।।२०.६६-६७।।**

ज्ञेयच नसेल तर ज्ञान कोणाचे होणार? ज्ञाताच नसेल तर ज्ञान कोण घेणार? अशी या ठिकाणची स्थिती आहे. शिवयोग्याचे संपूर्ण ज्ञेय परशिवब्रह्म असते. परंतु अहम्-त्वम् अशा भेदज्ञानाचा अभाव असल्याने त्याची अवस्था ज्ञानशून्य अशीच असते. ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान असा त्रिपुटीचा व्यवहार तेथे नसतो. विश्वनिर्मिती होण्याआधी द्वैत नव्हते. त्यावेळी एकच परब्रह्म अस्तित्वात होते. त्या एक तत्त्वाला जाणल्यामुळे शिवयोग्याच्या अंतिम स्थितीत द्वैत शिल्लक राहत नाही. त्याच्या दृष्टीत स्वतःशिवाय दुसरा पदार्थच अस्तित्वात नसतो. हीच ज्ञानशून्यस्थिती होय. माझ्याशिवाय दुसरे काही अस्तित्वात नाही, या विचारात देखील द्वैत आहे. शिवयोग्याच्या ठिकाणी हा विचार देखील नसतो. ज्ञानाची जाणीव नसल्यामुळे त्याची स्थिती ज्ञानशून्य असते.

**केवलं सच्चिदानंदप्रकाशाद्वयलक्षणम्।**
**शून्यकल्पं पराकाशं परब्रह्म प्रकाशते।।२०.६८।।**

शून्यस्थिती म्हणजे काहीच नाही असे आहे काय? बौद्धांचा शून्यवाद आणि ही ज्ञानशून्य स्थिती एकत्र आहे काय? असा प्रश्न तुमच्या मनात निर्माण होऊ शकेल. बौद्धांचा शून्यवाद परमात्म्याचे अस्तित्व नाकारतो. परंतु ज्ञानशून्य स्थिती अशी नसते. सच्चिदानंदरूप, अद्वय असे परब्रह्म शून्यसदृश्य होऊन तेथे प्रकाशमान झालेले असते.

**शून्यज्ञानादिसंकल्पे शून्यसर्वार्थसाधने।**
**ज्योतिर्लिंगे चिदाकारे स्वप्रकाशे निरुत्तरे।**
**एकीभावमुपेतस्य कथं ज्ञानस्य संभवः।।२०.६९।।**

शिवयोग्याच्या मनात ज्ञानाचा संकल्प नसतो. तो धर्म, अर्थ, काम, मोक्ष या पुरुषार्थसाधनेपासून मुक्त असतो. स्वयंप्रकाश अशा ज्योतिर्लिंगात ऐक्य पावलेल्या शिवयोग्याला अन्य वस्तूंचे ज्ञान कसे होऊ शकेल? स्व-स्वरूपाच्या ज्ञानाशिवाय अन्य कोणत्याही ज्ञानाला तेथे अवकाश नसतो. शिवयोगी निरुत्तर असतो. पूर्व-उत्तर या दिशा असतात. तत्त्वज्ञानात पूर्व व उत्तर हे दोन पक्ष (बाजू) असतात. पूर्व म्हणजे आधी आणि उत्तर म्हणजे नंतर.

प्रश्न विचारल्यानंतर शेवटी उत्तर दिले जाते. उत्तर म्हणजे अंतिम, शेवट. उत्तरक्रिया हा शब्द याच अर्थाचा आहे. या ठिकाणी प्रपंच हा पूर्व आहे आणि परमात्मा हा उत्तर आहे. याचा अर्थ असा की, परमात्मा हे अंतिम तत्त्व आहे. त्याच्या पलीकडे दुसरे तत्त्व नाही, म्हणून तो 'निरुत्तर' (निःउत्तर) आहे. अशा चित्स्वरूप, ज्ञानसंकल्परहित, सर्वपुरुषार्थरहित, स्वयंप्रकाश, निरुत्तर अशा परब्रह्माशी समरस झालेल्या शिवयोग्याच्या ठिकाणी ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान असा व्यवहार कसा राहील? त्या स्थितीत पोहोचल्यावर ऋषिमुनी मौन होतात. या ज्ञानशून्यस्थलाचा शेवटी समारोप करतातः-

**यस्य कार्यदशा नास्ति कारणत्वमथापि वा।**
**शेषत्वं नैव शेषित्वं स मुक्तः पर उच्यते।।२०.७०।।**

ज्ञानशून्यस्थलात पोहोचल्यावर शिवयोग्याची स्थिती कशी असते? तर त्याचे काही कार्य नसते, कोणते कारण नसते, काही शेष नसते आणि शेषिभाव नसतो. तो कृतकृत्य झालेला असतो. करण्याजोगे जे असते ते त्याने केलेले असते. आता त्याच्यासाठी करण्याजोगे असे काही शिल्लक नसते. संसार मात्र असा आहे की संपता संपत नाही. मृत्युशय्येवर पडलेला मनुष्य आपल्या मुलाला किंवा शिष्याला सांगतो, 'माझे अपुरे राहिलेले काम तू पूर्ण कर.' कितीही जन्म घेतले तरी सांसारिक कार्य पूर्ण होत नाही. काहीना काही शिल्लक राहतेच. संपूर्ण प्रपंच एका व्यक्तीच्या मालकीचा कधी होत नाही. याचा अर्थ असा की, प्रपंच संपूर्णतः एका व्यक्तीला मिळत नाही. परमात्मा मात्र असा आहे की तो पूर्णपणे शिवयोग्याला प्राप्त होतो. तो प्राप्त झाल्यावर मिळवावे असे काही राहत नाही. या स्थितीलाच मुक्ती, मोक्ष असे संबोधिले जाते. या स्थितीत कोणताही ज्ञानव्यवहार घडत नसल्यामुळे या स्थितीला ज्ञानशून्यस्थल असे म्हटले आहे.

अशा प्रकारे 'श्रीसिद्धान्तशिखामणि'मध्ये पिंडस्थलापासून ज्ञानशून्यस्थलापर्यंत १०१ उपस्थलांचे विवेचन केलेले आहे. एक सामान्य मनुष्य पिंडस्थली होऊन साधना करीत करीत ज्ञानशून्यस्थली होतो. हा त्याचा आध्यात्मिक विकासच होय. १०१ उपस्थले म्हणजे जणू परमात्म्यापर्यंत पोहोचण्याच्या पायऱ्याच होत. असा षट्स्थल सिद्धान्त जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्त्य महर्षींना विवरून सांगितला. त्यानंतर अगस्त्य कृतकृत्य झाले. षट्स्थलाचे हे ज्ञान कोणी कोणाला सांगितले हे पुढील श्लोकात स्पष्ट केले आहे.

**एतावदुक्त्वा परमप्रबोधमद्वैतमानन्दशिवप्रकाशम्।**
**देव्यै पुरा भाषितमीश्वरेण तूष्णीमभूद् ध्यानपरो गणेंद्रः।।२०.७१।।**

पूर्वी भगवान शंकरांनी पार्वतीला गुप्तपणे उपदेशिलेले हे वीरशैव शास्त्र रेणुक गणेश्वराला प्राप्त झाले. ज्ञानोपदेश करताना एका निष्ठावंत श्रोत्याची आवश्यकता असते. भगवान शंकरांनी आपल्या शक्तीला म्हणजे पार्वतीला समोर बसवून हे गुह्यशास्त्र सांगितले. त्यावेळी रेणुक गणाने त्याचे श्रवण केले. रेणुक गणानेच पुढे रेणुकाचार्य नावाने पृथ्वीवर अवतार घेतला आणि अगस्त्य महर्षींना ते ज्ञान उपदेशिले. उपदेश केल्यानंतर रेणुकाचार्य मौन धारण करून ध्यानमग्न झाले.

**एवमुक्त्वा समासीनं शिवयोगपरायणम्।**
**रेणुकं तं समालोक्य बभाषे प्रांजलिर्मुनिः।।२०.७२।।**

ज. रेणुकाचार्य ध्यानमग्न झालेले पाहून अगस्त्य महर्षींनी हात जोडून त्यांना विनंती केली.

**शिवयोगविशेषज्ञ शिवज्ञानमहोदधे।**

**समस्तवेदशास्त्रादिव्यवहारधुरंधर।।**

**आलोकमात्रनिर्धूतसर्वसंसारबंधन।**

**स्वच्छंदचरितोल्लास स्वप्रकाशात्मवच्छिव।।**

**अवतीर्णमिदं शास्त्रमनवद्यं त्वदाननात्।**

**श्रुत्वा मे मोदते चित्तं ज्योति: पश्ये शिवाभिधम्।।२०.७३-७४-७५।।**

हे गणश्रेष्ठा, आपण शिवयोग्याचे रहस्य विशेषत्वाने जाणलेले आहे, आपण शिवज्ञानाचा सागर आहात, सर्व वेद, आगम, पुराणे, शास्त्र यांमध्ये प्रवीण आहात. आपल्या केवळ दृष्टिक्षेपाने संसारबंधन गळून पडते. अशी आपली दृष्टी कृपामयी आणि सामर्थ्यशाली आहे. आपण स्वच्छंद आहात. स्वयंप्रकाश आणि शिवरूप आहात. आपल्या मुखातून हे षट्स्थल शास्त्र भूलोकावर प्रथमच अवतीर्ण झाले आहे. त्याचे श्रवण करून माझे मन अत्यंत आनंदित झाले आहे. आपला उपदेश ऐकून ज्योतिस्वरूप शिवाचे दर्शन मला झाले आहे.

**अद्य मे सफलं जन्म गतो मे चित्तविभ्रम:।**

**संजाता पाशविच्छित्तिस्तपांसि फलितानि मे।।२०.७६।।**

आज माझा जन्म सफल झाला. मानवजन्मात जे प्राप्त करायचे असते ते मला आज प्राप्त झाले. त्यामुळे माझा जन्म 'जन्म हा अखेरचा' ठरणार आहे. माझ्या मनातील सर्व भ्रम निवृत्त झाले आहेत. प्रारंभी द्वैतप्रतिपादक श्रुती आणि अद्वैतप्रतिपादक श्रुती यांच्या पैकी सत्य कोणत्या, असा भ्रम माझ्या मनात होता. परंतु आज माझ्या मनाची भ्रांती फिटली आहे. माझे सर्व पाश तुटून गेले आणि मी आतापर्यंत केलेली तपस्या सफल झाली आहे.

**इदानीमेव मे जातं मुनिराजोत्तमोत्तमम्।**

**इत: परं मया नास्ति सदृशो भुवनत्रये।।२०.७७।।**

मला ऋषिश्रेष्ठ असे संबोधिले जात होते. परंतु मी आज खरोखर सर्व ऋषीत श्रेष्ठ ठरलो आहे. आता तिन्ही लोकांत माझी बरोबरी करणारा कोणी नाही. आत्मरूपाने मीच सर्वत्र भरून राहिलो आहे, असा अनुभव मी घेत आहे.

**शास्त्रं तव मुखोग्दीर्णं शिवाद्वैतपरंपरम्।**

**मां विना कस्य लोकेषु श्रोतुमस्ति तप: शुभम्।।**

**तपसां परिपाकेन शंकरस्य प्रसादत:।**

**आगतस्त्वं महाभाग मां कृतार्थयितुं गिरा।।२०.७८-७९।।**

माझ्याएवढा भाग्यवान असा कोणता दुसरा तपस्वी आहे की ज्याला हे शास्त्र श्रवण करण्यास मिळाले? वीरशैव शास्त्राचा सर्वप्रथम उपदेश आपण मलाच केला आहे. माझी तपश्चर्या परिपक्व झाल्यामुळे आणि भगवान शिवाच्या अनुग्रहामुळे आपण मला उपदेश करून कृतार्थ करण्यासाठी अवतार घेऊन आला आहात.

**इति स्तुवन्तं विनयादगस्त्यं मुनिपुंगवम्।**

**आलोक्य करुणादृष्ट्या बभाषे स गणेश्वर:।।२०.८०।।**

आपली स्तुती करणाऱ्या अगस्त्य मुनीकडे अत्यंत करुणामय दृष्टीने पाहून जगद्गुरू रेणुकाचार्य म्हणाले,

अगस्त्य मुनिशार्दूल तपःसिद्धमनोरथ।
त्वां विना शिवशास्त्रस्य कः श्रोतुमधिकारवान्॥२०.८१॥

हे अगस्त्य, तू सर्व मुनींमध्ये श्रेष्ठ आहेस. तुझ्या तपःसामर्थ्यामुळे तुझे मनोरथ सिद्ध झाले आहेत. मी अवतार धारण केल्यानंतर माझा उपदेश श्रवण करण्यासाठी तुझ्याशिवाय दुसरा अधिकारी श्रोता मला सापडला नाही. म्हणून हे शिवशास्त्र ऐकण्यासाठी तूच एकमेव अधिकारी आहेस.

पात्रं शिवप्रसादस्य भवानेको न चापरः।
इति निश्चित्य कथितं मया ते तंत्रमीदृश्यम्॥२०.८२॥

हे शिवशास्त्र म्हणजे भगवान शिवाकडून मिळालेला प्रसाद होय. शिवप्रसाद पात्र अशा मनुष्यालाच दिला जातो. याला तूच एकटा पात्र असल्यामुळे मी या शिवशास्त्राचा उपदेश तुला केला.

स्थाप्यतां सर्वलोकेषु तंत्रमेतत् त्वया मुने।
ईदृशं शिवबोधस्य साधनं नास्ति कुत्रचित्॥२०.८३॥

मी जो सिद्धान्त तुला सांगितला तो अपूर्व आहे. या आधी पृथ्वीतलावर हे शास्त्र कोणालाही ज्ञात नव्हते. म्हणून मी जो उपदेश तुला केला त्याची तू सर्व लोकांत स्थापना कर. त्याचा प्रचार-प्रसार कर. शिवप्राप्तीचे या शास्त्राशिवाय दुसरे कोणतेही साधन नाही.

रहस्यमेतत् सर्वज्ञः सर्वानुग्राहकः शिवः।
अवादीत् सर्वलोकानां सिद्धये पार्वतीपतिः॥२०.८४॥

सर्वज्ञ, सर्व लोकांवर अनुग्रह करणाऱ्या पार्वतीपती भगवान शंकरांनी जगातील सर्व लोकांना भोग आणि मोक्षाची प्राप्ती व्हावी या उद्देशाने हे रहस्यमय शिवशास्त्र प्रकट केले आहे. मानवमात्राच्या कल्याणासाठीच हेच शास्त्र असून याचा अधिकाधिक लोकांना उपदेश केला पाहिजे.

तदिदं शिवसिद्धान्तसाराणामुत्तमोत्तमम्।
वेदवेदान्तसर्वस्वं विद्याचारप्रवर्तकम्॥
वीरमाहेश्वरग्राह्यं शिवाद्वैतप्रकाशकम्।
परीक्षितेभ्यो दातव्यं शिष्येभ्यो नान्यथा क्वचित्॥२०.८५.८६॥

कामिकागमापासून ते वातुलागमापर्यंत जे २८ आगम आहेत त्यांचे सार सर्वस्व या शास्त्रामध्ये आहे. चार वेद आणि सर्व उपनिषदे यांचे सार या शास्त्रात साठलेले आहे. विद्याचारप्रवर्तक म्हणजे ज्ञान आणि क्रिया या दोहोंचे निरूपण करणारे हे शास्त्र आहे. परशिवाद्वैताचे प्रतिपादन करणाऱ्या या शास्त्राचा वीरमाहेश्वरांनी अंगीकार केला आहे. नीट पारखून, परीक्षा घेऊन योग्य अशा अधिकारी शिष्यालाच या शास्त्राचा उपदेश करावा. अनधिकारी अशा कोणत्याही माणसाला याचा उपदेश करू नये. जर केला तर त्याचा दुरुपयोग होण्याची शक्यता आहे.

एतच्छ्रवणमात्रेण सर्वेषां पापसंक्षयः।
अवतीर्णं मया भूमौ शास्त्रस्यास्य प्रवृत्तये।
प्रवर्तय शिवाद्वैतं त्वमपि ज्ञानमीदृश्यम्॥२०.८७॥

या शास्त्राचे भक्तिभावपूर्वक श्रवण केल्याने सर्व पातकांचा नाश होतो. या वीरशैव शास्त्राचे प्रवर्तन करण्यासाठी, शिवाद्वैत सिद्धान्ताची स्थापना करण्यासाठी मी अवतार घेऊन आलो आहे. म्हणून हे अगस्त्य तू देखील या शास्त्राचा जगामध्ये प्रचार कर.

असे महर्षी अगस्त्यांना सांगून जगद्गुरू रेणुकाचार्य अंतर्धान पावले.

अशा प्रकारे 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथातील षट्स्थलसिद्धान्ताचे निरूपण या ठिकाणी पूर्ण झाले. जगद्गुरू रेणुकाचार्यांच्या आज्ञेप्रमाणे महर्षी अगस्त्यांनी या शिवसिद्धान्ताचा जगात प्रसार केला. याचे प्रमाण श्रीपती पंडितांच्या 'श्रीकरभाष्य' या ग्रंथात मिळते. श्रीपती पंडित लिहितात:-

**अगस्त्यमुनिचंद्रेण कृतां वैयासिकीं शुभाम्।**
**सूत्रवृत्तिं समालोक्य कृतं भाष्यं शिवंकरम्।।**

(श्रीकरभाष्य, अधिकरण १, श्लोक १७)

'ब्रह्मसूत्रा'त वीरशैव सिद्धान्त प्रतिपादन केला याला काय आधार आहे? तो सांगताना श्रीपती पंडित म्हणतात की, पूर्वी अगस्त्य महर्षींनी 'ब्रह्मसूत्रा'वर वीरशैवसिद्धान्तपर वृत्ती लिहिली होती. त्या 'अगस्त्यवृत्ती'चा आधार घेऊन मी हे भाष्य लिहीत आहे. यावरून अगस्त्य महर्षींनी ग्रंथरचना करून वीरशैव सिद्धान्ताचा प्रचार केला होता हे सिद्ध होते. 'अगस्त्यवृत्ती' हा ग्रंथ कालौघात नष्ट झाला आहे. परंतु श्रीपती पंडितांच्या समोर तो ग्रंथ होता याची खात्री वरील विधानावरून पटते. वीरशैव ज्ञानपरंपरा अखंडपणे चालत आलेली आहे, हे देखील सिद्ध होते. भगवान शिवाकडून शिवगणांना, शिवगणांकडून महर्षींना आणि महर्षींकडून मानवांना हे ज्ञान प्राप्त झाले आहे. भगवान शिवाकडून प्राप्त झालेल्या ज्ञानाला 'दिव्यौघ', शिवगणांकडून प्राप्त झालेल्या ज्ञानाला 'सिद्धौघ' आणि महर्षींकडून प्रसृत झालेल्या ज्ञानाला 'मानवौघ' असे म्हटले जाते.

आजवर ही ज्ञानपरंपरा अक्षुण्ण चालत आलेली आहे. रेणुकाचार्य-अगस्त्य महर्षी यांचा संवाद 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या नावाने शिवयोगी शिवाचार्यांनी संग्रहित केला. या ग्रंथाचा अभ्यास केल्यावर आपल्या सारख्यांना हे शिवज्ञान प्राप्त होते. आपण सर्वांनी देखील या शास्त्राचा प्रचार-प्रसार करावयास हवा. ज्ञानाएवढे पवित्र दुसरे काही नसते, हे जाणून आपण देखील हे शिवज्ञान सर्वसामान्य जनतेपर्यंत पोहोचविले पाहिजे. ज्याच्या अंत:करणात हे ज्ञान मुरेल त्याचा हा जन्म अखेरचा जन्म ठरेल. आपल्या सर्वांचा जन्म 'जन्म हा अखेरचा' ठरावा अशी शुभकामना व्यक्त करून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'च्या लिंग-षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थलावरील आशीर्वचने पूर्ण करीत आहोत.

या ग्रंथातील तात्त्विक भागाचे विवेचन पूर्ण झालेले असले तरी शेवटच्या एकविसाव्या परिच्छेदात जगद्गुरू रेणुकाचार्यांनी लंकेत जाऊन तीन कोटी शिवलिंगे स्थापन केल्याचे वर्णन आले आहे. उद्याच्या आशीर्वचनात लिंगस्थापनेचे माहात्म्य आपण श्रवण करू, एवढे सांगून आजचे आशीर्वचन पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

८ नोव्हेंबर १९९६

आशीर्वचन नववे

## त्रिकोटिलिंगस्थापनलीला

जिज्ञासू सद्भक्तांनो,

'श्रीसिद्धान्तशिखामणी'वरील आशीर्वचनांचा प्रारंभ १९९० मध्ये सोलापूर येथील श्री सिद्धेश्वर मंदिरात झाला. काशी महास्वामीजींचे पहिले श्रावणमासानुष्ठान सोलापूर येथे झाले. त्यावेळी ग्रंथमालेच्या रूपाने 'श्रीसिद्धान्तशिखामणी' वरील आशीर्वचने प्रकाशित करावी असे ठरले. ही आशीर्वचने पूर्ण होण्यास सहा वर्षे लागली. भगवद्गीतेत सातशे श्लोक आहेत तर 'श्रीसिद्धान्तशिखामणी'त चौदाशेपेक्षा अधिक श्लोक आहेत. श्रावणमासानुष्ठान, अधिकमासानुष्ठान, नवरात्रमहोत्सव अशा विविध प्रसंगी, महाराष्ट्रातील विविध ठिकाणी आणि काशी जंगमवाडी मठात देखील ही आशीर्वचने झाली. आज या बृहद् ग्रंथातील शेवटच्या परिच्छेदातील विषयावर आशीर्वचन करायचे आहे. प्रवचन करता करता एक पारायण पूर्ण झाले, याबद्दल आम्हाला अत्यंत आनंद होत आहे. अशी पारायणे यानंतर कित्येक वेळा करावी लागणार आहेत.

'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील या आधीच्या विसाव्या परिच्छेदात लिंग-षट्स्थलांतर्गत ऐक्यस्थलातील नऊ उपस्थलाविषयी विस्तारपूर्वक विवेचन झाले आहे. अंतिम ज्ञानशून्यस्थलात शिवयोग्याच्या ठिकाणी स्वरूपज्ञान असते, परंतु वृत्त्यात्मक ज्ञान नसते, असे सांगितले आहे. जगद्गुरू रेणुकाचार्यांच्या मुखातून षट्स्थलसिद्धान्त श्रवण करून अगस्त्य महर्षी कृतकृत्य झाले. त्यानंतर जगद्गुरू रेणुकाचार्य आकाशमार्गाने प्रस्थान करते झाले.

**इत्युक्त्वा पश्यतस्तस्य पुरस्तादेव रेणुकः।**
**अंतर्दधे महादेवं चिंतयन्नंतरात्मना।।**

(श्रीसिद्धान्तशिखामणी, २१.१)

अशा रीतीने अगस्त्य मुनींना उपदेश केल्यावर अगस्त्यांच्या समोरच परमात्मचिंतन करीत जगद्गुरू रेणुकाचार्य अंतर्धान पावले.

**स्वच्छंदाचाररसिकः स्वेच्छानिर्मितविग्रहः।**
**आससाद पुरीं लंकां रेणुको गणनायकः।।२१.३।।**

मलय पर्वतावर अंतर्धान पावून जगद्गुरू रेणुकाचार्य लंकानगरीत प्रकट झाले. शिवयोगामुळे स्वच्छंदपणे विहार करण्याची, आकाशगमन करण्याची आणि स्वेच्छेने देहधारण करण्याची सिद्धी त्यांना प्राप्त झाली होती.

**तमागतं महाभागं सर्वागमविशारदम्।**
**विभीषणः समालोक्य गेहं प्रावेशयन्निजम्।।२१.४।।**

सर्व आगमांत पारंगत असलेल्या श्रेष्ठ अशा रेणुकगणेश्वराला पाहून बिभीषणाने आपल्या राजवाड्यात त्यांचे स्वागत केले. आपल्या रमणीय सिंहासनावर बसवून अर्घ्यपाद्यादी उपचारांनी त्यांची यथाविधी पादपूजा केली. हस्तप्रक्षालनासाठी दिले जाणारे शुद्ध जल म्हणजे अर्घ्य, पादप्रक्षालनासाठी दिले जाणारे शुद्ध जल म्हणजे पाद्य आणि मुखप्रक्षालनासाठी दिले जाणारे शुद्ध जल म्हणजे आचमन होय. पूजेमुळे प्रसन्न झालेल्या रेणुकाचार्यांनी हात जोडून उभ्या असलेल्या बिभीषणाला बसण्याची आज्ञा केली. तेव्हा तो दुसऱ्या आसनावर बसला. आपल्या

समोर मनुष्यदेहधारी साक्षात शिवच बसले आहेत असे त्याला वाटले. त्याने हात जोडून जगद्गुरू रेणुकाचार्यांना विनंती केली.

**रेणुक त्वां गणाधीश शिवज्ञानपरायण।**
**अवतीर्णं महीमेनामिति सम्यक् श्रुतं मया।।२१.८।।**

मी आतापर्यंत आपले नाव ऐकले होते. शिवज्ञानपरायण, गणाधिपती अशा रेणुकाने भूलोकात अवतार घेतला असे मी ऐकले होते. आज आपले दर्शन झाल्याने मी धन्य झालो. आपण माझ्या नगरीत आल्यामुळे मी भाग्यवान ठरलो आहे. जे अभागी आहेत त्यांना आपल्या दर्शनाचा लाभ कसा होणार? मी आणि माझी प्रजा मात्र निश्चित भाग्यवान आहोत. आपण साक्षात महेश्वरच आहात. माझ्या घरी आपले आगमन झाल्यामुळे माझ्यासारखा भाग्यवंत या जगात दुसरा कोणी नाही. शिवयोग्याच्या पावलांनी धूळ घरात पडणे यापेक्षा अधिक भाग्य ते कोणते?

**कृतार्था मे पुरी ह्येषा कृतार्थो राक्षसान्वयः।**
**जीवितं च कृतार्थं मे यस्य त्वं दृष्टिगोचरः।।२१.११।।**

हे रेणुका, आपल्या दर्शनाने लंकानगरी कृतार्थ झाली, आमचा राक्षसवंश धन्य झाला आणि माझ्या जन्माचे सार्थक झाले.

अशा प्रकारे बिभीषणाची स्तुती ऐकून जगद्गुरू रेणुकाचार्य मंद हसले. सर्वांना उल्हसित करणाऱ्या आपल्या प्रसन्न वाणीने बिभीषणाला म्हणाले-

**विभीषण महाभाग जाने त्वां धर्मकोविदम्।**
**त्वां विना कस्य लोकेषु जायते भक्तिरीदृशी।।२१.१३।।**

हे बिभीषणा, तू श्रेष्ठ धर्मज्ञ आहेस आणि धर्माचरणी देखील आहेस. तुझ्यासारखी भक्ती दुसऱ्या कोण्या पुरुषाच्या ठिकाणी पाहायला मिळणार नाही. हे राक्षसेश्वरा, तू सर्व शास्त्रांचे रहस्य जाणतोस. सर्व धर्मांत तू परायण आहेस. अहिंसा, सत्य, अस्त्येय, ब्रह्मचर्य, दया, क्षमा, दान, पूजा, जप, ध्यान या दहा धर्मांचे तू अचूक पालन करतोस. केवळ कर्मकांडातच तुला रुची आहे असे नसून सर्व शास्त्रांचे शास्त्र असलेल्या अध्यात्मशास्त्रात देखील तुला गती आहे. तुझ्याकडे एवढे ऐश्वर्य असून देखील तुला अध्यात्मात स्वारस्य आहे हे जाणून मला आनंद झाला आहे. अगस्त्य महर्षींना षट्स्थलसिद्धान्ताचा उपदेश करून, त्यांचा प्रसार करण्यास सांगून मी कैलास पर्वताकडे निघालो होतो. तुझ्या धर्मसंपत्तीची कीर्ती ऐकून मी तुझ्याकडे आलो आहे. तुझे चरित्र प्रसिद्ध आणि मंगल असे आहे. त्यामुळे मी संतुष्ट झालो आहे. तुला वरदान द्यावे या इच्छेने मी येथे आलो आहे. म्हणून तुला हवे असेल ते माग.

गणेश्वराचे प्रसन्न वचन ऐकून बिभीषणाने त्यांना साष्टांग नमस्कार केला आणि तो अत्यंत भक्तिभावनेने त्यांची विनवणी करू लागला:

**आगमानुग्रहादेव भवतः शिवयोगिनः।**
**दुर्लभाः सर्वलोकानां समपद्यन्त संपदः।।२१.१८।।**

आपण 'वर माग' असे मला सांगितले, परंतु आपण येथे आलात हाच दुर्लभ असा अनुग्रह आहे. त्यामुळे काही मागण्याआधीच सर्व काही मला प्राप्त झाले आहे. आपण आल्यामुळे माझे मनोरथ आपोआप परिपूर्ण झाले

आहेत. परंतु हे गणेश्वरा, माझी एक अल्प प्रार्थना आहे. माझा थोरला बंधू रावण हा श्रेष्ठ शिवभक्त होता. तो अजातशत्रू असून तिन्ही लोकांवर राज्य करीत होता. त्याचा अतुल प्रताप इंद्रादी देवांना असह्य झाला आणि त्याच्याकडून पराभूत होऊन ते राज्यवैभवाला पारखे झाले. पराक्रमी, अजेय असा रावण कालगतीमुळे चारित्र्यभ्रष्ट झाला. त्याने सीतेचे अपहरण केले, त्यानंतर रामाकडून त्याचा वध झाला. राक्षसांपैकी केवळ मीच एकटा जिवंत राहिलो होतो. त्यावेळी रामाच्या बाणाने विद्ध झालेला रावण कंठात प्राण आणून माझ्याकडे पाहून म्हणाला, 'हे बिभीषणा, तू बुद्धिमान, धर्माचरणशील, विशेषज्ञ आहेस. राक्षसवंशात तू एकटाच जिवंत राहिला आहेस. अज्ञानामुळे आम्ही महान लोकांशी द्रोह केला, त्यामुळे अशी दुःखावस्था प्राप्त झाली आहे. जसे विधिलिखित होते तसेच घडले आहे. दैवगती मोठी दुस्तर असते, तिला पार करणे कठीण असते. लंकानगरीत नऊ कोटी शिवलिंगांची स्थापना करावी, असा संकल्प मी केला होता. त्यांपैकी सहा कोटी शिवलिंगांची स्थापना माझ्या हातून झाली आहे. परंतु माझ्या संकल्पाप्रमाणे आणखी तीन कोटी शिवलिंगांची स्थापना तू करावीस, अशी माझी इच्छा आहे.' मरणोन्मुख रावणाचे बोलणे ऐकून 'तुझी इच्छा मी पूर्ण करीन' असे वचन मी त्याला दिले. तीन कोटी शिवलिंगांची विधियुक्त स्थापना एकाच वेळी करावी असा माझा निश्चय आहे. एकाच वेळी तीन कोटी शिवलिंगांची स्थापना करणारा आचार्य न आढळल्यामुळे मी निराश झालो होतो. हे गणेश्वरा, आपण शिवशास्त्राचे ज्ञाते आहात. शिवज्ञानाचे सागर आहात. आपण एकाच वेळी तीन कोटी गुरूंचे रूप धारण करा आणि माझे मनोरथ पूर्ण करा.

ज. रेणुकाचार्यांनी राक्षसराज बिभीषणाचे बोलणे ऐकून 'तथास्तु' म्हणून अनुमती दिली. बिभीषणाला आनंद झाला. त्याचा मनोरथ पूर्ण करण्यासाठी ज. रेणुकाचार्यांनी तीन कोटी गुरूंचे रूप धारण केले आणि एकाच वेळी लंकानगरीत तीन कोटी शिवलिंगांची विधिवत् स्थापना केली.

योगसामर्थ्याने योगीपुरुष एकाच वेळी अनेक देह धारण करू शकतात, असा योगशास्त्राचा सिद्धान्त आहे. अनेक शरीरे धारण करून एकाच जन्मात प्रारब्धकर्म भोगून त्याचा क्षय करण्याची एक रीत योग्यांना माहीत असते, तिला 'कायव्यूह' असे नाव आहे. कर्मक्षय करण्यासाठी योगी कायव्यूह सिद्धीचा उपयोग करतात. परंतु ज. रेणुकाचार्यांना कर्मक्षय करायचा नव्हता. तर एका शिवभक्ताचा मनोरथ पूर्ण करायचा होता. त्यांनी त्यासाठी एकाच वेळी तीन कोटी देह धारण केले आणि एकाच मुहूर्तावर तीन कोटी शिवलिंगांची स्थापना केली. ज. रेणुकाचार्यांचा हा प्रताप पाहून बिभीषण आश्चर्यचकित झाला आणि त्याने भक्तिभावाने त्यांना नमस्कार केला.

**प्रणतं विनयोपेतं प्रहृष्टं राक्षसेश्वरम्।**
**अनुगृह्य स्वमाहात्म्याद् रेणुकोऽन्तर्हितोऽभवत्।।२१.३५।।**

नमस्कार करणाऱ्या विनयशील, आनंदी झालेल्या राक्षसेश्वर बिभीषणावर अनुग्रह करून ज. रेणुकाचार्य अंतर्धान पावले. संतुष्ट, शिवभक्तिरत असा बिभीषण आपल्या प्रजेचे पालन करीत राहिला.

इकडे महातेजस्वी ज. रेणुकाचार्य भूलोकात सातशे वर्षे गुप्त राहून पुन्हा सातशे वर्षे प्रकट रूपात राहिले. या काळात त्यांनी काही जणांवर आपल्या कृपाकटाक्षांचा वर्षाव केला, काही जणांना शिवाद्वैतज्ञानाचा उपदेश केला तर काहींना आपल्या मलत्रयनिवारक अशा सहवासाने कृतार्थ केले. सुराचाराचे, पाखंडाचे आणि नास्तिक दर्शनाचे खंडन केले. यंत्रतंत्रात सिद्धी प्राप्त केलेल्या सिद्धांना जिंकले आणि शिवागमांत प्रतिपादन केलेल्या शिवसिद्धान्ताची प्रतिष्ठापना करून ज्या ठिकाणी त्यांनी अवतार धारण केला होता त्या कोल्लिपाक क्षेत्री परत

आले. शिवभक्तांचा आदरसत्कार स्वीकारीत ते सोमनाथ मंदिरात पोहोचले. तेथे भगवान शिवाची स्तुती करण्यास आरंभ केला.

**देवदेव जगन्नाथ जगत्कारणकारण।**
**ब्रह्मविष्णुसुराधीशवंद्यमानपदाम्बुज।।२१.४४।।**

हे शिवा, तू सर्व देवांचा स्वामी आहेस, सर्व जगाचा अधिपती आहेस. जगताच्या निर्मितीचे तूच कारण आहेस. ब्रह्मा विष्णू इत्यादी सर्व तुझ्या चरणाची सेवा करतात. संसाररूप नाटकाची भ्रांती तू दूर करतोस. संसारनाटक ही तुझी लीला आहे. सर्व वेदोपनिषदे तुझ्या वैभवाची स्तुती गातात. संसाररूप रोग निवारण करणारा तू वैद्य आहेस. सामान्य वैद्य शारीरिक रोग दूर करतो, परंतु तू मात्र जन्ममरणरूपी रोग दूर करणारा वैद्यनाथ आहेस. तू सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान असून चिदाकाश आहेस. सर्व जगाचा तूच आधार आहेस. ज्योतिर्लिंगाच्या रूपात तूच प्रकाशित होत आहेस. सदाशिव, रुद्र, भर्ग इत्यादी अनेक लीलारूपे तू धारण करतोस. तू सत्त्व, रज, तम या गुणांच्या पलीकडे आहेस. आणव, कार्मिक व माया या तीन मलांचा तू विनाशक आहेस. तुझ्या कृपेने तुझे भक्त मलत्रयापासून मुक्त होतात. त्रैलोक्याची उत्पत्ती, स्थिती आणि संहार ही तुझी सहज लीला आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे तुझे तीन नेत्र आहेत. हे पार्वतीपते परमेश्वरा, माझे रक्षण कर. तुझ्या आज्ञेप्रमाणे भूतलावर राहून मी शिवागमाचा प्रचार करण्यासाठी संचार केला. आता तुझ्या स्वरूपात ऐक्य होण्याची माझी इच्छा आहे. म्हणून विशेष अनुग्रह करून तुझ्यात ऐक्य पावण्यासाठी मला अवकाश दे.

ज. रेणुकाचार्यांनी अशी प्रार्थना केल्यावर सोमेश्वर लिंगातून ध्वनी निघाला– 'वेदागमपारंगत, बुद्धिसंपन्न रेणुका, तुझ्या भक्तीने मी प्रसन्न झालो आहे, ये' लिंगातून परशिवाची अशी हाक ऐकून तेथे उपस्थित असलेल्या सर्व लोकांना आश्चर्य वाटले. अंतरिक्षात देवांनी दुंदुभी वाजविल्या, शिवगणांनी पुष्पवृष्टी केली. सोमेश्वरलिंगातून बाहेर पडलेले दयार्द्र वचन ऐकून ज. रेणुकाचार्य संतुष्ट झाले. आजुबाजूचे शिवयोगी आश्चर्यचकित होऊन त्यांची स्तुती करू लागले. त्याच वेळी ज्योतिर्मय सोमेश्वर लिंगात ज. रेणुकाचार्य ऐक्य पावले.

**लीने तस्मिन् शांकरे स्वप्रकाशे**
**दिव्याकारे रेणुके सिद्धनाथे।**
**सर्वो लोको विस्मितोऽभूत् तदानीं**
**शैवी भक्तिः सप्रमाणा बभूव।।२१.५३।।**

ज. रेणुकाचार्य स्वप्रकाशित अशा सोमेश्वर लिंगात ऐक्य पावले, हे पाहून सर्व सर्व लोकांना आश्चर्य वाटले. शिवभक्ती ही सर्वोत्कृष्ट आहे हे प्रत्यक्ष प्रमाणाने सिद्ध झाले. यानंतर शिवयोगी शिवाचार्य 'श्रसिद्धान्तशिखामणी' या ग्रंथाचे महत्त्व शेवटच्या श्लोकात समारोप करताना प्रतिपादन करतात.

**श्रीवेदागमवीरशैवसरणिं श्रीषट्स्थलोद्यन्मणिं**
**श्रीजीवेश्वरयोगपद्मतरणिं श्रीगोप्यचिंतामणिम्।**
**श्रीसिद्धान्तशिखामणिं लिखयिता यस्तं लिखित्वा परान्**
**श्रुत्वा श्रावयिता स याति विमलां भुक्तिं च मुक्तिं पराम्।।२१.५४।।**

'श्रसिद्धान्तशिखामणी' हा ग्रंथ कसा आहे? तर वेद आणि आगमांतील सारसर्वस्व या ग्रंथात संग्रहित केले आहे. षट्स्थलसिद्धान्त प्रकाशित करणारा हा एक दिव्य मणी आहे. एक तेजस्वी रत्न आहे. षट्स्थलसिद्धान्ताचे

एवढे सविस्तर, सूक्ष्म आणि सुरेख प्रतिपादन या आधी कोणत्याही ग्रंथात आलेले नाही. सूर्य उगवल्यावर कमळे उमलतात, त्याप्रमाणे या ग्रंथामुळे शिवजीवैक्यज्ञानाचे कमळ विकसित होते. म्हणून हा ग्रंथ एक सूर्यच होय. शिवाद्वैतज्ञानाचे गुप्तधन प्राप्त करून देणारा हा चिंतामणी आहे. सर्व सिद्धान्तामध्ये श्रेष्ठ असल्यामुळे याला 'श्रसिद्धान्तशिखामणी' हे नाव प्राप्त झाले आहे. या ग्रंथाचे जो स्वत: लेखन करील, इतरांकडून लिहवून घेईल, स्वत: श्रवण करील अथवा इतरांना याचे श्रवण घडवील त्याला निर्मल असे सुखोपभोग आणि सर्वश्रेष्ठ अशी मुक्ती प्राप्त होईल.

असा हा 'श्रसिद्धान्तशिखामणी' ग्रंथ सर्वांनी वाचावा, त्यातील सिद्धान्ताचे मनन करावे, त्याचे आचरण करावे आणि मानवी जीविताचे अंतिम ध्येय असलेली मुक्ती प्राप्त करून घ्यावी. 'जीवा'ने 'शिव' व्हावे. 'अंगा'ने 'लिंग' व्हावे. षट्सिद्धान्ताचे आचरण केल्यावर एकाच जन्मात मुक्ती प्राप्त होते. तुमचा आमचा, सर्वांचा हा जन्म 'जन्म हा अखेरचा' ठरावा, असा शुभाशीर्वाद देऊन 'श्रसिद्धान्तशिखामणी'वरील आशीर्वचने पूर्ण करीत आहोत.

।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

ज्ञानमंदिर, जंगमवाडी मठ, वाराणसी

९ नोव्हेंबर १९९६



# शैवभारती शोधप्रतिष्ठान

जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तरप्रदेश)२२१ ००१

## प्रकाशित ग्रंथ

| ग्रंथनाम | लेखक / संपादक | मूल्य रु. |
|---|---|---|
| १. लिंगधारणचंद्रिका (संस्कृत-मराठी) | नंदिकेश्वर शिवाचार्य | १२५ |
| २. ब्रह्मसूत्रश्रीकंठभाष्यम् (संस्कृत-हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ३. वीरशैव अष्टावरण विज्ञान (हिंदी व मराठी) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | ५० |
| ४. सिद्धान्तशिखामणिसमीक्षा (संस्कृत) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | २०० |
| ५. निगमागम संस्कृति (हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ६. सूक्ष्मागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १२५ |
| ७. चंद्रज्ञानागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १७५ |
| ८. मकुटागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १०० |
| ९. कारणागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. रामचंद्र पाण्डेय | १५० |
| १०. निगमागमीयसंस्कृतिदर्शनम् (संस्कृत-हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २०० |
| ११. पारमेश्वरागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २०० |
| १२. **Chandrajnanagama** (Sanskrit-English) | Tr. by Dr. Rama Ghose | 300 |
| १३. ईशावास्योपनिषद् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | १०० |
| १४. केनोपनिषद् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | १५० |
| १५. सिद्धान्तप्रकाशिका (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ७५ |
| १६. **Makutagama** (Sanskrit-English) | Tr. by Dr. Rama Ghose | 150 |
| १७. शक्तिविशिष्टाद्वैततत्त्वत्रयविमर्शः (संस्कृत) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | २०० |

| | | |
|---|---|---|
| १८. अनुभवसूत्रम् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. जगन्नाथशास्त्री मुसलगांवकर | १२५ |
| १९. सिद्धान्तशिखोपनिषद् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | २५० |
| २०. ब्रह्मसूत्रशांकरीवृत्तिः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. केदारनाथ त्रिपाठी | १५० |
| २१. सिद्धान्तसारावलिः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ४०० |
| २२. श्रीगुरुगीता (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १२५ |
| २३. शिवाद्वैतदर्पणः (संस्कृत-हिंदी) | शिवानुभव शिवाचार्य | १०० |
| २४. सिद्धान्तशिखामणी मीमांसा (संस्कृत-हिंदी) | संपा. पं व्रजवल्लभ द्विवेदी | २५० |
| २५. देवीकालोत्तरागमः (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १०० |
| २६. **Paramesvaragama** (English) | Tr. by Dr. Rama Ghose | 550 |
| २७. संस्कृत वाङ्मय में वीरशैव साहित्य (हिंदी) | एस.अक्कुरमठ, संपा.प्रभुनाथ द्विवेदी | १५० |
| २८. ऋग्वेदस्यप्रथममंडलस्य सयणवेंकटमाधव-भाष्ययोस्तुलनात्मकमध्ययनम् (संस्कृत-हिंदी) | डॉ. प्रमोदिनी पण्डा | ४०० |
| २९. तंत्रागमीय धर्मदर्शन (भाग १ व २) (संस्कृत-हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ९०० |
| ३०. साम्ययोगमीमांसा (संस्कृत-हिंदी) | मुकुट बिहारीलाल | ३०० |
| ३१. भारतीय संस्कृति का समग्र स्वरूप (हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ३०० |
| ३२. संस्कृत वाङ्मय वल्लरी (संस्कृत-हिंदी) | डॉ. गंगाधर पण्डा, डॉ. प्रमोदिनी पण्डा | ३०० |
| ३३. मुण्डकोपनिषद् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | ४५० |
| ३४. वातुलशुद्धाख्यतंत्रम् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २०० |
| ३५. **Transmigration** (जन्मांतरवादः) (English) | पं. केदारनाथ त्रिपाठी | १५० |
| ३६. सांस्कृतिक राष्ट्रवाद (हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ३०० |
| ३७. पारमेश्वरागम (तेलुगू) | डॉ. के. प्रताप | ६०० |

| | | |
|---|---|---|
| ३८. पंचविंशतिलीलाशतकम् (संस्कृत-हिंदी) | संपा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ३०० |
| ३९. **Siddhanta Prakasika** (English) | Tr. by T. Ganeshan | 150 |
| ४०. पंचवर्णसूत्रमहाभाष्यम् (संस्कृत-हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ४१. तंत्रागम सार-सर्वस्व (हिंदी) | पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५० |
| ४२. श्वेताश्वतरोपनिषद् (संस्कृत-हिंदी) | पं. जगन्नाथशास्त्री तैलंग | ३०० |
| ४३. सिद्धान्तशिखामणि (हिंदी व्याख्या) | पं. राधेश्याम चतुर्वेदी | ४५० |
| ४४. सिद्धान्तशिखामणि प्रवचनप्रभे (कन्नड) | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य | ५०० |
| ४५. **Siddhanta Shikhamani** (English) | Dr. M. Shivkumar Swami | 1400 |
| ४६. जन्म हा अखेरचा | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य (अनु. शे.दे.पसारकर) | ३५० |
| ४७. वीरशैव संतकवी बसवलिंग : चरित्र व वाङ्मय | डॉ. चंद्रशेखर कपाळे | ८० |
| ४८. लक्ष्मण महाराज : व्यक्ती आणि वाङ्मय | डॉ. भी. शि. स्वामी | ८० |
| ४९. श्रीमन्मथशिवलिंगकृत परमरहस्य | डॉ. शे. दे. पसारकर | २०० |
| ५०. वीरशैवांचे मराठी हिंदी वाङ्मय : एक अभ्यास | डॉ. श्यामा घोणसे | १०० |
| ५१. मन्मथस्वामी : व्यक्ती आणि वाङ्मय | डॉ. चंद्रकात देऊळगावकर | ८० |
| ५२. वीरशैव मराठी अभंगकविता : एक चिकित्सक अभ्यास | डॉ. शोभा कराळे | १०० |
| ५३. मराठी काव्यातील शिवदैवत-दर्शन | डॉ. शिवशंकर उपासे | १२५ |
| ५४. विदर्भातील वीरशैव संप्रदाय : ग्रंथकार व वाङ्मय | डॉ. अशोक मेनकुदळे | १०० |
| ५५. वीरशैव संतकवी शिवदास : एक अभ्यास | डॉ. वैजनाथ फास्के | १०० |
| ५६. वीरनाथ महाराजांची अभंगवाणी | डॉ. विनय अपसिंगकर | ८० |
| ५७. श्रीरमतेरामकथामृत (ओवीबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | २० |
| ५८. श्रीमन्मथचरितामृत (ओवीबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | २० |
| ५९. वीरशैव पंचपीठे | डॉ. चंद्रशेखर कपाळे | ३० |

| | | |
|---|---|---|
| ६०. **वीरशैव संतवाणी** | संपा. रे. रा. मगाई, ल. सि. हनगंडी, शे. दे. पसारकर | ३० |
| ६१. **अष्टावरण** | डॉ. शे. दे. पसारकर | ३० |
| ६२. **वीरशैव धर्माचा स्थूल इतिहास** | डॉ. चंद्रशेखर कपाळे | ३० |
| ६३. **पंचाचार** | पं. शिवाप्पा खके | ३० |
| ६४. **वीरशैवांची स्फुट कविता** | शांतितीर्थ स्वामी | ३० |
| ६५. **वीरशैवरत्न** | पं. काशीनाथशास्त्री | ५० |
| ६६. **परमरहस्य** | संतशिरोमणी श्रीमन्मथस्वामी | १०० |
| ६७. **श्रीसिद्धान्तशिखामणी** (अन्वयार्थ, मराठी भावार्थासह) | डॉ. चंद्रशेखर कपाळे | १०० |
| ६८. **श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत** (ओवीबद्ध पारायणग्रंथ) | डॉ. शे. दे. पसारकर | २०० |
| ६९. **श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा** (अभंगबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | १०० |
| ७०. **श्रीजगद्गुरू पंचाचार्य विजय** (ओवीबद्ध पारायणग्रंथ) | डॉ. शे. दे. पसारकर | १५० |
| ७१. रेणुकगीताई (अनुष्टुभ् छंदोबद्ध) | डॉ. शे. दे. पसारकर | १०० |
| ७२. **अभंगामृत** | रेवणसिद्ध परंडकर महाराज | १५० |
| ७३. **वीरशैव संस्कृति एवं दर्शन** (हिंदी) | सम्पा. डॉ. रमा घोष | ३०० |
| ७४. **म्हणे मन्मथशिवलिंग** | स्वाती साखरकर कराळे | १५० |
| ७५. **श्रीसिद्धान्तशिखामणी समीक्षा** | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य (अनु. शिवाप्पा खके) | १२५ |
| ७६. **वीरशैव तत्त्वदर्शन** | डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य (अनु. शे. दे. पसारकर) | १२५ |
| ७७. **Principles Of Virasaivism** (English) | Dr. Chandrashekhar Shivacharya Mahaswamiji<br>Tr. by Dr. M. Shivakumara Swamy | 501 |
| ७८. श्री काशी विश्वाराध्य गुरुकुल | डॉ. शे. दे. पसारकर | ३०० |
| ७९. वीरशैव अभंगगाथा (खंड १) | डॉ. शे. दे. पसारकर | ४०० |

तीच सुखे, तीच दुःखे.
तसेच उगवणे, तसेच मावळणे.
तेच हसणे, तेच रडणे.
कधीतरी माणूस कंटाळतो.
थकतो तीच ती वाट चालून.
अंतर्मुख होऊन विचार करतो
असेच का सारखे फिरत रहायचे आपण ?
घाण्याला जुंपलेल्या बैलासारखे.
मग तो शोध घेऊ लागतो.
शाश्वत मूल्यांचा.
मनात भक्तीचा कोवळा अंकुर फुलतो
आणि त्याची वाटचाल सुरू होते
महन्मंगल, शांतस्वरूप
परशिवाच्या दिशेने.
त्याची पुढे पुढे पडणारी पावलेच ठरवतात
'जन्म हा अखेरचा.'

जीवाच्या अखेरच्या जन्माचे स्वरूप
आणि रहस्य विशद करीत आहेत
प. पू. श्री काशी जगद्गुरूंच्या
अमृतवाणीतून प्रकटलेली
ही प्रासादिक आणि चिंतनगर्भ
आशीर्वचने.
**'जन्म हा अखेरचा !'**


। प्रकाशक ।

श्री जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन, जंगमवाडी मठ, वाराणसी

www.kashi_jagamwadimath.org